# ग्रंथ जुना पण अन्वय नवा

तिसऱ्या गोलमेज परिषदेची आरती झाल्यावर परिषदेचे हिंदी सभासद हिंदुस्थानाकडे तोंड वळवून लंडनहून परत निघाले. त्यापूर्वी सर तेजबहादुर सप्रु व बॅ. जयकर यांनी हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युअल होअर यांची भेट घेऊन त्यांना आपल्या मागण्यांचें एक पुरवणीपत्रक सादर केलें. सर्व पत्र लिहून झाल्यावर ज्या उद्देशानें प्रेरित होऊन लेखक ताजा कलम लिहितो तोच उद्देश सप्रू-जयकरांचा हें पुरवणी-पत्रक देण्यांत होता. पत्रांत लिहिलेला मजकूर पुरेसा स्पष्ट असला तरी त्या मजकुराचा स्पष्टार्थ अगदीं असंदिग्धपणें वाचणाराला कळावा व त्याबरोबरच आपल्या निश्चयाचा पाठिंबा या स्पष्टार्थाला आहे हें समजावें अशा उद्देशानें कांहीं वेळा ताजा कलम लिहिला जातो. सर तेज बहादुर सप्रु व बॅ. जयकर यांनी स्टेट सेक्रेटरीच्या हातीं अगदीं निघतांना जो खलिता दिला त्यांतून वर दिलेला अर्थच प्रतीत होतो. सप्रू-जयकर या जोडीचा तरी सर सॅम्युएल होअर यांच्यावर विश्वास नाही असाच त्याचा निष्कर्ष आहे. ते दोघेहि राजकारणांत मुरलेले व होअर-साहेबांना पुरे ओळखणारे असल्यामुळे ' परेषां न तु विश्वसेत् ' या राजनीतिशास्त्राच्या सर्वमान्य सिद्धांतासे अनुसरून त्यांनी आपलें म्हणणें पुनः या ताज्या कलमात अगदी रोखठोक मांडलें इतकेंच.

सर तेजबहादुर सप्रु यांनी गोलमेज परिषदेंतील त्यांच्या शेवटच्या भाषणांत त्यांच्या पक्षाचें समाधान कोणत्या गोष्टींनी होईल हें स्पष्ट मांडलें होतेंच. परंतु स्टेट सेक्रेटरींनी आपल्या समारोपाच्या भाषणांत त्यांच्या मागणीवर कालावधीचा व अनिश्चितपणाचा बोळा फिरवून त्या मागण्यांचें टोक बोथट केलें. म्हणूनच अगदी जरूरीचे नेमके मुद्दे घेऊन ते स्पष्टपणें या पत्रकांत मांडले आहेत व त्याबरोबरच होअर साहेबांच्या गुळवट थापांनी आपण फसणार नाही हेंहि त्यांत नमूद केलें आहे. नोकरशाहीच्या हातांतून सर्व राजकीय सत्ता काढून हिंदी लोकांच्या हातीं देण्याची तारीख निश्चितपणें मुकर करणें अगदीं जरूरीचें व आवश्यक आहे असें या पत्रकांत म्हटले आहे. स्टेट सेक्रेटरींचें अळंटळं जर कोणत्या एका बाबतींत चाललें असलें तर तें या च मुद्द्यावर. म्हणूनच या पुरवणी-पत्रकांत म्हटलें आहे कीं, १९३३ च्या जुलैमध्ये पार्लमेंटानें हिंदीसुधारणांचा कायदा पसार करावा; लॉर्ड लोथियन यांच्या शिफारशींप्रमाणे मतदारांच्या याद्या तयार ठेवाव्या; १९३४ सालाच्या प्रारंभीं प्रांतिक स्वायत्तता द्यावी व १९३५ सालांत मध्यवर्ती सरकार लोकसभेला जबाबदार करावें. स्टेट सेक्रेटरीचा डाव असा कीं, प्रांतिक स्वायत्ततेचा तुकडा अंगावर प्रथम फेकावा व मग संस्थानिकांच्या खुषीची सबब व रिझर्व्ह बँक काढली नाही हें कारण दाखवून जबाबदारीची राज्यपद्धति शक्य तितकी पुढें ढकलावी! ही त्यांची हिकमत लक्षांत आल्यामुळेच या पत्रकांत सप्रूंनी स्वच्छ सांगितलें आहे कीं, संस्थानिकांना आताच ' नोटीस ' द्यावी व १९३५ मध्ये जेवढे संयुक्त राज्यपद्धति मान्य करतील तेवढेच सामील आहेत असें समजावें. कोणीच आले नाहीत तर ब्रिटिश प्रांतांचीच एक संयुक्त घटना करून स्वराज्याच्या कारभाराचें यंत्र सुरू करावें. सारांश मुख्य वेळ १९३५ च्या पुढे जाऊं देऊं नये.

स्टेट सेक्रेटरींनी स्वराज्याच्या मार्गांत रिझर्व्ह बँकेचा जो एक खंदक खणून ठेवला आहे त्यासंबंधी सप्रु-जयकर आपल्या पत्रकांत म्हणतात, 'ही अट अगदी नवी आहे. व असल्या अटी नवीनच घातल्या गेल्यास हिंदुस्थानांत असमाधान व असंतोष उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाही!' वसाहतींना स्वराज्य दिलें त्या वेळीं या सर्व अटी आगाऊ घालण्यांत आल्या नव्हत्या; उलट वसाहतींनीच जवळ जवळ आपली घटना आपणच तयार केली व इंग्लंडला फक्त सल्ला करणारा सयाजीराव बनविलें; आणि बादशहाच्या नांवानें जाहीरनामा काढून स्वराज्याचे अधिकार वसाहतींना देण्यांत आले. मग हिंदुस्थाननेंच इंग्लंडचें कोणतें घोडें मारलें असा सप्रु-जयकरांचा स्टेट सेक्रेटरींस सवाल आहे. यानंतर या पत्रकांत व्हाइसरॉय यांचे खास अधिकार, लष्करावरील खर्चांत काटकसर, मूलभूत हक्कांचा प्रश्न वगैरे मुख्य मुख्य मुद्द्यांवर आलें म्हणणें सर तेजबहादुर सप्रू यांनी मांडलें असून त्यासंबंधाचे होअर यांचे मुद्दे खोडून काढले आहेत. हें करण्यांत त्यांनी दोन गोष्टी साधल्या. गोलमेज परिषदेंतील भाषणांच्या व वादविवादाच्या वेळीं सर सॅम्युएल होअर यांनीच जवळ जवळ अध्यक्षाची गादी बळकावली होती. सभेच्या शिस्तीच्या दृष्टीनें अध्यक्षानंतर कोणाला बोलतां येत नाही. हा नियम सामान्य सभांच्या बाबतींत योग्य आहे. पण ज्या सभेत राजकारणाचे डाव खेळले जातात व जेथे दुसऱ्यावर मात करण्याकरितां सूक्ष्मासूक्ष्म सर्व मार्गांचा अवलंब केला जातो तेथे असली शिस्त म्हणजे सत्ताधाऱ्यांच्या हातांतील एक शस्त्रच

बनते. तथापि ही शिस्त सप्रूंनी मानली. पण या खलित्याच्या रूपानें त्यांनी सर होअर यांचा शब्द शेवटचा असा राहूं दिला नाही. ही एक गोष्ट; व दुसरी गोष्ट त्यांनी अशी साधली कीं हिंदुस्थानातर्फे म्हणून आपलें म्हणणें मांडून या मागणीच्या पातळीच्या खालीं आम्ही येण्यास तयार नाही असें त्यांस बजावलें. स्वराज्याच्या लढ्याला पुनः तोंड लागण्याच्या दृष्टीने हें उत्तम झालें !

सर सॅम्युएल होअर यांनीं याच दिवशीं म्हणजे ता.२७ रोजीं ब्रिटिश मतदारांस उद्देशून ध्वनिक्षेपकांच्या सहाय्याने एक लहानसें भाषण करून आपले अंतःकरण उघडें केलें. सर होअर यांच्या सर्व युक्तयाप्रयुक्तयांचा ग्रंथ या त्यांच्या भाषणाने उत्तम लागतो. गोलमेज परिषदेंतील त्यांच्या शेवटच्या भाषणाप्रमाणे या भाषणांत शब्दालंकारांची किंवा उपमादृष्टांतांची रेलचेल नाही व तसेंच 'जर-तर' शब्दांनीं प्रारंभ झालेल्या वाक्यांची जरतारीहि लखलखत नाहीं. या भाषणांत ते स्पष्ट म्हणतात कीं, 'आमच्या नव्या योजनेने हिंदुस्थानास स्वराज्याचें पूर्ण अधिकार मिळणार नाहीत पण त्यांचें बरेंच मोठें माप त्याच्या पदरांत पडणार आहे !' वाहवा ! हिंदुस्थान पूर्ण स्वराज्याचें उच्च ध्येय डोळ्यांपुढे ठेवून 'नाप्राप्यं तपसः किंचित्' या महाभारतांतील सुप्रसिद्ध वचनावर विश्वास ठेवून मोठ्या उत्साहाने त्यागाची अत्युच्च सीमा गांठीत तपश्चर्या करीत आहे. व हे स्टेट सेक्रेटरी 'स्वराज्याच्या हक्कांचे कांही माप ' हिंदुस्थानाच्या पदरांत टाकणार आहेत ! मांजराच्या नाकाला थोडें लोणी लावून तेवढ्या वासावरच त्याला त्याच्या अविरत उद्योगापासून परावृत्त करून खूष ठेवण्याची युक्ति कित्येक लोक करितात. त्यांतलीच ही एक युक्ति आहे ! पण या युक्तीने फसण्याइतका हिंदुस्थान आता दुधखुळा किंवा लोणीखुळा राहिला नाही! हिंदुस्थानाला स्वराज्याचा खणखण वाजणारा बंदा रुपया पाहिजे कमी किंमतीचा व बद्द वाजणारा कमअस्सल किंवा नकली रुपया नको हें स्टेट सेक्रेटरींनी खूप लक्षांत ठेवावे. सप्रूंनीहि आपल्या पत्रकांत हेंच सांगितलें आहे.

या भाषणांत स्टेट सेक्रेटरींनी आणखीहि अशी स्पष्ट कबुली दिली आहे कीं, 'जीं संरक्षक बंधनें घालण्याचें आम्हीं ठरविलें आहे तीं इंग्लंडच्या हिताच्या दृष्टीने घातलीं गेली आहेत. हिंदुस्थानाच्या हिताची दृष्टि त्यांत नाही असें नाही. पण त्यांतून इंग्लंड वगळलें नाही.' या त्यांच्या विधानाने पूर्वीच्या सर्व वचनांना हरताळ लागला नाही काय? ता.५ मार्च १९३१ रोजीं दिल्लीस महात्मा गांधी व व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांच्यामध्ये जो करार झाला त्यांत पुढीलप्रमाणें वचन आहे. "ब्रिटिश सरकारच्या पूर्ण संमतीनें असें ठरविलें आहे कीं, नव्या योजनेमध्ये संयुक्त राज्यपद्धति, मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीची कल्पना, ह्या प्रमुख गोष्टी होत. लष्करी खातें, परराष्ट्रीय राजकारण, अल्पसंख्याकांचें संरक्षण व आर्थिक सुरक्षितता या बाबतींत संरक्षक बंधनें कांही काळपर्यंत घालावीं लागतील पण तीं हिंदी हिताच्या दृष्टीनेंच ठेवलीं जातील." इंग्रजी शब्दांना एकच अर्थ असला तर असें म्हणावें लागेल कीं, "हिंदी हिताच्याच दृष्टीने" या शब्दाचा अर्थ 'इंग्रजी हिताच्या दृष्टीने' असा होणें शक्य नाही.

हिंदुस्थानाचे व इंग्लंडचे संबंध शेकडों वर्षांचे आहेत व त्यावरून जवळ जवळ असा सिद्धांत मांडतां येण्यासारखा आहे कीं, राजकीय व आर्थिक बाबतींत एकाचें हित तें दुसऱ्याचें अनहित व एकाचे अनहित तें दुसऱ्याचें हित होऊन बसलें आहे. पण अशा परिस्थितींत जीं संरक्षकबधनं इंग्लंडच्या हिताच्या दृष्टीनें घातलीं गेलीं आहेत तीं हिंदुस्थानाच्या हिताचीं कशीं होऊं शकतील ? अग्नि व जल, प्रकाश व अंधकार किंवा जीवन व मरण हीं एकाच वेळीं एकत्र अस्तित्वांत असावीं इतकेंच तें असंभाव्य आहे ! आमच्या या म्हणण्याचा असा अर्थ नाहीं कीं, इंग्लंडचें हित अजीबात पाहूं नये. हिंदुस्थानाच्या हिताशीं तें जुळतें आहे असें स्पष्ट दाखविल्याशिवाय मात्र प्रत्यक्ष घटनेमध्ये त्याचा समावेश होऊं नये इतकाच मतलब. हिंदुस्थानाच्या हिताविरुद्ध संरक्षक बंधनें हिंदी घटनेंत घालणें म्हणजे दिल्ली करारांत दिलेल्या वचनांना हरताळ फासण्यासारखें आहे यांत शंका नाही !

याच भाषणांत स्टेट सेक्रेटरी म्हणतात कीं आमच्या योजनेमुळे ज्यांना हिंदुस्थानाला स्वराज्याचे हक्क देऊं नयेत असें ठाम वाटतें त्यांचें समाधान होणार नाही. व त्याचप्रमाणें ज्यांना सध्या हिंदुस्थानांत प्रचलित असलेली राज्यपद्धति पार बदलून टाकावी असें वाटतें त्यांचेंहि समाधान होणार नाही. भाषासौष्ठवाच्या दृष्टीने हें म्हणणें वरवर पाहणारास बरोबर आहे असें वाटणें साहजिक आहे. परंतु एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, हिंदुस्थानास कोणतेच अधिकार देऊं नयेत असें म्हणणाराचें समाधान करण्याकरितां कांही गोलमेज परिषद भरविली नाही. तेव्हा त्यांच्या समाधानाची मातब्बरी काय ? ज्यांना प्रचलित राज्यपद्धति बदलली पाहिजे असें वाटतें व ती बदलली जावी, म्हणून ज्या हिंदी लोकांनी विश्वप्रयत्न चालविले व अनुपम स्वार्थत्याग केला त्यांचें समाधान या

योजनेने होणार नाही असें म्हणणें म्हणजे 'वदतो व्याघातः' किंवा मुख्य यजमानालाच धाब्यावर बसविल्यासारखें होणार आहे. प्रचलित राज्यपद्धति अजीबात बदलणें अव्यवहार्य आहे हें कोणीहि कबूल करील. परंतु घटना सिद्ध करावयास बसणाराने प्रचलित नोकरशाहीची पद्धति बदलून त्या ठिकाणीं पूर्ण लोकशाहीची संस्थापना होण्याची तजवीज घटनेमध्यें करणें जरूर आहे. हिंदी लोकांची हीच आकांक्षा आहे. सर तेजबहादुर सप्रु यांनी आपल्या भाषणांत व पुरवणी पत्रकांतहि हीच मागणी केली. इतकेंच नव्हे तर १९३१ मध्ये पार्लमेंटाच्या संमतीने मुख्य प्रधान यांनी अशी तजवीज करण्याचें वचनहि दिलें होतें. त्या वेळीं मुख्य प्रधान मि. रामसे मॅक्डोनल्ड यांनी असें सांगितलें होतें कीं, "संक्रमणाच्या अवधींत जीं संरक्षकबंधनें घातलीं जातील त्यांचें स्वरूप असेंच असेल व त्यांची अंमलबजावणीहि अशाच पद्धतीने होईल कीं, त्या योगानें नव्या घटनेच्या द्वारा पूर्ण जबाबदारीच्या राज्यपद्धतीचें ध्येय गांठण्याच्या मार्गांत मुळीच अडथळा येणार नाही. आमच्या या परिश्रमाने ब्रिटिश कॉमनवेल्थमधील स्वराज्य भोगणाऱ्या वसाहतीचा दर्जा हिंदुस्थानाला लवकरच मिळेल व पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य नसल्याने आज जें त्याचें दैन्य आहे तें नाहीसें होईल." मि. रामसे मॅकडोनाल्ड यांचें हें वचन डोळ्यांपुढे ठेवलें म्हणजे सर सॅम्युएल होअर यांच्या 'प्रचलित पद्धति बदलावी असं म्हणणारांचेंहि समाधान होणार नाही' या विधानांत केवढा खोडा आहे याचें अनुमान करतां येतें!

सर तेजबहादुर सप्रू यांच्या निश्चित मागणीचें पत्रक प्रत्यक्ष हातांत असतांना सर सॅम्युएल होअर यांच्या मुखांतून वरील मुक्ताफळें निघालीं त्यावरून त्यांच्या मनाचा ठाव उत्तम लागतो. त्यांनी 'जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या वेळीं खुर्च्या रिकाम्या पाहाण्याची माझी इच्छा नाही.सर्व पक्ष सहकार करतील अशी व्यवस्था मीं करीन' असें म्हटलें हें खरें आहे. तसेंच लॉर्ड सँकी यांनीहि सांगितलें कीं, "घटनेचा विचार करण्यास पुनः आम्ही बसूं त्या वेळीं इंग्लंडांतील मजूर पक्षाचे सभासद व हिंदुस्थानांतील राष्ट्रीय सभेचे पुढारी येथे येऊन आम्हांस साहाय्य करतील अशी माझी खात्री आहे." ते म्हणतात त्याप्रमाणेच व्हावें अशी कोणाचीहि इच्छा असणार व ही परिस्थिति घडून यावी व अशा तऱ्हेचा समेट व्हावा अशी आमचीहि इच्छा आहे. पण हा भविष्यकाळाचा प्रश्न आहे व तो भविष्यकाळच सोडवील. त्या काळाची वाट आपण पाहिली पाहिजे.

आजच्या घटकेला मात्र गोलमेज परिषदेच्या शेवटीं भाषण करतांना सर सॅम्युएल होअर यांनीं मांडलेला पसाराच डोळ्यांपुढे आहे. त्या वेळीं ते जें बोलले तेंच या नव्या भाषणांत त्यांनी सांगितलें. त्यांनी संरक्षकबंधनांचें केलेलें वर्णन बहारीचें होतें, पण तें राष्ट्रीय पक्षाला न पटणारें व त्यांच्या अंतःकरणाचे वाभाडे काढणारें होतें. त्या वेळीं ते म्हणाले होते होते कीं "संरक्षक बंधनें म्हणजे प्रगतीचा रस्ता अडविण्याकरिता बांधलेली दगडी भिंत नव्हे. तीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंला लावलेलीं कुंपणें होत. गाडी हाकणारा हुशार असला म्हणजे या कुंपणाला त्याच्या गाडीचा स्पर्शहि होत नाहीं!" सर तेजबहादुर सप्रूंनीं आपल्या मागणी पत्रकांत लिहिल्याप्रमाणें हिंदुस्थानाला कुंपणें लावून आगाऊ आंखलेला रस्ता नको आहे. योग्य वाटेल त्या दिशेने आपली गाडी नेतां यावी असा रस्ता त्यांना करावयाचा आहे.हा कुंपणाचा रस्ता नसला तर त्यांना आपण खड्यांत पडूं असें वाटत नाही. कारण रस्ता बरोबर दिसावा म्हणून लावलेली हीं कुंपणें नसून एका विशिष्ट मार्गानेच हिंदुस्थानाने गेले पाहिजे अशा, होअर यांच्या आग्रहाच्या त्या मर्यादा आहेत असेंच लोकांना वाटलें! किंवा असेंहि म्हणतां येईल कीं सॅम्युएल होअर यांची इच्छा अशी आहे कीं, हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेच्या घोड्याचा लगाम आपल्या हातांत असावा व त्या घोड्याला इकडेतिकडे पाहता येऊ नये म्हणून दोन्ही डोळ्यांला हीं ढापणें लावलीं आहेत. कुंपणें नव्हतच! अशा परिस्थितींत भविष्य काळांत खऱ्या ठरणाऱ्या वचनापेक्षां वर्तमान काळांतील त्यांचें भाषणच डोळ्यांपुढें अधिक येतें.

सर सॅम्युएल होअर ब्रिटिश सरकारातर्फे जो आतां 'व्हाइट पेपर' म्हणजे श्वेत खलिता प्रसिद्ध करणार आहेत, त्यांत ते काय लिहितात यावरून त्यांचें धोरण ठाम समजणार आहे. आम्हांला इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, सरकारला यापुढे हिंदुस्थानाच्या बाबतींत दोनच मार्ग खुले आहेत.तरवारीच्या जोरावर म्हणजेच वटहुकूम काढून किंवा त्यासारखे कायदे करून हिंदुस्थानावर सोटेशाही चालवावयाची हा एक मार्ग. किंवा लोकांच्या संमतीने त्यांना पसंत पडेल अशी राज्यघटना करून पण पूर्ण स्वराज्याच्या ध्येयापर्यंत त्यांना पोहाचवावयाचें हा दुसरा मार्ग. तरवारीच्या जोरावर राज्य करण्याचे दिवस गेले. त्याप्रमाणेंच स्वराज्य बोंडल्याने पाजण्याचेहि दिवस गेले. हिंदुस्थानाची मागणी अगदीं स्पष्ट आहे. दुसरा मार्ग अनुसरून हिंदुस्थानाचा कारभार हिंदी लोकांच्या

हातीं घ्या एवढेंच त्यांचें म्हणणें आहे. सर तेजबहादुर सप्रू व बॅ. जयकर यांनी तेंच म्हणणें आपल्या पुरवणीपत्रांत मांडले आहे. पण सर सॅम्युएल होअर यांची भाषणे वाचलीं म्हणजे मात्र सुभाषितकारांच्या चातकान्योक्तीची आठवण होते. सुभाषितकार म्हणतो, "मित्रा चातका, एक क्षणभर तरी सावधान चित्ताने माझे म्हणणें ऐक. अरे, सगळेच मेघ सारखे नाहींत. कोणी खरोखरीच जलसिंचन करतात तर कोणी नुसतीच गर्जना करतात. उगाच प्रत्येकाच्या पुढे दीनवाणीने कां याचना करतोस!" सर सॅम्युअल होअर यांचा पुरा अनुभव हिंदुस्थानास आला असल्याने प्राचीन संस्कृत कवीचे 'मा ब्रूहि दीनं वचः' हेच शब्द हिंदी लोकांच्या दृष्टीने सार्थ ठरतील.

# साहित्यसंमेलन पाहून—

कोल्हापुरास साहित्यसंमेलन भरण्याची कल्पना निघून कोल्हापूरचे छत्रपति उद्घाटन करणार व श्री. सयाजीरावमहाराज संमेलनाध्यक्ष होणार अशी सुखस्वप्नें पडूं लागलीं तेव्हापासूनच सतरावे साहित्यसंमेलन अपूर्व होणार असे सर्वजण बोलू लागले. ह्या अपूर्वतेच्या मोहक आशेमुळेच सांगली व कोल्हापूर यामधील चुरशीचा निकाल साहित्यपरिषदेने कोल्हापूरच्या बाजूने दिला. आणि जर कोल्हापुरास प्रतिनिधींची संख्या बरीच मोठी दिसली असेल तर तिचे बहुतेक श्रेय या अपूर्वतेच्या नवलाईलाच दिले पाहिजे. सबंध महाराष्ट्राच्या दक्षिणोत्तरच्या दोन्ही अधिपतींची युति ही साहित्यसंमेलन व महाराष्ट्र साहित्य परिषद या दोघांनाहि सुवर्णफलदायी होईल अशी आशा पुष्कळांची होती. महाराष्ट्र विश्वविद्यालयाचा डंका कोल्हापुरास जोराने वाजविण्यासाठी पंग बांधणाराची उमेद याच संभवावर अवलंबून होती. कित्येक समर्पणसमारंभ याच वेळेला साजरे करून वाहत्या गंगेत हात धुण्याची संधि घेण्यांत येणार होती. दोन्ही अधिपतींना पाहण्यासाठीं म्हणून संमेलनाला अलोट गर्दी लोटणार या अपेक्षेने कार्यकारी मंडळाने साहित्यसंमेलनाचा मंडपहि कॉंग्रेसच्या भव्य प्रमाणावर व दरबारी रुबाबाचा बांधला होता. आणि कोल्हापुरातहि असली लोकगंगा यापूर्वी कधीच प्रगट झाली नव्हती. एकंदरीत सर्व प्रकारची अपूर्वता ह्या समारंभाला लाभली होती.

***

परंतु सयाजीरावमहाराजांच्या आगमनाबद्दल जसजशी शंकास्पद बातमी प्रसिद्ध होऊं लागली तसतशी लोकांच्या व कार्यकर्त्यांच्याहि उत्साहास थोडीशी ओहोटी लागली. व्यासपीठावर झळकण्य-जोग्या कित्येक मंडळींनी संमेलनास जाण्याचा बेत रहित केला. कित्येक कार्यक्रम आपोआप गळाले. आणि जरी सयाजीरावमहाराजांचें अध्यक्षत्व नियुक्तपणामुळे उल्लेखनीय आणि उल्लेखनार्ह म्हणून अपूर्व राहिले, तथापि एकंदर समारंभाची शोभा त्यांचें येणें रहित झाल्यामुळे कांहीशी कमी झाली यांत शंका नाही. मात्र मोठ्यांचें गैरहजर राहणे हेहि महत्त्वाचें ठरतें. या न्यायाने नियोजित अध्यक्षांच्या हजेरीने संमेलनाला प्राप्त झाल असतें तें अपूर्वत्व त्यांच्या गैरहजेरीनेहि ह्या समारंभाला लाभले. नियोजित संमेलनाध्यक्ष उपस्थित झाले नाहीत असा कोल्हापूरचा हा पहिलाच प्रसंग होय.

***

सयाजीरावमहाराज येत नाहीत ही बातमी इतक्या उशीरा खरी ठरली की कोल्हापूरची सर्व तयारी पूर्वीच्याच मोठ्या प्रमाणावर होत राहिली. आणि विस्तीर्ण मंडप व ध्वनिक्षेपकांची योजना वगैरे उपयुक्त व शोभेच्या सर्व गोष्टी प्रथमपासून ठरविलेल्या वैभवशाली प्रमाणावरच पार पाडण्यांत आल्या. साहित्य संमेलनाच्या दृष्टीने हे वैभव अपूर्वच होतें. व्यासपीठावरून भाषण करणाऱ्या भाषावीरांनी तर एकंदर अपूर्वतेबद्दल मुक्त कंठाने व अनेक वेळा उल्लेख केला. प्रत्येक उपसंमेलनाचे अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, ठरावांचे सूचक, अनुमोदक, चिटणीस, कार्यकर्ते व आभारप्रदर्शक या सर्वांनी ह्या एका मुद्द्यावर इतकें वक्तृत्व व कल्पनालालित्य खर्च केलें कीं कोणत्याहि स्वाभिमानी वाङ्मय सभेत ह्या सर्व भाटवृत्तीच्या भाषणांचा सौम्य कां होईना परंतु निषेध करणेंच इष्ट ठरलें असते!

***

संमेलनाच्या कार्यक्रमात ठरावांची मोठी माळ फार थोड्या वेळांत ओढली गेली. फार थोड्या म्हणजे नव्या व महत्त्वाच्या अशा दोनचार ठरावांवरच काय तीं सूचक, अनुमोदक ह्या प्रथेने भाषणे करविण्यांत आलीं. बाकी बरेचसे ठराव अध्यक्षांकडूनच मांडण्यांत आले. यामुळे कित्येक वेळा संमेलनाला वक्तृत्वोत्तेजक सभेचें स्वरूप येतें ते आले नाहीं. हे खरें असलें तथापि सुटसुटीतपणा मिळविण्याच्या नादांत संमेलनाच्या लोकशिक्षणात्मक कार्याकडे अक्षम्य दुर्लक्ष झालें असेंच म्हटलें पाहिजे. संमेलनांत होणाऱ्या निर-

निराळ्या विद्वानांच्या विविध विषयांवरील भाषणांमुळे सामान्य श्रोतृवर्गाला आपल्या देशांतील वाङ्मयिक प्रगतीबद्दल सहजच कल्पना येते. हा मोठा लाभ या संमेलनांत झाला नाहीं हें बरें झालें नाहीं. संमेलनांतर्गत विविध कार्यक्रमांत बराच वेळ गेल्यामुळे मुख्य संमेलनाच्या खऱ्या कामाला फारच थोडा वेळ लाभला. तीन दिवसांच्या भरगच्च कार्यक्रमांत फक्त सहासात तासच काय तें संमेलनाचें कार्य झालें.

***

उपकार्यक्रमांची फारच गर्दी झाली. ग्रंथप्रदर्शन, ग्रंथकार–संमेलन, कवि-संमेलन, ग्रंथ–प्रकाशक-संमेलन ह्या चार प्रमुख उपकार्यक्रमांच्या जोडीला निबंधवाचन, पोवाडेगायन, काव्यचर्चा, काव्यगायन असे दुय्यम कार्यक्रम आरंभींपासूनच कार्यक्रमांत समाविष्ट झालेले होते. बरीच प्रमुख मंडळी साहित्य परिषदेच्या वार्षिक सभेंत गुंतलेली होती. त्याशिवाय स्थानिक सिनेमा कंपनी, राजाराम कॉलेजचें वाङ्मय मंडळ वगैरे संस्था अभ्यागतांच्या स्वागताला उत्सुक असल्यामुळे त्यांनाहि नाखूष करणें कठिण होतें. त्यामुळे विषयनियामक कमिटीसारख्या महत्त्वाच्या सभा घाईघाईनेच उरकल्या गेल्या. यांपैकीं कांहीं गोष्टी अर्थात् अपरिहार्य होत्या. परंतु वर उल्लेखिलेल्या प्रमुख उपकार्यक्रमानीं बाहेरच्या पाहुण्यांचा उगाच वेळ खाल्ला असें म्हणणें प्राप्त आहे. हे उपकार्यक्रम म्हणजे स्थानिक कार्यांना प्रसिद्धि देण्याचीं साधनें व कांही वृद्ध माणसांना आपलें अध्यक्षत्व मिरविण्याचे प्रसंग! यापलीकडे यांतून साहित्यप्रगतीच्या दृष्टीने कांहीं निष्पन्न झाले असेल असें दिसत नाहीं. स्वागतपर पद्यगायन, निवडणुकीचीं भाषणें, स्वागताध्यक्षांचें बहुतांशीं कोल्हापुरासंबंधी गुणवर्णनपर भाषण, आणि अध्यक्षांचा एक लांबलचक निबंध असा ह्या उपसंमेलनांचा थाट होता. कविसंमेलनाचा कार्यक्रम साधारण मनोरंजक व काव्यचर्चेमुळे बोधप्रद झाला. पण त्यांतहि विडंबन काव्यावरील वादाला काट द्यावा लागलाच.या उपसंमेलनांमुळे एक गोष्ट साधली याबद्दल सर्वांसच समाधान वाटलें. आणि ती म्हणजे ज्यांना निरनिराळ्या कारणांमुळे मोठ्या संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान देणें शक्य झालें नसतें, अशा लोकांचा मान झाला ही होय.

***

प्रतिनिधींचीं राहण्याचीं ठिकाणें व सभागृह आणि निरनिराळ्या कार्यक्रमांचीं स्थानें इतकीं दूर अंतरावर व पांगलेलीं नसतीं तर कदाचित् कार्यक्रमांतील दाटी तितकी त्रासदायक वाटली नसती. प्रतिनिधि निरनिराळ्या सात ठिकाणीं विभागून राहिले होते. आणि यांपैकीं कोणतेंहि ठिकाण मंडपापासून मैल अर्ध्या मैलाच्या आंत-सर्वांत लांबचे अर्थात् अर्धा पाऊण मैलाच्या आंत-नव्हतें. भोजनगृह हें सभागृहाचेजवळ पण प्रतिनिधींच्या निवासस्थानापासून दूरच होतें. आणि गच्च भरलेल्या कार्यक्रमाच्या अनुरोधाने त्वरेने हालचाली कराव्या तर त्यासाठी अवश्य ती वाहनांची तजवीज अर्थात् नव्हती. प्लेग कोल्हापुरांत अगदीच नव्हता म्हटलें तरी चालेल. परतु शेगमुळेच नव्या राजवाड्याच्या आसमंतात् ही सर्व व्यवस्था करावी लागली. गांवांतच सर्व व्यवस्था करतां आली असती तर ही गैरसोय दूर झाली असती आणि लांबलांबच्या ठिकाणाहून आलेल्या प्रतिनिधींचा आपसांत विचारविनिमय होऊं शकला नाहीं ही आपत्ति ओढवली नसतं.

***

कोल्हापूर नांव घेतांच बडोदें किंवा ग्वाल्हेर, हैद्राबाद इकडील संस्थानी पाहुणचारांचीं सुखस्वप्नें ज्यांना पडलीं होतीं त्यांची निराशा झाली असल्यास नवल नाहीं. प्रतिनिधित्वासाठी तीन रुपये म्हणजे इतर कोणत्याहि संमेलनापेक्षा जबर फी ठेवून शिवाय भोजनाकरिता रोज एक रुपयाप्रमाणे आगाऊ, व खाद्यांचा विचार होणार नाही या अटीवर, जेव्हा रकम वसूल करण्यांत आली तेव्हा सहजच प्रतिनिधींत असमाधान फैलावलें. आणि भोजनाची वगैरे प्रत्यक्ष व्यवस्था पाहून तर तें दुणावलें. भोजनगृहाची व्यवस्था केवळ भोजनाचाच विचार केला तरी समाधानकारक नव्हती एवढेच नव्हे तर स्वच्छता वगैरे बाबतींत त्यांत कित्येक सुधारणा ताबडतोब व्हावयास पाहिजे होत्या. पंक्तींत वाढण्याचें काम ब्राह्मणेतरांनी केलें असें समजलें. यामुळे कित्येक वृद्ध व कर्मठ माणसांची निष्कारण कुचंबणा झाली. रेल्वेपासूनचें भाडें प्रतिनिधींनी दिलें पाहिजे इत्यादि बारीक बाबतींतहि काटेकोरपणाने प्रसिद्ध केलेल्या सूचनांच्या फर्मानांत भोजनाची वरील व्यवस्था आधींच स्पष्ट शब्दांत जाहीर झाली असती तर चालकांचा सरळपणा दिसून आला असता व कित्येकांनी दुसऱ्या दिवसापासून खाणावळीचा रस्ता पकडला तो आधीच पकडला असता; किंवा कोल्हापुरास जाण्यापूर्वीच तेथे जावयाचे कीं नाही याचा विचार केला असता. स्वयंसेवकवर्गांत सर्वच ठिकाणीं सर्व प्रकारच्या लोकांचा समावेश झाल्यामुळे स्वयंसेवक संख्येने विपुल होते. बहुधा ते कर्तव्यदक्ष व नम्र पण अननुभवी दिसले.एवढा मोठा समारंभ कोल्हापुरांत पहिलाच होता असें वाटतें. यामुळेच कित्येक प्रसंगीं

कांही स्वयंसेवकांनीं अप्रस्तुत उर्मटपणा दाखवून एक दोघां सज्जनांचा अपमान केल्याचीं उदाहरणें घडलीं. व्हावी तशी वाहनांची सोय न झाल्यामुळे प्रतिनिधींची स्वतःच्या सामानावर देखरेख नीट राहिली नाही. व कांहीं वस्तूहि चोरीस गेल्या.

***

कोल्हापुरांत शिक्षणाचा प्रसार बराच झालेल दिसला. सर्वसाधारण मराठा समाज बराच प्रगतीच्या मार्गावर दिसला. संस्कृतीचें प्रतिबिंब केवळ सर्वसाधारण समाजाच्या मनोवृत्तींत दिसलें एवढेंच नव्हे तर कित्येक अध्यक्षीय भाषणांतूनहि अनपेक्षित तऱ्हेने त्याचा पुरावा मिळाला. करवीर दरबारचे प्रतिनिधि स्वागताध्यक्ष रा. ब. भोसले यांच्या व फिरून ग्रंथकार संमेलनाचे स्वागताध्यक्ष प्रो. पंगू ह्यांच्याहि भाषणांत कै. प्रो. विष्णु गोविंद विजापुरकर यांचा अत्यंत गौरवपूर्ण उल्लेख यावा ही खरोखर समाधानाची गोष्ट होय. 'मरणान्तानि वैराणि' अशा उदारपणाने विचार करणारीं माणसें प्रमुख ठिकाणीं दिसावीं व एका काळीं हातबेड्या घालून भररस्त्यावरून अपमानाने मिरविलेल्या विजापुरकरांचा साहित्यसंमेलनाच्या व्यासपीठावरून कोल्हापुरांत गौरवपूर्ण असा उल्लेख व्हावा हें सुचिन्ह नव्हे असें कोण म्हणेल?

***

कोल्हापूरच्या साहित्यसंमेलनाचें वैशिष्ट्य कोणतें असा प्रश्न विचारून साहित्यदृष्ट्या उत्तराची अपेक्षा करणाराची बहुधा निराशाच होईल. श्रीमंत सयाजीरावांचें व कविवर्य भास्करराव तांबे यांचीं भाषणें वगळलीं तर कांहींसें समाधान करणाऱ्या भाषणांची संख्या संपली. ठरावांवर भाषणें फार झालींच नाहीत. विषयनियामक समितीच्या सभा कशाबशा आटोपल्या गेल्या.आणि बरेच ठराव अध्यक्षांनीच मांडले.यामुळे चर्चेत दिसून येणारें चैतन्य किंवा उद्‌बोधकत्वहि कोल्हापुरास प्रतीत झालें नाहीं. तसें म्हटलें तर कोल्हापूरचें संमेलन, एकदोन ठराव न येते आणि एकदोन व्यक्तींनी थोडा विक्षिप्तपणा केला नसता, तर अगदी जो हुकूमवाल्यांच्या सभेप्रमाणे नीरस आणि कंटाळवाणें झालें असतें. बुधवार व गुरुवार ह्या दोन दिवसांतील कांहीं क्षण तरी सभागृह सजीव दिसलें, त्याचें सर्व श्रेय संमेलनाच्या चालकांव्यातिरिक्त इतरांसच दिलें पाहिजे साहित्यसंमेलनाच्या शुद्धलेखन समितीने सुचविलेल्या सुधारणा सर्वांनी मान्य कराव्या या अध्यक्षांनी मांडलेल्या ठरावावर सातारचे श्री. पावशे ह्यांनीं बेकायदेशीरपणें आक्षेप घेतला व स्वतःलाच आपल्या असमर्थनीय विधानांनी हास्यास्पद करून घेतलें. त्यांचे तरुण सहकारी श्री. आचार्य यांनी देशस्थ--कोंकणस्थ वाद उकरून काढून अनेकांस बोलावयास लावलें. व रा. सा. चापेकरांचें ऐतिहासिक ज्ञान व श्री. कुळकर्णी यांचा कृष्णाकांठचा उदारपणा कसाला लावला. आचार्यांचें भावनाप्रधान भाषण व श्री. कुळकर्णी यांचें आर्जवी विवेचन हीं दोनहि बरीं वठलीं.

***

सामाजिक दृष्ट्या अनिष्ट वाङ्मयाचा व तें वाङ्मय निर्माण करणाऱ्या ग्रंथकारांचा निषेध करण्याचा ठराव गुरुवारीं पुढे मांडण्यांत आला. हा ठराव फार व्यापक आणि नांव न घेतां निषेध करणारा आहे म्हणून श्री.भास्करराव जाधवांनी त्याला विरोध केला. श्री. बागलांनी स्वातंत्र्याची मुस्कटदाबी करणारा म्हणून त्याला बगल देण्याची सूचना केली. आणि प्रो. मायदेवांनी सर्व लोकांत सत्प्रवृत्ति असते ती गृहीत न धरतां निष्कारण लांब सोटा घेऊन बडविण्याचा प्रकार म्हणून तो ठराव त्याज्य ठरविला. इतक्यांत पूर्ववक्त्यांबद्दल मनांत अढी बाळगून असलेले कोल्हापूरचे कांही गृहस्थ व्यासपीठावर चढून बोलण्याचा प्रयत्न करूं लागले आणि थोडा वेळ कांहींसा गोंधळ माजला. पण सूचकांनी अनेक वक्त्यांच्या आग्रहामुळे तो ठराव परत घेण्याचें जाहीर करतांच अध्यक्ष किबेसाहेबांना हायसें वाटून त्यांनी तो ठराव परत घेण्याची परवानगी दिली. पण आता तो प्रश्न सभेच्या निर्णयांतील आहे असा एकच गिल्ला केल्यामुळे सभेवर तो सोपविण्यांत आला. मतें मोजतांना गोंधळहि झाला ! पण शेवटीं सभेनें हा ठराव परत घेण्याची परवानगी दिली व वादळ शांत झालें.

***

या ठरावाला विरोध करणारे अर्थात् निरनिराळ्या सात्त्विक किंवा तामस दृष्टीनेंहि करीत होते हें उघडच आहे. परंतु या सर्व प्रकारच्या लोकांचें तेवढ्यापुरतें ऐकमत्य होऊन या ठरावाचें उच्चाटन झालें. ठराव परत घेण्याची परवानगी देऊं नये, उलट मतें देऊन तो नापास करावा व त्याचें भूत एकदाचें गाडून टाकावें असा चंग कांहीं जणांनी बांधला होता. नामदार जाधवराव तर व्यासपीठावरून लोकांना हात खालीं करण्याचा इशारा देत होते, परंतु त्यांचा तो डाव साधला नाहींच.

***

वर वर्णन केलेल्या सत्प्रवृत्ति सर्वांच्या ठिकाणीं सारख्या प्रमाणांत जागृत होत्या असें नाहीं. नामदार जाधवराव व्यासपीठावर चमकूं लागल्यापासून पुढे काय घडतें याविषयीं कांहींना सांहजिकच भीति वाटूं लागली. शुद्धलेखन समितीच्या ठरावावर दुटप्पी भाषण करून

आपण ब्राह्मणब्राह्मणेतर प्रश्न उपस्थित करूं नये असें मोठया उदारपणाचा आविर्भाव आणून त्यांनी सांगितलें. अनिष्ट वाङ्मयाचा ठराव नापास करून चालकांना तोंडघशीं पाडण्याचा त्यांनी प्रयत्न केला तोहि फसला. पण शेवटीं एका निरुपद्रवी ठरावावर त्यांच्या जातिविशिष्ट आग्रहाने उसळी मारलीच. साहित्य-प्रकाशन व साहित्य-प्रसार करण्याकरिता सहकारी संस्था स्थापन करण्याचा विचार करण्यासाठी चार इसमाचे एक मंडळ नेमण्यांत आलें. त्यांत केवळ ब्राह्मणच आहेत ब्राह्मणेतर-नाहीत ही जाधवरावांची मोठी तक्रार! ते म्हणाले 'ब्राह्मण ब्राह्मणेतर हा वाद पुढे आणूं नये म्हणून मी खूप जपत होतों (!) परंतु ब्राह्मणांचा स्वभाव जात नाही त्याला काय करणार!' व्यासपीठावरून सर्वांस ऐकूं जाईल असें मोठ्याने हें वाक्य त्यांनी उच्चारलें. अध्यक्ष किबेसाहेब यांनीहि थोडें प्रसंगावधान दाखवून त्यांना गप्प बसविलें. विषयनियामक कमिटींत हजर राहावयास नको आणि मागाहून बखेडे माजवावयाला पाहिजेत अशा अर्थाचें बोलून निर्भयपणें त्यांनी पुढील कार्याला हात घातला. सामान्यतः त्यांच्या गोडव्या स्वभावाची जी माहिती लोकांना होती तिच्यावरून पाहतां किबेसाहेबांचें अध्यक्षीय काम या वेळीं बरेंच चांगलें झालें असे प्रतिनिधींनी उद्गार काढले.

***

प्रतिनिधींची सभामंडपांत बसण्याची व्यवस्था सरमिसळ होती. पुणें, बडोदें, सांगली, कोल्हापूर असे विभाग पाडले नसल्यामुळे कोणते प्रतिनिधि कोठें बसले होते हें समजण्यास मार्ग नव्हता व दरखेपेला नवी खुर्ची शोधण्याची पाळी येई. ही व्यवस्था दंगा माजविण्याच्या दृष्टीने बरीच सोयीची असली तथापि सुव्यवस्थेला विघातक होती हें लक्षांत घेऊन यापुढील संमेलन भरवितांना ही खबरदारी घेतली पाहिजे. संमेलनाच्या प्रतिनिधींची उतरण्याची सोय करतांनाहि सर्वच लोक एकत्र उतरण्याची सोय नसेल तर कवि-कवि, ग्रंथकार-ग्रंथकार असे एके ठिकाणीं जमवितां आल्यास तसें होणें इष्ट आहे.

***

कॉंग्रेसच्या कांही वर्षांपूर्वीच्या स्वरूपाप्रमाणेंच कोल्हापुरास भरलेल्या संमेलनांत प्रतिनिधि वगैरेंची संख्या फार मोठी दिसून आली. साहित्याची प्रगति अजमावणें व साहित्यविषयक लोकशिक्षण फैलावणें ह्या तात्त्विक गोष्टींशिवाय एखाद्या विशिष्ट इष्टानिष्ट गोष्टीबद्दल लोकमत अजमावणें अशी व्यावहारिक व निर्णायक कामगिरी संमेलनांत होणें अवश्य वाटत असेल तर प्रांतवार विभागणी करून कांही प्रमाणावर प्रतिनिधींची संख्या मुक्रर केली पाहिजे. असें केल्यानेच एखाद्या महत्त्वाच्या प्रश्नावरील लोकमत यथार्थ अजमावतां येईल. स्थानिक बहुसंख्य प्रतिनिधींनी दडपून दिलेल्या लोकमताच्या जोरावर संमेलनांतील ठरावांचा निर्णय लागावा ही गोष्ट केव्हांहि शिष्टसंमत ठरणार नाही. आणि स्थानिक प्रतिनिधींची संख्या भरपूर आहे एवढ्या विश्वासावर कविसंमेलनस्वागताध्यक्ष श्री. सुमंत यांनी केलेल्या परनिंदापर आणि भरमसाट विधानांचा तर अवश्य निषेधच केला पाहिजे.

# गुरुवायुर मंदिराविषयी खुलासा

अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेशासंबंधी कुंभकोणम् कॉलेजचे माजी प्रिन्सिपाल रा. ब. शेष अय्यर म्हणतात. 'गुरुवायूरपासून मी ६० मैलांवर राहतों. एकदा मीं त्या देवालयांत जाऊन पूजाहि केली होती. देवालयांत चालू असलेल्या वहिवाटी मला माहीत आहेत. मंदिराच्या जवळपास उच्चवर्णीय हिंदूंची बरीच मोठी वस्ती आहे. त्या लोकांना देवळांत जाण्याचा हक्क आहे, तरी ते त्यांत देवदर्शनासाठी किंवा प्रार्थनेसाठी क्वचितच जात असतील. अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेशाबाबत अशा लोकांचीं मतें (रेफरेंडम्) घेण्यापासून कोणताच लभ्यांश नाही. एकदा एक मोठे अधिकारी मला भेटले व म्हणाले, 'पहा, मी कोणतींच धर्मबंधनें मानीत नाही. अशा मलाहि या मंदिरांत जाण्याची सवड आहे तर ती हरिजनांना कां असूं नये?' तशांतहि हरिजनांनी आपली वागणूक व आचार स्वच्छ केल्यावरच त्यांना मंदिरप्रवेशाची परवानगी द्यावी असें पुष्कळांचें मत आहे. आता असें सांगण्यांत येत आहे कीं, मंदिरांत जाणाऱ्या लोकांचीच मतें अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेशाबाबत घेण्यांत आलीं आहेत. परंतु माझ्या मतें प्रथम मंदिरांत जाणाऱ्या माणसाची व्याख्या ठरविली पाहिजे. आपल्याला देवळांत जाण्याचा हक्क आहे म्हणूनच देवळांत जाणारा तो मंदिर-प्रवेशाधिकारी असें न समजतां जो नियमतः देवळांत पूजे-अर्चेसाठी जातो तो मंदिरप्रवेशाधिकारी होय अशी व्याख्या बनविता येईल. सदर व्याख्येला उतरणाऱ्या उच्चवर्णीयांचींच मतें

घेण्यांत आलीं तर मला असें वाटतें कीं, अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशाविरुद्धच बहुमताचा कौल पडेल.

गुरुवायूर मंदिरांत वर्षांतून तीन दिवस सर्व स्पृश्यास्पृश्य हिंदूंना जाण्याची मोकळीक असते या गोष्टीचा मला स्वतःला तरी अनुभव नाही, परंतु मीं असें मात्र ऐकलें आहे कीं या तीन दिवसांनंतर देवाच्या पूजा—अर्चादि नित्य धार्मिक विधींना सुरुवात होण्यापूर्वी सर्व मंदिर संप्रोक्षणविधीने पवित्र. केलें जातें. सनातनी हिंदूंची मतें लाथाडून हरिजनांना देवळें खुलीं करण्यांत येतील तर त्या गोष्टीचा असा वाईट परिणाम होईल कीं, सनातनी हिंदु त्या देवळांत जाणार नाहींत व मग अस्पृश्यहि त्या देवळांत शिरण्याचें औत्सुक्य दाखविणार नाहींत! माझा असा एक अनुभव आहे कीं, एका देवळांत अस्पृश्यांना प्रवेश देण्याचा बळजबरीनें प्रयत्न करण्यांत आला. परंतु त्याचा शेवट असा झाला कीं, तें देऊळच वर्षभर बंद राहिलें! व्यक्तिशः मी अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेशास अनुकूल आहें. परंतु मला असें वाटतें कीं, हा प्रश्न सुलभ होण्याकरितां प्रथम अस्पृश्यांना स्वच्छ आचारविचारांचें शिक्षण दिलें पाहिजे व सनातनी हिंदूंमध्येंहि हरिजनाविषयीं सहानुभूति उत्पन्न केली पाहिजे. मध्यंतरीं पडिक देवळांना ऊर्जित दशा आणून किंवा कमी खर्चानें नवीं देवळें बांधून तीं स्पृश्यास्पृश्यांना खुलीं ठेवण्यांत यावीं. हा मध्यम मार्ग होय. जे सनातनी हिंदु अस्पृश्योद्धाराबद्दल सहानुभूति दाखवितात परंतु त्यांच्या मंदिर-प्रवेशाला विरोध करतात, त्यांना नवीन देवळांना लागणाऱ्या खर्चापैकीं ५० टक्के खर्च देण्याबद्दल विनंति करण्यांत यावी. नवीन देवळांत मात्र अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशास अनुकूल असणाऱ्या स्पृश्यांनी अस्पृश्यांबरोबर देवपूजादि धार्मिक कृत्यें केलीं पाहिजेत. नाही तर अस्पृश्यांचीं देवळें म्हणून तीं नवीं देवळेंहि अस्पृश्यच ठरावयाचीं! या पद्धतीनें हरिजनांमध्यें हळूहळू सुविचार, सदाचार व स्वच्छता हे गुण निर्माण होऊन अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशाचा प्रश्न कायमचाच सुटण्याच्या मार्गास लागेल.

# तळेगांवचा कोनशिला—समारंभ

तळेगांव (दाभाडे) येथील धर्मार्थ दवाखान्याच्या इमारतीची कोनशिला बसविण्याचा समारंभ शनिवार ता. ३१ माहे डिसेंबर सन १९३२ रोजीं सायंकाळीं ५ वाजता मुंबईचे सुप्रसिद्ध दानशूर सर **नसरवानजी वाडिया** यांच्या हस्तें मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. समारंभास ठिकठिकाणाहून पाचशेंवर आमंत्रित मंडळी आली होती. त्यांतल्या त्यांत खालील मंडळी प्रामुख्यानें दिसत होती.

सरदार बाल युवराज सेनापति दाभाडे, सर जदुनाथ सरकार, रावसाहेब गोविंद सखाराम सरदेसाई, मुंबई युनिव्हर्सिटीचे प्रो. डॉ घोष, मुंबईचे रघुनाथराव कालेवार, श्री. तालीम, डॉ. नरसू दमजी, सरदार मुदलियार, सरदार नातु, श्री. सौ. बगुताई तांबे इ. इ.

आरंभीं मुलांचें स्वागतपर गायन झाल्यावर संस्थेचे आद्य संस्थापक, चालक व प्रवर्तक **डॉ. दिनकर सखाराम सरदेसाई** यांनी अध्यक्ष सर नेसरवानजी वाडिया व हजर असलेल्या इतर मंडळींचे योग्य शब्दांत स्वागत करून मंडळींना सर नेस वाडिया यांच्या सार्वजनिक कामगिरीची थोडक्या शब्दांत ओळख करून दिली.

### डॉ. सरदेसाई यांचें भाषण

नंतर त्यांनी पुढील आशयाचें इंग्रजींत भाषण केलें. ते म्हणाले, " आपला देश मुख्यत्वेंकरून शेतकरी आणि कामगार याच्यावरच अवलंबून आहे. मोठमोठे लोक शहरीं जाऊन तेथे पाश्चिमात्य वैद्यकीचा फायदा घेऊं शकतात. खेड्यापाड्यांत वरील सोय नसल्यामुळे आणि शहरांत जाण्यास लोकां जवळ पैसा नसल्यामुळे त्यांना नवीन वैद्यकीय शास्त्राचा फायदा मुळींच घेतां येत नाही. तरी त्यांना वरील गोष्टीचा फायदा मिळण्याकरिता १०–१५ खेडीं मिळून एखादा धर्मार्थ दवाखाना असणें फार जरूर आहे.

याच उद्देशानें वरील संस्था १९२५ सालीं स्थापन करण्यांत आली. या संस्थेंत काम करण्याकरिता पुणें आणि मुंबई येथील कांहीं डॉक्टर येत असतात. अशा संस्था मोठ्या लोकांच्या उदार आश्रयावर बऱ्याचशा अवलंबून असतात. तरी असे लोक या गोष्टींत मनःपूर्वक लक्ष घालतील अशी आमची आशा आहे. १९२५ पासून या संस्थेचा उपयोग करून घेतलेल्या लोकांचा आढावा खालीलप्रमाणें आहे.

**संस्थेची कामगिरी**

| वर्ष | नवीन केसेस | एकंदर | शस्त्रक्रिया |
|---|---|---|---|
| १९२६ | १६४२ | २४२७ | ३३५ |
| १९३२ | २७५४ | ३५३० | ५८५ |

या आंकड्यांवरून असें दिसून येईल कीं, वाढत्या संख्येमुळे संस्थेस स्वतःच्या मालकीच्या इमारतीची आवश्यकता भासूं लागल्याकारणानें, महाराष्ट्र जनते-

च्या उदार आश्रयावर भरंवसा ठेवून माझ्या सहकारी मित्रांच्या साहाय्याने इमारत बांधण्याचा उपक्रम सुरू केला आहे. तरी प्रत्येकाने यथाशक्ति हातभार लावून इमारत पुरी करण्यास मदत करावी." अशी विनंति करून त्यांनी भाषण संपविलें.

डॉ. सरदेसाई यांच्या इंग्रजींतील भाषणांचा गोषवारा डॉ. आपटे यांनी श्रोत्यांना मराठींत सांगितला. नंतर तळेगांवचे नागरिक श्री. बाळासाहेब वाळुंज यांनी डॉ. सरदेसाई यांचा स्वार्थत्याग, उद्योगप्रियता आणि आपल्या कर्तव्याविषयी जाणीव आणि त्याबद्दल त्यांना रात्रंदिवस लागलेली तळमळ, यांचें यथायोग्य शब्दचित्र काढून श्रोत्यांच्यापुढे ठेविलें.

नंतर डॉ. सरदेसाई यांनी सर नेस वाडिया यांना इमारतीची कोनशिला बसविण्यास विनंति केली.

सर नेस वाडिया यांनी आपल्या भाषणांत स्त्रियांकरिता तेथे हॉस्पिटल असणें जरूर आहे या मुद्दयावर जोर दिला. कोनशिला बसविल्यावर संस्थेचे सहकारी डॉ. दत्तात्रय गोपाळ पटवर्धन D. O. (Oxon) D. O. N. S. London यांनी अध्यक्ष व इतर जनांचे योग्य शब्दांत आभार मानल्यावर खालील देणग्या डॉ. सरदेसाई यांनी जाहीर केल्या—

| | | |
|---|---|---|
| १ | श्री. सौ. बगुताई तांबे | रु. ५००० |
| २ | डॉ. नरसुजी दमुजी | रु. १००० |
| ३ | श्री. मन्नीराम निहालचंद गांधी | रु. १००० |
| ४ | मुंबई कॉफर्ड मार्केट, फळांचे व्यापारी | रु. ५०१ |
| ५ | रावसाहेब गो. स. सरदेसाई | रु. ५०० |
| ६ | श्री. चांदोरकर ( तळेगांव ) | रु. १०१ |
| ७ | श्री. बी. एस. बेगमसाहेब | रु. १०१ |
| ८ | पैसाफंड काचेचा कारखाना | रु. ५१ |
| ९ | हाजी बच्चुभाई | रु. ५१ |
| १० | श्री. गोडांबे | रु. ५१ |
| ११ | श्री. रंगनाथ के. आप्पा | रु. ५१ |
| १२ | श्री. रंगनाथ | रु. ५१ |
| १३ | श्री. माणिकचंद | रु. २५ |
| १४ | श्री खांडके | रु. २५ |
| १५ | श्री. वाळुंज | रु. २५ |
| १६ | प्रो. घोष | रु. २५ |
| १७ | श्री. बिहारीलाल | रु. २५ |
| १८ | श्री. एस. एल. आपटे | रु. २५ |
| १९ | मि. साम्पसन | रु. २५ |
| २० | श्री. पांडुरंगअप्पा | रु. २५ |
| २१ | सर जदुनाथ सरकार | रु. २५ |
| २२ | मि. मिरांडा | रु. २५ |
| २३ | काजीसाहेब | रु. २५ |
| २४ | मगनलाल निहालचंद यांजमार्फत | रु. १०० |
| २५ | के. एस. सल्लाउद्दिन | रु. ५१ |
| २६ | बोहरी यांच्यामार्फत किदुआ हुसेन | रु. २५ |

शेवटीं अत्तर-गुलाब, पानसुपारी आणि फोटो वगैरे होऊन अल्पोपाहारानंतर समारंभ आटोपला.

# महाराष्ट्रांत स्वतंत्र विद्यापीठाची स्थापना

झाडाला लहानशी हिरवी कैरी यावी व ती मोठी होऊन तिला पाड लागावा त्याप्रमाणेच कल्पनांचीहि प्रगति जगांत चालू असते. सुमारें आठ वर्षांपूर्वी मुंबईसरकारानें मुंबई विश्वविद्यालयाची सुधारणा करण्याच्या हेतूने सर चिमणलाल सेटलवाड यांच्या अध्यक्षतेखाली एक कमिटी नेमली. सदर कमिटीपुढे इलाख्यांतील अनेक विद्वानांच्या व शिक्षणप्रेमी गृहस्थांच्या साक्षी झाल्या. त्या साक्षीपुराव्यांतून ज्या नवीन कल्पना उदयास आल्या त्यांपैकींच मुंबई इलाख्याला एकच विद्यापीठ यापुढे न ठेवतां प्रांतानिहाय वेगवेगळीं विद्यापीठें स्थापन करावीं ही कल्पना होय. हिंदुस्थानांतील राज्यें बुडवीत असता इंग्रजांच्या हाताला जसजसा मुलुख लागत गेला तसतसे त्यांनी प्रांत बनविले. प्रांत बनवितांना त्यांच्या नैसर्गिक मर्यादांचा मुळींच विचार करण्यांत आला नाही. सन १८१८ सालीं पेशवाई बुडविल्यानंतर पेशव्यांच्या ताब्यांतील मुलुखाची अशीच कुतरओढ झाली. त्या वेळीं इलाखा बनविण्यास जेवढा मुलूख इंग्रज सरकारला पुरेसा वाटला तेवढा मुलूख त्यांनी मुंबई इलाख्यांत घातला. त्यामुळें मुंबई इलाखा हा एकदम व एक नमुन्याचा विणलेला सुंदर शेला न बनतां त्याऐवजीं गुजराथ, महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या चित्रविचित्र चिंध्यांची एक गोधडीच शिवली गेली. त्याच गोधडीला सिंध प्रांताचा एक चमत्कारिक तुकडा जोडला जाऊन तिचें काम पुरें झालें.

जी इलाख्याची दैना तीच इलाख्याच्या कौन्सिलाची व विश्वविद्यालयाचीहि दैना. मुंबई इलाख्याच्या चार प्रांतांत चार भाषा चालतात. पण त्या चार प्रांतांकरितां स्थापन झालेल्या विश्वविद्यालयाचें मुख्य पीठ म्हणून जें मुंबई शहर निवडण्यांत आलें त्या शहराची मुख्य अशी एक भाषा नाही. अशा बकाली शहराकडे विश्वविद्यालयाचें नेतृत्व गेल्यामुळें मुंबई युनिव्हर्सिटी राष्ट्रीय बाण्याला पूर्णपणें पारखी झाली. तिच्या छत्राखालीं इलाख्यांतील सर्व प्रांतांनी आपली दिन-

चर्या चालविली खरी, पण तिने कोणालाहि समाधान असें लाभलें नाही. एखादा वाटसरू झाडाखालीं बसून व चणेमुरमुरे चावून दोन प्रहरचें ऊन टाळतो व संध्याकाळीं गांवीं गेल्यानंतर ताजें जेवण पोटभर जेवून सत्तेच्या घरांत शांत मनानें झोप घेईन या आशेवर दृष्टि देऊन तो आपला मार्ग आक्रमीत असतो. मुंबई इलाख्यांतील प्रांत गेला ऐंशी-वर्षांचा काळ असाच वाटसरूसारखा कंठीत आले आहेत. परंतु आता त्यांच्या आयुष्यक्रमांत बदल होऊन प्रत्येक प्रांताच्या वाटा वेगवेगळ्या पडण्याचीं चिन्हें हळुहळू दिसूं लागलीं आहेत. कारण विशिष्ट भाषेचा प्रदेश म्हटला कीं शक्य झाल्यास त्याला स्वतःचा राजकीय विभाग, स्वतःचें विद्यापीठ व स्वतःचें कायदेमंडळ अवश्य लाभलें तरच त्याची नैसर्गिक वाढ सुरू राहते. बंगाल, संयुक्तप्रांत यांच्या वांटयाला ही अनुकूलता सहजगत्या आल्यामुळे ते प्रांत शिक्षणदृष्ट्या मुंबई इलाख्यापुढे सरसावले आहेत.

ब्रिटिश सरकारासहि या व्यवस्थेंतील रहस्य अलीकडे कबूल झालें असून त्यास अनुसरून प्रांतांची नवी मांडणी करण्याकरितां एखादें कमिशन नेमण्यांत यावें या प्रकारची सूचना सर जॉन सायमन यांनींहि आपल्या रिपोर्टांत केली आहे. सिंध व ओरिसा हे दोन प्रांत वेगळे बनविण्याचा जो उद्योग सांप्रत सुरू आहे त्याच्या अनेक कारणांपैकीं एक कारण वर सांगितलें तेंच होय. मुंबई, मद्रास, मध्यप्रांत इत्यादि इलाखे मोडून त्यांतील प्रांतांची रचना त्यांच्या स्वाभाविक सरहद्दींना धरून आज ना उद्या झालीच पाहिजे. ती ज्या वेळीं होईल व त्या प्रांतांचा राजकीय व इतर सर्व व्यवहार देशी भाषांतून चालूं लागेल त्याच वेळीं हिंदुस्थानाच्या राष्ट्रीय जीवनास खरी सुरुवात झाली असें समजण्यांत येईल. प्रांतिक विद्यापीठ हा त्या कार्याचा एक प्रमुख भाग होय. सन १९२४ सालीं सरकारानें मुंबई विश्वविद्यालय सुधारण्याच्या हेतूनें कमिटी नेमली त्या वेळीं महाराष्ट्राकरितां स्वतंत्र विद्यापीठ निर्माण करावें याविषयीं पुष्कळ ऊहापोह झाला व कमिटीच्या रिपोर्टास आठ वर्षें होऊन गेलीं तरी विद्यापीठाचा विसर कोणासच पडला नाही. गेल्या वर्ष सहा महिन्यांत या कल्पनेनें अधिकच उसळी खाल्ली असून तिची मूर्ति घडविण्याकडे सर्वांचें लक्ष वेधत चाललें आहे.

विद्यापीठ म्हटलें कीं त्यासाठीं द्रव्याची भली थोरली रास प्रथमदर्शनीं ओतली पाहिजे असा सामान्य समज आहे. कमिटीनें आपल्या रिपोर्टांत या प्रीत्यर्थ ५० लाखांचा आंकडा नमूद केला आहे. परंतु शिक्षण-संस्था चुटपुटत्या भांडवलावर कशा काढाव्या व मूळच्या भांडवलांत मुठीमुठीनें भर टाकीत त्यांना भव्य स्वरूप कसें आणावें याची विद्या महाराष्ट्रीयांना दुसऱ्या कोणापाशीं शिकावयास नको. पुण्यांतील न्यू इंग्लिश स्कूल, नू.म. विद्यालय, येथील महाराष्ट्र ए. सोसायटीचें हायस्कूल, फर्ग्युसन कॉलेज, सर परशुरामभाऊ कॉलेज, महिला विद्यापीठ, कन्याशाळा इत्यादि शिक्षणालयें व त्यांच्या महाराष्ट्रभर विस्तारलेल्या शाखा महाराष्ट्रीयांच्या कर्तबगारीची साक्ष देतच आहेत. या उत्कर्षाची गुरुकिल्ली पोट बांधून काम करण्याच्या पिढीजात गुणांत आहे. मुंबईसरकारानें सध्याचें मुंबई इलाख्याचें अवजड राज्ययंत्र मोडून ते सडपातळ बनविण्याकरितां व अशा रीतीनें पैशाची उधळपट्टीहि वांचविण्याकरिता माजी गृहमंत्री मि. जी. ए. थॉमस यांच्या अध्यक्षतेखाली एक कमिटी नेमली होती. तिच्या रिपोर्टाचा सारांश आज दुसरीकडे दिलाच आहे. कमिटीनें खास सरकारच्या पैशानें पोसलेल्या बहुतेक मोठमोठ्या शाळाकॉलेजांवर कुऱ्हाड उचलली आहे. तिनें सुचविलेल्या कत्तलींतून पुण्याच्या डेक्कन कॉलेजाबरोबर शेतकी कॉलेज व मुंबईच्या एलफिन्स्टन कॉलेजाबरोबर कॉमर्स कॉलेज, व्हेटरिनरी कॉलेज, व स्कूल ऑफ आर्ट्स या उपयुक्त व उच्च संस्थाहि सुटलेल्या नाहीत ! त्यांपैकीं डेक्कन कॉलेज व एल्फिन्स्टन कॉलेज या सरकारी कॉलेजांना खासगी कॉलेजांच्या तिपटीचौपटीनें खर्च येतो असें कमिटीनेच आपल्या रिपोर्टांत कबूल केलें आहे. तेव्हा पन्नास लाखांचा युनिव्हर्सिटी कमिटीनें नवीन विद्यापीठासाठीं सांगितलेला आंकडा अलीजाही व राजविलासीच ठरत नाही काय ?

डॉ. परांजपे हे युनिव्हर्सिटी कमिटीचे एक प्रमुख सभासद असून त्यांनीहि नवीन विद्यापीठासंबंधीं आपली योजना मांडली होती. त्या योजनेंत त्यांनी मोठमोठ्या पगारावर, नव्या इमारतीवर किंवा अवांतर अवडंबरावर आपली भिस्त ठेवलीच नव्हती. स्वार्थत्याग हाच त्यांचा मुख्य आधार होता. याच आधारावर येथील डेक्कन एज्युकेशन सोसायटी काय, किंवा शिक्षण प्रसारक मंडळी काय यांनीं आपल्या अनेक संस्थांची उभारणी केली आहे. सुमारें पन्नास वर्षांपूर्वी त्यांनी लहानशी इंग्रजी अथवा मराठी शाळा घालून व त्यांत थोडींशीं मुलें जमवून नवीन उपक्रमाची मुहूर्तमेढ रोविली. त्यांतून त्यांची भरभराट होत होत स्वतःच्या हिमतीवर श्रीगणेशापासून एम. ए. पर्यंत त्यांना शिक्षणाची सोय करतां आली. त्या दोनहि संस्थांचा पसारा इतका वाढला आहे कीं त्यांच्या शाळा—कॉलेजांनीं अर्धा अधिक महाराष्ट्र व्यापून टाकला आहे.

त्यांजमार्फत मिळणारें शिक्षणहि सरकारी शाळा-कॉलेजांपेक्षां कोणत्याहि गुणांत हीन प्रतीचें आहे असें नाही. म्हणूनच सरकाराला पुण्यांतील आपलें हायस्कूल बंद करण्यास हरकत वाटली नाही. ज्या संस्थांनी व त्यांतील कर्तबगार लोकांनी अगदी थोड्या खर्चात एम. ए. पर्यंत शिक्षण देण्याची कामगिरी यशस्वी रीतीने सिद्धीस नेली त्या संस्थांनी व लोकांनी एकविचाराने निर्धार केल्यास पुण्यासारख्या शहरांत स्वतंत्र विद्यापीठ स्थापणें त्यांस कठिण आहे असें नाही! थॉमस कमिटीच्या मताप्रमाणेहि खासगी प्रयत्नांनी द्यावयाच्या शिक्षणाचा खर्च ज्या अर्थी सरकारी खर्चापेक्षां एकतृतीयांशांत किंवा चतुर्थांशांत भागं शकतो त्याअर्थी विद्यापीठहि पन्नास लाखांऐवजीं पंधरा सोळा लाखांत चालण्यास प्रयास पडूं नयेत.

ही पंधरासोळा लाखांची रक्कम महाराष्ट्रीय विद्वानांनी व पुढाऱ्यांनी मनावर घेतलें असतां विद्यापीठाच्या प्रारंभींहि जमणें शक्य आहे. परंतु तितकीहि रक्कम एकदम हातीं न आली तरी कांहीं अंशीं आहे या सामुग्रीवर विद्यापीठाच्या कार्यास सुरुवात झाल्यास गरज लागेल तसा संकल्पित पैसा गोळा होऊं शकेल. डेक्कन एज्युकेशन सोसायटी व शिक्षणप्रसारक मंडळी यांच्या आजच्या साधनसामुग्रीची किंमत कित्येक लाखांनी मोजावी लागेल. हे लाखो रुपये त्या संस्थांच्या जन्मकालीं चालकांपाशीं नव्हते. तें त्यांचें कार्य जगास मूर्तिमंत दिसूं लागल्यावरच ज्या त्या संस्थेच्या व्यक्तिशः प्रयत्नाने ते रुपये जमले. त्याऐवजीं या व पुण्यांतील इतर खासगी शिक्षणसंस्थांनी विद्यापीठाकरितां संघटित उद्योग केला असतां पंधरासोळा लाखांचीच काय पण कोट सवा कोटीचीहि रक्कम काशीच्या हिंदु युनिव्हर्सिटी-प्रमाणे त्यांना आरंभीं नसली तरी पुढे क्रमाक्रमाने सहज गोळा करतां येईल.

युनिव्हर्सिटी कमिटीपुढे विचारासाठी तीन योजना आल्या होत्या. पुण्यांत सांप्रत डेक्कन कॉलेज, फर्ग्यूसन कॉलेज, सर परशुरामभाऊ कॉलेज व वाडिया कॉलेज अशीं चार आर्ट्स कॉलेजें आहेत. त्यांखेरीज लॉ कॉलेज, शेतकी कॉलेज, इंजीनियरिंग कॉलेज हीं तीन औद्योगिक कॉलेजें आहेत. एक मेडिकल स्कूल आहे, त्यांतून मेडिकल कॉलेज सहज निर्माण होऊं शकेल. इतकी कॉलेजें पुण्याबाहेर मुंबई इलाख्यांतील कोणत्याहि एका शहरांत नाहीत. या कॉलेजांच्या जिवावर पुण्यांत एक विद्यापीठ उत्तम प्रकारें चालेल, असें डॉ. परांजपे यांचें मत असल्याने त्यांनी हें विद्यापीठ एकट्या पुणें शहरापुरतें असावें असें प्रतिपादिलें होतें. याचा अर्थ हा नव्हे कीं त्यांत बाहेरील कोणाहि विद्यार्थ्याने शिकावयास येऊं नये किंवा पुण्यांतील कोणाहि विद्यार्थ्याने मुंबईसारख्या बाहेरच्या शहरीं इतर विषयांचा अभ्यास करण्यासाठी जाऊं नये. महाराष्ट्रांत सांगली, नाशिक, कोल्हापूर या शहरीं आर्ट्स कॉलेजें आहेत. त्यांतील विद्यार्थ्यांच्या परीक्षा पुण्याच्या विद्यापीठाने न घेतां त्याच्या ताब्यांत फक्त पुण्यांतीलच कॉलेजें असावीं. त्यांत द्यावयाच्या शिक्षणावर विद्यापीठानें आपली देखरेख ठेवावी, इतकेंच नव्हे तर आर्ट्स कॉलेजांमध्ये इंटरमीजिएट कॉलेजें व पूर्ण कॉलेजें असे दोन विभाग पाडून बी. ए. ऑनर्सचा व एम. ए. चा अभ्यासक्रम विद्यापीठाने आपल्या प्रत्यक्ष नजरेखाली घेऊन त्याच्या शिक्षणाची तरतूद स्वतःच्या प्रोफेसरांकडून करावी. या प्रकारचें डॉ. परांजपे यांच्या योजनेचें स्वरूप स्थूल मानाने आहे. मँचेस्टर, डाक्का लखनौ या ठिकाणीं याच धर्तीचीं विद्यापीठें अस्तित्वांत असून विद्यार्थ्यांचें शील बनविण्याच्या, त्यांस शिस्त लावण्याच्या व खरे विद्वान, विद्याव्यासंगी व संशोधक तरुण निर्माण होण्याच्या दृष्टीने या विद्यापीठांचा दर्जा उच्च प्रतीचा लागतो.

डॉ. परांजपे यांच्या योजनेशिवाय दुसरी योजना म्हटली म्हणजे सांप्रत हिंदुस्थानभर व मुंबई इलाख्यांतहि चालू आहे ती. या योजनेंत विद्यापीठावर स्वतः शिक्षण देण्याची जबाबदारी नसून कॉलेजांनी विद्यार्थ्यांना पढवावें व विद्यापीठाने त्यांच्या फक्त परीक्षा घ्याव्या असा प्रघात आहे. हा प्रघात असल्यामुळेच मुंबईतील विद्यापीठ कराचीपासून धारवाडापर्यंत पसरलेलीं पांचपंचवीस कॉलेजें सांभाळूं शकतें. पुण्याच्या विद्यापीठाची रचना या धर्तीवर झाल्यास अखिल महाराष्ट्रांतील सर्व कॉलेजें त्याच्या कक्षेत सांपडतील व त्या योगाने मुंबई युनिव्हर्सिटीवरील परीक्षा घेण्याचा वार्षिक व षाण्मासिक भार त्या प्रमाणात हलका होईल. परंतु ही धर्ती आता जुनीपुराणी व टाकाऊ ठरली असल्याने, पुण्यास विद्यापीठ काढून काढावयाचें तर केवळ परीक्षा घेणारें न काढतां शिक्षण देणारेंहि काढल्यानेच या कार्यात पुढे होणारास समाधान लाभणार आहे. पण मुंबई युनिव्हर्सिटीवरील कामाचा बोजा या योजनेने हलका होणारा नसल्यामुळे कमिटीला ही योजना तितकीशी मानवली नाही. आता नवीनांच्या महत्त्वाकांक्षेस अवसर सांपडेल व मुंबई युनिव्हर्सिटीचाहि कार्यभाग साधेल अशी तोड काढावयाची झाल्यास परीक्षा घेणें व शिक्षण देणें हीं दोनहि कामें पुण्याच्या विद्यापीठाने उचलावीं.

विद्यापीठाचे असे तीन पर्याय आहेत. त्या पर्यायांवर मतभेद होऊन पुणें विद्यापीठाची स्थापना मागे पडली कीं द्रव्याभावीं तिला बगल द्यावी लागली, या प्रश्नाचा निर्णय करणें कठिण असलें तरी

इतकें खरें कीं, विद्यापीठाची योजना आपली समजून तिचा पिच्छा पुरविणारी एखादी व्यक्ति किंवा व्यक्तिसमूह ताबडतोब पुढे न झाल्यामुळे विद्यापीठास मूर्तस्वरूप आलें नाहीं. परंतु गेल्या वर्षांत हें औदासीन्य मावळलें आहे. रा. न. चिं. केळकर यांनीं आठ हजार रुपयांचे डिबेंचर्स महाराष्ट्र विद्यापीठाला दिल्याचें जाहीर केल्यापासून विद्यापीठाचा विचार विशेष आस्थापूर्वक सुरू झाला. बॅ. जयकर, रा. ब. काळे व रा. न. चिं. केळकर इत्यादिकांच्या प्रयत्नाने पुण्यांतील कॉलेजांच्या व त्यासारख्या संस्थांच्या प्रिन्सिपालांची व प्रमुखांची एक कमिटी स्थापन करण्यांत आली. तिने विद्यापीठाच्या उभारणीची दिशा आंखावयाची आहे.

पुण्यांत नवीन निघालेल्या वाडिया कॉलेजाचे प्रिन्सिपाल खाड्ये यांनी कोल्हापुरांतील आपल्या भाषणांत विद्यापीठाची कल्पना ओघाने उच्चारली. तिचा इष्ट असा परिणाम कोल्हापूर दरबारावर होऊन कोल्हापुरांत स्वतंत्र विद्यापीठ काढण्याची वाटाघाट सुरुहि झाली. कोल्हापुरास राजाराम कॉलेज आहे. पण विद्यापीठ स्थापण्यास तें एकच कॉलेज अपुरें असल्याने लॉ कॉलेज व सेकंडरी ट्रेनिंग कॉलेज या दोन नव्या संस्थांची राजाराम कॉलेजास जोड देण्याची पूर्वतयारी म्हणून एक कमिटीहि अस्तित्वांत आली. साहित्यसंमेलनांतील आपल्या भाषणांत राजाराम कॉलेजचे प्रि. बाळकृष्ण यांनी पुणें व कोल्हापूर येथेच काय पण उमरावती आदिकरून महाराष्ट्रांतील तीनचार शहरीं वेगवेगळीं विद्यापीठें उत्पन्न होण्याची आवश्यकता प्रतिपादिली. महाराष्ट्रीय लोक सध्या एकच विद्यापीठ मागत आहेत. त्या एकाच्याऐवजीं चार विद्यापीठें लाभलीं तर तीं कोणास नको आहेत? पण तीं चारहि विद्यापीठें हवेंतील मनोरे किंवा कल्पनेंतील तरंग असतील तर निदान एक विद्यापीठ डोळ्यांना दिसलें तरी पुष्कळ झालें असें म्हणावें लागेल. या दृष्टीने कोल्हापूरच्या संमेलनांत विद्यापीठाच्या बाबतींत इतर कमिटयांशीं सहकार्य करण्यासाठी एक वेगळी कमिटी नेमण्यांत आली ही महत्त्वाची गोष्ट होय. मात्र या कमिटीने ताबडतोब कामास लागणें जरूर आहे.

महाराष्ट्र विद्यापीठास मूर्त स्वरूप येण्यास सध्याचा काळ बराच अनुकूल आहे. महाराष्ट्रांतील इतर शहरीं विद्यापीठें केव्हा चालतीं-बोलतीं होतील तीं होवोत, पण पुण्यास या कामीं सर्वांच्या आधीं यश येण्याचा फार संभव आहे. पुण्यांतील सरकारी शिक्षण संस्थांपैकीं डेक्कन कॉलेज व शेतकी कॉलेज यांचा गाशा गुंडाळण्याच्या विचारांत मुंबई सरकार आहे असें दिसतें; त्यामुळें या दोनहि संस्था विद्यापीठाच्या स्वाधीन होण्यासारख्या आहेत. डेक्कन कॉलेजाच्या इमारतीचा उपयोग विद्यापीठाच्या कचेरीकरितां व वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणविषयक कार्याकरितां होईल. तसेंच शेतकी कॉलेज बंद पडूं न देतां आपल्या देशाच्या कृषीसंबंधीं गरजा लक्षांत घेऊन त्या धोरणाने तेथील शिक्षणक्रमाची दिशा बदलतां येईल. सरकारास शिक्षणाचा खर्च झेपेनासा झाल्यामुळे बहुतेक सारेंच शिक्षण इलाख्यांतील शिक्षणप्रेमी संस्थांवर सोपवून सरकार अंग झाडून मोकळे होण्याच्या बेतांत आहे. यापुढे इलाख्याचा राज्यकारभारहि लोकमतानुवर्तिच व्हावयाचा आहे. अशा स्थितींत लोकशिक्षणास स्वातंत्र्य मिळवून देण्याची, त्यास राष्ट्रीय वळणावर आणण्याची व त्याजकडून देशाच्या गरजा भागवून घेण्याची वेळ हीच आहे.

देशाच्या अनेक गरजांपैकीं प्राथमिक शाळांपासून कॉलेजापर्यंतचें सर्व शिक्षण स्वभाषेंतून देण्याची गरज महत्त्वाची होय. हायस्कुलें व कॉलेजें यांतील बहुतेक सगळे विषय इंग्रजींतून शिकविण्याची सक्ती चालू असल्याने मराठी भाषेची, मराठी ग्रंथाची, मराठी विद्वानांची, वाढ खुरटली आहे. मराठीची विचारशक्ति विकसित होत नाहीं, तिचा व्यवहार विस्तारत नाहीं. तिला योग्य तो मान मिळत नाहीं; घरीं, दारीं, राजदरबारीं व बाजारीं मराठी भाषेची, इंग्रजी भाषेने मांडलेली विटंबना डोळ्यांना पाहवत नाहीं. मराठीची आंतडीं बाहेर काढण्याचे व गळा दाबून तिचे प्राण कासावीस करण्याचे प्रयत्न इंग्रजी भाषा सतत सव्वा शतक करीत आली आहे. त्या क्लेशांचा शेवट व त्या अपमानाची परिसमाप्ति होण्यास हीच वेळ अनुकूल असल्यामुळे त्या उद्योगास महाराष्ट्रांतील शिक्षणसंस्था व शिक्षणप्रेमी पुढारी लवकर लागतील अशी आम्हांस उमेद आहे.

# मुंबई सरकाराची पुनर्घटना
## थॉमस कमिटीचा रिपोर्ट

ता. ११ जुलै १९३२ रोजीं मुंबई-सरकाराने माजी होम मेंबर **मि. जी. ए. थॉमस** यांचे अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमून, त्या कमिटीनें सर्व खात्यांची पाहाणी करून सरकारी राज्यव्यवस्था काटकसरीची होण्याच्या दृष्टीने सर्व खात्यांत काय काय सुधारणा करणें जरूर आहे हें ठरवावें व शिफारशी कराव्या असा ठराव केला.

या कमिटीवर **मि. जी. ए. थॉमस** ( अध्यक्ष ); ( १ ) **मि. जी. कौल** सी. आय. ई. व **मि. डी. जी. हॅरिस** सी. एस. आय., सी. आय. ई., ( सभासद ); व **श्री. इ. डब्ल्यू. पेरी** ( सेक्रेटरी ) अशा नेमणुका करण्यांत आल्या. कमिटीनें गेल्या ता. ७ रोजीं आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला. त्याचा सारांश पुढीलप्रमाणे—

ऑ. इं. सर्व्हिसेसचा प्रश्न कमिटीच्या कक्षेबाहेरचा होता यामुळे त्यासंबंधाने कमिटीने विचार केलेला नाहीं. ना. गव्हर्नरसाहेबांनीं सरदार सुलेमान कासम मिठा, सर चुनीलाल मेथा, सर कावसजी जहांगीर, रा. भास्करराव जाधव, डॉ. परांजपे, ए. आर. दलाल, विंटर बोथॅम, सर ह्यू कोक, बॅ. चंदावरकर व खासदार एच. एम. मेथा यांना कमिटीला मदत करण्याकरितां निमंत्रण दिलें. पण सर चुनीलाल मेथा, डॉ. परांजपे, सरदार कासम मिठा हे हजर राहिले नाहीत. त्यांनी लेखीं पत्रकें पाठविलीं. याशिवाय श्री. चिकोडी, रा. ब. भीमभाई नाईक, बी. एस. कामत प्रभृति १४ आमदारांनी कमिटीपुढे साक्षी दिल्या. खेरीज ४४ निरनिराळ्या खात्यांच्या ४४ मुख्य अधिकाऱ्यांच्या साक्षी कमिटीने घेतल्या.

### जमाखर्चाचें अनुमान

१९२९-३० सालाचे जमाखर्चाचे आंकडे हे साधारणपणें जमाखर्चाचे वट आंकडे धरून यापुढील बजेटाचा अंदाज कमिटीनें केला आहे. ते अंदाजी आंकडे असे :-

| | १९२९-३० | १९३२-३३ | फरक |
|---|---|---|---|
| उत्पन्न | १५२९ लाख | १३८५ लाख | १४४ |
| खर्च | १५६८ लाख | १४५८ लाख | ११० |

सन १९३२-३३ सालीं खर्चांत ११० लाखांची बचत दिसली तरीदेखील रस्ते व इमारत दुरुस्ती; पगारांतील कपात व इतर अडचणीच्या प्रसंगीं केलेली कपात जमेस धरली नाहीं तर चालू सालांत १५१ लाखांची तूट येईल. व यापुढे सुधारलेलें कायदेमंडळ, पब्लिक सर्व्हिस कमिशन व पेन्शनचा वाढता खर्च लक्षांत घेतां ही तूट पुढे २ कोटींवर जाईल. आणखी २५ लाखांची तरतूद अडीअडचणीच्या कामाकरिता करावयाची म्हटलें तर २¼ कोटि रुपये तूट येईल. पण त्याबरोबरच आर्थिक परिस्थिति सुधारल्यानंतर स्टँप, रेजिस्ट्रेशन, फॉरेस्ट व अबकारी या खात्यांचें उत्पन्न सुमारें १ कोटीने वाढेल व अदमासें १। कोटी रुपयेच तूट येऊं लागेल. तथापि कमिटीने औद्योगिक खातें व प्राथमिक शिक्षणाचा वाढता खर्च लक्षांत घेऊन सुमारें २ कोटि रुपये तूट येईल असें गृहीत धरून सर्व खात्यांच्या कारभाराची व्यवस्था कशी बदलतां येईल याचें सूक्ष्म अवलोकन केलें आहे. पण ही पुनर्घटना ठरवितांना सिंध प्रांत वेगळा होणार ही गोष्ट कमिटीने लक्षांत घेतली नाहीं !

### मंत्रिमंडळाची पुनर्घटना

यापुढील मंत्रिमंडळांत अनुभविक अधिकाऱ्यांना स्थान मिळणार नाहीं व दिवाणांना अनुभविक अधिकाऱ्यांचा सल्ला मिळणें तर फार जरुरीचें आहे. याकरिता इलाख्याच्या मुख्य ठिकाणीं सल्ला देण्याकरिता अधिकाऱ्यांचीं सल्लागार बोर्ड्स स्थापण्यांत येणार आहेत--( १ ) रेव्हेन्यू बोर्ड ( २ ) बोर्ड ऑफ वर्क्स ( ३ ) पोलिस बोर्ड ( ४ ) बोर्ड ऑफ फॉरेस्ट्री व (५) बोर्ड ऑफ रूरल डेव्हलपमेंट हीं तीं बोर्डें होत. ह्या सल्लागार मंडळांच्या बैठकी पुण्यास होतील व खात्यांचे अधिकारी व इतर वरिष्ठ अधिकारी हे त्या बैठकींना हजर राहतील.

कमिटीने एक कमिशनर व एक कॉन्झर्व्हेटर ऑफ फॉरेस्ट अशा दोन जागा कमी करण्याची शिफारस केली आहे. बोर्ड ऑफ वर्क्स अंमलांत आलें तर चीफ इंजिनीयर व २ सुपरिंटेंडिंग इंजिनीयर कमी होऊं शकतील.

इलाख्याच्या मुख्य कचेरींत वाजवीपेक्षां जास्त अधिकारी आहेत व त्यामुळे कामें दुप्पट वाढतात. ही टीका सार्थ आहे इतकेंच नव्हे तर या टीकेला सरकारजवळ उत्तर नाहीं. दिवाणांचें मुख्य काम म्हणजे धोरण आंखणें व सांपत्तिक प्रश्नांचा विचार करणें. हल्लींचीं पुष्कळशीं मुख्य कचेरींतील कामें बोर्डामार्फत निकालांत निघू शकतील.

याकरिता या बोर्डांना सरकाराने आपले अधिकार द्यावे. दिवाणाला एक सेक्रेटरी असावा. म्हणजे इतर डेप्युटी व अंडर सेक्रेटरींची जरूर भासणार नाही. त्यामुळे सेक्रेटरिएटमध्ये पुष्कळ बचत होण्यासारखी आहे.

### इलाख्याची राजधानी

'मुंबई' ही एकच इलाख्याची राजधानी असावी. पुणें व मुंबई या दोन ठिकाणीं हलवाहलव ऋतुमानाप्रमाणे करण्याचें कारण नाही. एखाद्या कंपनीने मुख्य कचेरी एके ठिकाणीं ठेवून, अधिकारी वर्ग दुसरे ठिकाणीं सहा महिने ठेवणें जितकें युक्त होईल तितकेंच मुंबईहून पुण्यास ६ महिने येऊन राज्यकारभार चालविणें युक्त होईल. भौगोलिक व व्यापारी दृष्टीने व हुशार, तज्ज्ञ लोकांचें शहर या दृष्टीने मुंबई शहराचेंच महत्त्व विशेष आहे. महाबळेश्वर हें विश्रांति व सुटी यांकरिता कायम राहावें. मंत्रिमंडळ व त्याचे सेक्रेटरी यांना ६ आठवडे तेथे जाऊन राहण्यास परवानगी द्यावी. पुढील घटनेंत गव्हर्नराचीं कामें काय असतील हें सांगतां येत नाही. त्यामुळे गणेश खिंड (पुणें) येथील गव्हर्नराचा बंगला कायम ठेवणें जरूर आहे कीं नाही हें सांगतां येत नाही. गव्हर्नराने मुंबईसच वर्षातून १२ महिने राहावें असें ठरलें तर साहजिकच मुंबईतील 'गव्हर्नमेंट हाऊस' ची जुनी इमारत सुधारावी अगर नवी बांधावी लागेल आणि यालाच ७ ते ११ लाख रुपये खर्च येईल.

### खात्यांची नवी व्यवस्था

जिल्हा अधिकाऱ्यांचा संबंध मुख्य कचेरीशीं जवळचा व्हावा. जिल्हानिहाय २—३ प्रांत अधिकारी असतात, ते काढून टाकावे. कलेक्टराला १—२ निजबत चिटणीस द्यावे. त्यांनी जिल्ह्यांत कलेक्टराबरोबर फिरावें व प्रत्यक्ष माहिती करून घ्यावी. सर्कल इन्स्पेक्टराच्या ऐवजीं रेव्हिन्यू इन्स्पेक्टर नेमावा. तालुक्याच्या ठिकाणीं एक पोलीस स्टेशन असावें व पोलीस स्टेशनमध्ये एक अगर जरूर तर दोन सब-इन्स्पेक्टर असावे.

### सरकारी नोकरांचे पगार

हल्लींच्या सरकारी नोकरांच्या पगारांत कमिटीने कपात सुचविली नाही. पण नवीन नोकरांचा विचार करतांना इस्लिंग्टन कमिशनाच्या शिफारशींना अनुसरून आपलें धोरण ठरविलें आहे व प्रांतिक अधिकाऱ्यांच्या पगाराची वाढ त्यांनी निरनिराळ्या साक्षीदारांचें मत लक्षांत घेऊन ठरविली आहे. या दृष्टीने प्रांतिक नोकरांचे पाच वर्ग ठरविण्यांत आले आहेत.

( अ ) रेव्हिन्यू अँड ज्यूडीशिअल
( ब ) पब्लिक वर्क्स, फॉरेस्ट व पोलिस
( क ) एज्युकेशन, मेडिकल व पब्लिक हेल्थ
( ड ) ॲग्रिकल्चर, एक्साइज व फॅक्टरी.
( ई ) कोऑपरेशन व बॉयलर्स.

| | पगार सुरवातीचा रु. | पगार शेवटचा रु. |
|---|---|---|
| ( अ ) | २५० | १२०० |
| ( ब ) | २२५ | ९०० |
| ( क ) | २२५ | ७५० |
| ( ड ) | २०० | ७०० |
| ( ई ) | २०० | ५०० |

मुख्य दिवाणाचा पगार ३००० रुपये असावा. दुय्यम दिवाणांचा पगार २५०० रुपये ठेवावा व कायदेमंडळाच्या अध्यक्षाचा पगार २००० रुपये असावा.

### सबॉर्डिनेट सर्व्हिसेस

सिलेक्शन ग्रेड्स काढून टाकाव्या. २० रुपयांच्या खालच्या नोकरांचे पगार कमी करण्यांत येऊं नयेत ४९ रुपयांचें आंतील पगारावर ५ टक्के, ५० ते ९९ रु पर्यंत ७॥ टक्के, १०० ते २४९ पर्यंत १० टक्के व २५० वरील पगारांत १५ टक्के कपात सुचविण्यांत आली आहे. तसेंच कॉन्स्टेबलचे पगारांत ३६ रुपयांपर्यंत १ रुपया व त्यावरील पगारांत २ रुपये कपात करावी अशी शिफारस कमिटीने केली आहे.

### ऑल इंडिया सर्व्हिसेस

आय. सी. एस. व इंडियन पोलिस सर्व्हिस खेरीजकरून हळू हळू ऑ. इ. सर्व्हिसमधील जागा लायख प्रांतिक अधिकाऱ्यांकरवींच भरल्या जाणार आहेत. सध्या इंग्लंडमध्ये तज्ज्ञ म्हणून जी नोकर—भरती होते ती बंद करून त्या जागीं हिंदी लोकांची नेमणूक करावी व त्या नोकरांनाहि प्रॉ. स. प्रमाणेच योग्य तो पगार द्यावा. प्रेस, फॅक्टरी व बॉयलर्स खात्यांतहि हिंदी लोक अधिकाराचे जागीं नेमावे व त्यांना अनुभवाकरिता इंग्लंडांत पाठवावें. जर हल्लींच्या अधिकारी नोकर वर्गाचे जागीं नवीन पगाराच्या स्केलप्रमाणें नोकर वर्गाची निवडणूक झाली तर पगारांत ५७ लाख रुपये बचत होईल. याशिवाय पेन्शनमध्ये कायमची ८½ लाख रु. बचत होईल. आय. सी. एस्. व इं. पोलीस सर्व्हिस यांच्या जागा जर अशाच रीतीने भरल्या तर १८ लक्ष रुपयांची बचत होऊं शकेल. कमिटीने हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाचा पगार ३००० रु. व इतर न्यायाधीशांना २००० रु. पगार असावा अशी सूचना केली आहे!

### सरकारी नोकरांचे भत्ते

जादा पगार व भत्ते वरिष्ठ नोकरांना देण्यांत येतात तरी कामाची विल्हेवारी लक्षांत घेता ही पद्धति अमलांत ठेवणें योग्य नाही. याबाबत

गव्हर्मेंट सेक्रेटरी, श्रॉफ, कॅशियर्स व कॉलेजचे प्रिन्सिपाल यांना कमिटीने वगळलें आहे. गव्हर्नरच्या सेक्रेटरींना टाइम स्केलपेक्षां २५० रु. जास्त भत्ता मिळावा, अधिक मिळूं नये. पुण्यांतील कॉंपेन्सेटरी अलावन्स बंद व्हावा. तसेंच मुंबई, महाबळेश्वर, कराची व साष्टी यांखेरीज इतर ठिकाणीं घरभाडें अगर अलावन्स देऊं नये. नेहमी मोटार वापरणारांनाच दर मैलीं ५ आणे भत्ता यावा. व इतर अधिकाऱ्यांनी मैलीं २ आणे, व शिपाई वर्गाला १ आणा यावा. मोटारगाडीला १०० रुपये भत्ता व मोटार सायकल व सायकल याकरितां २५ व ३ रु. भत्ता यावा. घरभाडयाकरितां म्हणून १० टक्के कपात सरकारी बंगल्यांत राहणाऱ्या अधिकाऱ्यांचे पगारांत करावी.

## रजेचे नियम

किरकोळ रजा वर्षातून १० दिवस, हक्काची रजा १ महिना, पण ती दोन महिन्यांपेक्षा जास्त साठवूं नये. स्थानिक व जातवार सुटया बंद कराव्या. हायकोर्टाला ६ आठवडे व कोर्टांना चार आठवडे सुटी असावी.

## कायदे-मंडळ

कौन्सिलच्या सभासदाना जाण्यायेण्याच्या खर्चाबद्दल सिंगल फर्स्ट क्लास भाडे यावें. दीडपट देऊं नये. अध्यक्षाचा व दिवाणांचा पगार कमी व्हावा, उपाध्याक्ष बिनपगारी असावी. आमदारानें एका बैठकींत जास्तींत जास्त प्रश्न किती विचारावे याला कांही तरी मर्यादा घालण्यांत यावी.

## शिक्षण

स्थानिक स्वराज्य संस्था म्हणजे जि. लो. बोर्डें वगैरे यांना देण्यांत येणाऱ्या रकमेचा योग्य विनियोग योग्य होतो कीं नाही याची दक्षतापूर्वक तपासणी होणें जरूर आहे व आहे ती व्यवस्था सुधारली पाहिजे. प्राथमिक शिक्षणाचे बाबतींत गुणांपेक्षा संख्येकडे जास्त लक्ष दिलें जातें, तसें होऊं नये. ट्रेण्ड शिक्षकांना अन्ट्रेण्डपेक्षा जास्त पगार यावा लागतो. अर्ध्यापेक्षां जास्त शिक्षक ट्रेण्ड असूं शकत नाहीत. तरी यापुढे ट्रेण्ड शिक्षकांच्या जागा ठराविक असाव्या व त्या निवड करून नेमणुकीने भराव्या. प्राथमिक शिक्षकांचे पगारात कमिटीने सरसकट कपात सुचविली आहे या बाबतींत सरकारने पक्का विचार केलेला नाही, पण कमिटीने खालीलपगाराचें प्रमाण सुचविलें आहे.

### जिल्हालोकलबोर्डें

| | सध्याचे प्रमाण रु. | नवें प्रमाण रु. |
|---|---|---|
| अनक्वालिफाईड | १५ | १५ |
| क्वालिफाईड | २०–१/३–२५–१/२–३० | २० |
| १ लें वर्ष ट्रेण्ड | २५–१/२–३५–१–४० | २०–१/३–२५–१/२–३० |
| २ रें वर्ष ट्रेण्ड | ३०–१/२–३५–१–५० | २५–१/२–३५–१–४० |
| ३ रें वर्ष ट्रेण्ड | ३५–१–६० | ३०–१/२–३५–१–५० |

### म्युनिसिपालिट्या

| | सध्याचे प्रमाण रु. | नवे प्रमाण रु. |
|---|---|---|
| अनक्वालिफाईड | २० | २० |
| क्वालिफाईड | २५–१/५–३० | २५ |
| १ लें वर्ष ट्रेण्ड | ३०–१/३–३५–१/२–४० | २५–१/५–३० |
| २ रें वर्ष ट्रेण्ड | ३५–१/२–४५–१–५० | ३०–१/३–३५–१/२–४० |
| ३ रें वर्ष ट्रेण्ड | ४०–२/३–५०–१–६० | ३५–१/२–४५–१–५० |

हें वरील पगाराचें प्रमाण अमलांत आलें व अधिक ट्रेण्ड शिक्षकांना पगार यावा न लागला तर प्राथमिक शिक्षकांचे पगाराबद्दल होणाऱ्या खर्चातच २८ लाखांची बचत होईल! आणि त्या बचतीचा २/३ वांटा स्थानिक संस्थांना व १/३ सरकारला मिळेल. पण हा बचत खर्चात न करता प्राथमिक शिक्षण सुधारण्याकडे व्हावी अशी शिफारस कमिटीने केली आहे.

## सरकारी दुय्यम शिक्षणसंस्था

दुय्यम शिक्षणाच्या सरकारी शाळा 'खासगी' शिक्षणसंस्थांकडे चालविण्याकरिता देण्यांत याव्या. व एका ठराविक मुदतीनंतर खाजगी शिक्षणसंस्थेने ती सरकारी शाळा चालविण्यास घेतली नाही तर ती बंद करण्यांत येईल असें जाहीर करावें. खाजगी संस्थांनी चालविलेल्या शाळा चांगल्या रीतीने चालल्या आहेत.

तरी आता नमुनेदार शिक्षणसंस्था म्हणून जिल्हानिहाय सरकारी शाळा चालविण्याची जरूरी नाही. सरकारी शाळा बंद करण्याचें धोरण सरकारानें जाहीर केलें तर खाजगी शिक्षण संस्था त्या चालविण्यास पुढे येतील. त्याप्रमाणें सर्व अँग्लोव्हर्नाक्युलर शाळा बंद करण्याचें धोरण सरकारानें जाहीर करावें. या सुधारणा अमलांत आणल्या तर ५½ लक्षांची बचत होईल. यापैकीं बऱ्याच रकमेचा विनियोग ज्या शाळांना सध्या ग्रँट मिळत नाही अशा शाळांना ग्रँट देण्याकडे करण्यांत यावा.

### धंदे–शिक्षण

धंदेशिक्षणाच्या शाळांना वरील नियम लागू नाही. खासगी संस्थांनीं अशा शाळा काढण्याकरिता त्यांना उत्तेजन द्यावें व सरकारानें हातीं शिल्लक असलेला पैसा धंदे-शिक्षणावरच खर्च करावा.

### सरकारी कॉलेजें

सरकारी आर्ट्स कॉलेजें हळूहळू बंद करण्याचें धोरण सरकारानें जाहीर करावें. सरकारी कॉलेजांत विद्यार्थ्यामागे सालीना रु. १२० खर्च येतो व बिन-सरकारी कॉलेजांत रु. ३२ खर्च येतो ! कमिटीची शिफारस अशी कीं, कॉलेजांतील शिक्षण कशा प्रकारचें असावें हें लोकांनीच ठरवावें. प्रत्येक कॉलेज केव्हा बंद करावयाचें तें सरकारने स्थानिक परिस्थितीचा विचार करून ठरवावें. धारवाड येथील कर्नाटक कॉलेज व अहमदाबादचें गुजराथ कॉलेज चालविण्यास खाजगी संस्था पुढे येतील. एल्फिन्स्टन कॉलेजाइतकी विशिष्ट परंपरा या दुसऱ्या कॉलेजांना नाही हें खरें.तथापि इस्लामिया कॉलेज व एल्फिन्स्टन कॉलेज यांकरिता मिळालेल्या देणग्यांचा प्रश्न कॉलेज बंद करण्याचे आड येऊं शकणार नाही.

### डेक्कन कॉलेज

हें सरदार व संस्थानिक यांच्या मुलांचे शिक्षणाच्या सोयीकरिता उपयुक्त आहे व तें ठेवावें असें वाटत असेल तर त्याचा खर्च सरदार व संस्थानिक यांनीच द्यावा. सरकारानें योग्य प्रमाणांत फी वाढवावी व ठराविक किमान संख्येखालीं विद्यार्थ्यांची संख्या गेल्यास पांच वर्षांत तें कॉलेज बंद करण्यांत येईल असें जाहीर करावें.

### धंदेविषयक कॉलेज

कमिटीचें मत असें कीं, मेडिकल, ॲग्रिकल्चरल, व्हेटरिनरी, इंजीनिअरींग कॉलेज स्वतंत्रपणें प्रांतानिहाय चालविण्याची पद्धत निरर्थक खर्चाची आहे. इंजीनिअर्स व व्हेटरिनरी सर्जन्स यांची संख्या वाजवीपेक्षा अधिक झपाट्यानें वाढत आहे. फेडरल गव्हर्मेंटनें हा प्रश्न हातीं घेऊन कोणत्या ठिकाणीं कोणतें कॉलेज असावें हें ठरवावें. सध्या मुंबई सरकार सात कॉलेजें चालवितें. तीं अशीं.

(१) लॉ कॉलेज, मुंबई. (२) ग्रँन्ट मेडिकल कॉलेज, मुंबई (३) सिडेनहॅम कॉलेज, मुंबई (४) व्हेटरिनरी कॉलेज, मुंबई (५) स्कूल ऑफ आर्ट्स, मुंबई (६) इंजिनीअरिंग कॉलेज, पुणें व (७) ॲग्रिकल्चरल कॉलेज, पुणें.

ॲग्रिकल्चरल व व्हेटरिनरी कॉलेज चालविण्यापेक्षां कोइंबतूर व मद्रास येथील कॉलेजांत शिक्षण घेण्याकरितां इकडील विद्यार्थ्यांना पाठविल्यास खर्चांत बचत होईल. लॉ कॉलेज फीच्या उत्पन्नाच्या दृष्टीनें फायदेशीर म्हणून चालवावें !

### सिडेनहॅम कॉलेज

सिडेनहॅम कॉलेजाची उपयुक्तता आहे असें वाटत नाही, तर मग रयतेनें त्या कॉलेजचा खर्च कां सोसावा ? या कॉलेजाला १ लक्ष २७ हजार रु. खर्च येतो. पण फीचें व देणग्यांचें उत्पन्न अवघें ८५ हजार रुपये आहे. म्हणजे तूट ४२ हजार रुपये येते. आणि हें कॉलेज चालवावयाचें ठरलें तर ही फी वाढवूनच ती तूट भरून काढली पाहिजे. अर्थात् हल्लीची सहामाहीची फी १०० रुपये आहे ती १५० रु. पर्यंत वाढवावी लागेल. यामुळे ८ हजारांनी तूट कमी येईल. पण बाकीची तूट पगारांत कपात करून व आय. इ. एस. च्या जागा कमी करूनच भरून काढली पाहिजे. ही बचत होत नसेल तर कॉलेज बंद करणेंच योग्य होईल.

### ग्रँट मेडिकल कॉलेज

या कॉलेजची जरूरी नाही असें नाही. कॉलेजावर सुमारें चार लाख ( पगार--पेन्शन ) रुपये खर्च येतो. व त्यापैकीं फीचें उत्पन्न फक्त १ लाख ३० हजार रुपये येतें. यामुळे २ लाख ७९ हजार रु. सरकारी तिजोरींतून नगदी खर्च होतात. या कॉलेजांत पर प्रांतांतील व संस्थानांतील ३०० विद्यार्थी शिक्षण घेतात. तर त्यांनी त्याबद्दल जादा फी देणें योग्य होईल. याकरिता बाहेरच्या विद्यार्थ्यांनीं सालिना २३० रु. ऐवजीं ३५० रु. फी द्यावी. अधिकाऱ्यांचे पगारांत कपात झाली, कीं, कांही खर्चांत बचत होऊं शकेल.

## थॉमस कमिटीची काटकसर

थॉमस कमिटीनें खालीलप्रमाणे प्रत्येक खात्यांत कपात सुचविली आहे.

| | रु. |
|---|---|
| कायदे मंडळ | ४०,००० |
| मुख्य कचेरी ( सेक्रेटॅरिएट ) | ५,००,००० |
| पगार व पेन्शन | ५७,००,००० |
| जादा पगार | ३,५०,००० |
| भत्ता | १०,५०,००० |
| घरभाडें, भत्ता | २,००,००० |
| शेतकी | ७१,००० |

| | |
|---|---|
| सोसायट्यांचे हिशेब तपासणीची फी | ७०,००० |
| सहकारी खातें | ७७,५०० |
| शिक्षण | २३,४०,००० |
| आबकारी खातें | ६०,००० |
| जंगल खातें | १,१०,००० |
| औद्योगिक खातें | ७०,००० |
| न्याय खातें | ५,४५,००० |
| जमीनमहसूल व सर्वसामान्य राज्यव्यवस्था | ७,४०,००० |
| पोलिसखातें | २,६६,००० |
| स्टेशनरी छपाई | ५०,००० |
| आरोग्यखातें | ३६,००० |
| पब्लिक वर्क्स | ६,४४,००० |
| स्टँप्स | १५,००० |
| व्हेटेरिनरी | ४०,००० |
| फिनॅन्स खातें | २,००,००० |
| किरकोळ ,, | २६,५०० |
| स्थानिक स्वराज्य | ३८,००,००० |
| किरकोळ | ४,९०,००० |
| | १,७४,९१,००० |

याशिवाय मेडिकल एक्साइस डिपार्टमेंट व इतर खात्यांतील किरकोळ काटकसर लक्षांत घेतां एकंदर १७९ लाखांची बचत कमिटीने सुचविली आहे. व १९ लाख रुपयांची उत्पन्नांत वाढ सुचविली आहे. ही वाढ साधारणपणें रजिस्ट्रेशन, करमणुकीवरील कर व स्टँप्स या बाबत ११½ लाखांची होणार आहे.

### व्हेटरीनरी कॉलेज

या कॉलेजावर १९३०-३१ सालीं १०६ हजार रु. खर्च झाला व फीचें उत्पन्न फक्त ८ हजार रु. आलें. चालू सालीं खर्च ७२ हजार रु. व उत्पन्न ११ हजार येईल असा अंदाज आहे. मुं. सरकाराला ६-७ व्हेटरिनरी डॉक्टर्स दरवर्षी लागतात. या दृष्टीने दर विद्यार्थ्यामागे ९०० रु. सालिना खर्चणें आर्थिक दृष्ट्या अव्यवहार्य आहे.

याकरिता सरकाराने दरवर्षी ७ विद्यार्थी मद्रासच्या व्हेटरनरी कॉलेजांत पाठवावे त्यांना फीचा खर्च८०००रु. येईल. त्यांस शिष्यवृत्त्या देण्याचें ठरविलें तर १४००० रु. खर्च येईल. व्हेटरनरी लॅबोरेटरी पुण्याला आणावी. तिचा खर्च १६ हजार रु. येईल. कमिटीची ही योजना अमलांत आणली तर ३१ हजार रु. बचत होईल.

### ॲग्रिकल्चर कॉलेज

शेतकीचें संशोधन होणें जरूर आहे. पण आज विचार करावयाचा तो शेतकी शिक्षण—संस्था या दृष्टीने. या कॉलेजावर १ लाख ९३ हजार रुपये खर्च होतो. व संशोधनसंस्थाच चालू ठेवली तर हा खर्च ६१ हजार रुपयेच राहील. शिक्षणाकरितां असा १ लाख ३२ हजार रु. खर्च होतो व त्यापैकीं २६ हजार रु. फीचें उत्पन्न येतें ! मुलांची फी वाढवली तर ५ हजार रु. जमा होतील. तरीदेखील १ लाख रुपयांची तूट तिजोरींतून भरून काढावी लागेल. या कॉलेजांतून बाहेर पडलेल्या पदवीधरांची उपयुक्तता शेतकी-सुधारणेच्या दृष्टीने अगदी निराशाजनक आहे. प्रत्येक विद्यार्थ्यामागे दरवर्षी २५०० रु. रयतेच्या पैशांतून खर्च होतात आणि असे ४० पदवीधर शिक्षण घेऊन बाहेर पडतात. त्यांचा उपयोग रयतेला कांहीच नाही. सिंधमधील विद्यार्थ्यांना लियालपूर कॉलेजांतील शिक्षणाचाच विशेष उपयोग होतो. सरकारी नोकरीकरिता फक्त तीनच विद्यार्थी पदवी घेऊन बाहेर पडले तरी चालतील व १२०० रु. फी घेऊन कोईमतूरच्या कॉलेजांत परप्रांतांतील विद्यार्थी घेण्यास मद्रास-सरकार तयार आहे. ही योजना मान्य केली तर सालिना ११ हजार रुपये खर्च येईल, फार तर शिष्यवृत्त्यांसकट १६ हजार रुपये म्हणजे संशोधनसंस्थाच कायम ठेवली व कॉलेज बंद केलें तर एकूण बचत ९० हजारांची होऊं शकेल.

### इंजिनिअरिंग कॉलेज

मेडिकल कॉलेजप्रमाणें याहि कॉलेजाची आवश्यकता व उपयुक्तता आहे. सरकारी नोकरीकरितां दरवर्षी ९ पदवीधरच बाहेर पडले म्हणजे झालें. पण लोकल बोर्डें, म्युनिसिपालिटया, रेल्वे व खासगी संस्था यांना इंजिनिअरांची जरूर लागणारच. ५० पदवीधर बाहेर पडतात. इतक्यांना बाजारांत मागणी नाही. पण फेडरल गव्हर्नमेंटने कॉलेज काढलें नाहीं तोंपर्यंत अशा संस्थेची जरूरी आहेच. सध्या कॉलेजावर ३ लाख ६ हजार रु. खर्च होतो. त्यांपैकीं फीचें उत्पन्न अवघें ३७ हजार रुपये. वैद्यकी शिकणारा विद्यार्थी ५ वर्षांत ११५६ रु. फी भरतो. ह्या मानाने इंजिनियरिंगचे विद्यार्थ्याला ३ वर्षांत ६०० रु. फी ही फार कमी आहे. सबब दरवर्षी ४०० रु. फी करण्यांत यावी. बाहेरच्या विद्यार्थ्यांना ६०० रुपये फी दरवर्षी ठेवण्यास हरकत नाही ! प्रत्येक विद्यार्थ्यामागे सरकारी खर्च ४७५० रु. होतो.

### स्कूल ऑफ आर्ट

कमिटीने या संस्थेचा विचार करतांना सरकार नादार होत चाललें आहे तेव्हा काय करावें हीच दृष्टि ठेवली ! हिंदुस्थानांत अशी ही एकच संस्था आहे हें खरें. पण हिंदी चित्रकला राखण्याकरितां अशा संस्थेचीच जरूरी आहे असें नाही. संस्थेसाठी १॥ लाख

रु. खर्च होतो. फीचें उत्पन्न २१३४९ रु. येतें. हिंदुस्थान सरकारने ही संस्था आपल्या ताब्यांत घेऊन ती चालवली तर ठीकच. नाही तर मुंबई सरकाराला ही संस्था खर्चाच्या दृष्टीने बंद करणेंच भाग आहे. या संस्थेची जागा व इमारती विकल्या तर भली मोठी किंमत येईल. सुगीच्या दिवसांत जागेची किंमत सहज ५० लाख रु. येते. पण हल्लीच्या हलाखीच्या दिवसांत कॉलेजाच्या इमारतींचे १८॥ लाख रु. येतील. पण आमची सूचना अशी कीं, या जागेंतील ५ एकर जमीन युरोपियन हॉस्पिटल-करितां राखून ठेवावी व बाकीची जागा व्यापारी भावाने विकून टाकावी. ही संस्था बंद केली तर १ लाख ५६ हजार रु. वांचतील इतकेंच नव्हे, तर ती जागा विकून सुमारें ९ लाख रु. हातीं येतील व त्या वरील व्याजाचें उत्पन्न ४५००० रुपये येईल.

एकंदर शिक्षण खात्यांत कमिटीच्या शिफारशी अमलांत आणल्यास २३ लक्ष ४० हजार रुपयांची बचत होऊं शकेल. ती अशी—

| | | |
|---|---|---|
| व्यवस्था ( ॲडमिनिस्ट्रेशन ) | ८,००० | रुपये |
| प्राथमिक शिक्षण | १५,००,००० | ,, |
| दुय्यम शिक्षण | ३,००,००० | ,, |
| आर्टस कॉलेजें | १,००,००० | ,, |
| धंदे-शिक्षण कॉलेजें | ४,३२,००० | ,, |
| | २३,४०,००० | |

## स्थानिक स्वराज्य

जिल्हा लोकल बोर्डे सरकारपासून आर्थिक मदतीची अपेक्षा फार करतात. १९३०–३१ सालचा रिपोर्ट लक्षांत घेतां रु. २,३२,७१,८२६ उत्पन्नापैकीं रु. ४७,७५,१४१ लोकल फंड सेस जमा झाले. बाकीच्या १ कोटि ८४ लक्ष रकमेपैकीं रु. १ कोटि २३ लक्ष सरकारनेच निरनिराळ्या देणग्यांच्या रूपाने लोकल बोर्डांना दिले. हें प्रमाण शेंकडा ६७ टक्के पडतें. म्हणजे लोकल बोर्डांचें उत्पन्न फक्त रु. ६१,०२,००२ आहे. याकरितां प्रत्येक जिल्हा बोर्डाने रुपयाला २ आणे पावेतों लोकल फंड सेस वाढवावा म्हणजे हें उत्पन्न ६८½ लाख रुपये येईल व तशा प्रकारचा सरसकट कायदाच करण्यांत यावा.

कमिटीने धंद्यावर ( Profession ) कर बसवावा अशी सूचना केली आहे. भडोच जिल्ह्याची पाहणी सरकारने या दृष्टीने केली होती. तीच पाहाणी लक्षांत घेऊन अशा प्रकारचा कर बसवल्यास इलाख्यांतील जिल्हाबोर्डांचें उत्पन्न ४ लाखांनी वाढेल असा अंदाज कमिटीने केला आहे. याबाबत स्वतंत्र कायदाच करावा अशी सूचना कमिटीने केली आहे. पण होतां होईतों प्रत्येक जिल्हा बोर्डाने आपण होऊनच कर बसवून घ्यावा अशी शिफारस कमिटीने केली आहे.

दस्तुरीचे उत्पन्नांत जिल्हानिहाय फारच फरक दिसून येतो. दस्तुरीचें ठाणें जिल्ह्यांतील उत्पन्न १ लाखावर आहे. तर इतर १० जिल्ह्यांतील टोलचें उत्पन्नांत २१ ते ५४ हजारांइतका फरक दिसतो. ७ जिल्ह्यांत तर ४½ ते १७ हजार इतकेंच उत्पन्न येतें. व दोन जिल्ह्यांत तर टोलच नाही! तरी कलेक्टर, एक्झिक्यूटिव्ह इंजिनीअर व लोकल बोर्ड अध्यक्ष अगर लो. बो. ऑफिसर यांनी एकत्र जमून टोल नाकीं कोठे कोठे उघडतां येतील तें ठरवावें, व किती उत्पन्न येईल याचा अंदाज करावा. व सरकाराने ह्या अंदाजानुसार आपली ग्रँट कमी करावी. सिंधखेरीज इतर इलाख्यांत टोलचें उत्पन्न २ लाख व सिंधप्रांतांत १ लाख वाढेल असा अंदाज कमिटीने केला आहे. तसेंच वरील ३ प्रकारच्या करांनी जि. बोर्डांचें उत्पन्न २८ लाखांनी वाढेल असा कमिटीचा अंदाज आहे.

तसेंच कमिटीने मुंबई कॉर्पोरेशन, ठाणें व मुंबई सबरबन लो.बोर्ड यांना दस्तुरीचीं नाकीं बंद करण्याबद्दल देण्यांत येणारी ग्रँट बंद करावी! दर माणशीं म्युनिसिपल कराचें प्रमाण ५ रु. ४ आ. ४ पै पडतें. हें प्रमाण फारच कमी आहे. सिंध प्रांतांत २० म्युनिसिपालिटयांपैकीं फक्त ४ म्युनिसिपालिट्याच घरावर कर बसवतात! अहमदाबाद म्युनिसिपल हद्दींत माणशीं कर रु. ११८९८१ बसतो. सिंध प्रांतांतील म्युनिसिपालिट्यांना कराचें उत्पन्न सहज वाढवतां येण्यासारखें आहे. अहमदाबाद, कराची यांसारखीं मोठीं शहरें सोडलीं तर इतर म्युनिसिपालिट्यांचें उत्पन्न १ कोटी आहे. आणि या उत्पन्नांत शेंकडा दहा टक्के म्हणजे १० लाख रुपयांची वाढ होणें कठिण नाही तरी सरकारने कायदा करून दहा लाखांनी कर वाढविण्यास भाग पाडावें व आपला बोजा कमी करावा.

लोकल बोर्डांनी आपल्या अधिकाऱ्यांना, नोकर नेमणें व शिस्त मोडल्याबद्दल शासन करणें अशा प्रकारचे हक्क दिले पाहिजेत असा कायदा करण्यांत यावा.

## पब्लिक वर्क्स

या खात्यांत ६½ लाख रुपयांची बचत कमिटीने सुचविली आहे. तसेंच बोर्ड ऑफ वर्क्संची योजना केली आहे. कन्सल्टिंग आर्किटेक्ट डिपार्टमेंट रद्द करण्याबद्दल शिफारस केली असून इलेक्ट्रिकल शाखेचें काम फक्त तपासणीचें असावें व सॅनिटरी शाखेचें काम फक्त सल्ला देण्याचें रहावें. गुजराथेंतील रस्ते व इमारती खात्यांत कांही जागा

कमी कराव्या व डेक्कनमधील दोन इरिगेशन डिव्हि-जन्स बंद कराव्या. असिस्टंट इंजिनियर व सुपरिंटेंडिंग इंजिनिअरांच्या जागा कमी करण्यांत याव्या. स्थानिक स्वराज्य संस्थांना धरणें, तलाव यांच्या बाबतींत आरोग्याच्या दृष्टीने सल्ला देण्याकरितां एक एक्झिक्युटिव्ह इंजिनीअर नेमला म्हणजे झालें. ६ सॅनिटरी डिव्हिजन व सुप-रिंटेंडिंग इंजिनीअर यांची बचत होऊं शकेल.

लोकल बोर्डाप्रमाणें प्रांतिक सरकारानेहि आपल्या हद्दींतील रस्त्यांवर दस्तुरीचीं नाकीं अधिक वाढवावीं व दस्तुरीचें उत्पन्न वाढवावें. सरकारी इमारतींची रचना व बांधकाम अधिक मजबूत करण्याकडे प्रवृत्ति आहे ती कमी झाली तर बरी. जरूर तेथेच बांधकाम मजबूत व घट्ट व्हावें. लोकल बोर्डाकडे इंजीनिअरिंग खात्याचें काम द्यावें. या सूचनेसंबंधाने कमिटीचें मत असें कीं, रस्ते व सरकारी इमारती यांचें सर्वच काम द्यावें पण सगळ्याच सरकारी इमारतींचें काम बोर्डाकडे देतां येणार नाहीं. मुंबई, पुणें येथील इमारतींची पाहणी करण्याकरिता नोकर-वर्ग नेमावाच लागेल व इतर ठिकाणच्या इमारतीवर सरकारी अधिकाऱ्यांची देखरेख व तपासणी ठेवणें जरूरीचें आहे. बोर्डाकडे इंजिनिअरिंगचें काम देण्यापूर्वी बोर्डाने तज्ज्ञ इंजिनि-अराची नेमणूक केली असली पाहिजे व त्याचे हाताखाली अनुभविक व तरबेज नोकरवर्ग असला पाहिजे. अशा प्रकारचा प्रयोग एका जिल्ह्यांत (ठाणें) करून पहावा. व त्यानंतर धिमेधिमे या बाबतींतलें धोरण सरकारने ठरवावें.

दस्तुरी न विजेच्या तपासणीचें उत्पन्न १½ लाखांनी वाढवतां येईल व खर्च–खात्यांत ६ लाख ४४ हजा-रांची बचत खालीलप्रमाणे करतां येईल अशी शिफारस कमिटीने केली आहे—

| | |
|---|---|
| वरिष्ठ नोकरवर्ग व इलाख्याची कचेरी | २,८०,००० रु. |
| निरनिराळ्या मुख्य कचेऱ्यांचें एकीकरण | ५०,००० रु. |
| दोन सब–डिव्हिजन कमी | १५,००० रु. |
| ४ असिस्टंट इंजि. जागा कमी | २२,००० रु. |
| कन्सल्टिंग आर्किटेक्ट डिपार्टमेंट बंद करणें | ४६,००० रु. |
| इलेक्ट्रिकल इंजिनियरिंग शाखा | १,३१,००० रु. |
| पब्लिक हेल्थ ,, ,, | १००,००० रु. |
| | ६,४४,००० |

### उद्योगधंदे खातें

मुंबईसारख्या औद्योगिक महत्त्वाच्या प्रांताला उद्योगधंद्याकडे लक्ष चांगलेच दिलें पाहिजे आणि त्यादृष्टीने या खात्यावर भरपूर पैसा खर्च झाला पाहिजे. हल्लीच्या सारख्या तुटपुंज्या विदागीवर चालणारें खातें असलें काय व नसलें काय सारखेंच तेव्हा तें बंद करावें. हें बंद केल्यास ७०,००० रुपयांची बचत होईल. कमिटीची शिफारस अशी कीं पुरेसा पैसा व साधनें उपलब्ध करावीं व मगच उद्योगधंद्याचें खातें चालवावें.

### वैद्यक व आरोग्य खातें

हीं दोन खातीं वेगळीं ठेवणेंच इष्ट, मात्र या दोन खात्यांचा संबंध व विचारविनिमय अधिक सलगीचा असावा. सर्जन जनरलचें पुष्कळसें काम दुसऱ्या अधिकाऱ्यांना करतां येण्यासारखें आहे. या दोन खात्यांवर मिळून डायरेक्टर व मेडिकल सर्व्हिसेस म्हणून एका अधिकाऱ्याची नेमणूक करावी. व पब्लिक हेल्थ खात्याची माहिती असलेला एक निजबत अधिकारी त्याचे मदतीस असावा. सिंध प्रांत वेगळा झाला तर दोन खातीं वेगळीं ठेवण्याचें कारण नाहीं. मात्र दोन खात्यांचा एक्झिक्यूटिव्ह स्टाफ वेगळाच राहील.

जिल्हानिहाय मेडिकल बोर्डें कायद्याने स्थापण्यां-त यावीं व त्या त्या जिल्ह्यांतील दवाखान्यांची व्यवस्था त्या बोर्डाकडे ठेवावी. कलेक्टर हा मे. बोर्डाचा अध्यक्ष असावा व सिव्हिल सर्जन एक्झि-क्युटिव्ह ऑफिसर राहील. प्रथम सिव्हिल हॉस्पिट-लांची व्यवस्था या बोर्डानें कक्षेंत घेऊं नये. हळूहळू त्यांत फरक व्हावा. आय. एम. एस व आय. एम. डी ऑफिसर्स लष्कराच्या सुखसोयींकरितां नेमणें भाग पडतें म्हणून या अधिकाऱ्याकरितां जो जादा खर्च येतो तो हिंदुस्थान सरकाराने द्यावा. माथेरान, महाबळेश्वर येथील सि. सर्जनांच्या जागीं आय. एम. एस. अधिकारी नेमण्याची पद्धति बंद करावी.

मुंबई शहरांत ११ वैद्यक संस्था सरकार चालवतें व सुमारें १० लाख इस्पितळें, व वैद्यक संस्था चालविण्याकरितां दर वर्षी सरकार खर्चतें. मुंबई कॉर्पोरेशनने या व्यवस्थेबद्दल सुमारें ४ लक्ष १४ हजार रुपये द्यावयाचे असा करार २५ वर्षांपूर्वी झाला असला तरी, यापुढे मु. कार्पोरेशननेच ही जबाबदारी आपल्या अंगावर घेतली पाहिजे. सेंट जॉर्ज हॉस्पिटल हें युरोपियनांकरितांच बांधलं,त्यांत २२० रोग्यांची सोय आहे. पण ११० रोगीहि हॉस्पिटलमध्यें नसतात. व अर्धे अधिक युरोपियनहि नसतात. तरी तें हॉस्पिटल बंद करावें व १०० रोग्यांची सोय होईल असें नवीन हॉस्पिटल स्कूल ऑफ आर्टचे जागेंत बांधण्यांत यावें.

### रेव्हिन्यू खातें

खेड्यांतील तलाठ्यापासून तों खुद्द सरकारा-पर्यंतच्या सांखळींतील कांहीं दुवे कमी करावे. व

जितका निकटचा संबंध जोडता येईल तितका जोडावा. याकरिता प्रांत ऑफिसर्स व सर्कल इन्स्पेक्टरांच्या जागा कमी कराव्या. इलाख्यांतील कमिशनरांची मजलस सरकार भरवते व आपलें धोरण ठरवते. पण ही पद्धति बरोबर नाही. पुणे येथे राज्ययंत्राच्या मुख्य कचेरीच्या जागी रेव्हेन्यू बोर्ड स्थापन करण्यांत यावें. या बोर्डावर २ कमिशनर १ एक्साइज कमिशनर, व रेव्हेन्यू खात्यांतील एक वरिष्ठ अधिकारी चिटणीस म्हणून अशा नेमणुकी करण्यांत याव्या. सर्व सभासदांचा दर्जा सारखाच असावा. सिनियर कमिशनर अध्यक्ष असावा. तथापि एक्साइज कमिशनर असूं नये. दोन जिल्हे मिळून एक जिल्हा करण्याची योजना युक्त नाही. डेप्युटी कलेक्टर, प्रांत ऑफिसर या जागा कमी केल्या कीं, ही जरूरी भासणारहि नाहीं. प्रांत ऑफिसर व पर्सनल असिस्टंट यांच्या जागा ६१ आहेत. तरी त्या ३४ पर्यंत कमी करतां येतील व अशा रीतीने खर्चात २ लाख ३५ ह. रुपयांची बचत सालीना होऊं शकेल. जिल्ह्याचा सर्व कारभार कलेक्टराच्या हातीं ठेवावा.

सरकार ज्या खासगी इस्टेटी पाहते त्यावरील पाहणी—आकारफी वाढवावी. १० हजार रुपयेपर्यंतच्या उत्पन्नांवर शेकडा ५ टक्के व त्यावरील उत्पन्नावर २½ आकारणी करण्यात यावी. बॉबे सिटीसर्व्हेकरिता येणारा खर्च मुंबईच्या म्युनिसिपालिटीने करावा. टोबॅक ॲक्टाच्या अम्मलबजावणीबाबत, मुंबईच्या म्युनिसिपालिटीने व इं. ट्रस्टने खर्च भरून द्यावा. कमिटीने खर्चांत बचत करण्याच्या सूचना खालीलप्रमाणे केल्या आहेतः—

| | |
|---|---|
| १ एक कमिशनर व त्याची कचेरी | १,००,००० |
| २ १९ प्रांत ऑफिसर्स (यांतून ६ स्थायिक मॅजिस्ट्रेटांना लागणारा खर्च वजा जाता) | १,४४,००० |
| ३ सर्कल इन्स्पेक्टर्स | ४,००,००० |
| ४ सुपरव्हाइझिंग टपेदार | ५०,००० |
| ५ सिंध कमिशनरच्या असिस्टंटची एक जागा कमी | १०,००० |
| ६ २ सुपरिंटेडेंट लँडरेकॉर्डस् | २४,००० |
| ७ जेहलम बोट कमी करणे | १२,००० |
| एकूण | ७,४०,००० |

## पोलिसखातें

पोलिसखात्यांतील खर्चांत शक्य ती बचत करण्यांत आलीच आहे. पण अमुक एक जागा अमक्या ठिकाणच्या कमी कराव्या असें हमखास बोट ठेवून सांगतां येत नाही. पण हल्लीच्या व्यवस्थेंत फेरफार करता येण्यासारखे आहेत. आमची शिफारस अशी कीं, पायथ्यापासून शिखरावर येऊन पोचण्याला जरूरीपेक्षा अधिक टप्पे करण्यास लागू नये. या दृष्टीने आमची शिफारस अशीं पोलिस बोर्ड स्थापन करण्यांत यावें. या बोर्डावर इन्स्पेक्टर—जनरल व ३ डेप्युटी इ. ज. (या तिघांमध्यें क्रिमिनल इन्व्हेस्टिगेशन खात्याचा डे. इ. ज. असावा) असावे. वरिष्ठ अधिकाऱ्यांत कपात होईल असे दिसत नाही. पण कारकून नोकर या वर्गांत कांही कमी जागा करतां येतील. सिंध प्रांतांतील व्यवस्था हल्ली आहे तीच ठीक आहे. पोलीस सुपरिंटेंडंटला जिल्ह्यांतील प्रत्येक ठिकाणची माहिती असावी व सर्व कामाबद्दल त्यालाच जबाबदार धरण्यांत यावें. जिल्हा मोठा असेल व गुन्ह्याच्या दृष्टीने हाताखाली २-४ दुय्यम अधिकारी असतील तर त्या अधिकाऱ्यावर सुपरिंटेडेटची देखरेख असावी. मुंबई हीच एक राजधानी करण्यांत आली तर पुण्यांतील एका वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्याची जागा व चार डे. पो. सु. च्या जागा कमी होतील. अहमदाबाद, सुरत या जिल्ह्यांतील घोडेस्वार ठेवण्यांत यावे. पंचमहाल जिल्ह्यांतील १ हेड कॉन्स्टेबल व ४कॉन्स्टेबल कमी करण्याचें इ.ज. यांनी कबूल केलें आहे. पुणें जिल्ह्यांतील ३ सार्जेंट्स व ७ कॉन्स्टेबल कमी करण्याची शिफारस कमिटीने केली आहे.

रेल्वे पोलिसांच्या खर्चाकरिता बी. बी. सी. आय. रेल्वे कांही देणगी देते, पण जी. आय. पी. ॲंड एन. डब्ल्यू.एफ्. रेल्वे यांनी द्यावयाची रक्कम हिं. सरकारने द्यावयास पाहिजे. हिं सरकारानें २ लाख रुपये मुंबई सरकारास देणें जरूर आहे.

कोंडवाड्याचे बाबत प्रत्येक गुरामागे घेण्यांत येणारी दंड फी वाढवली पाहिजे. शेकडा ५० टक्के वाढ होण्यासारखी आहे. तरी कायदा करण्यांत यावा. २० हजार रुपयांनी हे उत्पन्न वाढूं शकेल.

## सहकारी चळवळ

हल्लीच्या सहकारी चळवळीची जी माहिती मिळाली ती अत्यंत निराशाजनक आहे. सहकारी पतपेढ्यांची चळवळ सरकारने हात न घालतां सुरळीत चालली पाहिजे. गेल्या २७-२८ वर्षांत ८० लाखांची मदत सरकाराने केली. लॅंड रे. कोडा—अन्वयें कर्जाची थकलेली बाकी वसूल करणें म्हणजे सहकारी चळवळीच्या मुळाशींच घाव घालणें होय. या पुढील नव्या कर्जांना हे नियम लावू नयेत. व नवीन सहकारी पतपेढ्या स्थापन करण्यांत येऊं नयेत. व ज्यांची स्थिति खालावली आहे त्या बंद कराव्या. अ. रजिस्ट्रार, सरकारी हिशेबतपासनीस व सु.युनियन्स या सर्वांस सारखेंच काम पडते. कामाचा द्विरुक्ति होते. कमिटीची शिफारस अशी कीं सुपरवायझिंग यूनियन्स मोडावी. व स. हिशेब तपासनीसांची संख्या दुप्पटीने वाढवावी. पण १० वर्षांनी

सरकाराने या सहकारी चळवळींतील आपलें अंग काढून घ्यावें. म्हणून ही हिशेबतपासणीची योजना १० वर्षेपर्यंतच अमलांत राहावी. सोसायटयांनीच हिशेबतपासणी-फी दिली पाहिजे. तसेंच कोर्ट फी व रजिस्ट्रेशन-फी याबाबत जी सवलत सोसायट्यांना देण्यांत येते ती बंद करावी. या योजनेने २ लाखांनी सरकाराचें उत्पन्न वाढेल.

**न्यायखातें**

न्यायखात्याच्या बाबतींत सुधारणा सुचविण्याची आमची तशी पात्रता नाही. ही सुधारणा त्यांतील तज्ज्ञ कमिटीनेच सुचवावी. इंडियन सिव्हिल सर्व्हिससंबंधी आम्हांला बोलतांच येत नाही; तरीपण अलीकडे कोर्टांत कामें करणाऱ्या वकील बॅरिस्टर वर्गांतूनच न्यायाधीशांचे जागीं नेमणूक करावी अशी प्रथा पडूं लागली आहे. त्या दृष्टीने आम्ही कांही सूचना केल्या आहेत. मुख्य दिवाणापेक्षां अधिक पगार हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधीशाला असण्याचें कारण नाही. विलायतेंतूनच हायकोर्टाच्या न्यायाधिशांची नेमणूक होऊं लागली तर पगार कमी करतां येईल असें वाटत नाही ! कांही ठिकाणीं मुदत भरेपर्यंत तोच पगार तर कांही ठिकाणीं ठराविक पगारवाढ पद्धति अमलांत आहे ती बंद करण्यांत यावी. हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाच्या पगारांतहि वाढ व्हावी. पुणें, अहमदाबाद येथील मुख्य सबजज्जांच्या पगाराचें स्केल ७५०-५०-९०० हें असावें. पण मुंबईत स्मॉ. कॉजेस जज्जाच्या पगाराचें प्रमाण १०००-५०-१२५० असावें व मुंबईत स्मॉ. कॉ. कोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाचा पगार १२५०-५०-१५०० या प्रमाणांत असावा. कांही तालुक्यांतील मुनसब कोर्टें बंद करण्याचें धोरण स्तुत्य आहे. मुनसबांना मॅजिस्ट्रेटचे अधिकार द्यावे व त्यांनी तेंहि काम पाहावें. प्रांत ऑफिसर्स कमी करून ६ रेसिडेंट मॅजिस्ट्रेट नेमण्यांत यावे. मुनसबाच्या पगाराचें प्रमाण खालील प्रमाणें असावें.

| | |
|---|---|
| फर्स्ट क्लास स. ज. | रु. ६००-२५-७०० |
| से. क्लास स. ज. | |
| फर्स्ट ग्रेड | रु. ४००-२०-५६० |
| सेकंड ग्रेड | रु. २००-२०-३८० |

हायकोर्टाचे ताब्यांतील फंड मुं. सरकारने आपल्या हातीं घ्यावे. ही रक्कम २½ कोट रु. आहे. त्यावर सरकारने २ टक्के व्याज द्यावें. याचें व्याजाचें उत्पन्न ५ लाख येऊं शकेल. सूचना अंमलांत आल्या तर ५ लाख ४५ हजार रुपयांची बचत होऊं शकेल.

# मुंबइकरांनो! हें घ्या प्रांतिक स्वराज्य

इंग्रजांपूर्वी हिंदुस्थानांत रजपूत, मसलमान व मराठे राजे अनेक होऊन गेले. त्या सर्वांपेक्षां आपण मोठे शहाणे, राजकारणपटु, व्यवहारदक्ष व हिशेबी अशी इंग्रजांना घमेंड आहे. पण हिंदुस्थानांतील अलीकडची राज्यव्यवस्था पाहिली असतां त्यांची ही घमेंड खोटी असली पाहिजे किंवा त्यांनी हिंदी लोकांशीं विश्वासघाताचें धोरण जाणूनबुजून स्वीकारलें असलें पाहिजे असे विचार मनांत आल्याशिवाय राहत नाहीत. इंग्रजांच्या राज्यव्यवस्थेंत एक ठळक दोष आढळतो तो हा कीं हिंदुस्थान देश जगांत सांपत्तिक दृष्ट्या अत्यंत गरीब असतां त्याचा कारभार पाहण्याकरिता अत्यंत श्रीमंती थाटाचा नोकर वर्ग नेमण्यांत आला. गव्हर्नर व गव्हर्नर-जनरल यांचे दरमहाचे पगार पंचांकी. गव्हर्नराला पगार दरमहा दहा हजार तर व्हाइसरॉयाला पगार वीस हजार. त्यांनीच पगाराचीं एवढालीं ओझीं उचलल्यावर त्यांच्या हाताखाली थेट विलायतेहून आणिलेल्या नोकरवर्गाचे पगारहि त्या तोलाचेच ठेवले असल्यास त्यांत नवल तें कसलें ?

व्हाइसरॉय हे बादशहांचे प्रतिनिधि म्हणून डामडौलाने व ऐश्वर्याने प्रतिबादशहाच. प्रांतांचे गव्हर्नर हे सुलतान आणि त्यांच्या हाताखालचे कौन्सिलर, कमिशनर, जज्ज व कलेक्टर हे अमीरउमराव व नबाब. जसें स्वर्गीचे इंद्र चंद्र तसे मृत्युलोकाचे गोरे अधिकारी लोक. त्यांचे राहणें प्रासादांतून, विहरणें नंदनवनांतून, फिरणें विमानांतून किंवा मोटारींतून. सरकारी अधिकारी वर्गाची असली मिजास इंग्रजी राज्य स्थापनेपासूनच सुरू होती. परंतु महायुद्धांत अतर्क्य यश मिळाल्यामुळे त्यांच्या डोळ्यांवर एक प्रकारची धुंदी चढून त्यांच्या सुखाच्या व संपत्तीच्या आकांक्षांना सीमाच राहिली नाही. महायुद्धानंतर थोड्याच दिवसांत सर्वच सरकारी नोकरांच्या पगाराचें मान इतकें वाढलें कीं त्यांपैकीं पुष्कळांच्या ध्यानीं मनींहि इतकी भरभराट पूर्वी आली नसेल. नोकरांचे पगार वाढले, भत्ते वाढले, जागाहि वाढल्या. ही बढती सगळ्याच खात्यांतून झाली. तिचा फायदा ज्याच्या त्याच्या परीने प्रत्येकास मिळाल्यामुळे कोणीं कोणाचा हेवादावा करण्याचें फारसें कारण राहिलें नाही.

महाभारतांत संद व उपसंद या दोन

राक्षसांची बोधप्रद कथा आहे. त्या दोघा भावांनी विंध्याचलावर तप करून ब्रह्मदेवाजवळ तीनहि लोकांवर विजय मिळविण्याचा वर मागितला. ब्रह्मदेवाने अमरत्वाखेरीज त्यानी जे मागितले तें त्यांस दिलें. त्या योगाने ते दोघे आनंदित व विजयी होऊन त्यांच्या राज्यांत

भक्ष्यतां भुज्यतां नित्यं दीयतां रम्यतामिति ।
गीयतां पीयतां चेति शब्दश्चासीत् गृहे गृहे ॥

असा उत्सव सुरू झाला. सर्व लोक, खावें प्यावें, गावें, रमावें या सुखांत दंग होऊन राहिले. महायुद्धानंतरच्या।काळांत हिंदी जनतेला या सुखाचा आस्वाद मिळाला नसला तरी सरकारी अधिकारी व इतर नोकर, वर वर्णिलेल्या सुखांत कमी अधिक प्रमाणांत लोळूं लागले. पण हें सुख निशाबाजींतील आनंदाप्रमाणें फार थोडा वेळ टिकून नित्याची खडतर अवस्था थोड्याच वर्षांत प्रकट झाली. हिंदुस्थानसरकार व प्रांतिक सरकार यांच्या जमाखर्चाचा मेळ बसेना. तो मेळ बसविण्याचे मामुली मार्ग संपल्यावर सरकाराची दृष्टि प्रथम प्रजेच्या कनवठीकडे वळली. प्रजेच्या चिंध्यांची चाळणी करून व तिला निर्धूत बनवूनहि फारसें निष्पन्न न झाल्यामुळे नोकर लोकांच्या खिशांवर सरकाराची नजर गेली.

मुंबई सरकारास ही तंगी सन १९२३ सालींच जाणवून मुंबई कौन्सिलाने तुटीवर तोड काढण्यासाठी श्री. सी. एम. गांधी यांच्या अध्यक्षतेखाली एक कमिटी नेमली. त्यानंतर त्याच दृष्टीने सन १९२७ साली मि. शिलिडी यांनी सर्व सरकारी खात्यांची तपासणी केली. पुढे १९२९ मध्ये मि. पी. जी. शहा यांनी पब्लिक वर्क्स खातें हुडकलें व शेवटीं गेल्याच्या मागील वर्षी मुंबई सरकाराचे दिवाण सर रुस्तुम जहांगीर यांच्या अध्यक्षतेखाली रोखठोक काटकसर कमिटीच बसली. या सर्व कमिटयांनी व व्यक्तींनी आपल्या डोळयांना सूक्ष्मदर्शक यंत्रें लावून काटकसरीसाठी खातीं धुंडाळलीं. त्यांनी केलेल्या कांही शिफारशी सरकाराने अमलांतहि आणिल्या व।बड्या अधिकाऱ्यांच्या पगारांत तात्पुरता १० टक्के काटहि मारण्यांत आला. परंतु डोक्यावरचें सारं आकाश जेथे फाटलेलें तेथे एखाद्या दुसऱ्या ठिगळाने तें कसें झांकलें जाणार ? म्हणून एवढ्या तेवढ्या डागडुजीनें हें राज्ययंत्र दुरुस्त होणार नाही अशी मुंबई सरकाराची गेल्या वर्षी बालंबाल खात्री झाल्यामुळे सबंध राज्ययंत्र उलगडून व त्यांतील फालतू भाग तोडून यंत्रच्या यंत्र फिरून जोडण्याकरितां गृहमंत्री मि. थॉमस यांच्या अध्यक्षतेखाली पुनर्घटना कमिटी अस्तित्वांत आली.

पूर्वीच्या कांमेटया व त्यांचे सभासद प्रायः सरकारी खात्याबाहेरचे, राज्ययंत्राचें अंतरंग न जाणणारे किंवा कारभाराचीं खरीं मर्मस्थानें न समजणारे होते. परंतु थॉमस कमिटी तशा लेच्यापेच्या लोकांची नेमलेली नव्हती. कमिटीचे अध्यक्ष मि. थॉमस मुंबई इलाख्यांतच असिस्टंट कलेक्टरपासून चीफ सेक्रेटरीच्या, कमिशनराच्या व गृहमंत्र्याच्या हुद्द्यापर्यंत चढलेले, मुंबई इलाख्यांत बहुतेक सर्व ठिकाणीं निरनिराळ्या निमित्ताने वागलेले व मुलकी खात्यांची खडानखडा माहिती असलेले होते. मि. थॉमस हे मुलकी खात्यांतील किडे तर मि. डग्लस गॉर्डन हॅरिस संयुक्त प्रांतांत एक वेळ एक्झिक्यूटिव्ह इंजीनियर असून आता हिंदुस्थानसरकारापाशीं कन्सल्टेटिव्ह इंजिनीयर होऊन राहिलेले. मि. कौल हे त्यांच्याच तोडीचे. ते पंजाबांत डेप्युटी कमिशनर, डिस्ट्रिक्ट जज्ज, सेटलमेंट ऑफिसर या दर्जाचीं कामें करीत करीत फिनॅन्शियल कमिशनरच्या दर्जाला पोचलेले. मुंबई सरकारच्या समग्र राज्ययंत्राची पूर्ण पुनर्घटना करावयाची ही जोखीम सोपी नव्हे. तिला एकाच प्रांतांतील अनुभव अपुरा पडावयाचा; यासाठी कोणी मुंबई इलाख्यांतील, कोणी संयुक्त प्रांतांतील व कोणी पंजाबांतील पुंजी बरोबर आणून हें अवघड कार्य अंगावर घेण्यास सिद्ध झाले होते.

ही तयारी एवढ्यानेच संपली नाही. कमिटीला जिकडूनतिकडून सल्ला मिळावा व माहिती उपलब्ध व्हावी, या उद्देशाने सरकारी व बिनसरकारी शेलक्या लोकांचें साहाय्य हजर ठेवलें होतें. बिनसरकारी लोकांत ज्यांनीं कार्यकारी मंत्री, दिवाण, आमदार, खासदार, नामदार, कार्पोरेशनचे अध्यक्ष या नात्यांनीं सरकारच्या राज्यकारभारांत शिरून व डोकावून पाहिलें होतें त्या सर चुनीलाल मेहता, सर कावसजी जहांगीर, डॉ. परांजपे, श्री. भास्करराव जाधव, रा. चंदावरकर, सर ह्यूज।कोक इत्यादि काळ्यागोऱ्यांचा समावेश।केला होता. त्याशिवाय सरकारी साक्षीदारांची फौज तर अगदी खडी होती. मुंबईसरकारच्या प्रत्येक खात्याचे सेक्रेटरी, चीफ सेक्रेटरी, कमिशनर, कलेक्टर, सुपरिंटेंडेंट असिस्टंट सुपरिंटेंडेट, डायरेक्टर, एक्झिक्यूटिव्ह इंजीनियर, चीफ कॉन्सरव्हेटर, कोऑपरेटिव्ह सोसायट्यांचे रजिस्ट्रार, सर्जन जनरल इत्यादि अधिकाऱ्यांपैकीं त्यांनी कोणासहि वगळलें नव्हतें. या तयारीच्या भरीला पूर्वीच्या कमिट्यांचे रिपोर्ट त्यांच्या हाताशीं पडूनच होते. इतक्या कसोशीने लिहिलेला रिपोर्ट प्रत्येक खात्याचा तळ पृष्ठभागावर आणणारा कसा असेल याची वाचकांना कल्पना करतां येईलच.

मुंबई सरकारानें १९२९-३० सालापासून आपला खर्च १ कोटी १० लक्षांनी तोडला आहे. ही तोड पायाशुद्ध नसून धसमुसळेपणानें झाली आहे. कोठें नोकरांचे पगारच तात्पुरते कापले आहेत, कोठें पाटबंधारे व इमारती यांचीं कामेंच बंद ठेवलीं आहेत, तर कोठें लोकलबोर्डांना प्राथमिक शिक्षणाकरितां द्यावयाची ग्रँटच छाटली आहे. या प्रकारची छाटाछाट निभावणुकीची किंवा कायम स्वरूपाची नव्हे. केव्हां ना केव्हां तरी ही दांडगाई बंद करून कांही विशिष्ट शिस्तीनेंच खर्चास आळा घालून राज्याकारभाराचें गाडें चालीस लावलें पाहिजे. त्या दृष्टीनें पाहिल्यास यंदाच्या सालीं मुंबई सरकारास दीड कोटीची तूट येईल असा कमिटीचा अंदाज आहे.

सरकाराचें उत्पन्न दरवर्षी कमी कमी होत चाललें आहे, ही गोष्ट खरी. परंतु उत्पन्नाची ही ओहटी सतत कायम राहील असें नाहीं. अबकारी, पाटबंधारे, स्टांप या बाबी सरकारच्या मतानें अशा आहेत कीं शेतमालाला भाव येतांच त्या उत्पन्नाची कमान चढती राहील. हें उत्पन्न पुढेमागे वाढेल म्हटलें तरी नव्या सुधारणांबरोबर नवे खर्च ठेवलेलेच आहेत. नव्या कौन्सिलाचा मांड मांडावयास लागलें कीं पहिल्याच वर्षी २५ लाख रुपये खर्चाकरितां वेगळे काढून ठेवले पाहिजेत. शिवाय नवीन नेमावयाच्या अधिकाऱ्यांची निवड व पारख करण्याकरितां जें पब्लिक सर्व्हिस कमिशन स्थापन व्हावयाचें तें दरसाल एक लक्ष रुपये खाऊन बसेलच. अशा रीतीनें नव्या उत्पन्नाची व नव्या खर्चाची गांठ घालून दिल्यावरहि एक कोट रुपयांची तूट राहतेच. पण हें झालें सरकारचा आहे हा जीव जगविण्यासंबंधानें. पण नवीन सुधारणांच्या अमलांत प्रांत स्वायत्त झाल्यावर त्यांतील लोकप्रतिनिधींना व नवीन प्रांतिक सरकाराला आपल्या फार फार वर्षांच्या अतृप्त राहिलेल्या आकांक्षा पूर्ण करण्याची उमेद यावयाची व. ती भागवावयास अधिक पैसा नको ? तो कोठून आणावयाचा, याचीहि तरतूद आजच लावून ठेवण्याची कमिटीला फिकीर मोठी !

कमिटीनें आपला रिपोर्ट लोकहितावर नजर देऊन करावयाचा असें म्हटल्यास त्याची रचना केव्हांहि तिनें स्वीकारलेल्या दिशेपेक्षां भिन्न दिशेनेंच व्हावयास पाहिजे होती. नोकर लोकांच्या मोठमोठ्या पगारात मोठा काट मारणें व उगीच वाढवून ठेवलेल्या जागांची संख्या खडसणें हा राज्ययंत्र आटोपशीर, सुटसुटीत व काटकसरीचें करण्याचा उत्कृष्ट उपाय होय. पण त्या उपायाचा अवलंब कमिटीनें जितका निक्षून करावा तितका केला नाहीं असें तिच्या रिपोर्टावरून दृष्टीस पडतें. त्याला एक कारण हें सांगण्यांत आलें आहे कीं ज्या बड्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची नेमणूक होते व पगार ठरतात ते अधिकारी भारतमंत्र्याच्या अखत्यारींतील असल्यामुळें कमिटीला त्यांच्याकडे सरळ काय पण वाकड्या नजरेनेंहि पाहण्याची परवानगी नव्हती. सर्वांत मोठा खर्च त्याच अधिकाऱ्यांकरितां व्हावयाचा व खालच्या अधिकाऱ्यांच्या पगाराचें मान त्यांच्याच पगारावरून ठरवावयाचें. त्यामुळें त्या अधिकाऱ्यांच्या पगारावर जर कमिटीनें आपली सावलीहि पडूं द्यावयाची नाहीं तर तिच्या कर्तृत्वांतील अर्धाअधिक जोर आपोआपच जिरावयाचा. परंतु कमिटीच्या या सबबींत फारसें हंशील आहे असें आम्हांस वाटत नाहीं. त्यांनी वेगवेगळया खात्यांचीं बोर्डे स्थापन करण्याचें सुचवून थोडयाशा सिव्हिलसर्व्हंटांच्या व इतर बड्या हुद्देदारांच्या पोटावर पाय आणिलाच आहे; त्याच मार्गानें आणखी थोडें चालून जाऊन त्यांना सद्यःस्थितींत सिव्हिल सर्व्हंटांच्या व त्यांच्या दर्जाच्या इतर इंपीरियल सर्व्हिसमधील नोकरांच्या पगाराचें किमान व कमाल मान अमुक इतकें असावें असें सांगण्यास काय हरकत होती ? ती सूचना अमलांत येणें न येणें ही गोष्ट तिच्या हातची नसली तरी आपल्यापुढें सोडवावयास ठेवलेल्या उदाहरणांत तो आंकडा त्यांना गृहीत धरतां आला नसता असें नाहीं.

परंतु तसें करावयास, बोलल्यानें ज्या बादशाही बड्या नोकर वर्गांकीं स्वतः थॉमससाहेब व त्यांचे सहकारी आहेत त्यांना आपल्या स्वतःच्या व आपल्या मित्रांच्या पायावर दगड पाडून घेतल्याप्रमाणें होणार असल्यामुळें कमिटीनें ती बाजू अजिबात टाळली! त्याचा परिणाम असा झाला कीं पगाराच्या व जागांच्या कपातीचा सगळा भार लहानमोठ्या काळ्या नोकर वर्गावर नेमका पडला. ऑ. इं. सर्व्हिसमधील बड्या अधिकाऱ्यांच्या पगाराची व भत्त्यांची महायुध्दानंतर जेव्हां चंगळ उडाली तेव्हां त्यांना आपले पगार खालील अधिकाऱ्यांच्या डोळयावर न येण्याकरितां त्यांच्याहि तनख्यांत वाढ करणें भाग पडलें. उदाहरणार्थ, एखाद्या कलेक्टराचा पगार दरमहा दोन हजार रुपये असला तर त्याच्या हाताखालच्या हिंदी डेप्युटी-कलेक्टराची नेमणूक दोनशें रुपयांवर झाल्यास सरकारला मनाची नसली तरी जनाची लाज वाटल्यावांचून कशी राहील ? हाच न्याय सर्व खात्यांतील वरिष्ठ कनिष्ठ नोकरांना लागू.

राज्ययंत्रांत चुकीचें मूळ कोठें असेल तर तें वरीलपेक्षांहि व्हाइसरॉय व गव्हर्नर यांचे पगार ठरविण्यांत. व्हाइसरॉयांस २० हजार रु. पगार म्हणून गव्हर्नरास १०हजार रु.पगार, गव्हर्नराला १०हजार म्हणून त्यांच्या

कार्यकारी मंत्र्यांना ५—५॥ हजार व कार्यकारी मंत्र्याला साडेपांचहजार म्हणून मागाहून आलेल्या दिवाणानाहि साडेपांचहजार रुपयेच पगार आणि त्याच मानाने हायकोर्ट जज्ज, कमिशनर, चीफ इंजीनियर, चीफ सेक्रेटरी, कलेक्टर, डे. कलेक्टर इत्यादिकांच्या लांबच लांब लागलेल्या रांगेचे पगार! यापैकीं खुद्द व्हाइसरॉय व गव्हर्नर यांच्या पगारावर कुऱ्हाड घालून निम्म्यावर तुकडा पाडला असतां तें प्रमाण खालच्या नोकरशाहीला आपोआपच लागू पडून एकंदर खर्चाचें मान गरीब हिंदी रयतेच्या आटोक्यांत येण्यासारखें आहे. परंतु कमिटी नेमणाऱ्या गव्हर्नरसाहेबांची व कमिटीची वृत्ति स्वतःच्या स्वार्थाला धक्का न लावतां राज्ययंत्रावरील खर्च हलका करण्याची असल्यामुळे कमिटी अखेर गोरगरीबांवर व बायाबापड्यांवरच घसरली आहे आणि तिचें स्वतःचें पाप तिला डाचत असल्याने प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमधील नोकरांचा पगार जरूर तितका कापण्याची शिफारस करण्याचें धैर्यहि तिला झालें नाही.

कमिटीच्या या पक्षपाती धोरणाने साऱ्या राज्यकारभारांत केवढा अन्याय व हाहाकार उडवून दिला आहे पहा! गरीब बिचारे मराठी शाळांचे मास्तर लोक. त्यांना कमिटीने अगदी सुळावरच चढवावयास काढलें आहे! प्राथमिक शाळामास्तरांच्या पगाराची वाढ महायुद्धानंतर इतर खात्यांतील नोकरलोकांच्या बरोबर कांहीशी झाली होती खरी. पण त्यानंतर त्यांचे ग्रह लवकरच फिरून त्यांच्या पगाराचें मान उतरलें. तेंच पुनः वाढवावें अशी शिक्षक वर्गाची ओरड असता त्याप्रमाणें एखादी योजना सुचविण्याचें बाजूस राहून थॉमससाहेबांच्या कमिटीने शिक्षकांच्या पगाराला आणखी मागे खेचलें आहे. सर्व ट्रेन्ड शिक्षकांच्या पगारांचा प्रारंभ पांच रुपयांनी कमी करून त्यांची वाढ दहा रुपयांनी मागे हटविली आहे. सारांश, महायुद्धापूर्वी शिक्षक वर्गाची प्राप्तीच्या दृष्टीने जी विपन्न स्थिति होती ती त्यांना फिरून प्राप्त होणार अशी भीति आता उत्पन्न झाली आहे. प्राथमिक शिक्षकांच्या व विद्यार्थ्यांच्या बाबतींत गुणांपेक्षा संख्येकडे अधिक लक्ष दिलें जातें असा कमिटीने शेरा मारला आहे. पण शिक्षणाचा प्रसार हें ध्येय ठेवलें व लायख शिक्षकांना भरपूर पगार देण्याचें सामर्थ्य सरकारापाशीं नसलें म्हणजे ट्रेण्ड शिक्षकांपेक्षा अन्ट्रेण्ड शिक्षकांची संख्या वाढावयाची व क्वालिफाईड शिक्षकांबरोबरच अनक्वालिफाईड शिक्षकेहि शाळांतून राहावयाचेच. कमिटीने गुणांचें वैगुण्य काढलेलें क्षणभर मान्य केलें तरी तें दूर करण्याचा उपाय शिक्षकांचा आहे तोहि पगार कमी करणे हा नव्हे. ही साधी गोष्ट ज्या कमिटीच्या लक्षांत येत नाही तिचें अक्कल काय वर्णावी?

कमिटीने एकट्या प्राथमिक शिक्षणाचीच का? पण सगळ्याच शिक्षणसंस्थांची राखरांगोळी करण्याचें ठरविलें आहे. दुय्यम व उच्च प्रतीच्या शिक्षणांत मुंबई इलाख्याने इतर प्रांतांपेक्षां अधिक चांगला लौकिक पूर्वी मिळविला आहे. त्यांतील शेतकी कॉलेज, व्यापारी कॉलेज, स्कूल ऑफ आर्ट यांच्या तोडीच्या संस्था बाकीच्या प्रांतांतून बहुधा आढळणार नाहीत. शेतकी कॉलेज सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी निघालें व व्यापारी कॉलेजच्या स्थापनेस अवघीं सतरा वर्षेहि झालीं नाहीत. हीं कॉलेजें स्थापण्याचा पहिला मान मुंबई इलाख्याने मिळविला व त्यांच्या नकला मागाहून इतर प्रांतांनी केल्या. असलीं कॉलेजें बाकीच्या प्रांतांतून आता आहेत, तरी पण स्कूल ऑफ आर्टसारखी संस्था मुंबई इलाख्याबाहेर कोठेंच नाही. कृषि व व्यापार हा देशाचा प्राण आहे. त्यांच्या अभिवृद्धीवर देशाची भरभराट अवलंबून आहे. मुंबई शहर व्यापाराचें माहेरघर व महाराष्ट्र हें कृषिदृष्ट्या सामान्येंकरून दुष्काळाचें आगर. त्या दोघांना व साऱ्या इलाख्यालाहि ज्या दोन कॉलेजांची गरज तीं कॉलेजें कमिटी बंद करावयास सांगणार! त्या दोन कॉलेजांतील शिक्षण सदोष असेल तर तें सुधारण्याचा तोड सुचवावयाची कीं त्यांना मातीस मिळविण्याचा विध्वंसक मार्ग कमिटीने अनुसरावयाचा?

आर्टस्कूल बंद करावयास सांगून कमिटीने आपल्या शहाणपणाचा कळसच केला आहे. भारतीयांच्या अलीकडील अवनत काळांत चित्रकलेचा अगदींच लोप झाला होता. ती कला उदयास आणण्याच्या सद्बुद्धीने आर्ट स्कूल जन्मास आलें. आधीच कलाकौशल्याचा आमच्या देशांत अभाव. त्यांत त्यास अल्पस्वल्प उत्तेजन देण्याचीं जीं थोडीशीं साधनें आज उपलब्ध आहेत तींहि काढून घेतलीं म्हणजे सगळाच अंधार. कृषि, व्यापार व कलाकौशल्य यांचें बीज या गाजरपारख्या कमिटीने या प्रकारें केलें आहे. आता राहिले उद्योगधंदे; त्यास साहाय्य करण्याकरिता गेल्या सुधारणांच्या काळापासून उद्योगधंद्यांचें एक खातें उघडलें आहे. त्याप्रीत्यर्थ सालिना खर्च काय तो फक्त ७० हजार रुपयेच होतो. तोहि कमिटीस जास्ती वाटून कमिटीने त्याहि खात्याचीं शंभर वर्षे अवघ्या बाराच वर्षांत संपविलीं आहेत!

सारांश, कमिटीच्या वरील सर्व शिफारशी अमलांत आल्यास मुंबई इलाख्यांत शेतकी, व्यापार, उद्योगधंदे कलाकौशल्य या सर्व आधुनिक सुधारणेच्या साधनांवरून अवदशेचा हात फिरून हा इलाखा

धनगरांचा देश बनणार. आपल्या प्रांताचें स्वराज्य हस्तगत करण्याकरितां वर्ष-दोन वर्षांनी लोक-प्रतिनिधि कौन्सिलांत व मंत्रिमंडळांत येऊन बसतील त्या वेळीं सर्व क्षेत्र उजाड व बेचिराख झालेलें आहे, तेथील मयासुराची सृष्टि मावळली आहे आणि खाली धरणी व वर तळपणारा सूर्य कायतो उरला आहे असें भीषण दृश्य त्यांच्या नजरेस दिसल्याशिवाय राहणार नाहीं. लोक-प्रतिनिधि हुरूपानें स्वराज्याचा कबजा घ्यावयास येणार व त्यांचा हिरमोड करणारें व भुतासारखें मागें लागणारें, उजाड व ओसाड असें स्वराज्याचें घर त्यांच्या हवालीं होणार! बिन्नी आली पणांत आणि मिरवणा चालला मसणांत या म्हणींत जें रहस्य सांठविलेलें आहे तेंच रहस्य हिंदी लोकांच्या प्रत्ययास वरील रीतीनें येणार आहे. हें म्हणे स्वराज्य! मुंबई इलाख्यांतील लोकांनो, तुम्हाला प्रांतिक स्वराज्य पाहिजेना? तर घ्या हें थॉमससाहेबांचें स्वराज्य!

# हिंदुस्थानाच्या आर्थिक स्वातंत्र्यास इंग्लंडाचा विरोध

तिसऱ्या गोलमेज परिषदेचें तारूं ज्या अनेक खडकांना अडखळलें त्यांपैकीं 'हिंदुस्थानाचें आर्थिक स्वातंत्र्य' हा एक महत्त्वाचा खडक होय. हिंदी लोकांना खरेंखुरें स्वराज्य हवें असेल तर त्यांनी या आर्थिक स्वायत्ततेच्या आधारावरच आपली प्रातिनिधिक राज्यसंस्था उभारली पाहिजे. गोलमेज परिषदेस गेलेल्या हिंदी प्रतिनिधींचा इरादाहि हिंदुस्थानास शक्य तितकें आर्थिक स्वातंत्र्य मिळवून देण्याचा होता. उलटपक्षीं ब्रिटिश प्रतिनिधींचा इरादा राज्य-कारभार जरूर तर हिंदी लोकांवर सोंपवून इंग्लंडास हिंदुस्थानापासून होणारा आर्थिक फायदा चालू ठेवण्याचा होता. तेव्हा अशा विरुद्ध हेतूंनी प्रेरित झालेल्या सभासदांत अखेर तडजोड न निघतां परिषद संपली यांत आश्चर्य काय? सैन्याच्या खर्चावर आमचा अधिकार पाहिजे, सनदी नोकरांचा पगार आमच्या अखत्यारींत हवा, ब्रिटिशांच्या कर्जाचें तारण आधीं दाखवा, आणि इतकी तरतूद झाल्या-वर मग उरलेली आर्थिक सत्ता घ्या असें जेव्हा हिंदी प्रतिनिधींना परिषदेंत सांगण्यांत आलें तेव्हा नारळांतील खोबऱ्याऐवजीं त्याची बहुतेक करवंटीच हातीं येणार ही गोष्ट हिंदी प्रतिनिधींना उघडच दिसली.

यासंबंधी हिंदी प्रतिनिधींची 'बँक ऑफ इंग्लंडाचे' गव्हर्नर मि. मॉंटेग्यू नॉर्मन व लंडनांतील कांही भांडवलवाले यांशीं चर्चा झाली. त्या वेळीं मि. मॉंटेग्यू नॉर्मन यांनी मुत्सद्द्यांच्या भाषणांतला मोघमपणाहि काढून टाकला. ते म्हणाले, "तुम्हांस आर्थिक सत्ता देतों असें अभिवचन ब्रिटिश सरकारानें दिलें असलें तरी त्याची पर्वा आम्हांला काय? आम्ही राजकारण जाणीत नाही. आम्हीं हिंदुस्थानास दिलेल्या कर्जाची हमी पार्लमेंटानें घेतली आहे. तिचा समाधानकारक निकाल लागल्यावांचून आर्थिक सत्ता तुम्ही स्वप्रांतहि आणूं नका." मॉंटेग्यू नॉर्मन यांनी असें स्पष्ट सांगितल्यावर आर्थिक सत्ता मिळत नाही ही गोष्ट स्पष्टच झाली. यानंतर भारतमंत्री सर होअर यांनी 'तरी पण आम्ही आपलें वचन पाळूंच' असें आश्वासन दिलें असलें तथापि त्या वचनांत फारसा अर्थ नाही.

बँक ऑफ इंग्लंड व लंडनमधील भांडवलवाले यांना एखादी गोष्ट अमुक प्रकारानेंच झाली पाहिजे असें म्हटलें असता त्याविरुद्ध ब्रिटिश प्रधान-मंड-ळास कितपत जाता येतें याचें प्रत्यंतर दीड वर्षापूर्वी मजूर-सरकार उलथून पडलें तेव्हाच आलें आहे. त्या वेळच्या निवडणुकींतील मजूर पक्षाचें धोरण जाहीर करतांना एच. एन. ब्रेल्सफर्ड लिहि-तात, "आम्हांस हें फार पूर्वीच कळून चुकलें आहे कीं मजूर-सरकारास बहुमताचें पाठबळ असलें तरीहि त्यास आपलें धोरण सिद्धीस न्यावयाचें असल्यास त्यानें लंडनच्या भांडवलवाल्यांना आधीं दडपून टाकलें पाहिजे. या बँकवाल्यांचें सामर्थ्य इतकें आहे कीं, आपले हेतु तडीस नेण्यासाठीं ते विदेशी लोकमत व संपत्ति यांचें पाठबळ मिळवूं शकतात, आमच्या चलन-पद्धतीचा लगाम खेचून मंत्रिमंडळास आपण बोलूं ते करावयास लावतात व भांडवलवाल्यांची तुंबडी भरतात. यापुढे प्रत्येक मजु-रानें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं त्यांना जर खरीखुरी सत्ता हवी असेल तर मजूरमंत्रिमंडळ अधिकारावर येतांच त्यांनी प्रथम या लंडन शहराच्या भांडवलवाल्यांशीं सामना दिला पाहिजे. 'बँक ऑफ इंग्लंडा'च्या गव्हर्नराची हांकलपट्टी ही मजूर-मंत्र्यांच्या कार्य-क्रमांतील पहिली बाब असली पाहिजे. कारण वेळोवेळीं कितीहि प्रधानमंडळें आलीं तरी हा बँकेचा गव्हर्नरच कायमचा खराखुरा मुख्य प्रधान असतो."

अशा सामर्थ्यसंपन्न बँकेविरुद्ध मजुरांनी आगाऊच युद्ध पुकारल्यानें त्यांची निवडणुकींत किती वाताहत झाली हें प्रसिद्धच आहे. त्या वेळचे 'बँक ऑफ इंग्लंड'चे गव्हर्नर मि. मॉंटेग्यू नॉर्मन हे वरील अर्थानें 'इंग्लंडचे कायमचे मुख्य प्रधान' असून

त्यांनीच स्वतः सर सप्रू प्रभृति हिंदी प्रतिनिधींच्या तोंडावर 'आर्थिक स्वायत्तता तुम्हांस देत नाहीं' म्हणून सांगितले आहे तर सर होअरसारख्या हिंदुस्थानाच्या हितास विरोध करण्यास नेहमी तत्पर असलेल्या भारतमंत्र्यांनी 'आम्ही आमचें वचन पाळूं' असें म्हटले तरी तें खरें अथवा शक्य असे कोणास वाटणार ?

पण व्यापाऱ्यांपेक्षा मुत्सद्दी हे बोलण्यांत अधिक धूर्त असतात; या दृष्टीने मॅांटेग्यू नॉर्मन यांच्याप्रमाणे स्पष्ट शब्दांत नकार न देता हिंदुस्थानच्या आर्थिक स्वराज्यास कृतीने हरताळ कसा फांसावा याचें कांहीं तरी कारस्थान ब्रिटिश मुत्सद्द्यांनी पडद्याआड चालविलें असावें असें वाटतें. या कारस्थानाचें थोडेसें अंग गोलमेजपरिषदेंत उघडें झाल्यामुळे त्याचें स्वरूपहि आता अजमावता येतें. ता. १९ जानेवारी १९३१ रोजीं पहिली गोलमेज परिषद संपली. त्या दिवशीं मुख्य प्रधानांनी वाचलेल्या प्रसिद्ध जाहीरनाम्यांत आर्थिक स्वायत्तता देण्याचा उल्लेख असून लवकरच रिझर्व्ह बँकहि काढण्याची आपण खटपट करीत असल्याचें त्यांनीं म्हटलें आहे. ६ वर्षांपूर्वी हिंदी चलनासंबंधी नेमलेल्या यंग कमिशनानेहि ही बँक काढावी असें सुचविलें होतें. त्याप्रमाणे १९२७ च्या जानेवारींत त्या वेळचे फडणवीस सर बेसिल ब्लॅकेट यांनी सदर बँक काढण्यासंबंधीचें बिलहि आणलें होतें. पण बँकेच्या घटनेवर एक वर्षभर सरकार व असेंब्ली यांमध्ये रण माजून अखेर १९२८ सालीं ले. असेंब्लींत रिझर्व्ह बँकेचा प्रश्न बिनमुदत तहकूब केला असल्याचें सरकारानें जाहीर केलें.

रिझर्व्ह बँकेच्या घटनेचा वाद कांहींहि असला तरी रिझर्व्ह बँक काढावी याबद्दल कोठेंच मतभेद नसल्यामुळे मॅक्डोनाल्ड यांनी रिझर्व्ह बँक काढण्याचें जाहीर केलें याबद्दल कोणासच आश्चर्य वाटलें नाहीं. उलट गोलमेज परिषद संपल्यावर पार्लमेंटांत सुधारणांचा कायदा पास होईल व मग नवी राज्यघटना सुरू होताच हिंदी लोकांस हवी तशी घटना करून रिझर्व्ह बँक काढतां येईल, असें थोडेसें समाधानहि मॅक्डोनाल्ड यांच्या भाषणावरून हिंदी लोकांना वाटण्यासारखें होतें. पण आता मॅक्डोनाल्ड यांच्या त्या भाषणाचा अर्थ वेगळा केला जात असून सर तेजबहादूर सप्रूसारख्यांना स्वराज्यदानांत ही एक नवीच अट उत्पन्न होत आहे असें वाटतें. हा नवा अर्थ अथवा नवी अट ही कीं, संयुक्त राज्यघटना व मध्यवर्ती जबाबदारी हिंदी लोकांस मिळण्यापूर्वी रिझर्व बँक स्थापन झाली पाहिजे असें या तिसऱ्या गोलमेज परिषदेंत सांगण्यांत आलें.

हिंदुस्थानाच्या परदेशीय व्यापारापेक्षा येथील अंतर्गत व्यापार पंधरापट मोठा असून सगळा देश दरिद्री शेतकऱ्यांनी भरलेला असल्यानें हिंदुस्थानाची आर्थिक उन्नति होण्यास येथें अंतर्गत चलनाची व्यवस्था मोठी व्यापक व संघटित असणें फार अवश्य आहे. पण खेदाची गोष्ट अशी कीं १८९३चे सुमारास चांदीचा भाव बेसुमार उतरून विलायतेस पैसे पाठविण्याची अडचण होऊं लागली तेव्हापासून पुढील ३०वर्षांत चार कमिट्या व कमिशनें बसलीं, पण एकानेहि या हिंदी बँकांचा म्हणजे अंतर्गत चलनाच्या व्यवहाराचा विचार केला नाहीं. डॉ. स्प्रॅग या अमेरिकन तज्ज्ञानें यंग कमिशनपुढे साक्ष देतांना सरकारच्या या उपेक्षेबद्दल आश्चर्य प्रगट केलें आहे. पण हिंदी लोकांना यांत कांहींच आश्चर्य वाटत नाहीं. हिंदुस्थानसरकारास विलायतेस दरसाल जे कोट्यवधि रुपये कर्जाचें व्याज, पगार, पेन्शनें, खरेदी केलेल्या मालाची किंमत वगैरेसाठी सोन्याचे रूपानें अथवा दरानें पाठवावे लागतात त्यांची सोय करणें व त्यासाठी हुंडणावळीवर नियंत्रण ठेवून त्यायोगें ब्रिटिश व्यापाऱ्यांना हिंदुस्थानांत आपला माल खपविण्यास उत्तेजन देणें एवढ्या एकाच दृष्टीनें हिंदुस्थानसरकारानें येथील चलनव्यवहाराचा आजवर विचार केला आहे, हें डॉ. स्प्रॅग यांना माहीत नसलें तरी हिंदी लोकांना पूर्णपणें माहीत आहे.

हातीं असलेल्या सत्तेचा दुरुपयोग करून हिंदुस्थान सरकारानें ब्रिटिश व्यापाराचा फायदा करण्यासाठी येथील चलनव्यवहाराचा आजवर इतका चुथडा करून टाकला आहे कीं, राजकीय अनीतीचें एवढें मोठें उदाहरण इतिहासांत दुर्मिळच ठरेल. आमच्या देशांत असलेलें व आमच्या निर्यात मालाच्या किंमतीच्या रूपानें येणारें सोनें सांठवून येथें इंग्रजांपूर्वीपासून असलेलें सुवर्णनाणें सुरू करा अशी ओरड आज पस्तीस वर्षे हिंदी लोक करीत आहेत. पण 'तुम्हां अडाणी व दरिद्री लोकांना सोन्याचें नाणें हवें कशाला ? तुमच्या परदेशी व्यवहाराला हवें तें सोनें इंग्लंडांत आहेच, तेथें ते घ्या म्हणजे झालें,' असें हिंदी लोकांना हिणवून व हिंदी लोकांचें कोट्यवधि रुपयांचें सोनें विलायतेस ठेवून सरकारनें तें विलायती व्यापाऱ्यांच्या उपयोगी लावलें. महायुध्दानंतर सोनें अतिशय स्वस्त झालें तेव्हा पन्नास कोटि रुपयांचें हिंदुस्थानचें सोनें विलायतेंत 'परत हुंड्यां'च्या निमित्तानें विकून टाकून पुढे जाब विचारतां 'आमचा थोडा अंदाज चुकला' अशी लंगडी सबब सरकारानें सांगितली. गेल्या एका वर्षात १०० कोटी रुपयांचें सोनें परदेशीं गेलें व अजून जात आहे. हा तर चालू इति-

हासच आहे. हिंदी लोक याबद्दल तक्रार करतात तेव्हा त्यांना 'अहो, यामुळे तर तुमची पत जगांत वाढते आहे ती पाहा' असें सांगण्यांत येतें. घरास आग लागली म्हणून मालक तळमळत असतां 'घराच्या आगीची काय शोभा दिसते आहे!' असें म्हणून एखाद्या कुचेष्टेखोरानें त्यास खिजवण्यांतलाच हा प्रकार नव्हे काय?

असो. पहिल्या तीस वर्षांत येथील अंतर्गत चलनाच्या व्यवस्थेकडे सरकारानें दुर्लक्ष केलें तें अयोग्य वाटून हिंदुस्थानांत रिझर्व्ह बँक काढावी व बँकांचा व्यवहार हिंदुस्थानांत वाढीस लावावा अशी यंग कमिशनानें सूचना केली. महायुद्धानंतर हिंदुस्थानांत ब्रिटिश भांडवल जोरानें येऊं लागलें होतें. तेव्हा चलनव्यवहारांत सरकारानें पूर्वीप्रमाणेच ढवळाढवळ चालू ठेविल्यास घोटाळे उत्पन्न होऊन यापुढें ब्रिटिश व्यापाऱ्यांचेंहि नुकसान होईल असें वाटूं लागल्यामुळे यंग कमिशनला हा बँक काढण्याचा पान्हा फुटला हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. आणि ब्रिटिश भांडवलवाल्यांचें वर्चस्व या बँकेवर राहावें या बुद्धीनेंच सर बेसिल ब्लॅकेट यांनी रिझर्व्ह बँकेच्या घटनेच्या बाबतींत ओढून धरलें होतें. रिझर्व्ह बँक अवश्य खरी, पण तिची घटना जर हिंदुस्थानाच्या हितास विघातक असली तर बँक न स्थापलेलीच बरी, असें हिंदी लोकांचें ठाम मत आहे. सर बेसिल ब्लॅकेट यांनी बँकेच्या घटनेंत गव्हर्नर-जनरलाचा हात शिरकावून ठेवला, आणि इंग्रज लोक व हिंदी लोक यांच्या हितसंबंधांत विरोध आला असतां गव्हर्नर-जनरल हिंदी लोकांच्या हिताचा बळी देईल हें माहीत असल्यामुळे असेंब्लीनें त्या वेळीं बँकेच्या घटनेच्या वादांत सर बेसिल यांचें कांहीं चालू दिलें नाहीं. त्या वेळच्या टणक असेंब्लींत जें साधलें नाहीं तें आज पुनः रिझर्व्ह बँकेचा प्रश्न काढून हल्लींच्या भुसभुशीत असेंब्लींत साधावें असा सरकारचा कावा नसेल काय?

पण आधी रिझर्व्ह बँक स्थापावयाची म्हटलें तरी तिच्या मार्गांत अडचणींचे डोंगर आहेत. त्यासंबंधीं जो कायदा होईल त्यांत हुंडणावळीचा दर लिहावा लागेल. त्याबद्दल अजून एकमत होत नाहीं. शिवाय रुपयाचा संबंध सोन्याशीं जोडावयाचा कीं, अथांतरीं पौंडाशीं जोडावयाचा हाहि प्रश्न आहे. तो संबंध पौंडाशीं जोडून ठेवण्यास कोणीहि हिंदी मनुष्य तयार होणार नाहीं. आणि सोन्याशीं जोडावा म्हटलें तर इतकें सोनें कोठलें आणावयाचें? जगांतील आर्थिक मंदी ज्या अनेक कारणांनी उत्पन्न झाली आहे तीं कारणें कांहीं लवकर नाहींशीं होणारीं नाहीत. मंदी जात नाही व युरोप—अमेरिका यांचा कर्जाचा तंटा मिटत नाहीं, तोंपर्यंत इंग्लंड व इतर राष्ट्रें सुवर्णमान सुरू करीत नाहीत. यामुळे सोनें महाग राहून तें दुर्लभच होणार. तें थोडेंफार जमविलें तरी आज जगभर अविश्वासाचें वातावरण उठलेलें असतां विदेशी कर्जदारांना आमच्या बँकेची पत पटण्यास किती सोन्याची गंगाजळी ठेवावी लागेल हें आज कसें ठरवितां येईल? कारण जराशी गडबड उडून विदेशी कर्जदारांनी बँकेच्या दारीं धरणें धरल्यास देशाची पत क्षणांत जाईल. या सर्व अडचणींमुळे रिझर्व्ह बँक हिंदुस्थानांत तूर्त स्थापन होणेंच कठिण. व तसें झाल्यास होअर यांच्या नव्या अटीप्रमाणे हिंदुस्थानास आर्थिक स्वातंत्र्य लवकर मिळणार नाहीं.

तथापि हिंदी लोकांनी फारच हट्ट धरला तर, रुपया पौंडाशीं जोडला त्याप्रमाणें, 'बँक ऑफ इंग्लंडाची' एखादी शाखा हिंदुस्थानांत रिझर्व्ह बँक म्हणून उघडून, तिचा लगाम हल्लींच्या असेंब्लीकडून व्हाइसरॉयांच्या हातीं द्यावा अशीहि योजना होण्याचा संभव आहे. ज्या असेंब्लींत ओटावा करार व वटहुकुमांचा कायदा पास झाला त्या असेंब्लींत आणखी काय होणार नाहीं? पण अशा प्रकारें रिझर्व्ह बँक स्थापन होऊन मध्यवर्ती सत्ता मिळाली तरी सैन्याचा खर्च, सनदी नोकरांचीं पगार-पेन्शनें व कर्जाची हमी म्हणून सर्व स्वदेशी व विदेशी व्यापाराचें नाक अशी जी रिझर्व्ह बँक ती गव्हर्नर-जनरलाकडे राहिल्यावर आर्थिक सत्तेच्या उष्ट्या पत्रावळीच हिंदी लोकांना मिळणार आहेत. यापेक्षा 'नवी राज्यघटना मॅक्डोनाल्डच्या वचनाप्रमाणे आम्हांस आधी द्या, मग नव्या लोकसभेस संमत होईल तशी घटना तयार करून अनुकूल काल येईल तेव्हांच आम्ही बँक काढूं, रिझर्व्ह बँकेची अट स्वराज्यदानास घालूं नका' असें हिंदी लोकांनी आज स्पष्टपणें जाहीर केलेलेंच चांगलें.

काँग्रेस कर्जें नाकारते व नवीन राज्यघटनेंत काँग्रेसच प्रभावी ठरणार म्हणून आम्ही तुमची पत मानीत नाहीं, असें सर मॅंटेग्यू नॉर्मनप्रभृतींचें म्हणणें आहे. पण असें म्हणणें म्हणजे हिंदुस्थानांतल्या एका ध्येयनिष्ठ संस्थेची नाहक बदनामी करण्यासारखें आहे. आमच्या कर्जांची चौकशी करा व मग आम्हांपासून कर्जें वसूल करा, असें गोलमेज परिषदेच्या आरंभापासून काँग्रेस ओरडत असतां काँग्रेस कर्जें नाकारते असें म्हणणें कांगावखोरपणाचें नव्हे काय? पण साम्राज्यलोभानें इंग्रजांनी लढलेल्या लढायांचे खर्च हिंदी तिजोरीवर लादले आहेत ते सर्व खर्च कर्जांच्या चौकशीअंतीं हिंदुस्थानाला माफ होतील, हें माहीत असल्यामुळे ही कर्जनाकारणीची हूल हे ब्रिटिश

भांडवलवाले उठवीत आहेत आणि कर्जाच्या चौकशीचें मात्र कोणी नांवहि काढीत नाही !

रिझर्व्ह बँकेसंबंधाच्या वाटाघाटींत ब्रिटिश भांडवलवाले जी एक गोष्ट लक्षांत घेत नाहीत ती ही कीं, हिंदुस्थानाची आर्थिक सत्ता गव्हर्नर जनरल, स्टेट-सेक्रेटरी किंवा खुद्द बँक ऑफ इंग्लंडचे गव्हर्नर मि. नॉर्मन यांच्या हातीं ठेविली तरी तेवढ्यावरून हिंदुस्थानाची कर्जदारांना एरवी न पटणारी पत पटवितां येणार नाही. ज्या देशांत ४ कोटी लोक अर्धपोटी राहत आहेत व कामधंदा नाही म्हणून सुशिक्षित व कर्तबगार; तरुण बेकारांचीं खिल्लारें असंतुष्ट होऊन भटकत आहेत, जेथे शें. ८६ लोक दरिद्री शेतीवर जगत आहेत आणि त्यांचे किडुक-मिडुकहि परदेशी मालाच्या द्वारें परके लोक पळवून नेत आहेत, ज्या देशांतील प्रजा सांथींनी किड्यामुंग्यांसारखीं मृत्युमुखीं पडत आहे त्या देशांतील पुढाऱ्यांनी राज्यसत्ता हातीं घेऊन ही दुःस्थिति निवारिल्याशिवाय त्या देशाची पत वाढणार तरी कशी? राष्ट्राची पत त्यांतील नैसर्गिक संपत्ति, मानवी श्रम व बुद्धि, आणि देशांतील संचित भांडवल यांत सुप्त असते. या सर्वांचा योग्य संयोग होईल तेव्हाच राष्ट्र वैभवास चढेल व तेव्हाच त्यास पत उत्पन्न होईल. ही गोष्ट आर्थिक स्वायत्ततेशिवाय कधींहि होणार नाही. आधी पत द्या मग स्वायत्तता देतों म्हणणें म्हणजे पाण्यांत पडण्यापूर्वी पोहावयास शिका म्हणून सांगण्यासारखें आहे. या वेळीं इंग्रजांस आर्थिक स्वराज्य द्यावें असें मनापासून वाटत असेल तर हिंदी लोकांच्या सचोटीवर विश्वास टाकूनच त्यांना आज स्वराज्यदान केलें पाहिजे व ऐपत वाढविण्यास हिंदी लोकांना संधि दिली पाहिजे.

# नाशिक तुरुंगांतील प्रकरण

### तिघां आरोपींना शिक्षा

नाशिकच्या तुरुंगाधिकाऱ्यांवरील खटल्यांतील चौकशीचें काम ता. ५ व ६ असें दोन दिवस चाललें. ता. ६ रोजीं उभय पक्षांच्या वकिलांची समर्थनपर भाषणें झालीं. निकाल सांगण्याचें काम स्पे. मॅजिस्ट्रेट यांनी सोमवार ता. ९ रोजीं करण्याचें ठरविलें. पण निकाल-पत्राचा संपूर्ण मसुदा लिहून व टाइप करून तयार होण्यास ता. ९ रोजीं सायंकाळीं ५ वाजले. निकाल सांगण्याचे वेळीं वकील व वर्तमानपत्राचे बातमीदार यांचेखेरीज इतर प्रेक्षकांना कोर्टाचे जागेंत येण्याची बंदी करण्यांत आली होती. तरी कोर्टाबाहेरील पटांगणांत व व्हरांड्यांत पुष्कळ लोक उत्सुकतेने निकाल ऐकण्यास जमले होते. ता. ९ रोजीं सायंकाळीं ५ वाजता मॅजिस्ट्रेटांनी निकाल सुनावण्यासाठी आरोपींना व वकिलांना कोर्टाचे खोलींत बोलावलें. पण आरोपी नं. १ व २ यांचेतर्फे वकील मि. टिळक यांनी कोर्टास अशी विनंति केली कीं, "निकाल जर आमचे-विरुद्ध झाला तर आम्हास अपील करावयाचें आहे. सायंकाळीं पांचचे पुढे अपील तयार करून जामिनाचा अर्ज देऊन आरोपींना जामिनावर मोकळें करण्यास अवकाश राहणार नाही व आरोपींना एक दिवस अटकेंत राहावें लागेल. सबब निकाल पुढे ढकलावा." कोर्टाने ही विनंति मान्य करून त्या दिवशीं निकाल न देतां दुसरे दिवशीं ता. १० रोजीं सकाळीं १० वाजता निकाल देण्याचें ठरविलें.

दुसरे दिवशींहि कोर्टाच्या बाहेरील पटांगणांत लोकांची बरीच गर्दी निकाल समजून घेण्यासाठी जमली होती. कोर्टाचे निकालपत्र टाइप केलेल्या मजकुराचीं ४० पृष्ठें खच्चून भरतील इतकें विस्तृत आहे. सर्व पुराव्याची छाननी करून कोर्टानें आरोपी नं. १ जेलर फ्रँक हेन्री रॉश यास १ वर्ष सक्तमजुरीची शिक्षा, नं. २ दुय्यम जेलर अर्नेस्ट कॉलिन जॅक्सन यांस ९ महिने सक्त-मजुरी व आरोपी नं. ५ वॉर्डर हुसेन फकिरा यास एक महिना सक्त-मजुरी अशा शिक्षा दिल्या व आरोपी नं. ३ व ४ म्हणजे खंडू बहिरू हवालदार व महादू मारुति शिपाई यांस दोषमुक्त ठरवून सोडून दिलें.

याप्रमाणे निकाल झाल्यावर आरोपी नं. १–२ यांचे वकील श्री. टिळक यांनी लगेच अपील तयार करून दुपारीं तें नाशिक येथील डि. जज्ज मि. वासुदेव यांचेपुढे सादर केलें व जामिनावर आरोपींना खुलें करण्याबद्दल अर्ज केला. या जामिनाच्या अर्जाचे बाबतींत फिर्यादी सरकारपक्षाचें काय म्हणणें आहे तें विचारतां या प्रश्नाबद्दल अधिकाऱ्यांकडून माहिती घेतली पाहिजे असें सरकारी वकिलांनी सांगितलें. यामुळें जामिनाच्या अर्जाचा निकाल ता. ११ पर्यंत तहकूब ठेवावा लागला. त्या दिवशीं सरकारी वकिलांनीं जामिनाच्या अर्जास फिर्यादीपक्षातर्फे विरोध केला आणि डि. जज्जांनी आरोपींना जामिनावर सोडण्याचें नाकारलें.

### मॅजिस्ट्रेटांची टीका

रॉश व जॅक्सन यांना ता. १८ रोजींच येरवड्याच्या तुरुंगाकडे रवाना करण्यांत

आलें होतें. आपिलाच्या चौकशीची तारीख पंधरा दिवसांत ठेवण्यांत येईल असें डि. जज्जांनी सांगितलें. मॅजिस्ट्रेट मि. स्ट्रीटफील्ड यांनी आपल्या निकालपत्रामध्ये जेलच्या अधिकाऱ्यांवर विशेषतः सुपरिंटेंडेंट विकहॅम, डॉ.काद्री व डॉ. न्यूबोल्ड यांच्यावर टीका केली आहे. व जेलचा कारभार ढिलाईने चालला होता असें म्हटलें आहे. जेल मॅन्युअलमधील कांही नियम वैद्यकीय अधिकाऱ्यांनी बिलकुल पाळले नाहींत व ते त्यांना माहीतहि नव्हते याबद्दल मॅजिस्ट्रेट यांनी निकालपत्रांत त्यांना दोष दिला आहे. सरकारी तुरुंग व्यवस्था खात्याने या गोष्टीचा विचार करावा असेंहि निकालपत्रांत म्हटलें आहे.

मॅजिस्ट्रेट स्ट्रीटफील्ड यांनी खटला चालवितांना निःपक्षपाती व शांतपणाची वागणूक ठेवली होती. निकालपत्रांतील पुराव्याच्या छाननीबद्दल व त्यांतील अनुमानांबद्दल कोणाचा मतभेद झाला तरी एकंदरींत हें निकालपत्र फारच कसोशीने लिहिलें आहे व त्यांत सर्व गोष्टींची बारकाईने फोड केली आहे.

या खटल्यांत नाशिकच्या तुरुंगांतील अनेक प्रकार कमजास्त प्रमाणांत पुढे आले आहेत. चंदूलाल नांवाच्या आणखी एका कैद्याला असेंच मारलें होतें ही गोष्ट या खटल्यांत बाहेर आली.साक्षीदार म्हणून चंदुलाल यांस फिर्यादी पक्षातर्फे पुढे आणणें जरूर होतें, असें स्ट्रीटफील्ड यांनीहि आपल्या निकालपत्रामध्ये एके ठिकाणीं सूचित केलें आहे. पायावर हात ठेवण्याच्या नियमाचा भंग केल्याबद्दल गेल्या सप्टेंबर ते नोव्हेंबरपर्यंत नाशिकच्या तुरुंगांत कोणास काय शिक्षा देण्यांत आल्या, चंदूलाल यांस कोणी व किती मारलें, त्यांस उपचार केव्हा व कसे झाले, आणखी कोणास मारलें कीं काय, इत्यादि प्रश्न या खटल्यांतून साहजिकपणें उत्पन्न होतात. सरकाराने या सर्व आनुषंगिक गोष्टींची योग्य चौकशी करून खरा प्रकार लोकांचे नजरेस आणला पाहिजे. तुरुंगखात्याच्या व्यवस्थेंत स्पष्टपणें दिसून आलेली शिथिलता नाहीशी करण्याचे उपाय सरकारानें ताबडतोब योजले पाहिजेत अशा प्रकारची सूचना मॅजिस्ट्रेटांनी निकालांत करून ठेवली आहे. त्याबद्दल सरकार काय करणार हे जनतेस लवकर कळेल तितकें चांगलें.

# प्रासंगिक बोल

**तुरुंगासंबंधी एक तक्रार**

पूर्व-खानदेशांतील अमळनेर तालुक्यांमधील डांगरी येथील खादी--कार्यालयांतील दोन स्वयंसेवक व एक स्वयंसेविका यांना गेल्या वर्षी अनुक्रमें एक वर्ष व चार महिने अशा शिक्षा झाल्या होत्या. आमचा बातमीदार कळवितो कीं, 'सदर स्त्रीस पांच वर्षाचा एक व दीड वर्षाचा एक अशीं दोन मुलें होतीं. हीं मुलें अर्थात् आईबरोबरच तुरुंगांत दाखल झालीं! परंतु दोन वर्षावरील मुलाला तुरुंगांत ठेवावयाचें नाही असा नियम असल्यामुळे पांच वर्षांवरील मुलास त्याचे आजोबांचे स्वाधीन करण्यांत आलें. सदर मुलगा १५ दिवस तुरुंगांत होता. पण आश्चर्य हें कीं या मुलाच्या खाण्याची तुरुंगांत व्यवस्था झाली नाही. त्याच्या आईला जें अन्न दिलें जात होतें त्यांतूनच त्याची भूक भागवावी लागे! लहान मुलालाहि प्रथम दूध वगैरे मिळत नव्हतें. त्या स्त्रीची सुटका झाली त्या वेळीं तिच्या गांवीं परत जाण्यापुरते पैसे अगर तिकीटसुद्धा अधिकाऱ्यांनी तिला काढून दिलें नाही! संस्थेंतील सामान जप्त करून नेलें हें सांगावयाचें कारणच नाही.' असल्या तक्रारी उत्पन्न होण्याचा प्रसंग अधिकाऱ्यांनी येऊं देऊं नये हें उत्तम. वरील गोष्टींत कितपत तथ्य आहे हें सरकारानें तपास करून प्रसिद्ध करावें व त्यांत तथ्य असल्यास असल्या गोष्टी पुनः होऊं न देण्याची तुरुंगांतील अधिकाऱ्यांनी खबरदारी घ्यावी.

**देशाची आर्थिक गणति**

लोकसंख्या अजमावण्याकरिता दर दहा वर्षांनी शिरगणति करण्यांत येत असल्यामुळे त्या शिरगणतीची कल्पना लोकांस आहे. पण या शिरगणतीपेक्षाहि महत्त्वाची अशी आर्थिक गणति होय. प्रत्येक नागरिकाचें उत्पन्न किती, त्याचा खर्च किती, देशांत संपत्ति उत्पन्न करणारे व वाढविणारे धंदे किती आहेत, हल्लींचे उद्योग कोणत्या दिशेने चालले आहेत याची पाहणी करणें आणि देशांतील नैसर्गिक व खनिज साधनांची व संपत्तीची माहिती हस्तगत करून आपला देश सुसंपन्न कसा होईल हें पाहणें म्हणजेच आर्थिक गणति करणें होय. हें काम इतक्या महत्त्वाचें व इतक्या खर्चाचें असतें कीं तें सरकारानेच केलें पाहिजे. पण आतापर्यंत अशा तऱ्हेची जरूरी इंग्रज सरकारास कधीच वाटली नाही. गेल्या आठवड्यांत कलकत्ता येथील आर्थिक संस्थेला हिंदुस्थानसरकाराचे फडणीस सर जॉर्ज शूस्टर यांनी भेट दिली. त्या वेळीं त्या संस्थेचे अध्यक्ष सर नलिनीरंजन सरकार यांनी हा प्रश्न उपस्थित केला.त्या वेळीं सर जॉर्ज शूस्टर म्हणाले कीं' हिंदुस्थान देशाचा औद्योगिक भविष्य-

काळ एवढा उज्ज्वल आहे कीं, त्याला जगांत तोड नाहीं. सरकार व लोक यांनी सहकार्यानें काम केल्यास ही गोष्ट साधणारी आहे. आर्थिक गणति करण्याची एक योजना सरकारानें ठरविली आहे व ती साधल्यास लवकर अमलांत येईलहि.' सर विश्वेश्वरअय्या यांची पंचवार्षिक योजना मात्र त्यांना मान्य नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांव्यतिरिक्त इतरांनी काढलेली योजना त्यांना मान्य कशी व्हावी ? झाली तरच तें आश्चर्य! सरकार आता तरी जागें होऊन देशाच्या आर्थिक उन्नतीचा प्रश्न हातीं घेईल तर उत्तम. पण सशाला शिंगें उत्पन्न होण्यासारखीच ही गोष्ट आहे. ओटावा कराराची योजना, लष्करी खर्च, परदेशी मालाकडून होणारी देशांतील संपत्तीची लूट यांना ज्यांना आळा घालतां येत नाहीं त्यांच्या हातून काय होणार ? स्वराज्य संस्थापन झाल्यावर या गोष्टींकडे प्रथम लक्ष गेलें पाहिजे एवढाच यांतील तात्पर्यार्थ आहे.

# स्फुट सूचना

१ गेल्या आठवड्यांत गोलमेज परिषदेहून परत आलेल्या सभासदांनी परिषदेच्या फलश्रुतीबद्दलचे आपले विचार प्रकट केले आहेत. त्यावरून कोणताच निश्चित निर्णय काढतां येत नाहीं व असें होणें साहजिकच आहे. ज्यांच्या आकांक्षाचें माप मोठें त्यांना नवीन सुधारणा निराशाजनक वाटत आहेत; तर जे अगदीं अल्पसंतुष्ट आहेत त्यांना परिषदेमुळे हिंदुस्थानानें मोठी प्रगति केली असें वाटतें. उदाहरणार्थ, मद्रासचे सर परशुराम पात्रो यांना ब्रिटिश लोकांच्या अंतःकरणात बरीच सहानुभूति उत्पन्न झाली असल्यामुळे संयुक्त घटना लवकरच अमलांत येऊन हिंदुस्थान कृतकृत्य होणार, असें वाटतें ! मुसलमान सभासदांना जातिविषयक अधिकारांचेंच आमिष महत्त्वाचें वाटत असल्यामुळे डॉ. शफात अहमदखान हे सिंध वेगळा करण्याचें ठरलें व मुसलमानांचे हक्क सुरक्षित होणार यामुळेच खूष आहेत ! पतियाळाचे तारासिंग यांनी शीखांच्या मागण्या आपण मांडल्या व त्याचा फार परिणाम झाला असें सांगितलें. एकंदरींत ज्यानें जो चष्मा चढविला त्याला त्या चष्म्यांतील कांचेच्या रंगाप्रमाणे गोलमेज परिषदेच्या निर्णयाची सृष्टि दिसली. यामुळे कोणी सुधारणा निराशाजनक म्हणून नाखूष आहेत तर अगदींच काकडीला राजी असणारे कांहीं सभासद ब्रिटिश सरकाराला धन्यवाद देत आहेत ! राष्ट्राची मागणी काय आहे व त्या मागणीपैकीं किती भाग मिळाला याची छाननी केली तरच या मतामतांच्या गलबल्यांतून कांहीं प्रमाण सापडणे शक्य होईल. या दृष्टीनें सर सप्रू यांनी अलाहाबादेस केलेलें भाषण अधिक महत्त्वाचें होय.

---

२ सर तेज बहादूर सप्रू आपल्या अलाहाबादच्या भाषणांत म्हणतात कीं, 'राष्ट्रीय सभेनें लाहोर व कराची येथे स्वातंत्र्य हें आपलें ध्येय ठरविलें. पण गोलमेज परिषदेच्या मंथनांतून निघणाऱ्या सुधारणा म्हणजे स्वातंत्र्य नव्हे. इतकेंच नव्हे तर सर्व प्रागतिक वगैरे पक्षांचे लोक जे ' डोमिनियन स्टेटस ' म्हणजे वसाहतींच्या धर्तीचें स्वराज्य मागत आहेत तेंहि या सुधारणांतून आज दिसत नाहीं. पण सप्रूंचें म्हणणें असे कीं, संयुक्त घटना ही एक अशी युक्ति आहे कीं, तिची कास आपण धरली तर आपल्यास ' डोमिनियन स्टेटस ' मिळवितां येईल. हें सांगतांना त्यांनी आणखी एक महत्त्वाचा मुद्दा मांडला. तो हा कीं, या नव्या सुधारणा कशाहि असल्या तरी यावर बहिष्कार न घालता डी व्हॅलेरा किंवा हिटलर यांच्याप्रमाणें त्यांचा फायदा घेऊन आपण सर्व राज्ययंत्र आपल्या ताब्यांत घेतलें तर राष्ट्राला स्वराज्य लवकर मिळवितां येण्यासारखें आहे. सर तेज बहादर सप्रू यांची सुधारणेसंबंधींची ही स्पष्टोक्ति विचार करण्यासारखी आहे.

---

३ गेल्या आठवड्यांत कलकत्ता येथे युरोपियन व्यापारी संघाच्या प्रतिनिधींची वार्षिक परिषद झाली. परिषदेचा उद्घाटनसमारंभ बंगालचे गव्हर्नर सर अंडरसन यांचे हस्तें झाला. परिषदेला व्हाइसरॉयांच्या कार्यकारी मंडळाचे सभासद सर जॉर्ज शुस्टर व सर फ्रँक नॉइस हे दोघे हजर राहून त्यांनी परिषदेंत भागहि घेतला. स्वागताध्यक्ष सर ई. सी. बेंथाल यांनी शांतता व सुव्यवस्था राखण्याकरिता बंगाल सरकारानें जें दडपशाहीचें धोरण स्वीकारलें त्याबद्दल गव्हर्नरसाहेबांना धन्यवाद दिले व ओटावा करार घडवून आणण्याबद्दल सर अतुल चतर्जी, सर जॉर्ज रेनी, षण्मुखं चेट्टिप्रभृति सभासदांचे स्तुतिगोत्र गाइलें. हिंदुस्थानाला सनिर्बंध आर्थिक स्वराज्य द्यावयाचें तें रिझर्व्ह बँक स्थापन झाल्यावर द्यावें अशी भाषा ब्रिटिश सरकार बोलूं लागलें आहे. तेव्हा आता गंगाजळींत भरपूर सोनें सांचल्याखेरीज

रिझर्व्ह बँकेची स्थापना होणेंच शक्य नाही अशी ओरड हिंदद्वेषी युरोपियन व्यापाऱ्यांनी करण्यास सुरुवात केली आहे. १९२५ सालीं जें करन्सी कमिशन बसलें त्या कमिशनाने रिझर्व्ह बँक स्थापावी अशी शिफारस केली व ती सरकाराने मान्यहि केली. पुढे बिल आलें. त्यांतील कांही कलमें मंजूर झालीं, व अखेर रिझर्व्ह बँकेच्या घटनेच्या प्रश्नावर सरकाराचा पराभव झाला तेव्हा तें बिल तसेंच राहिलें त्या वेळीं युरोपियन व्यापारी संघांनी रिझर्व्ह बँकेच्या बिलाला मान्यता दिली होती. पण आता पाहावें तो आर्थिक स्वराज्यदानाचा प्रश्न पुढे येतांच त्यांनी मुळावर घाव घालण्याचा डाव सुरू केला.

---

४ चालू सालच्या हिंदुस्थान सरकारच्या बजेटांत तूट न येतां कांही शिल्लक राहिल्यास तिचा विनियोग रयतेवरील कराचें ओझें कमी करण्याकडे करावा कीं सरकारी नोकराचे पगारांतील १० टक्के कपात माफ करण्याकडे करावा हा प्रश्न सहजच उद्भवतो. सर जॉर्ज शुस्टर यांनी सरकारी नोकरांना तुमची दाद पहिल्याने घेऊं असें आश्वासन दिलें होतें. म्हणून मुंबईचे युरोपियन व्यापारी विंटरबोथॅम यांनी सर जॉर्ज शुस्टर साहेबांना बजावलें कीं, आधी रयतेवरील नवीन करांचें ओझें हलकें करा व मग सरकारी नोकरांच्या पगाराकडे पाहा. त्यांचा मुद्दा असा कीं, आधीच आर्थिक हलाखी आणि करवाढ झालेली; यामुळे लोकांची क्रयशक्ति बरीच खालावली आहे ती स्थिति सुधारल्याशिवाय आर्थिक सुधारणा होणार नाही. या मुद्द्यावर मतभेद होण्याचें कारणच नाहीं. अशा स्थितींत आमचें म्हणणें एवढेंच कीं, सोनारानेच कान पिळला आहे तर आता तरी रयतेच्या गाऱ्हाण्याची दाद सरकाराने घ्यावी. डोईजड पगाराच्या जागा निर्माण करून सरकाराने गोऱ्या अधिकाऱ्यांची संख्या वाढवली व त्यामुळेच बजेटांत तूट येऊं लागली हे आता सिद्ध झालें आहे. म्हणून यापुढे याच गोऱ्या अधिकाऱ्यांचें कोडकौतुक सर जॉर्ज शुस्टर करूं पाहातील तर ते पर्यायाने असंतोष वाढविण्यासच मदत करतील यांत तिळमात्र शंका नाही.

---

५ सध्या मुद्रण-स्वातंत्र्याला सर्वच दृष्टींनी कुयोग येत चालले आहेत. वटहुकुमी कायद्याच्या भात्यांत मुद्रणनियंत्रणाचें तिखट हत्यार ठेवलेलें आहेच. त्याशिवाय इतर फुटकळ अधिकारीहि वर्तमानपत्राची गळचेपी करण्यास आपापल्या परी टपून बसलेले आहेत. मध्यप्रांताचे शिक्षणखात्याचे दिवाण व त्यांचें शाळाखातें यांनी आपल्या हातांतील नियंत्रणाचा पाश नागपूर येथील 'महाराष्ट्र' पत्रावर टाकला असल्याचें समजतें. लोकमत प्रकट करण्याच्या कामीं 'महाराष्ट्राचा' निर्भयपणा जसा महशूर आहे; तसाच अधिकारी वर्गाच्या चुकांवर व अन्यायांवर सडेतोड टीका करण्यांतील त्याचा बाणेदारपणा प्रसिद्ध आहे. पण वर्तमानपत्राच्या अंगीं आवश्यक असणारे हे गुणच मध्यप्रांताच्या शिक्षणखात्याला खुपूं लागले. आपले दोष 'महाराष्ट्र' चव्हाट्यावर मांडतो हें पाहून त्याचा सूड घेण्याकरिता मध्यप्रांतांतील शाळांमध्ये 'महाराष्ट्र' पत्र घेण्यास मनाई केल्याचें सुलतानी फर्मान तेथील शाळाखात्याने काढलें आहे. शाळाखातें आता देशी दिवाणांच्या ताब्यांत आले असता त्याजकडून हा अन्याय व्हावा यासारखें आश्चर्य तें कोणतें? वर्तमानपत्रांनी आपापल्या प्रांतांतील विविध विषयावरील आपले विचार प्रदर्शित करून लोकांना मार्गदर्शन करावयाचें नाही तर त्यांनी काय दिवाणांच्या दौऱ्याने आपले रकाने भरून काढावयाचे? मध्यप्रांतांतील शाळाखात्याच्या डायरेक्टरांनी 'महाराष्ट्रावर' चढविलेला हा हल्ला खुनशीपणाचाच नव्हे तर भ्याडपणाचाहि आहे. ज्या दिवाणांना किंवा शाळाखात्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांना आपल्यावर केलेली निर्भीडपणाची टीका सहन होत नाही ते दिवाण व डायरेक्टर आपल्या अधिकाराच्या जागेस त्या दृष्टीने अपात्रच ठरत नाहीत काय?

---

६ ब्रिटिश फौज अलवारांत आल्यापासून अलवारामधील मेयोचें बंड बरेंच विझत चाललें आहे. दंग्याच्या क्षेत्रात ज्या ज्या ठिकाणीं म्हणून लष्कराच्या हालचाली झाल्या तेथील बंडखोरांनी आपण शरण आल्याचें कबूल करून महाराजांशीं राजनिष्ठ राहू अशी कबुली दिल्याचे प्रसिद्ध झालें आहे. कांहींनी महाराजांची भेट घेतली व आपल्या तक्रारी त्यांच्यापुढें मांडल्या. त्यांचा योग्य विचार करण्याचें महाराजांनी आश्वासन दिलें आहे. ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांनी दंग्याच्या क्षेत्राचा ताबा आपल्याकडे घेतला असून बंडखोरांच्या पुढाऱ्यांना हुडकून काढून बंडाचे सूत्रधार कोण आहेत याची कसून चौकशी चालविली आहे. चौकशींत गुरगांव जिल्ह्यांतील कांही पुढारी याच्या मुळाशीं आहेत एवढेंच नव्हे तर पंजाब कायदे कौन्सिलमधील एक दोन सभासदहि या बंडाचे सूत्रचालक आहेत असें निष्पन्न झाले आहे. याच बाहेरच्या पुढाऱ्यांनी संस्थानी लष्कराने केलेल्या गोळीबारांत बरीच प्राणहानि झाल्याची खोटी बातमी देऊन दिल्लीच्या रेड क्रॉस सोसायटीस मेयोंच्या प्रेतांची व जखमी झालेल्या लोकांची काळजी घेण्यास विनंति केली होती. लष्करी अधिकारी

ब्रिगेडियर लाकिन यांनी या कामीं चौकशी केली. तिच्यांत अवघीं आठच प्रेतें सांपडलीं असें आता बाहेर आलें आहे. रेडक्रॉस सोसायटीचें एक पथक तिकडे गेलें असून त्यासहि हीच गोष्ट दिसून आली. अशा रीतीनें प्राणहानीची बातमी खोटी ठरल्याचें पाहून कोणासहि समाधानच वाटेल. संस्थानाचे रेल्हिन्यू मंत्री यांच्या अध्यक्षते-खाली नेमण्यांत आलेल्या कमिटीने योग्य ती चौकशी करून महाराजांस आपला रिपोर्ट सादर केला आहे. महाराजांनीं त्यांवर आपला निर्णय अद्यापि दिला नाहीं. या रिपोर्टाची दखलगिरी व्हाइसरॉयांच्याहि कानावर घालण्यांत आली असून महाराजांनी कोणतें धोरण स्वीकारावें याविषयीं विचारविनिमय सुरू आहे. संस्थानी अधि-काऱ्यांनी केलेली ही चौकशी कितपत न्याय्य व निःपक्षपाती आहे हें पडताळून पाहण्यासाठी हिंदुस्थानसरकारातर्फे एका बड्या अधिकाऱ्याची योजना लवकरच होईल असें प्रसिद्ध झालें आहे.त्या चौकशींत सारावाढीचे बाबतींत अलवार दरबाराकडे जुलुमाचा दोष कितो येतो हें उघडकीस आल्यानें बंडाच्या एका कारणाचा तरी उलगडा होईल.

---

७ ओरिसा प्रांत तिभंग होऊन शेजारच्या बंगाल, मद्रास वगैरे प्रांतांत वांटलेला होता. या विभक्तीकरणाविरुद्ध त्या प्रांताची आज कित्येक वर्षे मोठी जोराची तक्रार होती.आता तिसऱ्या गोल-मेज परिषदेच्या शेवटीं स्टेट सेक्रेटरींनी ओरिसा प्रांत हा एकत्र करून त्याची स्वतंत्र अशी घटना होणार असल्याचें जाहीर केलें आहे.त्यामुळे ओरिसा प्रांतांतील लोकांना आनंद व्हावा यांत नवल नाहीं. राष्ट्रीय सभेच्या घटनेंत भाषावार प्रांतरचना रावयाची ठरली, तेव्हाच हा प्रांत राष्ट्रीय सभेपुरता स्वतंत्र झालाच होता. पण राज्ययंत्र राष्ट्रीय सभेच्या हातीं नसल्यामुळे ओरिसा प्रांताची प्रत्यक्ष व्यवहारांत मोठी ओढा-ताण सुरू होती. ती आता दूर होणार या आनंदाप्रीत्यर्थ, ओरिसा प्रांतांचे गोलमेज परि-षदेंतील सभासद खालिकोटचे राजेसाहेब यांनी स्टेट सेक्रेटरींना विलायतेंत एक बडा खाना दिला व नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें 'यांनी 'परस्परं प्रशंसन्तिः' या तत्त्वानुसार एकमेकांची मनसोक्त स्तुति केली हे ठीकच झालें. जातां जातां स्टेट सेक्रेटरींनी मात्र ओरिसा प्रांतांतील जगन्नाथपुरी हें क्षेत्र हिंदु लोकांचें अत्यंत पवित्र असें स्थान आहे व तेथें जातगोत, स्पर्शा-स्पर्श वगैरे गोंधळ नाहींत ही अभिमानाची गोष्ट आहे असें सांगून जमीनदारांनी निवडणुकीस उभें राहून आपलें कर्तव्य बजवावें असा त्यांना उपदेश केला. ओरिसा प्रांतांतील रयतेविरुद्ध जमीनदारांना उठविण्याचा स्टेटसेक्रेटरींचा हा कावा आहे व तो त्यांच्या शीलाला धरूनच आहे.

---

८ मुंबई कायदेमंडळाच्या पावसाळी बैठकींत स्थानिक स्वराज्यखात्याचे दिवाण सर रुस्तुम वकील यांनी ग्रामपंचायतीचें बिल आणलें होतें व तेव्हा त्याचें प्रथम वाचन होऊन तें सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्यांत आलें होतें. सिलेक्ट कमिटीने बिलाच्या मूळ स्वरूपांत कांही महत्त्वाचे फेरबदल बहुमताने केले आहेत. ग्रामपंचायतींच्या जुन्या कायद्यानें ग्राम-पंचायतींना न्यायमनसुब्याचा अधिकार देण्यांत आला नव्हता. परंतु सिलेक्ट कमिटीने बहुमताने ग्रामपंचायतींना दिवाणी व फौजदारी खटले चाल-विण्याचा अधिकार देण्याची सूचना करून त्यासाठीं ग्रामपंचायतींतील कांही सभासद व बाहेरील कांही गृहस्थ यांची एक छोटी न्यायसभा निर्माण करावी असे म्हटलें आहे. तिचे अध्यक्ष व सभासद हे सर्व कलेक्टरानेच निवडावयाचे आहेत. 'ही न्याय-सभा निवडण्याचा अधिकार ग्रामपंचायतीला असावा, तिला गरजच वाटली तर कायद्यांतील विशेष तज्ज्ञ म्हणून तिने कांही सद्गृहस्थांना आपले सन्मान्य सभासद या नात्यानें समाविष्ट करून घ्यावें. कलेक्टरानें सभासद निवडणें व ग्राम-पंचायतीनेच आपली न्यायसभा निर्माण करणें यांत तत्त्वाचा प्रश्न असून पहिली न्याय-सभा सरकारच्या हातचें बाहुलें होऊन राहील; तर दुसरी न्यायसभा स्वतंत्रपणें व निःपक्षपातीपणाने न्यायदानाचें कार्य करण्यास समर्थ होईल' असें रा. ब. भीमराव नाईक यांनी आपलें मत दिलें आहे.

---

९ पूर्वीच्या कायद्यानें ग्रामपंचायतींना घरपट्टी बसविण्याचा अधिकार होताच. परंतु एखाद्या ग्राम-पंचायतीला घरपट्टी बसवू नये असें वाटलें तर तसें करण्याचा विकल्प नव्हता; नव्या कायद्यानें घरपट्टी विकल्पानें बसविण्याची सवलत ग्रामपंचायतींना मिळ-णार आहे. पाटाचें पाणी शेतलागवडीस देणें व त्या-वरील पट्टी वसूल करणें हाहि अधिकार ग्रामपंचायतींना असावा अशीहि कमिटीची शिफारस आहे. गांवांत राहणारा मनुष्य कामधंद्यानिमित्त बाहेरगांवीं राहण्यास गेला असताहि मतदानाचा हक्क त्याला असावा, इनामी खेडेगांवांना हा कायदा लागू करण्याचा सर-कारास अधिकार असावा, अल्पसंख्य जातींना त्यांच्या संख्येच्या प्रमाणांत निवडणुकींत जागा मिळाल्या नाहींत तर तें प्रमाण भरून काढण्याचा अधिकार कलेक्टरास असावा इत्यादि आणखी सूचना करण्यांत आल्या आहेत. सिलेक्ट कमिटीने केलेल्या कांही

शिफारशी महत्त्वाच्या असल्या तरी मूळ कायद्यांत सुधारणा होण्यास अजून पुष्कळच वाव आहे. ग्रामपंचायती हा स्वराज्याचा पाया होय ही गोष्ट लक्षांत घेऊन कायदेमंडळाच्या येत्या अधिवेशनांत लोकनियुक्त सभासदांनी त्या संस्था अधिक अव्यंग आणि निर्दोष कशा होतील याबद्दल मोठ्या दक्षतेने प्रयत्न केले पाहिजेत. कार्यक्षम ग्रामपंचायती या आपल्या जबाबदारीवर राज्यकारभार कसा चालवावा हें शिकविण्याच्या प्राथमिक शाळाच असल्याने त्यांच्या यशस्वितेवरच भावी स्वराज्यांतील राज्यकारभाराची यशस्विताहि अवलंबून आहे, असें म्हणण्यास हरकत नाही.

# मीरतच्या खटल्याचें खरें स्वरूप

मीरत येथे हिंदुस्थानातील शेतकरी व कामकरी पक्षाच्या पुढाऱ्यांना व कार्यकर्त्यांना झालेल्या कठोर व जबरदस्त शिक्षा वाचून व ऐकून कोणाहि देशप्रेमी मनुष्याचें अंतःकरण हादरून गेल्याशिवाय राहणार नाही! ज्या सत्तावीस आरोपींना जन्मठेप काळेपाण्यापासून तीन वर्षे सक्त मजुरीपर्यंतच्या शिक्षा झाल्या, त्यांपैकीं बहुतेक तडफदार तरुण, विश्वविद्यालयांच्या परीक्षा दिलेले विद्वान व राष्ट्रांत नवचैतन्य उत्पन्न करण्याची लालसा बाळगणारे असेच आहेत. कांही थोडेजण मुंबईतील गिरणी कामगार वर्गाच्या हालअपेष्टेचे प्रत्यक्ष कटु अनुभव घेतल्यामुळे या नव्या चळवळींत पडले होते. या सर्वांना खटल्याच्या निकालापूर्वी जवळजवळ चार वर्षे आरोपी म्हणून कच्चया कैदेंत राहावेंच लागलें होतें; म्हणजे ही चार वर्षांची सजा त्यांनी वेगळी भोगली आहे. पण यापुढेहि त्यांना ज्या घोर शिक्षा देण्यांत आल्या त्या पाहिल्या म्हणजे त्या सर्वांचें भावी सार्वजनिक आयुष्य संपलें असेंच म्हणावें लागतें. कर्तबगार तरुण पिढींपैकीं इतक्या लोकांचा सरकाराने कम्युनिस्टांविरुद्ध सुरू केलेल्या सत्रांत बळी पडावा ही दुःखाची गोष्ट होय.

सरकाराने उपस्थित केलेला हा खटला अनेक दृष्टींनी विलक्षण होता. हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या व दूरच्या भागांतील मजुरांच्या पुढाऱ्यांनी एकत्र कट केला ही भूमिकाच सकृद्दर्शनीं तरी विलक्षण वाटते. त्यांनी जो कट केला तो म्हणे हिंदुस्थानांतील बादशाही सत्तेचा नायनाट करून त्या ठिकाणीं रशियांतील कम्यूनिस्टांचा नेता स्टॅलिन याची सत्ता स्थापन करण्यासाठीं होता! सेशन जज्जांनी आपल्या निकालपत्रकांत या दोन गोष्टी देऊन पुढे असेंहि म्हटलें आहे कीं, या आरोपींनी वरील ध्येय साध्य करण्याकरितां संप, हरताळ व चळवळ हीं साधनें उपयोगांत आणिलीं. कायद्याच्या कलमांचा कीस काढून त्यांतून हा आरोप सिद्ध करण्यांत आला असेल, नाही असें नाही. पण सामान्य मनुष्याचें मन हा सर्व प्रकार पाहून गोंधळल्यासारखें होतें, यांत शंका नाही. हिंदुस्थानांत जवळ जवळ दृढमूल झालेल्या इंग्रजी बादशाही सत्तेचें अवाढव्य सामर्थ्य व जर्मनीसारख्या आधुनिक शस्त्रास्त्रांनी सज्ज असणाऱ्या महत्त्वाकांक्षी राष्ट्रालाहि उलथेंपालथें करणाऱ्या इंग्रजांचा पराक्रम यांजकडे लक्ष दिलें असतां प्रस्तुत खटल्यांतील अवडंबराचें एका अर्थाने हसूं आल्यावांचून राहात नाही!

खटल्यांतील सर्व इसमांवर ठेवलेला कटाचा आरोप पुराव्याने सिद्ध झाला असें न्यायाधिशांना वाटलें व त्यांनी जबरदस्त शिक्षा दिल्या यांत शंका नाही. 'टाइम्स ऑफ इंडियां' तील लेखकालाहि क्षणभर कां होईना पण ही स्वप्नसृष्टि वाटली. पण ती सत्यसृष्टिच आहे हें पाहून त्याने आपल्या संप्रदायास अनुसरून या निकालाचें समर्थन केलें आहे हें वेगळें. सरकाराने या खटल्याकरितां साडेसोळा लाख रुपये खर्च केले! हें मनांत आणलें म्हणजे याच खटल्यांतून उपस्थित झालेल्या व असेंब्लीचे माजी अध्यक्ष श्री. विठ्ठलभाई पटेल यांच्या करामतीने जिरलेल्या 'पब्लिक सेफ्टी' बिलाला विरोध करतांना श्री. न. चिं. केळकर यांनी दिलेल्या दृष्टांताचें मात्र येथे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. श्री. केळकर असेंब्लींत म्हणाले होते कीं, "कैकाडणीच्या डोक्यांतून उवा काढावयाच्या तर त्याला हॅरो ट्रॅक्टर म्हणजे वाफेने चालणारा लोखंडी फाळाचा कुळव घालण्यांत शहाणपणा काय?" सारांश मीरतचा खटला तो काय व त्याला पब्लिकसेफ्टीबिल कशाला असा केळकरांच्या म्हणण्याचा आशय होता. तोच न्याय त्याच खटल्यास आजच्या प्रसंगीं लावून मीरतचा खटला तो काय व त्याला साडेसोळा लाख रुपये कशाला असे उद्गार कोणाहि हिंदी माणसाच्या तोंडून निघतील.

मीरत येथील हा खटला केवळ हिंदुस्थानापुरताच नसून त्याचें स्वरूप आंतरराष्ट्रीय आहे. रशियांत झारला पदच्युत करून त्या ठिकाणीं सामान्य जनतेचें राज्य प्रस्थापित करण्याचें प्रचंड कार्य ज्या विचारसरणीमुळे शक्य झालें त्या नव विचारांचे इंग्लंडच नव्हे तर युरोपांतील सर्व देश द्वेष्टे आहेत.

आज जगांत भांडवलशाहीची सत्ता बेदरकार चालत आहे. ही सत्ता नष्ट करून निदान ती आपल्या काबूंत आणून तिला सामान्य जनतेच्या म्हणजेच राष्ट्राच्या सेवेकरितां राबवावयाची ही रशियांतील सोव्हिएटांची विचारसरणी युरोपांतील भांडवलवाल्या राष्ट्रांना पटत नाही. यामुळेच युरोपभर ह्या परस्पर विरोधी मतांची व विचारांची लढालढी कमीअधिक प्रमाणांत चालू आहे. त्या लढालढीचा हिंदुस्थानांत या कटाच्या खटल्याच्या रूपानें प्रतिध्वनि उत्पन्न झाला इतकेंच काय तें. खुद्द इंग्लंडांतहि या चकमकी झाल्या नाहीत असें नाहीं. एका अर्थानें इंग्लंडांतील मजूर पक्षांत झालेल्या फाटाफुटीच्या मुळाशीं हाच झगडा होता! रशियांत समाजाची नवीन घातलेली घडी युरोपास व इंग्लंडास मान्य नाही. समाजांत एवढी उलथापालथ होणें म्हणजेच क्रांति होय व ही क्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न करणें हा त्यांच्या मतानें गुन्हाच आहे. मिरतच्या खटल्यांत भांडवलशाहीच्याच दावणींत सरकारानें बादशहांना बांधले व हिंदुस्थानांतील फौजदारी कायद्याच्या १२१ अ कलमात हें सर्व प्रकरण बसविलें इतकेंच. त्या दृष्टीनें पाहतां मीरत येथील कटाचा खटला कां उभारण्यांत आला हें कोणाच्याहि लक्षांत येईल.

मीरतचा खटला चालविणाऱ्या न्यायाधीशांनी म्हटलें आहे कीं, "रशियांतील 'थर्ड इंटर नॅशनल' या संस्थेचे आरोपी हे 'एजंट' म्हणजे हस्तक होत. त्यांचा प्रत्यक्ष संबंध यासारख्याच इतर संस्थांशींहि होता. या संस्था म्हणजे "आंतरराष्ट्रीय-मजूर संघ' खुद्द इंग्लंडमधील मजूर पक्षांतर्गत कम्यूनिस्ट पक्ष, मजूर पक्षानें चालविलेलें संशोधन मंडळ'हिंदुस्थानांतील वर्कर्स वेलफेअर लीग व 'लीग अगेन्स्ट इंपीरियालिझम' म्हणजे साम्राज्यवादाच्या विरुद्ध असलेलें आंतरराष्ट्रीय मंडळ." या सर्व संस्था प्रसिद्ध आहेत व यांतून काम करणारे लोकहि प्रतिष्ठित व विद्वान आहेत. वरील संस्था व त्यांतील लोक तेवढेच भांडवलशाहीच्याविरुद्ध आहेत असें नव्हे तर इंग्लंडांत दोन वर्षांपूर्वी अधिकारारूढ असणारा मजूरपक्षहि भांडवलशाहीचा तत्त्वतः व कृतीनेहि द्वेष्टाच आहे. मजूर पक्षांतील कांही पुढाऱ्यांनी संप घडवून आणले होते, चळवळी केल्या होत्या व वेळीं खुद्द सरकारास व भांडवलशाहीस देमाय धरणी ठाय करून सोडलें होतें. पण योग्य वेळ येताच हे पुढारी इंग्लंडचें राज्ययंत्र हातीं घेण्यास लायक ठरले. सारांश, असल्या संस्थांशीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध ठेवणें अगर त्यांच्या पुढाऱ्यांनी प्रचलित केलेलीं मतें मान्य करणें हा गुन्हा होत नाही; निदान होऊं नये हें योग्य. मीरत येथील आरोपींनी या मतांचा पुरस्कार केला, यापेक्षां फारसें अधिक केलें नाही असें पुराव्यावरून दिसतें. म्हणूनच ह्या खटल्यांत झाल्या या शिक्षा अत्यंत कठोर होत्या असेंच म्हणावें लागेल!

या खटल्यांतील बरेच पुढारी मुंबईचे असल्यानें आपण मुंबईचेच उदाहरण घेऊं. १९२८ सालीं मुंबईत संपाची वावटळ उठली व या वावटळींत अनेकांचें नुकसान झालें. पण त्या वेळींहि पुष्कळसा व्यावहारिक व अगदींच थोडा असा तत्त्वांचा वाद नव्हता काय? मुंबईतील गिरण्यांत काम करणाऱ्या मजुरांची दुरवस्था वर्णन करणें शक्य नाही. गिरणींतील फाजील कामाचा ताण, पोट भरण्यास अपुरा पडणारा रोजमुरा व माणसांना बुजबुजलेलीं तीं चाळींतील रहावयाचीं खुराडीं ह्या गोष्टी विचारांत घेतल्या तर संपाचीं कारणें शोधण्यास लांब जावयास नको. खुद्द व्हिटले कमिशननें अगदीं निरपेक्षपणें या सर्व परिस्थितीचें केलेलें वर्णन हृदयद्रावक नाही काय? मजूर वर्ग अशा यातना सहन करून संतुष्ट राहिला तरच आश्चर्य असें या कमिशनानें म्हटले आहे.शहाण्याला-सुद्धा वेड लावणाऱ्या पण उलट निर्बलालाहि बलवान बनविण्यास प्रोत्साहन देणाऱ्या या हालअपेष्टांनी संप घडवून आणले तर त्यांत आश्चर्य कसलें? या संपाची शास्त्रोक्त संघटना मीरत येथील आरोपींनी केली व त्यांची व्यक्तिशः विचारसरणी कम्यूनिस्ट पक्षाची होती हें खरें; पण त्यामुळे मुंबईत संप झाले हें खोटें व म्हणून या पायावर उभारलेला पुरावा लटका व लंगडा पडतो इतकेंच आम्हांस म्हणावयाचें आहे.

मीरत खटल्यांतील आरोपींनी दिलेले जबाब म्हणजे समाजसत्तावादावरील व्याख्यानेंच होत. हीं व्याख्यानें जोरदार आहेत, जळजळीत विचारांनीं ओतप्रोत भरलेलीं आहेत, व त्यांत भांडवलशाहीवर जबर हल्ला आहे. पण तीं त्यांचीं मतें आहेत. ते त्यांचे विचार आहेत. व मतांना व विचारांना पायबंद घालणारी शक्ति जगांत नाही, हें कोणासहि कबूल करावें लागेल. खटल्यांतील पुरावा पाहातां त्यांत असा एकहि प्रसंग सिद्ध करून दाखविलेला नाही कीं, ज्या योगानें आरोपींनी कोठेहि अत्याचार केला किंवा सशस्त्र बंड उभारलें असें दिसून आलें आहे. अशा स्थितींत त्यांना झालेली शिक्षा त्यांच्या मताकरितांच झाली अशी लोकांची समजूत व्हावी हें स्वाभाविक होय. लंडनचे सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ प्रो. लास्की यांनी या खटल्यावर जो विशेष आक्षेप

घेतला होता, तो वरील कारणासाठीच. सरकाराने या दृष्टीनेच या चळवळीकडे पाहाणें जरूर होतें. पण सरकारला त्यांत राज्यक्रांति दिसली. महाभारतांत म्हटलें आहे कीं "कालस्य बलमेतावद्-विपरीतार्थदर्शनम्". त्याप्रमाणें कालाच्या प्रभावानें विपरीत भावनाच सरकारच्या मनांत उत्पन्न झाली व त्यामुळेच हा खटला उभारण्यांत आला, असें वाटल्याशिवाय राहात नाही.

मुंबईतील व हिंदुस्थानांतील मजुरांना व कामकऱ्यांना हा खटला व या शिक्षा जबरदस्त आघातासारख्या वाटल्या असतील यांत शंका नाहीं. परंतु ईश्वरीसूत्रच असें असतें कीं असल्या प्रत्येक संकटांतूनच नवीन नवीन घटना व सामर्थ्यें उत्पन्न होतात. म्हणून त्यांनीं धीर न सोडतां कायद्याच्या कक्षेंतच कां होईना पण आपली सुदृढ अशी संघटना केली पाहिजे. संघशक्तीचें महत्त्व सर्वच ठिकाणीं सांगितलें जातें. पण तें जर खरोखरी प्रभावी व्हावयाचें असेल तर मुंबईच्या मजुरांच्या सारख्या परिस्थितींतच. त्यांनीं संघटनाची कास धरावी हीच त्यांची तपश्चर्या. या तपश्चर्येच्या जोरावरच त्यांना आपलें साध्य गांठतां येईल. लोकमान्य टिळकांनीं १९०८ सालींच मुंबईच्या मजुरांना आपल्या एका व्याख्यानांत संदेश दिला होता. त्यांत त्यांनीं मजूर लोकांना सत्ताधारी होण्याचे दिवस खात्रीनें येतील असें म्हटलें होतें. त्या दिवसाकडे डोळे लावून त्यांनीं आपलें कार्य सुरू ठेवावें हेंच योग्य होय.

# मीरतच्या खटल्याचा निकाल

### सोळा आरोपींस काळेपाण्याची शिक्षा

मीरत येथें चाललेल्या खटल्याचा निकाल ता. १६ जानेवारीस सांगितला गेला. त्या दिवशीं हा निकाल होणार होता हें प्रसिद्ध झालें होतें त्यामुळें ज्या "गार्डन हौस" बंगल्यांत कोर्टाची जागा होती, त्या बंगल्याभोंवतीं १६ तारखेस पोलिसाचा कडक बंदोबस्त होता. खास परवाना असलेल्या लोकांनाच आंत सोडलें जाई व प्रत्येकाची कसून झडती घेतली जात होती. स्त्रियांना जाण्यास अजीबातच मज्जाव केला गेला होता.

### खटल्याची अपूर्वता

हिंदुस्थानांत अनेक राजकीय खटले झाले. पण हा खटला सर्व दृष्टींनीं अपूर्व होता असें म्हणणें प्राप्त आहे. खुद्द जॉर्ज बादशहांना गादीवरून काढून टाकण्याचा कट व प्रयत्न केला, असला भयंकर आरोप. खटल्यांतील आरोपींची संख्याहि थोडीथोडकी नसून ती मुळांत ३३ होती. आरोपीहि सर्व सुशिक्षित, विद्वान, परदेशांत अनेक वेळा जाऊन आलेले व अगदी साहेबी थाटाचे. त्यांची जातवारी पाहिली म्हणजेच या खटल्याची अपूर्वता लक्षांत येईल. या आरोपींपैकीं तीन युरोपियन नव्हे तर खुद्द इंग्रज, एक पारशी, मुख्य आरोपी मुसलमान व इतर मुसलमान मिळून चार व बाकीचे हिंदु आहेत. त्यांतहि महाराष्ट्रीय अकरा! खटल्याचें काम तीन वर्षें नऊ महिने व सत्तावीस दिवस चाललें. दहा हजार छापील कागद भरतील एवढें खटल्यांतील लिखाण झालें. निशाण्याच तीन हजार तीनशें पांसष्ट झाल्या. व साक्षीदार सहाशेंपंचाहत्तर घेतले गेले खटल्याचें निकालपत्रकहि अर्थात मोठें झालें. तें छापील सहाशेंपंचाहत्तर पानें आहे. एवढ्या खटल्यास खर्चहि मोठा झाला. सरकारनें या खटल्याकरिता एकंदर रु.१६,५४००० खर्च केले! यावरून हा खटला 'न भूतो' म्हणजे पूर्वी कधींहि झाला नाही असा होता यांत शंका नाही. भविष्य काळाचे मात्र कोणीं सांगावें!

### काळेपाण्याच्या शिक्षा

जानेवारीच्या सोळा तारखेस न्यायाधीशांनी निकाल सांगितला. त्यांत पुढील शिक्षा दिल्या गेल्या.

**जन्मठेप काळेंपाणी**

**एक**—मुजफर अहमद, कलकत्ता.

**बारा वर्षें काळेंपाणी**

**पांचः**—(१) श्रीपाद अमृत डांगे, मुंबई (२) फिलिप स्प्रॅट, कलकत्ता (३) सच्चिदानंद विष्णु घाटे, मुंबई (४) केशव नीलकंठ जोगळेकर, मुंबई (५) रघुनाथ शिवराम निंबकर, मुंबई.

**दहा वर्षें काळेंपाणी**

**तीन**—(१) बेंजामिन फ्रॅन्सिस ब्रॅडले, मुंबई (२) शांताराम सावळाराम मिरजकर, मुंबई (३) शौकत उस्मानी, मुंबई.

**सात वर्षें काळेंपाणी**

**तीन**—(१) सोहनसिंग जोशी, अमृतसर (२) अबदुल मजीद, लाहोर (३) धरणी गोस्वामी, मायमनासिंग.

**पांच वर्षें काळेंपाणी**

**चार**—(१) अयोध्याप्रसाद, कलकत्ता (२) गंगाधर मोरेश्वर अधिकारी, मुंबई (३) पूर्णचंद्र जोशी, अलाहाबाद (४) मोतीराव गजानन देसाई, मुंबई

**चार वर्षें सक्तमजुरी**

**सहा**—(१) गोपेंद्रचक्रवर्ती, डाका (२) गोपाळ बक्ष, डाका (३) ह्युग्लेस्टर हचिनसन,

मुंबई ( ४ ) राधाराम मित्र, बरद्वान ( ५ ) एस् एच. झाबवाला, मुंबई (६) केदारनाथ सहगल, लाहोर

**तीन वर्षें सक्तमजुरी**

**पांच**—( १ ) गौरीशंकर मिरत (२) लक्ष्मणराव कदम, झांशी ( ३ ) शमसुल हुसेन, कलकत्ता ( ४ ) गोविंद रामचंद्र कासले, मुंबई, ( ५ ) अर्जुन आत्माराम आळवे, मुंबई.

**दोषमुक्त**

**तीन**—( १ ) किशोरीलाल घोस, कलकत्ता ( २ ) शिवनाथ बानर्जी, कलकत्ता ( ३ ) डॉ. विश्वनाथ मुकर्जी गोरखपूर.

**प्रथमतःच दोषमुक्त**

**एक**—धर्मवीरसिंह, मीरत

**मृत**

**एक**—धुंडिराजपंत ठेंगडी, पुणें

**फरारी**

**एक**—अमीर हैदरखान

**आरोपींची माहिती**

**श्री. डांगे**—ऑल इंडिया ट्रेड यूनियनचे दुय्यम चिटणीस, मुंबईच्या गिरणी कामगार यूनियनचे मुख्य चिटणीस.१९२८ मधील गिरण्यांचा संप हे चिटणीस असतांना झाला. इंग्रजी साप्ताहिक 'सोशॅलिस्ट' या पत्राचे संपादक. १९२४ मध्यें कानपूर येथील कटाच्या खटल्यांत चार वर्षें शिक्षा.

**श्री. घाटे**—ऑल इंडिया ट्रेड यूनियनचे दु. चिटणीस.१९२७ ऑल इंडिया वर्कर्स व पेझंट पार्टीचे सभासद, गिरणी कामगार यूनियनचे खजिनदार.

**श्री. जोगळेकर**—गिरणीकामगार यूनियनचे चिटणीस, ऑल इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसचे प्रतिनिधि. जी. आय. पी. रेलवेमेन यूनियनचे प्रमुख सभासद.

**श्री. झाबवाला**—गिरणी कामगार यूनियनचे उपाध्यक्ष, ऑल इंडिया रेल्वेमेनचे चिटणीस.

**शौकत उस्मानी**—'पेशावरहून मास्को' या पुस्तकाचे कर्ते. १९२० मध्यें रशियांत गेले होते. १९२४ मध्ये कानपुर कटाच्या खटल्यांत चार वर्षांची शिक्षा झाली होती. मुंबईस निघणाऱ्या 'पमये मजदूर' या उर्दू पत्राचे संपादक.

**बी. एफ्. ब्रॅडले**—ऑल इंडिया पेझंट व वर्कर्स पक्षाचे एक प्रमुख कार्यकर्ते, इंग्रज एंजिनियर.गिरणी कामगार यूनियन, जी. आय्. पी. रेल्वेमेन यूनियन् वगैरेचे सभासद

**श्री. मिरजकर** 'क्रांति' पत्राचे संपादक. मुंबईच्या वर्कर्स व पेझंटपक्षाचे सभासद, ब्रिटिश इंडिया-स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या नोकरांच्या युनियनचे सेक्रेटरी.

**श्री. आळवे**—साठ हजार सभासद असलेल्या गिरणी कामगार युनियनचे अध्यक्ष.

**श्री. कसाले**—गिरणी कामगार युनियनचे अधिकारी.

**श्री. अधिकारी**—डॉक्टर ऑफ एंजिनियरिंगची परीक्षा देऊन १९२८ सालीं जर्मनीहून आले. मुंबई विश्वविद्यालयाचे उच्च पदवीधर, बंगलोर इन्स्टिटयूटचे विद्यार्थी. यांनी 'स्पार्क' या पत्रांत एक लेख लिहिला !

**श्री. देसाई**—१९२२ च्या जानेवारींत निघालेल्या 'स्पार्क' या इंग्रजी पत्राचे संपादक. इंग्लंडमध्ये व सर्व युरोपभर यांनी प्रवास केला होता. 'डेली हेरल्ड' वगैरे लंडनमधील पत्रांत लेख लिहीत असत. ब्रिटिश लेबर पार्टीच्या हिंदी कमिटीवर ते सभासद होते.

**श्री. निंबकर**—गिरणी कामगार युनियनचे उपाध्यक्ष, ऑल इंडिया वर्कर्स व पेझंट पार्टीचे चिटणीस, मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे चिटणीस.

**मि. लेस्टर हाचिनसन**—मुंबईच्या 'इंडियन डेली मेल' पत्राचे उपसंपादक म्हणून प्रथम मुंबईस आले. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीचे पदवीधर व लंडनमध्ये गिरणीकामगार युनियनचें उपाध्यक्ष. 'न्यू स्पार्क' पत्राचे संपादक.

**श्री. किशोरीलाल घोष**—'अमृत बझार' पत्रिकेचे उपसंपादक, संपादकांच्या अखिल भारतीय मंडळाचे चिटणीस, कलत्त्यांतलि अनेक कामगार मंडळांचे चिटणीस.

**मि. फिलिप स्प्रॅट**--केंब्रिज विश्वविद्यालयाचे पदवीधर, इंग्लंडमधील कामकरी वर्गाच्या चळवळींतील प्रमुख कार्यकर्ते. 'हिंदुस्थान व चीन' हे प्रत्रक लिहिल्याबद्दल १९२७ मध्ये यांच्यावर खटला झाला होता. पण ते निर्दोषी सुटले. १९२८ मध्ये बंगाल्यांतील कामकरी वर्गाच्या चळवळींत पुढारी होते.

**श्री. घोष**—१९२८ मध्ये भरलेल्या पहिल्या ऑल इंडिया वर्कर्स व पेझंट पार्टीच्या परिषदेचे अध्यक्ष.

**श्री. पूर्णचंद्र जोशी**—अलाहाबाद विश्वविद्यालयाचे पदवीधर. 'क्रांति–कारि' पत्राचे संपादक.

**अबदुल मजीद**—खिलाफत चळवळींतील प्रमुख कार्यकर्ते. पेशावर येथील कटाच्या खटल्यांत यांना एक वर्ष सजा झाली होता. हे रशियांत गेले होते.

**श्री. सहगल**—पंजाब नवजवान भारत सभेचे अध्यक्ष, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभासद, राजद्रोही भाषणाबद्दल याना पूर्वी तीन वर्षांची शिक्षा झाली होती.

**मुझफर अहमद**—१९२४ च्या कानपूर खटल्यांत

चार वर्षांची यांना शिक्षा झाली होती. 'गाना वानि' पत्राचे संपादक, ऑल इंडिया ट्रेड युनियनचे उपाध्यक्ष.

श्री. प्रसाद, श्री. कदम, श्री.गोपाळ बसक, डॉ. मुखर्जी, श्री. मित्र, श्री. गौरीशंकर व गोस्वामी एस. हुदा, श्री. बानर्जी व श्री. चक्रवर्ती हे सर्व संयुक्तप्रांत, बंगाल व पंजाब मधील कामगार वर्गाच्या चळवळींत पुढाकार घेत असत' व त्यांच्या त्यांच्या प्रांतांत त्यांचा दर्जा मोठा होता.

## थोडा इतिहास

१९२९ च्या मार्चच्या २० व्या तारखेस या खटल्यांतील निरनिराळ्या आरोपींना अटक झाली. हे सर्व निरनिराळ्या प्रांतांतील असल्याने त्या दिवशीं सर्व देशभर मोठाच धक्का बसला. मीरतच्या मॅजिस्ट्रेटाच्या वारंटावरून सर्वांस पकडण्यात आल्यावरून त्या सर्वांना मीरत येथे नेण्यांत आलें.

ता. १२ जून १९२९ मध्ये मि. मिल्नर व्हाइट या मॅजिस्ट्रेटपुढे त्यांच्या खटल्यास प्रथम सुरुवात झाली. ही अर्थात् प्राथमिक चौकशी होती. या चौकशींत ३५० साक्षीदार तपासण्यांत आले व त्यांचा पुरावा ७००० पानें भरतील इतका होता. अखेर १९३० च्या १४ जानेवारीला या मॅजिस्ट्रेटानी सर्व आरोपींना सेशन कमिट केलें, व ३१ जानेवारीला सेशन्समध्यें ह्या खटल्यास सुरुवात झाली. सरकारी बॅरिस्टर मि. लँगफोर्ड जेम्स यांनी सेशन जज्ज मि. यार्क यांच्यापुढे या खटल्यास सुरुवात केली खरी; पण ते मध्यंतरीं मृत्यु पावले. त्यांच्या जागीं मि. केंप यांनी नेमणूक झाली. १९३१ च्या मार्चच्या १७ व्या तारखेस फिर्यादी पक्षाचा पुरावा संपला. यानंतर आरोपींनी आपले जबाब दाखल केले. हे जबाब ३००० छापील पानें होतील इतके आहेत. हे जबाब १९३२ च्या जानेवारीच्या २१ तारखेस संपले. यानंतर आरोपीतर्फे २५ मार्च १९३२ पर्यंत साक्षीदार तपासण्यांत आले. फिर्यादी पक्षाच्या बॅरिस्टरांचें भाषण १५ ऑगस्ट १९३२ ला संपलें.

## असेसरांचा अभिप्राय

ता. १६ ऑगस्ट १९३२ रोजीं असेसरांनी आपलीं मतें नमूद केलीं तीं महत्त्वाचीं आहेत. पांच असेसरांपैकी चौघांनी पुढील आरोपींना दोषमुक्त ठरविले होते. ( १ ) ठेंगडी ( २ ) हचिनसन ( ३ ) हुदा ( ४ ) मित्र ( ५ ) घोष ( ६ ) गौरीशंकर ( ७ ) कदम. तीन विरुद्ध एक अशा मतांनी पुढील आरोपी निर्दोषी ठरले होते! ( १ ) झाबवाला ( २ ) आळवे ( ३ ) कसाले ( ४ ) सहगल ( ५ ) देसाई ( ६ ) मुखरजी. पाचव्या असेसरांनी सर्वच कमी अधिक प्रमाणांत दोषी आहेत. पण त्यांच्यावर राजाविरुद्ध बंड करण्याचा आरोप सिद्ध झाला नाही असें सांगितलें. बाकीच्या सर्वांना चार असेसरांनी दोषी ठरविलें होतें .

## आरोप

या खटल्यांत जो आरोप ठेवण्यांत आला तो इंडियन पीनल कोडाच्या १२१ अ कलमाखालील होता. मुख्य बॅरिस्टर मि. लँगफर्ड जेम्स यांनी त्या आरोपाचे थोडक्यांत पुढीलप्रमाणें वर्णन केलें होतें. ते म्हणाले, "हिंदुस्थानांतील बादशाही सत्ता बादशहांपासून हिसकाऊन घेण्याचा कट या आरोपींनी केला होता व राज्यक्रांति करून तो उद्देश साध्य करावयाचा असें त्यांनीं ठरविलें होते. उलट ही क्रांति म्हणजे राष्ट्रीय तत्त्वावर उभारलेली क्रांति नव्हे ही राष्ट्रीयत्वाच्या तत्त्वाविरुद्ध क्रांती होती. कारण, बादशहांचे राज्याचा नाश करून त्या ठिकाणीं रशियन बोल्शेव्हिकांच्या थर्ड इंटर नॅशनलची सत्ता यांना संस्थापन करावयाची होती. म्हणजेच बादशहांच्या जागीं रशियन पुढारी स्टॅलीन याची सत्ता स्थापन करण्याचा यांचा इरादा होता.'

## बचाव

या आरोपींपैकीं १८ आरोपींनीं स्वतःचा बचाव करतांना मार्क्स् व लेनिन यांचीं मतें आम्हांस पटतात, व त्यावर आमचा विश्वास आहे असें सांगितलें. पण त्यांनी असें सांगितलें कीं, हीं मतें असणें म्हणजे गुन्हा करणें नव्हे. समाजाची विस्कटलेली घडी नवीन अर्थशास्त्राच्या पद्धतीवर बसविण्यांत आपण राष्ट्राचें हितच साधतों, शिवाय, सर्व देशांत हीं मतें आज सर्वमान्य झालीं आहेत.इतर आरोपींनी सांगितलें कीं, आपण कम्युनिस्ट नाही, व आपला थर्ड इंटर नॅशनलशींहि संबंध नाही.आपण राष्ट्रीय सभेचे अनुयायी अगर कामगार वर्गाची कायद्याप्रमाणें संघटना करणारे व फारतर समाजसत्तावादी आहों. बादशहाविरुद्ध कट आपण केला नाही व करण्याचा इरादाहि नव्हता.

## न्यायाधीशांचा निकाल

न्यायाधीशांनी लिहिलेलें निकालपत्रक फार मोठें आहे. पण त्यांतील सारांश असा आहे कीं, "रशियांत कम्युनिस्ट इंटर नॅशनल या नांवाची एक संस्था आहे. ह्या संस्थेचा उद्देश सर्व देशात रशियाप्रमाणे राज्यक्रांति घडवून आणून रशियाप्रमाणे 'सोव्हिएट रिपब्लिक' म्हणजे समाजसत्तावादी अशी नवी राज्यपद्धति निर्माण करावयाची' हें ध्येय साध्य करण्याकरिता त्यांनी सर्व देशांत आपले प्रचारक पाठविले व आरोपींपैकीं कांही तसे प्रचारक व इतर त्यांचेंच कार्य करणारे लोक आहेत. यांचा काम करण्याचा मार्ग प्रसिद्ध आहे. कामगार वर्गांत असंतोष उत्पन्न करून व त्यांच्या संस्था स्थापून शेवटीं 'सशस्त्र राज्य-क्रांति'

घडवून आणावयाची हा त्यांचा मार्ग आहे. पुराव्यावरून असें सिद्ध झालें आहे कीं, आरोपींनी हिंदुस्थानांत वरील मार्गानें क्रांति करण्याचा प्रयत्न केला, व मीरतें येथे व इतरत्र बादशहांचें राज्य हिरावून घेण्याबद्दल त्यांनी कट केला म्हणून ते सर्व दोषी आहेत!"

# भाषाशुद्धि व भाषावृद्धि

अलीकडे भाषाशुद्धीच्या दृष्टीने अनेक प्रयत्न अनेक ठिकाणीं चाललेले दिसतात. एक राष्ट्रीयभाषा करण्याचा विचार आज तितक्या तीव्रतेनें पुढे मांडण्यांत येत नसला तथापि त्याच्या सिद्ध्यर्थ बडोदें संस्थानांतून वगैरे प्रयत्न शीघ्रगतीनें चाललेले दिसतात. हिंदी प्रचाराचें कार्य निरनिराळे संघ स्थापन होऊन उत्साहानें होतच आहेत. अशा वेळीं एका महत्त्वाच्या गोष्टीकडे लक्ष वेधणें अवश्य आहे. भाषेमध्ये अनेक भाषेंतील शब्द मिसळल्यामुळें होणारी हानी ही स्वाभिमानाच्या दृष्टीनें तीव्रतेनें भासते हें जितकें खरें आहे तितकेंच असें शब्द मिसळल्यामुळें ती मूळ भाषेपासून दूर दूर जाते व परभाषांचा अभ्यास न केलेल्या आणि केवळ बोलींत असलेल्या भाषेशीं परिचित असलेल्या अशिक्षितांना समजेनाशी होते हेंहि खरें आहे. कोणत्याना कोणत्या शब्दांच्या आणि रचनेच्या द्वारा बोलणाराचा भावार्थ ऐकणाराच्या मनावर ठसण्याची जी क्रिया ती या अशुद्ध भाषेनेंहि साधूं शकते, असें कोणीं म्हटल्यास, तें वरील अशिक्षितांचा अपवाद सोडून, बहुधा खरें आहे. यांत विपर्यासाची तरी चूक होत नाहीं. परंतु दुसरा असा एक जो विपर्यासाचा प्रचार हळुहळू व न कळत रूढ होत आहे त्याबद्दल आपण काळजी घेणें अवश्य असूनहि घेत नाहीं असें दिसतें. परस्परांच्या लिपींना व भाषांना पारखे झाल्यामुळे आपलें आंतरप्रांतीय लिखाण व वाचन इंग्रजींतच होऊं लागून स्वदेशांतील स्थलनामें व व्यक्तिनामेंहि हल्लीं आपण विपर्यस्त वाचीत आहोंत याची जाणीवहि नाहीशी झाली आहे. वास्तविक लोकांचीं व स्थलांचीं जीं खरीं नांवें असतील तीं बदलण्याचें कोणतेंहि कारण नाहीं, एवढेंच नव्हे तर तशीं तीं बदलण्याचा कोणाला हक्कहि नाहीं. हिंदी किंवा अन्य लिपी यथोच्चार लेखनक्षम असल्यामुळे त्यांच्या मार्फत मिळालेलें ज्ञान उच्चारांचे बाबतींत यथार्थ असतें.

***

इंग्रजी लिपी ही अत्यंत सदोष असल्यामुळें केवळ तिच्या अक्षर वाटिकेवर अवलंबून राहणाऱ्यांची गैरसमजूत कशी होणें शक्य आहे याबद्दल मुद्दाम उदाहरणें देण्याची जरूर आहे असें नाहीं. तथापि गोखेल व रानेडे हे उत्तर हिंदुस्थानी विपर्यास गोखले व रानडे याचेबद्दल होऊं शकले ही गोष्ट पुष्कळांस माहीत असेल. आपल्या आसपासच पाहिलें तर पुणें याचें पूना, खडकी बद्दल किरकी, भांबवडे याचे भांबुर्डा हीं रूपांतरें आपल्या देखत देखत होत असून आपण तीं सररहा स्वीकारीत आहोंत. आपल्या इतिहासांतील कित्येक नांवांची विल्हेवाट इंग्रज इतिहासकार कशी करतात ह्याचीं उदाहरणें शोधण्यास लांब जाण्यास नको. देहली, अलवर, मथुरा वगैरे नांवें मुळांतून शोधून काढून वापरण्यास लागणें आता अगदीं अवश्य झालें आहे. इंग्रजी भाषेंत पत्रें लिहिणारांनीहि इंग्रजांनी चुकून केलेलीं स्पेलिंगें वापरलीं पाहिजेत असा शिष्टाचार बाळगण्याचें कारण नाहीं हें जितक्या लवकर लक्षांत येईल तितकें इष्ट आहे. इंग्रजी भाषेमार्फत परदेशांचे भूगोल व इतिहास शिकण्यांत हाच दोष निर्माण होतो. स्वदेशांतून परदेशांत शिक्षणाकरितां जाऊं इच्छिणारांचा वर्ग दिवसेंदिवस वाढत जाणार असें धरून चालण्यास हरकत नाहीं. अशा वेळीं भावी उपयोगाच्या दृष्टीनें व यथार्थ ज्ञानाचें महत्त्व समजून हल्लींच्या शिक्षक वर्गानें परदेशी विशेषनामांचे यथार्थ उच्चार कसोशीनें शोधून काढून विद्यार्थ्यांच्या कानावर घालणें आवश्यक आहे. एकदा हें तत्त्व सर्वमान्य झालें म्हणजे हल्ली भूगोलाचीं पुस्तकें तयार करणारांना थोड्या श्रमांत इष्ट त्या दुरुस्त्या करता येतील. तात्पर्य, ज्या कोणत्या माध्यमाची अतीव मध्यस्थी पत्करल्यामुळें आपण वास्तविक ज्ञानाला मुकतों त्याचा शक्य तितक्या लवकर व निदान तेवढ्यापुरता तरी त्वरित त्याग केला पाहिजे.

***

विटंबना हा शब्दच मुळीं वीट आणि तिरस्कार उत्पन्न करणारा आहे. तशांत आपली स्वतःची, आपल्या मातेची आणि भाषेची विटंबना कोणीं केल्यास ती कोणाला बरें सहन होईल? परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, स्वभाषेची विटंबना पाहून हिंदी लोकांना लाज तर वाटत नाहीच; परंतु तीं विटंबना करण्यांत ते स्वतःच धन्यता मानतात! कालविपर्यय म्हणतात तो हा! आपणच आपल्या भाषेची विटंबना कशी करतों तीं पाहा. दोन विद्यार्थी रस्त्यांत

भेटले कीं, एकमेकांस म्हणतात, " आज आमच्या सरनी आम्हांला आलजिब्र्याचीं दोन एग्झाम्पल्स सॉल्व्ह करावयास दिलीं आहेत. " एका निश्वासाने दोनहि भाषांचा खून करणाऱ्या या मुलांची कींव करावी कीं त्याचा धिक्कार करावा हेच समजत नाही. असल्या धेडगुजरी वाक्संप्रदायाने कोणत्याच भाषेचें किंवा स्वतः वक्त्याचेंहि हित साधत नसून सर्वांचाच त्यांत घात आहे. भाषेची आपल्या हातून अशी विटंबना होत आहे हें न समजण्याइतके हल्लीचे सुशिक्षित बेभान बनले आहेत. अपरिहार्यतेमुळे क्वचित् संभाषणांत किंवा लेखनांत परकीय शब्द आले तर तें क्षम्य होत. परंतु जेव्हा सर्व व्यवहार केवळ मातृभाषेतूनच होणें शक्य आहे अशाहि वेळीं सुशिक्षितांनी परकीय शब्दांची वेसण मातृभाषेच्या नाकात घालावी या वर्तनाला म्हणावें तरी काय ? भाषावृद्धीच्या दृष्टीने मिश्र भाषाव्यवहार व परकीय भाषेंतून करण्यांत येणारा पत्रव्यवहार या दोनहि अनिष्ट गोष्टी ताबडतोब बंद झाल्या पाहिजेत. सवयीचा प्रभाव प्रबळ असल्याने प्रथम प्रथम ही सुधारणा होणे अवघड जाईल. परंतु सुशिक्षितांनी तसा निश्चयच केल्यास हे दोष काढून टाकणें दुर्घट नाही. सुशिक्षितांना मातृभाषेच्या संरक्षणासाठी एवढाहि प्रयत्न करता येणे अशक्य वाटत असेल तर त्यांच्यापेक्षा मराठी बोली शुद्ध बोलणार अशिक्षित गावढे लोक अधिक समंजस म्हणावे लागतील!

स्वतंत्र महाराष्ट्र विद्यापीठ केव्हा स्थापन व्हावयाचें असेल तें होवो; त्यापूर्वी निदान मुंबई विद्यापीठाच्या सत्तेखाली असलेल्या इंग्रजी शाळांतील शिक्षण त्या त्या मातृभाषेंतून देण्यांत यावे अशी फार दिवसांची मागणी आहे. मुंबई सरकारच्या शिक्षणखात्याने १९१४ सालीं वर्गांमध्ये मातृभाषेंतून पाठ देण्याची शिफारसहि केली होती. परंतु शिक्षणखात्याच्या या शिफारशीला १९२५ सालापर्यंत विद्यापीठाची मान्यता मिळू शकली नाही. मॅट्रिकच्या वर्गांत असलेल्या विद्यार्थ्यांना वार्षिक परीक्षेंतील प्रश्नांचीं उत्तरें मातृभाषेंतून देण्याची सवलत असावी अशा तऱ्हेचे ठराव सेनेटकडे पाठविण्यांत आले होते. परंतु विरोधाच्या भोवऱ्यांत सांपडल्यामुळे ते मधल्यामध्येच गटंगळ्या खात पडले. १९२५ सालीं मात्र विरोधाचें पाणी बरेंच तुटून इतिहास आणि संस्कृत, पाली, पर्शियन इत्यादि दुय्यम भाषा यांच्या प्रश्नपत्रिकांचीं उत्तरें मातृभाषेंतून लिहिण्यास विद्यार्थ्यांना सवलत देण्यांत आली. मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिक परीक्षेसाठी असलेल्या कांही विषयांच्या प्रश्नपत्रिकांचीं उत्तरें मातृभाषेंतून देण्याची विद्यार्थ्यांना जी सवलत देण्यांत आली तिचा कितपत उपयोग केला जातो याचा ठोकताळा पाहण्यासाठीं पुण्याचे प्रो. एम्. आर. परांजपे यांनी १९३२ सालापर्यंतचा अहवाल तयार केला असून तो हिंदुस्थान-सरकारच्या शिक्षणखात्याकडून नुकताच प्रसिद्ध झाला आहे. प्रो. परांजपे यांनी सदर अहवालांत परीक्षेंतील प्रश्नांचीं उत्तरें मातृभाषेंतूनच लिहिण्याकडे दिवसेंदिवस विद्यार्थ्यांच्या मनाचा ज्यास्त ओढा कसा लागत चालला आहे याचें कोष्टकें, ग्राफ इत्यादि साधनांनी मोठें मार्मिक विवरण केलें आहे.

***

मातृभाषेंतून शिक्षण देऊं नये व प्रश्नांचीं उत्तरेंहि मातृभाषेतून देण्यास विद्यार्थ्यांना सवलत असूं नये असे म्हणणाऱ्या पक्षाचा मोठा आक्षेप असा कीं, त्यामुळे इंग्रजी भाषेचा अभ्यास मागे पडून विद्यार्थ्यांचा तो विषय कच्चा राहील. आक्षेपकांचें हें विधान अनेक दृष्टींनी सदोष आहे. पहिला दोष असा कीं, इंग्रजी भाषेचें शिक्षण हेंच विद्यापीठाच्या शिक्षणाचें ध्येय आहे अशी त्यांची चुकीची समजूत झालेली दिसते. दुसरें असें कीं, मातृभाषेचा माध्यम म्हणून उपयोग व इंग्रजी भाषेचें ज्ञान यांच्यात अहिनकुलवत् थोडाच विरोध आहे? इंग्रजी भाषा उत्तम येऊन तिच्यांतील विषयांचें सम्यग्ज्ञान होणे हा स्वतंत्र विषय आहे. इतिहास इंग्रजींतून शिकताना आपल्याला इंग्रजी भाषेंत प्रावीण्य मिळावें म्हणून विद्यार्थी तो विषय शिकत नसून इतिहासज्ञानासाठीच त्या विषयाचें अध्ययन करीत असतो. इंग्रजीव्यतिरिक्त इतिहास, भूगोल, संस्कृत, गणित इत्यादि विषय इंग्रजींतूनच शिकविले जात असल्याने व परीक्षाहि त्याच भाषेंतून द्यावयाची असल्याने विद्यार्थ्यांची मनस्वी कुचंबणा होऊन त्या त्या विषयाचें आकलन त्यांना होत नाही तें नाहीच. उलट इतिहास व दुय्यम भाषा यांच्या प्रश्नपत्रिकांचीं उत्तरे मातृभाषेंतून लिहिण्याचीं विद्यार्थ्यांना सवड मिळाल्यापासून पूर्वीच्यापेक्षा हीं उत्तरें अधिक सरस ठरत असून त्या त्या विषयाचें ज्ञान विद्यार्थ्यांना उत्तम झाले असल्याचें त्यांत दिसून येतें असें परीक्षकांनीच शेरे दिले आहेत व ते या अहवालांत मुद्दाम उद्धृत करण्यात आले आहेत. आधींच परकी भाषा अपरिचितपणामुळे शिकण्यास व समजण्यास अवघड आणि तशांत त्या भाषेच्या द्वारें संस्कृत, इतिहास यांसारख्या विषयांचे पाठ देणें व परीक्षा घेणे म्हणजे बालविद्यार्थ्यांच्या बुद्धीचा, शक्तीचा व कालाचा शुद्ध अपव्यय करणें होय. मातृभाषेमुळे इंग्रजी विषय कच्चा होतो हा युक्तिवाद तर्कदुष्ट कसा आहे हें प्रो. परांजपे यांनी आपल्या या अहवालांत

अन्वयव्यतिरेक पद्धतीने दाखविलें आहे. अहवालांतील या प्रत्यक्ष अनुभवावरून तरी यापुढे इंग्रजीशिवाय सर्व विषयांच्या प्रश्नपत्रिकांचीं उत्तरें मातृभाषेंतून सर्रास देण्यास मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांना मुंबई विद्यापीठ सवलत देईल व तेंच लोण पुढे कॉलेजच्या आवारांतहि खेळवील अशी आशा आहे.

# म्हैसूर संस्थानांतील उद्योगधंदे

## १९३०–३१

म्हैसूर संस्थानामध्ये सरकारी प्रोत्साहनाने साबण, चंदन, वगैरेचे मोठे कारखाने निघाले आहेत व निघत आहेत. अशा दृष्टीने म्हैसूर संस्थानाचें लक्ष वाणिज्यविषयाकडे विशेष वळलेलें आहे. म्हैसूर संस्थानामध्ये तयार होणाऱ्या मालाचा उठाव परदेशात होण्याकरिता लंडन येथे म्हैसूर संस्थानाच्या व्यापारसंरक्षण खात्याचे एक अधिकारी कायमचे ठेवण्यांत आलेले आहेत. त्यांनी आपल्या कामगिरीचा रिपोर्ट सरकाराकडे सादर केलेला आहे. त्यावरून म्हैसूर संस्थानाच्या व्यापारासंबंधाची कल्पना येण्याजोगी आहे.

### चंदनी तेल

सन १९३०-३१ या वर्षांत युरोप व अमेरिका या देशांत एकंदर १,२१,१५८ पौंड ( वजन ) चंदनी तेल विकण्यांत आलें, पण १९३१-३२ सालीं फक्त ६४,१३७ पौंडच ( वजन ) तेल खपलें. यास व्यापारमंदी, लोकांचें दारिद्र्य, जिन्नस विकत घेण्याची आवड कमी वगैरे कारणें देण्यांत आलीं आहेत. यावरून गतवर्षापेक्षा या वर्षी निम्मा व्यापार कमी झाला असें दिसून येतें. या चंदनी तेलाच्या व्यापाराकरितांच फक्त १४६३१ पौंड रक्कम खर्च झाली आहे.

### भद्रावती कारखाना

भद्रावती येथे सरकारचा लोखंड व पोलाद यांचा मोठा कारखाना असल्याचें प्रसिद्धच आहे. या कारखान्याकडून नफा न होतां तोटाच होत आहे. तरीदेखील हा पांढरा हत्ती पोसण्याचें म्हैसूर सरकारने ठरविलें आहे! सन १९३१-३२ या वर्षांत या कारखान्यांत १,८०,००० रुपये नुकसान झालें. पण कौन्सिलांत पुढील वर्षाकरितां पुनः एक लक्ष रुपयांची मागणी या कारखान्याकरितां करण्यांत आली आहे !

### सोन्याच्या खाणी

सन १९३०-३१ या वर्षांत संस्थानांतील पांच खाणींमधून ३,३०,४३४ औंस सोनें व २२,६०५ औंस चांदी काढण्यांत आली. पूर्वीच्या वर्षी ३,२९,१३४ औंस सोनें व १७,८४४ औंस चांदी काढण्यांत आली. पहिल्या वर्षी यांची किंमत १३,९६,१४६ पौंड झाली व या वर्षी १५,०६,७४० पौंड रक्कम इतकी झाली. खाणींतून काढलेलें सोनें व चांदी यांच्यांत या दोन वर्षांत फारसा फरक नसला तरी सोन्याचा भाव वाढल्यामुळे १६,४५,९४ पौंड रक्कम या वर्षी जास्त आली. सोन्याच्या खाणीच्या कंपनीने भागीदारांना पूर्वीच्या वर्षी १,७९,००० पौंड नफा वांटला. तर या वर्षी २,१९,०११ पौंड ( म्हणजे गतवर्षीपेक्षा ४००११ पौंड अधिक ) इतका नफा वांटला, म्हैसूर–सरकारला या खाणीच्यासंबंधी मिळणारी रक्कम ८२०९४ पौंड (गतवर्षीपेक्षा ९०३९ पौंड जास्त ) मिळाली. मागील बाकी व सर्व खाणींबाबत चालू वर्षाची सरकारी मालकीबद्दलची मिळावयाची रक्कम मिळून एकंदर १४,४४,०८१ रुपये यावयास पाहिजेत. त्यांपैकीं सध्या ११,०६,७२० रुपये वसूल झाले व ३,३७,३६१ रुपये बाकी आहे.

### कामकरी व अपघात

गेल्या वर्षी सोन्याच्या खाणींत एकंदर १८,३८८ लोक काम करीत होते त्यांपैकीं युरोपियन ३४१, अँग्लो–इंडियन ४००, व हिंदी लोक १७,६४७ होते. खाणींत जमिनीच्या पोटांत ९,९५४ लोक व जमिनीवर ८,४३४ लोक काम करीत होते.

या खाणींत मागील वर्षी १८६ अपघात झाले तर या वर्षी २०० झाले. यांपैकीं ३५ प्राणांतिक अपघात व १६० विशेष स्वरूपाचे आणि ५ सामान्य असे अपघात घडले. यासंबंधीची चौकशी होऊन २२ अपघात दुर्लक्षामुळे, ३२ अज्ञानमूलक, १६३ अपघात अनिवार्य असे ठरले. सन १९३० मध्ये अपघाताने हजारीं दोन मृत्यु तर १९३१ मध्ये हजारीं सात मृत्यु घडले. नंदीदुर्ग येथील खाणींतील अग्निप्रलयामुळे प्राणहानि बरीच झाली. या अपघातासंबंधी विचार करण्याकरिता एक कमिटी नेमण्यांत आली असून त्या कमिटीचा रिपोर्ट अद्याप आला नाही.

### रेशमाचा व्यापार

म्हैसूर संस्थानांत रेशमाचा व्यापार सध्या मुख्य नसला तरी तो मुख्य व्यापार व्हावा अशी परिस्थिति संस्थानाची आहे. पण संस्थानचा रेशमाचा व्यापार यथातथाच चाललेला आहे. चीन व जपान देशांतील स्वस्त रेशमाने बाजार व्यापलेला

आहे. यामुळे स्थानिक रेशमाच्या व्यापारास अडथळा येत आहे. तो दूर करण्याचे सरकारचे प्रयत्न चाललेले आहेत. म्हैसूर वाणिज्यसंघाचे कार्यदर्शीनी यासंबंधाने हिंदुस्थानसरकारकडे एक तार पाठविली आहे.

### ओटावा करार

ओटावा करारामुळे मात्र म्हैसूर संस्थानाच्या व्यापारास बराच धक्का पोहोचण्याचा संभव आहे. सध्याच साबणाच्या व्यापारास तो करार अडचणीचा झाल्याचें दिसून येऊं लागलें आहे.

# म्हैसुराकडील प्रेक्षणीय स्थळांचें दर्शन

( ले. य. न. केळकर )

कांही दिवसांपूर्वी केसरींतून ' राममोहन ' नांवाची प्रवाशांची स्पेशल गाडी नाताळांत म्हैसूरच्या बाजूस सफर करण्यास जाणार असें वाचलें.हा प्रांत पाहण्याची फार दिवस इच्छा होती, आणि त्यांतच प्रवाशांच्या सर्व सुखसोयी घरच्यासारख्या पुरविण्याची राममोहन कंपनीने हमी घेतली होती म्हणून मीहि ताबडतोब तिच्या तांड्यांतला एक मुशाफर बनलों. एकंदर प्रवासी सुमारें १३० असून त्यात दक्षिणी, गुजराथी व पारशी असे तीन गट झाले होते. सर्व प्रवास एकदरींत ठीक झाला. पहिल्या एक दोन मुक्कामीं थोडीशी तारांबळ होऊन प्रवाशाची गैरसोयहि झाली हें खरें. तथापि गैरसोय झाल्याखेरीज प्रवासांत गम्मत येत नाही हें सर्वांनी लक्षांत घेऊन त्याचें कोणी फारसें मानलें नाही.तथापि पुढील वेळीं व्यवस्थापक अधिक दक्षता ठेवतील व ठिकठिकाणीं गाइडस म्हणजे वाटाडे स्थळें दाखविण्याकरितां आगाऊ नेमून ठेवतील तर बरें होईल. हे नाताळाचे दहा दिवस नित्य नूतन स्थळें पाहाण्यांत गेले व पाहिलेलीं सर्वच स्थळें ऐतिहासिक व इतर दृष्टींनी अपूर्व होतीं. तेव्हा त्यांचा परिचय वाचकाना किंचित् करून दिल्यास स्वतःचाहि आनंद द्विगुणित होणार आहे. असो.

### गोकाकचा धबधबा

पहिला मुक्काम गोकाकचा नेमला होता. २३ तारखेस सायंकाळीं पुण्यास स्पेशलमध्ये बसलों व दुसरे दिवशीं सकाळीं नऊ वाजतां गोकाकला पोंचलों. येथून गोकाकचा धबधबा सुमारें चार मैल आहे. तेथपर्यंत सर्व मोटारनेच गेलों. धबधब्याचें वर्णन लहानपणीं चौथीच्या पुस्तकांत वाचलें होतें. त्यानंतर तो प्रत्यक्ष पाहण्याचा योग आज वीस-बावीस वर्षांनी आला. हा धबधबा घटपा किंवा घटप्रभानदीचा आहे.जेथे धबधबा झाला आहे तेथे नदी सुमारें दोनशें फुटांवरून खाली उडी घेते. प्रपाताचा कडा वरपासून खालपर्यंत सरळ तासल्यासारखा साफ आहे.कड्याच्या वर घटप्रभेचे पात्र विस्तीर्ण आहे. मात्र सध्या त्यांतील क्षुद्र नदीचा प्रवाह छोटासाच आहे. सबंध पात्रभर दगडांच्या प्रचंड गोट्यांच्या राशीच्या राशी पसरलेल्या आहेत. पात्र विस्तीर्ण आहे व पावसाळयांत पुराच्या पाण्याने तें दुथडी भरून उचंबळूं लागून मोठ्या वेगाने कड्यावरून उडी टाकूं लागतें तेव्हाचा देखावा खरोखरच प्रेक्षणीय असेल यांत शंका नाही. या रम्य ठिकाणाचा आस्वाद रसिकपणाने जुन्या लोकांनीहि घेतलेला स्पष्ट दिसतो;कारण या धबधब्याच्या उत्तरतीरीं जुनीं तीन-चार देवस्थानें हटकून सापडतात. धबधब्याच्या वर थोड्या अंतरावर तारांचा एक झुलता पूल सबंद पात्रावर बांधलेला आहे. त्यावरून देखावा फार चांगला दिसतो. पण या पुलावरून फिरण्याची खरी मौज पावसाळयांत पुराचे वेळींच असणार हें उघड आहे. कारण त्या वेळीं एखाद्या गिरणींतील अजस्त्र रोलरप्रमाणें सगळें पात्रच्या पात्र पाण्याने उचंबळून येऊन मोठ्या वेगाने गरगरत असतें तेव्हां त्यावरून पायाने चालत गेल्याचा साक्षात्कारच या पुलावरून फिरण्याने होतो म्हणतात.

### पाचूचे पिंजरे

ता. २५ रोजीं सकाळीं शिमोग्यास आलों. हे इतिहासप्रसिद्ध ठिकाण असून येथल्या किल्ल्यांतच हैदर अल्लीस लाख होनांची लूट १७६३ सालीं सांपडली व त्याचा बिदनूर मोहिमेस शुभ शकुन झाला. सध्या हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. येथून गिरसप्पा सुमारें ६०–६५ मैल दूर आहे. हा सर्व प्रवास मोटारींतून झाला व तो अत्यंत सुखकर वाटला. महाबळेश्वरावरील ब्रह्मारण्यांतूनच प्रवास करीत आहोसें वाटलें. सर्व प्रदेशभर दाट जंगल लागून गेलेलें आहे. मात्र तें महाबळेश्वरासारखें खुरटें नसून चांगलें उंच उंच आहे. जंगल असें दाट लागून गेलें आहे कीं, भर बारा वाजतांहि त्यांतून सूर्याचें ऊन चाळणींतून चाळल्यासारखेंच दिसत होतें. रस्ता सर्व लाल मऊ मातीचा होता. दोहों बाजूंच्या दाट वृक्षराजींतून वाहणारे थड वारे, भोंवताली पसरलेलें वन्य सृष्टिसौंदर्य, व लाल रस्ते यामुळे हा

प्रवास किती रम्य वाटतो तें सांगतां येत नाही. मध्यंतरीं शेतांची,पोफळीच्या आगरांची,खेड्यांची जी शोभा दिसली ती अवर्णनीय आहे.असल्या पोफळीच्या हिरव्या गार सरळ सोटांच्या बनावरून मोटार जोरानं निघून जाई तेव्हां रसिक प्रवाशांच्या सौंदर्य शोधीत फिरणाऱ्या चंचल दृष्टिक्षेपांना कोंडून ठेवण्याकरितां हे निसर्गाने ठिकठिकाणीं पाचूचे पिंजरेच उभे केल्या-सारखे दिसत.

मधून मधून कोठे वळण संपून थोडासा निर्वृक्ष प्रदेश दिसे तों तेथे पायऱ्या-खाली पायऱ्या लागून गेल्याप्रमाणे एका-खालती एक सुंदर भातखाचरांचे पट्टे आणि त्यांतून घुमटासारखी सुंदर दिसणारी उडवी आणि त्याभोवती घातलेलीं वेळूच्या कामट्यांचीं कुंपणें दिसत. इतक्यांत फिरून मोटार झाडींत गुडुप होई. रस्ता सर्व लाल असल्यामुळे त्याची धूळ कडेला उगवलेल्या गवतावर पसरून अखंड गुलालाच्या पट्ट्याप्रमाणें ती शोभा दिसे. दुसरी एक गोष्ट अशी दिसली कीं, हीं सर्व भातखाचरें जेथे आहेत ती सर्व उथळ अशीं खोरींच आहेत; आणि त्यांच्या मध्यभागीं निसर्गतःच सुंदर जलाशय साठलेले आहेत. मध्यंतरीं कांहीं खेडीं लागत तींहि मनोहर, स्वच्छ आणि टापटिपीचीं दिसली.अगदी भिकार खेड्याच्या नांवाचाहि मोठा दगड रस्त्यालगत कोरलेला उभा असे. सागर नांवाचें एक इतिहासप्रसिद्ध परंतु आता मध्यम गांव वाटेंत लागलें तेंहि सुंदर दिसलें. वाटेत अनेक ठिकाणी रानांत खपणारे शेतकरी व त्यांचे बैल दिसत. शेतकरी अंगापिंडानें मराठी शेतकऱ्यासारखेच मध्यम उचीचें किरकोळ परंतु काटक होते. पण त्यांचे बैलहि तसेच दिसले. पूर्वी म्हैसूरच्या स्वारीची इंग्रज लेखकांनी व प्रवाशांनी लिहिलेलीं वर्णनें मी वाचलेली होती व त्यावरून इकडच्या प्रांतातले बैल चांगले धिप्पाड व मोठमोठ्या मजली मारणारे असतात अशी समजूत झाली होती.परंतु प्रत्यक्ष पाहतां बैल छोटेच परंतु सुंदर व चलाख दिसले. एक प्रवाशी तर थट्टेने म्हणाला कीं, हे बैल तर गाईसारखेच दिसतात! तें वर्णन हुबेहुब होतें.

## गिरसप्पाचा देखावा

असो. अशा रीतीने दुपारी ३ वाजता जोग फॉल्स या पाटीपाशीं येऊन पोंचलों. येथे रस्ता संपतो. त्याचे पुढे व डावे हातास उंच डोंगर असून मध्ये मोठा थोरला जलाशय बनलेला आहे. तो तराफ्या-वरून तरून जावा लागतो. त्याकारेतां म्हैसूर सरकाराने माणशीं दोन आणे फी घेऊन माणसें चढविण्याउतरण्याची व्यवस्था केली आहे. पैलतीरावर उतरल्यावर उंच उंच वन्य वृक्ष नी दोहो बाजूंनी वेढलेल्या रस्त्याने सुमारें ४-५ फर्लांग डोंगरी चढाव चढून जावे लागतें व तो चढून आपण म्हैसूर-बगल्याजवळ येतों. येथे साधारण मोठें पठारच आहे. पूर्वेस एक टेकडी असून ती गर्द जंगलाने भरलेली आहे. त्याचे खाली मैदान आहे. तेथे उभे राहून पाहिलें असतां पांच-गणीच्या 'टेबल लॅन्ड' खाली उभे राहिल्या-सारखा थेट देखावा दिसतो. येथे म्हैसूर सरकारने एका खाणावळवाल्याकडून प्रवाशांच्या सोयीकारितां खाणावळ ठेवली आहे. तिच्या समोर सुमारें १०० कदमांवर म्हैसूर सरकाराचा बंगला पश्चिमाभिमुख आहे. व त्या बंगल्याच्या व्हरांड्या-पुढे लगेच खोल दरी आहे. येथूनच गिरसप्पाच्या धबधब्याचा देखावा फार उत्तम दिसतो.

हा धबधबा दरीच्या पलीकडच्या टोकास असून तेथल्या कड्यावरून शरावती नदी ९६० फूट खोल उडी टाकीत आहे. ज्या कड्यावरून नदी कोसळते तो महाबळेश्वराच्या आर्थर सीट्समोरील कड्याप्रमाणेच भयप्रद आहे. तेथून कोसळणाऱ्या प्रचंड पाण्याची सोंड ऐरावताच्या सोंडेप्रमाणे अगदी पांढरी शुभ्र दिसते. खाली एक लहानशी टेकडी आहे. तीवर हा प्रवाह कोसळतो. सर्व बळ खर्चून आवे-शाने गर्जना करीत कोसळून पडणारी शरावती आणि तिच्याखाली कांहींच घडत नाही अशा उदासीन वृत्तीने तो 'गुरुवारिभार' डोक्यावर झेलणारें तें त्या टेकडीचें शिखर पाहून गंगावतरणाचीच आठवण होत! पाण्याचे ते प्रचंड प्रवाह इतके पांढरे शुभ्र दिसतात कीं त्यापुढे दूध काय असेल? आणि त्यांतून फेसाचे दाट लोळ उतरतांना स्पष्ट दिसतात तेव्हा एखादा मोठा आटीव दुधाचा हांडा ओततांना त्यांतून साय व मलई पडावी तसे दिसतें. पण येथलें एकंदर भव्य स्वरूप पाहून ही उपमा अगदीच क्षुल्लक वाटते यांत शंका नाही. आज शेंकडो वर्षे हीं नदी अशीच कोसळत आहे आणि पुढेहि शेंकडों वर्षें ती तशीच कोसळत राहणार ही कल्पना लक्षांत आल्यावर वरील उपमा फारच पोरसवदा वाटते.

## पाताळांत पडणारा क्षीरसागर

खरोखर उपमा द्यावयाची तर परमेश्वर क्षीरसागरच सगळाच्या सगळा उपडा करून पाताळांत ओतून टाकीत आहे असें म्हटलें तरच तें शोभेल. धबधब्याच्या मुख्य धारेखाली सुमारें दीडशें फूट खोलीचा खळगा झालेला आहे असें म्हणतात. त्या-वरून पडणारा प्रवाह केवढा प्रचंड असेल व केवढ्या उंचीवरून तो कोसळत असेल याची सहज कल्पना येईल. प्रवाहाखालची सर्व दरी तुषारांच्या पांढऱ्या धुक्याने भरून गेलेली असते.

या वेळीं ऊन पडल्यामुळे प्रवाहाच्या डाव्या बाजूस मोठें इंद्रधनुष्य निर्माण झालें होतें. आणि त्याच्या तलम रंगांतून अनेक पक्ष्यांचे थवे उडतांना आणि वर–वर चढतांना दिसत तेव्हां तर जी शोभा दिसे ती केवळ अवर्णनीय आहे. त्या वेळीं हा जड देह टाकून त्या पक्ष्यांत मिसळून अंतराळांत तरंगता तरंगता त्या स्वर्गीय धारेच्या तुषारांनीं स्नान करण्याची पात्रता आपणांत नाहीं याबद्दल किती चुटपूट लागते ती सांगतां येत नाहीं. एकंदर कड्यावरून चार धारा पडतात. एक एकदम दरींत कोसळते. दुसरी एका टेकाडावर उशी घेऊन उतरते. तिसरी कांचेच्या मण्यांच्या पडद्याप्रमाणे तुटक तुटक वृष्टि केल्याप्रमाणे पडते व चौथी जवळ जवळ तशीच आहे. या चार धारांच्या निरनिराळ्या देखाव्यांवरून त्यांना राजा, राणी, रावण अशीं निरनिराळीं नांवें ठेवलेलीं आहेत.

### महाभूताचें थैमान

या धबधब्याची शोभा पाहण्याचीं मुख्य ठिकाणें दोन. एक म्हैसूर बंगला व दुसरा ब्रिटिश बंगला. म्हैसूर बंगला धबधब्याच्या समोरील कड्यावर असल्यामुळे लांबून एकंदर देखावा पाहण्याच्या दृष्टीने फारच चांगला आहे. ब्रिटिश बंगला हा धबधबा ज्या कड्यावरून कोसळतो त्या कड्यावरच असल्यामुळे तेथून निराळीच शोभा पाहावयास सांपडते. तेथे ऑथरसीटप्रमाणे हत्तीच्या गंडस्थळासारखा एक मोठा खडक पुढे आलेला आहे. त्यावर निजून खालीं पाहिलें म्हणजे मुख्य धार ज्या खळग्यांत पडते तेथला देखावा पाहतां येतो. कड्याची अपरंपार खोली आणि प्रळय काळाचा साक्षात्कार घडविणारें तेथलें महाभूताचें थैमान निर्विकार व निर्भय वृत्तीने पाहणें अशक्य आहे.या टोकावर बसून पाहिलें तर घेरी आल्याखेरीज राहणार नाहीं म्हणून आडवें पडूनच पाहावें लागतें.

असल्या ठिकाणीं एकदोन दिवस मुक्काम केल्याखेरीज निदान मनासारखें दर्शनसुख मिळणें शक्य नाहीं तथापि आम्हास वेळ नसल्यामुळे आम्ही सायंकाळीं ७ वाजता परत मोटारने शिमोग्यास जाण्यास निघालों. अर्थात् तो सर्व प्रवास पूर्वीच्या गर्द जगलांतूनच होता. वाटेने बैलगाड्यांची रहदारी बरीच लागली. प्रत्येक गाडीला हटकून हरिकेन कंदील होता. तें पाहून इकडल्या बैलगाड्यांची आठवण झाली. कारण आपल्या गाडीवाल्यांची रीत प्रसिद्धच आहे ! त्यांचा दिवा फक्त चौकीवरील पोलीस शिपायाला ओवाळण्यापुरता असतो. पोलीसचौकी आली कीं मळकट धोतराची खोळ करून त्यांत क्षणभर एक मेणबत्तीचा तुकडा उजळला कीं संपलें! दुसरी एक गोष्ट दिसली ती ही कीं, प्रत्येक गाडीच्या चाकाला एकेक मोठा खुळखुळा लावलेला होता, व चाकाच्या दर फेऱ्याबरोबर तो मोठ्या तालबद्ध रीतीने साथ देत असे. बैलांच्या गळ्यांत घुंगुर व घंटा होत्याच. याचें कारण बहुधा हा पल्ला जंगलांतून आहे हेंच असावें. असो. आम्ही रात्रीं शिमोगा स्टेशनावर ११ वाजता आलों.

### चंद्रगिरि व इंद्रगिरि

दुसरे दिवशीं म्हणजे २६ तारखेस जेवणखाणे उरकून दुपारीं भद्रावतीस गेलों.तेथला म्हैसूरसरकारचा लोखंडाचा कारखाना पाहून २७तारखेस सकाळीं हसनला पोंचलों.तेथून मोटारने श्रावण बेलगोळ्याला गेलों. स्टेशनापासून सुमारें ४०।४० मैलांच्या सारख्या अंतरावर हाळीबीड व बेलगोळा हीं ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. हाळीबीडचीं देवळें दगडी कोरीव कामाकरिता आणि नक्षीकरितां प्रसिद्ध आहेत. आम्हांस बेलगोळ्याला जावयाचें असल्यामुळे आम्ही तिकडेच गेलों. सुमारें १० वाजता बेलगोळ्याच्या पायथ्याशी पोंचलों. बेलगोळा जैनांचें पवित्र क्षेत्र असून जैन काशी या नांवानें ओळखलें जातें. समोरासमोर दोन पर्वतींपेक्षां थोड्या उंच अशा टेकड्या आहेत. एकीचें नांव चंद्रगिरी व दुसरीचें इंद्रगिरी. त्या दोन टेकड्यांच्या मध्ये गांव व तलाव आहे. गांव खेडेंवजाच आहे. तेथे जैनांचा एक मठ आहे. तलाव चौकोनी असून फारच मोठा आहे व चारहि बाजूंनी घाटासारखा पायऱ्यांनीं बांधून काढला आहे. सबंध तलावाच्या भोंवती मोठा भक्कम दगडी कोट असून चारी भिंतींच्या मधोमध मोठमोठे दरवाजे केलेले आहेत. तलावाचें बांधकाम पुरातन असून मोठें प्रेक्षणीय आहे. मात्र या तलावाच्या पाण्याचा विन्यास उपयोग करीत नाहीत. गावाशेजारी तावरीकट्टी नदी आहे. तिचा उपयोग होतो. चंद्रगिरी समोर जी इंद्रगिरी टेकडी आहे तिजवरहि कांहीं देवस्थान आहे परतु त्यावर आता सगळी मुसलमानांची वस्ती आहे. तेथे सुमारें ४०-५० घरें असतील.

### सत्तर फूट उंचीचा पुतळा

चंद्रगिरी टेकडीच्या चढणीस सुरुवात होते तेथे मोठी वेस केलेली आहे. तेथे पादत्राणें काढून ठेवूनच मग डोंगर चढावा लागतो. ही टेकडी पर्वतीपेक्षा थोडीशी उंच असेल, परंतु सगळा दगड एकसंध असून खडूने पुष्कळ लिहून पुसलेल्या फळ्यासारखा पांढुरका पांढुरका दिसतो. शिवाय विशेष गोष्ट म्हटली म्हणजे तो यत्किंचित् खडबडीत नसून निसर्गतःच गुळगुळीत आहे इतका कीं तेथलीं मुलें वर शिखरापासून तळापर्यंत खालीं घसरण्याचा घसरगुंडीचा खेळ खेळत

असतात. मीहि तो प्रयोग करून पाहिला तेव्हा फार मौज वाटली. या टेकडीची बरोबर कल्पना द्यावयाची तर ती थेट खापराची प्रचंड कुंडी किंवा मोठा घडा उपडा घातल्यासारखी दिसते. वर एकहि झाड-झुडूप नाहीं. गवत वगैरे तर नाहीच; कारण तें उगवावयास भेगा खांचा किंवा कपारी पाहिजेत त्या कोठेच नाहींत. सर्वच टेकडी गुळगुळीत आहे. यामुळे पावसाळ्यांत या टेकडीची स्थिति अक्षरशः पालथ्या घड्यावर पाणी अशी होत असेल. प्रवाश्यांच्या सोयीकरिता त्यांतल्या त्यात उथळ अशा पायऱ्या कोरल्या आहेत. त्या सुमारें ३००-४०० असतील. त्या चढून गेलें म्हणजे प्रथम एका देवळाच्या तोंडाशी आपण येतों. तेथे काळ्या शिळेची बुद्धासारखी बद्धपद्मासनस्थ अशी जैनाची एक चार-पांच फूट उंचीची मूर्ति आहे. ती भव्य व शांत दिसते. अशाच मूर्तींचीं आणखी तीन-चार देवळें तेथे आहेत. तीं पाहून पुढे गलें म्हणजे गोमतेश्वराची मूर्त म्हणजे तिचे शिर बाहेरून दिसूं लागतें. त्यावरून कल्पना होते कीं ही मूर्ति बसलेली असून उंचावर असेल. परंतु देवळांत प्रवेश केल्याबरोबर एक सत्तर फूट उंचीचा प्रचंड पुतळा पाहून मन थक्क होतें. या पुतळयाचा मध्य कल्पून भोंवती चौफेर मोठमोठया ओऱ्या बांधून काढून निरनिराळ्या देवता स्थापन केल्या आहेत. खरोखर ही मूर्त पाहून आश्चर्य वाटतें. कारण येवढी अजस्र ती केवळ एकाच दगडांतून बनविलेली आहे!

शारीरशास्त्रदृष्टया मूर्ति प्रमाणबद्ध असून पुराणकाळीं केवळ हातोड्यानें व छिन्नीने हें काम ज्यांना तयार केलें असेल त्या शिल्प्यांचें केवढें कौतुक करावें! मी ही मूर्ति निरनिराळ्या ठिकाणाहून पाहिली परंतु सगळीकडून ती मोठी प्रमाणबद्ध दिसली. या पुतळयांत हाताच्या बोटांचीं नखेंसुद्धा हुबेहूब दाखविलीं आहेत. मूर्ती इतकी प्रचंड आहे कीं जत्रेच्या वेळी तिची पूजा करतात तेव्हा इमारतीच्या सारखा मोठा उंच पहाड बांधून मगच तिला स्नान घालावें लागतें व पूजा करावी लागते! असो. देवळाच्या प्राकाराभोंवती तटालगत प्रदक्षिणेपुरती पाऊलवाट आहे तेथून भोंवतीं पसरलेल्या सुपीक, संपन्न, हिरव्यागार भूप्रदेशाची व त्यांतल्या तळयांची फार चांगली शोभा दिसली. हें देवस्थान हसन जिल्ह्यापैकीं चेनरायपट्टण तालुक्यांत मोडतें म्हैसूर सरकारांतून याला ७ गांव इनाम असून एका पट्टाचार्याकडे म्हणजे पुजाऱ्याकडे त्याची अर्चा वगैरे सोंपविलेली आहे.

# मंदिरप्रवेशाचें बिल कीं बिलाचा मंदिरप्रवेश !

मंदिरप्रवेशाच्या बिलानें बराच गोंधळ उडवून दिला म्हणावयाचा ! पण हा गोंधळ म्हणजे तोहि धुळीचें वादळ आहे, पावसाचें वादळ नाहीं. धुळीच्या वादळानें दिशा धुंद होतात. पावसाळी वादळानें हवेंत असलेलीहि धूळ खालीं बसते. पण आता लवकरच हें वादळ थांबेल. कारण डॉ. सुब्बरायन यांच्या बिलाला लॉर्ड विलिंग्डन यांनीं परवानगी दिली तर या प्रश्नाचा एक प्रकारचा निकाल लागेल; किंवा परवानगी देण्याचें नाकारलें तर दुसऱ्या प्रकारचा पण निकालच लागेल ! कायदे-कौन्सिलाची आजची स्थिति पाहतां, लाटसाहेबांच्या परवानगीनें त्यांच्यापुढे आलेले हें किंवा अशा स्वरूपाचें दुसरें एखादें बिल मंजूर झाल्याशिवाय राहणार नाही; तसें झाल्यानें सुधारणावादी लोकांचें समाधान होईल. उलट, बिलाला परवानगी देत नाही असें गव्हर्नर-जनरल यांनीं सांगितलें तर या चळवळीचा हा मार्ग खुंटेल, व सनातनी लोकांचें समाधान होईल. गव्हर्नर-जनरल यांना मात्र मोठी अडचण येऊन पडली यांत शंका नाही. पण दिल्ली येथील बातमीदाराच्या अंदाजाप्रमाणे हें प्रकरण आता एकदोन दिवसांतच निकालांत निघण्याचा संभव आहे.

अशा संधिकाळांत गव्हर्नर-जनरल यांनी बिलाला परवानगी द्यावी कीं नाही हें लिहिणें व्यर्थच होय. तथापि या एकंदर प्रश्नाचा सारासार विचार करावयाचा तर तो या परवानगीचा प्रश्न वगळूनच करतां येण्यासारखा आहे. म्हणून या दृष्टीनें जो कोणी लिहील त्याचें लिहिणें, गव्हर्नर-जनरल यांनी परवानगी दिली किंवा न दिली, या दोनहि स्थितींमध्ये अबाधितच राहील. लॉर्ड विलिंग्डन यांच्या मनांत परवानगी देण्याचें आलें तर ते आमच्या म्हणण्यानें थांबत नाहींत; व ही परवानगी देण्याचें त्यांच्या मनांत नसलें तर आम्ही या म्हटल्यानें ते ती देत नाहीत. पण या बिलाच्या तत्त्वाच्या प्रश्नासंबंधानें आम्हांला काय वाटतें तें लिहिण्याचा तरी अधिकार आम्हांला आहे; व तो बजावूनच आम्ही या प्रश्नासंबंधानें आमचे विचार प्रकट करणार आहों.

डॉ. सुब्बरायन यांच्या बिलांतील कांहीं मुख्य तत्त्वें सामान्यतः पसंत होण्यासारखींच आहेत. तीं तत्त्वें म्हणजे (१) एखाद्या 'सार्वजनिक' देवळांतून

अस्पृश्यांना प्रवेश करूं देणें वा न देणें हें त्या गांवांतील लोकसमाजाच्या मर्जीवर अवलंबून राहावें. (२) ती मर्जी काय आहे हें या समाजांतील 'मतदारां'चीं मतें घेऊन ठरविण्यांत यावें. म्हणजे मतदारांच्या बहुमताप्रमाणे अस्तिपक्षी किंवा नास्तिपक्षी निर्णय व्हावा. (३) देवळाचे अधिकारी स्वतः लोकमत घेतील तर उत्तमच. पण त्यांनी तसें न केल्यास त्यांना तसें करण्यास इतरांना भाग पाडतां यावें. तात्पर्य, (४) अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश ही बाब केवळ देवळांच्या अधिकाऱ्यांच्या मर्जीवर राहू नये. उलट, आपल्या कल्पना बाजूस ठेवून, लोकमत अमुक प्रकारचें आहे म्हणन, त्यांनी त्याप्रमाणे वर्तन केल्यास, ट्रस्टींनी किंवा व्यवस्थापकांनी आपल्या अधिकाराचें अतिक्रमण केले अथवा मळ उत्पादकाचा विश्वासघात केला असा आरोप त्यांजवर राहू नये.

वरील तत्त्वे आम्हांस पसंत वाटतात. आणि या बाबतीत आम्ही सनातनी लोकांस स्पष्टच सांगतों कीं, अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश ही बाब यापुढे सनातनी म्हणविणाऱ्या केवळ शास्त्री–पंडितांचे हातीं राहणार नाही. धर्मशास्त्री, धर्मपंडित हे विद्वान असतील; तथापि केवळ तेवढ्यामुळे सर्व धार्मिक बाबींचा शास्त्र–निर्णय करण्याचा अधिकार एकट्या त्यांनाच आहे असे ठरत नाही. म्हणून कोणतीहि धार्मिक बाब निघाली कीं, काशीच्या सनातन धर्मसभापीठांकडे अंगुलिनिर्देश करून यापुढे भागणार नाही. काशींतील विद्यापीठें नामांकित आहेत. तथापि, शास्त्रज्ञान व धर्मविद्या यांचा मक्ता एकट्या काशीला आहे हें इतर ठिकाणचे शास्त्री कसें व काय म्हणन कबूल करतील ? धर्मशास्त्रांतील शंका–समाधान करण्यास लागणारी बुद्धिमत्ता, देवाने काशीबाहेरच्या विद्वान शास्त्री–पंडितांनाहि थोडीबहुत दिली आहे. आणि या शास्त्री पंडितांत, जुन्यापरंपरेच्या पढिक शास्त्रीपंडितांप्रमाणेंच, आस्तिक्य बुद्धीच्या व धर्माविषयी काळजी बाळगणाऱ्या आंग्लविद्याविभूषित विद्वानांचाहि समावेश केला पाहिजे. संस्कृताबरोबरच कोणी इंग्रजी शिकला म्हणन त्यामुळे त्याच्या आस्तिक्य बुद्धीचा नाश होतो, किंवा त्याला धर्म–प्रबंधांचा ग्रंथ लाविता येत नाही असें थोडेंच आहे. 'अधिकस्य अधिकं फलं' हें वचन सर्व प्रकारच्या विद्येला लागतें.

स्थानिक लोकमत स्थानिक विद्वानांच्या मताला जें प्रामाण्य देईल तें वेळीं काशीच्या पंडितमतालाहि देणार नाही. घरीं पायाला साप डसला तर हिमालयांतील दिव्य औषधींचें स्मरण करून काय उपयोग ? घराजवळ सांपडतील त्याहि औषधींचा उपयोग केला पाहिजे; व त्याहि पुष्कळ वेळां गुण देतात. पण विद्वानांच्या मतापलीकडेहि 'लोकमता-'च्या अधिकाराची मजल जाऊं शकते. "गांव करील तें राव करणार नाही" ही म्हण राजकारणाप्रमाणें धर्मकारणामध्येहि खरीच आहे. ज्या चालीरीतींना पुढें धर्माचें स्वरूप येतें त्या प्रायः, अविद्वान पण व्यवहारचतुर अशा सामान्य जनसमाजानेच, मूळ निर्माण केलेल्या असतात. रानांतील पाऊलवाट प्रथम प्रवासी उत्पन्न करितात. ती प्रस्थापित झाल्यावर मग इंजीनिअर खात्याचे लोक ती ठाकठीक किंवा साफसूफ करीत. पण तिचीं वळणें त्यांना कायमच ठेवावीं लागतात! एखाद्या गांवच्या एखाद्या देवळांत अस्पृश्यांना मूर्तिदर्शन करू द्यावें कीं नाही हें काशीकर शास्त्रीपंडितांच्या मतापेक्षा, त्या गांवच्या लोकमतावरच केव्हाहि अधिक अवलंबून राहणार हें अगदी उघड आहे. धर्मशास्त्राकरिता समाज जन्मला नाही; समाजाकरिता धर्मशास्त्र जन्मलें आहे. "आम्हीं म्हणतों त्या त्रिकालाबाधित हिंदुधर्माप्रमाणे जें चालतात ते हिंदु" हें खरें नसून, "हिंदु म्हणविणारा समाज हा युगयुगांतरीं जें ठरवितो–बनवितो तेंच हिंदुधर्मशास्त्र" हें केव्हाहि लक्षांत ठेविलें पाहिजे.

पण ज्या लोकमताच्या अधिकाराच्या दृष्टीने आम्ही हें म्हणतों, त्याच्याच दृष्टीने आम्ही असेंहि म्हणतों कीं, मंदिरप्रवेशाचे कामीं लोकमतानुसार व्यवस्था व्हावी, व ती व्यवस्था करण्यास कायद्याची मदत मिळावी, अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनी देखील तो उपक्रम करण्याची आजच घाई करूं नये. कारण आजचीं कायदेकौन्सिलें खरी प्रातिनिधिक नाहीत असे ज्या तोंडाने म्हणावयाचें, त्याच तोंडाने त्या कायदेमंडळांकडे मंदिरप्रवेशाला उपकारक अशा कायद्याची याचना करावयाची, हें विसंगत दिसत नाही काय? आणि कायदेमंडळावरील बहिष्काराचा ढोल वेळीं–अवेळीं बडविणारांसंबंधाने तर तें फारच विसंगत दिसतें. कायदेमंडळें हीं जर माया आहे, तें मोहजाल आहे, तें मृगजळ आहे, ती मयासुराची सभा आहे, तर त्यांतून मंदिरप्रवेशाला उपयोगी अशी सद्वस्तु कशी निघेल ? आणि ती निघाली तरी ती दूषित वस्तू हातीं धरून हात काय म्हणून बिटाळावे ?

हा विसंगतीचा प्रकार आम्ही आज दहा वर्षे पाहत आलों आहों. या अवधींत राजकीय, धार्मिक, सामाजिक, औद्योगिक, किंवा आर्थिक अशी कोणतीहि बाब नव्हती कीं, ज्यामध्ये कायदेमंडळांना भरमसाट नांवें ठेवणारांनीच त्या मंडळांना

कसून भरपूर उपयोग करून घेतला नाही. कातडें दूषित म्हणावयाचें पण पैसे सुरक्षित खिशांत ठेवण्याची वेळ आली म्हणजे त्याच कातड्याच्या पाकिटाचा उपयोग करावयाचा, असें कित्येक लोकांनी कायदेमंडळासंबंधाने दुहेरी-दुटप्पी धोरण ठेवलेलें आहे. आज तो विषय मुख्य नसल्याने आम्ही फारसें लिहीत नाही. तथापि कायदे-कौन्सिलांवर बहिष्कार पुकारण्यांत, त्या संस्थेची नालस्ती करण्यांत, जे अग्रगण्य समजले जातात, त्यांना मंदिर–प्रवेशाच्या बाबतीपुरता तरी कायदे–मंडळांचा उपयोग करावा, म्हणजे त्या घाणींत हात घालावा, असें वाटावें हें तरी सुचिन्हच नव्हे काय ? किंवा पुढे लवकरच येऊं घातलेल्या प्रांतिक स्वराज्याच्या अवताराची पूर्वतयारी त्याच्या निंदकांच्या हातूनच होत आहे, असेहि वाटेल तर, दैवगतीवर विश्वास ठेवणाऱ्या मनुष्याला, म्हणतां येण्यासारखें आहे.

१९३३ अखेर जो पार्लमेंटरी कायदा होण्याचें घाटत आहे त्यायोगाने दरएक प्रांतांत लोकतंत्र राज्यकारभार प्रस्थापित होणार हें उघड आहे. याचा अर्थ, प्रांतिक कायदे–मंडळांतील सर्व सभासद हे लोकांनी निवडलेले राहतील. त्यांच्यांतूनच संयुक्त प्रधानमंडळ नेमलें जाईल. मग मंदिर-प्रवेशासारख्या धार्मिक बाबतींत कायदे करावे असें कोणास वाटल्यास, लोकांना जबाबदार असलेल्या मंत्रिमंडळाची संमति मिळवावी लागेल. अीण ती मिळविली तर, गव्हर्नर–जनरलाची पूर्वसंमति मिळणें सोपें होईल. आज मात्र सर्वच स्थिति विपरीत व असमाधानकारक आहे. कायदे-मंडळांत सरकारी अधिकारी, कांही थोड्या तरी, जागा अडवून बसलेले आहेत. तसच सरकारानें नेमलेले (नॉमिनेटेड) सभासद तेथें आहेतच. आणि जे लोकनियुक्त सभासद म्हणून आहते तेहि, लोकांच्या उदासीन मनःस्थितींत, कसे तरी निवडून आलेले आहेत. निवडणुकीच्या वेळीं त्यांना धोरणा-संबंधाने कोणी कांही प्रश्न विचारले नाहीत व त्यांनीहि उत्तरें दिलीं नाहीत. या सर्वांचा परिणाम कसा होतो, हें हल्ली कायदेमंडळांतून चाललेल्या कामावरून दिसून येतच आहे. म्हणून मंदिर-प्रवेशाचें बिल अशा कायदेमंडळापुढे आल्यास जो निकाल होईल तो आज लोकांना मानवण्यासारखा असणार नाही. बिल मागण्याचें काम जसे जबाबदारीने व्हावयास पाहिजे, तसे त्याचा निकाल करण्याचें कामहि जबाबदारीनेंच व्हावयास पाहिजे. म्हणून बिलाची मागणी करणारांनी ती आणखी एक-दोन वर्षे तहकूब ठेवावी हें चांगलें. आणि लॉर्ड विलिंग्डन यांनी परवानगी नाकारली तर ही गोष्ट सहजच होणारी आहे.

दुसरीहि एक गोष्ट आहे ती अशी कीं, प्रस्तुत बिलांतील कांही कलमें सदोष आहेत. उदाहरणार्थ, त्यांतील मंदिर या शब्दाची व्याख्या आम्हांला पसंत नाही. तसेच मंदिरप्रवेशासंबंधी मतें घेण्याच्या बाबतींत म्युनिसिपल मतदार हा मतदार कां मानावा हेंहि आम्हांला कळत नाही. कारण धर्मदृष्ट्या मंदिराचा उपयोग व त्यासंबंधाचा हक्क हे श्रीमंताप्रमाणे अगदी गरीबालाहि असतात. तसेच प्रौढाप्रमाणे मुलांनाहि ते असतात. म्हणून निदान वयांत आलेल्या प्रत्येक स्पृश्य हिंदु स्त्री-पुरुषाला मतदार समजलें पाहिजे. नवीन राज्य-घटनेच्या चर्चेंत 'ॲडल्ट फ्रँचाइज' असावा-म्हणजे वयांत आलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषाला मतदारीचा अधिकार असावा–अशी मागणी कित्येकांनी केली आहे. आज ही मागणी सफळ झालेली नाही व पुढेहि पुष्कळ काळपर्यंत ती सफळ होईल असें वाटत नाही. लोकसत्ताक राष्ट्रांच्या इतिहासावरूनहि तसें दिसतें खरें. पण राज्यकारभाराच्या बाजींत हा स्वयंसिद्ध, म्हणजे केवळ वयोमानानें प्राप्त होणारा हक्क, लाभो वा न लाभो, आमच्या धर्म-व्यवहारांत तरी लहानथोरांना व स्त्री-पुरुषांना हा हक्क अनादिकालापासून दिला गेला आहे. सनातन हिंदुधर्म हा प्रगतिपर म्हणा वा न म्हणा, त्याने व्यक्ति-मात्राच्या अधिकाराचे बाबतींत सर्वांना आत्मोद्धाराचा सारखा अधिकार देऊन, आधीच इतकी प्रगति करून ठेवली आहे कीं, तिच्यांत आणखी प्रगतीची भर घालण्याला जागा नाही. तात्पर्य, मंदिरप्रवेशाच्या बाबतींत मताधिकार द्यावयाचा तर तो स्थानिक स्वराज्याचे कर भरणाऱ्या लोकांपुरताच मर्यादित असावा असें आम्हास वाटत नाही.

आजच्या कायदे-कौन्सिलापेक्षा उद्याच्या कायदे-कौन्सिलांत लोकमत अधिक प्रबळ होणार, अधिक प्रतिबिंबित होणार, हें निश्चित आहे. म्हणून मंदिर-प्रवेशाबाबत लोकमताच्या बळावर एखादा कायदा करवून फिरून लोकमताच्या बळावर तो अमलांत आणण्याची ज्यांना इच्छा असेल, त्यांनी आणखी थोडे दिवस दम धरावा, म्हणजे येत्या निवडणुकींत मंदिरप्रवेशाला अनुकूल कोण, प्रतिकूल कोण, या मुद्याचा निर्णय लावण्याची उत्तम संधि मिळेल. कारण मतदार हे उमेदवारांना सर्व तऱ्हेचे प्रश्न विचारतील व उत्तरें घेतील. आणि मतदारांच्या मनांत धर्माला स्थान किती आहे, राजकारणाला स्थान किती आहे, उमेदवाराने कोणत्या बाबतींत कोणतीं आश्वासनें

दिलीं, व मतदाराला तीं समाधानकारक वाटलीं कीं न वाटलीं, यावरून अखेर निर्णय सहजच होईल. आणि मग असें एखादें बिल पुढें आलें तरी कोणास भीति उरणार नाहीं. निदान कोणी कोणास नांवें ठेवण्यास तरी जागा उरणार नाहीं.

शेवटीं एक मुद्द्याची गोष्ट सांगून हा विषय आजच्यापुरता संपवूं. तो मुद्दा असा कीं, उद्या मंदिरप्रवेशासंबंधीं कायदा झाला तरी तो फक्त 'सार्वजनिक' देवालयांनाच लागू शकेल, खासगी देवालयांना तो लागणार नाहीं. अर्थात् या पुढे जीं देवळें कोणी बांधतील त्यांना हा कायदा म्हणजे सावधगिरीची ती आयती सूचनाच होईल. अर्थात् देवालयासंबंधी कागदपत्र करतांना तीं खासगी राहण्याची खबरदारी घेतली म्हणजे त्यांना अस्पृश्यतेच्या उद्धारकापासून त्रास पोचणार नाहीं. पण आज विद्यमान असलेल्या देवालयांपैकींहि पुष्कळशीं खरोखर कायद्याच्या दृष्टीने खासगीच असण्याच संभव आहे. अशा देवालयांच्या अधिकाऱ्यांना, आपल्या अस्पृश्य हिंदु बांधवांना देवदर्शनाचा लाभ देण्याच्या उदार बुद्धीची प्रेरणा झाली तर, त्यांनी पुढे होऊन तो मार्ग सरळ पत्करावा. पण ज्यांना ही गोष्ट पसंत नसेल त्यांनी वेळींच आपलीं देवालयें 'खासगा' आहेत, 'सार्वजनिक' नव्हेत असा हक्क उघडपणें मांडून तो तडीस नेण्याची तयारी करावी.

हें करणें फार सोपें आहे. देवालयावर 'खासगीं देवालय' अशी पाटी लावावी, व विशेष प्रसंगीं देवालयाचे दरवाजे बंद ठेवून खासगीपणाचा हक्क प्रस्थापित करावा. पण इकडे लोभबुद्धीने देवालयें सार्वजनिक असल्यासारखीं उघडी ठेवावयाचीं, आणि मग अस्पृश्यांना तेवढा बहिष्कार घालून, तो बहिष्कार काढून टाकणाऱ्या कायद्याबद्दल गवगवा व त्रागा करावयाचा ही गोष्ट सारासारविचाराला धरून नाहीं. देवालय हें एक खासगी तरी असेल किंवा सार्वजनिक तरी असेल. तें खासगी असेल तर व्यवस्थापकांच्या मर्जीप्रमाणें स्पृश्यांतील उत्तमानाहि प्रवेशाला मज्जाव करता येईल. पण तें कायद्याने सार्वजनिक ठरेल तर, अस्पृश्यांनाहि यापुढे अशा ठिकाणीं मज्जाव करण्याची आशा कोणी बाळगूं नये. कारण सार्वजनिक या शब्दाचा व्यापक अर्थ उगवून घेण्याच्या मार्गाला जनता आता लागलेली आहे, व तिला त्या कामीं प्रतिबंध करूं शकेल असा कोणीहि जबरदस्त भेटणार नाहीं. म्हणून सनातनी लोकांनी सारासार विचार करावा, निदान योग्य ती खबरदारी घ्यावी, उगीच रक्तपाताच्या गोष्टी बोलू नयेत अशी आमची त्यांना प्रार्थना आहे.

# हिंदुस्थानसरकाराचें नवें कर्ज

( ले.—आत्माराम रावजी भट एम. कॉम. )

### नवीन कर्जाचें स्वरूप

हिंदुस्थानसरकाराने पंधरा कोटींचें नवें कर्ज काढण्याचें ठरविलें असून नवीन कर्जरोख्यांच्या मागणीचे अर्ज मंगळवार ता. २३ जानेवारीपासून घेण्यांत येतील व २६ तारखेला अगर पंधरा कोटी रुपयांच्या कर्जरोख्याकरितां त्यापूर्वीच मागणी आल्यास २६ तारखेपूर्वीहि मागणीचे अर्ज घेण्याचे बंद करण्यांत येईल. जाहीर झालेल्या मुदतींत मागणी करणाराला १०० रुपयांचा रोखा ९८ रुपयांला देण्यांत येणार असून या कर्जावरील व्याजाचा वार्षिक दर ४ टक्के आहे. या कर्जाच्या परत फेडीची मुदत दहा वर्षांची आहे. आज ९८ रुपयांला मिळणाऱ्या रोख्याचे दहा वर्षांनीं १०० रुपये परत मिळावयाचे आहेत.

### नाणे बाजाराची आजची स्थिति

नाणेबाजारांत सांप्रत पैसा मुबलक आहे. सध्यांचा मोसम निर्गतीचा असूनहि इम्पीरिअल बँकेचा व्याजाचा दर चार टक्क्यांइतका खालीं आहे. बँकेच्या गेल्या साप्ताहिक ताळेबंदाप्रमाणें बँकेजवळ एकोणीस कोटींची रोकड आहे. गेल्या कित्येक वर्षांत जानेवारी महिन्यांत इम्पीरिअल बँकेचा व्याजाचा दर इतका कमी नव्हता. गेल्या कांही वर्षांतील डिसेंबर—जानेवारी महिन्याचे इम्पीरिअल बँकेचे व्याजाचे दर पाहिले तर असें आढळून येतें कीं, बँकेचा या महिन्यांतील व्याजाचा दर सहा अगर सात टक्के होता. नाणेबाजारांतील इतर व्याजांचे दर चार टक्क्यांहूनहि कमी आहेत. मागणीबरोबर परत करावयाच्या अल्प मुदतीच्या व्याजाचा दर गेल्या आठवड्यांत शेवटीं कांही दिवस पाऊण टक्का होता. इतर दोन, तीन व सहा महिने मुदतीच्या पैशांचे व्याजाचे दर दोनअडीच टक्क्यांच्या आसपास आहेत.

आज तारखेला सरकार तीन महिने मुदतीच्या इंटरमीजिएट ट्रेझरी बिलांची विक्री शेंकडा ९९॥ रुपयांप्रमाणे करीत आहे. म्हणजे या बिलांवरील वार्षिक व्याजाचा दर ठोकळ मानाने २ टक्के पडतो. गेल्या मंगळवारीं ३ महिने मुदतीच्या ट्रेझरी बिलांच्या खरेदीकरितां आलेल्या टेंडरांपैकीं सरकारानें स्वीकारलेल्या टेंडरांवरील वार्षिक व्याजाचा दर शेंकडा सरासरी २ रुपये ७ आणे पडला होता. नाणेबाजारांतील सध्याची परिस्थिति अशा रीतीनें नव्या कर्ज–उभारणीला निःसंशय अनुकूल आहे. परंतु ही अनुकूलता यदृच्छया जागतिक आर्थिक मंदीमुळे उत्पन्न झाली आहे. कीं तिला सरकाराचें आर्थिक व चलनविषयक धोरण कारणीभूत झालें आहे याचा विचार करणें जरूर आहे.

## सरकारी धोरणाची करामत

वरील प्रश्नाचा विचार करूं लागल्यावर असें आढळून येतें कीं, नवीन कर्जउभारणीला अनुकूल अशी पूर्व तयारी सरकारानें आपल्या विशिष्ट धोरणानें उत्पन्न केली आहे. सरकारानें आमच्या रुपयाची सुवर्णाबरोबरील सोयरीक मोडून टाकल्यामुळे आमच्या देशांतील सोन्याला पाय फुटले व त्याचा ओघ परदेशाकडे वळला. आतापर्यंत एकशें-आठकोटी रुपयांचें सोनें परदेशीं गेलें आहे. यांपैकीं कांही सोनें गोरगरिबांनीं पोटापाण्याकरितां विकलें हें खरें असलें तरी निर्गतीपैकीं बरेंचसें सोनें सावकार, जहागीरदार, व्यापारी व सराफ यांच्याकडून सोन्याच्या भावांतील वाढीचा फायदा घेण्याकरिता विकलें गेलें. या सुवर्णविक्रीमुळे आलेला पैसा बँकांत अगर सराफांच्या पेढ्यांवर पडून आहे. हिंदुस्थानसरकाराचें आर्थिक धोरण जर हिंदी उद्योगधंद्यांना पोषक असतें तर आजच्यासारख्या जागतिक मंदीच्या दिवसांतहि हिंदी उद्योगधंदे इतके विपन्न स्थितीला पोंचले नसते व सुवर्ण-विक्रीमुळे लोकांच्या हातांत आलेला पैसा उद्योगधंद्यात गुंतविला गेला असता. परंतु हिंदी उद्योगधंद्यांची स्थिति समाधानकारक नसल्यानें पैसेवाले आपला पैसा उद्योगधंद्यांत गुंतविण्यास राजी नाहीत. त्या योगानें सुवर्णविक्रींतून हातीं आलेला पैसा पडून राहिला व नाणेबाजारांतील व्याजाचे दर उतरले.

## अनुत्पादक कर्जाचा बोजा

आता नवीन कर्जाचा सरकार काय उपयोग करणार हें आपण पाहूं. सरकारापाशीं सुमारें पंचेचाळीस कोटी रुपयांचें ट्रेझरी बिलांच्या विक्रीनें उभारलेलें तरतें कर्ज आहे. ट्रेझरी बिलांच्या रूपानें उभारलेलें कर्ज सरकारानें नेहमीच्या उत्पन्नांतून फेडलें पाहिजे. कारण कांही करांचें व खात्यांचें उत्पन्न वेळेवर येत नसल्यामुळे जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्याकरितां सरकार ट्रेझरी बिलांच्या रूपानें नाणेबाजारांतून हातउसनें कर्ज उभारीत असतें. नवीन उभारलें जाणारें कर्ज पुढील दोन महिन्यांत मुदत भरणाऱ्या ट्रेझरी बिलांचे पैसे परत करण्याकरिता काढण्यांत येत आहे. अर्थातच अशा प्रकारें ट्रेझरी बिलांच्या तरत्या कर्जाचें रूपान्तर दहा वर्षे मुदतीच्या परंतु कायम स्वरूपाच्या कर्जात करून हिंदुस्थानच्या अनुत्पादक कर्जात सरकार पंधरा कोटींची भर टाकीत आहे असें म्हटल्यास वावगें ठरणार नाही. हिंदुस्थानसरकाराचें हें नवें पंधरा कोटींचें कर्ज म्हणजे हिंदुस्थानसरकारच्या खजिन्यांतील खडखडाटाचा व सरकारच्या दिवाळखोरी कारभाराचा पुरावा आहे. हा दिवाळखोरी कारभार सरकारी नोकरांच्या पगारांतील काट ठेवून फारसा कायमचा सुधारण्यासारखा नसून लष्करीखात्यासुद्धां सर्व खात्यांची पुनर्घटना करण्यांत आली तरच सुधारण्याची आशा आहे. जोंपर्यंत ब्रिटिश सरकारची हिंदुस्थानच्या डोक्यावरील लष्करी खर्च कमी करण्याची इच्छा नाही, रेल्वेचा डोईजड कारभार असाच चालविण्याचा हट्ट आहे व सनदी नोकरांचा ऐषआराम कमी करण्यास विरोध आहे तोपर्यंत हिंदुस्थानसरकारावर अनुत्पादक कर्जे काढण्याचे प्रसंग वारंवार आल्याविना राहणार नाहीत.

# गुरुजींची रवानगी गुरांच्या गोठ्यांत !

मुंबई सरकाराचे गृहमंत्री मि. थॉमस यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या कमिटीच्या रिपोर्टाचा सारांश केसरींत प्रसिद्ध झालाच आहे व त्याचे दुष्परिणाम शिक्षण–खात्याला कसे भोवणार आहेत हेंहि दाखविण्यांत आलें आहे. दिवाणी, मुलकी, पोलीस, जंगल इत्यादि खात्यांचा विचार केल्यास त्या मानाने सरकार शिक्षण-खात्याला धर्मादाय-खातें समजत असल्याचें स्पष्ट दिसतें. थॉमस कमिटीच्या रिपोर्टावरून हा समज अधिकच दृढ होतो. कमिटीने बहुतेक सरकारी कॉलेजें जमीनदोस्त करण्याविषयी आपलें मत दिलें आहे. परंतु लॉ कॉलेजाच्या बाबतींत मात्र कमिटीस पंक्तिप्रपंच ठेवावासा वाटतो. सदर कॉलेजाचा खर्च परभारें विद्यार्थ्यांच्या फींतून भागतो म्हणून त्यास टाळे ठोकूं नये असें कमिटी सांगत आहे. कमिटीचें हेंच तत्त्व सर्व शिक्षण-खात्यास लावल्यास, सगळें शाळा–खातेंच अजिबात उठवावें लागेल. याच विचारसरणीनें कमिटी प्राथमिक शिक्षणाकडे पाहत असली तर त्या शिक्षणासंबंधाने कमिटीने गाळलेल्या मुक्ता-फळांना नांवें ठेवण्याचें कारण नाही.

मुंबई इलाख्यांतील प्राथमिक शिक्षणाकडे दर-साल अजमासे दोन–पावणेदोन कोटि रुपये खर्च होतो. त्यांतून फीच्या रूपाने फक्त चार-साडेचार लक्ष रुपये वाचतात. कमिटीच्या हिशेबी दृष्टीने उरलेला दीड एक कोटि रुपयांचा खर्च हा निवळ बुडीत खर्च होय. त्यांतून शिक्षणासारखें धर्मार्थ खातें चालावयाचें! पोलिस–खात्याप्रमाणे त्याची देशांतील लोकांना कैचींत धरण्यास किंवा त्यांच्या चळवळी मारून टाकण्यास सरकारास मुळींच मदत मिळत नाही, उलट पीडाच मात्र होते. कारण यांतूनच शिक्षण लाभलेलीं मुलें मोठीं झाल्यावर कायदेभंगासारख्या चळवळींत शिरतात व सरकारास सळो का पळो करून सोडतात. लोथियन कमिटीच्या रिपोर्टांत शिक्षि-तांना मतदानाचा अधिकार देण्यांत आला असून तो निवडणुकीच्या नियमांत समाविष्ट होणार यांत शंका नाही. हीहि एक सरकाराच्यामागे नवीनच पीडा. तिने चळवळ्या लोकांची संख्या अधिक वाढणार व त्यायोगाने सबंध समाज जागृत होऊन सरकारास जुमानीनासा होणार. असलें हें संकट आपल्या हातांनी आपल्या अंगावर ओढवून घ्या कशाला या अर्थाचें पाप रिपोर्ट लिहितांना कमिटीच्या पोटांत नसेल असें म्हणवत नाही. म्हणूनच थॉमस कमिटी प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्याऐवजी तो खुंटविण्याच्या विचारांत आहे.

प्रचलित शिक्षणपद्धतींत कमिटीने एक मोठा दोष काढला आहे. तिची तक्रार अशी कीं सध्या शिक्षणखात्याचें लक्ष संख्येकडे आहे, गुणाकडे नाही; त्यामुळे शाळेंत जाणाऱ्या मुलांची संख्या वाढली असली तरी बऱ्याच मुलांची मजल लिहितां वाचतां येण्यापलीकडे जात नाही. इतकेंच नव्हे तर हीं मुलें तीन–चार इयत्ता झाल्या कीं, शाळा सोडतात, शिकलेलें सर्व विस-रून जाऊन पुनः कोरींच्या कोरीं बनतात, व त्यांच्याप्रीत्यर्थ सरकारानें सोसलेला खर्च फुकट जातो. मुंबई–सरकार शिक्षणाकरिता इतर प्रांता-पेक्षा अधिक पैसा खर्च करते, पण त्याचा व्हावा तसा उपयोग होत नसल्यामुळे शिक्षणपद्धतीचें धोरणच बदललें पाहिजे अशी कमिटीची शिफारस आहे. कमिटी केवळ मुलांच्या शिक्षणालाच दोष देऊन थांबली आहे असें नव्हे तर तिने दोषाचें लोण शिक्षकांपर्यंतहि पोचविलें आहे. तिचा कटाक्ष व्हर्नाक्युलर फायनल पास शिक्षक व मराठी सातवी पास झालेले शिक्षक यांजवर विशेष आहे. या दोनहि प्रका-रच्या शिक्षकांनी शाळाखात्यांत फार गर्दी केली असून ते शिक्षकांच्या कामाला नालायक असल्या-चा शेरा कमिटीने मारला आहे. कारण कमि-टीच्या मतें ज्याला शिक्षक नेमावयाचें त्याला ट्रेनिंग कॉलेजांतील पहिल्या वर्षाचा तरी लाभ मिळालाच पाहिजे.

प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्यासाठी उपाय-योजना सुचविण्याकरितां मुंबई सरकाराने कै. सर नारायण चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखाली एक कमिटी नेमली व तिच्या शिफारशीस अनुसरून सन १९२३ सालीं सक्तीच्या शिक्षणाचा कायदाहि पास झाला. मुलगे व मुली या उभयतांचें प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक व सक्तीचें करावें असें या कायद्याचें ध्येय असल्या-मुळे सक्तीचें शिक्षण द्रव्याभावीं अमलांत न आलें तरी गांवोगांवीं व खेड्यापाड्यानिहाय शाळा स्थापन करून शिक्षण फैलावण्याचा प्रयत्न लोकल बोर्डांनी नेटाने चालविला. प्राथमिक शिक्षणाचें किमान प्रमाण मराठी चार इयत्ता हें ठरविण्यांत आलें आहे. ज्या मुलाने शाळेंत चार वर्षें काढलीं तो मुलगा किंवा मुलगी जगाचा व्यवहार लिहिण्या-वाचण्याने समजून घेण्यापुरतीं शिक्षित झालीं असें समजण्यास हरकत नाही. शिक्षण फैलावलें पाहिजे

व त्याचा फैलाव शक्य तितक्या कमी खर्चात झाला पाहिजे या दोनहि अटी संभाळण्यासाठी शिक्षकाची निवड करतांना व्हर्नाक्युलर फायनल परीक्षा हेंच शिक्षकाच्या लायकीचें किमान प्रमाण शिक्षणखात्याने आपल्या डोळ्यांसमोर ठेवलें त्याबद्दल त्यास दोष देणें रास्त ठरेल काय? पण थॉमस कमिटीला हें धोरण दोषास्पद वाटतें. तिच्या दृष्टीने चार इयत्तां पर्यंतचें शिक्षण तत्त्वतः निरुपयोगी व तें देणारे व्ह. फा. शिक्षक नालायख होत.

कमिटीला व्ह. फा. शिक्षकांची लायखी अपुरी वाटत असली व त्यांच्याऐवजी ट्रेन्ड शिक्षक घ्यावयाचे झाले तर त्याला हरकत कोण घेईल ? उलट सरकारचा असा बेत ऐकून सर्व लोक आनंदाने टाळ्याच पिटतील.परंतु कमिटी अन्ट्रेंड शिक्षकाऐवजीं ट्रेन्ड शिक्षक सरसकट देण्याइतकी उदार नाही. अन्ट्रेड शिक्षक कमी करून त्यांच्या जागीं ट्रेन्ड शिक्षक नेमल्याने त्याना पगार अधिक द्यावा लागून खर्च वाढेल. पण थॉमस कमिटी खर्च कमी करण्याकरितां बसली होती, तो वाढविण्याकरितां जन्मास आली नव्हती. यासाठी तिने अन्ट्रेन्ड शिक्षक व त्यांच्या शाळा अजिबात बंद करण्यासच सुचविलें आहे. या शाळा दोन कारणांकरितां बंद व्हावयाच्या. एकतर त्यांवरील शिक्षक नालायख व दुसरें सदर शाळा चार इयत्तांपर्यंतच असल्याने त्यांतून शिकून बाहेर पडलेले तरुण शिक्षितपणाच्या दृष्टीने कुचकामाचे. प्रस्तुत ठिकाणीं प्रश्न असा विचारावासा वाटतो कीं, हे तरुण कुचकामाचे असतात म्हणजे काय ? प्राथमिक शाळांतून पुढील काळांत शिकून बाहेर पडावयाच्या विद्यार्थ्यांचे कमिटीने मोठें मोहक वर्णन केलें आहे. पण तें निवळ ढोंगीपणाचें आहे. सदर विद्यार्थी चांगला नागरिक निपजावा व त्याने आपल्या मगदुराप्रमाणे राष्ट्रीय आकांक्षांची पूर्तता करण्यास पुढे यावे असें कमिटी म्हणते.

कमिटीचें हें वर्णन मोहक असलें तरी तें सद्भावाने प्रेरित झालेलें नाहीं. सध्याचा चार इयत्ता शिकलेला विद्यार्थीच घ्या. त्याने जें कांही चारपांच वर्षांत ज्ञान मिळविलें असेल तें शाळा सोडतांच लुप्त होतें असें मानणें चुकीचें आहे. सांप्रत खेड्यापाड्यांतूनहि पाहूं गेल्यास वर्तमानपत्रांचा प्रसार बराच झाला आहे. साप्ताहिक किंवा द्विसाप्ताहिक पत्रेंच काय पण दैनिक पत्रेंहि त्यांत खपतात व त्यांतील बातम्या व इतर मजकूर र, ट, फ, येणारा प्रत्येक माणूस मोठ्या उत्सुकतेने वाचतो. जगाचें ज्ञान होण्यास, सद्यःकालांतील आपलें कर्तव्य कळण्यास व मिळालेलें पुस्तकी शिक्षण टिकून वाढीस लागण्यास वर्तमानपत्रांचें वाचन पुरेसें असून इतकी पुंजी ज्या तरुणाच्या पदरीं आहे तो शिक्षित या नात्याने सार्वजनिक व राजकीय व्यवहार समजून घेण्यास समर्थ आहे असे मानण्यास काय हरकत आहे ? शाळांतून व वर्तमानपत्रांतून मिळालेलें शिक्षण व लोकव्यवहाराचा अनुभव या दोहोंच्या बळावर हीं माणसें प्रांतिक व राष्ट्रीय कायदेमंडळांतील जागांकरितां उमेदवार उभे राहाणारास मते देण्याच्या लायखीचीं ठरतील. अशिक्षित लोकांना आज मिळकतीच्या आधारावर मताधिकार मिळाला आहेच कीं नाहीं ? तेच मतदार मराठी चार इयत्ता शिकले तर आपले मतदानाचें काम अधिक चोखपणाने बजावणार नाहींत काय ?

पण असलेहि तरुण गांवगन्ना निपजूं नयेत म्हणून थॉमस कमिटीचा अट्टाहास आहे. तेव्हा ही कमिटी देशाची हितकर्ती समजावयाची कीं देशहितविघातक मानावयाची याचा विचार वाचकांनीच आपल्या मनाशीं करावा. कमिटीने व्ह. फा. शिक्षक किंवा अन-पास शिक्षक नेमण्याचे बंद करून त्याऐवजीं ट्रेन्ड शिक्षक आणण्याची जी शिफारस केली आहे तिच्याहि पोटांत असलाच कुत्सितपणा भरला आहे. प्रत्येक प्राथमिक शिक्षक कमींत कमी ट्रेनिंगचें पहिलें वर्ष झालेला पाहिजे हें कमिटीचे मत कोणास नाकबूल होईल? पण व्ह. फायनलचा शिक्षक जाऊन त्याच्या जागीं ट्रेंड शिक्षक फुकट दृष्टीस पडत नाही. त्याला जास्ती पगार द्यावा लागतो. तो द्यावयाला सरकाराजवळ पैसा नाही ही तर कमिटीची मुख्य रड आहे. तेव्हा कमिटी सांगणार आहे याच शिक्षकांच्या चार इयत्तांच्या शाळा बंद करण्याला. चार इयत्तांपर्यंतच्या प्राथमिक शाळा बुडविण्यावरूनच कमिटीची प्राथमिक शिक्षणाविषयी आस्था सिद्ध होत असेल तर सबंध शाळाखातेच बुडविण्याची शिफारस कमिटीने करावी म्हणजे तिची शिक्षणविषयक आस्था सोळा आणे निदर्शनास येईल !

मुंबई इलाख्यांतील प्राथमिक शिक्षणावर टीका करणाऱ्या या कमिटीची तक्रार इतर प्रांतांपेक्षा मुंबई इलाख्यांत ट्रेन्ड शिक्षक कमी आहेत ही नसून ते जास्ती आहेत अशीच आहे. ट्रेन्ड शिक्षक म्हटला कीं त्याच्या पगाराचे मान अन्ट्रेड शिक्षकापेक्षां अधिक असावयाचें हें ठरलेलें,इतकेंच नव्हे तर ट्रेन्ड शिक्षकांतहि पहिल्या वर्षापेक्षा दुसऱ्या व दुसऱ्या वर्षापेक्षा तिसऱ्या वर्षाच्या शिक्षकांचा पगार जास्ती असतो व त्यांचे पगारहि आपोआपच वाढतात. पण ते पगार

कमिटीच्या डोळ्यांत खुपत असून सदर शिक्षकांची ही बढती थांबविण्याची कमिटीने एक अजब शक्कल काढली आहे. व्हर्नाक्युलर फायनलची परीक्षा पास होऊन जे उमेदवार ट्रेनिंग कॉलेजांत शिकावयास येतात. त्यापैकीं बऱ्याचजणांची पोटगी सरकार देते, थोड्यांची लोकलबोर्डाकडून मिळते व अगदीं थोडे पदरच्या खर्चाने राहातात. या दृष्टीने बहुतेक उमेदवार सरकार व लोकलबोर्डे यांनी पोटावारी विकत घेतले असल्याने ते सदर स्थानिक संस्थांचे एक प्रकारें गुलामच होत. बरें, या संस्थांना सरकाराकडून ग्रँट मिळत असल्यामुळे त्यांनीहि सरकाराची गुलामगिरीच पत्करलेली आहे म्हणून वरील शिक्षक सरकारचेहि गुलाम होत. यासाठी कमिटीच्या मतें ट्रेनिंग कॉलेजांतून शिकून बाहेर पडलेल्या शिक्षकांना आपणाला अमूक इतका पगार मिळालाच पाहिजे असें म्हणण्याचा हक्कच पोचत नाही. त्यांनी सरकार किंवा स्थानिक संस्था जेवढा अन्नाचा गोळा पोटाला देतील तो खावा व त्यांचे अभीष्ट चिंतन करीत स्वस्थ असावें. कमिटीने प्रस्थापित केलेलें हें गुलामगिरीचें तत्त्व अत्यंत भयंकर असून त्याचा जितका निषेध करावा तितका थोडाच होईल.

ट्रेन्ड शिक्षकांचे या शस्त्राने पंख उपटून व त्यांच्या कपाळीं गुलामगिरी लादून कमिटीने आणखी एक पुढील उपद्व्याप केला आहे. 'हल्ली शिक्षकांत बरेच वर्ग आहेत ते मोडून फक्त तीनच वर्ग कायम करावे, त्या तीन वर्गातील शिक्षकांची संख्या निश्चित करावी व त्यांनाच विवक्षित प्रमाणांत बढती देण्यांत यावी. या संख्येबाहेरचे जे शिक्षक आहेत त्यांची बढती बंद ठेवावी' अशी कमिटीची पुढील योजना आहे. या ठराविक शिक्षकांपैकीं कोणी मेला किंवा पेन्शनांत निघाला म्हणजेच त्या बाहेरच्या शिक्षकास त्या कोंडाळ्यांत यावयाची व त्याला बढती मिळण्याची आशा! आज आहेत हेच ट्रेन्ड शिक्षक नवीन योजनेतील संख्येहून जास्ती असल्यामुळे त्यांचे जर हाल व्हावयाचे तर ट्रेनिंग कॉलेजांतून यापुढे शिकून बाहेर पडणाऱ्या शिक्षकांची वाट काय असा प्रश्न साहजिकच कोणीहि विचारील. त्यालाहि कमिटीने उत्तर देऊन ठेवलेलेंच आहे. हल्ली ट्रेनिंगचे तिसरें वर्ष बंद असल्यामुळे त्याविषयी काळजी नाहीच. उरलें पहिलें व दुसरें वर्ष. या दोन वर्षांपैकीं ट्रेनिंग कॉलेजमधून दुसरें वर्ष बंद करावें असा कमिटीने उपाय सुचविला आहे. आणि ही बंदी कोठपर्यंत? तर दुसऱ्या व तिसऱ्या वर्षाचे वाजवीपेक्षा जे जास्ती शिक्षक आहेत ते संपेपर्यंत. ते संपले म्हणजे ट्रेनिंग कॉलेजची पवनचक्की पुन्हा चालू करावी व तीसुद्धा जरूरीपुरती. त्यापेक्षा पहिल्या वर्षाचे शिक्षकच अधिक पैदा करण्याची सरकारास गरज भासल्यास दुसऱ्या किंवा तिसऱ्या वर्षाच्या ट्रेन्ड शिक्षकापेक्षां पहिल्या वर्षाचे ट्रेन्ड शिक्षक पैदा करण्याकरिता तेवढ्यापुरत्या अधिक चक्क्या ठिकठिकाणीं उघडाव्या अशी कमिटीची शिफारस आहे.

कमिटीची ही शिफारस सरकाराने मनावर घेतली तर काय अनर्थ होईल पाहा. आजच ट्रेनिंग कॉलेजाची स्थिति अशी आहे कीं त्यांतील तिसरें वर्ष सरकाराने मागेच बंद केलें असून त्यांतून फक्त पहिल्या व दुसऱ्या वर्षाचे ट्रेन्ड शिक्षकच बाहेर पडतात. तिसरें वर्ष नष्ट झाल्यामुळे ट्रेन्ड शिक्षकांचे ज्ञान पूर्वापेक्षां बरेंच कोतें झालें आहे व जीं दोन वर्षे शिल्लक राहिलीं आहेत त्यांच्या अभ्यासक्रमांतून संस्कृतासारख्या प्रगल्भ व मराठीस अत्यंत उपकारक अशा भाषेचें उच्चाटण करण्यांत आलें आहे. आता कमिटीची शिफारस दुसरें वर्षहि रद्द ठरविण्याची आहे. तसें झाल्यास जाग्यावर एकच वर्ष शिल्लक राहणार. ज्या प्राथमिक शिक्षणाच्या प्रगतीचें कमिटीने आपल्या रिपोर्टांत एवढें मोठें स्तोम माजविलें आहे त्या शिक्षणाच्या प्रगतीचा हा उपाय सुचविणारी कमिटी शहाण्यांची म्हणावी, धूर्तांची म्हणावी, लुच्चांची म्हणावी, कीं मूर्खांची म्हणावी हें वाचकांनीच आपल्या मनाशीं ठरवावें.

हा उपाय शिक्षणाची प्रगति व प्रसार खुंटवून सरकारचा खर्च वांचविण्या करितांच कमिटीने आपल्या तरतरीत मेंदूतून शोधून काढला असल्याचें स्पष्ट दिसतें. कारण शाळाखात्याचे डायरेक्टर मि. ग्रीव्ह यांच्याशीं संगनमत करून कमिटीने ट्रेनिंगचें शिक्षण एक वर्षापुरतेंच ठेवल्यास दरसाल २७॥ लाखांची बचत होईल असा निष्कर्ष काढला आहे. सारांश, शाळाखात्यांतील भावी पिढीच्या गुरुजींच्या विद्वत्तेची वाढ खुंटवून, त्यांचे पगार कापून व त्यांच्या कपाळावर गुलामगिरीचा छाप मारून गुरुजींची रवानगी गुरांच्या गोठ्यांत करण्याचा तर कमिटीचा व तिजबरोबर सरकारचा विचार नाही ना? गुरु या शब्दावर कोटी लढवून त्याचा गोठ्यांतील गुरु असा श्लेषार्थ काढण्याचा कित्येक कुचेष्टेखोर लोक प्रयत्न करीत असतात. परंतु तसा श्लेषार्थ काढण्याची कमिटीने आता गरजच ठेवलेली नाही. तिने गुरुत्वास खरोखरच गुरांच्या दावणीस बांधून शिक्षकास गुरु ठरविण्याचें योजलेलें दिसतें. हा तिचा प्रयत्न अत्यंत दुष्ट असून त्याला आळा घालण्याचा उद्योग शिक्षकांनी व प्राथमिक शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांनी जरूर केला पाहिजे.

# अलिबाग तालुक्यांतील धारावाढ

भाताचे दर फारच कमी झाल्या कारणाने व चालू सालीं भाताची निपजहि अलिबाग तालुक्यांत कमी झालेली असल्या कारणाने वाढलेला सारा भरणें रयतेस अशक्य झालें आहे. अशा असहाय्य स्थितींत धाऱ्याची सूट देणें किती अवश्य आहे हे सरकारचे नजरेस आणण्याकरितां तालुक्यांतील खातेदारांची व शेतकऱ्यांची जाहीर सभा अलिबाग येथे डोंगरे हॉलमध्ये रविवार ता. १५-१- रोजीं भरली होती. सभेस रेवदंडा, चौल थळ आवास व खारेपाट या भागांतील बरीच मंडळी आली होती.

### अध्यक्षांचें भाषण

श्री. वामनराव लिमये वकील यांनी सभेचें अध्यक्षस्थान श्री. सप्रे मास्तर ( थळ ) यांनी स्वीकारावें अशी सूचना मांडली. त्यास श्री. शंकरराव केरोबा शेलार यांनी अनुमोदन दिल्यावर सभा त्यांचे अध्यक्षतेखालीं सुरू झाली. अध्यक्षांनी आपले प्रास्ताविक भाषणांत शेतसाऱ्याबद्दल माहिती सांगितली. " ज्या ज्या वेळीं सरकारधारा वाढला त्या त्या वेळीं लोकांनीं आपलें म्हणणें सरकारपुढे मांडलें. री. रिव्हिजनचे वेळीं तर लोकांनी बरीच चळवळ केली व वाढलेला धारा डोईजड आहे अशाबद्दल बरेच अर्ज, विनंत्या सरकारकडे केल्या. परंतु त्यांचा कांहींहि उपयोग झाला नाही व सरकारानें धाऱ्याच्या पध्दतींत आपलें धोरण बदललें नाही. आज ही सभा सरकारला जागें करण्याकरितां भरलेली आहे. सभेत फक्त शेतकीच्याच दृष्टीनें या प्रश्नाचा विचार होणार आहे." याप्रमाणे अध्यक्षांचे भाषण झाल्यावर श्री. रामजी लक्ष्मण घरत यांनी खालील ठराव मांडला—

### सूट द्या व करवाढ थांबवा

ठराव १—" अलिबाग तालुक्यांतील खातेदारांची ही सभा सरकारचे असें नजरेस आणीत आहे कीं, भाताचे दर फारच कमी झाले असल्यामुळें व चालू सालीं पिकाची निपजहि फारच कमी झाली असल्यामुळे व भाताला गिऱ्हाईक नसल्यामुळे वाढलेला शेतसारा भरणें रयतेस अशक्य झालें आहे व म्हणून ही सभा सरकारास अशी विनति करीत आहे कीं, (१) गुदस्त सालीं तहकूब केलेला रुपयास तीन आणे सारा सूट घालण्यांत यावा. (२) री रिव्हिजनचे अन्वयें झालेली धाऱ्याची वाढ अजिबात कमी करण्यांत यावी (३) लोकांचे अर्जाचा निकाल होईपर्यंत धारावसुली तहकूब ठेवण्याबद्दल स्थानिक अधिकाऱ्यांस हुकूम सोडण्यांत यावे. श्री. घरत यांनी या प्रश्नाचा बऱ्याच दृष्टींनी विचार केला.

### श्री. घरत यांचें भाषण

ते म्हणाले की, " माझें वय फार झालें आहे. मला अलीकडे दरसाल निर्वाहाकरितां कर्ज काढावें लागतें. व यंदा तर धारा कसा भरावा ही मोठी काळजी दत्त म्हणून पुढे उभी आहे. माझ्यासारख्या ४-५ खंडीचें उत्पन्न असणाऱ्या मनुष्याला धाऱ्याकरितां त्यापैकीं ३—३॥ खंडी भात विकावें लागतें. इतकें भात विकल्यावर सबंध वर्ष कशावर काढावयाचें? मी चाळीस वर्षे धाऱ्याबद्दल चळवळ करीत आहे. १८९३–९४ सालीं ज्या वेळीं सरकारानें धारा वाढविला त्या वेळीं झालेली वाढ कशी अन्यायाची आहे, हें टाइम्स ऑफ इंडियांत लेख लिहून मीं दाखविलेले आहे. माझीं बरीच पत्रें त्यांत छापलीं होतीं व त्यांत एकहि विधान असें नव्हतें कीं, जें सरकारला किंवा कुणाला खंडित करतां आलें. मी पहिल्यापासून ठाणें, रत्नागिरी वगैरे जिल्ह्यांतून पीकपाहणीची माहिती मागवून ती १९२० सालापर्यंत वर्तमानपत्रांत छापीत असे. ज्या वेळीं सरकारानें धारा ३३ टक्क्यांनी वाढविला व बागायतीवरील वाढ ६६ टक्क्यांनीं केली त्या वेळीं हें करें बरोबर नाहीं व त्यामुळे लोकांवर कराचा बोजा कसा भरमसाट पडणार आहे हें स्पष्टपणें सरकारच्या नजरेस आणलें.

"त्याचा परिणाम म्हणजे हूड साहेबांनी ज्या वेळीं आपला रिपोर्ट लिहिला, त्या वेळीं भीतभीतच शेतकीवरील कर ३३ टक्क्यांनी वाढविला व बागायतीवरील वाढीसंबंधानें तर असें स्पष्ट लिहिलें कीं, ह्यावरील ६६ टक्के वाढ करणें बरोबर होणार नाही. इतकें असूनहि त्या वेळच्या कलेक्टरांनी वाढ केलीच. कांहीं भागांवर तर यामुळे बराच अन्याय झाला. या गांवांतील एका खातेदाराला त्यामुळें ६६ रु. धारा भरावा लागला. हा अन्याय दूर व्हावा म्हणून मीं बरीच खटपट केली. बिचाऱ्याची वाडी वरकस जमीनीच्या लायकीची असूनहि ती बागायतीत असल्याचें नमूद झाल्यामुळे वाडीच्या उत्पन्नापेक्षाहि धारा त्याला जास्त भरावा लागत होता. संतोषाची गोष्ट एवढीच कीं, मि. हमीद अली यांचे कारकीर्दींत या खातेदाराची करुण कहाणी त्यांचे नजरेस आणल्यावर त्यांनी पूर्वींचा हुकूम फिरवून हल्ली त्या खातेदारास ७

रु. धारा केला आहे. कुठल्या वर्षी पाऊस जास्त तर कुठल्या वर्षी पाऊस कमी. यामुळें दर वर्षी जशीं पिकें यावयास पाहिजेत तशीं येत नाहीत. ही गोष्ट मी वेळो वेळीं माहिती मागवून छापीत आहे. इतकें असूनहि ह्या गोष्टीकडे सरकारचें अजून लक्ष जात नाही, ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

"१९२४ सालीं जेव्हा री रिव्हिजन झाली त्या वेळीं रिपोर्ट मला मामलेदार कचेरींत पहावयास मिळाला, व त्यांतील बरींच विधानें कशीं बरोबर नाहीत याबद्दलची टीका मी टाइम्स ऑफ इंडियामध्ये छापण्याकरिता पाठविली ती सदर वर्तमानपत्राकडून परत आली. हूडसाहेबांनी सन १९२५ सालीं कोळंब्याचा भाव ३॥। ते ४ रु. मणास धरला व असा भाव यापुढील वर्षांत धरण्यास हरकत नाही असें विधान केलें. परंतु हें विधान कसें बरोबर नाही व असा भाव धरणें कसें अन्यायाचें व खोटें होईल हें मी त्याच वेळीं दाखविलें आहे. याचा अनुभव हल्ली प्रत्यक्षपणेंच आपणां सर्वांस येत आहे. आपण निरपुंज भाताचेंच उदाहरण घेऊं. सदर भाताला एक महिन्यापूर्वी ३० रु. खंडी भाव होता. पूर्वी याच भाताचा भाव ७०–७५ रु. असे, इतर कोणत्याहि भातापेक्षा त्या भाताला ५–१० रुपये तरी जास्त भाव येत असे. हल्लीं तर २४ रुपयांसहि हें भात घ्यावयास कोणी कबूल नाही. हळवार भाताचा भाव १९२५ सालीं हूड साहेबांनी मणास २। ते ३ रु. धरला व हा भाव पुढे राहील असें विधान केलें. परंतु ह्या बाबतींतहि तें म्हणणें खोटें पडलें.

## हळवार भाताचा भाव

हल्लीं हळवार भाताला भाव २१-२२ रु. लागत आहे. म्हणजे हूड साहेबांच्या म्हणण्यापेक्षा या भाताचा दर निम्याहूनहि कमी झाला आहे. मी वसूल व धारा यांचा हिशेब करून पाहिला आहे. ज्याचें १०० खंडींचें उत्पन्न असेल त्यांस सुमारें १२०० ते १५०० रु. धारा भरावा लागतो. व खंडीस २५ रु. जरी भाव धरला तरी त्यांस धारा लावण्याकरितां ६० खंडी भात विकावें लागेल. मग बाकी राहिलेल्या ३०।४० खंडींत त्यांस निर्वाह करावा लागेल. ही गोष्ट झाली मोठ्या खातेदारांची. माझ्यासारख्या थोड्या उत्पन्नाच्या माणसाची स्थिति तर विचारावयासच नको. जितकें उत्पन्न येईल त्यांपैकीं बहुतेक भाग धारा भरण्याकरितां त्यास विकावा लागेल व अशा माणसाने निर्वाह कसा करावा ! सेटल्मेंट ऑफिसरांचा साधारण नियम आहे कीं, १० वर्षांमागची सरासरी काढून भाताचा भाव किती वाढला असें ठरवावयाचें. हूड साहेबांनी ही वाढ ८४ टक्के आहे असें ठरविलें. त्यावर मी १८९४ पासूनचे वाढीचे आकडे काढून ही वाढ कशी खरोखर ३६ टक्के होते हें दाखविलेलें होतें. वाढीपैकीं ३३ टक्के वाढ सरकारने काढून घेतल्यावर खातेदारास मग काय राहतें? याबद्दल मी बरेंच लिहिलें असूनहि तिकडे कोणी लक्ष दिलें नाही. या एकंदर विवेचनावरून सदर ठरावाचें किती महत्त्व आहे हे आपण जाणाल व सरकार ठरावाकडे सहानुभूतीनें पाहून धारा कमी करील अशी आशा आहे."

**श्री. लेले वकील** यांनी ठरावास अनुमोदन दिलें. त्यांनी आपल्या भाषणांत सदर ठरावाचें किती महत्त्व आहे हें विशद करून दाखविलें. प्रत्येक खातेदाराचा जितका ठराविक मक्ता आहे तितका येत नाही, त्यांत सूट द्यावी लागते. व ही गोष्ट सरकारचे नजरेस आणली पाहिजे असें सांगितलें. देशावरील मनुष्याला इकडील कंगाल स्थिति पाहून धारा इतका जास्त कसा याचें आश्चर्य वाटतें. पहिला धारासुद्धा माझ्या मताने जास्तच आहे. कराचा इतका बोजा असल्यावर लोकांना नवीन जमिनी पाडण्यास उत्साह कसा येईल?

नंतर सदर ठराव सर्वानुमतें पास झाला.

## अर्ज पाठवा

२ ठराव–श्री. वि. शं. गोंधळेकर वकील यांनी खालील ठराव मांडला. "ता. ३१-१२-३२ चे कुलाबासमाचारांत छापलेल्या नमुन्याबरहुकूमचे अर्ज प्रत्येक गांवाकडून ताबडतोब पाठविण्यांत यावे अशी ह्या तालुक्यांतील सर्व रयतेस ह्या सभेची विनंति आहे. त्यांनी कुलाबा समाचारांतील समग्र अर्ज वाचून दाखविला व ते म्हणाले, 'गांवोगांव अशा तऱ्हेचे अर्ज सरकारकडे गेल्यास रयतेची करुण कहाणी स्पष्ट रीतीनें दिसेल व सरकाराला सुद्धा रयतेच्या स्थितीकडे कानाडोळा करणें श्रेयस्कर नाही अशी खात्री होईल. माझे अगोदर भाषणें झालीं त्यांत सरकारधारा दिल्यावर खातेदाराचा शिलकेचा अंदाज दिला आहे तितकाहि माझ्या मताने शिल्लक राहत नाही. कारण इकडील जमिनी गुजराथ प्रांतासारख्या सपाटीवर नसून उंचसखल आहेत. त्यास बरेच ठिकाणीं पाट बंधारे घालावे लागतात. बंदिस्तीचा खर्चहि दरसाल खातेदारासच सोसावा लागतो. या सर्व खर्चाच्या बाबी सोसून खातेदारांकाय उरणार ! तरी आपण सर्वांनी सदरहू स्थिति सरकारापुढे जितक्या स्पष्ट रीतीनें येईल तितकी मांडावी व याकरिता सदर अर्ज गांवोगांव पाठवावे.

सदर ठरावास श्री. सुंकले मास्तर यांनी अनुमोदन दिल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला. ठराव ३--श्री. लिमये वकील यांनी खालील ठराव मांडला. "वरील ठराव नं. १ सरकारकडे ह्या सभेचे अध्यक्षांनी ताबडतोब पाठवावा दोन्हि ठराव सर्व वर्तमानपत्रांकडे प्रसिद्धीकरितां पाठवावे." त्यास श्री. गोंधळेकर वकील यांनी अनुमोदन दिल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला.

**खातेदारांची कमिटी**

अध्यक्षांनी खालील ठराव मांडला--"तालुक्यांतील खातेदारांची एक कमिटी नेमून त्यांनी कलेक्टरसाहेब यांची गांठ घ्यावी व त्यांना सर्व परिस्थिति समजावून सांगावी. कमिटींत खालील इसम असावे. १ श्री. विष्णु विनायक सप्रे, २ श्री. शंकर केरोबा शेलार, ३ श्री. वासुदेव नारायण वैद्य, ४ श्री. रामजी लक्ष्मण घरत, ५ श्री. रामचंद्र परशराम दातार, ६ श्री. रघुनाथराव बर्वे, ७ श्री. लक्ष्मण गोविंद पाटील, ८ श्री. वासुदेव कृष्ण ठेवरी, ९ श्री. विठ्ठल शंकर जोशी १० श्री. पुरुषोत्तम नागरदास शेठ ११ श्री. यशवंत महादेव कामत १२ श्री. रामराव नथोबा नाईक. अध्यक्ष आपल्या भाषणांत म्हणाले, "ठराव सरकाराकडे तर पाठवावयाचाच. परंतु त्याचबरोबर कलेक्टरसाहेबासहि सर्व परिस्थिति नीट समजावून सांगितली पाहिजे. हल्लींचे कलेक्टर एतद्देशीय आहेत, व त्यांस ही परिस्थिति समजेल व कळकळहि अधिक वाटेल. गव्हर्नरसाहेबांकडे जरी आपण अर्ज पाठविला तरी ते कलेक्टरांच्या सल्ल्याशिवाय कांही करणार नाहीत. तेव्हा योग्य इसमास प्रत्यक्ष सांगितल्यावर त्याचा जास्त फायदा होईल. गेल्या वर्षी जी तहकुबी म्हणून सरकारने दिली ती सूट देण्यांत येईल व वाढलेला धाराहि रद्द करण्यांत येईल, अशी खटपट आपण सर्वांनी केली पाहिजे."

शेवटीं श्री. लिमये वकील यांनी अध्यक्ष व सभेस आलेले लोक यांचे आभार मानल्यावर सभेचें काम संपलें.

# मंदिरप्रवेश बिलाला नकार

व्हाईसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनी मद्रासच्या कायदेमंडळांत डॉ. सुब्बारायन् यांनी मंदिरप्रवेशासंबंधी आणलेल्या बिलास परवानगी देण्याचें नाकारलें! व्हाईसरॉय यांच्या या नकारामुळे या बिलाबाबत सर्व हिंदुस्थानभर उठलेलें वादळ तूर्त कांही दिवस तरी शांत होईल. सनातनी हिंदुधर्मीयांची इच्छा, या बिलाला व्हाइसरॉयसाहेबांनी मंजुरी देऊं नये अशी होती व उलट पक्षीं सुधारकांची इच्छा या बिलाला व्हाइसरॉय यांनी आताच संमति द्यावी व त्या योगाने मद्रास प्रांतांतील देवळें तरी, हें बिल पास झाल्यास, अस्पृश्यांना लोकमतानुसार मोकळीं व्हावीं, अशी होती. या दोन पक्षांच्या झुंजींत एका बाजूस शास्त्रीपंडित व दुसऱ्या बाजूस महात्मा गांधी वगैरे नवमतवादी पुढारी असल्याने या वादाला खूपच रंग चढला होता. दोघांनीहि आपापलीं मतं साधकबाधक प्रमाणांसह युक्तिप्रयुक्तीच्या कोंदणांत उत्तम रीतीने मांडलीं व तीं व्हाइसरॉय व त्यांचे सल्लागार यांच्या कानापर्यंत व डोळ्यांपर्यंत जाण्याची खटपटहि केली. तेव्हा साहाजिकच या अडचणींतून व्हाइसरॉय कोणता मार्ग काढतात इकडे सर्वांचें लक्ष लागलें होतें. सोमवार ता. २३ रोजीं डॉ. सुब्बारायन यांच्या बिलावर नामंजुरीचा शिक्का व्हाइसरॉय यांनी मारल्यामुळे एका दृष्टीने तरी सनातनीयांचा विजय झाला असें समजण्यास हरकत नाही!

**व्हाइसरॉयांचा धूर्तपणा**

या विजयाचें पूर्ण फल मात्र सनातनीयांच्या पदरांत पडूं न देण्याची व्यवस्था व्हाइसरॉय यांनी मोठ्या धूर्तपणाने केली आहे. त्यांनी डॉ. सुब्बारायन यांच्या मद्रासमधील बिलाच्या प्रगतीचा मार्ग आपल्या नकाराची धोंड उभी करून रोखला हें खरें, पण त्याबरोबरच एका प्रांतांतच नव्हे तर अखिल हिंदुस्थानभर जें बिल लागू होऊं शकेल असल्या श्री. रंगा अय्यर यांनी असेंब्लींत मांडलेल्या बिलाला परवानगी देऊन या प्रश्नाला नवी वाट काढून दिली. वरील दोनहि बिलांतील कलमांत व उद्देशांत फरक आहे यांत शंका नाही. पण त्याबरोबरच हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे की, अस्पृश्य समाजाच्या हक्कांच्या प्रश्नांचा वाद यापुढे देशाच्या मैदानावर आल्यानें त्यालाहि मोठेंच तोंड लागणार व हा झगडा मोठ्या प्रमाणावर चालू राहाणार या दृष्टीने पाहातां व्हाइसरॉय साहेबांनी हा वाद आणखी वर्ष सहा महिनेच काय पण कदाचित् नवीन घटना अमलांत येऊन प्रांतिक स्वायत्तता मिळेपर्यंत मोठ्या युक्तीने पुढे ढकलला आहे असें वाटतें. सरकाराने आपण धर्मांत व धार्मिक रीतिरिवाजांत हात घालतों व घालीत नाही हे दोन्ही प्रकार त्यायोगें साधले! एका धोंड्याने दोन पक्षी

मारण्याच्या सरकारच्या कौशल्याचें हें उत्कृष्ट उदाहरण होय.

### मंजुरी कां मिळाली नाही?

डॉ.सुब्बारायन यांच्या बिलाला नामंजुरीचा नाट कां व श्री. रंगा अय्यर यांच्या बिलाला संमतीचा टिळा कां लावला याचीं व्हाइसरॉयांनी जीं कारणें दिलीं आहेत त्यांचा विचार केला म्हणजे व्हाइसरॉय यांचें मनोगत स्पष्ट होतें. या बाबतींत सरकारी पत्रकांत असें म्हटलें आहे कीं,' डॉ. सुब्बारायन यांचें बिल जरी मद्रास प्रांतांतील देवळासंबंधी असलें तरी त्याची तात्त्विक व्याप्ति सर्व हिंदुस्थानांतील देवळांपर्यंत आहे. शिवाय मद्रास प्रांतांतील मंदिरें हीं अखिल हिंदुस्थानांतील लोकांचींहि आहेत.केवळ मद्रास प्रांतीयांपुरतीं नाहीत. हे लक्षांत ठेवलें म्हणजे त्याचा परिणाम सर्व देशभर कसा होणार आहे हें समजेल. अर्थात् असलें बिल प्रांतिक कायदे मंडळापुढे न येतां अखिल भारतीय कायदेमंडळापुढेंच येणें योग्य आहे. तसेंच एका प्रांतांत असलें बिल पास झालें तर इतर प्रांतांत त्याच्या परिणामाच्या लाटा पोंचल्याशिवाय कशा राहतील !' या कारणाकरितां व्हाइसरॉयांनीं मद्रासचें बिल फेटाळलें व श्री. रंगा अय्यर यांच्या विस्तृत बिलाला संमति दिली. तथापि त्यांनी पुढे असें स्पष्ट म्हटलें आहे कीं,श्री.रंगा अय्यर यांच्या बिलास परवानगी दिली याचा अर्थ या बिलांत ग्रथित असलेली तत्त्वें सरकारास मान्य आहेत असा नाही. शिवाय श्री. रंगा अय्यर यांचें बिल पुढे आलेंच तर त्या बिलावरील लोकमत उत्तम रीतीने व पूर्णपणानें अजमावण्याकरितां सदर बिल प्रसिद्ध केलें जाईल व तीं मतें आल्यावरच त्याचा विचार होईल असेंहि सांगण्यांत आलें. तात्पर्य सरकारानें डॉ. सुब्बारायन यांचें बिल अटकविलें व श्री. रंगा अय्यर यांच्या बिलास दीर्घसूत्री चक्रांत अडकविलें !

### बिलांतील फरक

वरील दोनहि बिलांतील फरक लक्षांत घेण्यासारखा आहे. डॉ. सुब्बारायन यांचें बिल मंदिरप्रवेशापुरतें आहे. त्यांत अस्पृश्यांच्या इतर कायदेशीर अडचणींचा उल्लेख नाही. तो प्रवेश लोकमतावर अवलंबून ठेवला आहे. त्यामुळे नक्की अमूक एक भरीव हक्क आपल्या पदरांत असंदिग्ध रीतीनें पडला असें अस्पृश्य वर्गाला ठामपणें म्हणतां येणार नाही. कारण त्यांत ट्रस्टींना स्वतः वाटलें अगर पन्नास लोकांनी मागणी केली म्हणजे लोकांचीं मतें घेऊन बहुमत अनुकूल पडलें तरच मंदिरप्रवेश करून देतां येईल. सारांश डॉ.सुब्बारायन यांच्या बिलाचें सूत्र लोकमताच्या हातीं आहे. त्यांच्या बिलाचें तत्त्वच हें होतें. या तत्त्वाला पोषक अशींच त्या बिलांतील कलमें असून त्यांचा उल्लेख गेल्या अंकीं आम्ही केलाच असल्यानें तीं पुनः येथे देत नाही. श्री. रंगा अय्यर यांच्या बिलांतील मुख्य कलम असें आहे कीं, "आतांपर्यंतच्या कायद्यांत, फर्मानांत किंवा सरकारी मामुली हुकुमांत कांहीहि असलें किंवा आजपर्यंतची वहिवाट, रूढी अगर कायद्यांतील कलमें यांचा अर्थ काहीहि केला गेला असला तरी यापुढे वरीलपैकीं कोणतीहि गोष्ट मान्य न करतां हिंदुस्थानांतील अमुक व्यक्ति ही अस्पृश्य समाजापैकीं आहे म्हणून तिजवर कसलाहि दंड बसवितां येणार नाही किंवा तिजवर कसलेहि निर्बंध घातले जाणार नाहीत; तसाच त्यांच्या व इतर नागरिकांच्या हक्कांमध्ये अस्पृश्यतेच्या मुद्द्यावर कोणताहि फरक केला जाणार नाही; फौजदारी अगर दिवाणी अशा कोणत्याहि कोर्टांत अस्पृश्यतेबाबतची वहिवाट मानली जाणार नाही किंवा ती वहिवाट लक्षांत घेऊन कोणताहि निकाल न्यायकोर्टें करणार नाहीत."

श्री. रंगाअय्यर यांच्या बिलाचें स्वरूप किती व्यापक आहे हें यावरून लक्षांत येईल. आज मंदिरप्रवेशाचा प्रश्न त्यांत प्रत्यक्षपणे घातला नाही हें खरें. पण आतापर्यंतच्या पद्धतीप्रमाणे अस्पृश्यतेच्या रूढीला कायद्याचा जो पाठिंबा मिळत असे तो यापुढे मिळणार नाही. किंवा थोडक्यांत म्हणावयाचें तर कायद्यानेच अस्पृश्यता नाहीशी झाली असें म्हणावें लागेल. आजपर्यंत तसे हुकूम होते; पण त्यांना कायद्याचें स्वरूप नव्हतें. प्रत्यक्ष विधायक असें या बिलांत कांही मांडलें गेलें नसलें तरी निषेधामुळे येणारा भरभक्कमपणा त्यांत आहे.

### म. गांधींचें प्रायोपवेशन

व्हाइसरॉय यांच्या या निकालाचा महात्मा गांधींच्या प्रायोपवेशनावर कोणता परिणाम होणार हेंहि पाहणे महत्त्वाचें आहे. कायद्याच्या अडचणीमुळे ता. २ जानेवारीला सुरू होणारा त्यांचा आमरणान्त उपोषणाचा निश्चय त्यांनी पुढे ढकलला व डॉ.सुब्बारायन् यांच्या बिलाला व्हाइसरॉय संमति देण्यावर तो अवलंबून ठेवला. आता व्हाइसरॉय यांनी त्या बिलाला परवानगी दिली नाही. त्यामुळे महात्मा गांधी पुनः उपोषणास सुरुवात करतील किंवा काय अशी भीति उभी राहिली होती. पण गांधींनी या विषयासंबंधी जें पत्रक काढलें आहे त्यावरून ताबडतोब ते प्रायोपवेशनास सुरुवात करीत नाहींत असें दिसतें. व्हाईसरॉय यांच्या निकालाचा त्यांनी

एक दिवस पूर्ण विचार केला व मगच आपलें त्या बाबतींतील मत जनतेस सादर केलें. त्यांचें म्हणणें त्यांच्या शब्दांतच देणें बरें.

महात्मा गांधी आपल्या पत्रकांत म्हणतात "मद्रास बिलाला सरकारनें संमति दिली नाही याबद्दल मला दुःख होत आहे. मंदिरप्रवेश बिलाला संमति दिली असती तर सनातनीयांचा व सुधारकांच्या मतांचाच अजमास त्यांत घ्यावयाचा असल्यानें मला व सुधारकांना मतें मिळविण्याचेंच काम उरलें असतें व गुरुवायुर मंदिराबद्दल जो मी उपवास करणार होतों तोहि टळला असता" गांधीजींच्या या शब्दांवरून त्यांना व्हाइसरॉयांचा निर्णय नापसंत आहे हें स्पष्ट होतें. तसेंच या प्रकरणीं पुनः ते प्रायोपवेशन करणार नाहीत असेंहि नाही. पण त्यांनी या प्रश्नाचा व्यापक रीतीनें आपल्या पत्रकांत विचार केला असल्यामुळे या त्यांच्या नापसंतीचा परिणाम तूर्त तरी उपोषणांत होणार नाही असें दिसतें.

## ईश्वराचा हात

त्यांच्या मतानें व्हाइसरॉयांच्या नामंजुरींत ईश्वराचा हात आहे. कारण ज्या नव्या बिलाला व्हाइसरॉय यांनी संमति दिली आहे त्या बिलामुळे हा अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न चांगला धसास लागून अस्पृश्यतेचें कायद्यानेंच उच्चाटन होईल. कारण, यापुढे कोणत्याहि सनातनीयाला कायद्याचाच आधार घेऊन अस्पृश्यांवरील अस्पृश्यतेमुळे येणाऱ्या अडचणी कायम ठेवतां यावयाच्या नाहीत. धार्मिक व सामाजिक बाबी मात्र आहेत तशाच राहतील हें खरें. पण त्याचा विचार सुधारकांनी केला पाहिजे असें गांधींचें म्हणणें आहे. मंदिरप्रवेशाच्या प्रकरणांत यापुढे कोणाहि विरोधकाला कायद्यानें आडकाठी करतां यावयाची नाही असें त्यांना वाटतें. ते म्हणतात "एखाद्या अस्पृश्यानें धार्मिक वहिवाट मोडून मंदिरांत प्रवेश केला तर कायद्यानें त्याला शिक्षा व्हावी असें यापुढे कोणालाहि म्हणतां येणार नाही. कायद्याचा आधार यापुढे नव्या बिलानें मिळणार नाही; तथापि नव्या बिलानें झालें तरी मंदिरप्रवेशाचा प्रश्न एकमेकांच्या सलोख्यानेंच सोडविला पाहिजे. ज्या ठिकाणीं लोकमत अनुकूल नसेल त्या ठिकाणीं हरिजनांना देवळांत जातां येणार नाही. जेथे अनुकूल असेल तेथे एखाद्या व्यक्तीला कायद्याची मदत मागून अस्पृश्यांना बंदी करतां येणार नाही"

## गांधिजींचा अभिप्राय

एकंदरींत गांधीजींच्या मताचें तात्पर्य असें दिसतें कीं हा प्रश्न आतां सार्वदेशीय झाला आहे व यापुढे प्रायोपवेशन करण्याची पाळी आली तर ती सुधारकांनी आपल्या प्रयत्नांत कसूर केली तरच येईल, एरव्ही येणार नाही. तथापि त्यांच्या मतानें मंदिरप्रवेश हीच अस्पृश्यांचा प्रश्न सुटण्याची किल्ली आहे व तो प्रवेश मिळाला तरच इतर प्रश्न सुटतील. या त्यांच्या पत्रकांत यापुढे ते काय करणार हें दिलेलें नाही. कदाचित् त्यांच्या मार्फत नवें वर्तमानपत्र निघणार आहे त्यांत त्यांचा पुढचा कार्यक्रम येणार असेल.

श्री. रंगा अय्यर यांच्या बिलाचा नंबर ज्या बिनसरकारी बिलांचा विचार फेब्रुवारीच्या २७ व्या तारखेस व्हावयाचा आहे त्यांत कितवा येतो हें फेब्रुवारीच्या ११ व्या तारखेस ठरेल. तीन सभासदांनीं त्या बिलाची नोटीस दिली असल्यानें त्या बिलाला कौल मिळेल. पण त्या बाबतींत ता. ११ पर्यंत कांहीहि निश्चितपणें सांगतां येणार नाही. नंबर आला तरी ता. २७ चीं इतर कार्यक्रमपत्रिकेंतील कामें संपल्यावरच त्याचा विचार होणार. याचा इत्यर्थ हा कीं, प्रथम फेब्रुवारीची ता. ११ व मग ता. २७ अशा या बिलाच्या विचाराच्या पायऱ्या लागल्या आहेत.

# फेडरेशन व महाराष्ट्रांतील संस्थानिकांची बढती

येत्या एप्रिलपासून महाराष्ट्रांतील संस्थानिकांचा संबंध प्रांतिक सरकारपासून तोडला जाईल व हिंदुस्थान-सरकाराशीं जोडला जाईल. या तोड-जोडीला बराच अर्थ आहे. तो असा कीं, संस्थानिकांशीं ब्रिटिश सरकारचे संबंध हा विषय दिल्ली-सरकारच्या राज्यकारभारांत पडणारा असल्यामुळे, तो सर्वस्वी यापुढे एकट्या त्याच्या तंत्राने चालावा, त्यांत प्रांतिक सरकारचा हात कोणत्याहि प्रकारें राहूं नये. आज झाले तरी अंतिम स्वरूपांत संस्थानासंबंधांची सर्व अखत्यारी दिल्ली सरकारचीच आहे. परंतु या अखत्यारीची इमारत दुमजली होती, ती यापुढे एकमजली होणार. दुमजली म्हणजे अशी कीं, प्राथमिक व चालू चलाऊ अखत्यारी मुंबई इलाख्याच्या गव्हर्नराकडे असे, व त्याच्या निकालावर अपील म्हणूनच व्हावयाचें तर तें दिल्ली सरकाराकडे जाई. यापुढे गव्हर्नरसाहेबांची ही मधली पायरी काढून टाकण्यांत येईल, व मुळापासून काम चालवावयाचें तेंच दिल्ली सरकाराशीं चालेल.

हा फेरफार झाल्याने संस्थानिकांच्या महत्त्वांत किंवा अधिकारांत फेरफार असा कांहींच होणार नाही. ज्यांचे जे अधिकार व हक्क त्यांचे तेच राहतील. कारण या अधिकारांचा व हक्कांचा उगम ज्या तहांत आहे, ते तह दिल्ली सरकाराशींहि नव्हे तर कंपनीसरकाराशीं व बादशहांशींच झालेले आहेत. फरक इतकाच कीं, बादशहांचा प्रतिनिधि व्हाइसरॉय हा एकच असतां, चाकराने पडचाकर नेमावा त्याप्रमाणें, व्हाइसरॉय याने आपले कांहीं काम मुंबई इलाख्याच्या गव्हर्नराकडे सोंपविलें होतें. तें यापुढे तसें सोंपविलें जाणार नाहीं; व आपल्या परराष्ट्रीय मंत्र्याकडूनच तो तें करवून घेईल. आमच्या मतें ही व्यवस्था एकंदरीने संस्थानिकांना बहुधा हितकर अशीच वाटेल. कारण दोन धन्यांपेक्षा एक धनीच बरा. या नव्या योजनेने संस्थानिकांच्या वकिलांना-दिवाणांना मुंबईच्याऐवजी दिल्लीस हेलपाटे घालावे लागतील. परंतु दोन तंत्रें संभाळण्यापेक्षा थोडासा अधिक खर्च झाला तरी तो पुरवला, असें त्यांना वाटणें संभवनीय आहे.

नव्या व्यवस्थेंतहि पोलिटिकल एजंट रेसिडेंट वगैरे अधिकारी हस्तक म्हणून राहतीलच. पण त्यांचा शिलशिला किंचित तरी कमी होईल. व्यापारांत दलाली ही द्यावीच लागत असली तरी, दोन दलालांपेक्षा एकच दलाल असलेला बरा वाटतो, त्याप्रमाणे इलाख्याचा पोलिटिकल मंत्री, व फिरून त्यावर दिल्लीसरकारचा पोलिटिकल मंत्री, अशा दोन अधिकाऱ्यांची मर्जी संभाळण्यापेक्षा, येऊन-जाऊन जी काय मर्जी संभाळावयाची ती एकट्या दिल्लीवाल्याचीच संभाळली म्हणजे झालें! खालून वर जाणारी चहाडी नव्या व्यवस्थेत टळेलच असें नाही. पण स्वतः चहाडखोरालाच अधिकार असल्याने जो त्रास होतो तो तरी यापुढे होणार नाही. या लोकांचा सामान्य सत्कार—पाहुणचार केला म्हणजे झालं, अगदी खुशामतच करावयाला नको. पाहुणचारापेक्षा खुशामतीला जो अधिक खर्च लागतो तो तरी टळेल. श्रेष्ठ-कनिष्ठ भावाने वावरणारे लोक परस्परांपासून जितके दूर असतील तितकें दोघांनाहि बरें असतें. स्नेह व आदरबुद्धि मनांत असली तर ठीक; नाही तर आपला 'बोलका कागद' बरा! कागदाची दृष्ट पडत नाही किंवा लागत नाही. कागद शाईशिवाय दुसरें कांही खायाप्यायाला मागत नाही त्याची सरबराई करावी लागत नाहीं कीं, त्याला शिकारीला न्यावें लागत नाही. कागदहि वाईट बोलूं शकेल. नसते आरोप करील. पण त्याचा एक गुण तरी बरा कीं, तो एकदां जें बोलेल तेंच शंभर वेळ कायम ठेवील, बदलणार नाही. या कामीं जीभ फारच द्वाड !

आता संस्थानिकांचा संबंध जवळच्या गव्हर्नरापासून तोडून लांबच्या व्हाइसरॉयाशीं जोडला तर, प्रजेच्या दृष्टीने तें वाईट असें कांही लोकांना वाटते. पण त्यांना हे माहीत नाही कीं, गव्हर्नर जवळ असला म्हणून, त्याने संस्थानिकांविरुद्ध असणाऱ्या तक्रारी सांगण्याला प्रजेला उघड संधि कधी दिली आहे काय? अशा तक्रारी-अर्जांनी पोलिटिकल एजंटांच्या केरटोपल्या भरभरून जात असतील; व चिरुटांच्या जळत्या राखेने ते अर्ज जळून न गेले तर पट्टेवाला ते फेकून देत असेल. त्या अर्जांतला एखादा अर्ज गुप्त फाइलीवर गेलाच, तर ज्याचा उपयोग ब्रि. सरकाराला स्वतःच्या हिताच्या दृष्टीने संस्थानिकांविरुद्ध कधी काळीं करतां येईल असाच जावयाचा. म्हणजे प्रजेची चहाडी तेवढी सरकारच्या उपयोगी पडते; प्रजेचें दुःखनिवारण होत नाही तें नाहीच! म्हणून आम्हाला असें वाटतें कीं, ब्रिटिश सरकार व संस्थानें यांच्या संबंधाच्या दोरीची गांठ कोठे तरी एक ठिकाणींच पडेल तर बरें. आणि ती दिल्लीसरकारच्या कचेरींत पडली तरी त्यांत वावगें कांही नाही. यांत मोठ्याशीं संबंध आणून नसता मोठेपणा मिळविण्याचा प्रश्न नाही. असेल तर फक्त कारभाराच्या सोयीचा प्रश्न आहे.

आता हें म्हणणें थोडें खरें आहे कीं, मुंबईचा

संबंध तुटून दिल्लीस जोडला गेल्याने लहान लहान संस्थानांची थोडीशी कुचंबणा होणार आहे. आणि मोठ्या संस्थानांसंबंधानेंहि हें थोडेसें खरेंच आहे कीं, हा सर्व कारभार दिल्लीस चालूं लागल्यास उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानिकांचेंच कार्य अधिक साधेल. पण यावर दोन प्रकारचीं उत्तरें देतां येतात. दक्षिणेंतील मोठ्या संस्थानिकांना आम्ही असें म्हणतों कीं, हिंदुस्थानाची राजधानी केव्हाहि झालें तरी कोठल्या तरी एकाच शहरीं असावयाची. ती दर प्रांताकरितां वेगळी होऊं शकत नाहीं. आणि आता ती दिल्लीस होऊन बसली ती तेथून कशी हलणार? शिवाय ती दिल्लीस नव्हती, कलकत्त्यास होती, तेव्हा तरी अधिक काय लाभ होता? उत्तर—हिंदुस्थानांतील राजे—रजवाड्यांना या परिस्थितीचा फायदा इतरांपेक्षा थोडा अधिक मिळेल ही गोष्ट खरी. पण त्याला इलाज काय? तसेंच छोट्या संस्थानिकांनाहि आम्ही असें म्हणूं कीं, तुमची दाद येथे जवळच मुंबईस लागण्याचा संभव होता तो कमी झाला हें खरें; पण त्याबरोबरच नजीकपणाचा कांही उपद्रव व तोटा होत होता तो तरी वांचला अशी समजूत त्यांनी करून घ्यावी.

तसेंच छोट्या संस्थानिकांचा छोटेपणा एका गोष्टीने त्यांना घालवितांहि येईल. ती म्हणजे आपापसांत गट करून संघशक्ति निर्माण करणें. आमची अशी खात्री आहे कीं, दक्षिण महाराष्ट्रांतील जीं काय असतील तीं दहापंधरा संस्थानें एकी करून एकदिलाने वागूं लागतील तर त्यांच्या छोटेपणाचा अवगुण लोपून जाईल. नरेंद्र-मंडळाच्या अन्यायी रचनेच्या गाऱ्हाण्याचा गवगवा करण्याचे बाबतींत या संघशक्तीचा उपयोग, निदान तिची जरूरी, त्यांना थोडीबहुत कळून आलीच असेल. म्हणून तेंच धोरण त्यांनी आता, फेडरेशन व दिल्ली येथील कारभार यांनी उत्पन्न केलेल्या नव्या परिस्थितींतहि, चालू ठेवावें म्हणजे त्याचा कांही तरी उपयोग होईल.

महाराष्ट्रांतील किंबहुना हिंदुस्थानांतील उरल्यासुरल्या संस्थानिकांचा संबंध दिल्ली सरकाराशीं जोडण्यांत येत आहे त्यांत कोणतेंच कारस्थान नसून, जी गोष्ट केव्हा तरी व्हावयाची ती लवकर करून टाकावी अशा इच्छेनेच घडत आहे असें आम्हाला वाटतें. विशेषतः फेडरेशनची म्हणजे स्वराज्याच्या संयुक्त घटनेची कल्पना पुढे आल्यामुळे, उद्यां होणारी गोष्ट आजच घडली असाहि संभव आहे व त्या दृष्टीनेहि महाराष्ट्रांतील संस्थानिकांना मिळालेली ही बढती ठीकच आहे. आता कोणतीहि नवी परिस्थिति उत्पन्न झाली म्हणजे विचारी माणसाचें मन सहजच साशंक होतें. या नव्या परिस्थितींत कोणते धोके असतील अशाविषयी तो विचार करूं लागतो. त्याला थोडी भीतिहि वाटत असते. पण या सर्वांचें निराकरण आत्मविश्वासानेच होत असतें. दिल्ली सरकाराशीं संबंध जोडल्यामुळे आपलें कसें काय होईल अशी भीति छोट्या संस्थानिकांना वाटते, तशीच आम्हा खालसांतील प्रजेलाहि अशीच भीति वाटते कीं, फेडरेशन होऊन संस्थानिकांचें दडपण आमच्या कायदेमंडळावर येऊन बसलें म्हणजे लोकसत्तेचा मार्ग खुंटणार कीं काय?

पण आमच्या समजुतीप्रमाणे या दोन्हींहि गोष्टी खऱ्या नाहीत. हिंदुस्थान देश हा एकच व अविभाज्य आहे व असावा ही भावना जर सात्त्विक व सयुक्तिक असेल तर ती गोष्ट जितकी लवकर घडून येईल तितकें चांगलें. आणि या नव्या परिस्थितींत अकल्पित रीतीनें जीं संकटें येतील त्यांचा देशहिताच्या दृष्टीने देशप्रीति व बंधुभाव यांच्या बळावर आम्ही परिहार करूच करूं असा आत्मविश्वास उभयपक्षीं वाळगला पाहिजे.

संस्थानिकांना आम्हाला एकच गोष्ट सांगावीशी वाटते. ती ही कीं, केवळ सरकारच्या डोळ्याला डोळा लावून, आपलें स्थान अढळ ठेवण्याकरितां, भीतीने किंवा गांगरून जाऊन वागण्याचे दिवस आता राहिले नाहीत. ब्रिटिश सरकाराशीं वागतांना मान वर करून पहाण्याचें धैर्य जसें यापुढे त्यांनी दाखविलें पाहिजे; तसेंच आपल्या प्रजेनेहि यापुढे मान वर करून आपल्याकडे पाहिलें व ती आपल्याशीं बोलली तर त्याचा विषाद न मानण्याचें धैर्यहि त्यांनी दाखविलें पाहिजे. वरिष्ठाप्रमाणें कनिष्ठाशींहि न्यायबुद्धीने वागण्याला एकाच प्रकारचें धैर्य लागतें. इंग्रजींत 'बी जस्ट ॲंड फीअर नॉट' अशी एक म्हण आहे, ती संस्थानिकांनी यापुढे आचरणांत आणण्यास शिकलें पाहिजे.

# मुंबईचा टाइम्स व रा. केळकर

[ता. २६ जानेवारीच्या मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्रांत 'इंग्लिश लिबरल' या सहीनें एका गृहस्थाचें निनांवी पत्र छापण्यांत आलें होतें. त्यांत गोलमेज परिषदेविषयीचें लोकमत, व विशेषतः रा. केळकर यांचें धोरण, यासंबंधानें त्यानें आपल्या समजुतीप्रमाणें कांहीं विधानें केलीं आहेत. पण त्यांत बऱ्याच चुका आहेत. म्हणून या पत्राला उत्तरादाखल एक पत्र रा. केळकर यांनीं 'टाइम्स' पत्राला ता. २७ रोजीं पाठविलें, त्याचा सारांश याखालीं दिला आहे.—सं. के.]

"काल सकाळीं दिल्लीहून परत आलों, तेव्हा, ता. २६ च्या अंकांत 'इंग्लिश लिबरल' या सहीनें एक पत्र प्रसिद्ध झालें तें मला वाचावयास मिळालें. या गृहस्थानें आपल्या समजुतीप्रमाणें कांहीं विधानें केलीं आहेत. पण तीं ऐकीव वार्ता, किंवा वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या अर्धवट मुलाखतींतील इकडचीं तिकडचीं तुटकीं चार वाक्यें, यावरून बनवलीं गेलेलीं दिसतात. आपलीं मतें लोकांनीं सांगण्यांत कोणाचाहि तोटाच असतो. म्हणून माझ्या मताबद्दल माझ्या शब्दांनीं मीच खुलासा करावा हें बरें, असें वाटल्यावरून तो मी करीत आहें.

## हे असहकारितावादी नव्हेत

'इंग्लिश लिबरल' हें नांव घेणाऱ्या गृहस्थानें असें म्हटलें आहे कीं, "यच्चयावत् सर्व मुसलमान, अस्पृश्य वर्ग, यांच्याप्रमाणेंच सप्रू, जयकर, केळकर हे नेमस्त हिंदूदेखील सरकाराशीं सहकारिता करण्याला तयार आहेत. येऊन जाऊन मुंबईच्या लिबरल लोकांनीं आपलें एक जाहीर पत्रक प्रसिद्ध करून सुधारणांविषयी नापसंती व्यक्त केली"! असें म्हणून या गृहस्थानें त्यांना 'असहकारवादी' अशा सदराखालीं ढकलून वेगळें काढलें आहे. पण या इतक्या निरनिराळ्या लोकांचें एकच बोचकें बांधणें हें चुकीचें व गैरसमज उत्पन्न करणारें आहे हें उघड होय. मुंबईचे लिबरल यांनीं फक्त सायमन कमिशनच्या वेळीं, व परवा गोलमेज परिषद भरत नाहीं असें वाटलें तेव्हा, असहकारिता पुकारली होती खरी. पण सुमारें दहा वर्षांपूर्वी, असहकारिता खऱ्या जोरांत सुरू होती तेव्हा, लिबरल पक्षापैकीं सर चिमणलाल सेटलवाड हे मुंबई-सरकारचे कार्यकारी मंडळांत सभासद होते; व त्यांच्याच बरोबरीचे दुसरे एक लिबरल पुढारी सी. वाय. चिंतामणी हे अलाहाबाद प्रांतांत मंत्री होते. अर्थात् या लोकांना असहकारवादी म्हणणें ही चूक नव्हे काय?

त्याचप्रमाणें ! सप्रू—जयकर यांच्या जोडीला मला बसविणें हीदेखील चूकच. कारण डॉ. सप्रू हे स्वतःला "राजकारणांतील पोरका मुलगा" असें म्हणवून घेतात! त्याचें कारण ते मोठ्या दर्जाचे पण एकांडे शिलेदार. त्यांची बरोबरी माझ्याच्यानें होणें नाहीं. मी स्वतःला राजकारणांत पोरका किंवा अनाथ समजत नाहीं. कारण माझा एक राजकीय पक्ष असून, त्याचें मला जसें पाठबळ आहे तशीच त्या पक्षासंबंधानें मजवर कांहीं जबाबदारी आहे असेंहि मी मानतों. रा. जयकर यांचीहि बरोबरी माझ्याच्यानें होणार नाहीं. कारण त्यांचे अंगीं जो उत्कट गोड स्वभाव, व दुसऱ्याचें मन वळविण्यासारखा युक्तिवाद करण्याची पात्रता आहे तितकी मजमध्यें नाहीं. या त्यांच्या विशेष गुणामुळेच सरकार व लोक यांच्यावर रा. जयकर यांचें विशेष वजन पडत असतें. तात्पर्य, सप्रू व जयकर यांच्या जोडीला मी बसूं शकत नाहीं. त्या दोघांना तर "राजकारणांतील जुळीं भावंडें"च म्हणतात. अशा सप्रू—जयकर द्विदळाचें सप्रू—जयकर-केळकर हें त्रिदळ कसें होऊं शकेल? कारण आम्ही कांहीं कांहीं बाबतींत सारखे असलों तरी कांहीं कांहीं बाबतींत अगदीं वेगळे आहों.

## मी कोण आहे?

प्रतिसहकारवादी एवढेंच माझें वर्णन कोणी केलें तर तें बरोबर होईल, व त्यावर मी संतुष्टहि आहें. प्रतिसहकारवादी पक्ष या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, 'कायदेमंडळें व सरकारी राज्यकारभार यांच्याशीं सहकारिता करण्यासारखी योग्य म्हणजे विशेष चांगली परिस्थिति असेल, व तशी सहकारिता करण्यानें एकंदरीनें देशाचें हितच होणार असेल, तर ती करणारा किंवा करावी म्हणणारा पक्ष.' सहकारिता या शब्दाच्या मागें 'प्रति' हा जो उपसर्ग आहे तो केव्हाहि विसरून चालणार नाहीं. त्याला निश्चित अर्थ आहे, व त्याचा परिणाम 'सहकारिता' या शब्दार्थाचें क्षेत्र संकुचित किंवा मर्यादित करण्यांत होतो. म्हणूनच, हल्लीं ज्या नवीन राजकीय सुधारणा घडून येणार आहेत, त्यांचें प्रत्यक्ष बिल हातीं पडून तें वाचीपर्यंत, त्या सुधारणांचा उपयोग करण्याचे कामीं प्रत्यक्ष सहकारिता करावी कीं नाहीं याविषयींचें मत मीं थांबवून ठेवलेलें आहे. आणि ही गोष्ट मीं माझ्या व्याख्यानांतून व माझ्या मुलाखतींतून जाहीर रीतीनें सांगितलेली आहे.

“नवीन सुधारलेल्या राज्यघटनेंत काम करणें हें खुषीप्रमाण नाखुषीनेंहि होऊं शकेल किंवा करावें लागेल. अर्थात् हें काम खुषीनें करणें, उत्साहानें करणें,आनंदानें करणें,यालाच ‘सहकारिता’ म्हणतां येते. नाखुषीनें केलेलें काम ही सहकारिता नव्हे.सुधारणा निश्चित होऊन त्यांचा कायदा झाल्यावर कदाचित् असेंहि होऊं शकेल कीं, आहे त्या स्थितींतहि नाखुषीनें कायदेमंडळाच्या कामांत भाग घ्यावा अशी शिफारस मला स्वपक्षाला करावी लागेल पण त्याचें कारण उघड आहे. तें असें कीं, देशांतील इतर सर्व वर्ग या कायदेमंडळांतून स्वस्थानीं बसून आपला हात तर उगवून घेतीलच. पण तसें करतांना एकंदर देशाचें, व विशेषतः जो पक्ष कायदेमंडळावर बहिष्कार घालून बाहेर राहील त्या पक्षाचें, अहित होण्यासारखेंहि वर्तन करील. अर्थात् या गोष्टीचा प्रतिकार म्हणून कायदेमंडळांतून काम करणें, ही खरी सहकारिता नव्हे. विद्यमान राज्यघटना किंवा सरकार यांच्यासंबंधानें अनुकूल किंवा प्रतिकूल मत असणें, स्नेहबुद्धि किंवा विरोधी बुद्धि असणें, या दोहोंत जो फरक आहे तोच सहकारिता व असहकारिता यांतील खरा फरक होय. परिस्थिति प्रतिकूल किंवा नाउमेद होण्यासारखी आहे, निरुत्साह वाटण्यासारखी आहे, असें असतांहि केवळ कर्तव्य म्हणून एखाद्या मनुष्याला एखादी गोष्ट केव्हा केव्हा करावी लागते.तसा प्रकार हल्लींच्या सुधारणासंबंधानें घडेल किंवा नाहीं हें आजच सांगतां येत नाहीं. परंतु प्रतिसहकारवादी मनुष्येदेखील हल्लींच्या सरकाराशीं स्नेहबुद्धीच्या सहकारितेनें वागूं लागावा या गोष्टीला फारच काळ लोटला पाहिजे, असें आजच्या स्थितीवरून तरी दिसतें.

### अपेक्षेपेक्षा फार कमी

असो. तूर्त इतकी गोष्ट खरी कीं, सरकारासंबंधानें ज्यांचें धोरण व मनोभूमिका बऱ्याच वेगवेगळ्या प्रकारची आहे अशा लोकांमध्येंहि आज एका गोष्टीपुरतें मतैक्य दिसून येतें. सप्रू-जयकर काय, मुंबईचे नेमस्त काय, प्रतिसहकारवादी काय, व सर्वसामान्य राष्ट्रीय पक्ष काय, या सर्वांचें मत असें आहे कीं,हल्लीं ज्या सुधारणा सरकारानें देऊं केलेल्या दिसतात त्या लोकांच्या अपेक्षेपेक्षा फारच कमी आहेत. मी लोकांच्याकरितां कशाला बोलूं ? पण माझ्यापुरतें मी सांगतों; व तें सर्व माझीं व्याख्यानें व मुलाखती यांतून पूर्वी प्रसिद्ध झालेंहि आहे. ‘इंग्लिश लिबरल’ या टोपण नामधारी गृहस्थानें माझीं म्हणून जीं मतें सांगितलीं आहेत तीं तशीं नाहींत. केवळ नमुन्यादाखल म्हणून मी कांहीं उदाहरणेंहि देतों. सैन्यखात्यासंबंधानें सरकारचें धोरण घ्या. हें धोरण सरकाराला अत्यंत लांछनास्पद असे आहे व तें आम्हाला दुःसह होतें. फार काय, पण या धोरणाचा निषेध करण्याचा प्रसंग येतो तेव्हा नेहमीं मला असें वाटतें कीं, याविषयीची माझी निषेधाची खरी भावना व्यक्त करतील असे तीव्र व दूषणास्पद शब्द कोशांतहि आढळणार नाहीत! गोलमेज परिषदेपुढें मी माझ्या भाषणांत काय सांगितलें हें सर्व आता प्रसिद्धच झालें आहे. (केसरी ता. ३०-१२-३२ व मराठा ता. १-१-३३ या अंकांत रा. केळकर यांचीं या विषयावरील भाषणें छापलेलीं आहेत तीं वाचकांनीं फिरून वाचावीं. सं. के.)

लष्करी राज्यकारभारासंबंधानें मीं गोलमेज परिषदेपुढें असें स्पष्ट सांगितलें कीं, लष्करी खात्याचें स्वरूप बदलून, हल्लीं त्याजवर असलेला मुलकी कारभाराचा छाप काढून टाकण्याचा गुप्त प्रयत्न सरकार करीत आहे तो गर्हणीय होय! परराष्ट्रीय कारभाराच्या खात्यासंबंधानें मीं गोलमेज परिषदेपुढें स्पष्ट सांगितलें कीं, या खात्यांतील जबाबदारीचें काम करण्यास आणि मंत्रिपद घेण्यास लायख व विश्वासू हिंदी लोक सहज मिळतील. अर्थात हें खातें सर्वस्वी बेजबाबदार ठेवण्याचें सरकारचें धोरण समर्थनीय नाहीं. गव्हर्नर व गव्हर्नर-जनरल यांजकडे ठेवण्याच्या विशेष जादा अधिकारासंबंधानें मीं परिषदेंत असें स्पष्टच सांगितलें कीं, हे अधिकार विस्तारानें एखाद्या कंठाळीसारखे व्यापक आहेत व परिणामीं तर त्यांचा दगड लोकांच्या डोक्यांत केव्हा बसेल याचा नेम नाहीं! अर्थात् असे फाजील अधिकार राखून ठेवण्याच्याविरुद्ध मी आहें.

फडणिशी खात्यासंबंधानें सरकारानें जामिनक्या मागण्याचा घाट काढला आहे. पण त्याच्या मुळाशीं असलेला संशय निष्कारण आहे, व सरकारचें या बाबतींतलें धोरण निषेधार्ह आहे. हिंदी स्वराज्य विलायतेंतील पेढीवाले व भांडवलशाही यांच्या स्वाधीन करण्यांत येत आहे ही गोष्ट ठीक नाहीं. त्यांच्या हातीं स्वराज्याच्या आशेचा [illegible] वाट लागेल हें दिसतच आहे, व असें करण्याला वास्तविक सरकाराला कांहींच योग्य सबब नाहीं.

### सुधारणा असमाधानकारक आहेत

तात्पर्य, अशा रीतीनें मी आणखीहि किती तरी सांगूं शकेन. पण मी निष्कारण जागा अडवूं इच्छित नाहीं. देऊं केलेल्या सुधारणा सर्वस्वी असमाधानकारक आहेत असें माझें म्हणणें आहे. मीं असेंहि म्हणतों कीं, विलायती मुत्सद्द्यांनीं सुधारणांच्या देणग्यांचा अगदीं बारीक कीस काढून, तो फुंकून फुंकून हिंदी लोकांच्या हातीं कसा टाकतां येईल याविषयीं संशोधनाचा जसा कांहीं नुसता पोरखेळ चालविला

आहे.आणि 'इंग्लिश लिबरल' ह्या अशा सुधारणांना 'डोमिनियन स्टेटस' म्हणतो हें आश्चर्य नव्हे काय ? व मौज ही कीं, त्याला कै. देशबंधु चित्तरंजनदास यांची तो साक्ष देतो ! राष्ट्रीय सभेनें मागितलेलें सोळा आणे स्वातंत्र्यच न मिळालें तर ज्या डोमिनियन स्टेटसवर आपण संतुष्ट राहूं असें दास म्हणाले किंवा म्हणत, तें डोमिनियन स्टेटस हें नव्हे ! तसेंच माझें स्वतःचें धोरणहि या गृहस्थाला नीट कळलें नाही. "सुधारणा मिळतील त्या राबवाव्या" असें मी म्हणतों तेव्हा, सरकारानें ज्या दिल्या त्याच अधिक किंवा त्या पुरे असा त्याचा अर्थ नसतो. हें राबविण्याचें काम करतांना लोकांना उत्साह वाटेल किंवा आनंद होईल असें मीं कधीहि म्हटलें नाही! फार काय पण या सुधारणांत अशी काय जादू आहे कीं, नेमस्त पक्षानें झालें तरी त्यांचा खुषीनें स्वीकार करावा ? व सरकारच्या निशाणाखाली जमून राष्ट्रीय सभेशीं झगडा करावा? अशा स्थितींत "नेमस्त व लिबरल लोकांना वळवा" असें सरकाराला सांगणें म्हणजे त्या लोकांच्या बुद्धिमत्तेचा उपमर्द व अपराध करण्यासारखें आहे ! हे लोक म्हणजे निर्बुद्ध मुर्की जनावरं का आहेत कीं त्यांना वळवून न्यावयाचीं व सरकार वळवन नेऊं शकेल ? ता. १९ जानेवारीच्या आपल्या जाहीर पत्रकांत मुंबईच्या लिबरल लोकांनीं आपल्या किमान म्हणन काय मागण्या मागितल्या आहेत तें तरी पाहा म्हणजे समजेल. त्यांनीं अशीहि जोराची मागणी केली आहे कीं, सरकारानें राजकीय कैद्यांची सुटका ताबडतोब करावी;कारण त्यानेंच देशांत शांततेचें वातावरण निर्माण होईल व सुधारणांच्या गुणावगुणांची खरी चर्चा होईल. राष्ट्रीय सभेला आपण सर्वस्वी चिरडून टाकूं व नामशेष करूं असें सरकार म्हणत असेल तर तें व्यर्थ होय. आणि लिबरल लोक हे नेमस्त असले तरी,त्यांना फसवून, त्यांच्या तोंडून हल्लीच्यासारख्या सुधारणांचे गोडवे गाववून घेऊं ही आशाहि व्यर्थ होय.

तात्पर्य, ( १ ) गोलमेज परिषदेमधून निघालेल्या सुधारणांविषयीं लोकांना खरें काय वाटतें, आणि ( २ ) लोक त्यांच्याविषयी प्रत्यक्ष धोरण पुढे कोणतें स्वीकारतील, हे दोन प्रश्न अगदी वेगळे व स्वतंत्र आहेत. कारण सुधारणा निराशाजनक व अपुऱ्या असतांहि राजकारणांतील एक प्रकारची हुलकावणी म्हणनच त्या राबवून घेण्याचें धोरण लोकपक्षानें स्वीकारावें असेंहि कदाचित् संभवेल. मला सांगावयाचें तें इतकेंच कीं, सुधारणांविषयी खरें लोकमत काय आहे हें ध्यानांत घेऊन,सरकारानें अजून तरी, म्हणजे 'व्हाइट पेपर' लिहून होण्याच्या आधी, लोकांना समाधानकारक वाटतील अशा सुधारणा कराव्या, निदान महत्त्वाच्या बाबतींत तरी त्या अवश्य कराव्या."

# इचलकरंजी दत्तकप्रकरण

कोल्हापूर दरबार व इचलकरंजी जहागिरीचे अधिपति श्री. नारायणराव ऊर्फ बाबासाहेब घोरपडे यांच्यामध्ये दत्तकाच्या बाबतींत सन १९१७ पासून तेढ उत्पन्न झाली आहे. श्रीमंत बाबासाहेबांनी त्या वेळीं दत्तकाची परवानगी कोल्हापूर दरबाराकडे मागितली होती. रा. विनायक नारायण घोरपडे नांवाच्या गृहस्थांनी आपण मूळ संस्थापकाच्या घराण्यांतील असल्यानें आम्हांस दत्तक घेण्यांत यावें, अशा अर्थाचा एक अर्ज कोल्हापूर दरबाराकडे केला. पुढे या कामीं कोल्हापूर दरबार व श्रीमंत इचलकरंजीकर यांच्यामध्ये मतभेद उत्पन्न झाल्यानें मुंबई–सरकाराकडे दाद लावून घेण्याचा श्री. बाबासाहेब यांनीं प्रयत्न केला, व त्यांनीं अशी विनंति केली कीं, आपण लक्ष्मण विष्णु जोशी या मुलास दत्तक घेण्याचें ठरविलें आहे, सबब त्यास मान्यता द्यावी. लक्ष्मण विष्णु जोशी हे श्री. बाबासाहेबांच्या जनक भावाचे चिरंजीव होत. मुंबई–सरकारास श्रीमंतांचें म्हणणें पटल्यामुळे त्यांनीं त्यास मान्यता देऊन कोल्हापूर दरबारास आपला अभिप्राय कळविला. लक्ष्मण विष्णु जोशी ऊर्फ रावसाहेब यांस श्रीमंतांनी दत्तक घेतलें. कोल्हापूर दरबारानें या दत्तकास मंजुरी दिली नाही, व यामुळे हें प्रकरण हिंदुस्थान–सरकाराकडे गेलें. हिंदुस्थान–सरकारास श्रीमंत बाबासाहेब यांचें करणें गैरवाजवी वाटलें नाही. म्हणून त्यांनीं या दत्तकास परवानगी दिली व हे प्रकरण निकालांत काढलें.

**तीन मुद्दे**

रा. विनायकराव घोरपडे यांच्या अर्जासंबंधीहि हिंदुस्थान–सरकारानें खालील तीन मुद्दे काढून त्यांचा निकाल लवाद नेमून करावा असें ठरविलें. हे तीन मुद्दे खाली दिल्याप्रमाणे आहेत—

१ इचलकरंजी जहागिरीच्या मूळ संपादकाच्या सरळ वंशजांपैकीं कोणी लायक पुरुष आहे काय?

२ इचलकरंजी जहागिरीच्या मूळ संपादकाच्या सरळ वंशजांपैकीं कोणी लायक पुरुष हयात असेल व जहागिरीचे मालक दत्तक न घेतां निवर्तल्यास जहागिरीचा वारसा नेहमीच्या क्रमांत अशा पुरुषाकडे जाण्याचा संभव असेल अशा प्रसंगीं नारो महादेव यांस दिलेली देणगी अशा शर्तीवर आहे काय कीं, जीमुळे जहागिरीच्या मालकास तेढे वारसास दत्तकाची परवानगी देतां येणार नाही ?

३ दक्षिण-महाराष्ट्रांतील प्रचलित वहिवाटीवरून अगर इचलकरंजी जहागिरीच्या देणगीच्या स्पष्ट शर्तीवरून मूळ संपादकाच्या सरळ वंशजांपैकीं लायक इसम हयात असल्यास त्यासच दत्तक घेतला पाहिजे कीं काय ?

या तीन मुद्दयांपैकीं नंबर २-३ या मुद्दयाच्या शाबितीचा बोजा कोल्हापूर दरबारावर ठेवण्यांत आला.

### पुनश्च मागणी

१९२३ सालीं कोल्हापूर दरबार व श्री. इचलकरंजीकर यांच्यामध्ये आपसांत तडजोड होऊन लक्ष्मण विनायक जोशी यांच्या दत्तकास कोल्हापूर दरबाराने मान्यता दिली व यामुळे रा. विनायकराव घोरपडे यांच्या अर्जाबाबत हिंदुस्थान—सरकाराने सुचविलेल्या मुद्दयाची चौकशी होण्याचे कारण उरलें नाही. परंतु श्रीमंतांच्या दुर्दैवाने त्यांनी घेतलेले दत्तक पुत्र रावसाहेब निवर्तले, व त्यांच्यामागें त्यांचे एकुलतें एक पुत्रहि अकालीं मरण पावले. व श्रीमंत बाबासाहेब यांस पुनश्च दत्तकाची परवानगी मागणें भाग पडलें. सन १९३० सालीं त्यांनी कोल्हापूर दरबाराकडे परवानगी मागितली.

मागे उपस्थित झालेल्या तीन प्रश्नांची पुनः चौकशी करण्याचा आव घालून कोल्हापूर दरबाराने एका ब्रिटिश अधिकाऱ्याची चौकशीकरिता मागणी केली व त्याच्याकडे "रा. विनायकराव घोरपडे हे नारो महादेव यांच्या सरळ वंशजांपैकी आहेत काय" ही चौकशी करण्याचें काम सोंपविलें. इचलकरंजीच्या जहागिरदारांस या चौकशीमध्ये जरूर वाटल्यास भाग घेण्याचें कळविण्यांत आलें. श्रीमंत बाबासाहेब यांनी ही चौकशी अयोग्य आहे असें आपलें म्हणणें एका अर्जाच्या द्वारें सप्टेंबर १९३२ मध्ये सप्रमाण रीतीने मुंबई सरकारापुढे ठेविलें, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाही. परंतु या चौकशीबद्दल आपली तक्रार नमूद करून श्रीमंत बाबासाहेब यांनी या चौकशींत भाग घेतला.

### चौकशी व तक्रार

श्रीमंत बाबासाहेब यांचें म्हणणें असें आहे कीं, नारो महादेव यांना इचलकरंजी संस्थानाचे मूळ संपादक म्हणतां येणार नाही. कारण जहागिरींतील ८८ गांवांपैकीं शिरढ्राड या एकाच गांवाची सनद नारो महादेव यांचे चिरंजीव व्यंकटराव यांचे नांवाची आहे व फार झालें तर एका गांवचे संपादक नारो महादेव यांचे चिरंजीव होत. जहागिरींतील इतर गांवें दुसऱ्या व्यक्तींनी मिळविलीं आहेत. सन १८४८ सालीं कोल्हापूर दरबाराने जी कोल्हापूरच्याखाली असलेल्या जहागिरीची विस्तृत चौकशी कॅ. ग्रॅहॅम यांच्या हस्तें करविली व जो रिपोर्ट कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांनी मंजूर केला, त्यांत असें स्पष्ट ठरविलें आहे कीं, इचलकरंजी संस्थानाचें स्वरूप " इनाम " या सदराखालीं येत असून " सरंजाम " या सदराखालीं तें येत नाही व सरंजामाचे नियम या देणगीस लावतां येणार नाहींत. प्रचलित हिंदु कायद्याप्रमाणे अमुकच मुलगा दत्तक घेतला पाहिजे असें म्हणतां येणार नाही व १८५८ पासून जी दत्तकाची मुभा लॉर्ड कॅनिंग यांच्यापासून देण्यांत आली आहे, त्यामध्येहि अमुकच विशिष्ट मुलगा दत्तक घेतला पाहिजे असा निर्बंध घालण्यांत आलेला नाही. संपादकाच्या सरळ वंशजांपैकींच मुलगा दत्तक घेतला पाहिजे असा कोठेहि निर्बंध पाहण्यांत येत नाही. खुद्द इचलकरंजी जहागिरीमध्ये आजपर्यंत जे चार दत्तक झाले आहेत त्यांमध्ये संपादकाच्या सरळ वंशजांपैकींच दत्तक घेतला पाहिजे अशी अट केव्हांच घालण्यांत आलेली नाही.

### दत्तकाची अट

१७९५ सालीं पेशवे यांनी स्वगोत्री मुलगा दत्तक घेण्यास परवानगी दिली. १८४९ सालीं हुपरी घराण्यांतील तेढे वारसास दत्तक घेण्याची परवानगी सरकारने दिली. १८६२ सालीं मुंबई-सरकारने नारो महादेव यांचे घराण्यांतील मुलास दत्तक घेण्याची परवानगी दिली व १९१७ सालीं खुद्द बाबासाहेबांच्या दत्तकासहि मुंबई—सरकारने परवानगी दिली व त्यांत दत्तक मुलगा नारो महादेव यांचे घराण्यापैकीं असावा एवढीच अट घालण्यांत आली. व यानंतरचा पांचवा दत्तक १९२३ सालीं कै. रावसाहेब यांचा होय. या सर्व प्रसंगीं नारो महादेव यांच्या सरळ वंशजांपैकींच मुलगा दत्तक घेतला पाहिजे, नारो महादेव यांच्या घराण्यांतील इतर कोणासहि दत्तक घेतां येणार नाही अशी अट केव्हांहि घालण्यांत आली नाहीं. या पांच दत्तकांपैकीं एक दत्तक श्री. बाजीराव पेशवे यांनी मंजूर केला व बाकीचे चार दत्तक

मुंबई–सरकाराने मान्य केले यावरून हल्लींचा वाद किती निरर्थक आहे हें दिसून येईल. दक्षिणमहाराष्ट्रांतील वहिवाटीकडे पाहिलें असतांहि हीच गोष्ट दिसून येत आहे. १८६६ सालीं बहिणीच्या घराण्यांतील मुलगा कोल्हापूरच्या गादीस दत्तक म्हणून मान्य करण्यांत आला. हल्लींचे छत्रपति राजाराम महाराज यांचे वडील शाहू महाराज हे कागलच्या घाटगे घराण्यांतील पूर्वीच्या महाराजाच्या एका मुलीचे नातू होत. विद्यमान हिंदु लॉ, ब्रिटिश सरकाराचें दत्तकाच्या बाबतींतील धोरण, इचलकरंजी जहागिरींतील मागील पांच दत्तकांचा इतिहास, कोल्हापूरच्या राजघराण्यांतील वहिवाट या सर्व गोष्टींचा विचार केला असता संपादकाच्या सरळ वंशजांपैकींच मुलगा दत्तक घेतला पाहिजे, असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. संपादकाच्या कुटुंबांपैकींच मुलगा असला तरी चालेल हें उघड दिसणार आहे.

रा. विनायकराव घोरपडे यांच्या पूर्वजांनी अशाच तऱ्हेची तक्रार केली असून सरकारानें हें त्यांचें म्हणणें अमान्य केले आहे.

सध्यांच्या चौकशीचें स्वरूप

हल्लीं कोल्हापूर दरबारानें मि. नॉर्मन यांच्याकरवीं जी चौकशी केली आहे ती अगदी गैरशिस्त व हिंदुस्थान-सरकारनें ठरविलेल्या या तीन मुद्द्यांना अगदीं सोडून आहे. हिंदुस्थान सरकाराचा पहिला मुद्दा असा होता कीं, इचलकरंजी जहागिरीच्या संपादकाच्या सरळ वारसांपैकी लायक पुरुषसंतति आहे काय? व हल्लींची चौकशी अशी आहे कीं, विनायकराव घोरपडे हे नारो महादेव यांचे सरळ वंशज आहेत काय? इचलकरंजी जहागिरीचे मूळ संपादक नारो महादेव हे हिंदुस्थान-सरकारानें गृहीत धरले नव्हते व वादाकरिता नारो महादेव हे संपादक असें मानलें तरी त्यांचे सरळ वारस कोण आहेत हे पाहावयास पाहिजे. परंतु मि. नॉर्मन यांची चौकशी केवळ विनायकराव यांच्यापुरतीच असल्यानें विनायकराव यांच्याबरोबरीचे समान दर्जाचे नारो महादेव यांचे सरळ वारस दुसरे कोणी आहेत काय हा प्रश्न तसाच मोघम राहत आहे. खुद्द विनायकराव यांनी हजर केलेल्या वंशावळीवरूनहि त्यांच्या घराण्याची दुसरीकडे शाखा आहे, व त्यांच्या घराण्यांतील समान दर्जाचीं दुसरींहि लायक मुलें आहेत असें दिसत आहे. हिंदुस्थान–सरकाराच्या पहिल्या मुद्द्याप्रमाणे संपादकाच्या सरळ वंशजांपैकीं लायक मुलें आहेत असें जर दिसून येईल तर अमक्या मुलासच दत्तक घ्या असें केव्हांहि म्हणतां येणार नाही. शिवाय हिंदुस्थानसरकारनें सुचविलेल्या बाकी दोन मुद्द्यांचा विचार झाल्याखेरीज व हे दोन मुद्दे शाबीत करण्याचा बोजा इचलकरंजी दरबारावर ठेविला असल्यानें या तीनहि मुद्द्यांचा योग्य निकाल लागल्याखेरीज श्री. बाबासाहेब यांनी मागितलेली परवानगी नाकारतां येणार नाही. याशिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, कोणाहि व्यक्तीनें दत्तक घेतलाच पाहिजे अशी सक्ति कधीहि करतां येणार नाही.

मि. नॉर्मन यांनी केलेली चौकशी अगदी एकदेशीय व हिंदुस्थानसरकारनें सुचविलेल्या मुद्द्यास सोडून असली तरी, घटित गोष्टींबद्दल मि. नॉर्मन यांनी दिलेल्या अभिप्रायांवर अपील होईलच व बाकीच्या दोन मुद्द्यांबद्दल मुंबई–सरकारासहि योग्य विचार करावा लागेल. तोंपर्यंत इचलकरंजी जहागिरीचीं वस्त्रें अमुक एका व्यक्तीस मिळालीं असें समजणें चमत्कारिक होईल. याबद्दल कांहीं वर्तमानपत्रांतून विपर्यस्त मजकूर येत असल्यामुळे वस्तुस्थितीचें दिग्दर्शन केले आहे.

# काँग्रेसचा पुढील कार्यक्रम

काँग्रेसचे सध्याचे अध्यक्ष श्री. माधवरावजी अणे यांनी येत्या आठवड्यांत फेब्रुवारीच्या आरंभीं हिंदुस्थानांतील निवडक काँग्रेसभक्तांची एक खासगी सभा नागपुरास बोलविली आहे, असें आम्हांस समजतें. ही सभा कशासाठी बोलविली आहे, याचा खुलासा त्यांनीं वर्तमानपत्रांच्या बातमीदारापाशीं केला नाहीं. यामुळे या खासगी सभेसंबंधीं निश्चित बातमी आम्हास नाहीं. तथापि, या सभेच्या उद्देशासंबंधीं कांहीं तर्क करण्यास हरकत दिसत नाही.

गेल्या सप्टेंबरांत म. गांधींनी अस्पृश्य वर्गाच्या बाबतींत सरकारी निर्णय बदलून घेण्यासाठी येरवड्याच्या तुरुंगांत उपास सुरू केला. त्यानंतर अस्पृश्य पुढारी व स्पृश्य हिंदु समाजाचे पुढारी यांच्यांत तडजोड होऊन ती तडजोड मुख्य प्रधानांनी मान्यहि केली. त्यानंतर अस्पृश्यतानिवारण हा म. गांधींचा आवडता विषय असल्यामुळें व सरकारनें त्यांना तुरुंगांत राहूनहि अस्पृश्यतानिवारणाची चळवळ चालविण्यास परवानगी दिल्यामुळे ते ती चळवळ करीत आहेत. परंतु काँग्रेसच्या कार्यकर्त्यांत त्यामुळे बरीच दिशाभूल अणि समजु-

र्तींचा घोटाळा उत्पन्न झाला आहे. कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांपैकीं बरेच प्रमुख पुढारी अजून तुरुंगांतच आहेत. कांहीं परदेशांत गेले आहेत. कांहीं आपला तुरुंगवास संपवून परत आले आहेत. अशा मोकळ्या पुढाऱ्यांत कांग्रेसच्या कार्यक्रमाविषयीं कांहीच निश्चित धोरण दिसत नाही. कांहीं पुढारी तटस्थ बसले आहेत, तर कांहीं अस्पृश्यता निवारण किंवा अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश यासाठीं प्रयत्न करीत आहेत.

गेल्या वर्षी म्हणजे १९३२ च्या जानेवारी महिन्यांत कांग्रेसच्या वर्किंग कमिटीनें कायदेभंगाचें युद्ध पुकारलें. त्या वेळेपासून सुमारें ३।४ महिन्यांच्या आंतच कॉंग्रेसचे बहुतेक सर्व पुढारी तुरुंगांत अडकले गेले. त्यांपैकीं ज्यांना वर्ष-सहा महिन्यांच्या शिक्षा झाल्या होत्या, ते पुढारी हळहळू सुटून बाहेर आले आहेत. प्रत्येक प्रांतांत असे कांहीं पुढारी मोकळे आहेतच. कॉंग्रेसने १९३२ च्या जानेवारींत पुकारलेलें कायदेभंगाचें युद्ध अजून कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें तहकूब किंवा बंद केलेलें नाहीं, तें सुरूच आहे. अशा समजुतीनें ठिकठिकाणीं रोज कांहीं स्वयंसेवक मात्र कमीजास्त प्रमाणांत पकडले जात आहेत. ऑर्डिनन्स कायद्याच्या कडक अम्मलबजावणीमुळे कायदेभंगाचें युद्ध पूर्वीसारखें जोरांत चाललें नाहीं; मंद चाललेलें आहे. अशा परिस्थितींत सुटून आलेले कॉंग्रेस पुढारी काय करीत आहेत? एक तर ते स्वस्थ तरी बसले आहेत; किंवा अस्पृश्यतानिवारण किंवा मंदिर-प्रवेश यांच्या चळवळींत निमग्न आहेत.

गेल्या २ महिन्यांपूर्वी श्री. राजगोपाळाचार्य हे कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. परंतु त्यांनी मंदिरप्रवेशाची चळवळ करण्यासाठीं अध्यक्षपद सोडलें आणि त्या ठिकाणीं बाबू राजेंद्रप्रसाद यांची नेमणूक केली. सध्या ते गुरुवायूर मंदिरप्रवेशाच्या बाबतींत खटपट करीत आहेत. इतकेंच नव्हे तर कांहीं कांग्रेसभक्त मंदिरप्रवेशाची सवलत देऊं पाहणाऱ्या बिलांना व्हाइसरॉयांनीं संमति द्यावी म्हणून लोकमत व्हाइसरॉयांच्या कानीं घालण्याची खटपट निकरानें करीत आहेत! ज्या कौन्सिलांत कॉंग्रेसनें आपले प्रतिनिधि पाठविले नाहींत इतकेंच नव्हे, तर ज्या कौन्सिलावर कॉंग्रेसनें बहिष्कार पुकारला, त्या कौन्सिलांत अमुक कायदा येऊं देण्यास व्हाइसरॉयांनीं संमति द्यावी अशी खटपट कॉंग्रेसभक्तांनीं चालवावी, ही गोष्ट विलक्षण आहे! कॉंग्रेसनें पुकारलेलें कायदेभंगाचें युद्ध बंद किंवा तहकूब झालें नसतां, कॉंग्रेसभक्तांना कौन्सिलांतील मंदिरप्रवेशाच्या बिलास व्हाइसरॉयांची संमति मागण्यांत पुढाकार घ्यावा, हें कॉंग्रेस पक्षाचें धोरण सुसंगत आहे काय? कॉंग्रेसभक्तांनीं आज कोणतें कार्य एकनिष्ठपणें केलें पाहिजे? कायदेभंग चालविणें हें कीं, अस्पृश्यतानिवारण करणें हें?

या दोन कामांत विसंगति नाहीं. दोनहि कांग्रेसच्या कार्यक्रमाचीं अंगें आहेत. पण एकीकडे कायदेभंग व दुसरीकडे व्हाइसरॉयांस विनंति, हे दोन कार्यक्रम मात्र सुसगत नाहींत. ते परस्परविरोधी आहेत! कॉंग्रेसला कायदेभंग पुढे चालू ठेवणें अशक्य वाटत असेल तर तो तिनें जाहीर रीतीनें बंद तरी केला पाहिजे; नाहीं तर शक्य तितक्या निकरानें चालविला तरी पाहिजे! म. गांधींनीं नुकत्याच काढलेल्या जाहीर पत्रकांत यासंबंधी कांहीं खुलासा केला आहे. ते लिहितात कीं—

"कायदेभंगाच्या बाबतींत काय करावें, याबद्दल मी तुरुंगांत बसून कांहींच सूचना देऊं शकत नाहीं. एक तर मला तशी परवानगी नाहीं; असती तरी मीं या बाबतींत कांहींच बोललों नसतों. कायदेभंग चालू ठेवणें शक्य व इष्ट आहे कीं नाहीं, हें तुरुंगाबाहेरील कांग्रेसभक्तांनीं ठरविलें पाहिजे. कायदेभंगाच्या चळवळींतील जोर थकत आला असें त्यांस वाटत असेल, तर ती त्यांनीं बंद ठेवावी; तसें नसेल, तर चालू ठेवावी. पण या बाबतींत माझ्याकडून कांहीं सूचना मिळेल, अशी अपेक्षा त्यांनीं करूं नये!"

सारांश, म. गांधींनीं या बाबतींत सर्व जबाबदारी देशांत हल्लीं मोकळे असलेले जे प्रमुख कॉंग्रेसकार्यकर्ते व पुढारी आहेत, त्यांच्यावर टाकली आहे. ही जबाबदारी कोणताहि एकटा कॉंग्रेस पुढारी आपल्या माथ्यावर घेऊं इच्छिणार नाहीं. म. गांधी जानेवारी महिन्यांत सुटणार, अशी आशा मध्यंतरीं उत्पन्न झाली होती तीहि खोटी ठरली आहे. म. गांधी सुटले, तर ते कोणतीहि जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेण्यास समर्थ आहेत; तसें इतर पुढाऱ्यांना करतां येणें शक्य नाहीं. यासाठीं कॉंग्रेसपक्षाचें पुढील धोरण आंखण्याचें काम देशांत विद्यमान असलेल्या कॉंग्रेसभक्तांनीं एकत्र जमून सामुदायिक जबाबदारीवरच केलें पाहिजे. श्री. बापूजी अणे यांनीं प्रमुख व निवडक कांग्रेस पुढाऱ्यांची व कार्यकर्त्यांची सभा याच उद्देशानें बोलाविली असावी, असा आमचा अंदाज आहे. कांग्रेसनें एक वर्ष कायदेभंगाची चळवळ चालविली. आता तिची शक्ति थकली असेल, तर ती बंद करण्यांतहि कांहीं नामुष्की

नाही. प्रबळ ब्रिटिश सत्तेपुढे कॉंग्रेसचा पराभव झाला, तरी त्यांत कांही कमीपणा नाही. तिला जगांत कोणीहि हंसणार नाही ! महायुद्धांत अमेरिका दोस्त राष्ट्रांना सामील झाल्यामुळे जर्मनीचा पराभव झाला, म्हणून जगांत त्याला कोणी हंसलें नाही. त्याच्या पराभवाबद्दल तिऱ्हाइतांना हळहळ [illegible] वाटली. पराभवांत लज्जास्पद असें कांही नाही. कॉंग्रेसभक्तापुढे आज प्रश्न एवढाच आहे कीं, यापुढे कोणतें धोरण आंखावें ? नागपुरास भरविण्यांत येणाऱ्या कॉंग्रेसभक्तांच्या सभेंत याच प्रश्नाचा सांगोपांग विचार होईल, व पुढील मार्ग आंखला जाईल, अशी अपेक्षा आम्ही करतो.

—महाराष्ट्र ( नागपूर.)

# म्हैसुराकडील प्रेक्षणीय स्थळांचें दर्शन

( ले.—य. न. केळकर )

### ललित महाल

कन्नंबडीचें धरण पाहून आल्यानंतर 'ललितमहाल' नामक राजवाडा पाहावयास गेलो. असे निरनिराळे चार पांच राजवाडे येथे असून ते सर्व फार प्रेक्षणीय आहेत. मुख्य जगन्मोहन व अंबाविलास राजवाड्यांत जाण्याकरितां दरबारी पोशाख अवश्य असतो याची आगाऊ कांहींच कल्पना नसल्यामुळे ते आम्हांस पाहावयास सांपडले नाहीत. आणि हा ललितमहाल पाहूनच ते किती प्रेक्षणीय असतील याची मनानें कल्पना करावी लागली. वास्तविक अंबाविलास व जगन्मोहन हे दोन राजवाडे पाहिले म्हणजे म्हैसूरचा इतिहास, कलाकौशल्य, श्रीमंती, ऐश्वर्य, रसिकता यांचे सारच पाहिल्यासारखें होतें. आणि त्या राजवाड्यांचीं तपशीलवार वर्णनें मीं वाचलेलीं होतीं त्यावरून तर माझी उत्कंठा फारच प्रबळ झाली होती. तेथे जावयास मिळते तर तेथील ३००० जुन्या शस्त्रांचें शस्त्रागार, म्हैसूरचें इतिहासप्रसिद्ध हस्तीदंती सिंहासन, जुनीं चित्रें व रविवर्म्याच्या अस्सल चित्रांचा बहुमोल संग्रह, टिपू ज्यांतून स्वारी करीत असे ती गंधर्व पालखी, राजघराण्याची शिकेकऱ्यार, मयूरमहाल, संगीत शाळा इत्यादि विभाग तेथले बहुमोल सामान व पायांना गुदगुल्या करणारे उंची गालीचे, १६९४ सालीं तयार झालेला बिदनूरच्या केवलदुर्ग किल्ल्यावर सांपडलेला, प्रेक्षणीय दगडी पलंग, टिपूने तयार केलेला वाघाचा लांकडी कळीचा पुतळा कीं जो एका युरोपियनास फाडून खात आहे, तें सर्व पाहता आलें असतें पण उपयोग काय ? असो.

दिल्लीचें नवीन व्हाइसरीगल लॉज किंवा व्हाइसरॉयाचा राजवाडा ज्यांनी पाहिला असेल त्यांना ललितमहालाची बरीचशी कल्पना येईल. मला तर वाटलें कीं, या राजवाड्याचाच नकाशा तेथे उतरला असावा. आधुनिक सर्व सुखसोयींनी सज्ज असलेला हा राजवाडा एकवार दर्शनीय आहे. येथे एका दिवाणखान्यांत म्हैसूरसंबंधी सर्व इंग्रजी ग्रंथांचा व नकाशांचा संग्रह व १८०० सालीं तत्कालीन इंग्रज चित्रकारांनी काढलेल्या टिपूच्या मोहिमांचीं मोठमोठीं चित्रें यांचा संग्रह फारच मौल्यवान वाटला. इतिहासाभ्यासकास तो किती मौल्यवान आहे हें सांगणें नको. पण अशा दरिद्री लोकांना मग ते कितीहि आस्थेवाईक असले तरी त्याकडे पाहून नुसता निश्वास टाकून बाहेर पडण्याखेरीज गत्यंतर नसते. असो.

### प्राणि–संग्रहालय

यानंतर दुपारीं प्राणिसंग्रहालय किंवा शिकारखाना पाहिला. हिंदुस्थानांत कलकत्ता, मुंबई, जयपूर वगैरे ठिकाणीं असलीं प्राणिसंग्रहालयें आहेत. त्यांत कलकत्त्याचें फार उत्कृष्ट आहे. त्याच्याच तोडीचें हें आहे म्हणतात. या प्राणिसंग्रहानें फार मोठें मैदान व्यापलेलें असून आंतल्या निरनिराळ्या प्राण्यांची संख्याहि फार मोठी आहे. उंटाचा सौंदर्यगर्व परिहार करणारा आणि याच्यासारखी लांबच लांब मान उभारलेला जिराफ, कांगारू, निरनिराळ्या तऱ्हेचीं शेकडो माकडें, बर्फांत राहाणारे पांढरे अस्वल, गवे, पाणघोडे, वाघ, सिंह, अस्वल, लांडगे, कोल्हे वगैरे एकुणएक वन्य पशु आणि शेकडों तऱ्हांचे सुंदर सुंदर पक्षी, शहामृग, काळे हंस, मोर वगैरे येथ आहेत. विशेषतः पांढरे शुभ्र मोर आणि सफेत हरणें तसेंच काळे तांबडे पंचरंगी पोपटहि पाहण्यासारखे आहेत. प्रत्येक प्राण्याच्या पिंजऱ्यावर त्याचें नांव, वसतिस्थान व त्याला कोठे पकडला वगैरे माहिती लावलेली आहे. तसेंच त्यांतल्या त्यांतच त्या प्राण्याच्या मूळ वसतिस्थानासारखी कृत्रिम गुहा वगैरेहि करून ठेवलेल्या आहेत. ज्ञानदानाच्या दृष्टीनें या प्राणिसंग्रहालयांचा कितीहि

उपयोग असो, परंतु हे सर्व वन्य आणि हिंस्र पशुपक्षी येथे कोंडलेले पाहून मूर्तिमंत स्वतंत्रतेचाच हा बंदिखाना वाटतो व फार वाईट वाटतें. पण या एकाच स्थितीतहि निरनिराळ्या प्राण्यांच्या मनोवृत्तींतला तरतम भाव पाहून, मोठा तो कोठेहि मोठाच याचाहि सुदैवाने प्रत्यय येऊन बरें वाटतें. कारण शेंगाचे चार दाणे टाकतांच अंगविक्षेपांचे सगळे डौवारी प्रकार आणि वेडावण्याच्या सगळ्या तऱ्हा क्षणभरकां होईना पण करून दाखविणारें येथले माकड आणि उलट पुढे पसरलेल्या दोन पंजांवर सचिंतपणें आपली हनवटी टेकून सगळ्या जगाला विन्मुख होऊन पडलेली सिंहाची येथली गंभीर आकृति पाहिली म्हणजे झालें ! खरोखर या कोंडलेल्या प्राण्यांना पाहावयास येणाऱ्या मनुष्यांना ते प्राणी पाहून काय वाटतें त्याप्रमाणेच त्या प्राण्यांनाहि मौजेने आपणास पाहावयास येणारीं हीं माणसें पाहून काय वाटते हेंहि कळण्यास मार्ग असता तर फार बरें होतें !

**श्रीरंगपट्टण**

दुसरे दिवशीं सकाळीं श्रीरंगपट्टणास गेलों. श्रीरंगपट्टण म्हैसुराहून सुमारे ९ मैल आहे. या इतिहासप्रसिद्ध वास्तूंत प्रवेश करतांना पूर्वपरिचित अनेक स्मृति पुनः पुनः जागृत होऊन मन अस्वस्थ करतात यांत शंका नाही. पट्टणाचें महत्त्वच तसें आहे. कारण दिल्ली ही जशी मराठी राज्याची उत्तर सीमा होती तशी पट्टण ही त्याची दक्षिण सीमाच समजली जात असे. दिल्लीवरच्या मराठ्यांच्या अनेक स्वाऱ्यांप्रमाणें पट्टणावरच्या त्यांच्या स्वाऱ्याहि गाजलेल्या आहेत. किंबहुना मराठी लष्करांनी दिल्लीच्या अगोदर १०० वर्षे पट्टणाच्या तटाला टकरा घेतलेल्या आहेत. दिल्लींत मराठ्यांचा प्रवेश प्रथम शिवाजीमहाराजांबरोबरच झाला असला तरी विजिगीषेनें मराठी लष्करें दिल्लीवर नेणारा पहिला बाजीराव पेशवाच झाला हें प्रसिद्ध आहे. ती गोष्ट १७३८ च्या सुमारास घडली, पण त्याच्याहि आधीं बरोबर १०० वर्षे म्हणजे सन १६३८ सालीं शहाजीने श्रीरंगपट्टणास वेढा देऊन सक्तीने खंडणी वसूल केली आहे. सन १७२६ सालीं पहिल्या बाजीरावाने ६०० मैल धाऊन या किल्ल्याला वेढा दिला होता. त्यानंतर भाऊसाहेबांनी १७५७ सालीं या किल्ल्याला वेढा दिला आहे. त्यानंतर १७६० सालीं किल्ल्याच्या पायथ्याशीं मोठी घनचक्कर माजून हैदर अलीचीं शंभर वर्षेच भरलीं होतीं. त्यानंतर तर श्रीरंगपट्टण आणि त्याच्या भोवतालचा सर्व प्रदेश म्हणजे थोरले माधवराव पेशवे, गोपाळराव पटवर्धन, परशरामभाऊ पटवर्धन मुरारराव घोरपडे यांच्या पराक्रमांचें स्मारकच झालें होतें. मोती तलावाची सुप्रसिद्ध लढाई येथून अवघी १०।१५ मैलांवर झालेली होती असें हें श्रीरंगपट्टण आहे !

प्रथम श्रीरंगाचें देऊळ पाहिलें. देऊळ हेमाडपंती जुन्या पद्धतीचें असून प्रचंड आहे. आंतली श्रीरंगाची मूर्ति निजलेली आहे. गाभाऱ्याबाहेर सभामंडपांत एक मोठी पितळी मूर्ति ठेवलेली आहे. इतरहि कांही देव आहेत. देऊळ अंधेरें, कोंदट आणि उदास आहे. पण फार पुरातन आणि प्रसिद्ध आहे. १७५७ मध्ये मराठ्यांनी श्रीरंगपट्टणाला वेढा देऊन आपल्या तोफांचा धडाका सुरू ठेवला त्यावेळीं याच देवळाच्या शिखरावरचा कांही भाग ढासळला व त्याचवेळीं मराठ्यांच्याहि तोफखान्यांत एका दारूच्या पोत्यांत ठिणगी पडून भडका झाला व माणसें दगावलीं तेव्हा उभयपक्षीं अपशकुन समजून तहाचीं बोलणीं सुरू झालीं ही गोष्ट आठवून ऐतिहासिक स्मृतीने क्षणभर मी तन्मय झालों. असो; या देवावरूनच किल्ल्याला श्रीरंगपट्टण हें नांव पडलेलें आहे. देवळाच्या प्राकाराबाहेर श्रीरंगाचा एक मोडका अजस्र रथ पडलेला दिसतो. श्रीरंगाचें देऊळ पाहून झाल्यावर जेथ जेथे तटाची भित शिल्लक होती तेथें तेथे चौफेर फिरून आलों त्यावरून पूर्वी तटाआंत तट कसे होते व त्यांमध्यें खंदकांतून पाणी खेळवून स्थळ दुर्गम कसे करण्यांत आलें होतें त्याची बरीच कल्पना आली. तेथे जवळच एक विटांची भिंतीवरील कमान आहे ती इंग्रजी चित्रांतील धनुष्याकृति पुलासारखी दिसते. तीवर नाचलें म्हणजे ती हालते. तेथून निघून घुमज म्हणून एक मशीद आहे, ती पाहावयास गेलों. तिच्या उंच मिनारावर चढून जाण्याकरितां पोटांतून जिना आहे त्यावरून वर जाऊन भोवतालची चांगली शोभा दिसते. नंतर बारुतखाना म्हणजे दारूचीं कोठारें व टिपूने इंग्रज कैद्यांना डांबून ठेवलेली भुयारें वगैरे पाहिलीं. त्यानंतर मोटारने निघून टिपूच्या कबरस्थानाकडे आलों. ही कबर एका शांत पण सुंदर अशा बगिच्यांत आहे. भोवती आंब्यांची मोठी थोरली राई आहे त्यामुळे फारच निवांत वाटतें. कबरीपुढे ताजमहालाप्रमाणें सुरूच्या सरळ रांगा लावलेल्या आहेत. कबरस्थानाची इमारत सुंदर पण अतिशय साधी आहे. काळ्या कुळकुळीत घोटलेल्या काळ्या दगडाचे खांब त्याला दिलेले आहेत. त्यांत आपलें प्रतिबिंबहि दिसतें. आंत टिपू, हैदर, हैदराची बायको यांचीं रांगेने थडगीं आहेत. जन्मभर हजारों स्वाऱ्याशिकाऱ्या करून भागलेल्या राजपुरुषांच्या चिरंतन विश्रांतिस्थानाला खरोखर साजेसा

येथला देखावा आहे. या वास्तूंत प्रवेश केल्यानंतर वृत्ति गंभीर बनते, यांत शंका नाही.

### दर्यादौलत

'कृष्णेवर येऊन पेशव्यांशीं झुंजेन' ही महत्त्वाकांक्षा ज्यांनी धरली आणि जवळ जवळ ती खरी करून दाखविली त्या प्रतापी पितापुत्रांच्या कबरी पाहून ज्याला इतिहासाची यत्किंचितहि ओळख आहे त्याला ते मराठ्यांचे दुर्निवार शत्रु असतांहि आदराने अभिवादनाचा करभार स्वेच्छेने द्यावासा वाटल्याशिवाय राहात नाही. ही कबर पाहिल्यानंतर टिपूच्या 'दर्यादौलत' नामक राजवाड्याकडे गेलों. वास्तविक राजवाडा म्हणण्यासारखी ही इमारत प्रचंड नाही व त्यांत विशेषकलाकुसरहि नाही, एक साधा हवाशीर बंगला असेंच त्याचें स्वरूप आहे. परंतु ह्या इमारतीच्या भिंतीवर टिपूनें तेल्यारंगात नानातऱ्हेचीं चित्रे काढून ठेवलेलीं आहेत. तेवढीं मात्र फार उपयुक्त आहेत. त्या चित्रांत टिपूच्या स्वाऱ्यांचे देखावे, इंग्रजांच्या व टिपूच्या लढाया, टिपू व टिपूच्या गांडालिकांच्या भेटी वगैरे अनेक चित्रे चितारलेलीं आहेत. त्यांवरून टिपूच्या स्वारीचा कसा थाट असे, युरोपियन कवाईत शिकलेली त्याची फौज कशी दिसे, त्याचें खास हुजरातीचें चेल्याचें पथक कसें असे, स्वार शिलेदारांचे व गार्द्यांचे पोषाख पेहराव कसे असत; वगैरे बारीक माहिती प्रत्यक्ष पाहिल्यासारखीच मिळते. कारण ही चित्रें तत्कालीन आहेत व विशेष गोष्ट अशी कीं, तीं आजहि काल काढल्यासारखीं दिसतात. यत्किंचित् रंग उडलेला नाही किंवा रेघ पुसलेली नाही. सदर इमारतीवर एक मजला असून त्यांत श्रीरंगपट्टण किल्ल्याचा एक चांगला बारीकसारीक स्थळेंहि दाखविणारा नकाशा लाविला आहे. तसेंच लॉर्ड डलहौसीसाहेबांचा ह्या महत्त्वाच्या ऐतिहासिक स्थलाचें निगेनें रक्षण करण्याविषयींचा हुकम फ्रेम करून टांगून ठेवलेला आहे. एकंदरींत या 'दर्यादौलत' महालांत प्रवाशांना वश करण्यासारखें विशेष कांही नाही. परंतु हैदर, टिपू यांच्या महनीय व्यक्तिमत्त्वाची ओळख ज्यांनी इतिहासावरून करून घेतलेली असेल, त्यांना मात्र ही बाह्यतः शून्य व उदास दिसणारी वास्तु सजीव व गजबजलेलीच वाटेल.

### सोमनाथपूर

दुसरे दिवशीं सकाळीं ३५ मैलांवरील सोमनाथपूर नामक प्रसिद्ध देवालय पाहण्यास गेलों. हे देवालय हळवीडच्या धर्तीवर असून हेमाडपंती घाटाचेंच आहे. त्यांत दगडांवर इतकी कलाकुसर केली आहे व इतक्या निरनिराळ्या तऱ्हेच्या वेलबुट्या काढल्या आहेत, कीं हें देवालयहि हिंदुस्थानांतील जुन्या शिल्पाचा व कारागिरीचा उत्कृष्ट नमुना म्हणून यथार्थ उल्लेखलें जातें. प्रथम देवळांत प्रवेश केला तों तेथे अंधाराचेंच साम्राज्य होतें. पण नंतर तेथल्या वाटाड्यानें एका लांब काठीवर मेणबत्ती पाजळून छतावरील कलाकुसर दाखविण्यास सुरुवात केली तेव्हा मात्र हें देऊळ पाहण्यास आल्याचें सार्थक झालेंसे वाटलें. देवळाच्या बाहेरील दगडी भिंतीवरूनहि इतकीं चित्रें कोरलेलीं आहेत की लांबून सर्व देऊळ तळापासून शिखरापर्यंत नक्षीकामानें मढविल्यासारखें वाटतें. जवळून नीट पाहिलें म्हणजे तीं चित्रें किती प्रमाणबद्ध आहेत तें दिसतें. उदाहरणार्थ घोडेस्वाराचें चित्र असलें तर घोड्याच्या तोंडांत दिलेल्या ओठाळीची कडीसुद्धा स्पष्टपण निराळी कोरलेली आहे. या चित्रांत राउतांच्या भालाफेकी, हत्तींच्या साठमारी, रथांच्या शर्यती वज्रमुष्टीच्या लढाया, कुस्त्या, मुद्गल फिरविणारे पहिलवान इत्यादि नानाविध तत्कालीन स्थितिदर्शक चित्रें आहेत. मात्र पुष्कळशा सुंदर मूर्तींची नाकें फोडलेलीं आहेत. हा प्रकार येथेच नव्हे तर हंपी, बदामी वगैरे सर्वत्र ठिकाणीं दिसला. आणि हा सर्व धर्मवेड्या मुसलमानांचा प्रताप!

### शिवसमुद्रम्

सोमनाथपुराहून तसेंच मोटारनें कावेरी फॉल्स ऊर्फ शिवसमुद्रमला गेलों. कावेरीचा धबधबा पाहण्यासारखा आहे. येथे दोन खोऱ्यांत दोन निरनिराळ्या कावेरीच्या धारा पडतात. मध्यंतरीं पसरलेल्या मोठ्या थोरल्या डोंगराच्या टोंगांमुळे हे दोन प्रवाह झालेले आहेत. या धबधब्याचीहि शोभा फार उत्तम दिसते. शिवाय धबधब्याच्या धाराजवळ जाण्याची सोय असल्यामुळे कांही निराळीच शोभा दिसते. येथून जवळच म्हैसूरसरकारनें बोरघाटांतल्याप्रमाणें मोठमोठ्या नळांतून पाणी उतरून त्याच्या साहाय्यानें वीज उत्पन्न करण्याचा प्रचंड कारखाना केला आहे. त्या निमित्तानें येथे एक नवीनच गांव निर्माण झालेला आहे. गांव अर्थातच नवीन तऱ्हेचा फार आंखीव, व्यवस्थेशीर व सुंदर आहे. त्यांतून कावेरीच्या निळसर अस्मानी पाण्याचे तुडुंब भरून चाललेले मोठमोठे कालवे व त्यांवर वेलांट्यासारख्या उभारलेल्या छोट्या छोट्या सुंदर पुलांचा देखावा फार मजेदार दिसतो.

खुद्द पॉवरहाउसला जाण्याकरितां तीनशेंफूट खालीं उतरावें लागतें. त्याकरितां यंत्रसाहाय्यानें सरळ तीनशें फूट उंचीचा ट्रॉलीचा रेल्वे रस्ता केलेला आहे. त्या ट्रॉलींत बसून खालीं जातांना व वर येतांना डोळे फिरून जातात. तळाशीं जाताच समोर उंच उंच डोंगरांचा खोऱ्यांचा निमुळता कालवाच बनलेला दिसतो. डाव्या हातास

ते आवाढव्य पॉवरहाउस आहे आणि त्यांत गरगरणाऱ्या अजस्र यंत्रांचा इतका भयंकर धडधडाट चालू असतो की, कानठळ्या बसून जातात. तेथे एकमेकांशीं बोलणें म्हणजे बोगद्यांत आगगाडी धुमत असतांना बोलण्याइतकेंच कठिण आहे. वास्तविक ज्या चक्रावर विजेचे नळ सोडून दिले आहेत ते वरून कांहींच पाहतां येत नाहीत. वर आपणांस दिसतें तें म्हणजे सबंध लोखंडी आवरणें चढविलेलीं आणि धगीनें तापून गेलेलीं यंत्रांचीं धुडें! हीं पॉवरहाऊसची लांबच लांब प्रचंड इमारत व त्यांतलीं हीं अजस्र बारा धुडें पाहिलीं म्हणजे यांत्रिक युगांतला हा निराळ्या तऱ्हेचा हत्तीमहालच भासतो. आणि हल्लीच्या यांत्रिक युगांत असल्याच गजदळाचा उपयोग केला पाहिजे हे मात्र उघड आहे. म्हैसुरास जी पाण्यासारखी वीज खेळविली आहे त्याचें उगमस्थान हें असें आहे.

# अमेरिकेचा कौटुंबिक विध्वंस

संपत्तीच्या उत्पादनाचे कामीं यंत्राचा उपयोग होऊं लागल्यापासून गेल्या सवाशें वर्षांत जेथे जेथे यंत्राचा प्रवेश होत आहे तेथे तेथे त्यापूर्वी हजारों वर्षे मानव समाजांत दृढमूल होऊन आवश्यक व पवित्र मानल्या गेलेल्या भावना, समजुती, व संस्था पाण्याची वाफ होऊन तें नाहींसें व्हावें त्याप्रमाणें इतिहासांतून अजिबात नाहींशाच होऊं लागल्या आहेत. जेथे यंत्र जातें तेथे जुन्याचा हा विनाश इष्ट कीं अनिष्ट याचा विचार होण्याइतकीहि फुरसत राहात नाहीं. गांवाच्या वरील बाजूस अकस्मात् धरण फुटून गांवावर पाण्याचा लोंढा आला म्हणजे गांवकऱ्यांना पळून जाण्यासहि सवड मिळत नाहीं, अथवा चरकांत सापडलेल्या उसाच्या कांड्यांना चेंगरून जाणें एवढीच गति उरलेली असते, तद्वत् यंत्राच्या जबड्यांत सांपडलेल्या समाजाची हताश स्थिति होत आहे. यंत्राच्या तडाख्यांत सांपडलेल्या राष्ट्रांच्या परिस्थितीचा विचार करून जीं राष्ट्रें अद्याप यंत्रमय झालीं नाहींत त्यांनी मात्र यापुढें सावधगिरीनें पाऊल टाकावें हें बरें. पुढच्याला दिसलें नाही म्हणून तो ठेचकाळला. पण पुढच्याला ठेच लागलेली मागच्यानें पाहिली तर त्यानें तरी वळण घेऊन धोंडा चुकवावा.

### कुटुंब संस्थेचें श्रेष्ठत्व

आपसांतील संघटनेच्या जोरावर सृष्टीवर प्रभुत्व मिळवून माणसानें आपल्या भौतिक व आत्मिक उन्नतीकरितां सृष्टींतून साधनें उत्पन्न केलीं हें माणसाचें इतर प्राणिसृष्टीहून वैशिष्ट्यच होय! यासाठीं ज्या अनेक संस्था मनुष्यानें निर्मिल्या, त्यांत राज्यसंस्था व विवाहसंस्था या प्रमुख होत. या दोहोंतहि राज्यसंस्थेपेक्षां विवाहसंस्था हीच श्रेष्ठतर होय. धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे जे चतुर्विध पुरुषार्थ त्यांची सिद्धि करणें हें या दोन संस्थांचें एकमेव ध्येय आहे. पण तें यंत्रकालापूर्वी राज्यसंस्थेपेक्षांहि विवाहसंस्थेनें म्हणजे कुटुंबसंस्थेनेंच अधिक यशस्वितेनें साधलें होतें. लहान अथवा मोठीं राज्यें यांचे उत्पत्ति, स्थिति, विनाश एकसारखे चालू असतां जगांतील सर्व देशांत ही कुटुंबसंस्था मूळ धरून हजारों वर्षे टिकून आहे. इतकेंच नव्हे तर विनष्ट झालेल्या राज्यसंस्थांना पुनःपुनः सजीवन देऊन जिवंत करण्याचें व तद्द्वारा सामाजिक जीवनाचा सांभाळ करण्याचें श्रेयहि या कुटुंबसंस्थेनें यंत्रकाळापूर्वी हजारों वर्षे मिळविलें आहे. जगांत असमर्थपणें जन्मास येणाऱ्या बालकापासून चतुर्विध पुरुषार्थांची सिद्धि करून देहत्यागास सिद्ध झालेल्या कालपक्व वृद्धापर्यंत सर्व व्यक्तिमात्रास जगतीतलावर या कुटुंबसंस्थेचा आधार मिळालेला आहे. पण वाघानें गाईवर झडप घालावी त्याप्रमाणें यंत्रानें ज्या समाजावर झडप घातली त्या त्या समाजांतील जुन्या भावना, जुन्या समजुती व जुन्या संस्था नष्ट होत असून त्याबरोबर या यंत्रसत्तेंत हजारों वर्षांची प्राचीन, अखिल मानव जातीस मातृस्थानीं झालेली जगद्वंद्य कुटुंबसंस्थाहि बेचिराख होऊं लागली आहे.

यंत्रप्रधान म्हणजे भांडवलवाल्या देशाचा अग्रणी देश आज अमेरिका (अमेरिकन संयुक्त संस्थानें) होय. १८६७ सालीं अमेरिकेतील दक्षिणेकडील संस्थानें व उत्तरेकडील संस्थानें यांजमध्ये युद्ध झालें. युद्धांत उत्तरेकडील संस्थानांचा विजय झाला. पुढे उभयपक्षांत दिलजमाई होऊन तेथपासून तहत आजतागायत अमेरिकेंत फारच झपाट्यानें आर्थिक भरभराट झाली आहे. अर्थात् यांत्रिक प्रगतीचे सामाजिक परिणामहि याच काळांतील आहेत. म्हणून १८६७ ते आजतागायत हा ६०।७० वर्षांचा काल विचाराकरितां घेण्याचा प्रघात आहे. १८६७ सालीं अमेरिकेंत (संयुक्त संस्थानांत) १० हजार घटस्फोट झाले तर १९२९ सालीं तेथे २ लक्ष विवाह घटस्फोटाने मोडले! घटस्फोटांत ही जी साठ वर्षांत

वीसपट वाढ झाली तिला लोकसंख्येची व विवाहाची वाढहि कारण झाली हें खरें आहे. या काळांत लोकसंख्या दर शेंभरीं तीनशेंनी वाढली आणि विवाहसंख्या दर शेंभरीं चारशेंनी वाढली. पण त्याबरोबरच घटस्फोटांची संख्या दर शेंभरी २हजारांनी वाढली हें लक्षांत घेतलें म्हणजे ६३ वर्षांत विवाहसंख्येची ज्या प्रमाणांत वाढ झाली त्या प्रमाणाच्या ५ पट प्रमाणानें घटस्फोटांची वाढ झाली असें दिसून येतें म्हणून तिकडील समाजधुरीणांना हा काळजी करण्यासारखा प्रश्न झाला आहे.

**गृहपरित्यागाचें संकट**

घटस्फोटाप्रमाणें 'परित्यागा' (Desertion) नेहि कुटुंबसंस्थेचा विध्वंस होत आहे. १९१८ सालीं राष्ट्रीय परित्याग चौकशी मंडळानें (National desertion bureau) या विषयीं कांहीं संस्थांकडे प्रश्नावली धाडली होती. तींत 'तुमच्या क्षेत्रांत कौटुंबिक परित्याग हा चिंताजनक प्रश्न आहे काय?' असा एक प्रश्न होता. सदर प्रश्नास १८४ पैकीं १३५ संस्थांनीं होकारार्थी उत्तर दिलें. सदर चौकशीमंडळानें आपल्या कामाचा जो अहवाल प्रसिद्ध केला आहे त्यांत म्हटलें आहे कीं, "संयुक्त संस्थानांतील शहरांतील लोकसंख्या १९२० सालीं ५ कोटि होती. यांत दर एक लक्ष लोकसंख्येंत शंभरांनीं गृहत्याग केला असणें संभवनीय आहे. म्हणजे एकंदर शहरांतून मिळून ५० हजार गृहत्याग झाले असा अर्थ आहे." (केहेन यांनीं घेतलेला उतारा).

घटस्फोटांचीं कारणें निरनिराळ्या संस्थानांत निरनिराळीं मान्य केलीं जातात. पण सामान्यतः व्यभिचार, क्रौर्य, परित्याग, दारूबाजी अथवा पोटास देत नाहीं इत्यादि कारणें असतात. निरनिराळ्या काळीं यांचीं प्रमाणें निरनिराळीं झालीं आहेत. उदाहरणार्थ १८६७ सालीं दर शेंभरीं ३३ घटस्फोट व्यभिचारामुळें व १३ क्रौर्यामुळें झाले. पण १९२८ सालीं हे आंकडे अनुक्रमें ९ व ४७ असे आहेत. यावरून व्यभिचार कमी होत असून क्रौर्य वाढत आहे काय, असा प्रश्न येतो. पण तो निवळ आभास असून आकड्यांच्या फसगमतीचा हा एक उत्तम नमुना आहे. कायदे, शिक्षण वगैरेमुळें वास्तविक क्रौर्य कमी होत आहे पण याबाबतींत कोर्टें त्याहूनहि अधिक नाजूक मनाचीं बनत आहेत. यामुळें १८६७ सालीं नवऱ्यानें बायकोस क्रूरपणें वागविलेलें मुद्दा चाले तेथे आता थोडा अधिकउणा शब्दहि कोर्टास कठिण वाटतो. उलट औद्योगिक राहणीच्या वाढीबरोबर परस्त्री व परपुरुष यांचे संबंध अधिकाधिक येत असून व्यभिचाराचा संभव वाढतच आहे; पण शिक्षणानें राहणी अधिक उच्च व स्वाभिमानी झाल्यामुळें कोर्टांत येऊन एकानें दुसऱ्यावर व्यभिचाराचा आरोप करून घटस्फोट मागणें किळसवाणें वाटूं लागलें असून क्रौर्यासारखी दुसरी एखादी सबब सांगण्याची रूढि पडत आहे.

**न्यायकचेरींतला फार्स**

बहुधा वादीनें घटस्फोटास कोणतीं कारणें दाखवावीं हे उभयतांच्या संमतीनेंच अलीकडे ठरत असून प्रतिवादी हरकत न घेता होकार भरतो व न्यायाधीशहि चौकशीचा झटपट फार्स करून दंपत्यास काडी मोडून देतात. पुष्कळसे खटले स्त्रियाच आणतात. कोर्टांत कित्येकवेळीं प्रतिवादी हजरहि नसतो. क्रौर्य, गृहत्याग, दारूबाजी अशीं कांहीतरी कारणें फिर्यादींत असतात. वादीतर्फे साक्षीदारांच्या साक्षी होतात. सर्व प्रश्न आणि उत्तरें ठराविक सांच्याचीं असतात. दर पांच मिनिटांस एक या वेगानें या 'जन्माच्या गांठी' न्यायाधीश तोडीत असतो असा एकानें हिशेब दिला आहे. खाटकाच्या सुरीपेक्षांहि या न्यायाधीशांची लेखणी अधिक तीक्ष्ण असली पाहिजे यांत शंका नाहीं! पण बिचाऱ्या न्यायाधीशांचा यांत काय दोष? न्यायाधीश व कायदा या दोघांनीं घटस्फोटास एकसारखा विरोधच चाल ठेविला आहे. घटस्फोट कसा व्हावे याकरितां निरनिराळ्या संस्थानांनीं निरनिराळे अडथळे कायद्यांनें आणले आहेत. पण पतिपत्नीचा घटस्फोटाविषयीं हट्ट कायद्यापेक्षांहि वेगानें धावतो तेथे कोणाचाच इलाज चालत नाहीं. एका संस्थानांत कायद्याची अडचण वाटली तर पति अथवा पत्नी कायदा सोईस्कर असेल असें संस्थान गांठतात व तेथील कोर्टांत घटस्फोटाचा दावा लावतात; खरें कारण कांहीहि असो, कोर्टानें घटस्फोटास मान्य केलेलें एखादें कारण कोर्टास सांगतात व मंजुरी मिळवितात. दिवसानुदिवस लोकमताच्या दृष्टीनेंहि घटस्फोटास कोणी फारसें कसी लेखीनासें झालें असल्यानें कायदे व न्यायाधीश यांना हात टेकावे लागत आहेत. कारण कायदा झाला तरी लोकमताचा त्याला आधार नसेल तर तो दुर्बलच होय. घटस्फोटाकडे ही जी समाजाची वाढती प्रवृत्ति आहे तिचीं कारणें खालीलप्रमाणें असावींत असें तज्ज्ञांचें मत आहे.

**घटस्फोटांचीं कारणें**

'आर्थिक' संस्था या नात्यानें कुटुंबसंस्था मागे पडत आहे. कारण, खानावळी, फराळाचीं दुकानें, परटांचीं दुकानें, भाकरीच्या भट्ट्या वगैरे सोई

वाढल्याने घरच्याहून अधिक सोईने व कमी खर्चात राहतां येऊं लागलें आहे. दिवसानुदिवस विवाहित स्त्रियांनाहि घरकामांत खटण्यापेक्षां कारखान्यांत काम करून पैसा मिळवावा आणि हॉटेलांत जेऊन चैनीनें राहावें हें इष्ट वाटत आहे. मोठमोठ्या इमारती अशा बांधल्या जात आहेत कीं, बैठकीदाखल प्रत्येक कुटुंबास एक दोन खोल्या, अशा शें-दोनशें खोल्यांची चाळ अशा शें दोनशें कुटुंबांस पुरेल असें एकच मोठें स्वयंपाकघर, त्यांत या सर्वांची खाणावळ, आणि भोंवताली हवा खाण्यासाठी व खेळण्यासाठी मोकळी जागा, व्यायामशाळा, लायब्ररी वगैरे. अशा वस्तीमुळे 'घरोघर मातीच्या चुली' आता अमेरिकेंत पाहावयास मिळत नाहीत.

बरें मुलें कशी राहतात ? आधी मुलें दिवसानुदिवस कमी कमीच होतात. कारण मुलांमुळे होणारा शारीरिक त्रास व आर्थिक दारिद्र्य नको म्हणून प्रतिबंधाचे उपाय अमलांत येत आहेत. जीं मुलें होतात त्यांचें शिक्षण शास्त्रशुद्ध व्हावयाला पाहिजे म्हणून त्यांना अगदी लहानपणापासून बोर्डिंगांत ठेवण्यांत येतें. करमणुकीसाठी नाटक, सिनेमा, बागा, क्रीडांगणें हीं वृद्ध तरुण पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि इष्ट वाटूं लागलीं आहेत. यंत्रयुगापूर्वी कुटुंब हें संरक्षणाचा किल्ला होतें. पण आता स्त्री स्वावलंबी, धीट, समाजांत मिसळणारी झाली असून राज्यसंस्थाहि प्रबळ झाली असल्यामुळे स्त्रियांना आपल्या रक्षणासाठी पुरुषाची गरज वाटत नाही. अनेक स्त्रीपुरुषांशीं व्यवहारांत मनमोकळा संबंध येत असल्यामुळे आवड अथवा प्रीति जन्मभर एकावरच खिळून राहात नाहींशी झाली आहे. एकाच पुरुषाशीं सतत सहा महिने नांदलें तर त्याचा साहजिक कंटाळा येऊं लागतो असें एका विदुषीनें लिहिलें आहे. या सर्व कारणांमुळे घटस्फोटाची प्रवृत्ति वाढत आहे. घटस्फोटाच्या कारणांची चिकित्सा करून प्रो. ऑग्बर्न सांगतात, " उपलब्ध माहितीवरून दिसतें कीं, कौटुंबिक कार्ये कमी कमीच होत आहेत. आणि पुष्कळ कुटुंबांत प्रीति नांदावी तशी अलीकडे नांदत नाहीं; यामुळे जिकडे तिकडे कुटुंबें मोडण्याचा सुळसुळाट झाला आहे. साहजिकच वरील सर्व कारणें खेड्यांपेक्षां शहरांत अधिक आढळून येत असल्यामुळे शहरांत घटस्फोटांचें प्रमाण अधिक आढळतें.'

## कुटुंब संस्थेचें काय होणार ?

मुलें थोडीं असतां, अथवा मुळीच होण्यापूर्वी घटस्फोट फार होतात. १९२८ सालीं झालेल्या घटस्फोटांत मुलें नसलेलीं दंपत्यें शेकडा ६३, एक मूल असलेलीं शे. २०.५ दोन मुलें असलेलीं शें. ९.५, तीन मुलांचीं शे. ३.९, चार मुलें असलेलीं शें. १.७ व पांच मुलें असलेलीं शें. १.४ होतीं. यावरून मुलें होत नाहीत म्हणून घटस्फोट होतात, असा मात्र अर्थ नव्हे. पण मुलें जशजशीं होतील तशतशी आर्थिक परिस्थिति बिकट होत जाते आणि मुलें बोर्डिंगांत पाठविणें परवडत नाही. घराबाहेर राहण्यास वेळ कमी कमी राहतो व सर्वांपेक्षां अधिक महत्त्वाचें कारण म्हणजे वैवाहिक आकर्षणाचें वय व सौंदर्यादि साधनें दिवसानुदिवस कमी होऊं लागतात. व मग सहजच आहे तेंच लग्न संभाळून काळ कंठणें सोयिस्कर वाटूं लागतें. पण मुलें होऊं न देण्याची प्रवृत्ति बळावत चालल्यामुळे घटस्फोटाची प्रवृत्ति बळावत चालली असून आज अमेरिकेंत शंभर लग्नांत १८ लग्नें घटस्फोटानें मोडतात. तेथे आणखी सत्तर वर्षांनी म्हणजे इ. स. २००० या वर्षी शेकडा ५८.८ लग्नें घटस्फोटांत बुडवावीं लागतील असें डॉ. विलकॉक्स यांचें मत आहे. लोकसंख्येची वाढ खुंटूं लागली व घटस्फोट मात्र वाढत आहेत. अशा स्थितींत कुटुंबसंस्था जागेला तरी राहते कीं नाहीं याची तिकडील समाजधुरिणांनाहि काळजी वाटत आहे. पण आर्थिक भरभराटीचा मोह सुटत नाही आणि आर्थिक उन्नति व कुटुंबस्थैर्य यांचा मेळ कसा घालावा हें तज्ज्ञांसहि सुचत नाही. तेव्हा " औद्योगिक उत्कर्षाबरोबर घटस्फोट वाढत असून कुटुंबसंस्थेची धुळधाण होत असली तरी औद्योगिक उत्कर्षानें मानवजातीचें कल्याण होत असल्यानें, आर्थिक उत्कर्षाची कुटुंबविध्वंसरूपी किंमत आपण दिलीच पाहिजे " असें प्रो. लिचनबर्गर यांनी निर्भीडपणें सांगितलें आहे.

चतुर्विध पुरुषार्थांचा साधक व सामाजिक जीवनाचा आधार असा जो पवित्र गृहस्थाश्रम त्याची किंमत यापुढे अशी रुपये-आणे-पैंत होणार काय ? अमेरिकेच्या या भयंकर दृश्यावरून पौर्वात्य राष्ट्रांनी बराच बोध घेण्यासारखा असून प्राचीन संस्कृति व आर्थिक उत्कर्ष यांचा मेळ तीं कसा घालतात यांतच विसावें शतक त्यांची कसोटी पाहणार आहे.

# जर्मन लोकांची साधी राहणी

( लेखक—**विष्णु पांडुरंग नेने बडोदें.** )

गेल्या महायुद्धाच्या अनेक दुष्परिणामाबरोबर दारिद्र्य आलें. आज हें दारिद्र्य जर्मनींत जेवढ्या प्रमाणांत वावरत आहे तेवढ्या प्रमाणांतच तें इतरत्र क्वचितच वावरत असेल. या दारिद्र्याच्या मागोमाग बेकारी आली व तिने आज जर्मनींत लक्षावधि लोकांची अन्नान्न दशा केली आहे. लोकांच्या जवळ पैसा नसल्याने युद्धपूर्व सुखविलासास व शांतीस ते पारखे झाले असून आपल्या पूर्वीच्या चैनीच्या राहाणीच्या ऐवजीं त्यांनी साध्या निर्व्याज राहणीचा स्वीकार केला आहे. चवदाव्या लुई-पासून सोळाव्या लुईपर्यंतचा फ्रान्स देशाचा सामाजिक इतिहास पाहिल्यास फ्रेंच लोकांची राहणी तेव्हां अतिशय चैनीची होती; ऐषआराम, कपडेलत्ते, रंगसफेती इत्यादिकांत त्यांचा अलोट पैसा जात होता; पण सोळाव्या लुईचा वध होऊन तेथे राज्यक्रांति झाल्यानंतर लोकांच्या आचारविचारांत, कपड्यालत्त्यांत व एकंदर राहणींत फरक होऊन त्यांच्यांत साधेपणाची आवड उत्पन्न झाली असें दिसतें. जर्मन लोकांच्या बाबतींत या इतिहासाची पुनरावृत्ति झाली असून इतर अनेक गोष्टींप्रमाणे याहि बाबतींत जर्मनी आज इतर युरोपियन राष्ट्रांच्या आघाडीस आहे असें कोणाहि प्रवाशास दिसून येतें.

सन १९३२ सालच्या जून महिन्यांतील गोष्ट मी तेव्हा बर्लिन येथे होतों. रविवारचा दिवस असल्याने त्या दिवशीं सर्व सार्वजनिक आणि सरकारी संस्था बंद होत्या; व आबालवृद्ध स्त्रीपुरुष मनोविनोदनार्थ इतस्ततः भटकत होते. मी पण माझ्या दुभाष्याबरोबर या मंडळींत सामील होऊन त्या दिवशीं पुष्कळ भटकलों. परंतु पुढे फिरण्याचा कंटाळा आल्याने उंटरडन लिडन नांवाच्या राज रस्त्यावरील एका सुविख्यात कॅफेंचा ( कॉफीगृह ) मीं आश्रय केला.

कॅफेंत त्या वेळीं पुष्कळ गर्दी असून लोकांची ये—जा सारखी चालू होती. आम्ही एका कोपऱ्यांतील जागा पाहून तेथे बसलों व पिण्यासाठी कॉफी मागविली. कॉफी घेत आम्ही तेथे पुष्कळ वेळ काढला, व येणाराजाणारावर आणि तेथे बसलेल्या मंडळींवर पुष्कळ टीका केली. आमचें बोलणें तेथे जमलेल्यांपैकीं पुष्कळांना समजत नव्हतें व "बिट, डांकेशुन, त्राय ते" इत्यादि परिचित जर्मन शब्दांखेरीज ती मंडळी काय बोलत होती हें मला पण कळत नव्हतें.

**पायमोजावाचून बूट**

इतक्यांत कांही तरुणमंडळी तेथे आली. त्यांच्या साध्या पोषाकामुळे त्यांचेकडे माझे लक्ष गेलें. त्यांतील पुरुषमंडळींनी अंगांत अर्ध्या बाह्यांचे शर्टस् व साध्या पाटलोणीच घातल्या होत्या. स्त्रियांच्या अंगात फक्त एक बिन बाह्यांचा झगाच होता. त्या दोघांनी पायांत पायमोजे न घालताच बूट घातले होते. त्यांचा हा साधा पोषाक पाहून मला जरा नवल वाटलें. पण सभोंवार न्याहाळून पाहिलें तों तेथे त्यांच्या सारखाच पोषाक केलेली मला किती तरी मंडळी दिसली. युरोपियन मनुष्य म्हटला म्हणजे त्याच्या अंगावर अंडरवेअर, शर्ट, कॉलर, टाय, व्हेस्ट, कोट, विजार, पायमोजे व बूट इतका सरंजाम असावयाचा अशी तोंपर्यंत माझी समजूत होती. आणि त्यामुळे "या मंडळींनी असा पोषाक केल्याने जर्मन शिष्टाचाराचा भंग होत नाही काय?" असें मीं माझ्या दुभाष्यास विचारलें.

"महायुद्धानंतर आमच्या लोकांनी आपल्या पोषाखांत फरक केला असल्याने अशा पोशाखाने शिष्टाचाराचा भंग होतो असें आम्ही मानीत नाही" तो उत्तरला. "जर्मनींत सध्या साधेपणाची लाट उसळली असून आवश्यक तेवढीच गोष्ट करावयाची असा आता लोकांनी निर्धार केला आहे. सध्या उन्हाळा चालू असल्याने कॉलर—टायची व जाकिटाकोटाची आम्हांस मुळींच जरूरी भासत नाही. या दिवसांत हा सर्व सरंजाम घातल्यास मनुष्य उबून निघतो व सर्व कपडे त्याला खोगिराप्रमाणें वाटतात. आणि ते केव्हां काढू असें त्यास होऊन जातें. हिंदुस्थानांतील स्थिति मला विशेष माहीत नाही, पण इंग्लंडांत सर्व लोक रूढीचे गुलाम असल्याने ते गैरसोय सोसून उन्हाळ्यांत देखील सर्व सरंजाम अंगावर चढवतात. आमच्या मतें हा शुद्ध वेडेपणा होय. शरीर झांकण्यासाठी आपण अंगांत घालण्यासाठी कपडे करतों व ते करतांना सौंदर्यवर्धनाप्रमाणेच आपल्या शरीराच्या सुखसोयीकडे पण आपण लक्ष दिलें पाहिजे असें आमचें मत आहे." तो म्हणाला. "सर्वच जर्मन लोकांचें असें मत आहे काय!" मीं प्रश्न केला.

" होय, माझ्या समजुतीप्रमाणें सर्व जर्मन लोक या नव्या संप्रदायाचे अभिमानी आहेत. कांहीं लोकांना कदाचित् हा फरक मनापासून आवडत नसेल, पण परिस्थितीपुढे त्यांना मान वांकविणे भाग आहे. आपल्या देशाचें दारिद्र्य गणितश्रेढीनें वाढत असतां कोणता जर्मन मनुष्य स्वतः चा पैसा अनावश्यक कपड्यालत्त्यांत उधळील ? " तो उत्तरला.

## म. गांधींचें नांव

" तुमचें म्हणणे अगदीं खरें आहे. हिंदुस्थानांतील हवा उष्ण असल्यानें आम्ही तेथें फारच थोडे कपडे घालतों व उन्हाळ्यांत क्रेपर शान सारख्या पातळ मलमलीच्या सदऱ्या-धोतराशिवाय आम्ही कांहींच घालीत नाहीं. आमचेकडे इंग्लिश लोकांचें सर्व बाबतींत अनुकरण करणारी कांहीं मंडळी सुशिक्षित समाजांत आहेत, ती सोडली तर खेड्यापाड्यांतील लोकांचे अगदी तुमच्या सारखेच विचार आहेत. तुम्ही महात्मा गांधींचें नांव ऐकलें असेल. त्यांचे अनुयायी फक्त धोतर—सदरा—टोपीच—वापरतात आणि गांधीजी स्वतः तर एका वस्त्राशिवाय कांहींच वापरीत नाहींत. " मी म्हणालों.

" होय, मीं असें ऐकलें आहे खरं. आणि म्हणूनच इंग्लिश लोक त्यांना नग्न फकीर म्हणतात" तो उद्गारला.

" गेल्या वर्षी गांधीजी गोलमेज परिषदेसाठी इकडे आले होते. त्यांना तुम्ही पाहिलं असतं तर तुम्हांस अचंबा वाटला असता नाहीं!" मीं विचारलें.

"महात्मा गांधींस पाहण्याची आमची पुष्कळ इच्छा होती. पण वेळेच्या अभावीं त्यांना आमच्या देशास भेट देतां आली नाहीं. ते आले असते तर आम्हांला एका सत्पुरुषाचें दर्शन झाले असते. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणे अचंबा मात्र वाटला नसता. "

" कां बरें! त्यांचा साधा पण विचित्र दिसणारा पोषाक पाहून फ्रेंच लोक आश्चर्यमूढ झाल्याचें तुम्हांस माहीत नाहीं काय! "

माझा प्रश्न ऐकून तो खदखदा हंसला व म्हणाला, " महाशय, बोलतो याचा राग नसावा. नग्न माणसांचें प्रदर्शन करणाऱ्या या लोकांना गांधीसारख्या अर्धनग्न पण लोकोत्तर पुरुषाबद्दल एवढें कां आश्चर्य वाटावें हेंच मला समजत नाही. फ्रेंच लोकांना कांहींहि वाटो, आम्हांस तरी त्यांत कांहींच वावगं वाटत नाहीं. आमच्याकडे Nakt kultur नांवाचा एक नग्न संप्रदाय अलीकडे निघाला आहे. या संप्रदायाच्या माणसांनी तर गांधींवर ताण केली आहे ! "

## नग्न संप्रदाय

त्याचें हें उत्तर ऐकून मी तर क्षणभर स्तंभितच झालों. पण पुढे कांहीं वेळानें या नवीन संप्रदाया-विषयीं मीं पुष्कळ प्रश्न विचारले. या संप्रदाया-च्या मंडळींनीं बर्लिनजवळ आपली एक वसाहत स्थापिली असून तींत फक्त सांप्रदायिकांनाच जाण्यास परवानगी आहे. निसर्गास अनुसरा ( Return to Nature ) हें त्यांचे ब्रीदवाक्य असून हिंदुस्थानांतील नग्न गोसाव्याप्रमाणे या संप्रदायाची मंडळी या वसाहतींत वावरतात! वगैरे हकीकत त्यानें मला सांगितली. आपल्या संप्रदायाचा विस्तार करण्या-च्या हेतूनें या लोकांनीं आपल्या जीवनक्रमाचा एक चित्रपट तयार केला असून तो सर्वत्र दाखविला जाण्याची त्यांनी व्यवस्थाहि केली आहे.

बोलण्याच्या भरांत वेळ कसा गेला हे आम्हांस समजले नाही. घड्याळ पाहतो तो एक वाजून गेलेला व जेवणाची वेळ होऊन गेलेली सबब आम्ही तेथून उठलो व फ्रेडरिक स्ट्रास या रस्त्या-वरील एका शाकाहारी भोजनालयांत गेलों. हे भोजनालय विशेष लोकप्रिय दिसलें. कॉलेजांत शिकणारी पुष्कळ तरुण मंडळी तेथें मला भेटली.

भोजनोत्तर मी लनापार्क पाहावयास गेलों.हा पार्क बडोद्यांतील कमिटीबागेसारखा मोठा असून तेथें हर-तऱ्हेचे खेळ खेळण्यास मिळतात. रात्रीं तेथें मोठी रोषणाई केली जाते. पार्कच्या एका बाजूस मोठी इमारत असून तींत एक स्वीमिंग पूल ( पोहण्याची जागा ) आहे. यंत्राच्या साहाय्यानें या जलाशयांत कृत्रिम लाटा उत्पन्न करण्यांत येतात व प्रत्यहीं तेथें हजारों स्त्रीपुरुष जलविहारार्थ येतात. मी तेथें गेलो त्यावेळीं तेथें पन्नास साठ मंडळी पोहत होती. बेदिंग कॉस्च्यूम ( पोहतांना घालावयाचे कपडे ) अगदी अल्प दिसले. लंडनमधील हाइडपार्कच्या सरपन्टाइनमध्यें याच्या अगदी उलट प्रकार मला दिसला.

## घरांचें बांधकाम

लनापार्क पाहून झाल्यावर मध्यम स्थितींतल्या लोकांसाठी बांधलेल्या चाळी पाहण्यासाठी आम्ही गेलो. त्या चाळी अगदी साध्या पद्धतीनें बांधण्यांत आल्या असून आंतील सामानसुमान, फर्निचर वगैरे साध्या राहणीस शोभेल अशा रीतीनेंच तयार करण्यांत आलें आहे. नवीन कारागिरीचा नमुना ( Modern stile of architecture ) म्हणून हीं घरं बहुधा सर्व प्रवाश्यांना दाखविण्यांत येतात. या घरांचा विशेष असा कीं, जुन्या घरांप्रमाणें त्यांच्या दरवाजावर दगडी चित्रें,अर्धपुतळे फुलाफळां-च्या माळा वगैरे कांहींहि नसतें.अमेरिकन लोकांच्या घराप्रमाणें तीं अगदी साधीं असतात. " साध्या इमारतीची आवड सध्या इतकी जोरावली आहे

की, कांहीं लोकांनी आपल्या जुन्या घरांच्या सिंहद्वारावरील सर्व भूषणें काढून टाकून तीं अगदीं साधीं बनविलीं आहेत. सध्या हा प्रकार चालू आहे. आणखी ५० वर्षांनीं काय होईल हे कोणीं सांगावें ?" दुभाषा म्हणाला. तेथून परत येत असतांना आम्हांस एक टॉवर लागलें. ते पाहून दुभाषा म्हणाला, या घड्याळाची डायल तुम्हीं पाहिलीत कीं ? रोमन आंकड्याऐवजीं याच्या डायलवर नुसत्या रेघाच आहेत. अवर व मिनिट कांट्यांच्या स्थितीवरून आपण किती वाजले हें सहज सांगूं शकतों. त्याच्यासाठी आंकड्यांची आपणास मुळींच जरूरी भासत नाहीं. सबब हल्लीच्या काळांत येथे नवीन तऱ्हेच्या तबकड्या घड्याळावर बसविण्यांत आल्या आहेत. एक दोन इत्यादि आंकड्यांच्या ठिकाणीं या तबकडीवर रेघा आहेत, पण कांहीं ठिकाणीं तबकडीवर मिनिटसूचक असे साठ थेंबच तुम्हांस आढळतील."

ही साधेपणाची लाट हळहळू इतर देशांतहि पसरत असून इंग्लंडचा किनाराहि ती लवकर गांठील अशीं स्पष्ट चिन्हें आज दिसत आहेत.

# असेंब्लींतील मंदिर-प्रवेशाचें बिल

अस्पृश्यांच्या मंदिर प्रवेशाचें डॉ. सुब्बरायन यांचें बिल अखिल भारतीय स्वरूपाचें असल्यामुळे प्रांतिक कायदेमंडळापुढे मांडण्यास व्हाइसरॉयांनीं परवानगी दिली नाहीं. आता श्री. रंगा अय्यर यांना तत्त्वतः तशाच आशयाचें बिल असेंब्लीपुढे मांडण्यास व्हाइसरॉय यांनी मंजुरी दिली आहे. या बिलाचा गोषवारा पुढे दिल्याप्रमाणें आहे.

ज्या अर्थीं हिंदुसमाजाला असें अधिक अधिक वाटूं लागलें आहे कीं कांहीं वर्गांवर देवालय प्रवेशाचे बाबतींत रूढि व वहिवाट यांनी घातलेले निर्बंध दूर व्हावेत,

आणि ज्याअर्थीं ती रूढी व वहिवाट यांच्या विरुद्ध नवीन प्रघात पाडण्याची सत्ता आपल्याला आहे किंवा नाहीं याबद्दल देवालयाचे 'निधिप' अथवा चालक हेच साशंक आहेत,

आणि ज्या अर्थीं स्थानिक हिंदूंचें मत मंदिरप्रवेशाला अनुकूल असल्यास त्याप्रमाणें वागण्यास मंदिराच्या चालकाला कायद्यानें मनाई करणें योग्य होणार नाहीं,

त्याअर्थीं 'हिंदु मंदिरप्रवेशनिर्बंध-निवारक' असा कायदा करण्यांत यावा. यांतील 'मंदिर' या शब्दाचा अर्थ असा समजावा कीं, बहिष्कृत अस्पृश्य समाजाव्यतिरिक्त सर्व हिंदुसमाजाला ज्या जागेंत सार्वजनिक पूजाविधि करण्याचा हक्क चालत आलेला आहे तें.

तसेंच, 'स्थानिक लोकमत' दर्शविणारे 'मतदार' कोण असतील याचा खुलासा पुढीलप्रमाणें—म्युनिसिपालिटी किंवा जिल्हाबोर्ड अथवा तालुकाबोर्ड अगर लोकलबोर्डाच्या नियमानुसार बनलेली कोणतीहि स्थानिक संस्था यांचा मतदार. (५०० रु. व त्याहून अधिक वार्षिक उत्पन्न असणाऱ्या मंदिरापुरती ही व्याख्या समजावी ) आणि शहरांतील म्यु. चा किंवा तिच्या वॉर्डाचा मतदार (५०० रु. पेक्षा वार्षिक उत्पन्न कमी असणाऱ्या मंदिराचे बाबतींत ही व्याख्या समजावी. )

हा कायदा मंजुर झाल्यानंतर ५० किंवा अधिक मतदारांनी मंदिरप्रवेशाचा प्रश्न सर्व मतदारापुढे मांडावा अशा आशयाचा लेखी अर्ज चालकाकडे करावा. म्हणजे ते तो प्रश्न मतदारांकडे पाठवितील. मतदारांनीं बहुमताने अनुकूलता दर्शविली तर ती मंदिराच्या चालकांवर व त्यांत येणाऱ्या लोकांवर बंधनकारक होईल. आणि 'अस्पृश्यांना हें मंदिर उघडें आहे' अशा आशयाचें पत्रक चालक काढतील.

खुद्द चालकालाहि असें पत्रक स्वतःच्या प्रेरणेनें काढण्याची मुभा राहील. त्याला विरोध करण्याची मुदत एक महिन्याची आहे. त्या मुदतींत ५० किंवा अधिक मतदारांनीं आपला विरोध लिहून चालकांना कळवावा; म्हणजे चालक सर्व मतदारांकडे तो प्रश्न पाठवितील. अर्थात् त्या वेळींहि बहुमत हेंच बंधनकारक ठरेल. तें बहुमत मंदिरप्रवेशाला अनुकूल पडलें किंवा पत्रकाला एक महिन्याचे आंत कोणी विरोध केला नाहीं तर तें मंदिर अस्पृश्यांना चालक उघडें करतील.

नंतर अस्पृश्यांपैकीं कोणालाहि देवपूजा करण्यासाठी मंदिरांत प्रवेश करतां येईल. मात्र त्याने शिस्त, स्वच्छता व धार्मिक विधि, यासंबंधीं चालक जे सर्वसाधारण नियम करतील ते पाळले पाहिजेत.

मतदारांचें बहुमत मंदिरप्रवेशाला प्रतिकूल पडलें तर त्यासंबंधी एक वर्षाचे आंत मंदिरप्रवेशाच्या पुरस्कर्त्यांना अर्ज किंवा चालकाला पत्रक काढतां येणार नाहीं. मद्रासच्या 'धार्मिक देणग्यांच्या कायद्यामध्ये ४० व्या कलमांत पुढील शब्द घालावेत. 'हिंदु मंदिर प्रवेश निर्बंध निवारक' कायद्या-

च्या योजनेस अनुसरून त्या कायद्याच्या १० व्या कलमांत सांगितलेल्या 'बोर्ड ऑफ कमिशनरांच्या संमतीने चालकांनी शिस्त, स्वच्छता, धर्मविधि यासंबंधा नियम करावेत.

या कायद्याची अंमलबजावणी करण्याची सत्ता प्रांतिक सरकारांना असावी.

# खेड्यांचें स्वराज्य छोटें चालेल पण खोटें नसावें !

मुंबई कायदेकौन्सिल ची बैठक मुंबईस सोमवार ता. ६ रोजीं सुरू झाली. कौन्सिलच्या या बैठकींत सरकारतर्फे जीं बिलें यावयाचीं आहेत त्यांपैकीं ग्रामपंचायतीचें बिल हें महत्त्वाचें होय. सदर बिल गेल्या ऑक्टोबर महिन्यांत स्थानिक स्वराज्य खात्याचे दिवाण सर रुस्तुम वकील यांनी मांडलें व तें एकदा वाचन झाल्यावर त्याची रवानगी सिलेक्ट कमिटीच्या चाळणींत करण्यांत आली. सिलेक्ट कमिटींत निरनिराळ्या पक्षांच्या व मतांच्या सभासदांची योजना झाली होती. खरें म्हटलें असता ग्रामपंचायत हा पदार्थ असा निर्लेप आहे कीं, तो कोणत्याहि पंथाच्या व संप्रदायाच्या मनुष्यास चालावा. परंतु प्रस्तुत बिलासहि अंशतः निषिद्ध ठरविणारे कांहीं हरीचे लाल भेटलेच! इतकें त्यांचें सोवळें कडक. हे सोवळें कोणाचें? तर डॉ. आंबेडकर प्रभृति अस्पृश्यांचें व सर रफिउद्दिन अहमद प्रभृति मुसलमानांचें. ग्रामपंचायतीचा कायदा १९२० सालीं पास झाला. पण त्या कायद्यानें दिलेल्या पंचायती जनतेला इतक्या अप्रिय झाल्या कीं, त्यांची तरफदारी करणारा माणूसहि तिला नकोसा वाटूं लागला. ज्याला लोकांकडून दोन शिव्या खाण्याची हौस किंवा हिंमत असेल त्यानेच ग्रामपंचायत स्थापन करण्याची गोष्ट खेड्यापाड्यांतील रहिवाशांपुढे काढावी असा दुर्लौकिक ग्रामपंचायत कायद्यानें अवघ्या दोन वर्षांच्या अवधींतच संपादन केला. या दुर्लौकिकाच्या बाबतींत ग्रामपंचायतीची बरोबरी करण्यासाठी कोणाहि दुर्जनानें पैज लावली असती तरी त्याला तें कसब तितकें साधलें नसतें!

स्थानिक स्वराज्य खात्याचे त्यावेळचे दिवाण सर गुलाम हुसेन हिदायतुल्ला यांना हें बाळ कसें गुण उधळणारें आहे याची कल्पना लवकरच आली व त्यांनीं कायद्यांत सुधारणा करण्याचीं आश्वासनेंहि अघळपघळ देऊन ठेवलीं. परंतु हिदायतुल्ला पडले मुसलमानी रियासतींतील नबाबाप्रमाणे ऐदी, आळशी किंवा ऐषआरामी. त्यांच्या कारकीर्दींत स्थानिक स्वराज्य परिषदा भरवून चुटक्यांचे मांडव उभारण्यापलीकडे मजल गेलीच नाहीं. अखेर सध्याचे पार्शी दिवाण सर रुस्तुम वकील यांना सुबुद्धि सुचून, त्यांनीं चालू कौन्सिलाचा मनू संपून त्याचा अस्तमान होत आला असता, पंचायतीचें बिल पुढें आणिलें व मुंबई इलाख्यास एक दोन वर्षांत प्रांतिक स्वायत्तता मिळून आपला कारभार आपण चालविण्याचा अधिकार प्राप्त होण्यापूर्वी, जुन्या कायद्यांत सुधारणा केल्याचें श्रेय जोडावें अशी महत्त्वाकांक्षा बाळगली. प्रस्तुत बिल तयार करण्यांत सर रुस्तुम यांच्या अंगास लौकिकाचा स्वार्थमूलक हेतु कोणास चिकटविता आला तरी त्यांनी एकंदरीनें लोकप्रिय व्हावें असेंच बिल पुढें आणलें, याबद्दल त्यांचें अभिनंदनच केलें पाहिजे.

परंतु हल्लींच्या कायदेमंडळांत आलेलें बिल व शिप्यानें शिवून आणिलेला कपडा यांची अवस्था जवळ जवळ सारखी असते. किंबहुना कपड्यापेक्षांहि बिलाची फजिती अधिक. कारण शिंपी हा शिवावयाच्या कोटाचें कापड आगाऊ घेतून घेत असल्यामुळे त्याचा कपडा गिऱ्हाईकाच्या अंगाला बहुधा हवा तसा बसतोच. क्वचित् बाही किंचित लांबली असली तर ती टीप मारून आखूड करावी व गळ्याला कोट आवळ झाला असला तर नेवढी शिवण उसवावी एवढाच फेरबदल शिंप्याकडून व्हावयाचा उरतो. पण बिलाचें तसें नाहीं तें बिल शेसव्वाशे सभासदांपैकी प्रत्येकाच्या अंगाला आलें पाहिजे. अशा स्थितींत त्या सर्वांनीच बिलाचा धोशा उडविण्याचें ठरविल्यास बिल आणणारांस या कामांत केव्हांहि यश येण्याची आशाच बाळगावयास नको. प्रस्तुत बिल आणून सर रुस्तुम यांनी मूळ कायद्यांत जर कोणती मोठी सुधारणा सुचविली असेल तर ग्रामपंचायतींना दिवाणी व फौजदारी अधिकार देऊं केले ही होय. पण बिलाच्या त्याच मुद्दढ व पुष्ट भागास सूज आलेला समजून त्याजवर बिब्याची फुली घालण्यास डॉ. आंबेडकर व सर रफिउद्दीन सरसावले! त्यामुळे सगळेंच मुसळ केरांत जाण्याची पाळी आली.

डॉ. आंबेडकर यांनी कौन्सिलांत हें भांडण पुष्कळ विकोपास नेलें होतें. म्हणून बिलाचें पाहिलें वाचन गेल्या बैठकींत मंजूर झाल्यावर बिल चाळून, छाटून व पिंजून घेण्याकरिता जी कमिटी नेमण्यांत आली तिच्यांत अस्पृश्यांचे एक पुढारी डॉ. सोळंकी हे होते. एका बाजला डॉ. सोळंकी व दुसऱ्या बाजूला मुसलमान सभासद यांनी बिल ताणून, त्याचे वाभाडे

काढण्याचें मनांत आणिल्यास कमिटींतील युरोपियन अधिकारी बिलाचा विचका करून चिवडा उडविण्यासाठीं बसलेच होते. असल्या विघ्नसंतोषी लोकांच्या तडाक्यांतून बिलाला वांचविणारे सभासद रा. पंडितप्पा चिकोडी, रा. ब. भीमभाई नाईक, रा. ब. काळे, कामत इत्यादि होते. अशा या चौरंगी सामन्यांत पंचायतीचें बिल सांपडून मोठीच पंचाईत झाली. वस्तुतः सिलेक्ट कमिटीची नेमणूक बिलांतील रोगट व कुजट भाग छाटून टाकण्यासाठीच करण्यांत येते. परंतु प्रस्तुत बिलांत कमिटीनें निरोगी भागच कुचका ठरवून बिलाला नवा रोग जडविला !

शहराला जशी म्युनिसिपालिटी तशी खेड्याला ग्रामपंचायत अशी कल्पना मनांत धाळगून, मुंबई इलाख्याच्या ग्रामपंचायतीच्या कायद्याची उभारणी झाली. परंतु म्युनिसिपालिटीप्रमाणेंच ग्राम पंचायतीचा कारभार लोकांपासून कर वसूल करून, त्यांच्यांतून चालवावा असे धोरण आंखून दिल्यामुळें खेड्यांतील अडाणी व दरिद्री जनतेला हा मिजासखोर पाहुणा नकोसा वाटला. ग्रामपंचायतीची गोडी गांवकऱ्यांना लागावयाची तर तिला अशा रीतीनें निव्वळ गांवावर चरावयास सोडणें इष्ट नाही ही मुद्द्याची गोष्ट पटून सर रुस्तुम यांनीं आपल्या बिलांत ग्रामपंचायतीसाठीं द्रव्य-साहाय्याची मुद्दाम तरतूद करून ठेवली आहे. गांवापासून सरकारास जो लोकल फंड वसूल होतो त्याचा ¼ हिस्सा ग्रामपंचायतीस या बिलानें मिळावयाचा आहे. ग्रामपंचायतीचें हें उत्पन्न अवघें शेपन्नास रुपयांचें असलें तरी हमखास असल्यामुळे, त्याच्या जिवावर ग्रामपंचायत स्थापन करण्याचा आग्रह गांवापाशीं धरण्यास कोणालाहि हरकत नाहीं. ग्रामपंचायतींच्या केवाऱ्यांची एक कुरकूर या उपायानें मिटली. दुसरी त्यांची तक्रार अशी होती कीं, पंचायत स्थापन झाल्यावर तिने गांवांत घरपट्टी बसविलीच पाहिजे ही कायद्याची सक्ती नसावी. सर रुस्तुम यांच्या बिलांत ही सक्ती कायम आहे, पण सिलेक्ट कमिटीनें ती काढून टाकून घरपट्टी बसविणें अगर न बसविणें पंचायतीच्या नजरेवर सोपविले. ही सुधारणा इष्ट व महत्त्वाची अशीच झाली. त्या योगानें ग्रामपंचायतीचें गांवांना जें संकट वाटत होतें तें आता वाटणार नाही आणि तिचा तिरस्कार व टवाळी कोणी करणार नाही.

वरील गुणांच्या जोरावर ग्रामपंचायत बऱ्याचशा लोकप्रिय होतील यांत शंका नाही. परंतु त्याहिपेक्षा त्यांना खरी लोकप्रियता त्यांस मिळणाऱ्या दिवाणी व फौजदारी अधिकारानें लाभणार आहे. इंग्रजी राज्यापूर्वी गांवांतील बहुतेक तंटेबखेडे गांवांतल्या गांवांत पंचायतीमार्फतच मिटत; व एखादा कज्जा फार भानगडीचा व जोखमीचा असला तरच तो सरकारदरबारापर्यंत जात असे. नवीन बिलानें मोठे अधिकार ग्रामपंचायतीस देण्यांत यावयाचे नाहीत. जंगम मालाचा कब्जा, खंडचिठ्या इत्यादि २५ रु. पर्यंतचे दिवाणी दावे आणि शिवीगाळ, मारामारी, चोरी, असल्या फौजदारी कामांतील २० रु. पर्यंत दंडाचे दावे चालविण्याचा अधिकार ग्रामपंचायतीस मिळणार आहे.

सर रुस्तुम वकील यांच्या बिलानें वरील अधिकार देऊं केले आहेत. हे अधिकार वाढविण्याचें दूरच राहिलें. पण आहेत तेहि जसेच्या तसे ग्रामपंचायतीच्या पदरांत पडूं देण्यास सिलेक्ट कमिटी आडवी आली आहे. हल्लींच्या कायद्याप्रमाणें व बिलाप्रमाणेंहि पंच निवडण्याचा अधिकार वयांत आलेल्या सर्व पुरुषांना आहे. त्यास अनुसरून पंचायतींत पांचसात सभासद निवडून येतात व पंचायतीचें काम सुरू होतें. परंतु ही रीत डॉ. आंबेडकर यांस पसंत पडली नाही. खेडेगांवांत अस्पृश्य वर्गास हल्लीच अन्यायानें व अवहेलनेनें वागविण्यांत येतें. त्यांतच ग्रामपंचायतीची व ग्रामपंचायती-मार्फत व्हावयाच्या न्यायनिवाड्याची भर पडल्यास अस्पृश्यांना हल्लींहून अधिक जुलूम सोसावे लागतील. यासाठी ग्रामपंचायतींतील सभासदांत अस्पृश्य वर्गाचा प्रतिनिधि हटकून येऊन हक्कानें बसेल अशी तरतूद नव्या बिलानें केली पाहिजे, असें डॉ. आंबेडकर यांचें म्हणणें होतें. या त्यांच्या तक्रारीचें निरसन करण्याकरितां सिलेक्ट कमिटीनें एक नवीनच युक्ति काढून, पंचायतीचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याचें पातक मात्र जोडलें आहे.

ग्रामपंचायतीची निवड व्हावयाची ती नियमांनीं होईलच. पण तशी निवड झाल्यानंतर विशिष्ट वर्गाचा सभासद पंचायतींत निवडला गेला नाहीं असें कलेक्टराच्या नजरेस आल्यास त्यानें सदर वर्गातील सभासद आपल्या अधिकारांत नेमावा अशी नवीन बिलांत सिलेक्ट कमिटीनें दुरुस्ती सुचविली आहे. कमिटी एवढेंच करून थांबली आहे असें नव्हे तर तिनें गांवाला दिवाणी व फौजदारी अधिकार देण्याच्या बाजतींत आणखी एक खूट काढला आहे. तिचें म्हणणें असें कीं, हा अधिकार ग्रामपंचायतीस न देतां त्याकरितां ' व्हिलेज बेंच ' नांवाचें निराळें मंडळच स्थापण्यांत यावें. या मंडळांत कलेक्टरानें पांच ते सात इतक्या सभासदांची नेमणूक करावी. या पांच-सात सभासदांपैकीं तीन

ते पांच सभासद ग्रामपंचायतींतील असावे व बाकीच्या दोन सभासदांच्या जागा कलेक्टराने पंचायतीबाहेरच्या लोकांतून भराव्या.

खेडेगांवांतील कोणताहि सार्वजनिक व्यवहार सध्या जातिभेदाच्या तत्त्वावर चालतो असें नाही. ज्ञातिद्वेष सहसा त्यांच्या मनांत नसतो. खेड्यांत जितक्या जाति आहेत तितक्या सर्व जातींचे प्रतिनिधि ग्रामपंचायतींत निवडून यावे असें कोणीं म्हटलें तर त्याला वेड्यांतच काढावा लागेल. यामुळे पंचायत ही थोड्याच जातींतील सभासदांची बनणार हें उघड आहे. पण असें झालें म्हणून इतर जातींच्या लोकांवर या थोड्या जातींतील पंचांचा जुलम होईल ही भीति कोणच्याहि जातीस वाटत नाही. ती भीति अस्पृश्य वर्गाच्या पुढाऱ्यांस कां वाटावी हें समजणें कठिण आहे. पंच घरपट्टी बसवितांना ती अस्पृश्यांवर वाजवीपेक्षा जास्ती बसवितील व स्पृश्यांना माफी देतील अशा तऱ्हेचा आकस पंचांच्या मनांत असण्याचें कांहीच कारण नाही. गांवाची स्वच्छता ठेवणें, दिवाबत्तीची सोय करणें किंवा पाणीपुरवठ्याची व्यवस्था लावणें याहि बाबतींत ग्रामपंचायतींकडून पक्षपात होईल असें म्हणण्यास फारशी जागा नाही. यदाकदाचित् तसा पक्षपात होत असल्याचें आढळून आल्यास पंचायतीला न्यायानें वागावयास लावण्याचा अधिकार जिल्हा लोकल बोर्डाला आहेच.

न्याय-इन्साफाची गोष्ट याहून अधिक सोपी आहे. भिन्न भिन्न जातींतील वादीप्रतिवादींचे तंटे पंचायतीपुढे आले असतां, त्यांना न्याय मिळण्याच्या कामीं जसा जातिभेद आड येणार नाही, तशी स्पृश्यास्पृश्यांतील भांडणांत अस्पृश्यांची अस्पृश्यताहि त्यांना नडणारी नाही. अमुक मनुष्य अस्पृश्य आहे म्हणून पंचायतीने त्याच्याशीं अन्याय केला असें कधी तरी घडेल काय? आता पंचायतीने न्याय-इन्साफ करण्याची टूम नवी असल्यामुळे त्यांच्या हातून हें जोखमीचें कार्य कसें पार पडेल अशी शंका कोणी घेईल. त्या शंकेचें निवारण करण्याची एक तोड सिलेक्ट कमिटीनें आपल्या रिपोर्टांत सुचविलीच आहे. ग्रामपंचायतीच्या कारभारावर देखरेख ठेवण्याकरिता एक अधिकारी जिल्हा लोकल बोर्डाने अगर खुद्द सरकारानेहि नेमावा असें कमिटीचें मत असून तें सर्वथैव ग्राह्य आहे. या अधिकाऱ्याने पंचायतीवर देखरेख ठेवावी इतकेंच नव्हे तर जे लोक आपल्या गांवीं पंचायत स्थापन करण्यास कचरतील त्यांची समजूत घालण्याचें व त्यांना प्रोत्साहन देण्याचें कार्यहि त्यांजवर सोंपवावें. असा प्रयत्न मध्यप्रांतांत कांही प्रमाणांत झाला आहे. परंतु पुढारलेलें म्हणून दिमाख मिरविणाऱ्या मुंबई सरकारने तो मुळीच केला नाही हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

सिलेक्ट कमिटीने सुचविल्याप्रमाणे अशा अधिकाऱ्यांची नेमणूक झाल्यास त्याजवर इतरहि कामें सोंपवावयास सांपडतील. त्याने ग्रामपंचायतींना भेट द्यावी, त्यांच्या कामकाजाची व न्यायमुनसुफ्याच्या कारभाराची तपासणी करावी आणि त्यांत अन्याय, पक्षपात किंवा चुका आढळल्या असता त्याबद्दल पंचायतींना जबाबदार धरून त्यांना ताळ्यावर आणावें. आपल्या कारभारावर वरिष्ठ अधिकाऱ्यांची सक्त नजर असल्याचें पंचांना एकदा कळल्यानंतर ते शिस्तीत वागूं लागतील हें सांगावयास नकोच. आजहि मामलेदार किंवा सबजज्ज कोणत्याहि जातीचा किंवा धर्माचा असला तरी तो आपलें कर्तव्य भेदभाव लक्षांत न आणता चोखपणें बजावतो असें गृहीत धरण्यांत येतेंच कीं नाही? मग तोच नियम पंचायतींनाहि लागू कां करूं नये?

पंचायतींना आपणावरील जबाबदारीस जागण्यास भाग पाडण्याची तरतूद जर अधिकाऱ्याच्या नेमणुकीने होण्यासारखी आहे तर मग पंचायतीच्या निवडणुकींत कलेक्टराचें बोट कां शिरकाविण्यांत यावें व व्हिलेज कोर्ट वेगळें स्थापून, त्याला कलेक्टराच्या हातचें बाहुलें कां बनविण्यांत यावें हें आम्हांस समजत नाही. ग्रामपंचायतींची उभारणी, खेड्यांतील लोकांना सार्वजनिक कामाची गोडी लागण्याकरितां, त्यांना संघटनेचा धडा घालून देण्याकरितां, स्वावलंबी बनविण्याकरिता व त्यांची सामुदायिक दानत सुधारून स्वराज्याची जबाबदारी शिरावर घेण्याची त्यांच्या अंगीं पात्रता आणण्याकरिता आहे. हा उद्देश ग्रामपंचायतींना सरकारने काहींसें हातावेगळें करण्यानेच साधणार आहे, त्यांच्या कारभारांत फाजील ढवळाढवळ करण्याने साधणार नाही इतका पोच व दूरदर्शीपणा सिलेक्ट कमिटीने दाखवावयास पाहिजे होता. पण तो तिने दाखविला नाही. सिलेक्ट कमिटीच्या हातून ही चूक घडली यांत शंका नाही. पण सिलेक्ट कमिटीने ही चूक केली, म्हणून कौन्सिलांतील सभासदांनाहि ती चूक तशीच पुढे चालू ठेवावी असें कोणीहि समजस मनुष्य म्हणणार नाहीं. कौन्सिलाचें जर कांही कर्तव्य असेल तर अशा चुका दुरुस्त करण्याचें आहे, त्या कायम ठेवण्याचें नाहीं.

मुंबई कौन्सिलाने ग्रामपंचायतीवर दिवाणी फौजदारी कामें सोपविण्यांत केलें मत-

कृत्य केलें आहे, किंवा लोकोत्तर औदार्य दाखविलें आहे अशांतला मुळींच भाग नाही. मध्यप्रांतांतील ग्रामपंचायतींना हेंच काय पण याहूनहि जास्ती अधिकार मिळाले असताहि त्यांजकडून त्यांचा दुरुपयोग झाल्याचा बोभाटा नाही. मद्रास इलाख्यांतूनहि तशी तक्रार ऐकूं येत नाही. मग मुंबई कौन्सिलाच्या सिलेक्ट कमिटीने साप साप म्हणून भुई धोपटण्यांत कोणता शहाणपणा आहे? लोकांना जरा सैल सोडून पाहावें, मिळालेल्या अधिकाराचा उपयोग करण्यास त्यांस पुरेशी सवड द्यावी व त्या अवधींत त्यांची अपात्रता नजरेस आल्यास, कायद्यांत फिरून दुरुस्ती करण्याच्या बाबतींत कौन्सिलाचे हात कोणी धरून ठेवलेले नाहीत. कमिटीच्या रिपोर्टावर मि. यु बंक, रा. ब. काळे, आमदार गांगोली, डॉ. दिक्षित पुण्याचे रा. ल. र. गोखले वकील इत्यादिकांच्या तीनशें उपसूचनांचा भारा पडला असल्याचें समजतें. या भाऱ्याचें महत्त्व त्याच्या आकारावर नसून त्यापासून आसपच्या खेडेगावांना स्वराज्याचे थोडे कां होईना पण खरेखुरे अधिकार किती मिळतात यावर अवलंबन आहे. कौन्सिलांतील सभासद या दृष्टीने बिलाकडे पाहतील व सिलेक्ट कमिटीच्या प्रतिगामी सूचना उलथून पाडून इतर प्रांतांनी मुंबई इलाख्यास मागे टाकल्याने त्याची झालेली बेअब्रू साफ करतील अशी आम्हांस उमेद आहे. चालू कौन्सिलांतच बिलाचा सोक्षमोक्ष होणार असल्याने त्यावेळीं लोकनियुक्त सभासद आपली कामगिरी कशी बजावतात इकडे सर्वांनी जरूर लक्ष पुरवावें.

# पुण्यांतील नगरोत्सव

गेल्या दिवाळीच्या शेवटच्या आठवड्यांत पुणें शहर म्युनिसिपालिटीने नगरसप्ताह करण्याचें ठरवून त्यासाठी दहा हजार रुपये मंजूर केले होते. सदर ठरावाप्रमाणे सप्ताहाचें प्राथमिक कार्य म्हणजे प्रचारहि सुरू झाला होता. नगरसप्ताह यशस्वी करण्याचे दृष्टीने, साहाय्य मिळविण्यासाठी कांही पेठांतून पेठ कमिट्यांची स्थापना करण्यांत आली होती. परंतु कार्याच्या पसाऱ्याच्या दृष्टीने अवधि अगदीच थोडा उरल्यामुळे व अन्य कांही कारणाने सप्ताहाचें काम तहकूब करावें लागले.

"१९५० चें पुणें" या संस्थेच्या एकंदर योजनेंत अशा प्रकारच्या उत्सवाची एक कल्पना व कार्यक्रम आहे. सदर संस्थेने येत्या फाल्गुन कृष्ण १ (ता. १३-३-३३) पासून चैत्र शुद्ध १ (ता. २७-३-३३) पर्यंतच्या पंधरा दिवसांत शहरांत 'नगरोत्सव' करण्याचें ठरविलें आहे व त्यासाठी तूर्त खालील कार्यक्रम निश्चित केला असून तो यशस्वी करण्यासाठी पोटमंडळें निवडलीं आहेत.

### नगरोत्सवाचा कार्यक्रम

(१) कुस्त्या, खेळ व सामने.

(२) पुणें शहरांतील उद्योगधंदे व कला यांचें प्रदर्शन व निरनिराळ्या धंद्यांतील व कलांतील नागरिकांच्या परिषदा.

(३) लोकशिक्षण व जागृति.

वरील कार्यक्रमांपैकीं, कुस्त्या, लोकशिक्षण व प्रचारासंबंधी कमिट्यांचीं कामें चालू आहेत व लवकरच कांही कामास जोराने सुरुवात होईल. संस्थेने ठरविलेल्या या नगरोत्सवास जितकी अधिक व आपलेपणाची सहानुभूति मिळेल तितका तो यशस्वी झालेला पाहावयास मिळेल अशी उत्सवाच्या चालक मंडळाची खात्री असल्यामुळे, नागरिक व शहरांतील वेगवेगळ्या सार्वजनिक लोकोपयोगी संस्था यांचेकडून, सांपत्तिक, शारीरिक व बौद्धिक अशी सर्व प्रकारची मदत मिळावी अशी अपेक्षा व विनंति आहे.

म्युनिसिपालिटीने जो सप्ताह करण्याचें ठरविलें होते, त्यांत आरोग्य, स्वच्छता व शहर साफसुफी याला प्रमुख स्थान दिलें होते. वरील कार्यक्रमांत ही बाब अजिबात नाही असें वाटण्याचा संभव आहे. परंतु या बाबींपैकीं कोणत्या गोष्टी संस्थेच्या सांपत्तिक परिस्थितीच्या दृष्टीने करतां येणें शक्य आहे याचा विचार चालू आहे, व त्याबद्दलचा कार्यक्रम लवकरच जाहीर करण्यांत येईल.

### नागरिकांची सहानुभूति पाहिजे

आरोग्य, स्वच्छता व शहर साफसुफी यांचे दोन वेगवेगळे भाग आहेत. एक घरांतील स्वच्छता व आरोग्य, व दुसरा घराबाहेरील स्वच्छता म्हणजे म्युनिसिपालिटीच्या हद्दींतील साफसुफी. या दोनहि गोष्टी नागरिकांच्या व म्युनिसिपालिटीच्या सहानुभूतीवर बऱ्याचशा अवलंबून आहेत. आपलें घर स्वच्छ असावें, अशी प्रत्येक माणसाची इच्छा असणारच! परंतु अनेक कारणांनी क्वचित प्रसंगीं हलगर्जीपणानेंदेखील घरांत असूं नये अशी घाण राहूं शकते, होऊं शकते, व घाण आहे असें दिसत असतांहि ती नाहींशी करण्यास होत नाहीं. व अजाणतपणें आपल्या आरोग्याला आपणच अपाय करीत असतों. अशा प्रकारची शहरांत,

घरांत व घराबाहेर म्युनिसिपल हद्दींत असलेली घाण नगरोत्सवासारख्या निमित्ताने परीचशी कमी होण्याचा संभव आहे. व ही कामें प्रत्येक घर मालकाकडून व म्युनिसीपालिटीकडून व्हावयाचीं आहेत. उत्सव मंडळातर्फे निश्चित केलेल्या कार्यक्रमाविषयी सहाय्य करण्यासाठी नागरिकांना ज्याप्रमाणे विनंति करण्यांत आली आहे तद्वतच या बाबीसंबंधीची योजना मुक्रर झाल्यानंतर नागरिकांना व म्युनिसीपालिटीला विनंति करण्यांत येईल. साफसुफीची बाब म्युनिपल कामांपैकीं एक प्राथमिक कर्तव्य असल्यामुळे व शहरस्वच्छता व आरोग्य या बाबतींत आपली म्युनिसिपालिटी विशेष दक्ष असल्यामुळे, म्यु. चें साहाय्य सहज मिळेल अशी उत्सवमंडळास अपेक्षा असून, लवकरच म्युनिसिपालिटीस विनंति करण्यांत येईल.

संस्थेने योजिलेल्या या उत्सवाच्या कल्पनेंत व कार्यक्रमांत कोणास कांहीं सूचना करावयाच्या झाल्यास त्या अवश्य कराव्यात व त्याचप्रमाणें आपापल्या आवडीनुसार ज्या कोणाला उत्सवांत प्रत्यक्ष भाग घेऊन काम करण्याची इच्छा असेल त्यांनी त्याप्रमाणे आमच्याकडे कळवावें अशी विनंति आहे. आपला,

**ग. म. नलावडे**

चिटणीस नगरोत्सव प्रचार मंडळ **पुणें.**

# मोटारीची वाहतुक !

**(चिटणीस गोखले इकॉनॉमिक इन्स्टिटयूट, पुणें)**

गेल्या आठदहा वर्षांत मोटरींची वाहतूक बरीच वाढली असून, त्यामुळे खेड्यापाड्यांतील लोकांस सुद्धां प्रवासाचें एक नवीन साधन उपलब्ध झालें आहे. आगगाड्यांचा मार्ग निश्चित असल्यामुळे, आगगाडीपासून लांबवर असलेल्या ठिकाणास बैलगाडी, क्वचित् टांगे याचें साहाय्याने बराचसा प्रवास करावा लागे. १९१८-२० सालानंतर मोटार-बस वगैरेची वाहतूक सुरू होऊन हा प्रश्न बराचसा सुटू लागला व आता तर बहुतेक लहान खेडीपाडीं सुद्धां मोटरने मुख्य शहरांशीं जोडून टाकिलीं आहेत.

बाजाराकरितां जवळपासच्या गांवीं जाणें झाल्यास पूर्वीं खेड्यांतील लोकांस सामान गाडींत घालून किंवा डोक्यावर घेऊन सूर्योदयापूर्वीच घर सोडावें लागत असे. व वेळेवर घरीं परतणें श्रेयस्कर असल्याने आपल्या मालाची विक्री व लागणाऱ्या जिनसांची खरेदी करून लागलीच परत फिरावें लागत असे. आतां ही परिस्थिति बदलली असून सामानाची नेआण करण्यास किंवा परगावीं जाण्यास मोटरने बरीच सोय झाली आहे.

या नवीन साधनामुळे प्रवास सुखकर झाला खरा; परंतु त्याबरोबरच गरीब लोकांच्या दृष्टीने मोटार म्हणजे एक नुकसानीची बाब होऊन बसली आहे. मोटारीची वाहतुक अस्तित्वांत आल्यामुळे शेतकऱ्यास त्याच्या फावल्या वेळांत, पूर्वी आपली गाडी व बैल भाड्याने लावतां येत असत. ते तसें आता लावितां येत नाहीत ! त्यामुळे त्याच्या फावल्या वेळचा धंदा बसून त्याच्या उत्पन्नांत तूट पडूं लागली आहे. त्याचप्रमाणे मोटारी लहान लहान ठिकाणींहि जाऊं येऊं लागल्याने व आपसांतील चढाओढीमुळे मोटरींचीं भाडीं कमी झाल्यामुळे, अगदी गरीब लोक देखील मोटार वाहनाचा उपयोग करतात. असा उपयोग करण्याने थोडे श्रम वांचविण्यापलीकडे त्याचा काहीच फायदा न होता पदरचे दोन पैसे मात्र खर्च होतात, व असा खर्च करण्याची संवय जडते !

तसेंच सुरवातीच्या कांहीं काळांत मोटारी थोड्या असल्याने व धंद्यांत चढाओढ मुळीच नसल्याने मोटरमालकांस बराच फायदा झाला. परंतु गेल्या चारपांच वर्षांत मोटरींची संख्या फारच वाढली आहे. शिवाय या धंद्यांत शिरणारे बरेचसे लोक अशिक्षित असून, त्यांस फारसें ज्ञान नाही व आपसांत चढाओढहि फार होऊं लागली आहे. या सर्व कारणांमुळे मोटरमालकांची स्थिति दिवसेंदिवस अधिकाधिक हलाखीची झालेली दिसून येते. हप्त्यांच्या सवलतीने मोटारगाड्या विकत मिळतात, याचा परिणाम असा होतो कीं, पहिल्याने भरावे लागणाऱ्या रकमेचा आंकडा लहान वाटतो; व एकदा माणूस आपल्या मालकीचें शेत अगर घर गहाण टाकून हा पहिला हप्ता भरतो, व मोटार आपल्या ताब्यांत घेतो. पण पुढे मात्र धंद्यांतील चढाओढीमुळे त्यास हप्त्याचे पैसे भरतां भरतांच नाकीं नऊ येतात ! मग पैसे मिळविणें तर दूरच.

मोटारींची वाहतुक फार वाढल्याने कांहीं ठिकाणीं रेल्वेशीं चढाओढ होऊन, रेल्वेचें बरेंचसें

नुकसान होत आहे असेंहि सांगण्यांत येतें. याशिवाय मोटारींत प्रवास करणाऱ्या उतारूंच्या कांहीं ठराविक तक्रारी आहेतच (१) मोटारी रेल्वेप्रमाणें वेळेवर सुटत नाहींत व वेळेवर कोणत्याहि ठिकाणीं पोहोंचत नाहींत. यामुळें त्रासहि होतो व वेळ फार मोडतो. (२) भाडें ठराविक नसतें. (३) बहुतेक मोटारी सुस्थितींत नसल्यामुळे कित्येकदा वाटेंत कोठें तरी मुक्काम करण्याची पाळी येते. (४) मोटारड्रायव्हरच्या चुकीमुळें, किंवा बेजबाबदार वृत्तीमुळे पुष्कळसे अपघात होऊन कमीअधिक दुखापती होण्याचा संभव असतो व प्रसंगीं प्राणहानीहि होते.

वर उल्लेख केलेल्या व यांशीं संबंध असलेल्या इतर सर्व प्रश्नांचा अत्यंत बारकाईने अभ्यास करून व मोटार धंद्याची सध्याची परिस्थिति किती वाईट आहे हें अजमावून, ती कशी सुधारतां येईल याविषयीं कांही निश्चित सूचना पुढे मांडणें हे काम सध्या, 'गोखले राजकारण अर्थशास्त्र-संशोधन मंदिर' या संस्थेने हातीं घेतलें आहे. या करितां संस्थेमार्फत रा. ल. वि. गोगटे बी. एस. यांस संशोधक म्हणून नेमण्यांत आलें असून, ते महाराष्ट्रांतील सर्व जिल्ह्यांत हिंडून या बाबत माहिती गोळा करीत आहेत.

संस्थेचा प्रयत्न यशस्वी होण्यास सर्व प्रकारच्या लोकांनी त्यास हातभार लावणें जरूरीचें आहे. उतारूंनीं आपल्या गैरसोई, मोटारमालकांनीं त्यांच्या अडचणी, तसेंच ड्रायव्हरांनी आपली सध्याची परिस्थिति या विषयीं संस्थेस माहिती कळवावी.

प्रत्येकाने कळविलेल्या माहितीचा पूर्ण विचार केला जाईल. तरी वाचकांनी या धंद्यासंबंधी ज्यास जी माहिती असेल, किंवा ज्या तक्रारी असतील त्या चिटणीस गोखले राजकारण अर्थशास्त्र संशोधन मंदिर, पुणें ४ या पत्त्यावर पाठवाव्या.

# म्हैसुराकडील प्रेक्षणीय स्थळांचें दर्शन

( ले.—**य. न. केळकर** )

३० डिसेंबर रोजीं सकाळीं बंगलुरास आलों. बंगलूर सुमारें ३००० फूट उंचीवरचा गांव असल्यामुळे हवा फारच थंड व आल्हाददायक आहे. युरोपियनांना तर ती फारच मानवते. एकंदर ४०००० साहेबांची येथे वस्ती आहे म्हणतात. हें शहर फार मोठें म्हणजे सुमारें दोन लाख वस्तीचें आहे. म्हैसूर हा राजधानीचा गांव असला तरी त्या राज्याचा सर्व कारभार येथूनच चालतो. म्हैसूरसरकारचीं सर्व मोठीं मोठीं ऑफिसें येथेच असतात. शहराचे गांव व छावणी असे दोन भाग आहेत. अलीकडे नव्या वस्तीकरितां एक्स्टेंशनहि सुरू असून त्यांतल्या वसाहती नमुनेदार आहेत. शहर अर्थातच फार मोठें, व्यवस्थित व सुंदर आहे. भाजीपाल्याची स्वस्ताई फारच दिसली. शहरांत अनेक प्रेक्षणीय ठिकाणें आहेत. त्यांपैकीं कबनबाग, लालबाग, सुप्रसिद्ध टाटा इंस्टिटयूट, चंदन व लाखेच्या कारखान्याची कोठी वगैरे स्थळें पाहिलीं.

बंगलूरला सध्या जें महत्त्व आहे तसेंच किंवा त्याहिपेक्षा अधिक महत्त्व एका काळीं होतें यांत शंका नाही. कारण शिवाजीमहाराजांचे वडील शहाजीराजे यांची ही सुप्रसिद्ध राजधानी होती. याच ठिकाणी दक्षिणेंतून शेकडों कुटुंबें इकडे आणून तीं त्यांनी या प्रांतांत चिरस्थायी केलेलीं आहेत. शिवभारतकाराने केलेलें बंगलोरचें बहारीचें वर्णन या वेळीं आठवल्याखेरीज राहिलें नाही. तीनशें साडेतीनशे वर्षांनंतर फिरून आता या शहरास जवळ जवळ राजधानीची पूर्वस्थिति प्राप्त झाली आहे. मध्यंतरी जिंजीस जातांना राजाराम महाराजांवर येथेच मोठें प्राणसंकट गुदरल्याचें इतिहासज्ञांस माहीतच आहे. त्यानंतरच्या पेशवाईंतहि या गांवच्या किल्ल्याला वेढे बसलेले आहेत व लढाया झालेल्या आहेत. मी मुद्दाम किल्ला पाहाण्यास गेलों, पण आता तेथे एखाद्या बुरजाखेरीज किंवा मोडक्या तटाच्या तुटक्या तुकड्याखेरीज कांही शिल्लक राहिलेलें नाही. तथापि शहाजीच्या निवासामुळे पवित्र झालेल्या वास्तूस कदाचित् आपण स्पर्श करीत असूं या कल्पनेनेहि केवढा आनंद होतो ! शिवचरित्र संशोधन कार्यापैकींच हा एक भाग समजून इतिहाससंशोधकांनी येथे कांही उपक्रम सुरू केला व तत्कालीन अवशेषावर कांही प्रकाश पाडला तर फार चांगलें होईल !

### विजयानगर

दुसरे दिवशीं हॉसपेटला उतरून सर्व दिवस हंपी विजयानगर पाहिलें व तिसरें दिवशीं सकाळीं बदामी स्टेशनवर आलों. बदामीचीं कोरीव लेणीं आणि तेथला इतिहासप्रसिद्ध

किल्ला पाहाण्यासारखा आहे. हें ठिकाण प्रथम आमच्या कार्यक्रमांत नव्हतें. तें मागाहून दाखल करण्यांत आलें. पण त्यामुळे माझी फार दिवसांची इच्छा अचानक पूर्ण होण्याचा योग आला. 'शिपाई रोहिले जाट गाठ न पडलि हैदऱ्याची खबर ऐका बदामिची' किंवा 'सत्राशें सातांत बदामी। हल्ल्याखाली केलि रिकामी। एकेक मोहरे नामी नामी! फार उडाले रणसंग्रामीं।' इ. शाहिरांच्या पोवाड्यांतली वर्णनें व परशमभाऊच्या बदामीच्या वेळ्याची ऐतिहासिक कागदपत्रांतली वर्णन मी पूर्वी कांहीं प्रसंगाने अभ्यासिली होतीं. यामुळे त्यांत आलेल्या ठिकाणांचा पुन्हा पुन्हा निर्देश होऊन तें तें स्थळ प्रत्यक्ष डोळ्यासमोर दिसूं लागलें तेव्हा जें सम्यक् ज्ञान झालें व आनंद झाला तो विशेष होता. उदाहरणार्थ पोवाड्यांत अशी माहिती होती कीं, १७८६ सालीं टिपूच्या या किल्ल्याला वेढा पसला त्या वेळीं नागपूरकर भोसल्यांचा मोर्चा तळ्याकाठी होता, व तेथें एक दिवस किल्ल्यावरील तोफेचा गोळा पडून मोठाच हाहाःकार झाला. त्या वेळीं मला उपलब्ध झालेल्या कागदपत्रांत तळ्याचा कोठेंच उल्लेख नव्हता. पण या वेळीं बदामीच्या किल्ल्यालगतचें तें मोठें थोरलें तळें पाहातांच जो आनंद झाला त्याची किंमत कोण करूं शकेल?

## बदामीचीं लेणीं

स्टेशनपासून बदामीचीं लेणीं, किल्ला व बनशंकरीचें प्रसिद्ध देवस्थान हीं सुमारें तीन मैलांवर आहेत. बनशंकरीचें देवालय फार पुरातन व प्रसिद्ध आहे. बदामीच्या वेळ्यांत गांव लुटला गेला त्या वेळीं पुजाऱ्यांनीं बनशंकरीचे दागिने पुरून टाकले. पण पुढे पुजाऱ्यांस पकडल्यावर त्यांचेकडून त्या वस्ता काढवून परशराम-भाऊंनीं सरकारांत दाखल केल्या. बदामीचा किल्ला हा म्हटला तर डोंगरी आहे, म्हटला तर नाहीं. कारण ज्या डोंगरावर तो आहे तो फारसा उंच नाहीं अगदींच खुजा आहे. मात्र त्याला मोठमोठ्या सरळ दरडी असल्यामुळे तो बराच अवघड आहे. या डोंगरावरील भेगांची व कपारींची बरोबर कल्पना यावयाची तर पावसाळ्यानंतर तापलेल्या शेतवावरांत पडलेल्या खोलखोल चिरांची कल्पना करावी. यांपैकीं पुष्कळ भेगा अगदीं तळापर्यंत पोचलेल्या असल्यामुळे असे अनेक कडे एकत्र जोडूनच हा डोंगर बनविल्यासारखा दिसतो. किल्ल्याची टेंकडी अगदीं थेट एखाद्या अजस्र घोडनालाच्या आकृतीसारखी आहे. या घोडनालाच्या मधल्या सबंध पोकळींत वर उल्लेखिलेलें सुप्रसिद्ध तळें भरलेलें आहे. या तळ्याच्या डाव्या हातच्या अर्ध नालाकृती टेंकडीवर किल्ल्याचा एक भाग आहे, व उजव्या हातच्या अर्धनालाकृती टेंकडीवर किल्ल्याचा दुसरा भाग व बदामीचीं प्रसिद्ध लेणीं आहेत. आम्हीं प्रथम उजव्या बाजूचा भाग पाहिला. थोडेसे डोंगरावर चढून गेल्यावर एकावर एक थोडथोड्या अंतरावर हीं लेणीं आहेत. कार्ली वगैरे लेणीं ज्यांनीं पाहिलीं असतील त्यांना त्यांत विशेष कांहींच वाटण्यासारखें नाही. लेण्यांत निरनिराळ्या देवतांच्या मोठमोठ्या मूर्ति कोरल्या आहेत. त्या मात्र प्रेक्षणीय आहेत. त्यांपैकीं सर्वांत वरच्या लेण्यासमोर थोडेसें अंगण करून दगडी कठडा घातला आहे. तेथून खालच्या तळ्याचा व समोरच्या किल्ल्याचा देखावा मात्र फार उत्कृष्ट दिसतो. तिसऱ्या लेण्याच्या जवळच उजव्या हातच्या खड्कांत किल्ल्यावर जाण्याचा दरवाजा आहे. तेथून कंबरकंबर उंचीच्या पंचवीसपर्यंत पायऱ्या चढून जाव्या लागतात. त्या चढून गेलें म्हणजे आपण दरवाज्यावरील बुरजाच्या तटावर येतों. वर तटाची भिंत थोडीथोडी कोठें शिल्लक आहे. बाकी सर्व उजाडच आहे. येथे एक दगडी तोफ पडलेली दिसली. हा भाग पाहून खालीं उतरलों. व तळ्याकडून किल्ल्याचा डावा डोंगर चढून गेलों. या भागांत मात्र कांहीं जुने अवशेष शिल्लक आहेत. दगडी दरवाजांच्या चौकटी, तटाच्या भिंती व दोनचार देवळें वगैरे. अगदीं पर्वच्या टोंकास असलेल्या एका बुरुंजावर एक जुनें देऊळ आहे. व त्या बुरजावर खालीं गांवांत मारा करीत असल्यासारखी एक जुनी मोठी दगडी तोफ धमधमा रचून त्यावर ठेवण्यांत आली आहे. असो. किल्ला पाहून सुमारें बारा वाजतां खालीं गांवांत आलों व तेथून स्टेशनपर्यंत सर्व रस्ता दुतर्फा झाडें लावून छायावृत झालेला असल्यानें चालतच स्टेशनवर गेलों. सायंकाळीं ६ वाजता विजापूर स्टेशनवर गाडी १ तास उभी करण्यांत आली होती. तेवढ्यांत स्टेशनाच्या अगदी समीप असलेला गोलघुमट पाहून घेतला. नंतर हुटगीवर गाडी बदलून दुसरे दिवशीं सकाळीं ठरल्याप्रमाणें पुण्यांत दाखल झालों.

# मुंबई इलाख्यावरील अमावास्येची मध्यरात्र

मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांची मुदत आता संपली आहे. यंदाचें वर्ष हें त्यांच्या कारकीर्दीचें शेवटचें वर्ष होय. गेल्या चार वर्षांच्या काळांत मुंबई इलाख्याने त्यांचें नांव कौतुकाने घ्यावें असें एकहि सत्कृत्य त्यांच्या हातून घडलें नाहीं. इलाख्याचीं राज्यसूत्रें चालवूं लागल्यापासून त्यांचा बहुतेक काळ कायदेभंगाच्या चळवळींतील दडपशाहींनेच व्यापला; या कारणाने ते जनतेला एकंदरीने अप्रियच झाले आहेत. परंतु दडपशाहीच्या कांटेरी लगामाने जनता इतकी दीन बनली आहे कीं, तिला या बाबतींतील आपलें हृद्गत तोंडावाटे बोलून दाखविण्याचीहि हिंमत उरलेली नाहीं. अशा स्थितींत एक तर राजनिष्ठेचे पोवाडे गावे किंवा स्वाभिमानाने गप्प बसून मनांत कुढत असावें याशिवाय तिसरा मार्गच तिला उरलेला नाही.सर साइक्स यांनी कोंकण, कर्नाटक, महाराष्ट्र, गुजराथ व सिंध या प्रांतांतून दौरा काढला, व तो नुकताच संपविला त्या वेळीं हाच अनुभव सर्वत्र आला. गव्हर्नरसाहेबांनी दौऱ्यावरून परत आल्यावर मुंबईस कायदे कौन्सिलाच्या बैठकींत गेल्या सोमवारीं भाषण केलें. त्यांत त्यांनी कायदेभंगाच्या चळवळीस बंड या शब्दाने संबोधलें आहे. कायदेभंगवाले लोक हे बंडखोर आहेत; त्यांनी बंडाचा बावटा उभारून इंग्रजसरकारचा मुंबई इलाख्यांतील मुलूख सर केला; तो आपण परत जिंकून इंग्रजी राज्यास जोडला;अशा प्रकारचा अहंकार गव्हर्नरांच्या भाषणांत शब्दागणिक घुमत आहे.

गव्हर्नरसाहेबांनी आपल्या दौऱ्याकरितां कित्येक शहरें व गांवें मुद्दाम निवडून काढल्यासारखीं दिसलीं. ज्या ठिकाणीं चळवळीचा जोर विशेष त्या ठिकाणीं जाऊन त्यांनी आपला गौरव आग्रहाने करून घेतला. मानपत्रें स्वीकारतांना आपण अजिंक्यपलेंच काय पण शरणचिठ्या घेत आहों, राजनिष्ठेच्या स्तुतिपर शब्दांतून खंडणीचे पैसे उकळीत आहों व इलाख्यांतील अष्ट दिशांनी हिंडून दिग्विजय करीत आहों या आनंदाने त्यांचें अन्तःकरण उल्लसित झालें असावें. पण अन्तःकरणांतील आनंदाचे हे कल्लोळ त्यांनी मुंबईच्या कौन्सिलांतील आपल्या भाषणांत स्वैरपणाने उसळूं दिले तर तो मुत्सद्दीपणा कसला व इंग्रजी बाणा तरी कसला? सर साइक्स यांच्या भाषणांतील शब्दांवर फुलांतून जसे दवाचे तुरळक थेंब उडावे तसा आनंदाच्या बारीक तुषारांचा थोडथोडा वर्षाव झाला आहे. पण कौन्सिलांतील भाषण करण्यांत आपला प्रमुख हेतु आनंदप्रदर्शनाचा आहे यावरून लोकांचें लक्ष उडविण्याकरितां त्यांनी तो प्रजावात्सल्याने व औदासीन्याने झांकून घेण्याचा बाह्यतः प्रयत्न केला आहे.

मुंबई इलाख्यांत सांप्रत शांतता आहे; पण ती कशी आहे हें सर्वांना माहीतच आहे. गडबड कराल तर तुरुंगांत पडाल असा जनतेस धाक घालून ती निर्माण करण्यांत आली आहे. तिच्या मुळाशीं संतोष किंवा समाधान यांपैकीं कोणतीहि भावना नसून भीति व निरुपाय यांची विषण्णता मात्र पसरली आहे. पिंजऱ्यांत वाघ कोंडावा व पिंजऱ्यावरील शिपायाने पिंजऱ्याबाहेर आडवें होऊन झोप घ्यावी त्यासारखी झोंप घेण्याचें सोंग इंग्रजसरकार सध्या आणीत आहे. पिंजरा उघडला कीं वाघ छातीवर बसेल याची भीति इंग्रज सरकारालाहि आहे. अशा रीतीने पिस्तुल रोखून उसनी घेतलेली शांतता ही काय शांतता म्हणावयाची? व ती उत्पन्न करणाराने तिच्यांत भूषण तरी काय मिरवावयाचें ? सर फ्रेड्रिक साइक्स यांनाहि मुंबई इलाख्यांतील शांततेचें इंगित माहीत असल्यामुळे तेहि तिच्यांत भूषण मानीत नाहीत.

ते म्हणतात, "शांतता! राजकीय क्षेत्रांत शांतता आहे खरी,पण ती आम्हांला हवी त्या प्रकारची नाही. देशांतील आर्थिक व राज्यघटनेचे प्रश्न सोडविण्याकरितां जी शांतता पाहिजे ती ही शांतता नव्हे. स्वराज्याच्या अरुणोदयकाळीं नांदणाऱ्या शांततेंत रम्यपणा दिसावयास पाहिजे तो या शांततेंत दिसत नाही. " ही भयाण शांतता जर नको तर ती रम्य शांतता कां आणीत नाही असा प्रश्न ब्रिटिश सरकारास कोणी विचारील. त्याचें उत्तर गव्हर्नरसाहेबांनी मुंबईतील आपल्या भाषणांत दिलें नसलें तरी हिंदुस्थान सरकाराच्या गृहमंत्र्यांनी दिल्लीस असेंब्लींतील आपल्या भाषणांत दिलेंच आहे. त्यांची शंका अशी कीं,म. गांधीप्रभृति कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना आम्हीं मुक्त केलें तरी ते पुनः कायदेभंगाची चळवळ हातीं घेणार नाहीत याविषयीं आम्हीं खात्री कशी बाळगावी? म. गांधी किंवा कॉंग्रेसचे तुरुंगाबाहेरील मोकळे पुढारी यांनी आपसांत ठरवून सरकारची आपल्या पुढील धोरणासंबंधाने खात्री पटविली तर सरकार कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना सोडून देण्यांत माघार घेणार नाही असा हेगसाहेबांच्या उत्तराचा इत्यर्थ आहे. हेगसाहेबांना मुख्यतः शांततेचा

गरज आहे मग ती प्रतिपक्षाच्या डोक्यावर पिस्तुल रोखनहि राखण्यास हेगसाहेब तयार आहेत. हेगसाहेबांचें जें उत्तर तेंच साइक्स यांचेंहि उत्तर. तथापि हेग यांच्याहि पुढे जाऊन साइक्स यांनी आणखी एका गोष्टीची कबुली दिली आहे.

पिस्तुलाच्या धाकांत जी शांतता प्रस्थापित केली आहे तिचें साइक्ससाहेब भूषण मानीत नसले तरी त्यांना तिचा एक प्रकारें धन्यता मात्र खास वाटत आहे. कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनी गेल्या वर्षी बंडाचा बावटा उभारला, त्या वेळी ही शांतता लाभण्याची आशा आपणास कोठे होती, असे उद्गार सर फ्रेड्रिक साइक्स अभिमानपूर्वक काढीत आहेत. यावरून कायदेभंगाच्या चळवळीने आपल्या प्रभावानें सरकारास गेल्या वर्षी कसें गांगरून सोडलें होतें, याची उत्तम साक्ष पटते. ही चळवळ चिरडून टाकण्याची जबाबदारी एकट्या ब्रिटिश सरकारनें पार पाडली असती तर त्यांत गव्हर्नरसाहेबांना प्रौढी मिरविण्यासारखें फारसें कांहीं नव्हतें. कारण सरकाराचें सामर्थ्य तसेंच अलोट आहे. पण त्यांना आपले हात गगनाला लागल्यासारखे वाटले ते निराळ्याच गोष्टीमुळे. या बाबतींत मुंबई कौन्सिलाच्या मागील बैठकीने सरकाराची उमदी कामगिरी बजावली! गेल्या वर्षी सरकारानें काढलेल्या वटहुकुमांच्या विरुद्ध हिंदी जनतेनें आपल्या आक्रोशानें आकाशपाताळ एक करून सोडलें होतें. ते वटहुकूम कायद्याच्या रूपानें कौन्सिलापुढे मंजुरीकरितां मांडले असता कौन्सिलाचे लोकनियुक्त सभासद त्यास संमतीची मान तर डोलविणार नाहीतच, पण त्यांचे फाडून तोडून संतापानें तुकडे उडवितील अशी सरकारासहि कांहीं अंशीं चिंता पडली होती. म्हणूनच व्हाइसरॉयांनी दडपशाहीचे वटहुकूम आपल्या अधिकारांत काढून ते वर्षभर तसेच टिकविले. परंतु सरकारची ही चिंता अनाठायीं आहे असें ले. असेंब्ली व कौन्सिलें यापुढे दडपशाहीचे कायदे मंजुरीकरितां आले तेव्हा त्यांतील सभासदांनी सरकारच्या प्रत्ययाला आणून दिलें!

मुंबई कौन्सिलाचे सभासद सरकारचे केवढे निस्सीम दोस्त व पाठीराखे! त्यांना स्वदेश बांधवांपेक्षा व कॉंग्रेसभक्तांपेक्षा सरकारचाच कळवळा अधिक आला. त्यांचेंहि मत कॉंग्रेसची चळवळ चिरडलीच पाहिजे व कॉंग्रेसचे पुढारी तुरुंगांत घालून भरडलेच पाहिजेत असें पडून वटहुकुमांची जहरी पिलें अशीं जीं बिलें त्यांना त्यांनी मंजुरी दिली. अशा या नरपुंगवांना व सरकारच्या जिगर दोस्तांना डोक्यावर घेऊन नाचूं कीं, पालखींत घालून वाजत गाजत हिंडवूं असें सरकारास झालें असल्यास त्यांत काय नवल! गव्हर्नरसाहेब औदार्याच्या भाराखालीं वाकून व सद्गदित होऊन मुंबई कौन्सिलांतील सरकारच्या हिंदी भक्तांना उद्देशून म्हणतात, 'सभ्य गृहस्थ हो! तुम्ही आपल्या कृत्यानें माझ्या सरकाराला पाठिंब्याचा प्याला कांठोकांठ भरून दिला, इतकेंच नव्हे तर शांतता व सनदशीर राज्यपद्धति याप्रीत्यर्थ जे लोक हिंदुस्थानभर खपत आहेत त्यांच्यांत स्फूर्ति उत्पन्न करण्यास कारणीभूत झाला आहां!' गव्हर्नरसाहेबांनी कौन्सिलांतील आपल्या बगलबच्च्यांच्या पाठीवर ही शाबासकीची थाप इतक्या जोरानें मारली आहे कीं, त्यापेक्षा कंबरेत एखादी लाथ बसती तरी बरें होतें असेंच पुष्कळांना वाटलें असेल! गव्हर्नर साहेबांचे हे उद्गार ऐकून कौन्सिलांतील सभासदांच्या मनाची अवस्था काय झाली असेल ती त्यांची त्यांनाच माहीत!

गेल्या वर्षी लोकमताला गवसणी घालण्यांत आली ती अद्यापि कायम असून आणखी तीन वर्षेपर्यंत तिचा आयुर्दाय वाढला आहे. त्यामुळे देशांतील नैमित्तिक कायदेभंगाचीच काय पण दुसरी नित्याची प्रत्येक राजकीय चळवळ बंद पडून सर्वत्र भयाणपणा पसरला आहे. या भयाणपणाला भिण्याचें किंवा धाक घालण्याचें मुळीच कारण नाहीं असें व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन व गृहमंत्री सर हॅरी हेग हे सांगत आहेत. व्हाइसरॉय व गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स पुढील 'राजकीय सुधारणाकडे डोळे लावून बसले आहेत. राजकीय सुधारणा लवकरच अवतरतील, नवीन कायदेमंडळांचीं कामें सुरू होतील, जनतेला विस्तीर्ण कार्यक्षेत्र लाभून तिच्यांतील कर्तृत्ववान देशहितैषी व महत्त्वाकांक्षी माणसें आपापल्या कामांत दंग होऊन राहतील व त्यांच्या कानावर असहकारितेचा किंवा कायदेभंगाचा मंत्र घालणारा कोणी न उरल्यामुळे कार्यकर्त्यांना व सामान्य जनतेलाहि या प्रकारच्या चळवळीचा विसर पडेल. त्यानंतर म. गांधी प्रभृति राष्ट्रीय सभेचे पुढारी सुटून आले असतांहि त्यांजकडे नेते या नात्यानें हिंदी लोक ढुंकूनहि पाहणार नाहीत व अशा रीतीनें ते निष्प्रभ व निसत्त्व ठरतील' असा व्हाइसरायांचा कयास असून त्याच्याच आधारावर गांधिजींना तुरुंगांत अडकवून ठेवल्यानें आपण दूरदृष्टीचें राजकारण साधीत असल्याचा त्यांना विश्वास वाटत आहे.

भावी राजकीय सुधारणा हिंदी लोकांवर अशी मोहनी टाकणाऱ्या ठरतील तर त्यासारखा आनंद कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना देखील दुसरा कोणता आहे? कारण त्यांच्या चळवळीचा झाला तरी तोच उद्देश आहे. परंतु तो आनंदाचा दिवस

कधी उगवणार असेल तो असो, सध्याची वेळ मात्र अमावास्येच्या मध्यरात्रीप्रमाणे काळीकुट्ट व निराशाजनक भासत आहे. दडपशाहीचा बडगा पाठीत बसतच आहे. पण तो बसूनहि करांचा मार कमी होईल म्हणावें तर तीहि चिन्हें दिसत नाहीत. थॉमस कमिटीच्या शिफारसी अशा आहेत कीं त्या अमलांत आल्यास मुंबई इलाख्यांत विसाव्या शतकाचा अस्त होऊन मध्ययुगीन अज्ञानावस्था उदय पावेल असेंच म्हणावें लागतें. थॉमस कमिटीच्या सूचनांस अनुसरून कांही कपातीचे निकाल केल्याची व बाकीचे निकाल होण्याच्या मार्गात असल्याची भयसूचक घंटा गव्हर्नरसाहेबांनी वाजविली आहे. ही घंटा कोणकोणत्या उपयुक्त संस्थांच्या बाबतींत यमघंटा ठरून त्यांना मृत्यूची वाट दाखविणार आहे याचा अंदाज आज कोण करूं शकणार आहे. !

तथापि कांही लोकोपयोगी संस्थांच्या व खात्यांच्या डोक्यांत ही मुलतानी वीज कोसळणार यांत शंका नाही. परंतु इतका विध्वंस करून यंदाच्या बजेटांत जमाखर्चाची तोंडमिळवणी परभारें होणार आहे म्हणावें तर तसेंहि नाही. त्यासाठी नवीन करांची भरती करण्याकरिता मुंबई इलाख्यांतील रयतेने आपल्या तोंडचा घास काढून ठेवलाच पाहिजे. बिचारे गरीब लोक अन्नाने पोट न भरलें तरी तंबाखूची चिमूट तोंडांत टाकून किंवा विडीचा धूर सोडून जिवाला सांसारिक तापत्रयाचा विसर पाडीत आहेत. पण तंबाखूवर दारूप्रमाणे परवान्याची अट लादून तंबाखू खाण्याचें सुखहि हिरावून घेण्याचा मुंबई सरकारचा विचार दिसतो. त्याखेरीज स्टँप ड्यूटी व वीज यावरील नवीन कर आहेतच आणि ८।९ वर्षांपूर्वी सडकेवरील कांही ठिकाणची दस्तुऱ्यांचीं नाकीं उठविल्याने गाडीवानांचे दोन सव्वादोन लाख रुपये वांचत असत; तेहि सदर नाकीं पुनः बसवून लोकांपासून चोपून वसूल करण्याचा व नवीन नाकींहि सुरू करण्याचा निश्चय सरकाराने नुकताच सर्वांच्या कानांवर घातला आहे. हीं सगळीं संकटें लक्षांत घेतल्यास यंदाच्या वर्षाइतकें खडतर वर्ष मुंबई इलाख्याच्या वाट्याला पूर्वी कधीच आलें नव्हतें असें म्हणावें लागतें.

# मुंबईच्या गव्हर्नरांचें भाषण

### सिंध विभक्त होणार !

मुंबई येथे ता. ६ रोजीं मुंबई कायदेमंडळाच्या 'अंदाजपत्रकाच्या' बैठकीला सुरुवात झाली कायदेमंडळाचें उद्घाटन करताना ना. गव्हर्नरसाहेब यांनी जें भाषण केलें त्याचा सारांश पुढे दिला आहे. प्रथम प्रांताच्या हलाखीचें ओझरतें वर्णन करून गव्हर्नरसाहेब म्हणाले, " आपल्याला सिंध गमवावा लागत आहे,हें ऐकून कित्येकांना निःसंशय वाईट वाटेल.मुलगा वयांत आल्यावर त्याला स्वातंत्र्य देतांना आईबापांना होणारें दुःख आपल्याला सिंध वेगळा करताना वाटणें साहजिक आहे. परंतु इतक्या दिवसांच्या साहचर्याने परस्परामध्ये जो एक ऋणानुबंध निर्माण झाला आहे, त्याचा विचार करता, परस्परांतील स्नेहाचें नातें तुटणार नाही असा विश्वास वाटतो.शिवाय आपण सिंधच्या न्याय्य आकांक्षा तृप्त केल्याबद्दल आपल्याला सात्त्विक समाधानहि मिळणार आहे. त्या प्रांतांतून मी नुकताच दौरा काढून आलों. त्यावरून तेथील धरणाचें काम बव्हंशीं पूर्ण झालेलें असून त्याचा फायदा पुष्कळशा लोकांना मिळेल असें मला दिसलें. सिंध वेगळा करण्याबद्दल जो निर्णय झालेला आहे, तो आपल्याला मान्य केलाच पाहिजे. सिंधचा जो नवीन प्रांत बनणार आहे, त्यावर अर्थातच सुरुवातीस राज्यकारभाराचें मोठेंच जोखमीचें व जबाबदारीचें काम पडणार आहे."

### अंदाजपत्रकाची तोंडमिळवणी

प्रांताच्या भावी आर्थिक स्थितीसंबंधी बोलताना प्रांताधिपति म्हणाले, "गेलीं बारा वर्षे हिंदुस्थान सरकार व मुंबई सरकार यांमध्यें आर्थिक बाबतींत जी व्यवस्था चालू आहे ती, हा औद्योगिक प्रांत आहे हें लक्षांत घेता, अन्याय्य आहे. आजपर्यंतचा अनुभवहि तसाच आहे. म्हणून नव्या राज्यघटनेत आपल्या प्रांताच्या वाट्याला उत्पन्नाच्या बाबींची न्याय्य विभागणी यावी याबद्दल मीं व माझें सरकार अविरत प्रयत्न करीत आहों व पुढेहि करीत राहणार. उत्पन्नाच्या अशा न्याय्य विभागणीनेच आर्थिक सुस्थिति निर्माण होऊन जमाखर्चाचा तोल सावरणार आहे. जमाखर्चाची अशी तोंडमिळवणी झाली म्हणजे इतर राष्ट्रीय योजनांना हात घालता येईल. आर्थिक सुस्थितीशिवाय राजकीय स्थैर्य उत्पन्न होणें अशक्य आहे. प्रांतिक स्वायत्तता यशस्वी होण्यास आर्थिक स्थितीचा काटा अचल राहिला पाहिजे. अशी समाधानकारक स्थिति प्राप्त झाल्यावर मुंबई इलाखा सर्व हिंदुस्थानांत अधिक प्रगमनशील होईल अशी मला खात्री वाटते. पुढे काय व्हावयाचें असेल

तें होवो, तात्कालिक आपलें कर्तव्य म्हणजे प्रांताचें बजेट आंतबट्ट्याचें कसें न राहील याचा प्रयत्न करणें हें होय. बजेटांतील खोट भरून काढण्यासाठीं आम्ही सरकारी नोकरांच्या पगारांत कपात केली व ती आणखी एक वर्ष कांहीं कमी प्रमाणांत चालू राहणार आहे. ही कपात यंदाच रद्द केली तर सरकारच्या गंगाजळीवर मोठाच ताण पडेल. म्हणून कपात चालू ठेवणें आम्हांस भाग पडत आहे. शिवाय राज्यकारभारांत आणखी कोठें काटकसर करतां येणें शक्य आहे कां, याची पाहणी करण्यासाठीं सरकारनें एक चौकशी-मंडळ नेमलें होतें ही गोष्ट सर्वांना माहीतच आहे.

## पुनर्घटनामंडळाच्या शिफारशी

आतापर्यंत सरकारानें निरनिराळ्या खात्यांची आर्थिक दृष्ट्या जी पाहणी केली, तिचें एकत्रित स्वरूप पुनर्घटना-मंडळाच्या अहवालांत सर्वांना दिसून येईल. पुनर्घटना-मंडळानें केलेल्या शिफारशींपैकी कित्येक शिफारशींसंबंधीं तावडतोब निर्णय लावणें सरकारला आवश्यक वाटतें. असा निर्णय लावल्यामुळें आर्थिक दृष्ट्या तावडतोब होण्यासारख्या सुधारणा करता येतील; आणि दुसरें असें कीं, मंडळाच्या शिफारशीमुळें ज्यांना धोका पोहोचणार आहे, त्यांच्या मनांतून अनिश्चिततेचें धुकेंहि त्यामुळें विरून जाईल. कांहीं शिफारशीबद्दल सरकारनें आपल्या मनाशीं ठाम निर्णयहि लावले आहेत. पुनर्घटना-मंडळाच्या ज्या शिफारशी सरकारला न्याय्य व व्यवहार्य वाटतील, त्याबद्दल सरकार काय तें उपाय तावडतोब अंमलांत आणीलच. परंतु तसें करतांना सरकार, पूर्वी दिलेलीं अभिवचनें व करारमदार पाळण्याचा आटोकाट प्रयत्न करील, व शक्य तितक्या अधिक संस्थाहि सुरक्षित ठेवण्याची दक्षता घेईल, याची सर्वांनी खात्री बाळगावी.

## भावी धोरणाची रूपरेषा

पुनर्घटनामंडळाच्या शिफारशींना धरून यंदाचें बजेट करता आलें नाहीं. तरी चालू अधिवेशनांत सरकार जीं निरनिराळीं बिलें आणणार आहे, त्यांना आपण संमति दिल्यास नवीं कर्जें न काढताहि सरकारला आपल्या अंदाजपत्रकाची तोंडमिळवणी करता येईल. वाढतें उत्पन्न व काटकसर यामुळें अंदाजपत्रक समाधानकारक होईल अशी मला आशा वाटते. अशा तऱ्हेने बजेटाला सुस्थिति आणण्याचा मनःपूर्वक प्रयत्न होत असतानाच प्राथमिक शिक्षणाला अधिक मदत देण्याचें, ग्रामपंचायतींचा प्रसार करण्याचें व मुंबई शहरांतील इस्पितळांत रोग्यां घेण्याची चालू असलेली पद्धत यंदाहि तशीच सुरू ठेवण्याचें सरकारनें ठरविलें आहे. रोग्यांच्या शुश्रूषेसंबंधींचें श्रेय सरकारकडे येत नसून तें खाजगी दातृत्वालाच दिलें पाहिजे. या बाबतींत वेस्टर्न इंडिया टर्फक्लबानें मोठीच मदत केली."

## कायदेभंगाची घातुक चळवळ !

राजकीय परिस्थितीविषयीं बोलताना छोटे लाट म्हणाले, "आपल्याला आर्थिक आपत्तिच केवळ त्रास देत नसून तिच्या बरोबर कायदेभंगाची घातुक चळवळहि त्रास देत आहे. ही चळवळ उत्पन्न झाली नसती, तर आपल्याला आज तिच्या निवारणासाठीं जो पैसा खर्च करावा लागतो तो लागला नसता, व त्यामुळे साहजिकच आपली आर्थिक स्थितीहि निराळ्याच स्वरूपांत दिसली असती. भावी राज्यघटना सुस्थिर व्हावी एतदर्थ आपण जो आर्थिक व राजकीय मार्ग चाखाळीत आहों, यामुळें हिंदुस्थान व इंग्लंड यांमधील लोकांमध्यें अधिकाधिक समेटच जुळून येत आहे असें मला निःसंशय वाटतें. कायदेभंगाची चळवळ व आर्थिक मंदी या दोन कारणांमुळे उत्पन्नांतहि थोडी खोटच येत आहे या दोन विपत्तींपैकीं पहिलीच तेवढी विपत्ति असती तरीहि नोकरांची काटकसर व करवाढ यांची मागणी सरकारानें केली नसती.

## कराचा भार श्रीमंतांवर!

नवी जी करवाढ होणार आहे तिचा भार गरिबांपेक्षा श्रीमंतांवरच पडणार आहे. शेतसारा आणि मादक पदार्थांवरील कर यांपासून सरकारला हल्लीं जें उत्पन्न मिळतें तें दहा वर्षांपूर्वी मिळत असलेल्या उत्पन्नांपेक्षा पुष्कळच कमी आहे. सरकार कायदेमंडळापुढे बजेट व कराचीं बिलें लवकरच मांडणार आहे. त्याचा सभासदांनीं निर्विकार बुद्धीनें विचार करावा ! " कायदेमंडळानें ग्रामपंचायतीचें बिल लवकर संमत करावें; कारण त्यामुळे कित्येक ग्रामपंचायतींमध्ये नवें चैतन्य संचारून नव्या ग्रामपंचायतीहि उत्पन्न होतील, अशी गव्हर्नरांनी आशा प्रकट केली. नंतर कराची येथे म्युनिसिपल कॉर्पोरेशन स्थापण्यासंबंधी व इंप्रूव्हमेंट ट्रस्टचे अधिकार मुंबई कार्पोरेशनकडे देण्यासंबंधी अशीं आणखी दोन बिलें सरकार आणणार असल्याचें सांगून प्रांताधिपतींनी आपलें भाषण संपविलें.

# औद्योगिक शिक्षणाची मीमांसा

( ले. म. वि. आपटे, बी. एससी. एम्. बी. बी. एस. )

बेकारीवर इलाज काय ? असा प्रश्न उद्भवला असतां ' उद्यम वाढवा ' असा उपदेश वारंवार कानीं पडतो. हा उपदेश कितपत योग्य आहे याचा विचार ता.१७-१ च्या लेखांत करून त्यांत असे दाखवून दिलें आहे की, उद्यम कमी पडला म्हणून बेकारी झाली अशी वस्तुस्थिति नसून विनिमय सदोष झाला म्हणून बेकारी झाली. तो सुधारेल तेव्हा बेकारी संपेल. तेथेच असेंहि प्रतिपादन केलें आहे कीं, उद्यमाची वाढ करणें हा समाजप्रगतीचा स्वभावक्रम आहे, उद्यम सोडून चालावयाचें नाही तर तो नेटानें वाढविला पाहिजे. आपल्याकडे उद्यम ही गोष्ट बऱ्याच जणांना थोडथोडी माहीत होत चालली आहे. परंतु उद्यमशिक्षण म्हणजे काय या गोष्टीची माहिती यथार्थतेनें जाणणारा मनुष्य फारच क्वचित् दृष्टीस पडतो. म्हणून प्रस्तुत लेखांत उद्यमशिक्षणासंबंधी चार मूलभूत गोष्टींचें विवरण करण्याचें योजिलें आहे.

## उद्यम व कला

मनुष्य आपल्या बुद्धिमत्तेनें व अभ्यासानें आपल्या कर्मेंद्रियांत जेव्हां विशेष सामर्थ्य आणतो तेव्हा तो कलावान् बनतो, आणि असे अनेक कलावान हाताखाली वागवून त्यांच्या समवायानें विशेष काम करतो तेव्हा तो उद्यमी बनतो. एकेक सुतार व्यक्तिशः कामधंदा करतो तेव्हा तो व्यक्तिशः कलावंत असतो. अनेक सुतार हाताखाली घेऊन जेव्हा एखादा मनुष्य कारखाना उभारतो, तेव्हा तो उद्यमी होतो. सुतार, लोहार, कातार, कासार, धनगर, धनगर, विणकर, शिंपी, धोबी, न्हावी हे सर्व व्यक्तिशः कलावंत होत. यांतले अनेक प्रकारचे अनेक कलावंत एकत्र झाले तर त्यांना आपसांत कामाची वांटणी करून आपल्या कलेच्या एकेका अंगाची विशेष वाढ करिता येते. अनेक सुतारांचा संघ जमला तर एकानें घर-उभारणींतली सुतारी करावी, तर दुसऱ्यानें सामान-सुमानाची सुतारी करावी, आणि तिसऱ्यानें शोभासजावटीची सुतारी करावी, अशी कामाची वांटणी होऊं शकते. अशा रीतीनें कला वाढतात आणि मनुष्याचीं सुखसाधनेंहि वाढतात.

## उद्यमाचीं दोन अंगें

कलावंत आपली कला वाढवताना बुद्धि आणि कर्मेंद्रियें या दोहींचा उपयोग करीत असतो.तथापि या बाबतींत श्रमविभागतत्त्वानुसार कांही जणांनी बुद्धिविकासावर व कांहीजणांनी कर्मेंद्रियांच्या विकासावर भर दिला, तर कलेचा फारच मोठा उत्कर्ष होऊं शकतो. या अवस्थेमध्ये कर्मेंद्रियांच्या उत्कर्षाचें काम कलावंत पत्करतो आणि कलावंतांतले कांही थोडे लोक व विद्वान वर्गातले बरेचसे लोक बुद्धीच्या उत्कर्षाचें काम पत्करतात. विद्वान आणि कलावान हे जेव्हा परस्परांच्या आश्रयानें किंवा साहाय्यानें कामें करतात, तेव्हा उद्यमशिक्षणाचेहि दोन विभाग पडतात. एक विद्याशिक्षण आणि एक कलाशिक्षण. उद्यमाला जसजसें विराट स्वरूप येतें तसतसें उद्यमशिक्षण देणें हाच एक स्वतंत्र—म्हणजे सर्व वेळ त्यांतच खर्च करण्यास योग्य असा व्यवसाय होतो. आजच्या सुधारलेल्या जगांतील उद्यम हा या स्वरूपाचा आहेत.

## स्वदेशी टूथ पॉवडर

हल्ली जे अनेक लोकभ्रम प्रचलित आहेत. त्यांमध्ये कलेलाच उद्यम मानणे हा एक मोठा भ्रम आहे. उद्यमाचें नांव काढलें कीं, झाळकाम, विणकाम, सुतारकाम, इत्यादिकांची यादी पुढे येते. आजच्या पुढारलेल्या जगांत याला कोणीहि उद्यम म्हणणार नाही. या सर्व कनिष्ठ प्रतीच्या कला होत. कलावंताच्या हाताखाली उमेदवारी करणें, हेंच त्या कलेचें शिक्षण. आजच्या व्यवहारांत नुसत्या हमालीपेक्षा किंचिन् अधिक इतकेंच त्या कलेला मोल, अशी स्थिति आहे.पुष्कळ वेळा टथ पावडर आणि टूथ पेस्ट करणें हा एक उद्यम म्हणून सांगितलें जातें. पण ही निव्वळ भूल आहे. काड्या,दांडी,कापड आणि हा संच एकत्र जुळविण्याचीं सर्व साधनें अथवा हत्यारें, व शिकवणीचें सचित्र पुस्तक, हीं विलायतेहून आणून आमचा एखादा बोहरी जसा ' स्वदेशी छत्र्यांचा कारखाना ' काढतो तद्वतच हा प्रकार आहे ! खडू, त्याला लावायाचें वासाचें द्रव्य, रंगाचें द्रव्य, ती मिसळण्याचें यंत्र,आणि कलेच्या शिकवणीचीं पत्रकें, एवढी सर्व सामुग्री आयती तयार होऊन परदेशाहून येते.किंबहुना ती भरावयास लागणाऱ्या बाटल्या, बुचें आणि पाहिजे तर वर चिकटवण्याच्या आणि वांटावयाच्या जाहिराती यादेखील परदेशाहून येतात. एवढ्या माल-मसाल्यावर आमची ' स्वदेशी टूथ पावडर ' तयार होते!

## आमची काय ती मजुरी

'स्वदेशी' चा मुद्दा क्षणभर बाजूला ठेवला, तरी यांत शाळेंत शिकण्याशिकवण्याजोगें काय आहे, हें गूढच आहे. पुष्कळ लोक आज हा उद्योग करीत आहेत. त्यांची ओरड अशी आहे कीं, त्यांत पुरेशी किफायत होत नाहीं. खरोखर पाहतां, यांत मजुरीशिवाय आपलें जर कांहींच नसेल, तर किफायत मिळणार कशी ? कांहीं लोक त्या उद्योगावर श्रीमान् झाले असतील, तर तो केवळ भपक्याचा परिणाम आहे. अशा उद्योगांत मूळ व्यवसायापेक्षां भपक्यालाच भांडवल अधिक लागतें. त्या उद्योगानें व्यक्तिशः कोणी एखादा आपला उदय करून घेऊं शकेल. परंतु देशाच्या व्यवहारांत त्याला कवडीमात्र किंमत नाहीं. परदेशी सलग वस्तु आणून दिली, तर तिजवर प्रतिकार पडतो, म्हणून ती भागशः विकावयाची, ही एक युक्ति आहे. शिवाय परदेशच्या लोकांना आज इतक्या किरकोळ फायद्याची गरज नाहीं. तुकड्याचे पैसे घेऊन ते जोडण्याची मजुरी इतरांना मिळूं देण्याला त्यांची खुषी आहे. या धंद्यांना किंमत आहे ती इतकीच कीं, घरगुती, स्वाधीन परंतु अल्पमोली व्यवसाय म्हणून ते चालवावेत. मुलांची हौस पुरविण्याकरितां म्हणून किंवा त्यांना जगाचा पसारा दाखवण्याकरितां म्हणून या कलांचा उपयोग शाळेमध्ये मुद्दाम करावा.

दंतमंजन करणें किंवा तसबिरीला चौकट बसविणें यापेक्षा वरच्या पायरीचे उद्योग म्हणजे साबण किंवा कांच करण्याचे कारखाने घेतां येतील. या दोनहि धंद्यांना कला आणि विद्या या दोहींचा संगम असावा लागतो. अगदीं हलक्या प्रतीचा साबण करणें, हें दंतमंजन करण्यासारखेंच आहे. जरा वरच्या प्रतीचा साबण करण्यास कला आणि विद्या दोनहि थोड्याथोड्या अवगत करून घ्याव्या लागतात. पण त्यांतहि किफायत करावयाची म्हणजे यंत्रसाधनांचा उपयोग करावा लागतो. अर्थात् थोडीशी यंत्रविद्या यावी लागते. साबण करावयास कडक समुद्रखार आणि तेल असा माल लागतो. यांपैकीं खार परदेशी असतो. कांच तयार करण्यांत कला बरीच लागते. विद्याहि बरीच लागते आणि यंत्रसामुग्रीहि लागते. मालमसाल्यापैकीं नरम समुद्रखार परदेशी असतो.

## तळेगांवची कांचशाळा

देशांत उद्यमाची समृद्धि असून त्यांत कामकऱ्यांना सारखी मागणी असल्याशिवाय अशा धंद्याच्या धंदेशाळा म्हणून काढणें योग्य नसतें. यांत योग्य शिष्य व शिक्षक अशा दोघांचीहि वाण पडते! आणि एखादा शिष्य चांगला तयार झालाच तर त्याला धंद्याला लावून देणें कठिण पडतें. तथापि त्यानंतरची बेकारी फार भयाण स्वरूपाची असते. अशा धंद्याच्या कारखान्यांत लागणारीं कलावंत माणसें उमेदवार म्हणून कारखान्यांतच शिकलीं पाहिजेत. याला लागणारा विद्वान् कारखान्यांतच तयार व्हावयाचा. पण त्याला पूर्वशिक्षण मात्र एखाद्या विद्यापीठाच्या पदवीधराइतकें पाहिजे. आपल्याइकडील तळेगांवची 'कांचशाळा' हें अशा शिक्षणसंस्थेचें उत्तम उदाहरण आहे.

चित्र रेखाटणें, रंगवणें, कोरणें, ठोकळ्यावर बसवणें हे सर्व एकेकट्याला करण्याजोगे व्यवसाय आहेत. तथापि त्यांत थोडीशी कला व विद्या लागतेच. जगाच्या वाढत्या व्यवहाराबरोबर याची गरज वेगवेगळ्या स्वरूपांत समाजामध्ये वाढत जाणार हें निश्चित होय. परंतु या वाढत्या व्यवहाराशीं या कलावंतांचा संपर्क वरचेवर येत राहिला पाहिजे. रेखागणित, नेत्रविज्ञान, प्रकाशविज्ञान इत्यादि शास्त्रें आणि आधुनिक लौकिक व्यवहाराशीं परिचय करून देण्याकरिता व या छोट्या उद्यमांचें शिक्षण देण्याकरिता, शाळा उभारण्याची खरोखरीच आवश्यकता आहे. तथापि या शाळांच्या उत्कर्षानें देशाच्या संपत्तींत मोठीशी भर पडली असें होणार नाहीं. कारण या कलांना लागणारें सर्व साहित्य निर्माण करण्याचा जो श्रेष्ठ उद्यम तो परदेशाच्या हातांत आहे. चित्रपट उठवण्याची कला जरी अवगत झाली तरी तो पट ज्या पट्टीवर उठवावयाचा त्या पट्टीची निर्मिति आपण करूं शकत नाहीं. याकरितां लागणाऱ्या जिनसा आपणाला परदेशाहून आणाव्या लागतात. या मालावरची आयात जकात उठवा अशी आपणच सरकाराची विनवणी करतो.

## यंत्रें परदेशीच

जी स्थिति या किरकोळ धंद्यांची तीच बड्या धंद्यांची. आपण विलायती साखर खाणार नाहीं, परंतु स्वदेशी साखर करण्याला आपणाला यंत्रें विलायतेहून आणलीं पाहिजेत. तीं चालविणारा मुख्य नियंताहि विलायतेहूनच शिकवून आणला पाहिजे. विलायती कापड आपण वापरलें नाहीं, तरी कापड विणण्याचीं आणि सूत काढण्याचीं यंत्रें मात्र आपण विलायतेहूनच आणलीं पाहिजेत. विलायतेहून रंगवून आलेलें कापड आम्ही घेणार नाहीं, पण रंग आणि रंगविण्याचीं यंत्रसाधनें विलायतेहून आणून, 'स्वदेशी रंगारकाम' करूं. विलायती छपाई घेणार नाहीं, परंतु स्वदेशी छपाई करावयास विलायती यंत्रें आ[illegible] तात्पर्य असें कीं, मोटार चालविणारा स्वदेशी झाला

म्हणून मोटारचा प्रवास जितपत स्वदेशी, तितपतच हे सर्व धंदे स्वदेशी आहेत! असो. सध्या आपला मुद्दा स्वदेशीचा नाही. उद्यम-शिक्षणाचा आहे. त्या दृष्टीने पाहता, या धंद्याचे-देखील जें शिक्षण आम्ही येथे घेतो, ते सर्व मुख्यतः कलाशिक्षण होय. त्यांत विद्येचा अंश फारच थोडा असतो. तेवढ्या विद्येखेरीज कला–शिक्षणहि रुजत नाही. म्हणून तेवढी विद्याशिक्षणाची जोड द्यावी लागते व परिणामीं आम्ही कलावान च बनतो, विद्वान बनत नाही किंवा खरे उद्यमीहि बनत नाही!

### टेक्निकल इन्स्टिट्यूट

मुंबईला जेव्हा कापडाच्या गिरण्या प्रथम उभा राहिल्या, तेव्हा त्या चालविण्यास श्रेष्ठ नियंता आणि कनिष्ठ मजूर यांच्या मधला वर्ग पाहिजे होता. तो तयार करण्याकरिता व्हिक्टोरिया ज्युबिली कलाशाळा स्थापन झाली. गिरण्या पुष्कळ असून त्यांत नोकरांची गरज नेहमी चालू राहणारी असल्यामुळे, असें कलाशिक्षण वेगळ्या शाळेत देणें शक्य झालें. अर्थात् हा योजना जशा पाहिजे तशीच झाली. जायती संस्था स्थापन झाली होती, तेव्हा पाण्याच्या पुरवठ्याचे किंवा निचऱ्याचे नळ बसविण्याचे काम शिकविण्याची व्यवस्था तेथेच करण्यांत आली. परंतु तेंहि कलाच, तो उद्यम नव्हे.

आधुनिक व्यवहारामध्ये कागदाचा उपयोग अपाट्याने वाढत चालला आहे. कागदाच्या कारखान्याला लागणाऱ्या मालापैकी समुद्रखार आणि कागदाचा रांधा परदेशी आणावा लागतो. शिवाय यंत्र विलायती लागतातच. तथापि कागदाचा खप जवळ जवळ कापडाइतका होऊं लागल्यामुळे, कापडाखालोखाल कागदाच्या गिरण्यांची वाट व्हावयास पाहिजे. सध्या आपल्या देशांत चार-दोन कागदाचे कारखाने आहेत; पण त्यांची वाढ होण्यास पुष्कळ जागा आहे. या उद्यमाला भांडवल मोठें लागतें. शिवाय विद्या आणि कला दोन्हि चांगल्या असाव्या लागतात. या उद्यमांतील कलेचें व विद्येचें शिक्षण कारखान्यांतच मिळावयाचें. परंतु कापडाच्या कारखान्याप्रमाणे या कारखान्यांची संख्या वाढली तर त्यांच्या शिक्षणाच्याहि शाळा काढता येतील. अर्थात् या बाबतीत शिक्षण-संस्थांस पुढाकार घेतां येणार नाही. पुढाकार कारखानदारांनीच घेतला पाहिजे किंवा सरकाराने तरी घेतला पाहिजे.

### खरा उद्यम कोणता?

उद्यमाच्या शिडीवर चढता चढता, वरच्या पाय-रीवर गेलों असता, तेथे लोह गाळणें व वीज उत्पन्न करणें हे उद्यम आढळतील. ब्रिटिश मुलखांत हे दोन्ही उद्यम टाटा मंडळीने जमशेटपूर व खोपोली येथे मोठ्या प्रमाणावर चालविले असून, विजेचा उद्यम आणखीहि चार ठिकाणीं चालू आहे. याहि धंद्यांत विद्वान आणि कलावान या दोहोंनाहि उमेदवारी हेच अखेरचें शिक्षण होय. ही उमेदवारी देण्यापूर्वी कामाच्या दर्जाप्रमाणे पुष्कळसें सामान्य शिक्षण आणि चांगलें भरींव शास्त्रीय शिक्षणहि असावें लागतें. अशा उद्यमाची उभारणी करणें धनिकांच्या किंवा शासनसंस्थांच्या पाठबळावर अवलंबून आहे. म्हैसूर संस्थानांत भद्रावती येथे लोखंडाचा कारखाना आणि शिवसमुद्रम् येथे विजेचा कारखाना असे दोन कारखाने सरकारने उभारले आहेत. त्यांपैकी पहिल्या कारखान्याचें जीवित धागधुगीत आहे. तथापि दुसऱ्यापासून जबर फायदा होत असून, त्यांतून शिक्षणासारख्या खात्याला मोठी मदत होत आहे. कारखान्याची उभारणी सार्वजनिक स्वरूपाची म्हणजे सरकारी असणें एकंदर देशाला किती हितावह आहे, हे यावरून कळून येण्याजोगे आहे. उद्यमाभि-वृद्धीची ही सर्वांत उत्तम पद्धति होय. रंगद्रव्यें, गंधक आणि त्यांचा भाविक, अल्क आणि अम्ल तयार करण्याचे उद्यम, हे खरे अग्रगण्य उद्यम होत. परंतु त्यांपैकी एकहि उद्यम येथे चालू नाही. अम्लाचा एखादादुसरा कारखाना आहे, परंतु एकंदर देशाच्या उलाढालीत तो केवळ 'दर्यामें खसखस' होय!

### सारांश

उद्यमाची दोन अंगे आहेत; 'विद्या' हे एक अंग आणि 'कला' हे दुसरें; यांपैकी कलेचें शिक्षण कारखानदारांनी व्यक्तिशः किंवा समवायिकपणे द्यावयाचे असतें. कारखाना एखादाच असला, तर शिक्षणाची व्यवस्था त्याच कारखान्याने करावयाची. आणि कारखाने अनेक असले, तर समवायिक शाळा काढावयाची, अशी रीत आहे. कांही झालें तरी आर्थिक दृष्ट्या उद्यमाची नवीन स्थापना किंवा जुन्यां-तून वाढ किती होऊं शकेल याचा चांगला आढावा तयार करून, आगाऊ भांडवलाची उभारणी झाल्याखेरीज, अशा उद्यमीय कला शिकण्याच्या शाळा काढणें योग्य नव्हे.

बुद्धिबळावर कलावंतांना वागवणारा असा एक वर्ग कारखान्यांना नेहमी लागत असतो. याला 'इंजीनिअर' वर्ग म्हणतात. कारण वाफेचें इंजिन निघून उद्यमाला जेव्हा विराट स्वरूप आलें तेव्हा हा वर्ग उत्पन्न झाला. पूर्वी इंजिन चालविण्यास, कलावंतांना वागविणारा तो 'इंजी-निअर' असा अर्थ होता; पण हल्ली कोणत्याहि कलावंतांना एका सूत्रांत वागविणारा म्हणजे सामान्यतः 'प्रवर्तक' किंवा 'वर्तक' असा त्याचा

अर्थ झाला आहे. या वर्तक-वर्गाकरितां स्वतंत्र शाळा पाहिजेत; परंतु त्यांची स्थापना करणें हें चालू उद्यमावर किंवा संकल्पित उद्यमावर अवलंबून आहे.

उद्यमाची वाढ करणें किंवा नवीन उद्यम निर्माण करणें ही गोष्ट मात्र कलावंताकडून होणार नाहीं; बहुधा वर्तकाकडूनहि होणार नाहीं. तिला विद्वानांचाच पाठिंबा पाहिजे. जगाच्या चढाओढींत ज्या उद्यमांत वाढीचें सामर्थ्य नाहीं. तो टिकावयाचा नाहीं. आज आपण अगदीं उत्तमांतलें उत्तम मुद्रणयंत्र आणलें तरी दहा वर्षांनीं त्याहून सुकर यंत्र निघाल्यावर, आम्हांस मोठी किंमत देऊन तें विकत घेण्यावाचून गत्यंतर नाहीं. एवढें करूनहि आम्ही किंचित् काळ उत्तमांच्या पंक्तीला बसल्याचा देखावा दिसतो; पण लवकरच तेथून आम्हांला पुनः गचांडी मिळते! एकूण यंत्र आणि वस्तु निर्माण करण्यास शिकवणें हाच उद्यमशिक्षणाचा जीव कीं प्राण ठरतो.

# खडकी येथील बक्षिससमारंभ

सोमवार ता. ६ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां खडकी शिक्षण संस्थेतर्फे चालविण्यांत येत असलेल्या श्री. आलेगांवकर बंधूंच्या शाळेचा बक्षीससमारंभ खडकी येथे लष्कराच्या दक्षिण भागाचे लेफ्टनंट जनरल सर जॉर्ज डी. जेफरीज यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. सदर समारंभास त्यांच्या पत्नी कौंटेस कॅटेलप याहि हजर असून त्यांच्या हस्तें विद्यार्थ्यांना बक्षिसें देण्यांत आलीं. बालचरांच्या बँडच्या सुस्वर वादनांत शाळेच्या अधिकारी मंडळींनीं समारंभासाठीं उभारलेल्या भव्य मंडपाच्या दाराशीं अध्यक्षांचें स्वागत केलें. अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर विद्यार्थ्यांनीं 'वंदन ईशा तुझिया चरणीं' हें ईशस्तवन व 'हा शिशुजन करितो नमनातें' हें स्वागतपद्य म्हटलें. नंतर शाळेचे सुपरिंटेंडेंट श्री. आलेगांवकर यांनीं पुढीलप्रमाणें थोडक्यांत आपल्या शाळेची माहिती सांगितली.

## शाळेची माहिती

ते म्हणाले, "सुमारें २० वर्षांपूर्वी खडकी येथील ॲम्युनिशन फॅक्टरींत काम करणाऱ्या मजुरांना प्राथमिक शिक्षण देणारी एकहि शाळा नव्हती. परंतु १९१३ सालीं ॲम्युनिशन फॅक्टरींत काम करणाऱ्या आलेगांवकर बंधूंनीं मजुरांची व मागसलेल्या वर्गाची उन्नति होण्यासाठीं व त्यांना साक्षर करण्यासाठीं दोन रात्रीच्या शाळा सुरू केल्या. शिक्षणाची आवड मजूर व मागासलेल्या वर्गांत आतां इतकी उत्पन्न झाली आहे कीं आम्हांला दिवसा व रात्रीं शाळा भरवाव्या लागतात, इतकेंच नव्हे तर खुद्द खडकी व आजूबाजूच्या खेड्यांतहि शाळा उघडाव्या लागल्या. कार्याचा व्याप इतका वाढल्यामुळे १४ हि शाळा व्यवस्थित चालाव्या, म्हणून 'खडकी एज्युकेशन सोसायटी' नांवाची एक संस्था स्थापून ती सरकारीरीत्या रजिस्टर करण्यांत आली. आज सर्व शाळांत मिळून सुमारें हजार विद्यार्थी आहेत. मुंबई सरकारच्या शिक्षण शाखेने आमच्या शाळेचें कार्य पाहून १९२४ सालीं इमारत बांधण्याकरितां ३६६८४ रुपयांची ग्रँट दिली. पण एवढी रक्कम आम्हाला संबंध इमारत बांधण्यास पुरली नाहीं. आमच्या अंदाजाप्रमाणें संबंध शाळा बांधण्यास सुमारें ७० हजार रुपये लागतील. अरसेनल व ॲम्युनिशन फॅक्टरींचे अधिकारी, खडकी कँटोनमेंट बोर्ड व पुणें जिल्हा लोकल बोर्ड यांच्या सहानुभूतीनें व मदतीनें आमचें ध्येय लवकर सिद्धीस जाईल यांत शंका नाहीं.

## आर्थिक हलाखी

"आमच्या संस्थेची आर्थिक स्थिति हलाखीचीच आहे. १९३१-३२ सालीं संस्थेचें उत्पन्न ११९२१ रुपये झालें, तर खर्च १४७४८ रुपये आला! तरी पण संस्थेनें चालविलेल्या १० शाळांपैकीं ६ शाळांत मोफत शिक्षण दिलें जातें. तसेंच शाळेंत येणाऱ्या विद्यार्थ्यांपैकीं मुलें व मुली मिळून २०० विद्यार्थी अस्पृश्य समाजांतील आहेत. पूर्वी शाळेंत येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या संख्येच्या मानानें शाळेची इमारत अगदीं अपुरी पडे; इतकेंच नव्हे तर कांहीं वर्ग व्हरांड्यांतहि घ्यावे लागत. ही स्थिति १९२८ सालापर्यंत होती. परंतु शाळेची समाधानकारक वाढ पाहून तत्कालीन फॅक्टरी सुपरिंटेंडेंट कर्नल हरे यांनीं उपयोगांत नसलेली मिलिटरी हॉस्पिटलची इमारत आमच्या उपयोगाकरितां दिली. परंतु त्यांत अडचण इतकीच कीं, सदर इमारत आम्हांला फार्च थोड्या वर्षांच्या करारावर जी दिली गेली आहे, ती अधिक मुदतीनें मिळावी; दुसरी अडचण अशी कीं, शाळेभोंवती इतर लोकांचा त्रास होऊं नये म्हणून तारेचें कुंपण नाहीं, तसें एखादें घालण्यांत यावें. आमच्या मुख्य मागण्या अशा आहेत कीं, शाळेची जेवढी इमारत आज बांधलेली दिसते त्याकरितां काढलेलें कर्ज फेडण्यास ३८०० रुपये पाहिजेत, आणि दुसरा भाग बांधून शाळेची इमारत पुरी करण्यास

आणखी २४००० रुपयांची जरूरी आहे. शाळेची उपयुक्तता व वाढ लक्षांत घेऊन आजचे अध्यक्ष आमच्या सर्व गरजा भागविण्यास मदत करतील अशी आम्हांला आशा आहे." वरीलप्रमाणे शाळेची माहिती सांगितल्यावर संस्थेचे अध्यक्ष श्री. बाबासाहेब कामत यांनी आपल्या भाषणांत शाळेची शिक्षणपद्धति सांगून आलेगांवकर बंधूंची काटकसरीने शाळा चालविण्याची पद्धत व त्यांचा स्वतःचा अलोट स्वार्थत्याग किती आहे हें सांगितलें व श्री. आलेगांवकर यांनी निरनिराळ्या ठिकाणच्या लष्करी अम्मलदारांकडून सदिच्छापर व अभिनंदनादाखल आलेले निवडक संदेश वाचून दाखविले. कौंटेस कँटेल्यप यांच्या हस्तें विद्यार्थ्यांना बक्षिसें देण्यांत आल्यावर अध्यक्षांनी उत्तरादाखल भाषण केलें.

ते म्हणाले "मागासलेल्या वर्गात साक्षरतेची आवड उत्पन्न होत आहे हें पाहून मला समाधान वाटतें. तसेंच सदर शाळेचा वृत्तांत ऐकून व तिची होत असलेली प्रगति पाहून आनंद होतो. शाळेला असलेल्या गरजा दूर करण्याबाबत मला या घडीला जरी कांही आश्वासन देतां आलें नाहीं तरी पण मी त्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार करीन एवढेंच आजच्या प्रसंगीं सांगतो. तसेंच मिलिटरी हॉस्पिटलची बिल्डिंग मोफत जरी देतां आली नाही तरी पण अधिक वर्षांच्या कराराने शाळेच्या उपयोगाकरिता देतां येईल असें वाटतें. लष्करी खातें सोडून इतर खात्यांतच फक्त पैशाची टंचाई असतें. अशी जी सर्वसाधारण समजूत दिसते. ती बरोबर नाही. या खात्यांतहि अशीच टंचाई आहे. तरी पण शाळेची उपयुक्तता व सांप्रत काळीं तरी इंग्रजी शिक्षणाची जरूरी, प्रसार वगैरे गोष्टी लक्षांत घेतां शाळेला शक्य त्या मार्गांनी मदत करावी असें मला वाटतें."

### देणगी

संस्थेचे उपाध्यक्ष प्रो. द. वा. पोतदार यांनी समयाला उचित अशा शब्दांत आभार मानून लष्करी अधिकाऱ्यांनी तहानेलेल्या शिपायाला अगोदर पाणी द्यावें असा तात्पर्यार्थ असलेली एक गोष्ट पूर्वी इंग्रजी पुस्तकांत असे, तिची आठवण दिली. श्री. आलेगांवकर यांनी कर्नल ब्राऊन यांच्याकडून शाळेला आलेली ३० रु. ची देणगी जाहीर केली. संस्थेच्या अध्यक्षांनी अध्यक्षांना हार घातल्यावर राष्ट्रगीत झालें व समारंभ संपला.

# कौन्सिल-बहिष्कारवाद्यांची फटफजीती

हल्ली दिल्ली येथे वरिष्ठ कायदे कौन्सिलाची जी बैठक सुरू आहे तिला एका विशेष कारणानें अपूर्व असें महत्त्व प्राप्त झालें आहे. हें कारण म्हणजे राष्ट्रीय सभेंतलि असहकारपक्षानें या वरिष्ठ कायदेमंडळाचा कसून उपयोग करून घेण्याची चालविलेली खटपट हें होय. आणि खरोखरच कायदेमंडळ व असहकार पक्ष या, उत्तर व दक्षिण ध्रुवाइतक्या दुरावलेल्या, संस्थांचा संयोग म्हणजे तो चालू हिंदी राजकारणांतील कपिलाषष्ठीचा योगच होय! या संबंधांतील आजची वस्तुस्थिति वर्णन करून सांगितली तर ती कोणाला क्षणभर खरीहि वाटणार नाहीं. ती वस्तुस्थिति पूर्वापर कशी आहे ते पाहा.

१९२० सालीं असहकारिता पक्ष निर्माण झाला. त्याचीं तत्त्वें पुष्कळच आहेत. ती सर्व सांगत बसण्याचें आज प्रयोजन नाही. पण त्यांतलि एक अत्यंत महत्त्वाचें तत्त्व म्हटलें म्हणजे कायदेमंडळावरील बहिष्कार हें होय. हा बहिष्कार त्यासालीं इतक्या अकल्पित रीतीनें पुकारला गेला की, देशांतील राष्ट्रीय पक्षाचे बहुतेक सर्व पुढारी चकित व दिङ्मूढ झाले. राष्ट्रीय सभेची आज्ञा मोडावी, तर आपल्या परंपरागत बहुमतावरील निष्ठेला बाध येतो. उलट ती पाळावी, तर कायदे मंडळांचा उपयोग राष्ट्रकार्यार्थ करून घेणें हें सर्वस्वी युक्त आहे अशा आपल्या परंपरागत तत्त्वनिष्ठेला बाध येतो. दोनहि निष्ठा परंपरागतच. परंतु अपवादानें नियमाला क्षणभर धक्का द्यावा त्याप्रमाणे, वरीलपैकीं पहिल्या निष्ठेनें दुसऱ्या निष्ठेला धक्का दिला.

"राष्ट्रीय पक्षांतील एकी राखण्याकरिता, मनाला पटत नसला तरी, कौन्सिल बहिष्कार कांहीं दिवस पाळू, आणि त्यांतून काय निष्पन्न होतें हें तरी पाहूं" असें म्हणून, राष्ट्रीय सभेंत बहिष्काराच्या ठरावाला उघड विरोध करणारांनीहि शिस्तीकरितां तो बहिष्कार पाळला. पण (१) कोणत्याहि शिस्तीची कदर राखणारांचा हेतु सात्त्विक व उदात्त आहे, आणि (२) त्या शिस्तीची कळ क्षणभर सोसली असतां कांहीं महत्कार्य हटकून सफल होतें, असें प्रत्ययाला आलें तरच ती शिस्त चालू राहते; नाही तर तिजविरुद्ध बंड होतें. त्याप्रमाणें पुढील एक दोन वर्षांतच या बहिष्काराविरुद्ध राष्ट्रीय सभेंतल्याच कांहीं पुढाऱ्यांनीं बंड केलें. आणि गया येथे राष्ट्रीय सभांतर्गत असा एक कौन्सिल पक्ष निर्माण केला.

या पक्षाला 'कॉंग्रेस स्वराज्य पक्ष' असें नांव मिळालें. आणि राष्ट्रीय सभेने जरी या बंडखोरांना राष्ट्रीय सभेंतून तावडतोब हद्दपार केलें नाही, तरी प्रत्यक्ष कायदे कौन्सिलांशी आपला संबंधहि फारसा येऊं दिला नाही. १९२३व १९२६ सालीं झालेल्या कायदे मंडळांच्या निवडणुकींत राष्ट्रीय सभेने भाग घेतला नाही. फक्त राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने निवडणुकी लढविणाऱ्या आपल्यांतील पुढाऱ्यांकडे, किंचित स्नेहभावपूर्वक, काणाडोळा करून स्वार्थ व परमार्थ दोनहि साधले. पण १९३० सालीं फिरून राष्ट्रीय सभेला उघड बहिष्काराची लहर आली. कायदेमंडळांत असलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या व प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या सभासदांना, शिस्तीच्या नांवाखाली, पं. जवाहरलाल नेहरू यांनी त्या त्या संस्थांतून हुसकून काढलें. आणि 'हत्तीच्या पायांत सर्वांचे पाय आले' या न्यायाने, प्रत्यक्ष कायदेभंगाचीच चळवळ सुरू झाल्याने कौन्सिल बहिष्काराची ही चळवळहि न सांगतांच सुरू झाली.

पण या खेपेस बहिष्काराला प्रतिकूल असणाऱ्या लोकांनी मात्र पूर्वीहून थोडें वेगळें धोरण ठेविलें. पूर्वी त्यांनी शिस्तीकरिता बहिष्कारच स्वीकारून तो प्रभावी होण्याला मदत केली. परंतु १९३० सालीं बहिष्काराचा पुरस्कार न करतां, फक्त ते स्वतः कौन्सिल-निवडणुकींना उभे राहिले नाहीत. अर्थात् पुढारीपद न पावलेले असे अनेक लोक या उदासीन स्थितीचा फायदा घेऊन निवडणुकीस उभे राहिले. पैकीं कांहींना यश आलें, कांहींना आलें नाही. निवडून आलेल्या लोकांना पूर्वीप्रमाणे प्रबळ पक्ष स्थापतां आले नाहीत. फोनोग्राफची स्प्रिंग ढिली व्हावी त्याप्रमाणें, कायदे मंडळांतून बदसूर निघूं लागले; आणि कायदे मंडळ कमकुवत झाल्याने सरकारांचें चांगलेंच फावलें. अर्थात् ज्या कारणाकरिता कायदेमंडळ अनिष्ट ठरवून, राष्ट्रीय सभेने बारा वर्षांपूर्वी त्यांच्यावर बहिष्कार पुकारला, तीं कारणें आजच्याइतकीं पूर्वी केव्हाहि प्रबळ नव्हतीं. अशा स्थितींत म. गांधींसारखे असहकारवादी व बहिष्कारवादी, राष्ट्रीय सभेचे सेनापति, पुढे येऊन त्यांनी अस्पृश्यतानिवारणाचा म्हणजे केवळ एक उपांगभूत लाभ पदरांत पाडून घेण्याकरिता कायदेमंडळांकडे धाव घेऊन त्यांना कडकडून आलिंगन द्यावें, व त्यांच्या साहाय्याची विनवणी करावी, हें अत्यंत आश्चर्यजनक नव्हे काय ? या प्रसंगाला समर्पक असा पौराणिक दाखला आम्हांला तरी एकच दिसतो. तो म्हणजे क्षुधानिवारणाकरिता विश्वामित्राने कुत्र्याचें मांस खाल्याचा !

आज देखावा कसा आहे तो फिरून एक वेळ वाचकांनी लक्षांत आणावा. अस्पृश्यतानिवारणाची नवी मोहीम, म्हणजे देवालयप्रवेशाची मोहीम, म. गांधी यांनी एकदोन महिन्यांपूर्वी पुकारली तोपर्यंतचे, खुद्द राष्ट्रीय सभेचे नुसते नामधारी अध्यक्षच नव्हे, तर चालू चळवळींतील युद्ध मंडळाचे सेनापति अशा अर्थाचे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष, श्री. राजगोपाळाचारियर यांचा तळ श्री. देवीदास गांधी वगैरे दुय्यम सेनापतीं-समवेत दिल्ली येथे पडलेला आहे ! शेट घनश्यामदास बिर्ला यांच्यासारखे कट्टे कॉंग्रेसभक्त, म. गांधींचे अनुयायी व धनाढ्य व्यापारी, हेहि त्यांच्या मदतीला दिल्लीस हजर आहेत! हे प्रमुख पुढारी, इतरांचें साहाय्य घेऊन, वरिष्ठ कायदेमंडळांतील सभासदांच्या घरीं आपली पायधूळ अत्यंत नम्रभावाने झाडीत आहेत ! आणि मंदिरप्रवेशाच्या बिलाला कायद्याचें स्वरूप तावडतोब प्राप्त व्हावें याकरितां "आपला इतर स्वार्थ बाजूस ठेऊन मि. रंगा अय्यर यांच्या बिलाला सगळी वाट मोकळी करून द्या अशी त्यांची विनवणी करीत आहेत !" आणि कदाचित् दैवालाहि मनुष्याच्या मतपरिवर्तनाचे खेळ किंवा चाळे पाहण्याची हौस वाटते म्हणूनच कीं काय, त्यानेहि या बहिष्कारवाद्यांची कायदेमंडळावरील आगंतुक निष्ठा कसोटीला लावून पाहण्याकरिता, त्यांच्या मार्गांत विघ्ने आणण्यास सुरुवात केली आहे.

प्रथम डॉ. सुब्रायन यांनी मद्रास कायदेमंडळांत मंदिरप्रवेशाचें जें बिल आणण्याचा प्रयत्न केला त्याला गव्हर्नर जनरलांची संमति हवी होती ती मिळाली नाही. तथापि तशाच स्वरूपाचीं बिलें दिल्ली येथील वरिष्ठ कायदेमंडळाच्या कांही सभासदांनी तयार करून पाठविलीं. यांत इतकीच गोष्ट जातां जातां ध्यानांत ठेवावयाची कीं, राष्ट्रीय सभेच्या लोकांनी कायदेमंडळांतील सभासदांशीं कितीहि परकेपणाची व तुच्छतेची भावना ठेविली तरी, कायदेमंडळाच्या सभासदांनी मात्र तशी भावना उलट ठेविली नाही. "तुम्ही आम्हांला तुच्छ लेखितां तर आम्हीहि तुम्हांला तुच्छच लेखितों" असें न म्हणता, 'या! तुमचें कार्य करण्याला आम्ही केव्हाहि सिद्ध व सज्ज आहों' असें म्हणून स्नेहभावाने त्यांनी आपला उजवा हात पुढे केला. यावरून पक्षांधता असली, किंवा तत्त्वांचा फाजील बडेजाव असला, तर तो कोणत्या पक्षाच्या बाजूला आहे हें सहजच सिद्ध झालें नाही काय ? "मंदिरप्रवेश बिलाला राष्ट्रीय हितकारितेचें जितकें स्वरूप आहे तितकेंच स्वरूप, हेच कायदेमंडळाचे सभासद आपल्या बुद्धीप्रमाणे जीं इतर खाजगी बिलें पुढे आण-

ण्याचा प्रयत्न करितात त्यांनाहि आहे," असें राष्ट्रीय सभावाल्यांनीहि कबूल करावें कीं नाही? पण नाही! आजच्या क्षणाला सगळ्या हिंदुस्थानाचें भवितव्य, किंवा परमावधीचें कल्याण, जर कशांत साठविलें असेल तर राष्ट्रीय सभावाल्यांच्या दृष्टीने तें एका मंदिरप्रवेशाच्या बिलांतच आहे! आणि त्याकरिता आजवर मिरविलेल्या आपल्या बहिष्काराच्या तत्त्वाचे आपल्याच हाताने त्यांनी शंभर तुकडे केले तरी हरकत नाही! असो.

या दोन पक्षांतील तारतम्यासंबंधाने हें फक्त जातां जातां सांगितलें. अर्थात् पूर्वीचाच विषय पुढे चालू करावयाचा तर तो असा कीं, कायदेमंडळांतील कांहीं सभासदांनी मंदिरप्रवेशाचीं बिलें लिहून धाडलीं तरी त्यांचा कायदेमंडळांत प्रत्यक्ष प्रवेश होणें, व पुरस्कार होऊन तीं तडीस लागणें, ही गोष्ट शिल्लकच उरली. गव्हर्नर जनरलांच्या संमतीची अडचण डॉ. सुब्रायन यांच्या बिलाला आली ती रंगाअय्यर यांच्या बिलाला आली नाही. म्हणजे गव्हर्नर जनरलांनीं त्याला संमति दिली. ही संमति देण्याचा विपरीत अर्थ काहीं टीकाकारांनीं करावयाचा तो केलाच. "रंगा अय्यर यांचें बिल अधिक व्यापक म्हणजे फाजील व्याप्तीचें असल्यामुळे तें नापास होऊन म. गांधी यांची फजीती व्हावी अशी लॉर्ड विलिंग्डन यांची इच्छा असावी" असें भाष्य त्या संमतीवर झालेलें सर्वांनी पाहिलेंच. पण तें भविष्य खोटें ठरलें. कारण स्वतः रंगा अय्यर यांनी व इतर कांहीं लोकांनीं डॉ. सुब्रायन यांच्या बिलासारखींच जीं मर्यादित स्वरूपाचीं बिलें पुढे आणलीं त्यांनाहि लॉर्ड विलिंग्डन यांनी संमति दिली.

परंतु इतकें झालें तरी सहकारितेच्छु कॉंग्रेसवाल्यांच्या अडचणी संपल्या नाहीत. त्यांतील मुख्य अशी कीं, खाजगी बिलाच्या चर्चेला किती दिवस मिळावे हें सरकार ठरवितें. असे दिवस दिल्ली येथील बैठकींत अवघे दोन किंवा तीनच मिळणार! पैकीं एक फेब्रुवारीअखेर व दुसरा मार्चअखेर. पण आणखी वेगळीं खाजगी बिलें पुढे आणणाऱ्या सभासदांची संख्याहि कांही थोडी नाही. निरनिराळ्या अनेक बिलांना अनुक्रम कोणता मिळावा हें ठरण्याला 'बॅलट बॉक्स'ची शकुनवंती चाळवावीच लागते! आणि दैवाचा चमत्कार असा कीं, गेल्या शनिवारीं ही शकुनवंती या कामाकरिता चाळविण्यांत आली तेव्हा असें निष्पन्न झालें कीं, मंदिरप्रवेशाचीं म्हणून जितकीं बिलें होतीं त्यांना या अनुक्रमांत फारच प्रतिकूल अशीं स्थानें मिळालीं! खासदार गयाप्रसादसिंग यांच्या बिलाला सातवें, सतीशमित्र यांच्या बिलाला अकरावें, रा. ब. राजा यांच्या बिलाला चवदावें, आणि रंगाअय्यर यांच्या नव्या बिलाला सतरावें अशीं स्थानें मिळालीं! अर्थात् पहिलीं पहिलीं स्थानें ज्या इतर बिलांना मिळालीं त्यांच्या चालकांनी जर तीं सर्व मागें घेतलीं, आणि मंदिरप्रवेशाच्या बिलाला वाट मोकळी करून दिली. तरच एखादें तसलें बिल व तेंहि नुसतें प्रविष्ट होण्याचा संभव.

पण यात्रेचें प्रस्थान ठेवणें म्हणजे तीं कांहीं मांवद्याच्या पुण्याहवाचनाची गणपतिपूजा नव्हे! पूर्वी काशीयात्रेला जशीं प्रवासांतर्गत अनेक संकटें होतीं तशींच खाजगी बिलालाहि आज कायदेमंडळांत असतातच. सातपुड्याच्या बारींत भिल्ल लोक कोणीकडून अचानक हल्ला करतील, किंवा रानांत वाघ भेटतील, किंवा उघड्या गाडीतळावर रस्तेलूट होईल, किंवा शेवटीं गंगेंत उतरून स्नान करतांनाच एखादा मगर पायाला मिठी घालून ओढून नेईल अशी भीति पूर्वी यात्रेकरूंना असे. त्याच मासल्याची भीति खाजगी बिल यशस्वी करूं पाहणारांना असते. आणि ती केवळ मंदिरप्रवेशाच्या बिलापुरती आजच नव्याने येणारी नाही, तर नेहमीचीच आहे. सोडतींतून चिठ्या निघालेल्या बिलांचा अनुक्रम पाळावाच लागतो. बिलांवरील भाषणांना कालमर्यादा नसते. कोणत्याहि दिवशीं कायदेमंडळ ठराविक चारपांच तासच काम करतें. गेला दिवस पुन्हा येत नाही. अर्थात नवीन काम उपस्थित होतें. आणि एखादें बिल ताबडतोब निकालांत न काढावें असें कोणा हितशत्रूंना वाटलें तर "बिल ठीक आहे, पण लोकमत अजमावण्याला बाहेर धाडा" अशी सोज्वळ पण घातूक सूचना सहज करतां येते. सरकार खाजगी बिलासंबंधानें प्रायः विरोधी वृत्ति स्वीकारतें. आणि त्यांचा मोठा उपकार इतकाच कीं त्यांनी असा विरोध करूं नये, फार तर "आम्ही तटस्थ राहूं तुमचें तुम्ही पाहून घ्या" असें म्हणावें. आणि इतक्याउपर बिल पास झालें तरी शेवटीं त्याला संमति न देण्याचा गव्हर्नर जनरल यांचा अधिकार शिल्लक राहतोच!

प्रस्तुत मंदिरप्रवेशाच्या बिलासंबंधानें हा सुलतानी अधिकार लॉर्ड विलिंग्डन गाजवतील असें आम्हांला वाटत नाही. तथापि वर सांगितलेले इतर अपघात मंदिरप्रवेशाच्या बिलाला लागूच आहेत. अर्थात अपघातांची बाधा न व्हावी तर निरनिराळ्या मार्गांनी ग्रहांची शांति करावी लागणार. आणि मौज ही कीं, ही शांति करण्या-

करितां राष्ट्रीय सभेचे माजी अध्यक्ष श्री. राजगोपाळाचारियर हे कंबर बांधून सिद्ध झालेले आहेत! त्यांनी आपला तळ दिल्लीस नेऊन, बहिष्कार बाजूस सारून, पूर्वी तुच्छ मानलेल्या खासदार सभासदांना फार मोठेपणा देऊन, त्यांचें साहाय्य मिळविण्याचा लाघवी प्रयत्न सुरू केला आहेच. पण असें काडीने काडी झाडून तरी काम कसें होणार! म्हणून स्वतः राजगोपाळाचारियर यांनीच आपल्या मनाजोगें एक मंदिरप्रवेशाचें बिल लिहून तयार केलें आहे, व श्री. गयाप्रसाद यांच्याकडून त्याची नोटीसहि देवविली आहे!

पण इतकेंच काय? या महत्कार्याकरिता कॉंग्रेसच्या अध्यक्षांनी आपलें कायदेपांडित्य खर्ची घालून जसा एका नव्या बिलाचा मसुदा तयार केला त्याचप्रमाणें, उद्या कांहीं युक्तीने त्यांना गयाप्रसाद यांच्या जागीं कायदेमंडळाचे सभासद होतां आलें तर आपल्या स्वीकृत सत्कार्याच्या भरांत, ते त्याहि गोष्टीला माघार घेणार नाहीत अशी आमची पक्की खात्री आहे. पण ही अदलाबदल निवडणुकीच्या द्वाराने थोड्या वेळांत सिद्ध होणारी नाही; अर्थात गव्हर्नर-जनरल यांनी राजगोपाळाचारियर यांची नेमणूक केली तर अल्पा दिवसांत होऊं शकेल. आणि सरकारी नॉमिनेशनला इतर प्रसंगीं, विशेषतः लोकांना नांवें ठेवतांना, कितीहि दोषास्पदता असली तरी, अशा महत्कार्यांत ती दोषास्पदता कोणी काय म्हणून मानावी? उघडच आहे. कार्यावर ज्याने दृष्टि ठेविली तो बारिकसारीक गोष्टीकडे काय म्हणून पाहील?

तहान लागलेला मनुष्य नदींत उतरला, आणि पाणी पिण्यास ओंजळ भरणार तों वरून केर वाहत आला, तर तो नदी सोडून थोडाच बाहेर निघणार! हाताने केर बाजूला सारून ओंजळ भरून पाणी पिऊन तहान भागविणारच. लॉर्ड विलिंग्डन यांनी कॉंग्रेसच्या या अध्यक्षांना नॉमिनेट करण्याचा आज प्रश्न नाही. तथापि डॉ. गारसारख्या 'सन्मान्य' पुढाऱ्यांची मदत घेऊन, खासदारांची सभा भरवून, या बिलाला नदीपार होण्याला—म्हणजे त्याला कायद्याचें स्वरूप येण्याला—शक्य तेवढी मदत करावी अशी प्रार्थना व खटपट लॉर्ड विलिंग्डन यांजकडे करण्याचा ठराव दोनतीन महिन्यांपूर्वीच्या कॉंग्रेसच्या या अध्यक्षांनी हजर राहून आपल्या प्रयत्नाने करविला ही गोष्ट तरी कांहीं खोटी नाही!!! कांग्रेसचे कट्टे अनुयायी म्हणविणाऱ्या वर्तमानपत्रांतून व उपकृत वार्ताहरांकडून दिल्लीस चाललेल्या या खटपटींच्या बातम्यांवर बातम्या रोज येत आहेत. त्या वाचून ज्याला हसूं आवरेल असा रुक्ष मनुष्य बहुधा विरळा! पण हा जो दिव्य 'ट्रान्स्फर सीन' घडून आला आहे त्यापासून हंसण्याच्या करमणुकीपेक्षा गंभीर असा बोधच अधिक मिळण्यासारखा आहे. तो वाचकांनी घ्यावा एवढेंच आम्ही सुचवितो.

# 'महाराष्ट्र सांवत्सरिक' ग्रंथ

### समर्पणसमारंभ

रविवार ता. १२ रोजीं सायंकाळीं ६ वाजता टिळक मंदिराच्या पटांगणांत महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळाने तयार केलेला 'महाराष्ट्र सांवत्सरिक' किंवा 'मराठी वार्षिक ज्ञानसंग्रह' या नांवाचा ग्रंथ, श्री. **न. चिं. केळकर** यांच्या हस्ते कै. लोकमान्य टिळकांच्या पुण्यस्मृतीस मोठ्या समारंभाने अर्पण करण्यांत आला. समारंभासाठी हजारावर समुदाय जमला असून, सभास्थान तोरणें पताका वगैरेंनी शृंगारिलेलें होतें. मध्यभागीं वक्त्याकरिता स्वतंत्र व्यासपीठ उभारण्यांत आलें होतें. अध्यक्षांच्या मागील बाजूस लोकमान्यांचें भव्य तैलचित्र ठेवलेलें असून तें पुष्पहारांनी मंडित केलें होतें. सदर समारंभास साताऱ्याचे श्री. दादासाहेब, करंदीकर, भाऊसाहेब सोमण, नगरचे श्री. सप्तर्षि अकोल्याचे गोळे, पुण्याचे सदाशिवशास्त्री भिडे, प्रि. महाजनी, बॅ. अगरवाल, प्रो. करमरकर, प्रो. परांजपे, श्री. द. वि. आपटे, प्रि. विनायकराव आपटे, श्री. भा. म. गुप्ते, डॉ. गणपुले, श्री. भोंडे वकील, प्रो. हुदलीकर, सौ. सुलोचनाबाई हुदलीकर इत्यादि मंडळी उपस्थित होती. प्रारंभीं प्रो. विनायकराव पटवर्धन यांनी 'परम विमल तुझें स्मरण' व गोपाळ गायन समाजांतील विद्यार्थ्यांनी 'घडे दे सेवा देशाची' अशीं ईशस्तवनें म्हटलीं.

नंतर श्री. **वा. कृ. भावे** हे अध्यक्षांची सूचना करतांना म्हणाले, 'आज लो. टिळकांच्या स्मृतीस अर्पण करण्याचा ग्रंथ मराठी भाषेंत अपूर्व आहे. इंग्रजींत इयर बुकें प्रसिद्ध होतात पण तीं इंग्रजी वाचकांकरिता असतात. महाराष्ट्र सांवत्सरिक या ग्रंथाचें तसें नाही. हा ग्रंथ मराठी वाचकांच्या दृष्टीने लिहिला आहे. वर्तमानपत्रकर्ते व वर्तमान-

पत्रांचे वाचक या उभयतांनाहि प्रस्तुत ग्रंथाची गरज आहे वर्तमानपत्रें वाचणाऱ्या वाचकांना घडणाऱ्या हकीकतींची तांत्रिक तेवढीच माहिती मिळते. पण या ग्रंथाच्या वाचनानें त्यांची पूर्वपीठिकाहि त्यांना कळून येईल. सदर ग्रंथ तयार करणारांतील प्रमुख गृहस्थ सराईत आहेत. त्यांनी आतापर्यंत सांगोपांग माहिती देणारे तीन ग्रंथ प्रसिद्ध केले. हल्लीचा काळ मंदीचा व बेकारीचा असला तरी, या मंडळानें जनतेला वाचनाचें असें व्यसन लावून ठेविलें आहे कीं, ग्रंथ प्रकाशित होताच त्याच्या प्रति हातोहात उडतात. ग्रंथाची तीन रुपये किंमत उपयुक्ततेच्या व आकाराच्या दृष्टींनीं पाहिली तर अगदींच थोडी आहे. हाच ग्रंथ जर एखाद्या धंदेवाईक प्रकाशकानें प्रसिद्ध केला असता तर त्याची किंमत सातआठ रुपयांपर्यंत गेली असती. हा महाराष्ट्र सांवत्सरिक ग्रंथ तयार करण्यास टिळक स्मारक ट्रस्ट फंड व टिळक पर्स फंड याच्या ट्रस्टींनी साडेपाच हजार रुपयांची मदत केली आहे. ही मदत मिळण्यास फंडाचे चिटणीस व एक ट्रस्टी श्री. तात्यासाहेब केळकर हेच कारण झाले असल्यामुळे, व अशा तऱ्हेचा ग्रंथ प्रकाशित व्हावा ही कल्पनाहि प्रथम त्यांनीच काढली असल्यामुळे यांच्या व हातून ग्रंथसमर्पण होणें हेंच उचित आहे तेव्हा आजच्या समारंभास श्री. तात्यासाहेब केळकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी मी त्यांना मंडळातर्फे विनंति करतों.' या सूचनेस श्री. शंकरराव दाते यांनी योग्य शब्दांत अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले.

श्री. शंकरराव साठे यांनी अनेक ठिकाणाहून आलेल्या संदेशांपैकी श्रीमंत औंधकर, सातारचे श्री. वा. ना. देशपांडे, बॅ. जयकर, विसापूर तुरुंगांत असलेले राजबंदी श्री. वामनराव मुकादम, वगैरेंकडून सदिच्छापर आलेले निवडक संदेश वाचून दाखविले. नंतर महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळाचे अध्यक्ष श्री ल. ब. भोपटकर यांचें खालील आशयाचें भाषण झालें

## रा. ल. ब. भोपटकर यांचें भाषण

"दे. भ. तात्यासाहेब केळकर व बंधुभगिनींनो, महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळाच्या निमंत्रणास मान देऊन आपण सर्वजण या ठिकाणीं उपस्थित झालां याबद्दल मी आपणा सर्वांचें मनःपूर्वक स्वागत करतों व आभार मानतों.

"या प्रसंगीं 'महाराष्ट्र-सांवत्सरिक ऊर्फ मराठी वार्षिक ज्ञानसंग्रह' या ग्रंथाचा थोडासा इतिहास देणें मी माझें कर्तव्य समजतों. तो इतिहास ऐकल्यानंतर हा ग्रंथ अशा समारंभानें आम्ही मंडळ लोकमान्यांच्या पुण्यस्मृतीला कां अर्पण करीत आहे, याची आपणांस यथार्थ कल्पना येईल. लोकमान्यांच्या अनेक सदिच्छांपैकीं त्यांची अशी एक सदिच्छा असे कीं, निरनिराळ्या सार्वजनिक प्रश्नांवर लेख लिहिणारे लेखक आणि भाषणें करणारे व्याख्याते व प्रचारक यांना आपले लेख आणि व्याख्यानें व प्रवचनें साधार करतां येऊन लोकांच्या मनावर आपल्या लेखनकौशल्याप्रमाणे व वक्तृत्वाप्रमाणे शुद्ध ज्ञानाचाहि परिणाम घडविता येईल, असा एखादा ग्रंथ मराठींत प्रसिद्ध व्हावा. परंतु ही त्यांची इच्छा त्यांच्या हयातींत पूर्ण झाली नाही.

"त्यांचे पश्चात् टिळक-स्मारक-ट्रस्ट कमिटीच्या मनांत असें आलें कीं, या ट्रस्टच्या द्वारें लोकमान्यांचें स्मारक म्हणून राष्ट्रोपयोगी वाङ्मय स्वतः प्रसिद्ध करावें, किंवा असल्या वाङ्मयाचा पुरस्कार करावा. या निश्चयाला अनुसरून सदर कमिटीने गीताधर्ममंडळाने प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांना आर्थिक मदत केली आहे. तसेंच महाराष्ट्र व कर्नाटक या दोन प्रांतांच्या आर्थिक स्थितीसंबंधानें निबंध लिहिणारास एक हजार यांचें बक्षीस ठेविलें, व त्याप्रमाणें सर्वांत उत्तम ठरलेल्या निबंधास बक्षीस देण्यांत येऊन तो लवकरच प्रसिद्ध होणार आहे. याच हेतूस अनुसरून मराठी भाषेंत एक 'इयरबुक' तयार करावें ही कल्पना सदर कमिटीस सुचली. व सन १९३१ सालीं भरलेल्या कमिटीच्या वार्षिक बैठकींत तिने असला ग्रंथ तयार करण्याची कल्पना कायम केली. कल्पना कायम झाल्यावर तिची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याचें काम कमिटीने माझ्यावर व माझे मित्र दे. भ. दामोदर विश्वनाथ ऊर्फ बाबुराव गोखले यांच्यावर सोंपविलं व या कार्यासाठीं ता. १ ऑगस्ट १९३१ रोजीं रुपये दोन हजारांची रक्कम मंजूर केली.

"ही दोन हजारांची रक्कम अगदींच अपुरी पडणार, यावद्दल आमची लवकरच खात्री झाली. तथापि ग्रंथ तयार करण्याचें तर आम्हीं कायम केलें. परंतु प्रत्यक्ष ग्रंथ तयार करण्याचें काम मला किंवा बाबुराव गोखले यांना हातीं घेण्याजोगें नव्हतें म्हणून हे सर्व काम मी माझे स्नेही श्री. श्रीपाद महादेव माटे यांचेसह 'महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळ' बनवून त्यांचेवर सोंपविलें. या मंडळानें आपल्या शिरावर ग्रंथ तयार करण्याची जबाबदारी घेतली, एवढेंच नव्हे, तर बरीचशी आर्थिक जबाबदारीहि स्वीकारली.

## कामाची सुरुवात

"अशा प्रकारें पूर्वतयारी झाल्यानंतर ग्रंथाच्या

कामास सुरुवात सन १९३२च्या जानेवारी महिन्यांत करण्यांत आली. ग्रंथाचे मुख्य संपादक रा. माटे यांनी आपल्या सहकारी संपादकांच्या साहाय्यानें मोठ्या इर्षेने ग्रंथाच्या मागे लागून तो तयार केला. मध्यंतरीं 'केळकर' ग्रंथ तयार होत असतांना या ग्रंथाचें काम कांहीं काळ संथपणानें करावें लागलें होतें.

"ग्रंथाचें हस्तलिखित तयार झालेलें अवलोकन करून हा एक प्रचंड ग्रंथ होणार अशी मंडळाची खात्री झाली व त्यास लागणाऱ्या अवाढव्य खर्चाबद्दल मंडळास एकप्रकारें चिंताही वाटूं लागली. म्हणून मंडळानें टिळक-स्मारक-ट्रस्टची कमिटी व टिळक-पर्सफंड-संस्थेचे ट्रस्टी यांना ग्रंथाचा व्याप दाखवून आर्थिक मदतीविषयीं विनंति केली, व ती त्यांनीं थोर मनानें मान्य करून अनुक्रमें रुपये दोन हजार व दीड हजार अशा रकमा मंजूर केल्या. अशा रीतीनें या दोन संस्थांकडून मंडळास एकंदर साडेपांच हजारांची मदत मिळाली.

"लोकमान्यांच्या हयातींत जर हा किंवा असला ग्रंथ प्रसिद्ध झाला असता, तर त्यांना केवढा तरी आनंद वाटला असता ? त्यांच्या हयातींत नाहीं तरी त्यांच्या पश्चात् त्यांच्या इच्छेनुरूप तयार झालेला, व त्यांच्या नांवानें चाललेल्या पूर्वोक्त दोन संस्थांनीं पुरस्कार केलेला, हा ग्रंथ त्यांच्या पुण्यस्मृतीस त्यांचे पट्टशिष्य पं. भ. तात्यासाहेब केळकर यांच्या हस्तें समारंभानें भक्तिभावपूर्वक मंडळानें अर्पण करावा, यापेक्षा अधिक उचित तें काय असणार ?

## नांवाचा पीठिका

"'महाराष्ट्र सांवत्सरिक' हा ग्रंथ 'इयरबुका' च्या स्वरूपाचा असला तरी तो त्याचें अंध अनुकरण नाहीं, हें या ग्रंथाचीं दहावीस पानें नुसतीं चाळणाराच्याहि तेव्हांच लक्षांत येईल. या ग्रंथाच्या अंतरंगाबद्दल ग्रंथाचे मुख्य संपादक माझे मित्र रा. माटे हे माझ्यामागून विवरण करणार आहेतच. तथापि थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे ग्रंथाची रचना करतांना दोन तत्त्वें प्रामुख्यानें नजरेसमोर ठेवण्यांत आलेलीं होतीं. त्यांपैकीं एक तत्त्व असें कीं, ग्रंथ वाचतांना करमणुकींत ज्ञानसाधन व ज्ञानसाधनांत करमणूक असा वाचकांचा दुहेरी फायदा व्हावा; आणि दुसरें तत्त्व असें कीं, नागपुरापासून निजामशाहींतील मराठवाडा पोटांत घेऊन गोव्याकडे जी एक निमुळती रेषा जाते तिच्या पश्चिमेकडील सर्व देश म्हणजे महाराष्ट्र व या महाराष्ट्राच्या बाहेर ठिकठिकाणीं विखुरलेले महाराष्ट्रीयांचे लहान लहान प्रांत व संघ, अशा प्रकारें बनणाऱ्या बृहन्महाराष्ट्राची निरनिराळ्या प्रकारची माहिती जितकी गोळा करून देतां येईल तितकी अगोदर द्यावयाची व मग इतर माहिती द्यावयाची. या कारणास्तवच आमच्या मंडळानें या ग्रंथास 'सांवत्सरिक' असें नांव न देतां 'महाराष्ट्र-सांवत्सरिक' असें नांव दिलेलें आहे. मंडळास असें वाटतें कीं, मराठी वाङ्मयांत असल्या स्वरूपाचा हा पहिलाच ग्रंथ होय.

"याच प्रसंगीं दुसरीहि एक गोष्ट मला अशी सांगावीशी वाटते कीं, मंडळानें 'विज्ञानबोध' व 'वादकोश' असे दोन ग्रंथ तयार करून प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे. आधिभौतिक शास्त्रांची जी प्रगति होत आहे तिचें ज्ञान समाजांत फैलावून द्यावें, असा यांपैकीं पहिल्या ग्रंथाचा हेतु आहे. आजपर्यंत मुख्य मुख्य शास्त्रांनीं कोठपर्यंत मजल मारलेली आहे याची सामान्य वाचकालासुद्धा समजेल अशी सुबोध माहिती यांत प्रथम देण्यांत येईल; व मग प्रत्येक बारा महिन्यांत त्या त्या शास्त्रांत कोणकोणती प्रगति झाली आहे, ती ग्रथित करणारें असें एक लहानसें पुस्तक दरवर्षी प्रसिद्ध होत राहील. अर्थात् हा ग्रंथ तयार करतांना त्या त्या शास्त्रांत पारंगत असलेल्या अशा शास्त्रज्ञांचें साहाय्य मंडळास घ्यावें लागेल, व तें मंडळ घेणारहि आहे. तसेंच या सांवत्सरिकासारखा 'वादकोश' नांवाचा ग्रंथ तयार करण्याचेंहि मंडळानें बहुतेक मुक्रर केलें आहे. वेद, शास्त्रें, पुराणें, इतिहास, भाषा, न्याय, अर्थशास्त्र, वाङ्मय, कविता, कला, विज्ञानें इत्यादि प्रांतांत जे मोठमोठाले वाद म्हणून समजले जातात व ज्यामुळें विद्वानांची विद्वत्ता जनतेस प्रतीत होते, त्या वादांच्या उभय पक्षांचीं मतें या ग्रंथांत गोंविलीं जाणार आहेत. विशेष अडचणी उपस्थित न झाल्यास, विज्ञानबोध ता. १ ऑगस्ट १९३३ ला व वादकोश ता. १ ऑगस्ट १९३४ ला प्रसिद्ध करण्याची मंडळास उमेद वाटते, व तसें या ग्रंथाच्या प्रारंभीं जाहीरहि करण्यांत आलें आहे.

"शेवटीं महाराष्ट्र-सांवत्सरिक-मंडळातर्फे मी वाचकांना अशी विनंति करतों कीं, त्यांनी या ग्रंथाचा स्वीकार प्रेमळपणानें, सहानुभूतीनें व आपुलकीच्या भावनेनें करावा आणि आतापर्यंत निर्दिष्ट केलेल्या मित्रांना, संस्थांना व इतर सर्व लोकांना मी मंडळातर्फे अशी विनंति करतों कीं, मंडळानें योजिलेल्या वाङ्मयकार्यांत त्यांनीं मंडळास शक्य तें प्रोत्साहन द्यावें."

वरील आशयाचें श्री. भोपटकर यांचें भाषण झाल्यावर ग्रंथाचे मुख्य संपादक श्री. श्री. म. माटे

यांचें भाषण झालें. (त्यांचें भाषण पुढील अंकीं देण्यांत येईल.) नंतर अध्यक्ष श्री. केळकर यांनी महाराष्ट्र सांवत्सरिक ग्रंथ लोकमान्यांच्या पुण्य स्मृतीस अर्पण केला असें सांगितल्यावर त्यांच्या हस्तें, ग्रंथ तयार करण्यास ज्या ज्या गृहस्थांनी मदत केली त्यांना, ग्रंथाची एक एक प्रत देण्यांत आली. त्यानंतर श्री. न. चिं. केळकर यांचें खालील आशयाचें भाषण झालें.

**श्री. केळकर यांचें भाषण**

ते म्हणाले—"श्री. साटे यांनी महाराष्ट्र सांवत्सरिक या ग्रंथाची बहिरंग-अंतरंगाची माहिती आताच सांगितली. महाराष्ट्रांत शिक्षणाचा उपक्रम जरी ७५ वर्षांपूर्वी सुरू झाला असला तरी, अशा तऱ्हेचा म्हणजे ग्रंथनिर्मितीचा उपक्रम अलीकडे म्हणजे सुमारें चाळीस वर्षांपासूनच सुरू झालेला आहे. प्रथम असे ग्रंथ एकेकट्याच्या बळावर तयार झाले आहेत. आणि याला उदाहरण म्हणून कै. वामन शिवराम आपटे यांचे देतां येईल. त्यांनी एकट्याने कोशाचे दोन ग्रंथ तयार केले. पण आता दिवसेंदिवस सहकारितेने काम करण्याची पद्धत सुरू झाली आहे. ज्ञानकोशाचे काम सहकारितेने झाले. अशा तऱ्हेने काम केल्यास ते सुकर होतें. ऋग्वेदाचें भाषांतर झालें; रामायण महाभारताच्या आवृत्त्या निघाल्या; निरनिराळ्या नांवाखाली ग्रंथमाला सुरू झाल्या; सायण भाष्याचा ग्रंथ, आज जो दुर्मिळ झाला आहे, तोहि निर्माण करण्याचा उपक्रम खुद्द पुण्यासच सुरू झाला असून, तो लो. टिळकांच्या पुण्यस्मरणालाच समर्पण होणार आहे. तसेंच शब्दकोश, चरित्रकोश, व्यावहारिक ज्ञानकोश, वगैरेसारखे ग्रंथ तयार होत आहेत. यांचा उपयोग पुढील पिढीला मार्गदर्शक म्हणून झाल्याशिवाय राहणार नाही.

श्री. भावे आपल्या भाषणांत म्हणाले कीं 'पुस्तक-निर्मितीचें मंडळाला व्यसनच लागत चाललें आहे." गोष्ट अगदी खरी आहे. व्यसन म्हटलें कीं व्यसनी मनुष्य व त्याला लागलेल्या व्यसनाचा पदार्थ दोन्हीहि हवेत. आणि अशा दृष्टीने पाहता ग्रंथनिर्माता व वाचक वर्ग हे दोनहि झपाट्याने निर्माण होत आहेत. असलें व्यसन वाढणें केव्हाहि चांगलेंच. असा कोणता ग्रंथ आपल्या पाहण्यांत आहे कीं ज्याला प्रसिद्धीआधी अडीच हजारांपर्यंतची मागणी आली आहे ? हा ग्रंथ 'महाराष्ट्र सांवत्सरिक' या नांवाने प्रसिद्ध होत आहे. पण सांवत्सरिक म्हणजे तरी काय ? डोंगरावर दर वर्षी गवत उगवणें हेंहि सांवत्सरिक, व आम्रवृक्षाला दर वर्षी पालवी फुटणें, मोहोर येणें, व त्याचीं फळें तयार होणें हेंहि सांवत्सरिकच. पण दोहोंत फरक मात्र मोठा आहे. डोंगरावर उगवणारें गवत दरवर्षी मुळासकट उगवतें व तें वणव्यांत मुळासकट नाहीसें होतें. याच्या उलट आंब्याला दर वर्षी नवी पालवी जरी फुटत असली तरी, आमूलाग्र आंब्याचें झाड नाहीसें होत नाहीं. त्याची मुळें व बुंधा हा पहिलाच कायम असतो. हें सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, सदर सांवत्सरिक ग्रंथ हा गवतासारखा नसून आंब्याच्या वृक्षासारखा आहे. म्हणजे या ग्रंथांत दिलेली माहिती ही कायम स्वरूपाची अशीच आहे. जरी आतां दरवर्षी पुस्तक रूपाने या ग्रंथांत अधिक भर पडली तरी ती मूळ ग्रंथाला पुरवणी म्हणूनच होईल. मूळ ग्रंथ केव्हाच नाहीसा होणार नाही. हा ग्रंथ छोटेखानी म्हणजे खिशांत मावण्याजोगा असावा असें प्रारंभीं माझें मत होतें. याला कारण इतकेंच कीं व्याख्यात्यांना किंवा प्रवचनकारांना सहज रीतीने तो आपल्या जवळ बाळगता यावा आणि ग्राहकांनाहि तो अल्प किंमतींत घेता यावा. आता हा ग्रंथ हजार पानापर्यंत गेला असला तरी कांहींच बिघडलें नाही. श्री. भोपटकर यांनी आपल्या भाषणांत याच मंडळामार्फत लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांचीं नांवें सांगितलीं. पैकीं एक ग्रंथ 'वादकोश' असून त्यांत वादग्रस्त प्रश्नांचा उलटसुलट बाजूने विचार करण्यांत येणार आहे. आणि दुसरा 'विज्ञानबोध' हा ग्रंथ असून त्यांत आधिभौतिक शास्त्राची माहिती देण्यांत येणार आहे. वादकोशासारखीं इंग्रजींतहि 'प्रोज अँड कॉन्स' नांवाचीं लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध होत असतात. या पुस्तकांचा उपयोग वाद करणाऱ्यांना चांगला होतो. तात्पर्य ग्रंथ निर्मितीची ही परंपरा टिकून राहणार हें पाहून आनंद होतो.

**ज्ञान आणि विज्ञान**

बरेचसे लोक असें विचारताना आढळून येतील कीं, इतकें ज्ञान मिळवून व बहुश्रुत होऊन तरी करावयाचें काय ? या विषयांत वाद घालणारामध्येहि तीन पंथ आहेत. एक म्हणतो कीं, आम्हांला फक्त विज्ञानच पुरे, ज्ञानाची जरूर नाही. दुसरा पंथ म्हणतो कीं, विज्ञान हें ज्ञानाला बाधक होतें सबब विज्ञान नको, फक्त ज्ञान मिळालें म्हणजे झालें. तिसऱ्या प्रकारचे लोक असें म्हणतात कीं, ज्ञान आणि विज्ञान दोनहि पाहिजेत, कारण ज्ञान आणि विज्ञान हीं एकमेकाला पूरक आहेत. फक्त ज्ञान असूनहि चालत नाही, तसेंच नुसत्या विज्ञानावरहि भागत नाही. आता ज्ञान आणि विज्ञान यांचा अर्थ काय? ज्ञान म्हणजे अनेकांतून एकरूप सिद्धांत काढणें. उदाहरणार्थ सर्व

जगांत ब्रह्माशिवाय दुसरें कांहीं नाहीं. हें सांगणें याला ज्ञान म्हणतात. आणि एकरूप सिद्धांतांतून खाली उतरत उतरत तपशिलांत शिरणें हें विज्ञान कोठेंहि गेलें तरी ब्रह्म एकच आहे हें ज्ञान, व प्रपंचित सृष्टिसंसार त्या ब्रह्मापासून कसा होतो याचा विचार हें विज्ञान गणिती भाषेत सांगावयाचें झालें तर चढती भांजणी म्हणजे ज्ञान, व उतरती भांजणी म्हणजे विज्ञान. आणि गणितांत ज्याप्रमाणें चढती भांजणी व उतरती भांजणी ही दोनीहि माहिती असावी लागतात त्याच प्रमाणें प्रत्येकाला ज्ञान आणि विज्ञान हीं दोनीहि माहीत असावींच लागतात. विज्ञान नसून नुसतें ज्ञान असेल तर फुकट. तसेंच नुसतें विज्ञान असून ज्ञान नसलें तरीहि फुकटच. चाळीस वर्षापूर्वी महाराष्ट्रांतील कै. रा. ब. रानडे, गणपतराव जोशी वगैरे पुढाऱ्यांना असें वाटे कीं इंग्रज सरकारशीं विज्ञानमय युक्तिवाद करून त्यांच्याकडून स्वराज्य घेऊं, व तसा त्यांचा उपक्रमहि सुरू होता. पण पुढें काल पालटला व नुसत्या विज्ञानानें भागत नाहीं असें ठरून लोकांचें लक्ष ज्ञानाकडे वेधलें. १९०६ सालीं कलकत्ता येथें भरलेल्या कॉंग्रेसमध्यें कै. दादाभाई नौरोजी यांनीं 'आम्हांला स्वराज्य पाहिजे' असें सिद्धांतमय ज्ञानरूप उत्तर देण्यास शिकविलें. म्हणजे त्यांनीं विज्ञानाला म्हणजे तपशिलाला फाटा देऊन एकरूप सिद्धांत म्हणजे स्वराज्यज्ञान देण्यास सुरुवात केली. अशा तऱ्हेनें विज्ञानाचा विचार न करतां एकदम ध्येय सांगण्याची परंपरा १९१९ सालापर्यंत चालू होती. पण पुढें तिसरें युग सुरू झालें. सरकार म्हणूं लागलें कीं "तुम्हांला काय स्वराज्य पाहिजे म्हणतां! ठीक आहे. पण कसलें स्वराज्य पाहिजे तें सांगा? असा प्रश्न टाकून सरकार अडवूं लागलें.कसलें स्वराज्य पाहिजे याला उत्तर तपशिलानेंच द्यावयास पाहिजे.म्हणजे विज्ञान युग सुरू झालें.गेल्या गोलमेज परिषदेंत या विज्ञानाच्या भोवर्‍यांत पुष्कळांचा गोंधळ कसा उडाला हें स्वतः सर सॅम्युएल होअर यांनीं सांगितलें. या लोकांना फेडरेशन या शब्दाचें ज्ञान होतें पण विज्ञान नव्हतें. आताचें युग विज्ञानावर चालणारें आहे. तेव्हां ज्ञानाबरोबर विज्ञानाचाहि अभ्यास केला पाहिजे. वीज ही एक शक्ति हुडकून काढणारा हा ज्ञानी; पण तिचा आपल्या हरएक कामाकडे उपयोग करून घेणारा विज्ञानी, आणि समाजाला दोघांचीहि जरूरी आहे. वाङ्मयाच्याहि भाषेत बोलावयाचें तर अलंकार म्हणजे विज्ञान, आणि रस हें ज्ञान. ते अलंकार जर सगळे काढून टाकले तर नुसत्या साध्या शब्दानी रसनिर्मिती कितपत होणार? वाङ्मयांत जशी प्रज्ञा प्रतिभा यांची जोडी, किंवा बुद्धि व भावना यांची जोडी, तशीच राजकारणांत ज्ञान आणि विज्ञान यांची जोडी आहे.

असो, शेवटीं तरुण पिढीला एवढेंच सांगावेसें वाटतें कीं त्यांनीं ज्ञान आणि विज्ञान या दोहोंचाहि अभ्यास करावा.तशीच वाचक वर्गाला अशी विनंति करावयाची आहे कीं हा ग्रंथ वाचून त्यांत काय काय सुधारणा करावयास पाहिजेत त्या कळवाव्या. हा ग्रंथ लो. टिळकांच्याच चरणीं अर्पण करण्याचें कारण म्हणजे ते जसे ज्ञानी तसेंच विज्ञानीहि होते. ग्रंथाच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें पाहतां आम्हीं केलेली साडेपांचहजारांची मदत ही कांहींच नाहीं. वाचक वर्गानें या ग्रंथास उदार आश्रय द्यावा; तसेंच पुढें होणाऱ्या ग्रंथाकडेहि दृष्टि ठेवावी. शेवटीं मी संपादक मंडळाचे, भोपटकरांचे व आपले सर्वांचे आभार मानतों." वरील आशयाचें श्री. केळकर यांचें भाषण झाल्यावर श्री. पां. वा. गाडगीळ यांनीं अध्यक्षांचे आभार मानले. राष्ट्रगीत झाल्यावर हा गोड समारंभ संपला.

# वारकरी समाजाचें जाहीर पत्रक

॥ धर्माचें पाळण । करणें पाषांड खंडण ॥ १ ॥
॥ हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥२॥
॥ तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे ॥ ३ ॥
॥ नाहीं भीडभाड । तुका म्हणे सान थोर ॥ ४ ॥
॥ धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी ॥ १ ॥
॥ वाचा बोलूं वेद नीति । करूं संतीं केलें ते ॥२॥
॥ न बाणतां स्थिति अंगीं । कर्मत्यागी लंड तो ॥३॥
॥ तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषी श्रीहरिची ॥४॥

आम्ही खालीं सह्या करणार सर्व वारकरी समाजाचे प्रमुख देवस्थानांचे अधिकारी, प्रमुख फंडाचे मालक व आमचे संप्रदायाचे अभिमानी व अनुयायी लोक सर्व जनतेस विनयपूर्वक कळवितों कीं, सध्या आपले देशांत कांहीं 'राजकारणी पुरुषांनीं' अस्पृश्यतानिवारण या नांवाखालीं जी अनिष्ट धर्मविध्वंसक व वर्णसंकर करणारी चळवळ सुरू केली आहे ती आमचे सनातन वैदिक धर्मसंप्रदायाचे अगदीं विरुद्ध आहे. सबब ती आम्हांस बिलकुल मान्य नाहीं. आमचा भागवतसंप्रदाय सनातन

वैदिक धर्मानुयायी असल्यामुळे श्रुतिस्मृति-पुराणे आणि संतवचनें यांस शिरसावंद्य मानन चालणारा आहे. अस्पृश्य समाजावर स्पृश्यसमाजानें आजपर्यंत मोठा जुलम चालविला आहे व त्यांचा अनन्वित छळ केला आहे, अशीं जीं विधानें करण्यांत येतात तीं सर्वथैव खोटीं आहेत. अस्पृश्य समाजाचा सर्व व्यवहार आजपर्यंत स्पृश्यसमाजाशीं सलोख्यानें चललेला आहे. खेड्यापाड्यांतून बलुत्याचे रूपानें व गांवकामगिरीच्या नात्यानें परस्परांशीं मिळनमिसळून वागूनच उभयपक्षीं निर्वाह होत आला आहे; त्याचप्रमाणें मोठाल्या शहरांतूनहि श्रमविभागाचे तत्त्वावर वागूनच एकमेकांचा एकमेकांस उपयोग होत असून परस्परांचा योगक्षेम सुरळीतपणें चालला आहे. सर्व जनतेच्या सध्यांच्या सांपत्तिक स्थितीच्या मानानें अस्पृश्यांचीहि स्थिति त्यांचे समाजाचे पोषणापुरती समाधानकारकच आहे. मात्र त्यांचे धंदे अशुद्ध असलेमुळें त्यांचेपासून सर्व स्पृश्य समाज जरा अलिप्त व दूर राहतो इतकेच. व सर्व समाजाची घडी बरोबर राहण्याकरितां अशा रीतीनें वागणें हेंच अवश्य आहे, व याच धोरणानें शास्त्र व संतवचनें त्या समाजाशीं लगट न करण्याबद्दल सांगत आलीं आहेत.

सबब अशा वागण्यानें त्यांचेवर जुलम केला जातो अगर त्यांस पायाखालीं तुडविलें जातें असें म्हणणें वस्तुस्थितीत धरून नाहीं. उलटपक्षीं असा आरोप स्पृश्यसमाजावर करण्यानें जातीजातींत द्वेष, मत्सर व कलहाचें बीजारोपण केल्यासारखें होतें, समाजाचे धारणेसाठीं स्पृश्यास्पृश्य भेद, खाद्याखाद्य विचार व चातुर्वर्ण्यव्यवस्था हीं शास्त्रांनीं व संतांनीं मानलेलीं व पाळलेलीं आहेत. असें असल्यामुळे अस्पृश्यता हा आमचे धर्माचा कलंक नसून ती पाळणें हें आमच्या धर्माचें एक अंग आहे, व तें रक्षण करणें हा आमचा शास्त्रप्रतिपादित आचारधर्मच आहे. आमच्या धर्माला हा शाप लागलेला नसून जे कोणी याविरुद्ध मतें प्रतिपादन करीत असतील व त्याप्रमाणें स्वैरवर्तन करीत असतील ते आमच्या सनातन धर्मशास्त्राविरुद्ध उघडपणें बंडच उभारीत आहेत, असें आम्हांस वाटतें. आमचे सांप्रदायांतील सामुदायिक उत्सवप्रसंगीं अस्पृश्य समाजाच्याहि दिंड्या निघत असतात व त्या शास्त्रनियमानुसार वागून सर्व समाजांत मिळूनमिसळून गुण्यागोविंदानें आजपर्यंत वागत आल्या आहेत. अशी वस्तुस्थिति असतांना जे कोणी सुधारक लोक आपली स्वतःचीच शास्त्रविरोधी मतें प्रतिपादन करून समाजांत कलहाचें मूळ उत्पन्न करीत असतील त्यांस आमचे समाजांतील सर्व व्यक्तींनीं विरोधच केला पाहिजे, व त्यांचे नादीं बिलकुल लागतां उपयोगी नाहीं, असें आमच्या वारकरी समाजाचें स्पष्ट मत आहे. तरी सांप्रदायिक लोकांनीं आपली धर्मपरंपरा कायम राखावी व आपलें ऐहिक व पारलौकिक कल्याण साधावें.

बहुतां छंदाचे बहुवसे जन । नये बाटूं मन त्यांच्या संगें ॥ १ ॥
करावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥ २ ॥
सुखाची समाधि हरिकथा माउली । विश्रांति साऊली शिणलियांची ॥ ३ ॥
तुका म्हणे बुंड बांधूनि दगड । तेथे काय कोण धांवायाचें ॥ ४ ॥

**सह्या**

वे. शा. सं. बाबराव गंगाराम बडवे, अध्यक्ष बडवे कमिटी पंढरपूर, वे. शा. सं. विठ्ठल नारायण बडवे (पंढरपूर), श्रीमंत सरदार नानासाहेब खाजगीवाले पंढरपूर देवस्थान कमिटी (पंढरपूर), वे. शा. सं. वेणीमाधवाचार्य गजेंद्रगडकर (पंढरपूर), वे. शा. सं. भगवानशास्त्री धारूरकर (पंढरपूर), वे. शा. सं. काशीनाथशास्त्री उंबरकर, पंढरपूर; वे. शा. सं. दत्तात्रय सीताराम पुरोहित, पंढरपूर; वे. शा. सं. लक्ष्मण काशीनाथ उपाध्ये, पंढरपूर; वे. शा. सं. लक्ष्मण नारायण सावदेकर, पंढरपूर; वे. शा. सं. यशवंत बाळकृष्ण जोशी शिरपूरकर. पंढरपूर, श्री. रा. के. जी. जावडेकर. (पंढरपूर,) श्री. रा. रा. डी. ए. धारूरकर. (पंढरपूर,) श्री. रा. रा. विष्णु नारायण वर्तक, पंच आळंदी सं. कमिटी; श्री. रा. रा. श्रीधर विष्णु जोशी, पंच आळंदी सं. कमिटी, ह. भ. प. माधवराव गोडबोले, नृसिंह सरस्वती संस्थान आळंदी, ह. भ. प. पुरुषोत्तम नारायण साखरे जोशी कन्हय्याश्रम आळंदी, ह. भ. प. नारायणबुवा अरफळकर हैबतराव बाबा संस्थान आळंदी, ह. भ. प. भागवत भानुदासबुवा बेलापुरकर, ह. भ. प. दासगणु महाराज (नांदेड,) ह. भ. प. धोंडो गोविंद अत्रे गंगुकाकांचा फड पंढरपूर, ह. भ. प. रामचंद्र बाळकृष्ण महाराज चातुर्मास्ये. (अन्वेकर,) ह. भ. प. दिगंबर तुकारामबुवा देशपांडे, ह. भ. प. दत्तबुवा तुकारामबुवा ठाकूरबुवा, ह. भ. प. बापूसाहेब सोपानबुवा ठाकूरबुवा, ह. भ. प. पंजाबबुवा रामकृष्ण गंगाधर काळे, ह. भ. प. बाबासाहेब अजेरेकर, विठ्ठल वामन भुरे अजेरेकर फंडाचे पुढारी, संताजी महाराज कुकुरमुंडेकर, विष्णु नारायण ऊर्फ भाऊराव तोंडापूरकर.

श्री. रा. रा. गोविंद यादव कुलकर्णी, ह. भ. प. माधवबुवा व्यवहारे श्रीमुक्ताबाई संस्थानचे मालक, रामचंद्र विष्णु गोसावी मालक श्रीनिवृत्तिनाथ त्र्यंबकेश्वर, ज्ञानोबा वामन गोसावी मालक श्रीसोपानदेव स. सासवड, ह. भ. प. एन्. व्ही. गोसावी ऊर्फ बाबासाहेब देहूकर इनामदार संस्थान देहू, ह. भ. प. सोपानबुवा नामदेवबुवा देहूकर, ह. भ. प. बाबासाहेब महाराज वासकर यांचेतर्फे कृष्णाजी विठ्ठल कुलकर्णी, रावबुवा दासबुवा वरणगांवकर, बाबाबुवा वरणगांवकर, केशवराव रघुनाथ देशमुख, बाळकृष्ण धोंडदेव दिवेकर, रावबहादुर गोविंद महादेव वैद्य, पी. नटेश ऐय्यर, यशवंत नारायण वैद्य, वे. शा. सं. गोविंद विष्णु चौधरी, ह. भ. प. रामचंद्र यशवंत ऊर्फ भाऊसाहेब गोखले, प्रो. शंकर वामन दांडेकर.

# प्राथमिक शिक्षकांच्या पगाराची प्रदक्षिणा

थॉमस कमिटीने आपल्या रिपोर्टांत प्राथमिक शिक्षकांच्या पगारासंबंधाने जे अनुदारपणाचें धोरण स्वीकारलें आहे त्याविरुद्ध ठिकठिकाणच्या शाळा मास्तरांनी व शिक्षणसंस्थांनी कशी टीकेची झोड उठविली आहे याची कल्पना आमच्या वाचकांना आलीच आहे. मुंबई इलाख्यांतील प्राथमिक शिक्षक संघाची परिषद आमदार नामदेवराव नवले यांच्या अध्यक्षतेखाली मुंबईस ता. १९ रोजीं भरणार असून त्या वेळीं सर्व शिक्षक आपल्या तक्रारी एकजुटीने मांडतीलच. कमिटीनें कांहींहि शिफारशी केल्या असल्या तरी मुंबई सरकार त्यांपैकीं कोणत्या शिफारशी मान्य करतें हें पाहणें जरूर आहे. सरकारानें आपला निर्णय नुकताच प्रसिद्ध केला असून त्याचा विस्तृत गोषवारा आजच्या अंकांत दुसरीकडे दिलाच आहे. पण त्यांत शिक्षकांच्या पगारासंबंधाने मुळीं उल्लेखहि नाहीं. यामुळे त्यांच्या भवितव्याविषयीं कोणासहि अधिकच चिंता उत्पन्न व्हावी यांत नवल नाहीं. कौन्सिलच्या चालू बैठकींत थॉमस कमिटीच्या रिपोर्टाची चर्चा व्हावयाची आहे व खेरीज बजेटाच्या वेळींहि तो विषय घोळला जाणारच आहे. तरी त्या ऊहापोहास मदत व्हावी या हेतूने गेल्या बारा वर्षांत व त्यापूर्वीहि प्राथमिक शिक्षकांच्या पगाराच्या तक्रारी सरकारानें कशा चालढकलीवर नेल्या आहेत व त्यास ओरडत बसविलें आहे याचें प्रस्तुत लेखांत पर्यालोचन केलें आहे.

थॉमस कमिटीने आपल्या रिपोर्टांत प्राथमिक शिक्षकांच्या पगाराला देऊं केलेला टोला जर खरोखरच बसला तर त्यांचे हाल कुत्राहि खाणार नाहीं. कमिटीनें शिक्षकांच्या पगाराचे आदि व अंत सुचविले आहेत ते पाहून पुष्कळ शिक्षकांचा पंचवीस तीस वर्षांनी व्हावयाचा अंत आजच होण्याची भीति वाटत आहे. कमिटीचें पगारमान पुढीलप्रमाणें आहे—

| | आदि | मध्य | अंत |
|---|---|---|---|
| विनपरीक्षेचे शिक्षक | १५ रु. | | १५ रु. |
| पास झालेले शिक्षक | २० ,, | | २० ,, |
| पहिल्या वर्षाचे ,, | २० ,, | २५ | ३० ,, |
| दुसऱ्या वर्षाचे ,, | २५ ,, | ३५ | ४० ,, |
| तिसऱ्या वर्षाचे ,, | ३० ,, | ३५ | ५० ,, |

कमिटीने शिक्षकांचे पाच वर्ग पाडले आहेत व त्यास अनुसरून त्यांच्या पगाराचें मान ठरविलें आहे. या पाच वर्गांपैकीं पहिल्या दोन वर्गांवर कमिटीनें निर्दयपणाचा कळस केला आहे. त्यांनी पंधरा व वीस रुपयांवरच नोकरीची ऐन उमेदीच्या वयांत सुरुवात करावी व पंचवीसतीस वर्षांनी केस पिकल्यावर, अंग सुरकुतल्यावर व दात पडल्यावर तितक्याच पगारावर पेन्शन घ्यावें. नोकरीच्या या प्रवासास त्यांनी उन्हांतून निघावें व वाटेंत झाडाच्या छायेची किंवा मेघाच्या छत्रीचीहि आशा न धरता घाम गाळीत व डोकें तापवीत आपला प्रवास संपवावा. अशा मार्गास लागणारा संसारांतील कोणीहि यात्रेकरू सरकारास मिळणार नाहीं. एखाद्या ब्रह्मचर्याश्रमांतील बाल ब्रह्मचारी किंवा कुंभमेळ्यासाठीं प्रयागास गोळा होणाऱ्या टोळींतील कोणी नंगा गोसावी सरकारास भेटला तर न जाणो. परंतु अशा गोसाव्यापाशीं श्रीगणेशाऐवजीं व पाटीपुस्तकाऐवजीं 'आलेक् बम्' याचा पाठ आणि भांगेचा घोटा व गांजाची चिलीम यांचाच प्रसाद मिळणार हें उघड आहे. तात्पर्य, शाळांतील वर्ग हे सरकारास बैराग्यांचे मठ बनवायचे असतील तर गोष्ट निराळी !

शिक्षकांतील पहिले दोन सोडून पुढील तीन वर्गांकडे वळल्यास कोणास उल्हास—फाल्गुन मासांतल्याशिवाय—वाटणार आहे असें नाहीं. त्यांनाहि नोकरींतील सारा हयातींत १०, १५ व २० इतकीच बढती मिळावयाची आहे. आता हें खरें कीं, पहिल्या दोन वर्गांतील शिक्षकांप्रमाणें त्यांना ब्रह्मचर्याश्रमाचा किंवा चतुर्थाश्रमाचा स्वीकार करावा लागणार नाहीं. त्यांना लग्न करून

राहता येईल. पण संसार ! त्या संसाराची काय वाट! पहिल्या वर्षाच्या ट्रेन्ड शिक्षकाला फक्त लग्न लावूनच थांबावें लागेल. लग्न झालें कीं त्याचा संसार संपला म्हणून समजावा. त्याला संतात होता कामा नये, व त्यांतून यदाकदाचित ती जन्मास आलीच तर त्यानें आपल्या मुलांना मायामोह सोडून एखाद्या अनाथ विद्यार्थिगृहांत पाठविण्या-इतकें आपलें मन योगारूढ होऊन निर्विकार बन-विलें पाहिजे. पुढील दोन वर्गांतील शिक्षकांनी गीतेचा किंवा योगाचा अभ्यास ताबडतोब सुरू न केला तरी चालेल. परंतु नोकरीचीं दहापांच वर्षे झाल्यावर त्यांच्या हाताला गीतेचे श्लोक न लागले, त्यांना ट्रेनिंग कॉलेजांत संस्कृत शिकविण्यांत येत नसल्यामुळे त्या श्लोकांचा अर्थ न समजला अथवा त्यांचें मराठी भाषांतरहि न मिळालें तर संततिनियमनाचें शास्त्र शिकवि-णाऱ्या एखाद्या समाजस्वास्थ्यावरील पुस्तकाकडे वळल्याशिवाय निभाव नाहीं हें त्यांनी पक्कें लक्षांत ठेवावें. बढती न दिली तर न दिली, पण निदान हीं पुस्तकें तरी सरकारने त्यांस मोफत पुरवावीं !

शिक्षक मराठी झाला तरी विद्यावान असतो. मराठी शिक्षकांतील कित्येक जण चांगल्या विद्वानां-त गणले गेले आहेत. निव्वळ सातवी इयत्ता पास झालेला शिक्षकसुद्धा सुविद्य असूं शकतो. परंतु अशा प्रकारच्या सर्व शिक्षकांची शाळाखात्या-च्या प्रारंभापासून सरकारानें अनास्थाच मांडली आहे. सुमारें चोवीसपंचवीस वर्षांपूर्वीच्या हकीकती लोकांना कदाचित् त्रेतायुगांतील कथां-प्रमाणें जुन्यापुराण्या वाटतील. पण त्या वेळचे शिक्षकांचे पगार इतके लहान होते कीं तेवढ्यावर निर्वाह करणारांना एखादी सिद्धि सापडली होती किंवा काय अशी कोणासहि शंका आल्याशिवाय राहाणार नाहीं. १९०८ सालापूर्वी व्ह. फायनल शिक्षकाची प्राप्ति किती तर म्हणे रु. सात. त्या सालाच्या सुमारास त्या साताचे नऊ रुपये झाले. तेव्हापासून १९१७ पर्यंत शिक्षकांची सांपत्तिक स्थिति पुढीलप्रमाणें होती. व्ह. फायनल शिक्षकानें ९ रु. पगारावर पांच वर्षेपर्यंत जिवंत राहण्याचा चमत्कार करून दाखविला म्हणजे त्याला त्याबद्दल एक रुपया बक्षिस देऊन त्याच्या पगाराचा आंकडा बरोबर दहा रुपयांचा करावयाचा ! तशांतून त्याचें दैव हेडमास्तर होण्याइतकें थोर असलें तर त्याला एकावर एक अकरा रुपये मिळावयाचे ! याहि मास्तरांपैकीं, कोणाच्या पत्रिकेंत राजयोग वर्तविलेला नसेल कशावरून ? त्याला सिलेक्शन ग्रेड देण्यांत येऊन १२ ते १५ रु. पर्यंत त्याच्या पगाराची वाढ व्हावयाची.

सन १९१४ सालीं महायुद्धास सुरुवात झाली. व त्यानें १९१७ मध्ये चांगलेंच उग्र स्वरूप धारण केलें. युद्धकालांत कलियुगाचा प्रभाव जास्ती झाला कीं काय कोण जाणे, कारण मराठी शिक्षकां-ची सिद्धि किंवा कर्णपिशाच्च त्यांना सोडून चालतें झालें. दोस्त राष्ट्रांच्या सैन्यापुढे जर्मनीने हार खाण्यापूर्वीच शिक्षकांना कडाडत चाललेल्या धान्याच्या भावापुढे हार खावी लागली. शत्रूची गोळी खाऊन मरण्याऐवजी मराठी मास्तर अन्नाचा पोटभर गोळा खावयास न मिळाल्यमुळे मरतील अशी सरकाराची खात्री झाल्यामुळें त्यांनी १ एप्रिल १९१७ पासून नऊ रुपयांत आणखी एक रुपया वाढविला. हेडमास्तराना अकराचे बारा रुपये केले व ज्यांची नोकरी पंधरा वर्षे झाली, त्यांना तेथून आपल्या नोकरीचीं वर्षे मोजण्याचें काम सोपें व्हावें यासाठी पंधरा वर्षांबरोबर पगाराचाहि पंधराचाच आकडा घातला. व्ह. फा. शिक्षकांच्या पगाराचे आकडे असे चढत चालले असता त्यांच्या पुढचे जे ट्रेंड शिक्षक त्यांच्याहि पगारांत सुधारणा होत होती. त्यांना त्यांच्या सर्टिफिकिटांत सुरुवातीच्या पगाराचे आंकडे बारा, पंधरा, वीस, पंचवीस असे घातलेले असत. पण ते आंकडे व सणगावर दुकानदारानें लिहून ठेवलेले आंकडे सारखेच. त्यांनी महिन्याच्या काठीं हातांत पडणाऱ्या पगारावर समाधान झालें न हीं म्हणजे सर्टिफिकिटाच्या सनदी आकड्याकडे पाहून समाधान मानावें. सरकारचें हें दुटप्पी धोरण १९१७ सालीं बदलून ट्रेन्ड शिक्षकांना यांच्या सनदेप्रमाणें पगार मिळूं लागला व सनदेंतील आकडा हे ध्येय समजून त्याच ध्यान करीत बस-ण्याचें त्यांना कारण उरलें नाहीं!

सन १९२० सालीं जग महायुद्धाच्या क्लेशांतून बाहेर पडलें होतें. रशिया, जर्मनी, तुर्कस्थान या देशांतील राज्यक्रांतीबरोबर सर्वच विचारांची क्रांति होऊन जनतेच्या आकांक्षा बळावल्या. हिंदुस्थानांतील बहुजन समाजांतच काय पण सरकारी नोकरवर्गातहि नवचैतन्याचें तेज चमकूं लागून आपलें साध्य संघशक्तीनें हस्तगत करण्याचा मार्ग नोकर वर्गानेहि अवलंबिला. इतर नोकराप्रमाणे प्राथमिक शिक्षकांनीहि आपला संघ स्थापून व सोलापुरास परिषद भरवून पगारा! संबंधीं आपलें म्हणणें सरकारापुढे मांडलें. त्यांत त्यांनी आपल्या समजुतीप्रमाणे पसंत केलेल पगाराचे मान पाहिलें म्हणजे काय झालें असता शिक्षक समा-धान पावतील याची कल्पना येते. त्यांनी पुढील प्रमाणे आपल्या पगाराचा वर मागितला.

| परीक्षा | पगार रु. | सिलेक्शन ग्रेड रु. |
|---|---|---|
| व्ह. फायनल | ३०–६० | ७५ |
| ट्रेनिंगचें पहिलें वर्ष | ३५–७५ | १०० |
| ,, दुसरें वर्ष | ४०–१०० | १२५ |
| ,, तिसरें वर्ष | ५०–१२५ | १५० |

शिक्षकांच्या मागणीचा जास्तींत जास्त सहानुभूतिपूर्वक विचार जर कोठें झाला असला तर तो साठे-परांजपे योजनेमध्ये होय. ही योजना मुंबई कौन्सिलाच्या शिफारशीवरून करण्यांत आली होती. व तिचा अंमल चालविण्याची संधिहि डॉ. परांजपे मुंबई-इलाख्याचे शिक्षणमंत्री झाल्यावर त्यांस मिळाली होती. परंतु त्यांना आपल्या योजनेप्रमाणें वागता आलें नाही हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. साठे-परांजपे यांनी सुचविलेले पगारमान येणेप्रमाणें–

| परीक्षा | पगार रु. | सिलेक्शन ग्रेड |
|---|---|---|
| व्ह. फा. नापास झालेले शिक्षक | २० | ,, |
| ,, पास झालेले असिस्टंट | २५–½–३० | ,, |
| ,, पास झालेले हेडमास्तर | ३०–½–३५ | ,, |
| पहिल्या वर्षाचे ट्रेन्ड शिक्षक | ३०–१–५० | ५५ |
| दुसऱ्या वर्षाचे ,, | ३५–१½–६५ | ७५ |
| तिसऱ्या वर्षाचे ,, | ४०–२–८० | १०० |

शिक्षकांची मागणी व निर्वाह साठे परांजपे योजनेनें केलेली संभावना या दोहोंतील अंतर मोठें आहे हें खरें. तथापि इतकें नसलें तरी कांही अंतर राहणारच याची जाणीव शिक्षकांनाहि असल्यामुळे त्यांनी याहि योजनेवर आपलें समाधान मानून घेतलें असतें. परंतु या योजनेंतील पगार देतो म्हणून म्हणण्याचा धीर ना. परांजपे यांनाहि झाला नाही; इतकेंच नव्हे तर पुढील काळांत शिक्षक संघानें सोलापूरच्या परिषदेंत केलेली मागणी ही मनोराज्याप्रमाणें अशक्य ठरली, व साठे-परांजपे योजनाहि मृगजलाप्रमाणें शिक्षकांपासून दूर-दूर जात चालली. कारण १९२३ सालीं सक्तीच्या शिक्षणाचा कायदा मुंबई कायदे कौन्सिलांत पास झाल्यावर सर नारायण चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखालीं त्याच्या अंमलबजावणीचा आराखडा ठरविण्याकरिता जी कमिटी नेमली तिनें सुचविलेलें शिक्षकांचें पगारमान साठे-परांजपे योजनेपासून फारच खालीं घसरलें! चंदावरकर कमिटीची योजना अशी:–

| पराक्षा | पगार | सिले. ग्रेड |
|---|---|---|
| पास झालेले पण अन्ट्रेन्ड असि. | २५ | |
| ,, ,, हेडमास्तर | ३० | |
| प. व. चे ट्रेन्ड शिक्षक | १५-३० | ४० |
| दु. व. चे ट्रेन्ड शिक्षक | २०-४० | ५५ |
| ति. व. चे ट्रेन्ड शिक्षक | २५-६० | ७५ |

साठे–परांजपे यांच्यापेक्षा चंदावरकर कमिटीस अन्ट्रेंड असिस्टंटांची व हेडमास्तरांची दया आलेली दिसते. मास्तर अन्ट्रेंड झाला व त्याच्या सर्टिफिकेटाची रचना ट्रेंड शिक्षकाच्या सर्टिफिकिटाहून वेगळी असली तरी त्याच्या पोटाची रचना वेगळ्या तत्त्वावर केलेली नसते. ट्रेन्ड शिक्षकांना खावयास अन्न लागतें व अन्ट्रेंड शिक्षकांचें पोट मात्र उंटाप्रमाणें काट्यांनी किंवा शेळीप्रमाणें पाल्यापाचोळ्यानी भरतें असें थोडेच आहे. दोघांच्या पगारांतील ही विलक्षण विषमता चंदावरकर कमिटीच्या लक्षांत आली म्हणून च तिनें त्यांचा पगार कांही प्रमाणांत वाढविला. पण ट्रेन्ड शिक्षकांच्या पगाराचें मान वीस-पंचवीस रुपयांनी कमी धरलें. शिक्षकांच्या मागणीशीं तुलना करतां या योजनेंतील कमाल आंकडा निम्म्यावर आलेला दिसतो.

प्राथमिक शिक्षकांनीं सोलापुरास परिषद भरवून १९२०सालीं आपली पगाराची मागणी केली. तेव्हां मुंबई सरकार सांपत्तिक दृष्ट्या ऐश्वर्याच्या शिखरावर होतें. पण त्याची ती शक्ति १९२३ सालीं राहिली नाही, व १९२३ सालचें सामर्थ्य १९२५सालीं उरलें नाहीं. सरकाराला क्षयरोग लागून त्याच्या हातापायांतील नाड्या मरत चालल्या. म्हणून रोग असाध्य झाला म्हणजे डॉक्टरांच्या कमिट्यावर कमिट्या नेमून रोग्याचें औषध वारंवार बदलण्यांत येतें, त्याप्रमाणें मुंबईसरकार शिक्षकांच्या पगाराच्या बाबतींत कमिट्या मागून कमिट्या नेमून या बोटावरची थुंकी त्या बोटावर नाचवीत राहिलें. मुंबई कौन्सिलानें सुर्वे कमिटी बसविली व तिनें आपला रिपोर्ट १९२५ च्या सप्टेंबर महिन्यांत प्रसिद्ध केला. सदर रिपोर्टांत कमिटीनें पगाराचा प्रश्न गुंडाळून ठेवून केवळ अलावन्सवर शिक्षकांच्या तोंडाला पानें पुसण्याचें ठरविलें. शिक्षकांच्या पगाराकरिता अधिक पैसा तर खर्चावयाचा नाहीं; पण प्राथमिक शिक्षणाचा प्रसार थांबवावयाचा नाही असें धोरण असल्यामुळे अलावन्सची सवंग युक्ति लढविण्यांत आली. तिची कल्पना पुढील आकड्यांवरून वाचकांना येईल.

| शाळेचा दर्जा | हेडमास्तरांचा अलावन्स |
|---|---|
| ७५ पर्यंत मुलांची शाळा | ५ |
| ७६ ते १५० पर्यंत मुलांची | १० |
| १५१ ते २२५ | १५ |
| २२६ ते ३०० | २० |
| ३०० पेक्षां अधिक | २५ |

वरील अलावन्स हेड मास्तरांचा झाला. पण हेडमास्तराशिवाय फर्स्ट असिस्टंटालाहि अलावन्सचें आमिष लावण्यांत आलें होतें. त्यास अनुसरून १५०

मुलांपेक्षा अधिक मुलें असणाऱ्या शाळेवरील-फर्स्ट असिस्टंटाला दरमहा ५ रु.व २२५ मुलांपेक्षा अधिक मुलांच्या शाळेवरील फर्स्ट असिस्टंटाला १० रु. अलावन्स ठरला.हा अ ावन्स पेन्शनांतहि धरण्यांत यावा अशी सुर्वे कमिटीची शिफारस होती.कमिटीची योजना अमलांत आली, व तिचा फायदा हेड-मास्तर व फर्स्ट असिस्टंट यांना मिळूं लागला. या योजनेंत कमिटीनें शिक्षकांना संतुष्ट करण्यापेक्षा शिक्षणप्रसारावरच नजर ठेवलेली दिसते. कमिटीनें शाळेंतील दोन च शिक्षक त्यांस अलावन्सचें लालच दाखवून इतर शिक्षकांमधून फो डले व त्यांजमार्फत मुलांची संख्या फुगविण्याचें आपलें उद्दिष्ट साधलें. हजेरी अल वन्समध्येहि पंक्तिप्रपंच आहेच. १९२३ सालापासून प्राथमिक शाळा बोर्डाच्या ताब्यांत गेल्या, व बोर्डानें १९२३ सालापूर्वीचे व नंतरचे असा भेद शिक्षकांत करून १९२३नंतरच्या शिक्षकांना हजेरी भत्ता देण्याचें थांबविलें.

हेडमास्तर व फर्स्ट असिस्टंट याशिवाय इतर शिक्षकांना हजेरी भत्ता नाही. एवढ्यानें त्यांच्या दुर्दैवानें त्यांची पाठ काठे सोडली आहे? सरकार-च्या नाड्या अलीकडे अधिकच आखडल्यामुळें त्यांनी लोकल बोर्डाची ग्रँट कमी केली. तिचा धक्का शिक्षकांच्या पगाराला बसून त्यांचा पगार ६ टक्क्यांनी कापला जाऊं लागला. शिवाय त्यांच्या दर रुपयामागे एक आणा पेन्शन फंड घेण्यांत येत असल्यामुळे शिक्षकांच्या हातांत ठरलेल्या पगारा-पेक्षा किती कमी पगार पडतो याची चौकशी करण्या करितां सरकारानें खा ी कमिटी नेमून पाहावी, म्हणजे कमिट्यांच्या चौकशींत इतर कांहीं गुण न आला तरी नवीनपणाचा गुण खात्रीनें यईल व तितकाच शिक्षकांच्या जिवाला विरंगुळा मिळेल.

सरकारानें गेल्या बारा वर्षांत शिक्षकांच्या पगाराचा विचार करण्यासाठी तीन कमिट्या नेमल्या; परंतु त्यांच्या पगारांत खरी वाढ अशी एकाहि कमिटीच्या शिफारशीस धरून केली नाहीं. सन १९२०च्या ऑक्टोबरांत सरकारानें एक सर्क्युलर काढलें व त्यांत शिक्षकांचा तात्पुरता पगार ठरविला. त्यावरहि लोकल बोर्डानें आपली कुऱ्हाड चालविली व तो तासून काढून पुढील आकडे शिल्लक ठेवले आहेत.

| दर्जा | पगार |
|---|---|
| अनूपास शिक्षक | १५ |
| पास शिक्षक | २०—२५—३० |
| ट्रेनिंगच्या पहिल्या वर्षाचे | २५—३५—४० |
| " दुसऱ्या वर्षाचे | ३०—३५—५० |
| " तिसऱ्या वर्षाचे | ३५—६० |

हाहि पगार आणखी तासून गुळगुळीत करण्याचा थॉमस कमिटीचा विचार आहे, व तिचे आकडे आजच्या लेखाच्या प्रारंभीं दिलेच आहेत. त्या प्रमाणांतच शिक्षकांना यापुढे पगार देण्याचा कठोर-पणा सरकारानें प्रकट केला तर शिक्षकांच्या पगारवाढीची काल्पनिक प्रदक्षिणा पुरी होऊन त्यांच पगार फिरून पूर्वस्थळाजवळ आले व शेखमहमदा-प्रमाणें त्यांचें मनोराज्य खोटें ठरल्यामुळे त्यांचें जीवित पूर्वीपेक्षांहि अधिक खडतर व कष्टमय झालें असें म्हणावें लागेल. थॉमस कमिटीच्या शिफारशीमुळें शिक्षकवर्ग इतका भयभीत झाला आहे कीं आता आमच्या पगाराचें मान अधिक न वाढविलें तरी चालेल; पण मिळतो हा तरी पगार कमी करू नका अशी काकुळती शिक्षक करूं लागले आहेत. शिक्षकवर्गाचें हें म्हणणें वैता-गाचें असल्यानें त्याचें रहस्य नीट ओळखून मुंबई कौन्सिलाच्या सभासदांनी बारा वर्षें वाट पाहून रंजीस आलेल्या या शिक्षकांची पोटदुखी कौन्सिला-च्या चालू बैठकींत समाधानकारक रीतीनें कायमची मिटवावी अशी आमची त्यांस सूचना आहे.

# थॉमस कमिटीचा रिपोर्ट

## सरकारी निर्णय

**थॉमस पुनर्घटना कमिटीने केलेल्या सूचना लक्षांत घेऊन मुंबई सरकाराने १९३३-३४ सालीं ९-१० लाखांची खर्चांत बचत करण्याचें ठरविलें आहे. जकातीच्या उत्पन्नांत ३ लाख रु. वाढ, रजिस्ट्रेशन फीचे उत्पन्नांत ४ लाख ८० हजार रु. वाढ व कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या फीचे दर व करमणुकीच्या कराचे दर वाढवून एकंदर उत्पन्न सुमारें ९ लाखांनी वाढेल असा अंदाज केला आहे. एकंदरीनें सरकारची सांपत्तिक स्थिति १८ लाखांनी सुधारेल.**

**सरकारी आर्ट्स् कॉलेजें बंद होणार नाहींत. डेक्कन कॉलेज १९३४ मे अखेर बंद करण्यांत येईल. सिडनहॅम कॉलेज, इंजिनिअरिंग कॉलेज व जे. जे. स्कूल ऑफ आर्ट या संस्थांतील विद्यार्थ्यांच्या फीचे दर बरेच वाढविले जातील**

**थॉमस कमिटीने १ कोटि ७९ लाखांची बचत खर्चांत सुचविली होती, व उत्पन्नांत १९ लाखांची वाढ होईल अशा शिफारशी केल्या होत्या !**

थॉमस पुनर्घटना कमिटीने केलेल्या शिफारशीं पैकीं मुंबई सरकारने कोणत्या शिफारशी अंमलांत आणावयाच्या ठरविल्या आहेत, या संबंधाने केलेल्या निर्णयाचे एक पत्रक मंगळवारीं सायंकाळीं कायदेमंडळाचे सभासदांना सादर करण्यांत आले. त्याचा सारांश पुढें दिला आहे.

( १ ) कायदेमंडळाचे सभासदांना देण्यांत येत असलेला प्रवासाबद्दलचा भत्ता कमी करण्याची सूचना मान्य नाही.

( २ ) पुण्यास कामाकरितां राहाणाऱ्या हंगामी सरकारी नोकरांना देण्यांत येणारा स्थानिक नुकसानभरपाई भत्ता कमी करण्यांत येईल.

( ३ ) कराची, ठाणें, वांद्रे व कुर्ला येथील नोकरांना स्थानिक भत्ता मुंबईतील स्थानिक नोकरांना जो जादा भत्ता मिळतो त्या दराने यापुढे अर्धा मिळत जाईल. व कारकून शिपाई वर्गाच्या खर्चांत ताबडतोब ७५,६०० रुपयांची बचत केली जाईल. हळू हळू ही बचत १ लाखावर नेण्यांत येईल.

(४) सरकारी नोकरांना भाड्यानिमित्त मिळत असलेला भत्ता कमी करण्यासंबंधी व अजिबात बंद करण्यासंबंधी केलेल्या कमिटीच्या सूचना सरकारास मान्य आहेत. याबाबत १९३३-३४ सालच्या बजेटांत १ लाख ३१ हजाराची बचत होईल व अंतिम बचत १ लाख ५८ हजार होईल.

### प्रवास-भत्ता

( ५ ) मंत्रिमंडळाचे सरकारी सभासद व दिवाण यांच्या प्रवासभत्त्याच्या बाबतींत कांही शिफारशी थोड्या फार प्रमाणांत मान्य केल्या आहेत. इतर सरकारी अधिकाऱ्यांचे भत्ते बऱ्याच मोठ्या प्रमाणांत कमी करण्यांत येतील. भत्त्याचे दरच कमी केले आहेत. ही सूचना अंमलांत आल्यास २ लाख रुपये बचत होईल.

( ६ ) कायदेमंडळाचे अध्यक्ष व उपाध्यक्ष यांचे पगार किती कमी करावे यासंबंधीचा निर्णय कायदेमंडळाने करावा.

( ७ ) प्रॉव्हिन्शिअल व सबॉर्डिनेट सर्व्हिसेसमधील नोकरांचे पगार किती असावे यासंबंधी इतर प्रांतिक सरकारांशीं पत्रव्यवहार चालू आहे. नोकरांचे पगाराचे प्रमाणांत फारशी तफावत असू नये असें मुंबई सरकारचें मत आहे. १९३१ सालींच नव्या सरकारी नोकरांचें पगारांचें प्रमाण बरेंच कमी झालें आहे.

(८) दिवाणांचे पगार किती कमी करावयाचे तें कायदेमंडळानेच ठरवावे.

### हुजूरकचेरींतील बचत

(९) सेक्रेटरीएटमधील बचत हेडक्वार्टर्स बोर्ड्स स्थापन करण्यावर अवलंबून आहे. तथापि जॉइंट सेक्रेटरी, पी. डब्ल्यू. डी. ची जागा, स्टेटसेक्रेटरींचे संमतीनें १ जून १९३३ पासून कमी करण्यांत येईल. व भावी सुधारणांचे काम संपेल तेव्हां सेक्रेटरीची एक जागा कमी होऊं शकेल.

( १० ) हेड क्वार्टर्स बोर्ड स्थापन करण्याच्या सूचनेचा विचार चालू आहे.

(११) पब्लिक सर्व्हिस कमिशन नेमण्याचा विचार भावी राज्यघटना अस्तित्वांत येईपर्यंत तहकूब ठेवण्यांत आला आहे.

(१२) रजा व पेन्शन या संबंधींच्या सूचनांचा विचार चालू आहे. दरमहा पेन्शन न देतां कांही ठराविक रकमेने (पेन्शन) मोबदल्याची रक्कम देण्याची सूचना मान्य केली आहे.

(१३) सर्व खात्यांच्या स्टेशनरी खर्चात ५ टक्के बचत करण्यांत येईल. हा खर्च ३१ हजारांनी कमी होईल

(१४) राज्यकारभाराच्या व्यवस्थेच्या दृष्टीने संबंध येत असलेल्या खात्यांना जादा अधिकार देण्याबद्दलच्या सूचनांचा विचार चालू आहे.

### २ कोटींची शिल्लक

(१५) 'मुंबई' ही कायमची प्रांतिक सरकारची राजधानी असावी ही सूचना मान्य नाही. कारण भांडवली खर्च अधिक करावा लागेल.

(१६) २ कोट रुपयांची शिल्लक उत्पन्नांतून काढून ठेवण्याची सूचना अमान्य आहे. कारण व्याजाचें उत्पन्न बुडते. लॉइड बॅरेजवर कर्ज काढून मोठ्या रकमा खर्ची पडत. तेव्हा तिजोरीतून रकमा देत होता कारण व्याज मिळत होते. पण अशा मोठ्या प्रमाणावर भांडवली खर्च करण्याचा प्रसंगच कांहीं वर्षे तरी येईल असें वाटत नाही. आणि असा खर्च होणारच नसेल तर एवढी मोठी रक्कम तिजोरींत ठेवण्यानें व्याजाचें नुकसान होईल.

(१७) ४ आणे व त्यापेक्षा कमी दराच्या तिकिटावर अर्धा आणा 'करमणुकीचा कर' बसविणें व सूट अजिबात बंद करणें यासंबंधानें कायद्यांत दुरुस्ती करावी लागेल. तरी अशा बिलाचा विचार चालू आहे.

(१८) मुंबईत सिटी सिव्हिल कोर्ट स्थापन करण्याच्या सुचनेचा विचार चालू आहे.

### कामाच्या तासांत वाढ

(१९) कराची व मुंबई येथील नोकरांचे दररोजचे कामाचे तास वाढविण्याची सूचना मान्य आहे. मुंबईतील नोकरांना तसे हुकूम रवाना झाले आहेत. सिंधचे कमिशनरसाहेबांनाहि याबाबत कळविण्यांत आलं आहे.

(२०) सरकारी कचेरींतील पट्टेवाले कमी करण्याबाबतची सूचना मान्य आहे.मात्र या योजनेंत थोडाफार फरक करण्यांत येईल.तूर्त ५० हजारांची बचत होईल व अंतिम बचत ४ लाख ५० हजार होईल असा अंदाज आहे !

(२१) मुंबईतील नवीन पट्टेवाल्या नोकर वर्गाला देण्यांत येणारें भाडें भत्ता बंद करून डिलाइल रोडवरील अगर नायगांव येथील डेव्हलपमेंटचे चाळींत त्यांना मोफत जागा देण्यांत येईल. व हल्लींच्या नोकरांचा भाडेभत्ता कमी करण्यांत येईल. तूर्त बचत २४ हजार. अंतिम २९,००० रु

(२२) ग्रामसुधारणा मंडळाची स्थापना हेड क्वार्टर्स बोर्डाच्या निर्णयावर अवलंबून आहे.

### उच्च शिक्षण संस्थांच्या फीत वाढ

(२३) सरकारी 'आर्टस' कालेजें सरसकट बंद करण्याची शिफारस मान्य नाही. पण १९३४ मार्च अखेर 'डेक्कन कॉलेज' बंद करण्याचें ठरलें आहे.

(२४) मुंबईचे सिडनहॅम कॉलेज व पुण्याचें इंजिनिअरींग कॉलेज या दोन संस्थांतील विद्यार्थ्यांच्या फीचे दरांत जबर वाढ करण्यांत येईल. ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें वैद्यकीचें शिक्षण घेणाऱ्या नव्या विद्यार्थ्यांचे बाबतींतच फी वाढविली जाईल. पुण्याचें ॲग्रिकल्चर कॉलेज अधिक काटकसर करून चालविण्यांत येईल.

(२५) सध्या तरी 'जे. जे. स्कूल आफ आर्ट' ही संस्था चालविण्याचें ठरलें आहे. संयुक्त राज्यघटना अंमलांत आल्यावर मध्यवर्ती सरकारने ती चालवावी अशासंबंधानें हिं. सरकाराशीं पत्रव्यवहार चालू आहे. पण विद्यार्थ्यांची फी मात्र वाढविण्यांत येईल.

(२६) शिक्षणखात्यांत पुढील सालीं रु. ४४,५०० ची बचत होईल व अंतिम बचत रु. १,१५,३०० ची होईल.

### औद्योगिक खातें

(२७) औद्योगिक खातें बंद करण्याची सूचना मान्य नाही. सध्या ज्या पद्धतीने तें चालू आहे त्याच पद्धतीने ते चालू ठेवण्यांत येईल.

(२८) मुंबईस ऑर्थर रोड जेल आणि हाऊस ऑफ करेक्शन्स यांचे ऐवजीं सेंट्रल प्रिझन बांधण्याच्या योजनेचा विचार चालू आहे. 'जेल मेडिकल सर्व्हिस' स्वतंत्र करण्याची सूचना विचारांत घेण्यांत येईल.

(२९) भावी राज्यघटनेंत न्यायदान खात्याची जी व्यवस्था राहील तिजवर नवीन प्रांतिक न्यायाधिकाऱ्यांची योजना अवलंबून आहे.

(३०) सिंधमधील ज्युडिशिअल कोर्टातील हंगामी रिकाम्या जागा भरावयाच्या नाहीत असें दोन अटींवर ठरविण्यांत आलें आहे.

(३१) प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट व स्मॉल कॉजकोर्टातील न्यायाधिकारी यांच्या पगाराचा फेरविचार व मुनसफांच्या जागा कमी करण्यासंबंधीच्या सूचनांचा विचार चालू आहे.

(३२) सिंधचे कमिशनर 'जेहलम' बोटीचा उपयोग यापुढे करणार नाहीत पुढील सालीं ११,००० रुपयांची व शेवटीं १३००० रु. ची बचत होईल.

(३३) न्यायदान खात्यांत रु. २२,४०० ची बचत ताबडतोब करण्यांत येईल. जमीनमहसूल खातें व जनरल ॲडमिनिस्ट्रेशन यांमध्ये रु. १४,४०० ची काटकसर होऊं शकेल. या खात्याबाबत कमिटीनें केलेल्या इतर शिफारशींचा विचार चालू आहे.

(३४) माथेरान व महाबळेश्वर येथील सिव्हिल

सर्जनचे जागीं प्रॉ. सर्व्हिसमधील सरकारी नोकरांची नेमणूक करण्याची सूचना मान्य. याबाबत भारत-मंत्र्यांची अनुमति घ्यावयाची आहे. वैद्यक खात्यांत तूर्त काटकसर होणार नाही. पण अखेर ३० हजार रुपयांची बचत होईल.

( ३५ ) पंचमहाल जिल्ह्यांतील घोडेस्वार कमी करण्यांत येतील, व पोलीस खात्यांत फक्त ४ हजार रुपयांची बचत होईल!

( ३६ ) सरकारी छापखान्याच्या पुनर्घटनेचा विचार चालू आहे.

( ३७ ) डायरेक्टर ऑफ पब्लिक हेल्थची जागा कमी करण्याची सूचना मान्य करण्यांत आली आहे. पण या बाबतींत भारतमंत्र्याची संमति घ्यावयाची आहे. सर्जन जनरल हेच मेडिकल व पब्लिक हेल्थ खात्याचे प्रमुख अधिकारी राहतील. अ. पब्लिक हेल्थ डायरेक्टरचे जागी आय. एम. एस. अधिकारी न नेमतां प्रॉ. सर्व्हिस मधून नेमावा ही सूचना मान्य आहे. या सुधारणेने २६ हजारांची बचत होईल.

( ३८ ) सरकारी इमारतींचे भाडे म्हणून पगारांत सरास १०टक्के कपात करण्याची सूचना मान्य नाही. या बाबतींत कमिटीची टीका न्याय्य नाही. भारी पगाराचे अधिकाऱ्यांना मोठाले बंगले देण्याची व्यवस्था करण्यांत येईल. अकौंटंट जनरलच्या देखरेखीमुळे याबाबत नुकसान आलेलें नाही.

( ३९ ) इरिगेशन चीफ इंजीनिअर व रोड्स व बिल्डिंग्ज चीफ इंजीनिअर या दोन जागांवर एकच अधिकारी नेमावा, व या दोन जागांचे काम त्याने पहावें ही सूचना मान्य आहे. भारतमंत्र्याच्या संमतीने १ जून पासून ही सूचना अमलांत येईल.

**पब्लिक वर्क्स खातें**

( ४० ) इरिगेशन अँड रिसर्च सुपरिंटेंडिंग इंजीनिअरची जागा कमी करण्याची सूचना मान्य आहे. दुसऱ्या इंजीनिअरची जागा कमी करण्याचा विचार चालू आहे.

( ४१ ) सिंधमधील जॉइंट चीफ इंजीनिअरची जागा मार्च १९३३ पासून कमी करण्यांत येईल. पब्लिक हेल्थ अँड स्टाफचे सुपरिंटेंडिंग इंजीनिअरच्या ऐवजीं कन्सल्टिंग इंजीनिअर नेमण्याच्या सूचनेंतील तत्त्व मान्य आहे. इलेक्ट्रिकल इंजीनियर टु गव्हर्मेंटची जागा कमी करण्याच्या सूचनेचा विचार चालू आहे.

( ४२ ) प्रांतिक सरकारचे ताब्यांतील रस्त्यांवर जकात नाकी वाढविण्याची सूचना मान्य केली आहे जकातीचे उत्पन्न ३ लक्षांनी वाढेल असा अंदाज आहे.

( ४३ ) पब्लिक वर्क्स खात्यांत रु. ५,६४,-६०० बचत होणार असून शेवटीं हा आंकडा ७ लाखांवर जाईल.

**रजिस्ट्रेशन फींत वाढ**

( ४४ ) रजिस्ट्रेशन फी व नक्कल फीचे दरांत वाढ करण्याची सूचना मान्य. वाढत्या दराने फीचें उत्पन्न रु. ४,८०,००० नीं वाढेल.

( ४५ ) चेकवर स्टँपड्यूटी बसविण्याकरिता हिं. सरकारने कायदा केला पाहिजे. पण स्टँपची विक्री करणाऱ्या एजंटांचे कमिशनाचे दर कमी करण्याची सूचना मान्य केली आहे.

( ४६ ) व्हेटरिनरी खात्याच्या सुधारणेबाबतच्या सूचनांचा विचार चालू आहे.

( ४७ ) मान्य केलेल्या शिफारशीप्रमाणें सरकारी जमाखर्चांत ताबडतोब सुधारणा १८२०१०० लक्ष रुपये होईल व ही सांपत्तिक सुधारणा कांही वर्षांनी २७ लाख ९९ हजार होऊं शकेल असा सरकारचा अंदाज आहे.

# महात्मा गांधी व रा. केळकर

महात्मा गांधी यांच्या बोलावण्यावरून गेल्या मंगळवारी श्री. न. चिं. केळकर यांनी येरवड्याचे तुरुंगांत महात्माजींची गांठ घेतली. उभयतांचे सुमारें दीड तास संभाषण झालें. त्यांत मंदिर-प्रवेशाचे बिलासंबंधाने सर्व बाजूंनी मोकळ्या मनाने चर्चा झाली. मंदिर-प्रवेशासंबंधाने रा. केळकर यांनी आपली तडजोडीची योजना महात्माजीपुढे मांडली. महात्माजींनी ही योजना आपणास मान्य असल्याचे सांगितलें. आणि सनातनी लोक ती मान्य करीत असतील तर त्या योजनेने(फक्त अंबेडकरादि लोक वगळून) सनातनी व प्रागतिक यांचें एकमत होऊन हा प्रश्न सुटेल असेंहि महात्माजींनीहि सांगितलें. उलट सार्वजनिक मंदिराचे ट्रस्टी व मॅनेजर, आपलेंच मत चालवून व लोकमत धिःकारून, अस्पृश्यांना मुळीच मंदिरप्रवेश करूं देणार नाही असें म्हणतील तर, त्यांना योग्य मार्गावर आणण्याकरिता कायद्याची मदत घेणें योग्यच होईल असें केळकर यांनी आपलें मत सांगितलें. रा. केळकर यांची तड-जोडीची योजना अशी आहे. ( १ ) देवळाचें जें गर्भागार म्हणजे अंतर्गृह म्हणून असतें त्यांत अस्पृश्यच काय पण स्पृश्यांनाहि प्रवेश करूं देऊं नये. (२) या अंतर्गृहांतील सर्व व्यवस्था व प्रत्यक्ष देव-

पूजा ही फक्त नियोजित पुजाऱ्यानेच करावी, व इतरांना फलपुष्प नैवेद्यादि भोग मूर्तीला वाहावयाचे असतील तर ते पुजाऱ्याचे हातीं देऊन त्याजकडून ते वाहवावे. (३) अंतर्गृहाबाहेर सोईच्या अशा ठिकाणीं एक मर्यादेची खूण उभारण्यांत यावी, आणि स्पृश्य किंवा अस्पृश्य यांनी तेथूनच देवदर्शन घ्यावें. यानंतर इतर, पण अर्थात् राजकारणाशीं संबंध नसलेल्या, अनेक विषयांवर केळकर व महात्माजी यांचें संभाषण होऊन ही मुलाखत संपली.

या मुलाखतीच्या वेळींच 'सकाळ' पत्राचे संपादक डॉ. परुळेकर व प्रो. ओतुरकर यांची महात्माजींशीं मुलाखत झाली. तींत मंदिरप्रवेशाच्या चळवळीसंबंधानें मराठी वाचक वर्गामध्ये मतप्रसार होण्याची काय योजना करावी याची वाटाघाट झाली. डॉ. परुळेकर यांनी महात्माजींना असें सांगितलें कीं, राजकारणांत तुमचा आमचा मतभेद असला तरी, मंदिरप्रवेशाचे बाबतींत तुमचें आमचें सर्वस्वी एकमत आहे असा विश्वास ठेवून तुम्ही मराठी वर्तमानपत्रांचा सर्वस्व उपयोग करून घ्यावा.

# स्फुट सूचना

१ नाशिकच्या तुरुंगांतील बार्डोलीचे एक सत्याग्रही श्री. अमृतलाल यांना मारहाण व जबर दुखापत केल्याच्या आरोपावरून तेथील गोरे जेलर रॉश व डेप्युटी जेलर जॅकसन यांना अनुक्रमें एक वर्ष व नऊ महिने अशा शिक्षा झाल्या होत्या. या शिक्षांविरुद्ध आरोपींनी सेशन जज्जाकडे अपील केले होतें. सदर अपीलाचा निकाल होऊन झालेल्या शिक्षा सेशन जज्जांनी कायम केल्या. वरील आरोपींनी असहाय्य अशा कैद्यांवर जो हल्ला केला तो भ्याडपणाचा व निर्दयतेचा निदर्शक होता असें म्हणून सेशन जज्जांनी आपल्या निकालपत्रकांत त्याचा कडक निषेध केला आहे व त्याप्रमाणेंच एकंदर तुरुंगांतील कारभारावरहि सपाटून टीका केली आहे! श्री. अमृतलाल यांनी असा गुन्हा तरी कोणता केला कीं, ज्याकरितां त्यांना खुद्द जेलरने एवढी मारहाण करावी याची चिकित्साहि सेशन जज्जांनी केली आहे. तुरुंगांतील अधिकाऱ्यापुढे चवड्यावर बसून गुडघ्यांत मान घालण्याचें श्री. अमृतलाल यांनी नाकारलें हा तो गुन्हा होय! या शिस्तीला तुरुंगाच्या कायद्याच्या कलमाचाहि आधार नाही. परंतु, रूढीच्या जोरावर सर्व कैद्यांना ही बेकायदेशीर शिस्त तुरुंगाचे अधिकारी पाळावयास लावतात. ही शिस्त नसून हा जुलूम आहे हें या खटल्यावरून लक्षांत घेऊन सरकारने हा प्रकार ताबडतोब बंद करावयास पाहिजे. जेलरपासून तों अगदी खालच्या वॉर्डरपर्यंतच्या सर्व अधिकाऱ्यांना तुरुंगांत केवढी सत्ता असते व त्या सत्तेचा दुरुपयोग कसा केला जातो, याचेंहि चित्र सरकारापुढे व जनतेपुढे या खटल्याने उभें केलें आहे. तुरुंगखातें हें एक वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या खिशांतील खातें आहे, व त्यावरील अधिकाऱ्यांच्या नेमणुका जवळजवळ वशिल्यावरून अवलंबून असल्यामुळे पुष्कळच अंशीं अशिक्षित, अडदांड व आडमुठ्या लोकांची वरणी तेथे लागते. रॉश या जेलरला तुरुंगांतील कामाची माहिती होती. एकदा तर त्याला वरिष्ठांचा हुकूम न मानल्याबद्दल बडतर्फहि केलें होतें. परंतु पुनः तो जेलर होऊं शकतो, व असली भयंकर मारहाण करूं शकतो ही एकच गोष्ट तुरुंग खात्याचा कारभार कसा चालतो याची उत्तम निदर्शक आहे.

---

२ रॉश व जॅकसन यांना श्री. अमृतलाल यांच्यावर केलेला हल्ला अमानुष होता म्हणून तो न्याय कोर्टांत उघडपणें सिद्ध होऊं शकला. परंतु, अशा स्वरूपाचे कितीतरी गुन्हे तुरुंगांत घडतात. पण ते बाहेर येऊं शकत नाहींत. वास्तविक तुरुंगावरील सुपरिंटेंडेंट व वैद्यकीय अधिकारी यांचे असले गुन्हे घडूं न देणें हें कर्तव्य आहे. परंतु, या खटल्यांतील साक्षीपुराव्यावरून जी एक गोष्ट स्पष्ट झाली ती ही कीं, निदान या खटल्यांत तरी सुपरिंटेंडेंट व वैद्यकीय अधिकारी यांनी अत्यंत हलगर्जीपणा व कर्तव्यपराङ्मुखता दाखविली! तुरुंग खात्याच्या नियमाचें तर त्यांनी उल्लंघन केलेंच; पण कैद्यांना कोणत्याहि तऱ्हेची मारहाण करूं नये असा असलेला सरकारी हुकूम आपल्या हाताखालचे अधिकारी धाब्यावर बसवीत असता या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी मूग गिळले ही अत्यंत शरमेची गोष्ट होय. खटल्यांत असेंहि सिद्ध झालें कीं श्री. अमृतलाल यांनी जेलरचा गुडघ्यांत मान घालण्याचा हुकूम मानण्याचे स्वाभिमान बुद्धीने नाकारलें, ही गोष्ट सुपरिंटेंडेंटला माहीत होती. अशा स्थितींत त्यांनी रॉश व जॅकसन यांना आपल्या अपमानाबद्दल सूड घेण्याची संधि मिळूं दिली, ही

अक्षम्य चूक होय! तुरुंगावरील मुख्य डॉक्टरांनींहि आपलें कर्तव्य केलें नाहीं इतकेंच नव्हे तर नियमाप्रमाणें आपलें कर्तव्य काय आहे हेंहि आपणास माहीत नसल्याचें कबूल केलें. तात्पर्य, या खटल्यावरून सरकारनें तुरुंगखात्याची व्यवस्था आमूलाग्र सुधारली पाहिजे हे सिद्ध होतें. तुरुंगांतील अनियंत्रितपणाची कल्पना पुष्कळांना यापूर्वी होती. कौन्सिलमध्यें व वर्तमानपत्रांमधूनहि त्याची चर्चा होत होती. परंतु, या सर्वांला खटल्याच्या स्वरूपानें तोंड पाडण्यास श्री. अमृतलाल यांचा निग्रही स्वाभिमान, कठोर दृढनिश्चय व अपूर्व त्याग कारणीभूत झाला यांत शंका नाहीं. म्हणून त्यांच्या या गुणाचें अभिनंदन करणेंहि या वेळीं जरूर आहे.

# पार्लमेंटांतील महत्त्वाचीं प्रश्नोत्तरें

### गांधिजींच्या मुक्ततेस विरोध कां?

सोमवार ता. १३ रोजीं मजूर पक्षाचे सभासद मि. थॉमस विल्यम्स यांनी म.गांधींच्या मुक्ततेचा विषय काढला तेव्हा पुढीलप्रमाणें प्रश्नोत्तरें झालीं:—

सर सॅम्युअल होअर—म. गांधी व इतर राजबंदी यांची मुक्तता होतांच पुनः कायदेभंगाची चळवळ सुरू होणार नाहीं अशी सरकारची खात्री होण्याला जोंपर्यंत सबळ कारणें घडलीं नाहींत, तोंपर्यंत सरकार, म. गांधी व इतर राजबंदी यांच्या मुक्ततेच्या प्रश्नाचा विचारच करूं शकत नाहीं!

मि. थॉमस विल्यम्स—हिंदी जनतेचे अधिकृत पुढारी तुरुंगांत असतांना गोलमेज परिषदेनंतर अधिक फलनिष्पत्ति होईल असें स्टेट सेक्रेटरींना वाटतें काय?

सॅम्युअल होअर—सध्याच्या अगर पुढच्या चर्चेचे वेळीं विचारविनिमय करण्याला कितीतरी हिंदी प्रतिनिधि मिळूं शकतील.

मि. थॉमस विल्यम—हिंदी जनतेच्या पुढाऱ्यांची मुक्तता केली तर गोलमेज परिषदेचें झालेलें कार्य मान्य करण्याला अधिक लोक तयार होतील नाहीं काय?

सर सॅ. होअर—हा प्रश्न बराच भानगडीचा आहे. त्याला 'होय अगर नाहीं' यांपैकीं काय उत्तर द्यावें हें समजत नाहीं.

हुजूर पक्षाचे सभासद सर वॉल्टर स्माइल्स यांचे प्रश्नाला उत्तर देतांना होअर म्हणाले, "अँग्लो इंडियन लोकांच्या शिक्षणासंबंधानें गोलमेज परिषदेच्या कमिटीच्या रिपोर्टाचा विचार हिं. सरकार करीत आहे. ज्याकरितां वेगळा कायदा करण्याची जरूर नाहीं. अशा शिफारशी लवकरच अंमलांत येतील."

मजूरपक्षाचे सभासद मि. इ. जी. हिक्स यांनीं दिल्लीच्या कटाचा खटला हिं. सरकारनें काढून घेतला त्यासंबंधीं प्रश्न विचारला. त्यावर होअर म्हणाले, "अशा प्रकारच्या दीर्घकाल चाललेल्या कटाच्या खटल्याचा विशेष विचार केला पाहिजे. पण प्रस्तुत प्रश्न बराच गुंतागुंतीचा आहे. हिंदुस्थानांतील परिस्थिति बिकट आहे हें खरें. हिंदुस्थान सरकारशीं या बाबतींत पत्रव्यवहार चालू आहे."

मजूरपक्षाचे सभासद हिक्स यांच्या दुसऱ्या एका प्रश्नाला उत्तर देतांना सर सॅम्युअल होअर म्हणाले, "ऑल इंडिया सर्व्हिसेसमधील नोकरांच्या पगारांत कपात चालू ठेवावी लागत आहे ही दुर्दैवाची गोष्ट होय. पण कपात कमी करतां येणें शक्य आहे. लवकरच या संबंधाचें बिल पार्लमेंटपुढें येईल त्या वेळीं सविस्तर खुलासा होईल!!"

### मीरत कटांतील कैदी

मि. हिक्स यांच्या प्रश्नाला उत्तर देतांना सर सॅ. होअर म्हणाले, या कटांतील कैद्यांना अंदमानास पाठविण्याचा विचार नाहीं. त्यांना फक्त सक्तमजुरीचा कारागृहवास देशांतच भोगावा लागेल.

मजूर सभासद मॉर्गन जोन्स म्हणाले, इतका दीर्घकाल खटला चालला हें लक्षांत घेऊन 'मीरत कटाच्या खटल्यांतील कैद्यांवर सरकार दया दाखवील काय?'

सर सॅ. होअर—"अपील चालावयाचें आहे. म्हणून सरकारनें कांहींच निश्चित मत बनविलें नाहीं."

मि. डेव्हिड ग्रेनफेल (मजूर) यांच्या प्रश्नाला उत्तर देतांना होअर म्हणाले, "सुवर्णमापन व कागदी चलन गंगाजळी ठेव ३ कोटी ३२½ लक्ष पौंड होती गेल्या वर्षांत गंगाजळी ठेव १ कोटी ५२½ लक्ष पौंडांनीं वाढली आहे. हा परिणाम जमाखर्चाची तोडमिळवणी व शहाणपणाचें आर्थिक धोरण यांचा होय.

### ब्रह्मदेशाचा विभक्तपणा

ब्रह्मदेशासंबंधीं सरकारी धोरणाचा खुलासा करतांना सर सॅ. होअर म्हणाले, "ब्रह्मदेशच्या गोलमेज परिषदेच्या शेवटच्या बैठकींत मुख्य प्रधान मि. मॅक्डोनल्ड यांनी ब्रह्मदेशाचें विभक्तीकरण व त्याचा संयुक्त राज्यघटनेंत समावेश हे दोन प्रश्न मतदार संघापुढें पुढील निवडणुकीचे वेळीं मांडण्यांत येतील असें सांगितलें होतें. त्याप्रमाणें नोव्हेंबर-

मध्यें निवडणुकी झाल्या. व डिसेंबरअखेर कायदेमंडळांतील प्रतिनिधींनी दोन्ही सूचना फेटाळल्या. त्यांनी पास केलेल्या ठरावांत सरकारनें सुचविलेल्या योजनेशीं सुसंगत असें कांहींच आढळत नाहीं. सुधारणांच्या मार्गातील ब्रह्मी लोकांची अडचण दूर करण्याचा सरकार विचार करीत आहे. "

वऱ्हाडचा प्रश्न

मजूर पक्षाचे सभासद मि. मॅकेन्टी यांना उत्तर देतांना सर सॅ. होअर म्हणाले, 'वऱ्हाड निजामाकडे देण्यापूर्वी वऱ्हाडच्या लोकांना आपलें म्हणणें मांडण्यास पूर्ण संधि दिली जाईल.'

सिंधप्रांत विभागणी

मि. रेमर यांना सर सॅ. होअर म्हणाले, "पार्लमेंटपुढे नवीन राज्यघटनेचा आराखडा मांडला जाईल त्याच वेळीं सिंध प्रांत स्वतंत्र प्रांत राहील असें धरूनच त्याचा समावेश केला जाईल."

# मंदिर–प्रवेश बिलाची इष्टापत्ति

ता. २४ जानेवारीच्या केसरींत अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशासंबंधीं आम्हीं आपलें मत प्रगट केलेंच आहे. 'सार्वजनिक' ठरणाऱ्या देवळांत अस्पृश्यांना प्रवेश करूं द्यावा कीं नाहीं याविषयीं स्थानिक स्पृश्य लोकांचें बहुमत हें आम्हाला निर्णायक वाटतें. "हा प्रश्न धर्माचा; आणि धर्म म्हटला म्हणजे तो केवळ ज्याच्या त्याच्या सदसद्विवेकबुद्धीचा प्रश्न; त्यांत कोणाच्या कामीं कोणी हात घालूं नये," हें जरी खरें असलें तरी,तो विचार केवळ खासगी देवस्थानें यानाच लागू पडतो. पण एकदा देवस्थान सार्वजनिक ठरलें म्हणजे, त्याच्या व्यवस्थेसंबंधीं विशिष्ट मताचा आग्रह धरण्याचा अधिकार जसा एकाला पोंचतो, तसाच तो समान अधिकाराच्या इतरांनाहि पोंचतो. अशा कार्यांत असा विरोध उत्पन्न झाला म्हणजे अल्पमत बहुमत हा निर्णयाची कसोटी ओघानेंच प्राप्त होते.म्हणूनच हल्लीं सार्वजनिक शाळा, सार्वजनिक पाणवठे, सार्वजनिक धर्मशाळा, इत्यादिकांच्या उपयोगासंबंधानें सरकारनें कांहीं नियम लोकमतानुसार केले आहेत. व ते अधिकाधिक सक्तीनें अमलांतहि येऊं लागले आहेत. त्यामुळें ज्याला धर्माची आडकाठी वाटते त्यानें वाटल्यास स्वतः या सोयींचा उपयोग करूं नये. पण इतरांना या सोयींचा उपयोग करण्याचे कामीं त्याला प्रतिबंध करतां येत नाहीं.

शाळेंत अस्पृश्यांचीं मुलें येतात व त्यांच्या जोडीला आपलीं मुलें असूं नयेत असें ज्याला वाटतें, त्यानें वाटल्यास आपलीं मुलें शाळेंत पाठवूं नयेत. तीं पाठविण्याविषयीं त्याजवर सक्ति होणार नाहीं. सार्वजनिक विहिरीवर किंवा तळ्यावर अस्पृश्यांनीं पाणी भरणें हें ज्याला मान्य नसेल, त्यानें दुसऱ्या एखाद्या पाणवठ्यावर जाऊन आपली गरज भागवावी. त्याला त्याविषयीं कोणी मना करणार नाहीं, किंवा तूं अमुकच ठिकाणीं पाणी भर अशी सक्ती त्याजवर कोणी करणार नाहीं.. तीच गोष्ट सार्वजनिक धर्मशाळेची. अस्पृश्याच्या स्पर्शानें सार्वजनिक धर्मशाळा दूषित होते असें ज्याला वाटत असेल, त्यानें एखाद्या झाडाखालीं जाऊन आपला सवता सुभा स्थापावा. धर्मशाळेंतच जाऊन उतर असा त्याला कोणी आग्रह करूं शकणार नाहीं. पण शाळा, धर्मशाळा, पाणवठे इत्यादिकांवर सार्वजनिक पैशांतून खर्च झाला आहे, सबब तेथें स्पृश्यास्पृश्य भेद मानूं नये व मानतां येत नाहीं ही कायद्याची शिकवण, किंवा मानूं नये ही विवेकाची शिकवण ज्यांना समजते त्यांनीं न्यायबुद्धीनें अस्पृश्यांना दूर लोटूं नये असें ठरविलें, तर प्रामाणिक सनातनी लोकांना या गोष्टीला नांवें ठेवतां येत नाहीत.

दोन प्रकारच्या सदसद्विवेकबुद्धींचा विरोध उपस्थित झाला म्हणजे, सार्वजनिक बाबतींत बहुमतानेंच निर्णय होणार व झाला पाहिजे हें उघड आहे. धर्मांत इतरांनीं कोणी हात घालूं नये असें म्हणण्यांत येतें तेव्हा त्याचा अर्थ असा असतो कीं, कोणाहि मनुष्याला जें कृत्य अधर्म्य असें वाटतें तें करण्याला त्याला सक्तीनें भाग पाडूं नये. पण निवृत्तीचा मार्ग त्याला मोकळा राहातोच. दरएक युगांत जो नवीन धर्माचार रूढ होतो, तो त्या युगांत कित्येकांना भ्रष्टाचार असे वाटलें तरी, अखेर त्यालाच संमति मिळून तो पुढच्या युगांत सनातन ठरतो. गेल्या दोन हजार वर्षांतील हिंदु धर्माचें चरित्र पाहिलें तर, सुमारें दर दोनशें वर्षांनीं आचारांत फेरफार झालेले स्पष्ट आढळतील. तथापि, त्या प्रत्येक युगाच्या दालनावर 'सनातन धर्मा'चीच पाटी लागली होती असें दिसेल.

तात्पर्य, आज अस्पृश्यतानिवारण हें रूढ होऊं पाहणाऱ्या नव्या आचारासारखें दिसतें. म्हणून त्या आचाराला बंडखोर किंवा भ्रष्ट किंवा धर्मबुडवा असीं नांवें सनातनी देवोत. परंतु तो आचार लवकरच रूढ व सुप्रतिष्ठित होणार, व त्याच्याहि दालनावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें

'सनातन धर्मा'ची पाटी लागणार, हें सनातनी म्हणविणाऱ्या लोकांनी ध्यानांत आणावें. 'सार्वजनिक' देऊळ म्हटलें म्हणजे तेथील चालरीत व आचारविचार ठरविण्याचा अधिकार तेथे जाण्याचा हक्क असलेल्या बहुमताला उघडच प्राप्त होतो. सनातनी लोकांना ही नवी चालरीत मान्य नसेल तर, त्यांनी वाटल्यास स्वतःपुरता निवृत्ति–मार्ग स्वीकारावा. म्हणजे अशा देवस्थानांचा त्याग करून इतर देवळांत देवदर्शन करून आपली भक्तिभावना पुरवून घ्यावी. किंवा स्वतःच्या खासगी देवघरांत बसून ती भावना सफल करावी. पण एकदा 'सार्वजनिक' अशा शब्दाचा उच्चार झाला म्हणजे, तेथे आपणाप्रमाणे इतरांच्याहि मताला मान द्यावा लागतो आणि अखेर बहुमताप्रमाणेच वागावें लागतें, हे सनातनी लोकांच्या ध्यानांत यावयास पाहिजे. या बाबतींत खरा जुलूम होत असेल तर तो, केवळ एखाद–दुसऱ्या माणसानें, किंवा असेंहि म्हणूं कीं, अल्पसंख्याकांनी इतर सर्वांवर किंवा बहुसंख्याकांवर आपलीं मतें लादणें हाच ठरेल !

यानंतर पाठोपाठ उत्पन्न होणारा प्रश्न असा कीं देवस्थान सार्वजनिक खरें, पण ट्रस्टी किंवा व्यवस्थापक यांना आपल्या अधिकाराविषयीं शंका येईल. म्हणजे व्यवस्थापक किंवा ट्रस्टी या नात्यानें नवीन मताला मान देणें व जुना आचार बदलणे हें बेकायदेशीर ठरेल असें त्यांना वाटण्याचा संभव असतो. पुण्यास पर्वतीसंबंधानें व मुंबईस कित्येक सारस्वत ब्राह्मण ज्ञातीच्या देवस्थानासंबंधानें तेथील ट्रस्टी, व्यवस्थापक, पंच इत्यादिकांकडून हीच हरकत पुढे मांडण्यांत आली होती. आणि कायद्याची हरकत म्हटली म्हणजे तेथे कोणालाहि थांबावें नमावेंच लागतें. ही हरकत दूर करण्यास या पंचांना एकच मार्ग खुला असतो. तो म्हणजे न्यायकोर्टाकडे जाऊन आपल्या अधिकाराचा निर्णय करून घेण्याचा. पण न्यायाधीश तरी त्यांना काय सांगणार, किंवा काय निवाडा देणार ? तो म्हणणारच कीं "हा सार्वजनिक बाबींतील लोकांच्या दिवाणी हक्काचा प्रश्न आहे. तो त्यांनी वाटल्यास रीतसर फिर्यादीनें सिद्ध करून निवाडा व हुकूमनामा करून घ्यावा. किंवा नुसता सल्ला पाहिजे असेल तर मी एखादा कमिशनर नेमीन. तो देवस्थानचा उपयोग करण्याचा हक्क असलेल्या लोकांचें मत जाहीर रीतीनें घेईल, व तो जो निर्णय मला कळवील तोच माझा सल्ला ठरेल. मी न्यायाधिकारी झालों म्हणून पंचांना केवळ आपल्या मनचें असें कांही सांगू शकणार नाही."

पण अशी गोष्ट एखाद्या देवळासंबंधानें शक्य झाली तरी, प्रत्येक सार्वजनिक देवस्थानाच्या बाबतींत सल्ला देण्याचा हा द्राविडी प्राणायाम न्यायाधिशानें तरी कोठवर करीत बसावें? अर्थात् एकेकट्या देवस्थानाच्या किंवा जनसमूहाच्या निर्णयाऐवजी सामुदायिक निर्णय होईल तर तो सर्वांनाच सारखा लागू पडेल. गणितांत प्रत्यक्ष आंकडे घेऊनच उदाहरण करावयाचें असतें, म्हणून प्रत्येक गणितांतली आंकडेमोड व उत्तर हीं वेगवेगळीं करावीं लागतात. पण बीज–गणिताच्या साहाय्यानें आंकड्यांऐवजीं अक्षरांचाव' फॉर्म्युल्यांचा उपयोग केला म्हणजे,कोणत्याहि इष्टांकाच्या उदाहरणाला तीच कृति लागू पडते. लग्नविधीच्या मंत्रांत आजपर्यंत उपाध्ये लोक 'अष्टवर्षा भवेत् कन्या' असें म्हणत आले. पण आता ही वयोमर्यादा पालटून मुलींचीं लग्नें चौदा, सोळा, अठरा, वीस अशाहि वयांत होऊं लागलीं. तेव्हा कित्येक उपाध्यायांनी त्यामुळे पौरोहित्य सोडलें नाही, विधि वर्ज केला नाही,व मंत्रहि गाळला नाही.त्यांनी अलीकडे 'अष्टवर्षा भवेत् कन्या' असें म्हणण्याऐवजीं 'प्राप्तवर्षा भवेत् कन्या' असे शब्द घातले आहेत. आणि त्यामुळें त्या मंत्रानें आता कोणत्याहि वयाच्या मुलीचा विवाह सशास्त्र ठरतो !

प्रस्तुत विषयासंबंधानें हाच न्याय असा लावतां येतो कीं, प्रत्येक देवस्थानाबाबत मतमोजणी करण्याकरितां कमिशनर नेमून कोर्टानें अर्जदार पंचांना सल्ला देत जावा त्यापेक्षा, सामुदायिक निर्णयाकरितां कायदाच केला म्हणजे काम झालें. त्या कायद्यांत बहुमत अजमावण्याची रीत सांगितलेलीच असणार, व सल्ल्याकरिता न्यायकोर्टाकडे गेल्याशिवाय कोणालाहि त्या कायद्याचा रीतसर उपयोग करून आपलें काम भागवून घेतां येईल.

तात्पर्य, देवस्थान सार्वजनिक कीं खासगी हा एकदा निर्णय झाला म्हणजे मग, सार्वजनिक देवालयासंबंधानें बहुमतानेंच निर्णय करणें प्राप्त होतें. सर्व ठिकाणीं एकाच पद्धतीनें लोकमत अजमावतां यावें म्हणून त्याकरिता कायदा असणें हें बरें. आणि कायदा व्हावा तर तो अधिकृत कायदेमंडळेंच करणार. अशा रीतीनें मंदिरप्रवेश व कायदेमंडळें यांचा संबंध येतो.आता सार्वजनिक कार्यांत बहुमताचें तत्त्व मानणारे, आणि राजकीय संस्थेमध्ये कायदेमंडळ हेंच अंतिम अधिकाराचें व सर्वनिर्वाहक स्थान असें मानणारे, जे आमच्यासारखे धोपट मार्गी लोक

आहेत, त्यांना हल्ली दिल्ली येथील कायदेमंडळापुढे जशा प्रकारचीं बिलं आलीं आहेत तशा येऊन, त्यांत योग्य तो फेरफार होऊन, अखेर त्यांच्या मदतीनें लोकमतनिर्णय होत जावा व मंदिरप्रवेशाचा प्रश्न ठिकठिकाणीं सुटावा असें वाटणें हें ओघानेंच प्राप्त होतें. पण म. गांधी, राजगोपालाचारियर व कौन्सिलबहिष्कारवादी नाफेरवाले काँग्रेसभक्त यांची मात्र स्थिति आज अनुकंपनीय झाली आहे खरी ! कारण त्यांनीं तुपाकरितां उष्टें खाण्याची तयारी केली, पण उष्टें तेवढें तोंडांत पडलें व तूप नाहीं तें नाहींच असा प्रसंग त्यांच्यावर आलेला दिसतो.

# नीलगिरी पर्वतावरील विजेचें प्रचंड कार्य

( ले. **गो. के. मनोळीकर** इंजीनिअर पायकारा नीलगिरी. )

आता येथे गेलीं ४ वर्षे जें वीज उत्पन्न करण्यासंबंधीचें मोठें काम नुकतेंच संपलें त्याबद्दलची माहिती पुष्कळ दृष्टीनें वाचनीय असल्यामुळे त्यांतील महत्त्वाचा भाग खालीं देत आहें.

महाराष्ट्रांत पाण्याच्या जोरावर वीज उत्पन्न करण्याचीं " हायड्रो–इलेक्ट्रिकचीं " कामें टाटा कंपनीनें मोठ्या प्रमाणांत केलीं असल्यामुळे आपल्या पाहण्यांत खंडाळ्याजवळील पाण्याचे मोठाले नळ, खोपोलीचें पावरहाऊस व तेथून मुंबईपर्यंत नेलेल्या तारा हे आणि याच धर्तीवर आंध्र व्हॅली, मुळशी वगैरेंचीं कामें आलेलीं आहेत. त्याच प्रकारचें हें काम असून मुख्य तत्त्वेंहि एकच आहेत. तथापि आपणाकडील सह्याद्रीची उंची २००० फूट व नीलगिरीची उंची ७००० फूट असल्यामुळे कामाच्या मांडणींत व साधनसामग्रींत पुष्कळच तफावत आहे

येथे नुकत्याच पूर्ण झालेल्या कामाचा पूर्वेतिहास असा कीं, सन १९२१ सालीं एका युरोपिअन कंपनीचे इंजीनिअरास नीलगिरीवरील उंचावरच्या पाण्याच्या शक्तीचा विद्युदुत्पादनाकडे उपयोग करण्याची कल्पना सुचून सन १९२५ सालीं त्यासंबधी लागणारी माहिती, सर्व्हे व पाण्याचा आणि जागेचा उपयोग करण्याचा हक्क मिळविण्याची व्यवस्था झाली. पुढे मद्रास सरकारला येवढें मोठें काम एका कंपनीकडे देण्यापेक्षा स्वतःच्या मालकीचें असलेलें हितकर वाटल्यावरून त्यांनी त्याप्रमाणे तजवीज केली व हें काम ' हायड्रो इलेक्ट्रिक ' डिपार्टमेंटचे स्वाधीन केलें.

### उटकमंड कीं उदक मंडळ

कामाचें ठिकाण पर्वताचे माथ्यावर उटकमंड पासून १६ मैलांवर पायकारा नदीचे कांठावर आहे. निलगिरीवर पाणी मुबलक असून चोहोंकडे सदोदित झरे वाहत असतात; किंबहुना उटकमंडचें खरें नांव उदकमंडल असेंच आहे.येथील सर्व प्रवाहांमध्ये पायकारा नदीलाच पाणी जास्त आहे. सन १८८० पासूनचा दरसाल पावसाचा व वाहिलेल्या पाण्याचा आराखडा पाहिल्यास असें दिसतें कीं, ही नदी कव्हांहि कोरडी पडली नसून जास्तींत जास्त पाऊस ११० इंच व पाणी एका सेकंदांत २० हजार घनफूट वाहत होतें. तथापि नेहमीचे पावसाचें मान ७० ८० इंच असून प्रवाह पावसाळ्यांत ५१ सेकंदास एक हजार घ. फू. व उन्हाळ्यांत ६० घ फ असतो. हे आंकडे आपल्या इकडील एखाद्या लहान ओढ्यालाहि कमी पडतील. तरीपण येथील उच्च स्थानामुळे या पाण्याला जास्त महत्त्व आहे, व त्याचा उपयोग करून घेण्यासाठी या नदीचे कांठी मोठमोठीं धरणें बांधलीं आहेत.

### तलाव ( Storage Reservoir )

पाणी साठविण्यालायक अशी जागा जवळच मिळाली आहे. या जागेची निवड करतांना त्यांत पुरेसें पाणी सांठवितां येइल किंवा नाही, व पाणी थोपविण्यास बंधारे बांधणें शक्य असल्यास त्यास किती खर्च येईल या दोन गोष्टी मुख्यत्वेंकरून पाहाव्या लागतात. आणि त्या दृष्टीने पाहतां येथील तलावाची जागा फारच जवळ व सोयिस्कर आहे. त्याच्या दोन्ही लांबीच्या बाजूला दोन उंच टेकड्या असून त्या जेथे एकमेकाजवळ आलेल्या आहेत, अशा ठिकाणीं दोन धरणें बांधलीं आहेत. या जागेत पाणी आणण्याकरिता नदीचा मूळचा प्रवाह बदलणें भाग पडलें, व त्यासाठी नदीच्या पात्रांत एक बंधारा ( डायव्हर्शन् वीअर ) बांधावा लागला. या बंधाऱ्यानें नदीचे प्रवाहावर पूर्ण ताबा आणून हवें तेव्हा हवें तितकें पाणी घेतां अगर सोडतां येतें. येथून कॅनाल अगर पाट ( फ्लूम चॅनेल ) खणून डोंगराचे कडेकडेने ७००० फूट लांबीवर तें पाणी आणून तलावामध्ये सोडलें आहे. या तलावांत ८० दशलक्ष घनफूट पाणी थोपवितां येतें. हा आंकडा जरी मोठा दिसत असला तरी

देशावरील तलावांचे मानानें अगदींच लहान आहे. मुळशीचे प्रसिद्ध तलावांत १६२५० द. लक्ष घ. फूट पाणी सांठविलें आहे. आता पर्वताचे माथ्यावर एके ठिकाणीं इतकें पाणी साठवितां येणे शक्य नसल्यानें येथेहि दोन चार ठिकाणीं निरनिराळे तलाव बनवून ते एकमेकाला जोडण्याचा पुढे विचार आहे. परंतु या सध्याच्या तलावांतील पाण्यावर होणाऱ्या विजेलाच पुरेसा खप मिळणें कठिण जाईल इतकी वीज या पाण्यापासून उत्पन्न होणार असल्यामुळें तूर्त हेंच पाणी पुरेसें आहे.

**पॉवरहाउसची जागा**

पाणी सांठविण्याला जशी योग्य जागा शोधून काढावी लागते तितकेंच महत्त्व पायथ्याला पावरहाउसच्या जागेची निवड करण्यांत आहे. ही निवड करण्यांत जितकें खोल जातां येईल तितकें जावयाचें असून पाण्याच्या उंचीचा ( Head of water )· जास्तीत जास्त फायदा घ्यावयाचा असतो. तसेंच हा फायदा घेत असतांना तलावाचे जागेपासून जितक्या जवळ येतां येईल तितकें यावयाचें असतं; कारण त्यामुळे पाणीवाहतुकीचा खर्च कमी येतो. या बाबतींतहि पायकाऱ्याचे पाईप लाईन व पावर हाऊसचा नंबर संबंध हिंदुस्थानांत पहिला लागून सर्व जगांत पांचवा लागतो. येथे तलावाजवळच खोल दरी असल्यामुळे पाण्याचे मोठे नळ तलावापासून फक्त एक हजार फुटावर सुरू होतात. यांची तुलना लोणावळा गांवांतून खंडाळ्याचेहि पुढेंपर्यंत खोदाव्या लागलेल्या कालव्याशीं अथवा मुळशीला लक्षावधि रुपये खर्चून तीन मैल लांबीच्या खणलेल्या बोगद्यांशीं केली असता येथील जागा किती सोयिस्कर आहे हे सहज लक्षांत येईल.

हें माथ्यावर साठविलेलें पाणी खालीं पावर हाऊसला न्यावयाचें सकृद्दर्शनीं सोपें वाटतें; कारण उताराकडे पाणी आपोआप धाव घेणारच. तरीपण या पाणी नेण्याचें क्रियेंत व झऱ्याचें पाणी वाहण्यांत फार फरक असल्यामुळे या "पेन स्टॅाक" व "पाईप लाईन"ला अतिशय महत्त्व आहे; किंबहुना या नळांच्या सुरक्षिततेवरच सर्व अवलंबून असतें. याचीं कारणें म्हणजे एक तर या पाण्याच्या जोरावर पावरहाऊसमधील मशिनरी चालावयाची असल्यामुळे उंचावरील पाणी नळांमध्ये कोंडून जसेंच्या तसें खालपर्यंत बाहेरच्या हवेला न दाखवितां व त्याचा जोर शक्य तितका कायम ठेवून, हव्या त्या प्रमाणांत, पंख्यावर (' टरबाइन 'वर) सोडतां आलें पाहिजे. दुसरें म्हणजे पाण्याचा येवढा मोठा दाब सहन झाला पाहिजे.

येथील पाईपलाइनचा नंबर जगांत पांचवा लागण्याचें कारण जगांतील सर्वांत खोल पाईपलाईन ५००० फट असून येथील खोली ३०६० फूट आहे. तसेंच ही तीन हजार साठ फुटाची खोली अवघ्या दहा हजार फूट लांबीच्या नळांनीच आक्रमिल्यामुळे उताराचे प्रमाण सरासरीनें एकास तीन असें पडत असून दोन तीन ठिकाणीं अगदीं खडें म्हणजे एकास एक असेंहि नळ घालावे लागले आहेत. याची ही असामान्य खोली साधारण माणसाचे डोळे फिरवून टाकते, व कित्येक बघण्याकरिता आलेली मंडळी फारसें न पाहताच परत जातात. पाण्याचा तीन हजार फुटांचा दाब सहन करणें व तोहि अशा अवघड ठिकाणीं हें फार जोखमीचें होय. हा दाब आकड्यानें सांगावयाचा झाल्यास एका चौरस फुटाला दोन लक्ष पौंड असें म्हणता येईल. या कारणास्तव येथे वापरलेले नळ विशिष्ट प्रकारच्या पोलादाचे असून ते जर्मनींतील प्रख्यात मनेस्मन रोहेरेन कंपनीनें बनवून जागेवर बसवून दिले. ही कंपनी असले नळ करण्याबद्दल सर्व जगांत प्रसिद्ध असून तींत २८ हजार लोक काम करतात असें त्यांच्या प्रतिनिधीकडून समजतें येथील पाईप लाइनला १२ लक्ष रुपये खर्च झाले असून नळांना खालून आधार देण्यासाठीं सातशें भिंती व प्रत्येक वळणावर व कोपऱ्यावर नळ जाग्यावर दाबून बसविण्याकरिता तीस कांक्रीटचे मोठाले Anchors बांधावे लागले आहेत याशिवाय पुष्कळ गोष्टी या पाईपलाइनबाबत शिकण्यासारख्या आहेत. तथापि त्या सर्व येथे सांगणें शक्य नसल्यामुळे, हे अवजड नळ जागेवर नेण्याकरिता केलेल्या इलेक्ट्रिक रेल्वेची माहिती थोडक्यांत सांगितली आहे.

**माल नेण्याची रेल्वे** ( Rope railway )

ज्या तुटलेल्या कड्यावर मनुष्यास सरळ उभें राहतां येत नाही, तेथे मोठमोठी मशिनरी नेणें अतिशय बिकट असल्यामुळे तेथे मीटर गेजची दोन मैलांची रेल्वे लाईन घालून उघड्या लाडग्यांतून सामानाची व कामकऱ्यांची ने–आण करण्याची सोय केली आहे. या लाडग्याला तारेचा मोठा दोर बांधलेला असून तो इलेक्ट्रिक मोटारीनें सोडतां अगर ओढतां येतो. एका खेपेत दहा टन वजन सहज नेतां येतें. या रेल्वेवर वाटेंत चार स्टेशनें असून हिचा उपयोग रात्रंदिवस केला जात असे. कारण सडकेनें मोटारींतून खाली पॉवरहाऊसला जावयाचें तर ५५ मैलांचा प्रवास करावा लागतो!

**वीज कशी उत्पन्न होते?**

पॉवर हाऊसमध्ये पाणी पोहोचल्यावर ते [illegible]

बाइन " वर पडून त्यास फिरवितें, व त्यामुळे वीज उत्पन्न करणाऱ्या जनरेटरला गति देऊन त्यापासून वीज उत्पन्न होते. तेथील यंत्रसामुग्री नेहमीच्या पद्धतीची असल्याने त्याची विशेष माहिती न देतां त्यापासून उत्पन्न होणारी वीज अश्वशक्ति वगैरे खाली दिली आहेत—

सध्या बसविलेले टरबाईन्स नं. ३; जनरेटर्स प्रत्येक अश्वशक्ति १०९०० पाण्याची उपयुक्त उंची २७६७ फूट; दरमिनिटास फेरे ६००; जनरेटर्स नं. ३ प्रत्येकी K. V. A. ७८१० P. F. ०.८ दर मिनिटास फेरे ६०० Volts ११००० Amperes ५१३ Per term. वीज उत्पन्न झाल्यावर ट्रॅन्स्फॉर्मरचे साहाय्याने ती ११००० पासून ६६००० व्होल्ट्सपर्यंत चढवून मग बाहेरगांवीं पाठविण्यात येते

अशा तऱ्हेनें हें प्रचंड काम पुरें झालें असून याची वीज सध्या कोईमतूर वगैरे ठिकाणीं पुरविली जात आहे. ही वीज उत्पन्न होण्यापूर्वी, येथील कामावरील दगड दळण्याची मोठाली यंत्रें, वर्कशॉप, इलेक्ट्रिक रेल्वे, पंप वगैरे चालविण्यास-हि निर्माण शक्तिच उपयोगांत आणली होती. ही पायकारा धबधब्याजवळ लहानशा प्रमाणांत येथेच उत्पन्न केली होती.

येथील बहुतेक कामगार व मजूरवर्ग तामीळ प्रान्तांतील व मल्याळी जातीचा आहे. तरी पण अवघड ठिकाणीं, पाईपलाइनवर, इलेक्ट्रिकचे खांबांवर, आणि जड मशिनरी वाहून नेण्याचे कामीं महाराष्ट्रांतील घाटावरील सातारा, सोलापूर वगैरे भागांकडील लोकच प्रथमपासून उपयोगी पडले आहेत, हे त्यांस भूषणावह आहे. तथापि शरिराची फारशी काळजी न घेतल्यामुळे अगर ज्यास्त धडाडी दाखविल्यामुळे त्यांचे मृत्यूचें प्रमाणही ज्यास्त असलेलें दिसतें.

येथील अवघड कामांपैकी कालव्याचीं व धरणाचीं कामें पुण्याचे मेसर्स जोगळेकर आणि कंपनीने गेल्या तीन वर्षांत केलीं आहेत. कामाच्या सोयीच्या दृष्टीनें वाईचे रा. साने यांची मोटार सर्व्हिस अखेरपर्यंत सर्वांच्या उपयोगी पडली आहे. तसेंच उटकमंड येथील बडोदा-पॅलेसचे अधिकारी रा. केळकर यांची महाराष्ट्रांतील इकडे येणाऱ्या प्रत्येक मनुष्यास नेहमीच फार मदत होत असते.

असो. अशा तऱ्हेने निसर्गाचा फायदा घेऊन केवळ पाण्यापासून येवढी प्रचंड शक्ति निर्माण करण्याचे काम सवा कोटी रुपये खर्च करून मद्रास—सरकारने पुरें केले, हे देशाच्या हिताच्या दृष्टीने खरोखरच मोठें कार्य झालें. दिवसेंदिवस यंत्राचा उपयोग सर्व व्यवहारांत होऊं लागल्यामुळे त्यांना चालविण्याला शक्तिहि लागणारच. आणि ती जर स्वस्त दराने व खेडोपाडीं मिळं लागली तर शेतीवरहि त्याचा सुपरिणाम झाल्याशिवाय राहणार नाही. म्हैसूर संस्थानांत वीज इतकी मुबलक आहे कीं, त्यावर कोलारच्या खाणी, गिरण्या वगैरे चालून संस्थानांतील खेड्यांतूनहि ती खेळं लागली आहे. याचे कारण पाण्यापासून कमी खर्चांत वीज उत्पन्न करतां आली, व प्रजेला तिचा उपयोग करून घेण्यास संस्थानानें संधि दिली हे होय. महाराष्ट्राच्या सबंध पश्चिम बाजूला सह्याद्रि पसरला आहे आणि त्यावर दरसाल पाऊसही पुष्कळ पडत असल्याने तेथें पाण्यापासून विद्युच्छक्ति निर्माण करून घेण्यासारखीं अनेक सुस्थळें आहेत; त्यांपैकी कांहींचा तसा उपयोगहि करून घेतला आहे. तरी पण अशा निर्माण होणाऱ्या शक्तीला राबवून घेण्याची जोंपर्यंत सोय निघत नाही तोंपर्यंत दरसाल कोट्यवधि घनफूट पाणी सह्याद्रि आपल्या माथ्यावरून खाली ढकलून देणार. व त्याचे शक्तीचा हा अहोरात्र होत असलेला दुरुपयोग महाराष्ट्रीयांना पाहणें भाग पडणार. या माहितीचा सुपरिणाम होऊन तेथील कारखानदार व तज्ज्ञ लोक एकविचाराने शक्य तितका फायदा लवकरच करून घेतील अशी आशा प्रकट करून हा लेख पुरा करतों.

# बंगाली क्रांतिकारकास अटक

चितगाँग शस्त्रागारावरील हल्ल्यांत ज्या ज्या क्रांतिकारकांनी भाग घेतल्याचा पोलिसांना संशय आला त्यांजवर खटले होऊन शिक्षाहि देण्यांत आल्या. याच कामीं एक पुरवणी खटला अद्यापि चालू असून त्याचा निकाल लागावयाचा आहे. पण खटल्याच्या चौकशीच्या कामीं मुख्य सूत्रधाराचाच पत्ता पोलिसांना परवापावेतों लागला नव्हता. चितगाँग येथील एक तरुण शाळामास्तर या कटाचा मुख्य पुढारी असल्याचें पोलिसांना दिसून आलें. श्री. सूर्यसेन याचें वजन तरुणावर बरेंच असल्याने त्यानेच पहारतळी वगैरे ठिकाणीं घडलेल्या अत्याचारांत भाग घेतला असें पुराव्यावरून दिसून आल्यावरून त्यास पकडण्यासाठी पोलिसांनी आटोकाट प्रयत्न चालावले.

सूर्यसेन हा वेष बदलण्याच्या कामीं मोठा कुशल असल्यानें, त्यानें नाना तऱ्हा करून पोलिसांना दाद लागूं दिली नाहीं. लालघाट येथें एका घरांत सूर्यसेन आपल्या साथीदारांसह बसल्याची वार्ता पोलिसांना लागली. तेव्हां पोलिसांनीं कॅ. कॅमेरॉन यांच्या साहाय्यानें त्या घराला वेढा दिला होता. त्या वेळीं सूर्यसेन व त्यांचे साथीदार यांनीं पोलिसांवर गोळीबार करून आपली मोठ्या धाडसानें सुटका करून घेतली होती. तेव्हांपासून तो १९३२ पर्यंत फरारीच होता. वरील गोळीबारांत क. कॅमेरॉन हा बळी पडल्यामुळें पोलिसांनीं त्यास पकडण्याची फार खटपट चालविली होती व तिला ता. १६ रोजीं अचानक रीतीनें यश आलें. पाटिया पोलीस ठाण्यानजिक गैराड येथें निरंजन विश्वास नांवाच्या एका इसमाच्या घरांत सूर्यसेन असल्याचें समजल्यावरून, पोलिसांनीं गुरखा सैनिकांच्या साहाय्यानें या घरास वेढा दिला. आपणास धरणार अशी खात्री झाल्यानें सूर्यसेन व त्याचा साथीदार ब्रजेंद्रसेन यांनीं बाहेरच्या लष्करी लोकांवर गोळीबार सुरू करून फरारी होण्याचा बेत केला. गोळीबारामुळें सैनिकांमध्यें थोडीशी चलबिचल झाली. कारण गोळीबार झाल्यास आपल्यापैकीं कांहींना जखमा होतील या भीतीनें त्यांनीं उलट गोळीबार केला नाहीं. याचा फायदा सूर्यसेन व त्याचा साथीदार यांनीं घेण्याचें ठरविलें होतें. पण तें न साधल्यामुळें त्यांस सैनिकांनीं पकडलें. पुढें घरांतील मंडळीसहि पकडण्यांत आलें. सूर्यसेनास ज्या वेळीं अटक करण्यांत आली त्या वेळीं त्याच्याजवळ भरलेलें पिस्तूल होतें. अशा स्थितींत त्यास पकडण्याचें मोठ्या धोक्याचें होतें तरी एका लान्स नाइकानें दोघांच्या मदतीनें त्याच्यावर हल्ला करून त्यास पकडलें. चितगांग येथील पोलीस अधिकारी खानबहादुर अशानुल्ला यांचा खून करण्याच्या कामीं सूर्यसेनाचें अंग असल्याचें दिसून आल्यावरून, त्याच्यावर या व इतर निरनिराळ्या आरोपांवरून खटला भरण्यांत आला असल्याचें कळतें. पहारतळी येथील अत्याचाराबद्दलहि त्याजवर आरोप ठेवण्यांत आला आहे.

# प्रासंगिक बोल

**हैद्राबाद संस्थानांतील सभाबंदी**

हैद्राबाद संस्थानांतील प्रजेच्या गाऱ्हाण्यांचा कांहीं मासला ता. १० फेब्रुवारीच्या अंकांत आम्ही दिलाच आहे. त्यासारखें किंवा त्याहीपेक्षा महत्त्वाचें गाऱ्हाणें गेल्या आठवड्यांत निजामसरकारचे एक मंत्री सर रिचर्ड ट्रेंच यांजपुढें मांडण्यांत आलें. ब्रिटिश मुलखांत कोणतीहि जाहीर सभा भरविण्यास सरकारची आगाऊ परवानगी घ्यावी लागत नाहीं असा सामान्य नियम आहे. एखादे प्रसंगीं विशेष कारणामुळें विवक्षित स्थळीं सभाबंदीचा कायदा लागू करण्यांत आला तर गोष्ट वेगळी. परंतु हैद्राबाद संस्थानांत स्थिति अशी आहे कीं, सभा कसलीहि असो, ती आगाऊ परवानगी घेतल्यावाचून कधींच भरवितां येत नाहीं! सारांश, जी बंदी ब्रिटिश हिंदुस्थानांत विशेष प्रसंगीं होते ती बंदी हैद्राबाद संस्थानांत सदा सर्वदा आहे, हा ब्रिटिश हिंदुस्थान व हैद्राबाद संस्थान यामधील ठळक भेद होय. हा भेद नष्ट होऊन निजामशाहींतील प्रजेस भाषणस्वातंत्र्य लाभावें अशी विनंति करण्याकरितां ट्रेंच यांजकडे हैद्राबादेच्या नागरिकांनीं आपलें शिष्टमंडळ पाठविलें होतें.

***

शिष्टमंडळ एकट्या हिंदूंचें नसून हिंदू व मुसलमान या उभयतांचें होतें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सदर शिष्टमंडळाचें पुढारीपण बॅ. रामचंद्रराव यांनीं पत्करलें होतें. रामचंद्रराव यांनीं जनतेची बाजू ट्रेंच यांचेपुढें मुद्देसूदरीतीनें मांडली. जाहीर सभा परवानगीशिवाय भरवूं नये या अर्थाचें सरकारी सर्क्युलर आहे. त्यामुळें भाषण–स्वातंत्र्याच्या प्रजेच्या हक्काचा नाश होत असून त्याविरुद्ध हैद्राबाद हायकोर्टानें एका खटल्यांत निकाल दिला असल्याचें रामचंद्रराव यांनीं ट्रेंच यांच्या निदर्शनास आणिलें. वरील सर्क्युलरानें निजामशाहींतील प्रजेची इतकी मुस्कटदाबी झाली आहे कीं, तिला राजकीयच काय पण सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक असल्या निरुपद्रवी चळवळीहि कैक वेळां सोडून द्याव्या लागल्या आहेत. वाचनालयांच्या वार्षिक सभा व व्यापाऱ्यांच्या सभा यांच्यात निजाम सरकारच्या विरुद्ध असें काय असणार? पण त्यांनाहि पुष्कळदा सरकारी अधिकाऱ्यांनीं परवानगी नाकारली. आताच हैद्राबादेस शिक्षण परिषद भरावयाची असून तिला परवानगी अद्यापि न मिळाल्यामुळें ती लांबणीवर पडली आहे. हैद्राबाद संस्थानामधील तैलंगणांतील लोक आपली परिषद भरविणार होते. त्यांचेपाशीं रोख रकमेचा जबर जामीन मागण्यांत आला! किंबहुना याच जुलमामुळें तिकडील पुढाऱ्यांना

ट्रेंच यांजकडे शिष्टमंडळ पाठविणें भाग पडलें. ट्रेंच साहेबांनी शिष्टमंडळाची भेट घेतली हेंच एक प्रसादचिन्ह मानले जात असून त्यावरून शिष्टमंडळास समाधानकारक उत्तर मिळेल अशी आशा उत्पन्न झाली आहे. ट्रेंच साहेबापुढे शिष्टमंडळाने आपली बाजूच खुलासेवार मांडली असल्याने, भाषण-स्वातंत्र्याच्या बाबतींत आजपर्यंत अन्याय झाला आहे हें त्यांना नाकबूल करून चालणार नाही. तेव्हा ते शिष्टमंडळाची संभावना कोणत्या उपायांनी करतात याच्या परीक्षेचीच ही वेळ नव्हे काय?

# मंदिर–प्रवेश बिलाची इष्टापत्ति

अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न म.गांधी यांनी जितका नेटाला लावला तितका आजपर्यंत तो कोणीं लावला नव्हता हें खरें आहे.तथापि या सत्कार्याच्या आवेशांत ते कायदेमंडळाचीहि मदत घेण्यास धावतील असें फारच थोड्यांना वाटलें होतें. आणि त्यामुळेच हल्ली दिल्लीस चाललेल्या खटपटीचें लोकांना अत्यंत आश्चर्य वाटतें! महात्माजींनी आपल्याकडून कांही खुलासा म्हणून केला आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, "मद्रास इलाख्यांत सनातनी लोकांनी न्यायमंदिराकडे धांव घेऊन अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश जवळ जवळ अशक्य करून टाकला. कारण कोणाहि एकव्या माणसाने जुन्या वहिवाटीची सबब सांगितली तर, मंदिरप्रवेशाला अनुकूल असलल्या शेकडो हजारों लोकांना मग गिप्प गप्प बसावें लागणार. हा नड मोडून काढावयाचा तर ती कायद्यानेच मोडून निघेल, व कायदा व्हावा तर बिलाची खटपटहि हवी."

हा युक्तिवाद ठीक आहे. पण राज्य-कारभारांत असा कोणता विषय आहे की ज्याला हीच विचारसरणी तंतोतंत लागू पडणार नाही? कायदे मंडळांतून कायदे होतात ते एक प्रकारें लोकमताची अमलबजावणी करण्याकरितांच! पण आज राज्यसूत्रें परक्यांच्या हातीं आहेत म्हणून, आणि कायदेमंडळें खरीं लोकमतप्रदर्शक नाहीत म्हणून अशादुहेरी सबबीवर ज्यांनी कायदेमंडळावरील बहिष्काराची हुल्लड आज इतके दिवस चालविली आहे, त्यांना त्याच मंडळांची मदत घेण्याची आज गरज भासावी, व त्या गरजेला त्यांनी बळी पडून कायदेमंडळांना कौल लावावा हें आश्चर्य नव्हे काय? मद्रास इलाख्यांतील एका न्यायकोर्टाने अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत एक विशिष्ट प्रकारचा अनिष्ट निर्णय केला म्हणून आज हिंदुस्थान देश परकीयांच्या हातीं व परतंत्र आहे तो एकदम स्वाधीन व स्वतंत्र झाला काय? किंवा १९३० सालच्या बहिष्काराच्या वेळीं ज्या व्यक्ति कायदेमंडळांत शिरल्या त्याच आज तेथे काम करीत असताहि, हीं कायदेमंडळें आज एकदम लोकमतदर्शक स्वरूपाचीं झालीं काय?

समाजसेवेची भूक एका बाजूला, आणि कायदेमंडळाची दुःस्थिति व देशाची पर-तंत्रता ही दुसऱ्या बाजूला, असें असतां म. गांधी व राजगोपाळाचारियर प्रभृति नाफेरवाले हे आजवर ज्या गोष्टीला महत्त्व देत आले त्याच गोष्टीला त्यांनीं आताहि महत्व कां देऊं नये? उलट गांधीप्रभृति लोकांना आपली समाजसेवेची भूक जर अशा उपायांनी भागवून घेणें योग्य वाटतें, तर त्यांच्या-सारख्या इतर समाजसेवकांनी व राष्ट्रीय कार्य-कर्त्यांनी तीच भूक त्याच प्रकारें पूर्वी शमविली, व पुढेहि त्याच राजमार्गाने जाण्याची इच्छा दर्शविली, तर त्यांना हे कोणत्या तोंडाने नांवें ठेवणार? म. गांधी व त्यांचे बहिष्कार–वादी अनुयायी हे आपल्या परीने फार चांगल्या प्रकारची समाजसेवा करीत आहेत याविषयी वाद नाही. पण "या समाजसेवेचा मक्ता एकटा आपच्याकडे आहे, म्हणून आम्ही ठरवूं तेव्हा सहकारिता योग्य, व आम्ही ठरवूं तेव्हा बहिष्कार योग्य" असें एकतंत्री प्रामाण्य ते आपल्या हातीं घेऊन ठेवूं म्हणतलि, तर तें इतर समाजसेवक कां मान्य करतील? आज या बिलाच्या मोहांत पडल्यामुळे, जुन्या बहिष्कारवादा-मध्ये त्यांनी उपयोगांत आणलेलीं सर्व प्रकारचीं निषेध वचनें त्यांना उच्छिष्टसेवनाप्रमाणे फिरून स्वीकारावीं लागत आहेत! अंतिम दृष्टीने हा कोणी अधःपात म्हणणार नाही. कारण बहिष्कार–पक्षावरील ही आपत्ति देशाला इष्टापत्तिच वाटेल. पण त्यांच्या-पुरता मात्र आज तो अधःपातच होय!

मंदिरप्रवेशाचें कार्य हें जसें आम्हांला इष्ट वाटतें तशीच म. गांधीप्रभृति बहिष्कारवाद्यांवर आलेली कायदेमंडळाचा उपयोग करण्याची ही आपत्तीहि आम्हांला इष्टच वाटते. पण इतर रीतींनेंहि या लोकांनी स्वतःला मोठ्या अडचणींत घालून घेतलें आहे. उदाहरणार्थ, पं. मदन मोहन मालवीय हे अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं महात्माजींचे केवळ उजवे हात असे आहेत. असें असता ते मंदिरप्रवेशाच्या बिलाला सर्वस्वी प्रति-

कूल आहेत! संनातनी लोकांचें मन वळवावयाचें तर त्या कामीं पंडितजी जितके उपयोगी पडतील तितके महात्माजी देखील उपयोगी पडणार नाहीत. इतर कारणांकरितां सनातनी लोक म. गांधींना बहुमान देत असले तरी, या अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत या लोकांना महात्माजी हे शत्रूसारखे वाटतात. सनातनीयांच्या मनांत शिरून नाजूक हाताने त्यांचे संशय दूर करून, त्यांना मंदिरप्रवेशाला अनुकूल करण्याचा प्रयत्न पंडितजींनीं नुकताच अलाहाबाद येथे केला व तो कसा यशस्वी झाला हें आज दुसरीकडे दिलेल्या शास्त्री—पंडितांच्या सभेच्या हकीगतीवरून दिसून येईल. रा. बापूजी अणे, जे आज काँग्रेसचे अध्यक्ष आहेत, त्यांचीहि गोष्ट अशीच आहे. म्हणजे ते मंदिरप्रवेशाला व अस्पृश्यतानिवारणाला पूर्णपणें अनुकूल आहेत; परंतु त्यांना ही गोष्ट कायद्याने घडवून आणावी असें वाटत नाहीं.

म्हणून आपल्याला सध्या पदरांत पडणारे बिल अधिक, कीं अशा वजनदार पुढाऱ्यांची मदत अधिक उपयोगी पडेल याचा विचार महात्माजींनी अवश्य करावा. बहुमत निर्माण झालें तरी त्याची अंमलबजावणी होण्याला शेवटीं केव्हातरी कायदा लागणारच. कारण लोकमत तयार झालें तरी एकटादुकटा मनुष्य आजच्या स्थितींत कायदेशीर हरकत घेऊं शकेल. पण समाज एकंदरीने अनुकूल झाल्यावर कायदा थोड्याच श्रमाने पदरांत पडेल, व मग त्याचा उपयोग करण्यांत जनतेवर जुलूम झाला असे वाटणार नाहीं. एखाद्या नाठाळ, दुराग्रही, प्रतिपक्षाचा विरोध मोडून काढण्याचें एक अवश्य साधन असें त्या कायद्याला तेव्हा स्वरूप येईल, व तो उपयोगांत आणताना तो कायद्याच्या गंमतीचा एक खेळ इतकेंच वाटेल. पण कायदा हा हवा असला तरी, तो करण्याच्या आधी जनतेचें मन वळविणें हें अधिक श्रेयस्कर होय. आणि त्याहि दृष्टीने पाहतां महात्माजींकडून आज बिलाची घाई होत आहे असा आक्षेप कित्येकांना सहज घेता येईल.

वावटळींत वारा कोणत्याहि दिशेने येतो त्या प्रमाणें, या बिलाला विरोध पंडित मालवीय यांजकडून विरोध झालाच, पण मौज ही कीं डॉ. आंबेडकर यांचेकडूनहि झाला! अर्थात् आपल्या मारेकऱ्यांत जिवलग मित्र ब्रूटस हा आहे असें पाहून ज्यूलियस सीझरच्या तोंडून सहज उद्गार निघाला कीं "काय ब्रूटस तूं सुद्धां यांतच सामील?" त्याप्रमाणें "काय आंबेडकर तुम्हीसुद्धां विरोधीच?" असा उद्गार म. गांधींच्या तोंडून निघाला असला पाहिजे. डॉ. आंबेडकरांचें म्हणणें असें कीं "मंदिरप्रवेश इतका हवा आहे कुणाला? आणि अस्पृश्यांची सामाजिक व आर्थिक दृष्टीने जर उन्नति झाली नाहीं तर मंदिरप्रवेशाने काय होणार?" आंबेडकरांच्या म्हणण्यांत तथ्य नाहींच असें नाहीं. पण जें सहजासहजी मिळतें तें कृतज्ञापूर्वक घ्यावयाचें सोडून वरती बिलाला विरोध याचे नांव "डॉ. आंबेडकर"!

तें कसेंहि असो; कायद्याची कल्पना सुचतांच ती अमलांत आणण्याकरितां, काँग्रेसचे पूर्वीचे अध्यक्ष राजगोपाळाचारियर यांनी दिल्लीस जें वर्तन चालविलें आहे तें तर बहिष्कारवादी या नात्याने त्यांना शोभण्यासारखें नाहींच; पण ते व त्यांचे जोडीदार शेठ घनश्यामदास बिर्ला यांनी आणखीहि एका अनिष्ट मार्गाचें अवलंबन केलें आहे. आणि खुद्द म. गांधी यांनीच जाहीर रीतीने त्यांचा निषेध केला आहे. ही गोष्ट म्हणजे महात्माजींच्या उपवासाची भीति खासदार सभासदांना घालणें ही होय. ते म्हणतात "रंगा अय्यर यांच्या बिलाला वाट मोकळी करून द्या! नाही तर पहा! फिरून महात्माजी प्रायोपवेशनाला बसून प्राण देण्याला सिद्ध होतील!" महात्माजी पूर्वी प्रत्यक्ष उपवास करीत आसन्नमरणच होऊन बसले होते तेव्हा त्यांच्या उपवासाची कोणीं फारशी थट्टा केली नाहीं. पण आज तो तसा प्रसंग नाहीं. यामुळे त्या उपवासासंबंधाने देखील योग्य ती निर्भर्त्सना व निषेध करण्यांत कोणीहि मागें घेणार नाही हें राजगोपाळाचारियर व बिर्ला शेठजी यांनी खूप लक्षांत ठेवावें.

असेंब्लीच्या सभासदांना गांधींच्या उपवासाचा धाक घालणें ही गोष्ट अत्यंत गर्हणीय आहे असें आम्ही स्पष्ट म्हणतों. त्या धाकाचा अर्थ इतकाच होतो कीं, म. गांधींच्या या दोघां हस्तकांजवळचें बुद्धीचें भांडवल सगळें संपलें असून त्यांना शहाणपणाची दिवाळखोरी प्राप्त झाली! बाजारांत दुकानदारापुढे उभें राहून स्वतःच्या डोक्यांत खिळे ठोकून रक्त काढणारा खरखरमुंडा आततायी भिकारी, आणि असेंब्लीच्या सभासदांना गांधींच्या उपोषणाचा धाक दाखविणारे काँग्रेसचे अध्यक्ष, या दोघांचीहि कृती एकाच मासल्याची ठरत नाहीं काय? सुदैवाने स्वतः महात्माजींनाहि ही गोष्ट दूषणास्पद वाटून, त्यांनी 'हरिजना'च्या गेल्या अंकांत तिचा वेळींच निषेध केला ही गोष्ट फार चांगली झाली. नाहीं तर राजगोपाळाचारियर यांच्या बरोबर महात्माजींनाहि नांवें ठेवण्याला कोणीं कमी केलें नसतें.

दोघांत दोषाची भर या न्यायाने या बिलाच्या खटपटीला लागून महात्माजींनी आणखी एक धोका पत्करला. तो त्यांच्या कांहीं एकनिष्ठ भक्तांची

अप्रीति संपादण्याचा. या लोकांचें म्हणणें असें दिसतें कीं—"म. गांधी हे राजकारणी पुढारी असें मानून त्यांनी सुरू केलेल्या कायदेभंगाच्या चळवळींत आम्ही सामील झालों. कोणी एकदा तुरुंगांत गेला, कोणी दोनदां गेला, कोणी तिसऱ्यानदा जाण्याची तयारी केली. कोणी दोन दोन वर्षांची सजा भोगीत तुरुंगांत कष्ट काढीत आहेत. अशा वेळीं अस्पृश्यतानिवारणाचा हा एवढा उमाळा महात्माजींना कोठून आला व कां यावा? किंबहुना चळवळीचें मुकाणुं असें अनपेक्षित रीतीनें चालवून चळवळीचें तोंड फिरविणे, म्हणजे स्वार्थत्यागी अनुयायांचे श्रम व्यर्थ घालविणें असें होत नाही काय? गांधीजी तुरुंगांत नुसते गप्प बसतील तरी आम्ही व ते एकाच कार्यांत गुंतलों आहों असें मानून, चळवळीच्या पडत्या काळांतहि चळवळ चालू ठेवूं. पण इकडे लोकांनी तुरुंगांत जावें आणि तिकडे काँग्रेसच्या अध्यक्षांनी बिलाचें भिक्षापात्र हातीं घेऊन कायदेमंडळांतील सभासदांच्या दारोदार फिरावें, व लॉर्ड विलिंग्डन यांच्या राजवाड्याच्या दारांत उभे राहून कानोसा घ्यावा यांत संगति काय राहिली?"

तात्पर्य, हल्लीच्या बिलाच्या उपक्रमाच्या घाईनें महात्माजी हे सनातनी लोकांबरोबरच आपल्यांतील काही अनुयायांचे मनहि दुखवीत आहेत यांत शंका नाही. म्हणून ता. २४ जानेवारीच्या केसरींत आम्ही सुचविल्याप्रमाणे, असलें एखादें बिल हवें असलें तरी, उद्यां पूर्ण स्वायत्त असें प्रांतिक स्वराज्य झालें तर तेव्हा अशा प्रकारचें बिल पुढे आणणें अधिक श्रेयस्कर होईल. कारण प्रधानमंडळ संयुक्त व जबाबदार झालें म्हणजे मग, त्यांनी अंगिकारिलेल्या कोणत्याहि गोष्टीची जबाबदारी परिणामीं जनतेचीच जबाबदारी ठरेल. निवडणुकीच्या वेळीं लोक जागृत राहून कोणाला निवडून द्यावे कोणाला निवडून देऊं नये याचा विचार करतील. बिल पुढे आणणें, त्याला परवानगी मागणें, परवानगी देणें, बिल मंजूर करणें, इत्यादि बहुतेक गोष्टी जनतेच्या हस्तकांकडूनच होतील. आणि मग त्याचें पर्यवसान कसेंहि झालें तरी कोणास वाईट वाटणार नाही. अर्थात् तोंपर्यंत दम खाऊन सनातनी लोकांचें मन वळवीत बसणें हेंच अधिक श्रेयस्कर नाही काय?

# गुलाम हुसेन यांचा कबुलीजबाब

मुंबई इलाख्याचें यंदाचें अंदाजपत्रक सर गुलाम हुसेन हिदायतुल्ला यांनी कायदेमंडळास सादर केलें. गेल्या वर्षी हा मान सर गोविंदराव प्रधान यांना मिळाला होता. परंतु त्यानंतर ते सेवानिवृत्त झाल्यामुळे फडणविशीचीं वस्त्रें त्यांच्या अंगावरचीं निघून ना. हिदायतुल्ला यांच्या अंगावर पडलीं. प्रांतिक सरकारची फडणविशी ही कांही वर्षांपूर्वी गोऱ्या अधिकाऱ्यांची मिरास समजली जात होती. ती मिरास संपून त्या जागेवर हिंदी अंमलदार दृष्टीस पडूं लागले यामुळे घडून आलेलें सत्तेचें संक्रमण अनुकूल काळांत कोणीहि अभिनंदनीयच मानलें असतें. पण सर चुनीलाल मेहता गेले व सर गोविंदराव प्रधान आले आणि सर प्रधान जाऊन सर गुलाम आले तरी त्यांपैकीं कोणीहि खरे प्रधान न होता गुलामच राहिले असा जनतेस अनुभव मिळाल्यामुळे तिला या महत्त्वाच्या फेरबदलाचा विशेषसा आनंद वाटला नाही.

***

सत्तेच्या संक्रमणाची अपेक्षा आजवर हिंदी लोकांनी देशकल्याणाकरितां केली. परंतु वर दिलेल्या संक्रमणापासून देशहित फारसें साधलें नांही, उलट आपण नामानिराळे राहून पाहुण्याकडून साप मारण्याच्या कामीं नोकरशाहीने सोळा आणे यश मिळविलें असेंच म्हणावें लागतें. यावरून घडलें हें संक्रमण सत्तेचें नसून फक्त माणसाचेंच असल्याचें सिद्ध झालें. त्यापासून बोध घ्यावयाचा तो इतकाच कीं एखादी मोठ्या अधिकाराची जागा हिंदी मनुष्याच्या वांट्यास आली तरी त्या जागेचा बडा पगार व अनुभव यांचा फायदा त्या मनुष्याला मिळेल तेवढाच; बाकी त्याबरोबर सत्तेचें संक्रमण हटकून होतेंच असें नाही. तें व्हावयाचें झाल्यास संपूर्ण सत्ताच हिंदी लोकांच्या हातीं आली पाहिजे, अंशतः येऊन भागणार नाही. गंगोदक मुळचें मधुर खरें; पण तें समुद्रांत सामील झाल्याबरोबर खारेंच व्हावयाचें. तथापि याचा अर्थ असा नव्हे कीं संपूर्ण सत्ता हस्तगत होईपर्यंत ती सत्ता अंशाअंशाने मिळत असली तरी टाकावी. मिळेल ती घ्यावी व आणखी मिळविण्याचा प्रयत्न करावा.

***

ना. प्रधान काय किंवा सर गुलाम हुसेन काय त्यांनी फडणविशीचीं वस्त्रें धारण केल्यावर त्यांना स्वतःचीं खाजगी मतें

खाकुटींत मारून नोकरशाहीच्या राज्यकारभाराची गोऱ्या फडणविसाप्रमाणेंच भक्तिपूर्वक उपासना करावी लागली. मि. थॉमस हे मुंबई सरकाराचे मंत्री, सर गुलाम हुसेन हेहि त्याच सरकाराचे मंत्री. पण थॉमससाहेब पुनर्घटना कमिटीचे अध्यक्षस्थानीं बसताच मुंबई सरकारास खर्चाचे बाबतींत उधळे व अविचारी ठरवून त्यांची बेगुमानपणानें खरड काढतात आणि उलटपक्षीं सरसाहेब मुंबई सरकारचा आपुलकीनें कैवार घेऊन थॉमससाहेबावर आवेशपूर्वक तुटून पडतात. ही चकमक पाहून ना. हिदायतुल्ला यांजपेक्षा मि. थॉमस हेच जनतेचे खरे दोस्त असाच कोणासहि संशय उत्पन्न होईल. परंतु खरें पाहूं गेलें असता वस्तुस्थिति त्या प्रकारची नाही. कारण थॉमस यांनी सर्व शिक्षणसंस्थांविरुद्ध मार्शल लॉ पुकारून देहान्त शासनाखालची शिक्षाच ठेवली नाही. धर संस्था व दे फाशी असाच धडाका चालविला. पण उलट्या काळजाचें हें कृत्य सर हिदायतुल्ला सदर कमिटीचे अध्यक्ष असते तर त्यांजकडून सहसा घडतें ना. मुंबई सरकारानें आर्ट स्कूल, शेतकी कॉलेज व व्यापारी कॉलेज इत्यादि उच्च शिक्षण संस्था जिवंत राखण्याचें ठरविलें याचें श्रेय कदाचित् मुंबई सरकारच्या मंत्रिमंडळांतील हिदायतुल्ला प्रभृति हिंदी सभासदांनाच नसेल कशावरून?

***

परंतु तें कांहीहि असलें तरी थॉमस कमिटीनें मुंबई सरकारच्या फडणविशी खात्याचे अदूरदर्शित्वाबद्दल कान उपटले; त्याला समर्पक उत्तर ना. हिदायतुल्ला यांना सापडलें नाही हें कबूल केलें पाहिजे. वस्तुतः हिदायतुल्ला यंदाच्या बजेटापुरतेच कायते जबाबदार. त्यांना गेल्या दहाबारा वर्षांतील मुंबईसरकारच्या फडणविशी धोरणाची जोखीम स्वतःच्या शिरावर घेऊन थॉमससाहेबाना उत्तरें देत बसण्याचें विकत श्राद्ध करावयास सांगितलें होतें कोणीं? तथापि फडणविशीच्या पदावर स्थापना होऊन वर्षहि झाले नाही तोंच मुंबई सरकारच्या राज्यकारभारांतील मेरुमाण कायतो मी अशा उसन्या अभिमानास बळी पडून ते सरकारच्या बाजूनें वकिली करण्यास सरसावले. परंतु या कामांत ते सपशेल फसले. ते वकीलपत्र घेऊन उभे राहिले पण वकिलाची भूमिका क्षणांत विसरून आरोपीच्या पिंजऱ्यांत शिरल्याप्रमाणे त्यांनी भाबडेपणानें कबुलीजबाब देण्यासच सुरुवात केली. मुंबई सरकारच्या जमाखर्चांत ताळतंत्र मुळीच नाही, हा मुख्य दोष थॉमस साहेबांनी आपल्या रिपोर्टांत दाखवून १९२१ सालीं मुंबई सरकारापाशीं तीन कोटि रुपये शिल्लक होते ते त्या वर्षाच्या बजेटांत फस्त करून शिवाय बजेटांत दोन कोटि रुपयांची तूट आणिली. जी चूक बजेटांतील आंकडे व बोलून दाखवीत आहेत ती चूक नाकबूल करण्यास सर हिदायतुल्ला यांना तोंड होतें कोठें? पण ते गेले मुंबई सरकाराची अब्रू राखण्याला. त्यांच्या प्रयत्नानें अब्रू तर संभाळली गेलीच नाही, उलट जी जी बयाद ते सांगू लागले तिच्यामुळे मुंबई सरकाराचा मूर्खपणा व बेतालपणा अधिकच उघडकीस आला.

***

गुलाम हुसेन यांचा कोटिक्रम असा-'सन १९२१ सालीं तीन कोटि रुपये सरकारापाशीं सांचले होते. व बरींच सरकारी बांधकामेंहि महायुद्धाच्या कालांत तुंबून पडलीं होतीं. तेव्हा वाटलें कीं, आता हीं कामें उरकून घ्यावीं. म्हणून उडविला त्या रकमेचा ताबडतोब फन्ना. ती तीन कोटींची रक्कम मोठी खरी; पण सरकारला ती मुळीच पुरली नाही. यासाठी शिलकेंतले हे तीन कोटी रुपये उडवून आम्हीं खजिन्यांत दोन कोटींची आणखी तूटच पाडली. आम्ही कसले शहाणे! मोठमोठ्या खर्चाचीं कामें एकामागून एक काढीत गेलों. परशुरामानें कोंकणपट्टी समुद्रापासून जिंकून घेऊन ब्राह्मणांना दान केला अशी पुराणांतरीं कथा आहे. ती खरी कीं खोटी कोण जाणे. आम्हीं मात्र मुंबई या समुद्र मागे हटवून मुंबईकरांना भूदान करण्याचा घाट घातला. त्या अघटित उद्योगाप्रीत्यर्थ ५ कोटी ८४ लक्ष रुपये मातीसारखे समुद्रांत ओतले. हा उद्योग अखेर आमच्या अंगलट आला असला तरी जगानें आमचें कौतुकच करावें असें धाडस आम्हीं दाखविलेंच कीं नाही! १९१५-१६ सालीं नोकर लोकांचे पगार होते त्यापेक्षां १९२१–२२ सालीं ते पगार दीड पटीनें वाढल्यामुळे पगाराच्या पायींच युद्धपूर्वकालापेक्षां सरकारास दोन कोट रुपये अधिक खर्च आला मुंबई सरकाराचें आपल्या नोकरवर्गाविषयीं केवढें हे लोकोत्तर औदार्य! आमच्या अक्कलेचें खरें प्रतिबिंब सक्करच्या धरणातील पाण्यात पाहावयास सापडेल. त्या धरणाचें प्रचंड काम बांधून काढण्याकरितां आम्हीं वीस कोट रुपये उधळले!"

***

सर हिदायतुल्ला यांनीं येणेप्रमाणें केलें हें म्हणे मुंबई सरकाराचें समर्थन! काय पण समर्थन. यापेक्षां थॉमस साहेबानीं केलेलें खंडनच कोणासहि पटणारें आहे. सर गुलाम हुसेन यांचें हें समर्थन वाचून कोणासहि एका म्हातारीच्या गोष्टीचें स्मरण झाल्याशिवाय राहाणार नाही. म्हातारीच्या घरांत चोर शिरले, व ते घरांतील प्रत्येक मौल्यवान

चीजवस्त हुडकून काढून लांबवीत सुटले. तेव्हा म्हातारी अगदी घाबरली. तिला काय करावें हें सुचेना. त्या विमनस्क स्थितींत तिने चोरांना सांगितलें 'बाबानो या वस्तु घेतल्या त्या घ्या; पण त्या देव्हाऱ्याखाली रुपयांची पिशवी मीं जपून ठेवली आहे तिला निदान हात लावूं नका. तशांत तीहि नेलीत तर न्या, पण ज्या सोवळ्यांतल्या समळींत माझी स्वतःची मोहरची अंगठी आहे ती उच-लाल तर तुम्हाला माझ्या गळ्याची शपथ आहे. भोळी बिचारी म्हातारी. ती मूर्खपणानें चुरुचुरु बोलून शहाणपणा दाखवावयाला गेली, तोंच तिच्या अंगलट येऊन चोरांना आयती माहिती मिळाल्याने त्यांनी म्हातारीच्या घरांत होतें नव्हतें तें चटसारें लांबवून तिला रडत बसविलें. हिदायतुल्लांनी आपली फजिती म्हातारी सारखीच करून घेतली. थॉमससाहेबांनी म्हटलें कीं, सरकाराने आपल्या जवळची शिल्लक उधळली. तें ऐकून यांनी स्वस्थ बसावें कीं नाही? तसें न करता गुलाम हुसेन त्यांच्या माहि-तींत पदरची भर घालून शहाणपणा दाखवाव-याला गेले. पण तो ठरला मूर्खपणाच. या मूर्खपणा-लाच हिदायतुल्ला शहाणपणा समजत असतील तर गव्हर्नरसाहेबांच्या उरलेल्या चौघांच्या मंत्रिमंड-ळांत असलेच आणखी अडीच शहाणे जमल्यास हे साडेतीन शहाणे मिळून काय अनर्थ करतील याची कल्पनाहि होत नाही.

***

मांटेग्यु—चेम्सफर्ड सुधारणा अमलांत आल्या-पासून गेल्या बारा वर्षांत रयतेच्या दृष्टीनें हिदाय-तुल्ला यांच्याहि मताप्रमाणें मुंबई सरकारने शत-कृत्य केलें तें हें कीं मद्यप्रसारास नियंत्रण घातलें व त्यामुळे अबकारीचें उत्पन्न ५॥ कोटींनी कमी आलें. पण याच्या उलट सरकारने कितीतरी अवाढव्य खर्च वाढवून ठेवले. त्यासाठी काढलेल्या व इतर कर्जाची मार्च १९३४ अखेर गणती केली तर ती ७५॥ कोटी होईल. एकट्या सक्कर-च्या धरणाचें कर्ज जवळ जवळ २३॥ कोटी रुपये आहे. त्यावरील व्याजाची रक्कम दरसाल मुंबई सरकारास भरावी लागत असून ती १९३३-३४ सालाकरितां ९३ लक्ष धरण्यांत आली आहे. या कामापासून रयतेचा फायदा कधी व्हावयाचा असेल तो होवो, पण सध्या तरी व्याजाच्या ओझ्या-खालीच रयतेचें कंबरडें मोडण्याच्या बेतात आलें आहे. मुंबई इलाख्यावर व्याजाचा हा एक बोजा व दुसरा नोकरवर्गाच्या पगाराचा बोजा. इलाख्याचें वार्षिक उत्पन्न १३ कोटीहि नाही. पण इलाख्याचा कारभार पाहाण्याकरितां जो नोकरवर्ग ठेवला आहे त्याचा पगार भागविण्यांत पांच साडेपांच कोटि रुपये खलास होतात. एकंदर उत्पन्नाचा जवळ जवळ निम्मा हिस्सा पगारांत, एक कोट रुपये कर्जाच्या व्याजांत व एका कोटीहून अधिक रुपये पेन्शनफंडांत गडप झाल्यानंतर शिक्षण, आरोग्य, उद्योगधंद्यांची व शेतीची सुधारणा अशा उपयुक्त कार्याच्या वांट्याला पैसा यावा कसा!

***

हिंदुस्थान सरकारच्या नांवाने सर गुलाम हुसेन हे खडे फोडीत आहेत. पण घर खाऊन दार तोडीं लावणाऱ्या या मुंबई सरकारासारख्या दिवाळखोर नारायणाला हिंदुस्थान सरकार तरी कसें पुरे पडणार! हिंदुस्थान सरकार मुंबई इलाख्यांतील इन्कमटॅक्सच्या उत्पन्नाचा वाटा मुंबई सरकारास देत नाही ही तक्रार खरी आहे. पण मुंबई सरकारांचें भंबाळें वाजत चाललेलें पाहून हिंदुस्थान सरकारानें अन्य रीतीने त्यांची थोडी भर केली नाही. हिंदुस्थान सरकारास, मुंबई सरकाराकडून मिळावयाची ५६ लक्ष वार्षिक खंडणी माफ केल्यामुळे १९३१ च्या मार्च-अखेर २ कोटी ७४ लक्ष रुपयांची मुंबई सरकारास सूट मिळाली. खेरीज २ कोटी ३१ लक्ष रुपये दुष्काळ फंडांतून मदतीदाखल देण्यांत आले. पण मुंबई सरकारानें अविचारानें इतकें ऋण करून व खर्च वाढवून ठेवला आहे कीं, त्यांच्या साहाय्यास प्रत्यक्ष कुबेर धावून आला तरी तो भिकारी होईल मग हिंदुस्थान सरकारची काय कथा! अशा बेफामपणाने चाललेल्या उधळपट्टीला थॉमस साहेबांनी अविचाराची ठरविली म्हणून सर गुलाम हुसेन यांचा त्यांजवर घुस्सा होऊन एक एक डोळा वाघाएवढा करून त्यांनी गुरगुरावें हा न्याय म्हणावयाचा काय?

***

सर जॉर्ज लॉईड मुंबई इलाख्याचे गव्हर्नर होते तेव्हापासून हें दुखणें येथील राज्यकारभाराच्या अंगांत मुरलें असल्यामुळें त्यांतून हा रोगी एखादें इंजेक्शन घेऊन ताबडतोब व खडखडीत बरा होईल अशी आशा बाळगण्यांत अर्थ नाही. थॉमस कमिटीनें पावणेदोन कोटींचा काट सुचविला आहे. पण तो पवित्र अशा शिक्षण संस्थांचें रानटीपणाने खून पाडले तरच साधणार असल्याने असला मार्ग मुंबई सरकारानें आपण होऊनच निंद्य ठरविला आहे. या बिकट स्थितींत दोनच उपाय शिल्लक राहातात. एक नोकर लोकांचे पगार—भत्ते कातरण्याचा व दुसरा देशी उद्योगधंद्यांना उत्तेजन देऊन रयतेची सांपत्तिक स्थिति सुधारण्याचा. वरपासून खालपर्यंत नुसतां

दहा टक्के कपात गेल्या वर्षी केली त्याबरोबर २८ लक्षांची बचत झाली. महायुद्धापूर्वीच्या काळाइतकी जर आतां सर्व जिनसांत स्वस्ताई होत आली आहे तर पगाराचें मानहि सर्रास त्या बेतातच आणावयास नको काय? पण एक वर्ष ही कपात झाली नाही तोंच वरिष्ठ अधिकाऱ्यांचा जळफळाट होऊन त्यांनी दहा टक्यांची कपात पाच टक्यावर नेली. इतका तर वरिष्ठ अधिकाऱ्यांचा द्रव्यलोभ अनावर आहे! आणि याच अधिकाऱ्यांपैकीं एक बडे अधिकारी मि. थॉमस गरीब बिचाऱ्या मास्तर लोकांच्या पगारावर दरवडा घालून त्यांच्या पासून २७॥ लक्ष रुपयांची लूट गोळा करूं इच्छीत आहेत. नोकरशाहीचा हा द्रव्यलोभ लक्षांत घेतल्यास सर गुलाम हुसेन यांनी मांडलें याच प्रकारचें अंदाजपत्रक तयार व्हावें हें स्वाभाविक होय. त्यांनी जादा कराच्या व उत्पन्नाच्या रूपाने ३१ लाखांची तूट भरून काढण्याचा व नवीन कर्ज न उभारण्याचा विचार केला आहे. पण या रीतीने हें वर्ष कसें बसें मारून नेलें तरी पुढच्या वर्षी यंदाचें संकट उग्र स्वरूप धारण करून फिरून दत्त म्हणून उभें राहणारच. त्यापूर्वी थॉमस कमिटीच्या कोणत्या शिफारशी अमलांत आणून मुंबई सरकार आपला तारांबळीचा संसार सावरतें हें पहावें.

# प्रयागची सनातन--धर्म--परिषद्

तीर्थराज प्रयाग येथे जानेवारी ता. २५ ते २८ असे चार दिवस अखिल भारतीय सनातन धर्मपरिषदेचें सातवें अधिवेशन **पं. मदनमोहन मालवीय** यांचे अध्यक्षतेखालीं भरलें होतें. पंडितजींनी परिषदेच्या अगोदर पंधरा दिवस हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विद्वान पंडितांना, संस्थानिकांना व संस्थानिकांच्या प्रतिनिधींना निमंत्रणें पाठविलीं होती. यंदाच्या अधिवेशनांतील चर्चेचा मुख्य विषय म्हणजे अस्पृश्यता-निवारण व मंदिरप्रवेश हा होता. या विषयाच्या चर्चेची दिशा पंडितजींनी पंधरा दिवस अगोदर वृत्तपत्रांतून प्रसिद्ध केली होती.

### विद्वान् शास्त्रीमंडळी

निरनिराळ्या प्रांतांतील सुमारें सवाशें विद्वान शास्त्रीमंडळी परिषदेनिमित्त जमली होती. महामहोपाध्याय पंडित प्रमथनाथ तर्कभूषण (काशी), महामहोपाध्याय हाथीभाई शास्त्री (जामनगर), पं. आनन्दशंकर बापूभाई ध्रुव (काशी), पं. राजारामपतिशास्त्री राजगुरु (अयोध्या), पं. हृषीकेश उपाध्याय, गव्हर्नमेंट संस्कृत कॉलेज (बनारस), पं. श्रीकृष्णशास्त्री स. ध. प्र. उपदेशकमंडळ (पंजाब), पं. लक्ष्मणशास्त्री जोशी (वाई प्रा. पा. शाळा), पं. राधाप्रसादशास्त्री धर्मशास्त्राचार्य (काशी), पं. वासुदेव मिश्र मुकुंद संस्कृत विद्यालय (बरेली), पं. नंदकिशोर वाणीभूषण (उन्नाव), पं महादेवशर्मा पांडेय, साहित्याचार्य (काशी), श्रीगिरिजाकान्तशर्मा गोस्वामी, काव्य सांख्यतीर्थ (कलकत्ता), व्याख्यानवाचस्पति पं. बलदेव मिश्र व्याकरणतीर्थ राजपंडित (दरभंगा), पं. चिन्नस्वामी शास्त्री (काशी), पं. राजाराम शुक्ल साहित्याचार्य (जैनापूर) पं. चंद्रशेखर पांडेय धर्मशास्त्राचार्य (जैनापूर), पं. रामदेवजी व्याकरणाचार्य (काशी), पं. सीताराम जोशी साहित्याचार्य (काशी), पं. हीरावल्लभ शर्मा, व्याकरण—साहित्याचार्य, सांख्यशास्त्री, (अलमोडा), पं. गिरिजादत्त त्रिपाठी, न्यायाचार्य (आरा), पं. रामकुंवर मालवीय, व्याकरणसाहित्याचार्य काशी, (प्रयाग), श्री. हरिचरण स्मृतितीर्थ (भाटपाडा), पं. विश्वनाथशर्मा पांडेय, वेदाचार्य (काशी), पं. अम्बिकाप्रसाद उपाध्याय, व्याकरणाचार्य (काशी), पं. कालीदास मिश्र व्याकरणाचार्य (काशी), पं. विन्ध्येश्वरीप्रसाद पांडेय ज्योतिषाचार्य (काशी), पं. राजनारायणशर्मा व्याकरणाचार्य (काशी), इ. निरनिराळ्या शास्त्रांतील विश्वविद्यालयीन संस्कृत विद्येतील पदवीधरहि होते. काशी येथील पं. राजेश्वरशास्त्री यांना व त्यांच्या पक्षांतील मंडळींना पंडितजींनी स्वतः जातीनें निमंत्रण दिलें. परंतु पं. राजेश्वरशास्त्री व त्यांची कांही थोडी अनुयायी मंडळी याशिवाय काशी व कलकत्ता येथील इतर विद्वान मंडळी उपस्थित होती. शिवाय बडोदा, बिकानेर, दरभंगा, म्हैसूर इ. ३०-३५ नरेंद्रांचे संदेश आले होते.

### पं. मालवीयजींचें प्रास्ताविक भाषण

पं. मालवीयजींनी पुढील आशयाचें प्रास्ताविक भाषण केलें. "प्रयाग हें अतिशय प्राचीन काळापासून धर्मनिर्णयाचें व धर्माचरणाचें आदिपीठ, क्षेत्र व तीर्थराज म्हणून प्रसिद्ध आहे. प्राचीन महर्षींच्या तपस्येचें व महाकवींच्या प्रतिभेचें हें उगमस्थान आहे. नव्या विचारांचा व जुन्या विचारांचा प्रीतिसंगम येथे व्हावा अशी माझी इच्छा आहे. धार्मिक दृष्टीनें हिंदुसमाजांतलि बराच मोठा भाग संस्कारहीन

झाला आहे. तेवीस कोटी हिंदूमधील साडेतीन कोटी त्रैवर्णिक द्विज सोडून दिल्यास बाकीची प्रजा लुप्तसंस्कार झाली आहे! द्विजांचेदेखील संस्कार नाममात्र राहिले आहेत. पांच कोटी अंत्यज मानलेल्या बंधूंस जर शुद्धि व संस्कारद्वारा धार्मिक जीवनाचा लाभ दिला नाही तर यापुढे ते आपणांपासून दूर जातील व परकीय लोक त्यांच्या भेदबुद्धीला मदत करतील. म. गांधींना सनातन धर्माचा खरा कळवळा आहे, म्हणून ते इतक्या लगबगीने व कळकळीने प्रयत्न करीत आहेत. आपला त्यांच्याशीं इतर बाबतींत मतभेद जरी असला तरी आपण ही गोष्ट विसरूं नका. श्रीशिवाजीमहाराज, राणाप्रताप, गुरु गोविंद व लो. टिळक यांच्याप्रमाणेंच म. गांधींचीहि हिंदुधर्मावरील श्रद्धा अचल आहे. सनातनधर्मीय समाजांत अनेक दोष शिरले आहेत. हिंदु बालकांचें धार्मिक शिक्षण योग्य होत नाही; विवाहांत हुंड्याच्या वगैरे अनेक वाईट चाली शिरल्या आहेत; आचार व संस्कार यांकडे प्रौढ माणसांचें दुर्लक्ष झालें आहे; तरुणांच्या ठायीं दार्ढ्य, सामर्थ्य व बलोपासना राहिली नाही; त्यामुळे योग्य अभिमान, त्याग व धडाडी या वीरमनोवृत्तींचें पोषण त्यांच्याकडून होत नाही. या सर्व गोष्टींची जबाबदारी राजे, महाराजे व विद्वान ब्राह्मण यांचेवर आहे."

### विषयनियामक समितींतील चर्चा

वरील आशयांचें भाषण झाल्यावर ता. २५ रोजीं रात्रीं, ता. २६ रोजीं सकाळीं व दुपारीं ४ वाजेपर्यंत विषयनियामक समितीची बैठक झाली. विषयनियामक समितींत विद्वान पंडित व कांही संस्थानिकांचे प्रतिनिधी यांची निवड करण्यांत आली होती. केवळ शास्त्रीमंडळींनी ऐकमत्यानें संमत केलेले ठरावच खुल्या अधिवेशनांत मांडावयाचे असें सभेचें धोरण या पूर्वीपासूनच आहे. साधारणतः निर्विवाद अशा ठरावांची चर्चा झाल्यावर अस्पृश्यतेचा प्रश्न विषय-नियामक-समितींत चर्चेस निघाला. उत्तर हिंदुस्थानांत ब्राह्मणवर्णीयांनी स्वतः नांगर हाकून शेती करणें निंद्य मानतात. त्यामुळे तिकडे ग्रामण्यें उत्पन्न होतात. याकरितां स्वतः कृषिकर्म करण्यास ब्राह्मणादि उच्चवर्णीयांस हरकत नाहीं, अशा अर्थाचा ठराव बऱ्याच वादविवादानंतर ऐकमत्यानें सम्मत झाला. अस्पृश्यतानिवारणाचा ठराव निघाला असता त्यासंबंधीं शास्त्रीपंडितांतील मतांमध्ये निरनिराळे प्रकारचे मतभेद दिसून आले. कांही शास्त्रीपंडित अस्पृश्यांनी कलशदर्शन घेऊन कृतार्थ व्हावें असें मानणारे होते! कांही भैरवाच्या मंदिराशिवाय अन्यदेवदर्शनाचा त्यांना अधिकार नाही असें मानणारे होते. कांही मंदिराबाहेरून रस्त्यावरून अगर एखाद्या झरोक्यांतून त्यांनी दर्शन घ्यावें, असें म्हणणारे होते. कांही मंदिराच्या प्राकारांतून पण सभामंडपाच्या बाहेरून दर्शन घ्यावें, असें सांगणारे होते. म. म. प्रमथनाथ तर्कभूषण व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं धर्मशास्त्र व विशेषतः निरनिराळीं पुराणें यांचे आधारें गाभाऱ्यापर्यंत जाण्याचा, दर्शनाचा व पूजनाचा अधिकार अस्पृश्य जातींना आहे, असे प्रतिपादन केलें. दुर्गा, शंकर, गणपति, विष्णु, नरसिंह यांच्या मूर्तींचें पूजन करण्यासहि अनुकूल असे अनेक आधार पुराणांतून त्यांनी उद्धृत केले होते. पं. मालवीयजींनी मोठ्या कुशलतेने इतक्या भिन्न भिन्न मतभेदाच्या खडकांमधून सनातन धर्ममहासभेच्या अधिवेशनाची नाव पैलतीराला नेली.

### पंडितजींचें वादचातुर्य

पं. राधाप्रसादशास्त्री धर्मशास्त्राचार्य यांनी मंदिरप्रवेशाच्या विरुद्ध पक्षाची बाजू घेतली होती. पं. मालवीयजींनी नैय्यायिक-मीमांसकांच्या परिभाषेंत चाललेल्या या वादांना व्यवस्थित नियंत्रण घालून, तीन दिवसांच्या कालावधींत विषयनियामक समितीच्या बैठकींतून मंदिरप्रवेशाचा ठराव शास्त्रीमंडळींच्या ऐकमत्यानें सम्मत करून घेतला. अस्पृश्य मानलेल्या जातींना मंदिरप्रवेशाचा अधिकार विशिष्ट निर्बंध घातल्याशिवाय असूं नये, असें बहुतेक पंडितांचें मत होतें. उच्छिष्टभक्षण, मालिन्य, गोमांसभक्षण, प्रेतवस्त्रस्वीकार इ. अनाचारांचा त्याग केल्याशिवाय अस्पृश्यांना देवालयांमध्ये मंडपांत येऊं देणें ठीक नाही असें बहुतेक लोकांस वाटत होतें; व त्याप्रमाणे या विचारसरणीस पं. मालवीयजींचा पाठिंबा होता. श्री. रंगा अय्यर यांनी असेंब्लीपुढे आणलेल्या बिलासंबंधीं शास्त्रीमंडळींत तीव्र असंतोष पसरला होता, व त्या बिलांच्या निषेधाचा ठराव मंजूर करण्याकरिता बराच आग्रह कांही पंडितांनी धरलाहि. पण तोंपर्यंत बिलांतील कलमें प्रसिद्ध न झाल्यामुळे तसा ठराव न करता, त्यासंबंधानें विचार करणारी समिति नेमण्यांत आली. पं. मालवीयजी यांचें धर्मभीरुत्व, शुद्धाचार, कर्मनिष्ठा, मधुर वाणी यांचा योग्य तोच परिणाम शास्त्रीमंडळींवर झाला. पुढीलप्रमाणे महत्त्वाचे ठराव जवळ जवळ ऐकमत्यानें पसार झाले.

### मंजूर झालेले ठराव

( १ ) ब्राह्मणापासून अन्त्यजापर्यंत सर्व हिंदूंना 'द्वादशाक्षर' व 'अष्टाक्षर' किंवा 'षडाक्षर' मंत्रांचा विधिपूर्वक उपदेश होईल अशी व्यवस्था करावी, आणि सर्व हिंदु स्त्रीपुरुषांनीं नित्य स्नान व मंत्रजप केल्याशिवाय अन्नग्रहण करूं नये.

( २ ) मद्यपान हें महापातक असल्यामुळे हिंदूने मद्यपान किंवा मद्यस्पर्श करणें निषिद्ध आहे. म्हणून जे हिंदु मद्यपान अगर मद्यस्पर्श करीत असतील त्यांनी त्याचा सर्वथैव त्याग करावा.

( ३ ) अस्पृश्य म्हणून म्हटल्या जाणाऱ्या लोकांपैकीं जे मृतमांस किंवा गोमांस खात असतील त्यांनी त्यापासून पूर्ण निवृत्त व्हावें आणि उच्छिष्टभक्षणहि करूं नये.

(४)(अ) या महासभेचें असें मत आहे कीं, ज्या जाति आज अस्पृश्य मानलेल्या आहेत त्या सर्व सनातनधर्मी आहेत, आणि म्हणून त्या जातींना सनातन धर्मानुयायी असण्यापासून मिळणारा फायदा प्राप्त करून देण्यास प्रत्येक सनातन धर्मीयानें साहाय्य केलें पाहिजे.

( ब ) या परिषदेला ही गोष्ट निर्विवादपणें वाटते कीं, ज्या जाति अस्पृश्य मानल्या गेल्या आहेत त्या सनातनधर्मी असल्यामुळे त्यांना देवदर्शनाचा पूर्ण अधिकार आहे. म्हणून हिंदुस्थानांतील अनेक सुप्रसिद्ध मंदिरांतून त्यांना देवदर्शन करतां येतें; आणि तीर्थराज प्रयाग येथे त्रिवेणीवर ते सर्वांच्या बरोबर स्नानहि करीत असतात.

( क ) या महासभेचें असें मत आहे कीं, ज्या मंदिरांमधून आजपर्यंत अस्पृश्यांना देवदर्शनाची सोय केली गेली नाही त्या मंदिरांत गाभाऱ्याच्या बाहेरून, सर्वसामान्य नियमाप्रमाणे दर्शन घेण्यास या अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींस मुभा ठेवली पाहिजे. आणि सर्व मंदिरांच्या व्यवस्थापकांना या महासभेची अशी विनाति आहे कीं, त्यांनी आपली परिस्थिति पाहून अस्पृश्य जातींना देवदर्शनाची सोय करून दिली पाहिजे.

( ड ) या परिषदेच्या मतें अस्पृश्य जातींना सार्वजनिक विहिरी, आड, तलाव, बागा, सडका, धर्मशाळा, स्मशानें, शाळा व सभा यांचा उपयोग करावयाला प्रतिबंध असूं नये.

(५) या महासभेचें असें निश्चित मत आहे कीं, कायदेमंडळांनी कोणत्याहि समाजाच्या धर्मसंबंधी गोष्टींत हात घालूं नये. एवढेंच नव्हे तर धर्माविरुद्ध कायदे जर झाले असतील तर ते रद्द करावेत. धर्मसंबंधी बाबींत त्या त्या समाजास स्वयंनिर्णयाचा हक्क असला पाहिजे.

( ६ ) ही महासभा श्री. रंगा अय्यर यांनी असेंब्लीपुढे आणलेल्या बिलासंबंधी विचार करून आपला सल्ला देण्याकरिता खालील गृहस्थांची कमिटी नेमीत आहे. या कमिटीनें दोन महिन्यांनी होणाऱ्या हरिद्वार येथील महासभेपुढे आपला विचार मांडावा कमिटींतील सभासदांची नांवें—

१ म. म. पंडित प्रमथनाथ भट्टाचार्य, सभापति. २ पंडित हरिदत्तशास्त्री, टेहरी संस्थान, डेहराडून. ३ पंडित गोस्वामी गणेशदत्त, मंत्री. ४ पंडित रामराजशास्त्री, प्रयाग. ५ पंडित लक्ष्मणशास्त्री जोशी तर्कतीर्थ, वांई. ६ श्रीकृष्ण शास्त्री, लाहोर, ७ राधेशास्त्री, लाहोर. ८ श्याम बिहारी मिश्र, लखनौ.

(७) हिंदु समाजांतील कोणत्याहि जातींतील व्यक्तींनीं कन्येकडून हुंडा घेणें अत्यंत निंद्य आहे. हुंडा घेणाऱ्या लोकांवर बहिष्कार घातला पाहिजे. त्याचप्रमाणे हिंदुसमाजाचा विवाह हा प्रधान संस्कार आहे. शास्त्रविधीच्या दृष्टीनें या संस्कारांत शक्तीबाहेर खर्च करण्याची जरुरी नाही. म्हणून कोणीहि असा खर्च करूं नये.

(८) ही महासभा असें जाहीर करीत आहे कीं, कोणत्याहि पुरुषानें पन्नास वर्षांपेक्षा अधिक वय झाल्यावर विवाह करणें निंद्य आहे; आणि समाजानें अशा विवाहाची रूढी बंद केली पाहिजे.

# फलज्योतिष-संशोधन

( ले.—श्री. **रा. ज. गोखले, पुणें.**)

**शोधाचे मुद्दे:—**

(१) ग्रहस्थिति व भौगोलिक (म्हणजे पृथ्वीवरील) घडलेल्या गोष्टी, वृत्तें यांत कार्यकारण अथवा सूच्यसूचक संबंध आहे हें पुढील प्रमाणांवरून दाखवितां येतें काय ?

शनि २९॥–३० वर्षांनी ( अथवा कोणताहि ग्रह एक प्रदक्षिणा झाल्यावर ) त्याच स्थानीं अथवा राशीस आला असतां, व्यक्ति अथवा देश ( उदा. हिंदुस्थान ) यांच्या इतिहासांत तीच किंवा बहुतेक त्यासारखीच गोष्ट घडल्याचें आढळून येतें काय ? उदाहरणार्थ—पेशवाई गेली त्या वेळीं शनि ज्या राशींत होता त्या राशींत तो त्यापूर्वी व नंतर पुढील सालीं किंवा त्या सुमारास होता:—१७००, १७३०, १७५९, १७८९, १८४८, १८७८. तसेंच पेशवाई गेली त्या वेळीं शनि व गुरु जेथे होते तेथें त्यापूर्वी व नंतर पुढील सालांत होते:— १६४१, १७००, १७५९, १८७८. या सालीं पेशवाई जाण्याच्या तोडीचें राजकीय स्थित्यंतर

१८९९ साल, विशेषतः (त्यांतील जुलै महिना) दुष्काळ व प्लेग या आपत्तींमुळे पुणें शहरास फार त्रासाचें गेलें. ह्या वेळीं गुरु ज्या स्थानीं होता त्या स्थानीं तो १९१० नोव्हेंबर, १९११ मार्च ते ऑगस्ट वक्री, १९२२ ऑक्टोबर, या वेळीं फिरून आला; व त्यापूर्वी तो १८८६ डिसेंबर, १८८७ ऑगस्ट या वेळीं होता. त्याच वेळीं शनि जेथें होता तेथें, त्यापूर्वी व नंतर तो पुढील वेळीं होताः--१८४० जानेवारी व जून, १८६९ एप्रिल, १९२८ एप्रील. त्याच राशीस शनि व गुरु १८३९च्या ऑक्टोबरमध्यें होते. या वेळीं १८९९ सालाप्रमाणें कोणती स्थिति घडली? १८९७ साल प्लेगाबद्दल आणि सरकारी जुलम व रँडच्या खुनानंतर ची धरपकड यांमुळे विशिष्ट प्रकारचें होऊन गेलें. त्या वेळीं शनि जेथे होता तेथे तो मागें व नंतर पुढील वेळीं आलाः--१८६७ डिसेंबर, १९२६ डिसेंबर. या वेळीं तशीच स्थिति उत्पन्न झाली होती काय ?

हें दाखविता येत नसेल, तर अमुक ग्रह अमुक राशीस आला असतां अमुक होतें, असें म्हणण्याचा आधार नाहींसा होत नाहीं काय ?

(२) एकदोन ग्रह त्याच ठिकाणीं आले असतां तीच स्थिति घडून येते असें दाखवितां येत नाहीं. याचें कारण 'हे ग्रह जरी त्याच स्थितींत आले तरी इतर ग्रह भिन्न स्थितींत असल्यामुळे फरक पडतो' असें फलज्योतिषाभिमान्यांचें म्हणणें आहे काय ? तसें असल्यास हेंच तत्त्व आपणांस अनेक अन्य ठिकाणीं नडत नाहीं काय? अमुक ग्रह अमुक स्थानीं असतांना, उ० "बारावा गुरु असतांना किंवा अमुक राशीस शनि असतांना पूर्वी अमुक घडलें आतां तोच योग असल्यामुळें तसेंच घडेल" असें जें विधान ज्योतिषी केव्हा केव्हा करतात त्याशी वरील विधान विसंगत नाहीं काय ?

( ३ ) शिवाय, वरील तत्त्व मान्य केल्यास, एका वेळीं घडलेली गोष्ट फिरून घडण्यास, त्या वेळचे सर्वच ग्रह त्याच स्थितींत असणें अवश्य होणार नाहीं काय? आता सर्व ग्रहांची जी स्थिति एकदां घडली ती फिरून लक्षावधि वर्षांनींहि जर घडून येत नाही, तर वरील तत्त्व मानल्यानें, कोणत्याहि योगाचा उपयोग करतां यावयाचा नाहीं याची वाट काय ?

'तीच गोष्ट घडून येण्यास पूर्वीच्या सर्व ग्रहांची तीच स्थिति पाहिजे असें नाहीं ' असें आपलें म्हणणें असल्यास, कमींत कमी किती ग्रहांची कशी स्थिति असतां तीच गोष्ट घडून येते, असें आपण व्यक्तीच्या अथवा देशाच्या इतिहासावरून दाखविण्यास तयार आहां ? उदा०, हा आपला नियम हिंदुस्थानाच्या किंवा महाराष्ट्राच्या इतिहासास लागू कसा पडतो हें दाखवा.

पाच ग्रह त्याच राशींत साठ वर्षांच्या अंतरानें बऱ्याच वेळा आढळतात, तरी अशा वेळीं तीच स्थिति शेकडा किती प्रसंगीं दृष्टीस पडते ?

( ४ ) ग्रहयोग भौगोलिक वृत्तांचें पूर्णपणें सूचक, ज्ञापक अथवा कारक आहेत असें सिद्ध झालें, तरी आकाशांतील सर्व गोलांचा अथवा सर्व आकाशभागांचा परिणाम लक्षांत न घेतां, चालू पद्धती प्रमाणें फक्त ९ ग्रह व क्रांतिवृत्त यांचा परिणाम लक्षांत घेण्यानें भावी वृत्त कसें कळावें ?†

†(५) क्रांतिवृत्ताच्या अंशांचीं फलें दिलीं आहेत त्यामध्यें सर्व दृश्य आकाश अथवा दृश्य गोल यांचें फल समाविष्ट होतें असें म्हणता येईल काय ? नाहीं. कारण, क्रांतिवृत्ताचा कोणताहि अंश क्षितिजाजवळ असतां तेव्हां भिन्न अक्षवृत्तांवर दृश्य असणारे आकाश व खस्थ गोल हीं भिन्न असतात. फलज्योतिषांत कोणत्याहि ठिकाणीं त्या त्या लग्नांशांचें फल एकच मानलें आहे. यावरून चालू ज्योतिषांत सर्व तारे अथवा सर्व आकाश यांचा परिणाम लक्षांत घेतला जात नाहीं, हें उघड होत नाहीं काय ?

(६) asteroids म्हणजे मंगळ व गुरु यांच्या दरम्यानचे लघुग्रह, गुरु, शनि इत्यादिकांचे उपग्रह, भिन्न धूमकेतू, व्हल्कन, डिडो, जेसन, लिलिथ इ. (कांहीं ज्योतिष्यांनीं मानलेले) ग्रह ह्यांचा परिणाम लक्षांत घ्यावयास नको काय? ह्यांचा परिणाम लक्षांत घेणें जरूर आहे, असें कांहीं ज्योतिषी प्रतिपादतात.

ह्या गोलांचा परिणाम होतो व तो लक्षांत घेतला पाहिजे असें जे ज्योतिषी म्हणतात त्यांचें म्हणणें भ्रांति काय ? ह्यास आधार काय ?

फलास फक्त ९ ग्रह पुरे आहेत असें मानलें तरी फलें काढतांना पुढील भिन्न पद्धतींपैकीं एकीचेंच अवलंबन करावें लागतें. यांपैकीं कोणती पद्धति बरोबर? सर्व पद्धति बरोबर असणें शक्य आहे काय? कोणती पद्धति चूक? कां ?

( ७ ) नक्षत्रें व राशी ठरविण्यासाठी ( १ ) सायन, ( २ ) ग्रहलाघवीय निरयण, ( ३ ) शुद्ध-निरयण या तीन मुख्य पद्धति, शिवाय चित्रापक्ष इ.

(८) भाव ठरविण्यासाठी अनेक (६-७) पद्धति. (या पद्धतींमुळे भावारंभांत बऱ्याच अंशांचा फरक पडतो हें लक्षांत घेण्याजोगें आहे. )

याशिवाय, पाश्चात्य भावपद्धतींतील जो भावारंभ तो आर्यपद्धतींत भावमध्य मानला जातो, यामुळे पडणारा फरक.

( ९ ) दृष्टि ठरविण्यासाठीः-( १ ) आर्यपद्धति; ( २ ) पाश्चात्य पद्धति-जिच्यांत आर्य-पद्धतीच्या उलट अशुभ ग्रहांमधीलदेखील नव-पंचम

योग शुभदायक असतो व ४५ अंशांचा कोन तसेच प्रतियोग हे अशुभदायक मानले जातात. ( ३ ) मिश्रपद्धति (१ व २ या पद्धतींचे मिश्रणानें झालेली.) यांपैकीं कोणती पद्धति यथार्थ व कोणती अयथार्थ ? कां ? स्वतःचा अनुभव हें प्रमाण पुढे करणें असेल, तर विरुद्ध पक्षाचा अनुभव त्यांना अनुकूल आहे असें ते म्हणतात त्याची वाट काय ! या बाबतींत प्रत्यक्ष पुरावा आपण देतां काय ?

(१०) या पद्धतींपैकीं कोणती यथार्थ हें एकमतानें ठरलें नाहीं; एवढेंच नव्हे तर प्रत्येक पद्धतीची अयथार्थता विरुद्ध पक्षाभिमानी प्रतिपादितात, तर चालू अराजक स्थितींत कोणतें उत्तर विश्वसनीय मानावें व कां ?

# मंदिर-प्रवेश बिलाची इष्टापत्ति

मंदिरप्रवेशाचें बिल झटपट पदरांत पडाव म्हणून राजगोपालाचारियर यांनी मनस्वी खटपट चालविली आहे. त्या खटपटींत त्यांना भाषणेंहि करावीं लागतात, व त्या भाषणांतून ते अनेक कोटिक्रम करीत आहेत. पण हे सर्व कोटिक्रम कौन्सिलप्रवेशाच्या तत्त्वाला अनुकूल असल्यामुळे ते वाचणारांना खूप हसूं लोटत असावें! पोलीस लोकांचा असा अनुभव आहे कीं, गुन्हेगाराकडून कबुलीजबाब काढण्याचे दोन परस्पर विरुद्ध मार्ग असतात.एक त्याला झोप न येऊं देणें, व दुसरा त्याला मुद्दाम खूप झोप येऊं देणें. पहिल्या मार्गाप्रमाणे गुन्हेगाराला जागरणामागून जागरणें पडूं लागलीं म्हणजे तो त्रासून जातो, व "हा कबुली जबाब घ्या एकदाचा. पण मला कसेंहि करून झोप येऊं द्या" असें म्हणतो. दुसऱ्या मार्गाप्रमाणे, त्याला मुखाची गाढ झोप येऊं दिली म्हणजे तींत तो बडबडूं लागतो, व त्यांतच आपण केलेल्या गुन्ह्याची हकीकत सांगत सुटतो. श्री. राजगोपालाचारियर केव्हां एका तर केव्हां दुसऱ्या प्रकारानें कौन्सिलप्रवेशाच्या कबुल्या देत सुटले आहेत.

जे लोक आज आधींच कौन्सिलांत जाऊन बसले आहेत, त्यांच्या पायां पडणारे हे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष व बहिष्कारवादी, समजा कौन्सिल-निवडणूक उभी असती तर, मं. प्र. च्या बिलाच्या प्रेमाकरितां त्या निवडणुकी लढविण्याला तयार झाले असते; बिलाला अनुकूल असे उमेदवार पाहून पाहून त्यांनी त्यांना राष्ट्रीय सभेतर्फे उभे केले असते; व प्रतिकूल उमेदवारांना विरोध केला असता यांत काय संशय ? आणि लक्षांत ठेवा कीं, हें सर्व स्वराज्य नसतांना ! सरकार स्वराज्य देत नाहीं असें दिसत असतांना! कौन्सिलांत लोकमत हमखास प्रभावी होऊं शकत नाहीं हें उघड असतांना! कौन्सिलांत शिरणारे लोक सरकारच्या वजनदारीला, लाचलुचपतीला बळी पडतात हें प्रगट होत असतांना ! तात्पर्य, एका वाक्यांत बोलावयाचें तर, जे जे आक्षेप बहिष्कारवादतां कौन्सिलाविरुद्ध आणतांना या महाशयांनी तोंडसुख घेतले ते सर्व आक्षेप जसेच्या तसे किंबहुना अधिकच प्रमाणांत सिद्ध असतांना !

कोणी तरी राजगोपालाचारियर यांना विचारावेंच कीं, महाराज, आपण झोपेंत आहां कीं जागे आहां? आता कौन्सिलें आपणाला कशीं काय वाटतात ? या मयसभेंत जलाच्या ठिकाणीं स्थळ मानून संचरतांना आपले डोकें जागजागीं फुटत आहे कीं नाहीं ? या मृगजळामागे धावतांना आपल्याला पाणी न मिळतां उलट तोंडाला फेस आलाच कीं नाहीं ? सरकारच्या या कौन्सिलरूपी बंदिशाळेंत धडपडत आपल्या पायांनी जाऊन पडतच आहां कीं नाहीं? कौन्सिलांत जाणारे जर देशद्रोही तर आज आपण कोण आहां ? केवळ महात्मा गांधीजींची अनुज्ञा आहे म्हणून या आक्षेपांतून आपण वांचूं शकत नाहीं. उलट या युक्तिवादांत त्यांना घेऊन पडत आहां म्हणजे इंद्राय तक्षकाय स्वाहा' अशीच स्थिति होत आहे. 'ईश्वर न्यायी आहे' म्हणून ज्या तोंडानें कोणीं इतर लोकांची अन्यायानें नालस्ती केली असेल त्याच तोंडानें तो त्याजकडून असेच उद्गार काढवितो कीं, जगानें त्याकरितां त्यांचीहि नालस्ती करावी. आम्हांला तर असें वाटतें कीं, राजगोपालाचारियर यांना स्वप्नांत गया येथील राष्ट्रीय सभा दिसत असावी, व त्यांनी तेथें केलेला जनताद्रोह त्यांना भीषणस्वरूप दाखवून, झोंपेंतून दचकून जागें करवीत असावा !

असो. झालें तें झालें. पण अजून त्यांनी कौन्सिलप्रवेशाच्या प्रश्नाकडे आत्मौपम्य बुद्धीनें पहावें! म्हणजे यापुढें तरी त्यांच्या हातून कौन्सिल-बहिष्काररूपी जनताद्रोह होणार नाहीं. आत्मौपम्यबुद्धि म्हणजे "दुसऱ्यांच्या जागीं स्वतः आपणच आहों अशी क्षणभर कल्पना करून अंतर्मुख होऊन पाहणें; व अशा स्थितींत आपण जें काय करूं किंवा केलें असतें ते दुसरा सहजच करील, तो म्हणजे जगावेगळा आहे असें नाहीं, असें समजून घेणें." इंग्रजींत ज्याला 'सिंपथी' किंवा 'सहानुभवित्व' म्हणतात त्याचाहि अर्थ हाच आहे. कोणचेहि यथार्थ ज्ञान होण्याला दाखला फार उपयोगी

पडतो. दाखला द्यावयाचा तर तो अनुभवाचाच द्यावा लागतो. पण अनुभव हा अर्थातच ज्याचा त्याला. एकाला दुसऱ्याचा अनुभव सांगून काय उपयोग ? पण ही अडचण कल्पनाशक्ति व प्रतिभा, यांनी दूर होऊं शकते. साहित्यशास्त्रांतील रसांचा आस्वाद अशा काल्पनिक उसन्या अनुभवाने म्हणजे सहानुभवित्वानेच घेतां येतो. आणि जें साहित्य-शास्त्रांत तेंच राजकारणांत कारण एकाच मनो-धर्माच्या बैठकीवर ज्ञान व अनुभूति यांचे सर्व खेळ होतात.

मग राजगोपाळा चारियर यांनी आत्मौपम्य बुद्धीने कौन्सिलप्रवेशाकडे पाहावयाचें म्हणजे काय करावयाचें? तर तें असें. अस्पृश्यांना मंदिरप्रवेश घडविणें हा अस्पृश्यतानिवारणाचा एक भाग आहे हें खरें. राजगोपाळा चारियर यांचे गुरु म. गांधी यांनी तें करावयाचें ठरविलें. पण त्यांना असें आढळलें कीं, कायदा केल्याशिवाय हें सिद्ध होत नाहीं. आणि कायदा होणें तर तो कौन्सिलाबाहेर होत नाहीं! अशा तऱ्हेने समाजसेवेचें साध्य व साधन ही दोनहि त्यांच्या डोळ्यांना स्पष्ट दिसल्या-बरोबर, तें साध्य साधण्याला त्या साधनाचा उप-योग करण्याची बुद्धि महात्माजींना सहजच झाली. आता त्यांना अशी बुद्धि उत्पन्न झाली तरी तिजमुळे कौन्सिलांची स्थिति सुधारली काय ? नाहीं. जनतेला पूर्वीहून अधिक हक्क मिळाले काय ? नाहीं. स्वराज्य किंवा त्याचें सारसत्त्व हें तरी पदरांत पडलें आहे काय? नाहीं. गव्हर्नर, गव्हर्नर जनरल यांचे अधिकार कमी झाले काय ? नाहीं. गांधी मागणी करतात त्याप्रमाणे सरकारची मनोभूमिका ( मेंटॅलिटी ) बदलली काय ? नाहीं. सरकाराने भलेपणाची तरी एखादी खूण ( जेश्चर ) दाखविली काय ? नाहीं. मग सर्व स्थिति जुनी होती तीचहि आज आहे ना? आहे. उलट तात्पुरत्या ऑर्डिनन्सचे पक्के कायदे करून ठेवलेच ना? होय. राजबंदी तुरुंगांतून सोडले काय? नाहीं. मग अशी ही कहाणी असतांना, गांधीसारख्यांना कौन्सिलांची मदत घेण्याचा मोह आवरला नाहीं, आणि त्यांची आज्ञा होतांच त्यांचे हे बडे बारगीर दिल्लीकडे घोडी दामटीत सुटले! कशाला? कौन्सिलांत सत्ता गाजवायला ? नाहीं. सरकारच्या हातून आयत्या अधिकाराच्या जोरावर हवी ती गोष्ट घडवून आण ण्याला ? नाहीं. तर ' नादान नोकरीवाले ' म्हणून निंदिलेल्या, ' देशद्रोही ' म्हणून डागून भाजलेल्या, ' सरकारजमा ' म्हणून डांगोरा पिटलेल्या, ' सरकारी भत्त्यांचे भाकरीचे तुकडे खाणारीं कुत्रीं ' म्हणून तिरस्कार केलेल्या, अशा खासदार कौन्सिल सभासदांच्या हातापाया पडून, त्यांच्या मार्फत गव्हर्नर जनरलाला ' सहकारिते ' चा अर्ज करवून, सनातनी लोकांवर जुलूम करण्याचें एक यःकश्चित बिल पास करवून घेण्याला ! म. गांधींचा कोण हा अधःपात ! पण त्याबरोबरच आत्मौपम्य बुद्धीचा कोण हा गुप्त विजय व जयजयकार !

म. गांधींना कौन्सिलाकडे धाव घेण्याचा हा मोह आवरता आला असता. तर बरें होतें. आम्हा इतर ग्राम्य अल्पसंतुष्ट निम—सरकारी प्रति-सहकारी अशा व्यावहारिक म्हणजे ज्यांना ध्येयवादित्वाची ईश्वरी देणगी नाहीं (!) अशा प्राकृत जनाप्रमाणे त्यांजकडून आचरण घडलें नसतें, तर तें त्यांच्या योग्यतेला व आजपर्यंत मिरविलेल्या ध्येयवादित्वाला फार शोभलें असतें. म. गांधी यांचा करारी स्वभाव प्रसिद्धच आहे, व तो याच प्रसंगीं कसा मुटला यांचें लोकांना आश्चर्य वाटतें. स्वतःच्या शरीरासंबंधाने त्यांचा करारीपणा इतका कीं, प्रायोपवेशनाला बसून प्राणाचा पण लावण्याला ते तयार होतात. व तें कां ? तर कांहीं ध्येय गाठण्याकरिता. पण हा करारीपणा त्यांनी या बिलाच्या बाबतीत मुळींच सभाळला नाहीं. एका विशिष्ट कार्याची पोटदुखी उत्पन्न होताच, कौन्सिलाच्या वारुळांत हात घालून ओवा काढून त्यांनी खाल्लाच! म्हणजे ते कौन्सिलबहिष्काराच्या ध्येयापासून, अर्थात् सार्वजनिक हिताच्या दृष्टीनेच, घसरले व च्युत झाले! व्यक्तिगत स्वार्थ जरी त्यांना लोभवूं शकत नाहीं, तरी सार्वजनिक हित साधण्याचा मोह त्यांना मोहवून भ्रष्ट करूं शकतो हें मात्र आता कोणास नाकबूल करतां येणार नाहीं.

पण मग प्रश्न असा सहजच उत्पन्न होत नाहीं का कीं, इतर लोक जे कौन्सिलप्रवेशाचा सल्ला देतात, आणि या अधिकृत साधनाचा उपयोग करा म्हणून सांगतात ते सर्व काय स्वतःचें किंवा दुसऱ्याचें पोट जाळण्यासाठीं ! ज्याची अशी छाती असेल त्यानें तसें उघड म्हणावें. अस्पृश्यतानिवारण व्हावें या मताचे आम्हीहि आहों. एवढेच नव्हे, तर अस्पृश्यांना मंदिरप्रवेश घडावा, देवदर्शन लाभावें, व त्याकरितां स्पृश्यांनीं कांहीं स्वार्थत्याग करण्यास तयार व्हावें, आणि लोकमत बरेंचसे बदलल्यावरहि अडचण नडूं लाग-ल्यास ती मोडून काढण्याकरिता कायदाहि व्हावा, असें आम्ही म्हणतों. पण त्याबरोबर आम्ही असेंहि म्हणतों कीं, मंदिरप्रवेशाच्या या सार्वजनिक हित-कार्याला तरी असें काय सोनें लागून राहिलें आहे कीं, ज्याकरितां म गांधींनी येवढी आटापिटी करून 'बहिष्कृत' कौन्सिलाकडे धांव घ्यावी ? मग न

जाणो, बहिष्कृतावरील बहिष्कार आणि चांडालांचे अस्पृश्यत्व काढून टाकणे या गोष्टीने त्यांना इतके वेडावून सोडलें असेल कीं, हिंदु धर्मांतील चांडालांचा बहिष्कार हा कौन्सिलांचा बहिष्कारहि उठविल्यावाचून पुरा होतच नाहीं. तसें असेल तर ती इष्टापत्तिच होय. कारण अस्पृश्यांचा बहिष्कार हा जितका हानिकारक तितकाच कौन्सिल या बहिष्कार हाहि आम्हांला हानिकारक वाटतो. आणि "शब्दांत मावलें तें जगभर लागलें" या म. गांधींच्या नेहमींच्या अविवेचक पद्धतीचाहि फायदा मिळून जरी हा कौन्सिलबहिष्कार उठला तरी तो आम्हांला ग्राह्यच होईल.

राज्यकारभाराचा कोणताहि भाग असा नाहीं कीं ज्याला कायद्याचें अधिष्ठान नाहीं. मग ते प्रत्यक्ष कायद्याचें असो किंवा त्याखालीं झालेल्या कानूंचे व नियमांचे असो. सामाजिक व धार्मिक बाबतींतसुद्धा कायदा हवा, म्हणजे कौन्सिलाचा उपयोग करून घ्यावा, अशी कबुली जर म. गांधी देतात, तर प्रत्यक्ष राज्यकारभाराच्या बाबतींत तो उपयोग करून घेतल्याशिवाय चालेल किंवा ती मदत घेऊं नये, किंवा ती मदत घेणें गैर आहे, असें महात्माजी झाले तरी कोणत्या तोंडानें म्हणतील ? आणि त्यांनी तसें म्हटलें तरी जग त्यांचे काय म्हणून ऐकेल ? कवींना जसें आपण निरंकुश आहों असें वाटतें तसेंच कांहींसें महात्माजींचे झालेलें दिसतें. जगांतील सगळें प्रामाण्य आपल्या बुद्धींत येऊन बसलें आहे असें त्यांना वाटतें. म्हणून आजवर कौन्सिलबहिष्कार घातला तो तरी चूक किंवा, आपण कौन्सिलाकडे आज धांव घेतो ती तरी चूक यापैकीं कोणतें तरी एक कबूल करणें प्राप्त आहे हेंहि त्यांना कळत नाहींसें झालें आहे !

पण त्यांना हें न कळलें तरी जगाला कळतें. आणि आज मंदिरप्रवेशापुरता कौन्सिलांचा उपयोग करून, उद्यां फिरून राज्यकारभाराच्या दृष्टीनें कौन्सिलबहिष्कार पुकारण्यास पुढें येऊं, अशी जर त्यांची अपेक्षा असेल तर ती व्यर्थ आहे. कारण त्यांच्या विशिष्ट प्रकारच्या माहात्म्याला किंवा योग्यतेला किंवा गुणांना मोहून जाऊन, वेडे बनून, गांधी नाचवतील तसें नाचूं असें म्हणण्याला हिंदुस्थानांतील राष्ट्रीय वृत्तीचें जग केव्हांहि तयार होणार नाहीं. त्यांनाहि ईश्वरानें स्वतःची कांहीं बुद्धि दिला आहे. लोकहित साधण्याची इच्छा व पात्रता दिली आहे. गांधी म्हणतील ते वेदवाक्य असें मानण्यास ते तयार नाहींत. हा कौन्सिल—बहिष्काराचा प्रश्न कदाचित् पुन्हा डोकावण्याचा संभव आहे म्हणून आम्ही हें आधींच बोलून ठेवितों. मंदिरप्रवेशाचें बिल इष्ट असलें तरी "लोकांचे मन वळविण्याकरिता थांबण्याचें कारण नाहीं, बिलच हवें, आणि तें आजच हवें" अशा आग्रहानें, झाडाच्या फांदीवर पुढच्या टोकाला बसून आपल्याच हातानें मागच्या बाजूला ती तोडण्यासारखें आत्मघातकी म्हणजे अर्थात् तत्त्वघातकी आचरण म. गांधी हे आता करून चुकले आहेत. आणि त्यावर आता त्यांना किंवा इतरांनी कितीहि सारवासारव केली तरी या चुकीची दुरुस्ती होणें शक्य नाहीं. मात्र आम्हांला ती चूक इष्ट वाटते, व त्यांच्या हातून ती घडली हें सोन्याहून पिवळें झालें असें वाटतें, ही गोष्ट वेगळी !

# महिला विद्यापीठावरील संकट

पुणें येथील भारत महिला विद्यापीठाला कै. सर विठ्ठलदास ठाकरसी यांनी १५ लक्ष रुपयांची देणगी कांहीं शर्तींवर देऊं केली होती. रकमेचें सुमारें ५२ हजार रुपये व्याजाचें उत्पन्न या विद्यापीठाच्या खर्चाला गतवर्षापर्यंत मिळत होतें. परंतु सर विठ्ठलदास यांच्या मिळकतीच्या ट्रस्टींनी ही व्याजाची रक्कम विद्यापीठाला या पुढे आगण देणार नाहीं असें कळविलें. खुद्द विद्यापीठाचे चाललेल्या, व विद्यापीठाकडून मिळालेल्य देणग्यांच्या आधारावर चाललेल्या, शिक्षण संस्थांवर हें किती मोठें संकट येऊन पडलें याची कल्पना अशा संस्था चालविणारांना सहजच येईल. अर्थात् हें प्रकरण असेंच सोडून चालणें विद्यापीठाला शक्य नाहीं. म्हणून कांहीं तरी तडजोड निघावी, गैरसमज दूर व्हावे, अशाविषयीं खाजगी प्रयत्न बरेच झाले. पण ते एकतर्फी ठरले. शेवटीं कायदेपंडितांचा सल्ला घेऊन हें प्रकरण हायकोर्टांत न्यावें लागणार असें म्हणतात, व मग तेथें काय निकाल लागेल तो खरा!

### प्रो. कर्वे यांजवर आरोप

अशी फिर्याद करणें प्रो. कर्वे यांच्या अगदीं जिवावर आलें होतें. कारण एवढ्या उदार आश्रयदात्यांच्या वारसांवर व ट्रस्टींविरुद्ध तक्रार घेऊन कोर्टांत जाणें हें दिसण्यांत अगदीं कृतघ्नपणासारखें दिसतें. शिवाय खुद्द सर विठ्ठलदास यांच्या पत्नीनें व्यक्तिशः प्रो. कर्वे यांच्यासारख्या मनुष्यावरहि

संशयास्पद आरोप करण्यास कमी केलें नाही असें म्हणतात! यामुळे ही देणगी फुकट गेली व गेली, पण तिजबरोबर आपला स्वाभिमान खर्ची घालूं नये असें ठरवून प्रो. कर्वे यांनी आपल्या आत्मविश्वासू पद्धतीप्रमाणें, वेगळ्या देणग्यांकरितां विनंतिपत्रहि प्रसिद्ध केलें आहे. परंतु महिला विद्यापीठाची सिंडिकेट ही अर्थातच या प्रश्नाकडे सरळ व्यवहाराच्या दृष्टीने पाहणार. सर विठ्ठलदास यांच्या ट्रस्टींना देणगीचा करार मोडता येत नाही असा कायदेपंडितांचा सल्ला मिळाला असल्यामुळे, सिंडिकेटने कोर्टाचा राजमार्ग पत्करला असें दिसतें. हें प्रकरण प्रत्यक्ष कोर्टांत जाऊं घातल्यावर त्यासंबंधी कोणीं आपले खाजगी अभिप्राय देण्यांत कांही अर्थ नाही. तथापि नुकतेच अहमदाबाद येथून, ठाकरसी ट्रस्टींच्या प्रेरणेने लिहून प्रसिद्ध केलेलें एक पत्रक आमचे हातीं आलें आहे. म्हणून या विषयासंबंधाने दोन शब्द लिहावेसे वाटतात.

## विद्यापीठावरील आक्षेप

हें पत्रक निनांवी आहे. तथापि 'गुजराथ समाज-सुधारणा समिती'ने त्या पत्रकाबरोबर आपलेंहि एक पत्र जोडून ठिकठिकाणीं पाठविलें आहे. या पत्रांत ट्रस्टींची तरफदारी करून त्यांनी केलें ते योग्यच केलें असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे; आणि महिला विद्यापीठाच्या चालकांनी पुष्कळ चुका केल्यामुळे ही स्थिति आली असें दर्शविलें आहे. या पत्रकांत घेतलेले मुख्य आक्षेप असे कीं, (१) विद्यापीठाची कचेरी शक्य तितक्या लवकर पुण्याहून मुंबईस न्यावी ती नेली नाही. त्याकरितां विनाकारण सबबी सांगितल्या आहेत. हें न होण्याचें कारण विद्यापीठाच्या शिक्षणसंस्थेत हिंगणें येथील अनाथ बालिकाश्रमांतील शिक्षकांची सोय कर्वे यांना करावयाची होती. या शिक्षकांची निष्ठा जी आश्रमासंबंधाने ती विद्यापीठासंबंधाने राहूं शकत नाही. आणि पगार विद्यापीठाचा घ्यावा व हित आश्रमाचें पहावें अशी विसंगति उत्पन्न होते. (२) नांवाप्रमाणे हें विद्यापीठ सर्व हिंदुस्थानाचें असें करावें तें करण्यांत आलें नाही. (३) मुंबईस जितक्या लवकर विद्यापीठाचें कॉलेज काढावयास पाहिजे होतें तितक्या लवकर तें काढलें नाही. (४) सोळा वर्षांत जितकी अपेक्षा होती तितकी बाहेरची वर्गणी जमविली नाही. (५) विद्यापीठांतून निघाव्या तितक्या पदवीधारिणी निघाल्या नाहीत. (६) नवीन शिक्षणसंस्था काढाव्या त्या काढल्या नाहीत. सुरत, बडोदें, अहमदाबाद येथील संस्था पूर्वीच्याच होत्या. (७) विद्यापीठाचें काम लोकप्रिय नाही व सरकारला पटेल असेंहि नाही. म्हणून त्यांजकडून चार्टर मिळण्याची आशा नाही. (८) विद्यापीठाच्या सेनेट-सिंडिकेटवर गुजराथी सभासद असावे तितके नसतात. (९) विद्यापीठाने देशी भाषेतून पुस्तकें करावीं तितकीं निर्माण केलीं नाहीत. (१०) परीक्षा घेण्याची पद्धति सदोष आहे.

वरील सर्व आक्षेपांना योग्य उत्तरें देतां येतील. परंतु आता तसें करीत बसण्यांत अर्थ नाही. तथापि या पत्रकाच्या शेवटीं जीं एकदोन वाक्यें आहेत तीं आम्हांला महत्त्वाचीं वाटतात. पत्रकाचा लेखक म्हणतो "विद्यापीठाच्या चालकांनी अधिक कार्यक्षम बनावें व उत्साहाने कार्य करावें, या हेतूने मीं हें सर्व लिहिलें आहे. पण तसें न घडेल तर जनतेने हें विद्यापीठ सोडून देऊन, दुसरें एखादें निर्माण करावें. मग तें अखिल भारतीय होवो किंवा फक्त मुंबई इलाख्यापुरतें होवो. पण जें होईल तें खरें होईल भ्रामक होणार नाही. त्याला हवे तितके उत्साही कार्यक्षम लोक मिळतील, आणि मग सर विठ्ठलदास यांच्या ट्रस्टींना ती वार्षिक ५२ हजारांची देणगी या नव्या संस्थेला देतां येईल."

## तडजोडीची सूचना

हें सर्व लक्षांत घेऊन आम्हांला अशी सूचना करावीशी वाटते कीं, जबाबदारीच्या स्वराज्यांत एक प्रधानमंडळ जाऊन दुसरें प्रधानमंडळ नेमलें जातें, व नवें प्रधानमंडळ पहिल्याची जागा व त्याबरोबर सर्व जबाबदारी पत्करतें, त्याप्रमाणे या विद्यापीठाच्या कामींहि कां होऊं नये? व कोर्टांतील चौकशी कां थांबूं नये? सर विठ्ठलदास यांच्या ट्रस्टींनी सरळ पुढे येऊन आपल्या पसंतीचें म्हणून जें कार्यकारी मंडळ असेल तें सुचवावें. आणि विद्यापीठाच्या सेनेटने या नव्या कार्यकारी प्रधानमंडळाला रीतसर निवडून, पुढें कांही काळपर्यंत सर्व व्यवस्था त्यांचे स्वाधीन करावी. तसेंच अनाथबालिकाश्रमाच्या शिक्षकांनी आपण जरूर तर बाजूला होऊं, या मंडळाने हवे ते नवे शिक्षक नेमावे असें पुढे येऊन सांगावें. सर विठ्ठलदास ठाकरसी यांचा विश्वास प्रो. धोंडोपंत कर्वे व अनाथ बालिकाश्रम यांच्यावर होता तसा त्यांच्या ट्रस्टींचा नाही हें उघड आहे. शिवाय लेडी ठाकरसी यांच्या मानापमानाचे प्रश्न बरेच उत्पन्न झाले आहेत. अशा वेळीं जुनें विद्यापीठ मोडून नवें विद्यापीठ स्थापण्याऐवजीं जबाबदारीच्या पद्धतीवर नवें प्रधानमंडळ किंवा कार्यकारी मंडळच नेमलेलें काय वाईट? म्हणजे मग या पत्रकांत आजच्या चालकांवर

घेतलेले आक्षेप कितपत सकारण आहेत, व नवे चालक झाले तरी ते हे आक्षेप आपल्या कामांतून कितपत काढून टाकूं शकतील हें आपोआप कळेल.

### प्रांतिक अभिमान वाढला

आमच्या समजुतीप्रमाणें या प्रकरणाचा गुजराथी–मराठी हा प्रांतिक अभिमान उखेड्याला बराच कारण झाला आहे. सर विठ्ठलदास जिवंत होते, तेव्हा अशा क्षुद्र विचारांना थारा मिळाला नव्हता. केवळ कर्वे यांची योग्यता व कर्तृत्व सर विठ्ठलदास यांच्या डोळ्यांत भरून गेल्यामुळे त्यांना गुजराथी, दक्षिणी हा भेद दिसलाच नाही. आणि आता तो त्यांच्या ट्रस्टींना दिसूं लागला. एवढ्या मोठ्या देणगीचा फायदा मुख्यतः महाराष्ट्रीय लोकांना मिळतो असा गौण विचार जर खरोखरच उत्पन्न झाला असेल तर, विद्यापीठाच्या महाराष्ट्रीय चालकांनी बाजूला सरून प्रांजलपणानें विद्यापीठ गुजराथी चालक वर्गाच्या स्वाधीन करावें. म्हणजे मग विद्यापीठ लोकप्रिय किती होतें, सर्व देशांत त्याला मान्यता किती मिळते, गुजराथी विद्यार्थिनींची संख्या किती वाढते, इतक्या थोड्या पगारावर विद्वान नामांकित शिक्षक कसे मिळतात, या सर्व गोष्टी आपोआपच कळून येतील.

विधायक स्वरूपाच्या कामांत मत्सर बुद्धीला जबाबदारीसारखें औषध नाही. शिवाय सर विठ्ठलदास यांच्या देणगीच्या भांडवलाची हल्ली किंमत किती राहिली आहे, तिचें वार्षिक व्याज किती येतें, व या सार्वजनिक कार्याकडे हें सर्वच्या सर्व ट्रस्टी लावूं इच्छितात कीं नाही हेंहि कळेल. 'राज्य' मागेतोंपर्यंत ठीक असतें. पण 'राज्य अंगावर आलें' म्हणजे मग तितकें सोपें नसतें हा अनुभव सर्वत्र आहे. अनाथ बालिकाश्रमानें जिवापाड मेहनत घेऊन आज सोळा वर्षे हें कार्य कसें केलें हें प्रसिद्ध आहे. पण नांवाप्रमाणे अखिल हिंदुस्थान दर्शांतील स्त्रियांच्या विशिष्ट शिक्षणाचें कार्य जर या संस्थेच्या हातून व्हावयाचें आहे, तर कार्यकारी मंडळाचा खांदेबदल झाला तर त्यांत काय वावगें ? किंबहुना प्रो. कर्वे व त्यांच्यावर निष्ठा असलेला हल्लीचा चालक वर्ग यांच्या स्वार्थनिरपेक्ष सेवेचें महत्त्व स्पष्टपणें लोकांना कळण्याला व उमगण्याला जबाबदार राज्यपद्धतीला अनुसरून कार्यधुरेखालीं खांदेबदल हाच उत्तम मार्ग दिसतो.

---



प्रदर्शनाचे अध्यक्ष

राजा धनराज गिरजी

# पुण्यांतील औद्योगिक प्रदर्शनाचा उद्घाटनसमारंभ

रविवार ता. २६ रोजीं, सायंकाळीं ६ वाजतां श्रीशिवाजी पुतळ्यासमोरील भव्य पटांगणांत, पुणें औद्योगिक प्रदर्शनाचा उद्घाटन समारंभ हैद्राबादेचे नागरिक गोस्वामी श्रीमंत **राजा धनराजगिरजी बहादुर** यांच्या हस्तें मोठ्या थाटानें झाला. या प्रदर्शनानें जवळजवळ सहासात एकर जागा व्यापिली असून, अदमासें ३००चे वर दुकानें यांत समाविष्ट झालीं आहेत. प्रदर्शनांत आलेल्या उत्कृष्ट मालाला उत्तेजन मिळावें म्हणून ट्रस्टींनीं प्रत्येक बक्षिस शंभर रुपयांचें अशीं चार बक्षिसें ठेविलीं आहेत. तसेंच केसरी-मराठा संस्थेनेंहि एक टिळक नामजोशी पदक कांहीं विशिष्ट तऱ्हेच्या मालाकरिता बक्षीस देण्याचें ठरविलें आहे. कोणत्या मालास बक्षिस द्यावें हें ठरविण्याकरिता, एक परीक्षक मंडळ नेमलेलें आहे.

या समारंभास डि.जज्ज रा. नानावटी, कलेक्टरचे पर्सनल असिस्टंट, सिटी मॅजिस्ट्रेट इत्यादि सरकारी अधिकारी हजर असून, गांवांतील प्रमुख गृहस्थ व स्त्रियाहि आल्या होत्या. अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर मुलींनी 'देई मला इतुकें प्रभुराया' हें ईशस्तवन व 'मोद करूं या आजि स्वागताला' हें स्वागतपद्य म्हटलें. नंतर रे इंडस्ट्रियल म्यूझियमचे क्यूरेटर श्री. भा. वि. घारपुरे यांनी आलेले संदेश वाचून दाखविले. त्यांत बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव महाराज, श्रीमंत औंधकर, दिवाण बहादुर कंबळी, मि. पेरी, पुण्याचे कलेक्टर, औद्योगिक खात्याचे डायरेक्टर मि. अडवाणी, सुतन मिलसचे डायरेक्टर, वगैरेंचे संदेश होते शेठ गोकुळदास नारायणदास यांनी आपल्या संदेशाबरोबर प्रदर्शनास दीडशें रुपयांची देणगी पाठविली असल्याचें व श्रीमंत भिरजकर हे ज्याचें जरतारीचें काम उत्कृष्ट ठरेल त्यास शंभर ते दीडशें रुपयांपर्यंत एक बक्षीस देणार असल्याचें घारपुरे यांनी जाहीर केलें. नंतर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष डॉ. नायडू यांनी आपलें खालील आशयाचें भाषण वाचून दाखविलें.

## डॉ. नायडू यांचें भाषण

वेस्टर्न इंडिया इंडस्ट्रिअल असोसिएशनतर्फे, सन १८८८ सालीं पुणें शहरांत स्वदेशी वस्तूंचें एक प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें. त्यांत विक्री इतकी बेसुमार झाली कीं, अशा वस्तूंचा एक कायम संग्रह ठेवावा अशी कल्पना निघून, १ जानेवारी १८९० मध्यें एक म्यूझियम स्थापन करण्यांत आलें. असोसिएशननें म्यूझियम योग्य प्रकारें चालविण्याकरिता १८९५पर्यंत आठ हजार रुपयांची रक्कम जमविली. त्याच सुमारास मुंबईचे लोकप्रिय गव्हर्नर लॉर्ड रे यांचें स्मारक करण्याकरितां एक कमिटी स्थापण्यांत येऊन, तिचे मार्फत द्रव्यनिधि जमविण्याचें काम सुरू झालें. त्या कमिटीकडून म्यूझियमला लॉर्ड रे यांच्या स्मारकाप्रीत्यर्थ सहा हजार रुपये मिळाले. तेव्हांपासून या म्यूझियमला 'लॉर्ड रे इंडस्ट्रियल म्यूझियम' असें नांव पडलें. याशिवाय त्यास पुणें शहर म्युनिसिपालिटीनें तीन हजार रुपये ग्रँट दिली. अशा तऱ्हेनें १७ हजार रुपये जमले. १८९५ मध्यें म्यूझियम कमिटीनें आपल्या जवळ असलेला सर्व निधि व वस्तुसंग्रहालय म्युनिसिपालिटीचे स्वाधीन केलें. तेव्हांपासून हें काम म्युनिसिपालिटी पाहात आहे. १९३० मध्यें म्युनिसिपालिटीनें या बाबतींत एक योजना करून रे मार्केट टॉवर मधील जागा म्यूझियमला दिली, व पांच हजार रुपयांची निरंतरची वार्षिक ग्रँट मंजूर केली. वस्तुसंग्रहांतील याचें काम पाहण्यास जी एक कमिटी नेमण्यांत आली आहे तींत म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, चेअरमन व देणगीदारांतर्फे श्री. न. चिं. केळकर व सरदार श्रीमंत जगन्नाथ महाराज अशीं मंडळी आहेत.

## स्वदेशीला आश्रय

मुंबई सरकारचें औद्योगिक खातें, पंजाब, संयुक्तप्रांत आणि फॉरेस्ट रिसर्च इन्स्टिट्यूट, इंडिया पेटंट डिपार्टमेंट, म्हैसूर संस्थान, निजाम सरकार इत्यादिकांकडून निवडक वस्तू म्यूझियममध्यें ठेवण्यासाठीं मिळाल्या आहेत. रे मार्केटची जागा आतां या संस्थेस अपुरी पडत चालली असून, त्याकरितां शनवार वाडा मिळावा याबाबत सरकारशीं बोलणें सुरू आहे. सुशिक्षित वर्गांत दिवसेंदिवस बेकारी वाढत आहे, याचें कारण एकांगी शिक्षण हेंच होय. अलीकडे युनिव्हर्सिटीचें लक्ष या गोष्टीकडे गेलें असून, धंदेशिक्षणासंबंधी प्रयत्न सुरू झाले आहेत. पुणें शहरानें शिक्षणक्षेत्रांत घेतलेला पुढाकार व भावी महाराष्ट्र विद्यापीठाचें हें एक ठिकाण या दृष्टीनें, येथें एक नमुनेदार टेक्निकल स्कूल असणें जरूर आहे. कोणत्याहि राष्ट्राची सांपत्तिक स्थिति व वैभव त्याच्या व्यापारावर अवलंबून असतें. जेथें उद्योग-धंदे नाहींत तेथें व्यापार नाहीं व जेथें व्यापार नाहीं तेथें संपत्ति नाहीं. या यांत्रिक युगामध्यें परदेशी मालाच्या चढाओढींत आमचे धंदे टिकाव धरूं शकले नाहींत आतां तरी आमचा स्वाभिमान जागृत झाला आहे ही समाधानाची

गोष्ट आहे. स्वदेशी मालाला आम्हीं प्रथम आश्रय दिला पाहिजे ही गोष्ट सर्वांना पटूं लागली असून, देशांत अनेक कारखाने निघूं लागले आहेत. प्रदर्शनाचा हेतु सदर प्रदर्शनावरून सहज लक्षांत येईल.

### प्रदर्शनाचा हेतु

परप्रांतांत तयार होणारा माल जनतेसमोर आणणें, तसेंच आपल्या देशांत स्वदेशी मालाचे कारखाने कोठे आहेत तें लोकांना कळविणें व स्वदेशी मालाचा भरपूर खप करणें, हा प्रदर्शनाचा मुख्य हेतु आहे. औद्यौगिक शिक्षणाचें कार्यहि हें म्यूझिमय करीत असतें. तसेंच म्यूझियमला जोडून वाचनालयाची सोय केलेली असून, या वाचनालयांत सालीना २००० रुपयांपर्यंत किमतीचीं उद्योगधंद्याची माहिती देणारी पुस्तकें आणण्यांत येतात. पुण्यामध्ये हल्ली अनेक लहान लहान धंद्यांचे संघ आहेत. परंतु औद्योगिक उन्नतीकरितां एक असोसिएशन असणें अत्यंत जरूर आहे. व्यापार, उद्योगधंदे यांची आंकडेवार माहिती मिळविणें व ती प्रसिद्ध करणें, व्याख्यानद्वारा व इतर रीतीने जनतेमध्ये उद्योगधंद्यांची गोडी उत्पन्न करणे इत्यादि कामें या असोसिएशनमार्फत होण्यासारखीं आहेत. आज आपणास अध्यक्षहि उद्योगधंद्यास उत्तेजन देणारे व प्रत्यक्ष व्यापार करणारे लाभलेआहेत ही आनंदाची गोष्ट होय.

डॉ.नायडू यांचें भाषण झाल्यानंतर त्यांनी अध्यक्षांना प्रदर्शन खुलें करण्याची विनंति केली. पण तत्पूर्वी त्यांनी श्री. न. चिं. केळकर यांच्याकडून आपणास परगांवीं जावें लागल्यामुळें प्रदर्शनास हजर राहता आलें नाही, याबद्दल पत्र आल्याचें सांगितले. नंतर म्युनिसिपालिटीच्या स्टँडिंग कमिटीचे अध्यक्ष डॉ. गोरे यांनी प्रदर्शनांत कोणकोणत्या प्रकारचा माल आला आहे याची माहिती सांगितल्यावर, अध्यक्ष राजा धनराजगिरजी यांनी खालील आशयाचें भाषण वाचून दाखविलें.

### धनराज गिरजी यांचें भाषण

इ. स. १८८८ पासून ते १९३३ या ४५ वर्षांच्या कालांत आमच्या देशांत जी औद्योगिक प्रगति झालेली दिसून येत आहे, तिजवरून स्वदेशी चळवळीचें पाऊल झपाट्याने पुढें पडत आहे हें स्पष्ट सिद्ध होतें. आम्हीं स्वदेशी मालच वापरला पाहिजे ही जाणीव लहानापासून थोरापर्यंत आता सर्वांना झालेली आहे. ज्याप्रमाणे खालसा मुलुखांत ही चळवळ चालू आहे तशीच ती संस्थानांतहि आहे. याला उदाहरण म्हणून हैद्राबाद व म्हैसूर संस्थानांत भरलेल्या औद्योगिक प्रदर्शनांचें देतां येईल. अशा तऱ्हेचा उपक्रम इतर संस्थानांतूनहि होईल अशी मला आशा आहे. पुणें औद्योगिक प्रदर्शन हे लॉर्ड रे इंडस्ट्रियल म्यूझियम या संस्थेकडून भरविलें जात आहे. ही संस्था सुमारें ५० वर्षांपूर्वी स्थापन झाली असून, आता ती शहर म्युनिसिपालिटी व म्यूझियमचे ट्रस्टी यांच्या नजरेखाली चालली आहे. युरोप, अमेरिका वगैरे पाश्चात्य देशांत अशा तऱ्हेचीं संग्रहालयें पुष्कळ ठिकाणीं स्थापन करण्यांत आलीं आहेत. त्यांना सरकार व जनता यांचा आश्रय चांगला आहे.

### औद्योगिक उन्नति

औद्योगिक उन्नतीकरिता अशीं प्रदर्शनें भरविणें अवश्य आहे. प्रदर्शनामुळे देशांत तयार झालेला नवीन नवीन माल जनतसमोर येतो व त्यामुळे जागृति उत्पन्न होते आपला देश कृषिप्रधान आहे आणि शेतकऱ्याची स्थिति दिवसेदिवस अनुकंपनीय होत चालली आहे. ती बदलून त्यांना सुस्थितीस आणण्याला देशांत औद्योगिक सुधारणा घडवून आणून, स्वदेशी उद्योगधंद्यांची झपाट्याने वाढ केली पाहिजे. तसेंच शेतकरी वर्गाला साक्षर केलें पाहिजे. शेतीचा हंगाम संपल्यावर फुरसतीच्या वेळीं दुसरा एखादा जोड धंदा त्यांना शिकविणें जरूर आहे. या दृष्टीने कापड विणणें, रंगकाम, कापूस साफ करणे, कुंभारकाम ( पॉटरी ), सुतार काम वगैरे अनेक उपयुक्त धंद्याचें शिक्षण दिल्यास त्यांना पोट भरण्यास मदत होईल व देशाचेंहि हित होईल. प्रत्येक देशाची उन्नति व सुस्थिति तेथील औद्योगिक प्रगतिवरच अवलंबून असते. पुणें शहराला जरी उद्योगधंदा व व्यापार या दृष्टीने महत्त्व नसले तरी, येथे एक मोठें शेतकी कॉलेज व पदार्थसंग्रहालय ( इंडस्ट्रियल म्यूझियम ) आहे. शेतकी कॉलेज बंद करावें अशी शिफारस थॉमस कमिटीने केली.पण सरकारने तिकडे लक्ष दिलें नाही ही आनंदाची गोष्ट होय. तर्‍हां त्यांचा शिक्षणाकडे जनतेने योग्य तो उपयोग करून घ्यावा. स्वदेशी धंद्यास उत्तेजन व प्रोत्साहन देणें हें जसें जनतेचें आद्य कर्तव्य आहे, तशीच सरकारावरहि याची जबाबदारी आहे. स्वदेशी माल कोणता हें ठरविण्यांत वेळ न घालवितां आमच्या देशांत आमच्या भांडवलाने जो माल तयार होतो तो स्वदेशी असें खुशाल समजावें. शेवटीं माझी परमेश्वराजवळ अशी प्रार्थना आहे कीं,इतःपर आमचा देश जीवनास अवश्य अशा नित्योपयोगी वस्तूंबद्दल कधीहि परावलंबी राहूं नये, व त्याची पुढारलेल्या देशांत गणना व्हावी.

आता मी हें प्रदर्शन खुलें झाल्याचें जाहीर करतों व येथील जनता सक्रिय सहानुभूति दाखवून, प्रदर्शनाचा योग्य तो फायदा घेईल असें

इच्छितों." येणेप्रमाणे अध्यक्षांचें भाषण झाल्यावर श्री. शंकरराव भगत यांनी अध्यक्षांना हार घालून पान-सुपारी दिली. शेवटीं शेठ हणमंतराम रामनाथ यांनी योग्य शब्दांनी अध्यक्षांचे आभार मानले, व त्यांस डॉ. गोरे यांनी दुजोरा दिला. नंतर राष्ट्रगीत झाल्यावर हा समारंभ संपला.

# मंदिर-प्रवेश बिलाची इष्टापत्ति

"गेल्या सोमवारीं दिल्ली येथील वरिष्ठ कायदे-कौन्सिलांत फारच गमतीचे प्रकार चालू होते" असें कित्येक वर्तमानपत्रांच्या बातमीदारांनी प्रसिद्ध केलें आहे. आणि त्या दिवशीं या कायदेमंडळापुढे काय काम होतें, तें चालू असतां निरनिराळ्या पक्षांच्या हालचाली कसकशा सुरू होत्या, व अखेरीस कोणाचा निकाल काय झाला, हें सर्व नीट ध्यानांत घेऊन वाचलें म्हणजे, या बातमीदारांनी म्हटल्याप्रमाणे तो दिवस प्रेक्षकांना खरोखर मोठी मौज वाटण्यासारखाच गेला असावा यांत शंका नाही. म्हणून प्रथम त्या दिवशीं कायदे-मंडळांत कोणकोणते पक्ष होते, आणि त्यांनी एकमेकांना अडविल्यामुळे कोणाचेंच कांही न साधता त्या दिवसाचें सभेचें काम कसें संपवावें लागलें हें पाहूं.

सोमवार ता. २७ फेब्रुवारी हा दिवस खाजगी बिलांची चर्चा करण्याकरिता राखून ठेविला होता. या खाजगी बिलांच्या यादींत, श्री. गयाप्रसाद सिंह यांच्या मंदिरप्रवेशाच्या बिलाला सातवें स्थान मिळालेलें होतें. याचा अर्थ असा कीं, त्यापूर्वीचे नंबर लाभलेल्या सहा बिलांचा निकाल जो काय लागावयाचा तो लागला, म्हणजे मगच गयाप्रसाद सिंह यांच्या बिलाच्या चर्चेला मुळी प्रारंभ होणार आणि "प्रारंभ होणार" हें मुद्दाम सांगण्याचें कारण असें कीं चर्चेला सुरुवात झाली असती तरी ते बिल त्या दिवशीं तीनहि वाचनें होऊन मंजूर तर होणार नव्हतेंच.

असो. वर सांगितल्याप्रमाणें मंदिरप्रवेश बिलाचा नंबरच मुळी त्या दिवशीं पुकारला गेला नाही; कारण पूर्वीच्या दोन तीन बिलांच्या चर्चेतच कामाचा सर्व दिवस खलास झाला. हें सर्व रीती-प्रमाणेच झालें. परंतु हें न घडून यावें म्हणून कॉंग्रे-सचे अध्यक्ष राजगोपालाचारियर यांनी काय काय करामती केल्या हें पाहणें थोडेसें मौजेचें होईल. खास-दार सभासदांनी त्या दिवशीं विचारण्याकरिता ठेवलेले त्यांचे प्रश्न उघडपणें विचारूं नयेत असा प्रयत्न राज-गोपालाचारियर यांनी केला. याचा अर्थ ते प्रश्न व त्यांचीं सरकाराकडून मिळणारीं उत्तरें पुढे रीतीप्रमाणे छापून येतील त्यावरच समाधान मानून घ्यावें. कायदे मंडळांतील प्रश्न उघड रीतीनें विचारण्यांत फायदा असा असतो कीं, सरकाराकडून कांही अपुरें, चुकीचें किंवा असमाधानकारक उत्तर आलें तर मूळ प्रश्नांच्या जोडीला आयत्या वेळीं पुरवणी प्रश्न विचारून सरकाराची उलट तपासणी करतां येते. गेल्या सोमवारीं विचारलेल्या प्रश्नांत राजकीय दृष्ट्या कांहीं महत्त्वाचे प्रश्न होते. पण त्यांविषयीं सरकारची उलट तपासणी झाली नाही एवढं मात्र खरें. म्हणजे ती एक प्रकारची हानिच झाली, व राजगोपालाचारियर यांनी ती करविली! कां? तर मंदिरप्रवेश बिला-पर्यंत कामाची मजल लवकर पोचावी म्हणून!

पण ही हानी करूनहि काम साधलें नाही, आणि प्रश्न विचारणाऱ्या सभासदांच्या पायां पडून मनधरणी केली ती मात्र फुकट गेली! कारण प्रश्नांनंतर पुढे आलेल्या बिलांनीच वेळ अडविली. ज्याचें मूल त्याला आवडतेंच असतें. या दृष्टीनें कृष्णम्माचारियर व हाजी वाजिउद्दीन यांच्या बिलांना आधींचा नंबर मिळाला होता तो ते कां सोडतील? कृष्णम्माचारियर यांचें बिल हिंदु "स्पेशल मॅरेज ॲक्ट"च्या दुरुस्तीचें होतें. कृष्ण-म्माचारियर हे सनातनी पक्षाचे असून, त्यांच्या मते सर हरि गौर महर्षिप्रणीत कायद्यानें विवाह-बंधनांत जें शैथिल्य उत्पन्न केलें आहे तें काढून टाकलें पाहिजे; व ते करण्याकरिता त्यांनी दुरुस्तीचें बिल आणलें होतें. कृष्णम्माचारि-यर हे सनातनी असल्यामुळे ते मंदिरप्रवेश बिलाला प्रतिकूल असणार हें उघड आहे. अर्थात कायदे मंडळानें पूर्वी केलेली एक चूक दुरुस्त कर-ण्याच्या प्रयत्नांत ते असता, मंदिरप्रवेश बिलाचा कायदा होऊं देण्याची दुसरी एक चूक उघड्या डोळ्यांनी ते कां करूं देतील! "आपलें बिल मागें घ्या" असें त्यांना कोणी म्हणूं शकला नसता; व कोणीं त्यांना तशी विनंति केली असती तरी त्यांनी ती ऐकलीहि नसती. असो, त्यांच्या बिलावर भाषणें झालीं, तरी पण थोडींच होऊन तें बिल नापास होऊन निकालांत निघालें. परंतु त्यानें मधल्या सुटीपर्यंतचा वेळ खाल्लाच.

यानंतर निघालें हाजी वाजीउद्दीन यांचें बिल. तेहि गृहस्थ असेच सनातनी. पण अर्थात्

मुसलमान समाजाच्या दृष्टीने. त्यांच्या बिलाचा आशय असा कीं, शारदा अॅक्ट हा हिंदुस्थानांतील सर्व जातींच्या लोकांना आज लागत आहे. परंतु तो मुसलमान समाजाला लागू होऊं नये ! अशा-विषयी मुसलमान सभासदांची खटपट पूर्वीपासून होत आलेली आहे. शारदा बिलाची चर्चा होतांना हि अशीच खटपट झाली होती. पण ती तेव्हा फसली. परंतु प्रयत्नवादी मुसलमान हे थोडेच गप्प बसणार ! हाजी वाजीउद्दीन यांचें बिल हें त्या यत्नवादित्वाचेंच फळ आहे. कसेंहि असो. या बिलावर मुसलमान सभासदांचीं बरींच भाषणें होणार हे ठरल्यासारखेंच होतें, व तीं झालींहि. आणि त्या भाषणांनीच त्या दिवसाचा उरलेला सर्व वेळ खाऊन टाकला. पण कृष्णम्माचारियरप्रमाणेच मुसलमान सभासदांनाहि, ' तुम्ही आपलें काम आवरतें आखडतें घ्या ' असें म्हणण्याची सोयच नव्हती. आपल्या बिलाच्या आवेशाच्या भरांत काँग्रेसचे अध्यक्ष राजगोपाळाचारियर यांनी तशी विनंति कदाचित् केली असेलहि; पण तिचा उपयोग नव्हता. अशा रीतीने हिंदु व मुसलमान सनातनी लोकांच्या समाजप्रेमापुढे गांधींच्या अस्पृश्य-प्रेमाला हार खावी लागली.

पण या दिवशीं आणखीहि एक गोष्ट घडली ती मात्र जरा सुमारच म्हणावयाची. आणि ती घडवून आणण्याच्या कामीं जर राजगोपाळाचारियर यांचा कांही हात असेल, तर त्यांनी ती गोष्ट किती वाईट केली हे सहजच दिसून येईल. ती गोष्ट अशी. कलकत्ता येथे राष्ट्रीय सभेचें अधिवेशन भरण्याचें जाहीर झालें आहे. त्याला सरकारानें बंदी करूं नये अशी विनंति करण्याचा प्रयत्न झाला. पण ' आम्ही बंदी करणार ' असें आपलें धोरण सरकारानें जाहीर केलेलें वाचकांना माहीतच आहे. म्हणून " हें धोरण चुकीचें आहे; राष्ट्रीय सभा भरण्याला सरकारानें तीं भरण्या-पूर्वीच बंदी करण्याचें कांही कारण नाही; ती भरून कांही वेडेवांकडे ठराव झाले तर सरकारला आपले मार्ग मोकळे आहेतच, " अशा अर्थाची चर्चा कायदेमंडळांत उघडपणें व्हावी ही इच्छा धरून, खासदार जोग व पं. सत्येंद्र सेन यांनीं तहकुबीच्या सूचनेची नोटीस दिली होती. पण मंदिरप्रवेश बिलाच्या मोहाला बळी पडून राजगोपाळाचारियर यांनी अशी कारवाई करविली कीं, ही तहकुबीची सूचना पुढे येईल तेव्हा तिला पाठबळ देण्याकरिता कोणी फारसें उठून उभेंच राहूं नये. शेवटीं तसच घडलें, व तें इतकें बेमालूम की, खुद्द सरकारानेहि या तहकुबीच्या सूचनेला हरकत न केली तरी देखील पंचवीस माणसें तिच्या समर्थनार्थ उठून उभीं राहिलीं नाहीत ! आता सरकारी सभासद किंवा मुसलमान उठून उभे राहण्याचा प्रश्नच नव्हता म्हणा. पण जे कोणी खासगी सभासद उभे राहिले असते त्यांनाहि असें भासविलें गेलें असलें पाहिजे कीं, " अहो ! मंदिरप्रवेशाच्या बिलाचें महत्त्व केवढें तरी ! त्यापुढे काँग्रेसच्या बंदीच्या राजकीय प्रश्नाचें महत्त्व तुम्ही काय घेऊन बसलां ?" पाहा हीच गोष्ट एखाद्या दुसऱ्या कोणीं केली असती तर, काँग्रेस पक्षाच्या लोकांनी विशेषतः कट्टर वर्तमानपत्रांनी त्याला फाडून खाल्लें असतें; व ' हा पाहा देशद्रोही ' म्हणून त्याच्या नांवाची टिमकी जगभर वाजविली असती ! पण राष्ट्रीय-सभेच्या बंदीच्या चर्चेची बंदी किंवा मुस्कटदाबी राष्ट्रीय सभेचे खुद्द अध्यक्षच करावयास पुढे झाले तेव्हा काय बोलावयाचें ?

काँग्रेसचे युद्धनिवृत्त अध्यक्ष राजगोपाळाचारियर यांचा तळ आज कित्येक दिवस दिल्लीस पडलेला आहे. आणि राष्ट्राच्या इभ्रतीच्या नाकाला मंदिर-प्रवेशाचें हें बिल म्हणजे जसें कांही सूत धरलेलें आहे अशा बहाण्यानें, त्यांनी वरिष्ठ कायदे-मंडळाला तें बिल पास करण्याच्या इरेला घालण्याचा उद्योग चालविला आहे. मग सोमवारीं ते स्वतःच, असेंब्लीच्या गॅलरींत परवाना मिळवून, खाली चाललेल्या आपल्या कारवाईचा रंग कसा काय बनतो हें पाहात बसले असल्यास नवल काय? त्या दिवशीं त्यांच्या आगमनानें कायदेमंडळाची गॅलरी सनाथ झाली असेंच म्हटलें पाहिजे ! कायदे मंडळाच्या कामाला त्या दिवशीं त्यांच्या दृष्टीनें किती महत्त्व आलें असलें पाहिजे याची कल्पना कोणासहि करवेल. कायदे मंडळाचें सभागृह ही जशी कांहीं देवदानवांची समरभूमि ! गॅलरींत येऊन बसणारे राजगोपाळासारखे लोक हे यक्ष-किन्नर ! आणि स्त्रियांच्या गॅलरींत बसणाऱ्या स्त्रिया या अप्सरा ! या यक्ष-किन्नरांनी व अप्सरांनी हातांत स्तुतिरूपी पुष्पमाला घेऊन ठेवलेल्या आहेत ! आणि मंदिर-प्रवेश बिलाची चर्चा नुसती सुरू होणें हा खाली लढणाऱ्या अनुकूल सभासदरूपी देवांचा विजय व प्रतिकूल सभासदरूपी दानवांचा पराजय किंवा संहार ! फक्त तो घडून येण्याची वाट हे यक्ष-गंधर्व व या अप्सरा पाहात बसलेल्या होत्या ! अशी असेंब्लीतल्या त्या दिवसाच्या देखाव्याची कल्पना केल्यास ती फारशी चूक होणार नाही.

पूर्वी एक वेळ कौन्सिल बहिष्काराचें खूळ चालू असता, या बहिष्काराचे एक अग्रणी मौ. महमद अल्ली हे अस्सल अरबाचा जरतारी पोशाख घालून, तुच्छतादर्शक बुद्धीने कायदेमंडळाला

फिदी फिदी हांसत असेच गॅलरींत बसलेले पाहि-ल्याचे तेव्हांचे सभासद सांगतात. आणि आज पाहावें तर कोण पण बाजू उलटली होती? म० गांधींचें निशाण अशी ज्याला संज्ञा, त्या अस्सल खादीचा पोशाख करून, श्री. राजगोपाळाचार्य हे कायदेमंडळाच्या गॅलरींत बसून, एक यःकश्चित् बिल पास होणार म्हणून—नव्हे तर त्याच्या चर्चेला प्रारंभ तरी होईल का, अशा—आशाळभूत-पणाने राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष खाली डोळे लावून बसले आहेत! आणि खालचे लोक वर पाहून म्हणत आहेत "काय ही ईश्वराची करणी! आमची नित्य निंदा करणारे हे भले गृहस्थ आज आम्हांला यश चिंतीत दीन होऊन आमच्या पराक्रमाचे कौतुक करावें म्हणून बसले आहेत. "अहाहा, काय तें कौन्सिल" असें जर त्यांनी हेटाळणी करून पूर्वी म्हटलें तर "अहाहा! काय ते कॉंग्रेसचे बहिष्कारवादी अध्यक्ष" असें आज आम्हीं म्हटल्यास त्यांत काय गैर?" असेच ते खालचे सभासद म्हणाले असले पाहिजेत.

राजगोपाळाचारियर यांना अवचित आलेले कायदे-कौन्सिलचें प्रेम व अगत्य, व त्यापेक्षांहि आपलें बिल मंजर करून घेण्याची त्यांची घिसाडघाई, हीं पाहिलीं म्हणजे हरदासी गोष्टींतल्या संन्याशाची आठवण होते. संन्याशाला म्हातारपणीं उपरति होऊन—नव्हे रतिभाव उत्पन्न होऊन-लग्न करण्याची इच्छा झाली. वधू सिद्धच होती. परंतु "संन्याशाच्या डोकीला शेंडी फुटल्याशिवाय त्याला बोहल्यावर चढतां येत नाही" असा निर्णय धर्मशास्त्र्यांनी दिला! इकडे पुरोहिताच्या व उभय पक्षीय वऱ्हाड्यांच्या हातापायां पडून, वधूप्राप्तीकरिता उतावीळ झालेल्या या सन्याशी वराने तेलफळ, सीमांतपूजन, वाङ्-निश्चय, रुखवत वगैरे विलंबाच्या सर्व गोष्टींना फाटा देवविला. आणि आता शेवटची घटका बुडं घातली तरी डोक्याला शेंडी फुटत नाही या दुःखाने, मिळतील तीं औषधी तेलें गोळा करून तो तीं डोक्याला चोळीत घांशीत बसला! पण बिचारी शेंडी फुटेचना! असाच देखावा आज राजगोपाळा-चारियर दाखवीत नाहीत काय? वैराग्याचे आजवर अनेक प्रकार ठरीव म्हणून सांगण्यांत येतात. उदाहरणार्थ, स्मशानवैराग्य, प्रसूतिवैराग्य इ. त्यांतच कौन्सिलबहिष्काररूपी वैराग्याचा समावेश केला तर काय हरकत?

# हिंदुस्थान सरकाराचें अंदाजपत्रक

( आंकडे कोटी रुपयांचे )

| | कच्चा अंदाज १९३२-३३ | दुरुस्त अंदाज १९३२-३३ | कच्चा अंदाज १९३३-३४ |
|---|---|---|---|
| वट उत्पन्न | १२९·९६ | १२७·१३ | १२४·५२ |
| वट खर्च | १२७·८१ | १२४·९६ | १२४·१० |
| वाढ | २·१५ | २·१७ | ·४२ |

सप्टेंबर १९३१ सालीं १४½ कोटींचे नवीन वार्षिक कर लादण्यांत आले ते कायम राहतील.

१ जुलै १९३३ पासून चेकला तिकिटें लावावीं लागतील व त्यांचें उत्पन्न ७ लाख रुपये येईल. याचा बहुतेक फायदा बंगाल व मुंबई या प्रांतांना मिळेल.

पुढील सालीं ४२ लाख रुपये वाढ होईल असा कच्चा अंदाज आहे. लष्करी खात्यांत ५४ लाख व मुलकी खर्चांत ३६ लाख बचत करण्यांत आली आहे.

२८ फेब्रुवारीपर्यंत ३३ कोटींचें रूपांतरित कर्ज उभारलें गेलें. आता फक्त १ कोट रुपये नवीन कर्ज लागेल.

## १९३१ सप्टेंबरमधील करवाढ

सप्टेंबर १९३१मध्ये बजेटांतील तूट भरून काढण्याकरिता नवीन करवाढीचें बिल असेंब्लीकडून मंजूर करून घेण्यात आलें. त्यांत करांची वाढ पुढीलप्रमाणें करण्याचें योजिलें होतें--

**आयात जकातींत वाढ**

१ कापसावर दर शेरास एक आणा जकात.

२ गिरण्यांची व इतर यंत्रें यांच्या आयातीवर १० टक्के.

३ रंगावर १० टक्के.

४ परदेशी गुळावर आयात जकात दर हंड्रेडवेटास रु. ६८१२च्या ऐवजी रु. ७८४.

५ जोडे व बूट यांजवर २० टक्के किंवा दर जोडीस ८४ आणे.

६ कृत्रिम रेशीम किंवा कृत्रिम रेशमाचें सूत यांवर १०टक्क्यांऐवजीं १५टक्के.

७ कृत्रिम रेशमाचें कापड, कापूस व इलेक्ट्रीक बल्ब यांवर २० टक्क्यांच्या ऐवजी ४० टक्के.

८ इतर सर्व आयात मालावर हल्लीं जी जकात असेल तिजवर २५ टक्के वाढ.

**प्राप्तीवरील करांत वाढ**

९ १००० ते १९९९ पर्यंत उत्पन्नावर दर रुपयास ४ पै नवीन कर.

१० १९३१ सालीं प्राप्तीवरील कराचे आकारणींत सरसकट २५ टक्के वाढ.

**इतर कर**

११ एक्साईज ड्यूटींत चोथाई वाढ; ही वाढ मिठावरील करालाहि लागू करण्यात आली !

१२ पोस्टाचें कार्ड ९पै, पाकीट१६ पै हेच कर सध्या चालू आहेत. मात्र कृत्रिम रेशमाचे बदलींत थोडा फेर करण्यांत आला आहे.

## अंदाजपत्रकांतील महत्त्वाचे मुद्दे

हिं. सरकारचे फडणवीस सर जॉर्ज शुस्टर यांनीं मंगळवार तारीख २८ फेब्रुवारी रोजीं सायंकाळीं ५ वाजता लेजिस्लेटिव्ह असेंब्लीला पुढील सालाचें अंदाजपत्रक सादर केलें. त्यांना भाषण वाचून दाखविण्याला २ तास ५ मिनिटें लागलीं. त्यांचे अंदाजपत्रकांतील महत्त्वाचे मुद्दे खालीं दिले आहेत.

**१९३१ व १९३२ सालाचें पुरवणी बजेट**

( १ ) सप्टेंबर १९३१ सालीं पुरवणी बजेट मांडतांना १९३१ सालीं १२६ कोटी १३ लक्ष उत्पन्न व १३६ कोटी ३० लक्ष खर्च असा अंदाज करण्यांत आला होता. व १० कोटी १७ लक्ष तूट येईल असें दिसलें. पण उत्पन्न ४ कोटी ४९ लक्षांनी घटलें व खर्च मात्र २ कोटी ९१ लक्षांनी कमी झाला आणि अखेर हिशेबांत ११कोटि ७५ लक्षांची तूट आली. पण या हिशेबांत कर्ज फेडीकरिता ६ कोटि ९० लक्षाची तरतूद केली होती.

( २ ) १९३२–३३ सालच्या अंदाजपत्रकांत उत्पन्न १३३ कोटी ६ लक्ष व खर्च १२७ कोटी ८३ लक्ष असा अंदाज करण्यांत आला होता व ५ कोटि २३ लक्ष वाढ होईल असें दाखविण्यांत आलें होतें. तथापि ७ मार्च १९३२ रोजीं या सालचें अंदाजपत्रक मांडतांना उत्पन्न १२९ कोटी ९६ लक्ष व खर्च १२७ कोटी ८१ लक्ष होईल असा अंदाज करण्यांत आला. पण दुरुस्त अंदाजाप्रमाणें उत्पन्न १२७ कोटी १३ लक्ष आले व खर्च १२४ कोटी ९६ लक्ष नमूद करण्यांत आला आणि वाढ फक्त २ कोटी१७ लक्षांनी होईल असें दिसतें. चालू सालीं कर्जफेडीकरिता ६ कोटी ८४ लक्षांची तरतूद करण्यांत आली आहे.

**१९३३–३४ साल**

(३) पुढील सालीं उत्पन्न १२४ कोटी ५२ लक्ष येईल व खर्च १२४ कोटी १० लक्ष होऊन तिजोरींत ४२ लाख रु. शिल्लक राहील असा कच्चा अंदाज करण्यांत आला आहे. त्या उत्पन्नाचा अंदाज करतांना जकातीचें उत्पन्न ५१ कोटी २४ लक्ष धरण्यांत आलें आहे. साखरेचे कारखाने वाढल्यामुळे परदेशी साखर कमी येईल. तसेंच परदेशी कापडाची आयातहि थोडी फार घटेल. कारण पुढील सालीं जपानी आयात कमी होईल. व त्यामुळे जकातीचें उत्पन्न १ कोटीनें घटेल, पण चांदीवरील कराचें उत्पन्न २५ लाखांनी वाढेल. प्राप्तीवरील कराचें उत्पन्नांत १८ कोटी २३ लक्ष येईल. म्हणजे चालू सालापेक्षां उत्पन्नांत ५३ लक्षांनी वाढ होईल. ही वाढ पगारांतील काट कमी करून सर्व सरकारी नोकरांच्या पगारावर सारखा कर बसविला म्हणून झाली आहे. प्राप्तीवरील करांत २५ टक्के वाढ केल्यामुळे उत्पन्नांत ३½ कोटींनी भर पडली व दोन हजारांपेक्षा कमी उत्पन्नावरील कराची रक्कम ७० लाख झाली.

( ४ ) मिठावरील कराचें निव्वळ उत्पन्न ७

कोटी ५८ लाख आहे हे १९३२–३३ सालाचे उत्पन्नापेक्षा अदमासें १½ कोटींनी कमी आहे. याचें कारण १९३१ सालापर्यंत कराची जमा ६ महिन्यांनी होत असे. ती पद्धति बंद झाली व त्यामुळे १९३२ सालीं मागील सालाचें उत्पन्न १½ कोटी जमा झालें होतें.

( ५ ) अफूचें उत्पन्न १ कोटी२० लाख आले. आंतरराष्ट्रीयकराराप्रमाणे अफूवरील निर्गतीवर नियंत्रण घालण्यांत आलें व त्यामुळे गेलीं पांच वर्षे हें उत्पन्न घटत आहे

(६) व्याजावरील खर्च १९३१–३२ सालापेक्षां २ कोटी ४ लाखांनी कमी झाला आहे व १९३२-३३ सालापेक्षा ५१ लाखांनी कमी आहे.

( ७ ) मुलकी खात्यावरील खर्च २० कोटी २३ लक्ष आहे. म्हणजे खर्चांत १९३२–३३ सालापेक्षा ३६ लाखांनी बचत झाली.

( ८ ) पुढील सालीं लकरी खात्यावर ४६ कोटी २० लक्ष खर्च होईल म्हणजे तो खर्च चालू सालापेक्षां ५४ लाखांनी कमी आहे.

(९) ५ टक्के पगारांतील कपात कमी केल्यामुळे पगारखातीं खर्च १०८ लाखांनी वाढला. पण प्राप्तीवरील वाढत्या कराची सूट बंद केल्यामुळे सरकारी नोकरांचे पगारांतून ५३ लाख रुपये प्राप्तीवरील कराचे रूपाने तिजोरींत जमा होतील. व निव्वळ वाढ ५५ लाख रुपयेच होईल.

(१०) चालू सालाचे आरंभीं सरकारी कर्ज रोख्यांवरील व्याजाचा दर ५¾ टक्के होता.तो वर्षअखेर ४। टक्के झाला.

(११)पोस्टल कॅश सर्टीफिकिटांमुळे १९३२-३३ सालीं जमा झालेली रक्कम १० कोटी आहे. १९३१ सालीं ही जमा ६ कोटी १५ लक्ष रुपये झाली होती. त्यावरील व्याजाचा दर ६ टक्क्यावरून ४॥ टक्क्यांवर आणण्यांत आला.

(१२) पोस्टल सेव्हिंग बँकेचे खातीं १९३२-३३ सालापेक्षा ४ कोटी ३५ लक्ष रु. अधिक जमा झाले.

(१३) सप्टेंबर १९३१ मध्ये चालू कर्ज ( Floating Debt ) ८४ कोटी होतें तें हल्ली ३५ कोटी आहे.

(१४) पुढील सालीं नवें कर्ज हिंदुस्थानांत अदमासें ४ कोटि काढावें लागेल. व विलायतेत ६० लाख पौंड म्हणजे अदमासें ८ कोटि रुपयांचें काढावें लागेल.

( १५ ) सप्टेंबर १९३१ पासून आजतागायत ११४ कोटींचें सोनें हिंदुस्थानांतून बाहेर गेलें. फडणविसांचा युक्तिवाद असा कीं, या निर्गतीमुळे हिंदुस्थानाच्या आयातनिर्गत मालांतील फरक कमी असताहि व एकंदर हिशेबांत हिंदुस्थानाला परदेशी देणें जास्त असतांना, वार्षिक देण्याची फेड करतां येईल.

( १६ ) १९३२ सालीं सुमारें ९½ कोटी रुपयांचीं यंत्रें हिंदुस्थानांत आलीं. यापैकीं नवीन साखरेच्या कारखान्याकरिता १२९ लक्ष रुपयांचीं यंत्रें १९३१ सालापेक्षां अधिक आलीं. व कापडगिरण्यांकरिता २०८लाखांचीं नवीं यंत्रें मागविण्यांत आलीं. ही आयात २८ लाखांनी वाढली.

( १७ ) १९२९–३० सालीं परदेशाहून १४ कोटींची साखर हिंदुस्थानांत आली; पण गतवर्षी फक्त ३½ कोटींची साखर आली.

( १८ ) १९३२ सालाचे पहिले १० महिन्यांत निर्गत व्यापार ११० कोटी व आयात व्यापार ११२½ कोटींचा झाला.

( १९ ) निरनिराळ्या खात्यांच्या चार काटकसर कमिट्यांनी ४ कोटी ९९ लक्षांची बचत सुचविली होती; त्यापैकीं ४ कोटी ७८ लक्षांची बचत झाली. म्हणजे काटकसरीच्या शिफारसी ९६ टक्के अमलांत आल्या असें फडणविसांनी सांगितलें आहे.

**प्रांतिक सरकारांना मदत**

( २० ) प्राप्तीवरील करांत जी वाढ झाली त्याची सवलत सरकारी नोकरांना १० टक्के कपातीचीं आकारणी करतांना देण्यांत येत असे. पण आतां ती सवलत काढून घेतली. प्रांतिक सरकारी नोकरांचे पगार वाढले म्हणून प्राप्तीवरील कराच्या रूपाने जादा ३६ लाख रुपये हिंदुस्थान सरकाराच्या तिजोरींत पडूं लागले. कराची आकारणी करताना प्रांतिक सरकारी नोकरांचें नुकसान होतें तेंहि सरकाराने लक्षांत घ्यावें ही पद्धति आम्हांला मान्य नाही. पण सध्याची आर्थिक हलाखीची परिस्थिति लक्षांत घेऊन केवळ पगार–वाढीमुळे वार्षिक अंदाजपत्रकांत तूट आली असें प्रांतिक सरकारांकडून सिद्ध केलें गेलें तर १९३३-३४ सालीं या जादा करआकारणीचें उत्पन्न जितकें त्या प्रांतांतून जमा झालें असेल ततकी रक्कम प्रांतिक सरकारांना देणगीदाखल द्यावी असा ठराव असेंब्लीपुढे मांडला जाईल व संमति घेतली जाईल. या उदारपणाचा फायदा बंगाल, मुंबई व मध्यप्रांत या प्रांतांना घेतां येईल.

( २१ ) पुढील सालीं रेल्वेकरितां ३ कोटी ३० लक्ष व प्रांतिक सरकारांकरिता ४ कोटी २४ लक्ष कर्ज द्यावें लागेल.

( २२ ) बाजारांत पैशाची स्वस्ताई इतकी झाली कीं, सप्टेंबर १९३१ पूर्वी बंकेचा दर ८ टक्के होता तो आतां उतरत उतरत ३½ टक्क्यावर आला आहे.

**नवीन करांत फेरफार**

( २३ ) परदेशांतून बुटाला लागणारे कॅनव्हस व रबर येथे आणून बूट येथेच तयार करतात व तयार मालावरील जादा कर आकारणी टाळण्यांत येते. म्हणून बुटाच्या वरच्या भागावर २½ आणे स्पेसिफिक ड्यूटी बसविण्यांत येईल.

( २४ ) कृत्रिम रेशमी कापडावर कमींत कमी ४ आणे व कृत्रिम रेशमाचें मिश्रण असलेल्या कापडावर २ आणे ३ पै कर आकारणी होईल. हल्लीं सुमारें ३५ टक्के जकात सरसकट बसविण्यांत येते ती काढून टाकण्यांत येईल.

# स्फुट सूचना

१ मुंबई सरकारचे फडणवीस सर गुलाम हुसेन हिदायतुल्ला यांनी शनिवार ता.२५रोजीं मुंबई कायदेमंडळांत तंबाखूवरील कराचें बिल मांडलें.१९२५ सालींच मुंबई शहरांतील तंबाखूच्या विक्रीवर सरकारानें कर बसविला आहे.आता या नव्या बिलानें मुंबई शहराव्यतिरिक्त इलाख्यांतील इतर भागांतील तंबाखूवर कर बसविण्यांत येणार आहे. तंबाखू ही शेतकऱ्याला हरहमेश लागणाऱ्या आवश्यक वस्तूंत मोडते. तिला व्यसन किंवा चैन मुळीच म्हणतां येत नाही.या दृष्टीने तंबाखूवर कर बसाविणें म्हणजे अप्रत्यक्ष रीत्या निराळ्या नांवाखाली शेतकऱ्यांच्या खिशांतून पैसा काढून घेणेंच होय.या बिलाची रचनाहि अत्यंत सदोष आहे. म्हणजे त्यांत घाऊक आणि किरकोळ या शब्दांची व्याख्या देण्यांत आलेली नाही. बिलांत इतकेंच मोघम म्हणण्यांत आलें आहे कीं परवान्यावांचून तंबाखूची घाऊक किंवा फुटकळ विक्री करतां येणार नाही. ‘घाऊक’ आणि ‘किरकोळ’ या शब्दांच्या संदिग्धतेमुळें अबकारी खात्याचा शेतकऱ्यांवर व दुकानदारांवर जुलूम होण्याची धास्ती वाटते. शेतकऱ्याला घाऊक रीतीनें तंबाखू विकण्याची परवानगी असली तरी त्याला तिचा फायदा करून घेतां येईलच असें नाही. दुकानदारालाहि परवान्याची फी द्यावी लागणार असल्याने त्यालाहि तंबाखूचा व्यापार फायद्यांत पडणार नाही. म्हणजे शेतकरी आणि दुकानदार या दोघांनाहि या करापासून उपसर्ग पोंहोचणार आहे. अशी स्थिति असतांहि बिनबुडाच्या सभासदांच्या हुकमी बहुमतावर हें बिल मंजूर झालें!

---

२ सौ. यशोदाबाई भट या धुळ्याच्या तुरुंगांत सांप्रत शिक्षा भोगीत आहेत. त्यांस गेल्या पावसाळ्यांत सदर तुरुंगांत कसे हाल काढावे लागले हें आमच्या वाचकांना माहीतच आहे. त्यांचे हाल अद्यापि संपले नसून ते वाढतच असल्याचें खात्रीलायक बातमीवरून समजतें. यशोदाबाई वृद्ध व अशक्त आहेत एवढी एकच मुद्याची गोष्ट सांगितली असता तुरुंगांतील आयुष्यक्रम त्यांना किती कष्टप्रद होत असेल याची कोणासहि कल्पना होईल. तुरुंगांत पडण्यापूर्वीच त्यांच्या जिवावरचीं दुखणीं गेलीं आहेत. त्या शिक्षा होण्याच्या आधी क्षयाच्या आजारांतून नुकत्याच बऱ्या झाल्या होत्या. त्याखेरीज प्लेग होऊन त्यांतून त्या बाहेर पडल्या होत्या. ब्लडप्रेशरचा आजार तर त्यांना अलीकडे आहेच. तुरुंगांत गेल्यापासून भरींत भर असा हिवताप वारंवार लागल्यामुळे त्यांचें वजन ३० पौंडांनी उतरलें आहे. त्यांच्या हातापायांस मुंग्या येतात व ताकद इतकी कमी झाली आहे कीं त्यांस उठून दहा पावलेंहि जाववत नाही. प्रकृतीची ही स्थिति कायम राहिल्यास त्यांच्या जिवास अपाय होईल अशी त्यांच्या जवळच्या आप्तेष्टांस साहजिकच धास्ती वाटत आहे. त्यांना महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्ष व सर्वाधिकारी या नात्याने गेल्याच्या मागील जानेवारी महिन्यांत १८ महिन्यांची साधी शिक्षा झाली. ती शिक्षेची मुदत संपून त्यांची सुटका होण्यास आणखी चार पांच महिन्यांचा सहज अवधि असल्याने तोंपर्यंत त्यांस तसेंच तुरुंगांत ठेवणें अत्यंत धोक्याचें होय यांत शंका नाही. शिक्षा भोगण्याच्या दृष्टीने पाहिलें तरी त्यांनीं एक वर्षापेक्षा अधिक दिवस ती भोगली आहे. तेव्हा आणखी चारपांच महिन्यांनी सरकारास त्यांस सोडावेंच लागणार; त्यापेक्षां आताच त्यांची सुटका झाल्यास सरकारानें फाजील सवलत दाखविली असें न होतां आपल्यावरचें अपेश चुकविल्याचें श्रेय त्यांस लाभेल व एका वृद्ध पण करारी स्त्रीचा प्राण वांचेल. यांत स्त्रीदाक्षिण्य आहे इतकेंच नव्हे तर अशा आसन्नमरण स्थितींतील कैद्यास सरकारानें मुक्त केल्याचीं उदाहरणेंहि अनेक आहेत. दे. भ. सुभाषचंद्र बोस यांचें उदाहरण तर अगदीं ताजें आहे. तिकडेहि लक्ष देऊन सरकारानें सौ. यशोदाबाई यांस ताबडतोब सोडून द्यावें असें आम्हांस वाटतें.

# श्री जिवाजी वेधशाळा, उज्जयिनी भारतीयांचें वर्षमान व इतर वेध

आपल्या भरतखंडांत भारतीयांची अनेक प्रकारचीं वर्षमानें चालू आहेत. तथापि सर्व धार्मिक, ज्योतिष व फलित ग्रंथांस जें संमत आहे तें नाक्षत्र सौर वर्ष होय, याविषयीं मतभेद नाहीं. निरयन स्पष्ट रवि पुन्हा तितकाच आला म्हणजे एक वर्ष पूर्ण झालें असें आपण समजतों. याविषयीं ग्रंथांतील "जन्मार्कतुल्यो रविः" असें वचन प्रसिद्ध आहे. पाश्चात्यांनी अनेक वेधांनी जें नाक्षत्रवर्ष सिद्ध केलें आहे, त्यापेक्षां आपल्या ग्रंथांतील वर्षमान सुमारें ८॥ पळांनीं अधिक आहे. या व अन्य कारणांनीं आतापर्यंत सुमारें ४ दिवसांचें अंतर पडलें आहे, तें सत्याची चाड असणाऱ्या ज्योतिष्यांनीं काढून टाकिलें पाहिजे ही गोष्ट विचारवंतांस कबूल असली तरी आपल्या वेध घेण्याचे पद्धतीनें आपल्या येथेंच ती प्रत्यक्ष झाली पाहिजे. म्हणजे केवळ परप्रत्ययनेय होण्याची पाळी येणार नाही असें त्यांचें म्हणणें आहे. परंतु "संतः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते" यांतील "परीक्ष्य" पदावर लक्ष दिलें म्हणजे इतकाहि हट्ट धरण्याचें कारण नाहीं. तथापि आपल्या बुद्धीला पटेल असें विवरण आपल्याच वेधांनीं मिळाल्यास अधिक इष्ट आहे हें कोण नाकबूल करील ? अशा अर्थाची मागणी शके १८४७ मधील पुणें येथें श्रीमंत पंत प्रतिनिधि यांचे अध्यक्षतेखाली भरलेल्या ज्योतिषसभेंत आपल्या ज्योतिष्यांनीं केली होती तिची पूर्तता करण्याची संधि हल्लीं उज्जयिनीच्या वेधशाळेस प्राप्त झाली आहे ही आनंदाची गोष्ट होय.

वास्तविक पाहतां वर्षमान सिद्ध करणें म्हणजे सहज गोष्ट आहे असें नाहीं. सूर्याची स्थिति कोणत्या तरी एका विवक्षित नक्षत्रासंबंधीं बऱ्याच वर्षांच्या अंतरानें निश्चित करून तितका काळ मधील वर्षांवर वांटून देऊन पाश्चात्य ज्योतिष्यांनी नाक्षत्र वर्षमान दिनादि ३६५, १५, २२, ५८ इतकें सिद्ध केलें आहे (केतकरकृत ग्रह गणित पृ. ९८ पाहा) थेट तसेंच करण्याची आता आपल्यास आवश्यकता नाहीं. कारण आपल्यास या संबंधांत नवीन शोध लावण्याचा नसून लावलेला शोध पडताळून पाहावयाचा आहे. याकरितां आम्हीहि येथील वेधशाळेंत वरील प्रकारचा अनुभव घेऊन पाहात आहों. मघा, रेवती, शततारका, चित्रा, पुष्य या ताऱ्यांचें याम्योत्तर लंघनकाल ४-५ वर्षें टिपून ठेवून त्यांवरून वर्षमान पडताळून पाहावें असा आमचा बेत आहे. कोणी ज्योतिषी या ताऱ्यांना निजगति आहे या सबबीवर आपलें उत्तर सूक्ष्म येणार नाहीं असा आक्षेप घेतील तर त्याकरितां कॅपा ओरिऑनिस, अल्फा व बीटा अक्वेरी व बीटा पिशियम् या निजगति बहुतेक शून्य असलेल्या ताऱ्यांच्या याम्योत्तरलंघन काळाचाहि उपयोग करून घेण्याचा आमचा हेतु आहे. या संबंधांत किंवा वेधशाळेतील वेध घेण्याच्या इतर पद्धतींत जर कोणी सद्बुद्धीनें काम प्रत्यक्ष पाहून सूचना केल्या तर त्याविषयीं जरूर विचार करूं.

ॲप्रेंटिस् व ऑब्झरवर यांचा कोर्स ठरविला गेला आहे तो खात्याकडून लवकरच प्रसिद्ध होईल.

रेवती ही मुख्यतः पशूंची देवता असल्याकारणानें रैवतपक्षाचें पंचांग हेंच गोरक्षण पंचांग होय या विषयीं केसरींत पूर्वीच उल्लेख केला आहे. ही गोष्ट या प्रांतीं कांहीं लोकांना पटूं लागली आहे असें दिसतें.

शनीचा पश्चिमास्त शुद्ध पंचांगाप्रमाणें अनुभवास आला. कालांश ठरविण्याचें काम चालू आहे.

निरनिराळ्या संस्थांतून ग्रहलाघवाची परीक्षा घेतात तेव्हा चंद्रोदयासंबंधीं प्रश्न विचारीत नाहींत असें वाटतें. कारण 'तिथिगुणित रजनीपरिमाणं' इत्यादि अटकळ पंचविशीच्या रीतीनेंच गणित करणारे बहुतेक ज्योतिषी दिसतात. पण त्यामुळें ग्रहलाघवाच्या नांवाला आपण बट्टा लावतों याचें त्यांना भान नसतें. कारण खास ग्रहलाघवाच्या रीतीनें चंद्रोदयकाळांत ५-७ मिनिटांपेक्षा अधिक अंतर पडत नाहीं, इकडे आपल्या ज्योतिष्यांनी लक्ष्य द्यावें अशी विनंति आहे. सर्वानंदावरून अस्तोदयाचे काढलेलें काळ बरोबर जुळतात. ता. १३ फेब्रुवारी १९३४ च्या सूर्यग्रहणाचा भमंडळ नकाशा सर्वानन्दाप्रमाणें तयार करून गेल्या एप्रिलमध्यें काशीविश्वविद्यालयांतील ज्योतिषाच्या मुख्याध्यापकाकडे त्यांच्या मागणीवरून पाठविला होता तो बरोबर मिळाला. शुद्ध पंचांगांची सारणी तयार करून पुणें येथे छापण्यास पाठविली आहे. अशा प्रकारची सारणी तयार झाली पाहिजे असें केसरीच्या जादा अंकांत प्रसिद्ध झालें आहे.

लष्कर—ग्वाल्हेरचे डॉ. आपटे यांचे ज्येष्ठ चिरंजीव डॉ. विष्णु यशवंत आपटे हे विलायतेस डॉक्टरीचा पुढील अभ्यास करण्यास गेले आहेत. त्यांनीं ता १५।७।३२ च्या केसरींतील विनंतीस मान देऊन ग्रीनिच वेधशाळेसंबंधीं जी थोडीबहुत माहिती मिळवून दिली तिजबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

गोविंद सदाशिव आपटे
सुपरिंटेंडंट, श्रीजिवाजी वेधशाळा, उज्जैन,

# मराठी संपादकांचें पुण्यांतील संमेलन



श्री. गोपाळराव ओगले (अध्यक्ष)



श्री. द. वा. पोतदार (स्वागताध्यक्ष)

शनिवार ता. ४ रोजीं सायंकाळीं ५ वाजता पुणे भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सभागृहांत नागपूर येथील 'महाराष्ट्र' पत्राचे संपादक **श्री. गोपाळ अनंत ओगले** यांच्या अध्यक्षतेखालीं संमेलनास सुरुवात झाली. या संमेलनास महाराष्ट्रांतील वर्तमानपत्रे, नियतकालिकेवगैरेंचे संपादक, उपसंपादक व प्रतिनिधी या नात्याने सुमारं १५०–२०० गृहस्थ उपस्थित होते. प्रारंभीं प्रो. विनायकबुवा पटवर्धन यांनी 'आनंद नाद गंध 'रसिकांना करिती धुंद' हे पद म्हटलें. नंतर संमेलनाचे स्वागताध्यक्ष प्रो. **द.** वा. पोतदार यानी आपलें पुढील आशयाचें भाषण वाचून दाखविलें.

### प्रो. पोतदार यांचें भाषण

"संमेलनाचे फायदे स्वयंसिद्ध आहेत आणि तेच या संपादकांच्या संमेलनालाहि लाभणे क्रमप्राप्त आहे. परस्पर परिचय व स्नेहसंवर्धन हे सहवासजन्य फायदे तर कांहीं सांगावयास नकोनच. सहविचारापासून प्राप्त होणारे फायदे त्याहूनहि अधिक महत्त्वाचे. यास्तव सहविचाराचे कांहीं काही विषय निवडून काढून, तिकडे आपण लक्ष पुरवाल अशी मला उमेद आहे. उदाहरणार्थ आपण मराठी-साहित्याचा विषय घेऊं. प्रस्तुत विषय हा महाराष्ट्राच्या अत्यंत जिव्हाळ्याचा आहे, हे कांहीं सांगावयास नको. आपापल्यापरी आपण सर्व संपादक या मराठी साहित्याचे उपासक आहां. आपल्या धोरणाप्रमाणे व सामर्थ्याप्रमाणे आपण त्याच्या उन्नतीसाठी झटत आहां. तथापि एकंदर मराठी साहित्याच्या विपन्न स्थितीचा विचार केला असतां आपणांस असे वाटत नाही काय कीं, आपण सर्वांनी सहविचार केला असतां आज होत आहे यापेक्षा अधिक संघटित स्वरूप आणल्या उपासनेला प्राप्त करून देतां येईल?

### इंग्रजी भाषेचें दडपण

आपल्या समाजांत पुष्कळांनी अशी खोड आहे कीं, अनेक स्थळीं इंग्रजी अथवा दुसरे परकीय शब्द ते तसेच दडपून वापरतात. कोणता शब्द कोठें वापरावा यासंबधाने आपल्या अधिकारास जरी भलतीच मर्यादा घालता येणार नाहीं, तरी आपल्या पत्रांत संपादकीय व बिनसंपादकीय यच्चयावत् मजकुरांत शक्य तो परकीय

भाषेंतील शब्द रूढ न करतां योग्य ते मराठी प्रतिशब्द शोधून व योजून अपल्या भाषेचा कोश वृद्धिंगत करण्यास मदत करणें आपणांस साधणार नाही काय? आणि असा उपक्रम करण्यासाठीं आतासारख्या संमेलनाचीच आवश्यकता नाही काय? समाजांत सत्य व ज्ञान याचा सर्वत्र फैलाव करणें आणि समाजाचें जीवित सुरक्षित करणें हें आपणा सर्वांचें कर्तव्य आहे! उच्च ध्येयाचे समाजसेवक हीच आपणा सर्वांची भूमिका आहे असें मानल्यास, तिला शोभेशी आपली आचाराची व विचाराची सरणी आपण राखली पाहिजे, हें मी सांगावयास पाहिजे असें नाही. सत्याचें जागृत स्वरूप अकलंकित राखण्याविषयी, मग किती काळजी आपण बाळगली पाहिजे, हेंहि निराळें सांगण्याचें प्रयोजन नाही. सत्य हाच आपला मुख्य धर्म होऊन बसला पाहिजे. पक्षपात अन्याय व असत्य याची आपणांस चीड आली पाहिजे. सत्याबरोबरच ज्ञानाचा प्रसार आपण तितक्याच कसोशीने करावयास पाहिजे. त्यांत अगदीं कसूर होता कामा नये; एवढेंच केवळ नाहीं तर समाजाला थोडेफार रिझविण्यासाठीं व दुःखी मनाला प्रफुल्ल करण्यासाठीं आपणांस श्रम केले पाहिजेत. या तिन्ही बाबतींत आपण फार मागासलेले आहों.

### द्रव्यबल व मनुष्यबल

वर सांगितलेली आपली जबाबदारी योग्य तऱ्हेने पार पाडण्यासाठीं आपणांस द्रव्यबल, मनुष्यबल अशा प्रकारच्या बळाची आवश्यकता आहे. सबब तेंहि आपणांस कसें मिळेल याचा विचार आपण या संमेलनांत केला पाहिजे. आपल्या कार्यांत कायद्याच्या कृत्रिम अडचणी जर असतील तर त्यांच्या दुरीकरणाचाहि विचार करणें आपलें काम आहे. वृत्तसंग्रह करण्यासाठीं अवश्य लागणारी सामुग्री सुलभतेनें आपणास कशी मिळेल याचाहि विचार आपण केला पाहिजे. तसेंच मतभेदामुळे आणि पक्षभेदामुळे आपण मतभेदाचें क्षेत्र टाळून एक होणें हें आपलें कर्तव्य आहे.

मुद्रणकला आणि वृत्तपत्र वगैरेंचीं उदय विशेषेंकरून पाश्चिमात्य देशांत झाला आणि गेल्या सुमारें ३०० वर्षांत पाश्चिमात्य देशांत या संस्थांना एवढें अवाढव्य स्वरूप आलें आहे कीं, त्याची आपणांस येथे कल्पनाहि होत नाही. अमेरिकेंत कित्येक वर्तमानपत्रें आपले साप्ताहिक अंक १५४ पानांचे भले लठ्ठ असे प्रसिद्ध करतात. (Mansfield) पत्राच्या प्रती लक्षावधी काढतात. त्या देशांत सुमारें २-२॥ लाख लोक धंद्यांवर पोसले जात आहेत.

### प्रगतीचा आढावा

आपल्याकडे हा व्यवसाय सुरू होऊन नुकतीच कोठें शंभर वर्षे झाली आहेत. देशांत शिक्षणाचा प्रसार अतिशय अल्प प्रमाणांत झालेला आहे त्यामुळे वाचकांचा संख्या पण अल्प आहे. पुरुषापेक्षा स्त्रियांमध्ये शिक्षणाचा प्रसार फारच कमी असल्यामुळे, आपल्या मागासलेपणांत फारच भर पडली आहे. देशांत दारिद्र्यानें आपलें ठाणें सतत दिलें आहे. अशाहि स्थितींत गेल्या शंभर वर्षांत आपण पुष्कळच स्पृहणीय प्रगति केली आहे, यांत शंका नाही. अनेक वृत्तपत्रें अथवा मतपत्रें जन्मास येऊन अल्पकाळांतच नाहीशी झालीं. तथापि सतत पुष्कळ वर्षें चालत राहिलेलीं वृत्तपत्रें व नियतकालिकें आपणांकडे अगदींच नाहीत असें नाही. ज्ञानप्रकाश, ज्ञानोदय, विविधज्ञानविस्तार, केसरी वगैरेंचीं नांवें यासबंधांत कोणासहि सुचतील. गेल्या २५-३० वर्षांमध्ये दैनिक पत्रांचा फैलावाह आपणाकडे पुष्कळ झाला आहे. विविध व्यवसायाला वाहिलेलीं पत्रें व मासिकें निघत आहेत; अनेक सुधारणा होत आहेत. हे सर्व प्रकार अभिनंदनीय आहेत; तथापि दुःखानें हेंहि नमूद केलें पाहिजे की, संपादकीय जबाबदारीची योग्य जाणीव असलेली आपल्या इकडे आढळून येत नाही. खपतें तें लिहावें ही अधर्म नीति म्हटली पाहिजे. सांप्रत सामान्य लोकांत एक प्रकारचा चिवटपणा व चौकसबुद्धि वाढत आहे. वृत्तपत्रांची लज्जत लोकांस लागत आहे. अशा वेळीं बातमी जमा करणें, ती मांडणें व समजावून सांगणें ही जातिवंत कला ज्यांच्या अंगांत आहे, सत्याचे जे एकनिष्ठ उपासक आहेत, सभ्यतेचे जे संरक्षक आहेत, समाजोन्नतीच्या मार्गाचे द्रष्टे आहेत, न्यायाचे पालनकर्ते व दुष्टांचे दंडनकर्ते आहेत अशा प्रकारचे बुद्धिमान व परिश्रमी पुरुष या धंद्यांत जितके शिरतील तेवढे आपणांस पाहिजे आहेत. एक वृत्तमानपत्र व एक वृतपत्रकार संघ तावडतोब स्थापन करा आणि जेवढें काम पुढल्या वर्षाच्या आंत आपल्या हांतून उरकेल असा आपला अंदाज होईल, त्याबाबतच आपण अवश्य ते ठराव करा.

### मतभेद-पक्षभेद विसरा

आपणांमध्यें राजकीय, सामाजिक, धार्मिक असे अनेक प्रकारचे मतभेद आहेत. इतकेंच नव्हे तर एका पक्षाच्या निरनिराळ्या पत्रांत सुद्धां विविध प्रकारची चुरस आहे. या संमेलनाचा संबंध आपल्या मतांशीं व पक्षांशीं विशेषसा नसून, यच्चयावत वृत्तपत्रकारांशीं आहे. जवळ जवळ येऊन पक्षभेद विसरून जमेल तेथे व जमेल तोंवर एक होण्यांतच आपला फायदा

आहे, यास्तव आपण उदारपणाने आपले नेहमीचे मतभेद व पक्षभेद बाजूस ठेवून या संमेलनांत पूर्ण एकोप्याने व प्रेमाने नांदाल व आपल्या उन्नतींचा निश्चय कराल यांत मला संदेह नाही; करिता आपणांस अशी विनंति करून आपले नियोजित अध्यक्ष, माझे मित्र व 'महाराष्ट्र' या सुविख्यात पत्राचे संपादक श्री. गोपाळरावजी ओगले यांची योजना अध्यक्षपदावर करण्याचे तजवीजीस लागाल अशी मला उमेद आहे."

वरील आशयाचें प्रो. पोतदार यांचें भाषण झाल्यावर **श्री. न. चिं. केळकर** यांनी अध्यक्षांची सूचना मांडली. अध्यक्ष श्री. ओगले यांची ओळख करून देताना ते म्हणले, "श्री. ओगले हे पूर्वी पुण्यास महाराष्ट्र विद्यालय या खासगी शाळेत शिक्षकाचा धंदा करीत असत. त्या वेळीं त्यांचा येथील वर्तमानपत्रांच्या संपादकांशीं पुष्कळ ऋणानुबंध असे. पुढे ते नागपुरास गेले व तेथेच त्यांनी आपल्या संपादकत्वाखालीं 'महाराष्ट्र' नांवाचें वृत्तपत्र सुरू केलें. खरें पाहू गेलें असतां त्यांनी आपल्या अंगावर घेतलेली ही जबाबदारी जोखमीची होती. पण ती ते आपल्या गुणांनी योग्य तऱ्हेने कशी पार पाडीत आहेत हे आपण पाहातच आहां. 'महाराष्ट्र' हा 'केसरीचा' धाकटा भाऊ असेंच मी नेहमीं मानतों. तेव्हा आजच्या प्रसंगीं अध्यक्षपद स्वीकारण्यास ते सर्वस्वीं योग्य आहेत. सदर सूचनेस साताऱ्याच्या 'ऐक्य' पत्राचे संपादक **श्री. वा. रा. देशपांडे, शं. वा. किर्लोस्कर, वामनराव पटवर्धन, का. म. ताम्हणकर** व स. ब. पाटील यांनी योग्य शब्दांत अनुमोदन व दुजोरा दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले व त्यांनी आपलें खालील आशयाचें भाषण वाचून दाखविलें.

### अध्यक्षांचें भाषण

"मराठी संपादकांच्या प्रथम सम्मेलनाचें अध्यक्षपद मला देऊन आपण माझा जो गौरव केला, त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे. परंतु आपली निवड मात्र असावी, तशी समर्पक नाही. विद्वत्तेने, अनुभवाने व कर्तबगारीने माझ्यापेक्षा अधिक लायक असे संपादक मुंबई–पुण्याकडील महाराष्ट्रांत अनेक आहेत. त्यांना सोडून आपण नागपुराहून अध्यक्ष आणण्याचें कां ठरविलें, हें कोडें मला उकलत नाही. न्युकॅसलच्या कारखानदारांनी बाहेरून कोळसा बोलवावा किंवा नागपुरच्या फळविक्यांनी पुण्याहून संत्री मागवावीं, तसाच हा प्रकार विचित्र दिसतो.

### मतभेद प्रामाणिक असावा

संमेलनाच्या स्वागतमंडळाचे चिटणीस श्री. अधिकारी यांनी काढिलेल्या पत्रकांत या संमेलनाचे जे उद्देश संक्षिप्तपणें नमूद केले आहेत, त्यांत संपादकांनी व वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडलेल्या इतर लेखकांनी परस्परांचा परिचय करून घेणें, असा एक उद्देश दिला आहे. संपादक–उपसंपादक वगैरे मंडळींना परस्परांचा परिचय व माहिती असावी, हें इष्टच आहे. बऱ्याच संपादक–उपसंपादकांना तशी माहिती असतेहि परंतु, इतर धंद्यांतील लोकांप्रमाणेंच याहि धंद्यांतील लोकांत पुष्कळ वेळां परस्परासंबंधी गैरसमज झालेले आढळतात. हे गैरसमज परस्परांच्या प्रत्यक्ष परिचयाने दूर होण्याचा बराच संभव आहे. संपादकांच्या धंद्यांत पडलेले बहुतेक लोक त्या धंद्याची हौस म्हणून त्यांत पडलेले असतात. हा धंदा किफायतशीर आहे. म्हणून किंवा या धंद्यांत भरपूर पैसा मिळवितां येईल, अशा आशेने संपादक झालेले लोक क्वचितच सांपडतील. उदरनिर्वाहार्थ दुसरें साधन मिळत नाही, म्हणून वर्तमानपत्राच्या धंद्याची हौस नसताहि कांही लोक या धंद्यांत ओढले गेले असतील तरी पण लेखनव्यवसायाची हौस नसलेले किंवा संपादकाच्या धंद्यांत आपण नांव कमावूं अशी धमक नसलले लोक, सहसा वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडत नाहीत. अशा लोकांत वैयक्तिक मतभेद किंवा पक्षभेद अथवा 'व्यक्ति तितक्या प्रकृति' या न्यायाने आढळून येणारें रुचिवैचित्र्य, इत्यादि कारणांनी गैरसमज उत्पन्न झालेले असतात. सार्वजनिक प्रश्नांवर झालेल्या मतभेदांचें पर्यवसान कधी कधी खासगी व्यक्तिद्वेषांत होत असतें. वस्तुतः असें होण्याचें कारण नाही. स्वार्थासाठी जाणून बुजून जो समाज विघातक गोष्टी प्रतिपादील तर तो लेखक अधम कोटींतला समजला पाहिजे. परंतु तसें स्वतंत्रपणें सिद्ध होईपर्यंत, मतभेद हे प्रामाणिकच आहेत, असें धरून चालणेंच अवश्य आहे.

### परस्पर परिचयाची आवश्यकता

आपल्या मराठी संपादकांतहि पक्षभेद आहेतच. कांग्रेस पक्षीय, प्रतिसहकारयोगी, राष्ट्रीय, नेमस्त, जहाल, जुन्या मताचे, सुधारणावादी, क्रांतिवादी, सनातनी, ब्राह्मण, ब्राह्मणेतर, मुसलमान ख्रिस्ती असे अनेक पक्षभेद आहेत. श्री. देवदत्त राव टिळक यांचें ख्रिस्ती समाजाचें मुखपत्र म्हणून चालविलेलें 'ज्ञानोदय' पत्रहि प्रसिद्धच आहे. आनंदाची गोष्ट अशी कीं, हें ख्रिस्ति पत्र विचाराने राष्ट्रीय आहे; व महाराष्ट्रीय समजांची उन्नति प्रतिपादणारें आहे. तसेंच कांही पत्रें गंभीर आहेत, तर कांही विनोदी आहेत. वैमनस्यें पुष्कळ वेळां गैरसमजानें किंवा ऐकीव माहितीवरून उत्पन्न

होत असतात. संपादकाचा व लेखकांचा परस्परपरिचय होऊन एकमेकांशीं खुल्या दिलानें विचारविनिमय झाल्यास तीं दूर होताल अशी आशा आहे.

### संपादक-संघाचें कार्य

संपादक सम्मेलनामार्फत संपादक संघ स्थापन झाला तर, त्याच्या कार्यकारी मण्डळानें सर्व मराठी वृत्तपत्रांची व नियतकालिकांची नोंद ठेवावी व गेल्या सम्मेलनापासून चालू सम्मेलनापर्यंत किती पत्रें व नियतकालिकें बंद पडलीं, व किती नवीं निघालीं, यांची यादी सादर करावी. आणि त्यासंबंधीं आपले विचार प्रदर्शित करावे. तसेंच, वृत्तपत्रें व नियतकालिकें यांत कोणत्या प्रकारच्या वाङ्मयाला स्थान मिळालें पाहिजे व कोणत्या प्रकारचें वाङ्मय प्रसिद्ध होणें अनिष्ट व समाजास अपायकारक आहे, याची चर्चा करून आपले विचार प्रसिद्ध करावे. हल्लींच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळांत अमुक वर्तमानपत्र किंवा नियतकालिक अनिष्ट वाङ्मय प्रसिद्ध करित, असें नामनिर्देशपूर्वक जाहीर करण्यापासून फायदा होणार नाही. परंतु संघाच्या कार्यकारी मंडळांत सर्व मतांचे प्रतिनिधी समाविष्ट केल्यास त्यांच्या संमतीनें इष्ट वाङ्मय कोणतें व अनिष्ट वाङ्मय कोणतें, याबद्दल सामान्य एकवाक्यता करणें जड जाणार नाही.

### मराठी वृत्तपत्रांच्या वाढीची मर्यादा

मराठी वृत्तपत्रें कितीही चांगलीं चालली, त्यांत ताज्या ताज्या बातम्या कितीहि येत असल्या, त्यांत विचारपूर्ण व परिणामकारक लेख येत असले तरी त्यांच्या प्रसारास स्वाभाविक अडचणी फार आहेत. महाराष्ट्र अथवा मराठी भाषा बोलणारा भाग यांचा एक लांबलचक अरुंद पट्टी दूरवर गोव्यापासून नागपूरपर्यंत किंबहुना इंदूर ग्वाल्हेरपर्यंत पसरलेली आहे. महाराष्ट्र देश हा बंगालसारखा सुसंघटित व आटोपशीर प्रांत नाही. मराठी भाषा बोलणारांची संख्या जेमतेम २ कोटी आहे. हिंदी भाषा बोलणारांची संख्या १० कोटी आहे, तर बंगाली भाषा बोलणारांची संख्या जवळ जवळ ८ कोटी आहे. पावणेदोन-दोन कोटी मराठी बोलणारांपैकींहि लिहिण्या-वाचणाऱ्यांची संख्या अत्यंत थोडी व वर्तमानपत्रें वाचू शकणाऱ्यांची किंवा त्याची गोडी असणाऱ्यांची संख्या त्याहून थोडी. बेळगांवात निघणारें पत्र नागपूरास पोंचावयास सहज २-३ दिवस लागतात; तर नागपुरचें पत्र गोव्यास पोंचावयास तसाच कालावधि लागतो. महाराष्ट्राच्या एका टोंकास राहाणाऱ्या लोकांना दुसऱ्या टोंकास निघणाऱ्या पत्रांचा फारसा उपयोग होत नाही. यामुळे त्यांना स्वतःच्या पोट प्रांतांत निघणाऱ्या पत्रांवरच अवलंबून राहावें लागतें. आणि मराठी वृत्तपत्रांच्या वाचकांची वाढ ठरीव मर्यादेपलीकडे जाऊं शकत नाही. जसजसें प्राथमिक शिक्षण जास्त वाढत जाईल, आणि वाहतुकीचीं साधनें डांक अधिकाधिक त्वरित नेऊं लागतील, तसतशी मराठी वृत्तपत्रांची वाढहि अधिकाधिक होण्याचा संभव जास्त.

### श्री. दाते यांचें अभिनंदन

'लोकसंग्रह' छापखान्याचे व्यवस्थापक श्री. शंकरराव यांनी अनेक वर्षे विचार व मेहनत करून बिनडिग्रीचा मराठी अखंड टाईप (मोनो-टाईप मशीनवर) काढण्याची योजना तयार करून खिळे जुळविण्याचें काम जास्त सुलभ केलें आहे. त्यांच्यापूर्वी पुष्कळांनी हे प्रयत्न केले, परंतु त्यांच्या इतकें यश कोणी संपादन केलें नाही. स्वतः मोनो-टाईप मशीन विकत घेऊन त्यावर स्वतः आपलें पत्र 'कंपोज' करून घेण्याचें सामर्थ्य व आर्थिक परिस्थिति सध्या मराठी पत्रांत फारच थोड्या पत्रांची असेल. तरी मराठी पत्रांनी त्यांचा मोनोटाईप वापरल्यास कंपोझिंगचें काम अधिक त्वरेनें होईल. श्री. दाते यांच्या चिकाटीबद्दल व यशस्वी कल्पकतेबद्दल सर्व संपादकांनी त्यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे.

### संपादकाच्या अंगचे गुण

संपादकाचा धंदा हा अत्यंत जबाबदारीचा व जोखमीचा आहे. संपादक वर्ग हा विद्वान, बहुश्रुत, प्रगतिपर, सहृदय व चतुरस्त्र असला पाहिजे. सुदैवानें कांही मराठी वर्तमानपत्रांना असे लायक संपादक लाभले आहेत. परंतु, पुष्कळ वर्तमानपत्रांच्या संपादकांच्या अंगीं वरील सर्व गुणांचा समुच्चय असतो व असें नाही. त्या दृष्टीनें मराठी वर्तमानपत्रें हि कांही अंशीं बाल्यावस्थेंत आहेत. पाश्चात्य देशांत संपादक होऊं इच्छिणारा तरुण बहुधा 'रिपोर्टर' च्या कामापासून सुरुवात करतो; व मग वृत्तपत्राच्या कामाचा व्याप जसजसा त्याला आकलन होत जाईल, तसतसा तो चढत जाऊन, शेवटीं त्यानें आपली लायकी सिद्ध केल्यास तो मुख्य संपादकाच्या खुर्चीवर जाऊन बसतो.

यापुढे मराठी वर्तमानपत्राचा दर्जा वाढवावयाचें आपणा सर्वांची इच्छा असेल, तर संपादक उपसंपादक, प्रतिनिधी, रिपोर्टर ऊर्फ बातमीदार होऊं इच्छिणारासाठी कांही शिक्षणक्रम विश्व-विद्यालयें काढतील, तर फारच उत्तम. नाही तर 'सर्व्हण्टस ऑफ इंडिया सोसायटी'सारख्या संस्थेने

असा वर्ग चालविल्यास तो वर्तमानपत्रांच्या धंद्यास उपकारक होईल. मागे लाला लजपतरायांनीहि ' सर्व्हंटस ऑफ दि पीपल ' सोसायटींत असा वर्ग चालविला होता. तो हल्ली सुरू आहे कीं नाही याची मला माहिती नाही.

आतां वृत्तपत्रकारांच्या अडचणीसंबंधी दोन शब्द बोलून मी माझें भाषण पुरें करितों. वृत्तपत्रकांवर पहिलें मोठें संकट म्हणजे सरकारी कायद्याचें.१२४-अ १५३-अ वगैरे कायद्यांची वर्तमानपत्रांच्या मानेवर नेहमीचीच तरवार आहे. परंतु हल्लीं देशांतील लोकांची स्वराज्यतृष्णा अनिवार तीव्र झाल्यामुळे व ती बहुतांशीं पूर्ण करण्याचा सत्ताधारी वर्गाच्या मनोदय नसल्यामुळे, देशांत राजकीय अस्वस्थता माजली आहे. तिचा फायदा घेऊन कार्यकारी अधिकाऱ्यांना वर्तमानपत्रांची गळेदाबी करण्याचे भरमसाट अधिकार देणारे कायदे प्रथ ताः रते लागू केले, व आता ते येत्या ३ वर्षांकरिता देशाच्या कायदेबुकांत प्रसिद्ध करून घेतले आहेत. या कायद्याची झळ अगोदरच कांही वर्तमानकारांस व छापखानेवाल्यांस लागली आहे. व यापुढे त्या अधिकाराचा प्रयोग कोणावर केव्हा केला जाईल याचा नेम नाही! सारांश यापुढे सरकारी धोरणावर किंवा सरकारी अधिकाऱ्यांच्या कृत्यावर मनमोकळी टीका करणें अत्यंत धोक्याचे झालें आहे वर्तमानपत्रकर्त्यांस कधी कधी प्रचलित लोकमताविरूद्धहि कडक टीका करयाचा प्रसंग येतो व तशी टीका केली, तर आपलें पत्र लोकांस अप्रिय होऊन आपला वाचकवर्ग कमी होईल, हीहि भीति असते. अर्थात् ही भीति सरकारी रोषाच्या भीतिइतकी उग्र नाही परंतु दोन्ही बाजूंस असे लहान मोठे खडक पसरले असतां त्यांतून आपलें मतप्रतिपादनांचें तारूं सुरक्षित हांकारून तें पुढे चालू ठेवणें हें अत्यत बिकट काम होय.

### विवेकाला प्राधान्य द्या

जो संपादक केवळ स्वतःच्या फायद्यासाठी किंवा कोणाचें वैर साधण्यासाठी जाणूनबुजून लोकांची दिशाभूल करील, तो संपादकाच्या श्रेष्ठ धंद्याला दूषणभूत होय. असे संपादक आपल्या मराठी संपादकांत बहुधा कोणी नसतीलच, अपवादभूत कोणी असल्यास न कळे. तोहि अनुभवाने सुधारेल. आपणा संपादकांना बहुधा सर्वज्ञतेचा आव आणून लेख लिहिण्याची सवय असतेच ! तसाच आपण निःपक्षपातीपणाचा व निर्विकारबुद्धीचाहि आव आणीत असतो. परंतु आपण संपादक झालों तरी मनुष्यच आहोंत पूर्ण निर्विकार बुद्धि आपणाला साधणें कठीण ! आपणालाहि काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे विकार ग्रासून बसलेले असतातच. तथापि या विकारांना शक्य तोंवर दाबून विवेकाला प्राधान्य देणे आपणा सर्व संपादकाचें ध्येय असले पाहिजे. खऱ्या संपादकाच्या अंगीं प्रामाणिकपणा, धैर्य, दूरवरची व उदार दृष्टि; हे गुण अवश्य असले पाहिजेत. वैय्यक्तिक टीकेवर जोर न देतां त्याने तत्वचर्चेकडेच जास्त लक्ष पुरविलें पाहिजे.

आपण या ठिकाणीं जमलेले संपादक, उपसंपादक, बातमीदार इत्यादि वर्तमानपत्राच्या धंद्यांत वहिवाटलेले लोक आहांत. आपल्यापुढे कर्तव्याकर्तव्याचा विचार यापेक्षां जास्ती पाल्हाळ करण्याचें कारण नाही; जरूर नाही व आपणांस उपदेश करण्याचा माझा अधिकारहि नाही. फक्त या धंद्यांत आलेल्या तरुण मित्रमंडळीसाठी वर थोडेसें दिग्दर्शन मात्र केलें आहे.

अध्यक्षांचे वरील आशयाचे विचारपरिप्लुत असें भाषण झाल्यावर प्रो. पोतदार यांनी अध्यक्षांना हार घातला. नंतर संमेलनाचे चिटणीस श्री. अधिकारी यांनी ज्यांना सदर संमेलनास हजर राहाता आलें नाही अशा गृहस्थांकडून व संस्थेकडून आलेल्या तारा व सदीच्छापर आलेले संदेश वाचून दाखविले. त्यापैकीं कांही संदेश खालील गृहस्थांकडून व संस्थाकडून आले होते.

श्री. वाळके, चित्राव, तावडे, पांगळ, गद्रे, सारोळकर, संपादक, सोलापूर समाचार, टी. रघुनाथ, ल. ब. फाटक, अध्यात्म विवेचन मंडळ गुजराथ टाइप फौंडरी, मुंबई टाइप फौंडरी वगैरे.

नंतर श्री. न. चिं. केळकर यानी दहाबारा वर्षांपूर्वी त्यांनीं काढलेल्या संपादक शिक्षणाच्या वर्गाची माहिती सांगितली.( ती पुढील अंकी देण्यात येईल.)

शनिवारीं रात्रीं ९ वाजता संमेलनाच्या पुढील कामास सुरुवात झाली.अलीकडे कांही वर्तमानपत्रांचे संपादक मजकुरांत असभ्य व गैरशिस्त मथळे देऊ लागले आहेत; तेव्हा संपादकांनी ही प्रथा मोडली पाहिजे असें थोड्याशा चर्चेनंतर सर्वानुमतें ठरलें. नंतर दुसरे दिवशीं येणाऱ्या ठरावांवर व 'संपादक संघ' स्थापन करण्याबाबत बरीच चर्चा होऊन, रात्रीं १२ वाजता बैठक संपली. दुसरे दिवशीं म्हणजे रविवार ता. ५ रोजीं सकाळीं ८ वाजता संमेलनाच्या पुढील कार्यास सुरुवात होऊन बराचसा वादविवादानंतर खालील सूचनात्मक ठराव पास झाले

### ठराव

(१) पोस्टाच्या वाढत्या दरांच्या योगाने होणाऱ्या व इतर वाढत्या गैरसोयी, सरकारांत अवश्य ती खटपट करून दूर करून घेण्याचा प्रयत्न करावा.

(२) नियतकालिकांच्या चालकांनी पसंत करून प्रसिद्ध केलेल्या लेखांना योग्य तो मोबदला देण्यांत यावा अशी या संमेलनाची शिफारस आहे. (३) आज रोजी 'संपादक संघ' स्थापन करण्यांत येत असून त्याचें एक विधायक मंडळ व एक कार्यकारी मंडळ पुढील प्रमाणे नेमण्यांत येत आहे. नियामक मंडळांत अध्यक्ष व इतर मिळून १५ सभासद असावेत व कार्यकारी मंडळांत ५ सभासद असावेत. कार्यकारी मंडळाने नियम करून ते नियामक मंडळाच्या पसंतीने कायम करावे. कार्यकारी मंडळ चे कार्यवाह श्री. न. गं. आपटे यांना नेमण्यांत आले आहे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर, उपाध्यक्ष कृ. प्र. खाडिलकर, गोपाळराव ओगले, कृ. ग लिमये, सभासदः पां. म. भागवत, वा. कृ. भावे, रा. का. तटणीस, पं. सातवळेकर, पाटील, न. र. फाटक, शं. वा. किर्लोस्कर, सं. गो. पाटील, वा. ना. देशपांडे, न. गं. आपटे, ना. ह. आपटे, रामराव विजयकर, गोव्याचे भारतकार, के. ना. काळे, रा. चिने, नारायणराव बामणगांवकर, कृषानचे संपादक मराठी नियतकालिकांच्या व्यवसायांत संचालक, माजी व विद्यमान संपादक, उपसंपादक, अधिकृत बातमीदार यांना या संघाचे सभासद होतां येईल. असा ठराव श्री. भागवत यांनी मांडला. पण तो नापास होऊन त्यावर श्री. शं. वा. किर्लोस्कर यांनी आणलेला ठराव २२ विरुद्ध १९ मतांनी पास झाला. तो ठराव खालीलप्रमाणेः 'मराठी नियतकालिकांचा संघ, हा मचालक, संपादक व त्यांनी अधिकृत केलेल्या मराठी नियतकालिकांच्या उपसंपादकांचा असावा.' (५) सर्व मराठी संपादकांनी अनेक परकीय इंग्रजी शब्द होतां होईल तो तसेच रूढ होऊं न देतां त्याऐवजी योग्य ते मराठी प्रतिशब्द स्वतः बनवून किंवा दुसऱ्यांनी बनविलेले वापरून तेच रूढ करावे (६) सर्व नियतकालिकांनी अभिप्रायार्थ आलेल्या पुस्तकांची पोंच म्हणजे लेखकाचें नांव, पुस्तकाची किंमत व पत्ता यांसह ताबडतोब द्यावी व अभिप्राय सवडीप्रमाणें द्यावा. (७) मराठी वर्तमानपत्रांचा इतिहास लिहिला जावयाचा आहे. सध्या प्रसंगविशेषी कांही माहिती प्रसिद्ध होत असते. परंतु बिनचूक असत नाही तरी सदर माहिती संकलित करण्याच्या कामीं कांही तरी योजना करावी. वरील ठराव योजनेकरितां 'संपादक-संघा'कडे पाठविण्यांत यावा. (८) महाराष्ट्र साहित्य परिषदेने नेमलेल्या शुद्धलेखन कमिटीने तयार केलेल्या नव्या शुद्धलेखनाची पद्धति सर्व वर्तमानपत्रकारांनी शक्य तोंवर अनुसरावी.

वरील आशयाचे ठराव पसार झाल्यावर सकाळची बैठक १२ वाजतां संपली. दोन प्रहरीं चार वाजता केसरी मराठा कचेरींत रा. गोपाळराव ओगले यांच्या सन्मानार्थ केसरी-मराठा कचेरीकडून संपादक संमेलनास उपस्थित झालेल्या सर्व पाहुणेमंडळींना पानसुपारी व रसपान देण्यांत आलें. तसेच रात्रीं ९ वाजतां ज्ञानप्रकाश कार्यालयाने मराठी संमेलनाच्या प्रतिनिधींच्या सन्मानार्थ आलेल्या पाहुण्यांना उद्यानोपहार दिला. त्यानंतर रात्रीं १० वाजता ज्ञानप्रकाश कचेरीच्या माडीवर संमेलनाचें अधिवेशन भरून उरलेलें काम उरकण्यांत आलें. त्यांत मराठी ज्यांची जन्मभाषा आहे, अशा नियतकालिकांतील लेखकांचा संघ स्थापन करण्याचा एक महत्त्वाचा ठराव पास झाला. त्याखेरीज कांही किरकोळ ठराव व सूचना यांचा विचार होऊन अध्यक्ष व स्वागताध्यक्ष यांचीं समारोपाचीं भाषणें झालीं. त्यांस हारतुरे घालण्यांत आले व शेवटीं आभारप्रदर्शन होऊन संमेलनाचें काम रात्रीं १२ वाजता काम संपलें.

# शूस्टरसाहेबांचें शेवटचें बजेट

हिंदुस्थान सरकारचे फडणवीस सर जॉर्ज शूस्टर याची पंचवार्षिक कारकीर्द यंदा संपली. त्यांनी मंगळवार ता. २८ रोजीं जें असेंब्लीपुढें मांडलें तें त्यांचें शेवटचें अंदाजपत्रक होय. प्रांतिक सरकाराप्रमाणें हिंदुस्थान सरकाराचे फडणवीसहि पूर्वी सामान्य नोकरवर्गापैकीं असत. परंतु महायुद्धानंतर हिंदुस्थान सरकाराच्या बजेटाची घडी विस्कटली ती मामुली सिव्हिल सर्व्हंटाच्या हातून बसणार नाहीं असें दिसून आल्यावरून गेल्या दहा अकरा वर्षांत फडणविशी कामांतील निष्णात माणसाची नेमणूक या जागीं करण्याचा प्रघात सुरू झाला. त्यास अनुसरून इंग्लंडांतून पहिले फडणवीस सर बेसिल ब्लॅकेट हे नेमून आले व त्यांची मुदत संपतांच त्यांच्या खुर्चीवर सर जॉर्ज शूस्टर यांची योजना करण्यांत आली. ब्लॅकेटसाहेबांच्या कारकीर्दीपेक्षा शूस्टर यांच्या कारकीर्दींत हिंदुस्थानाची आर्थिक स्थिति फार बिघडली हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार मंदावला, देशांतील शेतकरी, कामकरी, व्यापारी, कारखानदार व खाजगी नोकर वर्ग यांच्या हातीं खेळावयाचा पैसा बहुतांशीं निर्गत व्यापारावर अवलंबून असल्यामुळे, तो व्यापारच मंदावल्याबरोबर त्याची झळ आयात व्यापारासहि बाधली.

***

देशाचा अन्तर्गत व परराष्ट्रीय व्यापार भरभराटींत असला तरच त्यावर सरकारच्या गमजा चालावयाच्या. पण त्या व्यापारास ओहोटी लागल्यावर सरकारी उत्पन्नांत साहजिकच तूट पडली व ती तूट भरून काढण्याकरिता हिंदुस्थान सरकारानें कर व काटकसर यांची कास धरली. तथापि काटकसर ही नाही म्हटले तरी नोकरशाहीच्या अंगाला येऊन डसणारी असल्यामुळे, त्याबाबतींत तिनें अळंटळं चालू ठेवून बहुतेक भार करवाढीवरच टाकला, व १९३१ सालीं ही तूट उग्र स्वरूपानें जाणवतांच त्या वर्षाच्या सप्टेंबर महिन्यांत असेंब्लीपुढे नवीन बिल आणून सरकारानें करवाढीवर कळस चढविला. त्या बिलानें सरकाराचें उत्पन्न १४॥ कोटींनीं वाढलें. त्या कराचा बोजा कापड, कापूस, यंत्रें, रंग यांच्या आयातीवर बसलाच, पण त्यांतून जनतेच्या नित्याच्या गरजेचें मीठहि सुटलें नाहीं. अशा रीतीनें जनतेचें मीठ तोडण्याचें महत्पाप जोडल्यानंतर सरकाराला त्यापुढे नवे कर बसविण्याची किंवा असलेले वाढविण्याची सोयच राहिली नाहीं. तेव्हा गेल्या वर्षाच्या बजेटांत किंवा यंदाच्या बजेटांत हिंदी लोकांवरील कराची पाळी आम्हीं आपल्या अक्कलहुषारीनें टाळली अशी फुशारकी मारण्यास शूस्टर साहेबांना जागाच राहिली नाहीं.

***

तथापि जित्याची खोड मेल्यावांचून सुटावयाची नाहीं म्हणतात ते कांहीं खोटें नाहीं. कारण यंदाचें वर्ष नवीन करावांचून सुनें जाऊं दिल्यानें आपल्या ब्रीदास बट्टा लागेल असें वाटून कीं काय शूस्टरसाहेबांनी जाता जाता कराची एक ओझरती थप्पड रयतेच्या तोंडावर लगावलीच. बँकेतून पैसे मिळण्याकरिता जे चेक देण्यांत येतात त्यांन १९२७ सालापूर्वी एक आण्याचें तिकिट लावावें लागत होतें. परंतु करन्सी कमिटीच्या शिफारशीवरून हा कर त्या वर्षापासून सरकारानें रद्द केला होता. हेतु असा कीं या अमिषानें जनतेला बँकेच्या व्यवहाराची गोडी लागावी. सरकार इतकें उदार झालें खरें पण त्या औदार्यांतील स्वारस्य ओळखण्याची अक्कल शूस्टर यांच्या मते हिंदी लोकांना आहे कोठे ? ते पडले अडाणी व अक्षरशत्रु. त्यांनी ६-७ वर्षांत या सवलतीचा घ्यावा तसा फायदा घेतला नाहीं म्हणून शूस्टरसाहेब म्हणतात, आम्हांला हा कर यंदापासून पुनः बसविणें भाग पडलें. पण या कराची खरी मख्खी वेगळीच आहे. हिंदुस्थान सरकारानें घाईत घाई करून गतवर्षाची नोकरवर्गाच्या पगाराची दहा टक्के कपात यंदा पाच टक्क्यांवर आणिली. हिंदुस्थानसरकारानें १९३१ सालच्या सप्टेंबर महिन्यांत अजीर्ण होईपर्यंत कराचें उत्पन्न वाढविलें असल्यामुळे, पांच टक्के कपात माफ करण्यानें त्यांना फाका पडण्याची धास्ती राहिली नाहीं. पण हिंदुस्थासरकाराच्या घरीं दिवाळीचे करंजा लाडू असले तरी मुंबई-बंगालसारख्या प्रांतिक सरकाराच्या पंचांगांत एकादशी असून तिला जोडून पगार वाढीची शिवरात्र येताच त्यांचे पोट खपाटीला जाण्याचीच पाळी आली. अशा या जोड उपासांतून त्यास निभावून नेण्याकरितां स्टांपाच्या उत्पन्नांतून मदत देण्याचें सर जॉर्ज शूस्टर यांनी योजिलें आहे.

***

सरकारानें खर्चांत काटकसर केली असें म्हणावें व रयतेनें उलट सरकाराला मनापासून काटकसरच करावयास नको, त्यांतून ती केलीच तर शपथेस मोकळें होण्यापुरती असते असे शाब्दिक टोले देत असावें हा क्रम ठरलेला आहे.

म्हणून सरकाराने आपल्या कृत्याचं समर्थन करणें कंटाळून सोडलें असें मात्र झालें नाही. गेल्या कांही वर्षांत सरकाराकडून एकंदर चार काटकसर कमिट्या नेमण्यांत आल्या. त्यांनी सुमारें पांच कोटी रुपयांची बचत सरकारास सुचविली होती. शिफारशी सगळ्याच्या सगळ्या अमलांत आल्या नसल्या तरी बहुतक सगळ्यांची अंमलबजावणी झाली असें शूस्टरसाहेब छातीवर हात ठेवून सांगत आहेत. सरकारचा लष्करी खर्च पाहिला कीं रयतेच्या पोटांत धस्स होतें हें शूस्टरसाहेब समजून आहेत. म्हणून खर्चाच्या नेमक्या त्याच आंकड्यावर बोट ठेवून ते विचारतात, १९२९ सालीं सदर खर्च ५५ कोटी १० लक्ष रु. होता तो १९३३–३४ सालीं ४६ कोटी २० लक्षांवर आला याला तरी तुम्ही आता काटकसर म्हणाल कीं नाही ! शूस्टर यांच्या या आंकड्याला काटकसर न म्हटलें तरी उधळपट्टी कोण म्हणेल? तिला काटकसरहि म्हणण्यास प्रत्यवाय नव्हता. परंतु तसें कबूल करण्यापूर्वी गेल्या चारपांच वर्षांत अन्नाचेच काय पण वस्त्राचेहि भाव पुष्कळच उतरल्यामुळे सरकारच्या खर्चांत बचत सहजच होऊन गेली हें विसरून कसें चालेल! घडलें हें दंडवतच, पण ते पडून घडलें आहे; मुद्दाम घालून घडलेलें नाहीं. त्यांत भक्तीचा अंश फार थोडा आहे,

***

आता कोणी म्हणेल शूस्टरसारखे एवढे तज्ज्ञ फडणवीस विलायतेहून मुद्दाम हिंदुस्थानांत मागविले, त्यांना जमाखर्चाची घडी बसविण्याचें व तोंडमिळवणी करण्याचें श्रेय मुळीच का नाही ? त्या प्रश्नाला ‘ नाही ’ असें उत्तर आम्हीच काय पण दुसरेहि कोणी देणार नाहीत. शूस्टरसाहेबांनी यंदाची जगांतील व्यापारमंदी लक्षांत घेऊन हिंदुस्थानसरकारच्या खजिन्यावरील व्याजाचें ओझें हलकें करण्यांत आपली अक्कल लढविली खरीच. नुकत्याच संपलेल्या वर्षांत हिंदुस्थानसरकाराने ३३ कोटी रुपयांचें नवें कर्ज उभारलें. हें नवें कर्ज हलक्या व्याजाच्या दराने काढलें. व त्या पैशांतून जुनें भारी व्याजाचें व लहान मुदतीचें कर्ज फेडलें. शूस्टरसाहेबांच्या या कारवाईने व्याजाची रक्कम २-२॥ कोटी रुपयांनी उतरली. सरकाराला व्याजाच्या हलक्या दराने एवढी मोठी रक्कम मिळवितां आली, यांत सरकारची बाजारांतील पत खंबीर झाली हें दिसून आलेंच, पण त्याखेरीज पैसेवाल्या लोकांना आपला पैसा गुंतविण्यास भरभराटीच्या स्थितींतील उद्योगधंदेच उरले नाहीत याचीहि साक्ष पटली !

***

गेलें वर्ष मागील वर्षांइतकेंच हिंदी लोकांच्या दृष्टीनें अत्यंत कष्टप्रद होतें यांत शंका नाही. तें वर्ष त्यांनी कसें कंठलें याची कल्पना ज्याची त्याला आपापल्या परीने असेलच. सर जॉर्ज शूस्टर हिंदुस्थान सरकाराचे फडणवीस असल्यामुळे त्यांच्यापाशीं हिंदुस्थानची खडानुखडा माहिती सांपडावयाचीच. गेल्या दहा महिन्यांतील निर्गत व्यापार घेतला तर त्याची किंमत ११०॥ कोटींची व आयात मालाची किंमत ११२॥ कोटींची भरेल. म्हणजे हिंदुस्थानने आपल्या ऐपतीपेक्षां दोन कोटी रुपयांचा माल परदेशांतून अधिक खरेदी केला. त्याखेरीज सेवानिवृत्त होऊन इंग्लंडांत परत गेलेल्या गोऱ्या नोकरांचें पेन्शन, कर्जावरील व्याज इत्यादि बाबीं संबंधाच्या रकमा हिंदुस्थानानें दिल्याशिवाय चुकत नाहीत. त्या सर्वांची बेरीज चाळीस कोटी रुपये होते. हे इतके रुपये हिंदुस्थानाने दिले कोठून ? तर श्रीमंतांनी व गोरगरिबांनी आपल्या जवळचें सोनें विकून. सप्टेंबर १९३१ पासून १९३२ अखेरपर्यंत हिंदुस्थानानें सुमारें ११० कोटी रुपयांचें सोनें विकलें. गेल्या वर्षापुरताच विचार केल्यास यापैकीं ४० कोटी रुपये हिंदी लोकांनी पोटाकरिता ओतले असे म्हणावयास हरकत नाही. ज्या लोकांना जवळचे दागदागिने मोडून पोटाची खळगी भरावी लागते ते लोक किती निकृष्ट दशेला पोचले असतील हें काय सांगावयास पाहिजे ? तरी देखील शूस्टरसाहेब म्हणावयास तयारच कीं हिंदुस्थानच्या संपत्तीचा एक कोपरासुद्धां अद्याप रिकामा झाला नाही. त्यांचा हिशेब असा कीं, एप्रिल १९२२ पासून मार्च १९२६ पर्यंत हिंदुस्थानांत २ कोटी ८० लक्ष औंस सोनें आलें आहे. त्या मानाने सप्टेंबर १९३१ पासून डिसेंबर १९३२ पर्यंत हिंदुस्थानांतून अवघे १ कोटी ४० लक्ष औंस सोनेंहि बाहेर गेलें नाही. पण त्याच काळांत हिंदुस्थानांत सोन्याची झालेली आयात जमेस धरल्यास विकलेल्या सोन्याच्या तिप्पट सोनें हिंदुस्थानाने विकलें असतें तरी शूस्टरसाहेबांना त्याची कुच पर्वा नव्हती कारण उघडच आहे. हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवण्यास शूस्टर यांचें काय वेचतें ! तथापि ही ऊर्मि जिरल्यावर शूस्टर यांना कबूल करावे लागलेंच कीं, असेंच सोनें मोडून हिंदी लोक पोट भरीत बसल्यास त्यांना लवकरच अन्नाऐवजीं पोटांत कांटे भरण्याची पाळी येईल. ही पाळी टाळण्याकरिता करावें काय ? तर लांब धाग्याचा कापूस हिंदुस्थानांत पैदा होण्यास सरकारने उत्तेजन द्यावें. व इतर उपायांनींहि हिंदी लोकांची ऐपत वाढवावी.

***

तें पुढचें काय व्हावयाचें असेल तें होवो. पण सध्याच्या काळीं तरी बारावें असो कीं बारसें असो, सरकाराची जी पोळी पिकावयाची ती पिकलीच. हिंदुस्थानसरकाराने १९१७ पासून कॅश सर्टिफिकिटांची ट्रम काढली आहे. दरसाल इकडील ही कॅश सर्टिफिकिटें सरासरीने २॥ कोटी रुपयांचीं लोक घेतात. पण यंदा त्यांनी तीं १० कोटींचीं घेतली व त्याखेरीज ४ कोटी ३५ लक्ष रुपयांची रक्कम पोस्टल सेव्हिंग बँकेंत टाकली. फक्त कॅश सर्टिफिकिटापुरतें पाहिल्यास नेहमीपेक्षां ७॥ कोटी रुपये कॅश सर्टिफिकिटांत लोकांनी अधिक घातले. अर्थात् एवढी मोठी रक्कम सरकारास आयतीच वापरावयास सांपडली. हा त्यांचा फायदाच झाला नव्हे काय? इतका पैसा जतन करून ठेवला याबद्दल शुस्टरसाहेबांनी हिंदुस्थानांतील गरीब लोकांची पाठ थोपटली आहे. त्यांची समजूत अशी कीं, सोनें विकून गोरगरिबांनीच आपली शिल्लक कॅश सर्टिफिकिटांत ठेवली. परंतु शुस्टरसाहेबांचा हा तर्क चुकीचा आहे असें आम्ही त्यांस साफ सांगतों. आपले दागदागिने व असेल नसेल तें किड़कीमिड़क मोडून व बायकामुलांना बुचाडून त्यांचा पैसा कॅश सर्टिफिकिटांत घालण्याइतके हिंदी लोक निघृण नाहीत व अरसिकहि नाहीत. तें सर्व मोडून त्यांनी पोटाला खाल्लें, सावकाराचें देणें वारलें, किंवा सरकारचा शेतसारा भरला. कॅश सर्टिफिकिटें घेणारे लोक गोरगरिबांपैकीं नसून ज्यांना जवळचा पैसा गुंतविण्यास सुरक्षित साधन नाही असे मध्यम किंवा श्रीमंत लोकच होत. पण हें उंटावरून शेळ्या हाकणाऱ्या शुस्टरसाहेबांना कळावें कसें?

# कायदेभंगाची चळवळ आता थांबवावी !

प्रत्येक गोष्टीची वेळ यावी लागते म्हणतात तेंच खरें. आणि आमच्या मतें देशामध्ये आज एका वर्षावर चालू असलेली कायदेभंगाची चळवळ थांबवण्याची वेळ आता सर्व बाजूंनी खरोखरच आली आहे. ही चळवळ थांबावयाची तर ती (१) सरकारच्या प्रयत्नाने (२) राष्ट्रीय सभेच्या इच्छेने व (३) लोकसमाजांतील इतर पक्षांच्या मध्यस्थीने किंवा शिफारशीने. पैकीं सरकारच्या प्रयत्नाने ही चळवळ थांबूं शकत नाही हें दिसून आलेंच आहे.

आज चौदा महिने सरकाराने दडपशाही वाटेल तितकी केली. त्यांनी ऑर्डिनन्सेसचे पक्के कायदेहि करून टाकले. पोलीस हवे तितके वाढविले. वेळीं लष्कराची मदत घेण्यास कमी केलें नाही. खर्चालाहि उणें नव्हतें; व होतें ते नवे कर बसवून पुरें करून घेतलें. हवे तितके पोलिस व मॅजिस्ट्रेट ! त्यांना तोटा नाही. तसाच तुरुंगांना. त्यांनी नवे तुरुंग बांधले, जुने वाढविले. तुरुंगांच्या अधिकाऱ्यांनी बेफाम व्हावें, व कैद्यांचा छळ करण्याच्या गुन्ह्याकरिता स्वतः तुरुंगांतील कैदी व्हावें, येथपर्यंत सरकाराने त्यांना ढिलें सोडलें. ऑर्डिनन्सेसच्या अधिकाऱ्यांनी वाटेल तसा धिंगाणा घालून लोकांना दहशत उत्पन्न करण्याची कमाल केली. सर्व प्रकारची राजकीयच काय, पण इतरहि चळवळ देशभर थांबली. आणि कायदेभंगाची चळवळ मोडून काढणें एवढाच उद्योग सरकाराला उरला.

अशी स्थिति असताहि आपण हीं चळवळ मारून काढली असें सरकाराला म्हणतां येत नाही. किंबहुना अशा प्रकारची स्पष्ट कबुली त्यांनी आपल्या तोंडानें परवाच भर कायदेमंडळ त दिलीहि ! अजूनहि लोक कायदेभंग करून तुरुंगांत जात आहेत. आणि सरकार स्वतःचा दिमाखच मिरवूं लागेल तर अजूनहि आणखी लोक तुरुंगांत जातील. तुरुंगांत जाऊन आलेल्यांना विश्रांति मिळाली म्हणून तेहि जातील. मग जे अजून गेलेच नाहीत तेहि जातील यांत काय नवल? पण हा प्रश्न असा धसाला लागूं नये यांतच आता सर्वांचें हित आहे.

सुदैवानें सरकारहि तसा दिमाख मिरविण्याच्या वृत्तींत नाही. "आम्ही कायदा निभवूं शकलों व शांतता टिकवून धरली" इतकाच हक्क फार तर ते सांगतात. आम्हीं चळवळ हाणून पाडली असें ते म्हणत नाहीत. आमच्या मतें हें सुचिन्ह होय मग सरकाराला स्वतःच्या मनाची थोडी तरी लाज आहे, किंवा जगांतील लोकमताची थोडी तरी पर्वा आहे, किंवा भावी राजकीय सुधारणा तडीस न्याव्या व कारभाराचें गाडें सुरळीत चालू करावें अशी मनांतून थोडी तरी खरी इच्छा आहे, यांपैकीं कोणतेंहि कारण प्रभावी झालेलें असो. ही चळवळ थांबावी अशी सरकाराची खरी इच्छा दिसते. ती थांबल्यास आम्ही या चळवळींतलें तरी सर्व कैदी सोडून देऊं असें ते म्हणत आहेत. इतर कोणत्याहि अटी राष्ट्रीय सभेने त्यांना न घातल्या तर, उलट सरकारहि तिला आपणाकडून कांही

अटी घालील, म्हणजे मानहानी करून तह्याचें काम बिकट करील, असें वाटत नाही. म्हणून आम्ही फिरून म्हणतों कीं, हें सुचिन्ह आहे.

यानंतर आता तिऱ्हाइतांनी मध्ये पडून ही चळवळ थांबविणें कितपत शक्य आहे याचा थोडासा विचार करूं. तिऱ्हाइतांनी मध्यस्थी करण्याचा प्रयत्न आज इतकीं वर्षें चालू आहे कीं, त्याचा जवळ जवळ एक इतिहासच बनला आहे असें म्हणतां येईल. ही मध्यस्थी करणें तर ती विशिष्ट प्रकारच्या लोकांनाच करतां येणे शक्य आहे. हे लोक म्हणजे ज्यांचें वजन सरकाराजवळ आहे, आणि ज्यांना लोक राजकीय चळवळीचे पुढारी असे म्हणत नसले तरी, इतर रीतीनें ज्यांना निःसंशय पुढारी-पण प्राप्त झालें आहे असे. मध्यस्थ होण्यास लायख व सत्पात्र असे आदर्शभूत गृहस्थ म्हणून डॉ. सप्रू व रा. जयकर यांचीं नांवें सहजच सुचतात. आणि त्यांनी ही मध्यस्थीची खटपट आजवर इतकी केली कीं, त्यांना 'मध्यस्थ' ही पदवीच मिळाल्यासारखी झाली आहे. त्यांनी वेळ म्हटला नाही, खर्च म्हटला नाही, श्रम म्हटले नाहीत, फार काय मानापमानहि म्हटला नाहीं. केवळ देशहिताच्या दृष्टीने आपल्या वजनाचा, बुद्धीचा चातुर्याचा अधिकांत अधिक व भरपूर उपयोग व्हावा या दृष्टीनें त्यांना खप खटपट केली.

ती खटपट सिद्धीस जाण्याला म. गांधीप्रभतींनीं जितकी मदत करावी तितकी तर केली नाहींच; पण उलट त्यांनीं घालता येतील त्या सर्व अडचणी त्यांच्या मार्गांत घातल्या. लॉर्ड आयर्विनशीं स्वतः बोलू यला लागले कीं पाघळले! आणि या मध्यस्थांशीं बोलावयाला लागले कीं आवळले! असे चमत्कार म. गांधीजींनीं अनेक वेळा केले. शेवटीं सप्रूजयकरांना मध्यस्थीचा कंटाळा आला. गांधींच्या लहरी स्वभावाला ते विटले. अपयशामुळे सरकारहि आपल्याला अवमानूं लागल्याचा भास त्यांना होऊं लागला. आणि "आपल्याला असल्या निष्फळ मध्यस्थीशिवाय देशहिताचे दुसरे मार्ग अनेक मोकळे व स्वाधीन आहेत तेच कां न अनुसरा ?" असा प्रश्न स्वतःला करून त्यांनी मध्यस्थीचा त्याग केला. आता त्याजजवळ कोणी मध्यस्थीची गोष्ट काढली म्हणजे, ते हात पुढे करून म्हणतात "या गांधींच्या राजकारणाचे बटाटे निखाऱ्यांवर भाजून करपून जाऊं न देता, ते बाहेर काढावे, म्हणून आम्हीं आजवर हा बोट किती वेळां भाजून घेतलें पाहा आता फिरून तोच उद्योग करा म्हणून आम्हांला सांगणराला लाज नसली, तरी तो उद्योग फिरून करण्याइतके बेअक्कली आम्ही नाही."

सप्रू-जयकरांचें म्हणणें अगदीं खरें आहे. त्यांना म. गांधी यांनी इतके वेळां अपयश दिलें कीं, त्यांनी फिरून हें काम हातीं घ्यावें असें आम्ही तरी कधीं सुचविणार नाही. कारण स्वाभिमानाचा मक्ता एकट्या म. गांधींनाच सर्वेच्या सर्व देवाने दिला आहे, असें मानणारांपैकीं आम्ही नाहीं. आणि जेथे सप्रू-जयकरांची अशी दुर्दशा, तेथे राष्ट्रीयपक्षाचे पुढारी लोक मध्यस्थीच्या खटपटींत पडून आपली शोभा कशाला करून घेतील ? एका अर्थानें राष्ट्रीय पक्षाचे पुढारी गांधींना व राष्ट्रीय सभेला अधिक जवळ; पण त्याबरोबरच सरकाराला ते तितके अधिक लांब ! म्हणून मध्यस्थीला त्यांची पात्रता तितकी कमी. तथापि अशा पुढाऱ्यांनी आपल्याला अनुकूल असणाऱ्या साधनांनी, दोघांशींहि फटकून कां होईना पण, मध्यस्थीची खटपट केली नाही असें नाही.

ही खटपट म्हणजे वर्तमानपत्रांतून लेख लिहिणें, सभांतून भाषणें व ठराव करणें, आणि याहिपेक्षां अधिक महत्त्वाचें म्हणजे, जे लोक राष्ट्रीय सभावाले व गांधीजींचे भक्त अनुयायी व चळवळीचे पुरस्कर्ते खरोखर आहेत, किंवा आम्ही तसे आहोंत असें म्हणतात किंवा बहाणा करतात, त्यांच्याशी खासगी रीतीनें बोलणें व चर्चा करणें या प्रकारच्या मध्यस्थांच्या खटपटीची मजल एका दृष्टीने मर्यादित असली तरी दुसऱ्या एका दृष्टीनें ती अधिक परिणामी होण्यासारखी असते. चळवळ थांबावी असें कॉंग्रेसवाल्यांना मनांतून वाटत असल्यास हे लोक राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांजवळ जितक्या मोकळेपणानें बोलतील, तितके ते सप्रू-जयकरांशीं सहजच बोलणार नाहीत. ही अंतस्थ मध्यस्थी करतांना सप्रू-जयकरांप्रमाणें या मध्यस्थांनाहि किंचित् उणेपणा सोसावा लागतो, अपमान करून घ्यावा लागतो, व गैरसमज होण्याला जागा द्यावी लागते. पण हें सर्व सोसूनहि राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांनी आपणाकडून शक्य तितकी खटपट समेटाबद्दल केलीच आहे. कांग्रेसच्या पुढाऱ्यांना तिची किंमत वाटो वा न वाटो !

तेव्हा आता शेवटीं, स्वतः या कायदेभंगाच्या चळवळीच्या पुढाऱ्यांनीच जें काय करावयाचें तें करावयाचें राहिलें आहे. तें करण्याला त्यांनी निःसंदेहपणें पुढे यावें असें आम्ही सर्वस्वी स्नेहभावाने सुचवितों. हें म्हणतांना कांहीं कांहीं आक्षेप सहजच पुढे येणारे दिसतात, म्हणून प्रथम त्यांनाच उत्तरें देऊं. पहिला आक्षेप हा कीं, चळवळ थांबविली तर तो पराभव म्हणून कबूल करावा लागेल ! पण "आम्हीं चळवळ मोडून काढली

ह्मणून काढली असें म्हणत नाही, म्हणू शकत नाही " अशी सरकारतर्फे नुकतीच उघड कबुली देण्यांत आली आहे. बरें, चळवळीचें यश मोजण्याला मानीव मोजमापाशिवाय दुसरें कांही मोजमाप आहे काय? नाही. चळवळ यशस्वी व्हावयाची म्हणजे कांही हिंदुस्थानांतले शेकडा शंभर लोक तुरुंगांत जावयाचे किंवा घालावयाचे असा अर्थ नाही. गेले इतके म्हणजे पांच पन्नास हजार लोक तरी तुरुंगांत जातील अशी सरकाराची अपेक्षा नव्हती. आम्ही चळवळ पंधरा दिवसांत हटवूं अशीच त्यांना अपेक्षा होती. मग ही अपेक्षा फसणें हा सरकारपक्षाचाच पराभव नव्हे काय ! उलट अमुक इतके लोक तुरुंगांत पाठवूं अशी प्रतिज्ञाहि राष्ट्रीय सभेनें जाहीर केली नव्हती. अमुक इतके ब्राह्मण भोजनास बोलावूं व इतकी भूयसी देऊं असें उदक यजमान सोडतो त्याप्रमाणें, इतके हजार लोक तुरुंगांत भरूं, व इतके हजार लाख दंडाचे रुपये सरकारी खजिन्यांत भरूं असें उदक कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीने सोडलें नव्हतें. अर्थात् चौदा महिने चळवळ चालली ही गोष्ट कांही लहान नाही. लोक स्वार्थत्यागाला किती तयार आहेत हें दिसून आलें. आणि दिवसेंदिवस कोणत्याहि चळवळींचें तेज वाढतेंच राहणार हें सरकारालाहि दिसून आलें. तात्पर्य, सरकार आपला जय झाला असें म्हणेल या भीतीने चळवळ चालू ठेवणें योग्य होणार नाही.

सरकार काय म्हणेल याचें उत्तर असें दिल्यानंतर, लोक काय म्हणतील याचें उत्तर देण्याचें कारण आहे असें आम्हांला मुळीच वाटत नाही. लोकांना देशाची स्थिति माहीत आहे. त्या दृष्टीने राष्ट्रीय सभेने केलें हें पुष्कळच केलें असे लोक म्हणतात. तिने आता हा चळवळ थांबविली तर कां थांबविली असें कोणीहि विचारणार नाही. किंवा आतां कशी थांबविली म्हणून पुढाऱ्यांना हिणविणारहि नाही असें आम्ही निश्चयात्मक सांगूं शकतों. उलट ही चळवळ थांबवावी असें लोकांच्या मनांत यापूर्वीच आलेलें आहे; व तें त्यांनी उघड व खासगी रीतीने बोलूनहि दाखविलें आहे. तेव्हा ते काय म्हणतील असा संशय प्रदर्शित करण्याचेंहि सबब उरत नाही. उलट केलें यापेक्षा अधिक उत्कट व उघड रीतीने, व कॉंग्रेसची पर्वा न करता, चळवळ थांबविण्याविषयींचें आपलें मत लोकांनीं प्रकट केलें नाही याचें कारण तसें करणें लोकांना बरें वाटलें नाही.

यानंतर एका आक्षेपाचा विचार करण्याचा उरतो. पण तो खरोखर आक्षेप नसून फक्त ती कार्यपद्धतीची अडचण आहे इतकेंच. ही अडचण म्हणजे चळवळ थांबवावी असें ठरलें तरी ते प्रत्यक्ष कोणीं कोठे व कसें करावें ही होय. पण खरोखरच चळवळ थांबवावी असा कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचा विचार ठरला किंवा ठरत असेल तर, वरील तीनहि प्रश्नांचीं उत्तरें समर्पक व सोपपत्तिक देता येण्यासारखीं आहेत. आणि तीं उत्तरें आम्हीं पुढील लेखात देऊं.

## लेखांक २ रा

कायदेभंगाची चळवळ आता थांबविली पाहिजे, व ती थांबविण्याचा अधिकार राष्ट्रीय सभेलाच असल्यामुळे तिनेच या गोष्टींत पुढाकार घेतला पाहिजे, असें आम्हीं मागील अंकीं लिहिलेंच आहे. ही गोष्ट केवळ आजच प्राप्त झाली, किंवा तिजविषयी आम्हां अशा प्रकारचें मत आजच प्रथम प्रगट करीत आहोंत, असें मात्र नाही. तर ता. १२ ऑगस्ट १९३२ च्या केसरीच्या अंकांत "तिरंगी सामन्यांतून तिरंगी समेट निघेल काय?" असा प्रश्न उपस्थित करून, त्याचें जें उत्तर आम्हीं दिलें होतें त्यांत कायदेभंगाची चळवळ थांबविण्याची सूचना केली होती. तेव्हा आम्हीं असें म्हटलें होतें कीं, राजकारणाचा डाव कुजलेला आहे. तो तसाच कुजलेला राहण्यापासून देशाचें अनहित आहे. हा कुजटपणा काढून टाकून राजकारण पुन्हा प्रवाही व खेळतें करण्याकरिता युक्तिप्रयुक्ति करणें अवश्य आहे. साध्या खेळांत बुद्धिवान पुढारी गडी जशा युक्त्या प्रयुक्त्या बदलतात, तशा राजकारणांतहि बदलणें अवश्य असतें. आणि युक्तिप्रयुक्ति बदलल्याने फायदाहि होण्याचा संभव असतो. प्रस्तुत युक्तिप्रयुक्ति म्हटली म्हणजे कायदेभंगाची चळवळ राष्ट्रीय सभेने आपण होऊन थांबविणें ही होय आणि सात महिन्यांपूर्वीच जर असें करणें योग्य होतें, तर आज त्यानंतर आणखी सात महिने गेल्यावर तसें करणें अधिकच योग्य ठरत नाही काय? म्हणून सात महिन्यांपूर्वी जी सूचना आम्हीं उघडपणें केली तीच फिरून एकवार आज करीत आहों.

राष्ट्रीय सभेने चळवळ थांबवावयाची तर ती कशी थांबवावयाची ? या प्रश्नाचें आमचें उत्तर असें कीं, मध्यस्थीने व खटपटीनें. पण कोणाच्या? तर जे राष्ट्रीय सभावाले किंवा चळवळीचे पुरस्कर्ते आज तुरुंगाबाहेर आहेत त्यांच्या. कारण जे तुरुंगांत आहेत, त्यांना ही खटपट करता येणें शक्य नाही. तुरुंगांत असलेल्या एखाद्याला फार तर कदाचित् शेठ जमनादास द्वारकादास यांच्याप्रमाणें करतां येईल. म्हणजे त्रागा करून, म. गांधींना दूषण देऊन, यापुढे आपण ही चळवळ करणार नाही असें जाहीर करून, व स्वतःची सुटका करून

घेऊन ! पण असें उदाहरण एखादेंच होणार; व झालें तरी त्याचा परिणाम चळवळीच्या पुढाऱ्यांवर चांगलासा होणार नाही. वास्तविक जम्नादास द्वारकादास यांनी दोनतीन वेळ स्वेच्छेने या चळवळींत तुरुंगवास पत्करिला; यामुळे त्यांच्यावर भ्याडपणाचा, भित्रेपणाचा आरोप कोणी करूं शकणार नाही. शिवाय त्यांच्या सुटकेची स्वाभाविक मुदत यापुढे फक्त एक-दीडच महिना उरलेली असल्यामुळे, त्यांनी केलें तें सुटकेच्या उतावळीपेक्षा म. गांधींच्या धोरणासंबंधाने उत्पन्न झालेल्या तीव्र नापसंतीने व उद्वेगानेच केलें असेंच कोणालाहि म्हणावें लागेल. आणि आमची अशी समजूतच काय, पण आम्हांला अशी माहितीहि आहे कीं म. गांधींचे कित्येक कट्टर अनुयायीहि म. गांधींच्या चुकीच्या धोरणामुळें त्यांच्यावर मनांतून खपच नाखष झाले आहेत !

गुरुनिष्ठेमुळे ते आपली नाखुषी बोलून दाखवीत नाहीत, व जम्नादास द्वारकादास यांच्याने ती बोलून दाखविल्याशिवाय राहवलें नाही, इतकाच फरक. तथापि प्रत्यक्ष समेटाच्या कारवाईच्या दृष्टीने, जम्नादास द्वारकादास यांचा त्रागा फारसा उपयोगी पडणार नाही. ते चळवळीमध्ये तुरुंगांत गेले तरी राष्ट्रीय सभेच्या अधिकारी वर्गांत त्यांची गणना कोणीहि करीत नाही. उलट तीन वेळ तुरुंगांत जाऊनहि, अविचारी कट्टर लोकांकडून देशद्रोही म्हणवून घेण्याची त्यांच्यावर पाळी आली आहे असेंच समजावें. कारण रागावलेल्या मनुष्याच्या तोंडाला पहिला शब्द शिवीचा येतो, व राजकारणाच्या भाषेत 'देशद्रोही' ही शिवी आजकाल कोणीं कोणाला सहज जाता येता द्यावी अशी सर्वसामान्य होऊन बसली आहे. म्हणून जम्नादास द्वारकादास यांच्या त्राग्याचा परिणाम इतर लोकांच्या मनावर झाला तरी, राष्ट्रीय सभेचें धोरण ठरविण्याचा अधिकार ज्यांच्या हातीं आहे त्यांच्यावर तो होण्याचा फारसा संभव नाही.

जम्नादास द्वारकादास यांच्याइतकेच म. गांधींना विटलेले, किंवा या चळवळीला कंटाळलेले, किंवा फक्त ती चळवळ आता थांबवावी हें युक्तिप्रयुक्तीच्या दृष्टीने योग्य आहे असें वाटणारे, असे बरेच लोक आज तुरुंगांत आहेत यांत शंका नाही. पण जम्नादास यांच्या उतू येण्याच्या पद्धतीने मनाच्या या जाचांतून सुटका करून घ्यावी हें त्यांना पसंत नाही. यामुळे प्रामाणिक मत बोलून दाखविण्याचें धैर्य त्यांच्या अंगीं असलें तरी फुकटच जाणार! म्हणजे त्यांच्या भलेपणामुळे तें निरुपयोगी ठरणार! तुरुंगांत असलेल्या लोकांचीं चळवळीविषयीचीं खरीं मतें घेण्याचा व मोजण्याचा कांही निरपवाद असा मार्ग असता तर त्यांचीहि कबुली चळवळ थांबविण्याला मिळाली असती. परंतु असा मार्ग मिळणें अशक्य आहे. यामुळे एक तर ते दुसऱ्या कोणी चळवळ थांबवीपर्यंत असेच मनांत कुढत व असंतुष्ट होऊन बसतील; किंवा अंगावर ओढून घेतलेली शिक्षा पुरी होईपर्यंत ते सात्विकपणें समाधान मानून आनंदानेहि काळ काढतील. पण हें माहित असतां त्यांची अडचण दूर न करणें हें मात्र राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांना दूरदर्शीपणाचें होणार नाही. तुरुंगांत असता सुटकेची रोज नवी आशा उत्पन्न व्हावी, व रोज ती नष्ट व्हावी, अशा रीतीने आशानिराशेचें खेळणें बनून दुःखित झालेले किती तरी लोक आज तुरुंगांत असतील. अर्थात त्यांची आशा निखालस नाहीशी तरी करावी, किंवा चळवळ बंद करून त्यांची सुटका करून द्यावी, हेंच चळवळीच्या पुढाऱ्यांचें आज कर्तव्य ठरतें.

नाही म्हणावयाला तुरुंगांत असूनहि चळवळ बंद करण्याचा ज्याला आज अप्रत्यक्ष अधिकार आहे असा एकच मनुष्य आम्हांला दिसतो व तो म्हणजे म. गांधी हे होत. त्यांच्या कैदेला मुदत नाही. कारण त्यांच्यावर खटला न होताच त्यांना तुरुंगवास प्राप्त झाला आहे. यामुळे त्यांची सुटका होण्याला जसा एक क्षणहि लागणार नाही तशीच त्यांचा तुरुंगवास लांबण्यालाहि कांही कालमर्यादा नाही. इतर कैद्यापेक्षा विशेष अर्थाने ते सरकारचे पाहुणे आहेत; व अशा पाहुण्या प्रमाणेच सरकाराने त्यांची सर्व व्यवस्था ठेविलेली आहे. यामुळे राजकारणासंबंधीं वाटाघाट करण्याची, किंवा मत प्रदर्शित करण्याची, जी सवलत इतर कैद्यांना मिळण्यासारखी नाही, ती म. गांधींना मिळण्यासारखी आहे. खुद्द सरकाराशीं बोलणें चालणें करण्याला तर त्यांना कांहीच आडकाठी नाही, आणि कित्येकांच्या मतें सरकाराशीं त्यांचा पत्रव्यवहार आज चालूहि आहे. फक्त तो प्रसिद्ध होत नाही इतकेंच.

पूर्वीच्या त्यांच्या प्रायोपवेशनाच्या आधी कित्येक दिवसपर्यंत त्यांचा थेट मुख्य प्रधानाशीं पत्रव्यवहार चालू होता, व तोच पुढे आयत्या वेळीं प्रसिद्ध झाला, हें सर्वांना ठाऊकच आहे. तथापि हल्ली पत्रव्यवहार चालू आहे किंवा नाही हें आम्हांला निश्चित माहीत नाही; शिवाय तो चालू असला तरी त्यांत ' मी चळवळ थांबवितों ' असें सरकारास कळविण्यापर्यंत त्या पत्रव्यवहाराची मजल आली आहे असें आम्हांस वाटत नाही. कारण कायदेभंगाची

चळवळ सुरू करण्याची जबाबदारी जशी कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीवर आहे, तशीच ती थांबविण्याचीहि जबाबदारी त्याच कमिटीने घेतली पाहिजे, असें म. गांधी यांचें मत असण्याचा संभव आहे. आणि तसें असेल तर त्यांत वावगें असें फारसें नाही. म. गांधी यांच्या मताला अर्थातच इतर कोणाच्याहि मतापेक्षा पुष्कळच अधिक किंमत असणार. पण चळवळ थांबविणें, सुरू करणें या गोष्टींत माणसाच्या महत्त्वापेक्षा त्याचा अधिकारच अधिक निर्णायक ठरतो.

अशा रीतीने तुरुंगांतून वैतागानें बाहेर पडलेले, किंवा तुरुंगांत राहून नाखुषीने कुढत बसणारे, किंवा सात्त्विक समाधान वृत्तीने राहणारे, किंवा म. गांधी सारखे व्यक्तिशः फार महत्त्वाचे—हे सर्व लोक चळवळ थांबविण्याला निरुपयोगीच ठरतात या कामीं आमच्या मतें आज तुरुंगांत नसलेले पुढारी हेच खरे उपयोगी आहेत. आणि म. गांधींच्या सल्लामसलतीचा किंवा वजनाचा उपयोग व्हावयाचा असेल किंवा होईल तर, तो या लोकांच्या अधिकृत खटपटीची केवळ पुरवणी म्हणून. पण तुरुंगांत नसलेल्या या लोकांतहि अनेक प्रकार आहेत. कांही लोक एकदा किंवा अनेकदां शिक्षा भोगून बाहेर आलेले आहेत. त्यांना फिरून चळवळ करून तुरुंगांत जावें असें खरोखर वाटत असतें तर त्यांनी तें या पूर्वीच केलें असतें; पण त्यांनी तसें केलें नाही याचा अर्थ काय करावयाचा हें उघडच दिसतें. दुसरे कांही स्वतःच्या कोणत्याहि उघड कृत्यामुळे तुरुंगांत गेलेले नसून, केवळ संशयाने सरकाराने त्यांना तुरुंगांत घातलें होतें. आणि मामुली दोन महिन्यांची मुदत संपतांच त्यांजवर कांही अटी घालून त्यांना मोकळे सोडलें आहे. अर्थात यांपैकीं ज्यांनी अटी पाळल्या त्यांच्या मतें ही चळवळ थाबावी असेंच असल्याचें अनुमान करता येतें. कारण असें अनुमान न केलें तर स्वतःला ही चळवळ चालविण्याची संधि असतां इतरांनी मात्र तुरुंगांत जावें व आपण मोकळे राहावें अशी त्यांची इच्छा असल्याचा आरोप त्यांच्यावर करावा लागतो ! पण तो करण्यास आम्ही तयार नाही. तात्पर्य, पक्की कैद भोगून बिनअटीने किंवा कच्ची कैद भोगल्यावर अटी पाळून, जे लोक आज तुरुंगाबाहेर आहेत त्यांनी ही चळवळ थांबवावी असें म्हणणें ओघानेच प्राप्त होते.

पण याशिवाय आणखी एक वर्ग आहे. त्याच्या संबंधाने तर हें विधान करण्यास काहीच भीति नाहीं. हा चमत्कारिक वर्ग म्हटला म्हणजे स्वतः कैच्या किंवा पक्क्या कोणच्याहि प्रकारच्या कैदेंत कधी न जातां चळवळीस मदत केलेल्या किंवा करणाऱ्या लोकांचा. हे लोक मनांत म्हणत असतील कीं, "आम्हींच तुरुंगांत कशाला जावयास हवें? आम्हीं मोकळे राहून चळवळीचा पाठपुरावा करणें हें प्रत्यक्ष चळवळ करण्यासारखेंच होय." पण त्यांनी लक्षांत ठेवावें कीं, त्यांच्या दुर्दैवानें जगाचें मत असें नाही. "मला चळवळ पसंत नाहीं असें म्हणून, किंवा मला चळवळ पसंत आहे पण तुरुंगांत जाणें मला अनुकूल नाही" असें म्हणून प्रांजलपणें सरळ अपवाद सोसणारा मनुष्य एक वेळ जगाला चालेल. पण जेव्हां पाहावें तेव्हां कायदेभंगाच्या चळवळीचा पाठपुरावा करण्याच्या बहाण्यांतच मग्न झालेले, इकडे लोकांना नांवें ठेवणारे पण स्वतःच्या कातडीला सोन्याचें मोल मानून, फिरून वरती ती देशहिताकरितां संभाळून ठेवीत आहे असला कांगावा करणारे लोक कांही थोडे नाहींत ! अर्थात् त्यांनी लोकांना परभारें तुरुंगात पाठविण्याची देशसेवा आता पुरी करावी असें त्यांना हात जोडून सांगण्याची वेळ आली आहे ! तोंडाने बहिष्काराचा घोष चालू ठेवणारे पण आंतून खुशाल परदेशी मालाचा व्यापार करून पोट भरणारे; तोंडाने कौन्सिल-बहिष्काराचा घोष करणारे, पण साधेल त्या प्रसंगीं साधेल त्या रीतीने कायदे कौन्सिलांचा उपयोग काडीइतकाहि होत असेल तरी न सोडणारे, तोंडाने सरकारी कायद्याविषयी अद्वातद्वा बोलणारे, पण स्वतः आचरणांत सर्व कायदे-कानू एखाद्या गुलामाप्रमाणें पाळणारे; आणि शेवटी कायदेभंगाच्या चळवळीचा स्तुतिपाठ गाणारे पण अनेक खाजगी किंवा सार्वजनिक पोकळ सबबी सांगून स्वतः तुरुंगांपासून शेकडों कोस दूर राहणारे—अशा दुटप्पी लोकांच्या वर्तनाने गेली बारा वर्षे या देशांत नुसता गोंधळ घातला आहे ! तो इतका कीं कॉंग्रेसचे खरे भक्त व खरे स्वार्थत्यागी पण विचारी, अशा पुढाऱ्यांचें त्या गोंधळांत कांही एक चालत नाहीं. भाडोत्री नौबती आणून कोणीं त्या बडविण्याचें काम सुरू ठेवलें तर बिचाऱ्या मनुष्याचा आवाज कितीहि मोठा असला तरीं कोणाला कसा ऐकूं जाईल ?

पण आता वेळ अशीच आली आहे कीं, कच्च्या दिलाचे पण सच्चे, भोळे पण भले, स्वार्थत्यागी पण विचारी, अशा लोकांनी जर एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन ही चळवळ थांबावी असें जाहीर रीतीने प्रगट केलें, व त्या आपल्या निःस्वार्थी मताचा योग्य तो आग्रह धरला, तर त्यांचें म्हणणें तडीला जाऊं शकेल. कारण आजवर झालेली चळवळ ही राष्ट्राला भूषणभूत अशीच झाली हें जसें त्यांना म्हणता

येईल, तसेंच ही चळवळ पुढे चालल्यास भूषण जाऊन त्या ठिकाणीं दूषण येईल, अति केलें तर माती होईल, चळवळीचें वस्त्र ताणलें तर फाटून जाईल,आणि वारा फार भरला तर कातडी चेंडूहि फुटून जातो, म्हणून चळवळ थांबवा असेहि त्यांना यथार्थतेने प्रतिपादितां येईल. म्हणून जे लोक या चळवळींत स्वेच्छेने जाऊन, तुरुंगवास पत्करून, खरा स्वार्थत्याग करून, आज हालचाल करण्याला मोकळे आहेत, त्यांनीच आता पुढे येऊन ही चळवळ थांबविण्याचा सल्ला राष्ट्रीय सभेला देण्याचें धैर्य दाखविलें पाहिजे.

तो मान व तो अधिकार हा जसा त्यांचा,तशीच ती जबाबदारीहि त्यांचीच होय. जे या चळवळींत पडले नाहीत त्यांना तो अधिकार अर्थातच नाही. तसेंच ज्यांनी त्यांत फक्त लुडबूड करण्याइतकाच भाग घेतला, किंवा तितकाहि भाग न घेतां फक्त लोकांना नांवें ठेविलीं, त्यांनाहि हा अधिकार नाही. तर जे खऱ्या मनाने चळवळींत पडले, ज्यांनी खऱ्या मनाने स्वार्थत्याग केला,व आता ज्यांना खऱ्या मनाने च ही चळवळ थांबावी असें वाटतें त्यांनाच ती थांबविण्याचा अधिकार आहे.आज चौदा महिने चाललेली चळवळ आता थांबवावी असें म्हणण्याला अनेक कारणें आहेत; पण त्या सर्वांचा स्पष्ट उच्चार करण्याचें कारण नाही. त्यांचा उच्चार न झाला तरी लोकांना ती कारणें माहीत आहेत. जें काय पाहिजे आहे तें विधायक स्वरूपाचें धैर्य, हें धैर्य दाखविल्याशिवाय, म्हणजे चळवळ आपण होऊन थांबविल्याशिवाय, ती थांबूं शकणार नाही. आणि ती जोंपर्यंत तशी थांबू शकत नाहीं, तोंपर्यंत इतर कांहीहि होऊं शकत नाही हेंहि उघड आहे.

तुरुंगांतील कैद्यांची संख्या दर महिन्याला घटत चालली आहे हें खरें. पण एखाददुसऱ्या ठिकाणीं एखादा दुसरा मनुष्य पकडल्याची बातमीहि रोज येतच आहे. याचा परिणाम मात्र कांही दिवसांनी असा होईल कीं, चळवळ आपोआप हटली असें सरकार म्हणणार! ती जोराने तर चाल राहणारच नाही, पण ती मुद्दाम थांबविल्याने जें आश्वासन सरकारला मिळालें असें कोणाला म्हणतां येईल, तेंहि त्याला देण्यास जागा उरणार नाही. जोंपर्यंत हें आश्वासन नाही तोंपर्यंत गांधींसारख्या मातबर पुढाऱ्यांची सुटका नाही. आणि जोंपर्यंत त्यांची सुटका नाही तोंपर्यंत विधायक स्वरूपाच्या राजकारणांतहि प्रगति नाही. अशी ही कारणपरंपरेची सांखळी घट्ट बांधली गेली आहे.

पण मुख्य एक गांठ सुटली म्हणजे बाकी सर्व आपोआप सुटतात त्याप्रमाणें, राष्ट्रीय सभेने आपण होऊन स्वतंत्रपणें, म्हणजे सरकारला कोणतीहि अट न घालतां किंवा सरकारची दुसरी कोणतीहि अट न मानतां, योग्य कारणाकरिता म्हणून पण धैर्याने ही चळवळ थांबविली तरच विधायक स्वरूपाच्या राजकारणांत पडलेली ही गांठ सुटेल.तसें न झालें तर अनेक परींनी देशाचें रोकडे अनहितच होणार याविषयीं आम्हांला मुळींच शंका नाही. चळवळ सुरू करण्यांत जर राष्ट्रीय सभेचें स्वतंत्र धोरण असूं शकेल, तर ती थांबविण्यांतहि तिचें कांही स्वतंत्रच धोरण असूं शकेल, असें म्हणण्यास कोणीं कां अडखळावें हें आम्हास कळत नाही. कायदेभंग चालू करण्यापुरती राष्ट्रीय सभा स्वतंत्र म्हणजे सरकारनिरपेक्ष ! आणि ती बंद करण्यापुरती मात्र काँग्रेस परतंत्र म्हणजे सरकार--सापेक्ष! असा कोलदांडा जर काँग्रेसचे पुढारी स्वतःला घालून घेतील तर ते त्यांतून कधींहि शीरसलामत बाहेर पडणार नाहीत असें आम्ही त्यांना एकवार नाही पण त्रिवार बजावितों. प्रत्यक्ष युद्धांतहि एखाद्या सेनापतीला जर असें वाटलें कीं, घातले याहून अधिक शिपाई इरेस घालण्याइतकी ही जागा बळकट नाही किंवा फायद्याची नाही, तर तो निश्चयाने ते शिपाई परत घेतो. त्याबद्दल शत्रूला काय वाटेल याची क्षिति तो बाळगीत नाही. कारण त्याला हें माहित असतें कीं, जी बगल आपण येथे दिली ती दुसऱ्या कोणत्या तरी ठिकाणीं तिचा वचपा भरून काढण्याकरिताच दिली!

# पुण्यांतील हत्यारांचा नवा कारखाना

दक्षण उत्तर पश्चिम भार्गी
पसरुनि तोफा जागोजार्गी
तमाम गारदी त्याचे मार्गी
स्वार सैन्य त्यामागे झगार्गी
जरिपटका तो दुरुनि धगार्गी
कोणीच नव्हता त्यांत अभार्गी
त्वरित बक्षिस पावे बिदागी
जासूद सांडणीस्वार धावती

— प्रभाकर

पुणें शहराचे दोन भाग आहेत. एक पूर्वेचा व दुसरा पश्चिमेचा. पूर्व भागांत ब्रिटिश लष्कराचा तळ पडला आहे व पश्चिमभाग बिनहत्यारी नागरिकांनी भरला आहे. लष्करी तळ हा पायदळ पलटणी, रिसाल्यांतील घोडे, तोफांचे गाडे, चिलखती गाड्या, विमानें व दारूगोळा यांनी व्यापला आहे. तेथील शिपायांच्या खांद्यावर रायफली लखलखतात व कंबरेला तलवारी लटकतात. दीडशें वर्षांपूर्वी पुणें शहराचा पश्चिम भाग याच वैभवानें विलसत होता. त्या वेळीं प्रत्येक मराठ्याचे हात आवेशाच्या भरांत कंबरेच्या तलवारीला पोचत व त्याच्या मुठी भाल्याची फेक करण्यासाठीं वळत. त्यांच्या पागा ठाणबंदीतून सुटण्यासाठी ओढ घेणाऱ्या घोड्यांच्या टापांनी दणाणून जात व त्याचे बाहू मुलखगिरीवर जाऊन शत्रूचें पारिपत्य करण्याठीं स्फुरण पावत. शनिवार वाड्याच्या दिल्ली-दरवाज्यावर मराठ्यांचा ऐश्वर्यशाली जरीपटका डौलाने डुलत होता व त्याच्या आजूबाजूंस झुलणारे गजराज आपल्या सुपासारख्या कानांनी त्याची साथ करीत होते. पुण्यांतील मराठे व त्यांना येऊन मिळणार महाराष्ट्रांतले मराठे स्वारीवर निघाले म्हणजे कसे दिसत याचें प्रभाकर कवीनें केलेलें वर्णन शिरोभागीं दिलें आहे तें तत्कालीन परिस्थितीचें हुबेहुब द्योतक होय.

***

प्रभाकर कवीने केलें ते वर्णन दीडशें वर्षांपूर्वीचें. त्यापैकीं आता या पुण्यांत काय उरलें आहे! तो शनिवारवाडा पडून जाऊन त्या जागेवर इमला किती मोठा होता हें समजण्याकरिता त्याच्या तटाच्या भिंती मात्र विश्वासू वाटाड्याप्रमाणें जो भेटावयास येईल त्याच्यापुढे दीन वदन करून उभ्या आहेत. अश्वशाळा रिकाम्या झाल्या आहेत व त्या अश्वांसारख्या पशूंच्या दर्जाला माणसें कशीं पोंचलीं हें दर्शविण्याकरित त्यांच्या जागा मुलाच्या शाळांनी गजबजून सोडल्या आहेत. बंदुकीची हौस नुसत्या काठ्यांवर भागवावी लागत आहे व सैन्यांतील शिपायांच्या मोजदादीचें समाधान विद्यार्थ्यांच्या सख्येकडे पाहून मानणें भाग पडत आहे. शौर्य हें रणभूमीऐवजीं रंगभूमीच्या आश्रयाला गेलें आहे, व वीर्य हें बाहूऐवजीं वक्त्यांच्या भाषणांतच काय तें शिल्लक राहिलें आहे. पलटणी बालचरांच्या पाहाव्या व घोडदळाची कल्पना लोणाऱ्यांनी पाळलेल्या चतुष्पादांच्या पायापाशीं समजून घ्यावी. गेल्या दीडशें वर्षांत शिपाईगिरीला पुणेकर पारखे झाले, त्यांचें शौर्य लोपलें आणि त्यांचीं शरीरें नाजुक व नरम बनलीं. परंतु इंग्रजसरकाराने मनुष्यांना मारण्याचें हत्यार पुण्यांतील मराठ्यांपासून हिरावून घेतलें तरी त्यांना त्यांची लेखणी कांहीं बोथट करतां आली नाहीं. त्या लेखणीच्या टाकाच्या टोकावर त्यांनीं तोफखान्याची उणीव छापखाने घालून भरून काढली असून या छापखान्यांची मारगिरी पुण्यांतून गेलें शतकभर सुरू आहे.

***

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, लो. टिळक, प्रि. आगरकर, प्रो. परांजपे प्रभृति कलमबहाद्दरांनी आपल्या बुद्धिवैभवानें व तेजानें प्रतिपक्षाचे डोळे दिपवून स्वदेशबांधवांत स्वाभिमानाचें व देशाभिमानाचे पर्णा खेळावयास लावले. मासिकें व वर्तमानपत्रें यांतील आपल्या लेखांनी त्यांनी आधुनिक काळाला आवश्यक अशी युद्धकला महाराष्ट्रीयांना शिकविली. फक्त त्यांच्या हातांत हत्यार ठेवण्याचेंच काय तें उरलें होतें. ही कामगिरी ज्ञानकोशासारख्या ग्रंथांनीं अलीकडे थोड्याबहुत प्रमाणांत बजावली आहे, यांत शंका नाहीं. परंतु ज्ञानकोश झाला तरी तो दुर्मिळच. त्याची भारी किंमत भरून तो विकत घेण्याचें सामर्थ्य फारच थोड्यांत असणार.

***

तथापि हल्लींचा काळ फार वेगळा आहे. यांत परचक्रें वारंवार येतात. पूर्वींचीं परचक्रें पंजाबापलीकडील खैबर घांटाच्या खिंडींतून हिंदुस्थानांत शिरत किंवा जहाजांत बसून समुद्रकिनाऱ्यावर अचानक उतरत. परंतु नव्या परचक्रांना अशा प्रकारची मर्यादा मुळीच राहिलेली नाहीं. तीं परचक्रें माणसांनीच आणलीं पाहिजेत असें नाहीं. तीं पुस्तकांत छापून किंवा वर्तमानपत्रांत लपून देखील येऊं शकतात. त्या परचक्रांनी माणसाचीं शरीरें मरत नाहीत, पण माणसांचीं मनें मात्र मरतात

अथवा घायाळ होतात. वर्तमानपत्राइतकी उपद्रव्यापी वस्तू जगांत दुसरी कोणतीहि नाही. ती कोठली काय ब्याद आणून कशी कलागत लावील याचा नेम सांगवत नाही.त्या शेकडों कोसांवर पेटवून फेकून दिलेल्या कोलत्या आहेत.त्या वाळलेल्या गंजीवर पडल्या तर गंजी जाळून त्यांची राखरांगोळी करावयाच्या. उलटपक्षीं पाण्यांत गळाल्या तर स्वतःच विझून जावयाच्या. परंतु पाण्याच्या दलदलीच्या व दमट जागांपेक्षां कोरड्या व पाल्यापाचोळ्यांनी व्यापलेल्या जागाच जमिनीवर फार असल्याने सर्वत्र आगी लागण्याची भीति जास्ती.

***

वर्तमानपत्रांचें व त्याचप्रमाणें छापील कागदांच्या चिठोऱ्यांचें सामर्थ्य इतकें अतर्क्य आहे कीं एकटा एक मनुष्य भुयारांत लपून बसून त्यांच्या साहाय्याने अल्पावधींत सारा देश बेचिराख करतो, भांडणें लावतो, दंगे माजवितो, बेदिली वाढवितो व समाजांतील व्यक्तिमात्रांच्या मनांत एकमेकांविषयी विष कालवितो. वर्तमानपत्रकार हा सेनापति व त्याच्या वर्तमानपत्राच्या प्रति या देशभर धुमाकूळ उडवून देणाऱ्या त्याच्या फौजा होत असेंहि समजण्यास हरकत नाही. त्या एकाच वेळीं हजारों, लाखों स्थळीं हल्ला चढवून लढत असतात. त्या लढून लढून दमतात न दमतात तोंच त्यांच्या पाठोपाठ नव्या दमाच्या फौजा येऊन थडकतात व तीच लढाई जोमानें चालवितात. सेनापति जसा बलाढ्य व लढवय्या असेल तसें हें युद्ध कमिअधिक चालू राहातें व यशस्वीहि होतें, इतकेंच नव्हे तर ज्या कारणांकरिता लढाई आरंभिली त्या कारणांचा सयुक्तिकपणा पटल्यास ठिकठिकाणीं सेनापतीस अनुयायी मिळून ते स्वेच्छेने व पदरखर्चानेहि त्यांच्या लढाया चालवितात.

***

वर्तमानपत्राचें जसें परचक्र आहे तसेंच प्रचारकांचें व फिरत्या व्याख्यात्यांचेंहि आहे. ते प्रचारक व व्याख्याते नवीन कल्पना व नवे विचार डोक्यांत घेऊन गावगन्ना हिंडतात व तेथील जुन्या कल्पनांना व विचारांना उध्वस्त करीत सुटतात. यापेक्षाहि मोठे परचक्र परदेशांतील पुस्तकांतून चालून येतें. तें समुद्र तरतें, पर्वत पादाक्रांत करतें व हजारों मैलांचें अंतर तोडतें. रशिया, इटाली, अमेरिका, इंग्लंड इत्यादि देशांत राजकीय, सामाजिक, धार्मिक वगैरे विषयांवरील नवे विचार जन्मास येतात व ते झंजावाताप्रमाणें कोठच्या कोठें जाऊन तेथील घरें पाडतात, जुनीं झाडें मुळासकट उपटतात, कुटुंबांना देशोधडीला लावतात व एक वेळ सुखी असणाऱ्या तेथील जीवांच्या हृदयांची तडफड उडवितात. कोठे मास्को व कोठे मुंबई, कोठे कार्ल मार्क्स व कोठे लेनिन, कोठे संततिनियमनाची पुरस्कर्ती मार्गारेट-सँगर व कोठे त्या मताचे हिंदुस्थानांतील अनुयायी ! त्यांनीं एकमेकांचीं तोंडेंहि पाहिलीं नसतील, ते एकाच काळांत कदाचित जिवंतहि नसतील. परंतु पुस्तकांच्या परकायाप्रवेशानें अनोळखी माणसेंहि परस्परांना ओळखतात व मेलेले लोक जिवंतांना भेटतात.

***

वाङ्मयाचा हा प्रताप इतका विलक्षण आहे कीं, तें वाङ्मय जन्मास आणणाऱ्या ग्रंथकारांच्या व लेखकांच्यापुढें चंगीजखान, तैमूरलंग, नादीरशहा, नेपोलियन यांचें शौर्य कांहीच नव्हे. ते एखाद्या शहरावर किंवा एखाद्या देशावर चालून जात व त्यांना जिंकीत. परंतु सध्याच्या ग्रंथकारांना व लेखकांना त्यांचें शौर्य गाजवावयाला एवढी विस्तीर्ण पृथ्वी पण तीहि अपुरी पडते. अशा या अंदाधुंदीच्या काळांत मनुष्याला मरेपर्यंत जगावयाचें असल्यानें या परचक्रापासून स्वतःचा बचाव करण्यास त्याला गावाभोवताल चे मातीचे तट किंवा दगडाच्या भिंती यांजकडे पाहून चालावयाचें नाही. कारण हीं जुनीं साधनें या नव्या हल्ल्यांना तटवूं शकत नाहीत. त्यासाठी नव्या साधनांचाच शोध लावला पाहिजे. अंगांत चिलखत असलें व हातांत तलवार, बंदुक यासारखें हत्यार असलें तरच मनुष्याचा या जगांत आता निभाव लागणार आहे. सध्याचें युग ज्ञानाचें व माहितगारीचें आहे. ज्याला नवीन नवीन विषयांचें ज्ञान व जगाची माहिती आहे त्याचीच विचारशक्ति वाढते आणि तो नव्या कल्पनेशीं व मतांशीं झगडून त्यांची युक्तायुक्तता ठरविण्यास समर्थ होतो. मनुष्याच्या मनावर केव्हाहि विचारांचेंच वर्चस्व असावयास पाहिजे. त्याच्या भावना मराव्या असें कोणी म्हणत नाही. पण त्या भावना विचाराच्या कह्यांत राहणें इष्ट आहे. एखादी नवी चळवळ सुरू झाली व नवें मत प्रसार पावूं लागलें म्हणजे माहितगार सुशिक्षित व विचारी मनुष्य त्यांतील तथ्य प्रथम समजून घेतो, त्याची कार्यक्षमता मनाशीं ठरवितो, या परीक्षेनंतर तें ग्राह्य वाटलें तरच स्वीकारतो नाहीपेक्षां अलिप्त राहतो. पण बिनमाहितगार अज्ञ व अल्लड मनुष्य लहान मुलें सांथीला बळी पडावीं त्याप्रमाणें भावनेला वश होऊन आलेल्या लोंढ्यांत सांपडून गटंगळ्या खातो किंवा त्या मतांवर चिडून अद्वातद्वा शिव्या देत सुटतो.

***

खरें म्हटलें असता वर दर्शविलेल्या दोनहि

आपत्ति टाळल्या पाहिजेत. नवमताची व संप्रदायाची नीट परीक्षा होऊनच त्यांचा मनुष्यमात्राकडून स्वीकार किंवा धिक्कार व्हावयास पाहिजे. याला साधन त्या त्या मताची, संप्रदायाची व विषयाची अनुकूल प्रतिकूल माहिती शिक्षित मनुष्यांकरितां उपलब्ध करून देणें हेंच होय. शहरांतून अनेक विषयांवरील पुस्तकें ज्यांत आहेत अशा ग्रंथशाळा आढळतात. त्यांचा फायदा घेऊन जिज्ञासू मनुष्य आपल्या मनांतील शंकाकुशंका फेडून टाकतो. आता शहरांतील सर्वच शिक्षित लोक इतक्या कसोशीनें वागतात असें नाहीं. तथापि त्यांनी स्वतः जरी कोणत्याहि विषयाची उलट बाजू पाहिली नसली तरी ती सांगणाऱ्याकडून त्यांच्या कानावर गेली असल्यानें तेवढ्यावर ते आलेल्या पुरांतून स्वतःस वांचवितात. परंतु खेड्यापाड्यांतून, मध्यम गांवांतून किंबहुना लहान शहरांतूनहि अशा प्रकारची साधनें नसल्यामुळे तेथील जनतेची स्थिति असहाय व अनुकंपनीय होते. त्यांच्या साहाय्यास धावून येणें हें एक महत्त्वाचें देशकार्य असून त्याची आवश्यकता दिवसानुदिवस अधिकाधिक भासूं लागली आहे.

***

पुण्यास नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या महाराष्ट्रीय सांवत्सरिकानें जर कोणती कामगिरी बजावली असली तर ती हीच होय. ज्याचा गरज बहुजन समाजाला आहे, असा एकहि विषय त्या ग्रंथांतून बहुधा गळलेला नाहीं. या ग्रंथांत हिंदुस्थानांतील अनेक धर्म, पंथ व जाति यांची माहिती जशी दिली आहे, तसेंच पाश्चात्य समाजस्थिति स्त्री-पुरुष विषयकनीतिकल्पना व विवाह संस्था यांचेहि विवेचन आलें आहे. उद्योगधंदे, सैन्य, आरमार या दृष्टीनें हिंदुस्थानाची परिस्थिति कशी आहे याचें ज्ञान या ग्रंथानें सामान्य वाचकांना होतें, तसेंच गोलमेज परिषद, सायमन कमिशन व प्रचालित राज्यघटना यांच्या माहितीनें हिंदुस्थानाची राजकीय स्थिति कळून येते. सारांश, सध्याच्या जगांत वावरणाऱ्या व वर्तमानपत्रें वाचणाऱ्या हरएक मनुष्यास त्याजपुढे येऊन पडणारा विषय समजण्यास ज्या माहितीची निकड आहे ती सर्व माहिती या ग्रंथांत आहे, इतकेंच नव्हे तर प्रचारक, व्याख्याते, लेखक व वर्तमानपत्रकार यांची बहुतेक गरज प्रस्तुत सांवत्सरिकानें भागणार आहे. सर्वसामान्य मनुष्यास स्वसंरक्षणार्थ अंगावर चढविण्याचें हें चिलखत आहे त्याचप्रमाणें ती तलवार हि आहे. या साधनानें ज्याला त्याला स्वतःचा बचाव करतां येईलच, पण त्याच्या ठिकाणीं तसें बुद्धिसामर्थ्य व वाक्सामर्थ्य असल्यास आसपासचा मुलख जिंकून एखादें लहानसें राज्यहि उभारणें त्यास कठिण जाणार नाहीं. अशा प्रकारचें बचावाचें व हल्ल्याचें हत्यार निर्माण करून महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळ या कारखान्यानें महाराष्ट्रावर उपकार केले आहेत यांत शंका नाहीं. त्यायोगानें महाराष्ट्र ज्ञानाच्या दृष्टीनें कांही पायऱ्या वर चढेल अशी आम्हांस खात्री वाटते.

# शवविशसनाची प्रयोगशाळा

## मीमांसा विद्यालयाचा नवा उपक्रम

सांप्रतचा काळ संशोधन आणि संकलन यांचा आहे. इतिहास, पुराणें, शास्त्रें, भाषा, काव्यें इ. वाङ्मयाच्या विविध शाखांतून संशोधन चालू असून भूतकालाच्या, विस्मृताच्या किंवा अज्ञानाच्या अंधारमय गुहेंत पडून किंवा दडून राहिलेलीं कित्येक सत्यरत्नें कष्टाळू आणि अभ्यासू संशोधक उजेडांत आणीत आहेत. इतिहासक्षेत्रांत पेशवे-दप्तराच्या प्रकाशनाचें जें महत्त्व तेच संस्कृत शास्त्रांच्या क्षेत्रांत मीमांसा-ग्रंथांच्या संशोधनपूर्वक प्रकाशनाचें महत्त्व होय. व्यवहाराच्या निकषावर षट्शास्त्रांना घासून पाहिलें तर मीमांसाशास्त्राची रेषा हीच अधिक चमकून दिसेल. ग्रंथाचा अर्थ लावावयाचा असो, कायद्याचा हेतु विशद करावयाचा असो किंवा विद्वत्सभेंतील वादांत अजिंक्यपत्र मिळवावयाचें असो, पूर्वमीमांसेचा उपयोग अनिवार्य आहे. पूर्वमीमांसेचें व्यवहारांत इतकें महत्त्व असूनहि त्या शास्त्राचा जितका अभ्यास व्हावयास पाहिजे तितका होत नाहीं. आश्चर्य असें कीं, युरोपीयन पंडितांनीं संस्कृत काव्य-नाटक-प्रबन्ध या उपसागरांतून तसेंच ऋग्वेद—ब्राह्मणें—उपनिषदें या तत्त्वज्ञानाच्या गिरिगव्हरांतूनहि अनिरुद्धपणे संचार केला, परंतु मीमांसेच्या उपयुक्त भागाकडे मात्र त्यांची जावी तितकी दृष्टि गेली नाहीं! ऋग्वेद, वेदान्त, अलंकार, व्याकरण इत्यादिकांवर इंग्रजींत बरेंच वाङ्मय झालें आहे. परंतु मीमांसेवर मात्र, वठत

वाललेल्या झाडावर क्वचित् एखादा अंकुर फुटलेला दिसावा त्याप्रमाणें, क्वचित् एखादा टीकालेख किंवा एखाद्या ग्रंथाचें भाषांतर झालेलें आढळतें. मराठींत तर त्या शास्त्रावर अजून फारसें वाङ्मय झालेलें नाही हें सांगावयास नकोच. अर्थातच ही स्थिति पालटली पाहिजे. इतर शास्त्रांच्या शाखावर प्रतिमासीं आणि प्रति-वर्षी नवीन नवीन भाषांतरांची, टीकालेखांची आणि चिकित्साग्रथांची नूतन घोसदार पालवी फुटत असते तशीच ती मीमांसेच्या वेली-वरहि फुटली पाहिजे.

## अष्टविध उद्देश

पुरातन काळीं षट्शास्त्रांचा अभ्यास हा गुरु-परंपरेने चालत असे. परंतु बौद्धकालानंतर हिंदुस्थानांत यावनी सत्तेचा प्रचंड पूर लोटला आणि त्यांत इतर अनेक गोष्टींप्रमाणें शास्त्रांच्या अध्ययन-अध्यापनाची पूर्वपीठिकाहि जवळ जवळ लुप्त झाली. पेशवाईच्या काळीं त्या पीठिकेला कोठें मुळी फुटूं लागली न लागली तोंच पाश्चात्य राजसत्तेचा आघात बसून ती परंपरा पुनरपि मागे पडली. सध्या तर इंग्रजी भाषा, पाश्चात्य शास्त्रें याच्याच अभ्यासानें हिंदी लोकांचीं मनें व्यापृत झालीं आहेत. परंतु विद्यापीठांत संस्कृत भाषेला अधिराज्ञीपद देण्यांत आलेलें नसलें तरी तिला मागची का होईना पण एक जागा देण्यांत आली आहे. त्यामुळे व सध्याच्या अन्तर्मुख निरिक्षणाच्या जाणिवेमुळे आर्यांच्या पुरातन शास्त्रांचें ज्ञानभांडार उघडण्या-कडे विद्वानांचें लक्ष जाऊं लागलें आहे ही अभि-मानाची गोष्ट होय. कांहीं वर्षांपूर्वी पुणें येथे जें मीमांसाविद्यालय स्थापन केलें गेलें हें त्याच प्रवृत्तीचें द्योतक आहे. मीमांसाविद्यालयाने (१) मीमांसाशास्त्राचें सप्रयोग अध्ययन करविणें, (२) मीमांसाशास्त्राचें संशोधन करून त्यावरील ग्रंथ प्रकाशित करणें, (३) 'ऋत्विज्' वर्गाच्या मुलांना शिष्यवृत्त्या देऊन त्यांना अध्ययनासाठी वसतिगृहांत राहण्यास जागा देणें, (४) शवविशस-नाच्या प्रयोगशाळेची (प्रॅक्टिकल पोस्ट मॉर्टेम हॉल) इमारत पूर्ण करणें, (५) होमहवनास गोदुग्ध मिळावें म्हणून गाई संभाळणें, (६) श्रौत-सूत्रांचें संशोधन आणि प्रकाशन करणें, (७) मीमांसाविद्यालयांत ज्यांनी आपला अभ्यास संपविला त्या विद्यार्थ्यांच्या रितार्थाची सोय लावणें व (८) हिंदु कायद्याची सुधारणा आणि संशोधन करणें हे आठ उद्देश आपल्या पुढे ठेविले असून ते आचरणांत आणण्याचा चालकांचा निश्चय आहे.

## वैद्यकदृष्ट्या यज्ञसंस्थेचें महत्त्व

मीमांसाविद्यालयाचे मेहनती व्यवस्थापक आणि प्रचारक पंडित वामनशास्त्री किंजवडेकर यांनी सदर उद्देशांपैकीं मीमांसाशास्त्राचें अध्यापन व त्यांतील ग्रंथांचें प्रकाशन हीं दोन कामें सुरू केलींच आहेत. अध्ययन-अध्यापनासाठी एक स्वतंत्र टुमदार इमारत सर परशुरामभाऊ कॉलेज-जवळ बांधण्यांत आली असून त्या इमारतींत यज्ञ-संस्थेचीहि सोय करण्यांत आली आहे. ऋग्वेदकाल संपून उपनिषत्कालाला प्रारंभ होईपर्यंत किंबहुना कांही दिवस नंतरहि हिंदुस्थानांत यज्ञसंस्थेचा प्रभाव फार प्रबळ होता. ब्राह्मणें, श्रौतसूत्रें आणि गृह्यसूत्रें यांमधून विविध यज्ञांची माहिती मिळते. यज्ञसंस्था ही तर पूर्वमीमांसेचा गाभाच होय. तेव्हा यज्ञान्तर्गत निरनिराळ्या प्रक्रियांची माहिती समजून देणें हेंहि मीमांसाशास्त्राचें एक कार्य आहे. यज्ञसंस्थेंत संशोधनोपयुक्त असा पुष्कळच भाग आहे. उदा-हरणार्थ, आपण 'षट्त्रिंशदाब्दिक शाक्त्यानाम-यनम्' नांवाचा ३६ वर्षे चालणारा यज्ञ घेऊं. हा यज्ञ चालू असतांना यजमान मृत झाला तर त्याचें तें शव यज्ञसमाप्तीपर्यंत ठेवून त्याचें विशसन करून नलद, शीपाल, अवकाप्रभृति द्रव्यांचा उपयोग करून तें टिकवावें लागते. बरें तें तसें ठेवावयाचें नसलें तर त्याचें विशसन करून मूत्राशय, पुरी-षाशय, आंत्रें, इत्यादि इंद्रियें साफ करून पृषदाज्य-प्रभृति द्रव्यांनीं तीं भरून काढावीं लागतात व मगच त्याचा दाह करावा लागतो. बौधायनसूत्र, आश्वलायनश्रौतसूत्र, आश्वलायनगृह्यसूत्र इत्यादि ग्रंथांतून अशा प्रक्रियेचीं वर्णनें आलीं आहेत. "अथास्य केशश्मश्रु वापयित्वा लोमानि संहृत्य नखानि निकृन्तयीताथास्य दाक्षिणं कुक्षिम-पावृत्य निष्पुरीषं कृत्वाद्भिः प्रक्षाल्य सर्पि-षान्त्राणि पूरयित्वा दर्भैः संसीव्यति।" या बौधायनसूत्रांतील उल्लेखावरून सदर माहितीची कल्पना येईल.

## संशोधनाची आवश्यकता

हल्ली शवाचें छेदन आणि तें शव किती दिवस टिकूं शकेल एतत्संबंधी आधुनिक वैद्यकशास्त्रांतील पंडितांचें संशोधन चालू आहे. अशाच वेळीं त्यासंबंधी आपल्या जुन्या सूत्रग्रंथांतून आलेली माहिती संशोधनाच्या मुशींत घालून परीक्षिणें आपलें कर्तव्य ठरतें. एखादा दीर्घकालीन यज्ञसमारंभ सुरू असता मध्येच यजमान मृत झाल्यास तो यज्ञ संपेपर्यंत त्याचें शव ठेवावयाचें तर तें सडणार नाही, त्याला दुर्गन्धी सुटणार नाही अशाच काळजीने ठेवावयास पाहिजे हें उघड होय. अर्थातच त्यासाठी पूर्वाचार्यांना व पुरातन

ऋषींना कांही मलविनाशक द्रव्यांची योजना करणेंहि आवश्यकच होतें. नलद, शीपाल, अवका इत्यादि द्रव्यांचा उपयोगहि ते करीत. ही सर्व माहिती जुन्या सूत्रग्रंथांतून वाचल्यावर जिज्ञासु वाचकाच्या मनांत नलद, शीपाल, अवका इत्यादि द्रव्यें आहेत तरी काय; मूत्राशय, पुरीषाशय, आन्त्र धुण्याची पद्धत तरी काय होती अशी कुतूहलबुद्धि उत्पन्न होणें साहजिक आहे. ही जिज्ञासा सफल व्हावयाची तर त्यासाठी सूत्रग्रंथांतून आलेल्या वर्णनाप्रमाणे प्रयोग व्हावयास पाहिजेत व प्रयोग करावयाचे तर त्यासाठी एक स्वतंत्र इमारतच बांधावयास पाहिजे. पुण्याच्या मीमासा-विद्यालयाने अशी इमारत बांधण्याचें ठरवून त्याप्रमाणे वर्गणी जमविण्यास सुरुवातहि केली आहे. शास्त्रसंशोधनाच्या दृष्टीने विद्यालयाने अंगीकारलेलें कार्य अतिशय महत्त्वाचें आणि उपयुक्त आहे. प्रयोगशाळा बांधून होऊन त्यांत शवविशसनाचे प्रयोग सुरू झाले म्हणजे वैद्यकशास्त्रांतील एका महत्त्वाच्या दालनावर नवीनच प्रकाश पडणार आहे. आजपर्यंत हिंदु कायद्याच्या संशोधनाचें आणि सुधारणेचें कार्य मीमांसा विद्यालयाने चालविलें आहे. बॅ. जयकर व न्यायमूर्ति माडगांवकर यांच्या अध्यक्षतेखाली हिंदु–कायदा सुधारण्याच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी दोन परिषदाहि पुणें येथे भरविण्यांत आल्या होत्या. परंतु आता शवविशसनाचे प्रयोग पूर्वपद्धतीला अनुसरून सिद्ध करून दाखविण्याचें कार्यहि अंगावर घेण्याचें विद्यालयाने ठरविलें हें खरोखरीच प्रशंसनीय होय. कायदा आणि वैद्यक यांनाहि मीमांसाशास्त्र पूरक आणि पोषक आहे हेंहि यावरून दिसून येणार आहे.

### तज्ज्ञांचे अनुकूल अभिप्राय

'ऐकावें जनाचें, करावें मनाचें' या बालबोध म्हणींत एक मोठेंच तत्त्व सांठविलें आहे. आणि तें हें कीं, आपण आपल्यापुढें ठेविलेल्या ध्येयाला हात घालण्यापूर्वी त्यासंबंधी चारचौघांचा सल्ला घ्यावा, इतकेंच काय, त्यांचें साहाय्यहि घ्यावें. मीमांसाविद्यालयाचे चालक पंडित वामनशास्त्री किंजवडेकर, प्रो. देवधर, प्रो. नारळकर या मंडळींनी शवविशसनाची प्रयोगशाळा बांधण्याची योजना केल्यावर त्या योजनेसंबंधीं अधिकारयुक्त वाणीने बोलूं शकतील आणि सूचनांच्या रूपाने कांही सांगूं शकतील अशा डॉक्टरांशीं विचारविनिमय केला. डॉ. व्ही. सी. गोखले, व्ही. डी. फाटक, बाबासाहेब परांजपे, व्ही. एन्. भाजेकर, एच्. व्ही. टिळक, आर. एन्. कूपर, पी. व्ही. घारपुरे, फ्रँक्लिन एडगर्टन, बर्नहार्ड ब्रेलर, रास्वेल पी. रसेल, डॉ. फ्लिंडर्स इत्यादि पौरस्त्य–पाश्चात्य वैद्यक–पंडितांनी विद्यालयाचें कार्य स्वतः पाहून शवविशसनाची प्रयोगशाळा बांधण्याच्या कामीं आपले अनुकूल अभिप्राय प्रकट केले. मुंबई इलाख्याचे माजी गव्हर्नर सर लेस्ली विल्सन आणि हिंदी संस्थानिक व राजेरजवाडे यांनीहि आपल्या आशीर्वादांची जोड विद्यालयाला दिली आहे.

### आर्थिक साहाय्याची अपेक्षा

विद्यालयाचा उद्दिष्ट हेतु म्हणजे शवविशसनाची प्रयोगशाळा आपल्या पायावर उभी राहावयाची तर तिचा पाया पैशांनी भक्कम भरला पाहिजे. प्रयोगशाळा बांधण्यास तूर्त तरी २० हजार रुपयेच लागतील असा अंदाज आहे. आनंदाची गोष्ट अशी कीं, योजनेची उपयुक्तता लक्षांत घेऊन ग्वाल्हेर दरबाराने विद्यालयाला सदर कार्याप्रीत्यर्थ ४ हजार रुपयांची उदार देणगी देऊन चालकांना सक्रिय उत्तेजन दिलें आहे. आता काय ती १६ हजारांची रक्कम पुरी व्हावयाची आहे. पं. किंजवडेकरशास्त्री व तपस्वी बाबासाहेब परांजपे हे सध्या प्रयोगशाळेस वर्गणी जमविण्यासाठीच बाहेर पडले आहेत. पुण्यांत श्री. ज. ग. आपटे हेहि वर्गणी जमा करीत आहेत. प्रो. एन्. जी. नारळकर, चिटणीस शिक्षणप्रसारक मंडळी या सहीनें मदतीचें एक पत्रकहि काढण्यांत येऊन तें धनिकांकडे व मंडळीच्या हितचिंतकांकडे पाठविण्यांत येत आहे. कार्याचें महत्त्व लक्षांत घेता वीस हजारांची रक्कम मुळीच अधिक नाही. तरी महाराष्ट्रांतील विद्याप्रेमी संस्थानिक, धनिक, व्यापारी आणि विशेषतः डॉक्टरवर्ग सढळ हाताने देणग्या देऊन मीमांसाविद्यालयाने अंगीकारलेलें एक उपयुक्त कार्य पुरें करण्याचें श्रेय घेतील असा आम्हांस विश्वास वाटतो. सरकारानेहि वार्षिक देणगीच्या रूपाने आर्यवैद्यकांतील एका शाखेचें पुनरुज्जीवन करण्यास विद्यालयास मदत करणें त्याचें कर्तव्य आहे.

# कायदेभंग व लोकमत

**महाराष्ट्र** (नागपूर) ता. ५-३-३३—"प्रश्न इतकाच की, सरकार म. गांधींना 'बोला, तुमचे पुढचे धोरण काय आहे ते?' असे म्हणते, की म. गांधी आपले धोरण जाहीर करावयास सरकाराजवळ परवानगी मागतात! कोणत्याहि प्रकारे ही परवानगी म. गांधींना मिळाली, तरी ते बहुधा कायदेभंग बंद ठेवण्याचीच जाहीर घोषणा करतील असा आमचा अंदाज आहे. कारण त्यांना तूर्त कायदेभंग चालवावयाचा नसून, अस्पृश्यता-निवारणाचा कार्यक्रम जोराने चालवावयाचा आहे. काँग्रेस—पुढाऱ्यांना त्यांना भेटून त्यांचा सल्ला घेण्याची परवानगी सरकाराने दिली तर त्यानाहि महात्माजी बहुधा तसाच म्हणजे कायदेभंग बंद ठेवण्याचाच सल्ला देतील, असे आम्हास वाटते. महात्मा गांधी वेळीच सुटले तर ते स्वतःच्या जबाबदारीवर कायदेभंग बंद ठेवू शकतील; व काँग्रेसलाहि आपला सल्ला मान्य करावयास वळवू शकतील. परंतु म. गांधी सुटणे अगर त्यांना आपले विचार प्रदर्शित करावयास परवानगी देणे, ही सरकाराच्या मर्जीची गोष्ट आहे. सरकार काय करील, त्याचा अंदाज कोणाला लागणार? अशा परिस्थितीत इतर काँग्रेसभक्तांनी सरकारी कारवाईवर अवलंबून राहून कसे चालेल? त्यांनी स्वतः व म्हणून काही धोरण आखलेच पाहिजे."

**ऐक्य** (सातारा) ता. ५-३-३३—"या बाबतीतील सरकारी धोरण इतके हास्यास्पद आणि दुराग्रही आहे की, सरकाराच्या मुत्सद्देगिरीबद्दल आणि सद्हेतूबद्दल जनतेस मुळीच आदर वाटणे शक्य नाही. कायदेभंगाचे धोरण काँग्रेसला आता अमान्य आहे व ते बदलावयास ती तयार आहे, याला पुरावा काय असा प्रश्न सर हॅरी हेग यांनी विचारला. हा पुरावा खुद्द दिल्लीतच सरकाराला मिळाला नाही काय? अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतीत असेंब्लीत बिले आणवून ती पास करून घेण्यासाठी काँग्रेसचे पुढारी दिल्लीत जी खटपट करीत आहेत, त्यापेक्षा या बाबतीत जास्त उत्कृष्ट पुरावा सरकाराला कोणता हवा आहे? तसेच या अधिवेशनाच्या कामी वऱ्हाडातील श्री. बापूजी अणे आणि पं. मालवीय यांनी पुढाकार घेतला असून, त्या उभयतांचे धोरण काय आहे हे प्रसिद्धच आहे. श्री. अणे यांनी तर काँग्रेसचे धोरण बदलण्याच्या बाबतीत विचारविनिमय करण्यासाठी मुद्दाम सभा बोलावून आपले पत्रकहि प्रसिद्ध केले होते. इतके झाले तरी सरकाराची अजून खात्री पटत नाही; आणि काँग्रेसला खुले अधिवेशन भरविण्यास परवानगी द्यावी असे त्यांना वाटत नाही! सरकारचे हे धोरण आणि राजबंद्यांना अद्यापहि न सोडण्याची वृत्ति पाहिली म्हणजे नवीन सुधारणांना अनुकूल, आणि शांततेचे वातावरण उत्पन्न व्हावे अशी सरकारची इच्छाच नाही असे म्हणणे भाग पडते."

**प्रभात** (मुंबई) ता. ७-३-३३—"महात्माजी व मालवीयजी यांचे आज जे काँग्रेसवर व हिंदु समाजावर वजन आहे आणि तरुणांची त्यांजवर जी श्रद्धा व भक्ति आहे तीच आज हिंदी राजकारण शांततेच्या राजमार्गाने चालण्यास उपयोगी पडत आहे. हा 'ब्रेक' काढून घेण्यांत आल्यास हिंदी राजकारणाची गाडी आयर्लंडाचे वळणावर जाण्याचा बलवत्तर संभव आहे आणि हिंदुस्थानात दुसरे आयर्लंड निर्माण होऊ नये हीच जर होअरसाहेब, वारंवार म्हणत आहेत त्याप्रमाणे त्यांची खरोखर इच्छा असेल तर उभयतांचे सहकार्य मिळविण्याची त्यांना शक्य ती खटपट करणेच अवश्य आहे. समेट घडवून आणण्याचा अधिकार व जबाबदारी दोन्ही अखेर महात्माजींचे शिरावरच राहतात. कायदेभंग लढा जाहीर करण्याचा हक्क व अधिकार जर त्यांचा, तर तो लढा थांबवून तहनामा व समेट घडवून आणण्याची जबाबदारी व अधिकारहि त्यांजकडेच राहतो. इतरावर ती जबाबदारी त्यांनी लोटणे इष्ट नाही. आणि त्यांनी लोटू म्हटले तरी इतरांना ती स्वीकारता येण्यासारखी नाही."

**माला** (पुणे) ता. [illegible]-३-३३—"श्री. गांधीजींच्या खुलेपणाने बारा वर्षांचा पूर्ण अवधि दिल्यावर असा कटु अनुभव आला आहे की, त्यांची असहकारिता व त्यांचा कायदेभंग या सर्वथैव फोल चळवळी आहेत. त्यांच्या चळवळीमुळे झालाच तर तोटा मात्र होण्याचा संभव आहे. श्री. गांधीजींनी अगोदर कायदेभंग बंद करून तुरुंगाबाहेर यावे. मग परिस्थितीप्रमाणे त्यांनी व त्यांच्या अनुयायांनी काँग्रेसची बैठक भरवावी म्हणजे इतरानाहि सदर बैठकीला हजर राहतां येईल. जोपर्यंत कायदेभंग अल्प प्रमाणांत तरी सुरू राहील तोपर्यंत काँग्रेस भरविण्याची परवानगी मिळणे शक्य नाही."

**परीक्षक** (बेळगाव) ता. [illegible]-३-३३—"काँग्रेसच्या कायदेभंगामुळे देशातील उत्तमोत्तम विचाराच्या माणसांना नाहक कष्ट सोसावे लागले. कष्टाच्या मानाने देशाची प्रगति अणुमात्रहि न होतां उलट

अनेक रीतीने अधोगति झालेली आहे. देशांतील हा अनवस्थेचा प्रसंग आज डोळे उघडून पाहणाऱ्यास दिसतच आहे. देशाची तयारी नसतांना स्वातंत्र्याचा ठराव पास करून तत्प्रीत्यर्थ चालू केलेली चळवळ आज मृतप्राय झालेली आहे. इतकेंच नव्हे तर ती नामशेष झालेली आहे, असें कांग्रेस--चळवळीच्या प्रवाहांत सांपडलेले कांग्रेस---पुढारीच आज कंठरवाने सांगत आहेत ! कांग्रेसच्या हिमालयन चुकीपासून देशाची सत्वर मुक्तता करणे किती इष्ट आहे हें सांगण्याचें कारण नाहीं."

**जागृति** (बडोदें ) ता ४-३-३३---"म. गांधी आणि राजगोपाळाचारियर यांसारखे त्यांचे अनुयायी यांचें सांप्रतचें जें धोरण दिसत आहे, त्यावरून कायदेभंगाच्या चळवळीला पूर्ण विराम देण्याची प्रवृत्ति त्यांच्या ठायीं उत्पन्न झालेली असावी असें मानण्यास बरीच जागा आहे. परंतु सरकारानें सध्याप्रमाणे आगाऊ शरणचिठी घेण्याचा हट्ट धरला तर त्यांना कांग्रेसच्या इतर मंडळींचें मन वळविणें कठिण जाईल. किंबहुना अशक्यप्राय होईल हें सांगावयास नकोच. सरकारानें जी नवी राज्यघटना हिंदुस्थानासाठीं तयार करण्याचें ठरविलें आहे ती कितपत ग्राह्य आहे आणि ती बरीच सदोष असल्यास यांतील दोष व अपुरेपणा काढून, ती कामचलाऊ करून घेतां येईल किंवा नाहीं याचा कांग्रेसने विचार करावयाचा तर कांग्रेसला आपलें अधिवेशन भरवून, तसा विचार करण्यास संधि मिळाली पाहिजे हें स्पष्ट आहे. कायदेभंगाची चळवळ थांबवावी किंवा हल्लींप्रमाणें चालू ठेवावी हा त्यानंतरचा प्रश्न होय."

# कायदेभंगाची चळवळ आता थांबवावी !

## लेखांक ३ रा

कायदेभंगाची चळवळ थांबवावी असें म्हणणारांवर एक ठराविक आक्षेप येण्याचा संभव आहे. तो हा कीं, आम्ही राष्ट्राचा हा तेजोभंग करीत आहों. त्यावर आमचें उत्तर अगदीं स्पष्ट व सरळ आहे. कोणतीहि चळवळ सुरू झाली म्हणजे प्रथम कांहीं दिवस तिला तेजस्वीपणाचें स्वरूप असतें हें खरें आहे. आणि त्या स्थितींत ती थांबवावी असा सल्लाहि कोणी देत नाहीं. पण तिचें हें स्वरूप तेजस्वी राहण्याला ज्या स्वाभाविक मर्यादा आहेत त्या तिच्या पुढाऱ्यांनी ओळखाव्या लागतात. आणि त्या न ओळखून केवळ आग्रहानें ती चळवळ त्यांनी तशीच पुढे चालू ठेवली, तर त्यानंतर तिच्या तेजापेक्षा तिच्या कमकुवतपणाच अधिक प्रतीत होऊं लागतो. हल्लींच्या चळवळीचें आता असेंच झालें आहे असें आम्हांला वाटतें. प्रतिपक्षी जोपर्यंत एकमेकांचें अवसान न कळता झगडत असतात, तोंपर्यंत तें तेज कायम राहतें. पण एक झगडणारा दुसऱ्याच्या आटोक्यांत गेला असें स्पष्ट झाल्यावर, झगडा चालू ठेवला तर तो पाहणाराच्या मनांत कौतुकापेक्षा कींवच अधिक उत्पन्न होते.

यावर कोणी म्हणेल कीं लढणारा लढतो, व सोसणारा सोसतो, मग तुम्हा बघणारांला त्याची कींव कां यावी ? त्याला आमचें पहिलें उत्तर हें कीं, चळवळ चालू असतां तिच्या चढत्या काळांत आपलेपणामुळे अभिमान वाटणें हा जसा बघणाराचा सहज मनोधर्म आहे तसा, त्याच आपलेपणामुळे, तिच्या पडत्या काळांत तिची कींव येणें हाहि सहज मनोधर्मच आहे. जे युद्धांत शिरतांना आपल्याकडे कोणी पाहत आहे कीं नाहीं याची पर्वाहि करीत नसतील, अशा सात्त्विक वीरांनाच 'आमची कींव तुम्ही कां करता? ' असें विचारून, आपल्या अभिमानी लोकांचा अधिक्षेप करण्याचा अधिकार असतो. पण प्रस्तुत चळवळीसारख्या युद्धांत पडणारांपैकीं तसे खरे किती ? आजबाजूला न पाहतां, कोणाच्या सहानुभूतीची अपेक्षा न ठेवतां, लोकैषणा यत्किंचितहि न बाळगतां, आणि चळवळींत पडण्यापासून होणाऱ्या संभवनीय स्वार्थी अहंकारनिष्ठ फलाची अपेक्षा न करतां, जो या चळवळींत पडणारा असेल त्याला लोकांच्या स्तुतीची किंमत वाटणार नाहीं; आणि त्याचप्रमाणे आपली कोणी सहानुभूतीने कींव केली तरी तिजमुळे आपला तेजोभंग झाला, अशी तक्रारहि तो करणार नाहीं.

असे केवळ सात्त्विक व धीर वृत्तीचे कांहीं महात्मे याहि चळवळींत आहेत याविषयी आम्हांला शंका नाहीं. पण वरील वर्णन ज्यांना लागू पडत नाहीं असे किती तरी लोक या चळवळींत पडतात, ही माहिती ज्यांना आहे त्याना अशांची कींव करावीशी वाटली तर त्यानी कां करूं नये ? या पक्क्या--कच्च्यांची अशी खिचडी होण्याचें कारण हेंच कीं, चळवळ सामुदायिक म्हणून योजली व चालली आहे हे होय. तिजमध्ये पडणारे बरेचसे लोक विवेकनिष्ठ निश्चयाने पडत नाहीत. ते केवळ

लोंढ्याबरोबर वाहवत जाणारे व भावनावश असतात. आणि कांही तर तुरुंगांत गेल्यावर आपण कोणत्या तरी प्रसंगाने, कोणत्या तरी निमित्ताने, किंवा कोणाच्या तरी खटपटीने सुटूं,अशी अपेक्षा मनांत ठेवून काळ कंठतात. अशा लोकांबद्दल सहानुभूति कां वाटूं नये? किंबहुना अशा लोकांचें तुरुंगांतील जीवित अशा सहानुभूतीवर व अवलंबून असतें.आणि तें तसें असतें म्हणूनच, बाहेर इतरांकडून त्यांच्या सुटकेची खटपट जाहीर रीतीनें सुरू असते. प्रस्तुत चळवळीच्या पुढाऱ्यांना ती थांबविण्याचा सल्ला हा जर खरोखर आपला तेजोभंग वाटत असेल, तर त्यांनी पहिली गोष्ट ही करावी कीं, "तुरुंगांतील राजबंद्यांची सुटका करण्या विषयीं लोकांनी सभांतून ठराव किंवा कायदे-मंडळांतून खटपट करणें हा चळवळीचा तेजोभंग होतो, म्हणून कोणीहि तसली गोष्ट करूं नये" असें फर्मानच काढावें. म्हणजे मग लोक त्या भानगडींत कशाला पडतील? कारण धावत्याचा पाय विनाकारण ओढावा, किंवा प्रकाशमानाच्या प्रकाशाचे आड येऊन त्यांचें तेज लववावें असा कोणाचाच हेतु नसतो. निदान कॉंग्रेस-विषयीं यथायोग्य अभिमान वाटणारांचा तरी तसा हेतु नसतो, हें कोणासहि कबूल करावें लागेल.

पण असें फर्मान खरोखर निघालें, व तुरुंगात जाणारासंबंधाने सहानुभति प्रकट करणें हें या फर्मानामुळें लोकांनी थांबविलें, तर त्याचा परिणाम चळवळीवर काय होईल याचा विचारच चळवळीच्या पुढाऱ्यांना करावा लागेल. अर्थात् चळवळीला सहानुभूति दाखविणें हा जोंपर्यंत राष्ट्रीय गुन्हा नाहीं (सरकारी गुन्ह्याच्या दृष्टीनें आम्हीं बोलत नाहीं) तोंपर्यंत चळवळ अमुक एका स्थितींत थांबवा म्हणणें हाहि गुन्हा होऊं शकत नाही. चळवळ वाढविताना तुम्हांला समाजाच्या मदतीची अपेक्षा असते, त्याअर्थी ती अमुक एका स्थितींत थांबवावी असें म्हणण्याचा, म्हणजे अर्थात् फक्त सल्ला देण्याचा, मतप्रकाशनाचा, तरी हक्क व अधिकार समाजाला आहे असें तुम्हांला कबूल करावें लागेल. निदान हा जो सल्ला दिला जातो तो, चळवळीचें स्वरूप सामुदायिक असें ठेवलें जातें व तें सामुदायिक राहावें म्हणून चळवळींत लोकांना ओढण्याढकलण्याचा प्रयत्न केला जातो, या गोष्टीला उद्देशूनच असतो. कारण आम्ही प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें, केवळ विवेकनिष्ठ धीर वृत्तीचे स्वयंप्रेरित लोकच यांत पडते तर गोष्ट वेगळी होती. आणि या वर्णनांत न पडणाऱ्या लोकांपुरताच चळवळ थांबवा म्हणणारांचा सल्ला असता, असेंहि वाटल्यास चळवळीच्या पुढाऱ्यांनी खुशाल समजावें.

यानतर असाहि एक प्रश्न उत्पन्न करण्यांत येऊं शकतो कीं, चळवळ चालविण्याचा उघड आग्रह धरणारे व ती थांबवा असा उघड सल्ला देणारे, म्हणजे अशा दुहेरी रीतीने उघड दिसून पडणोर, प्रतिपक्षी सोडले तर बाकीच्या समाजाला काय वाटतें? या प्रश्नाचा निकाल सभा भरवून मतें मोजून हाण्यासारखा नाही हें अर्थात् उघड आहे. किंबहुना अशा गोष्टीला सरकारी दडपशाही कायद्याची हल्ली फार मोठी नडच आहे यांत शंका नाही. कारण या प्रश्नाच्या निर्णयासाठी सभा भरण्यालाच बंदी न झाली तरी चळवळ थांबवा म्हणणारांना धोका नाही, पण चळवळ थांबवूं नये म्हणणाराला हटकून धोका येणार! म्हणून या प्रश्नावर उघड मतें घेऊन त्याचा निर्णय लावणें अशक्य आहे. पण इतर रीतीने जें मूक मत-प्रकाशन होण्यासारखें आहे, त्यांत आज चळवळ थांबवा म्हणणारांचीच संख्या अधिक भरेल असें आम्हांला वाटतें. यांतहि अर्थात् फिरून एक श्लेष आहेच. तो असा कीं, आपल्या मताची जबाबदारी पत्करणारे आणि ती पार पाडणारे असे जे लोक असतील त्यांचींच मतें चळवळ चालविण्याच्या बाजूला ग्राह्य व अनुकूल धरली पाहिजेत. एरवी भावनावशत्वामुळे, किंवा परस्पर गंमत होते ती पाहावी या हेतूने, 'हूं, चालू द्या कीं चळवळ अजूनहि' असें म्हणणारेहि कांही लोक असतात! पण विवेचक पुढाऱ्यांना हीं मतें जमेस धरितां येत नाहीत.

एका तत्त्ववेत्त्यानें असें म्हटलें आहे कीं, "मनुष्याला सर्वांत अधिक कोणती गोष्ट आवडत असेल तर ती ही कीं, स्वतः अधिकांत अधिक सुरक्षित असतां इतरांवर आलेला अधिकांत अधिक फजितीचा किंबहुना संकटाचा प्रसंग!" इंग्रज ग्रंथकार बेकन यानें हीच गोष्ट सांगतांना उदाहरण दिलें आहे तें असें कीं, "आपण स्वतः डोंगराच्या माथ्यावर बसून, समोर शेजारीं समुद्रांत गलबत बुडत असलेलें पाहणें." अशा उदाहरणांत मनुष्याची बुद्धि दिसून येते ती केवळ दुष्टपणाचीच असते असें नव्हे, तर अद्भुत अनभव घेण्याची! नवल न्याहाळण्याची! पण हें अद्भुत किंवा नवल हें जादुगाराच्या खेळांतल्या सारखें निरुपद्रवी असेल तर ठीक. पण दुसऱ्यावर येणाऱ्या आपत्तीचें किंवा दुःखाचें स्वरूप त्याला असेल तर, तसला अद्भुत प्रसंग पाहून त्या बिचाऱ्याला केवळ आपल्या कौतुकपूर्ण नजरेचा दुरून मोबदला किंवा बक्षीस दिलें म्हणजे आपलें काम झालें, असें मानण्याची मनोवृत्ति फारशी श्लाघ्य नाही. म्हणून चळवळ थांबवावी असें उघड म्हणणारांचीं मतें जर तुम्हीं

या कामीं ग्राह्य धरणार नाहीं व मोजणार नाहीं, तर स्वतः चळवळींत प्रत्यक्ष न पडतां परस्पर कोंबडीं झुंजवून गंमत पाहणारांचीं मतेंहि वगळलींच पाहिजेत.

ही चळवळ अजूनहि चालू ठेवा असा सल्ला देणारांना जितकी देशहितबुद्धीची चाड आहे तितकीच ती आता थांबवा म्हणणारानाहि आहे. चार ठिकाणीं मधून मधून अजूनहि कोणी पुढे येऊन, कोणी चुकवून पण अखेर तपासांत सापडून, तुरुंगांत जातात ही गोष्ट खरी आहे. इतकेंच काय, पण इतकें मर्यादितच ध्येय जर या चळवळीचें आहे असें तिचे पुढारी म्हणतील, तर ती वाटेल तितके दिवस चालेलहि. तिला मरणच नाहीं असें आम्हीं कबूल करूं. पण चळवळीच्या स्वरूपाविषयीं व कार्याविषयीं तिच्या पुढाऱ्यांची अशीच कल्पना आहे असें आमच्याने म्हणवत नाहीं. दुसरे पक्षीं अशी कोती कल्पनाच ठेवून ती चालवावयाची असें कोणाचें म्हणणें असेल, तर उद्या तिजकडे लोकांचें लक्षहि जात नाहींसें होईल. मग ती थांबवा असें म्हणण्याचा आग्रह तरी कोण धरील? पण मग नुसती कोती कल्पना हाच एकटा आक्षेप तिजवर राहणार नाही. तर दुसराहि आक्षेप असा कीं, स्वतः ती कोत्या स्वरूपाची आणि चळवळीच्या खास हेतूच्या दृष्टीने अपरिणामकारक असतांहि, देशांतील इतर विधायक स्वरूपाच्या कार्याला ती घातक होते.

आज दहा-बारा वर्षांत हाच क्रम चालू आहे. मध्ये कांहीं दिवस, म्हणजे स्वराज्य-पक्षानें कायदेमंडळें काबीज केलीं तेव्हां, राष्ट्रीय चळवळीला विधायक-विध्वंसक असें सजोड स्वरूप लाभलें होतें. आणि समजा उद्या कलकत्त्यास किंवा इतर कोठें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन भरून, तींत कायदेभंग करणारांनी जरूर तेथें कायदेभंग करावा, व त्याच बरोबर मतदार संघ राष्ट्रीय बुद्धीचे बनवून त्यांजकरवीं सर्व सत्तेचीं केंद्रें व कायदेमंडळें काबीज करावीं, असा ठराव केला, तर मग हें लोभनीय असें सजोड स्वरूप राष्ट्रीय चळवळीला राहील. आणि, उदाहरणाकरिता, खुद्द लो. ना. बापूजी अणे यांचेंच मत घेतलें तर ते चळवळीच्या या सजोड स्वरूपाचेच पुरस्कर्ते आहेत असें आम्ही म्हणूं शकतों. समजा, त्यांचा वऱ्हाड प्रांतच घेतला तर त्यांत त्यांनी कायदेभंगाची चळवळ जशी केली, तशीच पूर्वी कौन्सिल-प्रवेशाचीहि चळवळ पुढारीपणानें केली. आणि उद्या तीच चळवळ पुन्हा निघाली तर ते तीहि करतील. किंवा राष्ट्रीय सभेच्या शिस्तीच्या जाळ्यांतून त्यांना बाहेर पडतां न आलें तरी, ते मनाने व सल्लामसलतीने आशीर्वाद तरी खास देतील. पण आमची मुख्य तक्रार हीच कीं, राष्ट्रीय सभेचे कायदे-कौन्सिलावरील बहिष्काराचें जाळें अजून दूर होत नसून, बापूजी अण्यांसारखा विधायक कार्याचा अभिमानीहि त्या जाळ्यांत केवळ शिस्तीने गुरफटून जातो; आणि कायदेभंगाचीचळवळ ही स्वतः कमकुवत असता, भोळ्या भावनावश लोकांच्या अल्पबुद्धीवर घातक परिणाम करून, विधायक राष्ट्रकार्य आजच्याप्रमाणे सर्वस्वी अराष्ट्रीय अशा लोकांच्या हातीं देते ही केवढी हानि होय !

दोन्ही कार्यांकरिता सारख्याच कार्यकर्त्यांच्या जोड्या सजवून, हातांत हात घालून, जर दोन्ही कार्ये राष्ट्रीय सभा करील तर कायदेभंगाच्या चळवळीवरचा निम्मा अधिक आक्षेप एकदम कमी होईल. पण इकडे लो. ना. बापूजी अणे पहा, तर तिकडे राजगोपाळाचारीयर पहा! चळवळ चालू असतां राष्ट्रीय सभेचे अध्यक्षपद सोडून अस्पृश्यतेच्या भानगडींत पडतात इतकी राजाजींना कायदेभंगाची कळकळ! आणि कौन्सिल-बहिष्काराचे अध्वर्यु असतां स्वतः बिलाचे मसुदे तयार करकरून, दिल्लीस जा-जाऊन, खासदार सभासदांच्या पाया पड-पडून बिलाला बिनहिशेबी सवलती मिळाव्या म्हणून व्हाइसरॉय साहेबांना याचना करतात, इतकी राजाजींची कौन्सिल बहिष्काराची तळमळ ! तेव्हां यांना खरें विध्वंसक तरी कसें म्हणावें किंवा खरे विधायक तरी कसें म्हणावें ?

असल्या अर्धवट लोकांचें प्रस्थ राष्ट्रीय सभेंत आज माजलेलें असल्यामुळे धड कांहीच कार्य होत नाही. कायदेभंगासारखी चळवळ, ज्या लोकांवर भिस्त व विश्वास ठेवून ती केली जाते असें म्हणण्यांत येते, त्याच लोकांचे-कौन्सिल मतदारसंघ बनलेले असतात. मतदारीचा अधिकार जनतेंत आजहि इतका खोल गेलेला आहे कीं, ज्या खाणींतून विध्वंसकांची माती मिळावयाची तींतूनच विधायकांचीहि सहज मिळणारी आहे. आणि ज्या मातीच्या स्मशानघटिका बनतात तिच्याच, केल्या तर, पुष्पवाटिकेंतील कुंड्याहि कां नाही बनणार? का. भं. च्या चळवळींत उडी घालून पडण्याइतकी जाज्वल्य देशभक्ति, व सर्वस्वाचा होम करण्याइतकी त्याग बुद्धि, ज्या मनुष्यांत आहे त्यांच्यामध्ये राष्ट्रीय बुद्धीचा कणखर उमेदवार कौन्सिल-निवडणुकींत निवडून देण्याचा शहाणपणा का नसेल? आणि निवडणुकींत तर स्वार्थत्यागाचा प्रश्नच नाही; उलट फक्त अधिकार बजावण्याचा आहे. असें असतां कायदेभंगाची चळवळ यशस्वी करण्याची उमेद बाळगणारांनी, अगदीं सहजासहजीं, कौन्सिलें हस्तगत होण्यासारखीं असतां,

त्या कार्याला मात्र एखाद्या शत्रूसारखा विरोध करावा हें आश्चर्यांतलें आश्चर्य नव्हे काय ?

तात्पर्य, आम्ही चळवळ थांबवा म्हणतों तें तिच्या तत्त्वाला विरोध म्हणून नव्हे, तर तिला आजची व भावी स्थिति लक्षांत घेऊन. तसेंच चळवळ करणारांचा तेजोभंग व्हावा म्हणून नव्हे, तर जें काय तेज राष्ट्रांत आहे त्याचा केवळ एकदेशीय उपयोग अतएव दुरुपयोग होऊं नये म्हणून ! या दुहेरी म्हणजे विध्वंसक + विधायक या दोन्ही दृष्टींनी जेव्हां चळवळीचे पुरस्कर्ते उघड बोलूं लागतील, विशेषतः निदान या दोनहि दृष्टि असणारे पुढारी लोक एकदेशीय दृष्टीच्या पुढाऱ्यांचें जें मानेवरून झुगारून देण्यास तयार होतील, आपली स्वतंत्र बुद्धि प्रगट करतील, व राष्ट्राला योग्य मार्गावर आणतील, तेव्हां कायदेभंगाच्या चळवळीसंबंधीचे आक्षेप सर्वस्वी कमी होतील. किंबहुना विशेष प्रसंगींच व निश्चित ध्येय ठेवूनच तिचा उपयोग करतील तर तिला यश येतें व अधिक प्राप्त होईल. आजच्या चळवळीला ध्येय नाहीं, धोरण नाहीं, मुदत नाही, हिशेब नाही. ती कोणा एकट्याच्या लहरीनें निघाली असली तर उद्यां ती कोणा दुकट्याच्या लहरीनें परत घेतां येईल हा खास अनुभवाला पूर्वी आलें आहे व पुढेंहि येईल हें भविष्य आम्ही जाहीर करतों. मग ती आज थांबवावी असें आम्हीं म्हटलें तर त्याचा राग कोणाला कां यावा ?

# स्फुट सूचना

१ सध्या हरएक जिनसाचा भाव एकसारखा उतरत चालला असल्यामुळे शेतकरी वर्ग चिंताक्रांत झाला आहे. त्यांतल्या त्यांत जिरायती शेतकऱ्यांपेक्षा बागायतदार शेतकऱ्यांची स्थिति अधिकच चिंताजनक आहे. कारण त्यांना सरकारांत भराव्या लागणाऱ्या पाणीपट्टीचे दर शेतसाऱ्याच्या मानानें, कितीतरी पटीनीं भारी असतात. या दृष्टीनें त्यांनी आपलें गाऱ्हाणें सरकारापुढें शक्य तितकें लवकर मांडणें अत्यंत जरूर आहे, म्हणून दख्खन कॅनॉल्सवरील बागायतदारांनी आपली परिषद पुणें येथे ता. ५ रोजी आमदार नामदेवराव नवले यांच्या अध्यक्षतेखालीं भरविली. सदर परिषदेंत त्यांनी दोन ठराव पास केले. त्यांपैकीं एक ठराव पाणीपट्टी तहकूब ठेवण्याचा व दुसरा पाणीपट्टीचे दर कमी करण्याचा होता. महाराष्ट्रांतील नळाच्या पाण्यावर बहुधा उंसाचें पीकच काढण्यांत येतें व तें फायदेशीरहि असे. पण गेल्या ५-७ वर्षांत गुळाचा भाव उतरूं लागल्यामुळे, बागाईतदारांना सरकाराची भारी पाणीपट्टी सालोसाल भरणें अशक्य झालें. याकरितां गेल्या वर्षांत सरकारानें त्यांस पाणीपट्टीची तहकुबी दिली. परंतु यंदा मात्र सरकारच्या या सामोपचाराच्या धोरणांत एकदम फेरबदल होऊन बागायतदारांपासून पाणीपट्टीची मागील बाकीहि सक्तीनें वसूल करण्याचा उद्योग सुरू झाला असून, कित्येक ठिकाणीं सरकारी नोकर बागायतदारांच्या गुळाच्या गाड्याहि अडवीत आहेत!

२ बागायतदारांची सांपत्तिक स्थिति गेल्या वर्षापेक्षा यंदा सुधारली असती, तर ही सक्ति क्षणभर कोणी क्षम्य मानली असती. परंतु यंदा गुळाचा भाव इतका उतरला आहे कीं, पल्ल्याला १५-१६ रु. मिळत होते त्याऐवजीं १०-११ रुपयेहि मिळण्याची मारामार पडत आहे. अशा कठीण प्रसंगीं यंदाची पाणीपट्टीच तहकूब ठेवावयाची ती बाजूस राहून, मागील बाकीहि सरकार वसूल करूं लागल्यास बागायतदारांवर जुलमाची परमावधिच झाली म्हणावयाची! याच प्रश्नाबरोबर दुसराहि एक प्रश्न उद्भवतो तो असा कीं, गुळाचा व प्रत्येक उदिमाचा भाव जर इतका उतरला आहे, तर त्या प्रमाणांत पाणीपट्टीचा दरहि उतरावयास नको काय? वास्तविक महाराष्ट्रांतील सर्व कालवे दुष्काळनिवारणार्थ निघाले आहेत. त्यावर खर्च झालेला पैसा दुष्काळनिवारक फंडांतूनच खर्चण्यांत आलेला आहे. असे असता सरकारानें त्यापासून फायद्याचा अभिलाष धरावा हा विसंगतपणा आहेच, पण क्षुद्रपणाहि आहे. म्हणून बागायतदारांनी वर लिहिल्याप्रमाणे पाणीपट्टीच्या तहकुबीच्या माफीचा व पाणीपट्टीचे दर कमी करण्याचा असे दोन ठराव मंजूर केले आहेत. सरकाराच्या हृदयांत दयेचा कांही लवलेश असेल तर त्यानें या ठरावांचा सहानुभूतिपूर्वक विचार केला पाहिजे. इरिगेशन खात्याचे मंत्री मि. पेल यांजकडे बागायतदारांचें शिष्टमंडळ लवकरच जावयाचें आहे. त्या वेळीं सरकाराच्या दयाळुत्वाची पारख होईलच.

# हा काळोख मध्यरात्रीचा कीं पहाटेपूर्वीचा ?

मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांच्या कारकीर्दीचें हें वर्ष शेवटचें असल्यामुळे ते सांप्रत लोकांपासून गोड गोड मेजवान्या घेण्यांत व त्या मेजवान्यांचा मोबदला गोड गोड शब्दांनी देण्यांत गढून गेले आहेत. मुंबई सरकाराचीं वटहुकुमी बिलें पास करून मुंबईच्या कायदेमंडळांतील सभासदांनी सरकारावर केवढे उपकार केले आहेत याचा डंका गव्हर्नरसाहेबांनीं अनेकवार वाजविलाच आहे! सदर कायदेमंडळाची बैठक मुंबईत सध्या सुरू असून ती सर फ्रेड्रिक साइक्स यांच्या अमदानींतील शेवटची समजण्यास हरकत नाही.कारण या बैठकीनंतर दुसऱ्या बैठकीचा योग पुढील पावसाळ्यांत पुण्यास येईल त्या वेळीं साइक्ससाहेब गणेश खिंडीच्या बंगल्यांत चतुःशृंगीवरून वाहणारी हवा खाण्याऐवजीं कदाचित् इंग्लंडच्या कुंद हवेंत कुबटून गेलेले आढळतील. यासाठी साइक्स यांच्या भेटीचा हा शेवटचाच लाभ असें समजून मुंबई कायदेमंडळाच्या सभासदांनी त्यांस सोमवार ता. १३ रोजीं मेजवानी दिली. या मेजवानीच्या वेळीं सर फ्रेड्रिक साइक्स यांनी बऱ्याच मोकळ्या मनाने भाषण केलें. श्रोते भाविक भक्त व प्रेमळ मित्र असल्याचें पाहून साइक्ससाहेबांना काय काय सांगू व किती किती सांगूं असें होऊन गेलें.

गव्हर्नर काय किंवा व्हाइसरॉय काय तो हिंदुस्थानांत पांच वर्षांचा शाळसोबती असतो. तो बडा अधिकारी या नात्याने घोड्यावर बसला असल्यामुळे आपली कारकीर्द इंग्लंडच्या हिताच्या दृष्टीने यशस्वी करण्याच्या नादांत त्याला न्यायान्यायाची व जुलमजबरदस्तीची फिकीर वाटत नसली तरी त्याच्या डोळ्यांवरची ती धुंदी कारकीर्दीच्या अखेरीस जेव्हा उतरते व तो भानावर येऊन सभोंवार पाहूं लागतो तेव्हा त्याला त्याच्या सत्कृत्याबद्दल सात्त्विक समाधान व दुष्कृत्याबद्दल खेद व्हावा हें मनुष्यस्वभावास धरूनच होय यांत शंका नाही. याच मनुष्य-स्वभावाप्रमाणें सर फ्रेड्रिक साइक्स हे गेल्या चार साडेचार वर्षांतील आपल्या कारकीर्दीकडे दृष्टि फेकतील तर त्यांत त्यांनी जनतेकडून बरें म्हणवून घ्यावें असें काय केलेलें आढळेल ? गव्हर्नराच्या जागेची मुदत अवघी पांच वर्षांची असली तरी तीं पांच वर्षे संपवून परत स्वदेशास जातांना आपल्या पश्चात आपल्या प्रांतांतील जनतेने आपणांस तळतळाट देत बसावें अशी इच्छा कोणता गव्हर्नर मनांत बाळगीत असेल? आपल्या राजवटींत प्रजेच्या हिताचें एकहि सत्कृत्य हातून घडलें नाही याची जाणीव साइक्ससाहेबांना अन्तर्यामीं आहे. इतकेंच नव्हे तर तशा अर्थाचे उद्गारहि त्यांनी वरील मेजवानीचे वेळीं केलेल्या भाषणांत काढले आहेत. 'मीं या इलाख्यांत गव्हर्नर म्हणून यावें त्याच वेळीं हा इलाखा प्रचंड राजकीय चळवळींत सांपडावा याला योगायोग म्हणूं नये तर काय म्हणावें?' या अर्थाचीं सूचक वाक्यें साइक्ससाहेबांनी उच्चारलीं तीं त्यांच्या मनांतील खिन्नताच दर्शविणारीं होत.

इलाख्यांत दौऱ्यावर असता ठिकठिकाणच्या म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डे हीं मानपत्रांच्या सुरळ्या त्यांच्या हातांत ठेवोत,किंवा कौन्सिलांतील मूठभर सभासद त्यांना मेजवान्यांचा आग्रह करोत, हें आदरातिथ्य औपचारिक आहे; तें जगांतील व्यवहारांत स्वतःचा बाह्यात्कारीं बोज राखण्याकरिता आवश्यक असलें तरी त्यांत खरें लोकमत प्रतिबिंबित झालेलें नाही याची टोचणी साइक्ससाहेबांच्या हृदयाला देखील लागून राहिली असावी. पण ती टोचणी नुसती लागून उपयोग काय? साइक्स यांची कारकीर्द संपण्यास अजून कांही महिन्यांचा अवकाश आहे त्या अवधींत आपल्या तोंडाची काळोखी पुसून काढण्याचा त्यांनी निश्चय केल्यास ती गोष्ट त्यांच्या आटोक्याबाहेरची आहे असें नाही. त्यांचा या दिशेने कांही विचार चालू असल्याचाहि सुगावा त्यांच्या भाषणांत लागतो. ते म्हणतात, 'आम्हांला हा झगडा शक्य तितका लवकर मिटवून देशांत शांतता प्रस्थापित करावयाची आहे व पुढील राज्यघटनेला स्थिर आधार मिळवून द्यावयाचा आहे. म्हणून हिंदुस्थान

सोडण्यापूर्वी उरलेल्या दिवसांत या बाबतींत मी खटपट करून पाहणार आहें. '

गव्हर्नरसाहेबांचें हें वाक्य किती उमदं आहे! तें उच्चारणाराच्या तोंडांत साखर पडो असेंच कोणीहि म्हणेल. मुंबई इलाख्यांतच काय पण साऱ्या हिंदुस्थानांत शांतता नांदू लागावी अशीच प्रत्येक जण आज आशा करीत आहे. ही शांतता देशांत उदय पावण्याकरिता नवीन राज्यघटनेच्या सुरुवातीचीहि वाट पाहूं नये असें गव्हर्नरसाहेब म्हणत आहेत हेंहि किती उमदें वाक्य ! तें पहिलें वाक्य व हें दुसरें वाक्य हीं दोन्ही वाक्यें इतकीं उमदीं आहेत कीं त्यांपैकीं पहिल्या प्रतीचें कोणतें व दुसऱ्या प्रतीचें कोणतें याचा निर्णय ठरविणेंच कठिण आहे ! नवीन घटना अमलांत येण्यापूर्वीच जळो तें भांडण असें म्हणून झालें गेलें विसरून जावें आणि आपल्या स्लेट पाटीवर लिहिलेली सारी जुनी उजळणी पुसून टाकून नवीन धडा गिरविण्यास सर्वांनी प्रारंभ करावा ही साइक्स यांची इच्छा बिनमोल नाही असे कोण म्हणेल ! साइक्ससाहेबांनी आपल्या भाषणाच्या ओघांत उच्चारलेले कांहीं शब्द व कांहीं वाक्यें हीं मुक्ताफळें व मुक्तामाळा असल्याचाच भास होतो. परंतु प्रश्न येऊन पडतो तो असा कीं, हें सारें घडावें कसें? व तें घडून येण्याचा उपाय कोणता ? ज्याच्या हातांत उपाय योजण्याचें बहुतांशीं सामर्थ्य तोच उपायाचें चिंतन तळमळीनें करूं लागला असता त्याला अशक्य असें काय आहे ?

गव्हर्नरसाहेबांच्या डोक्यांत घोळत आहे तो कायदेभंगाचा प्रस्तुतचा लढा. हा लढा पहिल्या लढ्याप्रमाणे स्वातंत्र्याकरिता सुरू झाला नाही याची माहिती सर्वांना आहेच. व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनी म. गांधींची भेट घेण्याचें नाकारलें म्हणून नाइलाजानें त्यांना व त्यांच्या अनुयायांना कायदेभंगांत उडी घ्यावी लागली. तेव्हा आता या लढ्याचा शेवट करावयाचा तर म. गांधीप्रभृति राजबंद्यांची बिनशर्त सुटका हाच कायदेभंगाला खरा फटका होय.कारण कोणत्याहि प्रकारचा घासाघीस न घालता सरकार वरील राजकीय बंद्यांना बिनशर्त सोडून देईल तर त्याचा एकंदर जनतेवर व राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांवर अनुकूल परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही. कायदेभंगाचा लढा गेलें वर्ष सव्वा वर्ष रेंगाळत पडला आहे. तो चालू असता हजारों लोक तुरुंगांत गेले व तुरुंगांतून बाहेरहि पडले. त्याप्रीत्यर्थ जनतेचें लाखों नव्हे कोट्यवधि रुपयांचें नुकसान झालें. चळवळीची ओढणी सारखी बसल्यामुळे कित्येक कार्यकर्ते जिकीरीला आले, कंटाळले व थकनाहि गेले. कायदेभंग करून तुरुंगांत जाणारांची संख्याहि आटत चालली.

अशा बिकट अवस्थेत राष्ट्रीय सभेच्या बंधमुक्त पुढाऱ्यांचें सत्त्व न पाहता सरकारानें सर्व राजकीय कैद्यांना सोडून दिल्यास ती सरकारची मनोवृत्ति बदलल्याची खूणगांठ समजून राष्ट्रीय सभेच्या जबाबदार पुढाऱ्यांकडून कायदेभंगाची चळवळ बंद ठेवली जाण्याचा पुष्कळ संभव आहे. कारण खुद्द म. गांधी मनोवृत्तीच्या फरकास फार महत्त्व देतात हें सर्वांना माहीतच आहे. मुंबईचे गव्हर्नर या दृष्टीनें थोडीशी कल्पनाशक्ति चालवितील तर त्यांना हें सत्य पटण्यास मुळीच विलंब लागणार नाही. म्हणून गव्हर्नर साहेबांच्या तोंडची वरील मौक्तिकतुल्य वचनें वाचून कोणासहि असें वाटेल कीं सर फ्रेड्रिक साइक्स आपल्या भाषणाचा शेवट गांधीप्रभृतींच्या सुटकेच्या शुभवर्तमानानें करणार असतील. पण छे ! तसें नाही. सर साइक्स यांनी आपल्या तोंडाला गांधीजींच्या सुटकेच्या शब्दांचा विटाळहि होऊं दिला नाही. मुंबई इलाख्यांत स्थापन व्हाव याच्या शांततेची भिस्त त्यांनी आपल्यासमोर बसलेल्या भक्तजनांवर व प्रेमळ मित्रांवरच ठेवलेली दिसते ! ते त्यांस आर्जवून म्हणतात 'सभ्य गृहस्थ हो ! तुम्ही इलाख्यांतील जनतेचे प्रतिनिधि आहांत, तेव्हा शांततेच्या जबाबदारीचा बोजा तुमच्याच डोक्यावर येऊन पडतो !' गव्हर्नरसाहेबांच्या समोर मेजवानीच्या वेळीं बसलेले लोक सभ्य असतील, गृहस्थ असतील व कदाचित् ते लोकप्रतिनिधीहि असतील व तसे ते मेजवानीचें मिष्टान्न खातांनाच काय पण त्यापूर्वीहि दोन वर्षे होते व पुढेहि कांहीं काल राहतीलच. तथापि त्यांच्या हातून शांतता प्रस्थापित करण्याचें जे कार्य गेल्या वर्ष सव्वा वर्षांत झालें नाही तें आता कसें होणार हें फ्रेड्रिक साहेबांनाच माहीत ! पण या ठिकाणीं त्यांनी एक इषारा देऊन ठेवला आहे तो मात्र बराच उद्बोधक आहे.

गेल्या थोड्या वर्षांत जो आपणांस अनुभव आला आहे, व धडा मिळाला आहे त्यापासून आपण सर्वांनी आपला फायदा करून घेतला पाहिजे, असें एक वाक्य साइक्स यांनी मध्यंतरीं म्हटलें असून त्यांतच त्यांच्या एकंदर भाषणाचें सार उतरलें आहे असें समजण्यास हरकत नाही. साइक्स यांच्या वरील वाक्यावर भाष्यच लिहीत बसलें तर त्यांतून कितातरी अर्थ निघतील. 'हिंदी लोकांनी केवढीहि निकराची व स्वार्थत्यागाची चळवळ सुरू केली तरी सरकार आपल्या सत्तेच्या जोरावर ती चिरडून टाकण्यास समर्थ असल्यामुळे अशा

चळवळीच्या भरीस पडण्यापासून फायदा काय ? ' असें साइक्स यांनी उघडपणें आपल्या भाषणांत कोठेहि म्हटलें नाही हें खरें. तथापि तसा अर्थ वरील वाक्यांतून ध्वनित होणार नाही असें नाही. परंतु वरील वाक्यांतील एवढा श्लेष वगळून त्यांनी इतर मुद्द्यांचा खुलासा आपल्या भाषणाच्या उरलेल्या भागांत विस्तारपूर्वक केला असल्यामुळे त्यांना श्रोतृवृंदाच्या मनावर काय ठसवावयाचें आहे याविषयीं शंकाच राहत नाही.

गेल्या थोड्या वर्षांत मुसलमानांनी मुंबईस व इतर कित्येक शहरीं दंगे करून अंगावर कांटा आणणारे अत्याचार केले ते जनतेच्य मुद्दाम नजरेला आणून व हिंदु-मुसलमानांतील दुहीवरबोट ठेवून त्यांना असें सिद्ध करावयाचें आहे कीं हिंदी लोकांत भयंकर दुही असल्यामुळे लोकशाही राज्यपद्धतीचे अधिकार एकदम घाईघाईने त्यांना देऊन टाकल्यास ते त्यांस नीट रीतीने चालविता न येऊन देशांत अंदाधुंदी व बखेडा माजेल याची वाट काय ? चिनांत लोकनियंत्रित स्वराज्य एकदम स्थापन झाल्याने कसला घोटाळा माजून राहिला आहे तो हिंदी लोकांनी लक्षांत आणावा. राष्ट्रीय सभा मागते त्याप्रमाणे इंग्रजसरकार हिंदी लोकांस पूर्ण स्वराज्य अगर डोमीनियन स्टेटस एकदम देईल तर चीनसारखाच घोटाळा व अनर्थ हिंदुस्थानांतहि माजल्याशिवाय राहणार नाही. यासाठी राष्ट्रीय सभेची पूर्ण स्वराज्याची मागणी अविचाराची व अहितकारक असून इंग्रज लोक देत आहेत त्याप्रमाणे स्वराज्याचा एक एक घास तोंडांत घालून गुराप्रमाणें रवंथ करीत बसणेंच हिंदुस्थानाला श्रेयस्कर असल्याकारणाने नवीन सुधारणांचा हप्ता त्या धोरणास अनुसरून माफक ठेवण्यांत आला असल्याचें गव्हर्नरसाहेब मुंबई इलाख्यांतील लोकांना बजावून सांगत आहेत.

ते शिवाय असेंहि म्हणतात कीं इंग्रज लोकांचा हिंदी लोकांना फसविण्याचा किंवा भुलथापा देण्याचा मुळीच हेतु नाही. हिंदुस्थानास स्वराज्य शक्य तितकें लवकर उपभोगावयास मिळावें याची आतुरता इंग्रजांना इतकी लागून राहिली आहे कीं त्यामुळे ते हिंदी लोकांच्या लायकीपेक्षांहि स्वराज्याचा अधिक मोठा घास त्यांस भरवावयास तयार झाले असून तो मोठा घास गिळतांना त्यांना ठसका बसतो कीं त्यांचा प्राण कासावीस होतो याचीच भीति इंग्रज लोकांना पडली आहे. यासाठी हिंदुस्थानाने त्यांच्या तोंडांत पडणारा हा मोठा घास बिनधोक गिळून व पचवून दाखविला म्हणजेच त्याने जंगी करामत केली असें इंग्रज लोक समजतील. सारांश हिंदुस्थानास स्वराज्याचे हक्क दमादमानेच मिळणार, ते एकदम मिळण्याकरिता हिंदी पुढाऱ्यांनी केवढीहि खटपट केली तरी इंग्रज लोक ती चालूं देणार नाहींत, प्रांतांना स्वायत्तता मिळेल, पण सर्व प्रांतांना एका शिस्तींत राखण्याकरिता सगळया देशाची मध्यवर्ती मुख्य सत्ता इंग्रज लोक आपल्याच हातांत ठेवतील असें साइक्ससाहेबांच्या सांगण्याचे सार आहे.

साइक्ससाहेबांचा वरील आशय लक्षांत घेतला असता ते ज्या प्रकारच्या शांततेची व सलोख्याची अपेक्षा करतात ती फलद्रूप होण्याची आशा मुळीच उरत नाही. राष्ट्रीय सभेचे पुढारी त्यांनी सांगितलेल्या राज्यपद्धतीच्या साच्यांत बसावयास कबूल होण्यावर त्यांची मुटका गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स व व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन अवलंबून ठेवणार असतील तर त्यांची कबुली मिळण्याचा संभव नाही. इतकेंच काय पण नवीन राज्यपद्धति अमलांत आल्यानंतरहि तिजवर असंतुष्ट असणारा हिंदी लोकांचा फार मोठा वर्ग शिल्लक राहणार हे स्पष्ट आहे. साइक्ससाहेबांनी वर्णिल्या त्या प्रकारच्याच सुधारणा हिंदुस्थानांत दृष्टीस पडावयाच्या असतील तर राष्ट्रीय सभाभक्त राहोतच, पण नेमस्तादि इतर पक्षहि नाराज बनून सरकारास हटकून विरोध करतील असें मुंबई, पुणें इत्यादि ठिकाणीं भरलेल्या जाहीर सभांतून निदर्शनास आलेंच आहे. तेव्हा नवीन राजकीय सुधारणांनी व दडपशाहीच्या दबकावणीने देशांत शांतता नांदू लागेल ही साइक्स यांची समजूत साफ खोटी आहे.

स्वराज्यासाठी एकदा सुरू झालेलें युद्ध पूर्ण स्वराज्याची प्राप्ती झाल्याशिवाय थांबत नाही असा इतिहासाचा अनुभव आहे. खेरीज हिंदी स्वराज्याचा विषयहि इतका नाजूक व जबाबदारीच आहे कीं, तो साइक्स साहेबांच्या आटोक्याबाहेरचाच समजला पाहिजे. तेव्हां त्यांनी त्या भानगडींत न शिरलेंलेंच बरें. म. गांधी प्रभृति पुढाऱ्यांची मुटका करणें मात्र बऱ्याच अंशी त्यांच्या स्वाधीनचें आहे. त्यांच्या सुटकेचा प्रयत्न त्यांनी करावा व त्यांत यश जोडावें. गांधी किंवा त्यांचे अनुयायी हे एखाद्या शस्त्रधारी शत्रूप्रमाणें सुटका झाल्याबरोबर सैन्य व आरमार जमवून इंग्रज सरकाराबरोबर लढण्यासाठीं उभे राहणारे नव्हत. त्यांची सुटका झाल्यावर कदाचित् पुनः कायदेभंगाची चळवळ ते हातीं घेतील तर त्यांस पकडून तुरुंगांत ठेवण्यास सरकारचे हात कांही आंखूड नाहीत. आपल्या कारकीर्दीचा शेवट गोड व्हावा व दडपशाहीची काळरात्र संपून शांततेची पहाट फुटावी अशी साइक्स यांची मनःपूर्वक इच्छा असेल तर ती पूर्ण होण्याचा उपाय हा आहे, कायदे मंडळांतील सभासदांना सहकार्यासाठी आळविणें हा नव्हे !

# अमेरिकेंतील आर्थिक क्रांति कशी झाली ?

**( ले.—अर्थशास्त्राचा एक अभ्यासक )**

अमेरिकेचे नवे अध्यक्ष मि. रूझवेल्ट हे अध्यक्ष-पदारूढ होण्याचे वेळीच अमेरिकेवर आर्थिक अरिष्ट कोसळलें हें मोठें दुर्दैवच होय कारण गेली दोनतीन वर्षे या आर्थिक दु:स्थितीच्या फेऱ्यांत अनेक राष्ट्रें सांपडलीं व तिचे परिणाम अमेरिका, फ्रान्स या संपन्न राष्ट्रांनासुद्धा सोसावे लागले. परंतु हीं दोन राष्ट्रें निदान कातडी बचावन होतीं. जगांतील ३/४ सोनें फ्रान्स व अमेरिका या सारख्या दोनचार राष्ट्रांनीं आपल्या बँकेच्या तळघरांत आणून ठेवलें. आणि पुढे अमेरिका व फ्रान्स यांमध्येहि चढाओढ सुरू झाली. इंग्लंडाला आपण या चढाओढींत टिकत नाहीं असें दिसूं लागतांच त्यानें पौंडाचा सोन्याशीं कायद्यानें जडलेला संबंध तोडला. आजतागायत ४५ राष्ट्रांच्या चलनांचीं सोन्यापासून फारकत झाली आहे. अमेरिका हें सर्वांत संपत्तिवान् राष्ट्र व इंग्लंडाचें सावकार, यामुळे अमेरिकेला इंग्लंडाची आर्थिक दु:स्थिति पाहून हायसें वाटेल. वस्तूंच्या किंमती उतरत चालल्या. इंग्लंडाला अमेरिकेचें देणें असल्याकारणानें, अधिक माल पाठविणें अगर सोन्याच्या लगडी पाठविणें भाग पडलें. पण ऋणको राष्ट्रांना दांतीं तृण धरून शरण आणण्या-करितां अमेरिकेनें सोन्याची अनावर हाव धरली, व सोनें मिळेल तेवढें सांचविण्याचा घाट घातला. सोनें एके ठिकाणींच जमल्यामुळे बाजारांतील पतीचे व्यवहाराला बराच आळा बसला. अमेरिकें-तहि वस्तूंचे व धान्यांचे भाव उतरूं लागले. ऋणको राष्ट्रांनीं अमेरिकेला द्यावयाच्या कर्जाच्या हप्त्याची तहकुबी मागितली व ती अमेरिकेला देणें भाग पडलें. अर्थात् याचाहि परिणाम अमेरिकेंतील पतीचे व्यवहारावर झाला. व बाजारभाव इतर राष्ट्रांपेक्षा अमेरिकेंत थोडे अधिक उतरले.

***

१९३१ सप्टेंबरनंतर इंग्लंडांत मालाच्या पौंडांतील किंमती ( स्टर्लिंग प्राइसेस ) बऱ्याचशा स्थिर राहिल्या. पण अमेरिकेंत मालाच्या सोन्यांतील किंमती ( गोल्ड प्राइसेस ) ७२ वरून ६४ वर आल्या. यामुळें अमेरिकेंत बाजाराच्या सुस्थितीला लागणारा विश्वास उडत चालला. बजेटांत चालू सालीं बेसुमार तूट आली. १९३१ मध्ये ३४८ कोटी डॉलर्सचें सोनें अमेरिकेपाशीं होतें तें घटत घटत गेल्या जुलईंत २५७ कोटींवर आलें. पुनः अमेरिकेनें परराष्ट्रांतील देणेदारांकडून कर्ज वसूल करण्यास सुरुवात केली, तेव्हा तें ३१७ कोटींवर चढलें. पण पुनः घसरगुंडी सुरू झाली. धान्याचे व वस्तूंचे भाव उतरत चालले, व्यापारांतील अविश्वास वाढून बँकेंतून पैसे व सोनें काढण्यास खातेदारांनी सुरुवात केली. अमेरिका हें जितकें औद्योगिक राष्ट्र आहे, तितकेंच ते कृषिसंपन्न आहे. यास्तव अमेरिकन बँकांनी आपला पैसा शेतजमिनींच्या तारणांवर गुंतविला. धान्यांच्या किंमती उतरल्या. त्याचप्रमाणे जमिनींच्या किमतीहि उतरल्या. जमिनी विकूनहि बँकांचे पैसे उभे राहणें कठिण झाल्यामुळे बँकांच्या हातचा पैसा जमिनींत जाऊन पडला. व ठेविदारां-पाशीं खातेदारांना देण्याला पैसा हातीं राहिला नाही. तेव्हा नाइलाज होऊन कांहीं संस्थानांनी आपल्या कक्षेतील बँकांचे दरवाजे तीन—तीन दिवस तर कांहींनी १५ दिवस बंद केले आणि कांहींनीं तर बिनमुदत बंद ठेवले. बँकांचे व्यवहार बंद करणें ही एक प्लेग सारखी सांथच आली.

***

या सांथीची पहिली लागण मिचिगन संस्थानां-मध्ये झाली. १९३० सालीं गार्डियन ट्रस्ट कंपनी व युनियन ट्रस्ट कंपनी या दोन कंपन्यांचें एकीकरण करण्यांत आलें. या नवीन बँकेजवळ ६ कोटी डॉलर्सची जिनगी होती. पण प्रसंग असा आला कीं, बँकेच्या चालकांना २॥ कोटी डॉलर्स रोख हातीं ठेवणें भाग पडलें. कारण बँकेच्या खातेदारामध्ये फोर्ड मोटार, जनरल मोटार्स व क्रिसलर कॉर्पोरेशन या तीन कंपन्यांनींच बँकेपाशीं अर्धा अधिक पैसा ठेवला होता. मोटारीचा धंदा बसत चालला, तेव्हा मजुरांची मजुरी कमी करण्यांत येऊं लागली. मजुरांनीं संप केला व कारखाना बंद पडला. कारखानाच चालत नाहीसा झाल्यावर बँकेंतून पैसा काढून चालू देणें फेडणें भाग पडलें. बँकेवर खातेदारांनी गर्दी करून भराभर पैसे काढ-ण्यास सुरुवात केली. बँकेपाशीं रोकड पैसा फारच थोडा असल्यामुळे, फोर्ड मोटार कंपनी व इतर मोटार कंपन्यांचे चालक यांना पैसा तुम्हीहि इतरांचे-बरोबर काढून घेऊं नका असें सुचविण्यांत आलें. पण त्यांनी तें नाकारलें. यामुळे बँकेंत पैशाची तंगी झाली. तेव्हा गव्हर्नराचे परवानगीनें बँकेचे व्यवहार

आठ दिवस बंद ठेवण्यांत आले. ही आर्थिक प्लेगची सांथ नेव्हेडा, न्यू ऑर्लेन्स, कोलंबिया, ओहिओ व इतर संस्थानें यांमध्येंहि पसरत चालली व आता असें एखादें तरी संस्थान अमेरिकेंत असेल नसेल कीं, ज्यामध्ये बँकेचे दरवाजे बंद ठेवले गेले नाहींत, अगर कायदा करून बँकेचे व्यवहारावर नियंत्रण घालण्यांत आलें नाही !

***

१९२९ सालीं अमेरिकेंत २५ हजार बँका होत्या. पण गेल्या ३ वर्षांतच एकेक बँक बंद होत होत सुमारे ७ हजार बँकांना आपले दरवाजे कायमचे बंद करावे लागले आहेत. म्हणजे ही सांथ सुरू झाल्यापासून दररोज चार बँका या सांथींत दगावल्या अशी सरासरी बसते ! अमेरिकेंत बँकांचे दरवाजे बंद होण्याची ही जी सांथ पसरत चालली त्याचें एक मुख्य कारण म्हणजे अमेरिकेंतील पेढीच्या व्यवहारावरील नियंत्रणाचें बाबतींतील बारभाईचा कारभार हें होय. अमेरिकेंत पेढीच्या व्यवहाराचें जाळें खेड्यापाड्यांतून पसरलें आहे ही गोष्ट खरी. पण या पेढीच्या व्यवहारांत एकसूत्रीपणा नाही. गळ्यांतील मोत्याच्या पोताचे पदर सुटे असले तरी ते जर शेवटीं टोकाला एका गोफांत गुंतवून, त्यावर एकच बिरडी नसेल तर पोताचे पदर एके ठिकाणीं भरगच्च झळकून दिसूं शकणार नाहीत. तसेच प्रत्येक पदराला जर वेगवेगळी बिरडी असली तर तो पदर एखाद्या भामट्याला तोडून नेण्याला अधिक सोपा. तसेंच वेगवेगळ्या पदरांतील एकेक मोती फुटूं लागले अगर गळूं लागलें तर ते कळून येण्याचा संभवच कमी. बरें, एखादा मोत्यांचा सर गळला, तुटला अगर कोणीं पळवून नेला तर चटकन् घरधनिणीला तो गळ्यांत असला तरी कळूनहि येणें कठीण. पण पोताचे पदर एका बिरुदावलींत गुंफवलेले असले तर, त्या पोताचें तेज व किंमत सर्व मोत्यांच्या तेजःसमुच्चयावर अवलंबून असते. आणि एखादा पदर सुटला अगर कांही मोत्यें घसरूं लागलीं तर लगेच पटवेकऱ्याकडे जाऊन, तो पोत गुंफवितां येईल व कांही सरांच्या रेशमाचा दोरा कुजला असला तर तो नवीन घालतां येईल. पण अमेरिकेंतील बँकांची स्थिति पहिल्या पोताचे सर एके ठिकाणीं न गुंफवितां वेगवेगळे ठेवले तर जी स्थिति होते त्यासारखी आहे.

***

अमेरिकेंत बँकांचे तीन प्रकार आहेत. (१) 'नॅशनल बँक्स' म्हणजे फेडरल रिझर्व्ह बोर्डाचे देखरेखीखाली चाललेल्या. (२) 'स्टेट बँक्स' म्हणजे निरनिराळ्या संस्थानांतील कायदेमंडळाकडून सनदा मिळवून त्या त्या संस्थानांत पेढीचे व्यवहार करणाऱ्या व त्या त्या कायदेमंडळांचे नियंत्रणाखाली चालणाऱ्या व ( ३ ) ज्या बँकांवर फेडरल रिझर्व्ह बोर्ड व संस्थानी राज्यसत्ता या दोघांचेहि कांही कांही पेढीचे व्यवहारांचे बाबतींत नियंत्रण असणाऱ्या ( ट्रस्ट कंपन्या ). म्हणजे सर्व पेढ्यांना सारखाच कायदा लावतां येत नाही. तेव्हा साहजिकच आपापली आर्थिक स्थिति बिघडूं नये म्हणून संस्थानासंस्थानांतील पेढ्यांमध्येंहि मत्सर व चढाओढ सुरू झाली. एखादा व्यवहार करण्याला फेडरल रिझर्व्ह बोर्डानें संमति दिली नाही तर संस्थानी राज्यसत्तेकडून ती मिळवून घेण्याचा प्रघात पडला. फेडरल रि. बोर्डानें बँक स्थापण्याची कमींत कमी भांडवल-मर्यादा ५० हजार डॉलर्स ठरविली तर संस्थानी राज्यसत्तेनें ५ हजार भांडवलाचीहि अधिकृत पेढी स्थापण्यास परवानगी दिली ! कंट्रोलर ऑफ करन्सीच्या देखरेखीखाली व अधिकृत परवानगीनें कांही बँका चालत असल्या तरी देशांतील चलनाच्या व्यवहारावर या कंट्रोलरसाहेबांचा प्रत्यक्ष ताबा अगर व्यावहारिक संबंध नाहींच म्हटलें तरी चालेल. बरें, बँकेवरील देखरेखीचेहि दोन कायदे. ते म्हणजे ( १ ) नॅशनल बँक ॲक्ट व (२) फेडरल रिझर्व्ह बँक ॲक्ट. आणि तशांत फेडरल रिझर्व्ह बँकेच्या कायद्याचें नियंत्रण फक्त फेडरल रिझर्व्ह बोर्डाच्या सदस्य बँकांवरच चालतें. अशा प्रकारची ही पेढीच्या व्यवहाराच्या वाढत्या व्यापाची स्थिति आहे.

***

या सर्वांचा अर्थ असा कीं, एखाद्या शहरांत मध्यवर्ती जलसंचय असल्यावर त्याचें पाणी, त्याच शहरांतील इतर लहान लहान जलाशयांना अवर्षणाच्या प्रसंगींहि मिळूं शकतें. परंतु तेच सर्व जलाशय स्वतंत्र रीत्या आपल्या ठिकाणीं पाण्याचा पुरवठा करीत असतील तर मध्यवर्ती जलसंचयाच्या अभावीं अवर्षणाच्या वेळीं, त्यांना भरपूर पाणी मिळूं शकणार नाही व त्यामुळे साऱ्या शहरांत एकच हलकल्लोळ माजेल, त्याप्रमाणेच आज अमेरिकेंतील सर्व बँका आपापले व्यवहार स्वतंत्र रीतीनें चालवीत असल्यानें अमेरिकेवर हें अरिष्ट कोसळलें आहे. स्टेट बँकांचा पैसा जमिनीच्या तारणावर गुंतून पडला व धान्याचे भावच उतरले तेव्हा ऋणकोंना पैसे देणें परवडत नाहींसें झालें. पण तारण दिलेल्या जमिनी विकूनहि पैसा उभा राहणें शक्य नाही अशी स्थिति झाली. ठेविदारांना पैसा परत देण्याला बँकांचे हातीं पैसा नाहीसा झाला. सर्व बँकांना मदत करण्याकरिता म्हणून 'रिकन्स्ट्रक्शन

फिनॅन्स कंपनी' स्थापन करण्यांत आली. आणि या योजनेने बँकांवरील कांहीसें अरिष्ट टळलें जाण्याचा संभव होता. पण या रि. फि. कंपनीनें प्रत्येक बँकेला किती कोटींची मदत केली, यांचे आंकडे प्रसिद्ध करावे अशी मागणी अमेरिकन कॉंग्रेसनें केली! व ते आंकडे प्रसिद्ध झाले तेव्हां बँकांच्या ताळेबंदावरून, त्यांना दिलेली ही कर्जाची मदत वाजवीपेक्षा फाजील झाली असें ठेविदारांना वाटूं लागलें. इतकेंच नव्हे तर आपले पैसे बुडतील कीं काय अशीहि भीति वाटूं लागली. एकामागून एक ठेविदार पैसे काढून घेऊं लागला तसतसें अविश्वासाचें वातावरण निर्माण होऊं लागलें. ही अविश्वासाची ठिणगी कापसाच्या वखारींत पडावी, धुराचा लोट निघावा व त्यानंतर आगीचा भडका उडावा त्याप्रमाणें अमेरिकेंत बँकांची स्थिति झाली व दारांना कुलुपें लागू लागलीं. तेव्हां अमेरिकेचे नवे अध्यक्ष रूझवेल्ट यांनी सर्व बँकांचें एकसूत्रीकरण करण्याची एक योजना तयार केली.

***

आंतरराष्ट्रीय व्यापारमंदी, युद्धकर्जाची फेड-तहकुबी, सर्व राष्ट्रांनी वाढविलेल्या संरक्षण भिंती व परराष्ट्रांतून सोनें मिळेल तेवढें लुबाडून आपल्या तळघरांत सांठवून ठेवण्याची हाव, या कारणांमुळे परस्पर राष्ट्रांतील व्यापार खुंटत चालला, पैशाचे व्यवहार मंदावले, पतीचे व्यवहाराला आळा बसला व देशांतील चलनाचा सोन्याशीं जडलेला संबंध तुटूं लागला! अमेरिकेंत राष्ट्रीय चलनावरील लोकांचा विश्वास उडूं लागला, व जिकडे तिकडे अविश्वासाचें वातावरण निर्माण होऊं लागलें. १९३१ सप्टेंबरमध्ये इंग्लंडाला सुवर्णमानपद्धति सोडावी लागली. याचें कारण परराष्ट्रीय धनकोंनी गुंतविलेला पैसा सोन्याच्या रूपानें भराभर घेऊन जाण्यास सुरुवात केली. ही मागणी पुरी करण्याची आशा संपली; तेव्हां इंग्लडानें सोन्याशीं कायद्यानें जडलेला संबंध तोडला! पण आज अमेरिकेंत असा प्रकार झालेला नाही. अमेरिकेच्या पेढीवर परराष्ट्रांची झडप पडलेली नाही. अविश्वासामुळे देशांतील लोकांनीच पेढीवर ठेवलेला पैसा व सोनें काढून घेण्यास सुरुवात केली. व न जाणों कदाचित् हा पैसा परराष्ट्रांत गुंतविलाहि जाईल. म्हणजेच सोनें अमेरिकेंतून बाहेर जाऊं लागेल!

***

यास्तव अमेरिकन सरकारानें सोनें व रुपें यांच्यावर नियंत्रण घालून निर्गत थांबविली. शेंकडा ५-१० टक्केच ठेवींतून पैसा काढतां येईल असेंहि कांही बँकांचे चालकांनी जाहीर केलें. फेडरल रिझर्व्ह बोर्डाच्या सदस्य बँकांना नोकरांचे पगार, खाण्याचे पदार्थ व इतर आवश्यक वस्तूंची देवघेव याकरितां, सोनें अगर सुवर्णपत्रकें (गोल्ड सर्टिफिकेट्स) घेऊन चलनी नोटा जरुरीपुरत्या देण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. चलनी नोटांची इतकी तंगी करण्यांत आली आहे कीं, कांही ठिकाणीं सिनेमाचीं तिकिटें चेकनें देण्यांत आलीं. कांही ठिकाणीं तर वस्तूंची देवघेव सुरू झाली आहे! रूझवेल्ट यांनी पेढीच्या व्यवहाराची पुनर्घटना करण्याकरितां, एक बिल ताबडतोब अमेरिकन कॉंग्रेसला सादर करण्याचें ठरविलें आहे. १३ तारखेपर्यंत बँकांचे व्यवहार ठराविक प्रमाणांतच चालू राहणार आहेत. कॉंग्रेसची बैठक गुरुवार तारीख ९ रोजीं भरली व या सभेत रूझवेल्ट यांनी आपलें धोरण जाहीर केलें.

***

सोन्या-रुप्याच्या निर्गतीवर नियंत्रण घातलें याचाच अर्थ तत्त्वतः अमेरिकेनें सुवर्णमानपद्धति सोडली. कारण सुवर्णमानपद्धति चालू आहे असें म्हणावयाचें तर, अंतर्गत अगर परराष्ट्रीय सोन्याचा क्रय-विक्रय होण्याला अगर सोन्याची आयात निर्गत होण्याला, स्वतंत्रता ठेवण्यांत आली पाहिजे. ती स्वतंत्रता ठेवण्यांत आलेली नाही. धान्यांच्या व वस्तूंच्या किंमती वाढवाव्या अशा तऱ्हेची चळवळ सुरू झाली आहे. आणि किंमती वाढवावयाच्या तर सुवर्णमानपद्धति सोडणें अगर देशांतील चलन वाढवणें हे दोनच मार्ग शिल्लक उरतात. यांपैकीं पहिला मार्ग इतर राष्ट्रांप्रमाणें अमेरिकेनें अवलंबिला तर एक मोठीच आपत्ति ओढवेल. आणि मग अमेरिकेबरोबर फ्रान्सलाहि सुवर्णमानपद्धति सोडावी लागेल. मग येऊनजाऊन सुवर्णमानपद्धतीला महत्त्व देणारीं अशीं हॉलंड, बेल्जम, इटाली, स्वित्झर्लंड हींच काय तीं चारदोन राष्ट्रें शिल्लक राहतील. फ्रान्सनें या मार्गाचा अवलंब केला नाही, तोंपर्यंत सोन्याची किंमत स्टर्लिंग-फ्रँकचे प्रमाणांत मोजली जाईल. व फ्रान्सनें हाच मार्ग अवलंबिला तर, सोनें ही एक इतर वस्तूप्रमाणें बाजारांतील देवघेवीची वस्तु होऊन बसेल. व तदनंतर सोन्याची किंमत घटूं लागेल. आणि असें झालें म्हणजे सर जॉर्ज शूस्टर यांना हिंदुस्थानाच्या शेतकऱ्यांजवळील सोन्यावर झडप घालून, जी पत राखतां येते तीहि राखतां येणार नाही!

***

डॉलरची किंमत उतरूं लागेल हें दिसतच आहे. पण जोंपर्यंत परराष्ट्रीय बँकेचा व्यवहार

सुरू झाला नाही, म्हणजे अमेरिकेंतील हुंड्यांची देवघेव इतर राष्ट्रांतून होऊं लागली नाही तोंपर्यंत डॉलरची किंमत अमुक एक प्रमाणांत उतरली असें म्हणतां येणार नाही. तसेंच पौंड-डॉलरचा हल्लींचा दर ( १ पौंड=३·४० ) असाच राहिला तर ठीकच आहे. पण पौंडाला डॉलर जास्त मिळूं लागले याचा अर्थ डॉलरची किंमत कमी झाली तर हिंदुस्थानांत अमेरिकेंतून येणारा माल अधिक स्वस्त होईल. व आज जपानी येनचा भाव कमी झाल्यामुळे, त्या राष्ट्राने जशी रंग, व्हार्निश, चिनी मातीच्या कपबशा, पेन्सिली, ब्रश, कापड व कृत्रिम रेशीम या मालाची बाजारपेठ हिरावून घेण्याचा उपक्रम चालविला आहे, तसाच उपक्रम अमेरिकाहि करील यांत तिळमात्र शंका नाही. पण अमेरिकेने चलनी नोटा फाजील प्रमाणांत वाढविल्या, धान्याच्या व वस्तूंच्या किंमती अमेरिकेंत वाढल्या तर सर्व राष्ट्रांत थोड्याफार प्रमाणांत या किंमती वाढत जातील यांत शंका नाही. पण हिंदुस्थानाच्या दृष्टीने याचा एक परिणाम असा होईल कीं, डॉलरच्या बरोबर पौंड व पौंडाबरोबर रुपया यांचीहि किंमत न उतरली तर अमेरिकन कापूस हिंदुस्थानांत स्वस्त मिळूं लागेल! तेव्हा ह्या आर्थिक अरिष्टाचे परिणाम कोठवर भोगावे लागणार आहेत हें आजच निश्चित कांही सांगतां येत नाही. तूर्त एवढें मात्र खरें कीं, जागतिक आर्थिक परिषद यशस्वी होण्याचीं चिन्हें दिवसेंदिवस दुरावूं लागलीं आहेत.

# महात्मा गांधींना इषारा

## ( पांगारकर व गांधी यांजमधील पत्रव्यवहार )

नाशिक येथून ता. १६ जानेवारी रोजीं " मुमुक्षु " कर्ते ह. भ. प. श्री. ल. रा. पांगारकर यांनी म. गांधींना अस्पृश्यतानिवारणासंबंधी एक पत्र पाठविलें त्याचा मथितार्थ पुढे दिला आहे—

(१) तुम्ही आपल्याभोंवती कांही समाजसुधारक, आर्यसमाजिस्ट आणि सुशिक्षित गृहस्थ यांचा मेळा गोळा केला आहे. ह्या लोकांनी हिंदूंच्या सनातन आचारविचाराचा त्याग केलेला आहे. अशा लोकांच्या साहाय्यानें तुम्ही हिंदूंच्या देवालयांना सुरुंग लावूं पाहत आहां. पण मी तुम्हांला ठासून सांगतां कीं, शेकडा ९० स्पृश्य लोक सध्या मंदिरप्रवेशाचे विरोधी आहेत.

(२) अशा स्पृश्य लोकांची सहानुभूति मिळवून तुम्हांला तिचा उपयोग हिंदुस्थानाचें राजकीय व आर्थिक पुनरुज्जीवन करण्याचे कामी किती तरी करतां आला असता. पण तुम्ही त्यांच्या मनोभावनेवर मोठा आघात केला आहे. केवळ हिंदु समाजापुरती अस्पृश्यतानिवारणाची चळवळ असतांहि तुम्ही ती सामाजिक चळवळ कॉंग्रेसच्या हातीं सोंपविली. कॉंग्रेसमध्ये भिन्न भिन्न जातीचा व मतांचा अंतर्भाव आहे. आपल्या या कृत्याने स्पृश्य समाजांत कॉंग्रेस अप्रिय झालीच आहे. पण आता तर तुम्हीं तिच्या मस्तकावर वज्राघातच केला आहे.

( ३ ) न्या. रानडे, लो. टिळक, ना. गोखले हेहि समाजसुधारक होते, नव्हते असें नाही. पण त्यांनी आपली राजकीय चळवळ ही सामाजिक किंवा धार्मिक चळवळीपासून अलिप्त ठेविली होती. समाज आहे तसाच स्वीकारला पाहिजे. अकस्मात उलथापालथ करूं पाहणें ऐक्याला विघातक ठरतें.

( ४ ) महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तर ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम यांना लोक द्रष्टे, विभूति व अवतार असें मानतात. त्यांचा शब्द हा वेदवाक्य होय. त्यांचीं चरित्रें म्हणजे आत्मोन्नतीचे हिमालयच होत. भूतदयेची भागीरथी त्यांच्या अंतःकरणांतून स्रवत होती. तरी ते संकराला विरुद्ध होते. वर्णाश्रम धर्मसंस्था व जातिभेद यांचा त्यांनी पुरस्कार केला. मात्र अस्पृश्यांचा कधी अव्हेर झाला असें समजूं नका. रोहिदास, चोखामेळा या अस्पृश्यांना केवढा मान हिंदु समाज देतो ! 'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म' हें हिंदूंचें ब्रीद, समतेचें व बंधुतेचें व्रत, त्यांच्या इतकें कोणी क्वचितच पाळीत असेल. पण आचारधर्म व संस्कारशुद्धि यांच्या दृष्टीने विषमता येणारच. भेद आत्मा-आत्म्यांत नाही, देहा-देहांत आहे.

### म. गांधींचें उत्तर

या पत्राला म. गांधींनी ता. २० जानेवारी रोजीं पुढील आशयाचें उत्तर दिलें—

" आपल्या पत्राचा प्रारंभ चुकीच्या विधानाने झाला आहे; आणि तसाच त्याचा शेवटहि झाला आहे. माझ्याभोंवती मी ईश्वराखेरीज कोणालाहि गोळा केलेलें नाही. आपण कोणाला उद्देशून लिहितां त्यांचीं नांवे मला कळवाल तर बरें. प्रचलित असलेली अस्पृश्यता हें एक पातक आहे, या सत्याचा प्रकाश ५० वर्षांपूर्वी माझ्या मनांत पडला. त्या वेळीं माझेभोंवती कोण होतें असें आपणाला वाटतें?

शेंकडा ९० स्पृश्य मंदिरप्रवेशाच्या विरुद्ध आहेत असें म्हणण्याला आपल्याला काय आधार आहे? आणि ते असले आणि मी एकटा एक असलों तरी अस्पृश्यतेशीं झगडण्यास मला प्रत्यवाय कोणता?

कॉंग्रेसने १९२० सालीं अस्पृश्यतेची चळवळ आपली म्हणून स्वीकारली. पण तेव्हापासून तिच्या लोकप्रियतेला उतरती कळा लागल्याचें मला कांहीं माहीत नाहीं.

महाराष्ट्र-संतांची शिकवण मी थोडी-बहुत जाणतों. पण ती तुम्हांला मिळालेल्या शिकवणीच्या अगदी उलट आहे. हा कांहीं नवीन अनुभव नाहीं. ईश्वराची शिकवण असते तशी लोक स्वीकारतात असें नव्हे तर आपल्याला जें शिकावयाचें आहे तेवढेंच ते ईश्वरापासून शिकतात.

मी वर्णाश्रमधर्माचा विध्वंसक नाही. [illegible] पुनरुज्जीवन व्हावें म्हणून त्याच्यांतील अस्पृश्य[illegible] तच्या दोषाचा मात्र मी विध्वंस करीत आहें."

या उत्तराला श्री. पांगारकर यांनी ता. २-२ रोजीं एक प्रत्युत्तर म. गांधींना पाठविलें आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं, "नाशिकच्या सत्याग्रहांत स्पृश्यास्पृश्यांच्या मारामाऱ्या झाल्या. तोच प्रकार तुमच्या कृत्यानें होईल. तुमची अहिंसेची कल्पना वेदाला असंमत आहे. आत्मसंरक्षणासाठीहि अहिंसात्याग करूं नये, अशी एकांतिक व्याख्या तुम्ही करतां, त्यामुळे एक लाखाहून अधिक लोक फुकटाफुकट हाल काढीत आहेत. बेकीची वाढ करूं नका."

## वर्णाश्रम स्वराज्यसंघाची बैठक

महाराष्ट्र वर्णाश्रम स्वराज्य संघाचे अध्यक्ष श्री. विश्वासराव डावरे यांनीं पुढील आशयाची तार दिल्लीहून पाठविली आहे. "वर्णाश्रम स्वराज्य संघाच्या जादा अधिवेशनाचे नियोजित अध्यक्ष भयंकर अनंताचार्य यांचें ता. १५ रोजीं दिल्ली येथे मोठ्या थाटाचें स्वागत करण्यांत आलें. अधिवेशनासाठी जगन्नाथपुरीचे शंकराचार्यहि आले आहेत. मद्रास, गुरुवायूर, पालघाट, बेझवाडा, पुणें, सातारा, मुंबई, नाशिक, अकोला, खांडवा, नागपूर, अमदाबाद, सुरत, काठेवाड, जयपूर, सिद्धपूर, अलवार, प्रभासपट्टण, मारवाड, मीरत, कानपूर, अमृतसर, हरद्वार, इटावा, वृंदावन अलाहाबाद, काशी, कलकत्ता वगैरे भागांतून ५०० च्या वर प्रतिनिधि आले आहेत. ता. १५ रोजीं विषयनियामक कमिटीची बैठक होऊन व्हॉईसरॉयांकडे पाठविण्यांत येणाऱ्या शिष्टमंडळांत कोणास घ्यावें याजबद्दल खल झाला. सनातन धर्माची बाजू मांडण्यासाठी एका हिंदी दैनिकाची व इंग्रजी दैनिकाची आवश्यकता असून तीं पत्रें सुरू करण्यासाठी दहा हजार रुपयांपर्यंत फंड गोळा करण्यांत यावा असेंहि अधिवेशनांत ठरलें. इतर वृत्तपत्रांतून मंदिरप्रवेशाबद्दल विपर्यस्त बातमी प्रसिद्ध होते ती होऊं नये व सनातनी लोकांचें मत जनतेस कळावें म्हणून हा उपक्रम लवकरच व्हावा असेंहि सर्वानुमतें ठरलें. अधिवेशनास सायंकाळीं ८॥ वाजतां प्रारंभ होऊन स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांचीं भाषणें झालीं. शिष्टमंडळांत विषयनियामक कमिटीनें ४० जणांची निवड केली आहे."

बुधवारीं रात्रीं ८ वाजता अधिवेशनास सुरुवात झाली. इंपीरियल बँकेच्या मागे अधिवेशनासाठी एक मोठा मंडप उभारण्यांत आला होता. मंडपांत मंदिरप्रवेशाविरुद्ध निरनिराळीं असलेलीं शास्त्रवचनें मोठमोठ्या फलकांवर लावण्यांत आलीं होतीं. 'सत्यान्नास्ति परोधर्मः' हे वचन प्रामुख्यानें लावण्यांत आलें होतें. परिषदेचा मंडप चिकार भरून गेला होता, परिषदेसाठी महामहोपाध्याय हरीनारायणशास्त्री दिल्ली, व्याकरणाचार्य पं. मुखरामशास्त्री, लाला हरिरामजी, पंडित ताराचंदशास्त्री, लाला वैजनाथ साहेब, नारायणराव गुंजाळ राजा रघुनंदन प्रसादसिंह, (मोंगीर) सत्येंद्रनाथ सेन (बंगाल) अमलनाथ दत्त, सर जगमोहनदास वर्जिवनदास (मुंबई), सॉलिसिटर श्री. मनुभाई पंड्या (मुंबई), मनुभाई मेहता जे. पी मुंबई वगैरे मंडळी हजर होती.

# " बिशाद आहे, हिंदुस्थानाला स्वराज्य मिळेल ? "

ब्रिटिश सरकारचा स्वराज्यविषयक खलिता इंग्लंड व हिंदुस्थान या दोनहि देशांत ता. १८ मार्च रोजी प्रसिद्ध झाला. शेवटची गोलमेज परिषद इंग्लंडांत डिसेंबरच्या तिसऱ्या आठवड्यांत संपली. त्यानंतर हा खलिता फार तर एकदीड महिन्याच्या अवधींत बाहेर पडावयास पाहिजे होता व तशी आशाहि लावण्यांत आली होती. परंतु ज्या गोष्टीकडे सर्वांचे डोळे लागलेले असतात ती गोष्ट नेमकी ठरल्या वेळेला घडली तर तिच्यांत रसोत्कटता ती काय राहणार ? अशा प्रकारची रसोत्कटता निर्माण करण्यासाठी हिंदुस्थानाच्या स्वराज्याचा खलिता ब्रिटिश सरकारानें मुद्दाम लांबणीवर टाकला असें कोणी म्हणत नाही. तथापि या बाबतींत घडलेल्या दिरंगाईचा परिणाम मात्र तसा झाला खरा. ब्रिटिश सरकारचा खलिता प्रसिद्ध होण्यास एक महिन्याऐवजीं तीन महिने लागले, त्याचें कारण हिंदुस्थानास स्वराज्याचे अधिकार जास्तींत जास्त किती द्यावे याविषयीं इंग्रज मुत्सद्द्यांत वाद पडला होता हें नव्हे, तर हिंदुस्थानास स्वराज्याचे अधिकार कमींत कमी किती दिले पाहिजेत याविषयीं इंग्रज मुत्सद्द्यांचें एकमत होत नव्हतें हें होय.

भारतमंत्री सर सॅम्युएल होअर व हिंदद्वेष्टे मि. विन्स्टन चर्चिल यांजमधील लढाया प्रसिद्धच आहेत. चर्चिलसाहेबांनी म्हणावें, 'स्वराज्याचे फाजिल अधिकार देऊन तुम्ही साम्राज्याचा घात करणार आहा.' त्यावर होअरसाहेबांनी सांगावें, 'हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षांचा विचार करतां इतके कमीतकमी अधिकार आपण त्यांस दिलेच पाहिजेत.' होअर व चर्चिल यांच्या या हमरीतुमरीच्या अथवा खेळीमेळीच्या संवादांनी जनतेची मनोवृत्ति उलट दिशेने अधिकच ताणून धरल्यासारखी झाली व तिचा खलित्यावर तुटून पडण्याचा आवेश वाढला. सामान्य जनतेच्या मनाची स्थिति अशी असली तरी शहाणे लोक खलित्याचें स्वरूप जाणूनच होते. तथापि त्यांना देखील आपण खलित्यासंबंधानें जो अंदाज स्वतःपाशीं बांधला आहे त्याच्याशीं खलित्याचें चित्र कितपत जुळतें याचा पडताळा पाहावयाचा असल्याने, त्यांचें लक्षहि खलित्याकडे आतुरतेने वेधलें होतेच.

अशा रीतीनें या नाही त्या कारणासाठीं सर्वांच्या चिंतनाचा विषय होऊन राहिलेला हा खलिता एकदाचा बाहेर पडला. प्रस्तुत खलित्यांत ब्रिटिश सरकारानें हिंदुस्थानाच्या भावी राजकीय सुधारणांसंबंधानें स्वतःची योजना तपशीलवार मांडली असल्यामुळे, त्याचें महत्त्व विशेष होय. सुधारणांच्या हक्कांचा कच्चा खर्डा असून त्याचेंच रूपांतर क्रमाक्रमानें पार्लमेंटापुढील बिलांत व्हावयाचें आहे. हा खर्डा समोर ठेवूनच त्यांतील मुद्यावर पार्लमेंटाची संयुक्त कमिटी आपली हातोडी चालवील. त्या हातोडीचे घाव खाऊन त्यांतूनच बिल बाहेर पडेल, व शेवटीं तें बिल कायद्याचा शेवटचा टिळा लावून घेण्याकरितां पार्लमेंटांत येईल. सध्याच्या खलित्यावर वरील अनेक संस्कार अद्यापि व्हावयाचे असले तरी त्या कायद्याचा हाच मुख्य व खरा सांगाडा यांत शंका नाही. पण गेल्या दहाबारा वर्षांच्या चळवळींचें, स्वार्थत्यागाचें, हालअपेष्टांचें, कारागृहवासाचें व भगीरथ प्रयत्नांचे हें असलें दीनवाणें पर्यवसान पाहून प्रत्येक हिंदी मनुष्याची तीव्र निराशा झाल्यावांचून मात्र खास राहणार नाही.

प्रचलित राज्यपद्धतींत ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांजवर अखेरची हुकमत व्हाइसरायच चालवितो. परंतु राज्यकारभाराच्या दृष्टीने ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें हीं एकमेकापासून अलग आहेत. नवीन व्यवस्थेंत त्यांजमधील अलगपणा दूर होऊन त्यांना देशाच्या राज्यकारभारास एकत्र जोडण्याचें ठाम ठरलें आहे. याच सत्ताप्रकारास फेडरेशन किंवा संयुक्त राज्यपद्धति असें म्हणतात. हिंदी लोक व संस्थानिक हे उभयता एकाच देशाचे रहिवाशी असून, त्यांना एकाच देशांत नांदावयाचें आहे. हिंदी लोकांचे जे मित्र तेच संस्थानिकांचे मित्र व हिंदी लोकांचे जे शत्रु तेच संस्थानिकांचे शत्रु, अशी त्यांची सांगड निसर्गानेंच घालून दिली आहे. यासाठीं या दोन शकलांचा मिलाफ व एकजीव जितका लवकर होईल तितकें हिंदुस्थानाचें बल वाढून हा देश कालान्तरानें जगांत प्रमुखस्थान मिळवील असा विश्वास आहे.

संयुक्त राज्यघटनेचा हा फायदा हिंदुस्थानास केव्हा मिळेल तो मिळो. पण सध्यापुरते पाहिल्यास त्यापासून देशाचा तोटाच होणार असल्याचे स्पष्ट दिसतें. असें असतांहि गोलमेज परिषदेस गेलेल्या सभासदांनी या राज्यघटनेस संमति दिली याचेंहि एक कारण आहे; ते हें कीं, त्यावांचून हिंदुस्थानसरकारच्या मध्यवर्ती सत्तेंत जबाबदारीचे अधिकार हिंदुस्थानास मिळणार नसल्याचें ब्रिटिश मुत्सद्द्यांनी खडखडीतपणें सांगितलें होतें. आणि मध्यवर्ती सत्ते-

र्तील जबाबदारी म्हणजेच स्वराज्य हें उघड आहे. सारांश, स्वराज्याच्या लोभाने फेडरेशनची गोणी हिंदी लोकांनी आपल्या पाठीवर घेतली. पण त्याचा परिणाम मात्र त्या हेतूच्या अगदी उलट झालेला प्रारंभीं तरी अनुभवास येत आहे. कारण ज्या स्वराज्याकरिता हा भार उचलण्यांत आला त्या भाराखालीच त्या स्वराज्याचा जीव अर्धाअधिक घेण्याचा कावा ब्रिटिश मुत्सद्यांनी साधला असल्याचे ब्रिटिश सरकाराच्या नव्या खलित्यानें आता सिद्ध केलें आहे.

तिसऱ्या गोलमेज परिषदेस हिंदी प्रतिनिधी गेले त्यांनी एक नावाजण्याजोगी कामगिरी बजावली. सर सॅम्युअल होअर प्रभृति ब्रिटिश मुत्सद्दी नुसती प्रांतिक स्वायत्तता देऊनच हिंदुस्थानची बोळवण करणार होते; तें संकट हिंदी प्रतिनिधींनी आपल्या तीव्र विरोधाने टाळून प्रांतिक स्वायत्तता व मध्यवर्ती सत्ता हीं दोन्हीं एकदम मिळण्याचें आश्वासन ब्रिटिश मुत्सद्यांपासून घेतलें.नवीन खलित्यांत आपण त्या वचनापासून ढळलों नाही असे ब्रिटिश सरकार सांगत आहे. तथापि त्यांत त्यांनी बऱ्याच पळवाटा ठेवल्या आहेत. पुष्कळ हिंदी संस्थानिक अद्यापि फेडरेशनमध्ये सामील होण्यास कबूल झाले नाहीत. त्यांची समजूत व्हाइसरॉय लॉर्ड विलिंगडन दिल्लीस त्यांस जमवून काढीत असल्याची बातमी आहे. नवीन राज्यघटनेचा कायदा संस्थानिकांना जमेस धरून ब्रिटिश सरकार करणार आहे; परंतु त्याची अंमलबजावणी मात्र लागलीच होईल असें दिसत नाही ! हिंदी संस्थानांत जी लोकसंख्या आहे तिच्या निम्म्या इतक्या लोकसंख्येचे संस्थानिक फेडरेशनमध्ये सामील होतील किंवा संस्थानिकांकरिता मध्यवर्ती कायदेमंडळांत राखून ठेवलेल्या जागांपैकी निम्म्या जागा संस्थानिकांकडून भरून निघतील त्याच वेळीं मध्यवर्ती सत्तेंत जबाबदारीचे अधिकार हिंदी लोकांना मिळतील असा खुलासा नवीन खलित्यांत मुद्दाम करण्यांत आला आहे. संस्थानिकांना फेडरेशनमध्ये आणण्याचा खरा प्रयत्न सुधारणांचा कायदा पास झाल्यानंतरच सरकार त्यांजबरोबर नवीन करारमदार करून सुरू करणार आहे. म्हणजे फेडरेशनचा कायदा पास होण्यास वर्ष सहा महिने लागणार, पुढे संस्थानिकांशीं करारमदार करण्यांत एखाद-दुसरें वर्ष मोडणार व त्यानंतर संस्थानिक एकदाचे फेडरेशनमध्ये शिरले तरी स्वराज्याचें रसपान हिंदुस्थानास करावयास मिळणार आहे असेंहि नाही.

हिंदी कायदेमंडळांचीं दोन सभागृहें आज आहेत, तशींच तीं पुढेहि चालू राहावयाचीं आहेत. त्यांपैकीं असेंब्लींत म्हणजे कनिष्ठ सभागृहांत एकंदर जागा ३७५ असून, त्यांतील १२५ म्हणजे एक-तृतीयांश जागा संस्थानिकांस मिळावयाच्या आहेत. कौन्सिल ऑफ स्टेटमध्ये म्हणजे वरिष्ठ सभेंत सगळ्या जागा २६० असून त्यांपैकीं १०० संस्थानिकांना व १५० खालसांतील हिंदी लोकांना देण्यांत यावयाच्या आहेत. या वरिष्ठ सभेंत संस्थानिकांचें प्रमाण कनिष्ठ सभेपेक्षां पुष्कळच वाढलें आहे. दोन्ही सभागृहांतील संस्थानिक किंवा त्यांचे प्रतिनिधी व्हाइसरॉयांचे एक प्रकारें अंकित असल्यामुळे त्यांची मदत स्वतंत्र बाण्याच्या हिंदी प्रतिनिधींस मिळण्याऐवजीं सरकारपक्षासच मिळेल हें उघड आहे. तसें झाल्यास हिंदी प्रतिनिधींना वरील कायदे मंडळांतून आपल्या मनाजोगा एकहि महत्त्वाचा कायदा किंवा सुधारणा घडवून आणण्याची फारशी आशा बाळगावयास नको.

संस्थानिकांच्या चरकाकडून स्वराज्याचा रस अशा युक्तीने आगाऊ बराच पिळून घेतल्यावर त्या इक्षुदंडांत जो थोडासा रस शिल्लक राहील तो आणखी पिळून काढण्यास मुसलमानांचा दुसरा चरक सिद्ध आहेच. कारण नव्या खलित्यान्वयें ले. असेंब्लीमध्ये संस्थानिकांना देऊन उरलेल्या २५० जागांपैकीं ८२ जागा मुसलमानांना बहाल करून त्यांची मनकामना बऱ्याच अंशीं तृप्त करण्याचें सरकारानें ठरविलें आहे. हे मुसलमान जातवारीची बिरुदावली धारण करून असेंब्लीच्या कनिष्ठ सभागृहांत पाऊल टाकणारच असल्यामुळे त्यांचा गट हल्लीप्रमाणे पुढेहि राष्ट्रीय हितसंबंधाचा बळी ज्ञातिनिष्ठेच्या पायावर ठेवल्यावांचून सहसा राहणार नाही असें मानण्याशिवाय गत्यंतर नाही.

संस्थानिक व मुसलमान यांच्या चरकांतून पार पडल्यावर स्वराज्याचा रस शोषून घेणारा सरकारी वरिष्ठ नोकरांचा तिसरा चरक लागतो. हल्ली हिंदुस्थानसरकाराच्या बजेटांत अजमासे ४६ कोटी रुपयांपर्यंत रक्कम लष्करी खर्चासाठीं वेगळी काढलेली असते. ही रक्कम एकंदर जमेच्या मानानें एक तृतीयांशाहून थोडी अधिक आहे. लष्करी खातें यापुढें व्हाइसरॉयांच्या ताब्यांत राहणार असून त्याजवर हिंदी कायदेमंडळाची हुकमत चालणार नाही. तेव्हा त्यामुळे लष्करी खात्यांत हिंदी लोकांचा अधिकाराच्या जागांवर आपल्या इच्छेप्रमाणें शिरकाव करण्याचा अखत्यार हिंदी लोकमताला नाही त्याचप्रमाणे लष्करासाठी खर्च होणारी रक्कम कमी करण्याची सत्ताहि कायदेमंडळांना नाही. या रीतीने वट उत्पन्नापैकीं, एक तृतीयांशाहून अधिक वगळली गेल्यामुळे शिक्षण, उद्योगधंद्यांचें संरक्षण,

या बाबतींत सुधारणा घडवून आणण्याचे कामीं हिंदी लोकांच्या नाड्या इल्लीप्रमाणे पुढेहि आंख-डलेल्याच दृष्टीस पडणार आहेत.

लष्करी खात्याइतकें दुसरें महत्त्वाचें खाते रेल्वेचें होय. रेल्वे खात्याची जमा अजमासें ९०–९५ कोटी असते व खर्चेहि सामान्यतः तितकाच असतो. देशांत मालाची ने-आण रेल्वेमार्फत होते, व रेल्वेकडे मालाचा खप दरसाल कोट्यवधि रुपयांचा होतो, इतकेंच नव्हे तर वरिष्ठ, कनिष्ठ अशा सर्व प्रतीच्या नोकऱ्यांत माणसे भरण्याचें ते एक फार मोठे कुरण आहे. या खात्याचा ताबा हिंदी कायदेमंडळाकडे आल्यास देशी उद्योगधंद्यांना भाड्याच्या सवलती मिळतील, त्यांचा माल खपविण्यास त्या खात्यांत वाव सांपडेल व वरिष्ठ प्रतीच्या नोकरींत हिंदी माणसांचा शिरकाव अधिक प्रमाणांत झाल्याने रेल्वेच्या सर्व व्यवहाराचें ज्ञान त्यांना संपादावयास सांपडून खर्चांतहि काटकसर साधतां येईल. पण हे घबाड हिंदुस्थानास मिळू दिल्याने हिंदी लोकांस स्वराज्याचें सुख लाभेल याची वाट काय ! पण ब्रिटिश सरकारच्या नवीन खलित्याचें मुख्य सूत्रच असें आहे कीं, स्वराज्यसुखाचा अत्यल्प बिंदुहि हिंदी लोकांच्या मुखीं पडू द्यावयाचा नाही. या दुष्ट बुद्धीने त्यांनी नवीन राज्यघटनेबरोबरच हिंदुस्थानाच्या हुकमतीबाहेरचें स्वतंत्र रेल्वे बोर्ड निर्माण करण्याचे ठरविले आहे. रेल्वेच्या कारभारावरील खरी सत्ता त्या बोर्डाकडे राहील व हिंदी कायदेमंडळें त्यावर फक्त किरकोळ नियंत्रण ठेवतील.

लष्करी खाते व रेल्वे बोर्ड या चरकांनी स्वराज्याचें उरलेलें सार पिळून घेतल्यावर मुलकी खातें, न्यायखातें, पोलीसखातें पब्लिकवर्क्सखातें, शिक्षणखाते अशा प्रकारची कितीतरी खातीं शिल्लक राहतात. प्रत्यक्ष राज्यकारभार त्याच खात्यांतील वरिष्ठ नोकर वर्ग पाहात असल्यामुळे खरे राज्यकर्ते व सत्ताधारी तेच होत. या खात्यांपैकीं बहुतेक जागा स्टेट सेक्रेटरकिडून भरण्यांत येतात. त्यांच्या नोकरीचे नियम स्टेट सेक्रेटरीच करतो व त्यांच्या पगाराचे मानहि तोच ठरवितो. स्टेट सेक्रेटरीपासून सनद घेऊन आलेल्या या नोकरांच्या पगारास मंजुरी अगर नामंजुरी देण्याचा अधिकार हिंदी कायदेमंडळांना आज नाही. राज्यघटनेच्या कायद्याचा अंमल सुरू झाल्यावरहि भारतमंत्री हा इंडियन सिव्हिल सर्व्हिस, पोलीस खातें व धर्मखातें यांतील वरिष्ठ नोकरांच्या नेमणुका करण्याचा अधिकार आपल्याकडे ठेवील. हा क्रम पुढील पांच वर्षे तसाच चालू राहून परराष्ट्रीयखातें व धर्मखातें यांतील नोकर वर्गाव्यतिरिक्त बाकीच्या नोकऱ्या कशा भरावयाच्या हें पहाण्याकरितां एक चौकशी कमिशन नेमण्यांत येईल. तथापि त्या चौकशी कमिशनाने कांहीहि अभिप्राय दिला तरी अखेरचा निर्णय ब्रिटिश पार्लमेंट हिंदुस्थान सरकाराच्या सल्ल्याने करील. त्यांत जसें ठरेल त्याप्रमाणे वरिष्ठ हिंदी नोकरांची नेमणूक करण्याचें व त्यांच्या परीक्षा घेण्याचें काम फेडरल पब्लिक सर्व्हिस कमिशनाकडे सोपविण्यांत येईल व प्रांतिक नोकऱ्यासंबंधाचें हेंच काम प्रांतिक कमिशनें करतील.

फेडरल कमिशनांतील सभासद नेमण्याचा अधिकार भारतमंत्र्याकडे राहील व प्रांतिक कमिशनमधील सभासदांची नेमणूक प्रांतांच्या गव्हर्नरामार्फत होईल. या उद्योगाला सुरुवात पांच वर्षांनंतर व्हावयाची असली तरी त्यामुळे इंग्लंडमधून येणाऱ्या गोऱ्या नोकरवर्गाचा ओघ हटकून थांबेलच अशी खात्री कोणासहि देववणार नाही. कारण दोनहि कमिशनांमधील सभासदांची नेमणूक अनुक्रमें भारतमंत्री व प्रांतांचे गव्हर्नर करणार. ते अर्थात्च सगळे किंवा कांही सभासद गोरेच नेमतील व त्यांजकडून गोऱ्या नोकरवर्गाचा प्रवाह नसला तरी झरा अखंड वाहत राहील अशी खबरदारी घेतली जाईल. विशेषतः सिव्हिल सर्व्हिस व पोलीस या नोकर वर्गास सर्वांत अधिक जपण्यांत येईल. वर गव्हर्नर गोरा व खाली नोकरींतील जबाबदारीच्या जागांवरील अधिकारीहि गोरे या दोन दडपणांत सांपडून बिचाऱ्या मंत्रिमंडळाची दामटी वळून ते पराधीन होतील. त्यांना राज्यकारभाराची विश्वसनीय माहिती खालील सेक्रेटरी आदिकरून अधिकाऱ्यापासून मिळावयास पाहिजे ती मिळणार नाही व त्यायोगे राज्यकारभाराच्या धोरणांत त्यांना मूलग्राही फरक घडवून आणणें अशक्य होईल. त्याखेरीज दुसरी आपत्ति अशी कीं ज्यांचा चारा व चंदी मंत्र्यावर अवलंबून नाही असे पोळासारखे सुटलेले हे अधिकारी खालीं असल्यामुळे पगारांत काटाकाट करून होणारी बचत जनतेच्या कल्याणाकरिता व राज्यकारभाच्या सुधारणेकरिता खर्चण्याची संधिच मंत्र्यांना न लाभून आजची आहे हीच निकृष्ट स्थिति बहुधा प्रांतांत व मध्यवर्ती सरकारांत कायम राहील.

सारांश, नवीन राज्ययंत्र नवीन नवीन काढण्यांनीं इतकें जखडून जाणार आहे कीं, त्याखालीं व्हाइसरॉय व गव्हर्नर यांचीं मंत्रिमंडळें व कायदे कौन्सिलें व्याकुळ होऊन दुःखानें कण्हूं लागतील. सांप्रत ब्रिटिश पार्लमेंटांत व प्रधानमंड

ळांत कान्झरव्हेटिव्ह पक्ष म्हणेल ती पूर्वदिशा ठरणार आहे. त्यांतहि प्रधानमंडळापैकी खरा थैमान घालणारे राम्से मॅक्डोनाल्ड नव्हेत, बाल्डविन नव्हेत किंवा लॉर्ड आयर्विनहि नव्हेत.त्यांना होअर-चर्चिल-प्रभृतींच्या प्रतिगामी कंपूने गाय बनवून ठेवलें असून या कंपूने तर आपल्या मनाशीं हिंदुस्थानास स्वराज्याच्या अधिकारांचा लवलेशहि मिळूं न देण्याचा चंग बांधला आहे. होअर साहेब बाह्यतः चर्चिल साहेबांना हिणवीत व विरोध दर्शवीत असले तरी सिद्धसाधकांप्रमाणें त्यांचे आंतून त्यांजबरोबर संगनमतच असलें पाहिजे यांत शंका नाही. हा खलिता प्रसिद्ध झाल्यानंतर सर सॅम्युएल होअर हे मि.विन्स्टन चर्चिल यांना एकांतांत खात्रीने म्हणत असतील, 'मित्रा! बोल तुझ्या मर्जीप्रमाणे सर्व कांही झाले कीं नाही? अरे, माझ्यासारखा पठ्ठया भारतमंत्रिपदावर असतांना बिशाद काय आहे हिंदुस्थानाच्या दृष्टीला स्वराज्यलक्ष्मीचें मुखच काय पण नखहि पडण्याची!'

# ब्रिटिश सरकाराच्या पांढऱ्या खलिताचें काळें स्वरूप!

' हा खलिता (व्हाईट-पेपर) ब्रिटिश सरकाराने ता.१८ रोजीं प्रसिद्ध केला असून त्याची एकंदर १२५ पानें आहेत.त्याचे तीन विभाग करण्यात आले आहेत. या खलित्यांत हिंदी राज्यघटनाविषयक सुधारणा-संबंधी ब्रिटिश सरकाराने आपल्या सूचना समाविष्ट केल्या आहेत. पत्रकाचे जे तीन विभाग पाडण्यांत आले आहेत त्यांपैकीं पहिल्या भागांत सूचनांना अनुलक्षून अशी सर्वसाधारण खुलासेवजा प्रस्तावना दिली आहे.दुसऱ्या विभागांतील अनुक्रमवार अशा २०२ कलमांत खुद्द सरकारी सूचना देण्यांत आल्या असून तिसऱ्या विभागांत परिशिष्टांच्या रूपाने मध्यवर्ती कायदेमंडळाची रचना, प्रांतिक कायदेमंडळांची रचना (त्यांतच सिंध आणि ओरिसा याहि नव्या प्रांतांच्या कायदे-मंडळांची सभासदसंख्येसह माहिती देण्यांत आली आहे. ), मतदानाची पात्रता आणि फेडरल व प्रांतिक सरकारांचे कायदेकानू करण्याचे अधिकार इत्यादि प्रश्नांचा ऊहापोह करण्यांत आला आहे. पत्रकाचें एकंदर स्वरूप पाहाता तें तिसऱ्या गोलमेज परिषदेच्या कामकाजाला धरून असेंच आहे.फार काय पण सदर पत्रकांत कित्येक ठिकाणीं तिसऱ्या गोलमेज परिषदेच्या कामकाजाचा मजकूर जशाचा तसाच उद्धृत केला आहे.

### संयुक्त राज्यघटनेची योजना

१९३१ सालच्या डिसेंबर महिन्यांत अधिकारारूढ असलेल्या प्रधान-मंडळाने हिंदुस्थानाबाबत जें धोरण आखलें होतें त्या धोरणाला पार्लमेंटाच्या दोनहि सभांनी एका ठरावाने आपली मान्यता दिली. तें धोरण असें कीं, हिंदुस्थानामध्यें हिंदी संस्थानें आणि प्रांत यांचें मिळून एक जबाबदार संयुक्त राज्य कसें स्थापन करतां येईल या प्रश्नाची चौकशी व्हावी. हीच गोष्ट पत्रकाच्या आरंभीच्या परिच्छेदकांत पुनरपि सांगण्यांत आली आहे. वरील हेतूप्रमाणे तशा प्रकारची चौकशी आता पुरी झाल्यामुळे व्हाइट पेपरमध्ये ब्रिटिश सरकाराला हिंदी सुधारणाबद्दलच्या आपल्या सूचना बऱ्याचशा निश्चित स्वरूपांत मांडता येत आहेत. तसेंच त्या पत्रकाचा हिंदी प्रतिनिधींच्या सल्लामसलतीने विचार व्हावा म्हणून एक ' जॉइंट सिलेक्ट कमिटी ' स्थापन करण्यांत यावी अशीहि ब्रिटिश सरकार पार्लमेंटाला विनंति करणार आहे. 'जॉइंट सिलेक्ट कमिटी 'चा अहवाल पुरा झाल्यावर आपल्या निश्चित व निर्णायक योजनासह एक बिल तयार करून तें पार्लमेंटापुढे मांडणें ब्रिटिश सरकाराचें कर्तव्य आहे. मात्र व्हाइट पेपरमध्ये जी भाषा वापरण्यांत आली आहे, तशीच ती बिलांतहि उतरण्यांत येईल असें आश्वासन देता येत नाही. किंवा बिलाची भूमिका आणि व्हाइट-पेपरची भूमिका या दोनहि एकरूपच असतील असेंहि सांगतां येत नाही.

### आमूलाग्र फेररचना

व्हाइट पेपरच्या प्रस्तावनेचा निम्मा-अधिक भाग संयुक्त घटनेच्या प्रश्नाने व्यापला आहे. पत्रकाच्या सुरुवातीलाच असें स्पष्ट करण्यांत आलें आहे कीं, हिंदी संस्थानें आणि ब्रिटिश हिंदुस्थानाचे प्रांत यांची एक संयुक्त राज्यघटना व्हावयाची तर सध्याच्या राज्यघटनेची आमूलाग्र फेररचना करावी लागेल, आणि त्यासाठी सांप्रतचा सुधारणाकायदाहि (गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट ) सर्वतोपरी रद्द करावा लागेल. असा फेरबदल करण्याचें कारण असें कीं, हिंदी संस्थानें हीं बादशहांच्या सार्वभौमत्वाखालीं असलीं तरी तीं बादशाही मुलुखांत मोडत नाहीत. उलट प्रांतांची स्थिति पाहाता ते बादशाही मुलुखांत मोडतात. इतकेंच नव्हे तर अविभाज्य अशा ब्रिटिश हिंदुस्थानाचे ते घटकावयव आहेत.अर्थातच हिंदी संस्थानाप्रमाणें त्यांना स्वतःला स्वतंत्र अशी

राजकीय सत्ता नाही. अशा रीतीने जुन्या राज्यघटनेंतूनच नवी राज्यघटना विकास पावावयाची तर प्रथम मध्यंतरीच्या काळांत फेडरल आणि प्रांतिक सरकारें यांचे परस्पर आणि वैयक्तिक अधिकार स्पष्ट करण्यांत आले पाहिजेत. प्रांतांना पूर्ण स्वायत्तता देऊन राज्यकारभारांतील त्यांचा त्यांचा वाटा त्यांना पूर्णपणें तोडून दिल्याशिवाय वरील प्रश्न सुटणें अशक्य आहे.

### प्रांतिक स्वायत्तता

फेडरल सरकार आणि प्रांतिक सरकारें यांजमधील अधिकार–विभागणीचा प्रश्न सुलभ व्हावा म्हणून असें योजण्यांत आलें आहे कीं, सध्याचा सुधारणाकायदा रद्द करण्यांत आला कीं, ब्रिटिश हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची सर्व सत्ता बादशाहांच्या ठायीं सुपूर्त करण्यांत यावी आणि नंतर ती सत्ता गव्हर्नर जनरल, गव्हर्नर आणि नव्या कायद्याने उत्पन्न होणारे अधिकारी यांनी बादशहातर्फे म्हणून चालवावी. प्रत्येक प्रांतांत लोकनियुक्तांचें एक कायदे–मंडळ स्थापण्यांत येऊन, त्या कायदेमंडळाला जबाबदार असें एक मंत्रिमंडळ गव्हर्नरला सल्ला देण्यासाठी निर्माण करावें असेंहि सुचविण्यांत आलें आहे. प्रांतिक आणि फेडरल कायदेमंडळांकडे कोणकोणते विषय सोपविण्यांत यावे या प्रश्नाचाहि विचार करण्यांत आला आहे.

### मार्गांतील अडचणी

राज्यघटनेचा केवळ कायदा बनल्याने संयुक्त घटना अस्तित्वांत येईल असें नाही. कायदा पास होण्यापूर्वी मतदारांच्या याद्या तयार होणें, मतदारसंघ निर्माण होणें अशासारख्या आवश्यक गोष्टी अंमलांत येण्याचा प्रश्न जरा बाजूला ठेवला तरी संघटनेंत शिरण्याबद्दल संस्थानिकांशीं व्हावयाचे वैयक्तिक करार–मदारच लवकर पूर्ण व्हावयाचे नाहीत. कारण प्रत्यक्ष कायदा पास होईपर्यंत ज्या संयुक्त घटनेंत सामील व्हावयाचें ती घटना तरी कशा स्वरूपाची आहे याचें संस्थानिकांना पूर्ण ज्ञान असणें शक्य नाही. कायदा पास झाल्यावर व एकंदर संस्थानांतून जितकी लोकसंख्या आहे तिच्या निम्मी लोकसंख्या ज्या संस्थानांची आहे तीं संस्थानें सामील होणार असल्याचें निश्चित झाल्यावर, कांहीं आर्थिक अटीवर संयुक्त राज्यघटना अंमलांत येईल. मध्यवर्ती सरकारांत फेरफार होण्यापूर्वींहि नवीन प्रांतिक सरकारें अस्तित्वांत येऊं शकतील. तिसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळी ब्रिटिश सरकारानें जी घोषणा केली तिचाच पुनरुच्चार येथे करण्यांत येत आहे. ती घोषणा अशी कीं, प्रांतांना स्वायत्तता देण्यांत येईल आणि संयुक्त राज्यघटनेचा प्रश्न अधांतरीं किंवा अनिश्चित ठेवण्यांत येणार नाही. संयुक्त घटना स्थापन व्हावी अशी ब्रिटिश सरकाराची इच्छा आहे. परंतु ती स्थापन होण्याच्या मार्गांत अशींच कांही अधिदैविक विघ्नें उत्पन्न झालीं तर सर्व परिस्थितीचा विचार हिंदी लोकमताच्या सल्ल्याने पुनः एकवार करण्यांत येईल.

### गव्हर्नर जनरलचे जादा अधिकार

बादशहाचा प्रतिनिधि म्हणून गव्हर्नर जनरल हाच फेडरल सरकाराचा राज्यकारभार पाहील. त्याला त्या कामीं सल्ला देण्यासाठी एक मंत्रिमंडळ स्थापण्यांत येईल. मंत्रिमंडळांत ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थानें यांचे प्रतिनिधी घेण्यांत येतील. हे मंत्रिमंडळ कायदे–मंडळाला जबाबदार राहील. सैन्य, परराष्ट्रसंबंध आणि धर्मबाब यांचीं खातीं मात्र केवळ गव्हर्नर जनरलाच्याच अधिकारांत राहतील, व त्या बाबतींत तो पार्लमेंटाला जबाबदार राहील. तसेंच राज्यघटनेनेंच त्याला आणखी जे कांही विशिष्ट जादा अधिकार देण्यांत येणार आहेत त्यांच्या बाबतींत मंत्र्यांचा सल्लाहि तो धुडकावून लावू शकेल ! त्या अधिकारांची यादी पुढे सविस्तरपणें देण्यांत येणार आहे. राखीव खात्यांच्या कारभारांत सल्लामसलत मिळावी म्हणून, पाहिजे असल्यास, गव्हर्नर जनरल आपल्या इच्छेप्रमाणे तीन सभासद नेमील. मध्यवर्ती दोनहि कायदेमंडळांत हे सभासद 'एक्स ऑफीशियो' म्हणून बसतील. परंतु त्यांना कोणत्याहि प्रश्नावर मत मात्र देतां येणार नाही.

### कायदेमंडळांची घटना

मध्यवर्ती सरकारांत एक वरिष्ठ व एक कनिष्ठ अशीं दोन कायदेमंडळें अस्तित्वांत राहतील. दोनहि कायदेमंडळांचे अधिकार प्रायः सारखेच असले तरी पैशाचीं बिलें मात्र प्रथम कनिष्ठ कायदेमंडळांतच आणण्यांत येतील. कनिष्ठ लोकसभेंत ३७५ सभासद असून त्यांपैकी १२५ सभासद संस्थानांकडून नेमले जातील. उरलेले ब्रिटिश प्रतिनिधी त्या त्या प्रांतांतील मतदारसंघातर्फे प्रत्यक्ष मतदानपद्धतीने निवडले जातील. वरिष्ठ लोकसभेंत ज्यास्तींत जास्त २६० सभासद असतील. पैकीं १०० सभासद संस्थानांकडून नियुक्त केले जातील. १५० ब्रिटिश हिंदी प्रतिनिधी.हे प्रत्येक प्रांताच्या कायदेमंडळाकडून 'सिंगल ट्रॅन्स्फेरबल व्होट' या मतदानपद्धतीने निवडले जातील. वरिष्ठ लोकसभेंत ज्यास्तींत ज्यास्त १० सभासद नेमण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलला देण्यांत आला आहे. या लोकसभेंत बसणाऱ्या प्रतिनिधींची पात्रता उच्च ठेवण्यांत आली

असून तींत अधिक वयोमर्यादेचा अन्तर्भाव आहे. फेडरल कायदेमंडळांतन संस्थानांना कशा कशा जागा वाटून द्याव्या हे अद्यापि निश्चित झालें नसलें तरी मध्यवर्ती वरिष्ठ कायदेमंडळांत त्या देतांना संस्थानिकाच्या वंशपरंपरागत सलामीच्या तोफा इत्यादींचा विचार करण्यांत येईल. कनिष्ठ लोकसभेंत मुख्यतः लोकसंख्येच्या प्रमाणांत त्या देण्यांत येतील. हिंदी मतदानमंडळाने मतदारीची जी व्यवस्था केली आहे तशीच व्यवस्था फेडरल कायदेमंडळाच्या मतदारीची राहील. या व्यवस्थेमुळे फेडरल कायदेमंडळाच्या मतदारांची संख्या ७०-८० लक्षांपर्यंत जाईल.

**गव्हर्नर जनरलचे मंत्रिमंडळाशी संबंध**

संरक्षण, ( Defence ) परराष्ट्रीय राजकारण व धार्मिक हितसंबंध हीं तीन खातीं गव्हर्नर जनरलचे हातीं राहातील. या खात्यांचा कारभार दिवाणांचे हाती न राहाता, गव्हर्नर जनरल साहेबांचा सल्लागारांच्या सल्ल्याने चालेल. या खात्यांची सर्व जबाबदारी गव्हर्नर जनरल यांचेवर असली तरी दररोजच्या व्यवहारांत एकट्यालाच या खात्यांची सर्व व्यवस्था पाहणें शक्य होणार नाही. आणि तसें शक्य झालें तरी असें करणें अनिष्ट होय. दक्षतापूर्वक काम पाहाणारा गव्हर्नर जनरल आपल्या सल्लागारांना व दिवाणांना सर्वतोपरी कारभाराची माहिती मिळण्याची व्यवस्था करील. इतकेंच नव्हे तर कोणत्याहि बाबीवर सरकारी निर्णय होण्यापूर्वी, त्यांना आपले विचार मांडण्याला व सल्ला देण्याला पूर्ण मुभा दिली जाईल. गव्हर्नर जनरलना देण्यांत येणाऱ्या आज्ञा–पत्रकांत ( Instrument of Instructions) वरील शोध घातला जाईल,व असें नमूद करण्यांत येईल कीं, ' स्वतःच्या जबाबदारीला कमीपणा न आणूं देतां, सल्लागार, दिवाण यांचें बरोबर गव्हर्नर जनरलनी एकत्र चर्चा करावी विशेषतः संरक्षण खात्यावरील होणाऱ्या खर्चाचीं अंदाजपत्रकें या संयुक्त सभेंत चर्चेला मांडवीं व दिवाणांचीं मतें अजमावून नतर कायदेमंडळापुढें तीं अंदाजपत्रकें सादर करण्यांत यावीं. तसेंच इतःपर हिंदुस्थानच्या संरक्षणाची जबाबदारी केवळ ब्रिटिश सरकारची नसून ती जबाबदारी वाढत्याप्रमाणांत हिंदी लोकांची राहील.पण त्याबरोबर हेंहि तितकेंच खरें कीं, सल्लामसलती कांही झाल्या असल्या तरी राखीव खात्याची सर्व जबाबदारी एकट्या गव्हर्नर जनरलवरच राहील.

**आज्ञा पत्रकाचें महत्त्व**

सोपीव खात्यांचा कारभार साधारणतः दिवाणांच्या सल्ल्याने चालेल, पण त्याबरोबरच कांही बाबतींत स्वतःची 'खास जबाबदारी' पार पाडण्याकरितां, दिवाणांचा सल्ला न ऐकण्याचीहि मुभा दिली जाईल, व तसा शोध ' आज्ञा–पत्रकांत ' घातला जाईल. दिवाणांचा सल्ला गव्हर्नर जनरलच्या ' खास जबाबदारी ' शीं विसंगत आहे असें वाटेल, त्या बाबी सोडून देऊन, बाकी सर्व बाबतींत सोपीव खात्यांचा कारभार दिवाणांच्या तंत्राने चालेल. यावरून भावी राज्यघटनेच्या ॲक्टाला जितकें महत्त्व तितकेंच महत्व या ' आज्ञा पत्रका'ला (Instrument of Instructions) प्राप्त होणार आहे. व या आज्ञापत्रकांची चर्चा करून त्यांत जरूर ते फेरफार व दुरुस्ती करण्याची तसेंच कांही भाग गाळण्याची अगर वाढविण्याचीहि संधि पार्लमेंटला दिली जाईल. या सर्वाचा हेतु हाच कीं, ग. ज. च्या ' खास जबाबदारी 'च्या अधिकारांचा उपयोग करण्याचे प्रसंग थोडे यावेत व एकोप्याच्या भागीदारीच्या भावनेने राज्यकारभाराचा गाडा चालावा.

**खास जबाबदारीचा प्रश्न**

'फेडरल ' सरकारच्या राज्यकारभाराच्या दृष्टीने खालील बाबींत गव्हर्नर जनरलवर 'खास जबाबदारी' टाकण्यांत आली आहे.

( १ ) हिंदुस्थानच्या कोणत्याहि भागांत शांततेला धोका येईल तर प्रतिबंध करणें.

( २ ) संयुक्त सरकारची (फेडरेशन) पत व आर्थिक स्थैर्य राखणें.

( ३ ) अल्पसंख्याकांच्या न्याय्य–हक्कांचें संरक्षण.

( ४ )सरकारी नोकरवर्गाला राज्यघटनेच्या कायद्यानें देण्यांत आलेले हक्क व इतर न्याय्य हक्क यांचें संरक्षण.

( ५ ) हिंदुस्थानाच्या हक्कांचें संरक्षण.

( ६ ) व्यापारविषयक बाबींतील विषमतेला बंदी करणें.

( ७ ) राखीव खात्यांच्या कारभाराचे बाबतींत उत्पन्न होणाऱ्या अडचणी.

सातवी अट घालण्याचें कारण असें कीं, संरक्षण खातें हें राखीव खातें आहे, व ही जबाबदारी पार पडण्याच्या दृष्टीनें, केवळ संरक्षण खात्याचाच कारभार गव्हर्नर जनरलच्या तंत्रानें चालून भागणार नाही. इतर खत्यांतील कारभाराची जबाबदारी पार पाडण्याकरिता, इतर खात्याचा दिवाणांचा सल्ला अमान्य करणें भाग पडेल तेव्हा संरक्षण खात्याचा कारभार चालविण्याकरिता, वरील अधिकार गव्हर्नर–जनरलला असणें जरूर आहे. पाचवी अट घालण्याचें कारण असें कीं, संयुक्त सरकारनें एखादा कायदा संयुक्तसरकारच्या प्रजेच्या

हिताचा केला असला तरी ज्या बाबतींत हिंदी संस्थानांनी आपला अधिकार सोडलेला नाही त्या बाबतींत हिंदी संस्थानांच्या हक्कांना धक्का पोचण्याचा संभव आहे, तरी सस्थानचे हितसंबंध बादशहांशीं निगडीत आहेत या दृष्टीने गव्हर्नर जनरलला त्यांच्या हक्कांचें संरक्षण करण्याकारिता जादा अधिकार असणें जरूर आहे.

तसेच सहावीअट अशा करितां कीं, प्रांतिक सरकार व संयुक्त सरकार यांच्या कक्षेंतील एखाद्या विषयासंबंधाने एखादा कायदा ब्रिटिश प्रजाजनामध्ये विषमता उत्पन्न होऊन जाचक होत असेल, तर त्या बाबतींत दिवाणांचा सल्ला रद्द समजला जाईल. व विषमतेचें बिल माडण्यास परवानगी दिली जाणार नाही. पण विषमता व वर्णभेद उत्पन्न होऊं शकतो कीं नाही ह्या बाबत हायकोर्टाकडे न्याय मागण्याचा अधिकार देण्यांत येईल.

## आर्थिक सल्लागार

फडणविशी खात्याचे दिवाणांचें अंदाजपत्रक व कर्ज उभारणीचें धोरण या बाबतीत कांही प्रसंग असे येतील कीं, हिंदुस्थान सरकारच्या पतीला व आर्थिक स्थैर्याला धोका दिवाणांच्या योजनेने येण्याचा संभव आहे. तरी अशा स्थितींत जादा अधिकार असणें जरूर आहे. ही खास जबाबदारी पार पाडण्याकरितां, गव्हर्नर जनरलना एक आर्थिक सल्लागार नेमण्याचा अधिकार देण्यांत येईल, व फडणविशी खात्याच्या दिवाणांना देखील या आर्थिक सल्लागारांचा सल्ला उपलब्ध होऊं शकेल. तसेंच या सल्लागाराला अंमलबजावणीचा अधिकार दिला जाणार नाही.

## गंगाजळी पेढी

संयुक्त राज्यघटनेचें पहिलें मंत्रिमंडळ अस्तित्वांत येण्यापूर्वी गंगाजळी पेढीची स्थापना वरिष्ठ कायदेमंडळाच्या कायद्याने करण्यांत येईल. इतकेंच नव्हे तर ही पेढी आपला व्यवहार यशस्वीतेने करू लागेल अशी अपेक्षा आहे. पण हेंहि तितकेंच खरें कीं, ही पेढी राजकीय पक्षातीत असेल. तसेंच ब्रिटिश सरकार ह्या पेढीची स्थापना मजबूत पायावर करण्याच्या दृष्टीने योग्य ती त्वरा करीतच आहे. पण पेढीची स्थापना व कारभार कांही जागतिक अशा आर्थिक परिस्थितीवर अवलंबून असल्यामुळे, विलंब होण्याचा संभव आहे. कारण या बाबतींत ब्रिटिश सरकारचा कांहीच इलाज चालणें शक्य नाही. तिसऱ्या गोलमेज परिषदेने आर्थिक संरक्षण निर्बंधाचा विचार करितांना गंगाजळी पेढीच्या स्थापनेला चार अटी घातल्या आहेत. त्या अशा ( १ ) हिं. सरकारच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी व सुरक्षितता. ( २ ) विलायतेंतील व हिंदुस्थानांतील तात्पुरतें कर्ज बऱ्याच प्रमाणांत कमी होण्याची आवश्यकता ( ३ ) गंगाजळींत सुवर्ण निधींची वाढ व ( ४ ) हिंदुस्थानच्या निर्गत व्यापारांतील नेहमीची वाढ होईल अशी परिस्थिति निर्माण होणें. तथापि फेडेरेशनची स्थापना होण्यासाठीं आवश्यक असलेल्या इतर सर्व अटी पूर्ण झाल्या व गंगाजळी पेढी स्थापणें व यशस्वी रीतीने तिचा कारभार चालणें अशक्य आहे असें वाटलें तर, अगर संयुक्त सरकार व प्रांतिक सरकार यांचा कारभार, सांपत्तिक, आर्थिक व राजकीय कारणांमुळे, स्थिर पायावर चालणें अशक्य झालें तर, त्या परिस्थितीचा फेरविचार करणें भाग पडेल. व हिंदी लोक-प्रतिनिधींची परिषद बोलावून ब्रिटिश सरकार या प्रश्नांचा विचार करील.

## जादा कायदा करण्याचा अधिकार

गव्हर्नर जनरलला विशिष्ट परिस्थितींत दिवाणांचा सल्ला बाजूस सारून, आपल्यावरील जबाबदारी पूर्ण करण्यासाठी अधिकार देण्यांत आले आहेत. त्याला धरूनच विशिष्ट परिस्थितींत कायदेमंडळाच्या मताविरुद्ध काम करण्याचे अधिकारहि गव्हर्नर जनरलाला मिळणें जरूर आहे. आपली जबाबदारी पार पाडण्यासाठी त्याला एकादें बिल आणणें जरूरीचें वाटलें तर, दिवाणांनी सहकार्य न केले तरी, गव्हर्नर जनरलला आपली कायदे करण्याची सत्ता वापरावी लागेल. त्याचप्रमाणे एखाद्या बिलाची जबाबदारी दिवाणांनी पत्करली असून कायदेमंडळाने तें बिल फेटाळलें, किंवा त्यांत महत्त्वाचे फेरफार केले, तरी गव्हर्नर जनरलला कायदे करण्याची आपली सत्ता चालवावी लागेल. वरील दोन प्रकारांपैकी कोणताहि घडून आला, तरी त्यांत एक गोष्ट महत्त्वाची आहे. ती अशी कीं, दिवाण किंवा कायदे-मंडळ यांच्या संमतिविना झालेला कायदा हा नेहमींच्या कायद्याहून भिन्न असेल व त्याला 'गव्हर्नर-जनरलचा कायदा' असें संबोधण्यांत येईल. अर्थातच ग. ज. ने मंजुरी दिल्यानंतर कायदे-मंडळाचे जे कायदे रूढ होतात, त्यांच्याहून उपर्युक्त कायद्याचें स्वरूप व भाषाहि वेगळी राहील. त्याची जबाबदारी दिवाणांवर किंवा कायदे मंडळावर रहाणार नाही. पैशाच्या पुरवठ्याबाबत ग. ज. ला जे अधिकार दिलेले आहेत, त्यांतील तत्त्वहि हेंच.

फडणवीस आपल्या सहकाऱ्यांचा सल्ला घेऊन अंदाजपत्रक तयार करील. त्यांतील ज्या बाबी ग. ज. ला आपल्यावरील विशिष्ट जबाबदारी पार पाडण्याचे कामीं अपुऱ्या वाटतील, त्यांना पुरवणीचीं कलमें जोडण्याचा अखत्यार ग. ज.

ला राहील. या पुरवणीच्या कलमावर कायदे-मंडळाचें मत मागितलें जाणार नाही. कायदे-मंडळानें मंजूर केलेल्या अंदाज-पत्रकांतहि वरील कारणाकरिता ग. ज. ला आपल्या सोयीप्रमाणे योग्य तो फेरफार करतां येईल. तात्पर्य, ग. ज. च्या शिरावर विशिष्ट जबाबदारी टाकलेली आहे व ती पूर्ण करण्यासाठी कायदे-मंडळाच्या संमतिविना कायदे करण्याचा जादा अधिकार त्याचे हातीं दिला आहे. अर्थातच केवळ ती जबाबदारी पार पडण्यासाठीच तो हा अधिकार चालवील.

त्याचप्रमाणे आणीबाणीच्या वेळीं ताबडतोब लागू करण्यासारखे कायदे बनविण्याचा अधिकार ग. ज. व त्यांचे दिवाण यांना राहील. त्याचा विशेष उपयोग जेव्हां कायदे-मंडळाची बैठक चालू नसेल तेव्हा होईल. सध्या ग. ज. ला ज्याप्रमाणे वटहुकूम काढण्याचा अधिकार आहे तसा तो चालू रहावा एवढेच नव्हे, तर तसा अधिकार दिवाण आणि ग. ज. यांना मिळून ( म्हणजे संयुक्त सरकारला ) रहावा असे सरकारचें मत आहे.

### प्रांतांचा कारभार

हिंदुस्थानांतील एकंदर प्रांतांची संख्या अकरा होईल. म्हणजे सध्याच्या नऊ प्रांतांमध्ये सिंध व ओरिसा या दोन नव्या प्रांताची भर पडेल. हे सर्व प्रांत स्वयंसत्ताक असे घटक राहतील. त्यांचा कारभार राजाचा प्रतिनिधी म्हणून गव्हर्नर चालवील. त्याला सल्ला देण्याचें काम मंत्रि-मंडळ करील व तें मंत्रिमंडळ कायदेमंडळाला जबाबदार राहील. गव्हर्नरला सल्ला देण्याचा अधिकार मंत्री-मंडळाला राहील. हा सल्ला विशिष्ट जबाबदारीशीं विसंगत नसेल तेव्हा, गव्हर्नर त्याप्रमाणे वागेल. गव्हर्नरची विशिष्ट जबाबदारी गव्हर्नर ज. प्रमाणेंच असेल. त्याला अपवाद पुढीलप्रमाणे' ( १ ) सार्वजनिक शांततेवरील संकट टाळण्यासाठी गव्हर्नरवर जी जबाबदारी राहील ती प्रांतापुरती असेल, सर्व हिंदुस्थानाला व्यापणारी नसेल.( २ ) या बाबतींत ग. ज. ने आपण गव्हर्नरला केलेल्या सूचना अमलांत येत असल्याची खात्री करून घेतली पाहिजे. त्यासाठी गव्हर्नर असा अधिकार राहील कीं, आपल्या दिवाणांचा सल्ला ग. ज. च्या हुकुमाच्या आड येणारा असेल तर, तो त्याने मानू नये. ( ३ ) प्राथमिक स्वरूपाचे (जंगली लोकवस्तीचे कांही स्वतंत्र विभाग समजण्यांत येतील.) तेथे नित्य-पद्धतीचा राज्यकारभार न चालता तो गव्हर्नरला आपल्या जादा अधिकारांत चालवावा लागेल. या विभागापैकीं कांहींवर मंत्रिमंडळाची सत्ता चालेल. अर्थात तिच्यावर आक्रमण करण्याचा अधिकार गव्हर्नरला राहीलच. कांही विभाग मात्र बहुत करून फक्त गव्हर्नरच्याच हुकमतीखाली ठेविले जातील.

### द्विदळ पद्धतीचा अवशेष

कायदे बनविण्याचा अधिकार प्रांत व मध्यवर्ती सत्ता यांमध्ये विभागला जाणार आहे; त्याअर्थी आपत्कालीं वटहुकूम काढण्याचा अधिकार ग. ज. प्रमाणे गव्हर्नरलाहि असणें जरूर आहे. प्रांतिक कायदे-मंडळांचा आकार पुष्कळच वाढविण्यांत येईल. त्यांचें स्वरूप तीन प्रांतांत द्विदल राहील, आठ प्रांतांत एकच सभा असेल. वरिष्ठ सभेचा अधिकार लोक-सभे-इतका राहणार नाही. फेर-तपासणी आणि कालक्षेप हेंच त्यांचें कर्तव्य राहील. वरिष्ठ सभा चालू आहेत, तेथे त्या रद्द करण्याची आणि त्या चालू नाहीत तेथे उत्पन्न करण्याची तरतूद करण्यांत येईल

लोक-सभेतील जागांची वाटणी व निवडणुकीची पद्धत हीं सरकारी जातिनिर्णयाला धरून रहातील. त्यांत दोन किरकोळ फरक होतील-एक पुणें करारानें आवश्यक असलेला व दुसरा ओरिसा प्रांत स्वतंत्र झाल्यामुळे जरूर असलेला. प्रांतिक कायदे -मंडळाचे हे मताधिकार " मताधिकार मंडळाच्या " शिफारशीना धरून असतील, म्हणजे प्रांतिक मतदारांची संख्या खालसांतील लोकसंख्येपैकीं शेकडा १४ इतकी राहील. ( ही संख्या प्रौढांच्या लोकसंख्येच्या मानानें शेंकडा २७ इतकी भरते आणि प्रौढ पुरुषांच्या मानानें शें. ४३ भरते.)

### कायदेमंडळांच्या अधिकारमर्यादा

हल्लीं मध्यवर्ती व प्रांतिक कायदे मंडळांची अधिकार क्षेत्रें अगदी पृथक अशी नाहीत. परंतु मध्यवर्ती संयुक्त राज्यघटना आणि प्रांतिक स्वायतत्ता याच्या योगाने त्यांत पूर्ण फरक होणार असल्यामुळें फेडरल आणि प्रांतिक कायदे-मंडळें यांच्या अधिकारक्षेत्रांच्या मर्यादा घटनेंतच नमूद करणें भाग पडणार आहे.

निव्वळ फेडरल आणि निव्वळ प्रांतिक अशा विषयांच्या खुलाशांच्या याद्या व इतकेंहि करून शेवटीं उभयतांना समान असे जे ' शेषविषय' राहातात त्यांच्या याद्या श्वेतपत्रकाच्या परिशिष्टांत दिलेल्या आहेत.

बादशाहाचा सार्वभौम अधिकार, बादशहाचे कुटुंब, ब्रिटिश राष्ट्रीयत्वविषयक कायदा आणि

तरतमभावदर्शक नियमाचे कांही प्रकार अशासारखे विशिष्ट विषय कायदेमंडळांच्या अधिकाराच्या बाहेर ठेवण्यांत येतील.

**उत्पन्नाची विभागणी**

संयुक्त सरकार आणि त्याचे प्रांतिक घटक यामधील उत्पन्नाची वांटणी कशी करावी ह्या भानगडीच्या प्रश्नाचा विचार बऱ्याच विस्ताराने करण्यांत आला आहे. इन्कमटॅक्स किंवा उत्पन्नावरील कराशिवाय इतर उत्पन्नाच्या बाबींचे खालील चार वर्ग केले आहेत—

(१) केवळ फेडरल उत्पन्न—यांत (मिठाशिवाय) सर्व आयात जकाती, रेल्वे खात्याकडून मिळणारे हप्ते, अन्य फेडरल व्यापारी खात्यापासून होणारी जमा, टांकसाळीवरील नफा आणि रिझर्व्ह बँकेच्या व्यवहारांतील नफ्याचा कांही अंश यांचा समावेश होतो.

(२) उभयोपयोगी फेडरल बाबी—यामधील बाबी फेडरल खऱ्या; परंतु त्यांतील कांही अंश किंवा सर्वहि बाब कोणा प्रांतिक घटकाला तोडून देण्याचा अधिकार संयुक्त सरकारला राहील. यांत निर्गतीवरील जकाती, मिठावरील, आणि तंबाखूआदि करून जिनसांवरील जकातीचें अबकारी उत्पन्न (खालील कलम ४ मधील बाबी वगळून) अशीं येतात.

(३) उभयोपयोगी प्रांतिक बाबी ह्या सामान्यतः प्रांतिक उत्पन्नाच्या बाबी होत. परंतु यांवर संयुक्त सरकारच्यासाठी म्हणून जादा फेडरल आकार बसवितां येईल. माल आणि उतारू यावरील स्थानपरत्वें वसूल केले जाणारे टोल आणि कांही प्रकारच्या स्टँपांचे उत्पन्न ही यांत समाविष्ट होतात.

(४) केवळ प्रांतिक सरकारांचे उत्पन्न जमीन महसूल, मादक व भुलीच्या जिनसांवरील अबकारी जकात, स्टँप ड्यूटी (याला कांही अपवाद आहेत), राखीव जंगलें आणि इतर प्रांतिक व्यापारी खातीं, आणि इतरत्र विभागून न दिलेलीं कराचीं खातीं (कांही अटी यांतहि आहेत) ह्या बाबी प्रस्तुत वर्गांत पडतात.

**प्राप्तीवरील कराची वाटणी**

सदर कराबद्दल (प्रांतिक सरकारांनी स्वतः करितां जादा वाढावा आकारण्यासाठी करावयाच्या नियमांखेरीज इतर) सर्व बाबतींत फेडरल कायद्या-प्रमाणें नियंत्रण होईल. कराचें उत्पन्न उभय सरकारांनी आपसांत वाटून घ्यावयाचें आहे. त्याचें प्रमाण जरी अद्याप नक्की झालेलें नाही तथापि संयुक्त सरकारचा हिस्सा शेंकडा २५ आणि ५० टक्के यांच्या दरम्यान राहील.

प्रांतिक घटकांप्रमाणेंच फेडरल कायदेमंडळाला स्वतःसाठीं म्हणून जादा वाढावा आकारण्याचा अधिकार असून, असा वाढावा सर्वस्वी फेडरेशनच्या खजिन्यांत जमा होईल.

फेडरल नोकरींतील अधिकाऱ्यापासून वसूल झालेला उत्पन्नावरील कर आणि चीफ कमिशनराचे अधिकारांतील प्रांत व इतर फेडरल प्रदेश यांतील सदर कराचें उत्पन्न हीहि केवळ फेडरल उत्पन्नाची बाब होईल.

फेडरल अबकारी जकाती सारखे नवे कर फलदायी होण्याइतका काळ लोटण्यापूर्वी म्हणजे संयुक्त घटनेच्या प्रारंभीच्या काळांत ही विभागणी फेडरेशनच्या दृष्टीने थोडी अपुरी ठरेल असा अंदाज आहे.

**तात्पुरती तरतूद**

यामुळे उत्पन्नावरील कराच्या प्रांतिक हिश्शांतूनहि फेडरेशन सरकारला कांही ठराविक ठोकळ रक्कम मिळावी अशी मधल्या काळापुरती व्यवस्था करण्याचें योजिले आहे. हा ठोकळ आंकड पहिल्या तीन वर्षे पर्यंत कायम ठेऊन नंतर सात वर्षांत मिळून एका ठराविक प्रमाणांत कमी कमी करण्यांत येईल.

सुचविलेल्या योजनेमुळे कांही प्रांतिक घटक आणि विशेषतः सरहद्द वायव्य प्रांत, सिंध, ओरिसा आणि कदाचित् आसाम हे प्रांत कांहीसे तोट्यांत येण्याचा संभव आहे. त्यासाठी नवी घटना प्रत्यक्ष अमलांत येण्यापूर्वी, शक्य तितक्या उशीरा, त्या वेळच्या आर्थिक परिस्थितीचा विचार करून, फेडरेशन सरकार आणि प्रांतिक सरकारें यांच्या उत्पन्नाच्या विभागणीबद्दल फेरविचार करण्यांत यावा असा विचार आहे.

**नोकर वर्ग**

हिंदी सिव्हिल सर्व्हिस, हिंदी पोलीस आणि धर्मखात्यांतील नेमणुका पूर्ववत् सेक्रेटरी ऑफ स्टेटांचे कडूनच होण्याची व्यवस्था चालू राहणार आहे. घटना स्थापन होऊन पांच वर्षें झाल्यावर त्यानंतर ह्या खात्यांत भरती करण्याच्या प्रश्नाबद्दल चौकशी करण्याविषयी घटनेंतच व्यवस्था करण्यांत येईल. तोपर्यंत या खात्यांत भरती व्हावयाच्या ब्रिटिशांचें हिंदी लोकांशीं प्रमाण आहे तेंच राहील.

**स्टॅट्यूटरी रेल्वे बोर्ड**

रेल्वे विषयक धोरणावर फेडरल कायदेमंडळाचे सामान्यपणें नियंत्रण राहील. मात्र हिंदी रेलवेंच्या कारभारावर एका स्वतंत्र सरकार-नियुक्त मंडळाने नियंत्रण करावे असें बादशहांच्या सरकारचे मत आहे. ह्या मंडळाला रेल्वेचा कारभार राजकीयदृष्ट्या अडथळा होऊ न देता केवळ

व्यापारी तत्वावर करतां, यावा अशा तऱ्हेची त्याची निवड करण्यांत येईल.

वादग्रस्त प्रश्नांबद्दल सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे दाद मागण्याचे जे हक्क आपापल्या कराराअन्वये आज रेल्वेकंपन्यांना आहेत, ते तसेच राखण्यांत यावेत असा विचार आहे. स्टॅटयूटरी रेल्वे बोर्ड स्थापन करण्याच्या अनुषंगानें उद्‌भवणारे इतर अनेक प्रश्न अद्यापि अनिर्णीतच आहेत.

### मूलभूत हक्क

घटनेमध्येंच (प्रजाजनांचे) मूलभूत हक्क समाविष्ट व्हावे याबद्दल गोलमेज परिषदेंत बरीच भवति न भवति झाली.

अशा तऱ्हेच्या व्यापक स्वरूपाच्या घोषणा घटनेंत नमूद करण्याला बादशाही सरकारच्या दृष्टीनें अनेक आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत. तथापि वैयक्तिक स्वातंत्र्य व जिंदगीवरील हक्क, सरकारी नोकऱ्या मिळण्याची जातिधर्मभेदातीत लायकी, अशासारख्या कांही गोष्टी घटनाकायद्यांत समाविष्ट करण्यास त्यांची ना नाही.

### ब्रह्मदेश वगळला

बर्मा गोलमेज परिषदेंत सुचविलेल्या घटनेबर-हुकूम हिंदुस्थानापासून विभक्त व्हावें अगर गव्हर्नरांचें सरकार असणारा एक प्रांत म्हणून हिंदी फेडरेशनमध्ये सामील व्हावें, अशा दोन गोष्टी-पैकीं कोणतीहि ब्रह्मदेशनें अद्यापि निश्चितपणें स्वीकारली नसल्यामुळे, त्या देशाबद्दल कोणत्याही सूचना श्वेतपत्रकांत समाविष्ट केल्या नाहींत, अशी टीप पत्रकाला दिलेली आहे."

# श्री. सयाजीरावांच्या पुण्यांतील सत्काराची सयुक्तिकता

बडोद्याचे महाराज श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांची स्वारी गेल्या आठवड्यांत पुण्यास आली व त्यांचें स्वागत पुणेंकरांनी मोठ्या थाटाने केलें. यापूर्वी सयाजीराव पुणें शहरीं दोनतीन वेळां येऊन गेले आहेत. परंतु त्या वेळीं त्याजकरिता पुण्यांत एवढा जंगी समारंभ झाला नव्हता. इतकेंच काय, पण बाहेरून कोणी हिंदी संस्थानिक यावा व त्याच्या स्वागतार्थ हजारों नागरिकांनी उत्साहाने एकत्र जमावें असें हें पुणें शहरांत तरी पहिलेंच उदाहरण समजण्यास हरकत नाही. महाराजांना ७१ वें वर्ष नुकतेंच लागलें. त्याबद्दल आनंदोत्सव करावयाचा झाला तर तो त्यांच्या प्रजाजनांनी.त्याच्याशीं बडोदे संस्थानाबाहेरील जनतेचा तादृश संबंध नाही. या दृष्टीने विचार करणारास श्रीमंत सयाजीराव यांच्या पुण्यांतलि स्वागताचें गूढच पडणार आहे; तथापि तें उलगडणें फारसें कठिण आहे असें नाही.

श्रीमंत सयाजीराव आता वयोवृद्ध झाले आहेत. त्यांनी शेवटची भेट पुण्यास सुमारें चोवीस वर्षांपूर्वी दिली. त्यापुढचा बहुतेक काळ त्यांनी युरोप खंडातच घालविला. वर्षांतून कांही दिवस ते हिंदुस्थानांत येऊन राहतात. परंतु ते दिवस त्यांना स्वतःच्या राज्याची व्यवस्था पाहण्यासहि पुरत नाहीत; मग इतर शहरांना भेट देण्याची गोष्ट दूरच ! अशा स्थितीत या खेपेस ते फुरसतीने पुण्यास आले असतां या वृद्ध राजाचें दर्शन घ्यावे या बुद्धीने हजारों नागरिक त्यांच्या सन्मानार्थ भरलेल्या सभांना जमावे यांत आश्चर्य नाही. पण केवळ वृद्धपणा ही कांही मनुष्याची शिफारस नव्हे. कारण सामान्य प्रतीचीं वृद्ध माणसें व वृद्ध संस्थानिकहि देशांत काय थोडे आहेत? पण त्या कोटींतील श्रीमंत सयाजीराव हे नाहीत. हिंदुस्थानांतील संस्थानिकांत त्यांचा दर्जा श्रेष्ठ आहे. इंग्रजी राज्य स्थापन झाल्यापासून महाराष्ट्रीय संस्थानिकांतहि त्यांच्या तोडीचे पुरुष फारसे निपजले नाहीत. हल्लीच्या बहुतेक संस्थानिकांचे पूर्वज गरीब कुळांतच जन्मास आले होते. परंतु ते केवळ आपल्या कर्तबगारीवर व पराक्रमावर लहानाचे मोठे झाले व सरदार बनले. शिंदे व होळकर या घराण्यांच्या संस्थापकांनी गरीब व हलक्या कुळांतूनच डोकें वर काढलें. शिंदे घराण्याचा मूळ पुरुष राणोजी हा पेशव्यांच्या पादुका बगलेंत मारणारा यःकश्चित हुजऱ्या होता. मल्हारराव होळकर हा आपल्या आजाचीं मेंढरें वळीत होता. पण या दोघा पुरुषांनी लढाईत तलवार गाजवून व शौर्य प्रकट करून आपल्या हयातींत मोठी जहागीर तर कमावलीच,पण सेनापतीचें अभिलषणीय पदहि मिळविलें. राणोजी शिंदे व मल्हारजी होळकर हे दोघे ज्या पेशव्यांच्या पदरी वाढले ते पेशवेहि बोलूनचालून भट घराण्यांतील. ते आडनावाप्रमाणें भिक्षुकीवर निर्वाह करीत नसले तरी त्यांची योग्यता देशमुखाहून अधिक नव्हती. असें असतांहि कारकुनीपासून वाढत वाढत पेशवे घराण्याचा उत्पादक बाळाजी विश्वनाथ हा मराठी राज्याच्या अष्टप्रधानांत पहिला प्रधान होऊन बसला !

हें पूर्ववृत्त इतक्या विस्तारानें सांगण्याचें कारण असें कीं त्या जिवंत काळांत कोणाहि मनुष्यास मोठे पद प्राप्त होण्यापूर्वी आपली पात्रता शाबीत करणें

काम पडे. ती स्थिति सध्याच्या इंग्रजी राज्यांत राहिली नाही. या इंग्रजी राजवटींत कोणी मनुष्य कितीहि कर्तबगार व सामर्थ्यवान असला तरी त्याला एखादी नवी जहागीर किंवा राज्य मिळविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगावयास नको. त्याचें दैव तितकें थोर असल्यास त्याने निपुत्रिक संस्थानिकास दत्तक जावें. पण हेंहि दत्तविधान अशा वयांत होतें कीं, त्या वेळीं त्या दत्तकाची लायकी कोणासहि अजमावतां येत नाही. श्रीमंत सयाजीराव इतक्या लहानपणींच दत्तक गेले. श्रीमंत जम्नाबाईसाहेबांनी त्यांना दत्तक घेतलें तेव्हा त्यांचें वय तेरा वर्षांचें होतें. याचा अर्थ असा कीं ते गायकवाडांच्या गादीचे मालक आधी झाले व त्या गादीवर बसण्याची स्वतःची लायकी त्यांनी मागाहून शाबीत केली. त्यांच्या मोठेपणाचें इंगित असलें तर तें या एका गोष्टींतच आहे.

तसें म्हटलें तर त्यांचा जन्म एका अगदी गरीब घराण्यात झाला. त्यांच्या वडिलांचे नांव काशीराव. काशीराव हे नाशिक जिल्ह्यांत मनमाड स्टेशनापासून थोड्या अंतरावरच्या कवळाणे गांवीं राहात असत. त्यांना तीन मुलगे. त्यांपैकीं गोपाळराव म्हणजे सध्याचे सयाजीराव हे मधले. दत्तकाची निवड करण्यासाठी या तिघा भावांना जम्नाबाईसाहेबांकडे बडोद्यास नेलें तेव्हा गोपाळरावास जम्नाबाईंनीं पसंत कां केलें याची एक नवलकथा प्रसिद्ध आहे. जम्नाबाईंनी त्या तिघांहि मुलांना 'तुम्ही येथे का आला' म्हणून विचारलें. त्यावर इतर दोघांनी सामान्य कारणें सांगितली. पण सयाजीरावांनीं कारण सांगितलें ते त्यांच्या भावी थोरपणाचे निदर्शक म्हणून गणले गेले. ते म्हणाले 'मी राजा होण्यासाठीं आलों आहें.' झालें. ईश्वर त्यांचा परीक्षा तेवढ्या उत्तरावरून जम्नाबाईंनी त्यांना दत्तक घेण्याचें ठरविलें. दुसरेंहि एक कारण असें सांगतात कीं त्या तिघा मुलांपुढे खिरीच्या तीन निरनिराळ्या धातूंच्या वाट्या ठेवण्यांत आल्या. त्यांतून सोन्याची वाटी होती तीच गोपाळानें उचलली. यांतहि राजपदास साजशी त्यांची वासनाच प्रतिबिंबित झाली. अर्थात् या सर्व नवलकथा [illegible] होत!

अशा रीतीने सयाजीरावांविषयीं जम्नाबाईंनीं लहानपणीं जो अंदाज बांधला तो खरा ठरला व त्यांची गणना त्यांच्या अनेक असाधारण गुणांमुळे उच्च प्रतीच्या राज्यकर्त्यांत करण्यांत आली. पण ते राजे झाले तरी एका बडोदे संस्थानाचे त्यांचा गौरव मुंबई व पुणें यासारख्या ब्रिटिश हद्दींतील शहरांत कां व्हावा? याचें कारण असें कीं ते महाराष्ट्रीय असल्यामुळे त्यांजविषयी महाराष्ट्रीयांना आपलेपणा वाटतो. उलटपक्षीं महाराज मुंबई व पुणें या शहरीं आले तसे बंगाल किंवा मद्रास इलाख्यांतील मोठाल्या शहरीं गेले असते तर त्यांचा असा सत्कार झाला नसता. आता महाराष्ट्रीयांना महाराजांविषयी आपलेपणा वाटतो तसाच महाराजांनाहि महाराष्ट्रीयांविषयी वाटत असला पाहिजे हें ओघानेच कबूल करावें लागतें. आणि आपलेपणा म्हटला कीं त्याबरोबर त्याच्या अनुषंगानें होणारा फायदाहि आलाच. महाराजांच्या महाराष्ट्रीयपणामुळें त्यांचा सगळा गोतावळाहि महाराष्ट्रीयच आहे. त्या गोतावळ्यास राजघराण्यापासून व्हावयाचा आर्थिक लाभ झालाच असेल; पण त्याखेरीज महाराष्ट्रांतील मराठे, ब्राह्मण आदिकरून जातीहि कमीअधिक प्रमाणांत त्या लाभाच्या अंशभागी आहेत. महाराष्ट्रांतील मराठ्यांना शिक्षणाचीं व नोकरीचीं साधनें उपलब्ध करून देऊन त्यांना ऊर्जित दशेस आणण्याचें श्रेय महाराजांच्या औदार्यास व अभिमानासच आहे हेंहि मान्य केलें पाहिजे.

महाराजांपासून हे फायदे झाले तरी कांही मर्यादित व्यक्तींनाच असणार. त्या व्यक्ती व संस्था अर्थातच फार थोड्या. पण पुण्या-मुंबईंतलि समारंभांत सामील झालेले हजारों लोक असे होते कीं ते महाराजांचे कोणत्याहि प्रकारें मिंधे नव्हते. मग त्यांच्या ठिकाणीं महाराजांविषयीं इतका आदरभाव कां दिसावा? त्याचेंहि निमित्त शोधण्यासाठी फार दूर जावयास नको. महाराष्ट्रीय लोक कालवशात् आज पराधीन व पतित झाले असले तरी त्यांस आपण पूर्वी हिंदुस्थानभर वैभवशाली साम्राज्य गाजविलेल्या रणशूरांचे वंशज आहों असा अंतर्यामीं अभिमान वाटत असतो. शिंदे, होळकर, गायकवाड व पवार इत्यादि उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानें या त्या साम्राज्याच्याच शाखा असल्यानें त्यांजकडे पाहून त्यांस एक प्रकारचें आनंदाचें भरतें येतें, व स्वतःच्या श्रेष्ठत्वाविषयी आत्मविश्वास उत्पन्न होतो. शिवजयंत्युत्सव, संभाजी उत्सव बाजीराव-मल्हार उत्सव असल्या राष्ट्रीय उत्सवांना ज्या उदात्त मनोवृत्तींस जन्म मिळतो तीच मनोवृत्ति सयाजीरावासारख्यांच्या आगमनप्रसंगानें अंशतः उदय पावते. ज्यांची दृष्टि इतकी दूरवर पोंचत नाही असलेहि लोक या समारंभांत आनंद मानतात, ते केवळ राजवैभवाला भुलून.

सध्याचा काळ लोकसत्तेच्या महिम्याचा आहे. साऱ्या जगभर राजांच्या सिंहासनांचीं शकलें उडून सामान्य लोक आपली सत्ता स्थापन करीत आहेत. हिंदुस्थानांतहि त्याच लोकसत्तेवर राजकीय विचाराच्या माणसांचीं मनें जडलीं असून ती सत्ता मिळविण्याकरिता हजारों माणसें देहदंड भोगीत

आहेत. जनतेला अगदी साध्या राहणीची न म्हटली तरी साध्या कपड्यांची गोडी लागत चालली आहे. भरजरीचे अंगरखे, लफ्फेदार पागोटी मोत्यांची पेंडकीं, हिऱ्याच्या आंगठ्या व सोन्याची सलकडी आता सरदारांच्या व श्रीमंतांच्या शरीरावरहि फारशी दृष्टीस पडत नाहीत. सामान्य जनतेंत तर जिकडे पाहावें तिकडे गांधी टोपी व नेहरू सदरा यांनाच मान देण्यांत येतो. असा साधा देखावा सर्वत्र दिसत असता आणि संस्थाने बुडाली पाहिजेत व सारा हिंदुस्थान देश सपाट झाला पाहिजे अशा आरोळ्या वारंवार वक्त्यांच्या तोंडून निघत असता एका बड्या संस्थानिकाचा दरबारी थाटाने व डामडौलाने सत्कार-समारंभ व्हावा व त्याचे प्रत्येकाने कौतुकच करावें याचें कारण मनुष्यमात्राच्या हृदयांत नैसर्गिक रीत्या वसणाऱ्या ऐश्वर्यप्रीयतेशिवाय दुसरें कोणते असणार ? मनुष्यप्राणी कालाच्या ओघांत सांपडून कांही रीतिरिवाज मुद्दाम पाडीत व पाळीत असला तरी त्याचा स्वाभाविक कल तिकडे नसतो. जरा संधि मिळाली कीं, तो आपली ऐश्वर्याची व वैभवाची लालसा तृप्त करून घेतो. सणावारीं किंवा मंगलकार्याच्या प्रसंगीं प्रस्तुत काळांतहि तो आपली असेल नसेल ती श्रीमंती आपल्या स्वाभाविक प्रवृत्तीमुळे बाहेर मांडून ठेवतो. मग तशांत राजा म्हटला कीं तें ऐश्वर्याचें शिखरच होय. तो जुन्या कर्तृत्वदर्शक, पराक्रमदर्शक, वैभवदर्शक लव्याजम्यानिशी व भालदार चोपदारांच्या ललकारणीनिशीं भव्य मंडपांत येणार असें समजल्यावर त्यांस पहाण्याकरिता लोकांचे थवेच्या थवे लोटावे यांत नवल काय ?

पुणेकरांनी श्रीमंत सयाजीरावांचे आदरातिथ्य आपल्या शक्तीप्रमाणें इतक्या भपक्याने केलें म्हणून ते कोणत्याहि महाराष्ट्रीय संस्थानिकाच्या वांट्यास येईल असें कोणी कां समजूं नये, याचीं कारणें वर सांगितलींच आहेत. बडोद्याचें एवढे विस्तृत व संपन्न राज्य सयाजीरावांना केवळ दैवाने हात दिला म्हणूनच लाभलें यांत शंका नाहीं. त्याचप्रमाणें त्यांस तें गेलीं बावन वर्षे उपभोगावयास मिळालें हाहि दैवाचाच खेळ होय. परंतु मनुष्याचे स्वतःचें कर्तृत्व असें आहे कीं तें फारसें दैवावर अवलंबून राहात नाहीं. दैवयोगाने मिळालेल्या सुसंधीचा भरपूर फायदा मनुष्याने आपल्या गुणांनीं व कर्तृत्वाने न घेतला तर दैवालाहि अशा नादान मनुष्यापुढे हातच टेकावे लागतील. पण सयाजीरावांचा विशेष हा कीं त्यांना राजपद मिळालें, कोट्यावधि रुपयांची संपत्ति व लाखो प्रजाजनांची सत्तासाहेबी त्यांच्या हस्तगत झाली आणि त्या सर्वांचा उपयोग त्यांनी आपल्या प्रजेच्या व परंपरेने एकंदर देशाच्याहि कल्याणाकडेच केला याचे श्रेय पुष्कळ अंशी त्यांच्या निसर्गसिद्ध सद्गुणांना व सत्प्रवृत्तीलाच दिलें पाहिजे. आपलें राज्य सुराज्य असावे व तसे ते नमुनेदारपणाने करून दाखवावें या महत्त्वाकांक्षेने त्यांनी राज्यसूत्रें धारण केली व लोकांच्या मागणीची वाट न पाहताहि त्यांनी कित्येक राजकीय, सामाजिक, धार्मिक व शिक्षणविषयक सुधारणा कायद्यानी अमलांत आणिल्या. त्यांच्याइतका गुणांचा चहाता व विद्येचा भोक्ता असा राजा विद्यमान संस्थानिकांत विरळाच आढळेल. समदृष्टि व न्यायप्रियता हे त्यांचे दुसरे ठळक गुण होत. आपली जात, आपला प्रांत, आपली भाषा व आपली पूर्वपरंपरा यांविषयी योग्य ती हितबुद्धि जागृत असता त्यांनी तिला न्यायाच्या मर्यादा सहसा उल्लंघूं दिल्या नाहीत.

गुर्जर देशाचे राजे या नात्याने तेथील प्रजेच्या हितास श्रीमंत सयाजीराव हे सहजच अग्रस्थान देतात. मागासलेल्या जातींचे पुढारी या नात्याने महाराष्ट्रांतील मागसलेल्या जातींना सक्रिय सहानुभूति दाखवितात व हिंदुस्थानांतील प्रमुख राजे या नात्याने जात, गोत, प्रांत, देश व धर्म यांना विशिष्ट मर्यादेपलीकडे गौण समजून पात्रापात्रतेप्रमाणे कोणाहि व्यक्तीचा पदरीं संग्रह करण्यास तत्पर असतात. या दूर व्यापक व विशाल दृष्टीमुळेच त्यांना काजी शहाबुद्दिन, सर रमेशचंद्र दत्त, बाबू अरविंद घोष, अंबालाल साकरलाल, जनार्दन सखाराम गाडगीळ, विनायक जनार्दन कीर्तने व आठल्ये इत्यादि विविध जातींतील, धर्मांतील व प्रांतांतील लोकांच्या गुणांचें व कर्तृत्वाचें चीज करतां आलें. त्यांचा हा क्रम अद्यापिहि चालू असून थोड्याच दिवसांपूर्वी त्यांनीं डॉ. रवींद्रनाथ टागोर, श्री. चिंतामणराव वैद्य, श्री. विठ्ठलराव शिंदे प्रभृतींना अगत्यपूर्वक निमंत्रण देऊन त्यांचा गुणगौरव कसा केला हें सर्वांस माहीतच आहे.

जनतेशीं त्यांची वर्तणूक जशी उदार न्यायाची व सौजन्यपूर्ण आहे तसेंच त्यांचें ब्रिटिश सरकाराशीं वागण्याचें धोरण बाणेदारपणाचें व स्वाभिमानपूर्ण आहे. आपली इभ्रत, अधिकार व दर्जा कायम राखण्याच्या बाबतींत लॉर्ड कर्झनसारख्या अनेक चढेल व्हाईसरॉयाशी व रेसिडेंटाशीं त्यांस झगडावें लागलें आहे व त्या झगड्यात त्यांना केव्हा केव्हा यशहि मिळालें आहे. परंतु ब्रिटिशसरकाराशी झालेल्या तहनाम्यांतील कलमें कितीहि काटेकोरपणाने पाळण्याचा आपण प्रयत्न केला तरी अखेर पराधीनता महत्त्वाच्या राजकारणांत नडते असा कटु अनुभव आल्यामुळें महारा-

जांनी आपली मर्यादा ओळखून वरिष्ठ राजकारणांतून मन काढून घेतलेलें दिसतें. गेलीं वीस पंचवीस वर्षें त्यांनी एक प्रकारचा राजसंन्यास पत्करला आहे. तो वयोमानामुळें किंवा प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे असला तरी त्यांत निराशेचा छटा अगदींच नसेल असें म्हणवत नाही. तथापि त्यांनी आपल्या पूर्ववयांत जीं अनेक लोकोपयोगी कामे केली त्यामुळें त्यांना आपल्या संस्थानाबाहेरहि लोकप्रियता मिळवितां आली. त्यांचा पुण्यांत व मुंबईत कित्येक संस्थाकडून गुणगौरव करण्यांत आला तें त्यांच्या लोकप्रियतेचेंच फळ होय. न्यायबुद्धि, समता, गुणग्राहकता, जातिद्वेषाचा अभाव हे त्यांच्या अंगचे ठळक गुण असून ते कित्याप्रमाणें डोळ्यांपुढे ठेवून त्याप्रमाणे आचरण ठेवण्याची बुद्धि इतर कित्येक संस्थानिकांनाच काय पण व्यक्तीनाहि झाली तर त्यांच्या सत्कारसमारंभाचें खरें चीज झालें असें मानतां येईल.

# श्रीमंत सयाजीरावांचा पुण्यांतील सत्कार

मंगळवार ता. २१ रोजीं सायंकाळीं ६॥ वाजता श्रीमंत महाराज सर सयाजीराव गायकवाड यांचा सन्मान त्या करितां मुद्दाम स्थापन झालेल्या सत्कार मंडळातर्फे व स्थानिक अशा सुमारें पाऊणशें संस्थांतर्फे टिळकमंदिराच्या पटांगणावर मोठ्या थाटानें व उत्साहाने करण्यांत आला. पोतदार आणि कंपनीने वेजेचे रंगीबेरंगी दिवे लावून मंडपाला अधिक आकर्षकता आणली होती. तसेंच सदर कंपनीनें ध्वनिक्षेपक ( लाऊड स्पीकर्स ) यंत्राची योजना केल्यामुळे पांच सहा हजार श्रोतृसमुदाय असतांहि सर्वांना वक्त्यांचीं भाषणें स्पष्टपणें ऐकूं जाण्यास मदत झाली. समारंभास राजघराण्यांतील सर्व खाशी मंडळी लवाजम्यानिशी उपस्थित होता. प्रारंभीं सेवासदन संस्थेतील मुलींनी 'नमने वाहुनी स्तवने उधळा जयजयकार करा' हें स्वागतपद्य व 'बहु असोत सुंदर संपन्न कीं महा। प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा ॥' हें राष्ट्रगीत म्हटलें. नंतर श्री. गो. कृ. देवधर यांचें खालील आशयाचें प्रास्तविक भाषण झालें.

### श्री. देवधर यांचें भाषण

"आज आपण ज्या पाहुण्यांच्या सत्कारार्थ येथे जमलो आहो त्यांचें नांव आपणा सर्वांना परिचित आहेच.आजचा समारंभ ज्या अनेक कारणांनी चिरस्मरणीय असा होणार आहे त्या कारणसमुच्चयापैकी एक कारण असे कीं,महाराज सरकार परिवारासह आमच्या विनंतीला मान देऊन आले हें तर झालेच पण त्यांचा सत्कार करण्यास पुण्यांतील सर्व जुन्या नव्या लहान थोर संस्था अहमहमिकेने पुढे येऊन त्यांनी उत्साहाने भाग घेतला. तसेंच दुसरें प्रमुख कारण असें कीं महाराजांना नुकतेंच ७१ वें वर्ष लागलें आहे. अशा वेळीं त्यांचें आयुरारोग्य चिंतण्याची संधि महाराजांनी पुणेकरांना दिली याबद्दल पुणेंकर मंडळी त्यांची आभारी आहे. इमर्सनने समाजकर्त्यापुरुषांचे दोन भाग कल्पिले आहेत. पैकीं एक स्पिरीच्युअल आर्किटेक्ट व दुसरा सोशल आर्किटेक्ट. या दोन विभागांपैकीं दुसऱ्या विभागांत महाराजांची गणना करता येईल. सन १९१७ सालीं हिंदुस्थानांत फेडरेशन म्हणजे काय याची सामान्य लोकांना कल्पनाहि नव्हती; अशा काळांत सर्व संस्थानिकांचें एकीकरण करून संयुक्त राज्यघटना करावी अशी कल्पना ज्या विद्वान गृहस्थांनीं मूळ काढली त्यांत महाराजांचे नाव आढळून येईल. तसेंच सन १९०४ सालीं हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांची स्थिती अगदीं हीन दीन झाली व तीं सुधारण्याकरतां म्हणून लॉर्ड कर्झन यांनी सहकारी संस्थांचा कायदा केला. तो महाराजानींच प्रथम अमलांत आणून आपल्या संस्थानांत शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्यास मदत केली. यावरून महाराजांचे अंतःकरणांत स्वदेश हिताची जोत कशी तेवत आहे हें दिसून येतें.

पुण्यांतील मंडळी व्यापार धंद्याच्या क्षेत्रांत जरी मागासलेली दिसली तरी स्वार्थत्याग, स्वावलंबन, शिक्षण व समाजसेवा या क्षेत्रांत मात्र आघाडीला आहेत. हल्लींची भोंवतालची परिस्थिति पाहिली तर ती आम्हाला सर्व बाजूंनीं निराशाजनक व रडावयास लावणारी दिसते. पण परिस्थितीलाहि आपल्या मनासारखे वाकविणारी जी जुनी जोरदार मंडळी अद्याप हयात आहेत व जी कानीं कपाळीं ओरडून 'लढा पण रडूं नका' असें सांगत आहेत त्यापैकींच महाराजहि आहेत असो अशा तऱ्हेच्या सर्वगुणसंपन्न व थोर पुरुषाचें मी आपणा सर्वांतर्फे अंतःकरणपूर्वक स्वागत करतों."

येणेप्रमाणे श्री. देवधर यांचें स्वागतपर भाषण झाल्यावर श्री. न. चिं. केळकर यांनीं भाषण केलें.

## श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड



### श्री. न. चिं. केळकर यांचें भाषण

"रा. देवधर यांनीं स्वागत केलेंच आहे. महाराजांचें येथे स्वागत झालें तें परदेशचे कोणी मोठे राजे पुण्यास आले अशा भावनेने नाही. तर केवळ ते आपले आहेत अशा आपलेपणाच्या भावनेन झालें. पुणें व बडोदे या शहरांत बरेंच सादृश्य आहे. त्यांची मांडणी, रहाणी व समाजाची संस्कृति यांत पुष्कळ साम्य आहे. परवाच गीताप्रवचनकार भिडेशास्त्री बडोद्यास गेले. तेथे त्यांचा सत्कार झाला तसा एरवी तो होताना. पुण्याला बडोद्याचा अभिमान आजकालचा नाही. ६०।६५ वर्षांपूर्वी बडोद्यास राज्यक्रांति होण्याचा एक प्रसंग आला. त्या वेळीं पुणें शहरांतीलच दोन तीन प्रमुख पुढाऱ्यांनी न्यायाची मागणी करून त्याचा खर्च उभारण्याचें आश्वासन दिलें होतें. तसेंच कोल्हापूर संबंधानेहि संस्थानिकांचा अभिमान धरून टिळक व आगरकर यांनी तुरुंगवासहि पत्करला ही गोष्ट प्रसिद्ध आहे! तात्पर्य, महाराष्ट्राला राजेरजवाड्यांचा अभिमान अजून आहे याचें एक कारण असें कीं, स्वराज्याची आठवण महाराष्ट्राला जशी आहे तशी ती इतर प्रांतांतून फार थोडी आहे.

दुसरें असें कीं, महाराष्ट्रांतील राजेरजवाडे, अर्थात् एक प्रकारच्या तुलनेने सर्वस्वी असे नव्हे, इतर प्रांतांतील राजेरजवाड्यापेक्षा चांगले आहेत असें मला वाटते. आणि हा अभिमान सार्थ होण्याचें कारण इकडील कांही राज्यांतून असलेली सुराज्यव्यवस्था हें होय. या काळांतहि राज हवेत पण ते सुराज्याची आस्था बाळगणारे हवेत. सुराज्याची आवड व हौस ही सर्वांनाच असते. पण ती गरीबाला असून काय उपयोग? हातीं अधिकारहि तसाच असावा लागतो. या दृष्टीने पाहतां महाराजांना दैवाने हात दिला; पण महाराजांचा गुण हा कीं, त्यांनी या संधीचा उपयोग केला आणि सुराज्यव्यवस्थेविषयीं व जनतेच्या हिताविषयीं काळजी बाळगली. महाराजांच्या राज्यव्यवस्थेचें वर्णन खातेंवार किंवा तपशीलवार मी करीत बसत नाही. थोडक्यांत मी इतकेंच सांगतो कीं, राज्यकर्त्यांच्या जोरावर होणारी समाजसुधारणा, शिक्षण व विद्या यांवर त्यांनी पुष्कळ लक्ष दिलें. पण महाराजांच्या ठिकाणीं दुसराहि एक गुण आहे त्याचा विशेष प्रकारें उल्लेख करावा असें मला वाटतें. महाराज हे गुर्जर प्रजेवर राज्य करणारे असले तरी मूळचे ते महाराष्ट्रीयच होते. या दृष्टीने महाराष्ट्राच्या अंगचा अस्सल एक गुण त्यांजमध्ये आलेला असल्यास नवल नाही.

### विरोधी पक्षांची तोंडमिळवणी

हा गुण म्हणजे विरोधी हितांची व पक्षांची तोंडमिळवणी व जमाई करणें. यावरून मला लो. टिळक यांच्या १९१९ सालच्या कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहिरनाम्याची आठवण होते. त्यांत लक्षांत ठेवण्यासारखी एक गोष्ट असेल तर ती विरोधी पक्षांची तोंडमिळवणी करण्याचा प्रयत्न केला होता ही होय. देशांत आज श्रीमंत, गरीब, भांडवलवाले, मजूर असे अनेक पक्ष पडले आहेत; व कोणी आपण गरीबांचे वाली म्हणून उठला तर तो सहजच लोकप्रिय होतो यांत आश्चर्य नाही. पण गरिबांचे हित पहावयाचें म्हणून श्रीमंत नाहीसे करावयाचें कीं काय असा प्रश्न सहजच लो. टिळकांच्यापुढे उभा राहिला. तेव्हां त्यांनी आपल्या जाहिरनाम्यांत "गरीब व श्रीमंत, कामकरी व कारखानदार, मजूर व भांडवलवाले या सर्वांच्या मिळून हिताची तोंडमिळवणी करणें हें आपल्या राजकीय पक्षाचें ब्रीद राहील" असें लिहिलें. माझ्या समजुतीने हा अस्सल महाराष्ट्रीय गुण होय; व श्रीमंत सयाजीराव यांचेमध्ये तो उतरला आहे त्याचीं कांही उदाहरणें मी देऊं शकतो. पहिली गोष्ट ही कीं श्रीमंती व गरिबी यांचा सुंदर मेळ महाराजांनी स्वतःच्या व्यक्तींतच घालून दाखविला आहे. कारण ते लहानपणीं फार गरीब स्थितींत होते व मोठेपणीं श्रीमंत झाले. तथापि श्रीमंत झाले असतांहि त्यांनी गरिबांची आठवण ठेवली, व आपल्या श्रीमंतीचा उपयोग गरिबांना करून देण्याचा प्रयत्न केला. दुसरी गोष्ट ही कीं महाराजांना जातिभेद मोडावयाला हवा आहे; तथापि मागासलेल्यांना पुढे आणणें व त्यांचें विशेष हित साधणें इतक्या पुरती तरी ते जात मानतात. ते हिंदी समाजांतील जाती मानतात ही गोष्ट मराठा समाजाला त्यांनी काल दिलेल्या भेटी व त्या ठिकाणीं झालेलीं भाषणें यावरून सहज दिसून येते. तसेंच मातृभाषा व परभाषा यांचाहि मेळ महाराजांनी घातला. तो असा की, त्यांची मातृभाषा मराठी व त्यांच्या राज्यांतील प्रजेची भाषा गुजराथी. असें असतांहि या दोनहि भाषांविषयी त्यांनी सारखेच प्रयत्न चालू ठेविले. माझ्या माहिती प्रमाणे या भाषेच्या अभिवृद्धीकरिता महाराजांनी एक एक लाख रुपये काढून ठेवले आहेत व त्या रकमेच्या व्याजांतून दोन्ही भाषांची अभिवृद्धि चालू असते.

### श्रीशिवछत्रपतींचें अनुकरण

पण याशिवाय हिंदुस्थानांत हिंदी भाषा आहे. ती मातृभाषा किंवा राजभाषा नसतांहि देशहिताच्या व्यापक दृष्टीनें तिचा परामर्ष महाराज घेतात ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट

आहे. नुकताच अनेक प्रांतीय भाषांचा उपयोग करून, थोरल्या शिवछत्रपती महाराजांचें अनुकरण करून, सयाजीराव महाराजांनी एक प्रकारचा नवा राज्यव्यवहाराचा कोशच निर्माण केला आहे. त्यावरून त्यांचे भाषांविषयीं निःपक्षपातित्व दिसून येतें. चौथी गोष्ट हीं कीं स्वतंत्रता व परतंत्रता यांचा त्यांनी मेळ घातला. तो असा कीं, आपल्या संस्थानचे राज्याधिपती म्हणून स्वतंत्र असता एकंदर हिंदुस्थानच्या दृष्टीने फेडरेशनमध्ये शिरण्याला संमति देऊन त्यांनी स्वेच्छेने परतंत्रता कांहीशी स्वीकारली. गेली गोलमेज परिषद चालू असता इकडे बडोद्यास व्हाइसरॉय साहेबांनी भेट दिली त्या वेळीं महाराजांनी जी भाषणें केलीं त्यांच्या प्रती गोलमेज परिषदेच्या कांही सभासदांना बडोद्याचे दिवाण यानी दिल्या. त्या भाषणांत महाराजांनी फेडरेशनला पूर्ण संमति दिली असें वाचून मला फार आनंद झाला. पांचवी गोष्ट म्हटली म्हणजे राजसत्ता व लोकसत्ता यांचाहि मेळ घालण्याचा प्रयत्न महाराजांनी केला आहे. कारण खेडेगांवांतून ग्रामपंचायती स्थापन करण्याचा विशेष उद्योग त्यांनी करविला. तसेंच वरच्या बाजूला कायदे कौन्सिल त्यांनी निर्माण केलें आहे.

### युवराजांना विनंति

आता राजसत्ता व लोकसत्ता यांचा बडोदे राज्यांत जितका उत्कृष्ट मेळ पडावा तितका तो अजून पडलेला नाही असें त्यांच्या प्रजेचें म्हणणें आहे. म्हणजे लोकांना जितकी सत्ता देणें योग्य तितकी महाराजांनी दिल्याची पावती प्रजेकडून त्यांना अद्यापि मिळाली नाही. तथापि कांहीं गोष्टी एका हयातींत पुऱ्या होत नाहीत, दुसऱ्या हयातींत त्या पुऱ्या होतात. या दृष्टीने महाराजांनी परवा एका ठिकाणीं जें म्हटलें कीं "तरुण पिढीवर माझा विश्वास आहे" त्याचा आधार मीहि पण घेतों. तो असा कीं, तरुण पिढी ही प्रजेंत व जनतेंतच असते असे नाही, तर राजघराण्यांतहि ती असते. म्हणून ते महाराजांचे शब्द बडोद्याचे युवराज यांनाहि लागू पडतात असे मी युवराज समक्ष हजर आहेतच तेव्हा त्यांना कळविण्याची परवानगी घेतो. म्हणजे माझा अर्थ असा कीं, वयोवृद्ध महाराजांच्या हातून लोकांना योग्य ती सत्ता देण्याचें जें कार्य व्हावयाचें उरलें आहे तें तरुण पिढीचे युवराज पुरे करोत !

### महाराष्ट्र विद्यापीठ

शेवटीं एक गोष्ट सांगावयाची ती अशी की महाराज पुण्यास आले ही संधी साधली तरी त्यांच्यापुढे दानाची याचना करून हात पसरावयाचा नाही अशा विचारानेच आणि म्हणूनच सामुदायिका रीत्या सर्व संस्थांनी मिळून आज हा सत्कार केला आहे. तथापि सर्व संस्थानी मिळून एक याचना करावी असाहि विषय कां नसेल ? शिवाय अशी याचना कोणत्या बाबतींत करावी कोणत्या बाबतींत करू नये याचेहि तारतम्य पुण्यांतील लोकांना आहे. एखाद्या संस्थानिकापुढे ती याचना केली व तिचें मर्म—महत्त्व कळण्याइतके त्याला ज्ञान नसले तर ती त्याच्यापुढे करून तरी काय उपयोग ? मी जी याचना करणार आहे ती रुचण्यासारखे व पचविण्यासारखे सयाजीराव महाराज आहेत म्हणूनच मी ती करितो. एरव्ही 'यं यं पश्यसि तस्य तस्य पुरतो मा ब्रूहि दीनं वचः' हें वचन पुणेकरांच्या परिचयाचें आहे. कोठेहि एखादा काळा ढग दिसला कीं तो आपल्या शेतावर येऊन पाऊस पाडील अशी आशा भोळा शेतकरी धरीत असतो. पण त्या मेघाला त्या शेताकडे वळण्याला वेळच न मिळाला तर मग काय करणार ?

असो, मी ज्या एका भावी संस्थेसंबंधाने महाराजांच्यापुढे सामुदायिक याचना मांडणार आहे ती संस्था महाराष्ट्रीय विद्यापीठ ही होय. ती याचना मी मांडतो याचें कारण हेंच कीं विद्यापीठाचें महत्त्व व मर्म कळण्यासारखे सयाजीराव महाराज आहेत. मला हें माहीत आहे कीं महाराज हे गुर्जर प्रजेचे राजे मुख्यतः असल्यामुळे, त्यांच्या राज्याचा पहिला व शेवटचा पैसा गुर्जर प्रजेचें हित साधण्याकरिताच खर्च होणें रीतीचें आहे. तथापि आधुनिक तऱ्हेच्या पोषाखांतील अंगरख्याला जसें अनेक खिसे व कप्पे असतात. तसेंच राजे लोकांच्या द्रव्यनिधींना असतात. म्हणून माझी विनंति अशी कीं सयाजीराव महाराज यांचा हात त्यांच्या द्रव्यनिधींच्या ज्या कोणत्या खिशांत किंवा कप्यांत जाणार असेल तेथे जावो; पण त्यांनी या विद्यापीठाच्या कल्पनेचा परामर्ष अवश्य घ्यावा. महाराष्ट्र विद्यापीठाप्रमाणें गुजराथी जनतेकरितांहि स्वतंत्र विद्यापीठ निघणें अवश्य आहे. कोणी ते अहमदाबादेस निघावें म्हणतात, कोणी बडोद्यास निघावे म्हणतात. पण संपन्न गुजराथी समाज व महाराज यांच्या सहकारितेने तें या दोहोंपैकीं कोणत्याहि ठिकाणीं स्थापन झालें तरी अवश्य व लौकर व्हावे अशीच आम्हा महाराष्ट्रीयांची इच्छा आहे. पण त्याचबरोबर स्वतः सयाजीराव महाराज हे महाराष्ट्रीय असल्यामुळे मराठी मातृभाषेचा पुरस्कार करणारे महाराष्ट्र-विद्यापीठहि त्यांच्या परामर्षांत यावें अशी मागणी करण्यांत कांहींच चूक होणार नाही.

## विद्यापीठाची व्यापकता

विद्यापीठाची विशेष मागणी करण्याचा हेतू इतकाच कीं, महाराजांना ज्या ज्या कांही गोष्टी इष्ट वाटतात त्या सर्व विद्यापीठाच्या द्वारेंच साधण्या सारख्या आहेत. म्हणजे इतिहास, वाङ्मय, समाजशिक्षण, शास्त्रीय ज्ञान, राष्ट्रीय स्वाभिमान, व यापेक्षाहि महाराजांना प्रिय असणारी गोष्ट म्हणजे व्यापक दृष्टीने जगाकडे पाहण्याची बुद्धि व पात्रता, ही मातृभाषेंतून शिक्षण देणाऱ्या विद्यापीठाच्या द्वारेंच सिद्ध होऊं शकेल. म्हणूनच महाराष्ट्रांत अशा विद्यापीठाची कल्पना निघालेली आहे आणि महाराजांनी योग्य प्रसंगीं योग्य रीतीने तिचा परामर्ष ध्यावा अशी माझी त्यांस विनंति आहे; शेवटीं पुनः एकवार मी हेंच सांगतों कीं, महाराजांविषयीं वाटणाऱ्या आपलेपणामुळेच आजचा हा स्वागत–समारंभ घडून आला आहे; आणि तो आपलेपणा वृद्धिंगत व्हावा याकरिता यापुढेहि महाराजांनी सवडींत सवड काढून व जरूर तर थोडी वाकडी वाट करूनहि पुण्याला भेट देत जावी."

## शब्दकोश समर्पण

श्री. केळकर यांच्या मागून श्री. य. र. दाते यांनीं भाषण करून शब्दकोश महाराजांस अर्पण केला.

ते म्हणाले, 'भाषेची वृद्धि होण्यास शब्दकोश, संदर्भ ग्रंथ असणें अत्यंत जरूरीचें असतें, व ही मराठी भाषेंतील उणीव लक्षांत घेऊनच आम्ही एक मंडळ स्थापन केले व त्याच्याकरवीं प्रथम ज्ञानकोशांचे भाग काढले व आता शब्दकोश तयार करण्याचें काम हातीं घेतलें आहे. या कोशाचा पहिला भाग तयार झाला असून त्यांचीच एक प्रत महाराजांना आजच्या प्रसंगीं अर्पण करण्याचे मी योजले आहे. अशा तऱ्हेचा शब्दकोश तयार करण्याचे कार्य कै. वि. ना. मंडलीक व त्यानंतर रा. माधवराव नामजोशी यानी हातीं घेण्याचा प्रयत्न पूर्वी केला होता व मी प्रस्तुत कार्य हातीं घेतल्यावर बडोद्यास गेलों असतां महाराजांना आमची योजना सांगितली व ती त्यांना पटून लगेच त्यांनी पांच हजार रुपयांची उदार देणगी शब्दकोशाला दिली. पण ही देणगी स्वीकारतांना आम्ही आमच्यावरहि एक जबाबदारी घेतली किंवा ती आपोआप अंगावर आली असेंहि म्हणण्यास हरकत नाही. ती जबाबदारी म्हणजे संपूर्ण व महाराजांना साजेला असा ग्रंथ तयार करणें ही होय. या कोशाचें काम बरेंच होत आलें आहे. या कोशांत सर्व धंद्यांतील लोकांनी त्यांच्या वापरण्यांत आलेले शब्द दिले आहेत. आतापर्यंत सहा लाख शब्दांच्या याद्या तयार झाल्या आहेत. व अशाच तऱ्हेने सर्व शब्द एकत्रित करून सदर संपूर्ण कोश आम्ही लवकरच बाहेर काढू अशी आम्हाला उमेद आहे.' इतकें बोलून श्री. दाते यांनी कोशाचा प्रथम खंड चांदीच्या पेटींत घालून तो मंडळातर्फे महाराजांना नजर केला. यानंतर श्री. श्री. म. माटे यांनी पुण्यांतील सर्व संस्थानांची संकलित व थोडक्यांत माहिती करून दिली.

## श्री. माटे यांचें भाषण

" पुण्यांतील मंडळी हट्टी व भांडखोर आहेत असा परप्रांतांत गवगवा आहे असें समजतें परंतु असा लौकिक होण्यास ते अर्थाचा अनर्थ करतात हेंच कारण असावें. ज्याला ते लोक हट्ट म्हणतात त्याला आम्ही तत्त्वनिष्ठा समजतों. आम्ही भांडखोर नसून वाद कुशल आहों व हा आमचा दुलौकिक नसून कीर्ति आहे असें आम्ही मानतों. पुण्यांत मतांची पेरणी चमत्कारिक असल्यामुळे नानाविध स्वरूपाच्या व कार्याच्या संस्थाहि निर्माण झाल्या आहेत व होत आहेत. सर्व दोन हजार जाती, आहेत तशा कायम राहाव्या असा म्हणणारा एक पक्ष आहे तर सर्व जातींचें एकीकरण व्हावे असे प्रतिपादणारा दुसरा पक्ष आहे. तसेच आचार–विचारांच्या बाबतींत मतभेद " पक्षोपपक्ष आहेतच. एक पक्ष समईला मोठ्या भक्ति भावाने नमस्कार करील तर दुसरा अगदी उलट वर्तन करून समई मोडींत विकावयास काढील ! तात्पर्य, येथे सर्व मतांचे लोक व संस्था दृष्टीस पडतात. अलीकडे ज्या संस्था निघाल्या आहेत त्या पुण्याच्या नवान वस्तींत झाल्या आहेत; याचा अर्थ आम्ही जुन्या पुण्यांतून नव्या पुण्यांत प्रवेश करीत आहो असा होत नाहीं काय?" श्री. माटे यांचे वरील आशयाचे विनोदप्रचुर भाषण झाल्यावर ७३ संस्थांतर्फे महाराजांना व सौ. राणीसाहेब यांना हार घालण्यांत आले. नंतर समारोपादाखल श्रीमंत महाराजांचें खालील आशयाचें भाषण झाले.

## महाराजांचें भाषण

"आज आपण माझा जो गौरव केला त्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे. या सत्कारसमारंभामुळे माझें अंतःकरण इतकें भरून आलें आहे कीं मला शब्दच सुचत नाहीत. असो. अशा स्थितींत जे कांही चार विचार मला सुचतील तेच आपणापुढे मी मांडीत आहे.

पुणेकरांची ज्ञानपिपासा इतकी तीव्र आहे कीं या शहरांत इतक्या विविध विषयाकरिता वाहिलेल्या संस्था नसत्या तरच आश्चर्य होतें. या संस्था म्हणजे

ज्ञानबुद्धीच्या ज्योतिच आहेत. आपण आज माझा जो गौरव केला तो व्यक्ति म्हणून नव्हे तर माझ्या अल्पशा कार्याकडे बघून केला याबद्दल मला आनंद होत आहे. कोणतेहि कार्य म्हटले कीं तेथे जबाबदारी उत्पन्न होते व ही जबाबदारी योग्य रीतीने पार पाडण्यास त्रास, श्रम, शारीरिक झीज व द्रव्य झीज ही सोसावीच लागते. आणि सामर्थ्याचा व द्रव्याचा खरा विनियोग यांतच आहे असें मी समजतों. तसेंच कोणतेंहि काम जबाबदारीने पार पाडण्यास सहकार्याची अत्यंत जरूरी असते, व ही सहकार्याची बुद्धि जनतेच्या अंगीं उत्पन्न होण्यास त्याना शिक्षण दिलें पाहिजे. माझ्या हातून ज्या कांही थोड्या सुधारणा व लोकोपयोगी कामें झालीं तीं लोकशिक्षण, जनतेची सहानुभूति व सहकार्य आणि निष्काम सेवा या गुणत्रयीवर उभारलेली होती.

### राजा व प्रजा

कोणत्याहि राजकर्त्याला आपला राज्यशकट योग्य मार्गाने न्यावयाचा असेल तर त्याला स्वतःला तर सुशिक्षित झालेच पाहिजे पण आपल्या प्रजेलाहि शिक्षण द्यावयास पाहिजे. मी माझ्या संस्थानांत याच तत्वानुसार प्रजेला सुशिक्षित करण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. राज्यकर्त्यांच्या आकांक्षा कितीहिं मोठ्या असल्या व त्याला लोकसत्ताक राज्यपद्धीत सुरू करण्याची कितीहि इच्छा असली तरी जे अधिकार राजा प्रजेला देईल त्यांची जबाबदारी व किंमत ओळखण्याची पात्रता जनतेत आल्याशिवाय ते अधिकार देऊन न दिल्यासारखे होतात. आणि असें होऊं नये म्हणून जनतेला वैयक्तिक व सामुदायिक जबाबदारी व कर्तव्यें पार पाडण्याची योग्यता आणण्यास उपयोगी पडेल असे शिक्षण दिलें पाहिजे व तसें शिक्षण देण्यास मी सुरुवात केली आहे. परंतु अशा तऱ्हेचें शिक्षण देतांना एक गोष्ट राज्यकर्त्यांनी प्रामुख्याने लक्षांत ठेविली पाहिजे. ती अशी कीं, प्रजा व राजा यांची ओळख एकमेकांना चांगली झाली पाहिजे म्हणजे राजाने प्रजेच्या खालच्या दर्जापासून वरच्या दर्जापर्यंत असणाऱ्या सर्व जातींच्या लोकांत मिसळून त्यांच्या अडचणी लक्षांत घेऊन त्या दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. असे केल्याशिवाय त्यांच्या खऱ्या गरजा काय आहेत हें राजाला न समजल्यामुळे दोघांत असावा तसा एकोपा राहत नाहीं. लोकांना फक्त पुस्तकी ज्ञान न देतां व्यावहारिक ज्ञानहि दिलें पाहिजे.

### फेडरेशनची जरूरी

फेडरेशनसंबंधीं बोलावयाचें झालें तर हिंदी राष्ट्राला आपले ध्येय सत्वर गांठण्यास संयुक्त राज्य-घटनेच्याच मार्गाने गेलें पाहिजे. असें करतांना प्रत्येक घटकाला लघुत्व आलें तरी तें पत्करणें हें राष्ट्र-हिताचेंच होईल. राज्यघटना ही देशाच्या परिस्थिती-वर अवलंबून असल्याने ती देशागणिक निरनिराळी असलेली दृष्टीस पडते. हिंदुस्थानाला आपलें भवितव्य आंखण्याची पात्रता असेल तरच त्याने फेडरेशनला मान्यता द्यावी असें माझें मत आहे. मी प्रगतीचा भोक्ता असलों तरी मला समंजस प्रगति हवी. राजाने काल्पनिक अभिमानाच्या बळी न पडतां राज्ययंत्र हें शास्त्र व कला यांच्या संयोगाने बनलेलें असतें हें लक्षांत ठेवून अधिकार गाजावला पाहिजे तरच त्याला व प्रजेला सुख लागतें."

श्रीमंतांचे भाषण झाल्यावर प्रो. द. वा पोतदार यांनी महाराजांचे राजघराण्यांतील इतर मंडळींचे, ज्या संस्थांनी यांत भाग घेतला त्यांचे व श्रोतृवृंदाचें उचित शब्दांत रीतसर आभार मानले. शेवटीं राष्ट्रगीत झाल्यावर हा समारंभ मोठ्या उत्साहाने समाप्त झाला.

# भाकड गाईच्या दानाचा दीर्घकालीन वायदा

ब्रिटिश सरकाराने प्रसिद्ध केलेल्या नवीन खलित्याचें सामान्य स्वरूप गेल्याच्या मागील लेखांत आम्हीं सांगितलें. प्रस्तुत लेखांत हिंदुस्थानसरकाराच्या मध्यवर्ती सत्तेचा विचार कर्तव्य आहे. हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराचे दोन विभाग पडतात. एक प्रांताचा कारभार व दुसरा हिंदुस्थान देशाचा कारभार. या दोन कारभारांपैकीं प्रांताच्या कारभारांत मॉंटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणा कायद्याप्रमाणे तेरा वर्षांपूर्वी द्विदल राज्यपद्धति उत्पन्न होऊन, कांही खातीं कायदेमंडळास जबाबदार अशा दिवाणाकडे सोंपविण्यांत आलीं व बाकीचीं खातीं सर्वस्वी प्रांतिक गव्हर्नरांच्या हुकमती-खालील मंत्र्याकडे राहिलीं. नवीन राज्यघटनेचा कायदा पार्लमेंटांत मंजूर झाल्यावर राखीव व सोंपीव हा भेद मोडून प्रांतांचीं सर्वच खातीं दिवाणांवर सोंपविलीं जाणार आहेत. परंतु प्रकृत स्थळीं त्यांचा विचार करावयाचा नसून फक्त मध्यवर्ती सत्तेंत काय बदल होणार आहे एवढेंच पाहावयाचें आहे.

आतापर्यंत हिंदुस्थानसरकारचीं सर्वच खातीं राखीव आहेत. त्यांचा कारभार व्हाइसरॉयाचें मंत्रिमंडळ पाहत असून त्यांजवर सारी हुकमत व्हाइसरॉयाची व ब्रिटिश पार्लमेंटाची आहे. व्हाइसरॉयाच्या या मंत्रिमंडळाचे सर्व सभासद एके काळीं एकजात गोरे लोक असत. परंतु मोर्लेसाहेब हिंदुस्थानाचे स्टेट-सेक्रेटरी असता गोऱ्या सभासदांची ही फळी फुटून तिच्या फटींत एक हिंदी सभासद बसण्याची रूढि पडली. या मंत्रिपदावर लॉर्ड सिंह, सर तेज बहादुर सप्रू, एस. आर. दास, मित्र इत्यादि अनेक हिंदी गृहस्थांची आजवर नेमणूक झाली आहे. या सर्वांकडे बहुधा कायदेपंडिताचेंच काम देण्यांत आलें आहे. पण पुढे मॉंटेग्यू व चेम्सफर्ड याच्या शिफारशीवरून ही फट रुंद होऊन तिच्यांत अधिक हिंदी लोकांना बसण्यास जागा मिळाली. व्हाइसरॉयाच्या मंत्रिमंडळांत अवघा एकच हिंदी माणूस असावा याची मॉंटेग्यूसाहेबांना लाज वाटून त्यांनी आपल्या रिपोर्टांत एकाच्या जोडीस निदान दुसरा सभासद घेण्याची शिफारस केली. तथापि आज पाहावें तो सदर मंत्रिमंडळांत एक व काय पण तीन हिंदी सभासद दृष्टीस पडतात.

पण यावरून ब्रिटिश सरकारानें हिंदी लोकांच्या हातीं हिंदी राज्यकारभारांतील सत्ता तिपटीनें अधिक दिली असें अनुमान काढणें चुकीचें ठरेल. हिंदुस्थान-सरकाराच्या मंत्रिमंडळाचे सभासद सात असून वर लिहिल्याप्रमाणे त्यांपैकीं तीन सभासद प्रसंगवशात् हिंदी आहेत. स्वराज्याची आणेवारी सभासदांच्या संख्येवरून ठरवावयाची झाल्यास वरील हिशेबाप्रमाणे तीन-सप्तमांश किंवा जवळ जवळ निम्मे स्वराज्य हिंदी लोकांच्या आजच पदरांत पडलें आहे असेंहि म्हणतां येईल. परंतु तसें हिंदी लोकच काय पण इंग्रज लोकहि म्हणत नाहीत व याचें कारणहि उघड असून त्याचा खुलासा मॉंटेग्यूसाहेबांनी आपल्या रिपोर्टांत केलाच आहे. व्हाइसरॉयाच्या कौन्सिलांतील सगळेच सभासद गोरे नेमल्यानें व्हाइसरॉयास कोणतेंहि महत्त्वाचें धोरण आंखतांना बदसल्ला मिळण्याचा संभव असतो. तसा संभव राहूं नये व खरें हिंदी लोकमत व्हाइसरॉयास कळावें या हेतूनें हिंदी सभासदांचा त्यांच्या मंत्रिमंडळांत अधिक प्रमाणांत समावेश करण्यांत आला आहे.

व्हाइसरॉयाच्या मंत्र्यांत कामाची वांटणी कशी केली आहे हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे. एकंदर सात मंत्र्यांपैकीं तीन मंत्री वर सांगितल्याप्रमाणे हिंदी आहेत व बाकीचे चार युरोपियन आहेत. या चार युरोपियनांमध्ये एक तर प्रत्यक्ष हिंदुस्थान-सरकाराचे सेनापतीच असल्यानें लष्करी खात्याचा कारभार तेच पाहतात. फडणविशी खात्याच्या मंत्रिपदावर सांप्रत सर जॉर्ज शूस्टर हे विराजमान झाले असून ते इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या बाहेरचे मुद्दाम विलायतेहून निवडून आणलेले अधिकारी आहेत. उद्योगधंदे व मजूर हें खातें सर फ्रँक नॉइस यांजकडे आहे आणि सर हॅरी हेग यांची नेमणूक गृहमंत्री म्हणून झाली आहे. हीं खातीं जाऊन हिंदुस्थान-सरकारचीं उरलेलीं खातीं रेल्वे, व्यापार, धर्म, शिक्षण, आरोग्य, कायदा इत्यादि होत. त्या खात्यांचें काम पाहणारें बहुतेक अधिकारी हिंदीच आहेत. परंतु ते हिंदी कायदेमंडळांना म्हणजे लोकमताला जबाबदार नसल्यानें त्यांचा कारभार हिंदी लोकांस हवा त्याप्रमाणे न चालतां ब्रिटिश पार्लमेंटाच्या धोरणावर अवलंबून असतो. या कारणानें ते अधिकारी जन्मानें काळे असले तरी कर्मानें गोरेच आहेत.

म्हणून एवढ्या मोठ्या हुद्द्यावर त्यांची नेमणूक झाली काय किंवा गोऱ्या अधिकाऱ्यांची झाली काय हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीनें सारखीच. असें असताहि त्यांतल्या त्यांत कमी महत्त्वाचीं खातीं तेवढीं हिंदी मंत्र्याकडे आणि जोखमीचीं व मर्माचीं खातीं मात्र गोऱ्या मंत्र्याकडे असा पंक्तिप्रपंच करण्यांत आलाच आहे. कारण खजिना, उद्योगधंदे, लष्कर व गृहमंत्र्याचें हिंदी राजकारण यांपैकीं एकहि खातें हिंदी मनुष्याच्या हातीं दिलेलें नाही. सर जोसेफ भोर यांची नेमणूक रेल्वे खात्यावर झाली आहे व भोर हे धर्मानें ख्रिस्ती असले तरी राष्ट्रीयत्वानें हिंदीच आहेत. अशा मनुष्याच्या हातीं रेल्वेचा कारभार आल्याचें पाहूनहि आश्चर्य वाटावयास नको. कारण सर जोसेफ भोर हे सिव्हिल सर्व्हिसमधील सरकारी नोकरच आहेत. व त्यांना प्राप्त झालेलें मंत्रिपद ते हिंदी म्हणून मिळालें नसून कोणातरी सिव्हिल सर्व्हिसमधील माणसास लाभावयाचें या नियमास अनुसरून भोर यांच्या वांट्यास आलें आहे इतकेंच. एरव्ही हल्लीच्या राज्यघटनेप्रमाणे सदर जागा कोणाहि हिंदी मनुष्यास देण्यास सरकार बांधलें गेलेलें नाही. तथापि रेल्वेचा खरा कारभार पाहण्याकरिता वेगळें रेल्वे बोर्ड असल्यानें भोर यांना सदर खात्याचे साधारणपणें कुंकवाचे धनीच समजण्यास हरकत नाही. ब्रिटिश सरकारानें आपल्या नवीन खलित्यांत हिंदुस्थान सरकारच्या खात्यासंबंधानें कांहीं महत्त्वाचे फरक सुचविले आहेत. त्याप्रमाणे वरील खात्यांपैकीं सैन्य व ख्रिस्ती धर्मव्यवस्था हीं खातीं गव्हर्नर जनरलाचीं समजलीं जातील, परराष्ट्रीय खातें

सध्या गव्हर्नरजनरल कडे आहे तसेंच तें पुढेहि त्याच्याकडे राहील. बाकीच्या सर्व खात्यांची व्यवस्था हिंदी दिवाणांनी पाहावयाची असून सदर खात्यांत राजकारण, खजिना, रेल्वे, व्यापार, उद्योगधंदे इत्यादि महत्त्वाचीं खातीं आहेत. या खात्यांचे दिवाण हिंदी कायदेमंडळास जबाबदार समजले जातील. व बाकीच्या खात्यांकरिता गव्हर्नर जनरल आपल्या इच्छेप्रमाणे वाटेल त्या इसमांची नेमणूक करील.

या व्यवस्थेप्रमाणे रेल्वेचे खातेंच काय पण खजिना, हिंदी राजकारण हीं महत्त्वाचीं खातीं कायदेमंडळास जबाबदार अशा हिंदी दिवाणांकडे येणार यानेच काय थोडी चंगळ उडाली, असें कोणास वाटण्याचा संभव आहे. कारण सध्या तरी प्रांतिक सरकारचीं कांहीं खातीं दिवाणांच्या वांटणीस आलीं असताहि खजिन्याच्या किल्ल्या त्याच्यापैकीं कोणाच्याहि स्वाधीन करण्यांत आल्या नाहीत व त्याविरुद्ध हिंदी लोकांची प्रथमपासून तक्रार आहेच. पण त्या मानानें यापुढे खुद्द हिंदुस्थान सरकारचा खजिना एका हिंदी दिवाणाच्या, रेल्वे दुसऱ्या दिवाणाच्या, उद्योगधंदे तिसऱ्याच्या व राजकारण चौथ्याच्या ताब्यांत अशीं महत्त्वाचीं खातीं हिंदी लोकांना मिळालीं म्हणजे हल्ली प्रांतिक राज्यकारभारात हिंदी लोकांचा जितका हात शिरकला आहे त्यापेक्षा अधिक हात हिंदुस्थानाच्या राज्यकारभारांत शिरला असें सिद्ध झालें कीं नाही? सैन्याधिकार काय, मिळेल मागाहून. पण सगळ्यांत मुख्य मान पैशाला. आणि पैसा म्हणजेच सत्ता. तो पैसा खजिन्याच्या रूपानें फडणिसाच्या हातांत येणार, आणि ज्यावर देशाची सांपत्तिक भरभराट व प्रगति अवलंबून तीं उद्योगधंद्याची व शिक्षणाचीं खातीं हिंदी लोकांच्या हवालीं होणार हा तूर्तातूर्त फायदा काय थोडा झाला? एवढ्या तीन खात्यांच्या जोरावर हिंदी लोक आपली उन्नति हां हां म्हणता करून घेतील व स्वराज्याचें सुख अधिकाधिक अनुभवतील असें मनोराज्य एखाद्याला रचता येईल!

हीं खातीं जाऊन गव्हर्नर जनरलाकडे उरलीं खातीं कोणतीं, तर सैन्य, परराष्ट्रीय राजकारण व ख्रिस्ती धर्मव्यवस्था. या तीन खात्यांपैकीं सैन्यावरील सत्ता न मिळण्यानें हिंदी लोक नामर्द राहतील पण तें न्यून कांहीं काळ निरुपायानें पत्करलेंच पाहिजे. मात्र परराष्ट्रीय राजकारणाचें तसें नाही. आज हिंदुस्थानाला कोठे परराष्ट्राविरुद्ध लढाई पुकारावयाची आहे? तेव्हां त्या खात्यावांचूनहि फारसें नडलेलें नाही. आणि तिसरें - राखीव खातें धार्मिक. तें निवळ भिक्षुकी व तशांतून ख्रिस्ती धर्माचें. असलें खातें असलें काय व नसलें काय सारखेंच! ब्रिटिश सरकारचा खलिता वरवर चाळला असता असा एखाद्याचा ग्रह व्हावा यांत नवल नाही. आणि खलित्याची एकंदर रचना इतक्या साळसूदपणानें अथपासून इतिपर्यंत करण्यांत आली असती तर हिंदुस्थानांतील बहुतेक पक्षांनी एवढ्यावर समाधान मानलें असतें. परंतु मागील लेखांत म्हटल्याप्रमाणे इतक्या चरकांनी या खात्यांतील सत्ता पिळून काढली आहे व इतक्या काढण्यांनी त्या खात्यांना आंवळून टाकलें आहे कीं, शेवटीं उरलें काय हें समजणेंच कठिण झालें आहे. ज्यांना संरक्षक बंधनें किंवा 'सेफगार्ड्स' म्हणतात तें हेंच असल्यानें त्याविरुद्ध देशांतील सर्व पक्षांनी व पुढाऱ्यांनी साहजिकच ओरड सुरू केली आहे.

नवीन खलित्यांत म्हटल्याप्रमाणे खजिना खात्यावर शुस्टरसाहेबांऐवजीं हिंदी दिवाण येऊन बसेल. पण त्या खजिन्यांतील सगळा पैसा त्याच्या हाताला लागणार नाही. सैन्याच्या खर्चाचा पैसा गव्हर्नर जनरल हिंदी दिवाणाला न विचारतां काढून घेईल. बरें, तेवढी पंचेचाळीस शेचाळीस कोटींची रक्कम जाऊन उरलेल्या ऐशीं कोटींचें बजेट हिंदी दिवाण हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीनें ठरवील म्हणावें तर तेंहि स्वातंत्र्य त्याला नाही. ज्या नोकरांची नेमणूक भारतमंत्र्यानें केली आहे त्यांच्या पगाराला किंवा भत्त्याला हात लावण्याची त्याची प्राज्ञा नाही. तीहि रक्कम क्षणभर बाजूला काढली तरीहि गव्हर्नर जनरल फडणिसाला चैन पडूं देणार नाही. उरलेलें बजेट त्याच्या तंत्रानेंच हिंदी फडणविसानें केलें पाहिजे. पण तसा तो सर्वस्वी न वागल्यास त्याच्या बजेटाला स्वतःचें पुरवणी बजेट जोडण्याचा व तें मंजूर करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलाला आहे. अशा रीतीनें बडा लाट आपला हात जेथे तेथे घालूं लागल्यावर हिंदी फडणविसाला स्वातंत्र्य तें काय उरणार व तो हिंदुस्थानाचें हित तें काय साधणार?

बरें, देशी उद्योगधंद्यांच्या उन्नतीसाठी त्यानें आपल्यास योग्य वाटेल त्या परदेशी मालावरील जकात वाढविली किंवा स्वदेशी कारखान्यास सवलती दिल्या तरी तेथें गव्हर्नर जनरल हा पक्षपाताची सबब सांगून त्यांत ढवळाढवळ करण्याला शेजारीं उभाच. हिंदी चलनाचा व्यवहार रिझर्व्ह बँकेसारख्या निःपक्षपाती संस्थेकडे असावा हे योग्यच आहे. पण मागील अनुभवावरून पाहाता या बँकेची घटना ब्रिटिश भांडवलवाल्यांना अनुकूल होईल व तीच सरकाराला निःपक्षपाती वाटेल. आणि हल्लीच्या असेंब्लींत सरकारला अशी घटना

मंजूर करणें अगदींच सुलभ असल्याने भावी हिंदी दिवाणाचें हात ब्रिटिश भांडवलवाले आज आधींच बांधून ठेवणार असें दिसतें. पण हिंदुस्थानाच्या हितास प्रतिकूल अशी घटना असेंब्लीने पास केली तरी प्रत्यक्ष रिझर्व्ह बँक स्थापन होण्यासहि पुनः अनेक दुर्लंघ्य अडचणी आहेत. त्याकरिता घालण्यांत आलेल्या अटी अशा आहेत की, त्या पूर्ण होण्याचा योग वर्षांत येईल, दोन वर्षांतें येईल कीं, दहा वर्षांनी येईल, याचा अंदाज कोणीहि बांधूं शकणार नाही. प्रस्तुत खलित्यांत त्यांचा उल्लेख पुढील शब्दांनीं केला आहे. "हिंदी बजेटांत स्थिरता येईल, लंडन व हिंदुस्थान यांतील थोडक्या मुदतीची हिंदुस्थानसरकारची कर्जे बऱ्याच अंशीं फिटतील, सरकारच्या गंगाजळींत पुरेसें द्रव्य शिल्लक पडेल, व हिंदुस्थानाची निर्गत आयातीपेक्षां किमतीने अधिक वाढेल. तेव्हा बँक स्थापण्यास अनुकूल समय आला असें समजण्यांत येईल." ही गोष्ट एकट्या हिंदुस्थानच्या सुस्थितीपेक्षा साऱ्या जगाच्या सुस्थितीवर अवलंबून असल्याने ती जितक्या वर्षांनी घडून येईल तितकीं वर्षे हिंदुस्थानाने वाट पाहत बसलें पाहिजे. त्यानंतर बँक स्थापन होणार व फेडरेशनची राज्यघटना अमलांत येणार!

रेल्वेखात्याचा खोडाहि फडणविशी खात्याइतकाच अवघड आहे. हिंदी उद्योगधंद्यांच्या अभिवृद्धीस रेल्वे खात्याचा ताबा अत्यंत आवश्यक आहे. कारण रेल्वे कंपन्यांकडून स्वदेशी मालाच्या नेआणीस ज्या सवलती मिळतील त्यांवर स्वदेशी मालाचा खप वाढणें व परदेशी मालाचा खप उतरणें अवलंबून आहे. पण रेल्वेखात्याची ही अन्तर्व्यवस्था पार्लमेंटच्या कायद्यानें निर्माण झालेल्या रेल्वे बोर्डाकडे प्रथम देण्यांत येणार व मग रेल्वेखात्याचा ताबा हिंदी दिवाणांस मिळणार. अर्थात् रेल्वे खात्याचा दिवाण हा नुसता मानकरीच होऊन बसणार! सारांश मध्यवर्ती सत्तेच्या दानाचा विचार गंभीरपणाने जितका अधिक करावा तितका तो एक थट्टेचा विषय वाटूं लागतो. धर्मादायांत गोप्रदानाचीहि अशीच थट्टा अज्ञानपूर्वक होत असते. ब्राह्मणास गोप्रदान चार आण्यांतहि होते, व सवत्स अशी दुभती गाय देऊनहि होतें. ब्रिटिश सरकारच्या खलित्यांनीं गाय देऊं केली आहे. पण ती भाकड आहे. तिच्या कासेंत दूध नाही व तिला दूध फुटण्याची आशाहि नाहीं. फार काय पण ही गाय आज मिळावयाची नसून ती किती वर्षांनी मिळेल याचाहि नियम नाही.

# स्फुट सूचना

१ ले. असेंब्लींत फिनॅन्स बिलावरील कलमवार चर्चा चालू असतांना मिठावरील कर व कार्डापाकिटांचे दर कमी करण्यासंबंधाने लोकनियुक्त सभासदांनीं उपसूचना आणल्या व त्या सर्वच्यासर्व नामंजूर झाल्या ही मोठी खेदाची गोष्ट होय. बाबू अमरनाथ दत्त यानी मिठावरील कर अजिबात रद्द करण्यापासून तो निदान दरमणीं आठ आण्यांपेक्षां अधिक कर असूं नये येथपर्यंत दोन चार सूचना आणल्या होत्या पण त्यापैकीं एकीनेहि टिकाव धरला नाही. तसेंच कार्डापाकिटांच्या वाढलेल्या दरांची झळ गरीब लोकांनाच अधिक लागते व सरकारचें उत्पन्नहि त्या प्रमाणांत वाढत नाही याकरितां ते दर कमी करावे अशी सूचना मित्र, गयाप्रसादसिंग इ. सभासदांनी आणली होती. पण दुर्दैव असें कीं, तीहि सूचना फेटाळली गेली. तथापि आशेला जागा आहे ती एवढीच कीं, टपाल खात्याचे सर्वाधिकारी सर फ्रँक नॉइस यांना सभासदांच्या उपसूचनांतील तत्त्व मान्य झालें आहे. आता त्यांची अडचण काय ती तिजोरींतील पैशाच्या टंचाईची. पण जमाखर्चाची तोंडमिळवणी न होण्याला खरें कारण म्हणजे तार खात्याच्या जादा खर्चाच्या पायीं टपालखात्याला सोसावा लागणारा भूर्दंड. सरकारने ही दोन खातीं वेगळीं केलीं तर, गरीब रयतेवर लादला जाणारा अप्रत्यक्ष जादा कर बसविण्याची अवश्यकता राहणार नाही. तारेचे दर सरकारने वाढविले तर त्याचा बोजा श्रीमंत व व्यापारी वर्गावरच अधिक पडेल. तसेंच काटकसर कमिटीने केलेल्या शिफारशी सरकाराने अमलांत आणल्या तर कार्डा-पाकिटांचे दर कमी करण शक्य होईल. तरी आता निदान पुढील सालीं तरी टपालाचे दर कमी होणें आवश्यक आहे.

---

२ री गत कार्डापाकिटांच्या दरांची तीच प्राप्तीवरील करआकारणीची. प्राप्तीवरील करआकारणी २५ टक्क्यांनी वाढवून व करआकारणीची किमान मर्यादा १००० रुपये ठरवून ३॥ कोटींची वाढ उत्पन्नांत करण्यांत आली. प्राप्तीवरील कर कमी करण्याच्या उपसूचना तर फेटाळल्याच.

पण निदान करआकारणी व्हावयाची ती २००० रु. वरील उत्पन्नांवरच पूर्ववत् व्हावी ही सूचनाहि नामंजूर झाली ! चालू सालीं १००० ते २००० रु. वरील उत्पन्नांवर आकारणी करून, सरकारानें ७० लाख रुपये मिळविले आहेत. पण याचा परिणाम असा झाला कीं, पानपट्टीवाले, भाजीपाल्याचे दुकानदार, शिंपी यावरहि ही कर आकारणी होऊं लागली. ज्याचें दुकानच मुळी हातउसन्या पैशावर अगर चालचलाऊ उधारीवर चालत असतें त्याला रोज खर्डा ठेवणें, ताळेबंद काढणें प्राप्तीवरील कराचा कायदा माहीत असणें इ. गोष्टींचें ज्ञान नसतें. साहाजिकच हिशेब व्यवस्थित नाहीत या सबबीवर अधिकारी वर्ग म्हणेल ती आकारणी करण्यांत येते व ती आकारणी जप्ती टाळण्याकरितां भरावी लागते. तरी या जाचणुकीं-तून हा वर्ग सुटावा म्हणून २००० रुपयावरचे उत्पन्नावरच कर आकारणी व्हावी अशी सूचना आणली; पण तीहि ५६ विरुद्ध ४१ मतें पडून नामंजूर झाली !

---

३ ले. असेंब्लीत घडलेल्या एका गोष्टी बद्दल तरी खासदाराना धन्यवाद देतां येतील. ती गोष्ट म्हणजे सर जार्ज शूस्टर यांनी चेकवर स्टँप डयूटी लादली होती तिला असेंब्लीनें संमति दिली नाही. या कर आकारणीमुळे पेढीच्या धंद्याला आळा बसेल सबब ही आकारणी होऊं नये अशी उपसूचना श्री. एस. सी. मित्र यांनी मांडली व आपल्या सूचनेच्या पुष्ट्यर्थ बँकिंग कमिटीच्या रिपोर्टाचा आधारहि त्यांनी काढून दिला. या स्टँप डयूटीचें उत्पन्न बहुतांशीं बंगाल व मुंबई या सरकारांच्या पदरांत पडावयाचें होतें. पण हीं दोनहि प्रांतिक सरकारें पडलीं दिवाळखोर ! यामुळे फडणविसांना या प्रांतांतील लोकनियुक्त सभासदांचा पाठिंबा आपल्याला मिळेल असे वाटले होतें. पण मि. थॉम्पन, सर कावसजी जहांगिर, मोदी, सर रामस्वामी मुदालियार, के. सी. नियोगी व सर हरिसिंग गौर यांनी मित्र यांच्या सूचनेला दुजोरा दिला, व स्टँप डयूटीचें कलम ४८ विरुद्ध ४३ मतें पडून नामंजूर झालें. आता सर जॉर्ज शुस्टर कौन्सिल ऑफ स्टेटमध्ये सदर बिल जाईल त्या वेळीं हें कलम पुनः बिलांत गोवतात कीं आपला शहाण-पणा येथेच थांबवतात हें पाहणें आहे. ७ लाखां-करिता हा उपद्व्याप ते करणार नाहींत अशी आशा आहे.

# मिरजेचे डॉ. वॉन्लेस, एम. डी., एफ. ए. सी. एस.

( ले.—त्र्यंबक नारायण साठे, कोटा, राजपुताना)



अमेरिकन प्रेसबिटेरियन्स मिशनच्या मिरज येथील प्रसिद्ध हॉस्पिटलचे संस्थापक व माजी इन्-चार्ज फिजिशियन सर विल्यम वॉन्लेस हे अमेरिकेतील ग्लेनडेल गांवीं वयाचे ६८ वे वर्षी आपल्या स्वतःच्या घरी ता. ४ मार्च १९३३ रोजीं ख्रिस्तवासी झाले. हिंदुस्थानाच्या बहुतेक सर्व भागांतील विशेषतः महाराष्ट्रांतील त्यांचे असंख्य मित्रांस, चाहत्यांस व त्यांचे वैद्यकीय कौशल्याने व्याधिमुक्त झालेल्या हजारो जुन्या रोग्यांस हे वृत्त ऐकून अत्यंत वाईट वाटणे साहजिक आहे.

सदरील मिशनमधून ते प्रथम १८८९-१८९० चे सुमारास सांगली येथे आले व त्यांनी तेथे मराठी भाषेचा अभ्यास सुरू केला. गरीब शेतकरी मजर वगैरे लोकांशी बोलण्याइतकी तयारी होतांच त्यांनी तेथेच गोरगरीबांस मोफत औषधोपचार चालविला. व मोठे हॉस्पिटल स्थापन करण्याचे दृष्टीने महाराष्ट्राची पाहणी केली. दक्षिणेस बेळगाव, पूर्वेस सोलापूर विजापूर, उत्तरेस पुणे व अहमदनगर एवढीं सरकारी सिव्हिल हॉस्पिटल्स व पश्चिमेस कोल्हापूर ही सर्व शहरे व तेथील दवाखाने समक्ष पाहून या सर्वांचा साधारण मध्य कल्पून रेल्वेच्या सोयीचे व उत्तम हवेचे ठिकाण म्हणून त्यांनी मिरज पसंत केली व शहराचे उत्तर बाजस सांगली रस्त्यालगतची मोठी खुली जागा मिशन फंडातून खरेदी केली. सन १८९२ मध्ये तेथे इमारती बांधण्यास सुरुवात झाली. त्याच वेळी मिरज येथे मंगळवार पेठेत एक लहानसे दुकान भाड्याने घेऊन त्यांत त्यांनी दवाखाना सुरू केला. त्याचेच रूपांतर पुढे हल्लीच्या प्रचंड संस्थेत होईल ही त्या वेळीं कोणास कल्पनाही नव्हती.

डॉ. वॉन्लेस सांगलीहून सायकलवरून रोज सकाळ,सन्ध्याकाळ मिरजेस येऊन दवाखान्याचे काम करीत. सुरुवातीस कंपाउंडिंग, ड्रेसिंग वगैरे कामेहि ते स्वतःच करीत. त्यावेळी लोक त्यांस पाद्रीसाहेब म्हणत. त्यांनी पुढे डॉक्टराचे राहण्यासाठी बंगला व डिस्पेन्सरी प्रथम बांधून मुख्य हॉस्पिटलची इमारत पुरी केली व अमेरिकेचा स्वातंत्र्यदिन ४ जुलै हा सुमुहूर्त पाहून ता. ४ जुलै सन १८९३ रोजी या इमारतीचा उदघाटनसमारंभ मिरज संस्थानाचे अधिपति श्रीमंत सर गंगाधरराव बाळासाहेब पटवर्धन यांचे हस्ते मोठ्या थाटाने करण्यांत आला. या समारंभास श्रीमंतांबरोबर रा. ब. कल्याण सीताराम चित्रे माजी स्टेट-कारभारी मिरज, रा. ब. बाळकृष्ण नारायण वैद्य स्टेट कारभारी सांगली, व मिरज संस्थानचे अधिकारी वर्गातील रा. सा.

कर्नाटकर, गोगटे शास्त्रीबोवा, खरे, शहरांतील गोविंदराव शिराळकर वगैरे व्यापारी मंडळी व बरीच निमंत्रित मंडळी हजर होती.

दवाखान्यांत हळूहळू रोग्यांची गर्दी जमूं लागली. प्रथम ५६ बिछाने ठेवले होते.अनेक रोगावर शस्त्र क्रियेस सुरुवात झाली. या दवाखान्याचे उत्तरेस लागून असलेली आपली खासगी शेरी जर्मान श्रीमंतांनी हॉस्पिटलला मोफत दिली व म्युनिसिपालिटीने इमारती कामाला येणाऱ्या सर्व सामानावरील जकात माफ करून घरपट्टीहि माफ केली. मुख्यत्वे श्री. सर बाळासाहेब पटवर्धन, चीफ ऑफ मिरज यांचे सहानुभुतीने सर्व सोयी जमून आल्या.

सन १८९८ मध्ये मिरजेस प्लेगची पहिली भयंकर सांथ जोरांत सुरू झाली. त्या वेळीं रात्रंदिवस कांहीहि मोबदला न घेतां डॉ. वॉन्लेस यांनी अविश्रांत मेहनत करून मिरजवासी यांस कायमचें उपकृत करून ठेवले.

पुढें डोळ्यांचे सर्जन म्हणून त्यांचे लौकिकास सुरुवात झाली. व शेवटचीं २० वर्षे ते अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे सर्जन म्हणून प्रसिद्धीस आले. त्यांचें वैशिष्ट्य म्हणजे वैद्यकशास्त्राच्या सर्व शाखांतून ते सारखेच तरबेज होते.

नेत्रचिकित्सा, स्त्रीरोगचिकित्सा, वैद्यक व जनरल सर्जरी या प्रत्येक शाखेंत ते श्रेष्ठ पदावरच होते. त्यांचा विशेष म्हणजे पोटांतील रोगावरील शस्त्रक्रिया हा होता. ते अत्यंत जलद व समयसूचक सर्जन म्हणून प्रसिद्ध होते. त्यांनी मिशन हॉस्पिटलला जोडून एक मेडिकल विद्यार्थ्यांचा वर्ग सुरू केला. त्यांत प्रथम ख्रिश्चन विद्यार्थीच घेत व हे सर्व निरनिराळ्या प्रांतांतील मिशनमधून स्कॉलर्शिप मिळवून येत असत. परंतु आता इतरांसहि घेतात. १९१७ सालापासून हा क्लास रजिस्टर होऊन त्याचें रूपांतर मिरज मेडिकल स्कूल या संस्थेत झाले. तेथून आता विद्यार्थी मुंबईचे एल. सी. पी. एस. परीक्षेस बसूं शकतात. मिरजेस नर्स-क्लासहि आहे.

इ. स. १९२४ मध्ये मुंबई युनिव्हर्सिटीने मिरज हॉस्पिटलला 'मास्टर ऑफ सर्जरी' या परीक्षेसाठी लागणाऱ्या पोस्ट ग्रॅज्युएट अभ्यासासाठी मान्यता दिली. एम. बी. बी. एस. कोर्सचें पूर्ण मेडिकल कॉलेज मिरजेस सुरू करण्याची डॉ. वॉन्लेस यांची महत्त्वाकांक्षा होती व ती लवकरच पूर्ण होईल अशीं चिन्हें दिसत आहेत. मिरजेस गेलीं ३० वर्षे महारोग्यांचा आश्रमहि त्यांचे सल्ल्याने फार उपयुक्त काम करीत आहे. त्याची इतर सर्व व्यवस्था रे. मि. रिचर्डसन मिशनरी हे पाहात असतात. व अनेक गरीब महारोग्यांस या संस्थेचा फायदा मिळतो.

त्यांची शेवटची कामगिरी म्हणजे सर विल्यम वॉन्लेस ट्युबरक्युलोसिस सॅनिटोरियम या संस्थेची स्थापना ही होय. मिरज व सांगली यांचे दरम्यान सातारा जिल्ह्यापैकीं मौजे कुपवाड हद्दींतील एक विस्तीर्ण मोकळी जागा इंग्रज सरकाराकडून संपादन करून त्यावर या संस्थेची सुरुवात झाली आहे. क्षयासारख्या भयंकर व्याधीने ग्रस्त झालेल्या गरीब व मध्यम वर्गांतील रोग्यास अशा संस्थेची महाराष्ट्रांत अत्यंत उणीव भासत होती ती या संस्थेने बरीच भरून काढली आहे. कारण मिरजेचें हवापाणी उत्तम व इतर ठिकाणच्या मानाने खर्च कमी.

सर विल्यम वॉन्लेस यांचे नांव महाराष्ट्रांतील राजवाड्यापासून तो गरीबाच्या झोंपड्यांपर्यंत सर्वांस सारखेंच प्रिय व परिचित होण्याचें कारण त्यांची काम करण्याची पद्धत हेंच होय.सतत उद्योग, अविश्रांत मेहनत, गाजावाजा न करतां कार्य करून दाखवण्याची हातोटी, गरीबास फुकट व मध्यमास फारच अल्प मोलांत उत्कृष्ट प्रकारची औषधयोजना, हे त्यांचे विशेष गुण होते. त्यांच्या ऑपरेशनच्या फीचे माफक बिल पाहून मुंबईचे धनाढ्य लोक चकित होत. इमारतीचे बांध कामावर देखरेख, हिशेब ठेवणें, पत्रव्यवहार, क्लास शिकवणें, रोजचे काम, बाहेरगांवच्या व्हिजिटस्, मुंबईच्या खेपा या सर्व गोष्टी संभाळून फक्त झोपेच्या ४–५ तासांशिवाय उभ्या २४ तासांत विश्रांति न घेणारा हा पुरुष किती उत्साही व अद्वितीय कर्तृत्वशक्तीचा असेल याची कल्पनाच केलेली बरी.

शस्त्रक्रिया हिंदुस्थानांत लोकप्रिय करण्याचें श्रेय सर्वस्वी डॉ. वॉन्लेस यांस असून भावी शस्त्रवैद्यांचे पिढीवर हे त्यांचे उपकार आहेत. सर्व प्रांतांतील सर्व दर्जाचे रोगी त्यांजकडे येत हा विशेष होता. सर चंदावरकर, सर भांडारकर, नरोत्तम मुरारजी, कोल्हापूर बडोद्याचे राजघराण्यांतील मंडळी, पारशी समाजांतील टाटा, पेटिट, वाडिया, कावसजी जहांगीर,मुसलमानांत आदमजी पीरभाई, हैद्राबादचे मोठमोठे नबाब अशी सुशिक्षित धनाढ्य मंडळी मिरजेस धाव घेत याचें कारण त्यांचा डॉ. वॉन्लेस यांचे कर्तृत्वावरील विश्वास हेंच होय. त्यांतील कांही धनिकांनी आपले स्मरणार्थ इमारती व वॉर्डस हॉस्पिटलचे उपयोगासाठी बांधले आहेत.

# जर्मनीचा मोक्षकाल समीप आला !

महायुद्धांतून बाहेर पडल्यापासून साऱ्या युरोपखंडाची विशेषतः जर्मनीची राजकीय प्रकृति फारच नाजुक झाली आहे. महायुद्धानंतर जर्मनींतील कैसरशाही धुळीस मिळाली व तिच्या जागीं लोकशाही अवतीर्ण झाली. जर्मनींतील लोकतंत्र राज्यपद्धतीचें स्वरूप संयुक्त घटनेचें आहे. म्हणजे एकंदर स्वयंसत्ताक असे सुमारें २५ परगणे असून त्यांना राजकीय व्यवस्थेच्या रज्जूने निगडित करणारी अशी बर्लिन या राजधानीच्या शहरीं एक मध्यवर्ती लोकसभा आहे. जर्मनीची ही राज्यघटना सन १९३० सालापर्यंत जवळ जवळ अबाधित चालू होती. परंतु त्या सालीं मात्र राजकीय आणि आर्थिक वातावरणांत विलक्षण क्रांति होऊन जर्मनीचे भीष्माचार्य अध्यक्ष फॉन हिंडेनबुर्ग यांनी राइशस्टॅग बरखास्त करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली आणि डॉ. ब्रुनिंग यांना जवळ जवळ सर्वाधिकारी नेमलें. परंतु डॉ. ब्रुनिंग यांना राष्ट्राची अन्तर्गत आर्थिक स्थिति सुधारता न आल्यामुळे आणि निःशस्त्रीकरण व नुकसानभरपाई या दोन आन्तरराष्ट्रीय प्रश्नांच्या बाबतीतहि मिळावें तितकें यश न लाभल्यामुळे त्यांना राजिनामा द्यावा लागला. त्यांच्यानंतर फॉन पेपेन व जनरल शायचर या मुत्सद्यांनीहि आलटून पालटून मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें धारण केलीं. परंतु त्यांनाहि आपलें धोरण यशस्वी करून दाखवितां आलें नाही.

फॉन हिंडेन्बुर्ग हे आधुनिक मुत्सद्यांत एक नाणावलेले व स्थितप्रज्ञ मुत्सद्दी म्हणून गणले जातात. समुद्रावर तुफान माजून अजस्र लाटा उन्मत्तपणाने सह्याद्रीला धडक्या देतात व त्याच्या भोवतीं थैमान घालतात! परंतु त्यामुळे सह्याद्रीची गंभीरता रतिमात्रहि ढळत नाही; त्याप्रमाणे १९३० सालानंतर निवडणुकीमागून निवडणुकी होत आहेत, मंत्रिमंडळामागून मंत्रिमंडळें मोडत आहेत, दंगेधोप्यांच्या ज्वाळा भडकत आहेत आणि अत्याचारांचे स्फोट होत आहेत; तरी त्या तपोवृद्ध मुत्सद्याचें गांभीर्य आणि मनोधैर्य अढळच राहिलें आहे. एक राज्यव्यवस्था समूळ नष्ट होऊन तिच्या जागीं नवीन राज्यव्यवस्था दृढमूल होण्याच्या संक्रमणकालांत जर्मनीला फॉन हिंडेन्बुर्ग यांच्यासारखा करारी आणि अनुभविक अध्यक्ष मिळाला हें त्याचें भाग्यच होय.

१९३० सालानंतर जर्मनींत कोणताच पक्ष निर्भेळ बहुमताने निवडून येईनासा झाला. त्यामुळे एखाद्या पक्षाच्या हातीं राज्यसूत्रें पुरेतपणीं सोपविणें धोक्याचें वाटून प्रे. हिंडेन्बुर्ग यांनी साधारण जनतेला प्रिय असणाऱ्या पक्षाच्या पुढाऱ्यांना मुख्य मंत्रिपद देण्याचा उपक्रम सुरू केला. हेतु असा कीं, प्रत्येक पक्षाला राष्ट्राची सर्वांगीण पुनर्घटना करण्याची संधि मिळावी; ज्या पक्षाची योजना राष्ट्रहितवर्धक व सर्वमान्य ठरेल तो पक्ष अर्थातच स्थिर राहील. या दृष्टीनेच झालें तरी फॉन पेपेन व जनरल शायचर हे अल्पसंख्य पक्षाचे पुढारी असतांहि त्यांना मंत्रिपदाचा मान देण्यांत आला. फॉन पेपेन यांनी एक भली मोठी आर्थिक व औद्योगिक सुधारणेची योजनाहि केली होती. परंतु, त्यांची योजना राइशस्टॅगला पसंत पडली नाही आणि त्यामुळे त्यांना राजिनामा द्यावा लागला. जनरल शायचर यांची प्रधानकी औट घटकेची ठरल्याने त्यांची कोणतीच योजना उजेडांत येऊं शकली नाही.

मध्यवर्ती पक्षाचे पुढारी फॉन पेपेन व जनरल शायचर यांना संधि देण्यापूर्वी अध्यक्षांनी ती संधि वस्तुतः नाझीपक्षाचे पुढारी हर ॲडॉल्फ हिट्लर यांनाच द्यावयास पाहिजे होती. कारण इतर सर्व पक्षांपेक्षा नाझीपक्षानेच राइशस्टॅगमधील अधिक जागा जिंकल्या होत्या. परंतु एक तर गेल्या निवडणुकीपर्यंत हर हिटलर यांच्या पक्षाला केव्हांच निर्भेळ बहुमत मिळालेलें नव्हतें व दुसरें असें कीं, पेपेन व शायचर यांचे व्यक्तिशः फॉन हिडेनबुर्ग यांजवर वजन असून त्यांचे नाझीपक्षाशी सूत नसल्याने नाझी पक्षास ही संधि मिळण्याच्या आड ते आले. परंतु तो अधिकार परवाच्या निवडणुकीने हर हिट्लर यांच्या पायाशीं लोळण घेत आला! कालाची अघटित घटना म्हणतात ती हीच. ता. ५ मार्च रोजीं जर्मनीच्या सार्वत्रिक निवडणुकी होऊन हर हिट्लर यांच्या पक्षाला २८८ जागा मिळून तो निर्भेळ बहुमताने निवडून आला. नाझीपक्षाला हे दिवस दिसण्यास त्याचा अपूर्व मतप्रचार आणि दुर्दम सत्ताभिलाष हेच गुण कारणीभूत झाले आहेत. तशांतहि हर हिट्लर यासारखा जबरदस्त महत्त्वाकांक्षी, विलक्षण धाडसी, शक्त्युपासक सेनानी त्या पक्षाला मिळाला नसता तर इतर अनेक पक्षांप्रमाणे तो हवेतच विरून गेला असता किंवा सांदीकोपऱ्यांत पडून राहिला असता.

हर हिट्लर हे सत्ताधिष्ठित झाल्यामुळे जर्मनींत एकतंत्री किंवा सर्वाधिकारी युगाला प्रारंभ झाला असें म्हणावें लागतें. ता. २१ मार्च रोजीं पॉट्सडॅम येथील इतिहासप्रसिद्ध चर्चमध्ये नव्या राइशस्टॅगची

## जर्मनीचे सर्वाधिकारी



हर ॲडॉल्फ हिटलर

पहिली बैठक भरून हर हिटलर यांना राज्यव्यवस्था आणि आर्थिक व्यवस्था या दोन बाबतीत सर्वाधिकार देण्याचे बिल ४४१ विरुद्ध ९४ इतक्या प्रचंड बहुमताने मम्मत झाले. ता. २४ रोजी अध्यक्षांनी त्या बिलावर आपले शिक्कामोर्तबहि मारले. म्हणजे हर हिटलर हे आता कायद्यानेच जर्मनीचे सर्वाधिकारी झाले राइशरॅगच्या या नव्या बिलाने वीमर राज्यघटना १९३७ सालच्या एप्रिलपर्यंत तहकब ठेवण्यात आली आहे दिवसे दिवस जगाच्या राजकारणाची प्रवृत्तिच एकतंत्री राज्यपद्धतीकडे झुकू लागली असल्याचे दिसून येते. इटालीचा मुसोलिनी काय, रशियाचा स्टॅलिन काय किंवा आता जर्मनीचा हर हिटलर काय हे सर्व राष्ट्रपुरुष या उगवत्या नवयुगाचेच प्रवर्तक होत. एच. जी. वेल्स हाहि "डेमॉक्रसी अंडर रिव्हिजन" या आपल्या पुस्तकात म्हणतो "सांप्रतची लोकशाही ही राजकीय आणि सामाजिक जीविताचे शाश्वत स्वरूप नाही, तर ती विलयाचे दर्शक आहे. दिवसेंदिवस लोकशाहीचे रूपान्तर अन्य शासनप्रकारात होत आहे. तो शासनप्रकार असा की, त्यात लोकसभेसारख्या राज्यशासनसंस्था किंवा राजकीय जीवनक्रम यांना अस्तित्वच राहणार नाही." एच. जी. वेल्स यांच्या वरील वर्णनावरून त्यांच्या मनश्चक्षुपुढे एकतंत्री किंवा सर्वाधिकारयुक्त राज्यपद्धतीचा ताराच चमकत असावा असे वाटते.

एकतंत्री राज्यपद्धतीकडेच जगाची प्रवृत्ति कां होत जावी या गोष्टीची चिकित्सा पुढीलप्रमाणे करतां येईल. महायुद्धाने जित आणि जेते अशा सर्वच राष्ट्रांची औद्योगिक आणि व्यापारविषयक घडी विस्कटली. विशेषतः, जर्मनीसारख्या जित राष्ट्रांची तर नुकसानभरपाई व युद्धकर्जे यामुळे फारच हलाखीची स्थिति झाली. दोस्त राष्ट्रांनी व्हर्सेलिसच्या तहाच्या जळवा जित राष्ट्रांना लावल्या व त्यांचे आर्थिक शोषण करून स्वतःच्या तुंबड्या भरण्याचा निर्घृण प्रयत्न चालू ठेवला! या अर्थशोषणाने जित राष्ट्र आर्थिक दुःस्थितीच्या फेऱ्यात सापडली खेर, दोस्त राष्ट्रे तरी समाधानाचे सुस्कारे टाकून खुशाल रहप्रमाण वागत असतील म्हणावे तर तेहि नाही. जागतिक व्यापारमंदीने आणि अमेरिकेच्या युद्धकर्जांनी तीहि मेटाकुटीस आली आहेत. एकूण एकपुती रडते आणि सातपुतीहि रडते हाच न्याय त्यास लागू आहे.

आता राष्ट्रास आर्थिक दुरवस्थेतून वर डोके काढण्याचे तर जकातीचे आर्थिक धोरण जितके एकतंत्र आणि गुप्त राहील तितके चांगले. अशा तऱ्हेने राजकीय व आर्थिक सत्ता एकाच माणसाच्या ठिकाणी केंद्रीभूत झाल्यामुळे राष्ट्राचा भाग्योदयहि फारच लवकर होऊ शकतो. त्याला उदाहरण इटालीच किंवा रशियाच देता येईल. बारभाई च्या कारभाराने अशा वेळी निभाव लागत नाही. हे एकतंत्र राज्यपद्धतीचे एक कारण असू शकेल. दुसरे कारण म्हणजे त्या त्या देशांतील लोकांचे सांस्कृतिक जीवन हे होय. इटाली काय किंवा जर्मनी काय या दोनहि राष्ट्रांतील लोक लष्करी प्रवृत्तीचे आहेत. लष्करी शिस्तीत वाढलेल्या माणसाला एकमुखी सत्ताच अधिक मानवते हर हिटलर हा तर जन्मानेच शक्तिपथचा मोठा उपासक आहे. हर हिटलर यांचा चरित्रकार एमिल लेजिएल म्हणतो, "हर हिटलर याला इतिहासवाचनाचे लहानपणापासूनच जबरदस्त व्यसन होते. भूत काळांत होऊन गेलेल्या सर्वाधिकाऱ्यांची चरित्रे तर तो अत्यंत आवडीने आणि निष्ठेने वाचीत असे. अलेक्झांडर, ज्यूलियस सीझर, शार्लमेन या विभूतींना तो आपले दैवत समजे." यावरून हर हिटलर यांच्या मनोभूमीत एकतंत्री अंमलाचे बीजारोपण अगदी बाल्यावस्थेतच कसे झाले आहे हे दिसून येते.

कित्येक लोक एकतंत्री राज्यपद्धतीला राजशाही-

चेंच प्रच्छन्न स्वरूप मानतात. तथापि एखाद्या देशाच्या परिस्थितींत लोकशाही कुचकामी ठरली म्हणजे साहजिकच राज्यलक्ष्मीला सर्वाधिकाऱ्याकडेच आश्रयार्थ जावें लागतें. राजापेक्षा सर्वाधिकारी एकप्रकारें बरा. सर्वाधिकारी हा राजाप्रमाणेंच वरवर एकतंत्री दिसत असला तरी परंपरानुगत येणारी अधिकारलालसा व मदान्धपणा त्याच्या अंगीं उपजत नसतो, आणि दुसरें असें कीं तो फारच उन्मत्तपणानें वागूं लागला व त्याच्या वागणुकीनें राष्ट्राचें अहित होत असल्याचें आढळून आलें तर त्याला वठणीवर आणण्यास लोकमताचा अंकुश समर्थ असतोच. लोकमताच्या या नियंत्रणामुळें सर्वाधिकाऱ्याची कारकीर्द ही नादिरशाहीप्रमाणें तापदायक न होता रामराज्याप्रमाणें तापहारक होण्याचा बराच संभव असतो.

राष्ट्राचीं राज्यसूत्रें हातीं येताच हर हिट्लर यांनी राष्ट्रीय आणि आन्तरराष्ट्रीय प्रश्नांबाबत आपलें भावी धोरण जाहीर केलें; तें चढाईच्या स्वरूपाचें आहे ता. २३ रोजीं राइशस्टॅगपुढे भाषण करतांना हर हिट्लर म्हणाले, "जर्मनीवर महायुद्धाचा लादलेला आरोप खोटा आहे; तो आरोप नाहीसा करण्याचा आम्ही आटोकाट प्रयत्न करूं. इतर राष्ट्रांप्रमाणें जर्मनीला शस्त्रें बाळगण्याचा समान हक्क असला पाहिजे आतापर्यंत कम्युनिझमला आम्हीं दडपणाखालीं ठेवलें, तसें ठेवलें नसतें तर साऱ्या युरोपच्या स्वास्थ्याला धोका पोहोचला असता आम्ही आमच्या देशांतून कम्युनिझम समूळ उखडून टाकण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करणार आहों! तसेंच राष्ट्रांतील निरनिराळ्या घटक प्रांतांना एकछत्री अंमलाखालीं आणून जर्मनी हें एक अविभाज्य आणि संघटित राष्ट्र करण्याचा आमचा मनोदय आहे." हर हिट्लर यांच्या या भाषणानें राष्ट्रीय आणि परराष्ट्रीय राजकारणावर चांगलाच प्रकाश पडतो. त्यांची सर्वांत महत्त्वाची घोषणा म्हणजे व्हर्सेलिसचा तह रद्द करण्यासंबंधीची आणि डँझिग बंदर परत घेण्यासंबंधीची ही होय. आजवर डॉ. ब्रूनिंग, फॉन पेपेन, जनरल शायचर या सर्व मुत्सद्द्यांनी व्हर्सेलिस तहाच्या नांवानें बोटें मोडलीं, ओरडहि केली. परंतु तो तहच आम्हीं रद्द करणार इतकी निर्भीड भाषा आतापर्यंत कोणींच वापरलेली नाही.

व्हर्सेलिसचा तह अनेक पापांचें मूळ आहे. हर हिट्लर यांचा आरोप असा कीं, त्या तहानें दोस्त राष्ट्रांनी विशेषतः फ्रान्स, ब्रिटन या राष्ट्रांनी स्वतःचा आर्थिक आणि लष्करी दृष्ट्या फायदा करून घेऊन जित राष्ट्रांना कायमचेंच हतबल करण्याचें व युरोपांत आपलें लष्करी वर्चस्व स्थापण्याचें कारस्थान केलें. फ्रान्स, इंग्लंडप्रभृति साम्राज्यवादी राष्ट्रांचा हा तोरा आणि वर्चस्व हाणून पाडण्याकडेच हर हिट्लर यांच्या धोरणाचा रोख आहे व याच दृष्टीनें त्यांच्या निवडणुकीला अत्यंत महत्त्व आहे. तहांतील अटींनी दोस्त राष्ट्रांनी जर्मनीला धुळीस मिळविलें व त्याचें शस्त्र काढून घेऊन त्याला नामर्द बनविलें. ही लाजिरवाणी आणि अपमानास्पद स्थिति यापुढे आपण चालू देणार नाही असा हर हिट्लर यांचा निर्धार आहे. जर्मनीला नुकसानभरपाईदाखल दोस्तांना पर्वतप्राय रकमा द्याव्या लागत आहेत. दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस करून तेथील शेतकऱ्यांनी, मजुरांनी आणि कारखानदारांनी काम करावें व सर्व उत्पन्न दोस्तांच्या गंगाजळींत ओतावें. त्यांतच अलीकडे धान्याला व इतर मालाला भावच नसल्यानें पैशाची फार टंचाई भासूं लागली. राष्ट्राचा भावी कालांत उत्कर्ष व्हावयाचा तर अर्थातच ही असली स्थिति चालू राहणें श्रेयस्कर नाही. म्हणून डी व्हॅलेरा यांनी ज्याप्रमाणें इंग्लंडला द्यावयाची खंडणी बंद करून तिचा विनियोग शेतकऱ्यांची स्थिति आणि शेतीचा मगदूर वाढविण्याकडेच करण्याचें योजिलें आहे तद्वतच हर हिट्लर यांनीहि नुकसानभरपाई बंद करून ती रक्कम शेतकऱ्यांची स्थिति सुधारणें, उद्योगधंद्यांची वाढ करणें आणि बेकारी नाहीशी करणें या कार्याकडे खर्च करण्याचें ठरविलें आहे. हर हिट्लर यांच्या उदयाला हें आर्थिक धोरणहि एक कारण आहे.

नुकसानभरपाईच्या प्रश्नाप्रमाणेंच हर हिट्लर यांनी शस्त्रसमानतेचा प्रश्नहि धसास लावला आहे; तो इतका कीं, शस्त्रसमानतेला मोठ्या राष्ट्रांकडून मान्यता मिळेपर्यंत निःशस्त्रीकरण परिषदेला सरकारी राह्या प्रतिनिधि पाठविण्याचेंच त्यांनी रहित केलें आहे. निःशस्त्रीकरण परिषदेची प्रगति न होण्यास मुख्य कारण फ्रान्सची संशयी वृत्ति हें होय. फ्रान्सला असें वाटतें कीं, आज जर्मनीला शस्त्रसमानतेचा हक्क दिला कीं, उद्यां तो आपलें लष्कर, आरमार व वैमानिक दळ वाढवील आणि पुनः युद्धास प्रवृत्त होईल व त्यामुळें आमचे हितसंबंध धोक्यांत येतील. म्हणून प्रथम आम्हांला आमच्या संरक्षणाची हमी मिळाली पाहिजे. जर्मनी म्हणतो कीं, व्हर्सेलिसच्या तहानें जर्मनीलाच तेवढें शस्त्रहीन करण्यांत आलें आणि बाकीच्या दोस्त राष्ट्रांनी मात्र त्या तहांतील शस्त्रसंभार कमी करण्याच्या अटी पाळलेल्या नाहीत. अर्थात् इतर राष्ट्रें सशस्त्र असतां एकट्या जर्मनीलाच तेवढें संन्यस्तखड्ग राहण्यास सांगणें

शुद्ध अन्यायाचें आहे. म्हणून त्यालाहि शस्त्रसमानतेचा हक्क मिळालाच पाहिजे.

परिषद गेलें वर्ष दीडवर्ष हाच शुष्क वाद घालीत बसली आहे. आणि अलीकडे तर ती परिषद जवळ जवळ मोडण्याच्याच पंथास लागली आहे. ब्रिटन हें शस्त्रसंन्यास परिषदेचें सूत्रचालक असल्यामुळे परिषदेच्या अंगांत नवचैतन्य खेळविण्यासाठी मि. मॅक्डोनाल्ड यांनी कंबर कसली आहे. नुकतीच मि. मॅक्डोनाल्ड व सिनोर मुसोलिनी यांची मुलाखत होऊन शस्त्रसंन्यासाचा एक कच्चा खर्डाहि तयार करण्यांत आला. त्या खर्ड्यांत जर्मनीवरील महायुद्धाचा आरोप धुवून टाकण्यांत आला असून १९३७ सालानंतर त्याजवरील आरमारानियंत्रणाचें बंधनहि उठविण्यांत येणार आहे. याशिवाय महत्त्वाची गोष्ट अशी कीं, जर्मनीच्या शस्त्रसमानतेच्या हक्कालाहि त्या खलित्यानें मान्यता दिली आहे. हर हिट्लर यांनी परवाच एका भाषणांत सदर योजनेला आपली तात्त्विक सम्मति असल्याचें जाहीर केलें. स्वतः मुसोलिनी यांनाहि व्हर्सेलिसचा तह आमूलाग्र बदलल्याशिवाय व जित राष्ट्रांवरील अन्याय दूर झाल्याशिवाय युरोपांत खरी शांतता नांदणार नाहीं असें वाटतें.

हर हिट्लर यांना मुसोलिनींचें हें मत ग्राह्य आहे, इतकेंच काय पण दोस्त राष्ट्रांनीं भलेपणानें जर्मनीच्या या मागण्यांना मान्यता दिली नाहीं तर ते मुळीं व्हर्सेलिसच्या तहालाच बाल्टिक समुद्रांत बुडवणार आहेत ! परंतु फ्रान्सचा त्या खर्ड्याला विरोध आहे. हा विरोध वितळेपर्यंत अर्थातच वरील योजना निष्फळ आहे. हर हिट्लर यांच्या या चढाईच्या धोरणामुळे फ्रान्सच्या पोटांत धडकीचा गोळा उठला आहे तर इंग्लंडप्रभृति राष्ट्रांच्या मनांत अस्वस्थतेचें काहूर माजलें आहे. सामवादापेक्षां स्वकर्तृत्वावरच हर हिट्लर यांचा विश्वास असल्यामुळे आणि स्वध्येयसिद्ध्यर्थ आत्मार्पणहि करण्यापर्यंत त्यांच्या मनाची तयारी असल्यामुळे दोस्त राष्ट्रांना आपला ताठरपणा सोडून जर्मनीच्या मागणीला थोडी तरी मान तुकवावीच लागेल. नाहीं तर हिट्लर यांच्या धोरणाचें साहजिक पर्यवसान युद्धांत होईल असें वाटतें. सुचिन्ह इतकेंच कीं, आतां इटालीनेंहि या आन्तरराष्ट्रीय प्रश्नांत अधिक लक्ष घालण्याचें ठरविलें आहे. त्यामुळे फ्रान्सचा वरचष्मा न चालता जर्मनीला अनुकूल अशी कांही घटना घडून येण्याचा बराचसा संभव आहे.

शस्त्रसमानता आणि नुकसानभरपाई या दोन प्रश्नांपेक्षांहि जर्मनीच्या अत्यंत जिव्हाळ्याचा प्रश्न डँझिग बंदर व त्याभोवताली पसरलेला प्रदेश यांच्या मालकी हक्कासंबंधाचा होय. हर हिट्लर यांनी आपण तो प्रदेश आणि तें बंदर पुनरपि मायदेशाला जोडण्याची शिकस्त करणार असा आपला निश्चय प्रगट केला आहे. हर हिट्लर हे जगापुढे विध्वंसक पुढारी म्हणूनच आतापर्यंत वावरलेले आहेत. विधायक कार्यकर्ता म्हणून त्यांचें चरित्र अद्यापि लोकांपुढे यावयाचें आहे. इतकें मात्र खरें कीं, ते एक उमद्या स्वभावाचे, महत्त्वाकांक्षी, ज्वलज्जहाल व राष्ट्राभिमानी आहेत. आपल्या मातृभूमीला युद्धपूर्व वैभवाचे दिवस दाखविण्याबद्दल आणि जगाच्या दरबारांत तिला मानाचें स्थान मिळवून देण्याबद्दल त्यांच्या मनाला अहर्निश तळमळ लागली आहे. व्हर्सेलिस तहाच्या निरनिराळ्या साखळदंडांनी जखडून टाकल्यामुळे जर्मनीची स्थिति नक्रानें पकडलेल्या गजेंद्रासारखी मोठी केविलवाणी आणि शोचनीय झाली आहे. त्या साखळदण्डांतून सोडविण्याचा निश्चय करणारा पुरुष जर्मन जनतेला आपला उद्धारक वाटतो व म्हणूनच झालें तरी तिनें हर ॲडॉल्फ हिट्लर यांच्या शिरावर सर्वाधिकारित्वाचा मुगुट राजवैभवयुक्त मंगलविधींनी चढविला. " भूतकाळाला मूठमाती दिलीच पाहिजे; चला, मी तुम्हाला दिव्य अशा नूतन जगाकडे नेणार आहे ( दि पास्ट मस्ट बी बेरिड; आय वुइल गाइड यू टू ए न्यू वर्ल्ड ) " असे हिट्लर यांचे उद्गार आहेत. या उद्गारांत त्यांचें जीवितध्येय प्रतिबिंबित झालें आहे. हें जीवितध्येय ते कृतींत कितपत आणतात या गोष्टीवरच त्यांच्या कारकीर्दीचें यश अवलंबून आहे.

# नेपाळाचें निरीक्षण

(ले.—रा. नी. अंबिके बी. एससी. बनारस.)

नेपाळ हा प्रदेश मोठमोठे पहाड, विपुल नद्या, घनदाट अरण्यें व सुपीक दऱ्या यांनी व्यापला असून त्याचें सौंदर्य प्रेक्षणीय आहे. याची पाटणा ही जुनी व काष्ठमंडप ऊर्फ काटमांडू ही नवी राजधानी होय. काटमांडू विष्णुमती-वाघमतीचे संगमावर आहे. हें २० मैलांच्या सखल पठारावर वसलें असून सभोंवार डोंगरी कोट आहे. शहरास ३० वेशी व तितक्याच प्रमुख पेठा आहेत. त्यात दुतर्फा ३।४ मजली कौलारू हवेल्या असून फरसबंदी व विटबंदी प्रशस्त चौक आहेत. त्यांपैकीं राणीतलावाजवळचा आसनटोला इंद्रचौक व दरबारचौक हे प्रेक्षणीय आहेत. इतर भागांत काशीच्या घाटावरील गल्ल्याप्रमाणे अरुंद बोळांतून गलिच्छ व स्वास्थ्यनाशक वातावरण आढळतें. शहरचे मध्यभागीं प्रचंड राजप्रासाद असून त्या समोरील चौकांत अनेक सुंदर देवालयें आहेत. त्यांचा मुलामा व खोदकाम शोभिवंत आहे. महाद्वारांत हुबेहूब भासणारे सिंहाचे पुतळे आहेत. येथे बसल्यावर भाविकाचा श्रमपरिहार होतो व अनेक घंटांचा एकदम निघणारा कर्णमधुर ध्वनि त्यास तल्लीन करतो. हल्लीच्या सुधारणेच्या साधनांनी सुसज्जित अशा 'सिंग दरबार' या राजवाड्यांत प्रधानसाहेब राहतात. नजिकच्या पर्वतावर उभें राहून सायंकाळीं या निसर्गसुंदर दृश्याकडे नजर टाकली तर विजेच्या प्रकाशांत चमकणारी, नव्या सुधारणांनी नटविलेली स्वतंत्र हिंदु नगरी पाहून मनास स्वर्गीय आनंद प्राप्त होतो!

## नेपाळाची शासनपद्धति

नेपाळाचें राज्यशासन आजवर फार कडक होतें. पूर्वी क्षुल्लक अपराधास अवयव कापण्याची शिक्षा असे. हीन जातीय उच्चवर्णीय म्हणून मिरवतांच गुलाम म्हणून विकला जाई! पण आज गुलाम पाळणें कायद्याने बंद केलें असून फांशीची शिक्षा राजकीय गुन्ह्यापुरती मर्यादित आहे. तरी गोवधास देहदंड आहे, इतकेंच नव्हे तर गाईला छडी लगावल्यास, पाठीवर वेत फुटतात!

प्रत्येकाने लष्करांत पाळीपाळीने काम केलें पाहिजे या शिस्तीमुळे नेपाळांत १६ हजारांचा पगार देऊन युद्धप्रसंगास ७० हजार युद्धविशारद सैन्य समरांगणांत एकदम खडें करतां येतें. सैन्याची रचना व शिक्षण इंग्रजी पद्धतीवर आहे. पण अधिकाराच्या जागा राजघराण्यासाठीं राखल्या आहेत व प्रधानपुत्रच विविध खात्यांचे अधिकारी असतात. आज पंचराणे श्री. त्रिभुवनवीर विक्रमशाह देव हे सिंहासनाधीश आहेत. तीनराणे हे प्रधान असतात व तेच सरसेनापति असतात.

अशी एकसूत्री राज्यपद्धति एकतंत्री दिसली तरी ती नेपाळास फार हितप्रद आहे. कारण, प्रधान प्रजासेवेंतच सौख्य मानतात. माजी प्रधान चंद्रसमशेर जंगबहादूर यांनी आपल्या पदरचे ५० हजार रुपये खर्चून प्रजेला फुकट पाणी पाजलें. नळाने काटमांडूत पाणी आणलें, वीज खेळवली, विजेला ओझीं वाहायला लावून मजुरांचे कष्ट कमी केले, स्वराज्यांत अमलेखगंजापर्यंत रेल्वे बांधली, चंद्रगंजाजवळ शेतीसाठी कालवे काढले! यापासून आमच्या संस्थानिकांना बोध घेतां येईल काय?

तेथे कोणीहि महाराजांस भेटावें, सुखदुःख सांगावें अशी सुभा आहे. शिवाय महाराज मुजरे घेत दुपारीं लवाजम्यासह नगरफेरीस जातात तेव्हा प्रजेस जातीने अर्ज करतां येतो.

माघ-मेळ्यांतील फकीर बैराग्यांस रोज शिधा देवून महाराज शेवटच्या दिवशीं स्वतः विचारपूस करून तांब्याचांदीचीं कडीं व दोनपासून १० रुपयांपर्यंत दान देतात. महाशिवरात्रीस स्वतः पशुपतिमंदिरांत येऊन देवपूजा व पुरोहितपूजा करतात. यावरून स्वतंत्र हिंदुराजाचें औदार्य, धर्मप्रेम व गोब्राह्मणभक्ति प्रतीत होते.

शिवरात्रीचे दिवशीं दुपारीं १२ वाजता 'तुडीखेल' या कवायतीच्या मैदानावर सर्व नेपाळी फौज सरसेनापतीस लष्करी वंदन देण्यास जमते. ते खाकी खादींतील हिंदु सैनिक, निळ्या तांबड्या फितींचे हिंदु अधिकारी, व त्यांचे भरजरीच्या मखमलीच्या पोषाकांतील लष्करी चिन्हें धारण केलेले सरसेनापति आणि सर्वांचे ते शिरटोप व भालप्रदेशीं विलसणारे केशरी टिळे असें सर्वतोपरी हिंदुमय दृश्य पाहिलें म्हणजे अंगांत वीरश्री संचरते.

## नेपाळांतील सामाजिक दृश्य

नेवारी स्त्रिया दाक्षिण्याप्रमाणे नाकाकानांत नथ-बुगड्या घालतात. शहरी स्त्रीप्रमाणे त्या सुगंधी

फुलांच्या फार शोकीन आहेत. भोटिया स्त्रिया आमच्या वडारणींप्रमाणें चकाकी पाषाणाच्या माळा व पितळी दागिने वापरतात. राजमहिला डोक्यास कलाबतूचा मंदिल घालतात, व रणरागिणी झांशीवाली प्रमाणे त्यांच्या कमरेच्या दुपट्टयास तलवार झळकते.

नेपाळी ब्राह्मण फक्त निवृत्तमांस. पण इतरेजन मांसाहारासाठीं पाड्यांचे कळप पाळतात. खाण्यासाठीं मगर जातीस तुंबा बकर प्रिय तर गुरंग जातीस डुक्कर प्रिय ! तरी गरीबांचे नित्य खाद्य तांदळाचा भात व सरसो (मोहरी)चीं भाजी हेंच असतें. तेथे दुधदुभत्याची चंगळ आहे, पण जनता दीन दरिद्री आणि अल्पसंतुष्ट आढळते. बहुतेकांचा मजुरीवर निर्वाह चालतो. नेपाळी मजुराची श्वेत कांति व खुजी मूर्ति, बसकें नाक आणि बटबटीत डोळे पाहिले व त्याची रेंकत बोलणारी हेंगाडी भाषा ऐकली म्हणजे हा त्या निर्दय जपान्याचा भाऊ तर नसेल, अशी नवख्यास शंका येऊन भीति वाटते. पण सहवासाने त्याचें प्रेमळ अंतःकरण दिसलें म्हणजे मौज वाटते. हे लोक तहानेसाठी गहूतांदुळाचा ' रुक्षा ' (एक प्रकारची दारू) बनवून पितात. श्रीमंत मद्यपान करतात. इंग्रजी सुधारणा शिरल्यामुळे हल्ली कांहीं उच्च नेपाळ्यांचे घरी ब्रँडीबाई नाचूं लागल्या आहेत! तसेंच काटमांडूच्या बाजारांत नकली विलायती वस्तु वाढूं लागल्या आहेत ही दुःखदायक गोष्ट आहे.

### परधर्मप्रचारास बंदी

नेपाळांत परधर्मप्रचारास कायद्याने बंदी केली आहे. काश्मीरी व इराणी मुसलमान काटमांडूंत जुने आहेत, तसेंच भूतनाथाजवळ भूतानी व तिबेटी बौद्धहि राहतात. सर्वांचें पौरोहित्य ब्राम्हणच करतात. हेच ज्योतिषी व वैद्य आहेत.

आमच्या संस्थेस रेवदंड्याकडील एक बाई कोणी बाहेरप्रांतांत पळवून नेल्याचें मागे कळलें होतें काटमांडूंत त्याचा पत्ता लागला. चौलच्या श्री. गांगलांची एक ब्राम्हण स्त्री मुसलमानाने पळवून आठ वर्षांपूर्वी आणून ठेवल्याचें चौकशीअंतीं कळलें. तसेच धर्मप्रचारास बंदी असूनहि एक पाद्री फादर आपल्या औषधाच्या बाटल्या घेऊन तेथे लुडबुडतांना आढळलाच देवा! असला धर्मप्रेमाचा पान्हा आमच्या हिंदूंना कधी फोडशील बरें !

### तेथील लग्नपद्धतीचा विशेष

नेपाळांतील आजवरची सतीची चाल कायद्याने बंद झाली तरी बालविवाह होतात; व पुरुष अनेक स्त्रियांशीं लग्नें लावण्यांत भूषण मानतात. पण वेश्याव्यवसाय अस्तंगत झाला आहे.

विधुर व विधवा संततेच्छा असेल तर पुनः एकदाच लग्नसोहळा करूं शकतात. फक्त त्यांना मांडवाखालून जावयाचें नसतें. या पुनरूढ दंपत्यास जरी क्वचित् उच्च वर्णीयांत अपंक्त लेखलें जातें, तरी त्यांच्या पौनर्भव संततीचे प्रथम विवाहाच्या संततीशीं रोटी-बेटीव्यवहार सररहा चालू असतात.

नेवारी बालिकांचा श्रीफळांशीं विवाह लागलेला असतो. पुढे ऋतुमती झाल्यावर योग्य वराशीं परिणय होतो. पण वैधव्य आल्यास श्रीफळाशीं विवाह झालासे मानून त्या कुंकू पुसून टाकीत नाहीत !

आद्य शंकराचार्यांनी पशुपतीसाठीं अमेषाहारी पुजारी ठेवण्याची आज्ञा केल्यापासून राजे नर्मदेपलीकडील प्रांतांत जन्मलेल्यासच पुजेला ठेवतात. यामुळे तेथे आज नारायणशास्त्री गुर्जर, विष्णुशास्त्री बावडेकर व पाध्ये हे पुजारी व ढळबे, पाठक, करमरकर इत्यादि इतर महाराष्ट्रीय आहेत. तसेच दामोदरपंत जोशी हे एक गिर्झाजात तेथचे जहागिरदार आहेत. यांना सोयरिकीसाठीं महाराष्ट्राकडेच पाहावें लागते काशीकरांशीं यांचे अलीकडे बरेच संबंध घडत आहेत, ही आनंदाची गोष्ट आहे.

### नेपाळाची निसर्गसंपदा

हिंदुस्थानाच्या कोणत्याहि भागांत होत नसतील इतकीं हरतऱ्हेचीं फळझाडें आणि औषधि वनस्पति व विविध प्रकारचीं धान्यें नेपाळांत होतात. तराईत तांदूळ, अफू, अळशी, तंबाखू, ऊंस व सरस यांचें मोठें उत्पन्न आहे. अरण्यभागांत साधी व सफेत शाल, सुंदरी, तिलपत्र, तमालपत्र, मंदार व मंडल, शिरस व शिंगाडा आणि देवदार यांचे मोठाले वृक्ष व चाफा, अक्रोड, झाऊ, कुंझरू व अननस हीं फळझाडें शिवाय सुगंधी वृक्षहि आहेत. तसेंच, डांबर, गोंद, कापूर व कापूस होणारीं झाडेंहि आढळतात. मुबलक पाण्याचे ठिकाणीं मंजिष्ठ, वेलचीं व अधिक उष्णतेच्या जागीं द्राक्षें व ऊंस यांचें उत्पन्न आहे. डोंगरी भागांत वेत आणि बांबूचीं बनें तसेंच तूतफळ, रासबेरी, पिस्ते इ. फळझाडेंहि आहेत.

### भूगर्भसंपदा व शक्य उद्योग

नेपाळाच्या भूगर्भांत काय सांपडत नाही, असें विचारल्यास सर्व कांही सांपडतें असें उत्तर द्यावें लागेल. डोंगरगर्भात जे मूल्यवान दगड व धातु सांपडतात, त्यावरून तेथे धातूंच्या खाणी लागतील असें अनुमान निघतें. थोडी जमीन खणतांच तांबें व लोखंड आढळतें. आणि हें लोखंड महाबळेश्वराकडे ज्याचे धावडी तवे, कुऱ्हाडी करतात तशा अस्सल जातीचें आहे. ग्वाल्हेरकडेहि डोंगरांत असेच दगड असून त्यांत

शें. ७० लोखंड निघतें असें आमचे 'सुखाच्या मूलमंत्राचे' श्री. आपटे सांगत होते. पुढील खेपेस या दोनहि दगडांचें रासायनिक पृथक्करण करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. गंधक तर येथे मुबलकच आहे व तो सर्व बाहेर निर्यात होतो!

इतर जे दगड सांपडतात त्यांत मार्बल व चुनखडी आणि दुसरे लाल व पिवळ्या रंगाचे दगड मुख्य आहेत. पशुपतिमंदिरापासून ८-९ मैलांवर सुंदरीजल येथे एक मोठा लोण्याच्या गोळ्यासारखा शुभ्र पहाड दिसतो तो निव्वळ अभ्रकाचा आहे! त्या वाटेने वीरगंजावरून भीमफेडीस गेले तर स्लेटचा दगड, संगमरवर व लोखंड यांचे डोंगर पाहण्यास मिळतात. 'गुर्खा' या ठिकाणीं एक गुळगुळीत क्रिस्टल पाषाण मिळतो, तो घासल्यास हिऱ्यासारखा चमकतो! या ठिकाणीं माती इतकी चिकण आहे कीं, ती वापरल्यास सिमेंटासारखी कठीण होते. आज ती आम्ही झोंपल्यामुळे परदेशीं जाऊं लागली आहे.

या एवढ्या कच्चया मालावर रासायनिक धंदे उभारले तर हिंदुस्थानांत पुनः सोन्याचा धूर निघूं लागेल, अशी मला खात्री वाटते! आधुनिक रासायनिक उद्योगधद्याच्या प्रगतीचें जें 'थर्मोभिटर' तेजाप, तें मोठ्या प्रमाणावर नेपाळांत तयार होईल. मुंबईकडील गंधकाम्लाच्या कारखान्यांनी जपान, अमेरिका, सिसिलीकडे तोंड ज्यासाठीं वेंगाडावें ती वस्तु--गंधक--नेपाळाने परदेशीं पाठवावी, हा केवढा दैवदुर्विलास! हिंदुस्थानांत गंधकाम्ल पुराण्या 'लेड चेंबर प्रोसेस' नेंच बनवलें पाहिजे असा निर्बंध आहे. पण, नेपाळांत आपण अर्वाचीन अशा 'कॉंन्ट्रॅक्ट प्रोससनें' बनवूं शकूं. आणि मग हांहां म्हणतां इतर 'केमिकल्स' चे कारखाने उभे राहतील!

## पोलादाचा कारखाना

दुसरा महत्त्वाचा धंदा पोलाद गाळण्याचा कारखाना. नुसतें पोलाद गाळण्यावर जरी नेपाळ सरकारनें सर्व लक्ष दिलें, तरी हिंदुस्थान त्याचा कायमचा ऋणी राहील. या अस्सल पोलादापासून हरएक प्रकारच्या धंद्यास आवश्यक अशीं यंत्रें ढाळण्याचें काम जर आधीं हातीं घतलें तर हिंदुस्थानास जपान-जर्मनीच्या पदरांत पैसा ओतण्याचें कारण पडणार नाही. नेपाळाने अमेरिकेच्या मोटारी खरेदी करण्याऐवजीं स्वतः बनवलेल्या मोटारी अमेरिकेला विकणें अशक्य आहे काय? निदान फोर्डप्रमाणे प्रत्येक हिंदु कुटुंबात एकेक मोटार ठेवण्याची हिंमत धरल्यास नेपाळाला कांहीं अमान्य नाही.

आमचे हिंदु विश्वविद्यालयांतील प्रो. डॉ गोडबोले हे सर्व हिंदुस्थानाच्या जंगलांत लकडी पेन्सिलीस योग्य लांकूड नाहीं, असें ठरवून बसले. त्यांचा या धंद्याचा अभ्यास फार खोल आहे. पुढे नेपाळांतील लांकूड पाहिले व तें आपण कागद फाडतों इतक्या सुलभतेने, लोणीकाप्या चकूनेहि छेललें जातें! हे त्यांच्या नुकतेंच निदर्शनास आलें. हें लाकूड व इतर ३-४ जातींचें लाकूड दिवटीसारखें भुरभुर जळतें! त्यामुळे पेन्सिलीचा व काड्यांच्या पेट्यांचा धंदा फार मोठ्या प्रमाणावर तेथे चालूं शकतो. तिकडे चिकणमाती, सरस, मऊ व सरळ शिराचें (thread) लांकड, ग्राफाईट इ. सर्व कच्चा माल भरपूर असल्यामुळे पेन्सिलीचा व्यापार निदान हिंदुस्थानासाठी तरी एकट्या नेपाळाचा आहे. त्यांच्या हातचा कोणीं कितीहि स्पर्धा केली तरी, तो नष्ट होणार नाहीं. तसेंच विमको कंपनीला जपानाहून काड्या व डबडीं आणन स्वदेशीच आगपेट्या कराव्या लागतात; तेवढेंच काम नेपाळानें केलें तर अस्सल देशी काडीने हिंदी चूल पेटूं लागेल.

याशिवाय हिंदुस्थानांत न होणारा कापूर, पार्चमेंट पेपर, दगडी पाट्या हा मालहि नेपाळांत अल्पायासाने तयार होऊं शकतो. आज तेथे तांब्यापितळेचीं भांडीं, काशाच्या घंटा, 'जेफू' कागद, लोकरी व सुती कापडाचे धंदे व टांकसाळी आणि तोफा--बंदुका ओतण्याचे कारखाने आहेत. पण यांची सद्यःस्थिति अधिक पाहिल्याशिवाय लिहितां येत नाही. तरी इतकें ठासून म्हणतां येतें कीं, विजेसाठी मोठाले जलप्रवाह, गंधकाम्लासाठी मुबलक गंधक आणि यंत्रासाठीं मातामोल पोलाद तसेंच स्वस्त मजूर व बेकार हिंदु केमिस्ट, एंजिनीयर हाताशीं असतांना नेपाळानें जर रासायनिक उद्योगधंदे उभारण्यास विलंब लावला तर घात होईल.

# न्यायनिवाड्यांचें निरीक्षण

( ले.—एक ॲडव्होकेट )

**पुनर्विवाहित विधवा**

अयोध्या प्रांतांतील पार्वती नांवाच्या एका विधवेकडे तिच्यानवऱ्याच्या मिळकतीचा वारसा आला. त्या मिळकतीचा ती उपभोग घेत असतांनाच तिनें मुसलमानी धर्म स्वीकारून हझारी नांवाच्या मुसलमानाशीं लग्न केलें. वास्तविक हा पुनर्विवाह झाल्यावर तिचा पहिल्या नवऱ्याच्या मिळकतीवरील हक्क नष्ट होऊन ती मिळकत तिच्या उत्तराधिकाऱ्याकडे जावयास हवी होती. पण तसें न होता तिची वहिवाट पर्वींप्रमाणे पार्वतीकडेच राहिली व ती तिनें सुमारें २५ वर्षे केली. पुढे तिनें मृत्युपत्र करून त्यापैकीं कांहीं मिळकत दुसऱ्यास दिल्यावर तिच्या पहिल्या नवऱ्याच्या चुलतभावानें, पार्वतीच्या पश्चात् आपण उत्तराधिकारी असून तिला याप्रमाणें मिळकत देण्याचा अधिकार नाहीं, व तिनें केलेलें मृत्युपत्र रद्दबातल आहे अशाबद्दल दावा लावला. पार्वतीचें म्हणणें कीं हिंदु कायद्याप्रमाणे मी नवऱ्याच्या मिळकतीची पूर्ण मालक नसले तरी ज्याअर्थी पुनर्विवाह केल्यापासून १९ वर्षांवर मी मिळकतीची वहिवाट करीत आलें आहे त्याअर्थी उत्तराधिकाऱ्यांचा हक्क आता नष्ट झाला असून विरुद्ध कबजामुळे मी आता पूर्ण मालकीण झालें आहे कारण खरें पाहतां तिचें दुसरें लग्न होतांच त्या मिळकतीवर तिच्या पहिल्या नवऱ्याच्या सहभागीदारांची मालकी सुरू झाली; व त्यामुळे तेव्हापासून १२ वर्षांची मुदत धरणें साहजिकच होतें परंतु औध चीफ कोर्टानें असें ठरविलें की पार्वती ही पूर्ण मालक कधींच नसल्यामुळे तिला विरुद्ध कबजाच्या तत्त्वावर ह तशी मालकी संपादन करतां येणार नाहीं. पुनर्लग्न होतांच विधवा म्हणून मिळकत उपभोगण्याचा तिचा हक्क नष्ट व्हावयाचा, तो मात्र पुनर्लग्नानंतर १२ वर्षांवर त्या हक्काची तिनें वहिवाट केल्यामुळे नष्ट होणार नाहीं एवढेच. विरुद्ध कबजा (ॲड्व्हर्स पझेशन )चें तत्त्व तिच्या, मालकीच्या बाबतींत लागत नसून तिच्या विधवेच्या हक्काच्या बाबतींतच फक्त लागतें. आणि म्हणून ती हयात असेतोंपर्यंत तिच्या उत्तराधिकाऱ्यांस तिचा तो हक्क नाकबूल करतां येणार नाहीं. औध चीफ कोर्टानें केलेला हा सूक्ष्म भेद मोठा मार्मिक असून या निर्णयामुळे एका हिंदू कुटुंबाची मिळकत विधवेच्या कृत्यामुळे आणि तिच्या उत्तराधिकाऱ्यांच्या हलगर्जीपणामुळे मुसलमान कुटुंबांत जाणार होती ती वांचली. या कज्जांत निर्णीत झालेलें तत्त्व इतर सर्व प्रांतांतहि उपयोगी पडणारें आहे.

**खालच्या तिकिटावर वरच्या वर्गाचा प्रवास**

रेल्वेत एखाद्या उतारूनें दुसऱ्या वर्गाचें तिकीट घेतलें आणि दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत मुळींच जागा नाहीं, तर त्याच तिकिटावर पहिल्या वर्गानें प्रवास करण्याचा त्या उतारूस हक्क आहे काय? रेल्वेतून प्रवास करणारांना असा प्रसंग वारंवार येतो. आणि रेल्वे अधिकाऱ्यांच्या परवानगीनें किंवा अन्य मार्गानें पुष्कळदा अशा वेळीं दुसऱ्या वर्गाचे उतारू पहिल्या वर्गानें जातातहि. पण ही केवळ रेल्वेची मेहेरबानी असून, तसा उतारूस हक्क नाहीं व अधिकाऱ्यांच्या परवानगीशिवाय त्याला वरच्या वर्गानें जातां येणार नाहीं, असा मुंबई हायकोर्टानें मि. हॉर्निमन यांच्या खटल्यांत नुकताच निर्णय दिला आहे.

**वर्तमानपत्रें व कोर्टाची बेअदबी**

कोर्टानें दिलेल्या निर्णयावर बेजबाबदार रीतीनें टीका केल्यास संपादक कोर्टाची बेअदबी केल्याच्या गुन्ह्यास पात्र होतो हें तत्त्व आता प्रस्थापित झालें असून, असा गुन्हा केल्याबद्दल अनेक वृत्तपत्रांच्या संपादकांना आजपर्यंत शासन भोगावें लागलें आहे. खुद्द केसरीच्या बाबतींत, लोहगाव येथील प्रकरणीं टीका केल्याबद्दल मुंबई हायकोर्टांत श्री. केळकरांना जाब द्यावा लागला असल्याची आठवण पुष्कळांना आहेच. परंतु कोर्टांत एखाद्या खटल्याची चौकशी चालू असतां रोजची हकीकत प्रसिद्ध करतांना, त्यावर जर दिशाभूल करणारे मथळे घातले तरीसुद्धां ती कोर्टाची बेअदबी होते असें कलकत्ता हायकोर्टानें नुकतेंच ठरविलें आहे. तसेंच खटला चालू असेपर्यंत त्यावर टीका करणें हें तर गैर आहेच, पण खटला संपला तरी त्यावर अपील करण्याची मुदत टळेपर्यंतमुद्धां पहिल्या कोर्टाच्या निर्णयावर टीका करण्यानें कोर्टाची बेअदबी करण्याचा गुन्हा होतो असा कलकत्ता हायकोर्टाचा निर्णय आहे. ता. ३० एप्रिल रोजीं मिदनापूरचे डि. मॅ. मि. डग्लस यांचा प्रद्योतकुमार भट्टाचारजी यानें खून केल्यावरून तो खटला कमिशनरांपुढें चालला व ता. २५ जून रोजीं आरोपीस शिक्षा सुनावण्यांत आली. **अमृतबझार पत्रिकेनें** या खटल्याची खरी हकीकत वेळोवेळीं आपल्या पत्रांत आकर्षक मथळे घालून प्रसिद्ध

केली. आणि निकाल जाहीर झाल्यावर ता. २८ व २९ जूनच्या अंकांत कमिशनरांच्या ठरावावर टीका करून सदर ठराव चुकीचा आहे असें प्रतिपादन केलें. त्यावर ता. ३० जून रोजीं आरापीनें सदर निर्णयावर हायकोर्टाकडे अपील दाखल केलें. सरकारनें तक्रार केल्यापैकीं कांहीं मथळे दिशाभूल करणारे आहेत असें हायकोर्टानें ठरवून असें करणें गुन्हा असल्याचें आपलें मत दिलें. कमिशनरांच्या ठरावावर अपील प्रत्यक्ष दाखल होण्यापूर्वी संपादकांनी त्यावर टीका केली असली तरी त्यावर अपील दाखल होणार आणि तें न झालें तरी खालच्या कोर्टानें दिलेली फांशाची शिक्षा मंजुरीसाठी तरी हा खटला कायद्याप्रमाणे हायकोर्टाकडे येणें प्राप्त आहे हें संपादकांना ठाऊक असलें पाहिजे आणि म्हणून अपील ऐकणाऱ्या न्यायाधिशांचा गैरसमज होईल, किंवा अपील होण्यापूर्वी जनतेची त्या कज्याच्या गुणावगुणाविषयीं दिशाभूल होईल, अशी टीका करणें कोर्टाची बेअदबीच होय. असें म्हणून हायकोर्टानें अमृतबझार पत्रिकेचे संपादक व प्रकाशक यांस प्रत्येकीं ५०० रु. दंड केला. वृत्तपत्राच्या संपादकांस हा निकाल महत्त्वाचा वाटेल.

### स्कूलबोर्डावर दावा करतां येईल काय?

नवीन लोकल बोर्डांतील जिल्हा स्कूलबोर्डे हीं लोकल बोर्डापासून स्वतंत्र अशी संस्था आहे कीं, ती लो. बोर्डाची एक शाखा आहे असा प्रश्न मुंबई हायकोर्टापुढे नुकताच उत्पन्न होऊन त्यांत स्कूलबोर्डें ही जि. लो. बोर्डापासून स्वतंत्र अशी संस्था असून स्कूलबोर्डाला स्वतंत्र रीतीनें दावे करण्याचा हक्क आहे व त्याप्रमाणे स्वतंत्र स्कूलबोर्डावर दावे लावतां येतात असा न्यायकोर्टानें निर्णय दिला. याचें कारण असें झालें कीं विजापूर स्कूलबोर्डाच्या कांहीं शिक्षकांनी आपल्यास बोर्डानें निष्कारण शासन केल्याबद्दल बोर्डावर दावा लावून नुकसानभरपायी मागितली. त्यात स्कूलबोर्डावर असा दावा लावतां येईल कीं नाहीं, का हा दावा मुख्य जिल्हा लोकल बोर्डावरच केला पाहिजे असा प्रश्न उत्पन्न झाला. तेव्हां या बाबतींतल्या सर्व कायद्यांचें विवेचन करून हायकोर्टानें असा निर्णय दिला कीं, ज्याअर्थी स्कूलबोर्डाला स्थावर व जंगम अशी मिळकत स्वतंत्रपणें धारण करतां येते; स्कूलबोर्डाचा स्वतंत्र फंड व उत्पन्न असतें आणि लोकल बोर्डाची मुदत संपून त्याचें अस्तित्व संपलें तरी स्कूलबोर्डांत मात्र पुनः नव्या बोर्डाची निवड होईपर्यंत सर्व सभासद कायम असतात; व तसेच जिल्हा लोकल बोर्डाचे सभासद नसलेले लोकहि स्कूलबोर्डाचे सभासद असूं शकतात, त्याअर्थी स्कूलबोर्ड म्हणजे जि. लो. बोर्डाची एक शाखा किंवा उपांग नसून त्याला लोकल बोर्डापासून निराळें आणि स्वतंत्र असें अस्तित्व आहे. विजापूरच्या स्कूलबोर्डाप्रमाणें इतर ज्या ठिकाणी शिक्षकांवर बोर्डाकडून असा अन्याय झाला असेल तेथे त्या शिक्षकांनाहि आपापल्या स्कूलबोर्डाविरुद्ध कायद्याप्रमाणे दाद मागण्यास आता कांहीच हरकत नाहीं.

# कायदेभंगाच्या चळवळीचें हेंच फळ काय?

इंग्रज सरकारानें हिंदुस्थानाच्या राज्याधिकाराचा कच्चा खर्डा व्हाईट पेपरच्या रूपानें ता. १८ मार्च रोजीं प्रसिद्ध केला. सदर खर्ड्यांत बहुतेक मुद्दे पिंजून निघालेच आहेत. परंतु पहिल्या पिंजणींत एखादी गांठ चुकून राहिली असल्यास ती मोडण्यासाठी व केरकचरा चिकटून बसला असल्यास तो छाटून काढण्यासाठी, पार्लमेंटांतील सर्व पक्षांच्या निवडक सभासदांची एक संयुक्त कमिटी नेमण्याचा ठराव त्यानंतर नऊ दिवसांनी भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनी कॉमन्स सभेंत मांडला. व त्या ठरावावर सर्व पक्षांनी तीन दिवस कसून चर्चा केली. इतक्या महत्त्वाचा विषय गेल्या बारातेरा वर्षांत ब्रिटिश पार्लमेंटापुढे प्रथमच येत आहे असें समजण्यास हरकत नाही. या कारणाने खालिल्यावरील चर्चेत कॉमन्स सभेंतील सर्व पक्षांनी भाग घेतला होता. इंग्लंडांत कॉन्झरव्हेटिव्ह, लिबरल व मजूर हे तीन प्रमुख राजकीय पक्ष होत. या तीन पक्षांतील निदान तीस सभासदांचीं तरी ठरावावर भाषणें झालीं.

इंग्लंडचे राजकीय पक्ष दिसावयाला तीन आहेत, पण त्यांत तऱ्हा तेरा आहेत. एक कॉन्झरव्हेटिव्ह पक्ष घेतला तरी त्याचे पुढे तीन--चार पडतील. कारण सर सॅम्युएल होअर, मि. बाल्डविन व मि. चर्चिल या तीन व्यक्ति एकाच्या कॉन्झरव्हेटिव्ह पक्षांतच मोडतात; पण त्या व्यक्ति तीन प्रकारच्या आहेत. त्या तिघांत सर रेजिनाल्ड क्रॅडॉक या हिंदुस्थानाचें पेन्शन इंग्लंडांत बसून खाणाऱ्या अट्टल साम्राज्यवादी हिंदद्वेष्ट्यांची भर घातली असता जी चौकडी

जमेल तितें वर्णन काय करावें ? अशा चौकड्या प्रत्येक पक्षांतून बाहेर पडल्या व त्यांनी वाग्यांचे भाले नाचवून खालील सूचनांचीं म्हणण्यापेक्षा हिंदुस्थानांतील जनतेची राजकीय आंतडीं बाहेर काढलीं वादविवादाच्या वेळीं पार्लमेंटांतील सरासरी पाऊणशेंहि सा सभासद हजर होते. सभासदांचा एवढा मोठा समुदाय पार्लमेंटांत क्वचितच आढळून येतो. आलेल्या सभासदांत प्रत्येक पक्षाचे पुढारी प्रामुख्यानें दृष्टीस पडत होते.

कॉन्झरव्हेटिव्ह पक्षांत सर सॅम्युअल होअर व मि. बाल्डविन यांना अग्रपूजेचा मान मिळतो. सध्याच्या मंत्रिमंडळांत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचेंच प्राबल्य असल्यामुळे वरील जोडी अधिकाराच्या तोऱ्यानें चमकत असून, मि. विन्स्टन चर्चिल, सर रॉबर्ट हॉर्न, सर रेजिनाल्ड क्रॅडॉक यांनी तिच्या आजूबाजूला बसून आपल्या आरोळ्यांनी कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचा उदोउदो चालविला होता. इंग्लंडचा लिबरल पक्ष मोडकळीस आला आहे. त्याचे जुने पुढारी मि. लॉईड जॉर्ज त्यांतून फुटून निघाले आहेत. तथापि उरलेल्या सभासदांपैकीं सर हर्बर्ट सॅम्युएल व सर जॉन सायमन प्रभृतींनी आपल्या पक्षाची बाजू मांडण्याची हीं संधि दवडली नाही. त्यांतून सायमनसाहेब तर नवीन राजकीय सुधारणांचा आद्य ग्रंथ जो सायमन कमिशन रिपोर्ट त्याचे जनक असल्यामुळे त्यांनी केलेल्या भाषणास साहजिकच विशेष महत्त्व प्राप्त झालें.

लिबरल पक्षापेक्षा मजूर पक्षाची त्रेधा अधिकच उडाली आहे हा बोलूनचालून गरिबांचा पक्ष. त्यांतून मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी अंग काढून घेतल्याकारणानें सदर पक्ष अधिकच बापुडवाणा दिसूं लागला आहे. तथापि गरिबांची करुणा गरिबांनाच यावयाची या निसर्गनियमास अनुसरून त्या पक्षांतील मेजर अॅटली, कर्नल वेजवूड, मि. लान्सबरी इत्यादि नव्याजुन्या पुढाऱ्यांनी वादविवादाच्या वेळीं हजर राहून, होअर यांच्या ठरावावर उपसूचना मांडून, हिंदुस्थानाच्या वतीनें कळवळ्याचीं भाषणें करून व हिंदी लोकांच्या बाबतींत इंग्लंडचें कर्तव्य काय हें कॉन्झरव्हेटिव्ह पक्षास जोराजोरानें बजावून, आपली कामगिरी इमानेइतबारें पार पाडली. परंतु तिची मात्रा कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या करोल सैन्यापुढे न चालता मेजर अॅटली यांच्या उपसूचनेचा धुव्वा उडून होअरसाहेबांचा मूळ ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला. मेजर अॅटली यांनी मजूर पक्षातर्फे मांडलेल्या उपसूचनेचा आशय असा होता कीं, इंग्लंडनें हिंदुस्थानाशीं सतत सहकार्य करून हिंदुस्थानास त्याच्या अनुमतीनें ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींच्या मालिकेंत शक्य तितकें लवकर बसवावें. या उपसूचनेचा अर्थ हिंदुस्थानास लवकर डोमिनियन स्टेटस ऊर्फ वसाहतीचें स्वराज्य द्यावें असा आहे, आणि नव्या खलित्यांत स्वराज्य तर नाहींच पण स्वराज्याचें नुसतें नांवसुद्धा नाहीं, यामुळे मजुरांची उपसूचना होअरसाहेबांच्या शिळेवर आपटून तिचा साहाजकच कपाळमोक्ष झाला.

कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या करोल सैन्यापुढे इतर कोणताहि पक्षाचा विरोधी ठराव किंवा सूचना टिकाव धरणार नाही हें निश्चित असल्यामुळे मेजर अॅटली यांची उपसूचना सपशेल पडल्याबद्दल कोणासहि विषाद, खेद किंवा आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. पार्लमेंटांतील वादविवाद वाचून हिंदी लोकांना सात्त्विक संताप आला असेल तर तो इंग्रजांच्या क्षुद्र वृत्तीचा, स्वार्थांधतेचा व मानभावीपणाचा आणि खेद उत्पन्न झाला असेल तर तो स्वतःच्या दौर्बल्याचा, असहाय स्थितीचा व पराधीनतेचा. चर्चिलसाहेबांनीं यापूर्वी अनेक भाषणें केलीं आहेत व त्यांत त्यांनी स्वतःच्या दुःखांनीं पोळलेल्या हिंदी लोकांच्या हृदयाला आपल्या उद्दामपणानें, बेपर्वाईनें व तुच्छतेनें डागण्यांवर डागण्या देऊन तडफडावयास लावलें आहे. परंतु नव्या खलित्यावरील वादविवादाच्या वेळीं त्यांनी आपली जीभ सैल सोडून असले बेतालपणाचे उद्गार काढले कीं, त्या माणसाचें डोकें फिरलें असून तें ताळ्यावर आणण्याकरिता त्याला पलिस्तर मारून चांगले चरचरीत डागच दिले पाहिजेत असेंच कोणाचेंहि मत पडेल ते म्हणाले, 'मॉटेग्यू काय व चेम्सफर्ड काय सारे घसरले. त्यांनी हिंदुस्थानांत संतोष नांदावा म्हणून सुधारणा दिल्या. पण त्यांचा परिणाम उलटा होऊन असंतोषच वाढला. त्यापेक्षा नवा व्हाईट पेपर तर अगदीच वाईट. त्यांत सांगितलेले राज्याधिकार हिंदुस्थानास दिल्यानें हिंदुस्थानांत आकांत उडेल, माणूस माणसाला फाडून खाईल व राक्षसिणी दिवसाढवळ्या पीठ कांडूं लागतील.'

चर्चिल यांचीं पुढचीं वाक्यें कोणास ऐकवणारसुद्धा नाहीत. तीं ऐकत किंवा वाचीत असता असलीं वाक्यें उच्चारणारा प्राणी हा माणस आहे कीं, हैवान आहे अशीच कोणाहि शंका येईल. 'इंग्रजी राज्य स्थापन झाल्यावर गेल्या पन्नास वर्षांत हिंदुस्थानची लोकसंख्या दहा कोटींनीं वाढली. याला कारण इंग्रजांनो ! तुमचा मूर्खपणा. तुम्ही हिंदुस्थानांतल्या

लढाया थांबविल्या, दुष्काळ हटविले, दवाखाने घातले, औषधोपचार सुरू केले व बालहत्या बंद पाडल्या; त्यामुळे मुंग्यांच्या वारुळाप्रमाण हिंदुस्थान दश माणसांनी गजबजला व तेथील जनतेची अन्नासाठी चिवचिव झाली. त्यापेक्षा हिंदुस्थानाची लोकसंख्या कमी ठेवून लोकांना सकस अन्नाचा व भरपूर कामधंद्याचा पुरवठा केला असता तर हिंदी लोकांवर तुमचे केवढे उपकार झाले असते!' चर्चिलसाहेबांच्या भाषणाची तार अशी लागल्यावर यापुढे त्यांनी हिंदी लोकांची संख्या कमी करण्याकरिता इंग्रजांनी विमानांतून बाबगोळे टाकून गांवचे गांव जाळून पोळून फस्त करावे, सैनिकांनी भरवस्तींत शिरून मशीनगन्सच्या साहाय्याने हजारों जीवांचे पटापट प्राण घ्यावे व शेंकडों इसमांना तोफेच्या तोंडीं द्यावें या आशयाचा उपदेश आपल्या देशबांधवांना केला असेल अशी कोणाची समजूत होईल.

परंतु नशीब हिंदी लोकांचें कीं, त्या बृहस्पतीला आपल्या अविच्छिन्न पंचऐंशी मिनिटांच्या भाषणात हें पांडित्य सुचलें नाहीं. याहूनहि त्यांचें सुदैव हें कीं, अशा उलट्या काळजाच्या माणसाच्या हातीं हिंदी लोकांचे प्राण सांपडले नाहीत. तसे ते सांपडले असते तर त्यानें सरसहा त्यांची कत्तल करण्याचेच हुकूम सोडले असते असें त्याच्या आसुरी भाषणावरून वाटल्याशिवाय राहात नाही. चर्चिलसाहेब व्हाइट पेपरवर रागाने उसळले असले तरी त्यांचा अन्तरात्मा एका गोष्टीने फार संतोष पावल्यासारखा दिसला. हिंदुस्थानांत पक्का बंदोबस्त होऊन कायदेभंगाची चळवळ चिरडून निघाली, ज्या गांधीला मॅक्डोनाल्ड व आर्यावन यांनी लाडांनी कुरवाळलें त्या गांधीला तुरुंगांत पडून वर्ष होऊन गेलें असें म्हणून चर्चिल यांनी आनंदाने टाळ्या पिटल्या आहेत. चर्चिल यांजपासून दडपशाहीच्या कामगिरीबद्दल धन्यवाद मिळाल्याने होअर यांच्या अंगावर मूठभर मांस चढलें असेल यांत शंका नाही.

होअरसाहेबांनी वादविवादाच्या प्रारंभीं जें भाषण केलें त्यांत हिंदुस्थानाच्या तोंडाला चांगलींच पानें पुसलीं असल्याचें आपल्या इंग्रजी श्रोत्यांना आश्वासन दिलें होतें. त्यांचा युक्तिवाद असा होता कीं, गव्हर्नरजनरल, गव्हर्नर व बडे अधिकारी यांच्या नेमणुका इंग्लंडाकडूनच होणार आणि हा क्रम अव्याहत चालणार, तर मग आम्हीं केलें याविरुद्ध इंग्रजांना डोक्यांत राख घालण्यासारखें काय आहे? होअरसाहेबांना याहिपेक्षा एक अंतरकी बात सांगितली. ती ही कीं, नवा खलिता ब्रिटिश मंत्रिमंडळानें आपल्या मनाला येईल तसा इंग्लंडांत बसून वारेमाप झोकून दिला नसून, त्यांतील अक्षरन् अक्षर हिंदुस्थानांतील प्रत्येक जबाबदार अधिकाऱ्यास मान्य असल्याचें त्याजकडून वदवून घेतलें आहे. जे हिंदुस्थानांतील आजचे सत्ताधारी आहेत त्यांच्या संगनमतानें तयार झालेल्या खलित्यामार्फत त्यांची महत्त्वाची सत्ता काढून घेतल्याचा संशय तुमच्या मनास शिवतो कसा असा होअरसाहेबांचा आपल्या इंग्रज बांधवांना आश्चर्यपर्वक सवाल आहे.

पार्लमेंटांतील एकंदर वादविवादांत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे वृद्ध अध्वर्यु मि. बाल्डविन यांनी आपल्या पक्षाचें धोरण सांगितलें तें हिंदी लोकांनी सदैव लक्षांत ठेवण्यासारखें आहे इतकेंच नव्हे तर वारंवार मनन करण्यासारखें आहे. त्यांच्या पक्षाचा हिंदुस्थानास डोमिनियन स्टेटस किंवा स्वराज्य देण्याचा विचार कधीच नव्हता. हिंदुस्थानास राजकीय आकांक्षा तो साम्राज्यांतून फुटून बाहेर पडणार नाही इतक्या बेतानेच पुरविण्याचा त्यांचा संकल्प होता. एकीकडून स्वातंत्र्याच्या व पूर्ण स्वराज्याच्या कल्पनेने भारलेली कायदेभंगाची चळवळ दाबीत आणावयाची व दुसरीकडून थोडेसे राजकीय हक्क देण्यासाठी काढावयाचे असें दुहेरी धोरण कान्झरव्हेटिव्ह पक्षाने आपल्या मनाशीं योजलें होतें. त्यांपैकीं कायदेभंगाची चळवळ मोडण्याचें काम व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन व भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांच्या कडक अमलामुळे सिद्धीस गेलें असून दुसऱ्या कामाचा शेवट नवीन राजकीय हक्कांनी लागावयाचा असल्याचें बाल्डविन यांनी आपलें मन स्थिर व गंभीर ठेवून सांगितलें!

मि. बाल्डविन हेच कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे खरे सूत्रधार आहेत, व वरील धोरण त्यांनींच जाहीर केलें आहे. तें वाचून दोन कठोर सत्यें मनांत बिंबल्यावाचून राहत नाहीत. गरीब हिंदी लोकांनी स्वराज्याचें उच्च ध्येय उराशीं बाळगून गेलीं दोन वर्षें अनेक प्रकारचे कष्ट सोसले. वृद्ध व तरुण, श्रीमंत व गरीब, बायका व मुलें यांनी सुखावर पाणी सोडून तुरुंगवासाचा स्वीकार केला, आपली मिळकत घालविली, प्राप्ति बुडविली, शिक्षण गमावलें, शरीर कायमचें रोगाचें घर बनविलें व परवाचा मृत्यु उशावर आणून ठेवला हा क्रम हजारों हिंदवासीयांनी दोन वर्षें अव्याहत चालविला, व अद्यापिहि सोडला नाही हें चालू धरपकडीवरून सिद्ध झालेंच आहे. अशा रीतीने तुरुंगांत कैद्यांच्या उड्या पडत असतांना पार्लमेंटांत हिंदुस्थानाच्या सद्यःस्थितीवर वाद सुरू राहतो व बाल्डविन एवढे-

च आम्ही देणार व एवढेंच देण्याचें आम्ही पूर्वी-पासून ठरविलें असल्याचें बिनदिक्कत जाहीर करतात यापासून हिंदी लोकांनी काय समजावें ?

म.गांधीप्रभृति हजारो थोर व वंद्य देशभक्त तुरुंगांत पडले. त्यांचे क्लेश इंग्रज मुत्सद्यांच्या खातरेंत नाहीत, व त्यांचें राजकीय ध्येय त्यांच्या गांवींहि नाही असेंच हिंदी लोकांनी समजावयाचें काय? हेच सत्य याहिपेक्षा फटकळ भाषेंत बोलावयाचें तर कायदेभंगासारख्या आत्मक्लेशाच्या चळवळीचा इंग्रज मुत्सद्यावर तिळमात्रहि दृश्य परिणाम झाला नाही असेंच म्हणावें लागेल. त्यांना कैदेंत पडलेले हजारो हिंदी लोक खुले असले काय किंवा तुरुंगांत अडकले काय सारखेच वाटतात. त्यांची पुण्याई इंग्रजापाशीं नाही, व त्यांनी मागितले ते राजकीय हक्क देण्याची इंग्रजांना निकड भासली नाही. जबाबदार इंग्रज मुत्सद्यांनी जें अल्पस्वल्प द्यावयाचें मनाने ठरविलें आहे त्यापेक्षा कपर्दिकहि ते अधिक हातीं लागू देणार नाहात. सारांश, चळवळीचें सध्याचें धोरण परिणामकारक झालें नाही असाच पार्लमेंटांतील वादापासून निष्कर्ष निघत आहे. कायदेभंगाच्या चळवळीचा शोध म. गांधींनी लावला. ती चळवळ स्वराज्य मिळवून देते कीं नाही याचा प्रयोग केव्हा तरी व्हावयास पाहिजे होता. तो गेलीं दोन वर्षें जनतेनें करून पाहिला. त्यावरून इच्छित फळ पूर्णपणें नसलें तरी समाधान मानण्याइतकेंहि लाभत नाही असें अनुभवाअंतीं ठरलें. अशा स्थितींत ब्रिटिश सरकारच्या खलित्यांत व पार्लमेंटांतील वादविवादांत जें फळ दृष्टीस पडलें तेंच जर कायदेभंगाच्या विशाल वृक्षाला आलें असेल तर या चळवळीच्या कार्यक्षमतेविषयीं फेरविचार करण्याची वेळ आली आहे, एवढें प्रस्तुत प्रसंगीं बजावण आम्हांस आपलें कर्तव्य वाटतें

# महाराष्ट्र विद्यापीठाचें शिष्टमंडळ

सोमवार ता. ३ एप्रिल रोजीं दुपारीं १२ वाजता मुंबई येथे महाराष्ट्र विद्यापीठाच्या शिष्टमंडळाने गव्हर्नरसाहेबांची भेट घेतली शिष्टमंडळांत बॅ. मुकुंदराव जयकर, श्री. न. चिं. केळकर, रा. ब. आर. आर काळे, रा. ब. पी. सी. पाटील, डॉ. आर के. नायडू, प्रि जी. एस. महाजनी, प्रि. आर. पी. सप्रर्नस, प्रि. जे. आर. घारपुरे, प्रि. के एम. खाडये, प्रो. एम आर परांजपे, व प्रि. डी. आर. गाडगीळ हे गृहस्थ होते. शिष्टमंडळाने मुलाखतींत गव्हर्नरसाहेबांना विद्यापीठाच्या आवश्यकतेसंबंधी जी कैफीयत सादर केली तिचा आशय पुढीलप्रमाणे आहे.

### पुणें शहराचें महत्त्व

"पुणें येथे महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन व्हावें याबद्दल महाराष्ट्रीय जनतेला अतिशय तळमळ लागली आहे. सरकारानें त्याबाबत लवकरांत लवकर कायदा करावा असा तिचा आग्रह आहे. महाराष्ट्रांतील बहुजनमत विद्यापीठाच्या स्थापनेला अनुकूल असल्याचें प्रत्यंतर १९२४–२६ साली 'मुंबई विद्यापीठ सुधारणामंडळा'च्या पुढे झालेल्या साक्षीपुराव्यांत दिसून येतें. मुंबई इलाख्यांत आणखीहि विद्यापीठें स्थापण्यांत यावीं आणि त्यांतल्या त्यांत पहिलें नवीन विद्यापीठ पुणें येथे स्थापण्यांत यावें असें आपलें स्पष्ट मत कमिटीने नमूद केलें आहे. कमिटी म्हणते, 'इलाख्यांत उच्च शिक्षणाचा प्रसार करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. अत्यंत महत्त्वाचे आणि गुंतागुंतीचे अनेक प्रश्नहि उपस्थित झाले आहेत. अशा वेळीं एकट्या मुंबई विद्यापीठाला इतक्या गोष्टींचा उरक होणें शक्य नाही. यासाठीं इलाख्याच्या निरनिराळ्या विभागांत स्वतंत्र विद्यापीठें स्थापण्यांत यावीं. त्यापैकीं पहिलें विद्यापीठ महाराष्ट्रासाठीं पुणें येथे स्थापण्यांत यावें.' कमिटीनें ही उपयुक्त शिफारस केल्यापासून आठ वर्षें लोटलीं. मध्यंतरीं पुणें शहरांत शैक्षणिक केंद्रें आणि त्यांतून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढलीच आहे. गेल्याच सालीं वाडिया कॉलेज निर्माण झालें. भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन–मंडळ, रानडे एकॉनॉमिक इन्स्टिट्यूट, भारत–इतिहाससंशोधक मंडळ, गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स अँड एकॉनॉमिक्स या संस्थांना मुंबई विद्यापीठांत मान्यतेचें स्थान मिळालें असून, त्या संस्थांतून उच्चतम ( Post-graduate studies ) शिक्षण मिळण्याची सोय झाली आहे. बी. जे. मेडिकल स्कूलचें रूपांतर मेडिकल कॉलेजांत लवकरच होईल अशी अपेक्षा आहे. एकंदरींत इतर शहरांपेक्षा शैक्षणिक दृष्ट्या पुणें शहर पुष्कळच पुढारलेलें आहे असें म्हणावें लागतें. म्हणून मुंबई इलाखा विशेषतः महाराष्ट्र यांच्या शैक्षणिक वाढीच्या दृष्टीने महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना लांबणीवर टाकणें केव्हाहि श्रेयस्कर नाही.

### विद्यापीठाचें स्वरूप

पुणें येथे विद्यापीठ स्थापावयाचें तर तें कोणत्या

धर्तीचें असावें या प्रश्नाबाबत खुद्द पुण्यांतच दुमत होतें हें खरें. परंतु आनंदाची गोष्ट अशी कीं, अलीकडे हा मतभेद नाहींसा होत आला आहे. मुंबई विद्यापीठ सुधारणामंडळाने विद्यापीठ कोणत्या स्वरूपाचें असावें याबाबत पुढील शिफारस केली आहे. मंडळ म्हणतें, "पुणें येथे विद्यापीठ स्थापन व्हावयाचें तर ते 'ॲफीलिएटिंग' स्वरूपाचें असून पुरेशा शैक्षणिक उपकरणांनी युक्त असलें पाहिजे. महाराष्ट्रांतील सर्व कॉलेजांनीं त्या विद्यापीठाच्या आश्रयाखाली आलें पाहिजे आणि सर्व शाळांनी त्या विद्यापीठाचीच मान्यता घेतली पाहिजे अशा प्रकारचें विद्यापीठ पुणें येथे स्थापन झाल्यावर त्यांत केवळ स्थानिक लोकांचेंच मतप्राबल्य होता कामा नये, तर साऱ्या महाराष्ट्राच्या भावना, आकांक्षा आणि मत त्यांत प्रतिबिंबित झालें पाहिजे." ज्या विद्यापीठांत साऱ्या महाराष्ट्राच्या सांस्कृतिक आणि शैक्षणिक आकांक्षा प्रतिबिंबित होतील असें विद्यापीठच स्थापण्याविषयी आम्हा सर्वांचें ऐकमत्य आहे.

### विद्यापीठाचें कार्यक्षेत्र

मुंबई शहर आणि उपनगरें सोडून मुंबई इलाख्यांतील ज्या जिल्ह्यांतून मराठी भाषा बोलली जाते तेवढेच जिल्हे महाराष्ट्र विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रांत मोडतील. इतक्या मर्यादेंतील सर्व हायस्कुलें सदर विद्यापीठाची मान्यता मागतील आणि पुणें व पुण्याबाहेरील सर्व कॉलेजें त्या विद्यापीठाशीं आपला संबंध जोडतील. मुंबई विद्यापीठाचा संबंध तोडून महाराष्ट्र विद्यापीठाशीं नवा संबंध जोडतांना अर्थातच या संस्थांच्या शैक्षणिक दर्जांत कोणताच फरक होणार नाहीं. कारण असा संबंध जोडतांना मुंबई विद्यापीठाने जे नियम घालून दिलेले आहेत त्या नियमांत महाराष्ट्र विद्यापीठहि फरक करणार नाहीं. पुणें हद्दींतील कॉलेजें हे नियोजित विद्यापीठाचे घटक समजले जातील. या कॉलेजांचीं शैक्षणिक आणि इतर कार्यें एकाच सूत्रांत आणण्याबद्दल कायद्यानेच कांहीं तरी सोय करणें भाग आहे. अर्थात् एकसूत्रीकरणाचें (को-ऑर्डिनेशन) हें कार्य त्या त्या संस्थांना योग्य संधि येताच विद्यापीठाच्या नेतृत्वाखालींच करावें लागेल.

### शेतकी कॉलेज व स्थापत्य कॉलेज

पुणें येथील शेतकी कॉलेज आणि स्थापत्य कॉलेज हीं दोनहि कॉलेजें साऱ्या इलाख्याकरिता असल्यामुळे, तीं मुंबई विद्यापीठाशींच संलग्न असावीं अशी सुधारणामंडळाने शिफारस केली होती. परंतु हीं दोनहि कॉलेजें महाराष्ट्र विद्यापीठाला जोडलीं जाणें अत्यंत आवश्यक आहे, असें आमचें ठाम मत आहे. महाराष्ट्र विद्यापीठापासून हीं दोन कॉलेजें तोडून ठेवण्याने तीं कॉलेजें आणि विद्यापीठ यांपैकीं कोणाचाच फायदा होणार नाहीं. तीं कॉलेजें साऱ्या इलाख्यासाठीं आहेत असें म्हणून महाराष्ट्र विद्यापीठापासून त्यांना विलग ठेवणें केव्हांहि इष्ट नाहीं. साऱ्या इलाख्यांतील विद्यार्थ्यांना त्यांचा उपयोग होईल अशाबद्दल कांहीं नियम करतां येतील. तसेंच तीं कॉलेजें साऱ्या इलाख्यासाठीं राहीपर्यंत अध्यापनासाठीं आणि परीक्षांसाठीं मातृभाषेच्या माध्यमाची अट त्यांना लावण्यांत येणार नाहीं. महाराष्ट्र विद्यापीठाला हीं कॉलेजें जोडण्यांत आलीं कीं, त्यांच्या कार्यक्षमतेंत कमीपणा येईल ही भीति तर अगदींच अस्थानीं आहे. त्या त्या कॉलेजांच्या शिक्षकवर्गाला आज मुंबई विद्यापीठांत जेवढें स्थान आहे तेवढेंच ते महाराष्ट्र विद्यापीठांतहि त्याला राहील.

### माध्यम मराठी भाषा

लोकांना महाराष्ट्र-विद्यापीठाचें इतकें वेड लागण्याचें कारण असें कीं, असें विद्यापीठ स्थापन झालें म्हणजे मराठी भाषा, मराठी वाङ्मय, मराठी संस्कृति आणि इतिहास यांच्या अभिवृद्धीस मोठीच मदत होईल असें लोकांना वाटतें. अध्यापनाचें माध्यम मराठी भाषा केल्यामुळे, महाराष्ट्रीय जनतेची वरील आशा बव्हंशीं सफल होईल. नव्या विद्यापीठाच्या कांहीं शाखा महाराष्ट्राची भाषा, वाङ्मय, इतिहास आणि संस्कृति यांच्या शिक्षणाचें कार्य करताल. त्याप्रमाणें दुसऱ्या शाखा इतर भाषांचें अध्ययन आणि संशोधनाचें कार्य यांची वाढ करतील. अशा दुहेरी योजनेमुळे, महाराष्ट्र विद्यापीठ कूपमंडूकवृत्तीचें होईल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. पुणें येथे कार्यक्षम असा शैक्षणिक विभाग सुरू व्हावयाचा तर त्यासाठीं निरनिराळ्या संस्थांचीं ग्रंथालयें, प्रयोगगृहें यांचें प्रथम एकसूत्रीकरण झालें पाहिजे. परंतु इतक्यानेच भागणार नाहीं. नियोजित विद्यापीठाची सर्वांगीण वाढ होण्यास युनिव्हर्सिटी प्रोफेसर आणि अभ्यासक ( रीडर ) यांची संस्था मोठमोठ्या प्रयोगशाळा, पदार्थसंग्रहालयें आणि इतर उपयुक्त विभाग स्थापणें अत्यंत आवश्यक आहे. अर्थात् यासाठीं मोठाच द्रव्यनिधि लागेल. सर्व अंगोपांगानी युक्त असें विद्यापीठ एकदम निर्माण होत नसतें, हीहि गोष्ट तितकीच खरी आहे. समाजाकडून बुद्धि आणि अर्थ यांचें दान जसजसें मिळत जाईल तसतशी विद्यापीठाच्या उपाङ्गांची वाढ होणार आहे. बाहेरून मदत मिळाल्याशिवाय केवळ परीक्षांची फी आणि इतर फी यांतून विद्यापीठाचा योगक्षेम उत्तम रीतीने चालणार नाहीं. म्हणून

सरकार आणि जनता यांनी अशी आर्थिक मदत केली पाहिजे.

### महाराष्ट्राची स्वार्थत्यागपरंपरा

महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेची घोषणा सरकारानें निश्चित शब्दांत केली म्हणजे महाराष्ट्रांतील राजेरजवाडे, संस्थानिक, धनिक आणि इतर जनताहि शिक्षणाच्या या पवित्र कार्याला उदार अंतःकरणाने मदत करतील यांत आम्हाला शंकाच वाटत नाही. आतापर्यंत याच लोकांच्या उदार आश्रयाने शैक्षणिक कार्याचें पाऊल पुढे पडलें आहे. पुनर्घटना मंडळानेंहि इलाख्याच्या पश्चिम भागांत नव्या विद्यापीठाची आवश्यकता प्रतिपादून सरकारी कॉलेज बंद करून त्यांवर खर्च होणारा पैसा या विद्यापीठाच्या कामीं लावण्याबद्दल सुचविलें आहे. तेव्हा सरकाराला आमची अशी सूचना आहे कीं, त्यांनी डेक्कन कॉलेज बंद केल्यावर त्याची इमारत, ग्रथालय, प्रयोगशाळा आणि इतर सामान भावी महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्वाधीन करावें व त्या कॉलेजाला जी वार्षिक देणगी देण्यांत येत असे तिचाहि विनियोग विद्यापीठाकडे करावा. नवीन विद्यापीठ अस्तित्वांत येण्यास कमींत कमी दोन-तीन वर्षे तरी लागतील. तोंपर्यंत डेक्कन कॉलेज मात्र बंद करण्यांत येऊं नये असें आम्हांस वाटतें. मध्यतरीं तें कॉलेज एखाद्या शैक्षणिक संस्थेकडे देण्यांत यावें. आणि विद्यापीठ अस्तित्वांत आलें म्हणजे पोस्ट ग्रॅज्युएट अभ्यासासाठी तें त्यांकडे सोंपविण्यांत यावें.

गेलीं कित्येक वर्षे महाराष्ट्रांत स्वार्थत्यागाच्या पायावर शैक्षणिक कार्याची जी एक अखंड परंपरा सुरू आहे तीच या नव्या विद्यापीठाची चैतन्यज्योत आहे. भावी विद्यापीठाचा योगक्षेम चालण्यास तीच परंपरा कारणीभूत होणार आहे. स्वार्थत्यागाची ही भावना वेळेवरच अधिकाधिक रुजविली पाहिजे. अशाकरितां कीं, त्यामुळे महाराष्ट्राचा इतिहास आणि परंपरा यांना अनुरूप अशी नवी घटना निर्माण होईल नव्या विद्यापीठामुळे मुंबई विद्यापीठाचेंहि बरेंचसें काम हलकें आणि सोपें होणार आहे. म्हणून स्वतः गव्हर्नर साहेबांनी आपलीं अधिकारवस्त्रें खाली ठेवण्यापूर्वी ही इष्ट सुधारणा घडवून आणून तिला सढळ हाताने मदत करावी आणि महाराष्ट्राच्या उच्चतम आकांक्षांशीं आपलें नांव चिरतन कालपर्यंत निगडित करावें अशी आमची इच्छा आहे."

### विद्यापीठाचें प्रचारकार्य

गव्हर्नर साहेबांच्या उत्तराचा सारांश पुढील अंकीं सविस्तर देऊं. वरील कैफियतीचें वाचन व उत्तर झाल्यावर कांही थोडी खाजगी स्वरूपाची चर्चा बसल्या बसल्या झाली. तथापि तींत प्रायः व्यक्तिविषयक अशीच मतें सांगितलीं गेलीं. महाराष्ट्र विद्यापीठातर्फे मतप्रसार सुरू असून अनेक वर्गांतील जबाबदार लोकांचे अभिप्राय एकत्र करण्याचें काम सुरू आहे.

# ग्वाल्हेर संस्थानाचा राज्यकारभार

( लेखक-संस्थानी )

(लेखांक १ ला)

### क्षेत्रफळ, लोकसंख्या इत्यादि माहिती

ग्वाल्हेर संस्थानचें क्षेत्रफळ जहागीर, ब्रिटिश कँटोन्मेंट, रेसिडेन्सी हेड्क्वार्टर्स मिळून २६३६७ चौ. मैल आहे. १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणे लोकसंख्या ३५२३०७० इतकी आहे त्यांत ३२५५९७७ ( ९२ टक्के ) हिंदूच असून मुसलमान २०४२९७ म्हणजे फक्त सुमारें ५ टक्के आहेत. बाकीचे तीन टक्के शाख खिस्ती मिळून आहेत. सर्व संस्थानांत दोन शहरें व ४१ छोटीं शहरें (कसबे) आहेत. खेड्यांची संख्या १०८५२ आहे. म्हणजे संस्थानची प्रजा मुख्यत्वेंकरून शेतीवर उपजीविका करणारी आहे.

संस्थानांत मुख्य उत्पन्न जोंधळे, मक्का, बाजरी, गहूं, उडीद, तांदळ, मूग, हरभरे, यांचें आहे. माळव्यांतील भागांत अफूचें उत्पन्न पूर्वी दांडगें होतें. ही सर्व अफू भडोचमार्गे चीन देशांत जात असे. पण अलीकडेच ( पांच-पंचवीस वर्षांपूर्वी ) भडोचचा हा व्यापार इंग्रज व्यापाऱ्यांच्या दांडगाईने बंद झाल्यामुळे अफूची पैदास आता अगदी तुरळकच राहिली आहे.

संस्थानांत एकदर वार्षिक आयात ४॥ कोट व निर्गत ५॥ कोट रुपयांच्या मालाची होत असते. आयातींत साखर, तांदूळ, केरोसीन, धातुपदार्थ, मिठाया, नाना प्रकारचें कापड, साबू, अत्तरें,

तेलें इत्यादि सामान विशेष असतें. या संस्थानांतून धान्यें, कापूस व शुद्ध तूप बाहेरदेशीं फार मोठ्या प्रमाणांत जातें. व्यापार मारवाडी व बोहरी लोकांच्या हातीं आहे.

संस्थानाची स्वतःची शें-सवाशें मैलांची एक लाइट रेल्वे असून स्वतंत्र पोस्ट-खातें आहे. एकदोन ठिकाणीं टेलिफोनची व्यवस्था असून पक्के रस्तेहि बरेच आहेत. पोस्ट-खात्याचें काम अगदीं इंग्रजी इलाख्याप्रमाणे चालतें, ही गोष्ट संस्थानास भूषणावह आहे.

## सध्याचा राज्यकारभार

प्रस्तुत संस्थानचा राज्यकारभार कै. माधवरावांच्या मृत्युपत्रान्वयें निर्माण झालेल्या कौन्सिल ऑफ रीजन्सीचे हातीं आहे. हें हल्लीचें कौन्सिल वास्तविक कै. माधवमहाराजांच्या हयातींतील एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच होय.तथापि कांहीं जागा रिकाम्या झाल्या तेवढ्या खांदेबदलीचा फरक कौन्सिलांत झाला आहे. या राज्यशासक मंडळांत हल्लीं १० सदस्य असून अकराव्या श्रीमंत महाराणी गजराराजासाहेब शिंदे या अध्यक्ष आहेत. कर्नल सर हक्सर(राजकीय), सर शितोळे (जमीनमहसूल), जनरल राजवाडे (सैन्य व पोलीस), श्रीमंत खासेराव पवार (गृहव्यवस्था), सर सुलतान अहंमद, (अपील), श्री. जयगोपाळ अस्थाना (जमाखर्च—तिजोरी), मोहनलाल खोसला (न्याय), कॅप्टन रा. ब. बापूराव पवार (शेतकी), रा. सा. मुळे (शिक्षण व स्थानिक स्वराज्य) व मेजर रहिमतुल्ला (व्यापार) हे कौन्सिल-सदस्य होत. राज्यकारभाराच्या सोयीसाठी एकंदर ११ जिल्हे व ३९ परगणे पाडण्यांत आले आहेत. त्यांवर देखरेख अनुक्रमें सुभे व तहसीलदार यांची असते. सुभे यांना क्वचित् प्रसंगीं फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार असतात. डिस्ट्रिक्ट जज्ज यांचेकडे सेशन्स व डि. मॅजिस्ट्रेटचे अधिकार असतात! जमीनमहसुलाच्या तंट्यांत सुभ्याच्या वर दोघांचें एक बेंच अपलि असतें. निरनिराळ्या जिल्ह्यांमिळून हीं बेंचें एकंदर दोन आहेत. कै. माधवमहाराजांच्या कारकीर्दीत यांपैकीं एक मेंबर लोकनियुक्त असे. पण हल्लीं हा हक्क बुडविला गेला आहे. लोकनियुक्ताची जागा सरकारी पेन्शनराकडून भरली जाते. राज्यव्यवहारासाठी हल्लीं एकंदर ६३ खातीं चालू आहेत.

## उत्पन्न, खर्च व त्यांच्या बाबी

जमाखर्चाची पद्धत रा. ब. भिडे यांच्या मदतीने कै. महाराजांच्या वेळची ठरलेली आहे जमाखर्चाचे एकदर ५ प्रकार कल्पिले आहेत. आवश्यक अनावश्यक यांच्या तारतम्याकडे लक्ष देऊन एखाद्या जमाखर्चाच्या घसरगुंडीचा दुसऱ्यावर परिणाम होऊ नये असें एकंदर धोरण आंखलेलें आहे. जमाखर्चाचे हे प्रकार पुढील होत—१ नियमित, २ फंड, ३ अनावर्तमान, देणग्या इ., ४ व्यवस्थाविषयक ५ प्रायोगिक.

करांचे व जमीनमहसुलाचें उत्पन्न 'नियमित' जमेंत जातें. निरनिराळ्या शिलकी भांडवलावरील व्याज, नेमणुकी आणि इतर तत्सम बाबी मिळून इतर जमेच्या बाजू होतात.

नित्योपयोगी खात्यांचा खर्च 'नियमित' जमेच्या ⅞ हिश्श्यांत भागविला जातो. शिल्लक ⅛ 'जनरल स्टेट रिझर्व्ह'मध्ये जाते. नं.३ व ४ यासाठी निरनिराळ्या नेमणुका होतात तेवढा खर्च त्यांतून होतो. नं. ५ मध्ये जमाखर्च त्यांतला त्यांतच होतो.

## व्याजांत सर्व राज्यकारभार!

नं. २ चा जमाखर्च म्हणजे फंड बजेट. उसनें दिलेल्या भांडवलांच्या व्याजांतून राज्यकारभार म्हणजेच ही फंड बजेटाची युक्ति होय! सन १९१३ मध्ये ही योजना कै. माधवमहाराजांनी सुरू केली. निरनिराळ्या खात्यांच्या नांवें कांहीं ठराविक रकमा व्याजांत गुंतवून त्या व्याजाच्या उत्पन्नांवर त्या त्या खात्यांचा खर्च भागवावयाचा अशी ही मोठी दूरदर्शी योजना आहे. या युक्तीप्रमाणे कदाचित् कै. माधव महाराज आणखी २०-२५ वर्षे जगते वांचते, तर त्यांनी बहुतेक सर्व राज्याचा खर्च अशा या व्याजावर भागवून दाखविला असता असें अनुमान करणें खास चुकीचें होणार नाही! त्या स्थितींत मग ऐन उत्पन्न ऐन जमेंतच जमावयाचें! आजच शिक्षण, आरोग्य वगैरे खात्यांचा बराचसा खर्च व्याजांतूनच भागत आहे!

व्याजीं लाविलेलें भांडवल आज १३ ते १६ कोटींपर्यंत तरी असेल.त्यांतून बरेंचसे भांडवल मुंबई, दिल्ली यासारख्या ठिकाणीं मोठमोठ्या कंपन्यांत गुंतविलें असून त्याचा राज्यकारभाराशीं कांहीएक संबंध ठेवलेला नाही. या भांडवलावर फक्त चार टक्के व्याज निरनिराळ्या खात्यांना देण्यांत येतें.त्यांतूनहि केव्हा केव्हा निम्मी बचत निघते. तेवढी रक्कम मात्र जमाखर्चीं दाखविण्यांत येते.

सदरील भांडवलांतून अनेक मोठीं नफ्याचीं कामें चालत असतात, हें वर आलेंच आहे. त्यांतून चार टक्क्यांच्या वर सर्व नफ्याची रक्कम 'जनरल स्टेट रिझर्व्ह' मध्ये जाते.

## आंकडेबंद जमाखर्च

सन १९२७-२८ सालांत एकंदर उत्पन्न २०३·३ लाख इतके असून खर्च १७५·३४ लाख होता.

फंड बजेटांतील ४ टक्के दराप्रमाणे निरनिराळ्या

खात्यांमिळून ५१·१० लाख रक्कम आली. खर्च फक्त २१·५९ लाखच झाला.

इतर तीनहि अंदाजपत्रकांचा जमाखर्च येणे-प्रमाणे—

नेमणूक खर्च
अनावर्तमान (देणग्या इ.) १·६ लाख १·१८ ला.
व्यवस्था (फर्नीचर-एक्विपमेंट) ११३·७७ २६ ७९ "
प्रायोगिक ·६६ " ·६६ "

Normal व Fund या अंदाजपत्रकांमिळून १९२७–२८ चा एकदर जमा व खर्च अनुक्रमे २६२·४६ व २०९·३७ लाख येतात. यांत तुटीचेहि आंकडे धरले आहेत.

**नियमित ( Normal ) उत्पन्नाच्या बाबी ( १९२७–२८ )**

१ जमीनमहसूल ९०७३५७४, २ जकात ३९०९४४१, ३ अबकारी १५८०४९५, ४ जंगल ३१०८६८, ५ जहागिरी ६४९१७५, ६ रेल्वे १७०९५६४, ७ स्टँप ६६७३०२, ८ टपाल ४२६७००, ९ पाटबंधारे १३९७१७, १० इतर १८६२८३८. एकूण २०३२९६७४.

**फंड बजेट**

१ भांडवलावरील व्याज (४ टक्के) ५२९३१०८, २ सहकारी पतपेढ्यांचे व्याज २३२०४३, ३ इतर ३९२४८१ एकूण ५९१७६४२. Normal व Fund बेरीज २६२४७३१६.

खर्च

**नियमित** ' Normal ' (१) जमीन-महसूल खातें १५६६२०८. (२) न्याय ६२५६५१, (३) कारखाने जात ( खासगी ) १८१९०१५, (४) सैन्य ४५४४८९३, (५) पोलीस १८८८६३९. (६) शिक्षण, स्थानिक स्वराज्य व 'जयाजी प्रताप' ९५३२३८, (७) आरोग्य २३८८३७, (८) पब्लिक वर्क्स १३९३७९४, (९) रेल्वे ५८४८२४, (१०) पाटबंधारे ७३६७४३, (११) माफी नेमणुका ६२२८६१, (१२) पेन्शनें इ. ४७२९८३, (१३) राजकीय खातें ९६०३९, (१४) ४८५४५७. (१५) जमाबंदी २७७००५, (१६) व्यापार जकात व अबकारी ५२१४६८, (१७) टपाल व टेलीफोन २९६१८९, (१८) कौन्सिल ऑफिस १९२, ३१, (१९) इतर ३६९१०५ एकूण १७५३४५०८.

Fund Budget. **ऊर्फ व्याजांतील कारभार** (१) जमीनमहसूल ७०८१४३, (२) रेल्वे २८१९ ९९, (३) जंगल ३६४७७, (४) व्यापार ८१३६५, (५) शिक्षण ५५५४७१, (६) स्थानिक स्वराज्य व शहर-सुधार व ग्रामसुधार २४५७८०, (७) आरोग्य १९५३०२, (८) सोशल १७०००, (९) पाटबंधारे १६४४२९, (१०) जयाजी पारमार्थिक फंड ४००००, (११) दुष्काळनिवारण ३२८१४, (१२) तूट १२४४८७१, एकूण ३४०३२५१.

**सैन्याचें धूड शेतकऱ्याचे जिवावर**

ग्वाल्हेर संस्थानाचें खडे सैन्य ९-१० हजार आहे. त्याजसाठी ४५, ४६ लाखांचा सर्वांत जास्त व अनावश्यक खर्च केला जातो. वास्तविक डोळ्यां-मध्ये प्राण सांभवन करांचे आत्यंतिक ओझें सहन करणाऱ्या शेतकऱ्यांना सवलती देण्याऐवजीं ९-१० हजारांचे हे सैन्य पोसण्याची आजच्या शांततेच्या काळांत संस्थानिकांना तरी आवश्यकता नाहीं. अगोदर उत्पन्नाच्या ६७ टक्क्यांनच सर्व खर्च भागावला जातो. त्यांतून १७ टक्के या सैन्याच्या धुडानें फस्त केले म्हणजे राज्यकारभारासाठीं खराखुरा खर्च ५० टक्केच होतो असेच म्हणावे लागतें.

**बडे पाहुण्यांची चंदी**

आता या ५० टक्क्यांची वासलात पाहा—६॥ टक्के ( १८ लाख ) खासगीकडे गेले म्हणजे ४३॥ टक्कच उरतात. या ४३॥ टक्क्यांतूनहि P. W. D. च्या दुरुस्त्या वगैरे मार्गांनी निव्वळ खासगीकडे आणखी कांहीं जात नसेलच असे कसें सांगवेल? याशिवाय दरवर्षी दरमासीं पाहिजे तर—व्हाइसरॉय, गव्हर्नर, माजी व्हाइसरॉय, सेनापति, राजे, महाराजे, प्रतिनिधि हे लोक संस्थानांत खेपा घालीतच असतात. त्यांच्या बडेजावीचा खर्च करण्यास खासगीची रसद तुटणार नाहीं किंवा सैन्याची चंदी बंद होणार नाहीं, हे उघड आहे. अर्थातच त्याची आकारणी शिल्लक राहिलेल्या जमाखर्चांतून होत असली पाहिजे हे स्पष्ट आहे! पण शिताफी ही की, हे बडे पाहुणे दरसाल डझन वारी येत असतात. तथापि त्यांच्या भावभक्तीच्या नैवेद्याचा तपशील वार्षिक रिपोर्टांतून कोठें धुंडून-हि सांपडावयाचा नाहीं. मात्र १९२१ मध्ये प्रिन्स ऑफ वेल्सच्या आदरातिथ्यासाठीं चार लाखांवर खर्च केल्याचा उल्लेख एके ठिकाणीं पाहण्यांत आला होता. त्यावरून या बड्या पाहुण्यांची भावभक्ति चांगली भलीभक्कमच होत असली पाहिजे, असेच सिद्ध होतें. तात्पर्य, हे असलें खर्चहि या ४३॥ टक्क्यांबाहेर जाण्याचें कारण दिसत नाहीं. आणि हे जर खरें तर खऱ्या राष्ट्रबलसवर्धनोपयोगी खात्यांस कसें भुकें मरावें लागत असेल याची कल्पनाच करावी.

# राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांचें पुढील कर्तव्य

ता. ३१ मार्च व १ एप्रिल हे राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे दिवस. या दोन दिवसांत कलकत्ता येथे यंदाची राष्ट्रीय सभा भरण्याचे आगाऊ महिनाभर गाजत होतें.सरकार व कॉंग्रेसभक्त यांना एक महिना-पर्यंत आपापल्या फौजा सज्ज ठेवण्यास भरपूर वेळ मिळाला. विघ्नें कांहीहि येवोत, यंदाची राष्ट्रीय सभा भरवावयाचीच असा कॉंग्रेसभक्तांचा निश्चय. व परिश्रम कितीहि पडोत यंदाची राष्ट्रीय सभा भरूं द्यावयाचीच नाही असा सरकारचा निश्चय. गेल्या वर्षी याच सुमारास दिल्लीस राष्ट्रीय सभा भरण्याचें ठरलें, त्या वेळीं वरील दोन्ही पक्ष याच निश्चयाने नटले होते व अखेर आकाशांतून उतरून घारीने झाप मारून झटकन निघून जावें त्याप्रमाणें दिल्लीच्या चांदणी चौकांत राष्ट्रीय सभा उतरली व पोलिसांची झडप चुकवून ती झटकलीहि! गेल्या वर्षी दोन्ही पक्षांची अशा रीतीनें एकदा झटापट उडाली असल्यामुळे यंदा परस्परांना एकमेकांच्या डावपेचांची व सामर्थ्याची पुरी ओळख पटून त्यांनी आपली तयारी पूर्वीपेक्षां अधिक दक्षतेनें व सावधगिरीनें चालविली होती.

गेल्या वर्षीची समरभूमि पाणिपतच्या समरभूमि-जवळील नव्या दिल्ली राजधानींत सजली होती तर यंदाच्या युद्धाकरिता प्लासीच्या रणभूमीपाशीं जुन्या कलकत्ता राजधानीत रणक्षेत्र पाहून ठेवलेलें होतें. कलकत्त्याची रणभूमि उभय पक्षास सारखीच सोयी-गैरसोयीची समजण्यास हरकत नाही. कारण साऱ्या हिंदुस्थानांत बंगाल प्रांत हें क्रांतिकारकांचे आगर व त्या बंगाल प्रांतांत कलकत्ता शहर हें क्रांतिकारकांचें माहेर घर.ज्या कलकत्त्यांत इतरत्र दुर्मिळ अशा क्रांतिकारकांचा सुकाळ त्या कलकत्त्यांत मामुली राजकारणांत सतत वावरणाऱ्या लोकांचा दुष्काळ कसा असणार! यामुळे कलकत्त्यास गराडा देऊन बाहेरून येणाऱ्या प्रतिनिधींची सरकाराने कितीहि नाकेबंदी केली तरी एकटें कलकत्ता शहर राष्ट्रीय सभेस प्रतिनिधी देण्याच्या बाबतींत पुरून उरण्या-सारखें होतें.

पण उलट पक्षीं कॉंग्रेसभक्तास मोठी अडचण होती ती बंगाल्यांतील दडपशाही कायद्यांची. दडपशाहीचे कायदे सांप्रत साऱ्या हिंदुस्थानांतच आहेत. परंतु त्यापेक्षा बंगाल्यांतील कायद्यांची दडपशाही सवाई आहे. उन्हाळ्याचा ऋतु सर्वत्र सारखा असला तरी पुण्या-मुंबईकडील लोकांना अकोला—उमरावतीकडील प्रदेशांत अंगावर उन्हाने फोड येतात आणि उत्तर हिंदुस्थानातील कांही भागांत उन्हाची लूक लागून केव्हा केव्हा माणसे प्राणासहि मुकतात. बंगाल्यांतील कायद्यांचा कडकपणा तेथील सरकाराने कलकत्त्याच्या चांगलाच प्रत्ययास आणून दिला. कोणाहि कॉंग्रेस भक्तास कलकत्त्यांतील नागरिकांनी आपल्या घरांत घेणें म्हणजे इंग्रज सरकारच्या शत्रूला थारा देण्याप्रमाणे असल्याचें ठरवून सदर नागरिक शिक्षेस पात्र होईल असें जाहीर करण्यांत आले. कलकत्त्याच्या बागा, नाक्याच्या जागा व चौक, पोलीस व घोडेस्वार यांना गजबजून सोडून कलकत्ता शहरास रणांगणा-वरील लष्करी छावणीचा भीषणपणा बंगाल सरकारने आणिला आणि कलकत्त्याकडे चालून येणाऱ्या कॉंग्रेसच्या तुकड्यांना वाटेने स्टेशनास्टेशनांवर आडवून कलकत्त्यास बाहेरून येणारी कुमक बंद पाडली.अशा रीतीने एक प्रकारें तलवारीच्या धारेवर धरलेली यंदाची राष्ट्रीय सभा कलकत्त्यास कशी दिसली असेल याची वाचकांनीच कल्पना करावी!

राष्ट्रीय सभेचे नियोजित अध्यक्ष पंडित मदन-मोहन मालवीय असनसोलच्या तुरुंगांत, राष्ट्रीय सभेचे कामचलाऊ अध्यक्ष लोकनायक माधवराव अणे मिदनापूरच्या तुरुंगांत,स्वागत सभेचेअध्यक्ष श्री. प्रफुल्लचंद्र घोष कलकत्त्याच्या तुरुंगांत व राष्ट्रीय सभेस यावयाचे शेंकडो प्रतिनिधी निरनिराळ्या ठिकाण-च्या शेंकडो तुरुंगांत, अशा थाटाने कलकत्त्याची राष्ट्रीय सभा भरली. बरें ती तरी भरली कोठे? त्यासाठी मुद्दाम उभारलेल्या भव्य मंडपांत? विद्युद्दीपांच्या रोषनाईत? मंगलगीतांच्या निनादात? टाळ्यांच्या कडकडाटांत? शेंकडो स्वयंसेवकांच्या सेवेत? दूर ध्वनिक्षेपकाच्या टप्प्यांत? छे, कल-कत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत त्यांपैकीं एकहि नव्हते. किंबहुना तिच्याकरितां कोणतें स्थळ निवडलें होतें हें पोलिसानाच काय पण इतर पुष्कळांनाहि माहीत नव्हते.

ती सभा एस्प्लनेड रोडवर ट्रामगाड्यांच्या स्टेश-नांत, पोलिसांच्या एकदम पडलेल्या गराड्यांत व रहदारीच्या गडबडींत भरली. तिचें काम डॉ. सेन गुप्त यांची युरोपियन पत्नी सौ. नलिनी सेनगुप्त हिनें सरकारी हुकुम तोडून चालविलें. त्या सभेला पुरुषांच्या बरोबर बऱ्याचशा स्त्रिया हजर राहिल्या, व स्त्रियांच्या बरोबर त्यांच्याकडेवर बसून तान्ही मुलेंहि हजर राहिलीं. सभेंतील भाषणें संपण्यापूर्वी थांबली व तिच्यांत आलेले ठराव मांड-ण्यापूर्वीच मंजूर झाले.कारण हें सगळें काम उरक-

ण्यास कलकत्त्याच्या पोलिसांनी सभेंतील प्रतिनिधींस अवघ्या वीस मिनिटांचीहि अवधि ठेविली नाही. या सर्व आश्चर्यांत आणखी आश्चर्य असें कीं, राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांनी राष्ट्रीय सभा भरल्याची ग्वाही स्वतः जगास देण्याऐवजी ती त्यांना पुढें एकदोन दिवसांनी कलकत्त्यास आल्यावर तेथील बातमीदारांच्या तोंडून ऐकावी लागली! राष्ट्रीय सभेस इतकें करतां आलें तें तरी तिला कलकत्ता शहर लाभलें म्हणून च होय. पोलिसांनी आपली नजर चुकवून कलकत्त्यांत एक मुंगी देखील न शिरेल इतकी पाळत ठेविली व कलकत्त्यांतील सगळ्या नाक्यांच्या जागा रोखून धरल्या तरी पोलिसांची संख्या परिमितच. सरकारानें नेमलें तेवढेच पोलीस. त्यांची संख्या स्वयंप्रेरणेनें कोणाहि राजनिष्ठास वाढवितां येण्यासारखी नव्हती. पण कॉंग्रेसचें तसें नव्हतें. कलकत्त्यांत जो जो मनुष्य स्वतःस कॉंग्रेसचा प्रतिनिधी म्हणवून घेईल तो तिचा प्रतिनिधी. अमूक मनुष्य प्रतिनिधि असें पोलिसांनी त्यास ओळखावें कसें ? या कारणानें कलकत्त्यास कोठल्याहि कांही लोकांनी स्वतःस राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधी म्हणावें व सभा भरवावी असें करणें शक्य होऊन अनेक ठिकाणीं घाईघाईनें सभा भरल्या व त्या पोलिसांनी मागाहून लगबगीनें येऊन मोडल्या.

वरील एक अगर अनेक सभा खोखोच्या खेळातल्याप्रमाणें धावत पळत भरल्यामुळें नैतिक विजय मिळविण्यापलीकडे महत्त्वाचें कार्य कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत घडूं नये यांत नवल काय? तथापि सभेचे स्वागताध्यक्ष श्री. प्रफुल्लचंद्र घोष व अध्यक्ष पं. मदन मोहन मालवीय यांचीं भाषणें व सभेंत पास व्हावयाच्या ठरावांचे मसुदे छापलेले आता सर्वत्र उपलब्ध झाले असल्यामुळें सभेच्या चालकांचा हेतु व धोरण यांची कल्पना कोणासहि करतां येण्यासारखी आहे. स्वागताध्यक्ष प्रफुल्लचंद्र घोष यांनी कायदेभंगाच्या व बहिष्काराच्या चळवळीचें समर्थन करून सदर चळवळी नेटानें सुरू ठेवण्यास आपल्या श्रोत्यांना सांगितलें आहे. पंडित मालवीय यांनी जनतेच्या नैसर्गिक हक्कांवर सरकारानें घाला घातला असतां त्या हक्कांच्या संरक्षणार्थ प्रसंगीं कायदे मोडणेंहि कसें न्याय्य ठरतें याचें तात्त्विक विवेचन केलें असून शेवटीं हिंदु-मुसलमानांचें ऐक्य व सर्व राजकीय पक्षांची जूट झाली तर सरकारापासून स्वराज्याचे अधिकार मिळविणें शक्य असल्याविषयी आपला विश्वास प्रकट केला आहे.

अध्यक्ष व स्वागताध्यक्ष यांच्या भाषणांतील हा महत्त्वाचा फरक होय. तथापि स्वागताध्यक्षांच्या भाषणापेक्षा अध्यक्षांचें भाषण अधिक जबाबदारीचें व मार्गदर्शक समजलें जातें हें लक्षांत ठेवल्यास राष्ट्रीय सभा स्वस्थपणानें भरून तिच्यांत विविध विषयांचा विचार करण्यास वेळ मिळाला असता तर सद्यःस्थितींत देशाला योग्य दिशा दाखविणारे ठराव सभेपुढें आलेच नसते व पास झालेच नसते असें म्हणवत नाही. परंतु राष्ट्रीय सभा सरकारच्या विरोधामुळें व्यवस्थितपणें भरणार नाही व तिच्यांत राजकीय विषयांचा साधक बाधक रीतीनें ऊहापोह करण्यास सवड मिळणार नाही अशी राष्ट्रीय सभेच्या कलकत्त्यांतील चालकांची खात्री असल्यामुळें त्यांनी कायदेभंगाच्या चळवळीस गेल्या सालीं वर्किंग कमिटीनें केलेल्या ज्या ठरावांनी सुरुवात झाली त्याच ठरावांचे मसुदे छापून काढले व ते पास झाल्याचें समजण्यांत आलें. अर्थात हे ठराव सरकार आपल्याशीं दंडेलीनें व अरेरावीनें वागतें याचा तीव्र निषेध प्रतिक्रियेच्या रूपानें संतापपूर्वक करण्यासाठींहि सभेच्या चालकांनी तयार ठेवले असतील असें मानण्यास जागा आहे.

राष्ट्रीय सभेच्या चालकांचा असा हेतु असो वा नसो, बंगाल सरकारानें राष्ट्रीय सभेस जनतेच्या दृष्टीनें हट्टी दुराग्रही व अविचारी ठरविण्याकरिता सदर ठरावांची पुडकीं जप्त करून न ठेवता त्यांचा हिंदुस्थानभर प्रसार होण्यास अष्ट दिशा मोकळ्या सोडल्या. राष्ट्रीय सभा जर बेकायदेशीर ठरली नाही तर तिचें अधिवेशन सरकार व्यवस्थितपणें भरविण्यास कां हरकत आणितें असें ले. असेंब्लींत लोकनियुक्त सभासदांनी गृहमंत्री सर हॅरी हेग यांस प्रश्नांवर प्रश्न विचारून अगदीं भंडावून सोडलें होतें. याबाबतींत ता. १ मार्च रोजीं हेग यांनी पुढीलप्रमाणें उत्तर दिलें. ‘ राष्ट्रीय सभा सरकारानें बेकायदेशीर ठरविली नाही हें खरं आहे; तरी पण तिचा कायदेभंगासारख्या बेकायदेशीर चळवळीशीं संबंध आहे व तिनें बेकायदेशीर हेतु साध्य करण्यासाठीच खटपट चालविली आहे. म्हणून तिच्या बैठकीस सरकाराकडून परवानगी मिळणार नाही. ’ याच्यावर कोणी म्हणेल, ‘ झाल्या गेल्या गोष्टी आता विसरा, व सभेस परवानगी देऊन तर पहा. म्हणजे कळेल तुमचा तर्क कितपत खरा ठरतो तें. हातच्या कांकणास आरसा हवा कशाला? ’ याहि शंकेचें निरसन हेग यांनी आपल्याकडून केलेंच होतें. त्यांचा युक्तिवाद असा ‘ राष्ट्रीय सभेला कायदेभंगाची चळवळ बंद करावयाची नाही हें आम्हाला आधीच साधार कळून चुकलें आहे. तिची बैठक

कलकत्त्यास त्या हेतूने भरविली जातच नाही. तिच्या पुढाऱ्यांना देशभर डंका पिटून, जाहिराती फडकवून, मोठ्या दिमाखाने लोक जमवून सभा भरवावयाची आहे व तिच्यांत सरकारच्या नाकावर टिचून कायदेभंगाचा ठराव फिरून पास केल्याची प्रौढी मिरवावयाची आहे. हें सारें पुढचें चरित्र आम्ही ओळखून आहों. तेव्हा तिच्या बैठकीस परवानगी देण्याला आम्ही कांही भोळे लागून गेलों नाही!'

हिंदुस्थान सरकारचे गृहमंत्री सर हॅरी हेग यांनी ता. १ मार्च रोजीं वरीलप्रमाणें असेंब्लीपुढे आपली बाजू मांडली. त्यानंतर बरोबर एक महिन्याने म्हणजे याच महिन्याच्या पहिल्या तारखेस लोकनियुक्त सभासदांनीं असेंब्लींतच हाच विषय पुनः अन्यरीतीनें उपस्थित केला असता हेग यांनी आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ राष्ट्रीय सभेचे मागील कामचलाऊ अध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद यांनी कांही महिन्यापूर्वी ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांच्या माहितीकरितां एक सर्क्युलर काढलें होतें त्याचा पुरावा दिला. त्या सर्क्युलरांत राष्ट्रीय सभेचें स्वातंत्र्य हेंच ध्येय आणि त्याचें कायदेभंग व असहकारिता हेंच साधन असल्याचें हेग यांनीं सांगितलें व कलकत्त्याची राष्ट्रीय सभा मृतप्राय होत चाललेल्या कायदेभंगाच्या कुडींत नवा प्राण घालण्यासाठी भरणार असल्याविषयी आपलें भविष्य वर्तविलें. हेग यांनी बांधलेला हाच कयास कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत कसा खरा ठरला हें लोकनिदर्शनास आणण्याकरिताच तेथील ठरावांना बंगाल सरकारानें प्रसिद्धि मिळूं दिली असेंच या पूर्वेतिहासावरून सिद्ध होत नाही काय?

कलकत्त्याची राष्ट्रीय सभा तर होऊन गेली. आता यापुढे प्रश्न असा की, राष्ट्रीय सभेवरील ही बंदी उठावयाची कशी व तुरुंगांत पडलेले तिचे म. गांधीप्रभृति पुढारी सुटावयाचे केव्हा? त्यालाहि गृहमंत्री सर हॅरी हेग यांचे उत्तर ठेवलेलेच आहे. 'जोंपर्यंत कायदेभंगाची चळवळ पुनः सुरू होण्याची सरकारला भीति आहे व जोंपर्यंत राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनी आपलें स्वातंत्र्याचें अफाट ध्येय सोडून देऊन राजकीय हक्काकडे व्यावहारिक दृष्टीनें पाहाण्याचें ठरविलें नाही तोंपर्यंत राष्ट्रीय सभेवरील बंदी सरकार उठविणार नाही व गांधी आदिकरून पुढाऱ्यांनाहि सोडणार नाही असा हेग यांच्या खुलाशाचा स्पष्ट अर्थ आहे. अशा रीतीनें राष्ट्रीय सभा आपल्या निश्चयापासून ढळणार नाही व सरकारहि आपला दडपशाहीकरितां पुढे सरसावलेला सोटा मागे घेणार नाही तर देशाची स्थिति मूळ पदावर कधीच यावयाची नाही की काय? याहि शंकेला हेगसाहेबांच्या खिशांत उत्तर होतेंच. व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांच्या भाषणाचा आधार घेऊन ते म्हणतात, 'आता चालला आहे असाच कांही काळ गेला व त्या काळाबरोबर गत गोष्टी मागे पडल्या म्हणजे देशांत आपोआपच स्थिरस्थावर होईल.'

हेगसाहेबांचे वरील उत्तर वाचून कोणासहि जर्मन महायुद्धाच्या अखेरचेच दिवस आठवतील. त्या वेळेला उभय पक्ष लढता लढता जो पक्ष आधी दमेल तो लढाई थांबवील असेंच अनुमान निघालें होतें. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील आजच्या युद्धांत घडून यावयाचें झाल्यास सरकारने दमल्याचें कबूल करून दडपशाहीचे कायदे रद्द केले पाहिजेत किंवा राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनी सरकारास शरणचिठी लिहून दिली पाहिजे. परंतु अशा रीतीनें कांही तरी घडून येईपर्यंत दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसणें हिंदी लोकपक्षाच्या दृष्टीनें तरी श्रेयस्कर नाही. राष्ट्रीय सभेचें कलकत्त्यातील अधिवेशन नेहमीप्रमाणे मोकळेपणानें भरलें असतें तर लोकमताचें वजन राष्ट्रीयसभेच्या पुढाऱ्यांवर पडून कांही तोड निघालीच नसती असें म्हणवत नाही. या दृष्टीनें राष्ट्रीय सभेचा कोंडमारा करण्यांत सरकारच्या हातून अक्षम्य चूक घडली यांत शंका नाही. राष्ट्रीय सभा पूर्ण स्वतंत्रतेने व खुल्या दिलाने भरूनहि तिच्यांत कायदेभंगाचाच ठराव पास झाला असता तर सरकाराला सभेच्या चालकांच्या माथीं उघडपणें दोषारोप मारतां आला असता. परंतु तितका पोच सरकारानें आपल्या सामर्थ्याच्या घमेंडींत न दाखवून आतापर्यंतच्या चुकांच्या वड्यांत आणखी एक खडा टाकला!

सरकार अविचारानें चुकलें असलें तरी कॉंग्रेसच्या तुरुंगाबाहेरील पुढाऱ्यांचें कर्तव्य उरतेंच. म. गांधी आदिकरून प्रमुख पुढारी आज तुरुंगांत असल्यामुळे आहे या परिस्थितींत देशहितास इष्ट व आवश्यक मार्ग शोधून काढण्याची जबाबदारी कॉंग्रेसच्या मुक्त पुढाऱ्यांवरच पडते हें सांगावयास नकोच. या जबाबदारीची जाणीव लोकनायक माधवरावजी अणे व पं. मदनमोहन मालवीय यांना असून त्यांनी त्याप्रमाणें पुढील उद्योगास लागण्याचेंहि योजिलेलें दिसतें. श्री. अणे यांनी राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांची एक सभा पुढील कार्यक्रम ठरविण्याकरितां बोलावण्याचा मनोदय व्यक्त केला आहे व पं. मालवीय हे सर्व पक्षांचें ऐक्य घडवून आणण्याच्या उद्योगास लागणार आहेत. सध्याच्या देश-

स्थितीचा व राजकीय सुधारणांच्या निराशाजनक स्वरूपाचा विचार करता राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनी आपलें राजकारण वेगळें न मानता त्यास परिस्थित्यनुरूप मुरड घालून किंबहुना नवीन वळणहि देऊन इतर राजकीय पक्षांशीं जूट करावी व तिच्या बळावर देशांतील राजकारणाचा मोडून पडलेला गाडा उभा करून चालीस लावावा हेंच त्यांचें प्राप्त कर्तव्य होय.

# पुणें औद्योगिक प्रदर्शन

### समाप्तिसमारंभ

मंगळवार ता. ४ रोजीं सायंकाळीं ६ वाजता पुणें औद्योगिक प्रदर्शनाचा सभारोपसमारंभ मुंबई इलाख्यांतील औद्योगिक खात्याचे डायरेक्टर मि.बी. पी. अडवाणी यांच्या हस्तें प्रदर्शनाच्या आवारांत उभारलेल्या सुशोभित भव्य मंडपांत झाला. सदर समारंभास सरकारी अधिकारी, म्युनिसिपालिटींतील कौन्सिलर्स आणि गांवांतील इतर स्त्री-पुरुष समाज हजारांच्या वर जमला होता. प्रारंभीं म्युनिसिपल शाळेतील विद्यार्थिनींनी स्वागतपद्य म्हणून दाखविल्यावर लॉर्ड रे पदार्थसंग्रहालयाचे क्यूरेटर श्री. भा. वि. घारपुरे यांनी निरनिराळ्या ठिकाणांहून आलेले सदिच्छापर संदेश वाचून दाखविले. त्यांपैकीं प्रामुख्याने खालील गृहस्थांचा उल्लेख केला गेला. सावंतवाडीचे अधिपति, श्री. सौ. कमलाबाईसाहेब गायकवाड, श्रीमंत उदयसिंग महाराज गायकवाड, श्रीमंत बाळासाहेब औंधकर, दिवाणसाहेब बर्वे सांगली, सर विश्वेश्वर अय्या, मि. पेरी, बर्न्स, वगैरे. नंतर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष डॉ. आर. के. नायडू यांचें खालील आशयाचें स्वागतपर भाषण झालें.

### डॉ. नायडू यांचे भाषण

आपण आज या ठिकाणीं ता. २६ फेब्रुवारी रोजीं श्रीमान राजा धनराजगिरजी नरसिंगगिरजी यांच्या हस्तें उघडण्यांत आलेल्या पुणें औद्योगिक प्रदर्शनाच्या समारोपसमारंभाकरिता जमलेले आहों. सदर प्रदर्शन उघडण्यांत मुख्यतः दोन हेतु होते. पहिला हेतु असा कीं, आपल्या देशांत किती प्रकारचा स्वदेशी सुबक माल तयार होतो हें सर्व सामान्य लोकांच्या व व्यापाऱ्यांच्याहि नजरेस आणावें आणि दुसरा व विशेष महत्त्वाचा हेतु असा कीं, आजपर्यंत बाहेरगांवच्या लोकांची सर्वसाधारणतः अशी समजूत असे कीं, पुणें हें फक्त विद्येचेंच माहेरघर असून तेथे व्यापार-उदीमाला असावा तितका वाव नाही. ही समजूत नाहीशी करण्याकरिताच खुद्द पुणें शहरांत ज्या निरनिराळ्या स्वदेशी वस्तु तयार होतात, त्या संकलित करून जनतेच्या नजरेस आणाव्या. हे दोन हेतु लक्षांत घेऊनच सध्या शहर म्युनिसिपालिटी व म्युझियमचे ट्रस्टी पुणें शहरांत आज कोणते धंदे चालू आहेत व त्यांची वाढ कशी करतां येईल याचा विचार करीत आहेत.

प्रदर्शन उघडण्याची कल्पना निघाल्यापासून स्वदेशी म्हणजे काय यावर वादविवाद सुरू झाला. माझ्या मतें कच्चा माल, यंत्रसामुग्री, भांडवल, मजूर, व व्यवस्थापक या गोष्टी ज्या कारखान्यांत देशांतल्या आहेत, त्या कारखान्यांतून निघणारा माल निर्भेळ स्वदेशी मानावा. पण आज देशाची स्थिति पाहतां ही व्याख्या व्यवहारांत आणणें शक्य आहे काय? म्हणून माझी आज सर्वांना विनंति आहे कीं, पुढील वर्षी भरणाऱ्या प्रदर्शनापर्यंत जनतेनें सर्वसंमत अशी 'स्वदेशीची' व्याख्या ठरवावी. हें प्रदर्शन ३८ दिवस चालू असून सुमारें एक लक्ष पंचवीस हजार लोक प्रदर्शन पाहून गेले. प्रदर्शनांत करमणुकीचीं साधनेंहि ठेवण्यांत आलेलीं होतीं. प्रदर्शनांत आलेल्या वस्तूंपैकीं उत्तम ठरणाऱ्या वस्तूंना पारितोषिकें द्यावीं असें ठरल्यावरून प्रो. वा. गो. काळे, प्रि. ध. रा. गाडगीळ, रा. ब. हणमंतराम रामनाथ, या तीन तज्ज्ञांची एक कमिटी नेमण्यांत आली व तिनें आपला निकाल सांगितला.

प्रदर्शनांतील दुकानाचें भाडें, विजेचें भाडें आणि तिकिटविक्री मिळून सुमारें नऊ हजार रुपये प्रदर्शनाकडे जमा झाले असून सुमारें सात हजार रुपये खर्च झाले, आणि बाकी उरलेले दोन हजार रुपये म्युझियमकडे फंड म्हणून जमा करण्यांत आले आहेत. हें प्रदर्शन योग्य प्रकारें पार पाडण्यास पुण्याचे कलेक्टर, मुंबई इलाखा औद्योगिक खातें, को-ऑपरेटिव्ह सोसायट्यांचे रजिस्ट्रार, हैद्राबाद संस्थानच्या औद्योगिक खात्याचे डायरेक्टर, सेवासदन सोसायटी वगैरेंनी चांगली मदत केली. त्याचप्रमाणें 'केसरी,' 'ज्ञानप्रकाश' 'सकाळ', 'टाइम्स ऑफ इंडिया' यांनीहि, वेळोवेळीं प्रदर्शनाची हकीगत प्रसिद्ध करून प्रदर्शनास चांगली चालना दिली. त्यांतल्या

त्यांत 'केसरी' ने प्रदर्शनाकरिता म्हणून जी खास पुरवणी काढून मदत केली, त्याबद्दल मी निराळे आभार मानतों. शेवटी ज्या कंपन्यांना किंवा व्यक्तींना त्यांनी केलेल्या वस्तूंबद्दल बक्षिसें किंवा प्रशस्ती पत्रकें मिळतील त्या प्रत्येकाने तयार केलेल्या वस्तूंपैकीं एक एक वस्तु म्यूझियमला कायमची भेट म्हणून द्यावी अशी मी त्यांना विनंति करतों. आमच्याकडे अशी एक सूचना आली आहे कीं, अशा तऱ्हेचीं प्रदर्शनें दरसाल भरवून त्या बरोबरचे व्यापारधंद्याविषयी सभाहि भरवाव्या. या सूचनेचा आम्ही अवश्य विचार करूं. लहानलहान धंदे ( कॉटेज इंडस्ट्री ) जे लोक करीत आहेत त्यांना प्रदर्शनाने विशेष सवलती दिल्या होत्या. असो. अशा तऱ्हेने सर्व बाजूंनी परिपूर्ण अशा प्रदर्शनाच्या समारोपसमारंभाकरितां आज आपणास मि. अडवाणी यांजसारखे या विषयांत दर्दी असलेले गृहस्थ लाभले याबद्दल आम्हांला आनंद होत आहे."

डॉ. नायडू यांचें भाषण झाल्यावर श्री. भा. वि. घारपुरे यांनी बक्षिसांचा निकाल वाचून दाखविला. त्यांत रोख शंभर रुपयांचीं चार, पन्नास रुपयांचीं सहा, पंचवीस रुपयांचीं चार अशी एकंदर ऐन रकमी आठशें रुपयांचीं बक्षिसें असून केसरी–मराठा संस्थेने ठेवलेलें 'टिळक-नामजोशी' पदक होतें. शिवाय पहिल्या वर्गाचीं प्रशस्ति–पत्रकें ५० संस्थांना, दुसऱ्या वर्गाचीं १८ संस्थांना व नुसतीं गौरवपर प्रशस्तिपत्रके ८४ संस्थांना देण्यांत आल्याचें जाहीर केलें ( ज्या कंपन्यांना किंवा व्यक्तींना रोख रकमेचीं बक्षिसें मिळालीं त्यांचीं नांवें व कशाकरिता मिळालीं त्या वस्तूचीं नांवें पुढील अंकीं देण्यांत येतील. ) यानंतर अध्यक्षांचें विचारपरिप्लुत भाषण झालें. त्यांत त्यांनी पाश्चिमात्य देशांत उद्योगधंद्याकडे सरकार व कौंटि कौन्सिलस किती तऱ्हेने लक्ष पुरवून लहानसहान धंद्यापासून तों कारखान्यापर्यंत सर्वांना सारखी ऊर्जितावस्था आणण्याची कळकळ बाळगतात हें विशद करून सांगितलें. (त्यांचें समग्र भाषण पुढील अंकीं देण्यांत येईल) शेवटीं म्युनिसिपालिटीच्या स्टँडिंग कमिटीचे अध्यक्ष डॉ. गोरे यांनी अध्यक्षांचे, म्युनिसिपालिटी, ऑल इंडिया रेल्वे कंपन्या, पूना इलेक्ट्रिक सप्लाय कंपनी वगैरेंचे आभार मानले. अध्यक्षांना हार घातल्यावर राष्ट्रगीत झालें व समारोपसमारंभ संपला.

# औद्योगिक विषयांची चर्चा

(लेखक—डॉ. **म. वि. आपटे** बी. एससी., एम. बी. बी. एस. पुणें.)

क्षुद्रा पशुपक्ष्यांची काय कथा पांच हीं महाभूतें । ज्ञानबळें आकळुनी केलें मनुजें स्वदाससम त्यांतें ॥

—**कृष्णशास्त्री चिपळूणकर**

## उद्यम आणि विद्या

ता. १०-२च्या केसरीच्या अंकांत उद्यमशिक्षणाचा ऊहापोह करतांना असें दाखवून दिलें आहे कीं, उद्यमाचीं दोन प्रधान अंगें आहेत; विद्या हें एक अंग आणि कला हें दुसरें; दोनहि अंगें परस्परांच्या आश्रयाने चाललीं म्हणजे उद्यम सरसावतो. सरते शेवटीं तेथेच असें दिग्दर्शित केलें होतें कीं, उद्यम टिकाऊ होण्यास त्यांत वाढीचें बीज पाहिजे. जेथे वाढ नाही तेथे उतरती कळा लागली म्हणून समजावें. यंत्र आणि वस्तु निर्माण करण्याची जी सर्वश्रेष्ठ विद्या तिच्यांतच या वाढीचें सामर्थ्य आहे. म्हणून चालू उद्यमांतील विद्या आणि कला यांखेरीज आणखी वाढत्या विद्येचें निष्ठापूर्वक संगोपन केल्याखेरीज निभाव लागणार नाही.

### येथील चालू प्रघात

विद्या आणि कला हीं जीं उद्यमाचीं दोन अंगें त्यांपैकीं विद्या या अंगाकडे पूर्ण डोळेझाक करून कलेलाच उद्यम मानणें हा मोठा लोकभ्रम आहे. मनुष्य जेव्हा स्वतः एखादा कारखाना उभारूं पाहतो किंवा उभारलेल्या कारखान्याचें निरीक्षण करतो तेव्हां त्याचा हा भ्रम लवकरच नाहीसा होतो; कारण कारखाना उभारण्यास कलावंतापेक्षा विद्वान माणसांची वाण अधिक भासते. तीं माणसें लवकर तयार करतां येत नाहीत आणि आयतीं तयार माणसें आणावयाचीं तर तीं फार महाग पडतात असा अनुभव येतो. त्यांतल्या त्यांत देशाच्या दृष्टीने विशेष नुकसानीची गोष्ट म्हणजे हा विद्वान तयार करावयास आम्हांला आपले पैसे परदेशांत नेऊन ओतावे लागतात.

इतकेंहि करून आम्ही जो विद्वान इकडे आणतो त्याला आम्ही चालू कारखान्याच्या राहटीला गुंतवला म्हणजे विद्येच्या वाढीसाठीं जो खटाटोप करावयाचा तो करावयास त्याला मुळी अवसरच सांपडत नाहीं. त्याला अनुभवानें कांहीं किरकोळ सुधारणा सुचतात आणि त्या तो घडवून आणूं शकतो हें खरें; परंतु उद्यमाची विशेष वाढ जी नव्या ज्ञानाच्या पायावर व्हावयाची ती त्याला करतां येत नाहीं. तो केवळ कारखान्याच्या यांत्रिक दुव्यांतला एक दुवा, इतरांपेक्षा अम्मळ मोठा पण दुवाच होऊन बसतो.

## यंत्रापेक्षा यंत्रविद्या हस्तगत करा

चालू उद्यम सुधारणें किंवा नवीन उद्यम उत्पन्न करणें हें सामर्थ्य ज्या विद्येंत आहे त्या विद्येची जोपासना आपण अद्याप शिकलों नाहीं ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. हा आमचा परंपरागत दोष आहे. इंग्रजांनी हिंदुस्थान जिंकला तो त्यांच्या श्रेष्ठ विद्येच्या सामर्थ्यावर जिंकला. श्रेष्ठ प्रतीचीं शस्त्रास्त्रें ते लोक वापरत आहेत हें डोळ्यांनीं पाहूनदेखील आमच्या राजेलोकांनीं ती विद्या विकत घेण्याऐवजीं नुसतीं शस्त्रास्त्रेंच विकत घेतलीं. आपसांत भांडण्याग त्यांचा चांगला उपयोग झाला. परंतु शस्त्र करणाऱ्यापुढें त्यांचा काय पाड लागणार? सर्व देश इंग्रजांच्या आहारीं गेल्यावर आम्ही हाच क्रम उद्यमक्षेत्रांत चालविला. विलायती यंत्रसाधनें घेऊन आम्ही एकामेकांत खूप कुस्त्या खेळलों आणि अजूनहि खेळतों. कोणी जिंकतो, कोणी हरतो. पण परदेशी मल्लापुढें आम्हांला टिकाव धरतां येत नाहीं. उघडच आहे. यंत्र विकणारा आम्हांला उत्तम यंत्र विकतोच कशाला? त्यांतून एखादें विकलेंच तरी तो त्यापेक्षा बंड तयार करून आमच्या वर मात करावयास कसा सोडील? जोंपर्यंत उत्पादनविद्या त्याच्या ताब्यांत आहे तोंपर्यंत तो अजिंक्यच राहणार. इंग्रजी अमदानींत आम्हीं इंग्रजांची विद्या न घेता त्यांचीं उद्यमसाधनें घेतलीं. याचा परिणाम इतकाच झाला कीं, देशांत पसरलेली संपत्ति एकत्र गोळा होऊन एकमुठीनें परदेशीं जाण्याचा मार्ग मोकळा झाला!

## आजचा रशिया

अगदीं अलीकडे उद्यमाची स्थापना करण्याकरितां रशियानें जे प्रयत्न चालविले आहेत, ते पाहण्यासारखे आहेत. रशियन लोकांनीं आपली आर्थिक व्यवस्था पार बदलून घेतली. मोठ्यापासून लहानापर्यंत सर्व उद्यम एका तंत्रांत गोवले, कारखान्यालाच शाळा जोडून टाकल्या, शिक्षणसाधनें लागतील तितकीं परदेशाहून आणलीं, त्यांत कसूर बिलकुल केली नाहीं, आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे विद्येच्या बाबतींत आम्ही तुमच्या मागें आहों असें उघडपणें सांगून जर्मनी आणि अमेरिका या देशांतले अग्रगण्य विद्वान मोठमोठ्या दक्षिणा देऊन आपल्या देशीं नेले. उद्देश हा कीं, त्यांच्या सहवासानें आपल्या बांधवांना खऱ्या जागत्या विद्येचें बाळकडू मिळावें. यूरोप, अमेरिकेंतील सुशिक्षित बेकारीमुळें तिकडील विद्वान पैदा करणें रशियास सोपें गेलें. हिंदुस्थानापेक्षा रशिया पुष्कळच पुढारलेला आहे. तरीदेखील विद्येच्या बाबतींत आपण जगाच्या मागें आहों या गोष्टीची त्याला खंत वाटत आहे आणि म्हणूनच तो हें वैगुण्य घालवण्याकरिता जिवापाड मेहनत घेत आहे.

## जिनगरी धंदा

एकदोन लहानशीं उदाहरणें घेतलीं असतां या गोष्टी चांगल्या समजून येतील. मनुष्याला स्वसंततीपेक्षां कांहींच अधिक प्रिय नाहीं. मुलाबाळांच्या आनंदानें आपण आनंदी होतों आणि त्यांच्या दुःखानें दुःखी होतों. लहान मुलें म्हणजे प्रौढांच्याच छोट्या प्रतिकृति. त्यांना प्रौढांचेच सर्व व्यवहार करून पाहण्याची मोठी हौस. मोठीं माणसें वापरतात त्या सर्व जिनसाच्या छोट्या प्रतिकृति त्यांना अतिशय आवडतात. याच मानवस्वभावावर जिनगरांचा धंदा उभारला आहे. समाजांत जेव्हा जहागिरदारी गाजत होती, तेव्हा जिनगरांनीं बाहुलाबाहुलीं, घोडागाडी इत्यादि जिनसा करून विकल्या. आधुनिक काळांत जिनगरांची मोठी तिरपीट उडाली आहे. समाजामध्यें नवीन आकांक्षा, नवीन वाहनें, नवीन सुखसाधनें, नवीन व्यवहार सुरू झाले आहेत. या सर्वांच्या प्रतिकृति लहान मुलांच्या हातांत देणें आज अवश्य झालें आहे. परंतु आमच्या जिनगराला यांचें रंगरूपहि कळणें दुर्घट आहे, मग रचनाचातुर्य येणें तर दूरच राहिलें!

पूर्वींच्या मातीच्या किंवा लाकडाच्या चित्रांची जागा आज कचकड्याच्या चित्रांनीं घेतली आहे. पुष्कळांना आज असें वाटतें कीं, कचकड्याचा रांधा आणि चित्रांचे साचे आज विकत मिळतात ते आणून इकडे हा धंदा सुरू करावा. गोष्ट वावगी नाहीं. धातूंचे पत्रे आणि छापयंत्रें आणून भांडीं करण्याइतपतच हें सोपें आहे. परंतु या धंद्याला मुख्य भीति ही आहे कीं, त्यांत निरजणाऱ्या पक्क्या मालाच्या किंमतीचा बहुतेक अंश कच्चा माल आणि यंत्रें यांच्यांतच खलास व्हावयाचा. दुसरें असें कीं, कच्चा माल जरी आजच करतां न आला तरी निदान नवे नवे चित्रांचे

प्रकार तरी काढतां आले पाहिजेत. रोज नित्य नवे प्रकार दाखविण्याची करामत साधली तर त्या चित्रांचा खप होण्याचा संभव; नाही तर परदेशाहून ज्या प्रकारचीं चित्रें येतात त्याच प्रकारचीं आम्हीं काढलीं तर आमचा निभाव लागणें कठीण. आज चित्रपटांचा व बोलपटांचा धंदा तरी चालतो. याचा अर्थ इतकाच कीं, आमच्या समाजाच्या आवडीनिवडी व भाषा या परदेशच्याहून वेगळ्या आहेत, आणि निदान एवढ्यापुरता तरी हा धंदा परदेशी स्पर्धेपासून मुक्त आहे. आमच्या आवडीनिवडी आणि भाषा जेव्हा परदेशी समाजाच्या सारख्याच होतील किंवा परदेशी धंदेवाले जेव्हा आमच्या आवडीनिवडी आणि भाषा अवगत करून घेतील तेव्हा किफायतीर्चा ही बाजूदेखील संपलीच.

### बोलपटांतली विद्या

चित्रपट आणि बोलपट यांत चित्रकला आणि नाट्यकला या दोहोंचा संगम झालेला आहे. चित्रकलेंत पहिली मोठी क्रांति निकाशन-(फोटोग्राफी) विद्येनें केली. ही निकाशनविद्या एका पक्षीं वास्तवशास्त्रांतर्गत भिंगांचें ज्ञान आणि रसायनांतर्गत रजतलवणांचें ज्ञान यांमधून उगम पावली. साधा चित्रपट, चालता चित्रपट, आणि बोलता चित्रपट, हीं सर्व याच दोन शास्त्रांचीं अपत्यें होत. चित्रलेखन, अभिनय किंवा गायन-वादन या कलांत कितीहि निपुणता मिळविली तरी तिच्यांतून चित्रपटास चालता बोलता करण्याची युक्ति सुचावयाची नाही. त्यास जातीचा रसायनज्ञ आणि वास्तवज्ञच पाहिजे. बोलपटांच्या रचनेचा किंचितमुद्धा अभ्यास करण्याचा जो प्रयत्न कराल त्याची पहिल्याच पावलीं खात्री पटेल कीं, वास्तव-रसायन या शास्त्रांतल्या अगदी ताज्या ताज्या शोधांचा उपयोग यांत केलेला आहे. तडित्, सौदामिनी, विद्युत, चंचला, चपला इत्यादि विविध रूपें धारण करणारी वीज अगदीं सर्कशींतल्या घोड्याप्रमाणें ज्याला वागवता येईल तोच चित्रपटाला वाचा फोडूं शकतो.

शुद्धशास्त्र आणि प्रयुक्त शास्त्र यांचीं क्षेत्रं एकमेकांपासून फारच दूर आहेत अशी कांही लोकांची समजूत आहे. ती सपशेल चुकीची आहे. शास्त्र जेथें पिकतें तेथें अशी वस्तुस्थिति मुळींच नाही. पुष्कळ प्रसंगीं हीं दोन-हि क्षेत्रें एकमेकाला खेटून असतात तर कित्येक प्रसंगीं तीं एकमेकांत गुंतलेलीं असतात आणि कित्येक प्रसंगीं तर एकरूपच असतात. नवीन ज्ञान उपलब्ध झाल्याबरोबर त्याच माणसाला किंवा भोंवतालच्या एखाददुसऱ्याला त्याचा उपयोग सुचतो. क्वचित् अमुक उपयोग करून ज्ञान मिळविलें जातें आणि क्वचित् उपयोग करतां करता ज्ञानाचा लाभ होत असतो. हिंदुस्थानांत आपण ज्ञान उसनें घेतों म्हणून ज्ञानाची टाकराळ न पाहिली तरी चालतें, इतकेंच.

### भौतिक शास्त्रांचें बळ

शास्त्रीय युगाचा आणि अर्थात् उद्यम युगाचाहि आरंभ सोळाव्या शतकाअखेर ग्यालीलिओ यानें केला. दुर्बिणीचा उपयोग त्यानें प्रथम वेधशाळेत केला आकाशांतील तारे, ग्रह वगैरे पाहण्याकरितां तो अतिशय उत्सुक झालेला होता. तथापि लोकस्वभाव लक्षांत आणून त्याने पहिली दुर्बिण केल्याबरोबर समुद्रावरील किंवा पृथ्वीवरील देखावे पाहण्याचें उत्तम साधन म्हणून लोकापुढे मांडली. व्यापारी, सैनिक, सुखवस्तु अशा सर्व लोकांच्या त्या साधनावर उड्या पडल्या. दुर्बिणींना मागणी इतकी वाढली कीं, ग्यालीलियोच्या कारखान्यांत काम करण्यास पुरेशीं कलावान माणसें मिळेनात ! १८५७ त डॉ. हेल्महाट्स याने नेत्रादर्श काढला. हा नेत्रादर्श म्हणजे एक छोटासा खोलगट आरसा आणि त्याच्या मध्यभागीं बारीकसें भोक अशी अगदी साधी चीज होती. आरसे तयार करणारे त्यापूर्वीपासून कलावान पुष्कळ होते, परंतु अशा आरशाचा उपयोग नेत्राच्या आंत डोकावण्याच्या कामीं करावा ही कल्पना डॉ. हेल्महोट्सलाच सुचली. इतर कित्येक कल्पकानी या आदर्शाला इतर धंद्यांची जोड दिली आणि आजचें पन्नास पाऊणशें रुपये किंमतीचें साधन तयार झालें. जी गोष्ट या साधनाची तीच इतर अनेक वैद्यकीय साधनांची तीं सर्व साधनें बुद्धिमान चिकित्सकाकडून संकल्पिलीं जातात. त्यांचा पाठिंबा ज्यांना मिळतो त्यांच्या हातांत धंदा राहतो. वारंवार नवीन कल्पित जो काढील तोच बाजार जिंकील अशी स्थिति आहे. इतर सर्व परिस्थिति विरोधी असतांना जर्मनीनें जो माथा वर ठेवला आहे तो विद्येच्याच बळावर.

### उद्यमाची तालीम

युद्धाला समरांगणांत जाण्यापूर्वी ज्याप्रमाणें तालीम करावी लागते आणि एकदम युद्धक्षेत्रांत जाणें व्यर्थ ठरतें तद्वतच उद्यमाचीहि स्थिति आहे. प्रयोगशाळा या उद्यमाच्या व्यायामशाळा होत. तालमींत शिकलेला प्रत्येक पेंच किंवा मलखांबावरची उडी रणक्षेत्रांत जशीच्या तशीच उपयोगी पडेल असा नेम नाही; एखादाच पेंच किंवा एखादीच उडी लागू पडेल, तद्वतच उद्यमाचें आहे. शास्त्रीय ज्ञानाचा प्रत्येक भाग जशाच्या तसाच उद्यमामध्ये उपयोगी पडावयाचा नाही; एखादाच

उपयोगी पडावयाचा हें खरें आहे. परंतु तालमीमध्यें जसा नेमका रणक्षेत्रावरचा पेंच दाखवितां येत नाहीं तद्वतच उद्यमाचें आहे. कोणताहि उद्यम करावयाचा असला तरी आद्य शास्त्रांचें पाठबळ पाहिजेच; तें असलें तरच धडगत लागेल, नसलें तर कंबरडें केव्हा मोडेल याचा नेम नाहीं.

## रसायनाचें महत्त्व

सर्वसाधारण वाचकांना उद्देशून यंत्र, ध्वनि-प्रकाश, वीज इत्यादिकासंबंधीं चार-दोन वाक्यें तरी लिहितां आलीं. परंतु रसायनासंबंधीं तींहि लिहिणें कठीण आहे. जुन्या किमयेंतून रसायन-शास्त्र निर्माण झालें आहे. पद्धतशीरपणें ज्यानें त्याचा अभ्यास केला आहे, त्याला त्यांत कांहीं गूढ नाहीं हे खरें आहे. परंतु साधारण जनांना तें अद्याप किमयेप्रमाणेच गूढ आहे. संदर्श-यंत्र, चालतीं चित्रें दाखवण्याचें यंत्र पाहिलें तर साधारण मनुष्य त्याच्या रचनेचें बरेंच आकलन करूं शकेल. परंतु त्यांत वापरलेले धातु कसे तयार करावयाचे, त्यांतील भिंगाकरितां काच कशी तयार करावी, त्यांतील चित्रपट्टी कशाची करतात किंवा करावी इत्यादि गोष्टींसंबंधीं त्याला कांहींएक कळावयाचें नाहीं. साधें गानयंत्र पाहिलें तर त्याच्याहि यांत्रिक भागाचें अनुकरण एखादा कुशल कारागीर करील. परंतु त्याच्या तबकडीची निर्मिति कोण करूं शकणार? खंडोगणती रंगद्रव्यें आज बाजारांत येत आहेत तशींच औषधिद्रव्येंहि येत आहेत; परंतु तीं पाहून त्यांची निर्मिति कोणाला उलगडतां येईल काय? शोभेचें दारूकाम किती मनोहर, पण तें पाहून त्यांतील मालमसाला कोण तयार करूं शकेल? अज राजानें स्वर्गांत जाऊन कुबेरापासून संपत्ति आणली म्हणून आपण नुसतें ऐकतों, परंतु आज हवेपासून नत्रिक आम्ल आणि कोळशापासून पेट्रोल जर्मनीमध्यें तयार होत असलेलें प्रत्यक्ष दिसून येत आहे!

## बौद्धिक शिक्षणांत सुधारणा

आज बौद्धिक शिक्षण फार झालें आहे तें कमी करा असें कित्येकजण सांगत आहेत. परंतु हें त्यांचें करणें अगदीं गैर आहे. खरें पाहूं जातां, आपलें शिक्षण फार कमी पडत आहे, म्हणून आपली दुर्दशा आहे. एवढें मात्र खरें आहे कीं, आजचें बौद्धिक शिक्षण अनेक दृष्टींनी सदोष झालें आहे. त्यांत खऱ्या जागतिक परिस्थितीचें ज्ञान करून देण्याचें सामर्थ्य नाहीं, उद्यमविकासावर नजर नाहीं, सुबोधता नाहीं, सुलभता नाहीं, सुसंगति नाहीं, इत्यादि इत्यादि अनेक दोष त्यांत सांचले आहेत. ते सर्व दोष काढून टाकण्याकरितां त्यांत आमूलाग्र सुधारणा करणें अवश्य झालें आहे. आजच्या विद्वानांचें मुख्य कर्तव्य हेंच आहे. सकृद्दर्शनीं निरुपयोगी वाटणाऱ्या बौद्धिक शिक्षणाला त्यांनी उजळा दिला पाहिजे. उद्यमाची बढती होण्यास आर्थिक परिस्थितीचा अभ्यास झाला पाहिजे. शास्त्रीय ज्ञान भरभक्कम पाहिजे आणि विद्येचा व्यासंग किंबहुना व्यसन होऊन राहिला पाहिजे. विद्वान आणि कलावान यांची सतत दृष्टादृष्ट राहिली पाहिजे आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे हे दोनहि वर्ग आपल्या उन्नतीचे आधारस्तंभ आहेत अशी जाणीव बहुजनसमाजांत जागृत राहिली पाहिजे.

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांस महाराष्ट्रांतील शिक्षणसंस्थांचा पिता असें मानतात. हें जर खरें असेल तर मग कृष्णशास्त्री हे आमचे पितामह होत. सुमारें साठ वर्षांपूर्वी त्यांनी 'विद्या-प्रशंसा' हें कवन केलें. या कवनामध्यें ज्या विद्येची आपण प्रशंसा केली ती विद्या कोणती या विषयीं कवींनी स्पष्ट उल्लेख केला आहे कीं, पंच महाभूतांचें वशीकरण हीच ती विद्या; आगगाडी, आगबोट, तारायंत्र, सूरपेटी हेच तिचे विलास. आज जर हेंच कवन वेष पालटून म्हणावयाचें तर वीजगाडी, विमान, बोलपट यांचा उल्लेख केला पाहिजे. तेंच प्रस्तुत लेखांत केलें आहे. विष्णुशास्त्र्यांनी जीं रोपें महाराष्ट्रांत लावलीं त्यांत साध्या शाळाबरोबर चित्रशाळा आणि आर्यभूषण छापखाना यांचाहि समावेश आहे. मग त्यांतच एखाद्या भौतिक शास्त्र-मंदिराची भर टाकली तर त्यांत वावगें काय होणार आहे!

# खोबरें नाही, फक्त करवंटीच !

'इंग्रज पहिल्याने स्वार्थास व मग तर्कशास्त्र तदनुकूल असेल तर त्यास ओळखतो.'

—लो. टिळक

इंग्रजांच्या स्वभावाचीं चित्रें अनेकांनी मोठ्या कुशलतेने व गमतीने काढलीं आहेत. इंग्रज मनुष्य मोठा धर्त आहे; पण कल्पनाशक्तीचें वरदान त्याला ईश्वराने दिलें नाही. त्याचे पाय सदैव जमिनीलाच टेकलेले असावयाचे, भावनेचे पंख लावून आकाशांत घिरट्या घालीत तो आपली शक्ति फुकट खर्च करीत बसावयाचा नाही. सर्व दृष्टि पैशावर. कोणीं कांही सांगितलें तर अगदीं क्वचित् त्याच्या बुद्धीला पटेल, पण अंतःकरण मात्र कशानेहि द्रवणार नाही! व्यवहारी इतका कीं प्रत्येक गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव आल्याशिवाय त्याला कांही पटतच नाही. भिंतीवर डोकें आपटून फुटलें म्हणजे मग पुढे भिंत आहे हें त्यास कळतें ! हीं व अशा तऱ्हेचीं अनेक वर्णन इंग्रजांविषयी तज्ज्ञांनी केलेलीं आढळतात. पण या सर्वांत 'इंग्रज माणूस तोंडल्या जाखल्याशिवाय काहीहि धावयाचा नाही व दिलेली वचनें कधींहि पाळावयाचा नाही' हें फ्रेंच लोकांनी केलेलें वर्णन अधिक मार्मिक आहे यांत शंका नाही. राजकारणाच्या बाबतींत तरी वरील वर्णनाचा अनुभव पदोपदीं येतो. इजिप्त व आयर्लंड यांना हाच अनुभव आला. हिंदुस्थानासहि हाच अनुभव येत आहे.

गेल्या आठवड्यांत पांढऱ्या खलित्यांतील नव्या सुधारणांच्या योजनेच्या इष्टानिष्टतेसंबंधी हौस ऑफ लॉर्ड्समध्ये जो तीन दिवस वादविवाद झाला त्यांतहि इंग्रजांच्या वरील गुणांचा उत्तम प्रत्यय आला आहे. हौस ऑफ कॉमन्स मध्ये जें यासंबंधी दळण दळलें गेलें तेंहि याच जातीचें होतें. बाकी हौस ऑफ कॉमन्स काय आणि हौस ऑफ लॉर्ड्स् काय, हिंदुस्थानाच्या दृष्टीने जात्याची फारतर एक वरची तळी व दुसरी खालची तळी इतकाच फरक. हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीने ज्या चांगल्या गोष्टी असतील त्यांचें पीठच त्यांत पडावयाचें ! पांढऱ्या खलित्यांतील योजनेचा विचार करून नवें सुधारणांचें बिल तयार करण्याकरिता एक कमिटी नेमण्याचा ठराव हौस ऑफ कॉमन्सप्रमाणे हौस ऑफ लॉर्ड्समध्येहि पसंत करण्यांत आला ! हौस ऑफ कॉमन्समध्ये मजूर पक्षाच्या पुढाऱ्यांनी खणखणीत शब्दांत हिंदुस्थानाची बाजू तरी मांडली. पण हौस ऑफ लॉर्ड्स मध्ये मजूर पक्षाचे पुढारी लॉर्ड पॉनसम्बी व लॉर्ड स्नेल यांना तितकाहि धीर केला नाही !

प्रत्येक जण, मग तो कोणत्याहि पक्षाचा असो, अगदी तोलून मापून एक गोष्ट पाहात होता कीं, हिंदुस्थानाच्या पदरांत नवे हक्क किती पडतात व आपले जुने हक्क आपण किती गमावतों ! सर्वांचे अगदी बारकाव्याचे लक्ष एकाच मुद्दयावर खिळलेलें दिसलें व तो मुद्दा म्हणजे हिंदुस्थानावरील आपली पक्कड कोठेहि ढिली होऊं द्यावयाची नाही. हिंदुस्थानांतील नोकरशाही, पोलीसशाही, गव्हर्नरशाही व गव्हर्नर जनरलशाही ही त्यांच्या साम्राज्याची पोलादी चौकट. या चौकटींतील एकहि मोठा खिळा सैल होऊं द्यावयाचा नाही हा त्यांचा कृतनिश्चय. म्हणून वादविवादाच्या वेळीं, सरकारपक्षाने म्हणावें कीं, ही चौकट आम्हीं अगदीं घट्टमुट्ट ठेवली आहे, व प्रतिपक्षाने म्हणावें कीं, 'छे, हा खिळा थोडा सैल झालेला दिसतो, म्हणून तो जॉइंट कमिटींत पुनः व्यवस्थित बसविला पाहिजे' ! अर्थात् अशा या सिद्धसाधकांच्या वादविवादांत हिंदुस्थानाला पहिल्या गोलमेज परिषदेच्या शेवटीं मुख्य प्रधान मि. मॅक्डोनाल्ड यांनी दिलेलीं वचनें किंवा गांधी–आयर्विन करारांत नमूद केलेल्या व गंभीरपणें दोनहि पक्षांनी मान्य केलेल्या अटी विरघळून गेल्या असल्या तर त्यांत नवल काय !

या विवादांत हौस ऑफ लॉर्ड्स् मधल्या अनेक बड्या धेंडांनी भाग घेतला. एकंदर सव्वीस वक्ते बोलले, व त्यांत तेवीस असे होते कीं, त्यांनी केव्हां ना केव्हा तरी आपल्या आयुष्यांत हिंदुस्थानांत एखादी उच्च अधिकाराची जागा पटकावून व लठ्ठ पगार घेऊन आपली कारकीर्द गाजविली होती अगर हिंदुस्थानासंबंधी एखाद्या कमिशनावर काम केलें होतें ! यांपैकीं पुष्कळांनी "एकंदरींत सायमन कमिशनच्या शिफारशीच बऱ्या, 'व्हाइट पेपर' मधील प्रांतिक स्वायत्तता किंवा मध्यवर्ती जबाबदारी हीं प्रकरणें भयंकर दिसतात. पण पाहूं पुढे त्यांचें; जॉइंट कमिटी तर नेमा. ती करील सर्व ठाकठीक;" अशा आशयाचे

उद्‌गार काढून नव्या सुधारणांचे आखुड पाय आणखी मागे ओढण्याचा प्रयत्न केला !

लॉर्ड लॉईडसारख्या कट्टरानी उघड उघड विरोध केला. चर्चिलइतका दम लॉर्ड लाईड यांच्यांतहि नाही, तेव्हा त्यांनी फार ताणून धरलें नाही. त्यांच्या बोलण्याचा आशय हा होता कीं, 'या नव्या सुधारणांच्या योगानें हिंदुस्थानांत शांतता नांदूं लागेल ही कल्पना फोल ठरेल ! मला हिंदुस्थानांतील व इजिप्तमधील अनुभव आहे. अर्ध्या कच्चया लोकमतानुवर्ती संस्था निर्माण करणें हा गुन्हा आहे असें मला वाटतें. नुसती लोकशाहीचीं सोंगें उभारणें भयंकर आहे. विशेषतः पौर्वात्य राष्ट्रांत लोकसत्ता प्रत्यक्ष देत नसताना ती देतों असे सांगून त्यांची फसवणूक केली तर ती अंगावर येईलच येईल. कसलीं वचनें घेऊन बसलां आहां ? १९१९ च्या कायद्यापलीकडे आम्हांला कांही ठाऊक नाही. या नव्या सुधारणांनी इंग्लंड व हिंदुस्थान यांचे संबंध तुटतील ! हिंदी लोक सुधारणा घेतील व संरक्षक बंधनें फेकून देतील. म्हणून त्यांना कांही देऊं नका. फार तर सायमन कमिशनच्या शिफारशी विचारांत घ्या व त्याच ठीकठाक करून हिंदुस्थानाला द्या म्हणजे पुरे. खरी जबाबदारी व परिणामकारक बंधनें एकाच सूत्रांत गोवणें हा वेडेपणा होय !" लॉर्ड लॉइडसारख्या कट्टर साम्राज्यवादी हिंदद्वेष्ट्याचे विचार यापेक्षा दुसरे काय असणार ? लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट एवढीच कीं, एरव्ही दोन दिवस जवळ जवळ रिकामें असलेलें लॉर्डांचें सभागृह लॉर्ड लॉइड यांच्या भाषणाच्या वेळीं मात्र गजबजून गेले होत. पण लॉर्ड रीडिंग यांनी त्यांना चरचरीत उत्तर दिलें, त्यावेळीं तें रिकामेंच दिसलें. यावरून हौस ऑफ लॉर्ड्समधील सभासदाच्या मताचा वारा कसा वाहतो हे स्पष्ट दिसतें.

मजूर पक्षाचे पुढारी या हिंदद्वेषी कट्टर साम्राज्यवाद्यांचे तत्त्वनिष्ठेच्या दृष्टीने शत्रु आहेत. यांत शंका नाही. पण हौस ऑफ लॉर्ड्स मधील त्यांच्या पुढाऱ्यांनाहि हिंदुस्थानाची बाजू तितक्या कमोशीने व दणदणीतपणें मांडण्याची आवश्यकता वाटली नाही. यावरून हिंदुस्थानाने पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. पॉनसांबी यांनी सांगितलें कीं, 'हिंदुस्थानांतील राजकीय सुधारणांचा पाया पक्का घालावयाचा असेल तर तेथील लोकांचें या सुधारणेमुळे समाधान झालें पाहिजे. जे सुधारणा चालविण्यास तयार असतील त्यांना त्या द्या. पण असे लोक तरी कोठे आहेत? संयुक्त राज्यघटनेच्या अंमलबजावणीची तारीख ठरलेली नाहीं. मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीचें नाव नाही व 'डोमीनियन स्टेटस'चा तर पत्ताहि नाही ! खरें स्वराज्य हिंदुस्थानाला देण्याचें मजूर पक्षानें वचन दिलें आहे. तथापि, जॉइंट सिलेक्ट कमिटीवर आम्हीं काम करावयाचें ठरविलें असल्यामुळे आमचा मूळ सूचनेस पाठिंबा आहे!'

लॉर्ड स्नेल या मजूर पक्षाच्या पुढाऱ्याने यापेक्षा हिंदी बाजू अधिक जोराने मांडली. किंबहुना हौस ऑफ लॉर्ड्समधील सर्व भाषणांत त्याचेंच भाषण अधिक चांगलें झालें. ते म्हणाले, "मजूर पक्षाची एवढीच इच्छा आहे कीं, हिंदी लोकांच्या संमतीने व त्यांना पसंत पडेल त्याप्रमाणे नवी घटना बनवावी. परंतु, आज राष्ट्रीय सभेचे पुढारी तुरुंगांत आहेत. त्यांना सोडून देऊन त्यांचा विचार घ्यावा हें उत्तम. म्हणून माझी विनंति कीं, निदान कमिटीचें काम सुरू होण्यापूर्वी तरी राजकीय कैदी सोडावे! पांढऱ्या खलित्यांत कोठेंहि स्वराज्याचा वासहि नाही. मग त्याला स्वराज्य म्हणण्यांत अर्थ काय ? आत्मवंचनेपलीकडे त्यांत कांही हातीं लागणार नाही!" पण शेवटीं काय? त्यांनीहि कबुली दिली कीं, नोकरशाहीशिवाय इंग्लंडला दुसरा आधार नसल्याने तिचे अधिकार कमा करतां कामा नये! तसेंच ते आणखीहि उद्‌गारले कीं, 'संरक्षक बंधनें इंग्लंडच्या हितसंरक्षणाकरितां घातलीं; पण हिंदुस्थानास अगदीं वगळल आहे असें नाही!' आपल्यापुढे पंचपक्वान्नांनी भरलेलें ताट ठेवून पाहुण्याच्या पानांत शिळ्या भाकरीचा तुकडा ठेवणाऱ्या यजमानाने पाहुण्याकडे अगदींच दृष्टि नाही असें नाही असें म्हणण्यासारखाच हा युक्तिवाद आहे! राजकीय कैद्यांच्या मुक्ततेच्या वचनावर सर सप्रू झुलले व आतां हे लॉर्ड स्नेल तीच याचना पुनः करीत आहत. पण दोघांचीहि फसवणूकच होणार. कारण इंग्रज वचनें पाळीत नाही !

हौस ऑफ लॉर्ड्समधील या चर्चेमध्यें दुसरीं अनेक किरकोळ भाषणें झालीं. त्यांना अर्थातच महत्त्व देण्याचें कारण नाही. ज्या लॉर्डांचीं नांवें जॉइंट कमिटीवर आहेत त्यांच्या भाषणाला मात्र महत्त्व आहे यांत शंका नको. परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, हे सर्व लोक पांढऱ्या खलित्यांत नमूद केलेल्या सुधारणा म्हणजे इंग्रजी मुत्सद्यांच्या औदार्याचा कळस आहे असे मानणारे आहेत. लॉर्ड बर्नेहॅम, लॉर्ड लिटन, मार्किस ऑफ सॅलिसबरी हे या मताचे होत. त्यांचा या सुधारणांना विरोध आहे व कमिटींतहि ते आपल्या या प्रतिगामी विचारांची धोंड फेकल्याशिवाय राहणार नाहीत ! लॉर्ड हार्डिंज यांची ते मोठे प्रगमनशील मुत्सद्दी म्हणून ख्याति होती. पण त्यांनीहि या वादविवादांत सांगितलें

कीं, 'आता प्रांतिक स्वायत्ततेवर भागवावें. पण व्हाइसरॉय यांची सत्ता कमी करूं नये!' लॉर्ड झेटलंड, लॉर्ड लिनलिथगो व लॉर्ड लोथियन यांनी मात्र असें स्वच्छ बजावलें कीं, हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थिति बदलत चाललेली आहे; या वेळीं जास्तींत ज्यास्ती सुधारणांचा हप्ता हिंदुस्थानाच्या पदरांत टाकला पाहिजे. लॉर्ड लोथियन यांनी आणखी सांगितले कीं, तरुण पिढीची शक्ति व सामर्थ्य या सुधारणा यशस्वी करण्याकडे आपण लावूं शकलों तरच हिंदुस्थानांतील असंतोष नाहीसा होईल!

जॉइंट कमिटीवर जे पंधरा लॉर्ड्स काम करणार आहेत त्यांचीं मतें त्यांच्या भाषणावरूनच जर अजमावलीं तर भावी राजकीय सुधारणा म्हणजे सध्यांच्याच राज्यपद्धतीची एक सुधारून वाढविलेली आवृत्ति निघणार याबद्दल संशय राहत नाही. आज कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं अशी सर्व सत्ता कॉन्झर्व्हेटिव पक्षाच्या हातीं असल्यामुळे सर सॅम्युअल होअर व लॉर्ड सँकी हे म्हणतील तीच पूर्व ठरणार ! सर होअर यांच्या विचारांचें दृश्य कसें आहे हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. लॉर्ड सँकी यांनी हौस ऑफ लॉर्ड्समध्ये जें भाषण केलें ते साकल्यानें पाहिलें म्हणजे नव्या सुधारणांचें मोजमाप आपल्यास आता सहज करतां येण्यासारखें आहे.

पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या गोलमेज परिषदेचे अध्यक्ष म्हणून लॉर्ड सँकी यांनी काम केलें इतकेंच नसून, सुधारणांचा मसुदा त्यांनीच स्वतः तयार केला होता. असें असतांनाहि या सुधारणांवर होणाऱ्या हल्ल्यापासून त्याचा बचाव करण्याकरिता चढाईचें धोरण त्यांनी स्वीकारलें नाही. त्यांच्या म्हणण्याचा इत्यर्थ हा होता कीं, 'हें पहा, आम्हीं नवीन योजना केली आहे खरी. पण आम्हींच मोठे तज्ज्ञ आहों असा अर्थ नाही. सर सायमन व त्यांच्या कमिटींतील सभासद यांनीहि उत्तम काम केलें. नोकरशाही तर अत्यंत अनुभवी. तिच्या जिवावर आमचें राज्य चाललेले ! आता आपण कमिटी नेमूं व यांत जर कांही आमचें चुकले असले तर ध्या दुरुस्त करून झालें !' त्यांनी सुधारणांच्या योजनंतील मुख्य मुख्य असे प्रगतिपर मुद्दे मांडण्याच्या भरीस न पडता, संरक्षक बंधनांचेंच आपलें पुराण मुरू ठेवलें. व शेवटीं तर 'पंचवीस वर्षे वचनें देत आलों' तेव्हा कांही तरा देणें जरूर असल्यानें आम्हीं प्रांतिक स्वायत्ततेचा मसुदा तयार केला आहे पण त्यांतहि कायदा व सुव्यवस्था यांचें खातं धावयाचें जें आम्हीं ठरविलें त्याची मला मात्र फारच चिंता वाटते, असें त्यांनी सांगितलें ! त्यांची पुढील विचारसरणी चिंतनीय आहे. ते म्हणतात "स्वातंत्र्य देणें हें मोठेंच साहस आहे. कांही न देणें किंवा फारच थोडे हक्क देणें हेहि साहसच. सध्या आम्हीं केलेली योजना प्रारंभीं हिंदी लोकांपैकीं कांही थोडे लोकच मान्य करतील; पण शेवटीं सर्वांनाच या योजनेला मान तुकवावी लागेल ! आम्ही काय देतों हें जगाला कळेल, व पुढील हप्त्याची वेळ येईपर्यंत आपल्यास दम खाण्यास वेळ मिळेल. परंतु, आज ही योजनाच जर तुम्हीं नाकारलीत तर मात्र परिणाम भयंकर होईल !" प्रांताचे गव्हर्नर, गव्हर्नर जनरल, नोकरशाही व लष्कर यांना असलेल्या अधिकारावर खुशाल विसंबून राहून नवी योजना मान्य करावी असा त्यांचा स्पष्ट आग्रह दिसला. या त्यांच्या बोलण्यावरून पूर्ण प्रांतिक स्वायत्तता तरी हिंदुस्थानाच्या पदरांत पडते कीं नाही याचीहि शंका उत्पन्न होते. मग मध्यवर्ती जबाबदारी व पूर्ण स्वराज्य या फार लांबच्या कथा आहेत !

लॉर्ड आयर्विन यांचा रंगपालट तर आश्चर्य करण्यासारखा आहे. मी आयर्लंडच्या स्वातंत्र्य युद्धाच्या वेळीं चर्चिल यांचा शिष्य व स्वराज्याचा कट्टा विरोधी होतों असें सांगूनच त्यांनी आपल्या भाषणास प्रारंभ केला, व कमिटी नेमण्याच्या ठरावाला मान्यता द्या, कारण कमिटीच्या कामाच्या वेळीं विरोधी पक्षाचें म्हणणें ऐकलें जाईल असें सांगून त्यांनी आपलें भाषण संपविलें ! आपल्या भाषणांत त्यांनी हिंदी वर्तमानपत्रें व राष्ट्रीय सभा यांनाच नव्हे तर सर्व राजकीय पुढाऱ्यांना दिलेलीं शेलापागोटीं प्रेक्षणीय आहेत. त्यांचें म्हणणें कीं, सुशिक्षित माणसें बेकारीमुळे राजकारणांत पडतात व पुढारी होतात. तसेंच देशी वर्तमानपत्रांना सत्याची व नीतीची चाड नाही म्हणून तीं या पुढाऱ्यांना पाठिंबा देतात! अशीं एक ना दोन अनेक आक्षेपार्ह विधानें त्यांच्या भाषणांत आहेत. लॉर्ड सँकी यांनी आपल्या भाषणांत हिंदी लोक या सुधारणांना काय म्हणतील याचें वर्णन केलें आहे तेंच आपण खरें आहे असें मानूं म्हणजे आपलाहि कार्यभाग झाला. लॉर्ड सँकी म्हणाले "बरोबर असो कीं चूक असो, हिंदी लोक या नव्या सुधारणांवर असा छाप मारणार कीं, इंग्रजांनी खोबरें काढून घेऊन करवंटी त्यांच्या हातीं दिली !" लॉर्ड सँकी यांनी केलेला तर्क खरा असून त्याप्रमाणे सदर सुधारणांवर हिंदी लोकांनी आजच तसा छाप मारला आहे.

# महाराष्ट्रीय मंडळाच्या ग्रंथालयाचा उद्घाटनसमारंभ

पुणें येथील महाराष्ट्रीय मंडळाच्या विद्यमाने बांधण्यांत आलेल्या 'कोटरवार' ग्रंथालयाच्या इमारतीचा उद्घाटनसमारंभ मुंबईचे प्रसिद्ध दानशूर डॉ. श्री. कृ. श्री. म्हसकर यांच्या हस्तें रविवार ता. ९ रोजीं सायंकाळीं ६ वाजता मोठ्या थाटाने पार पडला. समारंभास शहरांतील निमंत्रित स्त्री-पुरुष हजर होते. नियोजित अध्यक्षांचे आगमन झाल्यावर मंडळांतील विद्यार्थ्यांनी कुस्त्य- व इतर मैदानी खेळ करून दाखविले. मंडळांतील एक उत्साही शिक्षक श्री. वझे यांनी फळयावर सुऱ्या फेकणें वगैरे कामें उत्तम रीतीने करून दाखविलीं. तसेंच त्यांचें रोमन रिंगचें कामहि मोठें चित्ताकर्षक झालें. नंतर संगीतचूडामणि प्रो. विनायकबुवा पटवर्धन यांनी ईशस्तवन केल्यावर लेफ्टनंट फडके वकील यांनी यशश्चिंतनपर आलेले संदेश वाचून दाखविले. त्यांत मि. त्र्यंबक, औंध, जमखंडी व इचलकरंजी येथील अधिपति, मि. गूल्ड, मि. पेरी वगैरेंचीं नांवें प्रामुख्याने होतीं.

नंतर मंडळाचे कार्याध्यक्ष श्री. ल. ब. भोपटकर यांनी मंडळाचा गेल्या आठ वर्षांचा अहवाल वाचून दाखवून डॉ. म्हसकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना केली. सदर सूचनेस श्री. न. चिं. केळकर यांनी मोठ्या मार्मिक शब्दांत अनुमोदन दिलें.

नंतर डॉ. म्हसकर यांचें पुढील आशयाचें भाषण झालें.

### डॉ. म्हसकर यांचें भाषण

"गेल्या दोन वर्षांतील येथे होणारे वार्षिक समारंभ, शास्त्रीय आणि साहित्य परिषदा, थोर विभूतींच्या वाढदिवसांचे उत्सव व स्मारकें, व्याख्यानें, प्रदर्शनें वगैरेंचीं येथील दैनिकांतून प्रसिद्ध होणारीं वर्णनें वाचून आम्हांसारख्या परस्थांना किती आनंद व अभिमान वाटतो याचें दिग्दर्शन करणें अशक्य आहे. आज पुण्यापुढे येणारे विचार तेच इतर महाराष्ट्रीयांपुढे येणारे उद्यांचे विचार. हा अग्रत्वाचा मान अबाधितपणें, अव्याहतपणें राहण्याविषयीं येथे सतत चालू असलेले परिश्रम पाहून इतर शहरें प्रतिस्पर्धी म्हणून पुढे कां येत नाहीत याचा अंदाज होतो. प्रत्येकाचे कदरीप्रमाणे, इच्छेप्रमाणे, फुरसत मिळेल तशी साहित्यसेवा, शास्त्रसेवा, समाजसेवा, देशसेवा करण्यास उपयुक्त अशा तऱ्हेच्या संस्था येथें आढळतात त्या सर्व संस्थांमध्यें महाराष्ट्रीय मंडळाने योजलेल्या शारीरिक-शिक्षण-विद्यापीठाची भर पडल्याने एक मोठी उणीव भरून निघत आहे याबद्दल कोणासहि आनंदच वाटेल. बौद्धिक विकास, नैतिक विकास आणि आता शारीरिक विकास या त्रयीच्या आधारावर होणारी व्यक्तीची उन्नति देशाच्या उन्नतीस परिपोषकच व्हावी.

शारीरिक विषयांत आजपर्यंत राष्ट्रीय दृष्ट्या फारच थोड्या समाजपुढाऱ्यांनी लक्ष घातलें हें आश्चर्य आहे. शरीराचा व मनाचा किती निकट संबंध आहे हें दर्शविणाऱ्या म्हणी पुस्तकांतच राहिल्या. शक्तिसाधनावर खेडवळ चाली म्हणून छाप पडली. शक्तीचे प्रयोग म्हणून अल्पबुद्धीचे लोकांसाठीं निर्वाहाचें साधन असें समजलें गेलें. पण हल्ली मनु पालटत चालला आहे. शक्तीचे खेळांना सामाजिक दर्जा प्राप्त होत आहे, व शक्तिसाधनांचें आता पर्यंत असलेले वैयक्तिक स्वरूप जाऊन त्यास सामाजिक, सांघिक, सामुदायिक व राष्ट्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न होत आहे. बॉयस्काऊट, गर्ल गाईडसारख्या संस्था, 'मास ड्रील' देशनिरीक्षणासाठीं चालत जाणारांचे तांडे वगैरे इतर देशांतून यशस्वी ठरलेल्या संस्था व प्रयोग यांकडे लक्ष जाऊं लागलें आहे. या शारीरिक शिक्षण विद्यापीठाची कार्यपत्रिका वाचल्यास शारीरिक शिक्षण किती व्यापक असावयास पाहिजे याचा थोडासा अदमास होतो. व वैद्यकीय शिक्षणाशीं त्याचा किती निकट संबंध आहे याची कल्पना होते. येथे स्थापन होणाऱ्या महाराष्ट्र विश्वविद्यालयाचें हें विद्यापीठ एक उपांग समजलें गेल्यास शारीरिक शिक्षणास स्थायिक व शास्त्रीय स्वरूप खात्रीने येईल. मंडळाचे सभासदांपैकीं एका सुप्रसिद्ध दानशूर सद्गृहस्थांच्या उदार देणगीमुळें विद्यापीठाचे संक्षिप्त योजनेस आज जास्त मूर्त स्वरूप येत आहे. 'रंगनाथ कृष्णप्पा कोटरवार ग्रंथालयाची' व त्याजबरोबर महाराष्ट्रीय शारीरिक शिक्षण विद्यापीठाची उत्तरोत्तर भरभराट होत जावो अशा आशीर्वादासाठीं आपणांबरोबर मीहि परमेश्वराची प्रार्थना करतों.

### शारीरिक शिक्षणांतील घोकंपट्टी

बुद्धीचा विकास करण्यासाठीं जसें शिक्षण आवश्यक आहे तसेंच शरीराचा व व्यक्तीचा विकास करण्यासाठीं विशिष्ट शिक्षणाची जरूरी आहे. या शिक्षणाने शक्तिरक्षण व शक्तिवर्धन करतां येतें. एवढेंच नव्हे तर रोगनिवारण व रोगपरिहार करता येणे

शक्य आहे. बुद्धिशिक्षणांत घोकंपट्टीस जो दर्जा मिळतो, तोच दर्जा शारीरिक शिक्षणांत व्यायामास दिल्यास वावगें होणार नाही. दोन्हींचेंहि अयोग्य प्रमाणांत अवलंब केल्यास अनिष्ट परिणाम होतात व ते सुधारण्यास पुढे फार कठिण जातें. विश्वविद्यालयांतून परीक्षा पास होण्यास आणि बक्षिसें मिळविण्यास विद्यार्थिवर्ग जे प्रयत्न करतो तशाच तऱ्हेचे चिकाटीचे प्रयत्न, शक्तिप्रदर्शनाचे अचाट धाडसी प्रयोग करतां येण्यासाठी करावें लागतात. निव्वळ परीक्षा पास होण्याच्या विद्यार्थ्यांच्या ध्येयाला आळा बसवावा व बुद्धीचा विकास होण्याच्या मार्गांतील अडथळे दूर व्हावे म्हणून आजपर्यंत विश्वविद्यालयांनी बरेच प्रयत्न केले आहेत. पण त्यांस म्हणण्यासारखें यश मिळालें असें दिसत नाही. शारीरिक शिक्षणाचे बाबतीतहि अशीच घोकंपट्टी करण्याची आजपर्यंतची वहिवाट आहे. पांचसहा हजार दंड बैठका काढणारांचा, किंवा पाचसात दिवस सतत मुद्‌गल फिरविणारांचा सन्मान होतो. अट्टाहासानें अयोग्य प्रमाणांत व्यायामाची वाढ व वयपरत्वेच्या निर्बंधाकडे दुर्लक्ष यांचे दुष्परिणाम वैद्यवर्गांना बरेच पाहावयास मिळतात. व्यायाम पाहिजे पण त्यांत निर्बंध ठेवले व योग्य वळण दिलें तर नदीच्या प्रवाहापासून निर्माण करतां येणाऱ्या विद्युत्‌शक्तीप्रमाणें शक्ति येणें शक्य आहे. नाही तर त्याच व्यायामानें शरीराचा ऱ्हास होणें संभवनीय आहे.

### व्यायामाचें शास्त्र

पूर्वीच्या व्यायामपद्धतींत मोठा दोष हा की कांही शेलक्या स्नायूंची वाढ होत असे, व तशी वाढ करण्यासाठी अवजड उपकरणांची जरूरी लागत असे. ऑलिंपिक गेम्सचे अनिष्ट परिणाम पाहून व्यायाम मर्यादित असावा असें हल्ली मत होत चाललें आहे. त्याच्या मर्यादा शास्त्रीय पद्धतीनें ओळखतां याव्या म्हणून बरेच प्रयोग केले गेले व त्याच प्रयोगानुसार हल्लींचें सुधारलेलें शारीरिक शिक्षण देतां येतें. शरीरांत दुसरे अनेक लहानमोठे स्नायु आहेत, व त्यांसहि परिमित व्यायामाची जरूरी आहे. ह्या शास्त्रीय मताचा पुरस्कार हल्ली सगळीकडे होत आहे ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. पाश्चात्यांचे "स्वीडिश" व्यायाम अथवा आपले देशांतील नमस्कारपद्धति यांना आता मानमान्यता मिळत आहे. संसारयात्रा सुखकर होण्याचें शारीरिक शिक्षण आणि स्वसंरक्षणापुरतें शक्तिवर्धन हीं कमावण्याचा सोपा राजमार्ग मंडळाचे अध्यक्ष श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनी दाखवून दिला. याबद्दल त्यांचे अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे.

शारीरिक शिक्षणाचे कक्षेंत रोगनिवारणाचे व रोगपरिहाराचे उपायहि येतात, ही मोठी आनंदाची गोष्ट होय. पाश्चात्य आणि पौर्वात्य वैद्यक शास्त्रांतून अशा उपायांबद्दल बरीच माहिती सांपडते. पण योगशास्त्रालाहि या विषयांत अधिकारवाणीने उपाय व नियम सुचवितां येतात हा पौर्वात्य संस्कृतीचा विशेष होय. या उपायांना व नियमांना सर्वमान्यता मिळविण्यासाठी मंडळामार्फत प्रसिद्ध होणाऱ्या माहितीला व निर्णयांना बरेंच महत्त्व येणार आहे.

### केरळ प्रांतांतील अंगमर्दन

शारीरिक शिक्षणक्रम सर्वांगव्यापक करण्यास आणखी एका शिक्षणाची जरूरी आहे. व्यायाम जसा स्वतः घेतां येतो, तसाच दुसऱ्याकडूनहि घेतां येतो व ह्या शास्त्राचे पुरस्कर्ते आपलेकडे नापिक वर्गांत अजूनहि आढळतात. आजारी माणसानें करून घेतलेलें अंगमर्दन व पैलवानांनी दुसऱ्याकडून घेतलेलें अंगमर्दन हीं या सदराखालीं येतात. केरळ प्रांतांत ही कला अतिशय पूर्णावस्थेस गेलेली आहे. शरीरशुद्धि, शक्तिवर्धन व विशिष्ट रोग यांसाठी अंगमर्दनाचे व स्नानाचे अनेक प्रकार केरळ प्रदेशांत प्रचलित आहेत. आपलेकडील कलेचें किंवा केरळ प्रांतीय कलेचें पुनरुज्जीवन करणें हें माझ्या मतें शारीरिक शिक्षण विद्यापीठाचें कर्तव्य आहे. पाश्चात्य देशांत अशा व्यायामास (मसाज) बरेंच महत्त्व मिळालें आहे, व या व्यायाम शिक्षणासाठी शाळा निघाल्या आहेत. त्यांतून तयार झालेले विद्यार्थी सन्मान्य रीतीनें चरितार्थ चालवीत आहेत, त्या धंद्यांत नांव लौकिकासहि येत आहेत व नवीन शोधहि लावीत आहेत.

पाश्चात्य देशांत शारीरिक शिक्षण वैयक्तिक करण्यापेक्षा सामुदायिक करण्याकडे जास्त कल दिसतो. आफ्रिकेतील लढ ईनंतर लढवय्ये तयार करण्यासाठी लहानपणापासून बाळकडू पाजण्यास बेडन पॉवेल या सैनिकानें सुरुवात केली व 'बॉय स्काऊट' संस्था काढली. तीस परिपोषक अशी 'गर्ल्स गाइड'ची संस्था लवकरच निघाली. आज या संस्थांच्या शाखा सर्व जगभर पसरलेल्या आहेत. युरोपांतील महायुद्धानंतर जर्मनी व ऑस्ट्रिया या देशांना निःशस्त्र करण्यांत आलें. शक्तीचा ऱ्हास होऊं नये म्हणून व लढवय्यांचा बाणा अंशतः तरी जागृत राहावा म्हणून, त्या देशांत सामुदायिक तऱ्हेच्या व्यायामशाळा निघाल्या, असून तेथे प्रत्येक मुलाला व मुलीला शारीरिक शिक्षण देण्याचा प्रयत्न करण्यांत येत आहे. त्याच्या सामुदायिक कवाइतीचीं चित्रें पाहून मन थक्क होऊन

जातें. शक्तिवर्धनाबरोबर, जुटीनें वागणें, एकमेकांविषयीं आदर आणि सहानुभूति, सहनशीलता इत्यादि अनेक सद्गुणांचेंहि शिक्षण त्यांस मिळत आहे. आपले देशांत त्यांच्या पद्धतीचें अनुकरण करण्यास सुरुवात झाली आहे. त्याचे चांगले फायदे लवकरच पदरांत पडण्याचीं सुचिन्हें दिसत आहेत.

## अन्नचिकित्सा

बौद्धिक किंवा नैतिक शिक्षण आणि शारीरिक शिक्षण, यांचें साम्य साधारणतः येथपर्यंत दिसूं शकतें, पण शारीरिक शिक्षणामध्ये वैद्यकीच्या प्राथमिक शिक्षणाचा अंतर्भाव होतो हें समजणें जरा कठिण आहे. चित्रकाराला चित्र काढतांना अथवा शिल्पकाराला मूर्ति तयार करतांना, सजीवता दाखविण्यासाठीं शरीराच्या रचनेची व ठेवणीची पूर्ण माहिती करून घ्यावी लागते. तसेंच ज्ञान व्यायाम प्रेमी मनुष्यानें अवगत केल्यास अल्प आयासानें त्यास स्नायूंना बळकटी आणतां येते. या शरीरशास्त्राची व इंद्रियविज्ञानशास्त्राची माहिती बऱ्याच शालोपयोगी पुस्तकांतून आढळते. पण नीटशी माहिती मिळत नाही ती अन्नविषयीं. अन्न कोणतें व किती खावें, कसें शिजवावें, वयपरत्वें त्यांत कायकाय फेरफार करावे याविषयी बरेंच अज्ञान व भ्रामक समजुती आढळतात. मांसवर्धक द्रव्यें, तेलमय व पिष्टमय धान्यें, यांचें अन्नांत काय प्रमाण असावें, याविषयी निश्चित सिद्धांत आतां झाले आहेत. व त्या सिद्धांतांच्या अनुरोधानें नियमित पण उपयुक्त आणि स्वस्त असा आहार करतां येतो. जीवनसत्त्वांचा शोध लागल्यापासून सात्त्विक आहार म्हणजे काय व त्याचे फायदे कोणते, आहाराची हेळसांड झाल्यास, किंवा आहार मौल्यवान असूनहि वाईट रीतीनें शिजविल्यास प्रकृति कां ढासळते, रोग कां व कोणते होतात हें हल्ली नीट समजूं लागले आहे, आणि पाश्चात्य देशांत या ज्ञानाच्या अनुरोधानें प्रत्येकास आपला आहार कसा असावा हें ठरवितां येतें. व्यायाम करावयाचा तर आहार चांगला व मुबलक पाहिजे, व त्यासाठीं पैसा पाहिजे, अशा सबबी आपले देशांत अनेक वेळां ऐकण्यांत येतात. जाडेभरडें व स्वस्त अन्नहि पौष्टिक असूं शकतें ही कल्पना समाजांत पसरविण्याची मुख्य जबाबदारी वैद्यवर्गावर येऊन पडते.

शारीरिक शिक्षणाची व्यापकता पूर्णपणें ओळखून मंडळानें आपला कार्यक्रम आंखलेला दिसतो. ग्रंथालयाची व वाचनालयाची शारीर शिक्षणासाठी आवश्यकता आतापासून ओळखून मंडळ त्या तयारीस लागलें, व रा. कोटरवार यांनी मंडळाला सढळ हस्तें मदत केली याबद्दल दोघांचेंहि अभिनंदन करावें तेवढें थोडेंच. पाश्चात्य देशांत या विषयावर अनेक शोध लागत आहेत व कल्पना पुढे येत आहेत. त्या सर्वांची माहिती होण्यास अनेक भाषांतील विशेषतः जपानी व जर्मन भाषांतील, ग्रंथांची व मासिकांची जरूर आहे. आपलेहि देशांत या विषयाचें बरेंच वाङ्मय उपलब्ध आहे. तें सर्व प्रसिद्ध करणें व आपले परिस्थितीस योग्य असे नवीन ग्रंथ तयार करणें, अथवा त्यांचीं भाषांतरें करविणें इत्यादि जबाबदारी मंडळावर ओघानेंच येत आहे.

## शरीर संपत्तीचा आढावा

आणखीहि एक मोठी जबाबदारी मंडळास स्वीकारावी लागणार आहे. आपले देशांतील शरीरसंपत्तीची मोजदाद करण्याचा प्रयत्न आजपर्यंत नीटसा झाला नाही. या संपत्तीचा आढावा आणि आयव्यय दरवर्षी काढणें अत्यंत आवश्यक आहे. गेले वीस वर्षांत शाळेंतील मुलांचे प्रकृतींत बरीच सुधारणा झाली आहे असें माझें तरी अनुमान आहे.कांही आंकडे-पंडित चार पांच वर्षांनी आयुर्मर्यादा लांबली आहे असेंहि म्हणतात. पण सप्रमाण पुरावा असा क्वचितच सांपडतो. धर्म, पोटशाळा, देश, सांपत्तिक स्थिति, संस्कृती, पिढीजाद धंदा इत्यादींत आढळणारे आहारांतील व शरीरसंपत्तींतील भेद, पोटभेद यांचें सूक्ष्म निरीक्षण करण्यासाठी लागणारे तज्ज्ञ व बुद्धिमान गृहस्थ मंडळाच्या सभासदांत चमकत आहेत. त्यांचेकडून प्रमाणसिद्ध पुरावा गोळा करविणें व त्यावरील निर्णय प्रसिद्ध करणें, ही जबाबदारीहि मंडळावर येऊन पडते. मंडळाची आठ वर्षांची कामगिरी लक्षांत घेतली तर मंडळ ही सर्व जबाबदारी यशस्वी रीतीनें पार पाडील असा भरंवसा वाटतो. या सर्व अवाढव्य कार्यास लागणारें मनुष्यबल व अर्थबल मंडळास सदैव मिळो अशी मी परमेश्वराचे चरणीं पुन्हां नम्र विनंति करतों.'

वरीलप्रमाणे भाषण झाल्यावर संस्थेचे चिटणीस श्री. शिवाजीराव दामले यांनी सर्वांचे आभार मानले याच प्रसंगीं डॉ. फडके (ससून इस्पितळ) यांजकडून शंभर रुपयांची व श्री. ल. ब. भोपटकर यांजकडून फिझिकल कल्चरचीं पुस्तकें अजमासे दोनशें रुपये किंमतीचीं अशा दोन देणग्या मिळाल्याचें जाहीर करण्यांत आलें. पानसुपारी देण्यांत आल्यावर हा समारंभ खलास झाला.

# स्फुट सुचना

१ ब्रिटिश सरकाराच्या पांढऱ्या खलित्यावर पार्लमेंटाच्या कॉमन्स व लॉर्ड्स या दोनहि सभांत वादविवाद होऊन खलित्याचीं अधिक छाननी करण्याकरिता जॉइंट सिलेक्ट कमिटी नेमण्याची भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनी आणिलेली सूचना पास झाली. त्याप्रमाणे कमिटींतील सभासदांची निवड करण्यांत येऊन त्यांचीं नांवहि बाहेर आलीं आहेत. कमिटींत एकंदर एकतीस सभासदांची नेमणूक झाली असून त्यांपैकीं, पंधरा सभासद कॉमन्स सभेपैकीं आहेत व सोळा सभासद लॉर्डांच्या सभेंतून घेतले आहेत सभासदांची संख्या चौतीसपर्यंत जाणार होती, असें म्हणतात. परंतु मि. चर्चिल, सर हेनरी पेज-क्रॉफ्ट व लॉर्ड लॉईड यांनी कमिटींत काम करण्याचें नाकारल्यामुळे तीन सभासद कमी पडले. यांपैकीं चर्चिल व लॉईड गळाले हा औषधावांचून खोकलाच गेला असें आनंदाने मानण्यास हरकत नाही. कॉमन्ससभेतर्फेच्या पंधरा सभासदांत लिबरल पक्षाचे दोन व मजूर पक्षाचे तीन सभसद असून बाकीचे दहा सभासद कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे आहेत. मजूर पक्षांतून मेजर ॲटली व मार्गन जोन्स यांची झालेली निवड हिंदी लोकांस हितकारकच वाटेल यांत शंका नाही. सर सॅम्युएल होअर यांच्या सूचनेस विरोधी सूचना मांडून हिंदुस्थानास शक्य तितकें लवकर डोमीनियन स्टेटस दिलें पाहिजे असें ॲटली यांनी आपल्या पक्षातर्फे प्रतिपादन केलें होतें. लिबरल-पक्षापैकीं मि. ऐझॅक फूट यांची नेमणूक कांही वावगी नाही. त्याच पक्षाचे सर जॉन सायमन हे लिबरल पक्षाचे असले तरी ते आपल्या रिपोर्टांतील सूचनांसच जरूर तेव्हां चिकटून राहणारे असल्यामुळे ते हिंदी लोकांच्या आकांक्षांचा कैवार घेणार नाहीत हें उघड आहे, अंडर सेक्रेटरी मि. बटलर हे सर सॅम्युएल होअर यांचे हस्तक या नात्यानेच वागतील, व बहुमत त्यांच्याच पक्षाचे असल्याने शेवटीं होअरसाहेबांचीं बहुतांशी सरशी होईल असें अनुमान निघतें परंतु या सर्व मंडळींत सर रेजिनाल्ड क्रॅडॉक यांच्या इतका हिंदद्वेष्टा कोणीहि नाही हें विसरता कामा नये.

---

२ लॉर्डांतून घेतलेल्या सभासदांत लॉर्ड रेडिंग हे एकटेच लिबरल व लॉर्ड स्नेल हे मजूर पक्षाचे आहेत. लॉर्ड आयर्विन यांची जोड रेडिंग साहेबांस मिळाल्याने हिंदी जनतेच्या राजकीय आकांक्षांविषयीं त्यांजकडून कांही तरी काळजी घेतली जाईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाही. बाकीच्या सभासदांपैकीं बरेचजण गोलमेज परिषदेने नेमलेल्या कमिट्यांत काम केलेले असून त्यांना इकडील लोकस्थितीची ताजी माहिती आहे. लॉर्ड लिनलिथगो हे शेतकी कमिशनचे अध्यक्ष होते. त्यामुळे त्यांना इकडील शेतकरी वर्गाचें प्रत्यक्ष ज्ञान आहे. लॉर्ड सँके यांच्याच अध्यक्षतेखाली गोलमेज परिषदेच्या बैठकी चालल्या. ते या कमिटींत असून तिचें अध्यक्षस्थानहि त्यांनाच मिळण्याचा संभव आहे. अशा रीतीने दोन्ही सभागृहांतील सभासदांचा विचार करता कमिटींतील सभासदांची निवड एकंदरीने गैर झाली असें मानण्याचें कारण नाही या कमिटीस सल्लामसलत देण्याकरिता हिंदुस्थानांतून प्रतिनिधी जावयाचे आहेत. त्यांपैकीं बऱ्याच जणांचीं नांवें खासगी रीतीने प्रसिद्ध झालीं असून तीच बहुधा निश्चित होतील. या प्रतिनिधींत ले. असेंब्लींतील दोन व कौन्सिल ऑफ स्टेटमधून एक असे तीन सभासद निवडले आहेत. निवडलेल्या प्रतिनिधींपैकीं सर सप्रू, बॅ. जयकर, सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास, सर अबदुर रहीम इत्यादिकांची निवड योग्य असून त्यांजकडून हिंदी लोकपक्षाची बाजू स्पष्टपणें मांडली जाण्यास मदत होईल अशी आशा वाटते. मात्र त्यांच्या अधिकाराचा खुलासा लवकर झाला पाहिजे. त्यांना कमिटीच्या रिपोर्टावर तिचे सभासद या नात्याने सही करण्याचा अधिकार मिळणार नाही.तथापि कमिटीपुढे आलेल्या साक्षीदारांना प्रश्न विचारणें व आपलें म्हणणें कमिटीच्या रिपोर्टांत नमूद करावयास लावणें एवढे तरी अधिकार त्यांना प्राप्त होणें आवश्यक आहे.

---

३ वऱ्हाडचे पुढारी व राष्ट्रीय सभेचे हंगामी अध्यक्ष श्री. माधवरावजी अणे हे कलकत्त्यास राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनासाठी जात असता वाटेंत खडगपूर स्टेशनावर पकडले गेले, व तेथून त्यांस मिदनापूर येथील तुरुंगांत अडकवून ठेवून पुढे सोडून देण्यांत आलें ही बातमी मागे प्रसिद्ध झालीच आहे. परंतु मिदनापूरच्या तुरुंगांत असता त्यांस अत्यंत उपमर्दकारक रीतीने वागविण्यांत आल्याचें आता समजतें.मिदनापुरास ज्या कोठडींत ते होते ती कोठडी फक्त ६० माणसांसच जेमतेम पुरण्यासारखी होती. पण त्या कोठडींत तुरुंगाच्या

अधिकाऱ्यांनी १२५ माणसें कोंबलीं. अशा रीतीने दुपटीहून अधिक माणसें त्या लहानशा जागेंत भरल्यामुळे गुदमरून जाऊन अणे यांचे व त्या सर्वांचेच या उन्हाळ्याचे दिवसांत किती हाल झाले असतील याची कोणासहि कल्पना करतां येईल. यापुढचे हाल अन्नाचे.श्री. अणे यांस ज्या अन्नाची सवय आहे ते त्यांस न मिळतां तिसऱ्या वर्गाचें कदन्न भक्षण करण्याची त्यांजवर पाळी आली. अणे हे धर्मनिष्ठ गृहस्थ असून संध्यावंदन सहसा अन्नग्रहण करीत नाहीत. पण त्यांस संध्येची उपकरणें जशीं मिळतील तशी पुरविण्याची पर्वा तुरुंगावरील अधिकाऱ्यांनी केली नाही. अन्नाचे हाल व धार्मिक अडचणी यांवर त्यापुढे वाढून ठेवलेल्या उपमर्दाने तर कळसच चढविला.

---

४ त्यांच्या कोठडींत कैद्यांची चौकशी करण्यासाठी सुपरिंटेंडेंटांची स्वारी आली त्या वेळीं इतर कैद्यांबरोबर श्री. अणे यांजकडून जमादाराने पायाचीं बोटें दुमडून बसून मग सलामीकरिता उभें राहण्याची कवाईत करून घेतली. ती विटंबना आपखुषीनें करून घेण्यास माधवरावजी साहजिकच तयार होईनात. तेव्हा त्यांना दोनतीन वॉर्डरांनी जबरदस्तीने तसें करावयास भाग पाडलें. खडगपूरच्या स्टेशनावर पकडून मिदनापूरच्या तुरुंगांत माधवरावांस आणिलें त्या वेळीं ते कोण आहेत व त्यांचा सामाजिक दर्जा किती उच्च आहे याची माहिती जेल सुपरिंटेंडंटाला नसेल असें म्हणवत नाही. ही माहिती असूनहि त्यांस तिसऱ्या वर्गाच्या कैद्याप्रमाणे सुपरिंटेंडंटाने जाणून बुजून वागविलें असेल व त्यांजवर चवड्यावर बसण्याची जबरदस्ती झाली असेल तर त्या बद्दल सुपरिंटेंडंट व दुसरे जबाबदार अधिकारी यांस योग्य तें शासन झालें पाहिजे असें आम्हांस वाटतें. वरील हकीकत ले. असेंब्लीत श्री. बी. दास यांनी गृहमंत्री सर हेग यांच्या नजरेस आणिली. पण त्यांनी तिजवर विश्वास ठेवण्याचेच नाकारलें. रा. जतकर हे यवतमाळचे पुढारी व वजनदार वकील असून ले. असेंब्लीचे पूर्वी सभासद होते. त्यांनीच ही माहिती बी. दास यांस कळविली असल्याने त्यांच्या शब्दावर गृहमंत्र्यांनी विश्वास ठेवावयाचा नाही तर कोणाच्या शब्दावर ठेवावयाचा? सारा हा प्रकार अत्यंत अनुचित व चीड आणणारा असून त्याची चौकशी गृहमंत्री सर हॅरी हेग यांनी करून या प्रकरणाचा समाधानकारक निकाल लावणें हें त्यांचे कर्तव्य आहे.

---

५ पुण्यांतील औद्योगिक प्रदर्शनाची समाप्ति मंगळवार ता. ४ रोजीं झाली. त्याची हकीकत गेल्या केसरीच्या अंकांत दिलीच आहे ती ज्यांनी वाचली असेल तिजवरून प्रदर्शनाचा उद्देश बऱ्याच अंशीं सफल झाला असेंच कोणाचेंहि मत पडेल. प्रदर्शनाच्या समारोपास मुंबई सरकारच्या औद्योगिक खात्याचे डायरेक्टर रा. पी. बी. अडवाणी अध्यक्ष या नात्याने लाभले ही महत्त्वाची गोष्ट होय. औद्योगिक खातें देशी उद्योगधंद्यास उत्तेजन देण्यासाठी निर्माण झालें असल्याने त्याच्या डायरेक्टरावर, आहेत या धंद्यांना जरूर ती माहिती पुरविणें व नवीन धंदे काढण्याचे मार्ग शोधून काढणें याची जबाबदारी स्वाभाविकच पडते.ती जबाबदारी रा.अडवाणी पूर्णपणें ओळखतात असें त्यांनी केलेल्या भाषणावरून दिसून येतें. त्यांनी पुणें जिल्ह्याच्या आर्थिक स्थितीचें निरीक्षण काळजीपूर्वक केलें असून ती स्थिति सुधारण्यासाठीं आपली एक योजनाहि तयार केली आहे. सदर योजना त्यांनी आपल्या भाषणांत सविस्तर मांडली. त्यांच्या योजनेप्रमाणे प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं एक स्थानिक कमिटी उत्पन्न करावी, तिने थोडेंसें भांडवल जमवावें, त्या भांडवलावर जिल्ह्यातील खेडेगावांतून जो औद्योगिक स्वरूपाचा माल उत्पन्न होतो त्याची विक्री करावी व अशा रीतीने जिल्ह्यांतील उद्योगधंद्यांचें रक्षण व संवर्धन चालवावें. रा.अडवाणी यांची ही योजना उपयुक्त असून तिला ते आपल्या खात्यातर्फे मदत करण्यासहि तयार आहेत.तरी पुणें म्युनिसिपालिटी व रे म्युझियम यांनी तिची शक्यता अजमावून तिला मूर्तस्वरूप देण्याचें ठरविल्यास पुण्याच्या प्रदर्शनाचे एका अर्थाने चीज झालें असें म्हणता येईल. ठिकठिकाणची आलेली दुकानें, मालाची झालेली विक्री व कांही धंद्यांचें लोकांना प्रत्यक्ष करून देण्यांत आलेलें ज्ञान याचा विचार करता यंदाचें प्रदर्शन अपूर्व झालें असून अडवाणी यांनी युरोपांतील प्रदर्शनाची हकीकत सांगितली त्या धर्तीवर विविध स्वरूपाचीं प्रदर्शनें भरविण्याचा पुणें म्युनिसिपालिटी व रे म्युझियम यांनी उपक्रम केल्यास त्यापासून महाराष्ट्रांतील उद्योग धंद्यास मोठेंच प्रोत्साहन मिळाल्यासारखें होईल असें वाटतें.

# शेत, शेतकी व शेतकरी

## कोंकणांतील शेतीच्या सुस्थितीचे उपाय

( ले.—रामचंद्र वासुदेव सोमण, मोहोपाडा. )

राष्ट्रीय संपत्तीच्या उत्पत्तिसाधनांत शेती हें प्रथम साधन होय. परंतु अज्ञानामुळे शेतकरी आणि अन्य कार्यव्यावृत्तीने पुढारी यांपैकीं कोणीहि शेतीच्या सुस्थितीचे प्रयत्न फारसे करीत नाहीत. यामुळे शेती व शेतकरी उत्तरोत्तर अगदी मरणाचे दारीं येऊन पोंचले आहेत असा माझा गेल्या ३०।३५ वर्षांचा अनुभव आहे.

भातशेतीचें पीक सूर्यप्रकाश व उष्णता, पाणीपुरवठा, खत, मशागत आणि बियाण्याची व आवणाची ( रोपांची ) जोपासना यांवर अवलंबून आहे. पैकीं प्रकाश व उष्णता यांखेरीज इतर सर्व साधनांची सध्या कमतरता आल्यामुळे जमिनीचा मगदूर अगदी कमी होऊन त्या दुःस्थितीस गेल्या आहेत. कोकणी शेतीचा पाणीपुरवठा केवळ पावसावर अवलंबून आहे. आणि उत्तरोत्तर पाऊस तर अपुरा आणि अनियमित पडूं लागला आहे. यामुळे भातशेतीस दरसाल बरेंच नुकसान पोंचत आहे. पावसाचा वर्षाव हा जरी केवळ निसर्गाधीन आहे तरी त्याचें थोडें आधिक्य आणि पडल्या पावसाचे पाण्याचा अधिक पुरवठा करून घेणे हीं मनुष्य कृतीने साध्य होणारीं आहेत. पाऊस पडण्याच्या अनेक कारणांपैकीं जंगल हेंहि एक कारण आहे. पण सत्ताधीश सरकाराने उत्पन्नाचे वाढीकरितां संरक्षणाचे कायद्याने लोकांस बंद केलेलीं जंगलें स्वतः पूर्णपणें नाहीशीं केलीं आहेत. व जंगलबंदीमुळे, सर्पणाकरिता खासगी झाडेंहि लोकांकडून बहुतेक नाहीशीं होत आलीं आहेत. यामुळे पर्जन्यवर्षावास व खताचे पुरवठ्यास कारण होणाऱ्या झाडेंऱ्याचा सध्या पूर्ण नाश झालेला आहे.

कोंकणी शेतीस कणशीस फूल धरीपर्यंत दररोज ताजें आणि वाहतें पाणी मिळण्याची आवश्यकता असते व तें डोंगरावरील वर्षाव आणि पाझर वाहात येऊन शेतीस मिळतें. परंतु जंगलें कमी झाल्यामुळे १।२ दिवस पाऊस न पडतांच झिरपे बंद होऊन ओहोळ्या वाहेतनाशा होतात व शेतें कोरडीं पडतात. ४—८ दिवसांचे उघाडीनंतर खाचरें भेगाळून आवण सुकूं लागतें व त्याचा परिणाम फुटव्याचे अभावांत होतो. करितां दरेक खेड्याचे घशांत म्हणजे डोंगरांचे दोन रांगांनी होणारे त्रिकोणाचे थोड्याखाली त्रिकोणाच्या दोन्ही रांगांस जोडणारा आडवा बांध घालून उंचावर पडत्या पावसाचें पाणी तुंबवून धरण्याची सोय करावी आणि उघाडीचे वेळीं त्यांतील पाणी खालच्या खलाटीस घेण्याची सोय करावी. असे संचय झाल्यास डोंगरांचे पाझरहि वाढतील आणि पाऊस उबतांच शेतें कोरडीं पडून त्यांचा फुटव्यावर होणारा दुष्परिणामहि टळेल. इतकेंच नव्हे तर पायथ्याचे गांवांस उन्हाळी पिण्याचे पाण्याचाहि पुरवठा होईल. कारण संचयाने डोंगर अधिक पाणी पितील व अधिक काळ अधिक प्रवाह प्रसवतील. कांही खलाट्या डोंगरखोऱ्यापासून दूर सपाटीवरहि आहेत. अशा ठिकाणीं टकल्याचे म्हणजे उंचावरील पहिले शेताचे ठिकाणीं खलाटीचे मानाने दोन ते चार एकर क्षेत्राचीं तळीं बनवावीं व पाण्याचे तुटव्याचे वेळीं त्यांतून खलाटीस पाणी पुरवावें. परंतु असे जलसंचय तयार करणें हें शेतकऱ्यांचे आटोक्याबाहेरचें आहे. तें काम सरकारचें आहे.

### खताचा तुटवडा

हें उत्पन्न कमी पडण्याचें दुसरें महत्त्वाचें कारण खताचा तुटवडा आहे. कोकणी शेतीस आतापर्यंत रानांतून पाण्याबरोबर वाहात येणारा जंगलाचा आणि शेणखताचा कुजवा व पशुपक्ष्यांच्या हांडाचे कण यांपासून खताचा पुरवठा होत असे. दररोज भुकेइतकें खाल्लेलें पौष्टिक पण साधें अन्न हें जसें आरोग्य आणि शक्तिसंवर्धनास कारण होतें त्याप्रमाणे तें शेतीचे उत्पादनसामर्थ्याचे स्थैर्यास कारण होत असे. परंतु जंगल आणि गुरें यांचा केवळ संहार चालू झाल्यामुळे सदर खतांचा रानांतच अभाव होऊन त्याचा शेतीसहि पूर्ण तुटवडा आला आहे. सदर तुटवडा देशी परदेशी खनिज आणि उद्भिज व कृत्रिम खतांनी भरून काढण्याच्या सूचना बहुतेक आधुनिक तज्ज्ञ आम्हां शेतकऱ्यांना करीत आहे व शेतीविषयक प्रयोगाचा बराचसा भरहि सदर बाबीवरच आहे. पण ज्यांचा नामोच्चारहि आम्हांस सुकर नाही त्यांची प्राप्ती आणि वापर आम्हांस कसा सुलभ होणार ? आणि

झाला तरी आमचे धंद्याचें जीवितच पराधीन करणारा तो उपाय अखेर हितपरिणामीं कसा ठरणार ? शिवाय शेतीस दिलेलीं सदर खतेंहि आळस दूर करण्याकरिता घेतलेल्या उत्तेजक द्रव्याप्रमाणे अथवा सणावारीं पोट फुटतों खाल्लेल्या प्रसंगप्राप्त मिष्टान्नाप्रमाणें अपचन आणि रोगोत्पत्तिद्वारा शक्तिपात करणारींहि होतात असा आमचा अनुभव आहे. कारण कुटा अगर फार्ममधून आणलेलें सरकारी खत पिकास देऊं लागल्यास जमिनीस त्याची संवय लागते म्हणजे जेथे तें द्यावें त्या जमिनीस पुन्हा खत दिल्यावांचून पीक येत नाही अशी अवस्था होते, व यावरून सदर खतें शेतीच्या उत्पादनसामर्थ्याचे ऱ्हासास किंबहुना पूर्ण नाशास परिणामीं कारण होतील अशी आमची समजूत आहे. निदान इतर जमीनींप्रमाणें कोकणी जमीनीहि ३।४ वर्षे पीक घेतल्यावर एखादें वर्ष ओस ठेवण्याचा प्रसंग तिजवर खास येईलच असें वाटतें.

### गोपालन

भातशेतीस शेणखत हें अत्युत्कृष्ट खत असल्यामुळे शेतकऱ्यांजवळ जनावरांचा सुकाळ असणे हें फार आवश्यक आहे. परंतु चाऱ्याचा अभाव आणि कत्तलीची मुभा यामुळे गुरांचा संहार होऊन खत आणि मशागतीचे कमतरतेने शेति अगदी निकृष्टावस्थेस गेली आहे. जनावरांपासून मिळणारें दूधदुभतें, शेणखतें व हाडेंकातडी आणि कष्ट इत्यादि दरेक बाब शेतीचे कामी फार उपयोगाची आहे. करिता उत्कर्षेच्छु शेतकऱ्याने सावकाराचे रोकड शिलकेप्रमाणें पशुसमूहाची जतन सदैव केली पाहिजे. पशुसंवर्धनास गोवधबंदीचे कायद्याची सध्या अत्यावश्यकता आहे. कारण जगण्याकरिता हातीं असलेली दरेक वस्तु शेतकरी विकीत आहे. व यामुळे जरूरीचीं गुरें हीं त्यांची पोटाची आग कसाबांचे हातीं देत आहे. जनावरांची निपज कमी आणि निकृष्ट होण्याचें मुख्य कारण चाऱ्याचा तुटवडा हें आहे, व तो सरकारी जंगलांची बंदी, मालकीच्या चराऊ जमिनी अधिकाधिक लागवडींत येणें; आणि जंगल सपाटीवरील उत्कृष्ट चराऊ रानें कातकरी व ठाकर यांस लागवडीस देणें या कारणांनी आलेला आहे.

गुरांची वाढ अल्पायासाने होण्याकरिता आम्ही सध्या अनुभव घेऊन पाहात असलेली एक योजना जमीनदारवर्गास सुचवितों. ती अशी कीं, प्रत्येकाने आपले जमीनीचे दर दोन एकरांस एक कालवड खरेदी करून ती आपल्या शेत्यास अर्धलीने द्यावी. यामुळे कुणबी आणि जमीनदार या दोघांचाहि आर्थिक फायदा होऊन शेतीस खताचा पुरवठा आणि दुभत्याची वाढ इतक्या गोष्टी साधतील. जनावरांची मालकी कुणब्याची नसल्यामुळे तीं विकलीं जाणार नाहीत, व भांडवलावांचून केवळ अंगमेहनतीचे जोपासनेने त्याचे मालकीचीं जनावरें त्याजवळ होतील. शेतास खताचे पुरवठ्यास विशेषतः कुणब्याचे गोठ्यांत जनावरें असण्याची आवश्यकताहि भागेल आणि जमीनदारासहि केवळ भांडवल गुंतविण्याने उत्पन्नाची वाढ व गोपालनाचें पुण्य मिळेल. कारण संगोपनाचे कष्ट करण्याची जमीनदारास सवय नाही, तें स्वखर्चानें करणे पुरवत नाही व नीट होत नाही. एवंच येन केन प्रकारानें गुरांची आणि जंगलांची वाढ शेतीचे सुस्थितीकरिता हर प्रयत्नाने केली पाहिजे.

### जमिनीची मशागत

उत्कृष्ट पिकाचें यापुढील कारण मशागत होय. भातशेतींत सर्वत्र सारख्या खोलीचें पाणी शेतांत तुंबवावें लागतें. यामुळे इतर शेतीच्या मशागतीपेक्षा बंदिस्त ही बाब भातशेतींत अधिक महत्त्वाची आहे; व ती दरसाल करावी लागते. बंदिस्त म्हणजे शेताचे पृष्ठभागाची सपाटी. बांध पऱ्हे आणि उघड्या ह्यांची बांधणूक अगर दुरुस्ती होय. शेतांत पाणी तुंबावें म्हणून खाचरांचे चाऱ्ही बाजूस बांध घातलेले असतात. अशा बांधांस पुराचे वेळच्या फार तुंबाऱ्यामुळे खांडी पडतात. व खेकडे स्वतःस राहण्याकरिता त्या बांधांत बिळें पाडतात. त्यांत पाणी शिरून तीं बिळे आरपार होतात, व शेतांतील पाणी अशा पडलेल्या गुरुळावाटे बाहेर निघून जातें. असे पडलेले गुरूळ आणि खांडी पुढील वर्षावाचें पाणी शेतांत तुंबण्याकरिता दर उन्हाळ्यांत बुजवावे लागतात व त्यावरच पुढील पिकाची सुस्थिति अवलंबून असते. पण शेतींतील कमाई कुणब्याचे पोटगीस सध्या अपुरी असल्यामुळे तो उन्हाळी मजुरी आणि काशी इत्यादि पिकें, आणि पावसाळी वाजवीहून अधिक भातशेती करतो. यामुळे त्यास पावसाळी उत्कृष्ट नांगरकी व उन्हाळ्याचीहि बंदिस्ती यांपैकीं कोणतीहि मशागत चांगले प्रकारें पुरेपूर करण्यास वेळ मिळत नाही व बंदिस्तीचे अभावीं मळी धुपून जाऊन पीक तर कमी येतेंच. पण जमिनीहि उत्तरोत्तर कमकस होत आल्या आहेत करितां जमिनीचे सुस्थितीसाठी एका नांगरास चार बिघ्यांहून अधिक जमीन करूं पाहाणारे कुणब्यास जमीनदाराने वसुलाचे निर्भयतेच्या आशेनेहि अधिक जमीन देऊं नये.

### खेकड्यांचा उपद्रव

खेकडे हे प्राणि कोकण शेतीस गुरूळ पाडून नादुरुस्त करतात. इतकेंच नव्हे तर शेतांतील

मेरांचे चूड खाऊनहि ते पिकांची हानि करतात. करिता सरकारी शेतकी तज्ज्ञांनी सदर प्राण्यांचें संहारक औषध शोधून काढून शेतकऱ्यांस उपकृत करावें अशी विनंति आहे. निगुड अगर भांभरूट या वनस्पतीपासून असें औषध तयार होण्याचा बराच संभव आहे. कारण सदर वनस्पतीचे पाल्यानें बिळ चोंदून बंद केल्यास खेकडे ४-६ दिवस त्या बिळास नवें तोंड पाडीत नाहींत असा अनुभव आहे. मशागतीची दुसरी बाब नांगरकी ही होय. ती कशी व केव्हा करावी याची माहिती शेतकऱ्यांना परंपरेनेच पूर्णपणें झालेली आहे. पण जनावरांची कमतरता आणि अधिक लागवडीची आवश्यकता यामुळे ती सध्या योग्यप्रकारें होत नाही. शेतास उखळण, दूण (बेर) आणि चिखल अशीं तीन नांगराचीं व चवथें फळीचें अशीं चार तासें घालण्याची पूर्वापार वहिवाट आहे, व तिची उपयुक्तता व माहितीहि सर्वांस आहे.

नांगरकीचे जनावरांची कमतरता हें कारण जमीनदारांनीच मनावर घेतल्यास दूर होणारें आहे. याविषयी अनुभवाने फलद्रूप झालेला आमचा असा उपाय आहे कीं, नांगरास वाहतां येतील अशा वयाची ताठ्यांची अगर खोंडांची जोडी घेऊन ती कुळास हलक्या वाफेने द्यावी. मात्र पडेल त्या किमतीच्या सवापट किंमत त्याने दिल्यास ती त्यास तिसरे वर्षी द्यावयाची बोली करावी. जोडी तिसऱ्या वर्षी मिळण्याची खात्री असल्यामुळे केवळ भाड्याचे जनावराप्रमाणें अनास्था न करतां कुणबी सदर जोडीची चांगली जोपासना करतो. चांगले जोपासनेने तयार केलेल्या सदर जोडीस तिसरे वर्षी दुप्पट किंमत देऊन कोणीहि घेतो व मूळ किंमत चुकवून उरले नफ्यांत कुणब्यास स्वतःची जोडी केवळ मेहनतीने होते, व जमीनदारासहि कांही एक झीज सोसावी लागत नाही आणि शेतीच्या वाहतुकीची ददात मात्र वांचते.

## रोपाची जोपासना

हींहि चांगलें पिक येण्यास अत्यावश्यक गोष्ट आहे. शिशुसंगोपनांत शिशु जन्मतःच निरोगी आणि सशक्त असण्याचा विचार करावा लागतो. त्याचप्रमाणे रोप निरोगी आणि जोरदार व्हावें याकरिता बीजसंग्रहाचा विचार रोपाचे जोपासनेंत करणें अवश्य आहे. पण बियाचे निवडीची काळजी घेण्याची जुनी चाल सध्या अगदीं संपुष्टांत आलेली आहे. सध्याचे बहुतेक शेतकी तज्ज्ञ कृतीने बियाऱ्या संकरजाति उत्पन्न करून अधिक पीक देणारें बीं पैदा करावें असें म्हणत असतात, व त्यांचे तसे प्रयत्नहि चालू आहेत. पण अखेर संकर पीक न देणारा ठरून हानिकारक होईल. कोंकणी शेतींत पेरणीपासून लावणीपर्यंतचीं सर्व कामें ४५ ते ५० दिवसांत पुरीं करावीं लागतात.व यांपैकीं नांगरकीचे वांट्यास काय ते १०।१२ दिवस मात्र मिळतात. कारण पेऱ्यापासून२० दिवशीं आवण लावण्यास होतें. नांगर लागण्याइतका पाऊस पेऱ्यानंतर ८।१० दिवशीं पडतो व तितके दिवस इतर पेरे, पोटगी, शाकरणी इत्यादि कामांस हवेहि असतात. यामुळे नांगरकीस फारच थोडे दिवस उरतात. कुणबी सध्या नांगरास चार एकर तरी जमीन करतात व नांगर दररोज १५ ते २० गुंठ्यांची उखळण काढतो. यामुळे जेमतेम कशी तरी उखळण काढून शेतकरी लगेच लाऊं लागतात. कारण लावणीचा मोसम चुकल्यास पीक कमी येतें. पण ह्या परिस्थितीने जमिनीची मशागत कमी होते, व त्याचा परिणाम फुटवा व गवताचा सुकाळ यांत होऊन शेताची बंदिस्तहि बिघडते. करिता नांगरकीचीं दोन तासें पेऱ्यापूर्वी उन्हाळी करून जमीन चिखलास तयार ठेवतां आल्यास जमिनीची उत्तम मशागतहि करतां येईल व दर नांगरास अधिक जमीनहि पत्करतां येईल. पण कोंकणी जमिनीस ओल गेल्यावर नांगर लागत नाही; कारण जमीन खोल तडकलेली असते यामुळे चार बैलांचा नांगर धरल्यास फार मोठालीं ढेपें पडतात. तीं फोडल्याशिवाय विरणार नाहीत व फोडण्याचा खर्च पुरवणार नाही; करता ओल असतां ही नांगरकी करतां येईल व नारळाहून अधिक मोठे ढेप निघणार नाहीत असा नांगर कोणी तयार केल्यास सुगीपूर्वीच जमिनीची मशागत करून ठेवतां येईल चांगले मशागतीने पीक व फुरसतीने अधिक जमीन कसता येऊन शेतकऱ्यांची प्राप्तिहि अधिक वाढेल. करतां कोणी कल्पक असें औत तयार करून शेतकऱ्यांचे पोटांत चार अधिक घास घालण्याचें पुण्य संपादील तर पाहिजे आहे.

# सुधारणांचा कायदा व शेतकऱ्यांचा फायदा !

पांढऱ्या खलित्यावर ब्रिटिश पार्लमेंटाच्या दोनहि सभागृहांत गेल्या आठवड्यांत कडाक्याचा वाद झाला. त्या वादविवादांत लॉर्ड हार्डिंजप्रभृति अनुभविक व पोक्त मुत्सद्यांची एका मुद्द्यापुरती एकवाक्यता दिसून येते. हिंदुस्थानास प्रांतिक स्वायत्तता तूर्त देऊन पाहावी; पण मध्यवर्ती सत्तेंत मात्र हिंदी लोकांचा हात शिरतां कामा नये असें त्यांचें मत आहे. तथापि मध्यवर्ती सत्तेचा थोडाबहुत अंश पदरांत पडल्यावांचून हिंदुस्थानांतील एकाहि राजकीय पक्षाचें समाधान होणार नाहीं अशी त्यांची खात्री असल्यामुळे ती सत्ता दिल्याची बतावणी करण्यास ते मोठ्या नाखुषीनें कबूल झाले आहेत. पार्लमेंटाच्या संयुक्त कमिटींत याच मताचे बरेच मुत्सद्दी निवडून आले आहेत त्याअर्थी ते पांढऱ्या खलित्यांतील वरील प्रकारच्या शिफारशी कांहींशा फेरबदलानें मंजूर करतील असें वाटतें. परंतु त्यांच्या पोटांतील हेतु पाहिल्यास आपण हिंदुस्थानास प्रांतिक स्वायत्तता देत आहों हेंच हिंदी लोकांचें फार मोठें कल्याण करीत आहों याच परोपकाराच्या डौलात ते आहेत.

भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनी हें मत अनेकवार बोलून दाखविलें असून त्याचा त्यांनी कॉमन्स सभेतील वादविवादांत पुनः एकदा निराळ्या रीतीनें अनुवाद केला. हिंदुस्थानांत शेतकरी लोक वीसपंचवीस कोटि आहेत. त्यांचें जीवित ज्यावर अवलंबून तें जमीनमहसुलाचें खातें आतापर्यंत राखीव ठेवण्यात आलें आहे; परंतु नवीन खलित्याप्रमाणे सदर खातें प्रांतिक स्वायत्ततेनें हिंदी दिवाणाच्या ताब्यांत गेल्यावर हिंदी लोकांना आपल्या शेतकरी वर्गाची स्थिति सुधारण्याची संधि पूर्णपणें मिळेल असें होअरसाहेबांनी आपल्या भाषणांत मधाचें बोट लावलें आहे. होअरसाहेबांच्या या फुशारकींत कांहीं हंशील नाहीं हें थोड्या विचाराअंतीं कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे शेतकरीवर्गाची स्थिति सुधारण्याचे जे कांहीं उपाय आहेत त्यांपैकीं औद्योगिक उन्नति हा एक होय. देशांतील जुने उद्योगधंदे धुळीस मिळाल्यापासून जो उठतो तो शेतीच्या व्यवसायांत शिरतो; यामुळे शेतीवर वाजवीहून अधिक माणसांच्या पोटाचा बोजा पडला आहे. इतक्यांचें पोट त्यावर न भागल्यानें त्यांची अन्नान्नदशा झाली आहे, त्यांच्या जमिनींचे लहानलहान तुकडे पडले आहेत, ते कर्जाखालीं बुडाले आहेत व त्यांना शेतसारा भरण्याचीहि शक्ति उरलेली नाही.

अशा आपत्तींत ते मोठ्या मुष्किलीनें दिवस कंठीत आहेत. ज्यांना शेतीचा व्यवसाय संभाळण्याकरिता आपल्या गांवीं राहिलेंच पाहिजे तेवढेच लोक खेड्यांत असतात व बाकीचे बहुधा देशोधडीस जातात. त्यांपैकींच कित्येकजण मुंबई, सोलापूर, अहमदाबाद इत्यादि शहरांतील गिरण्यांतून व कारखान्यांतून निढळाचा घाम गाळून मिळविलेला पैसा घरीं पाठवितात आणि आपल्या जिवलग माणसांचा जीव वांचवितात. याचा उघड अर्थ असा कीं आमची शेती स्वावलंबी नाहीं. तिला इतर धंद्यांची जोड अवश्य पाहिजे. मुंबई इलाख्याचे औद्योगिक खात्याचे डायरेक्टर मि. अडवाणी यांनी पुणें जिल्ह्याची औद्योगिक पाहणी केली तिच्यांत हाच अनुभव त्यांस आला. शेतकरी–वर्गाला शेतीशिवाय आणखी एक दुय्यम धंदा पाहिजे असेंच त्यांचें मत पडलें. महाराष्ट्रांत पुणें जिल्हा सर्वांत सुधारलेला व पुढारलेला समजतात. पण त्या जिल्ह्याच्या बारा लक्ष लोकसंख्येंत अवघे अर्धा लक्ष लोक शेतीशिवाय इतर धंद्यांवर व अवघे दहा हजार लोक कारखान्यांवर निर्वाह करीत असल्याचें त्यांना आढळलें; यावरून औद्योगिक बाबतींत हिंदी लोक किती मागें आहेत हें सरकारी आंकड्यांनीच सिद्ध होतें.

सावकार, सुशिक्षित वर्ग व फाजल शेतकरी यांचा सांधा जुळतो तो याच ठिकाणीं. सावकारांनीं भांडवल पुरवावें, सुशिक्षितांतील तज्ज्ञांनी कारखाने चालवावे व त्यांत शेतीस ज्यांची गरज नाहीं, अशा फाजल शेतकऱ्यांनी कामगार बनून कामें करावीं. या कारखान्यांना जरूर तो खनिज पदार्थ व कच्चा माल यांनी सारा देश समृद्ध असल्यानें प्रत्येक प्रांतांत व जिल्ह्यात लहानमोठ्या प्रमाणावर नवीन कारखाने सहज निघूं शकतील. त्यांतून सदर कारखाने शेतकरी–वर्गाच्या गांवापासून जितके नजिक स्थापन होतील तितके शेतकऱ्यांच्या संसाराची घडी कायम राहण्यास व गिऱ्हाइकास माल माफक किमतीस मिळण्यास अधिक सोयीचें होईल यांत शंका नाहीं. पण हिंदी उद्योगधंद्यांची अभिवृद्धि अशा रीतीनें घडून यावयास इंग्लंडची व हिंदुस्थानांतील ब्रिटिश कारखानदारांचीच मुख्य आडकाठी आहे. सन १९३० सालीं हिंदुस्थानांत परदेशांहून सुमारें २७५ कोटि रुपयांचा माल आला; त्यापैकीं १२५ कोटि रुपयांचा माल एकट्या इंग्लंडाचाच होता; म्हणजे इंग्लंडांतून

हिंदुस्थानांत येणाऱ्या मालाचें एकंदर परदेशाच्या मालाशीं जवळ जवळ निम्म्याइतकें प्रमाण बसतें.

ओटावा परिषदेनें इंग्लंडाच्या या मालास सवलत दिलीच आहे; पण त्या सवलतीच्या भरींत भर नवीन सुधारणांच्या काळांत गव्हर्नर–जनरलास प्राप्त झालेल्या विशेष अधिकारांनी पडणार आहे. हिंदी कौन्सिलें इंग्रजांस व इंग्रज कारखानदारांस पक्षपातानें वागवूं लागलीं असता त्यांस सदर अधिकारानें गव्हर्नर-जनरल प्रतिबंध करूं शकतो. या अधिकाराचा खुलासा पांढऱ्या खलित्यांत पुढीलप्रमाणे आढळतो 'इंग्लंडांत राहणाऱ्या कोणाहि ब्रिटिश प्रजाजनांना किंवा त्यांनीं स्थापलेल्या कंपन्यांना प्रतिबंधक असे कायदे पास करण्याची सत्ता हिंदुस्थानाच्या फेडरल किंवा प्रांतिक कायदेमंडळांना नाही. या नियमाप्रमाणे इंग्लंडच्या रहिवाशाला हिंदुस्थानांत येण्याचा, हिंडण्याचा, राहण्याचा व व्यापार करण्याचा हक्क प्राप्त होतो.' हा हक्क इतका विस्तृत आहे कीं, त्यायोगानें हिंदी उद्योगधंद्यांच्या संरक्षणार्थ ब्रिटिश मालावर जकात बसविण्याची सत्ता हिंदी कौन्सिलांना नाहीं, इतकेंच नव्हे तर तिकडील भांडवलवाल्यांच्या मनांत हिंदुस्थानांत नवे कारखाने काढण्याचें आलें असता त्यांसहि मनाई करण्यास हिंदुस्थान समर्थ नाही. सारांश, सातासमुद्रांपलीकडचें हें संकट दाराशीं येऊन ठेपलें, फार काय पण घरांत शिरलें, तरी तें हिंदी लोकांनीं डोळे मिटून बिनतक्रार शिरूं दिलेंच पाहिजे !

आजच हिंदुस्थानाची स्थिति अशी आहे कीं येथील बहुतेक धंदे इंग्रज लोकांनीं आधींच व्यापून टाकले आहत.इकडील कापडाच्या बऱ्याच गिरण्या इंग्रजांच्या मालकीच्या आहेत व त्यांची भरभराटहि चांगली झाली आहे.चहाच्या व्यापारापैकीं ९० टक्के व्यापार इंग्रजांनीच आटोपला आहे. कॉफीचे मळे व तागाच्या गिरण्या बहुधा त्यांच्याच आहेत. कोळशाच्या खाणी तेच खणतात व रॉकेलच्या विहिरींतील तेल तेच काढतात. बँका त्यांनी चालविल्या आहेत व विमा कंपन्यांच्या मार्फत हिंदुस्थानांतील भांडवल तेच शोषून घेत आहेत. इमारतींना सीमेंट तेच पुरवितात व मेजवानींतील पक्कान्नें त्यांच्याच साखरेनें गोड होतात. व्यापारी गलबतें तेच बांधतात, हाकारतात व हिंदी मालाची ने–आण तेच करतात. अशा रीतीनें इंग्लंडांत बसून व हिंदुस्थानांत येऊन इंग्रज कारखानदारांनी, भांडवलवाल्यांनी व व्यापाऱ्यांनी हिंदी लोकांना चाहोंकडून वेढून टाकलें आहे.

त्या मानानें हिंदी कारखाने अगदींच बाल्यावस्थेंत आहेत. त्यांजपाशीं भांडवल तुटपुंजे, अनुभव थोडा व ज्ञान कोतें. त्यांचा माल तितका श्रेष्ठ प्रतीचा नसतो व त्याची किंमतहि त्यांस माफक ठेवतां येत नाही. महाराष्ट्राचेंच उदाहरण घेतलें तर त्यांत साखरेचे कैक कारखाने गेल्या तीस-चाळीस वर्षांत हिंदी लोकांनी उभारले. पण ते सारे सपशेल बुडाले. पण बेलापूरचा युरोपियनांचें भांडवल व युरोपियनांची देखरेख असलेला साखरेचा कारखाना मात्र भरभराटीस येऊन आता भक्कम पायावर स्थिर झाला आहे ! सारांश, हिंदी उद्योग–धंदे सांप्रत इतक्या बाल्यावस्थेंत आहेत कीं त्यांचें सरकारानें कांहीं कृत्रिम उपायांनी प्रारंभीं लालनपालन व संगोपन न केलें तर त्यांचा जगाच्या चढाओढींत टिकाव लागावयाचा नाहीं.

हिंदुस्थान देश इंग्रजी कारखान्यांनीं आधींच ग्रासून टाकला असल्यामुळे त्यांत नवीन उद्योगधंदे काढण्यास हिंदी लोकांनीं आपली कल्पकताच चालविली पाहिजे. ब्रिटिश सरकार जसे इंग्लंडाच्याच हितास अग्रस्थान देऊन उपाय योजतें तसे उपाय योजण्याचें स्वातंत्र्य हिंदी लोकांना मिळण्याची आवश्यकता आहे. पण नवीन सुधारणांत त्या स्वातंत्र्याचा मागमूस मुळींच नाही. इंग्लंडाच्या हितसंबंधास अपाय होऊं न देता हिंदुस्थानसरकारानें आपलें आर्थिक धोरण ठरविलें पाहिजे असा पांढऱ्या खलित्याचा स्पष्ट अभिप्राय आहे. या कैचींतून हिंदुस्थान एवढेंच करूं शकेल कीं, इंग्लंड किंबहुना ब्रिटिश साम्राज्य यांच्या बाहेरचे जपान, अमेरिका, फ्रान्स, जर्मनी, इटाली इत्यादि देश आहेत त्या देशांत निपजणारा माल इकडे बनवील व संरक्षक जकातींचा तट त्यांजभोंवतीं बांधून नवीन धंद्यांच्या सुरक्षिततेचा मार्ग शोधून काढील. पण एवढ्यानें त्यांजवरील इंग्लंडचें संकट टळेल असें नाही. ब्रिटिश भांडवलवाले त्याच धर्तीचे नवे कारखाने हिंदुस्थानांत काढतील व या संरक्षणाचा फायदा आयताच आपण मिळवून इंग्लंडांतल्यापेक्षाहि आपल्या कारखान्यास इकडे अधिक सवलती मिळवितील.

खेरीज या देशांत मजुरीचे दर फारच कमी असल्यानें त्यांना आपला माल स्वस्त विकावयास सांपडेल. हिंदुस्थानानें आपल्याकरिता सुरक्षित असें बीळ खणून ठेवावें व त्यांत ब्रिटिश कारखानदारांचा नागोबा नेमका येऊन बसावा असा क्रम चालू झाल्यास हिंदुस्थानांत हिंदी लोकांच्या मालकीचे धंदे भरभराटीस येणार नाहीत व त्यांच्या कपाळाची मजुरी किंवा भीक चुकणार नाही ! असल्या कारखान्यांची वाढहि मर्यादित होणार असल्यानें हिंदी शेतकऱ्यांस पुरेशी मजुरीहि न मिळून त्यांची सांप-

त्तिक स्थिति भविष्य काळांत बहुधा आहे तशीच राहील; किंबहुना अधिक खालावेलहि !

उद्योगधंद्यांची अभिवृद्धि हाच शेतकऱ्यास संपत्ति मिळवून देण्याचा मुख्य उपाय होय. त्यास आमचा शेतकरी-वर्ग इंग्रज कारखानदारांच्या हितविरोधाने वरीलप्रमाणे मुकला असतां शेतीवरील भार हलका करण्याचा एक महत्त्वाचा मार्गच खुंटला म्हणावयाचा ! सर चुनीलाल मेहता मुंबई-सरकाराचे फडणीस होते त्या वेळीं त्यानी जमिनीचे तुकडे लहान लहान पडण्यास आळा घालण्याचें व पडलेले तुकडे एकत्र जोडण्याचें बिल मुंबई कायदेमंडळांत आणिलें होतें. त्यास रयतेकडून जोराचा विरोध झाला. त्या बिलानें जमिनीच्या वांटण्या विशिष्ट प्रमाणाबाहेर व्हावयाच्या बंद पडून व आहेत तेहि तुकडे हातचे जाऊन बरेच शेतकरी हरळीच्या मुळीस मुकणार होते. अर्थात् प्राप्तीचा नवीन मार्ग खुला होत नाही व आहे हा मार्गहि खुंटतो या समजुतीनेच शेतकरीवर्ग सदर बिलाविरुद्ध खवळून उठला व अखेर सरकारानें हार खाऊन ते बिल माघारें घेतलें.

उलटपक्षीं आपण अशी कल्पना करूं कीं शेतकऱ्यास स्वतःची जमीन कसून वर्षाच्या काठीं शेपन्नास रुपयांचें उत्पन्नहि येत नाहीं; ती जमीन इतरांकडे खंडानें लावून त्याच्या हातास पांचपंचवीस रुपयेहि लागत नाहीत; पण परगांवीं जाऊन एखाद्या धंद्यावर त्याचा उत्तम प्रकारें चरितार्थ चालतो; तर तो शेतकरी आपली जमिनीची लहानशी पट्टी विकून टाकील, त्या रकमेंतून कदाचित् एखाद्या कंपनीचा भाग खरेदी करील व स्वतःचें गांव सोडून परगांवचा रस्ता पकडील. जमिनीचे नवे तुकडे थांबण्याचा व जुने तुकडे एकत्र जोडले जाण्याचा नैसर्गिक क्रम हाच असून त्याच रूपानें शेतीवरील फालतू माणसांच्या पोटाचा भार हलका होणार आहे. पण हे धंदेच देशांत न निघाल्यास शेतकरी-वर्ग आजच्यासारखाच पुढेंहि आपल्या गांवच्या बंदिखान्यांत पिचत पडेल इतकेंच नव्हे, तर दिवसानुदिवस होत जाणाऱ्या प्रजावृद्धीनें जमिनीच्या वांटण्या वाढून त्यांच्या चिंध्या उडतील यांत आश्चर्य काय ?

ही स्थिति औद्योगिक उन्नतीनें सुधारण्याचें साधन प्रांतिक सरकाराच्या स्वाधीन नाहीं व जमीनमहसुलाच्या खात्यावरील दिवाणाच्या स्वाधीन नाहींच नाहीं. सदर दिवाण गरिबांचा कनवाळू व स्वभावाचा निःस्पृह भेटला तर इतकेंच करील कीं जमीनधाऱ्याचे दर उतरविण्याचें मनावर घेईल पण त्याला तो अधिकार गाजविण्यास मोकळीक आहे कोठें ? कारण प्रांताचीं सर्व खातीं चालावयास पाहिजेत व तीं आहेत तशींच जवळ जवळ चाललीं पाहिजेत. सिव्हिल सर्व्हिस, बडे पोलीस अधिकारी व त्याशिवाय इतर खात्यांतील ऑल-इंडिया सर्व्हिसमधील अधिकारी यांच्या पगारास हात लावण्याची सत्ता प्रांतिक सरकारास नसल्यानें प्रांताच्या खर्चात काटकसर होणार नाहीं व त्यामुळे शेतसारा कमी करण्याचा योगच येणार नाहीं. तीच अवस्था अबकारी खात्याची. आज अबकारी खात्याचे दिवाण हिंदीच आहेत. असें असता त्यांनी यंदाच्या सालीं मुंबई इलाख्यांतील गुत्ते कमी करण्याऐवजीं बंद ठेवलेल्या गुत्त्यांच्या उदघाटनसमारंभास मंजुरी दिली आहे ! याचें कारण तरी सरकाराच्या खजिन्यांत द्रव्याचें दुर्भिक्ष हेंच होय. नवीन सुधारणा अमलांत येतील तेव्हां त्या सुधारणांच्या पायींच अधिक खर्च होणार असल्यामुळे व काटकसरीची सत्ता प्रांतिक सरकारास परिपूर्ण नसल्यामुळे द्रव्याचें दुर्भिक्ष अधिकच जाणवणार यांत संदेह नाहीं. मद्यपानानें शेतकऱ्याच्या शरीराचें मातेरें होतेंच, पण त्याखेरीज त्याच्या द्रव्याची व घरादाराचीहि धूळधाण उडून तो आपल्या अल्प प्राप्तीसहि मुकतो. त्या दिशेनें त्याचें धनहरण वांचविण्याचा मद्यपानप्रतिबंध हा जो उपाय त्याचाहि अवलंब करण्याचें सामर्थ्य दारू- दिवाणास प्रांतिक स्वायत्ततेंतहि लाभणार नाहीं.

सारांश, उद्योगधंद्यांची अभिवृद्धि नाहीं, शेतसाऱ्यांत सवलत नाहीं व मद्यपानासहि आळा नाहीं अशी स्थिति पांढऱ्या खलित्यांतील शिफारशी जशाच्या तशा कायम राहिल्यास नवीन सुधारणा कायद्याखालीहि दृष्टीस पडून प्रांतिक स्वायत्तता निष्फळ ठरणार आहे व भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांच्या विधानास व्यर्थ बडबडीपेक्षा अधिक किंमत कोणी देणार नाहीं. म्हणूनच प्रांतिक स्वायत्ततेवर संतुष्ट न राहता सर्व राजकीय पक्षांचे हिंदी पुढारी मध्यवर्ती सत्तेवर जीव ठेवून आहेत. कारण खरें स्वराज्य मध्यवर्ती सत्तेंत आहे, प्रांतिक सत्तेंत नाहीं. आणि ती सत्ता जोंपर्यंत हिंदी लोकांच्या आटोक्यांत आली नाहीं तोंपर्यंत एकट्या शेतकरी वर्गाचेंच काय पण सुशिक्षित वर्गाचें व व्यापारी वर्गाचेंहि दैन्य फिटण्याची आशा नाहीं.

# औद्योगिक खात्याचे डायरेक्टर मि. अडवानी यांचें भाषण

मंगळवार ता. ४ रोजीं पुणें येथील औद्योगिक प्रदर्शनाचा समारोपसमारंभ मि. **पी बी. अडवानी** यांचे अध्यक्षतेखालीं साजरा झाला. त्या प्रसंगीं मि. अडवानी यांनी केलेल्या भाषणाचा सारांश पुढे देण्यांत येत आहे. ते म्हणाले, "कांहीं दिवसांपूर्वीं लॉर्ड रे औद्योगिक वस्तुसंग्रहालयाच्या ट्रस्टींनी पुण्यामध्ये आंतरप्रांतीय औद्योगिक प्रदर्शन भरविण्याची कल्पना मला सांगितली; तेव्हा त्या कल्पनेला मीं आपली संमति ताबडतोब दिली. कारण माझी अशी ठाम समजूत आहे कीं, राष्ट्राच्या औद्योगिक वाढीला असल्या सुव्यवस्थित प्रदर्शनांची अतिशय मदत होते. पूर्वसंकल्पाप्रमाणे हें प्रदर्शन इतकें सुव्यवस्थित रीत्या भरून यशस्वी झालें या गोष्टीबद्दल मला समाधान वाटते. लॉर्ड रे औद्योगिक वस्तुसंग्रहालयाचा जन्मच मुळीं १८८८ सालीं पुणे येथे भरलेल्या प्रदर्शनापासून झाला आहे. त्याच वस्तुसंग्रहालयातर्फे हे प्रदर्शन भरविलें गेलें हे योग्यच झालें. म्युनिसिपालिट्यांना सरकारांतून दरवर्षी जी देणगी मिळते त्या देणगींतून 'म्युनिसिपल बरोज़ ॲक्टा'न्वयें म्युनिसिपालिट्यांसारख्या स्थानिक संस्थांना अशीं वस्तुसंग्रहालयें ठेवता येतात. पुणें म्युनिसिपालिटीनें या सवलतीचा सर्वांच्या अगोदर फायदा घेतला त्याबद्दल तिचें अभिनंदनच केलें पाहिजे. रे वस्तुसंग्रहालयाच्या ट्रस्टींपैकीं तीन ट्रस्टी तर खुद्द म्युनिसिपालिटींतील अधिकारीच आहेत. म्हणून हें वस्तुसंग्रहालय म्युनिसिपालिटीचीच एक आनुषंगिक संस्था आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## युरोपांतील स्थानिक संस्थांचें कार्यक्षेत्र

अशीं प्रदर्शनें भरविण्याच्या कामीं इतर देशांतील स्थानिक संस्था कसा प्रयत्न करतात हे पाहणेंहि बोधप्रद होईल. म्हणून त्यांची थोडीशी माहिती देतों. युरोपांतील शहर म्युनिसिपालिट्या आरोग्यव्यवस्था, पाणीपुरवठा आणि प्राथमिक शिक्षणाचा प्रसार एवढींच कामें करून स्वतःला कृतकृत्य समजत नाहीत. युरोप आणि अमेरिका या देशांतील मोठमोठ्या शहर म्युनिसिपालिट्या आपल्या क्षेत्रांतील आर्थिक स्थिति सुधारण्यासाठीं प्रत्यक्ष कार्य करीत असतात. आहेत ते उद्योगधंदे वाढीस लागावे आणि नवे उद्योगधंदे सुरू व्हावे म्हणून त्या म्युनीसिपालिट्या त्या त्या संस्थांना जागा, पाणीपुरवठा, वीजपुरवठा इत्यादि बाबी सवलतीच्या दरानें देतात. नागरिकांना कलाविषयक शिक्षण देण्यांत त्या बराचसा पैसाहि खर्च करतात. उद्योगधंद्यांना उत्तेजन देण्याचा आणखीहि एक मार्ग आहे आणि तो म्हणजे उद्योगधंद्यांच्या निरनिराळ्या शाखांचीं पद्धतशीर प्रदर्शनें भरविणें. याशिवाय सार्वराष्ट्रीय अशा व्यापारविषयक आणि औद्योगिक जत्राहि अधनमधून मोठ्या प्रमाणावर भरविण्यांत याव्या. याचें उदाहरण म्हणून लंडन व बर्मिंगहॅम येथे प्रतिवर्षीं भरणाऱ्या ब्रिटिश औद्योगिक जत्रांचें देतां येईल.

## परदेशांतील औद्योगिक जत्रा

या जत्रेच्या लंडन विभागानें यंदाच्या सालीं ४६५३०३ चौरस फ़ूट जागा व बर्मिंगहॅम विभागानें २४४३७४ चौरस फ़ूट जागा व्यापली होती. लंडनविभागांत १५३३ दुकानें आणि बर्मिंगहॅम विभागांत १०४२ दुकानें थाटलीं होतीं. पुष्कळशा शहरांतून तर औद्योगिक प्रदर्शनासाठीं स्थानिक संस्थांनीं कायमच्याच इमारती बांधलेल्या आहेत. वरीलसारख्या जत्रा लिपझिग्, मिलन, ब्रुसेल्स येथेंहि भरत असतात. पुणें म्युनिसिपालिटीनें रे औद्योगिक वस्तुसंग्रहालयाचें पुनरुज्जीवन करून व सध्याचें प्रदर्शन भरवून युरोपांतील मोठमोठ्या म्युनिसिपालिट्यांनी घालून दिलेल्या परंपरेचें योग्य अनुकरण केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. सध्या देशामध्ये प्रदर्शनें भरविण्याची लाटच उसळली आहे. परंतु सर्व प्रदर्शनांना एका सूत्रांत आणील अशी एखादी मध्यवर्ती संस्था नसल्यामुळे प्रदर्शनांचा हेतु चांगला असला तरी त्याच्या फुटकळ आणि अव्यवस्थित स्वरूपामुळे तो व्हावा तितका सफल होत नाहीं. अशी एखादी मध्यवर्ती संस्था स्थापन होऊन तिच्यातर्फे असलीं प्रदर्शनें भरविण्यांत येतील तर देशाच्या निरनिराळ्या भागांतील मोठमोठे कारखाने त्यांत आत्मविश्वासानें भाग घेतील. असो.

## पुणें जिल्ह्याची औद्योगिक पाहणी

उद्योगधंद्याच्या दृष्टीनें पुणें जिल्ह्याची पाहणी करता मला असें आढळून आलें कीं, १०० इसम शेतीचा धंदा करणारे असले तर २० लोकच व्यापारउदीमांत लक्ष घालतात. उत्पन्नाची बाब पाहता, उद्योगधंद्यापासून येणारें उत्पन्न हें शेतीच्या उत्पन्नापेक्षां निम्म्यानें कमी असतें. पुणें जिल्ह्यांत एकंदर लोकवस्ती १२ लक्ष आहे. त्यांतील ५० हजार लोकच काय ते उद्योगधंद्यांत गुंतलेले आहेत. त्या ५०

हजारांपैकीं १० हजार लोक कारखान्यांत खपत असून बाकीचे घरगुती धंद्यांत अंगमेहनत करीत आहेत. पुणें जिल्हा हा कच्च्या मालानें समृद्ध आहे. तसेंच शिक्षणाचा प्रसारहि त्यांत भरपूर आहे. म्हणून त्या त्या उद्योगधंद्यांत तज्ज्ञ असे लोक मिळणें फारसें कठिण नाहीं व योजनाच निघाल्या तर त्यांना पैशाची उणीव भासेल असेंहि मला वाटत नाहीं. कापूस पिंजून गठ्ठे बांधण्याचे कारखाने, पिठाच्या गिरण्या, तांदूळ सडण्याच्या गिरण्या, छापखाने, सोडा वॉटरचे कारखाने सोडतां पुणे जिल्ह्यांत नांव घेण्यासारखे ६-७ कारखान्यांपेक्षा अधिक मोठाले कारखाने नाहींत. कापडाची गिरणी, कागदाची गिरणी, काचेचा कारखाना, पत्रे तयार करण्याचे दोन कारखाने, व एक तेल गाळण्याची गिरणी हे ते कारखाने होत.

### नवे धंदे कसे निघतील ?

घरगुती धंद्यांपैकीं मुख्य धंदा हातविणकामाचा आहे. घरगुती धंदे आणि मोठे कारखाने यांवर उपजीविका करणाऱ्यांची संख्या वाढली पाहिजे. मोठ्या कारखान्यांना म्युनिसिपालिटयांनीं पाणीपुरवठा, जमीन यांबाबत सवलती देऊन त्यांच्या वाढीस मदत केली पाहिजे. त्यापासून तिला अप्रत्यक्ष रीत्या फायदाहि झाल्यावांचून राहणार नाहीं. पुण्यामध्ये नवीन सुरू होणाऱ्या कारखान्यांची मध्यवर्ती संस्था लॉर्ड रे म्युझियम ही राहिली पाहिजे. नवीन धंदे निघणें सुलभ व्हावें म्हणून प्रथम रे वस्तुसंग्रहालयानें जिल्ह्यांतील (१) कच्चा माल ( २ ) आयात माल व ( ३ ) घरगुती धंदे आणि मोठे कारखाने यांची पद्धतशीर यादी प्रथम तयार केली पाहिजे. तसेंच एक तक्ता ठेवून त्यांत नवे निघणारे कारखाने व त्यांची प्रगति, त्या कारखान्यांत काम करणाऱ्या लोकांची संख्या आणि एकंदर उत्पादन या सर्वांचें शिस्तवार प्रमाण दाखविलें पाहिजे. इतर लोकांनी शेतीसंबंधी तयार केलेले तक्तेहि म्यूझियमने आपल्याजवळ ठेविले पाहिजेत. म्हणजे तौलनिक अभ्यासाला त्यामुळे मोठीच मदत होईल. कृषि आणि उद्यम यांतून काम करणारांची संख्या समसमान असली पाहिजे.

### मालविक्रीचीं मध्यवर्ती केंद्रें

घरगुती धंद्यांबद्दल बोलावयाचें तर त्यांना दोन प्रकारच्या मदतींची जरुरी आहे. कामाच्या नवीन सुधारलेल्या पद्धति दाखविणें आणि निरनिराळ्या मालांचे नवीन नमुने मिळवून देणें हे ते दोन प्रकार होत. त्याशिवाय मालाच्या पैदाशीला योग्य बाजारहि पाहून दिला पाहिजे. घरगुती धंदे करणाऱ्या लोकांना ही मोठीच गरज भासते. घरगुती धंद्यांना जोराचें प्रोत्साहन मिळण्यासाठी त्या धंद्यांत लक्ष घालणाऱ्या लोकांची एक जिल्हानिहाय कमिटी नेमली पाहिजे. या कमिटीनें थोडेसें भांडवल उभारून विक्रीचीं दुकानें काढावीं व त्या दुकानांतून जिल्ह्यांत तयार होणारा सर्व माल ठेवावा. दुकानावर नेमलेल्या माणसानें जिल्ह्यामध्ये मधून मधून दौरा काढून त्या त्या लोकांशीं कायमचा संबंध ठेवला पाहिजे. त्याचें मुख्य काम असें कीं, त्यानें नवीन पद्धति आणि नवे नमुने यांची खेड्यांतील लोकांना माहिती करून दिली पाहिजे. सरकारी औद्योगिक खातेंहि अशा कमिटीशीं सहकार्य करून, तिला जरूर पडेल तेव्हा, मदत करील. जिल्हानिहाय केंद्रांचें लोण मुंबई शहरापर्यंत व तेथून तें देशाबाहेरहि पोचवितां येईल. आज उद्योगधंद्यावर पोट भरणाऱ्या लोकांपैकीं नऊदशांश लोक घरगुती धंद्यांत मग्न आहेत. यावरूनच राष्ट्राच्या औद्योगिक प्रगतींत घरगुती धंदे हा महत्त्वाचा घटक आहे. म्हणून त्या धंद्यांच्या वाढीसाठी जितका प्रयत्न करतां येईल तितका केला पाहिजे.

### घरगुती धंद्यांना उत्तेजन द्या

इंग्लंडसारख्या उद्योगधंद्यांत पुढारलेल्या राष्ट्रांतहि घरगुती धंद्यांना उत्तेजन देणें महत्त्वाचें कर्तव्य समजलें जातें व तें तसें दिलेंहि जातें. तर हिंदुस्थानासारख्या उद्योगधंद्यांत मागासलेल्या देशांत घरगुती धंद्यांना उत्तेजन मिळणें शतपटीनें आवश्यक ठरतें. इंग्लंडमध्ये ' कन्ट्री इंडस्ट्रियल लिमिटेड ' नांवाची एक कंपनी निघाली आहे. ५ टक्क्यांपेक्षा अधिक नफा घ्यावयाचा नाहीं असें त्या कंपनीच्या भागीदारांनी ठरविलें आहे. कंपनीनें लंडनमध्ये एक मध्यवर्ती दुकान थाटून त्यांत इंग्लंडमध्ये घरगुती धंद्यांपासून उत्पन्न होणारा हरतऱ्हेचा माल विक्रीसाठी ठेवला आहे. या व्यवस्थेमुळे खेडयांतील कामकऱ्यांचा शहरांतील गिऱ्हाइकांशीं प्रत्यक्ष संबंध जोडला गेला आहे. इंग्लंडलाहि अशा धंद्यांची गरज भासते व तें त्याला सुव्यवस्थित मार्गांनी सक्रिय प्रोत्साहन देतें तर हिंदुस्थानानें त्या धंद्याला किती तरी अधिक मदत केली पाहिजे. पुणें या बाबतींत पुढाकार घेईल आणि त्यासाठी १५ हजारांचें भांडवल उभारून घरगुती धंद्यांना बाळसेदार स्वरूप देईल असा मला विश्वास वाटतो. असें झाल्यास सरकारी औद्योगिक खातेंहि आपल्यापरी त्याला मदत केल्याशिवाय राहणार नाहीं. "

# ग्वाल्हेर संस्थानाचा राज्यकारभार

( ले.—संस्थानी )

लेखांक ३ रा

गेल्या दोन लेखांकांतील विवेचनानें ग्वाल्हेर संस्थानाच्या सामान्य राज्यकारभाराबद्दल थोडीशी कल्पना वाचकांना आली असेल. या लेखकांत प्रस्तुत संस्थानांतील प्रजाजनांचा राज्यकारभारांत कांही अधिकारांश आहे किंवा कसें याचें दिग्दर्शन करण्याचें योजिलें आहे.

## नांवलौकिकासाठी लोकसभा

सन १९२१ म्हणजे मॉन्टफर्ड सुधारणेचा काळ. त्याच वेळीं कै. माधवमहाराजांनी आपल्या संस्थानांत 'मजलिस-इ-आम' या नांवाची एक लोकसभा स्थापन केली. ही सभा स्थापन करतांना महाराजांनी संस्थेचा उद्देश, 'संस्थानचे गेलेले हक्क व सवलती मिळविणें, संस्थान व ब्रिटिश राजसत्ता यांचे परस्परसंबंध अधिक सलोख्याचे करणें, संस्थानच्या राज्यकारभाराच्या सुधारणेंत मदत करणें, आणि संस्थानच्या परंपरा व रीतिभाति टिकविणें' असा जाहीर केला होता. वास्तविक हा उद्देश लोकसभेच्या ध्येयाला शोभण्यासारखाहि नाही इतका तो निष्क्रिय व प्रतिगामी आहे, हें चाणाक्ष वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल. संस्थानाच्या बाहेर जाऊन लंब्या लंब्या गप्पा मारणाऱ्या संस्थानिकांना स्वतःची टिमकी वाजविण्यास साधनीभूत होणाऱ्या अनेक पोकळ डौलाच्या गोष्टींपैकीच वरील गोष्ट आहे यांत संशय नाही.

मजलिस-इ-आममध्यें एकंदर ६९ सदस्य असतात. ते पुढील घटकांतून निवडलेले असतात. १० कौन्सिलर्स, ८ मजलिस-इ-कानूनचे सदस्य, २१ जिल्हाबोर्डे, ११ म्युनिसिपालट्या व टाऊन कमिटीज् २ औकाफ, २ बोर्ड साहूकारान, ५ जहागिरदार व १० इतर.

## सभाची सभाच सरकारजमा

या ६९ सदस्यांपैकीं १० तर बोलूनचालून सरकारी. मजलिस-इ-कानूनचे ८ सदस्य हांसुद्धां असतात. २१ जिल्हाबोर्डाचे व ११ म्युनिसिपालिट्यांचे असे ३२ सदस्यहि सरकारची मर्जी खप्पा न होईल असेच वागणारे असतात व असणार. कारण या संस्थाच मुळी सरकारी अधिकाऱ्यांच्या पूर्णपणें दावणींत असतात. जहागीरदार लोकांनाहि, त्यांच्या स्वार्थांत कोठे कांही बिघडलें नाही तर, कोठे इतकी लोकमताची चाड आहे? बोर्ड साहूकारान तर ट्रेड मेंबर व डेप्युटि कमिशनर ऑफ कस्टम्स यांच्या नजरेवर नाचणारे! तसलीच अधिकाऱ्यांच्या इशाऱ्यांतील ती औकाफ कमिटी. मिळून या चारी सदरांतील प्रतिनिधि वरील प्रतिनिधींच्या पंक्तींत बसणारे असल्यास आश्चर्य मानण्याचें कारण नाही! आता राहता राहिले १०. त्यांत कांही वकील तर कांही कोणी असे असतात. वकील लोकांची निवड पूर्वी बार असोसिएशन्सतर्फे होत असे. पण ही पद्धत आता रद्द झाली असून उज्जयिनी व ग्वाल्हेर येथे डिस्ट्रिक्ट जजाचे अध्यक्षतेखालीं ही निवड होते! कधीं कधीं या निवडणुकींत ज्ञातिनिष्ठ प्रश्न उत्पन्न होतात. त्यामुळे या मतदारसंघांतूनहि चांगला माणस निवडून येणें नेहमीं शक्य असतेंच असें नाही! पदवीधरांचा प्रतिनिधि बहुतेक पदवीधर सरकारी नोकर असल्यानें क्वचितच स्वतंत्र विचाराचा निवडला जाणें शक्य असतें. एकंदर अशा परिस्थितींत या लोकसभेंत सरकारी धोरणाला स्वतंत्र बुद्धीने विरोध करणारा एखादुसरा सभासद निघाला तरच फार समजावें. नाही तर सर्व सभाची सभाच सरकारजमा आहे असें समजण्यास हरकत नाही!

## निर्बल सभेचे नाव अध्यक्ष

सभेचें अध्यक्षस्थान आरंभीं कै. माधवमहाराज हे स्वतः स्वीकारीत. त्यांच्या निधनापासून राज्यशासक मंडळाचे उपाध्यक्ष सर अण्णासाहेब शितोळे हे स्वीकारीत असतात. पण दुर्दैवानें त्यांस सभासंचलनाची पूर्ण माहिती नाही. ठराव पास कीं नापास हें जाहीर करण्यासहि दुसऱ्यानें सुचवावें लागतें. एखाद्या वक्त्यास ५-१० मिनिटेंहि बोलण्यास परवानगी मिळत नाही. पण तीच लहर लागली तर कित्येकांस तासभर भाषण झोडण्याची संधि दिली जाते! या प्रकारावरून अध्यक्षांची जेवढी कींव करावी तेवढी थोडीच आहे! सभेची बैठक वर्षांतून फक्त एकदा फेब्रुवारी महिन्यांत लष्कर ग्वाल्हेर येथे भरते.

## लोकमत बरखास्त—सरकारमत हुकमखास

कोणत्याहि सदस्यास ठराव आणण्यासाठी राज्यशासक मंडळाची पूर्वमान्यता मिळवावी लागते.

सदस्यांना ठराव वाटेल त्या विषयावर आणतां येत नाही. ठराव आणण्याच्या बाबी मर्यादित रूपांत ठरवून टाकल्या आहेत. ठराव आणण्यास परवानगी न मिळाली तर मग कांहीं इलाज चालण्यासारखा नसतो. शिवाय राज्यशासक मंडळाने मान्य केलेला ठराव सभेच्या अध्यक्षांस कार्यक्रमांतून गाळतां येतो ! याहिपुढे कौन्सिल किंवा महाराज यांस 'व्हेटो'चा अधिकार असतोच! किंवा कित्येक असेहि प्रसंग घडले आहेत कीं, या सर्व मार्‍यांतून चुकून एखादा ठराव सहीसलामत पास झाला तरी तो सभेस न कळवितांहि रद्दींत टाकला जातो !!! सभेंत पसार झालेले ठराव राज्यकर्त्यांना सूचनात्मक असतात. संस्थानच्या अंदाजपत्रकाची चर्चा करण्याचा अधिकार सभेस नाही. सदस्यांना सरकारी अधिकार्‍याकडून प्रश्न विचारून माहिती मिळवितां येत नाही. किंवा विशिष्ट परिस्थितींत आपलें मत नमूद करतां येत नाही. अनेक ठिकाणीं धक्के—बुक्क्या खात एखादा अगदी किरकोळ स्वरूपाचा शिफारसवजा ठराव पास करून घेण्यापलीकडे सदस्याला कांहीएक करतां येत नाही. याशिवाय सभेत इतर कांही घडताहि नाही. अशा रीतीने लोकांचे वाटेल तें म्हणणें कायदेशीर रीतीने धुडकावून लावण्याची व आपलें धोरण वाटेल त्या परिस्थितींत दडपून देण्याची तरतूद ग्वाल्हेर दरबारने ही सत्ता स्थापन करतांना मोठ्या दीर्घ सूचनेनें करून ठेविली आहे.

एकंदरींत काय ? तर या लोकसभेत तत्त्वतः लोकोपयोगी किंवा राज्ययंत्रावर नियंत्रण घालण्याचें सार असलेला हेतु नाही. मग तो व्यवहारांत कसा व काय म्हणून दृग्गोचार होईल ? ब्रिटिश हिंदुस्थानांत प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळे झालीं तेव्हा आमच्या ग्वाल्हेर दरबारनेहि आपल्या बडेजावीसाठी 'लोकसभे'ची विटंबनारूप हो दोरी आपल्या गळ्याभोंवतीं अडकविली आहे येवढेंच !

**दडपशाहीने लोकमताची हाकलपट्टी**

प्रस्तुतच्या 'मजलिस-इ-आम' ची सुधारणा करण्याविषयी योजना ठरावरूपाने कै. महाराजांच्या कारकीर्दीपासूनच निरानराळ्या व्यक्तीकडून पुढे आणण्यांत येत आहे. पण या प्रयत्नाला सर्वदा वाटाण्याच्या अक्षता लाविल्या जातात. या ठरावाला सभागृहांत आजपर्यंत कधी प्रवेश मिळाला नाही. म्हणजे सभेच्या सुधारणेविषयी साधी चर्चा करण्याचीहि संधि राज्यशासक मंडळाने मिळूं दिली नाही !

१९२५ मध्ये मजलिसच्या कांही सदस्यांनी 'मजलिस-इ-आमसमिति' स्थापिली. त्यांत निरनिराळ्या मताचे लोक असतात. या समितीच्या बैठका मजलिसच्या दिवसांतच भरत असतात. १९२८ मध्ये सदर सभेने ( समितीने ) 'मजलिस-इ-आमच्या कार्यक्षेत्रांत व अधिकारांत वाढ करविण्याचा नेटाने प्रयत्न करण्याचा निश्चय केला. त्याचप्रमाणे एक खलिता तयार होऊन त्यावर निरनिराळ्या मतांच्या ( त्यांत सरदार जहागीरदारहि होते.) ३१ सदस्यांच्या सह्या घेण्यांत आल्या. खलिता मजलिसच्या बैठकींतच राज्यशासक मंडळास सादर करण्यांत आला. पण कौन्सिलनें त्या खलित्याची नुसती पोंच देण्याइतकेंहि दाक्षिण्य दाखविलें नाही. ११ महिने झाल्यावर दुसर्‍या बैठकीची वेळ येऊन ठेपली तेव्हा कांही तरी विक्षिप्त कारणें लावून खलिता अमान्य केला ! व त्यांतील कांही सह्या करणारांवर खलित्याचे ते मुख्य सूत्रचालक म्हणून मोठी तोहमत आणली व मजलिस-इ-आम-समितीस खेद प्रदर्शित करण्यास भाग पाडलें !! अशा प्रकारें लोकांची मागणी दरडावणीनें फेटाळून लावून खलित्याचा खुनशीपणाने सूडहि घेतला !

**दे. भ. पुस्तके व बाबू जगमोहनलाल बंडखोर !**

पुढील वर्षी सदस्यांनी दुसरा खलिता पाठविला. त्यांत राज्यशासकमंडळाने दाखविलेल्या कारणांचें योग्य असें खंडन केलें होतें ! अर्थात् हा खलिता पूर्वीच्यापेक्षा दुप्पट रागाने व त्वरेनें अमान्य करण्यांत आला ! या प्रकरणावरून मध्यभारताचे सुप्रसिद्ध पुढारी व मजलिसचे सदस्य दे. भ. त्रिं. दा. पुस्तके व भिंडचे वकील बाबू जगमोहनलाल यांचा इतमाम आता जवळ जवळ बंडखोराइतका ठेवण्यात येत असतो ! या उभयतांवर राज्यशासक मंडळाची हल्लीहि मोठी मेहेर ( ! ) नजर आहे.

याउप्परहि वरील दोन सदस्य व इतरहि कांही सदस्य मजलिस—सुधारणेचे ठराव दरवर्षी अद्यापहि पाठवीत असतात. पण त्या बिचार्‍यांना मजलिसचें दर्शन मात्र कधी होत नाही.

**प्रागतिक, अगतिक कीं परागतिक ?**

मजलिस-इ-आमची स्थापना होऊन आज १२ वर्षे झालीं. येवढ्या कालाचा तिचा इतिहास पाहिला तर आजपर्यंत कार्य असें कांहीच झालें नाही. १९२३–२४ मध्ये कै. माधव महाराजांनी सभेच्या माहितीसाठी अंदाजपत्रकासुद्धा वार्षिक अहवाल 'वाचण्याचा' उपक्रम केला होता. सरकारी सदस्य तेव्हा आपली वैयक्तिक मतेंहि ठरावांवर देत असत. पण आता या दोनहि गोष्टी बंद केल्या आहेत ! यावरून मजलिसने प्रगति तर केलीच नाही; पण ती आहे त्या जागेवरहि नाही. केली असेल तर

परागतिच ! सदस्यांनी या परागतीची जाणीव राज्यकर्त्यांना अनेकदां करून दिली. १९२५ त इल्लींच्या राज्यशासक मंडळाचे राज्यारोहणाचे प्रसंगीं प्रातिनिधिक सभांची वाढ करण्याचें अभिवचन देणारा जो जाहिरनामा लोकांचे तोंडावर टाकला गेला होता त्याचीहि यासंबंधीं वरचेवर आठवण करून देण्यांत येत असते. पण सर्व व्यर्थ होय ! आज प्रजाजनांना तरी इल्लींच्या राज्यशासक मंडळानें लोकांना कांही अधिकार देणें टोणग्याला आंचळ फुटण्याइतकें शक्य कोटींतील वाटत आहे! अस्तु.

**मजलिस--इ कानून**

मजलिस--इ कानून ही 'मजलिस-इ-आम'ची दुसरी बहीण. संस्थानांतील कायदे करण्यासाठीं हिचा अवतार आहे. राज्यशासक मंडळाचे दहाहि सदस्य व मजलिस--आमचे आठ 'निवडलेले' लोक मिळून ही बनली आहे. या आठ 'लोकां'ची निवडणूक म्हणजे निवडणुकीची केवळ थट्टा आहे. कारण, हे आठ इसम सरकारनेच नेमलेले असतात! मजलिस-इ-आममध्ये ज्याला जास्त मतें मिळतात, त्याला वाटल्यास या सभेवर घेतहि नाहीत. किंवा वाटल्यास मजलिस--आममध्ये अगदी कमी मतें मिळालेला पण सरकारच्या भरंवशाचा इसम असल्यास त्याला घेतले जातें !

**कायदे--कौन्सिलाची किंमत**

अशा रीतीने 'निवडलेल्या' या बिनसरकारी ऊर्फ लोक--प्रतिनिधींना सरकारी अधिकाऱ्यांच्या मांडीशीं मांडी ठोकन बसण्यापलीकडे कौन्सिल-सदस्यत्वाचें दुसरें वैभव नाहीं! आणि हा प्रसंग वर्षांतून एखाद्या वेळींहि येतोच असेंहि नाहीं! अलीकडे वर्ष--दोन वर्षांत कानून सभेची बैठकच नाहीं! ! बिनसरकारी गृहस्थांना या मंडळांत ठराव आणतां येत नाही हा याचा बहारीचा विशेष आहे ! सरकारी अधिकारीच लहर लागल्यास कांहीं थोडे ठराव शास्त्रार्थासाठी या नामधारी कायदेमंडळापुढे आणतात. त्यांना हमखास मान्यता अर्थात मिळतेच ! वास्तविक राज्यशासक मंडळ हें स्वतःच बहुतेक कायदे करतें ! येवढेंच कशाला? खात्यांचे प्रमुखच कित्येक नियम करतात; त्यांना राज्यशासक मंडळाचीहि मान्यता रीतसर मिळालेली नसते; तथापि त्यांना योग्यता थेट कायद्याची असते! ! यावरून मजलिस-इ-कानूनची कुवत काय व किती आहे हें जगजाहीर होत आहे!

# अक्कलकोट संस्थानांतील रयतेची स्थिति

देशांतील धान्याचे भाव गेल्या एकदोन सालापासून उतरल्यामुळे शेतकऱ्यांना सरकारी सारा देणें फार कठीण जात आहे. ब्रिटिश मुलख व संस्थानी मुलूख हा एकमेकांत इतका गुरफटून गेला आहे कीं, कोणीकडे जरी 'फट्' असा आवाज झाला तरी त्याचा प्रतिध्वनी दुसरीकडे उठण्यास वेळ लागत नाही. संस्थानी मुलुखांतील प्रजाहि ब्रिटिश मुलुखांतील प्रजेपेक्षा कांही निराळी नाही. इतका प्रपंच करण्याचें कारण अक्कलकोट संस्थानांतील रयतेची स्थिती फार असह्याय्य झाली हें होय.

संस्थान मजकुरी १९२९।३०सालीं दुष्काळामुळे पीक सहा आण्यांपेक्षा कमी आलें म्हणून संस्थानच्या अधिकाऱ्यांनी ज्या ज्या गांवांतून तक्रारी आल्या त्या त्या गांवास साऱ्याची तहकुबी दिल्याचें जाहीर केलें; पण त्यापासून शेतकऱ्यांचा व्हावा तसा फायदा झाला नाही. १९३१-३२सालींहि तीच स्थिति कायम होती. संस्थानांत पावसाचें मान नेहमींच कमी असल्याने पिकें यावीं तशीं येत नाहीत. १९३१--३२सालीं हि पीक सहा आण्यांच्या खाली होतें. तेव्हा पुनः साऱ्याची तहकुबी मिळावी म्हणून रयतेने फार खटपट केली. संस्थानी अधिकाऱ्यांनी ३१।३२ सालचा सारा भरा, मग पाहूं असें सांगितलें; व कांही लोकांनी जेव्हां सारा दिला तेव्हा त्यांना मागील सालच्या म्हणजे थकलेल्या बाकीबद्दल पावती देण्यांत आली. त्यामुळे चालू सालचा बोजा त्यांच्यावर बसलाच. मागील बाकी देण्यास त्राण नाही म्हणून व चालू सालीं धान्याचे भाव बेसुमार उतरल्यामुळे लोकांजवळ पैसा नाही म्हणून व पीकहि चांगलें आलें नाही, म्हणून तेथील रयतेने अधिकाऱ्यांकडे तहकुबीची मागणी केली असता तिकडे दुर्लक्ष करण्यांत आलें. विशेषतः मंगरूळ भागांतील रयतेची स्थिति फार नाजूक झाली असल्याने तेथील पुढारी श्री. रंगनाथ गोविंद पुजारी यांनी १९३१ मध्ये रयतेची परिस्थिति कशी आहे याची हकीगत श्रीमंत राणीसाहेब व मुंबई सरकारच्या राजकीय खात्याचे सेक्रेटरी यांच्याकडे तारेने कळवून सारातहकुबीची मागणी केली होती. श्रीमंत राणीसाहेब अगर सरकारी अधिकारी यांच्याकडून अर्जात लिहिलेल्या हकीकतीबद्दल इनकार आला नसल्याने रयतेची हकीकत न्याय्य होती असें अनुमान काढण्यास हरकत नाही. वरील अर्जात पुढील गोष्टींचा उल्लेख होता. (१)

आजूबाजूच्या ब्रिटिश तालुक्यापेक्षा संस्थानांत शेतसारा जबर आहे (२) संस्थान मजकुरीं आठ आण्यांपेक्षा पीक अधिक आलें नाहीं. (३) संस्थानांतील शेतसारा वसुलीचे मार्ग दडपशाहीच्या स्वरूपाचे असल्याने ते थांबवावे नमुन्यादाखल एक दोन गोष्टींचा उल्लेख करण्यासारखा आहे. लोकांचीं दु ती जनावरें जप्त करणें, बैल व गाडी नेणें, पिण्याचे पाणी बंद करणें इत्यादि. (४) ब्रिटिश मुलखांतहि शेतसाऱ्याची तहकुबी मिळाली असल्याने या गोष्टीचा विचार करावा तसेंच (५) प्रजेच्या गाऱ्हाणीं काय आहेत हें सरकारी अधिकाऱ्यांपुढे योग्य मार्गाने ठेवण्यासाठी प्रजापरिषद भरविण्यास परवानगी देण्यांत यावी.

वरील मागणींतील कांही बाबींचे स्वरूप किती साधें आहे याची सहज कल्पना येण्यासारखी आहे. असल्या मागणीस संस्थानी अधिकाऱ्यांनीं नाट लावून सारा वसूल करण्याचें आपलें व्रत चालविलें आहे. सारा वसूल करण्याचा एक अजब मासला देण्यासारखा आहे. मंगरूळचे रा. श्रीपत गोविंद पुजारी यांच्यावर सारा भरण्याच्या नोटीसा गेल्या फेब्रुवारींत बजावण्यात आल्या. सदर गृहस्थांनी आपला सारा अगोदरच भरला असल्याने त्यांनी ज्या जमिनी आपल्या ताब्यांत नाहीत त्याचा सारा भरण्यास आपण तयार नाही असा जबाब दिला. एवढ्याने अधिकाऱ्यांचें समाधान झालें नाहीं. अधिकाऱ्यांनी गांवांतील ३०।४० कुळांवर सारा भरण्याच्या नोटीसा काढल्या, व सारा न भरल्यास जमिनी खालसा केल्या जातील अशी ताकीदहि दिली. मंगरूळांतील १५।२० खातेदारांकडून सारा वसूल झाला नसल्याने त्यांच्या जमिनीहि खालसा झाल्या हें सांगण्याचें कारणच नाही. श्री. पुजारी गांवांतील कर्तेसवर्ते गृहस्थ असल्याने व प्रजेच्या चळवळींत यथायोग्य भाग घेणारे असल्याने त्यांच्यावर अधिकाऱ्यांचा डोळा होताच. खातेदारांना सारा देऊं नका अशी चिथावणी देणारे हेच गृहस्थ आहेत हे लक्षांत ठेवून अधिकाऱ्यांनी त्यांच्यावर लँड रेव्हिन्यू कोड कलम १५७ प्रमाणे खटला भरला. पण हें कलम टिकणार नाही म्हणून मामलेदारांनी खालसा झालेल्या जमिनींतील पीक नेलें म्हणून त्यांच्यावर व त्यांचे बंधू यांजवर चोरीचा आरोप ठेऊन त्यांस अडकवून ठेवलें. गेल्या फेब्रुवारीच्या १० तारखेस त्यांना अटक झाली. पण त्यानंतर एक एक हजाराचा जामीन घेण्यांत येऊन त्यांची नुकतीच सुटका झाली. खटल्याची चौकशी लौकरच होणार असल्याने त्यांत कोणत्या कोणत्या स्वरूपाचा पुरावा येणार हें कळेलच. पण संस्थानी अधिकाऱ्यांनी कांही तारतम्य दाखवून व आजूबाजूची परिस्थिति पाहून शेतसाऱ्याची तहकुबी देण्याची योजना केल्यास प्रजेमध्ये असंतोष वाढणार नाही. कित्येक संस्थानिकांनीहि साऱ्याची सूट दिल्याचे संस्थानी अधिकाऱ्यांस विदित झालेंच असेल. तेव्हा त्यांनी याचा पूर्ण विचार करून काय तें ठरवावें. तसेंच लोकांची प्रजापरिषदेची साधी मागणी मान्य करून व लोकांच्या तक्रारी दूर करून प्रजेचा दुवा घ्यावा एवढीच प्रजेतर्फे आमची त्यांस सूचना आहे; संस्थानचा कारभार रीजन्सीमार्फत चालला असल्याने श्रीमंत राणीसाहेबांनीं रीजंट या नात्याने या कामी मन घालून योग्य तो भलाईचा मार्ग स्वीकारावा.

# संस्थानिक व हिंदी लोक यांचें खडाष्टक

संयुक्त राज्यघटनेच्या वाटेंत इंग्रज मुत्सद्यांनी अनेक विघ्नें उत्पन्न करून ठेविलीं आहेत. तथापि सदर विघ्नें मोठ्या मुष्किलीने तुडून संयुक्त राज्यघटना कदाचित् प्रचलित झाली तरी तेंहि स्वराज्याच्या खऱ्या उपभोगास एक जबरदस्त विघ्नच होऊन राहणार आहे. कारण त्या पद्धतीप्रमाणे मध्यवर्ती कायदेमंडळें अस्तित्वांत येतील व त्यांत छोटे मोठे हिंदी संस्थानिक किंवा त्यांचे प्रतिनिधि नव्यानेच झळकूं लागतील. ब्रिटिश कायदेमंडळांतून हिंदु सभासदांना मुसलमान सभासदांची धास्ती वाटते. मुसलमानांत अद्यापि देशाभिमान व्हावा तसा उत्पन्न झाला नसून ते बहुधा देशहितापेक्षा ज्ञातिहिताकडेच लक्ष देऊन वागत असल्यामुळे, देशहिताच्या कार्यांत त्यांजकडून हिंदु बांधवांना पुष्कळ वेळां मदत मिळत नाही; परंतु मुसलमान कांहीं म्हटलें तरी हिंदी प्रजाजनांपैकींच असल्याने हिंदूंचें सुखदुःख तेंच मुसलमानांचें सुखदुःख अशी परिस्थिति वारंवार उद्भवून, उभयतांनी एकजुटीने सरकारास तोंड दिल्याचीं कित्येक उदाहरणें दाखवितां येतील. परंतु तो न्याय तितका संस्थानिकांना लागू पडणार नाही. कारण हिंदी संस्थानिक हे हिंदी आहेत, पण हिंदु-मुसलमानांप्रमाणे ब्रिटिश सरकाराचे प्रजाजन नाहीत. त्यांचा हितसंबंध अगदी वेगळा आहे, किंबहुना कित्येक बाबतींत हिंदी लोकांशीं त्यांचा हितविरोधहि आहे असें म्हटलें तरी चालेल.

राज्यकर्ते ही एक स्वतंत्र जात मानल्यास हिंदी संस्थानिकांची गणना इंग्रज राज्यकर्त्यांत करावी लागेल. त्या दृष्टीने त्यांचे व इंग्रज राज्यकर्त्यांचे हितसंबंध एक आहेत. इंग्रज लोक हिंदुस्थानांत सत्ताधारी आहेत, हिंदी संस्थानिकहि आपापल्या राज्यांत सत्ताधारी आहेत. इंग्रज लोकांना आपल्या हातची सत्ता सुटूं द्यावयाची नाही, संस्थानिकांनाहि आपल्या हातची सत्ता सुटूं द्यावयाची नाही. इंग्रज लोकांना आपल्या सत्तेचें हरण हें स्वतःचें मरण वाटतें, संस्थानिकांनाहि आपल्या सत्तेचें हरण हें स्वतःचें मरणच वाटतें. याहीपुढे जाऊन असेंहि म्हणण्यास हरकत नाही कीं, हें सत्तेचें मरण आपल्या डोळ्यांनी पाहण्यास इंग्रज लोक एक वेळ कबूल होतील; परंतु संस्थानिक मात्र सहसा कबूल होणार नाहीत. कारण इंग्रजांचा हिंदुस्थानावरील अंमल एका व्यक्तीचा नसून समुदायाचा आहे. सामुदायिक सत्तेची वांटणी करून म्हटल्यास ती व्यक्तिमात्रास अत्यंत अल्प अंशाने लाभेल. पण संस्थानिकांच्या वैयक्तिक अमलाचें तसें नाही. एक संस्थानिक घेतला तर सोळा आणे सत्तेचा तो एकटाच मालक असतो. तो रंकाला राव करील, प्यादाला फर्जी बनवील किंवा सावाला सुळावर चढवील. तो श्रीमंताच्या घरावरून गाढवाचा नांगर फिरवील व गरीबाच्या दाराशी हत्ती झुलवील. 'ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी। आढ्योऽभिजनवानस्मि। कोऽन्योऽस्ति सदृशो मया।' हें श्रीमद्भगवद्गीतेंतील वचन जर आज कोणास तंतोतंत लागू पडत असेल तर ते आमच्या हिंदी संस्थानिकाला.

राजे पंचम जॉर्ज हे साऱ्या ब्रिटिश साम्राज्याचे बादशहा खरे; पण त्यांचे दोस्त किंवा मांडलिक म्हणविणाऱ्या हिंदी संस्थानिकांची व राजेरजवाड्यांची सत्ता त्यांच्यापेक्षाहि व्यावहारिक दृष्ट्या अधिक आहे. जॉर्ज बादशहांची सत्ता साऱ्या इंग्रज लोकांत सारखी वांटली गेली असल्यामुळे, जे राजकीय हक्क हिंदी लोकांस देण्यास इंग्रज लोक पूर्वीच तयार झाले ते संस्थानिकांनी आपल्या प्रजाजनांच्या स्वाधीन अद्यापिहि केले नाहीत याचें इंगित तरी हेंच होय! हिंदी राजेरजवाड्यांच्या सत्तेची सर जगांतील फारच थोड्या राज्यकर्त्यांस येईल याची जाणीव आमच्या बहुतेक संस्थानिकांना आहे काठेवाडांतील नवानगरचे माजी महाराज रणजितसिंग याच वर्गांतील होत. ते नरेंद्रमंडळाचे चॅन्सेलर होते. नरेंद्रमंडळाच्या बैठकींत गेल्या महिन्यांत दिल्ली येथे भाषण करतांना फेडरेशनचें नांव काढतेवेळीं नवानगरच्या महाराजांच्या अंगांत कापरें भरल्यासारखें झालें.

युरोपांत क्रिकेटपटु म्हणून गाजलेला हा एवढा मोठा खेळाडू, परंतु त्याने फेडरेशनच्या कल्पनेपुढे काकुळतीने हात जोडले! महाराज हिंदी पुढाऱ्यांना उद्देशून म्हणाले, 'सज्जनहो! देव तुमचें भलें करो. तुम्ही स्वराज्य मिळवा व सुखी व्हा. पण कृपा करून आम्हांला त्या संकटांत घालूं नका.' फेडरेशनमध्ये शिरल्यास आपली धडगत नाही अशी महाराजांची खात्री झाली होती त्यांना फेडरेशन ही चुलाण्यावर ठेवलेली कढई वाटत होती. त्या कढईंत संस्थानिक गाठडी बांधल्यासारखा एकदाचा येऊन पडला कीं, लोकशाहीची आंच सर्व बाजूंनी त्याला पोंचून तो वितळू

लागेल व त्याच्या राजेपणाचें कालान्तराने पाणी होईल, हे संकट नवानगरच्या महाराजांच्या डोळ्यापुढे उभें राहून आपल्या आक्राळविक्राळ आकाराने भेडसावीत आहे कीं काय असा त्यास भास होत होता. त्यानंतर महाराज लवकरच मृत्यु पावले. त्या मृत्यूचीं खरीं कारणें जनतेस कळलीं नसतीं तर हे क्रिकेटपटु महाराज फेडरेशनच्या धास्तीने दिवंगत झाले कीं काय अशीहि शंका कित्येकांनी घेतली असती!

पण रणजितसिंगांचें मत कांहीहि असले तरी इंग्रज मुत्सद्यांनी हिंदुस्थानास फेडरेशन द्यावयाचें ठरविलेंच आहे. ते फेडरेशनची इमारत उभारणार व त्या इमारतीच्या पायांत हिंदी लोक मागत असलेल्या स्वराज्याचा बळी बँडच्या आवाजांत समारंभाने पुरणार. त्यांनी हा बेत मनांतून योजून ठेवला असल्यामुळे व्हाइसरॉयांनी नवानगरचे माजी महाराज रणजितसिंग यांस नरेंद्र-मंडळाच्या बैठकींत दाबून त्यांच्याबरोबर सर्व संस्थानिकांनाहि इषारा दिला, तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्याचा भावार्थ पुढीलप्रमाणे सांगता येईल. 'संस्थानिकांनो! तुम्ही आपल्याभोवतीं नीट डोळे उघडून पाहा. ज्या राजसत्ता मेरूप्रमाणे अचल समजल्या जात होत्या, त्या कालाच्या तडाख्यांत सांपडून केव्हाच धुळीस मिळाल्या. त्यापुढे तुमचे सामर्थ्य तें काय! आमच्या सत्तेचें छत्र तुमच्या मुकुटावर आम्हीं धरले असल्यामुळे तुम्ही हे दिवस पाहिलेत तरी. नाहींपेक्षा केव्हाच धुळीचे दिवे खात गेला असतां. यास्तव शाश्वतीच्या खोट्या भ्रमांत न राहतां त्यांतल्या त्यांत जिवंत राहण्याचा तुम्हास अधिक श्रेयस्कर मार्ग फेडरेशन हाच असल्याचे ओळखून तो बऱ्या बोलाने पत्करा. असें न कराल तर अविचाराने आपलें सरण आपल्याच हातांनी रचल्याचे पातक जोडाल'.

व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनी संस्थानिकास दिलेला वरील इषारा अत्यंत धूर्तपणाचा व मुत्सद्देगिरीचा आहे. त्याप्रमाणे हिंदी संस्थानिक वागल्यास त्यांत त्यांच्या सत्तेचा व इंग्रजी सत्तेचाहि निभाव आणखी कित्येक वर्षे लागणार आहे. संस्थानिकांनीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, त्यांना जसे राज्यकर्ते या नात्याने आपल्या हद्दींत दिमाखाने नांदावयाचें आहे, तसेंच इंग्रज लोकांनाहि खालसा मुलुखांत आपला अंमल टिकवून धरावयाचा आहे. म्हणून 'एकमेकां सहाय्य करूं। अवघे धरूं सुपंथ' या तुकोबारायाच्या उक्तींतील प्रथम चरणास अनुसरून विलिंग्डनसाहेबांनी दिल्लीस जमलेल्या संस्थानिकांना बोधामृताचें बोंडलें पाजलें आहे. आता नवानगरच्या महाराजासारख्यांना धास्ती पडली आहे ती अगदींच अवास्तव आहे असें नाही. संस्थानिक फेडरेशनमध्ये आले कीं, स्वतःच्या मुलतानशाहीकडे व एकतंत्री कारभाराकडे पाहून त्यांचें मन त्यांनाच खाणार. ते किंवा त्यांचे आश्रित दिल्लीच्या राजधानींत किंवा सिमल्याच्या शिखरावर कौन्सिलच्या व असेंब्लीच्या बैठकींत लोकसत्ताक पद्धतीने कायदेकानूंच्या व इतर कामकाजांच्या वाटाघाटी करावयास जाणार व तेथून आपल्या संस्थानांत परत आले कीं तोंडांतून निघेल त्या वाक्याला वेदवाक्य समजून शिरसावंद्य मानण्यास आपल्या प्रजाजनांना सांगणार. असें हें दुटप्पी वर्तन ते किती दिवस चालू ठेवतील?

त्यांना आपल्या वर्तणुकींत सुसंगतपणा आणण्याकरिता लोकशाही पद्धतीचा पायंडा आपल्या राज्यांत पाडून स्वतःच्या मुलतानी सत्तेस हळूहळू अस्ताचलास नेण्यावांचून गत्यंतरच राहणार नाही. पण याखाली पांच-पंचवीस वर्षे किंवा कदाचित् पाच-पन्नास वर्षेंहि सहज लोटतील. ही मुदत इंग्रज लोकांच्या दृष्टीने काय थोडी झाली! त्या काळात इंग्रज लोक संस्थानिकांची मदत घेऊन व मध्यवर्ती कायदेमंडळांत आपल्या बाजूनें बहुमत कायम ठेवून हिंदी प्रतिनिधींच्या मतास पायाखालीं दडपून टाकतील व ब्रिटिश हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या मर्जीप्रमाणे हाकतील. मध्यवर्ती सत्तेतील कांही खातीं पांढऱ्या खलित्यांत हिंदी लोकांच्या स्वाधीन केल्यासारखीं दिसत आहेत. पण हिंदी लोकांच्या मताचा जोर कायदेमंडळांत चालला तर तीं खातीं त्यांच्या हातीं येणार. नवीन योजनेप्रमाणे मध्यवर्ती कायदेमंडळांत संस्थानिकांची भरती होणार असल्याने ते आपल्या स्वार्थाकरिता किंवा सार्वभौम सरकारची मर्जी सुप्रसन्न राखण्याकरिता सरकारच्याच धोरणाची साथ करतील व हिंदी लोकांस नवे मिळणारे राजकीय हक्क पचूं देणार नाहीत.

तथापि याहिपेक्षा संस्थानिकांना आपला खरा स्वार्थ एकंदरीने संयुक्त राज्यघटनेच्या बाहेर राहण्यांतच आहे असें वाटतें. संयुक्त राज्यघटनेंत शिरल्यानंतर वर लिहिल्याप्रमाणे कित्येक संस्थानिकांना मनलज्जेकरिता नसे तरी जनलज्जेकरिता आपापल्या राज्यांत कायदेमंडळें स्थापून स्वतःच्या अनियंत्रित सत्तेवर प्रजाजनांचें नियंत्रण बसवून घेणें भाग पडेल अशा रीतीने त्यांच्या सत्तेला एकदा ही कीड लागली कीं लोकमताच्या वाढत जाणाऱ्या शक्तीपुढे नमून त्यांजवर स्वतःच्या हातची बहुतेक सर्व सत्ता गमावण्याचा प्रसंग क्रमाक्रमाने येईलच

म्हणून नवानगरच्या महाराजासारखे संस्थानिक म्हणणार ' ही पंचाईत आम्हांला सांगितली कोणीं ? फेडरेशनमध्ये शिरण्याचा जर हा परिणाम असेल तर तें फेडरेशन आम्हांला हवें कशाला ? म्हणून त्या फेडरेशनमध्ये आम्हांला यावयाला नको व आपलें राजेपण गमवायलाहि नको. कारण त्यावांचून आज आमचें मुळीच अडलें नाहीं ! ' संयुक्त राज्यघटनेला बऱ्याच हिंदी संस्थानिकांचा विरोध याच विचारसरणीनें होत आहे. पण इंग्रज सरकारला आपली सत्ता त्यांच्या मदतीनें अशीच कित्येक वर्षे टिकवावयाची असल्यामुळे व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन त्यांची धाकदपटशानें अगर गोडीगुलाबीनें समजूत घालण्याचा प्रयत्न करीत आहेत.

संयुक्त राज्यघटनेंत शिरण्यास मोठमोठे संस्थानिक जसे बिचकत आहेत तसें त्यांचें आगमन हिंदी लोकांनाहि भयप्रद वाटत असल्याचें वर सांगण्यांत आलेंच आहे. पण त्याच्या कारणांचा अधिक खुलासा करणें आवश्यक होय. ब्रिटिश हिंदुस्थानांत भावी सुधारणा अमलांत येईल तेव्हा प्रांतांची सत्ता प्रांतिक सरकाराकडे व देशाची सत्ता मध्यवर्ती सरकाराकडे अशी सत्तेची विभागणी हल्लींपेक्षांहि अधिक ठळकपणें व्हावयाची आहे. देशी संस्थानें संयुक्त घटनेंत आलीं म्हणजे त्यांना प्रांताप्रमाणेंच हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराचे घटक समजलें जाईल. पण त्यांची सत्ता मात्र प्रांतांइतकी मर्यादित राहणार नाही. प्रत्येक प्रांतांत प्रांतिक सरकारावर कांही मर्यादेपलीकडे मध्यवर्ती सरकारचा अंमल चालणारच. पण संस्थानिक मात्र प्रांतिक सरकार व हिंदुस्थान सरकार यांत वाटलेल्या दोनहि सत्तांचा उपभोग आपआपल्या राज्यांत घेण्यास मुखत्यार आहेत. इंग्रज सरकार व संस्थानिक यांजमधील वाटाघाटींत जेवढी सत्ता संस्थानिक मध्यवर्ती सरकारला देतील तेवढीच सत्ता मध्यवर्ती सरकार संस्थानांवर चालवील. याचा अर्थ असा कीं, मध्यवर्ती सरकारचा संस्थानाच्या राज्यकारभारांत हात घालण्याचा अधिकार मर्यादित, पण संस्थानिकांनी खालसा मुलुखाच्या कारभारांत हात घालण्याचा अधिकार मात्र ब्रिटिश प्रजाजनाइतका विस्तृत.

बरें, हा अधिकार संस्थनिकाऐवजी संस्थानिकांच्या प्रजाजनांना मिळता तर तें अतिक्रमण कांहींसें क्षम्य मानतां आलें असतें. कारण संस्थानी प्रजाजन व ब्रिटिश प्रजाजन यांची भूमिका समान व बरेच हितसंबंधहि समान असल्यामुळे संस्थानी प्रतिनिधींचे खालसांतील प्रतिनिधींना साहाय्य मिळण्याचा त्यांत संभव होता. परंतु संस्थानिकांनी आपल्या प्रजेस ब्रिटिश प्रांतांतील कायदेमंडळाच्या तोलाचीं कायदेमंडळें देण्याचें व त्या कायदेमंडळांनी निवडलेल्या प्रतिनिधींनाच हिंदुस्थानाच्या मध्यवर्ती कायदेमंडळांत पाठविण्याचें संस्थानिकांवर बंधन नसल्यानें संस्थानिक स्वतःच कायदेमंडळांत जातील किंवा आपल्या मर्जींतील बगलबच्चांस हजर राहावयास सांगतील. कांही संस्थानांत कायदेमंडळें आहेत तीं सोडलीं असतां बाकीच्या सर्व संस्थानांतर्फे वरीलप्रमाणेच भरती होईल. हे प्रतिनिधि म्हणजे राज्यकर्त्यांचे प्रतिनिधि. त्यांचें धोरण हिंदी लोकांपेक्षा ब्रिटिश सरकारशींच मिळतें राहणार. त्यांचें हें धोरण हिंदी लोकांस कसें जाचक होईल याची कल्पना चारदोन उदाहरणांवरून कोणासहि सहज करतां येणार आहे. मध्यवर्ती कायदेमंडळाकडे प्राप्तीवरील कर, आयातनिर्गत मालावरील कर, मिठाचा कर, इत्यादिकांत फेरबदल करण्याचा अधिकार आहे. पण यांपैकीं कोणताहि कर वाढला काय व कमी झाला काय, त्याचें सुखदुःख संस्थानिकांना नसल्यामुळें गव्हनर-जनरलाच्या नेत्रकटाक्षाबरहुकूम संस्थानिकांच्या मताचें पारडें अशा प्रसंगीं खाली वर होणार. ब्रिटिश मालावरील जकात वाढविण्याचें बिल कदाचित् कौन्सिलांत आलें कीं, संस्थानिक त्यास हटकून विरोध करणार, व मिठावरील कर जमाखर्चाच्या तोंडमिळवणीसाठीं कायम राहणें जरूर आहे अशी सूचना सरकारकडून मिळतांच हिंदी लोकमतास पायाखाली तुडवीत संस्थानिकांचे प्रतिनिधि सरकारच्या बाजूनें हात उचलतील. याच रीतीनें दडपशाहीचे कायदेहि सरकार त्यांच्याच बळावर हमखास पास करून घेईल. संस्थानिकांस मिळणारी ही सत्ता हिंदी लोकांच्या हितसंबंधाच्या आड येणारी आहे, इतकेंच नव्हे तर अन्यायाचीहि असल्यामुळे त्यांच्या आगमनाचें भय हिंदी लोकांना पडणें स्वाभाविक होय. तात्पर्य, संस्थानिकांना फेडरेशनमध्यें यावयास नको व ते फेडरेशनमध्ये आलेले हिंदी लोकांनाहि नकोत असें हें खडाष्टक आहे.

# पुणें शहर म्युनिसिपालिटी

## वसुली खात्यांतील अंदाधुंदी

( ले.—एक नागरिक )

तारीख ७ माहे ऑक्टोबर १९३२ चे ज्ञानप्रकाशाचे अंकांत "थकलेल्या बाकीबद्दल जबाबदार कोण ?" या मथळ्याखाली एक लेख प्रसिद्ध झाला होता. त्यामध्ये सन १९२५-२६ सालापासून दरसाल बाकी थकण्याचें प्रमाण कसें वाढत चाललें आहे, हें वार्षिक अहवालांतील आंकड्यांवरून लोकांच्या निदर्शनास आणलें होतें. तथापि याबाबत म्यु. ने कांहींच खुलासा अद्यापपर्यंत केलेला नाहीं. पुणें शहर म्यु. चा १९३१-३२ चा वार्षिक अहवाल नुकताच प्रसिद्ध झाला आहे. यामध्ये १९३१-३२ सालांत "रकम वसूल होण्यासारखी नाहीं" म्हणून म्यु. ने १९,३८८ रुपये मार्फीत टाकलेले आहेत. सदर सालीं बाकी १,४२,७५९ रु. दाखविण्यांत आली आहे. सन १९२५-२६ सालीं बाकी ७८,८१५ होती, व त्या सालीं १०,७५० रुपये वसूल होत नाहींत म्हणून मार्फीत टाकले आहेत. खालीं दिलेल्या आंकड्यांवरून म्यु.ने आतापर्यंत 'वसूल होत नाहीं' या सबबीखालीं किती रकम मार्फीत टाकली आहे हें दिसून येईल. सदर आंकडे फक्त १९२५-२६ सालापासून घेतले आहेत.

| सन | बाकी रु. | वसूल न करता मार्फीत टाकलेली रकम |
|---|---|---|
| १९२५-२६ | ७८,५१५ | १०,७५० |
| १९२६-२७ | ८१,४२३ | ८,०५१ |
| १९२७-२८ | ८८,०४९ | ८,१३८ |
| १९२८-२९ | ९३,९३४ | १०,९२७ |
| १९२९-३० | ९५,६२५ | ६,२८९ |
| १९३०-३१ | १,३०९४४ | १७,२८४ |
| १९३१-३२ | १,४२,७५९ | १९,३८८ |
| | | एकूण रुपये ८०,८२७ |

वरील आंकड्यांवरून गेल्या सात वर्षांत म्यु.ने ८०,८२७ रुपये वसूल करण्याची कांहींच तजवीज न करतां मार्फीत टाकले आहेत हें दिसून येईल. ज्या घरमालकाची बाकी थकलेली असते अशा घरमालकांवर घरपट्टीची बाकी वसूल करण्यासाठी नोटिसा, वॉरंटें व शेवटीं फिर्याददेखील लावण्याचा पूर्ण अधिकार म्युनिसिपालिटीस असतांना, वसुलीखात्याचे अधिकाऱ्यांनी कांहींच तजवीज वॉरंटें काढण्यापलीकडे न करतां एवढी मोठी रकम मार्फीत टाकावी, ही नागरिकांचे पैशाची उधळपट्टीच होय ! गेल्या तीन वर्षांपासून म्यु. ने रकम वसूल करण्यासाठी एकंदर वॉरंटांपैकीं प्रत्यक्ष अम्मलबजावणी किती वॉरंटांची केली हें पाहिलें असतां अत्यंत आश्चर्य वाटतें. १९२९-३० सालीं ८,१९३०-३१ सालीं ७ व १९३१-३२ सालीं १२ वॉरंट, एकूण एकंदर ३ वर्षांत २७ घरमालकांवर जप्तीचीं वॉरंटें काढण्यांत आलीं. परंतु जप्ती करून प्रत्यक्ष रकम किती वसूल झाली हे अहवालांत कोठेंच दाखविलें नाहीं. गेल्या सात वर्षांत ८०,८२७ रुपये वसूल न करता ते मार्फीत टाकण्यापूर्वी एकंदर किती घरमालकांवर फिर्यादी करण्यांत आल्या, व फिर्यादी लावल्यानेंहि रकम वसूल झाली नाहीं अगर कसें हें येथील चीफ ऑफिसर यांनी जरूर जाहीर करावें. म्हणजे वसुली खात्याचे अधिकारी कशा प्रकारें आपलें काम बजावात असतात हें लोकांचे निदर्शनास येईल.

कांहीं कांहीं घरमालकाकडून ११ वर्षांपासून थकलेली बाकी वसूल केल्याचीं उदाहरणें असतांना ज्या घरमालकांचेकडे एवढी रकम थकली त्यांचेवर म्यु.ने फिर्यादी कां लावल्या नाहींत याचा वसुलीखात्याचे अधिकारी खुलासा करतील काय ? दरसाल म्यु.चे कर न देणारा विवक्षित लोकांचा वर्ग असावा व नेमक्या अशाच घरमालकांना ही सवलत मिळत असली पाहिजे, अशी आम्हांस शंका येते. कारण दरसाल भाड्याचें उत्पन्न चांगलें येत असतांना घरपट्टी न भरतां रकमा मार्फीत टाकल्याचीं उदाहरणें आहेत. ही माहिती खोटी असल्यास चीफ ऑफिसर यांनी प्रत्येक घरमालकाचे नांवनिशीवार कोणाला किती रकमेची सूट मिळाली आहे, यांचे तयार केलेले तक्ते लोकांचे माहितीसाठी म्यु. गॅझीटमधून प्रसिद्ध करावे. म्हणजे म्युनिसिपालिटी अगर वसुली खात्याचे अधिकारी कसा कारभार करीत आहेत याची पूर्ण कल्पना येईल. म्यु. चे अधिकाऱ्यांचे हलगर्जीपणामुळें जी रकम वसूल झाली नाहीं व जी रकम मार्फीत टाकली आहे तिचा भुर्दंड इतर नागरिकांनी कां सोसावा हें समजत नाहीं. शेवटीं ही ८०,८२७ रुपयांची माफीत टाकलेली रकम, पुनः घरमालकाकडून फिर्यादी लावून वसूल केल्यास इतर नागरिकांवर हा बोजा बसणार नाहीं, व म्यु.चे उत्पन्नांतहि भर पडेल एवढें लिहून त्याप्रमाणें कोणती तरी म्यु. सभासदानें खटपट करावी व वसुली खात्यांतील ही अंदाधुंदी थांबवावी अशी विनंति करतों.

# या धरणीचा दाह केव्हा शांत होईल ?

लोकशाही हें इंग्रज सरकार व संस्थानिक यांजवरील समान संकट होय. त्या संकटापासून स्वतःचें संरक्षण करण्याच्या कामीं संस्थानिकांची आपणास हुकमी मदत मिळेल अशी खात्री इंग्रज मुत्सद्यांस असल्यामुळे त्यांनी संयुक्त राज्यघटनेचा घाट घालून त्यांत संस्थानिकांना ओढण्याचें ठरविलें आहे. भावी फेडरल असेंब्लीमध्ये संस्थानिकांची संख्या एकतृतीयांश भरली आहे. त्यांच्या बरोबरीने नसले तरी त्यांच्या खालोखाल असेंब्लींत सरकारचा तोल संभाळण्यास मुसलमान भाई आहेतच. असेंब्लीतील संस्थानिकांसुद्धा ३७५ सभासदांत मुसलमान ८२ आहेत. एकंदर संख्येशी त्या दोघांचे प्रमाण जवळ जवळ ½ पडते. त्याखेरीज युरोपियन, अँग्लो-इंडियन, जमीनदार, व्यापारी यांपैकीं पुष्कळजण आणी बाणीच्या प्रसंगीं सरकारची बाजू राखण्यास धावणारच. हे सर्व जाऊन उरलेले सभासद अगदीच थोडे आहेत व ते एकजात राष्ट्रीय पक्षाचे किंवा जहाल मताचे असतीलच असें समजण्याचें कारण नाहीं. म्हणूनच सर सॅम्युएल होअर यांनी कॉमन्स सभेंतील आपल्या भाषणांत वरिष्ठ कायदेमंडळांचा कारभार हिंदी जहाल पुढाऱ्यांच्या हातीं जाणार नाही अशी खात्री दिली आहे.

पांढऱ्या खलित्यांत केलेला हा एकच बंदोबस्त इतका कडक आहे कीं, त्यानंतर गव्हर्नर जनरलाकडे महत्त्वाचीं खातीं राखीव ठेवण्याची व त्याला विशेष अधिकारांनी शिरजोर बनविण्याची आवश्यकताच नाही. पण इंग्रज मुत्सद्यांची खबरदारी मोठी ! त्यांनी प्रांतिक स्वायत्तता हिंदी लोकांस देण्याचें व हिंदुस्थान सरकारचीं कांही खातीं हिंदी लोकांवर सोपविण्याचें ठरवितांच जणूं काय एखादा ढाण्या वाघ किंवा अजस्र सिंह मोकळा सुटावयाचा आहे असें सांग आणून भाले, बरच्या, रिव्हॉल्व्हर, तलवारी व बंदुकी इत्यादि संहारक-शस्त्रांनी सज्ज असलल्या रखवालदारांची त्याजभोवतीं गर्दी करून सोडली आहे. हा देखावा केवळ हास्यास्पदच नव्हे तर उपमर्दकारक व तिरस्करणीयहि आहे. त्यामुळे पांढऱ्या खलित्यावर एकटा राष्ट्रीय पक्षच काय पण नेमस्त, कारखानदार, सावकार व व्यापारीहि चिडले आहेत.

शनिवार ता. १५ रोजीं दिल्ली व कलकत्ता या दोन शहरीं दोन वजनदार परिषदा भरल्या. दिल्लीची परिषद हिंदुस्थानांतील अव्वल दर्जाच्या व्यापाऱ्यांची होती, व कलकत्त्याची परिषद नेमस्त पुढाऱ्यांची होती. दिल्लीच्या परिषदेचें अध्यक्षस्थान मुंबईचे सुप्रसिद्ध व्यापारी शेठ वालचंद हिराचंद यांनी मंडित केलें होतें व कलकत्त्यांतील नेमस्तांच्या परिषदेस मद्रासचे वयोवृद्ध व तपोवृद्ध गृहस्थ दिवाण बहादुर रामचंद्रराव हे लाभले होते. दिल्लीच्या परिषदेंत सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, सर चुनीलाल मेहता, खैतान, सिदवा इत्यादि तज्ज्ञांचीं भाषणें झालीं व कलकत्त्याच्या परिषदेंत ना. शास्त्री, सी. वाय. चिंतामणी, नारायणराव जोशी, हृदयनाथ कुंझरू इत्यादि राजकारणांतील दर्दी लोकांनी चर्चा केली. दिल्लीची परिषद व्यापारी, कारखानदार, भांडवलवाले यांची असल्यामुळे पांढऱ्या खलित्याचे पांढरे पाय हिंदी उद्योगधंद्यांना कसे मारक होणार आहेत हें त्यांनी स्पष्टपणें जगाच्या निदर्शनास आणिलें आणि कलकत्त्याची परिषद राजकारणी लोकांची असल्यामुळे तिने पांढऱ्या खलित्यांतील राजकीय सत्तेचा अंश संरक्षक बंधनांनी कसा काळा ठिक्कर पडला आहे हें सिद्ध केलें आहे.

अशा रीतीने पूर्व व पश्चिम या दोन दिशांना भरलेल्या वरील दोन परिषदांनी पांढऱ्या खलित्याला दोन भिन्न बाजूंनी पोखरून एक आरपार बोगदा पाडला व त्याच्या पोटांतील कृष्ण कारस्थान काळोखांतून उजेडांत आणिलें असें म्हणण्यास हरकत नाही. दिल्ली येथील व्यापारी फेडरेशनचे अध्यक्ष वालचंद शेठ हे टाटा कंपनीचे बडे भागीदार असून त्या व इतर अनेक नात्यांनी त्यांना उद्योगधंद्यांत येणाऱ्या अडचणी पूर्ण अवगत आहेत. या कारणाने हिंदुस्थानांत उद्योगधंदे सुरू करण्याच्या बाबतींत हे इंग्रज लोक व हे हिंदी लोक असा आपपर भाव न राहून उभयतांना सारखें लेखण्यांत येईल असें जें विलक्षण तत्त्व पांढऱ्या खलित्याने नव्यानेच मांडलें आहे त्याचा शेटजींनी खासा समाचार घेतला. या ठिकाणीं एक शंका मनांत उभी राहते ती ही कीं, हिंदी लोक स्वराज्यासाठी गेलीं साठ पाऊणशें वर्षे टाहो कां फोडीत आहेत, व इंग्रज मुत्सद्दी त्यांचा टाहो ऐकून तुम्हांस स्वराज्य देऊं असें सतत कां सांगत आले आहेत ? या शंकेचें उत्तर सरळ आहे. हिंदी लोकांना आपलें हित करण्याचें जसें साधेल तसें इंग्रज लोकांना साधत नाही व साधणार नाही म्हणून. इंग्रजांच्या हातांत जोंपर्यंत सत्ता आहे तों-

पर्यंत ते इंग्लंडच्या हितास आधी जपणार व मग हिंदुस्थानाचें हित पहाणार. ही स्थिति बदलून टाकण्याकरिताच हिंदी लोक हिंदुस्थानाला स्वराज्य मिळाल्यावर केव्हाहि आपल्या हितालाच अग्रस्थान देणार, व मग इतर राष्ट्रांच्या हिताकडे आपलें लक्ष वळविणार.

हिंदुस्थान व इंग्लंड यांचा ऋणानुबंध तीनशें साडेतीनशें वर्षांचा आहे.आणि गेल्या दीडशे वर्षांत तर उभयतांचें नातें जित व जेते या स्वरूपाचें जडलें आहे. त्या नात्याकड दृष्टि देऊन स्वतंत्र हिंदुस्थान इतर राष्ट्रांपेक्षा इंग्लडाला कदाचित जवळचें मानील व त्यास अधिक सवलतीने वागवीलहि.तथापि या सवलतींचे प्रमाण कितीहि वाढले तरी आपण स्वतः कोंडा खाऊन इंग्लंडला मांडा चारण्याचा मूर्खपणा हिंदुस्थान कधीहि करणार नाहीं.परंतु हा मूर्खपणा पांढऱ्या खलित्यानें हिंदुस्थानच्या गळ्यांत राजरोसपणाने बांधण्याचें ठरविलें आहे. होअर साहेबहि आपल्या भाषणांत म्हणतात ' हिंदुस्थानांत हे हिंदी लोक व हे इंग्रज लोक या आपपर भावाला बिलकूल थारा मिळणार नाही. इंग्रजांच्या कारखान्यांना हिंदुस्थानांत हिंदी कारखान्यांच्या बरोबरीने सवलती मिळतील. ज्या सवलती हिंदी कारखान्यांना त्याच सवलती इंग्रजी कारखान्यांना. त्या उभयतांत काडीमात्रहि फरक राहणार नाही. '

होअरसाहेबांनी इंग्रजी कारखान्यांना हिंदुस्थानांत देऊ केलेली ही सवलत त्यांच्या नागड्या स्वार्थाची द्योतक आहे असें कोणीं म्हटलें तर असला अन्यायाचा आरोप क्षणमात्रहि ऐकून घेण्यास होअरसाहेब तयार होणार नाहीत. ते पडले मोठे न्यायनिष्ठ ! जी सवलत इंग्रज कारखानदारांना व इंग्रजी मालाला हिंदुस्थानांत तीच सवलत हिंदी कारखानदारांना व हिंदी मालाला इंग्लंडांत ते देणार आहेत. इंग्रज कारखानदार व व्यापारी हिंदुस्थानांत येऊन आपले कारखाने काढतात व आपला माल खपवितात असें हिंदी लोकांस आढळून आल्यास हिंदी कारखानदारांनी व व्यापाऱ्यांनी इंग्लंडांत आपले कारखाने बेलाशक काढावे व आपला माल खपवावा त्याला होअर यांची मुळीच हरकत नाही.कारण जी सवलत इंग्रज कारखानदारांना व इंग्रजी मालाला हिंदुस्थानांत तीच सवलत हिंदी कारखानदारांना व हिंदी मालाला इग्लंडांत ! का आहे कीं नाही होअरसाहेबांच्या न्यायाचा काटा अगदीं धारवाडी !

होअरसाहेबांच्य धारवाडी काटयाच्या तोडीचा काटा आमच्यापाशींहि आहे. त्याने होअर यांनी न्याय जोखून द्यावा व घ्यावा. सर सॅम्युअल होअर यांना आम्ही अशी सवलत देतों कीं, इंग्लंडांतील कारखान्यावर व इंग्रजी मालावर हिंदी कारखान्यांनी जोराचें आक्रमण चालविलें आहे असें त्यांस वाटतें ना ? तर मग तुम्ही जबर जकातीच्या तोफा डागून हिंदी मालाची चाल खुशाल परतवा त्यांत हिंदुस्थानाचें कितीहि आर्थिक नुकसान झाले तरी तें सहन करण्यास हिंदुस्थान तयार आहे. त्याचप्रमाणे हिंदुस्थानहि इंग्लंडचा माल हिंदुस्थानांत येऊं लागला कीं त्याविरुद्ध आपला तोफखाना जय्यत ठवील व इंग्रजी मालाला पिटाळून लावील. जशास तसें (Reciprocity) हा न्याय लागू करण्यास होअर साहेब कबूल आहेतच. त्यांनी सांगितला तो न्याय जशास तसें या स्वरूपाचा आहे. आम्हीं सुचविलेल्या न्यायाचे स्वरूप तेच आहे. त्याअर्थी आमचाच न्याय लागू करून कसा काय चमत्कार होतो तो होअरसाहेबांनी जरूर पहावा !

होअर यांचा न्याय असा आहे कीं, तो तुल्यबळ अशा राष्ट्रांनाच झेपेल. दुर्बल हिंदुस्थानास तो मुळींच झेपणार नाही. इंग्रज लोकांनी हिंदुस्थानांत नाना प्रकारचे प्रचंड कारखाने उभारल्यास शंभराहूनहि अधिक वर्षे होऊन गेलीं आहेत. त्या कारखान्यांपुढे आपले कारखाने काढण्याची ज्यांना शक्ति नाही त्या हिंदी लोकांना इंग्लंडांत येऊन कारखाने काढण्यास किंवा आपला माल खपविण्यास सांगणें हें त्यांना त्यांच्या दुबळेपणाबद्दल खिजवून दुःखावर डागण्याप्रमाणेच निंद्य नव्हे काय? इंग्लंडशीं बरोबरी करण्याइतकी शक्ति हिंदी लोकांत व त्यांच्या कारखान्यांत असती तर हिंदुस्थानाला स्वराज्य हवें होतें कशाला ? तें सामर्थ्य नाही व संरक्षणावांचून हिंदी कारखाने निघू व जीव धरूं शकत नाहीत म्हणूनच हिंदुस्थान स्वराज्यासाठी रात्रंदिवस झुरत आहे हें भारतमंत्री म्हणविणाऱ्या होअरसाहेबांना दुसऱ्यांनी सांगावयास पाहिजे काय ?

इंग्लंड एवढा कारखानदारांतला अग्रेसर व बलाढ्य देश, पण त्याला सुद्धा अमेरिका, जर्मन यासारख्या राष्ट्रांपुढे व्यापाराच्या बाबतींत नांगी टाकावी लागल्यामुळे ओटाव्याच्या कराराने मान खाली घालून इंपीरियल प्रेफरन्सच्या ढालीमागे दडणें भाग पडले! ही इंग्लंडसारख्या बलाढ्य कारखानदार देशाची दुबळी स्थिति; तर आधींच सर्वथैव दुर्बळ, पंगू व परावलंबी असलेल्या हिंदुस्थानची अवस्था काय विचारावी ! इंग्लंडला उद्योगधंद्यांच्या संरक्षणाचा हक्क एकपट पाहिजे

असेल तर हिंदुस्थानाला त्याची गरज दसपटच काय पण शंभरपट मानली तरी ती कमीच आहे म्हणूनच शेठ वालचंद यांनी आपल्या भाषणांत शेती व उद्योगधंदे यांच्या संरक्षणाचा हक्क नैसर्गिक असून तो भावी सुधारणांत हिंदुस्थानास मिळाला पाहिजे असें जोराने प्रतिपादिलें आहे व इंग्लंडने आपला जहाजांचा धंदा व लँकेशायर येथील कापडाचा धंदा आपपरभावाच्या(discrimination) बळावरच भरभराटीस आणिला नाही काय असा त्यांनी बिनतोड सवाल टाकला आहे.

रेल्वेबोर्ड पार्लमेंटाच्या कायद्याने आगाऊ स्थापून घेण्याची घिसाडघाई पांढऱ्या खलित्याने केली आहे. त्यांतील इग्लंडचा कावा शेठजींनी चांगलाच चव्हाट्यावर आणिला आहे. आगगाड्या हे देशाचें मायपोट आहे. शेती व उद्योगधंदे भरभराटीस आणण्याची गुरुकिल्ली रेल्वेच्या हातीं आहे. तिच्यांत भांडवलहि ८०० कोटींचें गुंतलें आहे. तिचा ताबा हिंदी लोकांकडे आल्यास उद्योगधंद्यांच्या अभिवृद्धीस त्याची फार मदत होईल, शेतीची व कारखान्यांची उत्पादन शक्ति वाढेल आणि बेकारीला देशांतून तोंड काळेंच करावं लागेल. इतके अगणित फायदे हिंदुस्थानास लाभणार असल्यामुळे सदर खातें हिंदी लोकांच्या हातीं न लागू देण्याकरितांच पांढऱ्या खलित्याची सारी हुल्लड आहे. आज इंग्लंड हिंदी रेल्वेवर हवा तसा हात मारून घेत आहे. त्यांत बडे अधिकारी इंग्रज आहेतच; पण त्याखेरीज दरसाल कोट्यवधि रुपयांचा इंग्लंडचा माल रेल्वेकडे खपत आहे. पण सदर खातें नवीन राज्यव्यवस्थेप्रमाणे हिंदी लोकांच्या ताब्यांत आल्यास त्याजवरील नियंत्रण हिंदी दिवाणाकडे राहील व इंग्रजी कारखानदारांचा मलिदा बंद पडेल अशी इंग्रजांना भीति वाटत असल्यामुळेच रेलवेचा कारभार ठेवून मोहरबंद करण्याचा व्यूह रचण्यांत आला आहे असें शेठ वालचंद यांचें व दिल्लीच्या व्यापारी परिषदेचें मत आहे व तेंच खरें आहे.

सारांश, श्वेतपत्र हें हावऱ्या, संशयी व आपमतलबी बापाने करून ठेवलेलें दत्तकपत्र आहे. दागदागिने असतील ते माझ्या बायकोचे, सोनंनाणें असेल तें माझें, नोकरचाकरांवर हुकमत माझी, कोठीला कुलूप माझें, जामदारखान्याच्या किल्ल्या माझ्या जानव्याला, एका जमिनीचें बक्षिसपत्र एका मुलीच्या नांवचे व दुसऱ्या जमिनीचें उत्पन्न दुसरी मुलगी हयात आहे तोंपर्यंत तिचें आणि बाकीचा कारभार दत्तक मुलाने व तोहि माझ्या हाताखाली पाहावयाचा, अशी निरवानिरव दत्तविधानाच्या वेळीं केली असतां श्राद्धपक्ष घालण्याचा व पितरांच्या नांवाने पिंड पाडण्याचाच काय तो अधिकारी दत्तक पुत्र उरतो. त्याप्रमाणेंच नवीन सुधारणांचें आज काढलेलें चित्र आहे.

तें चित्र पाहून कलकत्याच्या परिषदेंत जमलेल्या नेमस्त पुढाऱ्यांचे हातपाय निराशेने अगदींच मोडल्यासारखे झाले. पांढऱ्याखलित्याच्या निषेधाचा ठराव नेमस्तांच्या परिषदेंत पास करण्यांत आला. त्यावर भाषण करताना ना. श्रीनिवास शास्त्री यांनी जोरजोराने भयसूचक घंटा वाजवून सुधारणांच्या नवीन कायद्यांत महत्त्वाचे फेरबदल न झाले तर हिंदुस्थानांतील असंतोष वाढेल, व कायदेभंगाची चळवळ डोकें काढल्यावाचून राहणार नाही असा इषारा दिला आहे. ना. शास्त्री यांचा हा इषारा खरा आहे. स्वराज्यचा अस्त झाल्यापासून गेली शें दीडशें वर्षे हिंदुस्थानांत एक प्रकारचा उन्हाळाच सुरू आहे. त्याचा कडकपणा दिवसानुदिवस वाढत आहे. जलाशय आटून गेले आहेत, अंगांतून घामाच्या धारा वाहात आहेत, सर्वांचीं तोंडे सुकलीं आहेत, उकाड्याने प्राण व्याकुळ झाले आहेत, धरणी तापली आहे व तिच्यांतून एकसारखी धग बाहेर पडत आहे. उष्ण वारे सुटले आहेत. अरण्यांत एकहि हिरवें पान दिसत नसून त्यांतील कित्येक झाडांना वणवा लागला आहे. अशा वेळीं जोराची पर्जन्यवृष्टिच पाहिजे ती झाली तरच या धरणीचा दाह शमेल व वणवा विझेल. नाहींपेक्षा सारेंच जंगल पेट घेईल. पण हें जंगल खात्यावरील अधिकाऱ्यांना कळेल तेव्हा.

# परराष्ट्रीय राजकारण

## इराणांतील तेलाचें भांडण

इराणांतील रॉकेल तेलाच्या खाणी सर्वस्वी ज्या कंपनीच्या हातीं आहेत त्या अँग्लो—पर्शियन ऑइल कंपनीच्या सर्व सवलती गेल्या ता २७ नोव्हेंबरला इराणी सरकारने रद्द केल्याचा हुकूम सोडला. ही बातमी जाहीर होतांच सर्वत्र खळबळ उडून गेली व विशेषतः ब्रिटिश सरकारने कंपनीचा कैवार घेऊन हा प्रश्न थेट लीग ऑफ नेशन्सच्या कौन्सिलपर्यंत नेऊन पोचविला, आणि कंपनी कांहीशी मागें पडून इंग्लंड व इराण हेच दोघे वादी प्रतिवादी म्हणून जगापुढे गेले. काही महिने दिसले हा चमत्कार कसा घडला याची हकीकत थोडी मनोरंजक आहे. ह्या प्रश्नाला प्रथमतः जेवढें उग्र स्वरूप आलें तेवढें शेवटपर्यंत टिकलें नाही. आणि शेवटीं कंपनीने 'इराणी सरकारशीं वाटाघाट करून अटी ठरवाव्या, अशा एक प्रकारची तडजोड होऊन हा इंग्लंड-इराणचा वाद तूर्त तरी मे महिन्यापर्यंत तहकूब करावा,' असा राष्ट्रसंघाच्या कौन्सिलने नेमलेल्या मध्यस्थामार्फत वादीप्रतिवादींत समेट झाला आहे. ह्या समेटाला राष्ट्रसंघाच्या कौन्सिलाने ३ फेब्रुवारीला मान्यता दिली. आता मे महिन्यापर्यंत ह्या वाटाघाटींतून काय निष्पन्न होणार इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले आहेत. मध्यंतरीं प्रस्तुतच्या वादाची पूर्वपीठिका पाहणें इष्ट होणार आहे.

### साठ वर्षांचा करार

इराण सरकारानें रद्द केलेला सवलतीचा करार २८ मे १९०१ रोजीं झाला विल्यम नॉक्स डार्सी या नांवाचा एक इंग्रज ऑस्ट्रेलियांतील सोन्याच्या खाणींवर गबर झाला होता. आपल्या संपत्तीवर एखादा किफायतशीर उद्योग करण्याच्या खटपटींत तो असतां एका इराणी मित्राकडून इराणमधील भूमिगत तेलाच्या सांठ्याची खबर त्यास लागली. त्याने नैसर्गिक गॅस, पेट्रोलिअम, ॲस्फॉल्ट आणि ओझोकेराइट अशा सर्व प्रकारच्या खनिज संपत्तीचा सर्वप्रकारचा मक्ता इराण सरकारकडून मिळविला. कास्पिअन समुद्रालगतचे पांच प्रांत वगळून राहिलेल्या सुमारें पांचषष्ठांश इराणावर या करारानें एका इंग्रजाला व्यापारी वर्चस्व मिळालें. हा करार साठ वर्षेपर्यंत अमलांत राहावयाचा असून त्यासाठीं तावडतोब इराण सरकारला फक्त वीस हजार पौंड रोख व वीस हजारांचे शेअर्स मिळाले करारांतील सवलतींप्रमाणें काम करण्याकरितां कंपनी स्थापन झाल्यास तिच्या निव्वळ नफ्यांतून शेकडा १६ टक्के इराण सरकारानें घ्यावे व कंपनीच्या मालावर जकात घेऊं नये अशा आणखी अटी त्या करारांतच होत्या. या वेळीं भावी भरभराटीची कोणालाच कल्पना नसल्यामुळे हा व्यवहार उभयपक्षीं परंतु विशेषतः इराणच्या दृष्टीनेहि किफायतशीर समजला गेला. डार्सीचे सर्व श्रम प्रथम फुकटच गेले. आणि डार्सी एक्स्प्लॉयटेशन कंपनी, डार्सी कन्सेशन सिंडिकेट अशा निरनिराळ्या नांवाखालीं त्यानें स्वतःचा व बर्मा ऑइल कंपनीचा मिळून पुष्कळ पैसा खर्च केला. शेवटीं १९०८ मध्ये त्याच्या प्रयत्नांना भरपूर यश आलें आणि जगांतील अत्यंत समृद्ध असें एक तैलक्षेत्र डार्सीला लाभलें. १९०९ मध्ये याचा फायदा घेण्याकरितां अँग्लो—पर्शियन ऑइल कंपनी या नांवाची २६ लक्ष पौंड भांडवलाची मोठी कंपनी स्थापन करण्यांत आली. तिच्याच हातीं आजहि इराणांतल्या तेलाच्या खाणी आहेत.

इराण देश बहुतांशीं वैराण असून त्यांत व्यापाराच्या सोयी व रस्ते नाहीत. हें लक्षांत घेतलें म्हणजे प्रस्तुत कंपनीला आपल्या धंद्याचा व्याप थाटण्यासाठी पाण्यासारखा पैसा ओतणें कसें जरूर होतें हें सहज लक्षांत येईल. तेलाच्या विहिरीं खणणें, विहिरींतून बाहेर काढलेलें तेल शुद्ध करणें, शुद्ध करण्याच्या सोईचे कारखाने असतील तेथपर्यंत तें मूळ विहिरींपासून जमिनींत नळ घालून नेणें, आपल्या नोकर लोकांच्या राहण्याची वगैरे व्यवस्था लावणें ह्या गोष्टी अत्यंत खर्चाच्या होत्या. वेळोवेळीं वाढत्या सांठ्यांचा शोध लागतांच त्याची तजवीज लावण्यासाठी कारखान्यांची बेसुमार वाढहि करावी लागली. या सर्व कारणांमुळे नियोजित भांडवलापलीकडे कंपनीच्या गरजा अमर्याद वाढल्या व १९१३च्या सुमारास त्यांना तीव्र स्वरूप प्राप्त झालें.

### इंग्रज सरकाराचें वर्चस्व

याच वेळीं ब्रिटिश आरमारासाठी तेलावर चालणाऱ्या एंजिनाची व्यवस्था करण्याचें घाटत होतें. अर्थात् आपल्याच एका इंग्रजाच्या इराणांतील तेलाच्या कारखान्याकडे सहजच ब्रिटिश सरकारचें

लक्ष वेधलें. भूगर्भशास्त्रज्ञांकडून तेथील प्रदेशाची पहाणी करून तो समाधानकारक ठरल्यामुळे कंपनीचे वीस लाख पौंडांचे शेअर्स खरेदी करून ब्रिटिश सरकारला तींत वर्चस्व मिळण्याची तजवीज १९१४ तील पार्लमेंटच्या कायद्यानें करण्यांत आली. ही रक्कम आतां पुष्कळच वाढली आहे. आणि ह्या परिस्थितींत अँग्लो—पर्शिअन ऑइल कंपनी आणि ब्रिटिश सरकार ह्यांचे हितसंबंध कसे एकरूप असले पाहिजेत हें ध्यानांत येऊन, परवाच ह्या वादांत वर सांगितल्याप्रमाणें कंपनीपेक्षां ब्रिटिश सरकारचेंच नांव कसें पुढे येणें अपरिहार्य झालें हेंहि लक्षांत येईल. अकरा वर्षांपूर्वीचे आकडे उपलब्ध आहेत. त्यांवरून पाहतां ऑर्डिनरी शेअर्सपैकीं एकदशांश शेअर्स केवळ ब्रिटिश सरकारचे आहेत. यांपैकीं पहिल्या वर्गाच्या प्रत्येक शेअरपाठीमागे दोन मतें व दुसऱ्या प्रत्येक पांच शेअरपाठीमागे एक मत अशीं मतें इंग्रज सरकाराच्या मुठींत आहेत. हे आंकडे सर ऑस्टेन-चेंबरलेन यांनी १४ ऑगस्ट १९२१ रोजीं हाऊस ऑफ कॉमन्समध्ये सांगितले असल्यामुळे त्यांच्या विश्वसनीयतेबद्दल प्रश्नच उद्भवत नाहीं. यानंतर प्रत्यक्ष रकमेंत वाढ झाली असण्याचा संभव आहे आणि तशी वाढ झाली नसली तरी मतदारांपैकीं बहुसंख्याकांचीं मतें इंग्रज सरकार वाटेल तशीं वांकवूं शकतात ही गोष्ट निर्विवाद आहे.

### आंतरराष्ट्रीय महत्त्व

हल्लींच इराणांतील तेलाचें उत्पन्न बरेंच मोठें आहे. परंतु कंपनीनें फारच थोड्या मुलुखांत तेलाच्या विहिरी चालू केल्या आहेत तोंच इराणचा नंबर तेलाच्या बाबतींत सर्व जगांत चौथा लागतो. अर्थात् सवलतीच्या मुलखांत आणखी विहिरींचे काम सुरू होतांच हा नंबर वर लागेल अशी अपेक्षा करण्यास मुळीच हरकत नाहीं. असें असतां इराण सरकाराने एकाएकी कंपनीला रद्दबातल ठरविल्यामुळे सर्वांचेंच धाबें दणाणलें असल्यास नवल नाही. अँग्लो—पर्शिअन ऑइल कंपनी आणि त्यांत बहुमतावर ताबा चालविणारें ब्रिटिश सरकार यांच्या व्यापारी हितसंबंधांवर या फर्मानामुळे गंडांतर येणार, एवढेंच नव्हे तर ज्या सांठ्याच्या जोरावर ब्रिटिश आरमाराच्या तेलाचा सर्व पुरवठा निर्वेध होत होता त्यालाहि खो मिळणार, या गोष्टी आतां उघड दिसूं लागल्या. एका अर्थानें इराण सरकारच्या उत्पन्नाचा बराच मोठा हिस्सा ह्या कंपनीकडून मिळणाऱ्या नफ्याच्या वांट्यावर अवलंबून असल्यामुळे त्या बाबतींत इराण सरकार निष्कारण आततायीपणा करणार नाही हेंहि तितकेंच स्पष्ट होतें. अशा एकंदर परिस्थितींत हा वाद प्रथम उपस्थित झाल्याचें जाहीर होतांच एक प्रकारें नवीन आंतरराष्ट्रीय प्रश्न उद्भवला अशीच सर्वांची भावना झाली. हा लढा इंग्लंडासारखें बलाढ्य राष्ट्र आणि इराणसारखें कोपऱ्यांतील राष्ट्र यांमध्ये उपस्थित झाल्यामुळे त्याला आशियांतील लोकांच्या दृष्टीने कांहीसें महत्त्व प्राप्त झालें. आणि लॉर्ड कर्झन यांनी इंग्रज व हिंदुस्थान यांचे उपकारकर्ते व उपकृत असे परस्परांचे संबंध वर्णन करतांना इंग्रज आले नसते तर हिंदुस्थानची स्थिति कशी झाली असती याचें उदाहरण म्हणून चीन, अफगाणिस्थान, अरबस्थान यावरोबरच इराणचें नांव सांगितलें असल्यामुळे इंग्रज व इराण यांचा हा व्यापारविषयक व तदनुषंगानें उद्भवलेला राजकीय विरोध ही थोडीशी कौतुकाची बाब ठरली.

### प्रस्तुत वादाचें मूळ

आरंभीच्या करारानें इराण सरकाराला मिळावयाच्या रकमेची आकारणी कशी करावयाची हा काय तो मुख्य वाद आणि तो वारंवार उपस्थित होत असे. कंपनीचें उत्पन्न काय आणि त्यांतून निव्वळ नफा काढण्यापूर्वी कोणते खर्च मंजूर करावेत याबद्दल पुष्कळ चर्चा होऊन फेब्रुवारी १९३२ मध्ये कांही नक्की ठरविण्यासाठी १९३१ चे हिशेब कंपनीनें इराण सरकारकडे पाठविले. १९३० च्या हिशेबांत बारा तेरा लाख पौंडांची उलाढाल दाखविली असून १९३१च्या हिशेबांत फक्त ३ लाख पौंडच दर्शविले गेले ! याचें सरकारला अर्थात् आश्चर्य वाटलें व त्यानें सर्व हिशेब बारकाईनें पाहिल्याशिवाय त्या सालची रक्कम स्वीकारण्याचें नाकारून आपल्या हिताच्या दृष्टीने करारांची नवीं कलमें आपण सुचविणार आहोंत असें कंपनीच्या प्रतिनिधीला कळविलें.

### इराण सरकाराची तक्रार

पूर्वीचा करार रद्द करण्याचीं कारणें जीं इराण सरकाराने दिलीं आहेत तीं पाहिली म्हणजे त्यांच्या तक्रारींचें स्वरूप लक्षांत येतें त्यांचें म्हणणें असें—

(१) पहिला डार्सी करार इराणच्या मनाविरुद्ध दडपशाहीनें केला गेला.

(२) इराण सरकारला द्यावयाची रक्कम आकारतांना इराणला अन्याय होतो.

(३) महायुद्ध चालू असतांना इराणला कांहीच देण्यांत आलें नाहीं.

(४) अँ. प. ऑइल कंपनीनें सरकारी तपासनीसांना हिशेब तपासूं दिले नाहींत.

(५) कंपनीनें इराणला इन्कमटॅक्स देण्याचें नाकारलें.

( ६ ) कंपनीच्या हिशेबांत इराणाबाहेर चाल-विलेल्या तेलाच्या शोधाकरितां मोठ्या रकमा खर्च पडतात. त्यामुळे निष्कारण नफा कमी दिसतो. हा इराणाला अन्याय घडतो.

( ७ ) इराणांत कंपनी तेल फार महाग विकते.

( ८ ) इराणांतील तैलक्षेत्रांपेक्षां बाहेरचीं क्षेत्रें तयार करण्याकडे कंपनीचें अधिक लक्ष आहे.

( ९ ) कंपनीकडून कोणीं येऊन तेहेरोन येथे सरकाराशी वाटाघाट करावी असे बोलावणें केले असताहि कोणी आले नाही. तेव्हा करार रद्द करण्याशिवाय गत्यंतरच राहिलें नाही.

( १० ) कंपनी नोकरांना प्रमाणाच्या बाहेर जास्त पगार देते व अवांतर अमर्याद खर्च करते. त्यामुळेहि नफ्याचा आंकडा रोडावतो.

( ११ ) इराणी नोकर ठेवण्याची अट कंपनीनें पाळली नाही.

(१२) कराराने कंपनीला मिळालेल्या कांही सवलतींमुळे इराण सरकारच्या स्वतःच्या अधि-राज्यालाच बाध येतो. इराण हें स्वतंत्र राज्य आहे. त्याला त्यामुळे वैषम्य वाटतें. करारांतील अटींच्या योगाने देशाचा पाचषष्ठांश भाग खरें म्हटलें तर इराण सरकारच्या ताब्यांत नाही अशीच परिस्थिति आली आहे. ती दुरुस्त झाली पाहिजे.

### ब्रिटिश सरकाराचें उत्तर

हिंदुस्थानच्या मार्गावर उत्पन्न झालेल्या या बखेड्यामुळें व वर सांगितलेल्या परस्परांतील हित-संबंधांमुळें कंपनीचें भांडण ब्रिटिशांना अंगावर घेणें भाग पडलें. ह्या सर्व भानगडींत झालेल्या पत्र-व्यवहारावरून त्याची बाजू अशी दिसते—

(१) १९०१ पासून पहिला सर्व व्यवहार खाजगी कंपनीशीं म्हणून झाला. १९१३ मध्येंच काय तो ब्रिटिशसरकारचा संबंध आला. परंतु खरें पाहिलें तर इराणचें सर्व देणें भागविलेलें आहे.

(२) १९११ मध्येंच काय ती पहिली विहीर चालू झाली. त्यापूर्वी केवळ खर्चच झाला. तेव्हां १९११ पूर्वीच्या वर्षांची नफ्याची मागणी अना-ठायीं आहे.

(३) महायुद्धाच्या काळांत खर्च फार वाढला व एकंदर धंदा मोठ्या अडचणींत चालवावा लागला या मुळें नफा देतां आला नाही. पण त्या मुदतींतील सर्व हिशेब पुरा करून सरकाराला २० लाख पौंड देऊन १९२० मध्यें पुरवणी करार करूनहि घेतलेला आहे.

(४) कंपनीला स्वतःच्या खर्चानें अनेक रस्ते वगैरे बांधावे लागले त्यांचा उपयोग सार्वजनिक हम-रस्ते म्हणून होत असतां बिनखर्चानें सरकारचें काम अनायासें झालें. त्याचा विचार न करितां कर बसविणें अयोग्य आहे.

(५) कामावर सुमारें २५००० इराणी लोक आहेत. परदेशचे फक्त ५००० लोक असून ते सर्व यांत्रिक तज्ज्ञ वगैरे, इराणांत मिळूं शकत नाहीत असे आहेत अप्रत्यक्षपणे हा पैसाहि दरसालच्या खंडणीबरोबरच इराणच्या हितार्थ खर्च होतो.

(६) शाळा, वाचनालयें, दवाखाने, करमणुकीचीं साधनें, पाणी, आरोग्य व प्रकाशाच्या वगैरे स्वतः-च्या नोकर वर्गाकरितां कंपनीनें केलेल्या सोयी इराणच्याच फायद्याच्या आहेत. त्यामुळें नफा कमी दिसला तरी हरकत असूं नये.

(७) करार रद्द करण्याचें कलम करारांत नसल्यामुळे नोव्हेंबरांतील फर्मानामुळें त्या कराराचा भंग होत आहे.

(८) कंपनीच्या उत्पन्नांतील दिसणारी घट हा जागतिक मंदीचाच परिणाम आहे. त्यांत अन्य लबाडी नाही.

### इराणाची कसोटी

परदेशांतील प्रजाजनांना त्रास दिल्याबद्दल आंतर राष्ट्रीय कायदा मोडल्याचा आरोप करून लीगच्या १२ व्या कलमान्वयें इराणला लीग ऑफ नेशन्ससमोर खेचण्याचा इंग्लंडचा विचार होता. परंतु आमच्या तक्रारी दूर होण्यासाठीं आपण हा प्रश्न उपस्थित केलेला आहे, कंपनीच्या मालमत्तेला आपण कोणत्याहि प्रकारें त्रास देऊं इच्छित नाही असें आश्वासन इराणानें दिल्यामुळे तो प्रश्न तूर्त कंपनी व इराण यांमध्यें तडजोड होण्यावर राहिला आहे. कंपनीनेहि आपलें म्हणणें स्वतंत्रपणें पुढे मांडून आत्मसमर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे. कायद्यानेंच पाहिलें तर कंपनी व ब्रिटिश सरकार यांचें म्हणणें काटेकोरपणाचें व म्हणून बरोबर असूं शकेल. परंतु इराणांत होऊं घातलेल्या राष्ट्रीय जागृतीमुळे केवळ मागें झालेल्या करारावर बोट ठेवून चालण्याचा शिष्टाचार त्याला आता खपेल असें म्हणतां येत नाही. कोणत्याहि राष्ट्राचे उच्चतम हितसंबंध केवळ प्रामाणिकपणासाठी किंवा वचनासाठीं गमावून बसण्यांत पौरुष नाही हें तरुण इराण जाणून आहे. म्हणूनच नोव्हें-बरच्या जाहिरनाम्यानंतर इराणी फडणीसानें भाषण करून 'उभय भागीदारांच्या हक्कांची पाय-मल्ली न होऊं देतां' नवा करार करण्यास आपण तयार असल्याचें सांगितलें. अँग्लो-पर्शियन ऑइल कंपनीचे हक्क ब्रिटिश सरकार अंतःकरणपूर्वक संभाळण्यास तयार आहे हें उघड दिसतें. इराणचें हक्क कसे सांभाळले जातात हें आतां पहावयाचें आहे. इराणांत झालेल्या क्रांतीमुळे इराण पूर्वीपेक्षा किती

अधिक समर्थ झालें आहे याची कसोटीच आता लावावयाची आहे किंवा दुसऱ्या बाजूने बोलावयाचें म्हटलें तर राष्ट्रसंघासारख्या आंतरराष्ट्रीय शांतता स्थापणाऱ्या संस्था न्यायदानाच्या कामीं कितपत प्रभावी ठरतात हें सिद्ध होण्याची वेळ आलेली आहे असेंहि म्हणतां येईल.

# माळव्यांतील सफर

(ले. रा. सदाशिव नारायण रानडे, पुणें.)

( पूर्वार्ध )

हिंदुस्थानांत प्रवास करणाऱ्या लोकांच्या नजरेस प्रामुख्याने येणारी गोष्ट म्हणजे त्यांतील प्रदेशपृष्ठाची विविधता ही होय. सर्व प्रकारचीं वातावरणें, सर्व प्रकारचे प्रदेश, सर्व प्रकारच्या प्रादेशिक घडामोडी, यामुळे हिंदुस्थानचा प्रादेशिक इतिहास म्हणजे पृथ्वीवरील घडामोडींची छोटी प्रतिकृतिच होय! अगदीं दक्षिणेस अजस्र शिला वेड्यावाकड्या स्वरूपाच्या व एखाद्या लहान मुलीच्या विसकटलेल्या खेळापारख्या विखुरलेल्या आढळतील. दक्षिण हिंदुस्थानांतील इतर भागांत काळ्या मातीने आच्छादिलेलें विस्तीर्ण पठार दिसेल. त्यांतील पश्चिम बाजूस समुद्र किनाऱ्याला लागून सह्याद्रीची लांबच लांब जवळजवळ अभंग डोंगरांची रांग लागेल, व नदीच्या घाटाच्या पायऱ्या बांधल्याप्रमाणे डोंगरांच्या उंच उंच पायऱ्या लागत लागत शेवटीं समुद्राकडे एकदम उतार लागेल. पूर्व बाजूस सरसकट उतार असल्याने व पूर्वेकडील घाट फारच तुटक असल्याने पश्चिमेकडील आणि पूर्वेकडील वनश्रींत बराच फरक आहे. हें झालें दक्षिण हिंदुस्थानाचें त्रोटक वर्णन.

हा सर्व भाग अति पुरातन काळापासून समुद्रपरिवेष्टित पण समुद्राला अजिंक्य असा राहिलेला आहे. हिंदुस्थानांतील जंबुद्वीपाची संज्ञा याच भागाला देण्यांत आली आहे. हल्लींचा दक्षिण हिंदुस्थान व विंध्य आणि अरवली पर्वत मिळून पेरूच्या आकाराचें पूर्वीं बेट होतें. त्याच्या आसपास सर्व बाजूंस समुद्र व लहान लहान बेटें होतीं असा जंबुद्वीपाचा इतिहास आहे. उत्तरेकडील समुद्राच्छादित भाग हळुहळू वर येऊन उत्तर हिंदुस्थान तयार झालेला आहे. हिमालयाची व तिबेटची उत्पत्ति नवीन आहे हें पुष्कळांस माहीत असेलच.

### अरवली पर्वत

जंबुद्वीपाच्या भागापैकीं अरवली पर्वत व त्याच्या रांगा हीं वर्षानुवर्ष पाऊस, वारा व ऊन खाऊन जीर्ण झालीं आहेत. अरवली पर्वतावर नेहमी बर्फ राहात असे इतका तो पूर्वी उंच होता. हल्ली ह्यातान्यासारखी त्याची विकल स्थिति झाली आहे. विंध्य पर्वताने ज्वालामुखींतून बाहेर पडलेल्या ज्वालारसाखाली आश्रय घेतल्याकारणाने त्याची इतकी विपन्न अवस्था झालेली नाही. सह्यपर्वत तर सबंध ज्वालारसवेष्टित असल्याने त्याला भंग फारच थोडा आहे.

जंबुद्वीपाची इतकी माहिती देण्याचें कारण असें कीं, माळवा हा त्याला लागूनच पण पूर्वी समुद्राच्छादित असलेला प्रांत आहे हें होय माळव्यामध्ये समुद्र व ज्वालारस यांचीं आक्रमणें प्राचीन भूतलावर व भूप्रदेशांवर झालेलीं आढळून येतात. झालेलाच इतिहास पुनः पुनः घडतो या नियमाप्रमाणें शक, मालव व गुप्त, रोहिले, जाट व रजपूत, इंग्रज, मराठे व मुसलमान यांचीहि समरभूमि म्हणून माळवा प्रसिद्ध आहे. या युद्धांचीं स्मृतिचिन्हें जवळ जवळ सर्व माळवा व्यापून आहेत. अनेक रीतिरिवाज व अनेक पडके—मोडके अवशेष माळव्याभर पसरलेले असून भिन्न भिन्न मानवी संस्कृतींचा इतिहास त्यांमधून पाहावयास मिळतो. समुद्राने आपल्या अस्तित्वाचें वर्णन तांबड्या वालुकामय प्रस्तरांच्या पटामध्यें सूचित केलें आणि आपल्या साम्राज्याचा पाया किती खोल होता तें संगमरवरी प्रस्तरांच्या थरामध्यें लिहून ठेवलें आहे. ज्वालारसानेहि आपण मिळविलेल्या विजयांचीं स्मारकें म्हणून जिकडे तिकडे आपले स्तंभ व कोट उभारले आहेत. विंध्य पर्वत त्यांच्या मजबूतपणाची साक्ष आजतागाईत देत आहे. हे समुद्रप्रस्तर व ज्वालाप्रस्तर घटकावयवांच्या परस्पर संघटनेमुळे वातपर्जन्यातपादि वातावरणांतील त्यांच्या शत्रूंना आजपर्यंत तोंड देत आले आहेत. पण त्यांच्यापेक्षां पुरातन असलेल्या भूप्रदेशीय खडकांत संघटना, सुरचना व त्राण नसल्यामुळें ते मातीमोल होत चाललेले आहेत. तिकडील सर्व जमिनींचा इतिहास असाच आहे.

## सातपुडा

आमचा माळव्यांतील प्रवास सात दिवसच झाला. पहिल्याप्रथम आम्ही मुंबईहून भोपाळला गेलों. भोपाळजवळ सांची येथें एक बुद्धकालीन स्तूप आहे. तेथें प्रवासी लोक, इतिहाससंशोधक व भूपृष्ठजिज्ञासु यांना पाहण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत. सांचीचें वर्णन देण्यापूर्वी आगगाडींतून भोपाळपर्यंत जो प्रदेश पाहिला त्याचें वर्णन आगगाडीसारखेंच धावतें केल्यास कंटाळवाणें होईल असें वाटत नाही. आपणा महाराष्ट्रीयांना काळवथरी दगड, कारीचा दगड, कातळ व काळी माती यांचें वर्णन द्यावयास नकोच. कारण महाराष्ट्र यांचाच बनलेला आहे. एवढेंच कशाला, हल्लीच्या बृहन्महाराष्ट्रामध्येंमुद्धां इंदूर, उज्जयिनी या ठिकाणांच्या आसपास आपल्यासारखाच प्रांत आहे. त्यामुळें तेथें गेल्यास मुळींच परकेपणा वाटत नाहीं. भुसावळला तापी नदी ओलांडल्यावर सातपुडा पर्वतांची रांग लागते. ही रांग सह्याद्रीचा एक फाटा आहे व त्यामुळें सह्याद्रीसारखेंच या डोंगराचें स्वरूप आहे. मात्र आपल्याकडे असणाऱ्या डोंगरांच्यासारखे यांचे माथे सपाट असले तरी जरा उतरते, लांबट, उंचीनें लहान, व जुन्या अर्धकिल्ल्याच्या पात्याप्रमाणें खांडे पडलेले आढळून येतात.

सातपुडा ओलांडल्यावर होसंगाबाद येथे नर्मदा-भेट होते. एका बाजूस विंध्य दुसऱ्या बाजूला सातपुडा अशा थाटामध्यें नर्मदा त्यांना आपल्या कांवेत ठेवून लुबाडीत लुबाडीत समुद्राकडे गेली आहे. नर्मदाप्रदक्षिणा केलेले लोक सर्व नद्यांत ती सुंदर आहे असें सांगत असले तरी होसंगाबाद येथे तिचें मनोहर स्वरूप आगगाडींतून तरी कांहींच पाहावयास मिळत नाही. कदाचित तिच्या छातीवरून धाडूधाड् करीत जाणारी आगगाडी पाहून ती खिन्नपणानें पुलाखालून हळूच निसटूनहि जात असावी!

होसंगाबाद सोडून पुढे जातांना वनश्रीची छटा पालटते. गाडी विंध्य पर्वत चढून जात असतां वेगवेगळ्या आकारांचे कळपेदार प्रस्तर पाहावयास मिळतात. या भूप्रदेशाखेरीज असले प्रस्तर हिंदुस्थानांत इतरत्र क्वचितच पाहावयास मिळतात. अगदीं फरशीवजा दगडापासून तो एकाद्या प्रशस्त कट्टयाच्या आकाराचे प्रस्तर या प्रदेशांत मिळतात. हा सर्व प्रदेश पूर्वी खोलांत असून त्यावर समुद्र पसरलेला होता व हे सैकतप्रस्तर त्या काळीं बनले असावे असें भूस्तरशास्त्रज्ञ सांगतात. ह्या प्रस्तरांचे रंग जरी पांढरा, तांबूस, पिवळसर, तांबडा, काळसर तांबडा निळसर तांबडा अशा वेगवेगळ्या प्रकारचे दिसले तरी रचनादृष्ट्या त्यांच्यांत फरक नाही. भोपाळ व सांची यांच्या आसपास तांबडे दगड आहेत; हे व याहून पिवळसर रंगाचे दगड बांधकामास चांगले असतात.

## भोपाळचे तलाव

भोपाळ शहर तेथील तलावामुळे प्रसिद्ध आहे. हे तलाव बांधण्यांत निसर्गाची फार मदत झाली आहे. तळ व बाजू हीं उत्कृष्ट दर्जाच्या सैकत प्रस्तरांचीच बनली असल्यामुळें कोठें इकडे, कोठें तिकडे अशा रीतीने बंधारा घातला कीं झाला तलाव तयार. प्रदेश सपाट असल्यामुळें व उतार जवळजवळ नाहीच अशी स्थिति असल्यामुळें पावसाळ्यांत तलावच तलाव तयार होतात. त्यांपैकीं कांहीं तलाव तर विशाल क्षेत्र व्यापून टाकतात. येथील डोंगर छोटे व प्रदेश खुरट्या जंगलांनी व्यापलेला आहे.

भोपाळ शहर ताल ( पुस्तपुल ) तलावाचे भोंवतीं वसलेलें आहे. ताल तलावाचे सभोंवार बांधलेले राजवाडे, मशिदी, त्या तलावाचा विस्तीर्णपणा, लहान उंचवटे व टेकड्या आणि तेथील तांबड्या दगडाची पार्श्वभूमिका यामुळे भोपाळ शहर बरेंच प्रेक्षणीय झालें आहे. परंतु राजवाड्यांची बांधणी तितकीशी सुबक नसल्यामुळे एकंदर सौंदर्यांत थोडी उणीव राहिली आहे असें म्हणावें लागतें. जयपूर, उदयपूर वगैरे ठिकाणीं तलावांचा उपयोग शहराचें सौंदर्य वाढविण्याकडे भरपूर केलेला आहे, तसें येथें साधलेलें नाही.

भोपाळ येथील लोक दरिद्री असल्याने व तेथे पडद्याची चाल असल्याने आपल्याकडील लोकांना ओसाड गांवांतून चालल्यासारखें वाटते. दरिद्री रहाणी म्हटल्यावर आणखी वर्णन तें काय करावयाचें राहिलें ? इकडील घरांच्या भिंती मात्र तांबड्या दगडाच्या बांधलेल्या असल्याने आपल्या इकडच्यापेक्षा त्या दिसावयास व टिकावयासहि मजबूत आहेत. वस्ती प्रामुख्याने मुसलमानी असल्यामुळे घरांच्या पुढच्या ओव्यावर व रस्त्यांत कायतीं माणसें पाहावयास मिळतात. कारण इतर खिडक्या दारें एक बंद तरी असतात, नाही तर त्यांवरून पडदे तरी सोडलेलें असतात!

## सांचीचा स्तूप

भोपाळपासून सांचीला जाण्याचा रस्ता आहे. सांची येथे हिंदुस्थानांतील प्रसिद्ध अशा तीन स्तूपांपैकीं एक स्तूप आहे. याचें वैशिष्ट्य दुसऱ्या तऱ्हेने असें सांगतां येईल कीं, हिंदुस्थानांत ख्रिश्चन साम्राज्या-

खालील मुसलमान संस्थानांतील हा एक बौद्ध-धर्माचा अवशेष आहे. प्रत्येकाने आपल्या स्वामित्वाची खूण येथे ठेवली आहे. हिंदु लोकांनी स्तूपाजवळ असलेल्या एका देवळांत बुद्धमूर्ति स्थापलेली आहे. तिच्या गळ्यात सर्प घालून आणि पुढे नंदी बसवून शिवस्वरूपांत मूर्तीचें रूपांतर केलेलें आहे. मुसलमान लोकांचें स्वामित्व त्यांनी फोडलेल्या व छिन्नविच्छिन्न केलेल्या मूर्तीच्या फुटक्या तुटक्या अवयवांत दृष्टीस पडतें. इंग्रज लोकांनी पुराणवस्तु-संरक्षक खात्याच्या हवाली करून या स्तूपाला आपलेसें करून घेतलें आहे.

सांचीचा स्तूप भरीव आहे. उत्तम प्रकारच्या सैकतप्रस्तरांनी रचलेला असल्यानें दोन हजार वर्षे पर्यंत तो टिकला आहे. हा स्तूप व त्या भोंवतालचा वाटोळा प्रदक्षिणेचा कठडा हे नुसते दगड एकावर एक रचून व एकांत एक कोरून अडकवून तयार केलेले आहेत. कठड्यावर अनेक वचनें, लेख व जातकें आहेत. प्रवेशद्वारावरील कमानीवर अनेक प्रेक्षणीय चित्रांचे द्वारां बुद्धचरित्र लिखित केलें आहे. त्यावरून पुरातन शिल्पप्रवीणतेची व चालीरीतींची कल्पना येते. भोगविलासांची व ऐश्वर्याची चित्रें व त्यांच्या पाठीमागें या सुखांचा क्षणभंगुरपणा दाखविणारा पाण्याच्या बुडबुड्याच्या आकाराचा अर्धगोल प्रचंड घुमट पाहून बौद्ध लोकांच्या सूचक चातुर्याचें कौतुक वाटतें. डोंगराखाली जवळच असलेल्या व आतां निर्जन झालेल्या विदिशा नगरीचे दिसणारे अवशेष व डोंगरावरील हा स्तूप यांकडे आळीपाळीनें पाहणाऱ्या प्रेक्षकाच्या मनांत अनेक विचारलहरी उत्पन्न होतात यांत शंका नाही.

सांची येथे बौद्धधर्माची स्थित्यंतरें व शेवटी त्यांचा हिंदुस्वरूपांत लय यांचा इतिहास पाहावयास मिळतो. मुख्य स्तूपांत मूर्ति नाही, कारण बौद्ध धर्म मूर्तिपूजेच्या विरुद्ध आहे. जवळच्या स्तूपांत आसनस्थ बुद्धमूर्ति आहे, व हें पहिलें स्थित्यंतर होय. त्याच्यानंतर तांत्रिक पद्धतीवर भिन्न आसनस्थ मूर्ति व इतर कोरलेली चित्रें असलेलें एक पडकें दऊळ आहे. तें त्याचें पुढचें स्थित्यंतर म्हणावयास हरकत नाहीं. येथील कांहीं चित्रें बीभत्स गणण्यासारखीं आहेत. स्तूपाजवळचें बुद्धमूर्ति व शिवमूर्ति यांच्यांत अभेद दाखविणारें देऊळ आहे; हें त्याच्या पुढचें स्थित्यंतर होय.

( उत्तरार्ध )

सांचीहून परत भोपाळला येऊन आम्ही उज्जयनीला गेलों. उज्जयनी हें नांव महाराष्ट्रीयांस ऐकून परिचित आहे. विक्रमराजा व उज्जयिनी यांचीं नांवें अशिक्षित लोकांना सुद्धा शनिमाहात्म्यावरून माहीत झालीं आहेत. विक्रम राजाला साडेसातीचे परिणाम भोगावे लागले. तशीच उज्जयनीलाहि साडेसाती भोगावी लागली व ती सुद्धा एकदां नव्हे तर अनेकदां! त्याच ओघानें पुढें असेंहि म्हणतां येईल कीं, पुन्हा विक्रम राजावर जसा शनिदेव प्रसन्न झाला तसाच तो उज्जयिनीवरहि झाला व त्यामुळेच ती आज पुनः भरभराटीस येतांना दिसत आहे. उज्जयनीचें 'प्रतिकल्पा' हें एकच नांव, तिचीं रूपांतरें पुनः-पुनः झालीं आहेत हे दर्शवितें. या अवंती नगरीचें प्राचीन अस्तित्व नावानें दर्शविणारा महांकाळेश्वर येथें आहे व बारा ज्योतिर्लिंगामध्यें तो मोडत असल्यानें, या नगरीला ऐतिहासिक महत्त्वाप्रमाणेंच धार्मिक महत्त्वहि आलें आहे. माळव्याचा पुष्कळसा भाग ज्वालारसाखालीं आच्छादला गेला आहे. माळव्यांत हा ज्वालारसाचा थर जेथे जेथे संपलेला दिसतो तेथूनच पूर्वी उत्तर हिंदुस्थान व्यापून टाकणाऱ्या समुद्राची हद्द सुरू होत होती, असे मोघम विधान लक्षांत ठेवण्यास हरकत नाही. थंड झालेल्या ज्वालारसापासूनच काळवथरी दगड, काळा कातळ, कारीचा दगड, व पुढे काळीमाती बनते. आपल्या कडील अशा रीतीनें बनलेले पाषाण इकडील पाषाणापेक्षा टणकपणा व टिकाऊपणा या दृष्टीनें उच्च दर्जाचे वाटतात. इकडचा दगड आपल्यापेक्षा कमी दर्जाचा वाटतो. याचें कारण इकडील जास्त विषम हवा त्यावर जास्त परिणाम करते हें असावें. तरी पण इकडचे तलाव गळकेपणाबद्दल प्रसिद्ध आहेत. इंदूर जवळचा बिलावली तलाव तर पुष्कळ वर्षे भरतच नसे व भरला तर गळत असे! भूस्तरशास्त्र दृष्ट्यासुद्धां एकावर एक असलेले दगडांचे थर जर वेगवेगळ्या काळांचे असले तर त्या एकंदर प्रदेशाची टिकाऊ शक्ति कमी भरते असे थर या भागांत दिसून येतात व त्यामुळे असा प्रकार घडत असावा.

उज्जयिनी व इंदूर या भागांत आल्यावर आपलेपणा वाटतो. उज्जयिनी व इंदूर येथील विद्वान लोकांनी महाराष्ट्रास अनेक प्रकारांनी आपल्या कामगिरीने गौरविलें आहे. कांहीं वर्षांनी तर बृहन्महाराष्ट्राऐवजी महाराष्ट्रांत सुद्धां या प्रांताची गणना करावी लागेल असें वाटतें. इंदूरचें वर्णन देण्याचा माझा विचार नाही. कारण शहर चांगलें असलें तरी महाराष्ट्राला अपरिचित अगर नवीन

असे त्यांत कांहीं दिसत नाहीं. थोडीशी मुंबई व पुष्कळसें पुणें, असें त्याचें वर्णन पुरेसें होईल. तेथील गिरण्या व व्यापार यामुळे इंदूरला मध्यहिंदुस्थानाची मुंबई तर म्हणतातच, व समुद्रसपाटीपासून उंची, हवामान, भरभराटीचें शहर व इकडील शिक्षणकेंद्र यामुळे पुण्याशीं इंदूरचें बरेच साम्य आहे. तेव्हां उज्जयिनीचेंच थोडें जास्त वर्णन देऊन मग तडक माळव्याच्या पश्चिम टोकांस पावागड येथें आमचा पुढचा मुक्काम झाला तेथें वाचकांस नेऊन सोडणार आहे.

## कालियादेह राजवाडा

उज्जयिनीस आजूबाजूस पहाण्यासारखीं ठिकाणें पुष्कळच आहेत. त्यांची सविस्तर यादी 'उज्जयिनी वर्णन' म्हणून एक पुस्तक आहे त्यांत दिली असल्यानें मी तिची पुनरुक्ति करीत नाहीं. अलीकडच्या काळांत म्हणजे मुसलमानी रियासतींत बांधलेला कालियादेह राजवाडा, वेधशाळा हीं सध्या सुस्थितींत आहेत. कालियादेह राजवाडा उज्जयिनीपासून बऱ्याच अंतरावर क्षिप्रानदींत असलेल्या एका छोट्या बेटावर, उज्जयिनी ज्या वेळीं मुसलमानांच्या ताब्यांत होती त्या वेळीं, एका पठाण सुभेदारानें बांधलेला आहे. राजवाड्याभोंवतीं पाणी खेळवलें असून, स्नान वगैरेकरितां कमीअधिक खोलीचीं कुंडें बांधलेलीं आहेत. या राजवाड्याच्या अगदीं नजीक जाईपर्यंत त्याच्याऐवजीं एखादी जुना फासलेली मशीदच असावी असा भास होतो! जवळ गेल्यावर त्या घुमटाखालचे मजले दिसतात. व नदीच्या पात्राची मौज दिसूं लागते. हल्लीं ग्वाल्हेर सरकारानें ह्या राजवाड्यांत स्वतःला रहाण्यासारखी सोय केली आहे. पठाणी बांधकामाची पद्धत या दृष्टीनें राजवाड्यांत नावीन्य आहे. कलाकुसर न करतां केवळ भरीव बांधकामांतून सौंदर्य निर्माण करणें ही कला आहे, व ती येथें दिसून येते. नुसते एकावर एक दगड रचलेले, कांतीव कोरीव काम नाहीं, रंगीत दगडाखेरीज रंग वापरलेला नाहीं, असें असून सुद्धां राजवाडा दर्शनीय झाला आहे.

उज्जयिनीची वेधशाळा आपल्या पूर्वजांच्या बुद्धिचातुर्याचें स्मारक आहे. एक त्रिकोणाकृति भिंत व तिच्याशीं काटकोण करून तिला छेदून जाणारी एक अर्धचंद्राकृति भिंत, अशासारख्या साधनांनी तेथील यंत्रें तयार झालीं असल्यानें, तीं आजतागाईत शिल्लक आहेत. एक वाटोळा विन पाण्याचा हौद व त्या मधोमध उभा केलेला खांब हेंहि एक यंत्र आहे. एक वाटोळा दगडी खांब वाकडा कापलेला आणि आडवा टाकलेला असा दिसतो. तेंहि एक यंत्रच आहे. जवळच एक उभी भिंत व त्यावर दोन तलवारी एकावर एक ठेवल्यासारख्या काढलेल्या दिसतात. हेंहि पण एक यंत्रच आहे. या यंत्रांची जास्त माहिती मी येथें देत नाहीं. पण इतकें सांगितलें असतां पुरे कीं, हीं यंत्रें अशा कल्पकतेनें व बिनचूक बांधलेलीं आहेत कीं, त्यांचे वेध बरोबर येत आहेत. ग्वाल्हेर सरकाराच्या कृपेनें गेल्या पंचवीस वर्षांतच तिचा जीर्णोद्धार झालेला आहे. त्याआधीं ती नुसतीच आकाशाकडे पहात तप करीत होती, व भोंवतालीं वारूळ व गवत उगवलें होतें. जुन्या महांकाळेश्वरावर तर एका मशिदीचें दडपण पडलें होतें! हल्लींचा महांकाळेश्वर मशीद पाडल्यावर पुन्हां स्वस्थाना आलेला आहे. तरीसुद्धां हल्लींचें देऊळ पूर्वीच्या गाडल्या गेलेल्या प्रचंड देवळावर बांधलें गेलें आहे. एवढेच कशाला, हल्लींच्या उज्जयिनी शहराखालीं खणलें असतां, जुनी उज्जयिनी सांपडूं लागते! जवळच गढ म्हणून एक जमिनीवर फुगवटा आल्यासारखा एक भाग आहे. त्याच्याखालीं एक जुन्या काळचें उज्जयिनी शहर गडप झालेलें आहे! व हीं गडप झालेलीं शहरें वर येण्याकरितां धडपड करतात कीं काय कोण जाणे, येथें धरणीकंपाचे लहान लहान धक्केहि बसतात!

## पावागडाची रचना

आम्हीं आमच्या प्रवासांत सैकतप्रस्तर, व ज्वालाप्रस्तर पाहिले. पण यांहून जुने दगड ज्यांना शिला अशी संज्ञा आहे, ते पावागडला पहावयास मिळाले. इतकेंच नव्हे तर स्फटिकप्रस्तरा सारखे आणखीहि दगड पहावयास मिळाले. खालीं शिला, मध्यभागीं स्फटिकप्रस्तर व वर ज्वालारसप्रस्तर असे एका डोंगरांतच पायऱ्यापायऱ्यांनीं पावागडावर पहावयास मिळतात. पावागडचा डोंगर हा अरवली पर्वत श्रेणींतील खालच्या टोंकास आहे. त्यावर पसरलेल्या ज्वालाप्रस्तरांमुळे तो डोंगर सुरक्षित राहिला आहे, व ही नवीन रचना अगर सुधारणा ज्यांनीं शिरोधार्य केली नाहीं अशा जवळच्या डोंगरांची आजची अवस्था अनुकंपनीय झाली आहे. याच कारणानें जवळच्या डोंगरापेक्षां हा डोंगर जास्त उंच आहे. येथेंच शिखरावर कालिकामातेचें प्रसिद्ध व पुरातन मंदिर आहे. त्यामुळें डोंगराला क्षेत्राचें महात्म्य आलें आहे. डोंगराच्या पायथ्याशीं पडका किल्ला व त्यांत गांव असून किल्ल्या बाहेर एक प्रेक्षणीय मशीद आहे. या ठिकाणीं मशिदींचा विशेष हा कीं प्रसिद्ध क्षेत्रांतील देवळाचा विध्वंस करून त्या ठिकाणावर अगर त्या सामानानें ही मशीद न बांधता ती अलग व स्वतंत्र बांधलेली आहे. तिच्यावर हिंदुपद्धतीची छाप

आहे. या बाजूचीं इतर देवळेंहि उध्वस्त न करतां त्यांजवळ जुन्या मशिदी बांधलेल्या आढळतात, असेंहि ऐकलें. पावागड, किल्ला व मशीद हीं एकमेकांच्या सौंदर्याला पूरक आहेत. मध्यभागीं मुख्य घुमट, त्याच्या भोंवती एकमेकांना लागून बारके घुमट, त्याच्या खालच्या मजल्यावर पुन्हां घुमटाचें वर्तूळ, चार टोकांस चार मनोरे व मुख्य दरवाजाच्या बाजूस दोन उंचच्या उंच मनोरे आणि एकंदर प्रमाणबद्धता या कारणानें मशीद दुरूनहि डौलदार दिसते.

### प्रस्तरांच्या जाती

पावागड चढतांना पुरातन दगड, ज्याला आपण शिला असें संबोधूं, तो लागतो. पृथ्वीचें कवच तयार होत असतांना हा दगड तयार झाला असावा, निदान हल्लीं दिसून येणाऱ्या दगडांत तो जुना आहे असें भस्तरशास्त्रज्ञ म्हणतात. याला विशिष्ट आकार असा नाहीं. वांकलेले, सुरकतलेले, घड्या पडलेले, सरकलेले, तोडलेले असेंच या शिलासमुच्चयाचें विचित्र वर्णन केलें पाहिजे. हें सर्व स्फटिकमय आहेत. थोडे वर गेल्यावर स्फटिक-प्रस्तर लागतात. यांसच रचनांतरितप्रस्तर म्हणतात. हे शिलांचेच बनलेले, पण प्रस्तर म्हणजे स्तर रचनात्मक असतात. सैकत-प्रस्तर अगर इतर जलजन्य प्रस्तर व हे प्रस्तर वरून दिसावयास पुष्कळ वेळां सारखे दिसतात; पण फोडल्यावर त्यांच्यांतील फरक ओळखता येतो. जलजन्यप्रस्तर पाण्यांत वाहून आलेला गाळ, दगडांचा चूर, शिंपा, खवल, प्राण्यांचे अवशेष यांपैकीं कशाचे तरी कण एकमेकांस चिकटून तयार झालेले असतात. त्यांत स्फटिकमय रचना नसून त्यांतील कणांना सांधणारें द्रव्य गुरु-दर्शकाखालीं दिसूं शकतें. स्फटिकप्रस्तर हे मलद्रव्याची विस्कळीत रचना बदलून आंचे-खालीं व दाबाखालीं तयार झाल्या कारणानें एक झालेले असतात, व त्यामुळे विजातीय द्रव्याची त्यांना गरज नसते. अशाच प्रस्तरांमध्यें बहुतेक रत्नें निर्माण झालेलीं आहेत. पावागड येथील स्फटिक प्रस्तर त्या डोंगरावर टोपीसारखा बसलेला जो ज्वालारस त्याचे आंचेमुळे व दाबाखालीं तयार झालेला आहे.

अर्धा डोंगर चढून गेल्यावर स्फटिक-प्रस्तर संपून ज्वालारसस्तर सुरू होतो. वर जातांना चढ बराच आहे. एका ठिकाणीं वर जाण्यास दगडी जिना बांधलेला आहे. वर तळें असून पाणी वरें आहे. तळ्याला लागूनच देवळा-कडे जाण्यास पायऱ्या आहेत. त्यामुळे ओले-त्यानें देवीच्या देवळांत जाण्याची भाविक मंडळींना सोय आहे. देवीचें मंदिर अगदीं टोकावर असलेल्या थोडक्या जागेंत बांधलेलें आहे, व देवळाला लागून देवळाचा तट आहे. तटाच्या खालींच कडे तुटलेले असल्यानें आजबाजूचा सर्व प्रदेश दिसूं शकतो.

# मराठीवरील सरकारी संकट

### मराठीची जागा कायम ठेवा

शुक्रवार ता. २१ रोजीं सायंकाळीं ६॥ वाजतां पुणें भारत इतिहास संशोधक मंडळाच्या दिवाण-खान्यांत प्रो. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षते-खालीं सरकारी कॉलेजांत मराठी प्रोफेसरची जागा रद्द करण्यांत आली या गोष्टीचा निषेध करण्याकरितां जाहीर सभा भरली होती. प्रारंभीं श्री. मा. पं. सोमण यांनीं सभेचा उद्देश सांगून प्रो. द. वा. पोतदार यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल विनंति केली. त्या सूचनेला श्री. दि. वा. दिवेकर यांनीं अनुमोदन दिल्यावर प्रो. द. वा. पोतदार स्थानापन्न झाले.

प्रो. वि. ब. नाईक यांनीं पुढील ठराव सभेपुढे मांडला.

"सरकारानें पुढील वर्षापासून डेक्कन कॉलेज बंद करण्याचें योजिलें आहे व तेथील मराठीच्या प्रोफेसराची जागा यंदापासून कमी करण्यांत आली आहे असें कळतें. मुंबई इलाख्यांतील इतर देशी भाषांच्या जागा कायम राहून कोणत्याहि सरकारी कॉलेजांत फक्त मराठीचीच काय ती जागा राहात नाहीं याबद्दल या सभेला खेद वाटत आहे. यंदापासूनच मराठीच्या सन्मान्य शाखेचा अभ्यासक्रम सुरू व्हावयाचा असल्यामुळे मराठी अध्यापकाची जागा मुंबई येथील एलफिन्स्टन कॉलेजांत तरी अवश्य असली पाहिजे अशी या सभेची सरकारास आग्र-हाची शिफारस आहे."

### प्रो. नाईक यांचें भाषण

वरील ठराव वाचून दाखविल्यावर प्रो. नाईक आपल्या भाषणांत म्हणाले, "डेक्कन कॉलेजमध्ये मराठीचे अध्यापक म्हणून काम करीत असलेले प्रो. चाफेकर यांना सर-कारानें नोटीस देऊन मराठीची जागा कमी केली हें धोरण अदूरदर्शीपणाचे आहे. सर्वच मातृभाषा बद्दल सरकारानें असलें धोरण स्वीकारलें असेल असें

म्हणावें तर तसें दिसत नाही. मराठीची सन्मान्य शाखा सुरू होण्याच्या वेळीं कॉलेजाच्या अभ्यासक्रमांतून मराठी भाषेची उचलबांगडी करण्याचें धोरण सरकारानें स्वीकारावें याबद्दल कोणालाहि उद्वेगच वाटेल. विश्वविद्यालय काय किंवा सरकारी अधिकारी काय दोघेहि मराठी भाषेला उत्तेजन दिलें पाहिजे असें प्रतिपादितात आणि प्रत्यक्ष पाहावें तर मात्र मराठी भाषेला अर्धचंद्र देण्यांत येत आहे! या दोन परस्पर विरोधी गोष्टींचा मेळ कसा घालावयाचा हेंच समजत नाही. सरकारानें काटकसरीची कात्री लावली असेल असें म्हणावें तर यामुळे कितीशी बचत होईल याचा तरी सरकारानें विचार करावयास पाहिजे होता. सारांश कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी सरकारानें मराठी भाषेची उचलबांगडी करण्याचा जो उपक्रम केला आहे तो अयोग्य होय. डेक्कन कॉलेजच जेव्हा बंद होईल तेव्हा तेथील मराठीची जागाहि जाईल. पण या कॉलेजामध्यें मराठीची जागा कमी केली तरी मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें मराठीची जागा पुनः निर्माण करण्यांत आली पाहिजे. मराठी विषय हा पास कोर्सकरिता असूनहि तो विषय घेणारे विद्यार्थी कमी असतात असे मुळीच नाही. तोच जर ऑनर्स कोर्स झाला तर विद्यार्थी कमी पडतील ही भीतीच बाळगावयास नको. अशा स्थितींत सरकारानें कॉलेजमधील अभ्यासक्रमांतून मराठी विषय काढून टाकू नये."

### श्री. य. रा. दाते

ठरावाला अनुमोदन देताना श्री. य. रा. दाते यांनी आपल्या भाषणांत सांगितलें की, मातृभाषेतून हायस्कूल व कॉलेज यांमध्ये शिक्षण मिळावें याबद्दल खटपट चालू आहे. मध्य प्रांतांतील हायस्कुलांतून मातृभाषेतून शिक्षण दिलें जातें व परीक्षा घेतल्या जातात. १९३५ सालापासून बहुधा कॉलेजमध्येहि मातृभाषेतून शिक्षण देण्याचा उपक्रम होईल. अशी तिकडे मातृभाषेची उन्नति होत असता, महाराष्ट्रांत पहावें तो मराठी भाषेची सरकाराकडून अवहेलना व्हावी ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. या पीछेहाटीला सरकारच सर्वथैव जबाबदार आहे. सरकारी कॉलेजांत मराठीच्या अध्यापकाची एकहि जागा सरकारानें न ठेवणें म्हणजे मराठी भाषा बोलणाऱ्या बहुसंख्य लोकांवर भयंकर अन्याय करणें होय!

### प्रो. आर आर. देशपांडे

नाशिक कॉलेजमधील संस्कृत व मराठी या भाषांचे अध्यापक प्रोफेसर आर. आर. देशपांडे ठरावास अनुमोदन देताना म्हणाले, "महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन करण्याची चळवळ चालू असता व मुंबई विद्यापीठानेंहि मराठीचा 'ऑनर्स कोर्स' करण्याचें ठरविलें असतां सरकारानें मराठी विषयाची जागा कमी करावी हा मोठाच अन्याय आहे. प्रांतांतील बहुसंख्य लोकांच्या भाषेची जोपासना आणि वाढ करणें ज्या त्या सरकाराचें कर्तव्य आहे. परंतु मुंबई सरकारानें मराठीची ज गाच कमीकरून बहुसंख्य लोकांवर केवळ अन्यायच केला नाही, तर त्याचा उपमर्द केला आहे. सरकारी कॉलेजांत मराठीचा जागा उत्पन्न करण्याबद्दल लोकांनी तीव्र चळवळ केली पाहिजे."

त्यानंतर नागपूर येथील **प्रो. पेंडसे** म्हणाले, "पाश्चात्य राष्ट्रांत मातृभाषेला पहिलें स्थान देण्यांत येतें. आणि इकडे इंग्रजीला पहिलें व मराठीला शेवटचें स्थान देण्यांत येतें! ही विपरीत व अस्वाभाविक स्थिति आम्ही मुकाट्यानें सहन करतो, त्याला कारण आमची स्वाभिमानशून्यता हेंच होय. मातृभाषेची होत असलेली ही हेळसांड पाहून जोंपर्यंत आम्हाला संताप येत नाही तोंपर्यंत नुसत्या ठरावाचा कांही उपयोग होणार नाही. आज जे शिक्षणाधिकारी मुंबई इलाख्याला लाभले आहेत तेच पूर्वी मध्यप्रांताला होते. त्या वेळीं त्यांनी तेथील मातृभाषेची जागा व दर्जा कॉलेजमध्यें ठेवला, व तो अद्याप चालू आहे. पण तेच शिक्षणाधिकारी इकडे असता मराठी भाषेचा खेळखंडोबा व्हावा याचा अर्थ काय तो आपणच समजा." बेळगांवचे **श्री. जोग वकील** म्हणाले कीं, "संकुचित दृष्टि ठेऊन भागत नाही. मराठी जागा कमी होण्यास कानडी—मराठी वादाचें भूत कारण असावें अशी मला जबर शंका येते. खासगी वाद सरकारी कामांत आणणें केव्हांहि श्रेयस्कर नाही. शिक्षणमंत्र्यांनी मराठीची जागा पुनः सुरू करण्याबद्दल प्रयत्न केला पाहिजे. सदर ठरावाला मी कर्नाटकातर्फे अनुमोदन देतों!"

तसेंच कोल्हापूर येथील श्री. कृ. **ना. देशपांडे** यांनी धारवाड येथील कॉलेजांत मराठी विषयाकरिता सरकारनें एक कायमची जागा निर्माण करावी. कारण तशी सोय आज नसल्यामुळे विद्यार्थ्यांना नाइलाजानें दुसरी भाषा घ्यावी लागते असें सुचविलें. शेवटीं अध्यक्षांनी सदर ठराव सभेपुढे मताकरिता मांडला व ठराव एकमतानें पसार झाला.

### अध्यक्षांचा समारोप

प्रो. पोतदार समारोप करतांना म्हणाले, "आज सभेपुढे मांडलेल्या ठरावास नागपूर, बेळगांव,

नाशिक, कोल्हापूर वगैरे प्रांतांतून आलेल्या मंडळींनी अनुमोदन दिलें यावरून सदर ठराव किती महत्त्वाचा व जिव्हाळ्याचा आहे हे दिसून येतें. तसेंच केसरी, महाराष्ट्र, विविध वृत्त, नवा काळ वगैरे पत्रांनींहि संपादकीय लेख लिहून विविध तऱ्हांनी अनुमोदन दिलें आहे. डेक्कन कॉलेजामधील मराठीची जागा कमी केल्यामुळे व्यक्तिविषयक अन्याय तर झालाच आहे. परंतु त्याकडे थोडें दुर्लक्ष केलें तरी सदर हुकुमामुळे मराठी भाषेच्या उन्नतीला मोठाच धोका पोंचला आहे. सरकारला या बाबतीत काटकसरीचीच कात्री लावावयाची होती तर ती लावूनहि--आणि तशी त्यांनी पूर्वी पगाराच्या बाबतींत लावलीहि-मराठीची जागा कायम ठेवतां आली असती. त्याचप्रमाणे सबंध वर्षाला मराठी विषय शिकवण्याकरिता जो खर्च लागेल तितका पगार महिन्यागणिक घेणारे जे प्रोफेसर आज आहेत त्यांच्या पगाराला मात्र धक्कादेखील लागलेला नाही! याचा अर्थ पैशाच्या काटकसरीकरिता ही जागा कमी केली नाही असा उघडच होत नाही काय? कॉलेजमध्ये आज मराठी विषय घेणारे विद्यार्थीच इतर भाषा घेणाऱ्यांपेक्षा कितीतरी अधिक असतात व हें प्रमाण गेल्या दहा वर्षांपासून तर सारखें वाढत आहे. शिक्षणमंत्र्यांनी प्रांतिक अभिमानाला बळी पडून मराठी भाषेचा दर्जा कमी करण्याचें जें धोरण स्वीकारलें आहे त्याबद्दल कर्नाटक बंधूही निषेध करतील अशी मला खात्री वाटते. मराठीची जागा कमी करून कानडीची प्रतिष्ठा वाढेल अशी त्यांची समजूत असेल तर ती साफ चुकीची आहे. सरकारच्या कानावर ही ओरड घालण्याचे त्वरित प्रयत्न केले पाहिजेत. मुंबई इलाख्यांत मराठीची सोय कोणत्या तरी कॉलेजमध्ये अवश्य झाली पाहिजे व ती एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये होण्यासारखी आहे.”

अध्यक्षांचे भाषणानंतर श्री. कर्वे यांनी या अन्यायाचा गवगवा वर्तमानपत्रें, नियतकालिकें वगैरेंतून केला पाहिजे असें सांगून सर्व मंडळींचे व भारत--इतिहाससंशोधक मंडळाच्या चालकांचे आभार मानल्यावर सभेचें काम संपलें.

## बृहन्महाराष्ट्र वार्षिक सन १९३३

(प्र. श्री. हे. सू. कुळकर्णी, चिटणीस महाराष्ट्र मंडळ, बेलताला रोड, कालीघाट, कलकत्ता. किं. एक रुपया.)

कलकत्ता येथील महाराष्ट्र मंडळाने पुढाकार घेऊन बृहन्महाराष्ट्राचें वार्षिक पुस्तक काढण्याचा उपक्रम गेलीं चार वर्षे सुरू ठेवला आहे ही अभिनंदनीय गोष्ट होय. महाराष्ट्राबाहेर महाराष्ट्रीयांच्या जुन्यानव्या व लहान-मोठ्या बऱ्याच वसाहती आहेत. त्या वसाहतींच्या व नोकऱ्याचाकऱ्यांच्या निमित्ताने गेलेल्या कुटुंबांत विद्वान व कर्तबगार माणसें अनेक आहेत. आणि त्या सर्वांना सोसाव्या लागणाऱ्या कांही अडचणी समान व कांही भिन्न आहेत. त्या अडचणी अखिल महाराष्ट्रीयांस कळण्यास, त्यांजवर कांही तोड निघण्यास व तिकडील विद्वानांच्या विद्वत्तेची व कर्तबगारांच्या कर्तृत्वाची ओळख पटण्यास बृहन्महाराष्ट्राचें वार्षिक पुस्तक हें एक महत्त्वाचें साधन उपलब्ध झालें आहे. हा चोथा अंक प्रकाशकांनी फार परिश्रमपूर्वक काढलेला दिसतो. त्यांत प्रो. भांडारकर, प्रो. टिळक, का. ना. दीक्षित, एम. ए. कलकत्ता, प्रो. मिराशी एम. ए., नागपूर इत्यादिकांनी लिहिलेले लेख संशोधनपर व विवेचनपर आहेत. प्रो. भांडारकर यांनी दंडकारण्य हें नांव हिंदुस्थानांतील कोणत्या प्रदेशास लागू पडतें याचा साधकबाधक प्रमाणांनी केलेला ऊहापोह त्यांच्या विद्वत्तेस साजेसा आहे. कालिदास बंगाली नव्हता हें सिद्ध करण्यांत प्रो. मिराशी यांची विवादपद्धति उत्तम रीतीने नजरेत भरते. रा. दीक्षित यांनी बृहन्महाराष्ट्राचा व्यापक दृष्टीने विचार करून, महाराष्ट्रीयांच्या गुणदोषांचें केलेलें विवेचन मार्मिक आहे. प्रि. आपटे यांची वस्ती माळव्यांत पुष्कळ वर्षे झाली असल्याने, इतर समाजाशीं तुलना करतांना महाराष्ट्रीयांत जे दोष दृष्टीस पडतात ते त्यांनी निस्स्पृहपणाने मांडले आहेत व त्या बाबतींत योग्य असाच इशारा त्यांनी महाराष्ट्रीयांस दिला आहे. रा. ताम्हनकर यांनी विलायतेंतील महाराष्ट्रीयांच्या संघटनेचें केलेलें वर्णन पुष्कळांना आवडेल. अजमीरास तिकडील महाराष्ट्रीयांनी बृहन्महाराष्ट्रीयांची परिषद भरवून संघटनेच्या दृष्टीने फार उपयुक्त कामगिरी बजावली आहे. सदर परिषदेचे अध्यक्ष प्रो. दामले, स्वागताध्यक्ष प्रो. साठे, यांची भाषणें व परिषदेत पास झालेले ठराव, बृहन्महाराष्ट्रांतील सर्व लहान–थोर महाराष्ट्रीयांस उपयुक्त व मार्गदर्शक असल्याने त्या सर्वांचा कोठे तरी एकत्र संग्रह व्हावयास पाहिजेच होता. तो प्रस्तुत वार्षिक पुस्तकांत समग्र छापण्यांत प्रकाशकांचें

दूरदर्शित्वच प्रत्ययास येत. सारांश, यांतील बहुतेक सर्व लेख व माहिती वाचनीय, उद्‌बोधक व संग्राह्य असल्याने, हा दोनशें पानांचा ग्रंथ प्रकाशित करून वार्षिकाच्या चालकांनी अखिल महाराष्ट्रीयांस ऋणी करून ठेवलें आहे यांत शंका नाही.

# इंग्लंड व रशिया यांजमधील बेबनाव

सन्धिना एकत : स्वकर्माणि प्रवर्तयिष्यामि विग्रहेण एकन : परकर्माणि उपहनिष्यामि ॥

—कौटिल्यकृत 'अर्थशास्त्र.'

परमेश्वराने सुख-दुःख, संतोष-असंतोष, शांतता-युद्ध यांच्या परस्परविरुद्ध ताण्याबाण्यांनी विश्वाचा विशाल पट तयार केला आहे. आज जागतिक राजकारणांत ज्या घडामोडी चालू आहेत, त्यांच्याकडे दृष्टि फेकता विश्वपटाच्या वैचित्र्याची प्रतीति आपल्या मनाला पटल्याशिवाय राहत नाही. जिनीव्हा येथे निःशस्त्रीकरणाच्या तत्त्वचिंतनांत युरोपियन राष्ट्रें मग्न आहेत, तर चीनच्या इतिहासप्रसिद्ध भिंतीजवळ जपान आणि चीन हीं पौरस्त्य राष्ट्रें रणरंगाने लाल झाली आहेत. वॉशिंग्टन येथे जगाची विस्कटलेली आर्थिक घडी पुनरपि नीट कशी बसविता येईल या प्रश्नाची वाटाघाट राष्ट्राराष्ट्रांच्या प्रतिनिधींमध्ये होत आहे, तोंच क्षुल्लकशा कारणांवरून रशियन मालावर बहिष्कार पुकारण्याचा कायदा इंग्लंड पास करीत आहे! युध्यमान राष्ट्रांत तह घडवून आणणें आणि झालेल्या तहाला मूठमाती देणें हीं दोनहि परस्परविरोधी कार्यें कोणी घडवून आणीत असेल तर तो एक गुप्त हेरच होय! गुप्त हेर हा, कमानींतील चावीच्या दगडाप्रमाणे, राज्यशासनसंस्थेचा महत्त्वाचा घटक आहे. सुमारें २३०० शें वर्षांपूर्वी आर्य चाणक्य याने आपल्या 'अर्थशास्त्र' नामक ग्रंथांत गुप्त हेरांचें महत्त्व वर्णन करून त्यांच्या पाताळयंत्री कामगिरीचें सोदाहरण विवेचन केलें आहे. गुप्त हेर हा पौराणिक कालांतील दानवाप्रमाणे कामरूप असतो. वेषान्तर हा त्याचा धर्म आणि त्याच्या जोरावरच शत्रुपक्षाचें अन्तरंग हेरून तो त्याच्या काळजाला हात घालतो. युद्ध आणि राज्यक्रांति यांसारख्या अवाढव्य घडामोडी हा त्याच्याच खेळाचा प्रताप! गुप्त हेरांचें हें राजकीय महत्त्व जाणूनच कौटिल्याने 'कृत्स्ने च मण्डले नित्यं दूतान् गूढांश्च वासयेत् । मित्रभतः सपत्नानां हत्वा हत्वा च संवृतः' असा विजिगीषु राजाला सल्ला दिला आहे.

गुप्त हेरांचें हें माहात्म्य आठवण्याचें कारण म्हणजे रशियाच्या मॉस्को राजधानींत नुकताच संपलेला एक राजकीय खटला हें होय. रशियामध्ये 'मेट्रापोलिटन व्हिकार्स कंपनी' नांवाचें एक इलेक्ट्रिकल इंजीनियरांचें मंडळ गेलीं दहा वर्षें वीज पुरविण्याचें काम करीत आहे. गेल्या महिन्यांत एके दिवशीं रात्रीं रशियन पोलिसांनी कंपनींतील मॉंकहौस, मॅक्डोनाल्ड, थॉर्टन इत्यादि सहा इंग्रज इंजीनियरांना व बारा रशियनांना अकस्मात् गिरफदार करून कैदेंत ठेवलें. विजेला बोट लागल्याबरोबर साऱ्या शरिरांत जसा थरकांप सुरू होतो, त्याप्रमाणे सहा ब्रिटिशांना पकडल्याची वार्ता इंग्लंडाच्या खाडींत पसरतांच तिच्या लहरींनी सारें इंग्लंड कंप पावूं लागलें! पोलिसांची मामुली चौकशी झाल्यावर बन्दीकृत इसमांवर कट, फदफितुरी, लांचलुचपत, कारस्थान आणि यंत्रनाश असे आरोप ठेवण्यांत आले. ता. १२ एप्रिल रोजीं खटल्याला आरंभ होऊन ता. १८ रोजीं त्याचा निकाल लागला, व थॉर्टन यांस ३ वर्षें कैद, मॉंकहौस, कुशने आणि नॉर्डवॉल यांना हद्दपारी, गुसेव, लोबॅनोव्ह आणि सुखोरुचकिन् यांना १० वर्षें कैद, मॅक्डोनाल्ड आणि लेबेडव्ह यांना दोन वर्षें कैद व इतर रशियनांना दीड वर्षांपासून दहा वर्षांपर्यंत कैद अशा निरनिराळ्या शिक्षा ठोठावण्यांत आल्या.

खटल्याची एकंदर हकीकत वाचली असतां किती तरी विचारतरंग मनांत उद्भवतात. इंग्लंडाहून कांहीं व्यापाऱ्यांची कंपनी रशियांत जाते, आणि तेथे गुप्त हेरांचें जाळें विणून रशियाची औद्योगिक वाढ खुंटविण्याचा प्रयत्न करते या घटनेंत पुष्कळच गढार्थ भरला आहे. खटल्याच्या चौकशींत असें दिसून आलें कीं, इंग्रज इंजीनियरांनी द्रव्याच्या संमोहनास्त्राने कांहीं रशियनांना वश करून घेऊन मुख्य मुख्य ठिकाणचे औद्योगिक कारखाने बंद पाडले. इतकेंच नव्हे तर कंपनीने वीजपुरवठ्याचीं जीं कामें

केलीं तीं इतकीं सदोष आणि कच्चीं केलीं कीं, अल्पशा प्रयत्नानेंहि तीं मोडून पडावीं. या सर्व कारस्थानांचा उघड उघड हेतु असा कीं, रशियाची औद्योगिक कुचंबणा व्हावी, उत्पादनशक्ति क्षीण व्हावी आणि इंग्लिश मालाशीं स्पर्धा करण्याचें सामर्थ्य रशियांतील कारखान्यांना येऊं नये.

उद्योगधंद्यांच्या नाड्या आखडविण्याचा डाव टाकूनच हे कारस्थानी लोक थांबले नाहीत तर त्यांनी लष्करी खात्याच्या गोटांत शिरून दारुगोळ्याचें कोठार हस्तगत करण्याची कारवाई चालविली होती. या कारवाईला उद्देशूनच रशियन वकिलांनी ब्रिटिश आरोपींना असें खडखडीत शब्दांनी बजावलें कीं, "आम्हांला युद्ध करण्याची इच्छा नाही, परंतु तुम्हांला युद्धाचा कंडुच आला असेल तर तो शमविण्यास आमची एका पायावर तयारी आहे. म्हणजे मगच प्रत्यक्ष युद्धांत रशियाची आत्मसंरक्षणशक्ति व पराक्रम किती आहे याची प्रतीति तुम्हांला येईल." अशा तऱ्हेने व्यापार, उद्योगधंदे आणि लष्कर यांची धुळधाण करणाऱ्या या हेरांना शिक्षेचे चाप लावण्यांत आले यांत रशियाने मोठा गुन्हा तो काय केला? परंतु स्वार्थान्ध माणसाला न्यायान्यायाची इतकी चाड कोठून असणार? इंग्रज हे स्वतःला मोठे न्यायप्रिय समजतात. पण आश्चर्य असें कीं, इंग्रज आरोपींवर कट, फंद फितुरी, लांचलुचपत यांसारख्या भयंकर आरोपांचा वहीम असतां 'त्या सर्व आरोपींना बिनशर्त सोडून द्या, आरोपांच्या शाबितीपूर्वी कैदेंत ठेवणें म्हणजे न्यायदेवतेचा दिवसाढवळ्या खूनच करणें होय, यामुळें रशिया आणि इंग्लंड यांच्या स्नेहावर विरजण मात्र पडणार आहे' असा ब्रिटिश मुत्सद्दी आणि वृत्तपत्रें यांनी एकच गिल्ला सुरू केला! स्वतःचीं पापें विसरून दुसऱ्यावर चडफडण्याचा मनुष्यस्वभावच आहे. हिंदुस्थानांतील, विशेषतः बंगाल्यांतील शेकडो तरुण देशभक्तांना विनाचौकशी वर्षानुवर्षे कैदखान्यांत खितपत व सडत ठेवणाऱ्या ब्रिटिश सरकाराने रशियन सरकाराला वरील प्रकारचीं नांवें ठेवावीं हें आश्चर्य होय.

इंग्लंडचे मरहूम मुत्सद्दी लॉर्ड पामर्स्टन यांनी एकदा असे उद्गार काढले होते कीं, "प्रत्येक ब्रिटिश प्रजाजनाने, मग तो कोणत्याहि धर्माचा, वर्णाचा असो, असा दृढ विश्वास बाळगावा कीं, तो ब्रिटनमध्ये राहो किंवा पृथ्वीच्या पाठीवर कोठेहि वावरो, त्याला जेथें जेथें म्हणून अन्याय, अप्रतिष्ठा किंवा अपमान सोसण्याची पाळी येईल तेथें तेथें त्याचें संरक्षण करण्यास ब्रिटिश सरकार धावून आल्याशिवाय राहणार नाही." ब्रिटिश प्रजाजन कोणत्याहि धर्माचा, वर्णाचा व राष्ट्रीयत्वाचा असो, त्याला परदेशांत अन्याय सोसावा लागणार नाही. तो सोसावा लागलाच तर ब्रिटिश सरकार त्या अन्यायाचा प्रतिकार करण्यास समर्थ आहे असा लॉर्ड पामर्स्टन यांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. आणि याच राजकीय तत्त्वानुरूप ब्रिटिश सरकाराने ब्रिटिश इंजीनियरांवर झालेल्या अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी रशियन आयात मालाला बंदी करणारें बिल, चटावरील श्राद्धाप्रमाणे, अगदीं झटपट पास करून घेतलें. ता. २६ एप्रिलपासून बिलाच्या अंमलबजावणीलाहि सुरुवात होणार आहे.

आम्हांला मुख्य मुद्दा सांगावयाचा तो असा कीं, ब्रिटिश सरकाराने रशियांतील आपल्या प्रजाजनांवरील अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठी जिवाचें रान करून जितका आपुलकीचा भाव प्रकट केला तितका इतर प्रजाजनांच्या बाबतींत तें मुळीच दाखवीत नाही. ही गोष्ट सिद्ध करण्यास नुकतींच दोन उदाहरणेंहि घडलीं आहेत. कांही दिवसांपूर्वी जर्मनीच्या नाझी सरकारानें तीन–चार हिंदी लोकांना कम्युनिझमचा प्रसार करण्याच्या आरोपावरून विनाचौकशी कैदेंत ठेवले व आरोप शाबीत झाला नसतांहि त्यांना जर्मनींतून हद्दपार केलें. दुसरें उदाहरण इंडो–चायनांतील चेट्टी लोकांचें देतां येईल. चेट्टी लोक इंडोचायनांत सावकारीचा धंदा करतात. परंतु परवा तेथील फ्रेंच अधिकाऱ्यांनी कुळांना सूट न दिल्याच्या आरोपावरून त्यांना देशोधडीस लावलें! हिंदी लोक हे ब्रिटिश प्रजाजनच ना? मग त्यांची परदेशीं अशी विटंबना होत असतां त्याबद्दल ब्रिटिश सरकाराला संताप, त्वेष कसा चढत नाही? याचा अर्थच असा कीं, इंग्रज सरकाराला स्वकीयांच्यावर झालेल्या अन्यायाची जितकी चीड येते तितकी आपल्या प्रजाजनांपैकींच पण परकीयांवर झालेल्या अन्यायाची चीड येत नाही.

ब्रिटिश सरकारानें रशियन मालावर बहिष्कार घालण्याचें बिल आकसानें पास करून जागतिक राजकारणांत नवीनच खळबळ उत्पन्न केली आहे. रशियाशीं असलेलें व्यापारी नातें आताच तोडण्यास ब्रिटनला हीच संधि योग्य वाटली. कारण ता. १८ रोजीं जुन्या कराराची मुदतहि संपलीच होती. इंग्लंड आणि रशिया यांजमध्ये १९२४ सालीं मजूर-सरकार अधिकारारूढ असतांना व्यापारी तह झाला. परंतु इंग्लंडमधील हुजूरपक्षीयांना तो तह केव्हाच मान्य नव्हता. हुजूरपक्ष सत्ताधीश झाल्यापासून रशियाशीं झालेला तह संपुष्टांत आणण्याची तो एक प्रकारें संधिच पाहत

होता. आता अनायासेंच ब्रिटिश लोकांवरील खटल्याचें निमित्त साधून हुजूर-पक्षीयांनी चोहोंकडून रान उठविलें, व त्या धांदलींत व्यापारी तहाची मुदत न वाढविण्याचा कायदा पास करून घेतला. इंग्लंडने रशियाशीं हा व्यापारी फारकत करण्यास नैमित्तिक खटल्यापेक्षा दुसरीहि दोन बलवत्तर कारणें आहेत. त्यांपैकीं पहिलें राजकीय व दुसरें आर्थिक किंवा व्यापारविषयक कारण होय. इंग्लंड व रशिया यांचीं राजकीय ध्येयें इतकीं परस्परभिन्न आहेत कीं, त्यांची त्या बाबतींत विळ्याभोपळ्याइतकें सख्य आहे! इंग्लंडमध्ये भांडवलशाही सत्ताधारी आहे, तर रशियामध्ये मजूरशाही सत्ताधारी आहे. या भिन्न तत्त्वज्ञानामुळेच झारशाहीचा नायनाट झाल्यावर रशियांत समाजसत्ता स्थापित झाली तरी प्रथम प्रथम तिला मान्यता देण्यास ब्रिटन तयार नव्हतें. ब्रिटनला अशी भीति वाटते कीं, 'वाण नाही पण गुण लागतो' या म्हणीप्रमाणे न जाणो, रशियाच्या मालाबरोबर कम्युनिझमचाहि प्रसार इंग्लंडामध्यें व्हावयाचा! दुसरें असें कीं, एकदा रशियन मालांनें ब्रिटनच्या बाजारपेठा काबीज केल्या म्हणजे तेथून त्याला हुसकणें मुष्किलीचें होईल, आणि ब्रिटिश उद्योगधंद्यांना ग्रहण लागेल.

गेल्या सालीं ओटावा येथे ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींची व इतर घटकांची आर्थिक परिषद भरली होती. त्या परिषदेंत इंग्लंड व वसाहती यांजमध्ये व्यापारविषयक करार झाला. त्या करारान्वयें ब्रिटनने व इतर घटकांनी साम्राज्यांतील मालालाच प्रथम सवलत दिली पाहिजे, तोच माल प्रथम विकत घेतला पाहिजे, तो मिळत नसेल तर इतर देशांशी त्याबाबत स्वतंत्र तह करावे असें ठरलें. कानडाला रशियाची चुरस शेतीपासूनच उत्पन्न होणाऱ्या जिनसांच्या बाबतींत फारच भोवते. इंग्लंडाला ओटावा कराराचें व्रत पाळावयाचें तर कानडांत उत्पन्न होणाऱ्या मालाकरितां रशियांतून इंग्लंडमध्ये येणाऱ्या मालाला पायबंद घातला पाहिजे. परवाच्या बिलानें इंग्लंडाने रशियाचा जो ८० टक्के माल बंद केला आहे तो सर्व याच प्रकारचा आहे. इंग्लंडाचें हें धोरण प्रत्यक्ष इंग्लंडाला आणि युरोपाला कितपत हितकर होणार आहे याची शंकाच आहे. मांस, लोणी, अंडीं इत्यादि पदार्थ आयर्लंडांतूनहि इंग्लंडामध्ये आयात होत असत. परंतु आयर्लंड व इंग्लंड यांजमधील मित्रत्वाचें नातें तोडून इंग्लंडाने आयर्लंडावर १०० टक्के आयात जकात बसविली म्हणून आयर्लंडानेहि इंग्लिश मालावर तितकीच जबर जकात बसविली.

आता रशियानें तर ता. २२ रोजीं **एक फर्मान** काढून ब्रिटिश मालाला चांगलाच **शह दिला आहे.** इंग्लंडापासून कोणत्याहि मालाची मागणी करावयाची नाही, इंग्लिश माल रशियांत उतरूं द्यावयाचा नाही, ब्रिटिश निशाण फडकत असलेल्या बोटी आपल्या किनाऱ्यानें जाऊं द्यावयाच्या नाहीत, ब्रिटिश बंदरांचा शक्य तितका कमी उपयोग करावयाचा इत्यादि कलमें त्या फर्मानांत नमूद आहेत. 'जशास तसें' या वृत्तीनें राष्ट्राराष्ट्रांमधील व्यवहार सुरू राहणार असतील तर अशा धक्काबुक्कीनें जगांतील शांततेचा भंग होऊन त्याचें पर्यवसान युद्धप्रसंगांत झाल्यावांचून राहणार नाही. एक गोष्ट मात्र खरी कीं, दिवसेंदिवस युरोपियन राष्ट्रांचीं मनें एकमेकांविषयीं फारच सांशिक, मत्सरग्रस्त आणि कलुषित होऊं लागलीं आहेत. ज्वालामुखीचा स्फोट होण्यापूर्वी धरणीच्या पोटांत एकसारखी खळबळ चालू असते, त्याप्रमाणे युरोपियन राष्ट्रांच्या मनांत द्वेष, अविश्वास, अहमहमिका इत्यादि भावना थैमान घालीत आहेत. त्या भावनांचा अतिरेक होऊन युद्धाच्या ज्वाला केव्हा भडकतील याचा नेम नाही. इंग्लंड रशियाशीं असलेलें व्यापारी नातें तोडून तें कानडाशीं अधिक बळकट करून जोडीत आहे. चाणक्यानें "सन्धिना एकतः स्वकर्माणि प्रवर्तयिष्यामि विग्रहेण एकतः परकर्माणि उपहनिष्यामि" या वाक्यांत सांगितलेल्या द्वैधीभावयुक्त (दुहेरी) धोरणानें आपलें कल्याण साधण्याचें व रशियाचें नुकसान करण्याचें इंग्लंडानें योजिलें आहे. परंतु या धोरणानें त्याचें कल्याण होईल कीं त्याचा विनाश ओढवेल हें काळानेच सिद्ध होणार आहे.

आघाताला प्रत्याघात या न्यायानें इंग्लंड व रशिया यांनी एकमेकांविरुद्ध जकातीचीं हत्यारें उपसून व्यापारी युद्धाला सुरुवात केली आहे. १९१४ सालाच्या महायुद्धाच्या वणव्यानें सारें युरोप खंड हैराण झालें. त्याच्या धक्क्यानें व्यापारी घडी विस्कटली, आर्थिक व्यवहार मंद चालूं लागले; ही आर्थिक दुरवस्था थोडी तरी निवळावी म्हणून सध्या मॅक्डोनाल्डप्रभृति मुत्सद्यांनी अमेरिकेंत उपक्रम चालविला आहे. अशा स्थितींत त्याच मॅक्डोनाल्डसाहेबांनी एका निश्वासांत शांततेचा मंत्र म्हणावा व दुसऱ्या निश्वासांत व्यापारी युद्धाची डरकाळी फोडावी हे मोठेंच आश्चर्य होय. खटल्याचें कारण तें काय व त्यासाठीं व्यापारी तह मोडतात तो काय याचा अर्थ ब्रिटनच्या अन्तरंगांत शिरल्यावांचून समजणार नाही.

वस्तुतः रशियानें इंग्रज इंजिनियरांवर खटला भरून त्यांना शिक्षा दिल्या यांत वावगें तें

काय झालें? इंग्लंडानेहि अशा बाबतींत रशियाचेंच उदाहरण गिरविलें असतें याचा पडताळा इंग्लंडामध्ये नुकत्याच झालेल्या एका खटल्यांत पाहावयास सांपडतो. परवाच इंग्लंडामधील एका तरुण लष्करी अधिकाऱ्याला, त्याने शत्रुपक्षाला गुप्त माहिती पुरविल्याच्या आरोपावरून, पांच वर्षांची शिक्षा सुनावण्यांत आली. तसेच चौघां वेल्स देशांतील खाणीवाल्यांना, त्यांनी कम्युनिझमच्या वाङ्मयाचा प्रसार केला म्हणून, एक तें तीन वर्षांपर्यंत कैदेची शिक्षा देण्यांत आली. जें इंग्रज सरकाराने स्वतःच्या देशांत केलें तेंच रशियन सरकारानें आपल्या देशांत केलें तर त्याविरुद्ध इंग्लंडाने एवढा गिल्ला काय म्हणून करावा ?

उलट इंग्रज आरोपींनी भयंकर गुन्हे केले असतां व त्यांच्यापैकीं कांहींना स्पष्ट शब्दांनी गुन्ह्यांची कबुली दिली असतां त्यांना इतक्या सौम्य शिक्षा रशियन न्यायाधिशानें दिल्या त्याबद्दल ब्रिटननें रशियाचे आभारच मानावयास पाहिजेत. शिक्षादानांत न्यायाधिशांनी सूड, दुष्ट बुद्धि, खुनशीपणा इत्यादि भावनांना वाव दिला नाही हें विशेष अभिनंदनीय होय. नाही तर तोच मीरत खटला पाहा. मीरत खटला सुरू होण्यापूर्वी व नंतर आरोपींना कच्चया कैदेंत दिवस काढावे लागले व त्यांना जामिनावर सोडण्यांत आलें नाही. खटला वर्षानुवर्षे चालून, पुराव्याच्या कागदांचे पर्वतप्राय ढिगारे रचून, लाखों रुपये वकिलाच्या पायीं घालवूनहि निर्विवाद रीतीने सरकाराला आरोपींवर प्रत्यक्ष राज्यक्रांतीचा आरोप सिद्ध करतां आला नाही. तरी खटल्याचा निकाल झाला त्यांत न्यायाधिशांनी निरनिराळ्या आरोपींना तीन वर्षांपासून जन्मठेप काळ्यापाण्यापर्यंतच्या शिक्षा ठोठावल्याच. रशिया व इंग्लंड या दोन राष्ट्रांमधील हा फरक कोणाच्याहि लक्षांत आल्याशिवाय राहील काय ?

# राजापूर आयुर्वेद विद्यालय

## इमारतीचा उद्घाटन समारंभ

राजापूर संस्कृत पाठशाळेच्या विद्यमानें आयुर्वेद विद्यालयाच्या इमारतीचा उद्घाटन समारंभ मुंबईचे डॉक्टर **ल. नी. पुरोहित** यांच्या अध्यक्षतेखाली चैत्र शुद्ध प्रतिपदेस मोठ्या थाटानें साजरा झाला. समारंभासाठीं गांवांतील निमंत्रित सद्गृहस्थ हजर होते. वैदिक व शास्त्रीमंडळीहि उपस्थित होती. मुंबईहून वैद्यरत्न ऐनापुरे, श्री. गोपाळराव मोघे, देवळें येथील श्री. सीताराम शास्त्री आठवले व रत्नागिरीचे डॉ. घाणेकर वगैरे मंडळी हजर झाली होती.

मुलांचें ईशस्तवन झाल्यावर समारंभाचे एक कार्यदर्शी श्री. **र. कृ. पाटणकर** यांनी स्वागतपर भाषण केलें. सदर भाषणांत त्यांनी शाळेची पूर्व माहिती, तसेंच आयुर्वेद शिक्षण देण्याची फार दिवस गुप्त असलेली कल्पना लोकांच्या मनांत कशी होती याची हकीकत सांगून, प्रस्तुत समारंभाचें नियोजित अध्यक्ष मुंबईचे श्री. केशवरावजी गोखले, हे कां हजर राहू शकले नाहीत हें निवेदन केलें. नंतर डॉ. पुरोहित यांनी अध्यक्षस्थान व वैद्यराज ऐनापुरे यांनी वैद्यक वर्गाच्या प्रारंभ समारंभाचे नेतृत्व स्वीकारावें अशी सूचना केली. श्री. दातारशास्त्री यांनी अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले. श्री. आठल्ये शास्त्री यांनी यशःचिंतनपर आलेले संदेश वाचून दाखविले. त्यामध्ये श्रीमंत बाबासाहेब घोरपडे इचलकरंजीकर, श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि औंध, श्री. भाऊसाहेब पुराणिक, पनवेल. श्री. नानलशास्त्री पुणें, नगरचे वै. पं. गुणे व अकोल्याचे पराडकर वैद्य वगैरेंचें संदेश आले होते.

वैद्यराज ऐनापुरे यांनी आयुर्वेदाचें महत्त्व व उपयुक्तता थोडक्यांत सप्रमाण निवेदन केली, व पाठशाळेने निवळ पोटभरू विद्यार्थी तयार न करितां उत्तम निष्णात वैद्य तयार करावेत असें प्रतिपादिलें. व तीन विद्यार्थ्यांना वाग्भटाचे शिक्षण देण्याचा आरंभ करून दिला. आठल्येशास्त्री यांनी आतापर्यंत सुमारे १३।१४ शे रुपयाची मदत कशी झाली हें सांगितलें व पुढील देणग्या जाहीर करण्यांत आल्या.

**देणग्या**

१५० श्री. स. भा. पाध्ये गुर्जर, राजापूर, १०१ श्री. ना. रा. अभ्यंकर, राजापूर, ५१ श्री. स. गो. मालवेकर यांजकडून कै. तीर्थरूप गोपाळ जिवबा शेठ मालवेकर यांचे स्मरणार्थ, २५१ कै. ती. हरी पांडुरंग लेले यांच्या स्मरणार्थ, ५१ तांबे आरोग्यभुवन, मुंबई, या संस्थेचे मालक श्री. बा. वि. तांबे, २५ श्री. गोपाळराव मोघे मुंबई. याशिवाय वे. शा. सं. पांडुरंगशास्त्री आठल्ये यांनी ५ हजार रुपयांची देणगी देण्याचें आश्वासन दिलें. अध्यक्षांनी आयुर्वेदाचें ज्ञान उत्तम रीतीने मिळवें असा विद्यार्थ्यांना उपदेश केला. पानसुपारी व हारतुरे झाल्या नतर सर्वांचे आभार मानल्यावर समारंभ समाप्त झाला

# मोरोपंतांचें बारामतींतील स्मारक

रा. रा. केसरीकर्ते यांसः—

वि. वि. ता. १८-४-३३ च्या केसरीच्या अंकांत बारामतीच्या मयूर पुण्यतिथ्युत्सवाची व मयूर स्मारक संस्थेची प्रसिद्ध झालेली हकीकत अनेक दृष्टींनी भ्रामक व दिशाभूल करणारी असल्यामुळे तिचा इनकार करणें मला माझें कर्तव्य वाटत आहे.

शके १८४६ च्या मयूर-पुण्यतिथीस बारामतीसच प्रसिद्ध केलेल्या 'भक्त मयूर-केकावली' च्या प्रस्तावलेखांत व तेव्हाच्या केसरींतच प्रसिद्ध झालेल्या माझ्या पत्रांत मयूरस्मारक संस्थेविषयींचें माझें धोरण नमूद आहे. तथापि वरील बातमी केसरींत आल्यामुळें मयूर स्मारक संस्थाविषयक माझ्या भूमिकेची फोड मला पुन्हा करून ठेवणें भाग आहे. कारण, बारामतीस ही मयूर-स्मारक संस्था स्थापन झाल्याचा जो देखावा करण्यांत आला तो समक्ष पाहण्याचें भाग्य मला लाभलें नाही व सदर स्मारक संस्थेत ठेवण्यासाठी मीं मयूरकाव्यग्रंथ देण्याचें मान्य करण्याचा संभव, सर्व मुद्रित प्रती नुकत्याच अग्नेयस्वाहा झाल्या असल्याने उरलेला नाही हें वाचकांनी अवश्य लक्षांत ठेवावें.

कवि मोरोपंतांचें देहावसान झालें. नंतर बाबूजी नाइकांच्याहि कुटुंबीयांच्या बारामतींतील वास्तव्याची वाताहत होऊन मोरोपंतांच्या पुत्रद्वयाची फाटाफूट झाली. वडील पुत्र रघुनाथ याने उत्तर हिंदुस्थानचे रस्त्यास लागून ग्वाल्हेर—उज्जयनी गांठली. त्याची व त्याच्या वंशजांची खात्रीलायक बातमी आम्हा पंढरपूरकर धाकट्या वंशजांच्या दप्तरीं व घरीं कांहीच नमूद नाही. पांगारकर-विरचित मयूर-चरित्रांत त्याचे नक्कल झाल्याचा मजकूर सर्वांबरोबर आम्हीहि वाचतों धर्मसिंधुकार पाध्यांचा जामात जो द्वितीय मयूर-पुत्र रामकृष्ण त्याने पाध्यांच्याच धोरणाने बारामतीचें वास्तव्य संपवून पंढरपुरास पाध्यांनी देऊं केलेल्या शेजारच्या वाड्याचा स्वीकार केला, तेव्हापासून आम्ही सारे द्वितीय मयूरपुत्राचे वंशज बारामतीकर न राहता पंढरपूरकर गणले जाऊं लागलों. तथापि पंतांचें "सदयहृदय अन्नदाते" बाबूजी नाईक यांनी पूज्य भावानें व व्यवहाररीतीलाहि धरून शके १६९९ मध्ये कवि मोरोपंतांना बक्षीसपत्राने दिलेल्या बारामतीच्या मयूर-वास्तुविषयीचा आत्मीय भाव कोणाहि पंत-वंशजाने केव्हांहि सोडलेला नाही, हें सदर भक्त मयूर केकावलींत छायाचित्र रूपाने सामील करून प्रसिद्ध केलेल्या पुढील कागदा (Document) वरून वाचकांच्या लक्षांत येईल.

श्रीगजानन

"श्रियासह चिरंजीव राजेश्री काशीनाथ पंतबावा व नारोपंतनाना यासी (प्रस्तुत लेखकाचे अनुक्रमें सख्खे व चुलत पणजे) प्रती गणेशभट पराडकर कृतानेक आशीर्वाद विशेष. ती. कैलासवासी रामकृष्णपंतबाबांना (द्वितीय मयूर-पुत्र व प्रस्तुत कागद लिहून घेणारांचे वडील) यांनी आम्हांस आपला वाडा बारामती येथे आहे, त्या वाड्यांत वस्ती नाही सबब आम्हांस राहावयास दिला. बोवांचे शिष्य तुम्ही आहांत त्यापेक्षां नैवेद्य वैश्वदेव करून तुम्हीं रहावें म्हणून पत्र, याजवरून आम्ही त्या घरांत राहतों. आम्हीं आजपावेतों घराची पडझड व नवीन इमारत केली व पुढेंहि पडझड नवीन इमारत केल्यास त्याचा पैसा तुम्हांस मागणार नाही. आम्ही राहतों त्यापेक्षा आमचे उपयोगार्थ आम्ही केलें. तुमचा वाडा तुम्हास पाहिजे तेव्हा खालीं करून देऊं. पडझड नीट केली त्याचे खर्च मागणें वगैरेविषयी तक्रार तुम्हासी सांगणार नाही. बोवा आमचे गुरु सबब बोवाचा वाडा नीट करणे आम्हांस श्रेयस्कर आहे. दात्ये यांचा व आमचा खटला जाग्यासंबंधी पडला त्याजबद्दल खर्च आम्हांस कांही लागला नाही व पुढे कांही खटला करणें झाल्यास तुमचे इतल्याखेरीज करणार नाही. बहुत काय लिहिणें. मिती शके १७६६ क्रोधी नाम संवत्सरे चैत्र व॥ १३ रोज चंद्रवार सन XXX५३ हा आशीर्वाद. दस्तुर गणेशभट पराडकर खुद्द.

साक्ष

१ धोंडो पांडुरंग शेवडे वस्ति क्षेत्र मजकूर द. खु.

१ सखाराम बिन मXXX शिंपी, बारामतीकर हल्ली मुक्काम बारामती द. खु.

सदरहू कागद भूतकाळाच्या अंधारांतून वर्तमानकाळाच्या उजेडांत आणण्याचेंहि कारण असें कीं, सदर वाड्याच्या विद्यमान कबजेदार (मालकीण नव्हे) गं. भा. सखूबाई पराडकर यांचे तर्फे त्यांचे व्याही कै. बाळासाहेब खाडेकर पेन्शनर मामलेदार यांनी तत्पूर्वी

मला गांठून सदर वास्तुविषयीचा पंतवंशजांचा आत्मीय भाव चाळविण्याचा विफल प्रयत्न केला होता. तथापि सदरहू कागद त्यांचे नजरेस आल्यानंतर त्यांनी आपल्या सुनेच्या ( सखूबाईच्या मृत कन्येच्या ) वारसा हक्काचा नाद सोडल्याचें स्पष्ट बोलून दाखविलें होतें. सखूबाई निपुत्रिक असल्या तरी त्यांचे सख्खे दीर श्री. केशवराव पराडकर हे बारामतीसच दुसऱ्या घरांत सकुटुंब सपरिवार नांदत आहेत. सदरहू कागदाशीं सखुबाईइतकाच त्यांचाहि जबाबदारीचा संबंध आहे. अशा स्थितींत मयूरस्मारक संस्थेची सखूबाईतर्फे घोषणा करण्यास घरचे केशवराव कामीं न येतां त्या वास्तूंत वकीलीचा धंदा थाटून राहिलेले परके गुणपुलेच कामीं आल्याचे केसरींत प्रसिद्ध झालें आहे.

आता कालांतराने पंतकुलवृक्षाला अनेक शाखोपशाखा फुटून चालू जीवनकलहांत ते पंढरपूरकरहि न राहतां हिंदुस्थानकर म्हणण्याइतके विविध स्थळीं पांगले आहेत. अशा स्थितींत बारामतीच्या पंत–वास्तूला सर्वच पंत–वंशजांनी शुद्ध सार्वजनिक स्वरूप देण्यास झटावें व तेथेच सर्व मयूरलेख एकत्वाने सुरक्षित राहण्याची योजना करावी असा एकभाव मी आळविला आहे. व म्हणूनच भक्तमयूर केकावलीच्या पुस्तकांत बारामतीकरांस श्रीरामनाममंत्राक्षरसंख्येच्या १३ आर्यांची उघडी अर्जी मीं सादर केली आहे. तीहि या वेळीं वाचकांनी नजरेखाली घालावी म्हणजे माझी मयूरस्मारकविषयक कल्पना त्यांना उमगेल इतकेंच नव्हे तर कोणाहि जिव्हाळ्याच्य मयूरभक्ताला तीच मानवेल असा मला विश्वास आहे.

सखूबाई या पंतवंशज नसल्या तरी पंताच्या ज्या चुलत भावाने पंतांच्या काशीयात्रेची झटून पूर्वतयारी केल्याचें विष्णुपद वकिलींत पंतांनी कृतज्ञतेने उद्गार काढले आहेत त्या गंगाधरभट पराडकराच्या कुळांतीलच आहेत. अर्थात आम्हांला पूज्य स्वजनच आहेत. मी त्यांचेपुढेंच प्रमाणपूर्वक पहिल्याने व्यक्त केलेल्या धोरणानें मयूर स्मारक संस्थेची पायाशुद्ध उभारणी करण्याची वाट त्यांनी उदार मनाने मला द्यावी. असें केल्याने त्यांची स्वतःची कोणतीहि गैरसोय त्यांचे हयातींत न होण्याविषयीं मी कर्तव्यबुद्धीने जबाबदार राहीन. श्रीराम त्यांना तशी बुद्धि देवो. कळावें हे विनंति.

३६८ सदाशिव पेठ
ताई रास्ते राममंदिर पुणें

आपला
**रा. द. पंतपराडकर.**

# पुस्तक–परीक्षण

## हिंदी परिस्थितीवरील इंग्रजी कादंबरी

### 'मान्सून'

लंडन येथील 'हॅमिश हॅमिल्टन लिमिटेड (९० ग्रेट रसेल स्ट्रीट डब्ल्यू. सी. १)' या मंडळीने 'मान्सून' नावाची कादंबरी आमचेकडे गेल्या महिन्यांत प्रसिद्धीपूर्वी अभिप्रायासाठीं पाठविली. प्रस्तुत कादंबरीचे कर्ते मि. वुइल्फ्रेड डेव्हिड हे ऐन पंचविशींतील लेखक असून त्यांची ही पहिलीच कादंबरी होय. तथापि, चमकदार व सुटसुटीत भाषा, जिज्ञासा ताणणारी व विविधता निर्माण करणारी रचना आणि विशेषतः मोजक्या शब्दांत एखाद्या प्रसंगाचें किंवा रसाचें चित्र खडें करणे या गुणामुळे कादंबरी या दृष्टीने कोणताहि रसिक वाचक 'मान्सून'ची प्रशंसाच करील.

### वीर व शृंगार

पण केवळ कादंबरी या नात्यानेंच प्रस्तुत पुस्तकाचें महत्त्व आहे असें नव्हे. हिंदी वाचकांच्या टेबलावर जाऊन बसण्याचाहि हक्क तिने संपादन केलेला आहे. कादंबरीचा नायक डोरियन याच्या व्यभिचारापर्यंत मजल मारणाऱ्या उत्तान प्रणयचेष्टा तिच्यांत भडकपणें रंगविलेल्या असल्या, तरी त्यांचें कार्य मुख्य कथाभागाची पार्श्वभूमि सजविण्याचेंच आहे. केंब्रिज येथील कॉलेजांत शिक्षण घेतलेला हा कथानायक मुंबईस येऊन बातमीराच्या दुर्बिणींतून हिंदुस्थानांतील राजकीय चळवळ न्याहाळीत आहे, आणि तिच्या आसपास दिसणारी धार्मिक, सामाजिक इत्यादि दृश्येंहि त्याच्या नजरेस पडत आहेत. हें एकटे एकच कथा-केंद्र कादंबरींत फुलवून दाखविलें असतें तर वाचकांना एकरंगीपणाचा कंटाळा आला असता. तो घालविण्यासाठी जळजळींत राजकारणाच्या आजूबाजूला युवयुवतींच्या मधुरामधुर अशा शृंगार-क्रीडांचे कारंजें लेखकाने उडत ठेवलें हें इष्टच आहे. आता मराठी कादंबऱ्यांतून युरोपियन गांवसासू किंवा कुमारी ल्यूसी मोकळेपणें वावरू लागली आहे, त्याची परतभेटच,

या कादंबरींतील माजी आमदार गणपतराव व दमयंती देवधर यांच्या वर्णनाने लेखक करीत आहे कीं काय असें वाटतें! कायदे भंगाची चळवळ, क्रांतिकारकांचीं मतें, समाज सत्तावादाच्या कल्पना, इत्यादि सांप्रतच्या हिंदी परिस्थितीचीं अंगें अर्थात 'प्रयोगाच्या सोयीसाठी योग्य फेरफार करून' कादंबरीकाराने रंगविली आहेत. या सर्वांवर त्यानें पसरलेलें कथाकौशल्याचें झिरझिरीत वस्त्र वाचकाने हळूच उचलून पाहिले तर त्याला त्याखालीं खान—पाणंदीकरांचा प्रीतिसंगम आढळेल; आणि हॉटसन—गोगटे प्रकरणाच्या ज्वालाहि दिसतील. युरोपियनांचा वर्णविद्वेष, गांधीराज्यांतील ५०० रु. पगाराचा व्हाइसरॉय आणि हिंदु-मुसलमानांचे दंगे, तसेंच मद्यपानावरील निरोधन, निरोधकावरील लाठ्या आणि लाठ्यावरील हिंदी रक्त हे सारे आजकालचे वृत्तपत्रीय प्रकार कादंबरीमय भाषेने मांडलेले या पुस्तकांत पाहावयास मिळतात.

### सहानुभूतीचा चष्मा

विशेष हें कीं, हिंदुस्थानाच्या परिस्थितीचें निरीक्षण करतांना या इंग्रज लेखकाने आपल्या डोळ्यावर सहानुभूतीचा व सत्यवृत्तीचा चष्मा लाविलेला आहे; मत्सर आणि पक्षपात यांचा चष्मा लावलेला नाही. एक बाल-विवाहाचेंच उदाहरण घेतलें, तर ती विवाहपध्दति कशी सुधारावयास पाहिजे या हेतूने थोडक्यांत चुरचुरीत टीका कादंबरीकाराने केलेली आढळते. "आमचीं लग्नें जमविण्याचें काम स्वर्गांतच उरकलेलें असतें, येथे फक्त त्यांचा समारंभ मात्र व्हावयाचा असतो." असे उद्गार गणपतरावांच्या तोंडीं घालून कादंबरीकार मोकळा झाला आहे. उलट याच विषयाचें हिडिस वर्णन अखंडकुमारी मेयो हिनें आपल्या "मदर इंडियां"त फिदिफिदि हंसत केलेलें आहे. अशी जखमेवर चोंच मारण्याची काकवृत्ति मि. डेव्हिड यांची नाही. इतकेंच नव्हे तर त्यांनीं 'मदर इंडिया' ला हिंदुस्थानाचें गटार म्हणून तुच्छ लेखिलें आहे. आणि त्याबरोबरच, हिंदुस्थानांत जीं घाणेरडीं गटारें आज वहात आहेत त्यांची जबाबदारी त्यांनी ब्रिटिशांच्या माथीं मारिली आहे. आजकाल विधर्मीय विवाह हा आपल्या सामाजिक जीवनांतील एक चिंतनाचा व चिंतेचाहि विषय होऊन बसला आहे. योगायोग असा कीं, त्याचें चित्र या इंग्रजी कादंबरींत रेखाटलें आहे—मराठी कादंबरीकारांचे हात मात्र तेथपर्यंत अजून पोहोंचले नाहीत. केंब्रिजच्या कॉलेजांत विद्यार्जन करून परत आलेला अल्लीखान नांवाचा एक मुसलमान तरुण दमयंती देवधर नांवाच्या हिंदु युवतीवर फिदा होतो असा प्रसंग उभा करून कादंबरीकाराने त्याचा परिणाम म्हणून अल्लीची आई वेड लागून कशी मरण पावते आणि त्याच्या बापालाहि हा धर्मांतरील घाला किती असह्य होतो वगैरे प्रकार स्वाभाविक रीतीनें व अचूकपणें रंगविलेले आहेत.

### अहिंसेची फलश्रुति

मात्र प्रेमभग्न व निराशामग्न झालेला असा हा अल्ली वैतागाने व अनास्थेने राजकारणाच्या रणांगणाकडे वळला असें दाखवून कादंबरीकाराने हिंदुस्थानांतील राजकीय कार्यकर्त्यांचा एकप्रकारें अन्यायच केला आहे. लाठीहल्ला, तुरुंगवास, पोलीस ठाण्यावर हजेरी वगैरे सर्व सरकारी कृपा-प्रसाद अल्लीच्या वाट्यास आले. तें सर्व गिळून व कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं उभा राहून त्यानें स्वातंत्र्ययुद्धांत भाग घेतला. परंतु कॉंग्रेसच्या या मार्गाबद्दल त्याला पुढे निराशा व अविश्वास वाटूं लागला असें कादंबरीकाराने दाखविलें आहे. वास्तविक, भारतीय शांतियुद्धाचें हें पर्व जागतिक इतिहासांत अद्यापि लिहून पूर्ण व्हावयाचें आहे. तेव्हा त्याच्या यशापयशाबद्दल भाकित वर्तविण्याची घाई करणे युक्त नाही. विशेषतः विरोधाची कुऱ्हाड या कोवळ्या वृक्षावर घालण्यापूर्वी कादंबरीकाराने अधिक विचार करावयास पाहिजे होता; पण तो न करतां त्यानें असें दर्शविलें आहे कीं, ज्याप्रमाणे अल्ली हा प्रेमाच्या बाबतींत थप्पड मिळाल्यानंतर राजकारणाकडे पाऊल टाकतो, त्याचप्रमाणे राजकारणांतील अहिंसेत गोडी वाटेनाशी झाल्यानंतर तो क्रांतींतील रक्तपाताची आणि मार्क्सच्या समाजसत्तावादाची भाषा काढूं लागतो. एवढेंच नव्हे तर, शेवटीं महालक्ष्मीच्या मैदानांत शर्यतीच्या वेळीं गव्हर्नरावर गोळ्याहि झाडतो!

### नमुनेदार कोटिक्रम

मात्र एवढे खरें कीं, ज्या वेळीं जें मत अल्ली प्रतिपादितो त्या वेळीं तो तें मोठ्या आवेशाने, मार्मिकतेने आणि संयुक्तिकपणें ते पुरस्कारितो. याचा एक सुंदर नमुना म्हणून अहिंसेचा फोलपणा दाखवितांना अल्ली हा, कथानायक डोरियन याच्याशीं जो बुद्धिबळाचा डाव खेळतो तो पाहण्यासारखा आहे. 'आम्हांला वीरात्मे हवेत; हुतात्मे नकोत' असे आवेशपूर्ण उद्गार तो काढतो तेव्हा त्याला उत्तर म्हणून डोरियन म्हणतो, 'अत्याचार कराल तर सरकार तुम्हांला उंदराप्रमाणे पटापट मारील. शिवाय, लपून—छपून गोळी घालण्यांत तुमचा काय पुरुषार्थ? या हेटाळणीने अल्ली हटत नाही. त्याला त्याचा जाब असा कीं, 'होय, आम्ही चोरटेच घाव घालणार; गुलामांना चोरटे

घाव घालण्याचा हक्कच आहे! अशा रक्तपातानेच आम्ही स्वातंत्र्य संपादन करणार.' या विधानाची कुचेष्टा करण्यासाठी डोरियन म्हणतो, "तुम्हाला स्वातंत्र्य मिळेल, तेव्हा मौज अशी होईल कीं, गांधी हे एका शिष्टमंडळासह एडनला धांव घेतील आणि इंग्रजांना म्हणतील, 'बाबांनो, कसेंहि करा, पण परत हिंदुस्थानाला चला" ब्रिटिशांच्या अभावीं हिंदुस्थानांत बेबंदशाही माजेल या आक्षेपाला अली चटकन् उत्तर देतो कीं, "तुमच्या युरोपांत तरी काय स्थिति आहे? सध्यां सारी बेबंदशाहीच आहे कीं नाहीं!"

### युरोपियनांचें नबाबी धोरण

रक्तपाताने स्वातंत्र्यप्राप्ति हें हिंदी राजकारणाच्या लंबकाचें जसें एक टोंक; तसें दुसरें टोंक इंग्रज अधिकाऱ्याच्या 'नबाबी' वृत्तीचें. 'तुंबडी भरा आणि घरचा रस्ता धरा' या इंग्रज अंमलदारांच्या धोरणाला 'नबाबी' वृत्ति म्हणून कादंबरीकारानें संबोधिलें आहे. ॲलन मर्केहॅम नांवाचा डोरियनचा चुलता हाडाचा सिव्हिलियन दाखविला आहे. त्याचें हिंदी लोकांशीं इतकें हाडवैर कीं, आपल्या क्लबावर त्यांची सावलीहि पडतां कामा नये असा त्याचा कटाक्ष आणि त्यांच्या क्लबांत आपली बायको एकदा गेली तेव्हा तर त्यानें आकाशपाताळ एक केलें; आणि आपल्या पत्नीच्या मुखांत त्या साहेबानें चपराक दिली! या त्याच्या सुलतानी वर्तनावर डोरियन यानें छोटीच पण मार्मिक अशी टीका केली आहे. तो म्हणतो, 'याचा अर्थ असा कीं, 'हिंदी माणूस हा आपल्याच देशांत बहिष्कृत समजावयाचा! किती मूर्खपणा हा!!' हिंदुस्थानांतील युरोपियन क्लबांमधून होणारी भाषणें वर्णविद्वेषाच्या विषानें किती माखलेली असतात, याची चुणूक मर्केहॅम यांच्या व्याख्यानांवरून दिसून येणारी आहे. त्याचबरोबर हेंहि पाहण्यासारखें आहे कीं, हिंदी माणसाला कुत्र्याच्या मोतीनें वागविणाऱ्या व स्वतःला ईश्वराचें लाडके लडके मानणाऱ्या मर्केहॅमनें आपल्या व्यापारांत नीच पाताळयंत्रीपणा केला. हिंदी लोकांनीं ब्रिटिशांवरील बहिष्काराचें लाक्षागृह निर्माण केलें असें पाहून आपल्या छत्र्या वगैरे माल त्यापासून बचावण्यासाठीं याच 'आकाशांतून पडलेल्या' (Heaven-born) मर्केहॅमनें आपल्या ब्रिटिश छत्र्यावर 'मेड इन् जर्मनी' असा खोटा शिक्का मारला. याची खबर मुंबईतील जर्मन वकिलाला लागतांच त्यानें मर्केहॅम याला चांगली तंबी दिली. पण 'राजा कालस्य कारणम्' हेंच खरें. हिंदुस्थानांतल्या वैश्यशाहीची पाठराखण इंग्रजी नोकरशाही करीत असते; म्हणून इंग्रज व्यापाऱ्यांचें कुलंगडें बाहेर काढणाऱ्या त्या जर्मन वकिलाचीच चीनमध्यें उचलबांगडी करण्यांत आली! असे अनेक प्रसंग वर्णून कादंबरीकारानें येथील इंग्रजी नोकरांच्या पुढें एक छानदार आरसाच धरला आहे असें म्हटलें तरी चालेल. या कादंबरींत हिंदी राजकारणाच्या दोन्ही बाजू यथास्थितपणें रंगविल्या असल्यानें येथील सुशिक्षित हिंदी वाचकाप्रमाणेंच इंग्रज अंमलदारांनाहि ती वाचनीय आहे. किंमत ७ शिलिंग ६ पेन्स आहे.

# टिळक-मंदिरांत रणदेवतेचें दर्शन

लो. टिळक हे वीर पुरुष होते. त्यांचें सर्व आयुष्य लढाया मारण्यांत व प्रतिपक्षाचा पाडाव करण्यांत गेलें. हिंदुस्थानाचें विस्तीर्ण रणांगणहि आपल्या पराक्रमास पुरत नाही असें वाटल्यामुळेच कीं काय त्यांनी आयुष्याच्या अखेरीस इंग्लंडावर मोहीम काढून लॉर्ड सिडनहॅम, सर मायकेल ओड्वायर, सर व्हॅलेंटाईन चिरोल, अशा कट्टया शत्रूशीं सामना दिला. चौदा वर्षांपूर्वी याच दिवसांत लो. टिळक इंग्लंडांत गर्जत होते, व स्वराज्याच्या हक्कांकरिता सनदशीर रीतीनें लढत होते. पण आता त्यांची ती गर्जना थांबली आहे. त्यांचे लढणारे बाहू विराम पावले आहेत. व त्यांचे तें सावळें ध्यान दृष्टीआड होऊन त्याऐवजीं दगडाची खोळ घातलेली स्थिर मूर्ति टिळक मंदिरांत उभी आहे. तथापि लो. टिळकांचें कार्यच असें आहे कीं, त्यांच्या सजीव देहाभोंवतीच काय, पण त्यांच्या निर्जीव पुतळ्याभोंवतीहि समाजाला जिवंत करणाऱ्या लाटा सतत उसळत असाव्या.

गेल्या मंगळवारीं टिळक-मंदिरांत वसंत-व्याख्यान-मालेस सुरुवात झाली त्या वेळीं हीच गोष्ट प्रत्ययास आली. यंदाच्या मालेंतील पहिलें व्याख्यान ग्वाल्हेरचे कॅप्टन गणपतराव मोडक यांनी दिलें. त्यांच्या व्याख्यानाचा विषय हिंदुस्थानाचें संरक्षण हा होता. कॅप्टन मोडक यांनी ग्वाल्हेरीस शिंदे सरकाराच्या सैन्यांत हुद्द्याचीं कामें केलीं आहेत. शिंदेशाहींतील सैन्याच्या शौर्याची शिफारस

आजच्या पडत्या काळांतहि होत असून इंग्रज सरकाराला संस्थानिकांच्या सैन्याची गरज लागते त्या वेळीं शिद्यांची फौज रणांगणावर जाऊन शत्रूची गांठ घेण्याला एका पायावर उभी असते. अशा या तयार फौजेंत शिरून सामान्य शिपायापासून कॅप्टनच्या हुद्दयापर्यंत वाढत वाढत मोडक यांनी युद्धकलेचें ज्ञान आत्मसात् केले आहे, खेरीज विविध रणक्षेत्रें पाहून रणदेवतेचा निनाद आपल्या कानांनी ऐकला आहे व तिच्या उग्र मुद्रेकडे धीर गंभीर चित्ताने टक लावली आहे. इंग्रज सैनिकांच्या शौर्याची कृत्यें अनेकवार त्यांच्या डोळ्यांना दिसलीं असल्यामुळे त्यांचें पाणी त्यांस बरोबर जोखतां आलें आहे.

कॅप्टन मोडक हे केवळ हडेलहप्पी शिपाईगड्याप्रमाणे अक्षरशत्रु नव्हेत. त्यांनी युद्धशास्त्राचा अभ्यास केला असून त्यांचें इंग्रजी भाषेचें ज्ञानहि उत्कृष्ट आहे. इंग्रजांचे लष्करी अधिकारी युद्धशास्त्रांत व युद्धकलेंत निष्णात असतात. त्यांच्या तोडीचीं माणसें हिंदी लोकांत सहसा पाहावयास सांपडत नाहीत. याचें कारण सुशिक्षित वर्गाला सैन्यांत शिरण्याची किंवा सँढर्स्टसारख्या श्रेष्ठ प्रतीच्या कॉलेजांत शिक्षण संपादून युद्धशास्त्रांत पारंगत होण्याची संधिच मिळाली नाही हें होय. परंतु ती नसली तरी त्या प्रकारची संधि लाभली असता हिंदी लष्करी अंमलदार गोऱ्या अंमलदाराहून रतिमात्रहि कमी पडणार नाहीत असा विश्वास मोडक यांच्या उदाहरणावरून बेलाशक बाळगण्यास हरकत नाहीं. टिळकमंदिराच्या पटांगणांत कॅप्टन मोडक यांचें भाषण एक तासभरच झालें. पण त्या एका तासांत विषयाचा अस्खलित ओघ, वाणीचा खणखणीतपणा, वीरवृत्तीचा जोर, अभिनयाचा थाट व माहितीचा पुरवठा यांनी श्रोत्यांची वृत्ति त्यांनी अगदीं तल्लीन करून सोडली. इंग्रजी किंवा मराठी भाषणें करणारे वक्ते अनेक असतात, व त्यांपैकी कित्येकांच्या मस्तकावर सरस्वतीचा वरदहस्तहि असतो. परंतु वीरवृत्तींत वाढलेल्या वक्त्याच्या अंगांतील वारें कांहीं वेगळेंच असते, असा अनुभव मोडकांच्या भाषणानें पुष्कळांना येऊन त्या योगानें त्यांच्या नसानसांतून आवेश संचरला असल्यास नवल काय! मोडकासारखा एखादा हिंदी लष्करी अंमलदार आपल्या सामर्थ्यानें जनतेची चित्तवृत्ति बदलून टाकून रणमद उत्पन्न करण्याचें श्रेय जोडतो तर अशा प्रकारचे शेंकडो हिंदी अंमलदार समाजांत मिसळल्यास व त्यांनी आपलें चैतन्य मृतप्राय बनलेल्या व्यक्तींमध्यें सोडल्यास भारभूत होणाऱ्या कोट्यवधि भारतवर्षीयांच्या तोंडाकडे त्रांकडया नजरेने पाहील कोण!

कॅप्टन मोडक यांनी कांहीं वर्षांपूर्वी 'प्रतापगडचें युद्ध' हें मौल्यवान पुस्तक लिहून अफजुलखान व शिवाजीमहाराज यांजमध्यें संग्राम घडून येऊन अफजुलखानाचा वध महाराजांच्या वाघनखांनी केला, या प्रसंगाचें वर्णन केलें आहे. त्या संग्रामांत महाराजांचें युद्धकौशल्य प्रतीत झालें त्याला युद्धशास्त्राच्या सांच्यांत बसविण्याची कामगिरी मोडकांना प्रथमच बजावल्याने मोडकांच्या या पुस्तकास मराठी वाङ्मयांत अपूर्व स्थान मिळविता आलें. त्यानंतर मोडक यांनी 'इंडियन डिफेन्स प्रॉब्लेम' नांवाचा ग्रंथ नुकताच इंग्रजी भाषेंत प्रकाशित केला आहे. जॉईंट पार्लमेंटरी कमिटीचें काम इंग्लंडांत लवकरच सुरू व्हावयाचें असून त्या वेळीं हिंदी लष्कराच्या पुनर्घटनेचा विचार साहजिकच पुनः एकदा झाल्यावांचून राहणार नाही. त्या विषयाचा अभ्यास रा. मोडक यांनी एका विशिष्ट दिशेने केला आहे. ती दिशा कमिटींतील सभासदांच्या नजरेपुढे स्पष्टपणाने यावी व हिंदी लष्कराचा प्रश्न हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीने सुटण्यास मदत व्हावी या उद्देशाने रा. मोडक यांनी आपला ग्रंथ लिहिला आहे मोडक यांचा स्वतःचाहि संकेत पार्लमेंटाच्या जोड कमिटीपुढे साक्ष देण्यास जाण्याचा आहे. ही गोष्ट इतर बऱ्याच गोष्टींवर अवलंबून आहे. पण त्या कामीं सुदैवाने त्यांस यश आल्यास लष्करी बाबतींत हिंदुस्थानाची बाजू मांडण्याकरिता मोडकासारखा गृहस्थ लाभला याबद्दल हिंदस्थानास स्वतःचें अभिनंदन स्वतःच करून घ्यावेसें वाटेल. मोडक यांनी स्कीनकमिटीपुढे यापूर्वीच साक्ष दिली आहे. त्या साक्षींत माहितगारी, सडेतोडपणा व हजरजबाबीपणा या गुणांच्या जोरावर मोडक यांनी कमिटीच्या सभासदांची अगदी खात्रीच करून सोडली. मोडक यांनी प्रस्तुत विषयाचा व्यासंग केवळ हौसेने चालविला असल्यामुळे स्कीन कमिटीला मोडकांची साक्ष साऱ्या हिंदी साक्षीदारांत बरीच जड गेली असेल यांत शंका नाहीं.

'इंडियन डिफेन्स प्रॉब्लेम' या पुस्तकांत कॅ. मोडक यांनी हिंदुस्थानाच्या लष्करी प्रश्नाकडे निराळयाच बाजूने पाहिले आहे. हिंदी लष्करांत ६५ हजार गोरे व १४० हजार काळे शिपाई आहेत. हें सैन्य हिंदी बनलें पाहिजे अशी हिंदी लोकांची महत्त्वाकांक्षा आहे. पण या हिंदीकरणाचा अर्थ कांहींकडून वेगळ्या रीतीनें करण्यांत येतो सैन्यावरचे बहुतेक वरिष्ठ अधिकारी इंग्रज आहेत. त्यास काट मिळून त्यांच्या

जागा हिंदी अंमलदारांनी भरून काढल्या पाहिजेत याचें नांव सैन्याचें हिंदीकरण. आज सैन्यांत ७-८ हजार गोरे अमलदार व ३-४ हजार काळे अंमलदार आहेत. पण सारे गोरे अंमलदार राजाने नेमले असल्यामुळे त्यांचा पगार व दर्जा मोठा आहे. बहुतेक हिंदी अंमलदारांची नेमणूक व्हाइसरायाने केल्यामुळे त्यांचा पगार व दर्जा लहान आहे. हिंदी अंमलदारांची संख्या चढत चढत तिने अखेर साऱ्या गोऱ्या जागा व्यापून टाकल्या पाहिजेत असे म्हटल्यास इंग्रज लोक त्यास लवकर कबूल होणार नाहीत. कारण तसें झाल्यास सैन्याचीं सर्व सूत्रें हिंदी लोकांच्या हातीं जाऊन हिंदुस्थान पूर्ण स्वातंत्र्य उपभोगूं लागेल. आज इंग्रज लोकांनी हिंदुस्थान ज्या अनेक काढण्यांनी व साखळदंडांनी आवळून ठेवला आहे,त्यांतील काढण्या व साखळदंड तुटतां तुटतां अखेर उरणारा सैन्य हा बळकट साखळदंड होय. तो साखळदंड तुटणार त्याच वेळीं तें पूर्ण स्वातंत्र्य हिंदुस्थानास मिळणार हें उघड आहे. म्हणून इंग्रज मुत्सद्दी सैन्यांतील अधिकाराच्या जागांवर हिंदी लोकांना अधिक प्रमाणांत नेमण्याचें टाळीत आहेत. पण त्याचें कारण हेंच असल्याचा उच्चार इंग्रज मुत्सद्दी आपल्या तोंडाने कधी करतील काय? तो उच्चार केल्यास इंग्रजांचे मुत्सद्दी-पण तें काय राहिलें! त्यांना झोपेंतून जागे करून केव्हाहि विचारलें तरी ते असेंच सांगणार कीं, हिंदी लोकांत दानत नाही, त्यांना इतक्या जोखमीचें काम झेपावयाचें नाही. इंग्रज लोक युक्तिवाद करावयाचे सोडून देतील तेव्हा सनदशीरपणाचें सगळेंच बोलणें खुंटेल. परंतु जोंपर्यंत ते युक्तिवादाने बोलत आहेत तोंपर्यंत त्यांचेंच हत्यार त्यांच्यावर उलट चालवून त्यांना हटविण्याचा उद्योग हिंदी राजकारणी पुढाऱ्यांनीहि सोडता कामा नये.

कॅ. मोडक यांनी तेंच हत्यार ब्रिटिश मुत्सद्द्यांवर उगारलें आहे. त्यांचें ब्रिटिश मुत्सद्द्यांना म्हणणें असें कीं, त्यांना लष्करी अधिकाराच्या सर्व जागा हिंदी लोकांना लवकर द्यावयाच्या नसल्या तर देऊं नका. परंतु सैन्याचें हिंदीकरण खुद्द सैनिकांपासूनच एकदम सुरू करा: हिंदी सैन्य बंडाचा बावटा उभारून इंग्रजांची सत्ता झुगारून देईल हीच काय ती इंग्रज मुत्सद्यांना भीति. वरचे अधिकारी इंग्रज असल्यावर खालचे सर्व सैनिक कोणत्याहि जातीचे, धर्माचे व देशाचे असले तरी त्यांची भीति बाळगण्याचें सरकाराला कारण नाही. त्यांतून हिंदी सैनिकांची निवड अशा विचित्र पद्धतीने करण्यांत येते कीं, त्या सर्वांचा एक विचार होऊन ते बंड उभारतील असाहि संभव नाही. कोणी बलुची, कोणी पठाण, कोणी गुरखा, कोणी पंजाबी, कोणी मराठा अशांची ज्या सैन्यांत खिचडी बनली आहे, व ज्यांच्यावरील अधिकारी गोरे आहेत तें सैन्य बंड कसें करणार? हल्ली सैन्यांत १४० हजार काळे शिपाई आहेत व गोरे काय ते ६५ हजारच आहेत. मग त्या ६५ हजारांच्या जागीं तितकेच हिंदी सैनिक नेमून तुम्ही काय मिळविणार असा प्रश्न कोणी विचारील. त्याला मोडक यांनी आपल्या पुस्तकांत व व्याख्यानांत उत्तर दिलें आहे तें चिंतनीय आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, गोरे सैनिक हिंदी सैनिकांच्या निम्म्यानेहि नसले तरी त्यांचा खर्च फार मोठा येतो. हिंदुस्थानसरकारच्या एकंदर उत्पन्नापैकीं एकतृतीयांशाहून अधिक भाग सैन्यच खाऊन फस्त करीत असल्याविषयी हिंदी लोकांची हाकाटी फार जुनी आहे. या अवाढव्य खर्चाने हिंदी लोकांवर कराचें ओझें त्यांच्या जिवापाड लादावें लागलें असून शिक्षण, आरोग्य, उद्योगधंदे इत्यादि बाबतींत जे उपक्रम आवश्यक आहेत त्यास हात घालण्यास सरकारला सवड सांपडत नाही. यासाठी खर्चाचा जबर भार हलका करावयाचा असेल तर मोडक यांच्या मते गोऱ्या सैन्याचें हिंदीकरण हाच त्यावर उपाय होय.

हिंदुस्थानाच्या सैन्यांत गोरे शिपाई आहेत तसेच काळे शिपाईहि आहेत. मग गोऱ्यांनाच तेवढा अधिक पैसा का लागावा या शंकेचें निराकरण सहज होण्यासारखे आहे. गोरे शिपाई आपला देश सहा हजार मैलांवर टाकून परकीय अशा हिंदुस्थानांत येतात. ते स्वदेशाच्या थंड हवेस मुकून हिंदुस्थानाच्या उष्ण हवेंत येऊन पडतात. त्यामुळे त्यांच्या प्रकृतीला येथील हवा मानवत नाहीं. ही हवा मानवावयाची झाल्यास त्यांना एक तर सिमला उटकमंड, महाबळेश्वर, मसुरी अशा गिरिशिखरांवरून हवा खात ठेवावयास पाहिजे किंवा इतरत्र ठेवणें भागच असल्यास त्यांच्या त्या त्या ठिकाणीं इतक्या सुखसोयींची तरतूद करणें जरूर आहे कीं त्यांना उष्ण व रोगट हवेची बाधाच होता कामा नये. अर्थात् सर्वांच्या नशिबीं गिरिशिखर येण्यास ते कांही व्हाइसरॉय किंवा गव्हर्नर लागून गेले नसल्यामुळे त्यांच्याकरिता सुखसोयींच्या दुसऱ्या मार्गाचाच अवलंब करावा लागला आहे. त्या सुखसोयी सामान्य हिंदी लोकांच्या कल्पनेबाहेरच्या आहेत. त्यांचा अंदाज बांधण्यासाठी गैरमाहितगारांना जर बक्षिसें ठेवलीं तर तीं त्यांपैकीं कोणालाहि जिंकतां यावयाचीं नाहीत.

इंग्रज शिपायाला कौतुकाने टॉमी या नांवाने सरसकट संबोधण्यांत येतें. या टॉमीची मिजास

एखाद्या नाजुक प्रकृतीच्या राजपुत्राप्रमाणें ठेवली जाते. त्याला एक शिंक आली कीं, त्याच्या तैनातींतला डॉक्टर घाबरा होतो व तो श्रमाच्या घामाने प्रमाणाबाहेर भिजून निघाला कीं, त्याच्या जवळच्या डॉक्टराच्या अंगाला भीतीने घाम सुटतो. आधी टॉमीची काळजी, टॉमीकरिता टॉमीच्या बायकोची काळजी, टॉमीच्या बायकोकरिता टॉमीच्या मुलांबाळांची काळजी व टॉमी कांही वर्षांनी पेन्शनांत निघाल्यावर त्या सर्वांकरितां त्याच्या उरलेल्या आयुष्याची काळजी. टॉमी उंच अशा हवाशीर बराकींत राहतो. त्या बराकींत रात्रीं निजला असतां त्याला डसूं पाहणारा एकहि डास जिवंत राहूं नये म्हणून तो हजारों गॅलन रॉकेल फस्त करतो. एकट्या पुण्याच्या लष्करांतच या कार्याकडे दरसाल १४०० गॅलन रॉकेल तेलाचा फडशा पडतो. त्याच्या पोटाची आबाळ होईल म्हणून त्याला सडकून खाऊंपिऊं घालावयास गेलें कीं तो बेटा अजीर्ण होऊन आजाऱ्यांत गणला जातो, व आजारांत त्याच्या फाजील अन्नाची रिकामी राहिलेली जागा औषधपाण्यानें भरून काढावी लागते.

बिचारा हिंदी शिपाई. त्याचें तें शरीर कसलें व पोट तें काय ? तो कसल्याहि बराकींत निजला तरी जगतो, व त्याला कांहीहि अन्न खावयास दिलें तरी त्याच्या पोटाची खळगी भरते. यासाठी टॉमीला हिंदी शिपायाच्या ५ पट पगार देणें भाग पडतें. हा पगार झाला. पण तो का कोठे त्याला खर्चासाठी द्यावयाचा असतो ? त्याने मिळालेला पगार बँकेंत टाकावा, निदान खिशांत ठेवावा. कारण त्याला पोटगी सरकारांतून वेगळीच मिळते. याखेरीज त्याजवर भत्त्यांची तर अगदीं खैरात उडते. लग्न होऊन घरीं बायको आली कीं पलंग-खुर्च्यांकरिता दरमहा तीन-चार रुपये, बायकोकरिता दरमहा तीस रुपये, बायकोने मुलाला जन्म दिला कीं प्रत्येक मुलाकरिता १० रुपये असा पैशाचा त्याजवर नुसता पाऊस पडत असतो.

हे वेगवेगळे भत्ते झाले खरे, पण ते सगळे घेऊनहि टॉमीची हजामत उरलीच. तिचा खर्च टॉमीच्या पगारावरच पडत असेल अशीहि शंका एखाद्याच्या विचक्षण डोक्यांतून निघेल. तथापि त्याने हें लक्षांत ठेवावें कीं, त्याच्यापेक्षां ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांचीं डोकीं अधिक विचक्षण व सुपीक आहेत. त्यांनी केवळ केशकर्तनाकरिता टॉमीला दरमहा तीन रुपये देण्याची तजवीज केली आहे. हाच हिशेब असाच वाढवीत गेल्यास टॉमीचा भत्ता हिंदी सैनिकांपेक्षां ११ पटींनी मोठा भरतो. पगार ५ पट व भत्ता ११ पट; मिळून काळ्या पलटणवाल्याहून गोरा टॉमी १६ पटींनी महाग पडतो. इतका खर्च हिंदुस्थान-सरकारच्या तिजोरीने सोसूनहि गोरा शिपाई काळ्या शिपायापेक्षा कामाला तितक्या पटींनी अधिक उपयुक्त म्हणावा तर तसेंहि घडत नाही. इतकेंच नव्हे तर त्याची तो बरोबरीहि करूं शकत नाही. तो गादींत लोळला, औषधांत घोळला, डोंगरावरच्या आरोग्य भुवनांत खेळला तरी आपला ठणकत असावयाचा. तो म्हणणार पेशावरची हवाच वाईट. शिकंदराबादेचा उन्हाळाच कडक.

ही त्याची कुरकुरहि कांही खोटी नाही. कारण गोऱ्या सैनिकांच्या मृत्यूचें प्रमाण पाहिलें तर हिंदी शिपायांपेक्षा ते शीत ज्वरासारख्या रोगांना अधिक बळी पडतात. मग प्रश्न असा उद्भवते कीं, हिंदुस्थानाने ही ब्याद पत्करावी का ? हिंदुस्थानाचे सध्याचे जेवढें सैन्यबळ आहे तेवढें आवश्यक आहे अशी सरकारची समजूत असल्यास त्यांनी गोऱ्या सैनिकांना काट मारून त्यांच्याऐवजीं हिंदी सैन्यच भरतीला घ्यावें. तें घेतल्यास हिंदुस्थानच्या लष्करी खर्चांत ३३ कोटी रुपयांची बचत होईल असें कॅप्टन मोडक यांनी आपल्या पुस्तकांत आंकड्यांनी सिद्ध केलें आहे. वरील गोरे अधिकारी तुमच्याने लवकर कमी करवत नसतील तर कमी करू नका, पण निदान खालच्या शिपायांत हिंदी लोकांनाच घेऊन आपल्या मातृभूमीच्या संरक्षणाची संधि हिंदपुत्रांना द्या व द्रव्याचा अपव्यय वांचवून त्या द्रव्याचा ओघ हिंदभूच्या उद्धाराकडे वळवा हा मोडकांच्या एकंदर विवेचनाचा मथितार्थ आहे. त्यांची ही विचारसरणी नवी व ब्रिटिश मुत्सद्यांना निरुत्तर करणारी असल्यामुळे ती सध्याच्या प्रसंगीं जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे जोराने मांडली जाणें जरूर आहे.



# शिवनेरीवरील शिवाबाई

घन झंकारी बीज शरीरी थरारुनि संचार करी।
विलोकिता तव मूर्ति मगले शिवनेरीच्या दिव्य दरी ॥

* * *

प्रखर क्रोधागार पेटला, थर थर थर तनु कापतसे।
रक्त वदन, आरक्त उफाळे ज्योत लोचनी तत्तरसे ॥
सूड संचरे, चीड नावरे, देह–चाप वाके सरसा।
नजर–फेक शरभेदक भारी नेम लाविला अचकसा ॥
आघात–प्रतिघात करारत दतघर्षणीं प्रतिरवती।
पुनः पुनः निःश्वास उष्ण जणु दाह पसरवी सभोवती ॥
कराल शस्त्र, बर्चा, भाला, लखलखतो जंबिया करी।
चकाकते समशेर करारी नम्रअर्ध चंद्राकारी ॥

* * *

गमे मागुती अफाट सेना, स्वार निघे उल्हासभरीं।
अश्व हिंसती, रव घुमवीती, भेरि–दुदुंभि स्फूर्ति करी ॥
फळी फोडिता, इर्षा चढते, सेना भिडते, घाव पडे।
'हर हर हर हर महादेव' रव जाय दिगतापलीकडे ॥
घाव घालिती, वार पेलिती, घुसती गर्दन घेत पुढे।
'सूड' गर्जती, वीर सिंचिती, रिपु रक्ताचे रक्त सडे ॥
आपटता खणखणाट शस्त्रे टणत्कार घुमती गगनी।
धुंद मर्द झुंझार झुजती थरारली माता धरणी ! ॥
बाहु छेदिती, शीर्ष भेदिती, देह दडिती वीरमणी।
नाचविती रिपु कबंध थयथय धावधावुनी रणांगणीं ॥
अहा खवळला! नेता घुसला, चरचर कापित रिपूदला।
झेप घालुनी दुस्मानाला गर्दन छेदुनि लोळविला ॥

ध्वजा विराजे, जय-रव सहजे अवनीतल साजे गाजे।
तन्मय मन्मन निरखूं जाता होय मुग्ध, कांही न दुजे ॥

* * * * * * * * *

कुठें अश्व ते! बर्ची ! भाले ! हवेंत सेना विरघळली !।
भेरि भंगली, स्फूर्ति खंगली, खेद-निराशा स्थिरावली ॥
वन्य शून्यता हीन खिन्नता दाटुनि गेली चोहिंकडे।
तूंच एकली उभी माउली, पुनरपि नेत्रद्वयापुढे ॥
पूर्व-ध्यानीं, पूर्व-रंगणी, पूर्व-रूपिणी तपस्विनी।
ना हलसी, ना वदसी,मज कां बघसी कोधें फिराकिरूनी?॥
शिवनेरीच्या शिवरायाची शिवदात्री गे शिवंकरी।
अशिव गावया शिव मागाया आलों, कां रुष्टसी तरी ? ॥
अनुष्ठान गे घोर कासया आचरसी तिष्ठुनी अशी।
कष्टविसी निजदेह जीव कां येत नसे कासाविशी ? ॥
भारतभूला, वाली नुरला, रक्षाया म्हणुनी तिजला।
धाव घेउनी काय घालिसी हात स्वतां समशेरीला ? ॥
किंवा भरले अखिल भारतीं माते वद नामर्द खुळे।
संतापानें शस्त्र तयावर उचलीसी हें काय बळें ? ॥
कीं निजरूपीं शिवरायाचा काळ हिंदूंना स्मरवीसी ?
'असे असे दुस्मान मर्दिले' रक्षाया भारतभूसी ॥
कीं, शिवबाला घेउनि गेला काळ कृतांत प्रबलारी।
सूड तयाचा घ्यावा म्हणूनी निघालीस कां त्वेषभरीं, ॥

**ओतूर** **'कृष्ण—शुक्र'.**

---

# येरवड्यांतील 'हाल'हवाल

( ले.—येरवड्याहून सुटलेला )

येरवडा ता. ३०-४-३३.

कैदखान्याचा गाडा नेहमींच इतका ठराविक सांच्याप्रमाणें चालतो कीं, त्यांत नवलाई अशी सहसा आढळत नाही. पण येरवडा येथील मुख्य अधिकाऱ्यांची नुकतीच खांदेपालट झाली त्यानंतर मात्र पुष्कळच गोष्टी घडून आल्या. मेजर भंडारी यांची बदली नाशिकला होऊन त्यांचे जागीं पूर्वीचे लेफ्टनंट कर्नल मार्टिन आले, आणि त्यांच्याबरोबरच नवीन दमाचें राज्य सुरू झालें! एकदोन गोष्टी उदाहरणादाखल दिल्या-विना दोनहि राजवटींतला फरक लक्षांत येणार नाही.

भंडाऱ्यांच्या कारकीर्दीत कैद्याला मारहाण होत नसे, आणि झालीच तर मारणाराला शासन होई. चौकशीचे वेळीं कैद्याला आपलें म्हणणें नीट सांगतां येत असून सुपरिंटेंडेंट तें नीटपणें ऐकून घेत. हल्ली मात्र तसें नाही. सुपरिंटेंडेंट कैद्यांचें म्हणणें ऐकूनच घेत नाहीत ! मग न्याय-निवाडा कसा होत असेल त्याची कल्पनाच करावी. पूर्वीच्या अमदानींत शिपाई व वॉर्डर यांनाच 'बड्या साहेबा'ची फार भीति वाटे. कारण थोडासा अपराध शाबीत झाला कीं त्यांनाच शिक्षा मिळे. तो नूर नव्या राजवटींत सफाई पालटला. शिपाई किंवा वॉर्डर सांगतील तेंच खरें व त्यांना साहेब कधीहि बोलणार नाही असा आज-

कालचा शिरस्ता आहे. बिचाऱ्या राजबंद्यांचे व इतर कैद्यांचेहि हाल आहेत.

दुसरी एक बाब घ्या. नवीन कैदी आला कीं, त्याला दळावेंच लागतें. पण तत्पूर्वी डॉक्टरी तपासणी होऊन, तो अशा मेहनतीच्या कामाला लायक आहे कीं नाही हें ठरविलें जातें.पूर्वीच्या कारकीर्दीत, असावयास पाहिजे त्यापेक्षा वजन सुमारे दहा किंवा त्याहून जास्त पौंड कमी असलें तर तो चक्कीला अयोग्य असें ठरविलें जाई आणि तें रास्तहि होतें. परंतु नव्या राज्यांत वजनाकडे लक्षच दिलें जात नाही. अगदीं नांवनिशीवारसुद्धा उदाहरणें देतां येतील. नमुन्यासाठीं २१६१३ नंबरचा राजबंदी पहा. त्याच्या उंचीच्या मानाने ( जेलप्रमाणांत ) त्याचें वजन ११४½ पौंड असावयास पाहिजे. वास्तविक तें आहे फक्त ८९ पौंड म्हणजे सुमारें २५ पौंड कमी. असें असतांहि हा इसम चक्कीला लायक असल्याचे नव्या बड्या साहेबांनी ठरविलें. यापेक्षा आणखी कसला पुरावा पाहिजे ?

## दगडापेक्षा वीट मऊ

एवढ्यावरून पूर्वी अगदीं रामराज्य होतें अशी कल्पना करण्याचें कारण नाही. दगडापेक्षा वीट बरी इतकेंच. राजबंद्यांची कुचंबणा करून सरकारची धन करण्याचा एक मार्ग भंडारी यांच्या कारकीर्दीतच सुरू झाला. तो म्हणजे राजबंद्यांना सोडण्याचे वेळीं रेल्वेभाडें न देण्याचा. ज्याचे नांवावर रेल्वेचा खर्च भरण्याइतकी शिल्लक असेल त्याला सरकारतर्फे सुटण्याचे वेळीं एक पैहि मिळत नाही. उलट त्याच्या पैशानेच त्याला तिकिट काढून देऊन, अमुक गाडीनें तूं जा अशी त्याची हकालपट्टी करण्यांत येते. माझीच गोष्ट पहाना. मला शिक्षा मुंबईस झाली असल्याने माझ्या शिलकी रकमेंतून रु. २-५-० कापून घेऊन मला स्टेशनावर नेऊन माझें तिकीट काढून देऊन, दुपारीं १२ च्या गाडीनें चला म्हणून सांगितलें. माझ्या पैशाने जर जावयाचें तर निदान कोणत्या गाडीनें व केव्हां प्रवास करावयाचा हें ठरविण्याचा हक्क सुद्धां मला असूं नये ? असो.

## म. गांधींचा सल्ला

अशा पुष्कळच तक्रारी जेल-अधिकाऱ्यांविरुद्ध आहेत. राजबंद्यांच्या कांहीं अडचणी, तक्रारी काय असतील त्या म. गांधींच्या कानावर घालण्याची सवलत दर पंधरा दिवसांतून एकदां मिळते. म्हणजे राजबंद्यांत कोण कोण आहेत हें एकदा गांधींच्या कानावर गेलें म्हणजे तें पाहिजे त्याला भेटीला बोलावतात. महात्माजींची अशी भेट घेण्याचा सुयोग मला लाभला. एका शुक्रवारीं (हें दर्शन बहुधा शुक्रवारीं होतें) मला बोलावणें आलें. त्या वेळीं जेलविरुद्ध तक्रारींची मीं फारशी चर्चा केली नाही. म्हणून प्राथमिक कुशल प्रश्न झाल्यावर मीं त्यांना विचारलें, "बापूजी, आमच्यापैकीं बरीच मंडळी लवकरच सुटतील. मीहि ३-४ आठवड्यांत बाहेर जाईन. तेव्हा बाहेर गेल्यावर आम्हीं काय करावें असा आपला उपदेश आहे ? नवीन चाललेल्या अस्पृश्योद्धाराला वाहून घ्यावें कां पुनः कायदेभंग करून तुरुंगांत यावें,कां कांही देशसेवा न करतां पूर्ववत उदरंभरणाच्या मागें लागावें ? आपण आमचे नेते, आपल्या हुकुमाची तामिली करण्यासाठीं तर आम्ही इकडे आलों. आता पुढची आज्ञा."

यावर महात्माजींनी उत्तर दिलें "हें ज्याचें त्यानें ठरवावें. मी हें सांगणारा कोण ? सौ. कस्तुरबाई गांधी व माझा मुलगा देवीदास ह्या दोघांचाहि मजवर परवा घुस्सा झाला. कारण त्यांनासुद्धां मी अगदीं असाच सल्ला दिला. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, मीं त्यांना कांही तरी निश्चित कार्य सांगावें."

मध्येच मीं म्हटलें, "पण बापूजी, आपणाला आतां एकटा देवीदासच विचारतो आहे असें नव्हे. ज्यांच्या वतीने मीं आपणाला हा प्रश्न केला आहे, ते सर्व राजबंदी व मीसुद्धां आपला पुत्रच नव्हे काय ? एक दोनच काय,परंतु आता सहस्रावधि पुत्र आपणाला आहेत."

नेहमीचें मुक्तहास्य बापूजींनी केलें आणि ते म्हणाले "होय तुम्ही म्हणतां तें खरें. मला पुष्कळच पुत्र आहेत. पण माझ्या औरस मुलांत आणि त्या दुसऱ्या दत्तक मुलांत थोडासा भेदभाव करतों असें धरून चाललें, तरीहि मी देवीदासाच्या बाबतींत कांहीं सांगूं शकलों नाही, तें तुमच्या बाबतींत कसें सांगूं ? मी आता जवळ जवळ १५-१६ महिने कारागृहांत आहे. बाहेरची परिस्थिति मला कळणार कशी ? आणि मी तुम्हांला अमुक कार्य करा असें भींतीआडून सांगूं तरी कसें ? "

प्रश्न—ही गोष्ट खरी आहे. आपणाला वर्तमानपत्रें तरी मिळतात. त्यावरून बाहेरच्या परिस्थितीची यथार्थ कल्पना येणार नाही हेंहि खरें; परंतु आम्हीं बाहेर पडल्यावर कार्य कोणतें केल्यास आपणास अधिक आनंद होईल? अस्पृश्योद्धारासाठीं मीं खटपट केली तर बरें, कां पुनः ताबडतोब कायदेभंग करून येथे आलों तर आपणांला आवडेल?

उत्तर—तुम्हीं कायदेभंग केला व पुनः कारागृहवास पत्करला तर मला अधिक आनंद होईल असें नाही, किंवा अस्पृश्योद्धाराकडे लक्ष द्यावयाचें,

ठरविल्याने मला बरें वाटेल असेंहि नाहीं. इतकेंच काय पण बाहेर गेल्यावर स्वस्थ बसलांत तरीहि मला मुळींच वाईट वाटणार नाहीं. माझें म्हणणें इतकेंच कीं, या बाबतींत मला भिंतीआडून कसली-च सल्ला मसलत देतां येत नाहीं. बाहेर असलेले कार्यकर्ते काय ठरवितील तेंच प्रमाण मानिलें पाहिजे. त्यांनाच परिस्थितीचें आकलन असणार. निश्चित असें मी कांहींच सांगूं शकत नाहीं.

यापेक्षां अधिक मोकळेपणानें गांधीजींशीं बोलतां येणार नाही. राजकारणांतील चर्चा करू नका असा इशारा आधींच सुपरिंटेंडेंट व महात्माजी-यांजकडून मिळाला होता. म्हणून मग जेलमध्यें कसें राहावें, अनेक वेळा बिकट प्रसंग येतात त्यावेळीं सत्याला अधिक मान द्यावयाचा कीं असत्याचा अवलंब करून, आपल्या बांधवांना सोडवावयाचें इत्यादि सूक्ष्म विचाराचें कांहीं प्रश्न मीं विचारलें व त्यांचीं उत्तरेंहि महात्माजींनी आपल्या तत्त्व-निष्ठेनुसार दिली.

सध्यां येरवड्यांत सुमारें ३५०–४०० राजबंदी असून बहुतेकांना पुष्कळ मोठमोठ्या शिक्षा आहेत. कर्नाटकांतील कार्यकर्त्यांना अगदी साध्या गुन्ह्याबद्दल ३ वर्षे, ४ वर्षे, ६ वर्षे व ८ वर्षेहि सक्तमजुरीच्या शिक्षा ठोठावलेल्या असल्याने, त्यांचें पुढें काय व्हावयाचें हा विचार क्षणोक्षणीं येतो. अजूनहि कांही तरी होईल आणि झटकन एके दिवशीं राजबंद्यांची सुटका होईल या आशा तंतूवर अवलंबून राहणारी मंडळी थोडीथोडकी नाहींत. एका दृष्टीने मात्र हा आशातंतु बरा वाटतो. कारण ती आशाच जर नसेल तर जेलमधील यांत्रिक व अपमानास्पद जिण्यांत वेड लागण्याची पाळी यावयाची. कर्नाटकी कार्यकर्त्यांचें जबर दंड बहुतेक सक्तीने वसूल झाले आहेत. कित्येकांची गुरेंढोरें किंवा शेतजमीन जप्त झाल्यामुळें, त्यांना साहजिकच मनस्वी त्रास झाला आहे. बरें, तुरुंगांत येणाऱ्या नवीन राजबंद्यांची संख्या अगदींच आटत चालली असून, चळवळ थंडावत आहे, या जाणीवने सर्वत्र निराशा वावरत असली तर तो कांहीं राजबंद्यांचा दोष नव्हे.

# हिंदू समाज कशाने समर्थ होईल ?

जगांत धर्माची उत्पत्ति ऐहिक व पारलौकिक सुखाकरितां झाली आहे. या सुखाची गरज मनुष्याला पुरातन कालापासून निसर्गतःच वाटत आल्यामुळें त्याजवर कोणताहि विशिष्ट धर्म स्वीकारण्याची सक्ती करण्याचें प्रयोजन नव्हतें. असें असतांहि ख्रिस्ती व मुसलमानी धर्मप्रसारकांनी जगांतील कित्येक देशांत जाऊन तेथील लोकांना आपला धर्म स्वीकरण्यास भाग पाडलें. परंतु हिंदु धर्म व त्या धर्माशीं संलग्न असा बौद्ध धर्म यांचा प्रसार मात्र जनतेच्या खुषीनेच झालेला दिसतो. बहुजनसमाजाला त्यांतील तत्त्वें पटलीं म्हणून त्यांनी तीं स्वीकारलीं. हिंदुधर्माच्या मानाने ख्रिस्ती धर्म व मुसलमानी धर्म नवीन होत. ते धर्म प्रथमतः इतरत्र प्रसार पावत शेवटीं हिंदुस्थानांत शिरले व त्यांनी हिंदु-धर्मावरहि आक्रमण चालवून बऱ्याच हिंदूंना आपल्या कळपांत ओढलें. हें आक्रमण त्यांनी केवळ उपदेशाने केलें नसून लोभ, मोह व जुलम इत्यादि हीन व अयोग्य उपायहि या कामी योजले.

उलटपक्षीं हिंदूंनी तशा प्रकारचे उपाय योजण्याचे कधीं मनांतहि आणलें नाही. त्याचा परि-णाम अलीकडे असा झाला कीं, हिंदु धर्माचा प्रसार व्हावयाचा दूरच राहून लक्षावधि नव्हे कोट्यवधि हिंदु त्याच्या गोटांतून मुसलमान व ख्रिस्ती राज्य-कर्त्यांच्या साहाय्याने त्या त्या धर्मप्रसारकांनी उचलून नेल्यामुळें हिंदु समाज संख्येने एक-सारखा रोडावतच चालला. ख्रिस्ती मिशनरी आणि मुसलमान मुल्ला यांचा हा कावा लक्षांत आल्यापासून हिंदु समाज सावध झाला आहे व शुद्धि-संघटनेच्या मार्गास लागला आहे खरा; तरी पण या बाबतींत त्यास यावें तसें यश लाभलें नाही हें कबूल केलें पाहिजे. याचें कारण असें कीं, हिंदु समाजाला जशीं बंधनें आहेत तशीं ख्रिस्ती व मुसलमानी समाजांना नाहीत. हिंदु समाजांत जाति आहेत तशा ख्रिस्ती व मुसलमानी समाजांत नाहीत. जाति या जन्मसिद्ध आहेत. जो ज्या जातींत जन्मला त्यालाच त्या जातींत राहण्याचा हक्क आहे, इतरांना नाही. पर-धर्मांतील एखाद्या इसमास हिंदु समाजाचा घटक या नात्याने त्या समाजांत शिरण्याची इच्छा झाली, तर त्यास प्रवेशाचा मार्गच उपलब्ध नाही. तीच स्थिति बाटून मुसलमान अगर ख्रिस्ती बनलेल्या व्यक्तींची. या व्यक्तींपैकी ज्यांचें धर्मांतर ताजें आहे व ज्यांचा परधर्मांत परिवार वाढला नाही त्यांनाच हिंदु धर्मांत परत येण्याची वाट मोकळी होण्याचा संभव आहे, बाकीच्यांना नाही. सारांश, हिंदु धर्मांतून बाहेर पडण्याचें फाटक सताड उघडें आहे पण आंत येण्याच्या फाटकास मात्र कायमचें कुलूप ठोकलेलें आहे.

हिंदु समाजांतील हा जातिभेद आर्य-समाजाचे संस्थापक स्वामी दयानंदसरस्वती यांसारख्या धर्म-सुधारकांना नडलाच; पण त्याखेरीज इतर समाज-सुधारक व राजकीय सुधारक यांनाहि प्रगतीच्या वाटेवर आडवी येणारी ती चीनच्या महाभिंती-प्रमाणे एक अजस्र व अनुल्लंघनीय भिंतच वाटत आहे. राजा हिंदुधर्माचा व त्याची प्रजा प्रायः हिंदुधर्माची अशी स्थिति होती त्या वेळीं ज्ञातिसंस्था उपयुक्त ठरली असेल व ती देशांत शांतता राखण्यास कारणहि झाली असेल; परंतु आता सर्व जगभर लोकसत्ताक राज्यें स्थापलीं जात आहेत व हिंदुस्थानांतहि त्याच राज्यपद्धतीची मुहुर्तमेढ रोवली गेली आहे तर ज्ञातिबंधनें मानणार कोण व तीं टिकणार कशीं असा सुधारकवर्गाकडून साहजिकच सवाल विचारण्यांत येतो. खेरीज देशांत पाश्चात्य शिक्षणपद्धतीचा फैलाव झाला असल्या-मुळे तें शिक्षण घेतलेल्या पुष्कळ सुशिक्षितांना जातिभेदाची एक प्रकारें लाजहि वाटूं लागली आहे.

ब्राह्मणास स्वतःला ब्राह्मण म्हणवून घेण्याने हिंदूंतील इतर जातींहून आपण श्रेष्ठ आहों असें भासविल्याचें राष्ट्रीय दुष्कृत्य आपण पाप तर करीत नाहींना हा विचार भिववून सोडतो आणि दुसऱ्या कित्येकांना आपली जात हीन असल्याविषयीं खेद वाटून दुसरेंच एखादें उच्च प्रतीचें नांव धारण करण्यांत ते भूषण मानतात. तसेंच हिंदु सुधारक जातीने श्रेष्ठ असो वा कनिष्ठ असो,जाति मोडल्या पाहिजेत असेंच उठल्या—बसल्या प्रतिपादन करीत असतो. या प्रतिपादनाने जातिभेदाच्या भिंतीची एक वीटहि जरी हलली नाही तरी हिंदु समाजांत ऐक्य होण्याच्या दृष्टीनें जातिभेद अनिष्ट आहे हें मत मात्र बरेंच रूढ झाल्यासारखें दिसतें. जसा जातिभेदाच्या उपयुक्ततेवरील समाजाचा विश्वास कांहीं अंशीं ढांसळला आहे, त्याचप्रमाणे देव व धर्म यांविषयींहि समाजांत बेफिकिरी अविश्वास व अनादर वाढत आहे. याचा बराचसा दोष पाश्चात्य शिक्षणा-च्या वांट्यास येतो यांत शंका नाहीं. तथापि या मनः-स्थितीच्या अगदीं विरुद्ध असा एक व्यापार हिंदु समाजांत चालूच आहे. अखिल भारताकरिता हिंदु महासभा स्थापन झाली असून तिला प्रांतोप्रांतीं शाखा फुटल्या आहेत आणि त्यांजमार्फत व स्वतंत्र रीतीनेहि शुद्धिसंघटनेचें कार्य होत आहे. मशिदी-पुढे वाद्यें वाजविण्याचा आपला हक्क हिंदु लोक न्याय-मंदिरामार्फत शाबीत करून घेत आहेत व त्या हक्का-च्या संरक्षणार्थ सत्याग्रहासाठीहि कोठे कोठे कंबरा बांधीत आहेत, यावरून सुशिक्षित हिंदूंना देवाचा आणि धर्माचा अभिमान आहे असें मानावयाचें काय? सूक्ष्म बुद्धीने विचार करणारास सर्व सुशिक्षित हिंदु लोक देवभक्तीने किंवा धर्माभिमानानें प्रेरित झाले आहेत असें निश्चयपूर्वक म्हणवणार नाही. त्याला या चळवळीच्या मुळाशीं देवभक्ती-पेक्षां किंवा धर्माभिमानापेक्षा समाजाभिमानच असल्याचें आढळून येईल. सांप्रत सुशिक्षित हिंदूंत हिंदुधर्मापेक्षा हिंदु समाजाचाच अभिमान अधिक बाणलेला आहे. त्या अभिमानाला देवाचें किंवा धर्माचें अधिष्ठान उत्कटत्वाने नाही. या कारणाने त्यांच्या चळवळींत उदात्तपणा आवेश व स्वार्थ-त्याग उत्कटत्वाने दृष्टीस पडत नाही. म्हणून प्रस्तुत चळवळीत खरा जोर उत्पन्न होत नाही व तिचें फळहि पुरेसें पदरांत पडत नाही.

अशा रीतीने हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक चळ-वळींचा विचार केला असता तिचें आसन डळमळित असल्याचा भास होतो. तिला धर असा सांपडतच नाही. हा दोष सुशिक्षित हिंदूंच्या धर्माभिमान-शून्यतेचा व संशयग्रस्त मनाचा आहेच; पण त्याखेरीज सुशिक्षित हिंदूंना हिंदु समाजाची खरी नस समजली नाही असाहि एक उलगडा करतां येण्यासारखा आहे. हिंदूंतील कित्येक विचारी लोकांचें लक्ष या गोष्टीकडे लागले असून ते आप-आपल्या परीने धार्मिक व सामाजिक चळवळींत आलेल्या अपयशाची चिकित्सा करीत आहेत ही समाधानाची गोष्ट होय. गेल्या आठवड्यांत रंगून येथे ब्रह्मदेशांतील हिंदूंनी आपली परिषद भरविली. तिचें अध्यक्षस्थान कलकत्त्याच्या विवेकानंद मिशनचे प्रमुख स्वामी निर्मलानंद यांनी स्वीकारलें होतें. स्वामीजींनी या प्रसंगीं केलेलें भाषण कोणासहि चिंतनीय व उद्बोधक वाटल्यावांचून राहणार नाही.

स्वामिजींच्या मतें ' हिंदु समाजाची उभारणी ज्ञातिव्यवस्था व कुटुंबपद्धति यांवर झाली आहे. त्याचप्रमाणे हिंदुमात्रांचें जीवित हजारों वर्षांच्या संस्कारांनी धर्मकल्पनांत मुरलेलें आहे. हिंदूंच्या जीवितक्रमा-तील कोणत्याहि हालचालीकडे पाहिलें तरी त्यांत धर्मतत्त्व गोवलेलें अनुभवास येतें; मग ती हालचाल राजकीय असो, सामाजिक असो, औद्योगिक असो किंवा सांसारिक असो. परंतु पाश्चात्य संस्कृतीचा हल्ला गेलीं शंभर-पाऊणशें वर्षे हिंदु समाजावर इतक्या वेगाने सुरू आहे कीं त्यापुढे हिंदूंच्या जीवनक्रमांतील हें धर्मतत्त्व क्षीण होत होत बहुतेक मरत चाललें आहे. सुशिक्षित हिंदूंचा आपल्या परंपरेवरील व संस्कृतीच्या उप-युक्ततेवरील विश्वास उडाला असून पाश्चात्य संस्कृतीचा सर्वस्वी स्वीकार केल्यावांचून आपला निभाव लागणार नाही असें त्यांच्या मनाने घेतलें

आहे. त्यामुळे तो निरीश्वरवादीच न म्हटला तरी संशयवादी व धर्महीन बनून प्रत्येक बाबतींत पाश्चात्यांचें शिष्यत्व पत्करण्याच्या धडपडींत आहे. या उद्योगापासून हिंदूंची उन्नति तर झालीच नाही, पण त्यांचा बौद्धिक सामाजिक व आधिदैविक दृष्ट्या ऱ्हास मात्र सुरू आहे. हा क्रम न बदलल्यास सुशिक्षित हिंदु व अशिक्षित हिंदु यांजमधील सध्याचें अंतर वाढत जाऊन त्यांची ताटातूट होईल. या संबंधांत स्वामिजींच्या समजुतीप्रमाणे तीन मार्ग संभवतात (१) ब्राह्मणवर्ग बाजूला पडून हिंदूंतील बाकीचा समाज बौद्धासारखा एखादा धर्म स्वीकारील (२) हल्लीच्या परिस्थितीस अनुरूप असा नवाच धर्म हिंदूंत प्रसार पावेल. किंवा (३) वरचे हिंदु नास्तिक व धर्महीन बनतील आणि खालचे हिंदु ख्रिस्ती किंवा इस्लामी धर्म स्वीकारतील.

यासाठी स्वामी निर्मलानंद यांचें म्हणणें असें कीं सुशिक्षित हिंदूंनी वरील परिणामांचा पूर्ण विचार करून हिंदुधर्म व हिंदु समाज यांचा नाश थांबविला पाहिजे आणि सुशिक्षित व अशिक्षित या दोन वर्गांत पडत चाललेलें अंतर थांबवून उभयतांचा पूर्ववत् मिलाफ घडवून आणला पाहिजे. स्वामिजींना हिंदूंच्या कोणत्याहि राष्ट्रीय चळवळींत धार्मिक उद्देश व स्फूर्ति दिसून येत नाही. तोच हिंदूंचा खरा कमकुवतपणा होय. म्हणून धर्माच्या मूलतत्त्वास धरूनच हिंदूंनी आपल्या चळवळी चालविल्या तरच त्यांच्या प्रयत्नांना यश येण्याची आशा स्वामी निर्मलानंद यांस वाटत आहे. पाश्चात्य संस्कृतींत स्वार्थ, ऐहिक सुखें व पाशवी सामर्थ्य हीच मुख्यतः बोकाळलीं असल्यामुळे केवळ त्यांच्याच पाठीस लागल्याने व उदात्त अशा धर्मस्फूर्तीला पाठमोरें झाल्याने हिंदूंची उन्नति होईल अशी स्वामींची समजूत नाही.

हिंदु समाज आंतून-बाहेरून बळकट व जोमदार व्हावयास पाहिजे असेल तर त्यानें आपलें सामर्थ्य कशांत आहे हें नीट ओळखलें पाहिजे. ज्ञातिसंस्थेची गणना स्वामीजी हिंदु समाजाच्या खऱ्या बळकटींत व सामर्थ्यांतच करीत असून ज्ञातिसंस्था ही हिंदु समाजास श्रेयस्कर आहे व तिचें महत्त्व तिच्या विशिष्ट क्षेत्रांत फार आहे या मताचा प्रचार अट्टाहासाने करण्यास ते हिंदूंच्या पुढाऱ्यांना सांगत आहेत. स्वामी निर्मलानंद यांनी आपला हा अभिप्राय हिंदु समाजरचनेचे व हिंदूंच्या गेल्या शतकांतील सामाजिक व धार्मिक चळवळीचें काळजीपूर्वक निरीक्षण करूनच दिला असला पाहिजे यांत शंका नाही. हिंदूंची राजकीय चळवळ हिंदुधर्म व हिंदुसमाज यापासून अलिप्त असल्याने तिला बरेंच यश लाभलें. कारण तिचा हिंदुधर्माच्या व हिंदु समाजाच्या प्रकृतीवर बरा वाईट असा कोणताच परिणाम घडणारा नव्हता परंतु हिंदूंच्या इतर काही चळवळींचा हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक जीविताशीं निकट संबंध पोंचतांच हिंदूमध्ये फळ्या पडण्यास व बखेडा माजण्यास सुरुवात झाली. अस्पृश्यतानिवारणाच्या व मंदिरप्रवेशाच्या बाबतीं हा अनुभव सर्वांना नुकताच आलेला आहे. अखिल भारतीय हिंदुधर्म परिषदा किंवा प्रांतिक परिषदा दरसाल सर्वत्र भरतात. त्यांत हिंदूंच्या संघटनेचा, शुद्धीचा व ऐक्याचा उपदेश ऐकू येतो. पण तो बहुधा वाऱ्यावरच उडून जातो. त्या प्रयत्नाने हिंदु समाजाचें दौर्बल्य कमी झालेलें फारसें आढळत नाही व त्याजकडून मुसलमान समाजाच्या चढाईचा प्रतिकारहि होत नाही. यावरून हिंदूंच्या संघटनेंत कोठे तरी फार मोठें न्यून पडत आहे असें कबूल करावें लागतें. तें न्यून संघटनेच्या कार्यपद्धतीत आहे.

अखिल हिंदु धर्मीयांचें ऐक्य हा संघटनेचा शेवटचा दुवा झाला. तो तेवढाच घेऊन बसणें म्हणजे गगनाला गवसणी घालण्याचा प्रयत्न करणें होय. हा प्रयत्न सिद्धीस जावयाचा असल्यास हिंदूंचें ऐक्य खालपासून वरपर्यंत रचीत नेलें पाहिजे. हिंदु समाज इतर समाजांप्रमाणें एकसंधी नसून अनेकसंधी आहे. प्रत्येक सांध्यापर्यंतचा जो हिंदु समाजाचा अवयव त्याची मजबुती वाढविली तरच हिंदू समाजरूपी सबंध साखळदंड बळकट व जोरदार होईल. गेल्या शंभर वर्षांतील चळवळीपासून हिंदूंनी धडा घ्यावयाचा तो हाच होय. हिंदु समाजाच्या सांखळीचा जाति हा एक दुवा आहे. इतर समाजांत तो नाही व हिंदुसमाजांत तो आहे याबद्दल हिंदूंना लाजण्याचें बिलकूल कारण नाही. हिंदूंत जाती आहेत हा दोष असो अगर गुण असो, त्याची जबाबदारी आजच्या हिंदुमात्रावर नाही. त्यांनी आहे ही स्थिति लक्षांत घेऊनच आपल्या समाजाचें पुनरुज्जीवन करण्याची व त्याचें बळ वाढविण्याची चळवळ हातीं घेतली पाहिजे. जाति आहेत म्हणून हिंदु समाजाची जूट होत नाहीं याबद्दल विषाद मानीत न बसतां त्याच जातीकडून एकजूट घडवून आणणें यांतच खरें शहाणपण व दूरदर्शित्व आहे.

किंबहुना हें सत्य पुष्कळांना पटलेंहि आहे. परंतु तें बोलून दाखविण्याचें धैर्य

त्यांना होत नसल्यामुळे समाजांत ढोंगीपणा व बखेडा मात्र वाढत चालला आहे! इतकेंच नव्हे तर तरुण पिढीची दिशाभूल होऊन तिला आपल्या धार्मिक व सामाजिक वागणुकीचें निश्चित असें धोरणच आंखणें अशक्य झालें आहे. सर्वत्र पाहावें तों हिंदूतील बहुतेक जातींच्या परिषदा भरत आहेत व त्यांतून त्या त्या जातीच्या हिताहिताचा विचार होत आहे. फार काय पण ही परिषदांची लाट पोट जातींपर्यंतहि येऊन थडकली आहे. सोलापुरास देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हण परिषदेचें दुसरें अधिवेशन गेल्या महिन्यांत भरून कित्येक ठरावहि पास करण्यांत आले. परिषदेंत सदर पोट जातींतील सुशिक्षित विद्वान अनुभवी पोक्त व विचारी माणसें होतीं. त्यांना देशहित कळत नव्हतें असें म्हणणें वेडेपणाचें होय. ज्याअर्थी त्यांना असली परिषद भरवावीशी वाटली त्याअर्थी त्यांच्या विशिष्ट गरजा भागविण्यास आणि अडचणी दूर करण्यास वेगळ्या परिषदेची त्यांना आवश्यकता भासली ही गोष्ट स्पष्ट झाली.

अशा रीतीनें प्रत्येक जातीस आपली संघटना करणें जर पटलें आहे तर सबगोलंकाराचें व जातिभेद मोडण्याचें ढोंग माजविण्यांत हंशील काय? या ढोंगानें समाजहित तर साधत नाहींच, पण समाज दुर्बळ, नेभळा व ढिला मात्र बनत आहे. यासाठीं हिंदु समाज बलशाली, प्रतिकारक्षम व सुदृढ व्हावयाचा असेल तर त्यांतील प्रत्येक जातीनें आपली संघटना करून हिंदूंतील ऐक्य खालपासून वरपर्यंत रचीत नेलें पाहिजे. प्रत्येक जातीनें आपल्या धार्मिक, आर्थिक व शैक्षणिक स्थितीचा विचार करून ती स्थिति जातींतील घटकांच्या सहकार्यानें सुधारावी व तिला नवजीवन पाजून जोमदार व कार्यक्षम बनवावें. एका जातीनें स्वतःची संघटना केली म्हणजे तिनें इतर जातींचा द्वेषच केला पाहिजे असें अनुमान काढणें चुकीचें होय. जात्यभिमानाच्या मर्यादा कोणत्या, धर्माभिमानाच्या मर्यादा कोणत्या व देशाभिमानाच्या मर्यादा कोणत्या हें ठरविण्याचें तारतम्य अद्यापि जनतेंत आलें नसलें तर तें यापुढें येणें जरूर आहे. लोकसत्ता म्हटली तरी तिचें स्वरूप पाश्चात्य देशांत सर्वत्र सारखें आहे असें नाहीं. ज्या त्या देशस्थितीप्रमाणें त्यांत फरक पडतो. तसा हिंदुस्थानांतील लोकसत्तेंतहि पडल्यास त्याबद्दल खेद करण्याचें किंवा विषाद मानण्याचें कारण नाहीं. हिंदुस्थानांत जी लोकसत्ता उद्या स्थापन होणार ती देशस्थितीला व हिंदु समाजस्थितीला धरून झाली तरच त्यांत देशाचें व तसेंच हिंदु समाजाचें कल्याण आहे हें विसरतां कामा नये. रंगूनच्या हिंदु परिषदेचे अध्यक्ष स्वामी निर्मलानंद यांच्या भाषणाचा रोख हाच असून त्यापासून योग्य तो बोध हिंदु समाज घेईल व आपलें धोरण फिरून विचार करून निश्चित ठरवील अशी आम्हांस आशा आहे.

# म. गांधींचा दुसरा उपवास

ता. २९ एप्रिल रोजीं रात्रीं म. गांधींनीं येरवड्याच्या तुरुंगांत असें निश्चित केलें कीं, ता. ८ मे पासून हरिजनांच्या कार्यासाठीं २१ दिवस उपोषण करावयाचें. लगेच रात्रीं त्यांनीं उपोषणाच्या खुलाशाचें एक पत्रक लिहून काढलें आणि दुसरे दिवशीं म्हणजे ता. ३० एप्रिल रोजीं रविवारीं सकाळीं आपले चिरंजीव श्री. देवीदास यांना बोलावून आणून त्यांनी ते त्यांचे हवालीं केलें. श्री. वल्लभभाई किंवा श्री. महादेवभाई यांनाहि या नव्या उपोषणाचें वृत्त अकस्मातच कळलें.

यापूर्वी ता. २० सप्टेंबर १९३२ रोजीं महात्माजींनी प्रायोपवेशन केलें होतें, व तें ता. २६ पर्यंत चालू होतें. सहा महिन्यांत आलेल्या या नव्या उपोषणापासून महात्माजींनी परावृत्त व्हावें म्हणून श्री. वल्लभभाई प्रभृतींनी दोन तास वाटाघाट केली, पण ती निष्फळ ठरली. तेव्हा श्री. देवीदास यांनी तारा व फोन यांमार्फत उपोषणाची वार्ता मित्रमंडळींस कळविली. ता. ३० रोजीं रविवार असल्यामुळे म. गांधींनी साप्ताहिक मौन दुपारपासून सुरू केलें. गांधींच्या पत्रकाचा अनुवाद पुढील प्रमाणें आहे—

" गेले कांहीं दिवस माझ्या अंतःकरणांत एक तुफान माजून राहिलें आहे आणि मी त्याविरुद्ध झगडत आहें. हरिजनदिनाच्या ( ता.३० एप्रिल) आधीं थोडा वेळ, अंतरीचा ध्वनि मला सारखा ऐकूं येऊं लागला. 'कां नाहीं तूं तें करीत !' हे हृदयाचें बोल मनावर आदळूं लागले. मीं विरोध करण्याचा प्रयत्न केला, पण तो व्यर्थ ठरला. तेव्हा असा निर्धार केला कीं, सोमवार ता, ८ रोजीं दुपारपासून सोमवार ता. २९ रोजीं दुपारपर्यंत

एकवीस दिवस बिनशर्त उपवास करावयाचा आणि तो रद्द करावयाचा नाहीं. अमुक एका विशिष्ट व्यक्तीविरुद्ध हा उपवास मी करीत आहे असें नाहीं. पण कांहीं काळ तरी, स्वतः उपवास न करतां माझ्या उपवासाच्या आनंदांत भाग घेऊं इच्छिणाऱ्या व्यक्तीविरुद्ध मात्र तो उपवास आहे. पण मुख्यतः हा उपवास माझ्याविरुद्धच आहे. माझ्या स्वतःची आणि माझ्या स्नेह्याची अंतःशुद्धि व्हावी, आणि त्यांची दक्षता व जागरूकता वृद्धिंगत व्हावी अशा अंतःकरणापासून प्रार्थना करण्यासाठीं हा उपवास आहे. मात्र माझी ही कृति मान्य असेल त्यांनी माझ्याप्रमाणे उपवास करता कामा नये. त्यांनी तसा उपवास केला तर तो त्यांना आणि मला उपद्रवच होईल.

माझ्यापेक्षा अधिक पुण्यवान् आणि अधिक सत्पात्र अशा माणसांच्या भावी उपोषणाची तयारी माझ्या या उपवासानें होवो असें मी इच्छितों. सप्टेंबरपासून आतांपर्यंत सर्व दिवस मी माझा पत्रव्यवहार बारकाईने वाचीत आहे, सारा मजकूर अभ्यासांत आहे आणि स्त्री-पुरुष, जाणता--अडाणी, स्पृश्य अस्पृश्य, अशा सर्वांशीं दीर्घ काळ संभाषण करीत आहे. गेल्या कांहीं दिवसांकडे मी वळून पाहिलें तर असें दिसतें कीं, हा उपवास घडवून आणण्याला पुष्कळच कारणें घडलीं आहेत. तीं कारणें इतकीं पवित्र आहेत कीं, त्यांचा उल्लेख करतां येत नाहीं. परंतु तीं सर्व हरिजनांच्या थोर कार्यासंबंधीच आहेत' आतांपर्यंत माझी कल्पना होती त्यापेक्षा हें संकट फार मोठें आहे. तें पैशाने, बाह्य संघटनेने किंवा हरिजनांना राजकीय अधिकार देण्याने दूर होणारें नाही. मात्र पैसा, संघटना व राज्याधिकार या तिघांचीहि जरूरी हरिजनांना फार मोठी आहे."

तथापि परिणामाच्या दृष्टीने त्यांनी आत्मधन, आत्मबल किंवा आत्मशुद्धि यांचा अवलंब केला पाहिजे. उपवास व प्रार्थना या दोन साधनांनीच ही प्राप्ती होईल. सामर्थ्याच्या प्रौढीने सत्यरूपी परमेश्वरापाशीं आपण पोंचूं शकणार नाही; पण अनाथ व दुर्बल या नात्यानें आपण त्याजवळ जाऊं.

तरी पण केवळ देहदंड म्हणून उपोषण करून उपयोग नाही. त्यामागे आत्मशक्ति पाहिजे. केवळ सत्याचा पुरस्कार करण्याची संवेदना हृदयांतून झाली पाहिजे. सत्याकरितां ज्यांनी कष्ट सोसले आहेत व ज्यांना आपल्या विरोधकांबद्दलहि प्रेम वाटतें अशा लोकांनी, तसेंच ज्यांची पाशवी वासना नष्ट झाली आहे व ज्यांनी ऐहिक सुखाचा व महत्त्वाकांक्षेचा त्याग केला आहे अशांनाच फक्त सत्याकरितां उपवास करण्याचा अधिकार आहे. म्हणून कोणीहि पूर्व तयारी व शिस्तीचें पालन केल्याशिवाय हा उपवास करूं नये.

या उपवासाबद्दल कोणीहि गैरसमज करून घेऊं नये. मला मरणाची इच्छा नाही. जरी मी या कार्याकरिता मरावयाला तयार असलों तरी त्या कार्याच्या सिद्ध्यर्थ मला जगावयाचें आहे. तथापि स्वतःकरितां व माझ्या सहकारी मित्रांकरितां अधिक पावित्र्य, अधिक भक्ति व आत्मसमर्पण जरूर आहे. अढळ निष्ठेचे कार्यकर्ते मला पाहिजेत.

अंगावर शहारे आणतील अशा कित्येक गोष्टी माझ्या नजरेस आल्या आहेत. अशा लोकांनी माझ्या ध्येयापासून दोन हात दूर असावें असा माझ्या या उपोषणाचा हेतु आहे. माझे कित्येक सनातनी मित्र व इतर लोक यांना असें वाटतें कीं, अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीचा राजकीय हेतु आहे. व हे मला माहीत आहे. या उपोषणाने हा हेतु केवळ धार्मिक आहे अशी लोकांची खात्री पटेल तर किती बरें होईल ? जर ईश्वराला या देहापासून अधिक सेवा करून घ्यावयाची असेल तर अन्नावांचूनहि हा देह तो टिकवूं शकेल. तो मला आध्यात्मिक जीवन देईल. पण ईश्वर आपलीं कार्यें उपाध्यायांच्या करवीं करीत असतो. तसेंच अस्पृश्यतानिवारणाची तगमग ज्यांना लागून राहिली आहे असे कार्यकर्ते वर्णाश्रमी हिंदूंतर्फे त्यांनी अस्पृश्यांस दिलेल्या वचनाच्या पूर्ततेसाठी शक्य ते परिश्रम करून मला जरूर तें जीवन देतील.

माझ्या सहकारी मित्रांनी उपोषणाबाबत खिन्न होऊं नये. उपवासाने त्यांना जोम यावा, आपलें कार्यक्षेत्र त्यांनी सोडूं नये. तसेंच प्रकृतिस्वास्थ्याकरिता जे विश्रांति घेत आहेत, त्यांनीहि विश्रांति घेतच राहावें. ते निरोगी कार्यकर्त्याप्रमाणे आपलें कामच करीत आहेत असें मी समजतो.

चळवळीच्या कामानिमित्त मजकडे येणें ज्याला जरूर भासेल त्यानेच मजकडे यावें, इतरांनी येऊं नये.

कोणत्याहि कारणास्तव उपवास पुढे ढकलण्यास, सोडून देण्यास अगर त्याचा दिवस बदलण्यास माझ्या मित्रांनी मला आग्रह करू नये अशी प्रार्थना आहे. आत्मस्फूर्तीने मी हा उपवास करीत आहें. ह्यावर त्यांनी विश्वास ठेवावा. आणि म्हणून माझ्या हिंदुस्थानांतील व परराष्ट्रांतील मित्रांनी मी या दिव्यांतून पार पडून यशस्वी होण्याकरितां, आणि तसेंच मी जगो अगर मरो, जें कार्य मी हातीं घेतलें आहे त्याची भरभराट

होण्याकरितां, ईशप्रार्थना करावी. सत्याला वेढिलेलें सुवर्णकवच दूर होण्याकरितां माझ्या सनातनी मित्रांना प्रार्थना करण्याची विनंति मी करूं कां!"

**मि. पोलक यांची चिंता**

म. गांधींच्या भावी उपोषणाची वार्ता लंडन येथे ता. ३० रोजींच जाऊन थडकली. ती ऐकून गांधींच्या तेथील मित्रमंडळींना मोठी काळजी वाटूं लागली. मि. पोलक यांनी आपली चिंता पुढील शब्दांनी व्यक्त केली. "गांधींनीं पूर्वी २१ दिवसांचा उपवास केला होता, त्यांपेक्षा आता ते वृद्ध झाले आहेत. त्यामुळें त्यांचा हा निर्धार चिंताजनक आहे. सदसद्विवेकबुद्धीने तो निर्धार केलेला असल्यामुळे त्याबद्दल मला आदर वाटतो. तथापि गांधींकडे शिष्टमंडळ नेल्यास त्यांच्या मनांतील किंतु दूर होईल, व ते फेरविचार करतील अशी मला आशा वाटते!

# अहमदाबादेची स्थापना

(ले.—दत्तात्रेय बाळकृण डिसकळकर, सातारा.)

रा. वाकसकरांनी केसरीच्या ता. १४-३-३३ च्या अंकांत अहमदाबादेची स्थापना कोणी व केव्हा केली अशी पृच्छा करून पूर्वीच्या कर्णावती शहराचेंच पुढे गुजराथेच्या सुलतानांच्या वेळीं अहमदाबाद हें नांव पडलें असावें असें सुचविलें आहे. त्या संबंधांत खालील खुलासा करणें इष्ट दिसतें.

अहमदाबादेची स्थापना कोणा अहमद नांवाच्या बादशहाने किंवा त्याच्या स्मरणार्थ त्याच्या वंशजाने केली असली पाहिजे हें उघड आहे. मग त्या ठिकाणीं पूर्वी अन्य नांवाचें एखादें गांव असो कीं निर्जन वन असो.

अहमदाबाद शहराच्या स्थापनेसंबंधाने मिराते अहमदी या ग्रंथकाराने जी संवत् १४४९ वैशाख शुद्ध पंचमी गुरुवार अशी तारीख दिली आहे, ती निःसंशय घोटाळा उत्पन्न करणारी व चुकीची आहे. त्या काळची हकीकत देतांना मिराते अहमदी, मिराते सिकंदरी वगैरे मुसलमानी ग्रंथकारांत बरीच विसंगतता दिसत असून त्याच्यामुळे कालनिर्णयाच्या कामीं बराच घोटाळा उत्पन्न होतो, म्हणून इतर बऱ्याच गोष्टी विचारांत घ्याव्या लागतात. अहमदाबादेच्या स्थापनेसंबधाने थोडक्यांत अशी हकीकत आहे; इ. स. १३९१ मध्ये दिल्लीचा बादशहा महमद तघलघ यानें बाटून मुसलमान झालेल्या एका रजपुतास जाफरखान हें नांव देऊन गुजराथेचा सुभा केलें. रास्तेखान नांवाचा पूर्वीचा गुजराथचा सुभा आपला अधिकार सोडण्यास तयार नसल्यामुळे जाफरखानाचें त्याच्याशीं पाटणजवळच खंभोई गांवीं युद्ध झालें. त्यांत रास्तेखान मारला गेला. त्या विजयाच्या संस्मरणार्थ जाफरखानाने जेतपूर नांवाचें गांव वसविलें(गुजराथ गॅझेटियर पा. २३२)

मिराते अहमदीमध्यें अहमदाबादेच्या स्थापनेचा म्हणून दिलेला काळ या गांवच्या स्थापनेचा असावा असें वाटतें. पुढे इ. स.१४०३त याच जाफरखानास त्याचा मुलगा नासिरुद्दीन याने पदच्युत केलें व त्याने महमदशहा हें नांव धारण करून हल्लीच्या अहमदाबादेच्या जागीं असलेल्या असावल गांवीं स्वतंत्र गादी स्थापन केली. जाफरखान याच ठिकाणीं आपल्या मुलाच्या कैदेंत होता. परंतु इ. स. १४०७ मध्ये जाफरखानाने आपल्या मुलास मारून मुझफरशहा हें नांव धारण करून गादी बळकावली. मुझफरशहास १४११ मध्ये त्याचा नातू अहमदशहा याने विषप्रयोग करून ठार मारलें व आपण गादीवर बसला. यानेंच १४१३ मध्ये असावल हें नांव बदलून अहमदाबाद हें नांव आपल्या राजधानीस दिलें. अर्थात् असावलें गांवाला राजधानीचा मान प्रथम महमदशहाने दिला असला तरी त्या गांवाला अहमदाबाद हें नांव अहमदशहानेच इ. स. १४१३ त दिलें. (गुज. गॅझे. पा. २३५)

असावल हें गांव बरेंच जुनें असून अहमदशहाच्या वेळेपर्यंत त्याचें तेंच नांव चालूं होतें. (गुजराथ गॅझेटियर पा. ५१२) मध्यंतरीं अणहिलवाडचा सोलंकी राजा पहिला कर्ण (इ. स. १०६४ ते १०९४) याने असावल गांवीं कर्णेश्वर महादेवाचें देऊळ व कर्णसागर नांवाचा तलाव बांधून त्या गांवाला कर्णावती असें नांव दिलें. या कर्णावती नगरीचा उल्लेख कांहीं ठिकाणीं आला असून अहमदाबादेनजीक सावरमतीच्या कांठीं सप्तर्षिअवताराच्या देवळांत एक खंडित शिलालेख सांपडला

आहे त्यावरहि हें नाम आढळतें (बुद्धिप्रकाश २७· १७४; ह्विएन्ना ओरिएण्टल जर्नल ७८७) परंतु कर्णानें पाटण ही राजधानी सोडून कर्णावती ही राजधानी केली असेल असें दिसून येत नाहीं. त्यानें आपल्या नांवावरून कर्णमेरु नांवाचें एक मोठें देऊळ खास पाटणांतहि बांधल्याचें आढळून येतें. कर्णाचा महाप्रतापी पुत्र सिद्धराज जयसिंह यानें कर्णावतीला महत्त्व दिल्याचें कोठेंच दिसून येत नाहीं. उलट त्यानें जीं शेंकडों बांधकामें केलीं त्यांपैकीं उत्कृष्ट असा सहस्रलिंग नांवाचा तलाव पाटणांत बांधला व रुद्रमाळ हें अप्रतिम मंदिर पाटणनजीकच सिद्धपुरांत बांधलें. कोणत्याहि सोलंकी राजानें किंवा त्याच्याच वाघेला नांवाच्या शाखेंतील राजानें पाटण राजधानी सोडली नाहीं, इतकेंच नव्हे तर इ.स. १३०४ नंतर दिल्लीच्या बादशहाच्या गुजराथेंतील सुभ्याचें मुख्य ठाणें पाटण शहरींच असे. कर्णावती हें नांव फारसें रूढ देखील न होतां त्या ठिकाणाला अहमदशहानें इ. स. १४१३ मध्यें अहमदाबाद हें नामाभिधान देईपर्यंत असावल हेंच नांव रूढ होतें. हें गांव अगदींच लहान नसून साधारण बऱ्यापैकीं होतें (गुज. गॅझे. ५१३).

अहमदाबाद शहराच्या पश्चिमेकडील भागाला भद्र म्हणतात. त्या भागाला पूर्वी माहिंसक म्हणत असावें असें भद्रमधील अहमदशहाच्या मशिदींत बसविलेल्या एका स्तंभावरील लेखावरून दिसून येतें. तो लेख असाः—

सं. १३०८ वर्षे-दि ११ रवौ अद्येह माहिंसके महाराजाधिराज श्रीमंत् वीसलदेवविजयराज्ये ... पेथडेन श्रीउत्तरेश्वरदेवमंडपे जाली कारापिता (एपि. इं. ५·१०२). यावरून अहमदशहानें उत्तरेश्वरमंदिराचा विध्वंस करून कदाचित् त्याच ठिकाणीं हल्लींची मशीद बांधली असावी.

# रेल्वेची चुरस मोटारीला भोवणार काय ?

भावी राज्यघटनेंत कायदेमंडळाला जबाबदार अशा मंत्रिमंडळाच्या हातीं कोणते अधिकार दिले जातील याची रूपरेखा श्वेतपत्रिकेंत प्रसिद्ध झालीच आहे. तथापि त्यापैकीं खरेखुरे किती अधिकार हिंदुस्थानाच्या पदरांत पडतील याची शंका आहे. रेल्वे खात्याचा १०० कोटींचा कारभार तत्त्वतः जरी रेल्वे बोर्डाच्या हातीं असला तरी त्या खात्यावर व्यापारमंत्रीच देखरेख ठेवतो. भावी राज्यघटनेंत व्यापारमंत्री कायदेमंडळाला जबाबदार होणार असल्याकारणानें, हा १०० कोटींचा कारभार हिंदी सभासदाच्या हातीं गेला तर वरिष्ठ गोरे अधिकारी, परदेशी कंपन्या व गोरा व्यापारीवर्ग यांची चंदी कशी चालू राहणार ही काळजी भारतमंत्र्यांना लागून राहिली व त्यांनी गोलमेज परिषदेच्या तीनहि बैठकींत ज्या कल्पनेचा हिंदी प्रतिनिधींना मागमूसहि लागू दिला नाहीं ती 'स्टॅटयुटरी रेल्वे बोर्डा'ची योजना मागाहून जाहीर करून, एका हातानें दिलेलें दान दुसऱ्या हातानें परत घेण्याचा घाट घातला आहे. हें स्टॅटयूटरी रेल्वे बोर्ड पार्लमेंटाच्या कायद्यानें मंजूर करून घेऊन, रेल्वे खात्याच्या सर्व नाड्या पार्लमेंटच्या म्हणजे पर्यायानें स्टेट-सेक्रेटरीच्या हातीं ठेवण्याचा कावा या योजनेच्या बुडाशीं आहे. अशी ही योजना एकदा मंजूर झाली कीं, भावी फेडरल कायदेमंडळाला केवळ रेल्वे बजेटावर व रेल्वे खात्याच्या धोरणावर सर्वसाधारण चर्चा करण्याचा अधिकार राहील !

रेल्वेखात्याचें कुरण अँग्लो-इंडियन-युरोपियन वरिष्ठ अधिकारी व रेल्वेला लागणारें सामान पुरविणाऱ्या ब्रिटिश कंपन्या यांनाच तेवढें मोकळें ठेवून व यांचीच तेवढी तुंबडी भरून सरकारांचे समाधान होत नाहीं. रस्त्यावरील मोटारींची वाहतूक दिवसेंदिवस वाढत आहे, तीहि आपल्याच हातीं राहावी असाहि त्यांचा डाव आहे. मोटारी, मोटारींचें सामान, पेट्रोल इत्यादि वस्तु कोणत्या देशांतून आणावयाच्या हें ठरविण्याचा अधिकार एका विशिष्ट मंडळाकडे ठेवण्यांत येणार आहे. हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य रस्ते, प्रांतिक रस्ते व देशभर पसरलेले शाखा रस्ते (फीडर रोड्स) सुधारण्याचा जो आज कळवळा हिंदुस्थानसरकाराला आला आहे तोहि याच उद्देशानें आला असावा. गेल्या आठवड्यांत सिमल्यास 'रेल्वे-रोड कॉन्फरन्स' भरून तिच्यांत शिफारसवजा जे ठराव झाले व चर्चा झाली त्यामुळें अशी शंका घेण्यास जागा झाली आहे.

मोटार व रेल्वे यांची चढाओढ कशी थांबेल आणि त्याचबरोबर रेल्वे व मोटार यांच्या वाहतुकीवर समान नियंत्रण कसें ठेवतां येईल या संबंधाचा विचार करण्याकरितां वरील परिषद भरविण्यांत आली व तिला प्रांतिक सरकारांचे प्रतिनिधि हजर राहिले. परिषदेचा उद्‌घाटनसमारंभ व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांच्या हस्तें झाला. हिंदुस्थान सरकारचे फडणवीस सर जॉर्ज शुस्टर, व्यापार व रेल्वे मंत्री सर जोसेफ भोर, रेल्वे बोर्डाचे कर्ण-

धार सर गुर्थी रसेल हे परिषदेला हजर होते. हिंदुस्थानांतील मुख्य रस्त्यांच्या व्यवस्थेचें खातें ज्यांचे हातीं आहे ते व्हाइसरॉयांच्या कार्यकारी मंडळाचे सभासद सर फ्रँक नॉइस हे तर परिषदेचे कार्याध्यक्ष होते. प्रांतिक सरकारांचे कांही दिवाण व पब्लिक वर्क्स खात्याचे सरकारी प्रतिनिधिहि परिषदेला आले होते. फार काय पण इंडियन रोड अँड ट्रॅन्सपोर्ट डेव्हलपमेंट असोसिएशनचे म्हणजे मोटार व पेट्रोलचा व्यापार ज्यांचे हातीं आहे अशा व्यापारी वर्गाचे प्रतिनिधि मेसर्स मिलर, ऑर्मेडा व चिनाय यांनाहि पाचारण करण्यांत आलें होतें.

पण अत्यंत उद्वेग आणणारी व लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, मोटार वाहतुकीवर निर्यंत्रण घातल्याने ज्या खासगी मोटारवाल्यांचें प्रत्यक्ष नुकसान होणार, त्या मोटारवाल्यांच्या प्रतिनिधींचा मात्र परिषदेंत प्रवेश नव्हता! येथील गोखले स्कूल ऑफ पॉलिटिक्स या संस्थेमार्फत मोटारवाहतुकीने प्रत्यक्ष कोणाचें किती नुकसान झालें याची पाहणी करण्यांत येत आहे. लवकरच या संशोधनाचा रिपोर्ट प्रसिद्धहि होईल. अशा या संस्थेमार्फत मोटारवाल्यांची कैफीयत मांडणाऱ्या प्रतिनिधीला परिषदेस हजर राहण्याची परवानगी द्या अशी विनंति करण्यांत आली असतां, परिषदेचा व्याप वाढला असल्याची सबब सांगून परवानगी नाकारण्यांत आली ! समतोल बुद्धीने संशोधन करणारांना हजर सुद्धा राहूं न देऊन सरकाराने परिषदेविषयीं जनतेचें मत अधिकच प्रतिकूल बनविण्याचें मात्र पुण्य जोडलें! वर्तमानपत्रांच्या बातमीदारांनादेखील मज्जाव होणार होता. पण पुढें कोठे माशी शिंकली कोण जाणे, फक्त सरकाराच्या विश्वासांतल्या बातमीदारांना प्रवेश मिळाला व त्यांच्या मार्फत परिषदेंतील चर्चेची रूपरेखा तरी बाहेर आली. मग गुलदस्तांत आणखी कारस्थानें काय झालीं हें कोण सांगणार ? यावरून परिषदेंत झालेली चर्चा एकतर्फीच झाली इतकेच नव्हे, तर परिषद जरी प्रास्ताविक स्वरूपाची असली तरी तिच्या ठरावाचा बडगा ज्यांच्या पाठींत बसणार त्या मोटार-वाहतुकीचा धंदा करणाऱ्या लोकांची बाजू ऐकून घेण्याचें सौजन्यहि सरकाराने दाखविलें नाही, ही गोष्ट अन्यायाची झाली यांत तिळमात्र शंका नाही.

परिषदेंत चर्चा झालेल्या ठरावांचा सारांश असा—रेल्वे व मोटार यांची चढाओढ नुकसानकारक असून ती थांबविण्यांत यावी. रेल्वेला पोषक अशी मोटारीची वाहतूक वाढविण्यांत यावी व हे दोन हेतु साध्य होण्याकरिता रस्ते सुधारण्याची एक व्यापक योजना तयार करण्यांत यावी. उतारू व माल यांच्या वाहतुकीची रेल्वेची चांगली सोय असेल तेथे मोटारवाहतुकहि कांही अंतरापलीकडे करण्यांत येऊं नये असें नियंत्रण घालण्यांत यावें. तसेंच रेल्वेस समांतर असलेल्या सडकांवरून जाणाऱ्या मोटारींची संख्या कमी करणें, रेल्वे कंपन्यांना मोटारी चालविण्याचा परवाना देणें, मोटारीवरील करांची योजना ठरविणें, कर्ज उभारून रेल्वे सुधारणें, मोटारी चालविण्याचे परवाने विवक्षित मुदतीपर्यंत ठराविक कंपन्यांना देणें, रोड फंडाचा विनियोग कसा करावा हें ठरविणें आणि मोटार व रेल्वे यावर नियंत्रण घालण्याच्या दृष्टीने मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार यांसाठी योजना बनविणें इत्यादि ठरावहि परिषदेपुढें आले अशा रीतीने एकंदर आठ ठरावावर परिषदेंत चर्चा झाली.

ह्या ठरावावर प्रांतिक सरकाराचीं मतें मागविण्यांत आलीं असून पुढील हिंवाळयांत पुनः परिषद भरवून निर्णायक ठराव होतील व असेंब्लीपुढे बिल आणून मध्यवर्ती व प्रांतिक कम्युनिकेशन बोर्डाच्या घटनेस मंजुरी घेण्यांत येईल असा अंदाज आहे. भावी राज्यघटना अंमलांत येण्यापूर्वी या महत्त्वाच्या प्रश्नाचा निर्णय करून कायद्याचा खोडा जनतेच्या पायांत अडकवण्याचा जो सरकाराने घाट घातला आहे तो सर्वथैव अनिष्ट असल्याने या योजनेचा कोणीहि निषेधच करील.

तथापि या प्रश्नासंबंधाने रेल्वे बोर्ड, सरकार, रस्त्यांची सुधारणा करू इच्छिणारे व मोटारवाले यांची बाजू काय आहे याचा थोडासा विचार करूं. रेल्वे बोर्डाचे कर्णधार सर गुर्थी रसेल यांनी आपली बाजू मांडली ती अशी. रेल्वेंत ८०० कोटि भांडवल गुंतलें असून त्याची जबाबदारी रयतेवर आहे. तसेंच शेकडा ८०-९० टक्के रेल्वे सरकारी मालकीची असल्यामुळें रेल्वेच्या नफ्याचे वाटेकरी हिंदी लोकच आहेत. अर्थात् रेल्वेचें नुकसान होऊं लागलें तर त्याची झळ रयतेलाच लागेल. शिवाय रेल्वेची व्यवस्था चांगल्या रीतीने ठेवावयाची म्हटली तर चालू खर्च ५० कोटि, भांडवलावरील व्याज ३३ कोटि, झीज फंड १४ कोटि व हिंदुस्थान सरकारला द्यावयाचा प्राप्तीचा वाटा सुमारे ६ कोटि एकूण १०३ कोटि रुपयांचें उत्पन्न जमा होणें जरूर आहे. रेल्वेचें इतकें उत्पन्न न आलें तर प्रतिवर्षी प्राप्तीचा वाटा म्हणून जे सहा कोटि रुपये दिले जातात ते गेल्या दोनतीन वर्षाप्रमाणे दिले जाणार

नाहीत व उत्पन्न तुटलें म्हणून रयतेला जादा कर द्यावा लागेल.

शिवाय कायद्याने जीं बंधनें रेल्वेवर घालण्यांत आलीं आहेत तीं बंधनें मोटारवाहतुकीचा धंदा करणारांवर नाहीत. तीं बंधनें अशीं— (१) रेल्वे लाइन व इंजिनें,तसेंच डबे वगैरे सामान ठराविक दर्जाचें ठेवणें (२) गाड्यांचा वेग, वजन, सिग्नालिंग, तज्ज्ञ व लायक नोकरवर्ग यासंबंधी नियंत्रण घालणें (३) वाहतुकांचे व रेल्वे भाड्याचे दर ठराविक मर्यादेत ठेवणें (४) नोकरवर्गाचे कामाचे तास ठरविणें; तसेंच कोळसा, लोखंड, मँगॅनीज, खनिज पदार्थ, धान्यें इत्यादि जड जिनसांकरिता माफक दर ठेवून त्यांची वाहतूक करणें वगैरे. रेलवेला हीं जी बंधनें आहेत तीं मोटारींना नसल्यामुळे रेल्वेचें नुकसान सुमारें १९० लाखांचें होत आहे. रेल्वेचें उत्पन्न १०० कोटि मानलें तर शेंकडा २ टक्के नुकसान मोटार-चढाओढीनें होतें असा अंदाज निघतो. मोटारींच्या चढाओढीमुळे रेल्वेचें नुकसान होत असेल तर चढाओढ थांबविण्याकरिता मोटारींच्या वाहतुकीला आळा पडला तरी हरकत नाही असें सरकारचें म्हणणें आहे. रेल्वेला समांतर अशी पक्की सडक (Metalled Roads) १३२२७ मैल म्हणजे २२ टक्केच आहे; व सर्व प्रांतांत मिळून मोटारवाहतुकीला योग्य अशी इतर पक्की सडक ६२ हजार मैल आहे. त्याशिवाय कच्ची सडक १६ हजार मैल आहे तीहि पक्की करितां येईल. मोटारींची वाहतूक आता इतकी वाढूं लागली आहे कीं, प्रांतिक सरकारांनी मध्यवर्ती सरकाराकडून कर्ज उभारून नवीन सडका बांधल्या अगर कच्चया सडका पक्क्या केल्यातर दस्तुरीचें जें उत्पन्न येईल त्यांतून कर्जावरील ५–६ टक्के व्याज निघून येईल. मात्र नवे रस्ते कोणते बांधावयाचे व कसे सुधारावयाचे ह्याची योजना मध्यवर्ती नियंत्रण बोर्डाकडून मंजूर करून घेतली पाहिजे. याचाच अर्थ हा कीं, रस्त्यावर पैसा खर्च होणार प्रांतिक सरकाराचा, पण नियंत्रण राहणार मध्यवर्ती सरकाराचें; कारण ज्याचे हातीं ससा तो पारधी !

रस्ते सुधारण्याचे कैवारी म्हणजे परदेशी मोटार कंपन्यांचे एजंट, पेट्रोल कंपन्या, आधुनिक शास्त्रीय पद्धतीनें पक्की सडक तयार करण्याकरिता आवश्यक अशा अस्फालट डांबर इत्यादि मालाचे कारखानदार व परकी कंपन्या इ. त्यांचें म्हणणें असें कीं, "मोटार, टायर व इतर मोटारीचें सामान यांवरील जकात, पेट्रोलवरील जकात व प्रांतिक सरकाराला द्यावयाचे कर यांच्या रूपाने ८ कोटि ३० लक्ष रुपयांचें उत्पन्न सरकाराला मिळतें व शेतकऱ्याच्या शेतांतील माल बाजारांत नेण्याला मोटारीचा उपयोग होतो. इतकेंच नव्हे तर मोटारवाहतुकीने बैलगाडीचें ३-४ दिवसांचें अंतर चारसहा तासांवर आलें आहे. सबब आमच्या मोटारवाहतुकीला उपयुक्त होईल अशी सडकांची दुरुस्ती झाली पाहिजे, आणि ती सुधारणा कशी झाली पाहिजे हें डि. लोकल बोर्डासारख्या स्थानिक संस्थांना पैशाच्या अडचणीमुळे ठरवितां येणार नाही म्हणून ते रस्ते प्रांतिक सरकारने आपल्या ताब्यांत घ्यावे!"

खासगी रीतीने मोटारीच्या वाहतुकीचा धंदा करणाऱ्या वर्गाची बाजू अशी की, 'मोटारीच्या धंद्यांत लाखों रुपये घालून हिंदी लोकांना पोट भरण्याचा एक स्वतंत्र व्यवसाय आम्हीं निर्माण केला आहे. महाराष्ट्रांतले १० जिल्हे जमेला धरले तर या मोटारीच्या धंद्यावर १२-१५ हजार लोक आज आपली उपजीविका करीत आहेत. १९२३-२४ सालीं ५८८४ मोटार लॉऱ्या हिंदुस्थानांत होत्या. तेथे गेल्या आठनऊ वर्षांत मोटार लॉऱ्यांची संख्या ३६०८३ म्हणजे सहापट झाली आहे. मोटारीसारखें जलद प्रवासाचें साधन लोकांना प्राप्त झाल्यापासून दळणवळण वाढलें. मोटारीच्या चढाओढीमुळे रेल्वेचे भाड्याचे दर कमी झाले. मोटार जरूर तेथे उभी करतां येते, व मोटारीचा उपयोग लहानसान सर्व खेड्यांना जसा होतो तसा रेल्वेचा होत नाही. नासणारी फळफळावळ व भाजीपाला मोटारीने बाजारांत जितका ताजा जाऊं शकतो तितका रेल्वेने जाऊं शकत नाही. लाइट रेल्वेच्या गाड्या ठराविक नियमित वेळीं दिवसांतून दोनतीनदाच सुटत असल्यामुळे लोकांची त्याजकडून विशेष सोय होऊं शकत नाही. मोटारीने गेलें असता प्रवाशांना गांवांतून स्टेशनावर यावें लागत नाही व थोड्या वेळाच्या अंतराने सुटणाऱ्या मोटार गाड्या लोकांना सोयिस्कर वाटल्यामुळे रेल्वेचें उत्पन्न बुडूं लागलें तर त्यांत मोटारवाल्यांचा काय दोष !'

या सर्वांचा विचार करतां असें दिसून येईल कीं, रेल्वेचें जें उत्पन्न बुडालें आहे तें बहुतांशीं तिसऱ्या वर्गाचेंच आहे. फळांची व भाजीपाल्याची वाहतूक मोटारींनी होत असली तरी ती फारच कमी आहे. रेल्वेंतील उतारूंच्या उत्पन्नापैकीं $\frac{3}{4}$ उत्पन्न तिसऱ्या वर्गाचें असतांहि त्या वर्गाच्या सुखसोयीकडे रेल्वेकंपन्यांनी लक्ष दिलें नाही. आणि म्हणूनच हा वर्ग सोयिस्कर अशा मोटार-वाहतुकीचा फायदा घेऊं लागला. रेल्वेच्या ब्रँच लाइनीवर चालणाऱ्या आगगाड्यांचा वेग ताशी

८-१० मैल असतो नसतो.तर अशा ठिकाणीं जास्त वेगाच्या मोटारींची वाहतुक सुरू झाली तर त्याला मोटारवाले काय करणार ? फार काय पण पुणें-नगर, नाशिक-कल्याण, पुणें-कोल्हापूर, धारवाड-कोल्हापूर यांसारख्या १०० मैलांपेक्षा अधिक अंतरावर देखील मोटारींची वाहतूक अधिक फायदेशीर होते यापासून योग्य तो बोध रेल्वे कंपन्यांनी घेतला पाहिजे. रेल्वेचे तज्ज्ञ मि. ए. पोप यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलल्या कमिटीनेंच पाहणी करून रेल्वेच्या खर्चात बरीच बचत होण्यासारखी आहे अशी कबुली दिली आहे. तरी त्याचा विचार सरकारनेच करावा. रेल्वेपेक्षा दोन चार पै अधिक देऊन जेथे लोक मोटारीने जातात तेथे तर रेल्वे कंपन्यांना मोटारीच्या नांवाने खडे फोडण्याचें कांहीच कारण नाहीं. केवळ रेल्वेचें नुकसान होतें म्हणून मोटारीची वाहतूकच बंद करणें अगर रेल्वे कंपन्यांना मोटारवाहनाची परवानगी देणें वगैरे गोष्टी करून सरकारने खाजगी मोटारवाल्यांच्या पोटावर पाय आणण्याचें पातक करूं नये. उलटपक्षीं मोटारींची वाहतूक आहे अशीच चालू ठेवणें केव्हांहि इष्ट नाहीं. सुरक्षितता, नियमितपणा, मोटारनोकरांचे कामाचे तास, मजुरीचे दर, वाहतुकीच्या दराची एकसूत्रता, व मोटारींतून जाणाऱ्या मालाची नुकसानभरपाई अगर विमा उतरण्याची पद्धति या बाबतींत जरूर तें नियंत्रण सरकारानें मोटारीवर घालावें. ज्याप्रमाणे मोटारींचे जास्तींत जास्त दर ठरवून देण्यांत आले आहेत त्याचप्रमाणे कमींत कमी दरहि ठरवून देण्यांत आले पाहिजेत.

मोटारवाहतुकीचे दर भरमसाट उतरल्याने व दस्तुरी वाढल्याने मोटार वाहतुकीचा धंदा परवडत नाहीसा झाला आहे. कित्येक ठिकाणीं आपापसांतील चढाओढीमुळे मोटार कंपन्यांना आतबट्ट्याचा धंदा करावा लागत आहे. हिंदुस्थानसरकार, प्रांतिक सरकार व स्थानिक संस्था या सर्वांना मिळून प्रत्येक मोटार-लॉरीमागे दरवर्षी मुंबई-इलाख्यांत १२००रु. मद्रास इलाख्यांत २३००रु. संयुक्त-प्रांतांत ९३० रु. बंगाल्यांत ९९९ रु. मध्यप्रांतात १०१२ पंजाब ९३६ व बिहार ओरिसा प्रांतांत ११६२रु.इतकी करापासून प्राप्ती होते.पण रस्ते कच्चे असल्यामुळे व सुधारलेले नसल्यामुळे मोटारवाल्यांना कराच्या मानाने अधिक झीज सोसावी लागते. याकरिता रस्ते सुधारण्याची व रस्ते वाढविण्याची योजना अमलांत येणें अत्यंत जरूरीचें आहे. तथापि मध्यवर्ती सरकारानें रस्ते दुरुस्तीकरिता व ते चांगल्या स्थितींत ठेवण्याकरिता प्रांतिक सरकारांना कांहीं वार्षिक मदत केली नाहीं तर कर्ज काढून रस्ते बांधण्याची योजना कितपत यशस्वी होईल यासंबधानें बंगालचे स्थानिक स्वराज्य खात्याचे दिवाण बी. पी. सिंग रॉय यांनी दिलेला इषारा लक्षांत ठेवण्यासारखा आहे. दस्तुरीचे दर लोकांना व व्यापाऱ्यांना जाचक न होतील असेच ठेवले पाहिजेत. केवळ भांडवलावरील व्याज निघण्याकरिता कर वाढविण्याची दृष्टि ठेवून चालावयाचें नाहीं हें सरकारानें विसरतां कामा नये. युरोपियन व्यापारी आपल्या मोटारी व त्यांस लागणारें सामान खपावें याकरिता मोटारवाहतुकीची कड घेत आहेत. पण त्यापेक्षा हिंदी व्यापारी वर्गाच्या हिताच्या दृष्टीने रस्त्यांची सुधारणा कशी होईल इकडे लक्ष पुरविणें जरूर आहे. याशिवाय आम्हांस जबर संशय येतो तो हा कीं, भावी राज्यघटनेने प्रांतिक सरकारांना जबाबदारीचे अधिकार दिले तरी देखील नवीन रस्ते व पूल शास्त्रीय पद्धतीनें बांधणें व त्यावरील वाहतूक ठरविणें, या बाबतींत शेवटची सत्ता नवीन वाहतुक मंडळाच्या ( 'कम्युनिकेशन बोर्डा'च्या ) हातांत जाईल. तरी या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधाने नवीन राज्यघटना अमलांत येण्यापूर्वी कोणताहि निर्णय देणें राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अनिष्ट आहे. यासाठी कायदेमंडळांतील लोकनियुक्त प्रतिनिधींनी व मोटारवाल्यांनी वेळींच सावध रहावें अशी आमची त्यांस सूचना आहे.

# धर्मपर विषयांचा खल

## गाडगेबुवांचें साधुत्व

(ले. ग. वि. केतकर)

### अंगीं गोधडें हातीं गाडगें

हिंदुस्थान हा साधूंचा देश आहे. येथे खरें व खोटें असें दोनहि प्रकारचें साधुत्व भरपूर आढळतें. खोट्या साधुत्वाचा दंभस्फोट व उपहास हीं समाजांत चालूच आहेत; व तीं मनोरंजक असल्याने लोकांचें करमणूक करतात. पण खरें शंभरनंबरी साधुत्व आजकाल हिंदुस्थानांत दुर्मिळ नाहीं आणि त्याचें वर्णन दंभस्फोटाइतकें रुचकर नसलें तरी उद्बोधक खास आहे.

महाराष्ट्रांत गेलीं तीस वर्षें,शिळी–कोरडी भाकर खाऊन उपजीविका करणारा, अंगावर ठिगळलेलीं व फाटक्या चिंध्यांचीं वस्त्रें धारण करणारा, थंडी ऊन न पाहता अनवाणी मराठी भाषेच्या प्रांतांत सतत पर्यटन करून लाखो लोकांना धार्मिक सदुपदेश देणारा, लाखो रुपये खर्चून यात्रेकरूंची व अनाथपंगूंची सोय लावणारा व इतकें करून स्वतः अत्यंत निरभिमानी व कोणास पायाहि पडूं न देणारा असा साधु विद्यमान आहे.

याचे बाबतींत जादू–चमत्काराचें ढोंग नाही, थापा नाहीत, अनीतिकारक वर्तनाच्या संशयालादेखील थारा नाही. सर्वच व्यवहार आरशासारखा स्वच्छ व प्रामाणिकपणाचा आहे. दोषी साधूंचें दोषदर्शन करून उपहास करणारे लोक खरा निर्मळ साधु दाखविल्यास त्याच्या कार्यास कितपत हातभार लावतील, निदान पूज्यभाव दाखवितील याची प्रचीति एकवार पाहण्यासारखी आहे.

### गाडगेबुवा

जातीचा परीट, वऱ्हाडांत उमरावती जिल्ह्यांतील दर्यापूर तालुक्यांत मूळचा राहणारा. त्याच्याच सांगण्याप्रमाणे मानलें तर गरीबीच्या हालअपेष्टांना वैतागून १९०२ च्या सुमारास तो घर सोडून बाहेर पडला. पुनः घराकडे पाहिलें नाही व प्रपंचाची पर्वा केली नाही. मूळचें नांव डेबूजी. आता लोकप्रसिद्ध नांव 'गोधडे-बुवा' अथवा 'गाडगेबुवा'. कारण अंगावर चिंध्या एकत्र शिवून तयार केलेली गोधडी व हातांत एक गाडगें अशा सरंजामानिशीं त्याचा संचार चालावयाचा !

"हे सोंग नरी लोकांना अद्भुतपणा वाटावा व साधुत्वाचा जम बसवण्याकरिताच ना ?" चिकित्सक लोक पटकन विजिगीषेने असा प्रश्न टाकतील. पण बुवा आपल्या कीर्तनांतच खुलासा करून टाकतात. साधूंच्या भोंवतीं ज्या काही वैचित्र्याच्या गोष्टी असतील त्याबद्दल त्यांनी मुग्ध राहावयाचें व शिष्यांनी भाविकांना त्यासंबंधी नवलपूर्ण खुलासे देत बसावयाचें असें बहुधा असतें.

पण येथे तसें नाही. बुवा स्पष्टच म्हणतात,—"हे चिंध्यांचे कपडे व मडकें हें काय सोंग आहे म्हणून लोक विचारतील. तेव्हा त्याबद्दल सांगून टाकतों. हरिभजनाच्या मार्गाला मीं लागण्यापूर्वी अशींच फाटकीं–तुटकीं ठिगळलेलीं वस्त्रें मला मिळत होतीं. आता हरिभजनामुळे लोकांच्या अनुकूलतेचा फायदा घेऊन चांगलीं वस्त्रें वापरावयाचीं का ? तसें केलें तर मला तें ऋण पुढील जन्मीं फेडावें लागेल. पूर्वी मला हे कपडे धुण्याला पाणीदेखील धड मिळत नव्हतें. आतां दुधांत कपडे धुवीन म्हटलें तर संपन्न भक्त तयार आहेत. पण हरिभजनावर सुस्थिति मिळवून मीं भोगली तर ती मला फेडावी लागेल. म्हणून मी जसा पूर्वी होतों तसाच राहतों. हातावर भाकरी खावी व गाडग्याने पाणी प्यावें.' त्याग असतांहि त्याच्याबद्दल किंचित् खेदकारक कुढेपणाची जाणीव एखाद्या वेळीं त्यागी माणसाला असते; पण तीहि यांना नाही ! या चिंध्याच्या पोषाखाबद्दल ते खुलेपणाने विनोद करतात.

### बुवांचें वैराग्य

ते म्हणतात, "खरें पाहिलें तर तुमच्यापेक्षा माझा हा पोषाखच फार सुखाचा आहे. परवां एकदा मी कल्याण स्टेशनावर सकाळीं उतरलों. माझेबरोबर डब्यांतून एक मारवाडीहि उतरला. दोघेहि स्टेशनाच्या नळावर तोंड धुण्यास गेलों. मारवाड्याचा होता जरीचा फेटा. तो वरवंटीवर ठेवून तो दांत घासूं लागला. मी माझी गोधडी बाजूस ठेवून तोंड धुऊं शकलों. पण मारवाडी एक बोट फिरवी, मागे फेट्याकडे पाही, चूळ

भरी, पुनः मागे पाही. कां कीं फेटा चोरीस जाण्याचा धाक! आम्हांस तसा कांही धाक नाही. कपडे कल्याण स्टेशनावर टाकून खुशाल बोरीवदरला जाऊन येऊं. पुनः आल्यावर कपडे जागेवरच आढळतील या-बद्दल शंका नको. इतकें या पोषाखाचें सुख आहे. उंची पोषाखासारखा याचा त्रास नाही!"

इतर साधूप्रमाणे हेहि रेल्वेंतून विगर तिकिटांन प्रवास करतात. कारण ते पैसाच जवळ ठेवीत नाहीत. तर तिकिट कोठल! तिकिट-कलेक्टराने विचारलें, कोठे जातां? तर उत्तर "गाडी जाते तिकडे". बाहेर काढून हुसकलें तर तेथेच त्या दिवशीं मुक्काम व तेथेच कीर्तन. पुढच्या दिवशीं पुनः प्रवास सुरू. बुवांचा वडील मुलगा पुण्यास शिकत होता. १८ वर्षांचा होऊन सासून हॉस्पिटलमध्ये तो कांही वर्षांपूर्वी वारला. ज्या दिवशीं तो वारला त्या दिवशीं बुवांचें कीर्तन खारे-पाटण जि. रत्नागिरी या ठिकाणीं झालें. तिसरे दिवशीं विजयदुर्ग, पांचवे दिवशीं मुंबईस महालक्ष्मी-वर, सातवे दिवशीं पालघरला, नववे दिवशीं साता-ऱ्यास, अकराव्या दिवशीं महाबळेश्वरास व तेराव्या दिवशीं धारवाडच्या बाजारांत कीर्तन झालें.

यावरून बुवांचा पर्यटनक्रम व त्यांची संसार-विमुक्तता ही दोनहि दिसून येतात. बुवांना संसार सोडण्यापूर्वी चार अपत्यें झालीं.पैकीं तीन दिवंगत होऊन एक मुलगी हयात आहे, व ती लग्न होऊन सासरीं नांदत आहे. बुवांची बायकोहि पूर्वीच्याच गरीब स्थितींत मोलमजुरी करून वऱ्हाडांत असते असें समजतें.

## लोकोपयोगी कामें

आता बुवांच्या प्रेरणेनें व त्यांच्या भक्तांच्या देणग्यांचे साहाय्याने झालेलीं कामें पाहा. श्रीक्षेत्र ऋणमोचन ता. दर्यापूर जि. उमरावती या ठिकाणीं देऊळ व घाट सुमारें वीस हजार रु. खर्चून बांधला. एक हजार रु. खर्चून विहीर बांधली हें बुवांचें पहिलें काम. त्यानंतर पंढरपूर येथे यात्रेचे वेळीं अस्पृश्यांची गैरसोय व हाल पाहून १९१८ सालीं बुवांनी पन्नास हजार रुपये जमवून "चोखामेळा" धर्मशाळा गोपाळपूर रस्त्यावर बांधली. त्यांत दिवाबत्ती इ. व्यवस्था आजतागायत सुरळीत चालू आहे. यानंतर पंढरपुरासच २५ हजार रु. परीट मंडळींकडून वर्गणी करून परीट धर्मशाळा बांधली. तिसरी धर्मशाळा सर्व स्पृश्य जातींकरिता पंढरपूर स्टेशनरस्त्यावर सवा लाख रु.खर्च करून बांधली. आळंदी येथें दहा हजार रु. खर्चून परीट धर्म-शाळा व एक लाख रु. खर्च करून मराठा धर्म-शाळा बांधली आहे.

नाशिक येथे गेल्या वर्षी म्युनिसि.कडून जागा घेऊन प्रशस्त धर्मशाळा, विहीर व पटांगण बांधण्यांत आलें आहे. पंढरपुरास मराठा धर्मशाळेंत यात्रेकरू-च्या सोयीसाठी तीन हजार रुपयांचीं भांडीं ठेवण्यांत आलीं आहेत. धर्मशाळेबाहेर १९२१ सालापासून अंध पंगू लोकांसाठीं सदावर्त सुरू आहे. आषाढी दशमीच्या दिवशीं गरीब यात्रेकरूंना १९२१ सालापासून दरसाल चार हजार रुपयांचीं भांडीं कपडे वगैरे देण्यांत येतात. देहू येथेहि विठ्ठल सायन्ना कॉंट्रॅक्टर यांचे मार्फत धर्मशाळा बांधण्यांत येणार आहे.

पंढरपूरच्या मराठा धर्मशाळेंत बिनपगारी धर्मार्थ काम करणारीं ३५ माणसें आहेत. इतर धर्मशाळांतूनहि अशींच बिनपगारी कामें चालतात. बावीस फिरत्या कीर्तनकारांना पैसे जमविण्याचा अधिकार आहे. पण त्यांनी स्वतः हातीं पैसा घ्याव-याचा नाही.परस्पर पंढरपूरला पाठविण्यास सांगा-वयाचें. तिकडे पैसा गेला म्हणजे उलट टपालीं पावती मिळते.

## हिशेबी व्यवहार

रु. ५०० च्या वर रक्कम देणारांचीं नांवें संगमरवरी दगडावर कोरण्यांत येतात. ५० ते ५०० रु. पर्यंत देणारांचीं नांवें पितळी पत्र्यावर लावण्यांत आलीं आहेत. रु. २५ ते ५० देणारांचीं नांवें लाकडी फळीवर लावण्यांत येतात. बाकी किरकोळ रकमाहि जमाखर्चांत पाहतां येतात. याप्रमाणे हिशेब व व्यवस्था उत्तम रीतीची ठेवण्यांत आली आहे. बुवांनी स्वतः दिडकीला हात लावावयाचा नाही, पण शिष्यांनी सांवळागोंधळ करावयाचा असा अनिष्ट प्रकार येथे बिलकुल नाही.

एका गृहस्थाने बुवांना मोठा पुस्तकसंग्रह नुकताच अर्पण केला. त्यासाठीं नाशिकच्य धर्मशाळेनजिक इमारत बांधण्यांत येणार आहे बुवांच्या दानधर्माला हें एक नवीन स्वरूप आलें आहे.

बुवांच्या कीर्तनाला जाहिरात लागत नाही. दवंडी दिली कीं, हजारों स्त्रीपुरुष जमतात. कोणाला पाया पडूं द्यावयाचें नाही असा त्यांचा दंडक आहे. म्हणून कीर्तन संपतांच ते निघून जातात. बरोबर साथीदार नाहीत व ते स्वतः हातीं टाळहि घेत नाहीत. ज्या त्या गांवची भजनी मंडळी मागे साथीला असतात. भजन फार वेळ करीत बसत नाहीत. बुवांचा आवाजहि खणखणीत व थरारून सोडणारा आहे. अडाणी लोकांनी आपल्या मुलांना

शिक्षण द्यावें, व्यसनें सोडावीं इ. उपदेश ते मोठ्या कळकळीने कीर्तनांत करतात. साधुत्वाबरोबर अडाणीपणा, आडमुठेपणा, विक्षिप्तपणा असले कांही लोकविलक्षण 'गुण' असतात तसे गोधडेबुवांमध्ये नाहीत. स्वतःचा प्रपंच सोडून जगाच्या उपकारासाठी त्यांनी जो नवा प्रपंच मांडला तोहि अत्यंत नेटकेपणाने व समंजस रीतीने त्यांनी चालविला आहे असें दिसून येईल.

# राजहंसाचें लग्न

( चंद्रपुरी लोकगीताचा मासला )

**संग्राहक—श्री. वि. वा. जोशी, मूल**

(महाराष्ट्रांत अलीकडे लोककथा व लोकगीतें यांच्या वाङ्मयाकडे बऱ्याच साहित्यभक्तांचें लक्ष लागलें आहे, ही गोष्ट खरोखरीच आनंदाची तशीच अभिमानास्पद आहे. प्रस्तुत स्थळीं मी चंद्रपुरी लोकगीताचा एक मासला देणार आहें. त्यांत वाचकास अज्ञ समाजाच्या सुंदर कल्पनांबद्दल आनंद वाटल्यावांचून राहणार नाही.)

राजहंसाच करु लगिन
हंसिन झाली नवरीन
राघो मैनाने पत्र लीहिले
पक्ष जोडण्या कारण.
टाकणघारिने गहूं दळले
सेवया वरल्या नानापरी
चीमणीने दाळ वाटली
वड्या घातल्या आपल्या घरीं
लावा तित्तीर डोंगर कवडा
मुरारि जा म्हणे जलदीनं
हुडी बोरडी ह्या दोध्या बहिणी
सवास्नी झाल्या हौसिन
कवडि ससाणा बहिरि बंगाला
म्हाली परठी होऊन
घुबड घुमड ढोलक वाजती
हातीं मशाल घेऊन
मारुतिपाशीं वरात नेली
ओवाळि या म्हणे पांघरुण
अंगड मंगड लग्न लाविले
पाहा त्या बा पिंगळ्यान
माशा मुरकुटया ह्या दोध्या बहिणी
स्वैपाक ठेवला रांधून
पडुला नाही केला म्हणून
घुबड बसला रुसून

उपरिनिर्दिष्ट लोकगीतांत अज्ञ समाजाच्या, पक्षांतील लग्नप्रसंगाच्या कल्पना मधुर व तंतोतंत मानवी लग्नाप्रमाणें वठविण्यांत आलेल्या आहेत. वरपक्ष—वधूपक्ष, वऱ्हाडीगण कार्यकर्ती मंडळी, पिंगळ्यासारखा जोशीबोवा, धार्मिक विधि, इतकेंच नाहीं तर विहीण-व्याह्यांचे अहेरासाठी रुसून बसणें ही साधी गोष्टसुद्धा त्यांच्या निरीक्षणांतून निसटली नाही.

# वसंत-व्याख्यानमाला

## हिट्लर व नाझी पक्ष

बुधवार ता. २६ एप्रिल रोजीं वसंत-व्याख्यान-मालेतर्फे श्री. **दा. वि. गोखले** यांच्या अध्यक्षते-खाली श्री. **दिनकर लक्ष्मण कानडे** यांचें 'हिट्लर व नाझीपक्ष' या विषयावर व्याख्यान झालें. व्याख्याते म्हणाले, "१९२४ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत म्युनिच शहरीं एक सुंदर देखावा दिसत होता! बव्हेरिया हें जर्मनींतील एक संस्थान आहे व म्युनिच हीं त्या संस्थानाची राज-धानी आहे. म्युनिच शहराच्या लष्करी छावणींत नऊ इसमांना गिरफदार करून लष्करी कोर्टापुढे उभे करण्यांत आले होते. त्या लोकांवर सरकारविरुद्ध बंड उभारण्याचा आरोप ठेवण्यांत आला होता. हर हिटलर व मार्शल लुडेन्डार्फ हे त्यांपैकींच आरोपी होते. हिट्लरच्या जबानीला सुरुवात झाल्यावर तो म्हणाला कीं, 'सध्याचें सरकार हें पैशावर म्हणजे अर्थशास्त्रावर उभारलेलें आहे. परंतु हा पायाच चुकीचा आहे. माझ्या मतें States must be a racial organisation म्हणजे सरकार हें ज्ञातिसंघा-त्मक असलें पाहिजे. सरकारची पैशाअडक्यांत किंमत करतां कामा नये. त्याला संस्कृतीचा आधार पाहिजे. जें सरकार अर्थशास्त्रावर उभार-लेलें आहे तें आम्ही जुमानीत नाही. मानवी जीवि-ताला जी कांहीं किंमत आली आहे ती संस्कृति, बुद्धिमत्ता, उत्साह यामुळेच होय. बहुमताने समाजाची प्रगति होत नसते. कारण सर्वसामान्य जनतेला राजकारण कळण्याइतकी कुवत नसते.'

हिट्लरचें हें ओजस्वी भाषण झाल्यावर लुडेन्डार्फ आपल्या जबानींत म्हणाला कीं, 'जर्मन राष्ट्र सध्या मेल्यासारखें पडलें आहे. त्यांत नवीन प्राण ओतण्यासाठी हे नऊ वीरात्मे तयार झाले आहेत. तुम्ही म्हणतां कीं, 'Nations are built by words' म्हणजे राष्ट्रांचा भाग्योदय शब्दजालाने होतो, परंतु तें म्हणणें व्यर्थ होय. 'Nations are built by deeds' म्हणजे राष्ट्रांचा भाग्योदय प्रत्यक्ष कृतीनेंच होत असतो हेंच तत्त्वसत्य आहे.' शेवटीं खटल्याचा निकाल लागून लुडेन्डार्फशिवाय बाकी सर्वांना प्रत्येकीं ५ वर्षांची शिक्षा झाली. लगेच नाझीं-ना गुन्हेगार ठरविण्यांत आलें. त्यांचा पिंगट गणवेष 'brown dress' बेकायदेशीर ठरला. त्यांच्या छावण्यांना कुलपें पडलीं. कम्युनिस्ट म्हणूं लागले कीं, हिट्लरला शिक्षा देऊन सरकारानें त्याचें नसतें प्रस्थ माजविलें!

### म्यूनिच येथील 'गांधी-दिन'!

१९२३ सालाच्या नोव्हेंबरच्या ९ तारखेस म्यूनिच येथें 'गांधीदिन' साजरा करण्यांत आला. बव्हेरियाला बर्लिनविषयी तिरस्कार वाटे. हा दिन या भावनेचेंच मूर्त स्वरूप होतें. आम्ही बर्लिनवर स्वारी करणार असें हर हिट्लरने जाहीर केलें. परंतु ही स्वारी निःशस्त्र होती. ठरलेल्या वेळीं हजारों लोक राजवाड्यापुढील पटांगणांत जमले. मिरवणुकीला सुरुवात होतांच पोलिसांनी ती अडविली. परंतु लोक थांबेनात. तेव्हा पोलिसानी बंदुकीची एक फैर झाडली. ३०-४० लोक जखमी झाले. हर हिट्लर याला पकडण्यांत आलें. ज्यू, कम्युनिस्ट व सोशा-लिस्ट यांच्यामुळेच जर्मनीचा पराभव झाला अशी नाझी लोकांची बालंबाल खात्री झाली होती.

१९१९ सालीं कम्युनिस्टांच्या बंडाला तोंड देण्यासाठी बव्हेरियांतील नागरिकांनी स्वयं-सेवक-दलें निर्माण करण्यास आरंभ केला होता. नित्सेचें तत्त्वज्ञान लोकांपुढे अधिकाधिक येऊं लागून कार्ल मार्क्सचें तत्त्वज्ञान मागे पडत चाललें. हर हिट्लर यानें पुढे येण्यास हीच संधि साधली. 'ज्यू, कम्युनिस्ट व सोशालिस्ट हेच व्हर्सेलिसच्या तहाला जबाबदार आहेत, जर्मनी-ची पत त्यांनीच घालविली. हे लोक केवळ पैशाचे दास आहेत. परंतु जीविताची प्रगति ही पैशानें होत नसून संस्कृतीनें होत असते. म्हणून नित्सेचेंच तत्त्वज्ञान पुनरपि अवतीर्ण झालें पाहिजे. त्यानेंच झालें तर जर्मन राष्ट्र सुसंघटित व वर्धिष्णु होईल' अशी हर हिट्लरची भावना आहे.

### हिट्लरचें पूर्ववृत्त

हिट्लरच्या पूर्वचरित्राकडे पाहता त्याचा जन्म एका गरीब कुळांत झालेला दिसतो. त्याला अभ्यासाची विशेष आवड होती असें दिसत नाही. तो १९१८ सालीं म्यूनिचमध्ये आला. तेथे तो सुतारी, लोहारी करून आणि मधून मधून वृत्तपत्रांना व्यंग्यचित्रें पाठवून कसें तरी पोट भरीत असे. आपण मोठें व्हावें ही महत्त्वाकांक्षा मात्र त्याच्या मनांत सारखी तेवत होती. महायुद्धामध्ये तो पायिकांच्या पहिल्या बव्हेरियन तुकडींत गेला होता. व्हार्डनच्या सुप्रसिद्ध लढाईत तो जातीनें हजर होता. परंतु त्याला असें आढळून आलें कीं, सांप्रतच्या लढायांतून

मानवी पराक्रमाला वाव नाहीं. ऑस्फिल्ड येथे सर्व सैनिक गॅसच्या माऱ्यामुळे रातांधळ्यासारखे होऊन आले. तेव्हां त्यांना कैसर बादशहा पळाल्याचें समजलें. १९१८ सालाची ही गोष्ट. १९१९ एप्रिलमध्ये म्यूनिच शहरापासून कांहीं मैलांवर कम्यूनिस्टांनी बंड केलें, त्यांना तोंड देण्यासाठी नागरिकांनी पथकें निर्माण केलीं. तेव्हां हिट्लरने त्यांत प्रवेश केला. आपल्याला नांव कमाविण्यास ही संधि चांगली आहे असें त्याच्या मनाने घेतलें. महायुद्धानंतर चोहोंकडे 'बियर हौसेस' (पानगृहें) स्थापन झालीं. प्रत्येक 'पानगृह' म्हणजे एकेका पक्षाचें केंद्रच बनलें. त्या पानगृहांत जर्मनीच्या पराभवाचें कारण काय या प्रश्नावर चर्चा होई. हिट्लरचें असें ठाम मत होतें कीं, कम्युनिस्ट, ज्यू व सोशालिस्ट यांजमुळेच जर्मनीला पराभवाची ठेच खावी लागली. पराभवाचा हा काळिमा धुऊन टाकण्याचा त्याने आपल्या मनाशीं निश्चय केला व त्यासाठी त्याने जर्मन लेबर पार्टी नांवाचा मजुरांचा पक्ष स्थापला. सारें जर्मन राष्ट्र हें अस्सल आर्यांचें असलें पाहिजे हा त्याचा आग्रह व म्हणूनच त्याचा ज्यू, कम्युनिस्ट या लोकांवर दात आहे.

### जर्मन लेबर पार्टीची स्थापना

एके दिवशीं जर्मन लेबर पार्टीची सभा भरली असतां हिट्लरने तींत भाषण केलें. हिटलर म्हणाला, 'बर्लिन हेंच पराभवाचें कारण आहे.मध्येच एक वक्ता म्हणाला, "बर्लिनपासून बव्हेरिया स्वतंत्र केला पाहिजे." परंतु हिट्लर म्हणाला, "छे, छे, आपण बर्लिन जिंकूनच घेतलें पाहिजे !" सभा संपल्यावर हिट्लर बाहेर पडला तोंच त्याच्या हातांत कोणी तरी 'माझी राजकीय जागृति' 'My political awakening' हें पत्रक टाकलें. त्या पत्रकांत असें लिहिलें होतें कीं, दोस्तांच्या पराक्रमामुळे जर्मनीचा पराभव झाला नसून कम्युनिस्टांनी, सोशालिस्टांनी व ज्यू बँकर्सनी ५० लाख लोकांच्या पाठींत मागून खंजिर खुपसला (Stab in the back) व म्हणून जर्मन राष्ट्र खच्ची झालें. हिट्लर हा तरणाबांड, तशांतूब सैनिक. त्याच्या मनाला तें वाक्य (Stab in the back) तेव्हांच जाऊन भिडलें व त्यांचा सूड घेण्याचें त्याने ठरविलें. त्याच्या पक्षांत सुरुवातीला तो धरून ७ च सभासद होते. हिट्लर याला प्रचाराधिकारी नेमण्यांत आलें. प्रथम ७ मार्क नाण्यांच्या भांडवलावर त्याने आपल्या चळवळीला प्रारंभ केला.

### हिट्लरचें ध्येय

हिट्लर बुद्धिशाली पुरुष नसला तरी अमोघ वक्ता आहे. आणि वक्तृत्वाच्या जोरावरच त्याने थोड्याच काळांत आपल्या पक्षाचें नुसतें नांवच नाही तर स्थानहि कायम केलें. सोशालिस्ट, कम्यूनिस्ट व ज्यू लोक यांचें निर्मूलन करणें हें त्याचें तत्त्वज्ञान आणि जर्मन राष्ट्राची प्रतिष्ठा वाढविणें व त्यावरील पराभवाचा काळिमा धुऊन टाकणें हें त्याचें ध्येय. हिट्लर याच्या पक्षांत जसे मजूर तसेच सुशिक्षित व बुद्धिमान तरुणहि आहेत. मोठमोठे प्रोफेसर, डॉक्टर, वृत्तपत्रकार हे त्याच्या पक्षांत सामील झाले आहेत. १९२६ सालीं फॉन हिंडेनबुर्ग निवडून आल्यावर राष्ट्रीय अभिमानाचा अग्नि पुनः डिवचला गेला. हिट्लरला या निवडणुकीमुळे आनंद झाला 'सोशालिस्ट' अध्यक्षापेक्षा त्याला 'मिलिटॅरिस्ट' (लष्करी) अध्यक्षच पाहिजे होता. फेडरेशनमधील सर्व घटकावयवांना एकत्रित आणण्यास व एका सत्तेखालीं वागावयास लावण्यास समर्थ अशाच अध्यक्षाची जरुरी होती. याच वेळीं इटालींत मुसोलिनी सत्ताधारी बनला आणि रशियांत लेनिन मरून स्टॅलिन सर्वाधिकारी झाला.

### नाझी पक्षाचा कार्यक्रम

हिट्लरने मुसोलिनीचें चरित्र आपल्या डोळ्यापुढे ठेविलें. तो आपल्या मनाशीं म्हणे कीं, इटालीमध्ये मुसोलिनीला जें करता आलें तेंच जर्मनीमध्ये जर्मन तरुणांना कां करता येऊ नये ? युरोपामध्ये 'पार्टी डिक्टेटरशिप' म्हणजे पक्षनिष्ठ एकतंत्री सत्तेचा उदय झाला होता. हिट्लरचें असें मत आहे कीं, सर्वसामान्य जनतेला राजकारण कशाशीं खातात हें कळत नाहीं. समाजांतील बुद्धिमंत पुढाऱ्यांना ती गोष्ट चांगली कळते. 'Majority rule' ची कल्पना हास्यास्पद आहे. ज्या निवडक लोकांच्या अंगीं कर्तृत्व, बुद्धिमत्ता, उत्साह, कल्याणेच्छा, राष्ट्रीय बुद्धि इत्यादि गुण वसत असतात त्यांच्याच हातून राष्ट्राचा उद्धार होत असतो. १९२५ सालीं बर्लिनपासून २५ मैलांच्या अंतरावर असलेल्या खेडेगांवांत 'ओसफ' (osaf) नांवाची संस्था त्याने स्थापली. तींत १८ वर्षांपुढील २ लाख तरुणांनी स्वयंसेवक म्हणून आपलीं नांवें नोंदवलीं. हिट्लरच्या नाझी सैन्याची व्यवस्था शिवाजीच्या पंचहजारी सैन्याप्रमाणे आहे. स्वसभासंरक्षक, परसभाविध्वंसक आणि शरीररक्षक असे त्यांत तीन पोटभाग आहेत. द्वेषाच्या पायावर आपण जितक्या लवकर एक होतो तितके दयेच्या पायावर एक होत नाहीं अशी हिट्लरची समजूत असल्याने तो लोकांना फ्रेंचांच्या द्वेषाची

शिकवण देत असतो. परंतु आज प्रत्यक्ष फ्रेंचाविरुद्ध दोन हात करण्याची शक्यता नसल्याने कम्युनिस्टाविरुद्ध नाझी लोकांच्या सारख्या कुरापती चालू असतात. अशा दंग्यामुळे व हातघाईमुळे तरुणांची युद्धलालसा व युद्धप्रियता प्र ीप्त राहते असें त्याचें मत आहे. 'थर्ड जर्मन एम्पायर' स्थापण्याचा हिट्लरचा संकल्प आहे. व्हर्सेलिसचा तह बदलून घेणें, नुकसान भरपाई रद्द करणें, शस्त्रसमानतेचा हक्क मिळविणें, बेकारी नाहीशी करणें, अनुत्पादक धंदे सर्वराष्ट्रीय करणें, मध्यवर्ती सत्ता प्रबळ करून संयुक्त राज्यांतील सर्व घटकावयवांना तिच्या अंकित बनविणें, महायुद्धांत गेलेल्या जर्मन वसाहती पुनः परत मिळविणें, पोलिश कॉरिडर काढून टाकणें हा आज नाझीपक्षाचा कार्यक्रम आहे व या कार्यक्रमाच्या जोरावरच हर हिट्लर हा आज जर्मनीचा सर्वाधिकारी झाला आहे."

# भाकरी हिंदुस्थानाची व चाकरी इंग्लंडची !

इंग्रजांनी हिंदुस्थान देश तलवारीच्या जोरावर जिंकला यांत शंका नाही. हिंदुस्थानांत लढवय्ये लोक लक्षावधि होते. पण इंग्रजांची शिस्त, सुधारलेलें हत्यार व कवायती कंपू यांजपुढे त्यांचा टिकाव न लागून सारा हिंदुस्थान इंग्रजांना काबीज करता आला. शंभर सव्वाशें वर्षांपूर्वी गेलेलें हें स्वातंत्र्य हिंदी लोकांना तलवारीच्या बळावर फिरून मिळविण्याची आशा नाही. तथापि सनदशीर मार्गाने हिंदुस्थानावर स्वातंत्र्यसूर्य उगवेल त्या वेळीं त्याच्या कंबरेला तलवार लटकलेली दृष्टीस पडलीच पाहिजे. कारण पूर्ण स्वराज्याचीं किंवा स्वातंत्र्याचीं सोनेरी अक्षरें तलवारीच्या पात्यावरच लिहिली जावयाची असतात. या दृष्टीने पाहाता हिंदुस्थान अद्यापि स्वराज्यापासून किती तरी योजने दूर आहे असें म्हणावे लागतें. हिंदुस्थानांत सैन्य आहे पण तें कसें आहे याचें वर्णन मागील एका लेखांत केलेंच आहे. त्या सैन्यांत पासष्ट हजार गोरे सोजीर आहेत व दीड लाख काळे शिपाई आहेत. नुसता सैनिकांचा आंकडा घेतल्यास गोऱ्या सोजिरांपेक्षा काळे शिपाई अडीच पटींनी अधिक आहेत. यावरून सैन्याचें हिंदीकरण बऱ्याच मोठ्या प्रमाणांत झालें असल्याचा वरवर पाहणारास भास होतो.

पण हें हिंदीकरणच नव्हे. याला जर हिंदीकरण म्हणावयाचे तर प्रत्येक सरकारी खात्यांत कारकून व चपराशी हिंदी असल्यामुळे, सर्व सरकारी खातीं हिंदी लोकांच्या ताब्यात आलीं व हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन झालें असेंहि म्हणावें! तथापि त्यास स्वराज्य कोणी समजत नाही. याचें कारण असें कीं ते केवळ हुकुमाचे चाकर होत. त्यांच्या हातीं ना कूच ना मुक्काम. तोच न्याय सैन्यासहि लागू आहे. इतर खात्यांतून सारे कारकून व चपराशी हिंदी आहेत. तितकेंहि हिंदीकरण सैन्यांत झालें नाही. इतकेंच नव्हे तर सैन्यखात्याकडे दरसाल सत्तेचाळीस कोटि रुपये खर्च होतात. त्यांपैकीं ३३ कोटींचा चुराडा गोरे सोजीरच उडवितात, हें लक्षांत घेतल्यास हिंदी लष्कराचा गाभा हिंदी शिपाई नसून गोरा सोजीरच असल्याचें सिद्ध होतें. यासाठी कॅप्टन मोडक यांचें म्हणणें ब्रिटिश सरकारास असें कीं, 'तुम्हाला अधिकारी वर्गांतून गोऱ्या अमलदारांचें तावडतोब समूळ उच्चाटन करावयाचे नसेल तर करूं नका, पण निदान सैनिकांत सगळ्या काळ्या शिपायांनाच घेऊन ३३ कोटींचा खर्च वांचवा.'

रा. मोडक यांची ही मागणी ब्रिटिश सरकार मान्य करील कीं नाही याविषयीं जबर शंका आहे. ज्या प्रमाणांत हिंदी लोकांचें प्राबल्य हिंदी सैन्यांत होईल त्या प्रमाणांत हिंदुस्थानवरचा इंग्लंडाचा ताबा उडेल असें इंग्रज मुत्सद्दी समजतात. परंतु याहीपेक्षा हिंदी लोकांची जुनी व महत्त्वाची मागणी वेगळीच आहे. त्यांना हिंदी सैन्यावरचे यच्चयावत् अधिकारी हिंदीच हवे आहेत. सध्या हिंदी सैन्यांत कॅप्टनच्या हुद्यापर्यंत चढलेले हिंदी अम्मलदार ३९पेक्षा फारसे अधिक नाहीत व त्यांच्याहून वरच्या पायरीवर एकाहि हिंदी माणूस गेला नाही. हिंदी राजकीय पुढारी याहीपुढे जाऊन असें म्हणतात कीं, लष्करी खातें हिंदी कायदेमंडळास जबाबदार करा. हिंदी पुढाऱ्यांचा हा सवाल ऐकताच इंग्रज मुत्सद्दी एक चमत्कारिक पकड घालतात. सैन्यावर सगळे अधिकारी हिंदी नेमल्यास त्यांचा सैनिकांवर वचक न बसून, आणीबाणीच्या प्रसंगीं हिंदी सैन्य निरुपयोगी ठरेल अशी ते सबब सांगतात. उलटपक्षीं लष्करी खातें हिंदी कायदेमंडळास जबाबदार करा असें म्हटलें कीं जोंपर्यंत सैन्यावरील अधिकारी गोरे आहेत तोंपर्यंत, ते हिंदी कायदेमंडळाच्या ताब्यांत जाण्यास तयार होणार नाहीत या ढोंगाची ते बतावणी करतात. बरें, त्याजपाशी स्वराज्याचे संपूर्ण हक्क मागावयास जा, म्हणजे त्या वेळीं ते बजावतात

कीं आत्मसंरक्षणाची तयारी हिंदी लोकांची होण्यापूर्वी त्यांना स्वराज्य दिलें, तर हिंदुस्थानाच्या सरहद्दीवरील पठाणांच्या, आफ्रिडींच्या व मोहमंदांच्या टोळ्या हिंदुस्थानांत घुसतील आणि मेंढरांच्या कळपावर लांडगे तुटून पडावे त्याप्रमाणे हिंदी लोकांना फाडून खातील! सारांश हिंदी लोकांना सैन्यांत घेऊन व अधिकाराच्या जागावर नेमून, त्यांच्या अंगीं स्वसंरक्षणाची पात्रता येऊं द्यावयाची नाही आणि ते स्वराज्य मागूं लागले म्हणजे तुम्हाला आपलें व आपल्या देशाचे रक्षण करण्याची धमक आहे कोठें? असें विचारून त्यांचें तोंड बंद पाडावयाचे असा हा इंग्रजी कावा आहे.

या ठिकाणीं एक प्रश्न विचारावासा वाटतो. तो हा कीं हिंदुस्थानांत जें सैन्य आहे तें इंग्रजांनी काय उद्देशानें बाळगलें आहे? सदर सैन्य केवळ हिंदुस्थानाच्या रक्षणाकरिता आहे कीं त्याहून इंग्रज लोकांना त्याचा अधिक उपयोग होत आहे? हिंदुस्थानाच्या रक्षणाकरिता या सैन्याची योजना असेल तर आपलें रक्षण करण्याची जबाबदारी हिंदी लोकांवर टाकून, इंग्रजांनी त्या काळजींतून मोकळे व्हावें. बरें, हिंदुस्थानाच्या रक्षणाबरोबरच ब्रिटिश साम्राज्याचे ते आधारस्तंभ बनले असतील तर ती कामगिरी हिंदी सैनिकापासून काढून घेऊन, ब्रिटिश सरकारानें आपल्याकडे घ्यावी व हिंदी लोकावरील खर्चाचा तो भार हलका करावा. या व्यवस्थेंत उभय पक्षांचाहि फायदा आहे. कारण इंग्रजांचें साम्राज्य आशिया खंडांत हिंदुस्थानाबाहेरहि बऱ्याच प्रदेशावर पसरलें आहे. त्याचप्रमाणे आफ्रिका व ऑस्ट्रेलिया यांतहि त्यांची सत्ता आहेच. त्या सर्वांचें संरक्षण परचक्रापासून करण्याची जबाबदारी इंग्लंडाची असल्यामुळें, इंग्लंडानें त्यासाठी आपलें सैन्य हिंदुस्थानाच्या लगत्याला किंवा आशिया खंडाच्या इतर कोणत्याहि भागांत ठेवावें. त्याची जरूर ज्याला लागेल तो त्या वेळेपुरता खर्च सोसून सदर सैन्यापासून आपली चाकरी करून घेईल. हवें तर ब्रिटिश सरकारानें या सैन्यांत हिंदी लोकांना सैनिक म्हणून नेमावें किंवा नेमू नये. असें झाल्यास गोरे सैनिक व अधिकारी हिंदी लोकांच्या हुकमतीखालीं ठेवण्याचा इंग्रजांना आज अपमान वाटतो, तो वाटणार नाही व ते इंग्रज सरकाराच्या इच्छेस येईल ती कामगिरी बजावण्यास त्यांचें सर्वस्वी अंकित राहतील. इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य मिळेपर्यंत जे इंग्रज लोक अधिकाराच्या जागांवर हिंदुस्थानांत असतील त्यांना एखाद्या धामधुमींत स्वतःच्या जीविताची भीति पडल्यास किंवा हिंदुस्थानावर परचक्राचें अरिष्ट कोसळून ते हिंदी सैन्याच्या शक्तीबाहेरचें ठरल्यास हें बादशाही सैन्य त्यांचीहि कुमक करील.

वरील तोड आम्ही सुचवितों ती अशाकरिता कीं, सांप्रत हिंदुस्थानांत जें सैन्य बाळगण्यांत आलें आहे तितक्या मोठ्या सैन्याची गरज हिंदुस्थानाला नाही असें अनेकवार सिद्ध झालें आहे. गेल्या चाळीस-पन्नास वर्षांचा इतिहास पाहिल्यास हिंदुस्थानावर रशिया, जपान यासारखा बलिष्ठ शत्रु चालून आला आहे व त्याच्याबरोबर हिंदुस्थानाच्या सरहद्दीपाशीं भयंकर संग्राम होऊन सारें हिंदी सैन्य रणांगणावर न्यावें लागलें आहे असें कधींच घडलें नाही. अफगाणिस्थानाशीं कांही युद्धें झालीं आहेत. परंतु अफगाणिस्थान देश तो केवढा व त्याच्याशीं लढण्याकरिता सैन्य ते किती लागणार? कांबाला भिसमिल्ला त्यांतलाच सारा प्रकार! अशा युद्धांतून लढण्याचा मुख्य भार हिंदी सैनिकांवरच पडला असून गोरे सोजीर फार थोडे कामास आले असें रा. मोडक यांनी आपल्या पुस्तकांत दर्शविलें आहेच. सारांश, असल्या किरकोळ लढाया हिंदी शिपाई पूर्वीच लढलेच आहेत व त्यांत त्यांनी जयहि मिळविले आहेत. त्याचप्रमाणे या लढायांकरितां हिंदुस्थानांत जय्यत ठेवलेल्या दोन लाख सैन्यास समरांगण पाहण्याची गरजाहि केव्हाच भासली नाही.

मग गरीब हिंदी प्रजेच्या पैशावर पोसल्या जाणाऱ्या प्रचंड सैन्यानें दिग्विजय तरी काय केले? त्यांनी आपली समशेर गाजविली, पण ती इजिप्तमध्ये, द. आफ्रिकेंत, चिनांत, मेसापोटेमियांत व फ्रान्समधील फ्लँडर्सच्या रण-मैदानांत. अर्थात या सर्व लढाया हिंदी सैनिक ब्रिटिश साम्राज्याकरितां लढले, हिंदुस्थानाकरिता लढले नाहीत. अशा रीतीनें एवढ्या मोठ्या सैन्याचा हिंदुस्थानाला उपयोग नाही तर त्याचा भार गरीब हिंदी लोकांच्या शिरावर काय म्हणून ठेवावा? यांपैकीं बहुतेक सैन्य हरकत ब्रिटिश सरकाराच्याच कामीं येत असल्यामुळे, त्याचा सगळा बोजा ब्रिटिश सरकारानेंच सोसावा व हिंदुस्थानास गरज लागेल तेव्हा हिंदुस्थानापासून त्या वेळचा खर्च वसूल करून, ब्रिटिश साम्राज्यांतील इतर देशांप्रमाणे हिंदुस्थानाच्या कुमकेलाहि सदर सैन्य पाठविण्यांत यावें. आतादेखील ब्रिटिश सरकार हिंदी सैन्य बाहेरदेशी मोहिमांवर नेतें तेव्हां त्याचा खर्च स्वतः देतेंच कीं नाहीं? तसाच हिंदुस्थानाहि प्रसंगविशेषीं कुमक घेऊन तो खर्च सोशील इतकेंच.

वरील अडचणीचा निर्वाह या उपायानें झाल्यावर हिंदुस्थानाची अन्तर्गत शांतता व सरहद्दीचा

बंदोबस्त एवढाच मुद्दा शिल्लक राहतो. सत्तावन सालाच्या बंडानंतर हिंदुस्थानाची अन्तर्गत शांतता फारशी बिघडल्याचें एकहि उदाहरण घडलें नाही. हिंदु-मुसलमानांत व इतर जातींत लहानसे दंगे होतात किंवा काश्मीर व अलवार इत्यादि संस्थानांतील प्रजा क्वचित् बिथरते. पण त्यांचे दंगे मोडण्यास पोलिसी फौज अगदी भरपूर आहे. तेवढ्यावर बंड न थंडावलें तरच सैन्याची कुमक घ्यावयाची. हिंदुस्थानाच्या संरक्षणासाठी ठेवलेलें सैन्य याचा बंदोबस्त सहज करूं शकेल. त्याचप्रमाणे पूर्व व पश्चिम सरहद्दीवरील आडदांड टोळ्यांना त्याजपुढे गमजा करण्याची हिंमतहि होणार नाही. खरें पाहूं गेल्यास हिंदी तरुणांना परचक्रापासून स्वदेशरक्षण करण्याची ती एक दुर्मिळ संधिच वाटेल. तरुण हिंदुस्थान या संधीची वाट पाहत आहे.

आजच्या सैन्यांत दीड लाख हिंदी शिपाई आहेत. पण ते सारे अशिक्षित आहेत. हिंदुस्थानच्या सरहद्दीवर छातीचा कोट बांधण्याकरिता आपण उभे आहोंत या उदात्त भावनेने, त्यांनी आपल्या कमरेला तलवारी लटकावलेल्या नाहीत किंवा खांद्यावर बंदुकी ठेवलेल्या नाहीत. पोटासाठी कोठे तरी नोकरी करावयाची म्हणून त्यांनी लष्करी बाणा पत्करला आहे. सैन्यांत सुशिक्षित वर्गाचा शिरकावच झालेला नाही. कारण सरकारचा त्यांच्या राजनिष्ठेवर विश्वास नसल्यामुळे तें त्यांस सैनिकांत दाखल करावयास बहुधा धजत नाही. सुशिक्षित तरुणहि शिपाईगिरींतून वाढत वाढत श्रेष्ठ हुद्द्यावर चढण्याची सवड न मिळतां वरिष्ठांनी हुकूम सोडावयाचे व आपण ते हडेलहप्पी करीत झेलावयाचे, या अपमानास्पद जिण्याची लाज वाटून त्या मार्गास वळत नाहीत.

तात्पर्य, सांप्रतचें हिंदी सैन्य हें केवळ भाडोत्री आहे. त्यांतील सैनिकांनी आपल्या वीरवृत्तीचा अभिमान बाळगावा अशी त्याची रचनाच नाही. त्याबद्दलचा अभिमान जागृत होत असेल तर तो फक्त ब्रिटिश सैनिकांत म्हणजे गोऱ्या सोजिरांत व गोऱ्या अम्मलदारांतच होय. हिंदुस्थानावरील राज्य आमचें आहे व तें राज्य राखण्याची स्पृहणीय कामगिरी आम्ही बजावीत आहों, या अभिमानाच्या ऊर्मि केवळ त्यांच्याच अन्तःकरणांत खेळत असतील. त्याच ऊर्मि हिंदी अन्तःकरणांत खेळूं लागण्यास हिंदी सैन्य सर्वस्वी हिंदी लोकांचेंच झालें पाहिजे. त्याजवरील सर्व अम्मलदार हिंदी व त्यांतील सर्व सैनिक हिंदी. हिंदुस्थान हा त्यांचा देश व त्या देशाचे संरक्षक तेच. या भावनेस अवसर मिळण्याचा अवकाश कीं, तिच्या लाटा सैन्यांतील शिपायांतच काय पण हिंदुस्थानांतील यच्चयावत् तरुणांच्या मनांत उद्भवून ते प्रसंग पडेल तेव्हा, मातृभूमीच्या हाकेसरसे पुढे येऊन तिच्या सेवेकरिता हवीं तीं हलकीं कामें करण्यास व आत्मबलिदानास सरसावतील.

वरील योजनेंत दुसरा फायदा असा आहे कीं, हल्लीप्रमाणे दोन लाख सैन्य खडें ठेवण्याचें हिंदुस्थानाला कारणहि उरणार नाही. इंग्लंडांत व इतर पाश्चात्य देशांत सर्वसामान्य जनतेला लष्करी शिक्षण देण्याची व्यवस्था आहे. तशी हिंदुस्थानांत केल्यास लष्करी शिक्षण मिळविलेले लाखों हिंदी तरुण स्वदेशाभिमानाने प्रेरित होऊन व शिरकमल हातांत घेऊन, तें हिंदी देवतेच्या चरणीं अर्पण करण्यास अहमहमिकेने संकटकाळीं पुढे येतील. आपल्या देशांत टेरिटोरियल व ऑक्झिलियरी पलटणी उभारण्याची सोय झाली आहे. तिचा उपयोग कॉलेजांतील विद्यार्थी व इतर जवान करून घेतातहि. पण तो याहिपेक्षा अधिक प्रमाणांत करून घेतां येण्यासारखा आहे. तथापि हिंदी सैन्याविषयी हिंदी सुशिक्षितांना आपलेपणा वाटत नसल्यामुळे त्यांना लष्करी शिक्षण घेऊन शिपाई बनण्याची प्रेरणाच होत नाही. ती प्रेरणा हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी वर सांगितल्याप्रमाणें हिंदी लोकांवर टाकल्यानेंच उत्पन्न होणार आहे.

सायमन कमिशनाच्या रिपोर्टांत अशा योजनेची थोडीशी रूपरेषा आखली आहे. पण तींत सध्याच्या सैन्यावरील खर्चाचा बोजा हिंदुस्थानावर ठेवला असून त्याशिवाय हिंदुस्थान सरकाराला वाटल्यास त्यांनी निराळें सैन्य उभारावें असें सुचविलें आहे. या बाबतींत आमचें म्हणणें असें कीं, बादशाही सैन्याच्या खर्चाची जबाबदारी हिंदुस्थानाच्या तिजोरीवर टाकणें अन्यायाचे होय. त्या सैन्याचा खर्च इंग्लंडाने आपल्या साम्राज्याकरिता सोसावा व साम्राज्यांतील घटकांना सदर सैन्यांची गरज पडेल तेव्हा ते त्यांच्या मदतीस पाठवून त्या खर्चाचा वांटा त्या घटकांपासून घ्यावा. या योजनेने हिंदुस्थानाला आपलें स्वतंत्र सैन्य वाढविण्यास पैशाची वाण भासणार नाही. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे हा प्रश्न या स्वरूपाने मांडतां येण्यासारखा आहे. तो मांडण्याचा योग कॅप्टन मोडक यांस लाभला तर उत्तमच. नाहीपेक्षा त्यांनी आपल्या इंडियन नॅशनल डिफेन्स लीगची स्थापना लवकर करून, त्यामार्फत हिंदी तरुणास लष्करी शिक्षणाची गोडी लावावी व यु. टी. सी. इंडियन टेरिटोरियल्स व रायफल क्लब्स यांसारखीं

जेवढीं लष्करी शिक्षणाची साधनें उपलब्ध आहेत त्यांचा पूर्ण फायदा घेऊन, लष्करी शिक्षणाच्या प्रसारास साहाय्यभूत व्हावें. हें एकच कार्य त्यांच्या हातून शेवटास गेलें तरी तीं त्यांची देशसेवा उच्च प्रतीचीच समजण्यांत येईल ; त्याविषयीं संशय नाहीं.

# शेत, शेतकी व शेतकरी

## शेतकऱ्याची स्थिति सुधारण्याचे उपाय

(ले.—**रामचंद्र वासुदेव सोमण**, मु. मोहोपाडा)

शेती आणि शेतकरी यांचा अंगागीभाव असल्यामुळे शेतीची सुस्थिति म्हणजेच शेतकऱ्याची सुस्थिति असें संस्कृतदृष्टीनें वाटतें आणि तें एकांशानें खरेंहि आहे. परंतु शेतकऱ्याची सुस्थिति केवळ शेतीच्या सुस्थितीनें साधेलच असा नियम नाहीं. त्याच्या सुस्थितीच्या अनेक साधनांपैकीं शेतीची सुस्थिति हें प्रधान कारण आहे इतकेंच. समजा उद्यां मशागत, खत, शास्त्रीय ज्ञान इत्यादि सर्व साधनांचे विपुलतेनें शेती सर्वोत्कृष्टतेस गेली तरी, धान्याचे भाव इत्यादि अन्य गोष्टी प्रतिकूल असतील तर, शेती सुस्थितीत असूनही शेतकरी सुस्थितीत असणार नाहीं व ह्याचा अनुभव गेल्या महायुद्ध काळीं आलेला आहे. त्यावेळीं शेती आजच्याहून अधिक चांगले स्थितींत होती असें नाहीं. पण त्या वेळीं शेतकरी आजच्याहून अधिक चांगले स्थितींत होता. कारण जमिनीचें पीक जरी अधिक नव्हतें तरी धान्याच्या भावाचे चढामुळे त्याची प्राप्ति अधिक होती. ह्यावरून शेतकऱ्याचे सुस्थितीस शेतीच्या सुस्थितीहून अन्य कारणेंहि आहेत हें स्पष्ट होत आहे. तीं कोणतीं ह्याचा विचार करूं.

### सुस्थितीचें गमक

खर्चाहून प्राप्तीची वाढ हेंच कोणत्याहि धंद्याच्या सुस्थितीचें गमक होय आणि ते शेतीच्या धंद्यासहि लागू आहेच. प्राप्तीची वाढ ही खर्चाची बचत, उत्पन्नाची वाढ आणि किंमतीची वाढ ह्या दोन साधनांनी होते. पैकीं उत्पादनाच्या वाढीस आमचे शेतींत फारच अल्प अवकाश आहे. कारण शेती ही बाबच अशी आहे कीं तिचे उत्पादन अपरिमित नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यास उतरत्या पैदाशीचा नियम लागू असतो. असें असल्यामुळे आज हजारों वर्षे लागवडीत असलेली आमची शेती तर अट्टाहासाचे प्रयत्नानेंहि उत्पन्नाची वाढ विशेष होणार नाहीं अशा प्रकारची आहे. शेतीच्या खर्चांत शेत तयार करण्यास लागलेल्या बैठ्या भांडवलाचें व्याज, साहित्याची किंमत, मेहनतीचा मोबदला अथवा मजुरी आणि सरकारदस्त अशा चार बाबी येतात. पैकीं भांडवलाच्या बचतीचा प्रश्न सध्याच्या विचारकक्षेंत नाहीं. कारण जमीन फार पुरातन काळींच भांडवल खर्ची पडून लागवडीस आलेली आहे. त्याचप्रमाणे जोंपर्यंत शेतीची सद्यःपद्धतीच रूढ आहे तापर्यंत साहित्यांतहि बचत करणें अशक्य आहे.

मजुरीची बचत यंत्रसाहाय्य आणि मजुरीची स्वस्ताई ह्यांनीं होईल. पण कोंकणी शेतींत शेतांचे लहान आकारामुळे यंत्रसाहाय्यास फारसा अवकाश नाहीं आणि शेतकऱ्यांत यंत्र घेण्याचें त्राण आणि चालविण्याचें ज्ञानहि नाहीं. शेतीच्या मजुरीचे दर तर सध्याच इतके कमी आहेत कीं शेतीच्या बारमाही कष्टांची प्राप्ति मजूर शेतकऱ्यास म्हणजे कुणब्यास वस्त्र राहोच पण नुसतें अन्नहि पुरवित नाहीं. "मनुष्यास योग्य त्या प्रकारें जगण्यास लागणाऱ्या साधनांची किंमत आणि त्याच्या कामाची दररोजची प्राप्ति यांचें समतोलन म्हणजे मजुरीचा योग्य दर" असा सिद्धान्त असल्यामुळे कृत्रिम साधनांनी मजुरीचा दर कमी केल्यास वर्गकलहानें संपत्त्युत्पादन मात्र थांबते. ह्यामुळे कृत्रिम उपायांनी मजुरीचे दर कमी करणें अखेर हितावहहि होत नाहीं. पोट भरेनासें झाल्यामुळें सध्याच जमीनदार आणि कूळ अशा वर्गकलहास आरंभ झालेला आहे. अशा परिस्थितींत उतार राहोच; पण जमीनदारांचे नाशावांचून कुणब्याची प्राप्ति कशी वाढवितां येईल याचाच विचार करावयास पाहिजे आहे. एवंच एका सरकारदस्तावांचून खर्चांत बचत होण्यास कोठेंहि सवड नाहीं अशी सद्यःस्थिति आहे.

### शेतसाऱ्याची आकारणी

'सरकार' ह्या संस्थेचें हें मुख्य कर्तव्य आहे कीं, संपत्त्युत्पादनाचें जें जें अंग त्याच्या संरक्षणाकरिता आपल्या सत्तेची ढाल उभी करावयाची व राष्ट्राचीं सर्व अंगें स्वसंरक्षणास असमर्थ होतील तेथे तेथे ती ढाल सारखी राखाव-

याचीं. असें असतां रक्षण तर दूरच राहून शेती-वरील कराची आकारणी सरकारानें इतकी अपरंपार आणि भयंकर केली आहे कीं, तिला इतर कोणत्याहि कर-आकारणीची तोडच नाही. उदाहरणार्थ, ज्याच्या अन्याय्यतेचा सर्वत्र गाजावाजा चालू आहे तो प्राप्तीवरील कर दर रुपयाच्या प्राप्तीवर दोन पै ह्याप्रमाणें आकारला जातो, आणि एक हजारापर्यंतचें प्राप्तीस कराची मुळीं माफीच असते. पण शेतीवरील कर-आकारणीचें प्राप्ति हें मुळीं गमकच मानलें जात नाही. शेतीपासून नफा होवो अगर तोटा होवो, कराची आकारणी 'क्षेत्र' हें गमक मानून कर आकारला जातो, व ती एक पैचें उत्पन्न देणाऱ्या क्षेत्रावरहि आकारली जाते. फार तर नफ्या तोटयाचा नव्हेच तर, कमी अधिक उत्पन्नाचा विचार वसुलाच्या बाबतींत करावा असें कायदेपुस्तकांत कलम आहे; पण ज्या तत्त्वावर एक हजार प्राप्तीपर्यंत प्राप्तीवरील कराची माफी आहे, त्याच तत्त्वानुरोधानें कुटुंबपोषणास लागणारें धान्य पिकण्याइतक्या क्षेत्रावर कराची माफी कां नसावी ?

इतर कर आणि डयूट्या नफ्यावर आणि उत्पन्नावर आकारल्या जातात तर शेतीवरील कर मात्र क्षेत्रमर्यादेवर कां आकारावा? शेतसाऱ्याची सध्यांची आकारणी इतकी अमर्याद आहे कीं ती प्राप्तीचे नव्हेच तर एक रुपया वटउत्पन्नाचे क्षेत्रावर चार ते पांच आणे प्रमाणें केलेली आहे. कारण एक एकराचें उत्पन्न सध्या तीस रुपये येत आहे. आणि लोकल फंडासुद्धा सरकारदस्त एकरास आठ ते नऊ रुपयांपर्यंत भरावा लागत आहे. कारभारखर्चाकरिता शेतकऱ्यांचे बोकांडीस बसविलेला हा करभार जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत कोणी कांहीहि केलें तरी शेतकऱ्यास सुस्थिति प्राप्त होणें अशक्य आहे. एवंच शेतकऱ्याचे सुस्थितीस शेतीवरील सध्याचा कर फार कमी करणें अत्यावश्यक आहे. इतकेंच नव्हे तर दस्तुरी, तंबाखूचा परवाना, गुरचरणी जकात इत्यादि करांनीहि शेतीस माफी मिळाली पाहिजे. तरच शेतीचा धंदा सुस्थितीस येईल आणि शेतकरी जगेल.

## शेतकऱ्यांचा मृत्यु

धान्याचे भाव सध्या परमावधीचे उतरले आहेत. ते पूर्वस्थितीवर आल्यावांचूनहि शेतकऱ्याचा तरणोपाय नाही. या किंमतीच्या उताराचें जागतिक व्यापारमंदी हें एक कारण आहे ही गोष्ट खोटी नाही. पण आमचे येथील अपरंपार मंदीस सरकारानें ठरविलेला रुपयाला अठरा पेन्सांचा दर, पौंडाशीं लावलेला रुपयाचा पाट, सुवर्णगंगाजळीचा ऱ्हास, सोन्याच्या निर्गतीस मुभा आणि मित्र राष्ट्रांनी चालविलेल्या व्यापारी लुटीकडे केलेली डोळेझाक हींहि अन्य कारणें आहेत, आणि ह्या कारणसमुच्चयानें खासगी व्यवहारांत सर्वत्र नाण्याचा हाः हाःकार माजून भाव अत्यंत उतरले आहेत. वस्तूंच्या किंमतीची वटघट ही बाजारांतील नाण्यांचा पुरवठा आणि मालाची मागणी यांवर, मुख्यतः अवलंबून असते; पण तिला या दोनहि गोष्टी प्रतिकूल झालेल्या आहेत. सोन्याची जरूर असलेल्या सरकारानें लोकांस सोनें विकणें भाग पडावें म्हणून, देशाचे एकमुखी प्रतिरोधास न जुमानतां आम्हांस पूर्णपणें नुकसानकारक असलेला अठरा पेन्साचा दर हट्टानें आणि निगरगट्टपणें चालू ठेवला, तो टिकविण्याकरितां व्यवहारांतील कोट्यावधि रुपयांचें नाणें कमी केलें आणि भारी व्याजानें कर्ज घेण्यासहि आरंभ केला ! ह्याचा परिणाम व्यवहारांत नाण्याच्या अत्यंतिक तुटवड्यांत होऊन धान्यादि कच्चया मालाच्या किंमती भराभर खाली जाण्यांत झाला आणि व्यापारास अनिश्चितपणा येऊन पतीचे व्यवहारासहि खो बसला.

सरकारदस्त आणि जगण्यास लागणाऱ्या आवश्यक वस्तु ह्याकरिता शेतकऱ्यांस व इतरांस जवळचें सोनें विकून जगणें भाग झालें. इतकेंहि करून सोनेविक्रीनें आलेलें नाणें बाजारात खेळतें राहतें तर आजचा स्थिति आली नसती. पण त्या आलेल्या सर्व नाण्यांचीहि पुनः सरकारी खजिन्यांत फेर भरपाई झाली; कारण कराच्या वैपुल्यानें शेतकऱ्याचे हातीं आलेल्या विक्रीच्या रकमेनें त्याचे हात काळे करून सरकारी खजिन्यांत स्वतःचें काळें केलें, आणि सावकाराचे हातीं आलेली रक्कम व्यापाराची अनिश्चिति व तिजपासून जन्मलेली जागतिक नापत यांमुळे सरकारी लोन आणि बँकांचीं तळघरें ह्यांत उड्या घेऊ लागली. याप्रमाणे सर्व बाजूंनी कोंडी होऊन खासगी व्यवहारास नाण्याचा पूर्ण तुटवडा आला आहे व त्याचा परिणाम धान्याचे भाव अपरंपार कमी होण्यांत झाला आहे. ह्या सर्व गोष्टींचा अखेर परिणाम थोडक्याच काळांत शेतकऱ्याचे मृत्यूंत होणार आहे. करितां हुंडणावळीचा दर इत्यादि सर्व कारणांस आळा घालून राष्ट्रस्वास्थ्याचा मेरू जो शेतकरी त्यास सर्वसत्ताधीश सरकारानें जगविलें पाहिजे.

## जमीनदार कंगाल होणार

आमचे येथे सध्या उक्त्या मक्त्याची उपरी कुळपद्धति रूढ आहे व तीमुळेहि शेती आणि शेतकरी यांस निकृष्टावस्था प्राप्त झालेली आहे. शेतकरी समाज हा जमिनदार आणि मजूर–शेतकरी अथवा

कूळ ह्या दोघांचा मिळून झालेला आहे. आणि जमीनदार हा जमिनीचा मालक असून कूळ हा त्याची जमीन उक्त्या खंडाने लागवड करीत आहे. पैकीं कुळांचा वर्ग हा सध्या पूर्ण कफल्लक झालेला आहे. तदनुषंगिक सर्व गुण त्यांचे ठिकाणीं उत्पन्न होऊन तो विधिनिषेधातीत व कर्तव्यमुक्त झालेला आहे व जमीनदारहि ऐतखाऊ आणि नाशन बनला असून थोडक्या काळांत पूर्ण कंगाल होणार आहे. या दोनहि वर्गांच्या ह्या हानीस रूढ असलेली उक्त्या मक्त्याची उपरी कुळपद्धति कारण झालेली आहे असें असल्यामुळे ही पद्धति शक्य तितक्या लवकर पालटणे राष्ट्रहितदृष्ट्या आणि शेती आणि शेतकरी ह्यांचेही सुस्थितीच्या दृष्टीने अगत्याचें आहे. ह्या पद्धतींत कफल्लक उपरीपणामुळे कूळ शेतीची मुळीच काळजी न घेतां, हातीं लागेल तितकें अधिकांत अधिक पीक पदरीं पाडून मोकळा होतो. आणि ऐतखाऊपणास सवकलेला जमीनदारहि कायदा रूढी आणि इभ्रत यांचे साह्याने उक्ता मक्ता पदरीं कुळाकडून पाडून घेऊं पाहतो.

## उपरी कूळपद्धति

जमीनदार हा कायदा रूढि वगैरेंचे जोरावर जें काय पदरीं पडेल तें पाडून घेऊन त्यांत गुजराणा करूं लागतो. पण पोटाचें साधन जी शेती तिची काळजी मुळींच घेत नाही. हा जमिनीचा वास्तविक मालक असतांना जमिनीविषयी इतका बेफिकीर असतो कीं, ह्याची जमीनसुद्धा त्यास माहीत नसते. कारण सध्याचे जमीनदारवर्गांत ज्यांनी पूर्वी हजारों एकर जमीन लागवडींत आणली तेच केवळ जातिवंत जमीनदार नसून व्यापारी, सावकार, सरकारी नोकर, वकील, डॉक्टर फार काय न्हावी, धोबी वगैरेसुद्धा सर्व प्रकारचे लोकांची खिचडी झालेली आहे, आणि ह्याचें कारण उक्त्या मक्त्याची प्रचलित उपरी कुळपद्धति हीच आहे. ह्या पद्धतीमुळे कोणत्याहि पेशाच्या मनुष्याजवळ थोडें भांडवल जमतांच त्याची मिळेल तितकी जमीन घ्यावी आणि ती चढाओढीच्या जोरावर उक्त्या मक्त्याने देऊन स्वतः कांहीएक न करतां तिचें मिळेल तें अधिकांत अधिक उत्पन्न मात्र घ्यावें, असें झालें आहे.

जमीनदारीचें कसब काय तें इतकेंच कीं चढाओढ उत्पन्न करणें; किंबहुना ती चढाओढहि अन्यधंद्यांचे बेकारीने आपोआपच उत्पन्न झालेली आहे. पण ही पद्धति कुळांजवळ कांही माया असे तोंपर्यंत बऱ्या प्रकारें चालली. गेलीं अनेक वर्षें शेतीचा धंदा केवळ नुकसानींत चालू असता, स्वातंत्र्याने पोट भरण्याचें साधन, अन्नाची स्वाधीनता आणि अंगतिकता ह्यांमुळे शेतकरी हा उक्ता खंड भरीत येऊन, सध्या पूर्ण कफल्लक बनला आहे. ह्यामुळे आता ह्या उक्तया मक्तयाच्या उपरी कुळपद्धतीचे सर्व दुष्परिणाम सध्या मूर्तिमंत प्रकट झाले असून, ते जमीनदार आणि कुळ ह्या दोघांसहि खाऊं लागले आहेत. कुळांची स्थिति सध्या "आई जेवूं घालीना आणि बाप भिक मागूं देईना" अशी शोचनीय झालेली आहे. त्यांचें शेतींत पोट भरत नाहीं व पोट भरण्यास दुसरें कांही साधनहि नाहीं, ह्यामुळे तो वाटेल तो मक्ता कबूल करतो व कशी तरी जमीन स्वाधीन करून घेतो. हेतु इतकाच कीं तिचे नांवावर नवीन कर्ज मिळवून जगावें. पण ह्याचा परिणाम फिर्यादि, जप्ती, संप, मारामाऱ्या, लबाड्या व गांवपालट इत्यादि किळसवाण्या प्रकारांत होत आहे. आतापर्यंत दुसरा जो जमीनदारांचा वर्ग तो कांही जीव धरून होता. पण अपरिमित सरकारदस्त, धान्याचे भावांचा कमालीचा उतार आणि वसुलाची बूड ह्यांमुळे सध्या तोहि मृत्युशय्येस खिळला आहे. करिता ह्या सर्व प्रकारांचें एक कारण अशी जी उपरी कुळपद्धति ती पालटणें शेतकऱ्याचे सुस्थितीस अवश्य आहे.

# तरंग—रंगण

(चाल—फटक्याचीं)

मंगल नादें विश्व निनादे यश-रव ज्याचा दुमदुमला।
भीष्म धुरंधर पारतंत्र्य-शर—शय्येवरती पहुडला॥
वृद्धा वीरांगना तयाला वंदायाला येत कुणी।
शिरीं तियेच्या शुभ्र कुंतला विलोकुनी तो वदे मुनी॥
" तव शिरभागीं जागोजागीं विशुभ्र कुंतल विलोकितां।
चित्त—सरोवर उचंबळूनी डुलें तरंगीं तन्मयता॥
देवी! प्रियजन—छलन पाहुनी क्रोधानल पेटे हृदयीं।
ज्वाला उफळे केश धगीनें काय जाहले श्वेतमयी ? ॥
आचरसी तप खडतर केवल मंगल—भू—मातेकरितां।
शुक्र अल्पसें तत्फल विलसें, दिसूं लागली नवल कथा॥
विमल भूमिचा धवल नकाशा, झाला काळा आज परी।
बदलूं लागे शुभ्र रंग कां चढावया लागला वरी ?॥
आत्मबलाच्या आत्मशुद्धिच्या ध्वजा रुपेरी शिरिं हलती
फडफडुनीया विमल तेजनीं नवल जगा कीं निवेदिती ? ॥
वाटे, देवी! शिरीं रुपेरी तार लकाके बघुनिया।
सद्हृदयीच्या हलतिल तारा नाद लागतिल करावया॥
कुंतल—कुंजीं शुभ्र बाण हे ठेविलेस जागोजागीं।
धीर—वीर घेतील स्वकरीं दंगुन जातिल रणरंगीं॥
पूर्वज गेले, रुतून बसल्या भूमितलीं ज्या समशेरी।
नग्न होउनी जणूं तळपती म्यान झुगारूनि बाहेरी॥
मागें पुढती, खाली वरती, लपलपती आवेगभरीं।
'कुणी वीर या, चला करीं घ्या,' वदती 'फुंका रणभेरी' ॥

*　　*　　*

बोले वृद्धा, 'केश न हे' मन तुज पाहुनिया कळवळतें।
रडें दाटतें हृदयाश्रू—जल उर्ध्वपथें गा खळाळतें॥
मूर्ती कृश तव पाहुनि मानस हेलावत बा! खालवरी।
तुटून गेले ममत्व—तंतू, गळुन झाले श्वेत शिरीं॥
आरंभीसी यज्ञ जिवाचा लोकमंगला पुनः पुनः।
दुःख स्मृतिचें मूर्तरूप त्या गोचर झालें गुणगाना॥
आशा—निर्झर तटूं लागला हृदयप्रांतीं झरझरतां।
ओघ धावले, शुष्क जाहले, सताड पडले इतस्तता॥
इच्छा—सुमनें हार गुंफिते नित्य नवे हृदयागारीं।
तुटून जाती फुलें, करपती धागे रुळती वरीवरी॥
किंवा तव तप पसरे भूवर धूळ उधळते रजत—मया।
तद्रज केशीं भरले, तेणें रंग रुपेरी खुले तया॥
शांत गुणांचा शीतचंद्रमा सन्निध माझ्या डुलताहे।
तत्किरणांचा शुभ्र मनोरम रंग मस्तकीं हसताहे॥
रंगवील तो सेतु हिमाचल कण कण होतिल सत्त्वजलें।
त्वद्यश-सागर नितांत भूवर डोलत राहिल आत्मबलें॥

ओतूर　　　　—'कृष्ण—शुक्ल.'

# एलिचपूरच्या शुद्धिकरणाचा वाद

उमरावती जिल्ह्यांतील शुद्धिकार्यासंबंधाने उमरावती जिल्हा हिंदु सभेचे कार्यकर्ते व धर्मभास्कर मसूरकरमहाराज यांचे शिष्य यांमध्ये कांही वाद उपस्थित होऊन, तो गैरसमजुतीमुळे विकोपास गेला या प्रकरणीं तडजोड घडवून आणावी अशी उभयपक्षांना विनंति केल्यावरून आम्ही जरूर ते कागदपत्र वाचले व इतर शक्य ती माहिती मिळविली. सदर्हू चौकशीवरून आम्हाला असें वाटतें कीं, या वादाच्या मुळाशीं तत्त्वाविषयीं मतभेद नसून केवळ तपशिलाचा प्रश्न आहे. व तोहि परस्परांच्या गैरसमजुतीमुळें तीव्र स्वरूपाला गेला. उभयतासहि प्रिय असलेल्या हिंदुधर्माच्या कार्याकडे लक्ष देऊन झाल्या गोष्टी इतःपर मनावर न घेण्याचें उभयपक्षांनी ठरविलें आहे. म्हणून आम्ही उभयपक्षाचें अभिनंदन करितों. यापुढे शुद्धिसंघटनेचें कार्य उभयपक्षांनी परस्पर सहकार्याने व एकजुटीने करावें अशी आमची त्यांस विनंति आहे.

सह्या

शुक्रवार ता. ५ मे १९३३ उमरावती (वऱ्हाड)

पन्नालाल बन्सिलाल सिंघई,
वामन गोपाळ जोशी,
बाळकृष्ण गणेश खापर्डे,
नारायण रामलिंग बामणगांवकर.

# सूर्य उगवला पण तो केतूने ग्रासला !

म. गांधी यांनी आपल्या एकवीस दिवसांच्या उपोषणास सोमवार ता. ८ रोजीं दोनप्रहरीं बारा वाजता येरवड्याच्या तुरुंगांत सुरुवात केली. उपोषणाच्या सुरुवातीस पहिला शकुन हा झाला कीं त्यांजवरील प्रतिबंधाच्या शृंखला खळकन् गळून पडल्या. या उपोषणाने गांधीजींनी तुरुंगांतून बाहेर पडण्याचा नवाच मार्ग हुडकून काढला व तो सर सॅम्यूएल होअर किंवा लॉर्ड विलिंग्डन यांपैकीं कोणासहि अडवून धरतां आला नाही. गांधींच्या उपोषणाची घोषणा अगोदर आठ दिवसच झाली होती. त्या आठ दिवसांत ज्योतिष न जाणणाऱ्या शेंकडो लोकांनीं गांधीजींनी उपोषणास प्रारंभ करतांच सरकार त्यांची सुटका करणार असें भविष्य वर्तविलें व तें खरें झालें. उलटपक्षीं तेंच भविष्य एका खऱ्या ज्योतिष्याने कुंडली मांडून वर्तविलें व तें मात्र खोटें ठरलें. यावरून खरें भविष्य वर्तविण्याचें साधन ज्योतिषशास्त्र नाही असेंच समजावयाचें काय?पण हीं सर्व भविष्यें व अनुमानें केवळ या एका आठवड्यांतील होत. त्यापूर्वी एक अगर दोनच दिवस काय स्थिति होती ? सर्वत्र काळोख पसरला असून गांधींची आठदहा दिवसांवर ठेपलेली सुटका आठ-दहा महिन्यांनी दूर आहे कीं, त्याहूनहि अधिक महिन्यांनी दूर आहे याची कल्पना दुसऱ्या कोणास काय पण खुद्द गांधीजींसहि नव्हती. इतकी ईश्वराची करणी अतर्क्य व अघटित आहे.

म. गांधी येरवड्याच्या खडतर व निर्दय कारागृहांतून सुटले आणि सर विठ्ठलदास ठाकरसी यांच्या इंद्रभुवनतुल्य प्रासादांत जाऊन राहिले. त्यांना येरवड्याच्या तुरुंगांत असता तेथील परकीय व स्नेहशून्य असे जेलर व जेल सुपरिंटेंडेंट यांच्यामार्फत गरजेच्या वस्तु मिळवाव्या लागत असत. तेथून 'पर्णकुटी' या केवळ नांवाने न्यून पण साधनांनी संपूर्ण अशा राजवाड्यांत जातांच गांधीजींच्याभोंवतालची परिस्थिति बदलून त्या वाड्याची राणी शोभणारी मालकीण प्रेमलीलाबाई त्यांच्या तोंडांतून एखादा शब्द कधीं निघतो व आपण तो केव्हा झेलतों अशा आदराने व भक्तीने तत्पर झाली. गांधीजींना त्या ठिकाणीं कोणत्याहि वस्तूची कमताई नव्हती. शृंगारलेला महाल होता मोकळी हवा होती. नजर टाकावी तिकडे वनश्री पसरली होती. शेळीचेंच काय पण कामधेनूचें दूध मागितलें असतें तरी तें मिळण्यासारखें होतें. इंद्राच्या प्रासादांत व ठाकरसीच्या पर्णकुटींत फरक होता तो इतकाच कीं, इंद्राच्या प्रासादांत अमृत होतें व पर्णकुटींत तें नव्हतें. म्हणूनच कदाचित् कै. सर विठ्ठलदास यांस मृत्युलोकचा हा वाडा तुच्छ वाटून त्यांनी त्यास पर्णकुटी हें दरिद्री नांव दिलें असावें ! गांधीजींच्या दृष्टीनेंहि ती पर्णकुटीच समजण्यास हरकत नाही. कारण त्या वाड्यांत प्रेमलीलाबाई ठाकरसी यांनी गोमांतकाचा आंबा, मस्कतचें डाळिंब, नागपूरचा संत्रा, माल्टाचीं द्राक्षें, राजेवाडीचे अंजीर, काबूलचा बेदाणा, व बसऱ्याचा खजूर आणून दिला तरी तो विषतुल्य होय. त्यांना अमृत तेवढेंच अमृत व तेंहि देवांनी

जलरूपानें त्यांस पोंचाविलें तर; बाकी दुनियेंतील प्रत्येक विषय विषसमान आहे.

गांधीजी अशा प्रकारचें असिधाराव्रत पत्करून तुरुंगांतून बाहेर आल्यामुळे त्यांच्या सुटकेंतील आनंदाचा अंश आटून जाऊन लोकाचीं मनें औदासीन्याने व चिंतेने खिन्न होऊन गेलीं आहेत. ठाकरसींची पर्णकुटी ही त्यांच्या वाटेवरची धर्मशाळा आहे. त्या धर्मशाळेंत निजावयास आलेले गांधीजी हे यात्रेकरू होत. त्यांचा खरा मुक्काम कोठे व्हावयाचा याची माहिती त्यांना नाही तर इतरांना कोठून असणार ! त्यांच्या मुक्कामाची माहिती असलीच तर त्या एकट्या जगन्नियंत्या परमेश्वरालाच असेल. तुरुंगांतून सुटल्याचा आपणास आनंद होत नाही असें गांधींनी आपल्या पत्रकाच्या प्रारंभीं म्हटलें आहे, त्याचें एक कारण हें असेल काय ? गांधींच्यापुढे एकवीस दिवसांच्या उपवासाचें भयंकर दिव्य उभें आहे. त्या दिव्यास सुरुवात होऊन दोनच दिवस झाले नाहीत तोंच त्यांस ग्लानि येऊन उठून बसणेंहि अशक्य झालें. पहिल्या दोनच दिवसांत जर ही अवस्था तर पुढील अठरा–एकोणीस दिवसांची मजल मारीत असतां त्यांजवर कोणकोणती संकटें ओढवतील याची काळजी त्यांना नसली तरी त्यांच्या लक्षावधि अनुयायांना व भक्तांना वाटल्यावांचून राहील काय !

परंतु गांधींजींची कर्तव्यनिष्ठा फार जबर आहे व त्यांचें हृदयहि फार कोमल आहे. कोणत्याहि निमित्तानें का होईना, आपण आपल्या हजारो भक्तांना, मित्रांना व अनुयायांना तुरुंगांतलि कष्टांत व पारतंत्र्यांत ठेवून तुरुंगाबाहेरील स्वातंत्र्य उपभोगण्यास जात आहों यांत आपण त्यांना दगा तर देत नाहीना या संशयाने त्यांचें अन्तःकरण अत्यंत विव्हल झालें असल्याचें गांधीजींच्या पत्रकांत पदोपदीं प्रत्ययास येत आहे. म्हणून त्यांनी सहा आठवडेपर्यंत कायदेभंगाची चळवळ बंद ठेवण्याचा सल्ला राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष लोकनायक माधवरावजी अणे यांस दिला व तो माधवरावांनी तत्परतेने मान्य केला.

कायदेभंगाची चळवळ आपल्या आज्ञेवरून सुरू झाली व त्या चळवळींत आपली इभ्रत राखण्याकरिता हजारों हिंदी स्त्री-पुरुषांनी उड्या टाकल्या याची म. गांधींस पूर्ण जाणीव असून ते तुरुंगांत होते तरी त्यांचे डोळे तुरुंगाबाहेरील जगाची टेहळणी करीत होते, असें त्यांच्या पत्रकाच्या अंतरंगावरून स्पष्टपणें दिसून येतें. त्यांनी तुरुंगांतून बाहेर पडतांच पहिलें काम हें केलें कीं आधी पत्रक प्रसिद्ध केलें. त्यांत त्यांनी आपल्याडोक्यांत गेलें दीड वर्ष कोंडून ठेवलेल्या सर्व विचारांना बंदिवासांतून बाहेर सोडन आपल्याबरोबर त्यांनाहि स्वातंत्र्य मिळवून दिलें आहे. न जाणो, उपोषणाच्या दुष्परिणामानी आज आहे इतकीहि शक्ति उद्या उरणार नाही आणि कदाचित् आपलीं मतें आपल्या जवळच जगास न कळतां राहून जातील अशी शंका मनांत येऊन त्यांनी प्रसिद्ध केलेल्या पत्रकांत एक प्रकारें आपल्या राजकीय धोरणाची निरवानिरवच केली आहे असें म्हटलें तरी चालेल. अस्पृश्योद्धाराकरिता त्यांनी आपला देह आज बलिदानासाठी काढलेला दिसत असला तरी त्यांना राष्ट्राच्या राजकीय उद्धाराची व स्वातंत्र्याची महती तितकीच किंबहुना त्याहूनहि अधिक आहे असें या क्षणींहि वाटत आहे.

कायदेभंगाच्या चळवळीची आजची स्थिति काय आहे व वटहुकुमी कायद्यांच्या जेरबंदाने जखडलेलें राष्ट्र दुःखानें कसें कण्हत कुंथत आहे व दीन बनलें आहे याचें उद्वेगकारक चित्र तुरुंगांत गांधींच्या डोळ्यांपुढे टांगून ठेवल्याप्रमाणे सतत दिसत असल्यामुळे त्यांनी कायदेभंगाची चळवळ सहा आठवडेपर्यंत बंद ठेवण्याची शिफारस श्री. अणे यास केली आहे. आपल्या उपोषणकालांत जनतेच्या मनाला कायदेभंग चालविण्याची टोंचणी लागू नये या हेतूने गांधींनी कायदेभंग बंद ठेवला असेल; कदाचित कायदेभंग बंद ठेवला नाही तर उपोषणाच्या निमित्ताने तुरुंगांतून बाहेर आल्यानंतरहि आपणावर कायदा मोडून पुनः ताबडतोब तुरुंगांत जाण्याचें नैतिक बंधन आहे हें माहीत असल्यामुळेहि गांधींनी कायदेभंग बंद ठेवला असेल; त्याचप्रमाणें कायदेभंगाची चळवळ राष्ट्रीय सभेने बंद पाडल्यावांचून वटहुकुमी कायद्यांचा अम्मल सरकार तहकूब करणार नाहीं व सर्व राजबंद्यांनाहि सोडणार नाही असें गृहमंत्री सर हॅरी हेग, व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन व भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनी अनेकवार बोलून दाखविलें असल्यामुळेहि गांधींनी कायदेभंग बंद ठेवला असेल.या तिहींपैकीं कोणत्याहि एका कारणाकरिता किंवा सर्व कारणाकरिताहि गांधींनी कायदेभंगाचा हात आटोपण्यास राष्ट्रीय सभेस सांगितलें असलें तरी त्यांनी यांत आपलें मुत्सद्दीपणाचें व दूरदृष्टीचें धोरणच दर्शविलें आहे यांत शंका नाही.

'कायदेभंग तुम्हांस बंद हवाना ? हा मीं बंद केला. आता तुम्हीहि आपली सोटेशाही बंद ठेवून देशांत शांतता निर्माण करण्यास सहकारितेचा हात पुढे करा ' असें गांधींचें सर.

कारास आव्हान आहे. या आव्हानाचा दिलदारीने, सरळपणाने व सुजनतेने फायदा घेऊन देशांत एक प्रकारें सुरू असलेल्या सुलतानी राज्यपद्धतीस मूठमाती देणें हें सरकारचेंहि कर्तव्य आहे. गांधीजींनी आपल्या पत्रकांत म्हटल्याप्रमाणे कायदे-भंगाच्या चळवळीचा सोक्षमोक्ष लावण्याचा अधिकार गांधींना नाही व राष्ट्रीय सभेचे आजचे अध्यक्ष श्री. माधवराव अणे यांनाहि नाही. हा अधिकार कायदेभंगाची चळवळ ज्या वर्किंग कमिटीने पुकारली त्या वर्किंग कमिटीला व तिच्या त्या वेळच्या सभासदांना आहे. वर्किंग कमिटीचे कांही सभासद तुरुंगांत आहेत व कांही बाहेर आहेत. त्या सर्वांनी एकत्र जमून व चर्चा करून यासंबंधानें निश्चित धोरण ठरविलें पाहिजे, म्हणूनच गांधीजींनी आपल्या पत्रकांत सरदार वल्लभभाई, पं. जवाहरलाल नेहरू इत्यादिकांच्या नांवांचा मुद्दाम उल्लेख केला आहे. वर्किंग कमिटीच्या या सभासदांनी एकत्र जमण्यास सरकाराने त्यांपैकीं जे सभासद अद्यापि तुरुंगांत आहेत त्यांना सोडून देणें अवश्य आहे. या गोष्टीची आवश्यकता आम्हींहि यापूर्वीं अनेकवार प्रतिपादिली असून आजहि तिचें महत्त्व सरकाराच्या निदर्शनास फिरून आणून देत आहों.

म. गांधींचें याहिपुढे जाऊन सरकारास असें सांगणें आहे कीं, या सहा आठवड्यांच्या अवधींत त्यांनी सर्व राजकीय कैद्यांना बंधमुक्त करावें. त्यांच्या या सूचनेंत गर्भित अर्थ पुष्कळ आहे असें आम्हांस वाटतें. आज या कैद्यांना सोडलें व उद्यां तडजोड फिसकटून त्या सर्वांना उचलून तुरुंगांत टाकावें लागलें तर हा सर्वांना सोडण्याचा उपद्व्याप हवा कशाला असें कदाचित् सरकार म्हणेल. परंतु ही सूचना म. गांधींसारख्या एकमेवाद्वितीय अशा राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांकडून येत आहे याचें मर्म सरकाराच्या लक्षांत आलें पाहिजे. पण तें येत नसेल तर त्यांच्या अधिकाऱ्यांचीं डोकीं अगदींच मठ्ठ व निर्बुद्ध बनलीं असें म्हणावें लागेल. सर्व राजकीय कैद्यांना आज सोडून दिल्यानंतर राष्ट्रीय सभा आपल्याकडून इतकी कोशीस करील कीं पुनः चालू वादाच्या संबंधांत कायदेभंगाच्या चळवळीस सुरुवात होणार नाही असा गांधींच्या सूचनेचा गर्भितार्थ आहे. आज त्यांच्या डोळ्यांपुढे अस्पृश्योद्धाराची चळवळ आहे, व त्याप्रीत्यर्थ उपोषणाचीं आवर्तनें करण्याचें त्यांनी ठरविलें आहे. कायदेभंगाची चळवळ ज्या पद्धतीने अलीकडे चालू होती ती पद्धति आपणास पसंत नसल्याचें ते सांगत आहेत व ही चळवळ अशीच पुढे सुरू ठेवण्यास जनतेची मनःस्थिति अनुकूल नाही हेंहि त्यांना समजून चुकलें आहे. तेव्हा वर्किंग कमिटीची सभा भरू दिल्यास सदर कमिटीच्या सभासदांस अस्पृश्योद्धाराच्या चळवळीस वाहून घेण्याचाच सल्ला गांधीजींकडून मिळेल, कायदेभंग चालविण्याचा सल्ला मिळणार नाही असें त्यांचें धोरण दिसतें. खेरीज अस्पृश्योद्धार व कायदेभंग या दोन भिन्न स्वरूपाच्या चळवळी एकाच वेळीं चालू ठेवता येण्यासारख्या नसल्यामुळेहि कायदेभंगाची चळवळ रहित झाल्याचेंच वर्किंग कमिटी ठरवील असें अनुमान काढण्यास जागा आहे.

वरील दृष्टीने विचार करतां वर्किंग कमिटीच्या सभासदांनाच काय पण सर्व राजकीय कैद्यांना सरकाराने आजच सोडून देण्यांत खरा शहाणपणा आहे. तथापि इतका शहाणपणा सरकारास सुचत नसला व त्यांत धोका वाटत असला तर निदान वर्किंग कमिटीच्या सभासदांची तरी सुटका त्यांनी केलीच पाहिजे. रा. न. चिं. केळकर, ना. श्रीनिवास शास्त्री व डॉ. अन्सारी प्रभृति पुढाऱ्यांनी सरकारास हाच सल्ला दिला आहे. इंग्लंडमधील 'मँचेस्टर गार्डियन,' 'डेली हेरल्ड' इत्यादि पत्रांचीहि त्याच सल्ल्यास पुष्टि मिळाली आहे. परंतु हिंदुस्थान--सरकाराच्या मनाची आढी मात्र अद्यापि मोडलेली दिसत नाही. 'कायदेभंगाची चळवळ तात्पुरती दीड महिना बंद ठेवून भागणार नाही. सदर चळवळ कायमची बंद ठेवण्यास राष्ट्रीय सभा कबूल असेल तरच सरकार राजकीय कैद्यांना सोडील. या कामांत तडजोडीची भाषा चालावयाची नाही किंवा कायदेभंग पुनः जिवंत करण्याचा धाकहि ऐकून घेतला जाणार नाही. कायदेभंग बिनशर्त बंद झाला पाहिजे. मग तडजोड होवो, अगर न होवो' अशा अर्थाचें चढेलपणाचें बेछूट उत्तर हिंदुस्थान-सरकाराने तातडीने प्रसिद्ध केलें आहे. हें उत्तर सरकाराच्या घमेंडखोरपणाचें व लोकमताच्या बेपर्वाईचें द्योतक नव्हे काय ?

सरकारप्रमाणे राष्ट्रीय सभेलाहि इज्जत आहे. सरकाराला स्वतःची इज्जत जशी राखावीशी वाटते तशी आपल्या प्रजेची इज्जतहि त्यांनीच राखली पाहिजे. म. गांधी यांचें किमान मागणें असें कीं, कायदेभंगाची चळवळ कायमची बंद पडण्यापूर्वी सर्व राजकीय कैद्यांना बंधमुक्त करण्याची सूचना सरकारास पटत नसली तर वर्किंग कमिटीच्या सभासदांना बंधमुक्त करून त्यांना आपसांतील वाटाघाटीस संधि द्यावी. म. गांधींची ही मागणी रास्त व न्याय्य आहे. कारण चळवळ बंद करावी असें खुद्द गांधींना वाटत असलें तरी तें राष्ट्रीय

सभेतर्फे ठरविण्याचा अधिकार वर्किंग कमिटीला आहे, गांधींना नाहीं. हिंदुस्थान सरकार हट्टास पेटून ही एवढीहि मागणी मान्य करणार नसेल तर ब्रिटिश सरकारानें हिंदुस्थान सरकाराविरुद्ध आपला अधिकार गाजविण्याची वेळ हीच आहे. सर तेजबहादूर सप्रू व बॅ. जयकर सुदैवानें याच संधीस विलायतेंत आहेत. त्यांची मध्यस्थीविषयीं प्रसिद्धि असून कायदेभंगाच्या पहिल्या चळवळींत त्यांना या कामीं खटपट केली होती. मध्यस्थांना बोलणें करावयास योग्य साधन पाहिजे. तें साधन गांधीजींनी त्यांस मिळवून दिलें असल्यानें त्या आधारावर त्यांस होअर, बाल्डविन, मॅक्डोनाल्ड या त्रिमूर्तींची समजूत घालतां येणार आहे. एकंदरींत राष्ट्राची राजकीय कोंडी फोडण्याच्या दृष्टीनें सुरुवात तर बरी झाली असून ती फोडण्यास वेळहि पुष्कळ आहे. गांधीजींच्या सुटकेनें रात्र संपून सूर्य उगवला आहे यांत शंका नाहीं. मात्र उपोषणामुळें त्या सूर्यास केतूनें ग्रासल्याप्रमाणें झालें आहे. तथापि तसें असलें तरी हें सूर्यग्रहण आहे, सूर्यास्त नाहीं. दिवस आहे, रात्र नाहीं. म्हणून राजकारणाची कोंडी क्रमाक्रमानें पण निश्चितपणें फुटून दडपशाहीचा मनु संपेल, देशांत स्थिरस्थावर होईल व राष्ट्रीय पक्षाची घडी फिरून नीट बसविण्यास अवसर मिळेल अशी आम्हांस आशा वाटत आहे.

# म. गांधी व श्री. अणे यांचीं पत्रकें

## कायदेभंग तात्पुरता तहकूब—राजबंद्यांच्या सुटकेस सरकारी नकार

महात्मा गांधींच्या सुटकेचें वर्तमान सायंकाळीं ७॥ वाजतांच येरवड्याच्या तुरुंगांत श्री. सौ. नायडू यांना कळविण्यांत आलें असलें तरी त्यांची प्रत्यक्ष तुरुंगांतून बाहेर रवानगी होण्यास रात्रीचे नऊ वाजले. प्रार्थना, सामानसुमानाची बांधाबांध एवढें होण्यास इतका वेळ लागणें सहज होतें. गांधीजींनी आपला मुक्काम लेडी प्रेमलीलाबाई ठाकरसी यांच्या भव्य प्रासादांत ठेवण्याचें ठरविल्यामुळे त्यांना तेथे नेण्यांत आलें. गांधींना सोडल्यास ते आपल्या 'पर्णकुटींत' राहावयास येणार अशी लेडी ठाकरसी यांची अपेक्षा होती. परंतु, कांहींच निश्चित नसल्यामुळे गांधींच्या आकस्मिक आगमनामुळे त्यांना फार आनंद झाला. मुक्कामावर पोहचताच प्रथम गांधींनी एक पत्रक तयार केलें व राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. बापुजी अणे यांना ताबडतोब बोलाविण्यास 'केसरी कचेरी' कडे संदेश पाठविला. श्री. अणे यांच्या संमतीनें त्यांनी तें पत्रक प्रसिद्धीकरितां वर्तमानपत्राकडे पाठविलें. या पत्रकांत ते म्हणतात.

### राजकारणाचा विचार बंद

" जेव्हां कर्नल डॉइल यांनी माझ्या मुक्ततेची बातमी मला सांगितली, त्या वेळींच लेडी ठाकरसी यांच्या बंगल्यावर जाऊन राहणें उत्तम असें मीं ठरविलें व त्याप्रमाणे हा मी येथे आलों आहें. या माझ्या मुक्ततेनें मला मोठा आनंद झाला आहे असें नाहीं. शिवाय सरदार वल्लभभाई मला काल म्हणाले त्याप्रमाणे या माझ्या मुक्ततेचा फायदा घेऊन कायदेभंगाच्या चळवळीचें सुकाणूं मला कसें हातीं घेतां येणार ? मी सत्याचा शोध करणारा व आपला शब्द पाळणारा असल्यामुळे या मुक्ततेनें माझ्या मनावर अधिकच ताण पडणार व मजवर नैतिक जबाबदारीहि मोठीच येणार आहे. हें उपोषणाचें व्रत तर चालणारच. मी कोणत्याहि गोष्टीसंबंधी मनाला क्षोभ होऊं देणार नाहीं किंवा कसल्याहि वादांत अगर चर्चेत भाग घेणार नाहीं असें ठरविलें आहे व हा निश्चय मी टिकवीन अशी मला अपेक्षा पूर्वी होती व आजहि आहे. जर बाहेरच्या कोणत्याहि गोष्टींना म्हणजे हरिजनांच्या चळवळीशिवाय इतर गोष्टींना मी माझ्या चित्तांत जागा दिली तर उपोषणाचा मुख्य हेतु फुकट जाईल !

### कायदेभंगांतील गुप्तपणा टाका

माझी मुक्तता झाल्याकारणानें या वेळीं कायदेभंगाच्या चळवळीसंबंधीहि कांही गोष्टी सांगितल्या पाहिजेत. कायदेभंगाच्या चळवळीसंबंधी मला प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, या चळवळीसंबंधीचे माझे जे पूर्वी विचार होते ते तंतोतंत कायम आहेत. त्यांत यत्किंचितहि फरक झालेला नाही. ज्या असंख्य लोकांनी कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतला त्यांच्या स्वार्थत्यागाबद्दल व शौर्याबद्दल निर्भेळ प्रशंसाच करणें भाग आहे. परंतु हें म्हटल्यानंतर मला असेंहि सांगितलें पाहिजे कीं, प्रस्तुतच्या चळवळींत गुप्तपणाचा जो भाग आला आहे तो यशःसिद्धीस घातक आहे ! म्हणून जर ही चळवळ पुढे चालवायाचीच असली तर देशाच्या निरनिराळ्या प्रांतांत या चळवळीचे जे

कर्णधार आहेत त्यांना माझें एवढेंच आग्रहाचें सांगणें आहे कीं, त्यांनी हा गुप्तपणा टाकावा. या योगानें एकहि कायदेभंगवाला मिळाला नाही तरी मला त्याची पर्वा नाही !

**मला उघडें सत्य पाहिजे**

वटहुकुमामुळे सर्वसामान्य जनसमाज भीतिग्रस्त होऊन दबला आहे यांत शंका नाही. व मला असें वाटतें कीं, गुप्त पद्धतीने चळवळ केल्यामुळेच हा नैतिक अधःपात झाला. कायदेभंगाची चळवळ तींत किती लोक आले यावर अवलंबून नगून तीमध्यें भाग घेणाऱ्या लोकांचा, गुणाच्या दृष्टीने दर्जा केवढा आहे यावर अवलंबून आहे व जर या चळवळीचा पुढाकार माझ्याकडे असता तर मी गुणावरच लक्ष दिलें असतें, सख्येवर दिलें नसतें. असें केलें गेलें असते तर चळवळीचा दर्जा उच्च झाला असता. दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें लोकांना शिक्षण देणें शक्य नाही. प्रत्यक्ष चळवळीसंबंधी मी कांहीच म्हणू शकत नाही. गेले कित्येक महिने वर प्रदर्शित केलेले विचार मी मनांत बाटलींत बंद केल्याप्रमाणें दडपून ठेवले होते व वर जें मी म्हटलें आहे तेंच सरदार वल्लभभाई यांचें मत आहे असें मला निश्चयाने सांगता येते.

**कायदेभंग तहकूब**

एकच शब्द आणखी सांगावयाचा आहे. मला तें आवडो वा न आवडो पुढील तीन आठवड्याच्या कालखंडांत कायदेभंग करणाऱ्या लोकांची मनःस्थिति संशयग्रस्त होईल. म्हणून अशा परिस्थितींत राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. माधवराव ऊर्फ बापूजी अणे हे चळवळ एक महिना अगर दीड महिना ती तहकूब केल्याचें जाहीर करतील तर फार चांगलें होईल.

**राजकीय कैदी सोडा**

आतां मला सरकारास विनंति करावयाची आहे. जर त्यांना आज राष्ट्रांत शांतता नाही असें वाटत असेल व जर त्यांना शांतता प्रस्थापित होण्याची जरूरी भासत असेल, तसेंच जर त्यांना वटहुकुमांच्या साहाय्याने अम्मल चालविणें म्हणजे राज्य करणे नव्हे अशी खात्री असेल तर त्यांनीं या कायदेभंगाच्या चळवळीच्या तहकुबीचा फायदा घेऊन सर्व कायदेभंगवाल्यांची बिनशर्त सुटका करावी. जर मी या माझ्या दिव्यांतून वांचलों तर मी देशाच्या परिस्थितीची छाननी करीन व मला योग्य वाटेल तो सल्ला राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांस किंवा धार्ष्ट्य करून बोलावयाचें तर सरकारासहि देईन.

**समेट शक्य आहे**

इंग्लंडहून परत आल्यानंतर अडथळा आल्यामुळें ज्या ठिकाणीं सूत्र तुटलें तेथूनच तें पुनः मी हातीं घेईन असें वाटतें. राष्ट्रीय सभा व व सरकार यांच्यामध्ये समेट माझ्या प्रयत्नामुळे झाला नाही, व कायदेभंगाच्या चळवळीचें पुनरुज्जीवन केलें गेलें तर जरूर वाटल्यास सरकारास वटहुकुमांचा अंमल जारी करतां येईलच. सरकारला जर खरोखरच समेटाची इच्छा असेल तर तो घडवून आणण्याचा मार्ग सांपडेल असें मला वाटतें.

**वर्किंग कमिटी व कायदेभंग**

स्वतःपुरतेंच बोलावयाचें तर एक गोष्ट मला निश्चयाने सांगता येते. ती ही कीं, जोंपर्यंत अनेक कायदेभंगवाले तुरुंगांत खितपत आहेत, तोंपर्यंत कायदेभंग मागें घेतला जाणार नाहीं. तसेंच, सरदार वल्लभभाई पटेल, खान बहादुर अबदुल गफुरखान, पं. जवाहरलाल नेहरू व इतर पुढारी तुरुंगांत जिवंत गाडल्यासारखे आहेत, तोंपर्यंत कोणतीहि तडजोड होणें शक्य नाहीं. किंबहुना, कायदेभंग बंद करण्याचा अधिकार आज जे तुरुंगाबाहेर आहेत त्यांना नाहीच. मला ज्या वेळीं अटक झाली त्या वेळीं जी वर्किंग कमिटी अस्तित्वांत होती त्या कमिटीलाच फक्त कायदेभंग बंद करणें शक्य आहे. कायदेभंगाच्या चळवळीसंबंधीं यापेक्षा अधिक कांही मी सांगणार नाही. मीं इतकें सांगितलें हेंच फार सांगितलें. माझ्या शरीरांत शक्ति आहे तोंपर्यंतच मला जें सांगावयाचें असेल तें सांगेन.

**मी येरवड्यास परत जाईन**

वर्तमानपत्राच्या प्रतिनिधींना माझी आग्रहाची विनंति एवढीच आहे कीं, त्यांनी मला यापुढे त्रास देऊं नये. मला भेटीस येऊं इच्छिणाऱ्या लोकांनाहि त्यांच्या इच्छा दाबावयास मी सांगत आहे मी तुरुंगांत आहे असेंच त्यांनी समजावें. राजकीय किंवा इतर विषयाची चर्चा करण्यास मी या उपोषणाच्या कालांत अपात्रच ठरेन. मला अगदीं शांतपणानें राहूं द्या. सरकारलाहि मला हेंच सांगावयाचें आहे कीं,त्यांनी माझी मुक्तता ज्या कारणानें केली तें कारण डोळ्यापुढे ठेऊन मी त्या मुक्ततेचा भलताच फायदा घेणार नाही. मी या उपोषणाच्या दिव्यांतून शीरसलामत बाहेर पडलों, व त्यावेळची राजकीय परिस्थिति आजच्या इतकीच काळीकुट्ट राहिली तर कायदेभंगाच्या चळवळीबाबत गुप्त रीतीनें अगर उघडपणें एकहि पाऊल पुढें अगर मागें न टाकतां मला येरवड्यास परत घेऊन जाण्यास मी त्यांना विनंति करीन. म्हणजे ज्या मित्रांना मी आज एकाकी सोडून आलों त्यांच्यांत

मला पुनः जाऊन राहतां येईल !

### सरदार वल्लभभाई पटेल

सरदार वल्लभभाईंच्या सान्निध्यांत राहण्यास मिळालें ही एक पुण्याईच मी समजतों. मला त्यांच्या शौर्य-धैर्याची चांगलीच माहिती होती. परंतु गेल्या सोळा महिन्यांत ज्या रीतीनें त्यांना व मला एकत्र राहावयास मिळालें असें पूर्वी कधीहि मिळालें नव्हतें. ते माझ्या आईप्रमाणें मजवर प्रेम करीत असत त्यांच्या अंगीं हा मातृवात्सल्याचा गुण असेल अशी मला कल्पना नव्हती. त्यांनी माझ्या सुख-सोयींची व्यवस्था उत्तम ठेवली. ज्या ज्या वेळीं आम्ही राजकीय गोष्टींची चर्चा करीत असू त्या त्या वेळीं सरकारच्या अडचणीहि ते पूर्णपणें विचारांत घेत असत यांत शंका नाहीं असें मला सरकाराला सांगावयाचें आहे, व या बाबतींत सरकारांनी माझ्यावर विश्वास ठेवावा. बारडोली व खेडा या जिल्ह्यांतील शेतकऱ्यासंबंधींहि त्यांना फार चिंता वाटे हें मला विसरता यावयाचें नाही."

### पहिला सरकारी खुलासा

गांधीजींची मुक्तता झाली त्याच दिवशीं म्हणजे ता. ९ रोजीं सरकारनेहि एक पत्रक काढून गांधींना कां सोडलें याचा खुलासा केला आहे. त्यांत ते म्हणतात कीं, "ता.१ मे या दिवशीं गांधीकडून जी तार आली त्यांत आपण २१ दिवसांचें उपोषण करणार आहों व त्या उपोषणाचा सरकाराशीं कांहीहि संबंध नसून हरिजनांच्या चळवळीशीं त्याचा संबंध आहे असें म्हटलें आहे. आपण कैदी असल्यामुळे हें उपोषण एकदम सुरू न करिता आठ दिवसांनी करण्याचें त्यांनी ठरविलें आहे. या योगानें उपोषणाच्या दिवसांत सरकारला ज्या व्यवस्था करावयाच्या असतील त्या करता येतील व गोंधळ होणार नाही. असें त्यांचें म्हणणें आहे. या उपोषणाचा उद्देश व प्रकार पाहून विशेषतः त्यांची जी मनोवृत्ति त्यात दृष्टीस पडते ती पाहून सरकारानें त्यांना बंधमुक्त करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें आज ते मोकळे झाले आहेत."

### श्री. अणे यांचें पत्रक

राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. बापूजी अणे यांना कायदेभंग तहकूब करण्यास गांधींनीं आपल्या पत्रकांत विनंति केली होती. कारण तो त्यांच्या अधिकारांतील प्रश्न होता. श्री. अणे यांनीं विचार करून त्यांच्या विनंतीला मान दिला व कायदेभंग तहकूब केल्याबद्दल पुढीलप्रमाणें पत्रक काढलें. ते म्हणतात "महात्मा गांधींच्या उपोषणाची वार्ता ऐकून सर्व देशभर चिंतेची काळीकुट्ट छाया पसरली आहे यांत शंका नाही. तथापि सरकारानें त्यांना बिनशर्त मुक्त केलें व आपलें उपोषणाचें व्रत खाजगी स्वतंत्र नागरिक या नात्यानें पार पाडण्यास परवानगी दिली हें पाहून जगभर पसरलेल्या त्यांच्या स्नेह्यांना व अनुयायांना आनंद वाटल्याशिवाय राहणार नाही. त्यांची सुटका झाल्याबरोबर काल रात्रीं त्यांनी जें एक पत्रक काढलें त्यांत कायदेभंगाची चळवळ कशी चालली पाहिजे याबद्दलचीं त्यांचीं मतें त्यांनी प्रसिद्ध केलीं आहेत. प्रत्येक कायदेभंगवाला तिकडे जरूर तें लक्ष देईलच याबद्दल मला शंका नाही. त्यांच्या उपोषणाच्या कालांत कायदेभंग तात्पुरता आपोआपच थांबेल यांत शंका नाही; आणि म्हणून त्यांनीं मला एक महिना अगर सहा आठवडेपर्यंत कायदेभंग तहकूब करण्यास सांगितलें आहे.

### तहकुबी कीं बंदी

मी गेल्या चार महिन्यांत जी गोष्ट अनेकवार कायदेभंगाच्या चळवळीवर आक्षेप घेणाऱ्या लोकांना सांगत आलों आहे तीच गांधींनी आपल्या पत्रकांत लिहिली आहे. 'कायदेभंग करणारे लोक जोंपर्यंत तुरुंगांत खितपत आहेत, तोंपर्यंत कायदेभंग मागे घेणें शक्य नाही; व सरदार वल्लभभाई पटेल, पं. जवाहरलाल नेहरू, खान अबदुल गफूरखान वगैरे लोक तुरुंगांत जिवंत पुरले गेले आहेत, तोंपर्यंत समेटहि होणे शक्य नाही. तुरुंगाच्या बाहेर असणाऱ्या लोकांना कायदेभंग बंद करण्याचा अधिकार नाही. ज्या वर्किंग कमिटीनें कायदेभंगाला प्रारंभ केला त्या कमिटीलाच तो थांबविणें शक्य आहे' ही ती गोष्ट होय. गांधींनी वर ज्या पद्धतीचें स्पष्टीकरण केलें आहे तीच पद्धति बरोबर आहे व राष्ट्रीय सभेच्या प्रत्येक सभासदानें तिचाच स्वीकार केला पाहिजे. कारण राष्ट्रीय सभेची घटनाहि तेंच सांगते. परंतु कायदेभंग बंद करणें ही गोष्ट वेगळी व तो कांही विशिष्ट हेतु साध्य करण्याकरितां कांही मर्यादित काळापर्यंत तहकूब करणें ही गोष्ट वेगळी. तहकुबीची सुद्धां जबाबदारी मोठी आहे यांत शंका नाही.

### मंगळवारपासून कायदेभंग तहकूब

ही तहकुबीची सूचना ज्यांच्याकडून आली ते सध्याच्या कायदेभंगाच्या चळवळीचे जनक तर आहेतच. पण कायदेभंगाची मूळ कल्पनाहि त्यांनीच काढली. इतकेंच नव्हे तर या चळवळीचें शास्त्र व त्याचा आचार या संबंधी बोलणारा त्यांच्या इतका दुसरा अधिकारी मनुष्य नाही. अशा गृहस्थांकडून ही तहकुबीची सूचना आली असल्यानें तें एक माझ्या हातीं शस्त्रच आलें आहे. उपोषणाच्या कालांत सर्व वातावरण शुद्ध राहावें व त्यांत कोणता-

हि प्रक्षोभ होऊं नये हेंच योग्य आहे. एका मोठ्या कार्याकरिता महात्माजी उपोषण करीत आहेत. व त्या उपोषणांत त्यांना ज्या अन्नाची जरूरी आहे, तें अन्न म्हणजे ईश्वराची कृपा हें होय त्या कृपेच्या बळावरच ते जिवंत राहूं शकतील. म्हणून या काळांत सर्वांना शुद्ध अंतःकरणाने ईश्वराची प्रार्थना करण्यास व करुणा भाकण्यास संधि मिळावी म्हणून मंगळवार ता. ९ मे पासून सहा आठवडेपर्यंत कायदेभंगाची चळवळ तहकूब केल्याचें मी जाहीर करतों. मला शेवटीं पुनः एकवार एवढीच विनंति करावयाची आहे कीं, या कालांत हरिजनांच्या उद्धाराचें जें काम ज्याला आवडेल तें त्यांने आपली शिकस्त करून करावें, व या कार्याला मदत करावी.''

## सरकारचा हट्ट व दुराग्रह

कायदेभंगाच्या तहकुबीची महात्मा गांधी व श्री. अणे यांनी ता. ८ व ता. ९ ला वरील पत्रकें काढलीं.समेटाच्या उद्देशानेंच त्यांनी आपला हात पुढे केला होता. पण हट्टाने व दुराग्रहाने सरकारने तो झिडकारला असे ता. ९ रोजीं उत्तरादाखल हिंदुस्थान सरकाराने जें पत्रक प्रसिद्ध केलें त्यावरून दिसतें. या पत्रकात सरकार म्हणतें कीं, ''गांधींनीं सुरू केलेल्या दीर्घ उपोषणाशीं सरकाराचा संबंध नसून फक्त हरिजनाच्या उद्धाराच्या चळवळीशीं त्याचा संबंध असल्यामुळे गांधींची सरकाराने मुक्तता केली हे खरें; पण यामुळे कायदेभंगाबद्दल जे लोक आज कैदखान्यांत आहेत त्यांच्या सुटकेच्या बाबतींत किंवा जे लोक उघड रीतीनें अगर कांही अटी संभाळून कायदेभंगाच्या चळवळीस मदत करतात त्यांच्या संबंधी सरकाराने पूर्वी ठरविलेल्या धोरणांत कांही फरक केला आहे असा अर्थ नाही.

## सुटकेच्या अटी

गेल्या एप्रिलच्या १ ल्या तारखेस ले. असेंब्लीमध्ये गृहमंत्र्यांनी राजबंद्यांच्या सुटकेबाबतचें सरकारचें धोरण जाहीर केलें होतें. त्या भाषणांत त्यांनी असें सांगितलें होतें कीं, 'जर राष्ट्रीय सभेला लढा चालू न ठेवण्याची खरोखर इच्छा नसेल तर ती गोष्ट अगदीं स्पष्टपणें कां मांडली जात नाही ? जर सरकारचें धोरण त्यांना आवडलें नाही तर कायदेभंगाची चळवळ पुनः सुरू केली जाईल असा धाक सरकारास घालण्याचा तर त्यांचा विचार नसेल ना? कायदेभंगाची चळवळ पुनः सुरू केली जाईल असला धाक ते घालीत असतांना सहकार्य होणें शक्य नाही. जरूर तितक्या काळापेक्षा अधिक काळपर्यंत या कैद्यांना तुरुंगांत ठेवण्याची आम्हांस इच्छा नाही. परतु, त्यांच्या मुक्ततेमुळे कायदेभंगाची चळवळ पुनः चालू होणार असेल तर त्यांना न सोडण्याचा आमचा दृढ निश्चय आहे. योग्य वेळ येण्यापूर्वी त्यांना सोडून पुनः कटकट उत्पन्न करण्याची सरकाराची इच्छा नाही.'

## शरणचिठी पाहिजे

हौस ऑफ कॉमन्समध्ये सेक्रेटरी ऑफ स्टेट यांनी आमच्या धोरणाचा खुलासा मोजक्या शब्दांत केला आहे. ते म्हणतात 'आम्हांला अशी खात्री पटली पाहिजे की, त्यांच्या मुक्ततेमुळे कायदेभंगाची चळवळ पुनरुज्जीवित होणार नाही.' राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांबरोबर वाटाघाटी सुरू व्हाव्या म्हणून तात्पुरती कायदेभंगाची चळवळ तहकूब करण्याने सरकाराने घातलेल्या अटी पुऱ्या होऊं शकत नाहीत. कारण, कायदेभंगाची चळवळ निश्चितपणें मागे घेतली गेली असा त्याचा अर्थ होत नाही.

या बेकायदा चळवळीच्या बाबत समेट व्हावा या उद्देशाने किंवा राष्ट्रीय सभेने कायदेभंग मागे घ्यावा या हेतूने किंवा राजबंदींची मुक्तता व्हावी एतदर्थ राष्ट्रीय सभेशीं कोणतीहि वाटाघाट करण्याची सरकाराची तयारी नाही.''

## देशांतील शांतता

राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. अणे यांच्या पत्रकानुसार महाराष्ट्र प्रांतिक कमिटी व निरनिराळ्या प्रांतिक कॉंग्रेस कमिटया यांनी डिस्ट्रिक्ट कॉंग्रेस कमिट्यांना व इतरांना कायदेभंग बंद ठेवण्यास हुकूम काढले आहेत. सर्वांनी हरिजनांच्या चळवळींत लक्ष घालून त्या चळवळींतील स्थानिक पुढाऱ्यांशी व संस्थांशीं सहकार्य करावें अशी त्यांची अपेक्षा आहे. आज महात्माजींना याच पुण्याईच्या अन्नाची जरूरी आहे. गांधींना आयुरारोग्य मिळावें म्हणून नित्यशः सर्वत्र प्रार्थना करण्यांत येत आहेत.

गांधीजी लेडी ठाकरसी यांच्या प्रासादाच्या तिसऱ्या मजल्यावरील उघड्या जागेंत खाटेवर पडून असतात. जवळ श्री. सौ. नायडू श्री. ब्रजकिशोर वगैरे मंडळींचा पहारा असतो. ते दिवसांतून अनेक वेळां मीठ घालून अगर सोडा घालून पाणी पितात व शक्य तों शरीराची हालचाल करीत नाहीत. स्नान वगैरे मुद्दां उचलून नेऊन घालण्यांत येतें. सोमवारचा पहिला दिवस ठीक गेला. त्यांना झोपहि चांगली आली. नित्याप्रमाणें मंगळवारींहि प्रार्थना, सूत कातणें वगैरे चालूच होतें.परंतु सायंकाळीं त्याना वांति झाली व त्यामुळे जीव घाबरला पण पुढे झोप लागली व बरें वाटलें. बुधवारींहि ते ठीक होते. डॉ. मेथा हे मालीश करतात. मुंबईचे डॉ. देशमुख यांनी बधवारीं पुण्यास येऊन त्यांची प्रकृति तपासली.

# यंदाच्या पावसाचें अनुमान

### गतसालाचा अनुभव

गतवर्षी जें पावसाचें भविष्य केलें होतें तें बहुतांशीं बरोबर जुळलें. होसरित्ती पंचांगांत व इतरहि कांहीं पंचांगांत गतवर्षी दुष्काळाची भीति प्रकट केली होती; पण ती खोटी ठरली व एकंदरींत पाऊस नेहमींपेक्षा कमी न पडतां उलट अधिकच पडला. मात्र पावसाची सुरुवात जोरांत झाली नाहीं. तथापि जूनच्या शेवटच्या आठवड्यापासून अंदाजाप्रमाणे पावसाला जोर चढला. जुलै,ऑगस्ट,सप्टेंबर व ऑक्टोबर या महिन्यांतील पावसाचा अंदाज खरा ठरला.नोव्हेंबर व डिसेंबर या महिन्यांतील पावसाचें अनुमान कोणीच केलें नव्हतें; तें आमच्या अंदाजाप्रमाणे बरोबर उतरलें. असो.

### चालू सालाचें अनुमान

आता चालू सालाचे पावसाचे योग काय दर्शवितात तें पाहूं. चालू सालांतील महत्त्वाचे योग खालीलप्रमाणे आहेत.

| | |
|---|---|
| ता. ९–२–३३ | रविबुधयुति |
| २४–३–३३ | ,, |
| २१–४–३३ | रविशुक्रयुति |
| १७–५–३३ | मंगळनेपच्युनयुति |
| २९–५–३३ | रविबुधयुति |
| ५–६–३३ | गुरुमंगळयुति |
| ८–६–३३ | बुधशुक्रयुति |
| ३०–७–३३ | रविबुधयुति |
| ५–८–३३ | शनिरविप्रतियुति |
| १७–८–३३ | गुरुशुक्रयुति |
| १२–९–३३ | रविबुधयुति |
| २७–९–३३ | गुरुरवियुति |
| १९–१०–३३ | हर्शल रविप्रतियुति |
| १९–११–३३ | रविबुधयुति |
| २१–१२–३३ | शनिशुक्रयुति |

या सर्व युत्यांचा विचार करतां, गुरु व शुक्र या ग्रहांच्या स्थितीवरून चालू सालाचा पावसाळा १९०९ सालाच्या पावसाळ्यासारखा होईल असा अंदाज आहे.

वर दिलेल्या योगांपैकीं पहिले तीन योग आतापर्यंत होऊन गेले आहेत व त्यांतल्या रविशुक्रयुतीने तर गेल्या महिन्यांत सर्वत्र आपला प्रभाव गाजविला. आता यापुढे रविबुधयुति मे-अखेर असल्याने, मे महिन्यांत पावसाचे योग फारच थोडे आहेत. जूनच्या प्रारंभींहि गुरु–मंगळयुति असल्याने झडीच्या पावसाला सुरुवात उशीरानेच होईल. तथापि मे-अखेरीस व जूनच्या प्रारंभीं वळवाचे पाऊस कांही ठिकाणीं पडतील.

कोंकणपट्टींत पावसाळ्याची सुरुवात ता. ८ जूनपासून होईल व मुंबईस ता. १३ पासून पावसाचीं चिन्हें दिसूं लागतील. तथापि ता. २१ पर्यंत पावसाचा जोर कोठेच विशेष दिसणार नाहीं. ता. २१ जूनपासून पाऊस सर्वत्र पडूं लागेल. ता. ९ जुलैपासून एक महिना पावसाला जोर विशेष आहे. या एका महिन्यांत सर्वत्र भरपूर पाऊस पडेल. त्यानंतर ऑगस्ट १० ते सप्टेंबरच्या प्रारंभापर्यंत पावसाचा जोर कमी होईल. सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्यांत आणि शेवटच्या आठवड्यांत पाऊस सर्वत्र जोराचा पडेल. ऑक्टोबरच्या प्रारंभापासून तों नोव्हेंबर ता. १० पर्यंत पाऊस कमजोर आहे. नोव्हेंबर ता. १० च्या पुढे पावसाला पुनः थोडासा जोर चढून, नोव्हेंबरच्या तिसऱ्या आठवड्यात बराच पाऊस पडेल. डिसेंबरांत यंदा पाऊस नाहींच म्हटल्यास चालेल. जानेवारी महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यांत थोडासा पाऊस पडून पावसाळा समाप्त होईल. त्यानंतर ता. १७ जानेवारीला शनिमंगळयुति असून, ती अनिष्ट आहे व इतरहि कांहीं अनिष्ट योग त्यानंतर येत आहेत. पण त्यांचा परिणाम १९३४ सालीं दृग्गोचर होईल. चालू सालाच्या पावसाशीं त्या अनिष्ट योगाचा संबंध नाहीं.

### पावसाचें तारीखवार अनुमान

मे—९, १७, २६, २९, ३१.

जून—३, ८, १२, १३, २१, २२, २४, २७, २९.

जुलै—१, ६, ९, १०, ११, १४, १५, १६, २२, २३, २५, २६, २७.

ऑगस्ट—३, ५, ६, ७, ८, ९, १२, १९, २१, २३, २४.

१९सप्टेंबर—१, २, ३, ५, ६, १३, १७, १८, , २१, २२, २३, २४, २५, २७, २९, ३०.

ऑक्टोबर—१, ९, १३, २१, २८.

नोव्हेंबर—१०, ११, १८, २२, २५.

डिसेंबर—२०, २१, २२.

# ब्रम्हदेशाच्या विभक्तीकरणाचा ब्रम्हघोटाळा !

ब्रह्मदेशाच्या विभक्तीकरणाचें भिजत घोंगडें अद्यापि तसेंच पडून आहे. इच्छा असली म्हणजे मार्ग सांपडतो असें म्हणतात. ब्रिटिश सरकाराला ब्रह्मी जनतेनेंच हा प्रश्न आपल्या मनाप्रमाणे सोडवावा असें अन्तःकरणपूर्वक वाटलें असतें, तर विभक्तीकरण कीं संयुक्तीकरण अशा पेंचांत तो देश सांपडलाच नसता. परंतु ब्रिटिश सरकाराची इच्छाच अशी कीं, ब्रह्मदेशाने हिंदुस्थानापासून फुटून निघून आपला स्वतंत्र संसार थाटावा व त्या संसारांतील कर्तेपणा इंग्लंडाच्या हातीं राहावा. विभक्तीकरणाचा बूट स्पष्ट शब्दांनीं प्रथम सायमन कमिशनाने जाहीर केला. त्याने आपल्या अहवालांत विभक्तीकरणाची आवश्यकता निवेदन करतांना वर्णविद्वेषाचें बीज पेरलें. ब्रह्मदेशाची भौगोलिक रचना, त्यांतील लोकांची संस्कृति, धर्म, वंश हीं सर्व हिंदुस्थानाशीं विसदृश असल्यामुळे, आज नाहीं उद्या, केव्हा तरी, तो देश हिंदुस्थानापासून तोडलाच पाहिजे असें सायमनसाहेबांनीं आपल्या करबी कलमाने लिहून ठेविलें.

विभक्तीकरणाचा प्रश्न आताच इतका नेटाला लागण्याचें कारण हिंदुस्थानाला लवकरच देण्यांत येणाऱ्या राजकीय सुधारणा हें होय. आतापर्यंत ब्रह्मदेश हा हिंदुस्थानाचा मुंबई, मद्रास, बंगाल इत्यादि प्रांतांप्रमाणे एक प्रांत समजला जात असे. हिंदुस्थानांतहि लवकरच संयुक्त राज्यघटना स्थापन करण्यांत येणार असल्याचें पांढऱ्या खलित्याच्या द्वारें ब्रिटिश सरकाराने जाहीर केलं आहे. पांढऱ्या खलित्यांत दिलेल्या आश्वासनाप्रमाणे हिंदुस्थानांत संयुक्त राज्यघटना सुरू व्हावयाची तर सर्व घटक प्रांतांनीं मध्यवर्ती सत्तेच्या छत्राखालीं एकत्रित होणे क्रमप्राप्त ठरतें. मध्यवर्ती सत्तेची ही पाखर विशिष्ट महत्त्वाच्या प्रश्नांबाबतच प्रांतांवर राहील, मामुली कारभाराच्या बाबतींत ते ते प्रांत स्वतंत्रपणाने मुखत्यार असतील. नव्या सुधारणांनी प्रांतांना स्वायत्तता मिळणार आहे. त्या दृष्टीने हिंदुस्थानाच्या एकछत्री अंमलाखाली नांदावयाचें का स्वतंत्र होऊन म्हणजे हिंदुस्थानापासून फुटून आपली निराळीच सुभेदारी निर्माण करावयाची हें ठरविण्याची ब्रह्मदेशाला हीच वेळ आहे. सध्या इंग्लंडमध्ये हिंदी सुधारणांच्या कायद्यांतील एक एक कलम लिहिलें जात आहे. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीची बैठक भरून उद्यापासून साक्षीपुराव्याला सुरुवातहि होणार आहे. अशा वेळीं ब्रह्मदेशाने हिंदुस्थानापासून फुटण्याचा किंवा त्याच्याशीं संलग्न राहाण्याचा निर्णय करावयास पाहिजे होता. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, ता. २५ एप्रिल ते ६ मे पर्यंत चाललेल्या ब्रह्मी कायदेमंडळाच्या खास बैठकींत कोणताच निर्णय लागू शकला नाही.

पाहुण्याच्या हातून परस्पर साप मारविण्याच्या युक्तीप्रमाणेंच ब्रिटिश सरकाराला ब्रह्मी लोकांच्या हातूनच ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून फोडून काढावयाचा आहे. या धोरणाने दोन गोष्टी साधतात; एक तर ब्रह्मी लोकांना स्वयंनिर्णयाचा हक्क दिल्याचा डांगोरा जगांत पिटतां येतो, आणि दुसरी गोष्ट म्हणजे स्वतःचा राजकीय हेतु साध्य करता येतो. विभक्तीकरणाच्या बाबतींत ब्रिटिश सरकारच्या पोटांतलि एक राजकीय हेतु असा कीं, आज नाही उद्या हिंदुस्थानाला स्वराज्य मिळून तो देश इंग्लंडाच्या हातून जाणार. तो गेला तरी आशिया खंडांतील इंग्लंडाच्या राजकीय वर्चस्वाला धोका पोहोचता कामा नये. त्यासाठी ब्रह्मदेशाची चौकी हिंदुस्थानाच्या दाराशीं बसविलीच पाहिजे. हिंदी महासागरांत लष्करी ठाण्याच्या दृष्टीने सिंगापूरचें जें महत्त्व तेंच महत्त्व भावी कालांत आशियामध्ये ब्रिटिश साम्राज्यशाहीचें वर्चस्व राखण्यासाठीं ब्रह्मदेशाला येणार आहे.

ब्रह्मदेश आपल्या कबेंत ठेवण्यांत ब्रिटिशांचें आर्थिक धोरणहि आहे. आज हिंदी व्यापाऱ्यांच्या चुरशीमुळे ब्रिटिश व्यापाऱ्यांना ब्रह्मदेशाची तांदुळ व तेल या बाबतींतील बाजारपेठ पूर्णपणें हस्तगत करतां येत नाही; शिवाय हिंदी लोक ब्रह्मदेशांत सावसावकारीचाहि धंदा करतात. त्यामुळे ब्रह्मी लोकांवर त्यांचेंच सामाजिक दृष्ट्या अधिक वजन राहतें ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या डोळ्यांत हिंदी लोकांचें हें महत्त्व सलत आहे, त्यांचा हा कसा कांटा काढतां येईल इकडे त्यांचें अहर्निश लक्ष आहे. यावर एक उपाय म्हणून ब्रिटिश अधिकाऱ्यांनी आणि व्यापाऱ्यांनीं ब्रह्मी लोकांच्या मनांत हिंदी लोकांविषयींच्या द्वेषबुद्धीचें बीं पेरलें. आणि आज यू बा पे यांचा विभक्तीकरणवादी जो पक्ष प्रसिद्ध आहे त्याचें लक्षण तर हिंदविद्वेष हेंच आहे. ब्रिटिश सरकाराची ही कुटील भेदनीति लक्षांत आल्यामुळेंच डॉ. बा मा, यू चित् लँग इत्यादि ब्रह्मी देशभक्तांनी विभक्तीकरणाला विरोध चालविला आहे.

कांहीं प्रसंगीं धमकावणीने एखाद्याच्या हातून काम करून घेण्यापेक्षां गोडगोड शब्दांनी त्याच्या पोटांत शिरून तें करून घ्यावें लागतें. ' आम्ही ब्रह्मदेशाची फारकत करणार ' ही चढाईची भाषा सोडून 'आपण विभक्त ब्रह्मदेशाची मामुली राज्यघटना तरी करूं या, ती घटना तयार झाल्यावर ब्रह्मी जनतेपुढें ठेवण्यांत येईल; घटना मान्य झाली तर बरेंच झालें; नाही तर ब्रह्मदेश पूर्वीप्रमाणेंच हिंदुस्थानाचा एक प्रांत म्हणून राहील व नव्या राज्यघटनेनें हिंदी प्रांतांना जे राजकीय हक्क प्राप्त होतील ते ब्रह्मदेशालाहि मिळतील.' ही नरमपणाची भाषा ब्रिटिश मुत्सद्यांनी आता सुरू केली आहे. पहिली ब्रह्मी गोलमेज परिषद भरविली गेली ती याच मायावी शब्दजालाच्या मोहिनीने. ब्रह्मी गोलमेज परिषद बोलावण्यांत ब्रिटिश सरकाराचा उघड उघड हेतु असा कीं, ब्रह्मी प्रतिनिधींकडून अप्रत्यक्ष रीत्या विभक्तीकरणाच्या तत्त्वाला मान्यता मिळवून घ्यावी.

परंतु खुद्द परिषदेंतहि थारावड्डी यू पू यासारखे कणखर वृत्तीचे मुत्सद्दी निघालेच. त्यांनी हलवून खुंटा बळकट करून घ्यावा त्याप्रमाणे अध्यक्ष लॉर्ड पील याजकडून निःसंदिग्ध भाषेंत असें वदवून घेतलें कीं, विभक्त ब्रह्मदेशाला कोणती राज्यघटना योग्य होईल या प्रश्नाच्या चर्चेत कोणत्याहि प्रतिनिधीने भाग घेतला तरी ती राज्यघटना त्याला बंधनकारक होणार नाही. हिंदुस्थानाशीं संलग्न राहावें कीं त्यापासून वेगळें निघावें हें ठरविण्यास प्रत्येक प्रतिनिधि त्याचा तो मुखत्यार आहे. परिषद जवळ जवळ दीड महिना चालू होती. परंतु फारकतवाले व बिनफारकतवाले यांच्या शाब्दिक वादापेक्षा त्यांतून कांहींच निष्पन्न झालें नाही. शेवटीं इग्लंडचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी समारोपात्मक भाषण करून विभक्त ब्रह्मदेशाच्या भावी राज्यघटनेची स्थूल मानानें रूपरेषा मांडली. मॅक्डोनाल्ड यांची ही योजना अत्यंत सदोष, अपुरी, आणि असमाधानकारक आहे. तिचें थोडक्यांत वर्णन करावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, तिजमुळे राज्यकारभाराच्या घोड्याचा लगाम गव्हर्नराच्या हातीं राहून, त्याची मोतद्दारी करण्याचा प्रसंग मात्र ब्रह्मी जनतेवर येणार आहे! आर्थिक सत्तेचा अंकुश गव्हर्नर पेलणार असून कर बसविण्याचा अधिकार तेवढा लोकांना देण्यांत आला आहे. असली करंटी राज्यपद्धति स्वीकारून ब्रह्मदेश भाग्यवंत थोडाच होणार !

मि. मॅक्डोनाल्ड यांची ही योजना प्रसिद्ध होतांच ब्रह्मदेशांत विरोधाची मोठीच लाट उसळली. पाण्यांतून अग्नि उत्पन्न व्हावा या विचित्र घटनेप्रमाणे मॅक्डोनाल्ड यांच्या योजनेमुळे फारकतवाल्यांच्याहि अंगांतूनहि विरोधाचे स्फुलिंग उडूं लागले ! फारकतवाल्यांचे पुढारी यू-बा-पे एके प्रसंगीं म्हणाले, " आमच्या प्रांतांत असे कित्येक लोक आहेत कीं, ते फारकतीला विरोधी नसले तरी ताबडतोब फारकत व्हावी असें त्यांना वाटत नाही. कारण फारकत झाल्यावर ब्रिटिश लोक ब्रह्मदेशाला वसाहतीचें स्वराज्य देतील असा त्यांना विश्वासच येत नाहीं ! " ब्रह्मदेशाच्या फारकतीसंबंधी जनतेला काय वाटते त्याचा यू-बा-पे हेच असा निर्वाळा देत आहेत. त्यावरूनहि ब्रह्मी लोकमताचा वारा कोणत्या दिशेने वाहत आहे याचा उलगडा होतो. सर्वसामान्य ब्रह्मी जनता विभक्तीकरणाच्या विरुद्ध आहे ही गोष्ट केवळ अनुमानसिद्ध आहे असें नाही, तर ती प्रत्यक्ष प्रमाणानेहि सिद्ध झालेली आहे.

पहिली ब्रह्मी गोलमेज परिषद व्हावी तशी यशस्वी झाली नाही. विभक्तीकरणाविरुद्धहि चोहोंकडून रान उठूं लागलें. हें पाहून मि. मॅक्डोनाल्ड यांनी जाहीर केलें कीं, ब्रह्मदेशाने एक तर हिंदुस्थानापासून फुटून निघावें किंवा हिंदुस्थानाच्या संयुक्त घटनेंत बिनशर्त शिरावे. या प्रश्नाचा निर्णय लावण्यासाठीं ब्रह्मी कायदेमंडळाच्या नव्या निवडणुकीहि करण्यांत आल्या. परंतु याहि बाबतींत दुर्दैवाने ब्रिटिश सरकाराला चांगलाच तडाखा दिला. निवडणुकींत बिनफारकतवाले प्रचंड बहुमताने निवडून आले. पुढे कायदेमंडळाची बैठक सुरू झाल्यावर ता. २३ डिसेंबर १९३२ रोजीं असा ठराव करण्यांत आला कीं, मुख्य प्रधानांनी सुचविलेल्या राज्यघटनेनुसार ब्रह्मदेश विभक्त करण्यांत येऊं नये. ब्रह्मदेश विभक्तच करावयाचा असेल तर त्याला संपूर्ण जबाबदारीचें स्वराज्य देण्यांत आलें पाहिजे. हिंदी संयुक्त राज्यघटनेंत शिरण्यास ब्रह्मदेश तयार आहे. त्याला तींतून फुटून निघण्याची सवलत मात्र देण्यांत यावी. मि. मॅक्डोनाल्ड यांना ब्रह्मदेशाने फुटून तेवढें निघावयास पाहिजे. त्याला जबाबदारीचें स्वराज्य देण्याची मात्र त्यांची मुळीच इच्छा नाही. विभक्तीकरणाला अनुकूल असणाऱ्या पक्षालाहि त्यांची ही स्वराज्ययोजना मान्य नाही. त्यांनी दोन अटींचा खोडा तयार केला खरा; पण त्यांतून सुटण्याची ब्रह्मदेशाने वरील युक्ति लढविली.

ब्रह्मी कायदेमंडळाच्या ठरावाने विभक्तीकरणाचा जुळवीत आणलेला घाट बिघडतो हें ओळखून भारतमंत्र्यांनी त्या ठरावावर 'संदिग्ध' असा शेरा मारला. बिनशर्त विभक्त किंवा बिनशर्त संयुक्त अशा रोकड्या शब्दांत त्यांना ब्रह्मी कायदे-

मंडळाचा निर्णय हवा होता. याच हेतूनें ब्रह्मी कायदेमंडळाची ता. २५ एप्रिल रोजीं खास बैठक भरविण्यांत आली. बैठकीपुढें मुख्यतः दोन प्रश्न निर्णयासाठीं ठेवण्यांत आले. ते दोन प्रश्न असेः-- ( १ ) ब्रह्मदेशाची फारकत करण्यांत यावी. ही फारकत झाल्यावर मि. मॅक्डोनाल्ड यांच्या योजनेप्रमाणें त्याची राज्यघटना असावी. ( २ ) पहिला प्रश्न मान्य नसल्यास इतर प्रांताप्रमाणे ब्रह्मदेशहि हिंदुस्थानाच्या संयुक्त घटनेंत समाविष्ट करण्यांत यावा. वस्तुतः या दोनहि प्रश्नांचा विचार निर्विकार बुद्धीने व्हावयास पाहिजे होता. विशेषतः, सरकारी पक्षानें निःपक्षपातीपणा स्वीकारून कायदेमंडळांतील चर्चेला गंभीर वळण द्यावयास पाहिजे होतें. परंतु ब्रह्मी सरकाराचे फडणवीस सर जे. ए. मॉंग गी यांनी कायदेमंडळाच्या सदर बैठकींत चढेलपणाचें भाषण करून बिनफारकतवाल्यांवर अवास्तव तोंडसुख घेतलें. त्यांनी फारकत केली असतां व केली नसतां ब्रह्मदेशाचा आर्थिक नफा व तोटा किती होईल याचा तुलनात्मक विचार ब्रह्मी कायदेमंडळापुढे मांडून फारकत न केल्यास ब्रह्मदेश आर्थिक दृष्ट्या रसातळाला जाईल व हिंदी भांडवलवाल्यांचें त्याजवर वर्चस्व राहील असें भासविलें. अध्यक्षांनी फारकतवाल्यांच्या भाषणाला कालमर्यादेची गवसणी घातली नाही व विभक्तीकरणाच्या विरोधी पक्षाला आपला ठराव व त्यावरील समर्थन मांडण्यास सवड दिली नाही. खेरीज गव्हर्नरांनी कारण नसतां, आगाऊच बैठकीच्या समाप्तीचा दिवस जाहीर केला. त्यामुळे फारकतवाल्यांना कालहरणाचा कपटी डाव खेळण्यास पूर्ण वाव मिळाला.

फारकतवाले, सरकार व अध्यक्ष यांजमध्ये विभक्तीकरणविरोधी ठराव चर्चेला येऊंच द्यावयाचा नाही, बैठकीचे दिवस विभक्तीकरणाच्या ठरावाच्या केवळ चर्चेतच संपवावयाचे असा कटच झाल्यासारखा दिसला. ता. २५ एप्रिल ते ता. ६ मेपर्यंतच्या दोन आठवड्यांत एकेका वक्त्याची रसवन्ती सहस्रधारा फुटल्याप्रमाणे आठ--आठ तास एकसारखी वाहात होती. आणि वाणी इतकी शिणवून फारकतवाल्यांनी पुरुषार्थ कोणता साधला म्हणून विचारालतर त्यांनी ब्रिटिश सरकाराचा कावा साधला! फारकतवाल्यांना स्वमताची एवढी चाड असती तर त्यांनी ठरावावर मतें घेऊन तो पसार करून घेतला असता. परंतु विभक्तीकरणाचा ठराव पसार करून घेतां येत नाही असें स्पष्ट दिसून आल्यामुळे फारकतवाल्यांनी बिनफारकतवाल्यांच्या न्याय्य हक्कांचें अतिक्रमण केलें. विशेष चीड आणणारी गोष्ट अशी की, ही सर्व तक्रार तारेच्या द्वारें गव्हर्नर व गव्हर्नर-जनरल यांना कळविण्यांत आली असताहि त्यांपैकीं कोणींच फारकतवाल्यांच्या पोरकट लीलांना पायबंद घातला नाही.

फारकतवाल्यांनी कालहरणाची शक्कल लढवून बिनफारकतवाल्यांचा कोंडमारा केला तरी बैठकीनंतर विभक्तीकरणविरोधी पक्षाने अध्यक्षांकडे ४५ सभासदांच्या सह्यांनी जो अर्ज पाठविला त्यावरून ब्रह्मी जनतेला विभक्तीकरण मान्य नाही, इतकेंच नव्हे तर हिंदी संयुक्त घटनेंत शिरण्याचीच तिची इच्छा आहे, ही गोष्ट सिद्ध होते. ता. १३ मे रोजीं डॉ. बा मा यांनी भारतमंत्र्यांना जी तार पाठविली आहे तींतहि 'कायदेमंडळांतील बहुसंख्य पक्षाचें मत हिंदी संयुक्त घटनेंत राहाण्यालाच अनुकूल आहे, म्हणून हिंदी राज्यघटनेंत ब्रह्मदेशाच्या दृष्टीने योग्य त्या सुधारणा करण्याची सवलत त्याला ताबडतोब देण्यांत यावी' असें म्हटले आहे. प्रत्यक्ष कायदेमंडळांत विभक्तीकरणविरोधी ठराव पसार होऊं शकला नसला तरी वरील प्रकारावरून ब्रह्मी जनतेचें मत कळून आल्याशिवाय राहात नाही.

ब्रह्मी कायदेमंडळाची खास बैठक बोलावूनहि तींत विभक्तीकरणाला अनुकूल किंवा प्रतिकूल असा कांहीच निर्णय लागू शकला नाही ही गोष्ट सरकाराला तशी ब्रह्मी प्रतिनिधींनाहि लांछनास्पद आहे. भेदनीतीच्या कारस्थानापासून सरकाराने तरी काय मिळविलें? ब्रिटिश सरकाराला ब्रह्मी जनतेकडून विभक्त किंवा संयुक्त असा निश्चित निर्णय पाहिजे होता, तर त्यांनी फारकतवाल्यांच्या बालिश वर्तनाला आळा घालून विभक्तीकरणविरोधी पक्षाला संधि द्यावयास पाहिजे होती. म्हणजे ब्रह्मदेशांत माजलेला ब्रह्मघोटाळा मिटला असता. पण त्यांना शेवटचा निर्णय आपल्या हातीं ठेवावयाचा असल्यामुळे त्यांनी हा ब्रह्मघोटाळा माजू दिला असेंच म्हणावें लागतें.

खरें पाहतां, मि. मॉंग मॉंगजी यांनी गेल्या फेब्रुवारींत म्हटल्याप्रमाणें हा प्रश्न अगदीं घरगुती स्वरूपाचा असून तो हिंदी व ब्रह्मी लोकांनी आपसांतच निकालांत काढणें योग्य होय. मि. मॅक्डोनाल्ड विभक्तीकरणाचीच तेवढी तार छेडीत आहेत पण त्यांतून स्वराज्यदानाचा स्वर मात्र काढीत नाहीत. अशी स्थिति असतांहि कांही ब्रह्मी पुढाऱ्यांच्या डोक्यांत ब्रिटिशांच्या कुटिल कारस्थानांचा प्रकाश अजूनहि पडत नाही. त्यांना अजूनहि हिंदी लोकांपेक्षा ब्रिटिश लोकच जवळचे स्नेही

वाटतात. परंतु त्यांनी हें पक्कें लक्षांत ठेवावें कीं, ब्रह्मदेशाचा खराखुरा राजकीय उद्धार व्हावयाचा असेल तर तो हिंदी संयुक्तघटनेंत शिरण्यापासूनच होणार आहे, इतके त्या दोन देशांचे व्यापारविषयक व राजकीय ऋणानुबंध निगडित आहेत. ही वस्तुस्थिति लक्षांत न घेता फारकतवाले ब्रिटिश मुत्सद्यांशीच तह करतील तर ब्रह्मदेशांचा आर्थिक आणि राजकीय विनाश ओढवल्याशिवाय राहाणार नाही.

# रायगडावरील सिंहासन

(रायगड स्मारक मंडळाकडून)

रायगड हें शिवाजीमहाराजांच्या राजधानीचें ठिकाण व मराठशाहीच्या संस्थापनेचें आद्यपीठ. तेथेंच महाराजाचा राज्याभिषेक झाला आणि तेथेंच तीसपस्तीस वर्षांच्या धामधुमी नंतर त्यांनी आपला देह ठेवला. अर्थात सिंहासनाची मूळ जागा आणि महाराजांची दहनभूमि अशीं दोनहि अत्यंत महत्त्वाचीं स्थलें रायगडावर आहेत. यामुळे रायगड हें महाराष्ट्रीयांचें अत्यंत आवडतें क्षेत्र झालें आहे.

कुलाबा जिल्हा लोकल बोर्डानें या दोन स्थलांपैकीं महाराजांच्या दहनभूमीचा जीर्णोद्धार करण्याचें श्रेय घेतलें. बोर्डानें रायगड-स्मारक कमिटीशीं सहकार्य केलें व लोकांकडून मदत मागून महाराजांच्या मूळच्या समाधीवर एक टुमदार छत्री उठविली. त्यानें गडावरच उतारूंच्या सोयीची धर्मशाळा बांधली; पायथ्याशीं पाचाडास एक विहीर व धर्मशाळा बांधली; पाचाडापासून गडावर जाण्याचा दोन अडीच मैलांचा चढावाचा रस्ता साफसूफ केला; आणि महाडापासून नात्यापर्यंत सडक बांधली. आता तेथून थेट पाचाडापर्यंत आंखणीचें काम चालू आहे, तेंहि लवकरच पुरें होईल.

## उदार देणग्या

रायगडावरील छत्रीचें वगैरे काम होऊन पांचसहा वर्षे होऊन गेलीं. तेवढ्या मुदतींत नाना प्रकारची मंडळी गडावर जाऊन महाराजांच्या राजधानीचें दर्शन घेऊन पावन झाली. कित्येक धनिकांच्या नजरेस ज्या ज्या उणीवा आल्या त्यांचें निराकरण करण्याच्या सदिच्छेनें चारपांच मोठ्या देणग्याहि मिळाल्या. (१) महाराजाच्या छत्रीजवळच त्यांच्या कुत्र्याची म्हणून समजली जाणारी एक छोटीशी छत्री आहे. त्या वाघ्या कुत्र्याचें स्मारक करण्याकरिता हिज हायनेस सर तुकोजीराव होळकर(इंदूर) यांनी रुपये तीन हजार दिले. (२) महाराजांच्या छत्रीलगतच जुनी दगडी धर्मशाळा आहे. तिच्या दुरुस्तीकरिता श्रीमती सौभाग्यवती शर्मिष्ठादेवी होळकर यांचेकडून रुपये दोन हजारांची देणगी मिळाली. (३) हल्लीची नवी धर्मशाळा झाली आहे, तिच्या नजिक शिरकाई अगर भवानी या नांवाची अष्टभुजादेवीची मूर्ति बहुतांशीं उघड्यावरच आहे. तिजवर मंदिर बांधण्यासाठी म्हणून अहमदाबादचे श्री. गणेश वासुदेव मावळणकर यांनी नऊशें रुपये दिले आहेत व (४) गंगासागर तलाव, कीं ज्याचें पाणी सर्व लोकांस पिण्यासाठीं वापरतात त्याच्या दुरुस्तीसाठीं राजस्नुषा कमलादेवी गायकवाड यांनी सातशें रुपये दिले आहेत.

गडावर गंगासागर तलाव एवढी एकच चांगल्या पाण्याची जागा असल्यामुळे माणसांप्रमाणेच गडावर भटकणारीं जनावरें, गाई, बैल वगैरे तेथेंच पाण्यासाठीं येतात. या तलावांत जनावरांनी उतरण्यासारखीं दोन ठिकाणें असून तीं जरा बिकट असल्यामुळे क्वचित अपघात होतात. तेवढीं दोन दारें कठडे बांधून बंद करावीं व जमेल त्याप्रमाणें जनावरांना बिनधोक्यानें पाणी पिण्याची सोय करून द्यावी अशी देणगीदारांच्या मनांतील योजना आहे.

## सिंहासनाचें संरक्षण

या गोष्टीशिवाय आणखी एक महत्त्वाचें व सुसंरक्षणीय स्थल गडावर राहिलें आहे. तें महाराजांच्या मूळ सिंहासनाचें स्थान होय. त्याकडे दानशूर धनिकांचें लक्ष अद्यापपर्यंत वेधलेलें दिसत नाही. हें स्थल म्हणजे बहुतांशीं पडिक व उजाड पडलेलें सभास्थान होय. हा मोठा चौक पूर्वाभिमुख आहे. याच्या सभोंवार तट आहे व पश्चिमेच्या बाजूला दोन थरांनी बांधलेला चबुतरा आहे. चबुतऱ्याच्या मध्यभागीं महाराजांच्या सिंहासनाची जागा उघडी उन्हांत, पावसांत, थंडीवाऱ्यांत हळूहळू झडून झिजून झिरपून नाश होण्याच्या मार्गांत आहे. या बाबतींत मुंबईच्या एका सहृदय सद्गृहस्थांचें पत्र याच अंकांत दिलें आहे. या जागीं महाराजांचें महत्त्वाचें स्मारक होणें इष्ट आहे अशी कित्येकांची आग्रहाची सूचना आहे. आणि तिकडेहि लक्ष देणें अपरिहार्य आहे. या कामासाठीं अद्यापि देणगी आलेली नाही. रा. विंझे यांजकडून १०० रु. चा पहिला हप्ता आला आहे व आणखीहि रुपये जमा होतील. परंतु रायगड या राजधानीच्या क्षेत्राला अनुरूप असें हें

सिंहासनाचें स्थान असून त्याच्या डागडुजीचें कार्य अवश्य करण्यासारखें आहे.

### श्री. नाझीम यांची भेट

रायगड व त्यांतील स्थलें हीं हिंदुस्थानसरकारच्या नियमांप्रमाणें संरक्षित स्मारक (Protected monument) असून त्यांची दुरुस्ती वगैरे करण्यासाठी त्या सरकारच्या अधिकाऱ्यांची परवानगी लागते. यामुळे वर सांगितल्याप्रमाणे जरी कुलाबा लोकल बोर्डाच्या हातांत सर्व देणग्या आल्या असल्या तथापि त्यांचा विनियोग होण्यासाठी सरकारला त्यासंबंधीच्या सर्व योजना सादर करून त्यांच्याकडून पसंत करवून आणाव्या लागतात. यामुळे आजपर्यंत हें काम तसेंच लांबणीवर पडत चाललें होतें. अखेरीस कुलाबा लोकल बोर्ड व रायगड-स्मारक कमिटी या उभयतांच्या, विशेषतः श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांच्या निकडीच्या तगाद्यामुळे पुणें येथील पुराणवस्तु-संशोधन खात्याचे सुपरिंटेंडेण्ट श्री. नाझीम यांनी गेल्या ता. २१ एप्रिल रोजीं रायगडचा मुक्काम लावून लोकल बोर्ड व रायगड मेमोरिअल कमिटीला तसें कळविलें. रायगड स्मारक मंडळातर्फे श्री. दिनकर विनायक काळे हे त्या दिवशीं हजर राहिले. श्री. शंकर नारायण जोशी हे रायगड-स्मारक मंडळातर्फे पूर्वीच्या उत्सवासाठी व साधल्यास संशोधन करण्यासाठी त्या प्रांतांत गेले होते. तेहि त्या दिवशीं हजर राहिले. कुलाबा लोकल बोर्डाचे एंजीनिअर श्री. नगरकर हे आपले नकाशे व अंदाज घेऊन सिद्ध होते. नाते येथील सुप्रसिद्ध शिवभक्त व लोकल बोर्डाचे प्रमुख सभासद शेठ धारिया हेहि अर्थात् होतेच. श्री. नाझीम यांच्या मोटारीला ता. २० रोजीं महाबळेश्वरचे रस्त्यावर अपघात झाल्यामुळे ते २१ तारखेला रायगडावर जाऊं शकले नाहीत. ता. २२ला जाण्याचें त्यांनीं ठरविलें. परंतु २२ तारखेला लोकल बोर्डाची एक महत्त्वाची सभा असल्यामुळे स्थानिक पुढारी व एंजीनियर नगरकर हेहि अलिबागला जावयाचे असल्यामुळे ता. २० रोजीं सायंकाळींच श्री. काळे, जोशी, नगरकर व श्री. धारिया शेठजी यांचा विचारविनिमय होऊन कांहीं गोष्टी ठरल्या व ता. २१ रोजीं श्री. काळे व जोशी रायगडावर जाऊन सर्व परिस्थिति दुरुस्तीच्या सूचनांच्या अनुरोधाने समक्ष पाहून आले. व त्याच रात्रीं श्री. काळे यांनी श्री. नाझीम यांची गांठ घेऊन त्यांना सर्व परिस्थिति समजावून सांगितली.

श्री. नाझीम यांनी सर्व प्रकारें सहानुभूति दाखविली व 'मी ता. २२ रोजीं सर्व गोष्टी समक्ष पाहून घेतों व मग पुण्यास गेल्यावर आपण आपसांत विचारविनिमय करून काय तें ठरवूं' असें आश्वासन दिलें. काळे हे ता. २२ रोजीं परतले.

### झालेले निर्णय

श्री. नाझीम वगैरे सरकारतर्फेची मंडळी व कुलाबा बोर्डाचे एक सुपरवायझर हे त्या दिवशीं रायगडावर जाऊन आले. अलिबागेहून परत आलेले धारिया शेठजी वगैरेंनी नंतर त्यांच्याशीं विचारविनिमय केला. त्याचींहि टिपणें आलेलीं आहेत. त्यावरून (१) कुत्र्याची छत्री (२) धर्मशाळा (३) शिरकाईचें देऊळ व (४) गंगासागर तलाव यांची दुरुस्ती करण्यास श्री. नाझीम यांची हरकत नाही असें कळतें. (५) महाराजांच्या सिंहासनाबद्दल अद्यापि नक्की निर्णय होऊं शकत नाहीं. त्या बाबतींत सरकाराच्या संरक्षित स्मारकांविषयीच्या धोरणाशीं कांहीं संबंध आहे असें कळतें. सिंहासन हें स्मारक अगदी पडक्या स्थितींत असल्यानें त्याची दुरुस्ती करण्याच्या तऱ्हेबद्दल मतभेद होईल. त्या ठिकाणीं महाराजांचा एखादा पुतळा बसवून तो निवाऱ्यांत राहण्यापुरतें मजबूत छपर बांधण्याची योजना सुचविण्यांत आली आहे. ती श्री. नाझीम यांना मान्य झाली नाही असें दिसतें. तथापि कांहीं तसाच किंवा अन्य मार्ग याहि बाबतींत निघून महाराष्ट्रीयांच्या मनाप्रमाणे सर्व गोष्टी घडून येतील यांत शंका नाहीं. गडावरील ऐतिहासिक महत्त्वाच्या स्थलांवर त्या त्या स्थलांचें महत्त्व दर्शविणाऱ्या पाट्या लावण्यास सरकारचा विरोध नाही असेंहि या वेळच्या बोलण्यावरून निष्पन्न झालें आहे. मात्र त्या पाट्यांवरील मजकूर फक्त इतिहासदर्शक असावा. शिवाजीला मोठा थोरला वीर किंवा देव बनविणारा नसावा! याच धोरणाप्रमाणे सिंहासनाचें स्थलदर्शक फलक व इतर स्थलांबद्दलहि फलक शक्य तितक्या लवकर लावावे याला कोणाचीच हरकत येण्याचा संभव नसून तें कार्य अविलंबानें करण्यासारखें आहे.

# पाश्चात्य राष्ट्रांतील विचार तरंग

## तज्ज्ञशाही व भावी समाजस्थिति

(ले. : बा. मो. कानिटकर, एलएल. बी., नाशिक)

थॉमस कमिटीचा पुनर्घटना रिपोर्ट प्रसिद्ध झाला. त्यावर सरकाराचें शिक्कामोर्तब होऊन किती खात्यांत कशी कपात करावयाची म्हणजे पर्यायानें किती लोकांना उदरभरणाच्या उद्योगाच्या विवेचनेस लावावयाचें हें ठरलें ! या सरकारी धोरणावर तज्ज्ञांच्या टीकासुद्धा येऊन निश्चित धोरणहि ठरलें. थोडक्यांत म्हणजे अस्तित्वांत असलेल्या बेकारांत आणखी किती भर पडावयाची हेंहि ठरलें. अशा वेळीं क्षणभर स्तब्ध होऊन बेकारीच्या कारणांची अल्पशी मीमांसा केल्यास आणि अमेरिकेसारख्या स्वतंत्र राष्ट्रांत या दृष्टीनें काय काय नवीन कल्पना, नवे उपक्रम व नव्या योजना अमलांत येत आहेत, अथवा येऊं पाहत आहेत हें पाहिल्यास वावगें होणार नाहीं असें वाटतें.

व्यापार--उदीम, कारखाने, नोकऱ्या, रेल्वे सर्वच ठिकाणीं उमेदवारांची, कामगारांची इतकी दाटी झालेली आहे कीं, मनुष्यास क्षणभर आश्चर्यानें मूढच होण्याची वेळ येते. आपल्या देशांतच अशी परिस्थिति आहे असें नसून जगांतील बहुतेक सर्व देशांत हीच परिस्थिति आहे. नुसत्या अमेरिकन संयुक्त संस्थानापुरतें पाहिलें तर आणखी वर्ष--दोन वर्षांत चालू वेगानें जवळ जवळ २॥ कोटी लोक बेकार होतील ! या प्रकारें सर्वच स्थळीं बेकारी माजल्यामुळें राष्ट्रांचें जीवन अत्यंत कष्टमय बनलें आहे.

या बेकारीचें मुख्य कारण मागणीपेक्षा माल जास्त उत्पन्न झाला हें आहे. गिरण्यांची गोष्ट घेतली तर उठावापेक्षा जास्त माल उत्पन्न केला गेला. जास्त माल उत्पन्न केला गेल्यामुळें कामगारवर्ग कमी करावा लागला आणि त्यामुळें पुनः मालाचें गिऱ्हाईक जास्तच तुटलें. असें हें घातक (व्हिशस सर्कल) चक्र फिरूं लागलें.

या प्रकारच्या जास्त निपजेचें कारण आजची यंत्रसामुग्रीमधील सुधारणा हेंच होय. पूर्वकाळीं जितकें काम तीं यंत्रें देत तितकें काम तीं यंत्रें सफाईनें व फारच अल्प वेळांत व अल्प खर्चांत तयार करूं लागल्यामुळे निपजेचें प्रमाण उठावाशीं व्यस्त पडूं लागलें.

याप्रमाणें आर्थिक परिस्थिति अत्यंत खालावल्यामुळे आणि दिवसेंदिवस ही परिस्थिति जास्तच बिकट होत जाणार असल्यामुळे, विचारवंतांच्यापुढे मोठाच प्रश्न येऊन पडला कीं, ततः किम्? पुढें काय? आर्थिक विषमतेबरोबरच राजकीय, धार्मिक व सामाजिक विषमतेला कंटाळून रशियासारख्या देशांत समाजसत्तावाद प्रस्थापित झाला. तरी तेथेहि आर्थिक परिस्थिति विशेष बदलली नाही. संपत्तीची वांटणी झाली हें खरें परंतु भावी काळाची तरतूद या दृष्टीनें विचार केल्यास समाजसत्तावाद किंवा तत्सम उपक्रम जरा अपुरे आणि असमाधानकारक वाटतात, असें नाइलाजानें म्हणावें लागतें.

### तज्ज्ञशाही

या अडचणींतून मार्ग काढण्यासाठीं म्हणून अमेरिकेंत हॉवर्ड स्कॉट यांच्या नेतृत्वाखाली एक नवीन चळवळ तज्ज्ञशाही (टेक्नॉक्रसी) नांवाची सुरू झाली आहे. या चळवळीचे परिणाम फार दूरवर पोंचणारे असल्यामुळे तिची अगदीं थोडक्यांत रूपरेषा मांडण्याचें आम्हीं ठरविलें आहे. तज्ज्ञशाही म्हणजे तज्ज्ञांची शाही. ज्याप्रमाणें झारशाही, बादशाही (ऑटॉक्रसी) किंवा लोकशाही (डेमॉक्रसी) त्याचप्रमाणें तज्ज्ञशाही म्हणजे 'टेक्नॉक्रसी' लोकशाही व बादशाही यांचा किंवा समाजशाहीचा अनुभव मनुष्यास मिळालेला आहे. परंतु तो समाधानकारक न वाटल्यामुळें या नव्या शाहीकडे लोकांचें लक्ष वेधत चालले आहे. राज्ययंत्र विशेषतः देशांतील आर्थिक घटना तज्ज्ञांच्या विचारानें व त्यांच्या अधिकारानें चालणें, यासच थोडक्यांत तज्ज्ञशाही म्हणतां येईल. आणि अशा प्रकारची घटना ही सर्व समाजाची नवीन मांडणी करणारीच ठरेल यांत शंका नाहीं.

### तज्ज्ञशाहीचा इतिहास

तज्ज्ञशाहीची साधारण कल्पना याप्रमाणें पाहिल्यावर आपण या नव्या चळवळीचें थोडें निरीक्षण करूं. या हळूहळू परंतु निश्चित अशी बेकारांची संख्या वाढत आहे. धंद्यांची व त्यामुळे एकंदर सर्वच राष्ट्राची आर्थिक परिस्थिति नित्यशः खालावत चालली आहे असें पाहून, अमेरिकेंतील कोलंबिया युनिव्हर्सिटीचे डॉ. निकोलस बटलर यांच्या अनुज्ञेनें त्या युनिव्हर्सिटींत मि. हॉवर्ड स्कॉट यांच्या नेतृत्वाखाली १९३० च्या मे-जून महिन्यांत एक

अभ्यासक मंडळ स्थापन झालें. या मंडळानें (१) अमेरिकेची निपज, (२) मनुष्याचे कामाचे तास (मनुष्य कारखान्यांत किती तास प्रत्यक्ष काम करतो ते), (३) त्या धंद्यांत एकंदर किती माणसांचा समावेश होऊं शकेल, (४) त्या धंद्यांत किती शक्ति (एनर्जी) खर्च होते वगैरे बाबतींत आंकडे जमवून त्यावरून तक्ते, रेषा-चित्रें वगैरे तयार केले. आज असे कित्येक तक्ते त्या मंडळानें बहुजनसमाजास सादर केले आहेत. त्यावरून प्रत्यक्ष निपज करण्यांत खरोखर मनुष्याची किती अल्प शक्ति लागते हें त्यांनी चांगलें सिद्ध केले आहे. हॉवर्ड स्कॉट यांच्यापूर्वी या विषयाकडे या दृष्टीने पाहणोरे थॉइर्डीन व्हेब्लेन व सॉडी हे होत. आजच्या तज्ज्ञशाहीच्या कल्पनेचा आत्मा हॉवर्ड स्कॉट असला तरी मूळ द्रष्टा व्हेब्लेन हाच होय. सदरहू व्हेब्लेनच्या 'एंजीनियर्स अँड प्राइस सिस्टीम' या पुस्तकांतलि विवेचनावरच तज्ज्ञशाहीची उभारणी झालेली आहे.

कोणत्याहि एखाद्या वस्तूला किंमत अथवा मूल्य पडतें. हें मूल्य ठरवितांना आतापर्यंत फक्त मानवी शक्तीचाच विचार करण्यांत येई. एखाद्या पदार्थाची किंमत ही मूळ किंमत (लेबर) मानवी मजुरी आणि नफा याच दृष्टीने ठरविण्यांत येई. परंतु यंत्रामुळे मानवी शक्तीचे जवळ जवळ उच्चाटनच झालें असल्यानें किंवा होणार अशी परिस्थिति येत चालल्यानें, ही किंमतांची पद्धति अथवा मूल्यपद्धति समाजाच्या स्थैर्याच्या दृष्टीने त्याज्य ठरण्याची वेळ आली आहे. आणि व्हेब्लेन व त्याच्यामागून हॉवर्ड स्कॉट वगैरेंचा मुख्य कटाक्ष या मूल्यपद्धतीवरच आणि मूल्यपद्धतीवर अधिष्ठित झालेल्या अर्थशास्त्र व संपत्तीची विभागणी यांवर फार आहे.

ही स्थिति कशी पालटेल हें पाहण्यासाठी स्कॉट प्रभृतींनी अमेरिकेच्या एकंदर उद्योगधंद्याची जी पाहणी केली ती फारच उद्‌बोधक आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, आजच्या यंत्रयुगांत कोणतीहि वस्तु निर्माण करण्यास मानवी शक्ति इतकी अल्प लागते कीं, ती विचारांतसुद्धा घेण्याचें कारण नाही. उदाहरणार्थ, पूर्वी एका चांभारास एका दिवसांत आठ तास याप्रमाणे एक बूट-जोडी करण्यास साडेपांच दिवस लागत. आज एखाद्या टॅनिंग बूट फॅक्टरींत एक मजूर एका दिवसांत तेवढ्याच वेळांत यंत्रामुळे ६७-६८ बूट-जोड्या तयार करूं शकतो! पूर्वी कुंभार एका दिवसांत ४००-४५० विटा करी. आज तोच कुंभार एखाद्या फॅक्टरींत चार लाख विटा एका दिवसांत करूं शकतो! धान्याचें पीठ करण्याबाबत एक दळणारीण पूर्वीच्या तीस हजार पट आज काम करूं शकते.

### मानव शक्तीस खो मिळाला

याचें कारण वस्तुनिष्पत्तींत मानवशक्तीचें यंत्रशक्तीने केलेलें उच्चाटन हें होय! इतकेंच काय पण कित्येक सुधारणा आजहि अज्ञून जगापुढे आलेल्या नाहीत. उदाहरणार्थ, एक शतकभर धार कायम टिकणारा वस्तरा, तीन ते साडे-तीन लाख मैल प्रवास होईपर्यंत एकदासुद्धा उस्तरावी न लागणारी मोटार, आजच्या कापसाच्या कपड्याच्या सातपट टिकणारा रॅमी नांवाच्या झुडपाच्या धाग्याचा कापडा किंवा फक्त दोन माणसांच्या साहाय्याने एका दिवसांत साठ फूट रुंदीचा व आठ मैल लांबीचा रस्ता खणून तो नवीन तयार करणारें यंत्र इत्यादि. या सुधारणा जर पुढे आल्या आणि त्या निश्चित पुढे येणार तर, यंत्रशक्तीने मानवशक्तीस पूर्णपणे (जवळजवळ) खो दिला असें म्हणण्यास हरकत काय? अर्थातच उत्पादन किंवा अन्य बाबतींतही मानवी शक्तीचा विचार गौणच करावा लागेल. तज्ज्ञशाहीच्या पुरस्कर्त्यांचें तर असें म्हणणें आहे कीं तो विचार सोडूनच द्यावा लागेल.

अर्थातच बेकारी यापुढे कमी न होतां वाढतच जाणार! अगदी पूर्वीच्याइतक्या जोराने व्यापार सुरू झाला तरी, नव्या यांत्रिक सुधारणांमुळे आजचे बेकार पुनः केव्हाहि कामामध्ये समाविष्ट करून घेतां येणार नाहीत. अर्थातच या सर्वांचा परिणाम राष्ट्राच्या एकंदर परिस्थितीवर, विशेषतः आर्थिक परिस्थितीवर झाल्यावांचून कधीहि राहणार नाही; आणि मग आर्थिक विषमता जास्तच तीव्र होईल हें उघड आहे.

### संपत्तीचा अर्थ

या सर्व भावी अनर्थपरंपरेपासून संरक्षण करण्यासाठी तज्ज्ञशाहीच्या पुरस्कर्त्यांनी एक अभिनव कल्पना पुढे मांडली आहे. त्यांचें म्हणणें असे कीं, आजपर्यंत आपण संपत्तीचा अर्थ सोनें चांदी किंवा अशाच धातूंवर किंवा त्यांवर अधिष्ठित असलेल्या चलनावर अवलंबून करीत होतों. परंतु या सर्व गोष्टी निश्चित स्वरूपाच्या किंमतीच्या नसल्यानें सर्व घोटाळा झाला. त्याऐवजी कोणतीहि गोष्ट निर्माण करण्यास किती शक्ति (एनर्जी) लागली ही कल्पना मूळ धरून, जर संपत्तीची उभारणी केली तर संपत्तीच्या किंमतींत फरक पडणार नाही संपत्ति फारच सुलभ प्रकाराने विभागून देतां येईल. म्हणून (१) संपत्ति म्हणजे शक्तीने उत्पन्न झालेली स्थिति. मग ती मानवीशक्ती असो किंवा यांत्रिक

असो. तिचें (संपत्तीचें) मापनहि त्या शक्तींच्या व्यय-परिमाणा ( यूनिट ) वर अवलंबून असलें पाहिजे एखादा पदार्थ, समजा कापड, तयार करण्यास किती शक्ति लागते हें पाहून त्या पें किती मापन होतें हें पाहणें व त्यावर संपत्तीची उभारणी करणें, ही तज्ज्ञशाहीच्या मूळ पुरस्कर्त्यांची कल्पना. ( २ ) अर्थातच प्रचंड बाष्प शक्तीनें अथवा विद्युच्छक्तीने निर्माण करण्यांत येणाऱ्या पदार्थांच्या निपजेंत मानवी शक्तीचें प्रमाण अत्यंत अल्प असणार. तेव्हां त्या पदार्थांच्या उपभोगाचा विचार करतांना कोण किती शक्ति लावतो हें पाहून, किती श्रम तो करतो हें तत्त्व लावतांच येणार नाहीं. या बाबतींत स्कॉट वगैरेंचें मत असें आहे कीं, संपत्तीचा उपभोग घेण्याची क्षमता हें मालकीचें लक्षण आहे. मोटार असणें ही संपत्ति नाही, तर तिचा उपभोग घेण्याची क्षमता असणे ही खरी संपत्ति किंवा मालकी होय. या दृष्टीने, वस्तुनिर्मितींत जर मानवाचें जवळ जवळ उच्चाटन झाले तर, वर दिलेल्या अर्थानें संपत्ति ही उपभोगक्षमतेसाठी कोणी किती काम केलें हें लक्षांत न घेतांच तिची विभागणी झाली पाहिजे. ( ३ ) यासाठी आजची मूल्यपद्धति ( प्राइस सिस्टिम ) अजिबात बंद होऊन, त्याऐवजी मध्यवर्ती तज्ज्ञमंडळानें काढलेलीं शक्ति–पत्रकें ( एनर्जी सर्टिफिकेट्स ) वापरून, पदार्थांची क्षमता वाढून देण्यांत आली पाहिजे.

### तज्ज्ञशाहीचें सुखस्वप्न

स्कॉट वगैरेंचें या बाबतींत असें निश्चित मत आहे कीं या प्रकारें तज्ज्ञशाही देशांत रूढ झाल्यास अमेरिकेंतील २१ ते ४५ वयाच्या लोकांना (सर्व) रोज चार तासांप्रमाणे आठवड्यांत फक्त चार दिवस काम करून, अमेरिकेंतील प्रत्येक इसमास दरवर्षी हजार डॉलर म्हणजे जवळजवळ ऐशी हजार रुपये ज्याची आजच्या चलनांत किंमत येईल इतकी उपभोगक्षमता प्राप्त होईल. तसेंच जसजशी शास्त्रीय प्रगति वाढेल तसतसे मनुष्याच्या कामाचे तास कमी होऊन, पाळीपाळीने ( शिफ्ट सिस्टिमने ) काम करून वर दिलेली आर्थिक स्थिति निदान ३००० वर्षें सहज टिकेल.

तज्ज्ञशाहीच्या पुरस्कर्त्यांचें हें एक गोड स्वप्न आहे. खऱ्या व्यवहारांत सिद्धान्त व प्रत्यक्ष प्रयोगाइतकें अंतर आहे. यांतील कांहीं कल्पना समाजसत्तावादाशीं बव्हंशी जुळत आहेत. तेव्हां भविष्यकाळांत तज्ज्ञशाहीमुळे भावी समाजस्थिति कशी होईल हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

## सेनापति बापट यांची भेट

रत्नागिरी ता. १३।५।३३

सेनापति बापट हे महात्माजींच्या बरोबर २१ दिवस उपवास करणार आहेत, ही बातमी पुणें येथे कळतांच त्यांची कन्या कुमारी कमलाबाई, मुलगा वामन व श्री.अ.ब.लागू हे रत्नागिरीस गेले. बुधवारीं सायंकाळीं म्हणजे उपवासाच्या तिसऱ्या दिवशीं बापटांची भेट हे तिघेजण व त्यांचे एक स्नेही यांनी घेतली. भेटीस ते तुरुंगाच्या कचेरींत चालत आले होते. ते क्षीण झालेले दिसत होते. मागे त्यांनी गांधीजींच्या बरोबर उपवास केला असतां जीं उपवासाचीं कारणें होतीं तींच या वेळींहि आहेत.

उपवास व हरिजनोद्धार यासंबंधांत ते म्हणाले, " परमेश्वरास ह्या हरिजनोद्धाराच्या कार्याकरिता जर कोणाचा बलि घ्यावयाचा असेल तर, त्याने तो माझा प्रथम घ्यावा, व महात्माजींना माझे आयुष्याचे उरलेले दिवस देऊन, त्यांचें आयुष्य वाढवावें. असा महात्मा राष्ट्राने गमावणें इष्ट नाही. असा महात्मा पुनः कधी मिळणार आहे काय ?"

तेव्हां एकाने विचारलें—' पण महात्मा गांधी मरण्याकरितां हा उपवास करीत नाहीत. आत्मशुद्धीकरितां करीत आहेत. '

उत्तर—" महात्मा गांधींच्या सध्यांच्या शरीरप्रकृतीवरून मला ते यांतून जगतील असें वाटत नाही. म्हणून मीं आत्मबलिदाननिश्चयाने परमेश्वरचरणीं ही प्रार्थना सुरू केली आहे.'

प्रश्न—महात्माजींना स्वतःची आत्मशुद्धी ती कसली करावयाची आहे ? ज्यांच्याकडून या कार्यामध्ये चुका झाल्या त्यांच्या अंतःकरणाची शुद्धि आपल्या तपश्चर्येने व्हावी हाच त्यांचा उद्देश असणार. पण त्यांच्याकरिता निवळ मरून जाण्याने काय होणार आहे ? त्याकरितां प्रत्यक्ष कार्य केलें पाहिजे.

उत्तर—मनुष्य पुष्कळ वेळां कार्याच्या नांवाखालीं आपल्या देहासंबंधी फार स्वार्थी विचार करतो. ज्याने त्याने आपल्या हृदयस्थ परमेश्वरास शरण जाऊन आपली भूमिका ठरवावी. आपण लोक मरणाची गोष्ट निघाली असता फार

बारीक दृष्टीने हिशेब करूं लागतों, व त्यांत खऱ्या कार्यनिष्ठेपेक्षा स्वार्थाचें, जड देहप्रेमाचें अधिक प्राबल्य दिसतें. खरें पाहिलें तर एकाचें बलिदान साहजिकच हजारांच्या अंतःकरणांत कार्याची स्फूर्ति आणतें. तेथे इतका बारकाईने हिशेब करण्याची जरूरी नसते. हिंदुस्थानांतील लोक या देहमायेचा—भंग करतील तरच त्यांचा उद्धार होणार आहे. गीतेच्या उपदेशाची सुरुवात या देहमाया भंगाच्या—अमरणत्वाच्या उपदेशापासूनच झालेली आहे. मी माझ्या गीताहृदयांत म्हटलें आहे कीं, 'मरण वाटे अमित्र जोंवरी। आत्मोद्धार अशक्य तोंवरी। देह न टाकवे जीर्ण वस्त्रापरी। आत्मविचारीं टोणपा तो।' हिंदुस्थानाने विशेषतः महाराष्ट्राने यांतील रहस्याकडे जरूर लक्ष द्यावें. यांत त्याच्या उद्धाराचें बीज आहे. कमल, तुझ्या बापानें तुझ्याकरितां कांही केलेलें नाही. माझीं पुस्तकें तूं मोठी होशील त्या वेळीं वाच. हेंच माझें भांडवल. खरोखरीच तुझ्या अडीच वर्षांपासून मी तुला मेल्याप्रमाणेंच आहें. आजपर्यंत श्रीहरीनें तुम्हा दोघांना जसें सांभाळलें तसें यापुढेहि तो सांभाळील. माझा त्याच्यावर पूर्ण विश्वास आहे. ही माझी शेवटचीच भेट असें समजून चाला."

कमलेच्या नेत्रांतून अश्रु वाहू लागले. सर्वांच्याच हृदयांत मोठी खळबळ उडून गेली. सर्वांनी बापटांचें पदवंदन केलें व मग भेट संपली.

या उपवासांत बळजबरीनें मला अन्न घालूं नये, (नाकाद्वारें नळ्यांनी दूध वगैरे) अशी सेनापतींनी मुंबई सरकारच्या गृहमंत्र्यांस तार केली आहे.

# देशी गिरण्यांना तारणार कीं मारणार ?

हिंदुस्थानांत हिंदी लोकांनी चालविलेला कापड हा एकच धंदा कांहीसा नांवारूपास आला आहे. त्याला महायुद्धापूर्वी इंग्लंडाशिवाय दुसरा प्रतिस्पर्धी देश नव्हता. त्या वेळीं तलम कापड इंग्लंडाने काढावें व जाड कापडावर हिंदुस्थानाने भर द्यावा अशा तऱ्हेचा मेळ बसून हिंदी गिरण्यांचा धंदा थोडथोडा भरभराट पावत होता. पण महायुद्धाच्या काळांत हिंदी गिरण्यांना दैवाने चांगलाच हात दिल्यामुळे गिरणीवाल्यांनी कल्पनातीत पैका कमावला. महायुद्ध हें जसें हिंदी गिरणीवाल्यांच्या उदरीं आलें त्याचप्रमाणे जपानावरहि त्याने पूर्ण कृपा केली. जपानाने स्वतःच्या प्रयत्नाने आपली गणना जगांतील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांत पूर्वीच करून घेतली आहे. जपानी राष्ट्र स्वतंत्र, सुधारलेलें व सामर्थ्यवान आहे. त्याने आपले धंदे मजबूत पायावर उभारण्याची ही पर्वणी उत्तम प्रकारें साधली. जपानाच्या औद्योगिक भरभराटीस १९०७ सालीं सुरुवात झाली व ती १९१९मध्ये परमावधीस पोंचली. जपानाच्या या भरभराटीकडे हिंदुस्थानाचें विशेष लक्ष लागण्याचें कारण असें कीं, सदर भरभराट नेमकी हिंदुस्थानाच्याच मुळावर आली!

सगळ्या आशियाखंडांत जपान हा एकच देश स्वतंत्र व कारखानदारीचा आहे. जगांत अन्नाच्या खालोखाल वस्त्र हीच मुख्य गरजेची वस्तु आहे. ती वस्तु आशियाखंडास आपणच पुरविण्याचा संकल्प जपानाने केला व बऱ्याच अंशीं तो सिद्धीस नेला. या बाबतींत इंग्लंडशीं चढाओढ करण्याच्या भानगडींत जपान फारसा पडला नाही. चीन व हिंदुस्थान यांसारखे मागसलेले देश जपानास जवळ असून त्यांत जाड कापडाचाच खप मोठ्या प्रमाणावर होतो. हिंदुस्थानांतील गिरण्याहि त्याच प्रकारचें कापड पैदा करतात. हिंदुस्थान देश सर्व बाजूंनी मागसलेला असल्यामुळे त्याचाच धंदा रसातळास मिळवून आपला खिसा गरम करण्याचा चंग जपानाने बांधला. हिंदी कापूस विकत घ्यावा व त्याचें हिंदुस्थानास हवें तसें कापड बनवून त्याचा उलट आहेर हिंदी लोकांस करावा असा क्रम जपानाने आरंभला. हा क्रम त्याने इतका यशस्वी करून दाखविला कीं जपानाची ही गोलंदाजी चुकविण्याकरिता एखादी आश्रयाची जागा पाहणें हिंदुस्थानास अलीकडे भाग पडलें आहे.

हिंदुस्थानांत कापूस खरेदी करून तो दोन अडीच हजार मैलांवर जपानाने घेऊन जावा व तेथे त्याचीं वस्त्रें विणून तीं परत हिंदुस्थानांत पाठवून हिंदी कापडापेक्षां त्यास स्वस्त विकतां यावीं याचें सकृद्दर्शनीं कोणासहि आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. कारण या कामीं नैसर्गिक अनुकूलता असेल तर ती एकट्या हिंदुस्थानालाच आहे. कापूस हिंदुस्थानांत पिकतो व त्याचीं वस्त्रें हिंदुस्थानांतच विणलीं जातात. अशा स्थितींत हिंदी लोकांना हिंदी कापड स्वस्त पडावें कीं जपानाचें अडीच हजार मैलांवरून येणारें कापड स्वस्त मिळावें? वास्तविक पाहता हिंदी कापड हिंदी लोकांनाच काय, पण जपानी लोकांनाहि स्वस्त दराने

हिंदुस्थानानें पुरवावें; किंबहुना जगांतील बहुतेक देशांना वस्त्रें पुरविण्याचा मक्ता हिंदुस्थानानेच आपल्याकडे घ्यावा! पण आज त्याच्या अगदी उलट प्रकार सुरू आहे! पश्चिमेस सहा हजार मैलांवरचा इंग्लंड व पूर्वेस अडीच हजार मैलांवरचा जपान हे दोन देश हिंदुस्थानास दोन दिशांनी आपलें कापड पाठवीत आहेत व त्यापुढे हिंदी गिरण्यांचा टिकाव न लागल्यामुळें त्या एकामागून एक बंद पडत आहेत, यासारखी खेदजनक गोष्ट दुसरी कोणती आहे!

मुंबई, अकोला वगैरे ठिकाणच्या कांही गिरण्या पूर्वीच बंद पडल्या व त्यामुळे बरेच मजूर रिकामे झाले. पण आतांपर्यंत ओढवलेलें संकट कांहीच नव्हे इतके मोठे संकट वाट चालत आहे. येत्या जून महिन्याच्या पहिल्या तारखेपासून अखिल हिंदुस्थानांपैकीं बऱ्याच शहरांतील गिरण्या बंद करण्याचें त्यांच्या मालकांनी आगाऊच ठरविलें आहे. मुंबईची कुर्ला येथील स्वदेशी मिल व टाटा मिल यांना कुलपें लागून त्यांतून दहा हजार मजुरांना हात हालवीत घरचा रस्ता सुधारावा लागणार! नागपूरची एम्प्रेस मिल व मॉडेल मिल या गिरण्या प्रसिद्ध आहेत. त्याहि जून महिन्यांतच बंद होऊन त्यांतील पंधरा हजार मजुरांच्या तोंडचा घास निघणार! या सर्व गिरण्या त्यांतील मालाचे ढीग गिऱ्हाइकावांचून धूळ खात पडल्यामुळे बंद व्हावयाच्या आहेत असें कारण सांगण्यांत येत आहे. या गिरण्यांतून हजारों मजूर आज पोट भरीत आहेत. वरच्या चारच गिरण्या घेतल्या तरी त्यांत पंचवीस हजार मजूर आहेत. त्यांच्यापूर्वी कुलूप लागलेल्या व त्यांच्या मागून कुलूप लागणाऱ्या गिरण्यांतील मजुरांच्या संख्येची गणती केल्यास ती एक लाखावर जाईल असें समजण्यास हरकत नाही.

हे एक लाख मजूर कपाळाला हात लावून घरीं स्वस्थ बसल्याने त्यांना दुपारच्या अन्नाची भ्रांत उत्पन्न होईलच; पण त्याखेरीज हे एक लाख मजूर म्हणजे महाराष्ट्र, मध्यप्रांत व गुजराथ इत्यादि अनेक प्रदेशांतील एक लाख कुटुंबे होत. त्या एक लाख कुटुंबांतील पांच लाख माणसांवर केवढा हा दुर्धर प्रसंग ओढवणार! कुटुंबांतील एक कर्ता माणूस रोजगाराला शहरांत पाठवावयाचा व त्याजकडून महिन्याच्या कांठीं येणाऱ्या मनीऑर्डरीकडे डोळे लावून घरच्या बायकामुलांनी व म्हाताऱ्या, कोताऱ्यांनी बसावयाचें असा सामान्यतः इकडील परिपाठ आहे. तशांत दिवस सुकाळांतील असून घरच्या कणगी धान्याने भरलेल्या असल्या व खेड्यापाड्यांत बसूनहि दोन पैसे मोलमजुरीवर मिळत असले म्हणजे आपला भाऊ, मुलगा किंवा नवरा घरीं चार दिवस राहावयास आला तर त्याची कोणाला गुमान वाटत नसे. मध्यंतरीं संपाच्या वावटळींत असे हजारों मजूर घाटावर व कोकणांत कैक महिने आपल्या गांवीं जाऊन राहिले व त्यांनी आपल्या जिवलगांच्या संगतींत मुंबईच्या गोष्टी सांगून मजेने दिवस घालविले.

पण आता ते दिवस कोठे उरले आहेत? कित्येक खेड्यांतून यंदा धान्यहि चांगलें पिकले नाही व जें पिकलें ते सरकारदस्त भागविण्याकरिता स्वस्ताईच्या भावाने विकावें लागल्यामुळे पुष्कळ शेतकऱ्यांपाशीं खावयाला पुरेसें अन्नहि उरलेलें नाही. खानदेश, वऱ्हाड व नागपूर हे प्रांत महाराष्ट्रांत धनत्तर समजले जातात. तेथील शेतकऱ्यांनी कपाशीच्या राशी विकून आपल्या बायकामुलांना सोन्याने मढवून काढलें असल्याची त्यांची एक वेळ सर्वत्र प्रसिद्धी झाली होती. सन १९२२ सालीं कपाशीचा भाव खंडीस ७२२ रुपयांपर्यंत चढला, त्याबरोबर खानदेश-वऱ्हाडांतील शेतकऱ्यांच्या डोळ्यांवर सोन्याचा धूर चढावा हें स्वाभाविक होय. परंतु ती उत्कर्षाची झुळुक निघून गेली व अवघ्या दहा वर्षांच्या अवधींत कपाशीचा भाव उतरत उतरत १४० रुपयांवर आला. त्यामुळे डोळ्यांवरचा सोन्याचा धूर तर निघून गेलाच, पण बायकामुलांच्या अंगावरील सोन्याला पाय फुटून त्याने मुंबईचा किनारा गांठून इंग्लंड, हॉलंड व अमेरिका येथील हवा पाहिली.

आज हा खानदेश वऱ्हाडांतील शेतकरी कफल्लक बनला असून त्याच्या श्रीमंतीचा लौकिक पार धुळीस मिळाला आहे. पुणें, सातारा, सोलापूर, नगर-नाशिक या देशावरील जिल्ह्यांतील शेतकऱ्यांची गरीबी जगजाहीर आहे, आणि रत्नागिरीचें अठरा विश्वे दारिद्य प्रत्येकास माहित आहे. त्यांतील बहुतेक शेतकऱ्यांना आपल्या कुटुंबापैकीं एक किंवा अधिक माणसे शहरांत रोजगारासाठी पाठवून त्यांच्या आधारावरच प्रपंचाचा गाडा ओढावा लागतो. पण यंदा त्यांना नेहमींपेक्षांहि कठिण दिवस प्राप्त झाले आहेत. कोंकणांत तांदुळाचा भाव निम्म्यावर आला व देशावर गुळाचा भाव तृतीयांशहि राहिला नाही. शेतींत थोडीबहुत किफायतशीर शेती भाताचीच. तीहि बसल्याने ठाणे व कुलाबा जिल्ह्यांतील लहानथोर शेतकरी वर्ग फिकीरींत पडला आहे आणि देशावरील नाशिक, नगर व पुणें या टापूंतील गोदावरी, प्रवरा, निरा, मुठा इत्यादि नद्यांच्या कालव्याजवळील बागायतदारांना आपला माल मातीच्या

मोलाने घालवून आंतबट्ट्याचा व्यवहार करावा लागत आहे!

अशा रीतीने साऱ्या मुलूखभर शेतकरी वर्ग दारिद्र्याने व उपासमारीने आधीच घाबरून गेला असता त्यांच्यांतील तरणींताठीं व कर्तीं सवरतीं माणसें हातचा उद्योग गेला म्हणून जड पावलांनी व खिन्न वदनाने घरीं परत येतांना पाहून त्यांची छाती भावी संकटाच्या भीतीने दडपून जाणार नाही काय? हें संकट अन्नान्नदशेस पोचलेल्या शेतकरी वर्गाला भोवेलच. पण त्याचे अनिष्ट परिणाम शेतकऱ्यांच्या गांवांत राहून जे लोक अन्य व्यवसायावर पोटभर अन्न खात आहेत त्यांनाहि जाणवून त्यांच्या पुढचें ताटहि ओढलें जाण्याची धास्ती आहे. 'बुभुक्षितः किं न करोति पापम्' या उक्तीप्रमाणे अन्नाला महाग झालेले लोक पोटासाठी चोऱ्या करतील, त्या दंगलींचा फायदा घेऊन पुंड लोक दरोडे घालतील व सर्वत्र अस्वस्थता माजून सारा देश हैराण होईल. सुशिक्षित वर्ग बेकारीच्या संकटांत सांपडलाच आहे. पण तो अल्प असल्यामुळे सरकार त्याची उपेक्षा करीत आलें. आता त्याच्या बाजूस अफाट असा बहुजन समाज मिळाल्यावर त्याचे दुष्परिणाम कोठपर्यंत जाऊन पोचतील याची कल्पनाहि करवत नाही.

या संकटांतून तरून जाण्याच्या उपायांचे दोन भाग पडतील. एक ताबडतोबीचा व दुसरा मुदतीचा. ताबडतोबीच्या मार्गाचा विचार करतांना डोळ्यांपुढे देशांत चालू असलेले धंदेच उभे राहतात. या धंद्यांत कापडाचा धंदा प्रमुख होय. तो पन्नाससाठ वर्षांचा जुना असून त्यांत कोट्यवधि रुपयांचें भांडवल गुंतलें आहे, व त्यावर तीन लक्ष मजूर पोट भरीत आहेत. या धंद्याला जपानसारख्या स्वतंत्र व पुढारलेल्या राष्ट्राशीं टक्कर देण्याची पाळी आली आहे. त्यापासून त्याला वांचविण्याचें साधन आयात जकातीचा कोट उंच वाढविण्यावांचून या घटकेस दुसरें दिसत नाही. हिंदुस्थान सरकारानें देशी गिरण्यांना संरक्षण देण्याचें बिल पास केलें आहे. पण त्याचा अंमल अद्यापि सुरू झालेला नाही. या अंमलबजावणीच्या आड जपानास सहा महिन्यांची आगाऊ नोटीस द्यावयास पाहिजे, ही शर्त येत आहे असें म्हणतात. हिंदुस्थान देश जपानी कापडास जकातीची ढाल पुढे करून आडवून धरील तर हिंदुस्थानाचें हें उसने फेडण्यास जपान माघार घेणार नाही असा जपानी लोक उलटपक्षीं हिंदुस्थानास धाक घालीत आहेत. हिंदुस्थानांतून दरसाल चौदा कोटि रुपयांचा कापूस जपानांत जातो. या कापसास जपानांत मज्जाव करून नाक दाबलें कीं हिंदुस्थानाचें तोंड आपोआपच उघडेल या घमेंडींत जपान आहे. परंतु जपानाच्या या घमेंडींत अर्थ नसल्याचें मुंबई येथील महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्सचे उपाध्यक्ष रा. डहाणूकर यांनी चेंबरच्या त्रैमासिक सभेंत केलेल्या भाषणांत नुकतेंच सांगितलें आहे. जपानास ज्या जातीचा कापूस लागतो त्या जातीच्या कापसाचा पुरवठा हिंदुस्थानाशिवाय इतर कोणत्याहि देशांतून होण्यासारखा नाही. किंबहुना अशा प्रकारचा कापूस हिंदुस्थानाशिवाय इतर देशांकडून मिळत नाही म्हणूनच जपान हिंदुस्थानापासून तो खरेदी करतो, इतर देशांपासून खरेदी करीत नाही हें उघड आहे.

उलटपक्षीं हिंदुस्थानाची मात्र तशी स्थिति नाही. जपानास कापसाकरिता जसें हिंदुस्थानाच्या तोंडाकडे पाहिलें पाहिजे तसें हिंदुस्थानास कापडाकरिता जपानाच्या तोंडाकडे पाहावयास नको. जपानची एक चिंधीहि हिंदुस्थानांत येण्याचें बंद झालें तरी हिंदी लोकांचे जपानी कापडावांचून मुळीच अडणार नाही. कांहीं वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत दरसाल पन्नास कोटींचें कापड परदेशांतून येत होतें. परदेशी कापडाची ही आयात हटत हटत आता वीस कोटींवर आली आहे. यापैकीं दहाबारा कोटींची आयात जपानांतून होते असें मानण्यास हरकत नाही. परदेशी कापडाची इतकी पिछेहाट झाली याचें श्रेय हिंदी गिरण्यांच्या प्रगतीला देणें जरूर आहे. हिंदी गिरण्यानी गेल्या दहाबारा वर्षांत हरतऱ्हेचा माल बनविण्यास सुरुवात केली असून अल्पावधींत हिंदी गिरण्या इतक्या सुधारतील कीं हिंदुस्थानाला इंग्लंडच्या तलम कापडाचीहि गरज उरणार नाही. आज जगांतील प्रत्येक देश स्वयंपूर्ण होण्याच्या मार्गांत आहे. तसा हिंदुस्थानहि वस्त्रस्वावलंबी सहज होऊ शकेल.

जपानी माल हिंदुस्थानांत येण्याचें थांबविल्यास स्वदेशी गिरण्यांचें धूळ खात पडलेलें कापड संपून जाईल, व जपानांत खपणाऱ्या कापसाची जरूरी हिंदी गिरण्यांनाच भासूं लागून हिंदी कापूस हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतच खलास होईल. ही योजना हिंदुस्थानांतील सर्व वर्गांना कल्याणप्रद आहे. त्यामुळे गिरण्या चालू राहून त्यांची स्थिति सुधारेल. हल्लीच्या तीन लाख मजुरांना काम पुरून नवीन हजारों मजुरांकरिताहि तें उरेल. स्वदेशाभिमानी मध्यम वर्गास स्वदेशी कपडा भरपूर मिळाल्याचें समाधान लाभेल व शेतीवरील उदरभरणाचा बोजा हलका होऊन शेतकऱ्यांच्या कापसा-

ला देशांतलें खात्रीचें व कायमचे गिऱ्हाईक भेटेल. हिंदुस्थानांत लांब धाग्याचा कापूस होत नसल्यामुळे तो परदेशांतून मागवावा लागतो. पण अमदाबाद वगैरे सारख्या शहरांतील गिरण्यांमधून तलम कापडाची निपज अधिक प्रमाणावर झाली व त्यास जरूर तें सूत देशी गिरण्यांनीच काढण्याचें ठरविलें तर लांब धाग्याच्या कापसास उत्तेजन मिळून त्याची लागवड विस्तृत क्षेत्रात होईल, व त्यापासून शेतकरी वर्गास अधिक फायदा मिळेल.पण हीं सर्व सुखस्वप्नें खरी ठरण्याचे हिंदुस्थान सरकारने देशी गिरण्यांकडे आपलेपणाने पाहण्यावर अवलंबून असून तें आपल्या कर्तव्यास कितीसें जागतें हें लवकरच समजेल. म्हणूनच सरकारला आमचा सवाल असा आहे कीं, तुम्ही हिंदी गिरण्यांना भरपूर संरक्षण देऊन तारणार कीं त्यांची उपेक्षा करून त्यांना मरूं देणार ?

---



धूतपापेश्वर आयुर्वेद–मंदिर

# श्रीधूतपापेश्वर आयुर्वेद ट्रस्ट

पनवेल येथील श्रीधूतपापेश्वर कारखान्याकरवीं कांही तरी आयुर्वेदशास्त्रसेवा व लोकसेवा व्हावी अशी फार वर्षांपासून म्हणजे कारखान्यास ऊर्जितावस्था आल्यापासून चालकांची इच्छा होती. कारखान्याचे मूळ संस्थापक कै. विष्णुशास्त्री यांची या बाबतींत फार मोठी महत्त्वाकांक्षा असे. परंतु दुर्दैवाने त्यांचें अकालीं व आकस्मिक निधन झाल्याने ती अपूर्ण राहिली.

व्यापाराबरोबरच शास्त्रसेवा करूं म्हटलें, मनांत तसें फार असलें, त्या दृष्टीने प्रयत्नहि केला तरी तें काम समाधानकारक होत नाही. तेव्हा अल्पांशाने का होईना, केवळ शास्त्रसेवा किंवा लोकसेवा करणें असेल तर, तें कार्य व्यापारापासून अलग राखलें पाहिजे, हें चालकांनी ओळखून त्याप्रमाणे एक ट्रस्ट करण्याची योजना आंखली आहे. कायद्याच्या दृष्टीने आणि शास्त्रीय

विषयाच्या दृष्टीने ती व्यवस्था सर्वांगसुंदर व्हावी म्हणून, त्या त्या विषयांच्या तज्ज्ञांचा सल्ला घेतला, व तो त्यांनी मोठ्या आनंदाने देऊन चालकांस उपकृत केलें. त्यामुळे आता ही योजना निर्दोष झाली आहे. ट्रस्टच्या सल्लागारमंडळांतील नियोजित सभासदांनीहि मंडळाचें सदस्यत्व स्वीकारून, या कार्यास मोठीच मदत करण्याचें पत्करिलें आहे.

सदरहू योजनेप्रमाणे श्रीधूतपापेश्वर कारखान्याचे संस्थापक कै. **विष्णुशास्त्री पुराणिक** यांचे उभयता चिरंजीव, गंगाधर विष्णु पुराणिक व महादेव विष्णु पुराणिक यांनी आपली पनवेल येथील ७५००० रुपये किंमतीची इमारत व बाग व ५०००० रुपये द्रव्यानिधि देऊन, एक पब्लिक ट्रस्ट–डीड सोमवार चैत्र शु. १ शके १८५५ ता. १७ मार्च सन १९३३ रोजीं केलें आहे.

या ट्रस्टबद्दल महत्त्वाची माहिती पुढीलप्रमाणे आहे.

### ट्रस्टी

डॉ. नीलकंट भालचंद्र भाटवडेकर, बी. ए. एम्. बी. बी. एस्., गिरगांव-मुंबई. रा. पुंडरीकाक्ष गदाधर पुराणिक, पनवेल-कुलाबा, रा. गंगाधर विष्णु पुराणिक, वहिवाटदार ट्रस्टी, पनवेल-कुलाबा.

### ट्रस्टचें पहिलें सल्लागार–मंडळ

(पहिल्या सुमारे पांच वर्षांच्या मुदतीकरिता) १ भिषग्वर डॉ. ए. लक्ष्मीपति, एम. बी. सी. एम्. (मद्रास), निखिल भारतीय वैद्य–महासंमेलनाचे हल्लींचे अध्यक्ष. २ वैद्यराज यादवजी त्रिकमजी आचार्य (मुंबई). ३ डॉ. कृष्णाजी श्रीपाद म्हसकर, एम. डी., एम. ए., बी. एस.सी., डी. पी. एच्., डी. टी. एम. (मुंबई). ४ वैद्यभूषण वामनशास्त्री दातार (नाशिक). ५ आयुर्वेदाचार्य पुरुषोत्तमशास्त्री नानल (पुणें). ६ वैद्यपंचानन गंगाधर गोपाळ गुणे (अहमदनगर). ७ श्री. गणेश गोविंद नवरे (शीव–मुंबई). ८ श्री. रामचंद्र कृष्णशास्त्री पुराणिक (पनवेल).

### ट्रस्टचें कार्य

ट्रस्टडीडमध्ये अनुकूलतेप्रमाणे यथावकाश खालील कामें व्हावीं असें नमूद करण्यांत आलें आहे.

(१) श्रीधूतपापेश्वर मूर्तीची स्थापना व्हावी, व तत्संबंधी नियमित धार्मिक कृत्य व खर्च व्हावा.

(२) वैद्यशास्त्रविषयक पदार्थसंग्रह करावा व त्याचें प्रदर्शन तयार करावें. यांत आयुर्वेदीय पदार्थांस जास्त महत्त्व द्यावें.

(३) वनौषधींच्या नमुन्यांचा संग्रह करावा. वनौषधींची लागवड करून, वनौषधि–उद्यान तयार करावें, व संदिग्ध वनौषधींचा निर्णय करावा.

(४) औषधींचा असंदिग्ध गुणनिश्चय, त्यांचें परीक्षण आणि निर्दोष, उपयुक्त व जास्तींत जास्त गुणकारी औषधें तयार करण्याच्या पद्धतींचा निश्चय करावा.

५ त्रिदोषसिद्धान्ताचें स्पष्टीकरण करावें.

६ आयुर्विद्याविषयक–प्रामुख्यानें आयुर्वेदीय–व तदनुषंगिक शास्त्रांचा छापील व हस्तलिखित ग्रंथ संग्रह करणें व योग्य त्या अप्रसिद्ध ग्रंथांस प्रसिद्धि देणें.

(७) आयुर्वेद विद्यालय स्थापन करून, त्यांत आयुर्वेद व आयुर्वेदोपयोगी अन्य शास्त्रें व विषय शिकवून, त्या मार्गानें व तसेंच इतर उपलब्ध मार्गांनी आयुर्वेदीय ज्ञानाचा प्रसार करणें आणि प्रयत्नपूर्वक आयुर्वेदाची उपयुक्तता वाढविणें.

(८) आधुनिक शास्त्रांच्या किंवा अनुभवाच्या साहाय्यानें आयुर्वेदाचा परिपोष करणें व आयुर्वेदांतील जुन्या लुप्तप्राय उपयुक्त कार्यांचा पुनः प्रचार करणें.

(९) धर्मार्थ दवाखाना, रुग्णालय, सूतिकागृह अशा लोकोपयोगी वैद्यकविषयक व आरोग्यविषयक संस्था चालविणें. आरोग्यविषयक संस्थांस नियमित मदत करता यावी म्हणून या ट्रस्टमध्ये तूर्त पांच हजार रुपयांची रक्कम स्वतंत्र दिली आहे व तिच्या विनियोगाबाबत खुलासा केला आहे. ही रक्कम पुढे ट्रस्टींनी वाटल्यास ट्रस्ट[illegible]न्नांतून वाढवावयाची आहे.

(१०) रोगांचे सांथीचे वेळीं शक्य तों फुकट किंवा अल्प किंमतीने त्या त्या रोगांवर औषधें पुरविणें व वैद्यकीय मदत देणें.

(११) निखिल भारतायुर्वेद विद्यापीठाच्या तीन पदवी-परीक्षांत उत्तीर्ण होऊन पहिल्या येणाऱ्या विद्यार्थ्यांस खालीलप्रमाणें पारितोषिकें देणें.

| पदवी–परीक्षा | पारितोषिकाचें नांव | रक्कम |
|---|---|---|
| १ आयुर्वेदाचार्य | श्रीधूतपापेश्वर पारितोषिक | रु. २५ |
| २ आयुर्वेदविशारद | कै. विष्णुशास्त्री पुराणिक पारितोषिक | रु. २१ |
| ३ आयुर्वेदभिषक् | कै. कृष्णशास्त्री पुराणिक पारितोषिक | रु. १५ |

या रकमा कमी जास्ती करण्यास, तसेंच हीं किंवा अशींच बक्षिसें दुसऱ्या कोणत्याहि योग्य संस्थेस अगर व्यक्तींस देण्यास ट्रस्टी मुखत्यार आहेत. त्याचप्रमाणे पारितोषिक रोख रकमेनें किंवा पदकें अथवा पुस्तकें अशा स्वरूपांत देणें हें ट्रस्टींचे इच्छेवर अवलंबून राहील.

मुख्य हेतु आयुर्वेदद्वारां आयुर्विद्येची उन्नति व्हावी हा आहे. देशकालाप्रमाणें कार्यक्षेत्र व कामाचा तपशील बदलूं शकेल, म्हणून कार्यक्षेत्र व कामाचा तपशील मर्यादित केलेला नाही.

ट्रस्टचें ध्येय व्यापक आहे. जरुरीप्रमाणे व अनुकूलतेप्रमाणे निसर्गोपचार,योगोपचार,मंत्रोपचार, मानसोपचार इत्यादि उपचारपद्धतींचे संशोधन व उपयोग करून, रोगनिवारणाचें कार्य या ट्रस्टकडून करतां येईल. कारण मुख्य हेतु मनुष्य निरोगी व्हावा व राहावा हा होय. तो आयुर्वेदोन्नतीचे द्वारें बहुतांशीं पुरा होईल, अशी ट्रस्टचे संस्थापकांची श्रद्धा असल्याने, आणि विशेषतः श्रीधूतपापेश्वर आयौषधि कारखाना ही संस्था या ट्रस्टची जनक असल्याने "श्रीधूतपापेश्वर आयुर्वेद ट्रस्ट" असें नांव ट्रस्टला दिलें आहे. ट्रस्टकडून आयुर्वेदीय चिकित्सेचाच अवलंब प्रामुख्याने करण्यांत यावयाचा आहे.

# रजिस्टर खात्यांतील गैरसोयी

(ले. शंकर रामचंद्र बेडेकर, वकील कोरेगांव.)

रजिस्टर कचेरींत जाणारे लोक परत आले असतां असंतुष्ट दिसतात. असंतुष्ट दिसणाऱ्या लोकांत मुख्य भरणा ऋणको लोकांचाच असतो. नाडलेला ऋणको सावकार घालील त्या अटी निरुपायाने कबूल करून निमूटपणें कायद्यापुढे मान वांकविण्यास मेंढरासारखा तयार होतो. कायद्यांतील दोष अनुभवाने त्याच्या प्रतीतीस आले असता त्यास वाचा फोडण्याचें काम त्याच्या हातून होत नाही. तालुक्याचे ठिकाणीं डोळे उघडे ठेवून व गरीब नाडलेल्या लोकांकडे सहानुभूतीनें पाहून त्यांच्या सोयी-गैरसोयीची विचारपूस करणारास व कायद्यांच्या गुणावगुणांची चिकित्सा करण्याची पात्रता असणारास नोंदणीचे (रेजिस्ट्रेशन) कायद्यांतील एकदोन दोषांसंबंधाने दुरुस्ती सुचवावीशी वाटणें अगदी स्वाभाविक आहे. पहिली दुरुस्ती नोंदणी कायद्याच्या ३४ कलमाचें पोटकलम ३ मधील व पोटकलम "बी" संबंधाने होय. तें कलम असें कीं "नोंदणी अम्मलदारापुढे हजर होऊन दस्तऐवज करून देणाऱ्या व देतों म्हणणाऱ्या व्यक्तींची नोंदणी अम्मलदारांन तो तोच मनुष्य असल्याबद्दल खात्री करून घ्यावी." सदरहू कलम कायद्यांत अन्तर्भूत करण्याचे वेळीं कायदे करणाऱ्या अंमलदाराचा हेतु काय होता याची कल्पना करणें अवघड आहे. परंतु सामान्यतः तोतया माणसाने पुढे येऊन लबाडीने दुसऱ्याची मिळकत फरोक्त करून देऊं नये असा उद्देश असावा असें वाटतें व त्या संबंधाची उपाययोजना म्हणून नोंदणी अंमलदाराची व दस्तऐवज करून देणारे पक्षकाराची ओळख असल्यास आपले खात्रीने नोंदणी अम्मलदाराने दस्तऐवज नोंदावा. नसल्यास नोंदणी अंमलदाराच्या व पक्षकाराच्या अशा दोघांच्या ओळखीच्या मध्यस्थाच्या माहितीवरून अंमलदाराने दस्त नोंदावा अशी व्यवस्था आहे.

### गांवगुंडांचा धंदा

अशा तऱ्हेचे मध्यस्थ ऊर्फ गांवगुंड यांचा रजिस्टर कचेरींत ओळख घालणें हा एक किफायतशीर धंदाच बनला आहे. कुळांच्या हिताकडे त्यांची नजर क्वचितच असते. त्यांची मुख्य दृष्टि स्वतःच्या पोटाकडे व अंमलदाराच्या भिडेकडे जास्त असते. अंमलदारास नाखूष करण्यास ते क्वचितच तयार असतात व नोंदणी अंमलदारास त्यांचा मोठा आधार वाटतो. परंतु ओळखीची रजिस्टर कचेरींत गरज पडणें हा मोठा छळ आहे असे कुळांस वाटतें.

ज्या वेळीं दस्तऐवज करून देणारे लोक निरक्षर असून त्यांचे दस्तऐवज निशाणी रेघा, नांगर वगैरेसारख्या गोष्टींनी होत असत तेव्हा दस्तऐवज करून देणारांच्या सुरक्षिततेबद्दल ओळखण्याची तजवीज करणे स्वाभाविक होतें. परंतु इंग्रज सरकाराच्या सुमारें १०० वर्षांच्या अमलानंतर अशा तऱ्हेची ओळखीची तजवीज कायद्यांत अजून शिलक राहणें अनुचित दिसतें. ओळख घालणारे धंदेवाईक गांवगुंड गांव सोडून तालुक्याचे गांवीं जाण्यास निघण्यापूर्वी कुळांकडून अडवून पैसे घेतात व कुळांस जावयाप्रमाणे त्यांची व्यवस्था निरुपायाने ठेवावी लागते. ठराविक ओळखदाराशिवाय नोंदणी कचेरींत कामाचा उरक लवकर होत नाही या कोड्याचा उलगडा नोंदणी कचेरीची एकदा यात्रा करणारास तेव्हाच होतो. वाढलेली नोंदणीची फी कमी करणें हें सामान्य मनुष्याचे हातीं नाही. परंतु ओळखीच्या कलमाची अट दूर झाल्यास सरकाराचा कोणत्याहि तऱ्हेचा तोटा न होतां कुळांची जी अनेक तऱ्हेने नाडवणूक होत असते त्यापासून मात्र त्यांची मुक्तता होणार आहे.

ओळखीची अट कायम ठेवण्यास कोणतेंहि

संयुक्तिक कारण दिसत नाही. मात्र ती अट काढून टाकण्यास खाली दिलेलीं बलवत्तर कारणें आहेतः—

१ निशाणी रेघ नांगर वगैरे दस्तऐवजावर सह्या करण्याचे प्रकार बंद होऊन नवीन लागलेल्या शोधामुळे दस्तऐवजावर आंगठे व सह्या घेण्याची पद्धत सुरू आहे व त्यामुळे लबाडी होण्याची बिलकुल भीति नाही.

२ नोंदणी कायदा अमलांत येण्याचे वेळीं व पुढेहि बरींच वर्षे आंगठ्याचें रजिस्टर बुक प्रचारांत नव्हतें. परंतु हल्ली सर्रास त्याचा उपयोग होत असल्यामुळे लबाडीनें खोटे दस्तऐवज होण्याचा संभव नाहीं.

३ हल्ली दस्तऐवज नोंदण्याचें काम फोटो-पद्धतीने होत असल्यामुळे अस्सल दस्तऐवजावरील सह्या व आंगठ्याचे ठसे यांचा बरोबर छाप सरकार-दप्तरीं राहतो अस्सल दस्तऐवज गहाळ झाला तरीसुद्धा फसवेगिरीचा गुन्हा उघडकीस आणतां येतो.

४ लोकांमध्ये साक्षरता वाढत आहे व लोक पूर्वीइतके भोळेभाबडे राहिले नाहीत.

५ दस्तऐवज करून देणारा मनुष्य तोतयापणाने दुसरेंच नांव सांगून कपट करील तर तो गुन्ह्यास पात्र होईल. त्यास शासन करण्यास पिनल कोड खंबीर आहे.

६ प्राणापेक्षा अधिक जतन करून ठेवलेली संपत्ति योग्य तऱ्हेने विचारपूस व चौकशी न करतां सहज भोळेपणाने तोतया इसमास देऊन व्यवहारांत आपली फसवणूक करून घेईल असा धनको क्वचितच आढळेल व ही गोष्ट मनुष्यस्वभावाच्याविरुद्ध असल्याने ती घडण्याचा संभव नाही.

७ कपटाने तोतया माणसाने दस्तऐवज करून देऊन त्यास त्याबद्दल शिक्षा झाल्याचीं उदाहरणें दंडनीतीच्या कायद्यामध्ये क्वचितच आढळून येत असतात.

८ दस्तऐवज करून देणारा व घेणारा दोघेहि सुविद्य व व्यवहारचतुर असतांना त्यांचेकडून नोंदणी अम्मलदाराने ओळख मागणें हा हास्यास्पद प्रकार आहे व अशा वेळीं नोंदणीचे कायद्यांत अपवाद सांगितलेला नाही ही गोष्टहि ओळखीचे प्रकाराची विफलता दाखविण्यास पुरेशी आहे.

९ ज्या समाजामध्ये पडद्याची चाल आहे त्या समाजांतील स्त्रिया ज्या वेळीं दस्तऐवज करून देण्यास नोंदणी कचेरींत येतात त्या वेळीं त्यांचें मुखावलोकन कोणासहि होत नाही व पडद्याचे चालीमुळे पूर्वीहि झालें नसतें. अशा स्थितींत धंदेवाईक गांवगुंडाने त्यांची ओळख सांगणें हा प्रकार असामान्य आहे.

१० एकाहि निरुपद्रवी माणसाची फसवणूक होऊं नये व त्याकरिता शेंकडा नव्याण्णव लोकांस कायद्यांतील ओळखीच्या कलमाचा त्रास झाला तरी पुरवला अशा उदात्त तत्त्वाने ओळखीचें कलम कायद्यांत निरंतर ठेवणें हें सुधारलेल्या सरकारास व रोज बदलणाऱ्या देशकालवर्तमानपरिस्थितीस शोभणारें नसल्यामुळे ओळखीचें कलम काढून टाकून रयतेचा त्रास चुकविणें हेंच न्यायाचें आहे.

वरील विवेचनांत आलेला गावगुंड शब्दकुळाची काळजी न घेतां स्वतःचे पोटाची काळजी जास्त घेऊन ओळखीचें काम करणारास अनुलक्षून लिहिलेला आहे. निरपेक्षपणें ओळख घालणारे सद्‌गृहस्थाची गोष्ट निराळी आहे. वेळीं अवेळीं आगाऊ रजा न काढता ओळखीचें काम सहेतुकपणें करणाऱ्या पाटील-तलाठ्यासंबंधी रयतेस विचार करण्याचें कारण नाही. त्यांचेसंबंधी विचार करण्यास सरकार समर्थ आहे.

ओळखीची अट कमी केल्यास दस्तनोंदणीस हल्ली जो खर्च येतो त्याचे निमे खर्चांत दस्तनोंदणीचें काम होईल असे कचेरींतून बाहेर पडणाऱ्या लोकांचे तोंडून नेहमी उद्‌गार ऐकूं येतात. या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या कारणास्तव नोंदणी कायद्यांतील सदरील आक्षिप्त कलम काढून टाकणें हें सरकाराचें कर्तव्य आहे. रयतेची होणारी कुचंबणा जाहीर रीतीने जगापुढे मांडून ती दूर करण्याबद्दल चळवळ करणें हें आधुनिक कालांतील अन्याय दूर करण्याचें मुख्य साधन आहे. कोणी तरी कौन्सिलर या गोष्टीकडे लक्ष देतील या आशेने दररोज होणाऱ्या गैरसोयीची रडकथा विस्तृतपणें मांडलेली आहे. तरी त्याबद्दल जरूर तें दुरुस्ती बिल आणून कौन्सिलांत खटपट व्हावी अशी विनंति आहे.

# शस्त्रसंन्यास परिषदेवरील संकट टळलें

हर हिट्लर यांनी सर्वाधिकारी म्हणून जर्मनीच्या राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेतल्यापासून आपल्या चढाईच्या धोरणानें अन्तर्गत आणि आन्तरराष्ट्रीय राजकारणांत एकच खळबळ उडवून दिली आहे. त्यांच्या या धोरणामुळें, विशेषतः नाझी सरकारानें ज्यू लोकांवर हत्यार उपसल्यामुळें, साऱ्या युरोपभर निषेधाचा एकच ध्वनि उमटूं लागला. तशांतच मॅक्डोनाल्ड यांच्या योजनेंतील सर्व राष्ट्रांना सैन्याचें ठराविक प्रमाण लागूं करणें व जर्मनीला लष्करी शिपाई वाढविण्याला बंदी करणें या कलमांना जर्मनीनें विरोध दाखवितांच ती संधि साधन फ्रान्स व इंग्लंडमधील कांहीं वृत्तपत्रें व वक्ते यांनी जर्मनीवर निंदा-नालस्तीचा चिखल उडविण्याची हौस भागवून घेतली! सुविचाराचा सडा तुटला म्हणजे मुत्सद्देगिरीचा पतंग कसा घिरट्या घेतो याचें लॉर्ड हेल्शॅम यांचे भाषण हें उत्कृष्ट प्रत्यंतर आहे. त्यांनी लॉर्डांच्या सभेंत अशी आरोळी ठोकली कीं, जर्मनीच्या हटवादीपणामुळें शस्त्रसंन्यास परिषदेचा पट उधळला जाऊन त्यानें शस्त्रास्त्रें वाढविण्याचा चंग बांधला तर दोस्त राष्ट्रांना ऱ्हाइन नदीलगतचा जर्मन मुलूख पुनरपि पादाक्रान्त करावा लागेल. लॉर्ड हेल्शॅम यांचा धाक असा कीं, जर्मनीला ऱ्हाइनचा सुपीक प्रदेश हातांतून गमवावयाचा नसेल तर त्यानें मुठींत नाक धरून मॅक्डोनाल्ड यांच्या योजनेला पाठिंबा दिला पाहिजे. 'स्त्रीला जसें मातृपद तसें मनुष्याला समरांगण आवश्यक होय' अशी गर्जना करून फॉन पेपेन यानींहि हेल्शॅम यांच्या हुंकाराला प्रतिहुंकार दिला.

लॉर्ड हेल्शॅम, न्यूरॉथ, पेपेन यांच्या भाषणांनीं क्षुब्ध झालेल्या वातावरणांत आपल्या भाषणाचा बॉंब फेकून हर हिट्लर हे परिषदेचा धुव्वा उडविणार असा कयास बहुतेक मुत्सद्द्यांनी आपल्या मनाशीं बांधला होता. किंबहुना याच समजुतीनेंहि कदाचित् अमेरिकेचे अध्यक्ष मि. रूझवेल्ट यांनी हिट्लर यांच्या अगोदरच सूचक असें भाषण केलें. प्रे. रूझवेल्ट यांनी ता. १७ मे रोजीं चव्वेचाळीस राष्ट्रांना संदेश पाठवून आपापलीं शस्त्रास्त्रें कमी करावीं, चढाईचीं हत्यारें नाहीशीं करावीं, आपल्या सीमान्त प्रदेशाबाहेर सैन्यें पाठवूं नयेत, जागतिक शांतता आणि आर्थिक स्थैर्य यांजवर दृष्टि ठेवून किरकोळ मतभेद विसरून जावे, शस्त्रसंन्यासासाठी मॅक्डोनाल्ड यांची योजना स्वीकारावी, या योजनेनुसार फ्रान्सचीं शस्त्रास्त्रें कमी करावीं आणि जर्मनीचीं शस्त्रास्त्रें निश्चित करावीं इत्यादि अनेक सूचना त्यांस कळविल्या. परंतु त्या कळवितानाच 'जर एखाद्या राष्ट्रानें शांततास्थापनेच्या या कार्यांत व्यत्यय आणला तर अपयशाचें खापर त्या राष्ट्राच्या माथीं फुटेल' असें बजावताना मि. रूझवेल्ट यांच्या मनश्चक्षूपुढें जर्मन गरुडच उभा होता हें काय सांगावयास पाहिजे ?

मि. रूझवेल्ट व इतर मुत्सद्दी यांनी हर हिट्लर यांच्या भाषणासंबंधीं बांधलेला कयास चुकला. कारण ता. १७ रोजीं राइशस्टॅगपुढें हर हिट्लर यांनीं जें भाषण केलें तें मुत्सद्दीपणाचें ठरलें; इतकेंच नव्हे तर त्यांत त्यांचा स्वाभिमान व देशाभिमानहि दिसून आला. हर हिट्लर हे एक हडेलहप्पी आणि आततायी गृहस्थ आहेत असा समज अलीकडे सर्वत्र पसरला होता. परंतु जर्मनीच्या सुखदुःखाची जबाबदारी त्यांजवर पडताच त्यांच्या उद्गारांत व विचारांत फरक पडत चालला. हिट्लर यांनी आपल्या भाषणांत असें निःसंदिग्धपणें जाहीर केलें कीं, 'जर्मनीला युद्धाची लालसा नाहीं, शजारचीं राष्ट्रें निःशस्त्र होतील तर जर्मनीहि निःशस्त्र होण्यास तयार आहे, मात्र ही गोष्ट शक्य नसेल तर शस्त्रास्त्रांतील समानतेचा हक्क मिळविण्यासाठी जर्मनी कसोशीचा प्रयत्न करील. जर्मनीवर पूर्वीप्रमाणेंच शस्त्रास्त्रांच्या बाबतींतलि विषमता कायम ठेवण्याचा अन्याय नव्या करारान्वये होणार असल्यास जर्मनी सर्व आन्तरराष्ट्रीय परिषदांतूनच काय, पण राष्ट्रसंघांतूनहि आपलें अंग काढून घेईल! मि. रूझवेल्ट यांच्या सूचना जर्मनीलाहि मान्य आहेत व वरील अटींवरच कोणत्याहि शांतता-स्थापनेच्या करारांत भाग घेण्यास जर्मनी तयार आहे. व्हर्सेलिसचा अन्यायमूलक तह आमूलाग्र बदलून घेण्याचा आमचा मानस आहे व तें कार्य बलात्कारापेक्षा सामोपचारानेंच साधावें अशी आमची उत्कट इच्छा आहे.'

हर हिट्लर यांच्या भाषणांतील मुख्य मुद्दा असा कीं, दोस्त राष्ट्रांनी जर्मनीच्या शस्त्रसमानतेच्या मागणीला मान्यता द्यावी, त्याजवरील महायुद्धाचा आरोप काढून टाकावा म्हणजे तो शांततास्थापनेच्या कोणत्याहि करारांत भाग घेण्यास तयार होईल.

यावर फ्रान्सचें म्हणणें असें कीं, जर्मनीला शस्त्रसमानतेचा पाहिजे तर हक्क द्या, परंतु त्याच वेळीं फ्रान्सच्या संरक्षणाची तजवीज करा. निःशस्त्रीकरण परिषदेची प्रगति अडली असेल तर ती यामुळेच. तिला या दोन मागण्यांचा मेळ कसा घालावा हें समजेना. मि. मॅक्डोनाल्ड यांनी पंचवार्षिक योजना तयार करून व तिला अमेरिकेचे अध्यक्ष मि. रूझवेल्ट यांची मान्यता मिळवून परिषदेला शृंगापत्तींतून सोडविण्याचा प्रयत्न चालविला आहे. मि. मॅक्डोनाल्ड यांना जर्मनीची शस्त्रसमानतेची मागणी कबूल आहे. परंतु ते तिचा अर्थ निराळा करतात. मॅक्डोनाल्ड यांच्या मतें जर्मनीची शस्त्रसमानतेची मागणी मान्य करणें म्हणजे इतर राष्ट्रांचीं शस्त्रास्त्रें जर्मनीच्या शस्त्रास्त्रांच्या प्रमाणांत कमी करणें होय. हर हिट्लर यांना हाहि श्लेष मान्य आहे. त्या अर्थाप्रमाणें तरी सर्व राष्ट्रांचीं शस्त्रास्त्रें कमी करा अशी त्यांची मागणी आहे. परंतु शस्त्रसंक्षेपाची योजना अंमलांत येणार नसेल व जर्मनीला पूर्वीप्रमाणेच शस्त्रसंन्यासाच्या बेडींत अडकवून ठेवण्यांत येईल तर मात्र जर्मनी दुसऱ्या अर्थानें शस्त्रसमानतेचा हक्क मिळविण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करील असा हिट्लर यांनी इषारा दिला आहे.

शस्त्रसमानतेचा दुसरा अर्थ शस्त्रवृद्धि हा होय. जागतिक शांतता हें ध्येय व शस्त्रसंन्यास हें त्याचें साधन अशा दृष्टीनें विचार करता कोणत्याहि राष्ट्राला यापुढे शस्त्रवृद्धीचा हक्क देणें अर्थातच योग्य नाही. परंतु हेंहि म्हणणें सापेक्ष आहे. जर्मनीला शस्त्रास्त्रें वाढविण्याचा हक्क देऊं नये असें जेव्हा म्हणण्यांत येतें, तेव्हा फ्रान्स, इंग्लंडप्रभृति राष्ट्रांचीं शस्त्रास्त्रेंहि कमी करण्यांत यावीं हें ओघानेच कबूल करावें लागतें. हर हिट्लर यांनी शस्त्रसमानतेविषयीं इतका हट्ट धरण्याचें कारण त्यांना व्हर्सेलिसच्या तहाचा आलेला कटु अनुभव हें होय. व्हर्सेलिसच्या तहांतील कलमांनी जर्मनीवर शस्त्रसंन्यास लादण्यांत आला, तेव्हाच 'जर्मनीचा शस्त्रसंन्यास ही भावी कालांतील सार्वत्रिक शस्त्रसंन्यासाची नांदी होय, जर्मनीनें आपलीं शस्त्रास्त्रें कमी केलीं म्हणजे दोस्त राष्ट्रेंहि तोच मार्ग अनुसरतील,' असें सांगण्यांत आलें. परंतु गेल्या चौदा वर्षांचा अनुभव असा कीं, एकट्या जर्मनीनेच तेवढें शस्त्रसंन्यासाचें व्रत एकनिष्ठपणें चालविलें आणि दोस्तांनी शस्त्रास्त्रें कमी तर केलीं नाहीतच परंतु ती बिनदिक्कत वाढविलीं मात्र!

दोस्तांच्या या वृकनीतीनें बिचारा जर्मनी तेवढा शस्त्रहीन, दुबळा व स्वसंरक्षणास असमर्थ असा झाला. उलट पक्षीं दोस्त राष्ट्रांनी आपलें लढाऊ सामर्थ्य वाढविलें. जर्मनीसारख्या पुढारलेल्या राष्ट्रानें विषमतेचें हें शल्य किती दिवस आणि काय म्हणून सहन करावें? ज्या राष्ट्राजवळ स्वतःचें संरक्षण करण्याइतकेंहि लष्करी सामर्थ्य नाही त्या राष्ट्राचा टिकाव स्वार्थी जगाच्या जीवनकलहांत लागणें शक्य नाही. व्हर्सेलिसच्या तहानें जर्मनीजवळ स्वतःचें संरक्षण करण्यास पुरेसें सैन्यहि ठेवलें नाही. अशा स्थितींत एकतर सारीं युरोपियन राष्ट्रें पुरतीं शस्त्रहीन झाली पाहिजेत किंवा आम्हांला तरी शस्त्रास्त्रांतील समान दर्जा मिळाला पाहिजे अशी मागणी हिट्लर यांनी करून ती धसास लावली, तर त्यांत त्यांची काय चूक?

कित्येक धूर्त मुत्सद्दी असा युक्तिवाद करतात कीं, जर्मनीला निःशस्त्रीकरणाचें तत्त्व मान्य आहे तर त्याला शस्त्रास्त्रांची गरजच काय? शस्त्रास्त्रें बाळगण्याचा पाश एर्वीतेवीं तुटलाच आहे. तेव्हा आता त्यानें फक्त हरिहरि करीत स्वस्थ बसावें, शस्त्रास्त्रांची नसती दगदग त्याला पाहिजे कशाला? पण जर्मनी या युक्तिवादानें फसणारा नाही. वरील युक्तिवादाला अगदीं साधें उत्तर असें कीं, कांही अनपेक्षित संकट उपस्थित झालें तर त्याच्या परिहारासाठीं राष्ट्राजवळ शस्त्र पाहिजेच. जर्मनीनें पुनः वर डोकें काढून युरोपियन राजकारणांत मानाचें स्थान पटकवावें हा विचारहि फ्रान्सला सहन होत नाही व म्हणूनच जर्मनीच्या मागणीला मान्यता देण्यांत तो नवीं नवीं खेकटीं उत्पन्न करीत असतो. इतके दिवस इंग्लंडहि फ्रान्सच्याच तालावर नाचत होतें. परंतु जर्मनीची न्याय्य मागणी नाकारण्यांत आपण निःशस्त्रीकरण परिषदेचें मरण म्हणजे पर्यायानें भावी महायुद्धाचेंच बीजारोपण करीत आहों ही गोष्ट इंग्लंडच्या लवकरच ध्यानीं आल्यामुळे व इटालीनेहि जर्मनीच्या मागणीबद्दल सहानुभूति दाखविल्यामुळे मॅक्डोनाल्ड यांनी जर्मनीच्या मागणीला मान्यता दिली व त्याप्रमाणें एक योजना तयार केली.

दुसरे कित्येक टीकाकार असा आक्षेप घेतात कीं, जर्मनीला आजच हा समानतेचा हक्क देण्यांत आला तर जगावर तें एक नवें संकटच ओढवणार आहे. कारण समानतेचा हक्क मिळतांच जर्मनी रणदेवतेला नररुंडांची माळ बांधल्याशिवाय राहणार नाही! असा युक्तिवाद करणें म्हणजे एकट्या जर्मनीवरच राक्षसी वृत्तीचा आरोप करणें होय. जर्मनी तेवढा चढेल आणि इतर राष्ट्रें मात्र साळसूद असें कोणी समजत असेल तर त्यावर

कोण विश्वास ठेवील ? शस्त्रसमानतेचा हक्क मिळतांच जर्मनी युद्ध पुकारील हे तर्कशास्त्राला तरी कसें पटेल? जर्मनीला युद्धाची लालसा नाही. त्याला समानतेचा हक्क केवळ स्वतःच्या संरक्षणापुरताच पाहिजे हें परवाच्या हर हिट्लर यांच्या भाषणाने जसें सिद्ध झालें आहे तसेंच ता. २५ रोजीं त्यांनी केलेल्या भाषणावरूनहि दिसून येतें. ता. २५ मार्च रोजीं केलेल्या भाषणांत हर हिट्लर म्हणाले, "भूतकालांतील शोकजनक घटनांवर पडदा टाकण्यास जें राष्ट्र तयार होईल त्याच्याशीं स्नेहाचें आणि सहकारित्वाचें नातें जोडण्यास राष्ट्रीय सरकार एका पायावर तयार आहे." त्यावरून जर्मनीची मनःप्रवृत्ति चढाईपेक्षा समेटाकडेच झुकत असल्याचें दिसून येत नाही काय ? लढाई म्हणजे कांही खेळ नाही कीं, तो केव्हाहि खेळावा. इतका साधा विचार केला तर शस्त्रसमानतेची मागणी करण्यांत जर्मनीचा काळाबेरा हेतु नसून त्यांत त्याची तात्त्विक भूमिकाच दिसून येते हें निष्कपट वृत्तीच्या कोणत्याहि माणसाच्या लक्षांत येईल.

कोणतेहि राजकीय तह चिरकालीन नसतात हे ज्यांना समजतें त्यांना जर्मनीच्या मागणींतील न्यायीपणा पटल्याशिवाय राहणार नाही. मि. मॅक्डोनाल्ड यांच्या लक्षांत ही गोष्ट असल्यामुळेच त्यांनी जर्मनीच्या शस्त्रसमानतेच्या मागणीला मान्यता देऊन सर्व राष्ट्रांची सैन्यसंख्या ठरवून टाकली आहे. हर हिट्लर यांनी सदर योजनेला तात्त्विक मान्यता दिल्यामुळे एक अडसर बाजूला झाला व त्यांच्यावर परिषदेच्या अपेशाचें फुटणारें खापर टळलें असें म्हटलें पाहिजे. दुसरा अडसर फ्रान्सचा. परंतु आता रूझवेल्ट यांनीच आपण होऊन निरनिराळ्या राष्ट्रांना संदेश पाठवून जागतिक शांततेच्या सुरक्षिततेची हमी एक प्रकारें आपल्या शिरावर घेतली असल्यामुळे फ्रान्सचा विरोधहि वितळेल असें वाटतें. इटाली आणि अमेरिका या दोन राष्ट्रांनी निःशस्त्रीकरणाच्या प्रश्नांत जातीने लक्ष घालण्याचें ठरविल्यामुळे निःशस्त्रीकरणाची निरगाठ सुटण्याच्या मार्गास लागली असें म्हणण्यास हरकत नाही.

शस्त्रसंन्यास परिषदेचें हें अनुष्ठान जागतिक अर्थ परिषदेच्या यशस्वितेसाठी बसविण्यांत आलें आहे. जागतिक अर्थ-परिषद भरून ती यशस्वी रीत्या पार पडणें ही गोष्ट अमेरिकेच्या फायद्याची असल्यामुळे तिने निःशस्त्रीकरणाच्या प्रश्नांत आता आपुलकीच्या भावनेने लक्ष घालण्याचें ठरविलें आहे. गेल्या वर्षी इंग्लंड व इटाली या राष्ट्रांशिवाय अमेरिकेला युद्ध कर्जाचे हप्ते कोणत्याच राष्ट्राने दिले नाहीत. इंग्लंडाने हप्ते भरले तेहि या अटीवर कीं, अमेरिकेने युद्धकर्जाचा फेरविचार केला पाहिजे. अमेरिका ही सर्व जगाची सावकार असली तरी आज कर्जमाफी देण्याइतकी तिची ऐपत नाही. व्यापारमंदी आणि बेकारी ह्या दोन रोगांनी तिलाहि घेरलेंच आहे. ऋणको राष्ट्रांचीं मनें न दुखवितां, किंबहुना त्यांच्याशीं व्यापारी करारमदार करूनहि युद्धकर्जाचे हप्ते कायमचे कसे येत राहतील ही अमेरिकेला चिंता लागली आहे. उलटपक्षीं अमेरिकेला अर्थ-परिषदेंत ओढून तिला युरोपियन राजकारणांत गुंतविलें म्हणजे तिचा युरोपच्या आर्थिक परिस्थितीशीं प्रत्यक्ष संबंध येईल. तसा संबंध आल्यावर ती दुरवस्था नाहीशी करण्यासाठीं स्वतः तिलाहि थोडासा स्वार्थत्याग करावा लागेल. मग तो स्वार्थत्याग कर्जमाफीच्या रूपाने दिसो किंवा व्यापारी करारमदारांच्या स्वरूपांत दिसो, असा मि. मॅक्डोनाल्ड यांचा डाव आहे. अशा रीतीने कोणत्या राष्ट्राचा कसाहि विचार असला तरी जगाची आर्थिक दुरवस्था घालवावी याविषयीं सर्वांची एकवाक्यता आहे व त्याच उद्देशाने ता. १२ जून रोजीं लंडन येथे जागतिक अर्थ-परिषदेची मेढ रोवण्यांत येणार आहे.

लंडन येथील जागतिक अर्थपरिषद सफल व्हावी म्हणून निःशस्त्रीकरण परिषदेच्या यशस्वितेबद्दल मि. मॅक्डोनाल्ड व मि. रूझवेल्ट हे आपल्या जिवाचा इतका आटापिटा करीत आहेत. निःशस्त्रीकरण परिषदेवर आर्थिक परिषद अवलंबून ठेवण्याचें कारण असें दिसतें कीं, पहिल्या परिषदेंत शस्त्रनियमनाची कांही निश्चित योजना तयार झाली तर त्या त्या राष्ट्रांच्या बजेटावर तिचा परिणाम होईल व त्या दृष्टीने आर्थिक परिषदेंत कांही आर्थिक योजना करतां येतील. मॅक्डोनाल्ड यांच्या योजनेचा सारा भर भौमिक, नाविक आणि वैमानिक दळ कमी करून व सैनिकांची संख्या मर्यादित करून सामवादाने राजकीय भांडणें मिटविण्यावरच मुख्यतः आहे. सैन्यच कमी झालें म्हणजे साहजिकच त्यावरील खर्चहि कमी होईल. अमेरिकेचें ऋणको राष्ट्रांच्या मागे एकसारखें हेंच टुमणें होतें कीं, तुम्हीं सैन्य आणि शस्त्रास्त्रें कमी केलीं तर आम्ही युद्धकर्जाचा फेरविचार करूं. मि. मॅक्डोनाल्ड यांनी आपली योजना तयार करून अमेरिकेला तिच्या शब्दांतच पकडलें आहे दिवसेंदिवस अमेरिकेलाहि व्यापाराच्या दृष्टीने एकांडे शिलेदार राहून भागणार नाही. युरोपियन राजकारणांत अमेरिकेने लक्ष घालण्यास हें आर्थिक धोरणच कारण झालें आहे.

जागतिक अर्थ-परिषद भरावयाची असेल तेव्हा भरो. तूर्त शस्त्रसंन्यास परिषदेच्या प्रगतीकडेच लोकांचें अधिक लक्ष लागून राहिलें आहे. वर एके ठिकाणीं दाखविल्याप्रमाणें शस्त्रसंन्यास परिषदेचें यश मुख्यतः ती जर्मनीची मागणी कितपत पुरवते व तदनुरूप इतर राष्ट्रांचें नाविक, वैमानिक आणि भौमिक दल किती प्रमाणांत छाटतें या गोष्टीवरच अवलंबून आहे. जर्मनीची मागणी सत्यार्थानें पुरी करावयाची म्हटलें तर सर्व पापांचें मूळ जो व्हर्सेलिसचा तह तोच आमूलाग्र बदलला पाहिजे. निःशस्त्रीकरण परिषदेचा हेतु जगांत शांतता स्थापन करणें हा असेल तर परिषदेनें व्हर्सेलिसचा तह बदलल्याशिवाय गत्यंतर नाहीं. प्रो. बार्नेस हेहि म्हणतात कीं, "व्हर्सेलिसच्या तहांतील अन्यायमूलक कलमें पूर्णपणें रद्द केल्याशिवाय युरोपमध्ये खरीखुरी शांतता नांदण्याची आशाच करावयास नको." हीं अन्यायमूलक व मानहानिकारक कलमें जर्मनीवर लादण्यांत आलीं असून त्यामुळे जर्मनी दुबळा बनला आहे. हीं कलमें जर्मनीच्या हृदयाला घरें पाडीत आहेत. जित राष्ट्रांच्या मनाला होत असलेल्या अपमानाच्या वेदना कमी करून व दोस्त राष्ट्रांना विश्वासांत घेऊन शस्त्रनियमनाचा प्रश्न सोडवितां आला तर पाहावा असा मॅक्डोनाल्ड यांचा विचार आहे. या विचाराला हर हिट्लर व मि. रूझवेल्ट यांजकडूनीह अनुकूलता लाभल्यामुळेच जिनिव्हा येथील शस्त्रसंन्यास परिषदेंत आशेचें नवें वारें खेळूं लागलें आहे. हें आशाजनक वातावरण कायम टिकून जर्मनी व फ्रान्स यांच्या मागण्यांतील विरोध परिषदेला काढून टाकतां आला तरी तिनें मोठेंच कार्य केलें असें होईल.

# प्राचीन शास्त्रें व आधुनिक विद्वान

( ले.—पं. रघुनाथशास्त्री कोकजे, तर्कतीर्थ.)

मराठी भाषेमध्ये निरनिराळ्यां तऱ्हेचें शास्त्रीय वाङ्मय उपलब्ध व्हावें म्हणून अनेक साहित्यभक्त आपापल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आहेत. या प्रयत्नाचें फळ अनेक प्रकारच्या शास्त्रीय वाङ्मयाच्या निर्मितींत दिसून येत आहे ही समाधानाची गोष्ट होय. नीतिशास्त्र, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, तसेंच समाजशास्त्र वगैरे विषयांवर कित्येक ग्रंथ मराठींत झालेले असून दिवसेंदिवस त्यांत अधिक भर पडत गेली तर लवकरच मराठीची कूस धन्य होईल असें म्हणावयास हरकत नाहीं. महाराष्ट्रांतील विद्वानांनी एका गोष्टीकडे मात्र अधिक लक्ष दिलें पाहिजे. उत्पन्न होणारें शास्त्रीय वाङ्मय शास्त्रशुद्ध आहे किंवा नाहीं याची त्यांनी करून परीक्षा केली पाहिजे. केवळ एखादा ग्रंथ शास्त्रीय विषयावर आहे, एवढ्याचकरितां त्यांतील दोष उघडकीस आणण्याचें टाळून चालणार नाहीं. आपल्या प्राचीन शास्त्राबद्दल बोलावयाचें तर असें दुःखानें म्हणावें लागतें कीं, मराठी वाङ्मयसेवकांनीं सदर वाङ्मयाच्या शास्त्रशुद्धतेकडे मुळींच लक्ष दिलेलें नाहीं. न्याय वेदान्त वगैरे शास्त्रावरील कांहीं ग्रंथ मराठींत आहेत. त्यांत शंकाच नाहीं. परंतु ते मराठी भाषेचें दैन्य फेडण्यास सर्वस्वी असमर्थ आहेत. हें वाङ्मय त्या त्या शास्त्रांतील विद्वान लोकांनीं लिहिलेलें असतें तर त्याचा बराच उपयोग झाला असता; परंतु तसें झालें नसून सदर वाङ्मय अनधिकारी पण तज्ज्ञ म्हणविणारांकडून लिहिलें गेलेलें आहे. या विधानाची थोडीबहुत प्रतीति यावी म्हणून येथें कांहीं ग्रंथकारांच्या ठळक चुकांचा विचार करण्याचे योजलें आहे.

मराठींत आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या सर्वच वाङ्मयाचें येथें परीक्षण करतां येणें शक्य नसल्यामुळें न्यायशास्त्र व वैशेषिक दर्शन या दोन शास्त्रांबद्दलच कसें भ्रमजाल पसरविलें गेलेलें आहे याचाच येथें विचार करावयाचा आहे. हें सर्व विवेचन वाचल्यावर तरी प्राचीन शास्त्रांचें मराठींत प्रकाशन करतांना प्राचीन प्रणालीप्रमाणें शिक्षण घेतलेल्या पंडितांचेंच साह्य घेतलें पाहिजे ही गोष्ट मराठी वाङ्मयभक्तांस पटली तरी लेखकाचे श्रम सफल झाले असें लेखकास वाटल्यावांचून राहणार नाहीं.

### कांहीं ठळक दोष

प्रथम रा. गो. रा. ओक यांनी लिहिलेल्या 'तर्कशास्त्र' या पुस्तकाकडे वळूं. सदर पुस्तकांत प्रथमारंभींच त्यांनी तर्कसंग्रहांतील तर्क पदाच्या व्याख्येवर झोड उठविली आहे. ते म्हणतात "तर्कसंग्रहाच्या दीपिकेंत 'तर्क्यन्ते प्रतिपाद्यन्ते इति तर्काः । द्रव्यादि सप्तपदार्थाः' अशी तर्काची व्याख्या दिली आहे. ही व्याख्या शुद्ध नाहीं."

परंतु एवढा दोषारोप करतांना आरोपीनें सदर स्पष्टीकरण व्युत्पत्ति म्हणून दिलेलें आहे, तें लक्षण म्हणून त्यानें दिलेलेंच

नाही ही गोष्ट सदर लेखकाने लक्षांत घेतलेली नाही. तात्पर्य, हा दोष म्हणजे ' अशुद्धं कृत्वा चोद्यते ' या म्हणीसारखाच होय. ग्रंथकार पुढे म्हणतोः—

"ज्या वस्तूचें लक्षण सांगणें आहे त्याच वस्तूचें नांव त्या लक्षणांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने येऊं नये. जसे ' तर्क्यन्ते इति तर्काः ' ' जिच्या ठिकाणीं पृथ्वीत्व राहतें ती पृथ्वी होय इ."

या उताऱ्यांत ज्या दोन लक्षणांचे दोष दाखविलेले आहेत त्यांपैकीं पहिलें लक्षणच नसल्यामुळे त्यावर दिलेला दोष अनाठायी आहे. दुसरा दोष अज्ञानाने दिला गेलेला आहे.पृथ्वी आणि पृथ्वीत्व हे दोन पदार्थ अत्यन्त भिन्न आहेत हें ग्रंथलेखकास माहीत असतें तर त्याने असें विधान करण्याचे धाडस केलें नसतें.

### वि. ज्ञानविस्तारांतील लेख

विविधज्ञानविस्तारांतील सातव्या व आठव्या वर्षाच्या अंकांतून ' तर्क–संग्रह ' या नांवाची एक लेखमाला प्रसिद्ध झालेली आहे. या लेखमालेंतहि अनेक ठळक चुका दिसून येतात.

उदाहरणार्थ, "न्यायशास्त्राचा उत्थापक गौतम मुनि असून तर्कशास्त्राचा कणाद मुनि आहे. तर्कशास्त्र सप्तपदार्थवादी आहे." या उताऱ्यांत वैशेषिकशास्त्रास तर्कशास्त्र हा शब्द लावलेला असून तो पूर्वपरंपरेस सोडून आहे.न्यायशास्त्रास केव्हा केव्हा तर्कशास्त्र म्हणण्यांत येतें, परंतु वैशेषिकशास्त्रास हें नांव कोठेच दिलेलें नाही.

वरील वाक्यापुढेच, " तर्कशास्त्र हें लोकप्रसिद्ध प्राचीन सहा शास्त्रांपैकी एक आहे. हे बहुधा न्यायशास्त्र ह्या नांवाने लोकांत मोडतें. " हें वाक्य तर केवळ लेखकाचा हास्यास्पद गोंधळ दाखवणार आहे. असो.

'आचार्य' मासिकाचे दुसऱ्या वर्षांत "न्यायशास्त्राचें सामान्य स्वरूप " या नांवाखाली श्री. असनारे यांचे लेख आले आहेत. हे लेख साधारणतः स्वतंत्र आहेत, असें म्हणावयास हरकत नाही. परंतु लेखकाच्या नव–शिक्षणाचा परिणाम त्यांत कांहीच दिसून येत नाही याचें आश्चर्य वाटतें. इतर गोष्टी बाजूस ठेवल्या तरी हेत्वाभासाचीं' उदाहरणें देतांना पाश्चात्य तर्कशास्त्रांतील fallacies चीं मनोरंजक उदाहरणें लेखकास देतां आलीं असतीं, परंतु तेवढेहि लेखकाने केलें नाही. 'साधारण' नांवाच्या हेत्वाभासाचें उदाहरण देतांना 'पर्वत वन्हिमान आहे. कारण त्याच्याहि ठिकाणीं प्रमेयत्व आहे' असें विवेचन न करतां 'राम्या गडी देशभक्त आहे, कारण तो गांधीपेयें पितो 'असें एखादें सुलभ उदाहरण सहज देतां आलें असतें. यापुढें दिलेलीं कांही हेत्वाभासाचीं लक्षणें चुकीचीं आहे.व्याप्यत्वासिद्धीचें निरूपण करीत असता 'उपाधी'चें निरूपण लेखकाने केलें आहे,आणि ह्या उपाधीची धोंड ' मायोपहित चैतन्य' या वेदांतांतील उपाधि शब्दाच्या गळ्यांत अडकविण्याचा व्यर्थ खटाटोप केला आहे.याशिवाय उपमान आणि शब्द यांच्या निरूपणांतहि लेखकाने आपल्या अनधिकाराचें चांगलेंच प्रदर्शन केलेलें आहे. विस्तारभयास्तव तें येथे देतां येत नाही.

### प्रो. भाटे यांचा निबंध

आता विविधज्ञानविस्ताराच्या पन्नाशीचा आनंदोत्सव जाहीर करण्याकरिता प्रसिद्ध केलेल्या निबंधसंग्रहांतील ' न्यायशास्त्र व तर्कशास्त्र ' ह्या निबंधाकडे वळूं. हा निबंध महाराष्ट्रांतील प्रसिद्ध प्रो. भाटे ह्यांनी लिहिलेला असून त्यांत पौर्वात्य व पाश्चात्य न्यायशास्त्राचा तौलनिक विचार केला आहे. हा विचार निर्दोष असता तर मराठी भाषेवर मोठेच उपकार झाले असते. परंतु न्यायशास्त्राच्या किंवा मराठी भाषेच्या दुर्दैवाने तसें झालें नाही. न्यायशास्त्रांतील मुख्य सोळा पदार्थांचे अर्थ प्रोफेसरसाहेबांनी काळजीपूर्वक दिलेले नाहींत. प्रोफेसरमजकूर लिहितात:—

" जल्प ( तर्कट वाद ) वितंडा ( वितंड वाद ) छल् ( शब्दछल ) जाति ( निरर्थक उत्तर ) " या उताऱ्यांत प्रोफेसरसाहेबांनी जे कंसांत प्रतिशब्द दिलेले आहेत ते त्यांनी कोठून शोधून काढले तें समजत नाही. न्यायशास्त्र हें एक शास्त्र असून वरील जल्प, वितंडा वगैरे शब्द त्यांतील पारिभाषिक शब्द आहेत. या दृष्टीने प्रोफेसरसाहेबांनी या शब्दांकडे पाहिलें असतें तर त्यांनी कंसांत त्या त्या शब्दांचे अर्थ देतांना थोडा तरी विचार केला असता. परंतु तसें न करतां मनास वाटले तसले पर्याय देऊन ते मोकळे झाले आहेत. परंतु एवढा निष्काळजीपणा न करतां त्यांनी नुसती तर्कसंग्रहावरील दीपिकाच पाहिली असती तरी त्यांत खालील व्याख्या दिसून आल्या असत्या.

' विजिगीषु कथा जल्पः '

' स्वपक्षस्थापनाहीना वितण्डा '

' अभिप्रायान्तरेण प्रयुक्तस्यार्थान्तरं प्रकल्प्य दूषणं छलम् '

' असदुत्तरं जातिः '

हीं दीपिकेंतील वाक्यें इतकीं सोपीं आणि स्पष्ट आहेत कीं तीं पाहतांच प्रोफेसरमजकुरांस वरील शब्दांचा खरा अर्थ कळून आला असता. असो. आता प्रोफेसरसाहेबांचें ऐतिहासिक ज्ञान पाहा. सदर लेखक म्हणतात—

' गौतमसूत्रें निर्माण झाल्यावर तो ग्रंथ इतर दर्शनसूत्रांप्रमाणे प्रमाणभूत गणला गेला व मग

स्वतन्त्र ग्रंथाचा प्रयत्नच झाला नाही. पुढे न्याय-शास्त्रांत भाष्य वार्तिकें अशी टीकारूपानेंच प्रगति झाली. '

### प्रोफेसरांचा अपूर्व शोध

प्रोफेसरसाहेबांचा हा शोध मात्र खरोखरच अपूर्व आहे. तत्त्वचिन्तामणि, शक्तिवाद, व्युत्पत्तिवाद मुक्तिवाद, आत्मतत्त्वविवेक, न्यायकुसुमाञ्जलि असे कित्येक ग्रंथ स्वतंत्रच असून ते सर्व सूत्रभाष्यग्रंथाच्या नंतरचे आहेत. या सर्व ग्रंथामध्ये तत्त्वचिंतामणि हा गंगेशोपाध्यायांचा ग्रंथ इतका प्रभावशाली ठरला कीं त्यामुळे सूत्रभाष्य ग्रंथांकडे कोणी पाहीनासे झाले. ही गोष्ट न्यायशास्त्राच्या इतिहासांत सर्वसंमत व प्रसिद्ध असूनहि प्रोफेसरसाहेबांनी तिकडे कानाडोळा केला तेव्हां आता या डोळेझांकीस काय म्हणावें! स्वार्थानुमान व परार्थानुमान यांचें विवेचन करतांना तर न्याय-शास्त्राचें पूर्ण अज्ञानच त्यांनी व्यक्त केलेलें आहे असें म्हणावें लागतें. प्रोफेसरसाहेब म्हणतातः—

" निव्वळ दाखल्यावर भर दिल्यामुळे परस्पर-विरोधी अनुमानें वादांत पुढे येऊं लागलीं म्हणूनच पंचावयवी वाक्यरूपी अनुमानपद्धति सदोष व दिखाऊ आहे असें वाटूं लागलें व अतएव अनु-मानाचें जास्त बारकाईनें पृथक्करण होऊं लागलें. "

### चुकीची कारण परंपरा

गौतमाच्या न्यायांत निवळ दाखल्यांवर भर दिलेला नाही म्हणून वरील कारणपरंपरा चुकीची आहे. साध्य आणि हेतु यांची व्याप्ति दाखविण्या-करितां एखादा दाखला देत ही गोष्ट खरी आहे. परंतु त्या दाखल्यावर जोर देण्याचा हेतु नसून साध्य आणि हेतु यांचेमधील व्याप्तीचें प्रदर्शन करण्यावरच भर असे. गौतमानेहि याचकरिता मूळ सूत्रांत 'साध्यसाधनयोः साहचर्यदृष्टान्त उदाहरणम्' असें उदाहरणाचें लक्षण न देतां 'साध्य-साधर्म्यात्तद्धर्मभावी दृष्टान्त उदाहरणम्' असेंच दिलेलें आहे. भाष्यकारांनीहि उदा-हरण शब्दाची व्युत्पत्ति देतांना 'उदाह्रिय-ते अनेन धर्मयोः साध्यसाधनभावः इत्युदाहरणम्' असेंच प्रतिपादिलें आहे. एवंच उदाहरणवाक्यांत दाखल्यास प्राधान्य नसून साध्यसाधनभाव म्हणजे व्याप्ति (Invariable Concomitance) दाखविणें हाच प्राचीन कालापासून नैयायिकांचा उद्देश होता. अर्थात् त्यास या पद्धतींत दोषहि दिसून येण्याचें कारण नव्हतें, परंतु प्रोफेसरसाहेब म्हणतात—

" व अत एव अनुमानाचें जास्त बारकाईने पृथक्करण होऊं लागलें व याचा परिणाम असा झाला कीं गौतमानन्तरच्या नैयायिकांनी तीन अवयवी अनुमान हा एक नवा अनुमान प्रकार मानण्याचा संप्रदाय पाडला. पहिला अनुमान प्रकार अगदींच टाकण्यांत आला असें नाही; पण पहिल्या अनुमानाला आता परार्थानुमान ( दुसऱ्याच्या समजुतीकरिता मांडलेलें अनुमान)असें म्हणण्याची वहिवाट पडली. व नव्या त्र्यवयवी अनुमानास स्वार्थानुमान ( स्वतःच्या समाधानाकरिता मांडलेलें अनुमान ) असें नैयायिक म्हणूं लागले." या उताऱ्यांत अनेक भरमसाट विधानें करण्यांत आलेलीं आहेत; गौतमानन्तरच्या नैयायिकांनी पंचावयवी अनुमानपद्धति टाकलीहि नाही व नवीन तीन अवयवांची शोधूनहि काढलेली नाही. या दोनहि गोष्टी प्रोफेसरसाहेबांनी स्वकपोलकल्पित निर्माण केलेल्या आहेत. नवे सर्व ग्रंथकार पंचावयवी अनुमानपद्धतिच मानतात. जिला प्रोफेसरसाहेबांनी वर त्र्यवयवी अनुमान ( स्वार्थानुमान ) असें म्हटलें आहे, त्या अनुमान. पद्धतीचें खरें स्वरूपच त्यांस कळलेलें नाही. परा-र्थानुमान आणि स्वार्थानुमान हे पारिभाषिक शब्द असून त्यांनी आपल्याच मतानें त्यांचे अर्थ ठरविले आहेत, ते ठरवीत असतां एकाच 'अर्थ' पदाचा अर्थ एकदां 'समजुतीकरिता' तर दुसरीकडे 'समाधानाकरिता' अर[illegible]ना त्यांना कोणतीच शंका कशी आली नाही याचें आश्चर्य वाटतें. स्वार्थानुमानाला आधी अवयवच नसतात. असें असता त्याची तीन ही संख्या त्यांनी ठरविली आहे. इतकेंच नव्हे तर " या नव्या पृथक्करणाचे तीन अवयव असे होते.

१ सिद्धान्त, २ हेतु, ३ व्याप्ति."

असें म्हणून त्यांनी कळसच केला आहे. या लेखांत अनेक चुका आहेत. परंतु स्थलाभावास्तव त्यांकडे न पाहतां आता ज्ञानकोशाकडे वळूं.

### ज्ञानकोशांतील विवेचन

ज्ञानकोशांत न्यायदर्शन आणि वैशेषिकदर्शन या शब्दांखाली जे विवेचन आलेलें आहे तें जवळ जवळ सर्वच चुकीचें आहे. त्या सर्व चुकांचें उद्घाटन एखाद्या मासिकांतून करण्याचा प्रस्तुत लेखकाचा विचार आहे. परंतु बोहनीखातर येथे एकच दोषस्थल दाखवितों.

' समान्यतो दृष्ट म्हणजे सामान्यापासून सामान्य-त्वासंबंधीचें अनुमान काढण्याची पद्धत! जसे इन्द्रियां-वरून इंद्रियत्वाचें अनुमान काढणें.'

या वाक्याचा नैयायिकास तर अर्थ कळणें शक्यच नाही पण स्वतः लेखकाला तरी कळला होता कीं नाही अशी शंका येते. याचप्रमाणे अनेक निरर्थक वाक्यें ज्ञानकोशांत सदर लेखकाने रगड

भरून दिलेलीं आहेत. त्या सर्वांचें परीक्षण एखाद्या मासिकांत लवकरच देण्यांत येईल.

**महाराष्ट्र सांवत्सरिक**

ज्ञानकोशांतील कांही दोष ज्ञानप्रकाशांत (ता. १४।४।३३) महाराष्ट्र सांवत्सरिकाचें परीक्षण करतांना दाखविलेलेच आहेत. कारण महाराष्ट्र सांवत्सरिकांतील सर्व दोषार्ह वाक्यें ज्ञानकोशांत सांपडतात. विस्तारभयास्तव ज्ञानकोशाच्या तसेच इतरहि कित्येक ग्रंथकारांच्या चुका चव्हाट्यावर आणण्याचें सोडून देऊन आता या चुका कां झाल्या व त्या न होण्यास काय केलें पाहिजे या विषयाकडे वळूं.

**चुका कां होतात ?**

उत्तम लेखकांच्या अभावीं या चुका होतात हें तर उघडच आहे. हे उत्तम लोक महाराष्ट्रांत दुर्मिळ आहेत असें नाहीं. नव्या तऱ्हेने लिहूं शकणारे शास्त्रीपंडित आता तरी महाराष्ट्रांत दुर्मिळ नाहीत. पण त्या पंडितांपेक्षा आधुनिक पद्धतीने संस्कृत विद्यांचें अध्ययन करणारे प्रोफेसर हें काम करण्यास योग्य होत अशा अंध विश्वासामुळेच असलीं कामें अनभिज्ञ प्रोफेसरांकडे सोंपविलीं जाऊन अनेक चुका पदरीं येतात. त्या न व्हाव्या अशी इच्छा असेल तर शास्त्री-पंडितांवरील अंध अविश्वास टाकून देऊन त्यांस विश्वासांत घेतले पाहिजे. ग्रंथप्रकाशक याप्रमाणे योग्य प्राचीन पंडितांकडे हें काम सोंपवितील किंवा निदान त्यांच्या सहकारितेचा अवलंब करतील तर निदान ढोबळ ढोबळ दोष तरी राहणार नाहीत. यापुढे 'वादकोश' वगैरेच्या संपादकांनी ही सूचना नीट लक्षांत घ्यावी असें सुचवून तसेच सत्य उघडकीस आणीत असतां एखादा कटु वाक्प्रयोग बाहेर पडला असल्यास त्याबद्दल वाचकांची क्षमा मागून हें विवेचन संपवितों.

# वसंत–व्याख्यानमाला–पुणें

**भौतिकशास्त्रांचें शिक्षण**

ता. ४ रोजीं पाऊस या विषयावर रा. बापट यांचें भाषण झालें. नंतर डॉ. **म. वि. आपटे** यांनीं शुक्रवार ता. ५ रोजीं वरील विषयावर भाषण केलें. त्यावेळीं अध्यक्षस्थान प्रो. **व्ही. के. भागवत** यांनी स्वीकारलें होतें. व्याख्याते म्हणाले,

आज आपलें भौतिक ज्ञान फार मागसलेलें आहे. उद्यमाला बरकत आणण्याला तें पुरेसें नाहां, अशी समाजांत जाणीव उत्पन्न झाली आहे. यासाठी विद्यापीठाच्या प्रवेशपरीक्षेचा अभ्यासक्रम बदलावा अशी एक सूचना पुढे आली आहे. त्याचप्रमाणे उद्यम–संस्था स्थापण्याचा उपक्रम व्हावयाचा आहे. अशा समयाला भौतिक शास्त्रांच्या शिक्षणाचा विचार करणें आपलें कर्तव्य आहे. वास्तव, रसायन, ऐंद्रिय आरोग्य, जैव आणि गार्हस्थ्य असे कप्पे करून त्यांपैकीं एखादा अभ्यासावा आणि त्यांत परीक्षा द्यावी असा आज प्रवेशपरीक्षेचा घाट आहे. हा घाट मोडून नुसतें सामान्य भौतिक शास्त्र असा एकच विषय नेमावा असा विचार चालू आहे तो कितपत योग्य आहे तें पाहूं.

आजच्या भौतिक ज्ञानाचा विस्तार फार मोठा आहे. त्याच्या अनेक शाखा निघाल्या आहेत. त्यांपैकीं वास्तव, रसायन, जैव व भौतिक अंतरिक्ष या विशेष प्रसिद्ध आहेत. ऐतिहासिक शास्त्रोघांत त्यांचा एक विशेष क्रम आहे आणि तोच क्रम बहुशः शास्त्रव्यवस्थेंतहि लागलेला आहे. जें शास्त्र सोपें, साधें, सुगम असें आहे, तेंच अगोदर विकास पावतें आणि दुर्गम व गुंतागुतीचें असें असते तें विकास पावण्यास अवकाश लागतो. म्हणून शुद्ध विज्ञान दृष्टीने जरी सर्व शास्त्रें सारख्याच योग्यतेचीं असलीं तरी सुलभतेच्या दृष्टीने त्यांचा एक क्रम लागतो आणि तो बहुशः ऐतिहासिक क्रमाशीं मिळता असाच लागतो.

**शास्त्रांचा विकास**

आज जो भौतिक शास्त्रांचा मोठा ओघ दिसत आहे त्याचा आरंभ सतराव्या शतकामध्ये गॅलीलिओ याने केला. त्याला ज्योतिषशास्त्राचा मोठा नाद होता. परंतु त्या शास्त्रांतील प्रश्नांचा तलास लावण्याकरितांच त्याला आगोदर वास्तवशास्त्राचा अभ्यास करावा लागला. गॅलीलिओच्या उपक्रमाची पूर्तता न्यूटनने केली. वास्तवशास्त्रांतील स्थितिगतिविषयक विचार न्यूटनने परिणत केले. त्या वेळेपासून वास्तवशास्त्राच्या जोडीनेच ज्योतिषाची वाढ होत आहे. वास्तवशास्त्राची उष्मशाखा १८ व्या शतकांत आणि वीजशाखा १९ व्या शतकांत प्रफुल्ल झाली. रेडिओसारखे विजेचे विलास जे आज दृष्टीस पडत आहेत त्यांचें बीजारोपण ५० वर्षांपूर्वी हर्ट्झ याने केलेल्या दीर्घ–तरंगाच्या शोधांत आहे. रसायनशास्त्र १८ व्या शतकाअखेर जन्मास आलें

आणि १९ व्या शतकांत पल्लवित झालें. वैद्यक शास्त्र फार जुनें खरें पण त्याची विशेष वाढ वास्तव रसायनांच्या मागोमाग घडून आली. हार्वे यान रुधिराभिसरणाचा उलगडा केला, तो गॅलिलिओच्या शास्त्रावरून. यंग व हेल्थ होल्टस यांनीहि इंद्रियविज्ञानाची ही इमारत वाढवली. पण ते स्वतः-च जसे १९ व्या शतकांतले उत्तम वैद्य तसे उत्तम वास्तवज्ञहि होत. आरोग्यशास्त्रांत पाश्चरचें नांव सर्वविश्रुत आहे. तो १९ व्या शतकांत रसायन आणि जैव या शास्त्रांत पहिल्या प्रतीचा निष्णात होता हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

या ऐतिहासिक विकासावरून कळून येईल कीं, वास्तव व रसायन हींच शास्त्रें सर्वांत साधीं सोपीं असल्यामुळें तीच प्रथम वाढीस लागलीं आणि मग त्यांच्या साहाय्याने इतर शास्त्रांना पोषण मिळालें. वैद्यकशास्त्राच्या अभ्यासाला लागावें तीं अभ्याससाधनें नीटपणें वापरतां येण्याससुद्धां वास्तव-रसायन माहीत पाहिजे असें आढळून येतें. आपल्याकडे आयुर्वेद संहितेमध्ये न्यायसांख्यादिकांचा अभ्यास करावयास सांगितलें आहे. त्यांतील भावार्थ हाच आहे कीं जडजीवविषयक भौतिक शास्त्रांच्या अध्ययनाने शास्त्रीय विचारसरणीचें चांगलें वळण लागतें आणि तें वैद्यकशास्त्राच्या अध्ययनास फार अवश्य आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेता आपणास असें दिसून येतें कीं भौतिक शास्त्राचे तुटक कप्पे मोडून टाकून एकच भौतिक शास्त्र असा विषय ठेवणें हें श्रेयस्कर आहे.

## शाळेंतील शास्त्रीय शिक्षण

सर्व शास्त्रांचा एक गट करण्यामध्ये एक हानि होण्याचा संभव आहे, ती आपण लक्षांत घेतली पाहिजे. प्रथमतः शास्त्र आणि त्याचा प्रपंच असा भेद ध्यानांत आणावा. प्रपंच हा फार मोठा, विविध आणि मोहक आहे. शास्त्र म्हणजे या सर्वांमधील गवसणी आहे. गवसणीकडे आपलें मुख्य लक्ष वेधलें पाहिजे. तो हस्तगत होण्यापुरताच प्रपंच-शाळेंतील शिक्षणरस पुरे झाला. तेवढ्यापुरताच परीक्षेंत भर द्यावा. बाकीचा प्रपंच दाखविण्याची व्यवस्था मूर्तालयें, संग्रहालयें, प्रदर्शनें इत्यादिकांच्याद्वारें करावी. त्यांचा भार परीक्षेवर टाकूं नये. सारांश असा कीं, शाळेंतील शास्त्रीय शिक्षण मुख्यतः वास्तव-रसायनापुरतेंच मर्यादित करावें लागेल. इतर शास्त्रांचा प्रपंच थोडा थोडा दाखवितां येईल, पण खऱ्या शास्त्राला हात घालणें कठीण जाईल. उदाहरणार्थ आरोग्यशास्त्र घेऊं या. या शास्त्रांत तद्विशिष्ट अशी विचारसरणी आहे. परंतु ती बालबुद्धीला झेपण्यासारखी नाही. त्या विचारसरणीवरून सुचणारे आदेश सांगितले तर ते सामान्यतः कोणासहि समजतील. परंतु तेवढ्याने शास्त्रीय शिक्षणाची सफलता होणार नाही, हें ध्यानांत ठेवावें. आरोग्य, गार्हस्थ्य हीं खरोखरीं शिखरावरचीं शास्त्रें आहेत.

## परिभाषा सिद्ध करा

परीक्षेचा अभ्यास बदलतेवेळीं मायभाषेतून उत्तर देण्यास सवड असावी अशी सूचना आहे. ही सूचना मान्य झाली तरी ती पुरती फलदायी होण्याला एक गोष्ट अत्यंत अवश्य आहे. ती ही कीं शास्त्रीय परिभाषा परीक्षेपुरती निश्चित करून देणें. एरवीच्या संभाषणाने किंवा लेखांत टीपा देऊन खुलासा करण्यांत येतो तसें करणें परीक्षेंत शक्य नसतें. पाश्चात्य देशांत सार्वत्रिक शास्त्रीय शिक्षणाची आवश्यकता उत्पन्न झाली तेव्हा त्यांनादेखील लॅटिन, ग्रीक या जुन्या भाषा आणि अन्यदेशीय भाषा सोडून देऊन स्वभाषेचाच आश्रय करावा लागला आणि विद्वत्-सभा भरवून परिभाषा ठरवून घ्यावी लागली असा इतिहास आहे. आपल्याकडे तोच मार्ग पत्करल्या-विना तरणोपाय नाही. मराठी भाषेंत असे प्रयत्न पूर्वी दोन वेळा होऊन गेलेले आहेत. आता हा तिसरा प्रयत्न विशेष जोमाने नवीन विद्यापीठ स्थापनेच्या वेळीं आणि त्यापूर्वी आजच्या शाळें-तील अभ्यासक्रम बदलण्याच्या वेळीं केला पाहिजे.

पाश्चात्य देशांत विद्यापीठशिक्षण आणि उद्यम-शिक्षण हीं दोनहि एकसाथ वाढत आलेलीं आहेत. विद्वानांनी ज्ञाननिष्ठेने शास्त्रें वाढविलीं व उद्यमी आणि राजकारणी लोकांना त्यांची उपयुक्तता दिसून येतांच त्यांनी विद्वानांना आश्रय दिला. यापैकीं आपल्याकडे कांहीच घडून आलेलें नाही. उद्यमोपयोगी शास्त्रीय शिक्षण जर द्यावयाचें तर तें उद्यमांत गुंतलेल्या लोकांच्या सोयीने विविध वेळेला आणि विविध प्रकारें दिलें पाहिजे. सध्या कलावंतांना विद्येची आस्थाच नाही. ती लोकशिक्षणाने एकंदर सामाजिक जीवनांतच उत्पन्न केली पाहिजे. हें काम शिक्षणसंस्थांचें आहे आणि त्यांनी यापुढे तें अंगावर घेण्यास विलंब लावूं नये."

वरील आशयाचें डॉ. आपटे यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांनी आपल्या समारोपादाखल केलेल्या भाषणांत सांगितलें कीं, "शास्त्रीय विषयाची आवड मुलांच्या मनांत लहानपणापासूनच उत्पन्न व्हावयास पाहिजे व विश्वविद्यालयानेहि शिक्षणक्रम आंखतांना हें लक्षांत घेऊनच अभ्यासक्रम आंखावयास पाहिजे. मारून मुटकून किंवा अंगावर पडलें म्हणूनच बी.एस्सी. होणाऱ्या विद्यार्थ्यांच्या हातून संशोधनाचें कार्य कितीसें होणार ! ही अडचण लक्षांत घेऊनच

विश्वविद्यालयाने 'एव्हरी डे सायन्स' हे एक नवे दालन उघडून अभ्यासक्रमात फरक करण्याचे ठरविले आहे. मातृभाषेचे माध्यम ठेवणे हे मुंबई विश्वविद्यालयाच्या तंत्राने जोपर्यंत शिक्षणक्रम आंखला जात आहे तोपर्यंत फारसे शक्य नाही. पण महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन झाल्यावर हे शक्य आहे. त्यामुळे शास्त्राचीहि वाढ झपाट्याने होईल यात शंका वाटत नाही."

# अलवारचे महाराज पदच्युत कां झाले ?



अलवारचे
**सर जयसिंग महाराज**

अलवारचे महाराज सर जयसिंग बहादूर याना आपल्या गादीवरून अचानक उतरून अबूचा पहाड चढावा लागला हे वर्तमान ऐकून कोणासहि आश्चर्य व उद्वेग वाटल्यावाचून राहणार नाही. अबूच्या पहाडात महाराज खुषीने जात नसून त्यांना तेथे व्हाइसरॉयाच्या हुकुमाने अलवारांतून हाकून लावल आहे असे प्रसिद्ध झालेल्या हकीकतीवरून अनुमान काढणे भाग पडते. कारण अबूवर ते उन्हाळ्याची थंड हवा खाण्याकरिता किंवा विश्रांति घेण्याकरितां राहावयाचे नाहीत. त्याची खरी रवानगी युरोप खंडाकडेच व्हावयाची आहे व युरोप अमेरिकेत त्यांचा मुक्काम दोन तीन वर्षे किंबहुना जन्माचाहि होण्याचा फार संभव आहे. इतक्या लांबच्या प्रवासाची तयारी करण्यास महाराजांस एक दोन आठवड्याची मुदत सहजच पाहिजे. पण तेवढ्या मुदतीपुरतीहि त्यास अलवारांत राहण्याची परवानगी न मिळाल्यामुळे त्यांना पहाडावर जाण्याची हुजूराकडून आज्ञा झालेली दिसते !

अलवार हे संस्थान राजपुतान्याच्या उत्तरेस आहे. तेथील महाराज धर्माने हिंदु व जातीने रजपूत असून आपला जन्म सूर्यवंशात झाल्याचा त्यास मोठा अभिमान वाटतो. संस्थानचे उत्पन्न सुमारे पासष्ट लक्षांचे आहे. सध्याचे महाराज जयसिंग बहादुर एकावन्न वर्षांचे आहेत. त्यांची अलवारच्या गादीवर १९०३ साली स्थापना झाली. महाराजापाशी दोन पायदळ पलटणी व गॅरिसन असून महायुद्धात सदर पलटणींनी फ्रान्समध्ये जाऊन मोठी मर्दुमकी गाजविली होती. सैन्यभरतीच्या कामात युद्धकाळी साऱ्या हिंदी संस्थानिकात अलवारच्या महाराजांनी पहिला नंबर पटकावला होता. इंग्रज सरकारानेंहि त्यास सतरा तोफांच्या सलामीचा मान देऊन मोठा गौरव केला आहे. स्वतः महाराजांना शिकारीचा व शिपाईगिरीचा षोक आहे. त्यावरून वीरेंद्रशिरोमणि ही त्यांजकडे परंपरेने चालत आलेली बिरुदावलि सार्थ करण्याचे सामर्थ्य महाराजात असावे असे वाटते.

एवढे हिंदुस्थानातील पोक्त, पराक्रमी व प्रमुख महाराज, पण त्याना व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यानी केवळ आपल्या तोंडच्या फुंकराने उडविले व अबूच्या पहाडावर फेकले. या एका कृत्यावरून कोणाहि हिंदी माणसास किती तरी गंभीर विचार सुचण्यासारखे आहेत. महाराज राजनिष्ठ होते, अनुभवी होते, त्यानी सतत तीस वर्षे आपल्या संस्थानाचा राज्यकारभार चालविला होता. इंग्रज सरकाराची इमानेइतबारे वेळ प्रसंगी सवाहि केली होती. परंतु इंग्रजसरकारच्या अरेरावी धोरणाच्या आगगाडीखाली मान ठेवून स्वतःची आत्महत्या करून घेण्यास ते तयार नाहीत असे दृष्टीस पडताच महाराजांची सगळी सेवा व सारे गुण कवडीमोल ठरून त्याना पदच्युत होण्याचीच नव्हे तर काळे पाण्याची किंवा कदाचित् जन्मठेप काळेपाण्याचीहि शिक्षा भोगण्याची पाळी आली आहे ! हीच जर आमच्या समाजांत अत्यंत श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या हिंदी

राजेरजवाड्यांची इंग्रज सरकारापाशीं किंमत असेल तर आमचे राजे लोक रंकाहूनहि रंक व दासाहूनहि दास आहत असंच म्हणावयास नको काय?

सामान्य हिंदी मनुष्यासहि काळेपाण्याची शिक्षा सुनावण्यापूर्वी त्याच्या उघड चौकशीचें सव्यापसव्य तरी सरकारास करावें लागतें. परंतु संस्थानिक समजल्या जाणाऱ्या असामान्य लोकांना तितकेंहि स्वातंत्र्य नाहीं. कुलीन कुटुंबांतील स्त्रीप्रमाणे त्यांची दीनदुबळी स्थिति आहे. नवऱ्याची तिजवर खप्पा मर्जी होऊन त्याने घरांतून घालवून दिल्यामुळे तिला माहेरच्या माणसांत नवऱ्यापासून मिळेल ती पोटगी खाऊन आयुष्याचे उरलेले दिवस कंठावे लागतात, त्या प्रमाणेच संस्थानिकांवरहि प्रसंग ओढवतो. कोट अर्धकोटीच्या राज्याचे मालक, पण दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडताच त्यांना क्षणांत त्या राज्याला पारखे होऊन दुबळेपणाने दीन बनून जगाच्या पाठीवर भटक्या मारीत दिडण्यावांचून दुसरा उद्योगच उरत नाहीं. आलवारचे महाराज शनिवारपर्यंत मोठ्या इतमामानें दरबारांत बसत होते व आपल्या राजधानींतून लहानापासून थोरापर्यंत सर्वांचे मुजरे घेत मिरवीत होते. पण शनवारा मागून दोनच दिवसांनीं सोमवार उगवला. त्या सोमवारीं राजतेज मावळल्यामुळे काळें ठिक्कर पडलेलें तोंड आपल्या प्रजाजनांस दाखविण्याची लाज वाटल्यामुळे दिवसाच्या उजेडाऐवजीं रात्रींच्या काळोखांतून त्यांनीं लपतछपत आगगाडीचा रस्ता सुधारला व अबूचा पहाड गांठला. आता सर जयसिंग हे महाराज नाहीत.त्यांच्या वीरेंद्रशिरोमणि या पदवींत वीरेंद्रपणा राहिला नाहीं. त्यांच्या पदवींतील पोकळपणा त्यांना आता पक्केपणीं कळून आला. ते वीर नाहीत वीरांचे इंद्र नाहीत व इंद्रांचे शिरोमणिहि नाहीत. ते नुसते मणि आहेत. मात्र ते ज्या माळेंत तुटण्यापूर्वी ओवले गेले होते, त्या माळेंतील इतर मण्यांनी आपल्या भवितव्यापासून पुष्कळच बोध घ्यावा असें तें त्यांस मूकपणाने शिकवीत आहेत.

महाराजांना गादीवरून खाली ओढण्यांत आलें त्याअर्थी त्यांच्या हातून तसेंच कांहीं घोर पातक झालें असलें पाहिजे अशी कोणाची समजूत होण्यासारखी आहे. परंतु हिंदुस्थानसरकाराने त्यांस असा एकहि अपराध अद्यापि उघडपणें चिकटविलेला नाहीं. वर्तमानपत्रांत हकीकत प्रसिद्ध झाली आहे तिजवरून त्यांच्या पदच्युतीचीं दोनच कारणें दिसून येतात. त्यांच्या राज्यांत मेयो जातीच्या मुसलमानांनी बंड केलें व त्यांना पन्नास लाखांचें नवीन कर्ज काढल्यावांचून राज्यकारभार चालविणें अशक्य वाटलें. अलवारांत मेयो मुसलमानांची बंडाळी सहा महिन्यांपूर्वी माजली व ती हिंदुस्थानसरकाराने आपली फौज पाठवून बरीचशी मोडूनहि टाकली व उरलेली बंडाळी मोडण्यास ब्रिटिश सैन्य समर्थ आहे. महाराजांपाशीं पायदळ पलटणी व गॅरिसन आहे. त्यांच्या बळावर मेयोंची धुंडाई त्यांस सहज थांबवितां आली असती. ज्या पलटणींनी फ्रान्समध्ये जाऊन जर्मन लोकांशीं लढतांना शौर्य गाजविलें त्यांजपुढे मेयोंच्या पुडाव्याची प्रतिष्ठा ती काय?

पण सध्या मुसलमान लोक इंग्रज सरकाराच्या नाकाचे बाल बनले आहेत. त्यांस सैन्याच्या चिमट्यांत धरून हलविल्याने सरकारच्या नाकाला झिणझिण्या येतील या संशयाने अलवारच्या महाराजांना आपल्या सैनिकांनी तलवारी-बंदुका काढून वापरण्याऐवजीं त्यांना त्यांजकडे दुरून पाहत बसविणेंच श्रेयस्कर वाटलें असो किंवा इंग्रज सरकारास अलवारी प्रजेच्या दृष्टीने महाराजांना नामर्द ठरविण्यांतच स्वतःचा अन्तःस्थ कावा साधावयाचा असो, अलवारचें सैन्य माशा मारीत बसलें व ब्रिटिश सैन्याने अलवारच्या हद्दींत शिरून तेथील बंड मोडल्याचें श्रेय संपादिलें. बंड कोणीहि मोडो, तें मोडलें व महाराज निर्धास्त झाले. काश्मीर संस्थानांतील मुसलमानांनी गेल्या वर्षी तेथील महाराजांविरुद्ध बंडाचा असाच बावटा उभारला होता व अद्यापि काश्मीरांतील बंडाच्या ठिणग्या पूर्णपणें विझल्या आहेत असें नाहीं. तिकडील मुसलमान कुळांनी हिंदु जमीनदारांना खंड देण्याचेंच हल्लीं नाकारलें आहे. तरी सुद्धा त्या बंडाचें प्रायश्चित्त काश्मीरच्या महाराजांना हद्दपारीच्या रूपानें भोगावें लागलें नाहीं. काश्मीरचे महाराज पूर्ववत् गादीवर आहेत व त्यांचे युरोपियन मंत्री आपण मुसलमानांना नमविण्याचा प्रयत्न करीत आहों असें दाखवीत आहेत

मग अलवारच्या महाराजांवरच राज्यपदास मुकण्याचें संकट कां ओढवलें? मेयोंना साऱ्यांत सूट पाहिजे होती तीहि महाराजांनीं दिली मेयोंना आपल्या गाऱ्हाण्यांची चौकशी व्हावयास पाहिजे होती तीहि महाराजांनी केली. या सुटीमुळे संस्थानच्या खजिन्याला पैशाची ओढ बसली ती निवारण्यासाठी राज्यकारभारांत ज्या काटकसरीची आवश्यकता भासली त्या काटकसरीचा धडाहि महाराजांनी स्वतःपासून घालून दिला. त्यांनी राज्यास मुकण्यापूर्वी कांहीं दिवस गॅझेट काढून त्यांत स्वतःच्या भोजनाचा रोजचा खर्च १५ रु. होता तो अवघा तीन रुपये घेण्याचें जाहीर केलें व त्याचप्रमाणे आपल्या खासगींतून

एक लाख रुपये दौलतीकडे खर्च करण्याचें ठरविलें. त्यांच्या या स्वार्थत्यागापासून बोध घेऊन संस्थानांतील नोकरवर्गानेहि आपल्या पगरांत १० टक्के कपात करण्यास आपखुषीने संमति दिली. परंतु तेवढ्याने महाराजांचे इंग्रज सरकाराने नेमलेले नवे मुख्य मंत्री मि.वायली यांचें समाधान झालें नाही. महाराजांनीं आपला खासगी खर्च दोनतीन लाख रुपयांच्या दरम्यानच बसवावा असा त्यांचा आग्रह पडला. महाराजांस ५० लाख रुपयांचें कर्ज पाहिजे होतें.तें त्यांस कोणी देईना. सदर कर्ज आपणापासून हवें असेल तर आम्ही सांगूं त्या अटींस कबूल व्हा व त्या अटी कबूल न झाल्यास गादी सोडून चालते व्हा असा हिंदुस्थानसरकारानें महाराजांस पेंच घातला.त्यांना या पेंचांतून सोडविण्यासाठीं पतियाळाचे महाराज व धोलपूरचे महाराज यांनीं सरकारदरबारीं बरेंच वजन खर्च केलें असें म्हणतात. पण त्यांत यश न येऊन अखेरीस अलवारच्या महाराजांना राज्यपदास मुकावें लागलें.

वर सांगितलीं हीं बाह्य कारणें होत. तीं वाचून कोणाचेंहि समाधान होईल असें आम्हांस वाटत नाही.महाराज आपला खासगी खर्च दोनतीन लाखांच्या घरांत आणण्यास कबूल झाले नाहीत म्हणून त्यांना गादी सोडण्याची पाळी आली ही सबब पटण्यासारखी नाही. मी घेतो तितकी खासगीकडील रक्कम मला घेऊं द्या, नाहींपेक्षा मजपासून माझें सालिना पन्नास लाख रुपये वसुलाचें राज्य घ्या अशा प्रकारचा दुराग्रह धरण्याइतके महाराज वेडे असतील अशी कल्पनाहि करवत नाही. यापेक्षा खरीं कारणें कांही वेगळीं असलीं पाहिजेत हें उघड आहे. महाराजांच्या उचलबांगडीचें कारस्थान हिंदुस्थानसरकाराचे वरिष्ठ अधिकारी व मुसलमानांचे सरकारी किंवा निमसरकारी पुढारी यांनी संगनमताने रचलेलें दिसतें. सांप्रत हिंदुस्थानसरकारच्या कारभारात मुसलमानांचा हात बराच शिरकलेला आहे.हिंदु व मुसलमान यांजमध्ये तेढ उत्पन्न झाली असता मुसलमानांना कुरवाळावयाचें व हिंदूंना लाथाडावयाचें हें सरकारी धोरण अलीकडे स्पष्टपणानें नजरेला येऊं लागलें आहे. सर फजली हुसेन हे मुसलमान मंत्री व्हाईसरॉयांच्या ज्ञातिविषयक कारस्थानाचे सूत्रचालक बनले आहेत. सर फजली हुसेन हे पंजाबी मुसलमान आहेत व मुस्लीम लीगचे जनक आहेत. काश्मीर व अलवार हीं दोनहि हिंदु संस्थानें पंजाबला अगदी भिडलेलीं आहेत. काश्मीरांत व अलवारांत मुसलमानांच्या दंग्याधोप्यास सुरुवात व्हावी, त्यास पंजाबांतील अहरर पक्षाने लागेल ती मदत पुरवावी, तो दंगा चांगला भडकूं देऊन त्या त्या महाराजांना आवरतां येत नाही असा देखावा दाखवावा व सदर संस्थानांत ब्रिटिश अधिकाऱ्यांनी प्रवेश करून त्यांचा अधिकार आपल्या हातीं घ्यावा असा गेल्या दोन वर्षांत प्रघातच पडून गेला आहे. या कारस्थानांत दोघांचे दोन कावे साधतात. त्यांतील एका काव्याने संस्थानिक हिंदु असला तरी त्याच्या मुलुखांत मुसलमानांचें राजकीय वर्चस्व स्थापन होऊन सदर संस्थान मुसलमानीच बनतें. पंजाबपासून बंगालपर्यंतचा हिंदुस्थानाचा विस्तीर्ण प्रदेश मुसलमानांच्या वर्चस्वाखाली आणण्याची 'पॅन इस्लामिझम'च्या पुरस्कर्त्यांची जी नळवळ चालू आहे त्या चळवळीचें हें एक प्रमुख धोरण आहे. त्या धोरणाप्रमाणे काश्मीर संस्थान मुसलमानांचें झालें व अलवार संस्थानहि त्याच पंथास लागलें.

हा कावा मुसलमानांचा झाला. इंग्रज सरकारचा कावा वेगळा आहे. खालसा मुलुखांतील कारभार इंग्रज सरकार ज्या धोरणाने चालवितें तेंच धोरण संस्थानिकांनी संभाळावें असा त्यांचा प्रयत्न आहे. आणि तो प्रयत्न हुजूरपक्ष अधिकारावर आल्यापासून व लॉर्ड विलिंग्डन यांची नेमणूक व्हाईसरॉयाच्या जागीं झाल्यापासून अधिकच जोरावला आहे. हिंदु लोक हेच इंग्रजी राजसत्तेचे हिंदुस्थानांतील खरे शत्रु होत. त्यांना कमकुवत व विस्कळित ठेवण्यांतच इंग्रज सरकाराला हिंदुस्थानांतील आपल्या सत्तेची सुरक्षितता वाटते. हिंदु लोकांना दडपावें व मुसलमानांना चढवावें या वागणुकींतील गुरुकिल्ली हीच आहे.नुसतें मुसलमानाना चढविण्यानें त्यांचा कार्यभाग पूर्णपणें साधणारा नसल्यामुळे उभय समाजांत दुही उत्पन्न करण्यास ते झटत असून त्यांचा हा उद्योग आजच्या घटकेस बऱ्याच अशीं सफळहि झाला आहे.

अलवारचे महाराज आपणास हिंदु धर्माचे अभिमानी समजतात. हिंदूंच्या धर्मपरिषदांत त्यांनी भाषणें केलीं आहेत व अलाहाबादेस पं. मालवीय यांनी भरवलेल्या ऐक्य परिषदेस ते एकटेच हिंदु संस्थानिक हजर राहिले होते. अशा प्रकारचा संस्थानिक मुसलमानांच्या कट्टर पुढाऱ्यांना असह्य व्हावा व त्याची उचलबांगडी करण्याची आलेली संधि इंग्रजसरकाराने हौसेने साधावी यांत नवल नाही. मौ. शौकतअली हे अलवारचे महाराज पदच्युत होण्याच्या वेळीं अलवारास नेमके बोलावल्याप्रमाणे हजर होते या गोष्टीचें महत्त्व दृष्टीआड करण्यासारखें नाही. शौकतअली यांनी महाराजांबरोबर अलवारापासून अबूपर्यंत प्रवास केला

व अबूस महाराज सुखरूपपणे पोचल्याचें पाहून शौकत अलींना हायसें वाटून ते मुंबईला निघून आले. शौकत अलींना महाराजांची ही केवढी काळजी! तरी महाराज आपल्या संस्थानांतील मुसलमानांना पक्षपाताने वागवीत नाहीत असें महाराजांना सर्टिफिकीट देण्यास शौकत अली तिकडूनहि तयारच. महाराजांची मुसलमानांशीं समतेची वागणूक असल्याविषयीं जर शौकत अलींची व व्हाईसरायाकडे गेलेल्या मुसलमान शिष्टमंडळाची खात्री होती तर महाराजांना पदच्युत करण्यास त्यांचा हिंदुधर्माभिमान कसा कारण व्हावा हें कोडेंच आहे. त्याचा उलगडा सरकारानें आपल्या खुलाशानें केल्यावांचून जनतेच्या पदच्युतीसंबंधाच्या शंका-कुशंकांचें निराकरण होणार नाही. कारण केवळ संस्थानाची आर्थिक परिस्थिति हलाखीची आहे एवढें उरलेलें निमित्त अलवारच्या महाराजांना राज्यावरून पदच्युत करण्यास पुरेसें नाही!

# इंदूर येथील क्रांतिकारकांचा कट

### कोर्टांत साक्षीदारांच्या जबान्या

**ता. १५** इंदूर येथील खुनाच्या खटल्याबाबत सत्तावीस माणसांना संस्थानाच्या पोलीसखात्यानें अटक केली होती. त्यांपैकीं तीन आरोपी फरारी झालेले असून दोघेजण माफीचे साक्षीदार बनलेले आहेत. उरलेल्या २२ आरोपींची चौकशी इंदूरचे स्पेशल मॅजिस्ट्रेट मि. अमरनाथ सीगल यांच्यापुढे ता. १५ पासून सुरू झाली आहे.

### श्री. राधेश्याम यांना अटक

डेप्युटी इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलीस मि. ब्रह्मस्वरूप यांची साक्ष प्रथम झाली. ते आपल्या जबानींत म्हणाले, "या खटल्यांतील पहिले आरोपी श्री. राधेश्याम यांना मी ता. ७ ऑगस्ट १९३१ रोजीं 'हिंदी साहित्य समितीच्या' इमारतीमध्ये पकडलें. त्या वेळीं त्यांचेजवळ दोन भरलेलीं रिव्हॉल्व्हरें होती, आणि कांही गोळ्याहि होत्या. त्यांचीं रिव्हॉल्व्हरें जप्त करण्यांत आलीं, आणि त्यांना संयुक्त प्रांतात पाठविण्यांत आले. त्या वेळीं त्यांचेवर खटला भरण्यांत आला नाही. परंतु चौकशी अंतीं असें आढळून आलें कीं, श्री. राधेश्याम यांचें संगनमत श्री. महावीरसिंग, नारायणसिंग आणि कुलकर्णी यांच्याशीं होतें. १९३२ च्या मे महिन्यामध्ये संयुक्त प्रांताच्या पोलिसांनी असें कळविलें कीं, 'श्री. राधेश्याम यांचा पत्ता नाही.' पण त्याच वर्षी ऑगस्ट महिन्यामध्ये 'गांधी आश्रमांत' त्यांचा माग लागला. १९३३ च्या जानेवारीमध्ये ते फिरून बेपत्ता झाले.

### बागेंतील निशाणबाजी

"धार येथील पोलीस सुपरिंटेंडेंट मि. कान्ताप्रसाद यांनी मला कळविलें कीं, "ता. १९ फेब्रुवारी १९३३ रोजीं धारजवळील एका खेड्यांत दरवडा पडला आणि या दरवड्यांत इंदूरच्या कांही लोकांचा संबंध असावा असा संशय आहे-धार येथील आरोपीजवळ कांही पुस्तकें सांपडलीं असून त्यांवर राधेश्याम यांचें नांव आहे." पुढे चौकशी केली असता मला असें कळलें कीं, दुर्गाशंकर आणि बच्चु यानी ता. १७ फेब्रु. रोजीं रात्रीं अल्लाबक्ष आणि निझाउद्दीन यांचेपासून एक मोटारगाडी घेतली आणि दुसरे दिवशी सकाळीं ती परत केली. 'इंदूर इलेक्ट्रिक सप्लाय कंपनींतील एक नोकर गोपाळराव नाईक यांच्या घराची मी झडती घेतली. झडतींत रायफल, रिव्हॉल्व्हर, जंबिये वगैरे हत्यारें सापडलीं आणि त्याबरोबरच चांदीचे दागिनेहि सांपडले. तें दागिने धारजवळील दरवड्यापैकीं होते. नाईक यांनी मला सांगितलें कीं, ह्या सर्व वस्तु पिले यांनी मजपाशीं ठेविल्या. नारायणसिंग हा दुधियाचा रहिवासी असून तेथे त्याची बागहि आहे. त्या बागेंतील दोन झाडांवर गोळ्या मारल्याच्या खुणा आहेत. यावरून तेथे नेम धरण्यास शिकविलें जात असावें. कांही निकामी गोळ्याहि तेथें आढळल्या. संयुक्त सरकारानें जप्त केलेलीं पुस्तकें, कागदपत्रें वगैरे झडतींत सांपडलीं.

### २३५ रुपयांची रायफल

हत्यारांच्या दुकानदारापाशीं चौकशी करतां असें आढळून आलें कीं, ता. २३ ऑक्टोबर १९३२ रोजीं भरतसिंग यानें २३५ रुपयांस एक बी. एस. ए. रायफल आपल्या भावाच्या नांवावर विकत घेतली. इतर आरोपींनीहि इंदूर येथे गेल्या वर्षांत गोळ्या पिस्तुल वगैरे साधनसामुग्री खरेदी केली.

**ता. १६**—श्री. ब्रह्मस्वरूप यांची साक्ष पुढे चालू झाली. ते म्हणाले, 'किंग एडवर्ड हॉस्पिटल स्कूल' च्या सुपरिंटेंडेंटांनी एक पत्र मजकडे पाठविलें. ते राजाराम नांवाच्या विद्यार्थ्याला हिरालाल यानें पाठविलेलें होतें. त्यांत असें म्हटलें होतें कीं, "हमीदपूर जिल्ह्यांत पोलिसांनी दोनतीन दिवस राहून तपास केला. पण त्यांच्या हातीं कांही

लागलें नाही. आपली सर्व चीजवस्त हातावेगळी केली आहे, तेव्हा तुम्ही पोलिसांना कांही दाद देऊं नये."

### सायकलच्या नंबराने काय सांगितलें ?

यानंतर होळकर दरबाराचे पोलीस इन्स्पेक्टर श्री. हरि शंकर दातरे याची तपासणी झाली. त्यांनी पहिल्या साक्षीदाराच्या विधानांना पुष्टि देऊन असें सांगितलें कीं, "ता. २८ फेब्रुवारी रोजीं मी कुलकर्णी आणि मदन गोपाळ यांना अटक केली आणि ता. ६ मार्च रोजीं पुण्यास गेलों. तेथे सोमवार पेठेंतील एका घरांत खांडेकर आणि बाबूराव पहिलवान यांचा पत्ता लागला. त्यांनी रतनसिंग दयालसिंग आणि सदाशिव अशीं नांवें धारण केलीं होतीं. खांडेकराच्या झडतींत इंदूरचा १९३९ नंबर असलेली बायसिकल सांपडली, यानंतर मी ग्वाल्हेर येथे गेलों. तेथे राधेश्यामचे कांही कागदपत्र सांपडले. त्यावरून असें दिसून आलें कीं, राधेश्याम यांनी 'हमारा जीवन' या नांवाचें पुस्तक छापलें असून त्याच्या छपाईचे चोवीस रुपये झांशी येथील 'मातृभमि' छापखान्याला दिले. रामगोपाळ हा जिल्हा कॉंग्रेसचा चिटणीस होता."

### 'गुप्त समिती'चे स्वरूप

ता १७—माफीचा साक्षीदार रामसिंग यांची तपासणी झाली. त्याने सांगितलें, "मी धारचा रहिवासी. माझी जात ठाकूर. महावीरसिंग हा माझा पुतण्या. त्याच्याशीं मी नेहमी चर्चा करीत असे. राष्ट्राला रक्तपाताने स्वातंत्र्य लाभेल कीं अहिंसेच्या मार्गाने लाभेल, असा आमचा वाद चाले. क्रांतिकारकाचा मार्ग मला पसंत पडला. माझें नांव क्रांतिकारकांमध्ये नोंदविण्याचें महावीरसिंगाने कबूल केले. १९३१ च्या एप्रीलमध्ये मॅट्रिकच्या परीक्षेला बसण्यासाठी महावीरसिंग इंदूरला गेला. तेथे त्याने मला सांगितलें, इंदूर येथे 'स्वतंत्र भारत गुप्तसमिति' या नांवाची संस्था आहे. तिचा उद्देश सध्यांची सुलतानी राज्यपद्धति बदलून तिच्या जागीं शेतकरी व कामकरी यांचें कल्याण करणारी राज्यसंस्था स्थापन करावयाची असा आहे. हा उद्देश साध्य होण्यासाठी देशांतील तरुणांना उत्स्फूर्त करावयाचें, शस्त्रास्त्रांची जमवाजमव करावयाची, पैसे मिळविण्यासाठी दरोडे घालावयाचे, आणि हिंसेचा मार्ग आक्रमण करावयाचा. गुप्तपणा राखणें हा या संस्थेचा दण्डक होता. संस्थेच्या सभासदाने आपलें सर्व वित्त आणि अखिल जीवित संस्थेला वाहिलें पाहिजे; आणि त्या सभासदांवर संस्थेची सर्वतोपरी सत्ता चालावी असे नियम होते. मला संस्थेची दीक्षा देण्याचा विधि आटोपल्यानंतर आमरण एकनिष्ठपणें सेवा करीन अशी शपथ घेवविण्यांत आली. पुढे मी धार येथे आल्यानंतर 'भारती विद्रोह' 'बंकिम ग्रंथावली' 'हमारा जीवन' वगैरे पुस्तकें महावीरसिंगाने मला वाचावयास दिलीं. यानंतर मला नारायणसिंगाच्या बागेंत नेण्यांत येऊन लष्करी शिक्षण देण्यांत आलें. मी काळूराम आणि मनोहर या दोघांना संस्थेचे सभासद करून घेतलें.

### दरवडा कसा घातला ?

"नोव्हें. १९३२ मध्ये राजाराम याने खांडेकर आणि पिले यांच्यामार्फत मला असा निरोप पाठविला कीं, आपल्याला आता द्रव्याची वाण आहे, त्यासाठी कार्याला त्वरित लागलें पाहिजे, 'कार्य' याचा अर्थ दरवडा. त्यासाठीं धारजवळील खेड्यामधील एका व्यापाऱ्याचें घर निवडण्यांत आलें. गांवाच्या एका टोकाला तें असल्यामुळें खांडेकर, पिले वगैरेंना तें पसंत पडलें. दरवड्यापूर्वी ४।५ दिवस आधीं मीं राजारामासह इंदूरला आलों. तेथें राधेश्यामची भेट झाली. त्याने मला 'हमारा जीवन' आणि 'आयुष्य जगण्यासारखे आहे काय?' या पुस्तकांच्या प्रति विद्यार्थ्यांत वांटण्यासाठीं दिल्या. इंदूरहून रायफल आणि गोळ्या घेऊन आम्ही धार येथें रात्रीं ८॥ वाजतां आलों. ही ता. १५ फेब्रु.ची गोष्ट. दरवडा घालण्याकरिता आम्ही ता. १९ ही मुक्रर केली. त्या दिवशीं रात्रीं १० पर्यंत इतर सहकाऱ्यांची आम्ही वाट पाहिली, पण कोणी आलें नाही. म्हणून आम्ही झोंपीं गेलों. पण मध्यरात्रीं पिले यान उठविलें. त्यानंतर इंदूरहून आलेली मंडळी भेटली. नंतर आम्ही सर्वजण हल्ला करण्याच्या खेड्याकडे निघालों. तेथे राधेश्याम आणि बच्चू हे गाडींत बसले. नारायणसिंग आणि मी टेहळणीसाठी बाहेर राहिलों आणि बाकीची मंडळी आंत शिरली. आंतून कुलुपें तोडल्याचा आवाज ऐकू आला. एका बालकाचें रडणेंहि कानीं आलें. दीड तासानंतर मंडळी बाहेर आली. बाबूराव पहिलवान आणि भरतसिंग यांच्या डोक्यावर पेट्या होत्या. सारी मालमत्ता मोटारींत घालण्यांत आली. मी, खांडेकर, नारायणसिंग आणि पहिलवान हे धारला राहिलों व बाकीची मंडळी इंदूरला परत गेली."

# ग्वाल्हेर संस्थानाचा राज्यकारभार

( ले. एक ग्वाल्हेरचा नागरिक )

[ग्वाल्हेर संस्थानाचा राज्यकारभार या विषयाची एक बाजू लेखक 'संस्थानी' यांनी लिहिलेली गेल्या एप्रिल महिन्यांत केसरींतून प्रसिद्ध झाली आहे. त्याची दुसरी बाजू ग्वाल्हेरचे 'नागरिक' यांनी लिहिलेली आजच्या अंकात देत आहों. या दोनहि बाजू देण्यांत सदर संस्थानाच्या राज्यकारभारासंबंधानें वस्तुस्थिति काय आहे हें बिनचूकपणें वाचकांस कळावें हा उद्देश आहे. संस्थानी कारभारावर विनाकारण टीका करण्याचें 'केसरी'चें धोरण नाही हें सर्वांना माहीतच आहे.—सं. केसरी.]

वरील मथळ्याखालीं गेल्या महिन्यांत केसरींत एक लेखमाला प्रसिद्ध झाली. त्या लेखमालेनें ग्वाल्हेर संस्थानासंबंधानें बराच गैरसमज उत्पन्न होणार आहे. त्यांतील कित्येक विधानें विपर्यस्त व सत्याला सोडून आहेत. येथील लोकसभेच्या रचनेवर मालेचे लेखक 'संस्थानी' यांनी टीका करून असें म्हटलें आहे कीं, सदर सभा केवळ नांव लौकिकासाठीं स्थापन करण्यांत आली आहे. परंतु ही सभा स्थापन करण्यांत कै. माधव महाराज यांचा हेतु कोणता होता हें महाराजांच्या उद्गारांवरून कळण्यासारखें आहे. ते म्हणतात "आपल्या अधिकाराच्या जोरावर आज्ञा देऊन एखादें कार्य करणें व तेंच कार्य लोकमतास अनुसरून करणें या दोन पद्धतींपैकीं दुसरी पद्धतच अधिक यशस्वी व लाभदायक होणार आहे. अशा लोकसभेंतील सभासदांस सरकारी कायद्याचे रयतेवर झालेले बरेवाईट परिणाम व खरी लोकस्थिति यांचें ज्ञान असतें. यासाठी सभासदांनी आपलीं कामें निरपेक्षपणें केलीं तर ती मोठ्या अभिमानाची गोष्ट ठरणार आहे." ( दरबार रिपोर्ट सन १९१२ १३ पान २९)

माधव महाराजांचा हा उद्देश लक्षांत घेतां लोकसभेंतील ६९ सभासदांचे 'संस्थानी' यांनी केलेलें गणित व लिहिलेले उद्देश यांचा विचार करण्याचें कारण उरत नाही. अशा लोकसभा संस्थानाच्या बाहेर जाऊन लंब्या लंब्या गप्पा मारणाऱ्या संस्थानिकांना स्वतःची टिमकी वाजविण्यास उपयोगी पडतात असें लेखक लिहितो. पण या बाबतींत लेखकाची कींव करावी तेवढी थोडीच आहे. कै. महाराजांना असल्या पोकळ गप्पा मुळीच आवडत नसत. जो आपला शब्द म्हणजेच कायदा असें म्हणतो त्याला गप्पा कशा पसंत पडतील?

लोकसभेच्या ६९ सभासदांपैकीं ३२ सभासद जिल्हाबोर्ड व म्युनिसिपालिट्या यांच्या वतीनें आलेले असतात. हे सभासद सरकारी अधिकाऱ्यांच्या पूर्णपणें दावणींत असतात असें 'संस्थानी' म्हणतात. पण त्याचा अर्थ काय हेंच मला कळत नाही. सभासद व सरकारी अधिकारी यांचा तसा संबंध नसतो. जहागिरदार लोकसभेचे सभासद आहेत. पण त्यांस लोकमताची चाड नसते अशी 'संस्थानी' यांची तक्रार आहे. पण त्यापुढे राज्यसुधारणेसंबंधानें संस्थानाकडे पाठविण्याचा एक अर्ज तयार होऊन त्यावर लोकसभेंतील जहागिरदारांच्या सह्या घेण्यांत आल्या असें 'संस्थानी' यांनी लिहिलें आहे. पण जहागिरदारांस लोकमताची जर चाड नाही तर त्यांनी वरील अर्जावर सह्या केल्या कशा हें एक मोठें कोडेंच आहे!

'निर्बल सभेचे नादान अध्यक्ष' या मथळ्याखालीं संस्थानीयानें केलेला आघात खरोखरच गम्य करण्यासारखा नाही. प्रस्तुत अध्यक्ष हे अत्यंत जोखमीचें काम करीत आहेत. त्यांना सरकारी कामांचा अनुभव वीस वर्षांचा आहे. त्यांना ठराव पास किंवा नापास सुचविण्यास देखील दुसरा मनुष्य लागतो हें विधान खोटें आहे. "वाटेल तो—अधिकारी बिनचौकशींत अटकेंत ठेवूं शकतो.... व लांचलुचपतीचा खटला बरेच दिवस चालला असला तरी तो काढून घेण्यास वरिष्ठ अधिकाऱ्यांना भाग पाडतां येते" हे लेखकाचे आक्षेप मनन करण्यासारखे होत. कै. महाराजांनी पावशेर कलाकंद खाणाऱ्यास चौदा वर्षांची शिक्षा ठोठावली व तिसऱ्या वर्गानें जाऊन दुसऱ्या वर्गाचा वाटखर्च मागणाराचीहि तशीच गत झाली. अशी महाराजांची शिस्त होती. ती लक्षांत घेतल्यास टीकाकाराच्या लिहिण्यांतील पोकळपणा दिसून येईल.

मुद्रणनियंत्रणाकडे पाहता खास ग्वाल्हेर येथे सहासात छापखाने चालू आहेत. रा. शिरढोणकर बी. ए. यांनी 'हितचिंतक' हे मासिक चालविलें असून त्याचा 'पानिपत' अंक इतिहासासारखाच अजरामर झाला आहे 'आरोग्यमित्र' हें डॉक्टर पुस्तके यांचें मासिक लोकप्रिय आहे. महाराष्ट्र ब्राह्मण सभा, क्षत्रिय सभा, आर्यसमाज, सनातन धर्मसमाज, उज्जयिनी येथील सार्वजनिक सभा इत्यादि संस्था या

संस्थानांत मोठ्या उत्साहाने चालविल्या जात आहेत. ग्वाल्हेर संस्थानांतील शेतकरी वर्ग खादीच वापरतो. स्वदेशीच्या प्रसाराला सरकाराची हरकत नाही. मात्र तिचा शाब्दिक गाजावाजा इकडे फारसा नाही.

ग्वाल्हेर येथे सी. आय. डी. खातें अस्तित्वांत आहे. रा. पिले हे ग्वाल्हेर येथे गुप्तपणें आले असता याच खात्याच्या जाळ्यांत सांपडले. अशा रीतीने हें खातें आपलें काम चोखपणें बजावीत असता शिक्षकांना सी. आय. डी. ची दीक्षा देण्याचे कारण काय ?

जहागिरदार व सरदार यांजवर 'संस्थानी' याचा बराच राग दिसतो. ते त्यांचें वर्णन "पाप्याचीं पितरें, आळस, स्वच्छंद व अज्ञान यांचीं आगरें आणि म्हणूनच घरकोंबड्या वृत्तीचीं प्रतिबिंबें होत" असें करतात. पण हे वर्णन साफ चुकीचें आहे. श्रीमंत शितोळे हे संस्थानाचे जमीनवसूलमंत्री आहेत. सरदार राजवाडे सैन्यमंत्री आहेत. सरदार नबाबसाहेब हे अपीलमंत्री आहेत. सरदार फाळके हे इतिहासाचे अभ्यासक आहेत. सरदार आंग्रे हे धर्मवीर व प्रायव्हेट सेक्रेटरी आहेत. सरदार पागनीस हे फिनान्स सेक्रेटरी आहेत. अशा रीतीने बहुतेक सरदार मोठमोठ्या हुद्द्यांचीं कामें करीत आहेत. एकंदर ४४२ सरदारांपैकीं सुमारें २५०—३०० सरदार ग्वाल्हेर संस्थानाच्या राज्यकारभारांत जबाबदारीचीं कामें करीत आहेत व बाकीचे आपापल्या संस्थानांचा कारभार पाहत आहेत. अशा सरदारांना 'आळशी स्वच्छंदी, आडाणी, पाप्याचीं पितरें या विशेषणानी संबोधणें अनुचित नव्हे काय ? 'संस्थानीं' याने या सर्व गोष्टींचा नीट विचार करून व त्यांची माहिती मिळवून जें लिहावयाचें तें लिहिणें योग्य होतें.

कै. माधवमहाराजांच्या निधनानंतर अलीकडेच्या काळांत ग्वाल्हेर संस्थानांत अनेक लोकोपयोगी कामें सुरू आहेत. रस्ता रुंद करण्याकरिता टाउन इंप्रूव्हमेंट ट्रस्ट, पाणी—पुरवठा, बागबगीचे, गटारांची सुव्यवस्था या गोष्टी काय दर्शवितात याचा विचार 'संस्थानी' याने करावा.

# प्रासंगिक बोल

## सांगली संस्थानाचे अरेरावी दिवाण

सांगली संस्थानचे राजेसाहेब सुविद्य बहुश्रुत व प्रजाहितदक्ष असल्यामुळे, स्वराज्यांतील सुराज्याबद्दल चांगला लौकिक सांगली दरबारने मिळविला आहे. परंतु अलीकडे विशेषतः सध्याचे नवे दिवाण यांच्या हातीं कामाचीं सूत्रें गेल्यापासून या शुभ्र यशास काळोखी लागूं लागली आहे असें म्हणावें लागतें. कोणत्याहि संस्थानांत कायद्याचा अंमल नाहीसा होऊन व्यक्तीच्या—मग तो सरकारी नोकर असो अगर खुद्द राजेसाहेब असोत—लहरीवर प्रजेची सुरक्षितता अवलंबून राहूं लागली कीं, त्या संस्थानांतील सुराज्य संपलें असें म्हणावयास हरकत नाही. अलीकडे सांगलीचे दिवाणसाहेब हे न्यायमंदिराच्या पवित्र वातावरणांतहि आपला अधिकार गाजवूं लागलेले पाहून, सांगली राज्यांत नवी अरेरावी सुरू झाली असें म्हणणें भाग पडतें. शहापूर बांबच्या खटल्यांत त्यांचें पत्र वकिलांनी कोर्टांत सादर केलें! आता सांगली बँकेच्या बाबतींतहि या दिवाणसाहेबांनी सर्व कायद्यांना धाब्यावर बसवून, बँकेचे मॅनेजर श्री. शिवरामपंत म्हैसकर यांना वॉरंटाशिवाय अटक करून मॅजिस्ट्रेटपुढेहि उभें न करतां, कित्येक दिवस कच्चया कैदेंत ठेवलें हे पाहून, कोणासहि उत्तर-हिंदुस्थानी संस्थानांतील अरेरावीची व जुलमाची आठवण झाल्याशिवाय राहणार नाही!

* * *

हें सांगली बँक प्रकरण मोठें गमतीचें आहे. सांगली बँक ही मर्यादित भांडवलाची खासगी संस्था असून ती कंपनीच्या कायद्याप्रमाणे रजिस्टर झाली आहे. या बँकेचे दरबाराने बरेच भाग खरेदी केले असल्यामुळे, भागीदारांच्या सभेस दिवाणसाहेब यांना अध्यक्ष निवडलें जातें. तसेंच सरकारी वरिष्ठ दर्जाचा अंमलदार या बँकेच्या व्यवस्थापक मंडळाचा चेअरमन असतो. इतकेंच नव्हे तर बँकेचा मॅनेजरहि सरकारी नोकर असतो. पण या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी बँक ही खासगी संस्था आहे व भागीदारांच्या अनुमतीनेच या निवडणुकी व नेमणुका होतात ही गोष्ट विसरतां कामा नये. कारण निम्म्याहून अधिक इतके भागीदार गांवांतील सद्गृहस्थ आहेत. तात्पर्य हें कीं, ही बँक म्हणजे कांही सरकारी खातें नव्हे किंवा दिवाणसाहेबांच्या नजरेखालील एखादी खासगत मालमत्ता नव्हे. अशी स्थिति असतांना बँकेचे मुंबईचे अडते लल्लुभाई लीलाचंद यांच्या पेढीचें दिवाळें निघालेलें

समजतांच, या दिवाणांनी मोठ्या कुशलतेने (?) श्री. म्हैसकर यांना आपल्या घरीं आणून अटक केली व त्यांच्याच घरांत त्यांना पंधरा दिवसपर्यंत कैदी म्हणून राहावयास लावलें, याचा अर्थ काय? दिवाणसाहेबांना आपण मोठी शिताफी करून, श्री. म्हैसकरांना अडकविण्यांत मोठी धूर्त मुत्सद्देगिरी केली असें वाटत असेल, पण ही निवळ अरेरावी असून प्रजाजनांपैकीं एका व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर हा बेकायदेशीरपणाने घातलेला घाला होय असेंच कोणाहि न्यायप्रिय माणसाला वाटल्याशिवाय राहणार नाही. सांगली बँकेवर जसा भागीदार या नात्याने सरकारचा तसाच इतर नागरिक भागिदारांचा हक्क आहे. मग हा उपद्व्याप त्यांना कोणीं सांगितला होता? इतर सर्व गोष्टी सोडून दिल्या तरी वॉरंट न दाखवितां, मॅजिस्ट्रेटपुढे उभें न करतां विनाचौकशी श्री. म्हैसकर यांना अटकेंत ठेवण्यांत आलें तें कशाच्या आधारें? तरी या प्रकाराचा सांगली दरबाराने खुलासा करावा अशी आमची सूचना आहे.

# स्फुट सूचना

१ अस्पृश्योद्धाराचे अनेकांनी अनेक प्रयत्न चालविले असले तरी अस्पृश्यांत शिक्षणप्रसार होणें हा सर्वांत जास्त फलदायी व श्रेयस्कर मार्ग आहे. शिक्षणाने ते संस्कारयुक्त झाले म्हणजे त्यांच्यांत असलेले अनेक दोष आपोआप दूर होतील. याच दृष्टीने नगर येथील एक प्रमुख कार्यकर्ते श्री. नानासाहेब देवचक्के यांनी ता. २९ पासून नगरास अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या वर्गांतील विद्यार्थ्यांसाठी हरिजन-सेवाश्रम नांवाची संस्था काढण्याचें निश्चित केलें आहे. या आश्रमांत हरिजनांच्या बारा वर्षांवरील व मराठी तीन इयत्ता झालेल्या विद्यार्थ्यांच्या राहण्याजेवणाची व शिक्षणाची व्यवस्था करण्यांत येणार आहे. आश्रमाचे संस्थापक श्री. नानासाहेब देवचक्के यांनी नगर येथे अनाथ विद्यार्थिगृह ही संस्था सुमारे वीस वर्षें अत्यंत यशस्वीपणाने चालविली आहे. खेरीज त्यांचा इतर अनेक सार्वजनिक संस्थांशीं निकट संबंध आहे. श्री. देवचक्के यांची सार्वजनिक कार्याची हौस व हातीं धरलेलें काम यशस्वी रीतीने तडीस नेण्यास लागणारी चिकाटी प्रशंसनीय असल्याने हरिजनसेवाश्रमाचें कामहि त्यांच्या हातून उत्कृष्टपणें होईल अशी खात्री वाटते. अस्पृश्यांचा उद्धार करण्याला शिक्षण हेंच खरें साधन होय व श्री. देवचक्के यांनी तेंच हातीं घेतलें याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

---

२ भोर संस्थानांत गेले कांही महिने शांतता नांदत होती; पण अलीकडे मोसेखोऱ्यांत अस्वस्थता माजून चिंताजनक परिस्थिति उत्पन्न झाली आहे. सरकार व प्रजाजन यांजमध्ये एक प्रकारची अढी पडल्यामुळे एकंदर प्रकरण बरेंच विकोपास गेलें आहे. भोर दरबाराने आपले पोलीस मोसेखोऱ्यांत पाठविले आहेत खरें, पण सदर पोलीसांना व संस्थानाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी जें धोरण स्वीकारलें आहे त्यामुळे शांतता प्रस्थापित होण्यास मदत होईल असें वाटत नाही. पोलिसांची मोसे खोऱ्यांतील धामधूम मुख्यतः वहिमी लोकांना पकडण्याकरिता आहे. त्या लोकांची नांवें भोर दरबाराने प्रसिद्ध करावी म्हणजे त्यायोगाने आरोपी हातीं लागण्याचा मार्ग सोपा होईल. मागील एका प्रसंगीं दरबाराकडून असें धोरण स्वीकारलें जातांच तो उपाय यशस्वी ठरला हा अनुभव लक्षांत घेण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें आरोपीस पकडल्यानंतर त्यांना अपमानास्पदरीतीने वागविण्यांत येते आणि त्यांना वकिलांची मदत घेण्यास व साक्षीपुरावा गोळा करण्यास संधि देण्यांत येत नाही अशाहि तक्रारी ऐकू येतात. त्या खऱ्या असतील तर दरबाराचें हें धोरण कोणत्याहि दृष्टीने श्रेयस्कर ठरणार नाही. तरी सर्वसामान्य आरोपीस कायद्याने ज्या सवलती देणें वाजवी आहे त्या सवलती दरबाराने द्याव्या, त्यांस हव्या असलेल्या वहिमी लोकांचीं नांवें प्रसिद्ध करावी व पकडलेल्या आरोपींना सहानुभूतीनें वागवावे म्हणजे दरबाराविरुद्ध घेण्यांत येणाऱ्या पुष्कळ आक्षेपांस जागा रहाणार नाही.

# लंडन येथील आर्थिक परिषद

गेलें वर्षभर गाजत असलेली अखिल जगाची आर्थिक परिषद ता. १२ जून रोजीं लंडन येथें भरण्याचें आता निश्चित ठरलें आहे. महायुद्ध संपल्यानंतर गेल्या पंधरा वर्षांत सर्व जगभर शेतकरी, कारखानदार, व्यापारी आणि सरकार या सर्वांच्या आर्थिक कारभारांत जे घोटाळे उडाले आहेत, त्या सर्वांचा या परिषदेंत साकल्यानें विचार व्हावयाचा आहे. जगांतील सर्व राष्ट्रांचें हिताहित कांही अंशीं या परिषदेच्या निर्णयावर अवलंबून असल्यामुळे तिजकडे साहजिकच सर्व जगाचे डोळे लागून राहिले आहेत.

महायुद्धाच्या शेवटीं युरोपांत जो असंतोष माजला तो पाहून मोठमोठ्या मुत्सद्द्यांचाहि त्या वेळीं धीर सुटल्यासारखा झाला. जिकडे तिकडे सर्व प्रकारच्या संपत्तीचा विध्वंस झालेला दिसत होता. कच्चा माल नाहीं म्हणून कारखाने थंडगार होऊन पडले होते. आपत्कालीं धैर्य व पराक्रम दाखवून ज्यांनी वैभवास पुनर्जन्म द्यावा असे कोट्यवधि तरुण वीर धारातीर्थी देह ठेवून परलोकीं गेले होते. जे जिवंत राहिले त्यांना अन्न नाहीं म्हणून घरांत बसून मरण्याचा प्रसंग आला होता. अशा दरिद्री व बेकार लोकांनी सर्वत्र दंगल माजविली असल्यानें जिकडे तिकडे राज्यक्रांतीचें वादळ उठलें होतें. राज्यकर्ते युद्धांत थकलेले व कर्जानें बेजार झालेले असून, युद्धांतून जगले त्यापेक्षा जे मेले तेच अधिक सुखी असें कित्येकांस वाटूं लागलें होतें. कारण युद्धाची आग विझवून आपण जिवंत बाहेर पडलों असलों, तरी युद्धोत्तर दारिद्र्य व असंतोष यांच्या फोफाट्यांत उरली सुरली संस्कृति व संपत्ति जळून जाऊन, पुनः रानटी माणसाच्या अवस्थेप्रत सुधारलेल्या राष्ट्रांनाहि जावें लागणार असें निराशापूर्ण भवितव्य दिसत होतें. पण महायुद्धानंतर अवघ्या ५।६ वर्षांत सर्व राष्ट्रांतील नागरिकांनी जे जिवापाड परिश्रम केले त्यामुळे ही सर्व भीति अखेर खोटी ठरली. आणि भाजलेल्या जमिनींत दुप्पट पीक येतें त्याप्रमाणे १९१३ सालीं जगाची जेवढी उत्पादन शक्ति होती, त्याहून अधिक शक्ति महायुद्धांतून होरपळून निघालेल्या जगांत १९२५ सालीं उत्पन्न झालेली दिसली.

युद्धानंतरच्या सात वर्षांत जगाची लोकसंख्या ८ टक्के वाढली तर उत्पादनशक्ति युद्धपूर्वकालापेक्षा १८ टक्के वाढली. युद्धानें खुद्द युरोपाची दुर्दशा फारच केली होती खरी. पण ऑस्ट्रियासारखे जे देश अगदींच डबघाईस आले होते त्यांना राष्ट्रसंघानें कर्जें व तज्ज्ञांची मदत देऊन थोडेफार पूर्वस्थितीस आणलें; यामुळें युरोपचीहि घडी पूर्ववत बसूं लागली. महायुद्धांत पतीचा व्यवहार बंद पडला व सोनें महाग झाल्यामुळे, जिकडे तिकडे सोन्याचें चलन बंद झालें होतें. पण १९२५ च्या सुमारास व्यापार व उद्योग–धंदे वाढीस लागल्यामुळे चोहोंकडे परस्पर विश्वासाचें वातावरण पसरलें, पतीवर व्यवहार सुरू झाला आणि राष्ट्राराष्ट्रांतील हुंडणावळीच्या दरांत स्थिरता आणण्याचें मुख्य साधन व राष्ट्रीय वैभवाचें लक्षण असें सुवर्णमानहि इंग्लंड इत्यादि प्रमुख राष्ट्रांनी सुरू केलें. पण मोठ्या दुखण्यांतून उठल्यावर प्रकृति भराभर सुधारूं लागतांच जो अविचार आजाऱ्याचे हातून होतो तो अविचार या वेळीं जगांतील सर्व राष्ट्रांनी केला ! आणि दारिद्र्यदुःखांतून सुखरूपपणें बाहेर पडलेल्या मानवजातीला आज अविचारानें वागल्यामुळे, वैभवाच्या ओझ्याखालीं चेंगरून मरण्याची पाळी आली आहे.

महायुद्धाचे वेळीं अमेरिकेनें अब्जावधि डॉलर्सचीं कर्जें युरोपियन राष्ट्रांना दिलीं होतीं. पण युरोपांत संपत्ति उत्पन्न झाली तरच कर्जाची फेड होऊं शकेल हें जाणून युद्धानंतर लगेच कर्जाचा तगादा न लावता, अमेरिकेनें युद्धोत्तर काळांत युरोपीय व इतर राष्ट्रांस पुनर्घटनेसाठी पुनः कर्जें दिलीं. या कर्जांच्या साहाय्यानें जगांत वैभवास एकदम इतकी भरती आलीशी दिसली कीं, विदेशीय राष्ट्रांना कर्जें देणें हा एक फार किफायतीचा धंदा आहे असें अमेरिकेंत लोकमत बनून कर्जें उभारणाऱ्या कंपन्या स्थापन झाल्या व त्यांनी खेड्यापाड्यांतून एजंट पाठवून, गोरगरिबांपासून पैसे घेऊन विदेशीयांची भर केली. पण सावकार रकमा गुंतविण्यास कितीहि हपापले तरी ऋणको राष्ट्रांचें वैभव कर्जांनी कांही एकसारखें वाढत जाणारें नव्हतें. १९२५ चे सुमारास त्या वैभवास शीग येऊन, उत्पन्न झालेल्या मालाचा उठाव झाल्याशिवाय धंद्यांत अधिक भांडवल गुंतविणें अशक्य झालें. पण दाराशीं चालून आलेल्या सावकारांच्या पैशाचा मोहहि अनावर होता. जर्मनीचा महायुद्धांत पराभव झाल्यामुळे त्यावर जी भरपाईची खंडणी लादली गेली, तिचा दरसालचा फार मोठा हप्ता कसा भरावा हा जर्मनीपुढे प्रश्न होता. तेव्हां अमेरिकेचा पैसा जर्मन लोकांनी कर्जाऊ घ्यावा, जर्मनीनें इंग्रज-फ्रेंचांना पर्यायानें त्या पैशांतून

नुकसानभरपाई द्यावी व इंग्रज फ्रेंचांनी या भर- पाईतून अमेरिकेचीं कर्जे फेडावीं असें चक्र चालू झालें. इतरहि पुष्कळ कर्जाऊ पैसा अनुत्पादक कार्यांत खर्च झाला. आणि कर्जें गुंतविण्याच्या चढाओढींत कर्जाचा पैसा कसा खर्चला जावा, यावर कांहींच नियंत्रण राहिलें नाहीं. अशा अनुत्पादक कर्जाचा फुगा केव्हा तरी कर्ज- रोख्यांच्या सराफ–कट्टयावर येऊन फुटणार हें ठरल्यासारखें होतें; त्याप्रमाणें १९२९ सालीं अमेरिकेच्या रोखे-बाजारांत रोख्यांच्या सट्टेबाजींत कर्जरोख्यांचे भाव भराभर उतरले आणि एजंटा- करवीं कर्जरोखे घेतलेले कोट्यवधि लोक भिकेस लागले. यामुळें एकदम चोहोंकडे अविश्वास माजला; नवीन कर्जें एकदम थांबलीं, सावकारांचे तगादे सुरू झाले.आणि तेथपासून हल्लींचें जगभर पसरलेलें आर्थिक संकट दिवसानुदिवस वाढत जाऊन आता अगदी निकरावर आलें आहे.

युद्धानंतरच्या इतर परिस्थितीमुळेंहि आंतरराष्ट्रीय व्यापार अगदींच डबघाईस आला असून कायमचा रसातळास जातो कीं काय अशी भीति उत्पन्न झाली आहे. महायुद्धानंतर शेतीच्या कामीं यांत्रिक शक्ति व शास्त्रीय ज्ञान उपयोगांत आणण्याची एक सांथच पसरली.यामुळे गहू,साखर इत्यादि खाण्याचे पदार्थ इतके उत्पन्न झाले कीं, युद्धापूर्वी हे पदार्थ बाहेरून विकत घेणारीं राष्ट्रें युद्धानंतर या पदा- र्थांची निर्यात करण्यासाठी आपसात चढाओढ करूं लागलीं. या सर्वांना गिऱ्हाइक नाहीं म्हणून धान्या- च्या बाजारांत स्वस्ताईचा पूर लोटला.यंत्राचा उप- योग वाढल्यामुळे धान्याचें पीक वाढलें. तरी पण माणसांना धंदा कांहीं वाढला नाहीं.उलटपक्षीं हिंदु- स्थानासारख्या मागासलेल्या पद्धतीनें शेती करणा- ऱ्या राष्ट्रांना या यांत्रिक शेतीशीं चढाओढ करणें अशक्य झाल्यामुळे,त्यांची धान्याची निर्गत थांबली, भाव उतरले, व बेकारीहि वाढली. अशा प्रकारें यांत्रिक कारखानदारीच्या मंदीस यांत्रिक शेतीच्या मंदीची जोड मिळाल्यामुळे जगभर सर्वच देशांत या मंदीनें दंगल उडविली.

महायुद्धापूर्वी स्वदेशांतला माल निर्यात करून, व आपल्या जहाजांतून इतर देशांच्या मालाची नेआण करून जीं राष्ट्रें गबर झालीं तीं महायुद्धांत सामील झाल्यावर त्यांनी हे नेहमीचे धंदे बंद करून युद्धाकडे सर्व बल खर्चिलें. अर्थात् यांच्या मालावांचून व वाहतुकीच्या साधनावांचून इतर राष्ट्रांची युद्धकाळीं कुचंबणा झाली. तेव्हा युद्धोत्तर काळीं स्वदेशास लागणारा माल स्वदेशांतच उत्पन्न करावा, हें तत्त्व बळावत जाऊन स्वदेशी धंद्यांना उत्तेजन देण्यासाठी बहुतेक राष्ट्रांनी आयात मालाविरुद्ध जकातीच्या भिंती उभारल्या. फ्रान्स व जर्मनी येथे गहू निसर्गतः पिकूं शकत नाहीं, पण गहूं पिकवून तोंच स्वदेशी गहूं खाण्याचा अट्टाहास तेथे एवढा चालला आहे कीं, परदेशी गव्हाच्या दुप्पट महाग पडणाऱ्या स्वदेशी गव्हासहि जकातीच्या भिंतींनी संरक्षण दिलें जात आहे. जिकडे तिकडे धान्यास संरक्षण व कारखान्यांच्या मालास संरक्षण अशी संरक्षणाची लाट उसळली असल्यानें, कोणत्याच मालास गिऱ्हाइक नाहीं. आणि यंत्राचे साहाय्यानें माल अफाट निर्माण होत असल्यानें तो ढिगाचे ढीग सांचून राहिला आहे. माणसापेक्षां यंत्रानें माल अधिक निपजतो व तोहि खपत नाहीं. म्हणून नवीन निर्मिण्याची गरज नाहीं. माल खपत नाहीं म्हणून वाहतूकहि नाहीं.यामुळे कारखान्यांत,शेतींत, आगगाडींत, आगबोटींत कोठेहि नको असणाऱ्या लक्षावधि बेकार मजुरांचें प्रत्येक देशास एक संकट झालें आहे. जर्मनीसारख्या विपन्न देशांत यांची संख्या लोकसंख्येच्या $\frac{1}{10}$ म्हणजे ६० लक्षां- पर्यंत गेली आहे, तर अमेरिकेसारख्या जगाचे सावकारांचे देशांतहि ती लोकसंख्येच्या $\frac{1}{10}$ म्हणजे १२० लक्षांपर्यंत गेली आहे. सुधारलेल्या देशांत बेकारांची नोंद ठेवतात, तीच नोंद आता एकंदर ३ कोटी झाली आहे. पण हिंदुस्थान या एकट्याच देशांत नोंद असती तर येथील एकटीच संख्या सहज ४ कोटींवर गेली असती.

या सर्व आपत्तींवर ताण करणारें संकट म्हणजे जर्मनीनें विजयी राष्ट्रांना द्यावयाची नुकसान- भरपाई आणि विजयी राष्ट्रांनी अमेरिकेकडून युद्धाचे वेळीं घेतलेल्या कर्जाची करावयाची फेड हें होय. महायुद्धाच्या चार वर्षांत परस्परांची संपत्ति जाळूनपोळून भस्मसात् करण्यांत जगांतील राष्ट्रांना यश आलें त्याहूनहि युद्धोत्तरकाळांत ढिगाचे ढीग संपत्ति उत्पन्न करण्याचे कामीं त्यांस अधिक यश आलें खरें. पण कितीहि संपत्ति उत्पन्न केली तरी अखेर ती कर्जापायीं परकीयांच्या खाईत जाऊन पडणार.तेव्हा ती निर्माण करण्याचा हुरूप कोणाला वाटावा? महायुद्धानें जो विध्वंस केला तो युध्यमान राष्ट्रांच्या केवळ वर्तमान संपत्तीचाच नव्हे, तर अश्वत्थाम्यानें परीक्षितीचा गर्भांतच वध केला.त्याप्रमाणे युरोपच्या भावी संपत्ती- चाहि केला असें म्हणावें लागतें. कारण युद्धाचा सर्व खेळ अमेरिकेकडून घेतलेल्या अब्जावधि डॉलरांच्या कर्जांनी खेळला गेला. आणि या कर्जाच्या भाराखालीं आता चिरडून मरण्याची पाळी ऋणको राष्ट्रांना आली आहे.

जर्मनीला अमेरिकेचें कर्ज मिळालें नव्हतें. पण युद्धांत पराभव झाल्यामुळे जर्मनीवर भरपाईची जी प्रचंड खंडणी लादली आहे ती माफ न झाल्यास तिच्या भाराखाली जर्मनीवर मरून जाण्याचाच प्रसंग येणार आहे. जर्मनीने यापुढे आपण नुकसानभरपाई करूं शकत नाहीं म्हणून खाका वर केल्याच आहेत. आणि अमेरिकेने कर्जे माफ केल्यास जर्मनीची नुकसानभरपाईहि जवळ जवळ माफ व्हावी असें ठरलें आहे.पण अमेरिकेकडून कर्जाची माफी कशी मिळवावी हा प्रश्न आज सर्व राष्ट्रांपुढे येऊन पडला आहे. ज्या वेळीं हीं कर्जे घेतलीं त्या वेळीं सोनें स्वस्त होतें पण नंतर तें महाग झालें, आणि कर्जे सोन्यांत ठरलीं असल्याने आजवर महाग सोन्यांत त्यांची फेड होत आहे. यामुळे ऋणको राष्ट्रांचें नुकसान होत असून जगांतील बहुतेक सोनें आज युरोपीय कर्जांचा सावकार अमेरिका व जर्मन भरपाईचा मोठा वाटेकरी फ्रान्स या दोन राष्ट्रांचे तिजोरींत जमा झालें आहे. सोन्याचा तुटवडा आणि निर्यात मालास गिऱ्हाईक नाही यामुळे दीड वर्षापूर्वी इंग्लंड प्रभृति राष्ट्रांनी सुवर्णमान बंद केलें.त्या योगाने राष्ट्राराष्ट्रांतील हुंडणावळ अनिश्चित झाली व जो थोडाफार आंतरराष्ट्रीय व्यापार चालत होता, त्याला हुंडणावळीच्या अनिश्चितीमुळे खोट येऊं लागून तोहि संपुष्टांत आला आहे.

या सर्व संकटांवर अमेरिकेने मनावर घेतलें तर तोड निघेल असें सर्व राष्ट्रांचें आज ठाम मत झालें आहे. अमेरिकेचीं कर्जे पै न पै फेडावयाचीं तर आजची पुष्कळशी संपत्ति व फार दूरच्या भविष्य काळची संपत्ति ऋणको राष्ट्रांनी अमेरिकेच्या पायावर ठेवणेंच अवश्य असून, तसेंच ठरल्यास ऋणको राष्ट्रांतील प्रजा संपत्ति निर्माण करण्यासाठी कष्ट करण्याचेंच नाकारील आणि मग संपत्ति निर्माणच होणार नाही अशी ऋणको राष्ट्रांची तक्रार आहे. म्हणून पुष्कळसें कर्ज माफ करण्याखेरीज उपाय नाही.पण उरेल तें थोडें कर्जेहि सोन्याचे रूपांत नव्हे तर मालाचे रूपांत अमेरिकेनें घ्यावें अशी ऋणको राष्ट्रांची मागणी आहे. ती मागणी पुरवावयाची झाल्यास अमेरिकेने चढविलेल्या जकातीच्या भिंती पाडाव्या लागतील. पण अमेरिका तरी एकटीच जकाती कां उतरवील? परदेशचा माल अमेरिकेच्या बाजारात येणार तर अमेरिकेचा मालहि परदेशाच्या बाजारांत जावा असें अमेरिकेला वाटतें. तेव्हा सर्वच राष्ट्रांनी जकाती कमी केल्यास कर्जांचाहि पुनर्विचार होईल असें अमेरिकेचें मत आज असल्याचें दिसत आहे.

सारांश, आजच्या आर्थिक आपत्तींतून सुटका करून घेण्यासाठी युद्धकर्जे रद्द—निदान बरींच कमी करणें व जकातीच्या भिंती बऱ्याच ठेंगण्या करणें या गोष्टींवर लंडनांतील वाटाघाटींत मुख्य भर देण्यांत येईल. कर्जे माफ करावीं या गोष्टीस अमेरिकन लोकमत प्रतिकूल असल्याने अमेरिकेचे प्रतिनिधि परिषदेस यावयाचे तर कर्जांचा विचार परिषदेत होणें अशक्य असल्याचें दिसून आलें. त्यावरून हा युद्ध-कर्जाचा प्रश्न परिषदेच्या कार्यक्रम पत्रिकेवर घेतलेला नाही खरा.तरीपण कर्जांचा विचार झाल्याशिवाय आर्थिक संकट टळणेंच अशक्य आहे. म्हणून कर्जांचा विचार परिषदेत व्हावयाचा नसला तरी तो परिषदेबाहेर व्हावयाचा हें आतां जवळ जवळ ठरल्यासारखेंच आहे. कर्जे माफ झालीं व जकाती कमी झाल्या म्हणजे राष्ट्राराष्ट्रांतील व्यापार वाढेल, मालाची देवघेव सुरू झाली म्हणजे वजावाटीसाठी सोनेंहि थोडें पुरेल व सुवर्णमान पुनः सुरू करणें सुलभ होईल, मालाला मागणी वाढली म्हणजे मजुरांना काम मिळून बेकारी कमी होईल आणि व्यापारधंदा वाढला म्हणजे सरकारांचीं उत्पन्नेंहि वाढतील, अशी विचारसरणी आज तज्ज्ञांनी मांडली असल्यामुळे युद्धकर्जे व जकाती हे दोन विषय लंडन येथे चर्चेसाठी प्रामुख्याने पुढे येतील हें उघड आहे.

# स्फुट सूचना

१ श्री. जयरामदास दौलतराम हे राष्ट्रीय सभेचे जनरल सेक्रेटरी आहेत. ते काही दिवसांपूर्वी म. गांधीस भेटून पुण्याहून मुंबईस गेले असता, तेथील पोलीस कमिशनरांनी त्यांना वटहुकुमी कायद्याखालीं भायखळ्याच्या तुरुंगांत अडकवून ठेवलें. त्यानंतर थोड्या दिवसांनी तुरुंगांतून त्यांस मोकळे करून त्यांजवर मुंबई सोडून हैद्राबादेस जाऊन राहण्याची नोटीस बजावण्यांत आली! वस्तुतः जयरामदास यांस या वेळीं पकडण्याची व नोटीस बजावून सोडून देण्याची कांहीच गरज नव्हती. कारण सरकार वारंवार धरपकड करतें ती मुख्यतः कायदेभंगाच्या चळवळीसंबंधाने. परंतु गेल्या ९ तारखेपासून म. गांधींच्या सूचनेवरून राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष लो. ना. माधवरावजी अणे यांनी सहा-आठवडेपर्यंत कायदेभंगाची चळवळ बंद ठेवली

असल्यानें, श्री. जयरामदास यांच्या हाल-चाली कायदेभंगाच्या बाबतींत नव्हत्या हे उघड आहे. परंतु सरकारास कोणीकडून तरी खाजवून खरूज काढून, खव्याळपणाच करावयाचा असल्यामुळे, त्यांनी जयरामदासांवर नोटीस बजावली. ती नोटीस बजावून राष्ट्रीय सभेने कायदेभंग बंद ठेवला असला तरी सरकारानें आपली दडपशाही थांबविली नाही असें सरकारास दर्शवावयाचें होतेंच; पण त्याखेरीज जयरामदास राष्ट्रीय सभेची आज्ञा पाळतात कीं नाही याचीहि परीक्षा त्यांस पाहावयाची होती. श्री. अणे यांनी सरकारचें हें कपट ओळखलें व जयरामदासयांस मिळालेली नोटीस पाळावयास सांगून, राष्ट्रीय सभेचे पुढारी आपल्या वचनास कसे जागतात याविषयीं जगाची खात्री पटविली, इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय सभेच्या सरळपणाबरोबरच सरकारचा क्षुद्रपणा सर्वांच्या नजरेस आणून, राष्ट्रीय सभेचें नैतिक श्रेष्ठत्व प्रत्ययास आणिलें. जयरामदास यांजवर बजावलेल्या नोटिशीवरून आणखी एक अनुमान निघतें. तें हें कीं, सरकारची दडपशाहीची खुमखुमी अद्यापि जिरलेली नाही. व कायदेभंग कायमचा बंद करण्यासंबंधानें, राष्ट्रीय सभेशीं सहकार्यानें वागण्याचीहि सरकारची इच्छा नाही.

---

२ जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या कामाची हकीगत अधिकृतरीत्या प्रसिद्ध होत नसल्यामुळे, कमिटीच्या कामाच्या उलटसुलट हकीकती बाहेर येत असतात. प्रांतिक स्वायत्तता दिली तरी त्या स्वायत्ततेला पायबंद म्हणून गव्हर्नरांना जादा अधिकार असावे असी श्वेतपत्रिकेंत योजना आहे. या महत्त्वाच्या विषयाची चर्चा झाली त्या वेळीं, हिंदी सभासदांना बोलावलेंच नाही असें समजतें. हें खरें कीं नाही हें लवकरच कळेल. परंतु असे झालें असल्यास तो हिंदी प्रतिनिधींचा अपमान आहे यांत शंका नाही. मध्यवर्ती सरकाराच्या कारभारांत जबाबदारीचें तत्त्व किती प्रमाणांत द्यावयाचें याचा वादविवाद या आठवड्यांत झाला. ता. २५ च्या सभेंत डॉ. आंबेडकर, सर ह्यूबर्ट कार, सर हरिसिंग गौर, सर अकबर हैदरी वगैरेंची भाषणें झालीं. शुक्रवार ता. २६ च्या सभेंत श्री. जयकर व श्री. जोशी यांनीहि आपलें म्हणणें मांडलें. संयुक्त राज्यपद्धतीचा प्रारंभ केव्हा केला जाईल या प्रश्नास श्वेतपत्रिकेंत लिहिल्याप्रमाणेंच, सरकारतर्फे उत्तर देण्यांत आलें कीं, त्याची तारीख सांगता येणार नाही, तत्पूर्वी अनेक अटी पुऱ्या झाल्या पाहिजेत व त्या केव्हा होतील हें सांगता येत नाही. उदाहरणार्थ, संस्थानी प्रतिनिधींनी आपली संमति दिल्याशिवाय कांहीच ठरवितां येत नाही असें सांगण्यांत आलें! मंगळवार ता. ३१ रोजीं संस्थानिकांच्या प्रतिनिधींचे प्रमाण काय असावें वगैरे प्रश्नाचा विचार होणार आहे. ता. १ जूनपासून साक्षींना सुरुवात होणार असून मुख्य मुख्य प्रश्नोत्तरांचा गोषवारा प्रसिद्ध करण्याचें ठरलें असल्यानें, त्या वेळी कमिटीच्या कामावर कांही प्रकाश पडेल असें दिसते.

---

३ जपानानें चीनवर केलेल्या आक्रमणाला चीनला यशस्वीपणें तोंड देतां न आल्याकारणानें जपानी सैन्यानें मोठी भिंत पाठीशीं घालून चिनी सैन्याला पेकिंगच्या दरवाज्यांत रेटून खुद्द पेकिंगवर मोर्चे लावले व चिनी साम्राज्याची राजधानी पेकिंग ही जपानच्या हातीं जाणार अशी परिस्थिति उत्पन्न झाली. त्यामुळे चिनी मुत्सद्दी जपान सांगेल तसा तह करण्यास सिद्ध झाले, असें प्रसिद्ध झालेल्या हकीगतीवरून म्हणण्यास हरकत नाही. ' आमचा हेतु मांच्युको राज्य सुरक्षित राहावें एवढाच आहे. व त्याची सरहद्द सुरक्षित करण्यासाठी आम्हीं चढाई केली. आम्हांला राज्यविस्ताराची हांव मुळीच नाही. फक्त चिनी सैन्य आमच्या या पवित्र कार्यांत विघ्नें उत्पन्न करीत असल्यानें, आम्हांस चढाई करावी लागते इतकेंच. असा या पेकिंगच्या चढाईबद्दल जपानी सरकारचा खुलासा आहे. आपण आंखून दिलेल्या रेषेबाहेर चिनी सैन्य गेलें म्हणजे आपली चढाई बंद होईल' असें जपानाचें म्हणणें आहे. ही अट चीननें मान्य केल्यानें, उभय राष्ट्रांचा तात्पुरता तह होऊन आता युद्धविषयक हालचाली बंद झाल्या अशी वार्ता आली आहे. परंतु या बातमीला अधिकृतरीत्या अद्याप दुजोरा मिळाला नाही. तथापि चीनची आजची दुर्बल स्थिति लक्षांत घेतां, चीनला मुठींत नाक धरून तहावर सही करणें भाग पडलें असावें असें वाटतें! चीनमधील अस्वस्थतेचा फायदा घेऊन चिनी तुर्कस्थान आज तरी स्वतंत्र झाला, मांच्युरिया हातचा गेला; तिबेटावरील चिनची सत्ताहि संपुष्टांत आली, उत्तर चीन तोडण्याचा जपानचा डाव आहेच ! अशा रीतीनें चिनचें राज्यास उतरती कळा लागली आहे. राष्ट्रसंघ दुर्बळ ठरल्यामुळे चीनला कोणीच त्राता उरला नाही हेंच खरें.

---

४ लो. टिळक स्मारक ट्रस्टचे दुय्यम चिटणीस रा. सदाशिव विनायक बापट हे गेला महिना-दीड

महिना पुणें जिल्ह्यांत स्वदेशी, गोरक्षण व अस्पृश्यतानिवारण या विषयांवर व्याख्यानें देत हिंडत आहेत. पुणें जिल्ह्याचे कलेक्टर यांची सदर व्याख्यानास हरकत नसल्याचें प्रसिद्ध झाल्या-पासून रा. बापट यांस पोलीस, गांवकामगार वगैरे अधिकाऱ्यांकडून प्रत्यक्ष त्रास पोंचण्याचे थांबलें. परतु कांही ठिकाणीं त्यांजकडून त्यांस अप्रत्यक्ष उपद्रव होतो व त्यामुळे सभा भरविण्यास व व्याख्यानाकरिता श्रोतृसमाज जमण्यास अडचण पडते. अशा प्रकारचा अनुभव त्यांस पिपळवंडी, इंदोरी व तळेगांव–दाभाडे या गांवी आला. सभेकरिता जागा मिळूं न देणं, सभेची बातमी दवंडीने गांवकऱ्यास कळविण्याची तज-वीज बापट यांनी आपल्या खर्चाने एखाद्या महारा-मार्फत केली असता, त्या महाराला दमदाटी देऊन त्या कामापासून परावृत्त करणें, सभेची एक वेळ ठरली असतां दुसरीच वेळ लोकांना सांगन, सभेचा विचका करणें अशा प्रकारच्या युक्त्या वरील गांवीं योजण्यांत आल्या. सभेचे विषय सरकारास नापसंत नाहींत असें एकदा ठरल्यानतर खालील अधिकाऱ्यांनी नसती लुडबूड किंबहुना उपद्व्याप करून सभेच्या कार्यांत विघ्न आणणें ही एक प्रकारे जिल्हाधिकाऱ्यांच्या उद्देशाची पायमल्ली असल्यामुळे, पुणें जिल्ह्याचे डि. मॅजिस्ट्रेट व डि. सुपरिंटेंडेंट हे प्रस्तुत तक्रारीकडे लक्ष पुरवून खालील अधिकाऱ्यांना योग्य ती ताकीद देतील व बापटांच्या कार्यक्रमांतील अडचणी दूर करतील अशी आम्हांस उमेद आहे.

# सेनापति बापट यांची प्रकृति



म. गांधींनी उपवास सुरू करण्याचें ठरवितांच सेनापति बापट यांनी रत्नागिरी तुरुंगांत एकवीस दिवस उपवास करण्याचा निश्चय जाहीर केला. सेनापति बापट यांचा त्याग, त्यांचा निश्चय व त्यांची कर्तव्यनिष्ठा महाराष्ट्रास परिचित असल्याने, त्यांच्या निश्चयाची बातमी समजतांच महाराष्ट्र चिंतेने व्यग्र झाला यांत आश्चर्य नाही. सेनापति बापट यांनी उपवास करण्याचें ठरविलें तेव्हाच असेंहि ठरविलें होतें कीं, सरकार जर त्याना सक्तीने अन्न घालूं लागेल तर त्यास प्रतिकार न करतां 'हरीची इच्छा' म्हणून उपवास सोडावयाचा.

त्यांनी उपवास सुरू केला तुरुंगांत, त्यामुळे त्यांच्या प्रकृतीबद्दल जनतेस विशेषच काळजी वाटूं लागली. उपवासाचे पंधरा दिवस कसेबसे निभले, परंतु त्यानंतर त्यांच्या अंगावर सूज येऊं लागली. उपवासाच्या काळांत अंगावर सूज येणें हें चिन्ह कांही ठीक नव्हे. त्यांची प्रकृति अशी बिघडल्यामुळे, जबाबदार अधि-काऱ्यांपुढेहि मोठा बिकट प्रश्न उत्पन्न झाला. शिवाय असें समजतें कीं, 'बापटांची अत्यवस्थ स्थिति झाली तर त्यांस जबरीनें अन्न घाला' अशी सूचना वरीष्ठ अधिकाऱ्यांकडून तुरुंगाधिकाऱ्यांस आली, व त्यांनी तसें श्री. बापटांस कळविलेंहि. तेव्हा तुरुंगाच्या नियमांचा भंग करावयाचा नाही असें त्यांचें मत असल्याने, आपण सक्तीने अन्न घालण्याला विरोध केल्यास आपल्या उपवासाचा निष्कारण गाजावाजा होईल. ही गोष्टहि त्यांस मान्य नसल्याने, बापट यांनी गुरुवार ता. २५ रोजीं दुपारीं म्हणजे उपवासाच्या सतराव्या दिवशीं मोसंब्याचा रस घेऊन उपवास सोडला.

सेनापति बापट यांची उपवासाने क्षीण झालेली प्रकृति अद्याप सुधारलेली नाही. अंगावरील सूज थोडथोडी कमी होऊं लागली आहे. हल्ली ते थोडें दूध व मोसंब्याचा रस घेत असतात. बापटांची प्रकृति अत्यंत काळजी करण्यासारखी झाल्याची वार्ता रत्नागिरींत पसरतांच तेथे जाऊन राहिलेले त्यांचे चिरंजीव श्री. वामनराव यांनी त्यांची भेट घेण्याची परवानगी मागितली, पण तुरुंगाधि-काऱ्यांनी ती दिली नाही हें आश्चर्य होय. श्री. बापट यांजबरोबर उपवास करीत असलेले श्री. परांजपे यांची प्रकृति बरी असून त्यांजवर सक्ती न होतां, ते उपवासांतून सुखरूपपणें पार पडतील असें वाटतें.

# श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम

## पांचव्या वर्षाचा वृत्तांत

श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम, दादर, ही संस्था चालविणाऱ्या 'दि हिंदु वुइमेन्स रेस्क्यु होम सोसायटी'ची ५वी वार्षिक सभा ता. २९ एप्रिलि रोजीं आश्रमाच्या जागेंत भरली होती. सोसायटीचे अध्यक्ष बॅ. मुकुंदराव जयकर विलायतेस गेले असल्यामुळे उपाध्यक्ष राजाबहादूर गोविंदलाल शिवलाल मोतीलाल यांनी सभेचें अध्यक्षस्थान मंडित केलें होतें.

प्रारंभीं संस्थेचे एक सेक्रेटरी डॉ. उदगांवकर यांनी ५ व्या वर्षाचा वृत्तांत वाचून दाखविला. त्याचा सारांश असा-१९३२ प्रारंभीं संस्थेमध्ये ३४ बायका व २८ मुलें शिल्लक होतीं. त्यांत गेल्या वर्षी १०५ बायका व ६३ मुलें अशी नवीन भर पडली. वर्षअखेर आश्रमांत ३५ बायका व २४ मुलें शिल्लक राहिलीं. प्रत्येक महिन्यांतील स्त्रियांची व मुलांची सरासरी अनुक्रमें ३६ व २३ पडते. नवीन दाखल झालेल्या १०५ स्त्रियांमध्ये ४२ विधवा, ४५ विवाहित व १८ अविवाहित होत्या. ह्यांपैकीं २५ विधवा, ३ विवाहित व ५ अविवाहित स्त्रिया केवळ प्रसूतीकरितां दाखल झाल्या होत्या.

## स्त्रियांची वर्गवारी

वृत्तांताच्या वर्षी दाखल झालेल्या स्त्रियांची वर्गवारी पुढीलप्रमाणे देतां येईल—

पतित ३१, अनाथ १९, संकटांतून सोडविलेल्या २६, नवऱ्याने टाकलेल्या ६, नवऱ्यांना सोडून आलेल्या १७, पोलीस किंवा मॅजिस्ट्रेट यांजकडून आलेल्या २२, तात्पुरत्या आश्रयार्थ १०, फक्त प्रसूतीकरिता ३३.

ही वर्गवारी परस्परनिरपेक्ष नाही. एकच स्त्री नवऱ्याने टाकलेली व पतित असूं शकेल. ह्या बायका आश्रमाची माहिती ऐकून स्वतः, नातेवाइकांच्या मार्फत किंवा कोणा सद्गृहस्थामार्फत दाखल झाल्या. कांही बायका ठिकठिकाणच्या हिंदू सभांकडून, आर्यसमाजाकडून किंवा दुसऱ्या सार्वजनिक संस्थांकडून पाठविण्यात आल्या. मुंबई शहरांत निराश्रित किंवा ज्यांच्यासंबंधी कोर्टांत कामें चालू आहेत, अशा हिंदू बायकांना पोलिस कमिशनरच्या शिफारशीवरून या आश्रमांत पाठविण्यांत येतें. क्वचित् प्रसंगीं शहराबाहेरचे अधिकारीदेखील हिंदू बायकांना आश्रयाकरिता या आश्रमांत पाठवितात.

## स्त्रियांची विल्हेवाट

दाखल झालेल्या स्त्रियांची गेल्या वर्षी खालीलप्रमाणे विल्हेवाट लावण्यांत आली.

| | |
|---|---|
| नवऱ्याकडे परत | १२ |
| पालकाकडे परत | ३३ |
| आश्रमांत लग्नें झालीं | १२ |
| कामधंदा मिळवून दिला | ८ |
| तात्पुरता आश्रय घेऊन निघून गेल्या | १० |
| पळून गेल्या | ९ |
| दुसऱ्या संस्थेंत पाठविल्या | ४ |
| लग्नाकरितां संस्था सोडली | २ |
| कोर्टाच्या परवानगीने घरीं गेल्या | ५ |
| पोलिसाकडे पाठविल्या | २ |
| आश्रमांत राहण्यास नाकबूल | ६ |
| इस्पितळांत मृत्यु | १ |

या आंकड्यांवरून असें दिसतें कीं, शेंकडा ४३ बायका स्वगृहीं परत गेल्या. आश्रम ही विवाहसंस्था नसली तरी आश्रमावर अवलंबन असलेल्या स्त्रियांनी लग्न करण्याची इच्छा दर्शविल्यास तें घडवून आणण्यास संस्था शक्य तेवढें साहाय्य करते. विवाहेच्छु पुरुषाचें वय, शिक्षण, सांपत्तिक स्थिति, सामाजिक दर्जा इ. प्रकारची शक्य तेवढी चौकशी करण्यांत येते. वधूवरांस पसंत करण्यास पूर्ण वाव दिला जातो. सुरवातीपासून संस्थेंत एकंदर २८ लग्नें झालीं असून, बहुतेक स्त्रिया सुस्थळीं पडल्या आहेत. घरगुती कामाकरिता संस्थेकडे बायकांच्या पुष्कळ मागण्या येतात; पण त्या सर्व पुरवितां येत नाहीत. घरंदाज कुटुंबांत राहून काम करूं इच्छिणाऱ्या निराश्रित बायकांना काम मिळवून देण्यास संस्था आनंदाने साहाय्य करील. उच्छृंखल स्वभावाच्या किंवा पोलिसांनी कोठून तरी पकडून आणलेल्या बायका आश्रमाचें बंधन सहन होत नाही म्हणून चोरट्या पावलाने पळून जातात !

## 'शिशुगृहाची' आवश्यकता

१९३२ सालीं आश्रमांत ६३ मुलें आलीं. पैकीं २६ मुलांचा जन्म खुद्द आश्रमांतच झाला. बाकीचीं मुलें आईबरोबर किंवा पृथक्पणे आलीं. यांतून बरींचशीं मुलें आईबरोबर परत गेलीं. द्रव्याचे अभावीं लहान बेवारशी अर्भकांकरिता स्वतंत्र 'शिशुगृह' सुरू करणें संस्थेला अद्यापि शक्य न झाल्यामुळे, २९ मुलें अशी व्यवस्था असलेल्या दुसऱ्या संस्थेंत पाठविण्यांत आलीं. ४ मुलें निपुत्रिक आईबापांना बाळगण्यास दिलीं.

आश्रमांत बायकांची राहणी सरासरी ३ महिने पडते. नित्य ये–जा चालू असल्यामुळे विशिष्ट अभ्यासक्रम आंखणें शक्य होत नाही. कोर्टांतून किंवा पोलिसाकडून आलेल्या बायका त्यांचें काम होतांच परत जातात. प्रसूतीपुरत्या आलेल्या बायका अधिक दिवस राहूं इच्छीत नाहीत. दुसऱ्या कांही लग्न होतांच निघून जातात. असें आहे तरी साक्षर करण्याची, शिवण-कामाची व सर्वसामान्य आचारात्मक धार्मिक शिक्षण देण्याची संस्थेंत व्यवस्था केली आहे.

संस्थेमध्ये येणाऱ्या बायकांमध्ये मुंबई शहर व उपनगर या भागांतून येणाऱ्या बायकांचा भरणा विशेष असतो. त्याच्या खालोखाल रत्नागिरी, पुणें ठाणें, कुलाबा, या जवळच्या जिल्ह्यांतील बायका येतात. गेल्या वर्षी महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक, या प्रांतांतील बहुतेक जिल्ह्यांतून व त्याचप्रमाणें संयुक्त-प्रांत, मध्य-प्रांत, वऱ्हाड, मद्रास, नेपाळ, इंदूर, ग्वाल्हेर, भोपाळ इ. दूरच्या ठिकाणांहून बायका आलेल्या आहेत. या बायकांत जवळ जवळ बहुतेक प्रमुख जातींचा अंतर्भाव आहे. ब्राह्मण, सारस्वत, मराठा, अस्पृश्य, कायस्थ, पाठारे प्रभु, रजपूत, सोनार, भंडारी, कोळी, लिंगायत, वैश्य, धनगर, इ. २५–३० जातींचा भरणा होता.

संस्थेला गेल्यावर्षी देणगीरूपानें दहा हजार रुपायांवर मदत झाली. यांत एक हजार रुपये मुंबई म्युनिसिपालिटीची ग्रँट होती. खर्च सहा हजार रुपये झाला. संस्थेची अद्यापि स्वतःची स्वतंत्र इमारत नाही. त्यामुळे भाड्याच्या घरांत बरीचशी कुचंबणा होते. लहान अर्भकांकरिता एक शिशुगृह शक्य तितक्या लवकर काढणें जरूर आहे. धनिक लोकांच्या सढळ मदतीवांचून हें कार्य होणें शक्य नाही.

### नवीन कार्यकारी मंडळ

याप्रमाणें वृत्तांताचें वाचन झाल्यावर नवीन वर्षाकरिता कार्यकारी मंडळाची पुढीलप्रमाणे निवडणूक झाली.—सॉलिसिटर बाळ गंगाधर खेर, सौ. ताराबाई माणिकलाल प्रेमचंद, शेठ लक्ष्मीदास गोवर्धनदास तेजपाळ, शेठ नारायणलाल बन्सिलाल, शेठ मुकुंदलाल बन्सीलाल, सॉलिसिटर पंड्या, श्री. के. विठ्ठलराव, श्री. भालचंद्र नीलकंठ भागवत, रावबहादूर सीताराम केशव बोलेशेठ मावजी गोविंदजी, डॉ. ना. दा. सावरकर, डॉ. मो. बा. वेलकर, सर गोविंदराव माडगांवकर, श्री भगवंतराव पळकर, डॉ. ए. पी. नाईक, डॉ. मा. भै. उदगांवकर, श्री. श्री. शं. नवरे, बॅ. जयकर, राजाबहादूर गोविंदलाल शिवलाल मोतीलाल, शेठ रामेश्वर दासजी बिर्ला, व शेठ वेलजी लखमसी हे ट्रस्टी या नात्यानें कार्यकारी मंडळाचे कायमचे सभासद आहेत.

या निवडणुकीनंतर रावबहादूर बोले, डॉ. साळुंके, डॉ. नाईक, श्री. गिरधरलाल मेहता, कु. शांताबाई दौंडकर, इ. सभासदांचीं संस्थेच्या कार्याबद्दल भाषणें झालीं. नंतर अध्यक्षांनी समारोप केला. डॉ. वेलकर व डॉ. सावरकर यांनी अध्यक्ष व सभासदांचे आभार मानल्यावर सभेचें काम संपलें.

# बडोद्याचा राज्यकारभार

( स. १९३१–३२ चा अहवाल )

बडोदें राज्याचा विस्तार ८१६४ चौ. मैल आहे. बडोदें राज्य एका ठिकाणीं सलग नसून त्याचे पांच वेगवेगळे भाग पडले आहेत. ते भाग ब्रिटिश व इतर हिंदी संस्थानें यांनी तुटक केले आहेत. हे पांच भाग म्हणजे बडोदें, मेहसाना, नवसरी, अमरेळी व उखामंडळ हे होत. यांची लोकसंख्या २४,४३,००७ इतकी असून त्यांत शहरे ५० व खेडीं २९२० आहेत. लोकसंख्येंत शें. ८८·१ इतके हिंदु व शें. ७·५ इतके मुसलमान आहेत. बाकीच्या संख्येंत जैन, पारशी व ख्रिश्चन यांचा समावेश होतो.

### अडीच कोटींचें उत्पन्न

संस्थानाचा कारभार दिवाणांच्या देखरेखीखाली चालतो व त्यांचे अध्यक्षतेखालीं पांच सभासदांचें एक कार्यकारी मंडळ असतें. इतर खात्यांवर एकेक प्रमुख अधिकारी असतो. अहवालाच्या सालीं एकंदर उत्पन्न २ कोटि ४९ लक्ष ४३ हजार रुपये झालें. उत्पन्नाच्या प्रमुख बाबी म्हणजे जमीनमहसूल १ कोटि २० लक्ष रुपये, अबकारी २५ लक्ष ६४ हजार, कस्टम १७ लक्ष, रेल्वे १३ लक्ष ५४ हजार या आहेत. खर्च रुपये २ कोटि ६१ लक्ष ८९ हजार रुपये झाला. त्यांत खर्चाच्या ठळक बाबी म्हणजे २२ लक्ष २९ हजार जमीनमहसूल, राजवाडा २६ लक्ष ९१ हजार, पोलीस १४ लक्ष ४९ हजार, लष्कर २२ लक्ष ६५ हजार, शिक्षण ३५

लक्ष १८ हजार, पब्लिक वर्क्स ५७ लक्ष ७ हजार या होत.

बडोदें राज्यांतील लष्कराची संख्या ३७५३ असून पोलिसाची संख्या ५१४० आहे. छापखान्यांची संख्या ५३ असून त्यांत ५ साप्ताहिकें, ३२ नियतकालिकें व १४५ पुस्तकें प्रसिद्ध झालीं. लोकल बोर्ड व ग्रामपंचायतीस सुरवात स. १८९१ मध्यें व प्रांतपंचायतीची स्थापना स. १९०४ मध्यें झाली. जमीनमहसुलांतील रुपयास एक आणाप्रमाणें या पंचायतींना कर बसवितां येतो व सरकारहि मदत करतें. अहवालाच्या वर्षी वरीलप्रमाणें ८४५७७० रुपये कर वसूल झाला. पाणी-पुरवठा, रस्ते, इमारती व इतर खेड्यांतील कामें हीं पंचायतींकडे असतात. राज्यांत जास्त ५१८ विहिरी खोदण्यांत येणार आहेत. अहवालाच्या वर्षी ३६ विहिरी पुऱ्या करण्यांत आल्या व ९१ विहिरींचें काम सुरू आहे. त्यावर खर्च ५८०७१ रुपये झाला. याखेरीज बोअरिंगचें कामहि पुष्कळ झालें.

एकंदर ३९२ मैलांचे रस्ते करण्याची योजना आहे. पैकी १५२ मैल रस्ते तयार झाले आहेत. राज्यांत 'ब' वर्गातील म्युनिसिपालिट्या १२ आहेत. त्यांचें उत्पन्न २८६४०८ होतें. 'अ' वर्ग म्यु. मध्यें बडोदा म्यु. आहे. तिचें उत्पन्न ९१६९४२ रु. आहे.

## शेतकी व धंदे

ब्रि. राज्याप्रमाणें या राज्यांतहि शेतकीखातें आहे. संशोधन, शेतकी सुधारणा, ग्रामोद्धार, दुग्धालयें, प्रचार व शेतकी-शिक्षण हीं कामें हें खातें करतें. बडोद्यास एक ८४ एकरांचें प्रयोगक्षेत्र आहे. त्यांत चिकू, मोसंबीं, अंजीर इत्यादि फळांची वाढ करण्यांत आली. अमरेली येथेहि एक प्रयोगक्षेत्र आहे. तेथीलहि काम बरें चाललें आहे.

उद्योगधंद्याच्या खात्यांत ओखा बंदराचा समावेश होतो. या बंदरांत जकातीचें उत्पन्न १८६९००० रुपये झालें. राज्यांत कापसाच्या गिरण्या १५ आहेत. त्यांत ६०८२८ कापसाच्या गांठींचें कापड तयार करण्यांत आलें. महाराणी वुलन मिलसमध्यें सुमारें ७ लक्षांचें कापड तयार झालें. द्वारका सिमेंट कारखान्यांत सुमारें ४० हजार टनांवर सीमेंट तयार झालें. ओखा मीठाच्या कारखान्यांत ३४ हजार टनांवर मीठ तयार झाले. सिमेंट व मिठाच्या कारखान्याच्या हक्काबद्दल बडोदें सरकाराला २८६ रु. रुपये मिळाले. याखेरीज गायकवाड शुगर वर्क्स, पेटलाद व बडोदें येथील आगपेट्यांचे कारखाने व कॅलिको प्रिंटिंग क्लास सुरू असून हातमागावें शिक्षण देण्याचें काम सर्वत्र करण्यांत येतें. स्टील बॉयलर उपयोगांत आणणारे कारखाने २५६ आहेत! कोऑपरेटिव्ह सोसायट्यांची संख्या १०६३ असून त्यांचें भांडवल ७४९४८११ रुपयांचें आहे. सरकाराच्या मालकीची रेल्वे ७०७.६७ मैल आहे. राज्यांत शिक्षणसंस्था २६४३ असून त्यांत २५३६६४ विद्यार्थी शिक्षण घेत होते. त्यांत एक सरकारी कॉलेज, १४ मुलांसाठी हायस्कुलें, १ मुलींसाठी हायस्कूल, २८ ए. व्ही. स्कूल्स इतकीं असून सरकारी मदत मिळणारीं ९ हायस्कुलें, १० ए. व्ही. स्कूल्स आहेत. देशी भाषांतून शिक्षण देणाऱ्या संस्था २५४५ आहेत. याशिवाय कॉलेजमध्यें शारीरिक शिक्षण सक्तीचें करण्यांत आलें असून विद्यार्थ्यांना शिक्षणाची उपकरणेंहि पुरविलीं जातात. कलाभवन या संस्थेंत औद्योगिक शिक्षण देण्यांत येतें. संगीताचें शिक्षण देण्याचीहि सोय करण्यांत आली आहे.

## एक लाख पुस्तकें

वाचनालयाची मोठी स्पृहणीय जोड या संस्थानाला आहे. सेंट्रल लायब्ररी व कंट्री लायब्ररी ब्रँच अशा दोन शाखा या खात्यांत आहेत. सेंट्रल लायब्ररींत १०३०४४ इतकीं पुस्तकें होतीं. कित्येक वाचनालयांना सरकारी मदत देण्यांत येते. त्यांत जिल्हा व शहर वाचनालयें आणि ग्रामिक वाचनालयें असे विभाग आहेत. जिल्हा वाचनालयांची संख्या ४५ व खेड्यांच्या वाचनालयांची संख्या ८१८ होती. स्त्रिया व मुले यांचीं वाचनालयें १२ व रीडिंग रूम्स १८० मिळून सर्व राज्यांत १०५५ वाचनालयें आहेत.

याखेरीज ओरिएण्टल इन्स्टिट्यूट, राजकीय संस्कृत महाविद्यालय, बालचर, म्यूझियम व आर्ट गॅलरी इत्यादि शैक्षणिक संस्था आहेत.

लोकांना औषधाची मदत व्हावी व आरोग्यरक्षण व्हावें म्हणून अहवालाच्या वर्षी ६६९५६८ रुपये खर्च करण्यांत आले.

## कायदेमंडळ

या राज्यांत कायदेमंडळ असून त्यांत २८ सभासद असतात. दिवाणसाहेब कायदेमंडळाचे अध्यक्ष. या कायदेमंडळांत कर्मसचीव, मंत्रसचीव न्यायमंत्री हे सरकारी अधिकारी व राजघराण्यानें नेमलेला एक, सात सरकारनियुक्त सरकारी अधिकारी व चार सरकारनियुक्त बिनसरकारी सभासद असून फक्त दहा सभासद लोकांनी निवडावयाचे असतात. या कायदेमंडळाला कायदे करण्याचा अधिकार आहे

# होअरसाहेबांचा पोकळ युक्तिवाद

हिंदुस्थानाचे सध्याचे अहंमन्य स्टेट सेक्रेटरी, सर सॅम्युएल होअर यांनी गेल्या आठवड्यांत मेजवानीचा प्रसंग साधून हिंदुस्थानविषयक एक लांबलचक व्याख्यान झोडलें! खाद्यपेयांची चंगळ झाल्यामुळे पोट आकंठ भरले म्हणजे रिकाम्या राहिलेल्या डोक्यांतून वाटेल ते विचार निघतात व ते क्षम्य असतात, असें म्हणतात. परंतु या मेजवानीच्या वेळीं स्टेट सेक्रेटरींनी हिंदुस्थानाच्या भावी राजकीय व व्यापारी धोरणासंबंधी जे तारे तोडले, इंग्रजांच्या भलेपणाचें जें ढोलगें बडविलें आणि हिंदुस्थानाच्या स्वाभिमानास जो कडकडून दंश केला तो पाहून कोणालाहि संताप व दुःख वाटल्याशिवाय राहणार नाही. म्हणूनच त्यांनी केलेल्या विधानांचा खरपूस समाचार घेणें जरूर झालें आहे.

सर सॅम्युएल होअर म्हणतात कीं, ब्रिटिशांचा व्यापार व उद्योगधंदे यांना कोणत्याहि तऱ्हेचा अडथळा होणार नाही असें ठरवूनच हिंदुस्थानाच्या राज्यपद्धतींत सुधारणा करण्यांत येईल. या त्यांच्या म्हणण्याचा उघड अर्थ असा कीं, हिंदुस्थानाला उद्या स्वराज्याचे हक्क दिले तरी आज व्यापार व उद्योगधंदे या साधनांनी ब्रिटिश व्यापाऱ्यांकडून हिंदुस्थानाची जी लूट होत आहे ती थांबविण्याचा अधिकार हिंदुस्थानाला मिळणार नाही. भावी सुधारणा अमलांत आणण्यापूर्वी इंग्रजांच्या हितसंबंधाचें संरक्षण करण्याकरितां जीं अनेक कुंपणें घालण्याचें ब्रिटिश मुत्सद्द्यांनी योजलें आहे त्यांतलेंच हें एक कुंपण होय. खजिना ताब्यात देतों म्हणावयाचें, परंतु प्रत्यक्षपणें एक कपर्दिकहि हातीं लागू नये म्हणून ज्या युक्त्याप्रयुक्त्या करावयाच्या त्यांतीलच हें एक कडीकुलूप आहे. केवळ भावनेच्या दृष्टीने पाहता गुलामगिरी म्हणजे नरक व स्वातंत्र्य म्हणजे स्वर्ग आहे यांत शंका नाही. परंतु, स्वातंत्र्य मिळाल्यानंतरहि त्या स्वर्गांतील अमृत हातीं लागले नाही तर गुलामगिरींत व त्यांत फरक काय ? हिंदुस्थानाच्या लोकांना पोटभर अन्न व अंगभर वस्त्र मिळावें, त्यांच्या उद्योगधंद्यांची वाढ होऊन देशांत संपत्तीचें पाणी खेळू लागावें व आज संपत्तीचा देशाबाहेर चाललेला प्रवाह बंद व्हावा म्हणूनच हिंदुस्थान स्वराज्याकरिता धडपड करीत आहे. सर सॅम्युअल होअर यांच्या म्हणण्याचा मतलब हा कीं, आज दीडशेंदोनशें वर्षे राजसत्तेच्या जोरावर ज्याप्रमाणे ब्रिटिश व्यापाराची भरभराट अप्रतिहत होत गेली तशीच यापुढे भावी स्वराज्याच्या काळांतहि ती कायम राहिली पाहिजे! हिंदी स्वराज्याचे कट्टे दुष्मन जे साम्राज्यवादी ते तरी यापेक्षां अधिक काय म्हणतात? मि. चर्चिल किंवा लॉर्ड लॉइड यांना तरी यापेक्षां अधिक काय पाहिजे? या बाबतींत तरी निदान मि. चर्चिल हे होअर यांच्या तोंडानेच आपलें हृद्गत सांगत आहेत किंवा होअर याच्या अंगांत मि. चर्चिल हे संचरले आहेत असें म्हणण्यास हरकत नाही !

हिंदुस्थानाच्या उद्योगधंद्याची वाढ खच्ची करणारी ही होअर यांची अट हिंदुस्थानास मान्य होणें अशक्य आहे. स्टेट सेक्रेटरी कांहीहि म्हणोत व आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ कोणताहि युक्तिवाद उपयोगांत आणोत, त्यांत सामान्य नीतीच्या मूलभूत तत्त्वावरहि घाला येत आहे यांत शंका नाही. निःशस्त्र व असहाय झालेल्या हिंदुस्थानाची लूट करण्यांत पराक्रमहि नाही व बुद्धिमत्ताहि नाही ! शिवाय आजपर्यंत इंग्रजी मुत्सद्द्यांनी "हिंदुस्थानाचें हित करण्याकरिताच आम्ही हिंदुस्थानावर राज्य करीत आहों, तेथील लोकांना स्वावलंबि करून त्यांना स्वराज्याचे हक्क दिले म्हणजे आमचें कर्तव्य संपलें" अशा ज्या थापा मारल्या त्यांचा अर्थ काय ? हिंदुस्थानाच्या लोकांना या थापांचा पोकळपणा व खोटेपणा पूर्वींच कळला आहे; म्हणूनच आमचें असें आव्हान आहे कीं, स्टेट सेक्रेटरींच्या या व्यापारविषयक अटीची व वरील तत्त्वाची सांगड त्यांनी घालून दाखवावी. सर सॅम्युएल होअर यांचा हा युक्तिवाद त्यांच्या आकुंचित दृष्टीचा व स्वार्थी मनोवृत्तीचा निदर्शक आहे. 'आकुंचित वृत्तीचीं व खुरटलेल्या विचारांचीं माणसें मोठीं साम्राज्यें चालवूं शकत नाहीत' असें प्रख्यात मुत्सद्दी एडमंड बर्क म्हणत असे तेंच खरें आहे. सर सॅम्युएल होअर यांनी निदान त्यांच्याच 'अंडर सेक्रेटरी' कडून कांही राजकारणाचे धडे गिरवावे असें आम्ही सुचवितों !

हिंदुस्थानाचे 'अंडर—सेक्रेटरी' मि. आर. ए. बटलर यांनी 'साम्राज्य दिना'चे दिवशीं एक भाषण केलें. त्यांत त्यांनी वरील व्यापारी वृत्तीचा निषेध केला. ते म्हणाले, "व्यापार व राज्यकारभार ह्या दोनहि बाबी स्वतंत्र ठेवल्या पाहिजेत. सरकाराने हिंदुस्थानाच्या किंवा लँकेशायरच्या हिताकडे दुर्लक्ष करावें किंवा या दोनहि

देशांतील मजुरांच्या हिताची दृष्टि ठेवूं नये असें म्हणण्याचा माझा उद्देश नाही; परंतु एक गोष्ट खरी कीं ब्रिटिशांच्या फायद्याकरिता साम्राज्यांतील लोकांची लूट करणें हे पाप आहे! " साम्राज्याच्या विस्ताराची मीमांसा करून ते म्हणाले कीं "आमचें तत्त्वज्ञान, आमच्या नीतीच्या कल्पना व ध्येयें हीं दृष्टीपुढे ठेवून साम्राज्यांतील घटक चालतात. हिंदुस्थानाचा प्रश्न सोडवितांना हींच तत्त्वें लावलीं तर इतराप्रमाणेंच स्वराज्य व सुराज्य यांचा उपभोग घेणारें हिंदुस्थान इंग्लंडचें दोस्त राष्ट्र म्हणून कां राहणार नाही ? " मि. बटलर यांच्या वरील म्हणण्यांत मुत्सद्दीपणाचें चातुर्य आहे. साम्राज्य जर टिकावयाचें असेल तर तें या वृत्तीनेंच टिकेल; एरव्ही टिकणे शक्य नाहीं ! सर सॅम्युएल होअर यांना हे विचार पटणार नाहीत म्हणूनच त्यांच्यासारख्या स्वार्थी मताचा पुरस्कार करणाऱ्या लोकांकडून साम्राज्याच्या ठिकऱ्या उडल्याशिवाय राहणार नाहीत हेंहि तितकेंच खरें आहे. व्यापार-विषयक पंक्तिप्रपंचाच्या होअर यांच्या विधानांना मि. बटलर यांनीच परस्पर उत्तर दिले असल्या-मुळें त्याची फारशी चर्चा करण्याचें कारण नाहीं.

सर सॅम्युअल होअर यांचें दुसरें विधान असे कीं, 'हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांच्या व इंग्रजी व्यापाऱ्यांच्या हितसंबंधात विरोध नाही, म्हणूनच त्यांनीं एकमेकांचे गळे न कापता हातांत हात घालून काम करावें. जपान आज हिंदुस्थानाची बाजारपेठ काबीज करीत आहे. अशा वेळीं तरी या दोन देशांनी दोहोंना, सामान्य अशा शत्रूशीं सहकार्यानें सामना द्यावा !' या होअर यांच्या म्हणण्यांत वरपांगीं प्रेमळपणा व सहकाराची वृत्ति दिसत असली तरी जरा खोल दृष्टि करून पाहिल्यास त्यांतहि त्यांच्या लबाडीची प्रतीति येते. जपानला मारण्याकरितां लँकेशायरची कायमची कुरघोडी करून घेण्यास हिंदुस्थानानें कां तयार व्हावें! आरबी भाषेंतील गोष्टींत सांगि-तल्याप्रमाणें एकदा या बुवांची स्वारी मानगुटीस बसली म्हणजे ती पुनः खाली उतरणें अशक्य होईल. लँकेशायर व हिंदुस्थान ही सामर्थ्याच्या दृष्टीने विजोड जोडी असल्याने शेवटीं या जपान-च्या झुंजींतहि हिंदुस्थानासच मार खावा लागेल! शिवाय सर सॅम्युएल होअर म्हणतात त्याप्रमाणे हिंदुस्थानाचे व इंग्लंडचे हितसंबंध एक नाहीत. हिंदुस्थानाचें हित तें इंग्लंडचें अहित व इंग्लंडचें हित तें हिंदुस्थानाचे अहित असेंच आज तरी दृश्य दिसत आहे. तेव्हा हितसंबंध एक आहेत या म्हण-ण्यांत अर्थ काय ? ते एक असते तर हिंदुस्थान व इंग्लंड यांमध्ये व्यापारी पंक्तिभेद करूं नये असें बंधन घालण्याचा ब्रिटिश साम्राज्यवादी व सर सॅम्युएल होअर यांनी तरी हट्ट कां धरला असता ? ह्या संरक्षक बंधनांची जरुरी त्यांना वाटते म्हणजेच हिंदुस्थान व इंग्लंड यांच्या हितसंबंधांत ऐक्य नाही हे उघड होतें !

सर सॅम्युएल होअर यांचें तिसरें विधान पाहिलें म्हणजे हे मुत्सद्दी सत्य कोळून प्याले आहेत असें वाटतें. ते म्हणतात "इंग्रजासारख्या पक्क्या व्यापारी वृत्तीच्या लोकांनी आपण स्वतः तरवारीच्या जोरावर हिंदुस्थानावर राज्य संपादन केलें असतांहि इतक्या थोड्या प्रमाणांत व्यापारी लूट केली असें उदाहरण जगांत दुसरें दाखवावें असें माझें आव्हान आहे? " या त्यांच्याच विधानांत इंग्लंडने हिंदु-स्थानाची कांहीं अंशीं कां होईना लूट केली अशी कबुली आहे हें तरी काय थोडें झालें ? त्यांची तक्रार एवढीच कीं, आपण तरवारीच्या जोरावर देश जिंकला असतांना त्याला लुटून साफ नागविला नाही! झाड मुळासकट उप-टून न टाकता जमिनीवर चार बोटें ठेवून तें तोडलें याबद्दल त्यांचे हिंदुस्थानाने आभार मानावयास पाहि-जेत! हल्ली हिंदुस्थानाची होत असलेली लूट कमी आहे हेंहि त्यांचें विधान धादांत खोटें आहे. दादाभाई, दत्त, डिग्बी, हिंडमन, रानडे व गोखले यांनी आंकडे देऊन ही गोष्ट पूर्वीच सिद्ध केली आहे. आजचे अर्थशास्त्रज्ञहि साठ कोटी रुपयांची लूट दरवर्षी केली जात असल्याचा पुरावा देत आहेत. ही लूट काय कमी समजावयाची ?

या लुटीची करुण कहाणी हिंदी लोकांच्या शब्दांत कित्येकांना पटण्याजोगी नाही म्हणून कांहीं इंग्रजी राज्यकर्त्यांनीच लिहून ठेवलेलीं वाक्यें या ठिकाणीं उद्धृत करण्यास हरकत नाही. इ. स. १७८७ मध्ये सर जॉन शोअर यांनी म्हटलें आहे कीं "कंपनी ही व्यापारी असून राज्यकर्ती संस्था आहे. व्यापारी या नात्यानें तिने व्यापार खाऊन टाकला व सरकार या नात्याने जमाबंदी खाल्ली. या पद्धतीपासून हिंदु-स्थानाचा फायद्यापेक्षा तोटाच अधिक झाला!" १८१६ मध्ये मॉंटगामेरी मार्टिन लिहितो कीं, " ३० वर्षेपर्यंत वर्षास तीस कोटि पौंडांचा चाल-लेला संपत्तीचा ओघ व त्यावरचें व्याज जमेस धरलें तर आतांपर्यंत ७२४ कोटि पौंडांची लूट हिंदु-स्थानांतून झाल्याचें सिद्ध होतें ! " असे एक ना दोन अनेक उद्गार प्रत्यक्ष राज्यकर्त्यांनी काढले आहेत. या सर्वांचा निष्कर्ष काढूनच कै. गोपाळरावजी गोखले हे १९०५ सालीं म्हणाले "वीस वर्षे काळजीपूर्वक अभ्यास करून मी असें स्पष्ट म्हणतों कीं, अर्थशास्त्राच्या दृष्टीने इंग्रजी राज्याने

हिंदुस्थानाचें अत्यंत नुकसानच झालें आहे! जमेपेक्षां खर्चच अधिक आहे." पण हे पुरावे तरी काय करावयाचे? आजहि हिंदुस्थानाची जी हलाखीची आर्थिक परिस्थिति आहे ती पाहून या बाबतींत कोणाचीहि खात्री होण्यासारखी आहे. सर सॅम्युएल होअर यांच्या भाषणाचा झोक असा आहे कीं, ही लूट फारच कमी प्रमाणांत पूर्वी झाली तेव्हां आता यापुढे ती पुरी करून घेतली पाहिजे!

आपल्या भाषणाच्या शेवटीं मोठा सज्जनपणाचा आव आणून सर सॅम्युएल होअर यांनी हिंदी व्यापारी मंडळींस पुढीलप्रमाणे उपदेश केला आहे. "व्यापार व राजकारण यांची फारकत करा. राजकारणांत व्यापार नको व व्यापारांत राजकारण नको." हिंदी व्यापाऱ्यांना व लोकांना सर सॅम्युएल इतके भोळे समजतात काय कीं, त्यांना या उपदेशांतील कावा कळणार नाही? राजकारण व व्यापार यांची फारकत केली पाहिजे असें म्हणतांना सर सॅम्युएल हे त्यांच्या पायाखाली काय जळत आहे इकडे लक्ष देत नाही असें म्हणावें लागतें. व्यापारी विचार जर राजकारणापासून दूर ठेवावयाचे तर नव्या सुधारणांच्या घटनेंत वर उल्लेखिलेल्या संरक्षक बंधनांची जरूरी काय होती? त्यांचा व्यापारी भेदाभेदाविषयीं एवढा हट्ट का? त्यांचें भाषण हेंच वरील विधानाला हरताळ फाशीत नाही काय? इंग्रजी राज्य व इंग्रजी व्यापार यांची गट्टी असून ते एकजीव आहेत. इंग्रजी व्यापार बसला तर इंग्रज हिंदुस्थान सोडून जातील आणि राज्य गेले व व्यापार राहिला तर ते येथे कायमचें ठाणें देतील. इंग्रजांची मनोवृत्ति, परंपरा व तत्त्वज्ञानच व्यापारी आहे. हे कोणी कबूल करतात, कोणी करीत नाहीत इतकेंच.

सर सॅम्युएल होअर यांचें वरील विधान हें एक ढोंग आहे. त्यांच्याच तोडीच्या व त्यांच्याच पक्षाच्या एका मोठ्या पुढाऱ्याचेच विचार परस्पर होअर यांना पुढील वाक्यांत उत्तर देत आहेत. १९२८ सालीं इंग्लंडाचे गृहमंत्री असलेले सर विल्यम जॉयसन हिक्स म्हणाले "हिंदी लोकांच्या कल्याणाकरिता कांही आम्हीं हिंदुस्थान जिंकला नाही. मिशनऱ्यांच्या सभेंत पाद्री लोक, हिंदुस्थानाचा दर्जा वाढावा म्हणून आम्हीं हिंदुस्थान जिंकला असें सांगतात. पण तें सर्व ढोंग आहे! ग्रेट ब्रिटनच्या मालाला बाजारपेठ मिळावी म्हणून आम्हीं हिंदुस्थान जिंकला. आम्हीं तो तलवारीने जिंकला व तलवारीच्या जोरावरच तो राखूं! ... हिंदी लोकांकरिता हिंदुस्थान जिंकला हे म्हणण्याइतका मी ढोंगी नाही. आमच्या मालाकरिता विशेषतः लँकेशायरच्या मालाकरिता, हिंदुस्थानावर आम्हांस सत्ता पाहिजे!" सर सॅम्युअल होअर यांच्या सर्व विधानांना वरील उतारा हें एक चोख उत्तर आहे. आम्हांला शेवटीं इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, सर सॅम्युएल यांनी अगर त्यांच्याच वृत्तीच्या मुत्सद्यांनी हिंदुस्थानांतील लोकांसहि स्वाभिमान आहे व खरें खोटें समजण्याची बुद्धि आहे हे लक्षांत ठेवावें. जीभ उचलली कीं टाळ्याला लागते हें खरें; पण सत्याला सर्वस्वी हरताळ फासणारी भाषा वापरण्यांत कोणाचेंच कल्याण नाही!

# स्फुट सूचना

१ म. गांधींच्या उपोषणकालांत त्यांची शुश्रूषा करण्याकरिता जमलेले डॉ. अन्सारी, डॉ. रॉयप्रभृति पाहुणे उपोषण सुटल्यानंतर आपआपल्या गांवीं निघून गेले. डॉ. ना. माधवरावजी अणे यांना राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्याने आपणावरील जबाबदारी ओळखून उपोषणाच्या काळांत पुण्यांत राहणें भाग पडलें होतें. त्यांनीहि गेल्या मंगळवारीं वऱ्हाडांत प्रयाण केलें. म.गांधींचें उपोषण निर्विघ्नपणें सुटल्यामुळें त्यांच्या प्रकृतीविषयीं काळजी दूर झाली असली तरी त्याबरोबर राजकारणाचा मागे पडलेला विषय पुनः हळूहळू पुढे सरकूं लागला आहे. गांधीजींची प्रकृति पूर्ववत् सुदृढ होण्यास आणखी पंधरा दिवस सहज लागतील; त्या मुदतींत गांधीजींपुढे हा विषय काढून त्यांना वाटाघाट करण्याचे श्रम देणें अनिष्ट असल्यामुळें राष्ट्रीय सभेच्या बंधमुक्त पुढाऱ्यांनी त्याच सुमारास पुनः पुण्यास जमण्याचें ठरविलें आहे. तथापि तेवढ्या काळांत प्रस्तुत विषयाची चर्चा देशांत व इतरत्र चालू राहण्यास मुळीच हरकत नाही व तशी ती चालू राहीलच. म. गांधी यांनी तुरुंगांतून बाहेर येतांच एक पत्रक प्रसिद्ध करून कायदेभंग सहा आठवडे पर्यंत तहकूब ठेवला. त्यापासून जरूर ती सूचना घेऊन हिंदुस्थान सरकार वर्किंग कमिटीच्या तुरुंगांतील सभासदांना सोडून देईल व देशांत स्वस्थता उत्पन्न करण्यास मदत करील असें वाटलें होतें. परंतु हिंदुस्थान सर-

काराने आपल्या धोरणांत फेरबदल करण्याचें नाकारलें.

---

२ त्या वेळीं सर तेजबहादूर सप्रू व बॅ. मुकुंदराव जयकर ही जोडी विलायतेस असल्यामुळे पुढील शिष्टाईचे कामीं त्यांच्या प्रयत्नांचें वजन पडेल असें आम्हीं म्हटलें होतें. त्याप्रमाणे गांधीजींचें उपोषण सुटतांच सप्रू–जयकरांनीं समेटाचें 'सूतोवाच' सुरू केले हें ठीक झालें. त्यांनी व विलायतेस गेलेल्या इतर हिंदी प्रतिनिधींनीहि समेटाच्या बाबतींत आपलीं मतें प्रकट केलीं आहेत. हिंदुस्थानांत शांतता प्रस्थापित करण्याच्या बाबतींत जयापजयाच्या क्षुल्लक कल्पना कोणीं मनांत आणता कामा नये हें सप्रू–जयकरांचें वाक्य बरेंच सूचक आहे. पण त्या वाक्यांतील सूचना एकट्या काँग्रेसपक्षालाच नव्हे तर सरकारालहि लागू आहे असें सरकार मानील तरच समेट दृष्टिपथांत येईल. म. गांधी हे कोणत्याहि एका पक्षाचे अध्वर्यू नसून ते ऐक्याचे पुरस्कर्ते आहेत, असें सप्रू-जयकरांचें दुसरें वाक्य आहे. तें पहिल्याइतकेंच महत्त्वाचें आहे. समेट घडवून आणतांना पक्षाभिनिवेश बाजूस ठेवून ऐक्यावर जोर देण्याइतके थोर व उदार मन गांधींचें आहे अशा खात्रीनेच वरील वाक्य सप्रू–जयकरांनी उच्चारलें आहे. समेट घडून येण्यास पहिली गरज वर्किंग कमिटीच्या तुरुंगांतील सभासदांची सुटका होऊन त्यांची बैठक भरण्याचीच आहे. तेवढें कार्य सप्रू-जयकर प्रभृतींच्या वजनाने साधल्यास गांधीजी राष्ट्रीय सभेवर आपलें वजन खर्चून समेटाची आलेली संधि आपल्याकडून हुकूं देणार नाहीत अशी बळकट आशा वाटते.

---

३ अलवारच्या महाराजांना पदच्युत केल्याची बातमी समजताच डॉ. मुंजे यांनी सदर कृत्याबद्दल सरकाराचा निषेध केला. डॉ. मुंजे यांनी अलवार प्रकरणाचे बाबतींत एक पत्रक काढलें असून तें संस्थानिकांनी व इतरांनीहि विचार करण्यासारखं आहे. हिंदुस्थान सरकार एखाद्या संस्थानचा राज्यकारभार बिघडलेला असला कीं, त्यांत हात घालतेंच अशी खात्री नाहीं. संस्थानी प्रजेच्या हितसंबंधापेक्षा आपलें राजकीय धोरणच अधिक प्रिय असल्यामुळे त्या धोरणास नीट जुळेल अशाच बाबींच्या वेळीं संस्थानी कारभारांत तें हात घालतें व संस्थानिकास कधी कधी पदच्युतहि करतें. अलवारचे महाराज सरकारच्या याच धोरणास बळी पडले आहेत. असल्या कठिण प्रसंगीं संस्थानिक व्यक्तिशः अगदींच एकाकी व असहाय असतात. प्रजेवर त्यांनी विश्वास टाकलेला नसतो, व त्यामुळे संस्थानिकावरील संकटाची प्रजेस पूर्ण माहिती असत नाही. ही आपत्ति संस्थानिकांना चुकवावयाची असल्यास त्यांनी ब्रिटिश सरकारास काय ते आम्ही जबाबदार व त्याचे. च काय ते आम्ही अंकित, असली भाषा बोलण्याचें सोडून आपल्या प्रजाजनांस स्वराज्याचे हक्क द्यावे व त्यांनाच स्वतःच्या सुखदुःखाचे वांटेकरी करावें. तसें झाल्यास अलवारच्या महाराजांवर गुदरला त्या प्रकारचा प्रसंग कोणाहि संस्थानिकावर ओढवेल तेव्हा प्रजाजन त्याच्या पाठीशीं उभे राहून त्याला न्याय मिळवून देण्याचा प्रयत्न एकजुटीनें करतील. डॉ. मुंजे यांनी आपल्या पत्रकात याच प्रकारची सूचना केली असून तिचा संस्थानिकांनी काळजीपूर्वक विचार करण्याची वेळ हीच आहे.

---

४ व्हाइसरॉयांस हिंदुमहासभेच्या वतीने डॉ. मुंजे यांनी केलेल्या तारेंत एक मुद्दा महत्त्वाचा होता. त्यांचें म्हणणें असें कीं हिंदुस्थान-सरकाराने एक कमिशन नेमून मुसलमानी संस्थानांत हिंदूंची स्थिति कशी आहे याची चौकशी करावी. पण ही सूचना व्हाइसरॉयांनी फेटाळली आहे. व्हाइसरॉयांनी वरील सूचना फेटाळली असली तरी नरेंद्रमंडळाने अशा तऱ्हेचें चौकशी कमिशन मुसलमानी संस्थानाकरिता नेमावें असें हिंदुमहासभेचें म्हणणें आहे. पण नरेंद्रमंडळाने हिंदुमहासभेची निराशा केल्यास तिला निर्वाणीचा एकच उपाय उरला. काश्मीर व अलवार या दोन संस्थानांत मुसलमानांनी ज्या बंडाच्या मार्गाचा अवलंब केला तोच मार्ग हिंदूंनाहि अवलंबावा लागेल, हा हिंदुमहासभेच्या म्हणण्याचा गर्भित अर्थ आहे. हिंदूंचीं मुसलमानी संस्थानांतील दुःखें अशींच कायम राहिल्यास हिंदु लोक कितीहि सहनशील असले तरी त अखेर याच मार्गास वळतील यांत शंका नाहीं.

# इंदूर येथील क्रांतिकारकांचा कट

### सुटकेसाठी हजार रुपयांची लांच

**ता. १८**—माफीचा साक्षीदार रामसिंग याची साक्ष पुढे चालू झाली. तो म्हणाला, "दरोडा घातल्यानंतर दुसरे दिवशीं मी कॉलेजांत गेलों. तेथून परत आल्यावर मला कैद करण्यांत आलें; आणि ता. २२ फेब्रु. १९३३ रोजीं मला काळुराम व गंगादास यांच्यासह इंदुरास नेण्यांत आलें. काळुरामाने पोलिसांना असें सांगितलें होतें कीं, इंदूरच्या विद्यार्थ्यांनी दरोडा घातला आहे. ता. २३ रोजीं रात्रीं काळुरामाने मला सांगितलें कीं, एक हजार रुपये दिल्यास आपल्याला धार येथे सोडून देऊं असें पोलीस म्हणत आहेत. दुसरे दिवशीं नारायणसिंगाने मला ९०० रुपये दिले. त्या दिवशीं रात्रीं पोलीस इन्स्पेक्टर मि. दातेरे हे मजकडे आले व मला सारी हकीकत विचारूं लागले. मीं त्यांना दुसरे दिवशीं खांडेकर, कुलकर्णी व मदनगोपाळ यांचीं घरें दाखविलीं. मला पुण्यास नेण्यांत आलें. तेथे मी बाबुराव पहिलवान यास ओळखलें."

### दरोड्यांतील प्राप्ति व तिचा विनियोग

यानंतर माफीचा दुसरा साक्षीदार जगन्नाथ झुत्शी याने आपल्या साक्षींत असें सांगितलें कीं, "मी काश्मीरहून इंदूर येथें १९२९ मध्ये आलों. तेव्हापासून मी मेडिकल स्कूलमध्ये शिकत आहें. माझी व राजारामाची प्रथम ओळख झाली. त्याने मला संस्थेची दीक्षा दिली. त्यावेळीं अग्नि पेटवून त्याच्या साक्षीने मीं शपथ घेतली. आरोपींनी टोपण नांवें धारण केलीं होतीं. राधेश्याम ह्यांना भाईसाहेब म्हणत. त्यांची माझी भेट १९३१ च्या एप्रिलमध्ये राजाराम याने करविली. राजारामाने मला लष्करी शिक्षण घेण्यास सांगितलें. मीं निशाणबाजीचें शिक्षण घेण्यास सुरुवात केली. एक वडाचें झाड हें आमचें लक्ष्य होतें. बरोबर आमची पांचसहा मंडळी होती. १९३२ च्या ऑक्टोबरमध्ये कौन्सिलची सभा झाली. आणि 'कार्य' करण्याचें म्हणजे दरोडा घालण्याचें ठरलें. दरोडा घालण्यासाठी आम्ही वेष बदलून गेलों. बरोबर बंदुका, रिव्हॉल्व्हर, सुरे, कुऱ्हाडी वगैरे हत्यारें होतीं. आम्ही सायकलवरून परत आलों. दुसरे दिवशी पिले याने दागिने नेले. ते सत्यनारायणाने कानपूर येथे विकले. त्यांचे ७०० रु. आले. त्यांतून दोन रायफली व दोन रिव्हॉल्व्हर विकत घेण्यांत आलें. हिशेबाचें खातें राजारामाकडे सोंपविलेलें असून शस्त्रास्त्रांचें खातें भरतसिंगाकडे होतें. महावीरसिंगाकडे बातम्यांचें काम होतें. या संस्थेचें केंद्रस्थान संयुक्त प्रांतांत होतें. कौन्सिलांतील सभासदांचे तीन वर्ग होते. ते असे-(१) एकनिष्ठ आमरणसेवक (२) जरुरीच्या वेळीं काम करणारे (३) द्रव्यसाहाय्य करणारे.

### व्हाइसरॉयांना ठार मारण्याचा व्यूह

१९३२च्या डिसेंबरमध्ये व्हाइसरॉय इंदूरला आले. ते मेडिकल स्कूलला भेट देणार असें आम्हांला कळलें. त्यांना ठार मारण्याचें आम्हीं ठरविलें. कुळकर्णी याने पिस्तुलें व काडतुसें दिलीं. पण व्हाइसरॉय आमच्या शाळेंत आलेच नाहीत. मी कच्च्या कैदेंत असतांना एका कैद्यामार्फत पुस्तकांत घालून कुळकर्णी याचें मला एक पत्र आलें. त्यांत "आम्हांला दगा देऊं नकोस" असें लिहिलें होतें. पत्रांतील अक्षर कुळकर्ण्यांचेंच आहे हें मी ओळखतों. (हें पत्र कोर्टांत वाचून दाखविण्यांत आलें.)

### खजिना लुटण्याचे बेत

**ता. १९**—जगन्नाथ झुत्शी याची साक्ष चालू झाली. तो म्हणाला, "राजाराम आणि कुळकर्णी हे दुसरे दरोडे घालण्याबद्दल व्यूह रचीत असत. प्रत्येक महिन्याच्या १ल्या तारखेला इंपीरिअल टेलिग्राफ ऑफिसमधून इंदूरच्या पोस्ट ऑफिसमध्ये रवाना होणारा खजिना लुटावा असा त्यांचा बेत होता. त्याचप्रमाणे पैसे नेणाऱ्या मोटारीवर धाड घालावी असाहि त्यांचा मनसुबा होता. खुद्द इंदूर शहरांत दरोडे घालण्यासंबंधी त्यांचे बेत वारंवार चालत. पिले आणि कुळकर्णी यांचा छडा पोलीस लावूं पाहात आहेत असें कळल्यावरून त्यांना फरारी होण्यासाठी मीं अनुक्रमें १० व २४ रुपये दिले"

यानंतर सब-इन्स्पेक्टर चौबे यांनी सांगितलें कीं, "ता. १ मार्च १९३३ रोजीं मीं 'भारत ट्रूप ऑफिस' ची झडती घेतली. तींत कांही फोटो सांपडले; त्यांत कांही आरोपींचीं चित्रें आहेत."

यानंतर कांही किरकोळ साक्षी झाल्या. दोघां सबइन्स्पेक्टरांनी राजाराम व नाईक यांना आपण कसें पकडलें हें सांगितलें. एका व्यापाऱ्यानेहि साक्षीदारांना पुष्टि दिली.

### हत्यारांची खरेदी

**ता. २०**—निरनिराळ्या पोलीस अधिकाऱ्यांच्या साक्षी जप्ती-अटक वगैरेंबाबत झाल्या. कागद-पुस्तकें याबरोबरच दाढी–मिशाहि त्यांनी जप्त केल्या आहेत. यानंतर मोटार ड्रायव्हर अल्लाबक्ष याची साक्ष

झाली. तो म्हणाला, " बच्चुभाईंनी मला मोटार मागितली होती, पण मी ती देण्याचें नाकारलें होतें. परंतु ता. १९ फेब्रुवारी रोजीं त्यानें माझ्या भावापासून Bom. Y 7788 या नंबरची मोटार मागून नेली व ती दुसरे दिवशीं पहाटे ५ वाजता परत आणून दिली."

हत्यारांचा व्यापारी बल्लाबक्ष यानें आपल्या साक्षींत सांगितलें कीं, " ११ वर्षांपूर्वी मीं महावीरसिंग याला एक रिव्हॉल्व्हर ८२ रुपयांस विकला. राजाराम यानें आपलें नांव कुमारसिंग असें सांगून आपण रेवा संस्थानचे जहागिरदार आहों असें मला सांगितलें होतें. माझ्यामार्फत अमीनुद्दीनकडून त्यांनी ८५ रुपयाला एक रिव्हॉल्व्हर खरेदी केलें होतें. तसेच प्रतापसिंगानें ९५ रुपयांचें एक रायफल आणि ४०।५० काडतुसें घेतलीं होतीं. या सर्वांची नोंद अमीनुद्दीनच्या वहींत आहे." यानंतर 'भारत स्काऊट ट्रूप'चे भरतसिंग, नारायणसिंग आणि महावीरसिंग हे सभासद होते अशा आशयाची साक्ष झाली.

### सफरी व सिनेमा

**ता. २२**—ता. २१ रोजीं रविवार असल्यामुळे साक्षीचें काम ता. २२ रोजीं पुढे चालू झालें. जगन्नारायण कपूर या रेल्वे-कॉंट्रॅक्टरनें असें सांगितलें कीं, "माझें एक दुमजली घर आहे. त्याचा दुसरा मजला दीड वर्षापूर्वी मीं पिले यांना भाड्यानें दिला. बाकीचीहि मंडळी तेथें असत. ते म्हणत, " आम्ही मधून मधून मौजेच्या सफरी करीत असतों". १९३२च्या एप्रिलमध्ये मंडू येथे आम्ही गेलों होतों असें ते म्हणाले. त्यानंतर घरामध्ये पिले एकटाच राहत असे. पुढे रामगोपाळ आणि राजाराम हे ऑक्टोबर १९३२ मध्ये तेथे आले. आम्ही आता वनभोजनाला जाणार असें ते एकदा म्हणाले. राजारामाला ३०० रुपयांचे विमा उतरलेलें पत्र आलेलें मला माहीत आहे. १९३३ च्या जानेवारीमध्ये राधेश्याम व राजाराम हे राहावयास आले. ते सुमारें दीड महिना राहिले. या अवधींत राधेश्याम हा एकदोनदाच घराबाहेर पडला असेल. मिरत येथील 'गांधी आश्रमाशीं' त्याचा कांही संबंध आहे असें मला कळलें. फेब्रुवारीच्या अखेरीस एके दिवशीं रात्रीं घरीं न आल्याबद्दल मीं राजारामास विचारलें. त्यानें उत्तर दिलें, " आम्ही सिनेमाला गेलों होतों. तेथे उशीर झाला म्हणून एका मित्राचे घरीं झोपलों. यानंतर एकदोन दिवसांतच राधेश्यामानें इंदूर सोडलें."

यानंतर 'संयोगिता हायस्कूलमधील' कन्हय्यालाल नांवाच्या विद्यार्थ्याची साक्ष झाली. मी आणि भरतसिंग एकाच वर्गात व एकाच चाळींत होतों असें त्यानें सांगितलें. त्यानें इतर आरोपींचीहि ओळख सांगितली. दुधियाच्या पाटलानें ब्रह्मस्वरूप यांच्या साक्षींतील निशाणबाजीच्या वर्णनास दुजोरा दिला. मेडिकल स्कूलमधील एक विद्यार्थी वेणीप्रसाद यानें सांगितलें कीं, "१९३१ च्या एप्रिलमध्ये राजारामानें माझ्यामार्फत एक एअर पिस्तूल मागविलें."

**ता. २३**—आरोपी रामगोपाळ याचा पाय दुखावल्यामुळे मी कोर्टात जाऊं शकत नाही असें त्यांनी सांगितलें. पण तुरुंगांतील डॉक्टरानें रामगोपाळाची प्रकृति ठीक आहे असें सांगितलें आणि म्हणून पोलिसानें त्याला त्याच्या मागणीप्रमाणें वाहनाची सोय करून दिली नाही. याचा निषेध करण्यासाठी इतर आरोपींनीहि कोर्टात जाण्याचें नाकारलें. म्हणून ता. २५ पर्यंत खटल्याचें काम तहकूब झालें.

**ता. २५**—सारे आरोपी हजर होते. किरकोळ साक्षी झाल्यानंतर पोलिस सब्-इन्स्पेक्टर मि. व्होरा हे म्हणाले, " मी ज्या चाळींत राहात होतों, तेथेच पिले आणि भरतसिंग राहात होते. ता. २० फेब्रुवारी रोजीं पहाटे ४ वाजता जिन्यापाशीं मोटार आलेली मीं पाहिली. तिच्यांत बच्चुभाई वगैरे दोघेतिघे बसलेले होते. मोटारींतून कांही सामान काढून पिले तें दुसऱ्या मजल्यावर नेत होता." या साक्षीला पुष्टि श्री. मोतिलाल ओंकार प्रसाद या कारकुनानें दिली. हत्यारांच्या कांही दुकानदारांच्या साक्षी झाल्या. त्यानंतर धार दरबाराचे पोलिस सुपरिंटेंडेंट मि. कांताप्रसाद यांनी दरोड्याची हकीकत सांगितली आणि रामसिंगाच्या घराच्या झडतींत राधेश्यामनें लिहिलेलें पुस्तक सांपडल्याचें सांगितलें. ते म्हणाले, " मी ता. २२ फेब्रु. रोजीं इंदूर येथे आलों. सब्-इन्स्पेक्टर मि. वीरकर यांना मीं सांगितलें कीं, हजार रुपयांचा लांच द्याल तर तुम्हांला सोडतों असें तुम्ही आरोपींना म्हणा. ता. २५ रोजीं ९०० रु. आरोपींनी वीरकरांचे हवालीं केले. कटाचा सुगावा अधिक लागावा म्हणून ही युक्ति योजिली होती.

**ता. २६**—किसन मिस्त्री याची साक्ष झाली. तो म्हणाला, भरतसिंगानें एक रायफल व काडतुसें कांही खेडयांतून आणलीं होतीं. याला पाठिंबा देणारी साक्ष मिस्त्री याच्या भावानें दिली. त्यानंतर सब्-इन्स्पेक्टर वीरकर यांची साक्ष झाली; ती कांताप्रसाद यांना पुष्टिकारक अशी होती. झडतींत 'चांद' चा फांशी अंक जप्त केल्याचें त्यांनी सांगितलें. मंगीलाल नांवाच्या व्यापाऱ्यानें

आपल्यावर आलेल्या एका सशस्त्र दरोड्याची हकीकत सांगितली.

ता. २७—इंदूर येथील वकील मि.अब्दुल मजिद हे आपल्या साक्षींत म्हणाले, मी भरतसिंगाला ओळखतों. तो भवानियाच्या ठाकूरसाहेबांचा भाऊ आहे. मीं त्याला १९३३च्या नोव्हेंबरांत एक रायफल १०५ रु. स विकलें होतें. कांही किरकोळ साक्षी झाल्यानंतर पोलिस इन्स्पेक्टर मि. दातेरे म्हणाले, 'किसन मिस्त्री यांजबरोबर मी कांही ठिकाणीं गेलों होतों. त्या ठिकाणीं रामसिंग व मिस्त्री हे गेलेले होते!'

# पं. मालवीय खोटे कीं सरकार खोटे

कलकत्त्याची राष्ट्रीय सभा झाली त्या वेळीं कलकत्त्यास जमलेल्या प्रतिनिधींपैकीं पुष्कळांना पोलिसाकडून जबर मार बसला; त्यासंबंधाचें एक पत्रक पं. मदन मोहन मालवीय यांनी प्रसिद्ध करून माझीं विधानें खरीं असल्यास अपराध्यांना शासन करा व तीं खोटीं ठरल्यास मजवर खटला भरा अशा आशयाचें सरकारास आव्हान केलें होतें. आता बंगाल सरकारने आपली बाजू मांडून पं. मालवीय यांच्या पदरांत खोटेपणा बांधण्याचा प्रयत्न केला आहे. मालवीय यांचीं विधानें सरकारी पत्रकाप्रमाणे थोडक्यांत अशीं होतीं. (१) राष्ट्रीय सभेंत ठराव मांडण्याकरिता प्रतिनिधि एकामागून-एक उभे राहूं लागले असतां त्यांस सार्जंटांनी लाठ्यांनी बेदम मारलें व लाथाहि दिल्या. (२) संयुक्त प्रांतांतील ८९ प्रतिनिधींना लाल बाजार ठाण्यावर नेऊन युरोपियन व अँग्लोइंडियन सार्जंटांनी गुराप्रमाणें चोपून काढले. (३) कालीघाट येथे १८० प्रतिनिधींना पकडून त्यांपैकीं बऱ्याच जणांवर पोलिसांनी हल्ला केला. त्यांत एकाच सार्जंटाने चाळीस इसमांना दुखापती केल्या. (४) संयुक्त प्रांतांतील २१ प्रतिनिधींना ता. १ एप्रिल रोजीं कालीघाटावर पकडून त्यांस पोलीस ठाण्यावर नेत असता वरील सार्जंटानेच त्यांपैकी दोघांना क्रूरपणाने मार दिला.

***

पं. मालवीय यांच्या पत्रकांतील वरील विधानें इतकीं भयंकर आहेत कीं तीं वाचून कोणासहि संताप उत्पन्न झाल्यावांचून राहाणार नाही. मालवीयजींस ही हकीकत समजली तेव्हा त्यांची मनोवृत्ति क्षुब्ध होऊन तिची शहानिशा करून घेण्याकरिता त्यांनी स्वतःवर खटला ओढवून घेण्यासहि तयार व्हावें हें त्यांच्या सात्त्विक व वीरवृत्तीचेंच दर्शक होय यांत शंका नाही. पं. मालवीय यांच्या विधानास बंगाल सरकाराने उत्तर दिलें आहे तें वाचून कोणाचेंहि समाधान होईल असें आम्हांस वाटत नाही. वरील प्रत्येक विधानास त्यांचें उत्तर पुढीलप्रमाणें आहे (१) ज्या ठिकाणीं राष्ट्रीय सभा भरली तें ठिकाण चव्हाट्यावर व उघड्या जागेवर असल्यामुळे पोलिसांनी केलेली मारहाण लोकांना दिसली असती व तिची हकीकत वर्तमानपत्रांतहि प्रसिद्ध झाली असती. ज्या अर्थी कलकत्त्याच्या कोणत्याहि पत्राने ती दिली नाही, त्या अर्थी पं.मालवीय यांचें विधान निराधार आहे. (२) संयुक्त प्रांतांतील ८९ प्रतिनिधींना पोलिसांनी पकडलें. ते पोलिसांचें ऐकेनात व रस्त्यांत बसून सत्याग्रह करूं लागले म्हणून पोलिसांनी त्यांस मार दिला. पण तो अगदी जरूर तेवढाच व अगदी माफक होता. (३) काली घाटावरील एका घरांत प्रतिनिधि उतरले होते. पण पोलिस येताच दारें लावून घेऊन ते गच्चीवर उभे राहिले. तेव्हा पोलिसांनी दारें फोडलीं व प्रतिनिधींना पकडलें. त्या वेळी मारहाणहि करण्यांत आली. तिच्यामुळे फकीरचंद याच्या खांद्याचें हाड निखळलें व तेजबहादूरसिंग याचे दोन दात पडले. अशा रीतीने म्हणण्यासारखी दुखापत फक्त ११ इसमांनाच झाली. (४) कालीघाटावरील संयुक्त प्रांताचे प्रतिनिधींना मोटारींत बसवितांना त्यांनी दांडगाई आरंभल्यामुळे त्यांस मार बसला असेल, पण त्यांत दुखापती झालेल्या दिसल्या नाहीत.

***

सरकारी खुलासा वरीलप्रमाणे आहे. पं. मालवीय यांची तक्रार व सरकारी खुलासा हीं ताडून पाहता कलकत्त्यांतील अत्याचाराचें क्षेत्र फार विस्तीर्ण होतें व पकडलेल्या प्रतिनिधींची संख्याहि फार मोठी होती असें दिसून येतें. बंगाल सरकाराने पोलिसांचे अत्याचार कितीहि झाकून ठेवण्याचा प्रयत्न केला असला तरी त्यांना एका प्रतिनिधीचा खांदा निखळला, दुसऱ्याचे दात पडले व पुष्कळांना मार बसला इतकी कबुली द्यावीच लागली. सरकाराने केली ही चौकशी कलकत्त्याच्या पोलिस कमिशनरामार्फत केली असल्याने पोलिस कमिशनरांनी आपल्या हाताखालच्या नोकरांना तिच्यांत सांवरून धरण्याचा प्रयत्न केला अस-

त्यास तो मनुष्यस्वभावास धरूनच होय. ही चौकशी कमिशनराकडून न करता एखाद्या न्यायाधीशाकडून किंवा स्वतंत्र कमिटीकडून झाली असती तर पं. मालवीय यांचीं बहुतेक विधानें खरा ठरल्यावांचून राहिलीं नसतीं असें अनुमान करण्याइतका आधार प्रस्तुत रिपोर्टात सांपडतो यांत शंका नाही. बंगाल सरकारासहि हीच शंका नडल्यामुळे त्यांनी कमिशनराच्याच चौकशीवर भागवून घेतलें; इतकेंच नव्हे तर हिंदुस्थान सरकार व भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनीहि त्याच चौकशीवर भिस्त ठेवून हें प्रकरण जिरवून टाकलें असें दिसतें. पं. मालवीय यांनी कलकत्त्याच्या पोलिसांवर केलेले आरोप इतके भयंकर आहेत कीं ते खोटे असते तर सरकाराने त्यांजवर खटलाहि उभारला असता. त्या दृष्टीने ता. २९ रोजीं कॉमन्स-सभेंत मि. टॉम विल्यम्स या सभासदाने होअरसाहेबास प्रश्नहि विचारला. त्यांनी म्हटले 'पुढे आलेल्या पुराव्यावरून पं. मालवीय यांचीं विधानें अजिबात खोटीं ठरतात. यासाठी पं. मालवीयप्रभृतीवर खटला करणें हिंदुस्थान-सरकाराचें कर्तव्य होय.'

***

वरील प्रश्नास होअर यांनी दिलेलें उत्तर खुबीदार व चुकवाचुकवीचें आहे. ते म्हणाले 'तसें करण्याचें कारण नाहीं. पण मालवीयांचे आरोप निराधार असल्याबद्दल माझें व हिंदुस्थानसरकाराचेंहि समाधान झालें आहे.' पाणी मुरतें तें येथेच. पंडितजींचे आरोप जर खोटे आहेत व सरकाराला स्वतःच्या अब्रूची चाड आहे तर त्यांनी पं. मालवीय यांजवर खटलाच भरला पाहिजे. व तसा खटला स्वतःविरुद्ध ओढवून घेण्यास पंडितजी छातीठोकपणानें उभेहि आहेत. मग सरकार टाळाटाळी कां करतें! खरें बाहेर येईल, आपली नाचक्की होईल, पोलिसांचीं घोर कृत्यें उघडीं पडतील,त्यांस शिक्षा करावी लागेल व पं. मालवीय यांच्या पक्षास विजय लाभेल याच दहशतीला सरकार भितेंना? सरकाराला ही भीति वाटत नसेल आणि त्यांना आपली बाजू सत्यास व न्यायास धरून आहे अशी खात्री असेल तर त्यांनी पं. मालवीय यांजबरोबर सामना करण्यास पुढे आले पाहिजे. त्याला सरकाराची तयारी नाही याचाच अर्थ सरकाराची बाजू लंगडी आहे असा होतो. पं. मालवीय यांनी एवढ्यावर स्वस्थ न बसता लोकपक्षाची चौकशी कमिटी नेमून तिजमार्फत बंगाल सरकाराचें बेंड फोडल्याचें श्रेय घ्यावें.

# अहमदाबाद येथील भयंकर अत्याचार

मुसलमानांना चिडीस जाण्यास अगदी क्षुल्लक कारणदेखील कसें पुरतें व त्याबरोबर ते प्राणघातक हल्ले करण्यास मागेपुढे कसे पाहात नाहीत याची उदाहरणें आजपर्यंत कांही थोडथोडकीं घडलीं नाहीत. परंतु त्यास आळा घालण्याचे प्रयत्न होत नाहीत हीच मोठी खेदाची गोष्ट आहे.

अहमदाबाद येथे गेल्या शनिवारीं घडलेली गोष्ट. तेंथील चंद्रकान्त गिरणींत श्री. नारायणराव हर्डीकर नांवाचे एक महाराष्ट्रीय नोकर आहेत. ते शनिवारीं सायंकाळीं गिरणी सुटल्यावर सायकलवरून घरीं परत येत होते. वाटेंत गर्दीमध्ये एका मुसलमानाच्या पायाला त्यांची सायकल लागली. श्री. हर्डीकर यांनी रीतीप्रमाणें त्याची माफी मागितली. कारण गर्दीत असे प्रकार हमेषा घडतात. व औपचारिक माफी मागितल्याने काम भागतेंहि. परंतु सदर मुसलमान व त्याचे तेथे असलेले १०।१२ मुसलमान सोबती यांना तो प्रकार न पाहवून त्यांनी शिवीगाळ करण्यास सुरुवात केली. व एकाने तर श्री. हर्डीकर यांजवर सुरी उपसली. हा प्रसंग पाहताच श्री. हर्डीकर पायउतार होऊन मुसलमानाशीं सामना देण्यास सिद्ध झाले व दहाहि मुसलमानांस धूळ चारून त्यांनी सुरा हिसकावून दूर फेकून दिला.

ही गोष्ट एवढ्यावर थांबली नाही. दुसरे दिवशीं म्हणजे रविवारीं श्री. हर्डीकर नेहमींप्रमाणे कामावरून परत येत असतां ५०।६० मुसलमान गुंडांनी श्री. हर्डीकर यांजवर अकस्मात् हल्ला करून त्यांच्या डोक्यावर व दंडावर सुऱ्याचे वार केले. शिवाय अंगावरहि काठ्यांचा मार दिला. रक्तबंबाळ स्थितींत ते घरीं जाऊन पोहचले, व हल्ली अत्यवस्थ स्थितींत डॉ. तळवळकर यांच्या दवाखान्यांत पडून आहेत. श्री. हर्डीकर यांजवर असा भयंकर हल्ला व तोहि भररस्त्यांत होत असतां पोलिसांस त्याची दाद लागूं नयें हें आश्चर्य होय!

# पुस्तक-परीक्षण

## मुक्तात्मा

(ले. : ग. त्र्यं. माडखोलकर. प्र. भारतगौरव ग्रंथमाला, ३१८ ए. ठाकुरद्वार मुंबई नं. २. किंमत दोन रुपये.)

महाराष्ट्रांतील एक सुप्रसिद्ध लेखक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनी लिहिलेली ही पहिली कादंबरी आहे. मुखपृष्ठावर ही स्वतंत्र सामाजिक कादंबरी आहे असें म्हटलें आहे व पहिलीं ७० पानें पाहिलीं तर कांही सामाजिक प्रश्नच प्रामुख्याने पुढे मांडण्याचा कादंबरीकारांचा उद्देश असावा असें वाटतें. पण 'गिरगांवांतील गांवठी नॉर्थ-क्लिफ' या प्रकरणापासून कादंबरीचें सामाजिक स्वरूप संपून तिला राजकीय स्वरूप येतें व कादंबरीला खरें तेज येथूनच चढूं लागतें. यापुढील बहुतेक सर्व कथाभाग राजकीय पक्षोपन्यासांनी व वादविवादांनी गजबजलेला असल्यामुळे आकर्षक झाला आहे. कादंबरींतील कथाभागाचें स्थल मुंबई शहर असून काळ, साम्यवादाचें नवीन तत्त्वज्ञान रशियांतून इकडे येऊन मंजुरांची चळवळ जेव्हा सुरू झाली तेव्हाचा आहे. मुंबईतील कांही ध्येयवादी तरुणांनी नव्या पक्षाच्या स्थापनेची प्रतिज्ञा करून उद्योगाला सुरुवात कां व कशी केली आणि त्यांचा नायक चंद्रशेखर हा शेवटीं पकडला जाऊन कैदेंत कसा पडला, वगैरे सर्व हकीकत क्रमाने वाचीत असतां आपण कादंबरींतील कल्पनासृष्टींत वावरत नसून त्यांतील पात्रें प्रत्यक्षच आपल्यासमोर आहेत कीं काय असा भास क्षणोक्षणीं झाल्यावांचून रहात नाही.

कादंबरीचा नायक चंद्रशेखर हा धीरोदात्त आहे. नायकिणीच्या पोटीं त्याचा जन्म झाला असला तरी "दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्" असें म्हणणाऱ्या कर्णाचा आत्मविश्वास त्याच्या ठिकाणीं दिसतो. त्याचें धैर्य आणि त्याग कौतुकास्पद आहेत. त्याचे हे गुण त्याचा मित्र केशव याच्या तुलनेने उठून दिसतात. केशव सत्प्रवृत्त आणि प्रेमळ आहे; पण स्वतंत्र रीत्या कोणतेंहि कार्य करण्याची धमक व धैर्य त्याच्या ठिकाणीं नाहीं. आपल्याला नवा पक्ष स्थापन केला पाहिजे व तत्पूर्वी सर्व जुने पक्ष नष्ट केले पाहिजेत असें केशवाला सांगतांना चंद्रशेखरने केलेला युक्तिवाद व प्रचलित राजकीय पक्षांच्या तत्त्वज्ञानाची त्याने केलेली चिकित्सा मननीय आहे.

### दारूवर पोसलेलें वर्तमानपत्र

"टिळक मंडालेहून सुटून आल्यानंतर जेव्हा राष्ट्रीय पक्ष प्रबल होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं तेव्हा मुंबईच्या सिंहाना, शृगालांना आणि सारमेयांना साहजिकच 'केसरीशीं' सामना देण्याकरिता एका मराठी साप्ताहिकाची जरूरी भासूं लागली. आणि फेरोजशहांनी दिलेल्या पांच हजार रुपयांवर "प्रागतिक" पत्र जन्मास आलें. नानासाहेब नांवाचा पूर्वी एका फर्ममध्ये असलेला कारकून या पत्राचा चालक बनला. पुणेरी ब्राह्मणांवर आणि विशेषतः चित्पावनांवर त्याचा फार दांत असे. त्याला राजकीय मतेंच नव्हतीं. पण सोयीचें म्हणून तो मवाळ पक्षाला सामील झाला होता. पांच हजारांत पत्र चालणें कठिण आहे असें त्याने सांगितल्यामुळे एका पार्शी खानबहादुराने त्याला दारूच्या जाहिराती देण्याचें कबूल केलें. तेव्हा बाहेर दारूच्या जाहिराती छापून आंत मद्यपानबंदीचा पुरस्कार करण्याचें नानासाहेबांने ठरविलें."

### इतिहाससंशोधक रावसाहेब

त्याच्या घरच्या अड्ड्यावर जमणाऱ्या व्यक्ति म्हणजे भगवंतराव, रावसाहेब भुजंगराव देशमुख, शास्त्रीबुवा, बबनराव आणि प्रो. राळे ह्या होत. यांतील प्रत्येक गृहस्थ वैशिष्ट्यपूर्ण आहे. भगवंतराव हे "प्रागतिक" पत्राचे संपादक आहेत. रावसाहेब देशमुख हे सी. आय. डीं.तील देशभक्त होत. क्रांतिकारकांच्या पोटांत शिरून त्यांचीं आंतडीं बाहेर काढणारे पाताळयंत्री अधिकारी असा त्यांचा लौकिक होता. ते नोकरींतून निवृत्त झाले होते तरी सरकार त्यांना मधून मधून जादा कामगिरीवर नेमीत असे. त्यांना इतिहास-संशोधनाचाहि नाद असून त्यांचे मित्र प्रो. पोतनीस यांच्याशीं शिवाजीच्या हस्ताक्षरावर त्यांनी चर्चा केलेली आढळते. आपल्या देशाभिमानाच्या जोरावर क्रांतिकारकांच्या मंडळांत प्रवेश मिळवून अनेक धाडशी तरुणांना त्यांनी काळेंपाणी दाखविलें असा प्रवाद होता. शास्त्रीबुवा हे मुंबईतील एक कर्तृत्ववान भिषग्भास्कर होते. त्यांचा स्वभाव आनंदी आणि साधा दिसतो. आपल्या विद्येच्या जोरावर थोड्याच अवधींत

मुंबईसारख्या शहरांत स्वतःचें घर बांधून, छाप-खाना व मासिकहि त्यांनी चालविलें होतें.

### शिवराळ अड्ड्याचें चित्र

बबनराव हे एक उभयान्वयी संपादक आहेत. कोणत्याहि प्रसिद्ध व पूज्य व्यक्तीची टवाळी करणें हा त्यांचा धंदा असतो. ते आपल्याला रानडे व गोखले यांचे अभिमानी म्हणवीत आणि एका राष्ट्रीय साप्ताहिकांत उपसंपादक राहून पुनः 'प्राग-तिक' या टवाळ पत्रांत शिव्या देण्याची हौस फेडून घेत. प्रो. राळे हे एका मिशनरी कॉलेजांत प्रोफेसर होते. तेथे राष्ट्रीय आणि क्रांतिवादी पुढा-ऱ्यांना शिव्या देण्याची हौस ते भागवून घेत. ' प्रबोधन ' कचेरींतील शनिवारच्या अड्ड्यावर आणि प्रेमाबाईच्या घरीं जमणाऱ्या या सर्व व्यक्तींच्या स्वभावाचा आविष्कार श्री. माडखोडकर यांनी मोठ्या मार्मिक आणि मनो-रंजक रीतीने केला आहे. रावसाहेबांचा ढोंगीपणा, बबनरावांचा टवाळपणा, शास्त्रीबोवांचा साधेभोळे-पणा आणि प्रो. राळे यांचा झब्बूपणा या अड्ड्यावर चालणाऱ्या संवादांतून फार चांगल्या रीतीने व्यक्त झाला आहे.

ह्या दोनही अड्ड्यांवर भगवंतरावाबरोबर केशव केव्हा केव्हा जात असे आणि चंद्रशेखरहि तेथील चर्चेचा विषय केव्हा केव्हा होत असे. कॉलेज-मध्ये तुकारामावरील व्याख्यान सर दीनानाथ यांनी मराठींतूनच दिलें पाहिजे असा भरसभेंत चंद्रशेखरने आग्रह धरल्यामुळे सभा कशी मोडली याची चटकदार हकीकत बबनरावाने जेव्हा सांगितली तेव्हा प्रो. राळ्यांना संताप आला तर शास्त्रीबुवांना आनंद झाला, आणि चंद्रशेखरच्या जातकुळीची तेथे चर्चा झाली. उच्चनीचत्वाच्या साऱ्या कल्पना हिंदु समाजांत जन्माभोवतीं केंद्रित झालेल्या असल्यामुळे ही समाजघटना बदलली पाहिजे असें चंद्रशेखरला साहजिकच वाटे. " नव्या पक्षाच्या स्थापनेची प्रतिज्ञा " या सुंदर प्रकरणांत चंद्रशेखराने ढोंगी समाजसुधारकांचा व इंग्रजी राज्य हिंदुस्थानावर झालें हा ईश्वरी योगायोग आहे असें म्हणणाऱ्या मवाळांचा चांगलाच समाचार घेतला आहे.

### समाजसत्तावादाचें प्रतिपादन

महाराष्ट्रांतले पक्ष हे तत्त्वावर आधारलेले नसून व्यक्तिमाहात्म्यावर अधिष्ठित आहेत; कालचे जहाल आज मवाळ झाले आहेत आणि गांधीहि भांडवलवाल्यांचे पुरस्कर्ते आहेत. त्यामुळे रानडे, टिळक किंवा गांधी यांपैकीं कोणीहि नव्या पक्षाचा गुरु होणें शक्य नाही. हे सर्व पक्ष नष्ट करून समाजसत्तावादी नवा पक्ष निर्माण केला पाहिजे असें चंद्रशेखराने या प्रकरणांत मोठ्या आवेशाने प्रतिपादन केलें आहे. टिळकांचें आणि तुमचें जमणें शक्य नाही तरीसुद्धा त्यांच्याबद्दल तुम्हां-ला आपलेपणा कां वाटतो, या केशवाच्या प्रश्नाला ब्रिटिश राजसत्तेविरुद्ध झगडणाऱ्या प्रत्येकाचीं मतें जरी मान्य नसलीं तरी टिळक त्याला सदैव पाठिंबा देतात आणि सरकारच्या क्रोधाला बळी पडण्याचा प्रसंग ज्या दिवशीं आमच्यावर येईल त्या दिवशीं टिळक आमच्या पाठीशीं उभे राहतील अशी खात्री असल्यामुळे त्यांच्याविषयीं आम्हांला आपलेपणा वाटतो; मवाळांचें तसें नाही. ते 'परकीय राज्यकर्त्यांचे पक्षपाती' असे उत्तर चंद्रशेखराने दिलें आहे.

### क्रांतिकारकांचे उद्योग

आपले सारे पुढारी ब्रिटिश संस्कृतीचे प्रसव असून आपल्या साऱ्या चळवळी ब्रिटिश राजकारणा-चीं प्रतिबिंबें आहेत असें म्हणतांना आपणहि साम्य-वादाचीं तत्त्वें रशियाकडून उसनीं घेत आहोत हें त्याच्या लक्षांत राहिलेलें नाही. बेझंटबाईच्या चळ-वळीच्या मुळाशीं साम्राज्यनिष्ठा आणि सैन्यभरती होती त्यामुळे क्रांतीच्या प्रयत्नाकडून लोकांचें लक्ष उडून गेलें असें त्याचें म्हणणें आहे. लोकांची तयारी नसली, काळ प्रतिकूल असला व अपयश येणार हें माहीत असलें तरीहि क्रांतीचा उद्योग केलाच पाहिजे आणि आपल्या रुधिराची संततधार धरली पाहिजे असें त्याचें मत असल्यामुळे त्याने उद्योगाला सुरुवात केली आणि परदेशांत असलेला हिंदी क्रांतिकारक वीरेंद्र याशीं संबंध ठेवून मुंबईत मजुरांची चळवळ झपाट्याने चालविली. इतक्यांत वीरेंद्राचा साम्य-वाद्यांच्या कार्यक्रमाचा जाहीरनामा प्रसिद्ध होऊन सर्व राजकीय पक्षांत मोठी खळबळ उडाली आणि ही नवी चळवळ टिळक आणि गांधींच्या चळ-वळीलाहि मागे टाकील असें मवाळांना वाटूं लागलें.

कलकत्त्याच्या स्पेशल कॉंग्रेसच्या वेळीं वीरेंद्राने गुप्त रीतीने हिंदुस्थानांत येण्याचें ठरविलें व तसें चंद्रशेखराला कळविलें. सरकारने मुंबईतील साम्यवादी तरुणांची शिकार करण्याच्या कामावर रावसाहेब देशमुखांची योजना केली. त्यांनी प्रेमाबाईला चंद्रशेखराच्या चळवळीची माहिती काढण्यास सांगितलें. तिने त्याला मोहित करण्याचा प्रयत्न केला; पण चंद्रशेखर तिला वश झाला नाही. शेवटीं रावसाहेबांनी त्याच्या घरीं जाऊन वीरें-द्राच्या येण्याचा उल्लेख असलेलें पत्र चोरून

खिशांत घातलें आणि क्रांतीचें समर्थन करणारें एक मोठें व्याख्यान देऊन ते तेथून निघून गेले! ललितेला भेटण्याच्या मोहांत पडल्यामुळे, एक ठरविलेली सभा चंद्रशेखराने आयत्या वेळीं रहित केल्याने, व एका मित्राने त्याला लिहिलेलें तें पत्र रावसाहेबांनी नेल्यामुळे, मोहांत पडल्याबद्दल चंद्रशेखराला वाईट वाटलें. पुढे या पुराव्याच्या जोरावर चंद्रशेखराला पकडण्याविषयी रावसाहेबांनी वॉरंट मिळविलें.

**टिळकांच्या समाधीपाशीं**

'टिळकांच्या समाधीपाशीं' हें प्रकरण उत्कृष्ट उतरलें आहे. 'टिळकांनी आपल्या जीवनसर्वस्वाचें अणुअणूंनी केलेलें हवन आणि या पोरक्या व परतंत्र राष्ट्राकरिता त्यांनी खाल्लेल्या खस्ता' यांचें वर्णन अत्यंत ओजस्वी भाषेंत आणि परिणामकारक रीतीनें चंद्रशेखराने केलें आहे. शिवाजीमहाराजांनंतर एवढा हा एकच पुरुष अवतीर्ण झाला कीं, ज्याचें स्मरण होतांच आम्हांला परवशतेची दिक्कत वाटूं नये आणि आत्मप्रत्ययाने आमचें रक्त उसळूं लागावें. 'असा पुरुष स्वतंत्र देशांत जन्मास येता तर विद्यापीठांनी त्याला डॉक्टरेट दिली असती आणि सरकाराने मानसन्मानांचा वर्षाव करून त्याच्या राष्ट्रसेवेचा गौरव केला असता', असे यथार्थ उद्गार त्याने काढले आहेत. हें प्रकरण इतकें परिणामकारक झालें आहे कीं टिळकांच्या समाधीपाशींच नव्या पक्षाच्या स्थापनेची प्रतिज्ञा चंद्रशेखराने केली असती तर तिला जास्त उठाव मिळाला असता.

रावसाहेबांच्या खिशांत असलेलें चंद्रशेखराला पकडण्याचें वॉरंट प्रेमाबाईच्या दृष्टीस पडून ती बातमी तिने मध्यरात्रीं चंद्रशेखराकडे जाऊन त्याला कळविली तेव्हा तो मजुरांच्या चाळींत लपून बसला. 'ज्वाळा भडकल्या' आणि 'आहुति' हीं शेवटचीं दोनहि प्रकरणें बहारीचीं आहेत. सुभान आणि त्याची पत्नी राई यांची राहण्याची खोली, त्यांचें चंद्रशेखरावरील प्रेम व त्याच्याकरिता वाटेल तो त्याग करण्याची त्यांची तयारी वगैरे गोष्टींचें वर्णन करुणरसपूर्ण आहे. चंद्रशेखर गुप्त झाल्यामुळे रावसाहेबांनी त्याच्या मित्रांना पकडलें. त्यामुळे गिरण्यांत संप होऊन पोलिसांनी गोळीबार केला. त्यांत पुष्कळ मजूर जखमी झाले. 'निरपराधी लोकांचें पवित्र रक्त! त्या निरागस रक्तांत अन्यायाला जाळून टाकण्याचें सामर्थ्य असतें; पण त्या सामर्थ्याचा प्रत्यय पाहण्याची वेळ अजून आलेली नाही' असें चंद्रशेखरलाहि शेवटीं वाटलें आणि तो स्वतः पोलीस कमिशनरच्या स्वाधीन झाला. इकडे रावसाहेबांनी केशवालाहि वॉरंट काढून पकडलें होतें. त्या धक्क्याने आजारी असलेली ललिता मरण पावली तेव्हा रात्रीं तिच्या उत्तर क्रियेलाहि हजर राहण्यास रावसाहेब चुकले नाहीत! पुढे केशव सुटला तेव्हा त्याला सोडविण्यासाठी आपण बरीच खटपट केली असेंहि त्यांनी सांगितलें! चंद्रशेखराला पांच वर्षांची शिक्षा झाली व येथेच कथाभाग समाप्त झाला.

**भाषेची बहार**

श्रीयुत माडखोलकरांनी हा सर्व कथाभाग आपल्या रमणीय आणि सहृदय लेखनशैलीने इतका चांगल्या रीतीने वर्णिला आहे कीं, तो वाचीत असतां कादंबरींतील कांही प्रकरणांत असलेला कृतीचा आणि बांधेसूदपणाचा अभाव वाचकांच्या लक्षांतहि येत नाही. कादंबरींतील सर्व पात्रें सामान्य माणसेंच आहेत; असामान्य किंवा दैवी नाहीत हें दाखविण्याची काळजी घेतली आहे. नायक चंद्रशेखर हाहि एकदाच कां होईना पण मोहग्रस्त झाला हें दाखविण्यांत हाच हेतु दिसतो. जागोजाग समर्पक दृष्टान्त आणि सुंदर उपमा यांची योजना करून सर्व कथानक सुशोभित केलें आहे. व ही योजनाहि इतक्या माफक रीतीने केली आहे कीं, मधून मधून आढळणाऱ्या सुंदर कल्पनांनी वाचक अडखळत तर नाहीच पण आनंदित मात्र होतो. व्यक्तींचीं आणि स्थलकालांचीं वर्णनेंहि रम्य उतरलीं आहेत. पात्रांच्या मानसिक वातावरणाला संवादी किंवा विसंवादी अशीं बहारीचीं सृष्टिवर्णनेंहि अनेक ठिकाणीं आलीं आहेत.

**संस्कृताचें दडपण नको**

संस्कृत शब्दांनी भाषेला प्रौढता आणण्याचें श्री. माडखोलकरांचें वेड मात्र मोरोपंती वळणावर जात चाललें आहे. कादंबरींत शास्त्रीबुवांचीं भाषणें संस्कृत शब्दप्रचुर करून विनोद उत्पन्न करण्याचा प्रयत्न श्री. माडखोलकरांनी केला आहे. शास्त्रीबुवांचें 'धन्वंतरी-मंदिर' झाडणारा गडीसुद्धां जाडे जाडे संस्कृत शब्द वापरीत असे असें प्रेमाबाईनी म्हटलें आहे. शास्त्रीबुवांच्या संस्कृत शब्दप्रचुर भाषेने उत्पन्न झालेल्या विनोदांत खुद्द माडखोलकरांनी संस्कृतप्रचुर भाषा लिहून बरीच भर टाकली आहे. 'अनघता' 'आलोक' 'सांद्र' 'परुषता' 'आबद्ध' 'पूर्णकल्प' अशा रीतीचे किती तरी संस्कृत शब्द त्यांच्या लिखाणांत आढळतात. कित्येक ठिकाणीं अनुप्रास साधण्याकरितांहि संस्कृत शब्दांची योजना झाली आहे. उ.–'दुरंत प्रेमाचा विदारक दुर्विलास' 'संध्येची सुनील सुषमा, 'चिंतनशील मनाचा चिरंतन विरंगुळा' 'अकलंक ललाटावर विमर्षाच्या ईषद्रेषा' इत्यादि ठिकाणीं सामान्य वाचकांना अपरिचित असे संस्कृत शब्द

योजलेले आढळतात. श्रीयुत माडखोलकरांची भाषाशैली आधीच इतकी सुंदर आहे कीं, तिला संस्कृत शब्दांची ही शाल पांघरण्याची कांहीहि जरूरी नाही.

### राजकीय दंभस्फोट

त्यांची ही पहिलीच कादंबरी तिच्यांतील विषयाच्या नावीन्यामुळे, नीटस, ओजस्वी व प्रसंगीं रमणीय अशा भाषेमुळे, आकर्षक वर्णनशैलीमुळे, तरुणांच्या ध्येयवादित्वामुळे आणि कलमकसाई उभयान्वयी संपादक, टवाळीवर पोट जाळणारें साप्ताहिक व रावसाहेब भुजंगराव देशमुख यांच्या दंभस्फोटामुळे महाराष्ट्राला आवडेल व त्यांच्या पुढील कादंबऱ्यांविषयी उत्सुकता उत्पन्न करील असा आम्हांला विश्वास वाटतो.

# ‘नीज वेल्हाळा, दारिं बागुलबावा आला’!

हिंदुस्थानाचे लोक हीं तान्ही मुलें समजून, त्यांची ब्रि०व अँ. इं. दाई त्यांना हल्ली वरील बालगीत गाऊन निजविण्याचा प्रयत्न करीत आहे. दाई स्वतः कोरी निस्तनी असली म्हणजे मुलाची भूक दुधाने भागविण्याची ऐपत तिजमध्ये नसते. तेव्हा त्या मुलाला दामटून निजविण्याचा दुसरा उपाय म्हणजे ‘दारिं बागुलबावा आला’ हा धाक घालून भिवविणें !

हिंदुस्थानाने स्वराज्याकरितां टाहो फोडला आहे. त्याचें समाधान स्वराज्य देऊन करण्याची इच्छा किंवा ऐपत ब्रि.प्रधान मंडळात नाही.त्यामुळे व्हाईट पेपरची बोथी तोंडांत देऊन, उरला उपाय म्हणून, चर्चिलच्या बागुलबुवाकडे बोट दाखविण्याचा उद्योग या मंडळाने मोठ्या कुशलतेने चालविला आहे. “व्हाईट पेपरमध्ये पुष्कळच दिलें आहे. निदान जें काय, थोडें कां होईना, दिलेलें असेल तेंहि हा चर्चिलरूपी बागुलबोवा पळवून घेऊन जाईल. किंवा न जाणो तुलाच खाऊन टाकील” असा धाक प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीने हिंदुस्थानाला घालण्यांत येत आहे.

हा बागुलबावा एकट्या चर्चिलरूपी व्यक्तीचा आहे असें मात्र नव्हे. तर त्याच्या बगलेंत इतर अनेक सोंगेंहि आहेत. चर्चिल हें हिंदुस्थानाच्या हित शत्रूंचें फक्त एक उपलक्षण होय. म्हणून पर्यायाने चर्चिल या नांवांत–लॉर्ड रॉदरमीअरसारखे कट्टर साम्राज्यवादी, लॉर्ड लॉइडसारखे उलट्या काळजाचे प्रतिगति–प्रिय मवाली मुत्सद्दी, सर मायकेल ओडवायरसारखे जबरदस्त निर्घृण राज्यकर्ते, हिंदुस्थानाच्या कुरणांत अनंत कालपर्यंत चरूं पाहणारे स्वार्थी ब्रि. व्यापारी, आपल्या मुलांना मुलकी लष्करी खात्यांत भारी पगाराच्या नोकऱ्या मिळवूं इच्छिणारे पुत्रवत्सल ब्रि०आईबाप,–या सर्वांचा समावेश होतो. हीं सर्व सोंगें सांगातीं घेऊन चर्चिलसाहेबांनी कडकलक्ष्मीचा खेळ उभा केला आहे.

याचा प्रतिकार करणें हें थोडेसें तरी प्रधानमंडळाचें कर्तव्यच नव्हे काय ? म्हणून आपलीं पिलें पंखाखालीं घालून, दुरून चाल करून येणाऱ्या, कुत्र्याच्या अंगावर धावणाऱ्या कोंबडीचें सोंग ब्रि. मंत्रिमंडळानेहि आणलें आहे. तें असें कीं, श्वेतपत्रिकेंत देऊं केलें इतकें तरी स्वराज्य हिंदुस्थानाला देण्याची प्रतिज्ञा हें मंडळ पुनः पुनः मोठमोठ्याने ओरडून व पंखे फडफडावीत करीत आहे.पण हें मंत्रिमंडळ स्वतःप्रमाण व स्वावलंबी नाही, तें कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या आधारावर उभें आहे, हें सारे जग जाणते. म्हणून मंत्रिमंडळाची अब्रू ती आपली अब्रू असें म्हणून इरेस पडणें हें त्या पक्षाच्या पुढाऱ्यांना प्राप्त झालें आहे.आणि या पक्षाचे मुख्य पुढारी पडले बाल्डविनसाहेब. म्हणून त्यांनी चर्चिलसाहेबांचें आव्हान स्वीकारून, या मतभेदाच्या मुद्द्यावर मारीन किंवा मरेन असें म्हणून कुस्तीच्या मैदानांत प्रवेश केला आहे.

संभव असाच दिसत आहे कीं, या कुस्तींत बाल्डविन साहेब विजयी होतील व चर्चिलसाहेब हरतील. या प्रसंगाचा पुकारा सहजच ब्रि. वर्तमानपत्रे करणार. कारण हिंदी राजकारणाच्या मुद्द्यावर राजकारणी ब्रि. मुत्सद्द्यांनी कधी भांडावयाचें नाही हा स्वार्थी कट फार दिवसपासून अमलांत आहे तो मोडला ! ब्रि.मुत्सद्द्यांमध्ये आपापसांत या विषयावर भांडण जुंपलें ! तेव्हा आता “हिंदुस्थानाचे ग्रह उच्चीचे झालें व साम्राज्यावर प्राण संकट आलें ! पण हिंदुस्थानाला दिलेल्या वचनाखातर इंग्लंड तेंहि सोसणार!” असा अपूर्व देखावा निर्माण होऊन, हरिश्चंद्राप्रमाणे ब्रि. प्रधान मंडळ सत्वपरीक्षेंत यशस्वी होणार ! तात्पर्य, आता फक्त दिव्य आकाशवाणी व्हावयाची व स्वर्गांतली घंटा वाजावयाची इतकेंच काय तें बाकी राहिलें ! असा कांगावा ब्रिटिश वर्तमानपत्रांनी सुरू केला आहे.

चर्चिल साहेबांना ‘डिफेन्स ऑफ इंडिया लीग’ प्रस्थापित केला आहे. डॉ. मुंजे किंवा कॅप्टन

मोडक हे काढणार त्याचेंहि नांव 'डिफेन्स ऑफ इंडिया लीग' अशासारखेच कांही आहे. मात्र या दोहोंचे अर्थ अर्थातच वेगवेगळे आहेत. या दुसऱ्या लीगचा अर्थ "परचक्रापासून हिंदुस्थानाचें रक्षण स्वतः हिंदुस्थानाच्या लोकांनी करण्याचा संघ." चर्चिलसाहेबांच्या लीगचा अर्थ "हिंदुस्थान इंग्लंडच्या हातून जाण्याचा रंग दिसतो, तेव्हा तें हर प्रयत्नाने वाचविण्याबाबद संघ" असा आहे. 'डिफेन्स ऑफ लेडी स्मिथ' 'डिफेन्स ऑफ पॅरिस' 'डिफेन्स ऑफ लखनौ' इत्यादि इतिहासप्रसिद्ध शब्द लक्षांत घेतले असतां, चर्चिलसाहेबांचा लीग म्हणजे "हिंदुस्थानाला स्वराज्यवादी हिंदी लोकांनी जो निकराचा वेढा घातला आहे तो उठविण्याचा प्रयत्न! आणि जुने मुख्य प्रधान व कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे विद्यमान पुढारी मि. बाल्डविन हे हिंदी लोकांतर्फे चर्चिलसाहेबांना या कामीं विरोध करणार! किती तरी हिंदुस्थानाचें नशीब शिकंदर !

या सावळ्या गोंधळाने भोळा हिंदी मनुष्य सहजच फसला जाणार नाही काय? पण त्याला या गोंधळांतून सोडविण्याला थोडीशी समजूत दिली तरी ती पुरे होईल. ती अशी कीं, हें सर्व भांडण व्हाइटपेपरमधील सुधारणा अमलांत आणावयाच्या कीं नाही इतकेंच खरोखर आहे.त्यामुळे हिंदुस्थान इंग्लंडच्या हातून जात नाही, व बाल्डविनसाहेबहि हिंदुस्थानाच्या हातीं स्वराज्य देत आहेत असें नाही. या सुधारणांनी जी काय एकदोन आणे सत्ता हिंदी लोकांच्या हातीं जाण्याचा चुकून संभव तीहि मी जाऊं देणार नाहीं असें चर्चिलमहाशय म्हणतात; व ती एक–दोन आणे सत्ता आम्ही देणारच देणार असें बाल्डविनमहाशय म्हणतात !

पण मिळून सत्ता एक–दोन आणेच! तेव्हा हें कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या प्रमुख लोकांतील भांडण म्हणजे, गिऱ्हाइकाच्या दुधांत पाणी शेराला अच्छेर घालावें कीं पाऊण शेर घालावें या भांडणासारखेंच गमतीचें नाही काय? आणि त्यांतहि फिरून विशेष गंमत म्हणून एक आहेच! गवळ्याचें भांडण जसे खुद्द गिऱ्हाइकाच्या समक्ष पण पाणी घालण्याची गोष्ट वगळून होतें, आणि अखेर गिऱ्हाइकाच्या देखत फक्त धार काढली जाऊन त्याला न कळत पाऊण नाही तर अच्छेर तरी पाणी युक्तीने ढकललें जातेंच, त्याप्रमाणे जॉइंट सिलेक्ट कमिटीचे हिंदी प्रतिनिधि खुद्द विलायतेत हजर असतां, त्यांच्यापुढे चर्चिल व बाल्डविन हे भांडणार! बाल्डविन हिंदुस्थानाला म्हणणार "बाळ, बघ हा चर्चिलचा बागुलबावा, मी त्याला मारतों हां! तूं तोंडांत आंगठा घालून नाही तर व्हाइट पेपरची बोथी चोखीत नीज कसा!'

# अंदमानांतून स्वर्गलोकांत!

अंदमान बेटावरील हवा रोगट व पाणी विषारी यामुळे तेथें काळ्या पाण्याच्या कैद्यांना पाठविण्याचें हिंदुस्थान सरकारने मागेच बंद केलें. अंदमानांतील हवापाणी वाईट तर तें सर्वच कैद्यांना वाईट. दरोडे घालणाऱ्या, खून व गळे कापणाऱ्या बदमाषांना अंदमानाची हवा मानवत नाही, पण राजकीय गुन्ह्यासाठी शिक्षा भोगणारांना ती मानवते असा भेद ईश्वराच्या घरीं तरी खास नाही. ईश्वराने जन्माला घालतांना राजकीय गुन्हेगारांचा पिंड सामान्य मनुष्यांच्या पिंडाहून निराळ्या द्रव्यांचा बनविलेला नाही.अशा रीतीने जो भेद ईश्वराने केला नाही तो भेद इंग्रज सरकाराने करून सामाजिक गुन्हेगारांना हिंदुस्थानांतील तुरुंगांत ठेवलें व कित्येक क्रांतिकारकांना मात्र अंदमानांत पाठविलें याचा उघड अर्थ असा कीं सामाजिक गुन्हेगारापेक्षा राजकीय गुन्हेगार सरकाराला अधिक त्याज्य व तिरस्करणीय वाटत असल्यामुळे त्यांना सरकाराने अंदमानांत मुद्दाम रवाना केलें !

अंदमानांत क्रांतिकारकांची अशा रीतीने उचलबांगडी झाल्यानंतर ते हिंदुस्थानापासून व हिंदी बांधवांपासून तुटक झाल्यामुळे त्यांना तुरुंगावरील अधिकाऱ्यांनी कितीहि क्रूरपणाने वागविलें तरी त्यांची खरी स्थिति हिंदी लोकांना कळण्याचा मार्ग बंद व्हावा हें स्वाभाविक होय. कांही महिन्यांपूर्वी क्रांतिकारकांच्या दोन टोळ्या हिंदुस्थान सरकाराने अंदमानांत पाठविल्या. सदर क्रांतिकारक तिकडे गेल्यापासून त्यांजविषयी ता. २८ मे रोजीं हिंदुस्थान सरकारने एक पत्रक प्रसिद्ध केलें. त्यावरून असें समजतें कीं, अंदमानांतील राजबंद्यांच्या कांहीं तक्रारी होत्या. त्या तेथील अधिकाऱ्यांनी दूर न केल्यामुळे राजबंद्यांनी ता. १२ मेपासून अन्नत्याग आरंभला.या अन्नत्यागाच्या सत्याग्रहांत २९ इसम सामील झाले. त्यांना आणखी १० राजबंदी मिळून त्यांची संख्या ३९ झाली. या सत्याग्रह्यांपैकीं महावीरसिंग याची प्रकृति १६ तारखेपर्यंत बरी होती. परंतु ता. १७

रोजीं सकाळीं ती अत्यंत नाजूक झाल्याचें मेडिकल अधिकाऱ्याला दिसून आल्यावरून त्याला जबरदस्तीनें अन्न घालण्याचा प्रयत्न झाला. त्याप्रमाणे महावीरसिंगाला नाकांतून दूध घातलें जात असता त्याने जोराचा विरोध केला व त्या दिवशीं मध्यरात्रीं तो मरणहि पावला. एवढ्यावरच हें प्रकरण थांबलें नाही. त्यानंतर दोन सत्याग्रही लागोपाठ मेले व त्यांच्या मृत्यूचें न्युमोनिया हें निमित्त सांगण्यांत आलें.

अशा रीतीने तीन राजबंद्यांनी परलोकाची वाट धरली व ते कशामुळे मेले याचीं कारणें तुरुंगावरील अधिकाऱ्यांनी जेवढीं सांगितलीं तेवढींच बाहेर आलीं. राजबंद्यांची तक्रार तुरुंगाधिकाऱ्यांविरुद्ध होती. त्या अधिकाऱ्यांनीच त्यांच्या मृत्यूचीं कारणें दिलीं असल्यामुळे त्यांच्या खरेपणावर कोणाहि हिंदी माणसाचा विश्वास बसणें शक्य नाही. सदर अधिकाऱ्यांच्या हातून राजबंद्यांचा छळ झाल्यावरून त्यांनी सत्याग्रह केला असल्यास ते अधिकारी त्या छळाचा कबुलीजबाब स्वमुखाने काय म्हणून देतील व सत्याग्रहाच्या काळांत राजबंद्यांची दयार्द्र अंतःकरणाने काय म्हणून शुश्रूषा करतील ! सरकारानें राजबंद्यांना हिंदुस्थानांत न ठेवतां अंदमानांत पाठविले यापासून अंदमानावरील अधिकाऱ्यांनी काय बोध घ्यावयाचा तो घेतला असेल व त्याचेंच कदाचित् घडलें हें पर्यवसान असेल. क्रांतीच्या चळवळींत जे तरुण लोक यापूर्वी पडले आहेत किंवा यापुढे पडतील त्यांच्या अंगाचा भीतीनें थरकांप करून सोडण्याकरिताहि अंदमानाच्या अधिकाऱ्यांनी तेथील कैद्यांचा अमानुष छळ केला असावा व तो छळ सोसण्यापेक्षा मृत्यू पुरवला असें वाटून त्यांनी अन्नत्याग आरंभला असावा असें लोकांना वाटणार नाही काय ?

ते अंदमानावरील राजबंदी आपल्या मायभूमीपासून, स्वदेशबांधवांपासून व आप्तवर्गापासून शेकडों कोस दूर होते. त्यांचे उसासे कोणाला ऐकूं जावयाचे नव्हते व त्यांच्या किंकाळ्यांनी कोणाचींहि अंतःकरणें विदीर्ण व्हावयाचीं नव्हतीं. परंतु त्या तिघांच्या मृत्यूच्या बातम्या अशा आहेत कीं, त्या कोट्यवधि हिंदी लोकांच्या अन्तःकरणाची कालवाकालव करून सोडतील व डोक्यांत असंख्य विचारांचें काहूर माजवितील. त्यांपैकीं कित्येक विचार ते बोलूनहि दाखविणार नाहीत. कारण मुक्त कंठानें रडण्याला व बोलण्यालाहि त्यांना कायद्याने स्वातंत्र्य ठेवलेलें नाही. परंतु इतकें मात्र खास कीं, असल्या अनिष्ट प्रकारांनी इंग्रज लोकांविषयीं हिंदी लोकांचीं मनें अधिकच दूषित होऊन देशांत शांतता प्रस्थापित व्हावयाचा संभव अधिकच दुरावेल !

नाशिकच्या तुरुंगांतील राजबंदी अमृतलाल यांच्या अंगावरील जखमा अजूनहि बुजल्या नाहीत. त्यांची स्मृति हिंदी जनतेस अगदीं ताजी असल्यामुळे अंदमानासंबंधीं तिनें जें भयंकर अनुमान करावें ते थोडेच होय. आता घडलेल्या हकीकतीची चौकशी करणें हा शेवटचा इलाज उरला. या चौकशीने परलोकास गेलेले तीन राजबंदी परत येणार नाहीत. त्यांची चौकशी करणें व मृतांना सरणावर चढविणे सारखेच. तथापि सरकारी व बिनसरकारी सभासद जिच्यांत आहेत अशी कमिटी नेमून तिजमार्फत सत्यान्वेषण झाल्यास तिचा तुरुंगाधिकाऱ्यांवर वचक बसेल एवढाच काय तो उपयोग !

# स्फुट सूचना

१ मुंबईचे सध्याचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साईक्स यांची मुदत संपली असून येत्या डिसेंबर महिन्यांत ते इंग्लंडला परत जातील. त्यांच्या जागीं बॅरन ब्राबोर्न यांची नेमणूक करण्यांत आली आहे. बॅरन ब्राबोर्न यांचें वय अवघें अडतीस वर्षांचें आहे. इतक्या अल्पवयी मनुष्याची नेमणूक मुंबई इलाख्यावर गव्हर्नर या नात्याने बऱ्याच वर्षांत झालेली नाही. मुंबई इलाखा राजकीय चळवळींत पुढारलेला असल्यामुळे त्यावर अनुभविक व मुरलेल्या मनुष्याचीच नेमणूक होणें जरूरीचें असतें. बॅरन ब्राबोर्न हे भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांचे पार्लमेंटरी प्रायव्हेट सेक्रेटरी होते. गेल्या जानेवारी महिन्यापासून त्यांनी होअरसाहेबांचें शिष्यत्व पत्करलें असल्याने, गुरुजींचा धडा ते मुंबईस आल्यावर मन लावून गिरवितील यांत शंका नाही. बॅरन ब्राबोर्न यांनी लष्करी शिक्षण मिळविलें असून महायुद्धांत चार वर्षे रणांगणावर बहादुरीहि केली आहे. खेरीज वैमानिक दलाचाहि त्यांना अनुभव आहे. पार्लमेंटांत ते कान्झरव्हेटिव्ह पक्षातर्फेच निवडून आले आहेत. अशा तरण्या बांड, लष्करी पेशांत वाढलेल्या, हुजूर पक्षाच्या गोटांत शिरलेल्या व होअरसाहेबापाशीं तालीम घेतलेल्या गव्हर्नराची कारकीर्द मुंबई इलाख्यास जाणवल्यावांचून कशी राहील ?

२ कलकत्त्यास राष्ट्रीय सभेच्या वेळीं पोलिसांनी प्रतिनिधींना मारहाण केली असें पं. मालवीय यांनी म्हटलें व पं. मालवीय यांच्या म्हणण्यांत सत्यांश नाही असें सरकारतर्फे उत्तर देण्यांत आलें. परंतु आता कलकत्त्याच्या स्टेटसमन पत्रांत मि. फ्रँक सी. बॅन्क्रॉफ्ट या अमेरिकन गृहस्थाने बंगालच्या गव्हर्नरांना लिहिलेलें पत्र प्रसिद्ध झाल आहे तें पं. मालवीय यांनाच पुष्टिकारक आहे. कलकत्त्यास हे गृहस्थ कॉंग्रेसच्या वेळींच अधिवेशनाचे जागीं हजर होते. ते म्हणतात, " अधिवेशन चालू असता मी तेथे गेलों व प्रेक्षकांच्या घोळक्यांत शिरलों. कॉंग्रेसचे कार्यकर्ते स्त्री-पुरुष ट्रॅमवेच्या इमारतींत जमले होते. त्यांस पोलिसांनी गराडा घातला. इतक्यांत आणखी कांही पोलिसांची गाडी तेथे आली. कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांवर ' जोराचा लाठीमार ' ( Severe lathi beating) चालू झाला. अटक केलेल्या बहुतेक कार्यकर्त्यांना मोटारींतून नेण्यांत आलें. मोटारींत चढतांना एका माणसाचा पाय अडखळून तो पडला, तेव्हा त्याजवर ' गुरासारखा ' ( Very brutally beaten ) लाठीमार करण्यांत आला. स्त्रियांनाहि वगळण्यांत आलें नाही. खांद्यावर, पाठीवर, गळ्यावर किती तरी स्त्रियांना प्रहार केल्याचें मीं पाहिलें. शेवटीं प्रेक्षकांवरहि मन मानेल तशी ( Indiscriminate ) लाठी चालविण्यांत आली." त्रयस्थ अशा अमेरिकन गृहस्थाची ही साक्ष ऐकून तरी या जिव्हाळ्याच्या प्रकरणाची सरकार जाहीर चौकशी करील काय ?

---

३ मुंबई इलाख्यांतील सहकारी पतपेढ्या, त्यांना भांडवल पुरविणाऱ्या जिल्हा बँका व प्रांताची मुख्य बँक, प्रस्तुतच्या आर्थिक दुःस्थितीमुळे व सहकारी चळवळींत प्रारंभापासून शिरलेल्या कांही वैगुण्यामुळे गेल्या चार वर्षांत निरनिराळ्या अडचणींच्या भोवऱ्यांत गिरक्या खात आहेत. ' नायट्यावर करट ' म्हणतात त्याप्रमाणे काटकसरीची कात्री हातीं घेतलेल्या थॉमस कमिटीने ज्या शिफारशी केल्या त्यामुळे तर या चळवळीच्या मर्मावरच घाव बसल्यासारखें झालें ! या वरील अडचणींचा व थॉमस कमिटीच्या शिफारशींचा विचार करण्यासाठी पूर्वी कायदेमंडळांत वचन दिल्याप्रमाणे या चळवळींत लक्ष घालणाऱ्या चाळीस-पन्नास कार्यकर्त्यांची सभा शुक्रवार ता. २ व शनिवार ता. ३ रोजीं पुण्यास दि. ब. कंबळी यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. या सभेस ' रेव्हेन्यू मेंबर ' सर गुलाम हुसेन वगैरे सरकारी अधिकारी हजर होते व खुद्द गव्हर्नरसाहेबांनी सभेस आपल्या भाषणाने प्रारंभ केला. गव्हर्नरसाहेबांनी आपल्या भाषणांत खेडेगांवांची सुधारणा व्हावयाची असेल तर प्रत्यक्ष खेडूतांनीच आपली उन्नति करून घेतली पाहिजे, सहकारी चळवळीचा पाया पतपेढ्या असल्याकारणाने त्यांत काम करणाऱ्या लोकांनी आपली जबाबदारी ओळखली पाहिजे, उत्तम बैलांची पैदास व्हावी म्हणून लवकरच कायदा करण्यांत येईल त्या वेळीं सर्वांनी सहकार्य करावें, पतपेढ्यांच्या अधिकाऱ्यांना शिक्षण दिलें पाहिजे, थकबाकी वसूल होण्याकरिता कांही कडक उपाय योजावे, मध्यवर्ती बँकांच्यापुढे थकबाकीमुळे उभ्या राहिलेल्या प्रश्नांचा विचार या सभेने करावा वगैरे मुद्द्यांची छाननी केली. तथापि सहकारी चळवळीच्या प्रमेयांचाच त्यांनी खल केला व प्रत्यक्ष प्रश्नांच्या सोडवणुकीस मदत केली नाही असाच ग्रह त्यांच्या भाषणाने होतो !

---

४ थॉमस कमिटीच्या शिफारशी सभेंत जमलेल्या पुष्कळशा लोकांच्या जोराच्या हल्ल्याने सरकारास मागे घेणें भाग पडेल असें वाटतें. नवीन बिगरशेतकी व योग्य ठिकाणीं शेतकी पतपेढ्या काढाव्या असा बहुमताचा प्रवाह होता. थकबाकी वसूल करण्यास सरकाराने रेव्हेन्यू खात्याची मदत देऊं नये अशी थॉमस कमिटीची शिफारस होती; पण तीहि मान्य झाली नाही ! सहकारी चळवळीच्या व्यवहारास स्टँप ड्युटीहि पडत नाही वगैरे ज्या सवलती आहेत त्या काढून घ्यावा अशी शिफारस थॉमस कमिटीची होती तीहि हाणून पडली असें दिसतें. ऑनररी ऑर्गेनायझर्सचें लोढणें मात्र यापुढेहि राहील. सुपरव्हाइझिंग यूनियन्स काढून टाकून त्यांऐवजी सरकारी ऑडिटर्सना सर्व अधिकार देण्याचा बूट पूर्णपणें यशस्वी झाला नाही हें चांगलें झालें. थॉमस कमिटीचा तर त्याच्यावर भर होता. सभेमध्ये बिनसरकारी अशा 'इन्स्टिटयूट'वर सरकारपक्षाचा निदान दिवाणांचा फार कटाक्ष आहे असें दिसून आलें ही खेदाची गोष्ट होय! ही सभा खासगी असल्यामुळे सभेचे निर्णय आज सांगतां येत नाहीत. सरकारी रीतीने पत्रक प्रसिद्ध झाल्यावरच या प्रश्नांचा विचार करणें अधिक योग्य होईल.

# नाशीकची सर्व-धर्म परिषद

सर्व-धर्म परिषदेचें अधिवेशन शनिवार ता. ३ रोजीं नाशिक येथील सर्कल थिएटरमध्ये सकाळीं डॉ. **कुर्तकोटी** यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू झालें. परिषदेस निरनिराळ्या ठिकाणांहून भिन्न धर्मीय संस्थांचे सुमारे १०० प्रतिनिधी हजर होते. प्रथम स्वागताध्यक्ष **सर गोविंदराव प्रधान** यांनी सर्वांचें स्वागत करून पुढील आशयाचें भाषण वाचून दाखविलें.

### स्वागताध्यक्षांचें भाषण

या परिषदेचा उद्देश सर्व धर्मांच्या लोकांत सलोखा, बंधुभाव व शांतता उत्पन्न करण्याचा आहे. ही कल्पना प्रथम जगद्गुरु श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांना शिकागोच्या जागतिक विश्वबंधुत्व संमेलनास निमंत्रण आल्यावरून निघाली. पुढे मुंबईस सर्व धर्मांच्या निमंत्रित मंडळींची सभा सरदारगृहांत बॅ. जयकर यांचे अध्यक्षतेखाली झाली. त्यानंतर ही परिषद भरण्याचें ठरून मि. आर. पी. मसाणी यांचे अध्यक्षतेखाली मुंबईस प्रातिनिधिक कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीने नाशिक येथे परिषद भरविण्याचें ठरविलें. तदनुसार नाशिकला परिषदेचें कार्यकारी मंडळ बनविण्यांत आलें. मुंबईच्या "केसर इ हिंद" सारख्या पत्रांनी परिषदेच्या धोरणाला मनःपूर्वक पाठिंबा दिला. यावरून विचारपूर्वक ही परिषद बोलावण्यात आली आहे हें सर्वांच्या लक्षांत येईल.

या परिषदेची कल्पना हिंदुस्थानांत नवी वाटते. पण १८९३ सालीं शिकागो येथे जागतिक धर्मसभा झाली. तिचे उद्देश पुढीलप्रमाणे होते. (१) जगांतील सर्व मोठ्या व जुन्या धर्मांचें प्रमुख प्रतिनिधी एकत्र बोलावणें. (२) सर्व धर्मांचीं महत्त्वाचीं तत्त्वें हीं सामान्य कशीं आहेत, हें लोकांच्या नजरेस प्रामुख्याने आणणें. (३) बाह्यतः एकंकार करण्याचा अगर धर्मशून्य बनविण्याचा प्रयत्न न करतां एकमेकांची सहानुभूति व मैत्री वाढवून बंधुभाव उत्पन्न करणें. (४) सर्व धर्मांचीं मुख्य तत्त्वें काय आहेत हे अधिकारी माणसाकडून सर्वांपुढें मांडणें. (५) आस्तिक्य बुद्धीचा पाया व मनुष्याचा अनंतावरील विश्वास याची कारणमीमांसा करून जडवादाच्या प्रवृत्तीस आळा घालणें. (६) त्या त्या धर्माच्या लोकांचे वाङ्मय कला, राज्यव्यवस्था, समाजव्यवस्था, गृहस्थिति इत्यादिकांवर त्या त्या धर्मांचा काय परिणाम झाला याबद्दल त्यांतील प्रमुख लोकांकडून संपूर्ण माहिती तयार करविणें. (७) प्रत्येक धर्म दुसऱ्या धर्माला कसा बोधक व पोषक होतो किंवा होईल याचें संशोधन करणें (८) जगातील प्रमुख राष्ट्रांतील लोकांची धर्मस्थिति व धर्माकडे पहाण्याची दृष्टि कशी आहे याबद्दल माहिती प्रसिद्ध करणें. (९) दारूबंदी, मजुरांचा प्रश्न, शिक्षण, आर्थिक व्यवस्था इ. सद्यःकालीन बिकट प्रश्नासंबंधी धर्म काय मार्ग दाखवूं शकेल याचें संशोधन तज्ज्ञ माणसांकरवीं करणें. (१०) कायमची जागतिक शांतता प्रस्थापित करण्याचे दृष्टीने राष्ट्रांराष्ट्रांत बंधुभाव व सलोखा उत्पन्न करणें. हे उद्देश विस्ताराने सांगण्याचें कारण अशा तऱ्हेच्या परिषदांचे हेतु काय असावे याचा नमुना त्यांत सांपडतो. यासारख्या दुसऱ्याहि परिषदा १८९३ नंतर भरल्या. १९०४ सालीं बासेल येथे, १९०८ सालीं ऑक्सफर्ड येथे व १९१२ सालीं लीडेन येथे परिषदा भरल्या. नंतर महायुद्ध सुरू झाल्याने १९१६ सालीं हीडेलबर्ग येथे भरावयाची परिषद भरली नाही.

यानंतर भिक्षु धर्मपाळ यांच्या निधनाबद्दल खेद प्रदर्शित करून स्वागताध्यक्ष म्हणाले, सर्व धर्मांमध्यें मनुष्यापेक्षा श्रेष्ठ अशा शक्तीशीं मनुष्याच्या संबंधाचा मूलभूत विचार आहे. त्याचप्रमाणें मरणोत्तर अस्तित्वावर विश्वासहि सर्व धर्मांत सांपडतो.

हल्लीं दिसणाऱ्या धर्मविरोधांचें दिग्दर्शन करून धर्मविषयक कडवट कर्मठपणा हा हितावह नाही असे सांगितल्यावर स्वागताध्यक्ष म्हणाले, "या परिषदेंत मतैक्य करण्याची कल्पना नाही. तर भिन्नत्वामध्येच ऐक्य पाहाण्याची दृष्टि आहे. मूलभूत गोष्टींत ऐक्य व किरकोळ गोष्टींत स्वातंत्र्य पण सर्व गोष्टींत सहिष्णुता व उदारपणा ठेवणें हें आमचें धोरण आहे. सर्व धर्मांच्या संस्थापकांनी इतर धर्मांच्या निष्ठांची व तत्त्वांची हेटाळणी केली नाही. मग त्यांच्या अनुयायांनी एकमेकांशीं असहिष्णुतेने कां वागावें?

"हल्लीं शास्त्रीय शोधांमुळे धर्मबुद्धीला जबरदस्त धक्का बसला आहे. आजच्यासारख्या परिषदांनी धर्मबुद्धीचा जोम कायम आहे व जागतिक ऐक्याचे कामीं त्या बुद्धीचा उपयोग व प्रभाव दिसू शकेल हें सिद्ध होणार आहे. शास्त्रीय परिषदा भरतात त्यांत जशी सहिष्णुतेने चर्चा व विचारविनिमय ही होतात तसेंच धर्माच्या बाबतींत आपण कां करूं नये!"

त्यांचे भाषण झाल्यानंतर यशाश्वितनपर संदेश

वाचून दाखविण्यात आलें. त्यात ना. व्हाइसरॉय डॉ. रवींद्रनाथ टागोर, श्री. हरविलास सारडा, श्रीमंत पंतसचीव, रे. एडवर्डस, शिकॅगो येथील 'वर्ल्ड फेलोशिप ऑफ फेथ्स' या संस्थेचे अध्यक्ष बिशप मॅकोनेल यांचे संदेश प्रामुख्याने होते. नंतर अध्यक्ष डॉ. कुर्तकोटी यांचे भाषण झाले.

**अध्यक्ष डॉ. कुर्तकोटी यांचें भाषण**

"स्वामी विवेकानंद हे शिकॅगो येथे पूर्वी भरलेल्या परिषदेस गेले होते. त्यांनी आपल्या अमोघ वाणीने आर्यांचें तत्त्वज्ञान काय होतें याची जाणीव अमेरिकेंत लोकांना करून दिली, व आर्योनी विविधतेंत एकात्मकता कशी असते याच्यासंबंधी केलेलें विवेचन त्यांच्या नजरेसमोर आणलें. या कल्पनेचा विचार तिकडे बराच झाला, पण त्याबद्दल जास्त शोध झाला नाही. पण महायुद्धानंतर परमेश्वरासंबंधी विचार तिकडे सुरू झाला. सर्व मानव जातीस सुख मिळावें ही भावना सर्व धर्मसंस्थापकांच्या मनांत पूर्णपणें वसत होती हें तत्त्व त्यांना पटलें. पण निरनिराळ्या धर्मांच्या लोकांमध्ये धर्मविषयक मतभेद असल्याने अखिल मानव जातीला सुख मिळू शकत नाही हेंहि तितकेंच खरें अशीहि तिकडील लोकांची खात्री झाली.

जगाकडे दृष्टि फेकली तर नास्तिकपणाची लाट जिकडे तिकडे पसरल्याचें दिसतें. तरुण बुद्धिवादी असल्याने त्यांस जुन्या मताची विचारसरणी पटत नाही. केवळ तर्कावर त्यांची भिस्त असल्याने धार्मिक भावनाशीं तितकेसे ते समरस होत नाहीत. आणि म्हणूनच ही भावना नष्ट करून सर्वव्यापी परमेश्वराच्या विभूतिमत्वाची भावना त्यांच्या मनांत जागृत करणें आवश्यक आहे.

ही भावना तरुणांमध्ये कां दृढावली याबद्दल माहिती मिळविण्याचा प्रयत्न एका अमेरिकन कमिशनाने केला आहे. त्यांच्या मतें हल्लींचें शिक्षणच याच्या मुळाशीं आहे. तेव्हा सर्व धर्मांतील प्रमुख गृहस्थांना एकत्र आणून ईश्वरविषयक भावना प्रस्थापित कशी करावी याचा विचार करणें अवश्य आहे असे कमिशनाने आपलें मत दिलें. सृष्टीच्या विविधतेत एकात्मकता आहे असा विचार हल्ली पुढे येत असून त्याचाहि सांगोपांग रीतीने विचार सुरू आहे. याच उद्देशाने बंगलोर येथे सर्व धर्मपरिषदेचें अधिवेशन नुकतेंच पार पडलें. लंडन येथे गेल्या मे महिन्याच्या १५ व्या तारखेस आंतरराष्ट्रीय धर्मपरिषद भरली होती. परिषदेस निरनिराळ्या १५ धर्मसंस्थांचे प्रतिनिधि हजर होते. परिषदेस हिंदु, पार्शी, मुसलमान व ख्रिश्चन वगैरे सर्व धर्मांच्या संस्कृतीचे लोक हजर होते. रे. लेस्ली बेटन यांनी आपल्याकडील धर्माची स्तुति फार केली असून पौर्वात्य खंडांतील धर्मांच्या बुडाशीं परमतसहिष्णुता ख्रिश्चन धर्मापेक्षा बरीच आहे असा अभिप्राय सदर परिषदेंत प्रकट झाला आहे.

अमेरिकन 'वर्ल्ड फेलोशिप ऑफ फेथ्सचे' अध्यक्ष बिशप मॅकोनेल यांनी हिंदुधर्माचें महत्त्व वर्णन मला परिषदेस बोलावलें आहे. सर्व धर्मांपेक्षा हिंदुधर्म श्रेष्ठ आहे अशी त्यांची भावना आहे व ही गोष्टहि कांही खोटी नाही. आपण एकाच देवाचे सेवक आहोत ही भावना आपणा सर्वांची आहे. सर्व धर्मांचें ऐक्य आहे असें मानणें म्हणजे आपला धर्म सोडणें असें नव्हे. ज्याने त्याने आपल्या समजुतीप्रमाणे वागून परधर्मसहिष्णुता दाखवावी एवढेंच माझें म्हणणें आहे.

हिंदमातेने आपलें धार्मिक श्रेष्ठत्व सर्व जगाला पटाविलें आहे. अनेक लोकांनी जरी विपर्यास केला असला तरी तिने आपली भूमिका केव्हाहि सोडली नाही. तत्त्वज्ञानी तिच्याकडे तो गंगौघाप्रमाणे परम पवित्र आहे याच भावनेने पाहतो. मग तिच्या जलपृष्ठावर कितीहि धूळ उडो !"

वरील आशयाचें भाषण झाल्यावर सभेचें त्या दिवसाचें काम संपलें.

# कायदेभंगाविषयी लोकमत

लाहोर येथील कै. लाला लजपतराय यांचें 'दी पीपल' पत्र म्हणतेः—

'म.गांधींच्या तत्त्वज्ञानावर कोणाची श्रद्धा असो किंवा तें अपेशी आहे असें कोणाला वाटो, आमचें तर मत असें आहे कीं, कायदभंगाची चळवळ तहकूब करण्यापूर्वी तिची जी मंदगति चालू होती, ती बंद करण्यांत काडीचेंहि नुकसान नाही. आमचें असें निक्षून सांगणें आहे कीं, झालेल्या कार्याचा आढावा घेणें आता जरूरीचें आहे.तसें करण्याची संधि चळवळ तहकूब केल्यास मिळणारी आहे. केवळ असा आढावा घेण्यासाठीच आम्ही चळवळ थांबवीत आहों असें कॉंग्रेसच्या अध्यक्षांनी स्वच्छपणें जाहीर केलें असतें, तर आम्हाला तें खरोखर अधिक पसंत पडलें असतें तसें करणे अधिक निःसंदिग्धपणाचें, प्रामाणिकपणाचें व हितकारक झालें असतें. कारण त्यायोगाने जनतेचें लक्ष खऱ्या मुद्दयाकडे खेचलें गेलें

असतें. हा आढावा घेतांना तो केवळ चालू स्थितीचा किंवा १९३२ सालाच्या चळवळीचा असा न घेता गांधींच्या कारकीर्दीचा अव्वलपासून अखेरपर्यंत घेण्यांत यावा, असें, पटेल व बोस यांच्याप्रमाणे, आमचेंहि मत आहे. गेलीं १३ वर्षे कॉंग्रेसने महात्मा गांधींचे मार्ग चोखाळले आहेत. आणि तसें करतांना (स्वराज्य पक्षाबरोबर केलेली तडजोड बाजूला ठेवली तर) दुसरें कोणतेंहि राजकीय साधन वापरण्यांत आलें नाहीं. अशा प्रयोगाला १३ वर्षे हा पुरेसा काल होय. विशेषतः एका वर्षात स्वराज्य स्थापन करण्याचा चंग बांधलेल्या ह्या चळवळीला दिलेला हा कालावधि बराच मोठा आहे. महात्मा गांधींनी कांहींहि साध्य करून घेतलें नाहीं आणि ते अपेशी ठरले असें म्हणणें म्हणजे निवळ कृतघ्नपणा होय! कोणत्याहि हिंदी पुढाऱ्याला शक्य नव्हती एवढी प्रचण्ड जनजागृति त्यांनी घडवून आणली! पण याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांचे अंदाज अचूक किंवा त्यांचे मार्ग सर्वोत्तम होते अथवा आहेत, अगर त्या मार्गांचे अंगीं कांहीं स्वयंभू शाश्वत महत्त्व आहे आणि म्हणून ते दुरुस्त करतां कामा नयेत किंवा दूर फेकतां कामा नयेत. कायदेभंग तहकूब करणें म्हणजे चळवळीचा नेम चुकला अशी कबुली देणें होय. कायदेभंगाच्याऐवजीं दुसरें कांहीं हत्यार गांधींजवळ नाहीं म्हणून गांधींच्या राजकारणाचा शेवट होत आहे असें दिसतें. त्यांतूनहि अजून गांधींच्या भात्यांत कांहीं नवे बाण शिल्लक असले तरी आतापर्यंतच्या त्यांच्या शरसंधानाने कोणता परिणाम घडून आला याची छाननी करणें हिताचें आहे."

दिल्ली येथील 'दी नॅशनल कॉल' पत्र म्हणतें—"कायदेभंगासंबंधी जनतेंतील उत्सुकता निश्चितपणें ओहोटीस लागली आहे हें कळण्याइतकें अवधान म. गांधींच्या ठायीं आहे. जनतेकडे कान देऊन ते सारखे बसलेले असतात. अलीकडे कायदेभंगाची चळवळ ज्या तऱ्हेने चालविली जात होती, ती तऱ्हा आपल्याला पसंत नाहीं असें त्यांनी जाहीर केलें आहे. यापुढे म. गांधी कायदेभंगाची दुसरी चळवळ लगेच सुरू करतील अशी अपेक्षा धरणें म्हणजे सद्यःस्थितीचें अज्ञान कबूल करणें होय! सरकाराने कॉंग्रेसशीं सन्मान्य रीतीने वाटाघाट सुरू न केली तर गांधी पुनः आपल्याला पकडून घेतील हें शक्य आहे. पण सरकाराने तसें करणें ही एक चूक होईल असें आमचें मत आहे. सन्मान्य रीतीने तहाची वाटाघाट सरकाराशीं होत असेल तर तसें करण्यास कॉंग्रेसने कांकूं करूं नये असें आम्ही वारंवार म्हणत आलों आहों. पण हें शक्य नसेल तर कॉंग्रेसने नवीन कार्याची दिशा आखावी, मग सरकाराचें धोरण कांहींहि असो. आज देशाला नवीन कार्यक्रमाची जरूरी आहे. त्या योगाने जनतेंत उत्साह उत्पन्न होईल. सध्याचे काळीं जनतेला उत्साहित करण्यास कायदेभग समर्थ नाहीं. अशा आणीबाणीच्या वेळीं राष्ट्राला योग्य दिशा दाखविण्यास महात्मा गांधी हे सर्वतोपरी लायक आहेत आणि सुदैवाची गोष्ट अशी कीं, नवा कार्यक्रम व नवें धोरण कॉंग्रेसला आंखून देण्यास आणि त्याच वेळीं सरकाराशीं सन्मान्य सहकार्य संपादणें साधतें कीं नाहीं हें पाहण्यास ते मोकळे आहेत."

# स्फुट सूचना

१ हिंदुस्थानांतील गिरण्या जपानाच्या स्वस्त मालापुढे अगदीं डबघाईस आल्या असून त्यांच्या मालास खप नसल्यामुळे त्या एकामागून एक बंद पडत आहेत. जून महिन्यापासून गिरण्या बंद ठेवण्याचा निश्चय कित्येक गिरणीवाल्यांनी केला होता. त्याप्रमाणे त्या आता बंद होऊं लागल्या आहेत. अशा स्थितींत जपानी मालावर पूर्वीपेक्षा अधिक जकात वाढवून जपानी कापड स्वदेशी कापडाहून महाग करणें हा एक तात्पुरता उपाय होय. तसें बिल ले. असेंब्लीच्या बैठकींतहि पास झालें आहे. पण त्या बिलाच्या अम्मलबजावणीस सरकाराने दिरंगाई चालविल्यामुळे जनतेला सरकारच्या हेतूबिषयीं संशय वाटूं लागला होता. याच सुमारास इंग्लंड व जपान यांजमध्ये प्रस्तुत बाबतींत खलबत सुरू झाल्याने हिंदुस्थानाच्या प्रश्नाचा निकाल इंग्लंडचें सरकार परभारें करणार कीं काय अशीहि भीति उत्पन्न झाली होती. परंतु उशीरा कां होईना हिंदुस्थान सरकार जागें होऊन त्यांनी जपानी कापडावरील जकात वाढविण्याचें ठरविलें, यामुळे गिरणीवाल्यांच्या जिवांत जीव येईल यांत शंका नाहीं.

---

२ जपानी कापडाविरुद्ध हिंदी गिरणीवाल्यांची ओरड बरीच जुनी आहे. ती मनावर घेऊन हिंदुस्थान सरकाराने जकातीचा प्रश्न १९३२ च्या जुलै महिन्यांत टॅरिफ बोर्डाकडे सोंपविला. त्याप्रमाणे

टॅरिफ बोर्डाच्या शिफारशीवरून त्या सालीं जकातीची वाढ करण्यात येऊन अच्छेर वजनाच्या कापडाला ४$\frac{3}{4}$ आणे जकात होती ती ५। आणे करण्यांत आली. म्हणजे किंमतीच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास ३१$\frac{1}{4}$ टक्के जकात होती ती ५० टक्के झाली. ही वाढ ऑगस्ट १९३२ पासून अमलांत आली. या वाढीच्या वेळीं १०६ रु. स १०० येन असा भाव होता. हा भाव उतरत उतरत गेल्या वर्षाच्या नोव्हेंबर महिन्यांत ८३ रु. स १०० येन असा झाला. त्यामुळे जपानी कापड अधिकच स्वस्त होऊन जकातीची पूर्वीची वाढ निरुपयोगी ठरली, व स्वदेशी कापड पडून राहिलें. या स्थितींत फेरबदल होण्याची हिंदुस्थान सरकारान गेले सहा महिने वाट पाहिली. पण तसें घडून न आल्यामुळे आता जकातीची वाढ ५। आण्यांची ६॥ आणे करण्यांत आली आहे. ही वाढ २५ टक्के झाली असून जपानी कापडाच्या किंमतीशीं तिचें प्रमाण ७५ टक्के आहे. या वाढीने जपानी कापडाच्या खपास किती आळा बसतो व हिंदी कापड किती अधिक खपतें हें अनुभवानेच कळून येईल.

---

३ कलकत्त्यास भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं पोलिसांनी प्रतिनिधींना बेदम चोपून काढलें अशी पं. मालवीय यांची तक्रार असून ती खरी असल्याविषयीं एका अमेरिकन गृहस्थाने आपलें मत दिलें आहे व तें केसरीच्या गेल्या अंकांत आम्हीं प्रसिद्ध केलेंच आहे. पं. मालवीय यांच्या तक्रारीविरुद्ध बंगाल सरकार व हिंदुस्थान सरकार यांनी आपली बाजू मांडली आहे; पण त्यांना देखील कांही जणांच्या जखमा उग्र स्वरूपाच्या होत्या ही गोष्ट झांकता आली नाही. आता म. गांधींचे चिरंजीव श्री. देवीदास गांधी यांचें एक पत्र प्रसिद्ध झालें असून त्यांनी सरकाराचा खोटेपणा पुराव्यानिशीं त्यांच्या पदरांत बांधला आहे. पं. मालवीय यांना जी माहिती मिळाली ती जखमी झालेल्या प्रतिनिधींपासूनच मिळाली हें उघड आहे. देवीदास यांनी त्यांपैकीं एक उदाहरण नमुन्यादाखल घेतलें आहे. मालवीय यांचें म्हणणें असें कीं, ता. ३० मार्च रोजीं संयुक्त प्रांतांतील ८९ प्रतिनिधींना लाल बाजार ठाण्यांत नेऊन ठेवल्यावर पोलिसांनी त्यांजवर जाणूनबुजून हल्ला करून त्यांचे डोळे दुखावले, नाकें ठेचलीं व बरगड्या मोडल्या.

---

४ सरकार आपल्या खुलाशांत वरील आरोप कबूल करीत नाही! ठाण्यांत गेल्यावर पोलिसांनी प्रतिनिधींवर हल्ला केला हें सरकाराने छपवून ठेवलें आहे. प्रतिनिधींना पोलीस ठाण्यावर मोटारींतून आणलें त्या वेळीं काळोखांत पायऱ्या चुकून एकदोघे प्रतिनिधी पडले व त्यांना जखमा झाल्या, असें सरकार म्हणतें. पण त्यावर प्रश्न असा कीं, अशा रीतीने दोघे जखमी झाले तर बारा जणांना औषधोपचार कां करावा लागला? दोघे पडले त्यामुळे बाराजण कसे जखमी झाले? दोघांनी पडावें व दुसऱ्या दोघांच्या पोटांतून कळा निघाव्या हें कसें ! यावरून कलकत्त्याच्या पोलीस कमिशनराने सरकाराकडे पाठविलेला रिपोर्ट खोटा ठरत नाही काय ? राष्ट्रीय सभेच्या वेळीं बंगाल कौन्सिलाची बैठक सुरू होती. तिच्यांत लोकनियुक्त सभासदांनी कसे प्रश्न विचारले नाहीत अशी सरकारातर्फे शंका घेण्यांत आली आहे. तिचें देवीदास यांनी केलेलें निरसन निरुत्तर करणारें आहे. बंगालचें कौन्सिल एप्रिल ४ तारखेपर्यंत चालू होतें. राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधि पोलिसांनी ३० मार्च रोजीं पकडले, व ते ४एप्रिलपर्यंत सरकाराने तुरुंगांत ठेवले. ४ तारखेपासून ७ तारखेपर्यंत ते तुरुंगांतून सुटत होते. अर्थात् कौन्सिलची बैठक तोंपर्यंत संपली असल्यामुळे प्रतिनिधींच्या तक्रारीचे प्रश्न कौन्सिलांत साहजिकच येऊं शकले नाहीत. म्हणून सरकाराची कौन्सिलासंबंधाची सबब लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकणारी आहे असें श्री. देवीदास गांधी यांचें स्पष्ट मत आहे. अशा स्थितींत घडलेल्या प्रकाराची चौकशी करणें हा सरळ मार्ग होय. तो सरकाराने न स्वीकारल्यास सरकारची बाजू लंगडी आहे असाच जनतेचा ग्रह होईल यांत शंका नाही.

# नोकरशाहीचे गोतावळे व लेकावळे

हे कोण बायकोचे साले । तुपावेगळा घास न गिळे —अनंतफंदी

जॉइंट सि. कमिटीपुढे साक्षीपुराव्यास सुरुवात होताच पहिली हजेरी नोकरशाहीने दिली. हा एक प्रकारें अपशकुनच होय! कारण हिंदुस्थानाच्या लोकांना स्वराज्य मिळण्याला जर खरा व प्रभावी असा अडथळा कोणाचा असेल तर तो या नोकरशाहीचा! ती काय मागण्या मागते, काय तक्रारी सांगते त्याची सर्व कैफियत लवकरच कळेल. तसेंच तिच्या प्रतिनिधींच्या उलटतपासणींत ते काय कबुल्या देतात हेंहि लवकरच कळून येईल. पण हिंदी लोकांच्या दृष्टीनें जॉ. सि. कमिटीच्या प्रस्थानाला हें मांजर आडवें गेलें खरें!

साक्षीदारांना पुकारलें कीं नोकरशाही आपल्या कैफियतीचें भेंडोळें घेऊन पुढे सरसावणार हें ठरल्यासारखेंच होतें. कारण स्वतः ती बया मोठी उद्योगवादी आहे. पण या प्रसंगीं प्रधानमंडळाने तिला आपल्या स्वतःच्या कामाकरिताहि म्हणून पुढे ढकललें आहे. कारण प्रधानमंडळाचे विरोधी मि. चर्चिल यांनी एकदा असें उघडपणें म्हटले कीं, "प्रधानमंडळाने देऊं केलेल्या व्हाईटपेपरमधल्या सुधारणा नोकरशाहीला मान्य नाहीत; तिच्यावर त्या जुलमाने लादल्या जाणार आहेत." तेव्हा हें खोटें पाडावयाचें तर त्याला उत्तम मार्ग म्हणजे स्वतः नोकरशाहीच्या मुखाने सुधारणा मान्य आहेत असें उघड वदविणें!

नोकरशाही अशी कबुली दोन कारणांकरिता देणार! पहिलें कारण शिस्त! त्याची फोड करून सांगण्याचें प्रयोजनच नाही. शिस्तीकरिता नोकरशाहीची जगभर प्रख्याति आहे. या गुणाच्या जोरावरच ब्रिटिशांचा राज्यकारभार तिकडे काय आणि इकडे काय सुरळीत चालतो. पण शिस्तीबरोबरचें दुसरें कारण असें कीं, सुधारणा द्यावयाला काढल्या तरी नोकरशाहीवरील मुख्य ताबा स्टेट-सेक्रेटरीच्या हातांत बराचसा राहणार. आणि तिची बहाली, बडतर्फी, पेन्शन इत्यादि गोष्टींत स्टे० से० चा अधिकार बराचसा चालणार. अशा रीतीनें मुखलेपाची व्यवस्था ठीक झाल्यामुळे हा नोकरशाहीचा मृदंग मऊ शब्दांनी प्रधानमंडळाच्या व्हाईट पेपरला मान्यता देणारच!

पण व्हाईट पेपरला मान्यता म्हणजे, त्यांत दिलेल्या लोकशाही स्वरूपाच्या थोड्याशा अधिकारच्या नियंत्रणाचें आग्रहपूर्वक प्रतिपादन हें विसरतां कामा नये. कोणत्याहि गृहव्यवस्थतील खरं मालकाचे स्वातंत्र्य मोजावयाचें तर, तें घरांतील नोकरांवरच्या हुकमतीने मोजण्यास सुरुवात करावी लागते. घरांतल्या नोकरांवरील हुकमत जर बाहेर दुसऱ्या कोणाच्या हातीं असली, तर मालकाच्या हातीं गृहव्यवस्थेचा अधिकार तो काय आला? पण हिंदुस्थानच्या घरची खण "नाथांच्या घरच्या खुणे"-सारखी उलटीच आहे! स्वतः शेटजी सवा शेर आणि गळ्यांतील लिंग अडीच शेर! धन्याचें नांव धरम्या आणि नोकराचें नांव रुद्राजीबुवा!

आजवर या डोईजड नोकरशाहीनेंच ब्रिटिश मतदारापेक्षाहि हिंदुस्थानाला अधिक पाण्यांत पाहिलें पृथ्वीच्या उदरांतल्या आगीनें रत्नें बनतात असें म्हणतात. त्याप्रमाणे लो. टिळकांच्या राष्ट्रीय बुद्धीच्या प्रखरत्वानें राजकारण विषयांतले अनेक उत्कृष्ट मराठी शब्द बनले. त्यांतलाच एक, पण फारच समर्पक असा, शब्द नोकरशाही हा होय. "वाल्मिकीचा शोक हा श्लोक बनला" तसाच "टिळकांचा क्रोध हा बोध बनला" असेंहि म्हणतां येईल. कारण हिंदुस्थानांतल्या विपरीत राज्यपद्धतीचे वर्णन 'नोकरशाही' या शब्दाशिवाय इतर कोणत्याहि शब्दाने यथार्थ होणें शक्य नाही. कसें तें पाहा!

वास्तविक राज्यावर राज्य करणारा धनी हा राजा असला पाहिजे. पण हिंदुस्थानाचें राज्य कोण करतो? तर धनी नव्हे! नोकर करतो! हिंदुस्थानाचा धनीपणा दोघांत सारखा वांटून गेला आहे. एक राजे बादशहा, आणि दुसरें पार्लमेंट. म्हणजे पर्यायाने इंग्लंडचा मतदार! हे दोघेहि हिंदुस्थानापासून सहा हजार मैल दूर आहेत. राजेसाहबांप्रमाणेच या मतदारांना हिंदुस्थान हें बहुधा नकाशावरून ओळखूं येतें. यामुळे हुकमत नांवाला या दोघांची असली तरी खरा अधिकार गाजविण्याचें ऐश्वर्य मुलकी व लष्करी अधिकारी वर्गालाच लाभतें. हा अधिकारी वर्ग, आणि कुकवाच्या बळावर मुलुखभर हैदोस घालणारी एखादी जहांबाज सौभाग्यवती हीं दोनहि एकच!

हें सर्व वर्णन 'नोकरशाही' या शब्दानेच यथार्थ होतें नव्हे काय? 'शाहाची बायको ती शाही' हा प्रयोग कदाचित् दुष्ट ठरेल. पण प्रकृत प्रकरणीं पत्नी ही व्यक्ति उद्दिष्ट नसून राज्यपद्धतिच उद्दिष्ट असल्याने शाही शब्दाने 'पत्नीत्व' व 'पद्धति' हीं दोनहि समान प्रतीत होतात. इंग्रजींतील याचा प्रतिशब्द 'ब्यूरॉक्रसी' हा आहे. तो पद्धतिवाचक व स्त्रीलिंगीच

आहे. नोकरवर्गाला स्त्री म्हणणें लक्षणेने समर्थनीय ठरेल. अज राजाने मृत स्त्रीविषयी विलाप करतांना इंदुमतीला गृहिणी व सचिव हे स्त्रीलिंगी व पुल्लिंगी शब्द जोडीने लाविले नाहीत काय ! 'गुणिषु नच लिंगं'!गुणाकडे पाहिलें तर हिंदुस्थानातला नोकरवर्ग इंग्लण्डांतल्या धन्याला पराक्रमी स्त्रीसारखा प्रिय कां नसावा? अर्थात् शहाचे नोकर तेच नोकरशहा बनले, आणि अशा नोकरांकडून धन्याने राज्यकारभार घेण्याची पद्धति ती नोकरशाही ठरली !

आणि आवडती बायको स्वतः एकटीच ऐश्वर्य भोगील असें कधी व्हावयाचें नाही!ती माहेरचीं माणसें उदार हाताने पोसणार,सजविणार,उजविणार! आणि ह्याच अनुभव वर्णितांना अनंत फंदी कवीने म्हटलें आहे कीं "बा तुझा चालता काळ। खायाला मिळती सकळ ॥ हे कोण बायकोचे साले । तुपावेगळ घास न गिळे" ! हिंदुस्थानांतील इंपीरिअल सर्व्हिसचेंच पर्यायाने हें वर्णन होय ! नोकरशाहीच्या कैफियतींत मुख्य कलम हें आहे कीं " हिंदी लोकांना जें काय स्वराज्य द्यावयाचें तें द्या. पण पूर्वीप्रमाणे आमची नोकरी,पगार,भत्ता,पेन्शन, सुखसोयी, ऐषआराम, हीं मात्र त्यांच्या हातीं देऊं देणार नाही."

हिंदुस्थानांतील नोकरशाहीचीं पाळेंमुळें इंग्लंडांतील शेकडों घराण्यांतून, जुनाट वडपिंपळाच्या मुळांसारखीं, पसरलेलीं आहेत. नोकरींत कोणाच्या सरळ औरस दहा पिढ्या झाल्या. कोणाच्या तेढ्या पिढ्या झाल्या पण त्याहि तितक्याच. हिंदुस्थानाच्या पैशावर चालू वहिवाट कायदेशीर सांगण्याची वेळ आली ! कोणतेंहि 'सर्व्हिस कमिशन' बसलें कीं नोकरशाही पगार वाढवून घेऊनच बाहेर पडते. जगांतल्या कोणत्याहि राष्ट्रांत नोकरांना इतके पगार नाहीत. जननापासून दफनापर्यंत सर्व खर्च दूरदृष्टीने बांधले गेलेले ! हे सर्व बोजे कायम राहिले, आणि आपणाला नोकर कोण, कसे, किती ठेवावयाचे हें जर स्वातंत्र्य मिळालें नाही, तर प्रांतिक स्वराज्य दिलें काय व मध्यवर्ती स्वराज्य दिलें काय एकच. नोकरशाहीचे सगळे गोतावळे लेकावळे पोसावयाचे,तुपावेगळा न जाणारा त्यांचा घास सांभाळावयाचा, व या सर्वांबद्दल कायदेशीर जामिनकी द्यावयाची, असा प्रसंग व्हाईटपेपरच्या स्वराज्याने हिंदुस्थानावर येणारा आहे.

# प्रतिष्ठित तिऱ्हाइतांची मध्यस्थी

उपोषणापूर्वी महात्मा गांधींची बिनशर्त मुक्तता केली तेव्हा त्यांत राजकारणाचा वासहि नाही असें सरकारने जाहीर केलें होतें. उपोषणांत कांही बरें वाईट झालें तर त्याचें खापर आपल्या डोक्यावर फुटावयास नको, यासाठीच सरकारने त्यांस सोडून दिलें. गांधींना बंधमुक्त केलें नाही तर सरकार मूर्ख व आत्मघातकी ठरेल असा इषारा आम्हीहि त्या वेळीं दिला होता. म्हणण्याचा इत्यर्थ हाच कीं, हिंदी लोकांशीं जमतें घेऊन चालू लढा बंद करण्याला योग्य असें वातावरण उत्पन्न करावें असा सरकाराचा त्यांत हेतु नव्हता. परंतु मौ. शौकतअल्ली हा हेतु त्यांना चिकटवून म्हणत आहेत कीं, गांधींना मुक्त करण्यांत सरकाराने मोठें औदार्य दाखविलें तेव्हा आता राष्ट्रीय सभेने कायदेभंग अजिबात बंद करावा व सरकारच्या उपकाराची फेड करावी. या आग्रहांत त्यांच्या पोटांतील पापच अधिक दृष्टोत्पत्तीस येतें, यांत शंका नाही.

सलोखा करून लोकमताला मान दिल्याचें श्रेय आपल्याकडे घेण्याची सोन्यासारखी सुसंधि आता मात्र सरकाराकडे आपल्या पायाने वाट चालत आली आहे. म. गांधींच्या मुक्ततेनंतर त्यांनी व राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष लोकनायक अणे यांनी कायदेभंग सहा आठवडे बंद केला. राष्ट्रीय सभेचे पुढारी आपण होऊन कायदेभंग बंद करतील अशी अपेक्षा फार थोड्यांची होती. पण अशक्यप्राय वाटणारी ही गोष्ट घडली. या तहकुबीपेक्षा महत्त्वाची अशी स्पष्ट ग्वाही गांधींनी आपल्या पत्रकांत दिली होती कीं, जर राजकीय कैद्यांची मुक्तता सरकाराने केली तर दुसऱ्या गोलमेज परिषदेहून परत आल्यावर ज्या ठिकाणीं आपण राजकारण सोडलें त्या ठिकाणाहून ते पुनः हातीं घेऊं. गांधीजींचें हें पत्रक बारकाईने पाहण्याची दृष्टि व सद्बुद्धि सरकारला असती तर त्यांतील उद्देश उघड्या केलेल्या पत्त्यांच्या डावाप्रमाणें त्यांना स्पष्ट दिसला असता. पण ही सद्बुद्धि व्हाइसरॉय यांना झाली नाही व त्यांनी सुईच्या अग्रावरील मातीहि देणार नाही असा दुर्योधनी हट्ट धरून आपण राष्ट्रीय सभेशीं बोलणेंहि सुरू करण्यास तयार नाही असें जाहीर केलें व गांधींनी पुढे केलेला सलोख्याचा हात झिडकारला ! आता डॉ. रवींद्रनाथ टागोर,सर शिवस्वामी अय्यर,श्री. न. चिं. केळकर,श्री. चिंतामणी वगैरे पन्नास साठ पुढाऱ्यांनी राजकीय कैदी सोडण्याची सरकारला जाहीर विनंति केली आहे. त्यामुळे सलोखा घडवून आणण्याची सरकाराला दुसरी संधि मिळत आहे.

डॉ. टागोर यांची मागणी अशी कीं, कायदे-भंगाच्या चळवळींत दडपशाहीच्या कायद्याखाली ज्यांना तुरुंगांत खेचलें आहे, अशा सर्व कैद्यांची मुक्तता सरकारानें करावी. ह्या मागणीला राष्ट्रांतील सर्व लोकांचा पाठिंबा आहे. नवी घटना करतांना राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांचा विचार घेणें अत्यंत जरूर आहे म्हणून तो घ्यावा ही त्यांची दुसरी मागणी आहे. राष्ट्रीय सभेनें कायदेभंग बंद करून जी सलोख्याची तयारी दाखविली, तिला मान देऊन राष्ट्रांत शांततेचें नवें वातावरण उत्पन्न करावें ही त्यांची तिसरी मागणी आहे. या बाबतींत सरकारानेंच राष्ट्रीय सभेशीं असहकारिता पुकारल्यास जे दुष्ट परिणाम होणार आहेत, त्यांची कल्पनाहि भयंकर आहे असा या तारेंत शेवटीं इषाराहि दिला आहे तोहि अत्यंत महत्त्वाचा आहे.

ब्रिटिश प्रधानमंडळाच्या मुत्सद्देगिरीच्या व दूरदृष्टि धोरणाच्या परीक्षेची वेळ हीच आहे. दिल्ली-सिमल्याच्या आकुंचित व खोट्या इभ्रतीस बळी पडलेल्या मतांची कुरघोडी ब्रिटिश प्रधानमंडळ आपल्यावर करून घेतें कीं मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड हे आपल्या शहाणपणाच्या जोरावर हिंदुस्थानाशीं सलोखा करून आपलें नांव अजरामर करतात हें लवकरच समजेल. हिंदुस्थानांतील लोकमत प्रभावी होतें कीं दुबळेंच ठरतें याचीहि परीक्षा यांतच होईल.

# नाशिकची सर्व-धर्म परिषद

नाशिक येथें योजल्याप्रमाणें ता. ३ ते ५ जून-पर्यंत सर्कल सिनेमा थिएटरांत सर्व-धर्म-परिषद उत्साहानें पार पडली. सर रवींद्रनाथ टागोर अगर प्रो. राधाकृष्ण यासारखी एखादी थोर व प्रसिद्ध व्यक्ति अध्यक्षस्थानासाठीं लाभेल असें लोकांना वाटलें होतें. पण तें शक्य न झाल्यानें लोकांचा थोडा विरस झाला. पहिले दिवशीं सकाळीं स्वागतपर पद्यें झाल्यानंतर स्वागताध्यक्ष सर गोविंदराव प्रधान यांनी परिषदेस आलेले संदेश वाचून दाखविले. त्यांत ना. व्हाइसरॉय, प्रो. कौसंबी, बॅ. जयकर, बिशप मॅक्डोनेल, प्रो. राधाकृष्ण, लाला दुनीचंद, रे. एडवर्ड्स्, श्रीमंत पंतसचीव, रवींद्रनाथ टागोर, गंगानाथ झा इ. प्रमुख लोकांचे संदेश होते. यानंतर स्वागताध्यक्षांचें व अध्यक्ष डॉ. कुर्तकोटी यांचें भाषण झालें. श्री. नाडकर्णी ( बडोदा संस्थानाचे धर्माधिकारी ) व सॉ. जिनवाला यांनी आभार-दर्शक भाषणें केल्यावर पहिल्या दिवसाचें काम संपलें.

दुसरे दिवशीं ता. ४ रोजीं बाहेरगांवांहून आलेल्या निरनिराळ्या वक्त्यांचीं भाषणें झालीं. मुंबईचे मि. आर. पी. मसाणी यांनी "अकबराचे कालांतील धर्मबंधुत्वाचा प्रचार" या विषयावर आपला निबंध वाचला. यानंतर इस्लामिया कॉलेजाचे प्रोफेसर झुउरुद्दिन अहमद यांनी सर्व धर्मांच्या मुळाशीं एकच तत्त्व आहे अशा अर्थाचा आपला निबंध वाचून दाखविला. नंतर बहाई पंथाच्या मिसेस शिरीन फौजदार या बाईनी 'अबदुल बहा यानें शिकविलेलें विश्वबंधुत्व' या विषयावर भाषण केलें. बाईचें भाषण काव्यमय व वक्तृत्व अस्खलित होतें. यानंतर बहाई पंथाच्या दुसऱ्या एका प्रतिनिधीचें लहानसें भाषण झाल्यावर डॉ. क्लिफर्ड मॅनशार्ड यांनी धर्म व यांत्रिक उद्योग या विषयावर भाषण केलें. त्यांच्या भाषणांत धार्मिक विषयाऐवजीं आर्थिक व मजूरसंघविषयक प्रश्नांवरच अधिक भर होता. याप्रमाणें भाषणें झाल्यावर सर्व धर्मांच्या प्रतिनिधींचा एकत्र फोटो घेण्यांत आला. त्यानंतर प्रो. एन्. के. भागवत, मुंबईचे मि. डिमटिमकर व लखनौचे मि. हैदरी यांचीं भाषणें झालीं. प्रो. भागवत यांचें भाषण त्यांच्या विद्वत्तेस साजेसें झालें.

### दिवस तिसरा

तिसरे दिवशीं ता. ५ रोजीं सकाळीं ८ वाजता परिषदेस प्रारंभ झाला. डॉ. कुर्तकोटी यांना कांहीं कारणानें उशीर लागल्यामुळें सर गोविंदराव प्रधान यांनीच अध्यक्षांचें काम दोनतीन तास चालविलें. अवशिष्ट पुष्कळच वक्त्यांचीं भाषणें व्हावयाचीं असल्यानें सर गोविंदराव यांनी प्रत्येक भाषणास कालमर्यादेची शिस्त लावून सर्वांना बोलण्याची संधि दिली. प्रथम मि. सुबराव, मि. अलहाज, मौ. अबदुल रहीमसाहेब व श्री. द्विजेंद्रनाथ शास्त्री यांचीं भाषणें झालीं. शास्त्री यांचें भाषण हिंदींत झालें. नंतर मि. केशवराव पाध्ये मुंबई यांचें 'धर्मांच्या तौलनिक अभ्यासाचें महत्त्व' या विषयावर भाषण झालें. यानंतर चन्न-बसवेश्वराचे अवतार म्हणून प्रसिद्धीस आलेले मौ. सिद्दिक दीनदार यांचें भाषण झालें. हिंदु व मुसलमान या दोन धर्मांत ऐक्य उत्पन्न करण्याबद्दलच्या त्यांच्या प्रयत्नाची माहिती त्यांनी सांगितली. यानंतर व्ही. रंगाचारी यांचें भाषण झालें. मौ. माझिर अहमद यांनी इस्लाम-धर्माच्या सहिष्णुतेचें वर्णन केलें.

मुसलमान वक्त्यांचीं बहुतेक भाषणें सहिष्णुतेच्या दृष्टीने का होईना पण स्वधर्माचा कड घेणारीं झालीं. नंतर मि. आर. व्ही. शहा व मिस् रुबेन ( ज्यू ) यांचीं भाषणें झालीं. मिस् रुबेन यांचें भाषण मुद्देसूद झालें. आर्यसमाजी लक्ष्मणराव ओघळे यांचें मराठींत खणखणीत भाषण झालें. आपापल्या धर्माची या परिषदेंत महती गाण्यापेक्षा प्रत्यक्ष व्यवहारांत सहिष्णुता कशी उतरेल याचा विचार करणें जरूर आहे असें त्यांनी सांगितलें. नाशिकचे मि. सबनीस वकील, मि. निसांक, श्री. स्वराज्यानंद व मि. धोलाकिया यांचींहि लहान लहान भाषणें झालीं. या वेळीं डॉ. कुर्तकोटी सभागृहांत आले. नाशिकचे श्री. कानिटकर वकील यांनी "आधुनिक शास्त्रें व धर्म यांचा संबंध" या विषयावर भाषण केलें. श्री. कोंडास्वामी चेट्टी व मि. अबदुल लतीफ यांचीं भाषणें झाल्यावर परिषदेचा मुख्य ठराव सर गोविंदराव प्रधान यांनी मांडला तो असाः—

### मुख्य ठराव

( १ ) सर्वधर्म परिषदेने सुरू केलेलें कार्य सतत चालविण्याची योजना करावी अशी सार्वत्रिक इच्छा दिसून आल्यावरून ही परिषद असा ठराव करते कीं, "सर्व-धर्म-संघ" (ऑल फेथ्स लीग) नांवाची सतत कार्य चालू ठेवणारी संस्था स्थापन करण्यांत यावी. भिन्न भिन्न धर्मांच्या लोकांत सलोखा उत्पन्न करण्याचे हेतूने अखिल मानवजात ही एका कुटुंबासारखी आहे व सर्व धर्मांचीं मूलतत्त्वें एकरूप आहेत असें मानणाऱ्या लोकांना एकत्र आणणें हा या संस्थेचा उद्देश असावा. ( २ ) परिषदेसाठी नाशिक व मुंबई येथे स्थापन करण्यांत आलेल्या दोनही कमिटयांचे मिळून व आणखी लोक सामील करून घेण्याचा अधिकार ठेवून परिषदेचें कार्यकारी मंडळ बनविण्यांत येईल व तें मंडळ परिषदेचे कार्याचा प्रचार करणें व पुढील अधिवेशन भरविणें या गोष्टीचा विचार करील.

या ठरावास मि. डिमटिमकर, मि. नाडकर्णी ( धर्माधिकारी बडोदें संस्थान ), डॉ. गोसावी ( इंदूर ), मौयर अबदुल रहीम, मि. रंगाचारी, मिसिस शिरीन फौजदार यांनी दुजोरा दिला व ठराव मंजूर झाला.

यानंतर नाशिक व मुंबई येथील कार्यकारी मंडळींच्या आभाराचा ठराव मि. कुरेशी यांनी मांडला, व डॉ.कोकटनूर यांनी त्यास अनुमोदन दिलें. श्री. सबनीस वकील यांनी स्वयंसेवकांचे आभार मानले.

परिषदेस प्रथम दिवशीं आलेल्या संदेशांखेरीज पुढील व्यक्तींचे व संस्थांचे संदेश आले होते. सिस्टर्स सोशल लॉज पुणें, मिसेस नलिनी भट, बॉंबे ह्यूमॅनिटेरियन लीग, मदर्स लॉज पुणें, जमशेद नसरवानजी मेहता, मराठी थिऑसफिकल फेडरेशन, दिवाणबहादुर के. एम. जव्हेरी, व्ही. बी.मुथा, जी. बी. कालेलकर, वामनरावजी नाईक हैद्राबाद,अध्यक्ष बुद्ध सोसायटी मुंबई, रेव्ह. जे. केलॉक, राजाबहादुर गोविंदलाल, आर.आर.सबनीस, इचलकरंजी संस्थानाधिपति, सरदार चंद्रोजीराव आंग्रे ग्वालेर, साधु मेहेरबाबा यांचा आशीर्वादात्मक संदेश छापून परिषदेंत वांटण्यांत आला. परिषदेच्या समारोपाच्या भाषणांत डॉ. कुर्तकोटी यांनी स्वतःचें अमेरिकेस जाणें अनिश्चित आहे असेच दर्शविलें ! श्री. तुकोजीराव होळकर यांनी परिषदेच्या पुढील कार्यासाठी एक हजार रुपये देऊं केले आहेत. आभारप्रदर्शनाच्या ठरावामध्ये परिषदेचे मुख्य चिटणीस मि. सी. एन्. वकील यांच्या परिश्रमाचा विशेष गौरवाने उल्लेख करण्यांत आला होता. श्रीजगद्गुरु डॉ. कुर्तकोटी यांनी समारोपात्मक भाषणांतहि त्यांचा "धर्मभूषण सी. एन. वकील" असा उल्लेख करून गौरव केला. अखेरीस सर्व वक्त्यांचा एकत्र फोटो घेण्यांत आला. परिषद लहान प्रमाणांत असली तरी तिला प्रातिनिधिक स्वरूप येण्याइतके सर्व धर्मपंथांचे प्रतिनिधि उपस्थित होते. नाशिक येथे बरेच दिवसांत अशा तऱ्हेची परिषद भरलेली नसल्याने परिषदेंत उत्साह दिसून आला. डिस्ट्रिक्ट जज्ज श्री. वासुदेव व इतरहि सरकारी अंमलदार व नोकरवर्ग परिषदेस हजर राहत असे.

# पंढरीचा पांडुरंग व अस्पृश्य वर्ग

( ले.—श्री. म. माटे )

[ लेखांक १ ला ]

संत घराण्यांत चोखोबांचे घराणे प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वर व त्यांचीं सर्व भावंडें, नामदेव व त्याचे नातेवाईक व दासदासीहि ज्याप्रमाणे वारकरी संप्रदायांत प्रसिद्ध आहेत त्याप्रमाणेंच चोखामेळा महार व त्याचे नातलग हेहि प्रसिद्ध आहेत. चोखोबा हा मंगळवेढ्याचा महार महान भगवद्भक्त होता; त्याची बायको सोयरा बाई ही 'चोखयाची महारी' ही हरिभजनीं सादरच होती. मह्रुणपुरा गांवीं दिलेली त्याची बहीण निर्मळा, सोयराबाईचा भाऊ बंका महार व चोखोबाचा खुद्द मुलगा कर्ममेळा हेहि संतांतच मोडतात. स्वतः चोखोबा हा नामदेवाचा शिष्य होता. विठ्ठलाचें नांव त्याच्या जिव्हाग्रीं बांधलेलें होतें. मंगळवेढ्याचें कुसूं रचण्याचें काम चालू असता तें एकदम कोसळलें व त्याच्या खालीं चोखोबा चिरडून मरण पावला. शेकडों लोक असेच चिरडले होते; अर्थात् चोखोबाचें प्रेत कोठे सांपडेल अशी पंचाईत पडली. पण मृत्यु आल्यानंतर सुद्धां चोखोबाच्या अस्थींतून विठ्ठल विठ्ठल असा ध्वनि निघत होता. त्या खुणेवर त्याचें शव उकरून काढलें अशी कथा आहे. नामदेवाने आपल्या या भक्ताच्या अस्थि पंढरपुरीं नेऊन पुरल्या. या महार संतपंचकाने लिहिलेले अभंग प्रसिद्ध आहेत; अभंगांची भाषा सोपी असून आधुनिक असल्यासारखी वाटते; पण पिढ्यानुपिढ्या जुनी भाषा जर माणसांच्या तोंडीं राहत आली, तर तिला नवें नवें रूप येत राहतें हा वाङ्मयांतील न्याय प्रसिद्ध आहे. इतर संतांच्या अभंगांत दिसणारा भक्तीचा जिवंत उमाळा याच्याहि अभंगांत दिसून येतो, पण यांच्या जोडीला, त्यांच्या म्हणून ज्या कांही चित्ताच्या वेदना होत्या, त्याहि या अभंगांतून चांगल्या उघडकीस येतात. आपल्या सामाजिक स्थितीसंबंधी पराकाष्ठेची खंती, विटाळाचीभीड, देवाशीं अगदी चडफडून भांडण इत्यादि या वाङ्मयांतील प्रकार पाहिले म्हणजे आज सहासात शतकें हें आपलें हिंदुधर्मीतील बांधव, आपल्या स्थितीसंबंधाने, कसा टाहो फोडीत राहिले आहेत हें पाहून अत्यंत दुःख होतें. पुष्कळांना असें वाटतें कीं, देवदर्शन अस्पृश्यता इत्यादिसंबंधाने खुद्द अस्पृश्यांना कांहीच वाटत नव्हतें व वाटत नाही, आपणच हे भलभलते विषय काढून उगाच उर बडवीत बसलों आहोंत. अस्पृश्य समाजाची सध्या इच्छा काय आहे, हें आता स्पष्टच झालें आहे व म्हणून त्यांचें त्यांना कांहीच वाटत नाही हा शेरा अगदीं लुला पडतो. त्याला भूतकालांत वाटत होतें कीं नाही याचा उलगडा या पंचकाच्या वाङ्मयांतून कसा होतो हें पुढील मजकुरावरून दिसून येईल. आपल्या देहाला विटाळ मानतात आणि त्यामुळे विठ्ठलाल भेटणें कसें अवघड बनलें आहे याबद्दल केवढें जोराचें भांडण चोखोबा व त्याची पत्नी यांनी केलें आहे हें या अभंगांवरून दिसून येतें. 'यातिहीन आम्हां कोण अधिकार अवघे दूरदूर करिताती' 'कोणीहि अंगीकार न करिती माझा', दूरदूर हो जा अवघे म्हणती' इत्यादि शब्दांत काय परमार्थ आहे काय? आपल्याला अस्पृश्य मानतात याची शुद्ध चडफड व्यक्त झाली आहे. पण नाइलाज झाला म्हणजे रोजच्या व्यवहाराच्या वरच्या तत्त्वज्ञानांत शिरून तेथून तेंच दुःख व्यक्त करण्याची व प्रतिपक्षालाहि लावून बोलण्याची जी पद्धति आहे तिचा अवलंब करून चोखोबांनी म्हटलें आहे "पंचहि भूतांचा एकचि विटाळ, अवघाचि मेळ जगीं नांदे" "चोखा म्हणे मज नवल वाटतें, विटाळापरतें आहे कोण?" "कोण तो सोवळा, कोण तो वोवळा ॥ दोहींच्या वेगळा विठ्ठल माझा !" सोयराबाईची हीच चडफड तिने किती नम्रपणाने व्यक्त केली आहे! 'देहीचा विटाळ देहींच जन्मला, विटाळावांचोनि उत्पत्तीचें स्थान, कोण देह निर्माण नाही जगीं?"

पुढील अभंग पाहाः—

यातिहीन आम्हां कोण अधिकार।
अवघे दूर दूर करिताती
चोखा म्हणे ऐसा हीन नरदेह।
पीडीला संदेह काय करूं
अवघ्या वर्णामाजी हीन केली जाति।
विटाळ विटाळ म्हणती क्षणोक्षणीं
कोणीहि अंगीकार न करिती माझा।
दूर दूर हो जा अवघे म्हणती
चोखा म्हणे तुम्हां घ्याल पदरीं।
तरीच मज हरिसुख होय

न यांति माझी देवा ।
ऐसी घडे तुमची सेवा
मज दूर दूर हो म्हणती ।
तुज भेटूं कवण्या रीतीं
माझा लागतांचि कर ।
सितोडा घेती करार
माझ्या गोविंदा गोपाळा ।
करुणा भाकी चोखा मेळा ॥४॥
पंचही भूतांचा एकचि विटाळ ।
अवघाचि मेळ जगीं नांदे
तेथें सोंवळा वोंवळा तो कोण ।
विटाळाचें कारण देह मूळ
आदि अंतीं अवघा विटाळ संचला
सोवळा तो झाला कोण न कळे
चोखा म्हणे मज नवल वाटतें
विटाळा परतें आहे कोण
चोखा म्हणे देव दोहींच्या वेगळा ।
तो मीं देखिला दृष्टभरीं
वेदांसी विटाळ शास्त्रांसी विटाळ ।
पुराणें अमंगळ विटाळाचीं
जीवासी विटाळ शिवासी विटाळ ।
काया अमंगल विटाळाचीं
ब्रम्हीयां विटाळ विष्णूसी विटाळ ।
शंकरा विटाळ अमंगळ
जन्मतां विटाळ मरतां विटाळ ।
चोखा म्हणे विटाळ आदिअंतीं
कोण तो सोवळा कोण तो वोवळा ।
दोहींच्या वेगळा विठ्ठल माझा ॥
कोणासी विटाळ कशाचा जाहाला ।
मुळींच संचला सोवळाची ॥
विटाळाचे अंगीं विटाळाचें फळ ।
चोखा तो निर्मळ नाम गाय

सोयराबाई म्हणतेः—

देहासी विटाळ म्हणती सकळ ।
आत्मा तो निर्मळ शुद्धबुद्ध
देहींचा विटाळ देहींच जन्मला ।
सोवळा तो झाला कवणधर्मे
विटाळावांचोनि उत्पत्तीचें स्थान ।
कोण देह निर्माण नाही जगीं
म्हणूनि पांडुरंगा वानीतसे थोरी ।
विटाळ देहांतरीं वसतसे
देहाचा विटाळ देहींच निर्धारीं ।
म्हणतसे महारीं चोखियाची

या पतिपत्नींनी आपलें मनोगत त्यांतल्या त्यांत नम्रभावाने व थोडा तात्त्विक पडदा ठेवून सांगितलें आहे. पण त्यांचा मुलगा जो कर्ममेळा त्याने तर आपल्या वयास अनुसरून विटाळाच्या कालीवर व प्रत्यक्ष पांडुरंगाच्या निष्ठुरपणावर कडाकड कोरडे ओढले आहेत. फार काय सांगावें, त्याने पांडुरंगाची लाज काढली आहे ! लोकांचें उष्टे खातां जन्म गेला, याची तुम्हांला कांही शरम पाहिजे असें त्याने देवालाच चमकाविलें आहे. "तुमची भक्ति करावी, पण आम्हांला त्याचें काय सुख आहे ? कारण तुम्ही हीन आहां, तुम्ही दीन आहां अ[illegible] आमच्या कानी कपाळीं लोक ओरडत आहेत. तुम्ही खुशाल आनंदाचे व सुखाचे सोहळे भोगतां, पण विठ्ठला आमच्या माथीं मात्र वोखटपण मारिलें आहेस !" या उद्गारांत अगदीं सतापाचा कढ सांडल्यासारखा दिसतो. याहीपुढे जाऊन कर्ममेळ्याने "गोड कधीं न मिळेचि अन्न, सदा लाजिरवाणे जगामध्ये," ही जी तक्रार केली आहे ती लक्षांत घेतली म्हणजे देशांतील संपत्तींत कसलाहि वांटा मिळूं न देणें व अस्पृश्याला जीवित सुखाचें करण्याची संधि न मिळूं देणें ही जी आपली सामाजिक व्यवस्था तिच्यावर अगदीं उघड उघड हल्ला आहे हें ध्यानांत येतें. पुढील दोन अभंग काय जोराचे आहेत हें पाहाः—

**कर्ममेळा**

आमुची केली हीन याती ।
तुज कां न कळे श्रीपती
जन्म गेला उष्टें खातां
लाज न ये तुमचे चित्ता
आमुचे घरीं भात दहीं
खावोनि कैसा म्हणसी नाहीं ।
म्हणे चोखियाचा कर्ममेळा ।
कासया जन्म दिला मला
तुमच्या संगतीचें काय सुख आम्हां
तुम्हां मेघश्यामा न कळे कांही
गोड कधीं न मिळेचि अन्नें ।
सदा लाजिरवाणें जगामध्ये
तुम्हासी आनंद सुखाचा सोहळा ।
आमुचे कपाळीं वोखटपण
चोखिया म्हणे कर्ममेळा देवा ।
हाचि आमुचा ठेवा भागाभाग ॥

अशा तऱ्हेचे उद्गार काढीत असतांसुद्धां ज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्यावर केलेल्या उपकाराची जाणीव चोखोबाला कशी होती तें पहाः—

तो हा महाराज ज्ञानेश्वर माऊली ।
जेणें निगमवल्ली प्रकट केली ॥
संसारी आसक्त माया मोहें रत ।
ऐसे जे पतीत तारावया ॥
चोखा म्हणे श्रेष्ठ ज्ञानदेवी ग्रंथ ।
वाचतां सनाथ जीव होती ॥

उघडोनी वेदार्थाचा ठेवा।
केला तरणोपाय जीवा
ऐसा समर्थ ज्ञानदेव।
तया चरणीं ठेवा भाव
प्रत्यक्ष प्रचीत लोचनीं।
अस्थि विरती जीवनीं
पुढे सोन्याचा पिंपळ।
ऐसी साक्ष असे अढळ
कर जोडोनिया दोन्ही।
चोखा जातो लोटांगणीं ॥

परमार्थ विचारांतील अधिकाराची कोंडी ज्ञानेश्वराने फोडली हें त्याचें ऋण चोखोबाने कृतज्ञतेने वर्णन केलें आहे. अस्पृश्य समाजाच्या उन्नतीचा जो कित्येक शतकांवर पसरणारा मार्ग त्याचा आरंभ ज्ञानेश्वरापासून होतो हें म्हणणें कित्येक सुधारकांस पसंत नसलें तरी चोखोबाच्या जबानीनेच तें खरें आहे हें मात्र यावरून स्पष्ट होते. पण हें जसें सुधारकांनीं ध्यानांत ठेवावयास हवें तसेंच सनातनी बांधवांनीहि चिंतून पाहावयास हवें. आज जो देवालयप्रवेशाचा प्रश्न चालू आहे, त्याचा जरी ज्ञानेश्वरांनी उल्लेख केला नाही तरी अस्पृश्यांसंबंधी त्यांचें धार्मिक धोरण काय होतें, याचा उलगडा खुद्द चोखोबांच्या शब्दांवरूनच होतो.

## ( लेखांक २ रा )

पंढरीच्या पांडुरंगाचें दर्शन पूर्वी अस्पृश्यांस घडत होतें काय, हा फार महत्त्वाचा प्रश्न असून तो कांही कांही अभंगांवरून उत्पन्न होतो. हा प्रश्न उपस्थित करतांना मजवर फार जबाबदारी पडते हें मी जाणून आहें. जुन्या पीठिका, माहिती, इतिहास इत्यादींच्या माहितगारांनी या प्रश्नासंबंधानें लिहिलें, तर उपस्थित केलेल्या या प्रश्नाचा अनुकूल निकाल लागण्यास फार मदत होईल. मी जीं वचनें म्हणून दाखवितों त्यांचे अर्थ परमार्थपरच लावावयास हवेत असा आग्रह सनातनी बांधव करतील. पण प्रत्येक वचनाचा तसा अर्थ लावणें केवळ आग्रहाचें दिसेल हें त्यांचे तेसुद्धा ओळखतील. मला असें खास वाटतें कीं, पूर्वी म्हणजे चोखोबाच्या वेळीं महाद्वारांतून श्रीविठ्ठलाचें दर्शन अस्पृश्यांस होत असावें. मीं पंढरपूरचें देऊळ पाहिलेलें नाही व तेथील दर्शनविषयक पद्धतिहि मला माहीत नाहीत. पण विचारून घेतलेल्या माहितीवरून असें दिसते कीं, सध्या अस्पृष्ट लोक हे चोखोबाच्या समाधीपाशींच उभे राहतात, तेथे कापूर लावतात व पंढरीला गेल्याचें सुख मानतात. याच्या शेजारीं पंधरा–सोळा पायऱ्या असून त्या चढून गेलें म्हणजे महाद्वार लागतें. हें महाद्वार व विठ्ठलाचें प्रत्यक्ष मंदिर यांच्यामध्यें मोकळ्या जागा, बारखांबी, सोळखांबी इत्यादि प्राकार आहेत. प्रत्यक्ष मंदिर व महाद्वार या दरम्यान असलेल्या इमारती जर नाहीत असें मानिलें व मधील सर्व जागा मोकळी आहे असें धरलें तर महाद्वारांत उभ्या असलेल्या माणसाला विठ्ठलाचें दर्शन होणें शक्य आहे कीं काय हें माहितगारांनी ठरवावयास हवें. तसें जर शक्य असलें तर पुढे दिलेल्या अभंगातील 'पाहिलें', 'देखिलें' या शब्दांचे अर्थ परमार्थपर लावण्याचें कांहीच कारण नाही. हे शब्द म्हणजे मानसपूजा आहे असें म्हणणें वायफळ दिसेल.

### महाद्वारांतून दर्शन

मला वाटतें कीं चोखोबाच्या वेळीं महाद्वारें व खुद्द मंदिर यांमधील सध्या जो पसारा आहे तो मुळींच नसावा; व कांही असला तर महाद्वारांतून विठ्ठलमूर्ति दिसण्याच्या आड तो येत नसावा. मधील सर्व मंडप इत्यादि प्रकार मागून उभारलेले असावे. व उभरातानी महाद्वारांतून अस्पृश्याला देवदर्शन करण्याची सोय केलेली होती तिजकडे दुर्लक्ष केलें असावें. हें अनुमान जर खरें ठरलें तर महाद्वारातून देवाकडे प्रत्यक्ष पाहून दर्शन घेण्याचा अस्पृश्यांचा पुरातन हक्क आहे हें आपोआप ठरेल. वहिवाट नसल्यामुळे दर्शन करण्यास परवानगी देतां येत नाही असें जे कोणी म्हणतात त्यांना समजून येईल कीं वहिवाट होती व म्हणून पुन्हा तशी वहिवाट पाडावयास कांहीच हरकत नाही. ही वहिवाट सहासातशें वर्षापूर्वीच होती हें जर सिद्ध झालें तर सनातनी बांधवांस असें विचारतां येण्यासारखें आहे कीं इतक्या वर्षांनंतर मंडपांत तरी येऊं देण्याची वेळ आता झाली नाही काय? अस्पृष्टांस दर्शन घडावयास हवें कारण वरील अनुमानावरून तेव्हा म्हणजे इतक्या वर्षापूर्वी तें घडतच होतें, ही अनुमानपरंपरा अर्थातच मीं वर सांगितलेल्या गोष्टीवर अवलंबून आहे. ती ही कीं खुद्द मंदिर व महाद्वार यांमध्ये कसलीच इमारत नाही असे धरलें तर महाद्वारांतून मूर्तिदर्शन होतें अथवा निदान मधील स्थिति अशी असावी कीं महाद्वारांतून दर्शन घेण्यास हरकत पडूं नये.

चोखामेळा हा महाद्वारांतून देवदर्शन करीत होता; खालून कोठून नव्हे, तर प्रत्यक्ष

महाद्वारांतून तो तें करीत होता; हें दर्शविणारे अभंग असे आहेत.यांत 'देखिल्याचें' म्हटलेंच आहे. पण महाद्वारांत तरी त्याचें स्थान होतें, त्याच्याखाली कोठें नव्हतें हें त्यांवरून दिसेल.

पहातां पहातां वेधियेला जीव।
सुखाचा सुखसिंधु पंढरीराव॥
उभा राहुनि महाद्वारीं।
चोखामेळा दंडवत करी॥
सुखाचा सुखराशी पंढरीसी आहे।
जावोनिया पाहे अरे जना॥
अवघीयां उद्धार एकाचि दरुशने।
भुक्ति मुक्ति केणें मिळे फुका॥
चोखा म्हणे आनंदें नाचा महाद्वारीं।
वाचे हरी हरी म्हणा मुखें॥
पहातां श्रीमुख हरे तहानभूक।
चोखा म्हणे सुख विठ्ठपायीं॥
चोखा म्हणें मज कांहीच न कळे।
उगाचि लोळें मी महाद्वारीं॥
गर्हिवरुनि चोखा उभा महाद्वारीं।
विनवी जोडुनि करीं विठोबासी॥
देखिला देखिला योगियांचा रावो।
रुक्मादेवी नाहो पंढरीचा॥
चोखामेळा तेथे वंदितो चरण।
घाली लोटांगण महाद्वारीं॥

### दर्शनास अनुकूल पुरावा

या महाद्वारांतून चोखोबाला व त्याच्या नातेवाइकांना व म्हणून इतर अस्पृश्यांस विठ्ठलमूर्ति प्रत्यक्ष दिसत होती असें म्हणावयास पुढील अभंगांचा आधार मिळतो:—

चोखामेळा:—

श्रीमुखाची शोभा कस्तुरी मळवट।
उभा असे नीट विटेवरी॥
कर दोनी कंटीं कुंडल झळकती।
तेज हे फाकती दशदिशा॥
वैजयंती माळा चंदनाची उटी।
टिळक लल्लाटीं कस्तुरीचा॥
चोखा म्हणे माझ्या जीवींचा जीवनु।
पाहता तनु मनु भुलोनी जाय॥
बहु मत ग्रंथ करितां पठण।
सुख समाधान नव्हे तेणे॥
चोखा म्हणे सुख समाधानवृत्ति।
पाहता विठ्ठल मूर्ति विटेवरी॥
पहा हो वैकुंठनिवासी।
उभा भिवरे तीरासी॥
कट धरोनि हृषीकेषी।
विटें समचरणीं देखिला॥
जो न कळे वेदशास्त्रा अगोचर।
तो हा कटीकर उभा विटे॥
गोड गोजिरें ध्यान मिरविलें।
तें आम्हां देखिलें पंढरिरायें॥
संतसमुदाय पताकांचे भार।
करिती जयजयकार महाद्वारीं॥
चोखा म्हणे सर्व सुखांची विश्रांति।
तो हा रमापति पंढरीये॥
लावण्याचा गाभा त्रैलोक्याची शोभा।
विटेवरी उभा पंढरीये॥
पाऊलें गोजिरीं श्रीमुख शोभलें।
ध्यान मिरविलें भीमातीरीं
वैजयंती माळा किरीट कुंडलें।
परिधान केलें पीत वस्त्र॥
चोखा मेळा म्हणे ऐसा लावण्य पुतळा:
आम्हीं देखिला दृष्टभरी॥

बंका—

न कळे वो भाव आगमा-निगमां:
जयाचा महिमा श्रुतिशास्त्रां॥
तो म्यां डोळेभरी पाहिला श्रीहरी।
भिवरेचे तीरीं विठ्ठलरूप॥
सुखाचा सागर भक्तांचा कैवारी।
ब्रीद चराचरीं गाजतसे॥
बंका म्हणे ऐसा जयाचा महिमा।
सुलभ तो आम्हा भाविकांसी॥

सोयराबाई:—

आजि माझा पुरला नवस।
देखिलें पायास विठोबाच्या॥
अनंता जन्मांचे फिटलें सांकडें।
कोंदाटलें पुढें रूप त्याचें॥
आठवीत होते गोमटीं पाऊलें:
तोचि देखियेलीं विटेवरी॥
आनंद न समाये मनाचे अंतरीं।
म्हणतसे महारी चोखियाची॥

बंका—

प्रेमाचा पुतळा विठोबा सावळा।
उभा तो देखिला भीमातटीं॥
कर कटावरी पाऊलें साजिरीं।
शंखचक्र करीं मिरवीतसे॥
योगियांचा राणा गोपीमोहन कान्हा।
भक्तीचा आंदणा घरोघरीं॥
बंका म्हणे ऐसा कृपेचा कोवळा।
पाळी भक्तलळा प्रेमासाठीं

### अर्थ परमार्थपर कां लावावे?

या अभंगांतील 'देखिला' 'पाहिला' 'दृष्टभरी' 'डोळेभरी' इत्यादि शब्दांचे अर्थ परमार्थपर कां लावावे हें समजत नाही. परमार्थपर अथवा मानसपूजापर असे ज्यांचे अर्थ बसवावेयास

हवेत असे दोन अभंग आहेत. 'देवचि देखिला देहामाजीं' 'प्रेमें आलिंगिलें चोखियानें' हीं वचनें साध्या अर्थानें घेतां यावयाचीं नाहीत हें उघड आहे. पहिलें तर स्पष्टच आहे व दुसरें प्रत्यक्ष आलिंगन या अर्थानें घेतां यावयाचें नाही. याचें कारण असें कीं, महाद्वारांत मी उभा असतों म्हणजे पुढे जात नाही हें चोखोबाने हजारदां सांगितलें आहे.

आम्हां आनंद झाला आम्हां आनंद झाला ।
देवचि देखिला देहामाजीं ।
देखणें उडालें पहाणें लपालें ।
देवें नवल केलें देहामाजी ।
मागें पुढे देव रिता ठाव कोठें ।
हृदयीं भेटे देहीं देवो ।
चोखा म्हणे देव देखिला पंढरी ।
उभा भीमातीरीं विटेवरी ॥

या अभंगांतील 'देव देखिला पंढरी' 'आलिंगिले' या शब्दांचे अर्थ 'मागे पुढे देव रिता ठाव कोठे । हृदयीं भेटे देहीं देवो' या शब्दांच्या अनुरोधानेच लावावयास हवा; पण याच्या वरच्या अभंगांतील 'देखिला' इत्यादि शब्द मानस-पूजापर घेण्याचें कारण नाही.

चोखोबा, बंका, सोयराबाई या सर्वांनी आपल्या मानसपूजेचेंच वर्णन चालविलें आहे असें म्हणणें अतिशयोक्तीचें आहे. शिवाय चोखोबा सोडला तर उरलेल्या प्रत्येकालासुद्धां हें परमार्थ-दर्शन घडलें होतें असें म्हणावयास मन धजावत नाही. घरांतला एक कोणी मोठा संत झाला म्हणजे घरांतील बाकीचीं माणसें भक्त बनत; पण भक्त बनलीं म्हणून त्या संताइतकींच तीं अधिकारी बनत हें खरें वाटत नाही. त्यांना प्रत्यक्ष विठोबाच्या मूर्तीचें दर्शनच घडत असावें असें वाटतें. वर सुचविल्याप्रमाणे प्रत्यक्ष मंदिर व महाद्वार यांत आड येण्यासारखें पूर्वी कांही नसेल तर हें दर्शन त्यांना खास सुलभ होतें. तरी इतिहास-संशोधकांनी व देवळाच्या पूर्वीच्या माहितगारांनी असा कांही प्रकार पूर्वी होता काय हें पाहावें; व मधील पसारा नाही असें मानलें तर महाद्वारांतून दर्शन होण्यासारखें आहे काय हें सर्वांनीच पाहावें. जर तसें असेल तर पूर्वी दर्शनाची वहिवाट होती असें सिद्ध होईल; व ती जर वहिवाटीस अनुसरून रूढ करावयाची असेल तर जेथून दर्शन होईल तेथपर्यंत जावयास अस्पृश्यांस परवानगी दिली पाहिजे असें मला वाटतें.

इतकें स्पृश्य हिंदूंस सांगितल्यानंतर चोखोबाच्या मनाचें दुसरें एक दुखणें समाजापुढे व विशेषतः अस्पृश्य समाजापुढे मांडलेंच पाहिजे. स्वकीय लोकांसंबंधाने चोखोबाने कांही तिरस्काराचे उद्गार काढले आहेत. आपले लोक अमंगळ खाणारे, मद्यमांस आहार करणारे व कश्मळ बोलणारे आहेत म्हणून मी मोठ्या कांचणीत पडलो आहे, ही जाचणी कोठवर सहन करूं ? असें त्याने मोठ्या कळवळ्याने सांगितलें आहे.

येथें तों संग आहे दुर्जनांचा ।
म्हणोनि शीण त्याचा होत आहे ॥
यातीचा प्रकार अमंगळ खाणार ।
मद्य मांस आहार करिताती ॥
मुखें तें वाईट कश्मळ बोलती ।
तेणें हळहळ जीव करी ॥
चोखा म्हणे ऐसा पडलों कांचणी ।
सोसूं हे जाचणी कोठवरी ॥

या अभंगांतील मर्म अस्पृश्यांनी आपल्या मनांत चांगलेंच बिंबवून घेतलें पाहिजे. सुधारणा उभयपक्षांकडून झाली पाहिजे हें विसरून चालावयाचें नाही. चोखोबा उघड्या डोळ्यांनी प्रत्येक गोष्ट पाहात होता.म्हणून वरील लिहिण्यांतील सर्व बाबींकडे त्या त्या माणसांनी लक्ष दिलें पाहिजे. तथापि या लेखांतील मुख्य मुद्दा जो कीं, अस्पृश्यांस पांडुरंगाचें दर्शन मागें घडत होतें कीं काय इकडे सर्वांनी लक्ष द्यावें.

# हिंस्र वाघांचा सरकारकडे अर्ज

हल्लीचे दिवस ज्याने त्याने सरकारकडून स्वतःला संरक्षण मागून घेण्याचे आहेत. तेव्हा आपण ज्यांना हिंस्र पशु म्हणतों अशा वाघांनीहि जर आत्मसंरक्षणार्थ हिंदुस्थानसरकाराकडे एखादा अर्ज केला तर काय आश्चर्य ! आणि तसा एक अर्ज नुकताच प्रसिद्धहि झाला आहे.आता वाघांना लिहितां वाचतां येत नसल्याने त्यांनी तो अर्ज आपल्या एका वकिलाकडून करविला आहे इतकेंच. हे वकील अर्थात् एक प्राणिशास्त्रज्ञ आहेत. त्यांचें नांव चार्लस थिओबोल्ड असें असून ते झुऑलॉजिकल सोसायटीचे फेलो आहेत. त्यांनी ता. ९ च्या 'टाइम्स' पत्रांत ही वाघांची कैफीयत सादर केली आहे. वाघांना मनुष्य वाणी नाही. म्हणून म्हैसुरास प्रकट झालेल्या या कैफियतीचा सारांश मराठींत दिल्यास मराठीने कानडीवर अतिक्रमण केलें असा

आरोप आमच्यावर केला जाणार नाही अशी आशा आहे. या कैफियतीचा आशय असा आहे.

( १ ) हल्ली शिकारी लोकांकडून आम्हा वाघांचा किती बेसुमार संहार चालला आहे याच्या हकीकती वर्तमानपत्रावरून लोकांना विदितच आहे. प्राणिसृष्टीतील देखणेपणाच्या वैभवांत आमचा दर्जा फार श्रेष्ठ आहे. आमची जात नष्ट झाली तर सौंदर्यशास्त्राची त्यामुळे फारच हानि होणार आहे. दुर्दैवाने आमची जात खरोखरच नष्ट होण्याच्या पंथाला लागली आहे!

(२) बरें, मनुष्याला असा उपद्रव तरी आम्ही काय करितों कीं त्याकरिता त्याने आमचा असा संहार करावा? घरीं गोठ्यांत बांधलेलीं पोसलेली जनावरें आम्ही सहसा खात नाही. तशींच शेतीला उपयोगी जनावरेंहि! कारण त्यांचे मालक त्यांना उत्तम जपतात. मग तो गोड घांस आम्हाला कसा लाभणार? आमचे मुख्य भक्ष्य हरणें, रानडुकरें पण हीं आम्हीं मारून खाल्याने शेतीबागायतीला होणारा किती उपद्रव आम्ही वांचवितो याचा नीट विचार करा.

(३)एखाद्या शेतकऱ्याने गुरांची नीट काळजी न घेतलेलें किंवा एखादें उनाड जनावर आम्हीं खाल्लें तर त्यांत आमचा काय दोष?

(४) आपल्या साऱ्या जन्मांत आपली एक दोहोंहून अधिक जनावरें वाघाने खाल्ल्याची तक्रार सहसा ऐकूं येणार नाही. दहापांच रुपयांचेंच नुकसान!

(५) वाघांच्या व वाघिणींच्या शिकारीबाबत सरकाराने आता नियमच करावे. व परवान्याशिवाय वाघ मारणें हा गुन्हा ठरवावा.

(६)एका जिल्ह्यांत एका सालांत दोहोंहून अधिक वाघ मारण्याला परवानगी देऊं नये.

( ७ ) गोळी घातली कीं, वाघ वाघीण गणनींत धरावी. प्रत्यक्ष मेलीच पाहिजे असें नाही.

( ८ ) गर्भारशी किंवा लहान लेकरांची आई (वाघीण) मारू नये. पुराव्याचा बोजा शिकाऱ्यावर राहावा.

(९) सरकारच्या परवानगीशिवाय वाघाचीं पिलें धरूं—मारूं नयेत. त्यांचे दुधाचे दांत पडले आहेत कीं नाही—हें आधी पाहावें. पुराव्याचा बोजा शिकाऱ्यावर.

(१०) मोटारींत बसून कोणीहि वाघ मारूं नये. तो भागुबाईपणा होय, मर्दानी खेळ नव्हे. पुराव्याचा बोजा शिकाऱ्यावर.

(११) जंगलांत हांके घालण्यास सरकाराची परवानगी घ्यावी.

(१२) विषारी खाद्य घालून किंवा सांपळे लावून वाघ मारूं किंवा धरूं नयेत.

(१३) मनुष्यें खाण्यास सवकलेल्या वाघाशिवाय इतरांस मारून आणणारास सरकाराने बक्षिसें देऊं नयेत.

(१४) वाघ चालूनच आला तर आत्मसंरक्षणाचे पिनल कोडांतले हक्क मनुष्याने बजावावे.

असें केल्यास शिकारीची क्रीडा संपुष्टांत न येता वाघांची जातहि भूतलावर शिल्लक राहील. ही कैफियत ठीक आहे. पण त्यांत आणखी थोडा खुलासा व्हावा असें आम्हांस वाटतें तो असाः—

१ वर्षातून ठरीव दोन वाघांची वर्गणी देण्याची कांही व्यवस्था वाघ करणार आहेत काय?

२ उलट आपणास अमुक इतके बळी वर्षातून हवे असें सांगून तेवढ्यांची व्यवस्था परस्पर झाल्यास दिवसारात्रीं आम्हीं इतर कोणालाहि उपद्रव देणार नाही असा करार करण्यास वाघ तयार आहेत काय?

३ मोटारींतून शिकार करू नये हें ठीक, पण रानांत झाडावर मचान बांधण्यास कांही हरकत आहे कीं काय याचा खुलासा करावा.

४ गोळी लागतांच आपण हरलों असें म्हणून, शिवलेला गडी जसा खेळांतून बाद होऊन निमूटपणें बाजूला बसतो त्याप्रमाणे, वाघ शिकाऱ्याचे हातीं जिवंत लागण्यास तयार होतील काय? तसे झाल्यास ते परवान्याच्या संख्येंत मोजतां येतील व प्रत्यक्ष मरण वांचेल. अशा रीतीने युद्धांतील कैद्याप्रमाणे शरण आलेल्या वाघांस शिकारखाने व अजबखाने यांत संभाळून फुकट मांस खावयास घातलें जाईल. अशाने प्राणि शास्त्रास मदत होईल.

५ पाडाव करून सोडून दिलेले वाघ अहिंसाव्रत स्वीकारण्यास तयार आहेत काय?

६ मनुष्याने बंदूक टाकून देण्याचें ठरविलें तर वाघहि आपले दांत व नखें काढून टाकण्यास तयार आहेत काय?

७ ज्या त्या गोष्टींत पुराव्याचा बोजा मनुष्यावर टाकलेला दिसतो. पण स्वतः वाघ हे आपणावर कोणत्या बाबतींतला पुराव्याचा बोजा घेण्यास तयार आहेत.

अनायासाने युरोपांत शस्त्रसंन्यास परिषद भरून संहार कमी करण्याचा विचार सुरू आहे. तेव्हा त्याबरोबर या दोन कैफियतींचा विचार होऊन कांही करार ठरतील तर बरें नव्हे काय?

# जगाचा विनाशकाल कसा टळेल ?

दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता —श्रीमद्भगवद्गीता

नाशिक येथे सर्वधर्म-परिषदेचें अधिवेशन गेल्या आठवड्यांत गंभीरपणाने पार पडलें. पुरातन नाशिक क्षेत्र, रम्य गोदातीर व स्वधर्मनिष्ठ श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी या त्रिवर्गांचें साहचर्य परिषदेस लाभल्यामुळे परिषद सर्व दृष्टींनी यशस्वी झाली असल्यास नवल नाही. परिषदेस हिंदु, पार्शी, ख्रिस्ती व मुसलमान या भिन्न भिन्न धर्मांचे प्रतिनिधि हजर राहिले आणि त्यांनी धार्मिक विषयांचा ऊहापोह आस्थापूर्वक केला यांतच परिषदेच्या यशाचें बीज सांपडतें. परिषदेंत मुख्य असा एकच ठराव पास झाला. तेवढ्याचीच अंमलबजावणी करण्यांत आली तरी परिषदेने फार मोठी गोष्ट साधली असें म्हणतां येईल. भिन्न भिन्न धर्मांच्या अनुयायांत सलोखा करावा, तें कार्य सतत चालू ठेवण्याकरिता सर्वधर्मसंघाची स्थापना व्हावी व सर्व धर्मांचीं तत्त्वें एक आहेत असें ज्यांचें मत आहे त्यांना एकत्र आणावें हा या ठरावाचा उद्देश आहे.

आज हिंदुस्थानास अशा ऐक्याची फार गरज आहे. हिंदु व मुसलमान या दोन समाजांत धर्म व व्यवहार या बाबतींत रणें माजून राहिलीं आहेत. वाद्यासारखें क्षुल्लक कारण तें काय! पण त्यावरून दोनहि समाजांत असें हाडवैर पडलें आहे कीं, त्यामुळे उभयतांना सुखानें एकत्र नांदणें अशक्य झालें आहे. राजकारणांतहि तीच स्थिति. हिंदु व मुसलमान हे दोनहि समाज राजकीय दृष्ट्या एकाच नावेंत बसले असताहि दोघांचा एकविचार होत नाही व त्यांजमधील दुहीमुळे वाटसरापुढील क्षितिजाप्रमाणें स्वराज्य हिंदुस्थानापासून दूरदूर पळत आहे. यासाठीं हिंदु काय किंवा मुसलमान काय त्यांचीं धर्मतत्त्वें एकच आहेत असें त्या त्या धर्मांतील वजनदार, वंदनीय व थोर व्यक्तींनी उपदेशाने व आचरणाने आपल्या अनुयायांच्या मनावर बिंबवून दिलें तर वरील अनर्थ टळतील व देशाचें ऐहिक व पारमार्थिक कल्याणहि साधेल.

सर्व-धर्मपरिषदेची कल्पना प्रथम अमेरिकेंत उदय पावली व त्यानंतर तिचा प्रसार सर्वत्र होऊन इंग्लंडमध्ये एक व हिंदुस्थानांत अनेक परिषदा नुकत्याच भरल्या. नाशिकक्षेत्रीं परिषद भरली तिचें श्रेय बहुतांशी श्रीशंकराचार्य डॉ कुर्तकोटी यांसच आहे. शिकागोच्या परिषदेकरिता निमंत्रण आल्यावरून तिकडे जाण्यापूर्वी आपल्या कार्यास लोकमताचा पाठिंबा मिळविण्यासाठी परिषदेचें एक अधिवेशन नाशिक येथे भरविण्याची आवश्यकता त्यांना तीव्रतेनें भासली. परंतु परिषदेच्या अखेरीस त्यांनी उद्गार काढले त्यावरून त्यांचा अमेरिकेस जाण्याचा बेत डळमळीत दिसतो. अमेरिकेंतील शिकागो शहरीं भरावयाच्या परिषदेचें महत्त्व कांही वेगळें आहे. मागील बैठकीच्या वेळीं हिंदुस्थानातर्फे स्वामी विवेकानंद यांनी हजर राहून हिंदुधर्माची थोरवी पाश्चात्य विद्वानांस व धर्मज्ञांस पटवून दिल्यामुळे हिंदुस्थानाचा दर्जा पश्चिमेकडील राष्ट्रांत वाढून हिंदु लोकांस तुच्छ व तिरस्करणीय लेखणाच्यां प्रवृत्तीला आळा बसला आणि त्यांस सहानुभूतीने व कौतुकाने वागविण्यांत येऊं लागलें.

डॉ. कुर्तकोटी यांनी सर्व धर्मांचा तौलनिक अभ्यास केला आहे. हिंदु धर्माचें श्रेष्ठत्व कशांत आहे हें परकीयांच्या मनावर बिनचूक ठसविण्यास लागणारी कुशाग्र बुद्धि त्यांच्या ठिकाणीं असल्याने हिंदुधर्माचे प्रतिनिधि या नात्याने सर्वधर्म-परिषदेस हजर राहण्याची योग्यता त्यांच्याइतकी फारच थोड्या हिंदु व्यक्तींत आढळून येईल. सध्याची शिक्षणपद्धति एकांगी असल्यामुळे तिच्यांतून बाहेर पडणारा मनुष्य फक्त ऐहिक विषयांत तरबेज होतो पण तो धर्मविचाराला व धर्माचरणाला पारखा झालेला असतो. हा दोष एकट्या हिंदुस्थानांतच आढळतो असें नव्हे तर पाश्चात्य राष्ट्रांत हिंदुस्थानापेक्षाहि तो अधिक ठळकपणाने दृष्टीस पडतो. किंबहुना या दोषाचा उगम पश्चिमेकडूनच झाला आहे असेंहि म्हटलें असता चालेल. पाश्चात्य लोक विद्वान आहेत, शोधक आहेत, कल्पक आहेत व धाडसीहि आहेत. पण त्यांच्या या गुणांना अध्यात्मज्ञानाची जोड नसल्यामुळे ते एका कलावर वळत वळत कलंडल्यासारखे झाले आहेत. पूर्वकाळीं सर्व शिक्षण अध्यात्मज्ञानांत घोळून देण्यांत येत असे. त्याचा परिणाम असा घडे कीं, निशिगंधाच्या फुलांत जसा सुगंध भरलेला असातो त्याप्रमाणें प्रत्येक मनुष्याच्या मनाच्या कोंदणांत बसून अध्यात्मज्ञानाचा हिरा आपलें तेज चौफेर फेकीत असे. या ज्ञानांत मनुष्य जितका अधिक मुरलेला तितकी त्याची वर्तणूक अधिक पवित्र, अधिक न्याय्य, अधिक

सरळ व अधिक उदार आढळावयाची. साधु, संत व महंत यांजवर सर्वांची श्रद्धा बसण्याचें कारण हें कीं त्यांजपाशीं आपपर भाव, हेवादावा व आंत-बाहेर कांही नसे. म्हणून देश, धर्म जात, गोत हा भेदभाव लक्षांत न आणतां भूतमात्रांचें ज्यांत कल्याण आहे असेंच बोधामृत ते सर्वांना पाजीत व सर्व लोक त्यांचें शिष्यत्व पत्करीत. अशा प्रकारचे सत्पुरुष त्या काळांत असल्यामुळेच हें जग मनुष्यप्राण्यास राहण्याजोगें वाटत होतें.

परंतु आता विद्येचा प्रसार सर्वत्र कल्पनातीत झाला आहे. पाश्चात्य राष्ट्रें फार सुधारलीं आहेत व त्यांचीं राज्यसूत्रें त्यांजमधील बुद्धिमान, विचारी व विद्वान लोकांच्या तंत्राने हालत आहेत. शास्त्रीय शोध परमावधीला पोंचल असून संशोधक पुरुष विश्वांतील गूढ व अज्ञात शक्ति हस्तगत करण्याच्या उद्योगांत अहर्निश चूर झाले आहेत. परंतु त्या त्यांच्या परिश्रमाने जग पूर्वीपेक्षा अधिक सुखी बनलें आहे असें मात्र म्हणवत नाही. आधुनिक शास्त्रवेत्त्यांना गूढ शक्तींचा तलास लागत असला तरी जगांतील राष्ट्राराष्ट्रांमधील कलह तोडण्याची युक्ति मात्र त्यांना सांपडत नाही. सांप्रत सर्वत्र शांतता प्रस्थापित करण्यासाठी राष्ट्रधुरिणांचे दीर्घोद्योग सुरू आहेत. राष्ट्राराष्ट्रांमधील तंटे मिटविण्याकरिता राष्ट्रसंघ अवतरला आहे. तरीहि त्या राष्ट्रसंघाचा जपान हा प्रमुख घटक संघाची आज्ञा झुगारून देऊन चीन देशास चेंपीत चालला आहे.

ज्यांच्या जोरावर लढाया खेळण्याची खुमखुमी राष्ट्रांत उत्पन्न होते तीं सैन्यें व आरमारें छाटण्याचीं एल्बतें करण्याकरिता शस्त्रसंन्यास परिषद भरते. पण तींत फ्रान्स जर्मनीवर गुरगुरून व जर्मनी फ्रान्सवर दांतओंठ चावून ती उधळून लावतो. सैन्यासैन्यांमधील चुरस, आरमारा—आरमारांमधील चुरस व व्यापारा—व्यापारामधील चुरस विकोपाला जाऊन प्रत्येक राष्ट्राची आर्थिक घडा विस्कटल्यामुळे ता नीट बसविण्याकरिता लंडन शहरीं जगाची आर्थिक परिषद कालपासून भरविण्यांत आली आहे. परंतु पूर्वीच्या आंतरराष्ट्रीय परिषदांप्रमाणेच हीहि परिषद विफल ठरणार असा अंदाज आजच बांधून ठेवण्यास हरकत नाही. कारण ज्या परिषदेंत सगळेच ठक जमून त्यांतील एक ठक दुसऱ्या ठकाच्या टाळूवरून हात फिरवूं पाहणार त्या परिषदेंतून कपटपटुत्वाच्या डावपेंचांशिवाय दुसरें काय निष्पन्न होणार? अशा रीतीने जगाचीं सूत्रें दुर्जनांच्या हातीं गेलीं असता जगाचा विनाशकाल समीप आला असें खुशाल समजावें.

जगाचा कलंडलेला हा व्यवहार सावरून धरण्याकरिता तो फसवेगिरीच्या जादूने भारून टाकण्याऐवजी आध्यात्मिक ज्ञानानेच मंतरला पाहिजे हें उघड आहे. या उपायाची सत्यता पाश्चात्य राष्ट्रांतील कांही थोड्या सत्त्वशील व्यक्तींना पटत चालली असून शिकागो येथे भरणारी सर्व-धर्म-परिषद त्याचीच द्योतक होय. सर्व माणसें हीं ईश्वराचीं लेंकरें आहेत असें नुसतें औपचारिक रीतीने किंवा दांभिकपणाने म्हणून भागणार नाही. तर कुटुंबांतील एक भाऊ दुसऱ्या भावाकरिता स्वार्थत्याग करण्यास तयार होतो, त्याप्रमाणे एका मत्त व बलिष्ठ राष्ट्राने दुसऱ्या दीन व दुबळ्या राष्ट्राकरिता स्वतःच्या लोभावर पाणी सोडण्याची वेळ आता आली आहे. या वर्तनक्रमाने दीन राष्ट्र उद्धरून जाईलच, पण बलिष्ठ राष्ट्रहि त्यामुळेच मृत्युमुखांतून वांचेल. आत्मरक्षणार्थ अमेरिका काय, इंग्लंड काय किंवा फ्रान्स काय, यांनी जर्मनीस खंडणीची सर्वस्वी सूट दिली पाहिजे असें सांगण्यांत येतें याचें इंगित झालें तरी हेंच होय. तथापि आसुरी संपत्तीने धुंद झालेल्या पाश्चात्य राष्ट्रांचे डोळे अंजन घातल्यावांचून उघडावे कसे! हें दिव्यांजन धर्मापासून, अध्यात्मविद्येपासूनच पैदा होईल अशी अमेरिकेंत या विषयाची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिशनाची खात्री झाल्यावरून प्रस्तुत परिषद शिकागो येथे भरविण्यात येत आहे. परिषदेचे उत्पादक बिशप मॅक्डोनेलसारखे विचारी लोक भारतवर्षाकडे अध्यात्माची माता या दृष्टीने पाहत आहेत. तेव्हा सदर परिषदेस श्री. शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांनी हजर राहण्याचा सुयोग जुळून आल्यास परिषदेच्या कार्यास योग्य दिशा दाखविण्याचें श्रेय हिंदुस्थानास मिळाल्यावांचून राहणार नाही असें आम्हांस वाटतें.

# सरकारी कुत्सित टीकेचा मासला

डॉ. रवींद्रनाथ टागोरप्रभृति पांच-पन्नास प्रतिष्ठित वयस्थ हिंदी पुढाऱ्यांनी विलायतेस मुख्य प्रधानांकडे तार पाठवून, राजकीय कैद्यांना बंधमुक्त करण्याची व शांतता प्रस्थापित होण्यास मदत देण्याची विनंति केल्याची बातमी आम्हीं गेल्या अंकीं दिली होती. या तारेला प्रधानमहाशयांकडून अद्यापि कांही उत्तर आलेलें नाही. पण हिंदुस्थानसरकाराची या तारेवरील टीका मात्र एका अँग्लो-इंडियन पत्राच्या द्वारें तीन दिवसांपूर्वी प्रसिद्ध झाली आहे. तिजवरून हिंदुस्थानसरकार विलायतेंतील प्रधानमंडळाला गैरवाका सुनावणी करून सामोपचाराचें धोरण स्वीकारण्याच्या मार्गांत आडवें पडणार असें उघड दिसतें.

या टीकेंत प्रथमच एक वितंडवादाच्या स्वरूपाची कोटी करण्यांत आली आहे. ती अशी कीं, "हिंदी राजकारणी पुढारी बोलतांना अघळपघळ बोलतात कीं, ब्रि. प्रधानमंडळानें हिंदुस्थानसरकारावर हुकमत गाजवूं नये. आणि मग आता काय म्हणून डॉ. टागोरप्रभृतींनी विलायतसरकाराकडे दाद मागावी?" पण ही कोटी निवळ हास्यास्पद आहे. कारण तींत हिंदी राजकीय पुढाऱ्यांच्या धोरणाचा निवळ विपर्यास, व तोहि बुद्धिपुरस्सर केला आहे, हें थोड्याशा विवेचनानें दिसून येईल.

हिंदुस्थानाच्या राज्यकारभारावरून विलायतसरकाराचें नियंत्रण निघून जावें ही मागणी हिंदी पुढारी करीत असतात हें खरेंच आहे. पण त्याचा अर्थ हिंदुस्थानसरकाराला अनियंत्रित अरेराव किंवा सुलतान बनवावा असा खचित व केव्हाहि नाही. हिंदुस्थान सरकारला कोणत्याहि बंधनाविरहित स्वैर सोडावें असें म्हणणारा मूर्खच ठरेल. आणि या म्हणण्यांत गर्भित असलेला भलेपणा हिंदुस्थानसरकारला कोणी कधीहि देण्यास तयार होणार नाही. खरी मागणी आहे ती अशी कीं, हिं. सरकारावर बंधन व नियंत्रण भरपूर हवें. पण तें सातासमुद्रांपलीकडे न राहता घरच्या घरीं म्हणजे हिंदुस्थानांतच राहावयास हवें. आणि तेंहि हिंदी लोकशाहीकडून!

'हिमवति दिव्यौषधयः शीर्षे सर्पः समाविष्टः' या म्हणीप्रमाणे साप डोक्यावर येऊन बसला तर म्हणे "कांही हरकत नाही. हिमालयांत विषपरिहारक वनस्पति भरपूर आहेत." पण त्या घेऊन करावयाच्या काय! त्या येईपर्यंत साप चावलेला मनुष्य दहादा मरावयाचा! आणि साप चावून मग वनस्पतींनी मनुष्य बरा व्हावयाचा त्याच्याऐवजीं, शक्य तर सापाला डोक्यावरून झाडून टाकून ज्याचा त्यालाच तो ठेचून मारतां आला तर बरें नव्हे काय? तात्पर्य, स्टेटसेक्रेटरीच्या हातीं जी सत्ता आज आहे ती त्याजकडून निघून हिंदी जनतेच्या हातीं आली पाहिजे, आणि हिंदुस्थानसरकार त्या जनतेला जबाबदार झालें पाहिजे अशी ती खरी मागणी आहे.

ही गोष्ट पुढे केव्हा घडून येईल तेव्हा येवो, पण आज मुख्य राज्यसत्ता हिंदुस्थानांत नसून विलायतेंत आहे त्याला काय करणार? दादांच्या नांवाने वहिनी जोंपर्यंत कुंकू लावतात तोंपर्यंत धनीपणाचा मान दादांकडे आहे; व वहिनींच्या अपकृत्यावर अपील करावयाचें तर दादांकडेच दाद मागितली पाहिजे. आता वहिनींना दादांकडे प्रवेश व कानमंत्र जितका सुलभ आहे तितका इतरांना तो असणें शक्य नाही. शिवाय वहिनींच्या अब्रूवर पांघरूण घालणें हें दादांच्याहि हिताचें असल्यामुळे तें इतरांपेक्षां वहिनींचेंच ऐकण्याचा संभव सहजच अधिक. यामुळे 'तिकडे' कागाळी केली तरी 'इकडे' भिण्याचें कारण फारसें नसेल. पण ही कागाळी तिकडे करणारांना हंसण्याचें इकडे कारण नाही. शिवाय टागोरप्रभृतींना हंसतांना स्वतःला किरकोळ शिरकोळ बाबतींहि विलायतेचे हुकूम कसे आणावे लागतात याची हिंदुस्थानसरकारानें आठवण करावी!

टागोरप्रभृतींच्या विनंतिपत्रकावर सिमल्यास जी इतर टीका होत आहे तीहि अशाच प्रकारची म्हणजे अगदी वाह्यात आहे. या विनंतिपत्रकावर एकाशिवाय कोणाहि कायदेमंडळाच्या सभासदांच्या सह्या नाहीत असा एक मुद्दा टीकेंत आहे. त्याचें उत्तर हेंच कीं, जे सभासद या पत्रकावर सही करण्यासारखे आहेत त्यांनी कायदेमंडळांत पूर्वीच या प्रश्नावर उघड भाषणें करून मतें दिलीं आहेत. सह्या न करण्यासारखेहि बरेंच आहेत; कारण कायदेमंडळांत राजकीय कैदी व म. गांधी यांना सोडण्याचा प्रश्न निघाला तेव्हा त्यांनी प्रतिकूल मतें दिलीं ही गोष्ट खरी. पण त्याला उत्तर हेंच कीं, राष्ट्रीय सभेनें कायदेमंडळांवर बहिष्कार घालण्याची घोडचूक केल्यामुळे, ओसाड घरांत उंदीर घुशी मोकाट वावरतात त्याप्रमाणे, कायदेमंडळांत आज अनेक नादान अलबतेगलबते शिरले आहेत, व बहुमत करून बसले आहेत. स्वराज्यपक्ष कायदेमंडळांत होता तेव्हा असला आक्षेप आणण्याची आपली

कितपत छाती होती याचा या सरकारी टीकाकारांनी विचार करावा.

म.गांधींच्या सांगण्यावरून काँ.चे हंगामी अध्यक्ष श्री.आणे यांनी चळवळ तूर्त थांबविली.या गोष्टीला हे टीकाकार महत्त्व तर देत नाहीतच; तर उलट असें म्हणतात कीं कायदेभंगाची चळवळ गुप्तपणाने चालते याचा निषेध गांधींनी करणें म्हणजे ती उघडपणेंच करा असें सुचवून ती अधिक खंबीर करणें होय! पण गांधींना जर हेंच करावयाचें असतें तर त्यांनी तुरुंगांतून बाहेर येताच असलें जाहीर पत्रक काढलें नसतें, किंवा चळवळ 'तूर्त' तरी तहकूब केली, ती केली नसती.त्यांना चळवळ अधिक जोराने चालावी किंवा आहे तशी पण पुढेंहि चालावीच असें वाटत असतें, तर तो सल्ला जाहीर पत्रक काढल्याशिवाय इतर अनेक रीतींनी देतां आला नसता काय? पण आपला प्रतिपक्षी बोलतो तें खरें असेल असें वाटावयाचें तर मनुष्य स्वतः खरें बोलणारा असावा लागतो त्याला काय करणार?

# संसारोपयोगी स्त्रीशिक्षण

( ले.—श्री. कृ. ग. जोशी, सेक्रेटरी, महाराष्ट्र गर्ल्स एज्युकेशन सोसायटी, पुणें. )

### हुजूरपागेंतील नवा उपक्रम

पुणें येथील 'महाराष्ट्र गर्ल्स एज्युकेशन सोसायटीनें' चालविलेल्या 'हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स' या संस्थेमध्ये व्यवस्थापक मंडळानें चालू वर्षापासून एक नवीन उपयुक्त उपक्रम करण्याचें योजिलें आहे. या उपक्रमाची रूपरेखा जनतेपुढे ठेवीत आहें.

हुजुर पागेंतील 'हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स' या संस्थेची स्थापना सन १८८४ मध्ये झाली. तेव्हापासून तिच्या इतिहासाकडे दृष्टि टाकल्यास ती प्रगतीचा मार्ग आक्रमित आहे असें दिसून येईल. सन १८८४ सालीं पटावर असणाऱ्या चाळीस विद्यार्थिनींच्या जागीं आज१९३३मध्ये सहाशेंसतरा विद्यार्थिनी आहेत. या सालीं मॅट्रिक्युलेशन परिक्षेस ३४विद्यार्थिनी पाठविल्या होत्या,त्यांपैकी ३२उत्तीर्ण झाल्या. एकंदर परीक्षेचा निकाल शेंकडा ४२ असतांना या शाळेंतील विद्यार्थिनींचे शेंकडा प्रमाण ९४ पडलें आहे. यावरून या शाळेंतील विद्यार्थिनींच्या शिक्षणाची कल्पना सहज होण्यासारखी आहे.येथे शिक्षण पुरें करून गेलेल्या विद्यार्थिनींची संख्या हजारावर गेली आहे. या माजी विद्यार्थिनींपैकीं बऱ्याच जणी आपापल्या अंगीकृत कार्यात यशस्वी रीतीनें काम करून दाखवीत आहेत. कित्येक जणी कॉलेजांत प्रोफेसरचें काम करीत आहेत. कांहीं वैद्यकीय शास्त्रांत नैपुण्य मिळवून उत्तम रीतीनें वैद्यकी करीत आहेत. अशा रीतीनें बहुविध समाजोपयोगी कार्यास पुष्कळांनी वाहून घेतलें आहे.

ही संस्था आरंभापासून सरकारी म्हणून चालावयाची होती. परंतु ती ता. १ ऑक्टोबर १९३१ पर्यंत निमसरकारी म्हणून चालविण्यांत येत असे. शाळेंतील शिक्षकांच्या पगाराचा भार सरकारवर असे व इतर सर्व खर्च महाराष्ट्र गर्ल्स एज्युकेशन सोसायटी सोशीत असे. परंतु पैशाच्या अडचणीमुळे सरकाराकडून सोसायटीस सरासरी ४५००० रुपयाऐवजीं हल्ली फक्त ३०००० रुपये वटग्रँट म्हणून मिळत आहे. यामुळें सोसायटीवर बराच खर्चाचा बोजा पडला आहे. शाळेत शिक्षणशास्त्राचा चांगल्या रीतीनें अभ्यास केलेले कायम व उत्साही शिक्षक मिळविण्यासाठी म्हणून सोसायटीने शिक्षकांचे पगारांत वाढ, रजा, प्रॉव्हिडंट फंड यासंबंधी योजना केली आहे.

शाळेचा ताबा पूर्णपणें सोसायटीकडे आल्यापासून सोसायटीने परीक्षांचें दडपण कमी करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याप्रमाणेंच विद्यार्थिनींना वर्गात मिळणारें शिक्षण त्यांच्या परिस्थितीला साजेसें करण्याचा प्रयत्न चालू आहे. शिवण, ड्रॉइंग व गायन या कलाकडे ज्या विद्यार्थिनींचा कल आहे त्यांच्या सोयीसाठी त्यासंबंधाने विशेष शिक्षण देण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. आता यापुढे मजल मारण्याची योजना सोसायटीने तयार केली आहे. हायस्कूलचें शिक्षण पूर्ण झालेल्या विद्यार्थिनींकरितां नवीन शिक्षणाची व्यवस्था करण्याची पूर्ण तयारी नुकतीच करण्यांत आली आहे. ह्या नवीन योजनेप्रमाणे हिंदी जीवनाला कौटुंबिक व सामाजिक दृष्टीने पोषक असें शिक्षण देण्यांत येणार आहे. या अभ्यासक्रमांत संस्कृतिक्षम शिक्षण, गृहजीवन शास्त्र व इतर आनुषंगिक शास्त्रें यांची सांगड घालण्याचा प्रयत्न करण्यांत येणार आहे. पुस्तकी ज्ञानाला योग्य ती जोड मिळून विद्यार्थिनींना प्रत्यक्ष व्यवहारोपयोगी शिक्षण मिळावें, हा या योजनेचा विशेष आहे.

अभ्यासक्रमाची साधारण रूपरेखा खालील प्रमाणें आहे.

१ गृहजीवन शास्त्र.

अ. शरीरशास्त्राचीं मूलतत्त्वें

आ. आरोग्याचीं मूलतत्त्वें.

इ. जमाखर्च, पाकशास्त्र, नमुनेदार गृहाची व्यवस्था.

ई. कपडे धुणें व त्यासंबंधीं विशेष माहिती.

उ. शिवण.

ऊ. रुग्णपरिचर्या व बालसंगोपन.

ऋ. प्राथमिक उपचार.

ॠ. शिक्षणशास्त्र व समाजशास्त्र यांचीं मूलतत्त्वें.

२ निवडक इंग्रजी व मराठी ग्रंथांचा अभ्यास (त्यांतील प्रतिपाद्य विषयांचें स्पष्टीकरण व तत्संबंधीं चर्चा)

३ कला व हुन्नर, खालील तीन विषयांपैकीं कोणताहि एक विषय—गायन, चित्रकला, भरतकाम वगैरे.

माजी विद्यार्थिनी—मंडळ व वुइमेन्स कौन्सिल (पुण्याची शाखा) यांना ही योजना पूर्णपणें पसंत आहे. या वर्गाला भरपूर विद्यार्थिनी मिळतील असें आश्वासन त्या संस्थांकडून मिळालेलें आहे. ही योजना अमलांत आणण्यास कमींत कमी ५००० रुपये वार्षिक खर्च येईल. ही मूर्त स्वरूपांत येण्याला जरूर ती आर्थिक व्यवस्था झाली पाहिजे. सोसायटीच्या सध्याच्या परिस्थितींत (वर नमूद केल्याप्रमाणें बराच अधिक आर्थिक भार सोसायटी सहन करीत असतांना) चालू उत्पन्नांतून ह्या जादा वार्षिक खर्चाची तरतूद करणें शक्य नाही. तेव्हा कार्याची उपयुक्तता लक्षांत आणून शाळेच्या माजी व विद्यमान विद्यार्थिनी, शिक्षणप्रेमी गृहस्थ व सर्वसाधारण जनता शाळेची आजपर्यंतची उपयुक्त कामगिरी लक्षांत घेऊन उदारपणाने सक्रिय सहानुभूति दाखवितील व सदर योजनेस विलंब न लावतां मूर्त स्वरूप देण्यास मदत करतील अशी उमेद आहे. जरूर तें द्रव्यसाहाय्य मिळाल्यास ही योजना तारीख १५ जुलै १९३३ पासून अमलांत आणण्यांत येईल. तरी ह्या कार्यास आपणांस काय काय करतां येईल त्याबद्दल सर्व शिक्षणप्रेमी गृहस्थांनी व स्त्रियांनी 'लेडी सुपरिंटेंडेंट हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स, हुजूरपागा पुणें' यास कळवावें अशी विनंति आहे. त्याचप्रमाणे ज्या विद्यार्थिनीस या योजनेप्रमाणें शिक्षण संपादन करण्याची इच्छा असेल त्यांनीहि लेडी सुपरिंटेंडेंट यांजकडे ताबडतोब अर्ज पाठवावेत.

# ना. शास्त्री यांची साम्राज्यनिष्ठा

गेल्या मंगळवारीं पुणें येथे, सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीच्या जागेंत, तिच्या वार्षिक समारंभाच्या निमित्तानें, शेंकडो पाहुण्यांना उपाहाराकरिता निमंत्रण करण्यांत आलें होतें. त्यांच्यापुढे ने. ना. श्रीनिवास शास्त्री यांनी विस्तृत असें एक भाषण केलें. ना. शास्त्री यांची शरीरप्रकृति दुर्दैवाने हल्ली बरीच क्षीण झालेली आहे; व जणू काय साधर्म्यानें तिला शोभेल अशीच त्यांची मनःप्रकृतिहि सकारण निराशाजनक झालेली आहे. शास्त्री हे अशा मुत्सद्दी वर्गापैकीं आहेत कीं, ज्यांना हिंदुस्थानाच्या भावी स्वातंत्र्याची कल्पना अद्यापि बुद्धिगोचर होत नाही; व वसाहतींचें स्वराज्य ऊर्फ डोमीनियन स्टेटस याच्या प्राप्तीच्या मर्यादित कल्पनेने त्यांच्या ध्येयवादित्वाची परिसमाप्ति होऊं शकते. पण दुर्दैवाने ब्रिटिश सरकार असें निगरगट्ट आहे कीं, त्यांच्याजवळ अमर्याद मागणारा व समर्याद मागणारा यांच्यामध्ये तात्त्विक दृष्ट्या फारसा फरक नाही.

व्यवहारांत इंग्रज मुत्सद्दी असं दाखवतील कीं, नेमस्त लोक हे जहालापेक्षा आपणाला अधिक जवळ आहेत व प्रिय आहेत. पण वेळ आली असतां या मर्यादित ध्येयाच्या लोकांनाहि ते जाणवितात व पटवितात कीं, व्यवहारांत तुम्हांला आम्ही जवळ करतों व प्रेमाने वागवितों त्यालाहि पण मर्यादा आहे. सरकारला एक दुसऱ्याहून अधिक जवळ व अधिक प्रिय असला तर, ती गोष्ट किंवा भावना प्रकट करण्याच्या कांही ठराविक खुणा सरकाराजवळ आहेत; व त्यांचा उपयोग तें सर्रास करतें.-उदाहरणार्थ, वर्तमानपत्रांना सरकारी जाहिराती देणें, कौन्सिलें कमिशनें यांजवर सभासद म्हणून नेमणुका करणें, किंवा ना. शास्त्री यांची नेमणूक आफ्रिकेंत हायकमिशनर म्हणून केली त्याप्रमाणे एखादी विशेष अधिकाराची जागा देणें. परंतु "आपल्या नेमस्त स्नेह्यानीं किंवा टीकाकारांनी जरा किंचित् स्वातंत्र्यबुद्धि प्रकट केली कीं, त्यांच्या नांवावर पेन्सिलीने काट घालण्याला आपण तयार आहों, व आपण कोणाचे ऋणानुबंध ओळखणारे असलों तरी आपणालाहि खारट तुरट कळतें" असें भासविण्याची सरकार दक्षता ठेवतें.

सरकार व नेमस्त पक्ष यांच्यांतील गेल्या पांच वर्षांतील संबंध लक्षांत घेतले असता, आम्हीं वर जें म्हटलें आहे त्याची थोडीबहुत तरी प्रचिती आल्याशिवाय राहत नाही. नेमस्त पक्ष हा अद्यापि तरी उघड साम्राज्यवादी आहे.

साम्राज्याने हिंदुस्थानावर कायमचें खोगीर ठेवावें, किंवा त्याच्या मानेवर आपलें जूं कायमचें रोवावें, ही गोष्ट नेमस्त वर्गालाहि अप्रिय व बोचणारी असली तरी, साम्राज्यांत हिंदुस्थानाला वसाहतीबरोबरचा दर्जा मिळाल्याने तूर्त तरी त्यांचें समाधान होणारें आहे. इंग्लंडाने या देशावर केलेल्या जन्या व चालू अन्यायाकरिता शिक्षा म्हणून ब्रिटिश साम्राज्याचें तळपट व्हावें अशी इच्छा ते तरी कधी करीत नाहीत. आणि ही साम्राज्यनिष्ठा सयुक्तिक दिसावी म्हणून, अत्यंत गहन तत्त्वापासून तों राजकारणाच्या व्यवहारांतील किरकोळ गोष्टींपर्यंत, जें जें कांही इंग्रजांना अनुकूल असेल तें तें प्रकट करून व खुलवूनहि दाखविण्याची कसोशी नेमस्त मुत्सद्दी आपणाकडून करतात. तीच गोष्ट मंगळवारीं निमंत्रितांच्या सभेपुढे ना. शास्त्री यांनी पुनः एकवार केली.

तत्त्वाच्या दृष्टीने ते असें म्हणाले कीं, " पूर्वीचे पुढारी रानडे, मेथा, गोखले यांची जी निष्ठा होती तीच आजहि माझी आहे. म्हणजे ब्रिटिश साम्राज्याचा व हिंदुस्थानाचा संबंध जोडला जाणें हा ईश्वराच्या सत्संकल्पांपैकीं एक संकल्प होता, म्हणूनच तो सिद्धीस गेला व हिंदुस्थानाला तो फायदेशीर झाला." राजकारणी व्यवहारांतील एक किरकोळ पण महत्त्वाची गोष्ट म्हणून त्यांनी सांगितली कीं, "इंग्लंडांत आज जरी लोकशाहीचें वारें खेळत आहे तरी त्या देशांत प्रतिपक्षी हे परस्पर शत्रु असे मानले जात नाहीत. आणि आज युरोपमध्ये किंवा दक्षिण-अमेरिकेंत घडतें त्याप्रमाणे, एक पक्ष राज्याधिकारावरून दूर होऊन त्याच्या जागीं कोणी दुसरा आला म्हणजे, तो अन्यायबुद्धि व निर्दयपणा यांची परमावधि करून पहिल्या पक्षावर सूड उगवितो त्याप्रमाणे इंग्लंडांत होत नाही. म्हणून हिंदुस्थानांत तसें होऊं नये याविषयी शिक्षण मिळण्याकरिता का होईना, ब्रिटिश साम्राज्याचा संबंध हिंदुस्थानाशीं राहणें इष्ट आहे."

आमच्या मतें ना. शास्त्री यांनी या दोनहि बाबतींत युक्तिवादाची तार [illegible] अधिक खेंचली आहे. हिंदुस्थान परकी राज्याच्या टाचेखाली जाणें हा एक ईश्वरी सत्संकल्प असे मानण्याचे दिवस जुन्या काळीं असले तरी आता ते राहिले नाहीत. त्या भावनेला जुन्या लोकांना जीं कारणें होतीं तीं अलीकडे ब्रिटिश मुत्सद्यांनी आपल्या हाताने नष्ट करून, ती जुनी निष्ठा ढांसळण्यास स्वतः आपणच मदत केली आहे. शिवाय कोणताहि अर्थवाद हा निष्ठेचा विषय होऊंच शकत नाही ! आणि हिंदुस्थान व इंग्लंड यांचा संबंध हा ईश्वराच्या भलेपणाचा व न्यायीपणाचा पुरावा मानणें याला तत्त्वमीमांसेच्या दृष्टीने अर्थवादापेक्षा अधिक किंमत कोणीहि देणार नाही.

तसेच खुद्द युरोपांत, म्हणजे पाश्चात्य देशांत, राजकीय प्रतिपक्षी परस्परांना दुष्टपणाने व अन्यायाने वागवितात हें स्वतः शास्त्री यांनीच दाखवून दिल्यानंतर हिंदुस्थान देश हा 'पौर्वात्य' म्हणून त्यांत तसें होण्याचा अधिक संभव या म्हणण्यांतहि फारसें स्वारस्य उरत नाही. इंग्लंडांत ही गोष्ट होत नाही याचे कारण तेथील लोक अधिक धर्मभीरू किंवा न्यायनिष्ठ असें म्हणण्यापेक्षा, इंग्लंडांत लोकशाही ही अजून कुजण्याइतकी पिकलीच नाही असेंहि म्हणतां येईल. एकतंत्री अंमल ही लोकतंत्री अमलाविरुद्ध प्रतिक्रिया असते. पण हिंदुस्थानांत अद्यापि खऱ्या लोकतंत्री अमलाला प्रारंभच नाही. म्हणून प्रतिपक्षांच्या दुष्ट लीलांना अवसर मिळण्याला अजून किती तरी काळ लागेल. तात्पर्य, या विशिष्ट मानसिक रोगावर साम्राज्य हें औषध होण्याइतका तो रोग इकडे अजून बळावलेला नाही. आणि खरोखर तो बळावण्याची वेळ येईल तेव्हा, साम्राज्याचा संबंध हें औषध त्यावर फारसें उपयोगीहि पडणार नाही. शिवाय तोंपर्यंत आजचे चर्चिल, बाल्डविन, लॉइड जॉर्ज, मॅक्डोनाल्ड व मॅक्सटन यांच्यापुढल्या पिढ्या किती उग्र व रानटी होतील किंवा न होतील हे तरी कोणीं सांगावें !

साम्राज्यनिष्ठा योग्य ठरविण्याचा शास्त्री यांचा युक्तिवाद जरी समर्पक नसला, तरी त्यांच्या त्या निष्ठेविषयीं मात्र प्रश्न नाही. तथापि क्षीण प्रकृतीच्या स्थितींत एका श्वासाने त्यांनी ही निष्ठा बोलून दाखविली तरी, दुसऱ्या श्वासाने त्यांना साम्राज्याकडून हिंदुस्थानाला न्याय मिळण्याची निराशा बोलून दाखवावी लागलीच ! या दोनहि गोष्टी एकत्र केल्या असतां फारच बोधप्रद ठरतात. इंग्लंडांत सप्रू व जयकर यांच्या तोंडून जे निराशेचे उद्गार निघत आहेत, त्यांचा बरोबर प्रतिध्वनि हिंदुस्थानांत ना. शास्त्री यांच्या तोंडून स्वतंत्रपणें निघावा हा योगायोग खरा! आणि साम्राज्यसंबंधाविषयीं ईश्वरी सत्संकल्प मानणारे जसे कांही लोक हिंदुस्थानांत आहेत, त्याप्रमाणे हिंदी नेमस्तांची निराशा हादेखील साम्राज्यनाशाविषयीं एक ईश्वरी सत्संकल्प मानणारे कांही लोक इंग्लंडांत असतील काय, असें विचारण्याचें कुतूहल मनाला वाटतें !

# डॉ. मुंजांनी कोणाचा घात केला?

हिंदुमहासभेचे अध्यक्ष डॉ. मुंजे गेल्या सोमवारीं विलायतेस जाण्याकरिता बोटींत बसले. ते पहिल्या दोन गोलमेज परिषदांत हिंदुमहासभेचे प्रतिनिधी या नात्याने हजर होते. परिषदेच्या तिसऱ्या बैठकींत त्यांना नाट लागला व तो पार्लमेंटांत जोड कमिटींतहि टिकला. पण मुंजे हे कर्मवीर आहेत. कर्म करीत राहण्यावर त्यांचा पूर्ण विश्वास आहे. पार्लमेंटाच्या जोड कमिटींत आपणास सरकारानें घेतलें नाहीं म्हणून ते गप्प बसले नाहींत. पांढरा खलिता बाहेर पडल्यावर हिंदी लोकांना निराशेनें झपाटलें, व नेमस्त पक्षांतूनहि कमिटीवर बहिष्कार घालून तिजपुढे साक्षीस न जाण्याचे उद्गार निघूं लागले. पण मुंजांचा निश्चय ढळला नाहीं. त्यांनी हिंदू महासभेचें शिष्टमंडळ विलायतेस साक्षीकरिता पाठविण्याचें ठरविलें, व त्याकरिता जरूर तें द्रव्यसहाय्य मिळवून आपल्या कंपूनिशीं बोटींत बसून ते निघालेहि. डॉ. मुंजे यांच्या या कार्यनिष्ठेचें कौतुकच करावयास पाहिजे. पण इतका मनाचा उदारपणा किंवा सहृदयता ज्यांच्या ठिकाणीं नसेल त्यांना निदान गप्प राहण्यास काय हरकत होती? तथापि, कांहीं लब्धप्रतिष्ठित असे असतात कीं, त्यांना आपल्या देशभक्तीचा टेंभा वेळीं अवेळीं मिरवून इतरांना हिणवावेसें वाटतें.

मुंबईचे सर चिमणलाल सेटलवाड हे बुरसलेले जुने मवाळ याच वर्गांतील होत. त्यांना हल्लीं त्यांच्या पक्षांतील लोकहि फारसे मानीत नाहींत. डॉ. मुंजे जोडकमिटीपुढे हिंदंतर्फे साक्ष देऊन स्वराज्याचें हातांशीं आलेलें गांठोडें बुडवतील अशी काळजी त्यांना पडली. पण सेटलवाड यांनी असें घाबरून जाण्यापूर्वी मुंजे यांचें चरित्र नीट समजून घ्यावयास पाहिजे होतें. मुंजे यांनी देशभक्तीच्या नादीं लागून डॉक्टरीच्या किफायतशीर धंद्यावर प्रथम पाणी सोडलें, व नंतर त्याच देशभक्तीसाठी त्यांनी हिंदू सभेची फकिरी पत्करली. सारांश डॉ. मुंजे हे देशभक्ती जागृत ठेवून धर्मभक्त बनले असल्यानें, ते आपल्या हातानें देशाचें नुकसान कसें करतील? उलट सर सेटलवाड यांनी असहकारितेच्या दिवसांत सरकारी पगारी नोकरी केली; गांधींना तुरुंगांत घालण्यास संमति दिली; व अजून त्यांचा पैसा मिळविण्याचा धंदा सुटत नाहीं. सर सेटलवाड यांनी डॉ. मुंजे यांजवर आग पाखडण्यास प्रवृत्त होण्यापूर्वी थोडी सबूर केली असती तर आज अविचारामुळे जगांत त्यांचें जें हसें झालें तें होतें ना.

हिंदुमहासभा जोड कमिटीपुढे जी कैफीयत देणार आहे, ती जो वाचील त्याला आमच्या वरील विधानाची सत्यता पटल्याशिवाय राहणार नाहीं. इंग्लंडचे मुख्य प्रधान राम्से मॅक्डोनाल्ड यांनी जातवारीचें निकालपत्र लिहिलें त्यानें हिंदूंचें फार नुकसान झालें असल्याचें डॉ. मुंजे यांनी हिंदुमहासभेच्या कैफियतींत प्रारंभींच स्पष्टपणें नमूद केलें आहे. तथापि तो निर्णय कायमच राहावयाचा असला तरी त्यांत ज्या इतर सुधारणा होण्यास जागा आहे त्या तरी करा असा हिंदुमहासभेचा जोड कमिटीस आग्रह आहे.

सिंध प्रांतांत हिंदु लोक अल्पसंख्य असून त्यांच्यावर बहुसंख्य मुसलमानांचा अंमल चालू होईल त्या वेळीं हिंदूंवर मुसलमानांकडून अन्याय होण्याचा संभव आहे. त्याजवर करांचा अधिक बोजा बसेल, त्यांना योग्य प्रमाणांत नोकऱ्या मिळणार नाहींत, त्यांच्या मुलांना शिक्षणसंस्थांत मज्जाव होईल, त्यांजविरुद्ध अन्यायमूलक कायदे करण्यांत येतील, व मिळकत संपादन करण्यास आडकाठ्या आणल्या जातील. हे सर्व अनर्थ चुकविण्यासाठी सिंध प्रांत वेगळा झाल्यानंतर पांच वर्षांनी तेथील कारभाराची तपासणी वरिष्ठ सरकारानें करावी व सदर कारभार वरील दृष्टीनें बिघडला असल्याचें ठरल्यास तो प्रांत मुंबई इलाख्यास फिरून जोडण्यांत यावा' अशी हिंदुमहासभेची शिफारस आहे.

त्याचप्रमाणे हिंदु हे अल्पसंख्य असल्यामुळे त्यांना विभक्त मतदारसंघापेक्षा संयुक्तमतदारसंघच श्रेयस्कर असें, त्यांचें मत झाल्यास ती सुधारणा अमलांत यावी, व संयुक्त मतदार संघांत हिंदूंना त्यांच्या संख्येच्या मानानें ज्या जागा मिळतील त्या मिळून शिवाय इतर जागांकरिताहि मुसलमानांबरोबर निवडणुकीस उभे राहण्याचा अधिकार त्यांस असावा असेंहि सभेनें सुचविलें आहे. अर्थात् ही सवलत अल्पसंख्य हिंदूंना मिळाली तर इतर प्रांतांतील अल्पसंख्य मुसलमानांनाहि ती मिळावी हें हिंदुमहासभेला मान्य आहेच.

हिंदु महासभेच्या कैफीयतीस वायव्य प्रांतांतील हिंदूंनी आपली पुरवणी जोडली आहे. वायव्य प्रांतांत हिंदु व शीख अवघे पावणेदोन लाख असून मुसलमान बावीस लाख आहेत. त्यांत पठाणच पुष्कळ आहेत. हिंदुस्थानाचा दरवाजा वायव्य प्रांत

हा असल्यामुळे त्या प्रांताच्या हातांतच हिंदुस्थानाची किल्ली स्वाभाविकच जाते. ती किल्ली हिंदूंच्या स्वाधीन असणें इष्ट कीं पठाणांच्या ताब्यांत गेली तरी चालेल हा महत्त्वाचा प्रश्न होय. पठाणांचा ओढा अफगाणिस्थानाकडे आहे व हिंदूंचा ओढा हिंदुस्थानाकडे आहे.या दृष्टीने हिंदूंना वायव्य प्रांतांत बरीचशी हुकमत असली पाहिजे हें कोणासहि कबूल करावें लागेल. म्हणून हिंदूंचें म्हणणें असें कीं वायव्य प्रांताच्या भावी मंत्रिमंडळांत एक हिंदु मंत्री अवश्य घ्यावा. खेरीज हिंदु व शीख लोकसंख्येने थोडे असले तरी त्यांची मालमत्ता व व्यापार बहुमोल आहे. यासाठी त्यांच्या हितसंबंधांचें संरक्षण नीट होतें कीं नाही हें पाहण्याकरिता एक अधिकारी ताबडतोब नेमण्यांत यावा व तो प्रांताच्या गव्हर्नरास जबाबदार असावा अशीहि वायव्य प्रांतांतील हिंदूंची मागणी आहे. प्रांतपरत्वें समाजस्थिति कशी बदलते व तिच्या बदलाबरोबर राज्यकारभाराच्या व्यवस्थेंतहि कसा फरक करावा लागतो याचें हें एक गमकच होय.

डॉ. मुंजे यांना हिंदी सैन्य खरें हिंदी व्हावयास पाहिजे असल्याचे सर्वांना माहीतच आहे. हिंदु महासभेच्या कैफीयतींत या व इतर बाबतींत महत्त्वाच्या सुधारणा सुचविण्यांत आल्या आहेत. 'हिंदुस्थानावरील संरक्षक बंधनें दहा वर्षांपुरतींच असावीं. त्या मुदतीच्या अखेर निःपक्षपाती पंच नेमून त्यांजमार्फत दिलेल्या हक्कांचा हिंदी लोकांनी योग्य उपयोग केल्याचें दिसून आल्यावर त्यांजवरील बंधनें काढून घेण्यांत यावीं. सगळ्या सैन्याचें तीस वर्षांत हिंदीकरण व्हावें व तें तितक्या मुदतींत सिद्धीस जाण्याकरिता सैन्यांत दरसाल फक्त साठच हिंदी अधिकाऱ्यांची भरती न करता मिळतील तितके हिंदी अधिकारीच नेमावे; पण ते अपुरे पडल्यास त्यांच्या भरतीला लागतील तितकेच अधिकारी इंग्लंडांतून आणावे. डॉ. मुंजे यांची कैफियत या प्रकारची असून ती दिल्याने मुंजांनी देशाचा कोणता घात केला तो सेटलवाड यांनी सांगावा, असें आमचें त्यांना आव्हान आहे.

# स्फुट सूचना

१ मसूर येथील ब्रह्मचर्याश्रम त्याचे संस्थापक श्री. विनायक महाराज यांस शनिवार १० जून रोजीं परत मिळाल्याची आनंददायक बातमी गेल्या अंकीं प्रसिद्ध झालीच आहे. मसूरचा ब्रह्मचर्याश्रम ही संस्था महाराष्ट्राला भूषणभूत वाटत असून तिच्या संवर्धनास महाराष्ट्रांतील लहानथोर सर्व व्यक्तींचा हातभार लागला आहे. खेरीज संस्थेचे उत्पादक व कार्यकर्ते यांचें धगधगीत वैराग्य, धर्मजागृतीचा उद्योग व स्वदेशबांधवांच्या उद्धाराची अनेक अंगांनी दृष्टोत्पत्तीस आलेली कळकळ या गुणांनी सदर संस्था महाराष्ट्रीयांस जीव कीं प्राण होऊन राहिली असल्यामुळे वटहुकुमांचा घाला घालून मसूरचा ब्रह्मचर्याश्रम सरकारानें जप्त केला ही भयंकर बातमी समजताच सर्वत्र संताप व उद्वेग उत्पन्न झाला. त्यानंतर आश्रमाची व आश्रमवासीयांची होऊं नये ती विटंबना करण्यांत आली. अखेर आश्रमाच्या लिलावापर्यंतहि मजल पोंचली. तेव्हा साहजिकच आश्रम ही संस्था सर्वस्वी बुडून नामशेष होणार अशी खात्री पटत चालल्यामुळे आश्रमाचे संस्थापक व कार्यकर्ते यांच्या मनांत निराशेने किती आकांत उडविला असेल याची कल्पनाच केलेली बरी. अर्थात् त्यांनी व महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनी आश्रम वांचविण्याची आपल्याकडून शर्थ केली.

---

२ या खटपटीला इतक्या उशीराने यश येण्याचें कारण असें कीं, सरकारानें आश्रमासंबंधानें आपल्या डोक्यांत भलतेंच वेड घेतलें होतें. पूर्वी रामदासांनी ज्याप्रमाणे तरुणांना जागृत करून त्यांजकडून मुसलमानी सत्ता उलथून पाडली तसलाच प्रयत्न मसूरचा आश्रम व त्याचे संस्थापक विनायकमहाराज यांचा असेल तर आम्हीं आश्रम कां जिवंत ठेवावा असा सरकारचा म्हणे युक्तिवाद होता. परंतु रा. ब. काळेप्रभृतींच्या खटपटीनें सरकारच्या डोक्यांतलें हें वेड गेलें. आश्रमास भेटून त्याची पाहणी करण्याकरिता सरदार अण्णासाहेब मुतालिक, रा. ब. काळे, कऱ्हाडचे रा. फणसळकर व रा. जोगळेकर वकील यांचें एक मंडळ नेमण्याचें ठरलें व तें सरकारानें मान्य करून आश्रमावरील जप्ती उठविली हें पाहून प्रत्येकास समाधान वाटेल यांत शंका नाही. आश्रमास पूर्वीचीं सर्व कामें हातीं घेण्याचें पूर्ण स्वातंत्र्य मिळालें

याबद्दल महाराजांचें व त्यांच्या सहकाऱ्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. पुढील काळांत आश्रम आपल्या कार्यास सुरुवात करील त्या वेळीं जनतेकडून त्यांस पूर्ववत् साहाय्य मिळेल असा आम्हांस भरंवसा आहे.

---

३ हिंदुस्थानांतील राजकीय पक्षोपपक्षांत एक असा पक्ष आहे कीं, त्याच्या ध्येयवादाची परिसीमा पूर्ण स्वातंत्र्यापर्यंत पोचली आहे. बाबू सुभाषचंद्र बोस हे या पक्षाचे एक पुढारी असल्यामुळे या ध्येयाचे पडसाद त्यांच्या अध्यक्षतेखाली म्हणून लंडन येथे भरलेल्या परिषदेंत निघाले असल्यास नवल नाहीं. त्यांचें त्या परिषदेत जें भाषण वाचलें गेलें त्यांत त्यांनी पूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार केला. कारण, त्यांच्या मतें हिंदुस्थान व इंग्लंड यांमध्ये हिताहिताचा तीव्र विरोध असल्याने त्यांच्यामध्ये समेट होणेंच शक्य नाहीं. पण हें स्वातंत्र्य हस्तगत कसें करावयाचें असा प्रश्न साहजिकच उभा राहतो. सुभाष बाबूंचें म्हणणें कीं, शास्त्रीय पद्धतीने आखलेली, परिणामकारक, बुद्धिप्रधान, अधिक व्यापक व भरीव अशी नवी चळवळ सुरू करून स्वातंत्र्य मिळविलें पाहिजे! त्यांना अर्थात् जुने पुढारी व जुन्या चळवळी पसंत नसल्याने त्यांनी त्या सर्वांवर सपाटून टीका केली- "१९३१चा दिल्लीचा करार ही घोडचूक हाती, तर १९३३ सालीं म. गांधींनी कायदेभंग दीड महिना बंद केला ही राष्ट्रावर आलेली भयंकर आपत्तिच होय! कारण त्या योगाने गेल्या तेरा वर्षांत राष्ट्राने जो स्वार्थत्याग केला, व जे हालकष्ट सोसले ते सर्व फुकट गेले!" पांढऱ्या खालित्यांत सुचविलेल्या सुधारणांचा त्यांनी निषेध केला, व "संस्थानिकांना घेऊन तयार केलेली संयुक्त योजना घातक आहे" असें त्यांनी आपलें मत नमूद केलें. ब्रिटिश राज्याच्या ऐवजीं पूर्ण लोकसत्ताक पद्धतीचें स्वराज्य स्थापन करण्याकरिता क्रांतीची जरूरी आहे, अशा अर्थाचा या परिषदेंत ठरावहि झाला! 'साम्यवादी' संघ निर्माण करण्याकरिता एक कमिटीहि नेमण्यांत आली. त्यांत मि. सकलातवाला, मि. मॅक्स्टन वगैरे मंडळी आहेत. विलायतेंत वाक्स्वातंत्र्य किती आहे याची उत्तम कल्पना वरील हकीगतीवरून येते, व त्याबरोबर हिंदुस्थानांतील दडपशाहीच्या कोंदट वातावरणाची तुलना मनांत आल्याशिवाय राहात नाहीं.

---

४ लंडनमधील आर्थिक परिषदेला हिंदुस्थान सरकाराने हिंदुस्थानातर्फे प्रतिनिधि पाठविले, पण या प्रतिनिधींचीं नांवें पाहिलीं म्हणजे हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि का विलायत-सरकारचे प्रतिनिधि अशी शंका येते. सर पदमजी जिनवाला यांच्याखेरीज त्यांत हिंदी तज्ज्ञांचा समावेश केला गेला नाहीं जवळ जवळ सर्व प्रतिनिधि युरोपियन आहेत व या प्रतिनिधिमंडळाचे पुढारी तर सर सॅम्युएल होअर हेच आहेत! असलें प्रतिनिधिमंडळ पाठविणें ही हिंदुस्थानाची थट्टा होय. या मंडळाला सल्ला देण्याकरिता सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, श्री. रंगास्वामी अय्यंगार व सर फेरोझ सेठना यांची नेमणूक करण्यांत आली होती. परंतु सर पुरुषोत्तमदास यांना हा हिंदी राष्ट्राचा झालेला उघड उघड अपमान सहन झाला नाहीं. हिंदुस्थानाचे प्रतिनिधि म्हणून सर सॅम्युअल होअर यांनी जागतिक परिषदेंत जाणें हें हिंदुस्थानाच्या नालायकीचा जगभर डंका वाजविण्यासारखें असल्याने केवळ सल्लागार म्हणून जाण्याने या नेमणुकीवर आपल्या पसंतीचा शिक्का मारल्यासारखा होतो अशा विचाराने सर पुरुषोत्तमदास यांनी आपल्या सल्लागाराच्या जागेचा राजीनामा दिला! श्री. रंगास्वामी अय्यंगार यांनी सल्लागार म्हणून काम करण्याचें त्याच कारणासाठी नाकारलें! तिसरे सल्लागार सर फिरोज हे काय करतात पाहावें. ओटावा परिषदेंत ज्या सभासदांनी उत्तम व यशस्वी कामगिरी केली त्यांनाच आम्ही जागतिक परिषदेला पाठवीत आहों असे हिंदुस्थान सरकारचें म्हणणें. परंतु, ओटावा करार ज्यांनी पसंत केला त्यांनी हिंदी राष्ट्राच्या हिताकडे न पाहतां इंग्लंडचें हितच अधिक केलें असा तर हिंदुस्थानाचा त्यांच्यावर आक्षेप आहे. या दृष्टीने पाहतां, सर पुरुषोत्तमदास व श्री. रंगास्वामी यांनी जो बाणेदारपणा दाखविला त्याला सर्व राष्ट्राचा पाठिंबा मिळेल यांत शंका नाहीं. हिंदुस्थानाचा स्वाभिमान नष्ट झाला नाहीं हें तरी या राजिनाम्यांनी जगास कळेल.

---

५ जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे साक्ष देण्याकरिता सरकाराने अनेक संस्थांस निमंत्रणें केलीं आहेत. पण त्याबरोबरच मुस्लिम लीगचे प्रतिनिधि म्हणून सरकाराने दोन सभासद निवडलेले आहेत! त्यांपैकीं सर महमद याकूब यांस मुस्लीम लीगने निवडलें नव्हतें. दुसरे प्रतिनिधि खानसाहेब हाजी रशीद अहमद यांनी गेल्या महिन्यांत भरलेली मुस्लीम लीगची सभा खुद्द अध्यक्षांना खुर्चीवरून ओढून मोडली होती! या त्यांच्या पराक्रमाबद्दल त्यांना सरकाराने ही बक्षिसी दिली कीं काय असा संशय येतो. मौज ही कीं, मुस्लीम लीगचे अध्यक्ष मि. अबदुल अझीज यांनी मुस्लीम

लीगतर्फे 'रिफॉर्म ऑफिस'ला तारेने व पत्राने स्पष्ट असें कळविलें कीं, हे आमचे प्रतिनिधि नाहीत. तरीसुद्धा सरकाराने हे प्रतिनिधि लीगवर लादलेच! लीगच्या बहुमताला अमान्य असलेले हे प्रतिनिधि घेणें सरकाराच्या सोयीचें असलें तरी तें न्याय्य खास नाही. हे प्रतिनिधिहि असे निगरगट्ट आहेत कीं, आम्हांस सरकाराने नेमलें तेव्हा आम्ही प्रतिनिधि आहोंच असा तोरा ते मिरवीत आहेत. जॉइंट कमिटीपुढे जाणाऱ्या साक्षीदारांत हे साक्षीदार विलक्षण खरे.

# जपानी कापडावरील जकातवाढ कोणाकरिता ?

जपानी कापडाच्या चढाओढीपासून हिंदी कापडाच्या धंद्याचें संरक्षण करण्याकरिता जपानी कापडावरील आयात जकातींत पंचवीस टक्के वाढ करून ती शेंकडा पंचाहत्तर टक्के करण्याचें हिंदुस्थानसरकाराने जाहीर केलें आहे. हिंदुस्थानसरकाराच्या या पत्रकावरून लोकांचा असा समज होईल कीं, हिंदुस्थानसरकार देशी कापडाच्या धंद्याचें संरक्षण करण्याकरिता जपानी कापडावर जादा जकात बसविण्यास सोईस्कर असा सुमुहूर्त काढण्यांतच इतके दिवस गुंतलें होतें. परंतु वस्तुस्थिति याहून भिन्न असून अंदरकी बात कांही निराळीच आहे. महायुद्धकाळीं जपानाने हिंदुस्थानाच्या व्यापारांत आपला चांगलाच हात शिरकवला. गेलीं कांही वर्षे खेळण्यांपासून तों कापडापर्यंत अनेक प्रकारचा स्वस्त माल जपानांतून बऱ्याच मोठ्या प्रमाणांत हिंदुस्थानांत येत असून, जपानाच्या नाण्याचा भाव भरमसाट उतरल्यापासून जपानी मालाच्या आयातीचें प्रमाण फारच वाढलें आहे, व या मालाची चढाओढ बऱ्याच लहानमोठ्या हिंदी उद्योगधंद्यांना मारक झाली आहे. जपानामधून येणाऱ्या मालांत कापडाचें प्रमाण बरेंच मोठें आहे. 'जपानी कापडाच्या आयातीमुळे आमचा धंदा बसत चालला आहे, वेळींच या आयातीला पायबंद न घालाल तर आमचा धंदा नामशेष होईल', असा टाहो हिंदी गिरणीवाल्यांनी सारखा फोडल्यामुळे निरुपायाने हिंदुस्थानसरकाराने १९३२च्या ऑगस्ट महिन्यांत जपानी कापडावरील जकात १८॥ टक्क्यांनी वाढवून पन्नास टक्के केली. त्या वेळींच हिंदी गिरणीवाल्यांनी जाहीर केलें होतें कीं, जपानी कापडावर बसविलेली ही जकात हिंदी कापडाच्या धंद्याचें संरक्षण करण्यास पुरेशी नाही. परंतु हिंदी गिरणीवाल्यांच्या या मताला हिंदुस्थान-सरकाराने भीक घातली नाही.

हिंदुस्थानसरकारच्या या औदासीन्यामुळे हिंदी गिरणीवाले हवालदील झाले होते. तितक्यांतच कांही दिवसांपूर्वी अशी बातमी आली होती कीं, हिंदुस्थानाच्या पेठेंतील कापडाचा व्यापार एकमेकांच्या सोयीने कसा कबजांत आणावा याबद्दल ब्रिटिश 'बोर्ड ऑफ् ट्रेड'चे प्रेसिडेंट मि. रन्सिमन व जपानी व्यापारी यांच्यामध्ये वाटाघाटी चालू आहेत. वास्तविक लँकेशायरचे व्यापारी जपानी व्यापाऱ्यांना पाण्यांत पाहतात. परंतु जपानी व्यापाऱ्यांच्या सहकार्याने हिंदी पेठेंत आपला पाय दृढमूल करतां येईल अशी थोडीशी आशा वाटूं लागतांच हिंदुस्थान-सरकाराने जपानी कापडावर आयात जकात वाढविण्याचा पायंडा घातला ही गोष्ट अँग्लो-जपानी व्यापारी सलोख्याला बाध आणणारी आहे अशीहि ओरड ब्रिटिश व्यापारी करूं लागले होते. "स्टेट्समन" पत्राच्या विलायतेच्या बातमीदाराने आपल्या पत्रांत या गोष्टीचा स्पष्ट उच्चारहि केला होता. अर्थातच या अँग्लो-जपानी व्यापारी वाटाघाटीची बातमी हिंदी गिरणीवाल्यांना समजल्यापासून सरकाराकडून जादा आयात जकातीच्या रूपाने आपल्या धंद्याला संरक्षण मिळेल याबद्दल त्यांना वाटणारी अंधुक आशाहि नाहीशी होत चालली होती.

### लँकेशायरच्या व्यापाऱ्यांचा कावा

अशा प्रकारें निराशेच्या ढगांनी हिंदी गिरणीवाल्यांचे मनःपटल व्याप्त केलें असतां सहा तारखेला जपानी कापडावरील आयात जकात पंचवीस टक्क्यांनी वाढविण्याचा हिंदुस्थान-सरकाराचा निर्णय जाहीर करणारें पत्रक बाहेर पडून हिंदी गिरणीवाल्यांचीं मनें प्रसन्न झालीं. हे निराशेचे ढग एकदम नाहीसे करण्याचा चमत्कार कोणीं घडवून आणला असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. परंतु ज्यांनी गेल्या आठवड्यांत अँग्लो-जपानी वाटाघाटींबद्दल आलेल्या बातम्या नीट लक्षांत ठेवल्या असतील त्यांना या प्रश्नांतील गूढ सहज समजेल. ज्या दिवशीं हिंदुस्थानांतील वृत्तपत्रांत हिंदुस्थान-सरकाराने जपानी कापडावरील जकात वाढविल्याची बातमी प्रसिद्ध झाली त्याच दिवशीं दुसरी अशी बातमी प्रसिद्ध झाली होती कीं, ब्रिटिश कापडाच्या व्यापाऱ्यांनी मि. रन्सीमन यांना असा निर्वाणीचा संदेश कळविला आहे कीं, जर जपानाने व्यापारी वाटाघाटीकरिता प्रतिनिधि पाठविण्यास विलंब केला तर अँग्लो-जपानी व्यापारी तह बाजूस सारावा. ब्रिटिश

व्यापारी अशा प्रकारें एकदम निकरावर येताच हिंदुस्थान-सरकाराला हिंदी कापडाच्या धंद्याच्या हिताचा एकदम उमाळा आला. यावरून हिंदुस्थानसरकाराला जपानाविरुद्ध जादा जकात बसविण्यास लँकेशायरच्या व्यापाऱ्यांनी भाग पाडलें असावें असें सिद्ध होत नाही काय ?

जपानाच्या येनाची किंमत उतरून जपानी कापडाची आयात वाढल्यामुळे जपानी कापडाच्या आयातीवर जादा जकाती बसविण्यांत येत आहेत असें सांगण्यांत येतें. परंतु जसा जपानाच्या येनाचा भाव घसरला आहे तसाच ब्रिटिश स्टर्लिंगाचाहि भाव खालीं आला आहे. स्टर्लिंगाची सुवर्णापासून फारकत केली जाण्यापूर्वी ब्रिटिश कापडाची हिंदुस्थानांतील आयात सारखी घटत चालली होती. परंतु स्टर्लिंगाचा भाव खालीं आल्यापासून ब्रिटिश कापडाची हिंदुस्थानांतील आयातहि वाढली आहे. हिंदुस्थान-सरकारने जपानी कापडावरील आयात जकातींत भरपूर वाढ केली ही बातमी समजतांच लँकेशायरच्या व्यापाऱ्यांना पराकाष्ठेचा आनंद झाला आहे असें मँचेस्टरची सात जूनची तार सांगते. काय केलें असतां हिंदुस्थानांतील कापडाची पेठ आपल्या हातीं येईल याची विवंचना ब्रिटिश व्यापाऱ्यांना लागली असल्यामुळे मिळालेल्या सवलतीचा पुरेपूर फायदा घेऊन लवकरच लँकेशायरचें कापड हिंदी व्यापारी पेठांतून हिंदी कापडाबरोबर मारक चढाओढ केल्याविना राहणार नाही. असें असतां एकट्या जपानी कापडावरच ज्याअर्थी जादा जकातीचें ओझें लादण्यांत येत आहे,त्याअर्थी हिंदुस्थान-सरकार ब्रिटिश व्यापाऱ्यांचें पक्षपाती आहे असा कयास कोणीं काढल्यास तो चुकीचा ठरेल असें वाटत नाही. सरकाराला मारक चढाओढीपासून हिंदी कापडाच्या धंद्याचें संरक्षण करावयाचें होतें तर त्यांनी जादा आयात जकाती बसवितांना त्या एकट्या जपानावर न बसविता ब्रिटिश कापडावरहि बसवावयास पाहिजे होत्या. कारण जपानाचा माल कमी येऊं लागतांच हिंदी व्यापारी पेठेंत जपानाची रिकामी होणारी जागा ब्रिटिश कापडाचे व्यापारीच भरून काढण्याचा पुष्कळ संभव आहे.

हिंदुस्थान सरकारानें जपानी कापडावरील आयात-जकात ७५ टक्क्यांपर्यंत वाढविल्याचें कळतांच हिंदी गिरणीवाले आनंदित झाले असल्याचें मुंबईच्या गिरणीवाल्यांच्या संघाचे अध्यक्ष मि. अहमद करीमभाई यांनी वृत्तपत्रांना दिलेल्या मुलाखतीवरून दिसतें. परंतु गिरणीवाल्यांचा हा आनंद फार वेळ टिकेल असें वाटत नाही. कारण हिंदी पेठांतून जपानी कापडाची हकालपट्टी नवीन जकातीमुळे होईल असें क्षणभर मानलें तरी जपानी कापडाची जागा सर्वस्वी हिंदी कापडाकडून घेतली जाण्याचा संभव कमी आहे. कारण लँकेशायरच्या व्यापाऱ्यांच्या हालचाली हिंदी पेठ काबीज करण्याच्या दिशेने चालू आहेत. हिंदी गिरणीवाल्यांपेक्षा लँकेशायरच्या गिरणीवाल्यांची व्यापारी दृष्टि भेदक असून कार्यक्षमताहि वरच्या दर्जाची आहे हें मशहूर आहे.

### कापूस बहिष्काराचा धाक !

जपानाचे हिंदुस्थानांतील कॉन्सल-जनरल मि. मियाके यांनी हिंदुस्थानसरकारानें वाढविलेल्या जकातींचा निषेध केला आहे. जपानांतील कॉटन स्पिनर्स असोसिएशनच्या कार्यकारी मंडळाची सभा ओकासा येथे भरून त्या सभेने जपानी गिरण्यांनी हिंदी कापसाची खरेदी करूं नये असा ठराव केला आहे. जपानच्या कॉटन स्पिनर्स असोसिएशनने हिंदी कापसावर बहिष्कार घालण्याचा ठराव केला असला तरी त्यांना तो ठराव लगेच अमलांत आणतां येईल असें वाटत नाही. जपान सांप्रत हिंदुस्थानांतून जो कापूस खरेदी करतें तो आखूड धाग्याचा असतो; व या कापसाचें सूत कातण्यास योग्य अशा प्रकारच्या गिरण्या जपानांत उभारलेल्या आहेत हिंदुस्थानाशिवाय युनायटेड स्टेट्स,आफ्रिका व चीन या तीन देशांत जपान प्रामुख्यानें कापसाची खरेदी करीत असतें.हिंदी कापसावर बहिष्कार घालावयाचा असला तर जपानाला कापूस-खरेदी मुख्यत्वें करून युनायटेड स्टेट्समधूनच करावी लागेल. परंतु अमेरिकन कापूस लांब धाग्याचा असल्यामुळे त्या कापसाला जपानी गिरण्यांतील आजची यंत्रसामुग्री सोयीस्कर नाही. अर्थातच कांहीं काळपर्यंत तरी जपानाला कापूस-खरेदीकरिता हिंदुस्थानाकडेच वळावें लागेल व निकटवर्ति काळांत तरी जपानी बहिष्काराची झळ हिंदी कपाशीच्या शेतकऱ्याला लागणार नाही.

परंतु हिंदी कापडाच्या धंद्याला संरक्षण देण्याच्या मिषाने ब्रिटिश कापडाचें हिंदुस्थानाच्या पेठेंतील डळमळीत स्थान स्थिर करण्याकरिता जपानी कापड हिंदुस्थानांत न येऊं देण्याचा चंग जर हिंदुस्थानसरकारानें बांधला व जपानी कापडाची आयात पुष्कळशी हटली तर आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या नियमाप्रमाणे जपानाला हिंदी कापसाची खरेदी कमी करावी लागेल. जपानाच्या गेल्या पांच वर्षांच्या परराष्ट्रीय व्यापाराच्या दिशेचें निरीक्षण केलें असता असें आढळतें कीं, चीन, हाँगकाँग, आफ्रिकन प्रदेश, डच इंडिया, फिलिपाईन्स या भागांत जपान आपलें कापड अधिकाधिक खपवूं पाहात असून, जपानानें युनायटेड स्टेट्स,

चीन व आफ्रिकन प्रदेश या भागांतून कापूस-खरेदी अधिकाधिक करण्याचें ठरविलें आहे. जपानाच्या परराष्ट्रीय व्यापाराची ही दिशा लक्षांत घेतली असतां असें दिसतें कीं, इंडो-जपानी व्यापारी संबंध जर सध्याप्रमाणे दूरावत चालले तर कांही काळानन्तर जपान हिंदी कापसाची खरेदी कमी कमीच करूं लागेल.

**सर्व परदेशी कापडावर जकात बसवा**

सर्व परदेशी कापडावर मग तें कोणत्याहि देशांतून येत असो, भरभक्कम आयात जकात बसवून जर हिंदुस्थानाची व्यापारी पेठ हिंदी कापडाला काबीज करतां आली असती तर, जपानाने हिंदी कापसावर बहिष्कार घातला तर कसें होईल, याची विवेचना करण्याचें मुळीच प्रयोजन पडलें नसतें. कारण हिंदुस्थानाची व्यापारी पेठ हिंदी कापडाने आपल्या कबजांत आणली म्हणजे साहजिकच हिंदी गिरणीवाले हिंदी कापूस खरेदी करूं लागले असते असें मानावयास जागा आहे. परंतु हिंदुस्थान-सरकाराच्या सध्याच्या धोरणाप्रमाणें जपानाच्या येनाप्रमाणेच ब्रिटिश स्टर्लिंगाची घसरगुंडी झाली असताहि एकट्या जपानाच्या कापडावरच डोईजड आयात जकात बसविली जाणार असल्यामुळे हिंदुस्थानाच्या पेठेंत ब्रिटिश कापड अधिकाधिक खपूं लागेल. लहान धाग्याचा हिंदी कापूस त्यांच्या उपयोगी पडणारा नसल्यामुळे त्यांची खरेदी करण्यास ब्रिटिश गिरणीवाले कसे कचरतात, हें ओटावा परिषदेच्या वेळीं चांगलेच प्रत्ययास आलें आहे. अर्थातच हिंदुस्थानाच्या पेठेंत ज्या मानाने ब्रिटिश कापड जपानी कापडाचें स्थान पटकावील त्या प्रमाणात ब्रिटिश गिरणीवाले हिंदी कापसाची अधिक खरेदी करतील असें वाटत नाही. त्यामुळे त्यांच्या मालाला भरपूर गिऱ्हाइकी नसल्यामुळे हिंदी कपाशीच्या शेतकऱ्यांचें नुकसान झाल्याविना राहणार नाही. अर्थातच गरीब बिचाऱ्या हिंदी कपाशीच्या शेतकऱ्यांचें नुकसान न होता हिंदी कापडाचा धंदा वर्धंटीस यावा अशी सरकाराची खरोखरच इच्छा असेल तर त्यांनी जपानी कापडाबरोबरच सर्व परदेशी कापडाच्या आयातीवर भरपूर जकात बसवावी असें आम्हांला वाटतें.

# कायदेभंग–तहकुबीचे टीकाकार

कायदेभंगाची चळवळ आणखी सहा आठवडे थांबविल्याबद्दल मुंबईच्या 'फ्री प्रेस जर्नल' पत्राने एक विस्तृत लेख लिहून, या तहकुबीबद्दल कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्ष श्री. अणे यांना सर्व दोष दिला आहे. या पत्राच्या मताप्रमाणे मत असणारे इतरहि कित्येक लोक असतील याविषयी आम्हांला शंका नाही. कारण म. गांधींनी तुरुंगांत असताच, अस्पृश्यतानिवारणाची चळवळ पुढे ओढून, पर्यायाने कायदेभंगाची चळवळ बाजूला सारली अशी तक्रार कांही थोड्या कॉंग्रेसवाल्यांनी उघड उघड पण पुष्कळांनी आंतून केली होती.

महाराष्ट्रांतील कॉंग्रेसच्या एका प्रमुख कार्यकर्त्याचें मत खरें धरलें तर "या चळवळींत पडून तुरुंगांतून सुटून आलेले, किंवा कच्ची कैद भोगून अटीमुळे मूकवृत्ति धारण केलेले, किंवा तुरुंगांत शिक्षा भोगीत असलेले किंवा चळवळीला अनुकूलता असली तरी तुरुंगाच्या दिशेकडे स्वतः कधी तोंड न फिरविलेले 'परस्पर साहाय्यकारी'–अशा सर्व लोकांच्या मतें कायदेभंगाची चळवळ ही बंद होता कामाच नये! ती बंद करणें हा नैतिक अधःपात होय व पराभवाची कबुली होय."

हेंच लोकमत जर खरें असेल तर, कॉंग्रेस वर्किंग कमिटीच काय पण खुद्द म. गांधी यांची तरी ही चळवळ थांबविण्याची काय छाती लागून गेली आहे? अनुकूल संधि येताच, महाराष्ट्रांतील कॉंग्रेसच्या सर्वाधिकाऱ्याप्रमाणे, इतर अनेक प्रांतांतील या चळवळीचे सूत्रचालकहि वरील प्रकारचें (म्हणजे युयुत्सु) लोकमत म. गांधी किंवा वर्किंग कमिटी यांचेपुढे ठेवतील व त्या लोकमताला त्यांना मान द्यावाच लागेल. चळवळ चालू करण्याला लोक तयार असतील व ती चलावी हेंच श्रेयस्कर ठरेल तर ती कोण बंद करणार? "आपण स्वतः मनांतून चळवळीला कंटाळलों आहों, पण निमित्ताला टेकून दुसऱ्यावर दोषाचें खापर फोडण्यास टपून बसलों आहों." असा अपवाद चळवळ चालावी म्हणणारे लोक आपणांवर कां घेतील?

उघड बोलण्याची अडचण असल्यास खाजगी रीतीने कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना आपलें मत कळविण्यास पुष्कळ साधनें आहेत. म. गांधी हे बंधमुक्त झाले आहेत. यामुळे त्यांच्या पत्रव्यवहारावर सरकारी हेरांची दृष्टि नाही. तसेच कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. अणे हे मोकळे असून तूर्त या कामालाच त्यांनी सर्वस्वी वाहून घेतलें आहे. तेव्हा चळवळ चालू ठेवण्याला अनुकूल असें

जें जें कांही कोणास सांगावयाचें असेल तें तें त्यांना समक्ष भेटून किती तरी सांगतां येईल. शिवाय राजगोपाळाचारियर, मिसेस नायडू, डॉ. अन्सारी अशांचें मत चळवळ पुढे चालविण्याला प्रतिकूल असलें तरी तें बोटचेपें आहे. तेव्हा चळवळ चालू राहावी म्हणणारांना तें मत चेपून त्या ठिकाणीं अनुकूल मत प्रगट करवून घेतां येईल. तात्पर्य, उद्या जर ही चळवळ कोणत्याहि कारणानें थांबविण्याचा ठराव झाला, तर लोकमत प्रतिकूल होतें म्हणूनच ती थांबली असें सरळ अनुमान निघण्याचा संभव आहे म्हणून ज्यांना ती चळवळ थांबूं नये असें वाटत असेल त्यांनीं ही सहा आठवड्यांची तहकुबी घातक न मानता, विचारविनिमयाला व खासगी मतपरिवर्तनाला, म. गांधींच्या प्रकृतीमुळे सोन्याची संधिच चालून आली आहे असें समजून तिचा त्यांनी योग्य तो उपयोग करावा.

देशाचें खरें मत चळवळ चालावीच असें असल्यास ती चालविणें हेंच योग्य होईल. पण दुर्दैवानें या गोष्टीचा साधकबाधक निर्णय देणें ही गोष्ट कांही विवक्षित लोकांच्या हातीं येऊन राहिली आहे. चळवळ वर्किंग कमिटीनें सुरू केली तेव्हा तो तिचा अधिकार ज्यांनी मानला त्यांना, तहकुबीच्या अखेरीस ती चळवळ कोणत्याहि कारणानें थांबवावी किंवा पुढें चालवावी हें ठरविण्याचा अधिकारहि व. कमिटीचाच मान्य करावा लागेल. वर्किंग कमिटीचे कांही सभासद तुरुंगांत आहेत व कांही बाहेर आहेत, ही अडचण त्यापुढची. शिवाय सरकार तुरुंगांतील सभासदांना सोडीत नाही असें दिसून आल्यावर, उरलेल्या बाहेरच्या सभासदांनी निर्णय करावा म्हटलें तरी, त्याहि पुढची आणखी एक अडचण आहे, ती ही कीं, बाहेर असलेल्यापैकींच एक, पण सर्वांत प्रमुख किंबहुना सर्वाधिकारीच असे एक, सभासद म्हणजे म. गाधी यांची प्रकृति क्षीण असून निदान कांही आठवडेपर्यंत त्यांना विचारविनिमय करण्याला डॉक्टर लोक परवानगी देत नाहीत. अर्थात् इकडे म. गाधी हे या निर्णयाच्या बाबतींत सर्वश्रेष्ठ असें मानणारांनींच दुसरीकडे विलंबाबद्दल उतावीळपणें आपापसांत कुरबूर करावी, किंवा कोणावर तरी उघड दोषारोप करावा हें त्यांना शोभत नाही.

उदाहरणार्थ, गेल्या रविवारच्या अंकांत 'फ्री प्रेस जर्नल'च्या संपादकांनी सर्वांना सोडून श्री. अणे यांना, हल्लींच्या सहा आठवड्यांच्या तहकुबीबद्दल, व्यक्तिशः जबाबदार धरलें आहे व त्याच्यावर आग पाखडली आहे! या संपादकाचें म्हणणें असें कीं, "गांधींनी या तहकुबीला मान्यता दिली असली तरी ती रुग्णशय्येवरील दुखणकरी म्हणून, पुढारी म्हणून नव्हे!" पण हा नुसता वितंडवाद होय. श्री. अणे हे कांही एका क्रमानें कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्ष झाले असले तरी, चळवळ कायमची थांबवावी कीं न थांबवावी याचा निर्णय करण्याचा अधिकार त्यांच्याकडे येऊं शकत नाही. निदान हल्लीं बंधमुक्त असलेल्या वर्किंग कमिटीच्या सभासदांचे ते फक्त मुख होत; व त्या मुखांतून निघणारा तहकुबीचा उद्गार गांधींच्या खऱ्या संमतीशिवाय निघाला असें सुचविणें हे शुद्ध बाष्कळपणाचें होय.

श्री. अणे यांना निर्णयाचें नैतिक धैर्य नाही असें म्हणणाऱ्यांच्या अंगींच म. गांधींना दोष लावण्याचें धैर्य नाही असें आम्ही उलट कां म्हणूं नये? शिवाय 'फ्री प्रेस जर्नल'ला आम्ही असेंहि जाणवूं इच्छितों कीं, कायदेभंगाची चळवळ थांबवावी कीं पुनः चालू करावी हें ठरविणें फार कठीण आहे; कल्पनेच्या विमानांत बसून जगांतील बातम्या आणून खऱ्या खोट्या प्रसिद्ध करण्याइतकें तें सोपें नाही. म. गांधींच्या मतावर निर्णय अवलंबून ठेवूं नये असें म्हणणारे जर कोणी असतील, तर त्यांनी पुढे येऊन आपलें म्हणणें आपल्या सह्यांनिशीं फ्री प्रेस जर्नलमधून प्रसिद्ध करावें असें आव्हान त्यांना सहज देतां येईल. आणि "चळवळ चालूच करा असें आम्ही म्हणत नाही, पण निदान होय किंवा नाही याचा निर्णय तरी ताबडतोब करा" असें म्हणण्याला तरी कायद्याची भीति कोणास नाही.

स्वतः अणे यांचें मत असें कदाचित् असेल कीं, म. गांधींशी भरपूर चर्चा करणें अवश्य आहे; व तेंहि अखेर-निर्णयाकरिताच नव्हे तर वर्किंग कमिटीची आहे तशी सभा बोलाविण्याकरितादेखील! अर्थात् ती चर्चा गांधींच्या क्षीण प्रकृतीमुळे जर आज करतां येत नसेल, तर त्यांनी सहा आठवड्यांची मुदत आणखी दिली व घेतली तर त्यांत काय गैर झालें? या अवधींत चार खुसखुशीत बातम्या रोज नव्या प्रसिद्ध करतां न आल्यामुळे आपल्या चार प्रती कमी खपतात ही कांही वर्तमानपत्रावर आपत्ति येईल खरी! पण चळवळ पुढे चालू ठेवावी, ती बंद करूं नये, असें म्हणणारांना तें लोकमत, आहे याहून अधिक संघटित करून तें म. गांधी व श्री. अणे यांना पटवून देण्याला किती नामी संधि आलेली आहे याचा 'फ्री प्रेस जर्नल'ने विचार

करावा. 'शेळीचे कान गोसाव्याच्या हातीं' ही म्हण प्रसिद्ध आहे. तसें हिंदी राजकारणाचें होऊन बसलें आहे. तें होऊं त्तांना गोड वाटलें! मग आता त्याचें वाईट वाटून काय उपयोग?

# कृपणांना कर्णाचा मान

हिंदुस्थानाचें अन्न खाणारे इंग्रज लोक हिंदुस्थानांत व इंग्लंडांत असंख्य आहेत. त्यांना इकडील अन्नाची गोडी कळली असल्यामुळे आपल्या ह्यातींत त्या अन्नाचा एक घासहि कमी पडूं नये अशी त्यांची इच्छा असतेच; पण खेरीज आपल्या पुत्रपौत्रांना तें सुग्रास अन्न पिढ्यानुपिढ्या खावयास मिळण्याची तरतूद करण्यासाठींहि ते डोळ्यांत तेल घालून जपत असतात. पार्लमेंटाच्या जोड-कमिटीनें साक्षी घेण्यास सुरुवात करताच हिंदी नोकरशाहीने आपली अर्जी सर्वांच्या आधीं कमिटी-पुढे गुदरली. ही नोकरशाहीची विद्यमान पिढी होय. पण नोकरांच्या बापदाद्यांची पिढी अद्यापि जिवंत आहेच. पांढऱ्या खलित्यानें चालू व भावी पिढ्यांचा मलिदा कमी पडणार अशीं थोडीशीं चिन्हें दिसूं लागताच बापदाद्यांच्या पिढींतील जहांबाज बुढ्ढे पुढे आले असून त्यांनी नोकरशाहीची तळी नेटाने उचलून धरण्याचें काम चालविलें आहे.

पंजाबचे माजी गव्हर्नर सर मायकेल ओड्वायर हे जहांबाजांतले जहांबाज बुढ्ढे होत. ते नुसते कलम-बहादर नसून आपल्या तलवारबहादुरीविषयी त्यांना गर्व वाटतो. या व तलवारबहादुराच्या कारकीर्दीत जालियनवाला बागेंत शेकडो गरीब हिंदी लोकांवर गोळ्या झाडून त्यांचे प्राण घेण्यांत आले. त्यांची साक्ष तीनचार दिवसांपूर्वी जोड कमिटीपुढे झाली. ओडवायर साहेबांची तलवार पांढऱ्या खलित्यावर चालणार हें ठरलें असल्याने त्यांस सामना देण्यास पांढऱ्या खलित्याच्या कैवाऱ्यांनी पुढे व्हावयास पाहिजे. त्याप्रमाणे हिंदुस्थानाचे माजी व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग, बडोद्याचे माजी दिवाण सर मनभाई मेहता व हैद्राबाद संस्थानाचे फडणीस सर अकबर हैदरी यांनी आपलीं हत्यारें ओडवायर यांच्या हत्याराशीं भिडविलीं. या लढाईंत खालसा मुलखांतील हिंदी प्रतिनिधींपैकीं सर तेजबहादुर सप्रू व चौधरी जाफरउल्लाखान हे हिंदु मुसलमान जोडीने घुसले होते. त्यांच्या हत्यारांचेहि ओड्वायर यांच्या अंगावर कांहीं वार झाले असल्याचें विलायतेहून आलेल्या बातम्यांवरून दिसून येतें. या लढाईची हकीकत विलायतेहून हप्त्याहप्त्यांनी येत असल्यामुळे तिच्यांत आणखी किती वीर शिरले व त्यांनी पराक्रम कसे गाजविले हें यथावकाशच समजणार आहे. तथापि उपलब्ध माहितीवरून ओड्वायरप्रभृतींचा विरोध हिंदी लोकांच्या आकांक्षांस किती तीव्र आहे हें मात्र स्पष्टपणें कळतें.

हिंदी लोकांस कसलेहि क्षुल्लक अधिकार द्यावयास काढले तरी नोकरशाहीच्या व तिच्या ओड्वायर-सारख्या सग्यासोयऱ्यांच्या पोटांत तिडीक उठावयाचीच. कारण हिंदुस्थानांत स्वराज्य आहे नोकरशाहीचेच. हिंदी लोकांस स्वराज्य मिळणार म्हणजे नोकरशाहीचें स्वराज्य नष्ट होणार! सध्याचा पांढरा खलिता कसा काळा आहे व हा व्हाइट पेपर किती वाईट आहे याची जाणीव हिंदी लोकांना आहे. पण ओड्वायर यांचा आपल्या जातभाईंना सवाल असा कीं तुम्हीं हा काळा कपटा तरी देता कां? तो फाडून त्याच्या चिंधाड्या कां उडवीत नाहीं? म्हणून ओड्वायर यांनी पांढऱ्या खलित्यांतील फेडरेशनपासून तों त्यांतील प्रांतिक स्वायत्तता व हिंदी लोकांस मिळणाऱ्या थोड्याशा वरिष्ठ प्रतीच्या नोकऱ्या येथपर्यंत प्रत्येक गोष्टीचे वाभाडे काढण्यास सुरुवात केली आहे.

ओड्वायर यांचा युक्तिवाद असा कीं, सायमन कमिशनानें फेडरेशन देण्यास सांगितलें नाहीं, यासाठी फेडरेशनचा समावेश पांढऱ्या खलित्या-मध्यें करण्यांत मंत्रिमंडळानें फाजीलपणा केला. होंहि फेडरेशन देऊं केले तरी पुष्कळ संस्थानिकांस तें नको असल्यामुळे तें ओड्वायर यांच्या मतें देऊन न देऊन नुसतें कागदांतच राहावयाचें. अशा रीतीनें फेडरेशन उधळून लावल्यावर, उरली प्रांतिक स्वायत्तता. तीहि संभाळण्याची अक्कल हिंदी लोकांना नसल्यामुळे, न्याय व पोलीस असलीं खातीं हिंदी लोकांच्या स्वाधीन करूंच नयेत. तीं खातीं वगळल्यावर शिक्षण, इंजीनियरिंग, व्हेटरिनरी, शेतकी व वैद्यक इत्यादि खातीं उरतात. त्या खात्यातहि सगळी भरती हिंदी नोकरांची न करता गोऱ्या अधिकाऱ्यांचें बेगें कायम ठेवलेंच पाहिजे असें ओडवायर साहेबांचें मत आहे.

सारांश ओड्वायर यांना फेडरेशन द्यावयास नको, प्रांतिक स्वायत्तता द्यावयास नको, कांहीं खातीं द्यावयास नकोत व त्या खात्यांतील नोकऱ्याहि द्यावयास नकोत. इतकेंच काय पण ओडवायर यांच्या जोडीला सर पॅट्रिक फॅगन व सर इव्हान कॉटन

ही दुकल मिळाली. तिने ओडवायरं यांजवरहि ताण केली. फॅगन यांनी सांगितलें कीं हिंदी दिवाण आपल्या वशिल्याचीं तट्टें लावून देऊन नोकरींत नालायक लोक भरतात. फॅगन हे पंजाबांत फिनान्स कमिशनर होते व कॉटन यांनी बंगाल कौन्सिलचें अध्यक्षस्थान पटकावलें होतें. कॉटन यांच्या मतें कौन्सिलाचे सभासदहि या झब्बूशाहींतून सुटणार नाहीत. या दुकलीचीं वरील बाष्कळ विधानें क्षणभर खरीं मानलीं तरी इंग्लंडांत ही झब्बूशाही नाही असा निर्वाळा छातीवर हात ठेवून ही जोडी यावयास कबूल आहे काय ?

कॉटन व फॅगन यांचे विचार ओड्वायरसाहेबांच्या विचारांत गोवून दिले म्हणजे, नवे अधिकार हिंदी लोकांना देऊं नयेतच पण आहेत हेहि अधिकार काढून घेऊन हिंदुस्थानास मोर्ले-मिंटोच्या काळापर्यंत पंचवीस वर्षें मागे रेटीत न्यावें असाच निष्कर्ष निघतो. संयुक्त कमिटीस साक्षीदार भेटतात ते या प्रतीचे; व कमिटींत काम करणारांत सभासद पाहावे तर लॉर्ड सालिसबरी, सर रेजिनॉल्ड क्रेडाकप्रमाणे चर्चिलच्या कट्टर पंथाचे. पांढरा खडा आधीच काळा झाला आहे तो जास्ती उजळ होत जाण्याऐवजीं अधिक काळा पडण्याचा संभव या कारवाईत स्पष्ट दिसतो; इतकेंच नव्हे तर त्यामुळे सर सॅम्युएल होअरप्रभृतींनी पांढऱ्या खालित्याची रचना कृपणपणाने केली असताहि त्यांना कर्णाचा मान मिळण्याची आयतीच संधि लाभते हें दुर्दैव होय.

# देवास संबंधीं खरी माहिती

( ले. : एक माहितगार )

देवास ( थोरली पाती ) या संस्थानासंबधाने प्रथम अनेक पत्रांतून बराच खोडसाळ मजकूर आला; व असें भासविण्यांत आलें कीं, संस्थानाधिपतीना राज्याधिकाराचा त्याग करावा लागणार असून संस्थानची व्यवस्था ब्रिटिश सरकाराच्या हातीं जाणार आहे ! कदाचित् या बातमीचा इन्कार वेळींच न झाल्याने, इतर वर्तमानपत्रांनाहि ही गोष्ट खरीच आहे असें वाटलें असावें. परंतु ही गोष्ट मुळीच खरी नाही. आणि माझ्या माहितीप्रमाणे जी खरी वस्तुस्थिति आहे ती मी खाली देत आहे.

देवासचे महाराज हे व्यक्तिशः कोण कसे आहेत याजविषयीं मी या लेखांत मुद्दाम लिहित नाही. त्यांची उदार मतें, निर्भिड स्वभाव, व जातिविद्वेषापासून अलिप्तपणा या गोष्टी प्रसिद्ध आहेत. मराठाशिक्षण परिषदांतून झालेलीं त्यांचीं भाषणें कशी असतात, व संस्थानी प्रजेच्यातर्फे होणाऱ्या चळवळीशी ते कसा मित्रत्वाचा संबंध ठेवतात, इत्यादि गोष्टी लोकांनी वर्तमानपत्रांतून वाचल्याच असतील. परंतु गृहकलहांनी कुटुंबांचा नाश झाल्याची उदाहरणें सर्वत्र आढळतात तीच स्थिति दुर्दैवाने देवासची असून, हल्लीच्या राजकारणी स्थितीलाहि तेंच खरें कारण होऊन बसलें आहे. उत्तर हिंदुस्थानाच्या संस्थानांतील जुलमासंबंधाने पुष्कळ कागाळ्या वर्तमानपत्रांतून येतात, तशा देवाससंबधी आजवर कधी किती आल्या ? याची वाचकांनी आठवण करावी, म्हणजे त्यांना कळून येईल कीं देवास संस्थानच्या कारभारांत त्याजवर गहजब होण्यासारखी कोणतीच अव्यवस्था किंवा जुलम नाही.

येऊन जाऊन जी काय खरी दुःस्थिति आहे ती सांपत्तिक. पण तिलाहि अनेक कारणें आहेत. पहिलें कारण हें कीं संस्थानच्या उत्पन्नांतून बरीचशीं इनामें व जहागिरी दिल्या गेल्या आहेत. यामुळे बरेंच उत्पन्न कायमचेंच कमी झालें आहे. हें धोरण कित्येक लोक चूक म्हणतील. परंतु एखाद्या राजाने आपल्या व्यसनापायीं पैसा उधळणें, आणि खानदानी धोरण स्वीकारून इनाम जहागिरी कदाचित वाजवीपेक्षा अधिक तोडून देणें, यांत किती तरी अंतर आहे ! खर्चाचें दुसरें कारण गृहकलह. या गृहकलहाची सरकाराकडून जर बारीक चवकशी झाली तर त्यांत खरा दोष कोणाकडे किती येतो हें कळून येईल. पण स्वार्थाकरिता मोठमोठ्या संस्थानिकांना खूष करण्याचें सरकारी धोरण हल्लीं प्रचलित असल्यामुळे, लहानसहान संस्थानावर सरकार खुशाल अन्याय करते ! तिसरें कारण असें कीं देवासच्या मंडी (बाजार) चें उत्पन्न तुटणें हें होय. माळवा प्रांतात धान्याचा व्यापार फार मोठा असतो. त्यांतून देवास ही फार मोठी उतार पेठ असल्यामुळे कराचे उत्पन्न बरेंच येत असे तें तुटलें. कारण हल्लीच्या धान्याच्या सुगींत शेतकरी व व्यापारी दोघेहि बुडाले आहेत. या सर्व कारणांमुळे गेलीं कांही वर्षें देवास संस्थानाला अतिशय खर्च पडला व

नुकसानहि आलें. यामुळे केसरींत उल्लेखिल्याप्रमाणे चेकच्या पद्धतीने कांही दिवस व्यवहार करावा लागला ही गोष्ट खरी आहे. पण हातीं रोख रक्कम नसल्यास हुंड्या लिहून देऊन आपल्या पतीवर व्यवहार करण्याची रीत जी बाजारांत आहे तिच्याहून ही चेक पद्धति कांहीं वेगळी नाही. तथापि गेल्या दोन वर्षांपासून ही पद्धत सर्वस्वी थांबली आहे. आणि माझ्या माहितीप्रमाणे आज तारखेस नोकरवर्गाचे पगार सर्व चुकते होत आहेत.

ही हलाखी कळसास पोचण्याचे सुमारास सरकाराकडून संस्थानला विचारपूस झाली होती, व जरूर तर एखाद दुसरा जाणता अधिकारी तुमच्या मदतीला देऊं असें सरकाराकडून सुचविण्यांत आलें होतें. परंतु धुळ्याचे रा. ब. सि. धों. गरुड व बडोद्यांतील माजी अकौंटंट जनरल श्री. अनंत नारायण दातार यांना देवास सरकारने स्पेशल ऑफीसर नेमून व्यवस्थेची घडी पूर्ववत् बसविण्याचा प्रयत्न केला. त्यांचे जागीं हल्ली नवीन मनुष्य असा कोणी नेमला नाही; तथापि संस्थानिक व दिवाण मिळून स्वतःच या कामीं लक्ष घालीत आहेत. मि. ग्लान्सी हे देवासला येऊन बसले, किंवा अधिकाराचीं सूत्रें खाली ठेवण्याबद्दल महाराजांना लिहून आले, वगैरे गोष्टी माझ्या समजुतीप्रमाणे निखालस खोट्या आहेत. असल्या बातम्यांचा उगम उत्तर हिंदुस्थानापेक्षा दक्षिण महाराष्ट्रांतच खरा आहे !

संस्थानिकांनी आपली सांपत्तिक स्थिति नीट ठेवावी ही गोष्ट योग्य आहे. पण तिचा आधार देऊन दोष लावावयाचा तर, इतर संस्थानांनाहि तो लावावा लागेल याचा वाचकांनीच मनाशीं विचार करावा. निजाम सरकार दोन कोटि कर्ज काढणार तर इंदूर सरकार कदाचित पन्नास लक्ष रुपये कर्ज काढणार वगैरे बातम्या वाचकांनी वाचल्याच असतील!! अशी आणखी किती तरी उदाहरणें देतां येतील. आणि तसेंच म्हणावयाचें तर, स्वतः ब्रिटिश सरकारची सांपत्तिक स्थिति कशी काय आहे? बजेटाचीं तोंडे मिळालीं नाहीत तर राजा किंवा मंत्रिमंडळ पदभ्रष्ट व्हावें असा शिरस्ता ठरेल, तर ती पदभ्रष्टतेची आपत्ति विलायतेचे प्रधानमंडळ व विशेषतः दिवाळखोर मुंबई सरकार यांना तरी चुकेल काय? सुनेच्या दोषांचा डांगोरा होतो पण सासूच्या दोषांचा नुसता विचार तरी कोण करतो ! त्यांतूनहि एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं देवास संस्थानांत उत्पन्नाच्या बाबींच आजपर्यंत थोड्या ठेवल्या गेल्या आहेत. तेथील करांची यादी, व मुंबई इलाखा आणि इतर कित्येक संस्थाने यांतील करांची यादी, यांची तुलना केल्यास, देवासची सांपत्तिक हलाखी ही उधळेपणामुळे कीं मुळांत उत्पन्नच कमी असल्यामुळे आहे हें वाचकांना कळून येईल.

# स्फुट सूचना

१ हिंदुस्थान राजकीयदृष्ट्या इंग्लंडचा गुलाम असल्यामुळे आर्थिकदृष्ट्या त्याची इग्लंडला कशी लूट करता येते याचें गेल्या आठवड्यांत अगदी ताजें उदाहरण घडलें ! इंग्लंडला जनच्या पंधराव्या तारखेस अमेरिकेच्या युद्धकर्जापैकीं एक कोट नव्वद लक्ष पौंडांचा हप्ता भरावयाचा होता. गेल्या डिसेंबरच्या पंधरा तारखेचा हप्ता इंग्लंडने पूर्ण व वक्तशीर भरला. जूनच्या हप्त्याची मुदत भरण्यापूर्वी सर्व युद्धकर्जाची आपण कांहीतरी वासलात लावूंच लावूं या भरंवशाने इंग्लंडाच्या या वर्षाच्या जमाखर्ची अंदाजपत्रकांत जूनच्या हप्त्याची तरतूदच केली नव्हती. जागतिक आर्थिक परिषदेचा घोळ घालून हा हप्ता निदान लांबणीवर टाकण्याचा तरी त्यांचा विचार होता. पण अमेरिकेच्या अध्यक्षांनी गळा धरल्यामुळे ह्या हप्त्यापैकीं पांच टक्के तरी मॅक्डोनाल्ड यांनी भरण्याचें कबूल केलें. वास्तविक इंग्लंडने आपल्या खजिन्यांतील सोनें काढून त्यांतून हा हप्ता भरावयास पाहिजे होता. परंतु, त्यांतल्या त्यांत कसर खाण्याची दुष्ट व्यापारी खोड इंग्रजी फडणीसांना असल्यामुळे त्यांनी एका औंसास पन्नास सेंट या दराने एक कोट डॉलर किंमतीची चांदी मुंबईस देण्याचें ठरविलें; व आश्चर्य हें कीं, हिंदुस्थान सरकारानें या व्यवहाराला मान्यता दिली !

---

२ हिंदुस्थान सरकारच्या खजिन्यांत चाळीस कोट औंस चांदी होती व त्यावर ब्रिटिशांचा डोळा होता. यांपैकीं लेखणीच्या एका फटकऱ्याने एक कोट डॉलरची म्हणजे दोन कोटि औंस चांदी अमेरिकेंत पाठविण्याचें ठरलें ! हिंदुस्थानांत पुढें निघणाऱ्या रिझर्व्ह बँकेसाठीं या चांदीची किंमत स्टर्लिंगमध्ये आम्हीं जमा करूं असें सांगण्यांत येत आहे. पण ही निव्वळ फसवणूक आहे. हिंदुस्थानाला स्टर्लिंगच्या पाठोपाठ पळण्याची

इच्छा नाहीं. जर खरोखर इंग्लंडला हा व्यवहार प्रामाणिकपणे करावयाचा असेल तर या चांदीबद्दल त्यांनी सोनेंच ठेवावें हें उत्तम. तो वादाचा प्रश्न म्हणून आज बाजूला ठेवला तरी कलकत्त्याच्या हिंदी चेंबरनें म्हटल्याप्रमाणे या व्यवहारांत हिंदुस्थानाला एक कोट रुपयांचा चाट बसतो त्याची वाट काय? इंग्लंडचा स्टर्लिंग गडगडूं नये म्हणून हिंदुस्थानांतून सुवर्णाचा प्रवाह इंग्लंडकडे चाललाच आहे. आता अमेरिकेच्या देण्याकरिता चांदीहि चालली ! शेवटीं एकच प्रश्न विचारावासा वाटतो. तो हा कीं, हा व्यवहार करण्यापूर्वी त्याला हिंदुस्थान सरकारानें हिंदी लोकांची संमति घेतली होती काय ? ती घेतली नव्हती म्हणून व त्यांत हिंदुस्थानाचें अतिशय नुकसान होत आहे म्हणून आम्ही याला लूट म्हणतों ! सोनें व चांदी यांचा प्रवाह आज जो देशाच्या बाहेर चालला आहे त्याला दुसर नांव काय द्यावयाचें ?

---

३ लेजिस्लेटिव्ह असेंब्लींतील सभासदांच्या शिष्टमंडळानें ता. १३ रोजीं हिंदुस्थान सरकाराचे गृहमंत्री ना. हेग यांची भेट घेऊन त्यांजपुढे अंदमानांतील राजबंद्यांचीं गाऱ्हाणीं व लोकांच्या मागण्या मांडल्या. ना. हेग यांनी शिष्टमंडळाला बेमुर्वतखोर उत्तरें देऊन लोकांच्या सर्व मागण्या कशा धुडकावून लावल्या हें वाचकांना कळलेंच आहे. आता शिष्टमंडळाच्या मागण्यासंबंधीं खुद्द हिंदुस्थान सरकारानें ता १७ रोजीं एक जाहीर पत्रक काढलें आहे. या पत्रकावरून तरी सरकार राजबंद्यांचीं गाऱ्हाणीं निवारण्यासाठी कांहीं हालचाल करणार असल्याचें मुळींच दिसत नाही. तिघा राजबंद्यांच्या मृत्यूनंतर सरकारी धोरणाचा निषेध करण्यासाठी हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं ज्या जाहीर सभा भरल्या त्यांतून सरकारानें राजबंद्यांच्या मृत्यूच्या प्रकरणाची उघड चौकशी करावी, इतर अन्नसत्याग्रह्यांची आरोग्यदृष्ट्या नीट निगा ठेवावी, आप्तेष्टांना त्यांच्या भेटीगांठी घेऊन द्याव्या असेंच लोकमत प्रकट झालें होतें. परंतु सरकार इतकें निगरगट्ट बनलें आहे कीं, त्यानें या नव्या पत्रकांत वरीलपैकीं विशेषतः उघड चौकशीच्या मागणीला मुळी उत्तरच दिलेलें नाही. 'कोणी राजबंदी आजारी पडला व त्याची प्रकृति चिंताजनक आहे असें दिसून आलें तर तसें सरकाराकडून त्या राजबंद्यांच्या आप्तेष्टांना तारेनें कळविण्यांत येईल' या एवढ्याशा खुलाशाशिवाय त्या पत्रकांत कांहींच सांगितलेलें नाही. आम्ही उघड चौकशी करणार नाही असेंहि सरकार स्पष्ट म्हणत नाही. कारण ती गोष्ट त्याच्या मनाला बोचत असावी. बरें, चौकशी करूं असेंहि आश्वासन देत नाही. कारण ती गोष्ट त्यांच्या इभ्रतीच्या आड येत असावी. अशा रीतीनें सरकारची द्विधावृत्ति झालेली दिसते. परंतु अशा अनिश्चित धोरणानें सरकारच्या वागणुकीबद्दल जनतेच्या मनांत असंतोष आणि अविश्वास अधिकच वाढत राहील हें निश्चित. जनतेनें मात्र उघड चौकशीच्या मागणीचें टुमणें सरकारामागे सतत लावीत राहिलें पाहिजे.

---

४ देशबंधु चित्तरंजन दास यांचा स्मृतिदिन ता. १६ रोजीं कलकत्त्यास व सर्व बंगालभर मोठ्या गंभीरपणें पाळण्यांत आला. देशबंधु दास यांचा अनुपम स्वार्थत्याग, त्यांचें उच्च दर्जाचें संघटनाचातुर्य व स्वराज्यसंपादनार्थ त्यांनी केलेला दीर्घोद्योग यांचा राष्ट्रास विसर कसा पडेल ? बंगाल्यांत तर या स्मृतिदिनाच्या उत्सवास आता अगदी सात्त्विक स्वरूप आलें आहे. कलकत्त्याच्या कार्पोरेशननें त्या दिवशीं आपल्या इमारतीवर राष्ट्रीय झेंडा अर्ध्या काठीवर फडकत ठेवून देशबंधूबद्दलचा आदर व त्यांच्या मृत्यूचें दुःख यांचे स्मरण ताजें ठेवण्याचें ठरविलें होतें. परंतु एवढी साधी गोष्टहि पोलीस अधिकाऱ्यांना सहन होईना. त्यांनी ता. १६ जूनपासून एक आठवडापर्यंत राष्ट्रीय निशाण फडकवूं नये असा बंदीचा हुकूम प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटांनी काढावा म्हणून त्यांच्याकडे अर्ज केला ! पोलिसांच्या या पोटदुखीचा खरा अर्थ काय याचा मॅजिस्ट्रेटांना अंदाज आल्यानें त्यांनी हा अर्ज फेटाळला! आपल्या निकालपत्रकांत मॅजिस्ट्रेटांनी म्हटलें आहे कीं, राष्ट्रीय निशाण फडकावणें हा कोणत्याहि कायद्यानें गुन्हाच ठरत नाही. शिवाय १४४ कलमान्वयें कोणी दंगाधोपा करणार असला तर त्यास बंदी करण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेटांना आहेच हें खरें असलें तरी त्या कलमाचा वरील तऱ्हेनें निशाण फडकाविण्यास बंदी करण्याकडे उपयोग करणें अनिष्ट व अन्यायाचें होईल ! मॅजिस्ट्रेटांनीं अशा तऱ्हेनें पोलिसांच्या कारवाईस थप्पड दिल्यानें देशबंधूचा स्मृतिदिनोत्सव कलकत्त्यास उत्तम रीतीनें पार पडला. त्यांची स्मृति कायम राहावी म्हणून लवकरच एक मोठा स्तंभ कलकत्त्यास उभा करण्याचा विचार चालू असून त्याकरितां द्रव्यनिधिहि गोळा होत आहे ही आनंदाची गोष्ट होय.

६ पुण्याचे एक सुप्रसिद्ध नागरिक व सार्वजनिक कार्यकर्ते श्री. भालचंद्र महेश्वर ऊर्फ बापूसाहेब गुप्ते हे त्यांच्यावर दडपशाहीच्या कायद्याखाली नुकत्याच झालेल्या खटल्यांतून दोषमुक्त ठरून सुटले याबद्दल कोणालाहि आनंद व समाधानच वाटेल, याच वेळीं श्री. ल. ब. ऊर्फ अण्णासाहेब भोपटकर यांनी त्यांचें वकीलपत्र घेऊन त्यांच्या बचावाची बाजू मोठ्या कुशलतेने व परिणामकारक पद्धतीने मांडली याबद्दल त्यांचेंहि अभिनंदन करणें जरूर आहे. दडपशाहीच्या कायद्यांतील कलमांचा व्यापकपणा एवढा मोठा आहे व असल्या खटल्यामध्ये मॅजिस्ट्रेटाची दृष्टिहि एवढी काटेकोर बनलेली असते कीं, या कायद्यांच्या कात्रींत सांपडलेल्या गृहस्थाचा तुकडा उडाल्याशिवाय सहसा राहत नाही असा आजपर्यंतचा अनुभव आहे. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं अजीबात निर्दोषी ठरून सहीसलामत सुटल्याचें श्री. गुप्ते यांचें पहिलेंच ठळक उदाहरण होय. या खटल्याची साग्र हकीगत वाचकांना मागील अंकीं आम्हीं कळविलीच आहे. खटल्यांतील मुख्य मुद्दे हे होते कीं, अंदमानांतील राजबंद्यांबद्दल सहानुभूति दाखविण्याकरिता अगर त्यांच्या मृत्यूबद्दल जाहीर चौकशी करा अशी मागणी करणारा ठराव पसार करण्याकरिता बोलावलेली सभा 'सरकार-विरोधी' ठरतें कीं काय? तसेंच असल्या सभांस हजर राहण्याने त्या सभेंत भाग घेतला असें होतें कीं काय? या दोन्ही मुद्द्यांसंबंधी श्री. भोपटकर यांनी मुख्य फिर्यादी सब्-इन्स्पेक्टर रा. कर्णीक यांची उलटतपासणी इतक्या कसोशीने व कौशल्याने केली कीं, त्यांच्या साक्षीनेच वरील दोन्ही मुद्द्यांचा निकाल आपोआपच श्री. गुप्ते यांच्याच बाजूचा होणार हें निश्चित झालें. श्री. गुप्ते यांनी दिलेला जबाब व खटल्याच्या मुळावरच घाव घालणारे त्यांतील मुद्दे महत्त्वाचे होते. मि. हयाम इस्रायल यांनी खटल्याचें मर्म लक्षांत घेऊन ही सभा सरकार-विरोधी होत नाहीं व तसेंच तिला हजर राहणें म्हणजे सभेंत भाग घेणें नव्हे असें ठरविलें; या गोष्टीचें महत्त्व विसरण्यासारखे नाही. या खटल्यापासून पोलीस अधिकारी योग्य तो बोध घेतील अशी आम्हांला आशा आहे. श्री. गुप्ते यांनी खटला लढविला म्हणूनच त्यांना न्याय मिळण्याचा संभव उत्पन्न झाला यांत शंका नाही.

# मोसेखोऱ्यांत काय घडलें ?

( ले. : बळवंतराव बाबूराव पासलकर देशमुख अध्यक्ष—भोर संस्थान प्रजासभा )

ता. १३ जूनच्या केसरीच्या अंकांत रा. दत्तात्रय शंकर वाळिंबे, ऑ. सेक्रेटरी भोर संस्थान प्रजासभा यांनी रा. आगाशे वकील यांच्या ता. २ जून १९३३ च्या अंकांतील मजकुरास उत्तर दिलें आहे. सदर उत्तर म्हणजे ता. ३ मार्च सन १९३३ च्या संस्थांनी स्वराज्याचे अंकांतील "भोर संस्थानांतील मोसेखोऱ्यांतील पोलिसांविरुद्ध तक्रारी" या मजकुराचें पुनर्मुद्रण होय. रा. वाळिंबे यांचे लेखांतील विधानें खरीं नाहींत. पोलिसांत दोन मुसलमान शिपाई होते; पण त्यांचेकरिता देवळाबाहेर मांडव घातलेला होता. हिंदु शिपाई किंवा आम्ही स्थानिक हिंदु लोक हे मुसलमान शिपायांस हिंदूंच्या देवळांत राहण्यास परवानगी देऊं किंवा देवाच्या मूर्तीस डोकें ठेवून झोपण्याची परवानगी देऊं इतके नादान झालेलों नाही. वरील मजकूर रा. नारायण महिपत देशपांडे व त्यांचे सहकारी यांचे अत्याचारावर पांघरूण घालण्याकरिता त्यांचे पक्षपाती लोकांनी प्रसिद्ध करविला आहे. त्याचप्रमाणें पोलिसांचें अनीतिकारक वर्तन, पांचशें रुपये पोलिसांनी हिसकावून घेतले, या तक्रारीहि पोकळ आहेत. देऊळ आडमाल गांवापासून पाऊण मैल लांब आहे, पळसें गांव दीड मैल लांब आहे व रा. नारायण महिपत देशपांडे यांचें बेबटमाळ गांव देवळापासून तीन मैल लांब आहे. तेव्हा देवळांतील पोलिसांच्यामुळे वरील गांवच्या बायकांना घराबाहेर पडणें अशक्य झालें हें रा. वाळिंबे यांचें विधान कितपत खरें आहे याचा वाचकांनीच विचार करावा. त्याचप्रमाणें पुरुष घरीं नसतांना पोलीस लोक घरांत येऊन झोंपतात ही तक्रारहि खरी नाही. आमचें तवगांव अडमाळापासून एक मैलावर आहे. सर्व खरी परिस्थिति आम्हांस पूर्णपणें माहीत आहे. पोलिसांवर विनाकारण शिंतोडे उडविण्याने प्रजापक्षाचा फायदा होईल असें आम्हांस वाटत नाही, ज्या तक्रारी रा. वाळिंबे यांनी नमूद केल्या आहेत त्या खऱ्या असत्या तर त्याबद्दल रा. नारायण महिपत देशपांडे हे कोर्टदरबार केल्याशिवाय राहतेना. प्रजासभेकडे अर्ज दिला असता तरीहि प्रजासभेच्या कार्यकारी मंडळाने ताबडतोब चौकशी केली असती.

घर सोडून बाहेर राहण्यापेक्षां न्यायकोर्टासमोर हजर राहणें व वकील देऊन व आपल्यातर्फे साक्षी-पुरावा देऊन सत्य काय याचा निवाडा करून घेणें हा मार्ग नारायण महिपत यांनी पत्करावा. कोण कोण आरोपी पाहिजे आहेत याचे जाहीर-नामे आता घरांना लागले आहेत. अशांतते-मुळे विधायक कार्यक्रम सुरू करण्यास किंवा दर-बाराकडे जादा अधिकारांची मागणी करण्यास व्यत्यय येतो व सर्व संस्थानी प्रजेचें नुकसान होतें यामुळेच प्रजासभेच्या कार्यकारी मंडळास प्रजेच्याच कांही व्यक्तींबद्दल सहानुभूति दाखविणें अशक्य झालें आहे. तरी रा. नारायण महिपत देशपांडे यांचे हितसंबंधी व्यक्तींना आमची अशी नम्र सूचना आहे कीं, त्यांनी रा. नारायण महिपत देशपांडे व त्यांचे सहकारी यांना न्यायकोर्टांत हजर होण्यास व त्यांच्या तक्रारी शाबीत करण्यास सांगावें.

## लोकमान्य पुण्यतिथि मंडळ

सदर मंडळाची शके १८५५ सालाची वार्षिक सभा ता. १६।६।३३ रोजीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत श्री. न. चिं. केळकर यांचे अध्यक्षते-खाली भरली होती. सभेंत शके १८५४ सालाचा अहवाल व जमाखर्च वाचून मंजूर करण्यांत आल्यावर ता. ८।७।३३ रोजीं होणाऱ्या यंदाचे पुण्यतिथीचा कार्यक्रम (अन्नदान, मधुकरी, लघुरुद्र व कीर्तन) दरसालप्रमाणे ठरविण्यांत आला व पुढील तीन सालांकरिता खालील कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.—

ट्रस्टी—रा. ब. हणमंतराम रामनाथ, श्री. न. चिं. केळकर.

अध्यक्ष—श्री. ल. ब. भोपटकर.

उपाध्यक्ष—श्री. ह. वि. तुळपुळे, धों. कृ. साठे.

सभासद—श्री. के वि. केळकर, श्री. शं. रा. भागवत, श्री. दा. वि. गोखले, श्री. रं. ग्या. लडकत, श्री. ना. वि. भोंडे, श्री. द. दि. चितळे, श्री. गो. भा. जपे.

चिटणीस—श्री. य. ग. कुलकर्णी, श्री. अ. वा. फडणीस.

ऑडिटर—श्री. ग. ना. साने.

## 'प्रतिभासाधन' वादाचा निष्कर्ष

प्रो. ना. सी. फडके यांचा 'प्रतिभासाधन' नांवाचा ग्रंथ क्लेटन हॅमिल्टनकृत 'आर्ट ऑफ् फिक्शन' या पुस्तकाच्या आधारें लिहिला आहे आणि असें असून त्यांत या ऋणाचा निर्देश केलेला नाही असा आक्षेप श्री. रा. प्र. कानिटकर यांनी वर्तमानपत्रांतून पूर्वी केला. त्यावर बराच खल झाल्यानंतर या वादाचा निष्कर्ष काढण्यासाठी श्री. गो. गो. अधिकारी यांच्या खटपटीने पुणे येथे **प्रो. द. वा. पोतदार** यांचे अध्यक्षतेखाली एक समिति स्थापण्यांत आली होती. समितीचे सभासद प्रो. चाफेकर, प्रो. केळकर, प्रो. हर्षे, प्रो. वाडेकर, प्रो. जोग, श्री. ना. गो. चापेकर, श्री. दा. न. शिखरे, श्री. श्री. म. माटे, श्री. बा. मा. आंबेकर, श्री. प्र. के. अत्रे, श्री. कृ. पां. कुळकर्णी, श्री. य. रा. दाते, श्री. ना. ह. आपटे, श्री. वि. सी. गुर्जर, हे होते. तिने आपलें 'निवेदन' प्रसिद्ध केलें आहे; त्यांतील महत्त्वाचा भाग पुढे दिला आहे.—**सं. के.**

### रासायनिक भट्टी कशी साधली?

आपला ग्रंथ लिहितांना आपण ५।५० इंग्रजी ग्रंथांच्या परिशीलनाचा उपयोग केला आहे असें खुद्द रा. फडके यांचें म्हणणें आहे. तसें करणें रा. फडके यांस शक्य आहे यांत शंका नाही. ५।५० इंग्रजी ग्रंथांतील ज्ञान साररूपानें ग्रहण करून व आपल्या स्वतंत्र प्रतिभेच्या रासायनिक भट्टींत त्याचें बाष्पीभवन करून त्यांत मराठी वाङ्मयाच्या उदाहरणांची आणि पदरच्या मसाल्याची भर घालून आपल्या कल्पना नलिकेच्या द्वारें सुंदर आणि स्वच्छ अशा अर्क-रूपानें ते त्यांनी जगापुढे मांडलें आहे. मात्र त्यांत आता मूळ ग्रंथाची ओळख मूळ स्वरूपांत व्हाव-याची नाही असें जर कोणाचें म्हणणें असेल तर तें परीक्षणाअंतीं सिद्ध होण्याजोगें नाही. इंग्रजींतील इतर ग्रंथाची गोष्ट जरी सोडून दिली तरी क्लेटन हॅमिल्टन यांच्या 'Art of Fiction' नामक एकाच ग्रंथांतील विचारकण रा. फडके यांच्या प्रतिभासाधनांत अशा स्वरूपाने चमकतांना आढळतात कीं, ते रा. फडके यांचे नसून मि. हॅमिल्टन यांचे आहेत ही गोष्ट उभयतांच्या परिचितांस सहज कळून येण्यासारखी आहे. परिशिष्ट रूपाने अशा विचारकणांची म्हणजे उभयवर्ति स्थळांची यादी जोडलेली आहे. ती बारकाईने पाहिली असता वरील विधान कोणासहि पटवून घेतां येईल.

### विचारसरणीचा धागा

समितीच्या मनाची अशी पक्की खात्री झाली आहे कीं, प्रतिभासाधन हा ग्रंथ लिहित असतांना इतर कोणत्याहि अन्य इंग्रजी ग्रंथापेक्षा प्रो. फडके यांच्या समोर क्लेटन हॅमेल्टन यांचा Art of Fiction हाच ग्रंथ असला पाहिजे. नुसता असला पाहिजे एवढेच नव्हे तर, त्याचें सूक्ष्म अवलोकन करून आणि आपल्या स्वतः-च्या अवलोकनाची त्यांत भर घालून पण क्लेटन हॅमिल्टनच्या विचारसरणीचा धागा बळकटपणाने हातीं धरून, प्रो. फडके यांनी आपला मार्ग आक्रमिला आहे. प्रो. फडके याचें काम अर्थात् अत्यंत अवघड होतें. एका अत्यंत कठीण विषयावर एक अत्यंत सरस असा ग्रंथ निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा मनांत धरून प्रो. फडके झटत होते आणि समितीला सांगण्याला आनंद वाटतो कीं, प्रो. फडके यांनी आपल्या कामांत पहिल्या प्रतीचें यश संपादन केलें आहे.

### हॅमिल्टनची मूर्ति

हेच विचार जर कोणी इंग्रजांमध्ये मांडले असते तर त्यांना विद्वान मंडळींत कांहीच किंमत मिळाली नसती. परंतु साहित्यशास्त्रविषयक विचारांचा जेथे खडखडाट होता आणि आहे अशा मराठी साहित्यांत प्रो. फडके यांनी तेच विचार आपल्या सुंदर आणि ललित अशा पद्धतीने व्यक्त केल्याकारणाने त्यांनी मराठी वाचकांस आपले ऋणाईत करून ठेविले आहे यांत शंका नाही. मात्र असें करतांना प्रो. फडके यांच्या मागें क्लेटन हॅमिल्टन यांची मूर्ति ठळकपणाने उभी आहे आणि ती त्यांस वारंवार उत्साहित करीत आहे आणि मार्गस्थ करीत आहे हेंहि क्लेटन हॅमिल्टनच्या ग्रंथाची ओळख असणाऱ्या कोणाहि सूक्ष्मदर्शी पुरुषांच्या नजरेंत आल्यावांचून राहणार नाही. वस्तुतः प्रो. फडके यांना हें जें हॅमिल्टनचें साहाय्य मिळालें आहे त्यापासून त्यांस कोणत्याहि प्रकारचा कमीपणा येतो, असें मानण्याचें कारण नाही. पण हें साहाय्य मिळालेंच नाही असें मानणें किंवा म्हणणें मात्र निःसंशय कमीपणा आणल्याशिवाय राहाणार नाही. इतकेंच नव्हे तर म्हणण्याची आवश्यकता किंवा अपेक्षा असता जर तसें म्हटलें नाही किंवा म्हणणार नाही आणि म्हणण्याचें कारण नाही असाच आग्रह धरला तर हें अधिकच वाईट आहे असें साफ लिहिणें आमचें कर्तव्य आहे.

### तीन ग्रंथाचा वर्ग एक नाही

रा. फडके यांचें एक म्हणणें असें आहे कीं, आपला ग्रंथ गीतारहस्य, नीतिशास्त्रप्रवेश किंवा राज्यशास्त्र या ग्रंथांच्या वर्गांतील आहे. विचारांतीं वरील तीनहि ग्रंथ एकाच वर्गांत दाखल करणें जड जाईल. गीताशास्त्र हा एक अत्यंत विस्तृत विवेचनपर, सांगोपांग परामर्ष घेणारा असा ग्रंथ असून त्यांत लोकमान्यांनी कर्मप्रधान ज्ञानभक्तियोगाची स्थापना केली आहे आणि पूर्वसूरींच्यापेक्षा भिन्न असा आपला नवाच सांप्रदाय उपक्रमोपसंहारादि मीमांसाशास्त्रांतील परीक्षणपद्धतीचा अवलंब करून प्रस्थपित केला आहे. शिवाय गीतारहस्यकारांनी जागोजाग आधारांचे उल्लेख सविस्तर दिले आहेत हें विसरतां कामा नये. नीतिशास्त्रप्रवेश, राज्यशास्त्र किंवा प्रतिभा-साधन यांपैकीं कोणताहि ग्रंथ या स्वरूपाचा नाही. अर्थात् गीतारहस्याची कोटी अगदी स्वतंत्र मानली पाहिजे. नीतिशास्त्रप्रवेश आणि राज्यशास्त्र हे दोन आणि प्रतिभा-साधन असे तिन्ही ग्रंथ वजनदारीच्या दृष्टीने पाहतां कांही अंशीं स्थूल मानाने एका वर्गांत बसवितां येतील. पैकी राज्यशास्त्रकर्त्यांनी आपल्या ग्रंथांत कांही संदर्भग्रंथांची यादी जोडलीच आहे आणि नीतिशास्त्रप्रवेशकर्ते यांनी आपण स्वतंत्र विचारप्रवर्तक असा हा ग्रंथ लिहिला अशी प्रतिज्ञा केलेली नाही.

### स्वतंत्र विचाराची भर आहे काय?

मराठी वाचकांच्या दृष्टीने नीतिशास्त्रप्रवेश व राज्यशास्त्र यांच्या कर्त्यांनी फारच उत्तम रचना करून प्रतिभासाधनाच्या कर्त्याप्रमाणेंच त्यांस आपले ऋणाइत केलें आहे यांत शंका नाही. आपले स्वतंत्र विचार व आपलें स्वतःचें अनेक वर्षांचें मनन व चिंतन यांचाहि या ग्रंथकारांनी उपयोग केला असला पाहिजे; किंबहुना तसें न करणें त्यांस अपरिहार्य होतें याविषयीं कोणासच शंका घेण्याचें कारण नाही. पण म्हणून पुष्कळ चांगल्या कल्पना, पुष्कळ चांगली मांडणी आणि पुष्कळ सरस स्थळें या दोनाहे ग्रंथांत दाखवितां आलीं तरी तेवढ्यावरून ते ते ग्रंथकार जगाच्या वाङ्मयांत स्वतंत्र विचारांची भर घालणारे ठरत नाहीत. स्वतंत्रप्राय म्हणून मागे जो वर्ग सांगितला त्या वर्गांत मात्र या दोनहि सुंदर ग्रंथांची गणना करता येईल. एवढेंच काय, त्या वर्गांत त्यांस अगदी पहिल्या ओळींत स्थळ मिळेल हें उघड आहे. प्रतिभासाधन हा ग्रंथहि स्वतंत्रप्राय वर्गांत आम्ही दाखल केलाच आहे. तथापि नीतिशास्त्रप्रवेश आणि राज्यशास्त्र या दोन ग्रंथांपेक्षांहि त्याचा अनुक्रम आमच्या मतें खालचाच लागेल.

### गोंडस ग्रंथापत्य

समिति कोणाचीहि पक्षपाती नाही. समितीस कोणाचा हेवादावा नाही. समिती पक्षपाती असेल तर ती सत्याची पक्षपाती आहे. प्रो. फडके यांचें

यश सत्यास धरून जेवढें वृद्धिंगत होईल तेवढा समितीस मनापासून आनंदच होईल. मराठी वाङ्मयांत प्रो. फडके यांच्यासारखे बुद्धिमान आणि चतुर व यशस्वी लेखक जेवढे निर्माण होतील तेवढा त्या वाङ्मयाचा भाग्योदय होईल अशी समितीची ठाम समजूत आहे. प्रतिभासाधन हें प्रो. फडके यांचें गोंडस ग्रंथापत्य महाराष्ट्र मोठ्या प्रेमानें, आशेने आणि अभिमानानें स्वीकारील याविषयीं आम्हांस यत्किंचित् संदेह नाही. आणि खरोखर ग्रंथाच्या सुंदरपणाविषयीं अथवा उपयुक्ततेविषयीं कसलाच वाद नव्हता. वाद या ग्रंथांत कांहीं स्थळीं प्रो. फडके यांनी क्रेटन हॅमिल्टनच्या ग्रंथांतील विचार उतरून घेतले असून त्या ठिकाणीं क्रेटन हॅमिल्टन यांचा उल्लेख केला नाहीं, आणि तो करावयास पाहिजे असून केला नाहीं, मुद्दाम गाळल्यासारखा तो गाळला अशा प्रकारचाच जो आक्षेप प्रमाणें देऊन मुख्यतः पुढे मांडण्यांत आला होता त्यावरून निघाला होता.

### एकच वाक्य

या वादाचा अग्नि वणव्याप्रमाणें त्वरेने फुलविला गेला आणि मग समितीची स्थापना झाली आणि त्याचें फल या निर्णयाच्या रूपानें सादर होत आहे. खरोखरीच प्रो. फडके यांनी आधारभूत ग्रंथांची यादी किंवा प्रस्तावना ही अजागलस्तनवत् निरर्थक म्हणून काढून टाकली असती तरी कांहीं विशेष बिघडलें असतें असें नाहीं. फक्त कोठें तरी ठळकपणानें पुढील एक वाक्य अथवा वाक्यांश त्यांनी दाखल करावयास पाहिजे होता— **क्रेटन हॅमिल्टनप्रभृति अनेक इंग्रजी ग्रंथांच्या साहाय्यानें तयार केलेला,**

# आजोबांना नातवंडांची काळजी!

कन्यागत सालाप्रमाणे बहुधा दर बारा वर्षांनी स्वराज्याची गंगा हिंदुस्थानाला भेटावयास येते व आपल्या धारा अल्प प्रमाणांत सोडून गुप्त होते असा अनुभव आहे. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी मोर्ले–मिंटो सुधारणा आल्या व त्यानंतर बारा वर्षांनी मांटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणांचा अवतार झाला. पण पहिल्या सुधारणांपेक्षा दुसऱ्या सुधारणांचें महत्त्व या दृष्टीनें कीं त्यांनी नोकरशाहीची फळी फोडून कांहीं खात्यांतील गोऱ्या नोकरवर्गास हिंदी दिवाणांचे अंकित बनविलें. त्यामुळे तेव्हापासून शिक्षण, पब्लिक वर्क्स, जंगल, पतपेढ्या व शेतकी इत्यादि खात्यांमधील गोऱ्या–काळ्या नोकरवर्गावर हिंदी दिवाणापुढे वांकण्याची पाळी आली. ज्यांनी एकजात सर्व लहानथोर हिंदी लोकांना तुच्छ लेखून गुलामाप्रमाणे वागवावें त्यांनी स्वतःस ताबेदार समजून त्यांचे हुकूम आदबीनें झेलण्यास त्यांजपुढे धावावें यासारखी गोऱ्या नोकरवर्गास मानहानिकारक गोष्ट ती कोणती?

सुमारें शंभर वर्षेपर्यंत स्वतःस हिंदुस्थानाचे चाकर म्हणवून घेऊन नोकरशाहीनें हिंदुस्थानावरच धनीपणा गाजविला. नोकरवर्गाच्या त्या शिरजोरपणास मूठमाती देऊन तुम्हीं हिंदुस्थानाचे राजे नसून चाकर आहां असें कान धरून सांगण्याचा मान माजी भारतमंत्री मॉंटेग्यू यांनीच मिळविला. पण ताहि मन पुढील एक दीड वर्षांत बदलणार. बारा वर्षांपूर्वी इलाख्यांतील कांहीं खातीं हिंदी लोकांच्या हवालीं करण्यांत आलीं. पण आता सर्वच प्रांतिक खातीं हिंदी दिवाणांच्या ताब्यांत जाणार असल्यामुळे ज्यांच्यावर हा अंकितपणाचा प्रसंग ओढवणार त्यांचीं मनें चिंतेनें चूर व्हावीं हें स्वाभाविक होय. सगळ्या नोकरांत सिव्हिल सर्व्हिसमधील नोकरांची प्रतिष्ठा मोठी. सर्व खात्यांत मुलकी, दिवाणी व पोलीस हीं खातीं श्रेष्ठ. त्यांपैकीं मुलकी व दिवाणी खात्यांतच सिव्हिल सर्व्हंटांचा मुख्य भरणा असून डिस्ट्रिक्ट जज्ज, डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व त्याच्या हाताखालील डिस्ट्रिक्ट पोलीस सुपरिंटेंडेंट या त्रिमूर्ति एकवटल्या कीं जिल्ह्यापुरतें तरी तेंच इंग्रजी राज्य असे समजण्यास हरकत नाहीं. सुधारणांच्या नव्या मन्वंतरांत याहि अधिकाऱ्यांचा तोरा कमी होऊन त्यांना हिंदी दिवाणांपुढे नमावें लागणार असल्यामुळे त्यांचें डोकें भणभणून गेलें आहे. हिंदुस्थानांतील खरें राज्य या सिव्हिल सर्व्हंटांचेंच. तेच कलेक्टर, तेच कमिशनर, तेच जज्ज, तेच गव्हर्नराचे सेक्रेटरी, तेच गव्हर्नराचे मंत्री व तेच प्रत्यक्ष गव्हर्नरहि. अशी आतापर्यंतची सांखळी असून त्याच सांखळीनें सारा हिंदुस्थान देश करकचून आवळला गेला आहे.

त्या सांखळीचे दुवे निखळण्याची वेळ जवळ आली आहे. ती सांखळी तोडून मध्येच गोऱ्या कार्यकारी मंत्र्याऐवजीं काळे कार्यकारी मंत्री प्रांतानिहाय घुसणार, कलेक्टर–कमिशनरावर हुकमत चालविणार व नोकरशाहीची अभेद्य ठरलेली ही शेवटची पण महत्त्वाची

फळीहि फोडणार. पांढऱ्या खलित्यांत म्हटलें आहे तें शेवटपर्यंत टिकल्यास नवीन सुधारणांचा अंमल बसल्यावर पांच वर्षांनी सिव्हिल सर्व्हेंटांची विलायतेहून येणारी टोळधाड अजीबात न म्हटली तरी पुष्कळशी रोडावण्याचाच संभव आहे.

हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हंट कांही झाले तरी ब्रिटिश सरकाराचे ताबेदारच असल्याने ब्रिटिश मंत्रिमंडळाकडून जें धोरण ठरून येईल त्यास मान तुकविण्यास त्यांनी तयार राहिलेंच पाहिजे. याच अर्थाने नोकरींतील सिव्हिल सर्व्हेंटांची नवीन योजनेस अनुमति आहे असें होअरसाहेबांनी कांही दिवसांपूर्वी पार्लमेंटांत सांगितलें. आपली नापसंती ते तोंडाने वदून न दाखवोत, पण ती त्यांच्या चर्येवर उमटल्यावांचून कशी राहील ? हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हेंटांपैकीं कांही सनदी नोकर संयुक्त कमिटीच्या वऱ्हाडी मंडळीबरोबर विलायतेस गेले आहेत. कित्येक जण रजेवर म्हणून इंग्लंडांत आहेत व थोडे इंडिया ऑफिसच्या परिवारांत पूर्वीपासूनच गुरफटले आहेत. ही सिव्हिल सर्व्हेंटांची चालू पिढी. नुकतेच विलायतेस गेलेले सर चार्लस इन्नेस यानी हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हिस मध्ये चाळीस वर्षे घालविलीं आहेत. व्हाइसरॉयांच्या कार्यकारी कौन्सिलांतील सभासदाचें काम त्यांनी केलें आहे आणि अखेर ब्रह्मदेशाच्या गव्हर्नराच्या दर्जावर पोचून व ब्रह्मदेशांत गुण उधळून आता विलायतेंत बसून पेन्शन खाण्याच्या विचारांत ते आहेत. ती सिव्हिल सर्व्हेंटांची मागची पिढी.

वरील दृष्टीने विचार केल्यास सर चार्लस इन्नेस हे सिव्हिल सर्व्हेंटांच्या चालू पिढीचे तीर्थरूप समजण्यास हरकत नाही. इन्नेस साहेब परवापर्यंत ब्रह्मदेशाचे गव्हर्नर होते व ब्रह्मी लोकांत आपल्या पाताळयंत्री स्वभावाने फूट पाडीत होते. पण सर मायकेल ओड्वायर यांच्या मांडीखालचा पंजाबाच्या गव्हर्नरीचा उमदा घोडा निसटून गेल्यास बारा वर्षे लोटलीं. म्हणून सिव्हिल सर्व्हेंटांच्या चालू पिढीने त्यांना आजोबांचाच मान द्यावा हें योग्य होय. लंडन शहरीं हिंदी सिव्हिल सर्व्हेंटांचा एक क्लब आहे. त्या क्लबामार्फत थोड्या दिवसांपूर्वी मेजवानीचा समारंभ जुळून आला. सदर समारंभास ओड्वायर आजोबा आपल्या चिरंजीवास बरोबर घेऊन नातवंडांना प्रेमाने कुरवाळतांना आढळले !

खरें म्हटलें असतां हिंदुस्थानाच्या अन्नावर वाढलेल्या वरिष्ठ प्रतीच्या नोकर वर्गाचें हें संमेलनच होतें, व त्या संमेलनास कलेक्टरापासून गव्हर्नरांपर्यंतचे अधिकारी हजर राहिले होते. अशा या मेळ्यांत एखादा माजी व्हाइसरॉय येऊन मिळता तर सदर सोहळा सर्वांगसुंदर ठरला असता. तसें हुडकूंच गेल्यास इंग्लंडांत माजी व्हाईसरॉयहि कांही थोडे नाहीत. तथापि त्यांपैकीं कोणीहि सिव्हिल सर्व्हंटांच्या क्लबास या प्रसंगीं लाभला नाही. तरी पण त्यांतल्या त्यांत सर ऑस्टिन चेंबरलेन यांनी क्लबाला उपकृत केलेंच. चेंबरलेन हे पार्लमेंटच्या संयुक्तकमिटीचे एक सभासद आहेत. व कांही वर्षांपूर्वी भारतमंत्र्याचें काम करून त्यांनी व्हाइसरॉयावरहि सासूपणा गाजविला आहे. या दृष्टीने एकीकडचा उणेपणा दुसरीकडील अधिकाराने त्यांनी भरून काढला असेंहि म्हणतां येईल.

आमच्याकडील जुन्या शिष्टमंडळीप्रमाणे इंग्रज लोक जेवतांना 'गोविंद गोविंद' कधी म्हणावयाचे नाहीत. पण अन्न हेंच त्यांचें ब्रह्म असल्यामुळे अन्नावर बसून ते अन्नाचीच आराधना करावयाचे. त्याप्रमाणें त्यावेळीं मेजावरील अन्नाकडे डोळे भरून पाहात आणखी पांच वर्षांनी आमच्या सिव्हिल सर्व्हिसमधील नातवंडांची वाट काय होणार असा कंठ दाटून आल्यासारखा हुंदका ओड्वायर यांनी दिलाच ! पण सर ऑस्टिन चेंबरलेन व सर चार्लस इन्नेस यांनी धीर न सोडता मुत्सद्दयाला शोभतील असे पोक्त व शांतवनपरच उद्गार काढले. चेंबरलेनसाहेब एकवार भारतमंत्री होते. त्या वेळच्या अनुभवावरून हिंदुस्थानांतील लोकांची मनोवृत्ति झपाट्याने बदलत असल्याविषयीं त्यांची खात्री झालीच होती. ती मनोवृत्ति लक्षांत घेऊन व हिंदी लोकांना इंग्रज मुत्सद्दयांनी स्वराज्याच्या वेळोवेळीं दिलेल्या अभिवचनांचें स्मरण ठेवून इंग्रज नोकरांनी आपली बळकटी हमालाच्या डोक्यावर देऊन हिंदुस्थानांतून बाहेर पडण्याकरितां 'पी. अँड ओ'च्या बोटीवर पाय ठेवण्यास सिद्ध असलें पाहिजे असा त्यांनी इषारा दिला. इंग्रज अंमलदार हे बोलूनचालून हिंदुस्थानाचे नोकर होत. तेव्हा यजमानपणाचा आजपर्यंत दडपून चालविलेला अधिकार गुंडाळून ठेवून ज्या कोणाला नांवाप्रमाणें नोकरच राहाण्याची पाळी येईल त्यांनी त्यांत खेद मानण्याचें कारण काय, असा त्यांनी सिव्हिल सर्व्हेंटांना रोकडा सवाल केला आहे. हिंदी लोक हे यजमान आहेत व इंग्रज त्यांचे नोकर आहेत तर हिंदी लोकांना स्वराज्य चालविण्याची संधि मिळाली असता त्यांस इमानाने मदत करणेंच इंग्रजांचें कर्तव्य असल्याचेंहि त्यांनी सांगितलें.

सर चार्लस इन्नेस यांच्या भाषणाचा आशयहि तोच होता. त्यांनी सिव्हिल सर्व्हेंटांस हिंदी लोकांच्या स्वराज्यास आपल्या स्वार्थाकरिता मोडता न घालण्याचाच सल्ला दिला. सिव्हिल सर्व्हेंटांना हिंदी

लोकांपुढे आम्ही तुमचे राज्यकर्ते या तोऱ्याने छाती काढून चालण्याचे दिवस यापुढे राहणार नाहीत; तथापि त्याबद्दल विषाद न मानता हिंदी लोकांशीं गोडी-गुलाबीने व नम्रतेने वागण्याची नव्या सनदी नोकरांची तयारी असल्याचें इन्नेस यांस माहीत आहे. सनदी नोकरांनी हुकूम सोडण्याचा काळ गेला व हिंदी लोकांस सल्ला सांगण्याचा काळ आला असला तरी त्यांना पानावरून कोणी उठवून लावणार नाही याविषयी इन्नेस यांना संशय नाही. सुधारणांचा कायदा अमलांत आल्यावर पांच वर्षांनी कदाचित् नवीन इंग्रज सिव्हिल सर्व्हंटांना हल्लीइतकीं ताटें वाढून मिळणार नाहीत. परंतु त्यांचा जथा आजच हिंदुस्थानांत एवढा मोठा आहे कीं, तो निखालस मोडण्याला पन्नास पाऊणशे वर्षें सहज लागतील असा इन्नेस यांचा अंदाज आहे. चेंबरलेन व इन्नेस यांनी असा कितीहि वेदान्त सांगितला तरी आपली चंदी अशीच चालू राहावी यासाठी हिंदी स्वराज्याच्या वाटेंत धोंड्याप्रमाणें आडवे पडण्यास पोटार्थी व अहंमन्य सिव्हिल सर्व्हंट कमी करणार नाहीत असें त्यांच्या आजोबांच्या म्हणजे ओड्वायरसाहेबांच्या जोड कमिटी-पुढील रदबदलीवरून मानावे लागतें.

# हिंदुस्थानावर एक कोटीची धोंड

ता. १५ रोजीं अमेरिकेला कर्जफेडीबाबत यावयाचा हप्ता, हिंदुस्थानांतील चांदी हिंदी जनतेच्या संमतीशिवाय विकत घेऊन, ग्रेटब्रिटनने भरला याचा निषेध आम्हीं गेल्या अंकीं केलाच आहे. ग्रेटब्रिटनला हा हप्ता भरण्याची मनापासून इच्छा नव्हती व हप्ता भरावा कीं नाही याबद्दल त्या राष्ट्राचें धोरणहि स्पष्ट ठरलें नव्हतें. एका बाजूने फ्रान्सने आपला हप्ता चुकविला तसा ग्रेटब्रिटननेंहि चुकवावा असें सर्वसाधारण इंग्रज लोकांचें मत असलें तरी ग्रेटब्रिटनने हप्ता भरण्यावरच आर्थिक परिषदेचें काम अवलंबून असल्यामुळे मुख्य मंत्री मि. मॅक्डोनाल्ड यांनी हप्त्याचा कांही भाग भरला. मि. राम्से मॅक्डोनाल्ड व त्यांचें प्रधानमंडळ यांनी हप्ता भरण्याची तारीख चुकवावयाची नाही पण हप्ताहि पुरता द्यावयाचा नाही व जी रक्कम द्यावयाची तीहि सुवर्णरूपाने न देतां चांदीच्या रूपाने द्यावयाची असे योजलें व त्याप्रमाणें केलेंहि. हेतु हा कीं त्यामुळे बँक ऑफ इंग्लंडच्या सुवर्णगंगाजळीला धक्का लागूं नये.

एक कोटि डॉलरांचा हप्ता भरण्याकरितां दोन कोटी औंस चांदी कोठून आणावी हा प्रश्न येतांच ब्रिटिश प्रधानमंडळाने हिंदुस्थान सरकारा-जवळील चांदी घेण्याचें ठरविलें; व ब्रिटिश सरकाराचें हें धोरण फडणवीस मि. नेव्हिल चेंबरलेन यांनी पार्लमेंट सभेंत जाहीरहि केलें. तें ऐकून ब्रिटिश मतदार खूष झाले. ग्रेटब्रिटन अब्रूदार राष्ट्र आहे, फ्रान्ससारखें चुकारतट्टू नाही असें मिशीवरून हात फिरवीत मि. मॅक्डोनाल्ड यांना अशा रीतीने जगाला दाखवितां आलें. ग्रेट ब्रिटनने हा कर्जफेडीचा हप्ता चुकविला असता तर आर्थिक परिषदेंतून अमेरिकेने अंग काढून घेतलें असतें, व त्यामुळे आर्थिक परिषद मोडलीहि असती. या संकटांतून मोठ्या मुत्सद्देगिरीने ब्रिटिश प्रधानमंडळाने मार्ग काढला, याबद्दल आर्थिक परिषदेला आलेल्या प्रतिनिधींनीहि त्यांस धन्यवाद दिला.

ग्रेटब्रिटनने ही भलाई मिळविली; पण ती हिंदुस्थानाचा बळी देऊन मिळविली. हिंदुस्थान सरकाराजवळील चांदी विकत घेऊन कर्जफेड करण्याचे ठरवितांना ब्रिटिश प्रधानमंडळाने हिंदुस्थानसरकाराला विचारलेंहि नाही असें दिसतें. हिंदुस्थानसरकारचे फडणवीस सर जॉर्ज शूस्टर हे विलायतेला जाण्यापूर्वी त्यांना वर्तमान-पत्राच्या बातमीदारांनी असा प्रश्न विचारला होता कीं, '१५ जूनचा हप्ता फेडण्याकरितां हिंदुस्थानसरकारा-जवळील चांदीची मागणी ब्रिटिश सरकारने केली आहे काय?' यावर सर जॉर्ज यांना सांगितलें कीं, 'तुम्ही म्हणतां ती एक गप्प आहे. आज-तागायत हिंदुस्थान सरकाराला त्याची गंधवार्ताहि नाही.'. सर जॉर्ज शूस्टर यांचें हें विधान धादांत खोटें होतें असें म्हणण्यापेक्षां ब्रिटिश सरकाराने हिंदुस्थानसरकाराला विचारलेंच नाही असें म्हणणें सयुक्तिक ठरेल.

पण या योजनेने आर्थिक व राजकीय असें हिंदुस्थानाचें दुहेरी नुकसान झालें आहे. मि. नेव्हिल चेंबरलेन यांनी पार्लमेंटांत एवढेंच सांगितलें कीं, पन्नास सेंटांना एक औंस या भावाने एक कोटि डॉलर अमेरिकेला देण्याचें ठरलें असून जरूर तेवढी चांदी हिंदुस्थान-सरकाराकडून विकत घेण्याची व्यवस्था झाली आहे. मि. चेंबरलेन यांनी हिंदुस्थानसरकाराकडून कोणत्या भावाने आपण चांदी खरेदी केली हें सांगितलें नाही. अगर अजूनपर्यंत हिंदुस्थानसरकारानेही या व्यवहाराची माहिती देणारें पत्रकहि प्रसिद्ध केलें नाही. चांदीचा भाव औंसाला साडेछत्तीस सेंट असा आहे.

हिंदुस्थानाच्या पदरांत यापेक्षा अधिक भाव पडणार नाहीच पण कमी पडला नाही म्हणजे मिळविली !

कारण औंसाला साडेबत्तीस सेंट या भावाने ब्रिटिश सरकारानें हिंदुस्थानाची चांदी खरेदी केली अशी बातमी असल्याचा उल्लेख संयुक्त हिंदी व्यापारी-संघाचे अध्यक्ष श्री. नलिनीरंजन सरकार यांनी आपल्या पत्रकांत केला आहे. या सगळ्याचा भावार्थ हा कीं, ग्रेटब्रिटनने हिंदुस्थान सरकाराकडून औंसाला साडेबत्तीस अगर साडेछत्तीस सेंट या भावानें चांदी घेऊन आपलें देणें मात्र औंसाला पन्नास सेंट या भावानें भागविलें. कर्जफेडीच्या या व्यवहाराचें रुपयाच्या भाषेंत स्पष्टीकरण करावयाचें तर असें म्हणतां येईल कीं चांदीचा सध्याचा भाव लक्षांत घेतां ग्रेटब्रिटनने आपलें साडेतीन कोटि रुपयांचें कर्ज अडीच कोटि रुपयांत फेडलें. म्हणजे या व्यवहारांत ग्रेटब्रिटनने मधल्यामध्ये एक कोटि रुपये खिशांत टाकले. ब्रिटनच्या प्रधानमंडळाचे अंगीं जर माणुसकी असेल तर त्यांनी हे एक कोट रुपये ब्रिटनच्या खिशांत न टाकता हिंदुस्थानाला दिले पाहिजेत.

गेलीं कांही वर्षें हिंदुस्थानसरकार मधून मधून चांदीची विक्री करीत असतें. परंतु त्यापैकी बरीचशी म्हणजे वीस कोटि औंस चांदी, १९१८ सालीं व्यावहारिक दृष्ट्या चांदीची किंमत औंसाला पंचायशी सेंटप्रमाणें असतां, अमेरिकेकडून औंसाला १०१॥ सेंट या भावानें विकत घेण्यांत आली होती. चांदीच्या खेरदीविक्रीच्या व्यवहारांत आजतागायत पंधरा कोटि रुपयांचें नुकसान झालें असावें असा तज्ज्ञांचा अदमास आहे. यावर असें सांगण्यांत येईल कीं, हिंदुस्थानाच्या चलनव्यवस्थेंत सुधारणा सुचविण्याकरिता नेमलेल्या हिल्टन यंग कमिशनानेच आपल्या जवळची चांदी विकून टाका असें हिंदुस्थान सरकारास सुचविलें होतें. परंतु आमचें म्हणणें असें कीं, कमिशनानें चांदीच्या विक्रीची सूचना केली ती हिंदुस्थानाच्या गंगाजळींत सोनें अधिक यावें व सुवर्णचलनपद्धती पूर्णांशानें सुरू करणें शक्य व्हावें म्हणून केली होती. त्या दृष्टीने चांदीची आज विक्री करून हिंदुस्थान सरकारानें सुवर्णचलनपद्धति सुरू करण्याचा मार्ग सुकर केला आहे काय, व जी चांदी विलायत सरकाराला विकण्यांत आली तिची किंमत स्टर्लिंगच्या चलनी चिटोऱ्यांत न मिळतां सुवर्णाच्या लगडींत मिळून त्या लगडी हिंदुस्थानांत पाठविण्यांत येणार आहेत काय, हा मुख्य प्रश्न आहे. त्याचें समाधानकारक उत्तर हिंदुस्थानसरकारास देतां येईल असें आम्हांस वाटत नाही. हिंदुस्थानास आर्थिक स्वातंत्र्य नसल्यामुळे हिंदुस्थान सरकारास ब्रिटिश सरकार गुलामाप्रमाणे कसें वागवितें त्याचें हें ताजें प्रत्यंतर होय.

# मुंबई विद्यापीठांतील घडामोडी

ता. १२ रोजीं मुंबई येथे विद्यापीठाच्या सभागृहांत सीनेटची बैठक सुरू झाली, व ती शुक्रवारीं समाप्त झाली. १९३३।३४ सालच्या अंदाजपत्रकाचा विचार करणें हा विषय त्या सीनेटपुढे मुख्यतः होता. या बैठकींत प्रथमतःच दिसून येणारी घडामोड म्हणजे रेव्ह. जे. मॅकेन्झी हे व्हाइस-चॅन्सेलरच्या पदापासून निवृत्त झाले आणि त्यांचे जागीं श्री. चंदावरकर हे अधिष्ठित झाले. पुढील गृहस्थांना फेलो करून घेण्यांत आलें. श्री. चंदावरकर ( आर्ट्स् ) प्रि. फॅरन ( आर्ट्स् ) मि. मीरचंदानी ( आर्ट्स् ) प्रि. खाड्ये ( आर्ट्स् ) प्रि. लिमये ( आर्ट्स् ) कर्नल नट ( मेडिसिन ) डॉ. खानोलकर ( मेडिसिन ).

**४० वाचकांसाठी ८ हजार रुपये**

चर्चेच्या रंगणांत प्रथम 'युनिव्हर्सिटी जर्नल' प्रविष्ट करण्यांत आलें. तें नियतकालिक आणखी ५ वर्षें चालू ठेवावें व त्यासाठी दरसाल ८००० रुपयांची देणगी द्यावी अशी शिफारस सिंडीकेटने केली होती. ती मान्य करावी असा ठराव डॉ. वाडिया यांनी मांडला. या नियतकालिकाचा उपयोग कितपत होतो याची चौकशी करण्यासाठी एक कमिटी नेमण्यांत आली होती. तिने पहिले तीन अंक पाहून असा शेरा दिला आहे कीं, संशोधनाच्या दृष्टीनें 'जर्नल' उपयुक्त आहे. ही उपयुक्तता मान्य करून श्री. एम. आर. परांजपे यांनी उपसूचना मांडली कीं, दरसाल ४००० रुपयांप्रमाणे तीन वर्षें खर्च सोसावा. यां जर्नलला फक्त ४० वर्गणीदार आहेत असें म्हणून मि. के. टी. शहा प्रभृतींनी त्याच्यावर कुऱ्हाड उचलली; तर डॉ. महाजनी, प्रि. हॅमिल वगैरेंनी संशोधनाच्या दृष्टीनें 'जर्नल'ची आवश्यकता प्रतिपादन केली. अशी खणाखणी दोन तास चालल्यानंतर मूळ ठराव बहुमतानें मंजूर झाला.

**देशी भाषांना ' सन्मान्य ' शाखांवर स्थान**

पुढील कॉलेजांना किंवा वर्गांना सीनेटने मान्यता दिली.

( १ ) **शिकारपूर येथील आर्ट्स् कॉलेज**

( २ ) **कोल्हापूर येथील लॉ कॉलेज** (५ वर्षें)

( पहिल्या वर्गांत १५० व दुसऱ्या वर्गांत १०० ही विद्यार्थ्यांची संख्या आणि ५० विद्यार्थ्यांची राहण्याची सोय. )

( ३ ) **सांगली येथील विलिंग्डन कॉलेज**

( इंटरमध्ये ' बी ' ग्रुप सायन्सचे २४ पर्यंत विद्यार्थी शिकविणें, मुदत ३ वर्षें )

( ४ ) **नाशिक येथील हंसराज कॉलेज**

( मराठी ' सन्मान्य ' शाखा आणि गुजराथी )

( ५ ) **कर्नाटक कॉलेज** ( बी. ए. मध्ये कानडीची सन्मान्य शाखा. )

( ६ ) कोल्हापूरचें **राजाराम कॉलेज** व सांगलीचें **विलिंग्डन कॉलेज** ( मराठीची सन्मान्य शाखा आणि बी. ए. ला. कानडी. )

( ७ ) सुरत येथील **मगनलाल कॉलेज** ( गुजराथीची सन्मान्य शाखा. )

( ८ ) पुणें येथील **वाडिया कॉलेज** ( मराठी व फ्रेंच यांची सन्मान्य शाखा. )

**संपत्ति राबवा**

गुदस्ताचें पक्कें अंदाजपत्रक व चालू सालाचें कच्चें अंदाजपत्रक सिंडिकेटनें तयार केलें आहे त्याला मान्यता द्यावी असा ठराव मि. वाडिया यांनी मांडला. १९३३।३४ सालची अंदाजी जमा १०,७०,१२२ रुपये असून खर्चाचा अंदाज ८,५८,०९३ इतका आहे. धंदेशिक्षणाच्या शाळेकरितां तीन लाख रुपये खर्च करण्याचें योजिलें आहे. गेलीं दहा वर्षें विद्यापीठाची शिल्लक सारखी वाढत असून तिचा कायमनिधि ३० लाख रुपयांपर्यंत आहे. या पैशाचा संशोधनादि कार्याकडे विनियोग करावा अशा सूचना बऱ्याच सभासदांनी मांडल्या. मि. के. टी. शहा यांनी विद्यापीठाचा स्वतंत्र छापखाना असावा असें सुचविलें. त्यायोगानें परीक्षेचे पेपर फुटणार नाहींत हाहि फायदा इतर फायद्यांबरोबर त्यांनी सांगितला. त्याचप्रमाणे इतर विद्यापीठांपेक्षा मुंबई विद्यापीठाच्या परीक्षांची फी शें. २५ ते ४० इतकी जास्त आहे. ती कमी करण्यासाठीं परीक्षकांची संख्या आंखूड करावी. आणि १५००० रुपये घेणारे ' नियामक '( Moderator ) अजीबात नाहींसे करावे असेंहि त्यांनी सुचविलें.

**वशिल्यामुळेच परीक्षक !**

परीक्षकांच्या जागेवर वशिल्याचीं तट्टें चरत ठेवण्याच्या प्रचलित पद्धतीवर मि. शहा यांनी खरपूस कोरडे ओढले आणि इतर सभासदांनीहि त्यांना चांगला हातभार लावला. त्यामुळे वादाची धूळ बरीच उडाली. परीक्षेचा खर्च म्हणून ५॥ लाख रु.ची जी देणगी दिली जाते, तींत ५० हजार रुपयांची कपात मि. शहा यांनी सुचविली व वादाला किल्ली दिली. फक्त मॅट्रिकची परीक्षा पास झालेल्या इसमाला मॅट्रिकच्या इंग्रजीचे परीक्षक नेमले अशीं एक सोडून पांच उदाहरणें मला माहीत आहेत असें त्यांनी सांगितलें. ज्याला अध्यापनाचा गंध नाहीं अशा वकिलाच्या गळ्यांत परीक्षकाची माळ घातल्याचा दाखला त्यांनी सभासदांपुढे मांडला आणि एका भूगोलाच्या परीक्षकाची लायकी तर एवढीच होती कीं, त्याने युरोप खंड व कदाचित् कांहीं नकाशे यांचें अवलोकन केलें होतें. अशीं अनेक उदाहरणें या वादाच्या मंथनांतून बाहेर पडलीं. त्या सर्वांचा निष्कर्ष असा कीं, ज्ञान, अनुभव इत्यादि शैक्षणिक गुणांपेक्षा ओळख, वशिला, या जादूच्या कांडीनेंच ' परीक्षकगिरी ' वश होते. परीक्षकाची जागा बहाल करण्याचीं सूत्रें ' ॲकॅडेमिक कौन्सिल ' च्या हातीं असतात. त्या कौन्सिलांतील सभासद या अंदाधुंदीला जबाबदार आहेत असें मत सीनेटमध्ये दिसून आलें. तथापि परीक्षकांचा मेहेनताना कमी करणें हा या रोगावर उपचार नव्हे या विचारानें मि. शहा यांची सूचना ३१ सभासदांनी हाणून पाडली. मात्र जवळ जवळ त्याच हेतूची पण फक्त १ रुपया कपात सुचविणारी मि. वाड यांची सूचना मंजूर झाली. या वादांतील गंमत एवढीच कीं, ज्या ॲकॅडमिक कौन्सिलसंबंधी नापसंती व्यक्त करण्यांत आली त्याचेच दोन सभासद सीनेटमध्ये हजर होते, आणि त्यांनीहि ॲकॅडमीच्या या 'दुष्ट व निंद्य' धोरणाच्या बुकलाबुकलींत यथेच्छ भाग घेतला!

**युरोपियनांचें नेमला!**

' परि माझा पांडवांकडे ओढा ' अशी वृत्ति चटसाऱ्या इंग्रजांची आहे. काळाने त्यांचें नाक दाबल्यामुळे हिंदीकरणाचे शब्द त्यांच्या तोंडांतून चुकूनमाकून बाहेर पडतात हें खरें. पण प्रत्यक्ष कृतीत करावयाची वेळ आली म्हणजे न्यायबुद्धिपेक्षाहि 'रक्त घट्ट' असतें असेंच ते दाखवितात. या स्वार्थी व अन्याय्य वृत्तीची चुणक सीनेटच्या सभेंतहि दिसून आली. रासायनिक धंदेशिक्षण या खात्याच्या डायरेक्टराची नेमणूक करण्याचा प्रश्न नुकताच सिंडिकेटपुढे आला होता. त्या वेळीं सिंडिकेटच्या मताचा कांटा पर्वपरम्परेनुसार युरोपियनांच्या बाजूकडेच झुकला ! डॉ. आर. बी. फॉरस्टर यांची नेमणूक सिंडिकेटनें करूनहि

टाकली ! आणि तसें करतांना लायक अशा हिंदी तज्ज्ञांची पायमल्ली बिनदिक्कत करण्यांत आली ! म्हणून मि. शहा यांनी १८००० रुपयांच्या कपातीची सूचना आणली आणि त्यायोगें टीकेच्या धरणाचा दरवाजा खोलला गेला.

### हिंदी-करणाची उचलबांगडी

डायरेक्टराची निवड करण्यासाठी रेव्ह.मॅकेन्झी, सर रामन्, सर विश्वेश्वर अय्या, डॉ नाझीर अहमद आणि डॉ. व्हीलर यांचें मंडळ नेमण्यांत आलें होतें. त्या मंडळांतील तीन सभासदांनी तिघा हिंदी तज्ज्ञांची शिफारस केली होती. सर्व सभासदांना कोणीहि मान्य नव्हता हें खरें; पण त्यांतले त्यांत संमतीचा कौल पडलाच तर हिंदी तज्ज्ञांच्या बाजूने पडला होता. शिवाय सीनेटने "हिंदीकरणाकडे लक्ष द्यावें" असा ठरावहि केला होता; पण या दोनहि बंधनांना झुगारून देऊन सिंडिकेटने एका इंग्रजाची नेमणूक आणि तीहि १५०० रुपयांसारख्या जाड्या पगारावर केली. सिंडिकेटचे एक सभासद मि. दळवी यांनी या कृत्याचा निषेध करून स्पष्टपणें असें सांगितलें कीं, डॉ. फॉरस्टरपेक्षा अधिक लायक अशा हिंदी तज्ज्ञांचे अर्ज आलेले होते व त्यांच्या मुलाखतीहि घेतलेल्या होत्या. उलटपक्षीं या डॉक्टरसाहेबांचे तोंडदेखील तपासणी-मंडळानें पाहिलेलें नव्हतें. त्याचप्रमाणे येथल्या स्थानिक परिस्थितीचें मुखावलोकनहि डॉक्टरमहाशयांनी केलेलें नाही ! त्यांची नेमणूक करण्याला शिफारस कोणाची ? तर ब्रिटिश साम्राज्यांतील युनिव्हर्सिटी ब्यूरोच्या तपासणी-मंडळाची !

### निषेधाचा बडगा दाखविला !

मुंबईच्या तपासणी-मंडळापैकीं दोघा सभासदांनी डॉक्टरमजकुरांना उचलून धरलें होतें अशी बढाई सांगून प्रि. हॅमिल हे डॉ. फॉरस्टर यांचें वकीलपत्र घेऊन पुढे सरसावले. पण त्यांनाहि केवळ लायकीचें ढोलगें वाजवूनच खाली बसावें लागलें. मि. शहा यांची सूचना बहुमताने मंजूर झाली. याचा स्पष्ट अर्थ असा कीं, सिंडिकेटने हिंदी तज्ज्ञांना (यांत डॉ. कोकटनूरांसारखे विख्यात व अनुभविक विद्वानहि होते असें म्हणतात.) लाथाडून एका इंग्रजाची वर्णी लावली याचा सीनेटने खडखडीतपणें निषेध केला हें इष्टच झालें. पण डॉ. फॉरस्टर यांची निष्कारण तळी उचलण्यास जे सभासद पुढे आले त्यांची कींव केली पाहिजे. या डॉक्टरांना बुटासह डोक्यावर घेऊन नाचणाऱ्या मंडळींत मि. मसानीसारखे मेणचट लोकच सामील झाले असें नव्हे, तर प्रो. एम्. आर. परांजप्यासारखे इसमहि मिसळले याचें जितकें आश्चर्य तितकाच खेदहि वाटतो !

मॅट्रिकची परीक्षा वर्षांतून दोनदां घ्यावी म्हणजे विद्यार्थ्यांचा वेळ वांचेल अशी सूचना डॉ. देशमुख यांनी माडली होती. दुसरी किरकोळ सूचना अशी होती कीं व्हाइस-चॅन्सेलर हा भरकामी (Whole Time) असावा. कारण यापुढे विद्यापीठाचें कार्यक्षेत्र वाढणारच आहे. मि. वाडिया यांनी विद्यापीठाची सध्याची स्थिति 'कप्तानाशिवाय आगबोट' अशी वर्णन केली.

### शारीरिक शिक्षणाची अनास्था

परीक्षक नेमण्यांतील पक्षपात आणि धंदे-शिक्षणाच्या डायरेक्टराची नेमणूक करण्यांत झालेला हिंदीकरणाचा उपमर्द या दोन वादचक्रांप्रमाणेच कॉलेजांतील 'शारीरिक शिक्षण' या विषयावरहि बरेंच वादळ माजलें. फिजिकल डायरेक्टराच्या खात्याला ६६०० रुपयांची देणगी मिळते. ती अर्धी कापावी अशी सूचना श्री. एम. आर. परांजपे यांनी मांडली. गेलीं दोन वर्षे या खात्याकडून समाधानकारक काम झाले नाही म्हणून हा खर्च वावगा आहे असा एक पक्ष होता. विद्यापीठाने पुणें येथे शारीरिक शिक्षणाची शाळा स्थापण्याचा संकल्प सोडला आहे, पण तो अद्याप मूर्तस्वरूपाला आला नाही म्हणून त्या खात्याच्या डायरेक्टराची जागा कांहीशी फालतू आहे, असें या पक्षाच्या सभासदांनी सांगितलें. उलटपक्षीं सिंडिकेटने नेमिलेली कमिटी शारीरिक शिक्षणाची योजना करीत आहे म्हणून हा कुऱ्हाडीचा घाव घालतांना जरा सबूर करा असें दुसऱ्या पक्षाचें सांगणें. बंगाल आणि मद्रास या सरकारांनी शारीरिक शिक्षणाकडे किती लक्ष पुरविलें आहे तें पाहा असें या दुसऱ्या पक्षांतील सभासदांनी सुचविलें. शेवटीं मतें घेतां वर उभारलेल्या हातांवरून श्री. परांजपे यांची सूचना बारगळली असें दिसलें, पण प्रत्यक्ष 'मत-मापन' (Poll) केलें असता २८ वि. २५ मतांनी ती सूचना मंजूर झाली; आणि शारीरिक शिक्षणाच्या तोंडांतील ३३०० रुपयांचा घास काढून घेण्यांत आला. त्याचप्रमाणे विद्यार्थ्यांना व्यायाम-शिक्षक करण्याकरिता तीन आठवडे शिक्षण देण्यांत येतें त्यासाठी होणारा २५०० रुपयांचा खर्च बंद करावा ही प्रो. परांजपे यांची सूचनादेखील मंजूर झाली.

### आरोग्यासाठी आठ आणे

या दोन विजयांप्रमाणे एक पराजयहि प्रो. परांजपे यांना पदरांत घ्यावा लागला. शारीरिक शिक्षणाप्रमाणेच वैद्यकीय तपासणीवरहि ते घसरले. शारीरिक शिक्षणाच्या योजनेचा

पाया म्हणून वैद्यकीय तपासणीची पद्धत सुरू केली. पण शिक्षणाची इमारत बांधण्याचा कांहीच ठावठिकाणा नसतांना तपासणीच्या या पायांत उगाच ६६०० रुपये कां ओतावे असा त्यांचा प्रश्न होता. त्यावर एकामागून एक डॉक्टर सभासद तुटून पडले. प्रत्येक विद्यार्थ्यामागे वैद्यकीय तपासणीसाठी तुम्हांला अवघे आठ आणे खर्च करवत नाहींत काय? असा सवाल टाकून डॉक्टर देशमुख हे विनोदाने म्हणाले, "आमच्या वेळीं कॉलेजांत वैद्यकीय तपासणी सुरू असती तर माझ्यासारखे खुरटलेले, फिकटलेले सभासद या सीनेटमध्ये दिसतेना! खंबीर देहाचे आणि म्हणून खंबीर मताचे लोकच येथे आले असते !" सूचना नामंजूर झाली.

शेवटीं परदेशीं जाणाऱ्या विद्यार्थ्यांसंबंधी एक-दोन सूचना पुढे आल्यानंतर सभा बरखास्त करण्याची सूचना मि. मसानी यांनी मांडिली. तिला विरोध करतांना एका सभासदाने सभेच्या नजरेस आणिलें कीं, अद्याप बऱ्याच महत्त्वाच्या सूचनांचा विचार व्हावयाचा आहे, पण उपयोग काय ? संध्याकाळ होताच आपआपल्या घरट्याकडे धांव घेणाऱ्या पांखराप्रमाणे बहुतेक सर्व सभासद आपआपलीं कॉलेजें उघडण्यासाठी रवाना झाले होते. कोरम भरण्याचीच मारामार होती. तेव्हा साहजिकच सीनेटने आपल्या या महत्त्वाच्या अधिवेशनावर पडदा पाडला.

# मुंबई येथील २६ वें नाटयसम्मेलन

उमरावतीच्या ' उदय ' पत्राचे संपादक श्री. **ना. रा. बामणगांवकर** यांच्या अध्यक्षतेखाली ता. १६ जून रोजीं सकाळीं मुंबई येथील बॉम्बे थिएटरमध्ये नाट्यसंमेलनाचें २६ वें अधिवेशन सुरू झालें. त्यांत खुद्द नाटक-मंडळ्यांनी फारसा भाग घेतलेला दिसत नव्हता. तरी वीर वामनराव जोशी, श्री. टिपणीस, फाळके, दाते वगैरे बरेच नाट्य-प्रेमी गृहस्थ हजर होते. आनंद संगीत मंडळींतील कांही नटांनीं स्वागतपर पद्यें म्हटलीं आणि **डॉ. वेलकर** यांनी सर्वांचें स्वागत केलें. धंदेवाईक नाटक कंपन्यांत स्त्रियांनी शिरूं नये असें मत आपल्या भाषणांत त्यांनी प्रतिपादन केलें. नंतर अध्यक्ष श्री. बामणगांवकर यांनी नाट्यकलेसंबंधी सविस्तर विवेचन करणारें भाषण केलें. भारतीय नाटकें व पाश्चात्य नाटकें यांचें समालोचन करून त्यांची त्यांचीं ठळक वैशिष्ट्येंहि त्यांनी सांगितलीं. व मराठी रंगभूमीचा आजमितीपर्यंतचा इतिहास त्यांनी निवेदन केला. नंतर ते म्हणाले, "आजची उर्दू गुजराथी व बंगाली रंगभूमि मराठी रंगभूमीपेक्षा श्रीमंत व विस्तृत दिसत असेल,पण मूळ कलेचें गांभीर्य अगर विकास त्यांत कितपत कायम आहे ह्याची शहानिशा जर कोणी बारकाईने केली तर मराठी रंगभूमीच्या अभिमान्यांस ती प्रोत्साहकच होईल. नाट्यरचनेच्या दृष्टीने, नटांतील वाढत्या समजुतीच्या दृष्टीने, स्वाभाविक देखावे तयार करणें, नटांनी आपापल्या भूमिका घेऊन त्याप्रमाणे पेहेराव करणें, ह्यांत बराच स्वाभाविकपणा मराठी रंगभूमीवर कायम आहे, व त्यांत पूर्वीपेक्षा बरीच प्रगतिहि झाली आहे. तात्पर्य काय कीं, मराठी रंगभूमीने संस्कृत नाटककारांतील रसोत्कर्षाच गुण घेतला व पाश्चात्य नाटककारांचा स्वभावपरिपोषाचाहि गुण घेतला.

तथापि, ह्या धंद्यांत लौकिक व्हावयास व पैसा मिळवावयास नाटक, नट व सजावट, ह्यांचा जो मिलाफ व्हावयास पाहिजे तो अलीकडे होत नाही. ह्याला कारण महाराष्ट्राचें वाढतें दारिद्र्य तर आहेच आहे; पण नाटककार, नट व भांडवल ह्यांचें जें कालानुसार साहचर्य पाहिजे तें नाहीं. शिवाय नट म्हणून धंदा करणारांना नाटकमंडळ्यांखेरीज बोलक्या चित्रपटांच्या कारखान्यांत वाव मिळूं लागला. ह्यांत लौकिक व पैसा ह्यांची जोड लवकर लाभूं लागल्यामुळे चांगले नट मराठी रंगभूमीला दुरावूं लागले आहेत. जोंपर्यंत महाराष्ट्रांतील कुलवधू स्त्री सहजगत्या विशिष्ट मर्यादेंतच राहते तोंपर्यंत कुलवधूने नाटकाच्या धंद्यांत कलेच्या दृष्टीने पडणें कलेला पोषकच होईल असें मात्र म्हणतां येणार नाही. सौ. गिरिजाबाई केळकर यांनी नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष या नात्याने केलेल्या भाषणांत व सौ. मथुराबाई द्रवीड ह्यांनी, कुलीन स्त्रियांनी नाट्यधंद्यांत पडूं नये असाच आपला अभिप्राय व्यक्त केला. तेव्हा पुरुषवर्गाप्रमाणेच कुलीन स्त्रियांनी सदर धंद्यांत पडलेंच पाहिजे असें अट्टाहासाने प्रतिपादन करण्यांत कांही विशेष आहे असें मला वाटत नाही. शिवाय मराठी रंगभूमीवरील स्त्री-भूमिका जर सर्वस्वीं स्त्रियांच्या हातीं गेल्या तरच कलेचा उत्कर्ष होऊ शकतो हें म्हणणें तर अधिकच हास्यास्पद ठरतें. कारण पुरुषांनी स्त्रीभूमिका करून ज्या महाराष्ट्रांत लौकिक संपादन

गेला त्या महाराष्ट्रांत स्त्रियांकडेच ह्या भूमिका गेल्याने विशेष प्रगति होईल असें म्हणतां येत नाही. कारण स्त्रियांनी स्त्री-भूमिका करण्यांत रूपक म्हणून जें एक नाटकाचें मुख्य अंग असतें त्यास गौणत्व येतें."

अशा आशयाचें अध्यक्षांचे भाषण झाल्यानंतर संमेलनाचें त्या दिवसाचें काम संपलें. दुसरे दिवशीं नाटिकासंप्रदाय, रंगभूमीवर कामें करणाऱ्या स्त्रियांचें अभिनंदन इत्यादि ठराव मंजूर झाले. मात्र उत्कृष्ट नटांची परंपरा चालू राहावी यासाठी एक मध्यवर्ती शाळा स्थापावी या सूचनेचा पुरस्कार अध्यक्षांनी आपल्या भाषणांत केलेला होता. आणि श्री. रा. गो. भिडे प्रभृतींनी तशा सूचना आधी प्रसिद्धहि केल्या होत्या. तथापि तिकडे विशेष लक्ष देण्यांत आलें नाही. शेवटीं अध्यक्षांचे आभार मानण्यांत येऊन संमेलन समाप्त झालें.

# पैसा नाकाराल तर पै पत्कराल !

इंग्लंडाच्या पार्लमेंटांत गेलीं दोन वर्षे कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचें मताधिक्य असल्यामुळे मंत्रिमंडळांत त्यांचेंच प्रस्थ आहे, व पांढरा खलिताहि मुख्यतः त्यांनीच बनविला आहे. इंग्लंडातील कॉन्झरव्हेटिव्ह, लिबरल व मजूर या तीन पक्षांत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाइतका अनुदार व कवडीचुंबक पक्ष दुसरा कोणताहि नाही. अशा पक्षाच्या कारवाईने निर्माण झालेला खलिता कितीहि मोठमोठ्याने वाजत असला तरी नगाऱ्यासारखा तो आंतून पोकळ आहे हें सर्वांस कळून चुकलेंच आहे. असे असताहि त्याच पक्षांतील मि. चर्चिल, लॉर्ड लॉईड, क्रॅडॉक प्रभृति सभासदांनी त्याजविरुद्ध काहूर उठवून सदर खलित्यांतील हक्क हिंदी लोकाना देऊन बाल्डविन आदिकरून कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे दुसरे पुढारी हिंदुस्थान हातचा गमावीत आहेत अशी हाकाटी सुरू केली आहे. चर्चिल, लॉईड, क्रॅडॉक यांनी या अर्थाचीं भाषणे पांढऱ्या खलित्यावरील चर्चेत पार्लमेंटांत केलींच; पण तेवढीच बडबड करूनहि ते स्वस्थ बसले नाहीत. त्यांनी देशांत ठिकठिकाणीं व्याख्यानें देऊन लोकमत मंत्रिमंडळाविरुद्ध खवळून सोडण्याचा प्रयत्न चालविला आहे. इतकेंच नव्हे तर सध्याचें मंत्रिमंडळ मोडण्यापर्यंत त्यांच्या प्रयत्नांची मजल जाणार आहे.

कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाची नॅशनल कौन्सिल या नांवाची इंग्लंडांत एक संस्था आहे. त्या संस्थेची सभा बुधवार ता. २८ जून रोजीं भरणार असून तिच्यांत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या सभासदांनी पांढऱ्या खलित्यास पाठिंबा द्यावयाचा कीं नाही या महत्त्वाच्या विषयाचा विचार व्हावयाचा आहे. सदर सभेंत पाठिंबा देऊं नये असें ठरल्यास बाल्डविन प्रभृति कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या मंत्र्यांना प्रधानमंडळांतील आपल्या जागांचा राजिनामा द्यावा लागेल व पार्लमेंटाची नवी निवडणूक करण्याचीहि पाळी येईल. नवीन निवडणुकींत मि. चर्चिल व त्यांचे अनुयायी निवडून आल्यावर त्यांजकडे मंत्रिमंडळाचीं सूत्रें गेल्यास सध्याच्या पांढऱ्या खलित्याच्या चिंधड्या उडून हिंदुस्थानास आज जें कांही देण्यासाठी काढलें आहे तेंहि मिळण्याची आशा उरणार नाही, अशी भीति कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या कैवाऱ्याकडून हिंदी लोकांना घालण्यांत येत आहे.

गेलीं दहाबारा वर्षे हिंदी लोक स्वराज्याच्या हक्कासाठी जोराने झगडत असून त्यांच्या आकांक्षा पूर्ण स्वातंत्र्य व स्वराज्य येथपर्यंत पोंचल्या आहेत. त्या आकांक्षांच्या मानाने पांढऱ्या खलित्यांत देऊं केलेले हक्क रुपयांत पाव आण्याच्या किंमतीचेहि नाहीत. त्या हक्कांनी नेमस्तांतल्या नेमस्त पक्षाचेंहि समाधान झालें नाही, मग कॉंग्रेस पक्षाचें व्हावयाचें दूरच हें सांगावयास नकोच. परंतु हिंदुस्थानांतील विविध पक्षांची ही नापसंती कोठच्या कोठे राहून जो खलिता हिंदी लोकांना तिरस्करणीय व क्षुद्र वाटतो तो खलिताहि चर्चिलच्या झंझावातापुढे तग धरणार नसल्यामुळे त्याला वांचविण्याकरिता आम्ही कंबर बांधीत आहों असा बहाणा बाल्डविन व त्यांचे अनुयायी यांनी आरंभिला आहे. त्यांचा हा सारा उद्योग कशाकरिता ? तर म्हणे हिंदी लोकांच्या कल्याणाकरिता. केवढी ही परोपकारबुद्धि ! या परोपकारबुद्धीने बाल्डविनचा कंपू हिंदी राजकीय पक्षांना लाजवूं पाहत आहे !

मि. विन्स्टन चर्चिल, लॉर्ड लॉईड व सर रेजिनाल्ड क्रॅडॉक यांच्याशीं लढण्याकरिता बाल्डविन, होअर, इत्यादि वीर उठलेच आहेत. पण तेवढ्याने शत्रूचा पूर्ण निःपात व्हावयाचा नाही अशा समजुतीने त्यांच्या कुमकेसाठी इंग्लंडांत नवा फौजफाटाहि जमविण्यांत येत आहे. या सैन्यभरतीच्या कामांत मद्रासचे माजी गव्हर्नर लॉर्ड गोशेन यांनी पुढाकार घेतला असून त्यांच्या मदतीस मुंबईचे

भावी गव्हर्नर लॉर्ड ब्रेबोर्न व इतर कित्येक सिव्हिल सर्व्हंटहि धावले आहेत. त्यांनी युनिअन ऑफ इंडिया अँड ब्रिटन या नांवाचा संघ निर्माण केला असून त्याजमार्फत व्याख्यानें व हस्तपत्रकें यांचा वर्षाव चालवून चर्चिल आदिकरून इरसाल हुजूर पक्षीयांना रणांगणावरून पिटाळून लावण्याचा गोशेनप्रभृतींचा इरादा आहे. संघांतील बहुतेक सभासदांनी हिंदुस्थानांत कित्येक वर्षे नोकरी करून हिंदुस्थानांतील लोकस्थितीचा व आकांक्षांचा नुकताच पूर्ण परिचय करून घेतला असल्यामुळे चर्चिल–लॉईड कंपूच्या तोंडास तोंड देऊन त्यांचे दांत पाडण्यास आपण समर्थ असल्याचा भरंवसा त्यांना वाटत आहे. हिंदी लोकांच्या राजकीय हक्काकरिता एकट्या इंग्रजांनी इंग्रजांशीं लढत राहण्यापेक्षा बाल्डविनप्रभृतींच्या किंवा गोशेन–ब्रेबोर्न यांच्या फौजेस हिंदी सैनिक सामील झाल्यास बाल्डविन पक्षास नैतिक पाठबळ मिळाल्याचें समाधान लाभणार आहे. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीशीं सहकार्य करण्यासाठी सप्रू—जयकर आदीकरून कित्येक हिंदी प्रतिनिधि गेलेच आहेत. पण ते कांही म्हटलें तरी नेमस्त पक्षांतच मोडतात. या दृष्टीने चर्चिललॉईड प्रभृतींच्या ते खिसगणतींतहि नाहीत. त्यांच्या मनावर ज्यांचा वचक बसेल असे काय ते कॉंग्रेस पक्षाचेच पुढारी होत.

म. गांधी व लो. ना. अणे यांनी कायदेभंगाची चळवळ आणखी सहा आठवडेपर्यंत थांबविली आहे. मागील सहा आठवड्यांच्या तहकुबीचा सरकाराचें धोरण बदलण्यावर कांही परिणाम झाला नाही, तसा याहि सहा आठवड्यांचा होईल असें वाटत नाही. कायदेभंगाचा कायमचा सोक्षमोक्ष लावण्याचा अधिकार वर्किंग कमिटीचा असल्यामुळे वर्किंग कमिटीचे तुरुंगांत अडकलेले सभासद सरकारानें सोडून देऊन त्यांची सभा भरविण्याची शक्यता उत्पन्न केली पाहिजे, असें म. गांधींनीं तुरुंगांतून बाहेर पडल्याबरोबर जें पत्रक काढलें होतें त्यांत म्हटलें आहे. पण त्याप्रमाणें सरकारानें कैदी न सोडले तरी त्यांपैकीं बहुतेक सर्व सभासद गांधी सांगतील त्यांच्या बाहेर जाणार नसल्यामुळे गांधींनीं कायदेभंगाचा निकाल मुक्त सभासदांच्या मदतीने त्यांच्या गैरहजेरींतच लावावा व राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनी जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या सभेस जाऊन पांढऱ्या खलित्यास तारण्याचें श्रेय जोडावें अशी टोचणी मुंबईच्या टाइम्स पत्रानें म. गांधींच्या मागे एकसारखी सुरू ठेवली आहे. कारण तसें न होईल तर चर्चिलच्या झंझावातामुळे पांढऱ्या खलित्याचा खर्डा कागदाच्या भिकार कपट्याप्रमाणे उडून जाऊन त्या खलित्याने देऊं केलेल्या हक्कांची किंमत एका पैशाइतकी असली तरी तोहि पैसा न मिळता कदाचित् चर्चिल देईल त्या पैकरिताच हात पसरण्याची पाळी हिंदी लोकांवर आल्यावांचून राहणार नाही अशी घाबरगुंडी टाइम्सकार राष्ट्रीय सभेच्या गांधीप्रभृति पुढाऱ्यांची उडविण्याची आपल्याकडून शिकस्त करीत आहेत.

टाइम्सकारास या उपदेशाची प्रेरणा सहा हजार मैलांवरूनहि होत असेल असा संभव आहे. पार्लमेंटाच्या जोड कमिटीपुढे सांप्रत ज्या साक्षी सुरू आहेत, त्या हिंदुस्थानाला अनिष्ट अशाच जुळवून आणिल्यासारख्या दिसतात. त्यांपैकीं विद्यमान इंडियन सिव्हिल सर्व्हंट, माजी इंडियन सिव्हिल सर्व्हंट, पोलीसखात्यांतील बडे नोकर व संस्थानिक यांच्यातर्फे कमिटीपुढे झालेल्या साक्षी पांढऱ्या खलित्यांतील हक्कांत पाणी घालून ते पातळ करणाऱ्याच आहेत. न्यायखातें, मुलकीखाते व पोलीसखातें दिवाणांच्या ताब्यांत गेल्यास अनर्थ ओढवेल असेच त्या त्या साक्षीदारांच्या कैफीयतींत सांगण्यांत आलें आहे. त्यावरून प्रांतिक स्वायत्ततेलाहि खो आणण्याचा त्यांचा इरादा उघड दिसत आहे.

नरेंद्रमंडळांतील १०९ संस्थानिकांपैकीं फक्त ४० संस्थानिकांची फेडरेशनमध्ये शिरण्याची तयारी आहे. पण त्यालाहि त्यांनी सतरा कुलंगडीं घालून ठेवलीं आहेत. संस्थानिकांनीं संघानें आंत जावें; व्यक्तिशः आंत जाऊं नये असें संस्थानिकांचें प्रतिनिधि मि. मकबुल महमूद, सेन व पाणिक्कर यांनी आपलें मत दिलें आहे. त्या योगानें संस्थानांच्या वतीने एकाच धोरणाचे सभासद वरिष्ठ कायदेमंडळांत घुसून आपलीं मतें कोणच्या तरी एका पक्षाच्या विशेषतः सरकार पक्षाच्या पारड्यांत गठानें टाकतील असा संभव आहे. हें धोरण अत्यंत अनिष्ट होय यांत शंका नाही. पण हीं कुलंगडीं कदाचित् कबूल केलीं तरी हिंदी संस्थानिक आज एकदम फेडरेशनमध्ये येण्यास सिद्ध आहेत असेंहि नाही. फेडरेशनच्या कायद्याचा मसुदा त्यांस पहावयास मिळेल तेव्हां ते आपला बेत निश्चित ठरवितील असें त्यांचे प्रतिनिधि सांगत आहेत. सारांश, संस्थानिकांनीहि फेडरेशनचा मार्ग बिकटच करून ठेवला आहे.

अशा रीतीने पांढऱ्या खलित्यांतील हक्क पातळ करण्याचा उपक्रम चोहोंकडून शिस्तवार सुरू आहे, व राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधि जॉइंट कमिटीपुढे आले तरी त्यामुळे हा उपक्रम बंद पडेल असें समजण्याचें कारण नाही. मात्र पांढरा खलिता खची होत होत

जें कांही शिल्लक उरेल त्यास राष्ट्रीय सभेचेंहि सहकार्य लाभलें असा डांगोरा पिटण्यास सत्ताधारी कॉन्झरव्हेटिव्ह पक्षास मात्र त्यामुळे आयतेंच फावेल. त्या घोळांत राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांना घालण्याकरिताच टाइम्सकाराच्या मसलती चालल्या आहेत. बाल्डविन कंपूने यावयास काढलेला पैसा पत्करता कीं चर्चिलची पै पत्करता असा त्यांचा सवाल आहे. पण त्याने कोणीहि फसणार नाही हें टाइम्सकारानी खूप समजावें.

# हिट्लर यांचा सोशालिस्टांवर सूड

मूलमेवादितश्छिन्द्यात्परपक्षस्य नित्यशः । ततः सहायांस्तत्पक्षान्सर्वांश्च तदनन्तरम् ॥—**महाभारत.**

गेल्या मार्च महिन्यांत निवडणुकींत यशस्वी होऊन जर्मनीचीं राज्यसूत्रें हातीं घेतल्यावर हर हिट्लर यांनी राष्ट्राच्या पुनरुज्जीवनाच्या कांही योजना आपल्या मनाशीं ठरविल्या. त्यांत प्रामुख्येकरून शेतीची सुधारणा, उद्योगधंद्यांची वाढ, मजुरांची संघटना, लष्करी शिक्षणाची सोय, पतपेढ्यांची स्थापना इत्यादि बाबी महत्त्वाच्या होत. जर्मन राष्ट्राचें सर्वांगीण पुनरुज्जीवन घडवून आणावें हाच त्यांचा हेतु आहे. ध्येयाचा हा ध्रुवतारा गांठण्यासाठी त्यांनी विधायक आणि विध्वंसक असें दुहेरी धोरण अंगीकारलें आहे. त्या कामीं आज हर हिट्लर यांना ज्यू व सोशालिस्ट हे लोक वाटेंतील धोंड वाटत असल्यामुळे त्यांचा नायनाट करण्याचा त्यांनी निर्धार केला आहे. त्यांच्या मनानें हें पक्कें घेतलें आहे कीं, ज्यू लोकांनीच जर्मनीवर व्हर्सेलिसच्या तहाची घोरपड आणिली आणि सोशालिस्ट लोकांनी देशांतील मजुरांचीं मनें भलत्याच कल्पनांनी बिथरवून देशाची औद्योगिक घडी बिघडविली. हर हिट्लर हे आता औद्योगिक पुनर्घटना आणि शेतीची सुधारणा घडवून आणण्याची योजना आंखीत असल्यामुळे त्यांना वरील दोन जातीचे लोक धूमकेतूप्रमाणे अनिष्ट वाटत आहेत.

हर हिट्लर हे जात्याच अत्यंत तडफेचे व महत्त्वाकांक्षेचे गृहस्थ असून त्यांच्या राजकीय धोरणांत थोडी विकारवशतेचीहि भर पडलेली दिसते. ता. २३ जून रोजीं हर हिट्लर यांनी एक फर्मान काढून सोशालिस्ट पंथाच्या लोकांच्या सत्त्वावरून गाढवाचा नांगरच फिरविला. त्या फर्मानामुळे यापुढे राइशस्टॅगमधील आपल्या १२० जागा सोशालिस्ट पक्षाला सोडाव्या लागणार आहेत. जर्मनींत आतापर्यंत त्या पंथाचीं जवळ जवळ १९२ वृत्तपत्रें चालत होतीं. परंतु त्या सर्व वृत्तपत्रांच्या मुसक्या बांधण्यांत आल्या असून त्या मताचें कोणतेंहि वृत्तपत्र चालविण्यास बंदी करण्यांत आली आहे. सोशालिस्ट पक्षावरील सर्वांत मोठा घाला म्हणजे त्यांच्या निधीवरील धाड हा होय. सोशालिस्ट पक्षाने आजवर ज्या द्रव्यराशी जोडल्या त्या द्रव्यराशीच सरकाराने जप्त करून आपल्या ताब्यांत घेतल्या आहेत. सोशालिस्ट पक्षावर ही संक्रांत गुदरण्याचें कारण सरकारी रीत्या असें सांगण्यांत येत आहे कीं, ते लोक हद्दपार केलेल्या लोकांशीं संबंध ठेवून व पत्रव्यवहार करून सरकारद्रोह करीत असतात.

कोणत्याहि राजकीय पक्षाची वाढ हीं वृत्तपत्रें आणि द्रव्यनिधि या दोन जिवंत झऱ्यांवरच अवलंबून असते. परंतु हर हिट्लर यांनी मुळीं त्या दोन साधनावरच कुऱ्हाड घालून सोशालिस्ट पक्षाचीं पाळेंमुळेंच तोडलीं आहेत. केवळ तत्त्वाच्या दृष्टीनेच विचार करतां त्यांचें हें सूडाचें धोरण गर्हणीय ठरतें. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत कित्येक वेळां तात्त्विक विचार गवसणींतच घालून ठेवावे लागतात. हर हिट्लर यांच्या धोरणाचा पुरस्कार किंवा त्याला अनुकूलता परतंत्र राष्ट्रांतील लोकांकडून जेव्हा दाखविली जाते तेव्हा त्याचा अर्थ हा कीं, त्यांना अशी आशा वाटते कीं, जर्मनींत लवकरच सर्वाधिकाऱ्याचें युग संपून लोकशाहीची स्थापना होईल. राष्ट्रपुरुषांच्या सुष्टदुष्टपणाची परीक्षा करावयाची ती तो राष्ट्राची राजकीय आणि आर्थिक उन्नति किंवा अवनति किती करतो या कसोटीवरच व्हावयास पाहिजे व त्याच दृष्टीने हर हिट्लर यांच्या सध्याच्या धोरणाकडे पाहिलें पाहिजे.

हर हिट्लर यांनी ज्यू आणि सोशालिस्ट यांजवर शस्त्र धरल्याची संधि साधून साम्राज्यवादी युरोपियन राष्ट्रांनी त्याजविरुद्ध मोठा गवगवा चालविला आहे. परंतु हिट्लर यांनी शस्त्रसंन्यासाच्या बाबतींत प्रसंगावधान साधून जो मुत्सद्दीपणा दाखविला त्याने मात्र विरोधी राष्ट्रांना त्यांनी नरम पाडलें आहे. चार प्रमुख राष्ट्रांच्या करारांत सामील झाल्यामुळे तर जर्मनीची आन्तरराष्ट्रीय प्रतिष्ठा अधिकच वाढली आहे. स्वराष्ट्रांत त्यांनी केवळ

विध्वंसनाचेंच कार्य चालविलें नसून मोठमोठ्या आर्थिक योजना करून बेकारीस हटावण्याचें आणि शेतकऱ्यांना शेतीला व कारखानदारांना यंत्र-सामुग्री घेण्याला पैसा पुरवून हे दोनहि राष्ट्रीय धंदे वाढविण्याचें विधायक कार्यहि त्यांनी संकल्पिलें आहे. ज्यू आणि सोशालिस्ट यांना दांतीं तृण धरावयास लाविल्यामुळे हर हिट्लर हे कांही काल कृतान्तासारखे जगाला भासत असतील, परंतु राष्ट्राचा आर्थिक, राजकीय आणि आन्तरराष्ट्रीय उत्कर्ष घडवून आणण्यासाठीं त्यांनी जे भगीरथ प्रयत्न चालविले आहेत,त्यांजकडे विकार-वश होऊन दुर्लक्ष करणें हे शुद्ध अन्यायाचें होईल.

# कार्यकर्त्यांचा कोंडमारा

पुणें ता. २३ जून १९३३

## बनारसी पाहुण्याचें म्हणणें

कायदेभंगाची मोहीम आणखी सहा आठवड्या-साठी तहकूब झाली असल्याने हें भिजत घोंगडें तसेंच किती दिवस पडून राहातें, इकडे बहुतेकांचे डोळे लागले आहेत. प्रत्यक्ष मोहिमेंत भाग घेणा-रांना या तहकुबीविषयीं काय वाटतें हें समजावून घेणें बोधप्रद होईल. जो तो आपापल्या जागी राहून कुढत आहे. ही गोष्ट खरी असली तरी कोणी स्पष्टपणे बोलण्यास मात्र तयार नाहीत. केवळ एक नमुना म्हणूनच वाचकांच्या विचारासाठी खालील संवाद देत आहे. काशी येथील एका प्रमुख विद्वानाकडून महात्माजींची खास मुलाखत घेण्यासाठी एक कार्यकर्ता इकडे आला. पण पर्णकुटींत प्रवेश मिळण्यापूर्वी श्री. अणे यांना भेटावें व त्यांचेकडूनच जम-ल्यास महात्माजींच्या दर्शनाची सोय करवून घ्यावी असा बेत त्याने ठरविला; आणि त्याप्रमाणे तो श्री. बापूजी अणे यांस भेटलाहि. बापूजींना भेट-ल्यानंतर माझी त्याची भेट झाली. त्यानें प्रचलित राजकारणावर चर्चा करण्याची उत्कट इच्छा दर्शविल्यावरून त्याच्याशीं बोलणें झालें तें खाली देत आहे. कार्यकर्ते पडले बनारसनिवासी. तेव्हा हा संवाद हिंदुस्थानींतूनच झाला.

प्रथमतः नमस्कार चमत्कार व कुशल प्रश्न झाले. काशीकर पाहुण्यांनी एकदमच विषयास हात घातला. "पहिल्यांदा सहा आठवड्यांकरिता आंदोलन स्थगित केलें व पुनः आणखीहि सहा आठवड्यांसाठी ती मुदत लांबवि-ली हें मुळींच चांगले झालें नाही. त्यामुळे लोकांत गैरसमज फार पसरला आहे. केलेलें इतके दिवस चे काम व्यर्थ जातें.कार्यकर्त्यांची फजिती होते" इत्यादि विधानें त्यांनी केली.लगेच त्यांना मी प्रश्न विचारला कीं, काय करावयास हवें होतें? राष्ट्राचें नुकसान तें कसें झालें किंवा गैरसमज म्हणता तो कसला ?

काशीकरांचें उत्तर असें—नुकसान नाही असें कसें म्हणतां ? आमच्या काशींतलीच गोष्ट पहा. चळवळीच्या ऐन रंगांत मी स्वतः डिक्टेटर म्हणून जिथे जिथे पिकेटिंग करवून विदेशी कापडाचीं दुकाने बंद करविलीं; किंवा गांजा, भांग, अफू यांची विक्री होऊं दिली नाही; त्याच ठिकाणीं आज हा व्यापार कसा तेजीनें चालला आहे पाहा. परंतु मला सर्वांत वाईट वाटतें तें यासाठी नव्हे. अनिर्बंध अशी ही देवघेव स्वतः डोळ्यांनी पाहिल्यानें दुःख तर होतेंच; पण पोलीस किंवा कांहीं नगरवासी लोक सुद्धा मला जेव्हां विचारतात की, "काय हो पुढारी, हे आतां असें चालायचेंच कां" "करा, करा पिकेटिंग, स्वस्थ काय राहातां ?" तेव्हा माझ्या उरांत जहरी सुरी भोसकल्याप्रमाणे तीव्र वेदना होतात. तुम्हाला कल्पना नाही, आम्ही काम कसें केलें त्याची. गेल्या वर्षी भर उन्हाळ्याचे दिवसात भांग गांजा-वाल्यांच्या दुकानापुढे आम्ही पिकेटिंग केलं.वरून आलेल्या हुकुमाची तामिली करणें आमचें काम. दुपारचे बारा वाजलेले. लोकांची गर्दी दुकानापुढे होऊ लागली. तेव्हा मी शिट्टी फुंकली आणि चाळीस स्वयंसेवकाना आज्ञा दिली कीं, रस्त्यावर आडवे निजा. कल्पना करा डांबरी सडका—जून महिन्यांतले दिवस आणि बारा-एक वाजण्याचा सुमार आणि गर्मी बनारसची बरं!—पाठी सगळ्या भाजून निघाल्या व व्हॉलंटीयर्स तरा किती लहून होते म्हणन सांग. (ह्या वेळीं काशीकर कार्य-कर्त्यांना तर बोलवेना. त्याचा गळा दाटून आला.) जरा थांबून ते पुढे म्हणाले—अशा ठिकाणीं पोलीस किंवा इतर लोक मला टोचून बोलतात तेव्हा किती शरमिंदे वाटत असेल कल्पना करा.

## महात्माजींनी काय करावें ?

बोलण्याचा ओघांत गाडी भलतीकडेच धांवूं लागली. म्हणून पाहुण्यांना पुनः प्रश्न

केला 'आपल्या मतें काय करावयाला पाहिजे होते ?'

उ—राष्ट्रपति अणे यांनीच काय तो निकाल ठरवावयास पाहिजे होता. लढाई अजून चालू ठेविली तरी आमची हरकत नव्हती. पण आपण होऊन तहकुबी केली ह्यानं आमच्या सारख्यांचा कोंडमारा विलक्षण होतो.

प्र—श्री. अणे तरी एकटे स्वतःच्या जबाबदारीवर निर्णय कसा देतील ? त्यांनी स्पष्टच म्हटले आहे कीं निश्चित गोष्टी ठरविण्यापूर्वी मला महात्माजींशीं चर्चा करावी लागेल आणि आहे या परिस्थितींत गांधीजींशीं निदान चार आठवडे तरी बोलता येत नाही. तेव्हां चळवळ सहा आठवडे तहकूब करण्याशिवाय गत्यंतरच नव्हते, असे नाही तुम्हाला वाटत ?

उत्तरः—माझी हरकत आहे ती महात्माजींच्या निर्णयासच आहे. कॉंग्रेसची वर्किंग कमिटी किंवा इतर कार्यकर्ते मिळून करतील तो निर्णय मान्य समजावा. इतके दिवस कॉंग्रेस म्हणजे महात्माजी आणि महात्माजी म्हणजे कांग्रेस असा शिरस्ता होता. तो अतःपर तरी नसावा.

प्रश्न—असं म्हणून कसे चालेल ? कायदेभंगाची चळवळ आरंभिली ती महात्माजींनीच ना ? ह्या तत्त्वाचे गुह्य ज्ञान इतर कोणासच नाही. महात्माजींचें पुढारीपण मानावयास तुम्ही तयार नाही कीं काय ?

उत्तर—तसं नाहीं. फक्त त्यांना आम्ही पाहिजे तेव्हा सल्ला विचारूं, त्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागंचा असें मात्र नाही. ते थोर पुरुष आहेत, साधु आहेत, हें सर्व कबूल. पण आता आमचा विचार आम्हांलाच करावयास पाहिजे.

प्रश्न—आपल्या विचारांत हा फरक कशानें पडला ? नुसते सल्लागार म्हणूनच आपण महात्माजींना मानणार ? आणि ते तयार तरी कसे होतील अशा सूचनेला ?

उत्तर—मी तुम्हांस सर्व कारणें सांगतों पाहिजे तर. आणि हें माझे एकट्याचें मत नव्हे. बऱ्याच ठिकाणीं मीं हिंडलों, पुष्कळांना भेटलों. त्यांना सुद्धां असेंच वाटतें कीं महात्माजींनी आपले अस्पृश्योद्धाराचेंच काम करीत रहावें व कांग्रेसने राजकीय चळवळीकडे लक्ष द्यावें.

प्रश्नः—म्हणजे आपले म्हणणं असं कीं, गांधीजींनीं ही चळवळ हातीं घेतला हे ठीक नाही झाले ? कॉंग्रेसनें अस्पृश्योद्धाराची चळवळ करूं नये काय ?

उत्तरः—राजकीय चळवळ हें कॉंग्रेसचें मुख्य कार्य अस्पृश्योद्धाराचें काम हळूहळू पूर्वीपासूनच चालत आलेंच आहे व तें करणारी मंडळी वेगळी होती. पण आता मात्र सर्वच नूर पालटला. ज्याला कांहीं काम करावयाचें नसेल, अधिकाऱ्याचा रोष संपादन करण्याची इच्छा नसेल त्याने आपले अस्पृश्योद्धाराच्या छत्रीआड खुशाल दडावें. इकडे कॉंग्रेसचे मुख्य कार्य राजकारण ते खुंटून पडतें त्याची वाट काय ? जो उठला तो हरिजन सेवापरायण बनला. असे होऊन चालावयाचें नाही.

प्रश्न—खादी शाखा पूर्वी कॉंग्रेसमध्येच अंतर्भूत होती. ती पुढें स्वतंत्र झाली. तशीच ही हरिजनसेवेची शाखा निघावी व तिचें अधिपत्य महात्माजींनी घ्यावें असाच आपल्या म्हणण्याचा रोख दिसतो पण महात्माजींना राजकारणांतून वगळण्यांत आपला हेतु काय ? त्यांच्या मुळें अडचण कोणती होते ?

या प्रश्नाचें उत्तर काशीकरांनी जरा पाल्हाळाने दिले. त्याचा सारांश असा कीं, सरकार मोठ्या धूर्ततेनें महात्माजींना वळवून घेण्याची खटपट करतें आणि महात्माजी थोडे-बहुत त्याला बळी पडतात. काशीकर पाहुण्यांनी दोनतीन उदाहरणेंहि दिलीं. राजबंद्यांना वर्तमानपत्रें किंवा वाचनीय पुस्तकें मिळण्याची पंचाईत असता गांधीजींना मात्र तुरुंगांतून अखिल भारतीय अस्पृश्योद्धाराची चळवळ करण्याची सवलत मिळते. राजकीय कैद्यांनी अन्नत्याग केल्यास त्यांचे अनन्वित हाल करतात, सक्तीनें अन्न घालतात, पाणी तोडतात, वाटेल ते प्रकार होतात. पण महात्माजींनी उपवास आरंभताच यांची बिनशर्त सुटका होते. एवढ्यावरच भागतें असे नाही. तुरुंगांत राजबंद्यांनी कसें रहावें हें महात्माजी सांगतात. ते जेल अधिकाऱ्यांच्या हिताचें असल्यानें गांधीजींची आज्ञा म्हणून आम्हांस ते नियम पाळण्यास फर्मावतात. जेलरच्या हातांत महात्माजींनी शस्त्र म्हणून जावें काय ? दुसरीहि गोष्ट. महात्माजींची बिनशर्त सुटका होताच त्यांनीं कायदेभंग ६ आठवडे तहकूब करण्याची सूचना कॉंग्रेसला केलीच की नाही ?

"स्वयंसेवकांची विलक्षण कुचंबणा अशानें कशी होते याचं यथार्थ वर्णन काशीच्या पाहुण्यांनी केलें. सरकार अशांना कुठल्याना कुठल्या तरी कलमाखाली पकडून तुरुंगात डांबण्यास टपलेलें. इकडे जनतेची विशेष सहानुभूति उरली नाही. परसोडीचा कार्यक्रम केल्यानें व्यापारी प्रतिकूल झालेले. आणि प्रथमपासून देशसेवा करीत राहिल्याने कनवटीस दोन दिडक्याहि नाहीत. तेव्हां करावें काय? हा प्रश्न स्वयंसेवकांपुढे सदैव उभा राहतो. त्यांत तहकुबीचा हा काळ आला. तुरुंगांत निदान कांही

उठाठेवी न करता दोन वेळ अन्न तरी मिळतें तें भाग्य बरें असे वाटूं लागते. त्याला उत्तर कोणी पुढारी सुचवीत नाही." अशा परिस्थितींत इतके दिवस केलेल्या कामावर बोळा फिरणार असे ते म्हणाले. तेव्हां त्यांना विचारलें कीं, आपण स्पष्टपणें हे विचार कोठे प्रकट कां करीत नाही ! संयुक्त प्रांतांत असें मत किती जणांचें आहे ?

उत्तर—मत आहे बहुतेकांचें. पण समजा, मी जरी लिहून दिलें तरी हें छापण्यास कोणी तयार होईल असें मला वाटत नाही. मी श्री. अणे यांच्याशी बोललों, आणखीहि पुष्कळ बोलेन; पण प्रत्यक्ष गांधीजींशीं याविषयीं कांहीच बोलता यावयाचें नाही. त्यांचें फक्त दर्शन घेऊन यावें लागेल. सगळ्यांना पटलें तरी बोलून दाखविणारा किंवा प्रकाशक असा कोणी नाही, त्याची वाट काय?

इतक्यांत श्रोत्यांपैकीं एकाने सहजच सुचविलें कीं, कदाचित् महात्माजींच्या व्याख्येप्रमाणे आपण इतके दिवस चालविलेला हा शुद्ध सत्याग्रह नसेल म्हणूनच त्यांनी आपलें लक्ष हरिजन कार्याकडे वळविलें असावे.

त्यावर पाहुणे जरा आवेशाने उत्तरले:—शुद्ध सत्याग्रह तो आणखी कसला असतो? पोलिसांनी लाठ्यांनी आमचीं टाळकीं सडकलीं ! आम्हीं शांतपणाने तें सोसले. त्यांनीं अटक केली, हाल केले. आम्ही एक चकार शब्दहि काढला नाही. खोट्या साक्षी देऊन अन्यायाने शिक्षा ठोठावल्या. त्या निमुटपणे सोसल्या. जेलमध्ये अमानुषरीत्या वागविलें. शिव्यांचा खुराक चारला. पदोपदीं अपमान केला. हे सर्व मुकाट्याने उप भोगून पुनः वर हा शुद्ध सत्याग्रह नव्हे असा शेलका अहेर करतां काय ? आपली व्याख्या तर सांगा पाहूं शुद्ध सत्याग्रहाची ?

हें प्रकरण भलतीकडेच वाहवूं लागलें—तेव्हा ताळ्यावर आणण्यासाठी म्हटले कीं, कांही कार्यकर्त्यांनी लपून छापून काम केलें म्हणून महात्माजींचा त्यांवर रोष आहे खरा. परंतु अशी उदाहरणें अपवादात्मक सोडलीं तर बहुतेकांनी शुद्ध सत्याग्रहच केला आहे. आणि आपण म्हणतां तशी त्यांची कुचंबणा कींव करण्यासारखी आहे, यांत शंका नाही. पण या प्रश्नाला तोंडच कोणी पाडीत नाही. जो तो मला लोक काय म्हणतील म्हणून भितो आणि खासगी संभाषणांतून होणारें बोलणें जाहिर करण्यास कचरतो. तेव्हां ही अनवस्था संपणार कशी ?

यावर पाहुणे मोठ्या विनयाने म्हणाले—मी काय साधा सैनिक आहें. विचार करण्याची जबाबदारी आज राष्ट्राने श्री. अणे यांजवर टाकली आहे. त्याचें फर्मान सुटेल तसें आम्ही वागलें पाहिजे. परंतु थोडासा विचारविनिमय करून वस्तुस्थिति तुम्हांस, सांगावी म्हणून इतके बोललों. पाहूं या, राष्ट्रनौका कुणीकडे जाते ती !

# अलिबागेवर विशेष साऱ्याची धाड

( ले.—श्री. गणेश भास्कर पंडित, अलिबाग )

पांचसात वर्षांपूर्वी सरकारने अलिबागेची 'सिटीसर्व्हे' करण्याचें ठरवून मोजणी केली. सरकार आपली जागा मोजून देणार त्यांत आपलें काय नुकसान आहे, असें त्या वेळीं गावांतील खातेदारांस वाटलें. अलिबाग गांवाला अतिशय अल्प गांवठाण आहे. मोजणी होताच शेतीजमिनीचा बिनशेतीकडे म्हणजे घरें बांधण्याकडे उपयोग केला म्हणून 'विशेष सारा' बसविण्याचा जाहीरनामा सरकाराने काढला. त्या विशेष साऱ्याला आरंभीं सर्व कंपौंऊंडें पात्र धरण्यांत आलीं ! बसविण्यांत येणारा विशेषसारा अतिशय जबर होता. अलिबाग गांवांत कित्येक घरांभोंवताली बरीच मोठी बागायत आहे. म्हणजे तें घर बांधतांना बागायती उपयोगासाठीं बांधण्यांत आलेलें दिसून येतें. गांवांतील खातेदारांनी व्यक्तिशः व सामुदायिक अर्ज, विनंत्या, तक्रारी, मेमोरँडमें. डेप्युटेशनें वगैरेद्वारा पुष्कळच चळवळ केली. तेव्हा घर व घराभोवतालची घराच्या उपयोगाची जागा एवढीच विशेष साऱ्यास पात्र धरून, त्यावर आकारणी करण्यासाठी फेर सर्व्हे करण्यांत आली. त्यामुळे लोकांचें अल्प अंशाने समाधान झाल्याचें दिसलें. आतापर्यंत घराखालची जागा खराबा धरून त्यावर अल्प कर सरकार वसूल करीत आहे. या सिटीसर्व्हेने तो खराबा शेतजमीन ठरला, व ती शेतजमीन बिगरशेतीकडे म्हणजे घर बांधण्याकडे उपयोजिली जात आहे म्हणून शेतीआकाराची दसपट करवसुली सरकार करणार असें जाहीर झालें होतें. त्यानंतर जमिनींचे गट पाडून त्यावर सरकार बसवूं पाहात असलेल्या साऱ्याचा आकार जाहीर

करण्यांत आला त्यावरून कित्येक ठिकाणीं आजपर्यंत भरीत असलेल्या धान्याच्या हजार-पटीपेक्षां जास्त धारा खातेदारांना भरावा लागणार आहे. या साऱ्याच्या ओझ्याखाली अलिबागेंतील खातेदार मेटाकुटीस येणार आहेत.

**साऱ्याची माफी कोणाला ?**

आता सरकारतर्फे असें प्रसिद्ध झालें आहे कीं, "जीं घरें सन १८४१ सालापूर्वी म्हणजे इंग्रजसरकारनें आंग्रेसरकारचें राज्य खालसा करण्यापूर्वी बांधलेलीं असतील व अशा तऱ्हेचा पुरावा जे घरमालक मुदतींत हजर करतील त्यांचे घरांवर विशेष सारा बसविला जाणार नाही." अलिबागेवर कंपनी सरकारचे राज्य सन १८४१ ते १८५८ पर्यंत होतें. सन १८५८ पासून सन १८६९ मध्यें लँड रेव्हिन्यू कोड पास होईपर्यंत इंग्रज सरकारनें आंग्रे सरकारचे जमिनीवर जे कर होते तेच वसूल केले. असें असता या विशेष साऱ्याचे बाबतींत मात्र आंग्रेसरकारचें राज्य खालसा केल्याचा सन दाखवून आपलें घर त्यापूर्वी बांधलेलें आहे, हे सिद्ध करून दाखविण्याची जबाबदारी सरकारनें खातेदारावर टाकावी हें कितपत रास्त ठरेल ? खरें व कायदेशीरपणें पाहतां सिटीसर्व्हे लागू केल्यानंतर बांधण्यांत येणाऱ्या घरांवर हा विशेष सारा लादणें एकवेळ रास्त ठरेल; पण सरकार लँड रेव्हिन्यू कोडाच्या मागें जाऊन, कंपनी सरकारच्याहि मागे जाऊन, आंग्रे सरकारचें राज्य खालसा केलें तो सन जाहीर करीत आहे, हा अन्याय आहे. शंभर वर्षांपूर्वीचीं घरें असणें कठिण आहे; व असल्यास तीं त्या वेळीं बांधलीं याचा पुरावा आज कागदोपत्रीं मिळणें दुरापास्त आहे. खुद्द हल्लीं अलिबागेंत असलेला आंग्रे सरकारचा वाडा त्यापूर्वी बांधलेला आहे कीं काय, याबद्दल शंका आहे. तो सन १८४१ पूर्वीचा आहे किंवा कसें हें सिद्ध करण्याच्या नोटिसा त्यांचे हल्लींचे वारसास लागल्याचें समजतें.

**चळवळ करा**

या बाबतींत चळवळ होणें जरूर आहे. सदर 'विशेष सारा' कोणत्या सालानंतर बांधलेल्या घरांखालील जमिनीवर बसविण्यांत यावा, किती क्षेत्र जमिनीवर बसवावा, चालू कराच्या किती प्रमाणांत कर बसवावा, याबद्दल जोराची रीतसर चळवळ होऊन खातेदारांची दाद सरकारांत लावण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. कायदेमंडळांत या प्रश्नावर चर्चा झाली पाहिजे. कुलाबा जिल्ह्याचे आमदार किंवा दुसरे कोणी या प्रश्नाची माहिती असलेले लोकहितैषी आमदार अलिबागेंतील खातेदारांची दाद कौन्सिलमार्फत लावतील काय ?

# मसूरचा आश्रम कसा वाचला ?

(चिटणीस, ब्रह्मचर्याश्रम मसूर)

मसूर येथील ब्रह्मचर्याश्रम ही संस्था ता. ५ जाने. १९३२ ला सरकारनें बेकायदेशीर ठरवून वटहुकुमानुसार तिची मालमत्ता सरकारजमा केली. पण आतां आश्रमावरील बेकायदेशीरपणाचा आरोप उठवून सरकारनें तो ता. १० जून १९३३ रोजीं धर्मभास्कर श्रीविनायक महाराज मसूरकर यांच्या रीतसर स्वाधीन केला. आश्रम सोडवून घेण्याकरिता नानाविध प्रयत्न झाले. त्याचा त्रोटक वृत्तांत पुढे दिला आहे.

**व्हाइसरॉयांशीं मुलाखत**

आश्रम जप्त झाल्याचें समजतांच साताराचे वकील रा. दादासाहेब करंदीकर यांनी या अन्यायाची सरकारांत प्रथम दाद मागितली. त्यानंतर धर्मवीर डॉ. मुंजे यांनी दिल्लीस व्हाइसरॉय साहेबांची गांठ घेऊन त्यांना आश्रम सोडण्याविषयीं सांगितलें. मुंबईच्या कायदे कौन्सिलांतील रा. ब. काळे व श्री. रघुनाथराव बखले यांनींहि मुंबईसरकारचे गृहमंत्री थॉमस यांची भेट घेऊन प्रस्तुत अन्याय दूर करण्यास सांगितलें. येरवड्याहून सुटका झाल्यानंतर श्रीमन्महाराजांनीहि सरकारांत आपली कैफीयत सादर केली. पण या सर्व गोष्टी मनावर न घेऊन सरकारनें २७ जून १९३२ रोजीं एकाएकीं

**आश्रमाचा जाहीर लिलांव**

पुकारला ! तो थांबविण्याविषयी सातारा, रहिमतपूर, मसूर, कऱ्हाड, इस्लामपूर, विटे, तासगाव, सांगली, मिरज, कोल्हापूर, रत्नागिरी, अलिबाग, निपाणी, बेळगांव, खानापूर, गोमांतक इत्यादि भागांतील नागरिकांचे हजारों सह्यांचे अर्ज सरकारांत गेले. आश्रमावरील या महत्संकटाची शेकडों लोकांना जाणीव करून देऊन त्यांच्या सह्यांचे अर्ज सरकारांत पाठविविण्याच्या या कामांत कऱ्हाडकर मंडळीं प्रमाणेंच अलिबागचे एक उत्कट आश्रमप्रेमी गृहस्थ श्री. देवल यांनी फारच परिश्रम घेतले. दुःखाची

गोष्ट ही कीं, ते आश्रम सुटलेला पाहाण्यास आज हयात राहिलेले नाहींत! जनतेच्या या विनंतिअर्जाप्रमाणेंच साताऱ्याचे रा.ब.काळे,बेळगांवचे श्री.दत्तोपंत बेळवी, धुळ्याचे श्री. शंकरराव देव, चांद्याचे श्री. बाबासाहेब देशमुख, अकोल्याचे श्री. काकासाहेब आठल्ये, मुंबई हिंदुसंरक्षणमंडळ चे अध्यक्ष श्री. बसनजी शेठ, पुण्याचे श्री. बापूराव भिडे इत्यादि स्थळोस्थळींच्या गृहस्थांनी लिलाव रहित करण्यासंबंधीं सरकारांत तारा केल्या. बॅ. जयकर यांनी गव्हर्नर व कलेक्टर यांना तारा करून खेरीज गृहमंत्री मि.थॉमस ह्यांना एक खाजगी स्वरूपाचें विस्तृत पत्र लिहिलें. पुण्यास श्री. ल. र. गोखले यांच्या नेतृत्वाखालीं पंडित जगन्नाथ महाराज, श्री. नारायणराव गुंजाळ, श्री. रघुनाथराव बखले, कऱ्हाडचे श्री. लक्ष्मणराव देशपांडे प्रभृतींचें एक शिष्टमंडळ गृहमंत्र्यांना भेटण्यास गेलें. महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभा, मुंबई प्रांतिक हिंदु सभा, वऱ्हाड-प्रांतिक हिंदुसभा व अखिल भारतीय हिंदुमहासभा यांनी सरकारच्या या अरेरावी कृत्याचा निषेध करून आश्रमासारखी धार्मिक संस्था ताबडतोब सोडून देण्याची विनंति केली. पण जनतेचे व पुढाऱ्यांचे हे सर्व प्रयत्न निष्फळ ठरून अखेरीस आश्रमाचा लिलाव व्हावयाचा तो झालाच. केसरी, महाराष्ट्र, उदय, प्रबोध, समर्थ, प्रभात, बलवंत इत्यादि प्रांतोप्रांतीच्या वृत्तपत्रांनी हिंदुजनतेचीं मनें अशीं न दुखविण्याविषयीं सरकारास योग्य तो हितोपदेश वेळींच केला होता. पण त्यावरून बोध घेण्याचें सोडून उलट सरकारनें 'बलवंत' पत्राकडून या बाबतींतच २००० रु. चा जामीन घेतला!

लिलावाच्या या धामधुमींतच सरकारी अधिकाऱ्यांनी आश्रमाच्या १२ वर्षांच्या कामगिरीचें संपूर्ण

**रेकॉर्ड जाळावयास काढलें!**

तेव्हां आश्रम व छापखाना यासंबंधी दोन तपासणी अर्ज ( Revision Petitions ) मुंबईच्या हायकोर्टांत ता. २२ ऑगस्टला करण्यांत आले. हे अपीलाचे अर्ज दाखल करून घेतांना बॅ. जयकर व प्रि. नानासाहेब घारपुरे हे आश्रमाच्या वतीनें काम चालवीत होते. तद्वतच मुंबईचे ॲडव्होकेट पटवर्धन, श्री. धारप वकील, सॉलिसिटर के. बा. जोशी, तद्वतच कऱ्हाडची व साताऱ्याची वकील मंडळी यांचेंहि साहाय्य या कामीं होत होतें. पुढें ता ७ नोव्हेंबरला अपील सुनावणीला निघालें तेव्हां दादासाहेब करंदीकर व प्रि. घारपुरे यांनी आश्रमाच्या वतीने काम चालविलें. "एखाद्याची मालमत्ता, त्याचा कांहीं एक गुन्हा प्रस्थापित झाल्याखेरीज त्याच्यापासून हिसकून घेण्याचा अधिकार ह्या जगांत कोणत्याहि कायद्यानें कोणालाहि दिलेला नाही; अर्थात् गेल्या ऑर्डिनन्समध्ये ज अशा जप्तीचें कलम घातलें गेलें आहे तें न्यायतत्त्वांना झुगारून देणारें व मानवी नैसर्गिक हक्कांना बाध आणणारें असल्यामुळे मूलतःच चुकीचें आहे असें श्री. दादासाहेबांनी हायकोर्टापुढे ठणठणीतपणे प्रतिपादिलें. पण गव्हर्नरसाहेबांच्या हुकुमावरून डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांनी जी ऑर्डर काढली ती चूक किंवा बरोबर असो, आम्हांला तिच्यांत ढवळाढवळ करतां येणार नाही, असें म्हणून हायकोर्टाच्या न्यायमूर्तींनीहि ऑर्डिनन्सच्या अमर्याद सत्तेपुढे हात टेकले! हायकोर्टानें दोन्ही अर्ज फेटाळून लावले. याच वेळीं रा. ब.काळे यांनी प्रस्तुत प्रकरणा बाबत सरकारचा अभिप्राय समजून घेण्यासाठीं एक प्रश्नमालिका

**मुंबई कायदेकौन्सिलांत**

पाठविली होती. दिल्लीच्या वरिष्ठ कायदेमंडळात श्री. नारायणराव गुंजाळ व श्री. भास्करराव जाधव यांनी आपापल्या भाषणांतून सरकारी अन्यायाचा खरपूस समाचार घेतला व हिंदुस्थान सरकारचे गृहमंत्री नामदार हेग यांचीहि त्यांनी भेट घेतली. याच समयीं रा. ब. काळे यांनी मुंबई सरकारचे गृहमंत्री हडसन व होम सेक्रेटरी मॅक्स्वेल यांच्या गांठीभेटी घेऊन त्यांना आश्रम प्रकरणाचा फेरविचार करण्यास सांगितलें. यापूर्वीच कांही दिवस त्यांनी पुण्यास मुद्दाम

**गव्हर्नरसाहेबांची मुलाखत**

घेऊन, त्यांना महाराष्ट्रांत तीव्र असंतोष पसरविणारें हें विशेष गाऱ्हाणे कसेंहि दूर करण्यास सांगितलें होतें व गव्हर्नरसाहेबांनीहि त्या वेळीं आशाजनक आश्वासन श्री. काळे यांना दिलें होतें. पण सखेदाश्चर्याची गोष्ट ही कीं, वरील सर्व बड्या सत्ताधिकाऱ्यांच्या आश्वासनानुसार आश्रम प्रकरणाचा निकाल अनुकूल पद्धतीनें तर लागला नाहींच, उलट १६ डिसेंबरला आश्रमाच्या मालमत्तेचा

**पुनश्च लिलांव**

करणार असल्याचें सरकारने जाहीर केले! (हायकोर्टाकडे अपील केल्यावर पहिला लिलाव कमी किंमत आल्याच्या निमित्तावरून सरकारने नामंजूर करून, लिलांव घेतलेल्यांच्या रकमा ज्यांच्या त्यांस परत करून टाकल्या होत्या. मात्र यंत्रादि सामानाविरहित असलेल्या चारपांचशे रुपये किंमतीच्या कांहीं किरकोळ जिनसांचा लिलांव तेवढा मंजूर केला होता व आश्रमाच्या सर्व धान्यसामुग्रीचा लिलांव तर मागे मे महिन्यांतच उरकून घेतला होता.) अशा प्रकारें

मानवी प्रयत्नांची गति खुंटल्यासारखी झाली म्हणून पुण्याचे श्री. देशदास रानडे यांनी एप्रिल १० पासून आश्रमावरील संकट नष्ट व्हावें हा एक हेतु धरून उपोषण केलें.

आश्रमाविषयीच्या सरकाराच्या उपरोक्त असमर्थनीय धोरणाकडे पाहून रा. ब. काळे यांनी पुनश्च मध्यस्थी करण्याचें ठरविलें व त्यांनी होमसेक्रेटरी मि मॅक्स्वेल यांना मुलाखत देण्यासंबंधी तारेने कळविलें. मॅक्स्वेल यांनी काळे यांच्या विनंत्यनुसार लिलाव कांही दिवसांसाठी तहकूब करून त्यांना मुंबईस भेटावयास बोलाविलें. त्याप्रमाणे २० डिसेंबरला रा. ब. काळे यांनी

## होम–सेक्रेटरीची मुलाखत

घेतली. व आश्रमाचा कॉंग्रेसच्या कायदेभंगाच्या चळवळीशीं संबंध नसल्याबद्दलची त्यांची खात्री पटवून देऊन त्यांचे इतरहि बरेचसे गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला. पण या सर्व वाटाघाटीचे अंतिम स्वरूप निश्चितपणें कांहीच आटोक्यांत येऊं शकत नसल्याकारणाने व आश्रम सोडवून घेण्याच्या बाबतींतला एक निरुपायाचा अखेरचा मार्ग, केवळ मुदतीबाहेर जाण्यामुळे नष्ट होऊं नये म्हणून स्टेट–सेक्रेटरी विरुद्ध कायदेशीर इलाज दिवाणी कोर्टांत करून घेण्याचेंहि ठरवावें लागले, व त्याप्रमाणे ता. ५ जाने. १९३३ रोजीं श्री. दादासाहेब करंदीकर, श्री. भाऊसाहेब सोमण, श्री. शंकरराव साठे प्रभृति वकील मंडळींच्या सल्ल्याने नोटीस बजावण्यांत आली. ही नोटीस लिहून तयार करण्याचे काम श्री. भाऊसाहेब सोमण यांनी केले.

## पुढाऱ्यांचा विचारविनिमय व बंधमुक्तता

वरील नोटीस बजावल्यानंतर कांही दिवसांनी श्री. तात्यासाहेब केळकर व बॅ. जयकर विलायतेहून हिंदुस्थानांत परत आले. तेव्हा त्यांच्या समवेत आश्रमप्रकरणीं यथायोग्य तो विचारविनिमय करण्यांत आला. याच वेळीं मुंबईच्या कायदेकौन्सिलाचीहि बैठक चालू झाली. त्यामुळे रा. ब. चितळे, श्री. विश्वनाथराव जोग, श्री. तात्यासाहेब गोखले, श्री. बखले, डॉ. वैशंपायन प्रभृति कौन्सिलरांशींहि विचारविनिमय होऊं शकला. तद्वतच रा. ब. काळे यांनाहि होमसेक्रेटरींशीं आश्रमाच्या भावी व्यवस्थेसंबंधी शांतपणें वाटाघाटी करण्यास पुष्कळ वेळां संधि मिळाली. अंतीं बऱ्याच चर्चेनंतर "आश्रमाने कायदेभंगासारख्या सरकारविरोधी चळवळीशीं संबंध ठेवला नाही म्हणजे झालें; मग त्याने आपल्या ठराविक उद्देशानुसार 'धर्मप्रसार, तरुणांचें शिक्षण, शुद्धिसंघटन, सार्वत्रिक व्यायामप्रसार' इत्यादि कामें पूर्ववत् चालू करण्यास सरकाराची कांहीच आडकाठी नाही, आश्रमासंबंधी तशी जबाबदार असणारी चार स्थानिक मंडळी मात्र सरकारला पाहिजेत" असें मॅक्स्वेलसाहेबानी काळे यांना सांगितले. तेव्हा साताराचे श्रीमंत सरदार अण्णासाहेब मुतालीक व रा. ब. काळे आणि कऱ्हाडचे श्री. फणसळकर व श्री. जोगळेकर वकील अशा चार जणांचीं नांवें आश्रमाच्या वतीने सुचविण्यांत आली. तीं सरकारलाहि मान्य होऊन आश्रम परत देण्याचा ठराव सरकारने केला व तसें आश्रम सोडल्याचें वृत्त १८ मेच्या सरकारी गॅझेटमध्ये प्रसिद्ध झालें. मध्यंतरींच्या या विपत्काळींहि आश्रमीय जनांनी आपापल्या वैयक्तिक जबाबदारीवर धर्मप्रचाराचीं कार्यें ठायीं ठायीं चालूच ठेवलीं होतीं. त्यांपैकीं सातारा जिल्ह्यांतील १०८ लोकांचें शुद्धीकरण, गोमातकांतील तीन विरोधांशीं झगडून महत्प्रयासाने घडवून आणलेलीं १००० हजारावर शुद्धीकरणें, गोमांतक व्यायामप्रसारक मंडळाची स्थापना करून तद्द्वारा आठदहा स्थळीं चालविलेले शारीरिक शिक्षणाचे वर्ग, मुंबईस केलेली महाराष्ट्र रुग्णशुश्रूषा–मंदिराची स्थापना व त्याचें कार्य, बोरिवली येथील हिंदुधर्मशिक्षणाचा वर्ग इत्यादि कार्यें विशेष महत्त्वाचीं म्हणून उल्लेखनीय होत.

# तदेकं वद निश्चित्य !

ज्यायसी चेत् कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन
तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि 'मोहन'॥
व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥

—श्रीमद्‌भगवद्गीता

सोमवार ता. ८ मे या दिवशीं म. गांधी यांच्या जगद्विख्यात उपोषणास सुरुवात झाली. आणि त्याच दिवशीं येरवडा जेलमधून त्यांची सुटका होऊन 'पर्णकुटी'च्या बंगल्यांत त्यांना नेऊन ठेवण्यांत आलें तेव्हापासून प्रचलित हिंदी राजकारणांतील एका नव्या युगाचा प्रारंभ झाला. वास्तविक या उपोषणाचा मुख्य हेतु राजकीय नव्हता. हरिजन समाजाच्या सुधारणेची जी चळवळ महात्माजींनी अलीकडे, म्हणजे गतवर्षीच्या उपोषणापासून, विशेष जोराने हातीं घेतली होती, तीच अधिक आध्यात्मिक बलानें करतां यावी हाच हेतु होता. सुटकेच्या दिवशींच त्यांनी प्रसिद्ध केलेल्या आपल्या जाहीर पत्रकांत ते म्हणतात, "जर बाहेरच्या कोणत्याहि गोष्टींना, म्हणजे हरिजनांच्या चळवळीशिवाय इतर गोष्टींना, मीं माझ्या चित्तांत जागा दिली तर उपोषणाचा मुख्य हेतु फुकट जाईल."

बंधमुक्ततेमुळे आपल्यावर आलेल्या नैतिक जबाबदारीचें वर्णन महात्माजींनी वरील शब्दांनी केलें आहे. आणि उपोषणाच्या मुदतींत ती जबाबदारी त्यांनी उत्तम प्रकारें संभाळलीहि. पण एका दृष्टीनें पाहतां या अवधींत ही जबाबदारी पार पाडण्यास त्यांस विशेष प्रयत्न करण्याचें कारणच नव्हतें. उपोषणाच्या तिसऱ्या चवथ्या दिवसापासूनच त्यांची प्रकृति इतकी क्षीण झाली कीं, त्यांच्यानें बोलवेना. मग ते राजकीय विषयांचीच काय, खुद्द हरिजनांच्या चळवळीचीहि चर्चा करण्यास असमर्थ झाले. या उपोषणाच्या अवधींत या चळवळीचें कार्य कांहीं थोडें झालें नाहीं, पुष्कळ झालें. पण ते प्रत्यक्षांत लोकांनी केलें, स्वतः महात्माजींनी केलें नाहीं. सभा भरल्या, मिरवणुकी निघाल्या, कांहीं मंदिरेंहि अस्पृश्यांना खुलीं झालीं. आपल्या उपोषणानें महात्माजींनी जी डांबरबत्ती पेटवून ठेवली ती एकवीस दिवस ठिकठिकाणीं सुरुंग उडवीत होती, दगड कोसळवीत होती, कामकऱ्यांना उकरण्या—भरण्या—बांधण्याच्या कामास लावीत होती. प्रथम त्यांचा जीव वांचेल कीं नाहीं या चिंतेत आणि पुढे त्यांचा जीव वांचला या आनंदांत—दोनहि मनःस्थितींत—त्यांच्या हातून एकच कार्य घडून येत होतें. या सुरुंगांमुळे उडालेले कांहीं दगड बांधकामाला उपयोगी पडले. तसेंच कांहीं दगड आपल्या डोक्यांत पडून आपण जखमी झालों अशी सनातनी लोकांनी तक्रार केली. पण हरिजनांच्या चळवळीचें कांहीं कार्य झालें खरें.

तथापि उपोषणाच्या प्रारंभीं महात्माजींनी जें उद्देशपत्रक प्रसिद्ध केलें त्यांत राजकीय विषय मुळींच नव्हता असें मात्र नाहीं! ज्यांना तसा भ्रम असेल त्यांनी कागदपत्र पाहून आपली स्मृति ताजी केली तर त्यांना हेंहि आढळेल कीं, त्या पत्रकांत हरिजनांच्या चळवळीपेक्षा राजकीय विषय पुष्कळच, म्हणजे काय बेसुमारच, अधिक होता. ता. १२ मेच्या केसरींत हें पत्रक आम्हीं छापलें आहे. तें वाचून हिशेब केल्यास तो असा आहे.—हरिजनांच्या चळवळीला अनुलक्षून चार ओळी आहेत, तर राजकीय विषयाला अनुलक्षून सुमारें नव्वद ओळी आहेत. आणि त्यांत खालील अर्थाचीं मुख्य विधानें आहेत. १ कायदेभंगाच्या चळवळीला यश अपेक्षेप्रमाणें आलें नाहीं. २ या अपयशाला चळवळीचा गुप्तपणा कारणीभूत झाला. ३ उघड चळवळ करणारे मूठभर चालतील, पण गुप्त चळवळ करणारे हजारों नकोत. ४ सरकाराला दडपशाहीचा वीट आला असेल तर त्यांनी सर्व कायदेभंगवाल्या कैद्यांना बिनशर्त बंधमुक्त करावें. ५ उपोषणांतून वांचल्यास मी लोकांना व सरकारालाहि योग्य तो सल्ला देईन. ६ तह करण्याचा माझा प्रयत्न म्हणून मी १९३२ च्या प्रारंभापर्यंत मागे जाऊन तेथें तुटलेलें सूत्र पुनः हातीं घेईन. ७ मात्र विशिष्ट लोक तुरुंगांतून न सुटले तर तडजोड होणार नाहीं. ८ उपोषणाच्या अवधींत सरकारी धोरणांत फरक न पडला तर मी परत तुरुंगांत जाईन. ९ माझी ही सर्व विचार-सरणी प्रिय व विवेकी वल्लभभाई पटेल यांना तंतोतंत मान्य आहे. १० त्यांना सरकारच्या अडचणींची पूर्ण जाणीव आहे; बार्डोली व खेडा येथील शेतकऱ्यांविषयीं त्यांना फार चिंता वाटते!

महात्माजींच्या उपोषणाचा मुख्य हेतु जर हरिजनांच्या चळवळीविषयींच होता तर, वरील पत्रकांत मुख्य किंबहुना सर्व भर असा हा राजकीय विषयावर देण्याचें काय प्रयोजन? ही शंका प्रथमच लोकांना आली. पण उपोषणांत चर्चेचा मनःक्षोभ नको म्हणून ती त्यांनी मोठ्याने व जोराने

विचारली नाही. पण आता मात्र तें उरलें नाही. लोक हटकून विचारणार कीं, "महात्माजी! हरिजन चळवळीच्या वीतभर वावडीला हा राजकीय चर्चेचा हातभर सडा कशाला? वावडी वर वर जाणार झाली तर लांब सडा तिला उपयोगी पडतो. पण ती वाऱ्यांत गिरक्या खाऊं लागली तर सडा तिला काय वांचविणार? उपोषणांत आपण स्वतः ध्यानस्थ बसणार; पण त्या अवधींत लोकानी हरिजन चळवळीचेंच कार्य करीत राहावें असे जर खरोखर आपणाला वाटत होतें तर हा राजकीय तत्त्वांचा व धोरणाचा उपन्यास करून लोकांचें मन विनाकारण द्विधा कां केलेंत? नाकांत सुंठीचा कण जावा त्याप्रमाणें हरिजन चळवळ करीत असता राजकारणी विचारांच्या शिंका त्यांना ठसठस येत होत्या. असो; झालें तें होऊन गेलें, पण आता तरी काय तें स्पष्ट बोला"!

महात्मा गांधींचें मुख हें लोकांच्या दृष्टीने बोधाला गुरुमुख व पवित्रपणाला गायमुख! महात्माजींनी मुळी जाहीर पत्रकच काढलें नसतें, किंवा काढले त्यांत फक्त हरिजनचळवळीचाच मार्ग दाखविला असता, तर लोकांचा गोंधळ झाला नसता. पण वर आंकडेवार दिलेल्या दहा विधानांत राजकारणाचा इतका मसाला भरला आहे कीं, मूळ जिनसाची खरी चवच कळत नाही. लोकांना हें पत्रक वाचून निश्चितपणें वाटलें तें इतकेंच कीं, आता राजकारणांतील एका नव्या युगाचा अवतार झाला. पण नव्या युगाचा अवतारी देव कोण? सात्त्विक बुद्ध? कीं राजस श्रीकृष्ण? कीं तामस कलंकी? म्हणून श्रीकृष्णाला अर्जुनाने गीतेंत विचारलें त्याप्रमाणे हिंदी राष्ट्रालाहि महात्माजींना "तदेकं वद निश्चित्य" असें म्हणणें प्राप्त झालें आहे. कारण जाहीरपत्रकांत कायदेभंगाच्या तत्त्वाचा ध्येयवाद आहे, अन् कायदेभंगाच्या तपशीलाचा निषेध आहे, अन् सरकारला सामाचें आश्वासन आहे, अन् दंडाची धमकी आहे, अन् इसमें मेरा (चांद) वल्लभभाई आहे, अन् बारडोलीचा शेतकरी आहे, अन् सर्व कांही आहे, अन् सर्व कांही नाही. तेव्हा लोकांनी 'तदेकं वद निश्चित्य' असें न म्हणावें तर काय करावें?

अर्जुनाने गीतेच्या तिसऱ्या अध्यायांत श्रीकृष्णाला नेमक्या याच शब्दांनी सवाल केला. 'तदेकं वद निश्चित्य' यांतील 'निश्चित्य' हा शब्द महत्त्वाचा आहे. त्याचा अर्थ मार्मिकपणाने करतां येतो तसा मिस्कीलपणानेंहि करतां येतो. पहिला अर्थ असा कीं, "निश्चय करशील तो मलों उद्देशून मत्सापेक्ष कर. स्वतः तूं ज्ञानी. तुझ्या मनांत निश्चितार्थ आहेच. पण मी पडलों प्राकृत, अज्ञानी, संशयग्रस्त व कमकुवत. म्हणून माझ्या बऱ्याचें तेंच ठरवून सांग." दुसरा अर्थ असा कीं, "देवा, तुझें तरी तुला कुठें रे नीट समजलें आहे? एकदा सांख्यज्ञानाच महत्त्व सांगतोस, एकदा कर्माचें महत्त्व सांगतोस! तें कांही उगाच नाही! तुझ्याहि अंतर्यामीं गोंधळ आहे म्हणून! 'निश्चित्य' म्हणजे निश्चय करण्याची, विवेकबुद्धीचा निर्णय देण्याची तुझीहि क्रिया चालू आहे, संपली नाही." असा अर्थ नसता तर अर्जुनानें 'निश्चित्य' च्या ऐवजीं 'सुनिश्चितं' असें किंवा त्या अर्थाचें पद घातलें असतें.

पण गुरुजींच्या ज्ञानाविषयी शिष्यांना संशय आला तरी आदरबुद्धीमुळे ते तो दाखवीत नाहीत. एखाद्या नव्या उदाहरणाची रीत मास्तरांनी सांगितली आणि उत्तर चुकलें, तर विद्यार्थी "रीत चुकली" म्हणतो. "मास्तर तुम्ही चुकलां" किंवा "तुम्हांलाच उदाहरण समजलें नाही" असें म्हणत नाही. तीच गोष्ट महात्माजींसंबंधानें आहे. असो. ता. १२ जुलैपासून पुण्यास काँग्रेसच्या पुढाऱ्यांची सभा भरणारच आहे. तर या प्रसंगीं तरी महात्माजींनीच कांही निश्चित मार्ग या नव्या युगाच्या अरण्यांतून दाखवावा. कारण तांब्या तीर्थानें भरला असला तरी, नैवेद्याचा प्रसाद पवित्र करण्याकरिता तीर्थोदक त्यावर शिंपडावयाचें तर तें कांही एका विशिष्ट आकाराच्या शिंपल्यांतून शिंपडावें लागतें. या न्यायानें इतर काँग्रेस पुढाऱ्यांनी कांही निर्णय करावयाचें ठरविलें किंवा केला तर तो महात्माजींच्या तोंडच्या शब्दानें व अभिप्रायानेंच कृतार्थ होणार! म्हणूनच 'तदेकं वद निश्चित्य' ही लोकांची प्रार्थना!

# पोलीस हे नोकर कीं धनी ?

हिंदुस्थानाच्या राज्यकारभारांत नव्या सुधारणांच्या दिंडीदरवाजानें हिंदी लोकांचा थोडासा हात शिरकत आहे असें दिसताच गोऱ्या नोकरशाहीच्या पोटांत कावळे टोकरूं लागले आहेत, व असें होणें साहजिकच आहे. कारण, या नव्या सुधारणांमुळे थोडा कां होईना, पण खरा शह जो बसतो तो या नोकरशाहीच्याच सत्तेला. पार्लमेंटाचा जो हिंदुस्थानावर अंमल आहे, तो एका अर्थानें तात्त्विक

स्वरूपाचाच आहे. पण इंग्रजी सत्तेचे हिंदुस्थानांतील खरे प्रतिनिधि कोण म्हणून विचारल्यास विनदिक्कतपणें नोकरशाहीकडेच बोट दाखवावें लागेल; किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, गोऱ्या नोकरशाहीची पोलादी चौकट हान्च ब्रिटिश सत्तेचा खरा आधार आहे. म्हणूनच हिंदी लोकांनीहि असें कोष्टक मनाशीं बसवून टाकलें आहे कीं, नोकरशाहीच्या सत्तेचें उच्चाटण म्हणजेच खरें स्वराज्यसाधन ! या पोलादी चौकटीच्या संरक्षणार्थ गोऱ्या नोकरशाहीने आपले खंदे वीर पुढे करून निरनिराळ्या स्वरूपाच्या अस्त्रांचा मारा या सुधारणांच्या योजनेवर करण्याचें सुरू ठेविलें आहे !

प्रथम सिव्हिल सर्व्हिसमधील नोकरांनीं आपली गोलंदाजी केली. नंतर पोलीस खात्यांतील नोकरांच्या गोलंदाजीस सुरुवात झाली. पोलीसखातें हें तर ब्रिटिश सरकारचें जावई खातें. लष्कराच्या खालोखालचा मान त्याचा-त्याच्या आधारावर शांतता व सुव्यवस्था राहावयाची. एवंगुणविशिष्ट अशा पोलीस खात्यांतील इंग्रज नोकरांनी जॉइंट कमिटीपुढे साक्ष देतांना सिव्हिल सर्व्हिसच्या मागण्यांपेक्षा एक पाऊल पुढे टाकलें असल्यास नवल काय? पेन्शनें, पगार व बहालीबढती यांबद्दलची हमी तर त्यांना पाहिजेच आहे; पण याशिवाय त्यांची मागणी अशी आहे कीं, त्यांच्या खात्यावर स्वराज्यांतील प्रधानमंडळाचा अखत्यार चालतां उपयोगी नाही. या खात्यावर देखरेख करण्याचा अधिकार वरिष्ठ संयुक्त सरकाराकडे असावा व त्याकरिता त्या सरकाराने आपला एक स्वतंत्र ' फेडरल इन्स्पेक्टर जनरल' नेमावा ! त्यांची दुसरी मागणी अशी आहे कीं, प्रत्येक प्रांतांतील इन्स्पेक्टर जनरल हा त्या खात्याचा सेक्रेटरी असावा, व त्याला खुद्द गव्हर्नराकडे जाऊन पोलीस खात्याबाबतचे हुकूम परस्पर घेतां यावे. आपलें कर्तव्य बजावीत असता पोलिसांनी केलेल्या कोणत्याहि कृत्याबद्दल त्यांना जबाबदार धरूं नये अशी त्यांची तिसरी मागणी आहे. त्यांची चौथी मागणी अशी आहे कीं, इन्स्पेक्टराच्या खालील जाग्यावरील पोलिसांच्या नेमणुका, त्यांची बढती किंवा बडतर्फी करण्याचा अधिकार पब्लिक सर्व्हिस कमिशनाकडे न ठेवतां तो त्यांच्याच वरिष्ठ अधिकाऱ्याकडे ठेवावा !

वरील मागण्यांचा साकल्याने विचार केला तर त्यांतून एकच ध्वनि निघतो; व तो हा कीं, पुढील राज्यघटनेंत प्रांतिक स्वायत्तता देऊन प्रांताचा सर्व कारभार हिंदी लोकांच्या हातीं सोपविला तरी या स्वायत्ततेंत पोलीस खात्याचा अंतर्भाव होऊं नये. श्वेतपत्रिकेंतील योजनेंत ' कायदा व सुव्यवस्था ' हें खातें सुद्धा प्रांतिक प्रधानमंडळाकडे सुपूर्त करण्याचें ठरलें आहे.त्यावर बिब्बा घालण्याचा हा प्रयत्न आहे. वरिष्ठ संयुक्त सरकाराची देखरेख या खात्यावर ठेवावयाची याचा स्पष्ट अर्थ प्रांतिक स्वायत्तता संपली असाच नव्हे काय ? पोलीसखातें सर्वस्वी सोपीव करावें असाच निकाल सायमन कमिशनानेंहि दिला आहे. परंतु, गोऱ्या पोलीस लोकांना हा सायमन कमिशनचा निकाल धाब्यावर बसवून आपल्या खात्याची व्यवस्था स्वतंत्र राहावी असें वाटतें हें आश्चर्य आहे. काळ्या हिंदी दिवाणांच्या हाताखाली गोऱ्या पोलिसाने काम करावें ही त्यांना शरमेची गोष्ट आहे असें त्यांचें मत आहे. म्हणूनच असा प्रश्न विचारावासा वाटतो कीं, हिंदुस्थानांत पोलिसांचें राज्य व्हावयाचें का लोकांचें ?

जॉइंट कमिटीपुढे पोलीस-संघातर्फे साक्ष चालली असता त्या संघाचे प्रतिनिधि सर राल्फ ग्रिफिथ यांना लॉर्ड आयर्विन यांनी वरील आशयाचाच प्रश्न सडेतोड रीतीने विचारला. ते म्हणाले, कायदा व सुव्यवस्था हीं खातीं हिंदी लोकांकडे सापवूं नयेत असाच तुमच्या म्हणण्याचा अर्थ करावयाचा ना? या प्रश्नाला मात्र त्यांनी गुळमुळीत उत्तर दिलें कीं, "आम्ही तसें कांहीच म्हणत नाही. आमच्या म्हणण्याचा मथितार्थ आपण हवा तो काढावा." सर राल्फ ग्रिफिथ यांनी या प्रश्नाला उत्तर देण्याची टाळाटाळ केली असली तरी त्यांच्या साक्षींत त्यांनीं दाखविलेलीं धाकदपटशाचीं नखें स्पष्ट दिसत होतीं. त्यांच्या मागणीपत्रकांतच शेवटीं म्हटलें आहे कीं, जर आमच्या या मागण्या मंजूर झाल्या नाहीत तर आम्हांला आमचा गाशा गुंडाळून राजीनामा देऊन विलायतेंत परत यावें लागेल ! जॉइंट कमिटी याला काय उत्तर देणार आहे हें पुढे समजेलच. पण हिंदुस्थानातर्फे मात्र वरील पोलीस-संघाला स्पष्ट सांगावयास हरकत नाही कीं, असल्या उद्दाम नोकरांची हिंदुस्थानाला गरजच नाही.

# कायदेभंगाची तहकुबी

## ( ठिकठिकाणचें लोकमत )

चळवळीच्या फेरतहकुबीची बातमी ऐकून कोणालाहि विस्मय वाटणार नाही. याचीं कारणें दोन आहेत; एक तर गांधीजींची प्रकृति सल्लामसलत देण्याइतकी सुधारलेली नाही. दुसरें असें कीं, आजमितीला राष्ट्रीय सभेचें सुकाणूं ज्यांच्या हातीं आहे त्यांना मुख्यतः सरकारी दडपशाहीमुळे आपली चळवळ फसली हें कळून चुकलें आहे. गांधीजींची प्रकृति चांगली असती आणि ते राजकीय वाटा-घाटींत भाग घेऊं शकले असते तरीदेखील त्यांनी चळवळीचा जीर्णोद्धार केला असता अशी कल्पना आम्हांला करवत नाहीं. —**न्यू टाईम्स** (मद्रास).

***

आम्ही वारंवार सांगत आलों आहों कीं, यापुढे कायदेभंग चालविण्यानें कोणताहि हेतु साध्य होणार नाही. राष्ट्राच्या वेदना मात्र वृद्धिंगत होतील. चळवळीचा मूळचा उद्देश असा होता कीं, बंगाल, संयुक्तप्रांत व सरहद्दप्रांत यांतील वटहुकुमांविरुद्ध देशात निषेधाचें तुफान माजवावयाचें; पण परिणाम काय दिसून आला ? सर्व हिंदुस्थानाला वट-हुकूम दीर्घ कालापर्यंत लागू करण्यात आले. कायदेभंग म्हणजे दडपशाहीच्या निषेधाचें साधन, आणि दडपशाही म्हणजे कायदेभंगावर तोडगा असें हें चक्र चालू आहे. कायदेभंग हें स्वराज्याचें साधन होईल अशी आशा नाही. म्हणून कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनी कायदेभंगाच्या स्वाभाविक मर्यादा ओळखण्याइतकी मुत्सद्दीगिरी दाखवावी आणि चढाईचें साधन असें त्यास मानूं नये. सत्याग्रह हें गांधींचें जिव्हाळ्याचें ब्रीद असेल; पण तसें तें कॉंग्रेसचें नाही. कांही काळापुरतें धोरण याच दृष्टीनें कायदेभंगाचा स्वीकार कॉंग्रेसने केला. धोरण हें परिस्थितीप्रमाणे बदलूं शकतें. म्हणून कॉंग्रेसच्या सध्याच्या धोरणाचाहि फेरविचार होणें आवश्यक आहे. —**दि न्यू ओरिसा** (उत्कल).

***

श्री. अणे यांनी फेर-तहकुबीसंबंधी पत्रक काढलें आहे. त्यापूर्वी त्यांनी इतर कॉंग्रेसच्या पुढाऱ्यां-चें सद्यःस्थितीसंबंधीचें मत अजमावलें असलें पाहिजे असें निश्चितपणें सांगतां येतें. कायदेभंगाच्या धोरणाचा नीटपणें विचार करावयास हवा, याची जाणीव कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांना झालेली आहे. अर्थात् अशा विचारा-ला गांधीजींच्या सहकार्याची आवश्यकता आहे. अशा प्रसंगीं कॉंग्रेसच्या अध्यक्षांनी योग्य दिशेने पाऊल टाकले याबद्दल देशानें त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत. —**हितवाद** ( नागपूर ).

***

कॉंग्रेसने सद्यःस्थितीला अनुसरून आपला कार्यक्रम बदलावा याविषयी हिंदी वर्तमानपत्र-कारांचें एकमत दिसून येतें. सरकाराची मनोवृत्ति बदलणें हें कॉंग्रेसचें ध्येय होतें, असें म्हणण्यांत कांही अर्थ नाही. कॉंग्रेसचें खरें ध्येय एकच. आणि तें म्हणजे स्वराज्य संपादणें तें ध्येय प्राप्त होईपर्यंत कॉंग्रेसचे कार्यक्रम अपेशी ठरलें असेंच म्हटलें पाहिजे. नैतिक विजयाची मातब्बरी आम्हांला वाटत नाही. कारण तसले विजय कृतींत उतरणें अशक्य असतें. सरकार कॉंग्रेसवाल्यांना बंधमुक्त करतें कीं नाही हाहि प्रश्न आम्हांला महत्त्वाचा वाटत नाही. कॉंग्रेसला स्वतःचें म्हणून देशाविषयी कांही कर्तव्य आहेच. त्याचें परिपालन तिनें चालविलें पाहिजे. कॉंग्रेसने सरकाराशीं सहकार्यच करावें असा कोणाचा आग्रह नाही. तिच्यासाठी दुसरीं पुष्कळ कामें उभीं आहेत. श्री. अणे यांनी हातीं घेतलेलें काम तडीस पोंचवावें आणि चळवळ बंद करण्याची संधि लवकर आणावी. असें करण्याशिवाय दुसरा मार्गच नाही. —**बॉम्बे क्रॉनिकल** ( मुंबई ).

***

कायदेभंगतहकुबीची मुदत लांबविल्यामुळे कित्येक कॉंग्रेसभक्त व कॉंग्रेसशीं सहानुभूति असलेला वर्ग असंतुष्ट झाला आहे आम्हांला असें वाटतें कीं, लोकमताचें होत असलेलें प्रदर्शन लक्षांत घेऊन व कॉंग्रेसच्या अवशिष्ट सैनिकांचा विचार एकत्र करून लो.ना.अणे कॉंग्रेसच्या चळवळी-ची पुनर्रचना करतील व जरूर पडेल तर तिचें धोरण व कार्यपद्धति यांमध्ये फरक करण्यास मागेपुढे पाहणार नाहीत. राष्ट्रापुढे कांही तरी उत्तेजक कार्यक्रम असणें आवश्यक होय. पूर्वीच्या विधायक कार्यक्रमांतील बाबी सर्व जनतेस विदित होऊन मागे पडल्या आहेत; आणि कॉंग्रेसने जे आजपर्यंत विधिनिषेध मानिले त्या विधायक कार्यक्रमाच्या व निषिद्ध कार्यक्रमा-च्या सर्वच बाबींविषयी कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनी पुनः एकदा विचार करावयास पाहिजे त्याअर्थी चालू तहकुबीच्या मुदतींत कायदेभंगाचा प्रश्न

वगळून बाकीच्या गोष्टींविषयी काँग्रेस पुढाऱ्यांनी निश्चित धोरण ठरविण्याचें हातीं घेतलें पाहिजे.

—प्रागतिक ( जळगांव ).

***

सत्याग्रह तात्पुरता थांबविण्यांत आला आहे. तो तसा थांबविण्याच्याऐवजी अजिबात थांबविला पाहिजे होता असें म्हणण्यांत अगर तो मुळीच थांबवावयास नको होता असा अट्टाहास करण्यांत व्यावहारिक दृष्टीनें कांहीं फायदा नाहीं. जोंपर्यंत काँग्रेसच्या अध्यक्षानें इतर काँग्रेसकार्यकर्त्यांच्या सल्ल्यानें अमलांत आणिलेला निर्णय झुगारून देऊन आपलाच हट्ट पुरा करण्याकरितां दुसरा कोणीहि पक्ष पुढें येत नाहीं तोंपर्यंत असल्या तात्त्विक चर्चेनें कोणतेंहि हित साधण्यासारखें नाहीं. जिकडे पाहावें तिकडे सर्वत्र एक प्रकारची शिथिलता उत्पन्न झाल्याचें दिसत आहे. ही शिथिलता लढाईच्या श्रमानें आलेली असो अगर उदासीनतेमुळें आलेली असो, अशी शिथिलता आलेली आहे खास. आमच्या मतें या स्थितींत काँग्रेसला सत्याग्रहाचें धोरण अबाधित चालू ठेवणेंच शक्य नाहीं.

—प्रतियोगी ( ठाणे ).

# औंधची प्रातिनिधिक सभा

औंध ता. २६ जून १९३३.

औंध संस्थान प्रातिनिधिक सभेची अंदाजपत्रकाची बैठक ता. २४, २५ व ता. २६ असे तीन दिवस भरून श्रीमंतांच्या समारोपाच्या भाषणानंतर सोमवार ता. २६ रोजीं समाप्त झाली.

प्रारंभीं प्रातिनिधिक सभेचे अध्यक्ष रा. ब. आर. आर. काळे यांचें प्रास्ताविक भाषण झालें. आपल्या भाषणामध्यें अध्यक्षांनीं हल्लींच्या पुष्कळ विषयांवर आपलें विचारपरिप्लुत मतप्रदर्शन केलें. औंध संस्थानाच्या प्रातिनिधिक सभेच्या या बैठकीपुढें येणारें 'देवस्थानाचें बिल' व 'ग्रामपंचायत योजना' या दोन बिलांचा प्रामुख्यानें उल्लेख करून त्यांनीं संस्थानाची सर्वांगीण उन्नति होण्याकरितां प्रयत्न होणें अवश्य आहे असें सांगितलें. शेतकऱ्यांच्या उन्नतीकरितां श्रीमंत औंधकर करीत असलेल्या सहानुभूतिपूर्ण परिश्रमांचा त्यांनीं कृतज्ञतापूर्वक उल्लेखहि आपल्या भाषणांत केला.

त्यांच्या भाषणानंतर संस्थानाचे दिवाण श्री. करंदीकर यानीं संस्थानाचें १९३३-३४ सालचें अंदाजपत्रक प्रातिनिधिक सभेपुढें मांडलें. अंदाजपत्रकावरून या सालीं बजेटामध्यें अदमासें ४५ हजार रुपये शिल्लक पडतात असें आढळून येतें.

### अंदाजपत्रकांतील कांहीं ठळक आंकडे

संस्थानाची एकूण जमा अदमासे रु. ६४१०००
संस्थानाचा एकूण खर्च रु. ३९६०००
शिक्षणखात्यावरील खर्च रु. २४०००
आरोग्य व दवाखानाखर्च रु. १४०००
औद्योगिक खात्याचा उपक्रमखर्च रु. १०००
ग्रामपंचायतप्रसाराबद्दल खर्च रु. २०००
श्रीमंतांचा एकूण खासगी खर्च रु. ५००००

या वर्षीच्या अंदाजपत्रकांत औद्योगिक शिक्षणाचा उपक्रम व ग्रामपंचायत अशा दोन नवीन लोकोपयोगी बाबींवर कांहीं खर्च टाकण्यास सुरुवात झाली आहे. अंदाजपत्रकावर सभासदांनीं मनमोकळेपणानें व असंदिग्ध भाषेंत चर्चा केली. बऱ्याच चर्चेनंतर किरकोळ फेरबदलानें अंदाजपत्रकाला सभेकडून मान्यता देण्यांत आली.

### पास झालेलीं महत्त्वाचीं बिलें

या अधिवेशनामध्यें सामाजिक उन्नतीप्रीत्यर्थ बिलें पास करण्यांत आलीं. त्यांत 'बालविवाह-प्रतिबंध बिल' व 'देवस्थानासंबंधींचें बिल' हीं प्रमुख होत. पहिल्या बिलांत १२ वर्षांखालील मुलींचा व १६ वर्षांखालील मुलाचा विवाह होण्यास प्रतिबंध करण्याची योजना आहे. देवस्थान व धार्मिक संस्था यांचें जें उत्पन्न येतें तें एका व्यक्तीकडे राहण्याऐवजी पंचांकडे राहावें अशी दुसऱ्या बिलानें तजवीज केली आहे. उत्पन्नावरील कराचें बिल ( Income Tax ) प्रातिनिधिक सभेच्या सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्यांत आलें. तालुकासभेसंबंधीं, बँकेसंबंधींचा ठराव, स्टँप ॲक्ट-दुरुस्तीचें बिल वगैरेहि पास करण्यांत आलीं. प्रातिनिधिक सभेची मुदत ६ महिन्यांनीं वाढविण्याचा ठरावहि मान्य करण्यांत आला. तंबाखूसंबंधाचें बिल लांबणीवर टाकण्यांत आलें.

### श्रीमंतांचें समारोपाचें भाषण

शेवटल्या दिवशीं दोनप्रहरीं श्रीमंतांचें समारोपाचें भाषण झालें. त्यांत तीन दिवस चाललेल्या प्रातिनिधिक सभेच्या कार्याचें श्रीमंतांनीं निरीक्षण केलें व सभेनें पास केलेल्या बहुतेक सर्व बिलांना व ठरावांना आपली संमति

दर्शविली. आमच्या प्रजेपैकीं प्रत्येकाला अन्न व वस्त्र कसें मिळेल यासंबंधी आमच्या अंतःकरणांत तळमळ आहे. आपल्या संस्थानास अशी सुस्थिति येईल तेव्हा आमचे समाधान होईल. पण ह्या गोष्टी निर्माण होण्याकरिता आमच्या अधिकारी वर्गावर व प्रातिनिधिक सभासदांवर प्रजेचा पूर्ण विश्वास बसला पाहिजे. आमच्या प्रजेचा आमच्यावर विश्वास आहे हें सांगावयास अभिमान वाटतो. हा विश्वास अधिकारी वर्गावर व मामदार सभासदांवर जेव्हा पूर्णपणें प्रकट होईल तेव्हा खरी प्रगति होऊं शकेल. म्हणून हा प्रजेचा विश्वास संपादन करण्यास सर्वांनी एकदिलानें व सहकार्यानें झटावें असें त्यांनी आग्रहानें सांगितलें. त्यानंतर आभारप्रदर्शन होऊन अधिवेशन खलास झालें.

# देवीदास—लक्ष्मी—विवाह

## ( कांहीं शंका )

[ ता. २८ च्या सकाळ पत्रांत श्री. काका कालेलकर यांनी पत्र प्रसिद्ध केलें आहे. त्यापूर्वी श्री. म्हैसकर यांनी हें पत्र लिहिलें आहे. रा. कालेलकर यांच्या पत्रांत व्रात्य स्तोमाचा हेतु वैश्याचा ब्राह्मण करण्याचा नव्हता असें लिहिलें आहे. तथापि या बाबतींत स्वतः लक्ष्मणशास्त्री जोशी अधिकृत खुलासा करतील तर त्यानें अनेक संशयांचें निराकरण होईल. सं. के. ]

म. गांधी यांचे चिरंजीव देवीदास गांधी व श्री. राजगोपालाचार्य यांची कन्या सौ. लक्ष्मी यांचा विवाह ता. १६-६-३३ रोजीं सकाळीं पर्णकुटिकेवर झाला. तो विवाह शास्त्रसंमत नसून हिंदुधर्मविघातक व चातुर्वर्ण्याचा नाश करणारा आहे. तो कसा हें आम्ही पुढे लिहीत आहों.

हिंदुधर्मामध्ये मुख्य जाति चार आहेत. त्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र याप्रमाणे होत. विवाहाचे प्रकार तीन आहेत. सवर्ण, अनुलोम आणि प्रतिलोम.

सवर्ण विवाहांत ज्या जातीची वधू त्याच जातीचा वर असतो व तो विवाह शास्त्र आणि कायदा या दोहोंसहि मान्य आहे.

अनुलोम विवाहांत वर ब्राह्मण जातीचा व वधू क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र अथवा वर क्षत्रिय, आणि वधू वैश्य किंवा शूद्र अथवा वर वैश्य आणि वधू शूद्र. हा विवाह शास्त्रसंमत असून कायद्यानेंहि मान्य आहे. मात्र अनुलोमाचे संततीस इस्टेट सवर्णाप्रमाणे मिळत नाही. (उदाहरणार्थ गुलाब वि. जीवनलाल 24 Bom.L. R.) (नाथा वि. मेथा छोटालाल 25 Bom.) ही विवाहपद्धति सांप्रत रूढ नाही.

प्रतिलोम विवाहांत सर्व स्थिति अनुलोमाचे विरुद्ध आहे. म्हणजे वर शूद्र जातीचा आणि वधू ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य; अथवा वर वैश्य जातीचा आणि वधू ब्राह्मण क्षत्रिय; अथवा वर क्षत्रिय जातीचा आणि वधू ब्राह्मण जातीची. या विवाहास शास्त्रांत कोठेहि आधार नाही, इतकेंच नव्हे तर त्यास कायद्याचादेखील आधार नाही. अशा तऱ्हेनें लग्न झालेली जी बायको तिला पोटगी मागण्याचा देखील अधिकार नाही. फार झाल्यास अवरुद्ध स्त्री म्हणूनहि तिनें पोटगी मागावी. तीदेखील नवऱ्याच्या पश्चात्, हयातींत नव्हे. कारण अवरुद्ध स्त्रीचा हक्क पश्चात् उत्पन्न होतो, हयातींत होत नाही. देवीदास व लक्ष्मी यांचा विवाह प्रतिलोम झालेला आहे. आता याचे खेरीज चौथा प्रकार आहे. तो म्हणजे स्पेशल मॅरेज ॲक्ट १९२३ चा. या ॲक्टाखाली लग्नें होतात त्यांचा विधि येणेप्रमाणे—

( १ ) वधू किंवा वर यांपैकीं कोणाचाहि पूर्वविवाहाचा नवरा किंवा बायको जिवंत असता उपयोगी नाही.

( २ ) वराचें वय अठरा व वधूचें वय चवदा पूर्ण असलें पाहिजे.

( ३ ) वर किंवा वधू यांपैकीं कोणाचें वय २१ वर्षांहून कमी असेल तर त्यांनी आपल्या पालकांची किंवा वडिलांची संमति मिळविली पाहिजे. वरीलप्रमाणे लग्न होताच वर जर एकत्र कुटुंबांतील असेल तर तो विभक्त होतो. याप्रमाणे विवाह झाल्यावर त्यांना दत्तक घेण्याचा हक्क, हिंदुधर्माप्रमाणे असलेला, राहत नाही व विवाह करणारा आपल्या बापास जर एकटा असेल तर बापास दुसरा मुलगा दत्तक घेण्याचा हक्क उत्पन्न होतो. या विवाहित कुटुंबाचा व त्यांच्या संततीचा वारसा हिंदु लॉ-प्रमाणे न ठरता इंडियन सक्सेशन ॲक्टाप्रमाणे ठरतो.

वरील स्पेशल मॅरेज ॲक्टाखाली देवदास गांधी व सौ. लक्ष्मी यांचा विवाह झालेला आहे. म. गांधी व श्री. राजगोपाळाचार्य यांच्यासारख्या पुढारी लोकांनी असें अधर्माचरण केलें आहे म्हणून याचा विचार करणें भाग आहे. कारण थोरांचें अनुकरण लहान करीत असतात. म. गांधी यांनी आपल्या आश्रमांतील एका अंत्यज मुलीचा

विवाह एका ब्राह्मणाचे मुलाशीं लावून दिला. तो विवाह अनुलोम होय. म. गांधी नेहमी तोंडानें म्हणतात कीं, मला शास्त्रें मान्य आहेत. मला धर्म पाहिजे. भगवद्गीता रात्रंदिवस जवळ पाहिजे. परंतु त्यांची कृति मात्र अगदी उलट आहे.

ज्या कौन्सिलावर बहिष्कार घाला असें महात्माजी लोकांस सांगत असत, त्याच कौन्सिलांतील लोकांची पायधरणी अस्पृश्यतानिवारणाकरिता त्यांचेच अनुयायी करीत आहेत. तसेच लोकांस करबंदी करा म्हणून शिकविणारे महात्मे आपण आपल्या मुलाचें लग्न स्पेशल मॅरेज ॲक्टाखाली करून सरकारास रजिस्ट्रेशन व स्टॅंप फीचे रूपानें पैसे भरीत आहेत. जर आपण धर्माप्रमाणे वागणारे आहांत तर आपल्या धर्माप्रमाणे लग्न रजिस्टर करावें लागतें असें झालें. मग तो आपला धर्म कोणता बरें ? आम्हांस म. गांधींचा धर्म म्हणजे ईश्वरी प्रेरणा याखेरीज कोणताच दिसत नाही. तसेच लग्न रजिस्टर झाल्यावर वैदिक धर्माची थट्टाहि करण्यांत आली. कारण एकदा लग्नाचा निश्चय रजिस्टर पद्धतीप्रमाणें करण्याचा ठरल्यावर मग वैदिक विधि करण्याचें प्रयोजन काय ?

वांईचे तर्कतीर्थ जोशी यांनी पुरोहिताचें काम केलें. त्यांनी कन्यादान, विवाहहोम, सप्तपदी वगैरे विधि केले असें समजतें. त्यांनी ते विधि कोणत्या शाखेने केले ! त्यांमध्ये कन्यादानाचा संकल्प कसा सोडला एवढें त्यांनी प्रसिद्ध केल्यास बरें होईल. कारण मी भिक्षुक असून नेहमी याज्ञिक करणारा आहें. मलाहि नवी माहिती होईल. कारण आमचे मतें कामशास्त्राखेरीज वरील विवाहास कोणत्याहि शास्त्राचा आधार नाही. शास्त्रीबुवांनी व्रात्यस्तोम होम करून देविदासास ब्राह्मण करून घेतला असें समजतें; परंतु व्रात्य कोणास म्हणावें ? तर " संस्कारहीनः व्रात्यः " असें स्पष्ट आहे; म्हणजे ज्याचा संस्कार झालेला नाही त्यास व्रात्य म्हणावें. (उ. अष्टमे वर्षे ब्राह्मणमुपनयेत् गर्भाष्टमे वैकादशे क्षत्रियं द्वादशे वैश्यं षोडशादानतीतः कालः) ब्राह्मणाचा उपनयनविधि आठवे वर्षी व्हावा, क्षत्रियाचा अकरावे वर्षी व वैश्याचा बारावे वर्षी; परतु त्या वेळीं न झाल्यास त्याची मर्यादा सोळा, बावीस व चोवीस अशी आहे. परंतु तसेहि न झाल्यास व्रात्यस्तोम विधि करावा असें आहे. परंतु येथे पाहावें तो वैश्याचा ब्राह्मण होतो. मग माझ्या मतें सर्व अस्पृश्यदेखील वरील विधीने ब्राह्मण का बरें होणार नाहीत, एवढें शास्त्रीबुवांनी स्पष्ट कळवावें.

**वासुदेवभटजी म्हैसकर,**
पुणें पेठ सदाशिव, ७६९ भागवतवाडा.

# सार्वजनिक कार्याची शिक्षणसंस्था

## ता. १६ जुलै रोजीं सुरू होणार

या संस्थेचे कार्यवाह म्हणून **पंडित दिनकरशास्त्री कानडे एम्. ए.** (अमेरिका) यांची नेमणूक करण्यांत आली आहे. आतापर्यंत सुमारे ४० विद्यार्थ्यांचे अर्ज हातीं आले आहेत. त्यांत प्रत्यक्ष सार्वजनिक कार्य करणारांचे कांही अर्ज असून बी. ए., विशारद इत्यादि पदवीधरांचे कांही आहेत. मॅट्रिक परीक्षाच उत्तीर्ण झालेल्या किंवा होणाऱ्या विद्यार्थ्यांना संस्थेचा अभ्यासक्रम झेपण्यासारखा नसल्यामुळे त्यांची सोय संस्थेला तूर्त करतां येण्यासारखी नाही. आलेल्या अर्जांची निवड करण्याचें व निरनिराळ्या विषयांवरील पुस्तकें आणि त्यांचे अभ्यासक्रम निश्चित करण्याचें काम चालू आहे. तें पूर्ण होण्यासाठी संस्थेचा प्रारंभ ता. १६ जुलै रोजीं करण्याचें ठरविण्यांत आले आहे. तोंपर्यंत सार्वजनिक काम करणाऱ्या पदवीधरांचे कांही नवीन अर्ज आले तर त्यांचाहि विचार होऊं शकेल. ज्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळेल त्यांना तसें पत्रद्वारें कळविलें जाईल. त्याला अनुसरून त्यांनी ता. १२ रोजीं पुणें येथे 'टिळक-मंदिरांत' कार्यवाह पंडित कानडेशास्त्री यांस भेटावें, म्हणजे त्यांच्या सोयीप्रमाणे वर्गाची वेळ ठेवण्यांत येईल. शिष्यवृत्त्यांचा निकाल वर्ग सुरू झाल्यावर लागेल.

लक्ष्मीविलास,
चिमणबाग पुणें.

चिटणीस
**दामोदर नरहर शिखरे.**

# भोर येथील नवा पूल

भोर येथे श्रीमंत बाबासाहेब पंत सचीव यांनी निरा नदीवर बांधलेल्या नव्या पुलाचा उद्घाटन समारंभ ता. २० रोजीं गव्हर्नर जनरलांचे दक्षिणेंतील एजंट ले. क. विल्बरफोर्स यांचे हस्तें झाला.

श्रीमंत पंतसचीव यांच्या कैलासवासी पत्नी सौ. लक्ष्मीबाई यांचें नांव सदर पुलास देण्यांत आलें आहे. हा पूल पुण्याचे प्रसिद्ध कॉंट्राक्टर मे. व्ही. आर. रानडे आणि सन्स यांनी बांधला आहे. पूल बांधण्यास दीडलक्ष रुपये श्रीमंतांनी खर्च केले आहेत. पावसाळ्यांत संस्थानाशीं ब्रिटिश मुलुखांतील कांही भागाचें व संस्थानांतील बऱ्याच भागाचें दळणवळण तुटत असे तें या पुलानें सांधलें.

या समारंभास संस्थानांतील अधिकारी उपस्थित होते. प्रथम श्रीमंतांनी एजंटसाहेबांचें स्वागत केलें व भोर कायदेमंडळाचे उपाध्यक्ष श्री. आगाशे यांनी पुलाचा इतिहास सांगून संस्थानांतील दळणवळणाचीं साधनें वाढविण्यास श्रीमंतांनी आतांपर्यंत काय काय प्रयत्न केले त्याची माहिती सांगितली. पुलाचें उद्घाटन करतांना एजंट साहेबांनी श्रीमंताच्य कारभाराचें सिंहावलोकन करून त्यांनी प्रजेस राज्याधिकारांत भाग घेण्याची संधि दिली याबद्दल अभिनंदन केलें. नंतर पुलास 'लक्ष्मीबाई पूल' असें नांव देऊन पुलाच्या प्रवेशावरील फीत सोन्याच्या कातरीने कातरून पूल रहदारीस खुला केला. नंतर अत्तर-गुलाब होऊन समारंभ समाप्त झाला.

# कायदेभंगाच्या चर्चेची प्रस्तावना

ता. ८ मे रोजीं म. गांधी यांनी जें जाहीर पत्रक काढलें त्यातील मुख्य मुद्दे आम्हीं गेल्या अंकीं दिलेच आहेत. त्यानंतर त्यांनीं आजवर दुसरें असें पत्रक काढलेलें नाही. उपवास संपल्याला आज एक महिना झाला. या अवधींत ते आणखी एखादं उद्देशपत्रक काढतील असें वाटलें होतें; पण तसें घडलें नाही. त्याला त्यांचीं कारणें कांहीहि असोत; तथापि राजकीय धोरणासंबंधाने त्यांचें पहिलें पत्रक हेंच आज कायम आहे असें समजून त्याची थोडीशी चर्चा करण्याचें आम्हीं योजिलें आहे. प्रचलित राजकारणाविषयीं त्यांनी असें जाहीर मौनव्रत पत्करलें असलें तरी बाहेर लोकांना आता हें पक्कें माहीत झालें आहे कीं, हल्लीं या विषयाची चर्चा मित्र-मंडळीशीं खासगी रीतीने केल्याशिवाय महात्माजींचा एक दिवसहि जात नाही. अर्थात् या खासगी कुजबुजीचा लवकरच जाहीर निकाल लागावा अशी सर्व लोकांची इच्छा आहे.

ता. ८ मेच्या पत्रकांत म. गांधींनी असें लिहिलें होतें कीं, "माझ्या मुक्ततेचा फायदा घेऊन कायदेभंगाच्या चळवळीचें सुकाणूं मला कसें हातीं घेतां येणार?" पण आज चळवळ 'तहकूब' राहिल्यामुळे प्रश्न प्रत्यक्ष आहे तो चालत्या चळवळीचें सुकाणूं हातीं घेण्याचा नाही. तर तहकूब केलेली चळवळ पुनः चालू करावी कीं नाही, व केली तर कशी करावी, या नुसत्या चर्चेचेंच सुकाणूं म. गांधी यांच्या हातीं आलेलें आहे. चळवळ फिरून प्रत्यक्ष चालू होईल तर म. गांधी आपण होऊन येरवड्याची वाट धरतील, व त्यांना आंत घेण्याकरिता सरकार तुरुंगाचे दरवाजे उघडील, ही गोष्ट खरीच आहे. पण ब्रेक लावून उभ्या केलेल्या मोटारींचें चाक डावें उजवें हवें तसें कोणीं फिरविलें, किंवा नांगरलेल्या गलबताचें सुकाणूं जरी कोणीं हलविलें तरी त्यांत धोका नसतो. अर्थात् चालू राजकारणाची तात्त्विक चर्चा महात्माजींना आपल्या मित्रांशीं मोकळेपणाने करूं देण्यांत 'आपण लोकाना आवडेल अशीच गोष्ट करीत आहों, किंबहुना खडा टाकून पाहत आहों' असें समजून सरकाराने हात आखडता घेतला असावा. असो. ही चर्चा ता. १२ नंतर एकदोन दिवस चालून ता. १५-१६ चे सुमारास महात्मासहित इतर बंधमुक्त असलेल्या वर्किंग कमिटीच्या सभासदांचा निर्णय कॉं. अध्यक्ष श्री. अणे यांच्या द्वारा प्रकट होईल. पण तो काय होईल त्याचें नक्की अनुमान आज कोणास करतां येत नाही.

कायदेभंगासंबंधाने कॉंग्रेस-पुढाऱ्यांच्या मतांत चलबिचल आहे यांत शंका नाही. अगदीच आडमुठ्यासारखी मुसंडी मारून काही तरी पुढचें धोरण स्वीकारावें अशी त्यांची इच्छा सहजच नाही. आज अठरा महिन्यांत मिळालेल्या अनुभवाची तपासणी अनेक अंगांनी करणें हें त्यांच्या विवेकबुद्धीला शोभण्यासारखेंच आहे. तत्त्व राखून तपशिलांत फरक करणें या गोष्टीला बरेंच शहाणपण लागतें; व तें शहाणपण खोल विचाराशिवाय लाभणें शक्य नाही. अशा वेळीं प्रांतानिहाय व

जिल्हानिहाय ज्यांच्यावर निर्णयाची प्रत्यक्ष जबाबदारी आहे अशा लोकांनी, व ज्यांच्यावर ती नाही अशाहि लोकांनी, आपापलीं मतें गुप्त न ठेवतां प्रकट केल्यास कॉंग्रेस-पुढाऱ्यांना ही गोष्ट इष्टच वाटेल. कारण ते स्वतःच्या व्यक्तीचा आग्रह चालविण्यापेक्षा लोकस्थिति व लोकमत पाहूनच निर्णय करण्याची आकांक्षा धरतील.

जे काय हित व अहित या निर्णयांत निगडित आहे तें सर्व राष्ट्राचें आहे, कोणत्याहि एका पक्षाचें नाही, ही गोष्ट लक्षांत घेऊन श्री. अणे यांनी एखादें विनंतिपत्रक काढून इतर लोकांना आपापलीं मतें देण्याविषयी निमंत्रण केलें असल्यास तें करणें योग्यच होईल. निदान प्रत्यक्ष चळवळीच्या ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांकडून किंवा संघटित संस्थांकडून त्यांनी पुढील धोरणासंबंधी अशीं मतें मागविलीं असण्याचा खास संभव आहे. पण ज्यांना तसें निमंत्रण गेलेलें नसेल त्यानीहि आपापलें मत प्रकट करण्यास मुळीच प्रत्यवाय नाही. गांवदेवीच्या उत्सवांतील भंडाऱ्याच्या भोजनाला व्यक्तिशः आमंत्रणाची अपेक्षा नसते. आणि कोणीं आपलें मत दिलें तें केवळ अनाहूत दिलें असा दोष लावून तें अव्हेरण्याचा स्वभावहि श्री. अणे यांचा बहुधा नाही. हे जाणूनच कीं काय, अनेक वर्तमानपत्रांनी या विषयावर मतें प्रकट करण्यास सुरुवात केली आहे. त्यांतील कांही निवडक मतें आम्हीं गेल्या अंकीं प्रसिद्ध केलीं आहेत आणि यापुढे येतील तसतशीं आणखीहि प्रसिद्ध करणार आहों! केसरी व मराठा या पत्रांनी तर आपलें मत प्रकट करण्याविषयी संकोच बाळगला नाहीच, पण इतरांच्या इतका विलंबहि केलेला नाही. का. भं.च्या नैमित्तिक चळवळीसंबंधाने, व कौन्सिलप्रवेशाच्या नित्य चळवळीसंबंधाने, केसरीने पूर्वी अनेक स्पष्ट लेख लिहिलेले वाचकांना स्मरत असतीलच. तथापि ताजी भूक तर ताजी शिदोरी या न्यायाने या विषयावर आम्हीं पुनः एकवार आपलें म्हणणें थोडक्यात लोकांपुढे मांडणार आहों.

कौन्सिलप्रवेश व का. भं. ची चळवळ या दोन विषयांपैकीं धोरण ठरविण्याच्या दृष्टीने अधिक जरूरीचा व तांतडीचा विषय म्हटला म्हणजे का. भं. च्या चळवळीचाच होय, कौन्सिलप्रवेशाचा नव्हे. कारण जॉ. सि. कमिटीचा रिपोर्ट येत्या ऑक्टोबरमध्ये झाला तर होणार. मग त्या अन्वयें पार्लमेंटांत बिल सादर होणार. आणि मग पार्लमेंटामध्ये भवति न भवति, सूचना, उपसूचना, या सर्वांचा निकाल लागून दोनहि सभागृहांतून बिलाचें त्रिवार वाचन होऊन कायदा जाहीर होणार. नंतर नियम पोटनियम होणार. आणि गव्हर्नर वगैरेंना ज्या विशेष सूचना राजे–बादशहा करणार त्या प्रसिद्ध होणार. इतकें झाल्यानंतर निवडणुकीची तयारी ! यामुळें प्रत्यक्ष निवडणुकीसंबंधाचा प्रश्न १९३४ त तरी उपस्थित होतो कीं नाही ही वानवाच आहे. तेव्हा आजच त्याबद्दल कोणीं जाहीरपणें किंवा संघटित रीतीने उलट-सुलट बोलण्याचें किंवा कबरा बांधण्याचे कांहीच कारण नाही. आता सर्वसामान्यपणें कौन्सिलप्रवेशाच्या नुसत्या तात्त्विक धोरणाचा प्रश्न प्रत्यक्ष निवडणुकीच्या आधी बरेच दिवस चर्चेला निघणें प्राप्त आहे. पण तोहि कांही अंशीं का. भं. च्या चळवळीच्या धोरणावर अवलंबून राहतो. तात्पर्य, का. भं. च्या चळवळीविषयींचें लोकमत प्रकट होणें हें, वर म्हटल्याप्रमाणे, आज अधिक जरूरीचें व तांतडीचें आहे.

दुसरें असें कीं, कायदेभंगाच्या चळवळीला कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं स्वतःला जितकें जबाबदार मानलें आहे तितकें दुर्दैवाने त्यांनीं कौन्सिलप्रवेश चळवळीला मानलें नाही. कौन्सिलप्रवेशासंबंधानेहि कॉंग्रेसने प्रगतिपर, उद्यमशील व जोराचें धोरण स्वीकारलें तर तें इष्टच होईल. पण त्यांच्या जुन्या विरोधाचें भूत कॉंग्रेस पुढाऱ्यांपुढे उभें राहून त्यांना बिचकवीत असल्यामुळे, त्यांच्याकडून कौन्सिलप्रवेशाला जास्तींत जास्त मदत कितीशी होणार ? खुल्या दिलाचा तोंडभर आशीर्वाद तर मिळणार नाहीच; पण त्यांनी सौजन्यपूर्ण उपेक्षा केली, गुप्त किंवा प्रगट विरोध केला नाही, किंवा थोडीबहुत मिळमिळीत मदत दिली तरी ती पुष्कळच म्हणावयाची !

असो. म्हणून कौन्सिल–प्रवेशाच्या धोरणाच्या आधी का. भं. च्या चळवळीसंबंधाने आम्ही आपलें मत वाचकांपुढे मांडण्याचें योजिलें आहे. ता. ८ मेच्या जाहीर पत्रकांत गांधींनी जें राजकारणी धोरण स्वीकारलें आहे त्यांत दोन टोंकांला दोन अशीं विधानें आहेत. एका बाजूचें विधान म्हटलें म्हणजे हें कीं, "इंग्लंडहून परत आल्यानंतर अडथळा आल्यामुळे ज्या ठिकाणीं सूत्र तुटलें तेथूनच तें पुनः मी हातीं घेईन असें वाटतें." आणि दुसऱ्या टोंकाचें विधान म्हटलें म्हणजे "जोंपर्यंत अनेक कायदेभंगवाले तुरुंगांत खितपत आहेत तोंपर्यंत कायदेभंग मागे घेतला जाणार नाही. विशेषतः सरदार वल्लभभाई पटेल, अबदुल गफूरखान, पं. जवाहरलाल नेहरू इत्यादि पुढारी तुरुंगांत आहेत तोंपर्यंत कोणतीहि तडजोड होणें शक्य नाही." हीं दोन विधानें एकत्र केलीं असतां असा

अर्थ निघतो कीं, महात्माजी सरकाराशीं समेट करण्यास तयार आहेत, पण तो कांही अटींवर! तेव्हा या बाबतींत शक्याशक्यता काय आहे याचा विचार पुढील अंकीं करूं.

# मसूरचा महोत्सव

मसूर येथील ब्रह्मचर्याश्रमावरील जप्ती उठल्याचें वृत्त सर्वांना माहीतच आहे. त्यानंतर आश्रमाच्या कार्याचें पुनरुज्जीवन करणें ही महत्त्वाची गोष्ट व्हावयाची उरली. त्या समारंभासाठीं अध्यक्ष-स्थान स्वीकारण्याची विनंति आश्रमातर्फे **रा. न. चिं. केळकर** यांस करण्यांत आली व ती त्यांनी आनंदानें मान्यहि केली. त्याप्रमाणें हा समारंभ मसूर येथें रविवार ता. २ रोजीं साजरा झाला.

समारंभासाठीं आश्रमाची जागा लतापल्लवध्वजा-पताका यांनी सुंदर रीतीनें नटविली असून, मधल्या अंगणांत मुख्य समारंभासाठीं सुंदर मंडप दिला होता. समारंभास श्री. पाचलेगांवकर महाराज, साताऱ्याहून सरदार मुतालिक बंधु, रा. ब. काळे, भाऊसाहेब सोमण, बाबुराव वैद्य, कऱ्हाडचे पांडुअण्णा शिराळकर व बरीच वकील मंडळी, कोरेगांवचे श्री. ना. ह. आपटे व बेडेकर वकील, तासगांवचे आबासाहेब जोग, मुंबईच्या समर्थ बालव्यायाम-मंदिराची चालक मंडळी, नाशिकचे श्री. महाबळ व पुण्याहून अध्यक्षांखेरीज श्री. शिवरामपंत दामले, रा. गो. भिडे, पैसाफंड रानडे इत्यादि सुमारें १५० गृहस्थ उपस्थित होते. एकंदर समुदाय सुमारें तीन हजारांवर जमला होता.

समारंभाचा मुख्य दिवस ता. २ रविवार हा होता. त्या दिवशीं सकाळीं उदकशान्त व इतर धार्मिक विधि झाल्यावर मंडळी अध्यक्षांच्या स्वागतार्थ स्टेशनावर गेली. प्रथम गांवच्या शिवेवर आश्रमाच्या मालकीचें मूळपीठ जें गजानन-मंदिर आहे तेथें श्री. विनायकमहाराज यांनी अध्यक्ष व पाहुणे यांचें स्वागत केल्यावर तेथून, अध्यक्षांचा वाजतगाजत आश्रमापर्यंत मिरवणूक निघाली. ती सुमारें तीन वाजतां विसर्जन पावली. नंतर कऱ्हाडचे श्री. **आबाराव घोपटे** यांचें कीर्तन झाल्यावर सुमारें सहा वाजतां मुख्य समारंभास सुरुवात झाली.

समारंभासाठीं आश्रमांत उभारलेला मंडप लोक-समुदाय फारच जमल्यामुळे आयत्यावेळीं निरुपयोगी ठरला व शाळेसमोरील पटांगणावर समारंभाची व्यवस्था करावी लागली. प्रारंभीं आश्रमाच्या ब्रह्मचाऱ्यांनी 'सहनाववतु' ही वैदिक प्रार्थना म्हटल्यावर मुलींनी स्वागतपर गीत म्हटलें व आश्रमाचे व्यवस्थापक श्री. **क्षीरसागर** यांनी सर्वांचें स्वागत करून, आश्रम जप्त झाल्याचा व त्यावरील जप्ती उठविण्याबद्दल झालेल्या प्रयत्नांचा साद्यंत इतिहास निवेदन केला. (ही हकीगत पूर्वी केसरींत प्रसिद्ध झालेलीच आहे) समारंभाबद्दल श्री. लोकनायक अणे, दादासाहेब करंदीकर, बाबासाहेब खापर्डे, औंधचे अधिपति इत्यादि बऱ्याच जणांनी सहानुभूतिपर पत्रें पाठविलीं होतीं त्यांचाहि निर्देश करण्यांत आला.

यानंतर समारंभाचे अध्यक्ष **श्री. न. चिं. केळकर** यांचें भाषण झालें. ते म्हणाले, "आश्रम जप्त झाला ही दुःखाची गोष्ट व जप्ती उठली ही आनंदाची गोष्ट. जप्ती उठविण्याचा प्रयत्न झाला त्याची हकीगत आपणास माहीत आहे. परंतु जप्ती कां बसली ही हकीगत गुप्त असली तरी आश्रमासंबंधींच विषबीज कोणीं तरी पेरलें होतें खास. परंतु दुःस्वप्न पडत असतांना दुःख होतें, तें स्वप्न संपतांच आनंद होतो, व स्वप्न विसरून जातें, तशी स्थिति आज प्राप्त झाली आहे. ही परमेश्वराची कृपा तर खरीच, परंतु त्याचा थोडा वांटा डेप्युटी परमेश्वरी जी सरकारी सत्ता तिच्याकडेहि जातो. परमेश्वराचे सर्व गुण राजाला न लागले तरी, भयकृत, भयनाशन हा गुण मात्र राजाला लागतो, म्हणून त्याचेहि आभार मानले पाहिजेत. ब्रह्मचारी म्हणजे ज्याचा आयुष्यक्रमारंभच त्यागापासून असा मनुष्य धर्मोपदेश करूं लागला म्हणजे ज्याचा प्रभाव पडणारच. तीनशें वर्षांपूर्वी श्रीसमर्थ रामदासांनी ज्या पद्धतीचें काम केलें, तसें काम आजच्या विपन्न स्थितींतहि करण्यास आपणास आश्रमांतल्यासारखीं माणसें लाभलीं हें आपलें थोर भाग्य होय. आश्रमासंबंधी खरी खटपट कोणी केलीं असेल तर ती इतर कोणापेक्षांहि रा. ब. काळे यांनीच होय. तेव्हा सर्वांपेक्षां त्यांचेच आभार जास्त मानले पाहिजेत. सुदैवानें आश्रमावरील संकट आज टळलें. यापुढे आश्रम पुनः जास्त तेजानें आपलें काम करूं लागो एवढीच इच्छा मी प्रदर्शित करतों"

यानंतर रा. ब. काळे म्हणाले, "रामदासांनी हा पंथ स्थापन केला. त्याचा अर्थ जनसेवा असा आहे. रामदास म्हणजे जनतेचा सेवक आणि हा आश्रम तेंच कार्य करीत असल्यानें, उत्कटतेनें त्या कामांत मीं भाग घेतला."

यानंतर श्री. नानासाहेब मुतालिक, श्री. पांडुअण्णा शिराळकर यांचीं भाषणें झालीं. **श्री. रामभाऊ सोमण** आपल्या भाषणांत म्हणाले, 'सरकारनें आश्रम जप्त करून आमच्या डोळ्यांत चांगलें अंजन घातलें व आमचें लक्ष स्वधर्माकडे खेचून नेलें, हा सरकारचा आमच्यावर उपकारच आहे.' श्री. फणसळकर वकील यांनीहि अनुरूप भाषण करून आश्रमाची उपयुक्तता सांगितली. शेवटीं धर्मभास्कर श्री. विनायक महाराज यांनी सर्वांचे आभार मानले. व नंतर पानसुपारी अत्तरगुलाब आणि प्रार्थना झाल्यावर हा अपूर्व समारंभ अत्यंत यशस्वीपणें व निर्विघ्न-पणें समाप्त झाला.

# सत्यशोधकी तमाशांचें पिशाच्च

( लि. आ. म. )

मुंबईची रेडिओस्टार्स नांवाची नाटक मंडळी मधून मधून पुण्यास येऊन आपले खेळ करून दाखवीत असते. सदर मंडळीचा बेबी हा खेळ बराच लोकप्रिय झाला असून, त्याचें पुण्यांतील रसिक व गुणग्राहक प्रेक्षकांनी योग्य तें चीजहि पूर्वी केलें आहे. मंडळी या खेपेस 'खराब्राह्मण,' हा आपला नवा खेळ घेऊन आली आहे. हा खेळ रा. ठाकरे यांनी लिहिला असल्याचें समजलें, त्या वेळींच सदर खेळ कसा असेल याची कल्पना आम्हांस आली होती व तो वाचल्यावरच ती खरीहि ठरली. रा. ठाकरे यांचें डोकें ब्राह्मणद्वेषानें भडकलेलें आहे हें कोणास नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाही. सांप्रत अस्पृश्यतानिवारणाची चळवळ देशांत सुरू आहे. ती पर्वणी साधून चळवळीच्या वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्याच्या इराद्यानें, रा. ठाकरे यांनी प्रस्तुत नाटक लिहिलेलें दिसतें. नाटकाचे पहिले प्रयोग मुंबईस करण्यांत आले. पण मुबई हें बकाली शहर असल्यामुळें त्याविरुद्ध तेथे फारसा गवगवा झाला नाही. मंडळी मुंबईहून पुण्यास आली व तिनें या नाटकाचे दोनतीन प्रयोग पुणेकरांस दाखविले. ते पाहून पुण्यांत त्याविरुद्ध बरीच खळबळ उडाली. वर्तमानपत्रांतून उलटसुलट टीका येऊं लागल्या व अखेर पुण्यांतील कांहीं ब्राह्मण गृहस्थांनी सदर नाटक ब्राह्मणांचीं मनें दुखविणारें असल्यामुळे, त्याचे प्रयोग बंद करण्याविषयी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व डिस्ट्रिक्ट पोलिस सुपरिंटेंडंट यांजकडे अर्जहि गुदरले. आता या नाटकाची तपासणी करण्याकरिता एक कमिटी नेमण्यांत आली असून, ती आपला निर्णय देई-पर्यंत 'खरा ब्राह्मण' हें नाटक येथील सरकारी अधिकाऱ्यांनी बद ठेवण्याचा हुकूम सोडला असल्याचें समजतें.

खरा ब्राह्मण या नाटकाचें कथानक एकनाथ-कालीन असल्याचें दाखविलें आहे. विठू नांवाचा महार श्रीरामचंद्राचा मोठा भक्त असून, तो राम-जन्माचे दिवशीं कोणाकडून तरी रामाला आपला हार घालावा म्हणून पैठणास रामाच्या देवळापाशीं आला होता. पण त्याचा हार रामास घालण्यास ब्राह्मणांनीं बंदी केली. पुढे विठूची निस्सीम देव-भक्ति अनेक प्रकारांनी कसोटीस लागून, ती टिक-ल्यावर एकनाथानें त्यास प्रेमपूर्वक मिठी मारली व 'हाच खरा ब्राह्मण' असें आवेशानें उद्गार काढले. या विठू महाराचा ब्राह्मणांनी छळ केला व त्याच छळानें नाटकाचें समग्र कथानक व्यापलें आहे. आधीं ब्राह्मणांच्या नालस्तीचा विषय व त्या विषया-वर लेखणी चालविणारे ठाकरे अशी जोडी जमल्यामुळे, एखाद्याच्या अंगाला खाज सुटावी व ती शमविण्याकरिता त्यानें आपली लांब लांब वाढवून ठेवलेलीं नखें वापरावीं ! यांत जो प्रेमा उत्पन्न होतो, तो ठाकऱ्यांच्या मेंदूत उत्पन्न झाला असल्यास नवल तें कसलें ?

ठाकऱ्यांच्या या कृतीला नाटक हें नांव शोभतच नाही. पण ह्याची गणना तमाशांत केली असता ती तमासगिरांना खपेल कीं नाही याचीहि आम्हांला शंका वाटते. सत्यशोधकांचे तमाशे पूर्वी ब्राह्मणेतरांच्या चळवळींत खेड्यापाड्यांतून होत असत. त्या तमाशांनी ब्राह्मणेतरांचीं डोकीं भडकून जाऊन, त्यांनी आपल्या भयंकर अत्याचारांनी ब्राह्मणांचें जिणें खेडेगांवांत कसें कष्टमय करून सोडलें याची स्मृति अद्यापि ताजी आहे. त्याच तमाशांचें 'खरा ब्राह्मण' हें सख्खें भावंड आहे एवढें सांगितलें म्हणजे त्याची यथार्थ कल्पना वाचकांस होईल. अस्पृश्यता-निवारणाचा खरा उपाय कोणता हें ठाकरे यांस माहीत नाहीं असें नाही. ते आपल्या नाटकांत एके ठिकाणीं म्हणतात 'भावनेच्या खळखळाटानें किंवा उपास-तापासाच्या व जीव देण्याच्या धमक्यांनी अस्पृश्यतेचा प्रश्न सुटणारा नव्हे. भावना कितीहि खवळली उसळली तरी व्यवहार व्यवहाराच्या कदरीनेच केला पाहिजे.'

सारांश घायकुतीने अस्पृश्यतेचे निवारण होणार नाही, ती समाजाची समजूत पाडीत पाडीतच घालविली पाहिजे हें व्यावहारिक तत्त्व ज्यास कळतें त्याला नाटकांत ब्राह्मणांची अवास्तव नालस्ती केल्याने, अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न सुटणार नाही हें कळत नसेल असें नाहीं.

अशा रीतीने कळून सवरून ठाकरे यांनी ज्या अर्थी प्रस्तुत नाटकाची उभारणी केली आहे त्या-अर्थी ब्राह्मण जातीविषयी, हिंदु समाजांत तिट-कारा वाढवून त्यांजविरुद्ध द्वेष माजविण्याची आयती आलेली संधि साधणें हा त्यांचा हेतु स्पष्ट दिसतो. प्रस्तुत नाटक वाचण्यासारखें सभ्य मनुष्याला दुसरें कोणतेंहि संकट नाही. तें कसल्याहि कारणासाठी वाचावयास घेतलें तरी, वाचकाला आपण पापकर्म करीत आहों असेंच क्षणोक्षणीं वाटल्याशिवाय राहणार नाही. रोडियो स्टार्स या कंपनींतील नट शिक्षित आहेत असें आम्हीं ऐकलें आहे. ठाकऱ्यांसारख्या माणसाने हें नाटक लिहिलें असलें तरी, सदरील कंपनीने तें कसें पत्करलें याचेंच आम्हांस सखेदाश्चर्य वाटतें. कारण या नाटकापासून अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यास काडी-चीहि मदत होणार नाहीच, पण हिंदुसमाजांतील जातीजातींत वैमनस्य वाढविल्याचें पातक मात्र ही कंपनी जोडील. पुण्या—मुंबईसारख्या शहरांतील रंगभूमीवर असले नाटकाच्या बुरख्याने झाकलेले तमाशे सुरू राहणें, ही गोष्ट त्यांतील संभावित व सुशिक्षित समाजाच्या तोंडास काळोखी फासणारी आहे. म्हणून पुण्यांतील लोकांनी वेळींच सावध होऊन, हा आग लावणारा द्वेष-मूलक पलिता विझवून टाकण्याचा जो प्रयत्न चालविला आहे तो अभिनंदनीय होय यांत शंका नाही. येथील स्थानिक अधिकारीहि हा गलिच्छ, किळसवाणा व लाज उत्पन्न करणारा प्रकार बंद पाडतील अशी आम्हांस आशा आहे.

# निजामशाहींतील अत्याचार

### हिंदु पुढाऱ्यावर गोळीबार !

आळंद येथील सुप्रसिद्ध जमीनदार व हिंदु पुढारी श्री. कल्याणराव देशपांडे हे शनिवारीं ता. २४ जून १९३३ रोजीं रात्रीं ८ वाजण्याच्या सुमारास तालुकदार साहेबांना भेटून परत येत असता वाटेंत मुसलमान गुंडांच्या एका टोळीने त्यांच्यावर हल्ला केला; पिस्तूल झाडून त्यांना जखमी केलें; डोक्यावर व इतर ठिकाणीं लाठ्यांचे जबरदस्त तडाखे मारले व जीव घेण्याचें आपलें कार्य झालें असें समजून ते पळून गेले. तशा रक्तबंबाळ स्थितींत त्यांच्या आप्तेष्ट व नोकर मंडळींनी त्यांना जवळच श्री. व्यंकटराव वकील यांच्या घरीं नेलें. परंतु आळंद येथे योग्य उपचार होण्याजोगा नसल्या-मुळे त्यांच्या आप्तेष्टांनी व मित्रमंडळींनी त्याना मोटारीमधून रातोरात सोलापूर येथील धनराज गिरजी हॉस्पिटलमध्ये आणलें.नामांकित सर्जन डॉ. भालचंद्रराव मुळे यांच्या करवीं त्यांच्या जखमांवर औषधोपचार सुरू झाला आहे. उजव्या छातीवर व बरगड्यांवर पिस्तुलांतील गोळयांच्या जखमा असून 'क्ष' किरणाच्या तपासणीवरून अद्याप कांही छरे शरीरांत तसेच शिल्लक असावेत असें म्हणतात. परंतु एकंदरीने श्री. देशपांडे यांची प्रकृति तूर्त तरी काळजी करण्यासारखी नाही. काळ आला होता, पण वेळ आली नव्हती म्हणतात तेंच खरें ! तालुकादारसाहेबांच्या कचेरीपासून सुमारें एक फर्लांगावर आणि पोलीस नाक्याजवळ हा अत्याचार झाला असे समजतें. अत्याचार झाल्या-बरोबर तालुकदारसाहेब व फौजदार यांना बोलावणें जातांच ते आले. डॉक्टर वगैरे अधिकारी मंडळी-हि येऊन जखमा पाहून गेली. श्री. देशपांडे यांचा एक जबाबहि घेण्यांत आला; परंतु त्यांच्या जख-मांचा वगैरे पंचनामा अद्याप झालेला नाही असें कळतें ! सोलापुरास आल्यावर मात्र सोलापूरचे फौजदार रा. गोखले यांनी येऊन जबाब वगैरे घेतले आहेत म्हणतात. आळंद येथे अलीकडे ४-५ दिवस संपूर्ण हरताळ पडला आहे !

श्री. देशपांडे यांजवरील हा हल्ला ते हिंदूंचे पुढारी म्हणून झाला, हें उघड आहे. आळंद येथे पुरातन कालापासून श्रीमारुतीचा रथोत्सव हनु-मान जयंतीस होत असतो. बऱ्याच वर्षांमागे या उत्सवप्रसंगीं मुसलमानांनी दंगा करून हा रथ जाळला होता ! तेव्हा हा उत्सव बंद पडला होता. याबद्दल येथील हिंदूंकडून निजाम सरकारा-पर्यंत दाद लावून घेण्याचे पुष्कळ प्रयत्न झाले. या सर्व कामीं श्री.देशपांडे यांचा प्रमुख पुढाकार होता. ४।५ वर्षांपूर्वी निजाम सरकारांनी आपल्या रियास-तींतील धार्मिक उत्सव, वहिवाटी वगैरेची चौकशी करण्याकरिता एक कमिशन नेमलें होतें. त्यांच्याहि चौकशींत हा रथोत्सव निष्कारण बंद पडला असें निष्पन्न झाल्यावर त्यांनी अनुकूल रिपोर्ट केल्या-

वरून खुद्द निजाम सरकारचें एक फर्मान निघून या रथोत्सवाला परवानगी मिळाली, व गतसालीं हा उत्सव थाटामाटानें पार पडला. मुसलमान गुंडांनी यांहि खेपेस खूप अवसान आणलें होतें. परंतु निजाम सरकारानें कडेकोट बंदोबस्त केल्यामुळे त्यांचा माइलाज झाला! यंदाहि त्यांनी हा उत्सव बंद पाडण्याची सर्व कारवाई केली. कनिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांचे त्यास अनुकूल असे रिपोर्ट झाले. परंतु आळंदच्या हिंदु पुढाऱ्यांनी हैद्राबाद येथील सरकारी धर्मखात्याच्या मुख्यांना—ते सद्‌गृहस्थ मुसलमान आहेत—सर्व गोष्टी समजून सांगितल्यावर त्यांनी उत्सव परवानगीबद्दल ताबडतोब हुकूम दिले व उत्सव पार पडला.

याहिनंतर यंदाच्या मोहरमांत मुसलमान गुंडांनी दंगली, मारहाण, अत्याचार केलेच. पण तेथील मुसलमान फौजदारांनी उलट ३०।३५ हिंदूंवर खटले केले. त्यांची तारीख श्री. देशपांडे यांजवरील अत्याचाराच्या दुसरे दिवशीं होती. दरम्यान हा हिंदूंवरील खटला विनाकारण आहे तो काढून घ्यावा असा वरिष्ठांकडून फौजदारसाहेबांस हुकूम येऊन थडकला. त्यामुळे गुंड लोक जास्तच खवळले व त्यांनी हा अत्याचार केला असावा असें दिसतें. हा अत्याचार होण्यापूर्वी मुसलमान गुंडांच्या निरनिराळ्या वेळीं बैठकी होत असत, व प्रत्यक्ष अत्याचार करणाऱ्या टोळीशिवाय आणखी एक दोन टोळ्या आजूबाजूस फिरत होत्या. त्यावरून हा कट पूर्ण तयारीनें झाला असावा असें म्हणण्यास हरकत नाही.

ह्या सर्व हकीगतीचा विचार केल्यास पोलीस अधिकाऱ्यांकडून या कामीं योग्य तो कसून तपास होऊन खरे आरोपी न्यायासनासमोर खेचले जातील कीं नाही याविषयी शंका वाटत असल्यामुळे निजाम सरकारच्या पोलीस खात्याचे मुख्यांनी स्वतःच या कामीं तपास करण्यांत लक्ष घालावें, नाही तर गुंडांकडून असले अत्याचार जास्त प्रमाणावर घडतील व गरीब हिंदु रयतेचें जीवित व वित्त वगैरे नेहमी धोक्यांत राहील अशा तऱ्हेचे अर्ज, तारा वगैरे श्री. देशपांडे यांनी व त्यांच्या आप्त हितचिंतकांनी केले आहेत. त्यांचा उपयोग होऊन पुढे काय काय घडेल तें प्रसंगानुसार कळून येईलच.

श्री. देशपांडे यांच्या समाचारार्थ सोलापूर येथील धनराज गिरजी दवाखान्यांत माणसांची रीघ लागून राहिली आहे. यावरून त्यांची लोकप्रियता सहज दिसून येते.

# पुणें शहर म्यु. चा अनागोंदी कारभार

( ले—एक नागरिक )

पुणें शहर म्यु. च्या कारभारांत बराच घोटाळा असून त्यासंबंधाचीं दोन तीन पत्रें केसरींत यापूर्वी प्रसिद्ध झालेलीं आहेत. परंतु म्यु.च्या कारभारासंबंधी अधिकृत रीत्या खुद्द सरकारचें म्हणणें काय आहे तें समजणें जास्त उपयुक्त असल्यानें म्यु.च्या सन १९३१-३२ च्या हिशेबासंबंधी मुंबई सरकारच्या हिशेबनिसांनी दिलेल्या शेऱ्यांतील कांही ठळक व महत्त्वाच्या बाबी येथे देण्याचें योजिलें आहे. ही सरकारी ऑडिटरची नोट फुलस्केपच्या छापील २७ पृष्ठें असून त्यांत अनेक गोष्टींचा उल्लेख आहे व त्यांचा खुलासा म्यु. जवळ मागण्यांत आला आहे. तो सर्व शेरा देण्यापेक्षा त्यांतील ठळक आणि महत्त्वाच्या गोष्टी दिल्यानें वाचकांस म्यु. कारभाराची चांगली कल्पना येईल. पृष्ठ दोनवर स. १९३०-३१ सालच्या ऑडिटरनें मारलेल्या शेऱ्यांची बजावणी झाली नाही अशीं ए बी सी डी ई व एफ हीं कलमें या नोटमध्यें पुनः नमूद करण्यांत आलीं आहेत.

## कर

त्याच पृष्ठांत ' कर ' या सदराखालीं पुढील उल्लेख आहे. या वर्षी वसूल होणाऱ्या रकमेपैकीं शे. २३ म्हणजे १५८८७७ रुपये बाकी वसूल होण्याची राहिली आहे. यापैकीं रकम रु. १९३८८ वसूल होत नाही अशा सबबीवर खर्ची घातली आहे. या प्रकारें वसुलाच्या रकमा 'राइट ऑफ' करीत असूनसुद्धा म्यु.ची वसूलबाकी दिवसानुदिवस वाढतच आहे; कसें तें पाहा.

| | | |
|---|---|---|
| स. १९२८-२९ | अखेर बाकी | रु. ९५६२५ |
| १९२९-३० | ,, | , १३०९४७ |
| १९३०-३१ | ,, | , १४२७५९ |
| १९३१-३२ | ,, | , १५८८७७ |

अशा प्रकारें वसुलाची बाकी एकसारखी वाढत जाणें व वसुली रकम माफ करणें ही गोष्ट वसुलीखात्याला व त्यावर देखरेख करणारांना कमीपणा आणणारी आहे. मार्च १९३२ मध्यें १९३८८ रुपये वसूल होत नाहीत म्हणून माफ केले आहेत व तो

वसूल न होण्यास अशीं कारणें दिलीं आहेत कीं, (१) घरमालकांचें दारिद्र्य, (२) मृतमालक, (३) पडीक घरें व मालक बेपत्ता असणें. वसुलीकारकुनाने दिलेलीं हीं कारणें खरीं आहेत कीं नाहींत याचा कोणीं जबाबदार अधिकाऱ्याने शोधहि केला नाही. याला उदाहरण असें कीं, वरील कारणांसाठी वसूल होत नाही म्हणून ज्या घरांचा कर माफींत टाकला त्यांपैकीं उदाहरणादाखल म्हणून रविवार पेठेंतील घ. नं. ३२, ५६५, ८२७, ८२८, ८२९, ८३५, ८७७, ८८२, ११९९, १२१४ व १२९५ हीं घरें दाखवितां येतील. या घरांत भाडेकरी राहात आहेत व त्यांवर सन १९३०–३१ सालीं करांची आकारणीहि झालेली आहे. असें असता व सरकारी कायद्याप्रमाणे वसुलीचे जे हक्क म्यु.ला मिळाले आहेत त्यांचा उपयोग न करता म्यु. ने हा कर माफ कां केला !

## रेमार्केट खातें

रेमार्केटांत ज्यांना गाळे भाड्याने दिले आहेत त्यांपैकीं १६५३५ रुपये वसूल झाले नाहींत. एकंदर रेमार्केट गाळाभाडें वसुलीपैकीं ही रक्कम सुमारें १/४ आहे. कित्येक भाडेकऱ्यांनीं दोन-दोन तीन-तीन वर्षांत मुळीं भाडेंच दिलेलें नाही. असें भाडें न देणारांत १ मैनाबाई हशमत रु. १०४ (२) अबदुल रहिम मोमिनभाई रु. ९६ व (३) लालभाई माणिकसाहेब रु. १६४० हीं ठळक नांवें आहेत. या तीन नांवांपैकीं नं. १ व २ यांचें नातें म्यु.कौन्सिलर मम्मुभाई हशमभाई यांच्यांशीं अनुक्रमें आई व मुलगा असें आहे. पैकीं नंबर १ ची बाई मरूनहि अनेक वर्षे झालीं व तिचा गाळा म्यु. कौन्सिलर मम्मुभाई यांच्या ताब्यांत आहे. १६४० रुपये ज्यांच्या नांवावर आहेत ते लालभाई माणिकसाहेब हेहि म्यु.कौन्सिलर आहेत. (यांपैकीं कांहीं रक्कम डिसेंबर १९३२ मध्ये वसूल झाली आहे.) वसुलीची स्थिति अत्यंत वाईट असतांहि वसूल नीट प्रकारें होण्याची कांहीं एक दक्षता ठेवण्यांत येत नाही.

## जकात

जकात रीफंड देण्याच्या कामीं दक्षता ठेवण्यांत येत नाही. आगगाडींतून जें सागवान येतें त्यांचें एक वॅगनचें वजन कायमचें १६० मण धरण्यांत येतें ! परंतु वॅगनचें खरें वजन २७७ मण असतें. पण १६० मण वॅगनचें वजन धरण्याला आधार काय तो दाखविण्यांत आला नाही. वॅगनच्या योग्य वजनाप्रमाणें जकात वसूल करण्याबद्दल ता. २३ एप्रिल १९३२ रोजीं जकात सुपरिंटेन्डन्टने नाका इन्स्पेक्टरला ताकीद दिली व त्याप्रमाणें त्यांनीं वसुली केली. परंतु त्यानंतर रा. सा. गायकवाड, किरपे, किराड, चीफ ऑफिसर व जकात सुपरिंटेन्डन्ट यांची एक बैठक भरून वॅगनचें वजन १७५ मण धरावें असें ठरलें. व त्याप्रमाणें जकात वसूल करण्याचा हुकूम सुटला. ही बैठक काय नियमानुसार भरली व १७५ मण वजन कां ठरविण्यांत आलें याची दप्तरीं कोठेंहि नोंद नाहीं.

## कर्जाचा व्यवहार

सरकारने म्यु. स ड्रेनेजसाठीं ७७ हजार, टाऊन प्लॅनिंगसाठीं २ लक्ष ५८ हजार व वॉटर वर्क्ससाठीं ३ लक्ष रुपयांचें कर्ज ६॥ टक्के व्याजाचें काढण्यास परवानगी दिली व त्याप्रमाणे म्यु.ने केसरींत व ज्ञानप्रकाशांत कर्जाच्या जाहिराती दिल्या. म्यु. ने कर्जाबद्दल टेंडर्स मागितलीं होतीं. त्याप्रमाणे शें. ८५ ते १०० भावाने कर्ज मागणारीं टेंडरेंहि आलीं होतीं. परंतु चीफ ऑफिसरनी ती सर्व नाकारून शें ९० व ९४ भावाने ड्रेनेज, टौन प्लॅनिंग कर्ज व वॉटरवर्क्सचे कर्ज शें. ९० प्रमाणे द्यावें अशी शिफारस करून कर्जाची विक्री मार्च १९३२ अखेरपर्यंत खुली ठेवावी अशीहि त्यांनीच शिफारस केली. यासंबंधांत स्टँडिंग कमिटीची सभा भरली असतां चीफ ऑफिसरनीं सांगितलें कीं जर आपण सरकारकडून कर्ज काढलें तर आपणास ७॥ टक्के व्याज द्यावें लागेल. वस्तुतः सरकार म्यु. स ७ टक्के व्याजाने कर्ज देण्यास तयार असतां चीफ ऑफिसरनी ७॥ टक्के सरकारी व्याजाचा दर कां सांगितला समजत नाही. चीफ ऑफिसरांच्या शिफारशीमुळे म्यु. चें ५३२७० रु. चें नुकसान झालें. ता. २३ डिसेंबर १९३१ रोजीं स्टँडिंग कमिटीची सभा भरून घाईघाईने व जनरल बॉडीची मान्यताहि न घेता चीफ ऑफिसरच्या सूचना मान्य केल्या. त्यामुळे वरील नुकसान झालें.

सरकारने शें. ६॥ टक्के व्याजाने कर्ज काढावें अशी परवानगी दिली असतां म्यु. ने ९०।९४ या भावाने कर्ज दिलें म्हणजे म्यु. ला दर शें. सुमारें दहा आणे जास्त व्याज द्यावें लागलें. या व्यवहारास सरकारची मान्यता नसल्याने ऑडिटमध्ये याचा समावेश करतां येत नाही.

इतक्या स्वस्त भावाने कर्जरोखे कां विकले अशी पृच्छा चीफ ऑफिसरना केली असता, माझा सरकारी कर्ज-व्यवहाराशीं जास्त संबंध असल्याने यापेक्षा जास्त किफायतशीर भावाने कर्जरोखे विकले जातील असें वाटेना, असें त्यांनी उत्तर दिलें.

## कर्जरोखे

स्टँडिंग कमिटीने ४९५००० चे रोखे ९० व ९४ भावाने विकण्यास संमति दिली. बाजारची स्थिति काय आहे हें कमिटीने पाहिले नाही व

इंपीरियल बँकेचा सल्लाहि घेण्यांत आला नाही. म्यु. ने एकंदर ६ लक्ष ३५ हजारांचे कर्जरोखे काढले. त्यांपैकीं एकट्या पुणें सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँकेने चार लक्षांचें कर्ज घेतलें व या बँकेनें ९० रुपयांच्या भावाने घेतलेले कर्जरोखे जुलै १९३१ मध्ये रु. १०० च्या भावाने व सप्टेंबरमध्ये रु. १०३ च्या भावाने आणि ९४ च्या भावाने घेतलेलें कर्ज जुलैमध्ये १०० च्या भावाने, ऑगस्टमध्ये १०३ रु. प्रमाणे, आक्टोबरमध्यें रु. १०६ च्या भावानें व नोव्हेंबर१९३१ मध्ये १०८ रु.च्या भावाने विकलें. चीफ ऑफिसरांचा डायरेक्टर या नात्यानें वरील बँकेशीं निकट संबंध असल्यानें त्यांस वस्तुस्थितीचें ज्ञान असावयास पाहिजे होतें.

मोटार अपघाताबद्दल विमा उतरण्यासाठी दरसाल दोन हजार रुपये खर्च केले जातात. परंतु म्यु.च्या एका मोटारला अपघात होऊन मोटारची दुरुस्ती म्यु.ने आपल्या खर्चात केली असता अपघाताच्या विम्याचे पैसे कंपनीजवळ मागितले नाहीत.

निवडणुकेसाठी ८४६९ रुपये खर्च झाले. परंतु त्यांपैकीं ४५०० रुपयांनाच मंजुरी मिळाली आहे. बाकीची रक्कम मंजुरी न घेतांच खर्च केली.

वकिलांकडे मोठमोठ्या रकमा 'अडव्हान्स'म्हणन दिल्या जातात, परंतु दोन दोन तीन-तीन वर्षांत त्यांचा हिशेब येत नाही. याखेरीज लाखों रुपयांच्या रकमा अडव्हान्स म्हणून दिल्या जातात; परंतु त्यांचा हिशेब व्यवस्थित नसतो.

ऑडिट नोटमधील या ठळक बाबी आहेत. यांखेरीज रिसीट ॲन्ड डिबेंचर्स फॉर्म्सचा हिशेब, किरकोळ वसुली, वर्कशॉप, किरकोळ, स्टोअर, पब्लिक वर्क्स, जनरल या खात्यांतील अनेक चुका ऑडिटरनी नजरेस आणल्या आहेत. म्यु. च्या कारभारावर सरकारच्या अधिकृत माणसानें केलेली ही टीका असल्यानें म्युनिसिपालिटी त्या दुरुस्त करण्याची व्यवस्था काय करते इकडे नागरिकांचें लक्ष लागून राहिलें आहे.

## दान

( चाल—महाराष्ट्र-गीत )

स्वीकारूं दान तुझें केवि देवते ? ॥ धृ. ॥

वैभव तव सुरसमान जगिं न त्या तुला
विश्वगोल नत तुझिया चरणिं राहिला
वैभवांत तुझिया परि मन न गुंगतें ! ॥ १ ॥

लोपतसे तिमिरिं मार्ग, भीति मानसीं,
रत्नखचित तेथ तुझा दीप दाविसी
क्षणहि परि न अन्तावरि दृष्टि पोंचते ॥ २ ॥

तळमळ अति जेंवि होतसे मदंतरीं
वर्षतेस षड्रस तूं तेंवि मजवरी
परि लवहि न दाह शमत, हृदय पोळतें ॥३॥

सागरांत जीव बुडे धीर ना मला
करिसि पुढे कोमल कर त्वरित आपुला
अधिकाधिक परि हें जल आंत ओढितें ॥४॥

व्यर्थ तुझें वैभव तव साह्य जीवनीं
तारक वा मारक तो प्रभुच निशिदिनीं
दाता जगिं तोच, तया चित्त लोभतें ! ॥ ५॥

पुणें. | —कु. संजीवनी मराठे.

# तहाच्या मार्गांतील अडचणी

ता. ८ मेच्या जाहीर पत्रकांत म. गांधी यांनी सरकाराशीं तह करण्याची तयारी किंबहुना इच्छाहि दर्शविली आहे. आणि हा उभयपक्षीं तह झाला म्हणजे मग ते कायदेभंग बंद करण्याला संमति देणार. पण असा तह न झाला तर अर्थात् ते ही संमति देणार नाहीत, आणि कायदेभंग हल्ली-सारखाच किंवा इतर एखाद्या रीतीनें चालू ठेवतील. पण गांधींनी तहाची खटपट करणें, व कोणत्याहि सबबीवर कायदेभंग न थांबविणें, या दोनहि गोष्टी अनिष्ट आहेत, असें आमचें स्पष्ट मत आहे.

प्रथम तहाची गोष्ट घेऊं. हा तह करण्याला गांधीजी तयार असतील किंबहुना उत्सुकहि असतील. पण या कामीं सरकार कितपत तयार किंवा उत्सुक आहे हें पाहिलें पाहिजे. तह होतात ते दुतर्फा कोणी तरी समक्ष बोलूनचालून 'लिखापढी' करून होतात, मानसिक तारायंत्रावर प्रतिपक्षी आपापल्या घरीं बसून होत नाहीत. निदान हें बोलणेंचालणें स्वतः प्रतिपक्षीयांनीच समक्ष बोलूनचालून न केलें, तर कोणी मातबर उभयान्वयी स्नेही तरी तें करण्यास लाभला पाहिजे.

पण या सर्व बाबी प्रस्तुत परिस्थितींत अडचणीच्याच ठरतात. सकृद्दर्शनीं तिऱ्हाईत किंवा मध्यस्थ यांच्या मार्फत बोलणेंचालणें हें त्यातल्या त्यांत अधिक संभवनीय व सोपें दिसतें. पण तिऱ्हाइतांच्या मध्यस्थीचा कडू अनुभव पूर्वी अनेकदा आला आहे. आणि पुनः त्या बाजूनें प्रयत्न झाला तर अनुभव येईल तो पूर्वीहून अधिक कडू येईल असें आम्हांला वाटतें. याचें कारण असें कीं, सरकारच्या अंगीं पूर्वीहून भलेपणा कमी व ताठरपणा अधिक आला आहे. मध्यस्थांची पत त्यांच्याजवळ आतां फारशी राहिलेली नाही.

उलटपक्षीं काँग्रेसचे पुढारी झाले तरी ते आपलें ऐकतील अशी खात्री मध्यस्थांनाहि कमी कमी वाटूं लागली आहे. मध्यस्थांनी मध्यस्थी करण्याची आपली तयारी आज कित्येक महिने उघड दर्शविलीच आहे. पण त्यांना विश्वासांत घेऊन चर्चा करणें हा देखील आपल्या इभ्रतीला कमीपणा वाटतो असें कांही काँग्रेसपुढाऱ्यांनी दर्शविलें आहे. कारण न जाणो त्यांच्याशीं आपण तहाकरितां अमुक करूं असें ओझरतें सांगितलें, आणि तें कोठें बाहेर उमटलें, तर तो आपल्या शरणागतीचा उद्गार ठरतो अशी भीति वाटण्याइतकी काँग्रेसच्या पुढाऱ्यांची मनोवृत्ति नाजूक झाली आहे !

शिवाय जे असे मध्यस्थ म्हणून म्हटले जातात त्यांचेंहि एकजात मत असें आहे कीं, कायदेभंगाची चळवळ थांबविली जावी. आणि याविषयीं तर काँग्रेस-पुढाऱ्यांत एकमत नाही! किंवा ते सर्व एकत्र जमून त्यांनी एकमत करण्याच्या मार्गांतल्या अडचणी दुस्तर ठरतात. या अडचणींचा परिहार करण्याचा एक बरासा मार्ग आहे. तो हा कीं म. गांधी हे जर वास्तविक व्यवहारांत सर्वाधिकारी मानले जातात, तर बंधमुक्त असलेल्या वर्किंग कमिटीच्या सभासदांनी एकत्र जमून, मध्यस्थांच्या मदतीनें तह करण्याला, गांधींना उघडपणें व यथाविधि सर्वाधिकारी नेमण्याचा ठरावच करावा.

गांधीजी तुरुंगांत होते तोंपर्यंत अशाहि ठरावाचा कदाचित् कांही उपयोग झाला नसता. कारण तुरुंगांत जाऊन त्यांना भेटण्याची परवानगी सरकाराकडे मागणें हें, मध्यस्थांनी स्वतःवर अपमान करून घेण्याचें संकट ओढवून घेण्यासारखें ठरण्याचा संभव होता. पण उपोषणाच्या कारणानें सरकारनें गांधीजींना बंधमुक्त केलें असून, आता तर त्यांना कोणासहि खुशाल भेटतां येतें व त्यांच्याशीं राजकारणाची चर्चा करतां येते. म्हणून वर्किंग कमिटीच्या विद्यमान सभासदांनी एकत्र जमून, किंबहुना सभा भरवून, म. गांधींना सर्वाधिकार देण्याचा ठराव करावा हें बरें. तसें झाल्यास त्यांचा विश्वास संपादन करूं शकणाऱ्या, मातबर प्रतिष्ठित वजनदार अशा, कोणा मध्यस्थांना गुप्तपणें गांधीजींशीं चर्चा करितां येईल, व व्हाइसरॉय यांचीहि गुप्त भेट घेऊन तहाच्या बोलण्याचें सूत्र दोनहि बाजूंना विकटवून कच्चें तारायंत्र सुरू करतां येईल !

पण म. गांधींचें नातें असें कांही चमत्कारिक होऊन बसलें आहे कीं, "असून अडचण व नसून खोळंबा!" इतर काँग्रेस पुढारी एकीकडे त्यांच्या शब्दाला वेदासारखें प्रामाण्य दिल्याचें दाखवितील, तर दुसरीकडे वर्किंग कमिटी रीतसर भरल्याशिवाय पुढील धोरण ठरविण्याचा गांधींना झाला तरी काय अधिकार असेंहि प्रतिपादितील ! पण कायदेशीर भाषा ही, धर्मशास्त्राच्या भाषेसारखीच, हवी तशी वापरतां येते हें सर्व जाणतातच. मनांत कांही करण्याची इच्छा प्रबळ झाली म्हणजे शास्त्राचा अर्थ हवा तसा लोक करतात हें आपण नित्य पाहतोंच. उलट न करण्याला सबब सांगावयाची झाली म्हणजे, बिचारें शास्त्र हरकाम्या नोकराप्रमाणें हात जोडून पुढें उभें राहतें, हेंहि आपण नित्य पाहतों.

तात्पर्य, आमचें म्हणणें असें कीं तिऱ्हाइतांच्या

प्रतिष्ठित मध्यस्थीची मदत गांधीजींच्या शांतिप्रिय व सामप्रवण मनाला देऊन हा गुंता उरकावा असें इतर कॉंग्रेस-पुढाऱ्यांच्या मनांत असेल, तर बंधमुक्त असलेल्या कॉं. वर्किंग कमिटीच्या सभासदांनी जमून ठराव करून गांधीजींना सर्वाधिकार द्यावा. उलट कायदेशीरपणाची सबब सांगून " या कमिटीचे सर्व सभासद बंधमुक्त होईपर्यंत कायदेशीर सभाच होऊं शकत नाहीं, आणि म्हणून तिऱ्हाइताच्या मध्यस्थीनें कायदेभंगाच्या प्रश्नाचा निर्णय होऊं शकत नाही" असें जर कोणी म्हणेल, तर त्याला हेंच उत्तर उघड आहे कीं गांधीजींनी प्रदर्शित केलेली तहाची तयारी जागच्या जागीं विराम पावणार !

कायदेशीरपणाच्या अतिशयोक्तीमुळे, कॉं. व. क. चे विद्यमान सभासद, मध्यस्थांना निर्णयात्मक मत सांगण्याकरिता, महात्माजींनाहि सर्वाधिकार देण्यास तयार नाहीत! आणि निर्णयाची जबाबदारी आपणावर घेण्याची हमी महात्माजी न देतील तर मध्यस्थी करण्याला कोणी प्रतिष्ठित मध्यस्थहि तयार होणार नाहीत. कारण सर्वांच्या शहाणपणाचें गांठोडें कायदेशीरपणाच्या खुंटीवरच अडकणार! म्हणजे अखेर निर्णय वर्किंग कमिटीच करणार व आधी कोणी कोणास कांहीच आश्वासन देणार नाही, तर मध्यस्थांनी मध्यस्थी पतकरूंच नये ! कारण कॉंग्रेस-पुढारी कितीहि मोठे असले तरी मध्यस्थहि जवळ जवळ तितकेच मातब्बर असणार. तेव्हा आपल्या स्वाभिमानाची पायमल्ली त्यांनी तरी अशी कां करून घ्यावी ?

तात्पर्य, मध्यस्थीनें तह होण्याला अशा दुस्तर अडचणी आहेत. मग तहाचा उरला मार्ग स्वतः महात्माजींनी व्हाइसरॉयसाहेबांची भेट घेण्याचा! पण या बाबतींतहि आमचें स्पष्ट मत असें आहे कीं, पहिल्यापेक्षां या दुसऱ्या मार्गांतल्या अडचणी अधिकच दुस्तर आहेत. कारण पहिल्यांतली वर्किंग कमिटीच्या कायदेबाजीची अडचण या नवीन योजनेंतहि तशीच शिल्लक राहून, शिवाय पहिल्यांत नव्हती ती स्वतः महात्माजींच्या स्वाभिमानहानीची अडचण या मार्गांत उत्पन्न होते.

हल्लींच्या स्थितींत महात्माजींना व्हाइसरॉय आपण होऊन भेटीस बोलावतील अशी आशा करणें व्यर्थ आहे. १९३२ च्या आरंभीं गांधीजींनी आपण होऊन भेटीची परवानगी मागितली तर लॉर्ड विलिंग्डन साहेबांनी त्यांना कोणत्या अटी घातल्या हें सर्वांना माहीतच आहे. त्यानंतर आता तर काय? कायदेभंगाची चळवळ अठरा महिने चालली! याहि उप्पर लॉर्डसाहेब त्यांना आपण होऊन भेटीस बोलावतील, किंवा गांधींनी भेट मागितली असता बिनशर्त भेटीस या म्हणतील, हें कसें घडणार? घडलें तर तो एक ईश्वरी चमत्कारच ठरेल!

पूर्वी एकदोन वेळ, आपल्या भलेपणाच्या निष्ठेवर आणि शत्रूंनाहि मोहून टाकण्याच्या शक्तीच्या विश्वासावर, म.गांधींनी व्हाईरॉयांच्या मुलाखतींतून तहाचा मार्ग काढण्याचा प्रयोग केला व तो कांहीसा साधलाहि. पण लॉर्ड रेडिंग व लॉर्ड आयर्विन यांनी गांधीसप्ताह सुरू करून गांधीमुखांतून निघणाऱ्या नव्या आध्यात्मिक नीतियोगसंहितेचें अभिश्रवण करण्याचे दिवस आता उरले नाहीत. दरम्यान महात्माजी विलायतेस जाऊन आल्यामुळे त्यांच्या संबंधाचा अद्भुतपणा व 'रोमान्स' पुष्कळच कमी झालें आहे. आणि १९३२ च्या कायदेभंगानें महात्माजींच्या योग्यतेंत, हिंदी लोकांच्या दृष्टीनें भर पडली असो वा नसो, इंग्रज मुत्सद्द्यांच्या दृष्टीनें तरी ती खास उतरली आहे. तात्पर्य, लॉर्ड विलिंग्डन हे गांधीजींना आपण होऊन दर भेटीला बोलावणार नाहीतच; पण महात्माजींनी आपण होऊन भेट मागितली तर ती साफ नाकारून किंवा नुसत्या भेटीलाच भलत्या अटी घालून त्यांचा अपमान करतील. म्हणून तो प्रसंगच न आलेला बरा !

अशा रीतीनें सरकाराशीं तह करण्याच्या प्रास्ताविक अडचणी सांगितल्यानंतर, उरतां उरतां कोणचा मार्ग उरतो याचा विचार पुढील अंकीं करूं.

# यापेक्षा झळझळीत वैधव्य बरें !

देशी संस्थानें हीं आपल्या पूर्वजांच्या वैभवाचीं स्मृतिचिन्हें आहेत म्हणून तीं राखावीं असें हिंदी लोकांना वाटतें व ते त्यांजविषयीं अभिमानहि बाळगतात. पण त्याखेरीजहि महत्त्वाचें कारण आहेच. ज्या ठिकाणीं हुशार व कर्तबगार हिंदी लोकांना मामलेदारापासून गव्हर्नरापर्यंतचे सर्व अधिकार चालविण्याची संधि मिळते, अशीं ठिकाणें संस्थानेंच होत. यामुळे ती बुडून ब्रिटिश साम्राज्यरूपी महासागरांत विरून जाऊं नयेत यासाठीहि कोणा संस्थानिकावर संकट ओढवतें त्या वेळी साऱ्या हिंदुस्थानभर हलकल्लोळ माजतो. परंतु संस्थानांच्या अधिपतींची सत्ता अनियंत्रित असल्यामुळे त्यांतील प्रजेचीं सुखदुःखें त्यांच्या लहरीवर अवलंबून राहतात. दैववशात् राजा सुज्ञ, शहाणा व प्रजावत्सल भेटला तर संस्थानांत रामराज्य नांदतें. नाहींपेक्षा रावणी अमलाखालील निखाऱ्यावर होरपळून काढणारी ती रसरसलेली खाईच ठरल्याचेंहि अनुभवास येतें !

पतिआळाच्या महाराजांचें नाव पुष्कळांनी ऐकलेलें आहे. ते मोठे मुत्सद्दी व राजकारणी समजले जातात. त्यांचा इंग्रज सरकारच्या दरबारीं तेगार फार मोठा आहे. ते नरेंद्र-मंडळाचे चॅन्सेलर पूर्वी होते व आजहि आहेत. पहिल्या गोलमेज परिषदेंतील संस्थानिकांत ते सर्वांच्या अग्रभागीं नाचत होते. उत्तर हिंदुस्थानातील जे चारदोन संस्थानिक राजकारणांत हल्ली चमकत आहेत त्यांत पतिआळाच्या महाराजांची प्रामुख्याने गणना करावी लागते. अशा या लौकिकवान संस्थानिकाचा राज्यकारभार प्रगमनशील असेल, त्याची प्रजा सुखी व संतुष्ट असेल व त्याचें संस्थान उत्कृष्टपणाबद्दल बोट दाखविण्यासारखें असेल अशी कोणाची समजूत झाल्यास त्यांत अस्वाभाविक तें काय आहे ! पण पतिआळाच्या महाराजांचा हा बाह्य थाटमाट प्रेतावर अंथरलेल्या शुभ्र वस्त्रासारखा व रचलेल्या पुष्पमालांसारखा आहे. कोऱ्या वस्त्राने व पुष्पमालांच्या सौंदर्याने प्रेताचा भयानकपणा जसा झांकण्याचा प्रयत्न करण्यांत येतो त्याप्रमाणें महाराजांनी आपल्या मोठेपणाच्या भपक्याखाली आपलीं सारीं पातकें झाकून टाकलीं आहेत.

तो त्यांचा भपका बाजूला सारला व त्यांचीं पापें मी तूं करीत पुढे येऊं लागलीं कीं दृष्टि उद्वेगाने अंध होईल असा देखावा दृष्टीस पडतो, कान बधिर होतील अशा दुःखाच्या किंकाळ्या ऐकूं येतात व डोकें रागाने फिरून जाईल असें अन्यायाचे आघात त्याजवर बसूं लागतात ! नाटकांत एक सीन राजमहालाचा तर दुसरा सीन यमपुरीचा उघडावा त्यांतलाच हा प्रकार. असल्या या महाराजांचा चारचौघांदेखत पदर ओढून त्यांची फटफजिती उडविण्याचा त्यांच्या प्रजेनें प्रयत्न कांही थोड्याथोडक्या वेळा केला नाही. सन १९२९ सालीं अ. भारतीय संस्थानी परिषदेने त्यांच्या पातकांची गणति करण्याकरिता एक चौकशी कमिटी नेमली होती. सदर कमिटींत 'लीडर' पत्राचे सुप्रसिद्ध संपादक सी. वाय. चिंतामणी, सांगलीचे प्रो. गणपतराव अभ्यंकर यांसारखे सभासद होते. त्यांनी चौकशी करून आपला दहा रुपये किंमतीचा रिपोर्ट छापूनहि ठेवला आहे. पण त्याकडे महाराजांनी ढुंकुनहि पाहिलें नसेल.

आपला हा खटाटोप फुकट गेला असें दिसून आल्यावर पतिआळा संस्थानांतील प्रजेने अर्ज करून व्हाइसरायांचें डोकें उठविलें. तेव्हा व्हाइसरॉयांनी एकदांचें प्रजेचें म्हणणें टिपून घेण्यासाठी मि. फिट्झ पॅट्रिक या नांवाच्या अधिकाऱ्यास नेमलें. पण महाराज असल्या चौकशीला थोडाच धूप घालणार. महाराजांचा सगळा जोर पैशाचा. जो पैसा खिशांत खुळखुळत असला म्हणजे राजाची राणी सुद्धा मिळते म्हणतात त्या पैशाला फिट्झ पॅट्रिकची पुंगी बंद पाडणें काय अवघड! महाराजांनी आपल्या दिवाणामार्फत अशाच कांही उपायांची योजना केली व चौकशी अगदी गारठून सोडली इतकेंच नव्हे तर दिवाण लियाखत हयातखान यांनी साक्षीदारांना जरब घातली कीं 'खबरदार, महाराजांविरुद्ध साक्ष द्याल तर. तसें कराल तर तुम्हांला तुरुंगच पाहावा लागेल.' अशी जरब बसल्यावर कोणता अब्रूचा व जिवाची खातर बाळगणारा संस्थानी माणूस फिट्झ पॅट्रिक यांजपुढे येऊन खरें बोलण्यास धजेल ? अशा रीतीने महाराजांनी आपल्या सगळ्या संस्थानाभोवती भक्कम तटबंदी बांधून दाबादाबी केली तरी पतिआळा संस्थानांतील दुःखाने गांजलेल्या प्रजेच्या किंकाळ्या बाहेर ऐकूं जावयाच्या त्या गेल्याच. त्यांनी फिरून एकवार जोराची किंकाळी फोडून ती अर्जरूपाने व्हाइसरॉयापर्यंत पोचविली आहे. जी किंकाळी हिंदुस्थानाच्या कोनाकोपऱ्यांतूनहि दणाणली आहे ती व्हाइसरॉयास कळल्यावांचून राहिली असेल

काय? पण तिची त्यांनी दाद घेतली तरच ती त्यांना ऐकूं गेली असें समजावयाचें!

पतियाळा संस्थानांत अनेक प्रजामंडळें आहेत व अकाली जथेहि आहेत. प्रजाजन कडव्या व शीख जातींपैकीं आहेत. त्यांनी व्हाइसरॉयांकडे पाठविलेल्या अर्जाची नक्कल वाचली असता तेथे कोणता जुलूम सुरू नाहीं हेंच समजत नाहीं! त्यांत नमूद केलेल्या एक एका अपराधाबद्दल सामान्य माणूस तुरुंगांत अडकला असता, काळे-पाण्यावर गेला असता किंवा फांसावरहि लटकला असता. अशा प्रकारचा एक नव्हे तर असंख्य अपराध करूनहि महाराज मोकळे ते मोकळे व पुनः साळसूदत साव म्हणून जगभर मिरवतात. या अर्जांत असे कांहीं गुन्हे लिहिले आहेत कीं, ते खरे-सुद्धा वाटणार नाहींत. परंतु पतियाळा संस्थानांत राहणाऱ्या जबाबदार लोकांनी ते महाराजांस जाहीर रीतीने चिकटवले असल्यामुळे खोटे मानावयाचे कसे? अर्जदार म्हणतात, "महाराजांनी नवऱ्यांच्या बायका सुंदर म्हणून त्या पळविल्या, त्यांच्या नवऱ्यांना इहलोकांतून काढून एकतर परलोक दाखविला किंवा निदान तुरुंग दाखविले! कांहीं जणांना महाराजांची लहर फिरली म्हणून चौकशीवांचून तुरुंगांत पडावें लागलें. एकाला तर त्याची बायको उपटून त्याच्या मोबदल्यांत महा-राजांनी किंमतीदाखल वीस हजार रुपयेहि देऊं केले. तुरुंगांतील कांहीं कैद्यांनी आजहि अन्न-त्यागाचा सत्याग्रह चालविला आहे.'

कराच्या बाबतींत पाहावें तर त्यांच्या ओझ्याखालीं प्रजा बेजार झाली आहे. आणि स्वतः महाराजांची सांपत्तिक स्थिति बघावी तर महाराजहि चार कोटि कर्जाच्या ओझ्याखालीं दडपले गेले असून त्यांतून सुटका होण्याची त्यांना या जन्मांत मुळींच आशा उरलेली नाहीं. पतिआळाच्या प्रजेचीं हीं गाऱ्हाणीं खरीं असल्यास अलवारच्या महाराजांस परागंदा व्हावें लागावें, नाभाच्या महाराजांना पदच्युत कर-ण्यांत यावें व पतिआळाच्या महाराजांनी न्यायी व प्रजाहिततत्पर संस्थानिकाप्रमाणे मानसन्मानाने गादी चा उपभोग बिनहरकत घ्यावा यांतील फरकांचा उल-गडा कांहीं केल्या होतच नाही. तेव्हा पतिआळाच्या प्रजेप्रमाणे आमचीहि व्हाइसरॉयास विनंति अशी कीं, महाराजांची चौकशी जाहीर रीतीने व निःपक्षपाती-पणाने करा व एकदांचे महाराजांचें बेंड बाहेर फोडा.

अर्जांतील कांही तक्रारी कदाचित् अतिशयोक्तीच्या व कांही अवास्तवहि असतील. त्या सर्व खऱ्या आहेत असें संस्थानाबाहेरील हिंदी लोकांना म्हणण्यास त्यांजपाशीं स्वतंत्र पुरावा नाही. प्रजेचे प्रतिनिधि देतील तोच पुरावा. परंतु प्रजाप्रतिनिधि सांगतात तें सारें खोटे हे उघड चौकशीवांचून समजावें कसें? व सगळीं दारें धूर्ततेने लावून घेतलीं तर गरीब व जुलमाने गांजलेल्या प्रजेची दाद लागावी कशी? अशा स्थितींत जुलमाखाली जिवास कंटाळलेल्या पतिआळाच्या प्रजेने 'हें संस्थान आम्हांस छळण्या-साठीं असेल तर त्यापेक्षा बुडालेलें काय वाईट?' असें म्हटलें तर तिचे काय चुकलें? म्हणूनच अशा परिस्थितींत मिळमिळीत सौभाग्यापेक्षा झळझळीत वैधव्यहि बरें असे कित्येक संस्थानांतील प्रजाजनांना वाटू लागले. संस्थानी प्रजेची दाद संस्थानिकांनी घ्यावयाची नाहीं, सार्वभौम सरकारानेहि घ्यावयाची नाही तर मग ती दाद लावून घेण्याकरितां प्रजेने बंडच केलें पाहिजे कीं काय याचा एकदांचा उलगडा झालेला बरा नव्हे काय?

# मानपत्राचा ठराव पास झाला!

## पुणें शहर म्युनिसिपालिटीची सभा

काल रोजीं सायंकाळीं ५ वाजता पुणे शहर म्युनिसिपालिटीतर्फे लॉर्ड विलिंग्डन यांना मान-पत्र द्यावे कीं नाही याचा विचार करण्याकरिता सभा-सदांची सभा भरली होती. प्रारंभीं श्री. भागवत यांनी सभेची नोटीस, ठिकठिकाणीं भरलेल्या सभांत पास झालेले ठराव, व आलेलीं विरुद्ध मतप्रदर्शक पत्रें वाचून दाखविलीं. त्यानंतर रा. सा. किबवे यांनी व्हाइसरॉयांस मानपत्र द्यावे असा आशयाचा ठराव मांडला व त्याला रा. डांभरे यांनी अनुमोदन दिलें. मग श्री. दा. वि. गोखले यांनी "आपण सभासद हे मतदारांचे एक प्रकारचे सेवक आहोंत व या दृष्टीने पाहतां मानपत्रासारख्या महत्त्वाच्या प्रश्नावर लोकमत अगोदर घेणे अत्यंत अवश्य आहे. व हे लोकमत रेफरेंडमच्या पद्धतीने घेण्यांत यावें" अशी तहकुबीची सूचना आणली. यावर अनुकूल प्रतिकूल अशी बरींच भाषणें झाल्यानंतर मतें घेतलीं त्यावरून पाहता सूचनेला अनुकूल १३ व प्रतिकूल २८ अशीं मते पडून सूचना नापास झाली. मग मूळ ठरावावर भाषणे होऊन मतें घेण्यांत आलीं. त्यांत ठरावास अनुकूल २९ प्रतिकूल १३ व तटस्थ ४ अशीं मतें पडून मानपत्र देण्याचा ठराव पास झाला. मानपत्राच्या खर्चाचा ठराव मांडण्यांत आला नाही.

# 'खरा ब्राह्मण' नाटकाचे टीकाकार

( दुसरी बाजू )

केसरीच्या गेल्या अंकांत प्रबोधनकार ठाकरे यांचें नवें नाटक 'खरा ब्राह्मण' यावर 'सत्यशोधकी तमाशांचें पिशाच्च' या मथळ्याखाली लिहून आलेला एक मजकूर छापला आहे. परंतु या प्रश्नाला दुसरीहि एक लहानशी बाजू आहे. म्हणून ती मुद्दाम देत आहें.

रा. ठाकरे यांना ब्राह्मणद्वेषाचा रोग जडलेला आहे ही गोष्ट खरी. तसेंच भावना तीव्र असली म्हणून शब्द तामसी वापरलेच पाहिजेत असें नाही हेंहि खरें. पण ठाकऱ्यांची ही खोड आता जाणें शक्य नाही ! 'खरा ब्राह्मण' नाटकाची प्रस्तावनाच घ्या. पृष्ठ ४ वर ते आपला हेतु खालील शब्दांनी प्रगट करतात. "प्रस्तुत नाटिकेतील पात्रें रंगविण्या-साठीं मीं सोळाव्या शतकांतली रंगपेटीच वापरली आहे. कलम मात्र विसाव्या शतकांतलें." हे रूपक सर्वथैव योग्य आहे. पण आपल्यावर हटकून येणारे दोषारोप लक्षांत घेऊन त्यांनी पुढच्याच ओळींत खालील शब्दांत आत्मसमर्थन केलें आहे. "स्वभाव-वैचित्र्याचे भडक रंग देतांना सहजगत्या भिर-कावलेले जोडे कोणाच्या पायाला फिट बसले तर त्याने ते मोफत वापरावे. माझी कांही हरकत नाही." यातील भावना जितकी दुष्ट तितकेंच रूपकहि औचित्यविचारदृष्ट्या दुष्टच आहे. हातांत कलम घेऊन चित्र रंगविणारा सहज-गत्या जोडे भिरकावतो, हें मिश्ररूपक कोठच्या गांवचें ! चित्रकार लोकांना जवळ न येऊं देण्या-करितांहि त्यांच्यावर भिरकावण्यासाठी जोड्यांची रास जवळ घेऊन बसतो हा अनुभव अपूर्वच होय!

मला तर वाटतें कीं, आपण चित्र काढीत असतां जवळ येऊन पाहणाऱ्या व कौतुक करणाऱ्या प्रेक्षका-वर चित्रकार प्रेमच करील. फक्त कलम झाडतांना न कळत चित्रकाराच्या हातून प्रेक्षकाच्या वस्त्रांवर रंगाचे ठिपके उडतील. पण ती आपत्ति प्रेक्षकहि कौतुकानें सोशील. म्हणून चित्रकाराचेंच रूपक ठेवून ठाकरे यांनी आत्म-समर्थनार्थ जर खालील वाक्य लिहिलें असतें तर तें तितकेंच सबळ होऊन त्यांतल्या त्यांत आनंददायक-हि झालें असतें.—"स्वभाववैचित्र्याचे निर-निराळे रंग देतांना सहजगत्या माझ्या कलमांतून उडालेले शिंतोडे कोणाच्या शुभ्र वस्त्रावर गेले तर त्यांनी तें रंगीत वस्त्र मोफत वापरावें. चित्रकार त्याबद्दल किंमत मागणार नाही." पण रा. ठाकरे जर असे मृदु व सौंदर्य लिहितील तर ते ठाकरे कसचे ! चित्रकारकर्म करीत असतां त्यांनी जवळ ठेवलेला खेटरांचा एवढा संभार पाहून, हे चामडे रंगविणारे चांभार आहेत असे केसरींतील लेखकाला वाटून, त्यानें ठाकरे यांची शाब्दिक खेटरांनीच उलट टीकारूप पूजा बांधली हें ठीकच झालें !

पण खुद्द नाटकासंबंधानें केसरींतील लेखकाचें वर्णन व त्या वर्णनावर आधारलेली टीका कांही अंशीं योग्य नाही. या नाटकांतील कर्णकटु व अंगाला झोंब-णाऱ्या शब्दांचा निषेध मीहि करतों; व तसले कांही शब्द रा. ठाकरे हे काढून टाकतील तर त्यांचीहि कांही कार्यहानि होणार नाही. म्हणून या खेळाचें परीक्षण करण्याकरितां नेमलेल्या कमिटीनें या दृष्टीनें पुस्तक व प्रयोग दोन्हीहि पाहून अवश्य सूचना कराव्या. तथापि हा प्रयोगच बंद व्हावा किंवा पुस्तक सरकारजमा व्हावें अशी अपेक्षा करणें म्हणजे एका विशिष्ट मताची अतिशयोक्ति करणें होय.

पहिली गोष्ट ही कीं, भाषा फुष्कळशी ग्राम्य असली तरी या पुस्तकांत क्वचितच, म्हणजे फार तर दोनतीनच शब्द अश्लील असे आढळतील. तसेंच इतर कित्येक चटोर नाटकांतून शब्द सफाईनें बोलून जाऊन अभिनयानें अश्लीलपणा रंगवितां येतो असेहि हे शब्द नाहीत. अश्लीलपणाला आधार मिळण्यासारखें एक पात्र म्हणजे वेश्येचें नाटकांत घातलेलें आहे. पण त्याची परिणति उत्तम ध्येय-वादित्वाची झालेली आहे. अस्पृश्यतानिवारणा-बरोबर, अनीतीच्या धंद्याकरितां एखादी विशिष्ट जातच राखून ठेवण्याची समाजाची चाल ही अन्यायमूलक म्हणून त्याज्य समजण्याचें सामाजिक प्रगतिपर ध्येयहि जातां जातां नाटक-कारानें रंगविलें आहे.

दुसरा प्रश्न एका विशिष्ट म्हणजे ब्राह्मण जाती-च्या निंदेचा. पण रा. ठाकरे यांनी प्रस्तावनेंत सुचविल्याप्रमाणें ब्राह्मणांतल्याच पण एका विशिष्ट वर्गाची व तीहि धंदेवाईक वर्गाची निंदा या नाट-कांत आहे. सरसकट ब्राह्मण वर्गाची नाही. पण एवढी गोष्ट खरी कीं हा ठाकरे यांचा विवेक प्रत्यक्ष कृतींत संभाळला जावा तितका संभाळण्यांत आलेला नाही. एकदोन पात्रांच्या तोंडीं कांही वाक्ये आहेत. पण ब्राह्मणांची निंदा करणा-ऱ्या इतर पात्रांच्या तोंडींहि ठाकरे यांनी दहापांच वाक्यें घालून, आक्षेप आहे तो सरसकट नाही, विशिष्ट मर्यादित वर्गावर किंवा कृतीवरच आहे,

असें वदविण्याची खबरदारी घेतली असती तर बरें झालें असतें.

विषय अस्पृश्यतेचा घेतला. तेव्हा अस्पृश्यतेला विरोधक अशा वर्गाची निंदा होणें क्रमप्राप्तच होय. पण ठाकरे यांच्याकडे एक दोष असा येतो कीं, मराठे व इतर ब्राह्मणेतर लोकहि अस्पृश्यतानिवारणाला सारखेच विरोध करतातना ? म्हणून बडव्याप्रमाणे कांही ग्रामकंटक, सनातनी पण विवेकशून्य मराठे व ब्राम्हणेतर यांचीं पात्रें ब्राह्मणांच्या जोडीला घालावयास पाहिजे होती. तीं ठाकरे यांनी घातलीं नाहीत. सनातनी लोक नुसत्या ब्राह्मणांत नाहीत. इतकेंच काय पण ब्राह्मण वर्ग इतरापेक्षा अधिक सुशिक्षित, या कारणाने तोच सर्व वर्गांत अधिक विवेकी व प्रगतिपर झाला आहे. ही गोष्ट ठाकरे यांच्या लक्षांत येत नसेल असें नाही पण. ब्राह्मणद्वेषाने त्यांचें डोकें कायमचें भडकल्यामुळे, सुशिक्षित ब्राह्मण वर्गाला योग्य तें श्रेय द्यावें व त्यांना तरी आपल्या क्रूर टीकेंतून वांचवावें ही गोष्ट ठाकरे यांच्या हातून होत नाही हें दुर्दैव होय. उच्च भावनेच्या दृष्टीने या प्रस्तुत नाटकांतील कित्येक प्रसंग चांगले साधले असून ते परिणामकारक होतील. म्हणून जो विवेक ठाकरे यांना साधला नाही, तेवढा कामिटीने करून सूचना कराव्या; व कांही वाक्यें, शब्द, किंवा भाग काढून टाकण्यास सांगावें. आणि ठाकरे यांनीहि सौजन्याने तें मान्य करावें. तसें झालें असतां नाटकाला सुशिक्षित प्रगतिपर वाङ्मयस्वातंत्र्यवादी लोक नांवें ठेवणार नाहीत.

शेवटीं या नाटकांतील विशिष्ट वर्गाची निंदा जमेस धरूनहि नाट्यकलेच्या दृष्टीने एक गोष्ट सांगणें अवश्य आहे. नाटक हें नुसतें कल्पनासृष्टींतील नसेल, व संसारांतील विषयालाच अनुलक्षून असेल, तर त्यांत एका मनुष्यवर्गाची स्तुति व एकाची निंदा ही क्रमप्राप्तच ठरते. सोललेल्या बदामांची उसळ केली तरी त्यांत एखादा चुकून वाईट कडू राहतोच. मग ध्येयवादी नाटकांत तर काय चांगल्यावाइटाचा विरोधच दाखवावयाचा असतो. आणि नाटकांतील पात्रांना नांवें व्यक्तीचीं असलीं तरी त्यांना विशिष्ट वर्गाचें व जातीचें प्रतिनिधित्व ओघानेच येतें. त्यांच्या जातीचा उच्चार ग्रंथकर्त्याने टाळला तरी नांवावरून त्या ओळखतां येतात. यामुळे वाईट स्वभावाचीं म्हणून जीं पात्रें घातलीं जातात त्यांच्या योगाने त्यांच्या वर्गाची निंदा ओघानेच होते. याशिवाय आणखीहि एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती ही कीं, विनोद व हास्यास्पदता या दृष्टीने दरएक काळांत एक एक वर्गाने हजेरी दिलेली आहे. याविषयी श्री. न. चिं. केळकर यांनी श्री. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या टीकात्मक ग्रंथाला प्रस्तावना लिहिली आहे ती पहावी. म्हणजे वरील सिद्धांत पटेल. कालिदासाचा विदुषक हा सदोदित ब्राह्मणच कां असावा ? व त्याचीच थट्टा खादाडपणाच्या अवगुणाला अनुलक्षून कां व्हावी ? इतर वर्ग खादाड नसतातच कीं काय ? भिक्षुक वर्गाला विनोदाकरिता वेठीला धरण्याचें काम अजूनहि सुरूच आहे. श्री. खाडिलकरांचीं बहुतेक नाटकें वाचलीं असतां ब्राह्मणावरच हत्यार दिसतें. केळकरांनी तोतयाचें बंड व अमात्यमाधव या नाटकांत ब्राह्मण पात्रांचाच विनोदाकरिता उपयोग केला. आणि केळकरांनी तर संत भानुदास या नाटकांत पंढरपूरच्या बडव्यांची विषयानुरूप खूपच निंदा केली आहे. पण केळकरांनी नाना फडणवीस इत्यादि ब्राह्मण पात्रें उच्च दर्जाचीं घातलीं आहेत; आणि अमात्यमाधवांतील माधवाचार्य हा आदर्श ब्राह्मण तर असा दाखविला आहे कीं, ब्राह्मण वर्गाची इतर रीतीने जी निंदा त्यांच्या हातून घडली तिचा सव्याज मोबदलाच त्यांनी घेतला असें म्हणतां येईल.

'खरा ब्राह्मण' या नाटकांतहि रा. ठाकरे यांनी जरी ब्राह्मण–भिक्षुक वर्गाची निंदा मनसोक्त केली आहे, तरी त्याच नाटकांत श्री. ज्ञानेश्वर व विशेषतः श्री. एकनाथ यांच्याबद्दल किती परोपरीने आदरभाव दाखविला आहे हें पाहिलें म्हणजे, या ब्राह्मणद्वेष्ट्या ग्रंथकाराची त्याच्याच हातून पुरी फजिती झाली असेंच म्हणावें लागेल ! नाटकांतील बडव्यांना जर ब्राह्मण वर्गाचें प्रतिनिधित्व येतें, तर ज्ञानेश्वर-एकनाथांना तें येतेंच येतें. मग ठाकऱ्यांना ब्राह्मणवर्गाची निंदा साधली असें म्हणतां येतें काय ? ब्राह्मणाप्रमाणेंच इतर वर्गहि निरनिराळ्या नाटकांतून असेच निंदास्पद झाले आहेत. पण महाराष्ट्र नाटककाराने ब्राह्मण व ब्राह्मणेतर याखेरीज स्तुतीप्रमाणे निंदेलाहि दुसरे वर्ग कोणते घालावे ? ते अरतून परतून येणारच. केळकरांनी भानुदास नाटकांत मुख्य नीच पात्र (व्हिलन) मराठा पाटीलच केला आहे. एक काळ असा होता कीं, रंगभूमीवर सुधारक आणिला म्हणजे तो स्त्रैण मद्यपी असाच असावयाचा. मग यच्चयावत् सर्व सुधारक असेच असतात काय ? हल्ली कॉलेजची तरुण मुलें व मुली यांच्यावर संक्रांत आली आहे. आणि रंगभूमीवर जीं कवींचीं पात्रें येतात त्यांची तर दुर्दशा बोलावयासच नको ! तात्पर्य, प्रत्येक काळीं समाजात निंदास्पद विनोदविषय होण्याचें एकेका वर्गाचे नशिबीं येतें.

या वर्गाला इंग्रजींत 'स्नॉब' ( Snob ) असें म्हणतात. ज्या त्या काळच्या 'स्नॉबरी'ची थट्टा करणें हा ज्या त्या काळच्या नाटककारांचा खेळच होऊन बसतो. पूर्वी इंग्रजींत अठराव्या शतकांत ॲडिसन-प्रभृतींनी हेंच केलें. हिंदुस्थानांतहि तोच प्रकार आज वाङ्मयाच्या प्रगतीमुळे दिसून येतो.

मीं रा. ठाकरे यांचें अशा रीतीने समर्थन केलें तें केवळ न्यायबुद्धीच्या व वाङ्मयस्वातंत्र्याच्या दृष्टीनें. एरवीं रा. ठाकरे यांच्या हृदयांत ब्राह्मणा-संबंधी किती कालकूट भरलें आहे तें मला माहीत आहे. याच नाटकांत पकारयुक्त सर्व शहरें वाईट असतात असा एक शेरा त्यांनी दिला आहे. या कोपरखळीचें खरोखर कांहीच कारण नव्हतें. पुण्याचें पहिलें अक्षर पकारात्मक आहे म्हणून पुणें शहर वाईट, तर तशाच पकारयुक्त जाती (उदाहर-णार्थ प्रभु) वाईट असतात असें कोणीं म्हणून उलट अहेर दिला तर ? पण या धुळवडीपासून कोणाला काय लाभ? रा. ठाकरे कलमबहाद्दरापेक्षाहि कलम-कसाईच अधिक ठरतात. म्हणून त्यांच्या या नाटकाच्या तर्फे मीं हें इतकें लिहिलें तरी, त्यांनी हा खाटकांचा धंदा टाकून आपल्या 'कलमा'ने सुगंधी व सुंदर वृक्षाचीं वाङ्मयरूप कलमें करावीं अशी विनंति करावीशी मला वाटते. जित्याची खोड जितेपणांतहि जाऊं शकते हें रा. ठाकरे सिद्ध करून देतील तर काय मौज होईल !

# व्हाइसरॉयांच्या मानपत्राचा निषेध

### पुण्यांतील जाहीर सभा

मंगळवार ता. ४ रोजीं सायंकाळीं ६॥ वाजता श्रीशिवाजी-मंदिरांत **श्री. न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखाली पुणें शहर म्युनिसिपालिटीकडून लॉर्ड विलिंग्डन यांना देण्यांत येणाऱ्या मानपत्रा-बाबत पुणेंकरांचें विरोधी मत प्रदर्शित करण्याकरिता जाहीर सभा होऊन तींत निषेधपर असा एक ठरावहि पास झाला.

### श्री. केळकर यांचें भाषण

प्रारंभीं अध्यक्षांचें खालील आशयाचें प्रास्ताविक भाषण झालें. ते म्हणाले, " सभेचा मुख्य उद्देश असा. लॉर्ड विलिंग्डन हे या महिनाअखेर पुण्यास येणार असून त्या वेळीं पुणें शहर म्युनिसिपालिटी त्यांना मानपत्र देण्या-च्या विचारांत आहे. तेव्हा वेळींच म्युनिसि-पालिटीला सावध करून पुणेंकरांचा विरोध अस-ल्याचें म्युनिसिपालिटीच्या नजरेस आणणें हा आहे. व्हाइसरॉय येथे येणार आहेत असें कळल्याबरोबर म्युनिसिपल सभासदांपैकीं २७ सभासदांनी व्हाइस-रॉयांना शहर म्युनिसिपालिटीतर्फे मानपत्र देण्यांत यावें कीं नाहीं या प्रश्नाचा विचार व्हावा, अशा आशयाचा एक मसुदा तयार करून व त्यावर आपल्या सह्या घालून तो अध्यक्षांकडे पाठविला. मग सह्या करणारांच्या पोटांतील हेतु काय होता हें समजणें कठिण आहे. कारण, त्यांपैकीं कांहींची इच्छा अशीहि असूं शकेल कीं, हा प्रश्न सभेपुढे येऊं दे तर खरा, मग अनुकूल वा प्रतिकूल मत देणें आमच्या हातांत आहे. याचा अर्थ असा कीं,ठराव सभेपुढे मताकरिता आला कीं, तो बहुमताने नापास करून फेटाळून लावावयाचा. किंवा असेंहि असूं शकेल कीं, सह्या करणारांची इच्छा खरोखरीच व्हाइसरॉय यांना मानपत्र द्यावें अशी असून जर सर्वांनी अनुकूल मत दिलें तर ठराव पासहि व्हावयाचा.कसेंहि असो.पण आपणास वाईट गोष्टीचाच अगोदर विचार करावयास पाहिजे. म्हणजे ठराव पास होण्याचे अगोदर व्हाइसरॉयांस देण्यांत येणाऱ्या मानपत्रास जनतेचा विरोध आहे, व म्युनिसिपालिटी जर मानपत्र देणार असेल तर आम्ही तिचा निषेध करतों, हें मत म्युनिसिपालिटीच्या नजरेस आणणें हें केव्हाहि योग्यच आहे. कारण 'अशुभस्य कालहरणम्' असें जसें म्हणतात तसेंच 'अशुभस्य निवारणम्' असें म्हणून येणाऱ्या संकटाची निरवानिरव अगोदर करून ठेवणें हें केव्हाहि चांगलेच असतें.

### मानपत्र देऊं नका

लॉर्ड विलिंग्डन या व्यक्तीबद्दल आमचा मुळीच द्वेष नाहीं. कारण ज्याची आमच्याशीं नुसती ओळखहि नाहीं त्याच्याबद्दल द्वेष तरी कां बाळगावा? पण त्यांनी आजवर व्हाइसरॉय म्हणून केलेल्या अनेक कृत्यांबद्दल आमचा विरोध आहे आणि म्हणूनच अशा गृहस्थास म्युनिसिपालिटीने मानपत्र देऊं नये असें आमचें म्हणणें आहे. ज्या संस्थांचा व कॉलेजांचा संबंध सरकाराशीं ग्रँटरूपाने निगडित झाला आहे त्यांनी जर व्हाइसरॉयसाहेबांस आपल्या संस्थेंत बोलावून अल्पोपाहारहि दिला तर त्यांत त्याबद्दल चालकांना फारसा दोष देतां येणार नाहीं. कारण त्यांना आपल्या संस्था टिकवावयाच्या आहेत. तसेंच काळा गोरा हा भेद मनांत आणून, आम्ही लॉर्ड विलिंग्डन यांचा द्वेष करतों असेंहि नाहीं. कारण सिल्व्हन लेव्ही किंवा बरनार्ड शॉ

यांसारखे लोक येथे आले आणि म्युनिसिपालिटीने त्यांना मानपत्र देण्याचें ठरविलें तर कोणी विरोध करील असें मला वाटत नाही. पण आज राजकीय स्थिति जशी आम्हांला माहीत आहे तशीच ती सरकारालाहि कळत आहे. अशा वेळीं अगदीं स्वतंत्र अशा स्थानिक स्वराज्य संस्थेने मानपत्राची ही खाजवून खरूज काढण्याचें काय कारण होतें ? आज पूर्वीसारखा सामुदायिक बहिष्कार व्हाइसरॉयांवर पडणार नाही हें जरी खरें असलें, तरी लोक त्यांच्याकडे असंतुष्टतेने बघतील इतकें खास. अशा स्थितींत हें मानपत्राचें खूळ कांही उपद्व्यापी लोकांनीं काढून सर्वांनाच पेंचांत आणलें आहे.

निर्लज्ज प्रतिनिधि

कांही लोकांचा कयास असा आहे कीं ही कल्पना प्रथम जिल्हाधिकाऱ्याच्या डोक्यांतून निघाली असावी. आणि हेंच जर खरें असेल तर त्यांत जिल्हाधिकाऱ्याला फारसा दोष देता येणार नाही. कारण त्याला तरी व्हाइसरॉयांचा सन्मान करण्याची संधि केव्हा येणार ? दुसऱ्या कांही लोकांचा असा अदमास आहे कीं, म्युनिसिपालिटीच्या आजच्या अध्यक्षांचीच ही करामत असावी. पण म्युनिसिपालिटींतील पक्षोपपक्ष व मतभेद पाहतां हा कयास फारसा सोपपत्तिक दिसत नाही. उलट अध्यक्षांनाच खड्ड्यांत घालण्याचा प्रयत्न दिसतो. असो, आता मानपत्र म्हणजे काय व त्यास विरोध कां करावयाचा याचा विचार करूं. स्थानिक स्वराज्य ही संस्था ५० वर्षांपूर्वी आपणास मिळाली. या संस्थेला कोणी कितीहि नांवें ठेविलीं तरी ती आपण निवडून दिलेल्या प्रतिनिधींची म्हणजे पर्यायाने आपलीच संस्था आहे हें विसरून चालणार नाही. तेव्हा शहर म्युनिसिपालिटीने मानपत्राचा ठराव पास करून व्हाइसरॉयांना तें देणें, याचा अर्थ अखिल नागरिकांची या गोष्टीस संमति आहे असा होत नाही काय ? तेव्हा वेळींच आपण जर निषेध केला नाहीं, आणि तसेंच मानपत्र दिलें गेलें, तर मागाहून " City gets the Municipality it deserves " असा निराशाजनक शेरा मारण्यापलीकडे आपण काय करणार ? आपण निवडून दिलेले प्रतिनिधि जर इतके निर्लज्ज व मतदार-संघाच्या मताला पायाखाली तुडविणारे असतील तर वरीलप्रमाणे शेरा मारण्याची वेळ येईल; व पुढील निवडणुकीच्या वेळीं या कृत्यापासून थोडा तरी बोध घेऊन कोणते प्रतिनिधि निवडावयाचे याचा विचार मतदारांना करावा लागेल.

आजचें राजकारण

आज राजकारणाची स्थिति अशी आहे कीं लोकांची चळवळ व सरकारची चळवळ ही समांतर असणाऱ्या रुळावरून चालणाऱ्या दोन आगगाड्यां-सारखी आहे. लोक म्हणतात, आम्हीं चळवळ करून सरकारला नमविलें तर सरकार म्हणतें कीं आम्ही कायद्याच्या जोरावर तुम्हांला बरोबर काबूंत आणलें. यांत दोघांनाहि समाधान वाटत आहे. आणि या चळवळीच्या गाड्या जोंपर्यंत समांतर रुळावरून जात आहेत तोंपर्यंत टक्कर होण्याचें कांहीच कारण नाही. टक्कर होण्याचा बराचसा संभव जंक्शनवर असतो. पण तो जर पॉइंटमनने बरोबर संभाळला तर एकमेकांनी एक-मेकांच्या गाड्यांकडे तिरवा डोळा करून पाह-ण्याचें कांहीच कारण नसतें. अशी स्थिति असता कांही उपद्व्यापी म्यु. सभासदांनी मानपत्राचा हिरवा दिवा दाखवून नाक खाजविल्या-सारखें केलें आहे. बरें, या सभासदांनी इरेस पडून पोलिस बंदोबस्तांत जर यदाकदाचित व्हाइसरॉयां-ना मानपत्र दिलेंच तर त्यांत मानपत्राची ती काय शोभा राहिली !

हलक्या प्रतीचें मानपत्र

मानपत्र घेण्यादेण्यांतहि प्रति आहेत. डॉ. टागोर, सिल्व्हन लेव्ही वगैरेसारखी मंडळी पुण्याला आली व त्यांना मानपत्र देण्याचें ठरवून म्युनिसिपालिटीने सर्व नागरिकांची संमति घेऊन मानपत्र दिलें तर तें पहिल्या प्रतीचें मानपत्र होय. कारण त्या समा-रंभास कोणाचाच विरोध नसतो तसेंच म. गांधी हे उपवासांतून सुखरूप बाहेर पडले म्हणून उद्या कोणीं त्यांना मानपत्र देण्याचा ठराव आणला तर पास होईल. पण त्याला सरकारी सभासद तरी निदान विरोध करतील. अशा वेळीं थोडक्यांच्या विरोधाला न जुमानतां जर म. गांधींना मानपत्र देण्याचा समारंभ केला तर तो दुसऱ्या प्रतीचा समारंभ म्हणतां येईल. पण सगळ्या नागरिकांचा विरोध असतां, व म्युनिसिपालिटींत या प्रश्नावर दुफळी असतां, मानपत्र समर्पण करण्याचा समारंभ पोलिस बंदोबस्तांत करणें हा तिसऱ्या म्हणजे अगदी हलक्या प्रतीचा होय. बरें, इतका विरोध असता व्हाइसरॉयसाहेबांचें तरी मानपत्र घेतल्यावांचून काय नडलें आहे ? त्यांना आज कोणत्याच बाबतींत कमी आहे असें नाही. कसेंहि असो, ज्या कांही उपद्-व्यापी सभासदांनी विनाकारण दोन गाड्यांची टक्कर लावण्याचा हा घाट घातला आहे तो वाईट आहे. आणि म्हणून वेळीच त्याचा निषेध करणें हें आपलें कर्तव्य आहे" नंतर रा. वि. रा. शिंदे यांनी खालील ठराव मांडलाः—

ठराव

"हिंदुस्थानाचे गव्हर्नर-जनरल व व्हाइसरॉय हे

लवकरच पुणें येथे येतील तेव्हा त्यांस शहर म्युनिसिपालिटीतर्फे मानपत्र समर्पण करावें असा ठराव कांही सभासदांकडून शहर म्युनिसिपालिटीकडे आला असून त्याचा विचार करण्याकरिता म्युनिसिपालिटीची खास सभा गुरुवार ता. ६ रोजीं बोलविण्यांत आली आहे. हें ऐकून पुणें शहरांतील नागरिकांच्या या सभेस खेद होत आहे व ही सभा या गोष्टीचा निषेध करीत आहे.

"राष्ट्रांत चालू असलेली दडपशाही व सरकारचें भावी हिंदी सुधारणांविषयींचें प्रतिगामी धोरण यायोगानें उत्पन्न झालेल्या राष्ट्राच्या आजच्या मनःस्थितींत, महाराष्ट्रांतील राजकारणाचें केंद्र समजल्या गेलेल्या पुणें शहरांतील स्थानिक स्वराज्याच्या मुख्य संस्थेने व्हाइसरॉयसाहेबांस मानपत्र देणें हें राष्ट्राभिमानास सर्वस्वी विरोधी आहे असें या सभेचें स्पष्ट मत आहे.

"म्हणून या पुणें शहरांतील म्युनिसिपालिटीच्या सर्व सभासदांस, विशेषतः लोकनियुक्त प्रतिनिधींस असा आदेश आहे कीं, त्यांनी या ठरावास संमति देऊं नये.

तसेंच व्हाइसरॉयसाहेबांसहि या सभेचें असें सांगणें आहे कीं जरी म्युनिसिपालिटीच्या बहुसंख्य सभासदांनी हा ठराव कोणत्या ना कोणत्या रीतीने मंजूर केला तरी जनतेचा त्यास विरोध असल्याकारणानें त्यांनी मानपत्राचा स्वीकार करूं नये.

वरील ठराव म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष व व्हाइसरॉयसाहेब यांजकडे रीतसर पाठविण्याचा अधिकार सभेच्या अध्यक्षांस देण्यांत यावा."

### श्री. वि. रा. शिंदे यांचें भाषण

वरील ठरावावर भाषण करतांना **श्री. विठ्ठल रामजी शिंदे** म्हणाले, "हेच व्हाइसरॉय पूर्वी मुंबईचे गव्हर्नर म्हणून काम करीत होते त्या वेळीं याच म्युनिसिपालिटीने त्यांना म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याकरवीं मानपत्र दिलें होतें. आणि आज तेच तात्यासाहेब लॉर्ड विलिंग्डन यांस द्यावयाच्या मानपत्राचा निषेध करतात. यांतली खरी मख्खी अशी आहे कीं लॉर्ड विलिंग्डन यांनी गव्हर्नर असतांना केलेल्या कृत्यांत व ते व्हाइसरॉय म्हणून आज जीं कृत्यें करीत आहेत त्यांत जमीन-अस्मानाचें अंतर पडलें आहे. जसजसे ते अधिकाराच्या शिखरावर चढूं लागले तसतशी त्याच प्रमाणात त्यांच्याविषयींची जनतेच्या मनांत असलेली आपुलकीची भावना घसरावयाला लागली आणि म्हणूनच आजची सभा बोलवावी लागली आहे. माझाहि विलिंग्डनसाहेब या व्यक्तिविषयीं मुळीच द्वेष नाहीं. त्यांनी आमच्या अस्पृश्यतेच्या चळवळीला आजपर्यंत पुष्कळच मदत केलेली आहे. पण राज्यकारभाराच्या कामांत त्यांनी जीं चक्रें फिरवावयास सुरवात केली व फिरविलीं तीं पाहिलीं असता कोणालाहि व्हाइसरॉयसाहेबांचा व त्यांच्या कृत्यांचा निषेधच करावासा वाटेल. कांही वर्षांपूर्वी लॉर्ड आयर्विन यांनी पुण्याला सहज धावती भेट दिली असता त्यांना म्युनिसिपालिटीने मानपत्र न देतां तसेंच वाटेस लावलें. आणि आता लॉर्ड विलिंग्डन यांना म्युनिसिपालिटीने ठराव पास करून जर मानपत्र दिलें तर ते घेऊन ते विलायतेला जातील आणि लॉर्ड आयर्विनला दाखवितील. आणि मग मात्र दोघांची टक्कर लागण्याचा अधिक संभव. पण असें लावालावीचे पोरखेळ म्युनिसिपालिटीने करूं नयेत व व्हाइसरॉयसाहेबांना मानपत्र देऊं नये असें माझें स्पष्ट मत आहे व सदर ठराव मला पूर्णपणें मान्य आहे" असें सांगून त्यांनी ठराव सभेपुढे मांडला.

### मतदारसंघाचा विरोध

ठरावाला अनुमोदन देतांना **श्री. गोरे** म्हणाले मी म्युनिसिपल मतदार–संघातर्फे बोलावयास उभा राहिलों आहें. आमच्या संघानें म्युनिसिपालिटीला असें कळविलें आहे कीं तिनें मानपत्र देण्याचा हा उपक्रम बंद करावा. आणि या आमच्या संघाच्या ठरावाला अनुसरूनच मी सदर ठरावास अनुमोदन देतों व व्हाइसरॉयसाहेबांस म्युनिसिपालिटीने मानपत्र देऊं नये असें पुनः एकदा जाहीर करतों!' यानंतर श्री. **चितळे** यांनी एक उपसूचना आणली व तिला श्री. खरे यांनी अनुमोदन दिल्यावर उपसूचना मूळ ठरावांत समाविष्ट करण्यांत आली. त्या उपसूचनेप्रमाणे मूळ ठरावांतील (१) 'तसेच व्हाइसरॉयसाहेबांसहि या सभेचें असें सांगणें आहे कीं जरी म्युनिसिपालिटीच्या बहुसंख्य सभासदांनी हा ठराव कोणत्या ना कोणत्या रीतीने मंजूर केला तरी जनतेचा त्यास विरोध असल्याकारणानें त्यांनी मानपत्राचा स्वीकार करूं नये.' आणि (२) अध्यक्षांनी 'व्हाइसरॉय साहेबांकडे हा ठराव पाठवावा,' एवढा भाग कमी करून तो ठराव सभेपुढे मांडण्यांत आला. यानंतर **मौ. करिमुद्दीन हुसेन** यांनी आपल्या भाषणांत देशाची परिस्थिति लक्षांत घेतां मानपत्र न देणें हेंच योग्य आहे असें सांगून ठरावाला पुष्टि दिली. तसेच श्री. बाबूराव गोखले वकील यांनी कांही शंका विचारून ठरावास अनुमोदन दिल्यावर शेवटीं अध्यक्षांचें समारोपादाखल भाषण होऊन त्यांनी उपसूचनेप्रमाणे कांही शब्द वगळलेला ठराव सभेपुढे मांडला व तो सर्वानुमतें पास झाल्याने अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

# तारतम्य दाखविण्याची हीच वेळ !

कायदेभंग चळवळीचें पर्यवसान, सरकाराशीं तह करण्याच्या मार्गानें,साधण्यांत काय काय अडचणी आहेत याचें विवेचन आम्हीं मागील अंकीं केलें. सरकाराशीं तह करण्याची पद्धतिच वाईट असें आमचें म्हणणें नाहीं. पूर्वी एकदोन वेळां असे तह झालेहि. उलट बार्डोलीची युद्धबंदी तहाशिवाय झाली ! सरकाराशीं तह करण्याला जें मुख्य अनुकूल साधन, म्हणजे शांतताप्रवण अशी सरकारची मनोवृत्ति, ती हल्लीं मुळींच राहिली नाहीं. तिचें एक कारण असें कीं १९३२ सालीं झालेल्या कायदेभंग चळवळीनें सरकार फार चिडून गेलें. विशेषतः जुनें आयर्विन प्रणीत धोरण चुकीचें होतें असें विलायतें-तल्या शिष्ट मुत्सद्यांनीं ठरवून नोकरशाहीचा लगाम सैल सोडला. आणि हिंदुस्थानसरकारानें, कानांत वारें शिरल्याप्रमाणें, सर्व मुलूखभर दडपशाहीचा कसा हैदोस घातला हें जगानें पाहिलेंच !

आपल्या भलेपणानें वजन गांधीजींवर पाडून आपण त्यांना गोलमेज परिषदेला घेऊन जाऊं शकलों, तर आपल्या मुत्सद्देगिरीचा तो एक विजय असें होईलच, तेव्हां तो मिळ-वावा अशी महत्त्वाकांक्षा लॉर्ड आयर्विन यांनी धरली व ती सिद्धीस गेली. जुन्या काळचे विजयी राजे पाडाव केलेल्या प्रतिपक्षीय राजांना लोखंडी सांपळ्यांत किंवा पिंजऱ्यांत घालून आपल्या सैन्याच्या मिरवणुकींतून चालवीत. लॉर्ड आयर्विन यांनीं आपले स्नेहपाश गांधीजींच्या स्नेहपाशांत गुंतवून त्यांना आगबोटींत घालून विलायतेस नेऊन गोलमेज परिषदेंत उभे केलें. त्यामुळे लॉर्ड आयर्विन हे आपल्या सामोपचाराच्या धोरणाचें समर्थन करूं शकले. पण आता लॉर्ड आयर्विन हिंदुस्थानां-तून परत गेले आहेत. गांधीजींविषयींची विलायती लोकांची आश्चर्यबुद्धि व अद्भुतभावना पार नाहींशी झाली आहे. गोलमेज परिषदेचें काम-हि संपून ते सरकारच्या पदरांत पडत आलें आहे. यामुळे सामनीतीचें धोरण बदलून यापुढे हातीं दंडच घ्यावयाचा असें ब्रिटिश सरकारानें मनाशीं पक्कें ठरविलें आहे.

पण हें धोरण नुसत्या दंडनावरहि थांबणारें नाहीं. याहि पलीकडे जाऊन सरकारचा असा निश्चय दिसतो कीं, कॉंग्रेसवाले तह करण्यास तयार झाले तर तो तह हरप्रयत्नानें घडून येऊं द्यावयाचा नाहींच; पण तह करण्यास आले-ल्यांना अशा अटी घालावयाच्या कीं, त्या अपमाना-स्पद वाटून कॉंग्रेसनेच आपण होऊन माघार घ्यावी, आणि त्या रागावर पुनः कायदेभंग सुरू करावा! अशा रीतीनें आयतेंच आपणास दडपशाहीला नवें निमित्त लाभावें; लोकांची कॉंग्रेसविषयीं सहानुभूति नष्ट व्हावी; आणि नव्या सुधारणा अमलांत येतांना कायदेमंडळांची जी पहिली रचना होईल तींत सर्वस्वीं स्वकीयांचाच प्रवेश व्हावा; म्हणजे पुढे दहापांच वर्षें तरी राष्ट्रीय मनो-वृत्तीचा उपसर्ग तेथे आपणास लागावयाला नको !

ही गोष्ट सांगण्याचें कारण इतकेंच कीं कॉंग्रेसनें, मध्यस्थामार्फत काय किंवा स्वतः गांधीजीं-मार्फत काय, तहाचा मार्ग अजीबात सोडून द्यावा हेंच ठीक. आणि यापुढील आपलें धोरण अगदीं स्वतंत्र बुद्धीनें व सरकाराला मनां-तून पूर्णपणें वगळूनच ठरवावें. पण तहाचा मार्ग सोडून दिला तर मग कायदेभंगाच्या चळवळीचें काय करावयाचें असा प्रश्न सहजच येतो. त्याला आमचें उत्तर स्पष्टपणें असें आहे कीं, ही चळवळ आता बंद करावी ! या उत्तरानें भावनावश मनाला एकदम धक्का बसतो हें खरें आहे; पण विशेष प्रसंगीं असले धक्के सोसूनहि योग्य तेंच करावें लागतें. धक्का बसतो तो या विचाराचा कीं, चळवळ थांबविल्यानें कॉंग्रेसनें आपला पराभव कबूल केला असें होतें. पण पराभव हा मानण्यावर आहे. समंजसपणानें बोलावयाचें तर यापुढे चळवळ थांबविणें हा पराभव नाहीं. या बाबतींत आम्हीं गेल्या मार्च महिन्यांत केसरींत सविस्तर विवे-चन केलेंच आहे. म्हणून ते पुनः येथें करीत नाहीं. येथें इतकेंच म्हणतों कीं, चळवळ न थांबविल्यानें कसे काय परिणाम होतील याचा विचार कॉंग्रेस खोल बुद्धीनें करील, तर त्या परिणामांच्या मानानें पराभवाच्या भ्रामक कल्पनेचें भय त्यांना फार कमी वाटेल चालत्या युद्धांत नफानुकसानीचें तारतम्य पाहून, सेनापतीनें एखादें लष्करी ठिकाण सोडून दिलें तर त्याला कोणी पराजय म्हणत नाहींत !

यापुढे सामुदायिक कायदेभंग अशक्य आहे, वास्तविक गांधीजींच्या सुटकेपूर्वींच चळवळ शिथिल होत चालली होती. आणि ही पूर्वींची स्थिति चालू राहिली तर, यापुढे पांचसहा महिन्यांत या चळवळींतील बहुतेक राजबंदी सुटून आपोआप बाहेर येतील असा अंदाज आहे. तो खरा ठरल्यास कोणी नुसते तोंडानें चळवळ चालू आहे असें म्हणण्यापासून कांहींच फायदा उरणार नाहीं. वीज सर्व आभाळभर तळपत असते तोंपर्यंत मेघमंडपाच्या दृश्याची रमणीयता भासते. मेघांनी

नुसतें आभाळ मात्र व्यापून ठेवलें, पण विजेची विध्वंसक चमक नाही व पावसाचा विधायक थेंब नाही, तर या फुकट फुगीर अवडंबरापासून पीकपाण्याला उपयोग नसून, उलट प्राणिमात्राला रोगराईचा उपद्रव मात्र सोसावा लागतो. पन्नास हजार देशभक्तांनी चळवळीमुळे तुरुंगवास पत्करल्यावर आता कोणीं ही चळवळ थांबवावी असें म्हटल्यास तो लाकांचा दोष नाही. तर पराभवाच्या भ्रामक कल्पनेनें ती चालू ठेवणाऱ्या पुढाऱ्यांच्या पदरींच तो दोष घालावा लागेल.

यावर कोणाला कदाचित् अशी तोड सुचेल कीं यापुढे काँग्रेसने सामुदायिक कायदेभंग थांबवावा; पण वैयक्तिक कायदेभंग तेवढा सुरू ठेवावा. आणि म. गांधींच्या ता. ८ मेच्या जाहीरपत्रकावरून वैयक्तिक कायदेभंगाचें भाकित कित्येकांनी आगाऊ वर्तविलेंहि आहे ! पण वैयक्तिक कायदेभंगाचा अर्थच आम्हांला नीटसा कळत नाही. या प्रमाणबद्ध चळवळीच्या मर्यादा किंवा तींत भाग घेणारांची यादी कोण कशी ठरविणार ! चळवळींत पडणारांपैकी अमुक मनुष्य त्या कामाला पात्र व अमुक अपात्र हें ठरविणें म्हणजे फार मोठी जबाबदारी पत्करणें होय. एकूण, या मर्यादित चळवळीने धड भपकेबाज सामुदायिक चळवळीचें श्रेय न मिळता, चळवळ चालू राहिल्याचें निमित्त करून सरकार मात्र दडपशाहीचे व मुस्कटदाबीचे सर्व प्रकार चालू ठेवणार ! आणि हल्लीचा सार्वजनिक कार्याचा कोंडमारा तसाच चालू राहाणार ?

चळवळ बंद केली असें म्हणून तिला एखादें क्रियाविशेषण जोडण्यालाहि, आमच्या मतें, हीच विचारसरणी--कांहीं, नव्हे बऱ्याच, अंशाने लागू होईल. चळवळ 'तूर्त बंद केली,' 'कांही दिवस बंद केली,' 'पुढील ठराव होईपर्यंत बंद केली' इत्यादि शब्दांनी बंद केलेली चळवळ बंद झालीच नाही, ती वाटेल तेव्हा लवकरच चालू करण्याचा धाक या शब्दांतून उघड निघतो, असें म्हणण्यास सरकारास आयतीच सबब सांपडेल. आणि बंद करण्याचा उपयोग प्रत्यक्ष कांही होणार नाही तो नाहीच. "चळवळ बंद केली" इतक्या मोजक्या शब्दांनीच ती बंद केली तर मात्र कोणासच कांही नांव ठेवण्यास जागा राहणार नाही. 'प्रस्तुत चळवळ' किंवा "१९३२ च्या प्रारंभीं सुरू केलली चळवळ" बंद केली असें म्हटल्यानें, काँग्रेसला नवी चळवळ नव्याने पुढे केव्हांहि सुरू करण्याला हक्क राहीलच. हा तिचा हक्क कोणीहि काढून घेऊं शकत नाही. आता काँग्रेसने अशा रीतीने चळवळ बंद केली तर तुरुंगांतले राजबंदी बंधमुक्त होतील काय असा प्रश्न कोणी करील. पण चळवळ बंद करावयाची ती हे कैदी सुटावे येवढ्याकरितां बंद करावयाचीच नाही. आणि चळवळ बंद करणें हेंच योग्य आहे, असें काँग्रेसने विचारपूर्वक ठरवून ती बंद केली तर, आपली सुटका काँग्रेसने केली नाही याबद्दल तिला कोणी दोषहि देणार नाही. कारण जे लोक कायदेभंग करण्याला तयार झाले ते कैदेची सर्व मुदत पुरी करण्यास आनंदाने तयार झाले, असें घेऊन चालावयाचा चळवळवाल्यांचा आग्रहच असतो.

सर्वांत शेवटचा मुद्दा असा कीं, कायदेभंगाची चळवळ सुरू केली ती ज्या कांही नैमित्तिक कारणाकरिता केली तीं आता त्या पूर्वीच्या स्वरूपांत जाग्यावर उरलेलींहि नाहीत. कायदेभंगाची चळवळ नैमित्तिक कार्याकरिता असते अशीच तिची खरी उपपत्ति आहे. ती एकदा सुरू झाली म्हणजे तिला अंतच असूं शकत नाही, अशी उपपत्ति केव्हाहि नाही. 'स्वराज्याकरिता ही चळवळ आहे' असें म्हणणें हें स्फूर्तिदायक पण औपचारिक असतें. तें शब्दार्थानें घ्यावयाचें नाही. कारण तें तसें शब्दार्थानें घेतलें म्हणजे, कायदेभंगाची चळवळ १९३२ त सुरू झाली ती, आहे तशीच, स्वराज्य व स्वातंत्र्य पदरांत पडेपर्यंत, अखंड चाललीच पाहिजे, मध्ये केव्हाहि थांबावयाची नाही, असा अर्थ होईल. पण तें शक्य नाही, समंजसपणाचें नाही, व पूर्वेतिहासांत तसें घडलेलेंहि नाही. अर्थात् ती सुरू करणें व थांबविणें या गोष्टी मधून मधून व नैमित्तिक अशाच घडल्या पाहिजेत; व त्या तशा घडविण्याचें तारतम्य चळवळीच्या पुढाऱ्यांनी ओळखलें पाहिजे. हें तारतम्य ओळखण्याची वेळ या चळवळींत आता आली आहे असें आमचें म्हणणें आहे. आणि या दृष्टीनेंच आम्ही उद्यांपासून पुण्यास भरणाऱ्या काँग्रेस पुढाऱ्यांच्या परिषदेच्या निर्णयाकडे पाहात आहों !

# पुण्यांत भरलेल्या विद्यापीठ परिषदेने काय केलें?

गेल्या शुक्रवारीं व शनिवारीं पुणें येथील कौन्सिल हॉलमध्ये विद्यापीठ परिषद भरली व दोनहि दिवसभर भरपूर चर्चा झाली. या चर्चेंत कोण काय बोलले याचें फार तर अगदी संक्षिप्त दिग्दर्शनच करतां येईल, म्हणून आजच्या अंकांत तसें केलें आहे. शिवाय परिषदेच्या चर्चेचा निष्कर्ष सरकारी चष्म्यांतून काय निघतो याविषयीं एखादें सरकारी जाहीर पत्रक निघेल, तेव्हा तोहि विचार समजून येईल. तथापि एखादा तिऱ्हाईत प्रेक्षक ही परिषद पाहण्यास जाऊन बसला असता तर त्याचा या परिषदेवरून एकंदरीने काय ग्रह झाला असता अशा दृष्टीने दोन शब्द आम्ही लिहीत आहों. कोणतेंहि कर्म सहेतुक असतें. यामुळे तें कर्म आचरिल्यावर त्याची फलश्रुति काय असा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. तसा प्रश्न या परिषदेसंबंधानें पुष्कळांच्या मनांत उत्पन्न होणार व त्याचें उत्तरहि दिलेंच पाहिजे. पण तें देण्यापूर्वी परिषदेचा पूर्ववृत्तांत व तिजपुढे मांडलेलें प्रत्यक्ष उद्देशपत्रक हेहि लक्षांत घेतलें पाहिजे.

हा पूर्ववृत्तांत असा. महाराष्ट्रांत एक नवीन व स्वतंत्र विद्यापीठ निघावें अशी चळवळ आज पुष्कळ वर्षे चालू आहे. १९२४-२५ सालीं मुंबई सरकारानें एक कमिटी नेमली, व तिजकडून मुंबई युनिव्हर्सिटीची सुधारणा कशी काय करावी याची चौकशी करविली. या कमिटीने सर्व बाजूंचा पुरावा घेऊन रिपोर्ट केला. त्यांत मुख्य दोन गोष्टी होत्या. त्या अशा (१) मुंबई विद्यापीठाची नवीन घटना करावी व तिजकरितां नवा कायदा करावा व (२) शक्य तर मुंबई विद्यापीठावरील हल्लीचा कामाचा बोजा कांहींसा कमी करण्याकरितां, अधिकारविभागणीच्या सुप्रसिद्ध तत्त्वानुसार, महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक व सिंध या चार उपप्रांतांत स्वतंत्र विद्यापीठें स्थापन करावीं. यांपैकीं पहिला कार्यभाग उरकण्याकरिता तीनचार वर्षांपूर्वी नवा कायदा करण्यांत आला; व त्यांत ठरल्याप्रमाणें (सेनेट) (नियामकमंडळ) ॲकॅडेमिक कौन्सिल (शिक्षणमंडळ), सिंडिकेट (कार्यकारी मंडळ) अशीं तीन मंडळे स्थापन करण्यांत येऊन, त्यांच्या विद्यमानें हल्ली नवा कारभार सुरूहि झाला आहे. तसेंच नव्या कायद्यांत वरिष्ठ शिक्षण आणि औद्योगिक शिक्षण वगैरे देण्यासंबंधीं मुंबई विद्यापीठाची जी अधिकारमर्यादा वाढविण्यांत आली, तदनुसार मुंबई शहरांत व मुंबई शहराबाहेरहि कांहीं थोडा उपक्रम करण्यांत आला आहे.

दुसरी गोष्ट नवीन स्वतंत्र विद्यापीठें निर्माण करण्यासंबंधाने. युनिव्हर्सिटी कमिटीचा रिपोर्ट सरकाराकडे गेला, तेव्हा तो रिपोर्ट मुंबई विद्यापीठाच्या जुन्या नियामक मंडळाकडे पाठविण्यात आला, व 'यावर तुमचा काय अभिप्राय?' असें विचारण्यांत आलें. तेव्हा नवीन विद्यापीठें योग्य परिस्थितींत काढतां आलीं तर काढावीं असा अभिप्राय नियामक मंडळान देऊन, कांही विशिष्ट सूचनाहि केल्या. त्यांत पहिलें नवें विद्यापीठ महाराष्ट्रांत म्हणजे पुण्यांत व्हावें, व तें अमुक एका प्रकारचें व्हावें, अशी विधायक सूचनाहि केली. या वेळीं मुंबईसरकाराची सांपत्तिक स्थिति अगदी हलाखीची नव्हती. अर्थात् तेव्हाच सरकाराने कमिटीच्या सूचनेप्रमाणे सरकारी ठराव काढून, आपलें धोरण म्हणून जें काय असेल तें प्रसिद्ध करावयास पाहिजे होतें. पण मुंबई सरकारांतील युरोपियन अधिकाऱ्यांना याविषयी विशेष आस्था वाटण्याची अपेक्षा कोणीहि करणार नाही. अपेक्षा करावयाचीच तर शिक्षणखात्याच्या प्रधानाकडूनच ! पण या खात्यांतील प्रधानांच्या कारकीर्दीचा इतिहास गेल्या बारा वर्षांत कसा काय झाला हें प्रसिद्धच आहे. तात्पर्य, प्रधानांच्या डोक्याच्या आडांत उत्साहाचें कांही पाणी असेल तरच तें सरकारी ठरावाच्या पोहऱ्याच्या रूपाने बाहेर निघणार ! म्हणून नवीन विद्यापीठासंबंधाने कोणताहि सरकारी ठराव असा आजवर निघाला नाही, व सरकारी धोरण असें जाहीर झालें नाहीं.

पण महाराष्ट्रांतील लोकांना नव्या विद्यापीठाची खरी हौस ! यामुळे ते निघण्याचा उपक्रम सरकार करील अशा आशेने सहा वर्षांपूर्वी पुणें शहरांत या विषयाची पुष्कळ उलटसुलट चर्चा झाली. ती इतकी सूक्ष्म व भरपूर कीं, 'बाजार भरण्यापूर्वी उचल्यांची तयारी' ही म्हण तिला सहज लावितां आली असती ! पण अशी उचल्यांची तयारी म्हणजे व्यर्थ तयारी असा आक्षेप घेऊन कां होईना, तथापि महाराष्ट्रांत विद्यापीठ असावें तर तें कसें असावें याविषयीं उलटसुलट कल्पनांची उत्कृष्ट छाननी तरी झाली यांत शंका नाही. मध्यंतरीं कांही काळ हा प्रश्न तसाच पडून होता. परंतु अलाकडे या प्रश्नाचा निकाल लावून घेण्याकरिता 'महाराष्ट्र विद्यापीठ असोसिएशन' नांवाची एक संस्था रजिस्टर झाली आहे. शिवाय, रा. न. चिं. केळकर यांची आठ हजार रुपयांची व पुण्यातील सुप्रसिद्ध व्यापारी रा. धोंडोपंत साठे यांची सहा हजारांची अशा दोन रकमा,

विद्यापीठाच्या उद्देशाने, येथील शिक्षणप्रसारक मंडळीच्या अधिकाऱ्यांकडे ट्रस्टच्या रूपाने ठेवल्या गेल्या आहेत.आणखीहि अशाच रकमा जमवावयाच्या आहेत व जमतील. पण या विद्यापीठासंबंधाने सरकारचें कांहीतरी धोरण आधी प्रगट झालें तर, पैसा मिळविण्यचें व मतें मिळविण्याचें काम अधिक यशस्वी रीतीनें करतां येईल अशा समजुतीने, म. वि. पीठाच्या कार्यकारी मंडळातर्फे गेल्या महिन्यांत मुंबईच्या गव्हर्नराकडे डेप्युटेशन पाठविण्यांत आलें. त्यान सरकारी धोरण कांहीतरी प्रकट व्हावें अशी विनंति केली. पण हें धोरण ठरण्यापूर्वी इतर प्रांतांचें याविषयीं काय म्हणणें आहे ते प्रत्यक्ष समजून घेण्याचें एक साधन म्हणून एक परिषद भरवावी, अशी सूचना करण्यांत आली व ती गव्हर्नरसाहेबांनी मान्य केली. व त्याप्रमाणे गेल्या शुक्रवार--शनिवारची ही परिषद भरविण्यांत आली.

अशा रीतीने या परिषदेला मूळ निमित्त म. विद्यापीठ मंडळाच्या उद्योगाचें झालें असलें तरी, परिषदेंत चर्चा व्हावयाची ती प्रादेशिक विद्यापीठें निघण्यासंबंधाने सरकारानें सर्वसाधारण धोरण काय ठरवावें याचीच हवी होती. आणि हाच मुख्य विषय परिषदेच्या कार्यक्रमपत्रिकेंत घालण्यांत आला होता. तथापि म. विद्यापीठाची पोटदुखी बाधणाऱ्या सभासदांनी, मुख्य म्हणजे प्रादेशिक विद्यापीठांसंबंधाने सर्वसाधारण चर्चा करावयाची सोडून एकट्या महाराष्ट्र विद्यापीठावरच टीकेचा सर्व गहजब केला!! असा गहजब करतील अशा कांही सभासदांना निमंत्रणच केलें होतें. मग त्यांनी हा गहजब केला त्यांत काय आश्चर्य? यामुळे चर्चेऐवजीं चिवडा किंवा चीरफाड मात्र झाली! आणि शिक्षणमंत्री दि. ब. कंबळी हेच परिषदेचे अध्यक्ष असल्यामुळे, व समारोप करण्याचा अधिकार त्यांचा असल्यामुळे, ज्यापासून कांहीच कोणाला बोध होणार नाही असले निरर्थक शब्द उपसंहारात्मक बोलून त्यांनी परिषद समाप्त केली. तथापि या परिषदेच्या कामाचा सारांश सरकारी रीतीने प्रसिद्ध होईल तेव्हा तरी कदाचित् सरकारी धोरणाचा सुगावा लागेल, या आशेने त्या धोरणासंबंधाने आज आम्ही कांही म्हणत नाही व म्हणूं शकतहि नाही. मात्र परिषदेची घटना, तिजमध्यें झालेले काम, व निरनिराळया प्रतिनिधींचीं भाषणें यासंबंधाने कोणी लिहील तर त्याला लिहितां येण्यासारखें बरेंच आहे. म्हणून त्यासंबंधाने पुनः केव्हा तरी लिहूं.

# स्फुट सूचना

१ व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांस मानपत्र देण्याचा ठराव गेल्या आठवड्यांत पुणें शहर म्युनिसिपालिटींत आला व तो फार मोठ्या बहुमताने पास झाला. पुण्यांतील नागरिकांचें मत मानपत्रास अनुकूल नाही ही गोष्ट प्रचंड सभा भरून म्युनिसिपालिटींतील सभासदांच्या नजरेस आली होती. इतकेंच नव्हे तर पुण्यांतील देडअडीच हजार मतदारांनी आपल्या सह्यांचा अर्ज म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षांकडे पाठवून मानपत्रास तीव्र विरोध दर्शविला होता. सारांश, लोकमत मानपत्रास सर्वस्वीं विरुद्ध होतें हें यावरून सिद्ध झालें. तथापि या लोकमतास न जुमानता म्युनिसिपालिटीच्या सभासदांनी बहुमतानें ठराव पास केला, यावरून सदर सभासद लोकमतास कितपत जबाबदार आहेत हें कळून येतें. कोणत्याहि शहराची म्युनिसिपालिटी लोकमतनिदर्शक असली पाहिजे. परंतु येथील म्युनिसिपालिटींतील सभासदांची छाननी केल्यास लोकमताचा ओघ एक प्रकारचा असतो, व सभासदांची मनःप्रवृत्ति निराळ्याच प्रकारची असते असें अनुभवास येतें. म्युनिसिपालिटींत निवडून येणें हें मनुष्याच्या राजकीय मतावर किंवा काम करण्याच्या लायखीवर अवलंबून नसून त्याला अवांतर गोष्टीच कारण होतात. राजकारणाचा ज्यांनी विचार केला नाही, व तो विचार करण्याची ज्यांची पात्रताहि नाहीं, असे किती तरी लोक म्युनिसिपालिटींत निवडून येतात!

---

२ म्युनिसिपालिटीच्या पर्वाच्या सभेंत ज्यांनी मानपत्रास अनुकूल मतें दिलीं त्यांपैकीं बरेच जण या नाही त्या कारणानें सरकारी अधिकाऱ्यांवर अवलंबून आहेत किंबहुना कांही त्यांचे मिंधेहि आहेत. अशांनी मानपत्रास अनुकूल मत दिलें म्हणजे पुणेकरांचें राजकीय मत मानपत्रास अनुकूल झालें असें समजणें चुकीचें होय. म्हणून पुणें म्युनिसिपालिटींत मानपत्राचा ठराव पास झाला तो पुणेकरांचा मतनिदर्शक आहे असें सरळपणाने कोणास मानतां येणार नाही. याला दुसरें उदाहरण द्यावयाचें तर कायदेमंडळांचें देतां येईल. कायदेमंडळातून दडपशाहीचे कायदे पास झाले यावरून ते कायदे हिंदी लोकांस संमत होते असें मानता येईल काय? तोच न्याय म्युनिसि-

पालिटीसहि लागू आहे. म्युनिसिपालिटीपुढें मानपत्राचा ठरावच यावयास नको होता. तो एकदा आल्यानंतर एका बाजूला प्रबळ सरकारपक्ष व दुसऱ्या बाजूला दुर्बळ लोकपक्ष यांच्या ओढाताणींत सदर ठराव पास व्हावा यांत नवल नाही. तथापि अशाहि परिस्थितींत ज्यांनी लोकपक्षाची बाजू धैर्यानें व बाणेदारपणानें राखली व ठरावास शेवटपर्यंत विरोध केला त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. त्याचप्रमाणें ज्या व्हाईसरॉयांच्या कारकीर्दींत दडपशाही कळसास पोचली आहे त्या व्हाइसरॉयांस मानपत्र देणाराचा त्यांच्या स्वाभिमानशून्यतेबद्दल व निस्सत्त्वपणाबद्दल आम्ही निषेध करतों.

---

३ बंगाल सरकारानें क्रांतिकारकांचा बीमोड करण्याकरिता जें रान पेटविलें आहे त्यांत अनेक निरपराधी लोकांचीहि कशी जाळपोळ होत आहे याचें एक गमतीचें उदाहरण नुकतेंच घडून आलें. डाक्का येथील सुपरिंटेंडिंग एंजीनियरच्या कचेरींत इमानें इतबारें काम करणाऱ्या व सरकाराची यापूर्वी शाबासकी मिळविलेल्या एका कारकुनाला बंगाल सरकारानें बडतर्फ केलें. या बडतर्फीचें कारण नमूद करतांना सरकार म्हणतें 'तुम्हांला आपल्या मुलाला घरीं चांगली शिस्त लावता आली नाही, किंवा तुमच्या वजनानें तुम्हीं त्याला राजनिष्ठच्या मार्गाला लावलें नाही हा तुमचा अपराध होय!' बडतर्फीचें हें कारण अजब आहे खरें. या वृद्ध गृहस्थाचा मुलगा शरीरानें सशक्त व तरुण आहे. त्याला राजबंदी म्हणून सरकारानें अटक करून बेव्हामपुरच्या तुरुंगांत पूर्वींच ठेवलें असून आतां त्याच्या बापाची नोकरी काढून घेतली आहे! शिष्याच्या अपराधाबद्दल गुरूला दंड व मुलाच्या अपराधाबद्दल बापाला शिक्षा करण्याची दंडनीति विचित्र व विपरीत आहे. परंतु ही शिक्षा कोणाच्या का होईना अपराधाबद्दल असती तर गोष्ट वेगळी. प्रस्तुत प्रकरणांत मुलानें काय अपराध केला हें न्यायकोर्टापुढें सिद्ध झालें नाही व त्याला यापुढेहि न्यायकोर्टापुढें उभें केलें जाणार नाही! अशा स्थितींत बपाला शिक्षा कां, हें एक कोडेंच आहे. बाप मुलाला विशिष्ट वयापर्यंतच शिस्त लावूं शकेल. त्यापुढें त्याचें मुलगा ऐकणार नाही. कदाचित् क्रांतिकारकांना दहशत बसावी व त्यांनी आपल्या आईबापांचे हाल होऊं नयेत म्हणून अशी चळवळीच्या भानगडींत पडूं नये, असा सरकारचा वरील शिक्षा करण्यांत हेतु असावा. हीच या बडतर्फीतील मेख असेल. तथापि या नव्या युक्तीला कितपत यश येतें पाहावें.

# पुण्यांतील विद्यापीठ-परिषद्

महाराष्ट्र विद्यापीठाच्या युक्तायुक्ततेबद्दल विचार करण्यासाठी पुणें येथील कौन्सिल हॉलमध्यें ता. ७ व ८ जुलै रोजीं शिक्षणमंत्री **ना. कंबळी** यांच्या अध्यक्षतेखालीं शिक्षणतज्ज्ञांची एक परिषद सरकारकडून भरविण्यांत आली होती. सदर परिषदेस इलाख्यांतील निरनिराळ्या सरकारी-निमसरकारी कॉलेजांचे प्रिन्सिपॉल, मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु बॅ. चंदावरकर, श्री. न. चिं. केळकर, रा. ब. काळे इत्यादि प्रमुख गृहस्थ उपस्थित होते. दुपारीं बरोबर १२ वाजता नेक नामदार गव्हर्नरसाहेबांनीं प्रास्ताविक भाषण करून परिषदेच्या कामास सुरुवात करून दिली.

### गव्हर्नरसाहेबांचें भाषण

ना. गव्हर्नरसाहेब आपल्या भाषणांत म्हणाले, "मुंबई इलाख्यांतील विद्यापीठाच्या उच्च शिक्षणाबाबतच्या कांही मूलभूत प्रश्नांची चर्चा करून त्याबद्दल सरकाराला सल्ला देण्यासाठी आपणा सर्वांना येथे आज बोलावण्यांत आलें आहे. मुंबई विद्यापीठाच्या कार्याचा कुलपति म्हणून मी जेव्हा विचार करूं लागलों, तेव्हा त्याचें काम दिवसेंदिवस फारच अवजड होत असल्याचें मला दिसून आलें. विद्यापीठावरील कामाचा हा वाढता बोजा कमी करण्याची योग्य वेळ आली आहे कीं नाही असाहि एक विचार माझ्या मनाला चाटून गेला. विद्यापीठाच्या कार्याचा व्याप इतका वाढला आहे कीं, तें काम यापुढें एकाच संस्थेकडून सुव्यवस्थित रीत्या पार पडेल कीं नाही याबद्दल जबर शंका वाटते."

### प्रादेशिक विद्यापीठावरील आक्षेप

"इलाख्यामध्यें स्वतंत्र विद्यापीठ स्थापण्यासंबंधीची एक योजना माझ्यापुढें मांडण्यांत आली आहे. १९२५ सालीं नेमलेल्या विद्यापीठ-पुनर्घटना मंडळानें या प्रश्नाची बारकाईनें छाननी करून इलाख्यांतील महाराष्ट्र, कर्नाटक, गुजराथ आणि सिंध या प्रमुख व नैसर्गिक प्रदेशांत स्वतंत्र विद्यापीठ स्थापण्याबद्दल शिफारस केली आहे. स्वतंत्र विद्यापीठें स्थापल्यानें उच्च शिक्षणाच्या प्रगतीला अधिक मदत व चालना मिळेल असें पुनर्घटना

मंडळाचें मत होतें. सदर प्रश्नावर मी आपलें निश्चित मत आताच देऊं शकत नाही. त्यासंबंधी सरकाराला तुमच्या सल्ल्याची अपेक्षा आहे. त्यापूर्वी आपण कांही महत्त्वाच्या मुद्द्यांचा विचार करावा असें मला वाटतें. १९२५ सालच्या पुनर्घटना—मंडळापुढे असा एक आक्षेप मांडण्यांत आला कीं, 'भाषावार आणि स्थानिक विद्यापीठें स्थापण्यांत आलीं तर त्यामुळे प्रांतिक दुरभिमान बळावेल; त्यांची दृष्टि संकुचित राहील; त्यांत जातीय, व्यापारविषयक किंवा भाषाविषयक मत्सरांना वाव मिळेल. संमिश्र (कॉस्मॉपॉलिटन) विद्यापीठांत मात्र असले अनिष्ट प्रकार संभवत नाहीत. राष्ट्रीय संस्कृति आणि राष्ट्रीय ऐक्य यांना पोषक आणि वर्धक होण्याऐवजीं असलीं प्रादेशिक विद्यापीठें त्यांच्या मुळावरच आल्याशिवाय राहणार नाहीत.' मला आपल्या ना इतकेंच सांगावयाचें आहे कीं, ज्यामुळे इलाख्यांतील निरनिराळ्या विभागांमध्यें असलेला जिव्हाळ्याचा संबंध तुटणार नाही असाच उपक्रम आपल्या हातून व्हावा."

### पैशाचा प्रश्न

"स्वतंत्र विद्यापीठ ताबडतोब स्थापतां येईल कीं नाही या प्रश्नाचा व्यावहारिक दृष्ट्याहि विचार केला पाहिजे. विद्यापीठ स्थापावयाचें तर त्याला पैशाचा भरपूर पुरवठा असणें अत्यंत आवश्यक होय. कार्यक्षम अध्यापक वर्ग ठेवण्यासाठीं अध्यापकांना भरपूर वेतन देण्यांत आलें पाहिजे. तसेंच विद्यापीठाला स्वतःची जागा हवी व त्याजजवळ शिक्षणशास्त्राच्या आधुनिक उपकरणांची सज्जता पाहिजे. सध्या इलाख्याची आर्थिक स्थिति अत्यंत शोचनीय असल्यामुळे नवीन योजनांना सरकार आर्थिक मदत करूं शकणार नाही. पुनर्घटना—मंडळानें सुचविल्याप्रमाणें महाराष्ट्र विद्यापीठ स्थापावयाचें तर प्रथम कमींत कमी दहा लाखांचें भांडवल उभारून २॥ लाखांच्या वार्षिक खर्चाची सोय झाली पाहिजे. शिवाय प्रत्यक्ष विद्यापीठ हालूं-चालूं लागलें म्हणजे जादा खर्च दत्त म्हणून उभे राहतील ते वेगळेच. तिसरा मुद्दा म्हणजे नव्या विद्यापीठांचा मुंबई विद्यापीठाशीं संबंध कोणता राहील हा होय. या बाबतींत मला इतकेंच म्हणावेंसें वाटतें कीं, नवीं विद्यापीठें व जुनें विद्यापीठ यांमध्यें स्नेह आणि सहकार्य कायम राहील अशा रीतीनेच त्यांच्यांतील कार्यक्षेत्रांची वांटणी करण्यांत यावी. असो, एकंदरींत सर्व मुद्द्यांचा विचार करता सध्याच्या स्थितींत एखादें नवें विद्यापीठ स्थापावें या गोष्टीला विरोधच होईल असें वाटतें. असें असलें तरी वर मी मुंबई विद्यापीठाच्या कामाचा जो व्याप दाखविला आहे तोहि दृष्टीआड करतां येत नाही."

गव्हर्नरांच्या भाषणानंतर मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु बॅ. चंदावरकर यांनी गव्हर्नरसाहेबांच्या आभारप्रदर्शनाचा ठराव मांडला व त्याला श्री. न. चिं. केळकर यांनी अनुमोदन दिलें. अनुमोदन देतांना श्री. केळकर यांनी महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधीं आगाऊच सभासदांचीं मनें कलुषित झालेलीं असल्याविषयीं उद्गार काढले.

### कंबळींचा थाट

गव्हर्नर निघून गेल्यावर दि. ब. श्री. कंबळी यांनी अध्यक्ष—स्थान स्वीकारलें. त्यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणांत सांगितलें कीं, "कोणत्याहि नव्या विद्यापीठाला द्रव्य—साहाय्य करण्याची आशा सरकार दाखवू शकत नाही. सध्या कोणतेंहि विद्यापीठ स्थापन करण्याचे मार्गांत द्रव्याची अडचण ही अनुल्लंघनीय आहे. कल्पनेपेक्षा अधिक औदार्याचा पूर वाहून त्यांतून मोठमोठ्या देणग्या विद्यापीठाला मिळाल्या नाहीत, तर ही एकटी एकच आर्थिक अडचण विद्यापीठाचा मार्ग रोधण्यास पुरेशी आहे. तुम्हां सर्वांना ठाऊकच आहे कीं, सरकार मोठ्या विलक्षण अशा आर्थिक पेंचांत सांपडलेलें आहे आणि त्यांतून त्याची सुटका लवकर होईल असें लक्षण दिसत नाही. अशा या दुःस्थितीमुळेच गेल्या वर्षी आम्ही प्राथमिक शिक्षणासाठीं जिल्हा लोकल बोर्डांना देत असलेल्या ग्रँटमध्यें शें. २० टक्के कपात केली. आणि आजहि शें. १४ पर्यंत कपात चालू आहे. ही कपात भरून काढणें हें सरकारचें खजिन्यांत शिल्लक पडतांच पहिलें कर्तव्य आहे. जी गत प्राथमिक शिक्षणाची, तीच दुय्यम शिक्षणाचीहि. त्याचीं साधनें व शिक्षण वर्ग यांची सुधारणा आवश्यक असूनहि तिच्याकडे द्रव्याभावीं दुर्लक्ष होत आहे.

### अडचणींची नामावळी

"याशिवाय दुसराहि एक मुद्दा विचारांत घेतला पाहिजे. तो म्हणजे महाराष्ट्र युनिव्हर्सिटी हें फक्त एका भाषेचें विद्यापीठ बनणार आणि पुणे येथील शेतकी कॉलेज व इंजीनियरिंग कॉलेज यांचें कार्यक्षेत्र तर सबंध इलाख्यापुरतें आहे. आता यावर असें म्हणण्यांत येतें कीं, शिक्षण व परीक्षा यांचें माध्यम महाराष्ट्र विद्यापीठानें मराठी हें ठेविलें, तरी सबंध इलाख्याशीं संबंध असलेल्या या दोन कॉलेजांना तें बंधन लागू करण्यांत येणार नाही. पण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, मराठी भाषा आणि मराठी वाङ्मय तसेंच मराठ्यांचा इतिहास व मराठ्यांची संस्कृति यांच्या अध्ययनाला उत्तेजन देणें हा महाराष्ट्र—विद्यापीठाचा एक उघड उघड उद्देश आहे. अशा स्थितींत वरील दोन कॉलेजांना या नव्या

विद्यापीठाच्या हातीं दिल्याने त्यांची स्थिति काय होईल याबद्दल मन साशंक होतें."

"सध्याच्या मॅट्रिक परीक्षेचें काम अवजड झालें आहे. म्हणून मुंबई विद्यापीठाचा कांही भार हलका करण्याकरिता नवें विद्यापीठ स्थापणें जरूर आहे असें कोणी म्हणतात. पण तुम्हांला हें कबूल केलें पाहिजे कीं, सर्व विद्यार्थ्यांना समान असणारें असें कांही एक प्रमाण राहणें जरूर आहे. याला उत्तर म्हणून 'विद्यापीठांच्या संयुक्त मंडळाची' कल्पना सुचविली जाते. पण मला वाटतें त्या मंडळावर हल्लींच्या मुंबई विद्यापीठा इतकाच भार पडेल. या सर्व अडचणींतून कसा मार्ग काढावयाचा याचा विचार तुम्ही करा. तुम्ही जी टीका व सूचना कराल त्यांचा सरकार अवश्य विचार करील. मात्र कोणत्याहि मुद्द्यावर मत असें घेतलें जाणार नाही."

### मुद्द्यांची खिचडी

विद्यापीठाच्या विषयाच्या चर्चेला प्रारंभ बडोदा कॉलेजचे प्रि बरोज यांनी केला ते म्हणाले, "नवीन विद्यापीठ स्थापण्याने मुंबई इलाखा दुभंगून जाईल. मुंबई विद्यापीठाच्या खांद्यांवरील ओझें हलकें करण्यासाठीं मी एक योजना सुचवितों. ती ही कीं, सर्व कॉलेजांनी एक होऊन विद्यार्थ्यांची मर्यादित संख्याच प्रविष्ट करून घ्यावी. असें झाल्याने अपेशी विद्यार्थ्यांचें प्रमाण कमी होईल आणि सुशिक्षितांची बेकारीहि नाहींशी होईल. लायक व निवडक विद्यार्थ्यांनाच कॉलेजामध्ये प्रवेश द्यावा." यानंतर चर्चा कोणत्या पद्धतीनें चालावी याबद्दल वाद झाला. सर्व मुद्द्यांवर एकाच वेळीं प्रत्येक वक्त्याने बोलून घ्यावें असें मत बॅ. चंदावरकर यांनी मांडलें. तर एकेक विषयाचा विचार पृथक् व्हावा असें प्रि. घारपुरे, रा. ब. काळे, दि. ब. डोंगरसिंग पाटील, वगैरे सभासदांनी प्रतिपादलें. श्री० न. चिं. केळकर म्हणाले, 'या परिषदेपुढे चार मुद्दे विचारासाठी आहेत. आणि परिषदेचे काम दोन दिवस चालणार आहे म्हणून प्रत्येक प्रश्नाला अर्धा दिवस द्यावा. विद्यापीठ प्रादेशिक असावें हा प्रश्न जर निकालांत निघाला, तर इतर प्रश्नहि भराभर सुटतील!' शेवटीं अध्यक्षांनी असा निर्णय दिला कीं, सर्व मुद्द्यांवर एकाच वेळीं वक्त्याने बोलावे!

### एकराष्ट्रीयत्वाला खो!

यानंतर दि. ब. डोंगरसिंग यांनी महाराष्ट्र विद्यापीठाच्या कामीं आर्थिक अडचण आड येणारी आहे असें सांगितलें. बॅ. चंदावरकर म्हणाले, 'नवीन विद्यापीठ स्थापावें असें म्हणणाऱ्या लोकांच्या मनांत राजकीय हेतु वावरत असतो' हा आक्षेप निराधार आहे. मात्र प्रादेशिक विद्यापीठाचा मला अगदी मनापासून तिटकारा आहे. हिंदुस्थान हें एक राष्ट्र व्हावें असें माझें ध्येय आहे. त्याला प्रादेशिक विद्यापीठानें खो बसतो. बनारस व अलीगड येथे स्थापन झालेलीं दोन विद्यापीठें म्हणजे हिंदु व मुसलमान या दोन संस्कृतींचीं आदिपीठेंच होत. त्यांच्या स्थापनेपूर्वी देशांत जात्यभिमान जितका होता त्यापेक्षा त्यांच्या स्थापनेनंतर तो वाढला हें उघड आहे. मी महाराष्ट्र विद्यापीठाच्या योजनेला विरोध करीत नाही मात्र मुंबई विद्यापीठाच्या शिरावर कामाचा बोजा वाढला आहे असें म्हणणारांनी बंगालकडे पाहावें. तेथील कॉलेजांची व पदवीधरांची संख्या येथल्यापेक्षा किती तरी अधिक आहे. पदवीधरांना शिक्षण देण्याचें कार्य मुंबई विद्यापीठ करीत नाही असा आक्षेप घेतला जातो. पण पुण्याच्या विद्यापीठाच्या योजनेंत तरी त्या शिक्षणाची काय सोय आहे? मराठ्यांच्या संस्कृतीचें संगोपन करणें हा उद्देश तर मला समजतच नाही. ती संस्कृति म्हणजे सर्व राष्ट्राचें धन आहे. शिवाजी हा सर्व हिंदुस्थान देशाची विभूति आहे असें कोण म्हणणार नाही? मराठी भाषेचा उत्कर्ष करणें हा उद्देश ठीक आहे. पण महाराष्ट्रांत एकच भाषा नांदते असें कोठें आहे?'

### स्वतंत्र विद्यापीठें पाहिजेत

वाडिया कॉलेजचे प्रि. खाड्ये यांनीं आर्थिक अडचण दुस्तर नाही असें सांगून ते म्हणाले, "कोल्हापूर येथे स्वतंत्र विद्यापीठ निघत आहे. त्याचप्रमाणें सांगली येथें दक्षिणी संस्थानांचें विद्यापीठ स्थापन होईल. पुणें येथे रेसिडेन्शिअल विद्यापीठ अस्तित्वांत येणें जरूर आहे."

### स्थानिक आकांक्षांची पूर्तता

प्रि. शहाणी यांनी मुंबई विद्यापीठाच्या कारभारावर टीकास्त्र सोडलें आणि प्रादेशिक विद्यापीठांची आवश्यकता प्रतिपादली. विल्सन कॉलेजचे प्रि. रे. केलॉक यांनी मातृभाषेंतून शिक्षण देण्याची जरुरी पटवून दिली. रा. ब. काळे म्हणाले, "१९२४ सालीं विद्यापीठाची सुधारणा कमिटी बसली होती. तिने स्वतंत्र विद्यापीठाचा पुरस्कार केला. त्यानंतर आता ९-१० वर्षांनी विद्यार्थ्यांची संख्या बेसुमार वाढलेली असतांना नवीन विद्यापीठाची गरज अधिकच भासत आहे. प्रादेशिक विद्यापीठामध्ये स्थानिक आकांक्षा पूर्ण होण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ, गुजराथ विद्यापीठ व्यापारी शिक्षणावर भर देईल तर मुंबई विद्यापीठ धदेशिक्षणाकडे लक्ष पुरवील आणि पुणें विद्यापीठ वाङ्मयावर कटाक्ष ठेवील. अर्थात् या विद्यापीठांत चुरस लागण्याची

कांहींच भीति नाही. डेक्कन कॉलेज किंवा तशाच इतर शिक्षण-संस्था बंद करून सरकार जे पैसे शिलकेंत टाकीत आहे त्यांचा विनियोग नवीन विद्यापीठें स्थापण्याकडे व्हावा हें उचित आहे. सरकारच्या शिक्षणखात्याच्या बजेटावर नवा बोजा न टाकतां महाराष्ट्र विद्यापीठाला पैशाचा पुरवठा कसा करतां येईल हें मी दाखवूं शकेन."

**'छदामहि देणार नाही'**

या शेवटच्या विधानावर वक्ते व अध्यक्ष यांची चकमक उडाली. दि. ब. कंबळी म्हणाले, "नव्या योजनेला सरकार एक छदाम देणार नाही." उलट रा. ब. काळे यांनी टोला लगावला कीं, "आपण माझीं मतें मागितलीं व तीं मी देत आहें." कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे प्रि. बाळकृष्ण म्हणाले, "प्रादेशिक विद्यापीठाची मागणी गुजराथ किंवा सिंध यांपैकीं कोणत्याहि प्रांताने केलेली नाही. विश्वविद्यालय हा शब्दच प्रादेशिकत्वाच्या संकुचित स्वरूपावर घाव घालणारा आहे. त्यांतूनहि नवें विद्यापीठ स्थापावयाचेंच असेल तर ते एका-वयवी असावें".

## आर्थिक हानि होणार नाही

यानंतर डॉ. बर्न्स, प्रो. वाडिया वगैरे वक्तयांनी नव्या विद्यापीठाला विरोध करणारीं भाषणें केलीं. त्यांचा मुख्य मुद्दा असा कीं, मुंबई विद्यापीठाचें सामर्थ्य व द्रव्यनिधि खर्ची करूं नये. हा मुद्दा खोडून काढतांना प्रि. ध. रा. गाडगीळ म्हणाले, "मुंबई विद्यापीठाची शिल्लक ३० लाखांवर आहे. केवळ यंदाची शिल्लक २ लाख रु. आहे. संकल्पित अशीं सर्व प्रादेशिक विद्यापीठें मूर्त स्वरूप पावलीं तरी मुंबई विद्यापीठाची एक लाख रुपयांहून दरसाल अधिक हानि होणार नाही." याला उत्तर म्हणून प्रि. हॅमिल म्हणाले, "मुंबई विद्यापीठ आता धंदेशिक्षणाकरिता पैसे खर्च करीत आहे." प्रि. शहा यांनीं महाराष्ट्र विद्यापीठांतील अडचणींचा पाढा वाचला.

## जात्यंधतेच्या कोलत्या

दुसरे दिवशीं म्हणजे शनिवारीं दुपारीं परिषदेचें काम पुढे सुरूं झालें. नवीन विद्यापीठाला पैशाची वाण पडणार नाही असें प्रि. गोखले यांनी सांगितलें. रा. ब. बोले यांनी विरोधाच्या कोलत्या फेकल्या. नवीन विद्यापीठ जात्यभिमानाने चालेल अशी भीति प्रदर्शित करून ते म्हणाले, 'अशा विद्यापीठाला पैसा चारण्यापेक्षा तो प्राथमिक शिक्षणावर खर्च करावा.' सेंट झेवियर कॉलेजचे फादर डूर यांनी स्वतंत्र विद्यापीठांना व मातृभाषेच्या माध्यमाला जोराचा पाठिंबा दिला. ते म्हणाले, मुंबई विद्यापीठ फक्त मुंबई शहरापुरतेंच राहिलें तरी चालेल.' श्री. दळवी यांनी मुंबई सिंडिकेटचे म्हणून असें मत सांगितलें की, "महाराष्ट्रांत प्रादेशिक विद्यापीठ नसावें. एकावयवी व अध्यापन करणारें असें विद्यापीठ निघाल्यास चालेल. महाराष्ट्र विद्यापीठाच्या योजनेंत मराठीला लवकरच बोध-भाषा करण्यांत येईल असें दिसत नाही. उलट मुंबई विद्यापीठाने देशी भाषांच्या सन्मान्य शाखा स्थापन केल्या आहेत. मॅट्रिकला देशी भाषा ठेवल्यापासून संस्कृत वगैरे प्राचीन भाषा मागे पडत चालल्या, म्हणून कॉलेजांतील पहिल्या दोन वर्गांत देशी भाषांना स्थान दिलें नाही. याला सर्व भागांतील सभासदांनी संमति दिली होती. मुंबई विद्यापीठाचे अवयव न तोडता निरनिराळीं शिक्षण-केंद्रें स्थापावीत. यांतील तत्त्व पंजाब युनिव्हर्सिटी कमिटी, सॅडलर कमिशन, वगैरेंनी मान्य केलें आहे. महाराष्ट्रांत नवीन विद्यापीठ स्थापावयाचेंच तर तें अध्यापन करणारें असावें."

## प्रांतिक स्वायत्ततेचें तत्त्व

रा. ब. आसवले यांनी ब्राह्मण पुढाऱ्यांना शिव्या देण्याची हौस रा. ब. बोले यांप्रमाणेच फेडून घेतली व प्राथमिक शिक्षणाचा कळवळा दाखविला. प्रि. महाजनी म्हणाले, "आमची मागणी महाराष्ट्र विद्यापीठ ताबडतोब स्थापावें अशी नाही, तर अशा विद्यापीठाला मान्यता दिल्याचा जाहीरनामा सरकारनें काढावा एवढीच आहे. बॅ. चंदावरकर म्हणतात त्याप्रमाणें या विद्यापीठानें एकराष्ट्रीयत्वाला खो बसणार नाही. अधिकारविभागणी करून प्रांतिक स्वायत्तता स्थापण्यांत येतेंच कीं नाही? तीच दृष्टि प्रादेशिक विद्यापीठाचे बाबतींत ठेविली पाहिजे." रँ. पावटे, प्रि. तावडे, प्रि. लिमये, श्री. भास्करराव जाधव वगैरे वक्तयांनी उलट-सुलट मतें प्रतिपादन केल्या-नंतर श्री. न. चिं. केळकर यांनी तास ते सव्वा तास भाषण केलें. (तें पुढील अंकीं देण्यांत येईल) माजी शिक्षणमंत्री दि. ब. देसाई यांनी प्रादेशिक विद्यापीठाला विरोध केला. नंतर अध्यक्ष ना. कंबळी यांचें समारोपाचें भाषण झालें.

ते म्हणाले, "गेले दोन दिवस परिषदेमध्ये जो वादविवाद झाला, त्यासंबंधी सरकार लवकरच एक सरकारी पत्रक काढणार आहे. झालेल्या चर्चेचा सरकार काळजीपूर्वक परामर्ष घेईन एवढें मी आश्वासन देतों." शेवटीं बॅ. चंदावरकर यांनी अध्यक्षांचे आभार मानल्यावर परिषदेचें काम समाप्त झालें.

# महाराष्ट्र विद्यापीठ–परिषद

## श्री. न. चिं. केळकर यांचें भाषण

[ सदर परिषदेपुढे सर्वांत मोठें व सर्वांत महत्त्वाचें भाषण रा. केळकर यांचें झालें व त्यावरून परिषदेचा रागरंग वाचकांच्या लक्षांत येण्यासारखा आहे. म्हणून त्या भाषणाचा सविस्तर सारांश आम्हीं मुद्दाम दिला आहे. —सं. के. ]

"आता वेळ थोडा उरला आहे म्हणून मी आपलें भाषणहि फार लांबविणार नाहीं.

( अध्यक्ष—तुम्ही महाराष्ट्र युनिव्हर्सिटी योजनेचे मुख्य चालक आहां. म्हणून तुम्हांला मी भरपूर वेळ देणार आहें.)

आपण मला भरपूर वेळ देणार याबद्दल मी आपला आभारी आहें. आणि कदाचित् मी त्याचा भरपूर उपयोगहि करीन. पण नवीन विद्यापीठाच्या योजनेचा मी मुख्य उत्पादक किंवा चालक हा जो मान आपण मला देतां तो मात्र मला स्वीकारतां येत नाहीं. तो मान १९२४–२५ च्या मुं. यु. रिफॉर्म्स कमिटीकडे जातो. शिवाय या परिषदेंत, चोराला सोडून संन्याशाला बळी द्यावा त्याप्रमाणे, नव्या प्रादेशिक विद्यापीठाची कल्पनाच तेवढी चर्चेला घेणें योग्य असतां, तिचा सर्व विरोधी भर महाराष्ट्र विद्यापीठावर दिला गेला ही माझी कालची तक्रार आजहि शिल्लक आहे.

( अध्यक्ष—मी अध्यक्ष या नात्यानें कालचा दिलेला निर्णय तुम्ही अमान्य करतां काय ? )

आपला निर्णय मी अमान्य कसा करूं ? पण तो देण्याचा आपल्याला जसा हक्क होता तसा त्या निर्णयाचे परिणाम कसे घातक झाले हें सभेला जाणविण्याचा उलट हक्क मलाहि आहे. कारण काल व आज दोन दिवस सभासदांनी, मुख्य विषय सोडून, महाराष्ट्र विद्यापीठाचाच तेवढा विषय विनाकारण पुढे मुद्दाम ओढून, कुचेष्टेने त्यावर जळजळीत टीकेचा भडिमार केला हा अन्याय नव्हे तर काय ? राजे लोकांच्या घरीं अशी चाल असते कीं,राजपुत्राने अपराध केला तर त्याची शिक्षा म्हणून एखाद्या गरीब नोकराला छड्या व चाबूक मारतात! तसाच प्रकार हा झाला. पण इतर सभासदांनी कांहीं एका हेतूने जी दिशाभूल केली तिला मी बळी पडणार नाहीं हें मात्र निश्चयाने सांगतों. महाराष्ट्र विद्यापीठाचें वकीलपत्र मीं या सभेंत घेतलेलें नाही. तिची योजना किंवा तिचा द्रव्यनिधि याविषयींहि मी एक शब्ददेखील तुम्हांला सांगणार नाही. कारण परिषदेच्या कार्यक्रमपत्रिकेंत, पहिला चर्चेचा मुद्दा म्हणून, नवीन प्रादेशिक विद्यापीठाचा जो सरकारी रीतीने घातला गेला त्याला कांही सभासदांनी बगल दिली. पण तोच मुद्दा नेमका मी आपणापुढे मांडणार आहे.कारण तो मुद्दा सर्वसाधारण आहे, तत्त्वाचा आहे. अर्थात् त्यावर जो निर्णय होईल तो महाराष्ट्र विद्यापीठालाहि लागू होईलच.

### करोल ब्राह्मणेतरांचाच रिपोर्ट

प्रत्येक टीकाकाराला प्रत्येक मुद्द्यावर मी वेगळें उत्तर देणें शक्य नाही. आणि कांही टीकाकारांना तर मी मुळींच उत्तर देणार नाही. नव्या विद्यापीठाची कल्पना मीं काढलेली नाही; ती वर सांगितलेल्या कमिटीनेच काढली आहे. ही कल्पना पुण्यांत माझ्या सुपीक डोक्यांतून निघाली असा आक्षेप एका वर्तमानपत्रात एकाने घेतला आहे ! त्याला उत्तर हेंच कीं, सगळ्याच कल्पना मेंदूंतून निघतात ! आणि नवी कल्पना निघण्याला आधी मेंदू चांगला लागतो. तो आपल्या डोक्यांत आहे कीं नाही याचा विचार आक्षेपकाने आधी स्वतःचें डोकें खाजवून करावा ! कमिटींतील सभासदांच्या डोक्यांत अशा मोठ्या कल्पना जन्मण्याइतका मेंदू होता हें मात्र खास. ही कल्पना बामणांनी काढली असा एक आक्षेप. पण कमिटीवर चौदा सभासद होते त्यांत डॉ. रँ. परांजपे याशिवाय एकहि ब्राह्मण नव्हता. आणि डॉ. परांजपे हे कसे काय ब्राह्मण आहेत, हें लोक जाणतातच. माझा अर्थ असा कीं, माझ्यासारख्या ब्राह्मणावर जे आरोप ब्राह्मणेतर करूं शकतील ते परांजपे यांजवर करतां येणार नाहींत इतके ते उदारमतवादी आहेत. पण त्याहून मौज ही कीं, या अर्ध्यामुर्ध्या ब्राह्मणाचीहि त्या रिपोर्टावर सही कांही कारणाने झाली नाही. मिळून उरले तेराच्या तेरा करोल ब्राह्मणेतर ! त्यांना वाटल्यास नांवें ठेवा. पुण्याच्या बामणाला कां नांवें ठेवतां? या तेरांत कोणी युरोपियन, कोणी अनुभविक व्यापारी व अनेक विद्वान असे लोक आहेत. त्यांनीच नव्या विद्यापीठाची कल्पना सुचविलेली आहे. त्यांच्यावर तुम्हांला जातिद्वेषाचा किंवा गुप्त राजकीय हेतूचा आरोप करतां येणार नाही !

### विद्यापीठाची परंपरा

आता या कल्पनेची परंपरा पाहा. १९२५ सालीं कमिटीचा रिपोर्ट झाला. १९२६ सालीं मुंबई-सरकारानें तो मुं. युनिव्हर्सिटीकडे पाठवून अभिप्राय मागितला. तेव्हां मुख्य सेनेट सभेनें, सिंडिकेट सभेनें नव्हे, रिपोर्टातील शिफारशींना पाठिंबाच दिला. तेव्हां सहजच वाटलें कीं, सरकार एखादा ठराव काढून आपलें धोरण जाहीर करील. पण तेव्हांचे शिक्षणमंत्री पडले आमच्या जाधवरावासारखे! तेव्हा त्या प्रश्नाचें काय झालें असेल हें मनांत ओळखालच. पण दुर्दैवानें १९२८ सालीं मुं. यु. चा नवा कायदा झाला. त्यांत संभवित नव्या विद्यापीठांच्या कल्पनेचा स्पष्ट उल्लेखच केला गेला. प्रि. हॅमिल म्हणतात कीं, 'या कायद्याच्या सरनाम्यांत मुं. यु. ने उच्च शिक्षणाची विशेष सोय करावी, असा हेतु दर्शविला आहे." होय; मी तें नाही कोठे म्हणतो ! युनिव्हर्सिटीने त्याचें प्रत्यक्ष काय केलें हा प्रश्न वेगळा. पण सरनाम्यापेक्षा अॅक्टाचें तेरावें कलमच येथे अधिक लागू पडतें. कारण तेथे नव्या घटनेंत एक्स-ऑफिशिओ फेलोज व सभासद कोण असावेत हे सांगतांना, मुंबई इलाख्यांत नवीं विद्यापीठें झालीं तर त्यांचे व्हाइस चॅन्सेलर हे असे सभासद असावेत असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून नव्या विद्यापीठांचा संभव हा कायदा करतेवेळीं सरकारला स्पष्ट दिसत होता.

असो, तात्पर्य १९२४पासून १९२८पर्यंत नव्या विद्यापीठांच्या कल्पनेची परंपरा अखंड चालू राहिली तरी मुंबई-सरकार आपलें धोरण प्रकट करीत नाही, हें पाहूनच या नव्या चळवळीचा आम्हीं उपक्रम केला आहे. पण तोहि एकट्या महाराष्ट्राला नवें विद्यापीठ द्यावें म्हणून नव्हे; तर गुजराथ,कर्नाटक, सिंध यांनाहि तें मिळावें म्हणून. पैकी सिंध आता वेगळा होणार. तेथील लोकांना स्वतःच्या कायदे-कौन्सिलांत नव्या विद्यापीठाचा कायदा करवून घेतां येईल. त्याला मुं. यु. विरोध कसा करणार हें सांगा पाहूं ?

### विद्यापीठें निघणारच !

कर्नाटकचे म्हणून प्रतिनिधि या सभेला आले. त्यांनी येथे महाराष्ट्र युनिव्हर्सिटीला विरोध केला. तो ते करणारच. पण कर्नाटक प्रांतांत एकीकरणाची चळवळ सुरू आहे व प्रांतिक एकीकरण विद्यापीठाशिवाय सार्थ व सफल होत नाही हें त्यांनाहि माहीत असेल. पुण्याच्या या परिषदेंत त्यांनी खुशाल वाटेल तें बोलावें! गुजराथेंतील एका प्रतिनिधीनें या सभेंत नव्या विद्यापीठाला पाठिंबाच दिला. परवा दि. ब. ध्रुव, बनारस युनिव्हर्सिटीचे प्रिन्सिपाल, यांच्या अध्यक्षतेखाली अहमदाबादेस सभा भरून गुजराथी विद्यापीठाची मागणी करण्यांत आली अशी तारच आली आहे. बडोद्याचे अधिपति श्री. सयाजीराव यांनी गुजराथ विद्यापीठाची योजना तयार करून ठेवली आहे हें प्रसिद्ध आहे. तात्पर्य, महाराष्ट्राच्या द्वेषानें इतर प्रांतांतील लोक कांहीहि बोलले तरी, त्यांच्या प्रांतांत लोकमत खरें कसें आहे हें योग्य साधनांनी अजमाविल्यास तें कळून येणारें आहे; व तें अनुकूलच आढळेल असें मला वाटतें. तात्पर्य, नव्या विद्यापीठाच्या कल्पनेचा इतिहास व परंपरा ही अशी आहे. म्हणून तिचा त्याग करावा व धोरण बदलावें असें जे म्हणतात त्यांच्यावरच त्याच्या शाबितीचा सर्व बोजा येऊन पडतो. स्वतः माझा तर विश्वासच आहे कीं, तुम्ही कांहीहि म्हणा, कांही करा, नव्या विद्यापीठाची कल्पना रुजणार व फलप्रद होणार. तिला तुम्ही जादा विद्यापीठ म्हणा, प्रादेशिक म्हणा, भाषिक म्हणा, उपप्रांतिक म्हणा, स्थानिक म्हणा, किंवा काय वाटेल तें इतर नांव द्या.

### चंदावरकर काय म्हणाले ?

यानंतर आता मी खुद्द मुंबई विद्यापीठासंबंधानें दोन शब्द बोलतों. कारण नव्या पीठांच्या योगानें मुंबई विद्यापीठाचें नुकसान होण्याचा संभव कोणासहि वाटतो. प्रथम मला व्हाइस चॅन्सेलर विठ्ठलराव चंदावरकर यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले पाहिजेत. कारण त्यांनी भाषण करतांना आमच्या टीकाकारांना परस्पर उत्तर देऊन, आमचे हेतु शुद्ध आहेत, विद्यापीठ मागण्यांत आमचा राजकीय हेतु नाही, उच्च संस्कृतीच्या दृष्टीने विद्यापीठ मागण्याला पुण्याची पात्रता आहे इ. उदार उद्गार काढले. तसेच भावी प्रतिस्पर्धी संस्थेबद्दलहि त्यांनी समर्थन न केलें तरी द्वेष प्रकट केला नाही. अतिशय विनत भावानें व किंबहुना स्वतःकडे कमीपणा घेऊन ते म्हणाले, "मुंबई युनिव्हर्सिटीच्या चुका असतील त्या सुधारण्याची आमची इच्छा आहे. आम्हांला एक वेळ संधि तरी देऊन पाहा." विलायतेंत गवती मैदान तुडवूं नये म्हणून पाट्या लावलेल्या असतात. त्यांवर "गवत उगवण्याला संधि द्या" असे मार्मिक शब्द लिहिले असतात,त्यांची मला आठवण झाली.

### हॅमिल यांचा कांगावा

पण मी चंदावरकर यांना असें सांगतों कीं, अशी विनम्र प्रार्थना करण्याचें तुम्हाला कांहीच कारण नाही. नवें विद्यापीठ मागण्यांत कोणाचाहि हेतु मुं. यु. ला दोष देण्याचा, पायमल्ली करण्याचा, उणेंदुणें काढण्याचा नाही. आणि आपल्या शुभ्र कीर्तीच्या वस्त्रावर नव्या

विद्यापीठाच्या मागणीने दोषांचा शिंतोडा उडतो, अशीहि भावना तिने करून घेऊं नये. तिने आजवर पुष्कळ काम केलें, चांगलें काम केलें. अजूनहि चांगलें काम ती करील. तिच्या कर्तृत्वाविषयीं कोणालाहि शंका नाही. तिच्या प्रचंड कामाच्या व्यापाचें वर्णन कोणीं केलें तर तें तिची अपात्रता जाणविण्याकरिता नव्हे. किंवा तिच्या संपत्तीचें वर्णन केलें तर तिचा हेवा वाटून किंवा कायदेशीर हिस्सा मागण्याकरिता नव्हे. वास्तविक तिच्या संपन्नतेचें समर्थन करतांना प्रि. हॅमिल यांनी केला तसा कावा किंवा कांगावा करण्याचें कारण नव्हते. कारण तिच्या लाखों रुपयांच्या शिलकी रकमेला रुपये न म्हणतांना त्यांचे त्यांनी मुद्दाम पौंड करून सांगितले. हेतु हा कीं, एकदम तेरा—चौदा पट कमी संख्या व्हावी. पण या युक्तीने जगांतलि समुद्राचें पाणीहि फार थोडें असें म्हणतां येईल. कारण अवघे सातच समुद्र! काय अधिक आहेत!! मुंबई युनिव्हर्सिटीचे लाख रुपये विलायतेंत का खर्च व्हावयाचे आहेत म्हणून त्यांचे पौंड करून सांगावेत? असला कोटिक्रम साधक न होतां बाधकच होतो हें त्यांनी पुरें लक्षांत ठेवावें.

## आम्हाला संधि द्या

नवें विद्यापीठ मागतांना आमची द्वेषबुद्धि मुळीच नाही. तर अधिकारविभागणी, कार्यविभागणी, हें लौकिक कार्यांतील महत्तत्त्व लक्षांत घेऊनच मागणी करण्यांत येत आहे. लौकिकापेक्षाहि कौटुंबिक व्यवस्थेंतील उदाहरण दिलें तर तें अधिक पटेल. युरोपियन समाजांत अशी चालच आहे कीं, मुलगा कर्ता झाला म्हणजे तो आपलें बिऱ्हाड वेगळें करतो. पण त्याचा अर्थ तो भांडून निघाला असा होत नाही. तर मनुष्य वयांत आल्यावर त्याने आपला कारभार आपण करावा अशा समजुतीने! अशा वेळीं चंदावरकर यांनी शब्दयोजना केल्याप्रमाणे "बाळ, आम्हांला संधि तरी देऊन पाहा" असें आई-बाप म्हणत नाहीत. कारण तसें म्हणण्याचा प्रश्नच नसतो. सवत्या सुभ्याची योजना उभय पक्षीं हौसेनेच होते. आई-बाप मुलाला निघतांना प्रेमाने आशीर्वाद देतात व मुलगा ते कृतज्ञतेने स्वीकारतो. कदाचित् या सवत्या सुभ्याचा बस प्रथम नीट बसावा म्हणून आईबाप त्याला कांही तरी आपल्या पैशांतून देणगीच देतात! तात्पर्य, संपन्न अशा मुंबई युनिव्हर्सिटीने नवीन विद्यापीठांना सुरुवातीला देणग्या दिल्या तरीहि तें शोभेल. मग चंदावरकरांना विचारूं का कीं, तसें कांही करण्याचा विचार आहे काय? कारण इतर विद्यापीठें नव्हतीं, मुंबईचें एकटें एकच होतें, अशा वेळीं इलाख्याच्या सर्व भागांतून ज्या देणग्या मिळाल्या त्यांनीच मुंबई-पीठाची संपन्नता सजली आहे. पण तो मुद्दा विनोदाचा म्हणून वाटेल तर मी बाजूला ठेवतों.

## वेगळें पीठ कां?

आता प्रादेशिक विद्यापीठावरील कांही आक्षेपांना उत्तर देतों. पहिला हा कीं, अशा विद्यापीठांनी फाटाफूट होते व दुही माजते. पण हा आक्षेप खरा नाही. वेगळी व्यवस्था करणें यांत फुटून निघण्याची वृत्ति असतेच असें नाही. वेगळ्या व्यवस्थेंत अधिक सोय व अधिक कार्यक्षमता असते म्हणनच ती करावयाची. मी असेंच म्हणणारा आहे कीं, सर्व हिंदुस्थान हा एकच देश व अविभाज्य देश आहे व असला पाहिजे. ब्रिटिश मुलुखाला उद्देशून मी हें म्हणतोच पण त्यांत फारसें स्वारस्य नाही. कारण एकाच इंग्रजी राज्याखाली असल्यामुळे ब्रिटिश हिंदुस्थान हा सर्व एक देश आहेच आहे. पण देशी संस्थानांतून तेथील प्रजेसंबंधी मी बोलतों तेव्हाहि हेंच प्रतिपादितों कीं, संस्थानें व ब्रिटिश मुलूख मिळून सर्व एक व अविभाज्य देश आहे व असला पाहिजे. पण कोणतेंहि ध्येय व त्याचा व्यवहार यांचा मेळ घातला पाहिजे. तो न घातला तर हास्यास्पदता निर्माण होते. ब्रिटिश मुलुखच नुसता घेतला तरी त्यांत कारभाराच्या सोयीकरिता प्रांत पाडलेच आहेत कीं नाही? फार काय, पण या एकाच मुलखांतील एकेका प्रांतांत कांही ठिकाणीं अनेक विद्यापीठें आहेतच कीं नाहीत? एवढेसें इंग्लंड! एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत प्रवास करण्यास बारा तासहि लागत नाहीत. पण या एवढ्याशा भागांत दहा—वीस विद्यापीठें कां असावींत? तीं काय त्या लोकांना दुहीची—भांडखोरीची आवड म्हणून?

## आम्ही भांडखोर नाही!

यूरोपमध्येहि अशींच लहान लहान विद्यापीठें आहेत. याचें कारणच हें कीं, राजकीय सत्ता व सांस्कृतिक सत्ता यांचीं क्षेत्रें व अधिकारमर्यादा समव्याप्त असणें शक्य नसतें. आम्ही वेगळें विद्यापीठ मागतों म्हणून एकाचें ध्येय सांगून, व आम्हांला भांडखोर, फुटून वागणारे, सवता-सुभावाले म्हणून खिजवितां काय? पण आक्षेपकांचें तोंड बंद करण्यासारखें एक उत्तर मजजवळहि आहे. तें असें कीं, हिंदुस्थानाच्या नवीन राज्यघटनेंत ज्यांनी जातवार मतदारी आग्रहाने मागून, आणि ज्यांनी ती मोठ्या उदार हस्ताने देऊन, जातिद्वेषाला सर्व रान मोकळें करून दिलें त्या जातवाल्यांना व त्या सरकारांना आम्ही पुण्याचे लोक वेगळें विद्यापीठ मागतों एवढ्याकरिता आम्हांला नांवें ठेवण्याला काय तोंड आहे? म्हणून

असली बाष्कळ कोटि कोणीं करूं नये. आम्ही मागतों तें एखादा सवता सुभा हवा म्हणून नव्हे, तर खुद्द मुंबई विद्यापीठाच्या कामांत विभागणी करण्याची वेळच आता आली आहे म्हणून. प्रादेशिक विद्यापीठें निर्माण झालीं तरी त्यांच्यामध्ये परस्पर सहकार्य होणार नाही, किंवा होऊंच नये असें आम्ही कोणीहि म्हणत नाही. याचें कारण हें कीं, या निरनिराळ्या संस्थांतून अभ्यासक्रम, संशोधन, गुणप्रमाण, परीक्षण, इत्यादि दृष्टींनी सहकार्य होण्यासारखें आहे व तें व्हावें असें म्हणणारांपैकीं आम्ही आहों.

### अधिकार-विभागणीची जरूरी

कारभाराची वांटणी व अधिकारविभागणी या तत्त्वाचा विजय आज ३० वर्षे हिंदुस्थानांत होत असून, त्याचें अंतिम स्वरूप म्हणून लवकरच राज्यघटनेंत स्वायत्त असे प्रांत निर्माण होणार आहेत व प्रॉव्हिन्शियल ऑटॉनमी मिळणार आहे स्थानिक स्वराज्यांत तर ती सर्वत्र यापूर्वीच मिळून चुकली आहे. लॉर्ड कर्झन यांच्या वेळीं थट्टेने असें म्हणता येत असें कीं, हिंदुस्थानांतील एखाद्या टोकाच्या खेडेगांवांत चावडींत लावलेल्या पाटीवरील नांव बदलावयाचें झालें तर, सिमल्यास बसून कारभार चालविणाऱ्या एखाद्या खातेवार डायरेक्टर-जनरलची परवानगी आधी घेतली पाहिजे; त्याशिवाय तें होणार नाही. इतकी अधिकाराच्या एकीकरणाची अतिशयोक्ति एक वेळ झाली होती! पण आता वारा सर्वच अगदी उलट्या दिशेने वाहत आहे.

### मातृभाषेची प्रगति

आता मी मातृभाषेच्या मुद्द्यावर येतों. आठ वर्षांपूर्वी युनिव्हर्सिटी कमिटीनेंच म्हणून ठेवलें होतें कीं, मुंबई विद्यापीठांत मातृभाषांची प्रगति दिवसेंदिवस अधिकाधिक होणार आहे, आणि ती व्हावी हेंच योग्यहि आहे. हल्ली एका इंटर आर्ट्सशिवाय इतर सर्व परीक्षांत मातृभाषेचा प्रवेश झालेला आहे. यंदापासूनच बी. ए. ऑनर्सच्या परीक्षेंत देशी भाषांना स्थान मिळालें. शिक्षणाच्या या सुलभ साधनांचा फायदा विद्यार्थि-वर्ग हळुहळू घेऊंहि लागला आहे. युनिव्हर्सिटी कमिटीचें म्हणणें असें कीं, निरनिराळ्या मातृभाषांचा उपयोग होऊं लागल्यास युनिव्हर्सिटीच्या कामांत फार गुंतागुंत होईल याचाच अर्थ ही गुंतागुंत न राहावी तर वेगळीं विद्यापीठें असावीं. अर्थात् कमिटीची शिफारस सकारणच होता. मातृभाषांच्या अभ्यासाचा विस्तार वाढणारा म्हणून वेगळीं विद्यापीठें करावीं हा एक मार्ग; व वेगळीं विद्यापीठें करावीं लागतील या भीतीने मातृभाषांच्या अभ्यासाचा प्रसार थांबवावा हा दुसरा मार्ग--यांपैकीं अधिक न्यायाचा व श्रेयस्कर कोणता हें मी तुम्हाला सांगावयाला पाहिजे काय?

### मातृभाषा हीच बोधभाषा

मी तुम्हांला असं हडसून खडसून विचारतों कीं, सगळ्या जगांत असा एक तरी देश आहे काय कीं, ज्यामध्ये मुलांचें शिक्षण--युनिव्हर्सिटींतील शिक्षण--परकीय भाषेंतून दिलें जातें. (येथे प्रो. फादर डूअर यांनी युरोपांतील अपवादात्मक अशीं एकदोन उदाहरणें सांगितलीं) प्रोफेसरसाहेबांनी दिलेलीं उदाहरणें खरीं असलीं तरी त्या अपवादांनी माझें सिद्धांतिक बोलणेंच खरें ठरतें. जपानाने युरोपांतील सर्व कांही घेतलें आहे. ज्ञान, सुधारणा इ. पण अशा जपानांतदेखील युनिव्हर्सिटींतील शिक्षण मातृभाषेंतूनच होत आहे. क्वचित् शास्त्रीय विषयांत एखाद्या परभाषेचा उपयोग केल्यास न कळे.

अशी जगांतील स्थिति असल्यामुळे हिंदुस्थानांतच परभाषेचा जुलूम आम्ही कां व किती सोसावा! आता हिंदुस्थानाने परकीय राज्य आपल्या डोक्यावर घेण्याचा गुन्हाच केला आहे, तेव्हा राज्यकर्त्यांच्या भाषेचा वरचष्मा येथे व्हावा हें सरळच आहे. पण त्याची मर्यादा दिवसेंदिवस हटली पाहिजे.

### परकीय भाषेचा अवघडपणा

परकीय भाषा कोणी किती चांगली शिकला तरी ती परकीच. मी स्वतः आज ४५ वर्षे इंग्रजी भाषेचा व्यासंग करतों. पण अजून उठून इंग्रजींत बोलण्याचा प्रसंग आला म्हणजे मला सुख वाटत नाही. याचें कारण कदाचित् असें असेल कीं, परकी भाषा बोलतांना अनुद्दिष्ट, अप्रयोजक किंवा तोल घसरणारा शब्द सहज हटकून निघून जातो; व औचित्याची दृष्टि असेल असा मनुष्य ही चूक लक्षांत येतांच गांगरून जाणें स्वाभाविक आहे. लाज न ठेवता बोलणाराला मदान मोकळेंच असतें. इंग्रजी बोलतांना हिंदी लोक स्वतःला हास्यास्पद करून घेतात; पण युरोपियन लोकांनीहि यांत तोरा मिरवावयास नको. सिव्हिलियन लोकांना डिपार्टमेंटल देशी भाषांच्या परीक्षा ठेवलेल्या असतात; पण त्या काय असतात हें मला माहीत आहे. कोणाहि इंग्रजाला दहा मिनिटेंपर्यंत हिंदुस्थानांतील कोणतीहि भाषा अस्खलित बोलण्याविषयी मी आव्हान करतों. ते स्वतःला हास्यास्पद करून घेतल्याशिवाय राहणार नाहीत. तात्पर्य, बोधाचें उत्तम साधन म्हणजे मातृभाषा. ती आपली कोणी सोडीत नाही. ( प्रि. हॅमिल म्हणाले--' वः, आम्ही स्कॉच लोकांनी नाही का इंग्रजी भाषा स्वीकारली ?) हॅमिलसाहेबांना मी सांगतों कीं, स्कॉच लोकांनी

सगळें इंग्लंडचें राज्यच ताब्यांत घेतलें अशी इंग्रज लोकांचीहि तक्रार आहे. मग येवढें इंग्लंडचें राज्य व पैसा खिशांत आल्यावर मोबदला म्हणून त्यांनी आपली भाषा कां सोडूं नये? आम्हालाहि उद्यां इंग्लंडवर राज्य मिळालें तर आम्हीदेखील मराठी सोडून इंग्रजीच घेऊं. काय हरकत आहे?

**गैरसमजाचा खुलासा**

मातृभाषेसंबंधानें एका गैरसमजाचा खुलासा केला पाहिजे. प्रादेशिक विद्यापीठें स्थापलीं तर त्यांत अनेक भाषा बोलणारे लोक येणार, म्हणून अनेक देशी भाषांतून शिक्षणाची योजना करावी लागेल, मग मुंबई विद्यापीठांतील भाषांच्या खिचडीपेक्षा तुम्ही अधिक काय मिळविलें? व तुमचा गोंधळ कसा थांबणार? असें कोणी विचारतात. त्याला माझें उत्तर असें कीं, प्रांतवार विद्यापीठें स्थापलीं म्हणजे तेथे शिक्षण मुख्यतः त्या प्रादेशिक भाषेंतूनच बहुतेक दिलें जाईल. वेगळी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या लक्षांत घेण्याइतकी पुष्कळ असेल, तरच त्या भाषेंतून शिक्षणाची कांही व्यवस्था करावी लागेल. पण दोनशें मुलांच्या कॉलेजांत वेगळी मातृभाषा बोलणारे पांच विद्यार्थी आले तर तेवढ्याकरितां वेगळे वर्ग, वेगळे शिक्षक अशी सजोड व्यवस्था करण्याची जबाबदारी कॉलेजाच्या चालकावर नाहीं. त्या विद्यार्थ्यांनी मुंबईच्या इंग्रजी विद्यापीठांत खुशाल जावें. उदा० कानडी लोकांनी म्हैसुरास कां जाऊ नये? उर्दू मातृभाषावाल्यांनी हैद्राबादेस कां जाऊ नये?

**बहुसंख्य लोकांची भाषा**

हिंदुस्थानांतील म्युनिसिपालिट्यांपासून लीग ऑफ नेशन्सच्या संरक्षणाखाली असणाऱ्या अल्पसंख्य राष्ट्रांपर्यंत एकच नियम आहे; व तोच समंजसपणाचा आहे कीं, विशिष्ट भाषा बोलणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या अमुक किमान मर्यादेवर असेल तरच आपल्याकरितां खर्च करून शिक्षणाची वेगळी सोय करा असें म्हणण्याचा हक्क त्यांना येतो, एरवी नाही. ही गोष्ट लक्षांत घेतल्यास जी अडचण आज मुंबईच्या विद्यापीठासंबंधानें आहे ती प्रादेशिक विद्यापीठांत उरणार नाहीं. कोणत्याहि प्रदेशांत राहणारे अल्पसंख्य लोक तेथे उपरे नसतील तर, म्हणजे कायमचे रहिवासी असतील तर, तेथील बहुसंख्य लोकांची भाषा शिकतातच. या उलट-सुलट तारतम्यानेच हा प्रश्न सोडविला पाहिजे. राज्यकर्त्यांची भाषा ती प्रजेची भाषा नाहीं असें पुष्कळ ठिकाणीं घडतें. शिंदेशाहींत राजा मराठा, पण दरबारी भाषा मराठी नाहीं, हिंदी उर्दू आहे. बडोद्याचा राजा मराठा, पण राज्यकारभाराची भाषा गुजराथीच आहे. येऊन जाऊन हैद्राबादेंत मात्र विपरीत घडत आहे. कारण निजामशाहींत नऊ-दशांश लोक असे आहेत कीं त्यांची मातृभाषा उर्दू नाहीं, असें असतां राजा मुसलमान म्हणून युनिव्हर्सिटी उर्दू भाषेची ठेविली आहे! पण निजामशाहींत इतर इतके अन्याय चालले त्यांतलाच हा एक. त्या अन्यायाची दाद कोण लावून देणार?

असो. अशा रीतीनें प्रादेशिक विद्यापीठावर जे आक्षेप घेतात त्यांना मीं यथामति उत्तरें दिलीं आहेत. आणि अजून तरी सरकारानें याविषयी आपलें धोरण प्रकट करावें अशी माझी आग्रहाची सूचना आहे. तथापि फिरून सांगतों कीं, महाराष्ट्र युनिव्हर्सिटी हा विषय या सभेपुढे नाहीं. तिची योजना आपणांपुढे नाहीं. तिच्या खर्चाचें अंदाजपत्रक आपल्यापुढे नाहीं. कारण ही परिषद त्या गोष्टींचा विचार करण्याकरितां भरविलेलीच नाहीं. म्हणून तिला ज्यांनी नांवें ठेविलीं ते सभेपुढे नसलेल्या भलत्या विषयांवर भलतेंच बोलले असें मी म्हणेन!"

# पै कीं पैसा, पैसा कीं पै?

ब्रिटिश पार्लमेंटाच्या जोड कमिटीनें बहुतेक सगळा जून महिना साक्षीपुरावा घेण्याचें काम चालविलें. हें काम जुलई महिनाअखेर तसेंच सुरू राहणार असून ऑगस्ट महिन्यापासून त्यांत बऱ्याच महत्त्वाचा फरक करण्यांत येईल. ऑगस्ट महिन्याच्या चार तारखेपर्यंत हिंदु महासभा व मुस्लीम परिषद यांच्या साक्षी संपल्यावर जोड कमिटीचे सर्व सभासद पुढील साक्षी घ्यावयास न बसता, जोड कमिटीच्या पोटांतून एक छोटी कमिटी बाहेर पडेल. आणि ती हा सप्ताहाचा विणा आपल्या खांद्यावर घेईल व बाकीचे सभासद सुटीच्या दिवसांत बाहेर अंग मोकळे करण्यास जातील. ज्या हिंदी साक्षीदारांना इंग्लंडांत रिकामपणच्या मौजा मारीत राहण्याचा कंटाळा आला असेल त्यांनी ४ ऑगस्टपासून ६ ऑक्टोबरपर्यंतच्या दोन महिन्यांत पोट कमिटीपुढे विडा–दक्षिणा ठेवून व तिजपासून प्रसादाचा नारळ घेऊन आपली दिंडी आल्या वाटेनें केव्हांहि खुशाल परत फिरवावी, तिला जोडकमिटीची मुळीच हरकत नाहीं!

या सवलतीचा फायदा घेणारे कांही तरी हिंदी वारकरी निघतीलच यांत शंका नाही.त्यानंतर सहा ऑक्टोबरपासून जोडकमिटीचे समस्त सभासद सप्ताहासाठी कमिटीच्या मंदिरांत नव्या दमाने हजर राहतील. मग त्यांचें हें अनुष्ठान किती महिने चालेल याचें ज्ञान पार्लमेंटरूपी परमेश्वरासच काय असेल तें खरें! इतर प्राकृत जनांचा तर्क या ठिकाणीं मुळींच चालणार नाही. मात्र श्रावणांतील पहिला होम आटोपून दुसऱ्या होमास सुरुवात होईपर्यंत जशी श्रावणींतील मंत्रांचें श्रवण करीत बसलेल्या ब्रह्मवृंदांस सुटी मिळते, तशी सप्रू-जयकरप्रभृति हिंदी प्रतिनिधींना आगस्टांत सुटी मिळून त्यांना हिंदुस्थानाची यात्रा घडण्याचाहि पुष्कळ संभव आहे.श्रावणींत एक गंगास्नान असते.त्या गंगास्नानाकरितां सर तेज बहादुर सप्रू हिंदुस्थानांतील आपल्या प्रयाग क्षेत्रीं येण्याइतके भाविक नाहीत हें कोणास सांगावयास पाहिजे असें नाही. परंतु जर्मनींत किश्लू नांवाचे एक पंडित नुकतेंच मरण पावले,त्यांच्या अस्थी गंगेंत विसर्जन करण्याकरिता सर सप्रू हिंदुस्थानांत घेऊन येणार असल्याचें मात्र प्रसिद्ध झालें आहे.

जोड कमिटी ही निवळ कवडीचुंबकांची बनली आहे. सायमन कमिशनाचा रिपोर्ट, मजूर मंत्रिमंडळाचीं आश्वासनें व नंतर गोलमेज परिषदांचा सुखसोहाळा असला थाटमाट आगाऊ उरकून गेला नसता तर सध्याच्या जोड कमिटीने हिंदुस्थानच्या हातावर नवीन अधिकारांच्या नांवाने कवडीच टिकविली असती यांत शंका नाही. परंतु काय करावें, पूर्वीचे भोळसर ब्रिटिश मुत्सद्दी वाचादत्त होऊन बसले ! त्यामुळे हुजूर पक्षास एकदाचा जिवाचा धडा करून पांढऱ्या कागदाच्या पुडींत गुंडाळलेला तांबडा पैसा हिंदुस्थानाच्या तोंडावर टाकावाच लागला. तरी बरें, अजून तो पैसा हातचा सुटावयाचाच आहे. अजून ती जोडकमिटी आहे, जोडकमिटीमागून पुनः हुजूर पक्षाचें ते मंत्रिमंडळ आहे, व हुजूरपक्षाच्या मंत्रिमंडळामागून पार्लमेंट आहेच आहे. अबब किती तरी या पळवाटा व चोरवाटा! त्यांतून हा पैसा हातचलाखीने पळवून त्याजागीं टोली, दमडी, किंवा पै ठेवतां आल्यास ती संधि चालू जोडकमिटी बहुधा दवडणार नाही. कमिटीला चर्चिल ओड्वायर यांनी पैशाऐवजी पै दाखविल्यापासून तिला एक प्रकारची चुटपूट लागून राहिली आहे. कमिटींतील सभासदांना एखादे वेळीं वाटतें कीं 'अरेरे, हिंदुस्थानाला पैसा दाखविण्यांत पांढऱ्या खलित्याने विनाकारण घाई केली! त्यापेक्षा पैच पुढे ठेवली असती काय बहार उडाली असती !' सांप्रत कमिटीने एका हातांत पैसा घेतला आहे व दुसऱ्या हातांत पै धरली आहे. आणि ती आपल्यापुढे येणाऱ्या इंग्रज साक्षीदारांना विचारीत आहे कीं 'दोस्तहो ! खरेंच सांगा. हिंदुस्थानाला पसा देण्यांत फाजील औदार्य तर दिसत नाही ना? कां आंग्ल भूमीचे परमभक्त चर्चिलसाहेब म्हणतात त्याप्रमाणे पैच देऊन मोकळें व्हावें ?'

चालू जुलै महिन्यांत विश्वासू, ऋणानुबंधी जिगर दोस्त असे जिव्हाळ्याचे साक्षीदार कमिटीपाशीं गुजगोष्टी बोलून गेले. त्यांत संस्थानिकांचे प्रतिनिधि, ब्रह्मदेशाचे माजी गव्हर्नर सर चार्लस इन्नेस, असोसिएटेड चेंबर्स ऑफ कॉमर्सचे सर कॅंटो, सर बेंथाल आणि युनियन ऑफ ब्रिटन अँड इंडिया या संस्थेचे सर जॉन थॉम्सन, सर वॉटसन इत्यादि कैक गृहस्थ येऊन गेले. ब्रिटिश हिंदुस्थानाचें तिकडे कांही कां होईना, संस्थानिक आपले गांवाबाहेरच्या वायुपुत्राप्रमाणे ! त्यांना फेडरेशनची पीडा कोठून आपल्या मागे लावून घेतली असें झालें असून त्यांतून ते शिताफीने सुटण्याच्याच हिकमतींत आहेत. म्हणून त्यांनी लग्न मोडावयास टपलेल्या वरपक्षासारखी मानपानाची इतकी लांबलचक यादी केली आहे कीं, सदर यादींतील अटी कबूल करून कफल्लक बनण्यापेक्षां आपली मुलगी जन्मभर—कुवार राहिली तरी पत्करली असेंच वधूपक्षास वाटावें. या दृष्टीने संस्थानी प्रतिनिधींनी कमिटीपुढे साक्षी दिल्या त्या कमिटींतील सभासदांनी हर्षातिरेकाने बेहोष होऊन नाचूं लागावें अशाच वठल्या यांत नवल काय ?

परंतु कमिटींतील सभासद फार सावध, फार धोरणी, फार दूरदृष्टि, फार हुषार; ते तेवढयाने हुरळून गेले नाहीत. इन्नेस, बेंथाल, थॉम्सन, वॉटसन यांच्याशीं त्यांच्या लवकरच गांठी पडल्या. या सगळ्या असाम्या हिंदुस्थानांत वागलेल्या, रुळलेल्या व खेळलेल्या. त्यांना पैशाऐवजीं पैवर भागावेण्याचा दीडदमडीवाल्या सभासदांचा सराफी व्यवहार पटेना. त्यांनी बंगाल्यांत बॉंब गोळे घेऊन उठलेल्या तरुणांच्या क्रोधाने अग्नीप्रमाणे ठिणग्या टाकणाऱ्या डोळ्यांकडे बोट दाखविलें; त्यांनी हजारों राजबंद्यांनी भरलेले तुरुंग त्यांजसमोर उभे केले; त्यांनी हिंदी सुशिक्षित लोक स्वराज्याशिवाय दुसरी बात बोलत नसल्याचें त्यांस बजावलें. पण सुशिक्षित हिंदी लोक स्वराज्याशिवाय दुसरी बात बोलत नाहीत म्हणून त्यांस स्वराज्याचा बंदा रुपया देऊन टाकावयाचा कीं काय ? अहो रुपया म्हणजे सोळा आणे, सोळा आणे म्हणजे चौसष्ट पैसे आणि चौसष्ट पैसे म्हणजे एकशे ब्याण्णव पया. आहांत कोठे ? कोठे ते चौसष्ट पैसेन् कोठें तो द्यावयास काढलेला एक पैसा. आणि कोठे त्या

एकशें ब्याणव्व पया न् कोठे ती एक पै.

असें तें रुपयावाले स्वराज्य आजच व एकदमच देऊन टाकलें पाहिजे म्हटलें कीं कमिटींतील सभासदांचे डोळे रुपयाप्रमाणेंच पांढरे व्हावयाचें. पण असल अभद्र बोलण्याला इन्नेस काय, थॉम्सन काय किंवा वॉटसन काय इंग्लंड देशाला थोडेच बुडवावयाला निघाले आहेत? त्यांनीं सांगितलें कीं 'हिंदुस्थानाला आजच सगळें स्वराज्य द्यावयास पाहिजे असें नाहीं; पांढरा रुपया बंदाच्या बंदा त्यांच्या हातावर न ठेवला तरी पांढऱ्या खलित्यांत गुंडाळलेला तांबडा पैसा त्यांजपुढे केल्यानें भागेल."

सर चार्लस इन्नेस यांनीं पांढऱ्या खलित्यावर विशेष जोर दिला. तो पाहून कमिटीच्या सभासदांनीं आपल्या कपाळाला सतरा आठ्या घातल्या. त्यांना पैसा कीं पै हा छंद लागलेला. तीन पयांची एकदम एक पै न म्हटली तरी दोन पया तर खऱ्या म्हणून त्या आशेनें इन्नेसचा पिच्छा सोडून वॉटसन–थॉम्सन प्रभृतींना सभासदांनी खोदखोदून प्रश्न विचारले. प्रांतांचीं सगळींच खातीं सोपीव न करता पोलीस खातें राखीव ठेवलें तर? मध्यवर्ति सत्तेंतील जबाबदारी आजच न देतां कालान्तरावर टाकली तर? असे किती म्हणून त्यांनी प्रश्न विचारावे! या प्रश्नांना वॉटसन थॉम्सन इत्यादिकांनी तसें करून चालावयाचें नाहीं असेंच उत्तर दिलें.

वॉटसन–थॉम्सन प्रभृति साक्षीदारांना हिंदुस्थानांतलि परिस्थिति चांगली माहीत आहे. त्यांना बहिष्कारासारख्या चळवळींचा चटका बसला आहे व हिंदी लोकांना उद्योगधंद्यांत अधिकाधिक वाव मिळाल्याशिवाय ते युरोपियन व्यापाऱ्यांना सुखाचा घास खाऊं देणार नाहीत याविषयीं त्यांची खात्री झाली आहे. या दृष्टीनें त्यांनी आपले कांही आडाखे सांगितले त्यावरून त्यांचें पुढील धोरण अजमावतां येतें. इंग्रजांचे कारखाने व उद्योग धंदे हिंदुस्थानांत आहेत. त्यांचे संरक्षण करण्याची युक्ति त्यांनी पूर्वींच काढली असून तिचा ते भविष्य काळीं मोठ्या प्रमाणावर अवलंब केल्यावांचून राहणार नाहीत. त्यांनी आपल्या कारखान्यांत हिंदी लोकांना भागीदारीनें घेण्याचा उपक्रम केला आहे. त्या योगानें त्यांच्या कारखान्यांच्या रक्षणाची जबाबदारी हिंदी लोकांवर पडून त्यांजवरील संकट आपोआपच टळेल. यानंतर एकच प्रश्न उरतो. तो हा कीं, पांढऱ्या खलित्यांत घातलेलीं संरक्षक बंधनें केव्हा जावयाचीं? त्यांना कांही कालमर्यादा आहे कीं नाही? वरील साक्षीदारांच्या म्हणण्यावरून हीं बंधनें तूर्त कायमचींच समजावयाचीं. त्यांना का·मर्यादा नाही. याचा अर्थ असा कीं पांढऱ्या खलित्यांतील हक्क एकदांचे आदळआपट करीत हिंदी लोकांच्या तोंडावर फेकले म्हणजे संपलें. पुढील हक्कांचे किंवा सबंद अर्ध्या अगर चतकोर स्वराज्याचें इंग्रज सरकार आपण होऊन नांवच काढणार नाही. मग हिंदी लोकांच्या चळवळीने त्यांना सतावून सोडल्यास गोष्ट वेगळी! ही साक्षीदारांची मनःस्थिति झाली. पण जॉइंट पार्लमेंटरी कमिटी पाहावी तों स्वराज्याचा आखा रुपया आपल्या पिशवींत ठेवून पैसा द्यावा कं पैवरच भागवावें या विवंचनेंत पडलेली दिसते.

# पुणे येथील राष्ट्रीय पुढाऱ्यांची सभा



श्री. माधवराव अणे



महात्मा गांधी

### कायदेभंगाचें भवितव्य

बुधवार ता. १२ रोजी दुपारी दोन वाजता लोकनायक **मा. श्री. अणे** यांच्या अध्यक्षतेखाली टिळक स्मारक मंदिरांत राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या सभेस सुरुवात झाली. महात्मा गांधीच्या एकवीस दिवसांच्या उपोषणामुळे कायदेभंगाची चळवळ दोन वेळा तहकूब करण्यांत आली होती. ती चळवळ पुनः राष्ट्रीय सभेने हाती घ्यावी किंवा नाही या महत्त्वाच्या प्रश्नाची भवति न भवति होऊन त्याबद्दलचा निश्चित निर्णय या सभेत व्हावयाचा असल्याने, अखिल हिंदुस्थानाचे डोळे सदर सभेतील चर्चेकडे लागले असल्यास नवल नाही. ही सभा टिळक-स्मारकमंदिरात भरत असल्यामुळेहि या सभेला लोकमान्यांच्या पुण्यस्मृतीने एक प्रकारचा गंभीरपणा आला होता. टिळक-स्मारक मंदिर मुळांतच मोठे सुंदर, टुमदार व मनोहार आहे. त्यांत थेट दरवाजासमोर लोकमान्यांचा अर्धपुतळा असून त्याच्यावर लोकमान्यांचे भव्य रंगीत तैलचित्र असल्यामुळे,

### लोकमान्यांचें स्फूर्तिदायक दर्शन

अखिल हिंदुस्थानांतून आलेल्या सभासदांना होत होतें. आणि प्रत्येकजण आत येतांच लोकमान्यांना प्रथम वंदन करून मग जाग्यावर बसत असे. मंदिराच्या ट्रस्टींनी व स्वागतमंडळाने आंत उत्तम बिछायत घालून चांगली शोभा आणली होती. महाराष्ट्र चित्रकार मंडळाचीं कलापूर्ण अशी रंगाचित्रेंहि आंत असल्याने टिळक मंदिर प्रेक्षणीय झाले होते. सभेच्या कामास दुपारीं दोन वाजता सुरुवात होणार होती, तरी साडेबारा वाजल्यापासूनच निमंत्रित सभासदांची व महात्मा गांधीच्या दर्शनास उत्सुक झालेल्या लोकांची टिळक मंदिरांचे दारांत गर्दी होऊं लागली होती. स्वयंसेवकांनीहि सर्व व्यवस्था इतकी चांगली ठेवली होती कीं, परवान्याच कागद घेऊन आंत जाणाऱ्या पाहुण्यास बिलकुल त्रास होत नव्हता. या सभेस जवळ जवळ सव्वाचारशे निमंत्रणे गेली होतीं. तरी अनेक कारणांनी पुष्कळांना येतां आले नाही. पुण्यातील निमंत्रित मंडळी धरून जवळ जवळ पावणेदोनशे सभासद हजर होते.

### उपस्थित पुढारी

त्यांत निरनिराळ्या प्रांतांतून आलेले पुढील पुढारी प्रामुख्याने दिसत होते. संयुक्त प्रांतांतून पं. मालवीयजी, गोविंदकांत मालवीय, कृष्णकांत मालवीय, सौ. कमला नेहरू, श्री. स्वरूपाराणी नेहरू, सौ. उमा नेहरू, बॅ. पंडित, श्री प्रकाशम्, आचार्य कृपलानी, बॅ. शेरवाणी, रफी अहमद किडवाई. पंजाब

प्रांतांतून डॉ. आलम, अंबाल्याचे लाला दुनीचंद, पं. नेकीराम, सरदार शार्दूलसिंग, डॉ. गोपीचंद. सरहद्द प्रांतांतून सरहद्द गांधी म्हणून नांवाजलेले अबदुल गफूरखान यांचे चिरंजीव अबदुल गनी, बंगालचे बॅ. दासगुप्त, श्री. गोपीविलास सेन, डॉ. घोस. बिहारचे श्री. नीलकंठदास. सी. पी. हिंदुस्थानी प्रांतांतून पं. द्वारकाप्रसाद मिश्र, सील, सुभेदार. सी. पी. मराठी प्रांतांतून बॅ. अभ्यंकर, डॉ. खरे, बाबासाहेब देशमुख. वऱ्हाडांतून वीर वामनराव जोशी, श्री. बापट, श्री. पु. य. देशपांडे. तामीलनाडूमधून श्री. सत्यमूर्ति, राजगोपालाचारियर. आंध्रांतून श्री. कोंडा वेंकटअप्पय्या, श्री. टी. प्रकाशम्, कालेश्वरराव, मुंबईहून श्री. पुरुषोत्तमदास त्रिकमदास, जम्नादास द्वारकादास, श्री. पुप्पाला. कर्नाटकांतून श्री. गंगाधरराव देशपांडे, श्री. हणमंतराव कौजलगी. महाराष्ट्रांतून श्री. गरूड, पटवर्धन, पंडित, मंडलीक, राजवाडे, दामले, दादासाहेब गद्रे, बा. ज. मराठे, दादासाहेब करंदीकर, रमणीकराय मेथा, सौ. लीलावती मुनशी, व पुण्याचे श्री. न. चिं. केळकर, तुळपुळे, दा. वि. गोखले, ल. ब. भोपटकर, दिवेकर, आगाशे, देवगिरीकर, डॉ. फाटक वगैरे मंडळी होती. याशिवाय सौ. सरोजिनी नायडू, श्री. दुर्गाबाई जोशी, सौ. अनसुयाबाई काळे, सौ. हंसा मेथा सौ. कमलादेवी चट्टोपाध्याय वगैरे स्त्रियांहि हजर होत्या.

**श्री अणे यांचें भाषण**

राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. अणे हे महात्मा गांधींबरोबर दोन वाजता आल्यानंतर, पांच मिनिटांनी सभेच्या कामास सुरुवात झाली. त्यांनी सर्वांचें मनःपूर्वक स्वागत करून आपल्या निमंत्रणावरून लांबलांबून इतके सभासद हजर झाले याबद्दल त्यांचे आभार मानले. महात्मा गांधींना सर्वांचा सल्ला घ्यावयाचा असल्यानें त्यांच्या सांगण्यावरून आपण सर्वांस निमंत्रण केलें तेव्हां आपण हा सल्ला द्यावा अशी त्यांनी विनंति केली.

**मेहेर अलींचा उद्धट प्रश्न**

इतक्यांत मुंबईचे मि. मेहेरअली यांनी अध्यक्षांना असा एक उद्धट प्रश्न विचारला कीं, "ही सभा कॉंग्रेसच्या सभासदांची असतांना तुम्ही, ना. शास्त्री, श्री. बिर्ला, श्री. न. चिं. केळकर या बाहेरच्या लोकांस कां बोलावलें?" श्री. अणे यांनी शांतपणें पण परिणामकारिक रीतीनें उत्तर दिलें कीं, 'ही सभा सर्व स्नेही व राष्ट्रांतील कार्यकर्त्या पुढाऱ्यांची आहे. ना. शास्त्री व श्री. बिर्ला येथे नाहींत व श्री. केळकर हे राष्ट्रीय सभेचे सभासद आहेत.' श्री. केळकर यांनीहि मेहेर अलींना बजावलें कीं, "मी राष्ट्रीय सभेचा सभासद आहें, इतकेंच नव्हे तर जुन्यांत जुना सभासद आहें. येथे जमलेल्यांपैकीं, ज्यांना आक्षेप घ्यावयाचा असेल त्यांना माझें असें स्पष्ट आव्हान आहे कीं, मी राष्ट्रीय सभेचा सभासद नाहीं हें त्यांनी सिद्ध करावें"! यावर मि. मेहेरअलींना उत्तर देतां आलें नाहीं. पण त्यांनी 'तुम्ही गोलमेज परिषदेला कसे गेलां?' असें विचारतांच श्री. केळकरांनी उत्तर दिलें कीं, "महात्मा गांधीहि गोलमेज परिषदेला गेले होते हें विसरलांत वाटतें? ते ज्याकरितां गेले त्याकरिता मी गेलों"! या उत्तरानें तर मेहेर अली चूपच झाले!! श्री. अणे यांनी आपलें भाषण पुढें सुरू करून पुनः एकवार श्री. केळकर हे राष्ट्रीय सभेचे सभासद आहेत असें ठासून सांगितलें व कामास प्रारंभ केला.

**बोलले नसते तर बरें होतें!**

नंतर म. गांधींनी प्रथम सर्वांचे आभार मानून आपल्या मुख्य भाषणास सुरुवात केली. मि. मेहेरअली व मि. अबीद अली यांच्या प्रश्नांचा उल्लेख करून ते म्हणाले, "ना. शास्त्री व मी यांचे संबध काय आहेत हें सर्वांस आज कित्येक वर्षें माहीत आहे. ते येथे हजर नाहींत, पण मीं त्यांना त्यांचा सल्ला घेण्याकरिता स्वतः बोलावलें होतें श्री. बिर्ला यांनाहि बोलावलें होतें, पण मागाहून येथे येऊं नका असें मींच त्यांना कळविलें. अध्यक्षांनीच माझ्या सांगण्यावरून सर्व निमंत्रणें दिलीं. श्री. केळकर हे राष्ट्रीय सभेचे सभासद आहेत. या सर्वांसंबंधी मेहेरअलींनी प्रश्न विचारले, पण या बाबतींत ते बोलले नसते तर बरें झालें असतें! त्यामुळे मला दुःख झालें!"

इतकें सांगितल्यावर सध्याच्या आणीबाणीच्या प्रसंगाचा उल्लेख करून त्यांनी कोणत्या प्रश्नावर आपल्यास सल्ला पाहिजे हें खुलासेवार सांगितलें. त्यांच्या भाषणाचा झोक असा होता कीं चळवळ चालू ठेवावी हें ठीक असें समजून, चालू ठेवूं नये असें म्हणणारांनी आपलें म्हणणें मांडावें. मी मोकळ्या मनानें त्याचा विचार करीन व मग आपला निर्णय सांगेन!

**१७ भाषणें**

यानंतर कायदेभंग बंद करावा अशा अर्थाचीं सतरा भाषणें झालीं. त्यांत मुंबई, बंगाल, मद्रास, सं. प्रां., वऱ्हाड वगैरे प्रांतांतून आलेल्या प्रतिनिधींचीं भाषणें होतीं. सभा खासगी आहे असें समजावें या अध्यक्षांच्या सूचनेस मान देणें हें वर्तमानपत्रकारांचें कर्तव्य असल्यानें, वक्त्यांचीं नांवें व त्यांचीं भाषणें आजच्या अंकीं आम्हांस देतां येत नाहींत.

उपाहार झाल्यानंतर, पुनः सभेस सुरुवात झाली व सहा वाजून पंचावन्न मिनिटांनी सभेचें त्या दिवसाचें काम संपलें.

महाराष्ट्र व्यायाम शाळेला सर्वांनी भेट द्यावी व गुरुवारीं स्वागत-मंडळाने दिलेल्या मेजवानीस सर्व सभासदांनी यावें अशी अध्यक्षांनी विनंति केली.

### गांधींचें दर्शन

म. गांधींचें दर्शन घेण्यास टिळक मंदिराबाहेर असलेला जनसंमर्द वाढतां वाढतां सायंकाळीं बाहेरील दरवाज्याशीं अतोनात गर्दी झाली. शेवटीं लोकांच्या आग्रहावरून मंदिराचे दरवाजे उघडे करावे लागले व सर्व लोकांना आंतील मोठ्या आवारांत येण्यास मुभा देण्यांत आली. जवळ जवळ सातआठ हजार लोक जमले होते. महात्मा गांधींनी टिळक मंदिराच्या दुसऱ्या मजल्यावरील गॅलरींत उभे राहून सर्वांस दर्शन दिलें व श्री. दा. वि. गोखले यांनी त्यांच्या सांगण्यावरून सर्वांचे त्यांच्यातर्फे आभार मानले. "त्यांचा आवाज अशक्ततेमुळे सर्वांस ऐकूं जाण्यासारखा नसल्याने आजच्या घटकेला त्यांना कांहीं सांगावयाचें नाहीं" असें श्री. गोखले यांनी सांगितलें.

### गुरुवार

गुरुवार ता. १३ रोजीं सभेच्या कामास दुपारीं एक वाजता सुरुवात झाली. प्रारंभींच अध्यक्ष श्री. अणे यांनी सांगितलें कीं, मला आज सकाळच्या वर्तमानपत्रांतून या सभेची हकीकत आलेली पाहून फार वाईट वाटलें. ज्या गृहस्थांना या ठिकाणीं निमंत्रण केलें आहे त्यांनी सभेंतील हकीगत प्रसिद्ध करावयाची नाहीं असें वचन दिलेलें आहे असें मी समजतों. म्हणून वर्तमानपत्रांशीं ज्यांचा संबंध आहे अशा सद्गृहस्थांनी आपल्या वर्तमानपत्रांत ही हकीगत येऊं न देण्याची तजवीज करावी. ते ही विनंति मान्य करतील अशी आशा आहे."

यानंतर, निरनिराळ्या प्रांतांतील सभासदांचीं उलटसुलट भाषणें झाल्यावर सभेचें काम ४ वाजतां संपलें. पुनः शुक्रवारीं १ वाजता सभेस सुरुवात होईल असें जाहीर करण्यांत आलें.

### केसरी-मराठा कचेरींतील समारंभ

गुरुवारीं सायंकाळीं ६॥ वाजता म. गांधींना केसरी-मराठा संस्थेतर्फे अल्पाहार व पानसुपारी थाटाने करण्यांत आली. त्या वेळीं निरनिराळ्या प्रांतांतील पुढारी मंडळी आली होती. व गांवांतील सभ्य गृहस्थ हजर होते. संस्थेसंबंधी माहितीचें एक पत्रकहि त्यांना त्या वेळीं देण्यांत आलें. श्री. केळकरांनी सर्वांचे आभार मानल्यावर हा मोठा समारंभ संपला.

## हा काय सत्याग्रह कीं अत्याग्रह ?

आज सुमारें एक महिनाभर 'भरणार भरणार' म्हणून गाजत असलेली कॉंग्रेसपुढाऱ्यांची सभा गेले बुधवार गुरुवार शुक्रवार असे तीन दिवस पुण्यास भरली. या सभेंत वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींना प्रवेश ठेवला नव्हता. तथापि तीन दिवसांत झालेल्या सर्व कामाचा वृत्तांत बहुतेक खडानूखडा आता जाहिर झाला आहे. वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना पक्का प्रतिबंध घातला असताहि, हा सायंत वृत्तांत प्रसिद्ध व्हावा याचें बाहेर गांवच्या लोकांना सहजच आश्चर्य वाटेल. परंतु सुमारें दीडशें लोक ज्या सभेला हजर राहिले त्या सभेच्या रसाळ हकीकतीचा एक बिंदुहि बाहेर झिरपूं नये असा लाखलोटा पुण्यास कसा लाभणार ?

आधीच लोकांना अशी सवय असते कीं जेथे बोलण्याला कांहीं विषय नाहीं तेथेहि हवें तितकें बोलून तोंडसुख घ्यावें. नसल्या गोष्टी बोलण्याची संवय असल्याने जेथे खाजगी व्यक्ति व संसार यांच्या चर्चेचे अड्डे रोज कुटाळचावड्यांतून बसलेले आढळतात, तेथे म. गांधी राष्ट्रीय सभा, कायदेभंग व सरकार अशा सार्वजनिक, किंबहुना सर्व भरतखंडास व्यापून सोडणाऱ्या, गोष्टींची चर्चा करण्याचा अभिनव प्रसंग उपस्थित झाल्यावर, जनतेची जिव्हा, कल्पनाशक्ति व तर्कचातुर्य यांना वसंतांतील वृक्षलतांप्रमाणें भरघोस रंगीबेरंगी पालवी फुटावी यांत काय आश्चर्य ?

शिवाय गेलीं दहाबारा वर्षें, सत्यप्रिय म. गांधींनी, मन खुलें करून उघड बोलणें हें सत्याग्रहाचें एक मुख्य लक्षण म्हणून ठरविलें आहे. यामुळे राजकारणाच्या चर्चेचा गुप्तपणा सर्व कांहीं निघून गेला आहे. स्वतः म. गांधींचें अंतःकरण तर असें खुलें असतें कीं, जणू कांहीं चारी बाजूंना स्वच्छ काचा लावल्या आहेत व आंतील सर्व चक्रांच्या हालचाली पाहणारास स्पष्ट दिसत आहेत, असें एखादें मोठें घड्याळच सार्वजनिक चौकांत उभें करावें !

या दृष्टीने पाहाता, कॉंग्रेस पुढाऱ्यांच्या या सभेला विशेष महत्त्व व गंभीर स्वरूप होतें तरी, तिला हजर राहण्याला नेहमीच्या वार्ताहरांना बंदी

करावयास नको होती. पण प्रतिबंध आहे म्हणूनच, तो जणूं कांहीं नाहींच अशा रीतीने, गुप्त वार्ता बाहेर प्रकट करण्याच्या आपल्या कौशल्याला आव्हानच आहे असें समजून, या वार्ताहरांनी स्वतःचा प्रवेश सभेंत नसताहि, आदल्या दिवसाच्या हकीकतीचा विश्वसनीय चित्रपट दर दुसरे दिवशीं वर्तमानपत्रांतून रंगविला! पण याचें श्रेय वास्तविक वार्ताहरांच्या कौशल्यापेक्षा निमंत्रणाने सभेला हजर राहणाऱ्या सभासदांच्या तोंडाळ वृत्तीलाच अधिक दिलें पाहिजे!

बरें ते तरी काय करणार? विषयच असा वादग्रस्त निघाला कीं, त्याची चर्चा केवळ औपचारिक रीत्या सभेंत झाली तरी, खरी हडसून-खडसून साधकबाधक प्रमाणांनी होणारी चर्चा, सभागृहाच्या बाहेर म्हणजे सभासदांच्या नुसत्या वसतिगृहांतच नव्हे तर रस्त्यानेहि सुरू रहावी. जो तो या चर्चेंत इतका गढून गेला होता कीं, त्याला मागेपुढे किंवा आजूबाजूस पाहण्याचें भानच नव्हतें. यामुळे "इमान तर राखलें पण आपलें कर्म तर केलें" असें दुतर्फी श्रेय वार्ताहरांना संपादितां आलें. आणि जी गोष्ट वर्तमानपत्रांच्या दूतांची तीच सरकारी गुप्त पोलीस खात्याच्या दूतांचीहि समजतां येईल. त्यामुळे रोज झालेल्या कामाचा खडान्खडा वृत्तांत सरकाराकडे गेला असल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

असो. अशा रीतीने गुप्त पण जगजाहीर व जगजाहीर पण गुप्त अशा या अपूर्व सभेंतील भाषणें व ठराव यांची संगतवार हकीकत आम्हीं, सार्वजनिक साधनांवरून तयार करून, आज दुसरीकडे दिली आहे. ती वाचून सामान्य वाचकाच्या मनांत काय प्रश्न उद्भवतील हें उघड आहे. त्याला पहिला प्रश्न सुचेल तो हा कीं, सभेचा वृत्तांत वाचीत असतां कायदेभंग थांबविण्याविषयीं प्रतिपादन करणारीं भाषणेंच बहुधा एकजात आढळत असतां, अखेर निकाल झाला तो पर्यायाने कायदेभंगाची चळवळ चालू राहावी असा झाला हें कसें घडून आलें? या प्रश्नाचें उत्तर फारसें कठिण नाहीं. तें हें कीं, म. गांधी यांनी आज इतकीं वर्षें जो संघटित संप्रदाय स्थापला त्याचेंच हे फळ होय. तें फळ असें कीं, विचार करणाऱ्या गांधीजींच्या एखाद्या अनुयायाला स्वतंत्र बुद्धीचा विचार सुचावा, पण तो बोलून दाखविण्याची वेळ आली म्हणजे त्याची जीभ व हात हे पांगुळल्यासारखे व्हावेत!

श्रद्धानिष्ठ गुरुभक्तीला हें भूषणभूत नाही काय? आणि अशा भक्तांचा एक प्रचंड संप्रदायच संघटित करतां आला याबद्दल म. गांधींना धन्यता वाटल्यास तें किती स्वाभाविक आहे! आपल्या अनुयायांची चिकित्सक बुद्धि आपणाला इतकी ताब्यांत ठेवतां येते या अनुभवामुळेच या सभेंतील बहुमत, कायदेभंग पुढे चालविण्याला स्पष्टपणें प्रतिकूल दिसत असताहि, पर्यायाने तो चालू करण्याविषयींचा ठराव महात्माजींना मंजूर करून घेण्याची खात्री वाटली असली पाहिजे हें अगदीं उघड आहे.

पं. मदन मोहन मालवीय यांना अशा श्रद्धानिष्ठ अनुयायांच्या संप्रदायाची फुशारकी आजवर कधींच मारतां आली नाही. कारण लोक त्यांच्या व्यक्तीला जो मान देतात तो त्यांच्या मताला देत नाहीत; आणि त्यांचें मतहि बहुधा निश्चित नसतें. पण या प्रसंगीं पंडितजींच्या मताचा कौल महात्माजींच्या बाजूचाच पडला. आणि कायदेभंग थांबवावा असें सर्वसाधारण मत असतां, या दोघा पुढाऱ्यांच्या जुटीने सभेचा फड मारून नेला. त्यांत कदाचित् इतकेंच अपूर्व झालें म्हणता येईल कीं, आता यापुढे सामुदायिक कायदेभंग न करतां व्यक्तिशः करावा हें महात्माजींचें मत म्हणून बरेच दिवस प्रकट झालें असूनहि, नक्की त्याच अर्थाचा स्पष्ट ठराव सभेपुढे मांडण्यांत आला असतां तो प्रचंड बहुमताने नामंजूर झाला!

पण सवाशेरांत शेर हा बसतोच; या न्यायाने सामुदायिक कायदेभंगाचा ठराव मंजूर करून, गांधीजींना तो नजर केल्यावर, त्यांच्या आवडत्या व्यक्तिकृत कायदेभंगाचा ठराव नामंजूर केला तरी त्यांत त्यांचा अनादर आपण केला नाहीं, असें त्यांच्या अनुयायांनी मनाशीं म्हटल्यास तें शोभण्यासारखें आहे. कायदेभंगाची चळवळ एकदम बिनशर्त थांबवावी हा ठराव नामंजूर झाल्यामुळे, त्यांतल्या त्यांत अनुमानानें असें सिद्ध होते कीं, चळवळ एकदम थांबवू नये म्हणजे वाटल्यास कालांतराने थांबवावी. आणि बिनशर्त थांबवूं नये म्हणजे कांही अटींवर थांबविता आली तरच थांबवावी. या अटींचा स्पष्ट उच्चार किंवा खुलासा सभेंत कांहीच झाला नाहीं. पण तो तसा न होण्याचें कारण बहुधा हेंच कीं, त्या अटी काय असाव्या हें महात्माजी जाणतात. मग इतरांनी त्या जाणण्याची उठाठेव कां करावी?

"सत्याग्रह हा एक नवीन प्रकारचा योग आहे. त्याचा दृष्टांत आपणालाच झाला. अर्थात् त्याचें शास्त्र, त्याचीं सूत्रें, त्याचे मंत्र, त्याचें तंत्र, त्याचा न्यास, त्याची ध्यान-धारणा, त्याचा आसनविधि आणि त्याचें आवाहन विसर्जनयांची माहिती आपणाला आहे तशी ती दुसऱ्या कोणालाहि आज नाही" असा महात्माजींचा द

विश्वास आहे. आणि तो विश्वास ते स्वतःच कांही विनोदाने पण पुष्कळसे खऱ्या भावनेनेहि बोलून दाखवीत असतात. तेव्हा त्यांच्या अनुयायांना तें मान्य करणें प्राप्तच होतें !

असो. कायदेभंगाची चळवळ थांबवावयाची तर सरकार बहुमानास्पद असा तह मान्य करील तरच थांबवावयाची हें पर्यायाने मान्य करून, या तहाची वाटाघाट करण्याची कामगिरि सभेंतील लोकांनी एकट्या महात्माजींवरच सोपविली. त्याप्रमाणें गांधीजींनी व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांना मुलाखत देण्याविषयीं तार केली. तें कांहीहि असो, कायदेभंगासंबंधाने लोकमत अजमावण्याची एक संधि पुण्याच्या या सभेने दिली, आणि अखेर ठराव कांहीहि झाला तरी तो थांबवावा असेंच बहुतक एकंदरीने लोकमत असल्याचें सिद्ध झालें, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. विशेषतः चळवळ थांबवावी असें ज्यांनी स्पष्ट बोलून दाखविलें त्यांतले बहुतेक लोक या गेल्या चळवळींत स्वतः अंग मोडून काम करणारे होते. पण त्यांपैकीं कित्येकांनी जर, ठराव मताला घालण्याच्या वेळीं, स्वतःच्या मताविरुद्ध मत दिलें असलें, तर त्याचें कारण एकच. तें हें कीं, 'एक मी कीं एक तूं!' असा कठोर सवालच गांधींनी अनुयायांना टाकून त्यांच्या काळजाला हात घातला !

गेल्या मार्च महिन्यांत कायदेभंगाची चळवळ थांबविण्याविषयीं आम्हीं कांही लेख लिहिले त्यांत, आमच्या माहितीप्रमाणें, जें लोकमत अजमावतां येत होतें त्या आधारें चळवळ थांबवावी अशी सूचना आम्हीं केली होती. पण आमचा तो आधार खरा नाहीं असा बहाणा कित्येक टीकाकारांनी केला! त्यांनी असेंहि प्रतिपादिलें कीं, पूर्वी या विषयीं ठिकठिकाणीं खासगी सभा भरल्या. त्यांत चळवळ चालावी असेंच ठरलें; आणि पुढे सभा भरल्या तर त्यांतहि असेंच ठरेल. सुदैवाने तशी सभा भरण्याचा हा योग परवां आला. आणि तींत, ठराव कसाहि झाला तरी, कार्यकर्त्यांचें लोकमत काय होतें हें प्रकट झालें. यानंतर चळवळ पुढे चालेल कीं थांबेल, आणि चालली तर कशी काय चालेल याचा विचार आजच करण्याचें कारण नाही. वस्तुस्थिति काय आहे याचें फक्त दिग्दर्शन करणें इतकेंच काम आम्हांस करावयाचें होतें व तें आम्हीं केलें. लोकमत विरुद्ध असता आपलाच हेका चालविणे हें महात्मा गांधींचें ब्रीदच आहे. आणि त्याप्रमाणेंच गोष्टी घडून येत आहेत इतकें म्हणण्यास कांहीच प्रत्यवाय नाही.

# स्फुट सूचना

१ गेल्या शुक्रवारची सभा संपली त्या दिवशींच रात्रीं म. गांधी यांनी व्हाइसरॉयसाहेबांना खालील आशयाची तार केली. " शांततेच्या मार्गाने समेट होण्याची शक्याशक्यता काय आहे याविषयी आपणाशीं बोलण्याची इच्छा आहे. तर मला भेट द्याल काय ?" सदर तारेला रविवारीं रात्रीं सिमल्याहून उत्तर आलें ते निराशाजनक आहे. त्यात मजकूर असा आहे म्हणतात कीं " या भेटीपासून कांहीं उपयोग होण्यासारखा नाही." लॉर्ड विलिंग्डन यांजकडून महात्माजींना वरीलप्रमाणे उत्तर आलें ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. वास्तविक महात्माजींनी मागितलेली मुलाखत लाटसाहेबांनी दिली असती तर त्यांत फारसें बिघडले नसतें. गांधीजींनी मागितलेली मुलाखत बिनशर्त होती. शिवाय मानापमानाच्या सामान्य मनुष्याच्या कल्पना गांधीजींना लागू पडत नाहीत. वाटल्यास वेळीं स्वतःचा अपमान करून घेऊनहि तो दुसऱ्याचा अपमान असें म्हणण्यास ते तयार होतात! म्हणजे सरळ युक्तिवादांत बसणारें हें प्रकरण नाही. तेव्हा त्रासदायक असला तरी भला माणूस आहे, व विक्षिप्त असला तरी मोठा माणूस आहे, असे समजून लाटसाहेबांनी मुलाखत द्यायाध्यायास पाहिजे होती. १९३२ च्या प्रारंभीं गांधीजींनी अशीच मुलाखत मागितली असता ती लाटसाहेबांनी नाकारली, ती त्यांनी चूक केली असें हिंदुस्थानांत व विलायतेंतहि पुष्कळांनी त्यांस दूषण दिले, आणि कायदेभंग चळवळीच्या धाकाच्या दृष्टीने तेव्हांची व आताची स्थिति बहुतेक सारखीच आहे. म्हणन लाटसाहेबांनी त्या चुकीची पुनरावृत्ति करावयास नको होती. भेटींतून कांही निष्पन्न होणार नाही असें गृहीत धरून भेटच नाकारण्यापेक्षा, भेट घेऊन समक्ष बोलणेंचालणें करून 'भेट निष्फळ' हे भेटीनंतर व्हाइसरॉयांनी सिद्ध करावयास पाहिजे होतें.

---

२ पण यापुढे असे एकांगी बोलून लाटसाहेबानाच सगळा दोष देण्यापासून तरी काय फायदा ? आपण जें एकदा केलें त्याची संपादणी करण्याचा प्रयत्न करणे हा मनुष्यस्वभावच आहे. १९३२ सालीं कायदेभंग सुरू केला म्हणून तो १९३३

मध्येहि थांबवावयाचा नाहीं, किंबहुना पुढेहि केव्हा थांबवावयाचा नाही, हा निर्णय जसा गांधीजींनी लोकमताविरुद्ध दिला; तसाच लॉर्ड विलिंग्डन यांनीहि १९३२ सालीं भेट नाकारली म्हणून १९३३ सालींहि ती नाकारण्याचें लोकमताविरुद्ध ठरविलें! अर्थात झाली ही चूक उभयपक्षीं झाली असें आम्हांस वाटते. गांधींनी मागितलली भेट लाटसाहेबांनी नाकारावयास नको होती. पण आधी गांधींनीच लाटसाहेबांची भेट मागावयास नको होती. भेट नाकारली हें जरी वाईट झालें, तरी भेट मागितल्यास ती नाकारली जाणार हें भविष्यदेखील सर्वांनीच केलें होतें. पुण्याच्या सभेंत व सभेबाहेर पुष्कळांनी हे भविष्य बोलून दाखविलेंच; पण सभेपूर्वीच्या केसरीच्या अंकांत या भविष्याचें दिग्दर्शन आम्हींहि केलें होतें. व्हाइसरॉयांची भेट घेण्याची म. गांधींची कल्पना त्यांना अगदी आयत्या वेळीं सुचलेली नव्हती हें कोणीहि सांगेल. आपल्या तर्कवादाचे वळसे वळावयाचे ते वळून, या मुलाखतीची गांठ त्यांनी आपल्या मनांत या सभेच्या आधीपासूनच घातलेली असावी. आणि असें होतें तर सभेंत सर्वांचें फक्त ऐकून घेऊन, आपलें मत आपणापाशीं ठेवून, म्हणजे कायदेभंग चालविण्याचा ठराव पर्यायानें मंजूर करून घेतला तो करून न घेऊन, मग व्हाइसरॉयांना भेट मागितली असती तर कदाचित् ती मिळालीहि असती. पण आपला हेका न सोडता, किंबहुना तो उघड बोलून दाखवून, दुसऱ्याला निमित्तांत घालून, खोटें पाडावें किंवा चूक ठरवावें असल्या युक्तींत फारसें शहाणपण आहे असें आम्हांला वाटत नाहीं. महात्माजी हे महा बुद्धिवान असले तरी, लॉर्ड विलिंग्डन व त्यांचे कार्यकारी मंडळ यांनाहि कांहीं थोडी बुद्धि ईश्वराने दिलेलीच आहे. तेव्हा प्रांजलपणा खिशांत राखून केवळ निमित्त ठेवण्याच्या झुकांड्या एका पक्षाने दुसऱ्याला दिल्या, तर दुसराहि पहिल्याला त्याचा उलट आहेर करणार हें उघडच आहे.

---

३ वरीलप्रमाणे व्हाइसरॉयांना भेट मागून ती नाकारली जाण्याचें संकट गांधीजींनी आपणावर विनाकारण ओढून घेतले. कदाचित लाटसाहेब भेट घेणार नाहीत या संभवाचें दुःस्वप्न आधीच पडून, गांधीजींनी त्याच्या परिहाराची तरतूद आधीच करून ठेविली असावी. ती अशी कीं, पुण्याच्या सभेंत त्यांनी असें सांगितलेंच कीं, "व्हाइसरॉय माझी मुलाखत न घेतील तर तो माझा किंवा हिंदुस्थानाचा अपमान नसून, तो स्वतः व्हाइसरॉयांचाच अपमान ठरेल!" पण मनुष्य कितीहि मोठा झाला म्हणून, त्याने पांढऱ्याला काळें व काळ्याला पांढरें म्हटलें तर तें शोभत नसतें! झाल्या प्रकारांत उलट व्हाइसरॉयांचाच अपमान झाला असें निरर्थक बोलणें, हें जनरीतीला सोडून बोलणें, फक्त विदेही मनुष्यालाच शोभेल! श्री. भागवतांत विदेही साधूचें वर्णन 'बालोन्मत्तपिशाचवत्' असें केलें आहे! बरें. व्हाइसरॉयांनी भेट नाकारण्याला जर ही 'नाथाच्या घरची उलटी खूण' लावावयाची, तर कायदेभंगाची चळवळ लोकमताप्रमाणे थांबवूनहि, तो काँग्रेस पक्षाचा पराभव नसून सरकारचाच आहे असेंहि महात्माजींना सहज म्हणतां आलें असतें! आम्हांला तर वाटतें कीं, झाला हा राष्ट्राचा अपमान झाला; व त्याला महात्माजी हेच विनाकारण कारणीभूत झाले. स्वतः त्यांचा अपमान झाला कीं नाहीं हें त्यांचें पाहणें आहे. त्याविषयीं आम्हांला कांही म्हणण्याचा अधिकार नाही. पण देशाचा अपमान झाला कीं नाही, व त्याला महात्माजी हे कारणीभूत झाले कीं नाही, याविषयीं बोलण्याचा तिऱ्हाइतालाहि अधिकार आहे. या पडत्या कायदेभंगाच्या चळवळीला वाढता जोर मिळावा म्हणून, मुलाखतींची, म्हणजे मुलाखत नाकारून घेण्याची व सरकारावर लोक नाखुष करण्याची, युक्ति म्हणून महात्माजींनी योजली असेल तर ती फुकट आहे. कारण काय होणार हें लोकांना पूर्वीच कळून चुकले होतें. आणि झाल्या गोष्टींत अपमान कोणाचा होणार याविषयीं आम्ही म्हणतों असेंच लोकमत होतें. यामुळे लाटसाहेबांकडून आलेल्या नकाराने लोकांना राग येऊन चळवळीला विशेष जोर चढेल असें आम्हांला वाटत नाही!

---

४ पुणें शहर म्युनिसिपालिटीतील कांही सभासदांना व्हाइसरॉयांस मानपत्र देण्याची दुर्बुद्धि झाली. तिनें त्यांना अखेर चांगलीच शिक्षा भोगावयास लावली म्हणावयाची! मानपत्राचा ठराव बहुमताने पास झाला असला तरी, सदर मानपत्र पुणें शहराच्या नांवावरच विकावयाचें असल्यामुळे, तें देणारांपेक्षा घेणारालाच खरा पेंच पडला. देणारांना लोकमताच्या विरोधाची लाज वाटली नाहीं; पण घेणारास ती वाटून व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनी मानपत्र स्वीकारण्याचेंच साफ नाकारलें! विलिंग्डन हे स्वतः मानी आहेत व बादशहांचे प्रतिनिधि आहेत. त्यांना पेंच असा पडला असला पाहिजे कीं, म्युनिसिपालिटीनें देऊं केलेलें मानपत्र पुण्यांतील लोकमताचें निदर्शक समजावयाचें कीं नाहीं? म्युनिसिपालिटी मानपत्र देण्याचा ठराव बहुमताने पास करते, व पुण्यांतील

नागरिक जाहीर सभा भरवून, व म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षाकडे हजारों सह्यांचे अर्ज पाठवून, मानपत्रास विरोध करतात! अशा स्थितींत खरें लोकमत त्यांनी कोणतें समजावयाचें ? म्युनिसिपालिटींतील सभासदांचें कीं गांवांतील लोकांचें ? ज्या मानपत्राची चोहोंकडून अशी विटंबना झाली तें मानपत्र व्हाइसरॉयांसारख्या मानी अधिकाऱ्यास अपमानपत्र वाटलें असल्यास त्यांत आश्चर्य काय ? व्हाईसरॉयांनी मानपत्र नाकारताना हें कारण न देतां, वेगळें कारण सांगितलें यांत त्यांनी शिष्टाचारबुद्धिच प्रकट केली. त्यामुळें मानपत्र देणाऱ्या कंपूची मात्र पुरी फटफजिती झाली. कारण लोकनिंदेस ते पात्र होऊनच्या होऊन सरकारच्या कृपेचा लाभ त्यांस व्हावयाचा तोहि न झाल्यानें, त्यांना त्यांच्या तोंडपुजेपणाबद्दल शासनच मिळालें असें म्हटलें पाहिजे. घडलेल्या प्रकारापासून ते जरूर तो बोध घेतील, व पुणेंकरांच्या दुर्लौकिकास यापुढें तरी ते कारण होणार नाहींत अशी आम्हांस आशा आहे.

---

५ कापडाच्या खालोखाल साखरेचा धंदा हिंदुस्थानांत प्रसार पावणार असा संभव दिसतो. कापडाप्रमाणें साखरेसहि सरकारी संरक्षण मिळालें असल्यामुळें, संयुक्त प्रांत, बिहार, ओरिसा, म्हैसूर, मुंबई इलाखा इत्यादि प्रदेशांत साखरेचे नवीन नवीन कारखाने निघूं लागले आहेत. मुंबई इलाखा या धंद्यांत इतर प्रांतांपेक्षां बराच मागसलेला आहे तरी त्यांत सांप्रत सुरू असलेल्या बेलापूरच्या एका कारखान्याखेरीज पुढील सालीं पांच कारखाने चालत असलेले दृष्टीस पडतील. त्या शिवाय सं. प्रांतांत आणखी ४८ कारखान्यांची स्थापना होऊन, एकंदर कारखान्यांची संख्या पुढील वर्षी १२४ पर्यंत जाईल असा अंदाज आहे. सांप्रत स्वदेशी साखर मिळते तितकी संपून, परदेशी साखरहि गिऱ्हाइकास घ्यावी लागते. या दृष्टीने परदेशी साखरेचा खप हिंदुस्थानांत बंद होईपर्यंत स्वदेशी साखरेच्या कारखान्यांच्या वाढीस वाव आहे असें मानण्यास हरकत नाही. सध्या सिमल्यास प्रांतिक सरकारांचे दिवाण व प्रांतांचे प्रतिनिधी एकत्र जमले असून, या धंद्याच्या प्रगतीसंबंधानें त्यांची वाटाघाट सुरू आहे. त्यांच्या परिषदेपुढील मुख्य प्रश्न असे आहेत कीं, साखरेस मिळालेल्या जकातीच्या संरक्षणाचा साखरेच्या कारखानदारांकडून योग्य उपयोग केला जातो कीं नाही ? त्याच प्रमाणे देशांत कारखान्यांची वाढ सुरू आहे तिला आळा घालावयास पाहिजे काय ? व बागाईतदारांस मिळावयाची उंसाची किंमत कायद्यानें ठरवून टाकावयास पाहिजे काय ?

---

६ परिषदेंतील एकंदर चर्चेवरून साखरेच्या धंद्यांत सरकारानें तूर्त हात घालूं नये असेंच ठरण्याचा संभव दिसतो व तेंच धोरण आमच्या मतें योग्यहि आहे. इकडील उंसांत जावा बेटांतील उंसाच्या मानानें साखरेचें प्रमाण ½ हि नाहीं. तें प्रमाण वाढविण्याचा प्रयत्न सरकारच्या शेतकी खात्यानें केल्यास, त्याची शेतकऱ्यांना उंसाचा उदीम अधिक किफायतशीर होण्यास पुष्कळच मदत होईल यांत शंका नाहीं. हल्लीं स्वदेशी साखरेच्या कारखानदारांना जकातीमुळें फाजील नफा मिळत असेल, तर कारखान्यांची वाढ योग्य प्रमाणांत झाल्यानें त्या नफ्यास स्वाभाविकच पायबंद बसेल. सध्या साखर व गूळ हे दोनहि पदार्थ लोकांच्या खाण्यांत येतात. पण उद्या गुळाइतका साखरेचा भाव उतरला तर गुळाऐवजी साखरच खाण्याची जनतेंतील प्रवृत्ति वाढून, कदाचित् गुळाचें अजिबात उच्चाटनहि होईल. साखर ही वस्तु एक वेळ अतिशय दुर्मिळ असल्यामुळें, 'साखरेच खाणार त्याला देव देणार' अशी म्हण पडली इतकी ज्या साखरेची महती ती साखर देवा ऐवजीं हवा तो दुकानदार अगदी स्वस्त किंमतींत विकूं लागल्यावर, असा कोण अभागी माणूस आहे कीं जो साखरेचा गोड घास तो नको म्हणेल? या दृष्टीनें विचार केल्यास साखरेच्या खपाचें क्षेत्र पाहिजे तसें वाढणारें असल्या कारणानें, सरकारानें त्या धंद्यास थोपवून धरण्याच्या भानगडींत तूर्त न पडणेंच बरें असें आम्हांस वाटतें.

## व्हाइसरॉयांनी मुलाखत नाकारली !

शुक्रवार ता. १४ रोजीं पुण्यांतील राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या भरलेल्या सभेचें काम संपल्यानंतर त्याच दिवशीं रात्रौ महात्मा गांधींनी व्हाइसरॉयांना तार केली. त्या तारेंत त्यांनीं व्हाइसरॉयांना विचारलें होतें कीं "देशांत शांतता प्रस्थापित करण्याचें मार्ग चोखाळण्याची शक्याशक्यता किती आहे, हें ठरविण्याकरिता आपण मला मुलाखत द्याल काय ? देणार असाल तर तसें कळवा."

### व्हाइसरायांचें म. गांधींना उत्तर

या तारेला ता. १७ रोजीं पहांटेस

व्हाइसरायांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींनी म. गांधीं-ना खालील आशयाचें उत्तर तारेने पाठविलें.

" जर परिस्थिति हल्लींहून भिन्न असती तर व्हाइसरॉयांनी आपणास आनंदाने भेट दिली असती. परंतु कायदेभंगाची चळवळ बिनशर्त थांबविण्याविरुद्ध आपण आहां असें दिसतें. आणि म्हणूनच आपल्या भेटींतून तडजोडीचें बोलणें निघूं शकणार नाहीं. आपण मागतां ती मुलाखत या अटी-संबंधी सरकाराशीं वाटाघाट करण्याकरितां आहे. कायदेभंग सर्वस्वी बिनशर्त बंद करावा अशी सरकाराची इच्छा असल्यामुळे समेट होणें शक्य नाही व म्हणून सरकार कायदेभंग बंद करण्याचे बाबतींत तुमच्याशीं बोलणें करण्यास तयार नाहीं. कॉंग्रेस आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर कायदेभंग बंद करण्यास तयार नसल्याने व्हाइ-सरायांशीं तुमची मुलाखत होण्यापासून कांहीं कार्यभाग होण्यासारखा नाहीं."

### पर्णकुटीवरील वाटाघाट

ता. १७ रोजीं सकाळीं अकरा वाजल्यापासून एक वाजेपर्यंत व पुनः दुपारीं ३ वाजल्यापासून सायंकाळपर्यंत राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांच्या पर्णकुटीवर खासगी गुप्त बैठकी चालू होत्या असें समजतें. गांधीनी व्हाइसरॉयसाहेबांस आणखी एक उत्तरादाखल तार दोन प्रहरीं केली ती येणेंप्रमाणें—

### म. गांधींचें व्हाइसरॉयांना उत्तर

तुमच्या उत्तराने माझी निराशा झाली, वास्तविक रीतीनें तुम्ही जर परिषदेसंबंधीं अन-धिकृत रीत्या ज्या बातम्या प्रसिद्ध झाल्या त्यावरून आपला ग्रह बनवून, मुलाखतीला नकार दिला नसता तर मी असें सिद्ध करूं शकलों असतों कीं, एकंदर परिषदेचा रोख शांततामय तडजोड घडवून आणण्या-कडेच होता. अपमान न पत्करता समेट घड-वून आणता येईल तर तो परिषदेला निःसंशय हवा होता. परंतु सरकारचे कायदे दडपशाहीचे असल्यामुळे कॉंग्रेसने ते मोडले. असे कायदे कॉंग्रेस मोडते म्हणून तिजबरोबर समेटाचें बोलणे देखील करण्यास सरकार तयार नसेल तर माझें कांहींच म्हणणें नाहीं.

आजच्या स्थितींत मला स्वतःसंबंधानें कांहीं सांगावेसें वाटतें. माझें सर्व आयुष्य शांततेच्या प्रयत्नांत खर्ची पडलें आहे व शांततामय तडजोडीची मला तळमळ लागली आहे. पण मला थातुरमातुर तडजोड चालत नाहीं. जर मी असहकारास किंवा कायदे-भंगास प्रवृत्त झालों असलों तर तें केवळ तडजोड घडवून आणावी, आपखुषीनें सहकार्य करावे व सक्तीच्या जुलुमाऐवजीं आपखुषीनें कायदे पाळ-ण्यास तयार व्हावे याकरिता होय. म्हणून मला अशी आशा आहे कीं मुलाखत मागण्याची माझी विनंति अमान्य होणार नाहीं.

# लक्ष्मी—देवीदासविवाह

( ले.-महादेवशास्त्री दिवेकर )

हिंदुस्थानांत व हिंदु समाजांत ज्यांना अग्रेसर-त्वाचा मान आहे अशा दोन मोठ्या पुढाऱ्यांच्या पुत्राचा व कन्येचा जो विवाह नुकताच झाला, तो आज सर्व लोकांच्या चर्चेचा विषय झाला असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. धर्मकारण, समाजकारण व राजकारण यावरहि या विवाहाचे परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीत. प्रथम या विवाहाचें शास्त्रदृष्ट्या कोणतें स्थान आहे हें पाहूं.

वैश्यपुत्र व ब्राह्मणकन्या यांचा हा विवाह असून, धर्मशास्त्रदृष्ट्या हा प्रतिलोम विवाहच आहे. असे प्रतिलोम विवाह महाभारतकालीं होत होते व त्यानंतर ते निषिद्ध ठरले. एक काल असा होता कीं, स्त्री कोणत्याहि वर्णांतील असो, तिच्यापासून झालेलीं अपत्यें, पितृजातीय समजत असत. पितृसावर्ण्याचीं मोठीं उदाहरणें पुढील होतः—

| | पिता | | माता | | अपत्य |
|---|---|---|---|---|---|
| (१) | शंतनु (क्ष.) | + | गंगा (अनामक) | = | भीष्म (क्ष.) |
| (२) | पराशर (ब्रा.) | + | मत्स्यगंधा (धीवरी) | = | कृ. द्वै. (ब्रा.) |
| (३) | शंतनु (क्ष.) | + | मत्स्यगंधा (,, शूद्र) | = | विचि. (क्ष.) |
| (४) | विश्वामित्र (क्ष.) | + | मेनका (अप्सरा) | = | शकुं. (क्ष.) |
| (५) | ययाति (क्ष.) | + | देवयानी (ब्रा.) | = | यदु (क्ष.) |
| (६) | ययाति (क्ष.) | + | शर्मिष्ठा (आसुरी) | = | द्रुह्यु (क्ष.) |

वरील सहा विवाहांमध्ये एक पिता ब्राम्हण, पांच पिते क्षत्रिय आहेत. आणि त्यांची संतती (क्षेत्र कोणतेंहि असलें तरी) सवर्णच आहे. या विवाह-पद्धतींत दोष दिसूं लागल्यामुळे, ती बंद पडली व पुढे मातृसावर्ण्य सुरू झालें. चार वर्णांपैकीं वरच्या वर्णाचें बीज व खालच्या वर्णाचें क्षेत्र यांच्या संततीला जाति असें म्हटलेलें असून, त्या अनुक्रमें मूर्धावसिक्त, अंबष्ठ, निषाद, माहिष्य,

उग्र, करण, रथकार इत्यादि आहेत. अलीकडील निबंधकारांनी जाति हें नांव याच वर्गांना दिलें असून, प्रतिलोमविवाहजन्य संततीला संकर असेंच म्हटलें आहे. सूत,मागध, वैदेहक, आयोगव, क्षत्ता, चंडाल इत्यादि प्रसिद्ध प्रतिलोम संकर होत. संकरांचे संकरहि असंख्य आहेत.

वैश्यपुत्र व ब्राह्मणस्त्री यांचा हा प्रतिलोम विवाह समंत्र झाला असला,तथापि संततीला नाव मागध अगर आयोगव हेंच शास्त्रतः येणार आहे! हें नांव टळावें, म्हणून लग्न रजिस्टर केलें आहे. रजिस्ट्रेशनने संततीचें अधर्मत्व नष्ट होतें, पण प्रतिलोम संतती ही अधर्मसंतती आहे असें नाही. ती निंद्य संतति आहे. रजिस्ट्रेशनने संततीचा दर्जा उच्च होणार नाही.

## विवाहाचा अनिष्ट परिणाम

या विवाहामुळे महात्मा गांधींच्याविषयी ते चातुर्वर्ण्याचे अभिमानी आहेत, अशा ज्या कल्पना होत्या त्या आता जाणार आहेत. गेल्या नोव्हेंबरात महात्माजींचें जें पहिलें पत्रक अस्पृश्यांविषयी प्रसिद्ध झालें ते पाहून कित्येकांना वर्णसंकराचा वास आला होता. पण त्या पत्रकाचें किंवा त्या मताचें जे समर्थन करीत त्यांना त्यांत आता कांही अर्थ नाही असें कळून चुकलें. अपवाद म्हणून हा विवाह झाला असला तरी तो मोठ्यांनी केला आहे म्हणून अनुकरणीय आहे असें मात्र नव्हे! हीं दोनहि वधूवरें एक तत्त्व, एक शिस्त, एक ध्येय, एक निष्ठा अशा आईबापांचीं असल्यामुळे, आणि शिक्षणामुळेंहि या उभयतांत संस्कृतिसाम्य उत्पन्न झालें आहे, यांत मुळीच शंका नाही. पण याचें अनुकरण म्हणून विषम संस्कृतीचे विवाह जर घडूं लागले तर त्याचा परिणाम अनिष्ट असाच होईल. हिंदु समाजामध्ये अनेक जाति आहेत. त्यांमध्ये सांस्कृतिक दृष्ट्या फार अंतर आहे. खालचे व वरचे थर यांमध्ये समान संस्कृति उत्पन्न करण्याचे जोराने यत्न केले पाहिजेत. समान संस्कृति उत्पन्न करण्याला हल्ली काल फार अनुकूल आहे. हें सर्व खरें आहे, म्हणूनच पोटजातींच्या एकीकरणापुढे एक पाऊलभरहि जाऊं नये असें आमचें मत आहे.

कोणतीहि सुधारणा मध्यम वर्गात गेली म्हणजे ती स्थिर होते. पोटजातींचें एकीकरण या विषयाची आवश्यकता आज फार आहे व ती मध्यम वर्गाला पटत आहे. म्हणून राष्ट्रांतील तरुणांनी जाति मोडण्याच्या चळवळीला उचलून न धरतां, आपला सर्व शक्ति पोटजातींच्या एकीकरणाकडेच खर्च केली पाहिजे.

## राष्ट्राचें दुर्दैव

१९३० सालीं महात्मा गांधींचा शब्द म्हणजे राष्ट्राचा शब्द अशी सत्य व दृष्ट लागण्याजोगी राष्ट्राची स्थिति होती. पण महात्माजींचा मंदिरप्रवेशाच्या बिलाकडील ओढा व त्याकरिता खटपट हीं पाहून, त्यांच्या झेंड्याखालीं असलेला एक मोठा वर्ग हळहळू दूर झाला आहे. आता या विवाहामुळे आणखी एक मोठा वर्ग साशंकतेने बाहेर पडणार, व राष्ट्रांत यापुढे कोणतेंहि कार्य कांही दिवस तरी नेटाने होण्याला अडथळाच येणार! राष्ट्राची सर्व शक्ति एकवटली पाहिजे. ती एका कार्याकडे लावली पाहिजे, आणि आधी राजकीय हक्क मिळविण्याची तळमळ लोकांत उत्पन्न केली पाहिजे. हें जर सर्व खरें असल, तर हल्ली जे चाललें आहे, त्यामुळे अस्पृश्यता-निवारण लांबेल आणि राजकारणहि जोराने चालणार नाही! राष्ट्राचें बल म्हणजे राष्ट्रीय सभा! ती नष्ट करण्याकरिता सरकार बद्धपरिकर झालें असताना, तिचें बल क्षीण करण्याचे यत्न राष्ट्रीय पुढाऱ्यांनीच करावेत, हें राष्ट्राचें दुर्दैवच होय! हिन्दी राष्ट्राची शक्ति एकवटलेली व कार्यप्रवण झालेली दिसावयाचीच नसेल, तर ही ईश्वरी घटना योग्यच आहे असें म्हणावें लागेल.

## राष्ट्रबलाची हानि

महात्माजींनी अस्पृश्यांकरिता हट्ट घेतला तो एक परीने योग्य होता व त्यांनी कांही दिवस तें एकच कार्य करावें असेंच रा. श्री. म. माटे यांचे म्हणणें होतें. पण आता कायदेभंग किंवा नव्या पक्षाची घटना, अस्पृश्यतानिवारण आणि मधूनमधून जाति मोडण्याच्या चळवळीला प्रोत्साहन यांचा परिणाम काय होईल हें सांगावयास नको! पण एवढ खरें कीं, या सर्व प्रकारांमुळे इंग्रजांचें बल वाढतें आहे, व राष्ट्राचें बल क्षीण होत आहे.

खरें पाहिलें तर आता अडूनदडून वळसे घेऊन बोलण्याचें कांहीच प्रयोजन नाही. चातुर्वर्ण्याविषयींच्या ज्या कल्पना महात्मा गांधी वेळोवेळीं प्रकट करतात त्या जुन्या धर्मशास्त्रांत बिलकुल नाहीत. वर्ण चारच आहेत. ते जन्मतः श्रेष्ठ आहेत. अनुलोम सहा जाति व प्रतिलोम संकर असंख्य असें धर्मशास्त्रांत आहे. जातीचा उत्कर्ष होतो हेंहि धर्मशास्त्राला मान्य आहे. खालच्या वर्णाने वरच्या वर्णाचा व्यवसाय स्वीकारला व त्यांत त्याच्या कांही पिढ्या गेल्या, म्हणजे खालच्या वर्णाची संस्कृति बदलते व तो वरच्या वर्णाचा होतो, हें आपस्तंब, बौधायन, गौतम इत्यादिकांनाहि मान्य आहे. खालचा वर्ण वरच्याच्या बरोबरीचा होतो, म्हणजे त्याची हीनता जाते इतकेंच! तो वरच्या वर्णाशीं

विवाह करण्याला योग्य होती असें धर्मशास्त्राचें मत नाहीं. धर्मशास्त्र पोटजातींचें एकीकरण करण्याला व खालच्या जातीला वर आणण्याला आणि अस्पृश्यांचा विटाळ समूळ नष्ट करण्याला आमच्या मतें मान्यता देते. आमच्या दृष्टीने धर्मशास्त्राची मजल एवढीच आहे.

# केसरी—मराठा कचेरींतील उपाहारसमारंभ

म. गांधी यांनी गेल्या वर्षी सप्टेंबर महिन्यांत प्रायोपवेशन केलें. त्या निमित्ताने पुण्यांत परप्रांतीय पुढाऱ्यांचें वारंवार येणेंजाणें सुरू झालें. परंतु गेल्या आठवड्यांत लाहोरपासून तों थेट कलकत्ता आणि काशीपासून तहत मद्रास, इतक्या दूरदूरच्या प्रदेशांतील पुढाऱ्यांचा समुदाय जसा एकदम व मोठ्या प्रमाणांत जमला तसा पूर्वी कैक वर्षांत जमला नव्हता. राष्ट्रीय सभा भरते तेव्हा पुढारी व प्रतिनिधि यांची अलोट गर्दी नियोजित स्थळीं येते; पण तसा प्रसंग फक्त पुण्यात भरलेल्या परिषदेचा नव्हता. निरनिराळ्या प्रांतांतील ठळक व प्रमुख अशाच व्यक्तींना निमंत्रण असल्यामुळे, निवडक तेवढेच स्त्रीपुरुष पुण्यांत एकत्र पहावयास सांपडले. या दुर्मिळ संधीचा फायदा घेण्याचें केसरी-मराठा संस्थेने योजून, उपाहाराचा मोठा समारंभ घडवून आणिला. परिषदेस सुरवात बुधवारीं झाली. परिषद गुरुवारीं संपणार असा प्रारंभीं अदाज होता. त्यास अनुसरून गुरुवारीं सायंकाळीं ६॥ वाजता उपाहाराचें निमंत्रण सर्वांना देण्यात आलें.

दिवस पावसाळ्याचे असल्यामुळे समारंभाकरिता केसरी—मराठा कचेरीच्या भव्य पटांगणांत दाते आणि मंडळींनी मंडप उभारला होता. मंडप फार शोभिवंत बनविला होता. केसरी—मराठा कचेरींतील संपादकांच्या उपयोगाकरिता गतवर्षी ग्रंथशाला बांधण्यांत आली आहे तिच्यांत पानसुपारीचा बेत केला होता. विजेच्या रोषणाईमुळे ती इमारत व मंडप यांस विशेष सौंदर्य प्राप्त झालें होतें. ग्रंथालयाच्या दरवाजापाशीं लो. टिळकांचा प्लॅस्टरचा पुतळा ठेवला होता. त्याखेरीज ग्रंथालयांत दुसरा पुतळा बसवून त्यापुढे विजलीच्या बत्तीची कमान उभी केली होती. केसरी—मराठा संस्थेंत पूर्वी जे संपादक होऊन गेले त्यांपैकीं कित्येकांचीं रंगीत छायाचित्रें तेथे लावण्यांत आलीं असल्याने, ग्रंथालय प्रेक्षणीय चित्रशाळेप्रमाणेंच सजलें होतें.

सायंकाळीं सहा वाजल्यापासूनच ॲड्व्होकेट देशमुख यांच्या लोकमान्य पथकांतील बालवीरांचा बँड गायकवाड—वाड्यांत झडूं लागला. पाहुणे मंडळीची बरदास्त ठेवण्याकरिता महाराष्ट्रीय मंडळांतील व केसरी—मराठा संस्थेंतील मंडळी सज्ज होऊन राहिली होती. सहा—सवासहा वाजल्यापासून निमंत्रित मंडळी येण्यास सुरुवात झाली. म. गांधींची स्वारी ६॥ वाजण्याच्या सुमारास आली. त्या वेळीं, सबंध गायकवाड—वाडा स्त्रीपुरुषांनी व मुलांनी गजबजला असून, मंडपांत तर अगदी रीघ नव्हती. म. गांधींनी मंडपांतून एक फेरी मारली. ते थोडा वेळ ग्रंथालयांत बसले. तेथे त्यांस व त्यांजबरोबर पं. मालवीय, मौ. अबुल कलम अझाद, अबास तय्यबजी यांस हार घालण्यांत व पानसुपारी देण्यांत आल्यावर सर्वांचा निरोप घेऊन परत पर्णकुटीकडे गांधीजी निघून गेले. त्यांच्या सतेज चेहऱ्याकडे ज्याने पाहिलें त्यास ते २१ दिवसांच्या भयंकर दिव्यांतून नुकतेच बाहेर पडले आहेत असें क्वचितच वाटलें असेल. त्यांचें व सर्वांचें स्वागत करण्यास वाड्याच्या दरवाज्यापाशीं रा. न. चिं. केळकर, धोंडोपंत विद्वांस व संपादकमंडळी उभी होती.

उपाहारास आल्यावांचून पाहुण्यांपैकीं क्वचितच एखादा मनुष्य राहिला असेल. पं. मालवीय, ना. शास्त्री, श्री. सरोजिनी नायडू, डॉ. अलम, श्री. सत्यमूर्ति, मौ. अबुल कलम अझाद, जे. सी. दासगुप्त, द्वारका प्रसाद मिश्र, बॅ. मोरोपंत अभ्यंकर, डॉ. प्रफुल्ल चंद्र घोष, बॅ. असफअली, अबास तय्यबजी, सी. राजगोपाळाचार्य, सौ. कमला नेहरू, व श्री. उमा नेहरू, सौ. हंसा मेथा, सौ. लीलावती मुनशी, बॅ. पुरुषोत्तमदास त्रिकमदास, श्री. जमनादास द्वारकादास इत्यादि अनेक प्रमुख मंडळी आली. त्या सर्वांचीं नांवें दिलीं तर ती यादी फार मोठी भरेल. पुणें शहरांतील बऱ्याच प्रमुख गृहस्थांस पाचारण केलें होतें. त्याप्रमाणे रा. ब. हणमंतराम रामनाथ, प्रो. काळे, वामनराव पटवर्धन, रा श्री. ग. वझे, ल. ब. भोपटकर, प्रो. हर्डीकर, प्रो. पोतदार, केशवराव जेधे, ह. वि. तुळपुळे, वासुदेवराव जोशी, दत्तोपंत आपटे, कवडेशास्त्री, विश्वासराव डावरे, इत्यादि अनेक गृहस्थ येऊन गेले. परगांवचे पाहुणे व गांवांतील निमंत्रित मिळून सातआठशें लोक उपाहारासाठी आले होते. रात्रीं ९ वाजेपर्यंत सारखी ये—जा सुरू होती. म. गांधींचें आगमन गेल्या ५।६ वर्षांत गायकवाड-वाड्यांत प्रथमच झालें असें समजण्यास हरकत

नाही. ते नुकतेच उपोषणांतून बाहेर पडले असल्यामुळे त्या दिवशींचा एकंदर देखावा सहृदय माणसास संस्मरणीय वाटावा असाच झाला. हा समारंभ यशस्वी करण्याच्या कामीं मोडक-वाले रा. दाते, [illegible] बोर्डिंगाचे व्यवस्थापक, महाराष्ट्रीय-मंडळ व देशमुख यांचें लोकमान्य पथक यांचे परिश्रम पुष्कळ अंशीं कारणीभूत झाले ही गोष्ट नमूद करणें आवश्यक होय.

# रेव्हरंड हिंदु झाले

मसूर ब्रह्मचर्याश्रमाचे संस्थापक श्री. धर्मभास्कर श्रीविनायकमहाराज यांचे हस्तें शनिवार ता. १५ रोजीं सायंकाळीं गायकवाडवाड्यांत एक अपूर्व असा शुद्धिसमारंभ झाला. शुद्धीकृत गृहस्थ हे उत्तर–हिंदुस्थान युनायटेड चर्चचे एल्डर व त्यांच्या महाराष्ट्र सिनडचे उपाध्यक्ष आणि नागपूर येथील स्कॉटलंड चर्चचे माजी रे. मि. जेम्स डा रवेला हे होत. या समारंभासाठीं सुमारें दीडदोन हजारांचा श्रोतृसमुदाय जमला होता.

शुद्धिसंस्कार आश्रमांतीलच एक कार्यकर्ते वे. शा. सं. मोडकशास्त्री यांनी केला. होमहवन, यज्ञोपवीत-धारण, गोपूजन इत्यादि विधि झाल्यावर मसूरकर-महाराजांनी शुद्धीकृताचें नांव 'किसन दुलारेसिंग' ठेवल्याचें जाहीर करण्यांत आलें. नंतर आश्रमाचे व्यवस्थापक ब्र. क्षीरसागर यांनी डॉ. मुंजे व पं. मदन मोहन मालवीयजी यांनी या समारंभास सहानुभूतिदर्शक पाठविलेले संदेश वाचून दाखविल्यावर शुद्धीकृत किसन दुलारेसिंग यांनी इंग्रजीमध्ये पुढील आशयाचा आपला पूर्वेतिहास सांगितला.

### रेव्हरंडांचा पूर्वेतिहास

"माझे पणजोबा आठनऊ वर्षांचे असतांना त्यांचे वडील व मातुश्री हीं दोनही पटकीच्या साथींत वारलीं. ते हैद्राबाद येथे फ्रेंच सेनापति बुसी यांच्या सैन्यांत नोकर होते. माझे पणजोबा असे निराधार झाल्यावर त्या सैन्यांतील फ्रेंच अधिकारी डा रवेला याने त्यांचें संगोपन केलें व त्यांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. अशा रीतीने माझ्या पूर्वजांचा ख्रिस्ती धर्मांत प्रवेश झाला.

मी कांही आकस्मिक कारणाने माझ्या पूर्वजांच्या धर्मांत परत आलों नाहीं अगर मला कोणी थापा, आमिष दाखविलें नाहीं अगर जुलूम–जबर-दस्तीहि केली नाही. गेलीं दहा वर्षें माझ्या डोक्यांत हा विचार थैमान घालीत होता. श्रीकृष्णाच्या मोहक मुरलीरवानें माझें हृदय व्यापून गेलें व मला माझ्या मूळ धर्मांत आल्याखेरीज उद्धाराची आशा वाटेना. आपला सनातन हिन्दु-धर्म सर्वव्यापी व सर्वसंग्राहक आहे. त्याच्यावर अलीकडे आचाराचे कांही पटल आले असतील, परंतु त्याचें मूळ स्वरूप अत्यंत शुद्ध, सात्विक व आनंदमय असें आहे, तें कोणासहि वेड लावील. हिंदुधर्माचें सत्यस्वरूप मला श्रीविनायकमहाराज यांनी दर्शविलें व त्यांच्या कृपेने आज मला माझ्या मायधर्मांत येतां आलें हें माझें परमभाग्य होय."

### रा. केळकर यांचें भाषण

समारंभाचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर आपल्या भाषणांत म्हणाले "जगांत दोन आपत्ति अशा आहेत कीं त्यांतून मुक्त होण्याचा प्रत्येकाने सदैव प्रयत्न केला पाहिजे. त्या दोन आपत्ति म्हणजे स्वराज्यनाश व स्वधर्मच्युति! मनुष्यमात्राने या दोन गोष्टींतून मुक्त होण्यासाठीं सदैव अट्टाहास केला पाहिजे. अत्यंत संपत्तिवान मनुष्य संपत्तीने धुंद होऊन त्याला जग दिसूं नये त्याप्रमाणे हिंदुधर्माची स्थिति झाली. त्याचा फायदा विधर्मीयांनी घेऊन ते आपल्या घरांत शिरले. अज्ञानी मनुष्याला धर्मांतर करतां येऊं नये असें डॉ. र. पु. परांजपे म्हणत. ही गोष्ट सुदैवाने घडली तर हिंदुस्थानांतील धर्माधर्मांतील तंटे सुलभतेने मिटतील. यापुढे आजचे शुद्धीकृत गृहस्थ मसुराश्रमाला या कार्यांत मनोभावें साहाय्य करतील अशी आशा आहे."

शेवटीं श्री. विनायकमहाराज यांनी सर्वांचे आभार मानल्यावर धार्मिक, आर्थिक, ऐहिक व पारलौकिक दृष्टया हिंदु–धर्म श्रेष्ठ कसा आहे हें सांगून ते म्हणाले, "जगांत ख्रिस्ती व मुसलमानी लोकांनी धर्माच्या नांवावर जितका रक्तपात केला आहे तितका आजतागायत कोणीहि केलेला नाही. जगांत जर शांतता स्थापन होण्याची गरज असेल, अहिंसावृत्ति वाढावयास पाहिजे असेल, रक्तपात थांबवावयाचे असतील तर हिंदुधर्माचा प्रसार झाला पाहिजे. सुदैवाने किसन दुलारेसिंग यांना हिंदुधर्माचें महत्त्व पटून त्यांनी ख्रिस्ती धर्मांत असलेली मानाची नोकरी सोडली. आता ते आपल्या मायधर्मांत आले आहेत व यापुढे ते स्वधर्मप्रसाराचें कार्य हातीं घेतील अशी आशा वाटते."

वरीलप्रमाणे भाषणें झाल्यावर जमलेल्या लोकांना शर्करा वांटण्यांत आली व समारंभ समाप्त झाला.

# प्रांतिक स्वराज्याचा बोजवारा!

हिंदुस्थानाचे स्टेट-सेक्रेटरी सर सॅम्युएल होअर, यांनी गेल्या आठवड्यांत जॉइंट सिलेक्ट कमिटीपुढे दिलेला साक्ष वाचून भावी राजकीय सुधारणांच्या योजनेंत, निदान प्रांतिक स्वायत्तता तरी खास मिळेल, अशी जी अंधुक आशा वाटत होती, तीहि नष्ट झाली असे वाटल्याशिवाय राहत नाहीं ! स्वायत्तता किंवा स्वराज्य यांचा खरा व स्पष्ट अर्थ हाच कीं, लोकप्रतिनिधींनी निवडलेल्या मंत्रि-मंडळाच्या हातीं अनिर्बंध अशी राज्यसत्ता असली पाहिजे व हें मंत्रिमंडळ लोकनियुक्त अशा कायदे-मंडळाला पूर्ण जबाबदार राहिलें पाहिजे. असलें निर्भेळ स्वराज्य सर्व हिंदुस्थानाकरिता देण्यास ब्रिटिश सरकार केव्हाच तयार नव्हतें. प्रथमपासूनच संरक्षक बंधनांच्या खोड्यांत या स्वराज्याचे पाय अडकलेले होते; पण प्रांतिक राज्यकारभारांत तरी जवळ जवळ पूर्ण स्वायत्ततेचे अधिकार दिले जातील असें वाटत होतें व तसें वाटणें अगदींच निराधार होतें असें नाहीं. सर सॅम्युएल होअर यांनी मात्र आपल्या साक्षींत प्रांतिक स्वायत्ततेचें जें चित्र काढलें तें पाहून, सध्याच्या द्विदल राज्य-पद्धतींतसुद्धा जे हक्क दिले गेले आहेत तेहि काढून घेऊन संरक्षक बंधनांच्या नांवाखाली प्रांतिक गव्हर्नरांची किंबहुना नोकरशाहीचीच अधिकाराच्या सिंहासनावर पुनः स्थापना होणार असें स्पष्ट दिसतें !

पांढऱ्या खलित्यांतील योजनेंत प्रांतिक गव्हर्नरांना त्यांच्यावर टाकलेल्या जबाबदाऱ्या पार पाडण्याकरिता कांही विशिष्ट अधिकार देण्यांत आले आहेत. गव्हर्नरांना दिलेले अधिकार हें एक संरक्षक बंधनच आहे असेहि मानलें जातें. स्टेट-सेक्रेटरींनी आपल्या साक्षींत या बंधनाची दोरी इतकी करकचून आवळली आहे कीं प्रांतिक स्वायत्ततेचा प्राण कुडीच्या आंत घोटाळावयास लागेल असें स्पष्ट म्हणावें लागतें! भावी प्रांतिक स्वराज्याचें वर्णन होअर यांच्याच शब्दांत थोडक्यांत पुढीलप्रमाणे देतां येईल. ते म्हणाले, "प्रांतिक राज्यव्यवस्थेच्या सर्व खात्यांवर खुद्द गव्हर्नरसाहेबांची देखरेख राहील. ही देखरेख करण्याकरिता तज्ज्ञ अधिकारी त्यांच्या दिमतीस दिले जातील. याशिवाय सध्याच्या कार्यकारी मंडळांतील सभासदाच्या दर्जाचा एक मुख्य चिटणीसहि त्यांना सल्लामसलत देईल. खुद्द गव्हर्नरसाहेब व्यक्तिशः कांही मंत्र्यांना व सामुदायिकपणे मंत्रिमंडळाला कारभार कसा चालवावा याबद्दलची दिशा दाखवितील. नोकरशाही व मंत्री यांचा खटका उडण्याचा प्रसंग आल्यास मंत्र्याला राजीनामा देण्याचा हुकूम सोडण्यांत येईल व तो त्याने न दिल्यास त्याला बडतर्फ केलें जाईल ! सर्व मंत्रिमंडळानेच राजीनामा दिल्यास स्वतः गव्हर्नर सर्व कारभार आपल्या हातीं घेतील व आपल्या तज्ज्ञ अधिकाऱ्यांच्या साहाय्यानें कारभार चालवितील. असा कारभार त्यांना चालवितां यावा म्हणून कायद्यांत त्यांना पूर्ण अधिकार दिले आहेत !!"

प्रांतिक स्वायत्ततेंतील गव्हर्नराला दिलेल्या जादा अधिकारांच्या या संरक्षक बंधनांना कोणीं बिचकूं नये म्हणून स्टेट सेक्रेटरींनी वरीलसारखे प्रसंग फारच क्वचित् उद्भवतील असे सांत्वनाचे चार शब्द काढले व शिवाय मोठ्या साळसूदपणाचा आव आणून असेहि सांगितलें कीं, लोकनियुक्त प्रधानांनी, आपण होऊनच नोकरशाहीशीं व गव्हर्नरसाहेबांशीं सहकार करण्याचें धोरण पत्करिलें तर वरील आपत्ति येणारच नाहीं !

सर सॅम्युएल होअर यांची वरील योजना अधिक स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाहीं, परंतु त्यांच्या योजनेच्या बुडाशीं असलेलें कपट लक्षांत घेतलें पाहिजे. आपण पोलीस खात्याचेंच उदाहरण घेऊं. हे खातें सर्व प्रांतांत लोकनियुक्त मंत्र्यांच्या हातीं द्यावयाचें असे होअर यांनी ठासून सांगितलें. परंतु ते व्यवस्था अशी करणार कीं, या खात्यापैकीं गुप्त पोलिसांचा जो भाग आहे त्याच्या कारभारासंबंधी गव्हर्नरसाहेब आपल्या तज्ज्ञ अधिकाऱ्यामार्फत रोजच्या रोज हुकूम देतील. गृहमंत्र्यानें हे हुकूम बिनबोभाट ऐकावे अशी त्यांची अपेक्षा आहे, व यालाच ते गव्हर्नराशीं मंत्र्यांनी करावयाचा सहकार अशी संज्ञा देतात! त्यानें हे हुकूम शिरसा वंद्य केले तर ठीक; नाहीं तर त्या मंत्र्याला राजीनामा द्यावा लागेल व राजीनामा दिला नाहीं तर बडतर्फीचा ब्रह्मराक्षस त्याच्या बोकांडीं बसलाच ! जी स्थिति पोलीस खात्याची तीच जमाबंदी, खजिना वगैरे इतर आर्थिक खात्यांची. प्रत्येक बाबतींत गव्हर्नर व नोकरशाही यांना हात घालण्याचा अधिकार दिला आहे. मग मंत्रिमंडळाचें स्वातंत्र्य तें काय राहिलें! बडतर्फीचा बडगा सदैव पाठीशीं ठेवून 'आम्ही प्रांतिक स्वायत्तता देतों' असा कांगावा करणें यापेक्षा कपटनीतीचें दुसरें कोणतें उदाहरण सांगावयास पाहिजे !

सध्याच्या द्विदल राज्यपद्धतीच्या अनुभवावरून

लोकसभेला मंत्रिमंडळ सामुदायिक रीतीने जबाबदार राहिलें तरच प्रांतिक कारभार सुव्यवस्थित चालेल अशी जनतेची खात्री पटली व म्हणूनच तशी मागणी हिंदुस्थानातर्फे करण्यांत आली होती. सर सॅम्युएल होअर यांनी या मागणीलाहि वाटाण्याच्या अक्षता लावल्या ! ते म्हणाले " अशा तऱ्हेची सामुदायिक जबाबदारी ठेवावी असें वाटतें खरें. पण प्रत्यक्ष कायद्यांत तसें सध्या तरी आम्ही नमूद करूं इच्छित नाहीं. " ह्या नकारघटेचा अर्थ काय ? सायमन कमिशनाच्या शिफारशींच्या पायावर पांढऱ्या खलित्यांतील योजनेची इमारत बांधली आहे अशी कबुली होअर यांनी दिली आहे. पण या बाबतींत तरी सायमन कमिशनाच्या शिफारशीलाहि त्यांनी धाब्यावर बसविलेलें दिसतें. सायमन कमिशनाने स्पष्ट म्हटलें आहे कीं, " प्रत्येक कृत्याबद्दल व प्रत्येक धोरणाबद्दल मंत्रिमंडळ सामुदायिक रीतीने जबाबदार राहील अशीच योजना केली पाहिजे. " या सिद्धांतास पोषक असा अनेक रीतींचा युक्तिवादहि त्या कमिशनाच्या अहवालांत आहे. पण ही शिफारस पत्करणें आज तरी स्टेट-सेक्रेटरींना सोयीचें नसल्यामुळे त्यांनी तिला धुडकावून लावलें आहे.

या बाबतींत स्टेट-सेक्रेटरींच्या पोटांत काय पाप आहे हें समजणें फारसें कठिण नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं पांढऱ्या खलित्यांतील योजनेप्रमाणे प्रांताचा कारभार चालविणें कोणत्याहि मंत्रिमंडळाला शक्य नाहीं. महिन्या दोन महिन्यांच्या अवकाशांत अनेक खटके उडून मंत्र्यांना राजीनामे तरी द्यावे लागतील, किंवा त्यांना बडतर्फ तरी केलें जाईल. अशा परिस्थितींत सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व मान्य केल्यास एका मंत्र्याबरोबर सर्व मंत्रिमंडळच राजीनामा देईल ! या मंत्रिमंडळाला कायदेमंडळाचा पाठिंबा असणारच. कायदेमंडळांतील बहुमत या मंत्रिमंडळाच्या पाठीशीं असतांना त्याला काढून टाकल्यावर नवें मंत्रिमंडळ अस्तित्वांत आणून त्यांच्याकडून कारभार करवून घेणें गव्हर्नरांना अशक्य आहे ही गोष्ट उघड आहे. ही आपत्ति टळावी व आपल्या पसंतीचा होयबा मंत्रिमंडळांत कायम राहावा, त्याला राजीनामा देणें भाग पडूं नये म्हणून सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व आज कायद्यांत घालण्याची टाळाटाळ केली जात आहे! सर सॅम्युएल होअर यांना हा डाव साधावयाचा आहे व याकरिताच लोकनियुक्त नसलेला असाहि मंत्री प्रधानमंडळांत घ्यावा असेंहि एक पिल्लू त्यांनी आपल्या साक्षींत सोडून दिलें आहे. वर गव्हर्नर व खाली नोकरशाही यांच्या जात्यांत कसलाहि टणक मंत्री सांपडला तरी तो भरडून निघणार. अशी ही आपत्ति कोण पत्करील ? म्हणून स्टेट सेक्रेटरी सामुदायिक जबाबदारीचें साधें तत्त्वसुद्धा मान्य करण्यास तयार नाहीत यांत आश्चर्य काय ?

अशा रीतीने प्रांतिक स्वायत्ततेंतील प्राण काढून घेतल्यानंतर राहिलेली निर्जीव कुडी होअरसाहेब हिंदुस्थानाच्या स्वाधीन करणार आहेत असें दिसतें. पण हाहि काल शक्य तितका लांबणीवर पडावा यासाठी अनेक युक्त्या व प्रयुक्त्या लढविल्या जात आहेत हें पाहून हंसूं आल्याशिवाय राहत नाहीं. स्टेट सेक्रेटरींच्या बरोबरच साक्ष देणारे व खजिना खात्याचे हिंदुस्थानांतील तज्ज्ञ सर माल्कम हेले यांनी आपल्या साक्षींत असें सांगून ठेवलें आहे कीं, प्रांतिक स्वराज्य दिलें गेल्यास प्रत्येक प्रांतावर सहा ते आठ कोटींच्या नवा खर्चाची धोंड बसणार आहे ! एवढ्या जादा खर्चाचें ओझें प्रत्येक प्रांतिक सरकारावर पहिल्या वर्षापुरतें बसल असें जरी मानलें तरी तें त्यांना कसें सोसणार? नवे कर बसवून एवढी जमाबंदी वाढविणें आजच्या परिस्थितींत शक्य नाहीं. हिंदुस्थानाजवळ असा परीस नाहीं कीं, तो लावून हिंदुस्थान लोखंडाचें सोनें बनवील ! तेव्हा अशा आर्थिक विकट परिस्थितींत हें प्रांतिक स्वराज्याचें लोढणें लोकांच्या गळ्यांत बांधावें तरी कशाला ? जगाची आर्थिक परिस्थिति सुधारली म्हणजे सध्याची दुःस्थिति जाईल व मग हिंदुस्थानाचा व्यापार वाढल्याने अधिक जमाबंदी होईल व मगच हा प्रांतिक स्वायत्ततेचा प्रश्न हातीं घेतां येईल अशी त्यांची गर्भित शिफारस आहे. सर माल्कम हेले यांनी लाविलेला हा नाट व सर सॅम्युएल होअर यांनी केलेला वरील अपशकुन पाहता प्रांतिक स्वराज्य लवकर अमलांत येईल कीं नाही याचीहि शंका वाटते.

# पुण्याच्या परिषदेचें अंतरंग

( लेखक : गोकुळ )

जुलै महिन्याच्या पंधरवड्यांत पुण्याला ज्या दोन महत्त्वाच्या परिषदा झाल्या त्यांच्या फलश्रुतीचा विचार केला म्हणजे असें म्हणण्याचा मोह होतो कीं, या पंधरा दिवसांतलें पुण्याचें ग्रहविषयक मान कांही विचित्र असलें पाहिजे. प्रादेशिक विद्यापीठ परिषदेंतले वारे पुणेकरांना प्रतिकूल वाहतील हें जवळ जवळ ठरल्यासारखेंच होतें. पत्त्यांचीं पानें लावावीं व खेळ चालू करावा म्हणजे अखेर काय होणार हें जसें आगाऊच कळतें, तसाच या परिषदेचा प्रकार अव्वलपासून चालला होता. पण कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांच्या परिषदेचा प्रकार असा नव्हता. या परिषदेला आलेल्या प्रतिनिधींमधलीं खासगी संभाषणे व पहिल्या दोन दिवसांच्या भाषणांचा रोंख यांवरून असें वाटूं लागलें होतें कीं, कायदेभंगाची चळवळ बंद करून कॉंग्रेस राजकारणाची कोंडी फोडून पुढचा रस्ता मोकळा करून देईल ! पण तिसऱ्या दिवशीं परिषदेचा सारा नूर एकदम पालटला व कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनी आपल्या अघटित घटनापटुत्वाच्या लौकिकांत फिरून एकदा भर घातली !

***

परिषदेच्या प्रारंभींच मेहेरअल्लींनी जो अप्रिय प्रसंग घडवून आणला त्याबद्दलची हकीकत वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालीच आहे म्हणून मीहि त्याबद्दल दोन शब्द लिहितों. परिषदेला जीं निमंत्रणें धाडण्यांत आलीं होतीं तीं पुणें येथील स्थानिक कमिटीमार्फत अगर तिच्या संमतीने धाडण्यांत आलीं होती. मेहेरअल्लींनी श्री. केळकरांवर खोट्या आधारावर आक्षेप घेण्याचा अनुचितपणा दाखविला त्या वेळी या कमिटींतल्या लोकांना असें समजावयाला हवें होतें कीं, मेहेरअल्लींनी अप्रत्यक्षपणें आपलाच उपमर्द चालविला आहे. मेहेरअल्लींच्या आक्षेपांना उत्तर देण्याचें काम वास्तविक या कमिटीचें होतें; व मेहेरअल्लींच्या उद्धटपणाबद्दल कमिटीने त्यांना चांगलीच समज द्यावयाला पाहिजे होती. पण कमिटींतले लोक पडले केळकरांचे फार हितचिंतक ! पाहुण्याच्या हातून परभारा साप मारला जात आहे याबद्दल त्यांना समाधान वाटलें असल्यास नवल काय ? केळकर पहिल्या दिवशीं जे एकदां निघून गेले ते फिरून परिषदेकडे फिरकले नाहीत या गोष्टीचा गवगवा करणाऱ्या लोकांनी या मुद्द्याला उत्तर दिलें तर तें अधिक बरें होईल !

***

परिषदेची स्थानिक कमिटी किती पक्षपाती होती याचा आणखीहि एक मासला सांगण्यासारखा आहे. ज्यांचा कॉंग्रेसशीं अर्थाअर्थी कांही संबंध नाही अशा सहासात लोकांना कमिटीतर्फे पाचारण करण्यांत आले होतें. वेताळ पेठेंतील एक व्यापारी नागपूरच्या कांही निमंत्रित पाहुण्यांच्या पाठोपाठ परिषदेंत ‘ सन्मान्य पाहुणे ’ म्हणून घुसले. पण सार्वजनिक सभेचे चिटणीस श्री. सदाशिवराव बापट यांना मात्र पास दिला तो ‘ कामगारा ’चा ( workman ). श्री. अण्णा बापटांना व त्यांच्या हाताखाली काम करणाऱ्या शिपायाला एकाच मापाने मोजणाऱ्या स्थानिक कमिटीची अक्कल कोठें गहाण पडली होती कोण जाणे !

***

या परिषदेसाठी स्थापन झालेल्या स्थानिक कमिटीची मनोभूमिका कशी होती याची कल्पना वाचकांना करून देण्यासाठी एक मासलेवाईक उदाहरण सांगतों. टिळक स्मारकमंदिरांत जशीं इतर अनेक चित्रें लावून ठेवण्यांत आलेलीं आहेत, तसेंच त्या ठिकाणीं दोन पुतळेहि ठेवण्यांत आलेले आहेत. एक गु. अण्णासाहेब कर्वे यांचा व दुसरा केळकरांचा. श्री. केळकर यांचा पुतळा अस्सल कॉंग्रेसभक्तांच्या सभास्थानीं दिसला तर तो कॉंग्रेसच्या कामाला अपशकून करील असें समजणाऱ्या एका बालिश माणसाने हा पुतळा उचलून दुसरीकडे ठेवून देण्याची सूचनाहि केली होती म्हणतात ! केळकरांनी कॉंग्रेसच्या धोरणावर जे हल्ले चढविले त्यापेक्षा किती तरी पटीने जास्त जळजळीत हल्ले या ठिकाणीं इतरांकडून चढविले गेले; व खुद्द महात्माजींच्या भाषणानंतरहि त्यांच्या म्हणण्याचें वैयर्थ्य प्रतिपादन करणारे बॅ. असफअल्लीसारखे लोक या परिषदेच्या निमित्तानें पुढे आले. हें पाहून तरी या स्थानिक लोकांनी यापुढे शहाणपण शिकावयास नको काय !

***

परिषदेला सुरुवात होण्यापूर्वीं, जमलेल्या पुढाऱ्यांचे जे संवाद चालत ते मोठे ऐकण्यासारखे असत. कैदेतून नुकतेच सुटून आलेले कार्यकर्ते कैदेंत आपल्याला कशा प्रकारें वागविण्यांत आलें

याचें रसभरित वर्णन करीत असलेले आढळत. ज्यांना बरें वागविण्यांत आलें होतें ते समाधानानें बोलत; उलट ज्यांचे हाल झाले होते ते जळफळून तावातावानें बोलत. पण फिरून तुरुंगांत जाण्याची तयारी अथवा जेलखाना भरून काढण्याची भाषा मात्र कोठेंच ऐकूं येत नव्हती. आलेला शीण नाहींसा होण्याला सवड मिळावी, जुलमी कायदे रद्द होऊन स्वाध्या कामाचीहि चाललेली कुचंबणा टळावी, व राजकारणाचा अडलेला डाव पुनः चालू व्हावा असा या सर्व उद्‌गारांचा इत्यर्थ होता.

***

आपूर्वी जी चळवळ झाली त्यांत मुंबईचें कर्तृत्व लोकांच्या विशेष नजरेस पडलें. पहिली चळवळ झाली त्या वेळीं काँग्रेसवाल्या लोकांना सहानुभूति विलक्षणच मिळाली ! पैसा–अडका, चीजवस्त, कापडचोपड इत्यादि सर्व प्रकारांनी इतकी मदत झाली कीं, आता तूर्त मदत करूं नका असें सांगण्याची काँग्रेस कमिट्यांवर पाळी आली. १९३२ च्या चळवळींत लोकांची इतकी सहानुभूति कधींच मिळाली नाहीं; आणि आता द्रव्यद्वारा मिळणारी मदत अगदींच बंद पडत चालली आहे ! या सर्व परिस्थितीचा विचार करून कायदेभंग बंद करावा असें मुंबईच्या प्रतिनिधींचें मत होतें. राजकारणाच्या चळवळीचा अंत पाहणें श्रेयस्कर नाही असा या मुंबईकर कार्यकर्त्यांच्या सांगण्याचा इत्यर्थ होता ! पण, सारा उपदेश पालथ्या घागरीवरील पाण्याप्रमाणें निष्फळ ठरला !

***

पहिलीं दोन दिवस झालेलीं बहुतेक सगळीं भाषणें कायदेभंग बंद करा अशा आशयाचींच होतीं. तीं ऐकत असता महात्माजींच्या चर्येकडे ज्याची नजर गेली असेल त्यांच्या हें स्पष्टपणें लक्षांत आलें असेल कीं, भाषणांचा रोख महात्माजींच्या मनाला मुळींच पटत नव्हता. महात्माजींच्या चर्येचें सूक्ष्म निरीक्षण करणारे व पर्णकुटीवरील खलबतांचे सूक्ष्म पडसाद ऐकूं शकणारे लोक आधीपासूनच समजून होते कीं, खुल्या परिषदेंतील भाषणें कांहींहि होवोत, अखेरचा निर्णय महात्माजींच्या मर्जीनुरूपच होणार!

***

परिषदेच्या तिसऱ्या दिवशींच्या कार्यक्रमांत महात्माजींचें जें भाषण झालें तें ( Stage-effect ) फड जिंकण्याच्या दृष्टीनें फारच चांगलें झालें. लोकमान्यांच्या करारी मूर्तीसमोर उभे राहून महात्माजी बोलत आहेत, प्रकृतीच्या क्षीणपणामुळे खोल गेलेला त्यांचा आवाज सभागृहांत सर्वत्र ऐकूं जावा यासाठी विजेचे पंखेहि बंद ठेवण्यांत आलेले आहेत, भावी अनर्थाची अंधुक कल्पना असल्यामुळेच कीं काय, कस्तुरबा खिन्न वदन करून जरा बाजूला बसल्या आहेत, व प्रलयकालच्या समुद्राप्रमाणे क्षुब्ध झालेल्या महात्माजींना कवियत्री सरोजिनी नायडू व धर्ममूर्ति मालवीयजी हीं दोघेजणें वारा घालीत आहेत, हे दृश्य पाहून ज्याच्या हृदयाचा क्षणभर तरी थरकांप झाला नसेल असा माणूस 'स वै मुक्तोऽथवा पशुः ' याच कोटींत पडेल !

***

शेक्सपियरच्या शोकान्त नाटकांत कांही प्रवेश असे आहेत कीं, ते वाचीत असतां वाचकांचा श्वासोच्छ्वासहि नीटपणें चालूं शकत नाही. अशा गंभीर प्रसंगांत देखील शेक्सपिअरनें एखादें विनोदी विधान केलेलें आठवतें. पण, या विनोदी वाक्याचा परिणाम मात्र असा होतो कीं, मुळच्या प्रसंगाची भीषणता त्या वाक्यामुळे अधिक भीषण वाटूं लागते. घनघोर अंधारांतून वाट काढणाऱ्या प्रवाशाच्या डोळ्यांना विद्युदुन्मेष दिसावा, पण त्या विद्युदुन्मेषामुळे नजीकच्या दरीचें प्राणघातक स्वरूप स्पष्ट व्हावें म्हणजे त्या प्रवाशाची जी अवस्था होते, तसाच प्रकार महात्माजींच्या भाषणांतील कांही विनोदी वाक्यांमुळे झाला !

***

कायदेभंगाची चळवळ चालू ठेवणें हें तर्कबुद्धीला पटणार नाहीं, त्यांत भावनेचा अंशच अधिक आहे, या गोष्टीची जाणीव महात्माजींना नव्हती असे नाहीं; पण या जाणिवेची कुरकूर बंद पाडण्यासाठी त्यांनी प्रश्न विचारला कीं 'स्त्रीला मातृपदवी मिळते व पुरुषाला पितृपदाचा मान मिळतो तो तसे भावनेमुळेच मिळत नाहीं काय'? 'लोक दमले म्हणून चळवळ थांबवावी' या म्हणण्याची संभावना तर त्यांनी आपल्या लोकोत्तर पद्धतीनेच केली ! 'गाडीला जुंपलेल्या काठेवाडी बैलांना थकवा आला तर गाडीवान गाडी सोडतो कीं काय ? तो बैलांच्या पाठीवर दोन चाबूक अधिक लगावतो व इष्ट स्थळीं गाडी घेऊन जातो, ' असें सांगून त्यांनी चळवळ चालूच ठेवण्याचें आपलें तत्त्वज्ञान लोकांच्या गळीं उतरविलें ! कायिक, वाचिक, मानसिक अहिंसेचे पुरस्कर्ते जे महात्माजी त्यांच्या तोंडून हा निर्दय दाखला निघावा हें पाहून मात्र मला आश्चर्य वाटलें !

***

चळवळ बंद ठेवूं नये असा ठराव पास झाल्यावर माझी कित्येक महाराष्ट्रीय प्रतिनिधींशीं गांठ पडली ! या लोकांनी गांधींचें वाक्य शिरसावंद्य

मानून आपलीं मतें बदललीं होतीं हें मला माहीत होतें. गांधींच्या भिडेखातर आम्हीं मत बदललें असें नव्हे हो!' असें मात्र जेव्हा हे लोक म्हणूं लागले तेव्हा मला हॅम्लेटने काढलेल्या 'My lady protests too much' या उद्गारांची आठवण झाली. दोनतृतीयांशांहून अधिक सभासद कायदेभंगबंदीला अनुकूल आहेत हें स्पष्ट दिसत असतां अखेर निर्णय गांधींच्या मताप्रमाणें व्हावा याचा अर्थ बुद्धिविक्लव माणसांना न समजला तरी सामान्य माणसाला तो सहज समजूं शकेल! 'आदम तो खुदा नही' असें म्हणणाऱ्या लोकांप्रमाणे गांधीभक्तांनी कॉंग्रेस म्हणजे गांधी नव्हेत असें खुशाल म्हणावें. पण 'खुदाके नूरसे आदम जुदा नही!' हें वाक्यहि त्यांनी विसरूं नये!

***

लोकमत व लोकप्रतिनिधींचें मत यांकडे दुर्लक्ष करून कायदेभंगाची चळवळ महात्माजी चालू ठेवितात हा त्यांच्या सत्याग्रह संप्रदायाचा विजय असला तरी, ही चळवळ चालण्यांत देशाचें दुर्दैवच आहे ही गोष्ट निर्विवाद खरी आहे. गांधीसहित कॉंग्रेस जर आपल्या मागें उभी नसेल तर आपल्याला कोणी ढुंकूनहि विचारणार नाहीं असे मानणाऱ्या लोकांनी चळवळ चालविण्याच्या ठरावाला होकार भरला, व आपल्या बुद्धीची व लोकांची प्रतारणा केली असें कोणीं म्हटलें तर त्यांत वावगें काय?

# मुलाखत फिसकटल्यावर

म. गांधींनी व्हाइसरॉयांस दोन तारा केल्या. पण त्या दोनहि तारांना कायदेभंग आधी बंद ठेवा आणि मग मुलाखतीची भाषा बोला अशा अर्थाचे व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांजकडून उत्तर आल्यामुळे गांधीजींचा तडजोडीचा मार्ग आपोआपच खुंटला. गांधींचा मुक्काम ठाकरसींच्या पर्णकुटींत गेले दोन महिने होता. तो मुक्काम यापुढे चालू ठेवण्याचें कारण नाहीं असा त्यानंतर मनाचा निश्चय करून मंगळवार ता. १८ रोजीं दुपारीं साडेतीन वाजताच्या गाडीने गांधीजी पुण्याहून अहमदाबादेस जावयास निघाले. वाटेंत मुंबईसहि न थांबतां गुजराथ मेलने ते पुढे रवाना झाले. व ता. १९रोजीं अहमदाबादेस पोंचले. त्यांजबरोबर सौ कस्तुरबा गांधी व श्री. महादेव देसाई इत्यादि मंडळी होती. मुंबईस त्यांना निरोप देण्यास स्टेशनावर सुमारें चारशेंपर्यंत लोक जमले होते. स्वतःच्या पुढील धोरणासंबंधाने गांधींना जाहीरपणें खुलासा केला नाही तथापि त्यांचें वर्तमानपत्रांच्या बातमीदारापाशीं संभाषण झालें त्यावरून भावी योजनेची अटकळ बांधतां येते.

गांधींनी सामुदायिक कायदेभंग बंद ठेवण्याचें ठरविलें आहे. जुलै महिना संपेपर्यंत कायदेभंगाची सर्वच चळवळ तहकूब आहे. पण ती तहकुबीची मुदत ऑगस्ट महिन्याच्या प्रारंभींच समाप्त होत असल्याने त्यानंतर कायदेभंग सुरू होईल तेव्हा त्याचें स्वरूप वैयक्तिकच राहील. राष्ट्रीय सभेच्या सर्व संस्था बंद करण्यांत येतील. फक्त राष्ट्रीय सभेचा एक हंगामी अध्यक्ष व प्रत्येक प्रांताला एक सर्वाधिकारी एवढेच अधिकारी काम करतील. या सर्व गोष्टींचा खुलासा अध्यक्ष या नात्याने श्री. माधवरावजी अणे एक पत्रक काढतील त्यांत यावयाचाच आहे. स्वतः कायदेभंग करण्यापूर्वी सरकारास मी आगाऊ सूचना देईन असेंहि गांधींनी वर्तमानपत्रांच्या बातमीदारापाशीं सांगितलें आहे.

### होअर साहेबांचा खुलासा

व्हाइसरॉयांनी मुलाखतीला नकार दिल्याबरोबर हिंदुस्थानांत सर्वत्र खळबळ उडाली तशी ती विलायतेंतहि उडाली. इंडिया ऑफिसाचें बजेट ता. १७जुलै रोजीं भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनी कॉमन्स सभेंत मांडलें. त्या वेळीं 'व्हाइसरॉयांनी गांधीजींस दिलेला नकार तुम्हांला पसंत आहे का?' असा होअरसाहेबांना सभासदांनी सहजच प्रश्न विचारला. तेव्हा होअर यांनी काढलेले उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. ते म्हणाले "हिंदुस्थानसरकाराबरोबर शिष्ट म्हणून वाटाघाट करण्याची गांधींना पुनः इच्छा झाली आहे. पण शिष्टाईस येतांना ते आपल्या खिशांतून कायदेभंगाचें बिनसनदशीर हत्यार आणणार आहेतच. कायद्याला धरून वागणें हें नागरिकांचें कर्तव्यच आहे. तें कर्तव्य सौद्यांतील एक अट म्हणून गांधी मानीत असतील तर त्यास आम्ही मुळीच कबूल होणार नाहीं."

पार्लमेंटांतील मजूर पक्ष हिंदुस्थानाविषयीं सतत सहानुभूति बाळगीत आला आहे त्या पक्षाचे एक सभासद मि. लॅन्सबरी हें हिंदी लोकांच्या पूर्ण परिचयाचे आहेत. त्यांनी गांधींची कड घेऊन होअर यांना पुष्कळ छेडलें. पुण्यास परिषद भरली;

त्या परिषदेंत पुष्कळजण बोलले व एक ठरावहि पास झाला. अशा या खासगी स्वरूपाच्या परिषदेची ऐकीव हकीगत वर्तमानपत्रांतून आली असली तरी ती सरकाराने विश्वसनीय समजूं नये. परिषदेने आपलें पत्रक प्रसिद्ध केलें असतें तरच तें विश्वसनीय ठरलें असतें. परंतु तसें पत्रक प्रसिद्ध झालें नसता केवळ वर्तमानपत्रांतील बातम्यांवर विसबून गांधींनी केलेली भेटीची मागणी झिडकारण्यांत व्हाइसरॉयानी चूक केली असें मि. लॅन्सबरी यांनी होअर यांच्या नजरेस आणिलें त्यांस होअर व उपभारतमंत्री मि. बटलर यां उभयतांनीहि उत्तरें दिलीं. होअर यांचें म्हणणें असें कीं "त्यांचीं म्हणून जीं विधानें प्रसिद्ध झालीं आहेत तीं आपलीं नव्हेत असें गांधींनी जाहीर करावें. पुण्याच्या परिषदेंत गांधींनी कायदेभंगास पाठिंबा दिला असें स्पष्ट दिसतें. आमची माहिती खोटी असल्यास जी माहिती खरी असेल ती गांधींनी सांगावी."

### चर्चिल साहेबांच्या गुदगुल्या

मि. चर्चिल यांस मात्र होअर यांचें उत्तर ऐकून पोटांतून गुदगुल्या झाल्यासारख्या दिसल्या. ते म्हणाले 'मी दोन वर्षांपूर्वीच मि. वेजवूड बेन हे भारतमंत्री असता त्यांच्या कानींकपाळीं ओरडत होतों कीं जरा करडा अंमल चालवा म्हणजे सगळी चळवळ दबेल. पण बेनसाहेबांना तें म्हणणें पटलें नाही. विलिंग्डन व होअर यांना तें पटून त्यांनी करडा अंमल सुरू केल्यामुळे गाडें बैताला आलें. आता हेंच शहाणपण नवीन राजकीय हक्क हिंदुस्थानाला देतांना दाखवून दानाचा हात आंखडता धरा म्हणजे मिळवली.' बॅ. जयकर व सप्रू यांनाहि व्हाइसरॉयांनी गांधींना भेट न दिल्याचें वर्तमान ऐकून खेद वाटला व तशा अर्थाचें एक पत्रहि मि. लान्सबरी यांस लिहिलें. त्यांत त्यांनीं गांधीना संधि मिळावयास पाहिजे होती असें म्हटलें आहे. त सर्व ऐकून घेऊन बटलर यांनी एवढेंच आश्वासन दिलें कीं गांधींनी एक पत्रक काढून वर्तमानपत्रांतील हकीकत खोटी असल्याचें सांगावें म्हणजे तिकडे सरकार योग्य तें लक्ष पुरवील.

व्हाइसरॉयांनी म. गांधींना मुलाखत देण्याचें नाकारलें या गोष्टीचा विचार करण्यासाठी लंडन येथे ता. १८ रोजीं फ्रेंड्स हाऊसमध्ये एक सभा भरली होती. सदर सभेंत मि. सी. एफ. अँड्रयूज यांनी व्हाइसरॉयांनी महात्माजींना भेट नाकारली याबद्दल आपल्यास वाईट वाटत असल्याचें सांगितलें. सभेत या गोष्टीचा फेरविचार व्हावा अशा आशयाचा ठराव पास होऊन तो मुख्य प्रधान व भारतमंत्री यांजकडे पाठविण्यांत यावा असें ठरलें.

### म. गांधींची विलायतेत तार

लंडन येथील डेली हेरल्ड या मजूर पक्षीय दैनिक पत्राने म.गांधींस मुलाखतीसंबंधीं कांही प्रश्न विचारले होते. त्यास गांधींनी पुढीलप्रमाणे उत्तर पाठविलें आहे. ' माझी साधी व बिनशर्त विनंतिहि व्हाइसरॉयांनी झिडकारली. आता समेटाची आशा संपली. मनुष्याला शक्य तो प्रयत्न मीं केला. पण समेटाचा दरवाजा मला न जुमानता झांकून घेण्यांत आला. पुण्यास खासगी स्वरूपाची परिषद भरली ती समेटास अनुकूल होती. मीं व्हाईसरॉयापाशीं मागणी केली असती तर ती पूर्वी गांधी–आयर्विन पॅक्ट झाला होता त्या प्रकारचीच केली असती. गांधी-आयर्विन पॅक्ट सरकारानें मोडला, कॉंग्रेसनें मोडला नाही. पाढऱ्या खलित्याने कोणत्याच पक्षांचें समाधान झालेलें नाही, मग कॉंग्रेसचें कोठून होणार ! माझी योजना अगदी वेगळी होती व ती व्हाइसरॉयांना व राष्ट्रीय सभेला स्वीकारण्याजोगी वाटली असती. यापुढे सामुदायिक कायदेभंग बंद होऊन वैयक्तिक कायदेभंगास सुरुवात होईल. त्या कायदेभंग करणारांनी आर्थिक मदतीची अपेक्षा करूं नये. चळवळ अत्याचारी बनली तर काय कराल असें तुम्ही विचारतां. त्यावर माझें उत्तर असें कीं, पूर्वी चीड येण्यासारखे प्रसंग आले असताहि जशी आमची चळवळ अनत्याचारी राहिली होती तशी ती पुढेंहि राहील. पण ती अत्याचारी होऊं लागल्यास त्यावर मजपाशीं उपाय आहेच. '

# बनारसच्या शिक्षणसोयी

( ले.-रा. नी. अंबिके, बी. एस.सी., चिटणीस, महाराष्ट्र विद्यार्थी-साहायक सभा, काशी. )

आंग्लशाहींत आमचा चोहोंकडून कोंडमारा झाला असल्याने, एखादा मार्ग मोकळा होतांच तिकडे झुंडीच्या झुंडी लोटतात त्याप्रमाणे गेल्या ८।१० वर्षांत हिंदु विश्वविद्यालयांत जाणाऱ्या महाराष्ट्रीयांची संख्या इतर प्रांतीय विद्यार्थ्यांपेक्षा वाढलेली दिसते. महाराष्ट्रीयांत वऱ्हाड-मध्यप्रांतांतील संपन्न विद्यार्थ्यांचा अधिक भरणा आहे. त्यांचें अनुकरण गरीब विद्यार्थीहि करीत आहेत. परंतु कोणालाहि फीमाफी, अर्धनादारी मिळणारी परिस्थिति पूर्वीइतकी अनुकूल नसल्याने व शेंडी राखून गंध लावण्याच्या अटीवर हिंदु विद्यार्थ्यांस मिळणाऱ्या धनशेठ बिरलाजींच्या शिष्यवृत्त्या १९३० पासून मिळत नसल्यामुळे, आज विशेषतः गरीब महाराष्ट्रीयांचे तेथे फार हाल होतात. वऱ्हाडी पालकहि आज फिकीरींत आहेत. अशा पालकांनी अर्धवट माहितीवर विश्वासूं नये व गरीब महाराष्ट्रीयांनी तेथे जाऊन पस्तावूं नये, या उद्देशाने खालील माहिती देत आहे.

**हिंदु विश्वविद्यालयाच्या शिक्षणशाखा** काशीस अनेक आहेत. प्रत्येकीसाठी विद्यार्थ्यास येणारा कमींत कमी मासिक खर्च (फी, राहणे, जेवणमुद्रा) पुढीलप्रमाणे आहे. एंजिनिअरींग ( ४५रु.); मायनिंग, मेटॅलर्जी किंवा सायन्सचें पोस्ट-ग्रॅज्युएट शिक्षण (४० रु.); सायन्स कॉलेजाचें किंवा आर्ट्सचे पोस्ट ग्रॅज्युएट् शिक्षण ( ३० रु.); आर्ट्स किंवा आयुर्वेदिक कॉलेज ( २२ रु. ); याच्या पहिल्या १।२ वर्षांस महिना (१८ रु. )पुरतात. संस्कृत कॉलेजच्या शिक्षणास पहिल्या सहामाहीस महिना (८।१० रु.) पुरेत. पुढे सर्व शिक्षण मोफत आहे. कायदा व पोस्ट ग्रॅज्युएट कोर्स तीन वर्षांत पुरा करतां येतो. तसेच यापुढील संशोधनात्मक असा डी. एससी. चा कोर्सहि आहे. औद्योगिक रसायनशास्त्र (Industrial Chemistry ) स्पेशल कोर्स म्हणून एका वर्षांत शिकतां येतें. याला महिना ३० रु. खर्च लागतोच. यांत तेल, साबण ( Oils & Soaps ) व मातकाम ( Ceramics ) हे विभाग आहेत. याशिवाय गायनवादन ( ऐच्छिक ) शिकण्यास विद्यालय आहे. यांत महिना २ रु. देऊन सायंकाळीं १॥ तास शिक्षण मिळतें. पुस्तकांसाठी व वार्षिक परीक्षांसाठी अलग पैसा खर्च होतो. वास्तविक कॉलेजांत मिळणाऱ्या शिक्षणासाठी लांबवर जाण्याची आवश्यकता नाही. परंतु 'स्पेशॅलिटी' म्हणून जे हिंदु विश्वविद्यालयांतील विशेष अभ्यासक्रम आहेत, त्यांना विशेषतः मध्यम विद्यार्थ्यांनी जावें. श्रीमंत विद्यार्थ्यांना कोणतेहि शिक्षण कोठेहि घेतां येतें, त्यासाठी त्यांनी येथे यावें हे उत्तम; व ऐच्छिक म्हणून शिक्षण घ्यावें, अथवा स्पेशल कोर्स घेणारांवर प्रेमपूर्ण लक्ष असूं द्यावे. ( १ ) इकडे इंटर सायन्स ( गणितासह ) होऊन तिकडे गेल्यास औद्योगिक रसायनशाखेंत एम. एस. सी. होता येते. ( २ ) इलेक्ट्रिकल मेकॅनिकल एंजिनिअरिंग, ( ३ ) बी. ए. आणि एम. ए. कडे प्राचीन हिंदी संस्कृति व एम. ए. ला एपिग्राफी, (४) आयुर्वेदासह पाश्चात्य वैद्यकाचें एम. बी. बी. एस. दर्जाचें शिक्षण. मेडिकल कॉलेजांत मिळतें. त्यांत 'संस्कृत' मध्यमा किंवा 'मॅट्रिक पास' झालेल्यास प्रवेश व ६ वर्षांनी पदवी मिळते. ( ५ ) जुन्या पाठशाळांत, पंडितांकडे, किंवा फक्त क्वीन्स कॉलेजासारख्या संस्कृत कॉलेजांत विद्यार्थ्यांनी 'शास्त्री–आचार्या'चें शिक्षण घेण्यापेक्षा हिंदुविश्वविद्यालयाच्या संस्कृत कॉलेजांत शिक्षण घ्यावें. यांत असा फायदा आहे कीं, इतरत्र न लाभणारें इतर उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचें साहचर्य येथे लाभतें.

( ६ ) याशिवाय मॅट्रिकच्या परीक्षेस इतरत्र सोय नाही अशी बाहेरून बसण्याची खासगी विद्यार्थ्यांना सोय आहे. यासाठी रजिस्ट्रारला सप्टेंबरमध्ये कळवावें लागतें. मार्चांत रोज एक पेपर अशी परीक्षा होते; विषय मुंबई विश्वविद्यालयाइतकेच, पण माध्यम हिंदी किंवा इंग्रजी घेतां येत व विषयनिवडणुकीस वाव पुष्कळ आहे. या परीक्षेस वऱ्हाडी पुष्कळ येतात. यासाठी उद्योगधंदे करीत मॅट्रिक होऊं इच्छिणाऱ्या होतकरूंनी चांगली तयारी करून काशीस परीक्षेस जरूर जावें. मात्र 'या परीक्षेच्या आधी एक वर्ष खासगी बसणाराचें कोणत्याहि रजिस्टर शाळेंत नांव असतां कामा नये' ही अट पाळली पाहिजे.

( ७ ) मुलांसाठी स्वतंत्र आर्ट्स कॉलेज असून, इंटरनंतर त्यांना घरीं बसून २ वर्षांनी बी. ए. होतां येतें.

### नवीन विद्यार्थ्यांस सूचना

काशीस गेलेले विद्यार्थी बहुशः पहिल्या वर्षास फार फिकीरीस येतात, बरेच विद्यार्थी आजारी पडतात, कित्येक परत येतात. व मॅट्रिकच्या

(Admission Exam.) विद्यार्थ्यांना नापास होऊन फिरून वारीचा प्रसंग येतो असें आढळतें. याचें कारण असें कीं, प्रांतांच्या बदलत्या हवामानाप्रमाणे अन्नांत बदल करण्याचें आम्हांस साधत नाही. महाराष्ट्रीयांस तेथील डाळरोटी अळणी व पांचट म्हणून फेका-विशी वाटते तर पुरबडी-रसगुल्ले, मेवामिठाई खावीशी वाटते. पण मग पोट दुखतें म्हणून विवळावें लागतें. यासाठी रात्रीं नुसता तूपभात खावा अथवा दूध प्यावें. जुलैमध्ये येणारांस उन्हाळा बाधतो यासाठी दुवक्त शीत स्नान करावें, सैल व पातळ कपडे वापरावे. हिंवाळयासाठी बनातीचे गरम कपडे जवळ असावेत.

### स्वावलंबनाचा उपाय

खरोखर पाहिलें तर कर्ज काढून निवळ पदवीसाठी शिक्षण घेण्यांत कांही आता अर्थ नाही. तसेच स्वावलं-बनाचे नांवाखाली हाडाचीं काडं करण्याचेंहि यापुढे कारण नाही. याचें कारण कांही योग्य चीज होऊं शकत नाही, असा सध्याचा काळ आहे! मात्र जे महत्त्वाकांक्षी व बुद्धिमान गरीब विद्यार्थी ही विद्या करूं इच्छितात, त्यांना थोडे कष्ट स्वीकारावयाचे असतील, तर त्यांनी यामागे लागल्यास चालेल असें मला वाटतें. अशा विद्यार्थ्यांनी लक्षांत ठेवावें कीं, शिकवणी किंवा वारांची सोय हा स्वावलंबनाचा उपाय हिंदुविश्वविद्यालयांत क्वचितच उपयोगी पडतो. टायपिंग किंवा फळें, स्टेशनरी व टॉयलेट्स यांची विक्री फिरिस्ता बनून केल्यास तें बरेंच फायदेशीर पडतें. यासाठी तेथे महाराष्ट्रीयांचा स्वावलंबी विद्यार्थी संघ आहे. गांवांत राहिल्यास जागा व जेवणाची सोय अर्धवट लाभूं शकते. तसेंच पं. मणरकरशास्त्री यांनी 'विद्यार्थि-साहाय्यक-भांडार' विद्यार्थ्यांकडून चालविण्याचें सुरू ठेवले आहे. या दुकानावर काम मिळूं शकतें. इतर कांही सोयी श्रीमंत विद्यार्थी व प्रोफेसर यांचे साहाय्यानें लाभूं शकतात. परंतु साधारणपणें महिना दहा रुपये तरी घरून मिळण्याची सोय होईल अशी व्यवस्था करावी. महाराष्ट्रांतून येणारांनी मला रहिमतपूर (जि. सातारा) येथे २५ जुलैपर्यंत भेटावें अथवा अहिल्या-वाडा काशी येथे सभेच्या पत्त्यावर लिहावें.

## स्फुट सूचना

१ राष्ट्रीय सभेने कायदेभंग पुनः सुरू करूं नये असें निश्चितपणें व निःसंदेहपणे सांगणारा राष्ट्रांतील वजनदार कार्यकर्त्या लोकांचा एक मोठा वर्ग आहे यांत शंका नाही. मद्रासचे प्रसिद्ध पुढारी श्री. सत्यमूर्ति हे या वर्गांत मोडतात. राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनी कायदेभंग सुरू करण्याचें ठरविलेलें समजताच, त्यांनी जें पत्रक प्रसिद्ध केलें आहे त्यांतील विचारपरंपरा अनेक दृष्टींनी मननीय असल्यानें, तिजकडे आम्ही वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितों. ते म्हणतात, "राष्ट्रीय सभेने वैय्यक्तिक कायदेभंगास संमति देऊं नये. कारण, पुण्याच्या परिषदेंत मोठ्या बहुमतानें त्याबद्दलचा ठराव नापास झाला होता. महात्मा गांधींना अगर त्यांच्या सहकाऱ्यांना जर तसें करावें असें वाटत असेल, तर त्यांनी कायदेभंग स्वतःच्या जबाबदारीवर बेलाशक करावा. राष्ट्रीय सभेच्या नांवानें करूं नये इतकेंच. गांधींनाहि हे संमत आहे म्हणून त्यांनी राष्ट्रीय सभेला त्यापासून परावृत्त करावें !"

---

२ श्री. सत्यमूर्ति यांच्या पत्रकांतील विधायक भाग फार महत्त्वाचा आहे. ते म्हणतात "राष्ट्रीय सभेचे जे सभासद कायदेभंग करूं इच्छीत नाहीत त्यांनी रागावून, राष्ट्रीय कार्यांतून अंग काढून घेणेंहि योग्य नाही, किंवा जे कायदेभंग करून तुरुंगांत जातील त्यांना फुकटचा आशीर्वाद देऊनहि स्वस्थ बसण्यांत हंशील नाही. अत्यंत जरूरीची जी गोष्ट आहे ती ही कीं, कांही प्रगतिपर राष्ट्रकार्य करावें अशी ज्यांची इच्छा आहे अशा सर्व राष्ट्रीय कार्यकर्त्यांनी सार्वजनिक कार्याचा कोंडमारा संपवून, राष्ट्रांत नवीन चैतन्य आणणें जरूरीचें आहे." त्यांच्या मतें या-करितां एका नव्या पक्षाची संस्थापना करून स्वदेशी, बहिष्कार, शेतकरी व कामकरी यांची संघ-टना, ग्रामसंघटना, लोकांना राजकीय शिक्षण देणें व कायदेमंडळांतून फक्त राष्ट्रीय वृत्तीचेच लोक पाठविणें हा कार्यक्रम त्यानें आपला ठरवावा. तीन कोटि साठ लक्ष मजुरांच्या संघटनेच्या प्रश्नाचें महत्त्व किती आहे हें सांगणे नकोच.

---

३ नव्या पक्षाची संघटना करून राष्ट्रकार्याला नवे वळण देण्याचा उपक्रम कलकत्त्यासहि सुरू झाला असून, तेथे लवकरच या कार्याकरिता अखिल भारतीय पुढाऱ्यांची सभा भरविण्यांत येणार असल्याचें समजतें. मुंबईत 'प्रभात' पत्राचे संपादक श्री. भागवत व तेथील कार्यकर्ते श्री. ललित, डॉ. सावरकर, डॉ. आठवले प्रभृति मंडळींनी

तर जुन्या स्वराज्य-संघसंस्थेचें पुनरुज्जीवन करून, त्यामार्फत पुनः भरीव कामगिरी सुरू करावी म्हणून, नव्या संघटनेला सुरुवातहि केली ही आनंदाची गोष्ट होय. मुंबईतील निरनिराळ्या कार्य-कर्त्यांचें एक नवें केंद्र निर्माण होईल तर या कामाला जोर येईल यांत शंका नाही. मद्रास, बंगाल, महाराष्ट्र व वऱ्हाड यांचे ऐकमत्य झालें तर मध्यप्रांत, सं. प्रांत व पंजाब यांचाहि पाठिंबा त्यांस मिळाल्यावांचून राहाणार नाही.

---

२ कोणत्याहि कामांत एकदा ठेंच लागली म्हणजे मनुष्य शहाणपणा शिकतो असें म्हणतात. पण ही अनुभवाची खूण सर्वांनाच उमजते असें नाही. व्हाइसरॉयांना मानपत्र द्यावें म्हणून पुणें शहर म्युनिसिपालिटींत ठराव आला होता व तो पसारहि झाला. मण लोकमत इतकें प्रक्षुब्ध झालें होतें कीं, जबाबदार अधिकाऱ्यांच्या सल्ल्यावरून व्हाइसरॉयांनी मानपत्र घेण्याचें नाकारलें ! या सर्व गोष्टींची स्मृति अगदी ताजी असतांना, पुनः मुंबईच्या गव्हर्नरांना मानपत्र देण्याचा घाट निघावा ही दुःखाची गोष्ट होय. आजच्या पुणें शहर म्युनि-सिपालिटीच्या कार्यक्रमपत्रिकेवर हा ठराव चर्चे-साठी घालण्यांत आला असल्याचें समजतें. सध्या-च्या आणीबाणीच्या राजकीय परिस्थितींत गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांना शहर म्युनिसिपालिटी-सारख्या प्रातिनिधिक संस्थेकडून म्हणजे पर्यायानें नागरिकांकडूनच मानपत्र दिलें गेल्यास ती एक लांछनास्पद गोष्ट होईल असें नागरिकांनी आपलें मत पूर्वी स्पष्टपणें दिग्दर्शित केलेंच आहे. तेव्हा हा मानपत्राचा ठराव परत घेतला जावा, निदान तो पास तरी न करण्याइतकी समयज्ञता सभासदांनी दाखवावी एवढी त्यांच्यापासून मतदारांनी अपेक्षा करण्यास हरकत नाही.

# चळवळींची जोडगोळी

शनिवार व रविवार या दोन दिवशीं मुंबईस अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषद भरली व श्री. रा. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं यशस्वी रीतीनें शेवटास गेली. परिषद संस्थानी प्रजेची म्हणावयाची; पण तिचें अधिवेशन संस्थानाच्या राजधानींत न भरता त्याजकरिता मुंबईसारख्या खालसा मुलुखाच्या राजधानीचा आश्रय पहावयाचा हें जरा विचित्रच ! तथापि हा विचित्रपणा याच खेपेला प्रथम दृष्टीस पडत आहे असें नाहीं. हैद्राबाद संस्थानांत तेथील प्रजेला परिषद भरविण्याला थोडी का जागा आहे ? पण हैद्राबादी लोकांना आपल्या परिषदेकरितां पुण्यास किंवा अकोल्यासच आश्रयस्थान हुडकावें लागतें. कोल्हापूर संस्थानांतील कुळकर्ण्यांनी आपली ओरड पुण्यास जमून दमेपर्यंत करावी हाहि त्याच विचित्र-पणाचा एक मासला होय. खालसा मुलूख व संस्थानी मुलूख यांजमधील राज्यव्यवस्थेंत हाच महत्त्वाचा फरक असल्यामुळे, संस्थानी प्रजाजन ब्रिटिश हिंदुस्थानांतल्यासारखी राज्यपद्धति तरी किमान पक्ष आपणास लाभावी अशी अपेक्षा करीत आहेत.

संस्थानांत स्वराज्य आहे, पण तें स्वकीय संस्थानिकाचें राज्य या स्वरूपाचें आहे. संस्थानी प्रजेला त्याऐवजीं स्वतःच्या तंत्रानें चाललेलें राज्य हवें आहे तसलें राज्य त्यांना अजून लाभलें नसल्यामुळे, सध्याच्या स्वराज्यांत त्यांची अवस्था ब्रिटिश प्रजाजनाहूनहि अधिक अनुकंपनीय झाली आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यकारभार कोणाहि एका व्यक्तीच्या हातांत नाहीं. तेथील कायदे, कौन्सि-लांत मंजूर होतात व त्या कायद्यांपुढे गव्हर्नरापासून तालुक्याच्या मामलेदारापर्यंत प्रत्येकाला आपली मान वांकवावी लागते. गुन्हा करणारा गोरा असो कीं काळा असो, बडा अधिकारी असो कीं यःकश्चित् भिक्षेकरी असो त्याची मान कोर्टाच्या कैचींत सांपडल्यावाचून राहात नाहीं. याहि पकडींतून मधून मधून अन्याय घडत नाहीत असें नाहीं. परंतु ते प्रसंग फार विरळा. एकंदर राज्ययंत्राचा सर्वांवर इतका दाब बसला आहे कीं, ज्याला त्याला आपली चीजवस्त व प्राण यांविषयीं सामान्यतः निर्धास्त राहतां येतें. परंतु संस्थानांतील राज्यकारभार एका व्यक्तीच्या आधीन असल्या-मुळें, एखादा शकार गुन्हेगार असताहि केवळ राज-शालक म्हणून मोकळा सुटून न्यायाधीशालाहि वांकुल्या दाखवितो व निरपराधी चारुदत्त मात्र वसंतसेनाघातक ठरून वधस्तंभाचा मार्ग आक्र-मितो ! यासाठी संस्थानी प्रजेचें मागणें हेंच आहे कीं, संस्थानाचा राज्यकारभार आपल्या अनुमतीनें चालावा. तो केवळ राजेसाहेबांच्या मर्जीवर अवलंबून राहूं नये आणि अशी सनदशीर घटना संस्थानामध्ये अमलात यावी कीं, तिच्यापुढे राजे-साहेबांचाहि अधिकार कुंठित व्हावा.

अशा प्रकारचे अधिकार मिळविण्याची चळवळ

संस्थानी प्रजेने अलीकडे बरींच वर्षे सुरू ठेवली असून, प्रजापरिषद हें त्या चळवळीचें प्रमुख अंग होय. परंतु आता यापुढें केवळ संस्थानांतील त्रस्त लोकांनी या चळवळीकडे लक्ष पुरवावें व ब्रिटिश मुलुखांतील जनतेने तटस्थ राहून त्यांची मौज पहावी असे दिवस उरले नाहीत. संस्थानांचा हत्ती अलंकारांनी सजून व पाठीवर सोन्याची अंबारी घेऊन, सणावारीं मिरवत चाललेला पाहण्याचें ब्रिटिश मुलुखांतील सपाट व शून्य माळावरील जनतेस अपूर्वाईमुळे क्वचित् प्रसंगीं अननुभूत सुख वाटत असेल; परंतु वर्ष दोन वर्षांच्या अवधींत हा संस्थानी हत्ती आपली हद्द ओलांडून सोड फिरवीत व पायाखालीं हिंदी जनतेच्याहि हक्कांना व आकांक्षांना तुडवीत, मस्तीला आल्याप्रमाणें स्वैर सुटणार असल्यामुळे, त्या कल्पनेने आतापासूनच ब्रिटिश मुलखांतील हिंदी जनतेला भयचकित करून सोडले आहे.

संस्थानिकांचा प्रवेश फेडरेशन अमलांत आल्यानंतर फेडरल असेंब्ली व कौन्सिल यांजमध्ये व्हावयाचा असून, ते आपल्या संस्थानी दिवाणखान व जाम्यानिम्याने मध्यवर्ती कायदेमंडळातील खुर्च्या अडवून बसतील, तेव्हा राजेरजवाड्यांचा अम्मल ब्रिटिश हिंदुस्थानावरहि प्रस्थापित झाला असें समजण्यास हरकत नाहीं. हिंदी लोक गेलीं पाऊणशे वर्षे ज्या स्वराज्याकरितां टाहो फोडीत आहेत तें स्वराज्य त्यास लाभावयाचें बाजूस राहून, संस्थानिकांना स्वराज्य आहे तसें पचवनच्या पचवून ब्रिटिश हिंदुस्थानावर साम्राज्यहि पटकावण्याचा योग मात्र आलेला दिसतो ! या कारणाने खालसा मुलुखांतील हिंदी जनतेनेहि स्वराज्याचे हक्क बिनहरकत आपल्या पदरात पडण्याकरिता संस्थानी प्रजेलाहि स्वराज्याचे हक्क लवकर मिळवून देण्याची चळवळ सुरू करण्याची वेळ येऊन ठेपली आहे.

फेडरल असेंब्लीच्या ३७५ जागांपैकीं १२५ जागा व वरिष्ठ कौन्सिलाच्या २६० जागांपैकीं १०० जागा संस्थानिकांना देण्याचे पांढऱ्या खलित्यात नमूद आहे. या इतक्या जागा संस्थानिकास मिळणार व हे संस्थानिक फेडरल सरकारचे अंकित न राहता, व्हाइसरॉयांशीं व बादशहाशीं आपला साक्षात संबंध जोडून स्वतःस त्यांचे ताबेदार मानण्यांत भूषण समजणार. अशा रीतीने ज्या संस्थानिकांनी स्वदेशभूमीच्या पाठीवर कृतघ्नपणाने पाय देऊन, व्हाइसरॉयांच्या व बादशहांच्या पायावर लोटांगण घालण्याचें ठरविलें ते संस्थानिक सरकारजमा व्हावयाचे काय उरले? त्यांनी व ब्रिटिश सरकाराने मिळून हिंदुस्थानावर चिरकाल राज्य करावें असाच या कारस्थानाचा अर्थ नव्हे काय ? संस्थानिकांना असल्या अजब कामगिरीबद्दल बक्षिस कोणतें म्हणाल तर संस्थानिकांनी आपल्या प्रजाजनांना गुलामगिरींत सतत सडत ठेवलें व त्यांस कितीहि निर्दयपणाने वागविलें तरी, व्हाइसरॉयाने व ब्रिटिश सरकाराने त्यांजकडे ढुंकूनहि पाहूं नये हें होय !

हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याचें अभिवचन जबाबदार ब्रिटिश मुत्सद्द्यांपासून कैक वेळां मिळाले आहे. हे स्वराज्य तुर्की घोड्याच्या दौडीने नसलें तरी, हरिदासी तट्टाच्या मंद गतीने हिंदुस्थानाची वाट चालत आहे. तें तट्टू आज नाहीं उद्या आपल्या तबेल्यात ठाणबंदीस येणार अशी आशा बाळगून हिंदी जनता आहे. ही जनता या आशेवर बसली असली तरी संस्थानी प्रजेची वाट काय ? त्यांना स्वराज्य देण्याची हमी इंग्रज सरकाराने घेतलेली नाहीं; आणि संस्थानिकांच्या मनांत आपल्या मांडीखालचा सत्तेचा घोडा आपल्या प्रजाजनांच्या हवालीं करण्याचें नाहीं. संस्थानिक स्वराज्य आपखुषीने देणार नाहीत व इंग्रज सरकार त्यांजकडून ते देववणार नाहीं. मग संस्थानी प्रजेला तें स्वराज्य मिळावयाचें कसें ? अर्थात् खालसा मुलुखांतील हिंदी जनतेच्या सहानुभूतीने व मदतीनेच.

संस्थानी प्रजाजन व ब्रिटिश प्रजाजन यांचें नातें दूरचे लावालावीचें नसून, पाठच्या भावाचें असल्याचे आता स्पष्टपणे दिसू लागले आहे. ते इतके की, जर संस्थानी प्रजेला स्वराज्याचे अधिकार लवकर मिळाले नाहीत तर खालसांतील प्रजेलाहि स्वराज्याचे खरे अधिकार लवकर मिळण्याची आशा नाहीं. यासाठी इंग्रजसरकार व संस्थानिक यांची जशी गट्टी बनत चालली आहे तशी संस्थानी प्रजाजन व ब्रिटिश प्रजाजन यांचीहि गट्टी बनणें अत्यंत आवश्यक होय. फेडरेशनची घटना अमलांत आल्यावर असेंब्लींत व वरिष्ठ कौन्सिलांत संस्थानिक किंवा ते पाठवितील ते सभासद अधिष्ठित होतील. परंतु वरील कायदेमंडळाचे ब्रिटिश मुलुखातील सभासद लोकनियुक्त असावयाचे तसे संस्थानांतील सभासदहि लोकनियुक्त असावयास नकोत काय ? साऱ्या जगांतील फेडरेशनें याच धर्तीवर आहेत; पण हिंदुस्थानांत पहावे तो साराच प्रकार मुलुखानिराळा ! संस्थानी सभासदांना ब्रिटिश मुलुखांतील राज्यकारभारांत हात घालण्यास पूर्ण मुभा, पण खालसातील प्रतिनिधींना संस्थानांच्या अन्तर्गत कारभारांत नुसतें डोकावून पाहण्यासहि शपथ. कायदेमंडळाचे सभासद म्हणवि-

णारांत असा श्रेष्ठ-कनिष्ठपणाचा भेदभाव उभ्या जगांत कोठेंहि आढळणार नाही.

हा भेदभाव नष्ट करावयाचा असेल तर खालसांतील जनतेने संस्थानी प्रजाजनांस स्वराज्याचे अधिकार लवकर मिळवून देण्यास झटलें पाहिजे. सर्व संस्थानांतून कायदेमंडळें स्थापन होऊन जबाबदार राज्यपद्धति अस्तित्वांत आली, तरच असेंब्ली व वरिष्ठ कौन्सिल यांत संस्थानांतर्फे लोकनियुक्त प्रतिनिधी पाठविले जाण्याचा पुष्कळसा संभव आहे. संस्थानी राजकारणास खालसांतील राजकारणापासून भिन्न व अलग राखण्याचा एक वेळ प्रघात होता आणि राष्ट्रीय सभेने तें आपलें धोरण निश्चितहि केलें होतें. सदर धोरण बदलण्याचा काल आता आला आहे यांत शंका नाही. या दृष्टीने मुंबईस भरलेली अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषद संस्थानी प्रतिनिधि व खालसांतील पुढारी यांच्या सहकार्याने पार पडली ही गोष्ट इष्ट अशीच झाली.

---

# बॅ. सेनगुप्त यांचें शोचनीय निधन



बंगालचे एक पुढारी व कलकत्त्यांतील प्रसिद्ध बॅरिस्टर श्री. जतींद्र मोहन सेनगुप्त यांस रांची येथे शनिवारीं ता. २२ रोजीं रात्रीं देवाज्ञा झाली हें कळविण्यास अत्यंत खेद वाटतो. सेनगुप्त यांची प्रकृति कलकत्त्याच्या तुरुंगांत फार बिघडल्यामुळें, त्यांना बिहार-ओरिसा प्रांतांतील रांची या चांगल्या हवेच्या ठिकाणीं आणून ठेवण्यांत आलें होतें. रांचीस ते एका खाजगी घरांत राहात असू, त्यांच्या कुटुंबांतील माणसें त्यांजपाशीं शुश्रूषेकरितां होतीं. त्यांना बाहेर फिरावयाला जाण्याचीहि मोकळीक होती. ते रांचीस ता. ४ जून रोजीं आले. तेव्हापासून गेले पावणेदोन महिने प्रकृति सुधारण्याचे सर्व प्रयत्न सुरू होते. ता. २२ रोजीं सायंकाळीं मोटारींत बसून ते फिरावयासहि गेले व कांही वेळ पायींहि चालले. पण पायीं फिरत असता त्यांच्या प्रकृतींत चलबिचल झाल्यामुळे, ते घरीं परत आले. आणि रात्रीं प्रकृति अधिक बिघडत जाऊन हृदयक्रिया बंद पडून त्यांचा अंत झाला.

बॅ. सेनगुप्त यांचा जन्म १८८५ सालीं चितागांग येथें झाला. त्यांनी बी. ए. व एलएल. बी. या दोन परीक्षा पास होऊन बॅरिस्टरीचीहि परीक्षा दिली होती. प्रथम त्यांनी चितागांग येथे वकिलीच्या धंद्याला प्रारंभ केला. चितागांग येथें असता त्यांनी जहाजाच्या गिरण्यांतील मजुरांनीं संप केला तेव्हा त्यांची बाजू उचलून धरली व सार्वजनिकदृष्ट्या हीच त्यांची पहिली मोठी कामगिरी होय. पुढें ते चितागांगहून कलकत्त्यास आले. त्यांनी आपल्या धंद्यांत चांगलाच लौकिक संपादन केला. १९०९ सालापासूनच ते राजकारणांत लक्ष घालूं लागले. बंगालीं प्रांताचें राजकीय पुढारीपण गेल्या वीस वर्षांत बॅ. चित्तरंजनदास यांजकडे आलें दासबाबूंनी आपल्या गुणांनी ज्या तरुणांचें मन आपल्याकडे ओढून घेतलें त्यांपैकींच सेनगुप्त हे एक होत. दासबाबूंच्या मृत्यूनंतर त्यांचा धुरा सेनगुप्त व बाबू सुभाषचंद्र बोस यांच्या खांद्यावर स्वाभाविकच पडली. हे दोघे दासबाबूंचे डावे उजवे हातच समजण्यास हरकत नाही. परंतु या उभयतांचें लवकरच पटेनासे होऊन त्यांच्यांत फूट पडत चालली व ती बरीच विकोपास गेली. म. गांधी, पं. मोतीलाल नेहरू यांजबरोबर सेनगुप्तांची राजकीय मतें मिळतीं असल्याने, कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचा विशेष पाठिंबा सेनगुप्त यांसच होता. सेनगुप्त व सुभाष बाबू यांजमधील दुही इतकी वाढत गेली कीं, ती मोडण्याचे प्रयत्न बाहेरून मोतीलाल

नेहरू यांजसारख्यांना करावे लागले. बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचें काम दोघांच्या भांडणांत बंद पडलें, तेव्हा श्री. माधवरावजी अणे यांची नेमणूक सदर प्रकरणाची चौकशी करण्याकरिता राष्ट्रीय सभेकडून झाली व त्या निमित्ताने अणे यांस कित्येक दिवस कलकत्त्यास मुक्काम करावा लागला होता.

सेनगुप्त हे मोठे महत्त्वाकांक्षी व स्वार्थत्यागी होते. असहकारितेच्या चळवळींत त्यांनी आपला वकिलीचा धंदा बंद ठेवून पुष्कळच झीज सोसली. त्याची मुद्रा भव्य, शरीरयष्टि डौलदार व आवाज खणखणीत असल्यामुळे, त्यांचें वक्तृत्व परिणाम कारक वठत असे. सन १९२८ सालीं कलकत्यास राष्ट्रीय सभा भरली, तेव्हा स्वागत समितीचें अध्यक्षस्थान त्यानाच देण्यांत आलें होतें. त्या वेळीं त्यांनी पहाडी आवाजाने केलेलें भाषण पुष्कळांच्या स्मरणांतून गेलें नसेल. राष्ट्रीय सभेच्या कामकाजांत मनापासून पडल्याचीं बरींवाईट दोन्ही प्रकारचीं फळें त्यांच्या वांट्याला आलीं. दासबाबूंच्या शोचनीय निधनानन्तर स्वराज्य पक्षाच्या पुढारीपणाचा, बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदाचा व कलकत्ता कार्पोरेशनच्या मेयरशिपचा असा देशबंधु दासांचा तिहेरी मुगुट महात्मा गांधींनी त्यांच्या शिरावर चढविला होता. फॉरवर्ड पत्र बुडाल्यानंतर कॉंग्रेसपक्षीय मतांचा प्रचार करण्याकरिता त्यांनी ॲडव्हान्स पत्र काढलें व तें आज चांगल्या स्थितींत आहे. फेर—नाफेर वादाच्या वेळीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचा वाद तोडण्याकरितां पंच म्हणून त्यांची नेमणूक श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्याबरोबर झाली होती. १९२९ सालीं त्यांना तीन महिन्यांची कैद भोगावी लागली. जाहीर सभेंत सरकारजमा वाङ्मय वाचले यावरून १९३० सालच्या कायदेभंगाच्या पहिल्या चळवळींत त्यांना शिक्षा झाली होती. सन १९३१ सालीं सेनगुप्त युरोपच्या सफरीस गेले होते. ते २० जानेवारी १९३२ रोजीं मुंबईस परत आले. त्या वेळीं कायदेभंगाची दुसरी चळवळ नुकतीच सुरू झाली होती. त्या वेळीं सुभाषबाबूंस कल्याणच्या स्टेशनावरच पकडण्यांत आलें होतें.

बंगाल्यांत कायदेभंगाचा प्रसार होऊं नये या हेतूने सरकाराने सुभाषबाबूंना बाहेरच्या बाहेर अटक केली. आता उरले सेनगुप्त. त्यांचे पाय बंगाल्यास लागण्यापूर्वीच त्यांना बोटीवरच मुंबईस पकडण्यांत सरकाराने आपला कावा सफाईने साधला. त्यांस १८१८ च्या बंगाल रेग्युलेशनखाली कलकत्याच्या तुरुंगांत अटकेंत ठेवण्यांत आलें. ही शिक्षा त्यांनी १॥ वर्ष भोगली व त्या मुदतींत त्याची प्रकृति ढासळली ती नवीन स्थळीहि न सुधारून, त्याचा रांची येथे वरीलप्रमाणें अंत झाला. मरणसमयीं त्यांचें वय अवघें ४८ वर्षांचे होतें. यावरून त्यांच्या मृत्यूस कारागृहवासच कारण झाला याविषयीं शंका राहात नाहीं. सेनगुप्त यांनी एका इंग्रज स्त्रीशीं लग्न केलें होतें. या नलिनी सेनगुप्त बाईनी गेल्या मार्च महिन्यांत कलकत्त्यास भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं अध्यक्षाची कामगिरी धैर्याने बजावली होती. असें हें दांपत्य तेजस्वी, स्वदेशाभिमानी, स्वार्थत्यागी व बाणेदार असून, त्यांपैकी बॅ. सेनगुप्त यांजवर मृत्यूने घाला घातल्यामुळे, बंगाल प्रांताचें व हिंदी राष्ट्राचेंहि जें नुकसान झालें आहे तें लवकर भरून येण्यासारखें नाही.

# रा. बापटांचें प्रचारकार्य

(‘लो. टिळक स्मारक मंदिर’ या संस्थेतर्फे रा. सदाशिवराव बापट यांनी यंदाच्या वर्षी पुणें जिल्ह्यांत स्वदेशी, गोरक्षण व अस्पृश्यतानिवारण या विषयांवर व्याख्यानें दिलीं. त्यासंबंधाचा अहवाल त्यांनी ‘मंदिर संस्थेस’ सादर केला. तो सार्वजनिक दृष्ट्या उपयुक्त असल्यामुळे खाली दिला आहे.

—सं. केसरी)

There is much to be endured and little to be enjoyed.

— डॉ. जॉन्सन.

### प्रास्ताविक

गेल्या तीन वर्षांत लो. टिळक स्मारक मंदिर या संस्थेतर्फे मध्य महाराष्ट्रांतील नऊ जिल्ह्यांत मी प्रचाराचें काम केलें. प्रत्येक जिल्ह्यांतील मुख्य तालुक्याचा गांव व शिवाय तालुक्याच्या गांवाएवढीं त्या तालुक्यांतील प्रमुख अशीं एकदोन गांवें अशा रीतीनें दरसाल तीन जिल्हे मी घेत असें. प्रस्तुत सालीं एका पुणें जिल्ह्यांतच मीं हिंडावें असें ट्रस्टचे चिटणीस श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांच्या विचाराने ठरविण्यांत आलें. यामुळे वास्तवीकच एका जिल्ह्यांतील मोठ्या अशा बऱ्याच गांवीं मला जातां आलें.

### दौऱ्यांतील गांवें

पुणें जिल्ह्यांत एकंदर आठ तालुके आहेत.

त्यांपिकीं खेड, जुन्नर, मावळ, शिरूर व पुरंदर या पांच तालुक्यांतील पस्तीस गांवीं मी गेलों होतो. बाकीच्या तिन्ही तालुक्यांत, मूळच्या सकल्पाप्रमाणे, मी जावयाचा; परंतु या प्रचारांतील शेवटच्या गांवीं म्हणजे परिंचे मुक्कामी एकाएकीं माझी प्रकृति विलक्षण रीतीनें बिघडून मी पुण्यास आजारी होऊन आल्यामुळें व पुढें लगेच पावसाळा सुरू झाल्यामुळे पुढील हिंडण्याचा बेत निरुपायास्तव रहित करणे प्राप्त झाले. वर दिलेल्या पाच तालुक्यांतील ज्या पस्तीस गावीं मी गेलो होतों तीं गांवे येणेंप्रमाणें:—( खेड तालुका ) खेड, कडूस, चासकमान, वाडें, मंचर, घोडें, आंबेगाव; ( जुन्नर तालुका ) जुन्नर, नारायणगांव, आळे, राजुरी, बेल्हें, आणें, पिंपळवंडी, ओतूर; ( मावळ तालुका )तळेगाव–दाभाडे, इंदुरी, वडगाव, माजें, आंबेगांव, शिवणे, चांदखेड; ( शिरूर तालुका ) केंदूर, पाबळ, कोरेगांव, तळेगाव–ढमढेरे, श्री राजणगाव गणपती, घोडनदी; ( पुरंदर तालुका ) कौडीत, सासवड, जेजुरी, परिंचें.

## दवंडी देण्यांतील अडचणी

खेडेगांवांतील लोकांस सबंध वर्षांत फुरसतीचा वेळ असेल तर तो सामान्यपणें उन्हाळ्यांतच होय; आणि मी याच ऋतूंत हिंडत असल्यामुळे सभेस लोक जमणें शक्य होई. पण लोकांस सभेस येण्यास वेळ असला तरी त्यांस सभेची बातमी कळली पाहिजे म्हणून गांवांत जातांच प्रथम सभेची दवंडी देण्याच्या उद्योगास मी लागें. खेडेगांवांत दवंडी देणे हें एक अलीकडे मोठें प्रकरण होऊन बसले आहे. नेहमींचा शिरस्ता म्हणजे गांवकीची पाळी ज्याचेकडे असेल त्या 'वेसकराने' हें काम करावयाचे. परंतु अलीकडील चळवळीच्या काळांत वेसकर यास केवळ सरकारी कामगार समजण्यांत येऊन त्याने पाटलाचे परवानगीशिवाय दवंडी देता कामा नये असें ठरविण्यांत आल्याचे दिसतें. वेसकर हा जसा सरकारचा कांहीं अंशीं नोकर तसा तो गांवच्या लोकांचाहि ताबेदार आहे असें गांवकऱ्यांचें म्हणणें आहे. कारण त्यास गांवांतील लोकांकडून बलुतें मिळतें, रोज हक्कानें तो भाकरी वसूल करतो व सणासुगीचे दिवसांत लोकांकडून त्याचा हात ओला होतो. यामुळे त्याने गांवकीचें सार्वजनिक काम केलें पाहिजे असें गांवकऱ्यांचें म्हणणें.

## आळेगांवचा अनुभव

याच दृष्टीनें गेल्या सालीं जुन्नर तालुक्यांतील आळे या गांवीं माझ्या व्याख्यानाच्या दवंडीचें काम करण्यास वेसकर यांस तेथील प्रमुख व गांवमुन्सफ असलेले श्रीमंत नानासाहेब शेटे यांनी सांगितलें. परंतु दवंडीवाला दवंडी देत असतां सरकारी अधिकाऱ्यांनीं ती बंद पाडली. पण श्रीमंत शेटे हे त्या गांवचे फार वजनदार व मातबर गृहस्थ असल्यामुळे त्यांस हा अपमान वाटून ते स्वतः गांवचे प्रमुख जागीं जाऊन उभे राहिले व त्या दवंडीवाल्याकडून त्यांनी तेथे त्रिवार दवंडी पिटवून सबंध उभे गावभर ती देवविली; पण पुढे सरकार–दरबारीं हे प्रकरण बरेच वाढलें. वरिष्ठ अधिकाऱ्यांपुढे रा. शेटे यांचे जाबजबाब झाले. त्याकरितां पर ठिकाणी त्यांस हेलपाटे खावे लागले. एकंदरीत या प्रकरणीं त्यांस बरीच जिकीर सोसावी लागली ! असले प्रकार पाहून प्रस्तुतच्या दौऱ्यांत सरकारी कामावर नसलेल्या लोकांकडून त्यांस योग्य तो मेहनताना देऊन त्यांचेकडून दवंडी देण्याचा मी प्रयत्न करीं; परंतु कांहीं गांवच्या सरकारी अधिकाऱ्यानी ही दवंडीदेखील बद केली ! आणि त्यांत आश्चर्य असें कीं, माझ्या या प्रचारकार्यास मे. कलेक्टरसाहेब यांची लेखी संमति आहे असे गांवच्या अधिकारी लोकांस वर्तमानपत्रद्वारे व खाजगी रीतीनें मीं कळविलें असतांहि त्यांजकडून दवंडीस बंदी होई !

## स्वतः दवंडी दिल्याचें फळ

एका गांवीं तर तेथील पद्धतीप्रमाणे गुरवास योग्य तो मोबदला देऊन लोकाच्या घरोघरीं सभेचें बोलावणें करण्यास सांगितलें असता पाटलाने त्यासहि धाकदपटशा देऊन त्याचें काम बंद पाडले. अशा प्रकारें कोठे प्रत्यक्ष तर कोठें अप्रत्यक्ष रीतीने अडथळे उत्पन्न करण्यांत आल्यामुळें सभा भरविण्याचे काम अधिकच निकट होई. जेथे अशी बिकट परिस्थिति निर्माण होई तेथे नाइलाजास्तव जातीनें मला स्वतः गांवांत दवंडीवाल्याचे काम करावें लागे ! पण लोकांवर याचा उलटाच परिणाम होत असल्याचें दिसून आले. मी स्वतः दवंडी देणे याचा लोक असा अर्थ लावीत कीं, कायदेभंग करणे, सरकारास सारा न देणें किंवा सत्याग्रह करणें अशासारखे सरकारचे विरुद्ध काम करण्याकरिता यांची सभा होणार असावी. म्हणून यांस दवंडी देण्यास कोणी मिळत नाही व म्हणून जातीनें दवंडी देण्याचे काम हे करीत आहेत ! अर्थात् याचा परिणाम असा होई कीं, सभेस जितके लोक जमावे तितके जमत नसत. त्यांतून कोणी धीर धरून येत, ते तेथे हजर असलेल्या पोलिस शिपायांस पाहून गुपचुप मागील पायाने पसार होत !

## सभेस जागा मिळण्यास पंचाईत

सभेकरिता जागा ठरविण्याचे बाबतींतहि असाच त्रास होई. गांवांतील चावडी सरकारी

म्हणून ती मिळावयाची नाही आणि रस्ते सार्वजनिक म्हणून ते अडवावयाचे नाहीत. फार काय पण अशा रस्त्यांस लागून असलेली मोकळी जागाहि कांही तरी निमित्त सांगून आमच्या सभेस मिळावयाची नाही; पण तमाशे किंवा गारोड्या-डोंबाऱ्यांचे खेळ मात्र तेथे करण्यास हरकत नसे! वरील कारणामुळे आमच्या सभा कोठेतरी बाजूस असलेल्या खासगी देवळासारख्या जागेंत भरवाव्या लागत.

## सरकाराच्या भीतीचा परिणाम

सभेची प्रसिद्धि गांवांत नीट रीतीने झाली तर सभेस मुळीच लोक येत नसत असें नाही. आतां पूर्वीच्या मानाने लोक कमी जमतील हें खरें, पण तितके तरी लोक जमविण्यास गांवांतील कोणी वजनदार मनुष्याने या कामीं थोडाबहुत पुढाकार घेतल्याशिवाय लोक तरी कसे जमावे! पण बहुतेक गांवीं पुढारी लोक या कामीं कच खाऊं लागले आहेत यांत शंका नाही. पण यांत त्यांना तरी दोष कसा द्यावा? जेथे तालुक्याच्या गांवीं वकीलवर्गासारखा सुशिक्षित वर्ग असून तो या कामीं सर्वस्वी उदासीन राहूं लागल्यामुळे साधी सभाहि होऊं शकत नाही, तेथे खेडेगांवांत गेल्या कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतल्याबद्दल ज्यांचें अनेक रीतींनी नुकसान झालें त्यांनी आतां कच खाल्ली तर त्यांस नांवें कोण ठेवील? गेल्या कायदेभंगाच्या चळवळींत या जिल्ह्यांत जेथे जंगल सत्याग्रह करण्यांत आला, तेथील लोकांचे अधिकारी वर्गाने आकसाने कसें नुकसान केलें हें पाहिलें म्हणजे त्या लोकांनी हल्ली सर्वच सार्वजनिक कामांत जी हाय खाल्ली आहे त्याबद्दल त्यांस दोष देण्यास कोणीहि धजणार नाही. सरकारच्या या दडपशाहीचा खेडेगांवीं इतका विलक्षण परिणाम झाला आहे कीं, गोरक्षणासारख्या अगदीं साध्या सभेसहि हजर राहण्यास सामान्य लोक भिऊं लागले आहेत. मग जे लोक एकदां तुरुंगांतून जाऊन आले त्यांनी सभेचें नांव सोडलें असल्यास किंवा माझ्यासारख्याशीं नुसता संबंधहि ठेवण्याचें टाळल्यास त्यांत नवल नाही.

## ब्याद कां वाटूं लागली ?

लोकांचे घरीं मी उतरण्यास गेलों असता मला पाहून सरकारच्या भयाने कांही लोकांस वाटावें कीं, आपणांवर हा आता केवढा प्रसंग आला, ही ब्याद आपले घरीं कोठून आली! दारिद्र्यांतहि अतिथि-अभ्यागत घरीं आल्यास त्यांचें अगत्य बाळगणाऱ्या खेडेगांवांतील उदार मनाच्या लोकांच्या विचाराची, केवळ सरकारच्या भीतीमुळे येथपर्यंत मजल आली आहे. एका गांवच्या गृहस्थांनी त्यांचेकडे नेहमीप्रमाणे उतरण्यास मी गेलों असता आरंभींच मला सांगितलें, "तुम्ही जरी कोठेहि परान्न घेत नाही, दुसऱ्यास उपसर्ग देत नाही, तरी गेल्या वर्षी तुम्ही आमचे घरून गेल्यावर पोलिसांनी आम्हांस फार त्रास दिला. फार काय पण तुम्हास उतरण्यास आम्ही जागा दिली म्हणून आम्हाला पकडणार अशी गांवांत वदंता उठली करिता या खेपेस तुम्ही अजिबात हें गांव सोडून दुसऱ्या गांवीं गेलांत तर बरेंच. निदान आमचेकडे तरी न उतरणें हें अधिक बरें!"

## फौजदाराशीं संवाद

या दौऱ्यांत कलेक्टरसाहेबांच्या संमतीचे पत्र माझ्याबरोबर असल्यामुळें सरकारी अधिकाऱ्यांचा त्रास होणार नाही अशी माझी कल्पना होती. परंतु एका गांवीं एका सद्गृहस्थांकडे उतरलों असतां 'यांना तुम्ही आपल्या घरीं का उतरूं दिलें?' असें घरमालकांस कोणी अधिकाऱ्याने दटावल्याचें समजलें. जिल्हाधिकाऱ्यांची हरकत नसलेल्या दौऱ्याची ही अशी गत! एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन मी या दौऱ्यांत अत्यंत साक्षेपाने, सावधानपणाने व कायदेशीरपणानेहि वागत असे. तरीदेखील पोलीस अधिकाऱ्यांस स्वस्थ बसवत नसे. तालुक्याच्या एका गांवीं फौजदारांनी मला आपले कचेरींत भेटण्यास बोलाविलें. त्या वेळीं त्यांचा माझा झालेला संवाद मासलेवाईक असल्यामुळे सारांशरूपाने पुढे देतों.

फौजदार—तुम्ही आमचे तालुक्यांत व्याख्यानें देत हिंडता; पण आम्हांस अगोदर कांही कळवावयाचें तरी?

मी—होय; मी पूर्वीच तसें कळविलें आहे.

फौजदार—कोणास कळविलें?

मी—एक तर 'केसरी'पत्रांत मीं कार्यक्रम प्रसिद्ध केला आहे. शिवाय तुमच्या तालुक्याचे मामलेदारसाहेबांस तुमचे तालुक्यांतील सबंध कार्यक्रम मी कळविला आहे.

फौजदार—आम्ही कोठें वर्तमानपत्रांत पाहिला नाही तो?

मी—(खिशांतील केसरी काढून) हा पहा केसरी व यांतील तो कार्यक्रम.

## "दंग्याला जबाबदार तुम्ही!"

फौजदार—पण मामलेदारसाहेबांना जो कार्यक्रम तुम्ही पाठविला तो आधीं फक्त दोनच दिवस. शिवाय त्यांजकडे पाठविलात म्हणून काय झालें, आमचेकडे स्वतंत्र कां नाही पाठविला? कां मी कोणी ऑफिसरच नव्हे! यापुढे जो कार्यक्रम पाठवाल तो अगोदर बरेच दिवस पाठवित जा. व स्वतंत्रपणें तो आमचेकडे पाठविण्यांत आला पाहिजे. थोड्या मुदतीने कार्यक्रम पाठविण्यांत तुम्हा लोकांचा हेतु

असा असतो कीं; आम्हास तेथें मनुष्य पाठवितां येऊं नये व मग आपणास वाटेल तें बोलण्यास सांपडावें. शिवाय आमचा मनुष्य गांवीं आला म्हणजे त्यास पाहून लोक सभेस येण्यास बिचकतात, तसें होऊं नये हाहि प्रचारकाचा एक हेतु असतो. पण आतां असें करून चालणार नाहीं. शिवाय मी तुम्हाला बजावितों कीं, आमचा मनुष्य हजर नसतां तुम्ही सभा केली आणि तेथे जर चोरी झाली, दंगा झाला, तर मी तुम्हांस जबाबदार धरीन. गराडें या गावीं तुम्ही येणार म्हणून तेथील पाटलानें आम्हांस कळविलें, म्हणून मी आपला शिपाई आज तेथें दोन दिवस बसवून ठेविला आहे. आणि तुम्ही आपल्या कार्यक्रमांत तें गांव घातलें नाहीं, अजिबात वगळलें हें ठीक नव्हे. कलेक्टर साहेबांची परवानगी तुमचे जवळ आहे काय ? तो कागद द्या. त्याची नक्कल आम्हांस हवी. ”

### अपमानास्पद वर्तन

फौजदारसाहेबांच्या वरील प्रश्नांस द्यावयाचीं तीं योग्य उत्तरें मीं दिलींच; पण गराडें गांवचा मजकूर ऐकून मी तर थक्कच झालों. मी या बाबतींत त्यांस एवढेंच म्हणालों, “गराडें या नांवाचें गांव मी आजच तुमच्या तोंडून ऐकतों आहे. मग तेथील कार्यक्रम मी कसा ठरविणार ? आपणांस एवढीच विनंति कीं, तेथील पाटलास विचारा कीं, तुला ही बातमी कोणी दिली ? कृपा करून त्याचें उत्तर मला कळवाल तर मी आपला आभारी होईन ” ही माहिती फौजदारसाहेब अजून मला कळवींत आहेत ! वास्तविक मी कोणत्याहि रीतीनें कोणासहि बांधला गेलों नसतांनाहि मी होऊन सर्वांच्या सोयीसाठीं वर्तमानपत्रांत व मामलेदार यांजकडे आगाऊ कार्यक्रम पाठवीत असतों. पण यानेंहि समाधान न होऊन वर दिलेल्या वर्तनाचें जबाबदार अधिकाऱ्यांनी हिडिस प्रदर्शन करावें, यास काय म्हणावें ? तक्रारीच्या रूपानें मी हें म्हणत नाहीं; पण सभ्य अशा लौकिक व्यवहाराच्या दृष्टीनें मी असें विचारतों कीं, उघडपणानें व कायदेशीर रीतीनें निरुपद्रवी काम करणाऱ्या माझ्यासारख्या प्रचारकाचा गांवांत मुक्काम असेपर्यंत गस्त पोलिसांनीं व पाटीललोकांनीहि छायेप्रमाणें माझेमागें एकसारखें असावें व गांव सोडून जाईपर्यंत एखाद्या वहिमी इसमाप्रमाणें अत्यंत अपमानास्पद रीतीनें मला लेखावें हें योग्य आहे काय? गांवच्या कनिष्ठ अधिकाऱ्यांचें हें वर्तन सरकारास कदाचित् मंजूरहि नसेल; फार काय त्यांना त्याची दखलगिरीहि नसेल.

बरें; वरील सर्व गोष्टींस पुरावा काय म्हणून कोणी विचारील तर खेडेगांवांत अधिकाऱ्यांच्या कोणत्याहि कृत्याविरुद्ध कोणासहि तसा पुरावा मिळणें ही अशक्यांतील अशक्य गोष्ट आहे. इतकेंच काय, पण मनुष्य हा मनुष्य आहे असें सिद्ध करण्यासहि खेडेगांवांत सरकारच्या विरुद्ध कोणी पुरावा देण्यास उभा राहील असें मला वाटत नाहीं. पण गांवांत पाय ठेवल्यापासून तों गांव सोडीपर्यंत नाना रीतींनी या अधिकाऱ्यांकडून होणारा जाच सहन करूनच प्रचारकास आपलें काम बिनबोभाट व बिनतक्रार करावें लागतें हेंहि कांहीं खोटें नाहीं.

### परिस्थितीचा दोष

दौऱ्यांतील सर्वच गांवीं वरीलप्रमाणें प्रकार घडून येई असें मात्र नाहीं. पुष्कळ गांवीं फारशा आयासाशिवाय सभा होऊं शकल्या. कांहीं गांवीं मनाप्रमाणें नसले तरी बऱ्या प्रकारें कार्यक्रम घडून आले व क्वचित् कांहीं गांवीं तर अपेक्षेपेक्षांहि अधिक काम करतां आलें. याचें कारण अर्थातच स्थानिक अधिकाऱ्यांचा समजुतदारपणा हेंच होय. तथापि हेंहि लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं, माझ्या दौऱ्यास कलेक्टरसाहेबांची हरकत नाहीं हें सांगितल्याशिवाय मात्र वरील अधिकाऱ्यांचा हा समजुतदारपणा कोठेंच प्रतीत होत नसे ! हा दोष केवळ परिस्थितीचाच असूं शकेल हेंहि मी विसरत नाहीं. पण अपवाद म्हणून कां होईना कांहीं ठिकाणीं वरच्या दर्जाच्या पोलिस अधिकाऱ्यांनीं अपेक्षेपेक्षांहि अधिक सौजन्यानें व भलेपणानें वागून माझा कार्यक्रम पार पाडण्यास मला मदत केली याचाहि साभार उल्लेख करणें माझें कर्तव्य आहे.

### दौऱ्यास सरकारची ‘परवानगी’ घेतली काय ?

कलेक्टरसाहेब यांस कळवून ( त्यांची ‘परवानगी’ मागून नव्हे ) मी दौरा काढणें ही गोष्ट असहकारी मनोवृत्तीच्या माझ्या कांहीं देशभक्त मित्रांस पटणारी नाहीं हें मला माहीत आहे. कांहींनी तर थट्टेनें म्हणण्यास सोडलें नाहीं कीं, “आतां काय बुवा ! सरकारच्या परवानगीनें आणि आश्रयानें तुमचा दौरा चालणार ! तुम्हांस आता काय कमी !! ” पण या लोकांस हें माहीत नाहीं कीं, मी कलेक्टर यांस लिहिलें तें परवानगी मागण्याकरितां नसून केवळ माझ्या प्रचाराच्या कार्याचें स्वरूप त्यांस स्पष्ट कळावें म्हणून; आणि हें कलेक्टर यांस पाठविलेल्या माझ्या पत्रावरून कोणासहि दिसून येण्यासारखें आहे. शिवाय सरकारची परवानगी मागण्याकरिताच त्यांस मीं लिहिलें असें म्हणावें, तर त्यांचें उत्तर येण्याची मीं वाट पाहिली असती हें उघड आहे. पण वस्तुस्थिति अशी आहे

कीं, कलेक्टराचें उत्तर येण्यापूर्वींच मीं दौरा सुरूहि केला होता! तथापि मला आता अनुभवावरून असें स्पष्ट म्हणावयास हरकत वाटत नाहीं कीं, वर लिहिल्याप्रमाणे कलेक्टरसाहेब यांस माझ्या दौऱ्याचा हेतु व त्याचें स्वरूप स्पष्टपणें कळविल्या-खेरीज मी दौऱ्यावर निघालों असतों तर या सबंध दौऱ्यांत एखादे गांवीं तरी जाहीर रीतीने माझें व्याख्यान होऊं शकलें असतें किंवा नाही अगर खाजगी रीतीनेहि गांवकरी मंडळींशीं चर्चा करतां आली असती किंवा नाहीं याची मला जबरदस्त शंका आहे.

## इकडे आड व तिकडे विहीर

प्रस्तुतच्या प्रचाराचें कार्य करण्यास एका बाजूस अधिकाऱ्यांच्या धोरणाचा आड व दुसऱ्या बाजूस लोकांच्या सहानुभूतीच्या अभावाची–किंब-हुना–विरोधाची विहीर असल्याचें दिसून आल्या-मुळे अशा अडचणींतून मोठ्या कष्टाने मला आपला मार्ग काढावा लागे. या वेळीं प्रचाराकरिता 'स्वदेशी, गोरक्षण, व अस्पृश्यतानिवारण' असा त्रिदलात्मक विषय मीं घेतला होता. सरकारी अधिकाऱ्यांस मनांतून 'स्वदेशी 'चें वावडें. यामुळे हा विषय मी व्याख्यानात मांडतांना त्यांतील प्रत्येक शब्द ते कान टवकारून ऐकत व कागदावर टिपून घेण्याचा यत्न करीत. इकडे लोकांकडे पाहावें तर 'अस्पृश्यतानिवारण' हे शब्द कानांत जाणाऱ्या तापलेल्या तेलाप्रमाणे त्यांस असह्य होत. अधिकारी व जनता यांजकडून निरनिराळ्या कार-णास्तव होणाऱ्या विरोधाचें हें दुधारी हत्यार पेलणें खरोखरच मोठ्या मुष्किलीचें काम होऊन बसे. 'सरकारची माझे दौऱ्यास हरकत नाहीं,' असें लोकांस सांगितलें असता त्यांनी त्याचा विपरीत अर्थ करावा कीं, आमचा धर्म बुडविण्यास सरकार टपलेच आहे. तेव्हा अनायासें यांचकडून ते काम होत असेल तर सरकाराने तें कां न करून घ्यावें! एवढ्या कामापुरते हे गृहस्थ सरकारजमा झाले आहेत असें समजावें म्हणजे झालें! बेळगांवचे एक कार्यकर्ते श्री. गोखले वकील यांनी केसरींत दिलेल्या पत्रांतील "हरिजन कार्याकरितां सबंध बेळगांव जिल्ह्यातील जनतेंत विरोध नाहीं, इतकेंच नव्हे तर जनता पूर्ण अनुकूल आहे" हा मजकूर वाचून बेळगाव जिल्हा धन्य व तेथील कार्यकर्ते त्याहून धन्य होत असेंच म्हटलें पाहिजे. पण अशा धन्यतेचे उद्गार निदान आमच्या पुणें जिल्ह्यापुरते तरी लवकर काढण्याचा योग कोणाच्या नशिबीं येईल असें चिन्ह दिसत नाहीं. मी असें कां म्हणतों हें पुढील मजकुरावरून कळून येईल.

## अस्पृश्यतानिवारणाशिवाय बोला!

कोणत्याहि गांवीं जाण्यापूर्वी तेथील सर्व प्रमुख लोकांस 'मी अमुक दिवशीं येतों, तेथे सभा वगैरे करण्याचा कार्यक्रम करावयाचा आहे' अशाबद्दलचीं खासगी विनंति-पत्रें मी पाठवीत असें. पण नमूद करण्यास दुःख वाटतें कीं, कांही लोकांस ही आयतीच सूचना पथ्यावर पडून नेमकें त्या दिवशीं कामानिमित्त बाहेर गांवीं जाणें त्यांस सोयीचें वाटे! पत्र पाठविलें म्हणून भिडस्तपणामें जे कोणी मला भेटत त्यांपैकीं कांही लोक निराशेनें, कंटाळून व त्रासून म्हणत, "पुरें झाल्या तुमच्या आतां या सभा, तीं व्याख्यानें व ती चळवळ! शहरांतून ज्याने उठावें त्याने खेडेगांवीं येऊन आम्हां लोकांस काय वाटेल तें सांगत सुटावें, व आम्हीं तसें ऐकून तुमच्यामागे लागावें असें आज कैक दिवस चाललें आहे. पण कशास फेंस ना पाणी! तेव्हा आता तूर्त हे सर्व बस्स झालें!" स्वराज्याचा घड आता अगदी हाताशीं आला आहे, नुसती टांच वर करून त्याला एक हिसका देण्याचा अवकाश कीं तो हातांत पडणार अशा उतावीळपणाच्या आशाळभूतपणाने जे या चळवळींत पडून आता अगदी निराश झाले आहेत असे लोक सोडून देऊन दुसरे कांही लोक काय म्हणतात तें सांगतों.

हे लोक सामान्यपणें गांवांतील शिष्ट वर्गात मोड-तात. अशा लोकांपैकीं, प्रमुख लोकांस मी प्रथम भेटत असें. तेव्हा ते स्पष्ट म्हणत, "अस्पृश्यता-निवारण हा विषय सोडून तुम्ही सभा करण्यास तयार असाल तर आमचे गांवीं सभा होऊन इतर दोन विषयांवर नेहमी-प्रमाणे तुमचे व्याख्यान करूं." एरवीं सहसा एकदम तुसडेपणाने न बोलणाऱ्या पण या विषयाचे बाबतींत स्पष्टोक्ति करणाऱ्या कांही पुढारी लोकांशीं खासगी तऱ्हेने मी थोडाबहुत बुद्धिवाद करीं. लोकांशीं आपले-पणाने, सौम्य रीतीने व त्यांचे पोटांत शिरून करण्यांत येणाऱ्या या वादाचा मुळींच उपयोग होत नसे असें नाहीं. कांहीं ठिकाणीं तर या वादाचा शेवट अस्पृश्यता-निवारण याहि विषयावर मीं बोलावें असा होई. पण पुष्कळ गांवीं मीं हा विषय वगळलाच पाहिजे, तरच व्याख्यान होईल असेंच निग्रहाने मला सांगण्यांत येई. तेव्हा 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या न्यायाने एक विषय मिळविण्याच्या आशेने दोन विषय बुडविण्याचा अविचार करण्या-पेक्षा त्या एकाचें विषयाला रजा देऊन दोन विषयांचा बचाव करण्याची लोकांची सूचना मी मान्य करीं. हें सामोपचाराचें धोरण मीं अंगीकारल्यामुळे अजीबात सभा झाली नाही अशीं गांवें फारच थोडीं भेटलीं. पूर्वीच्या दौऱ्यांत

ज्या गांवीं सभा भरविण्यांत येई त्या गांवच्या भोंवतालच्या सुमारें दोन–तीन मैलांच्या घरांतील निदान तीन गांवांतील लोकांस सभेस बोलाविण्याचा माझा परिपाठ असे; पण आता या खेपेस वरील एकंदर परिस्थितींत भरणाऱ्या आमच्या सभेस खुद्द गांवचे लोकहि येण्याची जेथे मारमार तेथे आता बाहेरगांवचे लोक कसचे यावयाचे !

**अस्पृश्यांचे वस्तींत अस्पृश्यतेचें निवारण**

वर लिहिल्याप्रमाणे ज्या गांवीं अस्पृश्यतानिवारण या विषयावर बोलण्याची गांवकरी लोकांची परवानगी मिळत नसे त्या गांवीं 'स्वदेशी व गोरक्षण' या जोड–विषयावर व्याख्यान देऊन मग त्या गांवांतील अस्पृश्य लोकांच्या वस्तींत जाऊन स्वतंत्र रीतीने त्यांच्या समाजापुढे मी व्याख्यान देत असें व ही गोष्ट गांवकरी लोकांच्या संमतीनेच मी करीं. अस्पृश्य लोकांच्या मोहल्यांत जाऊन मी येथे व्याख्यानाकरिता आलों आहें, असें त्यांस म्हटलें म्हणजे तें ऐकून त्या लोकांना फार अचंबा वाटे व आनंद होई. सभेची ते लोक मोठ्या उत्साहाने तयारी करीत. थोड्या वेळांत सबंध मोहल्यांतील एकूणएक लोक सभास्थानीं येऊन बसत. सभेस आलेल्या या आमच्या उघड्यावाघड्या श्रोत्यांचा तो देखावा पाहून मनामध्ये क्षणभर नाना प्रकारचे विचार उत्पन्न होत. असो. स्पृश्य समाजापुढे अस्पृश्यतानिवारणाचे बाबतींत जे विचार बोलावयाचे त्याहून अगदी भिन्न असे विचार या ठिकाणीं सांगावे लागत; शिवाय येथील श्रोत्यांस कळेल अशी भाषा आपण कशी वापरतो याची आपली येथे खरी परीक्षाच होणार असेंहि मनांत येई. व्याख्यानानंतर कांहीं प्रश्नोत्तरें होत. क्वचित् तेथीलहि लोक सभेंत बोलत व एकंदरींत मोठा बोधप्रद प्रसंग तेथे घडून येई.

अस्पृश्यांचे मोहल्यांत म्हणजे गांवच्या महारमांगवाड्यांत मी व्याख्यानास गेलों असता तेथे लोकांना मी काय सांगतो, याचा कानोसा घेण्यासाठी गांवांतील कांहीं विलक्षण लोक तेथें येऊन आजूबाजूस लपून–छपून बसत अस्पृश्यतानिवारण करण्याचा भार ज्या स्पृश्य वर्गावर आहे, त्याचेसंबंधीं वरील सभेंत अर्थातच फारसे कांहीं बोलावयाचें नसून अस्पृश्यतेचें उच्चाटन होण्यास अस्पृश्यांनी कसें पात्र झालें पाहिजे हा जो त्या संपूर्ण विषयाचा दुसरा भाग तेवढाच विषय येथे प्रामुख्याने मी मांडीत असे. यामुळे सभा आटोपल्यावर गांवांत परत जातांना तेथे आलेली स्पृश्य मंडळी मला म्हणत, " अशा रीतीने अस्पृश्यतेचें निवारण करण्याबद्दल तुमचें व्याख्यान होत असतें व तुम्ही फक्त एवढेंच सांगत असता असे आम्हांस अगोदर कळतें तर गांवांतील सभेंतहि तुम्हांस हा विषय सांगण्यास हरकत पडली नसती ! "

**अस्पृश्यतानिवारणाच्या विरोधाचे कांहीं मासले**

ज्या गांवीं या विषयावर बोलण्यास लोकांची संमति मिळे, तेथे या विषयाची दुसरी बाजू म्हणजे स्पृश्य वर्गाने बजवावयाचें कर्तव्य लोकांना सांगतांना खेडेगांवांतील सर्वसामान्य लोकांच्या विचारांची धाव व त्यांच्या मनाची तयारी लक्षांत घेऊन फार दक्षतेने व मर्यादित क्षेत्रांत त्या विषयाचें मी प्रतिपादन करीत असें. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, इतकी सावधगिरी बाळगूनहि तेथे विलक्षण अस्वस्थता उत्पन्न होई. त्याचे कांहीं मासले पुढे देतों. ( १ ) तालुक्याच्या एका मोठ्या गांवीं भरलेल्या आमच्या सभेचे अध्यक्षच, मी हा विषय मांडीत असता, माझ्याशीं हुजत घालून अगदी वर्दळीवर आले ! ( २ ) एका गांवीं आमची सभा उघड्या मैदानांत भरली होती. म्हणून तेथील एक अस्पृश्य शिक्षक सभेस आले. हा दिवस महात्मा गांधींच्या एकवीस दिवसांच्या उपोषणांतील असल्यामुळे स्वाभाविकच पहिल्या दोन विषयांचें प्रतिपादन झाल्यावर हा विषय सुरू करण्यापूर्वी, महात्मा गांधींबद्दल मीं ईशप्रार्थना केली. प्रार्थनेचा मजकूर पटल्यामुळे ती संपतांच हजर असलेल्या त्या अस्पृश्य बंधूने पसंतीदाखल सहज टाळी वाजविली. पण एवढीहि गोष्ट न खपून गांवच्या लोकांनी त्यास सभेंतून जाण्यास भाग पाडून मलाहि पुढे तो विषय मांडण्यास बंदी केली ! ! (३) एका गांवीं तर या विषयाच्या प्रतिपादनास मी सुरुवात करतांच ' पुंडलीक वरदे हारिविठ्ठल ' अशी गर्जना करून सभेतून लोक उठून गेले ! (४) एका गांवीं ब्राह्मणांची मुळींच वस्ती नसल्यामुळे एका ब्राह्मणेतराकडे मी उतरलों होतों. तेथे गांवांतील मुख्य व्याख्यान झाल्यावर अस्पृश्यांच्या वस्तींत व्याख्यान देऊन मी घरीं आलों. तेथून मला ताबडतोब दुसऱ्या गांवीं जावयाचें होतें. बैलगाडी दाराशीं उभीच होती. म्हणून माझ्य सामानाची ट्रंक घेण्यास मी ओटी वर जातों तोंच यजमान म्हणाले, " हं, अंगणातच थांबा; मी ट्रंक आणून देतों; घरांत विटाळ कालवूं नका !" हे शब्द गाडीवानाने ऐकतांच आपणासहि यांचा विटाळ नको असें म्हणून स्वारी गाडी घेऊन निघून गेली !

**अस्पृश्यतानिवारणाच्या विरोधाचीं कारणें**

अस्पृश्यांचें अस्पृश्यत्व कधीच जाऊं शकणार नाही अशा एकांतिक विचाराचा मनुष्य खेडेगांवांत शेंकडा एखादा सहज सांपडूं शकेल. पण कालमान बदललें आहे, देश-परिस्थिति झपाट्यानें बदलत आहे, जगाचा ओघ निराळ्या रीतीनें वाहत आहे, तेव्हां आस्ते आस्ते अस्पृश्यता जाण्याची सुधारणा झाली तर ती नको आहे असें नाही अशा प्रकारचे विचार व उद्गार सामान्य लोकांचे तोंडूनहि आता ऐकावयास मिळूं लागले आहेत. मग वर दिल्याप्रमाणे त्यांचा विरोध कां ? या प्रश्नाचें उत्तर जितकें सोपें, तितकेंच अवघड आहे. या विरोधास लोकांचीं कारणें अगदी जय्यत आहेत. पण त्यांचा जाहीर रीतीनें उल्लेख करणें मला धाडसाचें वाटतें. तथापि केवळ कर्तव्यबुद्धीनें त्यांचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों. अस्पृश्यांची नुसती अस्पृश्यताच नष्ट करण्याचा पुढाऱ्यांचा विचार चालू होता व त्याकरिता ते चळवळ करीत होते तोंपर्यंत या चळवळीस विरोध करण्याचें कोणाच्याहि मनांत आलें नाही. फार काय पण, खेडेगांवांतील लोकहि या प्रयत्नाकडे केवळ तटस्थ बुद्धीनें पाहत नसून सहानुभूतीनें पाहूं लागले होते. परंतु पुढे पुढे या चळवळीच्या उत्पादकांचे या बाबतींत प्रसिद्ध होणारे अमर्याद व अधार्मिक विचार व आचार आणि महाराष्ट्रांतील कांही प्रसिद्ध पुढाऱ्यांची त्यास मिळणारी मान्यता या गोष्टीच खरोखर लोकांच्या विरोधास कारणीभूत होत आहेत असें दुःखानें म्हणावें लागतें.

याचें कारण असें कीं, वरील गोष्टींमुळे लोकांना एक प्रकारची भीति उत्पन्न झाली आहे. पुढाऱ्यांचा हेतु नुसती अस्पृश्यता नाहींशी करणें हा नसून या चळवळीचे पर्यवसान सर्व जातींत रोटी-बेटी-व्यवहार सुरू करून सब-गोलंकार करण्याचा म्हणजे जाति व वर्णव्यवस्था मोडण्याचा आहे, ही गोष्ट सर्वसामान्य लोकांना अत्यंत नापसंत व अधार्मिक वाटते. आपण पुढाऱ्यांच्या नादानें वागून अस्पृश्यता-निवारणाच्या खटपटीस लागल्यानें आपल्या जातीच जर मोडणार असतील तर या पुढाऱ्यांपासून, मग ते कितीहि श्रेष्ठ असले तरी, व त्यांच्या या चळवळीपासून दोन पावलें दूर राहणेंच शहाणपणाचें आहे असें लोकांच्या मनानें पक्कें घेतलें आहे. राष्ट्रीय पुढाऱ्यांचे या बाबतींत एका टोंकास गेलेले विचार व धार्मिक दृष्टीनें जनतेस पूज्य असलेल्या लोकांचे दुसऱ्या टोंकाचे विचार खेडेगांवांतील लोकांना फारच गोंधळून टाकीत आहेत. यामुळे नको त्या सभा, नको तुमचीं व्याख्यानें, नको तुमची चळवळ व नको तो तुमचा संबंध असें म्हणण्यापर्यंत त्यांची मजल गेली आहे !

**अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीचे परिणाम**

वर दिलेल्या लोकांच्या मनोवृत्तीचें गमक म्हणून एकदोनच गोष्टी देतों. ( १ ) पुणें महाराष्ट्र स्वदेशी संघाचा मी एक सभासद आहे. या संघाचे पुणें जिल्ह्यांतील लोकांनी सभासद व्हावें म्हणून मी प्रयत्न करावा असें संघाचे अधिकाऱ्यांनी मला सांगितल्यावरून प्रत्येक गांवीं संघाची माहिती सांगून सभासद होण्याबद्दल लोकांना मी विनति करीत असें. या बाबतींत लोकांकडून मिळालेलीं उत्तरें खरोखरच अंतःकरण विदीर्ण करणारीं आहेत. लोक म्हणत, " यापुढे तुम्हां शहरांतील लोकांना व तुमच्या चळवळींना आम्हीं खेडेगांवच्या लोकांनी कोणत्याहि प्रकारें पोसावयाचें नाही असें ठरविलें आहे. आमच्या नांवावर राजदरबारीं तुम्ही व्यवहार करतां आणि आमच्या उलट वागतां! पुढे होणाऱ्या निवडणुकीचे वेळीं आम्हांस आता डोळ्यांत तेल घालूनच बसलें पाहिजे. आमचीं मतें व मदत घेऊन आम्हांवर उलटणाऱ्या तुम्हां शहरांतील लोकांशीं अतःपर आम्ही संबंध कां ठेवावा ? " ( २ ) पण सर्वांत दुःख होत असेल तर तें देशांतलि अत्यंत प्रिय, पूज्य व पवित्र व्यक्तीबद्दल खेडेगांवांतील लोकांच्या मनाच्या होणाऱ्या प्रतिक्रियेबद्दल.+++या गांवीं ब्राह्मणांची मुळींच वस्ती नाही. तेथील प्रमुख लोक म्हणजे गुजराथी मंडळी. येथे अस्पृश्यतानिवारण या विषयावर माझें व्याख्यान झाल्यावर तेथील एक प्रमुख गुजराथी गृहस्थ म्हणाले, "एकवीस दिवस नाही, सबंध जन्मभर उपवास करून शेवटीं कोणीं प्राणहि सोडला तरी आम्ही धर्माचे बाबतींत कोणी कितीहि मोठा असला तरी त्यांचें भलतें-सलतें ऐकणार नाही. एका बाबतींतील मोठेपणावर दुसऱ्या बाबतींतील फायदा मिळविण्याचा कोणी प्रयत्न करील तर तो अप्रामाणिकच ठरेल ! "

**स्वदेशी माल व घरगुती धंदे**

' अस्पृश्यतानिवारण ' या विषयाप्रमाणे ' स्वदेशी ' हा विषय आता विवादात्मक, मतभेदाचा किंवा भानगडीचा उरला नसल्यामुळे प्रत्येक गांवीं त्यावर व्याख्यान होण्यास अडचण पडत नसे. तथापि सरकारी दृष्टीनें तोहि विषय या खेपेस थोडा अवघडच होऊन बसला होता. कलेक्टर-साहेब यांनी मला जें उत्तर पाठविलें त्यांत असें म्हटलें होतें कीं, ' स्वदेशी या विषयावर तुम्हीं व्याख्यानें देण्यास आमची कांहीच हरकत नाही. पण तो विषय मांडतांना बहिष्काराचा नुसता वासहि

येईल, तर तुम्हांवर खटला करण्यांत येईल.' सभेस हजर असलेल्या पोलिस अधिकाऱ्यांस ही गोष्ट माहीत असल्यामुळे ते मुख्यतः त्याच दृष्टीने व्याख्यानाकडे पाहत असत. व क्वचित् एखाद्या खाष्ट अधिकाऱ्यांस वाटेहि कीं, या सांपळ्यांत ही शिकार सांपडण्यास हरकत नाही ! पण रोजच्या रोज पिंजरे लावण्याने उंदीरहि त्यांतील मख्खी ओळखून उलट त्यावरून उड्या मारीत जातो व आंत न सांपडतां आपलें कार्य साधतो असें म्हणतात. मग उंदराइतकें तरी ज्ञान माणसास आहे खास ! तथापि या बहिष्काराच्या पिंजऱ्यावरून उड्या मारून त्यांतील शुद्ध 'स्वदेशीचें' खाद्य पैदा करतांना मनास फार ताण बसत असे यांत शंका नाही. तसेंच भावना, अतिशयोक्ति, सूडबुद्धि या विकारांना थारा न देता केवळ आर्थिक दृष्टीने स्वदेशीचें महत्त्व मी वर्णन करीत असें. घरगुती धंदे जितके निर्माण करतां यतील तितके थोडे आहेत या गोष्टीच्या खोल तपशिलाकडे मी श्रोत्यांचें लक्ष वेधीत असें. पण अशा प्रकारच्या घरगुती धंद्यांना उत्तेजन देण्याचें काम सुशिक्षित वर्गाचें, धनाढ्य व्यापाऱ्यांचे व अखिल राष्ट्राचें आहे. इग्लंडासारख्या उद्योगधंद्यांत पुढारलेल्या राष्ट्रांतहि खेडेगांवांतील घरगुती धंद्यांना उत्तेजन देणें हें महत्त्वाचें कर्तव्य समजलें जातें, व तें तसें दिलेंहि जातें.

इंग्लंडामध्ये 'कंट्री इंडस्ट्रियल लिमिटेड' नांवाची एक कंपनी निघाली आहे. पांच टक्क्यांपेक्षा अधिक नफा घ्यावयाचा नाही असें या कंपनीच्या भागीदारांनी ठरविलें आहे. कंपनीने लंडनमध्ये एक मध्यवर्ती दुकान थाटून त्यांत इंग्लंडामधील घरगुती धंद्यापासून उत्पन्न होणारा हरतऱ्हेचा माल विक्रीसाठीं ठेविला आहे. यामुळे खेड्यांतील कामकऱ्यांचा शहरांतील गिऱ्हाइकांशीं प्रत्यक्ष संबंध येऊन त्याचा त्यांना फार फायदा होतो. इंग्लंडालाहि अशा धंद्याची गरज भासते व तें त्याला सुव्यवस्थित मार्गांनी सक्रिय प्रोत्साहन देतें तर हिंदुस्थानासारख्या उद्योगधंद्यांत सर्वस्वी मागसलेल्या देशांत घरगुती धंद्यांना उत्तेजन देणे शतपटीने आवश्यकच ठरतें. म्हणून खेडेगांवांतील घरगुती धंद्यांना सर्वांनी हरतऱ्हेने मदत केली तरच खेडेगांवांतील लोकांना आता जगण्याची आशा उरली आहे. परदेशी माल शहरांतच पुष्कळ खपतो, खेड्यांत फारसा खपत नाही अशी कित्येकांची असलेली समजूत साफ चुकीची आहे. शहरांतील लोकांचें खेड्यांत अनुकरण होतें, किंबहुना शहरांतील प्रत्येक गोष्टीची तेथे नक्कल होत असते. नाही नाही ते पदार्थ व नको नको त्या परदेशी वस्तु खेड्यांत पसरत आहेत. जपानी कापडाचा तर खेड्यास पूर आला आहे. परदेशी साखरेचा व चहाचा गांवभर पाऊस पडत आहे परदेशी कंदिलाशिवाय गांवांत दिवा लागेनासा झाला आहे. आणि अशाच इतर शेंकडो गोष्टी. पण दुःख होत ते या गोष्टीचें कीं, देशांत इतकीं वर्षे स्वदेशीची चळवळ चालू असूनहि खेड्यांतील परदेशी मालाचा धिंगाणा अजून कमी होत नाही व क्वचित् कोठे तो वाढत्या प्रमाणांतहि दिसून येतो! ही दारुण परिस्थिति पालटावयास नको काय?

**गोरक्षण--लोकांचें व सरकाराचें कर्तव्य**

प्रचाराकरिता घेतलेल्या तीन विषयांपैकीं, गोरक्षणासारखा खेडेगांवांतील लोकांस जिव्हाळ्याचा व अत्यंत उपयुक्त असा दुसरा विषय नाही. मला तर नेहमी असें वाटतें कीं, खेडेगावांतील लोकांपुढे इतर कोणत्याहि विषयाचें निरूपण केलें तरी तें त्यांस हवेंतील तरंगाप्रमाणे किंवा निराकार मूर्तीचे ध्यानाप्रमाणे केवळ तात्त्विक स्वरूपाचे वाटत असल्यामुळे तें सर्व सोडून देऊन त्यांच्या संसार—प्रपंचाशीं निगडित असलेल्या या एका विषयावरच आपली सर्व भिस्त ठेवावी व शक्ति खर्च करावी. जंगलखात्यांत 'राखीव' व 'सामान्य' जंगल असे भाग असतात. हा सर्वच भाग केवळ डोंगराळ असतो असें नाही. यांत लागवडीस योग्य अशा पहिल्या प्रतीच्या जमिनी पुष्कळ आहेत. पण त्या सर्व फॉरेस्टांत अडकून पडल्या आहेत. अशा परिस्थितींतच सर्व प्रांतभर पसरलेल्या लोकवस्तीच्या ठिकाणाजवळ पुरेशीं गायरानें नसल्याने व कित्येक ठिकाणीं मुळींच नसल्याने या राखीव जंगलाच्या तुकड्यामुळे जनावरांच्या मालकांस फारच अडचण सोसावी लागते. सरकाराकडे अशा शेतीवाल्यांची गैरसोय दूर करण्याकरिता गायरानांची मागणी केली तर ती मान्य होत नाही. उलट गोचराईची फी अलीकडे दुपटीने वाढविण्यांत आली. व सरकाराने ही गोष्ट फार विचारपूर्वक केली आहे असें दिवाणसाहेब कंबळी वर सांगतच आहेत ! परंतु पोलीस व फॉरेस्ट खात्यांतील राजनिष्ठ अशा सुमारें पंचवीस लोकांना त्यांच्या कामगिरीबद्दल राखीव जंगलापैकी १६४२२९८१० एकर जमीन बहाल करण्यास सरकार काढीत आहे ! गायरानें नाहीत म्हणून इकडे गाई व गुरें उपाशीं मरत आहेत; आणि काय कामगिरी केली हे जाहीर न करतां फॉरेस्ट व पोलिस खात्यांतील लोकांना सरकार तिकडे मलिदा चारीत आहे ! याबद्दलचा जाब सरकारास विचारावयास नको काय ?

### खासगी बैठकींतील चर्चा

प्रत्येक गांवीं माझ्या कार्याचें स्वरूप पुढील-प्रमाणे त्रिविध प्रकारचें असे. (१) गांवांत सार्वजनिक सभा करणें. (२) अस्पृश्य लोकांचे वस्तींत व्याख्यान देणें. आणि (३) गांवातील निवडक लोकांची खासगी सभा करून चर्चा करणें. पहिल्या दोन बाबींसंबंधाने वर विवेचन केलेंच आहे. आता तिसऱ्या बाबीसंबंधाने थोडें लिहितों. खासगी चर्चेचा हा कार्यक्रम अनेक अडचणींमुळे या खेपेस कांही गांवीं घडून आला नाही. पण जेथे जाहीर सभा होऊं शकत नसे तेथे मात्र हा कार्यक्रम अवश्य घडून येई. सर्व ठिकाणीं खासगी चर्चा फारच मनमोकळेपणाने होत असे. या बैठकींत मी विशेष न बोलतां गांवातील पुढारी लोकांचेच विचार प्रामुख्याने मला ऐकावयास मिळत. त्यांपैकीं कांहींचा येथे उल्लेख करतों.

(अ) **ग्रामोद्धार**–अलीकडे शहरांत 'ग्रामोद्धार' हा शब्द खेडेगांवात करावयाच्या कार्यास अनुलक्षून वापरण्यांत येऊं लागला आहे. पण हा शब्दप्रयोग खेडेगांवांतील पुष्कळांना अपमानास्पद वाटत असून त्याबद्दल त्यांनी आपला तीव्र निषेध व मोठा राग व्यक्त केला. 'ग्रामसुधारणा' हा साधा शब्द सोडून अहंकारबुद्धीचें प्रदर्शन करणारा 'ग्रामोद्धार' हा शब्द वापरण्यांत काय भूषण आहे असाहि ते प्रश्न करीत. "शहरांतील लोक अगोदर उद्धरून जाऊं द्या, मग आमचें पाहतां येईल, असा आमचा संदेश अगर निरोप त्यांना कळवा" असेंहि कांहींनी बोलून दाखविलें ! !

(आ) **पांढरा खलिताः**—सरकारी पांढऱ्या खलित्याबद्दल कांही लोक आशाळभूतपणाने व कांही लोक जिज्ञासेने अनेक प्रश्न विचारीत. त्या सर्वांना वेगवेगळीं उत्तरें देत बसण्यापेक्षा थोडक्यांत व मुद्देसूद असा "सुधारणांचा कायदा व शेतकऱ्यांचा फायदा" हा केसरी पत्रांतील अग्रलेख मी वाचून दाखवीं. तो ऐकून द्वेष व निराशा यांच्या छटांनी व्याप्त झालेले लोकांचे भेसूर चेहरे माझ्याने पाहवत नसत !

(इ) **सरकारी सारा व ऋणकरी शेतकरी**—

खेडेगांवांतील लोकांच्या आर्थिक परिस्थितीचें वर्णन आता शब्दांनी करता येणें शक्य नाही. लोकांची विद्यमान स्थिति अशीच आणखी कांही काल कायम राहिल्यास मुद्दाम क्रांति घडवून आणविणारांचे श्रम वाचून साक्षात् क्रांति-देवताच अवतीर्ण होणार असाच नेमानेम दिसतो ! शेतांत धान्य पिको वा न पिको, किंवा तें विकून मातीमोलाने विको, शेतकऱ्याने सरकारी धारा हा द्रव्यरूपानेच भरला पाहिजे असा नियम असल्यामुळे व तें द्रव्य तर लोकांच्या डोळ्याला आता पाहण्यास मिळणें मुष्कीलीचें होत चालल्यामुळे या बाबतींत लोकांचे होणारे हाल काय विचारावे ? एका गांवीं एक अब्रूदार शेतकरी गृहस्थ कपाळास हात लावून म्हणाले, "घरांत खंडोगणती कांदा पडला आहे; पण भाव नसल्याने तो बाजारांत नेण्यास जो खर्च येईल तितकीहि यांत प्राप्ति होणार नाही; म्हणून आता तो सर्व माल कुजवून रानांत खताकरिता घालणार आहे व घरांतील वडिलोपार्जित मोठीं भांडीं विकून उद्या सरकारी सारा भरणार आहे! कारण आता आम्हां शेतकरी लोकांस कोणी कर्जहि देईनासा झाला आहे !" गांवांत ज्यास कर्ज नाही असा शेतकरी आढळत नाही. हिंदुस्थानांतील प्रत्येक शेतकऱ्यावर कमींतकमी ११७८ रुपये कर्ज बसत असून सर्व हिंदी शेतकऱ्यांना मिळून ९०० कोटि रुपये कर्ज आहे असें जें बँकिंग इन्क्वायरी कमिटीने म्हटलें आहे त्याची गांवोगांवीं प्रचीति येते.

(ई) **अस्पृश्योद्धार**—या खाजगी चर्चेत कांही समंजस लोक म्हणाले, "अस्पृश्यता-निवारण असा विषय तुम्ही जाहीर करून तो व्याख्यानांत घेता त्याऐवजीं 'अस्पृश्योद्धार' असा विषय तुम्हीं घेतला आणि तुमच्या चालू पद्धतीप्रमाणे तुम्हीं अस्पृश्यता निवारण्याचे उपाय सांगितले तरी लोक बिचकणार नाहीत व सर्वसामान्य लोकांसहि तें पटण्यास हरकत पडणार नाही. खेडेगांवांमध्ये या विषयांत तुम्ही एकदा चंचुप्रवेश केल्यावर खात्रीने तुमचा पुढील मार्ग फार सोपा होईल. सहानुभूतीने लोकांनी केलेली ही सूचना विचार करण्यासारखी आहे असें वाटतें !

(उ) **निनांवी अर्जांची दुष्ट खोडः**–खेडेगावांतील कुटाळ व उपद्यापी लोकांस एक दुष्ट खोड लागली आहे. ती म्हणजे सरकारी अधिकाऱ्यांस उठल्याबसल्या निनांवी अर्ज करण्याची. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, असल्या अर्जाला अधिकारी नसतें महत्त्व देऊन प्रकरण वाढवीत बसतात ! यामुळे भल्या माणसाचें जीवित खेडेगांवांत बरेंच धोक्याचें होतें. आणि त्यांत तो ब्राह्मण असेल तर मग कांही विचारावयासच नको ! अधिकारी वर्ग ज्या गृहस्थाविरुद्ध निनांवी अर्ज आला असेल त्याची चौकशी कामगार पाटलाकडे करतात. परंतु पाटील हा क्वचितच निःपक्षपाती असूं शकता. यामुळे खरी हकीकत कळत नाही. पण तसा विचार करावयाचा असेल तर तो स्वतः डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट अगर तालुका मॅजिस्ट्रेट यांनी करावा. म्हणजे कुटाळ लोकांवर बंधन पडून सरकारी काम कमी होईल व सज्जनांचा त्रास वांचेल.

(ऊ) **ग्राम-पंचायतः**—पुणें जिल्ह्यांतील ग्रामपंचायती दिवसेंदिवस कमी होत आहेत. या

जिल्ह्यांत पूर्वी जितक्या ग्रामपंचायती होत्या त्यांच्या निम्म्या हल्ली जेमतेम तग धरून आहेत. हल्लीं सबंध जिल्ह्यात फक्त पंधरासोळा ग्रामपंचायती अस्तित्वांत आहेत. पुणें शहरापासून दूर असलेल्या दोन तालुक्यांत एकहि ग्रामपंचायत नाहीं. पुणें शहर हवेली तालुक्यांत आहे. आणि या एका हवेली तालुक्यांतच सात पंचायती आहेत. ग्रामपंचायत असलेल्या गांवीं गेल्यावर पचायतीबद्दल तेथील लोकांशीं खाजगी सभेंत मी थोडी वाटाघाट करीं; तीवरून या विषयाबद्दल लोकांत फारसा उत्साह नाहीं असें दिसून येई. वऱ्हाड मध्यप्रांतमधील ग्रामपंचायतविषयक थोडीबहुत माहिती लोकांस सांगून नागपूर येथे तपस्वी बाबासाहेब परांजपे यांच्या परिश्रमाने चाललेल्या 'ग्रामणी' या मासिकाचे अंकहि मी लोकांस दाखवीत असें. या मासिकाने अलीकडे आपल्या अंकांत 'मुंबई विभाग' म्हणून एक सदर घालून त्यात इकडील ग्रामपचायतींची माहिती देण्यास सुरुवात केली आहे. ही गोष्ट प्रामुख्याने लोकांचे नजरेस आणून प्रत्येक ग्रामपंचायतीने हें मासिक सुरू करावें अशी मी विनंति करीं.

(ए) **पुढील दौऱ्याचा विषय**—मुंबई सरकारानें दुरुस्त करून व सुधारून नुकताच मंजूर केलेला ग्रामपंचायतीचा कायदा लोकांच्या थोड्याबहुत फायद्याचा असल्याचें लोकांस मी दर्शवीत असें! त्या कायद्यासंबंधाने पूर्ण माहिती घेऊन पुढील दौऱ्याचे वेळीं प्रचाराकरिता मुख्यतः हाच विषय घ्यावा असें मीं योजिलें आहे.

**समारोप**

आतांपर्यंत एकंदर वृत्तांत मीं कथन केला, त्यावरून सध्याची देशस्थिति कशी आहे हें लक्षांत येईल. गेल्या दोनतीन वर्षांत राजकीय व सामाजिक चळवळीचे परिणाम बहुजनसमाजावर चमत्कारिक झाले आहेत. देशांत हल्लीं जें कांहीं होत आहे तें आपल्या हिताचें नाहीं व त्यांतून संकटेंच उत्पन्न होऊन शेवटीं नाश होणार अशी लोकांची समजूत झालेली दिसते. परंतु देशांत जेव्हा क्रांतिकारक चळवळी उत्पन्न होतात तेव्हाच अशी मनःस्थिति उत्पन्न व्हावी हे स्वाभाविक होय. लोकांना राजकीय संकटें सोसण्याची सवय नाहीशी झाली आहे व सामाजिक पुनर्घटनेची आवश्यकता नीटशी आकलन झाली नाहीं म्हणून असें घडतें. परंतु या नवीन गोष्टींचा परिचय अधिकाधिक वाढत गेला म्हणजे, खेड्यापाड्यांतील लोकसमाजाहि त्यांतून मार्ग काढण्यास समर्थ होईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. मनुष्याच्या आयुष्यांत कष्ट फार व सुख थोडें असा शिरोभागीं उध्दृत केलेल्या डॉ. जॉन्सन यांच्या उक्तीचा अर्थ आहे. हा अर्थ सर्वकाळीं सारखाच लागू आहे तसाच तो चालू काळासहि लागू आहे. हें सर्वांनी लक्षांत ठेवल्यास कोणासहि निराश होण्याचें कारण नाहीं. शेवटीं ज्या सद्गृहस्थांनी माझ्या कार्यास मदत केली, त्यांचे आभार मानून मी हा अहवाल संपवितों.

# मुंबई विद्यापीठ व विद्यार्थ्यांची संख्या

दरसाल मुंबई विद्यापीठाकडून होणाऱ्या निरनिराळ्या परीक्षांचा विचार केला, तर मुंबई विद्यापीठाला तें काम दिवसेंदिवस अधिकाधिक अवजडच होत जाणार असें दिसतें. १९२४ सालीं मॅट्रिक्युलेशन परीक्षेस ७४६२ विद्यार्थी बसले तर १९३२ सालीं १५४७७ विद्यार्थी बसले! तीच स्थिति प्रवेश–परीक्षेनंतरच्या परीक्षांची. त्यांचें प्रमाण पुढीलप्रमाणे दाखवितां येईल—

| परीक्षा | विद्यार्थ्यांची संख्या १९२४ साल | १९३२ साल |
|---|---|---|
| पहिलें वर्ष | ३६३६ | ५२०१ |
| इंटर आर्ट्स व सायन्स | २६१३ | ३४०२ |
| बी. ए. | ८७३ | १४११ |
| बी. एस्सी. | १५७ | ४४६ |
| बी. कॉम्. | ४८ | २०८ |
| बी. टी. | ६० | ११४ |
| बी. एजी. | ६८ | १३८ |
| एल्एल्. बी. | ३३२ | ८८१ |
| एम्. बी. बी. एस्. | ३०८ | ४२७ |
| बी. ई. | ७६ | १४७ |

सर्व परीक्षांचा एकत्र विचार करता विद्यार्थ्यांची संख्या ८१८१ वरून १२३७१ वर गेलेली दिसते. म्हणजे गेल्या आठ वर्षांत विद्यार्थ्यांची संख्या ५० टक्के वाढलेली आहे.

# न्यायदेवतेची कबर बांधणार का?

निजामशाहींतील आळंद येथील हिंदु पुढारी रा. कल्याणराव देशपांडे यांच्या खुनाचा प्रयत्न मुसलमानांनी केला त्यास एक महिन्याहून अधिक दिवस लोटले. कल्याणरावांना छातींत एक व पाठींत एक अशा बंदुकीच्या दोन गोळ्या बसल्या. कल्याणरावांच्या खुनाचा हा प्रयत्न इतका सुसंघटित व बिनचूक करण्यांत आला होता कीं त्या दोन गोळ्यांनी कल्याणरावांचा मुडदाच पाडला असला पाहिजे याविषयीं खुनी इसमांची खात्री होती. पण तेवढ्याने त्यांचा तत्क्षणीं प्राण गेला नाही याचें नवल वाटून कीं काय, एका मुसलमानाने त्यांचा कपाळमोक्ष करण्याकरिता डोक्यांत लाठीचा घाव घातला. तरी कल्याणराव जिवंतच ! त्या स्थितींत कल्याणरावांना आळंदमध्ये ठेवणें सर्व दृष्टींनी धोक्याचें वाटल्यामुळे त्यांना सोलापुरास धनराज गिरजी यांच्या दवाखान्यांत तावडतोब पोंचविण्यांत आलें. तेव्हापासून गेला महिना--सवा महिना कल्याणराव सोलापुरासच आहेत.

कल्याणरावांचा प्राण त्यांच्या कुडींत चालू घटकेला आहे इतकेंच. बाकी त्यांची अवस्था दिवसानुदिवस इतकी चिंताजनक होत आहे कीं त्यांच्या जीविताचा मुळीच भरंवसा लागत नाही. त्यांच्या उजव्या दोन बरगड्या मोडल्या आहेत. उजव्या फुप्फुसांतून गोळी गेल्यामुळे तें निकामी झालें आहे. फक्त डाव्या फुप्फुसाचा आधार आहे म्हणूनच प्राणाला त्यांचें शरीर सोडून जाववत नाहीं इतकेंच. त्यांच्या डोळ्यांना मधून मधून अंधारी येते व बोलतांना दमहि लागतो. खेरीज दररोज १०२ अंशांपर्यंत ताप हा ठेवलेलाच आहे. सोलापूरचे डॉक्टर रा. मुळे यांनी क्ष किरणांनी त्यांच्या प्रकृतीची नुकतीच तपासणी केली असून त्यांचे वैद्यकीय उपाय चालूच आहेत. अशा रीतीने कल्याणराव, त्यांचे आप्तइष्ट, डॉक्टर व अभीष्टचिंतन करणारी सामान्य जनता कल्याणरावांना वांचविण्याच्या प्रयत्नांत आहे आणि त्यांच्या जिवावर उठलेले मुसलमान आळंदहून सोलापुरास येऊन कल्याणराव ज्या दवाखान्यांत पडून आहेत त्या दवाखान्याभोवती घिरट्या घालीत आहेत. हे दृश्य यमदूत व त्यांच्या पाठिशीं उभे असलेले अदृश्य यमदूत यांचे पाश कल्याणरावांच्या मानेभोंवती पडूं न देण्याकरिता दवाखान्याच्या बाहेर रक्षकांचा पाहारा बसविला आहे आणि दवाखान्यांत डॉक्टर व त्यांचे हस्तक यांचा पहारा सुरू आहे.



कल्याणराव हे आळंदचे मोठे वजनदार व सपन्न गृहस्थ आहेत. निजामशाहींत अनेक जहागिरी आहेत त्यांपैकीं आळंद ही एक जहागीर असून ती कोर्ट ऑफ वॉर्ड्सच्या नजरेखाली आहे. त्यामुळे आळंदवर दिवाणी व फौजदारी अंमल निजामांचाच चालतो. आळंदमधील हिंदु व मुसलमान यांच्यामधील कलह तीस वर्षांचा जुना आहे. तेथील सहनशील व गरीब हिंदूंना मुसलमानांनी अमुक एका प्रकाराने आजपर्यंत छळावयाचें शिल्लक ठेवलें आहे असें नाही. साऱ्या हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या ठिकाणच्या मुसलमानांनी हिंदूंना छळावयाच्या जेवढ्या म्हणून तऱ्हा अमलांत आणिल्या असतील त्या सर्व तऱ्हा आळंदमधील एकाच ठिकाणच्या मुसलमानांनी एकत्र करून दाखविल्या आहेत. हिंदूंचें देऊळ फोडावयाचें तें त्यांनी फोडलें आहे देवाच्या मूर्तींचीं शकलें उडवावयाचीं तीं त्यांनी उडविलीं आहेत. मूर्ती पळवून न्यावयाची ती त्यांनी पळवून नेली आहे. देवाच्या रथाला अडवावयाचें तें त्यांनी अडविलें आहे. हिंदूंच्या स्त्रियांवर हात टाकावयाचे ते त्यांनी टाकले आहेत. हिंदूंच्या घरांत शिरून त्यांच्या जिनगानीची नासधूस करावयाची ती त्यांनी केली आहे. शेवटीं हिंदु पुढाऱ्याचा बळी घ्यावयाचा उरला, तोहि त्यांनी घेण्यापर्यंत प्रयत्नांची पाळी आणिली आहे. आता काय तो त्यांच्या प्रयत्नास यश येऊन कल्याणरावांचा प्राण जावयाचा राहिला आहे. ईश्वराचा तसा संकेत असला तर तो त्यांची ती इच्छाहि सफल करणार नाही कशावरून !

एखाद्या शोकपर्यवसायी नाटकाचे प्रवेशामागून प्रवेश व अंकामागून अंक रचले जात जात शेवटच्या अंकांत जशी मारेकऱ्यांनी अंधाऱ्या रात्रीं गर्दी करून आकस्मिकपणें नाटकांतील नायकाच्या प्राणाशीं गांठ घालावी त्याप्रमाणेच कल्याणरावांवर ता. २४ जून रोजीं दुर्धर प्रसंग ओढवला ! ती शनिवारची रात्र. आठांची वेळ. कल्याणराव तालुकदाराच्या कचेरींतून बाहेर पडताहेत, पोलीसचौकीजवळ पोंचताहेत, कोणी लिंबाच्या झाडाखालून आलेले, कोणी इमाम शेखच्या घरांतून बाहेर पडलेले मारेकरी भरलेल्या बंदुका रोखून अंगावर धावून येताहेत आणि देखत देखत गोळ्या लागून कल्याणराव जखमी होताहेत, सारीच विलक्षण घटना! त्या गोळ्या कल्याणरावांना अशा वर्मी बसल्या कीं त्यांचा तेथेच अंत व्हावयाचा. परंतु ते त्यांतून आजतागा-

यत वांचले हीहि एक विलक्षण विधिघटनाच म्हटली पाहिजे. आजपर्यंत मोंगलाइ राज्यांत हिंदूंवर थोडे का अन्याय घडले आहेत? पण ते अन्याय लोकांच्या मनावर ठसावे अशा रीतीनें घडले नाहीत. जगांत थोड्या का स्त्रिया मरतात? पण अजाची सुंदर स्त्री इंदुमती ऐन तारुण्यांत स्वर्गीय सर हृदयावर पडून मेली व तिच्या मरणाचें हृदयभेदी वर्णन करावयास कविकुलगुरु कालिदास भेटला म्हणून जगांत इंदुमति व अजविलाप अजरामर होऊन राहिला.

कल्याणरावांवरील हल्ल्याची अवस्था तशांतलीच झाली. कल्याणराव तालुकदाराच्या कचेरींतून बाहेर निघाले त्या वेळीं रात्रीचे आठ वाजले होते. तरी त्यांचा शिपाई इस्माईल कंदिल घेऊन त्यांजपाशीं हजर होता. ते गोळ्या लागून पडले तरी त्यांना शेजारीं व्यंकटरावांच्या घरीं नेऊन पोंचविण्यास डॉ. मोघे हजर होते. डॉ. मोघे व इस्माईल बरोबर नसते तर कल्याणरावांचा अंत जागच्या जागीं होऊन त्यांचें नखहि कोणाच्या दृष्टीस पडतेंना. डॉ. मोघे व इस्माईल बरोबर नसते तर तालुकदार व तहशीलदार यांना निरोप जाऊन ते कल्याणरावांकडे कदाचित् येतेना व त्यांना त्यांची जबानी घ्यावी लागतीच ना. तसेंच कल्याणराव आळंदहून सोलापुरास गेले नसते तर आज जो साग्र संगीत पुरावा उपलब्ध झाला आहे तो होताना व मुसलमानांनी एका हिंदु पुढाऱ्याच्या खुनाचा प्रयत्न केला याचा डांगोरा सर्व देशभर पिटला गेला तोहि जाताना.

कल्याणरावांनी जिवंत राहून मोगलाईतील न्यायदेवतेला जिवंत ठेवण्यास किती तरी मदत केली आहे. पण याहिउपर ती मरणार असेल तर कल्याणराव तिला कसें वांचविणार? कल्याणरावांनी मरणकाळाची जबानी सोलापूरच्या सिटी मॅजिस्ट्रेटपुढे दिली आहे; तिच्यांत त्यांनी हल्ल्यासंबंधाने अमुक एक माहिती सांगितली नाहीं असें घडलें नाहीं. त्यांनी खुनी इसमाचें पागोटें खुनाचे जागीं पडल्याचा उल्लेख केला आहे. ज्यानें गोळी घातली त्या न्हान् चितापुरीचें नांव त्यांनी घेतलें आहे. बंदुका कोणीं व कोठून आणिल्या आणि त्यांना साहाय्य कोणाचें व कसें झालें याची नांवनिशी त्यांनी दिली आहे. आसन्नमरण झालेल्या फिर्यादीने पोलिसांना यापेक्षा अधिक माहिती ती काय पुरवावयाची? किंबहुना आपणांस पुरेशी माहिती कोणीं पुरविली नाहीं, हें निमित्त सांगावयास पोलिसांना संधि मिळूं नये, यासाठींच कल्याणराव मरणोन्मुख स्थितींत महिना, सव्वा महिना जिवंत राहिले आहेत, असेंहि म्हणावयास हरकत नाहीं! कल्याणरावांनी आळंद येथील तालुकदारापुढे, सोलापुरास फौजदार रा. गोखले यांजपुढे व सिटी मॅजिस्ट्रेटापुढे जबाब दिले आहेत. ते सर्व त्यांच्या प्रकृतीच्या प्रतिकूल स्थितींतहि सुसंगत आहेत, ही गोष्ट महत्त्वाची आहे यांत शंका नाहीं.

पोलिसांस इतकी माहिती मिळाल्यानंतर त्यांनी आरोपींना पकडावें कीं नाहीं? पण तें त्यांनी केलें नाहीं! हल्ल्यानंतर दहापंधरा दिवसांनी गुलबर्ग्याहून डेप्युटी डायरेक्टर जनरल पंचवीस पोलिसांची तुकडी बरोबर घेऊन आळंद येथे गेले. तेथे पंधरावीस दिवस त्यांनी मुक्काम केला. आरोपींपैकीं मोहिद्दिन बिचू यास त्यांनी पकडलें देखील. पण मोंगलाईतल्या पोलिसांनी हिंदूंवर हल्ला केलेल्या मुसलमानास पकडावें म्हणजे काय? मुसलमान आरोपी पकडले गेले व त्यांना शिक्षाहि गुन्ह्याप्रमाणे कडक ठोठावण्यांत आल्या तर मोंगलाईचा परंपरागत लौकिक तो काय राहिला? त्यांनी बिचूला धरलें व त्याला लागलीच जामीनावर सोडूनहि दिलें. जो सांपडला तो बिचूहि जर त्यांनी सोडून दिला तर बाकीच्या आरोपीस पकडण्याला पोलिस जातात कशाला? त्यांनी पहिल्यापासूनच अगदी सावधगिरीचें धोरण ठेवलें! पागोटें हा मुद्देमाल महत्त्वाचा ना? त्याला त्यांनी हातच लावला नाहीं. कल्याणरावांच्या जखमांचा पंचनामा करणें अगदी अवश्य ना? पण तालुकदारासारखे कलेक्टराच्या हुद्द्याचे अधिकारी व पोलिस इन्स्पेक्टर हे कल्याणरावास भेटून गेले असताहि पंचनाम्याची व्यवस्था तीन तासांच्या अवधींत कोणींच केली नाहीं. पोलिसांनी पुरावाच गोळा केला नाहीं तर तो त्यांना मिळणार कसा! त्यांनी आरोपींना पकडलेंच नाहीं तर ते त्यांना सांपडावे कसे? आरोपींना पकडून त्यांजवर खटले भरून त्यांना न्यायाधीशांपुढे उभेंच केलें नाहीं तर त्यांना शिक्षा व्हाव्या कशा? आता याउप्पर आरोपी आपण होऊनच पोलिसांच्या स्वाधीन झाले व त्यांनी गुन्हा कबूल करून आपल्या हातांनी आपल्या गळ्याला फास लावून घेतला तर त्याला पोलिसांचा तरी काय इलाज?

कल्याणरावांच्या खुनाचा प्रयत्न हें आळंद येथील हिंदु-मुसलमानांच्या तंट्यांतील कळसाचें कृत्य होय. असें असताहि निजामशाहींतील हिंदु-मुसलमानांत तंटा नसून पूर्णपणें सलोखा नांदत असल्याची कंडी हैद्राबादेंतील उर्दू पत्रें उठवीतच आहेत. ही जर खुनाचें प्रकरण जिरवून टाकण्याची पूर्वतयारी असेल तर हैद्राबाद संस्थानांतील अन्यायांचे घडे जगाच्या दृष्टीने भरले असें समजण्यास हरकत नाहीं. कारण हे घडे भरल्याची ग्वाही जगास देण्याकरिताच कल्याणराव अद्यापि

जिवंत राहिले आहेत. मोंगलाईत हिंदूंवर मुसलमानांकडून जुलूम होतो, निजामसरकारहि हिंदु प्रजेला अन्यायाने वागवितें व निजामाच्या राज्यकारभारांत हात घातल्यावांचून तो सुधारणार नाही अशी हिंदुस्थानसरकाराची खात्री झाली म्हणूनच त्यांनी बडे गोरे अधिकारी निजामावर लादले अशी समजूत आहे.. तेथील पोलिसखात्याचे डायरेक्टरजनरल गोरेच आहेत. त्यांनीहि जो गुन्हा आंधळ्यांनाहि दिसेल व ज्यांतील गुन्हेगार थोड्यालाहि सांपडतील असा गुन्हा जिरविला व गुन्हेगारांना पकडून शिक्षा ठोठावण्यास मदत केली नाही तर निजामसरकारची व इंग्रज सरकारानें पाठविलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांची न्यायबुद्धि लुप्त झाली, किंबहुना मोगलाईतील न्यायदेवतेचे डोळे फुटले व ती मेली आणि तिचें आळंद येथे कल्याणरावांच्या रक्ताने घट्टथडगें बांधलें गेलें असें समजावें लागेल!

# डॉ. टागोर यांचा पश्चात्ताप !

अपथे पदमर्पयन्ति हि । श्रुतवन्तोपि रजोनिमीलिताः ॥

स्पृश्यास्पृश्य हिंदुधर्मीय बांधवांमध्ये संयुक्त मतदार-संघाच्या द्वाराने ऐक्याची भावना उत्पन्न होऊन कायदे-मंडळांतील राजकारणाचा गाडा सुरळीत चालावा या उद्देशाने ' पुणें-करार ' घडविण्यांत आला; परंतु या कराराचा जन्म झाला त्या वेळीं त्याच्या कुंडलींत असे परस्पर विरुद्ध स्वभावाचे ग्रह एकत्र झाले होते कीं, त्यांनी या कराराचा मूलभूत हेतु मुळीच साधूं दिला नाही ! नवीन योजनेप्रमाणे संयुक्त मतदार–संघाच्याच द्वारा अस्पृश्य मानल्या गेलेल्या वर्गाचे प्रतिनिधि शेवटीं निवडून जातील पण त्यापूर्वी केवळ स्वतंत्र मतदारसंघानेच उमेदवार निवडण्याचें एक लहान चक्र निवडणकीच्या मोठ्या चक्रांत अडकाविलेलें राहील. त्यामुळे हरिजनांतर्फे होणाऱ्या निवडणुकी साध्या, सोप्या व कमी खर्चाच्या व्हावयाच्या ऐवजीं त्या मोठ्या गुंतागुंतीच्या व दोन वेळां लढल्या जावयाच्या असल्याने डोईजड खर्चाच्या होऊन बसतील ! तसेंच कांही प्रांतांतील अस्पृश्य वर्गाला त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर बेसुमार जागा दिल्याकारणाने स्पृश्य हिंदूंचे फारच मोठें नुकसान होईल. असल्या या कराराने जवळ जवळ सर्वच प्रांतांतून प्रथमपासूनच थोडीबहुत खळबळ उडविली. पण त्यांपैकीं बंगाल प्रांतांतील स्पृश्य हिंदूंवर फार अन्याय झाला असल्यामुळे त्यांना सदर कराराविरुद्ध नेटाने मोहीम चालवावी लागली आहे.

जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या कामाला विलायतेंत सुरुवात होण्यापूर्वीच बंगाल प्रांतांत ठिकठिकाणीं प्रचंड सभा भरवून बंगाली स्पृश्य हिंदूंनी या करारांतील जागांची वांटणी लोकसंख्येच्या प्रमाणांत पुनः करावी अशी त्या कमिटीस विनंति केली होती-अस्पृश्य वर्गाला जरूर जागा द्याव्या, किंबहुना त्यांच्या पदरांत थोडें झुकतें मापहि टाकावें; पण त्यांचा कैवार घेण्याच्या उत्साहाच्या भरांत बंगाल प्रांतांतील स्पृश्य हिंदूंच्या मोठ्या सुशिक्षित समाजाला अगदीं कोंपऱ्यांत टाकून देऊं नये एवढीच त्यांची मागणी आहे. सर एन्. एन्. सरकार यांनी हीच मागणी जॉ. सिलेक्ट कमिटीपुढे मांडली व पुणें–कराराची पुनर्घटना करण्याची विनंति केली. या विनंतीला ब्रिटिश सरकारतर्फे उत्तर देतांना सर सॅम्युएल होअर यांनी मोठा निःस्पृहपणाचा आव आणला व उपरोधिक स्वराने ते म्हणाले, 'वाः, आमची तर समजूत अशी कीं, हा करार सर्व स्पृश्यास्पृश्य हिंदूंना मान्य आहे व अर्थात् त्यांत बंगाल प्रांताचा समावेश झालाच. या करारावरहि कांही बंगाली प्रतिनिधींच्या सह्या आहेत व त्याहून विशेष गोष्ट ही कीं तुमच्या बंगालचे ते त्रिखंडकीर्ति, कविसम्राट, डॉ. टागोर यांनी तर मुख्य प्रधानांना तार पाठवून या कराराला संमति द्या म्हणून फार आग्रह केला! आता तुमची तुम्हीं आपल्या प्रांतांत तडजोड केल्याशिवाय आम्ही करारांत कांहीच फरक करूं शकत नाही !'

या सडेतोड उत्तराने या बाबतींत चळवळ करणाऱ्या पुढाऱ्यांवर वज्राघातच झाला ! डॉ. टागोर यांची स्थिति तर फारच केविलवाणी झाली आहे. आपला मोठेपणा आपल्या अंगावर आला व मोठेपणाच्या भरांत घाईने व पूर्ण विचार न करता केलेल्या तारेने आपण स्वकीयांचे शत्रु बनलों व परकीयांच्या थट्टेला विषयीभूत झालों याचें टागोर यांना फारच वैषम्य वाटूं लागलें आहे. डॉ. टागोर यांनी या चुकीची निष्कृति करण्याकरिता आता एक पत्रक काढून त्यांत जवळ जवळ बिनशर्त माफी मागितली आहे. या पत्रकांत त्यांनी आपण मुख्य प्रधानास तार पाठविली हें कबूल करून महात्मा गांधींवरील आपल्या निरतिशय प्रेमामुळे त्यांचे

प्राण वांचावे म्हणून आपण तार करण्यास उद्युक्त झालों असें म्हटलें आहे. राष्ट्राच्या चिरंतन हिताच्या दृष्टीने पाहता आपण फारच मोठी चूक केली, असा त्यांना आता पश्चात्ताप झाला आहे !

घाईने लग्न उरकल्यामुळे भलतीच घोरपड गळ्यांत पडल्याबद्दल पश्चात्ताप करण्यास पुष्कळ अवधि मिळतो अशा अर्थाची एक उपरोधिक म्हण इंग्रजी भाषेंत आहे. तिची आठवण डॉ. टागोर यांचें उत्तर वाचल्यावर झाल्याशिवाय राहत नाही. ते आता स्वतःचे कान स्वतःच पकडून, असें म्हणत आहेत कीं, 'मला राजकारणाचा अनुभव नाहीं. मला महात्माजींबद्दल फार प्रेम व शिवाय त्यांच्या राजकीय शहाणपणावर माझा पूर्ण विश्वास. यामुळे मी मुळीं विचार न करताच न्यायाच्या तत्त्वाची होळी केली !' हा अन्याय असाच राहिला तर सर्व पक्षांचेंच त्यांत अहित आहे इतकेंच नव्हे तर जातिद्वेषाचा अग्नि बंगाल्यांत तरी कायमचा धुमसत राहणार अशी भीति वाटते! त्यांना जें आश्चर्य वाटत आहे तें एका गोष्टीचें. ती गोष्ट ही कीं, ब्रिटिश सरकार पांढऱ्या खलित्यांतील प्रत्येक सूचनेचा फेरविचार करीत आहे, पण या पुणे कराराचा मात्र तें फेरविचार करावयास तयार नाही ! इतर प्रांतांतील जॉ. कमिटीस गेलेले प्रतिनिधि या बंगालच्या कवींच्या मागणीला फारसा पाठिंबा देत नाहीत याबद्दल त्यांजवरहि ते रागावले आहेत.

डॉ. रवींद्रनाथ टागोर यांचा हा पश्चात्ताप अनेक दृष्टींनी चिंतनीय आहे यांत शंका नाही. महात्मा गांधींनी आपण प्राणांत उपोषण करणार म्हणून अहिंसात्मक अशी गदा उचलली. त्या गदेने टागोरसारख्या प्रेमळ व मृदु अंतःकरणाच्या कवींद्राच्या न्यायबुद्धीचा चक्काचूर केला. महात्माजींचे प्राण वांचावे म्हणून त्यांच्या आजच्या मताप्रमाणें आपल्या बांधवांच्या हितावर त्यांनी अग्नि ठेवला. अहिंसेच्या तात्त्विक वादांत निदान आजच्या राजकीय परिस्थितींत आम्ही शिरूं इच्छित नाही. पण प्राणांत उपोषणाचा अहिंसेचा पण अघोरी उपाय दुसऱ्या अनेकांना अजाणतपणे कसा हिंसेच्या भलत्याच मार्गाला नेतो याचें हें उत्तम उदाहरण आहे व तें सर्वांनी एक अनुभव म्हणून अंतःकरणांत साठवून ठेवण्यासारखें आहे. पुणें-कराराचा फेरविचार करून त्यांत झालेल्या अन्यायाचें परिमार्जन करणें राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनेंहि किती अवश्य आहे हेंहि यावरून चांगलेंच कळतें. मनुष्य कितीहि विद्वान असला तरी रजोगुणाने व्याप्त झाला म्हणजे जें करूं नये ते करतो असें जें मथळ्यावरील श्लोकांत सांगितलें आहे तेंच खरें !

# कल्याणरावांवरील हल्ल्याचा साद्यंत वृत्तान्त

[ निजामशाहींतील आळंद गावचे पुढारी रा. कल्याणराव देशपांडे हे गोळ्या लागून सोलापूरच्या धनराजगिरजी दवाखान्यांत अत्यवस्थ स्थितींत पडले आहेत; त्यांजवरील प्राणांतिक हल्ल्याची व आळंद येथील परिस्थितीची वाचकांस नीट कल्पना यावी यासाठीं कल्याणरावांनी सोलापुरास सिटी मॅजिस्ट्रेटपुढे दिलेला जबाब, त्यांचे बंधु रा. धोंडोपंत यांनी व आळंदच्या लोकांनी निजामशाहींतील अधिकाऱ्यांकडे अर्जरूपाने कळविलेली कहाणी खाली विस्तृत रीतीने दिली आहे.

—सं. केसरी ]

( १ )

## कल्याणरावांचा अंतकाळचा जबाब

### गोळीबार व लाठीमार !

आळंद येथील तालुकदाराकडे (कलेक्टराकडे) मी शनिवारीं गेलों होतों. मी त्यांच्याशीं रात्रीं ८ वाजेपर्यंत बोलत होतों. माझा नोकर मला बोलावण्यास कंदील घेऊन आला, तेव्हा मी घरीं जाण्यास निघालों. तों थोड्या अंतरावर एका लिंबाचे झाडाखालीं तीन मुसलमान बसलेले मीं पाहिले. येथे मला माझे चुलतभाऊ डॉ. मोघे हे भेटले. ते दवाखान्यांतून परत जात होते. मी, मोघे व नोकर असे तिघेजण पोलिसठाण्यापर्यंत गेलों. वर सांगितलेले तिघे मुसलमान आमच्या पाठोपाठ येत होते. आम्ही सोनारआळीपर्यंत गेलों तरी ते आमच्या मागे येतच होते. इतक्यांत आम्हांला पावलांचा आवाज ऐकूं आला. आम्ही मागें वळून पाहिले तेव्हा शेख इमाम याच्या घरांतून सात माणसें बाहेर पडत असलेलीं दिसलीं. तीं दुसरीकडे कोठे तरी जात असावीं असें आम्हाला वाटलें. आम्ही आमचा मार्ग चालूं लागलों. चालतां चालतां डॉ. मोघे म्हणाले, 'येथे कांही तरी धोका असावा असे मला दिसतें!' त्याच क्षणीं एक मोठा आवाज ऐकूं आला आणि माझ्या पाठींत बंदुकीची गोळी लागली. मी मागे वळलों, तों माझ्या छातींत दुसरी गोळी घुसली. दुसऱ्या वेळेला गोळीबार करणारा इसम

मी पाहूं शकलों. तो म्हातू चितापुरी होता. तो, महमदअली किंवा अहमदअली (मशीद इस्मालचा धाकटा भाऊ) आणि मोहद्दीन बिचू या तिघांजवळ बंदुका होत्या. पहिली गोळी अंगांत शिरल्यानंतर मीं मागें पाहिलें, तेव्हां त्या तिघांजवळ बंदुका असलेल्या मला दिसल्या. त्या तिघांसुद्धा एकंदर सात मुसलमान तेथें होते.

मला गोळ्या लागल्या तरी मी ठार झालों नाहीं हें पाहून कोणी एकानें माझ्यावर लाठीमार केला. मी त्या सर्वांना ओळखूं शकेन. त्यांचीं नांवें मात्र मला सांगतां येणार नाहीत. त्या सात मुसलमानांमध्यें इस्माइल पुडुद व इमाम शेख हे होते. नंतर डॉ. मोघे व माझा नोकर यांनी मला व्यंकटराव देशमुख यांच्या घरीं नेलें. लिंबाच्या झाडाखाली उभे असते वेळीं त्या तीन मुसलमानांजवळ बंदुका नव्हत्या; पण इमाम शेख याच्या घरांतून त्यांनी त्या घेतल्या.

**मजवर राग कां ?**

हिंदु-मुसलमानांचें भांडण पुष्कळ काळ चाललेलें आहे. निझामांच्या परवानगीनें २०० पोलिसांनिशीं रथाची मिरवणूक काढण्यांत आली होती. याचा मुसलमानांना संताप आला होता. म्हणून ते माझा सूड उगविण्यास पाहत होते. मिरवणुकीस परवानगी आणण्यांत माझा पुढाकार होता. म्हणून गांवांतील पोलीस सबइन्स्पेक्टर हेहि माझ्याविरुद्ध होते आणि आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याकडे माझ्याविरुद्ध अर्ज पाठविण्याची तयारीहि त्यांनी केली होती. पोलिस ठाण्याजवळ मजवर गोळीबार झाला असल्यामुळे त्याला उत्तेजन देण्याचे कामीं पोलिसांचा हात असावा अशी माझी साधार समजूत आहे. पोलिसांनी माझ्या जखमांचा पंचनामाहि केला नाही. मी व्यंकटरावांच्या घरीं तीन तास होतों; तरी त्यांनी पंचनामा केला नाही. पोलिस सबइन्स्पेक्टर हे व्यंकटरावाच्या घरीं आले, पण त्यांनी पंचनामा केला नाही. तालुकदार आणि तहशीलदार हे देखील आले. त्यांनी माझा जबाब लिहून घेतला.

पहाटे ४ वाजता मला सोलापुरास आणण्यांत आलें. ज्यांनी ज्यांनी म्हणून माझ्याविरुद्ध अर्ज केले होते त्या सर्वांनी मला ठार करण्याचा कट केला होता असें मला वाटतें.

**( २ )**

**कल्याणरावांच्या बंधूंचा अर्ज**

श्री. कल्याणरावांचे कनिष्ठ बंधु श्री. धोंडोपंत देशपांडे यांनीहि डायरेक्टर जनरल ऑफ पोलीस व तुरुंग हैद्राबाद (दक्षिण) यांजकडे खालील आशयाचा अर्ज पाठविला आहेः—

"माझे ज्येष्ठ बंधु रा. कल्याणराव हे ता. २४ जून १९३३ रोजीं शनिवारीं आळंद येथील तालुकदारांना भेटून त्यांच्या कचेरींतून रात्रीं ८ वाजता गडी इस्माईल व डॉ. एन. के. मोघे यांबरोबर घरीं येण्यास निघाले. तालुकदारांच्या कचेरीपासून एका फर्लांगावर व अगदी पोलिस नाक्याजवळ पाठीमागच्या बाजूने कांहीं मुसलमान धावत आले. एकाने ताबडतोब कल्याणरावांवर पाठीमागून बंदूक झाडली ! काय झालें हें पाहण्यासाठी कल्याणराव मागे वळतात तोंच त्यांच्या छातीवर दुसरी गोळी झाडण्यांत आली. इतक्याने त्यांची रक्तपिपासा शमली नाहीं म्हणूनच कीं काय? त्यांच्या डोक्यावर लाठीचे तडाखेहि लगावण्यांत आले ! लगेच डॉ. मोघे हे कल्याणरावांच्या रक्षणासाठी, त्यांच्या अंगावर पडले. इस्माईल गड्यानेहि कल्याणरावांच्या रक्षणासाठी व पळपुट्या गुंडांना पकडण्यासाठी शिकस्त केली.

हल्ल्यानंतर कल्याणरावांना श्री. व्यंकटराव वकील यांचे घरीं नेण्यांत आलें. हल्ल्याची वर्दी दिल्यानंतर सबइन्स्पेक्टर ऑफ पोलीस आणि आळंदचे तालुकदार हे दोघेहि कल्याणरावांना पाहण्यासाठी रा. व्यंकटराव यांच्या घरीं आले. जेथे हा अत्याचार घडला तेथेच गुंडांपैकीं एकाचें मुंडासें पडलेलें आढळलें. माझे बंधु ( रा. कल्याणराव) गुन्हेगारांना बरोबर ओळखूं शकतील. माझ्या माहितीप्रमाणे हल्ल्याच्या जागेचा किंवा कल्याणरावांच्या जखमांचा पंचनामा करण्यांत आला नाही. येथे वैद्यकीय मदत चांगलीशी मिळणें अशक्य असल्याने तीन तासानंतर त्यांना सोलापूर येथील धनराज गिरजी हॉस्पिटलमध्ये नेण्यांत आलें.

आळंद गांवीं हिंदु व मुसलमान यांजमध्ये बेबनाव चांगलाच आहे. गेल्या दोन वर्षांत मुसलमान गुंडांनी अत्याचार आणि जुलमजबरदस्ती किती तरी केली. परंतु स्थानिक अधिकाऱ्यांनी गुन्हेगारांना शोधणें किंवा त्यांच्या अत्याचारांना आळा घालणें यांपैकीं कोणतीच गोष्ट केलेली नाही.

स्थानिक अधिकाऱ्यांची वृत्ति पाहतां हें प्रकरण असेंच दडपलें जाईल अशी मला सकारण भीति वाटते, म्हणून आपण स्वतःच या प्रकरणीं लक्ष घालून त्याचा निकाल करावा अशी विनंति आहे. आळंद येथील मुसलमानांचा फार दिवसांचा एक जबरदस्त कटच आहे अशी माझी खात्री आहे. हा कट लवकरच उघडकीस आणून गुन्हेगारांना शासन करण्यांत आलें नाही तर मुसलमानांच्या गुंडगिरीला ऊत येऊन हिंदूंना तेथें राहणेंच अशक्य होईल. सदर प्रकरणाची कसून चौकशी झाली नाही तर गुंडांचें राज्य पसरेल हें निश्चित. यास्तव आपण

जातीने या प्रकरणाचा निकाल लावावा अशी आपल्याला पुनः एकवार विनंति आहे.

( ३ )

## आळंदगांवच्या हिंदूंचा अर्ज

विखराबाद जिल्ह्यांतील आळंद गांवाच्या हिंदु प्रजाजनांनी हैद्राबाद संस्थानाच्या डायरेक्टर ऑफ पोलीस व तुरुंग यांजकडे आपलीं गाऱ्हाणीं पुढील-प्रमाणे अर्जद्वारें पाठविलीं आहेत.

"आळंद गांवांतील हिंदु-मुसलमानांचे संबंध गेलीं तीस वर्षे अतिशयच बिघडलेले आहेत. मुसलमानांनीच नेहमीं हिंदूंवर आक्रमण केल्याचा आजपर्यंतचा अनुभव आहे. मुसलमानांच्या या गुंडगिरीमुळे आमचें जीवित, अब्रू आणि वित्त हीं नेहमीच संकटांत सांपडलेलीं आहेत. मुसलमानांच्या या अत्याचारी प्रवृत्तीला आळा बसावा म्हणून आळंद गांवीं जादा पोलीस बसविण्याबद्दल आपल्याकडे आम्हीं अर्जावर अर्ज केले, परंतु त्यांची कांहींच दाद लागली नाहीं. आम्ही आपलीं हीं दुःखें स्थानिक अधिकाऱ्यांपुढे हजारदा मांडलीं, परंतु ते मुसलमानांचे पक्षपाती असल्याने त्यांनी तीं नाहीशीं करण्याची कांहींच उपाययोजना केली नाहीं. सर्व अत्याचारांवर कळस म्हणजे आळंद गांवाचे वजनदार व प्रतिष्ठित पुढारी श्री. कल्याणराव देशपांडे यांजवर मुसलमानांनीं नुकताच केलेला पाशवी आणि निर्दय हल्ला हा होय. आणि उद्वेगाची गोष्ट ही कीं, हा रानटी हल्ला तालुकदाराच्या कचेरीपासून फर्लांगाच्या अंतरावर करण्यांत आला.

गेल्या संबंध वर्षांत मुसलमानांनीं केलेल्या अत्याचारांपैकीं कांहीं अत्याचारांची आम्ही यादीच देत आहोंः—

(१) धनगरांनी बांधलेलें देऊळ व त्यांत स्थापलेली मूर्ति फोडणें.

(२) नगरेश्वराच्या देवळांतून गणपतीची मूर्ति पळवणें.

(३) मोहरमच्या दिवसांत हिंदूंच्या घरांत शिरून त्यांच्या चीजवस्तूंची नासधूस करणें.

(४) हिंदूंच्या कुलशीलसंपन्न स्त्रियांची अब्रू घेणें.

(५) भानुदासांच्या पत्नीची केलेली बेअब्रू.

(६) हिंदूंच्या घरांवर दगड फेकणें.

गुंडांचे वरील निंद्य अत्याचार व गुन्हे आम्ही स्थानिक पोलिसांच्या कानांवर घातले तरी पोलिसांनी चौकशी तर केली नाहींच; परंतु गुन्हेगारांवर वचक ठेवण्याचाहि प्रयत्न केला नाहीं! पोलिसांच्या या उपेक्षेनें शेफारून गेल्यामुळेच मुसलमान गुंडांना श्री. कल्याणराव यांच्या जीवितावर हल्ला करण्यास दिक्कत वाटली नाहीं. मुसलमानांच्या या अत्याचारी प्रवृत्तीला दाबांत ठेवण्याचा कांहींच प्रयत्न करण्यांत आला नाहीं, तर भविष्यकाळांतहि आजच्याप्रमाणेच आमच्या जीवितावर, अब्रूवर आणि वित्तावर कसा घाला येणार आहे याची जाणीव वरील गोष्टींवरून आपल्याला होईल. मुसलमान हिंदूंवर केव्हा, कसे हल्ले चढवितील याची कांहींच कल्पना नसल्यामुळे आळंद गांवीं जादा पोलीस बसविण्यांत यावे अशी आपल्याला आमची सूचना आहे.

श्री. कल्याणराव यांजवर मुसलमानांनीं जो भ्याड आणि रानटी हल्ला केला त्याच्या निषेधार्थ व्यापाऱ्यांनी आपलीं दुकानें बंद ठेवलीं. आपल्याला ही गोष्ट पुनः पुनः सांगाविशी वाटते कीं, मुसलमानांना कह्यांत ठेवण्यासाठीं जालीम उपायांचा तांतडीनें अवलंब करण्यांत आला नाहीं तर हिंदूंवर त्यांचे पुनः हल्ले सुरू होतील व त्यामुळे नाइलाज होऊन आम्हांला आळंद गांव सोडून जाणें भाग पडेल. म्हणून आपल्याला अशी विनंति आहे कीं हिंदूंच्या जीवितरक्षणार्थ आळंद गांवीं लवकरांत लवकर जादा पोलीस बसविण्यांत यावे व १३२० फसली सनांतल्या जादा पोलिसांचा खर्च गुंडगिरी करणाऱ्या मुसलमानांकडून वसूल करण्यांत यावा. कारण वरील अत्याचारांना आणि गुन्ह्यांना ते एकटेच सर्वथैव जबाबदार आहेत.

# स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता विल्यम विल्बरफोर्स

( लेखक—**बाळकृष्ण मोरेश्वर कानिटकर**, एलएल्. बी. नाशिक. )

इसवी सन १८३३ च्या जुलै महिन्याच्या २९ व्या तारखेस सुप्रसिद्ध विल्यम विल्बरफोर्स हा लंडन येथे मरण पावला. त्याची पुण्यतिथि उद्या पडते. उद्या त्याच्या मृत्यूला शंभर वर्षे पुरीं होतात. सर्व सुधारलेल्या देशांत आणि प्रत्येक स्वातंत्र्यवाद्याच्या अन्तःकरणांत उद्या त्याचें शतसांवत्सरिक साजरें करण्यांत येईल. या प्रसंगीं आपण स्वातंत्र्योन्मुख परवश लोकांनी त्याचें चरित्र व कार्य यांचें स्मरण करणें, हें निःसंशय योग्यच ठरेल. विल्बरफोर्सच्या जीविताचें मुख्य कार्य म्हणजे पृथ्वीतलावरून गुलामगिरी नष्ट करणें हेंच होय. अर्थात् त्याच्या कार्याचें स्वरूप नीट समजून घ्यावयाचें असल्यास आपणास थोडा पूर्वेतिहास पाहिला पाहिजे.

"मनुष्य हा स्वतंत्रच जन्मास येतो; जगांत मात्र त्यावर बंधनें घालण्यांत येतात" असे सुप्रसिद्ध फ्रेंच तत्त्ववेत्ता व लेखक रूसो यानें आपल्या 'सोशल कॉंट्रॅक्ट' (सामाजिक करार) या सुंदर पुस्तकांत प्रथमच म्हटलें आहे. या तत्त्वाप्रमाणें कोणाहि व्यक्तीचें अथवा समाजाचें दुसऱ्यावर आक्रमण होणें नैतिकदृष्ट्या योग्य होणार नाही. परंतु शक्तीच्या जोरावर ही परवशता आजपर्यंत अनेकांवर लादण्यांत आलेली आहे.

आद्य मानव किंवा तत्सम मानवजाति यांकडे आपण पाहिलें तर असें आढळेल कीं, प्रारंभींच्या काळांत एका मनुष्यास दुसऱ्यास दास बनविण्याची प्रवृत्ति नव्हती. पारध करून राहणाऱ्या मानवजाति आपल्या शत्रूंचा पाडाव करून त्यांच्यापैकीं जित पुरुषांची कत्तल करीत. स्त्रियांना मात्र ते धरून नेत. कारण आपलीं प्रापंचिक कामें अशा स्त्रियांकरवीं ते करून घेत. धनगराच्या जातीच्या मानवजाति जित शत्रूंना परक्यास विकीत. फक्त कांहीं लोक खासगी कामासाठी वगळून ठेवीत असत. परंतु मानवजाति जसजशी उत्क्रांत होत गेली, जसजशी ती भटकण्याचा मार्ग टाकून गांवादि वसवून राहूं लागली, तसतशी गुलामपद्धति अमलांत येऊं लागली.

रोमन लोकांतहि गुलामगिरी फार जारीनें प्रचारांत होती. त्यांची गुलामांना वागविण्याची पद्धति ग्रीक लोकांच्या पद्धतीपेक्षाहि जास्त निर्दयपणाची असे ( एन्सायक्लोपीडिआ ब्रिटानिका ). भारतवर्षांतील गुलाम जास्त सुखी होते. किंबहुना आजच्या मजुरांच्या आर्थिक गुलामगिरीपेक्षा त्या काळच्या कोठल्याहि गुलामांची स्थिति निःसंशय बरी असे (गुलामगिरी-ले. कॅथलीन सिमन १९२९).

पूर्वीच्या काळीं गुलाम होण्याचीं कारणें ग्रीक लोकांच्या लेखनांतील आधारावरून मुख्यतः पांच असत. (१) जन्म,(गुलामांच्या पोटीं) (२) विक्रय, (३) लढाईतील कैदी, (४) बलात्कार आणि (५) व्यापार. या पांच प्रकारांमुळे कोणीहि गुलाम होई ( ब्रिटिश एन्सायक्लोपिडिया ). आमच्या इकडे वैदिक वाङ्मयांतहि गुलाम ( दास ) होण्याचे जवळ जवळ हेच प्रकार सांगितले आहेत(ज्ञानकोश).

अशा प्रकारचा व्यापार पूर्वी सीरिया, थ्रेस या देशांतून चाले. विशेष प्रसिद्ध असे बाजार अथेन्स, सायप्रस, सामोआ, चिआस येथे होते. येथून हिंदी राजांकडेहि प्रतिहारी, नर्तकी वगैरे रूपांत 'यवनी' सुंदरी, गुलाम, दासी म्हणून येत. याप्रमाणे गुलामगिरीचा त्रोटक पूर्वेतिहास आहे. परंतु त्या वेळीं एकाने दुसऱ्यावर मालकी चालविणे गैर समजलें जात नसे. ॲरिस्टॉटलसारख्या, सॉक्रेटिससारख्या तत्त्ववेत्त्यांनाहि गुलामगिरींत गैर असें कांहीच आढळलें नाही. ही परंपरा अशीच चालू राहिली. परंतु ज्याच्याविरुद्ध विल्यम विल्बरफोर्स वगैरेंस आपलें आयुष्य झगडण्यांत वेंचावे लागलें त्या गुलामगिरीचा प्रारंभ यांत झालेला नाही. एका मनुष्याने स्वतःस कमी कष्ट व कमी खर्च लागावा यासाठी दुसऱ्या माणसांस स्वतःच्या ताब्यांत ठेवणें, त्यांच्या सुखदुःखांचा विचारसुद्धा न करणे ही

## आधुनिक गुलामगिरी

इ. स. १४४२ त ॲन्टन गुसाल्व्हस या सैन्याधिकाऱ्याने सुरू केली. खलाशी राजपुत्र हेन्री याच्या हुकुमाप्रमाणे तो पोर्तुगालहून आफ्रिकेंत गेला असता कांहीं मूर लोकांबद्दल त्यास सोन्याची माती व इतर मौल्यवान पदार्थ मिळाले! या गोष्टींनी अर्थलोभी पाश्चात्यांच्या तोंडास पाणी सुटून त्यांनी आफ्रिकेंत तेथील रहिवाशी पकडून त्यांना विकून पैसे वगैरे मिळवण्यास सुरुवात केली. खुद्द कोलंबसानेसुद्धा अमेरिकेहून १४९४ त ५०० रेड इंडियन गुलाम धरूनं आणले होते. परंतु स्पेनच्या दयाळू

इसाबेला नांवाच्या राणीने त्यांच्यावर दया करून त्यास पुनः अमेरिकेंत नेऊन सोडून दिलें. या धंद्याच्या

### भीषणतेची कल्पना

येण्यास एकच गोष्ट सांगितली तरी पुरे. एकट्या हिस्पॅनिओला येथील (क्युबा, जमेका, पोर्टो रिको, वगैरे ठिकाणाहून) दहा लाख मूळ रहिवाशांपैकीं पंधरा वर्षांच्या काळांत फक्त६००००लोक उरले !! इ.स.१६८०ते१७८६ या शंभर वर्षांत एकंदर गुलाम २१,३०,००० म्हणजे दरवर्षी २००९५ अमेरिकेंत नेण्यांत आले. हा व्यापार मुख्यतः लिव्हरपूल येथून चाले. पण लंडन, ब्रिस्टल वगैरे ठिकाणांहून सुद्धां गुलामांची सर्रास निर्गत होई. गुलामांचे हाल किती होत हें Uncle Tom's Cabin हा चित्रपट पाहिला असेल त्यांच्या सहज लक्षांत येईल. त्याची थोडीशी कल्पना पुढे दिलेल्या आंकड्यांवरून येईल. गुलाम पकडण्याच्या आवारांना 'फॅक्टरी' (वखारी!) म्हणत. एडवर्ड्सने लिहिलें आहे कीं इ. स. १७९१ त अशा ४० वखारी आफ्रिकेच्या पश्चिम व उत्तर किनाऱ्यावर मिळून अस्तित्वांत होत्या. यांपैकीं

| | |
|---|---|
| इंग्रजांच्या | १४ |
| डचांच्या | १५ |
| फ्रेंचांच्या | ३ |
| पोर्तुगीजांच्या | ४ |
| व डॅनिश लोकांच्या | ४ |

एकूण ४० अशा होत्या.

हे सर्व अड्डे गुलाम पाठवीत. अशा पाठविल्या जाणाऱ्या लोकांपैकीं शेकडा १९ लोक पाठविण्याच्या हालअपेष्टांमुळे प्रवासात फक्त २-२॥ महिन्यांत मरत ! जे गुलाम दणगट व स्वाभिमानी असत त्यांना योग्य शिक्षण देण्यांत $\frac{1}{3}$ गुलाम इहलोक सोडून जात ! ( सायक्लो. व ज्ञानकोश ) अशा भयंकर परिस्थितींत

### दीनांचा वाली

परमेश्वर द्रवला. त्याने बॅक्स्टर, सर रिचर्ड स्टील, कवि पोप वगैरेसारख्या दयाशील लोकांच्या हृदयांत गुलामांबद्दल करुणा उत्पन्न केली, आणि त्यांनी त्या दृष्टीने प्रयत्न सुरू केले. इ. स. १७९२ च्या जूनच्या २२ तारखेस लॉर्ड मॅन्स्फील्ड यांनी सॉमरसेट नांवाच्या नीग्रोच्या बाबतीं असा निकाल दिला कीं, ब्रिटिश 'बेटावर उतरतांच कोणताहि इसम गुलाम असा राहातच नाही, तो स्वतंत्र आहे.'

इ. स. १७७६ तच डेव्हिड हार्टले नांवाच्या सभासदाने पार्लमेंटांत बिल आणलें कीं, गुलामगिरी बंद व्हावी. परंतु त्या वेळीं तें नापास झालें ! त्या कारणासाठी विल्यम विल्बरफोर्स सारख्यांचीं २०-२० वर्षें खर्ची पडावयाचीं होतीं. डॉ. पिकार्ड नांवाच्या एका व्हाइस चॅन्सेलरनी (केंब्रिज विद्यापीठ) एक निबंध मागवला होता. त्याचें बक्षिस थॉमस क्लार्कसन यांस मिळालें. परंतु त्या निबंधाची तयारी करीत असतांना गुलामांबद्दल त्याला इतकी तळमळ लागली कीं त्याने व विल्यम विल्बरफोर्स यांनी १७८९ त १९ मार्चला एक कमिटी स्थापन केली. यानंतर अनेक अपयशांनंतर

### १८०७ व १८०८ चे कायदे

पसार झाले आणि ब्रिटिश साम्राज्यांतून गुलामगिरी नांवाने व कायद्याने नष्ट करण्यांत आली. नंतरहि जरी मुदतबंदी मजूरपद्धतीसारखे प्रकार घडले असले तरी गुलामगिरी म्हणून गुलामगिरी बंद झाली. परंतु इतर देशांतून वगैरे ती नष्ट होण्यास १८३३ वं १८४८ हीं सालें उजाडावीं लागलीं. परंतु विल्बर फोर्सच्या आयुष्याचें इतिकर्तव्य १८३३ च्या कायद्याने साधलें. वाईट येवढेंच कीं त्यापूर्वी तो एक महिनाच खिस्तवासी झाला होता.

### अल्पचरित्र

अशा प्रकारच्या दीनदुबळ्या निराधार गुलामांचा कैवारी, याचें चरित्र म्हणजे उद्दिष्ट कार्याच्या पूर्ततेसाठी अखंड धडपड होय. शरीराने दुबळा, अशक्त परंतु कार्य केवढे केलें ! याच्या बापाचें नांव रॉबर्ट आणि आईचें नांव एलिझाबेथ असें होतें. यांचें घराणें यॉर्क परगण्यांत प्रसिद्ध होतें, आणि आईचा बाप थॉमस बर्ड नांवाचा एक प्रसिद्ध पुरुष होता. अशा आईबापांच्या पोटीं हा एकुलता एक मुलगा ऑगस्टच्या २४ व्या तारखेस १७५९ सालीं हल्ल येथे जन्मला. वयाच्या दहाव्या वर्षीच बाप वारल्यामुळे हा लंडनला आपल्या चुलत्याकडे आला. आधीच नाजूक प्रकृति, त्यांत लंडनचें चैनीचें जीवन ! यामुळे त्याच्या शिक्षणाची बरीच हेळसांड झाली. तथापि इ. स. १७७६ त तो केंबिजच्या सेंट जॉन कॉलेजमध्ये दाखल झाला. याच सुमारास त्याचा आजोबा व चुलता यांच्या इस्टेटीचा तो वारस झाला. यानंतर तो फ्रान्समध्ये प्रवासास गेला पिट वगैरे प्रख्यात पुढाऱ्यांशीं त्याने याच वेळीं स्नेह संपादन केला. पुढे आयुष्याच्या ध्येयपूर्तीस या स्नेहाचा फार उपयोग झाला. १७८४ मध्ये तो हल्ल व यॉर्क यांजतर्फे पार्लमेंटांत निवडून आला. इ. स. १७८७ त गुलामांच्या व्यापाराविरुद्ध चळवळ सुरू केली. या प्रकारच्या इतर अनेक परोपकारी चळवळींशीं याचा संबंध आहे. कांहींचें जनकत्व त्याजकडे आहे. गुलामांचा व्यापार

पावला, परंतु असलेल्या गुलामांना स्वातंत्र्य मिळवून दिल्यावांचून त्याला चैन पडणें शक्य नव्हतें. त्याच्या सुंदर व परिणामकारक वक्तृत्वामुळे सरते. शेवटीं १८३३ मध्यें मुक्तता-बिल (Emancipation) पार्लमेंटानें पसार केलें. त्यापूर्वी महिनाभर त्याचा अंत झाला होता !

त्याच्या मृत्यूनंतर (ता. २९ जुलै १८३३ रोजीं) त्यास वेस्ट मिन्स्टर अॅबेमध्यें पिट, फॉक्स, कनिंगहॅम वगैरे थोर गृहस्थांशेजारीं पुरण्यांत आलें. यास मेरी नांवाच्या बायकोपासून रॉबर्ट व सॅम्युएल नांवाचे दोन मुलगे झाले. त्या मुलांनी त्याचें चरित्र पांच खंडांत प्रसिद्ध केलें आहे.

अशा प्रकारें पृथ्वीवरून गुलामगिरी नाहींशी करण्यासाठीं ज्यानें आपलें आयुष्य वेचलें अशा थोर पुरुषाची त्याच्या शतसांवत्सरिक पुण्यतिथीच्या सुमारास आठवण करून परमेश्वरानें हिंदी राष्ट्राची राजकीय गुलामगिरी लवकरच नष्ट करावी असें चिंतून वाचकांची रजा घेतों.

# तूर्त तरी राजकीय जळप्रळयच खरा!

## बॅ. बाप्टिस्टांचें भविष्य

सन १९२० च्या सप्टेंबरांत, कलकत्ता येथील स्पेशल काँग्रेसच्या बैठकींत, म. गांधी यांचा जय होऊन असहकारितेचें नवें युग अवतरलें. त्यानंतर लवकरच प. वा. बॅ. बाप्टिस्टा यांनी जाहीर रीतीनें असे उद्गार काढले कीं, " म. गांधी हे तरी एक राष्ट्रीय सभा नष्ट करतील किंवा राष्ट्रीयसभा तरी म. गांधींना नष्ट करील ! " या दोन वैकल्पिक विधानांपैकीं आज पहिलें विधान म्हणजे भविष्य खरें ठरलेंच आहे. कारण म. गांधींनी श्री. अणे यांचे हातून राष्ट्रीय सभा नष्ट करविली ! पण वरील जोडींतील दुसरें भविष्यात्मक विधानहि खरेंच ठरलें असें म्हणतां येणार नाही काय? वास्तविक कोणतेहि दोन विकल्प हे तर्कशास्त्राप्रमाणें प्रतिपक्षीसे वाटतात. आणि त्यांपैकीं कोणी तरी एक अधिक प्रबळ ठरून दुसऱ्याला असंभवाच्या गर्तेत लोटून गाडून टाकील असें अनुमान सुचतें. पण कित्येक वेळां हें अनुमान खोटें ठरून दोनहि पक्ष घातक गुणांत तुल्यबल ठरतात. पौराणीक सुंदोपसुंदांच्या युद्धांत " सुंदाची उपसुंदीं उपसुंदाची गदा पडे सुंदीं " असें होऊन दोघेहि एकमेकांच्या हातून मृत्यू पावले. सिंहगडाच्या हल्ल्यांत तानाजी व उदेभान हे दोघे वीर परस्परांच्या हातून मेले असें इतिहास सांगतो. तशीच गोष्ट म. गांधी व काँग्रेस यांची झाली !

## घातक प्रेम

आता या दोघांचा परस्पर नाश झाला तो मात्र, वरील दोन दाखल्यांतल्याप्रमाणें, शत्रुत्वानें झाला नाही, तर मित्रत्वामुळे झाला इतकेंच काय तें ! पण जगांत फाजील प्रेम हें फाजील द्वेषाइतकेंच हानिकारक ठरू शकतें. " किलिंग विथ काइंडनेस " ही इंग्रजींत एक म्हणच होऊन बसली आहे ! आईचें आपल्या मुलावरील प्रेम हें एक महत्प्रेमाचें मापच होय. म्हणूनच वाटतें कीं, अविचारी आयांच्या फाजील प्रेमाच्या दुष्परिणामांचा अनुभव घेऊनच, वरील म्हण बहुधा बनविणारानें बनविली असावी. " अति स्नेहः पापशंकी " अशी म्हण संस्कृतांतहि आहे पण अति स्नेह हा जसा पापशंकी असतो, तसा तो पापकारीहि होतो !

## एक गोष्ट

एका क्रमिक मराठी पुस्तकांत अशी गोष्ट आहे. मुलाला लहानपणीं चोरीची सवय लागली. तो मधून मधून चोरीचे जिन्नस आईला आणून देई, तेव्हा ती त्याला रागें न भरतां प्रमानें कौतुक करून त्याला खाऊ देई. पुढे मुलग्याचे अपराध वाढून त्यानें एक खून केला. त्याला फाशीची शिक्षा झाली. फासावर चढतांना आई प्रेमानें व दुःखानें त्याचा मुका घ्यावयास गेली, तेव्हां उलट तिचा कान खूप जोरानें चावून तो तिला म्हणाला, " आई ! माझ्या जागीं सरकारानें तुलाच फाशी द्यावयास

पाहिजे होतें. कारण माझ्या पहिल्या गुन्ह्या-बरोबर मला रागें भरून तूं माझा निषेध केला असतास तर मी इतका बिघडलों नसतों!" अर्थात् मुलाचे लाड करून आईनेच त्याला फासावर चढविलें, असें पर्यायानें सिद्ध होतें.

## गांधी व काँग्रेस

काँग्रेस व म. गांधी यांची गोष्ट कांहीशी अशीच झाली १९२० सालीं गांधीजींनी काँग्रेस हस्तगत केली;तेव्हापासून जनतेने त्यांचे लाड करण्यास सुरुवात केली. आणि १९२१ च्या बैठकींत अहमदाबादेस त्यांना काँग्रेसनें जवळ जवळ सर्वाधिकारीच नेमलें. तेव्हांपासून गांधींनी जी राजकारणी अविचाराची परंपरा सुरू केली, तिचाच परिणाम यंदा काँग्रेस बुडविण्यांत झाला हें उघड आहे. उलट गांधींनीहि काँग्रेसचे इतके लाड केले कीं, आपणाजवळ होती नव्हती ती बुद्धि जवाहरलाल प्रभृति लोकांच्या स्वाधीन केली; स्वतःला काँग्रेसच्या हातचें खेळणें बनविलें; स. १९३२ साली आपल्या मताविरुद्ध कायदेभंग करण्यास परवानगी दिली; ऑर्डिनन्सेसचें राज्य दडपशाही वगैरे आपत्ति ओढवून घेतल्या; स्वतःची सर्व विधायक उपयुक्तता गमावून बसले, आश्रमादि नष्ट करून तुरुंगांत जन्म काढण्याची पाळी आणली; म्हणजे अशा रीतीनें काँग्रेसनेंहि गांधींचा नाश केला!

## एक नैमित्तिक प्रळय

कसेंहि असो. काँग्रेस तर आता नष्ट झालीच आहे; आणि उद्यां गांधीजी तुरुंगांत जाऊन बसले म्हणजे हिंदी राष्ट्रीय राजकारणातला एक नैमित्तिक प्रळय झाला असेंच म्हणावें लागेल! प्रळयकालचीं वर्णनें निरनिराळ्या पुराणांत निरनिराळीं केलेलीं आढळलीं तरी त्यांचें तात्पर्य एकच असतें. "प्रळय झाला तेव्हा सर्व जलमय झालें. एकट्या ईश्वराचा आत्मा तेवढा या जलमय विश्वावर एकाद्या प्रकाशकिरणाच्या कवडाशाभारखा चंचलपणानें तरंगत राहिला" असें वर्णन ख्रिस्ती धर्मग्रंथांत आहे. हिंदू पुराणांतहि असें वर्णन आढळतें कीं "प्रळय होतो तेव्हा सर्व विश्व जलमय होतें; व एकटा श्रीविष्णु तेवढा पिंपळाच्या एका पानावर आंगठा चोखीत बसतो." राष्ट्रीय राजकारणाचा जलप्रळय करून म. गांधी हे ईश्वराप्रमाणेंच अहंकारांत एकाग्र व मग्न होऊन बसणार हें ठरलें. पण पुराणांतरीचा ईश्वर आत्यंतिक नाश तरी इच्छीत नाही. ख्रिस्तपुराणांतल्या ईश्वरानें, सृष्टि फिरून उत्पन्न करण्याची, आपल्या आवडत्या नोहाची इच्छा तृप्त केली. त्या मानसपुत्रानें एका मोठ्या नावेंत सर्व जीवसृष्टीचे बीजरूप अवशेषांश भरून ठेवले; आणि प्रळयजळ ओसरल्यावर त्यानें त्यांतूनच नवी सृष्टि निर्माण केली. हिंदुपुराणांतला श्रीविष्णुहि असाच प्रवृत्तिपर आहे. तो पिंपळाच्या एका पानावरच बसल्या बसल्या नाभिकमलांतून ब्रम्हदेव उत्पन्न करतो; व तो ब्रम्हदेव मग सर्व चराचर सृष्टि पुन्हां उत्पन्न करतो. याप्रमाणे सृष्टीच्या नैमित्तिक प्रळयाबरोबर नैमित्तिक उत्पत्तीचीहि व्यवस्था झालेली असते. पण म. गांधींची लहर ईश्वरा-इतकीहि प्रवृत्तिप्रवण व लीलाप्रिय दिसत नाही.

## राजकारणांतला हिरण्यगर्भ

श्री. अणे यांनी त्यांतल्या त्यांत जी प्रवृत्तिपरता दाखविली तीहि गांधीजींना पसंत पडली नाही. सर्व काँग्रेस घटना मोडून टाका असा सल्ला गांधींनी आग्रहानें दिला असतां, श्री. अणे यांनी डिक्टेटररूपी हिरण्यगर्भ शिल्लकच ठेवला. गांधीजींच्या पायीं इतर सर्व रीतींनी श्री. अणे यांनी आपलें स्वत्व गमावलें असलें तरी, हें काँग्रेसच्या कुशीतलें सल किंवा गर्भबीज त्यांनी शिल्लकच राहूं दिलें हा, पर्णकुटीच्या अभिमंत्रित योगभूमींत, गांधींशीं झगडून अणे यांनी मोठाच पराक्रम केला असें म्हणावें लागतें! पण त्यांच्या मागाहून येणारे सर्वाधिकारी जयरामदास दौलतराम हे अणे यांच्यापेक्षाहि गांधींचे परम भक्त आहेत. यामुळे हें सल व बीज तरी अखेर शिल्लक उरतें, किंवा अश्वत्थाम्याच्या अस्त्राप्रमाणें गांधीजींच्या लहरीपणाचें अस्त्र काँग्रेसच्या गर्भात शिरून त्या गर्भबीजाचाहि संहार करते हें पाहावयाचें आहे!

## दोन बापूजी

ओघानेच आलें म्हणून म. गांधी व श्री.

अणे (म्हणजे प्रस्तुत राजकारणाच्या इतिहासांत एकाच बापूजी या लाडक्या नांवाने कांही काळ लोकांच्या तोंडीं झालेल्या ) या दोन व्यक्तींच्या परस्परसंबधांविषयीं दोन शब्द लिहिणें अपरिहार्य आहे. अणे हे टिळकांचे शिष्य व अनुयायी. मरणसमयीं आपल्या राजकारणविषयक तत्त्वांचें व उद्योगांचें व्यवस्थापत्र करून, त्यांची वहिवाट करण्याकरितां टिळकांनी एखादें पंचायतन नेमलें असतें, तर त्यांत अणे यांचें स्थान निश्चित होतें. टिळकांच्या पश्चात अणे यांनी, "वऱ्हाड प्रांतांतील टिळक" असें बहुमानास्पद नामाभिधान आपल्या कर्तृत्वाने स्वतःस जनतेकडून मिळवून घेतलें. स.१९१९ पासून स.१९२९पर्यंत अणे हे, इतर महाराष्ट्रीय पुढाऱ्यांबरोबरच, गांधीजींच्या प्रतिपक्षीयांत गणले जात. ज्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना म. गांधी हे प्रांजलपणानें विरोधी व विनोदानें 'शत्रु' असें म्हणतात त्यांपैकींच अणे हे होते.

## अणे व पुणे यांची मैत्री

स. १९२१ सालीं सारा देश कौन्सिल-बहिष्कार गर्जत असतां, अणे यांनी स्वतःच्या व्यक्तीपुरती काँग्रेसची आज्ञा तोंड वाईट करून गिळली. तरी दादासाहेब खापर्डे व श्री. जतकर वकील यांना, ती आज्ञा धाब्यावर बसवून, कौन्सिल निवडणुकीस त्यांनी उभे केलेंच. नंतर काँग्रेसविरुद्ध उघड बंड करून, दास व नेहरू यांना मिळून, ते स्वराज्य पक्षाचे प्रांतिक पुढारी बनले. आणि त्यानंतर वेळ आली तेव्हा खुद्द पंडित नेहरूशीं भांडून प्रतिसहकार-पक्षाच्या स्थापनेस त्यांनी फार मोठी मदत केली. कारण ज्या विधिघटनेमुळे श्री. तांबे हे नागपूर सरकारचे कार्यकारी कौन्सिलर व शेवटीं गव्हर्नरहि झाले, ती वऱ्हाडांतच घडून आली; व बापूजी अणे हे तिला मदत करणारेच होते. लाहोर काँग्रेसमध्ये अणे यांनी म. गांधी यांना अनेक गोष्टींत विरोध केला. आणि स.१९३० सालीं काँग्रेसचे अध्यक्ष जवाहरशहा यांनी हुकूम काढून, "एक काँग्रेस तरी सोडा, नाही तर कौन्सिल तरी सोडा" असा कोलदांडा घातला, तेव्हां अणे यांनी कौन्सिलची जागा सोडली नाही, पण ऑल इं. काँग्रेस कमिटीच्या सभासदत्वाचा व वऱ्हाड प्रांतिक काँग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला ! १९२१ ते १९२९ या सालांतली अणे यांचीं व्याख्यानें पाहिलीं तर, तीं गांधीभक्तासारखीं नसून गांधीविरोधकासारखींच आढळतील.

## अणे यांचें मतांतर

पण स. १९३० पासून थोडेसें व १९३२ पासून बरेंचसें हें गाडें बदललें. त्याची मीमांसा करण्याचें कारण नाही. तथापि स. १९३० सालच्या का. भं.चळवळींत त्यांनी भाग घेतल्यामुळे, व त्यांना शिक्षा झाल्यामुळे, काँ. वर्किंग कमिटींत त्यांची निवड झाली. आणि १९३२च्या कायदेभंगांत ते केवळ इमानदारीमुळे सांपडले. संगतीचा गुण हा, नाही म्हटलें तरी कांही अमतोच. त्याप्रमाणें अणे यांचें होऊन, असहकारितेचे एक कट्टे विरोधी ही भूमिका त्यांनी हळूहळू सोडली. आणि कौन्सिल—प्रवेशाचे सगळ्यांत अधिक कट्टे पुरस्कर्ते अशी आजहि मनानें त्यांची खरी भूमिका असतां, काँग्रेसचे हंगामी अध्यक्ष या नात्यामुळें, त्यांनी कौन्सिल प्रवेशाबाबद मौनव्रत स्वीकारलें. इतकेंच नव्हें तर कायदेभंगाची चळवळ पुढें चालविण्याला आपल्या खऱ्या मताविरुद्ध संमति दिली; व गांधींच्या एखाद्या हस्तकाची नम्रभूमिका स्वीकारून एका डिक्टेटरशिवाय इतर सर्व गोष्टींत गांधींच्या आज्ञेप्रमाणें फर्मानें काढलें !

## संगतीचा गुण

वास्तविक गांधी हे जसे एका प्रकारचे डिक्टेटर तसेच काँग्रेसचे हंगामी अध्यक्ष हेहि डिक्टेटरच होत पण पर्णकुटीच्या रणभूमींत या दोन डिक्टेटरांची जी लढत झाली त्यांत अणे हरले व गांधी हे विजयी झाले असेंच मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें! स्वतः त्यांच्याच प्रांतांत, अणे यांचे स्नेहीसोबती व शिष्य म्हणविणारे लोकच, काँग्रेसविरुद्ध बंड करून आज उठले आहेत; अणे यांच्या मानसिक आशीर्वादानें नवा पक्ष ते स्थापीत आहेत; आणि "तुम्ही जुने असलां तरी आमचे पुढारीच

आहां. तथापि यापुढे पूजा तुमची आणि प्रसाद आमचा" अशी वाटणी प्रेमाने मांडून ते त्यांच्याशीं करून घेत आहेत. हें दृश्य पाहिलें म्हणजे, म. गांधींचे पाश अणे यांच्यावर पडले ते कांही अगदीं फुकटच गेले नाहीत, असें गांधीजींच्या अनुयायांना यथार्थ अभिमानाने म्हणतां येईल !

## अणे व असहकारिता

असहकारिता ( म्हणजे गांधीप्रणीत असहकारिता ) इजमध्ये असलेले 'आनुषंगिक' गुण केसरीप्रमाणें अणे यांना मान्यच आहेत. पण केसरीप्रमाणेंच अणे यांनाहि त्या विशिष्ट असहकारितेचे दोष किती जाणवत होते हे सप्रमाण सिद्ध करतां येतें. 'गेलीं पांच वर्षे' या नांवाचें केळकरकृत लेखसंग्रहाचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें. त्याला श्री. अणे यांनी प्रस्तावना लिहिली आहे. तींत ते लिहितातः—" ब. बॅपटिस्टा यांनी, एका महर्षीने करावें त्याप्रमाणें, असहकारितेच्या जन्मकालींच तिचे जातक वर्तवून ठेविलें. तें एखाद्या भविष्याप्रमाणें, पांच वर्षांच्या कटु अनुभवाने, खरेंच ठरलें. असहकारितेंतून कांही गोष्टी बऱ्या निघाल्या एवढ्या कबुलीवरच, सर्वथैव अव्यवहार्य ठरून पाहणारा कार्यक्रम कोणी अट्टाहासानें उचलून धरण्याचा प्रयत्न करील, तर त्यांतून कार्यसिद्धि न होता कार्यहानि मात्र होणार आहे, असें महाराष्ट्रीयांना प्रामाणिकपणाने कां वाटतें याची विस्तृत मीमांसा केळकरांच्या या लेखसंग्रहांत वाचकांना पाहावयास मिळेल!"

## वऱ्हाड–नागपुरांतील लोकमत

पण हे शब्द प्रस्तावनेंत राहिले, आणि अव्यवहार्य गांधीप्रणीत विशिष्ट प्रकारच्या असहकारितेचें आज्ञापत्रक, त्याच गांधीजींच्या आज्ञेने लिहून छापून, जगजाहीर करण्याचें अणे यांच्या नशिबीं आलें हें दैवदुर्विलसिताचेंच एक उदाहरण होय. आणि हे आम्हीच म्हणतों असें नाही; तर त्यांचाच एक अनुयायी केसरीच्या गेल्या अंकांतील बातमीपत्रांत लिहितो कीं—" बापूजींचें पत्रक कसें असेल याची रूपरेषा गांधीजींच्या मुलाखतींत प्रगट झालेली असल्यामुळे या पत्रकाचें लोकांना आश्चर्य असें कांहीच वाटलें नाही. परंतु गया कॉंग्रेसच्या वेळीं स्वराज्यपक्षाला जन्म देणाऱ्या मंडळींत प्रमुख असलेले, व पुढे स्वराज्यपक्षाच्या वांझोट्या धोरणाविरुद्ध बंडाचें निशाण घेऊन उभे राहिलेले, ते बापूजी अणे कोणीकडे ? व आज बहुधा स्वतःच्या स्वयंस्फूर्त मताला बाजूस सारून प्रवाहपतितप्रमाणे गांधीजींच्या पावलावर पाऊल टाकून वैयक्तिक कायदेभंगाचें धोरण जाहीर करणारे बापूजी कोणीकडे ? असा प्रश्न त्यांच्या अनेक चाहत्यांच्या मनांत उद्भवला असेल यांत संशय नाही" !

## दोन मांत्रिकांची लढत

श्री. अणे हे आपल्या अनेक गुणांमुळें महाराष्ट्रीय जनतेला आदरणीय झाले आहेत. त्याने त्या जनतेला खरोखरच असें वाटत आहे की, अणे हे गांधींच्या आहारीं जाऊन विनाकारण त्यांच्या पंक्तीनें पडले. गेल्या मे महिन्यापासून या दोघां व्यक्तीचें झुंज चाललेलें लोक तर्फ दृष्टीने पाहत होते. जशी कांही दोघां मांत्रिकांची गांठ पडावी; पण एक आत्मसंवित असा स्वस्थानीं असल्यामुळे दुसऱ्यास भारी ठरावा असें अखेर झालें. " नक्रः स्वस्थानमासाद्य गजेंद्रमपि कर्षति " हेंच खरें. या तीन महिन्यांत अणे यांनी म. गांधींचा पलंगपहारा ठराविक वेळीं कधीच चुकविला नाही. त्यांच्या परिवारांत समरस होतां येत नव्हतें तरी स्वतःचें दाक्षिण्य संभाळिलें. मनांत दूर पण जनांत जवळ अशा एखाद्या अंतेवासी 'शागीर्दा'-प्रमाणें अणे यांनी गांधीजींच्या लहरी स्वभावाची खरत खाल्ली. आणि अखेर टिळक मंदिरांतील परिषदेंत, स्वतःच्या मताचा एकहि शब्द न बोलतां, गांधींचे उपाध्येपण सांग सफल करून देऊन, कॉंग्रेसची अंत्येष्टि त्यांनी आपल्या हाताने केली! या स्वत्वसंन्यासाबद्दल अणे यांची स्तुति गांधीजींचे अनुयायी तरी खचित करतील यांत शंका नाही.

## गांधी व अणे यांच्यांतील मतभेद

श्री. अणे यांना म. गांधींच्या जितक्या गोष्टी पसंत आहेत, यापेक्षा नापसंत अशा गोष्टी पुष्कळच अधिक आहेत. अणे हे खादीचे कपडे घालतात. तरी त्यांनी खादीचें स्तोम माजविलें नाहीं. गांधीटोपी घातली नाही. खादीकार्याचें केंद्र काढलें नाही. खादीसंघाकडून द्रव्यसाहाय्य घेऊन सूत कातण्यास स्वयंसेवक बनविले नाहीत. प्रेमानें जग जिंकण्याची आकांक्षा धरली नाही. अनत्याचारित्व हें तत्त्व वा ब्रीद असें मानलें नाहीं आणि ते धोरण म्हणून मानलें तरी त्याच्या विशेष अर्थाचें गांधीभाष्य त्यांना कधीच पटलें नाही. त्यांनी राष्ट्रीय शिक्षणाची शाळा काढली नाही. कोर्ट-कचेरीवर बहिष्कार 'पुकारला' नाहीं. पुढे मुसलमानांची मनधरणी करण्याकरितां हिंदूंनी वाटेल तितकें नुकसान सोसावें असें प्रतिपादिलें नाही. अस्पृश्यतानिवारणाचे गांधींचे विक्षिप्त प्रयत्न व फाजील अट्टाहास यांचा अणे यांनी निषेधच केला. पाणवठे व देवळें यांच्या जुन्या वहिवाटी मोडून नव्या वहिवाटींचा जुलूम करणें हें अणे यांना मान्य नाही आणि याकरिता जुलमी कायदा करून घेणें तर त्यांना मान्य नाहीच नाहीं. गांधींच्या वर्णाश्रम धर्माचा अर्थ अणे यांना कबूल नाहीं. आणि दुर्गादास-लक्ष्मीचा विवाह गांधींनी जो मध्ये असता प्रतिपादून अनुमोदिला तो अणे यांना अधर्म्य म्हणून अमान्य आहे. कायदेभंगापैकी करबंदीची चळवळ अणे यांना कधींच मान्य नव्हती. आणि ज्या कौन्सिलांना महात्माजी विष मानतात त्यांना ते अमृत मानण्यापर्यंतहि अणे यांची धाव जाऊं शकेल. फक्त जंगलांत जाणाऱ्या कायदेभंगाला अणे यांनी मान्यता दिली, व त्यापुरतें त्यांचें गांधींशी ऐकमत्य दिसलें तरी, इतर कोणत्या एखाद्या परिवारात अणे असते (म्हणजे ते कॉं. वर्किंग कमिटीचेच सभासद आहेत तसे नसते) तर त्यांनी १९३२ च्या कायदेभंगाला संमति दिलीच असती असें आम्हांला वाटत नाही.

## मतभेद नाही म्हणून काय उपयोग ?

तात्पर्य, गांधी व अणे यांचा अलीकडे पडला तो मेळ खरोखरच स्वभावसादृश्य किंवा तत्त्वसादृश्य यामुळे पडलेला नसून, वर्किंग कमिटीच्या सभासदाच्या कर्तव्याची अणे यांची जी कल्पना आहे तिच्यामुळेच पडला हें कोणीहि सांगेल. ही कर्तव्यकल्पना इमानदारीवर अधिष्ठित म्हणून उदात्त असें कोणीहि म्हणेल. पण गेल्या मे महिन्यापासून गांधी व अणे यांचें जें साहचर्य घडलें, त्याचा खरा अर्थ समजून घेतल्याशिवाय पुणें परिषदेंतील व त्यानंतरचें अणे यांचें वर्तन, यांचें खरें मर्म कोणास सहसा कळणार नाही. श्री. अणे व म. गांधी यांच्या संबंधाविषयी हें थोडेसें विस्तारपूर्वक वर्णन आम्ही केलें याचें कारण इतकेंच की. "अणे हे गांधीजींच्या आहारी गेले, व तेथून ते आता परत येणें शक्य नाही," अशी कांही लोकांना भीति वाटते ती तितकीशी खरी नाही, असें जें आम्हांला वाटतें तें स्पष्टपणें सांगण्याकरिताच ! एरवीं कोणाहि दोन व्यक्तींच्या स्नेह वा वैर संबंधाशीं आम्हांला कांहीच कर्तव्य नाही. गांधी यांनी व अणे यांनी आपणामध्यें मतभेद नव्हते असें जरी कितीहि निक्षून सांगितलें, तरी त्यावर आमचा जसा विश्वास बसत नाही तसा इतर पुष्कळांचाहि बसणार नाहीं.

## दोन जाहीर पत्रकांतील इत्यर्थ

पण त्यांच्यांत गुप्त मतभेद असोत वा नसोत, त्या दोघांनी मिळूनच आज जें केलें त्याचा परामर्ष घेणें, तर तो मिळूनच घतला पाहिजे. या दोघांनी काढलेल्या जाहीर पत्रकांचा इत्यर्थ असा कीः—(१) कायदेभंगाची चळवळ बिनशर्त थांबविणें देशाच्या हिताचें नाही (२) या शर्ती सरकाराने समेट करण्याची बुद्धि दाखविण्यावर अवलंबून राहतील. (३) ही बुद्धि दिसून यावयाची म्हणजे प्रथम व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनी म. गांधींची भेट बिनशर्त द्यावयाची (४) या भेटींत म. गांधी यांना आयत्या वेळी ईश्वर बुद्धि देईल ती योजना—स्वराज्यविषयक योजना—ते व्हाइसरॉय यांजपुढे मांडतील! (५) ती योजना काय

हें आज गांधीचें गांधींना नुसतें माहितिहि नाही. तथापि त्यांचा दृढविश्वास मात्र असा आहे कीं, ती पुढे मांडल्यास व्हाइसरॉय म्हणजे सरकार व हिंदी जनता या उभयतांना ती एकदम सारखीच मान्य होईल!! (६) (६) पण व्हाइसरॉय गांधीजींना भेटीस बोलावीत नाहीत हें व्हाइसरॉय यांचेंच दुर्भाग्य व त्यांचाच अपमान! गांधीचा नव्हे! व हिंदुस्थानाचा नव्हे! (७) आणि हा लॉर्ड विलिंग्डन यांचा अपमान धुवून निघण्याकरितां किंवा स्वराज्य मिळविण्याकरितां हिंदी जनतेने कायदेभंगाची चळवळ चालू ठेवली पाहिजे. (८) पण ती यापुढे सामुदायिक रीतीने चालू ठेवूं नये. कारण त्या रीतीत कार्ययोजना गुप्तपणाने होते; आणि सत्याग्रहा या अनेक मोहिमा केल्यानंतर आज प्रथमच गांधीजीना कळलें कीं, गुप्तपणा हा सत्याग्रहाच्या तत्त्वाविरुद्ध आहे (९) ही गुप्तपणाची योजना मुळींच नये म्हणून काँग्रेस कमिट्या सर्वच्या सर्व मोडून टाकाव्या मात्र व्यक्तिशः वाटेल त्याने कायदेभंग करावा पण तो स्वतःच्या जबाबदारीवर. म्हणजे त्याने दुसऱ्या कोणाकडून मदतीची अपेक्षा करूं नये. आणि दुसऱ्या कोणी त्याला ती मदत करूं नये मदत उघड केली तर तें कृत्य बेकायदा ठरणार, आणि गुप्तपणें केली तर तें सत्याग्रहाच्या तत्त्वाविरुद्ध म्हणून गांधीच्या कायद्याप्रमाणें बेकायदा ठरणार (१०) मात्र अशा रीतीने कोणी कायदेभंग केला तर तो काँग्रेसच्या नांवावरच करावा (११) म्हणजे एतावता कायदेभंगाचें नांव तर राहिलें मग कार्य न झालें तरी चालेल! किंबहुना कार्य जितकें थोडें तितकें तें अधिक सुगुण होतें! फार काय एकटे गांधी व त्यांच्या गुजराथींचें पथक इतकेच लोक तुरुंगांत गेल्याने सरकारावर जितका परिणाम होईल तितका पूर्वीसारखे जिकडे तिकडे तुरुंग भरल्यानेहि होणार नाही. (१२) व्यक्तींनी कायदेभंग केला म्हणजे तो केवळ स्वयंस्फूर्तीचाच असतो. व्यक्ति गुप्त कारस्थान करीत नाहीत! कॉं. कमिट्या सामुदायिक म्हणून त्या मात्र गुप्तपणा राखूं शकतात!! (१३) काँग्रेस कमिट्या मोडल्या म्हणजे त्यांचे जागी डिक्टेटर उभा करावा (१४) सगळ्या हिंदुस्थानाकरिता खुद्द काँग्रेसचा प्रतिनिधि म्हणून एक डिक्टेटर जनरल—सर्वाधिकारी असावा (१५) ही सर्व भानगड गांधींना व्हाइसरॉयसाहेबांनी भेटीस बोलावल्याने मिटली असती. (१६) पुणें परिषद ही गुप्तस्वरूपाची होती म्हणून तिजमध्ये कायदेभंगाला अनुकूल झालेल्या भाषणांचा परामर्ष, स्वतःकडे आलेल्या बातम्यांवरून, व्हाइसरॉयसाहेबांनी घेता कामा नये पण कायदेभंगाला प्रतिकूल झालेल्या भाषणांचा परामर्ष वाटल्यास घ्यावा! तथापि त्यांतल्या त्यांत व्हाइसरॉयसाहेबाकडे जाऊन भेट मागण्याचा गांधीजीना जी परवानगी व जो अधिकार पुणें परिषदेने दिला त्याचा परामर्ष मात्र, ती परिषद गुप्त असली तरी, व्हाइसरॉय यांनी अवश्य घ्यावयास पाहिजे च होता! (१७) गुप्त परवाई वाईट म्हणून ती थांबविण्याकरिताच पुणें परिषदेचें काम गुप्तपणें करण्यांत आलें (१८) सगळ्या वर्तमानपत्रांतून हकीकत एकाच प्रकारची आली म्हणून काय झालें ती 'अनधिकृत म्हणून खोटीच' समजावी (१९) "तुम्ही आपली परिषदेची हकीकत म्हणून खरी काय असेल ती प्रसिद्ध करा ना" असें आम्हांला कोणीं म्हणूं नये. व्हाइसरॉय बोलावतील तेव्हा ती सर्व त्यांजपुढे खरी खरी मांडूं मात्र आमच्या जवळ त्या हकीकतीची टिपणेंहि नसेनात कां? (२०) ज्यांना व्यक्तिशः जबाबदारीवर कायदेभंग करतां येईल ते तो करतीलच अशी अपेक्षा आहे पण ज्यांना तो करतां येणार नाही त्यांनी आपल्या लागी असेल तें विधायक कार्य करीत राहावें (२१) इतर काय वाटेल तें करावें किंवा काय नको तें न करावें पणपण एक गोष्ट मात्र करूं नये! करूंच नये! करूं नयेच नये' ती म्हणजे कौन्सिल-प्रवेश!! (२२) इतर विधायक कार्यक्रमांनी एक वेळ स्वराज्य मिळेल. पण कायदेकौन्सिलांत शिरण्याने तें मिळावयाचें असेल तर मृगजळा

सारखें तें दूर दूर जात राहील. ( २३ ) म. गांधींनी राजगोपाळाचारियर यांना मंदिरप्रवेश बिलाकरिता कौन्सिलाकडे जाऊन खटपट करावयास सांगितलें म्हणून काय झालें ? गांधी व त्यांचे शिष्य यांनी सहकारिता केली तरी ती असहकारिताच समजावी. फक्त इतरांनी असहकारिता केली तरी ती सहकारिताच होते ! (२४) पुणें परिषद भरविली ती फक्त लोकांचें म्हणणें ऐकून घेण्याकरिता परिषदेनें ठराव म्हणून केले तरी ते फुकटच समजावे ( २५ ) गांधींच्या मताशी लोकांचें मत जुळतें असेल तेव्हा, किंवा गांधींच्या मताप्रमाणे मत द्यावयास लोक तयार असतील तेव्हा—त्या लोकांचें मत गांधी वेदाक्षराप्रमाणे पवित्र मानतील! गांधींच्या मताशी न जुळणारें मत हें केव्हाहि लोकमत असूंच शकत नाही.

## कायद्याचा प्रश्न

वरील मुद्दयांत गांधी व अणे या दोघांच्याहि जाहीरपत्रकांचें सार आलें आहे. अणे यांनी जाहीरपत्रकें काढण्याचें काम थांबविलें आहे पण म. गांधींचें तें काम सुरूच आहे. स्वतःचा खुलासा करण्याकरिता तर ते जाहीरपत्रकें काढतातच; पण श्री. अणे यांच्या पत्रकांतील मुद्दयांचा खुलासा करण्याचेंहि काम आपणाकडेच आहे असें गांधीजी समजतात असें दिसतें. हें पाहून या उभयतांच्या अधिकारांच्या व्याप्ति व मर्यादा तरी काय आहेत यासंबंधानें वाचकांच्या मनांत गोंधळ उत्पन्न व्हावा हें साहजिकच आहे. पण अणे हे कोणीहि, म्हणजे खुद्द काँग्रेस असले तरी, गांधी हे त्यांच्याहून वरिष्ठ आहेत येवढें मात्र त्यांना स्पष्ट दिसतें. मग हा वरिष्ठपणा कायदेशीर दृष्ट्या खरा असो वा नसो. मद्रासचे सत्यमूर्ति, मुंबईचे सावरकर, लखनौचे किडवाई, अलाहाबादचे पुरुषोत्तमदास टंडन, इत्यादि गृहस्थ अणे यांच्या जाहीरपत्रकावर नाराज असून, ते ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची स्पेशल सभा भरविण्याच्या विचारांत आहेत; व त्याकरिता ते या कमिटीच्या सभासदांच्या सह्या गोळा करीत आहेत असें समजतें. त्यांचा हा प्रयत्न यशस्वी झाल्यास कायदेशीरपणाचे हे व इतर अनेक प्रश्न सहजच चर्चेला निघतील. आणि अशा दृष्टीनें काँग्रेसची विटंबना होणें एवढाच तिच्या दुर्दैवाचा प्रकार व्हावयाचा शिल्लक असेल, तर तो होईलहि !

## स्पेशल काँग्रेस कशी भरेल ?

पण आम्हांला या कायदेशीर—बेकायदेशीरपणाच्या प्रश्नांत फारसें महत्त्व किंवा रहस्य वाटत नाही कारण जें बेकायदा झालें, तेंहि मागाहून कायदेशीर असल्याप्रमाणेच झालें, असें ठरवून घेण्याचा अधिकार सर्वांत वरिष्ठ विधिमंडळाला असतो. याला कायदेकानूंच्या शास्त्रांतच 'व्हॅलिडेशन' म्हणतात. फक्त वरिष्ठ विधिमंडळांत बहुमत मिळालें म्हणजे झालें. वास्तविक ऑ. इं. कमिटी व खुद्द काँग्रेसहि अद्यापि बेकायदा संस्था अशी ठरलेली नाही. यामुळे जमल्यास प्रथम एक व नंतर दुसरी सभा बोलावून निर्णय लावून घेतां येईल. निदान ऑ. इं. काँ. कमिटीचे तरी सभासद निश्चित व पूर्वीच रीतसर निवडणूक झालेले आहेत. खुद्द काँग्रेसचें मात्र तसें नाही. तिला येणारे प्रतिनिधि प्रां. काँ. कमिट्यांनी निवडावे लागतात. आणि या कमिट्या बहुतेक बेकायदा ठरून राहिल्या आहेत. यामुळे त्यांच्यातर्फे असें कांहीच काम करतां येणें शक्य नाही. खुद्द ऑ. इं. काँ. कमिटीची कचेरीहि अणे यांनी बंद केली आहे ! डिक्टेटर लोक आपला अधिकार सांगून पुढे येणार कसे ? आणि त्यांच्या हुकुमांचा अंमल होणार कसा ? तात्पर्य, आहे तो सर्वच गोंधळ आहे. शिवाय एखादी कमिटी बेकायदा ठरलेली नसली तरी ती कमिटी भरूं नये असें सरकारास वाटल्यास, त्यांना हल्लीच्या कायद्याखाली बंदीचा हुकूम काढतां येतो; व तो मोडणें म्हणजे फिरून कायदेभंगच ! याचा अर्थच असा कीं, कोणत्याहि कमिटीची सभा भरणें शक्य व्हावयाचें तर, त्या सभेंत कायदेभंग थांबविण्याचा ठराव निश्चित होईल अशी सरकारची खात्री आधी पटविली पाहिजे ती हटकून कोण कशी पटवूं शकणार ? सरकारानें

पुण्याची परिषद भरूं दिली तिचीं दोन कारणें. ( १ ) सभेच्या तारखा का. भं. तहकुबीच्या मुदतींत ता. ३१ जुलैच्या पूर्वी होत्या. शिवाय (२) परिषदेंत ठराव बहुधा कायदेभंग चळवळ बंद करण्याचा होईल, निदान तसें करण्यास एक संधि देऊन पाहावें, असें सरकाराला वाटलें, म्हणूनच मनाईहुकूम निघाला नाही पण ता. ३१ जुलैनंतर सरकार अशी संधि देईल असें मात्र वाटत नाहीं.

## याला एक तोड

याला खुद्द म. गांधी यांनी एक तोड म्हणून सुचविली आहे. ती अशी कीं ऑ. इं. कॉं. कमिटीच्या ज्या सभासदांना खरोखर व कायदेभंग बंद व्हावा असें वाटत असेल, त्यांनी तें मत आगाऊ कोठे तरी आपल्या सहीनें प्रसिद्ध करावें आणि अशीं अनेक मतें ( ऑ. इं. कॉं. क. च्या सभासदांचीं ) प्रसिद्ध झालीं म्हणजे मग सरकारला कांही अंदाज येऊं शकेल. पण फिरून गांधी म्हणतात की " हा प्रश्न ज्याच्या त्याच्या स्वभावाचा आहे. " म्हणजे जो उपाय म्हणून सुचविला त्याची निंदास्पदताहि त्याच-बरोबर ( गांधींच्या प्रांजळ अप्रांजळपणानें ) त्यांनी सुचविली ! अर्थात् त्यांचा हेतुच हा कीं, ऑल इं. कॉं. कमिटी भरून पुणें परिषदेचे ठराव फिरविले जाऊं नयेत !

## लोकमत स्पष्ट लेखी पाहिजे

पण खरोखरच जर या कमिटीच्या सभा-सदांना गांधी व अणे यांनी आरळीं पत्रकें अनधिकारीपणानें काढलीं आहेत असें वाटत असेल, आणि शिवाय खरोखरच जर त्यांना का. भं. ची चळवळ थांबावी असें वाटत असेल, तर त्यांनी सह्या घेण्याचा उपक्रम अवश्य करावा ! मात्र आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणे नुसती सभा भरविण्याच्या (रेक्विझेशन) विनंतिपत्रकावर किंवा मागणीपत्रकावर सह्या घेऊन उपयोग होणार नाही. तर का. भं. ची चळवळ बंद व्हावी असें स्पष्ट मतप्रदर्शन करणाऱ्याच त्या सह्या पाहिजेत. एरवीं त्यांचा कांही उपयोग होणार नाही. कॉंग्रेस कमिट्या बंद करण्याचा अधिकार अणे व गांधी यांना नसेल, पण कायदेभंग बंद करून त्यांचा तो हुकूम रद्द करून कमिट्यांचें अस्तित्व पुनः प्रस्थापित करण्याचा हेतु सभा बोलावणाराच्या मनाशीं स्पष्ट असला पाहिजे. नाही तर 'तूं ताक नाही म्हणणार कोण? नाही म्हणणारी मी!' असें सासूनें सुनेला म्हणावें त्याप्रमाणें, कायदेभंगाची चळवळ थांबवूं नये असें म्हणणार अणे कोण? तें म्हणण्याचा अधिकार आम्हां ऑ. इं. कॉं. कमिटीलाच आहे! असें प्रतिपादण्याकरिताच हा खटाटोप असेल तर तो व्यर्थ होय. कारण आज आहे या स्थितीत म्हणण्यासारखी कांही सुधारणा न होतां, वरती ऑल इंडिया कमिटी ऑर्डिनन्सेसच्या तडाख्यांत सांपडलेली नाही ती सांपडण्याची पाळी मात्र यावयाची !

## निश्चित निर्णयाची आवश्यकता

तात्पर्य, देशापुढे आज हा रोकडा प्रश्नच आहे कीं, देश यापुढे म. गांधींचें दास्यच अनुसरणार, कीं स्वतंत्र बुद्धि व सारासार विचार यांचा उपयोग करून कांही निराळा मार्ग काढणार? आणि त्याचीं एक खूणच का. भं. चळवळीसंबंधाचा निर्णय ही ठरेल. म. गांधी आणि विचारी लोकमत यांच्या दरम्यान जुळतें काय व न जुळतें काय याची फोड व चिकित्सा आता हवी तितकी झाली आहे. फक्त उरलें आहे तें इतकेंच कीं, ज्या गोष्टींत गांधींचें व विचारी लोकमताचें जुळत नाही तेथे लोक अजून तरी पुढे येऊन, स्पष्ट बोलून, निःसंदेह मत देऊन व गांधींना बाजूस ठेवून, आपल्या मताचा आग्रह तडीला लावणार कीं नाही? म्हणून काय जुळतें काय न जुळतें याचा थोडा उल्लेख करूं.

## विधायक कार्यक्रम हवा

जुळणारी बाब म्हणजे मुख्यतः विधायक कार्यक्रमाची. परवा अहमदाबादेहून गांधीजींनी एक मोठें पत्रक प्रसिद्ध केलें आहे, त्यांत विधा-यक कार्यक्रमाचा बराच तपशील दिला आहे. त्यांतील बहुतेक विषय कोणालाहि मान्य होण्यासारखे आहेत. पण विषय मान्य झाले तरी गांधींची कार्यपद्धति कांही बाबतींत

कित्येकांना मान्य होण्यासारखी नसेल. तेथे कार्यकर्त्यांनी आपली पद्धति चालवूनहि कार्य करण्यास हरकत नाही. एकेक उदाहरणच घेऊं म्हणजे झालें. खादी हें सर्वोत्तम स्वदेशीचें ध्येय. पण त्याबरोबर स्वदेशी गिरण्यांच्या कापडालाहि लोकांनी आश्रय द्यावा, आणि या दोघांनीं मिळून परदेशी कापडाची हकालपट्टी करावी, असें कोणीं प्रतिपादिल्यास त्यास हरकत असूं नये. अस्पृश्यतानिवारण ही करण्यासारखी गोष्ट आहे. पण ती मतपरिवर्तनाने घडवून आणावी किंवा कायद्याच्या आधाराने सिद्ध करावी याविषयींची वादग्रस्तता मान्य करावी; व ज्यांनी त्यांनी आपापल्या आवडत्या उपायांनी तेंच काम केल्यास त्याला वाव व मोकळीक द्यावी. तात्पर्य, विधायक कार्यक्रमाला सर्व पक्षांची सारखीच संमति असून, त्यांपैकीं आपणास जें कांही करतां येईल तें यथाशक्ति करावें अशीच सर्व पक्षांचीहि इच्छा आहे.

## सत्याग्रहाश्रम

या ठिकाणीं साबरमती आश्रम-बंदीविषयीं दोन शब्द लिहिणें अप्रासंगिक होणार नाही. हा आश्रम 'सत्याग्रहाश्रम' नांवाने प्रसिद्ध आहे. त्यांतील लोकांनी करण्याचा सत्याग्रह हें काम नैमित्तिक असून, नित्य काम म्हणजे विधायक कार्यक्रमापैकीं गांधींचीं आवडतीं पण त्यांतल्या त्यांत आश्रमांत होऊं शकतील तीं कामें करणें हें होय. पैकीं गुजराथ विद्यापीठ हें महात्मा गांधींनी सन १९३० च्या चळवळीच्या प्रसंगीं आपण होऊन बंद केलें. आणि आता तर सर्व आश्रमच्या आश्रम ते बंद करणार. वास्तविक आश्रमांतील जुनीं अनुभवी व सराईत माणसें यंदाच्या नव्या चळवळीला अर्पण करून, इतर मुलें व रहिवासी यांना तेथेच आश्रमांत ठेवून त्यांना विधायक कार्यक्रमाचें शिक्षण दिलें असतें तर अधिक बरें झालें असतें. त्या कार्याला लागणारा पैसा महात्माजींजवळ हवा तितका आहे. शिवाय चळवळींतील इतर लोक तुरुंगांत खितपत पडले असतां, आश्रमांतील लोकांनी तेथे राहून भोगलें जाणारें सुख असें काय मोठें आहे कीं, तें भोगण्याचा त्यांना चळवळ चालू असता हक्क नाही असें कोणीं म्हणावें ?

## ही निराशा नव्हे काय ?

पण सत्याग्रहाचें योगशास्त्र आपण नवीन निर्माण केलें व सत्याची प्रयोगशाळा आपण प्रथम स्थापिली, अशी गांधींची भावना असली तरी, जी जी नवी कल्पना किंवा जो जो नवा विचार जगांत प्रकट होतो तो तो आपल्याला उत्पन्न करणाऱ्या मनुष्यव्यक्तीपासून लवकरच स्वतःला सोडवून घेतो, व जगांतील अखिल जनतेच्या अंतःकरणांत शिरून तेथे घर करतो. अर्थात्, सत्याग्रहाची किंवा सत्याच्या प्रयोगाची कल्पना गांधींनी आपल्यापुरती अनुभवली असली तरी, तिचा उगम त्यांच्यापूर्वी झालेला आहे; ती त्यांच्या निधनानंतरहि जगांत वावरत राहणार आहे; व इतरांच्या हातून प्रभावीहि होणार आहे. असें आहे तर आपण काढलेल्या संस्था आपल्याच हाताने त्यांनी कां मोडाव्या याची मीमांसा बरोबर करतां येणार नाही. तोंडाने ते म्हणतात कीं, मी कोणत्याहि गोष्टीबद्दल निराश झालेलों नाही. पण आगीच्या फोफाट्याच्या कड्यांत सांपडलेला विंचू आपल्या नांगीने आपल्यालाच दंश करून घेऊन मरण पावतो असें म्हणतात, त्याप्रमाणें निराशेच्या चक्रांत सांपडलेले गांधीजी हे स्वतःबरोबर स्वकृत गोष्टींचा नाश करण्यास उद्युक्त झाले आहेत, असें कोणीं अनुमान केल्यास त्याला काय बोल लावतां येईल ?

## कायदेभंगाची बाब

महात्मा गांधींचें व इतरांचें ज्या विषयांत जुळतें त्यांत ही स्थिति, मग ज्या गोष्टींत त्यांचें आणि समाजाचें मत जुळत नाही त्यांत त्यांना दोष देण्याला अनेक जागा निघतात यांत काय आश्चर्य ? पैकीं कायदेभंगाची चळवळ व कौन्सिल--प्रवेश या मुख्य दोन गोष्टी घेऊं. यांतील कायदेभंगाची गांधींची हलींची कल्पना ही त्यांची जुनी कल्पना नाही, नवी आहे. ही नवी कल्पना अशी कीं, हिंदी राष्ट्राने काँग्रेसच्या द्वारें कायदेभंगाची चळवळ जी

एकदा दोन वर्षांपूर्वी सुरू करून ठेवली ती स्वराज्य रोकडें प्रत्यक्ष पदरांत पडेपर्यंत कॉंग्रेसच्या नांवानें तशीच चालली पाहिजे. कित्येक देवस्थानांतून अशी चाल आढळते कीं ईश्वरनाम—स्मरणाचा पाहारा चोवीस तास चालू राहावयाचा, विणा खालीं ठेवावयाचाच नाहीं. म्हणजे पाहारा बदलून एका पाहारेकऱ्यानें तो दुसऱ्या पाहारेकऱ्याचे हातीं धावयाचा. गांधीजींची नवीन कल्पना ही अशी एकांतिकच दिसते.

## कायदेभंगमीमांसा

पण कायदेभंगाची उपपत्ति आणि स्वतः महात्मा गांधी यांनीच वेळोवेळीं केलेली कायदेभंगाची चळवळ, हीं दोनहि या आत्यंतिक विधानाला प्रतिकूळ आहेत. खरी उपपत्ति अशी कीं, कायदेभंग हा राष्ट्राच्या रागाचा एक सक्रिय उद्गार होय. आणि मनुष्यमात्राच्या रागाच्या उद्गाराप्रमाणेंच हा राष्ट्राचाहि उद्गार सकारण परंतु नैमित्तिक अतएव मर्यादित कालपावेतों टिकणारा असाच असणार. मनुष्याला राग केव्हा कशानें येईल याचा नियम सांगतां येत नाहीं. राग हा एक विकार आहे. तो विकार मनुष्याचें कोणी नुकसान केलें किंवा अपमान केला म्हणजे प्रदीप्त होतो. पण एकदा प्रदीप्त झाला म्हणजे तो जन्मभर टिकतो असें मात्र नाहीं. त्या झालेल्या हानीचा परिहार होऊन रागाचा उपशम होईल. किंवा हानी, हानीचा परिहार न होतांहि, परिहाराचे बाबतींत प्रयत्न करूनहि आपण असमर्थ ठरलों, असें मनाला पक्कें पटलें म्हणजे मनुष्य आपण होऊनच सुविचारानें शांत होईल.

## क्रोधमीमांसा

दुसऱ्या प्रकारानें, म्हणजे सुविचारानें, आपला राग आपण होऊनच परत घ्यावयाचा तर मुळांत न रागावणें हेंच बरें नव्हे काय? असा प्रश्न यावर कोणास सुचेल. पण त्याचें उत्तर हेंच कीं राग येतो तो प्रायः एकदम येतो, झटक्यानें येतो. यामुळे तो येतो त्या वेळीं आपण स्वतः चुकलों कीं दुसरा चुकला याचें भान कोठे असतें? आपलें बळाबळ, शत्रूचें बळाबळ, व एकंदर परिस्थिति हीं सर्व पाहून पारखून घेण्याला वेळ असतो कोठे? आपली सर्व शक्ति खर्चून मनुष्य प्रयत्न करतो. मग त्यांत त्याला यश येतें किंवा न येतें. यश आलें तर राग सार्थ सफळ झाला म्हणून, व यश न आलें तर सुविचार करावाच लागतो म्हणून, राग ओसरतो. रानांतील वणव्यासारखा रागाचा प्रकार नाहीं. "दाह्याभावात् न खेदात्"—जाळायला कांहीं मिळत नाहीं असें होईल तेव्हाच वणवा थांबावयाचा; पण मनुष्याला 'खेद' म्हणजे थकवा येणें शक्य असतें. तथापि वणव्याला देखील प्रतिकूल वारा सुटल्यास समोर 'दाह्य' म्हणजे जाळण्यासारखी वस्तु असताहि विराम पावावें लागतें. रागावलेल्या मनुष्यालाहि उद्योगास प्रतिकूल व स्वतःला एकंदरीनें हानिकारक अशी परिस्थिति दिसून आली म्हणजे राग आवरावाच लागतो.

## इतिहास काय सांगतो?

इतिहासांत राष्ट्राराष्ट्रांचीं युद्धें अशींच म्हणजे निमित्तानें उद्भवतात; यथाशक्ति तीं चालविलीं जातात; नंतर तह होतात; त्यांत उभयपक्षीं कांहीं साधतें कांहीं फसतें; कांहीं वेळ शांतता नांदते; कदाचित् फिरून युद्ध सुरू होतें; किंवा शत्रु राष्ट्रें मित्र राष्ट्रेंहि बनतात! युरोपांत झालेलीं सात वर्षांचीं, तीस वर्षांचीं, शंभर वर्षांचीं अशीं युद्धें प्रसिद्ध आहेत. हिंदुस्थानांत मोगल-रजपूत, मुसलमान-मराठे, मराठे-इंग्रज, इंग्रज-फ्रेंच अशीं युद्धें अनेक झालीं. पण त्या सर्वांचा इतिहास वर दर्शविल्याप्रमाणेंच झाला. हिंदुस्थानाच्या लोकाचीं स्वराज्यें गेलीं तेव्हापासून त्याचें इंग्रजांशीं एक प्रकारें युद्धच सुरू आहे; व तें युद्ध तें स्वातंत्र्य परत मिळेपर्यंत चालावयाचें असा तात्त्विक सिद्धांतहि आहे. परंतु दरम्यानच्या काळांत वर दर्शविल्याप्रमाणे त्यांच्यांतहि स्थित्यंतरें झालीं आहेत.

## पुणें परिषदेची अपेक्षा

राष्ट्रीय सभा ब्रिटिश साम्राज्यसत्तेचा शत्रुच आहे. म्हणून तिने १९२१ सालीं असहकारितेचें युद्ध पुकारलें; व तें स्वराज्य मिळेपर्यंत चालू राहणार हें म्हणणें तात्त्विक

दृष्ट्या खरें आहे. पण या बारा वर्षांतच स्वतः गांधी यांनीच सरकाराशीं खंडशः अनेक पोट भांडणें सुरू केलीं. त्यांतलें एखादें तहाने मिटलें तर एखादें आपोआप संपलें; एखादें कलाटणी मिळून थांबलें तर एखादें मुद्दाम माघार घेऊन थांबवावें लागलें. या प्रत्येक भांडणाला निमित्त होतें; तें निमित्त मर्यादित कालपर्यंत टिकलें; भांडण या नाहीं त्या रीतीने संपवून घ्यावें लागलें; व सहकारिता नसली तरी निदान ताटस्थ्य, पण प्रत्यक्ष शांतता असा कालावधिहि मधून मधून गेलेला आहे. याच पूर्ववृत्तांताला अनुसरून १९३२ सालीं सुरू झालेली का. भं. ची चळवळ आता थांबवावी, असें लोकमत परवांच्या पुणेपरिषदेंत प्रगट झालें. म्हणून ती थांबविली जाईल अशी अपेक्षा होती. आणि ही अपेक्षा चळवळींत न पडलेल्यांचीच नव्हे तर तींत पडून कसून प्रयत्न केलेल्या कामकऱ्यांचीहि होती.

तथापि म. गांधींच्या अहंकाराला सर्वाधिकारित्वाचें पाठबळ मिळाल्यामुळे ती अपेक्षा फसली. आणि १९२४ सालाप्रमाणे आता त्यांच्या विरुद्ध प्रत्यक्ष बंडाळी करण्याचीच पाळी त्यांच्या अनुयायांवर येऊन ठेपली आहे. स्वराज्य हें कॉंग्रेसचें ध्येय असलें तरी, कायदेभंग हें कॉंग्रेसचें एकच ब्रीद आहे हें म्हणणें खोटें आहे. खरें आहे तें इतकेंच कीं जेव्हा जेव्हा देशांत कोण्या एखाद्या प्रांतांतील, जिल्ह्यांतील, तालुक्यांतील, शहरांतील लोकांचा स्वाभिमान दुखविण्यासारखें अपकृत्य सरकारच्या हातून घडेल, तेव्हा तेव्हा त्या लोकांना कायदेभंग काय करबंदी काय असलीं जालीम प्रतिकाराचीं साधनें उपयोगांत आणण्याचा नैतिक हक्क कॉंग्रेसने राखून ठेवला आहे; आणि राष्ट्रीय सभेला ज्या कोणत्या रीतीने त्या विपन्न लोकांना सहानुभूति दाखवितां येईल, त्या रीतीने ती दाखविण्याचा, व मदत करतां येईल ती करण्याचा, असाहि हक्क राष्ट्रीय सभेने स्वतःकरिता राखून ठेवला आहे. पण १९३२ च्या प्रारंभीं कायदेभंग सुरू करण्यांत आला त्या वेळची स्थिति आज नाही. तीं त्या वेळचीं कांही निमित्तें नाहींशीं झालीं म्हणून, कांही अंशीं लोकांनी प्रयत्न करावयाचा तो भूषणास्पद रीतीने करून झाला म्हणून, आणि कांही अंशीं सरकारची पूर्वीची मनःस्थिति आज राहिली नाही म्हणून— हीं सर्व कारणें लक्षांत घेऊनच पुणें परिषदेंत अनेक लोकांनी चळवळ थांबवावी असा सल्ला दिला. पण तो फुकट गेला याबद्दल वाईट वाटतें. याच्या परिणामांचें भविष्य आज करतां येत नाही, व करण्याचें कारणहि नाहीं. पण गांधींजी हे लोकमतावर जुलूम व शिरजोरी करण्यास प्रवृत्त झाले असें मात्र म्हणणें प्राप्त होतें. कायदेभंग सविनय असेल. पण गांधीजी लोकमताचा अनादर करणारे म्हणून अविनयी ठरले असें म्हणावेंच लागतें.

## महात्माजी व कौन्सिल प्रवेश

महात्माजींशीं देशाचा बेबनाव असणारी दुसरी गोष्ट म्हणजे कौन्सिलप्रवेश. "कौन्सिलाचें नाव काढलें कीं माझें डोकें चक्राकार भ्रमूं लागून घेरी येते " असें विधान त्यांनी आपल्या एका ताज्या मुलाखतींत केलें आहे. पण एकाला जांभई आली म्हणजे ती पाहून दुसऱ्यालाहि येते, त्याप्रमाणे एकाचें डोकें फिरलेलें पाहून सहानुभवित्वाने दुसऱ्याचेंहि डोकें केव्हा केव्हा फिरतें. कौन्सिलसंबंधात गांधींचें हें मस्तकभ्रमण पाहून आमचेंहि डोकें फिरतें. म्हणून आम्ही जास्त कांही न बोलण्याची मुद्दाम सावधगिरी घेतों. आम्हांला आश्चर्य इतकेंच वाटतें कीं, गांधीजींचें डोकें भ्रमून त्याबरोबर कायदेकौन्सिलहि गिरक्या खात असतां, मंदिरप्रवेशाच्या बिलासारख्या प्रसंगीं मात्र गांधीजींना अचूक आपलें बोट, शकुनवंतीच्या कोष्टकांतील मंगलदर्शक घराप्रमाणे, कौन्सिलवर ठवतां येतें; आणि आपल्या चपल शिष्याकडून नेमकी त्या कौन्सिलात उडी घेववितां येते ! पण कौन्सिलच्या विषयासंबंधीं गांधीजींचा व आम्हां इतरांचा इतका वाद आज दहा वर्षें झाला आहे कीं, त्यांना उद्देशून त्या विषयावर एक शब्द लिहिणें हा देखील आम्हाला शीण वाटतो. एखाद्याला

एखाद्या गोष्टीची शिसारी कांही तरी कारणाने येते. कोणाला कोथिंबीर आवडत नाही तर कोणाला कलमी आंबा आवडत नाही ! किंवा एखाद्याची नेत्ररचनाच अशी असते कीं, त्याला एखादा रंगच अजिबात दिसत नाहीं. तशांतलें हेंहि एक व्यंग गांधीजींना जडलेलें आहे इतकें म्हणून सोडून द्यावें हेंच बरें. "लोक कौन्सिलांत जाणार झालेच तर मी एका व्यक्तीनें त्यांना विरोध करून काय होणार?" असें गांधींनी त्याच मुलाखतींत म्हटलें आहे. कदाचित् याचा गांधींच्या मनांतला अर्थ मात्र अगदी उलटहि असेल. तसें उलट अर्थानें ते कित्येकदा बोलतातहि. म्हणून कदाचित् त्यांना असें म्हणावयाचें असेल कीं, "मी एक विरुद्ध आहें असें कळल्यावर मग काय बिशाद आहे कौन्सिल-प्रवेशाची चळवळ होण्याची!" पण आम्हीहि महात्माजींना स्पष्टच सांगतों कीं, आता त्यांनी सगळीच्या सगळी पुण्याई कौन्सिल-प्रवेशाविरुद्ध खर्चली तरी ती चळवळ यशस्वी झाल्याशिवाय राहत नाही ! सरकार 'शत्रूणां बुद्धिनाशोऽस्तु' ही प्रार्थना ईश्वरापाशीं करीत असावें, व ती प्रार्थना ईश्वर सफल करीत असावा, असें धार्मिक बुद्धीनें आजच्या राजकारणाकडे पाहणारांना वाटलें तर त्यांत नवल नाही.

# मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमाची सार्वजनिक कार्यक्षेत्रांतील यशःसिद्धि

[ बारा वर्षांचा त्रोटक वृत्तान्त ]

### १ स्थापना

'ब्रह्मचर्याश्रम–मसूर' ह्या संस्थेची स्थापना सुमारें १२ वर्षांपूर्वी करण्यांत आली. धर्मभास्कर श्री विनायकमहाराज मसूरकर हे ह्या संस्थेचे संस्थापक असून त्यांच्याच साक्षात् नेतृत्वाखाली व मार्ग-दर्शित्वाखालीं ह्या संस्थेचें कार्य चाललेलें आहे.

### २ ध्येय

सर्वत्र वाखाणल्या गेलेल्या प्राचीन आर्षांच्या 'गुरुकुल' पद्धत्यनुसार शिक्षण देऊन शीलसंपन्न, विरक्त, त्यागी, निग्रही व कर्त्या तरुणांचा स्वतंत्र वर्ग निर्माण करणें, आणि आपले थोर-थोर वैदिक ऋषि. स्मृतिकार व श्रीमच्छंकराचार्य, ज्ञानेश्वर, रामदासादि प्राचीन व अर्वाचीन समाजोद्धारक सत्पुरुष व तत्त्ववेत्ते यांच्या महनीय शिकवणीचा लोकांत प्रसार करून त्याप्रमाणें त्यांच्या विचारांना व आचारांना साक्षात वळण लावणें, म्हणजेच हिंदुधर्म व संस्कृति यांचें संरक्षण, संवर्धन व प्रसार करणें, हें ह्या संस्थेचें मुख्य ध्येय आहे.

### ३ कार्यविभाग

वरील धोरणाप्रमाणें संस्थेच्या कार्याचे साहजिकच —(१) वैयक्तिक विकास व (२) सामुदायिक उन्नति–असे दोन मुख्य विभाग पडत असून तसे ते केलेलेहि आहेत. त्यांपैकीं पहिल्याला 'शिक्षण-विभाग' व दुसऱ्याला 'लौकिक विभाग' अशीं नांवें देण्यांत आलीं आहेत.

### ४ लौकिक कार्यक्षेत्रें

वैयक्तिक विकासाच्या दृष्टीनें योजलेल्या अभ्यासक्रमाच्या जोडीला सामुदायिक उन्नतीच्या दृष्टीनें व विद्यार्थ्यांना सार्वजनिक कामाचें प्रत्यक्ष ज्ञान मिळण्याकरिता आश्रमानें पुढील सार्वजनिक कार्यें हातीं घेतलेलीं आहेत—

(१) धर्मजागृति—प्रार्थना, भजन, कीर्तन, जपयज्ञ, पुराण-प्रवचनादि द्वारा.

(२) वाङ्मय-प्रकाशन व प्रसार—तेजस्वी व उद्बोधक वाङ्मयाचें प्रकाशन व त्याचा लोकांत प्रसार ( स्मूल्य व विनामूल्य ).

(३) संघटन व शुद्धिकार्य.

(४) उद्योगमंदिर–बेकार तरुण व शुद्धी-कृतांसाठीं.

(५) बलसंवर्धन-सार्वत्रिक व्यायामाचा प्रसार:

(६) रुग्णशुश्रूषामंदिर—लोकांच्या औषधोपचाराची व दुःखनिवारणाची सोय, औषधालयें, सूतिकागृहें इ.

सामुदायिक उन्नतीच्या दृष्टीनें व आश्रमीय विद्यार्थ्यांना सार्वजनिक कामाचें प्रत्यक्ष शिक्षण मिळावें म्हणून आश्रमानें जीं सार्वजनिक कार्यें हातीं घतलेलीं आहेत त्यांत लौकिक दृष्ट्याहि त्यानें आतापर्यंत किती यश संपादन केलें आहे ते पुढील त्रोटक वृत्तान्तावरून कळून येईल.

(१) **धर्मजागृति**--दक्षिणेस गोकर्णापासून तों

उत्तरेस थेट हरिद्वारपर्यंत व पश्चिमेस डाकोरपासून तो पूर्वेस थेट जगन्नाथपुरापर्यंत आणि विशेष करून महाराष्ट्र, कर्नाटक, गुजराथ, मध्यप्रांत-वऱ्हाड गोमांतक व मोगलाई या सर्व भागांतील शकडो लहानमोठ्या नगरी व गावी आश्रमाच्या निरनिराळ्या शाखांचा आतापर्यंत संचार झालेला असून त्याच्या त्या त्या स्थळाच्या वास्तव्यात नमस्कार, योगासने, करुणाष्टक, भजन सामुदायिक प्रार्थना, जपयज्ञ, कीर्तन, प्रवचन, उत्सव, मुलामुलींचे गानादि धर्म-शिक्षणाचे वर्ग इत्यादि सार्वजनिक कार्यक्रमाच्या



धर्मभास्कर श्रीविनायक महाराज मसूरकर

योगानें लक्षावधि लोकांत धर्माविषयींची जागृति चेतविली गेली आहे. कित्येक ठिकाणीं श्रीमारुति-रायांच्या मूर्तींची स्थापना वा जीर्णोद्धार श्रीमन्महाराजांच्या शुभ हस्तें झालेला आहे. ह्या सर्व हालचालींचा प्रत्यक्ष परिणाम गांवोगांवच्या सहस्रों घरांतून नित्यशः दृष्टीस पडत आहे.

## परधर्मीयांचें आक्रमण

परधर्मीयांच्या सतत चाललेल्या आक्रमणामुळे हिंदुधर्म, हिंदु समाज व हिंदु संस्कृति हीं सांप्रतकालीं चोहोंकडून कशीं घोर संकटांत सांपडलेलीं आहेत याची यथार्थ कल्पना आश्रमानें गांवोगांव हिंडून सर्व समाजाला आणून दिलेली आहे. हिंदूंच्या अजाणतेपणाचा व भाबड्या भोळेपणाचा फायदा घेऊन सांई, फकीर, उलेमा, काजी, हकीम, जादूटोणेवाले, ताईतवाले, मंतरतंतरवाले--अथवा नित्य व्यवहारांतील गरजा पुरविण्याच्या निमित्तानें जरीपुराणेवाले, छत्र्यादुरुस्तीवाले, कुलपकिल्ली-दुरुस्तीवाले, कापूसपिंजारी, खडीवाले, बांगड्यावाले, हिंगमिरीवाले, तऱ्हेवार कापडवाले इत्यादि अनेकविध फेरीवाले अशा नाना प्रकारच्या सोंगांनी आपल्या समाजांत खोलवर शिरून समाजाचा अनेक अंगांनी कसकसा भेद घेत असतात आणि त्या सर्वांच्या योगानें बलात्कार, भ्रष्टीकरण, जाळपोळ, लुटालूट, स्त्री-धनापहार, बाटवाबाटवी, ग्रंथनाश, मूर्तिभंजन, देवळें फोडणें, तीर्थक्षेत्रें मोडणें हे सर्व अनन्वित प्रकार जे शेकडों वर्षे चालत आलेले आहेत ते अद्यापहि जसेच्या तसेच अथवा किंचित् निराळ्या स्वरूपांत पण उलट अधिक भरीनें व सफाईनें कसे अव्याहत चाललेले व आहेत त्याची स्पष्ट जाणीव आश्रमीय प्रचारकांनी गांवोगांवच्या हिंदु लोकांना आजवर करून दिलेली आहे.

## आक्रमणाचा प्रतिकार

तद्वतच आकाशांतल्या बापाकडून तारण करविणारे, मुक्तीचा मार्ग दाखविणारे, पोटापाण्याची सोय करणारे, अनाथांना आश्रयस्थानें उघडणारे, रोगग्रस्तांच्या औषधोपचारार्थ रुग्णालयें काढणारे, सूतिकागृहांच्या द्वारां बाळंतपणाच्या सोयी करून देणारे, शिक्षणदानाचें कार्य अंगावर घेणारे असे ख्रिस्ती मिशनरी परोपकाराच्या मोहक पांघुरणाखालीं नेमकाच आपला कावा साधून हिंदुसमाजाचे ठिकठिकाणीं कसे लचके तोडीत आहेत त्यासंबंधीचीहि भरपूर माहिती आश्रमानें हिंदुलोकांना करून दिलेली आहे. त्यायोगें ठिकठिकाणचा हिंदुसमाज जागृत होतसाता परधर्मीयांचे बेरचसे कावे ते दक्षतेनें पाहूं व ओळखूं लागून त्यासंबंधी योग्य ते उपायहि अवलंबूं लागला आहे.

आश्रमाच्या ह्या प्रकारच्या प्रचारामुळे हिंदु समाजांतील शास्त्री, पंडित, पुराणिक, हरिदास कीर्तनकार, प्रवचनकार, मठपति, महंत इत्यादि पुराणमतवाल्या धर्मप्रचारक वर्गाचेहि डोळे हळूहळू उघडूं लागले आहेत आणि त्यांना लोकांत कोणतें ज्ञान प्रसृत करणें सद्यःकालीं अवश्य आहे त्याची बरीचशी योग्य कल्पना येत चालली आहे. तेहि अलीकडे शुद्धि, संघटन, नमस्कार, व्यायाम यांसारख्या विषयांवर अनुकूल प्रतिपादन करूं लागले आहेत व अल्प प्रमाणावर का होईना पण धर्मभावनोत्तेजक चित्रें, पत्रकें, पुस्तकें इत्यादिकांचाहि आश्रमाच्या धर्तीवर प्रसार करूं लागले आहेत.

## अस्पृश्य वर्गांतील धर्मप्रचार

आश्रमानें आपलें हें धर्मजागृतीचें कार्य समाजांतील इतर वर्गांप्रमाणें अस्पृश्य वर्गांतहि केलेलें आहे. ठिकठिकाणीं त्यांच्या वस्तींत जाऊन आश्रमीय प्रचारक पुराणें किंवा कीर्तनें करतात. तद्वतच आश्रमाचें धार्मिक वाङ्मयहि त्यांच्यांत वाटलें जातें. आश्रमाच्या मुक्कामाच्या शेवटीं जेव्हां सर्व गांवाला भंडारा घालण्यांत येतो त्या दिवशीं हे अस्पृश्य बांधवहि हजारोंनी येऊन प्रसाद घेऊन जातात. परधर्माचा आश्रय घेतलेल्या शेंकडों अस्पृश्यांना आश्रमानें हिंदु धर्मांत परत घेतलें असून तसा आश्रय करावयाला निघालेल्या हजारों अस्पृश्यांना त्यांची समजूत घालून त्यांच्या त्या अविचारापासून परावृत्तहि केलेलें आहे. तसेच केवळ अस्पृश्यांसाठी उभ्या हिंदुस्थानांत एकटें एकच रत्नागिरी येथें बांधण्यांत आलेल्या 'पतितपावनमंदिरां'तील मूर्तीची वैदिक प्राणप्रतिष्ठा करण्याला काशी--नाशिकसारख्या प्रख्यात क्षेत्रींचे कोणीहि शास्त्रीपंडित शंभर-शंभर रुपये दक्षिणा देऊन सुद्धां सिद्ध न होतां एकेकजण पांच-पांचशें रु. मागूं लागल्यामुळे उत्पन्न झालेली २५ ३० ब्राह्मणांची नड आश्रमांतले कार्यकर्ते वे. शा. सं. मोडकशास्त्री व त्यांचे सहकारी यांनी पुढे होऊन एक कपर्दिकहि दक्षिणा न घेतां किंवा आश्रमालाहि कांहींहि देणगी न स्वीकारतां दूर केली व वैदिक पद्धतीनें ती प्राणप्रतिष्ठा केली. त्यावेळीं आश्रमाची सुमारे शंभर एक मंडळी मुद्दाम ह्या स्थापनेसाठीं आपापल्या मुक्कामांवरून आली होती. आश्रमीय प्रचारक आपल्या प्रेमळ व सहानुभूतीच्या उपदेशानें अस्पृश्यांत धर्मप्रेम, शिक्षणाविषयीं आवड. आणि स्वच्छता व आरोग्य यासंबंधीं आस्था निर्माण करतातच; पण त्याबरोबरच त्यांच्या नाना प्रकारच्या अडी--अडचणी समजून घेऊन त्या

निवारण करण्याचा यावच्छक्य तो प्रयत्नहि आश्रम करीत असतो. तद्वतच हाडे, शिंगें, केंस, कातडीं इत्यादि प्रकारचे त्यांचे धंद सद्यःस्थितींत ऊर्जितावस्थेस कसे येतील ह्यासंबंधीं तज्ज्ञाकडून मुद्दाम प्रयोग करून मिळविलेलें अनुभवजन्य ज्ञान आश्रमीय प्रचारक त्यांना सांगतात व त्यांचा संसार सुखानें कसा चालेल त्याचा बरोबर मार्ग त्यांना दाखवितात.

अशा प्रकारें उच्चवर्णीयांपासून तों थेट अस्पृश्यांपर्यंत अथवा राजाच्या राजवाड्यापासून तो थेट रंकाच्या झोपडीपर्यंत हिंदुधर्माचा दिव्य संदेश आश्रमानें आतांपर्यंत अव्याहतपणें नेऊन पोहोंचविलेला आहे व स्वयःकर्तव्याची जाणीवहि ठायींठायीं उत्पन्न करून सोडली आहे.

( २ ) **वाङ्मयाचें प्रकाशन व प्रसार** वाङ्मयप्रसाराच्या संबंधांत ‘ समूल्य ’ व ‘ विनामूल्य’ असे दोन प्रकार आहेत.

त्यांपैकीं ‘ विनामूल्य ’ ह्या विभागांत–१ श्रीमारुतिराय, २ श्रीसमर्थ रामदासस्वामी, ३ भगवान् श्रीकृष्ण, ४ भगवान् श्रीरामचंद्र, व ५ श्रीगजानन यांचीं स्फूर्तिप्रद चित्रें आणि १ मनाचे श्लोक, २ मनःप्रभाव, ३ समर्थकृपेचीं वचनें, ४ मनोविकास, ५ मनःशुद्धि, ६ सुभाषितमौक्तिकानि, ७ श्रीकृष्णसंदेश, ८ भक्तिसुधा, व ९ नित्योपासना हीं लहान लहान पुस्तकें यांचा अंतर्भाव होतो. चित्रें आतांपर्यंत सुमारें ५ लाख व हीं पुस्तकें २ लाख वाटण्यांत आलीं. नित्यपाठाला अत्यंत उपयोगी अशा तेजस्वी, उद्बोधक व पवित्र अवतरणांचा वेगवेगळा निवडक संग्रह या सर्व पुस्तकांतून केलेला आहे. हें वाङ्मय प्रत्यक्ष द्रव्यदृष्ट्या जरी ‘विनामूल्य’ असलें तरी दुसऱ्या रूपानें मात्र त्याचें मूल्य घेण्यांत येत असतें. हें मूल्य म्हणजे नमस्कार व पठन हेंच होय. पुस्तकपरत्वें नित्यशः १२, २४, ३६, ४८ व ६० असे नमस्कार व पठन असें भिन्न भिन्न मूल्य ठरविलेलें असतें. अर्थात् वर लिहिल्याप्रमाणें आतांपर्यंत लाखों चित्रें व पुस्तकें जीं वाटण्यांत आलेलीं आहेत तीं सर्व हें मूल्य घेऊनच होत.

### ‘ लक्ष दासबोध ’

ह्या व्यतिरिक्त श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या सुप्रसिद्ध ‘ श्रीदासबोध ’ ग्रंथाच्या एक लक्ष प्रती अशा विनामूल्य वांटण्याचा आपला संकल्प आश्रमानें प्रथितपणेंच घोषित केलेला आहे. एक वर्षभर प्रतिदिनीं १२० सूर्यनमस्कार व त्याच अवधींत ग्रंथाचीं तेरा पारायणें करण्याचें प्रतिज्ञापत्रक लिहून देणाऱ्या कोणाहि स्त्रीपुरुषाला हा ग्रंथ विनामूल्य देण्यांत येतो. या नियमाप्रमाणें आतापर्यंत सुमारें १५ सहस्रांवर प्रती वाटण्यांत आल्या. आणि पुढे ३५ सहस्र प्रतींचें सर्व सामुग्री मसूर येथें येऊन सिद्ध होते न होते तोंच आश्रमावर जप्तीचें संकट कोसळून तें कार्य तसेंच पडून राहिलें. आता तें संकट निवारण झालें असल्यामुळ तें कार्य पुनश्च लवकरच चालू होईल. ह्या प्रसाराकरिता ‘ श्रीमत् लक्ष दासबोध ’ ह्या नांवानें ग्रंथाची स्वतंत्रच प्रत काढलेली आहे. ग्रंथाची प्रत घेऊन त्याकरितां लिहून दिलेली प्रतिज्ञा ज्यांच्या हातून पुरी करण्यांत येते त्यांना पारितोषिक म्हणून मराठी भाषांतरासह श्रीमत् गीतेचें एकेक पुस्तक देण्यांत येतें. अशीं गीतेचीं पुस्तकेंहि आतापर्यंत सहस्रों देण्यांत आलेलीं आहेत. इष्ट प्रतिज्ञेसह हा दासबोध घेणाऱ्या स्त्रियांची संख्याहि शेंकड्यांनीं मोजतां येण्यासारखी आहे.

### मासिकाचें कार्य

आता ‘समूल्य’ अर्थात विक्रीच्या वाङ्मयाकडे वळूं. उपरोक्त दासबोधग्रंथांतील ओजस्वी शिकवण लोकांना समजावून देण्याकरिता ‘श्रीदासबोध’ ह्याच नांवाचें एक स्वतंत्र मासिकहि चालविण्यांत आलें व तें सतत ५ वर्षे पर्यंत चालू होतें ह्या मासिकाच्या ग्राहकांची संख्या २ सहस्रांच्या खालीं कधींच आली नाही. हे मासिक सरकारी शाळा व ग्रंथालयें यांतून चालू करण्याविषयीं सरकारकडूनहि प्रशंसिलें गेलें होतें. मध्यंतरीं आश्रम जप्त झाल्यामुळे हें मासिकहि बंद ठेवणें अपरिहार्यच झालें.

मासिकांत चालू झालेला ‘ श्रीमत् दासबोधा ’ च्या रहस्याचा व विवरणाचा मुख्य ग्रंथ सवडीप्रमाणें स्वतंत्र ग्रंथरूपानेंच प्रसिद्ध करण्याचा आश्रमाचा विचार आहे.

उपरोक्त ‘ श्रीदासबोध ’ मासिकांतून निरनिराळ्या वेळीं प्रसिद्ध झालेले—१ समर्थांचें पुण्यस्मरण, २ बजरंग बली की जय, ३ सती सावित्री, ४ शिवकल्याण राजा, ५ धर्मवीर कुमार हकीकतराय व ६ शिवाजीचें जयसिंगास पत्र—हे स्फूर्तिदायक व चारित्र्योद्बोधक लेख एक स्वतंत्र ‘ उद्बोधनमाला ’ काढण्यांत येऊन तिचीं पुष्पें म्हणून पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आलीं. त्यांतील कांहींना ग्रंथोत्तेजक संस्थांकडून पारितोषिकेंहि मिळालेलीं आहेत. कांहींच्या द्वितीयावृत्तीहि निघाल्या आहेत. हीं सर्व पुस्तकें विक्रीकरितां उपलब्ध आहेत.

ह्या ‘ उद्बोधनमाले’तला सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे ‘गोमांतक शुद्धीचा इतिहास’ हा होय. ह्याच ‘उद्बोधन मालें’तील पुढील संकल्पित पुष्पें म्हणजे १ झांशीची महाराणी लक्ष्मीबाई, २ श्रीनिवृत्तेश्वरी

व ३ सूर्योपासना हीं तीन पुस्तकें लवकरच प्रसिद्ध करण्यांत येतील.

( ३ ) संघटन—आजकाल सर्वतोपरी विस्कळित व दुर्बळ झालेला हिंदुसमाज परस्पर ऐक्यभाव व प्रेम यांची वाढ होऊन सुसंघटित, एकशिस्तीचा व बलवीर्यशाली व्हावा ह्या हेतूने 'भारतीय समर्थ संघ' स्थापन करून अनेक स्थलीं त्याच्या निरनिराळ्या शाखा काढण्यांत आल्या होत्या; आणि त्यांच्याकडून त्या-त्या ठिकाणीं आखाडे व नमस्कारमंडळें काढवून तद्द्वारा शरीरबलसंवर्धन; दासबोधमंडळें काढवून तद्द्वारा दासबोधाची चर्चा व उद्बोधक वाङ्मयाचें वाचन; उत्सवमंडळें काढवून तद्द्वारा दासनवमी, शिवजयंति, हनुमज्जयंति यांसारखे महत्त्वाचे उत्सव; तसेंच वाचनालयें काढणें, साक्षरतेचा प्रसार करणें, गांवांतील परकीय आक्रमणाच्या आपत्तींचा शोध घेणें व तन्निवारणार्थ उपाय योजणें, स्वदेशीचा प्रसार करणें अशा प्रकारचीं विविध कार्यें करण्यांत आलीं. त्याप्रमाणेच आश्रमाच्या शाखा ज्या–ज्या गांवांतून फिरल्या त्या–त्या बहुतेक गांवांतून भंडारा अर्थात् महाप्रसादाचीं गांवभोजनें घालण्यांत आलीं. या भंडाऱ्यांतून दहा–दहा सहस्र माणसें जमत असत. गांवांतील लोकांचीं आपापसांतील पिढ्यान् पिढ्यांचीं भांडणें, तंटे, बखेडे, दुही इत्यादि सर्व भेदभाव पार विसरवून त्यांना एकत्र आणण्याच्या आणि त्यांच्यांत परस्पर प्रेमभाव व एकोपा उत्पन्न करण्याच्या कामीं या भंडाऱ्यांचा उपयोग आश्रमाला चांगलाच करून घेतां येत असे.

( ४ ) शुद्धिकार्य—आश्रमाचे अधिकारी विद्यार्थी गांवोगांव संचार करीत असतांना तेथील सर्व लोकांना ते हिंदुधर्माचीं प्रभावी तत्त्वें समजावून सांगतात आणि परधर्मांत गेलेल्यांपैकीं ज्यांना आपल्या पूर्वजांच्या पूज्य हिंदुधर्मांत परत येण्याची इच्छा असेल त्यांना त्या दृष्टीनें सर्व प्रकारचें साहाय्य करतात. त्या संबंधांत आश्रमाला दुहेरी काम करावें लागत असतें. एक ख्रिस्ती व मुसलमान झालेल्या लोकांना हिंदुधर्माची महती व श्रेष्ठत्व पटवून देणें आणि दुसरें त्या–त्या स्थानच्या आपल्या हिंदुसमाजाचें मत त्या शुद्धीकृतांना आपल्यांत समाविष्ट करून घेण्याला अनुकूल करणें तसेंच नाना अडचणीआपत्तींच्या पायीं हिंदुधर्माचा त्याग करून ख्रिस्ती वा मुसलमान होऊं निघालेल्या लोकांना त्यांच्या त्या आत्मघातकी विचारापासून परावृत्त करण्याचें कामहि आश्रमीयांना अनेक स्थलीं करावें लागतें. ह्या शुद्धीकरणाच्या कार्यांत आश्रमानें साऱ्या दक्षिण हिंदुस्थानांत तरी असाधारण यश प्राप्त केलेलें आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. आज ४०० वर्षांवर पोर्तुगीज राजसत्तेखालीं अर्ध्याहून अधिक लोक ख्रिस्ती बनलेल्या गोमांतक प्रांतांतच गेल्या ६ वर्षांत दहा सहस्रांवर ख्रिस्ती लोक आश्रमीयांनीं हिंदु केले आहेत. तसेंच इतर अनेक भागांतहि आश्रमानें हें कार्य केलेलें असून त्याप्रमाणें प्रत्यक्ष सातारा जिल्ह्यांत सातशेहून अधिक व मुंबई-वसई भागांत सुमारें शंभर शुद्धीकरणें आतापर्यंत घडवून आणलीं आहेत. वऱ्हाड–मध्यप्रांत, खानदेश इत्यादि भागांतहि अशीं थोडीफार शुद्धीकरणें आश्रमाकडून करण्यांत आलेलीं आहेत.

( ५ ) उद्योगमंदिर—सध्याच्या वाढत्या बेकारीच्या काळांत उद्योगधंद्यांची भक्ती व आवड असणाऱ्या तरुणांची सोय करणें हेंहि आश्रमानें आपलें कार्य ठरविलेलें असून त्याकरितां औद्योगिक विभाग म्हणून एक उद्योगमंदिर आश्रमानें स्वतंत्रपणें चालविलें आहे. त्या औद्योगिक विभागांत बेकार तरुणांना कांहीं लहानसहान धंद्यांचें प्रत्यक्ष ज्ञान देण्यांत येतें व शुद्धीकृतांची सोय प्रामुख्यानें करण्यांत येते. ह्या उद्योगमंदिराच्या वतीनें एक 'प्रपंच विभाग' म्हणून उघडण्यांत आलेला होता व त्यांत ठिकठिकाणच्या सुमारें पन्नास-एक विद्यार्थ्यांना मुद्रणाचें व ग्रंथबांधणीचें शिक्षण देण्यांत आलें. या विद्यार्थ्यांच्या शिक्षणाचा व राहण्याजेवणाचा सर्व खर्च आश्रमानेंच केला.

( ६ ) बलसंवर्धन—आपल्या हिंदु समाजांत शक्तीचा व आरोग्याचा अलीकडे झपाट्यानें ऱ्हास होत असल्यामुळें आश्रमीय विद्यार्थी आपल्या गांवोगांवच्या संचारांत इतर कार्यांबरोबरच शारीरिक बलसंवर्धनाची आवश्यकता लोकांना पटवून देऊन त्यांच्यांत सूर्यनमस्कार, योगासनें, लाठी, लेजीम इत्यादि व्यायामाचा प्रसार करतात. आश्रमाच्या शाखा ज्या–ज्या गांवीं जातात त्या–त्या गांवांतील शेंकडों मुलांमुलींकडून नमस्कार घालून घेण्यांत येतात. वर उल्लेखिलेलें 'विनामूल्य' वाङ्मय जें आतांपर्यंत वांटण्यांत आलें आहे त्याच्या योगानें लाखों मुलें नमस्कार घालूं लागलीं आहेत. स्त्रियांतहि हा सूर्यनमस्काराचा प्रसार करण्यांत आलेला आहे. प्रत्यहीं १२० नमस्कार घालणाऱ्या स्त्रिया तर शेंकडोंच आहेत, पण प्रत्यहीं १२०० (बाराशें) नमस्कार नेमानें घालणाऱ्या १८ स्त्रियांची नोंद आश्रमाजवळ आहे. तसेंच अलीकडे गांवोगांवीं दंगे होऊन गुंडांच्या अत्याचाराना आपल्या आयाबहिणी बळी पडतात, देवळें

फोडली वा भ्रष्टविलीं जातात, व आणखीहि नाना प्रकारचे घोर अनन्वित अत्याचार वरचेवर होतात. अशा संकटसमयीं आपद्ग्रस्तांना आवश्यक तें साहाय्य देऊन आपल्या प्राणप्रिय देव-धर्म संस्कृतीचें संरक्षण व्हावें एतदर्थ 'बलोपासक' मंडळाची स्थापना करण्यांत आली होती व ह्या उद्दिष्टासाठीं आपले प्राण वेंचण्यास सिद्ध होणारीं लाखों माणसें निर्माण करण्याचें काम हें मंडळ करीत होते.

(७) **रुग्णशुश्रूषामंदिर**—ठाणें जिल्ह्यांतील डहाणू येथें आश्रमानें सवादोन वर्षांपूर्वी एक रुग्ण-शुश्रूषा मंदिर काढलेलें असून तें आपलें अंगीकृत कार्य अत्यंत समाधानकारक रीतीनें करीत आहे. ख्रिस्ती मिशनरी औषधोपचाराच्या मिषानें जीं अगणित माणसें आपल्या हिंदु समाजांतून सारखी ओढून नेत आहेत त्याला शक्य तितका आळा घालावा हा उद्देश हें कार्य हातीं घेण्यांत प्रमुख आहे. स्थानिक भगिनीवर्ग गांवोगांवीं हिंडून घरोघर भिक्षा मागतात, व त्या भिक्षेवरच मुख्यत्वें करून प्रस्तुत मंदिराच्या खर्चाची व्यवस्था होते. आजपर्यंत ११० सूतिकांची येथून सुखरूपपणें प्रसूति झाली व पांच-सहा हजार लोकांना औषधोपचार करण्यांत आला. शेकडों प्रतिष्ठित व सन्मान्य व्यक्तींनी या संस्थेला भेट देऊन तिच्या कामाविषयीं समाधान व्यक्त केलें आहे. खुद्द गव्हर्नरसाहेबांच्या पत्नी लेडी साइक्स यांनीहि मुद्दाम भेट देऊन संस्थेला एक 'स्टर्लायझर' अर्पण केला आहे. या स्टर्लायझरची किंमत जवळ जवळ २५० रुपये आहे.

### जमीच्या काळांतील कार्य

संस्था ह्या नात्यानें सर्व आश्रमीय विद्यार्थी एकसूत्रित व सुसंघटित असतांना निरनिराळ्या सार्वजनिक कार्यक्षेत्रांत त्यांनी कोणत्या प्रकारचें प्रशंसनीय यश मिळविलें तें येथवर निवेदन केलें. परंतु गेल्या दीड वर्षाच्या काळांत संस्थेवर बेकायदेशीरपणाचें अनपेक्षित गंडांतर येऊन संस्थेंतील विद्यार्थ्यांना संस्था ह्या नात्यानें एकत्र राहणें अशक्यच झालें व त्यांची सर्वत्र पांगापांग झाली. तथापि आश्रमीय विद्यार्थ्यांना व्यक्ति-विशिष्ट व सामुदायिक ह्या दोनहि अंगांचें देण्यांत आलेलें शिक्षण त्यांच्या अंगीं कितपत मुरलें आहे, याची प्रत्यक्ष परीक्षा ह्या आणीबाणी-च्या काळांतच उत्कृष्ट रीतीनें झाली. ठिकठिकाणीं पांगलेल्या ह्या मंडळींनीं केवळ आपापल्या वैयक्तिक दायित्वावर महाराष्ट्र, गोमांतक, वऱ्हाड, मध्यप्रांत, मोंगलाई इत्यादि भागांत आपलीं धर्मप्रचाराचीं नियत कार्यें धडाडीनें चालू ठेविलींच होतीं. त्यांत गोमांतकांतील तीव्र विरोधाशीं झगडून महत्प्रयासानें घडवून आणलेलीं १००० (एक सहस्र) शुद्धी-करणें, 'गोमांतक व्यायाम प्रसारक मंडळा'ची स्थापना करून तद्द्वारां ८-१० स्थळीं चालविलेले शारीरिक शिक्षणाचे वर्ग, सातारा जिल्ह्यांतील अंक-लखोप गांवच्या १०८ ख्रिस्ती लोकांचें शुद्धीकरण, मुंबईस केलेली 'महाराष्ट्ररुग्णशुश्रूषामंदिरा'ची स्थापना व त्याचें कार्य, बोरिवली येथील 'हिंदुधर्म-शिक्षणाचा वर्ग' इत्यादि कार्यें विशेष महत्त्वाचीं म्हणून उल्लेखनीय होत.

आता आश्रम संकटांतून मुक्त झाला असल्याकार-णानें आश्रमीय मंडळी आपल्या उज्ज्वल ध्येयानुसार पूर्वींच्याच तेजस्वी बाण्यानें आणि पूर्वींहूनहि चढत्यावाढत्या उत्साहानें व धडाडीनें आपल्या नाना-विध कार्यक्षेत्रांत 'पुनश्च हरिः ॐ' म्हणून पुनरपि उडी ठोकीत आहेत. यापुढील त्यांचें यश अर्था-तच भावी काळच सांगूं शकणार!

## तेरा वर्षांनी पुनः टिळक !

पुण्याहून अहमदाबादेस गेल्यापासून म. गांधी रणछोडभुवनांत राहत असत. तेथे त्यांस सोमवार ता. ३१ जुलै रोजीं मध्य-रात्रीनंतर डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, डिस्ट्रिक्ट पोलीस सुपरिंटेंडंट व त्यांच्या हाताखालील इतर पोलीस अधिकारी यांनी जाऊन पकडलें व जवळच साबरमतीच्या तुरुंगांत नेऊन ठेवलें. या खेपेस त्यांना सन १८१८ च्या रेग्यूलेशनखाली अटक झाली नसून त्याऐवजीं वटहुकुमी कायद्याचें तिसरें कलम लागू केलें असल्यामुळे त्यांजवर प्रथम नोटीस बजाव-ण्यांत येईल व ती नोटीस त्यांनी मोडल्यावर मॅजिस्ट्रेटपुढे खटला चालून त्यांस दीड—दोन वर्षांची शिक्षा होईल असा अंदाज आहे. साबरमतीच्या तुरुंगातून त्यांची रवानगी थोड्याच अवकाशांत येरवड्याच्या तुरुंगाकडे झाली. येरवड्यास ते बुधवारीं दुपारीं आले असून त्यांजवरील पुढचे मामुली संस्कार अद्यापि सुरू व्हावयाचे आहेत. सारांश, सुमारें तीन महिन्यां-पूर्वी गांधीजी ज्या तुरुंगांतून बाहेर पडले

त्याच तुरुंगांत ते आता फिरून कोंडले जाणार !

गाधीजी आफ्रिकेंतून हिंदुस्थानांत आल्यावर त्यांजवर कारागृहवासाचे अनेक प्रसंग ओढवले. त्या सर्व प्रसंगांपेक्षा या प्रसंगाची परिस्थिति पुष्कळच वेगळी आहे. ही वेळ गांधींनी आपल्या मतानें निर्वाणीची ठरविली आहे. सरकार जसे हट्टाला पेटलें आहे तसे गांधीहि हट्टाला पेटले असून कायदेभंगाची चळवळ बिनशर्त थांबवून सरकाराला शरण जाण्यापेक्षा जन्माचा कारागृहवास आला तरी तो पत्करला असा मनाचा निर्धार करून त्यांनी सांप्रत तुरुंगाची वाट धरली आहे. म्हणूनच पुण्याहून अहमदाबादेस गेल्यावर त्यांनी आपल्या सार्वजनिक संसाराची शेवटची वासलात लावली. आपल्या हातांनी लहानाचा मोठा केलेला व पुत्रप्रेमाने वाढविलेला साबरमतीचा सर्वश्रुत सत्याग्रहाश्रम त्यांनी मोडला व आश्रमवासी जनांना जड अंतःकरणाने निरोप दिला. म. गांधी विरक्ताप्रमाणे वागत असले तरी त्यांचें हृदय स्नेहरसाने ओथंबलेलें आहे. या कारणाने शकुंतलेचा विरह सहन न झालेल्या कण्व मुनीस ती नजरेआड होतांना दुःखाने ऊर फाटून जें वैक्लव्य प्राप्त झालें त्याचा अनुभव कण्व मुनीहूनहि अधिक प्रमाणांत गांधी मुनींना आला असेल यांत शंका नाही.

म. गांधींनी जुलै महिन्याच्या अखेरीस साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमाचें शेवटचें दर्शन घेतलें. त्या वेळीं हिंदी राजकारणाचेंदेखील हें दर्शन शेवटचेंच होय हा विचार एकसारखा घोळून त्यांचें हृदय विदीर्ण करीत नसला तरच आश्चर्य. हा विचार त्यांच्याच काय पण त्यांच्या लाखों देशबांधवांच्या डोक्यांत खेळत असून त्यांना या क्षणीं खिन्न बनवीत आहे. ता. १ ऑगस्ट हा दिवस हिंदुस्थानाच्या अलीकडील राजकारणांत अत्यंत महत्त्वाचा गणला जाईल. तेरा वर्षांपूर्वी याच दिवशीं लो. टिळकांनी आपला नश्वरदेह मुंबईतील चौपाटीच्या वाळवंटावर ठेवला. तेरा वर्षांपूर्वी याच दिवशीं म. गांधींनी लो. टिळकांचें राजकारणांतील स्थान पटकावून असहकारितेचा झेंडा उभारला. एक तेजोगोल अस्तास जावा व दुसरा तेजोगोल उदय पावून त्याने भूगोल प्रकाशित ठेवावा त्यांतलाच हा प्रकार झाला. टिळक व गांधी यांजमधील स्वभाववैचित्र्य व मतवैचित्र्य लक्षांत घेतां ते उभयतां मिळतें घेऊन किती दिवस एकत्र वागले असते याची शंकाच आहे. या दृष्टीने टिळकांनी इहलोक सोडून गांधीजींना राजकारण एकतंत्री हाकण्यास रान मोकळें केलें असेंच म्हटलें पाहिजे. त्यामुळे गांधीजींचा अभिनव प्रयोग बिनहरकत शेवटास जाण्यास सर्वस्वी मदतच झाली हें उघड आहे.

टिळक व गांधी यांजमधील फरकच दाखवावयाचा तर तो थोडक्यांत पुढीलप्रमाणे दाखवितां येईल. टिळक प्रतिसहकारितावादी होते, गांधी असहकारितावादी आहेत. टिळक स्वदेशी कापडाचे पुरस्कर्ते होते, गांधी फक्त खादीचेच पुरस्कर्ते आहेत. टिळक 'शठं प्रति शाठ्यम्' या तत्त्वाचें प्रतिपादन करणारे होते, गांधी 'शठं प्रति सत्यम्' या तत्त्वाचें प्रतिपादन करणारे आहेत. टिळक शत्रूवर चोहोंकडून हल्ला करून त्यास गांगरून सोडावें म्हणणारे होते, गांधी कित्येक मान्यांच्या जागा निषिद्ध समजून रिकाम्या टाकणारे आहेत. टिळक मर्यादित स्थळीं व काळीं कायदेभंगाचा अवलंब करणारे होते, गांधी सरोस कायदेभंगानेच स्वराज्य मिळवूं पाहणारे आहेत. टिळकांचें साध्य स्वराज्य होतें, गांधींचें साध्य विश्वबंधुत्व व अहिंसा हें आहे. अशा रीतीने टिळक व गांधी या उभयतांच्या धोरणांत तात्त्विक व व्यावहारिक फरक मोठा असल्यामुळे गेल्या तेरा वर्षांत म. गांधींनी लो. टिळकांचें राजकारण मारून किंवा अर्धमेलें करून आपल्या राजकारणाची घडी बसविल्याचें प्रत्ययास आलें.

सत्याग्रह व कायदेभंग हे एकाच तत्त्वाचे पर्यायवाचक शब्द मानल्यास हा तेरा वर्षांचा काळ असहकारिता व कायदेभंग या दोन चळवळींनीच व्यापला होता असें समजण्यास हरकत नाही. या दोन्ही चळवळी हिंदी राजकीय क्षेत्रांत नवीन

व आकर्षक वाटल्यामुळे त्या स्वराज्याच्या त्वरित प्राप्तीच्या आशेने जनतेने बऱ्याच मोठ्या प्रमाणावर अवलंबिल्या. असहकारितेच्या चळवळीपेक्षाहि कायदेभंगाच्या चळवळीचा प्रवेश बहुजनसमाजांत तळापर्यंत झाला. परंतु ही चळवळ केवळ तुरुंगांत जावयाचीच असल्याने सरकारास घाबरून सोडण्याचें सामर्थ्य तिच्यांत नव्हतें. मामुली कायद्यांनी तुरुंगांत येणारांना दहशत बसत नाही असें अनुभवाअंतीं दृष्टीस पडल्यावर त्यासाठी सरकारास नवे वटहुकूम बनवावे लागले इतकेंच.

या चळवळीचें स्वरूपच इतकें चमत्कारिक होतें कीं तुरुंगांत जाणारांना आपण विशेष प्रकारची देशसेवा करीत आहों या भावनेने समाधान लाभावें व उलटपक्षीं सरकारानें मात्र आपल्या राज्यास बिलकुल धक्का नाही या खात्रीने निर्धास्त राहावें. ही चळवळ सरकाराच्या दृष्टीने धुक्याप्रमाणे रम्य होती, पण समुद्राप्रमाणे बुडविणारी नव्हती; राळेप्रमाणे झगझगीत होती, पण अग्नीप्रमाणे दाहक नव्हती; वरातीप्रमाणे शोभिवंत होती, पण सेनेप्रमाणे भीतिप्रद नव्हती. याचा परिणाम असा झाला कीं ती चळवळ करतां करतां लोक जितके कंटाळले, तितकें ती मारता मारता सरकार मात्र कंटाळलें नाही आणि जनतेच्या कोट्यवधि रुपयांची धूळधाण उडाली तरी स्वराज्य मिळालें नाही. पुण्याच्या परिषदेंत चळवळ सुरू ठेवण्यास कार्यकर्त्यांनी याच कारणासाठी पाठबळ दिलें नाही व म.गांधी सर्वस्वाचा त्याग करून तुरुंगांत जावयास निघाले असताहि याचमुळे जनतेंत उत्साह उत्पन्न झाला नाही.

अशा रीतीने म. गांधींच्या राजकारणास तेरा वर्षांचा भरपूर काळ मिळाला व त्यांच्या राजकारणावरील जनतेचा विश्वास उडाला. या दृष्टीने ता. १ ऑगस्ट १९२० रोजीं म. गांधींनी जें युग प्रवर्तित केलें तें ता. १ ऑगस्ट १९३३ रोजीं म्हणजे बरोबर तेरा वर्षांनी संपलें असें समजण्यास हरकत नाही. ता. १ ऑगस्ट १९२० रोजींच लो.टिळकांनीहि आपला देह चौपाटीच्या दहनभूमीवर ठेवून ते अन्तर्धान पावले. ते मेले त्याबरोबर त्यांचें राजकारणहि मेलें असें पुष्कळांस हळूहळू वाटूं लागलें होतें. परंतु ता. १ ऑगस्ट १९३३ रोजीं त्याच दहनभूमींतून व त्याच भस्मीभूत देहांतून ब्राँझ धातूची मूर्ति प्रकट झाली. म. गांधींची मूर्ति राजकीय रंगभूमीवरून पडद्याआड होणार याचीं पूर्व चिन्हें दृष्टीस पडताच जनतेला लो. टिळक आठवले व ते मूर्तस्वरूपाने तिच्या डोळ्यांसमोर उभे राहिले. त्यांच्या पुतळ्याचा अनावरणसमारंभ लो. ना. माधवरावजी अणे यांनी आपल्या हातांनी साजरा केला, तेव्हा जी भाषा त्या अचेतन पुतळ्याला बोलतां येत नव्हती ती रा.अणे, डॉ. देशमुख, जम्नादास मेहता, मि. हॉर्निमन इत्यादिकांनी बोलून दाखवून टिळकांच्या राजकीय धोरणाची उपयुक्तता व आवश्यकता जनतेस पटवून दिली.

म. गांधींच्या राजकारणांतील मुख्य भाग स्वावलंबनाचा आहे. लो. टिळकांनी जनतेला-विशेषतः आपल्या कारकीर्दीच्या अखेरीस, स्वावलंबनच शिकविलें. परंतु गांधींनी जनतेस त्या मंत्राची संथा देऊन ती तिजकडून घोकून घोकून पाठ करवून घेतल्यामुळे स्वावलंबनाच्या तालमींत राष्ट्र आता चांगलेंच तरबेज झालें आहे. स्वावलंबनाने एक प्रकारची हिंमत, उत्साह व कर्तृत्वशक्ति उत्पन्न होत असते. हे गुण जनतेच्या अंगीं बाणले असल्याने त्या गुणांना टिळकांच्या धोरणाची, दूरदृष्टीची, सावधगिरीची, तारतम्याची व सारासार विचारांची जोड दिल्यास सद्यःस्थितींतहि राष्ट्राला निराश होण्याचें कारण नाही. टिळकांच्या काळांत ज्या गुणांची राष्ट्रांत उणीव होती ती गांधींच्या कर्तबगारीने भरून निघाली याबद्दल राष्ट्राने त्यांचे जितके उपकार मानावे तितके थोडेच आहेत. टिळक व गांधी हीं राष्ट्राचीं दोन भिन्न अंगें असलीं तरी तीं पूरक होत. ता. १ ऑगस्ट रोजीं गांधींच्या चरित्रांतील पूरक तेवढेच भाग उचलून व त्यांची टिळकांच्या राजकारणाला जोड देऊन राष्ट्राने आपल्यापुढील मार्ग चोखाळला असता त्याला स्वराज्याचा मुक्काम गांठण्यास फारसा विलंब लागणार नाही. अशा प्रकारें गांधींच्या तेरा वर्षांच्या कार

कीर्दीनंतर टिळकांच्या राजकारणाची गरज भासूं लागल्यामुळे लो. टिळक मुंबईच्या चौपाटीवरील दहनभूमींत पुनः प्रकट झाले व त्यांच्या तत्त्वांचा जयजयकार पुनः देशभर ऐकूं आला.

# लोकमान्यांचें मुंबईतील स्मारक

## चौपाटीवरील भव्य पुतळा

मंगळवार ता. १ ऑगस्ट १९३३ रोजीं, मुंबईतील चौपाटीवर, राष्ट्रीय सभेचे सन्माननीय अध्यक्ष **श्री. माधवरावजी** अणे यांच्या हस्तें लोकमान्यांच्या भव्य पुतळ्याचा अनावरणसमारंभ मोठ्या थाटानें व गंभीरपणानें करण्यांत आला. लोकमान्यांच्या पुतळ्यावरील कापडाचें आवरण ज्या वेळीं दूर करण्यांत आलें त्या वेळीं हजारों लोकांच्या अंतःकरणांतील लोकमान्यांबद्दलचा भक्तिभाव उचंबळून येऊन तो त्यांच्या मुखावाटें 'लोकमान्य टिळकमहाराजकी जय'च्या गगनभेदी निनादानें व्यक्त झाला, व सर्वांनी अत्यंत नम्र भावानें लोकमान्यांच्या स्वर्गीय आत्म्यास अभिवंदन केलें! त्या वेळचें दृश्य अवर्णनीय आहे. तेरा वर्षांनंतर लोकमान्यांनी आपल्यास प्रत्यक्ष दर्शन दिलें अशीच भावना उत्पन्न झाल्यामुळे सर्वांना एक प्रकारची धन्यता वाटली!

## समारंभाची उत्तम व्यवस्था

श्री. सीलम यांच्या नेतृत्वाखालीं स्मारक कमिटीने या समारंभाची व्यवस्था उत्तम ठेविली होती. मुंबईच्या सुप्रसिद्ध स्वस्तिक मंडळाचे सुशिक्षित व कर्तव्यदक्ष स्वयंसेवक प्रवेशद्वारापासून तो पुतळ्यापर्यंत अर्धवर्तुळाकार ठेवलेल्या तीन-चार हजार खुर्च्यांवर निमंत्रित स्त्रीपुरुषांची बसण्याची सोय सभ्यतेनें व शांतपणें लावीत होते. पुतळ्याजवळ २० फूट उंचीचें व्यासपीठ तयार केलेलें होतें. व त्यावर अध्यक्ष, चिटणीस व वक्ते यांच्या बसण्याची सोय केली होती, ध्वनिवाहक यंत्राची सोय सर्व बाजूस केल्याकारणानें तेथें जमलेल्या जनसंमर्दास भाषणें ऐकण्याची इच्छा तृप्त करतां आली. या सर्व बाबतींत व्यवस्थापक मंडळाची स्तुति करावी तितकी थोडीच आहे.

## प्रेक्षकसमुदाय

चौपाटीच्या विस्तृत वाळवंटावर मुंबईतील सर्व धर्मांचे, सर्व जातींचे व सर्व वर्गांचे हजारों प्रेक्षक जमले होते. पन्नास हजारापासून एक लाखापर्यंत श्रोतृ-समुदाय असावा असा अदमास केला जात होता. उपस्थित असलेल्या सद्गृहस्थांत सर जुनीलाल मेथा, सर गोविंदराव प्रधान, लेडी ठाकरसी, श्री. कमलादेवी चट्टोपाध्याय, श्री. जम्नादास द्वारकादास, मौ. शौकतअली, मौ. इफ्रान, मि. हॉर्निमन, डॉ. साठे, श्री. बाबुराव साळवेकर, नागपूरचे 'महाराष्ट्र' पत्राचे संपादक श्री. ओगले, पेणचे श्री. मंडलीक, कल्याणचे श्री. महाजन, पुण्याचे श्री. नरसिंह चिंतामण केळकर, श्री. कवडेशास्त्री, श्री. वासुकाका जोशी, यांशिवाय श्री. कृष्णाजीपंत खाडिलकर, श्री. बाबासाहेब विद्वांस, श्री. वा. कृ. भावे, श्री. दा. वि. गोखले, श्री. नारायणराव गुंजाळ, श्री. रंगोबा लडकत, श्री भट, श्री. अंतुकाका फडणीस, श्री. यशवंतराव कुळकर्णी वगैरे मंडळी होती.

## लोकमान्यांची कामगिरी

मुंबईचे डॉ. गोपाळराव देशमुख यांनी अध्यक्षांची सूचना करतांना सांगितलें कीं, 'टिळकांनी धार्मिक, सामाजिक व राजकीय बाबतींतील लोकांच्या मनांत ठाणें देऊन बसलेलीं अनेक खुळें नाहीशीं केलीं. यास्क, शंकराचार्य वगैरे अधिकारी पुरुषांनाहि उत्तरें देऊन आपला कर्मयोग सांगतला राजकीय गुलामगिरींत वाकलेल्या जनतेला ताठ उभें केलें. त्याचा पुतळा उघडतांना त्यांचे एक निःसीम भक्त व सर्वश्रेष्ठ कार्यकर्ते श्री. अणे यांनीच अध्यक्षस्थान स्वीकारावें हे योग्य आहे.'

## गुलामगिरी नष्ट होणार !

**श्री. जम्नादास माधवजी मेहता** यांनी या सूचनेस दुजोरा देतांना सांगितलें कीं, लोकमान्यांच्या पूर्वीच्या काळांत इंग्रजांनी हिंदुस्थान जिंकलें हा एक ईश्वरी संकेत आहे असें खूळ पिकलें होतें. तें टिळकांनी नष्ट केलें. सहा हजार मैलांवरून येणाऱ्या मूठभर लोकांनी तेहतीस कोटी लोकांवर राज्य करावें असा संकेत किंवा अशी आज्ञा करण्या इतका ईश्वर बुद्धिहीन खास नाही! अशीच लोकमान्यांची शिकवण होती. ते पुढे म्हणाले 'ज्या ठिकाणीं हा पुतळा उभा करण्यांत येत आहे, ती जागा औचित्याच्या दृष्टीनें अत्यंत योग्य आहे. या समुद्रकिनाऱ्यावरून हिंदी स्वातंत्र्याच्या, या समुद्रांतून येणाऱ्या व या समुद्रापलीकडील सर्व शत्रूंना व विरोधकांना लोकमान्य आव्हान करीत आहेत व मी माझा जन्मसिद्ध हक्क मिळविणारच असें ठासून सांगून यापुढे हिंदुस्थान गुलाम राहणार नाही अशी ते सर्वांना ग्वाही देत आहेत."

## ताजमहाल व टिळक

श्री. बी. एफ. भरुचा यांनी चंदन झिजेल तितका त्याचा सुवास अधिक, सुवर्ण जळेल तितकें त्याचें तेज अधिक हा हिंदी दोहा लोकमान्यांना कसा लागू पडतो, हें सांगून एका जर्मन गृहस्थांनी 'हिंदुस्थानांत एक ताजमहाल व एक टिळकच पाहण्यासारखे आहेत' असें म्हटलें होतें, त्याची आठवण करून देऊन त्यांनी लोकमान्यांचा मोठेपणा वर्णन केला.

अशा रीतीनें अध्यक्षस्थान श्री. अणे यांनी स्वीकारावें याबद्दल सूचना पाठिंबा वगैरे मिळाल्यानंतर श्री. अणे हे अध्यक्षस्थानीं विराजमान झाले.

## स्वराज्यमंत्राचे द्रष्टे

यानंतर स्मारक मंडळाचे सरचिटणीस श्री. सिलम यांनी आपल्याकडे समारंभाच्या यशःश्चितनाच्या व लोकमान्यांच्या अभिवादनपर अशा शंभरांवर तारा व पत्रें आलीं असल्याचें सांगितलें. त्यांत म. गांधी, सौ. नायडू, ना. नटेसन, डॉ. अन्सारी, स्वित्झरलंड व जर्मनी या देशांचे कौन्सलजनरल्स, श्री. ल. ब. भोपटकर वगैरे प्रमुख लोकांचे संदेश होते. महात्मा गांधींनी आपल्या संदेशांत म्हटलें होतें कीं, 'मला येतां येत नाही याबद्दल दुःख होतें. सध्याच्या आणीबाणीच्या वेळीं ज्या लोकमान्यांनी राष्ट्रास स्वराज्याचा मंत्र शिकविला त्यांना माझें अभिवादन आहे ! '

## स्मारकाचा इतिहास

श्री. सीलम यांनी स्मारकाचा इतिहास सांगितला. त्यांत त्यांनी कांही गोष्टींचा प्रामुख्यानें उल्लेख केला. श्री. सीलम यांनी १६ जुलै १९२५ रोजीं मुंबई 'क्रॉनिकल'मध्यें एक पत्र प्रसिद्ध करून ज्या जागीं लोकमान्यांचें दहन झालें त्या जागेवर लोकमान्यांचा पुतळा उभा करण्याची सूचना केली व ती मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीनें ताबडतोब उचलली. ता. १ ऑगस्ट १९२५ रोजीं भरलेल्या जाहीर सभेंत या कार्याकरिता एक मंडळ नेमण्यांत आलें. त्यांत सौ. नायडू, श्री. विठ्ठलभाई पटेल, डॉ. देशमुख मि. हॉर्निमन, श्री. कृष्णाजीपंत खाडिलकर, श्री. सहस्रबुद्धे वगैरे सन्माननीय गृहस्थ होते. या मंडळाच्या चिटणिसाचें काम श्री. सीलम यांच्याकडे देण्यांत आलें. या कमिटीनें सरकाराशीं पत्रव्यवहार करून या दहनभूमीच्या जागेवर स्मारक करण्याची परवानगी सरकाराकडून मिळविली. पण याला तीन वर्षें लागलीं.

## स्त्रियांची वर्गणी

कमिटीच्या कामाला स्त्रियांची फार मदत झाली. सौ. अन्नपूर्णाबाई देशमुख व सौ. अवंतिकाबाई गोखले यांच्या अविश्रांत परिश्रमानें मुंबईतील स्त्रियांनी पांच हजार रुपयांची वर्गणी गोळा केली ही अभिमानाची गोष्ट आहे. याचा उल्लेख पुतळ्याच्या खालील बाजूवर करण्यांत आला आहे ! या कमिटीनेंहि चार महिन्यांच्या अवधींत चाळीस हजार रुपये गोळा केले हें सांगून त्यांनी सर्व साह्यकांचे आभार मानले. श्री. सीलम यांनी श्री. अणे यांना पुतळ्याचें अनावरण करण्याची विनंति करण्यापूर्वी 'महात्मा गांधी आले असते तर फारच चांगलें झालें असतें. परंतु त्यांच्या जागीं लोकमान्यांचे अनुयायी व राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. अणे हे येऊं शकले ही आनंदाची गोष्ट होय' असें सांगितलें.

## लोकमान्यांचा भव्य पुतळा

वरील विनंतीप्रमाणे श्री. अणे यांनी लोकमान्यांच्या पुतळ्यावरील कापडाचें आच्छादन काढून लोकमान्यांचें दर्शन लोकांना घडविलें. त्या वेळीं जमलेल्या प्रेक्षकांनी आनंदानें व श्रद्धायुक्त अंतःकरणानें लोकमान्यांना अभिवादन करून 'लोकमान्य टिळक महाराजकी जय' अशी ललकारी दिली ! पार्श्वभागीं चौपाटीच्या दगडी भिंतीवर धडक्या देऊन वर उसळणाऱ्या समुद्राच्या लाटा व त्यांचा गंभीर ध्वनि लोकमान्यांच्या धडाडीच्या व चढाईच्या राजकारणाची व वक्तृत्वाची आठवण देत होता! तें समुद्रावरील विस्तीर्ण मैदान, त्यावर जमलेले सहस्रावधि लोक व त्यांच्या तोंडांतून होणारा जयजयकार हा देखावा अपूर्व होता.

## श्री. फडके यांचें कौशल्य

या पुतळ्याचे शिल्पकार श्री. फडके यांनी आपली कला उत्तम रीतीनें प्रकट केली आहे. पुतळा साडेदहा फूट उंचीचा आहे. पायांत पुणेरी जोडा, वर धोतर, आंगरखा व उपरणें, हातांत काठी व 'केसरी' आणि डोक्यावर पुणेरी पगडी आहे; एका बाजूस थोडें कलून लोकमान्य वक्तृत्व करीत आहेत व चेहऱ्यावर वादविवादाच्या वेळीं येणारी छटा आहे; आणि समुद्रावरील वाऱ्यानें अंगरखा व धोतर हलत आहे असा देखावा दाखवून श्री. फडके यांनी आपलें कलानैपुण्य निदर्शनास आणिलें याबद्दल त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत.

पुतळ्याखालील प्रमुख जागेवर दोन बाजूंस आपला विशाल जबडा दाखविणारे दोन सिंह व त्यांच्यावर हिंदुस्थानाचा नकाशा व भोंवतीं वर्तुलाकार 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळविणारच' हा टिळकांचा महामंत्र कोरला आहे. बाकीच्या तीन बाजूंवर तोच मंत्र इंग्रजी, गुजराथी व उर्दू लिपींत लिहिलेला आहे. पुतळ्याच्या कामास एकंदर वीस

हजार रुपये खर्च झाला आहे.व पुढील संरक्षणाची वगैरे तजवीज करण्याचें मुंबई कॉर्पोरेशनने आपल्या अंगावर घेतलें आहे.

### श्री. कोल्हटकर

बडोद्याचे सुप्रसिद्ध शिल्पकार श्री. कोल्हटकर यांनी श्री. फडके यांच्या प्लॅस्टर ऑफ पॅरिसच्या नमुन्याबर-हुकूम ब्रांझचा पुतळा ओतला असल्यामुळे पुतळ्या-च्या उत्कृष्टपणाच्या यशाचे तेहि अंशभागी आहेत. श्री. मिठबावकर आणि कंपनीने भोवतालचीं 'पॅनेल्स' केलीं आहेत. एकंदर खालची बैठक १९ फूट व वरील १०॥ फुटांचा पुतळा मिळून एकंदर २९॥ फूट उंच हा पुतळा दिसतो.

### पारितोषिकें व उलट देणगी

श्री. अत्रे यांनी आपलें भाषण सुरू करण्यापूर्वी शिल्पकार फडके, श्री. कोल्हटकर व 'पॅनेल्स'चे नकाशे करणारे श्री. मास्टर यांना चांदीच्या करंडे-कांतून आभारप्रदर्शक पत्रें दिलीं. श्री. फडके हजर नव्हते. श्री. कोल्हटकर यांनी त्याचवेळी स्मारकाच्या कार्याकरिता रु. २००० ची देणगी जाहीर केली!

### दोनशें संस्थांचे हार

मुंबई व पुणें वगैरे महाराष्ट्राच्या इतर भागांतून आलेले दोनशे हार लोकमान्यांच्या पायाशीं अर्पण करण्यांत आले. ज्या संस्थांनी हार पाठविले त्यांची नांवानिशी वाचली गेली, पण ती सर्व नांवें या ठिकाणीं देणें शक्य नाही.

### श्री. अत्रे यांचें भाषण

श्री. अत्रे यांनी इंग्रजींत अर्धा तासपर्यंत वक्तृत्व पूर्ण व अस्खलित भाषण करून लोक-मान्यांच्या चरित्राचें रहस्य सांगितलें. ते म्हणाले "आज महात्मा गांधी यांनी येथे येऊन या पुतळ्याचें अनावरण केलें असतें तर औचित्याच्या दृष्टीनें तें योग्य झालें असतें. लोकमान्य कर्मयोगी, गांधीहि कर्मयोगी, अशी जोडी ठीक होती. आज ते प्रत्यक्ष शरिराने हजर नसले तरी ते मनाने येथेच आहेत. शिवाय जसा आज हा पुतळा अनावृत होत आहे तसेंच गांधीं-नीहि आज सत्याग्रहावरील आवरण काढून टाकलें आहे व म्हणूनच त्यांना अटक झाली. मी त्यांचा व राष्ट्रीय सभेचा प्रतिनिधि म्हणूनच हें काम करीत आहें. नाही तर माझ्यापेक्षा अधिक अधिकारी पुरुष येथे हजर आहेत.

### स्वातंत्र्यवादाचे जनक

लोकमान्यांचें चरित्र थोडक्यांत सांगणें मला अशक्य आहे. त्यांच्या इतका थोर व कर्तृत्ववान पुढारी हिंदुस्थानांत झाला नाही. चिरोलने त्यांना 'असंतोषाचे जनक' म्हणून संबोधलें. मी म्हणतों, कीं, ते असंतोषाचे जनक होतेच, पण त्यापेक्षाहि ते हिंदुस्थानाने स्वतंत्र व्हावें या मताचे व या स्वातंत्र्यवादाचे जनक होते. त्यांनी उत्पन्न केलेल्या असंतोषाचें स्वरूप दोन प्रकारचें होतें. एक लोकांना गुलामगिरीची लाज उत्पन्न करणें व दुसरें स्वातंत्र्य मिळविण्याचा प्रयत्न करणें. ह्या दोन्हीं भावना त्यांनी जागृत केल्या!

### 'भिक्षांदेहि' नको!

त्यांच्या काळच्या पुढाऱ्यांत व त्यांच्यांत जर कोणता मोठा फरक असेल तर तो हा होता कीं, इतरांना 'अर्ज, विनंत्या व निषेध' यापलीकडे कांही करावयाचें नव्हतें. लोकमान्यांनी या-पुढे जाऊन या 'भिक्षांदेहि' पंथाचें निर्मूलन केले व स्वावलंबनाचा धडा देऊन राष्ट्राला स्वराज्याचा महामंत्र सांगितला! स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य ही त्यांची चतुःसूत्री प्रसिद्ध आहे. आपला जन्मसिद्ध हक्क मिळवा अशी त्यांची स्वावलंबनाची व पराक्रमाची शिकवण होती!

### सिंहासनाधिष्ठित राजा

अशा तऱ्हेची जबरदस्त व सरकाराला धडकी भरणारी चळवळ त्यांनी केल्यामुळे हिंदुस्थानांत त्यांना ठेवणें अशक्य होऊन सरकारानें त्यांना सहा वर्षें काळ्यापाण्याची सजा दिली व मंडालेस पाठविलें! परंतु सरकाराने त्यांना दृष्टीआड केलें तरी लोकांच्या अंतःकरणांतील सिंहासनावर राजाप्रमाणे अधिष्ठित झालेलें त्यांचे आसन डळमळलें नाही, हें १९१४ नंतर सिद्ध झालें.

### स्वराज्यसंघाची चळवळ

१९१६ पासून त्यांनी स्वराज्याची चळवळ स्वराज्य संघामार्फत सुरू केली. याचें कारण एकच होतें तें हें कीं, त्यांना या चळवळीला जनतेचा पाठिंबा पाहिजे होता; तो त्यांनी मिळविला. स्वराज्य संघाने स्वराज्य जवळ आणलें एवढेंच मी सांगतों. अधिक तपशील सांगण्याला वेळ पुरणार नाही.

### चौफेर हल्ल्याचें तत्त्व

लोकमान्यांच्या राजकारणाची गुरुकिल्ली मीं सांगितली नाही तर मी त्यांच्या तत्त्वज्ञानाशीं व राजकीय धोरणाशीं प्रतारणा केली असें होईल. त्यांना नोकरशाहीवर चौफेर हल्ला चढविणेंच अधिक पसंत असे. एका बाजूवर चढाई करून इतर सर्व रणक्षेत्र मोकळें टाकणें हें त्यांच्या युद्धनीतीला वावडें होतें. उदाहरणार्थ, म्युनिसिपालिट्यांपासून तों कौन्सिला-पर्यंतच्या सर्व प्रातिनिधिक संस्था जिंकाव्या असें त्यांचें मत होतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे! त्यांच्या निधनाला आज तेरा वर्षें झालीं पण त्या दिवशीं मला जें दुःख झालें तें दुःख तितक्याच प्रमाणांत आज होत आहे. लखनौच्या कराराने

त्यांनी हिंदी समाजांत एकी घडवून आणिली व राजकारणावरच राष्ट्राची दृष्टि लागावी म्हणून त्यांनी सामाजिक गोष्टींकडे दुर्लक्ष केले."

### त्यांची विद्वत्ता

इतकें सांगून श्री. अणे यांनी त्यांच्या 'ओरायन' 'आर्टिक होम' व 'गीतारहस्य' या ग्रंथांची थोरवी सांगून लोकमान्यांच्या गाढ विद्वत्तेची साक्ष पटविली व शेवटीं, 'असा पुढारी झाला नाही! अशा पुढाऱ्याच्या बरोबर काम करण्याची व राजकारणाचे धडे घेण्याची आपणास संधि मिळाली, याबद्दल स्वतःस धन्यवाद देऊन त्यांनी आपलें भाषण संपविलें!

### शौकतअलींचें वंदन

मौ. शौकत अलींनी आपल्या भाषणांत छिंदवाड्यांतून आपली सुटका लोकमान्यांच्या प्रयत्नानें कशी झाली, लखनौच्या करारांतील रहस्य काय वगैरे सांगून लोकमान्यांच्या पावलावर पावलें टाकून धडाडीचें, लढाऊ वृत्तीचें व करारी राजकारण करा असें सांगितलें.

### मि. हॉर्निमन यांच्या आठवणी

मि. हॉर्निमन यांनी लोकमान्यांच्या काळीं एकीनें, स्फूर्तीनें आपण किती चळवळी केल्या याची स्मृति ताजी करून, स्वराज्य पाहिजे असेल तर तें ऐक्याच्या भावनेनें व एकजुटीनें कार्य करण्यानेच मिळेल असें सांगितलें. आज लोकमान्यांच्या पुतळ्यासमोर उभें राहून त्यांची स्मृति जागृत ठेवून आपण ऐक्यानें लढण्याचा निश्चय करूं असें ते म्हणाले.

### अणे म्हणजे सोळा आणे

शेवटीं श्री. न. चिं. केळकर हे आभार मानतांना म्हणाले, "आजच्या प्रसंगाला लोकमान्यांचे विश्वस्त व निःसीम अनुयायी हे अध्यक्षस्थानाकरितां लाभले ही उत्तम गोष्ट झाली. एक श्री. अणे मिळाले त्यामुळे सोळा आणे काम झालें. त्यांनी आजच्या या पवित्र प्रसंगाची आठवण ठेवून आपल्या राष्ट्रकार्यास लागावें." या आभारप्रदर्शनानंतर श्री. अणे यांनी सभा बरखास्त केली.

## म. गांधींस अटक

आपणांस लवकरच अटक होणार अशा कल्पनेने म. गांधी साबरमती आश्रमाची निरवानिरव करून तुरुंगांत जाण्यासाठी सिद्ध झाले. त्यांचें हें भविष्य सत्य ठरून त्यांस ता. ३१ रोजीं रात्रीं सुमारें दीड वाजता 'इमर्जन्सी पॉवर्स' कायद्याच्या तिसऱ्या कलमान्वयें अटक करण्यांत आली!

### मुंबई सरकारला पत्र

यापूर्वी महात्माजींनी मुंबई-सरकाराकडे एक पत्र पाठवून आपला कार्यक्रम आगाऊच कळविला होता. त्यांत ते म्हणतातः—

'मी मंगळवारीं प्रातःकाळीं आश्रम खाली करीन. मला अटक न झाली तर रास येथे जाईन. तेथे माझ्या शेतकरी बांधवाशीं मद्यपानबंदी संबंधी चर्चा करीन. दारूविक्यांना व विदेशी कापडाचा व्यापार करणारांना तो धंदा करूं नका, त्याऐवजीं खादी विका असा उपदेश करीन. आणि काँग्रेसच्या इतर विधायक कार्यक्रमांचा प्रचार करीन. या प्रवासांत मी अगर माझे सहकारी जवळ एक पैहि न घेतां बाहेर पडणार असून खेडेगांवचे लोक जें कांही देतील त्यावर आम्ही आपली गुजराण करूं. परंतु दरम्यान मला पकडल्यास माझे ३२ सहकारी (यांत १६ स्त्रियाहि आहेत,) माझा संकल्पित प्रवास पुरा करतील."

महात्माजींनी वर निर्दिष्ट केलेलें पत्र पाठवितांच सरकारानें ताबडतोब महात्माजींस व त्यांच्या ३२ सहकाऱ्यांसहि अटक केली व त्यांस साबरमती तुरुंगांत नेलें.

### अटक कशी झाली?

मुंबई—सरकारानें आपला निर्णय ना. व्हाइसरॉय यांच्या संमतीनें केला. सोमवारीं रात्रीं बरोबर १ वाजून २५ मिनिटांनी डि. सु. ऑफ पोलिस मि. प्राईड, व आणखी दोन पोलिस अधिकारी शे. रणछोडदास यांच्या बंगल्यांत दोन मोटारी घेऊन आले;व आम्ही आपणांस सौ.कस्तुरबा, श्री.महादेवभाई यांस अटक करण्यास आलों असल्याची वर्दी त्यांनी महात्माजींस दिली. तेव्हा महात्माजींनी इतर मंडळींचा प्रेमाने निरोप घेऊन 'वैष्णवजन तो तेने कहिये,' हे आपलें आवडतें पद्य म्हणून प्रार्थना केली. नंतर त्यांनी मोटारींत प्रवेश केल्यावर त्यांना साबरमती तुरुंगाकडे नेण्यांत आलें. दरम्यान खा. सा. सोराबजी कारंजवाला यांनी आश्रमांत जाऊन तेथेहि म. गांधींच्याबरोबर प्रचारार्थ बाहेर पडणाऱ्या ३२ लोकांना अटक केली. म. गांधींना तुरुंगांत नेण्यापूर्वी त्यांची गाडी आश्रमाजवळ थोडा वेळ थांबवून, तेथे त्यांनी आश्रमवासीयांचा निरोप घेतला व तेथून तुरुंगाकडे ते रवाना झाले.

महात्माजी तुरुंगाकडे जातांच पहांटे ४ वाजता आश्रमांत राहिलेले लोक एकत्र होऊन त्यांनी

'वैष्णव जन तो तेने कहिये' हें गांधीजींचें आवडतें गीत म्हटल्यावर, त्यांनी आश्रम खाली केला.

### सरकारी बाजू

गांधींच्या अटकेसंबंधीं सरकारानें पुढील आशयाचें पत्रक प्रसिद्ध केलें आहे.

"मि. गांधींनी व्यक्तिशः कायदेभंग करण्यास मान्यता देऊन कायदेभंगाचा पुरस्कार केला आहे. ते कायदेभंगाला उत्तेजन व चिथावणी देत होते व त्या योजनेस अनुसरून त्यांनी मुंबई-सरकारास आपला कार्यक्रम कळविला होता. त्यांत आपण रास गांवीं पायीं चालत जाऊन, कॉंग्रेसच्या कार्यक्रमाचा प्रचार करणार असें म्हटलें होतें. या स्थितींत त्यांना पकडणें अवश्य वाटल्यावरून अटक करावी लागत आहे."

याशिवाय सदर पत्रकांत म. गांधींची ता. ८ मे रोजीं सुटका झाल्यापासून काय काय गोष्टी घडल्या तें नमूद केलें आहे. "सामुदायिक कायदेभंग जरी ते ताबडतोब सुरू करणार नव्हते तरी त्या कार्याचा प्रचार करण्याचा त्यांचा विचार होता. मागील चळवळीप्रमाणेंच कायदेभंगाची पुनरावृत्ति करावी असा त्यांचा हेतु असल्याचें स्पष्ट दिसून येतें. आश्रमाचा त्याग करून आपल्या त्यागाचें भडक चित्र लोकांपुढे उभें करावयाचें व लोकांची सहानुभूति संपादन करावयाची आणि शेतकऱ्यांच्या गेलेल्या जमिनी परत मिळवून देण्याचें त्यांना आमिष दाखवून, त्यांना चिथावणी देण्याचा त्यांचा इरादा स्पष्ट दिसत होता.

व्यक्तिगत व सामुदायिक कायदेभंग यांत सरकारला फारसा फरक वाटत नाहीं. व्यक्तिगत कायदेभंगांतूनच सामुदायिक कायदेभंग निर्माण होईल अशीच गांधींची अपेक्षा होती. अशा रीतीनें चळवळ करण्याचें स्वातंत्र्य सरकार यापुढे देऊं शकत नाहीं."

महात्माजी, देसाई, कस्तुरबा व कालेलकर यांना प्रथम साबरमती तुरुंगांत नेल्यावर, मंगळवारीं रात्रीं गांधीजी व देसाई यांना साबरमतीजवळील एका स्टेशनावर नेऊन तेथून गुजराथ मेलनें येरवड्यास नेण्यांत आलें असें समजतें.

### अगोदरची तयारी

म. गांधींनी आपण पकडले जाणार या जाणिवेनें मुंबई-सरकारास पत्र लिहून आश्रम ताब्यांत घेण्याबद्दल विनंति केली होती. परंतु सरकारानें त्यांची विनंति मान्य केली नाहीं. आश्रम मोकळा केला त्या वेळीं आश्रमांत १०७ आश्रमवासी होते. त्यांत ४२ पुरुष, ३१ स्त्रिया, १२ मुलगे व २२ मुली होत्या. आश्रमाची स्थावर मिळकत सुमारें तीन लक्ष साठ हजार रुपयांची असून, जंगम मिळकत तीन लक्ष रुपयांची आहे.

आश्रमाच्या मिळकतीपैकीं कांहीं इमारती व थोडी जमीन हरिजनांच्या स्वाधीन करण्यांत आली असून, त्या जमिनीचा सारा भरणें अगर न भरणें ही गोष्ट हरिजनांच्या मर्जीवर सोंपविली आहे.

अटक होण्यापूर्वी महात्माजींनी आपल्या मित्रमंडळींना पत्रें पाठविलीं. त्यांनी टिळकांचा पुतळा उघडण्यास आपणास हजर राहतां येत नाहीं याबद्दल खेदप्रदर्शक पत्र टिळक-स्मारक कमिटीला लिहिलें.

इंग्रज स्नेह्यांना उद्देशून एक पत्र लिहिलें असून हिंदुस्थानांत शांतता राखण्यासाठी व हिंदुस्थानची मैत्री राखण्यासाठी ऑर्डिनन्सचें राज्य उपयोगी नाहीं असें म्हटलें आहे.

कॉंग्रेसबाहेरील पक्षांना उद्देशून लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात 'राष्ट्रीय सभा' ही एका विशिष्ट-पक्षाची सभा नसून ती खरी राष्ट्रीय संस्था आहे व ती तशी राहील अशीच खटपट सर्वांनी करावी.

### अटकेनंतर

म. गांधी यांना अटक झाल्याची वार्ता पहाटे अहमदाबादेंत पसरली त्याबरोबर शहरांत खिन्नता पसरून स्वयंस्फूर्तीनें शहरभर हरताळ पडला. सर्व गिरण्याहि बंद पडल्या. मुंबईसहि कापड-मार्केट, दाणेबाजार, सराफबाजार, जव्हेरी बाजार, गिरगांव, काळबादेवी भुलेश्वर या भागांत हरताळ पडला.

# डॉ. मुंजे यांजवरच गहजब कां ?

पार्लमेंटाच्या जोड कमिटीचा त्याग हिंदुस्थानांतील प्रमुख राजकीय पक्षांनी केला त्यामुळे कमिटीपुढील कार्यक्रम नीरस, क्षुल्लक व कंटाळवाणा ठरेल असें वाटलें होतें. परंतु गेले दोन महिने कमिटीसमोर अनेक पात्रें आलीं व बोललीं त्यावरून, इंग्रज लोकांनी व इंग्रज सरकाराने, आपल्याकडून तरी, कार्यक्रमांतील अंगें मनोरंजक रीतीने सजविण्यांत कसूर होऊं दिली नाही हें कोणासहि कबूल करावें लागेल.कमिटीपुढे चर्चिल, ओड्वायर, इन्नेस, कर्नल वेजवूड इत्यादि अनेक व्यक्तींच्या साक्षी झाल्या. त्या इतक्या विसंगत, असंबद्ध व परस्पर-विरुद्ध होत्या कीं, सदर साक्षी वाचून शाळेच्या वार्षिक संमेलनांतील विविध प्रसंगांवरील संवादाचीच आठवण व्हावी. हे सगळे अहिरावण महिरावण, हिरण्याक्ष, हिरण्यकश्यपू, अक्रूर, बिभीषण येऊन गेल्यानंतर सर सॅम्युएल होअर यांनी अठरा पुराणांत गणण्यासारखें पुराणच रचून कमिटीच्या हवालीं केलें. होअर यांची उलटतपासणी कमिटीच्या चालू बैठकींत न आटोपल्यामुळे,ऑक्टोबर महिन्यांत कमिटींतील सभासद पुनः एकत्र बसतील तेव्हा होअरसाहेब आपली करामत तिला पुनः दाखविणार आहेत.

कमिटीने आपलें काम अशा रीतीने लांबविलें असलें, तरी तिच्या कार्यक्रमापैकीं महत्त्वाचा भाग चालू महिन्याच्या प्रारंभींच संपला असें मानण्यास हरकत नाही. परंतु हा कार्यक्रम संपवितांना ब्रिटिश जनतेला चटकदार वाटण्याजोगा एक झगडा शेवटीं ठेवण्यांत आलाच. हिंदु व मुसलमान यांचे प्रतिनिधि इंग्लंडांत बरेच दिवस आपल्या कमिटीपुढील साक्षीकरिता तळ देऊन राहिले आहेत. त्यांना कमिटीने सोमवार ता. ३१ जुलै व मंगळवार ता. १ ऑगस्ट या दिवशीं आपल्यासमोर सामन्याला बोलावलें. डॉ. मुंजे अस्तन्या सारून तयारीनेच होते. त्यांनी आपल्या पुढ्यांत हिंदूंची बाजू चांगली मांडतील अशाच प्रतिनिधींची योजना केली होती. इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी ज्ञातिविषयक तंट्याचा निर्णय सांगितला; त्यांत हिंदूमधील स्पृश्यवर्ग व अस्पृश्यवर्ग यांच्यापुरता जो निकाल मॅक्डोनाल्ड यांजकडून मिळाला तो म. गांधी यांना पसंत न पडल्यामुळे, त्यांनी प्रायोपवेशनाचा बिनतोड शह देऊन बदलून घेतला ! हे दोनहि निर्णय एकंदरीने हिंदु समाजाच्या मुळावरच आले.किंबहुना, पहिल्या निर्णयापेक्षा दुसऱ्या निर्णयाने स्पृश्य हिंदूंची स्थिति अधिकच दुबळी करून सोडली. पहिला निर्णय जर सन्निपातासारखा तर दुसरा निर्णय सन्निपातांत आलेल्या वाताच्या झटक्यासारखा होता.

वरील दोन निर्णयांनी इतर प्रांतांतील हिंदूंपेक्षा बंगाल व पंजाब यांतील हिंदु अधिकच हवालदिल होऊन गेले. पंजाबांतील हिंदूंची तक्रार मुसलमानांच्या बाबतींत आहे. पण बंगाल्यांतील हिंदूंना जसे मुसलमान भोवले आहेत, तसेच तेथील स्पृश्य हिंदूंना अस्पृश्य हिंदुहि भोवले आहेत. बंगाली हिंदूंचा स्वभाव कौन्सिलांतील जागांकरिता मुसलमानांबरोबर भांडत बसण्याचा नाही. परंतु गप्प बसण्याने अन्याय कमी न होतां वाढतो अशी म. गांधींमुळे घडून आलेल्या पुणें कराराने अद्दल घडविल्यावरून, बंगाली हिंदुहि आता सावध झाले आहेत. डॉ. मुंजे यांच्या पुढ्यांत पंजाब व बंगाल या दोनहि प्रांतांतील प्रतिनिधि होते. पंजाबातर्फे भाई परमानंद व पं. नानकचंद यांनी हजर राहून, पंजाबी हिंदूंची बाजू कमिटीस समजावून सांगितली, आणि बंगालच्या वतीने श्री. चतर्जी व बानर्जी यांच्या साक्षी झाल्या.

हिंदुमहासभा म्हटली कीं, तिच्याशीं भाऊबंदकी साधावयास मुस्लिम लीग व मुस्लिम परिषद पाळतीवर असावयाचीच. किंबहुना मुस्लिम लीग व मुस्लिम परिषद या संस्था हिंदूंशीं दावेदारी केल्यावाचून राहणार नाहीत हें डॉ. मुंजे यांस माहीत असल्यामुळेच, ते आपला

कंपू घेऊन लंडनमध्ये ठाणें देऊन बसले. हिंदुमहासभेला मुसलमान तेवढेच काय ते प्रतिस्पर्धी आहेत असें नाही. त्याखेरीज अस्पृश्यांचाहि विरोध त्यांना आहेच. या कारणाने डॉ. मुंजे प्रभृतींना दोन प्रतिस्पर्ध्यांबरोबर सामना द्यावा लागला. हिंदु, मुसलमान व अस्पृश्य यांच्या या तिरंगी सामन्यांची मौज पाहण्याकरिता जोड कमिटींतील कित्येक विघ्नसंतोषी सभासद बसलेच होते. ते गंमत पाहता पाहतांच तंट्यांना चिथावणी देण्याचेंहि श्रेय जोडीत! अशा रीतीने डॉ. मुंजे, डॉ. आंबेडकर, सर अबदुल रहीम, युसफअली, गझनवी व लॉर्ड सालिस्बरी इत्यादि विविध प्रकृतींचीं, विरुद्ध धोरणाचीं व भिन्न जातींचीं मोहोरीं आपसात तुटून पडल्यामुळे, त्यांजमध्ये मोठीच खडाजंगी उडाली.

हिंदुद्वेष्ट्या टाइम्सप्रभृति कित्येकांचें म्हणणें असें कीं, हिंदु महासभेने ज्ञातिनिर्णयाची वाळत आलेली खपली फिरून खाजवून काढावयाची नव्हती. कारण त्यामुळे विझूं लागलेलें भांडण चिघळून नवीन राजकीय सुधारणांना अपशकुन होईल. परंतु हा आक्षेप घ्यावयाचाच तर तो हिंदू महासभेप्रमाणेच मुसलमानांविरुद्धहि घेतां येण्यासारखा आहे. खेरीज मॅक्डोनाल्ड यांचा निर्णय बदलण्याची संधि जॉइंट कमिटीशिवाय दुसरी उरलीच नसल्यामुळे डॉ.मुंजे यांनी ती साधली हें योग्यच केलें. असें असताहि डॉ. मुंजे यांनी हिंदूंची कैफियत कमिटीपुढे मांडण्यासाठी बाहेर काढताच त्यांजवर सर अबदुल रहीम, डॉ. आंबेडकर व होअर यांजतर्फे उपभारतमंत्री मि. बटलर हे उसळले. अबदुल रहीम व आंबेडकर यांनी रागाचा आविर्भाव आणून जवळ जवळ कमिटी सोडून जाण्याचेंहि भय घातलें! बटलर यांनी कानावर हात ठेवून मंत्रिमंडळ पुनः हें लचांड गळ्यांत घेणार नाही असा निर्वाळा दिला. अशा रीतीने या सर्वांनी हिंदुमहासभेची वरील मुद्द्यावरील साक्षच धुडकावून लावण्याचा रंग आणिला. परंतु कमिटीचे अध्यक्ष लॉर्ड लिन्लिथगो यांजकडून डॉ. मुंजे यांची बाजूच उचलून धरण्यांत आल्यामुळे इतरांची कावकाव आपोआपच बंद पडली.

वास्तविक या बाबतींत लिन्लिथगो यांनी अध्यक्ष या नात्याने जो निर्णय दिला तोच योग्य होता. कमिटी पांढऱ्या खलित्यांतील शिफारशींचाच तेवढा विचार करण्यास बसली होती व तिने त्या खलित्यांतील विषयांबाहेर साक्षीदारांना सरकूंच द्यावयाचें नाही असेंच जर मानावयाचें, तर तिच्यापुढे पांढऱ्या खलित्याच्याच चिंध्या उडविणाऱ्या चर्चिल-ओड्वायर प्रभृतींच्या साक्षी झाल्या कशा? कर्नल वेजवूड यांनी आपल्या पोतडींतून पांढऱ्या खलित्याहून अगदीच वेगळी व विक्षिप्त योजना बाहेर काढली ती कमिटीने कां काढूं दिली? त्या योजना व साक्षी ऐकून घेण्यास जर कमिटीने मुळीच आक्षेप घेतला नाही तर डॉ. मुंजे यांच्या साक्षीस तो काय म्हणून घेण्यांत यावा? उलट, डॉ. मुंजे यांची साक्ष सर्वथैव योग्य व पांढऱ्या खलित्याच्या चतुःसीमेंत बसण्याजोगी होती असेंच आमचें मत आहे. मि. मॅक्डोनाल्ड यांचा ज्ञातिविषयक निर्णय व पुणेकराराने त्यांत घडवून आणिलेला फेरबदल यांत ढोबळ चुका राहिल्या व पक्षपात झाला, अशी कोणाची तक्रार असल्यास ती बोलून दाखविण्याची जागा जॉइंट पार्लमेंटरी कमिटी ही एकच आता उरली आहे. त्या टेकावर उभे राहून हिंदुमहासभेने अन्यायाविरुद्ध शेवटची हाकाटी केली यांत ती आपल्या कर्तव्यासच जागली यांत शंका नाही. कारण मॅक्डोनाल्ड यांच्या हातून झालेला अन्याय दूर करण्याचा अधिकार जर कोणास असेल तर तो पार्लमेंटाच्या जोडकमिटीलाच आहे.

हिंदुमहासभा व मुसलमानांच्या धार्मिक संस्था यांत महत्त्वाचा फरक आहे. हिंदुमहासभा हिंदूंवरील मुसलमानांकडून होणाऱ्या धार्मिक व सामाजिक आक्रमणापासून हिंदूंचा बचाव करण्याच्या उद्देशाने जन्मास आली आहे, व हें उघडपणें सांगण्यांत सभेच्या अभिमान्यांना राष्ट्रीय दृष्ट्या मान खाली घालण्यासारखें लाजिरवाणें कांहीच नाही. किंबहुना, तिचें राजकीय

धोरण हिंदुस्थानांतील कित्येक इतर धार्मिक संस्थांपेक्षा अधिक पायाशुद्ध आहे. हिंदुस्थानाची राजकीय घटना केवळ लोकशाहीच्या तत्त्वावरच झाली पाहिजे, त्या घटनेंत जातवारीची विषवल्ली लावूं नये; हीच महासभेची मागणी आहे. पण हें निर्भेळ राष्ट्रीय धोरण मुसलमानांना मान्य नसल्यामुळे, जातवारीचें खूळ राजकीय घटनेंत शिरावयाचेंच असेल तर निदान न्यायाला स्मरून जी व्यवस्था लावावयाची ती लावा व जातीवरून कायदेमंडळांतील जागा देतांना, हिंदु—मुसलमानांना एकाच मापाने मोजा असें महासभा इंग्रज सरकारास व मुसलमानांस सतत सांगत आली आहे.

पण मुसलमान या कामांत लबाड बनिया-प्रमाणे खोटीं मापें वापरीत आले आहेत. त्यांनी हिंदूंकरिता लहान माप लावलें आहे व आपल्याकरिता मोठें माप बाळगलें आहे. कांही दुकानदार तरी खरेदीविक्रीच्या वेळीं अशींच लहानमोठीं खोटीं मापें चालवून, गिऱ्हाइकाचा खिसा कातरीत असतात. मुसलमान असा खोटा व्यवहार करूं लागले असतां, त्यांचीं मापें जप्त करून त्यांजवर खटला भरण्याचें काम सरकारानें ना? पण सरकारहि चोराला सामील व त्यांचे म्होरपे मॅक्डोनाल्डहि सामील! मग हिंदूंनी स्वस्थ बसून कसें चालेल? पंजाबांतील हिंदूंची बाजू कमिटीस समजावून देतांना, भाई परमानंद यांनी हा सगळा आंधळा कारभार कमिटीच्या नजरेस आणिला. त्याप्रमाणें बंगाली प्रतिनिधि चतर्जी यांनीहि पुणेकराराने बंगाल्यांतील स्पृश्य हिंदुसमाज राजकीय दृष्ट्या कसा नामशेष होणार आहे हें कमिटीपुढे आंकड्यांनिशीं सिद्ध केलें.

बंगाल सरकारानें हिंदूंची मोजदाद केली आहे, तिच्यांत अस्पृश्य वर्गाचा आंकडा वेगळा दाखविलेलाच नाही. तेथील मागसलेल्या वर्गाचें एक सदर आहे. पण मागसलेल्या वर्गात अस्पृश्यांबरोबरच नामशूद्र व राजवंशी हे स्पृश्य लोकहि येत असल्याने, त्या सर्वांची संख्या एक कोटीवर गेली आहे. पण खरे अस्पृश्य ३५ लाखहि नाहीत! तथापि पुणेकराराप्रमाणें जागा मिळणार त्या एक कोटीच्या संख्येवरून फक्त अस्पृश्यांनाच! हें सारें गौडबंगाल हिंदुमहासभेने बाहेर काढलें व तें ती काढणार याविषयीं मुसलमान प्रतिनिधि व डॉ. आंबेडकर यांना पक्कें ठाऊक असल्यामुळेच, त्यांचा डॉ. मुंजे यांजवर एवढा गहजब. पण त्यास न जुमानता मुंजेप्रभृति हिंदुमहासभेच्या प्रतिनिधींनी हिंदूंची बाजू निर्भीडपणाने मांडली याबद्दल हिंदूंनी तरी त्यांचें अभिनंदनच केलें पाहिजे.

# मीरतच्या खटल्याचें स्वरूप

हिंदुस्थानावर राज्य करणाऱ्या सिंहासनाधिष्ठित बादशहांना त्यांच्याशीं युद्ध पुकारून पदच्युत करण्याच्या उद्देशाने कट करणें कांही पोरखेळ नव्हे. त्याला एवढ्या करोल सैन्याची जमवाजमव करावी लागेल, एवढें अजस्र आरमार तयार ठेवावें लागेल व विमानांचे एवढे काफिले बांधावे लागतील कीं, त्या गोष्टी हिंदुस्थानांत अशक्य आहेत. जिभेला लगाम न घालतां ऐसपैस व लांबरुंद भाषण करण्याची खोड असणाऱ्या भैदानी वक्त्यांच्या तोंडांतहि हा विषय मावणें दुरापास्त आहे असें सामान्यतः वाटतें. परंतु हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या प्रांतांतून कामगार व शेतकरी लोकांच्या कल्याणाकरिता खटपट करणाऱ्या तेहतीस कार्यकर्त्यांना कम्यूनिस्ट म्हणून पकडून, त्यांच्यावर मीरत येथें वरील गुन्ह्याकरिता सरकाराने खटला उभा केला, त्या वेळीं ही अशक्य वाटणारी गोष्ट शक्य झाली म्हणून पुष्कळांना आश्चर्य वाटलें असल्यास नवल नाही! सेशन्स कोर्टाने या तेहतिसांपैकीं कांहींना या गुन्ह्याबद्दल दोषी ठरवून दहा-दहा, बाराबारा वर्षांची सक्तमजुरी तर एकास जन्मठेप काळेपाणी अशा शिक्षा ठोठावल्या! समाधानाची व आनंदाची गोष्ट

ही कीं, अलाहाबाद हायकोर्टानें अपिलात या शिक्षा रद्द करून, जास्तींत जास्त शिक्षा फक्त तीनच वर्षांची ठेवली हें आज दुसरीकडे दिलेल्या हकीगतीवरून कळेलच.

या खटल्याला एवढें अजस्र स्वरूप कां दिलें गेलें हें समजण्यासाठी, त्याचे धागेदोरे नीट पाहिले पाहिजेत. एकच गोष्ट सांगितली म्हणजे पुरे कीं, या खटल्याची व्याप्ति हिंदुस्थानापुरतीच नसून त्याला आंतरराष्ट्रीय स्वरूप आहे. मीरत खटल्यांतील आरोपी 'कम्यूनिस्ट' तत्त्वानें भारले गेले होते, इतकेंच नव्हे तर त्यांपैकीं कांही युरोपांतील व हिंदुस्थानांतील 'कम्युनिस्ट' पक्षाचे प्रत्यक्ष सभासद आहेत, यावर सरकाराचा कटाक्ष होता. कम्युनिस्ट पक्षाच्या सभासदांच्या मागें रशियाची प्रचंड शक्ति उभी आहे अशी सरकाराची खात्री असल्यामुळें, या आरोपींवरील खटल्याच्या मिषानें सरकारानें रशियाच्या डोक्यांत दुरून गदा घालण्याचा व्यूह रचला होता ही या खटल्यांतील खरी मेख आहे. या दृष्टीनें पाहता, सरकारचें उद्दिष्ट पुष्कळ अंशांनी साधलेंहि !

मूळ भांडण आहे तें ब्रिटिश साम्राज्यवादी व भांडवलवाले एका बाजूस आणि साम्राज्यें व भांडवलशाही यांवर निखारे ठेवण्यास तयार असलेले रशियांतील कम्यूनिस्ट दुसऱ्या बाजूस अशा स्वरूपाचें आहे. हिंदुस्थानांतील खटला हा इंग्लंड व रशिया या दोन राष्ट्रांमधील झटापटींतील, एक डाव होता इतकेंच. मीरतच्या खटल्याचा वचपा रशियानें अनेक इंग्रज एंजिनियरांवर रशियांत तोहमत आणून काढला असें तज्ज्ञ लोकांनी लिहिलें आहे व त्याचा उल्लेख आम्हींहि त्या खटल्याच्या वेळीं केला आहे. त्या एंजिनियरांना बंधमुक्त केल्यामुळें, पुनः इंग्लंड व रशिया यांचें सख्य जमूं लागलें आहे व त्याचाच परिणाम या दृष्टीनें अपीलकोर्टांत आरोपींवरील शिक्षा कमी झाल्या,व पुष्कळांना निर्दोषी ठरवून सोडण्यांत आलें अशी कोणीं कल्पना केल्यास त्यांत अस्वाभाविक वाटण्यासारखें कांहीं नाहीं !

मीरत खटल्याचें हें आंतरराष्ट्रीय स्वरूप बाजूस ठेवलें तरी या खटल्यांत आरोपी म्हणून उभे केलेल्या कार्यकर्त्यांच्या बाबतींत सरकारानें मोठा अन्याय केला असें म्हणावें लागतें. एवढें सहाशेसदतीस साक्षिदारांचें सैन्य, तीन-साडेतीन हजार निशाण्या लागलेले कागद व त्यासाठी सोळा लाख रुपयांचा खर्च एवढें अवडंबर उभारून सरकारानें सिद्ध केलें काय तर, या कार्यकर्त्यांना 'कम्युनिस्ट'पंथाचीं तत्त्वें मान्य होतीं! पण विशिष्ट तऱ्हेचीं मतें असणें हा कोणत्याहि देशाच्या फौजदारी कायद्यानें गुन्हा ठरविला नाहीं. व नैतिक दृष्ट्या यांत पापहि नाहीं. हिंदुस्थान सरकारानें मात्र मतांच्या या मनोमय विचारांना गुन्हा ठरवून,पूर्वकाळच्या सर्व सुलतानांना लाजविलें यांत शंका नाहीं. अलाहाबाद हायकोर्टानें आपल्या निकालपत्रकांत आरोपींचे चार वर्ग करून, जे कम्युनिस्ट पक्षाचे सभासदहि नाहीत व ज्यांचीं मतेंहि कम्युनिस्ट पक्षाचीं नाहीत अशा सात आरोपींचा एक वर्ग केला व त्यांना त्यांनी दोषमुक्त केलें. ह्या सात लोकांना तरी कटवाले म्हणून कां पकडलें व त्यांना भरमसाट शिक्षा कां दिल्या, हाहि प्रश्न विचार करण्यासारखा आहे. त्यांनी तरी बादशाहाबरोबर युद्ध पुकारण्याचा कट खास केला नव्हता ! या मुद्द्यांचा निष्कर्ष हाच कीं, हिंदुस्थानांतील पोलिसांना अनियंत्रित सत्ता दिली गेल्यामुळें, त्यांनी 'कम्युनिस्ट' मतें मान्य असणाऱ्या कोणासहि अटक केली व चार वर्षेपर्यंत कच्च्या कैदेंत त्यांना खुशाल डांबलें ! या पोलिसांना दिलेल्या अधिकारांस पुढील काळांत लगाम घालणें अत्यावश्यक आहे यांत शंका नाहीं. तसेंच कटाच्या गुन्ह्याचें जें एक नवीन कलम फौजदारी कायद्यांत घुसडलें गेलें आहे त्याचीहि कायदेमंडळानें पुनः जरूर छाननी करावी असें आम्हांस वाटतें. शिक्षांच्या प्रमाणाचीहि तीच स्थिति. इंग्लंडमध्येहि कम्युनिस्टांवर खटले झाले नाहीत असें नाहीं. पण त्यांत जास्तींत जास्ती शिक्षा फक्त तीन वर्षांचीच एकदा देण्यांत आली होती ! ऐंक वर्षापेक्षा अधिक शिक्षा कोणासच

झालेली नाही. हिंदुस्थानांतील मात्र माप वेगळें! येथे जन्मठेप, काळेपाणी व दहादहा, बाराबारा वर्षांच्या शिक्षा हा न्याय कां ?

मीरत खटल्याच्या दिव्यांतून निघून पुष्कळ 'ट्रेड यूनियन' वाले व कामगारांच्या हिता-कडे लक्ष पुरविणारे पुढारी सुटून आले याबद्दल कोणासहि समाधानच होईल. ज्या ज्या आरोपींच्या शिक्षा कमी केल्या आहेत त्यांनाहि आपल्या अधिकारांत सरकारानें सोडून द्यावें हें उत्तम. कारण अलाहाबाद हायकोर्टानेंच चार वर्षेपर्यंत खटले चालू ठेवणारांचे वाभाडे काढलेच आहेत, व आता हें प्रकरण प्रिव्ही कौन्सिलाकडे गेलें तर, या बाबतींतील सर-काराची अब्रू आंतरराष्ट्रीय चव्हाट्यावर आल्याशिवाय राहणार नाही हें निश्चित आहे! मीरत खटल्याचा विचार करतांना आम्हांला कै. धुंडिराजपंत ठेंगडी यांची मात्र पुनःपुनः आठवण होते. आमची खात्री आहे कीं, कै. ठेंगडी या खटल्यांतून दोषमुक्त होऊन बाहेर आले असते व आपल्या सार्वजनिक कार्यास पुनः सुरुवात करण्याची त्यांना संधि मिळाली असती. पण या अन्याय्य खटल्यामुळे उतार वयांत त्यांच्या सामर्थ्याचा ऱ्हास होऊन ते मृत्युमुखीं पडले! या हत्येचें पाप कोणाच्या माथीं बसेल याचा वाद न करणेंच बरें. अशा तऱ्हेचे खटले उभे करणें चुकीचें आहे एवढा धडा सरकारानें या खटल्यापासून घेतला, तरी या अनेक कार्यकर्त्यांच्या हालअपेष्टा कांही अंशीं कारणीं लागल्या असें होईल!

# म. गांधींना एक वर्षाचा बंदिवास

## खटल्यांची सविस्तर हकीकत

तारीख १ ऑगस्ट रोजीं पहाटे १॥ वाजता **महात्मा गांधी** यांना अहमदाबादेस पकडून येरव-ड्याच्या तुरुंगांत कच्चे कैदी म्हणून ठेवण्यांत आलें. गांधीजींना या खेपेस १८१८ च्या रेग्युलेशन-खाली पकडण्यांत आलें नाही, त्यावरूनच त्यांच्या-वर रीतसर खटला भरण्यांत येऊन त्यांना शिक्षा होईल असा लोकांनी आपल्या मनाशीं कयास बांधला होता. शेवटीं हा कयास अचूक ठरून ता. ४ रोजीं महात्माजींवरील खटला रीतसर चालून त्यांना एक वर्षाची साध्या कैदेची शिक्षा फर्माविण्यांत आली. महात्माजींची अटक, सुटका आणि बंदिवास हीं सगळीच खरोखरी पावसाळ्यां-तील ऊन आणि सावली यांच्या पाठशिवणीच्या खेळा इतकी लवकर घडून आलीं. म. गांधी यांजवर भर-लेल्या खटल्याची सारीच हकीकत मोठी मनोरंजक असल्यामुळे ती पुढे देण्यांत येत आहे.

### महात्माजींवर हुकूम बजावला !

शुक्रवारचा तो दिवस. महात्माजी आपलीं प्रातःकरणीय कर्मे आटोपून तुरुंगाच्या कोटडींत नुकतेच बसले होते. त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी **श्री. महादेवभाई देसाई** त्यांजवळच होते. घड्याळांत नऊचे ठोके पडले आणि कोठडीच्या दरवाजाशीं जेल सुपरिंटेंडेंट **मि. मार्टिन** उभे राहिले. बरोबर सकाळीं ९ वाजता म. गांधी व महादेवभाई देसाई यांना बंधमुक्त करण्यांत आलें. आणि ९ वाजून ५ मिनिटांनी मि. मार्टिन यांनी वरील उभयतांवर नोटीस बजावली. सदर नोटीस बॉंबे स्पेशल पॉवर्स ॲक्टाच्या ४ थ्या कलमान्वयें काढण्यांत आली होती. नोटिशीचा आशय असा—"(१) आज (ता. ४ ऑगस्ट रोजीं) ९॥ वाजण्याच्या पूर्वी गांधी आणि देसाई यांनी येरवडा गांवाची हद्द सोडून जावें. त्यांनी पुणें कॅन्टोन्मेंटच्या हद्दींत राहूं नये, पुणें शहर म्युनिसिपालिटीच्या हद्दींतच राहावें. (२) त्यांनी कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेऊं नये. (३) त्यांनी लोकांना कायदेभंगाचा किंवा करबंदीचा उपदेश करूं नये. (४) डि. मॅजि-स्ट्रेटाच्या परवानगीशिवाय १२ माणसांपेक्षा जास्त माणसें असलेल्या सभेंत, जमावांत किंवा मिरवणुकींत त्यांनी भाग घेऊं नये. हा हुकूम एक महिना अमलांत राहील." सदर हुकुमावर मुंबई-सरकारचे सेक्रेटरी मि. मॅक्सवेल यांची सही होती.

### सरकारी हुकुमाचा भंग

महात्माजींची मुक्तता झाल्यावर येरवडा गांवा-च्या हद्दीबाहेर त्यांना जातां यावें, म्हणून त्यांज-साठी सरकारानें तुरुंगाच्या दाराशीं एक खासगी

भाड्याची मोटार तयार ठेवली होती. महात्माजींनी नोटिशीवर जेव्हा सही केली तेव्हाच 'आपल्याला या हुकुमाप्रमाणें वागतां येणार नाही' असें तिजवर लिहून ठेवलें. नंतर महात्मा गांधी, श्री. महादेवभाई देसाई यांच्या समवेत, सदर मोटारींत बसून, येरवड्याच्या हद्दींतीलच एका ठिकाणीं गेले व तेथे उतरले. हुकुमांतील वेळ टळून गेली, तरी गांधी यांनी येरवडा गांव सोडले नाही; म्हणजे त्यांनी हुकुमाचा भंग केला असें पाहून अ. सुपरिंटेंडेंट ऑफ् पोलीस मि. जेन्नर यांनी म. गांधी व देसाई या उभयतांना अटक करून पुनः येरवड्याच्या तुरुंगांत आणलें. पुढे मि. जेन्नर यांनी इमर्जन्सी पॉवर्स ॲक्टाच्या १४ व्या कलमाच्या १६ व्या भागान्वयें गांधी व देसाई यांजवर खटला भरून, पुण्याचे ॲडि. डि. मॅजिस्ट्रेट मि. हॅम एस्. इस्रायल यांच्या कोर्टांत पाठविला.

### मि. ओगार्मन यांची साक्ष

कोर्टाची जागा येरवडा तुरुंगाच्या महाद्वारावरील दिवाणखान्यांत होती. मि. इस्रायल यांजपुढे खटल्याच्या कामास बरोबर दुपारीं तीन वाजता सुरुवात झाली. सरकारातर्फे रा. सा. कुलेंकर हे काम चालवीत होते. म. गांधी व महादेवभाई देसाई यांनी खटल्यांत भाग घेतला नाही; शेवटीं त्यांनीं आपल्या लेखी जबान्या तेवढ्या दिल्या. खटला चालू असता महात्माजी व देसाई या दोघांनाहि बसण्यास खुर्च्या देण्यांत आल्या होत्या. खटल्याच्या कामाला सुरुवात होताच सरकारातर्फे प्रथम पुण्याचे डी. एस्. पी. मि. ओगार्मन यांची साक्ष झाली. ते आपल्या साक्षींत म्हणाले, "मि. गांधी यांजवर जादा अधिकारांच्या कायद्याखालीं हुकूम बजावण्यांत आला ही गोष्ट मला माहीत आहे. येरवडा गांवाची हद्द सकाळीं ९॥ च्या आंत सोडून जाण्याबद्दल मि. गांधी यांना सदर हुकुमान्वयें बजावण्यांत आलें होतें. येरवडा तुरुंगाचे मुख्याधिकारी मि. मार्टिन यांनी हा हुकूम गांधी यांजवर बजावला तेव्हां मी तेथे हजर होतों. मि. गांधी यांनी त्या हुकुमावर सही करून 'मी त्याप्रमाणें वागण्याचें नाकारतों' असें त्यावर लिहिलें. मि. गांधी यांनी मला विचारल्यावर मी त्यांना असें सांगितलें कीं, 'तुम्हाला (गांधींना) येरवड्याची हद्द सोडून, पुणें शहराच्या हद्दींतच राहिलें पाहिजे असा सरकारचा हुकूम आहे. तसें न कराल तर तुमच्या हातून हुकुमाचें उल्लंघन होईल.' नंतर त्यांच्याच इच्छेप्रमाणें त्यांना मोटारींतून येरवड्यांतील एका शांत स्थळीं नेण्यांत आलें. परंतु त्यांनी ती मनाई हद्द उल्लेखिलेल्या वेळेच्या आंत न सोडल्यामुळे, असि. सुपरिंटेंडेंट ऑफ् पोलीस यांनी त्या दोघांना अटक करून परत तुरुंगाकडे आणलें."

### मि. जेन्नर यांची साक्ष

मि. जेन्नर, असि. सुपरिंटेंडेंट ऑफ् पोलीस, आपल्या साक्षींत म्हणाले, "मि. गांधी व देसाई यांना गोल्फ लिंक्सकडे मोटारींतून जातांना मीं पाहिलें. त्यांनी गोल्फ लिंक्सजवळ ९ वाजून ४० मिनिटांनी मोटार थांबविली. मी लगेच तेथे गेलों व त्यांना ती जागा ताबडतोब सोडून जाण्याबद्दल सांगितलें. त्यावर त्यांनी तसें करण्याचे साफ नाकारलें. तरीहि मी आणखी त्यांना १० मिनिटें अधिक वेळ दिला. परंतु तेवढ्यांतहि ते तेथून निघून गेले नाहीत. तेव्हा ९ वाजून ५२ मिनिटांनी मी त्या दोघांना अटक केली. दुपारीं १ वाजता मी त्यांच्यावरील फिर्याद दाखल केली."

जेल सुपरिंटेंडेंट मि. मार्टिन म्हणाले, "निशाणी नं. १ अ चा मला दाखविण्यांत आलेला हुकूम मला सरकाराकडून आला. मी तो सकाळीं ९ वाजून ५ मिनिटांनी मि गांधी यांजवर बजावला. त्यावर मि. गांधी यांनी सही केली व एकदोन मिनिटात मला परत दिला."

### पुनः येरवडा !

टॅक्सी ड्रायव्हर मि. पी. मॅसी म्हणाला, "मी येरवडा तुरुंगापाशीं सकाळीं नऊ सव्वानऊच्या सुमारास आलों. नंतर मोटार तुरुंगाच्या दरवाज्याजवळ बोलावण्यांत आली. मि. गांधी व आणखी एक गृहस्थ तींत बसलों. मि. गांधी यांना एखाद्या निवांत जागीं जावयाचे होतें. म्हणून तुरुंगापासून एक मैलावर येरवड्याच्या हद्दींतच मोटार चालवून मी उभी केली; सुमारें अर्ध्या तासानंतर एक पोलीस अधिकारी तेथे आले व त्यांनी गांधींना 'तुम्हाला दिलेली वेळेची मुदत संपली' असें सांगितलें. त्यावर 'आपला हुकूम पाळतां येत नाही याबद्दल खेद वाटतो. तुम्हाला आम्हां दोघांवरहि खटला भरतां येईल' असें गांधींनी उत्तर दिलें. नंतर गांधींना आणखी दहा मिनिटें वेळ देण्यांत आली. ती वेळ संपल्यावर पोलीस अधिकारी त्यांजजवळ आले आणि कांहींसें बोलले. नंतर मोटार येरवडा तुरुंगाकडे नेण्याविषयीं मला सांगण्यांत आलें व त्याप्रमाणे मी आपली मोटार येरवडा तुरुंगापाशीं घेऊन गेलों."

### महात्माजींची लेखी जबानी

शेवटीं महात्मा गांधी आपल्या जबानींत म्हणाले, "फिर्यादीपक्षातर्फे साक्षीदारांनी दिलेल्या जबान्यांतील सर्व विधानें बिनचूक आहेत. मी मुंबई सरकारच्या हुकुमाचा भंग जाणूनबुजून व बुद्धिपुरस्सरच केला.

वस्तुतः, मी शांततेचा परम भोक्ता आहें. सुसंघटित सरकाराचे कायदे स्वयंस्फूर्तीने पाळणें हें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य आहे असें मानणारांपैकीं मी एक नागरिक आहें. परंतु प्रत्येक नागरिकांच्या आयुष्यांत असे प्रसंग येतात कीं, तेव्हा त्याला नाइलाजाने सरकाराचे कायदे मोडणें भागच पडतें. असा प्रसंग माझ्यावर प्रथम १९१९ सालीं आला. स्वतः नुसता कायदेभंग करणेंच नव्हे तर, लोकांत त्याचा प्रचार करणें हें मी आपलें कर्तव्य समजतों. सध्या ज्या कायद्यांनीं हिंदुस्थानाचा राज्यकारभार चालविला जात आहे त्यामुळे हिंदुस्थानाचें आर्थिक आणि नैतिक दृष्ट्या अव्याहत अधःपतनच होत आहे. तसेंच ज्या कायद्यान्वयें आज माझ्यावर खटला भरण्यांत आला आहे, तो कायदाहि मी कायदे कां मोडतों, ही गोष्ट सिद्ध करण्यास पुरेसा आहे. मी मोकळा होतो तेवढ्या वेळांत अनेक लोकांशीं माझे संबंध आले. त्यावरून लहान-थोर, गरीब-श्रीमंत, सुशिक्षित-अशिक्षित या सर्वांचेंच अधःपतन होत असल्याचें मला दिसून आलें! प्रत्येकाला आपल्या स्वातंत्र्याबद्दल आणि जिनगीबद्दल कसली ती शाश्वतीच राहिलेली नाही. अशा लोकांत राहाणें म्हणजे मला मेल्यापरी मेलें होते. हीं दुःखें नाहीशी करण्यास आत्मक्लेश हाच एक उपाय आहे असें माझ्या मनाने घेतलें व म्हणूनच सध्याच्या सरकाराला विरोध करण्याचें मीं ठरविलें. मी जन्माचा अनत्याचारी, परंतु मलाहि असा कायदेभंग करण्याशिवाय गत्यंतरच राहिलें नाही. मला शेवटीं सरकाराला एकच गोष्ट सांगावयाची आहे आणि ती ही कीं, सरकाराने राजबंद्यांचे अ, ब, क असे जे वर्ग पाडले आहेत ते मला सर्वथैव अमान्य आहेत. म्हणून मला सर्वांत कनिष्ठ असा वर्ग देण्यांत यावा."

### कांहीं प्रश्नोत्तरें

महात्माजींची जबानी झाल्यावर मॅजिस्ट्रेट यांनी आरोप पत्रिका तयार केली व ती म. गांधींना वाचून दाखविली. त्यावेळीं म. गांधी आणि मॅजिस्ट्रेट यांजमध्ये पुढील आशयाचीं प्रश्नोत्तरें झालीं.

मॅजिस्ट्रेट—तुमच्यावरील आरोप तुम्हांला समजला काय?

म. गांधी—होय, मला कळला.

मॅजिस्ट्रेट—तर मग, गुन्हा तुम्हाला कबूल आहे?

म. गांधी—होय; गुन्हा मला कबूल आहे.

[ जबाब घेण्यांपूर्वी महात्माजींना पुढील प्रश्न विचारण्यांत आले. त्या वेळीं मॅजिस्ट्रेट व महात्माजी यांजमध्ये झालेलीं प्रश्नोत्तरें खाली दिलीं आहेत. ]

प्रश्न— तुमचें नांव काय?

उत्तर— मोहनदास करमचंद गांधी.

प्रश्न—तुमचें वय काय?

उत्तर— ६४ वर्षें.

प्रश्न—तुमचा धंदा कोणता?

उत्तर—सूत कांतणें, कापड विणणें, शेती करणें.

प्रश्न—राहण्याचें ठिकाण?

उत्तर—अहमदाबाद जिल्ह्यांतील साबरमती आश्रम.

नंतर मॅजिस्ट्रेटांनी म. गांधी यांना १ वर्ष साध्या कैदेची शिक्षा सुनावून त्यांना 'अ' वर्ग देण्याबद्दल शिफारस केली. त्यानंतर श्री. महादेवभाई यांजवरील खटला चालून त्यांनाहि १ वर्ष साध्या कैदेची शिक्षा सांगण्यांत आली. त्यांना 'ब' वर्ग देण्याबद्दल मॅजिस्ट्रेटांनी शिफारस केली.

## हिंदुमहासभेची कैफियत

भावी राज्यघटनेसंबंधाने पार्लमेंटाच्या जोडकमिटीपुढे हिंदु महासभेतर्फे पुढील सूचना करण्यांत आल्या आहेतः—

### हिंदी लोकांच्या आकांक्षा

१. हिंदुस्थानांत आज जी अस्वस्थता दिसत आहे ती केवळ राजकीय आहे. आर्थिक आपत्ति व हिंदु-मुसलमानी तेढ, या दोन प्रश्नांनी मूळच्या अस्वस्थतेंत भर पडली आहे इतकेंच. लोकांना वसाहतीच्या दर्जाचें पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य पाहिजे. तें मिळाल्याखेरीज लोकांचें समाधान होणार नाही व देशांतहि शांतता नांदणार नाही. स्वराज्य प्राप्त झाल्यावर हिंदु-मुसलमानांच्या लढ्यासारखे प्रश्न आपोआप सुटून, देशांत एक नवेंच युग निर्माण होईल, आणि बेकारी, दारिद्र्य या गोष्टी नष्ट होतील असा लोकांना विश्वास आहे.

२. या संबधांत लोकांना आशा उत्पन्न होण्याजोगीं कारणेंहि घडलीं आहेत. सरकाराने वेळोवेळीं आश्वासनें देऊन व जाहीरनामे काढून, आपलें अनुकूल धोरण दर्शविलें आहे. लॉर्ड आयर्विन यांनी ता. ३१ ऑक्टोबर १९२९ रोजीं केलेल्या भाषणांत व मुख्य प्रधानांनी कॉमन्स सभेंत केलेल्या भाषणांत लोकांच्या आकांक्षेचा पुरस्कार केलेला आहे व हल्लीच्या पार्लमेंटाने भावी राज्यघटना संयुक्त स्वरूपाचा

असून, तींत राखीवपणा कोठे असावा हेंहि सांगितलें आहे. त्यासंबंधानें आमच्या सूचना अशा कीं:—

**घटना अशी पाहिजे**

( १ ) कार्यकारी मंडळ कायदेमंडळाला जबाबदार राहावें, हें तत्त्व अ. भा. फेडरेशन होण्यावर अवलंबून ठेवूं नये.

(२) फेडरेशन झालें तर आम्हांस पाहिजेच आहे, परंतु तें केव्हा होणार हें सांगतां येणें शक्य नसल्यानें, कार्यकारीमंडळ कायदेमंडळालाच जबाबदार असावें, अशी योजना ब्रि. हिंदुस्थानापुरती करावी. संस्थानिकांना घटनेंत येण्यास सवड ठेवावी. तथापि त्यांच्यासाठी थांबून राहूं नये.

(३) संक्रमणकाल दहा वर्षांपेक्षा जास्त नसावा. दरम्यान भारतमंत्र्यानें केलेल्या (आर्थिक) देवघेवीची चौकशी करण्यासाठी एक कमिटी नेमावी. दहा वर्षांनंतर तो कारभार हिंदी लोकांच्या हातीं सोंपवावा. संक्रमणकाळांत नेमावयाचे मंत्री लोकनियुक्त सभासदांपैकीं असावे. म्हणजे या काळांत लोकांना राज्याधिकाराचें शिक्षण घेतां येईल.

(४) डिफेन्स सब कमिटीच्या सूचनेप्रमाणे, हिंदुस्थानाची राजकीय प्रगति जसजशी होत जाईल त्याप्रमाणे हिंदुस्थानचें संरक्षण एकट्या ब्रिटिशांच्या हातीं न ठेवतां हिंदी लोकांकडे तें सोंपविण्यांत यावें.

(५) जास्तींत जास्त तीस वर्षांच्या काळांत सैन्याचें हिंदीकरण करण्यांत यावें. हिंदुस्थानांतील लष्करी कॉलेजामध्यें हल्ली फक्त ६० उमेदवार घेण्यांत येतात, तें प्रमाण वाढविण्यांत यावें.लष्कर,आरमार व वैमानिक दळ यांमध्यें प्रतिवर्षी कमिशन्ड जागांसाठी जी भरती केली जाते ती हिंदी लोकांतून चढाओढीची परीक्षा घेऊन करावी.

(६) लष्करी व बिनलष्करी जाती असा भेदभाव आज केला जातो तो रद्द करण्यांत येऊन, लष्करी नोकऱ्या सर्व जातींस खुल्या ठेवाव्या.

**श्वेतपत्रिकेंतील दोष**

३. श्वेतपत्रिकेची नीट छाननी केली असता असें आढळून येईल कीं, त्यांत सुचविलेल्या राज्यघटनेंत हिंदी लोकांचा दर्जा मुळीच वाढला नाही. लोकांकडे जबाबदारी कांहीच सोंपविण्यांत आलेली नाहीं. त्यासंबंधानें सभेचें म्हणणें असें कीं:—

(१) श्वेतपत्रिकेंतील घटनेमुळे लोकांतील असंतुष्टता कमी होणार नाहीं.कारण हिंदुस्थान हा जित देश आहे. व त्यावर इंग्लण्डाच्या बादशहांची मालकी असल्यानें, त्या धोरणानुसार कारभार करावयाचा आहे या भावनेनें सर्व घटना तयार करण्यांत आली असल्याचें तिजवरून दिसतें. हिंदी लोकांचें हित त्यांत पाहिलें नाहीं.

(२) वसाहतीच्या दर्जाच्या स्वराज्याचा तिला गंधहि नाहीं.

(३) विशिष्ट कालमर्यादेपर्यंत निर्बंध ठेवून, त्या कालात वसाहतीचे हक्क मिळतील इतकी मध्यवर्ती जबाबदारी द्यावी असें ठरलें असताहि कालमर्यादा किती ती ठरविण्यांत आली नाहीं.

(४) मध्यवर्ती जबाबदारी संस्थानिकांच्या इच्छेवर व जागतिक आर्थिक स्थितीवर अवलंबून ठेवण्यांत आली आहे.गव्हर्नर-जनरलाला नानारूपांनी पुष्कळच अधिकार देण्यांत आले आहेत.संयुक्त कायदेमंडळाला रेल्वेची व्यवस्था पाहण्यासाठीं आपलें बोर्ड नेमण्याची सत्ता दिलेली नाहीं. उत्पन्नापैकीं ८० टक्के उत्पन्नावर कायदेमंडळाला मत देण्याचा हक्क नाहीं. विशिष्ट कालमर्यादेंत सैन्याचें हिंदीकरण करण्याची योजना नाहीं. पब्लिक व पोलिस सर्व्हिसेस आणि इतर नोकऱ्या यांवरील ताबा भारतमंत्र्यांच्याकडे आहे घटनेंतून वसाहतीचें स्वराज्य आपोआप निर्माण होईल अशी योजना नाहीं. मूलभूत हक्क कोणते त्यांची व्याख्या ठरविण्यांत आली नाहीं. जातवारीचा निर्णय मुसलमानांच्या बाजूनें दिला आहे. त्यांत मुसलमानांना जादा सवलती देण्यांत आल्या आहेत.

५. हिंदुमहासभेचें असें मत आहे कीं, ब्रिटिश सरकारनें दिलेल्या जातवारीच्या निर्णयावर निर्माण झालेल्या घटनेंतून वसाहतीचें स्वराज्य कधींच निष्पन्न होणार नाहीं.

# मुंबई कौन्सिलाचें कामकाज

ता. ७ ऑगस्ट रोजीं दुपारीं दोन वाजता पुणें येथील कौन्सिल हॉलमध्यें मुंबई कायदेमंडळाच्या बैठकीस सुरुवात झाली.

प्रारंभीं नवीन सभासदांचा शपथविधि झाला व अध्यक्षांनी त्यांच्याशीं स्मितपूर्वक हस्तांदोलन केलें. त्यानंतर श्री. कामत, डॉ. कोलेंको, शेख अब्दुल अझीद व श्री. पाटील या चौघां सभासदांना 'चेअरमन' नेमल्याचें अध्यक्षांनी जाहीर केलें. हा प्रास्ताविक भाग आटोपल्यावर प्रश्नोत्तरांचा विधि उरकण्यांत आला. एक दोन वेळां वादाची झुळूकहि वाहिली. मोटारकरितां ठेवलेली जकातनाकीं १९३४ च्या मार्चपासून कमी करण्यांत येणार आहेत. सिटी सर्व्हेचा उतारा मागण्याच्या अर्जांवर आण्यांचा स्टँप लावण्याची गरज नाहीं वगैरे महत्त्वाची माहिती या प्रश्नोत्तरांचे मंथनांत बाहेर आली.

त्यानंतर बरोबर २ वाजून २५ मिनिटांनी गव्हर्नरांची स्वारी आपल्या इतमामानिशी सभागृहांत प्रविष्ट झाली. त्यांनी पंचवीस मिनिटें भाषण केलें ते म्हणाले,

### गव्हर्नरांचें भाषण

"गेल्या बऱ्याच वर्षांपेक्षा राजकीय वातावरण यंदा पुष्कळ शांत झालें आहे हे सांगण्यास मला संतोष वाटतो. मि. गांधी यांच्या नव्या धोरणाच्या पोटीं कोणतीं संकटें आहेत याची जाणीव ठेवूनच मी हे विधान करीत आहे. राजकीय व आर्थिक या दोन्ही दृष्टींनी परिस्थिति निवळल्यासारखी असतांना, मि. गांधी यांना पुनः विध्वंसक धोरण आंखलें आहे. त्याच्या पूर्वीच्या पाठीराख्यांनाहि त्यांच्या कार्यक्रमाचा फोलपणा पटत चालला आहे. असें असतांना गांधींनी निष्फळ व घातक असा कार्यक्रम पुनः चालवावा ही दुःखाची गोष्ट होय. तेव्हा राष्ट्राला १९३० सालच्या दुःखांत आणि कोंडमाऱ्यांत लोटूं नये म्हणून, तुम्हीं सभासदांनी दिलेल्या जादा अधिकारांचा उपयोग सरकारानें केला आहे. यायोगें विधायक कार्य करण्याला मैदान मोकळें होईल हे जाणून, लोक सरकारांचे अभिनंदन करतील असा मला विश्वास आहे. इंग्लंडमध्येंहि पार्लमेंटरी जॉइंट कमिटी नवीन सुधारणा घडविण्याच्या कामांत प्रगति करीत आहे.

### समाधानकारक अंदाजपत्रक

गेल्या फेब्रुवारीच्या बैठकींत काटकसरीसंबंधींचा विचार पुढे आला होता. तेव्हापासून आम्हीं जरूर तेथे काटकसर केलेली आहे. पगारांचें प्रमाण बदलल्यामुळे, सुमारे ४० लक्ष रु.ची बचत होणारी आहे. 'पुनर्घटना मंडळा'ने केलेल्या सूचना अंमलांत आणण्याचा प्रयत्न आम्हीं केला. त्याचा परिणाम काय झाला तें या बैठकीच्या शेवटीं आपल्याला सांगण्यांत येईल. सध्या मी एवढे सांगू शकतों कीं, यंदाचे अंदाजपत्रक तोंडमिळवणीचें होईल. त्यांत तूट येणार नाही. अशाच इतर समाधानकारक बाबी आहेत. सक्कर धरणाचा शेतीस उपयोग होत आहे, बॅकबेवरील सरकारी जमीन विकली जात आहे, विजेचा पुरवठा अनेक शहरांना होत आहे व पाणीपुरवठा व ड्रेनेज यांकडे म्युनिसिपालिट्या लक्ष देत आहेत. प्राथमिक शिक्षणांत जी शें. २० टक्के कपात करावी लागली तिच्यापैकीं ६ टक्के कपात कमी करण्यांत आली आहे.

### शेतकीच्या पिकांचें संशोधन

औद्योगिक शिक्षणाची सोय करणें सरकाराला अगत्याचें वाटत होतेंच; पण द्रव्याभावीं त्यांना आतापर्यंत कांहीं करता आलें नाहीं. यंदा मुंबई विद्यापीठानें धंदेशिक्षणाचें खातें उघडण्याचें ठरविलें आहे. त्यासाठी सरकारानें कांहीं अटींवर 'रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्स' च्या इमारतीचा उपयोग करून देण्याचें योजलें आहे. या धंदेशिक्षणाच्या व्यवस्थेमुळे मध्यम वर्गांतील बेकारीवर थोडा फार इष्ट परिणाम होईल अशी आशा आहे. बहुतेकांचें लक्ष राजकारणानें वेधून घेतलेलें असलें, तरी शेतकी खातें हें आपलें काम बजावीत आहे. कापसासंबंधी नवे तीन शोध लावण्यांत आले असून, त्यांचा प्रचार अभूतपूर्व प्रमाणांत झाला पाहिजे. त्यायोगें शेतकऱ्यांना प्रत्यक्ष फायदा होण्यासारखा आहे. कापसाप्रमाणें ऊंस पिकविण्याला किती खर्च येतो याची पाहाणी करण्यासाठीं एक अधिकारी मुद्दाम नेमण्यात आला आहे. आणि त्याचे हाताखालीं जिल्ह्यांसाठी ४ व खेड्यांसाठी २४ कामगार दिलेले आहेत. तसेच, पाडेगांव येथें उंसाचें संशोधन चाललें आहे. आंबे परदेशीं पाठविण्याची व्यवस्था होत आहे. सोलापूर व विजापूर येथें 'ड्राय फार्मिंगचा' प्रयोग सुरू होणार आहे. आणि गणेशखिंडीच्या बागेतहि फळांसंबंधीं प्रयोग सुरू होणार आहेत. याशिवाय शेळ्या-कोंबड्यांची पैदास सुधारणें, यांत्रिक नांगरांचा प्रसार वाढविणें, लिंबाचें संशोधन करणें, कारवार जिल्ह्यांत सुपारीवर पडणाऱ्या रोगाचें संशोधन करणें इत्यादि योजनांचाहि विचार चालू आहे.

### ग्रामोद्धार व 'दरबार'

खेड्यांच्या सुधारणेविषयीं माझी किती उत्कंठा आहे हें तुम्हांला माहिती आहेच. कमिशनर कलेक्टर व त्यांचे हाताखालील कामगार यांनी खेडोपाडीं गांव-पंचायती, सहकारी संस्था वगैरे संस्था स्थापण्याकडे लक्ष द्यावें. लोकल बोर्डांनीहि खेड्यांचें आरोग्य, ज्ञान व वैभव वाढेल अशी खटपट करावी. रयतेपैकीं, रावापासून रंकापर्यंत सर्वांनी या ग्रामसुधारणेच्या कार्यास हातभार लावावा यासाठीं सरकार एक योजना करीत आहे. मी लवकरच प्रत्येक भागांत एकेक दरबार भरविणार आहे.त्यांत पाटील व खासगी संस्था यांचें सहकार्य कसें घडून येईल व खेड्यांची सुधारणा कशी होईल याचा विचार होईल. या कार्यासाठीं लागणारा थोडाबहुत पैसा आपण मंजूर करालच.

आपणापुढील माझें हें शेवटचें भाषण आहे. येत्या डिसेंबरांत मी येथून जाणार. आपलीहि मुदत एरवीं यावेळींच भरली असती; पण नव्या राज्यघटनेमुळे ती वाढविण्यांत आली आहे. तुम्हांपैकीं बरेचजण त्या नव्या घटनेंतील कायदेमंडळांतहि निवडून याल आणि आपल्या अनुभवाच्या बळावर नवी राज्यघटना यशस्वी कराल अशी मला आशा आहे."

### म्युनिसिपल ॲक्टाची दुरुस्ती

गव्हर्नरांनी भाषण वाचून दाखविल्यावर ते लगेच सभागृहांतून निघून गेले. त्यानंतर मुंबई म्यु. ॲक्टाच्या दुरुस्तीबद्दलचा सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट सर रस्तुमजी वकील यांनी सादर केला व त्यावर सुमारें अर्धा तास भाष्य केलें. त्यासंबंधीं मुंबई कार्पोरेशनचा अभिप्राय काय आहे तो बॅ. चंदावरकरांनी निवेदन केला. डॉ. कोलॅको, सोळंखे, चितळे वगैरे सभासदांचीं भाषणें झालीं.

# संशयित शब्दांचा खुलासा

ता. १.ऑगस्टच्या केसरीच्या अग्रलेखांतील 'संगतीचा गुण' या छोट्या सदराखाली एक वाक्य असें पडलें आहे—"स्वतः अणे यांच्याच प्रांतांत अणे यांचे स्नेही सोबती व शिष्य म्हणविणारे लोकच कॉंग्रेसविरुद्ध बंड करून आज उठले आहेत"!

आमचे अमरावतीचे बंधु 'उदय' कर्ते यांनी ता. ८ ऑगस्टच्या अंकांत या वाक्यांतील 'कॉंग्रेस विरुद्ध बंड' या शब्दांना हरकत घेतली आहे. पण उदयकर्ते स्वतः करतात त्याप्रमाणें या शब्दांचा आमचा अर्थ नाही. "कॉंग्रेस सर्वस्वी सोडून, कॉंग्रेसचे सभासदहि न राहतां निघून चालतें होणें" असा त्या शब्दांचा अर्थ असणें शक्यच नाही. त्या वाक्यांतील "कॉंग्रेस" या शब्दाचा आमचा अर्थ "महात्मा गांधी" असा अभिप्रेत आहे;व तो अर्थ घेतला असतां आमचें वाक्य मुळींच चूक ठरणार नाही;आणि तोच अर्थ घेणें प्राप्त. कारण पुणें परिषदेंत निर्णय प्रत्यक्ष झाला तो म. गांधींच्या वजनदारीमुळे झाला. आणि कॉंग्रेस शब्दाचा कायदेशीर अर्थ इतर कांहीहि असला तरी, आज व्यवहारतः कॉंग्रेस व गांधी यांची समव्याप्तिच आहे हें कोणीहि कबूल करील. म्हणून 'उदया'ने आक्षेप घेतलेल्या आमच्या वाक्यांतील "कॉंग्रेस विरुद्ध बंड" याचा अर्थ "म. गांधींविरुद्ध बंड" म्हणजे पर्यायाने "गांधींनी पुणें परिषदेकडून मिळविलेल्या निर्णयाविरुद्ध बंड" असाच केला पाहिजे.

'उदय'कारांच्या लक्षांत हें आलें नाही कीं, केसरीच्या याच लेखांत "अणे व पुणें यांची मैत्री" या दुसऱ्या एका सदराखाली आम्ही "कॉंग्रेस विरुद्ध उघड बंड करून" हेच नक्की शब्द एका वेगळ्या प्रसंगाला उद्देशून घातले आहेत. तें वाक्य असें—"नंतर कॉंग्रेसविरुद्ध उघड बंड करून, दास व नेहरू यांना मिळून ते (अणे) स्वराज्यपक्षाचे प्रांतिक पुढारी बनले." या वाक्यांत बंड याचा अर्थ कॉंग्रेसच्या सभासदत्वाचा राजीनामा देऊन ती सोडून जाणें असा होणें शक्यच नाही, हें उदयकारांच्या लक्षांत तेव्हाच येण्यासारखें आहे.

या पूर्वीच्या (१९२४च्या) 'बंडाचा परिणाम 'कॉंग्रेस—स्वराज्य' पक्ष स्थापण्यांत झाला. त्या पक्षांतील पुढाऱ्यांनी कॉंग्रेसचें सभासदत्व सोडलें नव्हतें. किंबहुना कौन्सिलांत जाऊन बसणारे कांही 'बंडखोर' स्वराज्यपक्षीय पुढारी पुढे कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीचे

सभासदहि होते. तसेंच प्रतिसहकार पक्षाची स्थापना झाली तेव्हा या पक्षाच्या सभासदांनी कॉंग्रेसचे सभासद असलें पाहिजे असेंच ठरविण्यांत आलें. १९२० सालीं कॉंग्रेस बेकायदा ठरविण्यांत येत आहे अशा भीतीच्या वेळीं प्रतिसहकार पक्षाचे अनेक लोक मुद्दाम नवा फॉर्म भरून देऊन कॉं. कमिटीचे सभासद झाले. आणि स्वतःस कॉं. विरुद्ध बंडखोर म्हणविणारे केळकर यांनीं, या ताज्या आधारावरच, पुणें परिषदेंत मेहेरअल्लींच्या पोरकट आक्षेपास उत्तर देऊन त्यांना गप्प बसविलें. अजूनसुद्धा लिबरल पक्ष कॉंग्रेस मेंबरशिपला हरकत घेतो, आणि त्यामुळेच, लिबरल पक्ष विचारानें पुढे गेला असला तरी, राष्ट्रीय पक्षांत सामील होत नाही. या सर्व गोष्टींवरून हें दिसून येईल कीं, कॉंग्रेसविरुद्ध बंड म्हणजे फक्त तिचे कांही ठराव अमान्य करणें, बंधनकारक न मानणें, इतकाच अर्थ होतो. कॉंग्रेसच्या सभासदत्वाचा राजीनामा देणें असा होऊंच शकत नाही.

शिवाय 'बंड' हा शब्दच मुळी राज्यसत्तेशीं प्रजाजनाचें नातें मानणारालाच लावतां येतो. परराष्ट्राच्या प्रजेला लावितां येत नाही. बंडाचा उद्देश, आपल्यावरील वरिष्ठ राजकीय सत्तेला सत्ता या नात्याने मान देऊन, फक्त कांही बाबतींत न जुमानणें इतकाच असतो. तात्पर्य, बंड या शब्दाचा जो अर्थ होऊंच शकत नाही, म्हणून जो अर्थ आम्ही करूंच शकत नाही, त्या अर्थानें आम्ही तो शब्द वापरूं कसा? आणि उदयकारांनी आपल्या सोईकरितां तो अर्थ तसा केला तरी तो होत नाही. ती त्यांची नजरचूकच ठरते.

पुणें परिषदेने केलेले कायदेभंगासंबंधाचे निर्णय वऱ्हाडच्या राष्ट्रीय पक्षास फारसे संमत नाहीत. वऱ्हाडांत सामुदायिक कायदेभंग तर राहोच, पण वैयक्तिक कायदेभंगहि फारसा होईल असें केसरीला ता. १ ऑगस्टचा लेख लिहितांना वाटत नव्हतें. आणि वऱ्हाडच्या राष्ट्रीय पक्षाला जी गोष्ट मनांतून मान्य नाही, ती केवळ केसरीला खोटा पाडण्याकरिता तो पक्ष करील असेंहि आम्हांस वाटत नाही. याचें एक प्रत्यंतर वऱ्हाड प्रां. कॉं. क. चे अध्यक्ष यांचा सर्वाध्यक्षत्वाचा राजीनामा! असो. पण कॉंग्रेसला धरून राहणाऱ्या वऱ्हाडांतील राष्ट्रीय पक्षाच्या वर्तनाचें व मनःस्थितीचें इतर दृष्टीने वर्णन यथार्थतेने करण्याचा हक्क पुण्यांतील 'केसरी'पेक्षा वऱ्हाडच्या राजधानींतील 'उदय' पत्रालाच अधिक पोंचतो, ही गोष्ट आम्हाला सर्वस्वी केव्हाहि मान्य असली पाहिजे व आहेहि. म्हणून 'उदया'ने 'कॉंग्रेसविरुद्ध बंड' या आमच्या शब्दांत सुचविलेली दुरुस्ती आम्ही प्रांजलपणें स्वीकारतों.

तसेंच श्री. बापूजी अणे यांच्यासंबंधाने केसरीनें ता. १ ऑगस्टच्या अंकांत जें लिहिलें त्याचाहि कांही खुलासा 'उदय' पत्राने केला आहे. याहि संबंधाने आमचें इतकेंच म्हणणें कीं, श्री अणे हे पुणें परिषद संपताच पुण्याहून निघून गेले, व त्यानंतर वऱ्हाडांत त्यांचा बराच मुक्काम झाला. यामुळे पुणें परिषदेसंबंधी गुंतागुंतीच्या निरनिराळ्या प्रश्नांवर अणे यांचे खुलासेवार मनोगत कळण्यास त्यांच्या स्नेह्यांना तिकडे जी प्रशस्त संधि मिळाली ती इकडे मिळणें शक्य झालें नाही, म्हणून याहि बाबतींत, 'उदय'कारांनी जें विवेचन प्रस्तुत अंकांत केलें आहे तेंच वस्तुस्थितीस धरून असण्याचा कदाचित् अधिक संभव आहे, असें मानण्यास केसरीला फारसा प्रत्यवाय वाटत नाही. मात्र नागपुराकडील केसरीच्या बातमीदाराने इकडे काय मत कळविलें व खुद्द केसरीइतकेंच श्री. अणे यांच्याशी स्नेहबद्ध असलेल्या नागपूरच्या 'महाराष्ट्रां'त काय मत प्रगट झालें याचा विचार केल्यास स्वतःला निराधार वाटणारें मत केसरीने प्रगट केलें असें सहसा कोणी म्हणणार नाही.

असो; 'उदय' पत्राच्या या अग्रलेखांतील खालील वाक्यें आम्ही आनंदानें उद्धृत करतोंः-

"लो. ना. अणे केळकरकृत लेखसंग्रहास प्रस्तावना लिहितांना जसे होते तसेच आजहि आहेत व उद्याहि राहतील हें निश्चित ... पण ते कॉं. कमिटीचे अध्यक्ष राहून

कायदेभंग बंद करा असें कसें म्हणतील? शिस्तीकरिता त्यांना तसें म्हणतां येत नव्हतें! ...गांधींचे जे अनुयायी आहेत त्यांना अणे मुळीच अध्यक्षपदावर नको होते व आजहि नको आहेत ...लोकनायक अणे यांनी राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष म्हणून काढलेल्या जाहीर पत्रकासंबंधाने प्रामाणिक मतभेद नागपूर—वऱ्हाडाकडे आहे ही गोष्ट खरी. पण तेवढ्याने केसरीच्या नागपुरी बातमीदाराने केलेलें वर्णन मात्र आज सार्थ आहे असें नाही."

केसरीच्या लेखांतील 'बंड' या शब्दाची थोडीशी थट्टा करण्याकरिता 'उदय'कारांनी "केसरीविरुद्ध उदयाचें बंड" अशी भाषा वापरली आहे. पण ती सांगूनसवरून मुद्दामच वापरली आहे! अर्थात् 'तुला भिवविण्याकरिता आला मी ओरडतों हां'! असें ओरडणाराने सांगितल्यावर त्याला कोण भिईल? किंबहुना ही सूचना 'उदय'कारांनी स्नेहभावाने आगाऊच दिली नसती तरी, उदयकारांच्या 'बंडा'ने केसरी भ्याला नसता. मनांत प्रेम असलें म्हणजे बाहेरच्या अंगाचीं नखें एकमेकांला लागलीं तरी रक्त निघत नाही. पुराणांतरींची कृष्णार्जुनांच्या युद्धाची कथा पुष्कळांना माहीत आहे. त्यांना व ज्यांनी केळकरांनी लिहिलेलें कृष्णार्जुन-युद्ध हें नाटक पाहिलें किंवा वाचलें असेल त्यांना अशल्या युद्धाच्या दुष्परिणामांची भीति स्वप्नांतहि वाटणार नाही हें सांगावयास नकोच. असो. वऱ्हाड—नागपुराकडच्या काय वा महाराष्ट्रांतील काय, कॉंग्रेसला सभासदत्वाच्या दृष्टीने कां होईना पण मान्यता देणाऱ्या राष्ट्रीय पक्षाचें आता हेंच काम आहे कीं, कौन्सिल प्रवेशासक्त विधायक कार्यक्रम यापुढील काळांत यशस्वी करावयाचा. म्हणून तो यशस्वी करण्याकरिता सर्वांनी, वादाच्या क्षणिक भावना व मुद्दे टाकून देऊन, मुख्य व कायमच्या धोरणाच्या दृष्टीने आपल्या शक्तीचें व बुद्धीचें संघटन केलें पाहिजे.

# रेल्वेच्या कारभाराची पुनर्घटना

नवी फेडरल राज्यघटना अमलांत आल्यावर हिंदुस्थानांतील रेल्वेचा कारभार कसा चालविण्यांत यावा याची रूपरेषा आंखण्याकरिता ब्रिटिश प्रतिनिधि व हिंदी मध्यवर्ति कायदेमंडळाचे कांही सभासद यांची परिषद लंडन शहरीं नुकतीच भरविण्यांत आली होती. त्या परिषदेने केलेल्या सूचनांचा खर्डा प्रसिद्ध झाला असून तो वाचून हिंदी जनतेची निराशा झाल्याशिवाय राहाणार नाही. लंडन परिषदेच्या मुख्य सूचना अशा—

(१) हिंदुस्थानांतील रेल्वेचा कारभार सात सभासदांच्या रेल्वे ऑथॉरिटी या नवीन संस्थेकडे सोपविण्यांत यावा. (२) रेल्वे ऑथॉरिटीचे सभासद कोणीं नेमावे यासंबंधी परिषदेंत मतभेद झाला. परिषदेंतील हिंदी मध्यवर्ति कायदेमंडळाच्या हिंदु व मुसलमान सभासदांचें मत असें कीं, रेल्वे ऑथॉरिटीचे सर्व सभासद गव्हर्नर जनरल यांनी फेडरल मंत्रिमंडळाच्या शिफारशीप्रमाणे नेमावे. मात्र या सात सभासदांपैकीं दोन सभासद मुसलमान व एक युरोपियन असावा. ब्रिटिश प्रतिनिधी व सर मनुभाई मेहता प्रभृति याचें मत असें कीं, तीन सभासद गव्हर्नरजनरल यांनी स्वतःच्या इच्छेनुसार नेमावे व चार फेडरल मंत्रिमंडळाच्या शिफारशीप्रमाणे नेमावे. (३) रेल्वे ऑथॉरिटीवर नेमावयाचा सभासद नेमणकीपूर्वी एक वर्षपर्यंत तरी कोणत्याहि कायदेमंडळाचा सभासद असता कामा नये. कायदेमंडळाच्या सभासदाची अर्थातच रेल्वे ऑथॉरिटीवर नेमणूक होऊं शकणार नाही. व्यापार, उद्योगधंदे, शेती व पतीचे व्यवहार यांचें विशेष ज्ञान असणाऱ्यांचीच 'ऑथॉरिटी'वर सभासद म्हणून नेमणूक करण्यांत यावी. (४) रेल्वेचें सर्वसाधारण धोरण ठरविण्याचा अधिकार फेडरल कायदेमंडळाकडे राहावा. रेल्वेच्या जमाखर्चाचें अंदाजपत्रक फेडरल कायदेमंडळापुढे मांडण्यांत यावें व त्या अंदाज-

पत्रकाची सर्वसाधारण चर्चा फेडरल कायदेमंडळाने करावी. परंतु त्यामध्ये फेरफार घडवून आणण्याचा अधिकार कायदेमंडळाला नसावा. आगगाडीचे नवीन रस्ते बांधावयाचे झाल्यास व त्याकरितां जादा रक्कम पाहिजे असल्यास ती देण्याचा अगर नाकारण्याचा अधिकार कायदेमंडळाकडे असावा. (५) फेडरल सरकाराच्या वाहतुकीच्या खात्याच्या दिवाणाने रेल्वेच्या धोरणाची चर्चा करण्याकरिता जरूरीप्रमाणें रेल्वे ॲथॉरिटीची सभा बोलवावी व अशा सभेचें त्याने अध्यक्ष व्हावे. परंतु रेल्वेच्या कारभाराची चर्चा करण्याकरिता रेल्वे ॲथॉरिटीच्या सभांना त्याला हजर राहतां आलें तरी कोणत्याहि प्रश्नावर त्याला मत देण्याचा अधिकार नसावा. ( ६ ) रेल्वे ॲथॉरिटीने व्यापार, शेती, उद्योगधंदे वगैरेंचे हितसंबंध लक्षांत घेऊन व्यापारीदृष्टीने रेल्वेचा कारभार पाहावा. रेल्वेचा खर्च भागून जो निव्वळ फायदा उरेल त्याची विल्हेवाट फेडरल कायदेमंडळ वेळोवेळीं ठरवील त्याप्रमाणें करावी. ( ७ ) रेल्वेचा कारभार चालविण्याकरितां रेल्वेच्या कामाची सर्वांगीण माहिती असलेल्या माणसाची चीफ कमिशनर म्हणून गव्हर्नर जनरलच्या अनुमतीने नेमणूक करावी. रेल्वे खात्यांतील नेमणुकीचे नियम करण्याचा अधिकार रेल्वे ॲथॉरिटीला असावा. निरनिराळ्या जातींना कोणत्या प्रमाणांत नोकऱ्या द्याव्या यासंबंधाने जे नियम ठरविण्यांत येतील ते रेल्वे ॲथॉरिटीने अमलांत आणले पाहिजेत. ( ८ ) रेल्वेच्या वाहतुकीचे किमान व जास्तींतजास्त दर ठरवून देण्याचा अधिकार रेल्वे ॲथॉरिटीकडे असावा. मात्र यावर फेडरल सरकाराचें नियंत्रण राहावें. रेल्वेच्या कारभाराविरुद्ध कोणी तक्रार केल्यास रेल्वे खात्याने ती तक्रार चौकशीकरिता रेल्वे रेट्स ॲड्व्हायसरी कमिटीकडे सोपवावी. परंतु ॲड्व्हायसरी कमिटीच्या शिफारशींचा विचार करून निर्णय देताना रेल्वे खात्याने रेल्वे ॲथॉरिटीचा सल्ला घेतला पाहिजे!

रेल्वेचा कारभार कसा चालावा याबद्दलच्या लंडन परिषदेने केलेल्या वरील सूचनांचा समावेश पार्लमेंटच्या नवीन हिंदी राज्यघटनेच्या कायद्यांत व्हावयाचा आहे. दुसऱ्या गोलमेज परिषदेनन्तर व्हाइसरॉयांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या कन्सल्टेटिव्ह कमिटीने असा ठराव केला होता कीं, रेल्वेचा कारभार रेल्वे ॲथॉरिटीने चालवावा एवढीच सूचना राज्यघटनाकायद्यांत समाविष्ट करण्यांत यावी. परंतु या रेल्वे ॲथॉरिटीचे सभासद किती असावे, त्यांची कार्यमर्यादा कोणती असावी वगैरे गोष्टी फेडरल कायदेमंडळाने ठरवाव्या. कन्सल्टेटिव्ह कमिटीची ही सूचना स्वीकारली गेली असती तर रेल्वे कारभाराचें नियंत्रण बरेचसें फेडरल कायदेमंडळाच्या कक्षेंत येऊन रेल्वेचा कारभार कायदेमंडळाच्या इच्छेप्रमाणें चालला असता; परंतु आता रेल्वे ॲथॉरिटीची घटना कशी असावी हें पार्लमेंटाच्या कायद्याने ठरणार असल्यामुळे व त्या घटनेप्रमाणें फेडरल सरकारचा वाहतूकमंत्री रेल्वेकारभाराच्या बाबतींत अस्पृश्य ठरणार असल्यामुळे रेल्वेच्या कारभारावर फेडरल कायदेमंडळाची काडीमात्रहि सत्ता चालणार नाही !

रेल्वेचा कारभार फेडरल कायदेमंडळाच्या नियंत्रणाखाली गेला तर रेल्वेचें धोरण हिंदी उद्योगधंद्यांच्या वाढीला पोषक ठरविण्यांत येऊन आज तागायतचें कच्च्या मालाच्या निर्गतीला व परदेशी पक्क्या मालाच्या आयातीला पोषक असें ब्रिटिश पार्लमेंटांच्या ताबेदार अशा नोकरशाहीने आंखलेलें येथील धोरण आमूलाग्र बदलण्यांत येईल; सांप्रत रेल्वेवर अँग्लो-इंडियनांची जी बेसुमार भरती करण्यांत येते ती बंद पडून लायकीप्रमाणे नेमणुका केल्या जातील, वगैरे अनेक प्रकारच्या हिंदुस्थानाच्या हिताच्या परंतु ब्रिटिशांना न मानवणाऱ्या सुधारणा करण्यांत येतील अशी भीति ब्रिटिश मंत्रिमंडळाला वाटत असल्यामुळेच पार्लमेंटरी कायद्याने रेल्वे कारभारावर कायदेमंडळाची सत्ता न ठेवतां ती गव्हर्नर—जनरलरूपी हिंदुस्थानाच्या सुलतानाकडे देण्यांत येणार आहे.

# स्फुट सूचना

१ मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांनी गेल्या सोमवारीं कायदेकौन्सिलाच्या सुरुवातीस भाषण केलें. त्यांची कारकीर्द आता संपत आली असल्यामुळे त्यांचें हें भाषण शेवटचेंच होय. त्यांच्या भाषणात लक्ष देण्यासारख्या गोष्टी दोनच आढळतात. त्यांपैकीं एक गोष्ट अशी कीं राज्यकारभाराचा खर्च कमी करण्याकरितां मुंबई–सरकारानें नोकरवर्गाच्या पगाराचें स्केल नवीन बनविण्याचें ठरविलें आहे. या नवीन योजनेत भारतमंत्र्यांनी नेमलेले नोकर व हिंदुस्थान–सरकाराच्या हुकमतींतील नोकर येत नाहींत. फक्त प्रांतिक व कनिष्ठ नोकरवर्गच येतो. देशांत महायुद्धामुळे मध्यंतरीं जी महागाई झाली होती ती आता राहिली नसून सर्व जिनसांचे भाव पुष्कळच उतरले आहेत. खेरीज राज्यकारभाराचा खर्चहि सरकाराच्या शक्तीबाहेर गेला आहे. अशा स्थितींत नोकरवर्गाचे पगार योग्य प्रमाणांत कमी करण्यांत आल्यास त्यांत नांवे ठेवण्यासारखें कांहीं नाहीं. परंतु या बाबतींत एक पक्षपात मात्र होणार आहे. तो असा कीं, मुंबई–सरकाराच्या अधिकारांत नाहींत असे वरिष्ठ नोकर जसेच्या तसेच राहणार. पण त्या मानानें लहान नोकरांच्या पगारांना मात्र कात्री लागणार म्हणून आमची शिफारस अशी आहे कीं, कनिष्ठ नोकरांचे पगार ज्या वेळीं व जितक्या प्रमाणांत कमी करण्यांत येतील त्यावेळीं व निदान तितक्या प्रमाणांत भारतमंत्री व हिंदुस्थान–सरकार यांनी वरिष्ठ नोकरांच्या पगाराचा प्रांताच्या तिजोरीवरील बोजाहि हलका करावा.

---

२ अलीकडे ग्रामोद्धार व ग्रामसुधारणा या चळवळींचा बोलबाला बराच ऐकूं येतो, आणि त्या दिशेने ठिकठिकाणीं लहानमोठे खासगी प्रयत्न सुरूहि आहेत. आता मुंबई–सरकाराचेंहि लक्ष सदर विषयाकडे वेधलें असून त्याप्रमाणे कांहीं उपक्रम करण्याचें आश्वासन गव्हर्नरांनी आपल्या भाषणांत दिलें आहे. हें काम हातीं घेण्यास सरकारास नवीन नोकर ठेवण्याची गरज अर्थातच नाहीं. यामुळे कमिशनर, कलेक्टर व त्यांच्या हाताखालील अधिकारी यांनाच राबविण्याचा सरकाराचा विचार दिसतो. सरकारी अधिकाऱ्यांनी दिशा दाखवावी, प्रोत्साहन द्यावें आणि ही कामगिरी ग्रामपंचायती, पतपेढ्या, तालुका डेव्हलपमेंट असोसिएशन व लोकल बोर्डें यांनी बजावावी असा संकेत आहे. आता या ठिकाणीं ग्रामोद्धार म्हणजे काय असा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. गव्हर्नरांच्या भाषणांवरून खेड्यांतील लोकांचें आरोग्य सुधारणें, त्यांना ज्ञान देणें, व त्यांची भरभराट करणें या बाबी ग्रामोद्धारांत येतात. त्यांपैकीं ज्ञानदानाची व्यवस्था सरकारी अधिकाऱ्यांनी मनांत आणल्यास त्यांजकडून होण्यासारखी आहे. ग्रामस्थांचें आरोग्यहि थोडेसें सुधारेल. परंतु, जरूर तितकें सुधारण्यास व ग्रामस्थांची भरभराट घडून येण्यास याहून अधिक परिणामकारक उपाय अमलांत आले पाहिजेत. लोकांची प्राप्ति वाढविणें हा अत्यंत महत्त्वाचा उपाय होय व ती प्राप्ति लोकांना सुधारलेल्या व किफायतशीर पद्धतीनें उद्योगधंदे करतां येऊं लागल्यावांचून वाढणार नाहीं. परंतु राजकीय चळवळीमुळे असो अगर दुसऱ्या कोणत्याहि कारणाने असो, सरकारास खेड्यांतील जनतेविषयीं कळवळा उत्पन्न झाला, हें खरें असेल तर तो अभिनंदनीयच आहे. ग्रामोद्धाराचें कार्य करण्याचें सामर्थ्य खासगी व्यक्ति व संस्था यांजपेक्षा सरकारांतच अधिक आहे यांत शंका नाहीं. गव्हर्नरसाहेब आपली योजना लवकरच बाहेर काढणार आहेत. ती दिसेल तेव्हां तिचें स्वरूप कळेलच व सरकार प्रयत्नाला लागेल तेव्हा त्या प्रयत्नांचा भरींवपणाहि सर्वांच्या नजरेस येईल. त्यापूर्वी नवीन योजनेविषयीं बरेंवाईट म्हणण्यांत हंशील काय?

---

३ मुंबई शहरांत भेसळीचें लोणी, तूप व दूध हे खाद्य पदार्थ येतात व त्यामुळे शहरवासीयांच्या आरोग्याची हानि होते. तेव्हा मुंबई कॉर्पोरेशनने या पदार्थांची तपासणी करण्यासाठी वेगळे अधिकारी ठेवून भेसळीचे पदार्थ विकणारास शासन करण्याची व्यवस्था करावी अशा अर्थाचा ठराव कॉर्पोरेशनचे एक सभासद श्री. तळपदे यांनी गुरुवार ता. ३ रोजीं मांडला असता तो नामंजूर झाला! या ठरावाला मुंबईच्या तुपाच्या व्यापारी संघानें दुजोरा दिला असून शुद्ध तूप विकणारे व वनस्पतिजन्य तूप विकणारे यांना परवाने द्यावेत अशीहि त्यानें विनति केली आहे. गेल्या सोमवारीं कॉर्पोरेशनची सभा भरली असतांना श्री. मोहनलाल देसाई यांनी भेसळीच्या तुपासंबंधीं पुनः ठराव आणला व तो मंजूरहि झाला. लोणी, तूप, दूध हे पदार्थ मनुष्याला नित्य जीवनास अत्यवश्य असल्याने ते शक्य तितकें

शुद्ध स्वरूपांत मिळतील अशी व्यवस्था करण्याची जबाबदारी म्युनिसिपालिटीवर पडते व मुंबई म्युनिसिपालिटीप्रमाणें ठिकठिकाणच्या म्युनिसिपालिटयांनी या संबंधांत दक्षता घेतल्यास आपल्या आवश्यक कर्तव्यास त्या जागल्या असेच होणार आहे. पुणें शहरांत जोगेश्वरीसमोर रोज सकाळीं जो दुधाचा बाजार भरतो तो पुणें शहर म्यु. च्या अधिकाऱ्यांनी डोळे उघडून पाहिल्यास त्यांनाहि त्यावर नियंत्रण घालण्याजोग्या गोष्टी आठवल्यावांचून राहणार नाहीत.

# ग्रंथ—परीक्षण

## आंधळ्यांची शाळा

वरील नांवाचें एक नवीन नाटक रा. श्रीधर विनायक वर्तक बी.ए. यांनी लिहिलें असून तें मुंबईस 'नाट्य मन्वंतर' नांवाची नवीन नाटक मंडळी करीत असते. म्हणून हें नवें नाटक व नवीन मंडळी यांच्या संबंधाने दोन शब्द लिहितों:—

हें नाटक व ही नाटक मंडळी यांचा मुख्य विशेष म्हटला म्हणजे नाट्यविषयक एक नवीन ध्येय समाजापुढे ठेवणें हा आहे. पण त्यांतल्यात्यांत प्रयोग करणारी नाटक मंडळी नवीन ध्येयाच्या आवडीची न लाभेल तर हल्लींच्या दिवसांत रा. वर्तक यांनी लिहिलें तसलें नव्या पद्धतीचें नाटक लिहून छापूनहि कांहीं उपयोग होणार नाही. या कामीं नवीन नाटक मंडळीच्या ध्येयाला नाट्य ग्रंथापेक्षांहि अधिक महत्त्व ओघानेंच येतें. म्हणून नाटक ग्रंथासंबंधानें ओझरतें लिहून या ध्येयवादी नाटक मंडळीसंबंधाने दोन शब्द अधिक लिहिणें प्राप्त आहे.

नाटकांतील विषय सामाजिक आहे. त्याची भाषा फार साधी, सुबोध व व्यवहारांतील आहे. भावना किंवा विनोद रंगवितांना कोठेहि अतिशयोक्ति केलेली नाही. नाटकाचा विषयहि मनुष्यस्वभावाचें चित्र रंगण्यासारखा आहे. तथापि एकदोन दोष वाटतात ते असे. सामाजिक प्रश्नच घ्यावयाचा तर त्याचें स्वरूप विद्यमान समाजस्थितीला जितकें धरून व जवळ असेल तितकें असावें. प्रस्तुत नाटकांत प्रश्न घेतला आहे तो असा कीं, लग्नव्यवहारांत उभयपक्षांच्या वर्तनाच्या नैतिक संशोधनांत किती खोलांत शिरणें योग्य होईल ! पण या प्रश्नाची चर्चा करतांना जी समाज स्थिति दाखविली आहे ती महाराष्ट्रांत आजची आहे असें वाटत नाही. कदाचित् एका पिढीनंतर ती अनुभवाला येईल. वरचाच प्रश्न पण विद्यमान समाज स्थिति लक्षांत घेऊन, कांहीं जुन्या सनातनी मतांचे कांहीं नव्या सुधारकी मतांचे असे लोक कल्पून, त्यांच्या मतविरोधांतून कथानक तयार केलें असतें तर, कदाचित् आहे यापेक्षा स्वाभाविक विनोदालाहि अधिक वाव मिळाला असता. हल्लींच्या रचनेंत एकाच सुधारकी मतांचीं सगळीं पात्रें आल्यामुळे विनोदाला फारसा वाव राहिलेला नाही. आणि नाटक पाहात असतांना एखाद्या परकी समाजाचें चित्र आपण पाहात आहों असा भास होतो तो वेगळाच. तथापि विनोदाची मदत नसता कथाभाग सर्वच्या सर्व गंभीरपणाचा ठेवूनहि नाटक वाचण्याला व पाहण्याला मोठें परिणामकारक होतें यांत शंका नाही.

## नाटकांतील खटके

नाटकाच्या भाषेंतील खटके ठीक आहेत. परंतु कथानक समजण्याच्या दृष्टीने कांहीं खटके फारच खटकेदार होतात. त्यामुळे कथानक चटदिशीं लक्षांत भरण्याला अडचण पडते. म्हणून अशा खटक्याऐवजीं किंचित् कथानकाचा खुलासा केला व त्यामुळे अधिक वाक्यें पडलीं तर तीं पोषकच होतील. इबसेन, जॉर्सेन, यांचा मुख्य नाट्यगुण सूचक संभाषणांत असतो. त्यांतल्या त्यांत जॉर्सेनपेक्षाहि इबसेनचा विशेष. यामुळे नाटकांतला शब्दन्शब्द वाचावा लागतो; व तेथें ती पद्धत मार्मिकपणाचीहि ठरते. पण ग्रंथवाचकाला जशी एकाग्रता मिळते तशी नाट्यप्रेक्षकाला ती मिळत नाही ही गोष्ट नाटकप्रयोगाच्या दृष्टीने विशेष लक्षांत ठेविली पाहिजे. विलायतेंत प्रेक्षकांना असें शिक्षण मिळालें आहे कीं, नाटकगृहांत टाचणी पडल्याचा आवाज ऐकूं यावा इतकी शांतता प्रत्येकाने राखण्याचा प्रयत्न करावा. पण मुंबईच्या रिपन थिएटरमध्ये प्रस्तुत नाटकाचा प्रयोग चालू असता दारासमोरून जाणाऱ्या ट्रामगाड्या व मोटारींचीं शिंगें यांच्या योगानें आंतील शांततेचा उच्छेद किती होतो याची कल्पना नाट्यग्रंथकार करील तर तो आपली पद्धति अवश्य बदलील. कारण प्रयोग सुरू असता मुद्दयाचे शब्द किंवा खटके ऐकू न आले तर प्रेक्षकाच्या मनांत नाट्यकथानकाचा प्रकाश पडावा तितका पडत नाही. कांहीं तरी सुटलें असें वाटतें. पण काय सुटलें हें कळत नाही. सांधा तुटला असा वाटतो पण तो

खरोखर कशाने जोडलेला आहे हें ध्यानांत भरत नाही. असो. एकंदरीने नाटक चांगलें लिहिलें गेलें आहे इतकेंच नव्हे तर जॉर्सनचें मूळ 'गॅटलेट' हें नाटक आम्हीं वाचलें व 'आंधळ्याची शाळा' हे नाटक वाचले. म्हणून या दोहोंची तुलना करता रा. वर्तक यांचा अखेरचा कथाभाग अधिक चांगला साधला आहे, व अधिक परिणामकारक होतो असें आम्हांला वाटतें. जॉर्सनच्या नायिकेपेक्षा वर्तकांची नायिका अखेरपर्यंत अधिक पाणीदार भासते.

### नाट्यप्रयोग

नाट्यप्रयोगासंबंधाने विशेष कांहीं लिहावयाचें नाही. मंडळींनी प्रयोग परिश्रमपूर्वक व सदाभिरुचि ठेऊन बसविला आहे. तथापि विश्वनाथकाका या पात्राची कल्पना जॉर्सन याच्या किंवा प्रस्तुत नाटकांतहि जशी आहे तशी ती प्रयोगांत वठत नाही. म्हणजे मूळ कल्पना तत्त्ववेत्त्याची व वृद्ध किंवा निदान पोक्त माणसाची असतां, पात्राची सजावट व नाट्य हीं दोन्ही चलाख तरुणाप्रमाणे वाटतात. मनोहर, सुशीला, विश्वनाथ व अण्णासाहेब हीं चारहि पात्रें जवळ जवळ समवयस्क व प्रौढ अशीं आहेत. तथापि मनोहर हा वार्धक्यांत तारुण्य भासविणारा आहे तर विश्वनाथ हा प्रौढ वयांत वार्धक्य पावलेला असा आहे. यामुळे तो मेंदूच्या श्रमाने अकालीं केस पिकलेला, स्थगित, संथ, समदृष्टि, सत्प्रवृत्त असा म्हातारा दिसला पाहिजे.

नाट्यप्रयोगांत सामाजिक नाटकाला अनुरूप असा साधेपणा आहे. परंतु रंगभूमीवर येणाऱ्या प्रकाशाची वांटणी साधली नाही. नाट्याला संगीताचा म्हणून जी जोड दिली जाते ती अनुरूप नसून आक्षेपार्हहि वाटते. रंगभूमीवर पात्र नसतां, किंवा ते भावनावश स्थितींत असल्यामुळे निष्क्रिय असतां, सुस्वरांची लकेर ओझरती कानावर आली व ती भावनासदृश असली तर बरी नवी टूम होईल. परंतु प्रत्यक्ष प्रयोगांत एकीकडे संभाषण सुरू असतां स्पष्ट ऐकूं येईल असें (रसानुकूल कां होईना पण प्रत्यक्ष) पद किंवा गत पियानोवर वाजविलेली कानावर आल्यामुळे प्रेक्षकांचे मन द्विधा होतें. म्हणून या बाबतींत सुधारणा म्हणून योजली ती कुधारणा होते.

### स्त्रियांची भूमिका

स्त्रियांची भूमिका स्त्रियांनी करावी हें ध्येय नाटकमंडळीने नुसतें डोळ्यापुढे ठेवलें इतकेंच नाही तर प्रत्यक्ष अमलांतहि आणलें आहे. कारण स्वतः ग्रंथकार यांच्या पत्नीच सुशिलेचें काम करतात व संगीताचे चालक रा. केशवराव भोळे यांची पत्नी मुख्य नायिकेचें काम करतें. अशा रीतीने स्वतः पतिपत्नीच्या दोन जोड्या एक प्रकारें नाटक मंडळींत समाविष्ट झाल्याकारणाने, स्त्रियांनी स्त्रियांचीं कामें करण्याची अडचण बिनतोड रीतीने घालविण्यांत आली असें सहज म्हणतां येईल. यांपैकीं सौ. वर्तक यांना तीन मुलें आहेत. आणि असें ऐकिवांत आहे कीं, स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनी कराव्या म्हणून इतर रीतीने प्रयत्न झाला असतां, उपलब्ध स्त्रिया नाटक मंडळींत घेतल्यास एकंदरीने लाभापेक्षा हानिच जास्ती होईल असें दिसून आल्यावरून या तीन मुलांच्या आईने, ती सुशिक्षित व कलाप्रेमी म्हणून व अर्थात् आपल्या पतीच्या नाट्यप्रेमाची हौस पुरवण्याकरितांहि, आपण होऊन नाटकांत भूमिका करण्याचें पत्करलें! आणि हे खरें असेल तर स्त्रियांनी स्त्रियांची भूमिका करण्यासंबंधाने लोकांचा जो दूषित पूर्वग्रह होता, तो मूळापासून उपटून पाडण्याचें हे नैतिक धैर्याचें कृत्य झालें असें म्हणण्यास हरकत नाही. आणि खरोखर या बाबतींत जो दूषित पूर्वग्रह म्हणून आहे तो, स्त्रिया नाटकांतून काम करण्याला पुरुषापेक्षा अपात्र असा बुद्धीचा नसतो. साध्या शिक्षणाच्या कामीं देखील सहशिक्षणाविरुद्ध आक्षेप सहज येतात; तेव्हां स्त्रियांनी नाटकांत काम करण्याविरुद्ध यांवियांत नवल काय? उलटपक्षीं स्त्रियांनी स्त्रियांची भूमिका करावी या मताचे लोक म्हणतात कीं, कोणत्याहि गोष्टीला संभवनीय दुष्परिणामांच्या योगाने दूषण देणें हें ठीक नाही. चुलींतील विस्तवाने स्वयंपाक करणाराचा हात भाजूं शकतो म्हणून बिनविस्तवाने स्वयंपाक व्हावा हेंच इष्ट आहे या म्हणण्यांत काय अर्थ? पण व्यवहारांतील अनुभव पहातां स्त्रिया व नाट्यभूमिका या विभागांतील गुणागुणांत प्रवेश करावयाचा तर तो प्रस्तुतच्या उदाहरणाप्रमाणें प्रौढ कुलीन स्त्रियांनी रंगभूमीवर सात्त्विक आवेशाने उडी घातल्यानेच निरपवाद रीतीने होऊं शकेल. प्रस्तुत नाटक मंडळीने कलाविषयक प्रेमाने ही धाडसाची उडी घेऊन हा प्रश्न आपणापुरता सोडविला आहे. तरी तेवढ्याने तो सर्व प्रश्न कायमचा सुटला असें मात्र म्हणता येणार नाही. तो सुटावयाचा तर सुशिक्षण, सद्गुण व कलाप्रेम यांचा मेळ नाट्यव्यवसायांत जसजसा अधिक पडत जाईल तसतसाच तो अधिक सुटेल.

### लक्षांत ठेवण्याची गोष्ट

सर्वसाधारण रीत्या या ध्येयवादी नाटक मंडळीने एक गोष्ट मात्र खास केली. ती ही कीं, सौम्य सोज्ज्वळ अतिशयोक्तिविरहित बिनधांगडधिंग्याचें व बाष्कळ विनोद नसलेलें असें नाटक रंगभूमीवर चित्ताकर्षक होऊं शकणार नाही असें म्हणण्याची जी

एक प्रथा पडून गेली आहे तिला या नाटक मंडळीने चांगलें उत्तर दिलें आहे. आणि या मंडळीचा हा प्रयत्न जर यशस्वी होऊन टिकला तर सदभिरुचि-निष्ठ नाटकें लिहिणें म्हणजे व्यर्थ श्रम करणें अशी जी वाङ्मयलेखकांची समजूत होऊन राहिली आहे ती कदाचित् कांहीशी बदलेल.

रंगभूमीचें अलीकडील वळण पाहतां दिवसें-दिवस नाटककर्ता हा नाटक मंडळीच्या आधीन व तिचा गुलाम अशी स्थिति येऊन ठेपलेली आहे. बरें! नाटक मंडळ्यांनी तरी काय करावें? त्यांच्या चालकांनाहि सदभिरुचीची चाड नसेल असें तरी कसें म्हणावें? पण नाटक मंडळीची संस्था चालविणें इतकें खर्चाचें काम होऊन बसलें आहे कीं, थिएटरभर लोक जमल्याशिवाय जरूर तें उत्पन्न होत नाही; व थिएटरभर लोक जमावयाचे तर त्यांना साधेंसुधें सोज्ज्वळ असें कांही चालावयाचें नाही. तें अति-शयोक्तिपूर्ण व परम विकृत असें असेल तरच चालेल अशी स्थिति होऊन बसली आहे. राजकारणांत लोकशाही प्रबळ होण्याच्या अनुषंगाने जे परिणाम इतर खात्यांत अनुभवास येतात तेंच नाटकाच्या खात्यांतहि अनुभवास येऊं लागल्यास काय नवल!

## नाटकांचा वाद

मग चांगलीं नाटकें कां केवळ उत्पन्न देणारीं नाटकें, याचा वाद कसा मिटावा? त्याचें आमचें उत्तर हेंच कीं, दोनहि आपापल्या परीने नांद-ण्याला समाजांत अवकाश आहे. इतकेंच नव्हे तर एकाच प्रकारची अभिरुचि सर्व समाजावर लादण्याचा प्रयत्न अशक्य म्हणून सोडून द्यावा; आणि समाजांतील ज्या वर्गाला जशा प्रकारचे नाटकप्रयोग व नाटकें पाहिजेत तशीं त्यांना मिळण्याची व्यवस्था हटकून होईल इतकें ध्येय व त्या दृष्टीचा प्रयत्न झाला तरी पुष्कळ झालें. प्रच-लित रंगभूमीवर होणाऱ्या नाटकांवर टीका करण्याचें आम्हांला कारण नाही. परंतु इतकें खास म्हणतां येईल कीं, सोज्ज्वळ अभिरुचीच्या प्रेक्षकांना समान भावनेच्या प्रेक्षकांसह स्वस्थ बसून पाहण्याची हौस वाटेल अशीं नाटकें आज रंगभूमीवर नाहीत यांत मात्र शंका नाही; व ही गरज भागविण्याचें काम 'नाट्य-मन्वंतर नाटक मंडळीला' वाढत्या प्रमाणांत करतां आलें तर तिने एक मोठेंच कार्य केलें असें म्हणतां येईल.

पण असें होण्याच्या मार्गांत पुष्कळच अडचणी आहेत. कारण नाट्यमन्वंतर करूं पाहणाऱ्या नाटक मंडळीमध्ये सर्वच बिनधंदेवाले लोक असें नाही. कांही केवळ हौसेने येतील तर कांही धंदा म्हणूनहि येतील. अर्थात् धंद्याच्या दृष्टीने येणाऱ्यांनी जर केवळ कलेच्या हौसेने स्वार्थत्यागाचें प्रेम दाखविलें, व इतर चार सार्वजनिक संस्थांतून केवळ निर्वाहापुरतें द्रव्य-साहाय्य घेऊन काम करणारीं माणसें भटतात त्या-प्रमाणे या नाटक मंडळीलाहि माणसें येऊन मिळतील तरच त्यांतील हौशी लोकांना यश मिळण्याची धडगत दिसते. तथापि आज या नव्या संस्थेच्या सुरुवातीला अधिक खोलांत शिरणें अवश्य नाहीं. या नाटक मंडळीचा, संस्था या दृष्टीने, नाटकासारखाच नवा प्रयोग आहे. तेव्हा पुढील काळांत त्या संस्थेला जो अनुभव येईल तो जमा धरूनच याहून सूक्ष्म अशीं अनुमानें काढावीं लागतील. आज तरी स्थूल दृष्टीने या नव्या ध्येय-वादी नाटक मंडळीचें अभिनंदन कोणालाहि केलें पाहिजे. त्याच्या ध्येयवादी प्रयत्नाने समाजांतील नाट्य-प्रेमी अशा विशिष्ट वर्गाला आशेचा एक नवीन किरण दिसला असें निश्चितपणाने म्हणतां येईल. म्हणून तूर्त आम्ही इतकेंच लिहून थांबतो.

नाट्य वाङ्मयांत व नाट्यप्रयोगांच्या सृष्टींत क्रांति होण्याची वेळ आली आहे. इबसेन, जॉर्सन यांच्या ज्या नाटकांनी प्रस्तुत नाटककाराला स्फूर्ति मिळाली, तीं नाटकें स्वतः त्या नाटककारांच्या देशांत साठ सत्तर वर्षांपूर्वी रंगभूमीवर प्रथम आलीं हें लक्षांत घेतलें म्हणजे एका ठराविक नियमाला नवीन पुरावा मिळतो. तो नियम असा कीं, कांही कांही बाबतींत हिंदुस्थानांत आम्ही युरोपियन समाजाच्या मागे साठ पाऊणशें वर्षें असतो. आणि नवीन इंग्रजी शिक्षणाच्या द्वारें त्या बाबतींतील क्रांतिकारक विचारांचा ओघ युरोपांतून वाहून आमच्या-पर्यंत येऊन पोचण्याला साठ—पाऊणशें वर्षांचा कालावधि लागत असतो. ही क्रांति सर्वस्वी चांगली किंवा वाईट हें ठरविणें मोठें कठिण आहे. परंतु नाटकांत साधेपणा व सदभिरुचि असून केवळ नाट्य-गुणोत्कर्षामुळे नाटक मनोरंजक व हृदयस्पर्शी व्हावें असें ध्येय बाळगणाऱ्या सुशि-क्षित वर्गाची गरज नाट्यमन्वंतर नाटक मंडळीच्या प्रयत्नाने, व तेंच ध्येय असणाऱ्या इतरांच्या प्रयत्नाने, अखेर साध्य होणार काय, अशी आकांक्षा नाटक पाहून व वाचून मनांत उत्पन्न होते.

# उज्ज्वल भविष्य

येणारे घटी ज्या अजुन पुढे
मन ओढे त्यांच्याचकडे ॥ ध्रु. ॥
दाट धुक्याच्यामागे लपुनी
गाती दिक्कालाचीं गाणीं
धडपडतों पण येति न कानीं
लक्ष परी सगळें तिकडे ॥ १ ॥
नाव वल्हवीं त्याच दिशेनें
वळवुन हीं मी बसलों नयनें
उत्सुकतेने अन् प्रेमाने
फडफडती पांढरीं शिडें ॥ २ ॥
ज्याच्यासाठी चाले धडपड
ज्याच्यासाठी संतत तडफड
ज्याच्यासाठी इतकी बडबड
अटोक्यांत तें मधुर घडे ॥ ३ ॥
अमुचें आम्हां मिळावयाचें
दिवस गोजिरे दिसावयाचे
दुर्दिन मागिल विसरायाचे
स्वप्न असें मज रोज पडे ॥ ४ ॥
मना ! माझिया भुता आंतल्या
उमलतील रे ! खरोखर कळ्या
बहरतील फुलतीलहि सगळ्या
अंगणांत पडतील सडे ॥ ५ ॥

—अज्ञातवासी

# ब्रह्मदेशाची भावी राज्यघटना

### ब्रिटिश सरकाराचा खलिता

ता. ७ ऑगस्ट रोजीं भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनी ब्रिटिश सरकाराच्या वतीनें जॉइंट सिलेक्ट कमिटीला ब्रह्मदेशाच्या विभक्त राज्यघटनेची एक योजना सादर केली. योजना सादर करतांना सर सॅम्युअल होअर म्हणाले, "ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून वेगळा झाल्यास त्याला कशा तऱ्हेची राज्यघटना असावी या दृष्टीने ही योजना तयार करण्यांत आली आहे. जॉइंट सिलेक्ट कमिटीचें असेंच मत पडलें कीं, ब्रह्मदेश हिंदी फेडरेशनमध्येच समाविष्ट व्हावा तर, कांही थोडासा फेरफार करून, पांढऱ्या खलित्यांतील शिफारशी हिंदुस्थानांतील घटक प्रांतांना जशा लागू होतील तशाच त्या ब्रह्मदेशालाहि लावण्यांत येतील. त्या शिफारशींत काय दुरुस्त्या करावयाच्या त्यासंबंधीचा अधिकार आमच्या हातांत राहील. विभक्तीकरणाबद्दल म्हणाल तर, ब्रह्मी कायदेमंडळानें हिंदी फेडरेशनमध्ये इतर प्रांतांप्रमाणें सामील होण्यास जोराचा विरोध दाखविलेला असला तरी,मुख्य प्रधानांनी सुचविलेल्या राज्यघटनेप्रमाणेहि विभक्त होण्यास ब्रह्मदेशाच्या कायदेमंडळानें नकारच दिला आहे.वस्तुतः, माझ्या मतें मुख्य प्रधानांच्या योजनेप्रमाणे हिंदी फेडरल कायदेमंडळाला आणि प्रांतिक कायदेमंडळांना पांढऱ्या खलित्यान्वयें जे अधिकार मिळणार आहेत ते सर्व ब्रह्मदेशालाहि देण्यांत आले आहेत. तें असो. जॉइंट सिलेक्ट कमिटीने मात्र विभक्तीकरणाला अनुकूल किंवा प्रतिकूल यांपैकीं एक कोणता तरी निःसंदिग्ध आणि स्पष्ट असा निर्णय प्रथम दिला पाहिजे. सुटीनंतर कमिटीच्या बैठकीला पुनः सुरुवात होईल. तेव्हा हिंदी प्रतिनिधींना या प्रश्नांवर आपलीं मतें मांडण्यास सवड देण्यांत येईल. तसेच सल्लामसलतीसाठी ब्रह्मदेशाचे कांहीं प्रतिनिधिहि लंडनला बोलावण्यांत येतील.

### कायदेमंडळाची घटना

"मी सुचवीत असलेल्या योजनेप्रमाणे ब्रह्मदेशाच्या गव्हर्नरालाच राज्यकारभाराचे अष्टाधिकार दिले जातील आणि देशाचा मुख्य सैन्याधिपतिहि तोच राहील. सैन्यखातें, परराष्ट्रीय खातें, धार्मिक खातें, आर्थिक धोरण, चलन, नाणीं आणि विशिष्ट म्हणून ठरविलेल्या प्रदेशावरील अम्मल हीं सर्व गव्हर्नराच्या दिमतीखालीच राहतील. राखीव खात्यांच्या कारभाराबाबत गव्हर्नराला तिघे मंत्री साहाय्य करतील. त्या तिघांपैकीं एक आर्थिक बाबतींतील सल्लागार असेल. देशांत 'हाऊस ऑफ रेप्रेझेंटेटिव्ह्ज' आणि 'सेनेट' अशीं दोन कायदेमंडळें स्थापण्यात येतील.पैकीं 'हाऊस ऑफ रेप्रेझेंटेटिव्ह्ज'-मध्ये १३२ सभासद आणि सेनेटमध्ये ३६ सभासद असतील. सेनेटच्या ३६ सभासदांपैकीं १८ सभासद 'हाऊस ऑफ रेप्रेझेंटेटिव्ह्ज'कडून निवडले जातील व १८ सभासद बिनसरकारी असून ते गव्हर्नराकडून नेमले जातील. सर्वसाधारणपणें 'हाऊस ऑफ रेप्रेझेंटेटिव्ह्ज'चें आयुर्मान पांच वर्षें ठरविण्यांत आलें आहे. सेनेटला आयुर्मानाची अशी कोणतीच मुदत घातलेली नाही. सेनेटच्या सभासदांपैकीं एक-चतुर्थांश सभासद दोन दोन वर्षांनीं राजीनामा

देतील. आणि तात्पुरत्या योजनेप्रमाणे सेनेटमधील जागांची मुदत आठ वर्षांची राहील.

### गोऱ्या लोकांची वर्णी

युनायटेड किंग्डममध्ये राहणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनांच्या व्यवहारांना अडथळा आणणारा किंवा त्यांच्या बाबतींत पंक्तिप्रपंच करणारा असा कोणताहि कायदा करण्याचा अधिकार ब्रह्मी कायदेमंडळाला राहणार नाही. ब्रह्मदेश आणि हिंदुस्थान यांच्या बाबतींतहि वरील सूचनेंतील तत्त्वें स्वीकारता येतील की नाही याचा विचार करणें जरूर आहे. ब्रह्मदेशांत बाहेरून येणाऱ्या लोकांचा विचार करता या बाबतींत ब्रह्मदेशाने कांही तरी तरतूद करणें आवश्यकच आहे. गव्हर्नरकडून पब्लिक सर्व्हिस कमिशन नेमण्यांत येईल. पब्लिक सर्व्हिससंबंधीं पांढऱ्या खलित्यांत जीं संरक्षक बंधनें घालण्यांत आलीं आहेत तींच ब्रह्मदेशांतील नोकऱ्यांना लागू आहेत. बादशाही कमिशनाकडून चौकशी होईपर्यंत नोकऱ्यांमध्ये आज भारतमंत्र्याकडून जितके युरोपियन नेमण्यांत येतात तितकेच पुढेहि नेमण्यांत येतील. ब्रह्मदेशांतील रेल्वेची व्यवस्था पाहण्यासाठी स्टॅट्यूटरी रेल्वे बोर्ड नेमण्यांत येईल. राज्यघटनेच्या कायद्यांतील कलमांच्या अर्थासंबंधी कांही शंका उपस्थित झाल्यास प्रिव्ही कौन्सिलपर्यंत त्याबाबतचें अपील चालू शकेल. आणि आतांपर्यंत गव्हर्नरजनरलाकडे जीं अपिलें होत, तीं यापुढे स्टेटसेक्रेटरीकडे होतील. सल्ला देण्यासाठी स्टेट सेक्रेटरीला दोन माणसें नेमण्याचा अधिकार राहील. त्या दोघांपैकीं एकजण ब्रह्मदेशांतील सरकारी खात्यांत निदान दहा वर्षे तरी नोकरी केलेला असला पाहिजे.

"ब्रह्मदेशाच्या कायदेमंडळाला नेव्हल डिसिप्लिन ॲक्ट, आर्मी ॲक्ट, एअर फोर्स ॲक्ट किंवा यासारखे दुसरे कायदे यांच्यांत फेरफार करणारा कसलाहि कायदा करतां येणार नाही. ब्रह्मदेशांतील ज्या लोकांना हिंदी कायदे लागू आहेत त्यांची योग्य तऱ्हेने अम्मलबजावणी सरकारी अधिकाऱ्यांनी केली पाहिजे. सेंट्रल सर्व्हिसचा विचार करतां, जे अधिकारी सध्या ब्रह्मदेशांत नोकरी करीत आहेत, परंतु ब्रह्मदेशांतच केवळ नोकरी करण्यासाठी ज्यांची नेमणूक झालेली नाही, त्यांना ब्रह्मदेशांत कायमचेंच ठेवावें किंवा नाही ही गोष्ट ते ते अधिकारी, आणि ज्यांनी त्यांना नेमले ते यांच्या संमतीवर अवलंबून राहील. साहजिकच ब्रह्मी सरकार आणि हिंदुस्थान-सरकार या उभयतांनी विचार करण्याचा हा प्रश्न आहे. फॅमिली पेन्शन फंडाचें सदस्यत्व ठेवण्याची ब्रह्मदेशांतील अधिकाऱ्यांना मुभा राहील."

## रेल्वेच्या कारभाराचें भावी स्वरूप

हिंदुस्थानाला नवीन राजकीय हक्क देतांना खरी व भरीव सत्ता हिंदी लोकांच्या हातीं द्यावयाची नाही, असें ब्रिटिश राज्यकर्त्यांनी योजिलें असल्यामुळे, त्यांनी त्या हक्कांना बरींच बंधनें घालण्याचें ठरविलें आहे. हीं बंधनें संक्रमणकालापुरतीं असून, त्यानंतर तीं नाहीशीं होऊन संपूर्ण स्वायत्तता आपणाला मिळेल अशी समजूत हिंदी जनतेने करून घेतली होती. परंतु गोलमेज परिषदांतून नवीन सुधारणांची जसजशी अधिकाधिक चर्चा झाली तसतसें या बंधनांचें भेसूर स्वरूप प्रगट होऊं लागलें. पार्लमेंटाच्या भावी हिंदी राज्यघटना कायद्यान्वयें निर्मिली जाणारी रेल्वे ॲथॅारिटी हें एकअशाच प्रकारचें अनिष्ट बंधन आहे. लंडनमध्ये पहिली गोलमेज परिषद भरण्यापूर्वी हिंदुस्थानसरकाराने २० सप्टेंबर १९३० रोजीं विलायत सरकाराकडे एक खलिता पाठविला. त्यांत रेल्वे खात्यापासून रेल्वेच्या कारभाराची फारकत करण्यांत यावी, व हिंदुस्थानाचें परचक्रापासून संरक्षण करण्याच्या आणि अँग्लो-इंडियन लोकांचे हितसंबंध अबाधित ठेवण्याच्या दृष्टीने, पार्लमेंटाने रेल्वे-कारभारांत पूर्वीप्रमाणेंच लक्ष घालावें असें हिंदुस्थानसरकारानें म्हटलें होतें. हिंदुस्थानसरकाराचा हा खलिता आल्यावर भारतमंत्र्यांनी ब्रिगेडिअर जनरल हॅमॉंड या गृहस्थांना इतर देशांतील रेल्वेचा कारभार पाहून येऊन, हिंदुस्थानांतील रेल्वेचा कारभार कोणत्या पद्धतीने चालावा याबद्दल सूचना करण्यास सांगितलें.

हॅमॉंड यांनी ता. ५ ऑगस्ट १९३१ रोजीं आपला रिपोर्ट सादर केला, व त्यांत स्टॅट्यूटरी रेल्वे बोर्डाकडे रेल्वेचा कारभार सोंपविण्यांत यावा व हे बोर्ड राजकारणापासून अलिप्त राखावें असें सुचविलें. पहिल्या गोलमेज परिषदेपूर्वी

हिंदुस्थानसरकारचा खलिता विलायत सरकाराकडे गेला होता. पण गोलमेज परिषदेपासून विलायतसरकाराने तो छपवून ठेवला. दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या प्रारंभींच्या जाहीर अधिवेशनांतहि त्यासंबंधी गोष्ट काढण्यांत आली नाही. परंतु फेडरल स्ट्रक्चर कमिटीच्या रिपोर्टांत हे स्टॅटच्यूटरी रेल्वे बोर्डाचें पिलूं घुसडून देण्यांत आलें. फेडरल स्ट्रक्चर कमिटाची रिपोर्ट गोलमेज परिषदेपुढे आल्यावर हिंदी प्रतिनिधींनी त्याचा निषेध केला व लॉर्ड सँकी यांनी तो निषेध नमूद करण्याचें आश्वासनहि दिलें.

वास्तविक जनरल हॅमाँड यांचा रिपोर्ट स्टेट सेक्रेटरींच्या दप्तरीं दाखल असल्यामुळे, ब्रिटिश सरकाराने प्रामाणिकपणे तो गोलमेज परिषदेपुढे मांडावयास पाहिजे होता; परंतु तसें त्यांनी केलें नाही. पुढे कन्सल्टेटिव्ह कमिटीने या प्रश्नाचा विचार करून स्टॅटच्यूटरी रेल्वे बोर्डाच्या घटनेचा कायदा फेडरल कायदेमंडळाने करावा असें सुचविलें. परंतु कन्सल्टेटिव्ह कमिटीच्या नशिबीं अपमृत्यु लिहिलेला असल्यामुळे, ही सूचना जागच्या जागींच राहिली. तिसऱ्या गोलमेज परिषदेंत या प्रश्नाची तपशीलवार अशी कांहीच चर्चा झाली नाही.

कोणतीहि गोष्ट हिंदी लोकांच्या सल्लामसलतीने करण्याचें नाटक रंगविण्यांत ब्रिटिश मुत्सद्द्यांचा हातखंडा आहे. स्टॅटच्यूटरी रेल्वे बोर्डाची घटना ठरविण्याकरिता त्यांनी लंडन येथे एक परिषद बोलावली व त्या परिषदेला असेंब्लींतील व कौन्सिल ऑफ स्टेटमधील कांही सभासदांना निमंत्रण केलें. या परिषदेंत रेल्वेचा कारभार नवी राज्यघटना अमलांत आल्यावर कसा चालवावा याची चर्चा झाली. परंतु दुर्दैव असें कीं, हिंदी कायदेमंडळाच्या या सभासदांनी रेल्वे ऑथॉरिटीच्या योजनेला संमति दिली.

फेडरल सरकाराचीं जीं खातीं फेडरल कायदेमंडळाला जबाबदार अशा मंत्र्यांच्या स्वाधीन करण्यांत यावयाचीं आहेत, त्यांत रेल्वे खात्याचा प्रथमच समावेश करण्यांत आल्यामुळे, हिंदी लोकांना साहजिकच असें वाटूं लागलें होतें कीं, नवीन सुधारणा अमलांत आल्यावर रेल्वेचा कारभार लोकमतानुवर्ती होऊन जनतेचीं रेल्वेसंबंधी गाऱ्हाणीं दूर होतील, रेल्वेचा कारभार लोकप्रतिनिधींना जबाबदार अशा मंत्र्याच्या हातीं आल्याने, रेल्वेचे वाहतुकीचे दर हिंदी उद्योगधंद्यांच्या वाढीला पोषक असे ठरविले जातील, रेल्वेखातें अँग्लो इंडियनांचें व सरकारच्या जातभाईंचें राखीव कुरण झालें आहे तें हिंदी लोकांना मोकळें होईल, रेल्वेला लागणारा माल कोठला खरेदी करावा हें ठरविण्याची सत्ता आपल्या हातीं येईल, व रेल्वेची सामुग्री देशांतल्या देशांत तयार करण्याची व्यवस्था होईल.

परंतु सरकारची इच्छा रेल्वेचा कारभार हिंदी लोकांच्या तंत्राने चालावा अशी नसल्यामुळे त्यांनी रेल्वेखातें व रेल्वेचा कारभार यांची फारखत करून, रेल्वेचा कारभार कायदेमंडळाला जबाबदार नसलेल्या रेल्वे ऑथॉरिटीकडे सोपविण्याचें ठरविलें आहे. या रेल्वे ऑथॉरिटीचे सात सभासद असावे असें लंडन परिषदेने ठरविलें. परंतु त्यांची नेमणूक कशी करावी याबद्दल परिषदेंत मतभेद झाला. परिषदेंतील हिंदी मध्यवर्ती कायदेमंडळाच्या हिंदु व मुसलमान सभासदांचें म्हणणें असें कीं, हे सातहि सभासद गव्हर्नर जनरलाने फेडरल मंत्रिमंडळाच्या शिफारशीप्रमाणें नेमावें, परंतु सातांपैकीं दोन सभासद हिंदी व एक युरोपियन असावा. परिषदेंतील हिंदु व मुसलमान सभासदांखेरीज इतरांचें म्हणणें असें कीं, तीन सभासदांची नेमणूक गव्हर्नर जनरलानें स्वतःच्या मर्जीस येईल त्याप्रमाणे करावी व चारांची मात्र फेडरल मंत्रिमंडळाच्या शिफारशीप्रमाणे व्हावी व ती व्यापार, उद्योगधंदे, शेती, पतीचे व्यवहार यांची माहिती असणाऱ्या गृहस्थांचीच व्हावी.

यांपैकीं कोणत्या तरी एका रीतीने सात सभासदांच्या रेल्वे ऑथॉरिटीकडे रेल्वेचा कारभार दिला जाणार असून, तो चीफ कमिशनरामार्फत चालविला जावयाचा आहे. चीफ कमिशनराची

नेमणूक करण्याचा अधिकार रेल्वे ॲथॉरिटी-कडे राहाणार असून, चीफ कमिशनरास लागणारे सहकारी त्यानेच नेमावयाचे आहेत. तसेंच रेल्वेच्या जमाखर्चाची व्यवस्था पाहण्याकरिता फिनॅन्शल कमिशनर नेमण्यांत येणार आहे. राजकारणापासून बोर्डाला अलिप्त ठेवावयाचें असल्यामुळे,कायदेमंडळाच्या सभासदाला रेल्वे ॲथॉरिटीचा सभासद होतां येणार नाही असें सुचविण्यांत आलें आहे. फेडरल मंत्रिमंडळांतील वाहतूक मंत्र्यालाहि ॲथॉरिटीमध्ये स्थान असणार नाही! मोठी मेहरबानी म्हणून त्याला स्वतःला अगर प्रतिनिधींमार्फत ॲथॅारिटीच्या सभेला हजर राहण्याची मोकळीक ठेवण्यांत येणार आहे. परंतु तो सभेला हजर असला तरी त्याला कोणत्याहि प्रश्नावर मत देण्याचा अधिकार असणार नाही! ॲथॅारिटीच्या सभासदाला बडतर्फ करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलाला देण्यांत यावयाचा आहे. कोणाहि सभासदाला बडतर्फ करण्यापूर्वी गव्हर्नरजनरल मंत्रिमंडळाचा सल्ला घेईल हें खरें. परंतु अखेरचा निर्णय देतांना मंत्रिमंडळाच्या सल्ल्याला तो धाब्यावर बसवूं शकेल.

रेल्वेच्या जमाखर्च कायदेमंडळाला सादर करण्यांत यावयाचा असला तरी त्यांत फरक करण्याची सत्ता त्यांना असावयाची नाही ! नवीन नेमणुकी करणें, स्टोअर्सची खरेदी करणें, वगैरे बाबतींत कायदेमंडळाला अगर वाहतूक मंत्र्याला हात घालतां येणार नाही. ज्या वेळीं नवीन रेल्वेकरिता पैसा पाहिजे असेल अगर रेल्वेच्या जमाखर्चांतील तूट भरून काढावयाची असेल त्या वेळीं तो पैसा देणें न देणें कायदेमंडळाच्या हातीं राहील. रेल्वेचें सर्वसाधारण धोरण काय असावें हें ठरविण्याचा अधिकार कायदेमंडळाकडे राहणार असला तरी त्यांना जबाबदार असलेल्या वाहतूक मंत्र्याचा रेल्वेच्या कारभाराशीं संबंध राहावयाचा नसल्यामुळे रेल्वे ॲथॉरिटीला प्रत्यक्ष व्यवहारांत तें धोरण अमलांत आणण्यास भाग पाडणें त्याला कठिण जाईल. रेल्वे कारभाराच्या सद्यःस्थितीशीं तुलना करता ही नवीन योजना हिंदी जनतेच्या दृष्टीने प्रगतिपर नसून पिछेहाट करणारी आहे असेंच म्हणावें लागतें.

# ब्रह्मदेशाने विभक्त व्हावें काय ?

हिंदुस्थानास नवीन राजकीय हक्क कोणत्या प्रकारचे मिळणार याची कल्पना हिंदी लोकांना आता आली आहे. ब्रह्मदेश हा एक हिंदुस्थानाच्या आगगाडीस चिकटलेलाच डबा आहे. परंतु हिंदुस्थानाच्या आगगाडीपासून त्यास सोडवून व त्याला नवीन एंजिन लावून ब्रह्मदेशाची ' स्पेशल ट्रेन ' बनविण्याचा ब्रिटिश मुत्सद्द्यांनी घाट घातला असून, त्या घाटास अनुसरूनच सर सॅम्युएल होअर यांनी आपली योजना पार्लमेंटाच्या जोडकमिटीपुढे मांडली आहे. ही योजना व मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी पूर्वी प्रसिद्ध केलेली योजना यांत पुष्कळच साम्य आहे. फरक असलाच तर होअर यांची योजना अधिक खुलासेवार आहे एवढाच.

ब्रह्मदेश आजपर्यंत हिंदुस्थानाचा एक प्रांत होता; पण यापुढे तो वेगळा देश मानला जाणार असल्यामुळे, त्याची राज्यघटना हिंदुस्थानांतील इतर कोणत्याहि प्रांतापेक्षा भिन्न असणार हें स्वाभाविक होय. कारण ब्रह्मदेशाच्या राज्यघटनेंत दोन कार्यांचा समावेश करावा लागणार आहे. प्रांताचीं खातीं व देशाचीं खातीं हीं दोनहि एकाच सत्तेखाली येऊन, त्यांजवरील शेवटचा अधिकार गव्हर्नराच्या हातीं जाणार. म्हणजे ब्रह्मदेशाचा गव्हर्नर हा ब्रह्मदेशापुरताच जसा गव्हर्नर तसा गव्हर्नर जनरलहि होऊन बसणार ! याचा परिणाम असा आढळून येईल कीं, सैन्य, परराष्ट्रीय संबंध, खजिना इत्यादि खातीं राखीव राहतील; गव्हर्नर हाच कमांडर-इन-चीफचे अधिकार चालवील;आणि बाकीच्या खात्यांवरील

हुकमत कायदेमंडळाकडे येईल. हें एक द्विदल राज्यपद्धतीचेंच धेडगुजरी स्वरूप असल्यानें, ब्रह्मदेशाला हिंदुस्थानांतील इतर प्रांतांच्या तोडीची प्रांतिक स्वायत्तता तरी त्यापासून लाभेल कीं नाही याची शंकाच आहे. कारण हिंदी प्रांतांतील कायदेमंडळांची सत्ता आपआपल्या खजिन्यावर चालणार आहे तशी ब्रह्मी कायदेमंडळांची चालणार नाही, हें मोठेंच वैगुण्य ब्रह्मदेशाच्या नवीन राज्यघटनेंत उद्भवणार आहे.

ब्रह्मदेशाचा गव्हर्नर हाच गव्हर्नरजनरलहि व्हावयाचा असल्यामुळे,दुसरें एक लचांड ब्रह्मदेशाच्या गळ्यांत पडणार आहे. हिंदुस्थानांतील कित्येक प्रांतांतून एकच कायदेमंडळ स्थापण्यांत येणार आहे. पण ब्रह्मदेशावर वेगळा देश या नात्याने मध्यवर्ती हिंदी सत्तेप्रमाणें वरिष्ठ व कनिष्ठ अशीं दोन कायदेमंडळें लादलीं जावयाचीं आहेत. कनिष्ठ कायदेमंडळ केवळ लोकनियुक्त सभासदांचेंच बनेल, पण वरिष्ठ कायदेमंडळाच्या ३६ सभासदांपैकीं १८ सभासद सरकारी अधिकारीच असल्यामुळे, त्याचें काम गव्हर्नरांच्या धोरणाप्रमाणेच चालून, सदर कौन्सिलाचें दडपण कनिष्ठ कौन्सिलावर पडल्यानें, ब्रह्मदेशांतील सोपीव खात्यांच्या कारभारांतहि लोकमत प्रभावी ठरेलच असा निर्वाळा देतां येणार नाही. या दृष्टीने ब्रह्मी कायदेमंडळाकडे पाहिल्यास हिंदी प्रांताइतकीदेखील स्वायत्तता ब्रह्मदेशास मिळणार नाही असें स्पष्टपणें म्हणावें लागतें. कायदेमंडळांची रचना अशा प्रकारची असल्यामुळे, ब्रिटिश लोकांच्या हितसंबंधास बाध आणणारा एखादा कायदा ब्रह्मी कायदेमंडळांत पास होईल हा संभव मुळीच उरलेला नाही. तरी देखील ब्रिटिशांच्या हिताकरिता घटनेंत जो बंदोबस्त करावयाचा तो होअरसाहेबांनी पक्का करून ठेवला आहे.सदर घटनेंत एक कलम घातलें आहे; त्याप्रमाणे ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या हितसंबंधांना आणि व्यापाराला जेणेंकरून धोका पोंहोचेल असा कोणताहि कायदा ब्रह्मी कायदेमंडळाला करतां येणार नाही व ब्रह्मदेशाला इंग्लिश मालाविरुद्ध संरक्षक जकातीहि बसवितां येणार नाहीत.

सर सॅम्युल होअर हे ब्रह्मी कायदेमंडळाला ब्रह्मी लोक आणि ब्रिटिश लोक यांच्यांत पंक्तिप्रपंच न करण्यासाठी वेसण घालीत आहेत. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्यांनी तशा प्रकारचें कलम हिंदी लोकांच्या हितरक्षणाकरितां नवीन घटनेंत घातलें नाही. उलट हिंदी लोकांपासून ब्रह्मी लोकांना आपल्या बचावाची कायदेशीर तजवीज करावयाची झाल्यास ती करण्यास मोकळीक ठेवली आहे.

होअरसाहेबांनी सुचविलेल्या योजनेचें स्वरूप या प्रकारचें आहे. ती अमलांत आल्याने ब्रह्मदेशास हिंदुस्थानाइतकीहि प्रांतिक स्वायत्तता लाभणार नाही, मग मध्यवर्ती सत्तेसंबंधाने बोलावयासच नको. अशा स्थितींत ही योजना पत्करून हिंदुस्थानापासून अलग व्हावें कीं हिंदी संयुक्त राज्यघटनेंत शिरून प्रांतिक दर्जा पत्करून राहावें याचा निर्णय ब्रह्मी पुढाऱ्यांनीच ठरविला पाहिजे. त्यांच्या कौन्सिलांत मागील खेपेस हा विषय निघाला असता, त्यांना स्पष्ट अभिप्राय देतांच आला नाही. जॉइंट कमिटीचें काम फिरून लंडनांत येत्या आक्टोबरांत सुरू होईल, तेव्हा ब्रह्मदेशाच्या प्रतिनिधींना बोलावून त्यांचें मत कमिटी विचारणार आहेच. त्या वेळीं तरी ब्रह्मी प्रतिनिधींनी आपलें धोरण ठाम ठरवून, या विषयाचा कायमचा निकाल लावला हेंच श्रेयस्कर.

आज ब्रह्मदेशांतील बराचसा व्यापार हिंदी लोकांच्या हातीं आहे शिवाय ते तेथे सावसावकारीचाहि धंदा करतात. ब्रिटिश व्यापाऱ्यांना हिंदी व्यापाऱ्यांची ही चुरस नडत असल्यामुळे, त्यांना निर्वेधपणें आपले व्यापारी हातपाय लांबवर पसरण्यास अडचण पडते. हिंदी लोकांचा हा वाटेंतील कांटा काढून टाकण्यासाठीच होअरसाहेबांनी वरील बचावाची योजना ब्रह्मी लोकांना सुचविली आहे.

# स्फुट सूचना

१ मुंबईंत मुसलमानांचे दंगे वारंवार होतात व त्यांची सुरुवात केव्हा होईल याचाहि नेम नसतो. गेल्या वर्षाचा दंगा फारच उग्र स्वरूपाचा असून, त्यांत मुसलमान गुंडांनी सुऱ्यांचा सर्रास उपयोग केला. असले अमानुष प्रकार पुनः दृष्टीस पडू नयेत अशी प्रत्येक सुजाण मनुष्याची इच्छा असणें स्वाभाविक होय. हे दंगे बंद पाडण्याचें निमित्त सांगून, मुंबई–सरकारानें कायदेमंडळाच्या मागील बैठकींत दंग्यांतील गुंडांना फटके मारण्याचें बिल आणिलें. सदर बिलावरील प्राथमिक चर्चा आटोपल्यावर त्याची रवानगी सिलेक्ट कमिटीकडे झाली. सिलेक्ट कमिटीनें बिल तपासून कायदेमंडळाला सादर केलें. त्यावर गेला शुक्रवार व शनिवार हे दोन दिवस चर्चा चालून त्याचें तिसरें वाचनहि मंजूर झालें. बिलांत सुधारणा झाल्या त्या अशा कीं, त्याची व्याप्ति फक्त मुंबई शहरापुरतीच ठरली, व बिलाचा अंमल जेव्हा सुरू करणें जरूर वाटेल तेव्हा त्याबद्दलचा जाहीरनामा आगाऊ निघेल.

---

२ वरील दोन सुधारणांपैकीं पहिल्या सुधारणेनें नवीन कायद्याची भीति मुंबई इलाख्यांत मुंबई शहराबाहेरील कोणत्याहि स्थळाला नाही. त्याचप्रमाणें मुंबई शहरांतहि हा कायदा सतत लागू व्हावयाचा नसून, फक्त आणीबाणीच्या प्रसंगीं आगाऊ जाहीरनामा प्रसिद्ध होऊन लागू करण्यांत येणार आहे. जे गुंड निरपराधी स्त्रीपुरुषांच्या व मुलामाणसांच्या पोटांत सुरे खुपसण्याचें क्रूर कर्म करण्यास प्रवृत्त होतात त्यांना फटक्यांची शिक्षा देण्यांत आली तर त्यांजविषयी कोणासहि दया वाटण्याचें कारण नाही. परंतु सरकाराच्या हातीं हें शस्त्र पडलें म्हणजे तें एकट्या गुंडांवरच चालविलें जाईल, राजकारणी लोकांवर चालविलें जाणार नाही, अशी खात्री जनतेस वाटत नसल्यामुळेच सदर बिलाला कायदेमंडळांतील बऱ्याच सभासदांनी विरोध दर्शविला. परंतु बिलावर मतें घेतां तें मंजूर झालें; यावरून बिलाला अनुकूल असणारांचेंच बहुमत कायदेमंडळांत होतें असें दिसून आलें. गुंडांचे दंगे बंद पाडण्यास सरकाराच्या कायदेबुकांत थोडीं शस्त्रें आहेत असें नाही. त्या शस्त्रांचा ताबडतोब अंमल केल्यानेहि दंगे थांबवितां येतील; पण ती तत्परता ठेवण्याऐवजी सरकार नवे कायदेच करीत सुटलें, तेव्हा त्यांत त्यांचा गुंडांचें नांव घेऊन दुसऱ्यावरच झडप घालण्याचा कावा असला पाहिजे अशी साहजिकच शंका येते. आता हा कायदा पास होऊं नये तो झाला; तरी त्याचा अम्मल सरकार किती सरळपणानें करतें हें वेळ येईल तेव्हा दिसेलच.

---

३ म. गांधींचे चिरंजीव श्री. देवीदास गांधी हे आपली नवप्रणीत पत्नी लक्ष्मीबाई यांच्यासह दिल्लीस गेले. दिल्लीच्या स्टेशनावर उतरण्यापूर्वीच त्यांजवर दिल्लींत न शिरण्याचा हुकूम पोलिसांनी बजावला देवीदास यांनी यापूर्वी अनेक वेळा कायदे मोडले आहेत व त्याकरिता बंदिवासहि स्वीकारला आहे.परंतु या खेपेस दिल्लीस जाण्यांत त्यांचा हेतु कायदे मोडण्याचा नसून, विधायक काम करण्याचा आहे असें आगाऊ जाहीरहि झालें होतें. त्यांना हुकूम बजावण्यांत आल्यावर दिल्लीच्या चीफ कमिशनराकडे त्यांनी तसें उघडपणें कळविलेंहि. तरी सदर हुकूम त्यांच्याकडून परत घेतला गेला नाही. आता यापुढे देवीदास यांना दोनच वाटा मोकळ्या होत्या. एक तर त्यांनी दिल्लींत न शिरता माघारें फिरावें,किंवा हुकूम मोडून जी शिक्षा मिळेल ती भोगावी.पण देवीदास हे कांही म्हटलें तरी सत्याग्रहीच असल्यामुळे, त्यांना प्राप्त झालेला हुकूम मोडण्याचा प्रसंग टाळणें त्यांच्या ब्रीदास सोडून होतें. सरकारानें त्यांना मुद्दामच या खिंडींत गांठून त्यांजवर कायदा मोडण्याची पाळी आणिली. या बाबतींत सरकाराचा हेतु असा दिसतो कीं, या उपायानें देवीदास यांना तुरुंगांत अडकवून त्यांच्या हालचालींसंबंधानें निर्धास्त व्हावें. परंतु देवीदास यांचा आजपर्यंतचा आयुष्यक्रम पाहता विधायक कार्याचें ढोंग करून, कायदेभंगाची गुप्तपणें तयारी करण्यासाठी ते दिल्लींत गेले असतील हें संभवत नाही. या दृष्टीनें विचार केल्यास देवीदास यांना तुरुंगांत ढकलण्यांत सरकारानें धडधडीत अन्याय व खुनशीपणा केला असेंच म्हणावें लागतें.

---

४ बॉम्बे इंप्रुव्हमेंट ट्रस्टची व्यवस्था कित्येक वर्षें ट्रस्ट कमिटीकडे देण्यांत आली आहे. पण गेल्याच आठवड्यांत मुंबई कायदेमंडळानें मंजूर केलेल्या बिलाप्रमाणें ही व्यवस्था मुंबई कॉर्पोरेशनकडे कांही दिवसांनी दिली जाईल हें उघड आहे. इंप्रुव्हमेंट ट्रस्टचा कारभार आजतागायत आंतबट्ट्याचाच ठरला आहे. त्याच्या जमाखर्चांत येणारी तूट सरकार भरून काढीत असे. ही तूट साधारणपणें ३५–३६ लाख रुपये येत असते. पण या नव्या

बिलानें या तुटीचा बोजा मुं. कॉर्पोरेशनवर पडणार आहे. मुंबई कॉर्पोरेशन हीं एक लहानसा प्रांतच आहे. कॉर्पोरेशनचा जमाखर्च सुमारें ३ कोटि ४० लक्षांचा आहे. यापैकीं ४० टक्के उत्पन्न कर्जावरील व्याजाची फेड करण्यांत खर्च होतें. सध्याचें कॉर्पोरेशनचें कर्जाचें ओझें १७ कोटींचें आहे, तें इंप्रुव्हमेंट ट्रस्टचा कारभार कॉर्पोरेशनकडे आल्यावर ३४ कोटींचें होईल! जमाखर्चांत बचत करून व कर वाढवून कॉर्पोरेशननें आपला कारभार कसाबसा आजपर्यंत चालविला! पण यंदाच्या सालापासून जमाखर्चांतील तूट १७½ लाखांवर जाईल असा अंदाज करण्यांत आला आहे.

---

५ अशा परिस्थितींत इंप्रुव्हमेंट ट्रस्टचा कारभार शिरावर घेतल्यावर, कॉर्पोरेशनची स्थिति काय होईल याची कल्पना सहज येईल. पण इतकें असूनहि मुंबई सरकारानें कॉर्पोरेशनच्या जमेंत कांहीं भर पडेल अशी व्यवस्था केली असेल तर ती ही कीं, तंबाखूवरील उत्पन्न वाढवून त्यांतून सुमारें ९ लाख रुपये कार्पोरेशनला देण्याचें योजलें आहे! मुंबई शहरांतील रहिवाशांना आधीच दरमाणशीं २५ रु. कर द्यावा लागत आहे; आणि हातीं उत्पन्नाची दुसरी बाब नाहीं म्हणून कार्पोरेशनचे माजी अध्यक्ष डॅ. विठ्ठलराव चंदावरकर यांनी, 'टर्मिनल टॅक्स' बसविण्याची परवानगी कॉर्पोरेशनला द्यावी व त्याकरिता नवीन बिल कायदेमंडळापुढे आणून, ही अडचण दूर करावी अशी स्थानिक स्व. मंत्र्यांचेकडे मागणी केली होती. टर्मिनल टॅक्स हा अप्रत्यक्ष स्वरूपाचा कर असला तरी त्याचा बोजा लोकांवर पडावयाचा तो पडतोच. याकरिता आधीच डोईजड असलेला कर वाढविणें शहाणपणाचें होणार नाहीं. कॉर्पोरेशन व इंप्रुव्हमेंट ट्रस्ट यांच्या कारभारांत आणखी काटकसर कोठें व किती करतां येईल याची पाहणी सरकारानें करावी, व येणारी तूट आपल्या खजिन्यांतून भरून काढावी, त्याकरिता टर्मिनल टॅक्स बसवूं नये. कारण त्यामुळें मुंबई शहरांतील व्यापार व रेल्वेची वाहतूक यालाहि धक्का बसेल.

# लोकनायक अणे यांना अटक

अकोला ता. १३

काँग्रेसचे चालू अध्यक्ष लोकनायक माधवरावजी अणे हे यवतमाळ येथून रेल्वेने आज रोजीं दुपारीं बारा वाजता अकोल्यास आले. त्यांच्याबरोबर यवतमाळ जिल्ह्यांतील पांच सत्याग्रही होते. त्यांत दोन स्त्रियाहि होत्या. बापूजींचे बंधु श्री. यादवराव अणे, शेठ जमनलाल बजाज, डॉ. पटवर्धन, डॉ. भोजराज, हरिहरराव देशपांडे वगैरे अनेक गृहस्थ श्री. अणे यांना निरोप देण्यासाठी अकोल्यास आले होते. स्टेशनावर श्री. ब्रिजलाल बियानी, श्री. गोळे, मामा जोगळेकर, गोपाळराव चितळे, दुर्गाबाई जोशी, यांनी बापूजींचें स्वागत केल्यावर सर्व मंडळी श्री. गोपाळराव चितळे यांचे घरीं गेली. तेथे बापूजींना अल्पोपाहार देण्यांत आल्यावर श्री. मामा जोगळेकर यांनी बापूजींस पुष्पहार समर्पण केला. अकोला येथे आणखी आठ स्वयंसेवक बापूजींना मिळाले.

बापूजी अणे यांनी अकोला जिल्हा मॅजिस्ट्रेटाला पत्र पाठवून आपण दुपारीं तीन वाजता टिळक मैदानावरून आपल्या तेरा सहकाऱ्यांसह लोणी येथे जंगलसत्याग्रहास निघणार असल्याचें कळविलें होतें.

टिळक मैदानावर बापूजींस निरोप देण्यासाठी स्त्री पुरुषांची गर्दी झाली होती. बापूजींना निरोप देण्यासाठी मैदानावर भरलेल्या सभेचे अध्यक्ष श्री. केशवराव लेले यांनी वऱ्हाड प्रांतिक काँग्रेस कमिटीचे आपण अध्यक्ष असल्याचें जाहीर करून बापूजींस व त्यांच्या तेरा सहकाऱ्यांस पुष्पहार व जंगलसत्याग्रहासाठी कुऱ्हाडी समर्पण केल्या. अध्यक्ष श्री. लेले भाषण करतांना म्हणाले, आज श्रीकृष्णाच्या शुभ जन्मदिवशीं लोकनायक अणे पारतंत्र्याच्या शृंखला तोडून टाकण्यासाठी जात आहेत. यानंतर वंदेमातरम् गीत झाल्यावर बापूजी म्हणाले, 'राष्ट्रीय सभा सरकारशीं स्वातंत्र्यार्थ झगडा करीत आहे ही गोष्ट सर्वांनी ध्यानीं धरावी. सरकार जर सन्मानाची तडजोड करीत असेल तर कायदेभंगाची चळवळ बंद करावी असेंच माझें म्हणणें होतें व म्हणून काँग्रेसचा अध्यक्ष या नात्यानें मी महात्माजींना व्हाइसरॉयापाशीं मुलाखत मागावी असा सल्ला दिला. परंतु व्हाइसरॉयांनी मुलाखत दिली नाहीं व बिनशर्त चळवळ माघारी घ्यावी असा पुणें परिषदेचा ठराव नसल्यानें आम्हांसहि चळवळ चालवावी लागत आहे. ज्यांना तुरुंगांत जाणें नसेल त्यांनी काँग्रेसचा

विधायक कार्यक्रम विशेषतः स्वदेशी व मद्यपान-प्रतिबंध हीं कामें करावींत.'

या भाषणानंतर लोकनायक अणे आपल्या १३ संवगड्यांसह लोणी येथे जाण्यास निघाले. ते कोतवालीजवळ पोंचले तेव्हा तेथे डि. सु. ऑफ पोलीस, व डि. मॅजिस्ट्रेट सुमारें ७५ पोलिसांसह हजर होते. त्यांनी श्री. अणे यांना अशी बेकायदा मिरवणूक नेऊं नका म्हणून सांगितलें. तें अणे यांनी नाकारतांच त्यांना व त्यांच्या तेरा सहकाऱ्यांना इं. पि. कों. कलम १४५ खाली अटक करून अकोला सेंट्रल तुरुंगांत नेण्यांत आलें.

# प्रतिलोम विवाह अयोग्य आहे

## ( ले.—म. म. श्रीधरशास्त्री पाठक—धुळें )

कांही दिवसापूर्वी एक आकस्मिक् प्रकार घडून आल्यामुळें, देशांत बरीच खळबळ उडून गेली आहे. एरवीं सदरहू प्रकारामुळे जनतेंत क्षोभ उत्पन्न झाला नसता. परंतु अप्रत्यक्षपणें कां होईना महानुभावांचा त्या प्रकाराशीं निकट संबंध आल्यामुळे, जनतेने आपल्या स्वभावाप्रमाणे खूप दंगल उडवून दिली आहे. सदरहू प्रकार म्हणजे 'देवीदास-लक्ष्मी-विवाह ' हा होय. शास्त्राप्रमाणे सदरहू विवाह प्रतिलोमपद्धतीचा असल्यामुळे, जनता त्यामुळे चिडल्यासारखी झाली आहे. क्षुब्धान्तःकरणान चर्चा सुरू असल्यामुळे, शास्त्रवचनाच्या फुलांबरोबर अधिक्षेपांची धूळहि फार उधळली जात आहे. सदरहू प्रश्नावर मत देणें आपल्यास आवश्यक होईल ही जाणीव आम्हांस प्रारंभापासूनच उत्पन्न झाली होती. तथापि सदरहू विवाहांत पौरोहित्य करणारे वे. शा. सं. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे स्वतःचा अधिकृत खुलासा जाहीर करून, स्वतःस चिकटविलेले कांही अवास्तव दोषारोप दूर करीपर्यंत आम्हांस स्वस्थ बसणेंच योग्य वाटलें. आता त्यांचा खुलासा जाहीर झाल्यावर प्रतिलोम विवाहासंबंधाने आम्ही आमचें म्हणणें प्रसिद्ध करतों.

प्रतिलोम विवाह शास्त्रतः अनिष्ट आहे असेंच आमचे धर्मशास्त्रनिरूपणाने मत बनलेलें आहे. कसें तें पाहूं. फार फार प्राचीन काळीं सर्वत्र एकच वर्ण होता ही गोष्ट खरी आहे. नंतर एकाचे दोन तीन व चार असे वर्णभेद पडले. चातुर्वर्ण्य अस्तित्वांत आल्यावरहि विवाहाचे बाबतींत शैथिल्य दीर्घकाळपर्यंत अस्तित्वांत होतें. म्हणजे सवर्ण विवाह होत, तसेच भिन्नवर्णीयांचे विवाहहि होत असत. भिन्न वर्णीय विवाहांचे अनिष्ट परिणाम शास्त्रज्ञांस दिसूं लागल्याबरोबर, विवाहांमध्ये भेद दर्शवून, त्यांची श्रेष्ठकनिष्ठता ठरविण्यांत आली. सवर्णविवाह प्रशस्त व उच्चजातीय पुरुष व कनिष्ठजातीय स्त्री यांचा विवाह म्हणजेच अनुलोम विवाह, हा त्याहून गौण. उच्चजातीय स्त्री व कनिष्ठजातीय पुरुष यांचा विवाह म्हणजे प्रतिलोम विवाह. हा हीन मानला गेला. आरंभीं ब्राह्मण पुरुष व क्षत्रिय स्त्री या अनुलोमाची संतति क्षत्रियाहून वरिष्ठ ठरविली होती. परंतु पुढे अनुलोमसंतती पितृसावर्ण्य होतें तें मातृसावर्ण्य ठरविण्यांत आलें व सवर्णसंततीहून ही संतति हीन ठरविली गेली. प्रतिलोमसंततींत उच्चतादर्शक मातृसावर्ण्य न ठेवता, पित्र्यानुरूप पितृसावर्ण्य ठरवून, प्रतिलोमसंततीचा हीनपणा ठरविण्यांत आला. ब्राह्मणकन्या देवयानी व क्षत्रिय ययाति यांचा संतति क्षत्रियच ठरली. या उदाहरणावरून प्रतिलोम हा विवाहच होता हे स्पष्ट होतें. प्रतिलोम हा विवाह नव्हेच जें कित्येकांच म्हणणें आहे ते शास्त्रास सोडून आहे. बाळंभट्टींत व सूतसंहितेंतील श्लोकांत ही गोष्ट स्पष्ट सांगितलेली आहे (विप्राया क्षत्रियाज्जातः सूत इत्युच्यते बुधैः। चौर्येणास्यामनेनोत्थो रथकार इति स्मृतः ॥ याज्ञ० श्लो०९४ ) तथापि हे प्रतिलोम विवाह शास्त्रकारांनी निषिद्ध ठरविले व त्यांतल्या त्यांत ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यांची संतति व जो चांडाळ तो अत्यंत हीन ठरविला ! द्विजांतील प्रतिलोम हे त्या मानाने कमी गर्ह्य मानीत, तथापि हे सर्व प्रतिलोम पुढे निषिद्ध ठरविले गेले.

आता तर्कतीर्थांच्या म्हणण्याचा थोडासा विचार करूं. त्यांचें म्हणण्याचें तात्पर्य हें कीं, वर्ण हे मूळ स्वरूपांत हल्ली अस्तित्वांतच नाहीत. म्हणून संस्कृति दृष्ट्या समान अशा भिन्नवर्णीयांचा विवाह करण्यास हरकत नसावी. पण हें त्यांचें म्हणणें चिन्त्य आहे. हल्ली वर्ण हे पूर्वीच्यासारखे शुद्ध स्थितींत नाहीत ही गोष्ट खरी. परंतु भ्रष्ट स्थितींत का होईना चारीहि वर्ण आज अस्तित्वांत आहेत. भ्रष्ट स्थितींत असले तर सर्वच वर्ण भ्रष्ट आहेत, केवळ ब्राह्मण व शूद्रच आहेत असें म्हणणेंहि बरें नव्हे. मग ज्या स्थितींत चातुर्वर्ण्य आहे त्या स्थितींत व शक्य तर त्याहून वरच्या स्थितींत तें टिकवावयाचें कीं नाही हा आपल्या समाजापुढे

प्रस्तुत प्रश्न आहे. पौरोहित्य करतांना आश्वलायन व हिरण्यकेशी सूत्रानुसारी प्रयोग केले असें त्यांनी प्रसिद्ध केलें आहे. सूत्र हे प्रयोगग्रंथ असून, ते त्रैवर्णिकांकरितां असतात. जर आज वर्ण नाहीतच तर पौरोहित्य करतांना त्या सूत्रांचा आश्रय त्यांस कसा करतां आला? जर आपण सूत्रांप्रमाणे प्रयोग करतां तर वर्ण आहेत हें आपण स्वीकारतां हे सिद्ध झालें. यावरून वर्ण हल्ली नाहीत असें सिद्ध होत नसून ते मूळ स्वरूपांत नाहीत तर किंचित् भ्रष्ट स्वरूपांत आहेत हेंच सिद्ध होतें. म्हणून अनुलोम किंवा प्रतिलोम विवाह जे शास्त्रकारांनी आता निषिद्ध ठरविले आहेत ते पुनः रूढ करण्याचें प्रयोजन नाही. सवर्ण विवाह शास्त्रतः योग्य होय हेंच धर्मशास्त्रकारांचें मत बहुकाळ परिनिष्ठित झालेलें आहे. ज्या काळीं ज्या प्रकाराचे द्विज असतील त्या काळाला ते अनुरूपच होत. त्यांची निंदा करूं नये असें पराशरस्मृतींत म्हटलें आहे. 'तेषां निंदा न कर्तव्या युगरूपा हि ते द्विजाः ॥' तेव्हा पूर्वीच्या शास्त्राविरुद्ध जर एखादा निर्णय करावयाचा असेल तर, त्या त्या काळच्या ब्रह्मवृंदांपुढे तो प्रश्न आला पाहिजे. समाजाला जर प्रतिलोम विवाह इष्ट वाटत असेल तर, त्याने ब्रह्मवृंदाकडून तशी अनुज्ञा मिळविली पाहिजे व तशी मान्यता मिळाल्यासच असे संबंध करतां आले तर येतील, तोंपर्यंत नाही. एरवी ते शास्त्रविरुद्ध होतील, व प्रतिलोम विवाहास मान्यता मिळवावी अशी वेळ आलेली नाही असेंच आम्हांस वाटते.

प्रतिलोमविवाहाविषयीं प्रतिकूल मत आम्हीं शास्त्रानुसार दिलें आहे, तथापि कोणाला अनुकूल व कोणाला प्रतिकूल मत द्यावें या बुद्धीने ते दिलेलें नाही."

# जर्मनींतील नवा जोम

सांप्रत युरोपांतील बहुतेक सर्व राष्ट्रांना स्वराज्य लाभलें आहे. परंतु स्वराज्यप्राप्तीनेहि राष्ट्राच्या गरजा भागत नाहीत असें अनुभवास आल्यावरून बऱ्याच राष्ट्रांतील लोकांना स्वराज्यापेक्षा सुराज्याचीच तहान अधिक लागलेली दिसते. स्वराज्य काय किंवा सुराज्य काय, त्याचा जन्म व्यक्तिमात्राच्या सुखाकरिता असल्याने तें सुख केवळ स्वराज्याची मोहक मूर्ति उराशीं कवटाळून धरल्याने लाभत नसेल तर त्या स्वराज्यावर पाणी सोडून जो राष्ट्राला वैभवावर चढवील अशा अरेरावाच्या अमलापुढेहि मान लवविण्यास जनता कशी तयार होते याचें प्रत्यंतर सध्याच्या युरोपांत ढळढळीत पाहावयास सांपडत आहे. इटालींत मुसोलिनीचा एकतंत्री अंमल सुरू आहे; रशियांत स्टॅलिन अधिकारारूढ आहे; ऑस्ट्रियाचा राज्यशकट डॉल्फस हांकीत आहे व जर्मनीचीं सूत्रें हिटलर हलवीत आहे. हीं चारहि राष्ट्रें विस्तार, लोकसंख्या, विद्वत्ता, बुद्धिमत्ता व प्राचीनता या दृष्टीने युरोपांत प्रमुख असून तेथील प्रातिनिधिक राज्यपद्धति संपुष्टांत येऊन त्यांतून एकतंत्री अंमल सुरू झाला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

वरील चार राष्ट्रांना लोकसत्ताक राज्यपद्धतीचा अनुभव फारसा जुना नाही. राजाने राज्य करावें व त्याचे हुकूम मुकाट्याने मानावे या पद्धतींतच त्यांतील जनता पुष्कळ वर्षे रुळलेली आहे. या कारणाने कांही काळ लोकसत्ता बुडून एकतंत्री अंमल सुरू झाल्याचा विषाद तिला वाटत नसेल असें कोणी म्हणेल व तें कांही अंशीं खरेंहि आहे. तथापि मिळालेली सत्ता सोडून देण्यास व सर्वाधिकाऱ्याचा सासुरवास आपणावर गाजवून घेण्यास जर्मनी, ऑस्ट्रिया, इटाली या देशांतील सुशिक्षित समाजहि कबूल झाला; याच्या मुळाशीं तशींच जबरदस्त कारणें असलीं पाहिजेत यांत संशय नाही. हल्ली हर हिटलर याने जर्मनींत प्रळय उडवून दिला आहे, तो जर्मन लोक विशिष्ट परिस्थितीमुळेच चालूं देत आहेत. हिटलर हा जर्मनीच्या चॅन्सेलर—पदावर जानेवारी महिन्याच्या अखेरीस चढला. त्याची चॅन्सेलरच्या पदावर स्थापना करण्यास जर्मनीचा अध्यक्ष फॉन हिंडेनबुर्ग याचीच सर्वतोपरी मदत झाली.

जनरल हिंडेनबुर्ग हें कांही लहानसान प्रस्थ नव्हे. त्यांचें वय पंचाऐशी वर्षांच्या घरांत गेलें आहे; त्यांनी प्रख्यात जर्मन मुत्सद्दी प्रिन्स बिस्मार्क याची कारकीर्द पाहिली आहे.

जगाला चळचळां कापावयास लावणाऱ्या महायुद्धांत जर्मन सेनासमुद्राचें आधिपत्य त्यांनीच संभाळलेलें आहे; व आज तमाम जर्मन लोकांचा भरंवसा त्यांजवरच आहे. अशा या रणधुरंधर व वयोवृद्ध राष्ट्रपुरुषापुढे हर हिटलर हा केवळ कोवळा पोरच म्हटला पाहिजे. त्याची फक्त चाळिशी काय ती उलटली आहे. त्याचें शिक्षण म्हणावे तर जवळजवळ आवळ्याएवढें. त्याची आरंभाची कामगिरी पाहावी तर गवंड्याच्या हाताखाली चिखलाच्या पांट्या वाहण्याची. असल्या यःकश्चित् दिसणाऱ्या मनुष्याच्या हवालीं जर्मन राष्ट्राचीं सूत्रें हिंडेनबुर्ग यांनी सुखाने केलीं नसतील. महायुद्ध संपून कायसर बादशहा जर्मनींतून सहकुटुंब पळून गेल्यावर जर्मनीची राजकीय घडी बसविण्यासाठी मोठमोठ्या जर्मन मुत्सद्द्यांनी आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा करून पाहिली. डॉ. स्ट्रेसमन, ब्रूनिंग, पेपेन इ. अनेक विद्वान व अनुभवी मुत्सद्द्यांनी जर्मनीचें चॅन्सेलर पद स्वीकारलें. पण त्यांपैकीं, प्रत्येकास जर्मनीचा खरा उद्धार करण्याच्या कामीं हात टेकावे लागल्यामुळे हिटलर यांची चॅन्सेलर-पदावर योजना केल्यावांचून हिंडेनबुर्ग याला गत्यंतर उरलें नाही. इतकेंच नव्हे तर त्यानंतर अवघ्या तीन महिन्यांच्या आंत राइसस्टॅगची सर्वसाधारण सभा भरून तिने हिटलर यास सर्वाधिकारहि देऊन टाकले.

हिटलर हा तसा म्हटला तर उपटसुंभच आहे. व्हर्सैलीसच्या तहाने जर्मनीचें थडगें बांधलें असें त्याच्या मनाने पक्कें घेतलें असल्यामुळे तो त्या थडग्यांतून जर्मनीस बाहेर काढून तहालाच त्या थडग्यांत गाडून टाकण्यास सिद्ध झाला आहे. तो तह उरावर घेऊन जर्मनी बसला तर जर्मनीच्या उत्थानाची आशा कायमचीच सोडून द्यावयास पाहिजे, याविषयी हिटलर याची इतरांप्रमाणे बालंबाल खात्री पटली आहे. त्याने आपल्या डोळ्यांपुढे जर्मनीचा उद्धार हें एकच ध्येय ठेवलें आहे. त्या कामीं त्याला सूक्तासूक्त मार्गाची मुळीच क्षिति नाही. व्हर्सैलिसचा तह रद्द करावयाचा, दोस्त-राष्ट्रांना नुकसानभरपाईची रक्कम द्यावयाची नाही, आफ्रिका वगैरे खंडांतील आपल्या गेलेल्या वसाहती परत मिळवावयाच्या, सैन्य व आरमार हीं इतर प्रमुख राष्ट्रांच्या तोडीचीं ठेवण्याचा हक्क भांडून घ्यावयाचा आणि जर्मनी, ऑस्ट्रिया व हंगेरी यांचें एक राष्ट्र बनवावयाचें हें हिटलरनें आपल्या कारकीर्दीचें धोरण ठरविलें आहे. गेल्या सहासात महिन्यांत हिटलर याच धोरणाने वागत आला आहे. हिटलर यास आर्यवंशाचा व संस्कृतीचा मोठा अभिमान आहे. यहुदी हे सेमिटिक वंशाचे लोक आहेत. त्यांनी बाहेरून येऊन जर्मन लोकांच्या तोंडचा घास काढून गबर व्हावें याचा हिटलर याला मोठा विषाद वाटत असल्यामुळे सर्वाधिकाऱ्याचीं सूत्रें स्वाधीन होताच त्याने यहुद्यांवर शस्त्र धरलें. यहुदी डॉक्टर व वकील यांना धंदा करण्यास त्याच्या कारकीर्दींत बंदी झाली. यहुदी व्यापाऱ्यांच्या दुकानावर बहिष्कार पडला व कांही ठिकाणीं त्यांची मालमत्ताहि जाळण्यांत आली. यहुदी लोक आपणांवर उठलेलें हें काहूर पाहून इतके घाबरून गेले कीं, त्यांच्यापैकीं पुष्कळजण जर्मनींतून चालते झाले. जर्मनींतील यहुद्यांवरील संकटाने युरोपमधील ठिकठिकाणचे यहुदी जागे होऊन त्यांनी आमस्टरडाम येथे नुकताच आपला एक संघ स्थापन केला आहे

यहुद्यांबरोबरच कम्यूनिस्ट पंथावरहि हिटलरची संक्रांत गुदरली आहे. कम्यूनिस्ट लोक राष्ट्रीय कल्पना झूट समजतात. जगांतील सारे कम्यूनिस्ट परस्परांशीं बंधुत्वाच्या नात्याने वागावें असें म्हणतात; त्यांच्या चळवळीचें स्वरूप आंतरराष्ट्रीय आहे, राष्ट्रीय नाही. देशांतील सारी संपत्ति समाजाच्या मालकीची असून ती सर्वांना प्रथम समान वांटण्यांत आली पाहिजे व सर्वांपासून सारखें काम करून घेतलें पाहिजे असें त्यांचें मत आहे. हिटलरला तें मत पसंत नाही. ज्याच्या योगाने देशांत दुही उत्पन्न होऊन अस्वस्थता माजेल व राष्ट्रीय प्रगति खुंटेल अशा वादांत त्याला सध्या पडावयाचेंच नाही. कम्यूनिस्ट पंथाचा त्याने अंगीकार केला तर जर्मनींतील कारखानदार,

जमीनदार व भांडवलवाले हे सर्व वर्ग हिटलरला व त्याच्या नाझी पक्षाला खावयास उठतील. हिटलरच्या चळवळीची सारी उभारणी त्यांच्या मदतीवर झाली असून त्यांनी हिटलरला हातचें सोडल्यास हिटलरचा पक्ष निर्माल्यवत् होईल. उलटपक्षीं कम्यूनिस्ट पाहावेत तर ते अगदीच खंक. त्यांजपासून हिटलरला तादृश फायदा कांहींच नाही. सदर पंथ हिटलरच्या नाझी पंथास ठिकठिकाणीं नडूं लागला असल्याने हिटलरने त्याचा बीमोड आरंभिला आहे.

महायुद्धानंतर युरोपांतील प्रत्येक देशांत स्वयंसेवक दळें निघालीं आहेत. हीं दळें सैन्याच्या खालोखाल उपयुक्त ठरलीं आहेत. हिटलरच्या नाझी पक्षानेहि अशीं दळें स्थापन केलीं असून त्यांतील स्वयंसेवकांची संख्या एक लक्षावर गेली आहे. मुसोलिनीच्या फासिस्टांचे डगले काळे असतात तर नाझींचे डगले खाकी असतात. हिटलरच्या खाकी डगलेवाल्यांनी अखिल जर्मन राष्ट्र व्यापलें असल्यामुळे त्यांजकडून त्याला हवा तो मनोरथ साधून घेतां येतो. तो चॅन्सेलर पदावर बऱ्याच अंशीं त्यांच्याच मदतीने चढला. हे सैनिक व त्यांचे साहाय्यकर्ते पोलीस यांनी मोटारी व विमानें यांत बसून कम्यूनिस्टांचा पाठलाग करीत त्यांचा निःपात आरंभला आहे. हिटलरला ऑस्ट्रिया व हंगेरी या दोन देशांना महायुद्धांतल्याप्रमाणे आपल्या जोडीस घ्यावयाचें असल्यामुळे त्यांतहि नाझी पंथाचा त्याने जोराने प्रसार चालविला आहे. जर्मनींतील तरुणांचीं मनें त्याने भारलींच आहेत, खेरीज शाळांमधून जीं मुलें शिकत आहेत, त्यांसहि जर्मनीच्या अधःपाताविषयीं तिटकारा उत्पन्न करण्याकरितां त्याचप्रकारचें शिक्षण देण्याची तजवीज त्याने चालविली आहे. आता शाळांसाठी नवीन नकाशे तयार झाले आहेत. त्यांत जर्मनीचे हिरावून घेतलेले प्रांत, धुळीस मिळविलेले किल्ले, व्हर्सेलीसच्या तहाने केलेलें नुकसान दाखविलें असल्याने जर्मनीची नवी पिढी फ्रान्सविरुद्ध डोक्यांत राख घालून उठल्यावांचून राहणार नाही. या तयारीवरून जर्मनी बेफाम बनत चालला असल्याचें स्पष्ट दिसतें. तो तहाची पर्वा करणार नाहीच, पण नष्ट झालेलें सामर्थ्य व वैभव निस्संगपणाने परत मिळविणार किंवा तें न साधल्यास नव्या संकटांत उडी घेणार असें वाटतें.

# रिझर्व्ह बँक बटीक बनणार !

पहिल्या गोलमेज परिषदेचें भरतवाक्य इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी ता. १९ जानेवारी १९३१ रोजीं म्हटलें. त्यांत भावी राज्यघटनेंत हिंदुस्थान सरकारच्या फडणविसाच्या हातीं तिजोरीची सर्व सत्ता देण्यापूर्वी रिझर्व्ह बँक स्थापन होणें अत्यंत आवश्यक आहे असें सांगितलें होतें. फेडरल स्ट्रक्चर कमिटीने रिझर्व्ह बँकेविषयीं बराच ऊहापोह करून नवीन राज्यघटना अमलांत आल्यावर हिंदुस्थानाचे पतीचे व्यवहार व चलनव्यवस्था नीट चालेल याबद्दल विश्वास वाटण्याकरिता सदर बँक राजकीय पक्षोपपक्षांपासून अलिप्त राहिली पाहिजे, असें आपल्या रिपोर्टांत नमूद करून ठेवलें. पुढे तिसरी गो.मे.परिषद झाली. त्या परिषदेने रिझर्व्ह बँकेच्या स्थापनेचें बिल हिंदी कायदेमंडळांत लवकरच आणण्याविषयीं सुचविलें. यावर भारतमंत्र्यांनी असें आश्वासन दिलें कीं बँकेची स्थापना करण्यापूर्वी हिंदी प्रतिनिधींचा विचार घेतला जाईल. या आश्वासनाप्रमाणे जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या बैठकीच्या वेळीं ब्रिटिश प्रतिनिधींबरोबर वाटाघाट करण्याकरिता हिंदी कायदेमंडळाचे कांही सभासद व इतर गृहस्थ यांना हिंदुस्थानसरकाराने विलायतेस पाठविलें. त्या उभयतांची वाटाघाट होऊन रिझर्व्ह बँक कमिटीचा रिपोर्ट ता. १५ ऑगस्ट रोजीं बाहेर पडला.

१९२८ सालीं हिंदुस्थान सरकाराचे फ -

णीस सर बेसिल ब्लॅकेट यांनी रिझर्व्ह बँकेची जी घटना आपल्या बिलांत समाविष्ट केली होती तीच कांही फरकाने या कमिटीने मान्य केली आहे. बँकेचें भांडवल खाजगी भागीदारीने उभारावें या सूचनेला कमिटीच्या सभासदांपैकीं लाला रामशरण दास यांनीच काय तो विरोध केला. त्यांचें म्हणणें असें कीं, बँकेचें भांडवल सरकाराने पुरवावें. १९२७सालीं हिल्टन यंग कमिशनच्या सूचना लक्षांत घेऊन सर बेसिल ब्लॅकेट यांनी आपलें रिझर्व्ह बँक बिल तयार केलें होतें. बँकेचा कारभार राजकारणापासून अलिप्त राहावा यावर त्यांचा कटाक्ष होता. त्यांनीहि बँकेचें भांडवल खासगी भागीदारीने उभारावें व भागीदारांनी निवडलेल्या व गव्हर्नर जनरल इन--कौन्सिल यांनी नेमलेल्या गृहस्थांनी बँकेचा व्यवहार पाहावा असेंच सुचविलें होतें.

कायदेमंडळाचा सभासद बँकेचा भागीदार असला तर त्याला बँकेचा नियामक होतां येणार नाहीं असेंहि कलम त्या बिलांत होतें. तें बिल ज्या वेळीं सिलेक्ट कमिटीकडे गेलें त्या वेळीं पंडित मालवीय, असेंब्लीचे अध्यक्ष विठ्ठलभाई पटेल, रा. केळकर, जम्नादास मेथा वगैरे लोकपक्षीय सभासदांच्या प्रयत्नाने सर बेसिल यांची योजना फेटाळली जाऊन बँकेचें भांडवल सरकाराने भरावें, बँकेच्या नियामकमंडळावर कायदेमंडळाचे, युरोपियन व हिंदी व्यापारी संघांचे आणि कोऑपरेटिव्ह बँकांचे प्रतिनिधि असावे असें बहुमताने ठरलें. रिझर्व्ह बँकेकडे सरकाराचे कोट्यवधि रुपये बिनव्याजी राहतात. त्या पैशावर व्यवहार करून मिळविलेला फायदा खाजगी भागीदारांना न मिळतां जनतेला मिळावा म्हणून लोकपक्षाने या बँकेचें भांडवल सरकारानें भरावें असा आग्रह धरला होता.

बँकेचें भांडवल सरकाराने भरावें ही लोकपक्षीय सभासदांची सूचना मोठ्या नाइलाजाने सर बेसिल यांनी मान्य केली. परंतु नियामक मंडळावर कायदेमंडळाचे प्रतिनिधि असूं नयेत व राजकारणापासून बँकेचा कारभार अलिप्त राहिला पाहिजे याबद्दल त्यांचा हट्ट कायमच राहिला. लोकपक्षीय सभासदांनी त्याचें मुळीच न ऐकिल्यामुळे सर बेसिल यांनी रिझर्व्ह बँक बिलाची चर्चा पुढे चालवावयाची नाहीं असें ठरविलें व ते विलायतेच्या सफरीस निघून गेले. बँकेचें भांडवल सरकाराने भरावें याला संमति दिल्याबद्दल स्टेट-सेक्रेटरींनी सर बेसिल यांची चांगलीच हजेरी घेतली व पुनः त्यांना खासगी भांडवलाच्या रिझर्व्ह बँकेची योजना तयार करून ती मध्यवर्ती कायदेमंडळाला सादर करण्यास सांगितलें. सर बेसिल यांनी स्टेट-सेक्रेटरींच्या हुकुमानुसार नवें बिल तयार करून १९२८ च्या फेब्रुवारी महिन्यांत असेंब्लीपुढे मांडलें. पूर्वीचें बिल परत न घेतांच नवें बिल आणणें हें नियमबाह्य असल्यामुळे प्रेसिडेंट विठ्ठलभाई पटेल यांनी सर बेसिल यांना नवें बिल मांडूंच दिलें नाही. ज्या बिलाच्या आधारावर रिझर्व्ह बँक कमिटीने आपली योजना तयार केली आहे तेंच हें बिल होय.

रिझर्व्ह बँकेचा कारभार राजकारणापासून अलिप्त राहावा असा हट्ट ब्रिटिश सरकाराने विशिष्ट हेतूनेच धरला हें कमिटीच्या सूचनांवरून उघड होत आहे. हिंदुस्थानसरकाराने बँकेस भांडवल पुरवूं नये या हट्टाचें कारणहि तसेंच आहे. कारण बँकेंत सरकारी भांडवल आलें तर बँकेच्या धोरणावर हिंदी मंत्रिमंडळाची हुकमत चालेल. ती ब्रिटिश सरकाराला नको आहे. पण बँक जर राजकारणापासून अलिप्त राहावयाची तर तिच्या नियामक मंडळावर गव्हर्नर-जनरलास चार प्रतिनिधि नेमण्याचा अधिकार तरी कमिटीने काय म्हणून द्यावा ? 'बँक ऑफ इंग्लंड'च्या नियामक मंडळाचे सर्व सभासद जसे भागीदारांकडूनच निवडले जातात तसेच हिंदी रिझर्व्ह बँकेचेहि निवडले जावे असें कमिटीने सुचवावयास पाहिजे होतें

हिंदी रिझर्व्ह बँकेने बँक ऑफ इंग्लंडची नेमणूक आपले विलायतेंतील एजंट म्हणून करावी; रिझर्व्ह बँकेने स्टर्लिंग मापनपद्धतीचा अवलंब करून ( स्टर्लिंगशीं जोड-

लेला रुपयाचा संबंध कायम करून) रुपयाचा अठरा पेनी भाव टिकवावा; या ब्रिटिश मुत्सद्द्यांना संमत असलेल्या किंबहुना त्यांच्या आग्रहावरून रिझर्व्ह बँक कमिटींतील होयबांनी मान्य केलेल्या सूचना पाहिल्या म्हणजे भावी रिझर्व्ह बँक ही कायदेशीर दृष्ट्या नसली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत बँक ऑफ इंग्लंडची बटीक बनणार असेंच सिद्ध होत नाहीं काय?

# महाराष्ट्र विद्यापीठाची पुण्यांतील जाहीर सभा

रविवार ता. १३ रोजीं सायंकाळीं ६ वाजता महाराष्ट्र साहित्यमंदिरातर्फे भारत इतिहास संशोधक मंडळाच्या दिवाणखान्यात प्रो. द. वा. **पोतदार** यांचें 'महाराष्ट्र विद्यापीठ' या विषयावर श्री. **न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. प्रारंभीं श्री. य. रा. दाते यांचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर प्रो. पोतदार आपल्या भाषणांत म्हणाले, "महाराष्ट्र युनिव्हर्सिटीसंबंधानें सरकारतर्फे येथें नुकतीच एक परिषद भरविण्यांत आली होती, तिचा वृत्तांत बहुतेकांना माहीत आहेच. या परिषदेचा निर्णय जरी कांहींहि लागला तरी सदर विषयाला सुरुवात गेल्या परिषदेपासून झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. आता पुण्यासच विद्यापीठ कां असावें याचा विचार करूं. एक तर पुणें हें 'विद्येचें माहेरघर' म्हणून प्रसिद्ध आहे व ही गोष्ट हें येथील कॉलेजें आणि इतर संशोधन संस्था पाहिल्या म्हणजे कोणाच्याहि लक्षांत येईल. १८८२-८३ साल हें शैक्षणिक दृष्ट्या पुण्यास क्रांतिकारक झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. कै. टिळक, नामजोशी, चिपळूणकर यांनी न्यू-इंग्लिशस्कूलची स्थापना केली. 'केसरी व मराठा' हीं वर्तमानपत्रें निघालीं. महाराष्ट्र युनिव्ह-र्सिटी असावी ही अंधुक कां होईना पण त्या वेळींहि पुढाऱ्यांच्या डोक्यांत कल्पना होती. न्यू इंग्लिश स्कूलचे अगदीं पहिले अहवाल व हंटर कमिशनापुढे कै. वामनराव आपटे यांनी दिलेली साक्ष याला दाखला म्हणून देतां येईल. १९१७ सालीं मुंबई येथें कै. सर नारायणराव चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखालीं शिक्षणपरिषद भरविण्यांत आली तींतहि प्रादेशिक विद्यापीठें असावींत असेंच सर्वानुमतें ठरलें.

### लोकमताचा पाठिंबा

हा इतिहास सांगण्याचें कारण असें कीं महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेला परंपरा आहे. मध्यंतरीं हा विषय इतर राजकीय उलाढालींमुळे थोडासा मागे पडला असला तरी तो परवाच्या परिषदेपासून फिरून धसाला लागणार आहे. महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन होण्यास कायद्याची मदत पाहिजे. आणि शिक्षणखातें आता आपल्या ताब्यांत आलें असल्यामुळे कौन्सिलमध्ये याबाबत खटपट केली पाहिजे. निर-निराळ्या ठिकाणीं भरलेल्या साहित्य संमेलनांतहि महाराष्ट्र विद्यापीठ असावें अशाबद्दलचे ठराव झालेले आहेत. सांगण्याचा मुद्दा असा कीं, महाराष्ट्र विद्यापीठाला जनतेचा पूर्ण पाठिंबा आहे.

### दोन मतें

येथे झालेल्या परिषदेत दोन तट होते. एका पक्षाचें म्हणणें असें कीं, पुण्याला निघणाऱ्या विद्यापीठाचा अधिकार पुण्यांतील व बाहेरील सर्व शिक्षणसंस्थांवर चालावा. याचा अर्थ असा कीं हे विद्यापीठ अनेकावयवी असावें. दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असें कीं या विद्यापीठाचा अधिकार फक्त पुण्यापुरताच असावा. कारण या पीठाला जर बाहेरच्या अनेक शिक्षणसंस्था जोडल्या तर त्या चालविण्यांत व त्यांवर देखरेख ठेवण्यांतच सर्व शक्ति खर्च होईल; आणि नवीन विद्यापीठ ज्या हेतूकरिता काढावयाचें तो संशोधनाचा हेतु तसाच बाजूला राहून हें विद्यापीठहि मुंबई युनिव्हर्सिटी-प्रमाणें नुसतें परीक्षा घेणारें यंत्र होईल. म्हणून विद्यापीठ एकावयवी असावें. खरें पाहूं गेलें असता दुसऱ्या पक्षाचें म्हणणें अधिक सयुक्तिक दिसतें! पण आजच्या परिस्थितीचा विचार करतां 'युनिटरी' म्हणजे एकावयवी विद्यापीठ काढण्यापेक्षां 'अॅफीलिएटिंग' म्हणजे अनेकावयवी विद्यापीठ काढणें सोयीचें व सोपें होईल असें वाटतें. तरी पण युनिटरी युनिव्हर्सिटी असावी असें म्हणणाऱ्यांचा पक्ष मोठा असून असली संस्था ही अॅफीलिएटिंग युनिव्हर्सिटीपेक्षा अधिक फायदेशीर व अधिक कार्यक्षम असते हे पाश्चिमात्य पंडितांनींहि कबूल केलें आहे मग युनिटरी युनिव्हर्सिटी काढण्यास विरोध कां ?

### विरोधाचीं कारणें

याचें कारण असें कीं पुण्यापुरतीच युनिव्हर्सिटी स्थापन झाली कीं येथील सर्व कॉलेजें युनिव्हर्सिटीला जोडलीं जाणार व युनिव्हर्सिटीतर्फे प्रोफेसर निवडले जाऊन कॉलेजाचें आजचें स्वातंत्र्य व वैशिष्ट्य नाहींसें

होणार. आता युनिटरी युनिव्हर्सिटीस सरकार विरुद्ध याचें कारण असें कीं, त्याला कमींतकमी तीन लाख रुपये तरी ग्रँट द्यावी लागणार. लोकांना व सरकाराला वाटत असलेली ही जी निरनिराळ्या प्रकारची भीति म्हणून सांगितली ती खरी खोटी ठरण्यास सरकारतर्फे या युनिव्हर्सिटीबाबत काय म्हणणें आहे तें बाहेर आले पाहिजे. येथील कांही विद्वानांनें असे मत आहे कीं पुण्याची युनिव्हर्सिटी ही पुण्यापुरती युनिटरी व बाहेरच्या कॉलेजांकरिता ॲफिलिएटिंग अशा स्वरूपाची ठेवावी. पुण्याला विद्यापीठ काढण्यास एक आक्षेप असा घेण्यांत येतो कीं या तऱ्हेची युनिव्हर्सिटी काढणाऱ्यांची दृष्टि संकुचित व स्वार्थी आहे. पण पुण्याला जरी विद्यापीठ स्थापन झाले तरी त्यांत कोणत्याहि धर्माचा, जातीचा, वयाचा विद्यार्थी घेतला जाईल हें लक्षांत ठेविलें पाहिजे. फक्त या विद्यापीठाचें वैशिष्ट्य हें कीं, त्यांतील माध्यम मराठी राहील. आणि आम्ही प्रादेशिक विद्यापीठें असावींत असें जें म्हणतो त्याचें कारण असें कीं, त्यामुळें प्रांतिक भाषेचा उद्धार व वृद्धि होईल.

### अडचणींत अर्थ नाही

पुण्याला विद्यापीठ काढण्यासंबंधी द्रव्य, जागा, कार्यकर्ते वगैरेंच्या ज्या निरनिराळ्या अडचणी म्हणून दाखविल्या जातात त्यांत कांही अर्थ नाही, येथे स्वार्थत्यागानें काम करणारे विद्वान आहेत. एक विद्यापीठ चालण्याइतका पैसा आहे, ग्रंथसंग्रह आहे. अधिक आर्थिक मदत व्हावी म्हणून कांही वर्षांपूर्वी आम्ही महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिएशन या नांवाची एक संस्था काढली होती व ती रजिस्टरहि करण्यांत आली होती. मध्यंतरीं विद्यापीठाचा प्रश्न बाजूला टाकला गेल्यामुळे आमची ही संस्था स्वस्थ बसली. पण आतां तशी स्थिति उरली नाही. यासाठीं प्रत्येकानें दहादहा रुपये देऊन या संस्थेचे सभासद होऊन आपला पाठिंबा असल्याचें दर्शविलें पाहिजे." वरील आशयाचें प्रो. पोतदार यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांचें समारोपादाखल खालील आशयाचें भाषण झालें.

### श्री. केळकरांचें भाषण

ते म्हणाले, "आताच झालेल्या प्रो. पोतदार यांच्या भाषणावरून आपल्या लक्षांत जी एक गोष्ट आली असेल, ती ही कीं, महाराष्ट्र विद्यापीठ पुण्यास स्थापन व्हावें याबद्दल वाद नाही, तर फक्त आता प्रयत्न करण्याचा राहिला आहे. कांही वर्षांपूर्वी या बाबत पुण्यास जाहीर सभा भरून तींत विद्यापीठ हें युनीटरी (एकावयवी) असावें कीं ॲफिलिएटिंग (अनेकावयवी) असावें याबद्दल बराच वादविवाद झाला. पण त्यानंतर जसा काल पालटला तशी परिस्थितिहि पालटली आहे; व त्या दृष्टीनें पाहता हा वाद अमुख्य मानून युनिटरी कां होईना पण पुण्याला विद्यापीठ निघेल याबद्दल मला अधिक शक्यता वाटते. पोतदारांनी आपल्या भाषणांत तात्त्विक आक्षेपांना आपणाकडून चोख उत्तरें दिली आहेत. पण एका दृष्टीनें पाहतां तात्त्विक आक्षेपांना समर्पक उत्तर देतांच यावयाचें नाही. कारण कितीहि उत्तरें व वादविवाद केला तरी शेवटीं तत्त्व म्हणून कांही तरी मिरवत त्याच्या नांवावर वाद घालणारे भेटतातच. म्हणून त्या भानगडींत मी न पडता व्यावहारिक आक्षेप काय घेतले जातात तें पाहून त्याला उत्तर देण्याचा प्रयत्न करतो.

### कायद्याची बैठक पाहिजे

विद्यापीठाच्या व्यावहारिक प्रश्नाला दोन टोकांच्या दोन अडचणी आहेत. अगदी वरच्या टोकाची अडचण अशी कीं या विद्यापीठासंबंधाने कौन्सिलामध्ये सरकारतर्फे बिल आलें पाहिजे व तें पास झालें पाहिजे. आणि याच्या उलट अगदी तळाची अडचण अशी कीं येथील स्थानिक शिक्षणसंस्थांची अशा तऱ्हेचें विद्यापीठ काढण्यास एकमुखी योजना व संमति असली पाहिजे. ही दुसरी अडचण म्हणून जी सांगितली ती अडचण कांही वर्षांपूर्वी जरा तीव्र स्वरूपांत होती. पण सुदैवानें आता येथील कॉलेजांच्या प्रिन्सिपालांमधील सर्व मतभेद नाहीसे होऊन पुणें येथे विद्यापीठ स्थापन करावें याबद्दल एकमत झाले आहे. तेव्हा ही अडचण दूर झाल्यामुळे विद्यापीठ स्थापन करण्यास लागणारे स्थान, द्रव्य, विद्यार्थी, शिक्षक वगैरे सर्व सरंजाम जमेल. पण त्याच्या बुडाशीं कायद्याची बैठक नसेल तर तो डोलारा उभा राहणार नाही. कायद्याशिवाय ज्या खासगी संस्था स्थापन होतात त्या मर्यादित व नैमित्तिक स्वरूपाच्या असतात; त्या सर्व राहोत व राहतील. पण महाराष्ट्र विद्यापीठ हें नैमित्तिक नाही व तें अल्पकाळ टिकण्याकरिता काढावयाचें नाही. ही गोष्ट साध्य होण्याला कायद्याची मान्यता अवश्य घेतली पाहिजे.

### शिक्षणमंत्री कार्य करील

आता विद्यापीठ हें ॲफिलिएटिंग असावें कीं युनिटरी असावें याबद्दल जर वादविवादाचें रणच माजलें तर माझ्या मतें युनिटरी युनिव्हर्सिटी निघाली तरी हरकत नाही. मग 'लिव्ह अँड लेट लिव्ह' या तत्त्वानें बाहेरचीं कॉलेजेंहि आपलें कार्य करूं शकतील. आता अगदी वरची जी अडचण म्हणजे कायद्याची मान्यता ती कशी दूर करता येईल हें पाहूं. कोणतेंहि बिल

पास करून घ्यावयाचें म्हणजे त्याला लोकप्रतिनिधींचें बहुमत असावें लागतें. आणि तें बहुमत इतकें प्रबल असलें पाहिजे कीं, त्याचा दाब जो शिक्षणमंत्री असेल त्यावर पडला पाहिजे. नव्या कौन्सिलमध्ये कितीहि संरक्षक बंधनें असलीं तरी जर शिक्षणमंत्री आपल्या हातांतला असेल तर गव्हर्नरालाहि त्याच्याविरुद्ध कांहीं गडबड करतां यावयाची नाहीं. अशा तऱ्हेचा शिक्षणमंत्री किंवा बहुमत असणारे प्रतिनिधि कौन्सिलेला जेवढे अधिक लवकर मिळतील त्या मानानें हा प्रश्न लवकर निकालांत निघेल. मला पैशाची अडचण मुळींच भासत नाहीं. कारण सरकार, बिल पास झाले तर, पैसाहि देईल. पण मुख्य अडचण उत्साही व प्रयत्नवादी शिक्षणमंत्री केव्हा लाभेल याची आहे. तसेंच इतर कांहीं आक्षेप नाहींसे होण्यास नोकरीमध्ये हिंदीकरण झाले पाहिजे. मला कौन्सिलमध्ये असणाऱ्या युरोपियनांचीहि भीति वाटत नाहीं; कारण ते विद्यापीठाच्याविरुद्ध बोलणार नाहींत. भीति वाटते ती जे युरोपियन आज शिक्षणखात्यांत नोकरीवर आहेत त्यांची. असे युरोपियन म्हाताऱ्या माणसाच्या टक्कल पडलेल्या डोक्यावरील कोठेतरी दिसणाऱ्या एखाद्या पांढऱ्या केसासारखे जरी तुरळक असले तरी तेवढे सुद्धां उपटून काढले पाहिजेत. कारण असे नोकरीवर असणारे साहेब आपलीं कॉलेजे या युनिव्हर्सिटीस जोडण्यास केव्हाच तयार होणार नाहीत.

**मतदारांची जबाबदारी**

तेव्हा इतक्या अडचणीतून मार्ग काढण्यास आपल्या हातांत कोणती गोष्ट आहे? या बाबतींत प्रत्येक मतदाराला एक मार्ग मोकळा आहे. तो हा कीं, नवीन निवडणुकीच्या वेळीं जो उमेदवार तुमच्याकडे मत मागावयास येईल त्या वेळीं तुम्ही त्याला 'विद्यापीठ काढण्याबाबत तू खटपट करशील का?' असें स्पष्ट विचारून जर तो खटपट करण्यास कबूल असेल तरच त्याला मत देणें हा होय. या योगें तोहि थोडाबहुत बांधला जाईल. मतदारांनी हे एक धोरण ठेवलें पाहिजे. तसेंच ब्राह्मणेतरांची याविषयीं समजूत घालून त्यांचें मन वळविलें पाहिजे. कारण कौन्सिलच्या नवीन निवडणुकींत ब्राह्मणेतर प्रतिनिधि अधिक येणार हे पक्कें लक्षांत ठेवलें पाहिजे. तसेंच तिसरी एक खूणगांठ अशी बांधली पाहिजे कीं, विद्यापीठाचें बिल हें शिक्षणमंत्र्यामार्फत आलें तर तें मंजूर होईल आणि खाजगी स्वरूपाचें जर कोणी आणूं म्हणेल तर ते मंजूर होणार नाहीं. पण मार्गदर्शक म्हणून त्याचाहि उपयोग आहे. एवढ्याकरिता नवीन होणाऱ्या शिक्षणमंत्र्याकडे लक्ष ठेवलें पाहिजे. आणि त्याच्याशीं व ब्राह्मणेतर वर्गाशीं सहविचार करून बिल आणविलें पाहिजे. असो. अशा तऱ्हेने जर अगदीं वरचें आणि अगदीं तळचें टोक हातीं येईल तर मधले दुवे जोडण्यास मुळींच अडचण पडणार नाहीं. एक-जिनसी स्वतंत्र स्वरूपाची आणि अधिकांत अधिक कार्यक्षम अशी संस्था कायद्याच्या संमतीनें कशी निघेल इकडे सर्वांनी आपली दृष्टि ठेविली पाहिजे. काल्पनिक अडचणी उत्पन्न करून वादविवाद करण्याच्या भरीस कोणीं पडूं नये. असो. शेवटीं प्रो. पोतदार यांनी या कामीं शक्य तितकी खटपट करावी व विद्यापीठाच्या कार्यास त्यांनी आपल्या स्वतःला वाहून घ्यावें अशी त्यांना मी विनंति करतों." अध्यक्षांचें भाषण झाल्यावर सभेचें काम संपलें.

# रा. गोसावी यांजवर खटला

अलीबागचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते श्री. महादेव रामचंद्र गोसावी हे पुणें जिल्ह्यांतील बारामतीजवळ कळंब येथे असतांना त्यांच्यावर पुण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांनी कळंब येथेच राहिलें पाहिजे असा 'इमर्जन्सी पॉवर्स'च्या कायद्याखालीं हुकूम बजावला होता. ते ज्या कंपनीच्या साखरेच्या कारखान्यांत काम करीत होते, त्या कंपनीनें मुंबई-सरकारच्या गृहमंत्र्याकडून नगर जिल्ह्यांतील बेलवंडी येथे त्यांना जावें असा हुकूम आणला व त्याअन्वयें श्री. गोसावी हे बेलवंडीस गेले. परंतु बेलवंडीजवळील खंडाळा येथे पुणें जिल्ह्याच्या पोलिसांनी त्यांना ता. ९ रोजीं अटक करून पुण्यास आणून खडकावरील पोलीस लॉक-अपमध्ये ठेवलें. ता. १७ रोजीं प्रांतसाहेब मि. मोडक यांच्यापुढे त्यांना उभें केलें. परंतु पोलिसांच्या अर्जावरून खटल्याची पुढील तारीख २५ नेमली आहे. त्यांच्यावर कळंब सोडून कुलाबा जिल्ह्यांतील चेंवढी येथे व नंतर नगर जिल्ह्यांतील बेलवंडी येथे जाऊन हुकूम मोडल्याचा आरोप आहे. श्री. भा. ग. गुप्ते वकील हे या बाबतींत डि. मॅ. कडे अर्ज करणार आहेत. श्री. गोसावी यांना कोर्टापर्यंत हातकड्या घालून आणलें होतें!

# लो. अणे यांजवरील खटला

## ६ महिने कैद, २५० रु. दंड !

कॉंग्रेसचे अध्यक्ष लोकनायक बापूजी अणे हे आपल्या तेरा अनुयायांनिशीं जंगलाचा कायदा तोडण्याच्या हेतूने तारीख १३ रोजीं लोणी गांवाकडे निघाले होते. परंतु वाटेंतच अकोला येथे त्यांना व त्यांच्या सहकाऱ्यांना त्याच दिवशीं अटक करण्यांत आली. सरकाराने त्यांजवर रीतसर खटला भरला व त्याच्या सुनावणीस ता. १५ रोजीं अकोल्याच्या तुरुंगांतच अकोल्याचे फर्स्ट–क्लास मॅजिस्ट्रेट मि. चौधरी यांजपुढे सुरुवात झाली. 'तेरा स्वयंसेवकांपैकीं सौ. काशीबाई काळे आणि सौ. सीताबाई सराफ यांजवरील खटला चालविण्याची सरकारची इच्छा नाही, तरी त्यांजवरील खटला काढून घेण्यास परवानगी द्यावी' अशी विनंति पब्लिक प्रॉसिक्यूटर मि. कामा यांनी कोर्टाला केली. कोर्टाने तशी परवानगी दिल्यावर त्यांना सोडण्यांत आलें. नंतर फिर्यादीतर्फे प्रथम सब्इन्स्पेक्टर रा. देशमुख यांची साक्ष झाली. ते आपल्या साक्षींत म्हणाले, "ता. १३ रोजीं श्री. अणे यांनी भाषण करून आपल्या तेरा सहकाऱ्यांसह आपण जंगलाचा कायदा मोडण्यासाठी लोणीस जात आहों असें जाहीर केलें. भाषणानंतर रा. अणे यांना हारतुरे घालण्यांत आल्यावर ते एका हातांत राष्ट्रीय निशाण घेऊन १३ सवंगड्यांसह लोणीस जाण्यास निघाले. मीं त्या भाषणाचीं टिपणें घेतलीं आहेत." सिटी मॅजिस्ट्रेट रा. संन्याल म्हणाले, "लोणीच्या जंगलाकडे जाण्यास श्री. अणे हे आपल्या तेरा स्वयंसेवकांसह निघाले होते. कोतवालीजवळ येताच त्यांना थोपवून धरण्यांत आलें. तुमचा जमाव बेकायदेशीर असल्यामुळे तो मोडून तुम्ही येथून जा असा हुकूम मीं त्यांना केला. परंतु त्यावर 'जंगलाचा कायदा मोडण्याचा आम्हीं निर्धार केला आहे' असें उत्तर देऊन श्री. अणे हे आपल्या पथकानिशीं पुढे जाऊं लागले. तेव्हा अणे यांच्यासह सर्वांना अटक करण्यांत आली." लो. ना. अणे यांची नंतर जबानी झाली. ते म्हणाले, "कोर्टापुढे आलेला साक्षीपुरावा खरा आहे. सर्व आरोपी आपण होऊनच या मोहिमेंत सामील झाले आहेत. मला गुन्हा कबूल आहे." नंतर तिघांखेरीज बाकीच्या सर्वांनी गुन्हा कबल केला. तारीख १६ रोजीं खटल्याचा निकाल सांगण्यांत येऊन श्री. अणे यांना सहा महिने साधी कैद आणि २५० रु. दंड किंवा तीन महिने कैद अशी शिक्षा सुनावण्यांत आली. त्यांना 'अ' वर्ग देण्यांत आला. त्यांच्या अकरा अनुयायांना प्रत्येकीं सहा महिने सक्तमजुरीची शिक्षा सांगण्यांत आली.

# म. गांधींचें प्रायोपवेशन

म. गांधी यांना एक वर्षाची शिक्षा सांगण्यांत आल्यावर येरवडा तुरुंगांत आणण्यांत आलें. येरवडा तुरुंगांत आल्यावर आपल्याला पंधरा दिवसांच्या आंत हरिजनकार्यासाठी आणखी एक प्राणान्तिक उपोषण करावें लागणार असें त्यांनी सरकारला एका पत्रानें कळविलें. नंतर त्यांनी इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन्स, कर्नल डॉइल यांना पत्र पाठवून, त्यांत आपल्याला हरिजनकार्य चालविण्यास पूर्वीप्रमाणें सवलत असावी, राजबंद्याचे ( स्टेट प्रिझनर) हक्कहि पूर्वीप्रमाणेच उपभोगण्यास मिळावे, असें कळविलें. पत्राचें उत्तर २४ तासांच्या आंत यावें, तसें न आल्यास आपण प्राणान्तिक उपोषणास सुरुवात करूं असें शेवटीं त्यांनी लिहिलें होतें. लिहिल्याप्रमाणें २४ तासांच्या आंत सरकारकडून कसलेंच उत्तर न आल्यामुळे ता. १६ रोजीं दुपारीं १२ वाजल्यापासून महात्माजींनी प्राणान्तिक उपोषणास आरंभ केला ! त्यांचें म्हणणें असें कीं, हरिजनकार्य न करता तुरुंगांत स्वस्थ बसणें म्हणजे जिवंतपणीं मेल्याप्रमाणेंच होय. अर्थात् मग जगून तरी काय करावयाचें आहे !

### कौन्सिलांतील खुलासा

गुरुवार ता. १७ रोजीं दुपारीं दोन वाजता मुंबई कौन्सिलच्या कामास सुरुवात होण्याचे वेळीं रा. चितळे यांनी म. गांधींच्या उपोषणाबद्दल सरकाराने खुलासा करावा अशी सूचना केली. तेव्हा गृहमंत्री मि. बेल म्हणाले:—"श्री गांधी यांना शिक्षा झाल्यानंतर त्यांनी अशी मागणी केली कीं, 'हरिजन' वर्तमानपत्र चालविणें वगैरे अस्पृश्यांच्या सेवेचीं कार्यें करण्यास मला सरकाराने पूर्वीप्रमाणे

सवलती द्याव्या; नाहीं तर प्राणान्तिक उपोषण मला करावें लागेल. या मागणीचा सरकारानें विचार केला व कांहीं सवलती त्यांना दिल्या. तेव्हा 'आपण उपवास करणार नाहीं' असें श्री. गांधींनी सरकारास कळविलें. परंतु काल संध्याकाळीं त्यांनी आपला बेत बदलून जेवण घेण्याचें बंद केलें. याहून अधिक माहिती मिळालेली नाही. ती मिळाल्यास योग्य वेळीं सांगण्यांत येईल."

# रिझर्व्ह बँक कमिटीच्या सूचना

### सारांश

रिझर्व्ह बँकेची घटना कशी असावी याचा विचार करण्याकरिता नेमलेल्या कमिटीचा रिपोर्ट १५ तारखेला प्रसिद्ध झाला. त्या कमिटीनें १९२८ सालीं सर बेसिल ब्लॅकेट यांनीं जें रिझर्व्ह बँक बिल तयार केलें होतें त्यांतील बहुतेक सूचना मान्य केल्या असून त्या बिलांत जे फेरफार होणें इष्ट आहे असें या कमिटीला वाटलें तेवढें करून आपल्या सूचना केल्या आहेत.

( १ ) बँकेचें भांडवल पांच कोटि रुपयांचें असावें व तें खाजगी भागीदारांनें उभारावें. बँकेच्या भांडवलाच्या एका भागाची किंमत पांचशें रुपये असावी.

( २ ) बँकेचा कारभारी (गव्हर्नर), एक उपकारभारी, जरूर तर दोन उपकारभारी-- (डेप्युटी गव्हर्नर), एक सरकारी अधिकारी, भागीदारांनी निवडलेले आठ प्रतिनिधि व गव्हर्नर-जनरलने नेमलेले चार प्रतिनिधि या सर्वांचें मिळून पंधरा सभासदांचें नियामक मंडळ असावें. यापैकीं उपकारभारी व सरकारी अधिकारी यांना नियामक मंडळाच्या सभेंत मत देण्याचा अधिकार असूं नये.

(३) भागीदारांच्या प्रतिनिधींच्या निवडीकरिता हिंदुस्थानाचे मुंबईविभाग, कलकत्ताविभाग, दिल्लीविभाग, मद्रासविभाग व रंगूनविभाग असे पांच विभाग पाडण्यांत यावे. देशी संस्थानांचा समावेश त्यांच्या भौगोलिक स्थानाप्रमाणे ज्या त्या विभागांत करावा. वरील पांच ठिकाणीं त्या त्या भागांतील भागीदारांनी निवडलेले स्थानिक बोर्ड असावें. मुंबई, कलकत्ता आणि दिल्ली येथील स्थानिक बोर्डांनी प्रत्येकीं दोन आणि मद्रास व रंगून येथील स्थानिक बोर्डांनी प्रत्येकीं एक याप्रमाणे आपले प्रतिनिधि बँकेच्या मध्यवर्ती नियामक मंडळावर पाठवावे.

( ४ ) बँकेचे शेअर्स एका माणसानें किती विकत घ्यावे यावर नियंत्रण नसावें; परंतु कोणाहि एका माणसाला दहा मतांहून अधिक मतें देण्याचा अधिकार नसावा.

( ५ ) मुंबई, मद्रास, कलकत्ता, रंगून व दिल्ली या पांच ठिकाणीं बँकेनें आपल्या शाखा उघडाव्या. दुसऱ्या देशांतील आपल्या एजन्सीचें काम त्या देशांतील मध्यवर्ती बँकेकडे सोंपविण्याचा परिपाठ आहे. त्याला अनुसरून रिझर्व्ह बँकेनें बँक-ऑफ इंग्लंडला आपले विलायतेंतील एजंट नेमावें. असें केल्यास बँक ऑफ इंग्लंडहि रिझर्व्ह बँकेला आपले हिंदुस्थानांतील एजंट नेमील असें वाटतें. हिंदुस्थानांत ज्या ठिकाणीं स्वतःची शाखा नाही, त्या ठिकाणीं रिझर्व्ह बँकेनें इम्पीरिअल बँकेच्या शाखांना आपले एजंट नेमावें.

( ६ ) रिझर्व्ह बँकेच्या कारभाऱ्याची व उपकारभाऱ्याची नेमणूक गव्हर्नर--जनरलानें नियामक मंडळाच्या शिफारशी लक्षांत घेऊन करावी.

( ७ ) बँक ऑफ इंग्लंडच्या धर्तीवर कायदेशीर कागदी चलनाचें व पताच्या व्यवहाराचें (बँकिंगचें) अशीं दोन खातीं स्वतंत्र ठेवण्यांत यावीं.

( ८ ) बँकेनें स्टर्लिंग--मापन-पद्धतीचा अवलंब करावा.

( ९ ) परिशिष्टांत नमूद केलेल्या बँकांनी रिझर्व्ह बँकेजवळ ठराविक प्रमाणांत ठेवी ठेवाव्या.

# हिंदुस्थान पन्नास वर्षें परतंत्र ?

सर मालकम हेले हे हिंदुस्थानांतील सिव्हिल-सर्व्हंटांपैकीं मोठे तरबेज अधिकारी आहेत. ते असिस्टंट कलेक्टरापासून वाढत वाढत हिंदुस्थान सरकारच्या गृहमंत्रिपदावर चढले. गृहमंत्री असता त्यांची असेंब्लीमधील त्यावेळचे स्वराज्य पक्षाचे पं. मोतीलाल नेहरू, रा. विठ्ठलभाई पटेल प्रभृति पुढाऱ्यांबरोबर पुष्कळ वेळां जोराची झटापट उडाली. त्या झटापटींत स्वराज्य पक्षाकडून मिळालेले ठोसे हेले अद्यापिहि विसरले नसतील. तरी पण त्या प्रसंगाने हेलेसाहेबांची जी हुशारी नजरेस आली, तिची आठवण हेले यांचें नांव निघालें कीं कोणासहि होईल. गृहमंत्रिपदावरून त्यांची पंजाब प्रांताच्या गव्हर्नराच्या जागीं स्थापना करण्यांत आली, याला त्यांची वरील हुशारीच कारण झाली यांत शंका नाही. पंजाब प्रांतांतून त्यांचा मोर्चा संयुक्त प्रांताकडे वळला व संयुक्त प्रांताचें गव्हर्नरपद कांही दिवस गाजविल्यानंतर जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या कामाकडे त्यांची योजना झाली.

सांप्रत ते विलायतेंत असून भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांस नवीन राज्यघटनेच्या कामीं हरएक प्रकारचें साहाय्य करीत आहेत. परवा होअरसाहेबांनी जोडकमिटीपुढे जंगी साक्ष दिली. तिच्या पूर्वतयारीचें बरेचसें श्रेय हेले यांजकडेच जातें. अशा रीतीने हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराची माहिती सरकारच्या बाजूने हेले यांना आटोकाट असल्यामुळे त्यांनी हिंदुस्थानासंबंधाने काढलेल्या उद्गारांना आपोआपच महत्त्व येतें. ऑक्सफोर्ड येथे रॉयल एम्पायर सोसायटीच्या शाळेंत थोड्या दिवसांपूर्वी त्यांचें विस्तृत भाषण झालें, तें कोणासहि मननीय वाटल्यावांचून राहणार नाही. आधी विषय हिंदुस्थानाचा व तोहि पन्नास वर्षांनी राजकीयदृष्ट्या हिंदुस्थान कसा दिसेल याचें चित्र रंगविण्याचा; या कारणाने त्यांच्या भाषणाकडे प्रत्येक विचारी हिंदी मनुष्याचें लक्ष वेधावें यांत आश्चर्य काय ?

लोण्याच्या गोळ्याकडे डोळा लावून बोका बसावा त्याप्रमाणे इंग्रज माणूस हिंदुस्थानावर लालचावलेला असल्यामुळे तो हा गोळा सतत गट्ट करण्यास मिळावा अशी आशा बाळगणारच. सर माल्कम हेले त्याच कोटींतील होत. इंग्रज लोक आपल्या पंजांत सांपडलेला हिंदुस्थान सुखाने सोडणार नाहीत हाच हेले यांचा सिद्धान्त आहे. स्वराज्याचे जेवढे कण हिंदी लोक भांड—भांडून हिसकावून घेतील तेवढेच कण हिंदुस्थानास मिळणार असें गृहीत धरून हेले बोलल्यामुळे पुढील पन्नास वर्षांच्या आंत हिंदुस्थान इंग्रजांच्या गुलामगिरींतून पूर्णपणें मोकळा होईल या कल्पनेस त्यांनी आपल्या भाषणांत मुळीच थारा दिलेला नाहीं. जे हिंदी लोक वर्षांत, दोन वर्षांत, पांच वर्षांत, दहा वर्षांत हिंदुस्थानास पूर्ण स्वातंत्र्य नसलें तरी वसाहतींचें स्वराज्य लाभेल अशा आशेने दिवस कंठीत असतील त्यांची हेले यांचें भाषण वाचून तीव्र निराशा झाल्याशिवाय राहणार नाही.

हेले यांच्या मतें पुढील पन्नास वर्षांच्या अखेरीस हिंदुस्थानांत फरक दृष्टीस पडेल तो एवढाच कीं, बरेचसे ब्रिटिश अधिकारी नोकरींतून निवतील व सैन्यांतील हिंदी अंमलदारांचें प्रमाण वाढलेलें आढळेल. परंतु खरें राष्ट्रीयत्व हिंदी लोकांत उत्पन्न होऊन ते समान भावनांनी व समान कल्पनांनी एकत्र आवळले जातील असें हेले यांना वाटत नाही. 'हिंदुस्थान देश फार अफाट आहे. त्यांतील जातिभेद कितीहि ढिला पडला तरी अजिबात मोडणार नाही, व हींच विघ्नें राष्ट्रैक्याच्या सतत आड येत राहतील. सुशिक्षित हिंदी लोकांत देशाभिमान उत्पन्न झाला आहे व त्यामुळे त्यांची स्वतःच्या संस्थांविषयी कौतुकबुद्धि वाढली आहे. हें खरें असलें तरी त्या कौतुकाच्या भरांत हिंदुस्थान नवीन शास्त्रीय व यांत्रिक युगास पाठमोरा होऊन जुन्या काळाकडे हटत जाईल आणि हिंदी भाषेस राष्ट्रीय भाषा बनविण्याच्या

कल्पनेने इंग्रजी भाषा हिंदुस्थानांतून काढें करील' अशी हेले यांची समजूत नाही. हिंदुस्थानांत शास्त्रीय ज्ञान दिवसानुदिवस पसरेल व इंग्रजी भाषेचा उपयोग हिंदी लोक अधिकाधिक करीत राहतील याविषयी त्यांस मुळीच शंका नाही.

हेलेसाहेब हिंदुस्थानांतील इतर बाबींसंबंधाने कांहीहि म्हणत असले तरी त्याची तितकीशी क्षिति हिंदी लोकांना नाही. हिंदुस्थानाची राजकीय घटना बनविण्याच्या कामगिरीवर हिंदुस्थानांतून विलायतेस मुद्दाम पाठविण्यांत आलेला एक बडा व अनुभविक अधिकारी हिंदुस्थानाच्या राजकीय आकांक्षाविषयी काय म्हणतो एवढेंच हिंदी मनुष्य पाहणार. त्यास हिंदी राजकीय प्रगतीविषयी हेले यांनी प्रकट केलेले विचार एकदेशीय व स्वार्थबुद्धीचेच वाटतील. सर मालकम हेले हिंदुस्थानाचें पन्नास वर्षांनंतरचें चित्र आपल्या डोळ्यासमोर रेखाटतात. तें रेखाटतांना पन्नास वर्षांपूर्वीचा हिंदुस्थान व हिंदुस्थानाभोवतालचें जग कसें होतें याच्या चित्राकडे त्यांनी आपली नजर फेकली असती तर त्यांना पुढील पन्नास वर्षांविषयीं निराळींच अनुमानें बांधावीं लागलीं असतीं. पन्नास वर्षांपूर्वीचा हिंदुस्थान मनाने परावलंबी होता. सध्याचा हिंदुस्थान मनाने स्वावलंबी बनला आहे. कोणतीहि गरज उत्पन्न होवो, ती सरकाराने भागविली पाहिजे अशी दुबळेपणाची खोड हिंदी लोकांना लागली असल्याचें हेले मोठ्या दिमाखाने सांगत आहेत. परंतु त्यांचें हें विधान सद्यःस्थितींत साफ खोटें आहे असेंच कोणीहि म्हणेल.

हिंदी लोक आपले आपणच स्वतंत्रपणें उभे राहूं इच्छित आहेत याचें प्रत्यंतर गेल्या पंचवीसतीस वर्षांत देशांत सुरू झालेल्या राष्ट्रीय चळवळी देतच आहेत. हिंदुस्थानांत जाती व धर्म विविध आहेत, पण राजकीय चळवळींत ते बऱ्याच अंशीं विसरून जाण्यास निदान हिंदु लोक तरी खास शिकले आहेत. ऐक्याचें बळहि वाढत्या प्रमाणावर आहे. पण त्या बळाने सरकारास वाकवून त्यांजपासून राजकीय हक्क मिळविण्याच्या कामीं म्हणण्यासारखें यश अद्यापि आलेलें नाही. सरकारास अडविण्याची युक्ति हिंदी लोकांना साधण्याजोगी आहे. पण तिचा प्रयोग त्यांना आतापर्यंत परिणामकारक रीतीने करून दाखवितां आला नाही. प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळांत स्वराज्य पक्षाने या गुणाची कांहीशी चुणूक दृष्टीस पडली आहे, व त्या मार्गाचा अधिक मोठ्या प्रमाणावर यापुढे अवलंब केला जाणार नाही असेंहि नाही. परंतु नवीन राजवटींत कायदेमंडळांची घटनाच अशी होणार आहे कीं, कदाचित् सुशिक्षित वर्गाला प्रारंभीं दहापांच वर्षेपर्यंत ज्ञातिनिष्ठ प्रतिनिधींच्या संकुचित व अराष्ट्रीय वृत्तीपुढे हारच खावी लागेल. तरी पण अनुभव हा सर्वांनाच शहाणा करणारा असल्यामुळे सुशिक्षित वर्गाच्या बरोबरीला ज्ञातिनिष्ठ प्रतिनिधींनाहि लवकरच येणें भागच पडेल. बहुसंख्य समाजाच्या हाडामांसाचे पुढारी आज प्रायः ज्ञातिनिष्ठ आहेत. त्यांजवर जबाबदारी पडून त्यांना दहापांच वर्षांत राष्ट्रीय दृष्टि आली कीं अडवणुकीचा मार्ग अधिक फळप्रद होईल.

सध्याच्या निःशस्त्र स्थितींत अडवणुकीचा हा एकच मार्ग हिंदी लोकांना उपलब्ध आहे. त्या मार्गावर येण्याकरिता जी ऐक्याची व संघटनेची शक्ति लागते तिच्या शोधाला हिंदी सुशिक्षित वर्ग आहे. आतापर्यंत गेलीं कांही वर्षे या शक्तीची उपासना झाली आहे. परंतु तेवढ्याने भागणार नसल्याने कामगारांचे व शेतकऱ्यांचें संघ बनविण्याकडे जाणत्या लोकांचें लक्ष वेधलें आहे. तथापि अडवणुकीच्या मार्गाने स्वराज्याचा सोपान जलदीने चढणें शक्य झालें तरी ती प्रगति मर्यादितच राहणार व तिला कालहि बराच लागणार यांत शंका नाही. परंतु हे विचार केवळ हिंदुस्थानाच्या अन्तर्गत चळवळीपुरते होत. हिंदुस्थानाबाहेर जग आहेच. तें जग हिंदुस्थानापेक्षाहि पुढील पन्नास वर्षांत किती तरी पटींनी बदलेल. इंग्रजांचा व्यापार बसून त्यांची आर्थिक शक्ति क्षीण होईल. त्यांच्या वसाहती त्यांजपासून निसटून जाऊन ब्रिटिश साम्राज्य संपुष्टांत येईल. युरोपांत महायुद्धें

भाजून भयंकर उलथापालथ झालेली दृष्टीस पडेल. जपानाची सत्ता वाढत वाढत कदाचित् त्याचें साम्राज्य आशिया खंडास व्यापत जाईल व अशा स्थितींत हिंदुस्थान त्याच्या भक्ष्यस्थानीं पडण्यापेक्षा त्याला पूर्ण स्वराज्य देऊन आपला मित्र बनवून हिंदुस्थानाशीं कायमचा ऋणानुबंध जोडणें इंग्लंडला इष्ट वाटेल, नाही कोणी म्हणावें? अशा व्यापक दृष्टीने हिंदुस्थानाकडे पाहिल्यास पन्नास वर्षांनी हेले म्हणतात त्याप्रमाणे हिंदुस्थान इंग्लंडचा दास न राहता त्याच्या तोलाचा मित्रच बनेल असें अनुमान काढणेंच सयुक्तिक ठरेल.

# हिंदी व्यापार सुधारला काय ?

ओटावा परिषदेंत ब्रिटिश सरकार व त्यांचे ताबेदार हिंदुस्थान सरकार यांच्या प्रतिनिधींनी आपसांत व्यापारी करार करून एकमेकांना जकातीच्या बाबतींत सवलती देण्याचें ठरविलें. सदर कराराला ब्रिटिश पार्लमेंट व हिंदी कायदे मंडळ यांची अनुमति मिळाल्यावर त्या कराराचा अंमलहि सुरू झाला. त्याप्रमाणें गेल्या जानेवारी महिन्यापासून मार्च महिन्यापर्यंत हिंदुस्थानाचा सदर करारापासून काय फायदा अगर तोटा झाला याचे आंकडे विलायतेंतील हिंदुस्थान सरकाराचे ट्रेड कमिशनर मि. लिंड्से यांनी आपल्या १९३२-३३ सालच्या रिपोर्टांत प्रसिद्ध केले आहेत. या रिपोर्टास हाय कमिशनर सर बी. एन. मित्र यांनी प्रस्तावना जोडली असून. त्यांत ओटावा कराराच्या दृष्टीने नफ्यातोट्यासंबंधी निश्चित अनुमान बांधण्यास तीन महिन्यांची मुदत अपुरी आहे असें मित्र यांनी आपलें मत दिलें आहे.

लिंड्से यांस ओटावा कराराचें समर्थन करावयाचें असल्यामुळे ते विशेष आशावादी दिसतात. त्यांचें म्हणणें असें कीं १९३२ सालाच्या पहिल्या तीन महिन्यांपेक्षा १९३३ सालाच्या पहिल्या तीन महिन्यांत हिंदी मालाचा विलायतेंतील खप वाढला असल्यामुळे ओटावा कराराचा फायदा हिंदुस्थानाच्या पदरांत पडला असून ब्रिटिश पेठेंतील हिंदी मालाचें स्थान स्थिरतर झालें आहे. लिंड्से यांचें म्हणणें वस्तुस्थितीला धरून नाही हें त्यांनी दिलेल्या आंकड्यांवरूनच दिसतें. अहवालाच्या काळांत तांदूळ, वाटाणे, अळशी, चहा, तंबाखू, पिग आयर्न (लोखंड) या जिनसा इंग्लंडांत अधिक प्रमाणांत खपल्या हें खरें, पण कॉफी, मेंढ्यांचीं कातडीं, बिन कमावलेलीं कातडीं व कडधान्यें यांचा खप बराच कमी झाला. ज्यांचा खप वाढला अशा पदार्थांत चहाचा खप फक्त सहा टक्क्यांनी वाढला व तंबाखूचा खप अकरा लक्ष पौंडांवरून तेरा लक्ष पौंडांवर गेला.

खपासंबंधाने एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे; ती ही कीं एकट्या ग्रेट ब्रिटनमध्ये विशिष्ट माल अधिक खपला म्हणून ओटावा करारामुळे हिंदुस्थानाचा एकंदरींत फायदाच झाला असें अनुमान काढतां येणार नाही. ओटावा करारापूर्वी विशिष्ट पदार्थाचा ग्रेटब्रिटनशिवाय बाहेर देशांत जितका खप होता तितका तो कायम राहून ब्रिटनमधील खप वाढला कीं काय हें पाहावयास पाहिजे. तशी माहिती लिंड्से यांनी आपल्या रिपोर्टांत दिलेली नाही. ब्रिटिश कापडाच्या आयातीला हिंदुस्थानाकडून जकातीची सवलत मिळाली आहे. पण तिच्या मोबदल्यांत हिंदुस्थानाचा कापूस घेण्यास इंग्लंड मात्र बांधलें गेलेलें नाही. ओटावा परिषदेंत हा विषय निघालाहि; पण त्यावेळीं हिंदी कापूस इंग्लंडमधील गिरण्या अधिक प्रमाणांत कशा वापरतील याचा आपण विचार करूं एवढेंच आश्वासन ब्रिटिश प्रतिनिधींनी दिलें. त्यास अनुसरून सर आर. एच. जॅक्सन यांच्या अध्यक्षतेखाली इंग्लंडांत एक कमिटी नेमण्यांत आली, व तिने मुंबईच्या गिरणीवाल्यांच्या संघाचे अध्यक्ष मि. मोदी हे नुकतेच लँकाशायरला गेले असता त्यांना इंग्लंडांत

हिंदी कापसापासून कोणत्या प्रकारचें कापड तयार होतें याचे नमुनेहि दाखविले.

गेल्या तीन महिन्यांत विलायतेंतील हिंदी कापसाची आयात १२७.४ सेंटलवरून ( १०० पौंड=१ सेंटल ) २१०.२ सेंटलपर्यंत पोचलीहि आहे. परंतु त्याच मुदतींत अमेरिका व इजिप्त या देशांतून इंग्लंडांत २७७२ सेंटल कापूस आला हें लक्षांत ठेवल्यास हिंदुस्थानाच्या कापसाची आयात दर्यामे खसखशीप्रमाणे ठरेल. इंग्लंडच्या नादीं लागून हिंदुस्थानाचा किती फायदा कापसाच्या बाबतींत झाला तो दिसलाच आहे. आता तोट्याचें प्रमाण पाहा. जपान हें हिंदी कापसाचें बडें गिऱ्हाईक, पण तेथील कापडाच्या आयातीवर हिंदुस्थानाने जबर जकात बसवितांच हिंदी कापूस घेण्याचें जपानी गिरण्यांनी बंद केलें व त्यामुळे हिंदी शेतकऱ्यांचें कल्पनातीत नुकसान होऊं लागलें आहे.

बरें, विलायतेंत हिंदी कापसाची खरेदी थोडीशी वाढली असली तरी तिची शाश्वती काय समजावयाची? कारण तिला सवलतीच्या जकातीचा आधार नाही. अमेरिकन कपाशीचे भाव हिंदी कपाशीच्या भावाच्या मानाने फायदेशीर आहेत असें दिसतांच ब्रिटिश व्यापारी हिंदी कपाशीची खरेदी कमी करून अमेरिकन कपाशीची खरेदी वाढवतील. या दृष्टीने लिंड्से यांचा आशावाद लंगडा व अस्थानीं आहे.

# प्रो. शहा यांचीं व्याख्यानें

## पहिलें व्याख्यान

शनिवार ता.१२ रोजीं सायंकाळीं ६वाजता पुणे येथील गोखले स्मारक-मंदिरांत श्री. **धनंजयराव गाडगीळ** यांचे अध्यक्षतेखालीं प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ **प्रो. के. टी. शहा** यांचें ‘जगा’ पुढील आर्थिक प्रश्न’ या विषयावर पहिले व्याख्यान झालें.व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले, “ सध्या जे बिकट आर्थिक प्रश्न उत्पन्न झाले आहेत त्यांची झळ सर्वच राष्ट्रांना लागत आहे. आपल्या देशाच्या राज्यकारभाराला आपला हात लागावा अशी सर्वांची इच्छा आहे. अर्थात् सदर प्रश्नांकडे दुर्लक्ष करून भागणार नाही. गेलीं पांच वर्षें जिनसांच्या किंमतीमध्ये सतत पण निश्चित असा उतार होत आहे; आणि आर्थिक संकटाचें हेंच एक निश्चित चिन्ह आहे. धंद्यांत भांडवल म्हणून जितका पैसा गुंतवावा तितका फायद्याच्या रूपाने निघण्याचे तर राहोच, परंतु उपजीविकेला पुरे इतकें उत्पन्न त्यांतून निघत नाही. धंदेवाल्यापेक्षाहि शेतकऱ्यांची स्थिति अत्यंत शोचनीय झाली आहे.शेतकऱ्यांनी काबाडकष्ट करून शेतांत धान्य पिकविलें तर धान्याचा उठाव होत नाहीं; व थोडा फार झालाच तर त्याला चांगलासा भाव येत नाही! बरें, चावडींत कांही सूट मिळेल म्हणावें तर तिकडूनहि निराशाच. एकूण शेतकऱ्याची चोहोंकडूनच कुचंबणा!

## आर्थिक स्थितींत अस्थिरता

व्यापारधंदा बसला, शेतीहि किफायतशीर होईना, लोकांची क्रयशक्तिहि कमी होत चालली. याचा साहजिकच परिणाम असा झाला कीं, त्या त्या देशाच्या सरकारांचीं अंदाजपत्रकें आंतबट्ट्याचीं झालीं. अंदाजपत्रकांतील ही खोट भरून काढण्यासाठी त्या त्या सरकारांना आंतरराष्ट्रीय कर्जें काढावीं लागलीं. परंतु त्या सरकारांना पूर्वीची देणीं होतीं तीं अशा आर्थिक दुरवस्थेमुळे भागविता येईनात. पूर्वीचींच कर्जे फिटनात हें पाहून सावकार राष्ट्रांनी नवीं कर्जे देण्याचें बंद केलें. त्यामुळे आर्थिक परिस्थितीत अत्यंत अस्थिरता निर्माण झाली. हुंडणावळीच्या दरांत उतार होऊं लागला, राष्ट्रांच्या व्यापारावर त्याचा प्रतिकूल परिणाम होऊं लागला व उद्योगधंदे आणि शेती यांमध्ये बेकारी बळावूं लागली. बेकारीचे दोन अर्थ होऊं शकतात. एक अर्थ असा कीं, ज्यांना मुळी कसल्याहि प्रकारची नोकरीच नाही, जे पोटासाठी दोन पैसेहि मिळवूं शकत नाहीत असे बेकार लोक. दुसरा अर्थ असा कीं, ज्यांना नोकरी वगैरे आहे, परंतु त्यांच्या प्राप्तींत त्यांना आपला मासिक खर्चहि भागविता येत नाही.

## युरोपियन राष्ट्रांचें संकुचित धोरण

आर्थिक दुरवस्थेचें हें असें कोडें आहे कीं, त्यांतून कोणाचीच सुटका होणें शक्य नाही. अर्थात जगाच्या मुत्सद्यांना या परिस्थितीचा विचार करून तींतून सुटण्याचा कांही मार्ग काढणें अपरिहार्य झालें. म्हणून लंडन येथे जगाची आर्थिक

परिषद भरविण्यांत आली. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, परिषदेंत चर्चेच्या वायफळ भुग्याशिवाय भरीव असें कोणतेंच कार्य निष्पन्न झालें नाही. परिषद अयशस्वी ठरण्याचें कारण असें कीं, सर्व राष्ट्रांनीच मुळी आपल्या पायापुरतें पाहण्याचें संकुचित धोरण स्वीकारलें ! परिषदेंत चलनाच्या स्थिरीकरणाचा प्रश्न निघाला. सर्व राष्ट्रांना स्थिरीकरण पाहिजे आहे, परंतु त्याच्या अर्थाबद्दल मात्र सर्वांची मतभिन्नता! शिवाय परिषदेमध्ये मुख्य प्रश्न बाजूलाच पडून, उपप्रश्नांनीच सारा वेळ खाल्ला. राष्ट्राराष्ट्रांचीं आन्तरराष्ट्रीय कर्जे बुडवून टाकावींत असाहि एक बूट निघाला होता. अमेरिका ही सर्व युरोपियन राष्ट्रांची धनको असल्यामुळे, प्रथम तिने या कर्जांना मूठमाती द्यावी असें सांगण्यांत येऊं लागलें. परंतु युरोपियन राष्ट्रे आपल्याला, कर्जे माफ झाल्यानंतर तो पैसा शस्त्रास्त्रें वाढविण्यावर खर्च करणार नाहीं, अशी हमी जोंपर्यंत देत नाहीत, तोंपर्यंत या प्रश्नाचा आपण विचारच करूं शकत नाहीं असें अमेरिकेचें म्हणणें आहे. जर्मनीला वार्षिक नुकसानभरपाई रद्द व्हावयास पाहिजे. परंतु सुरक्षिततेची हमी मिळेपर्यंत जर्मनीच्या मागणीला मान्यता देण्यास फ्रान्स कबूल नाहीं. अशा रीतीने प्रत्येक राष्ट्र दुसऱ्याविषयीं संशयित आहे.

### सगळ्याकरिता एकच धोरण

जगाच्या आर्थिक परिषदेची गति खुंटण्यास अशा रीतीने ज्या त्या राष्ट्राची संकुचित आणि संशयीवृत्तिच कारण झाली. जोंपर्यंत युरोपियन राष्ट्रे राष्ट्रीयत्वाची संकुचित भावना सोडणार नाहींत, तोंपर्यंत आर्थिक दुरवस्थेंतून मार्ग निघणें कठीण आहे. आंतरराष्ट्रीय दृष्टि आणि परस्परसहकारित्व या दोन भावनांची वाढ जसजशी होत जाईल तसतशी जगावरील ही संक्रान्त नाहींशी होणार आहे. सर्व राष्ट्रांना, आपले हितसंबंध एकमेकांशीं निगडित आहेत, एकमेकांपासून विलग राहूं तर आर्थिक दुःस्थिति सर्वांनाच गिळंकृत करील, या गोष्टीची जाणीव जितक्या लवकर होईल तितकें चांगलें. आर्थिक दुःस्थितीचे परिणाम प्रत्येक राष्ट्राला इतक्या लवकर जाणवूं लागले याचें मुख्य कारण असें कीं, त्या त्या राष्ट्रांत शास्त्रीय पद्धतीवर उभारलेली अशी सुसंघटित आर्थिक व्यवस्थाच अस्तित्वांत नाही. जगांतील साऱ्या राष्ट्रांकरिता अशी समाईक व्यवस्था स्थापित होईल तेव्हांच व्यापारांतील नसती चुरस बंद पडेल. नाहीं तर ही चुरस वाढत जाणार आणि यांत्रिक सुधारणेमुळे ती बळावतच जाणार. या गोष्टीच्या पुष्ट्यर्थ कानडाचेंच उदाहरण देतां येईल. गव्हाचें पीक येण्यास कानडाचे हवामान सर्वतोपरी प्रतिकूल आहे. परंतु शास्त्रज्ञांनी प्रयोग करून अशा रीतीची स्थिति निर्माण केली आहे कीं, गव्हाच्या उत्पादनांत कानडा हा प्रामुख्याने गणला जाऊं लागला, व गहू पिकवणाऱ्या देशांना त्याची चुरस भोवूं लागली !

### खरें दुखणें

लंडन येथील आर्थिक परिषदेंत वरील सर्व गोष्टींवर कांही तरी तोड निघावयास पाहिजे होती. परंतु जेथे सर्व ठकांचाच बाजार तेथे एखादी ऋजु योजना तयार कशी होणार ! कोणतीहि योजना पुढे आली कीं, जे तें राष्ट्र आपला स्वार्थ तिच्याने किती साधतो या दृष्टीनेच त्याकडे पाही! आपलें दुखणें एक असावयाचें व दुसऱ्याच दुखण्याकडे बोट दाखवावयाचें अशी प्रत्येक युरोपियन राष्ट्राची वर्तणूक असल्यामुळें लंडनमधील परिषदेंत कांही मेळच बसला नाही. प्रत्येक राष्ट्राला आर्थिक परिस्थितींत स्थैर्य यावयास पाहिजे आहे, परंतु त्यासाठी स्वार्थ सोडावयास नको आहे. राष्ट्रांच्या विचारांत आन्तरराष्ट्रीय दृष्टि बाणल्यावांचून हा स्वार्थाचा जोर कमी होणार नाही व तोंपर्यंत आर्थिक दुरवस्थेचें संकटहि टळणार नाही. आर्थिक परिषदेंतील सारें वातावरण पूर्वीपासूनच संशयी वृत्तीने दूषित झालें असल्याने ती परिषद अपेशी ठरली नसती तरच आश्चर्य ! ”

### दुसरें व्याख्यान

रविवार ता. १३ रोजीं सायंकाळीं प्रो. के. टी. शहा यांचे प्रि. धनंजयराव गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखालीं गोखले स्मारक मंदिरांत मागील विषयावरील दुसरें व्याख्यान झालें. या व्याख्यानांत प्रो. शहा यांनी लंडन येथे भरलेल्या जागतिक आर्थिक परिषदेचा बोजवारा कसा उडाला याची माहिती सोप्या भाषेंत श्रोत्यापुढे मांडली. ते म्हणाले, “ जगांतील आर्थिक मंदीचें वातावरण नाहींसें करण्याकरितां आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवहारांची पुनर्घटना घडवून आणण्याच्या विचाराने जागतिक आर्थिक परिषदेच्या कार्यक्रमांत प्रामुख्याने पुढील चार विषयांचा समावेश करण्यांत आला होता—( १ ) चलन विषयक धोरण (२) बाजार भाव (३) आंतरराष्ट्रीय व्यापार व (४) भांडवलाची आंतरराष्ट्रीय हालचाल. सांप्रत जगांतील प्रमुख राष्ट्रांच्या नाण्याची सोन्यापासून फारकत झाल्यामुळे नाण्याच्या किंमतींत जी अस्थिरता उत्पन्न झाली आहे ती नाहींशी करून त्यांत स्थैर्य आणल्यास, वस्तूंचें उत्पादन मर्यादित करून त्यांच्या भावांत वाढ घडवून आणल्यास, आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या आड येणारीं जकातींची

बंधनें दूर केल्यास व भांडवल खुलेपणानें खेळूं दिल्यास जागतिक आर्थिक स्थिति सुधारेल ही गोष्ट परिषदेला आलेल्या प्रत्येक राष्ट्राच्या प्रतिनिधींना माहीत होती. परंतु प्रत्येक राष्ट्र इतर राष्ट्रांकडे अविश्वासानें पहात असल्यामुळें परिषदेचें कार्य यशस्वी होऊं शकलें नाही. जें तें राष्ट्र फक्त स्वतःच्या फायद्याकडेच पहात होतें.

### चलनानें उडविलेला गोंधळ

चलनविषयक धोरणाचा प्रश्न घेतला तरी काय आढळतें पहा. गेलीं कांहीं वर्षें प्रत्येक राष्ट्रानें स्वतः-पुरता हा प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न केल्यामुळें आजची घोटाळ्याची परिस्थिति निर्माण झाली. १९२५ सालीं ज्या वेळीं इंग्लंडनें पुनः सुवर्ण-चलनपद्धीत सुरू करून पौंड स्टर्लिंगाचा संबंध पूर्वीच्याच दरानें सोन्याशीं जोडला त्या वेळीं तेवढा भारी दर पेलण्यासारखी इंग्लंडची औद्योगिक व व्यापारी परिस्थिति नव्हती. आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण होण्यासारखी इंग्लंडची भौगोलिक परिस्थिति नाही. बरेचसें इंग्लंडचें भवितव्य त्या देशाच्या परराष्ट्रीय आर्थिक व्यवहारांवर अवलंबून आहे. १९१४ सालीं इंग्लंडचा परराष्ट्रीय व्यापार जोरांत असल्यामुळें पौंड स्टर्लिंगचा जो सुवर्णभाव त्यावेळीं टिकविणें शक्य झालें तो १९२५ सालीं इंग्लंडचा परराष्ट्रीय व्यापार खालावलेला असल्यामुळें टिकविणें शक्य नव्हतें. परंतु आंतरराष्ट्रीय नाणें—बाजार म्हणून लंडनचा असलेला लौकिक कायम राखण्याच्या लोभाला इंग्लंडचे मुत्सद्दी बळी पडले व त्यांनी व्यापारी परिस्थिति अनुकूल नसतांना स्टर्लिंगचा संबंध पूर्वीच्या दरानें सुवर्णाशीं जोडला. परंतु तो टिकविणें इंग्लंडला जड गेलें. इंग्लंडचा निर्गत व्यापार खालावत चालला होता. नौकानयनाच्या धंद्यांत परराष्ट्रीय चढाओढ भोवूं लागली होती. महायुद्धापूर्वी इंग्लंड धनको राष्ट्र होतें तें ऋणको बनलें होतें. अमेरिकन कर्जफेडी-बाबतहि इंग्लंडनें सुमारें वीस टक्क्यांची सवलत मिळविली. परंतु तिचा फारसा उपयोग झाला नाही.

इंग्लंडची आर्थिक स्थिति खालावतच गेली. मॅकमिलन कमिटीच्या रिपोर्टानें ही गोष्ट भडकपणें लोकांपुढें आणली. बजेटाची तोंडमिळवणी करणेंहि कठीण होऊन बसलें. यामुळें आर्थिक अरिष्ट येणार हें जवळ जवळ ठरून गेल्यासारखें होतें व शेवटी तेंच खरे ठरलें. २१सप्टेंबर १९३१ रोजीं इंग्लंडनें स्टर्लिंगची सुवर्णापासून फारकत केली. सुवर्णापासून स्टर्लिंगची फारकत करून स्टर्लिंगचा भाव उतरवून व बाजारभावांत वाढ घडवून आणून आपली स्थिति सुधारावी असा इंग्लंडचा विचार होता. परंतु तो सफल झाला नाही. व्यापार जसा व्हावा तसा वाढला नाही अगर बेकारीहि कमी झाली नाही. इंग्लंड नंतर अमेरिकेनेंहि डॉलरची सुवर्णापासून फारखत केली. परंतु अमेरिकेची परिस्थिति इंग्लंडपेक्षा भिन्न आहे. अमेरिका धनको राष्ट्र आहे. त्याला भौगोलिक परिस्थितिहि अनुकूल आहे. देशांत पेठ मोठी आहे. मनांत आणलें तर आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण होणें अमेरिकेला शक्य आहे. डॉलरचा भाव उतरण्यानें अमेरिकेचें उद्दिष्ट साध्य होईल की नाही हें या वेळीं निश्चित सांगणें कठीण असले तरी इंग्लंड जेथें यशस्वी होऊं शकलें नाही तेथें अमेरिका यशस्वी होणे शक्य नाही असें नाही. चलनांचे भाव स्थिर करण्याचा प्रश्न ज्या वेळीं लंडन परिषदेपुढें आला त्या वेळीं अमेरिकेनें कांहीच निश्चित धोरण स्वीकारलें नाही यामुळें हा प्रश्न सुटला नाही हें खरें; परंतु युरोपियन राष्ट्रांची मनःस्थिति लक्षांत घेतां अमेरिकेला या बाबतींत सर्वस्वी दोषी ठरवितां येणार नाही.

बाजारभावाचीच गोष्ट घ्या. मिवळ चलनांत वाढ केल्यामुळें वस्तूंचा बाजारभाव वाढूं शकत नाहीं. त्याकरितां बाजारभाव कां उतरले यांची कारणमीमांसा लक्षांत घेऊन उत्पादनाचें नियंत्रण केलें पाहिजे. परंतु उत्पादनाचें नियंत्रण करण्याची कोणतीहि योजना परिषदेंत निश्चित झाली नाही.

### परस्पर विश्वास पाहिजे

भांडवलाची हालचाल खुलेपणानें होण्यास धनको राष्ट्रांना ऋणको राष्ट्रांबद्दल विश्वास वाटला पाहिजे. नाण्यांच्या किंमती स्थिर ठेवण्याबद्दल कांहीं योजना झाली असती तर धनको राष्ट्रांना गरजू राष्ट्राबद्दल विश्वास वाटला असता. परंतु तसें परिषदेंत कांहीच घडलें नाही. धनको राष्ट्रांनी गरजू राष्ट्रांना उत्पादक कार्याकरितां पैसा दिल्या. विना त्यांची आर्थिक स्थिति सुधारूं शकत नाहीं, व सांप्रत तसा पैसा मिळत नाही व व्यापारहि वाढत नाही.

आंतरराष्ट्रीय व्यापार धोक्यांत येण्याचें प्रमुख कारण प्रत्येक राष्ट्रानें स्वयंपूर्ण होण्याची धरलेली हाव हें होय. इंग्लंडला आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण होणें शक्य नाही. इंग्लंडचें जीवन परराष्ट्रीय व्यापारावर अवलंबून आहे. असें असतां इंग्लंडनें पूर्वीचें धोरण सोडून देऊन जकातींच्या भिंती उभारल्या. महायुद्धानंतर मध्य व दक्षिण युरोपांत जी छटाक एवढी लहान राष्ट्रें आहेत, त्यांनीहि स्वयंपूर्णतेच्या मृगजळापाठीमागें

धाव घेतली आहे. स्वयंपूर्ण होण्याची शक्यता असो वा नसो, प्रत्येक राष्ट्राने स्वतःभोंवती जकातींची तटबंदी उभारल्यामुळे आंतरराष्ट्रीय व्यापाराची नाकेबंदी झाली. चलनविषयक प्रश्न सुटल्याविना जकातींचा प्रश्न सुटण्यासारखा नसल्यामुळे आंतरराष्ट्रीय व्यापारवाढीचा प्रश्नहि परिषदेला सोडविणें शक्य झालें नाही. अशाप्रकारें जागतिक आर्थिक अभ्युदयाच्या दृष्टीने लंडन परिषदेने पाऊल पुढे टाकलें नाही. या परिषदेमुळे निरनिराळया राष्ट्रांची आर्थिक दृष्ट्या दिलजमाई होण्याऐवजीं त्यांच्यामधील मतभेदांचें मात्र दृढीकरण झालें आहे. जागतिक प्रश्न सुट वयाचा आता फक्त एकच मार्ग आहे; आणि तो म्हणजे सर्वांवर येणाऱ्या आगामी संकटाची जाणीव होऊन परस्पर बंधूभावाची कल्पना वाढीस लागणें हा होय."

वरील आशयाचें प्रो. शाहा यांचे उद्बोधक व्याख्यान झाल्यावर प्रिन्सिपॉल गाडगीळ यांनी समयोचित शब्दांत त्यांचे आभार मानल्यावर सभेचें काम आटोपलें.

# महात्मा गांधींचें उपोषण व सरकारी पत्रक

महात्मा गांधींची येरवड्याच्या तुरुंगांत रवानगी झाल्या दिवसापासून ते पुनः लवकरच उपोषण सुरू करणार अशी कुणकूण कानीं येत होतीच. ती खरी ठरून ता. १६ रोजीं दुपारपासून गांधींनी उपोषणास सुरुवात केल्याचें वृत्त जाहीर झालें ! हें उपोषण कांही नियमित दिवसांचें आहे किंवा आमरणान्त आहे हें अद्याप निश्चित समजलेलें नाही. या बाबतींत हिंदुस्थान—सरकाराने ता. १८ रोजीं एक पत्रक प्रसिद्ध केलें असून त्यांत या प्रकरणावर प्रकाश पाडणारा मजकूर आहे, हें त्या पत्रकाचा पुढील सारांश पाहिला म्हणजे लक्षांत येतें.

### सरकारी खुलासा

या पत्रकांत असें म्हटलें आहे कीं, ता.१ऑगस्टला गांधींना अहमदाबाद येथे अटक केल्यानंतर त्यांनी अहमदाबाद येथील तुरुंगाच्या सुपरिंटेंडेंटांना एक पत्र लिहिलें. त्यांत त्यांनी आपल्या हरिजनकार्याचा इतिहास देऊन आपल्या मागण्या कोणत्या आहेत या विशद केल्या आहेत.

### गांधींच्या मागण्या

ते म्हणतात,"मला गेल्या मे महिन्यांत येरवडा तुरुंगांतून सोडण्यापूर्वी पुढील सवलती दिल्या होत्या. (१) हरिजनांचें कार्य करण्याची मोकळीक होती. (२) त्या संबंधांत लोकांना भेटण्याची मुभा होती. (३) पत्रें पाठविणें व लोकांकडून पत्रें येणें याबाबत पूर्ण मोकळीक होती. ( ४ ) माझ्या दिमतीस एक 'टाइपिस्ट' दिला होता. ( ५ ) मला सर्व वर्तमानपत्रें, मासिकें व दुसरें वाङ्मय वाचावयास दिलें जात होतें. (६)'हरिजन' या वर्तमानपत्रांत लेख लिहिण्याला व त्या पत्राच्या संपादकांना कामासंबंधी दिशा दाखविण्याला व तपशीलहि सांगण्याला परवानगी होती."

ता. ४ ऑगस्ट रोजीं पुण्यास गांधींना पुनः अटक झाल्यानंतर त्यांनी वरील मागण्य केल्या व ता. ७ ऑगस्टच्या आंत उत्तर मागितलें व उत्तर न आल्यास आपण आपल्या उपोषणास सुरुवात करूं असेंहि कळविलें ! परंतु या तारखेच्या आंत उत्तर देणें अशक्य आहे असें सरकाराने कळविलें. म्हणून ८ ऑगस्ट व १० ऑगस्ट या तारखांस गांधींनीं सरकाराला उत्तर पाठविण्याविषयीं पुनः लिहिलें !

### उपोषणास सुरुवात

ता. १४ ऑगस्ट रोजीं महात्माजींनी सरकारास पत्र लिहून कळविलें कीं, " मी १ ऑगस्टला सरकारास कळविलें होतें कीं, जर माझ्या हरिजन कार्यांत अडथळा आला तर मला जिवंत राहण्यांत अर्थ वाटत नाही. त्यानंतर सरकारास तीन पत्रें लिहिलीं पण आज सोमवार ता. १४ पर्यंत उत्तर नाही. जर बुधवार ता. १६ पर्यंत उत्तर आलें नाही तर मी ता. १६ बुधवार रोजीं दुपारीं बारा वाजल्यापासून उपोषणास सुरुवात करीन हें निश्चित समजा. मी फक्त पाणी व मीठ घेईन. माझी शपथ पुरी करण्याचा व माझ्या मनाला होणारे क्लेश नाहीसे करण्याचा हाच एक उपाय आहे असें मला वाटतें."

### येरवड्याच्या करारांतील सवलतींचें वचन

यापुढे ते म्हणतात कीं, "उपवास करून सरकारावर आसर पाडावा अशी माझी मुळीच इच्छा नाही. माझें म्हणणें इतकेंच कीं, पूर्ण स्वतंत्रपणें जर मला हरिजनकार्य करूं दिलें नाही तर मला जगण्यांत कांही हंशील वाटत नाही ! मी माझ्या पूर्वीच्या पत्रांत लिहिलें आहे व सरकारांनेहि ही गोष्ट त्यांच्या पत्रव्यवहारांत कबूल केली आहे कीं, येरवड्याच्या करारांतच अशा तऱ्हेची मला 'हरिजनसेवा' करतां यावी ही गोष्ट अंतर्भूत होते ! या कराराला सरकाराने संमति दिल्याकारणाने त्यांनाहि हें बंधनकारक आहे.

मी उपोषण करतों म्हणून सरकाराने सवलती देऊं नयेत तर या बाबतींत मला न्याय पाहिजे. मी उपोषण करतों हें फक्त माझ्या स्वतःच्या समाधानाकरिता आहे इतकेंच. "

**सरकारानें सवलती दिल्या !**

वरील पत्राला उत्तर म्हणून ता. १६ ऑगस्टला सरकाराने गांधींना पत्र लिहून पुढील सवलती दिल्या. त्या अशाः—(१) वर्तमानपत्रें व मासिके यावीं. परंतु वर्तमानपत्रांच्या बातमीदारांची अगर इतरांची भेट घेऊन वर्तमानपत्रांत मुलाखती प्रसिद्ध करण्यास बंदी असावी. (२)प्रत्येक दिवशीं दोन गृहस्थांची भेट घेण्यास परवानगी आहे. (३) आठवड्यांतून तीन वेळां 'हरिजन' वर्तमानपत्राच्या संपादकाकडे मजकूर पाठविणें व त्याला कामाची दिशा सांगणें यास परवानगी आहे. त्याप्रमाणेच इतर पत्रव्यवहार करणाऱ्या कांहीं मर्यादित लोकांना उत्तरें पाठविण्यास परवानगी दिली आहे. (४) हरिजनाच्या कार्याला जरूर तीं पुस्तकें, वर्तमानपत्रें व वाङ्मय वगैरे जवळ ठेवण्यास व एक कैदी 'टाइपिस्ट' गांधींनी आपल्या दिमतीस ठेवण्यास सरकाराची परवानगी आहे. ह्या सवलती कळविल्यानंतर गांधींनी आपण उपोषण करणार नाहीं असे दर्शविलें. परंतु पुढे त्यांनी तो बेत बदलून मुंबई-सरकारास दुसरें पत्र पाठविलें.

**मी उपोषण सोडीत नाही !**

या पत्रांत ते म्हणतात कीं, " दुधाकरिता शेळ्या पाठवा असें जे मी लिहिलें तें मीं फार घाईने व गडबडीनें कळविलें असें मला आतां वाटतें. कारण जे कागद मजकडे आतां दिले आहेत ते वाचून पाहाता मी उपोषण बंद करूं नये असें मला वाटूं लागले आहे. सरकाराने पूर्वी सवलतींसंबंधी जे हुकूम काढले होते त्यांपेक्षा ज्या सवलती हल्ली दिल्या आहेत त्या फारच थोड्या आहेत. सरकाराला जर पूर्वीच्या सवलती काढून घ्यावयाच्या असतील तर मला फक्त वाईट वाटेल इतकेंच. परंतु या नव्या हुकुमान्वयें मला मात्र वागतां येणार नाही. या प्रकरणांत वादविवाद करीत बसण्यापेक्षा उपोषणच पुढे चालविणें बरें ! "

**फळें व दूध परत न्या**

" नागरिक या नात्याने सरकाराशीं सहकार्य करावयाचें नाही असा माझा बाहेर असतांना निश्चय असतो. पण तुरुंगांत तेथील शिस्त पाळण्याची पराकाष्ठा करणें मी माझें कर्तव्य समजतों. मात्र सरकार या माझ्या वागणुकीला किंमतच देत नाही. मीं सरकाराच्या सर्व सूचना वाचल्या. त्यावरून मला स्पष्ट वाटलें कीं, हरिजनकार्याची मला किती जरूरी व निकड आहे याची सरकाराला क्षितीच वाटत नाहीं. म्हणून, उपोषण सोडण्याची माझी इच्छा असूनहि जर सरकार मला पूर्ण स्वातंत्र्याने हरिजनकार्य करूं देणार नसेल तर उपोषण सुरु ठेवल्याशिवाय गत्यंतर नाही. म्हणून मी घाईने उपोषण सोडतों असें सांगितल्यामुळे जीं फळें व जें दूध पाठविलें आहे तें परत न्यावें "

**येरवड्याच्या कराराची योजना**

सरकाराचें यावर उत्तर असें कीं, 'हरिजन' पत्राच्या संपादकांला रोज भेटण्यास आम्ही परवानगी दिली आहे. त्या वेळीं गांधींना मजकूर देतां येईल व त्या कार्याबाबतचा इतर पत्रव्यवहार संपादकांजवळ त्यांना देतां येईलच. येरवड्याच्या करारांतच या सर्व योजना येतात असें जें गांधी म्हणतात त्याचा मात्र अर्थ आम्हांला कांहीं कळत नाही. हें खरें कीं, त्या करारानंतर गांधींना या कार्याकरितां पुष्कळ सवलती दिल्या. पण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, त्या वेळीं गांधी हे 'सरकारी राजबंदी' होते. व या फक्त सवलती होत्या. येरवड्याच्या करारांत त्या अंतर्भूत कशा होतात तें मात्र समजत नाही.

**सनातनी लोकांची तक्रार**

त्या वेळींसुद्धा अनेक सनातनी लोकांनी सरकाराकडे अशा तक्रारी केल्या होत्या कीं, गांधींना तुरुंगांतून अशा तऱ्हेचें प्रचारकार्य करूं देण्यांत अन्याय व पक्षपातीपणा होत आहे. या खेपेस तर ते राजकारणाकरितां तुरुंगांत आले आहेत. तेव्हां त्यांना इतर 'अ' वर्गातील कैद्यापेक्षां अधिक सवलत दिली तर ती दिली जाऊं नये म्हणून अधिकच तक्रारीस जागा देण्यासारखें आहे. तथापि या सर्व गोष्टी लक्षांत न घेतां एक सामाजिक कार्य करण्याकरितां म्हणून सरकाराने अनेक सवलती दिल्या.सरकार या कार्याच्या आड येतें असा आक्षेप येऊं नये एवढाच सरकाराचा विचार होता. गांधी हे इतरांप्रमाणेच एक राजकीय गुन्ह्याकरिता तुरुंगांत आलेले कैदी आहेत ही गोष्ट व तुरुंगांतील इतर शिस्तहि बाजूला ठेवून या समाजकार्यास मदत म्हणून सरकाराने या सवलती दिल्या हें गांधी लक्षांत घेत नाहीत.

**गांधींच्या तक्रारी चूक**

गांधी तुरुंगांतून निघून बाहेर मोकळे होते,त्यावेळीं सुद्धा त्यांनीं आपला वेळ व शक्ति सर्वस्वीं या हरिजनकार्यांत खर्च केली असें म्हणतां येणार नाही. उलट त्यांनी राजकारणाच्या व कायदेभंगाच्या बाबींतच आपला वेळ व शक्ति वेंचली. आज आपल्याला हरिजनकार्य अगदीं स्वतंत्रपणें करूं द्यावें असें म्हणणें म्हणजे फक्त शारीरिक

बंदी करावी पण इतर सर्व बाबतींत आपल्यास स्वातंत्र्य द्यावें असें म्हणण्यासारखें आहे. म्हणजे आपल्यास कैद कोणत्या प्रकारची व्हावी हें ठरविण्याचा व सरकारास त्याप्रमाणें करण्यास भाग पाडण्याचा त्यांचा इरादा दिसतो. हें चूक आहे व सरकारास ते कबूल नाही ! अस्पृश्यतानिवारणाला जरूर त्या सर्व सवलती सरकाराने दिल्या आहेतअसें सरकारचें स्पष्ट मत आहे

**सुटका होण्याचा मार्ग**

गांधींना सरकाराने असें स्पष्ट कळविलें आहे कीं, जर गांधींना हरिजन कार्याशिवाय आपलें जिणें व्यर्थ आहे असें खरोखरच वाटत असेल तर त्यांना ती चळवळ पूर्ण स्वातंत्र्याने करण्याकरितां सरकार मुक्त करण्यास तयार आहे. अट एवढीच कीं, यापुढे मुक्तता झाल्यानंतर गांधींनी आपण कायदे भंगाच्या चळवळींत पडणार नाही असें सरकारास कळविलें पाहिजे. हे केलें तर सरकार त्यांना तावडतोब मुक्त करण्यास तयार आहे !

# जाहीर विनंति

काल ता. २४ ऑगस्ट रोजीं माझ्या वयाला एकसष्टावें वर्ष संपून बासष्टावें वर्ष लागलें. केसरी—मराठा संस्थेंतील माझी प्रत्यक्ष नोकरीहि सुमारें साडेसदतीस वर्षें झाली. यामुळे, केवळ वयाच्या टिपणाला मेळ घालून, आज तारखेपासून मीं फर्लो रजा घेत आहें. अर्थात् आजपासून केसरीचें संचालकत्वहि मी सोडीत आहें. कारण माझें संचालकत्व व माझें संपादकत्व यांमध्ये, लेखनव्यवसाय, श्रम व जबाबदारी या दृष्टींनी कांहीच फरक पडूं शकला नाही असें माझ्या अडीच वर्षांच्या अनुभवाने मला कळून आलें. असो मीं 'केसरी' पत्राचें संपादकत्व १९३१ च्या जानेवारींत सोडलेंच होतें; त्यानंतर आता संचालकत्वहि सोडीत आहें. तथापि मला केव्हा 'केसरी-मराठ्यां'त लिहिण्याची इच्छा झाली तर, मी आपल्या सहीवरच लेख लिहीन. म्हणून यापुढे, या दोनहि पत्रांत, माझी सही नसलेल्या अशा कोणत्याहि लेखाबद्दल अगर धोरणाबद्दल मी जबाबदार नाही असें वाचकांनी समजावें.

केसरी-मराठा संस्थेशीं लेखक या नात्याचा संबंध आज इतकीं वर्षें मला ठेवतां आला हें मी माझें सुदैव समजतों. आणि म्हणूनच आज केसरी—मराठ्याच्यां वाचकांची रजा घेतांना मला सहजच वाईट वाटत असेल हें कोणीहि कबूल करील. तथापि, आता वयपरत्वें लेखनव्यवसायाचे श्रम पूर्वीसारखे करवत नाहीत. आणि विशेषतः, एकाच म्हणजे वर्तमानपत्री लेखनपद्धतीचा मला फार कंटाळा आला आहे. म्हणून लेखक या नात्याचा केसरी—मराठा संस्थेशीं असलेला नोकरीचा संबंध मी सोडून देत आहें.

मात्र सदर संस्थेचा एक ट्रस्टी या नात्याचा संबंध व त्यासंबंधाचे सर्व अधिकार मी पूर्वी प्रमाणेच आपणाकडे ठेवणार आहें.

जें कारण केसरी—मराठा पत्रांतील लेखक या नात्याचा संबंध सोडण्याला तेंच इतर कित्येक कामांनाहि लागू पडतें. यामुळे यापुढे कोणाच्या प्रस्तावना, अभिप्राय, समालोचन, मासिकादिकांकरिता लेख, प्रशस्तिपत्रें, शिफारसपत्रें लिहून देणें इत्यादि कामें माझ्या हातून होणार नाहीत. अशा गोष्टी मीं आजपर्यंत पुष्कळच केल्या. परंतु यापुढे या बाबतींत मला नकारच घोकावा लागेल. याबद्दल मी लोकांची आगाऊच क्षमा मागतों.

तात्पर्य, यापुढे वरील दोनहि कामांसंबंधी कोणीहि मजकडे पत्रव्यवहार करूं नये. केल्यास पत्रोत्तरें मिळणें कठिण होईल. केवळ केसरी—मराठा ट्रस्टसंबंधाने पत्रव्यवहार असेल तेवढाच मजकडे करावा. इतर सर्व पत्रव्यवहार 'केसरी—मराठा' पत्रांचे संपादक किंवा व्यवस्थापक यांजकडे करावा.

'केसरी—मराठा'सारख्या वर्तमानपत्रांशीं संबंध आल्यामुळे, माझी पात्रता नसतांहि, अनेक लोकांनीं मजवर लोभ केला. तसेंच इतर कारण नसतां अनेक लोकांनी मजवर राग केला. उलट, माझ्या हातून कोणाचें काय किती बरें झालें असेल हें जरी मला सांगवत

नाही, तरी अनिच्छेने व अजाणतांहि अनेक लोकांचे मी अपराध केले असतील किंवा त्यांना दुखविलें असेल. म्हणून ज्यांनी मजवर लोभ ठेवला त्यांचे आभार मानतांना, व ज्यांना राग येण्याला मीं कारणीभूत झालों असेन त्यांची क्षमा मागतांना, मला आनंदच वाटतो.

पुणें,
ता. २५।८।१९३३. } न. चिं. केळकर.

# आयर्लंडांतील नवी यादवी

निसर्ग काय, समाज काय किंवा राष्ट्र काय, प्रत्येकामध्ये खळखळाट उडाल्याशिवाय त्याचा जिवंतपणा प्रत्ययास येत नाही. ओढा खळखळते, सागर गरजतो, व्यक्ति चळवळ करते आणि राष्ट्र आंदोलित होतें म्हणूनच त्याचें त्याचें अस्तित्व भासमान होतें. मध्यंतरीं आयर्लंडासंबंधी विशेष महत्त्वाची अशी कोणतीच बातमी प्रसिद्ध होत नसल्याने जगाला तें झोंपल्याप्रमाणेच वाटत होतें. परंतु गेल्या पंधरवड्यांत जनरल ओडफी यांनी जीं चढाईचीं भाषणें केलीं, डी व्हॅलेरा यांना ज्या धमक्या दिल्या, नीलवेषधारी पथकांच्या मिरवणुकींचा जो गोंधळ माजविला, त्यामुळे साऱ्या जगाचें लक्ष पुनरपि आयर्लंडाकडे वेधलें आहे. राष्ट्रसूत्रधार इमॉन डी व्हॅलेरा यांनी, अध्यक्षपदाचीं महावस्त्रें परिधान केल्यापासून, आयर्लंडाच्या राज्यघटनेमध्ये कांही आमूलाग्र सुधारणा केल्या व पुढेहि करण्याचा त्यांचा मानस आहे. संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्रुव ताऱ्यावर आपली दृष्टि अचल ठेवून राज्यकारभाराचें सुकाणूं त्या दिशेने ते वळवीत आहेत. संपूर्ण स्वातंत्र्याचा अर्थ अर्थातच ब्रिटिश साम्राज्यांतून बाहेर पडणें असा असल्याने तें ध्येय ज्यांना मान्य नाही अशा कॉस्ग्रेव्ह पक्षाने त्यांजविरुद्ध गिल्ला चालवावा हें स्वाभाविक होय.

परंतु विरोधी पक्षाच्या हुल्लडीकडे दुर्लक्ष करून डी व्हॅलेरा यांनी दुसऱ्या क्रांतिकारक बिलाचा मसुदा तयार केला. तें बिल म्हणजे इंग्लंडाला आयर्लंडाने द्यावयाच्या खंडणीबाबतचें. डी व्हॅलेरा यांना इंग्लंडाचे वसाहतमंत्री मि. थॉमस यांच्याशीं जितका युक्तिवाद करतां आला तितका त्यांनी केला. परंतु अखेर सामोपचाराचीं बोलणीं फिसकटलीं आणि उभय राष्ट्रांत जकातीचें युद्ध सुरू झालें. डी व्हॅलेरांनी खंडणी बंद करताच 'जशास तसें' या न्यायाने इंग्लंडाने आयर्लंडामधून येणाऱ्या मालावर जबर जकाती बसविल्या. त्यामुळें विरोधी पक्षाच्या हातांत अप्रत्यक्ष रीत्या एक नवें हत्यारच दिल्यासारखें झालें. कॉस्ग्रेव्ह पक्ष डी व्हॅलेरा यांना कैचींत धरण्याची संधि पाहतच होता. त्याला समेटाचें हें अपयश सरकाराच्या विरुद्ध चळवळ करण्यास चांगलेंच उद्दीपक झालें!

कॉस्ग्रेव्ह पक्षाने डी व्हॅलेरांची 'राष्ट्रद्रोही, राष्ट्रघातक' इत्यादि शेलक्या शिव्यांनी पूजा बांधली. त्याचा आक्षेप असा कीं, डी व्हॅलेरा यांनी खंडणी बंद केली म्हणूनच इंग्लंडाने आयरिश मालावर जबर जकाती बसविल्या आणि अशा जबर जकाती बसविल्या गेल्या म्हणूनच आयरिश शेतकऱ्यांचें आर्थिक नुकसान अतिशय होऊं लागलें! यावर प्रश्न असा कीं, कॉस्ग्रेव्ह हे स्वतः अधिकारावर असतांना ते इंग्लंडाची खंडणी बिनचूक भरीत होते, तेव्हा जिनसांच्या किंमतीहि आजच्याइतक्या उतरल्या नव्हत्या. मग शेतकऱ्यांची आर्थिक स्थिति वाईट कां होती? शेतकरी खरोखरीच तसे संपन्न असते, तर खंडणी बंद करण्याच्या निर्धारावर निवडणुकीस उभे राहिलेले डी व्हॅलेरा व त्यांचा पक्ष यांना त्यांनी इतक्या प्रचंड बहुमताने निवडून दिलेंच नसतें.

डी व्हॅलेरा ध्येयवादी असले तरी केवळ विलोभनीय तत्त्वांच्या मृगजळामागे पळणारे व फस-

णारे पुरुष नव्हत.त्यांची अशी ठाम समजूत आहे कीं, आज खंडणी बंद केल्यामुळे इंग्लंडाच्या जकातींनी शेतकऱ्यांचें तूर्त थोडेंफार नुकसान होणार असलें तरी,पुढेमागे राष्ट्रामध्ये औद्योगिक क्रांति घडवून आणून आपल्याला आयर्लंडास स्वयंपोषित करतां येईल.शेतीला उद्योगधंद्यांची मदत झाली म्हणजे शेतकऱ्यांना परकीयांच्या तोंडाकडे पाहण्याचें कारण नाही. देशांतील कच्चा माल देशांतच पक्क्या मालांत रूपांतरित होऊं लागला म्हणजे राष्ट्र स्वावलंबी झालें म्हणून समजावें.मनुष्य तात्कालिक नफानुकसानीच्या संकुचित वृत्तीने राष्ट्रधुरीणाच्या कृत्याकडे पाहूं लागल्यास कोणत्याच पुरुषाच्या हातून राष्ट्राचें कल्याण झालें असें त्यास वाटणार नाही. परतंत्र राष्ट्र स्वतंत्र करणें म्हणजे पुंगी वाजवून टोपलीखालून आंब्याचें झाड निर्माण करणें नव्हे! अर्थातच दहावीस वर्षांची सवड आपण त्यांच्या योजनेला दिलीच पाहिजे.

खंडणी बंद करतांच डी व्हॅलेरा यांनी ती रक्कम शेतकऱ्यांना मदत म्हणून दिली आणि सरकार लवकरच एक औद्योगिक योजना अमलांत आणणार असल्याचें जाहीर केलें. डी व्हॅलेरा यांच्या या कृतीवरून आणि उद्गारावरून त्यांना आयरिश शेतकऱ्यांचें नुकसान करावयाचें नाही, त्यांची स्थितिच सुधारावयाची आहे असें अनुमान निघतें. परंतु डी व्हॅलेरा यांचें हें वरील धोरण न पटल्यामुळे जनरल ओडफी हे व्हॅलेरांना नवे शत्रु उत्पन्न झाले आहेत. ओडफी हे डी व्हॅलेरा अधिकारारूढ होण्यापूर्वी पोलीस खात्याचे वरिष्ठ अधिकारी होते. डी व्हॅलेरा यांचा पक्ष सत्ताधीश होतांच ओडफी यांना अर्धचंद्र देण्यांत आला. ‘ निग्रकृतः पन्नगः फणां कुरुते ’ म्हणजे डिवचलेला साप लगेच फणा उचलतो, त्याप्रमाणे अधिकारावरून च्युत होतांच ओडफी यांनी डी व्हॅलेरा यांना दंश करण्याचें ठरविलें.

डी व्हॅलेरा यांच्या प्रत्येक धोरणाला कॉस्ग्रेव्ह विरोध करतात हें पाहून त्यांच्या पक्षांत शिरून आपलें बळ वाढविण्याचा ओडफी यांचा प्रथम विचार असावा. परंतु कॉस्ग्रेव्ह आणि ओडफी यांच्यामध्ये तत्त्वतःच विरोध आहे. कॉस्ग्रेव्ह यांना इंग्लंडाशीं असलेलें नातें तोडावयास नको तर, ओडफी यांना तें नातें तोडून सर्वाधिकारी व्हावयाला पाहिजे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळे या उभयतांत सख्य होणें शक्यच नव्हतें. कॉस्ग्रेव्ह यांनी झटकल्यावर ओडफी यांनी आपला तृतीय पंथ स्थापून आपल्याभोवती माणसांची जमवाजमव करण्यास आरंभ केला. ओडफी यांना डी व्हॅलेरा यांच्या धोरणामुळे शेतकऱ्यांचें व राष्ट्राचें नुकसान होत आहे असें वाटतें. पण शेतकऱ्यांनाहि डी व्हॅलेरा यांचें धोरण स्वहितविघातक व राष्ट्रघातक वाटलें असतें तर, त्यांनी या वेळेस ओडफी यांच्या निशाणाखाली उभे राहून डी व्हॅलेरा यांचा धिक्कार केला असता. इतकेंच नव्हे तर, सरकार उलथून पाडण्याचाहि त्यांनी प्रयत्न केला असता. परंतु ता. २० रोजीं ठरल्याप्रमाणें कॉर्क शहराच्या राजरस्त्यांतून ओडफीचे नीलवेषधारी सैनिक चालले असतां नागरिकांनी त्यांच्यावर हल्ला केला! त्यावरून लोकमत ओडफी यांस तितकेंसें अनुकूल नाही असेंच सिद्ध झालें.

इतक्याहि उपर ओडफी यांना तशी हिंमत असेल तर, त्यांनी फेरनिवडणुकीस सिद्ध व्हावें. यदाकदाचित् फेरनिवडणुकी करण्यास डी व्हॅलेरा कबूल न झाले तर, त्यांना तसे भाग पाडण्यास आयर्लंडाच्या राज्यघटनेंत सोय आहेच. ओडफी यांनी राष्ट्रामध्ये चळवळीचा एकच हलकल्लोळ माजवून फेरनिवडणुकीस जनतेची मान्यता मिळविल्यास डी व्हॅलेरा निवडणुकी करण्यास कचरतील असें वाटत नाही. कोणत्याहि पक्षाला आपलें बळ किती आहे हें अजमावण्याचा हाच सनदशीर मार्ग आहे. याच युक्तीने गेल्या निवडणुकींत व्हॅलेरा यांनी कॉस्ग्रेव्ह यांना चारहि मुंड्या चीत केलें! जनरल ओडफी यांना डी व्हॅलेरा यांजवर मात करून स्वतःचें प्रभुत्व आयर्लंडामध्ये स्थापावयाचें असल्यास त्यांनी डी व्हॅलेरा यांना त्यांच्या पेंचानेच पकडलें पाहिजे; नसता बखेडा माजविण्यांत अर्थ नाही.

वेडाळी माजवून डी व्हॅलेरा यांना आपण नरम आणूं ही जनरल ओडफी यांची अटकळ चुकीची आहे. ओडफी यांची मगरुरी वाढत चालली असल्याचें पाहून ता. २२ ऑगस्ट रोजीं डी व्हॅलेरा यांनीं एक फर्मान काढून ओडफी यांचा नीलवेषधारी संघ बेकायदेशीर ठरविला व त्याचें पारिपत्य करण्यासाठीं लष्करी कोर्टाची स्थापना केली! म्हणजे आयर्लंडामध्ये लहान प्रमाणांत सध्या लष्करी राज्यच सुरू झालें असें म्हणावें लागतें. डी व्हॅलेरा हे संनदशीर राज्यकारभाराचे भोक्ते आणि पुरस्कर्ते असल्यामुळे त्यांनी हिट्लर-शाहीचें अनुकरण, परपक्षाची हड्डी नरम करण्याच्या कामीं, केलें नाही. जनरल ओडफी यांनी आततायीपणाचे वाम मार्ग न स्वीकारतां उच्च ध्येयाने प्रेरित हाऊन राष्ट्रापुढे कांही आकर्षक असा विधायक कार्यक्रम मांडला तरच त्यांच्या उठावणींत कांहीं तरी तथ्य आहे असें म्हणतां येईल.

# गिरणीवाल्यांची तिरंगी परिषद

जपानी येनाची किंमत प्रमाणाबाहेर उतरून जपानी कापड हिंदुस्थानांत फारच स्वस्त दराने विकलें जाऊं लागल्यामुळे हिंदी गिरणीवाल्यांनी जपानी कापडावरील जकात वाढविण्याविषयी हिंदुस्थानसरकाराला विनंति केली; व ती जकात वाढविल्याने लँकेशायरला आयतीच सवलत मिळते असें पाहून हिंदुस्थानसरकाराने ती विनंति मान्यहि केली. आपल्या कापडावरील आयात-जकात हिंदुस्थान—सरकाराने वाढविली म्हणून जपानी गिरण्यांनी हिंदी कापसावर बहिष्कार घातला. व्यापारांत अडवणुकीचें धोरण फारसें इष्टफलदायी होत नाही याची जाणीव जपानी गिरणीवाल्यांना होती. यामुळे हिंदी कापसावरील बहिष्काराची भाषा ओंठीं असतांच हिंदुस्थानाची पेठ अगदींच आपल्या हातची जाऊं नये म्हणून त्यांनी हिंदी गिरणीवाल्यांबरोबर कापडाच्या व्यापाराबाबत तडजोडीचें बोलणें करण्याचें ठरविलें.

मुंबईच्या गिरणीवाल्यांच्या संघाचे अध्यक्ष मि. मोदी यांचीं लँकेशायरच्या गिरणीवाल्यांबरोबर जीं नुकतीच बोलणीं झालीं त्यांवरून लँकेशायरलाहि असें वाटूं लागलें आहे कीं, हिंदुस्थानाच्या पेठेंतील आपलें डळमळीत स्थान हिंदी गिरणीवाल्यांच्या सहकार्याने स्थिर करण्यास सध्याची परिस्थिति अनुकूल आहे. हिंदी गिरणीवाले परदेशी कापडाच्या चढाओढीमुळे बेजार झाले असल्यामुळे त्यांनाहि ही चढाओढ टाळण्याकरिता कांही तोड निघाल्यास पाहिजेच होती. अशा रीतीने हिंदुस्थान, लँकेशायर व जपान या तीनहि ठिकाणच्या गिरणीवाल्यांना एकमेकांच्या सहकार्याची गरज भासून त्यांनी सिमला येथे आपली एकत्र बैठक करण्याचें ठरविलें आहे. या बैठकीकरिता लँकेशायरच्या गिरणीवाल्यांचे प्रतिनिधि लवकरच हिंदुस्थानांत यावयास निघतील व त्यांच्या पाठोपाठ जपानी गिरणीवाल्यांचे प्रतिनिधीहि येऊन दाखल होतील.

जपान व लँकेशायर येथील गिरणीवाल्यांची व जनतेची दृष्टि बाहेर देशांतील पेठांत आपापल्या मालाचें स्थान स्थिर करण्याकडे आहे. परंतु हिंदी जनता व हिंदी गिरणीवाले यांची या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टि एक नाही. आपल्या गिरण्या कशा तरी जगवाव्या एवढेंच हिंदी गिरणीवाल्यांना पाहावयाचें आहे असें त्यांच्या अलीकडील धोरणावरून दिसतें. पण हिंदी जनतेची मनःस्थिति याहून वेगळी आहे. तिला आपल्या देशांत फक्त स्वदेशी कापडच खपावें असें वाटत असून त्यासाठी तिने स्वार्थत्यागपूर्वक वर्षानुवर्षे खटपट चालविली आहे. परदेशी कापडावर वाटेल तेवढी जकात वाढविण्यास संमति देऊन हिंदी जनता सांप्रत महाग दराने कापड खरेदी करीत आहे याचें कारण तरी हेंच होय

हिंदी, जपानी व ब्रिटिश गिरणीवाल्यांनी आपसांतील चढाओढ थांबविण्याकरिता हिंदी व्यापारी पेठांची वांटणी केल्यास एका बाजूने हिंदी जनतेची कापडपुरवठ्याच्या बाबतींत स्वयंपूर्ण होण्याची महत्त्वाकांक्षा गारद होणार आहे व दुसऱ्या बाजूने हिंदी जनतेचा आर्थिक तोटाहि मोठ्या प्रमाणावर होण्याची भीति आहे. हिंदुस्थानाच्या पेठांची तीन देशांच्या गिरणीवाल्यांत वांटणी झाली म्हणजे त्यांच्यामधील चालू चढाओढ बंद होऊन कापडाच्या उतरत्या भावांचा जो फायदा आज जनतेच्या पदरांत पडूं शकतो तोहि पुढे पडणार नाही. या दृष्टीने सदर परिषदेस सर्वसाधारण जनतेचेहि प्रतिनिधि हजर असणें अगत्याचें आहे. हिंदी विणकर सांप्रत परदेशी कापडाच्या बरोबरीने हिंदुस्थानाला कापड पुरवीत आहेत. अर्थातच या गिरणीवाल्यांच्या परिषदेंत विणकरांच्या प्रतिनिधींकडून त्यांची बाजू मांडली जाणें आवश्यक आहे. असो.

गिरणीवाल्यांच्या या तिरंगी परिषदेला हिंदी जनता व विणकर यांचे प्रतिनिधि बोलावले गेले नाहीत व परिषदेची योजना हिंदी आकांक्षांना पोषक अशी झाली नाही तर त्या योजनेला हिंदुस्थानाचा पाठिंबा मिळणार नाही हें उघड आहे.

## म. गांधींची बिनशर्त सुटका!

महात्मा गांधी यांना ता. ४ ऑगस्ट रोजीं एक वर्षाची साध्या कैदेची शिक्षा होऊन त्यांची रवानगी येरवड्याच्या तुरुंगांत झाली. हरिजनांचें कार्य हें त्यांस अत्यंत प्रिय असल्याने ते तुरुंगांतून चालविण्यास सरकाराने भरपूर सवलती दिल्या नाहीत असें वाटून गांधींनी ता. १६ रोजीं प्राणान्तिक उपोषणास सुरुवात केली ! ता.१६ रोजीं बारा वाजता त्यांनी प्रायोपवेशन आरंभिलें. २१ दिवसांचा उपवास संपून फार दिवस झाले नसल्याने या दुसऱ्या उपोषणांत त्यांचा निभाव फार दिवस लागणें शक्य नव्हतें. उपोषणाचा एक एक दिवस जसजसा लोटूं लागला तसतशी गांधींची प्रकृति खचत चालली, ओकाऱ्यांचा विकार बाधूं लागला आणि रोजचीं कामें करणेंहि त्यांना अशक्य झालें. म. गांधी हे तुरुंगांत राजबंदी म्हणून राहात असल्याने पर्णकुटींतील शुश्रूषा तेथे कशी मिळणार ? वैद्यकीय शुश्रूषा योग्य प्रकारें होत नसल्यामुळे त्यांची प्रकृति फारच क्षीण होऊं लागली. ती इतकी कीं, त्यांच्या तोंडावाटे शब्दहि निघेना.

तेव्हा ता. २० रोजीं सायंकाळीं गांधींना येरवड्याच्या तुरुंगांतून पुण्याच्या ससून इस्पितळांत पोहोचविण्यांत आलें. ससून हॉस्पिटलमध्ये आणण्यांत आल्यामुळे गांधींची वैद्यकीय शुश्रूषा बरी होऊं लागली. परंतु तेथेहि गांधींना भेटणाऱ्या लोकांच्या येण्याजाण्यावर सरकारी निर्बंध असल्यामुळे त्या शुश्रूषेंत थोडीफार न्यूनता होतीच. ससून हॉस्पिटलमध्येहि त्यांची प्रकृति आहे तशी राहात नाही, उलट ती अधिकच चिंताजनक होत आहे असें सरकारास आढळून आलें. कांही डॉक्टरांच्या मते, गांधींना काविळीची भावनाहि होत चालली होती.

ता. २३ हा दिवस गांधींच्या उपोषणाचा आठवा दिवस. त्या दिवशीं प्रकृतींत विशेष चिंताजनक बिघाड झाला नसला तरी ता. २२ रोजीं रात्रीं त्यांना थोडथोडे मळमळत होतेंच. हॉस्पिटलचे सिव्हिल सर्जन ले. क. कँडी हे त्यांची प्रकृति तपासत असत. सौ. कस्तुरबा गांधी याहि पतिशुश्रूषेसाठी इस्पितळांत दिवसभर असत. परंतु ता. २३ रोजीं सरकारला काय वाटलें कोणास ठाऊक, त्यांनी त्या दिवशीं दुपारीं गांधींची मुक्तता केली. बरोबर दुपारीं तीन वाजता मि. अँड्रयूज यांजबरोबर सिव्हिल सर्जन ले. क. कँडी हे इस्पितळांतील गांधींच्या खोलींत गेले आणि त्यांनी त्यांना 'आमची सरकाराने बिनशर्त मुक्तता केली आहे' असें सांगितलें. मुक्तता झाल्याचें समजताच म. गांधी यांनी दुपारीं ३॥ वाजता मोसंब्याचा रस घेऊन आपलें उपोषण सोडलें. उपोषण सोडल्यावर मोटारींत बसवून गांधींना पर्णकुटीवर नेण्यांत आलें. मुंबई कायदेमंडळांत रा. ब. चितळे यांनी विचारल्यावरून गृहमंत्री ना. आर. डी. बेल यांनी असा अविकृत खुलासा केला कीं, 'गांधींची सरकारने बिनशर्त सुटका केली आहे.' याच दिवशीं रात्रीं ८॥ वाजता डॉ. व्ही. डी. फाटक व डॉ. घारपुरे या उभयतांनी महात्माजींची प्रकृति तपासली.

म. गांधींची प्रकृति ता. २४ रोजीं दुपारीं डॉ.

गिल्डर व डॉ. घारपुरे यांनी तपासून पुढील आशयाचें पत्रक प्रसिद्ध केलें आहे. 'गांधींची प्रकृति फार खालावली असली तरी तींत इतर कांही विकृति नाही. त्यांना विश्रांतीची अत्यावश्यकता आहे. त्यांचें वजन ९३॥ पौंड आहे. त्यांनी पत्रव्यवहारहि बेतानेंच केला पाहिजे.' महात्माजींच्या सुटकेची वार्ता मुंबई, नागपूर इत्यादि शहरीं समजतांच लोकांनी आनंद प्रदर्शित केला.

# स्फुट सूचना

१ लोकनायक अणे यांनी आपण कायदेभंग करण्यापूर्वी आपल्या जागीं राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्याने सरदार शार्दूलसिंग यांचें नांव जाहीर केलें होतें. श्री. अणे यांच्या मागून लाहोर येथे सरदार शार्दूलसिंग यांनी परदेशी कापडाच्या दुकानावर ता. २१ रोजीं पिकेटिंग केल्यावरून त्यांना पंजाब क्रि. लॉ. अमेंडमेंटच्या १७व्या कलमान्वयें पकडण्यांत आलें, व त्यांस सहा महिन्यांची शिक्षाहि झाली. सरदार शार्दूलसिंग यांनी तुरुंगांत जाण्यापूर्वी राष्ट्रीय सभेच्या बाबतींत पुढील सर्व निरवानिरव करून टाकली. म. गांधी राष्ट्रीय सभा अजिबात बंदच ठेवा असें श्री. अणे यांस म्हणत होते. पण अणे यांनी तसें न करता राष्ट्रीय सभा निदान जिवंत राखण्याचें श्रेय संपादिलें. परंतु शार्दूलसिंग यांस अणे यांजपेक्षा गांधींचा मार्गच पसंत पडून, त्यांनी आपल्या नंतरचा अध्यक्ष नेमण्याचें नाकारलें. अशा रीतीने कॉंग्रेसच्या प्रमुख सर्वाधिकाऱ्याचें पद बुडवून प्रांतिक व जिल्हा कॉंग्रेस कमिट्याहि बुडविल्या. कराचीच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. वल्लभभाई पटेल हे होते, तेव्हा त्यांजकडेच अध्यक्षस्थानाचा अधिकार आपल्या पश्चात् गेला असें शार्दूलसिंग यांचें म्हणणें आहे. वल्लभभाई सांप्रत तुरुंगांत आहेत. ते सुटल्यानंतर काय करतील याचा अंदाज बहुतेकांना आहेच. या दृष्टीने तूर्त तरी कॉंग्रेस ठार झाली असून ऑ. इं. कॉंग्रेस कमिटी भरून म. गांधींचें धोरण बदलण्याचा जो थोडासा संभव होता तोहि नाहीसा झाला. ता. १ ऑगस्टच्या केसरींत आम्ही पुढील उद्गार काढले होते. "सर्व घटना मोडून टाका असा सल्ला गांधींनी आग्रहाने दिला असता श्री. अणे यांनी डिक्टेटररूपी हिरण्यगर्भ शिल्लकच ठेवला होता. गांधीजींच्या पायीं इतर सर्व रीतींनी श्री. अणे यांनी आपलें स्वत्व गमावलें असलें तरी हें कॉंग्रेसच्या कुशींतलें सल किंवा गर्भबीज त्यांनी शिल्लक राहूं दिलें हा, पर्णकुटीच्या अभिमंत्रित योगभूमींत गांधींशीं झगडून अणे यांनी, मोठाच पराक्रम केला असें म्हणावें लागतें. पण त्यांच्या मागून येणारे सर्वाधिकारी जयरामदास दौलतराम हे अणे यांच्यापेक्षाहि गांधींचे परमभक्त आहेत. यामुळे हें सल व बीज तरी अखेर शिल्लक उरतें किंवा अश्वत्थाम्याच्या अस्त्राप्रमाणें गांधीजींच्या लहरीपणाचें अस्त्र त्या गर्भांत शिरून त्या गर्भबीजाचाहि संहार करतें हें पहावयाचें आहे." आमचा हा त्या वेळचा संशय अखेर खरा ठरला म्हणावयाचा!

---

२ जमीनमहसूल खात्याचा व शेतकऱ्यांच्या जीविताचा संबंध किती निकटचा आहे हें नव्याने सांगण्याची जरुरी नाही. या दृष्टीने १९३१-३२ सालाचा जमीनमहसूल खात्याचा अहवाल व त्यावरील सरकारी ठराव पाहतां शेतकऱ्यांच्या दुःस्थितीच्या अनेक गोष्टी डोळ्यापुढे उभ्या राहतात. १९३०-३१ सालींच धान्याच्या किंमती फार उतरल्या होत्या. १९३१-३२ मध्यें त्यांत सुधारणा तर झाली नाहीच, पण उलट या किंमती अधिकच घसरल्या. अशा परिस्थितींत शेतकऱ्यांच्या हातीं धान्याची काय किंमत पडली असेल याची कल्पनाच करणें बरें. धान्याला भाव नाही इतकेंच नव्हे तर त्याला गिऱ्हाईकहि नाही; त्यामुळे शेतसारा व सावकारी देणें देतां देतांच शेतकऱ्यांचे प्राण कंठाशीं आले! या आपत्तींतून बाहेर पडण्यास सरकाराने शेतकऱ्याला काय मदत केली हें पाहण्यासाठी ठराव चाळल्यास दैववादी मनुष्याप्रमाणे जगाच्या आर्थिक दुःस्थितीकडे बोट दाखवून सरकार स्वस्थ बसलें आहे असेंच दिसतें.

---

३ परंतु अशा संकटांतहि सरकाराने आपला सारा मात्र जवळ जवळ पैन् पै वसूल केला असें म्हणण्यास हरकत नाही. उत्तर भागांत १,१८,०६,८४८ रुपयांची वसुली व्हावयाची. त्यांपैकीं १,१७,३२,७७९ रुपये सारा वसूल झाला! मध्य व दक्षिण या विभागांत तीन कोटि शहाण्णव लक्ष वसूल व्हावयाचा, त्यांतून अनधिकृत अशी दोन--सवादोन लाख बाकी राहिली. कांही ठिकाणीं तहकुबी दिली गेली हें खरें. पण अजिबात माफी अशी या दोन विभागांत सुमारे तीन लक्ष सात हजारच आहे, हा सरकारसारा या दुःस्थितीच्या वर्षांत वसूल झाला कसा हा प्रश्न आहे. सरकारी जमीनमहसूल

खात्याचें चक्र किती पद्धतशीरपणें चालतें व शेतकऱ्यांकडून वसूल कसा केला जातो याची साक्ष मात्र त्यावरून उत्तम पटतें. परंतु दुसराहि सिद्धांत तितकाच खरा आहे. तो हा कीं, या वर्षाच्या भयंकर परिस्थितींतहि सरकारानें सूट अगर माफी फारच थोड्या प्रमाणांत दिली! 'वसुलीसाठी कायद्यांत सांगितलेले तीव्र उपाय आम्ही फारसे उपयोगांत आणलेले नाहींत'असेंहि अहवालांत म्हटलें आहे. याला अपवाद सरकाराच्या मतें फक्त कारवार जिल्ह्याचाच दिसतो. कारण त्या जिल्ह्यांत ८०८ शेतकऱ्यांविरुद्ध हे उपाय योजावे लागले व अद्यापिहि ते उपाय योजावे लागत आहेत असें त्यांत लिहिलेलें आढळतें! हा अहवाल व त्यावरील ठराव पाहून जमीनमहसुलाच्या कायद्यांत आमूलाग्र फरक व्हावयास पाहिजे असें वाटल्याशिवाय राहत नाही. भावी स्वराज्य—योजनेंत हे खातें कायदेमंडळाच्या अधिकारकक्षेंत येईल त्या वेळीं गव्हर्नराच्या खास अधिकारांच्या संरक्षक बंधनांची जर अडचण उभी राहिली नाही तर या खात्याची पुनर्घटना प्रथम करावी लागेल यांत शंका नाही.

---

४ ता.८ ऑगस्टच्या 'उदय' पत्राच्या अंकांत 'केसरी' विरुद्ध 'उदय' चें बंड या मथळ्याखालीं एक लेख आला.त्याचा परामर्ष केसरीनें ता. ११ ऑगस्टच्या अंकांत 'संशयित शब्दांचा खुलासा' या लेखानें घेतला. त्यांतील विचारसरणी उदयकारांना सर्वस्वी मान्य होऊन त्यांनी ता.१५ ऑगस्टच्या अंकांत स्फुट लिहिलें तें अभिनंदनीय असून तें आम्ही याखालीं मुद्दाम देत आहों:—

"'केसरी' सारख्या सर्वमान्य पत्रावर 'उदय'ला लेखणीचें धनुष्य उचलावें लागलें होतें. त्या धनुष्याचा परिहार 'केसरी' ने आपल्या उदार व समतोल वृत्तीनें करून हें एक 'कृष्णार्जुनयुद्ध' समाप्त केलें ह्याबद्दल आम्हांला प्रेमादरपूर्वक आनंद वाटतो. आज महात्मा गांधी काय, लोकनायक अणे काय, सत्यमूर्ति काय, किंवा 'केसरी' कार काय, अगर 'उदय' काय, एकाच सरकाराच्या प्रचंड शक्तीला आपापल्या परीनें विरोध करावयास उभे ठाकले आहेत हें कोणासहि कदापिहि विसरून चालतां येत नाही. मतभेद काय माणसागणीक होऊं शकतील; पण त्यास कोणी किती व कसें प्राधान्य द्यावयाचें हा ज्याच्या त्याच्या मनोवृत्तीचा तर प्रश्न आहेच, पण त्यांत सर्वांची दृष्टि प्रतिपक्षावर वक्र असणें हें खरें महत्त्वाचें. आणि ही दृष्टि ज्यांची असते ते मतभेद मिटते घेतात व मुख्य कार्यास प्रोत्साहन देतात. 'केसरी' ने 'संशयित शब्दांचा खुलासा' करून सर्वांना आपापल्या मार्गानें संघटित होऊन प्रतिपक्षावर मात करावयास शिकण्याचा जो संदेश दिला आहे त्यामुळें हें 'कृष्णार्जुनयुद्ध' संपलें असें जाहीर करावयास 'उदय' आनंदानें तयार झाला आहे. विलक्षण परिस्थितीचा पेच हाच कोणी नारद, ह्यानें हें 'कृष्णार्जुनयुद्ध' घडवून आणलें होतें यांत संशयच नाही. पण तें 'केसरीनें' मिटविलें यानें 'केसरीचा' थोरपणा व्यक्त होतो. 'केसरीच्या' ह्या थोर व उदार वृत्तीपुढे 'उदय' आनंदानें नमते घेत आहे. आणि ही नम्रता सर्व वऱ्हाड धारण करील अशी त्याची खात्री आहे."

# वैदिक राष्ट्र-गीत

## पद

["ॐ राजाधिराजाय प्रसह्यसाहिने" इ० प्रार्थना मंगलमूर्ति गणेशाच्या पूजनानंतर मंत्रपुष्पाचे प्रसंगीं प्रत्येक घरीं गणेशोत्सवांत म्हटली जाते. ह्या प्रार्थनेचाच आशय महाराष्ट्रीय भाविकजनाकरितां मराठींत आणण्याचा प्रयत्न पुढील कवितेंत केला आहे.]

प्रणति अमुची असो, हे प्रभो तव पदां,
राजराजेश्वरा ॥ धृ० ॥
अमित बल, तेज तें, वीर्य तें, धैर्य तें,
निश्चयें राहतें, तूझिया आश्रयें,
प्रत्यया येत हें सर्वदा, श्रीधरा! ॥ १ ॥ प्रणति०॥
बिंदु बिंदूहि तो यांतुनी निज करीं
देशि आम्हां जरी धन्य होऊं तरी
या जगाभीतरीं सकल विश्वंभरा! ॥ २ ॥ प्रणति०॥
अखिल विश्वाचिया कोणकोणांतुनी
प्रार्थितां तुज कुणी मंद्र रव काढुनी,
श्रवणिं तो तव पडे सहजची श्रीधरा!॥३॥ प्रणति०॥
यामुळे तुजप्रती लोक "वैश्रवण" हें
नाम देती जगीं, ऐक तरि आमुची
प्रार्थना तव पदीं सकल विश्वंभरा! ॥ ४ ॥ प्रणति०॥
कामना, वासना, होति ज्या जन—मना,
त्यास पुरवावया ऋद्धि, सिद्धी उभ्या
चरण चालीं तुझ्या जोडुनीया करां ॥ ५ ॥ प्रणति०॥

वासना-पूर्तिची आस हृदयांतरीं
होत बहुता परी सफल करि सत्वरी
हे 'महाराज' तूं 'काम कामेश्वरा'! ॥ ६ ॥ प्रणति०॥
भोग्य वस्तू जिथें लाभतीं प्रचुरशा,
प्रकृति तंत्रेंच जें चालवयास ये
दे स्वराज्यास त्या, करि कुबेरा धरा! ॥ ७ ॥
दे महाराज्य तें आधिपत्यासवें,
ज्यामुळे नांदती सर्व अधिकार ते
या प्रजाजन करी, करि असें श्री-करा ॥ ८ ॥
अखिल विश्वामधे अन्य स्थलिं नाढळें
देई वैराज्य तें, ज्यापुढे होतसे
सकल जग नम्र तें; त्रिभुवनाधीश्वरा! ॥ ९ ॥
'स्वस्ति'—कर तो तुझा शुभ करो सर्वदा,
मांडलिक—मंडलें नांदतीं ज्यामधें
देइ साम्राज्य तें; विश्व विभवाऽकरा! ॥ १० ॥
दशदिशा विस्तरूनि जें समुदाप्रती
पोंचतें जाउनी, देइ साम्राज्य तें
सार्वभौमा नृपा आमुच्या नर-वरा! ॥ ११ ॥
सार्वभौमा अशा नृ-पतिला आमुच्या
दे उदंडायु तें; भोगुं साम्राज्य तो
जोंवरी रवि, शशी, उजळती अंबरा! ॥ १२ ॥
पारमेष्ठयहि तुझें मुक्ति-सुख-राज्य जें
तेंहि आम्हांस दे, ज्यामुळे शांतिचें
राज्य विश्वामधें विस्तरो, श्री-धरा! ॥ १३ ॥
प्रार्थना प्रभु तुझ्या हेच पादांबुजा
भयद भव-सिंधुतुनि अखिल जग उद्धरा
शुभ करा शिरिं धरा, भुवन रत्नाकरा! ॥ १४ ॥
तोत्र-पाणे! तुझ्या गाऊं स्तोत्राप्रती
सर्वदा सकलहि निवटुनी त्वत्पदीं
हर्ष—निर्भर—हृदीं त्रिभुवनाधीश्वरा! ॥ १५ ॥
विश्वधाताहि तूं विश्वकर्ताहि तूं
विश्वभर्ताहि तूं विश्ववंद्या तुला
अशित करूं वंदना; प्रेममय प्रभुवरा! ॥ १६ ॥
प्रणति आमुची असो० ॥

—किरात

# इंग्रज व्यापाऱ्यांचा मानभावीपणा

हिंदी स्वराज्याच्या कल्पनेने जर कोणाच्या पोटांत खरी कळ उठत असेल तर ती येथील गोऱ्या नोकरशाहीच्या व युरोपियन व्यापाऱ्यांच्या होय. गोरा सनदी नोकर फक्त नांवाचाच नोकर; कारण, त्याची जरब धन्यापेक्षाहि अधिक असते! इतकेंच नव्हे तर, राजसत्तेच्या बाबतींत तोच आज हिंदुस्थानाचा खराखुरा धनी आहे. पूर्ण स्वराज्याचे हक्क जर हिंदुस्थानाने मिळविले तर या गोऱ्या अधिकाऱ्यांचा धनीपणा नाहीसा होऊन त्यांना त्यांचा जो खरा नोकरांचा दर्जा आहे तोच प्राप्त होईल! युरोपियन व्यापाऱ्यांची निराळ्या दृष्टीने तीच स्थिति आहे. हिंदुस्थानाची बाजारपेठ आज त्यांना लुटण्यास मोकळी आहे. हिंदुस्थानाला पूर्ण स्वराज्य मिळालें कीं, त्याला कडी—कुलूप लागणार. अर्थात् पूर्ण स्वराज्याचे हक्क हिंदुस्थानाला मिळूं न देण्यांतच त्यांचाहि स्वार्थ आहे. नोकरशाहीचे प्रतिनिधि सर माल्कम हेले यांनी जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे साक्ष देऊन स्वराज्याच्या मार्गांत किती अडचणींचीं भुतें उत्पन्न केलीं याचा विचार आम्ही पूर्वी केलाच होता. युरोपियन व्यापाऱ्यांचे प्रतिनिधि म्हणून विलायतेंत जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे साक्ष देऊन आलेले कलकत्त्याचे प्रतिष्ठित व्यापारी मि. जेम्स हे काय म्हणतात हें या खेपेस पाहावयाचें आहे.

मि. जेम्स यांनी गेल्या सोमवारीं कलकत्त्यास एक भलें मोठें भाषण करून युरोपियन व्यापाऱ्यांच्या ज्या मागण्या त्यांनी जाइंट कमिटीपुढे मांडल्या त्यांच्यासंबंधीं ऊहापोह केला. पांढऱ्या खलित्यांत ग्रथित केलेली योजनासुद्धा आहे अशी पसार होण्याचा बिलकुल संभव नसून त्या योजनेंत युरोपियन व्यापाऱ्यांना पाहिजे आहेत त्या सुधारणा खास घुसडल्या जाणार अशी खात्री जेम्स यांना पटली असल्यामुळे त्यांच्या मुखाने युरोपियन व्यापाऱ्यांच्या पोटांतलें पाप बाहेर पडलें. त्यांनी प्रारंभींच सांगितलें कीं, सुधार-

णांची योजना मांडण्याला ही वेळ फार चांगली आहे ! युरोपियन व्यापाऱ्यांना सध्याची वेळ हा थवाड मुहूर्त कां वाटतो याचीं कारणें शोधण्यास प्रयास पडण्याचें कारण नाही. खुद्द मि. जेम्स यांनीच अप्रत्यक्षपणें तीं सांगितलींहि आहेत. मजूर पक्ष अधिकारारूढ असतांना जेव्हा हिंदी सुधारणांच्या वाटाघाटीस खरी सुरुवात झाली त्यावेळीं या व्यापाऱ्यांचें धाबें दणाणलें होतें. समाजसत्तावादाकडे ज्यांचीं मनें निश्चितपणें झुकलीं होतीं अशा मजूर पक्षाच्या पुढाऱ्यांनी कितीहि हात आखडला तरी त्यांचें दान मोठेंच असणार अशी या व्यापाऱ्यांना भीति वाटत होती. पण त्या वेळ्या-खुळ्या बेन—मॅक्डोनाल्ड यांचा आता पत्ताहि नाही. यामुळे युरोपियन व्यापाऱ्यांच्या मनाला गुदगुल्या होत असल्याचें मि. जेम्स यांच्या भाषणांत स्पष्टपणें दिसून येत आहे !

हिंदुस्थान ही आपली खासगी मालमत्ता आहे असें समजणारें प्रधानमंडळ मोठें उदार झालें तरी प्रत्यक्ष देणार काय? खरी सत्ता तें हिंदी लोकांच्या स्वाधीन करील नाही हें खास. शिवाय अधिकाराचा जो तुकडा ते टाकणार तोहि हिंदुस्थानाच्या पदरांत पडूं नये म्हणून अविश्रांत खटपट करणारीं चर्चिल-सारखीं माणसें तेथे आहेतच. या जाणीवेनेच मि. जेम्ससारखे व्यापारी या वेळींच हें सुधारणांचें प्रकरण निकालांत निघावें असें सांगत आहेत. इंग्लंडांतील स्वराज्यविरोधी वर्तमान-पत्रांनी तर हिंदुस्थानाविरुद्ध तेथील लोकांचीं मनें कलुषित करण्याचे जे प्रयत्न चालविले आहेत ते पाहून खुद्द मि. जेम्स यांनीहि तोंडांत बोटें घातलीं. त्यांच्या भाषणांतच त्यांनी एक गमतीचें उदाहरण सांगितलें. ते म्हणाले, 'मी माझ्या बँकेंत गेलों त्या वेळीं बँकेच्या कारकुनाने मला सांगितलें कीं, हिंदुस्थानाच्या नव्या घटनेंत असे अधिकार हिंदी लोकांना दिले आहेत कीं, त्या अधि-कारांचा उपयोग करून हिंदी लोक युरोपियनांना हाकलून देऊन त्यांच्या सर्व बँका व इन्शुअरन्स कंपन्या सरकारजमा करणार आहेत!' लोकांच्या अशा मनःस्थितीची ही वेळ इंग्रज व्यापाऱ्यांना सुमुहूर्तासारखी वाटावी यांत आश्चर्य काय ?

युरोपियन व्यापाऱ्यांना काय पाहिजे हेंहि जेम्स यांनी स्पष्टपणें नमूद केलें आहे. हिंदुस्थानाची बाजारपेठ पूर्णपणें आपल्या हातांत राहावी म्हणून इंग्रजी व्यापार व हिंदी व्यापार असा पंक्तिप्रपंच हिंदुस्थानाच्या भावी कार-भारांत होणार नाही असा कायद्यानेच निर्बंध घालावा अशी त्यांची मागणी आहे. व्यापार सुखाने चालावयाचा तर देशांत शांतता पाहिजे. ही शांतता राखली जावी, चळवळ्या हिंदी पुढाऱ्यांना ती मोडतां येऊं नये आणि त्यांनी ती मोडल्यास त्यांना शासन करतां यावें म्हणून मि. जेम्स यांचा आग्रह एकच कीं, 'शांतता व सुव्यवस्था' हें खातें राखीव करावें ! हीं सर्व बंधनें तोडून टाकणाऱ्या क्रांति-कारकांना पायबंद घालावा म्हणून पोलिस-खातें, निदान सी. आय. डी. खातें, खुद्द गव्हर्नरा-कडे राहावें व त्याच्यावरहि गव्हर्नर—जनरला-चा ताबा असावा, गव्हर्नरांना जे अधिकार देण्यांत आले आहेत ते बजावण्याकरिता त्यांना स्वतंत्रच मदतनीस द्यावे अशी त्यांची शिफारस आहे. शेवटीं, अशा तऱ्हेच्या या अधिकारावर संतुष्ट होऊन हिंदी पुढाऱ्यांनी स्वस्थपणें राज्यकारभार हाकावा, उगाच इंग्रज सरकाराला शिव्या देत बसूं नये, असा उपदेशहि हे व्यापारी करीत आहेत ! मि. जेम्स यालाच पूर्ण स्वायत्तता म्हणतात !

पांढऱ्या खलित्यांतील योजना लंगडीलुली होऊन का होईना पण, ती पसार होणार असें मि. जेम्स यांना वाटतें. मि. बाल्डविन यांचें वजन फार मोठें आहे, शिवाय आज पार्ल-मेंटामध्ये असणाऱ्या सभासदांना आपण पुनः निवडून येऊंच अशी खात्री नसल्या-कारणाने प्रधानमंडळाचा पराभव होऊन नव्या निवडणुकीस तोंड देण्याचा प्रसंग येऊं देणें त्यांना इष्ट वाटत नाही. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या शिफारशी पुढील वर्षाच्या प्रारंभीं प्रसिद्ध झाल्या म्हणजे पक्षोपपक्षांतील खऱ्या तंट्याला सुरुवात होईल. त्यांत सरकाराचा पराभव झाला तर पुनः

निवडणुकी होतील. त्यावेळीं त्या निवडणुकींत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या चर्चिलप्रभृति कट्टर सभासदांचें पार्लमेंटांत प्राबल्य झाल्यास हिंदुस्थानास सध्याच्या सुधारणाहि मिळणार नाहीत. मि. जेम्स यांना त्याचें फारसें दुःख वाटत नाही. पण अशांतता ही व्यापारवृद्धीला धोक्याची असल्याने हिंदुस्थानांत शांतता पाहिजे हा या व्यापाऱ्यांचा आग्रह आहे. या कारणाकरिताच त्यांचें म्हणणें कीं, हिंदुस्थानाच्या अंगावर कांही तरी तुकडा फेका व त्यांना शांत करा !

युरोपियन व्यापाऱ्यांचें इंग्रज राज्यकर्त्यांवर फार मोठें वजन आहे हें सर्वांना माहीतच आहे. इंग्रजी राज्याचा प्रधान हेतुच असा आहे कीं, या व्यापाऱ्यांना सर्व सुखसोयी मिळाव्या व त्यांनी गुंतविलेलें भांडवल सुरक्षित राहून त्याची दामदुप्पट व्हावी ! पण ही लूट चालूच राहिली तर तें स्वराज्य कसलें ? मंत्रिमंडळावर जर गव्हर्नर-जनरलांच्या खास अधिकाराचा वरवंटा सारखा फिरत राहिला तर त्याला स्वायत्तता कशी म्हणावयाची ? इंग्रजी व्यापाऱ्यांचें म्हणणें इतकेंच कीं, तें स्वराज्य अगर ती स्वायत्तता असो वा नसो, यापेक्षा हिंदुस्थानाला अधिक देतां यावयाचें नाही व या मताचीच री इंग्रजी मुत्सद्दी ओढीत आहेत. त्यावर आयर्लंडा-मधील इतिहासाची आठवण करा, एवढेंच आमचें या सर्वांना सांगणें आहे.

## लँकेशायर व हिंदुस्थान

हिंदी गिरणीवाल्यांशीं मिळतें घेऊन हिंदुस्थानाच्या व्यापारी पेठेंतील डळमळत चाललेलें आपलें आसन स्थिर करावें या उद्देशाने लँकेशायरच्या गिरणीवाल्यांचें शिष्टमंडळ विलायतेहून तारीख २० रोजीं हिंदुस्थानास यावयास निघालें. निघण्यापूर्वी सदर शिष्टमंडळाचे प्रमुख सर वुइल्यम केअरलीज यांनी रूटरच्या बातमीदाराला मुलाखत देऊन शिष्टमंडळापुढील कार्याचें दिग्दर्शन केलें. त्यांत त्यांनी सांगितलें कीं, जपानाच्या चढाओढीला कसें तोंड द्यावें हा जसा हिंदी गिरणीवाल्यांपुढे बिकट प्रश्न आहे तसाच तो लँकेशायरच्या गिरणीवाल्यांपुढेहि असल्यामुळे तो परस्परांनी परस्परांच्या सहकार्यानेच सोडविला पाहिजे. मुंबईच्या गिरणीवाल्यांच्या संघाचे अध्यक्ष मि. एच्. पी. मोदी हे रिझर्व्ह बँक कमिटीच्या बैठकीकरिता विलायतेस गेले असता त्यांचीं लँकेशायरच्या गिरणीवाल्यांशीं व्यापारी सहकार्यासंबंधाने बरींच खलबतें झालीं. त्यावरून सर वुइल्यम यांना हिंदी गिरणीवाल्यांच्या सहकार्यासंबंधाने आशा वाटूं लागली असावी असें दिसतें

मि. मोदी हे नुकतेच विलायतेहून परत आले. त्यांचीहि मुलाखत वृत्तपत्रांच्या बातमीदारांनी घेतली. त्यांत ते म्हणाले, "मी लँकेशायरच्या गिरणीवाल्यांना असें बजावलें कीं, व्यापारी सहकार्याची कोणतीहि योजना करतांना हिंदुस्थानाचे हितसंबंध अबाधित राहिले पाहिजेत. व स्वतःच्या हिताच्या दृष्टीने योग्य तें आर्थिक धोरण आंखण्याचा हिंदुस्थानाचा हक्क लँकेशायरने मान्य केला पाहिजे. मात्र हिंदुस्थानाचें नुकसान न होतां जर लँकेशायरच्या गिरणीवाल्यांची सोय पाहणें शक्य असेल तर ती आम्ही जरूर पाहूं. परंतु लँकेशायरवाल्यांनी पक्कें ध्यानांत ठेवावें कीं, विश्वास हा व्यापारी सहकार्याचा पाया आहे." हिंदुस्थानाचा विश्वास संपादन करण्याकरिता लँकेशायरने दोन गोष्टी कराव्या असें मि. मोदी यांनी सुचविलें आहे. पहिली गोष्ट ही कीं, हिंदुस्थानांतील जबाबदार पुढाऱ्यांनी केलेल्या राजकीय मागण्यांना लँकेशायरने पाठिंबा द्यावा, व आपल्या गिरण्यांत हिंदी कापसाचा अधिक उपयोग करावा.

लँकेशायरच्या गिरणीवाल्यांना हिंदुस्थानांत आपला माल अधिक खपविण्याची आतुरता उत्पन्न झाली असून त्यांना त्या बाबतींत हिंदु-

स्थानाच्या सहकार्याची जरूर भासत आहे तिचा फायदा घेऊन लँकेशायरवाल्यांचा पाठिंबा हिंदुस्थानाच्या राजकीय मागण्यांना मिळवावा, व हिंदी कापसाची अधिक खरेदी करण्यास लँकेशायरला भाग पाडावें अशी मि. मोदी यांची इच्छा दिसते व त्यांत वावगें असें कांही नाही. पण मूळ उद्दिष्ट साधण्यास या सवलतींचा कितपत उपयोग होणार आहे व तसें करणें राष्ट्राच्या अंतिम व चिरस्थायी फायद्याच्या दृष्टीने कितपत उचित आहे हा प्रश्न आहे.

मि. मोदी यांना हिंदुस्थानाच्या जबाबदार पुढाऱ्यांनी केलेल्या राजकीय मागण्यांना लँकेशायरकडून पाठिंबा मिळवावयाचा आहे. वेस्ट मिनिस्टर कायद्याने कानडा, द. आफ्रिका, ऑस्ट्रेलिया वगैरे वसाहतींना जो राजकीय दर्जा दिला आहे तो राजकीय दर्जा हिंदुस्थानाला लवकर मिळाला पाहिजे अशी प्रागतिकांसुद्धा सर्व हिंदी राजकीय पक्षांची मागणी आहे. या मागणीला लँकेशायरच्या गिरणीवाल्यांचा पाठिंबा मिळेल काय असा प्रश्न आहे. मँचेस्टर चेंबरचे अध्यक्ष मि. रिचर्ड बाँड यांनी आपल्या चेंबरच्या सहामाही सभेंत त्यांच्या चेंबरचें हिंदुस्थानविषयक जें धोरण सांगितलें त्यांत व सर सॅम्युएल होअरप्रभृतींच्या धोरणांत मुळींच फरक नाही. हिंदुस्थानाला वसाहतीचें स्वराज्य लवकर द्यावें असें मि. बाँड यांचें मत नाही. त्यांनी आपल्या भाषणांत पांढऱ्या खलित्यामधील योजनेलाच सामान्यतः उचलून धरलें आहे. पण पांढऱ्या खलित्यांतील योजनेने हिंदुस्थानांतील कोणत्याहि महत्त्वाच्या राजकीय पक्षाचें समाधान झालेलें नाही. तसेच हीहि गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे कीं, मँचेस्टर चेंबर, कॉटन स्पिनर्स असोसिएशन वगैरे संस्थांचा पाठिंबा म्हणजे कांही सबंध लँकेशायरचा पाठिंबा नव्हे. कारण हिंदुस्थानाला जादा राजकीय हक्क देऊं नयेत असें आग्रहाने सांगणारी कॉटन ट्रेड लीग या नांवाची एक संस्था लँकेशायरमध्ये आहे. मि. मोदी व लँकेशायरचे गिरणीवाले यांचीं बोलणींचालणीं झाल्यावरहि सदर संस्थेच्या वरील धोरणांत फेर पडलेला नाही. लँकेशायरमधील ही परिस्थिति पाहिली म्हणजे लँकेशायरवाल्यांचा उपयोग हिंदी जनतेला आपल्या राजकीय मागण्या ब्रिटिश सरकाराकडून कबूल करून घेण्याच्या कामीं म्हणण्यासारखा होणार नाही असें म्हणावें लागतें.

हिंदुस्थानांत उत्पन्न होणारा आखूड धाग्याचा कापूस लँकेशायर कितपत खरेदी करूं शकेल हेंहि पाहिलें पाहिजे. त्या बाबतींत लँकेशायरच्या इंडियन कॉटन कमिटीचे अध्यक्ष सर रिचर्ड जॅक्सन यांचें मत असें आहे कीं, वरच्या प्रतीच्या हिंदी कापसापासून चांगलें कापड निघूं शकेल; परंतु तो कापूस हिंदुस्थानांत फारच थोडा उत्पन्न होतो. खालच्या प्रतीचा कापूस हिंदुस्थानांत मुबलक मिळण्यासारखा आहे, परंतु कापसाचें सूत कातून कापड विणण्याकरितां लागणारी यंत्रसामुग्री लँकेशायरच्या गिरण्यांपाशीं नाही. मँचेस्टर चेंबरच्या हिंदी विभागाचे अध्यक्ष मि. हॅरोल्ड रोडिअर यांचें म्हणणें असें आहे कीं, हलक्या प्रतीच्या हिंदी कापसापासून बनविलेल्या कापडावर परदेशांत जबर जकाती आहेत; सबब तो कापूस वापरणें तितकेंसें सोयीचें नाही. सर रिचर्ड जॅक्सन व मि. रोडिअर यांच्या वरील उद्गारांवरून एक गोष्ट स्पष्ट होते. ती ही कीं, जोंपर्यंत हिंदी कापूस आखूड धाग्याचाच आहे तोंपर्यंत लँकेशायरकडून म्हणण्यासारखी हिंदी कापसाची खरेदी होणार नाही. सारांश, सद्यःस्थितींत लँकेशायरबरोबर हिंदुस्थानाने तडजोड करण्यापासून हिंदुस्थानाचा कांहीच फायदा होण्यासारखा नाही ही गोष्ट सिद्ध होते.

# पांढरा खलिता व हिंदी प्रतिनिधि

गेल्या गुरुवारीं पार्लमेंटच्या जोडकमिटीच्या हिंदी सभासदांपैकीं बडोद्याचे दिवाण सर कृष्णम्माचारियर, पतियाळाचे दिवाण सर लियाकत हयातखान, म्हैसूरचे दिवाण सर मिर्झा इस्मायल, सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास, सर सी. पी. रामस्वामी अय्यर, मि. गझनवी व डॉ. शफत अहमदखान हे हिंदुस्थानांत परत आले. याच वेळीं सर कावसजी जहांगीर, भाई परमानंद हेहि परत आले. कमिटीपुढील कामासंबंधानें त्यांनी पुढील आशयाचीं मतें व्यक्त केलीं:—

**सर सी. पी. रामस्वामी**—हिंदी लोकांना जबाबदारीचे हक्क मिळूं नयेत असे प्रयत्न चर्चिल, लॉईड जॉर्ज यांनी केले. परंतु श्वेतपत्रिकेंतील मुख्य योजना अमलांत येईल अशी खटपट भारतमंत्री केल्याखेरीज राहणार नाहीत. जातवारीवर रणें फार माजलीं. तीं माजतां जर एकजूट झाली असती तर बरीच प्रगति झाली असती. सर सॅम्युएल होअर यांना हिंदी लोकांना कांहीं द्यावें याविषयीं खरी इच्छा असल्याचें व्यक्त झालें आहे. अर्थात त्यांनाहि मर्यादेबाहेर जातां येत नाही हें उघड आहे.

**सर कृष्णम्माचारी**—संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थान यामधील संबंध सलोख्याचे होतील अशी आशा वाटते. राज्यघटनेचें बिल पास होतांच बरींच संस्थानें फेडरेशनमध्ये सामीलहि होतील यांत शंका नाही.

**नबाब लियाकत हयातखान**—माझा ब्रिटिश न्यायप्रियतेवर पूर्ण विश्वास आहे ! सर सॅम्युएल होअर यांनी हिंदुस्थानच्या वतीने उत्तम काम केलें त्यांत त्यांना यश आल्याखेरीज राहणार नाही. नरेंद्रमंडळातर्फे आम्ही सादर केलेल्या कैफियतीचा सहानुभूतीने विचार होईल व त्यामुळे संयुक्त घटनेंत संस्थानें शिरण्याचें द्वार खुलें होणार आहे.

**डॉ. शफत अहमदखान**—आम्ही मुसलमानांनी एकजुटीने काम केलें. श्वेतपत्रिकेच्या योजनेला तेथे फार विरोध झाला. परंतु भारतमंत्री श्वेतपत्रिकेची योजना अमलांत यावी, याविषयीं फार प्रयत्न करीत असल्याने या विरोधाची विशेष बाधा होणार नाही. हिंदु-मुसलमानांत एकी होऊन उभयतांत एखादा राष्ट्रीय करार झाला असता तर ठीक होतें. परंतु आजच्या परिस्थितींत जातवारीचा निर्णय बदलून घेणें अशक्य आहे. जातवारीच्या निर्णयाप्रमाणें पुढील दहा वर्षांत काय घडामोडी होतात हें पाहूं तर खरें ! आम्ही मुसलमान मात्र मोठ्या संकटांत सांपडलों आहों. तेव्हा देशांत एखाद्या राजकीय पक्षाशीं सहकार्य केल्यावांचून आम्हांला गत्यंतर नाही. जातवारीचा निर्णय आहे असाच राहणार.

**मि. गझनवी**—जातवारीचा निर्णय लावल्यानें एक मोठा विवादाचा प्रश्न नाहींसा झाला. मुसलमानांना तो निर्णय मान्य आहे. हा वाद कमिटीपुढे कांही लोकांनी मुद्दाम उकरून काढला. परंतु आम्ही निर्णयाला मान्यता दिली ती त्यांत पुनः बदल होणार नाही, अशा समजुतीवर दिली ही गोष्ट मुसलमान प्रतिनिधींनी कमिटीस बजावून सांगितली. आम्ही मुसलमान प्रतिनिधींनी एकमतानें काम केलें.

**श्री. एम. के. आचार्य**—श्वेतपत्रिकेंतील सूचना पार्लमेंटानें मान्य केल्यास इंग्लंडचा तोटा होऊन हिंदुस्थानाचेहि कल्याण होणार नाही. त्यामुळे राज्यपद्धतींत कांहीच फरक होणार नाही. श्वेतपत्रिकेंतून स्वराज्य प्राप्त होईल अशी कोणाची कल्पना असल्यास ती त्याची दासवृत्तीच होय !

**सर फेरोज सेठना**—आम्हांला तेथें ब्रि. प्रतिनिधींच्या बरोबरीचा दर्जा मिळाला. परंतु ज्या वेळीं कमिटी आपला अखेरचा रिपोर्ट लिहावयास बसेल त्या वेळीं आम्हांला ब्रि. सभासदांबरोबर बसतां येणार नाही. त्या सभासदांचा रिपोर्ट आम्हांला न पटल्यास आम्हीं आपला स्वतंत्र रिपोर्ट लिहू व तो मुख्य रिपोर्टास जोडला जाईल. भारतमंत्री साक्षीस उभे राहिले ही गोष्ट चांगली झाली. त्यांची चाळीस तास कसून साक्ष घेण्यांत आली. श्वेतपत्रिकेंत सुधारणा व्हाव्या अशी हिंदी प्रतिनिधींची अपेक्षा असल्याची गोष्ट होअरसाहेब जाणतात. परंतु श्वेतपत्रिकेंतील योजना तरी कमी होऊं नये अशा खटपटींत ते आहेत. हिंदी हितविरोधी लोकांनी आपल्या साक्षींत हिंदी आकांक्षांना कसून विरोध केला; परंतु अनुकूल बोलणारेहि कांही निघाले. कमिटीची बैठक ता. ३ आक्टोबर रोजीं पुनः भरेल. त्यावेळीं ब्रि. हिंदुस्थानांतील व संस्थानांतील प्रतिनिधींनी तेथे अवश्य जावयास हवें. सर तेजबहादुर सप्रू हे एक अद्वितीय गृहस्थ आहेत. ते पुनः तेथे जातील तर चांगलें होईल. कमिटीचें काम नोव्हेंबरपर्यंत चालेल. यावेळीं भारतमंत्र्यांची अपुरी साक्ष पुढे चालेल. मँचेस्टर येथील चेंबर ऑफ कॉमर्सची साक्ष व्हावयाची आहे. तेव्हा सर्व सभासदांनी हजर राहणें अगत्याचें आहे.

श्रीमती मुथुलक्ष्मी रेड्डी—अखिल भारतीय महिला संघाने स्त्रियांसाठी एकच मतदारसंघ मागितला. याबाबतींत बऱ्याच प्रतिनिधींनी पाठिंबा दिला असला तरी भारतमंत्र्याच्या कैफियतीवरून जातवारीचा निर्णय कायमच राहणार असें दिसतें. हिंदी लोकांत एकमत होऊन त्यांनी एकमुखानें मागणी केल्यास जबाबदारीचें स्वराज्य मिळणें शक्य आहे. हिंदहितविरोधी असें वाङ्मय तिकडे फार प्रसिद्ध होत आहे व लोकहि तें वाचतात. हिंदी स्वराज्याविरुद्ध मोठी चळवळ केली जात आहे.

सर नृपेंद्रनाथ सरकार—श्वेतपत्रिकेच्यापुढें एक इंच जास्त सुधारणा मिळेल हें शक्य वाटत नाही. कोणाकडून थोडीशी तरी सहानुभूति मिळेल ही आशा व्यर्थ आहे. आपणच आपणासाठी प्रयत्न करावयास हवेत.

# नगर येथील आयुर्वेद–संस्था

## सोळा वर्षांतील प्रगति

गेल्या जन्माष्टमीचे मुहूर्तावर अहमदनगर येथे आयुर्वेदाश्रम औषधीशाळेस लिमिटेड कंपनीचें रूप देण्याचा व आयुर्वेद सेवासंघ ही सोसायटी म्हणून नोंदण्याचा समारंभ नगर येथील पुढारी श्री. फिरोदिया वकील यांचे अध्यक्षतेखाली झाला. १९१७ सालीं नगर येथे सुप्रसिद्ध वैद्य गंगाधरशास्त्री गुणे यांनी आयुर्वेदाच्या उन्नतीसाठी शाळेच्या रूपानें जें कार्य सुरू केले, त्यास अनेक निरलस कार्यकर्ते व उदार साहाय्यक यांची मदत मिळून आज त्या कार्याचा अनेक शाखांचा वाढता वृक्ष बनला आहे. कायदेशीर स्वरूप देण्यांत आलेल्या वरील दोन संस्था या त्याच व्यापक कार्याच्या शाखा होत.

## स्थापना

१९१६ सालीं पुणें येथे जें आयुर्वेद-संमेलन झालें त्यांतील विचार–विनिमयावरून आयुर्वेदशिक्षणाची पद्धतशीर सोय करण्याची आवश्यकता गुणेशास्त्रीबुवांस पटून त्यांनी १९१७ सालीं अक्षय्य तृतीयेच्या मुहूर्तावर कै. माणकचंद मुथा व डॉ. सप्तर्षी यांच्या साहाय्यानें नगर येथे आयुर्वेदविद्यालयाची स्थापना केली. त्या सालीं विद्यालयांत फक्त चार विद्यार्थी व दोन शिक्षक होते. १९२० सालीं तीन वर्षांचा शिक्षणक्रम पूर्ण करून नऊ विद्यार्थी गृहीतायुर्वेद पदवी परीक्षेस बसले व त्यांपैकीं सात चांगल्या रीतीनें उत्तीर्ण झाले. परीक्षकांत नाशिक व पुणें येथील विद्वान वैद्य होते.

१९२१ सालीं असहकारितेच्या चळवळींत नगरयेथील आपला धंदा सोडून वै. प. गुणेशास्त्री अमळनेर येथील राष्ट्रीय शाळेंत आयुर्वेदाध्यापक म्हणून काम करण्यास गेले. पण पुढे सरकारी ग्रँट घेण्याचें तेथे ठरल्यानें तें नापसंत म्हणून इतरांबरोबर शास्त्रीबुवांनीहि अमळनेर सोडलें व ते परत नगरला आले. या वेळेपासून त्यांनी विद्यालयाचे कामांत चांगलें लक्ष घालून तें भरभराटीस आणलें.

## शंभर विद्यार्थी

हल्लीं विद्यालयांत 'आयुर्वेदतीर्थ' या पदवीचा चार वर्षांचा क्रम असून चारी वर्षे मिळून शंभर विद्यार्थी शिकत आहेत. यांत मॅट्रिक व अंडर-ग्रॅज्युएटहि कांहीं आहेत. औंध संस्थानाधिपति श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनी संस्थानांतील वैद्यकीय खात्यांतील डॉ. इंगळे यांना जादा शिष्यवृत्ति देऊन नगरच्या विद्यालयांत आयुर्वेदशिक्षणासाठी पाठविलें आहे.

१९२५ सालीं संस्थेनें ११ एकर जमीन भाडे-पट्ट्यानें घेतली. तींत सध्या संस्थेच्या चार इमारती आहेत. ही जागा १९३१ पासून संस्थेच्या मालकीची झाली आहे. विद्यार्थ्यांस प्रात्यक्षिक शिक्षण मिळावें यासाठी १९२७ सालीं महात्मा गांधी यांचे हस्तें आयुर्वेदीय रुग्णालय (हॉस्पिटल) सुरू करण्यांत आलें असून त्यांत सहा पुरुष व सहा स्त्री रोग्यांची सोय आहे. आधुनिक पद्धतीनें शव-च्छेदनपूर्वक शारीरविज्ञान मिळवण्यासाठी छेदनालयहि विद्यालयास जोडलेलें आहे. १९२४ सालीं विद्यालयांतून उत्तीर्ण झालेल्या कांहीं विद्यार्थ्यांनी स्वार्थत्यागपूर्वक आयुर्वेदसेवेचें ध्येय पत्करून गु. गुणेशास्त्री यांच्या नेतृत्वानें 'आयुर्वेद-सेवा-संघ' नांवाची संस्था स्थापन केली. पुढच्याच सालीं संघानें कांहीं अटींवर शास्त्रीबुवांची औषधीशाळा (कारखाना) हातीं घेतला. संघाच्या सभासदांनीहि त्यांत भांडवल घातलें. कारखान्यांतून होणाऱ्या नफ्यापैकीं निम्मा नफा आयुर्वेदसेवेकडे खर्च करावयाचा व बाकीचा भागिदारांस वांटावयाचा ही अट आजतागायत कारखान्यांत पाळली जात आहे.

## संस्थेचा कल्पवृक्ष

१९२५-२६ सालीं कारखान्यांतील औषधविक्री ४००० रु.ची झाली. ती वाढत जाऊन १९३१--३२

सालांत विक्रीचा आंकडा चौपन हजारांचे घरांत गेला आहे. १९२५ सालीं विद्यालयांतील शिक्षकांचा पगार व विद्यालयाच्या धर्मार्थ दवाखान्यासाठीं औषधांचा खर्च विद्यालयसंस्थेने केला. पण पुढील वर्षी विद्यालयाच्या तीन धर्मार्थ दवाखान्यांना संघाच्या कारखान्यानें औषधें पुरविलीं व २७ सालीं विद्यालयाच्या शिक्षकांचा पगार संघांतून खर्ची पडूं लागला. व तो आज तागायत चालू आहे. १९२९–३० सालीं २७७७रु.ची मदत संघाकडून विद्यालयास लाभली. विद्यालयाच्या वसतिगृहाची इमारत संघाकडूनच विद्यालयास बक्षीस मिळाली आहे. संस्थेच्या दोन धर्मार्थ दवाखान्यांत रोज ८० ते १०० रोग्यांना औषधोपचार केला जातो.

### २५ हजारांचे भाग

गेल्या जन्माष्टमीस कारखान्याला प्रायव्हेट लिमिटेड कंपनीचें रूप देण्यांत आल्याचें जाहीर करण्यांत आलें. आयुर्वेदसेवासंघाचे ११ सभासद यापूर्वी कारखान्याचे भागीदार होते व कारखान्याचें भांडवल ६५ हजार रुपये होतें. नवीन स्वरूप देण्याचे वेळीं पंचवीस हजारांचे शेअर्स घेण्याचीं अभिवचनें मिळालीं. अहमदनगर येथील सरकारी वकील रा. ब. आप्पासाहेब देशमुख यांनी एक हजार रु. चे शेअर्स घेण्याचें आश्वासन समारंभाचे वेळीं दिलें. यावरून संकल्पाप्रमाणें कारखान्याचें भांडवल एक लाख रुपये होण्यास अडचण पडणार नाही. नफ्यापैकीं निम्मा नफा आयुर्वेदसेवेकडे खर्च करावयाचा हा नियम कायम असून शिवाय भागिदारांस सहा टक्क्यांपेक्षा अधिक नफा न देतां तोहि आयुर्वेदसेवेकडेच खर्च करावयाचा असें ठरलें आहे.

'आयुर्वेदविद्यालय' हें पूर्वीपासूनच नोंदलेलें आहे. त्याच्याच जोडीला कारखाना व संघ या दोन नोंदलेल्या संस्था झाल्या. त्या एकमेकांस पूरक व पोषक अशाच आहेत. यापुढे औषधींचा बाग, काष्ठौषधिसंग्रह, सिद्धौषधींचा कारखाना, रसायनशाळा व मासिक पुस्तक इत्यादि अनेक उपांगें संघाला सुरू करावयाचीं आहेत. रुग्णविज्ञान शाळा ( क्लिनिकल लेबोरेटरी ) संघाने नुकतीच सुरू केली आहे. आयुर्वेदिक औषधांच्या परिणामासंबंधीं शास्त्रीय परीक्षण या रुग्णविज्ञानशाळेंत होते. वरील सर्व उपांगांनीं पूर्ण होण्यास संघाला सर्वांनी मदत देणें जरूर आहे. आयुर्वेदप्रेमी धनिकांनी मोठ्या प्रमाणांत मदत केल्यास हीं कार्यें हातीं घेतां येतील.

# व्हिएन्नांत प्रो. देवधर

### हिंदी संगीतावर व्याख्यान

मुंबई येथील "स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक" ह्या संस्थेचे संस्थापक प्रो. बी. आर.देवधर, इटाली देशांत फ्लॉरेन्स येथे भरलेल्या "आंतरराष्ट्रीय संगीत परिषदेसाठीं", हिंदी प्रतिनिधि म्हणून हजर राहण्याकरिता युरोपमध्ये आले आहेत. परिषद आटोपून ते आता निरनिराळ्या देशांत प्रवास करून, येथील प्रमुख संगीत संस्थांतील शिक्षणपद्धतींचा अभ्यास करीत आहेत. प्रत्येक ठिकाणीं हिंदी संगीतावर व्याख्यानें व जलसे करून, ते येथील लोकांत हिंदी संगीताची अभिरुचि उत्पन्न करीत आहेत. गेल्या जून महिन्यांत व्हिएन्ना येथील "इंटर नॅशनल सोसायटी फॉर कॉंटेंपोररी म्यूझिक" ह्या संस्थेने त्यांचें व्याख्यान व जलसा केला. जलशास दे. भ. सुभाषचंद्र बोस हे बऱ्याच हिंदी विद्यार्थिगणासह हजर होते. प्रो. देवधर यांनी इंग्लिशमध्ये भाषण केलें, व तें श्रोत्यांकरिता मिसेस पिस्क यांनी जर्मन भाषेंत सांगितलें. त्यांच्या व्याख्यानाचा मथितार्थ पुढीलप्रमाणें आहे—

### संगीतकलेचा इतिहास

"हिंदी संगीतकला ही जगांतील अत्यंत जुनी कला आहे. ख्रिस्ती शतकापूर्वी बरींच शतकें लिहिल्या गेलेल्या वेदांत या कलेचा निर्देश केला आहे. प्राचीन पुराणें, 'रामायण' व 'महाभारत' यांतहि त्या काळचे राजे लोक व सामान्य जन संगीतकला अत्यंत पूज्य मानून तिचा आस्थेने अभ्यास करीत असल्याचे दाखले आहेत. सर्वांत जुना ग्रंथ 'भारतनाट्य' हा आता उपलब्ध आहे व त्या ग्रंथांत मुख्यत्वेंकरून नाट्यकलेचें वर्णन असलें तरी एक भाग संगीतकलेवर आहे, व तज्ज्ञांच्या मतें ह्या ग्रंथाचा काल इसवीसनपूर्व पांचवें शतक आहे. त्यानंतरचा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे तेराव्या शतकांतील सारंगदेवाने लिहिलेला "संगीत रत्नाकर." ह्या ग्रंथांत बऱ्याच जुन्या ग्रंथांचे आधार दिले आहेत. पण ते ग्रंथ आज सांपडत नाहीत. सारंगदेवानंतर लिहिले गेलेले लहानमोठे ग्रंथ सांपडले आहेत. मुसलमान लोकांनीं हिंदुस्थानांत वसाहत केल्यानंतर त्यांचें लक्ष आमच्या

संगीतकलेकडे गेलें. त्यांना आमची कला फारच आवडली व ते तिचा आस्थेने अभ्यास करूं लागले, पण त्यांना संस्कृत भाषेंत असलेलें शास्त्र मिळालें नाही. त्यामुळेच त्या कालांत शास्त्र व कला यांची फारकत झाली. कलेला मुसलमान लोकांनी नवें वळण दिलें. सम्राट् अकबराच्या कारकीर्दींत बरेच नवे राग प्रचारांत आले, व नवी पद्यरचना सुरू झाली. ध्रुपद व धमार गायन अत्यंत लोकप्रिय झालें. पण १८ व्या शतकांत ' सदारंग '' ' अदारंग ' ह्यांनी ख्यालरचना केली, व आता तर ' ध्रुपद ' ' धमार ' यांचें गायन जवळ जवळ नष्टच झालें आहे.

### इंग्रजी राज्यांत

हिंदुस्थान इंग्रज लोकाच्या ताब्यांत आल्यावर तर राजाश्रय अजिबात गेला व ह्या कलेस वाईट दिवस आले. १९ व्या शतकांत फारशी नवी रचना झालीच नाही. पण विसाव्या शतकांत राजकीय चळवळीबरोबरच, ह्या कलेंतहि नवें चैतन्य सुरू झालें. कै. गु. पंडित विष्णु दिगंबर यांनी अनेक वेळां हिंदुस्थानांत प्रवास करून ह्या कलेची अभिरुचि लोकांत उत्पन्न केली. शेंकडों विद्यार्थी स्वखर्चानें शिकवून, त्यानीं त्यांना कलेच्या प्रसारासाठीं हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांत पाठविलें. पंडित वि. ना. भातखंडे यांनी प्रचारांत असलेल्या कलेचा अत्यंत बारकाईने अभ्यास करून, आधुनिक पद्धतीवर नवें शास्त्र लिहिलें. बऱ्याच विश्वविद्यालयांतहि ह्या कलेचा समावेश झाला आहे, व नवी पद्यरचना सुरू झाली आहे."

### हिंदी व पाश्चात्य कला

ह्यानंतर प्रो. देवधर यांनी हिंदी संगीतकलेचा पाया जे ' राग ' त्यांची रचना कोणत्या तत्त्वावर झाली आहे हें सांगून हिंदी व पाश्चात्य संगीतामधील ठोकळ फरक सांगितले.

( १ ) हिंदी संगीतकला 'मेलडी' ( एकामागून एकच स्वर येणें ) ह्या तत्त्वावर असून पाश्चात्य संगीताची वाढ 'हार्मनी' ( एका वेळीं अनेक स्वर वाजविणें ) ह्या तत्त्वावर झाली आहे.

( २ ) प्रत्यक रागास एक ठराविक रस व भावना असते, आणि तो राग गात असतां गायन संपेपर्यंत, एकच रस हिंदी गवयास कायम ठेवावा लागतो. हिंदी संगीतकलेचें वैचित्र्य निरनिराळ्या रागांत आहे.

पाश्चात्य संगीतांत हें बंधन नाही, व त्यामुळे एकाच गायनांत वैचित्र्य निर्माण करतां येतें.

( ३ ) पाश्चात्य संगीतांत आमच्या रागासारखे कांही प्रकार ( Scales ) दोनच ( Minor and Major Scales ) आहेत, तर हिंदी संगीतांत प्रचारांत असलेल्या रागांची ( Scales ) संख्या १०० वर आहे.

(४) हिंदी संगीतांत श्रुतिसहित ( quarter tones ) स्वरांची संख्या २२ आहे व युरोपियन सप्तकांत १२ स्वर आहेत.

( ५ ) हिंदी संगीतांत ' गमक ' " मींड " ' घसीट ' ( grace notes ) हे अवश्य विभाग आहेत, तर ते पाश्चात्य संगीतांत कधी कधी शोभेसाठीं ( ornamentation ) येतात.

(६) हिंदी तालरचना कवितेच्या यमकावर झाली आहे, व पाश्चात्य तालरचना शब्दांच्या जोरावर (accent) झाली आहे. पाश्चात्य तालविभाग, अथवा आवर्त २, ३ किंवा ४ मात्रांचा असतो, तर एकाच हिंदी तालविभागांत ७-९-१४ इतक्या मात्रा असून त्यांचे पोटविभाग २-३-४ तत्त्वावर असतात, आणि ह्याच कारणामुळे पाश्चात्यांना आमची तालपद्धति अत्यंत अवघड वाटते व समजत नाही.

( ७ ) पाश्चात्य देशांत ज्याला गवई व्हावयाचें असतें त्याचें काम फक्त आवाज तयार करणें येवढेंच असतें. एकदा आवाज चांगला तयार झाला कीं, त्याला संगीतरचनाकाराने ( Composers ) लिहिलेलीं गाणींच गावयाचीं असतात व चांगल्या तऱ्हेने लिहिलें तेवढें गाइलें कीं झालें. पण हिंदी संगीतांत, गवयाला शेंकडों रागांचे नियम शिकावे लागतात, त्यानंतर हजारों चिजा पाठ कराव्या लागतात. पण येवढ्यानेच भागत नाही, तर रागविस्तार, व रागाची सुंदर मांडणी, स्वतःच्या बुद्धीनेच त्याला करावी लागते; तर पाश्चात्य गवयास स्वतःच्या बुद्धीची इतकी ओढाताण करण्याची मुळीच जरूर नसते.

व्याख्यानानंतर प्रो. देवधर यांनी " ध्रुपद " व " धमार "च जुनें गाणें तंबोऱ्यावर गाऊन दाखविलें. नंतर कांही " ख्याल " पद्धतींतील चिजा गाइल्या, व एक तराणा गाऊन दाखविला. तराणा लोकांना इतका आवडला कीं तो तीन तीनदा गावा लागला. त्यानंतर प्रो. देवधर यांनी बरोबर आणलेली " ग्रामोफोन रकॉर्डस " वाजवून दाखविली, व तीहि श्रोत्यांना फारच आवडलीं.

येथील प्रमुख वर्तमानपत्रांनी प्रो. देवधर यांच्यावर बरेच लेख लिहिले आहेत. पण मुख्यत्वेंकरून डॉ. वेलेज, व्हिएन्ना विश्वविद्यालयाचे संगीत अध्यापक, डॉ. पिस्क, एक अत्यंत नांवाजलेले कंपोजर व डॉ. स्टीफन येथील प्रमुख संगीत टीकाकारें (Music Critic) यांच्या लेखांचें महत्त्व फार आहे.

येथील रेडिओने प्रो. देवधरांना मुद्दाम आमंत्रण देऊन त्यांचा कार्यक्रम ता. ३ जुलै रोजीं केला. एकंदरींत येथील लोकांवर हिंदी संगीताबद्दल फारच अनुकूल ग्रह करून देण्याचें श्रेय, प्रो. देवधरांना आहे. प्रो. देवधर हे पहिलेच महाराष्ट्रीय संगीतज्ञ युरोपांत आले आहेत, व ते इतर देशांत जाऊन असेंच कार्य करणार आहेत.

# ग्रामोद्धाराचें सरकारी अवडंबर

खेड्यांतील जनतेची स्थिति सुधारण्याकडे पुढाऱ्यांचें लक्ष बरींच वर्षें लागलें आहेच; परंतु आता सरकारासहित्या चळवळींचें महत्त्व पटत चाललें आहे हें सुचिन्ह होय. मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साईक्स यांनी सुमारें तीन आठवड्यांपूर्वी मुंबई कायदे-कौन्सिलांत भाषण करून यासंबंधाची आपली एक योजना लोकांपुढे मांडण्याचें आश्वासन दिलें होतें. त्याप्रमाणे रविवार ता. २७ रोजीं लोकल सेल्फ-गव्हर्मेंट इन्स्टिटयूटची सभा स्थानिक स्वराज्यखात्याचे दिवाण सर रस्तुम वकील यांच्या अध्यक्षतेखालीं येथे भरली, त्या वेळीं ना. गव्हर्नर यांनी भाषण करून आपल्या योजनेचें स्वरूप परिषदेच्या प्रतिनिधींस समजावून सांगितलें. खेडेगांवांची स्थिति सर्व बाजूंनी बिघडलेली असल्यामुळे ती सुधारण्याकरिता जितके उपाय योजावे तितके थोडेच आहेत. खेड्यांत योग्य ज्ञानाचा प्रसार झाला पाहिजे; तेथील लोकांना स्वच्छतेचें महत्त्व कळून त्या प्रकारचें वळण लागलें पाहिजे; त्यांच्यांत उपयुक्त वाचनाची अभिरुचि वाढली पाहिजे; रिकामपणाचा काळ आळसांत न घालवितां खेड्याच्या परिस्थितींत शक्य ते फायदेशीर उद्योग करण्यास त्यांनी उत्साहाने झटलें पाहिजे; देशाच्या राज्यपद्धतीचें स्वरूप लक्षांत घेऊन तदनुरूप वागण्यास त्यांनी शिकलें पाहिजे, आणि नवीन शोधांची माहिती मिळवून तिच्या अनुरोधाने शेतीच्या व अन्य व्यवसायांत फेरबदल करण्यास सिद्ध झालें पाहिजे; इत्यादि त्यांच्या सुधारणेचे किती तरी मार्ग सांगतां येतील.

हें कार्य फार व्यापक, बिकट व बऱ्याच अंशीं नवीन असल्याकारणाने खेड्यांतील रहिवाशांना तें केवळ स्वावलंबनानेच साधेल असें नाहीं. त्यांनाहि या कार्याची अंधुक कल्पना आलेली आहे. परंतु तें आपल्या शक्तीबाहेरचें आहे या समजुतीने हताश होऊन ग्रामस्थ स्वस्थ बसल्यासारखे दिसत आहेत. ग्रामस्थांची ही शोचनीय अवस्था नजरेस आल्यावरून शहरांतील कित्येक प्रमुख समाजहितचिंतकांनी खेड्यांतील बांधवांना आपल्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा देऊन त्यांची सुधारणा घडवून आणण्याचें कार्य स्वार्थत्यागपूर्वक चालविलें आहे. पुणें शहर म्युनिसिपालिटीचे चीफ ऑफिसर रा. भागवत व त्यांचे सहकारी यानी पुण्याजवळील ताथवडें या गांवीं आपल्या कल्पनेप्रमाणे ग्रामसुधारणेचा एक प्रयोग गेलीं दोनतीन वर्षें सुरू ठेवला असून त्या कामीं त्यांनी हौसेने बरीच झीजहि सोसली आहे. सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे अध्यक्ष रा. गोपाळ कृष्ण देवधर यांनी डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशनमार्फत खेड-शिवापूर येथे हेंच कार्य हातीं घेतलें आहे. आपल्या या प्रयत्नास सेवासदनाचीहि जोड देऊन खेड-शिवापुरांतील स्त्री-पुरुषांत ते जागृति उत्पन्न करीत आहेत. त्यांनी तेथे प्रौढ स्त्री-पुरुषांकरिता शिक्षणाचे वर्ग काढले, वाचनालय स्थापन केलें, औषधपाणी पुरविलें, आखाडा उघडला, विणकाम शिकविलें, शेतकऱ्यांकरिता लोखंडी नांगर भाड्याने ठेवले, निकोप बींविक्रीचें दुकान घातलें आणि सेवासदनांतील स्त्रियांनी शिवापूरच्या स्त्रियांत मिसळून त्यांच्या गृहकृत्यांत व सामाजिक चालीरीतींत फेरफार घडवून आणण्याची खटपट केली.

सातारा जिल्ह्यांत रा.ब. काळे, रा. किर्लोस्कर इत्यादिकांना ग्रामोद्धाराचें महत्त्व पटलें असून ते व इतर कार्यकर्ते दरसाल परिषदेच्या निमित्ताने एकत्र जमतात व एकमेकांचे अनुभव पड-

तपासून पाहून पुढील मार्ग निश्चित करतात. अशा कार्यकर्त्यांची एक सभा थोड्याच दिवसांत कवलापूर येथे भरण्याचें ठरलें आहे. त्यावरून या कार्याची आस्था समाजांतील स्वार्थत्यागी व कर्तृत्ववान माणसांना किती वाटत आहे याची कल्पना कोणासहि सहज होणारी आहे परंतु या सर्व प्रयत्नांत साधनसामुग्रीच्या दृष्टीने शिवापूरचा प्रयत्न अधिक व्यापक समजणें योग्य ठरेल. तो प्रयत्न तीन वर्षें चालविल्यानंतर रा. देवधर यांनी त्यापासून काढलेला निष्कर्ष लक्षांत घेण्यासारखा आहे. त्यांच्या मतें परस्थांनी खेड्यांतील लोकांना मदत करण्याची सीमा इतकीच कीं, त्यांच्या खटाटोपाने खेड्यांतील लोकमत जागृत व्हावें व त्यांचे स्थानिक पुढारी त्यांच्यांतूनच पैदा होऊन त्यांनी ग्रामोद्धाराचें काम शिरावर घेण्यास पुढे यावें. रा. देवधर यांनी काढलेला हा निष्कर्ष अगदी योग्य असून शहरवासीयांच्या प्रयत्नांची मजल इतकीच होय यांत शंका नाही. कारण ग्रामोद्धाराचें काम एवढें मोठें व अमर्याद आहे कीं, तें कधीच संपावयाचें नाही. जोंपर्यंत जगाच्या पाठीवर गावें आहेत तोंपर्यंत त्यांच्या उद्धाराचें काम चालावयाचेंच.

तसें म्हटलें तर शहरांचा उद्धार तरी कोठे पुरा झाला आहे? शहरांत दारिद्य आहे, बेकारी आहे, अज्ञान आहे, गलिच्छ राहणी आहे, सर्व कांही आहे. शहरें व खेडीं यांत फरक हाच कीं, शहरांत उणीवा असल्या तरी त्याजबरोबर झगडण्याची बुद्धि शहरवासीयांत आहे, पण ती ग्रामवासीयांत नाही. ही बुद्धि ग्रामस्थांत जागृत करून त्यांस आपल्या परिस्थितीशीं टक्कर द्यावयास शिकविणें हेंच कार्य महत्त्वाचें असून तें शहरांतील लोकांनी पार पाडलें म्हणजे त्यांनी आपलें कर्तव्य बजावलें असें समजण्यास हरकत नाही. गव्हर्नरसाहेबांनीहि आपल्या भाषणांत ग्रामोद्धाराचें हेंच इंगित सांगितलें. त्यांचें म्हणणें असें कीं, खेडुवळांना आपल्या हीन परिस्थितीविषयी असंतोष उत्पन्न झाला पाहिजे. तो असंतोष त्यांच्यांत उद्भवला कीं, ते स्वावलंबी बनून आपली स्थिति सुधारण्याच्या मार्गास लागतील.

आत्मोद्धाराची ही भूक निर्माण करणें व ती अनेक साधनांनी शमविणें या दोनहि क्रिया पुष्कळ अंशीं एकट्या सरकारालाच सुसाध्य आहेत, इतरांना नाहीत. उदाहरण, आकर्षण, प्रचारकार्य व संघस्थापना हे ग्रामोद्धाराचे चतुर्विध उपाय गव्हर्नरांनी सांगितले आहेत. या उपायांच्या अंमलबजावणीचें ग्रामपंचायत हें एक साधन आहे. पण तें इतकें लहान व अपुरें आहे कीं, त्यावर अवलंबून राहण्यात अर्थ नाही. यासाठी ग्रामोद्धाराची मुख्य जबाबदारी गव्हर्नरांनी कलेक्टर, असिस्टंट कलेक्टर, मामलेदार व पाटील या मुलकी अधिकाऱ्यांवरच टाकली असून त्यांनी सरकारी आरोग्यखातें, शाळाखातें, शेतकीखातें इत्यादि अठरा कारखान्यांची मदत घेऊन ग्रामोद्धाराची चळवळ चालवावी असें सुचविलें आहे. त्या अधिकाऱ्यांच्या माहितीकरिताहि एक मॅन्युएल बनविण्याची त्यांनी शिफारस केली आहे. गव्हर्नरसाहेबांनी रेखाटलेलें हें चित्र बरेंच मनोवेधक असून त्याप्रमाणे मुलकी अधिकाऱ्यांनी वागण्याचें ठरविलें तर पतपेढ्यांचें महत्त्व पतपेढ्यांचे कामगार गांवीं जाऊन ग्रामस्थांना सांगतील, शेतसुधारणेचे धडे शेतकी-खात्याचे अंमलदार देतील, आरोग्याचें महत्त्व सरकारी डॉक्टर शिकवितील व खेड्यांत राहून करावयाच्या धंद्यांचें ज्ञान औद्योगिक खातें देईल.

पण ही आवळ्यांची मोट कोण कशी बांधणार हा मुख्य प्रश्न आहे. मुलकी अधिकारी बहुधा इतके चढेल व स्वतःच्या कामांत गुर फटलेले असतात कीं, दौऱ्यावर गेल्यानंतर ग्रामस्थांना कळकळीने बोलावून त्यांच्या गरजा समजून घेण्याची फिकीर ते सहसा करणार नाहीत. त्यातून एखादा हौशी अंमलदार भेटलाच तर त्याला तितकी फुरसत सांपडणार नाही. यासाठी ही कामगिरी प्रत्येक जिल्ह्याला ऑर्गनायझर नेमून त्यांजवरच सोपविण्यांत आली पाहिजे. गव्हर्नर ऑर्गनायझरची योजना करण्यास तयार आहेत. तथापि त्यांना हा ऑर्गनायझर ब्रिन-

पगारी हवा. पण ऑर्गनायझरचें काम सर्व खात्यांतील अधिकाऱ्यांचें सहकार्य मिळविण्याचें असल्याने तितकी पात्रता अंगीं असणारा व जबाबदारीची जाणीव बाळगणारा आस्थेवाईक ऑर्गनायझर सरकारास केव्हाहि फुकट मिळणार नाही. तो पगारीच असला पाहिजे, व असा एक मनुष्य प्रत्येक जिल्ह्यांत नेमल्यावांचून गव्हर्नरसाहेबांची ही ग्रामोद्धाराची योजना यशस्वी होणार नाही. पंचवीस हजार रुपयांची रक्कम या कार्यासाठी पुढील सालाच्या बजेटांत मुंबई सरकार खर्ची घालणार आहे. ही रक्कम अगदी थोडी आहेच, पण तीहि ऑर्गनायझरकरिता नाही असें गव्हर्नरसाहेब बजावून सांगत आहेत. ग्रामोद्धाराचें कार्य सरकार अशा रीतिने वाऱ्यावर सोडून देणार असेल तर त्यापासून तादृश फायदा नसून गव्हर्नरसाहेबांनी आपल्या कारकीर्दीच्या अखेरीस फुकटचा भलेपणा मिळविण्याकरिता हें एक पोकळ अवडंबर उभें केलें आहे असेंच म्हणावे लागेल.

# स्फुट सूचना

१ मद्रासचे श्रीमान कारखानदार सर षण्मुखं चेट्टी हे सांप्रत इंग्रज सरकाराच्या नाकाचे बाल होऊन बसले आहेत. ओटावा परिषदेस गेल्यापासून त्यांचें दैव फळफळलें. त्यांना लवकरच ले. असेंब्लीचे अध्यक्षपद लाभलें व आता तर ते सर या पदवीने विभूषित झाले आहेत. अशा रीतीने सरकारी कृपाछत्राच्या सुखद सावलीत शिरल्यानंतर त्यांना बड्या सरकारी अधिकाऱ्यांचीं स्तुतिस्तोत्रें आठवावीं यांत काय नवल ? सर षण्मुखं चेट्टी यांना गेल्या सोमवारीं व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन व लेडी विलिंग्डन यांजकडून बडा खाना देण्यांत आला. त्या वेळीं त्यांनी व्हाइसरॉयांचे अघळपघळ गोडवे गाइले व भावी राजकीय सुधारणांचाहि खल केला. तो करीत असतां व्हाइसरॉयांस न खुपेल अशा रीतीने पांढऱ्या खलित्यांतील दोष दाखविण्यांत त्यांचा दरबारीपणा चांगलाच खुलून दिसला. पांढरा खलिता म्हणजे डोमिनियन स्टेटसची सनद नव्हे ही कबुली चेट्टी यांनी दिली, ही एक मेहरबानीच समजली पाहिजे. कारण त्यानंतर त्यांच्या भाषणाचा वळलेला ओघ पाहिल्यास त्यांना खुष्मस्कऱ्याच्या सदरांत घालावेंसें प्रत्येकाला वाटेल! हिंदुस्थान व जपान यांजमध्ये कापडासंबंधाने लवकरच बोलणें व्हावयाचें आहे; हें बोलणें पूर्ववहिवाटीप्रमाणे परभारें इंग्लंडांत व्हावयाचें तें न होतां सिमल्यांत होणार ही हिंदुस्थानाची राजकीय दर्जाच्या दृष्टीने मोठीच प्रगति झाली असें चेट्टी यांनी सांगितलें.

---

२ चेट्टी यांचें दुसरेंहि विधान असेंच तोंडपुजेपणाचें होतें. गव्हर्नर-जनरलास नवीन घटनेंत जुलमी व अनियंत्रित सत्ता लाभणार हें चेट्टी यांना कबूल आहे. परंतु त्या सत्तेचा उपयोग न करता गव्हर्नर-जनरलाने ती गंजूं दिल्यास हिंदुस्थानाचा जो राज्यकारभार चालेल त्यांत व डोमिनियन स्टेटसमध्ये कांहींच फरक उरणार नाही असें चेट्टी यांनी बिनदिक्कत सांगून टाकलें आहे. तोंडपुजेपणाची कमाल याहून अधिक ती काय व्हावयाची उरली? व्हाइसरॉयांचें भाषण चेट्टी यांजपेक्षा वस्तुस्थितीस अधिक धरून होतें. नवीन सुधारणांविषयी सरकारी अधिकारी व जनता हीं उभयतां आपापल्या ठिकाणीं संशयग्रस्त व निरुत्साही असून त्यांतच मंदीची भर पडल्यामुळे सर्वत्र निराशा पसरली असल्याचें व्हाइसरॉयांस दिसत आहे. इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानसरकाराने आर्थिक धोरण स्वीकारलें आहे तें कितपत फायदेशीर आहे याविषयींहि त्यांना संशयच वाटत आहे. व्हाइसरॉयांनी भाषणाच्या आधांत डोमिनियन स्टेटसचा उल्लेख करतांच श्रोत्यांनी टाळ्या पिटल्या. ते म्हणाले 'हिंदुस्थानाची राजकीय प्रगति होत होत तिचें पर्यवसान जबाबदारीचें स्वराज्य, होमरूल अगर डोमिनियन स्टेटस यांमध्ये व्हावें असेंच आमचें धोरण आहे. ब्रिटिश वसाहतींचा दर्जा हिंदुस्थानाला प्राप्त व्हावा असें मी आपल्या भाषणांत अनेकवार म्हटलेंहि आहे !' परंतु व्हाइसरॉयांच्या या शब्दांत हुरळून जाण्यासारखे कांहीच नाही. कारण कालान्तराने हिंदुस्थानास डोमिनियन स्टेटसच काय पण स्वातंत्र्यहि मिळेल हें सांगावयाला व्हाइसरॉय कशाला पाहिजेत ? प्रश्न आहे तो आज डोमिनियन स्टेटस मिळेल कीं नाही याबद्दलचा आहे.

---

३ देशांतील राजकारण सांप्रत अगदी कोंडल्यासारखें झालें आहे. ती कोंडी फोडण्याचा प्रयत्न ज्याने त्याने देशहितावर नजर देऊन कोणाची

भीडभाड न धरतां प्रामाणिकपणानेच केला पाहिजे. मुंबईचे बॅ. जम्नादास मेहता हे याच वर्गांतील गृहस्थ होत. त्यांनी आपणास कायदेभंगाची चालू चळवळ पसंत नसल्याचें पूर्वी अनेकवार जाहीर रीतीनें बोलून दाखविलेंच आहे. गेल्या आठवड्यांत मुंबईस त्यांचें 'सद्यःस्थिति'या विषयावर व्याख्यान झालें, त्या वेळीं त्यांनी आपली हीच विचारसरणी श्रोत्यांपुढे मांडली. कांहीं प्रसंगीं हिंदी लोकांस सरकाराबरोबर असहकारिता करावी लागेल व कायदे मोडणेंहि भाग पडेल परंतु हेंच धोरण सदासर्वकाळ जर राष्ट्रानें स्वीकारलें तर राष्ट्राची प्रगति खुंटल्यावांचून राहणार नाही. बॅ. मेहता यांनी आपल्या भाषणांत हाच मुद्दा डोळ्यांपुढे ठेवून कायदेमंडळें काबीज करण्यावर भर दिला. कायदेमंडळांप्रमाणेच म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डें व ग्रामपंचायती हींहि कारभाराचीं केंद्रें असल्यामुळे तींहि हस्तगत करण्याचा त्यांनी उपदेश केला. असहकारिता व कायदेभंग या चळवळींना उपयुक्ततेपेक्षा सांप्रदायिकपणाचेंच स्वरूप सांप्रत आलें आहे. तें जाऊन जनतेनें आपला राजकीय व्यवहार व्यावहारिक पद्धतीनें पाहावयास लागलें पाहिजे. असा आमच्याप्रमाणेच रा. जम्नादास मेहता यांचाहि आग्रह आहे. त्यांच्याप्रमाणेच आपलीं मतें निर्भयपणानें मांडणारे जितके लोक पुढे येतील तितके देशहिताच्या दृष्टीनें इष्टच आहे.

# साताऱ्यांतील एक नमुनेदार संस्था

## शाहू बोर्डिंग हाऊस

अस्पृश्योद्धाराच्या चळवळीला आज कशा प्रकारचा विरोध होत आहे हें पाहिलें म्हणजे पंचवीस वर्षांपूर्वी अशी चळवळ करणाराला किती विरोध सहन करावा लागला असेल याची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे. परंतु साताराचे श्री. भाऊराव पाटील ऐतवडेकर यांची ध्येयनिष्ठा जबर; त्यांनी कसल्याहि विरोधास भीक न घालतां आपलें कार्य चिकाटीनें व नेटानें अप्रतिहत सुरूच ठेवलें. कोणत्या संस्थेचा आधार नाही, पाठीशीं फंड नाही, समाजांत विरोध, मदतगार नाहीत! अशा एकाकी स्थितींत श्री. भाऊराव पाटील यांनी धीरानें जें एकदां पाऊल पुढे टाकलें तें कायमचेंच.

प्रथम प्रथम त्यांनी हरिजन विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति देऊन, त्यांना स्वतः शिकवून कार्यारंभ केला व हेंच कार्य पुढे वाढूं लागलें. तेव्हा त्यांनी स. १९२४ सालीं विद्यार्थ्यांसाठी एक बोर्डिंग स्थापन केलें. श्री. भाऊरावांच्या योजनेला हंसणारे लोक तेव्हा कांही कमी नव्हते व त्यांचा हा प्रयत्न म्हणजे वाऱ्याची मोट बांधण्याप्रमाणें आहे अशीहि टीका प्रारंभीं झाली. कोणत्याहि संस्थेला प्रारंभीं अशींच विघ्नें येतात. परंतु कार्यकर्ता निष्ठावंत असला तर विघ्नांना दूर सारून किंबहुना त्यांना राबवून आपल्या लगामीं लावून कसा घेतो ही गोष्ट कोणास पाहावयाची असल तर त्यांनी सातारा येथे श्री. भाऊराव पाटील यांनी स्थापन केलेलें 'श्रीछत्रपति शाहू बोर्डिंग हौस' एकवार अवश्य पाहावें. कोणत्याहि जातीच्या विद्यार्थ्यानें भेदाभेद न मानतां आपण सर्व बंधूच आहोंत असें मानून आपलें वर्तन ठेवलें पाहिजे हें या बोर्डिंगचें ब्रीदवाक्य आहे. शारदामंदिरांत भेदाभेद नाही, तिची उपासना करणारा, मग तो समाजाच्या दृष्टीनें कोणत्याहि जातीचा व पंथाचा असो, त्याला तेथे मज्जाव नाही हें या बोर्डिंगचें धोरण आहे. संस्था सन १९२४ सालीं स्थापन झाली व तिचा प्रस्तुतचा नामकरण समारंभ म. गांधींच्या करवीं ता २५ फेब्रुवारी सन १९२७ रोजीं झाला.

## विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय

या बोर्डिंगमध्ये अगदी प्राथमिक शिक्षण घेणारापासून तों एम. ए. चा अभ्यास करणारापर्यंत, सात वर्षें वयापासून तों २५ वर्षे वयापर्यंत, अनाथ निराश्रितापासून तों समाजांतील इभ्रतदार अशा कुटुंबांतील मुलापर्यंत, सुमारें १५० विद्यार्थ्यांचा आज समावेश झालेला आहे. साताऱ्याच्या बोर्डिंगमध्ये सुमारें १३५ विद्यार्थी आज राहत आहेत. त्यांत सर्वांत जास्त संख्या अस्पृश्य म्हणून मानल्या जाणाऱ्या वर्गांतील विद्यार्थ्यांची म्हणजे महार, मांग, चांभार, रामोशी, वडार यांची आहे. त्याच्या खालोखाल मराठे व तत्सम जातींतील विद्यार्थी व त्यापेक्षाहि कमी पुढारलेल्या वर्गांतील व मुसलमानांची आहे. संस्थेच्या आश्रयानें प्राथमिक अभ्यासक्रम पुरा करून उच्च शिक्षण घेणारांची सोय साताऱ्यास होण्याजोगी नसल्यानें कॉलेजशिक्षण घेणाऱ्या सुमारें १४ विद्यार्थ्यांसाठी पुण्यास नुकतेंच एक बोर्डिंग सुरू करण्यांत आलेलें आहे. विद्यार्थ्यांचा प्रातर्विधि होतांच सर्वांनी स्नान व व्यायाम केलेच पाहिजे, असा सक्तीचा नियम असल्यानें नियमितपणा, स्वच्छता व आरोग्य या गोष्टी आपोआप साधल्या जातात. विद्यार्थी गांवांतील वेग-

वगळ्या शाळांत शिकत असतात, व ज्यांचा अभ्यासक्रम पुरा झाला आहे अगर वरच्या वर्गांत जे विद्यार्थी आहेत ते फावल्यावेळीं आपल्या खालच्या वर्गांतील मुलांना बोर्डिंगमध्ये शिकवीत असतात. बोर्डिंगमधील सर्व कामें, स्वयंपाकापासून झाडलोटीपर्यंत, विद्यार्थ्यांस पाळी-पाळीने करावीं लागतात. दहा विद्यार्थ्यांची एक टोळी, तिजवर एक प्रमुख, अशी तेथे शिस्त आहे व या अकराजणांच्या टोळीने पाळीप्रमाणे त्या दिवसाचा स्वयंपाक, बाजारहाट अगर शेतीचें काम करावयाचें असतें. या अकरा जणांच्या टोळींत सर्व जातींचे विद्यार्थी असतात. स्पृश्यास्पृश्य ही भावनाच तेथे नसल्याने स्वयंपाकापासून सर्व कामें मोठ्या दिलजमाईने होत असतात. संस्थेला अद्याप स्वतःच्या मालकीची जागा नाही.

संस्थेतील विद्यार्थ्यांना संस्कृत भाषा आवश्यक केली असल्याने विद्यार्थ्यांची वाणी स्पष्ट व भाषा शुद्ध आहे. संस्थेतील विद्यार्थी हुशार, चलाख, कर्तव्यदक्ष व शीलवान कसे होतील इकडे चालकांचें लक्ष असल्याने विद्यार्थी जसा शरीराने तसाच मनानेहि निकोप असतो यांत आश्चर्य नाही. विद्यार्थ्यांच्या बुद्धीचें प्रमाण पाहिलें तर असेंच आढळून येतें कीं, बालपणापासून शिक्षणास पूर्ण वाव मिळाला तर ते पुढारलेल्या जातीच्या विद्यार्थ्यांप्रमाणेच विद्यासंपन्न होतील.

### संस्थेचें पोषण कसें होतें ?

दीडशें विद्यार्थ्यांच्या या अवाढव्य कुटुंबाची जोपासना करण्याची जबाबदारी केवढी मोठी आहे याची कल्पना करतां येण्यासारखी आहे. श्री. भाऊराव पाटील हे या संस्थेचे एकाकी आधारस्तंभ असून त्यांनी आपली सर्व मिळकत संस्थेला अर्पण केली आहे इतर संस्थांप्रमाणे या संस्थेस द्रव्यसाहाय्य मागितल्याचा फारसा बोभाटा नाही. साधी राहाणी व उच्च विचारसरणी हें या संस्थेचें ध्येय आहे. वाजवीपेक्षा एक पैहि जास्त खर्च न करण्याकडे चालकांचें फार लक्ष असतें. आणि त्यामुळेच अगदी थोडक्या खर्चांत एवढा पसारा चालकांस आटोपतां येतो. विद्यार्थ्यांस भोजनासाठी प्रत्येक महिन्यास चार रुपयांवर जास्त खर्च येतच नाही; व संस्थेंत खर्च देऊन शिकणारे जे विद्यार्थी आहेत त्यांजकडून भोजन, राहणें, दिवाबत्तीसुद्धा खर्चासाठी फक्त सहा रुपये घेण्यांत येतात. यावरून संस्था किती काटकसरीने चालविली जात आहे याची कल्पना येईल. आपला खर्च देऊन शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या फारच थोडी असून संस्थेंतील बहुतेक विद्यार्थी संस्थाच पोसते. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाकडे चालकांचें बारकाईने लक्ष असल्याने संस्थेतील विद्यार्थी सहजच हुशार निघतो. त्यामुळे शिष्यवृत्त्यांचें माप संस्थेच्या विद्यार्थ्यांच्या पदरीं पडतें. अशा रीतीने विद्यार्थ्यांस मिळालेली शिष्यवृत्ति संस्थेकडे विद्यार्थ्यांच्या नांवाने जमा होते. ती विद्यार्थ्यांच्या कामींच खर्च करण्यांत येते. ही रक्कम मागील वर्षी सवातीन हजारांपेक्षा जास्त होती.

### स्वावलंबन हा पाया

स्वावलंबन हें संस्थेचें दुसरें ध्येय आहे. वरीलप्रमाणें शिष्यवृत्त्या संपादन करून त्या संस्थेस मिळाल्याने संस्थेची एक मोठीच गरज भागते. परंतु एवढ्याने खर्चाची तोंडमिळवणी कशी होणार ? तेव्हा ती अल्पांशाने कां होईना, भागावी व विद्यार्थ्यांस स्वावलंबनाचे शिक्षण मिळावें म्हणून दुसरीहि एक सोय चालकांनी केलेली आहे. सातारचे श्रीमन्महाराज छत्रपति यांची गांवाला लागून 'धनाची बाग' नांवाची एक बाग आहे. संस्थेने ती बाग खंडाने घेतली आहे. या बागेचे संस्थेला नानाविध उपयोग होतात. बागेंत दोन विहिरी असल्याने बागायतीची सोय होते. आंबे, फणस, नारळी, पोफळी यांच्या राया असल्याने पर्जन्यकाळाखेरीज अन्य ऋतूंत वृक्षांच्या घनदाट छायेखालीं विद्यार्थ्यांचे वर्ग घेण्यांत येतात. विद्यार्थ्यांकडून तेथील शेतीचें काम करून घेण्यांत येत असल्याने विद्यार्थ्यांस शेतीचें ज्ञान मिळून संस्थेसहि मदत होते, व विद्यार्थ्यांच्या राहण्याची सोयहि तेथे करण्यांत आली असल्याने तीहि गैरसोय आज दूर झाली आहे.

### प्रसन्न वातावरण

तेथील सर्व वातावरणच प्रसन्न व खेळतें आहे; विद्यार्थी आनंदी आणि उत्साहित दिसतात. विद्यार्थ्यांस भोजनास इतका अल्प खर्च लागतो यावरून मुलांची प्रकृति खराब असेल अशी कोणी कल्पना केली तर ती खास खोटी व चुकीची ठरेल. तेथे दुपारच्या जेवणास भाकरी, भाजी, कालवण व रात्रीं भात, भाकरी, भाजी, कालवण एवढेच साधे पदार्थ असतात. सणावारीं तूप मिळतें व दसरा, दिवाळी, पाडवा या सणांच्या दिवशीं पक्वान्नें करण्यांत येतात. मांसाहार वर्ज आहे.

### भावी कार्याची रूपरेषा

प्राथमिक शिक्षणापासून प्रवेशपरीक्षेपर्यंतचें सर्व शिक्षण आपल्या संस्थेमार्फत संस्थेंत द्यावें अशी श्री. पाटील यांची महत्त्वाकांक्षा आहे. सुमारें १५ विद्यार्थी आज उच्च शिक्षण घेत आहेत. त्यांत बी. ए., एम. ए. चा अभ्यास करणारेहि आहेत. अर्थात् श्री. पाटील यांच्या कार्याचा भार हलका करण्याची जबाबदारी

त्यांच्यावर असल्यामें संस्था त्यांच्याकडे संस्थेचे भावी आधारस्तंभ म्हणून पाहत असल्यास नवल नाही. सर्व महाराष्ट्रभर अशा संस्थांचें जाळें पसरण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा असून त्यांच्या ध्येयानुसार निपाणीस एक संस्था नुकतीच स्थापन झाली आहे व पुण्यास एक शाखा नुकतीच सुरू झाली आहे. शेतकऱ्यांच्या शिक्षणाखेरीज संस्था स्वतःची एक उद्यमशाळा व विणकरशाळा काढण्याच्या प्रयत्नांत आहे व त्यासाठी संस्थेंतील विद्यार्थी आज शिक्षण घेत आहेत. ते शिकून तयार होऊन आले म्हणजे वरील दोन्ही शाखा सुरू होऊन संस्था खरीखुरी स्वावलंबी होईल.

## संस्था काय साधते ?

राष्ट्रकार्यांत जातिभेद आड येतात म्हणून ते नष्ट झाले पाहिजेत अशी ओरड कानीं कांहीं कमी येत नाही. परंतु त्या दिशेनें प्रयत्न कितीसे होतात? श्री. पाटील यांनी मुळालाच हात घातला आहे. उच्चनीच भावना व जातिभेदाच्या कल्पना उत्पन्न होण्यापूर्वीच म्हणजे बालपणापासूनच विद्यार्थी संस्थेंत घेतला म्हणजे आपण एकाच कुटुंबांतील आहों ही भावना दृढ होऊन आपण सर्व 'हिंदी' एवढीच कल्पना शिल्लक उरते. दुसरी एक गोष्ट संस्था साधते. ती म्हणजे शिक्षणाची. आपण सर्व हिंदी ही भावना जागृत करून समानतेचें शिक्षण व वागवणूक लाभल्यास काय परिस्थिति निर्माण होईल याचा प्रत्यक्ष नमुना म्हणजे श्रीछत्रपति शाहू बोर्डिंग हें आहे.

## महाराष्ट्रीयांतील अवगुण

आपणा महाराष्ट्रीयांत एक वैशिष्ट्य आढळतें. तें हे कीं, अनेक प्रकारच्या लोकोपयोगी संस्था काढून अगर चळवळी करून त्याचा गाजावाजा न करणें! 'आधी केलें मग सांगितलें' हें तत्त्व कांहीं बाबतींत हितकर असलें तरी नेहमीच तें हितप्रद नसतें. आज अस्पृश्योद्धाराचा सर्व हिंदुस्थानभर गाजावाजा होत आहे. महाराष्ट्रांत अशा अनेक संस्था आहेत व असे अनेक कार्यकर्ते तपानुतपें कामें करीत आहेत कीं, त्यांना हिंदुस्थानांत तोड नाही. त्यांना प्रसिद्धी-करण नको असतें; परंतु यामुळेच महाराष्ट्रीयांबद्दल निष्कारण गैरसमज पसरतात. पुण्यांतील केतकरांचे अनाथ विद्यार्थिगृह. यानें किती उपयुक्त कार्य केलें आहे बरें! प्रो. कर्वे यांचे महिलोन्नतीचे प्रयत्न, श्री. वि. रा. शिंदे, श्री. ल. ब. भोपटकर, श्री. श्री. म. माटे यांचें अस्पृश्योद्धाराचे प्रयत्न यांची परप्रांतीयांस कितीशी दाद आहे ? हे सर्व जगापुढे आणलें पाहिजे व राष्ट्रकार्यांत इतरांच्या बरोबरीनें आम्हीहि आपला भाग उचलतों याची जाणीव करून दिली पाहिजे.

## जुने भाऊराव हे नव्हेत!

श्री. भाऊराव यांना दहा वर्षांपूर्वी महाराष्ट्रीय वेगळ्या प्रकारानें ओळखीत. ब्राह्मण—ब्राह्मणेतरांमध्ये तंटे उत्पन्न करणारांत ते एक प्रमुख गणले जात. परंतु राष्ट्रकार्य करण्याची त्यांची तळमळ दिखाऊ नव्हती. जातिद्वेष पसरणाऱ्या चळवळीनें समाजहित न होतां घातच होतो हें पटतांच निरभिमानानें त्यांनी जुनें धोरण सोडून या नवीन चळवळीस प्रारंभ करून ध्येयनिष्ठ मनुष्य अगदी एकाकी असला तरी केवढें कार्य करू शकतो याची लोकांना खात्री पटवून दिली आहे.

# अरबस्थानांतील हिन्दुबांधव

(ले.--पांडुरंग प्रल्हाद कुकडे, पुणें माजी शिक्षक, नवीन समर्थ विद्यालय.)

आशिया खंडांतील अरबस्थान देशामध्ये हिंदु बांधव आहेत. ते अनेक शतकांपूर्वी तेथे जाऊन वसलेले आहेत. ही गोष्ट ऐकून कोणाहि हिंदु धर्मीयांस साश्चर्य अभिमान व आनंद वाटल्याशिवाय राहणार नाही. म्हणून महाराष्ट्रीयांच्या माहितीकरितां अरबस्थानांतील आपल्या हिंदु बांधवासंबंधी वर्णन देण्याचें मी ठरविलें आहे.

ज्या देशांत महंमद मसीह (पैगंबर) हा इस्लामधर्मसंस्थापक जन्मास व उदयास आला त्या अरबस्थान देशांतच अद्यापहि कित्येक शतकांपासून स्वतःस हिंदुधर्मीय म्हणवून घेऊन मूर्तिपूजा करणारे हिंदु लोक ओघ धरून आहेत हें त्या अरबस्थानांतील हिंदु लोकांच्या हिंदु-धर्मावरील अप्रतिम निष्ठेचें, श्रद्धेचें व अभिमानाचें श्रेष्ठतम द्योतकच होय.

अरबस्थानांतील हिंदूंना, हिंदु धर्माचा पराकाष्ठेचा अभिमान आहे आणि "आम्ही हिंदुस्थानांतून आलेले आहों. हिंदुस्थान हा आमचा मूळचा देश आहे" हें ते अभिमानानें सांगत असतात. हिंदुस्थानांतून येणाऱ्या लोकांना हे गुरुतुल्य मानतात व त्यांचें अत्यंत ममोभावानें आदरातिथ्य करतात. यांची भाषा अरबी आहे. पूर्वी हे लोक तुर्कस्थानच्या सुलतानाच्या ताब्यांत होते. परंतु महायुद्ध समाप्त

झाल्यानंतर हे हिंदुबांधव हल्लीं फ्रान्स देशाच्या अधिकाराखालीं किंवा नेतृत्वाखालीं आलेले आहेत. हे लोक आपणा स्वतःस "दुर्जा" म्हणवितात. दुर्जे-हा "दुर्गा"चा अपभ्रंश असावा. कारण अरबी मध्ये 'ग' हें अक्षरच नाहीं. या लोकांचें संस्थान एका अर्थी स्वतंत्र आहे. ह्या संस्थानीं भागाचें अरबी भाषेंतील नांव 'डविल-डल-बुरुज' हें होय. डविल-डल बुरुज याचा अर्थ 'दुर्गेचे लोक' हा असून या संस्थानचा अमीर किंवा राजा स्वतःस 'अतरस' (दृढ) असें म्हणवितो.

## अरबी भाषेंतील हिंदुधर्मग्रंथ!

ह्या लोकांचे आज दृष्टोत्पत्तीस येणारे दोन वर्ग आहेत. (१) जो "शेंडी" ठेवतो तो व (२) जो शेंडी ठेवीत नाहीं तो. शेंडी ठेवणाऱ्यांची लोक-संख्या कमी असून शेंडी न ठेवणाऱ्यांची लोकसंख्या अधिक आहे. हे सर्वच "शिव" व "गणेश" ह्यांच्या मूर्तींची पूजा करतात. ह्या लोकांनी जीं मंदिरें बांधलेलीं आहेत तीं कांहींशी मशिदींप्रमाणे व कांहींशी आपलेकडील देवळाप्रमाणे आहेत. आणि हें देशकालपरिस्थित्यनुसार योग्यच होय. पूजेनंतर शिरा (हलवा) व पक्वानें यांचा नैवेद्य दाखविण्याचा त्यांचा प्रघात आहे. मंदिरामध्ये पूजा करण्याप्रीत्यर्थ ह्या लोकांबरोबर उपाध्याय असतो. या उपाध्यायांचा खर्च लोकांच्या कडून होणाऱ्या संभावनेवर अवलंबून असतो. यांचे धर्मग्रंथ अरबी भाषेमध्ये पद्यरूप आहेत, ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट होय. ते पूजा करताना ढोल, डफ व झांज वाजवितात. देवतांच्या शक्तीचीं गीतें अत्यंत प्रेमपुरःस्सर गायिलीं जातात.

## लढाईचा शोक

ह्यांच्या मुलांना लढाईचा अत्यंत शोक असून तत्प्रीत्यर्थ लोकांकडून नित्यशः उत्तेजन दिलें जातें. जो पुरुष किंवा स्त्री युद्धामध्ये वीरोचित मृत्यु पावते त्याचा इतिहास श्रेष्ठवर्णीय शाहीर लिहून घेतात व त्यावर कविता व उत्तेजक गीतें रचिलीं जातात. सर्व तरुणांकडून हीं वीरगीतें मुखोद्गत करून घेण्यात येतात. यांच्या स्त्रियाहि वीररमणी असून त्यांचीं नांवें फूल किंवा पक्वान्न यांनी सुरुवात झालेलीं असतात. त्यांच्यामध्ये अद्यापहि एक दंतकथा प्रचलित आहे ती अशी कीं, त्यांच्या पूर्वजांनी "कर्बला"च्या युद्धामध्ये भाग घेतला होता. हें कर्बला स्थान कोठचें ह्याचें संशोधन होणें जरूर आहे. गोषा-प्रथा-प्रतिष्ठित अशा अरब भूमींत प्राचीन कालापासून वसत असतांहि त्यांच्या स्त्रियांमध्यें कोणत्याहि प्रकारचा गोषा किंवा पडदा नाहीं ही गोष्ट त्यांच्या हिंदु रीतीरिवाजांच्या अभिमानाची प्रत्यक्ष साक्ष होय.

हे लोक असें सांगत असतात कीं, "हरबुल अजीम" म्हणजे "मोठी लढाई" नंतर आम्ही हिंदुस्थानांतून इकडे आलेलों आहों. याबद्दल वर्षांतून एक दिवस "स्मृति-दिन" म्हणूनदेखील सणाप्रमाणें मानण्यांत येतो. "ही मोठी लढाई" म्हणजे कोणती याचेंहि संशोधन होणें अवश्य आहे.

## अरबी हिंदूंच्या गरजा

वास्तविक ह्या पृथ्वीतलावर कोण कोणत्या हिंदु जाती कोठे कोठे वसल्या आहेत. या-बद्दलचे सर्व निरीक्षण करणें व त्याचा प्रत्येक दहा वर्षांनी अहवाल तयार करून सर्व हिंदु जनतेस आपापल्या भावंडांची ओळख होऊन परस्पर सुखदुःखें कळविण्याचा प्रयत्न करणें हें भारतीय हिंदु महासभेचें एक काम आहे. हल्लीं हिंदु महासभेच्या पाठीमागे शेंकडों महत्त्वाच्या गोष्टी असल्या तरी त्यांतूनच वेळांत वेळ काढून तिने अरबस्थानांतील आपल्या हिंदु बांधवां-चें वर्तमान व समाचार घेणें अवश्य आहे. विशेषतः, डॉ. मुंजे यांच्यासारख्यांस हें कार्य सुकर जाईल. डॉ. मुंजे हल्लीं विलायतेस गेलेच आहेत. येतांना त्याना वाटेंत अरबस्थानांत उतरून "डविल डल-बुरुज" च्या ह्या हिंदूंस भेट दिल्यास त्यांच्या गरजा सहज अजमावता येतील. (१) अरबभूवासी हिंदूंची आजची मुख्य व प्रथम गरज म्हणजे धर्मग्रंथांची होय. जर उपनिषदें, वेद, भगवद्गीता इत्यादि पुस्तकें अरबी भाषेंत भाषांतर करून मुद्रित केलीं व तीं धार्मिक पुस्तकें ह्या लोकांमध्ये वाटण्यांत आलीं तर त्यांच्यावर महदुपकार होतील. (२) ह्या लोकांची दुसरी महत्त्वाची गरज म्हणजे हिंदुधर्म प्रचारकाची होय. अरबी भाषा जाणणारे कांहीं हिंदुधर्म प्रचारक इकडे पाठविण्याची अत्यंत आवश्यकता आहे. सिंध, काश्मीर, पंजाब व विशेषेंकरून निजामचे राज्यांत शेकडों विद्वान हिंदु अरबी भाषेंत निष्णात आहेत. त्यांच्यापैकीं कांहीं प्रचारक आळीपाळीनें अरबस्थानांत पाठविल्यास तेथील हिंदूंना नवचैतन्य प्राप्त झाल्याशिवाय राहाणार नाहीं. (३) ह्या लोकांची तिसरी गरज म्हणजे 'हिंदी लिपीचें ज्ञान' होणें ही होय. हीं आपलीं भावंडें हिंदी (देवनागरी) लिपी शिकण्यास अत्यंत आतुर आहेत. इकडून कांहीं स्वयंस्फूर्तीनें अरबीभाषाकोविद प्रचारक तिकडे जाऊन आळीपाळीनें कांहीं काल तेथे राहतील व ही देवनागरी लिपी त्यांना शिकवितील तर अरबस्थ हिंदूंवरच नव्हे तर समस्त हिंदु जातिवरहि त्यामुळें महदुपकार होतील.

# ब्रह्मी समाजांतील चालीरीति

( लेखकः—श्री. रा. गो. नातु )

हिंदुस्थान व ब्रह्मदेश भौगोलिक दृष्टीने भिन्न खरे; परंतु ब्रह्मदेश सांस्कृतिकदृष्ट्या हिंदुस्थानाचाच भाग समजला जातो. ब्रह्मदेशांत हिंदी, चिनी, जपानी वगैरे परदेशीय लोकांची बरीच संख्या असली तरी मोंगोलियन रक्ताच्या ब्रह्मी लोकांवर हिंदी संस्कृतीचा बराच पगडा बसलेला दिसतो. तत्त्वज्ञानी व निसर्गप्रेमी, इतिहास व पुराणवस्तु-संशोधक आणि प्रवासी व शिकारी वगैरे लोकांना ब्रह्मदेश मनोरंजक व प्रेक्षणीय वाटेल यांत शंका नाही. एके काळीं स्वर्गातून चार ब्रह्मे इहलोकावर उतरले. परंतु येथील अन्नपाणी ग्रहण करतांच ते भ्रष्ट झाले व इंद्रांनी त्यांना स्वर्गांत प्रवेश करण्यास मज्जाव केला.त्यामुळे त्यांनीं इहलोकावर वस्ती केली. त्यांचेपासून जी पुढे प्रजा उत्पन्न झाली त्यांना ब्रह्मी म्हणतात अशी आख्यायिका आहे.

साधारणतः ब्रह्मी मनुष्य वामनमूर्ति, रुंद तोंडाचा व चपट्या नाकाचा असतो. त्याचा चेहरा निर्विकार असल्यामुळे त्याच्या मनांतील भावना सहजगत्या कळत नाही.स्वभावाने गर्विष्ठ,आळशी व बराच माथेफिरूहि असतो. हाडाचीं काडें करून कामें करावींत, पैसा किंवा जगांत मोठेपणा मिळवावा ही महत्त्वाकांक्षा त्याला कधी शिवत नाही.

ब्रह्मी लोक बुद्धधर्मीय होत. हिंदी लोकांप्रमाणे त्यांच्या दररोजच्या हालचालींत धार्मिक कल्पना गोवल्या गेल्या आहेत. प्रत्येक खेडेगांवांतून बुद्धाचीं मंदिरें असून त्यांचेभोंवती भिक्षु लोकांची वस्ती असते. हे भिक्षु आपल्याकडील भिक्षुकांप्रमाणे श्राद्ध पक्ष वगैरे धार्मिक संस्कार करून चरितार्थ करीत नसून प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रचार करण्याचें विशिष्ट कार्य करीत असतात. या धार्मिक सक्तीच्या शिक्षणामुळे ब्रह्मदेशांत शेंकडा ९० लोक साक्षर आहेत.ब्रह्मदेशांतील कांही घरें लांकडी असून त्यांची बांधणी अत्यंत साधी व कमी खर्चाची असते. याला एकदोन कारणें आहेत. एक म्हणजे धरणीकंपाचें भय व दुसरें, त्यांची घरांवर फारसा पैसा न खर्च करण्याची धार्मिक कल्पना.

### ब्रह्मी कुटुंबपद्धति

एकत्र अगर विभक्त अशा कोणत्याच एका विशिष्ट कुटुंबपद्धतीची ब्रह्मदेशांत परंपरा दिसत नाही. कारण दोनहि प्रकार सर्वत्र दिसून येतात. पुरुष आळशी व उधळा असला तरी त्या मानाने बायको कामाचे डोंगर उचलते असें म्हणावयास हरकत नाही. शेतांतील अंगमेहनतीचीं कामें सोडून दिल्यास मागांवर कापड विणणें, लांकडाचीं भांडीं व हस्तिदंती फण्या तयार करणें, चिरूट वळणें वगैरे उद्योग बायकाच करतात; एवढेंच नव्हे तर किराणा मालापासून तों थेट रेशीम सोनें चांदी यांसारख्या उंची मालाची खरेदी-विक्री करण्याचें काम बहुशः स्त्रीच करते. दिवसेंदिवस पुरुष जरी धंद्यांत शिरकाव करून घेऊं लागले असले तरी आज प्रत्येक कारभारांत स्त्रियांचें विलक्षण वर्चस्व दिसून येतें.

अशा रीतीने ही बाई जरी व्यापारधंदा करून पैसे कमावीत असली तरी तिचें गृहव्यवस्थेकडे पूर्ण लक्ष असतें. चूल व मूल सांभाळून पतिसेवेसहि ती आंचवत नाही. यामुळे ती व्यवहारकुशल व स्वाभिमानी बनते. या व्यावहारिक दृष्टीमुळे ती कोरड्या परमार्थांत शिरून ध्येयविहीन धार्मिक मार्गांचें अवलंबन करीत नाही.

स्त्री-पुरुषांचा पोषाक जवळ जवळ सारखाच असतो. धोतर-लुगड्याऐवजीं एक सहा वार कापडाची हे लोक लुंगी गुंडाळतात. स्त्री असल्यास तिची लुंगी उंची कपड्यांची व हरतऱ्हेच्या रंगाची असते. पुरुष अंगांत कोट घालतात; बायका फक्त एक जाकिट चढवितात. बायकांना केशभार विपुल असतो. व हें एक सौंदर्याचें चिन्ह म्हणून समजलें जातें. केसास तेल चोपडून ऋषींच्या जटाभाराप्रमाणे त्या त्यांचें वेटोळें करून डोक्यावर ठेवतात. स्त्री-पुरुषांना नटण्याची अतिशय हौस असते. केसांत अनेक रंगांचीं फुलेंपानें घालून व उंची वस्त्रें नेसून स्वतःस शक्य तितकें सजविण्याचा ब्रह्मी तरुणी प्रयत्न करीत असते.

### विवाहसंस्कार

ब्रह्मी देशांत विवाह हा धार्मिक संस्कार समजला जात नाही. विवाहाचा हेतु सामाजिक नसून थोडाबहुत वैयक्तिक असतो. खरोखर पाहिलें तर लग्नैक सभारंभ असा नसतोच; पण आताशा काडीमोडीच्या खटल्यामध्ये लग्न झालेल्या पुराव्याची जरूर भासत असल्यामुळे लग्नास समारंभाचें स्वरूप येऊं लागलें आहे. व असा समारंभ श्रीमत लोकांत जास्त लोकप्रिय होत आहे.

विवाह स्वयंनिर्णय पद्धतीने होतात. ब्रह्मी समाजांत मुलांमुलींना एकत्र येण्याचे वारंवार

प्रसंग येत असल्यामुळे स्वतःची 'निवड करण्यास दोघांनाहि पूर्ण वाव मिळतो.' ओळख झाली कीं गट्टी जमते. नंतर मुलगा मुलीची भेट घेण्यास घरीं जातो व तेथे मित्र-मंडळीच्या व पालकांच्या संमतीने लग्नाचा घाट घालण्यांत येतो. पालक बहुशः नापसती दर्शवीत नाहीत. अशा रीतीने साखरपुडा झाला कीं एखादा मुहूर्त पाहून त्या दिवशीं एक मेजवानी देण्यांत येते. या प्रसंगीं वधू-वर एका ताटांत जेवले कीं झाले लग्न कायम!

विवाह हा संस्कार नसून करार आहे व हा करार पसंत न पडल्यास काडीमोड मिळूं शकते हे जरी ब्रह्मी स्त्रीपुरुष जाणत असले तरी पाश्चात्य देशांप्रमाणे क्षुल्लक कारणांवरून नवराबायकोंत घटस्फोटाचे प्रसंग वारंवार येत नाहीत. सबळ कारणे असल्यास गांवच्या पाटलाकडून अगर कोर्टाकडून ताबडतोब मान्यता दिली जाते.

अशी काडीमोड झाली तरी ब्रह्मी स्त्री अनाथ होत नाही. भावाप्रमाणे तिलाहि बापाच्या इस्टेटीचा वांटा मिळत असल्यामुळे व लग्नानंतर समाईक समजल्या जाणाऱ्या मिळकतीचा वांटाहि घटस्फोट झाल्यास तिला कायद्याने मिळणारा असल्यामुळे तिची आर्थिक दृष्ट्या कोणत्याहि तऱ्हेने दुर्दशा होत नाही.

ब्रह्मी लोकांत स्त्रीपुरुषांचा सामाजिक संबंध अगदीं मोकळेपणाचा असतो. फाजील लाजलज्जा बाळगून ब्रह्मी ललना आपल्या भेकडपणाचे प्रदर्शन कधींहि करीत नाहीत. पुरुषवर्गहि त्यांना समतेने व आदराने वागवतो. परंतु एखाद्या पुरुषाकडून त्यांचे बाबतींत असभ्यपणाचे वर्तन घडल्यास जागच्या जागीं त्याची रेवडी उडविण्यास त्या मागेपुढे पाहणार नाहीत. याचा अर्थ असा नव्हे कीं, ब्रह्मी स्त्रियांत उद्धटपणाचे वारे खेळत आहे. त्यांच्या अंगांत शालीनता मोकळेपणा व आदरयुक्त वागणूक पूर्णपणे बाणलेली असते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हिंदी व युरोपियन स्त्रियांच्या कांहीं गुणांचा ब्रह्मी बायकांत चांगला मिलाफ झालेला दृष्टीस पडतो.

ब्रह्मी समाजांत मुलाप्रमाणे मुलींना मिळणारा पित्याचे प्राप्तीचा समान वांटा, नवऱ्याची निवड व उच्चाटन करण्याचे स्वातंत्र्य व काडीमोडीनंतरसुद्धा वडिलार्जित इस्टेट शाबूत राखण्याचा हक्क यांना कायद्याने दिला असल्यामुळे हिंदी स्त्रियांनी कांहीं बाबतींत हेवा करण्यासारखा दर्जा ब्रह्मी स्त्रियांना मिळाला आहे यांत शंका नाही.

### ब्रह्मी लोकांचा शोक

ब्रह्मी लोकांना जुगार खेळण्याचा व नाटकें तमाशे पाहण्याचा विलक्षण शोक आहे. नाटकांत ऐतिहासिक राजे-राण्यांच्या गोष्टी व पौराणिक कथा असतात. अशा नाटकांस नाटकगृहांची जरूरी त्यांना भासत नाही. एक उंचवटा तयार करून तो फुलांनी-पताकांनी शृंगारला कीं थिएटर तयार होतें. आपल्याकडील गोंधळाप्रमाणे नाटकाचे स्वरूप असते. नाटकांत थट्टेची, तत्त्वज्ञानाचीं संभाषणे असली तरी नाचास मुख्य प्राधान्य दिले जातें. नाचणारींचें सर्व शरीर रंगीत वस्त्रांनी झांकून टाकतात. पाय, पोटऱ्या, उघडे ठेवणे नीतिबाह्य समजले जाते.

ब्रह्मी मनुष्याच्या ऐहिक सुखाच्या कल्पना थोड्याशा विचित्र असतात. एक राजा सोडला कीं आपण ताबडतोब रंकापाशी येऊन पोहोचतों. मधले जमीनदार नाहीत. सरदार नाहीत व बडे व्यापारीहि नाहीत. त्यामुळे बहुजन समाज एकाच दर्जाचा सापडतो. ब्रह्मी मनुष्याची प्रवृत्ति पैसा कमावून तो साठवून ठेवण्याकडे नसते. एक तर तो धर्मदाय करील, नाही तर पैसा चैनीत उडवून टाकील. जमिनीला जमीन जोडून जमीनदार होण्याचा किंवा पैशांतून पैसा उत्पन्न करून माया बाळगण्याचा शोक अगर मोह त्यांला नसतो. पूर्वी धर्मादाय करण्याची विलक्षण प्रवृत्ति या लोकांमध्ये असली तरी आता पाश्चात्य फॅशन्सचें अनुकरण करण्यांत, सिनेमा, नाटकें पाहण्यांत, जुगार खेळण्यात असेल नसेल तो पैसा उडविण्याची खोड लागल असल्यामुळे ब्रम्ही समाज कर्जबाजारी होत चालला आहे.

### वाचनाचा तिटकारा

"मनुष्याचे विचार हीच त्याची खरी संपत्ति होय" अशी एक ब्रह्मी भाषेत म्हण आहे. परंतु ही संपत्ति मिळविण्यासाठी तो ग्रंथ वाचीत बसत नाही. पुस्तके वाचून काय करावयाचे? काव्याचीं पुस्तके वाचून काय फायदा? मित्रांचे प्रेम, बायकोचे प्रेमळ शब्द व पालकांचा लडिवाळपण घरांत अनुभवीत असता कवींच्या काव्यास कोण विचारतो! जो दुबळा झाला किंवा जगापासून वेगळा होऊं लागला म्हणजे सांसारिक सुखास अंतरला. त्याने पाहिजे तर ग्रंथाचीं पारायणें करावीत!

हिंदुस्थानाप्रमाणे ब्रम्हदेशांत जोतिष्यांचा बराच सुळसुळाट आहे. कर्मठ लोकांत तर त्यांचेवांचून पाऊल पुढे पडत नाही. तसेच त्यांच्याच धार्मिक वेडगळ कल्पनाहि बऱ्याच रूढ आहेत. कुत्र्याने

घरांवर पाणेरडा जिन्नस आणून टाकला तर मालक श्रीमंत होतो; वाऱ्यांने विड्याचीं पानें उडाल्यास नूतन परिणत वधूवरांचे सौख्य नष्ट होतें, काडीमोडीचा प्रसंग त्यांचेवर येतो; अशा रीतीने हिंदी लोकांप्रमाणे ब्रह्मी समाजासहि अनिष्ट समजुतींनी वेढून टाकले आहे.

# भल्याची दुनिया नाही

व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनी सिमला येथे ता. ३० ऑगस्ट रोजीं ले.असेंब्ली व कौन्सिल ऑफ 'स्टेट' यांतील सभासदांपुढे एक विस्तृत भाषण केलें.त्यांनी सदर भाषणांत हिंदुस्थानाचे परराष्ट्रीय संबंध,देशांतील व्यापारधंदा व राजकीय परिस्थिति आणि भावी राज्यघटना यांचें चित्र रेखाटलें आहे.हें चित्र त्यांनी आपल्याकडून बरेंच भडक रंगविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तो करीत असता त्यांच्या मनाला उल्हास किंवा उमेद वाटत असावी असें दिसून येत नाही. तथापि रोग्याची प्रकृति कितीहि दुःसाध्य असली तरी डॉक्टर रोग्याला व रोग्याच्या आप्तेष्टांना धीराचे शब्द बोलतच असतो, त्याप्रमाणे व्हाइसरॉयांनी पोकळ अवसान आणून आपल्या भाषणांत हिंदी लोकांना बरेंच उत्तेजन दिलें आहे. पण त्याचा परिणाम हिंदी लोकांवर होण्यासारखा नाही. कारण हिंदी लोकांना सध्याच्या हलाखीचे चटके क्षणोक्षणीं इतके बसत आहेत की ती स्थिति सुखाची आहे म्हणून व्हाइसरॉयांनी कितीहि सांगितलें तरी, असल्या भुलथापांवर कोण विश्वास ठेवील?

या स्थितींत सुधारणा भावी राजकीय हक्कांनीच व्हावयाची. पण त्यांचेंहि स्वरूप हिंदी लोकांपासून अगदी लपून राहिलें आहे असें नाही. पांढरा खलिता जनतेपुढे आहे व त्यावर जॉइंट पार्लमेंटरी कमिटींत झालेल्या उलटसुलट साक्षीहि जनतेने वाचलेल्या आहेत. त्यामुळे पुढील राजकीय सुधारणांचा अंदाज हिंदी लोकांना आता लागला आहे. त्या सुधारणा कायद्याच्या चौकटींत बसून तसबिरीप्रमाणे डोळ्यांपुढे उभ्या राहिल्या असतां, त्यांचें स्वरूप आजच्या अंदाजाहून किंचित् निराळें दिसलें तरी, त्यायोगाने हिंदुस्थानाचें दैन्य फिटेल अशी कोणासहि आशा बाळगतां येणार नाही. अशा मनोवृत्तीने व्हाइसरॉयांच्या भाषणाकडे जो पाहील त्याला त्यांच्या भाषणांतील कित्येक विधानें वाचून हसूं आल्याशिवाय राहणार नाही!

इतर देशांप्रमाणे हिंदुस्थानाचें जीवितहि व्यापाराच्या भरभराटीवरच अवलंबून आहे. पण हिंदी व्यापाराला एकदा मंदी आली आहे ती कांही केल्या हलत नाही. असें असताहि व्हाइसरॉयांनी हातचलाखी करून हिंदुस्थानाला हरभऱ्याच्या झाडावर चढविण्याकरितां आपले हात उचलले आहेत. यंदाच्या वर्षी जुलैअखेर हिंदुस्थानाची निर्गत ७॥ कोटींनी वाढली व आयात ११॥ कोटींनी कमी झाली. असे आकडे व्हाईसरॉयांनी आपल्या विधानांच्या समर्थनार्थ दिले आहेत. हे आंकडे देशाच्या उत्कर्षाचे कीं अपकर्षाचे द्योतक समजावयाचे? आयात ११॥ कोटींनी कमी झाल्यामुळे सरकाराचें जकातीचें उत्पन्न घटलें तें घटलेंच; पण त्याखेरीज हिंदी लोकांना जिन्नस विकत घेण्यास ऐपत उरली नाही हेंहि निदर्शनास आलें. तथापि या ठिकाणीं हातचलाखीचा खेळ खेळून डोंबाऱ्याने फुंकर मारून आंब्याचें झाड क्षणांत निर्माण करून दाखवावें त्याप्रमाणे व्हाइसरॉयांनी राष्ट्रीय अपकर्षाला उत्कर्षाच्या पदवीवर चढविलें आहे! व्हाइसरॉय आपल्या भाषणांत म्हणतात 'पहा ही हिंदुस्थानाची औद्योगिक भरभराट. देशी उद्योगधंद्यांची वाढ झाली म्हणूनच हिंदुस्थानाला परदेशी माल घेण्याची गरज राहिली नाही'!

व्हाईसरॉयांचा हाच कोटिक्रम आणखी पुढे वाढवीत नेला तर हिंदुस्थानाची संपत्ति कुबेराच्या अलकावतीलाहि लाजविण्याइतकी विपुल आहे असें म्हणण्यास काय हरकत आहे? कारण हिंदुस्थानांतून गेल्या दोन वर्षांत अब्जावधि रुपयांचें सोनें इंग्लंड आदि-

करून देशांत गेलें आहे. हिंदी लोकांच्या घरांत सोनें व माती सारखी झाल्यामुळे सोन्याला भाव येताच त्यांनी तें विकून आपल्या घराचा एक कोपरा रिकामा केला, असेंहि व्हाइसरॉयांनी म्हणून वाटल्यास हिंदी लोकांच्या दुःखावर आणखी डागण्या द्याव्या ! पण व्हाईसरॉयांचें भाषण होऊन गेल्यानंतर थोडक्याच दिवसांत ले. असेंब्लींत आयातनिर्गतीचा तपशील सरकारतर्फेंच सांगण्यांत आला हें एक प्रकारें बरेंच झालें. कारण त्यामुळे त्यांचे दांत त्यांच्याच हाताखालच्या अधिकाऱ्याने परभारे त्यांच्या घशांत घातले. हे आंकडे जानेवारीपासून मे महिन्यापर्यंतचे आहेत. त्यांतील आयातीकडे पाहिल्यास परदेशी कापडाची आयात पंचवीस टक्क्यांनी व लोकरीच्या मालाची आयात दीडपटीने वाढली असल्याचें दिसून येतें.

हिंदुस्थानांत मोठा धंदा चालत असेल तर तो कापडाचा होय. पण त्याच धंद्याची आजची रडकथा अशी आहे कीं, कापडाच्या गिरण्यांपैकीं बऱ्याच गिरण्या कापडाला खप नसल्यामुळे बंद ठेवाव्या लागल्या आहेत. एकीकडून देशी कापडाला पुरेसें गिऱ्हाईक नाही म्हणून ओरड सुरू आहे. आणि दुसरीकडून परदेशी कापडाने देशांत शिरून तेंच गिऱ्हाईक उपटण्याचें काम चालविलें आहे यालाच देशी उद्योग–धंद्यांची भरभराट समजावयाची असेल तर सर्व देशी गिरण्या बंद पडून आमच्या पेठा परदेशी कापडाने व्यापून टाकल्या म्हणजे हिंदुस्थान वैभवाच्या शिखरावर पोचला असें मानावें लागेल. त्यांतच आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची कीं, हिंदुस्थानांत यावयाची यंत्रसामुग्री या काळांत कमी पडली. हेंहि भरभराटीचेंच लक्षण म्हणावयाचें ! कारण त्यापासून व्हाइसरॉय असें अनुमान काढणार कीं, हिंदुस्थानांत जिकडे तिकडे कारखानेच कारखाने व धंदेच धंदे झाल्यामुळे परदेशांतून यंत्रें आणण्याची हिंदुस्थानाला गरजच राहिली नाही; अथवा याहिपुढे जाऊन असेंहि म्हणतां येईल कीं देशांतच नवीन नवीन यंत्रें निर्माण होऊं लागल्यामुळे हिंदुस्थानाला या बाबतींत परदेशांची पर्वाच वाटेनाशी झाली.

बरें, निर्गतीचे आंकडे पाहिले तरी त्यांवरून काय निष्पन्न होतें ? हिंदुस्थानांतून ताग, पोती कॉफी, पोलाद, लोखंड व गळिताचीं धान्यें यांची व्हावयाची निर्गत उतरली. चहा, कापूस व तांदूळ यांची निर्गत वाढली. ताग व गळिताचीं धान्यें कमी गेल्यामुळे बराच मोठा शेतकरी वर्ग बुडाला. लोखंड व पोलाद यांचा खप कमी झाल्यामुळे इकडील टाटा आयर्न वर्क्स व भद्रावती आयर्न वर्क्स यांसारख्या लोखंड-पोलादाच्या कारखान्यांना ठोकर बसली. चहा अधिक खपला असला तरी चहाचे मळेवाले प्रायः युरोपियन असल्यामुळे त्यांची तेवढी तुंबडी भरली. आणि हिला व्हाईसरॉय म्हणणार हिंदुस्थानाची भरभराट ! फार लांब कशाला ? व्हाइसरॉयांनी याच आपल्या भाषणांत जपानचे व्यापारी हिंदी व्यापाऱ्यांशीं कापड व कापूस यासंबंधाने वाटाघाट करण्यास येणार असल्याचे सांगितलें आहे. जपानाने हिंदी कापसावर बहिष्कार घातला असून तो कापूस हिंदुस्थानांतहि खपत नसल्यामुळे शेतकरी वर्ग हवालदिल बनला आहे व त्याच गोष्टीचा विचार वरील वाटाघाटींत व्हावयाचा आहे. हें व्हाइसरॉयांस माहीत असता त्यांनी हिंदी उद्योग-धंद्याच्या भरभराटीची टिमकी वाजवावी हा उलटा न्याय नव्हे काय ?

व्हाइसरॉयांच्या भाषणांतील दुसरा महत्त्वाचा मुद्दा हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेचा. भावी राज्यघटना संयुक्त स्वरूपाची असून तिचे तीन आधारस्तंभ मानण्यांत येतात. त्यापैकीं रिझर्व्ह बँकेची मोट कशी घाईघाईने बांधण्यांत आली आहे व रेल्वे बोर्डाचें गांठोडें कसें डाव्या हाताने लांबविलें जात आहे हें वाचकांना माहीतच आहे. राहावा राहिले संस्थानिक. त्यांना व्हाइसरॉय व भारतमंत्री यांनी नुसत्या नजरेने इशारा देण्याचा अवकाश कीं ते फेडरेशनमध्ये पायांनी कशाला डोक्यानी चालत येतील याविषयीं शंका नाही. जाइंट पार्लमेंटरी कमिटिपुढे संस्थानिकां

तर्फे प्रतिनिधी म्हणून गेलेले सर अकबर हैदरी व कृष्णम्माचारी यांच्या भाषणावरून संस्थानिकांना हा इषारा आगाऊ मिळालेलाच दिसतो. फेडरेशनच्या पूर्व तयारीपैकीं ब्रिटिश सरकार व भारत मंत्री यांनी आपला भाग उचललाच असून व्हाइसरायांनीहि आपण आपल्या कामास लागल्याचें सांगितलें आहे. ओरिसा प्रान्त बिहारपासून व सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून विभक्त व्हावयाचा आहे. ओरिसा प्रांताच्या राज्यकारभाराची घडी बसवून देण्याकरितां हिंदुस्थान सरकाराने एक कमिटी नेमली आहे व सिंध प्रांताकरितां दुसरी कमिटी नेमण्याच्या ते तजविजींत आहेत.

फेडरेशनची स्थापना हिंदुस्थानांत वर्ष दोन वर्षांत होणार असली तरी फेडरेशन हें स्वराज्य नव्हे अशी कबुली सर षण्मुखं चेट्टी यांच्या मेजवानीचे वेळीं व्हाईसरॉयांनी दिलीच आहे. सध्याचें फेडरेशन स्वराज्यापासून फार दूर आहे हें त्यांना माहीत आहे. तरी देखील आहे या फेडरेशनची महती गातांना प्रत्यक्ष स्वराज्याचा भास त्यांनी उत्पन्न केला आहे! सांप्रत नवा कर बसला, जुलुमी कायदा पास झाला, बजेटात तूट आली, खर्चाला काट मारला नाहीं कीं कौन्सिलांतील राष्ट्रीय पक्षाचे प्रतिनिधि टीकेचा बडगा घेऊन सरकारी अधिकाऱ्यांच्या मागें लागतात. पण व्हाइसरॉय आपल्या भाषणांत हिंदी प्रतिनिधींना व जनतेला बजावतात कीं 'आतां त्या गमजा विसरा. नवीन राज्यघटनेंत सामाजिक व आर्थिक स्थिति सुधारण्यास हिंदी लोकांना पुष्कळ वाव मिळणार आहे. त्यावेळीं सरकार तुम्हीच व टीकाकारहि तुम्हीच होणार. यासाठी राष्ट्रीय पक्षाच्या प्रतिनिधीनो! तुमच्या अंगांत काय कर्तृत्व असेल ते दाखवा.'

व्हाइसरॉयांनीहि स्वराज्य छाटीत आणता आणता सामाजिक व आर्थिक सुधारणेवरच आणून ठेवलेंच आहे म्हणा; पण यापैकीं कायद्याने सामाजिक सुधारणा घडवून आणण्याच्या कामांत हिंदी लोकांना फुशारकी वाटण्यासारखें काय आहे हेंच आम्हांस कळत नाही. कारण तिच्यापासून इंग्रज सरकाराचे व त्यांच्या जातभाईचें कोणतेंच नुकसान नाही आणि हिंदुस्थानाचा राजकीय किंवा आर्थिक लाभ नाही. त्यांत कलागती लागल्या तर त्यांचा तमाशा पाहाण्यास इंग्रजलोक बसलेच आहेत. परंतु औद्योगिक सुधारणेचे तसें नाही. तिजमुळे इंग्रज लोकांच्याहि पोटाला चिमटा बसण्याचा संभव असल्याने नुसतें औद्योगिक स्वराज्यहि हिंदुस्थानाला मिळण्याची आशा नाही. अशा स्थितींत त्या स्वराज्याचें नांव घेऊन हिंदी लोकांना जिभल्या चाटावयास लावण्याचा व्हाईसरॉयांचा विचार दिसतो. तरी पण त्यांच्या भाकितापैकीं हें एवढेंच पूर्णांशाने खरें ठरल्यास हिंदी लोकांस तें समाधानहि कांही थोडे नाही. सारांश व्हाइसरॉयांचें भाषण वाचलें व त्यांत त्यांनी उभा केलेला मायावी बाजार पाहिला म्हणजे 'भल्याची दुनिया नाही' असेंच म्हणावें लागतें.

# पुण्यांतील गिरणीकामगारांचा संप

पुणें येथील राजाबहादुर मिलमधील कामगारांच्या पगारांत १२॥ टक्के कपात करण्यांत आल्याने गिरणीमधील कामगारांनी गेल्या शुक्रवारीं संप पुकारला. गिरणीमधील कापड--खात्यांतील एकूण एक कामगार संपांत सामील झाले. संपवाल्या व इतर कामगारांची जाहीर सभा संगमावरील उघड्या मैदानावर सोमवार ता. ४ सप्टेंबर रोजीं सकाळीं ७॥ वाजता श्री. व्ही डी. चितळे यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सभेस सुमारें ४०० कामगार हजर होते. सभेत संप एकजुटीने व जोमाने टिकविण्याबद्दल चितळे, महंमद शिदिक नूरमहंमद, बाबूराव शिंदे वगैरे कामगारांचीं भाषणें झाली. नंतर श्री. के. एन. फडके यांच्या अध्यक्षतेखाली कामगारांची संप-कमिटी नेमण्याचा ठराव एकमताने पास झाला. चितळे यांनी आपल्या भाषणांत आपल्या लढ्याचें यश कामगारांच्या एकजुटीवर आहे, कामगारांचा लढा कामगारांनी आपल्या हिताला जागून लढविण्यास पुढे आलें पाहिजे, व संपाचा लढा संप—कमिटीच्या पुढारीपणाखाली अत्यंत शिस्तीने व जोमाने चालविला पाहिजे,

असें सांगितलें. संपाचें यश पुढाऱ्यांच्या मोठेपणावर वर नसतें तर कामगारांच्या एकजुटीवर व जोमावर असते ही गोष्ट त्यांनी कामगारांना पटवून दिली. भाई महंमद शिदिक यांनी आपल्या भाषणांत हा संप चालवून कामगारांचें काम संपत नाही, तर कामगारवर्गाच्या हितासाठी झगडण्यास लढाऊ कामगार यूनियन स्थापन केली पाहिजे असे सांगितलें. भाई शिंदे यांनी 'कामगारांची एकजुटीने संप चालविण्याची तयारी आहे ना?' असें विचारतांच कामगारांनी एका आवाजाने व हात वर करून होय म्हणून सांगितलें. शेवटीं कामगारांच्या लाल बावट्याच्या जयजयकारांत सभा बरखास्त झाली. संप कमिटींत पुढील सभासद आहेत--फडके के. एन. अध्यक्ष, व्ही. डी. चितळे, शिदिक, शेळके, गोडसे, नूरमहंमद, शिंदे, काळे व सावंत सभासद.

# ग्रामोद्धाराचा एक प्रयोग

( लेखक--कृष्ण--कुमार )

भादें ( सं. भोर ) मुक्कामीं ग्रामसंघटण मंडळ स्थापन झाल्यास आज उणीपुरीं पावणेतीन वर्षे होऊन गेलीं. मंडळाचे कार्याला एक वर्षानंतर चालना मिळाली, असे आजपर्यंतच्या माझ्या अनुभवावरून दिसून आलें आहे. मंडळाची पहिली कामगिरी म्हणजे मोफत वाचनालय काढून लोकांना जगांत काय चाललें आहे याची कल्पना देणें. सर्वच लोक जवळ जवळ अशिक्षित किंवा सही करण्यापुरते शिकलेले! तेव्हा अशा लोकांना वर्तमानपत्रें वाचून दाखविण्याचें ठरलें. परंतु पैशाशिवाय वर्तमानपत्रे कशीं येणार? तेव्हा वर्गणी करावयाचे योजिले. पण तोंपर्यंत काय स्वस्थ बसावयाचे? म्हणून येथील सावकारांना विनंति करून कार्याची दिशा सांगितली व ती त्याना पटलीहि. त्यांनी आपल्याकडील केसरी, मौज व यशवन्त हीं नियतकालिकें मंडळाला दिलीं. सेक्रेटरींनी श्रीबहिरवनाथाच्या देवालयांत मंडळाचे वाचनालय थाटले व प्रारंभीं पदरचें तेल जाळून लोकांना वर्तमानपत्रे वाचून दाखविण्यास सुरुवात केली. खेड्यांतील लोकांना रात्रीशिवाय दुसरा निवांत वेळ नसतो, म्हणून तीच वेळ मुद्दाम पसंत केली. एकदोन आठवडे जातांच लोकांना गोडी वाटं लागली व तें पाहून सभासदानाहि आपण वाचून दाखवावेंसें वाटूं लागलें. पण तेवढ्याच वर्तमानपत्रावर भूक भागवावयाची का? भूक पुष्कळ होती पण पैसे मिळेनात. तेव्हा गरीब सभासदानी पाळीने वाचनालयांत रात्रीचा दिवा लावावयाचा व लोकांना वर्तमानपत्रें वाचून दाखवावयाचीं आणि श्रीमंत मेंबरांनीं वर्तमानपत्रें मागवून वाचनालयांत ठेवावें असें ठरलें. त्यामुळे हिशोब ठेवणें नको व सेक्रेटरीने पैसे खाल्ले म्हणावयाला नको! महिना--अखेरीस भाला, ऐक्य, महाराष्ट्र वगैरे अनेक पत्रें व किर्लोस्कर, कृषिवल चित्रमयजगत् वगैरे मासिकें येऊं लागलीं. श्रोतृगणहि भरपूर येऊं लागला.

### भांडणास सुरुवात

गांव तेथे महारवाडा असावयाचाच! आमच्या गांवांत मंडळ स्थापन होऊन ९--१० महिने झाले नाहीत तोंच रणें माजलीं. बेदूर त्या वेळेस दणकला. फिर्यादीअर्यादी झाल्या. हा खटला दोन-तीन महिने गर्जत होता. आरोपी--फिर्यादींचें शिरवळ मुक्कामीं कोर्ट-खोटे चालतेच होते. सेक्रेटरीचें कोणीच ऐकेना. त्यांचें वजन कोणत्याच पक्षावर पडेना. मंडळाला ही गोष्ट तर लाजिरवाणी. आता काय करावें हा प्रश्न पडला. तेव्हा सर्व सभासदांनी मिळून परगांवचा वजनदार गृहस्थ आणून समेट करावयाचें ठरविलें. सेक्रेटरी पुण्यास गेले. श्री. काशिनाथ ठकजी जाधव याना दसऱ्याचे दिवशीं घेऊन आले. सभामंडपांत सभा झाली. दोन्ही पक्षांचे लोक बोलाविले व आले. जाधवांनी एकीचा उपदेश केला. फिर्याद काढून टाकण्यांत आली; व एकीचीं बंधनें अधिक दृढ होण्याकरिता नवे पंच निवडले. पुनः एकी होऊन मंडळाचें काम सुरक्षित चालू लागलें.

### रस्त्याची दुरुस्ती

दुसऱ्या वर्षाला नव्या जोमाने सुरुवात झाली. एकीचें बळ या वेळेस अधिक होतें. पूर्वीच्या वर्षी पंच नव्हते ते नऊ जण मिळाले. त्यांचा पाठिंबा मंडळाला मिळाला. ग्रामकार्याला सुरुवात झाली. गांवांत जिकडे तिकडे केरकचरा दिसत होता, तो नाहीसा कसा करावा म्हणून सेक्रेटरी विचार करीत होते. गांवांतील तंटेबखेडे कोर्टापर्यंत जाऊं न देता आपसांत तडजोड करून मिटवून टाकण्याचें कार्य नवे पंच करूं लागले. नऊ पंच होते खरे, परंतु जवळ

जवळ सहाजण, मंडळ असलें काय किंवा नसलें काय दोन्ही सारखेंच, असा मत्लाचे! ज्यांनी मंडळ स्थापन केलें तेच अर्थात् गांवभानगडींत पडत. सेक्रेटरी हाच सरपंच पाहिजे म्हणाना! एके दिवशीं एक भंग्याचें जोडपें फिरत फिरत भादें मुक्कामीं आलं. सेक्रेटरींना आयतीच संधि सांपडली. त्यास त्यांनी कामावर ठेविलें. रात्रौ श्रीबहिरव—देवालयांत वाचन चालू झालें. पुनः श्रोतृगण जमूं लागला. गांवांतून शिरवळ-लोणंद सडकेला जाण्याची जी १ मैल लांबीची सडक आहे ती पावसाळ्यांत फारच खराब होत असे. गांवांतून एक मोठा नाला जात आहे. परंतु पुढे त्याचें पाणी ओढ्यास मिळूं न दिल्यामुळे फुगे. त्यामुळे गांवांतून रानांत मनुष्यें, जनावर जाण्यास मांड्याइतका चिखल होत असल्यामुळे फार त्रास पडे. तेव्हा लोकांनी एका बाजूने साधारण ६ फूट रुंदीची (सडक) तयार केली. नंतर पुन्हा दुसरी बाजू करण्याचा गमतीचा प्रसंग आला. भोरचे दिवाण मोटार उडवीत आले; पण जेव्हा मोटारीचें चाक चिखलांत रुतून बसलें तेव्हा बैल लावून मोटार ओढावी लागली! पुढे नवपंचांनी पुन्हा गांवांतील लोकांना गोकुळ-अष्टमीस श्रीहनुमंताचे देवालयांत बोलवून दुसरी बाजू (सडक) करावयाचें ठरविलें. कोणा गाडी तर कोणी गडी देऊन गोकुळ-अष्टमीनंतर ७—८ दिवसांनी कामाला सुरुवात केली. पूर्वीप्रमाणेच मोठमोठे दगड, नंतर गोटे व त्यावर मुरूम टाकून सडक तयार केली.

### रात्रीची शाळा

रात्रीची शाळा काढण्यांत आली. प्रारंभीं चौघेजण मास्तर होते. ते पाळीप्रमाणे काम करीत. मुलें (ता. ३ जुलै १९३२) सुरुवातीला ७—८ होतीं. दीड महिन्यांत संख्या वाढत वाढत २७ वर आली. त्या वेळेस माझा मुक्काम तेथेच असल्यामुळे व मी दुय्यम शिकलेला व रिकामा असल्यामुळे मला सेक्रेटरींनी रात्रीच्या शाळेची व्यवस्था पाहण्यास सांगितलें. मीहि तेवढीच ग्रामसेवा म्हणून कबूल केलें व त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे व्यवस्था करून दिली.

सडकदुरुस्ती, वाचनालय, मोफत रात्रीची शाळा वगैरे कामें एका झाल्यावर आठवड्यांत भंडारा करण्यांत आला. तीस गांवांच्या लोकांना दिंड्या घेऊन बोलाविलें होतें. ७-८ गांवची मंडळी आली! भजनें वगैरे कार्यक्रम झाला.

### पंचांवरील संकट

मध्यंतरीं गांवांतील एका वाण्याने भरलोकांत पंचांचा अपमान केला म्हणून त्या वाण्याला पंचांनी दंड केला. परंतु त्याने शिरवळ कोर्टांत हे सर्व पंच उभे केले. तेव्हा पंचांना गांवचा पाठिंबा नाहीसा झाला. पंचांची स्थिति फारच केविलवाणी झाली; परंतु निभावलें. या अडचणीशिवाय दुसऱ्या वर्षांत पंचांना तापदायक असें कोणतेंहि दुसरें कृत्य झालें नाही. पहिल्या भंग्याने ७५ रुपये नेल्यावर दुसरा दरमहा १२ रुपये पगारावर ठेवला. तो आठ महिने होता. 'जनता, दक्षिणमहाराष्ट्र, जागृति' हीं वृत्तपत्रें व स्त्री मासिक नवीन सुरू केलें व ऐक्य (फक्त पोस्टेज) भाला हीं मोफत मिळविलीं. मौज बंद केली. गांवचा इतिहास व इतर माहिती जमा करण्याचें काम सुरू केलें. रात्रीच्या शाळेंत ४५ मुलें झालीं. ग्रामदूत मासिक श्री. विष्णु कृष्ण वाघ यांचे (हस्तलिखित) संपादकत्वाखाली सप्टेंबर १९३२ पासून निघूं लागलें. गांवांतील लोकांचें लेखन यांतून सुरू झालें. लेखन, वाचन, झाडलोट, शाळा वगैरे व्यवस्थित चालू झालें. आरोग्याच्या दृष्टीने मुद्दाम दरसोमवारी लोणंद येथून वैद्य आणण्यांत येऊं लागला, परंतु त्याला रोगीच कोणी भेटेना. तेव्हा ७-८ आठवडे होतांच तो येईना, व्यर्थ हेलपाटे किती घ्यावयाचे?

### सल्लागार मंडळाची निवडणूक

दसरा येतांच पुण्याची मंडळी भादें मुक्कामीं येणार होती. दसऱ्याचे आदले दिवशीं श्री. वि. दा. फाटक भाद्यास आले. निवडणुकीला वर्ष झालें. पुनः पंच निवडावयाचे होते. श्री. फाटक यांचे अध्यक्षतेखाली श्रीबहिरवनाथाचे देवालयांतील सभामंडपांत निवडणुकी झाल्या. त्या वेळेस हो ना करता करता, समजूत घालता घालता, लोकांना उत्तरें देता देता व जुन्या पंचांना गोंजारता गोंजारता श्री. फाटकांच्या नाकीं नव आले! पंचांना वाटे आम्ही पगार न घेता कामें करतों तर गांवाने आमचें ऐकू नये कीं काय? आम्ही वावगें तें काय करतों? तर गांवाला वाटे आम्हाला पंच पाहिजेत! पण ते श्रीमंतांपुढे गोंडा घोळणारे व गरिबांचे पाठींत काठ्या घालणारे नकोत! जुन्या पंचांतील तीन पंच काढून नवीन तीन पंच घातले. इतःपर पंचांनाच सर्व भार उचलावा लागूं नये म्हणून २७ जणांचे सल्लागार मंडळ निवडण्यांत आलें. अहवालवाचन व गांवाची माहिती वाचून दाखविण्यात आली.

कोणतीहि गोष्ट करतांना हुरूप असावा लागतो. तो हुरूप एकदा का गेला म्हणजे मग कोणतेंहि कार्य हातीं असेना त्याचा समाधानकारक निकाल लागावयाचाच. अशीच स्थिति भाद्याच्या ग्रामसंघटन-मंडळाची झाली. पूर्वीचा उत्साह गेला त्यामुळे वाचनालयांत कीं ऑफिसमध्ये सेक्रेटरी ढुंकून पाहीनात! आता फक्त रात्रीची शाळा व

मासिक चालू आहे. सेक्रेटरींनी आपलें अंग मंडळांतून जवळ जवळ काढल्यासारखें. दुसरे पंच तर आपले भंगयापायीं १३। रुपये गेले म्हणून स्तब्ध आहेत! मुख्य पंच जर निरुत्साही तर मंडळ असलें नसलें तरी चालेल म्हणणारे इतर पंच किंवा सल्लागार मंडळी काय करणार?

यासाठी नवीन निघणाऱ्या ग्रामसंघटनेच्या मंडळांत पैसा, उत्साही व सुशिक्षित पंच अवश्य असावयास पाहिजेत. त्याचप्रमाणे पक्षपात होता उपयोगी नाही. जर पक्षपात झाला तर लोकांचा विश्वास उडतो. त्याचप्रमाणे आंतून शिरजोर पक्षास मदत करणें, वरून सभ्यपणाचा आव आणून आंतून बेकीला उत्तेजन देणें असें करणारे पंच मंडळांत मुळीच नसावेत; व पक्षपातीपणा जर पंचांत नसेल तर सबंध गांव त्यांच्यामागे धावेल. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पैसा व उत्साह पाहिजे. पक्षपातरहित व शांत असा पंच पाहिजे.

# बंगालमधील अत्याचार

## मिदनापूरच्या कलेक्टराचा खून

गेल्या शनिवारीं सायंकाळीं मिदनापूर येथे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मि. बी. ई. जे. बर्ज यांच्यावर गोळीबार करून त्यांस ठार मारण्यांत आलें. १९३१ च्या एप्रिल महिन्यांत त्याच जिल्ह्याचे डि. मॅजिस्ट्रेट मि. पेड्डी यांचा अशाच भयंकर रीतीने खून झाला होता व १९३२ च्या एप्रिलमध्ये त्याच जागेवरील अधिकारी मि. रॉबर्ट डग्लस हेहि गोळीबारास असेच बळी पडले होते. मि. बर्ज हे क्रांतिकारकांच्या गोळीबाराने मरण पावणारे मिदनापूरचे तिसरे जिल्हाधिकारी होत.

शनिवारीं टाऊनक्लब व मुसलमान यांमध्ये फूटबॉलचा सामना व्हावयाचा होता. टाऊन क्लबाच्या वतीने मि. बर्ज खेळणार होते. ते मोटारींतून पोलीस लाईनीच्या मैदानांत उतरले, व चार-दोन पावलें टाकतात न टाकतात तोंच त्यांच्यावर गोळ्या झाडण्यांत आल्या. ते तत्काळ व त्याच ठिकाणीं गतप्राण होऊन पडले. त्यांच्या सर्वांगावर गोळ्या लागल्या होत्या. मि. बर्ज यांच्या संरक्षकांनीं हा प्रकार पाहून उलट गोळीबार सुरू केला. क्रांतिकारकांपैकीं एकजण गोळी लागून जागच्या जागीं ठार झाला. हा तरुण स्थानिक कॉलेजांतील विद्यार्थी होता दुसऱ्यास नुसती गोळी लागली व तिसरा पकडला गेला. मि. बर्ज यांच्या पत्नीहि त्या वेळी तेथें हजर होत्या. जखमी झालेल्या इसमास इस्पितळांत नेण्यांत आले व तेथे त्याची शेवटची जबानी घेण्यांत आली.

भर मैदानावर हजारों लोकांच्या देखत हा भीषण अत्याचार घडला हें पाहून लोक फार स्तंभित झाले. अर्थात् सामना तहकूब झाला व सामन्याच्या ऐवजी या अत्याचाराच्या परिणामानेच लोकांचें मन व्याप्त होऊन गेलें.

मि. बर्ज ३८ वर्षांचे होते. १९२१ सालीं ते नौकरींत शिरले व बंगालमध्येंच त्यांनी सर्व वर्षे घालविलीं. टाऊन क्लबाचे ते अध्यक्ष होते व क्रिकेट वगैरे सर्व खेळांविषयीं त्यांना फार आवड होती. ते क्रिकेट खेळण्यांत तर निष्णात होतेच व लोकांमध्यें-खेळांविषयीं प्रेम उत्पन्न करण्यासाठी ते फार प्रयत्न करीत. ते स्वभावाने फार गरीब व मनमिळाऊ होते व त्यांना त्यांच्या परिचयाची सर्व मंडळी डिक बर्ज या घरगुती नांवानेच संबोधीत.

बरद्वान भागाचे कमिशनर मिदनापूर येथे गेले असून, पोलीस चौकशीनंतर आतापर्यंत साठ लोकांना अटक करण्यांत आली आहे. जखमी झालेल्या बंगाली तरुणाच्या अंगांतून एक गोळी बाहेर काढण्यांत आली. पकडलेल्या इसमाजवळ एक पिस्तुल व एक रिव्हॉल्व्हर सांपडलें.

मि. बर्ज यांच्या शवाची मिरवणूक रविवारीं सकाळीं लष्करी थाटाने काढण्यांत आली व स्टेशन चर्चमध्ये त्यांचे शव पुरण्यांत आलें. जेम्स पेड्डी यांच्या प्रेताजवळच बर्ज यांचें प्रेतहि पुरण्यांत आलें.

टाऊन क्लबाच्यामार्फत सभा भरवून बर्ज यांच्या निधनाविषयी खेदप्रदर्शन करण्यांत आलें.

महात्मा गांधींनी या अत्याचारासंबंधी खालील मत व्यक्त केलें आहे—अहिंसेवरील माझा आत्यंतिक विश्वास व राजकीय स्वातंत्र्य व हक्क संपादन करण्याचा मार्ग या नात्यानें अत्याचारावरील माझा पूर्ण अविश्वास पुनश्च जाहीर करणें अनवश्यक होय. मिदनापूरच्या जिल्हाधिकाऱ्याचा खून झालेला ऐकून मला अत्यंत खेद झाल्याखेरीज कसा राहील?

जखमी झालेला बंगाली तरुण इस्पितळांत ता. ३ रोजीं दोनप्रहरीं निवर्तला. हा तरुण मॅट्रिकच्या वर्गांत शिकणारा असून खुनाच्या दिवशीं दुपारीं दोन वाजेपर्यंत वर्गांत हजर होता.

या अत्याचाराविषयीं ले. असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांत अनुक्रमें एफ्. ई. जेम्स व घोष मलिक यांनी तातडीचे प्रश्न पाठविले आहेत.

# चिपळुणकर पारितोषिक समारंभ

शनिवार ता. २ रोजीं सायंकाळीं ५ वाजता पुणें फर्ग्युसन कॉलेजाच्या ॲंफिथिएटरमध्ये यंदा एम. ए. च्या परीक्षेंत मराठी विषय घेऊन पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झालेले श्री. **वा. भा. पाठक** यांस चिपळुणकर पारितोषिक देण्याचा समारंभ श्री. **न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखाली झाला. प्रारंभीं प्रि. महाजनी यांचे प्रास्ताविक भाषण झालें.

### प्रि. महाजनींचें भाषण

ते म्हणाले, "हा समारंभ यापूर्वींच व्हावयाचा.परंतु या कॉलेजाचे आजीव सेवक प्रो. के. के. जोशी यांच्या मृत्यूमुळे तो लांबणीवर टाकावा लागला. आजच्या समारंभालाहि शहरांत चालू असलेल्या प्लेगच्या छायेमुळे थोडें वैगुण्य आलें असले तरी आजच्या या समारंभाला अनेक दृष्टींनी महत्त्व आहे. पहिलें महत्त्व असें कीं आज ज्या थोर विभूतीच्या स्मृतीनिमित्त पारितोषिक देण्यांत येणार आहे त्या विष्णुशास्त्री चिपळुणकरांनींच डेक्कन एज्युकेशन सोसायटी स्थापन केली. त्या सोसायटीचेंच हें कॉलेज आहे. दुसरी गोष्ट अशी कीं चिपळुणकर स्मारक मंडळातर्फे देण्यात येणारें पहिल्या वर्षाचें बक्षीस चिपळुणकरांनी स्थापन केलेल्या कॉलेजमधील विद्यार्थ्याला मिळत आहे. आणि तिसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं, तें बक्षीस श्री. तात्यासाहेब केळकरांच्यासारख्या एका उत्कृष्ट साहित्यसेवकाच्या हस्तें मिळत आहे. महाराष्ट्राच्या इतिहासांत सन १८८० ते ९० हा दहा वर्षांचा काळ सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा आहे. या काळांत राष्ट्राला परिपोषक अशा 'केसरी–मराठा संस्था,' 'शिक्षणप्रसारक मंडळी', 'चित्रशाळा', 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी', 'आर्यभूषण प्रेस' वगैरेसारख्या ज्ञान देणाऱ्या संस्था चिपळुणकरांच्या हस्तें सुरू झाल्या आणि त्यांनी लावलेल्या या वृक्षांना १९३०-४० सालांत किती गोड फळें येत आहेत हें निराळें सांगावयास नकोच.

### शास्त्रीबुवांची योग्यता

मराठी भाषेची अविश्रांत सेवा करणारे विष्णुशास्त्री यांची योग्यता निदान महाराष्ट्राला तरी नव्यानें सांगावयास नको. आणि म्हणूनच मी त्यांच्याविषयी महाराष्ट्रांतील व्यक्तींना काय वाटतें हें न सांगतां मि. झकेरियस यांनी आपल्या 'रिनेसंट इंडिया' नांवाच्या पुस्तकांत चिपळुणकरांच्याविषयीं काय मत प्रगट केलें आहे तें वाचून दाखवितों. तो म्हणतो, "Chiplunkar, alas, died too young to be able to do more than set in motion what others have carried on—but it is noteworthy that the 'London Graphic' in an obituary on Chiplunkar's death called him 'one of those pioneers of progress, who, if they become numerous enough, will some day make India a Self-governing Community,"

आज ज्या विद्यार्थ्याला मराठीचें बक्षीस देण्यांत येणार आहे ते रा. पाठक हे आमच्या कॉलेजचे विद्यार्थी असून एक उदयोन्मुख कवि व लेखक आहेत. त्यांनी 'आशागीत' नांवाचें एक काव्याचें पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. असो. तेव्हा अशा समारंभप्रसंगीं श्री. तात्यासाहेब केळकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी मी सूचना करतों."

या सूचनेस प्रो. चाफेकर यांनी उचित शब्दांत अनुमोदन दिलें. अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर कॉलेजांतील वाङ्मय मंडळाचे चिटणीस श्री. अ. ह. लिमये यांनी चिपळुणकर स्मारक मंडळाची हकीकत वाचून दाखविली. त्यांत त्यांनी कै. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांच्या अर्धशत सांवत्सरिक श्राद्धदिनानिमित्त ता. ३ एप्रिल १९३२ रोजीं भरलेल्या सभेचा व त्यांत झालेल्या स्मारकाच्या योजनेच्या ठरावाचा उल्लेख करून आज या स्मारक मंडळाजवळ रु. २८५५८१८२ रक्कम आहे व या रकमेवर येणाऱ्या व्याजापैकीं दरसाल दीडशें रुपयांचें चिपळुणकर पारितोषिक देण्यांत येणार असल्याचें सांगितलें.

### केळकरांचें भाषण

यानंतर अध्यक्ष श्री. केळकर यांचें समारोपादाखल खालील आशयाचें भाषण झालें. ते म्हणाले, 'विष्णुशास्त्री कोण होते व त्यांनी मराठीची सेवा किती केली आहे हे प्रत्येकाला माहीतच आहे. गेल्या दीडशें वर्षांत मराठी लेखक पुष्कळ झाले असले तरी विष्णुशास्त्र्यांच्याबद्दल प्रेम वाटण्याचें कारण त्यांची लेखनशैली हें तर एक आहेच पण त्याहूनहि विशेष म्हणजे त्यांचें निर्मळ चरित्र व उच्च ध्येय हें होय. मराठी भाषेचें महत्त्व व इंग्रजी भाषेच्या तोडीचें लेखन जगाला जर कोणी लिहून दाखविलें असेल तर तें विष्णुशास्त्री यांनीच होय. पण याहि गुणापेक्षा त्यांनी आपल्यासमोर जे ध्येय ठेवलें होतें त्याला मी विशेष महत्त्व देतों. शास्त्रीबोवांच्या वेळचा काळ असा होता कीं

सरकारी नोकरी अगदी सरळ मार्गानें मिळत असे. आणि एकदा कां मनुष्य सरकारी नोकरीला चिकटला कीं तो शेवटच्या हुद्द्यापर्यंत आपोआप चढत जावयाचा. अशा तऱ्हेची नोकरी शास्त्रीबोवांना मिळाली असतां मराठी भाषेची होत असलेली केविलवाणी स्थिति पाहून त्यांनी स्वेच्छेने व नातेवाईकांची इच्छा बाजूला सारून नोकरीवर पाणी सोडलें व मराठी भाषेची सेवा करण्यास सुरुवात केली.

त्याकरिता त्यांनी पहिल्याप्रथम 'आर्यभूषण' छापखाना काढला व लेखनद्वारा जागृति करण्यास सुरुवात केली. नंतर 'चित्रशाळा' आणि मग इतर संस्था व इंग्रजी-मराठी वर्तमानपत्रें सुरू केलीं. यावरून त्यांच्या प्रतिभेला किती पैल होते व त्यांची राष्ट्रोन्नतीकडे पाहण्याची दृष्टि कशी चौफेर होती हें दिसून येतें. अशा तऱ्हेनें शास्त्रीबुवांनी पुढील पिढीवर मोठें ऋण करून ठेवलें आहे. हल्लीच्या काळांत ज्ञान देणारीं सुलभ अशीं साधनें अनेक निर्माण झाल्यामुळे त्यांचा उपयोग करून चालू पिढी शास्त्रीबोवांच्या-पेक्षा नानाविध विषयांचें ज्ञान संपादन केलेली असेल पण मनुष्याची योग्यता नुसत्या ज्ञानभांडारा-वर करावयाची नसते तर त्याच्या कर्तृत्वावर मोजाव-याची असते. शास्त्रीबोवांनी ज्या ज्या संस्था स्थापल्या त्या आज किती भरभराटींत आहेत हें प्रत्यक्ष दिसतच आहे. अशा तऱ्हेच्या कर्तृत्ववान विभूतींचें स्मरण ठेवून अल्पांशानें का होईना पण अनृणी होण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.

### महाराष्ट्र विद्यापीठामार्फत बक्षीस

आणि याच दृष्टीनें या मंडळानें चिपळूणकरांच्या नांवानें पारितोषिक देण्याचा उपक्रम सुरू केला आहे. इतके दिवस मुंबई युनिव्हर्सिटींत मराठीला स्थान नव्हतें, पण तें स्थान मराठी भाषेच्या कांहीं अभि-मान्यांनी प्रयत्न करून खालपासून वरपर्यंत, विश्व-विद्यालयांत मिळवून दिलें. परंतु मराठी विष-याला निराळें बक्षीस असें अद्याप ठेवण्यांत आलेलें नाहीं. कोणी असें विचारतील कीं ही रक्कम मुंबई विश्वविद्यालयाच्या ताब्यांत कां दिली नाहीं ? याला उत्तर असें कीं, पहिल्याप्रथम हजार-दोन हजारांची रकम युनिव्हर्सिटी घेत नाहीं, तिला रक्कम द्यावयाची झाली तर निदान दहा हजार रुपये तरी लागतात आणि शिवाय ज्या ठिकाणीं मराठी भाषेविषयीं आस्था नाहीं तेथे रक्कम देऊन उपयोग तरी काय ? आज नाहीं उद्या महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन होणार हें खास आणि तसें तें स्थापन झालें म्हणजे त्यांच्या ताब्यांत आहे ही रक्कम आणखी थोडी भर घालून देऊं आणि ज्या दिवशीं महाराष्ट्र विद्या-पीठाकडून चिपळूणकरांच्या नावानें प्रथम बक्षीस दिलें जाईल तो दिवस मी अधिक भाग्या-चा समजेन. यंदा फर्ग्युसन कॉलेजांतील विद्यार्थ्या-ला बक्षीस मिळालें हे एका दृष्टीनें योग्यच झाले. तरी पण ते एखाद्या सरकारी कॉलेजांतील किंवा मिशन-यांच्या कॉलेजांतील विद्यार्थ्याला मिळतें तर अधिक बरें झाले असतें कारण ज्यांनी चिपळूणकरांचा जन्मभर द्वेष केला त्यांच्याच कॉलेजांतील विद्या-र्थ्याला चिपळूणकर पारितोषिक म्हणून बक्षीस देतां आलें असतें. यंदा या कॉलेजाला बक्षीस मिळालें हीहि गोष्ट कांहीं वाईट झाली नाहीं."

वरील आशयाचें श्री. केळकर यांनी भाषण करून दीडशें रुपयांची थैली श्री. पाठक यांना बक्षीस म्हणून दिली. यानंतर श्री. पाठक यांनी 'झाला हा सन्मान माझा नसून मराठी भाषेचा आहे' असें सांगून समयाला उचित अशा शब्दांत सर्वांचे आभार मानले. श्री. लिमये यांनी अध्यक्षांना हार घातल्यावर कॉलेजाच्यावतीनें प्रि. महाजनी यांनी गोड शब्दांत सर्वांचे आभार मानल्यावर हा समारंभ संपला.

# नाकापेक्षा मोतीं जड काय कामाचें

हिंदूंच्या प्राचीन कल्पनेप्रमाणे राजा हा प्रजेचा पिता होय. पाश्चात्यांच्या राजनीतींत आधुनिक काळांत बराच फरक पडला आहे. तो विचारांत घेतला असतां राजाची गणना नोकरांतच करावी लागते. तथापि राजा हा पिता असो वा नोकर असो, त्याच्या कर्तव्यांत मात्र त्यामुळे बदल होत नाहीं. बाप मुलांना जीव कीं प्राण करून त्यांच्या कल्याणाकरिता स्वतःच्या सुखावरहि पाणी सोडण्यास तयार असतो. उलटपक्षीं इमानी नोकरहि धन्याचा ऐषआराम व सुखसोयी यांना अग्रस्थान देऊन नंतरच स्वार्थाकडे पाहतो. हिंदी नोकरशाहीस यांपैकीं कोणताहि न्याय लागू पडत नाहीं. ती हिंदी लोकांना पुत्रवत् लेखीत नाहीं व त्यांचा धनी-पणाहि कबूल करीत नाहीं. यामुळे बेवारशी मिळकत हातांत आली असता तिची जशी

धूळधाण उडावी त्याप्रमाणे हिंदुस्थानाच्या हितसंबंधाचें नोकरशाहीच्या हातून मातेरें होत गेलें आहे. गेल्या बारापंधरा वर्षांतील मुंबई इलाख्याचा राज्यकारभार पाहून या गोष्टीचा प्रत्यय अधिक तीव्रतेने येतो.

वरील काळांत मुंबई इलाख्याच्या राज्यव्यव. स्थेंत दूरदृष्टीचें धोरण असें राहिलेंच नाही- त्यामुळे पैशाच्या उधळपट्टीस बेगुमानपणें सुरुवात झाली. शिलकी पैसा संपवून टाकावा व नवीन खर्च चालू उत्पन्नांतून न भागल्यास नवीन कर बसवावे अगर कर्ज काढावें हा क्रम मुंबई-सरकाराने आरंभिला. त्याचा परिणाम असा झाला कीं, नोकरशाहीची स्वार्थावर नजर असल्याने नोकरवर्गाचे पगार व भत्ते वाढले व नोकरांची संख्याहि फुगली. परंतु त्याबरोबरच जनतेच्या अपरिहार्य गरजाहि भागविणें भाग पडल्यामुळे त्याहि खर्चाचा आंकडा मोठा होत चालला. उदाहरणार्थ, प्राथमिक शिक्षण ही एकच बाब घेतली तरी तिचें महत्त्व जनतेस कळूं लागल्याने प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या मुलांमुलींची संख्या वाढून त्याजकरिता नवीन शाळा स्थापन करणें व शिक्षक नेमणें यावांचून सरकारास गत्यंतर राहिलें नाही. बरें, तशांतच प्राथमिक शिक्षण सक्तीने देण्याचा कायदा पास झाल्यामुळे तर सरकाराच्या फटफजितीस पारावारच उरला नाही. खर्चाचीं नवीं तोंडें अशा रीतीने उघडत असतां सर जॉर्ज लॉइडसारख्या गव्हर्नराला विलक्षण ढंग सुचत चालले. त्यांनी लाखों रुपये उधळून मुंबईच्या समुद्रास कॅन्यूट राजाप्रमाणे मागे हटविण्याचे वेडेचार सुरू केले; तसेच सिंधू नदीस बंधारा घालून सिंध प्रांताच्या रूक्ष मैदानाचें नंदनवन बनविण्याच्या अचाट कृत्यासहि हात घातला.

मुंबई-सरकारचें हें मूर्खपणाचें व अविचाराचें धोरण अखेर त्यांसच नडून त्यांना खर्चाची तोंडमिळवणी करतां करतां नाकीं नव आले! जवळची शिल्लक संपली, कर्जें काढलीं व नवीन कर बसाविले तरी खर्चाची खांच भरून येईना तेव्हा त्यास काटकसर हा एकच निर्वाणीचा उपाय शिल्लक राहिला. त्या दिशेने गेल्या दहा वर्षांत सरकाराने अनेक कमिट्या बसवून राज्यकारभाराची तपासणी केली. त्यांत थॉमस कमिटीची तपासणी ही शेवटची होय. थॉमस कमिटी ही खास सरकारी अधिकाऱ्यांची असल्यामुळे तिच्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करणें सरकारास भागच होतें. थॉमस कमिटींतील सभासदांस एकंदर राज्यव्यवस्थेंत चुकतें कोठे याचा बरोबर छडा लागला. नोकर लोकांचे पगार व भत्ते अवाच्या सवा वाढले आहेत व त्यांची भरतीहि भरमसाट करण्यांत आली आहे, याविषयी कमिटीची बालंबाल खात्री झाली. खालपासून वरपर्यंतच्या सर्व नोकरांचे पगार फाजील वाढण्याचें कारण कमिटीस समजून चुकलें तें असें कीं, ऑ. इं. सर्व्हिसमधील अव्वल दर्जाच्या अधिकाऱ्यांना ओझींच्या ओझीं पगार देण्याचें ठरल्यामुळे प्रॉ. सर्व्हिसमधील व कनिष्ठ नोकरींतील इसमांचे तनखेहि वरील क्रमाला शोभतील अशा क्रमाने ठेवण्याचा पायंडा पडला. कमिटीच्या मतें न्यायतः म्हटलें असता वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या पगारावरच घाव घालून प्रथम तेच तोडले पाहिजेत. त्यानंतर प्रॉव्हिन्शिअल सर्व्हिस व तिच्यामागून कनिष्ठ नोकरवर्ग यांच्यावर गदा आणिली पाहिजे. परंतु कमिटीकडे वरिष्ठ नोकरवर्गाविषयी सूचना करण्याचा अधिकार मुंबई-सरकाराने ठेवला नसल्यामुळे तिने लहानसान बायाबापड्यांच्या मुंड्या मुरगळण्याच्या युक्त्या सुचविल्या व त्याखेरीज इतरत्रहि धिंगाणा घातला.

कोठे शेतकी कॉलेजच बंद ठेवा, व्यापारी कॉलेजास गचांडी द्या, स्कूल ऑफ आर्ट बुडवून टाका, प्राथमिक शिक्षकांचे पगार छाटून त्यांतूनच २७॥ लक्ष रुपयांची बचत करा अशा कैक अर्वाच्यपणाच्या सूचना कमिटीच्या रिपोर्टांत होत्या. परंतु मुंबई—सरकाराने शहाणपणा करून यांपैकीं बहुतेक सूचना त्याज्य ठरविल्या व बाकीच्या अमलांत आणण्याचें योजलें, त्यासंबंधाचे कित्येक आंकडे गेल्या

आठवड्यांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यावरून सरकार बरेंच शुद्धीवर येत चाललें आहे असें दिसतें. इलाख्यांतील सर्व खात्यांवरून सरकारानें आपली कात्री फिरविली असून त्याप्रमाणे यंदाच्या वर्षी २४ लक्ष रुपयांची बचत होईल असा सरकाराचा अंदाज आहे. सरकारानें जशी सर्रास कात्री चालविली आहे, तसेच चिमट्यानें कांही केसहि उपटले आहेत. त्यांनी भत्ते कापले आहेत; नोकर कमी केले आहेत, नवीन नोकरांच्या पगाराचें स्केल कमी धरलें आहे व कांही नोकर आज कामावरून काढतां येत नसले तरी ते पेन्शनांत निघाल्यानंतर त्यांच्या जागा रद्द व्हावयाच्या आहेत.

एकंदर कपातींत पब्लिक वर्क्स खात्याचा आंकडा मोठा दिसतो, परंतु तो फुगवून दाखविला आहे. या खात्यांत दहा लक्षांहून अधिक रकमेची बचत यंदाच झाली आहे. परंतु त्या दहा लक्षांतील सात लक्ष रुपये दस्तुरीच्या उत्पन्नाचे आहेत हें लक्षांत घेतल्यास सदर आंकडा ३ लक्षच उरतो. भत्ता सर्रास छाटल्यामुळे त्यांतून सुमारें ४॥ लक्ष रुपये वांचले आहेत. बड्या अधिकाऱ्यांपैकीं फक्त दोनच अधिकाऱ्यांच्या जागा रद्द झाल्या आहेत. एक जागा डायरेक्टर ऑफ पब्लिक हेल्थची व दुसरी सुपरिंटेंडिंग इंजीनियराची. पंचमहाल व भडोच हे दोन जिल्हे मोडून त्यांचा एक जिल्हा करण्यांत येणार आहे. कुलाबा जिल्ह्याचीहि तशीच वासलात लागणार आहे. प्रॉव्हिन्शियल व सबॉर्डिनेट नोकरवर्गाच्या पगारासंबंधी थॉमस कमिटीनें केलेल्या सूचना महत्त्वाच्या असून त्यांचा अंमल दरसाल होत राहून अखेर बचत चोवीस लक्ष रुपयांची होईल असा अंदाज आहे. शिक्षण खात्यांत ४४५०० रुपयांस यंदा काट बसला असून अखेर हा काट ११५३०० रुपयांवर जाणार आहे. यांत डेक्कन कॉलेज, ग्रँट मेडिकल कॉलेज, स्कूल ऑफ आर्ट यांच्यांतील कपातीचा समावेश झाला असल्यामुळे प्राथमिक शिक्षकांच्या पगारावर थॉमस कमिटीनें उगारलेली गदा टळली असावी असें वाटतें. परंतु प्रांतिक व कनिष्ठ नोकरांच्या पगारांना व जागांना काट मारून जे चोवीस लक्ष रुपये कित्येक वर्षांच्या अखेरीस वांचविले जाणार आहेत त्यांत प्राथमिक शिक्षक येतात किंवा कसें हें समजण्यास तूर्त तरी मार्ग नाही. मुंबई कौन्सिलांत सरकारानें आपलें काटकसरीचें पत्रक अद्यापि मांडलें नाही. तें मांडलें जाईल त्या वेळीं लोकप्रतिनिधींनी या व इतर कित्येक संशयित बाबींचा खुलासा करून घेतला पाहिजे.

मुंबई कौन्सिलाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व दिवाण यांच्या पगारांतहि कपात करण्याचा प्रश्न कौन्सिलांत येणार आहे; त्या वेळीं इतर गोष्टींचाहि ऊहापोह होईलच. सर्व खात्यांना मुंबई—सरकारानें हात लावला आहे. परंतु त्या मानानें पोलीस खातें मात्र त्याजवर मायेची पाखर घातल्याप्रमाणे, बहुतेक कुरवाळून अलग ठेवल्यासारखें दिसतें. पोलीस खात्यांतहि काटकसरीस पुष्कळ वाव आहे. त्यांत जिल्हाधिकाऱ्यांच्या व तालुकाधिकाऱ्यांच्या जागा पूर्वीपेक्षा दुपटी—चौपटीनें वाढल्या आहेत; त्यांपैकीं कित्येक जागा कारभाराच्या चोखपणास धक्का न लागतांहि कमी होण्यासारख्या आहेत. जिल्ह्याच्या पोलीस खात्याची पुनर्घटना करण्याची योजना सरकारापुढे आहे असें आश्वासन रिपोर्टांत देण्यांत आलें आहे. पण तें अपुरें आहे. नवीन सुधारणांचा कायदा पास झाल्यानंतर प्रॉव्हिन्शिअल सर्व्हिस कमिशन नेमलें जाईल व तें सगळ्या नोकरवर्गासाठी नवीन नियम करील असें रिपोर्टांत म्हटलें आहे. ते नियम अर्थातच थॉमस कमिटीच्या शिफारशींस धरून होतील असें वाटतें. परंतु या पुनर्घटनेची लाट कनिष्ठ नोकरापासून वरिष्ठ अधिकाऱ्यापर्यंत चढत गेली तरच ती नोकरवर्गाच्या दृष्टीनें अन्यायाची ठरणार नाही. या दृष्टीनें सिव्हिल सर्व्हिस व ऑल-इंडिया सर्व्हिस यांजमधील बड्या अधिकाऱ्यांचे पगार पुष्कळच कमी व्हावयास पाहिजेत. त्याचा विचार करण्याची जबाबदारी भारतमंत्री व हिंदुस्थानसरकार यांजवर असली तरी

त्यांच्यामागे तशा प्रकारचें टुमणें मुंबई-सरकाराने आजपासून लावून ठेवणें जरूर आहे.

मुंबई-सरकाराच्या हातून आज फक्त चोवीस लक्ष रुपयांचीच बचत होणार असून त्यांनी केलेल्या योजनेप्रमाणे एकंदर ७६ लक्षांची बचत होण्यास कैक वर्षे लागणार आहेत. नवीन प्रांतिक स्वायत्ततेबरोबर नवे खर्च वाढून ठेवलेलेच आहेत. नवीं कौन्सिलें निर्माण होतील त्या वेळीं २५ लाख रुपयांचा पहिल्याच वर्षी फन्ना उडेल असा अंदाज आहे. खेरीज पब्लिक सर्व्हिस कमिशनास दरसाल एक लक्ष रुपये लागणार आहेत. यापेक्षाहि महत्त्वाची गोष्ट ही कीं, राज्यकारभारांत लोकमताचें प्राबल्य वाढलें म्हणजे प्राथमिक शिक्षण, वरिष्ठ शिक्षण, औद्योगिक शिक्षण, रस्ते, आरोग्य यांच्या गरजा अधिकाधिक भासूं लागून त्या भागविण्याकरिता सध्याच्या नोकरवर्गाचा अवजड बोजा हलका करणें हा एकच उपाय शिल्लक राहील. याहि दृष्टीने विचार केल्यास वरिष्ठ अधिकाऱ्यापासून कनिष्ठ नोकरापर्यंत सर्वांच्या पगाराचें प्रस्थ पुढील काळांत हिंदी लोकांच्या गरिबीस झेपेल अशा बेतानेच कमी करावें लागेल असा रंग दिसतो. गोऱ्या नोकरवर्गाचें मरण यांतच असल्यामुळे त्यांची भावी राज्यव्यवस्थेंत डाळ शिजणें कठिण आहे. परंतु नथीपेक्षा नाकाची गरज अधिक हें लक्षांत ठेवल्यास नथींतील मोतीं नाकाला जड वाटूं लागल्यावर तें मोतीं काढून नथीचा घाट बदलून घ्यावयास पाहिजे हें उघड असून असा प्रसंग नोकरशाहीने कितीहि टाळावयाचा म्हटलें तरी टळणार नाही असें वाटतें.

# स्फुट सूचना

१ मुंबईच्या ' फ्री प्रेस ' या इंग्रजी दैनिकावर वर्तमानपत्रांच्या नव्या कायद्याची गदा बसून प्रकाशकांनी व मुद्रकांनी भरलेल्या वीस हजारांच्या जामिनकीपैकीं दहा हजारांची रक्कम सरकाराने जप्त केल्याचें नुकतेच जाहीर केलें ! गेल्या चौद महिन्यांत जामिनकीची रक्कम जप्त होण्याचा त्या पत्रावरील हा तिसरा प्रसंग आहे. ता. २३ जुलै १९३२ रोजीं त्या पत्राने जामिनकीची भरलेली सहा हजारांची रक्कम प्रथम जप्त करण्यांत आली, व त्या वेळींच नवा दहा हजारांचा जामीन सरकाराने मागितला! ही दहा हजारांची रक्कम १९३२च्या ऑक्टोबरांत जप्त झाली !! कायद्याप्रमाणे कोणत्याहि वर्तमानपत्राकडून जास्तींत जास्त वीस हजारांची रक्कम जामिनकी म्हणून मागतां येते. ती रक्कम या वेळीं मागितली गेली व ती ' फ्री प्रेस ' च्या चालकांनी भरली. यांपैकीं दहा हजारांची रक्कम गेल्या आठवड्यांत जप्त झाली !!! तात्पर्य, आतापर्यंत या पत्राने जामिनकीचे २६००० रु. सरकारांत भरले. या खेपेचें कारण असें सांगण्यांत आलें आहे कीं, ९ जलै ता. १९३३ या फ्री प्रेसच्या अंकांत श्री. विठ्ठलभाई पटेल यांनी अमेरिकेंतील न्यू यॉर्क शहरांत जें भाषण केलें तें प्रसिद्ध केले आहे व तसेंच ता. ५ ऑगस्टच्या अंकांत महात्मा गांधींच्या अटकेसंबंधी जो मजकूर दिला आहे तो सरकारास आक्षेपार्ह वाटत असून त्या मजकुराने कायद्याने प्रस्थापित झालेल्या राज्यासंबंधी द्वेष व तिरस्कारबुद्धि लोकात पसरेल असें सरकारास वाटतें. आम्ही हा मजकूर पाहिला असून आम्हांस स्पष्ट वाटते कीं हा मजकूर राजद्रोहात्मक आहे कीं काय याची शहानिशा हायकोर्टांत या हुकुमावर दाद मागून ' फ्री प्रेस 'च्या चालकांनी करून घ्यावी. त्या चालकांनी यापूर्वी असे प्रयत्न केले होते व त्यांत यश आलें नाही हें आम्हास माहीत आहे. तथापि याशिवाय दुसरा कायदेशीर इलाज नसल्याने हाच इलाज शिल्लक राहतो. वर्तमानपत्राच्या कायद्याचा केवढा तडाखा आहे याची कल्पना जनतेस या 'फ्री प्रेस' प्रकरणावरून उत्तम येईल.

---

२ कराची म्युनिसिपालिटीची घटना तीसबत्तीस वर्षांपूर्वी तयार झाली व त्यानंतर तेथील लोकसंख्या दोन अडीचपटींनी वाढली. त्या दृष्टीने या घटनेंत फेरफार करण्याची गरज होतीच. खेरीज यापुढे सिंध प्रांत वेगळा होणार असल्यामुळे त्याची राजधानी होण्याचा मानहि कराचीसच मिळणार आहे हेहि विसरता कामा नये. यासाठी कराचीची म्युनिसिपालिटी ही वाढत्या कार्यक्षेत्राला अनुरूप बनविण्याचें बिल मुंबई कायदेमंडळाच्या 'उन्हाळी' बैठकींत दाखल करण्यांत आलें होतें. त्या वेळीं त्याचें पहिले वाचन मंजूर होऊन त्याची रवानगी सिलेक्ट कमिटीकडे

करण्यांत आली होती. त्या कमिटींतून नीटनेटकें झालेलें बिल चालू 'पावसाळी' बैठकींत ता. १८ ऑगस्ट रोजीं स्थानिक स्वराज्य खात्याचे मंत्री सर रुस्तम वकील यांनी दुसऱ्या वाचनासाठी मांडलें. हें बिल तयार करण्याचें काम दहा वर्षे चाललें होतें. त्याचीं कलमें पाहिलीं तर तीनशे आणि त्यावरील उपसूचनांचीहि संख्या तितकीच. त्यापैकीं पहिल्या आठ कलमांची चर्चा होण्यासच सहा दिवस लागले. तेव्हा हें बिल कौन्सिलाच्या बैठकींतून पार पडणें म्हणजे सिंधी उंट सुईच्या नेढ्यांतून पलीकडे जाण्यासारखेंच दुर्घट आहे असें कांहीजणांना प्रारंभीं वाटलें. पण एकंदर दहा दिवस चर्चा होऊन सदर बिल ता. १ सप्टेंबर रोजीं मंजूर झालें व त्यास कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें. यापुढें त्याच्या डोक्यावर व्हाइसरॉयांच्या संमतिदर्शक अक्षता पडतील आणि पुढील महिन्यापासून तो कायदा अंमलातहि येईल. नव्या घटनेनुसार मतदारांच्या याद्या तयार होऊन एप्रिल-मध्यें निवडणुकी होतील आणि मे महिन्यापासून नव्या म्युनिसिपालिटीचा कारभार कराचीमध्यें सुरू होईल.

---

३ सिलेक्ट कमिटीनें आणि कायदेमंडळानें बिलाच्या मूळ स्वरूपांत किरकोळ सुधारणा बऱ्याच केल्या असल्या, तरी मतदारसंघाच्या बाबतींत बिलाचें धोरण द्वैतमूलक, प्रतिगामी व दोषास्पद असेंच राहिलें. पहिल्या वाचनाचे वेळीं बिलांत मताधिकाराचें क्षेत्र मर्यादित असून दरमहा पांच रुपये भाडें देणाराला मताचा हक्क असावा अशी अट होती. पण ती सैल करून एक रुपया भाडें देणाराला सिलेक्ट कमिटीनें मताधिकार दिला व तो कायदेमंडळानेंहि मान्य केला. प्रौढाधिकाराच्या दृष्टीनें हें पुढचें पाऊल असल्यामुळें ही सुधारणा इष्ट मानली पाहिजे. तसेंच सभासदांची संख्या ५८ ऐवजी ६४ ठरविण्यांत आली आणि त्यांची वाटणी लोकसंख्येच्या प्रमाणांत करण्यांत आली हेंहि योग्यच झालें. पण त्यांतील आठ सरकारनियुक्त सभासदांचें उच्चाटन करण्याची रा. सा. कुळकर्णी यांची सूचना मंजूर झाली नाहीं ! यावरून निर्भेळ लोकनियुक्त सभासदांचा कारभार कराचीस चालणार नाहीं हें उघड आहे. सरकाराचा पगडा अजून किती जरूर वाटतो याचा हा एक पुरावा समजण्यास हरकत नाहीं. त्याचेंच आणखी एक प्रत्यंतर, सरकार-नियुक्त सभासदाला मेयर होता येऊं नये ही रा. सा. कुळकर्णी यांचीच सूचना नामंजूर झाली, यांत पहावयास सांपडते. पण व्हावयास हवी अशी मुख्य सुधारणा म्हणजे संयुक्त मतदारसंघाची स्थापना. जातिद्वेषाच्या विषानें कालवलेले स्वतंत्र मतदारसंघ समाजाला घातक ठरतात म्हणून त्यांना कराचीचे माजी नगराध्यक्ष श्री. जमशेटजी मेहता यांनी कायदेमंडळांत कसून विरोध केला; पण तो फुकट गेला. जातिनिष्ठ मतदारसंघ व अल्पसंख्याकांना पासंग (वेटेज) यांचें लोढणें गळ्यांत अडकवूनच कराची कॉर्पोरेशनच्या बिलानें मंजुरीपर्यंत मजल मारली. अशा प्रकारचे दोष वगळल्यास मुंबई कायदे-मंडळानें विभक्त होणाऱ्या सिंधप्रांताची या बिलाच्या रूपानें चिरस्मरणीय अशी पाठवणी केली असें म्हणण्यास चिंता नाहीं.

---

४ बंगाल प्रांतांत हिंदु स्त्रियांवर नाना तऱ्हेचे अत्याचार होतात त्यांना पायबंद घालून अत्याचारी गुंडांना दहशत बसेल असा बंदोबस्त करण्याचे प्रयत्न बंगाली पुढाऱ्यांनी सुरू केल्याचें ऐकून कोणालाहि समाधानच वाटेल. असा एक दिवस जात नाहीं कीं ज्या दिवशीं बंगाल्यांतील हिंदु स्त्रियांवर हात टाकल्याची बातमी वर्तमानपत्रांत आढळत नाहीं ! फुसलावून पळविणें, अपमान करणें, जबरदस्ती करणें वगैरे अत्याचार हा गुंडांच्या हातचा मळ होऊन बसला आहे. या सर्व गोष्टींना आळा बसावा म्हणून बंगाल प्रांतिक हिंदु-सभेनें गांवोगांव 'संरक्षक दळें' स्थापन करण्याचें ठरविलें असून त्या कार्याला आर्थिक वगैरे सर्व प्रकारची मदत करावी म्हणून सर पी. सी. रे वगैरे सन्मान्य पुढाऱ्यांनीं जनतेस विनंति केली आहे. ज्यांना अशा प्रकारची मदत करावयाची असेल तीं त्यांनी 'सेक्रेटरी, वुइमेन प्रोटेक्शन कमिटी, बंगाल प्रॉव्हिन्शिअल हिंदुसभा, ३६ हॅरिसन रोड कलकत्ता' यांच्याकडे पाठवावी. बंगाली बंधु शूर व धाडशी आहेत यांत शंका नाहीं.पण ते या बाबतींत आजपर्यंत मुग्ध कां राहिले याचें आश्चर्य वाटतें !

---

५ मुंबईच्या 'दी इंडियन सोशल रिफॉर्मर' या इंग्रजी साप्ताहिकाचे संपादक श्री. के. नटराजन हे शिकागोहून नुकतेच हिंदुस्थानास परत आले. शिकागो येथे हास्केल व्याख्यानमालेतर्फे 'आधुनिक हिंदुस्थानांतील सामाजिक चळवळी' या विषयावर व्याख्यानें देण्यासाठी त्यांना निमंत्रण होतें. तेथे त्यांनी सामाजिक चळवळीचा गेल्या तीस वर्षांचा आढावा निवेदन करून हिंदी परंपरेला अनुसरूनच सामाजिक बाबतींत हिंदी लोक प्रगति करीत असल्याचें सांगितलें. निरनिराळ्या ठिकाणीं विद्यापीठांतील विद्यार्थ्यांपुढे व्याख्यानें देऊन हिंदु धर्म, आधुनिक शास्त्रीय सुधारणां-

ना विरोधी नाहीं ही गोष्ट त्यांनी प्रामुख्याने निदर्शनास आणिली. हिंदी लोक म्हणजे पुराणमताभिमानी, जगांत दर क्षणीं निर्माण होणाऱ्या शास्त्रीय चमत्काराच्या आणि सुधारणांच्या ते विरुद्ध आहेत इत्यादि गैरसमज सहेतुकपणें परदेशांत पसरविण्यांत येतात. श्री. के. नटराजन यांनी संधि मिळाल्याबरोबर ते गैरसमज दूर करण्याचा आपल्याकडून यथाशक्ति प्रयत्न केला याबद्दल कोणीहि त्यांचें अभिनंदनच करील. अमेरिकेंत असतांना हिंदु लोकांविरुद्ध असलेले गैरसमज त्यांनी जसे दूर केले तद्वतच अमेरिकेविषयीं हिंदी लोकांच जे कांहीं विपरीत ग्रह झाले आहेत ते पुसून टाकण्याचा प्रयत्न त्यांनी टाइम्सला दिलेल्या मुलाखतींत केला आहे. 'अमेरिकेंत वसाहती करून राहण्याच्या बाबतींत हिंदी लोकांवर असलेले निर्बंध लवकरच ढिले करण्यांत येतील. अध्यक्ष रूझव्हेल्ट यांच्या आर्थिक पुनर्घटनेच्या धोरणास साऱ्या राष्ट्राचें पाठबळ आहे. अमेरिकेंत गुन्ह्यांची संख्या वाढत असल्याचा समज अतिशयोक्तिपूर्ण आहे. अमेरिकन लोक धनलाभासाठी अविश्रांत श्रम करीत असल्यामुळे ते जडवादी वाटतात. परंतु ही समजूत तितकाशी खरी नसून सामान्यतः अमेरिकन राष्ट्र अध्यात्म तत्त्वज्ञानाकडेच झुकलेलें आहे' इत्यादि गोष्टींवर त्यांनी आपल्या मुलाखतीत विशेषेंकरून भर दिला. अमेरिकेंत स्त्री–पुरुषांमध्ये पूर्ण समानता स्थापित झाली असून त्याची प्रचीति हरएक व्यवहारांत त्यांस दिसून आली. श्री. नटराजन यांनी अमेरिकेसंबंधी सांगितलेली माहिती उद्बोधक असून त्या देशाच्या राजकीय, धार्मिक आणि सामाजिक प्रश्नांविषयी विचार करणाऱ्या गृहस्थांनी ती लक्षांत घेणें आवश्यक आहे.

---

६ भोर संस्थानांतील एक प्रमुख कार्यकर्ते श्री. धोंडो अमृत शेटे हे ता. २ रोजीं येळंक येथे मरण पावले हें कळविण्यास आम्हास दुःख होतें. कै. शेटे हे वारकरी संप्रदायांतील असून पंढरीची वारी करून नुकतेच परत आले होते. पंढरीहून आल्यापासून ते आजारीच असून त्यांतच त्यांचा अंत झाला. कै. शेटे यांनी गेल्या सहासात वर्षांत अविश्रांत श्रम करून भोर संस्थानांतील शेतकऱ्यांत बरीच जागृति घडवून आणिली व त्यांच्यांत एक प्रकारची प्रतिकारशक्ति निर्माण केली. हिरडा-प्रकरणांत त्यांनी भोर संस्थानांतील शेतकरी बंधूंची अमूल्य सेवा केली. त्यांजवर मध्यंतरीं कारागृहवासाचाहि प्रसंग आला. श्री. शेटे यांच्या निधनामुळे भोर संस्थानांतील एक स्वार्थत्यागी कार्यकर्ता नाहींसा झाला यांत शंका नाही.

# बॅ. रामराव देशमुखांचें व्याख्यान

मुंबई ता. ६।९।३३

हिंदु महासभेच्या वतीने पार्लमेंटाच्या जॉइन्ट सिलेक्ट कमिटीपुढे साक्ष देण्याकरिता गेलेल्या शिष्टमंडळाचे एक सभासद व वऱ्हाडच्या राष्ट्रीय पक्षाचे अध्यक्ष **बॅ. रामराव देशमुख** यांचें मंगळवारीं सायंकाळीं मुंबईतील गिरगांव हिंदू सभेच्या विद्यमाने मुंबई सरकारचे माजी फडणवीस सर **गोविंदराव प्रधान** यांच्या अध्यक्षतेखाली **भावी राज्यघटना** व **हिंदुमहासभेच्या शिष्टमंडळाचें कार्य** या विषयावर ब्राह्मण सभेच्या दिवाणखान्यांत सुमारें सव्वातास सुश्राव्य व्याख्यान झालें. सभागृह श्रोत्यांनी भरून गेलें होतें. हजर असलेल्या मंडळींत उमरावतीचे श्री. नारायणराव बामणगांवकर, यवतमाळचे श्री. माधवराव कोल्हे, डॉ. आठवले, श्री. भावे, खानविलकर, 'प्रभातचे' पां. म. भागवत, डॉ. सावरकर, केसरीचे श्री. आ. रा. भट वगैरे मंडळी प्रामुख्याने दिसत होती. अध्यक्षांनी प्रास्ताविक भाषण केल्यावर बॅ. रामराव देशमुख म्हणाले, "हिंदुमहासभेच्या शिष्टमंडळाचा एक सभासद या नात्याने जॉइन्ट सिलेक्ट कमिटीपुढे साक्ष देण्याकरिता मीं गेलों होतों. माझ्याकडे वऱ्हाडची बाजू मांडण्याचें काम होतें. हिंदुस्थानाच्या दृष्टीने वऱ्हाडचा प्रश्न महत्त्वाचा नसला तरी आम्हा वऱ्हाडच्या लोकांना तो जिव्हाळ्याचा आहे.

### वऱ्हाड प्रांताचें भवितव्य

हिंदुमहासभेने आपल्या लेखी साक्षींत वऱ्हाडच्या मागण्या विस्तृत रीतीने जॉइन्ट कमिटीला सादर केल्या होत्या. परंतु तोंडीं साक्षीच्या वेळीं कोणीहि वऱ्हाडबद्दल मला प्रश्न विचारला नाही. या दृष्टीनें माझी बरीच निराशा झाली. त्यांतल्या त्यांत समाधान मानण्यासारखी गोष्ट एवढीच कीं, कमिटीचे अध्यक्ष लॉर्ड लिन्लिथगो यांनी असें आश्वासन दिलें कीं, ज्या गोष्टींबद्दल तोंडीं प्रश्न विचारले गेले नाहीत त्यांबद्दल कमिटी विचार करणार नाही असें कोणी समजूं नये. कमिटीने जरी वऱ्हाडची बाजू तोंडीं ऐकून घेतली नाही तरी इंडिया ऑफिसाने वऱ्हाडचा प्रश्न समजून घेण्याकरिता अंडर सेक्रेटरी

ऑफ स्टेट मि. बटलर यांच्या अध्यक्षतेखाली पांच गृहस्थांची एक कमिटी नेमली होती. त्या कमिटीने सुमारें सव्वा तासपर्यंत माझें म्हणणे ऐकून घेतलें. वऱ्हाडचें भवितव्य आज काय दिसतें असा प्रश्न मला कोणी विचारल्यास त्या बाबतींत मी एवढेंच सांगू शकेन कीं, वऱ्हाडचा प्रत्यक्ष कारभार निजामाकडे जाणार नाहीं असें मि. बटलर यांनी मला सांगितलें. निजामसाहेबांना वऱ्हाडाबाबत कांहीं तरी मिळाल्याची बोलवा आहे; पण प्रत्यक्ष काय मिळालें हें अद्यापि गुलदस्तांत आहे. वऱ्हाडावर निजामाचें निशाण फडकवावें असला एखादा हक्क कदाचित् निजामाला दिला गेला असेल. वऱ्हाड हा स्वतंत्र प्रांत करावा अशी आमची मागणी होती; परंतु तो स्वतंत्र केला जाण्याचा संभव कमी आहे. परंतु वऱ्हाडाचे कायदे वऱ्हाडाने करावे व वऱ्हाडचा कमींत कमी कित्ता टक्के पैसा वऱ्हाडावर खर्च केला जावा या बद्दलची योजना राज्यघटनाविषयक कायद्यांत समाविष्ट केली जाईल असें वाटतें.

### कमिटीपुढील हिंदुमहासभेची साक्ष

इंग्लंडांत यंदा उन्हाळा फार कडक असल्यामुळे जो तो थंड हवेच्या ठिकाणीं जाण्यास आतुर होता, यामुळे कमिटीचें काम घाईने उरकण्याकडे सभासदांची प्रवृत्ति होती. सिंध व वायव्य सरहद्दीवरील प्रांत यांमधील हिंदूंची परिस्थिति, पंजाब व बंगाल या प्रांतांतील कायदे–मंडळांत मुसलमानांना देण्यांत आलेलें हुकुमी बहुमत-स्पृश्यास्पृश्य करारांत बंगालच्या स्पृश्यांचे बाबतींत झालेला अन्याय, वऱ्हाडचें भवितव्य वगैरे अनेक प्रश्न कमिटीपुढे चर्चेला येतील असें हिंदुमहासभेला वाटलें होतें. पंजाब व बंगाल यांच्याबद्दल कांहीं प्रश्न कमिटीच्या मुसलमान व युरोपियन सभासदांनी विचारले. पण ते प्रश्न सदर प्रांतांतील स्थितीबद्दल कमिटीच्या सभासदांचें अज्ञान दर्शविणारे होते. कमिटीच्या हिंदु सभासदांपैकीं सर हरिसिंग गौर यांच्याशिवाय कोणीच प्रश्न विचारले नाहीत व सर हरिसिंग यांनी जे विचारले तेहि अगदीं भीतभीत विचारले.

### हिंदूंना हिंदूंचाच विरोध

हिंदु सभासदांनी तोंडाला कां कुलूप घातलें याचें कारण लवकरच समजलें. हिंदुमहासभेनें साक्षीला यावें अशी कमिटींतील हिंदु-मुसलमान सभासदांची इच्छाच नव्हती. मुसलमानांनी हिंदुसभासदांना आगाऊ असें सांगितलें होतें कीं, आता हिंदुमुसलमानांचा प्रश्न मिटलेला आहे. तेव्हा तो प्रश्न पुनः उकरून काढून पुनः एकीची बेकी होऊं नये म्हणून हिंदुमहासभेच्या शिष्टमंडळाला आपणांपैकीं कोणीच प्रश्न विचारूं नयेत. मुसलमानांना पाहिजे असलेल्या गोष्टी त्यांच्या पदरांत पडल्या असल्यामुळे त्यांनी ही बतावणी करणें अगदीं साहजिक होतें. परंतु हिंदु सभासद या मायाजालांत गुरफटले हें दुर्दैव. मुसलमानांची मनधरणी करण्यांत राष्ट्राचें हित आहे असें हिंदूंना वाटूं लागलें आहे. मुसलमानांनी जरा बेकीचा धाक घातला कीं हिंदु गडबडतो, व आता संकट येणार या कल्पनेने तो मुसलमानांच्या आहारीं जातो. आम्ही विलायतेस जाण्याकरितां निघाल्यापासून आमच्यांतलेच लोक आम्हांला उपदेश करूं लागले कीं, 'झगडा मिटला आहे.आता मेहरबानी करून तुम्ही भांडणें उपस्थित करूं नका.' विलायतेंतहि गेल्यावर लोक आम्हांला म्हणूं लागले कीं, 'आधी जातवार निर्णय फिरवून घेण्याकरिता साक्षीला येऊं नये, तें तुम्ही आलांत. अजून वेळ गेली नाहीं.कमिटीच्या अध्यक्षांना कळवा कीं, 'आम्ही साक्ष देत नाही. आल्या पावलीं परत फिरतों.' आम्ही अर्थातच या उपदेशाकडे लक्ष दिलें नाही व राष्ट्रीय दृष्टीने आमचें कर्तव्य पार पाडण्याचें ठरविलें.

कमिटीपुढे आम्ही साक्षीला गेलों तेव्हा हिंदुसभासद आम्हाला प्रश्नच विचारीनात. हिंदु सभासदांची प्रश्न विचारण्याची पाळी गेल्यावर मुसलमान सभासदांची पाळी आली. त्यांनी एकापाठीमागून एक प्रश्न विचारण्यास प्रारंभ केला. पंजाबचे नानकचंद व बंगालचे चतर्जी यांनी मुसलमानांना उत्तरें दिलीं. मुसलमानांचा प्रश्न विचारण्यांतील रोख असा होता कीं, 'हिंदु तेवढे कायदेभंगवाले व क्रान्तिकारक आहेत. ब्रिटिशांचे दोस्त कोणी असतील तर ते काय ते आम्ही.' मुसलमानांचे प्रश्न ऐकून हिंदु सभासद जागे झाले. बॅ. जयकरांना कमिटीच्या अध्यक्षांकडे अशी तक्रार केली कीं, 'आमचें व मुसलमान सभासदांचें असें ठरलें होतें कीं, ज्ञातिविषयक प्रश्न विचारावयाचे नाहीत. आम्ही त्याप्रमाणें प्रश्न विचारले नाहीत; पण मुसलमानांनी करार मोडला, व प्रश्न विचारले. तेव्हा आम्हांला प्रश्न विचारूं द्यावे.' यावर अध्यक्षांनी असा निर्णय दिला कीं, आतां तुमची पाळी गेली असल्यामुळे तुम्हांला प्रश्न विचारता येणार नाहीत. सर परशुराम पात्रो यांनी तर असें भासविण्याचा प्रयत्न केला कीं, हिंदुसभा ही हिंदूंची प्रातिनिधिक संस्थाच नव्हे.

### मुसलमानांचा कावा

विलायतेंत हिंदु-मुसलमानांचें दृश्य असें दिसलें कीं, मुसलमान हे संघटित, एक विचाराचे व निश्चित राजकीय धोरण असलेले असे लोक आहेत; याउलट हिंदु लोक विस्खळीत व निश्चित मत नसलेले

आहेत. हिंदूंतील प्रत्येक सभासदाला असें वाटे कीं, आपण कायते शहाणे, व बाकीच्यांनीं आपलें ऐकावें. स्वहक्कसंरक्षणाचा प्रश्न आला कीं, मुसलमानाने आता तेढ उत्पन्न होईल असें सांगून हिंदूला भेडसवावें व हिंदूने तोंडाला कुलूप घालावें. मुसलमानांनीं इंग्रजांपाशीं मिळतें घेऊन आपल्याला पाहिजे ते हक्क मिळविले आहेत. मुसलमान राजकीय दृष्ट्याच इंग्रजांना उपयोगी पडत आहेत असें नव्हे तर मुसलमानांचें जेथें बहुमत आहे, अशा प्रांतांत तुम्हांला भरपूर व्यापारविषयक सवलती देऊं असें त्यांनी ब्रिटिश व्यापाऱ्यांना सांगूनहि टाकलें आहे!

### पुढे काय होईल ?

मुसलमानी प्रांताबद्दल मला दोन शब्द बोलणें आवश्यक आहे. बंगाल, पंजाब, वायव्य सरहद्दीवरील प्रांत व सिंध यांत मुसलमानांचें मताधिक्य होणार आहे. मुसलमानांची आजची वृत्ति अशी आहे कीं त्यांना आज प्रांतिक स्वायत्तता मिळाली म्हणजे पुरे आहे. मध्यवर्ती सरकारांतील स्वायत्तता पाठीमागून मिळाली तरी चालेल असें त्यांना वाटतें. प्रान्तिक स्वायत्तता मिळाली म्हणजे बहुमताच्या जोरावर आपण वाटेल तसा अधिकार गाजवूं असें त्यांना वाटतें. अल्पसंख्याकांचे हाल कोठपर्यंत केले जातात हें आज पुढारलेला समजला जाणाऱ्या जर्मनींतील हिटूलरशाहींत आपणास पाहावयास मिळत आहे. ज्यू लोकांवर अनन्वित जुलूम चालू असून आज त्यांच्यावर स्वदेशत्यागाची वेळ आली आहे. सुधारलेल्या जर्मनीचें जर हें चित्र आहे तर मागसलेल्या मुसलमानी प्रांतांचें चित्र किती भेसूर निघेल याची आपण कल्पना करा. जर्मनींतील ज्यू लोकांवर आज जी पाळी आली ती पाळी सिंधप्रांत, पंजाब, वायव्य सरहद्दीवरील प्रांत यांतील हिंदूंवर येणारच नाहीं असें मला तरी वाटत नाहीं. या दृष्टीने दक्षिणेंतील हिंदूंनी मुसलमानी प्रान्तांतील हिंदूंच्या हितसंरक्षणाबाबत एव्हापासूनच जागरूक राहिलें पाहिजे. भावी हिंदी फेडरेशनलाहि मुसलमानी प्रान्तांपासून धोका आहे. मुसलमानांची प्रवृत्ति मध्य एशियांतील मुसलमानी राज्यांबरोबरोल आपले संबंध दृढ करण्याकडे आहे. हिंदी फेडरेशन अस्तित्वांत येण्याच्या सुमारास जर मध्यएशियांतील मुसलमानी राष्ट्रांचा संघ स्थापन झाला तर मुसलमानी प्रांत आपले संबंध त्या संघाकडे जोडण्याचा यत्न करतील असा संभव आहे. अफगाणिस्थान हा एका काळीं हिंदुस्थानाचा भाग होता तो आज विलग झालेला आहे. तीच गत मुसलमानी प्रान्तांची होणार नाही असें कोण सांगूं शकेल ? या गोष्टींचें पूर्ण आकलन करून हिंदूंनी राज्यघटनेच्या प्रश्नाकडे पाहाणें जरूरीचें आहे.

### नवीन सुधारणा १९३६ मध्ये

नवी राज्यघटना केव्हा अमलांत येईल असा प्रश्न आपण मला विचाराल तर त्याचें उत्तर असें कीं, १९३५ च्या आंत निवडणुकी होतील असें मला वाटत नाहीं. प्रांतिक स्वायत्तता १९३६ मध्ये येईल. फेडरेशन केव्हां होईल किंवा निश्चित होईल कीं नाही याबद्दलच मी साशंक आहे. तें निश्चित झाले तरी त्याला बराच कालावधि लागेल. मुसलमान फेडरेशन ताबडतोब होण्याबद्दल फारसे उत्सुक नाहीत. त्यांना त्यांची सत्ता त्यांच्या प्रांतांतून बद्धमूल झाल्यावर मग फेडरेशन यावयाचें असेल तर यावें असें वाटतें. कारण त्यांना असें वाटते कीं, आपल्या प्रांतांत आपण आपली घडी नीट बसविली म्हणजे फेडरेशनवरहि आपण आपली छाप बसवूं. १०–१५ वर्षांनी फेडरेशन आलें तरी त्यास त्यांची हरकत नाहीं. फेडरेशन अस्तित्वांत येण्याच्या मार्गांत खरी अडचण संस्थानिकांची आहे. पहिल्या गोलमेज परिषदेच्या वेळीं संस्थानिकांचा जो उत्साह होता तो आता बराचसा कमी झाला आहे. ते कांही अटींवर फेडरेशनमध्ये येऊं इच्छित आहेत. संस्थानिकांचें हें धोरण फारसें आशादायक आहे असें मला वाटत नाही.

नव्या राज्यघटनेमध्ये लोकांच्या हातीं सध्यापेक्षा अधिक सत्ता येणार हें निश्चित आहे. जे हक्क मिळणार आहेत त्यांमुळे कोणाहि राष्ट्रीय वृत्तीच्या माणसांचें समाधान होण्यासारखे नसलें तरी आपली राजकीय मागणी मान्य करून घेण्याकरिता नवीन राज्यघटनेचा आपण पुरेपूर उपयोग करून घेतला पाहिजे. गव्हर्नराला राखीव हक्क आहेत. त्याचा बागुलबोवा करून नव्या राज्यघटनेवर बहिष्कार घालण्याची भाषा बोलणें आत्मघातकीपणाचें होईल. आपण पक्षसंघटना निर्माण करून कार्यक्रम निश्चित केला, कायदेमंडळांतील जागा काबीज केल्या व संघटित बहुमताचा पाठिंबा असणारीं मंत्रिमंडळें बनविलीं तर गव्हर्नराच्या हातांतील अधिकार दहा-पंधरा वर्षांच्या आंतच निर्जीव ठरतील. लोकशाही देशांत स्थापन करावयाची असेल तर कणखर वृत्तीच्या माणसांना राज्ययंत्र जितकें हस्तगत करतां येईल तितकें तें त्यांनी केलें पाहिजे. त्याकरिता जरूर त्या खटपटीला लागलें पाहिजे. राज्ययंत्रावर बहिष्कार घातला तरी तें चालतें व बहिष्कार घालणाऱ्यावर

उलटतें हें आपण लक्षांत ठेवा, एवढेंच मला आपणांस सांगावयाचें आहे."

**समारोप**

याप्रमाणे डॅ. रामराव देशमुख यांचें भाषण झाल्यावर अध्यक्ष सर गोविंदराव प्रधान यांनी समारोप करतांना मिळेल तें हातीं घ्या व जास्त मिळविण्याकरिता भांडा हा लोकमान्यांचा उपदेश डोळ्यांपुढे ठेवून पुढील कार्यक्रम आखा असें श्रोत्यांना सांगितलें. मुसलमानांच्या धोरणाबद्दल बोलतांना सर गोविंदराव म्हणाले कीं, 'मुसलमानांना जसजसें जवळ करावें तसतसें ते कसे वरचढ होत जातात हे मुंबई इलाख्यांत चांगलें पहावयास मिळतें. मुसलमानांचे लाड पुरविणें आज सरकाराला गोड वाटत असलें तरी हें धोरण सरकारलाच घातक झाल्याशिवाय राहणार नाही. 'सिंध प्रांत वेगळा झाल्यावर तेथील मंत्रिमंडळांतील एक जागा आम्हा हिंदूला मिळेल. तेव्हा हिंदूंना भिण्याचें काय कारण' असें सिंधमधील एक हिंदु गृहस्थ मला म्हणाले. परंतु मंत्रिमंडळाचे निर्णय बहुमताने होतात हें ज्याला माहीत आहे त्याला सिंधच्या मंत्रिमंडळांत एक हिंदु असला तरी त्यामुळे हिंदूंचें हितसंरक्षण होऊं शकत नाही हें सहजीं कळून येतें. मंत्रिमंडळ आपली जबाबदारी ओळखून वागलें तर गव्हर्नराचे विशेष अधिकार निर्माल्यवत् ठरतील असें व्याख्यात्यांप्रमाणे मलाहि वाटतें.' याप्रमाणे समारोप केल्यावर डॉ. सावरकर यांनी वक्ते व अध्यक्ष यांचे आभार मानले व सभेचें काम समाप्त झालें.

# संस्थानिकांचें संरक्षण आजच कां

ज्या नव्या सुधारणा आता उदयास येणार आहेत त्यांत खालसा मुलुखांतील ब्रिटिश राज्यकर्ते व संस्थानी मुलुखांतील राजेमहाराजे हातांत हात घालून अखिल हिंदुस्थानाचा राज्यशकट हांकणार असें सांगण्यांत येतें. या नव्या अमदानींत खालसा मुलुखांतील रयतेचें काय कल्याण होणार आहे किंवा त्यांच्या तोंडांत कोणत्या अधिकाराच्या धारा सोडल्या जाणार आहेत हें आज तरी निश्चितपणें सांगतां येत नाही. पण आजचा देखावा मात्र असा आहे कीं, ब्रिटिश सरकार व संस्थानिक दोघेहि अगदीं एक दिलाने एकमेकांच्या सोयीकरिता एकमेकांच्या मार्गांतील कांटेकुटे काढून टाकण्यांत व खाचखळगे भरून काढण्यांत, एकमेकांस साहाय्य करण्यांत गर्क झाले आहेत. गेल्या आठवड्यांत असेंब्लीमध्ये संस्थानिकांच्या संरक्षणाचे जें एक नवें बिल हिंदुस्थान सरकाराच्या गृहमंत्र्यानी मांडलें तें वरील उद्देशानेंच प्रेरित होऊन त्यांनी तयार केलें होतें. हें बिल असेंब्लीच्या याच अधिवेशनांत घाईने पसार करून घेण्याचा सरकाराचा इरादा नव्हता हें खरें; पण या बैठकींत ते सिलेक्ट कमिटीकडे पाठवावयाचें, त्या कमिटीच्या शिफारशी या वर्षाअखेर आणावयाच्या व पुढील वर्षाच्या फेब्रुवारी–मार्चमध्ये त्याला कायद्याचें स्वरूप द्यावयाचें असें वेळापत्रक गृहमंत्र्यांनी मांडलें होतें. आनंदाची गोष्ट ही कीं, सरकाराचा हा व्यूह ढासळून टाकून असेंब्लीने ६७ विरुद्ध ७ मतांनी श्री. बी. दास यांची, लोकमत अजमावण्याकरिता बिलाचा विचार पुढील वर्षाच्या जानेवारीपर्यंत लांबवावा, ही सूचना शनिवार ता. ९ रोजीं पसार केली व लोकपक्षाला विजय मिळवून दिला!

संस्थानांतील राज्यपद्धति एका अर्थाने एकतंत्री व सुलतानशाहीचीच असते. कांही संस्थानांत या सुलतानशाहीला लोकप्रतिनिधी सभांच्या द्वारें थोडाबहुत लगाम बसला असेल; नाही असें नाही. पण एकंदरींत अगदीं निर्भेळ नसली तरी कमीज्यास्ती प्रमाणांत सुलतानशाहीच सर्व संस्थानांत आढळते हें नाकबूल करण्यांत अर्थ नाही. लोकशाही हा या युगाचा दंडक असल्याने ती जुनी एकमुखी पद्धत बदलून घेऊन ती बहुमुखी करण्याचा संस्थानी मुलुखांत जर कोणी प्रयत्न केला तर हे संस्थानिक त्याला मुरगळून टाकून केव्हाच गतप्राण करतात. प्रत्यक्ष उदाहरणें देऊन हें सिद्ध करण्याचें कारण नाही. कारण तीं सर्वांस माहीत असण्याइतकीं ढळढळीत आहेत. पण खालसा मुलुखांत ज्या वेळीं चळवळी

जोराने चालू हातात त्या वेळीं मात्र या सोटे-शाहीवाल्या संस्थानिकांचे हात लुले पडतात. ह्या चळवळी बंद व्हाव्या, संस्थानिकांवर अगर त्यांच्या कारभारावर खालसा मुलुखांत कोणींहि कडक टीका करूं नये व आपला बेलगामी अनियंत्रित अमल बेछूट चालविता यावा म्हणून, खालसा मुलुखांत आपल्याला संरक्षण मिळविण्याकरिता संस्थानिकांनी पूर्वीपासूनच प्रयत्न चालविले आहेत व त्याप्रमाणें १९२२ सालीं संस्थानिकांच्या संरक्षणाचा कायदा पसारहि झाला; तो त्यांना अपुरा वाटल्यामुळेच हें नवें बिल त्यांनी ब्रिटिश सरकारास आणावयास लाविलें असावें. असा त्या बिलाचा पूर्वेतिहास आहे.

१९२२ सालीं झालेल्या कायद्यांत मुख्य अशीं दोनच कलमें आहेत. त्या कायद्याच्या तिसऱ्या कलमाने, जो कोणी वर्तमानपत्र-कर्ता संस्थानिकांविरुद्ध राजद्रोहात्मक मजकूर लिहील अगर त्यांच्यासंबंधी किंवा त्यांच्या कारभारासंबंधी द्वेषाच्या, तिरस्काराच्या भावना उत्पन्न करील त्याला पांच वर्षांची शिक्षा व दंड केला जाईल अशी योजना केली आहे. चवथ्या कलमाने अशा तऱ्हेचे आक्षिप्त लेख, पुस्तकें, चित्रें वगैरे सरकारजमा करण्याचा अधिकार दिला गेला आहे. नमूद करण्यासारखी व लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट एवढीच कीं, त्या वेळच्या असेंब्लीने हें बिल बहुमताने नामंजूर करून फेकून दिलें होतें! त्या वेळेचे गृहमंत्री सर वुइल्यम व्हिन्सेंट यांनी हें बिल विचाराकरिता असेंब्लीपुढे मांडण्याची परवानगी मागितली होती; पण तीसुद्धा असेंब्लीने दिली नाही. कारण ह्या बिलाची आवश्यकताच कोणास पटत नव्हती. वर्तमानपत्रांच्या कायद्याबाबत विचार करण्याकरिता सर तज बहादुर सप्रु यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या कमिटीनेहि या कायद्याची जरूरी नाही असें मत स्पष्टपणें नमूद केलें असल्याने त्याला कोणाचाच पाठिंबा मिळाला नाही. तथापि त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग यांनी आपल्या शिक्केबाजीच्या अधिकाराचा उपयोग करून त्या मृत बिलाला जिवंत केलें व कौन्सिल ऑफ स्टेटमधील सरकारी बहुमताच्या जोरावर तें पसार करून घेतलें!! खालसा मुलुखांतील लोकमत असल्या कायद्याच्या विरुद्ध किती आहे हें या इतिहासावरून कोणालहि स्पष्ट दिसेल!

राजद्रोहाच्या गुन्ह्याला कडक शिक्षा देण्याचें एवढें पराक्रमी व जलाल अस्त्र नोकरशाहीच्या शस्त्रागारांत असूनहि त्यामुळे संस्थानिकांचें समाधान झालें नाही. परतु, त्या वेळीं त्यांचा इलाज नव्हता. संयुक्त राज्यघटनेचा विचार सुरू झाल्यानंतर संस्थानिकांनी पुनः उचल खाल्ली व त्यांच्या प्रयत्नाचें फल म्हणजेच असेंब्लीपुढे मांडलेलें नवें बिल होय. हें नवें बिल अर्थात् पूर्वीच्या बिलापेक्षा अधिक व्यापक आहे. खालसा मुलुखांतील फौजदारी कायद्यांत, कायद्याने प्रस्थापित केलें गेलेलें राज्य उलथून पाडण्याचा कट करणें हा गुन्हा आहे व त्याला शिक्षाहि जबर आहे. ह्या कलमाचा अंमल संस्थानिक व त्यांचा कारभार याविरुद्ध कट करणारांवर व्हावा असा या नव्या बिलाच्या तिसऱ्या कलमाचा उद्देश आहे. त्याप्रमाणेच १९३१ च्या वर्तमानपत्रासंबंधीच्या दडपशाहीच्या कायद्यांतील पत्रकर्त्यांकडून जामीन मागणें, तो जप्त करणें व शेवटीं वर्तमानपत्रच बंद करणें वगैरे गोष्टींचाहि समावेश या बिलांत केला आहे. याहि पुढे जाऊन नव्या दडपशाहीच्या कायद्यांतील ज्या कलमान्वयें कोणाचेंहि लेखनस्वातंत्र्य व भाषण–स्वातंत्र्य काढून घेण्याचा अधिकार डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांना दिला आहे, तींच कलमें संस्थानिकांच्या विरुद्ध चळवळ करणाऱ्या लोकांविरुद्ध त्या मॅजिस्ट्रेटांनी अंमलांत आणावीं असा त्यांना नव्या बिलाने अधिकार देण्यांत आला आहे. हे तीन गुन्हे संस्थानिकांच्या बाबतींत या कायद्याने नवीनच निर्माण होतील व त्यामुळे संस्थानी प्रजाजनांच्या पुढाऱ्यांना अगर खालसांतील त्यांची कळकळ बाळगणाऱ्यांना सभा करणें, परिषदा भरविणें, स्वयंसेवकांचे जथे

तयार करून पाठविणें अशक्य होऊन संस्थानिकां-विरुद्ध असलेली सर्व चळवळ गतप्राण होईल अशी त्यांची कल्पना आहे.

हे नवे गुन्हे व त्याबद्दल होणाऱ्या कडक शिक्षा यामुळे खालसांतील लोकांच्या नैसर्गिक व मूलभूत हक्कांवर आपण किती आक्रमण करीत आहों याची जाणीव ज्यांनी हे बिल असेंब्लींत मांडलें त्या सर हॅरी हेग यांना पूर्ण होती असें त्यांचें लंगडें समर्थन पाहतांना स्पष्ट वाटतें. लोकपक्षाने एकदम त्रुजून जाऊं नये म्हणून सरकाराला या बिलाची घाई नाही, एक वर्ष लागले तरी चालेल असें ते म्हणाले. हें त्यांचें म्हणणें जर प्रामाणिकपणाचें आहे तर त्यांनी, हें बिल वास्तविक आताच न आणतां संयुक्त राज्यपद्धति स्थापन होईल तेव्हा लोकसभे पुढे आणावयास पाहिजे होतें. गृहमंत्र्यांनी असा युक्तिवाद केलाच होता कीं, पुढे होणाऱ्या 'फेडरेशन' च्याच दृष्टीने या कायद्याची जरूरी आहे. एक वर्ष वाट पाहण्यास ते तयार होते तर आणखी कांही दिवस वाट पाहून 'फेडरल कौन्सिल-लाच ह्या बिलाचा विचार करण्याची संधि देण्यास हरकत कोणती ? यापुढे हिंदुस्थानाची राज्य-घटना एकजिनशी अखिल भारतीय व्हावयाची आहे तर मग ब्रिटिश मुलुखाचे व संस्थानांचे कायदेहि सारखेच नकोत काय असें त्यांचें म्हणणें आहे. सकृद्दर्शनी हा कोटिक्रम सयुक्तिक दिसतो. पण आम्हांला त्यांना एवढेंच विचारावयाचें आहे कीं, खालसा मुलुखांत लोकशाही व चार पावले पलीकडे असणाऱ्या संस्थानांत मात्र एकतंत्री सुलतानशाही हा एक जिनसी राज्यपद्धतीचा नमुना समजावयाचा काय ? संस्थानिकांनांहि लोकशाही स्थापन करावी म्हणजे हा प्रश्न उरणारच नाही !

गृहमंत्री सर हॅरी हेग यांनी या बिलाच्या समर्थनांत आपले नेहमीचे डावपेंचहि केलेच. या बिलाने कोणत्याहि सनदशीर, कायदेशीर, व योग्य अशा चळवळीवर वरवंटा फिरला जाणार नाही असें त्यांनी आश्वासन दिले. निरनिराळे दडपशाहीचे कायदे पसार करून घेतांना असल्या आश्वासनांची खैरात कशी केली जाते व पुढे पुराणांतील वांगीं पुराणांत राहून लोकांच्या हक्कांवर या कायद्यांचीच गदा कशी पडते, याचा अनुभव खालसा मुलुखांतील लोकांना पूर्ण आहे! त्यांनी अशीहि कबुली दिली कीं, कांही संस्थानांचा राज्यकारभार हा अत्यंत मागसलेला व सर्वांसच लाज आणणारा आहे. परंतु त्यांच्या मतें या संस्थानांचा बंदोबस्त साम्राज्य-सरकार करील.लोकांनी त्यांत ढवळाढवळ करू नये. असेंब्लींतील सभासदांनी याला उत्तर देतांना स्पष्ट सांगितलें कीं, साम्राज्य-सरकार प्रजेच्या गाऱ्हाण्याबाबत काय उपाययोजना करतें हें लोकांनी पाहिलें आहे. संस्थानिक पदच्युतहि होतो,पण लोकांच्या गाऱ्हाण्यांची मात्र दाद लागत नाही! संस्थानांचा कारभार जर वाईट तर ते वाईट आहे असें म्हणावयास हरकत कोणती ? हा तोंड दाबून बुक्क्यांचा मार कां ? या प्रश्नांना माव ना. हेग हे उत्तर देऊं शकले नाहीत.

कांही संस्थानांतील अंदाधुंदी व जुलूम-जबरदस्ती इतक्या थराला गेलेली असते कीं, त्यांचें नुसतें सत्यस्वरूप वर्णन केलें तरी नव्या बिलाने त्या संस्थानाच्या कारभाराबद्दल तिरस्कार उत्पन्न होईल! नव्या बिलाने हा जर गुन्हा ठरविला तर असल्या दुष्ट कारभाराला मदत करण्याचें पाप सरकारास लागल्याशिवाय राहणार नाही. अशा दुसऱ्याहि अनेक बाबी आहेत. निजामाच्या राज्यांतील आळंद गांवांतील श्री. कल्याणराव देशपांड्यांवरील मुसलमान गुंडांच्या अमानुष हल्ल्याचीच गोष्ट उदाहरणार्थ घेऊ. त्या संस्थानांत जर या अन्यायाची दाद लागली नाही व जुलुमाला आळा बसला नाही, तर या प्रकाराचें नुसतें वर्णन केलें तरी तिरस्काराची भावना उत्पन्न केल्याचें पाप वर्तमानपत्रकर्त्यांस लागावयाचें. मग हा प्रकार वर्तमानपत्रकर्त्यांनी मूग गिळून पाहावा काय, असा सरकारास आमचा सरळ सवाल आहे. काश्मीर अगर अलवार हीं हिंदु संस्थानें बुडविण्याकरिता चंग बांधून जथे तयार करणाऱ्या मुसलमानी अधिराज्यांचे पुरस्कर्ते उघड उघड

बंडच उभारतात; त्याजविरुद्ध उपाय योजणें जरूर असेल.परंतु वर वर्णन केलेला आळंद्चा प्रकार अगर राज्यपद्धतीत लोकशाहीचा प्रवेश व्हावा म्हणून करण्यांत येणारी चळवळ अगर संस्थानिकांच्या अवाढव्य खासगी खर्चाची छाननीहि या बिलाच्या कलमाच्या कात्रींत बसेल याची वाट काय? अशा सर्व दृष्टींनी पाहता लोकमत अजमावण्याकरिता सदर बिल पाठविण्याचें ठरलें हें उत्तम झालें. संस्थानी प्रजाजनाकरितां निर्माण झालेल्या संस्थांनी व पुढाऱ्यांनी या संधीचा फायदा घेऊन आपआपलीं मतें स्पष्ट शब्दांनी सरकारास कळवावीं असा आमचा त्यांना इषारा आहे.

# टिळक–पर्सफंड ट्रस्ट

## तिसरी सभा

सदरहू पर्सफंड ट्रस्टची तिसरी सभा पुणें येथे ता. ३१ जुलै १९३३ रोजीं सकाळीं व सायंकाळीं भरली होती. ट्रस्टच्या नियमाप्रमाणे केसरी-मराठा ट्रस्टीशिवाय इतर तीन गृहस्थ एक वर्षापुरते ट्रस्टी म्हणून नेमून घ्यावयाचे ते खालीलप्रमाणे नेमून घेण्यांत आले होते. त्यांनी काम करण्यास संमति दिली व त्याप्रमाणे ते सभेस हजर राहिले.

## ट्रस्टींचीं नांवें

१ रा. पुरुषोत्तम गोपाळ जोशी, वकील एरंडोल.
२ आमदार डॉ. वि. ग. वैशंपायन, सोलापूर.
३ रा. धोंडो कृष्ण साठे, व्यापारी पुणें.

वरील तीन व केसरी ट्रस्टचे दोन मिळून पांच ट्रस्टींची सभा भरून तींत खालील कामें झालीं. (१) मागील दोन वर्षांचे ट्रस्ट–सभेचे अहवाल वाचण्यांत आले, (२) सभेच्या तारखेपर्यंतचे महाराष्ट्र, वऱ्हाड व कर्नाटक या तीन ट्रस्टशाखांचे हिशेब वाचून दाखविण्यांत आले, व गतवर्षीच्या ट्रस्ट कमिटीने मंजूर केलेल्या रकमांचा विनियोग कसा झाला हें सांगण्यांत आलें.

## फंडांतील वाढ

(३) सदर ट्रस्टसंबंधीं सरसालांत घडलेली महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे तीनहि शाखांचे नांवाने फंडाची जी रक्कम होती ती सरकारी प्रॉ. नोटा (पांच टक्के १९४५-५५) मध्ये होती. पण गतवर्षी एप्रिल महिन्यांत सदर नोटांचा बाजारभाव वर गेला; व सदर नोटा मोडून त्यांची रोख रक्कम केल्यास ते फायदेशीर होईल असा तज्ज्ञांचा सल्ला मिळाला म्हणून त्या पुणें सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँकेमार्फत मोडल्या. तो व्यवहार खाली दिल्याप्रमाणेः—

| खातें | नोटांची मूळ रक्कम | विक्रीचा भाव | एकंदर रक्कम वाढाव्यासह |
|---|---|---|---|
| महाराष्ट्र | १७५००० | १११-११ ६ | १९५६०१ |
| नागपूर-वऱ्हाड | १००००० | १११-१२ | १११७५० |
| कर्नाटक | २५००० | १११-११-९ | २७९२९ |

सदर रकमा मोठ्या, व त्या तूर्त फिरून सरकारी नोटांत गुंतविण्याची स्थिति नाही. म्हणून त्या निरनिराळ्या बँकांतून डिपॉझिट म्हणून ठेवल्या. हल्ली बाजारांत एकंदरीने व्याजाचा भाव कमी झाला आहे व बँका तर फारच कमी व्याज देतात. तथापि मुदलांत वाढावा झालेला लक्षांत घेऊन, कांही दिवस कमी व्याज आलें तरी या रकमा निरनिराळ्या बँकांतून ठेवणेंच अवश्य आहे. कदाचित् एकदोन वर्षांत सरकारी प्रॉ. नोटांचा भाव उतरेल, किंवा स्थानिक स्वराज्य-संस्थांचीं कर्जे बाजारांत येऊन त्यांत पैसा गुंतविणें ट्रस्ट ॲक्टाप्रमाणे शक्य होईल. त्या वेळीं एकंदरीने फायदेशीर होईल अशा दराने सरकारी नोटा किंवा हीं कर्जे विकत घेतां येतील. तूर्त कांही वर्षे व्याजाचें उत्पन्न कमी होणार हें उघड आहे; व ही गोष्ट लक्षांत घेऊनच पुढील सालीं ट्रस्ट फंडांतून देणग्या किती देतां येतील याचा अंदाज केला आहे.

यंदांच्या देणग्यांना उद्देशून सुमारें वीस अर्ज ट्रस्ट–कचेरीकडे आलेले होते. त्यांचा विचार करून योग्यायोग्य पाहून आम्ही सर्वांनुमतें खालील देणग्या द्याव्या असें ठरविलें आहे.

## केसरी–मराठा ग्रंथशाळा

(१) मुख्य बाब केसरी-मराठा संस्थेंत नवीन बनविण्यांत आलेल्या ग्रंथालयाची. या संबंधाचा सविस्तर खुलासा गतवर्षाच्या ट्रस्ट कमिटीने आपल्या रिपोर्टांत केला तो ता. ९ ऑगस्ट १९३२ च्या केसरींत छापलेलाच आहे, म्हणून तो पूर्ववृत्तान्त येथे फिरून सांगण्याचें कारण नाही. सदर

ग्रंथालयाच्या एक वर्षाच्या कामाचा अहवाल आमचेपुढे वाचून दाखविण्यांत आला. तो पाहता ग्रंथालयाचें काम व्यवस्थित व पद्धतशीर चाललेलें असून सर्व प्रकारच्या वाचकांना त्याचा पुष्कळच फायदा होईल असें आम्हांला वाटतें. आम्हीं स्वतः ग्रंथालयांत हिंडून ग्रंथसंग्रह व व्यवस्था पाहिली. त्यावरून आमचें मत असें झालें आहे कीं, आणखी दोन वर्षेपर्यंत या ट्रस्ट फंडांतून या ग्रंथसंग्रहालयास मदत दिली असता त्याच्या त्रैवार्षिक कल्पनेची योजना पूर्णपणे सफल होईल. त्यानंतर ग्रंथालयाचा बोजा सदर पर्स फंड ट्रस्टवर प्रायः पडणार नाहीं; व पडलाच तरी इतका थोडा पडेल कीं महाराष्ट्रांतील दहा जिल्ह्यांना होणाऱ्या त्याच्या उपयोगाच्या मानानें पर्स फंडमधून खर्च होणारी रक्कम कोणी विशेष अशी म्हणणार नाही.

### ग्रंथशाळेचा सार्वत्रिक उपयोग

गतवर्षी एका रकमेनें दहा हजार रुपये ग्रंथसंग्रह संस्थेला दिले त्यामुळे त्याचें बहुतेक काम झालें. तथापि, अद्यापि कांही खात्यांतील ग्रंथखरेदी व्हावयाची आहे, व कांही सामानसुमानहि लागणार आहे. म्हणून या ग्रंथसंग्रहालयाकरिता यंदा पांच हजार रुपयांची मागणी केसरी-मराठा ट्रस्टींकडून करण्यांत आली होती. पण यंदा व्याजाचें उत्पन्न कमी म्हणून फक्त चार हजार रुपये मंजूर करावे असें आम्हीं ठरवितों. गतवर्षीचे दहा हजार व यंदाचे चार हजार मिळून चौदा हजार रुपयांनी चालचलाऊ ग्रंथसंग्रहालयाची भरती जवळ जवळ होते. पण पुढील सालीं या फंडांतून आणखी दोन अडीच हजार रुपये दिल्यास एक मध्यम प्रतीचें पण नमुनेदार ग्रंथसंग्रहालय पुण्यासारख्या शहरीं बनविलें जाऊन केसरी-मराठा संपादक-मंडळ, इतर लेखक-वर्ग, आणि बाहेरच्या दहा जिल्ह्यांतील आस्थेवाईक अभ्यासु यांना अवश्य तें ज्ञानार्जनाचें साधन निर्माण होईल. चालू सालीं वाचकांची संख्या बरी होती व दिवसेंदिवस ती वाढेलहि. तसेच बाहेरच्या जिल्ह्यांतून कोणी कांहीं माहिती मागविल्यास त्यांचीं टिपणें बिनखर्चानें करून पाठविण्याची व्यवस्था ग्रंथालयाकडून करण्यांत येईल असें आश्वासन देण्यांत आलें आहे. तीन वर्षांत अशा तऱ्हेचा ग्रंथसंग्रह निर्माण होऊन त्यापुढील कायम व्यवस्था ठरली म्हणजे एक कार्य झालें असें म्हणता येईल.

### आक्षेपांना उत्तर

या ग्रंथालयाकरिता पर्स फंड ट्रस्टमधून रक्कम दिली जाते यासंबंधीं कांही लोकांचा गैरसमज झालेला दिसतो. पण प्रथम हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हा पर्स फंड मूळ केसरी-मराठा संस्थेच्या पैशांतूनच निर्माण झाला आहे. म्हणजे सदर संस्थेच्या ट्रस्टींना, पर्स फंड काढून न ठेवता, वाटेल तितकी रक्कम खर्च करून हें ग्रंथसंग्रहालय यापूर्वीच बनवितां आलें असतें. दुसरें असें कीं, अभ्यासु लोकांना अभ्यासाकरिता ग्रंथसंग्रहालयाचें असें केंद्र आजवर पुण्यामध्ये 'सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटी'च्या ग्रंथालयाशिवाय दुसरें नव्हतें. तें गांवांत नवीन झालें; व केसरी-मराठा संस्था हें मतप्रसाराच्या दृष्टीनें एक मुख्य केंद्र असें मानलें जात असल्यामुळें, येथेंच हा ग्रंथसंग्रह असण्यापासून होणारा फायदा उघड आहे. ग्रंथसंग्रहाला लागणारी इमारत केसरी संस्थेनें आपल्या खर्चानें बांधून दिलीच आहे. बाहेरच्या दहाहि जिल्ह्यांतील लोकांनी या ग्रंथालयाचा अवश्य उपयोग करून घ्यावा अशी आमची शिफारस आहे.

### पुढील तजवीज

ही त्रैवार्षिक योजना पुरी झाली म्हणजे चवथ्या वर्षापासून ग्रंथालयाच्या खर्चाची कांही तरी कायमची व्यवस्था करावी लागेल. त्यासंबंधीं असें दिसतें कीं नित्य व चालू खर्चाचे असे दोन भाग करावे. (१) नित्य वार्षिक ग्रंथखरेदी; व (२) ग्रंथसंग्रह उघडा ठेवून तो चालविण्यास लागणारा चिटणीस कारकून वगैरे. हा चिटणीस स्वतः पदवीधर व अभ्यासु असलेला बरा. कारण निवळ कारकुनाकडून अभ्यासु वाचकांस फारशी मार्गदर्शक मदत होत नाहीं. वरील दोन बाबींकरिता सालाला प्रत्येकीं एक हजार मिळून दोन हजार रुपये खर्च होतील. यांपैकीं एक बाब केसरी-मराठा संस्थेनें पत्करावी; व दुसऱ्या बाबीचा खर्च पर्स फंड ट्रस्ट (महाराष्ट्र-शाखा) याकडे कायमचा राहावा. दहा जिल्ह्यांना मिळून एक हजार रुपये इतकी रक्कम ग्रंथसंग्रहाच्या उपयोगाच्या मानानें फार नाही. शिवाय कोणत्याहि मतप्रसाराला ग्रंथाचें साधन मुख्य आहे हें विसरतां कामा नये, तथापि आमची अधिकारमर्यादा चालू वर्षापुरतीच आहे म्हणून यंदाचे चार हजार रुपये मंजूर करून, बाकीचें लिहिलें तें नुसतें दिग्दर्शन व शिफारस म्हणून लिहिलें आहे.

### स्त्रियांचें विद्यापीठ

यानंतर देणग्या देण्याचें ठरलें तें खालीलप्रमाणेः-
(२) रु. ५०० (रु. पांचशें) इंडियन वुइमेन्स युनिव्हर्सिटी पुणें. या संस्थेवर हल्लीं आपत्ति आलेली आहे. ही शिक्षण-संस्था सर्वस्वी राष्ट्रीय भावनेची आहे. आम्हीं देतों याहून अधिक रक्कम देतां येत नाही याबद्दल दिलगिरी वाटते. पण

केवळ महाराष्ट्राच्या सहानुभूतीची खूण म्हणून हे पांचशे रुपये आम्हीं देत आहों.

### ताथवडें ग्राममंदिर

( ३ ) रु. ५०० (रु. पांचशें) चिंचवडनजीक ताथवडें येथे ग्रामसंघटनेचें कार्य आज तीन वर्षे श्रमपूर्वक चालू आहे. त्या कामीं कांहीं थोड्या व्यक्तींनी केवळ स्वार्थत्यागपूर्वक बरीच रक्कम खर्च केली आहे. आम्हांपैकीं दोघा ट्रस्टींनी ताथवडें येथे जाऊन प्रत्यक्ष कार्य पाहिलें आहे. ग्रामसंघटनेच्या कार्याचें महत्त्व वेगळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. म्हणून ही रक्कम दिली आहे.

### अस्पृश्यांकरिता रुग्णालय

( ४ ) रु.५०० (रु. पांचशें) अस्पृश्यतानिवारक चॅरिटेबल हॉस्पिटल,सोलापूर.हें हॉस्पिटल यंदा नवीन सुरू झालें. त्याचा उद्देश मुख्यतः अस्पृश्य लोकांना औषधोपचार व शस्त्रक्रिया वगैरे करणें हा आहे. स्थानिक कार्यकर्त्यांनी सुमारें दहा हजार रुपये जमविण्याची योजना केली आहे. पर्स फंड ट्रस्टच्या विद्यमानें दरसाल अस्पृश्यतेच्या कार्याकरिता कांहीं रक्कम खर्च व्हावी असें योजण्यांत आलें आहे. त्याप्रमाणे, पूर्वी दोन वर्षे दिली तशीच यंदाहि पांचशें रुपयांची रक्कम देण्याचें ठरविलें आहे. सदर संस्थेचे चालक यांनी असें आश्वासन दिलें आहे कीं, या देणगीला उद्देशून इस्पितळांतील एका खोलीला लोकमान्य टिळक यांचें नांव देऊन त्याप्रमाणे खोलीवर पाटी लावण्यांत येईल.

### लष्करी शिक्षण

(५)रु. ५०० (रु.पाचशें) महाराष्ट्रांतील लष्करी शिक्षण—संस्था पुणें येथे लष्करी शिक्षणाची संस्था यंदा निघणार आहे. तिच्याविषयींचा एक प्रास्ताविक लेख ता. १ ऑगस्टच्या केसरींत आलाच आहे. हें लष्करी शिक्षण व्याख्यानें, वाङ्मय, शारीरिक शिक्षण, शिस्तीचें शिक्षण वगैरे रूपानें द्यावयाचें आहे. त्याकरिता एक मुख्य पगारी प्रचारक, व्याख्याता व शिक्षक अवश्य हवा. त्याच्या पगाराला या रकमेची अंशतः मदत होईल. या लष्करी शिक्षणाचें मुख्य केंद्र पुणें येथे असलें तरी त्याचा प्रचार महाराष्ट्रांतील दहाहि जिल्ह्यांतन व्हावा अशी योजना आहे. म्हणून कोणत्याहि जिल्ह्यांतील पुढाऱ्यानें या केंद्राच्या चालकास आपणाकडे बोलाविल्यास त्याला येथील कामांतून कांहीं दिवस रजा देऊन तिकडे पाठविण्यांत येईल.मात्र ज्या जिल्ह्यांत प्रचारकास बोलवावयाचें त्यानें त्यां प्रचारकाची तेथपर्यंतच्या प्रवासाची व राहण्याची व्यवस्था केली म्हणजे झालें. हें सर्वच कार्य प्रयोगादाखल आहे. पण तेंहि द्रव्याशिवाय होत नाहीं. या नवीन संस्थेच्या चालकांनी सभासदत्वाचे निरनिराळे वर्ग करण्याचें योजिलें असून त्यांतून जी रक्कम जुळेल तिला ही पांचशें रुपयांची मदत समजावयाची आहे.

### परराष्ट्रीय राजकारण

(६) रु. ४०० ( रु. चारशें ) परराष्ट्रीय राजकारण. ही रक्कम योग्य वाटेल त्या रीतीनें खर्च करण्याचा अधिकार डॉ. ना. भि. परुळेकर व श्री. न. चिं. केळकर यांना देण्यांत आला आहे.

### महाराष्ट्रनिवास

(७)रु.३००(रु. तीनशें) मद्रास येथील महाराष्ट्र-निवास ट्रस्ट.मद्रास येथे महाराष्ट्र-निवास या नांवाची नुकतीच एक संस्था सुरू झाली आहे. स्थानिक महाराष्ट्रीय लोकांनी हें मोठ्या खर्चाचें व उपयोगाचें कार्य केलें आहे. तरी त्या कार्याला इतर महाराष्ट्रीयांकडून कांहीं मदत व्हावी म्हणून ही रक्कम देण्याचें ठरविलें.

### ग्रामपंचायत

(८) रु. ३००( रु. तीनशें ) ग्रामपंचायतीची चळवळ ही रक्कम सर्वस्वी तपस्वी बाबासाहेब परांजपे यांच्या विद्यमानें खर्च व्हावयाची असून त्यांनी वेळोवेळीं लागेल तशी घेऊन खर्चावी.

### प्रचार—कार्य

(९) रु. २०० ( रु.दोनशें ) मॅजिक लँटर्न. नाशिक येथील श्री. ग. वि. केतकर यांच्यामार्फत जिल्ह्यांतील प्रचारकार्याकरिता मॅजिक लँटर्न घेण्यांत येणार आहे. त्यास मदत म्हणून ही दोनशें रुपयांची रक्कम देण्यांत येत आहे. ती रा. ग. वि.केतकर यांच्या विद्यमानें खर्च व्हावी. मात्र यांत पर्स फंड ट्रस्टची अट अशी कीं, या मॅजिक लँटर्नचा उपयोग कोणत्याहि तऱ्हेनें बेकायदेशीर चळवळींतील मतप्रसाराकडे करण्यांत येऊ नये. तरी ही जोखीम जाणून व्यवस्था करण्याचें आश्वासन मॅजिक लँटर्नचा उपयोग करणाऱ्याकडून मिळेल तरच या रकमेचा उपयोग प्रचारकार्याकडे करावा.

### व्यायामशाळा

(१०) रु.२०० (रु.दोनशें) हनुमान व्यायाम शाळा, यावल. या संस्थेंत तरुणांना बलवर्धनाचें शिक्षण देण्यांत येतें. जिल्ह्यांतील व्यायामाचे शिक्षकहि या संस्थेंत शिक्षण घेत असतात.म्हणून या कार्यास ही रक्कम देण्यांत येत आहे.

### नमस्कारमंडळ

(११) रु. १०० (रु.शंभर ) नमस्कार-मंडळ, कल्याण. सदर संस्थेकडून नुसत्या नमस्काराचेंच नव्हे तर इतरहि शारीरिक शिक्षण देण्यांत येत असतें. हें कार्य असेंच चालू राहावें म्हणून ही रक्कम देण्यांत येत आहे.

### शुद्धिकार्य

(१२) रु.१०० ( रु. शंभर ) शुद्धिकार्य, वसई. वसई येथील हिंदु-महासभेचे प्रचारक श्री. जयरामनाना गवंडी हे वसई तालुक्यांत शुद्धिकार्य करीत असतात. त्यांनी केलेल्या कार्याचा अहवाल आम्ही पाहिला. त्यावरून त्यांना ही मदत करणें योग्य आहे असें वाटतें. याहून अधिक मदत करतां आली असती तर बरें झालें असतें.

### राजकारण

वरीलप्रमाणे दिलेल्या देणग्यांची एकूण रक्कम रु. ७६०० होते. याशिवाय चालू सालीं राजकीय मतप्रसाराचें कार्य महाराष्ट्रांत निघेल तर तें करणाऱ्या गृहस्थाच्या पगाराकरिता रु. ९०० व त्याच्या व इतर व्याख्याते वगैरे लोकांच्या प्रवासाकरिता रु. ५०० अशी एकूण--रु. १४०० (रु.चवदाशे) ची रक्कम योजून निराळी काढून ठेवण्यांत आली आहे. तिचा उपयोग करण्याचा प्रसंग आल्यास, यंदाकरिता नेमलेल्या ट्रस्टींची लेखी मतें मागवून त्याप्रमाणे त्यांतून खर्च करण्यांत येईल. याशिवाय एक हजार रुपये रिझर्व्ह-अनामत म्हणून बाजूला काढून ठेवण्यांत येतील.अशा तऱ्हेची शिल्लक रक्कम ठेवणें अवश्य आहे. अंदाजी उत्पन्न होणाऱ्या सर्व रकमेचा विनियोग करणें योग्य नाही. कोणत्या वेळीं कोणते कार्य निघेल तें अगाऊ समजेल असें नाही. म्हणून ही अनामत रक्कम ठेवण्याची योजना अवश्य आहे.

### इतर शाखा

पर्सफंड ट्रस्टच्या मूळ योजनेंत वऱ्हाड नागपूर व कर्नाटक यांना दिलेल्या रकमा सर्वस्वी, त्या त्या प्रांतात वेगवेगळया, पंच मंडळींच्या अधिकाराने खर्च व्हावयाच्या आहेत. म्हणून त्यांच्या खर्चाचा तपशील मुख्य कचेरीकडे मागविला जात नाही व तो तसा येतहि नाही. तथापि त्या शाखा-फंडाची व्यवस्था आजतारखेस काय आहे हें खाली दिलें आहेः-

**नागपूर वऱ्हाडशाखाः**—ता. १ ऑगस्ट, १९३२ रोजीं या शाखेचे खातीं जमा असलेली रक्कम रु. ४८४५--१३--५ व सदर सालांतील व्याज रु.४७२५--९--९ मिळून एकंदर रु. ९५७१-७-२. त्यांतून सरसालांत शाखेच्या खर्चाकरिता मागून घेतलेली रक्कम रु. ६४०७--५. ता. १ ऑगस्ट १९३३ रोजीं सदर शाखेच्या खातीं शिल्लक असलेली रक्कम रु. ३१६४-२-२.

**कर्नाटकशाखा**—ता. १ ऑगस्ट १९३२ रोजीं सदर शाखेचे खातीं असलेली रक्कम रु. १८१०--६--४ व सदर सालांतील व्याज रु. १२३४-२-४ मिळून एकंदर रुपये ३०४४-८-८. त्यांतून सर सालांत शाखेच्या खर्चाकरिता मागून घेतलेली रक्कम रु. २६३०-१. ता. १ ऑगस्ट १९३३ रोजीं सदर शाखेच्या खातीं शिल्लक असलेली रक्कम रु. ४१४-७-८.

### मध्य व दक्षिण महाराष्ट्रशाखा

ता. १ ऑगस्ट १९३२ रोजीं या शाखेचे खातीं जमा असलेली रक्कम रु. ११२७२-६-९ व सदर सालातील व्याज रु. ८१३०-१२. मिळून एकंदर रु.१९४०३-२-९.त्यांतून सरसालांत शाखेच्या खर्चाकरिता घेतलेली रक्कम रु.१४९९४-९ वजा जाता ता. १ ऑगस्ट १९३३ रोजीं सदर शाखेच्या खातीं शिल्लक असलेली रक्कम रु. ४४०८-९-९.

येणेंप्रमाणे ठराव ट्रस्टींनी केला. पुणें ता. १ ऑगस्ट १९३३ इ.

| | |
|---|---|
| न. चिं. केळकर | पुरुषोत्तम गोपाळ जोशी |
| | वि. ग. वैशंपायन |
| धोंडो वासुदेव विद्वांस | धोंडो कृष्ण साठे |

# एक भयंकर खेडें

( ले. श्री. द. नागपूरकर, एम. ए. जी. ग्रामसंघटनामंदिर, ताथवडें.)

ग्रामसंघटनामंदिर, ताथवडें येथें काम करीत असतांना एके दिवशीं एक परगांवचा माणूस आमचा शोध करीत आला. त्यानें आम्हांस विनवणी केली कीं, आमचे गांवीं एकदा येऊन आमचे गांवाचा उद्धार कराल का? आम्ही मनामध्ये म्हटलें कीं, ताथवड्याचा उद्धार करता करता नाकीं नव आले, आणि ही नवी ब्याद कोणी अंगावर घ्यावी? परंतु हा माणूस असा खप्पी भेटला की, आम्हास आपल्या गांवी नेल्याशिवाय राहिलाच नाही. हे गांव म्हणजे वडगांव (खुर्द). पुण्यापासून सातच मैल. पुणे—खडकवासला रस्त्यावर आहे. परंतु या रस्त्यापासून उजव्या बाजूस एक अर्धामैल आत आहे.

आम्ही पुण्याहून सात मैलपर्यंत बांधीव रस्त्याने व उत्तम विलायती मोटारीने गेलों. तेथे खाली उतरून उजव्या बाजूच्या ओढ्याचे कडेने आंत शिरलों. थोडक्याच वेळामध्ये एका गळक्या कमानीखालून आंत शिरण्याचा प्रसंग आला. याच कमानीवरून मुठेचा मोठा कालवा चाललेला आहे, या कमानींतून खाली आज कित्येक वर्षे पाणी झिरपत आहे. पुढे एक ओढा आडवा आला तो ओलांडावा लागला. त्यांतून जात असता कांही ठिकाणीं गुढघाभर व कांही ठिकाणीं मांड्याभर पाण्यांतून अर्धा फर्लांग लांब, पायांतील पादत्राणें हातामध्ये घेऊन जावें लागलें. पाण्यास ओढ होतीच. इतकें सर्व ठीक. पुढे पाहतों तों एक दुसरा ओढा बेफाम वाहात येत आहे. व तोहि आपणास ओलांडावा लागणार आहे. हें पाहातांच आमची गाळण उडाली. पाय पाण्यांत घालवेना, कारण कीं, जर का एकदा पाय घसरला कीं, झाली गच्छंतिचें. आमचा वाटाड्या म्हणाला, आमच्या गांवच्या बायका दररोज याच ओढ्यांतून डोकीवर ओझीं घेऊन व कमेरवर पोरें घेऊन सहज जातात येतात.

### गांवांतील भयाणपणा

आम्ही मनामध्ये खजील झालों. रस्ता इतका अरुंद कीं, मधून मधून निवडुंगाची फांदी अंगासहि घासे व खाली चिखलामध्ये निवडुंगाच्या तुटक्या कुजक्या फण्या आडव्या पडलेल्या. गांव पाहतों तों अगदी नदीचे कांठीं. गांवात घरें पन्नासाचे आंतच. परंतु घरें मात्र बांधीव दगडी. मोठीं ऐसपैस. कांही घरें तर दोन दोन मजली. बहुतेक घरें अगदीं मोडकळीस आलेलीं. गांवभर जिकडे तिकडे कुचक्या पाण्याचीं डबकी; त्यावरून तोंडावर एकदम घुंघरट्या व डास यांचे घोळकेच्या घोळके घुंगघुंग करून येते. बरींच घरें बंद दिसलीं. आमच्या वाटाड्यानें आम्हांस एका मारुतीच्या देवळांत नेलें. देऊळ पांचशें माणसें बसूं शकतील एवढें ऐसपैस. भिंतीवर लाखी रंगीत चित्रें काढलेलीं होतीं. परंतु गिलावा पडत चालल्याने चित्रे पुसकट होत चाललेलीं होतीं. अलीकडे शाकारणी वगैरे होत नसल्याने पटई अगदी डबघाईस आलेली होती. एका बाजूला एक खोली दिसली. दार उघडून पाहिलें तों आंत एक उत्तम तालीम असावी असें वाटलें. जरा आंत शिरून पाहूं लागलों तो आमचा वाटाड्या म्हणाला कीं, अहो, आंत जाऊ नका, बारा पंधरा वर्षांमध्ये अलीकडे तीमध्ये कोणीहि गेलेलें नाही.

देवळामध्ये आमचे भोंवती माणसें हळूहळू जुळू लागलीं. आम्ही सर्वजण खाली बसलों. प्रथमतः कांही मुली, कांही तरुण बायका व कांही म्हाताऱ्या बायका आपआपले हात पुढे करून 'हें पहा, हें पहा' असें म्हणत हात दाखवूं लागल्या. पुढे कांही वेळाने पाहतों तों कांही पोरें, कांही तरुण माणसें व म्हातारे पुरुषहि पोटें वर करून आम्हांस दाखवूं लागले. इतक्यांत एक म्हातारी बाई पुढे आली. आणि आमच्यापुढे तान्हें मूल ठेवून म्हणाली कीं आमची एवढी वात जगवा. घ्या आपल्या मांडीवर. आणि आम्हा सर्वांस या विषाची गोळी, आणि टाका मारून. आम्हांस जगून काय करावयाचें! ती म्हातारी बाई पुढे म्हणाली कीं, गेल्या १०–१५ वर्षांमध्ये आमच्या गांवांतील एकूणएक घरांतून झाडून सार माणूस झीज झिजून मरत आहे. तरण्याबांड पोरांना आमच्या देखत मरावें आणि आम्ही जगावे आणि तें कशासाठी? आमच्या घरांत माणसें मावत नव्हती. घरीं पैसे ठेवण्यास जागा नव्हती. तो आज घरांत एक नातवंड उरले आहे. व तेंहि दररोज तापाने झिजत आहे. औषध पाण्याचे पायांत घरेंदारें सावकारांचे घशामध्यें आम्ही घातलीं. शेते तर कोण करणार? देवळांत जिकडे तिकडे एकच रडारड चालू झाली! आम्ही घाबरून गेलो. कांही वेळाने बरींच माणसें आम्हांस हींव आलें, हींव आलं असें म्हणत आपआपल्या घरीं निघून गेलीं.

### भरभराटीची स्थिति

आमचा वाटाड्या व गांवांतील कांहीं वृद्ध माणसें मिळून चर्चा करीत बसलों. बोलत बसलों असतां हकीकत समजली कीं, आज ३०-४० वर्षें झालीं. गांवाच्या वरच्या बाजूने मुठेचा कालवा आणण्यांत आला. ज्या गांवांत पूर्वी बाजरी पिकत नव्हती, त्या गांवी ऊंस पिकूं लागला. जिकडे तिकडे पेरू, केळी, संत्रीं—मुसंबीच्या बागाच बागा झाल्या. आरंभीं लोकांजवळ फुटकी दमडीसुद्धां नव्हती. गाडीवानी करावी. शहरांत जाऊन मोलमजुरी करावी. अशा रीतीने जेमतेम गुजराणा करावा. नंतर कालवा आला. शेतकीचा उद्धार झाला. पैशाला ऊत आला. मोठमोठीं घरेंदारें बांधलीं, देवळें उभारलीं, गांव सुधारलें, गांवांत शाळा आली. गांवांतील सर्व मुलें शाळेंत जाऊं लागलीं. सोसायटी काढली. गांवांत उत्तम तालीम बांधण्यांत आली. घरोघरीं पैलवान झाले. गांवांत घर शंभराचे खालीच पण गांवांत पैलवान मात्र शंभराचे वर. असें समजलें कीं, एकसाल तर पुण्याच्या मैदानावर या गांवचे सत्तेचाळीस पोर लढले.

मध्यंतरींच एक वृद्ध माणूस घोगऱ्या पण खोल आवाजाने म्हणाला, 'नानासाहेब, मला चार मुलगे होते. हत्तीसारखे दांडगे होते! परंतु गेल्या १०-१५ वर्षांत एकापाठीमागून एक असे झिजून झिजून त्यांपैकीं तीन मरून गेले. एक उरला आहे तोहि झिजत आहे. त्याच्या बायकोला मुलें होतात. एक दोन महिन्यांचें झालें म्हणजे मरतात. सध्या एका सुनेला एक चार-सहा महिन्याचें मूल आहे. पण तेंहि तापाने झिजत आहे. मरतें का जगतें कोण जाणें!'

इतक्यांत दुसरा एक म्हातारा माणूस म्हणाला, 'घरोघरीं हीच स्थिति आहे. गांवांतील समदी पोरें पानथरीच्या रोगानें मरतात. सगळ्या घरांचा निर्वंश होत चालला आहे.' आमचे डोळे उघडले व लोक खिन्न कां, याचें स्पष्ट कारण डोळ्यांपुढे उभें राहिलें.

### वैद्यकीय तपासणी

आमच्याबरोबर संस्थेचे वैद्य हजर होते. त्यांना आम्ही विनंति केली कीं, झाडून सर्व लोकांची प्रकृति तपासा. तपासाअंतीं वैद्यबुवांनी पुढील निकाल दिला.

| | |
|---|---|
| आज अंथरुणावर पडून असलेले लोक | ११ |
| अंगामध्ये बारीक ताप असलेले, पण फिरते | ,, २३ |
| एक दिवसाआड हिवाचे रोगी | ,, २० |
| चातुर्थिक हिवाचे | ,, २६ |
| पंधरा दिवसाआड हिवाचे | ,, १७ |
| पांथरीने खंगत असलेली अर्भकें | ,, ९ |
| गावांची एकूण लोकसंख्या | ११६ |

गांवकऱ्यांकडून आणखी हकीकत समजली कीं मध्यंतरीं गुळास भाव आला. एकटें इरिगेशन खातें या गांवांतून हजारों रुपये गोळा करीत असे. गांवकऱ्यांस पट्टीपासोडी कस्पटासमान दिसत असे. पुढे पुढे हळुहळू गांवांत थंडताप चालू झाला. दरवर्षी या तापाने १०-१५ तरुण माणसें मरूं लागलीं. पुष्कळ उपाय केले. गुण नाही. अशी कांही वर्षें गेलीं. गांवांतील तरणा ताठा माणूस नाहीसा होत चालला. घरोघरीं दवाखाना झाला, तालीम बंद पडली, शाळेंत पोरें कमी कमी पडत चाललीं. शाळा बंद करण्यांत आली. शेतांत जाऊन काम करण्याची हिंमत कमी कमी पडत चालली; मळे, बागा मोडत चालल्या. अंगावर कर्जे आलीं. सोसायटी बोकांडीं बसली. जी सोसायटी आम्हांस लक्ष्मी वाटे तीच सोसायटी अवदसा वाटूं लागली.

कोणी म्हणूं लागले, आमचा नाश सोसायटीने केला. कोणी म्हणूं लागले कीं, नळाचे पाण्याने आमचा नाश केला. कोणी म्हणूं लागले कीं आमचा नाश हिवतापाने केला. कोणी म्हणाले कीं नशीब आमचें. आणखी काय!

### लोकांचें कर्तव्य

प्रो. भागवत यांचे ग्रामसंघटना मंदिराने हें गांव नुकतेंच हातीं घेतलें आहे. सबब या कामीं आजच जास्त लिहिणें बरें नाहीं एवढे खरे तथापि कीं, या कामीं आरोग्यखात्याचे अधिकारी, त्याचप्रमाणे मुलकी खात्याचे अधिकारी, लोकल बोर्डांतील मेंबरलोक, पुणें म्युनिसिपालिटीमधील कौंसिलर्स व श्री. भागवत यांचे स्नेही सर्वतोपरी आपआपल्या पद्धतीने प्रयत्न करीत आहेत.

# स्वराज्याच्या चळवळीला धोका

हिंदुस्थानांत राष्ट्रीय सभा ही प्रमुख राजकीय संस्था आहे व तिचा उद्देश हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य मिळवून देणें हा आहे. राष्ट्रीय सभेच्या अनुयायांत वकील, डॉक्टर, व्यापारी, कारखानदार, जमीनदार, सावकार, नोकर, शेतकरी व मजूर इत्यादि विविध धंद्यांचे लोक आहेत. राष्ट्रीय सभेनें स्वराज्य या सर्वांकरिता आहे असें म्हणण्यांत येतें.तथापि राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांत स्वराज्याच्या अंतिम स्वरूपासंबंधाने मात्र एकवाक्यता नाही. तो पल्ला दूरचा असल्यामुळे स्वराज्य कसें असावें याबद्दल पुढाऱ्या–पुढाऱ्यांत सांप्रत हमरीतुमरीचा वाद उद्भवत नसला तरी त्यांच्यांतील मतभेद प्रसंगाप्रसंगाने प्रकट झाल्यावांचून राहात नाहीत. राष्ट्रीय सभेच्या तरुण पुढाऱ्यांपैकीं पंडित जवाहरलाल नेहरू व बाबू सुभाषचंद्र बोस हे समाजसत्तावादी होत. म. गांधी यांचींहि मतें बहुतेक त्यांच्यासारखींच असून तीं त्यांनी गोलमेज परिषदेच्या वेळीं बोलूनहि दाखविलीं आहेत. समाजसत्तावादाचें मूळ युरोपांत आहे. त्याचीं तत्त्वें लक्षांत घेतल्यास समाजसत्तावाद्यांना देशांत सावकार, कारखानदार, जमीनदार इत्यादि भिन्न भिन्न वर्गांचें अस्तित्व बहुजनसमाजाच्या हिताच्या दृष्टीने अपायकारक वाटत असल्यामुळे त्यांचा नायनाट करावयाचा आहे.

पं. जवाहरलाल नेहरू यांनी आपलें वरील प्रकारचें मत नुकत्याच दिलेल्या मुलाखतींत उघडपणें सांगितलें व त्याचा अनुवाद त्यांच्या आज इतरत्र छापलेल्या नव्या पत्रकांतहि नमूद आहे. पं. जवाहरलाल नेहरू, बाबू सुभाषचंद्र बोस, म. गांधी हे राष्ट्रीय सभेचे पुढारी होत. परंतु सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे सभासद व ले. असेंब्लीचे सरकारनियुक्त प्रतिनिधि रा. नारायणराव जोशी यांचीं मतेंहि समाजसत्तावादास बरींचशीं अनुकूलच दिसतात. रा. जोशी यांस सरकाराने मजुरांचे प्रतिनिधि या नात्याने असेंब्लींत नेमलें असलें तरी ते लिबरल म्हणजे नेमस्त पक्षाचे आहेत हें विसरता कामा नये. राष्ट्रीय पक्ष व लिबरल पक्ष यांतील कित्येक व्यक्तींच्या मनावर समाजसत्तावादाची जर इतकी छाप बसली आहे तर जे लोक मजुरांच्या चळवळीसच वाहिलेले आहेत व ज्यांचें समाजसत्तावादाशीं किंबहुना कम्यूनिझमशीं तादात्म्य झालें आहे त्यांच्या मताविषयी बोलावयासच नको.

मद्रास इलाख्यांतील उत्तर अर्काट जिल्ह्यांत वेलोर येथे ता. १० सप्टेंबर रोजीं मजुरांची परिषद भरून तिच्यांत रा. व्ही. व्ही. गिरी यांनी अध्यक्ष या नात्याने भाषण केलें. रा. गिरी हे मजुरांचे पुढारी आहेत. हिंदुस्थानांतील मजुरांच्या पुढाऱ्यांनी आपलीं बहुतेक मतें पश्चिमेकडील समाजसत्तावाद्यांच्या ग्रंथामधून उचललेलीं असल्यामुळे त्यांच्या विचाराचा व चळवळींचा एकंदर झोक त्या धर्तीवरच असावा यांत नवल कसलें ? त्यांनी आपल्या भाषणांत हिंदी स्वराज्य सोशालिस्ट पद्धतीचेंच बनविलें पाहिजे असें सांगितलें. हें स्वराज्य केव्हा मिळेल तेव्हा मिळो, पण तें जर समाजसत्ताकच बनावयाचें तर त्याच्या तयारीस आजपासूनच लागणें जरूर आहे. यासाठी अखिल हिंदुस्थानाकरिता एक समाजसत्तावादी पक्ष स्थापण्याचा त्यांनी आपल्या श्रोत्यांस उपदेश केला. या ठिकाणीं समाजसत्तावाद्यास काय पाहिजे हें सांगितलेलें बरें.

समाजसत्तावाद्यांना भिन्नभिन्न वर्गांचा तिटकारा आहे. देशांतील सर्व प्रकारची संपत्ति अखिल समाजाकरिता आहे व तिचा विनियोग व्यक्तींच्या हिताकडे न होता समाज–हिताकडेच झाला पाहिजे असें सोशालिस्टांचें मत आहे. आजमितीला जगाची संपत्ति नदीच्या डोहांतील पाण्याप्रमाणे ठिकठिकाणीं सांचून राहिली असून त्या डोहांच्या खालच्या प्रदेशांत नदीचा ओघ आटून गेला आहे. या बाबतींत पश्चिमेकडील उदाहरण द्यावयाचें झाल्यास भांडवलवाल्याकडे बोट दाखवावें

लागेल. युरोप व अमेरिका येथील खाणी, कारखाने व मोठमोठे धंदे श्रीमंत व मध्यम वर्ग यांच्या मालकीचे आहेत. त्यांनी सदर व्यवसाय भागीदारीच्या पद्धतीने चालविले आहेत, व त्यापासून जो फायदा होतो तो ते आपसांत वांटून घेतात. पण या व्यवसायांतून करावयाचे शारीरिक कष्ट मात्र मजुरांच्या नशिबी येतात. मजूर आपखुषीनेच ते पत्करतात व त्याबद्दल त्यांना शिरस्त्याप्रमाणे मजुरीहि मिळते हें खरें आहे; परंतु ती श्रमाच्या मानाने कमी असते व त्यांना सुखसोयीहि पुरेशा नसतात अशी त्यांच्या पुढाऱ्यांची तक्रार आहे. ती लक्षांत घेऊन युरोपांत मजुरांच्या आंतरराष्ट्रीय परिषदा दरसाल भरविण्यांत येतात व त्यांत मजुरांच्या कामाचे तास कमी करावे, त्यांच्या आरोग्याकडे लक्ष पुरवावें, त्यांच्या मुलाबाळांस शिक्षण मिळावें व त्यांचा आयुष्यक्रम एकंदरींत सुखावह व्हावा यावर नजर देऊन ठराव पास होतात आणि त्यांची अंमलबजावणी प्रत्येक देशांत कमी–अधिक प्रमाणांत केली जाते. हिंदुस्थानांतहि आंतरराष्ट्रीय मजूर परिषदेच्या शिफारशींस अनुसरून हिंदुस्थान सरकारानें कांही सुधारणा घडवून आणिल्या आहेत. फॅक्टरी ॲक्ट, ट्रेड युनियन ॲक्ट हीं त्याचींच फळें होत. परंतु तेवढ्याने मजुरांचें व त्यांच्या पुढाऱ्यांचे समाधान झालेलें नाही. त्यांचें म्हणणे असें कीं, सर्व मोठमोठ्या कारखान्यांत मजुरांना भागीदारी मिळाल्यावांचून किंबहुना ते भांडवलवाल्यांच्या ऐवजीं राष्ट्राच्या मालकीचे ठरल्यावांचून मजुरांचें दैन्य फिटणार नाही.

युरोपांत मोठाले कारखानदार आहेत तसे जमीनदारहि आहेत. कारखान्यांत मजुर खपतात तशीं जमीनदारांच्या शेतांतून त्यांचीं कुळें निढळाचा घाम गाळतात. यासाठी कारखान्यांप्रमाणे जमिनीहि राष्ट्राच्या मालकीच्या झाल्या पाहिजेत असा त्यांच्या पुढाऱ्यांचा आग्रह आहे. हिंदुस्थानांत गिरण्या, खाणी व इतर कारखाने आहेत; पण ते अद्यापि बाल्यावस्थेंत आहेत. रेल्वे हा फार मोठा धंदा आहे. तथापि तो प्रायः सरकारच्या मालकीचाच आहे. रेल्वे खातें कांहीच नाही अशीं इतर कैक खातीं सरकाराचीं असून त्यांत कोट्यवधि माणसें गुंतलेलीं आहेत. या दृष्टीने हिंदुस्थानसरकाराइतका बडा कारखानदार हिंदुस्थानांत दुसरा कोणीहि नाही हें कबूल करावें लागेल. ही स्थिति साऱ्या हिंदुस्थानाची झाली. परंतु प्रांतपरत्वें इतर बाबतींत कांहींसें भिन्नत्व आहे. बंगाल व संयुक्तप्रांत यांत जमीनदारीची व तालुकदारीची पद्धति शेकडों वर्षें चालत आली असून जमीनदार व तालुकदार यांचें वार्षिक उत्पन्न लक्षावधि रुपयांचें आहे. पण त्यांच्या शेतांत खपणारीं कुळें मात्र हालविपत्ति भोगीत आहेत. त्या कुळांना हालअपेष्टांतून सोडविण्याकरितां प्रांतिक सरकाराने कांही कायदेकानू केले आहेत. तथापि त्यामुळे त्यांच्या दुःखांचा परिहार झाला आहे असें नाही. म्हणूनच संयुक्त प्रांतांतील शेतकऱ्यांनी वैतागून तालुकदाराविरुद्ध बंड केलें व तें मोडण्याकरिताच सरकारानें वटहुकुमाचा सोटा सदर प्रांतावर फिरविला.

तिकडील शेतकऱ्यांस जागृत करण्यास व त्यांच्या चळवळीस वळण लावण्यास पं. जवाहरलाल नेहरू व त्यांचे अनुयायी यांचे परिश्रम पुष्कळ अंशीं कारण झाले यांत शंका नाही. किंबहुना जवाहरलाल व सुभाषचंद्र यांचीं मतें समाजसत्तावादाकडे विशेष झुकण्यास त्यांच्या प्रांतांतील लोकस्थितीनेच त्यांस शिकविलें असेंहि म्हटलें तरी चालेल. परंतु शेतकऱ्यांची जी अवस्था बंगाल व संयुक्तप्रांत यांत आहे ती मुंबई, मद्रास, वऱ्हाड इत्यादि प्रांतांत नाही. तेथील शेतकरी वर्ग स्वतंत्र असून तो स्वतःच्या शेताचा मालक आहे. तो दारिद्र्याने पीडला असला तर त्याची जबाबदारी जमीनदारावर नसून सरकारावर आहे. प्रांतपरत्वें या प्रकारचे भेद असल्यामुळे समाजसत्तावादाचें पीक उत्तर हिंदुस्थानांत जितकें जोमाने फोफावेल तितकें दक्षिण हिंदुस्थानांत फोफावण्याचा संभव नाही.

दक्षिण हिंदुस्थानांत काय किंवा उत्तर हिंदुस्थानांत काय जेथे मोठाले कारखाने

आहेत तेथे हजारों कामगार जमावाने राहत असल्याकारणाने त्यांची संघटना थोडीबहुत घडून आली आहे. परंतु कारखान्यांच्या बाल्यावस्थेचा व दुबळ्या स्थितीचा विचार केल्यास कारखानदार व मजुर यांजमध्ये पाश्चात्य धर्तीवर चुरशीचा सामना लावून देण्याने आहेत हेहि कारखाने धुळीस मिळतील व औद्योगिक बाबतींत हिंदुस्थानाचें पाऊल पुढे न पडता मागेच सरकेल. तसेंच हिंदुस्थानाची एकंदर संपत्ति किती आहे व तिचा हिस्सा मजुरांच्या वांट्यास केवढा येतो याचा अंदाज बांधण्यास आज निश्चित साधन कांहीच नसल्याने त्यांच्या मजुरीचें प्रमाण ठरविण्याचा हट्ट धरण्यांतहि कांही अर्थ नाही. ज्याप्रमाणे कारखानदारांचा मालकीहक्क न बुडविताहि मजुरांच्या सुखसोयी साधण्याचा संभव आहे त्याचप्रमाणे जमीनदारांचें स्वामित्व न घालविताहि त्यांच्या कुळांचे हाल दूर करतां येणार आहेत.

वास्तविक हिंदुस्थानाची राजकीय स्थिति अशी आहे कीं, त्यांतील पुढाऱ्यांना येथे समाजसत्ता स्थापन करावी कीं लोकसत्ताच अमलांत आणावी या वादांत पडण्याचें तूर्त तरी कारण नाही. इंग्रज सरकाराचा जन्म भांडवलवाल्यांच्या पोटीं झाला असल्यामुळे त्यांच्या हातांत हिंदुस्थानाचीं मुख्य राज्यसूत्रें आहेत तोंपर्यंत या देशांत समाजसत्ता अवतरण्याचें नांवहि काढावयास नको. असें असताहि पं. जवाहरलाल नेहरू समाजसत्तेचा पुरस्कार करतात; रा. गिरी तेंच ध्येय डोळ्यांपुढे ठेवून शेतकरी, कामकरी व सरकारी नोकर यांस सोशालिस्ट पक्ष उभारण्यास सांगतात; या कारणाने श्री. व्रजकिशोर यासारख्या असेंब्लीच्या सभासदास कोणाचीहि मिळकत त्यास योग्य मोबदला दिल्यावांचून त्याजपासून सरकाराने काढून घेऊं नये हें तत्त्व फेडरेशनच्या घटनेंत नमूद करण्याची आवश्यकता वाटली. नारायणराव जोशी काय जवाहरलाल नेहरू काय किंवा गिरी काय, आपलीं समाजसत्तावादाचीं तत्त्वें प्रचलित राजकारणास लावूं पहातील तर हिंदुस्थानांतील भिन्न भिन्न वर्गांच्या मनांत एकमेकांविषयी अविश्वास उत्पन्न होऊन देशांत जी थोडीबहुत एकजूट आज आढळत आहे तीहि मोडण्याचें अपेश ते जोडतील. तथापि जोशी यांनी जो खुलासा नव्याने प्रसिद्ध केला आहे त्यावरून त्यांचें म्हणणें हिंदुस्थानाच्या राजकीय घटनेंत मोबदल्याचें तत्त्व घालून भावी पिढीचे हातपाय आज बांधून ठेवूं नये एवढेंच दिसतें. तें कांहीहि असलें तरी जमीनदार, इनामदार, व्यापारी, सावकार, कारखानदार व सुखवस्तु लोक यांस आपली मिळकत भावी स्वराज्यांत आपल्या मालकीची राहाणार नाही असा अविश्वास वाटूं लागल्यास ते स्वराज्याच्या चळवळीस सोडून देतील किंवा तिजपासून अलिप्त तरी राहातील.

# म. गांधी व पं. नेहरू यांचा खुलासा

## महात्मा गांधींचें भावी धोरण

गुरुवार ता. १४ रोजीं सकाळीं अकरा वाजता म. गांधींनी पुढील पत्रक प्रसिद्ध केलें.

"माझ्या दीर्घकालाच्या लोकसेवेमध्ये मला पुढील क्षणाचा मार्ग नेहमीं स्वच्छपणें दिसत असे. पण ता. २३ ऑगस्ट रोजीं माझी आकस्मिक मुक्तता झाल्यापासून माझ्याभोंवती अंधार पसरला आहे. त्यामुळे कर्तव्याची वाट मला स्पष्टपणें दिसेनाशी झाली आहे. माझी सध्याची प्रकृति अशी आहे कीं, ती सुधारून घटलेली शक्ति मिळविण्यास अजून बरेच आठवडे लागतील.

### तुरुंगांत जात नाही

निर्वाणीची प्रार्थना आणि दीर्घ विवेक करून माझ्या मनाचा असा निर्णय झाला आहे कीं, बंदिवासाची मुदत संपेपर्यंत म्हणजे ता. ३ ऑगस्ट १९३४ पर्यंत मी चढाईचा कायदेभंग करून तुरुंगवास स्वीकारूं नये. अर्थात् पुणें-परिषदेनंतर मी जें पत्रक काढलें त्यांतील सूचनेशीं हा निर्णय मुळींच

विसंगत नाही. प्रत्यक्ष कृति करणें मला कांही काळ लांबणीवर टाकावें लागत आहे ही दुर्भाग्याची गोष्ट होय, पण ती अपरिहार्य आहे. माझ्या बंधमुक्ततेमुळे माझी स्थिती फार कोंडमाऱ्याची झाली आहे. परंतु एक सत्याग्रही या नात्यानें— म्हणजे सत्याचा एक पामर संशोधक या दृष्टीनें—माझ्या बंधमुक्ततेमुळें निर्माण झालेल्या परिस्थितींत मी तुरुंगांत आपण होऊन जाणें हें औचित्याला सोडून होईल असें मला वाटतें. मला बंधमुक्त करण्यांत सरकाराचा हेतु कोणताहि असो, त्याबद्दल मला भांडत बसावयाचें नाही. कृतीची पारख तिच्या गुणावरूनच मला केली पाहिजे. माझ्या बंदिवासाच्या उर्वरित कालांत मी चढाईची कृति करावी व मला पकडणें सरकाराला भाग पाडावें हें मी क्षुद्रपणाचें समजतों. सविनय कायदेभंगांत क्षुद्रपणाला मुळीं थाराच नाही. माझा हा निर्णय मला फिरविण्यास लावणारे कांही अलौकिक प्रकार घडले तर मात्र गोष्ट वेगळी; पण तसे प्रकार आज माझ्या दृष्टीपुढे नाहीत.

स्वतःवर हा निर्बंध लादून घेणें म्हणजे एक कडू पेय पिण्यासारखें आहे. मला अटक झाल्यानंतर, चौकशीचे वेळीं मी असें म्हटलें होतें कीं, तुरुंगाच्या बाहेर मोकळें राहावयाचें आणि वटहुकुमी राजवटींत होत असलेला विध्वंस आणि नीतिभ्रंश हात जोडून पाहात बसावयाचें याची वेदना केवळ असह्य होय. हें माझें विधान म्हणजे एक साधें सरळ सत्य होय. ता. ४ ऑगस्टरोजीं ती वेदना जितकी तीव्र होती, तिच्यापेक्षा आता ती कमी तीव्र मुळीच झालेली नाही. पण मला ती सोसलीच पाहिजे.

सरकाराच्या मनांत मांजराउंदरांचा क्षुद्र खेळ खेळावयाचा असेल पण मी त्यांत राजीखुषीनें भाग घेऊं शकत नाही. म्हणून, जर मला सरकारानें पुनः पकडलें पण हरिजनांची सेवा करूं दिली नाही तर, अंतःप्रेरणा होतांच, प्राणांतिक उपोषण करण्यास मी कांकूं करणार नाही. सरकारानें पूर्वी संकटकाल समीप येतांच ता. २३ ऑगस्ट रोजीं मला बंधमुक्त केलें, त्याप्रमाणे या भावी उपोषणाचे वेळीं सरकारानें मला मोकळें केलें, तरी मी माझें उपोषण मोडणार नाही.

### हरिजनांची सेवा

माझ्या निर्बंधाच्या मर्यादा मी स्वच्छपणें सांगणें जरूर आहे. जोंपर्यंत मी मोकळा आहें पण चढाईचा कायदेभंग आचरीत नाही तोंपर्यंत जे लोक मला सल्ला विचारतील, त्यांना योग्य दिशा दाखविल्याशिवाय मला राहातां येणार नाही. त्याचप्रमाणें राष्ट्रीय चळवळ वाममार्गानें जात असल्यास ती ताळ्यावर आणल्यावांचूनहि मी राहाणार नाही. अत्याचारी मार्गानें सत्याचा शोध लागणार नाही हा माझा विश्वास क्षणोक्षणीं वृद्धिंगत होत आहे. राष्ट्राची स्वातंत्र्यप्राप्ति हें मी एक सत्यशोधनच समजतों. अत्याचारांचीं कृत्यें-मग तीं जुलमी मनुष्यानें केलेलीं असोत वा त्या जुलमाखालीं चिरडणाऱ्या माणसानें केलेलीं असोत—अत्याचारांमीच परतविणें कदापि शक्य होणार नाही. त्यांना परिणामकारक उत्तर सविनय कायदेभंग हेंच होय, अशी माझी खात्री पटली आहे. म्हणून या पत्रकांत मी माझ्यावर घालून घेतलेल्या निर्बंधांपेक्षा अधिक निर्बंध घालून घेतले असते, तर मी माझ्या ब्रीदाशीं बेइमान ठरलों असतों. यासाठीं माझा संकल्प असा आहे कीं, सरकारानें मला मोकळें ठेवलें तर बंदिवासाचा उरलेला काळ मी हरिजनांच्या सेवेंत वेंचीन, आणि प्रकृति संभाळून विधायक कार्य करीन.

कायदेभंगाइतकाच शांतता हाहि माझ्या जीवनाचा भाग आहे हें मी पुनः सांगण्याची गरज नाही. खरोखर जेव्हा शांतता प्राप्त होणें अशक्य होतें तेव्हाच मनुष्य सविनय कायदेभंगास सुरुवात करतो. यासाठीं जोंपर्यंत मी मोकळा आहे तोंपर्यंत सन्मानपूर्वक शांततेचे सारे मार्ग शोधण्याचा यावच्छक्य प्रयत्न करीत राहीन."

## पं. नेहरूंचें निवेदन

पं. जवाहरलाल नेहरू यांनी पुढील पत्रक ता. १४ रोजीं प्रसिद्ध केलें आहे. या पत्रकांत प्रारंभीं आपण आपल्या मातोश्रींच्या प्रकृतीबद्दल काळजींत असल्यामुळे त्यांची शुश्रूषा करण्यात गुंतलों होतों वगैरे सांगून ते पुढे म्हणतात—"देशांतील सांप्रतच्या राजकीय परिस्थितीबद्दल व स्वातंत्र्याच्या लढ्याबद्दलचा खोल विचार करणें मला निकडीचें वाटत असल्यास नवल नाही. गेल्या वीस महिन्यांत चळवळीची व माझी ताटातूट झाली होती. गेल्या दोन वर्षांत महात्माजींची व माझी भेट झाली नव्हती आणि या कालखंडांत पुष्कळच गोष्टी घडल्या आहेत. संयुक्त प्रांतांतील माझ्या सवंगड्यांकडून सद्यःस्थितीची मी माहिती घेण्याचा प्रयत्न केला. परंतु, महात्माजींची भेट घेण्याचीच माझी फार इच्छा होती. मला महात्माजींशी सल्लामसलत करण्यास पूर्ण वाव मिळाला. मी माझें म्हणणें त्यांच्यापुढे मांडलें व त्यांचाहि सल्ला ऐकला.

### दोन प्रश्न

आमच्यापुढे दोन प्रश्न होते. स्वातंत्र्याच्या लढ्यासंबंधीचा राष्ट्रीय प्रश्न, हा एक व गांधीजींची तुरुंगांतून बंधमुक्तता झाल्यामुळे उत्पन्न झालेला वैयक्तिक प्रश्न, हा दुसरा. दुसरा प्रश्न

फक्त गांधीजीच सोडवूं शकतात. तो त्यांचा वैयक्तिकच आहे हें खरें असलें तरी त्याचासुद्धा ते जो निकाल देतील त्याचा राष्ट्रावर परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही हें निश्चित.

### पत्रें प्रसिद्ध होणार

अनेक प्रश्नांसंबंधी आपले संशय फेडून घ्यावे या उद्देशानें प्रेरित होऊन मी पुण्यास आलो. परंतु येथे आल्यावर मला असें आढळून आलें कीं, आमच्या संभाषणासंबंधी लोकांत फारच कुतूहल उत्पन्न झालें आहे,व त्यासंबंधी कांही तरी प्रसिद्धि पत्रक काढणें जरूरीचें आहे. गांधीजी व मी यांच्यामध्ये महत्त्वाच्या मुद्द्यासंबंधानें जणु काय पत्रव्यवहार झाला अशा स्वरूपांत त्यांतील मुद्द्यांची चर्चा मांडणें आम्हास इष्ट वाटतें. अशा तऱ्हेचा पत्रव्यवहार लवकरच तयार करून वर्तमानपत्राकडे प्रसिद्ध करण्याकरिता पाठविण्याचें आम्ही ठरविलें आहे.

### भिन्न दृष्टि

गांधीजींच्या प्रेरणेने व त्यांच्या पुढारीत्वाखाली गेलीं तेरा वर्षें माझ्या इतर देशबांधवांप्रमाणेच स्वातंत्र्य-युद्धांत भाग घेण्याची सुसंधी मला मिळाली. या लढ्याकडे पाहण्याची माझी दृष्टि राजकीय व आर्थिक आहे. धार्मिक किंवा दुसऱ्या इतर प्रवृत्तींचा पगडा माझ्यावर बसलेला नाही. फक्त सत्याग्रहांतील नैतिक व व्यावहारिक भागाने मात्र मी मोहून गेलों हे कबूल करणे प्राप्त आहे. गांधीजींची गोष्ट माझ्यासारखी नाही. ते अत्यंत धार्मिक वृत्तीचे आहेत व त्यांची या लढ्याकडे पाहण्याची दृष्टीहि धार्मिक आहे. आमच्यापैकीं पुष्कळांचे व त्यांचें अनेक गोष्टींत ऐकमत्य आहे. म्हणून आम्ही मोठ्या आनंदाने व खुषीनें व्यावहारिक राजकारणांत त्यांच्या नेतृत्वाखाली भाग घेत आलों. ते केवढे कर्तृत्ववान पुढारी आहेत हें हिंदुस्थानाला व जगाला माहीत आहे. जनतेंत आज त्यांनी नवी आशा व नवें धैर्य उत्पन्न केलें.

### गांधींचे मार्ग

त्यांचें उद्दिष्ट हें राजकारणाच्या व आर्थिक लढ्याच्या दृष्टीने आम्हांस पटलें म्हणून आम्हीं तें साध्य करण्याकरिता भगीरथ प्रयत्न केले. त्यांनी राजकीय लढ्याचा आखून दिलेला मार्ग आमच्यासारख्यांच्या आजच्या परिस्थितींत बिनचूक व योग्य आहे असें माझें मत आहे व म्हणूनच तें उद्दिष्ट साध्य होईपर्यंत आपण त्याच मार्गानें जाणें अत्यंत जरूरीचें आहे. याचकरिता त्यांच्या नेतृत्वाचीहि आम्हास गरज आहे. गरीबांतल्या गरीबास व राष्ट्रांत सर्व तऱ्हेची नागवण होत असलेल्या असहाय मनुष्याला जर स्वातंत्र्य मिळालें तरच तें खरें स्वातंत्र्य! याच मुद्द्यावर गांधीजी जोर देतात व म्हणूनच त्यांच्या चळवळींत सामर्थ्य येते तथापि हिंदुस्थानांत व बाहेर आमच्या ध्येयासंबंधी गैरसमज न राहावा म्हणून तें स्पष्ट व विशद करून मांडणें मात्र जरूरीचें आहे. विशेषतः भांडवलशाहीची आर्थिक दृष्ट्या मोडतोड चालली असता आपल्या राष्ट्रीय चळवळीचें आर्थिक स्वरूप काय राहील हें स्पष्ट करणें जरूर आहे.

### ऑल–इंडिया कॉं. कमिटी

ऑल–इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा भरविण्यासंबंधी मला एका वजनदार मित्रानें सूचना केली आहे. अशी सभा भरवावी म्हणून जर कायदेशीर मागणी कोणी केली तर मी सभा बोलावीन व ती बोलावणें माझें कर्तव्य आहे. परंतु, माझें व्यक्तिशः मत आहे कीं, अशी सभा बोलावण्याच्या मार्गांत अनेक अडचणी आहेत.

# वाङ्मयांत विडंबनाचें स्थान

( ले.—के. ना. वाटवे, एम. ए. पुणें. )

हल्लीच्या मराठी वाङ्मयावर इंग्रजी व संस्कृत या दोन संपन्न भाषांचे ठसे स्पष्ट उमटलेले दिसतात. तें एक गंगायमुनाप्रवाहाचें सुंदर मिश्रणच, आहे म्हणाना. त्यामुळे विडंबनाचा एक लहानसा स्रोत घेतला तरी त्यांत वरील दोनहि रंगांच्या छटा स्पष्ट व्यक्त होतात.विडंबन हा शब्द संस्कृत असून त्याचा अर्थ साधें अनुकरण करणें असा आहे. तसेच अनुकरणमूलक उपहास किंवा नुसतीच फजिती याहि अर्थी त्याचे प्रयोग आढळतात. इंग्रजींतहि Parody (विकृतानुकरण) या विनोदी वाङ्मय प्रकारांत असाच अनुकरणमूलक उपहास प्रामुख्याने केलेला आढळतो. संस्कृतांत विडंबन हा शब्द असला तरी त्याच्या पृथक्करणात्मक स्वरूपाचें विवेचन किंवा उदाहरणहि फारसें नाही. जें आहे तें साध्या विनोदांत सामील होण्यासारखें संकीर्ण स्वरूपाचें

आहे. कारण विनोदाला संस्कृतांत विशेष प्राधान्य देण्यांत न आल्याने त्याची विवेचक चर्चा कोठेहि उपलब्ध नाही. इंग्रजींत मात्र विनोदाला वाटेल तेवढें रान मोकळें असल्याने त्याच्या निरनिराळ्या प्रकारांची सूक्ष्म छाननी केलेली आढळते. सुदाम्याच्या पोह्यांतला अखंड प्रवाही विनोद जसा मूळ इंग्रजींतून आला त्याचप्रमाणे हल्लीच्या विडम्बनाची तऱ्हाहि इंग्रजीवरून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें सूचित झालेली आहे.त्यामुळे साध्या उपहासाच्या मूळ संस्कृत सांगाड्यांत इंग्रजी कल्पनांची जोडणी होऊन हल्लीचें विडम्बन तंत्र कसें निर्माण झालें तें पाहिलें पाहिजे. आता इंग्रजी तंत्र (Technic) जरी घेतलें तरी मराठी विडम्बनांत तें अक्षरशः पाळलें जातें किंवा जावें असें नसल्याने त्याचें सामान्य स्वरूप सांगून मराठींतील विडंबनाचें थोडक्यांत समालोचन करूं.

## विडंबनाचें लक्षण

पॅरॉडीची कल्पना जुनीच असली तरी तिचें स्पष्ट व रेखीव लक्षण इंग्रजींतहि सर्वमान्य झालेलें दिसत नाही. 'क्वार्टरली रिव्ह्यू'च्या १८९५ सालच्या अंकांत एका लेखकानें "एखाद्या कवीच्या मूळ काव्यांतल्या उदात्त-गंभीर अर्थाला त्याच कवितेंतील वृत्त, शब्दयोजना, मांडणी व इतर विशेष कायम ठेवून विनोदी वळण देणारी कविता." असें पॅरॉडीचें लक्षण दिलें आहे. विडम्बन गद्य पद्य दोन्हींहि असतें तरी त्यांतल्या त्यांत विडम्बन काव्यें संख्येने व गुणानेहि अधिक भरतील. याचें कारण असें असावें कीं, गद्यापेक्षा पद्यांत मनुष्य सामान्यतः आपल्या भावना उत्कटतेने प्रकट करतो. त्यामुळे त्याला विनोदी कलाटणी झटदिशीं देतां येते. "My heart leaps when I behold a rainbow in the sky" किंवा "To be or not to be" या दोन प्रसिद्ध काव्यस्थलांचीं कित्येक विडंबनें झालेलीं आहेत. पहिल्यांत वर्डस्वर्थ आपली बाल्याविषयीची नवीन उपपत्ति (Child is father of the man) द्रष्ट्याच्या अभिनिवेशाने सदर कवितेंत आत्मविश्वासपूर्वक मांडीत असल्याने व हॅम्लेटच्या मनांतील भयंकर खळबळ, जीविताच्या टोकांवरून अज्ञातांत डोकावून शेक्सपिअर येथे पाहत असल्याने या दोनहि ठिकाणीं एक विशेष गांभीर्य व उत्कटता आली आहे. व रबरी फुगा जितका अधिक ताणला जावा तितका थोडा स्पर्शहि त्यास चटकन फोडून टाकतो. तसें वाचकाच्या भावना सदर काव्यें वाचतांना जितक्या ताणल्या जातात तितका विनोदाच्या टांचणीचा थोडासा स्पर्शहि त्यांतील गंभीरतेचें वारें फुसदिशी सोडून देतो.

## जावईबुवांची कोटी !

ग्र कवीच्या प्रसिद्ध शोकगीतांतील पहिल्याच कवितेंतील शेवटच्या ओळीचें असेंच एक मजेदार बिडम्बन एका जुन्या प्रोफेसरांनी केलेलें परवा ऐकिवांत आलें. करफ्यू घंटा काय काय करतें हें सांगून शेवटीं कवि म्हणतो कीं ती-" leaves the world to darkness & to me." या काव्यांतील गंभीरता व तत्त्वज्ञानाची उंची ही सर्वविश्रुत असल्याने वरील दोन उदाहरणांप्रमाणे याचेंहि बिडम्बन बहारीचें होऊं शकेल. पहिल्यानेंच दिवाळसणास गेलेला व प्रियेच्या भेटीची वाट पाहत असलेला जांवई हे म्हणतो आहे, व म्हाताऱ्या सासऱ्याची वटवट ही करफ्यू घंटेच्या जागीं leaves याची कर्त्री आहे असें मानिल्यास केवळ एकच शब्द बदलून ही ओळ अशी म्हणतां येईल,

And leaves his daughter to darkness & to me!! असो.

## विनोद व विडंबन

वरील पॅरॉडीचें लक्षण अधिक स्पष्ट होण्यास त्याचे आणखी कांही अधिक विशेष व व्यवच्छेदक भाग त्यास जोडले पाहिजेत. वरील लक्षणांत सूचित होणाऱ्या गोष्टी याः-१ सुप्रसिद्ध कवीचें किंवा लेखकांचें सर्वांस माहीत असे लिखाण प्रायः गंभीर स्वरूपाचें व उदात्त अर्थाचें आगाऊ असलें पाहिजे. २ शिवाय त्यांत शब्दयोजना, रचाई, विचार मांडण्याची पद्धत वगैरे बाबतींत कांही ठळक निराळेपणा पाहिजे. या दोनच गोष्टींनी युक्त काव्याबरहुकूम कोणी एखादें काव्य केल्यास तें नुसतें अनुकरण होईल, विडंबन होणार नाही. भगवद्गीता, पुराणें, स्तोत्रें इत्यादि आपल्याकडील धार्मिक वाङ्मयांत अशा अनुकरणाचीं शेंकडों उदाहरणें दाखवितां येतील. पण विडंबन करावयाचें म्हणजे मूळ ग्रंथाचें अनुकरण त्याला विनोदी रूप येईल अशा तऱ्हेचें असावयास पाहिजे. हा त्याचा तिसरा व महत्त्वाचा विशेष होय. भगवद्गीतेची कपिलगीता, गणेशगीता हीं अनुकरणे, पण नाशिकच्या सहस्रबुद्धेशास्त्र्यांची "चहागीता" हें मात्र विडम्बन होय. यापुढें विडंबनाचा आणखी एक सूक्ष्म व व्यवच्छेदक विशेष आहे. तो असा. मूळ लिखाणाला विनोदी वळण द्यावयाचें कबूल; पण तें कोणत्या हेतूने ? या प्रश्नाच्या उत्तरांत विडम्बनकाव्यें व इतर विनोदी काव्यें यांतील फरकाचें बीज आहे. मूळांत विनोद तरी कां उत्पन्न होतो, असा प्रश्न केल्यास असें दिसतें कीं, आपल्या मनांत आपल्याभोंवतालच्या वस्तूंच्या

व व्यक्तींच्या नेहमींच्या योग्य स्वरूपाची कांहीं ठराविक कल्पना असते (Idea of the Form) तिचें नेहमीचें स्वरूप पालटून आपण तिजविषयीं ठरविलेलें प्रमाण सुटूं लागलें कीं, आपल्या मनांत त्या विसंगतीच्या दर्शनानें विनोदी वृत्ति डोकें काढूं लागते. आता हें सुटलें प्रमाण, वस्तु त्या अवस्थेंत जशी दिसली तशीच मांडून केवळ तटस्थ वृत्तीने दाखवून विनोद निर्माण करतां येईल. अशा त्रयस्थ वृत्तीने लिहिलेला विनोदहि पुष्कळ असतो. पण विनोद करतांना माणूस नेहमीच तटस्थवृत्ति टिकवूं शकत नाहीं. त्या प्रमाण सुटलेल्या वस्तूबद्दल किंवा व्यक्तीबद्दल सहानुभूति किंवा तिटकारा आदर किंवा अनादर अशा कांहीं भावनांची भेसळ त्या वृत्तींत होऊन विनोदाच्या जाति निर्माण होतात. सहानुभूतीशीं मिसळून वाहणारी विनोद-वृत्ति अनुकंपेंत पर्यवसान पावून शोकान्त होते. व तिरस्कारांच्या बैठकीवरून टेहळणी करणारी विनोद-बुद्धि तिखटपणें मूळ विडंब्य वस्तूला हास्यास्पद करून कायमच्या द्वेषाचें रूप घेते.

### थट्टेंतूनच भक्ति !

विडंबन (Parody) हें पहिल्या सहानुभूति-पूर्वक विनोदाच्या वर्गांत मोडतें. नुसती सहानुभूतिच नव्हे. पण विडंबनकाराला मूळ ग्रंथकाराबद्दल वाटणारें प्रेम, आदरयुक्त कौतुक किंवा पूज्यता या भावनाच मुळीं पॅरॉडीचा प्राण होत असें आर्थर सायमन्सचें मत आहे. तसेच " None can parody what he does not love " असें हॅम्बर्ट वूल्फ याने प्रतिपादलें आहे. आदर, भक्ति, प्रेम अशा भावनांचें विनोदी वृत्तीशीं साहचर्य जल आणि अग्नि याच्या सहवासासारखें दिसतें खरें; पण आपल्याकडील शंकर, गणपति इत्यादि विचित्र रूपांच्या व वृत्तींच्या देवतांवर अनेक थोर थोर भक्तानी केलेल्या नान्या पाहिल्या म्हणजे हा मेळ कसा घालता येतो याचा बोध होईल. कालिदासाने कुमारसंभवांत जटिलाच्या तोंडून करविलेल्या क्वचित् विनोदी तर क्वचित् फटफजिती उडविणाऱ्या शब्दांची बैठक पार्वतीच्या उत्तरांत कडकडून प्रकट होणाऱ्या भक्तीवरच नाहीं काय ? तेव्हा भक्ति असूनहि उगीच आपलें लडिवाळ-पणाने देवाची थट्टा करून तर कधी त्यास पुरा हास्यास्पद करून आपल्या भक्तीची उत्कटताच भक्त प्रकट करीत असतात. अशासारखा प्रकार वरील दोनहि आंग्ल टीकाकारांचे अभिप्रायांत दिसतो. असो.

### महानुभूतिशून्य विनोद

सहानुभूति किंवा तिरस्कार यांची विनोदी वृत्तीशीं मिसळणसुद्धा, ज्या हेतूने आपण विनोदाचें हत्यार चालवावयास तयार होऊं त्यावर अवलंबून आहे. अतिरेकाने झालेल्या चुका प्रेमाने नजरेस आणून एखाद्यास सुधारणें, किंवा द्वेषाचे वार करून त्यास कायमचा जायबंदी करणें ( To cure or to kill ) हीं दोनहि कामें विनोदाने होतात. व्हॉल्टेअर हा पहिल्या प्रकारच्या व स्विफ्ट हा दुसऱ्या प्रकार-च्या विनोदाचा पुरस्कर्ता होता. सहानुभूतिशून्य विनोदी लिखाणास सामान्यतः ( Satire ) उपरोध म्हणतात. एका टोकास पॅरॉडी व दुसऱ्या टोकास सटायर कल्पिल्यास इंग्रजी वाङ्मयांत रूढ असलेले Burlesque, Travesty, Skit, Imitation, Caricature इत्यादि विनोदी प्रकारांमध्ये कोठे तरी आगेमागे बसवितां येतील. मुख्य फरक हेतूचा व त्यामुळे लेखकाच्या भावने-च्या कमी अधिक मिश्रणाचा.

### विडंबकाचेंच विडंबन

विडंबनांत मूळ ग्रंथकाराबद्दल आदर, प्रेम, निदानपक्षीं सहानुभूति तरी पाहिजे. येवढें सिद्ध झाल्या-नंतर ही गोष्ट ओघानेच आली कीं तें विडंबन अशा खुबीने व्हावें कीं, त्यामुळे मूळ अभिप्रायाला धक्का लागून ग्रंथकार हास्यास्पद न ठरावा, येवढेंच नव्हे तर या करण्याने त्याबद्दलचें प्रेम शक्य तर वाढावें. Rejected addresses नांवाच्या विडम्बन-संग्रहाच्या कर्त्यांना वरील प्रकारचें यश मिळालें असें त्यांनी नमूद करून ठेविलें आहे. यावरून असें दिसतें कीं, विडंबना-साठीं विडम्ब्य व्यक्तीचे जे विशेष निवडावयाचे ते निवडताना विधिनिषेध पाळला पाहिजे. हें कर-ण्यास विडंबनकाराने सदभिरुचि, सौजन्य, पावित्र्य यांच्या मर्यादा बिलकुल ओलांडतां कामा नयेत. त्याचप्रमाणे केवळ चांगल्या ग्रंथकाराचा एकदा प्रसिद्ध परिच्छेद विडम्बनासाठीं निवडून उगीच कांहीं तरी पांचटपणा करीत राहणें म्हणजे खरें विडम्बन नव्हे. ( त्यामुळे झालें तर विडम्बकाचेंच विडम्बन होतें ! ) मूळ काव्यास विनोदी वळण देण्यास मोठ्या कल्पकतेची व प्रतिभेचीहि आवश्यकता आहे. कवि किंवा विडं-बक हे दोघेहि सारखेच प्रतिभासंपन्न असावे लागतात. एकाची प्रतिभा फार झालें तर साम्य शोधते व दुसऱ्याची वैषम्य धुंडाळीत असते, येव-ढाच दोहोंतला फरक ! त्यामुळे मूळ ग्रंथकाराचें वैशिष्ट्य नेमकें कशांत आहे हें हेरून तें सुसूत्रपणें चितारून दाखविणें सामान्य काम नाहीं. इंग्रजींत ज्यांच्या काव्याचीं विडम्बनें होऊं शकतात असे कवि म्हणजे वर्ड्स्वर्थ, सावदे, ब्राउनिंग, किपलिंग, टेनिसन हे होत. कारण

मुळांत विडंबनाई अशा कांहीं गोष्टी असाव्या लागतात. बोलण्याचालण्याच्या नकला करतांना सुद्धा हेंच नाहीं कां? वाटेल त्या माणसाची नक्कल कुशल नकलाकाराकडूनहि विशेष यशस्वी होत नाही.

### नमुनेदार विडंबनें

वरील विवेचनावरून हें लक्षांत येईल कीं, विडंबकाची जबाबदारी फार मोठी आहे. नुसती टर उडविणें, बेजबाबदारपणें घातक हल्ले करणें हें त्यांचें काम नव्हे. विडम्बन ही एक प्रतिभापूर्ण अशी टीकाच ( Criticism ) आहे. शिवाय स्वतंत्र काव्य म्हणून आपल्या गुणानें कांहीं दिवस वाङ्मयांत जगण्याची तिची पात्रता असते. अशा तऱ्हेचीं नमुनेदार विडम्बनें Chrismas Garland, Maxford Book of Verse व वर उल्लेखिलेले Rejected addresses या पुस्तकांतून पाहावयास सांपडतात. वर विडम्बनाचे जे विशेष सांगितले ते सर्वच एका विडंबनांत एकाच ठिकाणीं यावयास पाहिजेत असें नाही. कांहीं ठिकाणीं मुळांतले विशिष्ट शब्दच ( word-rendering ) तर कांहीं ठिकाणीं वृत्तादिकांची ठेवण किंवा साचा ( form-rendering ) तर कोठे मूळ भावार्थ ( sense-rendering ) यांचें विडम्बन केलेलें आढळतें. विडंबनाच्या स्वरूपाबद्दल येवढें विवेचन केल्यावर मराठींत हल्ली चालू असलेल्या विडंबन–प्रकाराकडे वळण्यास हरकत नाही.

### मराठींतील विडंबनें

वर सांगितल्याप्रमाणे मराठी विनोद हा कांहीं सगळाच परका नाही. संस्कृतांतील लहानसा का होईना एक प्रवाह त्यांत आहे. रोग व औषध याप्रमाणे विसंगति व उपहास या जोडीचीं बीजेंहि एकाच मनोभूमींत निसर्गानें पेरलेलीं आहेत. खुद्द ऋग्वेदांतील ७ व्या मंडलांत अर्थहीन घोकंपट्टी करणाऱ्या वेदपाठकास बेडकांची उपमा देऊन एक मण्डूकसूक्त लिहिण्यांत आलें आहे. त्याचप्रमाणे सोंवळे सामवेदी व अहिंसावादी बुद्ध भिक्षू हे सुरतप्रसंगीं आपापला सोंवळेपणा राखण्याचें ढोंग कसें करतात याचें शब्दचित्र फार मार्मिक उपहासाचा मासला आहे. संस्कृत सुभाषितांतून उपरोध किंवा विनोद असला तरी इंग्रजी अमदानींतील नवें मराठी सुरू होईपर्यंत जुन्या धार्मिक ठशाच्या मराठींत विनोदाला वाव मिळाला नाही. केशवसुतांनी एकदोन ठिकाणींच पण गोविंदाग्रजांनी मात्र कवितेंत विनोद आणावयास खरी सुरुवात केली. इतकेंच नव्हे तर आधुनिक विडंबनाचें अस्पष्टसें स्वरूपहि त्यांनी 'अरुण' व 'रांगोळी घालतांना पाहून' या अनुक्रमें बालकवि व केशवसुत यांच्या कवितांचें अनुकरण करून दाखवून दिलें. 'कुलकर्णी लीलामृत' हा पाटलांचा ग्रंथ विडंबन व तिखट उपरोध यांच्या मिश्रणाचें एक सुंदर उदाहरण आहे. पण मतप्रतिपादनाच्या भरांत जातिजातींत वैमनस्य उत्पन्न करण्याच्या त्याच्या खोडसाळ उद्देशाने त्यास हिणकसपणा आला आहे. या काव्याचें श्री. तात्यासाहेब केळकरांनी केलेलें नितांत सुंदर परीक्षण व हें काव्य या दोहींचें परिशीलन एकादा तरी अभ्यासूने करावें अशी शिफारस केल्यावांचून राहवत नाही.

कालिदासाच्या मेघदूताची मूळ कल्पना घेऊन कांहीं केवळ अनुकरणात्मक ( मुजुमदारांचें हंसदूत ) व अनंततनयाचीं 'शारदादूतिका' व कांहीं विडंबनात्मक अशीं काव्यें मराठींत बरींच आहेत. लिमयांचे "बल्लवदूत" "काकदूत ( संस्कृत ? )" वगैरे. जोशांनी खाडिलकरांच्या मानापमान नाटकांतील कांहीं पदांचें केलेलें विडम्बन ( माता दिसली स्वगृहिं रखडत घाशित ताट तव्यासि पळ्याशी व मी अधणा न शिवे. ) शब्दनिष्ठ विडम्बनाचें उदाहरण होईल. रा. ठोसरांच्या "नाट्यकलारुकुठारां"त कांहीं ठिकाणीं बरा विनोद व बाकीचा बराच आचरटपणा आहे. गिरीश कवींची "संशयरत्नमाला" "वृद्ध भटजी" वगैरे विडंबनें बऱ्यापैकीं आहेत. प्रस्तुत लेखकाने 'संशयरत्नमाला' व 'घनश्यामसुंदरा'या भूपाळीचें 'माध्याह्नीची भूपाळी' या नांवाखाली १९१८ त फ. कॉ. त्रैमासिकांत केलेलें विडंबन तेव्हा विद्यार्थिवर्गांत बरेंच प्रिय झालें होतें. श्रीयुत काणेकरांचीं विडंबनें चांगलीं आहेत. 'तारकांचें गाणें' या बालकवींच्या कवितेचें 'लग्नघरांतील स्वयंपाकिणीचें गाणें' हें व माधव ज्यूलियन या कवींच्या व गडकऱ्यांच्या कवितेचीं इतर विडबनें त्यांची निरुपद्रवी विनोदशीलता प्रकट करतात. याशिवाय साधारणपणे विनोदी कविता या सदराखाली पडतील, अशा पुष्कळ कविता सांगतां येतील. पण विडंबनाचें तंत्र संभाळून केलेल्या कविता त्यांत थोड्या.

### श्री. केशवकुमार

यानंतर नजरेंत भरण्याजोगा विडंबनाचा प्रयत्न श्रीयुत केशवकुमारांचा आहे. त्यांचीं झेंडूचीं गेंदेदार फुलें हुंगून त्यांच्या तळचें खोबरेंहि ज्याने खाल्लें नाही असा सुशिक्षित मनुष्य महाराष्ट्रांत विरळा. त्यांच्या विडम्बनाचीं लक्ष्यें केशवसुत, माधव ज्यूलियन, गडकरी वगैरे कवि, पण त्याहीपेक्षा एकंदर कविवर्गाचा आचरटपणा, त्यांची चौर्यप्रवृत्ति इत्यादि गुण हींच विशेष

होत. मनाचे श्लोक वगैरे ठिकाणीं त्यांनी नुसता मूळ सांचा उचलला आहे. रा.अत्रे यांचें भोवतालच्या व्यवहाराचें अवलोकन मार्मिक व सूक्ष्म असल्याने व त्यांची विनोदी वृत्ति चांगली तल्लख असल्याने त्यांचीं काव्यें स्वतःच्या स्वतंत्र गुणानेहि टिकाऊ होतील. पण त्यांच्या विडंबन काव्याच्या लोकप्रियतेचें दुसरेंच एक कारण आहे. तें हें कीं, त्यांच्या विनोदांत जरा खोंचकपणा अधिक आहे. त्याच्या तरवारीच्या या तिखटपणाने कांही व्यक्तींनां घांव बसावेत असा उग्र उपरोध त्यांत आहे. रा. अत्रे यांचे तडाख्यांतून कोणत्याहि पक्षाचा व मताचा जुना नवा सुधारक, सनातनी, जहालमवाळ कोणीहि सहसा सुटत नाही. विडंबन काव्याच्या फैलावाला रा. अत्रे यांचीं 'झेंडूचीं फुलें' व 'साष्टांग नमस्कार' हीं चांगलींच कारणीभूत झालेलीं आहेत. हल्लीं बऱ्याच लहानमोठ्या कवींच्या लेखण्या विडंबनाकडे वळलेल्या असून विडंबन काव्याचा एक संग्रहहि लवकरच प्रकाशित होणार आहे असें ऐकिवांत आहे. नाट्यछटेप्रमाणे विडंबनाचें पीकहि लवकरच फोफावणार आहे. म्हणून त्याची मशागत करणारांनी एकदोन गोष्टी जरूर लक्षांत ठेवाव्या.

### काव्याच्या काकबळीवरील कावळे !

अतिरेकावरील परिणामकारक टीका व निरागस विनोद येवढ्या गोष्टी साधण्यास कवींनी आपली प्रतिभा ( ती ज्याचेजवळ असेल त्याने ) क्वचित् या बाजूला वळवावी. मात्र त्यांतच सदैव प्रौढी मिरविण्याजोगें फारसें कांही नाही. तसें पाहिलें तर तें एक परकाव्योपजीवित्वच नव्हे काय ? चांगल्या कवींच्या काव्याची काकबळ केव्हा पडते व मी त्यावर केव्हा चोंच मारतों. अशी वाट पाहत राहणें लाजिरवाणेंच होय. शिवाय नेहमीच लोकांची टर उडविण्याकडे एकदा कल झुकला कीं जगांत गंभीर, जिव्हाळ्याचें व पवित्र कांही आहे असें माणसाला वाटतच नाही. गुडघ्यांत मान घालून सुतकी चेहऱ्याने आयुष्याचीं स्मशानगीतें केकाटणें किंवा तत्त्वज्ञानाच्या गंभीरतेने प्रेताप्रमाणे स्तब्ध राहणें हें जसें बरें नव्हे तसें यच्चयावत् गोष्टींचा पोरखेळ करून फिदीफिदी हंसत राहणें हीहि आयुष्क्रमणाची योग्य रीत आहे असें कोणी समजणार नाही. ही झाली प्रवृत्तीबद्दलची गोष्ट. आता हें काव्य करावयाचेंच म्हटलें तर त्याचें वर सांगितलेलें योग्य तंत्रहि सांभाळलें पाहिजे व त्याहूनहि महत्त्वाचें म्हणजे तसें करण्यांत निसर्गदत्त विनोदी बुद्धि आपल्यामध्ये आहे का, याचा पूर्ण विचार आधीं केला पाहिजे. नाही तर विडंबन काव्य योग्य तंत्राने शृंगारलेल्या मढ्यासारखें दिसतें. तसेच कांही प्रवृत्तींचा अतिरेक झाला कीं विडंबन जन्म घेतें, त्याप्रमाणे विडंबनाच्या अतिरेकाला आळा घालण्यास दुसरें विडंबन किंवा इतर औषध आपल्याचमधून सुरू झाल्याशिवाय राहणार नाही.

# व्यापारी शिष्टमंडळांचें आगमन

लँकेशायर व जपान यांचीं व्यापारी शिष्टमंडळें हिंदुस्थानांत येऊन दाखल झालीं असून हिंदुस्थानाच्या दारीं आलेल्या या पाहुण्यांचा प्रमुख उद्देश हिंदुस्थानांत खपणाऱ्या कापडाची वांटणी करून घेण्याचा आहे. १९०४ सालीं हिंदुस्थान आणि जपान यांजमध्ये व्यापारी तह झाला. हा तहनामा गेलीं तीस वर्षें अमलांत होता. या काळांत इन्डो-जपानी व्यापारी संबंध दृढ होत जाऊन हिंदुस्थान व जपान यांजमधील व्यापाराची चांगलीच वृद्धि झाली.

जपानाचा हिंदुस्थानाच्या पेठेंत प्रवेश होण्यापूर्वी हिंदुस्थानाला लागणारें कापड देशी गिरण्या, हातमाग व लँकेशायर हीं पुरवीत असत. परंतु गेल्या अडीच तपांत ही परिस्थिति पार पालटून गेली आहे. हिंदी गिरण्या व हातमाग यांजकडून सांप्रत हिंदुस्थानाला लागणाऱ्या कापडापैकीं तीन-चतुर्थांशाहून अधिक कापडाचा पुरवठा होतो व उरलेलें एक-चतुर्थांश कापड मुख्यतः जपान व लँकेशायर यांजकडून येतें. ईस्ट इंडिया कंपनीने सूक्ष्मासूक्ष्म उपायांचा अवलंब करून हिंदुस्थानाचा नांवारूपाला आलेला कापडाचा धंदा नामशेष केला व हिंदुस्थानाला कापड पुरविण्याचा मक्ता ग्रेट-ब्रिटनकडे दिला. परंतु त्यानंतर हिंदी लोकांनी एका बाजून राजकीय हक्क मिळवून त्यांचा उपयोग देशी उद्योग-धंद्यांचें संरक्षण करण्याकडे जितका करतां आला तितका केला व दुसऱ्या बाजूने स्वदेशीची चळवळहि जोराने चालविली. त्यामुळे प्रतिकूल परिस्थितींतहि हिंदी कापडाचा धंदा वाढीस लागून त्याने हिंदी

पेठेंतील लँकेशायरच्या कापडाला बराच आळा घातला.

जपानानेहि हिंदुस्थानांतून कापूस खरेदी करून व हिंदी लोकांच्या गरजा लक्षांत घेऊन आपल्या व्यावहारिक चातुर्यानें आपला कापडाचा धंदा भरभराटीस आणला व हिंदुस्थानाच्या पेठेंत लँकेशायरला इतकें चीत केलें कीं १९३१–३२ सालीं लँकेशायरच्या तिप्पट कापड जपानानें हिंदुस्थानांत खपविलें. परंतु हिंदी कापडाला जपान व लँकेशायर यांची चढाओढ मारक होऊं लागल्यामुळे १९३० सालीं परदेशी कापडाच्या आयातीवर संरक्षक जकात बसविण्यांत आली. त्यानंतर जपानानें सुवर्णमापनपद्धतीचा त्याग केल्यापासून येनाची किंमत घसरूं लागून हिंदुस्थानांत जपानी माल कमालीचा स्वस्त विकला जाऊं लागला. याच्या प्रतिकाराचा उपाय जपानी मालावरील आयात जकात वाढविणें हा एकच होता. परंतु १९०४ चा व्यापारी तह एकट्या जपानी मालावरील आयात जकात वाढविण्याच्या कामीं आड येत असल्यामुळे हिंदुस्थानसरकारानें तो व्यापारी तह ता. १० ऑक्टोबर १९३३पासून रद्द करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें ता. १०एप्रील रोजीं त्याबद्दल जपानला रीतसर नोटीसहि दिली. यामुळे एकंदर परिस्थितीचा विचार करून गेल्या अडीच तपांचे व्यापारी संबंध मोडूं नयेत म्हणून जपानानें हिंदुस्थानाशीं नवीन व्यापारी तहाचें बोलणें करण्याचें ठरविलें. त्या वाटाघाटीकरिताच मि. सावडा यांच्या नेतृत्वाखालीं जपानी सरकाराचें शिष्टमंडळ इकडे आलें असून या सरकारी शिष्टमंडळाला सल्लामसलत देण्याकरिता जपानी व्यापाऱ्यांचेंहि शिष्टमंडळ आलें आहे.

जपानी शिष्टमंडळ येण्याचें ठरल्यावर इन्डो-जपानी व्यापारी तहाच्या वाटाघाटीच्या वेळीं आमची बाजूहि ऐका, अशी विनंति लँकेशायरच्या गिरणीवाल्यांनी हिंदुस्थान सरकाराला केली. लँकेशायरची ही विनंति हुकूमवजाच होती व ती त्यांच्या ताबेदार हिंदुस्थानसरकारानें मान्यहि केली. आज लँकेशायरच्या कापडावर फक्त पंचवीस टक्के आयात जकात असून जपानी कापडावर तीं पाऊणशें टक्के आहे. त्यामुळे लँकेशायरला हिंदुस्थानाच्या पेठेंत जपानाविरुद्ध आयतेंच पन्नास टक्के जकातीचें संरक्षण मिळालें आहे. इन्डो–जपानी व्यापारी तहाची वाटाघाट मुख्यत्वेंकरून जपानी कापडावरील आयात जकात कमी करतां येईल कीं नाहीं व कमी करावयाची झाल्यास कशी करतां येईल, याचा विचार करण्याकरिता व्हावयाची आहे. ही वाटाघाट यशस्वी होऊन जपानी कापडावरील आयात जकात कमी करण्यांत आली तर हिंदुस्थानात आपल्या मालाचा खप कमी होईल अशी भीति लँकेशायरला वाटत असल्यामुळे त्यांनीं सामदामादि सर्व मार्गांचा अवलंब करून हिंदुस्थानांतील आपलें आसन स्थिर करण्याचा शेवटचा भगीरथ प्रयत्न करण्याचें ठरविलें आहे.

लँकेशायरच्या आजपर्यंतच्या परंपरेकडे पाहतां त्यांनीं वास्तविक स्टेट–सेक्रेटरीच्या हस्तें हें काम करवून घ्यावयाचें; परंतु सुधारणा कायद्यानें हिंदुस्थानसरकाराला बेगडी का होईना पण आर्थिक स्वायत्तता दिली असल्यामुळे त्यांना ही हिंदुस्थानाची यात्रा करणें भाग पडलें आहे. ही यात्रा करण्यांतील लँकेशायरचा हेतु उघड आहे. त्यांना हिंदुस्थानाच्या कापडपेठेंतील कांहीं हिस्सा पाहिजे असून त्यांनीं हिंदुस्थानाच्या व विशेषतः मुंबईच्या गिरणीवाल्यांना हाताशीं धरून आपली यात्रा सफल करण्याचें ठरविलें आहे. मुंबईच्या गिरणीवाल्यांच्या संघाचे अध्यक्ष मि. एच. पी. मोदी हे मध्यंतरीं विलायतेंत गेले असता त्यांचीं व लँकेशायरवाल्यांचीं गुप्त बोलणीं झालेलीं असून जपानाला त्या दोघांनीं मिळून नामोहरम करून हिंदुस्थानाच्या पेठेंतून हाकलून देण्याचा त्यांचा विचार आहे. लँकेशायरच्या शिष्टमंडळाचे नायक सर वुइल्यम क्लेअरलीज यांनीं मुंबईस उतरल्यावर जी मुलाखत दिली तिच्यांत त्यांनीं हिंदी गिरणीवाल्यांबरोबर आमच्या ज्या वाटाघाटी व्हावयाच्या आहेत त्यांना आम्ही विशेष महत्त्व देतों असें जे म्हटलें, त्यांतील इंगितहि हेंच आहे.

हिंदुस्थानसरकार लँकेशायरच्या पक्षपाती असल्याबद्दलची त्यांची लौकिक आजकालची नाही. इन्डो—जपानी व्यापारी तहाच्या वाटाघाटींच्या वेळी त्यांनी आपले सल्लागार म्हणून ज्यांना निमंत्रण केलें आहे .त्यांत इतर उद्योगधंद्यापेक्षा गिरण्यांचे प्रतिनिधी प्रमाणांबाहेर बोलावले आहेत. सरकाराचा गिरण्यांना अधीक प्रतिनिधित्व देण्यांतील आंतला हेतु असा असावा कीं त्यांच्या प्रतिनिधींनी जपानी कापडावरील आयात जकात कमी करण्यास जोराचा विरोध करावा. इतकें सर्व करूनहि हा विरोध प्रभावी ठरला नाही व असंभाव्य गोष्ट घडून यक्षिणीची कांडी फिरली आणि हिंदुस्थानसरकारने जपानी कापडावरील आयात जकात कमी करण्याची योजना मान्य केली तर, तो तहनामा परराष्ट्रीय संबधांच्या कक्षेंत येणार, आहे, या सबबीवर ब्रिटिश सरकाराला त्यांत लँकेशायरच्या वतीने हात घालावयाला संधि आहेच. हिंदुस्थानसरकार व जपानी शिष्टमंडळ यांजमधील इकडील वाटाघाटींबरोबरच जपान व लँकेशायर यांच्या प्रतिनिधींमधील वाटाघाटींना लंडन येथे प्रारंभ झाला आहे. ब्रिटिश साम्राज्यांतील कापडपेठा आपसांत कशा वाटून घ्याव्या यासंबंधीं जर त्यांच्यामध्ये तडजोड झाली नाही तर ब्रिटिश साम्राज्यांत जपानी कापडाच्या आयातीवर भरभक्कम जकाती बसवून घेण्याच्या उद्योगाला लँकेशायर लागेल असें प्रसिद्ध झालें आहे.

जपानी शिष्टमंडळाला हिंदुस्थानाच्या कापडपेठेंत हिस्सा मिळवावयाचा असला तरी त्यांचा मुख्य हेतु हिंदुस्थानाशीं मिळतें घेऊन उभयतांना फायदेशीर असा व्यापारी तह घडवून आणणें हा आहे. जपानी शिष्टमंडळाचे पुढारी मि. सावडा यांनी आपल्या मुलाखतींत असें सांगितलें कीं, हिंदी उद्योगधंद्याच्या वाढीला अपाय करण्याची अगर इतर राष्ट्रांचा तोटा करून हिंदुस्थानाची पेठ कबजांत आणण्याची जपानाला इच्छा नाही. आमचें म्हणणें इतकेंच कीं योग्य अटींवर आमचा माल हिंदुस्थानाच्या पेठेंत खपविण्याची आम्हाला मुभा असावी." या मुलाखतींत मि. सावडा यांनी अप्रत्यक्ष रीत्या असें सुचविलें आहे कीं ज्या अटींवर ब्रिटिश माल हिंदुस्थानांत येतो त्याच अटींवर जपानाच्या मालाला हिंदुस्थानांत प्रवेश मिळावा.

पण या बाबतींत हिंदी जनतेचें धोरण स्पष्ट आहे.कापडपुरवठ्याच्या प्रश्नावर हिंदी जनता लँकेशायर अगर जपान यांपैकी कोणाशींहि तडजोड करूं शकत नाही. ब्रिटिशांचे पाय हिंदुस्थानाला लागण्यापूर्वी हिंदुस्थान स्वतःला लागणारें कापड तर तयार करीत असेच. परंतु तें ब्रिटिशांनाहि पुरवीत असे. त्याच हिंदुस्थानावर परदेशांतून कापड आणण्याची पाळी यावी याची हिंदी जनतेला साहजिकच खंती वाटते. १९०५ सालीं हिंदी माणसाला सुमारें दहा यार्ड कापड लागत असे; त्यांपैकीं आठ यार्ड परदेशांतून येई व दोनच यार्ड काय तें येथे तयार होई. १९३१ सालीं दर माणशीं सुमारें साडेदहा यार्ड कापड हिंदुस्थानांत खपलें. परंतु त्यापैकीं आठ यार्ड येथे तयार झालेलें असून अडीच यार्डच बाहेर देशांतून आलेलें होतें. हें अडीच यार्ड कापडहि हिंदुस्थानांतच तयार झालें पाहिजे असा हिंदी जनतेचा आग्रह आहे.

गिरणीवाल्यांना आजच्या स्थितींत हें कापड पुरविणें शक्य नसेल तर त्यांनी स्वस्थ बसावें. परंतु लँकेशायरशीं भलताच करार करून दरमाणशीं लागणारें हें अडीच यार्ड कापड पुरविण्याचें उदक त्यांच्या हातावर त्यांनी सोडू नये. हिंदी जनतेला ती गोष्ट केव्हाहि मान्य होणार नाही. जपान हिंदुस्थानचा कापूस खरेदी करतें म्हणून त्याच्या भारंभार जपानी कापडहि विकत घेण्यास हिंदुस्थानहि बांधला जाण्यास तयार नाही. परंतु जपानाने जर हिंदी कापूस पूर्ववत् विकत घेण्याचें मान्य केलें तर मात्र जे पदार्थ हिंदुस्थानांत सांप्रत होत नाहीत व जे निकटवर्ती कालांत हिंदुस्थानांत तयार होण्याची आशा नाहीं असे पदार्थ हिंदुस्थान

जपानापासून खरेदी करण्यास तयार होईल. या दृष्टीने हिंदुस्थान व जपान यांना फायदेशीर असा व्यापारी तहनामा होणें शक्य आहे. परंतु लँकेशायरबरोबर मात्र तो होण्यासारखा नाही.

# सहकारी संस्थांचें स्वातंत्र्य

सहकारी चळवळींशीं प्रत्यक्ष संबंध असलेल्या परंतु एकंदर शेतकरी वर्गाच्या हिताच्या अशा तीन निरनिराळ्या प्रश्नांचा विचार करण्यासाठी मुंबई सरकाराने कमिट्या नेमल्या असून त्यांचें काम सांप्रत सुरू झालें असल्याचें समजतें. ह्यापैकीं एक प्रश्न, शेतकी पतपेढ्यांवर देखरेख करून त्यांस सहाय्य देण्यासाठी स्थापन झालेल्या संघांची घटना व कामागिरी कोणत्या प्रकारची असावी ह्याविषयींचा आहे. हे संघ पेढ्यांच्या सभासदांनी निवडलेल्या पंचाच्या देखरेखीखाली चालतात व त्यांस खर्चास लागणारा बहुतेक सर्व पैसा पेढ्यांकडूनच मिळतो. एकंदरीने ह्या संस्था उपयुक्त कामें करीत असल्याचा दाखला सरकारी वार्षिक रिपोर्टांत सांपडतो. त्यांची संख्या वाढविणें आणि संघाचा कारभार अधिक कार्यक्षम करणें ह्या कामीं सरकाराने वेळोवेळीं सूचना आणि सहाय्यहि केलें आहे. मुंबई सरकारच्या राज्यकारभाराची चौकशी करून काटकसरीच्या व उत्पन्नवाढीच्या दृष्टीने तिच्यामध्ये सुधारणा सुचविण्यासाठी नेमलेल्या थॉमस कमिटीचें लक्ष या संघाकडे जाऊन तें एक सरकाराच्या उत्पन्नांत भर टाकण्याचें उत्तम साधन आहे असें तिला वाटलें.

मंदीच्या गेल्या चार वर्षांत पतपेढ्यांचा वसूल पुष्कळ थकलेला पाहून त्याचा आणि देखरेख करणाऱ्या संघांच्या सैल कारभाराचा कमिटीने संबंध जोडला आणि असें सुचविलें कीं, तो कारभार सरकाराने स्वतःच्या हातीं घेऊन त्यांत योग्य ती सुधारणा केली म्हणजे दहा वर्षांनी तो पुन्हा स्वयंशासित संघांच्या स्वाधीन करावा. ह्या योजनेचा मुख्य उद्देश सरकारी खर्च कमी होऊन उत्पन्न वाढवावें हाच होता; आणि त्यामुळे देखरेख करणाऱ्या संघांचा पूर्वेतिहास व चालू कार्य ह्याविषयीं कमिटीस विशेष चौकशी करण्याचें महत्त्व वाटलें नाही. संघांच्या वर्गणीचें सुमारें सव्वालाख रुपये उत्पन्न घेऊन त्यांत लोकांच्या इच्छेविरुद्ध पतपेढ्यांवर लादलेल्या ऑडिट फीची भर घातली असतां, आपल्या नोकरांकरवीं देखरेखीचें काम करून घेऊन सरकारास सुमारें पाऊण लाखाने आपलें उत्पन्न वाढवितां येण्यासारखें आहे एवढेंच कमिटीने पाहिलें!

ह्यापूर्वीच सरकाराने शेतकी पतपेढ्यांवर आपला हिशेबतपासणीचा खर्च अंशतः भागविण्यासाठी स्वतंत्र ऑडिट फी बसविली होती; आणि ह्या फीच्या उत्पन्नापैकीं पंचवीस हजार रुपये तिजोरींत जमा करून शिलकेचा विनियोग देखरेख करणाऱ्या संस्थेस मदत म्हणून देण्याकडे करूं, असें जाहिर केलें होतें. ह्या पैशाचा कसा उपयोग करण्यांत आला आहे ह्याची माहिती प्रसिद्ध झालेली नाही. थॉमसकमिटीची शिफारस मान्य झाल्यास संघांनी उभी केलेली रकम व ऑडिट फीपैकीं शिलकी पैसा ह्या दोहोंची व्यवस्था सरकाराने स्वतःच देखरेख करणारे अधिकारी नेमून करावयाची; असें झालें म्हणजे पतपेढ्यांच्या संघांची स्वायत्तता गेली व स्वतःच्या पैशावरची हुकमतहि गेली!

सहकारी संस्थांच्या लोकशाहीच्या व स्वायत्ततेच्या तत्त्वास ही योजना सर्वस्वीं विघातक आहे. सोसायट्यांचा कारभार व त्यांच्या संघांची कामागिरी यांमध्ये सुधारणा करण्यास पुष्कळ वाव असेल. परंतु ती सुधारणा स्वतःच्या अधिकाऱ्याकरवीं कारभार करून घेऊन व पेढ्यांवर कर बसवून सरकार घडवून आणणार असेल तर सहकारी चळवळ जाग्यावर राहिली कोठे? ती चळवळ अयशस्वी झाली असेल तर त्याचा दोष पुष्कळसा सरकारावरहि येतो, हें लक्षांत ठेवलें पाहिजे; आणि सुधारणा

करावयांची असेल तर ती सहकारी तत्त्व आणि घटना यांच्या मर्यादा संभाळून केली पाहिजे. नाही तर सत्ता आणि कारभार सरकाराचा व देखावा स्वयंशासित सहकार्याचा असा प्रकार होणार. आता ह्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी कमिटी बसली आहे. तिने त्याची सांगोपांग शहानिशा केली पाहिजे. थॉमस कमिटीच्या विचारसरणीविरुद्ध लोकांनी तक्रार केल्यामुळेच कमिटी नेमली गेली असल्याने पतपेढ्यां व इतर सहकारी संस्था ह्यांच्या स्वातंत्र्यास व जबाबदारीस बाध न येतां देखरेख–संघांच्या घटनेंत व कार्यपद्धतींत काय फेरफार सुचवितां येतील ह्या प्रश्नाकडेच तिने मुख्यतः लक्ष दिलें पाहिजे.

पतपेढ्या, देखरेख–संघ व इन्स्टिट्यूट ह्या संस्था सरकारच्या सहाय्याने व नजरेखालीच चालत आल्या आहेत. तेव्हा त्यांवर दोष टाकून सरकारला निसटून जातां येणार नाही. किंवा तसेंच प्रबळ कारण निर्विवाद असल्यावांचून त्या आपल्या हुकमतींत आणतां येणार नाहीत. ह्या बाबतींत इन्स्टिट्यूट व इतर सहकारी संस्था ह्यांनी आपलें मत कमिटीस स्पष्टपणें वेळींच कळविणें अगत्याचें आहे.

# श्रीशिवाजी रायगड–स्मारक–मंडळाची सभा

रायगड स्मारक-मंडळाची वार्षिक साधारण सभा रविवार ता. १० माहे सप्टेंबर सन १९३३ रोजीं सायंकाळीं ४ वाजता स्मारक-मंडळाचे कचेरींत म्हणजे भारत इतिहास संशोधक-मंडळाचे सभागृहांत भरली होती. सभेच्या वेळीं श्री.न.चिं.केळकर, ल. ब. भोपटकर,सरदार दाजीसाहेब पटवर्धन,आम. व्यंकटराव सुर्वे, श्री. पां. के. शिराळकर, प्रो. द. वा. पोतदार, श्री. श्री. म. माटे प्रभृति मंडळी उपस्थित असून श्री. भोपटकर यांच्या अध्यक्षतेखालीं सभेच्या कामास सुरुवात झाली.

( १ ) प्रथम ता. ३ माहे जुलै १९३२ रोजीं भरलेल्या सभेचा अहवाल वाचून तो मंजूर करण्यांत आला.

( २ ) शिवचरित्रकार्यालयाकडून रायगड स्मारक-मंडळाच्या मदतीने प्रसिद्ध व्हावयाच्या 'चित्रमय शिवाजी' या ग्रंथाबद्दलच्या त्या अहवालांतलि उल्लेखाला अनुसरून खालील ठराव करण्यांत आला–' चित्रमय शिवाजी ' या ग्रंथाची संपूर्ण योजना पुरी होण्याकरिता लागणारा दीर्घ कालावधि लक्षांत घेतां त्या ग्रंथाचें भागशः प्रकाशन करण्याचें ठरवून त्यांतील निदान एक भाग एक वर्षाचे आंत छापून तयार करावा. या संबंधांतील योजना करणें, तपास व निवड करणें व अखेरीस पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याच्या बाबतींतील सर्व तपशील ठरविणें हे काम श्री.द.वि. आपटे, प्रो. द. वा. पोतदार व श्री. दि. वि. काळे या त्रिवर्गावर सोंपवावें. रायगड स्मारक–मंडळाने गतवर्षी या कामाकरिता मंजूर केलेल्या रकमेच्या आंत योग्य तो खर्च करण्यास त्यांस पूर्ण अधिकार आहे.

(३) ता. ३० माहे ऑगस्ट सन १९३३ अखेर संस्थेचा हिशेब तपासनिसांकडून तपासून आलेला जमाखर्च छापवून सभासदांचे हातीं ठेविला होता. त्यांतील शिलकेचा सर्व तपशील योग्य त्या कागदपत्रांनिशीं पडताळून पाहून सर्वानुमतें मंजूर करण्यांत आला.

(४) श्री. बाबुराव भाऊराव फुले यांच्या निधनामुळे रायगड स्मारक मंडळाचा एक आस्थेवाईक सभासद नाहीसा झाला याबद्दल रायगड स्मारक मंडळाला खेद होत आहे, हा ठराव चिटणिसांनी कै. फुले यांच्या कुटुंबियांकडे पाठवावा.

( ५ ) कै. बाबुराव भाऊराव फुले यांच्या रिकाम्या झालेल्या जागीं मुंबईचे ( १ ) श्री. लक्ष्मण गोविंद विंझे यांची निवड करावी, व शिवाय (२) श्री. वा. कृ. भावे ( संपादक केसरी ) ( ३ ) श्री. शंकर नारायण जोशी, पुणें, व (४) श्री. माधवराव भोसले, साक्री यांची रायगड मंडळाचे साधारण सभासद म्हणून निवड करावी.

( ६ ) रायगड किल्ल्यावरील छत्रपति शिवाजीमहाराजांच्या सिंहासनाच्या जागेची दुरुस्ती करून त्या जागीं स्मारक व्हावें या हेतूने रा. लक्ष्मण गोविंद विंझे (मुंबई) हे गेले पांच सहा महिने खटपट करीत असून गोळा झालेली वर्गणी रायगड स्मारक मंडळाकडे जमा करीत असतात. ह्याबद्दल मंडळाने त्यांचे आभार मानावे. मात्र त्यांस यापुढे वर्गणी जमविण्याबद्दल मंडळाची अधिकृत परवानगी देण्यापूर्वी प्रास्ताविक खबरदारी म्हणून सिंहासनाच्या जागीं कोणतें व कोणत्या दृश्य स्वरूपाचें स्मारक होणें शक्य आहे याबद्दल आर्किऑलॉजिकल

खात्याकडे चौकशी करवून निश्चितपणें नकाशे व अंदाज तयार करवून घ्यावे. आणि त्या बाबतींत काय ती परवानगी मिळाल्यावरच म्हणजे त्याबद्दल स्पष्टपणें समज करून देतां व घेतां येईल, अशी पुरेशी तजवीज झाल्यावरच मग रायगड स्मारक मंडळानें सिंहासनाकरिता म्हणून वर्गणी जमविण्यास उत्तेजन द्यावें. अशा समजुतीने वर्गणी गोळा करण्याचें काम चालू आहे तसेंच चालू ठेविल्यास मंडळाची हरकत नाही.

(७) महाडापासून रायगड किल्ल्यापर्यंतचा रस्ता दुरुस्त करून नीट कायम ठेवण्याबद्दल मे. प्रेसिडेंट कुलाबा डि. लो. बोर्ड यांस विनंति करावी.

(८) रायगडावर गेल्या वर्षाच्या ठरावाने दरवर्षी दोन उत्सव करण्याचें ठरल्याने व स्थानिक उत्सव-मंडळाकडून तशी मागणी आल्यामुळे पूर्वी दरसाल रायगडावरील उत्सवाला १०० रु.ची मंजुरी देण्यांत आली होती. ती वाढवून उत्सवाचे कामीं दरसाल १५० रु. मंजूर करावे.

(९) मंडळाजवळील शिल्लक रकमांबाबत येणें-प्रमाणे ठरविण्यांत आलें—

(अ) सेंट्रल को. बँकेंत ७ मे १९३२ रोजीं २५०० रु. ५ वर्षांच्या करारानें ६ टक्के दरानें मुदत ठेव ठेविले; हा व्यवहार मंजूर करावा.

(आ) बारा हजार रुपये २ मे १९३३ रोजीं एक वर्षाचे करारानें सें. को. बँकेंत ठेवण्यांत आले; तोहि व्यवहार मंजूर करावा. सदर रकमेची एक वर्षाची मुदत भरतांच सदर रकम सोडवून तिजपैकीं दहा हजारांचीं पोस्टल कॅश सर्टिफिकेट घेऊन ठेवावीं. व दोन हजार सेव्हिंग्स् बँकेंत ठेवावे.

(१०) सर्व मुंबई इलाख्यांत सर्वांना मान्य होईल अशा एखाद्या दिवशीं शिवाजीमहाराजांच्या नांवानें सरकारी सुटी कायमची मिळविण्याबाबत खटपट चालू आहे. त्यासंबंधांत रायगड स्मारक मंडळाचें संपूर्ण सहकार्य आहे. रायगडाशी संबद्ध व सर्वांशीं निर्विवाद असा राज्याभिषेकदिन (ज्येष्ठ शु. १३) हा दिवस या सुटीसाठी सरकारानें मुक्रर करावा असें या मंडळाचें मत आहे. तदभावीं चैत्र शु. १५ हा छत्रपतींच्या निधनाचा दिवसहि या कामीं ठरवावयास मंडळास हरकत वाटत नाही.

(११) शिवाजीमहाराजांच्या शिवशकाप्रमाणे रायगड स्मारक मंडळाच्या हिशेबाचें वर्ष समजावें व पुढच्या वार्षिक अहवालाचे वेळीं ज्येष्ठ शु॥ १३ शके १८५६ अखेरचे हिशेब व अहवाल सादर करून यापुढे ज्येष्ठ शु॥ १३ हाच मंडळाचे वर्षाचा तिथ्यंत ठरवावा.

(१२) श्री. न. चिं. केळकर यांनी आपल्या खजीनदारीचा राजीनामा दिला, तो त्यांच्या अत्याग्रहास्तव मंजूर करण्यांत आला. व त्यांचे जागा रा. वासुदेव कृष्ण भावे यांची निवड करण्यांत आली. यापुढे श्रीशिवाजी रायगड स्मारक मंडळाची जिंदगॉव बँकेंतील हिशेब हे रा. वा. कृ. भावे व रा. पां. के. शाराळकर या उभयतांच्या नांवाने ठेवण्यांत यावे. असें ठरविण्यांत आलें.

(१३) श्री. न. चिं. केळकर यांचें नांव उपाध्यक्ष म्हणून सुचविण्यांत आलें. व सर्वानुमतें तसें दाखल करण्यांत आलें.

वर नमूद केलेले सर्व ठराव सर्वानुमतें मंजूर झाले.

याप्रमाणे सभेंत काम झाल्यावर अध्यक्ष श्री. भोपटकर यांचे आभार मानून सभा संपली.

११ सप्टेंबर १९३३

दत्तात्रय विष्णु आपटे,
दिनकर विनायक काळे,
चिटणीस.

# श्रीशिवाजी रायगड-स्मारक फंड

### अहवालाची मुदत

(१) ता. ३ जुलै १९३२ रोजीं भरलेल्या वार्षिक साधारण सभेंत ता. १५ जून १९३२ पर्यंतचा सुमारें दोन वर्षांचा (१ ऑगस्ट १९३०ते१५ जून १९३२) हिशेब व झालेल्या कामाचा अहवाल सांगण्यांत आला. त्यानंतरच्या ३१ ऑगस्ट सन १९३३ अखेरपर्यंतच्या साडेचौदा महिन्यांचा हिशेब व कार्याचा वृत्तांत येथे दिला आहे. रायगड स्मारक फंडाच्या मंडळाच्या साधारण सभा सवडीप्रमाणे भरतात. यामुळे मंडळाचें साल कायमचें असें ठरविलें गेलेलें नव्हतें. तें ठरल्यानंतर एक वर्षाचेच हिशेब प्रतिवर्षी सादर करतां येतील अशी आशा आहे.

### शिवचरित्र–कार्यालयाला देणगी

(२) नित्याप्रमाणे रिकाम्या पडलेल्या सभासदांच्या जागा भरण्याचा विचार झाल्यानंतर गेल्या सभेंत शिवचरित्रकार्यालयाला मदत देण्याबद्दलचे दोन महत्त्वाचे ठराव विचाराकरितां पुढे आले. पैकीं एकाने श्रीशिवचरित्रकार्यालयाने योजलेल्या 'चित्रमय शिवाजी' नांवाच्या ग्रंथाच्या प्रकाशनाला मंडळाजवळील १२०० रु. ची असलेली शिल्लक रक्कम यावी असें ठरविण्यांत आलें. त्याच ठरावांत सदर योजनेला १९३० चा ठराव नं. ७-३ प्रमाणें निवडलेल्या नऊ गृहस्थांच्या कमिटीकडून संमती आणविण्याबद्दल कलम घातले होतें. त्याप्रमाणे १ऑगस्ट रोजीं पत्रें रवाना झालीं. कामिटींतील एक सभासद श्री. ज. स. करंदीकर हे कारावासांत असल्यामुळे त्यांचें मत घेतां आलें नाहीं. श्री. आनंदराव सुर्वे यांचें उत्तर आलें नाहीं. बाकी राहिलेल्या सात सभासदांची संमति लेखी किंवा समक्ष आलेली आहे. यामुळे शिवचरित्र कार्यालयाचा प्रस्तुत ग्रंथ तयार करण्याचे कामीं सदरहू रु. १२०० ची रक्कम राखून ठेवली असून ती त्यांचेकडून मागणी येईल त्याप्रमाणे त्यांचे हवालीं करण्याची आहे.

शिवचरित्र–कार्यालयाकडे दरसाल कांही रक्कम लावून देण्यासंबंधाचा ठराव गेल्या वर्षी देण्यास रक्कम शिल्लक नसल्यामुळे मागे पडला होता. त्याचा विचार महाराजांचें कायमचें वाङ्मयस्मारक करतां येण्याच्या दृष्टीने यापुढेहि करतां येण्यासारखा आहे.

### रायगडावरील ऐतिहासिक स्थल-संरक्षण

(३) रायगडावरील इतिहासप्रसिद्ध असलेल्या कांही जागा नादुरुस्त आहेत. त्या दुरुस्त करून नीट राखण्याबाबत मे. सुपरिंटेंडंट ऑफ आर्क्यॉलॉजी यांस मंडळामार्फत विनंति करण्यांत यावी व त्या कामीं कुलाबा लोकलबोर्ड व प्रचारक श्री. आठवले यांचे साहाय्य घ्यावें, असाहि एक महत्त्वाचा ठराव झाला होता. त्याबाबतींत सरसालीं थोडी प्रगति झाली. श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या खटपटीने पुणें येथील आर्किऑलॉजिकल सर्व्हेचे सुपरिंटेंडंट मि. नाझीम यांनी रायगडकडे २१ एप्रिलचे सुमारास दौरा काढून तेथील परिस्थिति पाहण्याचें नक्की केले. त्याचवेळी कुलाबा लोकलबोर्डाची मंडळीहि रायगडला येणें अपरिहार्य असल्यामुळे जाग्यावरच जाऊन सर्वांशीं विचार विनिमय करण्याच्या दृष्टीने मंडळाचे दु. चिटणीस श्री. दिनकर विनायक काळे हे रायगडला हजर राहण्यासाठी गेले होते. त्यांनी तेथील स्थानिक मंडळी, कुलाबा लोकलबोर्डाने प्रतिनिधि व खुद्द पुराणवस्तु संरक्षण खात्याचे अधिकारी यांच्याशीं बराच विचारविनियम केला. परंतु मि. नाझीम यांचा कार्यक्रम अपघातामुळे बदलल्याने त्यांना खुद्द रायगडावर ठरलेल्या दिवशीं हजर राहातां आलें नाहीं. रा. काळे यांनी या वाटाघाटीबद्दलचा अहवाल परत येतांच केसरीमध्ये प्रसिद्ध केला आहे (१६ मे १९३३). कुलाबा लोकलबोर्डाकडे कुत्र्याची समाधि, धर्मशाळा, शिवाईचें देऊळ व गंगासागर तलाव यांच्या दुरुस्तीकरितां अनेक रकमा जमा असून त्याबाबतींत पुराणवस्तुसंरक्षणखात्याकडून परवानगी मिळत नाही व कामे पडून राहिलीं म्हणजे दात्यांचा गैरविश्वास पत्करावा लागतो ही तक्रार यापुढे राहूं न देण्याची तजवीज मि. नाझीम हे कांही गोष्टींना परवानगी देऊन करणार आहेत, ही समाधानाची गोष्ट आहे. याबद्दल विचारविनिमय सतत चालू ठेवून शक्य ती खटपट करण्याचा रायगड स्मारकमंडळाचा अर्थात् विचार आहेच.

### रायगडावरील उत्सव व शिवाजीसंशोधन

(४) रायगडावर दरसाल जन्मतिथीप्रमाणेच मृत्युतिथीलाहि उत्सव सुरू करण्याचा ठराव जुलै १९३२ मध्ये झाला; त्याची या वर्षी चांगली अंमलबजावणी झाली. फाल्गुन वद्य ३ व चैत्र शु॥ १५ असे दोन्हीहि उत्सव परिश्रमपूर्वक साजरे करण्यांत आले. या कामीं श्री. टिळक (नागोठणें), रायगड प्रचारक श्री. आठवले व नात्याचे श्रीमंत धारियाशेठजी यांनी केलेल्या खटपटीबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. पहिल्या

उत्सवाकरितां सालाबादप्रमाणे १०० रु. नेमणूक करून दिली होती. दुसऱ्या उत्सवाकरितां पुण्याहून श्री. शंकर नारायण जोशी यांस पाठवून देण्यांत आलें. त्यांना उत्सव साजरा करून आमपास शक्य तें शिवाजीविषयक संशोधन करावें अशीहि त्यांस विनंति करण्यांत आली. रायगडस्मारकमंडळाच्या शिवाजीविषयक वाङ्मयाची प्रसिद्धि करण्याच्या उद्देशाकडे लक्ष दिलें असतां अशा तऱ्हेने श्रीशिवछत्रपतीच्या बाबतींत संशोधन करणाऱ्या लायक इसमाना थोडीबहुत मदत करणें मंडळाला केव्हा केव्हा शक्य व्हावें अशी उमेद आहे.

**रायगडावरील वार्षिक उत्सवाची नवी योजना**

(५) शिवाजीमहाराजांच्या रायगडावरील उत्सवाबाबत पेणचे श्री. रामचंद्र नारायण मंडलिक यांजकडून एक पत्र सरसालीं मंडळाकडे आलें. त्यांत त्यांनी रायगडावरील उत्सव दरसाल मोठ्या प्रमाणावर करण्याबद्दल संघटनेची मोठी योजना सुचविली होती. रायगड मंडळाने पूर्वीच मंडळाचे खर्चानें दरसाल छोटा उत्सव व्हावा व दोनतीन वर्षांनी मोठा उत्सव व्हावा असें ठरविलें असल्यामुळे त्यापलीकडे मंडळानें नवीन उपक्रमांत भाग घेण्याचें कारण दिसलें नाहीं. मात्र एखादा वार्षिक उत्सव करण्याची व्यवस्था परस्पर होऊं शकली तर रायगडमंडळ त्या उपक्रमाला काय साहाय्य द्यावें याचा नंतर विचार करील. उत्सवाच्या मितीबद्दल मे महिन्याच्या सुटीला सोयीचा असा एखादा दिवस ठरवावा हें जे श्री. मंडलिक यांचें म्हणणें आहे त्याला मंडळाचा विरोध नाहीं असें त्यांस कळविण्यांत आलें. त्यानंतर स्थानिक लोकांकडून ह्यापुढे काय ठरविण्यांत आलें हें अद्यापि कळलेलें नाहीं.

**रायगड येथील सिंहासनाचा जीर्णोद्धार**

(६) अहवालाच्या सालीं रायगडस्मारक-कमिटीच्या कार्याला पोषक अशी एक नवी चळवळ श्री. ल. गो. विंझे यांनी आत्मस्फूर्तीनें अंगावर घेतली याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. रायगड येथील सिंहासनाची मूळ जागा तशीच पडक्या अवस्थेंत राहिली असून यापुढे तिची आणखी दुरवस्थाच होणार. तेथे कांहीं स्मारक व संरक्षक उभारणी करण्याचे कामीं पत्रें व लेख प्रसिद्ध करून रा. विंझे यांनी दोन महिन्यांखालीं त्यासाठी वर्गणीहि गोळा करण्याची सुरुवात केली आहे. आजपर्यंत त्यांचेकडून २५० रु. येऊन जमा करण्यांत आले आहेत. आता ते हस्तपत्रकें वगैरे छापवून त्या बाबतींत अधिक जोराचे प्रयत्न करणार आहेत. पुराणवस्तुसंरक्षण खात्याचें धोरण ध्यानांत घेता रा. विंझे यांचे प्रयत्न यशस्वी होण्यासाठी बरेच परिश्रम करावे लागतील असें दिसत आहे. परंतु अशा गोष्टी कालांतरानेंच होत असतात हें जाणून रायगडस्मारक मंडळाने रा. विंझे यांच्या सर्व खटपटींना पाठबळ देण्याचें ठरविलें आहे.

**शिवाजीमहाराजांच्या स्मृतिदिनाची सुटी**

(७) सदर अहवालांत श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांच्या संबंधांत नमूद करण्यासारखी एकच गोष्ट राहिली. ती ही कीं एवढ्या भारतमान्य छत्रपतीच्या स्मरणार्थ अखिल भारतवर्षांत, निदान महाराष्ट्रांत तरी सर्वमान्य सुटी मिळत नाहीं, ती मिळविण्याची खटपट करणें ही होय. या बाबतींत जागृति झाल्याचीं सुचिन्हें दिसत असून लौकरच तिला फळ येईल अशी आशा आहे. तिथींचा वाद पुढे न आणतां जी तिथि सर्वमान्य होईल त्याच तिथीची अशा सार्वजनिक संमति मिळण्याच्या दृष्टीने स्वीकार करण्यांत यावा हें तत्त्व मंडळाला मान्य असून रायगड स्मारक मंडळानें ह्या तत्त्वाला प्रथमपासूनच आपली सहानुभूति दर्शविली आहे.

**सरकारी बाँडची किफायतशीर विक्री**

(८) रायगडमंडळाचे अहवालाच्या मुदतीचे हिशेब सोबत जोडलेले आहेत, त्यांवरून रायगड मेमोरिअल फंडाचे शिलकेच्या व्यवस्थेंत फरक झाल्याचें दिसून येईल. एक दहा हजार रुपयांचा पांच टक्के दराचा सरकारी बाँड होता, त्याचा भाव बराच वाढला, त्याचा फायदा घेण्याच्या इरादाने तो विकून टाकण्यांत आला. त्यावर १०८७ रुपये इतका नफा झाला. यानंतर सदर किंवा दुसरा कोणताहि अधिक व्याजाचा कागद सवलतीने घेतां येईपर्यंत बाँड विकून आलेली रक्कम तूर्त सें. को. बँकेमध्ये मुदतीची ठेव म्हणून ठेवण्यांत आली आहे. हा व्यवहार गेल्या फेब्रुवारीमध्ये मंडळाच्या अधिकारी वर्गाच्या सल्ल्यानें खजिनदार यांनी योग्य वेळीं पुरा केल्यामुळे आज रायगड मंडळाचे निधींत एक हजाराचे वर भर पडली आहे, ही गोष्ट अभिनंदनीय आहे.

(९) प्रस्तुत सालाचें काम करण्यामध्ये मंडळाचे सर्व अधिकारीवर्ग, श्री. अंतुकाका फडणीस व मंडळाचे निर्वेतन सन्मान्य हिशेबतपासनीस रा. केतकर यांची अमूल्य मदत झाली तिचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करण्यास आम्हांस समाधान वाटत आहे.

पुणें
ता. ३१ ऑगस्ट
१९३३.

**दत्तात्रय विष्णु आपटे**
**दिनकर विनायक काळे**
**चिटणीस, रायगड स्मारक मंडळ.**

श्री

# श्रीशिवाजी रायगड–स्मारक फंडाचा हिशोब.

## ता. १६ माहे जून सन १९३२ पासून ता. ३१ माहे ऑगस्ट सन १९३३ अखेर.

| जमा रुपये | | खर्च रुपये | |
|---|---|---|---|
| १८०४६-१२-१ | शिल्लक तारीख १५ जून सन १९३२ अखेर. | १३२-५-३ | रायगड किल्ल्यावरील यंदाचे दोन्ही उत्सवांस खर्च. |
| ७७७-३-६ | व्याज ( बँकेंतील ठेवी, सरकारी बॉन्डस्, प्रॉमिसरी नोटांवरील. ) | ३-८ | छपाई खर्च. |
| २५७-४ | देणगी. | ४-७ | टपाल खर्च. |
| | २५५ रायगड किल्ल्यावरील सिंहासनाच्या जागेचे जीर्णोद्धाराकरिता म्हणून रा. ल. गो. विंझे व इतरांकडून. | १६-०-३ | किरकोळ ( यांत प्रॉ. नोट विकली त्याबद्दल बँकेस दिलेले कमिशन रु. १४-२ आहे. ) |
| | २-४ इतर. | १५६-४-६ | |
| | २५७-४ | २००१२-७-१ | शिल्लक. |
| १०८७-८ | सरकारी प्रॉमिसरी नोट रु. दहा १० हजारांची विकली त्याचा वर्ताळा आला तो. | | |
| २०१६८-११-७ | | २०१६८-११-७ | |

### शिलकेचा तपशील

| | |
|---|---|
| १४५०० | पुणे सें. को–ऑ. बँकमध्ये मुदतठेव. |
| | १२००० डि. रि. नं. १२ ता. २ मे १९३३ |
| | २५०० डि. रि. नं. ११४ ता. ७ मे १९३३ |
| ५,००० | सरकारी प्रॉमिसरी नोट साडेतीन टक्के व्याजाची. बी. १०१४३१ सन १८६५ |
| ५०३-१२-४ | पुणे सें. को–ऑ. बँकेचे सेव्हिंग खात्यांत. खा. नं. १६ |
| ८-१०-९ | रोख जवळ. |
| २००१२-७-१ | |

सदर आढावा व आढाव्याच्या तारखेपर्यंतचे जमाखर्च बरोबर आहेत.

श्री. रा. केतकर,
ऑडिटर.

ता. ३१-८-३३.

न. चिं. केळकर,
खजिनदार.
श्रीशिवाजी रायगड–स्मारक फंड.

# नेहरू-गांधी यांचा पत्र-व्यवहार

## राष्ट्राचें साध्य व साधनें यांची चर्चा

### पं. नेहरू यांचें पत्र

पर्णकुटी, ता. १३ सप्टेंबर.

प्रिय बापू,

" आपल्या राष्ट्रीय ध्येयाचा पुनरुच्चार करावा व त्याचा अधिक स्पष्ट खुलासा करावा असा आग्रह आपल्या उभयतांच्या संभाषणांत मी धरला हें आपणांस स्मरत असेलच. राजकीय स्वातंत्र्याचें ध्येय राष्ट्रीय सभेनें कायमचें नमूद करून ठेवलेंच आहे. त्यांत कांही भरहि घालावयाची नाही व त्यांतून कांही कमीहि करावयाचें नाही. आपण पूर्ण स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहेत. अस्पष्ट शब्दरचना व भ्रामक चळवळ या योगानें पुष्कळ वेळां कधी कधी गोंधळ उत्पन्न होतो. म्हणून आपली राजकीय मागणी पुनः मांडून हा घोटाळा नष्ट करणें बरें. 'स्वातंत्र्य' हा शब्द देखील विविध अर्थांनी उपयोजिला जातो. अर्थातच त्याच्या अर्थांत लष्कर व परराष्ट्रीय संबंध यांचा पूर्णताबा, त्याचप्रमाणें सांपत्तिक व आर्थिक ताबा यांचाहि समावेश झाला पाहिजे व तसें राष्ट्रीय सभेनें स्पष्टपणानें व निश्चितपणानें लिहून ठेविलेंहि आहे.

आर्थिक बाबींविषयीं कराचीच्या राष्ट्रीय सभेनें 'मूलभूत हक्क व आर्थिक फेरबदल' याविषयीं एक महत्त्वपूर्ण ठराव मंजूर करून आपण कोणत्या दिशेनें जावयाचें हें पुढाकार घेऊन दाखविलें आहे. मी त्या ठरावाला अत्यंत महत्त्व देतों; व्यक्तिशः या ठरावाच्या पुढें एक पाऊल जावें व आपलीं मतें जास्त स्पष्टपणें सांगावीं असें मला वाटतें.

#### बड्या प्रस्थांचें निर्मूलन

जनतेला स्वातंत्र्य देणें, त्यांची आर्थिक उन्नति करणें व त्यांची स्थिति सुधारणें या गोष्टी आपणास जर साधावयाच्या असतील तर हिंदुस्थानांतील बड्या लोकांना प्राप्त होणाऱ्या पुष्कळ सवलती त्यांना सोडून द्याव्या लागतील, व त्यांचा सामाजिक दर्जाहि थोडा खाली आणणें अपरिहार्य होईल. याशिवाय जनता कशी उन्नत होणार याची मला कल्पनाच करवत नाही. म्हणून स्वातंत्र्य-संपादन म्हणजे बड्या लोकांच्या हक्कांचें पारडें हलकें करून जनतेच्या बाजूचें पारडें जड करणें असें समीकरण होतें. ज्या प्रमाणांत हें सिद्ध होईल त्या प्रमाणांत स्वातंत्र्य हस्तगत होणार असें समजावयाचें.

सर्वांत जड व बड्यांत बडें प्रस्थ हिंदुस्थानांत कोणाचें असेल तर ब्रिटिश सरकाराचें; त्याच्या खालोखाल राजेरजवाड्यांचें आणि बाकी सारेच मागाहून. कोणत्याहि वर्गाला अगर संघाला दुखवावें असा आमचा मनोदय नाही. आणि या प्रस्थांचें उच्चाटन करवयाचें तें शक्य तितकें हलक्या हातानें व दुखापत न करता. तथापि जनतेला बाजूस सारून ज्या जादा सवलती कांही वर्गांना उपभोगण्यास मिळतात त्या काढून घेण्यांत त्या वर्गांचें नुकसान हें होणारच. शिवाय जनतेची स्थिति अतिशय वाईट असल्याकारणानें जनतेला तावडतोब दुःखमुक्त करण्यासाठी बड्या प्रस्थांचें निर्मूलन लवकर व्हावयास पाहिजे हें उघड होय.

खरोखरच आर्थिक शक्ति आश्चर्यकारक वेगानें आज वाढत आहे व तिच्या प्रभावानें जुन्या समाजरचनेच्या कोटाचे दगड खालीं कोसळत आहेत. संयुक्त प्रांतांतील जमिनदारी व तालुकदारी पद्धति बहुशः कोलमडून पडलीच आहे. बाहेरून टेंकू देऊन ती कांही काळपर्यंत कदाचित् उभी राहील. जमीनदारांची स्थिति फार वाईट आहे, व शेतकरी तर अर्थात् कमालीच्या दैन्यावस्थेंत आहेत.

#### लोकशाही व सुलतानशाही

हिंदुस्थानाला पुष्कळ प्रश्न सोडविण्याचे पडले आहेत. पण त्यांपैकी एकहि, गोलमेज परिषद व तींतून निघणाऱ्या गोष्टी यांच्या योगानें सुटणार नाही याविषयीं आपलें एकमत आहे. मला तर असें वाटतें कीं, ब्रिटिश सरका-

राच्या पाठीमागे सर्व बडीं प्रस्थें संघटित करावीं व त्यांच्यावर आघात करणाऱ्या बलिष्ठ व वर्धिष्णु राष्ट्रीय व आर्थिक चळवळींना तोंड देता यावें म्हणून गोलमेज परिषदेचा प्रयत्न झाला. वस्तुतः पाहिलें तर हें सारें, आंतर-राष्ट्रीय स्वरूपाच्या भाषेंत बोलावयाचें तर, फॅसिस्ट तऱ्हेचें संघीकरण झालें. राष्ट्रीय चळवळ दाबून टाकण्यास उपायहि योजिले ते फॅसिस्टांचेच. हीं प्रस्थें चालू ठेवलीं तर सामान्य जनतेचीं काय किंवा मध्यम वर्गाची काय आर्थिक दुःखें नष्ट होण्याचा संभव नाही ! असा प्रयत्न निखालस अयशस्वी होणारच. तुम्ही स्वतः गोलमेज परिषदेंत म्हटल्याप्रमाणे लोकशाही स्वरूपाचें राष्ट्रीयत्व घेतलें तरी, लोकशाही व सुलतानशाही असे दोन घोडे एकाच रथाला जोडल्यास चांगले कसे चालणार ?

दुसरी एक गोष्ट विचार करण्यासारखी आहे. जगाचे महत्त्वाचे आंतरराष्ट्रीय प्रश्न व हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न यांची फारकत करतां येत नाही. जगांतील व्यवहारांत ज्या लाटा उसळत आहेत त्या भारताच्या किनाऱ्यावर आपटल्या खेरीज राहात नाहीत. जगांत केव्हा एकदम प्रलय होईल याचा कांही नेम नाही. जनतेचीं उन्नति व सुधारणा एका बाजूस आणि बड्या धेंडांची परागतिप्रियता व स्वार्थसाधुपणा दुसऱ्या बाजूस असा लढा सर्वत्र चालू आहे. या राक्षसी लढ्याकडे केवळ प्रेक्षक म्हणून बघत बसण्याने आपलें भागणार नाही कारण त्याचा व आपलाहि निकट संबंध आहे. आपल्या स्वतःच्या हिताकरिता आंतरराष्ट्रीय कल्याणाकरिता व मानवी प्रगतीकरिता जगांतील पुरोगामी शक्तींच्या बाजूलाच आपण उभें राहिलें पाहिजे. अर्थात् आज या शक्तींचा पुरस्कार आपण केवळ कल्पनेपुरताच व विचारापुरताच करणार हें उघड आहे.

## राष्ट्रीय सभा जिवंत आहे

हे सर्व मोठे व व्यापक प्रश्न महत्त्वाचे आहेत. परंतु आज आपल्या बहुसंख्य देशबांधवांचें मन ताबडतोबीच्या राष्ट्रीय प्रश्नांविषयीं व विशेषें करून लढा चालू ठेवण्याविषयीं व्यग्र झालेलें आहे. तुम्ही व श्री. अणे यांनी लोकांना दिशा दाखविण्याकरिता जीं पत्रकें काढली त्यांनी लोकांचें मन उलट गोंधळूनच गेलें. कांही बाबतींत तर त्यांतील सूचनांचा लोकांना रागहि आला.

राष्ट्रीय सभा विसर्जन पावली अशी भाषा कित्येक ठिकाणीं चालते. घटनेप्रमाणे असें कांही करतां येत नाही व तसें करण्यांत आलेलें नाहींहि. तुमच्या काय किंवा अण्यांच्या काय ज्या सूचना होत्या त्या विशिष्ट परिस्थितींत कसें वागावें यासाठी उपदेशवजा होत्या. पूर्वीप्रमाणें राष्ट्रीय सभा आहेच. फक्त सरकाराने तिच्या कमिट्या गैरकायदा ठरविल्या असल्यामुळे ती कार्य करूं शकत नाही. उघड चळवळ किंवा व्यवस्थित कचेरी वगैरे असूं शकत नाही इतकेंच. ही गोष्ट जाणणें व परिस्थितीशीं जुळवून घेणें म्हणजे कांही कोणतीहि कॉंग्रेस कमिटी बंद करणें नव्हे, मग सर्व राष्ट्रीय सभेविषयीं तर बोलावयासच नको.

## कायदेभंग

जुने कार्यकर्ते तुरुंगांत गेले म्हणजे मूठभर नवीन माणसांनी कमिट्या बनवाव्या व मग कमिट्यांनी किंवा व्यक्तींनी कॉंग्रेसच्या नांवांवर हवें ते करावे–बोलावें, ही आपत्ति टाळावयास पाहिजे होती. पूर्वी असा अनुभव आपणांस आला होता; कांही स्थानिक लोका पुढे येत व जें कार्य करण्याचा ते बहाणा करीत तेंच कार्य नष्ट करण्याचा खटाटोप त्यांच्या हातून होई. म्हणून अविश्वसनीय माणसापासून राष्ट्रीय सभेचा बचाव करणें इष्ट झालें. असे असलें तरी आपल्या कार्यक्रमाच्या सिद्धीसाठीं राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यांनी संघटित सहकार्य करूं नये असा निर्बंध नाही.

सामुदायिक व वैयक्तिक सत्याग्रहाच्या अर्थाविषयीं देशांत घोटाळा उत्पन्न झाला आहे. या दोहोंत किंचित अंतर आहे. पण तें मूलतत्त्वासंबंधाने नाही. कारण कांही असलें तरी परिणामीं कायदेभंग तत्त्वतः वैयक्तिकच होऊन राहतो. वैयक्तिक कायदेभंगापासूनच सामुदायिक कायदेभंग विकास पावूं शकतो. शिवाय तुम्ही मला सांगितलेंच आहे कीं, एखाद्या संस्थेला शक्य वाटलें तर तिनें स्वतःच्या जबाबदारीवर व सामर्थ्यावर सामुदायिक कायदेभंग सुरू करावा. तुम्ही मला म्हणालांत कीं, राष्ट्रीय सभेच्या धोरणाच्या अथवा मार्गाच्या विरुद्ध नाही अशा प्रकाराने कोणत्याहि स्थानिक संस्थेने पुढें कूच करावें.

## गुप्तपणा

जरी गुप्त मार्गांत मूलतः अन्याय्य असें कांही नसलें तरी, गुप्तपणा अनिष्ट आहे असें तुम्ही आपल्या मागील पत्रकांत आग्रहाने प्रतिपादिलें आहे. आपली चळवळ उघडाउघडीची आहे. तींत गुप्तपणास स्थान नाही. यावर आपणा सर्वांचेच ऐकमत्य आहे. जर गुप्त पद्धतीचा उपयोग जारी झाला तर चळवळीचें एकंदर स्वरूपच पालटतें व तिचा दबदबाहि कांहींसा कमी होतो.

असें असून देखील आपणांपैकी कांहींना असें वाटतें कीं, एकमेकांशीं पत्रव्यवहार करण्यास किंवा सूचना देण्यास गुप्तपणाचा अवश्य अवलंब करावा लागतो. कदाचित् याला गुप्तपणा म्हणण्याऐवजी खाजगीपणा असें म्हणावें. खाजगी म्हटलें कीं तें व्यक्तींना

व व्यक्तिसमूहांना माहीत असूं शकतें. पण गुप्तपणा राखणें अथवा तो नष्ट करणें या गोष्टींचें वाजवी-पेक्षां जास्त स्तोम मात्र माजवण्यांत येऊं नये.

छापील पत्रकें काढण्यांत मात्र गुप्तपणा खात्रीनें लागतो. मध्यवर्ती कचेरी व जिल्हे यांचा संबंध राखण्यात किंवा माहिती—सूचना वगैरे पाठविण्यास पत्रकाचा फार उपयोग झाला. हे गुप्त छापखाने चालविण्यांत किती अडचणी येतात ते तुम्ही मला सांगितलें. चांगले कार्यकर्ते लोक यांत गुंतून पडतात. त्यांना चढाईचीं कृत्यें करता येत नाहींत. या यंत्रांत पैसा घालावा लागतो व तीं यंत्रे पोलीस लोक घेऊन जातात. व्यवहारा-च्या दृष्टीनें पाहिले तरी, ही पैशाची संतत धार चालू ठेवणें इष्ट नव्हे व कार्यकर्ते अडकवन ठेवणें बरें नव्हे. याचा परिणामहि वाईट होतो. तुमचें म्हणणेंहि असें कीं, पत्रकांच्या हस्तलिखित प्रति असाव्या व त्यांवर प्रकाशकाचें नांव असावें. सामान्यतः मला हें मान्य आहे व तुमच्या विधा-नांचा रोख मला पटतो.

### हास्यास्पद नोटीस

तथापि कांहीं विशिष्ट परिस्थितींत स्थानिक किंवा प्रांतिक कमिटीला अथवा संघाला गुप्त पत्रकें कार्याची दिशा दाखविण्यासाठीं काढावीं लागतील, असें मला वाटतें. याला उत्तेजन देऊं नये, उलट आळा घालावा. पण विशेष परिस्थितींत थोडें स्वातंत्र्य देण्यात यावें. आणखी एक क्षुल्लक गोष्ट आहे. ती मला तर हास्या-स्पद वाटते. अधिकाऱ्यांना अगाऊ इशारा देऊन तुरुंगांत जाणे हें तुम्हाला योग्य व बरोबर असेल, पण इतरांच्या व राष्ट्रीय सभेच्या स्वयंसेवकांच्या बाबतींत अधिकाऱ्यांना नोटिसा देणें वगैरे मला तर सर्वस्वी मूर्खपणाचें दिसतें. ज्याला कायदेभंग करून तुरुंगात जावयाचें असेल त्यानें आपली चळवळ उघडपणें करावी. चळवळ विसरून किंवा तिकडे दुर्लक्ष करून त्यानें फक्त स्वतःला पकडून घेण्याच्या मागे लागतां कामा नये.

हेंच पत्र लांबलें. आपल्या संभाषणांतील इतर गोष्टींचा मी उल्लेख करीत नाहीं."

जवाहर

## म. गांधी यांचें उत्तर

पर्णकुटी, पुणें, ता. १४ सप्टेंबर.

प्रिय जवाहरलाल,

तुमचें मनमोकळें व सविस्तर लिहिलेलें पत्र पाहून मला मोठा आनंद झाला. १९३१ सालच्या अखेरीस मी लंडनहून परत आलों; तेव्हां माझ्या-पासून तुम्हांला एकाएकीं दूर ठेवण्यांत आलें; त्या वेळीं मला वियोगाच्या वेदना तीव्रतेनें जाणवल्या. म्हणून मी तुमची भेट घेण्याला आणि तुमच्याशीं विचारविनिमय करण्याला अत्यंत उत्सुक होतो.

### ध्येयामध्यें मतैक्य

तुम्ही आपल्या पत्रात जे म्हटले आहे, त्यांतील बऱ्याचशा बाबींसंबंधीं माझें पूर्ण एकमत आहे. कराची कॉंग्रेसनंतर मला जो अनुभव आला, त्यामुळे त्या कॉंग्रेसच्या ठरावावरील आणि तुम्ही उल्लेखलेल्या आर्थिक कार्यक्रमावरील माझी श्रद्धा दृढतर झाली आहे. आपलें ध्येय संपूर्ण स्वातंत्र्यापेक्षा अणुमात्र कमी नाही याबद्दल माझ्या चित्तांत संदेशाचा लवलेशहि नाहीं. ज्यांचे हितसंबंध आहेत अशा वर्गांची पुनर्घटना केल्याविना बहुजन समाजाची स्थिति कदापि सुधारणार नाही हें तुमचें मत मला पूर्णपणें मान्य आहे. तसेंच हिंदुस्थानांत एकजिनसी ऐक्य निर्माण करण्यापूर्वी संस्थानिकांना पुष्कळच अधिकार-न्यास करावा लागेल आणि आपल्या रयतेचे लोकप्रिय प्रतिनिधि म्हणून त्यांना रहावे लागेल, हा विचार तुमच्याइतका नसला तरी, बऱ्याच अंशांनी मला संमत आहे. गोलमेज परिषदेसंबंधी-च्या आपल्या अभिप्रायाला मी साक्षात् अनुभवा-ची पुष्टि देतों. दळणवळणाचीं शीघ्र साधनें आणि मानवजातीच्या ऐक्याची वाढती भावना यांमुळे आपला राष्ट्राभिमान हा आंतरराष्ट्रीय सहकार्याच्या आड येता कामा नये, हेंहि तुमचें मत मला निरपवाद-पणे संमत आहे. हिंदुस्थान हा अलग राहूं शकणार नाही, जगाच्या इतर भागांत जें घडत आहे, त्याचा परिणाम त्याजवर होणारच. म्हणून मी तुमच्या-प्रमाणे म्हणतों कीं, जगांतील प्रगमनशील शक्तींच्या-बरोबर आपण पावलें टाकलीं पाहिजेत.

### शुद्ध साधनें

तुमच्या—माझ्यांत या प्रकारें ध्येयाचे बाबतींत मतैक्य असलें तरी आपणांमध्यें स्वभावभेद आहेत हें मी जाणतों. म्हणून आपल्या साध्याचा निः-संदिग्धपणें पुनः उच्चार करावा यावर तुमचा भर आहे; तर तें साध्य एकदां निश्चित

केल्यानंतर तें वारंवार उच्चारण्यांत मला कांही महत्त्व वाटत नाही. साध्याची कितीहि लखलखित व्याख्या केली आणि ती समजून घेतली, तरी त्याचीं साधनें माहीत नसतील किंवा तीं वापरलीं नाहीत, तर तें साध्य कधींहि प्राप्त होणार नाही. यासाठी मी साधनांचें संरक्षण करण्याकडे व त्यांचा वापर वाढविण्याकडे लक्ष पुरवितो. साधनांना संभाळलें कीं साध्यप्राप्ति ही ठेवलेली च! त्याचप्रमाणे माझें असेंहि मत आहे कीं, आपलीं साधनें जितकीं शुद्ध असतील, त्या प्रमाणांत आपण आपल्या साध्याकडे जाऊं शकूं. सत्य आणि अहिंसा यांचें निस्सीम परिपालन आपण करतों असें जगाला दिसलें म्हणजे आपल्या ध्येयामुळे दुसरे लोकहि बिचकणार नाहीत आणि संस्थानिक, जमानदार व रयतेला लुबाडून गहणारे जे लोक तेहि आपल्याबद्दल अविश्वास किंवा साशंकता धारण करणार नाहीत. आपल्याला कोणावरहि बळजोरी करावयाची नाहीं; सर्वांचीं मनें वळवावयाचीं आहेत. हा मार्ग लांबचा वाटेल; पण तोच जवळचा आहे अशी मला खात्री वाटते.

### वटहुकुमांना उत्तर

श्री. अणे यांचे पत्रक आणि त्यावरील माझें पत्रक यांचा तुम्ही जो अर्थ लावला आहे, तो मला मुख्य बाबतींत मान्य आहे. मला अशी मनोमन बालंबाल खात्री वाटत आहे कीं, त्या सूचना दिल्या गेल्या नसत्या तर कायदेभंगाची सारी चळवळ, तिच्या वाढत्या अंतःस्थ दुर्बलतेमुळे, कोलमडून पडली असती. कारण कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांची अशी भ्रामक समजूत झाली होती कीं, कॉंग्रेसच्या संस्था आपल्याला वाट दाखविण्याचें काम करण्यास समर्थ आहेत पण वस्तुस्थिति अशी होती कीं, वटहुकुमी अमदानी-मध्ये कॉंग्रेस कमिट्यांचे काम चालणें अशक्यच झाले होते. अशा भ्रामक स्थितीमुळे नैतिक अधः-पात निर्माण होत होता; आणि तो थांबविणें जरूर होतें. कायदेभंगाचें योग्य आचरण केल्यास त्यांत नैतिक अधःपाताला स्थानच नाही. 'कायदेभंग हा मुख्यत्वेंकरून वैयक्तिक स्वरूपाचाच असतो' हें तुमचें म्हणणें मला रास्त वाटतें. मी तर एक पाऊल पुढे टाकून असें म्हणतों कीं, जोंपर्यंत एक तरी सत्याग्रही कायदेभंग करीत आहे, तोंपर्यंत कायदे-भंगाच्या चळवळीला मरण नाही; किंबहुना, तिची अखेरीस फत्तेच व्हावयाची. श्री. अणे यांचें पत्रक म्हणजे सरकारी वटहुकुमांना अमोघ उत्तरच होय. त्यांतील सूचनांचा भावार्थ ध्यानीं घेऊन कॉंग्रेसचे कार्यकर्ते वागतील, तर निदान त्यांच्यापुरते तरी वटहुकूम लुले पडतील. अशा वैयक्तिक कायदेभंग-वाल्यांचें पथक एका केंद्रस्थानीं उभारता येणें शक्य आहे. कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांनी संघटित प्रयत्न करूं नये असा ध्वनि माझ्या किंवा श्री. अणे यांच्या पत्रकांतून अणुमात्र निघं शकत नाही.

### वैयक्तिक कायदेभंगाचे गुण

वैयक्तिक कायदेभंग आणि सामुदायिक कायदे-भंग यांत मूलतः कांही फरक नाही ही विचार-सरणी योग्य नाही. वैयक्तिक कायदेभंगामध्ये प्रत्येक व्यक्ति ही स्वयंपूर्ण घटक असते आणि तिचें पतन इतरांवर कांही परिणाम करूं शकत नाही. सामुदा-यिक कायदेभंगाला नेत्याची गरज असते, पण वैय-क्तिक कायदेभंगांत प्रत्येक जण हा आपला आपण पुढारी असतो. तसेंच सामुदायिक कायदेभंगाला अपेशाचें भय असतें, वैयक्तिक कायदेभंगांत परा-भवाला थाराच नसतो. सरकार सामुदायिक कायदे-भंगाला तोंड देऊं शकते. वैयक्तिक कायदेभंग गाडून टाकणें कोणाहि सरकाराला अद्याप शक्य झालें नाही. ज्या संस्थेला आपल्या सामर्थ्याची खात्री वाटत असेल तिनें आपल्या जबाबदारीवर सामु-दायिक कायदेभंग करावा असें मी म्हटलें होतें. पण त्याचा गाजावाजा करण्यांत हशील नाही. कारण तशी संस्था सध्या कोणतीहि नाही हें मला माहीत आहे; मग उगाच पोकळ आशा बाळग-ण्यांत काय फायदा?

### गुप्तपणा नको

गुप्त मार्ग बंद केले पाहिजेत हें माझें मत पूर्वी इतकेंच ठाम आहे. त्यांत पळवाट ठेव-ण्याला मी असमर्थ आहे. गोप्यामुळे फार नुकसान झालेलें आहे, आणि तें जागनें दाबून टाकलें नाही तर साऱ्या चळवळीचाच घात होईल. कांही विशेष प्रसंगीं गुप्त मार्गाची जरूरी लागेल हें खरें; पण त्यापासून होणाऱ्या लाभावर पाणी सोडण्यास मी तयार आहे. कारण बहुजनसमाजाचे अंगीं निर्भयता बाणावी म्हणून आमचे प्रयत्न चालू आहेत. आपली सारी जिंदगी केव्हाहि जप्त होणारी आहे याची जाणीव कॉंग्रेसवाल्यांना झाली, तर ते तिच्याविना राहाण्याचा धडा घेतील.

### विधायक कार्य

आपण सत्याग्रह करणार असल्याची वर्दी प्रत्ये-कानें सरकारी अधिकाऱ्यांना देणें हास्यास्पद आहे असें तुमच्याप्रमाणेंच मलाहि वाटतें. तुम्ही आपल्या पत्रांत कॉंग्रेसच्या विविध विधायक कार्यक्रमांचा उल्लेख केला नाही. ही तुमच्या पत्रांत उणीव राहिली आहे. विधायक कार्यक्रम १९२० सालीं पूर्ण विचारान्ती ठरविले असून तो कॉंग्रेसच्या कामाचा एक महत्त्वाचा भाग होय. जातीय ऐक्य, अस्पृश्यतेचें उच्चाटन, चरखा आणि

खादी यांचा सार्वत्रिक प्रसार इत्यादि विधायक कार्यक्रमावर माझा पहिल्या इतकाच जोर आहे. काँग्रेसवाल्यांची संख्या शेकड्यांनी व हजारांनी मोजण्याइतकी असली,तरी कायदेभंग करून तुरुंगांत गेलेल्यांचा आंकडा लाखाच्या पलीकडे कधीच गेला नाही हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. उरलेल्या लक्षावधि काँग्रेसवाल्यांच्या दौर्बल्यावरून आपण कोठे तरी चुकत आहों असें मला वाटतें.

### अमर विश्वास

वटहुकूम चालू असोत वा नसोत, एक गोष्ट निश्चित आहे कीं, जर प्रत्येक काँग्रेसभक्त स्वातंत्र्याचें मंदिर बांधण्याचे कामीं आपला वाटा उचलील तर सर्व वातावरण अंधःकारमय दिसत असलें तरी, विषाद किंवा निराशा, वाटण्याला काडीमात्र कारण उरणार नाही. तुम्ही मला घमेंडखोर म्हणणार नसाल तर मी असें सांगतों कीं, पराभवाची कल्पनाहि माझ्या चित्तांत येत नाही, आणि आपलें राष्ट्र आपल्या ध्येयाकडे झपाट्याने जात आहे ही आशा माझ्या अंतःकरणांत १९२० सालीं जितक्या तेजस्वीपणें तेवत होती, तितक्याच तेजस्वीपणें आताहि प्रज्वलित झालेली आहे. कारण कायदेभंगाच्या यशस्वितेवर माझा अमर असा विश्वास आहे. तुमचा

बापू.

## कागद

कागदा, तुझें सामर्थ्य अफाट
सहचरी तुझी अनुरूप तशांत ॥ ध्रु ॥
ताम्रपटोद्भव तव जन्मकुळी
वंश--वाढ ताडपत्राभाळीं
प्रताप ह्यांचे प्रभावशाली
जगविले जुने जुने सम्राट १
प्रिया तुझी पण कभिन्नकाळी
तूं गोरा तरि ती मुज उजळा
तिजवांचून तुज किंमत नच मुळी
तिच्यामुळे तुज मान जगांत २
इतिहासाचे दुर्गम पर्वत
तुवांच केलें त्यांना शाश्वत
अखंड आचरसी हें असिव्रत
त्रिखंडांत यामुळेच ख्यात ३
वेद पुराणें ऋषी घोषिती
ऋचा मंत्र तगवाया झटती
साह्य तुझें त्यां मिळतां अंतीं
शुद्ध राहिले प्रभुचे पाठ ४
झणत्कार मधु–सरस्वतीचे
कालिदास–भवभूति कवींचे
संस्कृतिप्रिय वाग्भट धीटांचे
सुलभ जगातें अल्पश्रमांत ५

—अज्ञातवासी

# मुंबई सरकाराचा पुढाऱ्यांना शह

जनतेची मदत घेतल्यावांचून आपल्या मताचा दाब सरकारावर पडत नाहीं असें पुढाऱ्यांस कळूं लागल्यापासून त्यांनी आपला मोर्चा बहुजनसमाजाकडे गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत अधिकाधिक वळविण्यास सुरुवात केली. या कार्यास प्रारंभ लो. टिळकांच्या हातून झाला व त्यांच्या पश्चात् म. गांधींच्या कारकीर्दींत त्याजवर जोरानें भर देण्यांत आला. स्वदेशी, बहिष्कार अस्पृश्यतानिवारण यांजवरील दौरे खेड्यापाड्यापर्यंत जाऊन पोचले; त्यामुळे जनता व पुढारी यांचें परस्परांमधील दळणवळणहि पुष्कळ वाढलें. जनतेचा विश्वास व प्रेम संपादण्याकरितां राष्ट्रीय सभेने व पुढाऱ्यांनीहि लाखों रुपये खर्च केले. बार्डोली तालुक्यांत म. गांधींच्या प्रेरणेने विधायक कार्य सुरू होऊन ठिकठिकाणीं आश्रम स्थापन झाले व त्यांतून गोरगरीबांना औषधपाणी, सल्लामसलत व उपदेश यांचें सहाय्य मोफत मिळालें. खानदेशांतील खादीकार्य व कारवार जिल्ह्यांतील करबंदी हीं कामें अशींच होत. कारवार जिल्ह्यांत सिद्धापूर, अंकोला व कुमठें या तालुक्यांतील शेतकऱ्यांना सारा भरण्याची ताकद नव्हती. शेतकऱ्यांची ही दुःस्थिति पाहून राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यांनी त्यांस हरएक प्रकारचें सहाय्य करून त्यांजकडून करबंदीची चळवळ चालविली व अशा रीतीने त्यांचें प्रेम व विश्वास संपादिला.

कायदेभंगाच्या गेल्या दोन चळवळींत राष्ट्रीय सभेच्या कार्यास जनतेचा पाठिंबा मिळण्यास तिचा वरील प्रकारचा उद्योग बऱ्याच अंशीं कारणीभूत झाला. त्या दोनहि चळवळींत पुढाऱ्यांचा हात खेड्यापाड्यांतून लांबवर पोचला व राष्ट्रीय सभा हीच आपली कल्याण करणारी संस्था आहे अशी आबालवृद्धांची खात्री पटली. राष्ट्रीय सभेने ही चळवळ सद्यःस्थितींत अशीच पुढे चालवावी कीं काय याविषयीं आमच्याप्रमाणे पुष्कळांचा मतभेद असला तरी तिने आपल्या उद्योगाने राष्ट्रांतील बहुजनसमाज मुठींत आणला ही गोष्ट भिन्न भिन्न पक्षांच्या लोकांनाच काय, पण सरकारालाहि कबूल आहे. मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांनी ग्रामोद्धाराकरितां आपल्या जिवाची तडफड चालविली आहे, तिचें कारण झालें तरी हेंच होय. त्यांनी मुंबई कायदेकौन्सिलाच्या बैठकींत व त्यानंतर लोकल सेल्फ गव्हर्मेंट इन्स्टिटयूटच्या सभेंत याच विषयावर भाषणें करून आपल्या ग्रामोद्धारविषयक धोरणाचें अवडंबर माजविलें. ता. १२ सप्टेंबर रोजीं मुंबईस 'रोटरी' क्लबांत हाच विषय उगाळून त्यांनी क्लबाच्या श्रीमान सभासदांपाशीं मदतीची याचना केली. मदतीसाठी त्यांनी सभासदांपुढे परळ फिरविला, त्या वेळीं अंगावरील कफनीची बाही बरीचशी बाजूला सरल्यामुळे त्यांच्या बगलेंतील गुप्तीचें दर्शन सर्वांना झालें व त्यांचा गनिमी कावा सर्वांच्या ताबडतोब प्रत्ययाला आला.

भाषणाच्या भरांत गव्हर्नरांनी आपल्या मनांतील मळमळ बाहेर ओकून टाकली. त्यावेळीं त्यांना राष्ट्रीय सभा व तिचा वर वर्णिलेला कार्यक्रम ढळढळीत डोळ्यांसमोर दिसत होता. त्यांनी आपल्या भाषणांत दोन प्रमेयें कबूल केलीं असून तीं लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत. ते म्हणाले, 'क्रांतिकारक किंवा राजसत्ता उलथून पाडूं पाहणारे लोक आपले नांगर वाळवंटांत फिरवीत नाहीत. त्यांचा डोळा जनतेचीं गाऱ्हाणीं व दुःखें यांजवर बिनचूक असतो.' गव्हर्नरसाहेबांनी काढलेलीं हीं दोनहि प्रमेयें बरोबर आहेत. जनतेचे पुढारी हे कुडाला तुंबड्या लावीत बसणारे रिकामे न्हावी नव्हेत. जनता सुखी असती तर पुढाऱ्यांना कोणीच विचारलें नसतें. इतकेंच काय पण पुढारीहि आपला वेळ मोडून या कष्टदायक व संकटकारक फंदांत पडले नसते. जनतेचीं हीं गाऱ्हाणीं व दुःखें हरण व्हावीं

म्हणूनच हिंदुस्थानाला स्वराज्याची गरज आहे; व तें स्वराज्य संपादण्याकरिताच जनतेच्या उपयोगीं पडून जनतेचा पाठिंबा पुढारी मिळवीत आले आहेत.

परंतु गव्हर्नरांच्या प्रतिपादनाचा आशय असा कीं, हिंदुस्थानाला स्वराज्य लाभलें म्हणजे गोरगरीबांच्या घरापुढून घृतकुल्या व मधुकुल्या वाहूं लागतील, त्यांच्या घरावर रत्नखचित कौलें चढतील व त्यांच्या चुलींतून सोन्याचा धूर निघेल या प्रकारची जनतेची कल्पना पुढारी करून देत आहेत. यामुळे तिची फसवणूक होत आहे. यासाठीच सरकार व त्यांचे पाठीराखे यांनी पुढे सरून जनतेला वस्तुस्थितीचें ज्ञान करून दिलें पाहिजे. ही कामगिरी एकट्या सरकारी अधिकाऱ्यांनीच बजावली असती. परंतु सरकाराची साधनसामुग्री तोटकी असल्यामुळे शहरांतील श्रीमान, कारखानदार, व्यापारी व सुशिक्षित लोक यांचा गव्हर्नरसाहेबांनी धावा केला आहे. त्यांचा धावा करण्याचीं इतरहि कारणें त्यांनी आपल्या भाषणांत सांगितलीं आहेत. गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांचा वरील सद्गृहस्थांना सवाल असा कीं, राष्ट्रीय पुढारी सरकारावर मत्सराने व खोडसाळपणाने हल्ले चढवितात तर त्यांजबरोबर लढण्याची जोखीम केवळ सरकारी अधिकाऱ्यांवर काय म्हणून ? सरकारी कृपा व साहाय्य यांच्या आधारानेच मुंबईतील कारखानदार व व्यापारी हे भरभराटीस आले आहेत. तेव्हा सरकारावर संकट ओढवलें असता त्यांच्या पाठिशीं कारखानदार व व्यापारी यांनीच उभें राहावयास नको काय ?

खेरीज गव्हर्नरांच्या मनांत दुसरेंहि कारण आहे. भांडवलवाल्यांच्या गिरण्या व इतर धंदे मजूर वर्गाच्याच जिवावर चालतात. पण हा वर्ग बेदिल होऊन संपाच्या मार्गास लागतो. मजूर वर्गांत अशा प्रकारची बेदिली समाजसत्तावाद्यांच्या उपदेशानेच उद्भवते. राष्ट्रीय सभावाले खेड्यापाड्यांतून व शहरांतूनहि परदेशी मालावर बहिष्कार घालण्याची चिथावणी देत आले आहेत. त्यामुळे परदेशी कापडाची व मालाची खरेदी—विक्री करणाऱ्या धनाढ्य व्यापाऱ्यांना लाखों रुपयांचें नुकसान पोचलें आहे. वरील दोनहि आपत्तींतून सुटण्याचे उपाय गव्हर्नरांनी उभयतांना सुचविले आहेत. खेड्यांतील दरिद्री व अज्ञानी शेतकऱ्यांना उपकारांनी मारून त्यांच्या विश्वासास स्वतःला पात्र करून घेणें हेच गव्हर्नरांचे उपाय होत. कारखानदारांनी व व्यापाऱ्यांनी आपल्या व्यवसायांत लक्षावधि नव्हे, कोट्यवधि रुपयांची कमाई केली आहे. पण त्यांनी खेड्यांतील गरिबांच्या सोयीकरिता एखादा दवाखाना किंवा शाळा आपल्या खर्चाने घातली असली तर शपथ !

वरील परोपकाराचीं कृत्यें धनिक वर्गाने केल्यास खेड्यांतील जनता त्यांची मिंधी बनेल आणि संपाच्या व इतर भानगडींत न शिरतां त्यांच्याशीं नमून वागेल. या हिकमतीने कदाचित् कारखानदार व व्यापारी यांजवरील संकट टळेल व ते समाजसत्तावादी अगर कम्यूनिस्ट यांच्या जाळ्यांत सांपडले नाहीत याचा फायदा सरकारास परंपरेने होईल असें मानलें तरी राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या चळवळीचा सरकाराच्या मागे लागणारा ससेमिरा त्यामुळे कसा थांबणार ? अशी शंका कोणी काढल्यास त्यावरहि साइक्स साहेबांनी तोड सांगितली आहे. खेड्यांतून व्यापाऱ्यांचा माल खपविणारे व गिरण्यांसाठी किंवा परदेशांत पाठविण्यासाठी कापूस, भुईमूग, गहूं इत्यादि जिनसा खरेदी करणारे एजंट असतात. त्यांजकडे त्या त्या गांवांचें पुढारीपण सहज येईल. त्याचा फायदा घेऊन इंग्रजी राजसत्तेचा उदोउदो म्हणण्याचें काम त्यांनी करावें.

राष्ट्रीय सभेची चळवळ सांप्रत मृतप्राय होऊन पडली आहे. त्या अवधींत ठिकठिकाणीं आपले भाट उभे करून सरकाराचें बस्तान बसविण्याचा साइक्स यांचा विचार आहे. हे भाट आपल्या जागीं स्थिर झाले व मागाहून एखादी राष्ट्रीय चळवळ जोरावली तर तिला प्रतिरोध करण्यास ते सरसावतील अशी त्यांची समजूत दिसते. हे झाले वित-

सरकारी उपाय; त्याशिवाय सरकारी उपाय आहेतच. मागील लेखात आम्ही सांगितल्याप्रमाणे सरकार आपल्या निरनिराळ्या खात्यांमार्फत जनतेला आरोग्य, पतपेढ्या, शेतकी इत्यादि विषयांचें ज्ञान देऊन तिची मर्जी संपादन करणार आहेच. परंतु गांवगन्ना अधिकारी पाठवून त्यांजकडून हा कार्यभाग उरकून घेण्यास खर्च बराच येईल व वेळहि मोडेल; याकरितां त्यावरहि त्यांनी एक उपाय योजण्याचें ठरविलें आहे. मुंबई अगर पुणें अशा एकाच ठिकाणीं भाषण करून रेडिओच्या सहाय्याने त्याचा पसार सर्व प्रांतभर करण्याचे सरकाराचे प्रयोग सुरू आहेत. ते यशस्वी झाल्यास आपल्या मतप्रसाराचें प्रचंड कार्य शेवटास जाईल असा गव्हर्नरांना भरंवसा वाटत आहे.

गव्हर्नरसाहेब आपली ही योजना बनवीत असून तिचें दिग्दर्शन ता. ३० सप्टेंबर रोजीं एक दरबार बेळगांवास व ता. २ आक्टोबर रोजीं दुसरा दरबार सुरतेस भरवून ते करणार आहेत. त्यांचा तिसरा दरबार आक्टोबर महिन्याच्या अखेरीस पुण्यास भरेल व त्या वेळीं वरील योजनेस मूर्त स्वरूप प्राप्त होईल. गव्हर्नरांनीच सरकारतर्फेचें विधायक कार्य हातीं घेण्याचें ठरविलें असल्यामुळे तिन्ही दरबारांत गांवोगांवाहून खेचून आणलेले पाटील आणि म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें व ग्रामपंचायती यांचे सभासद यांजपुढे एकंदर भपका थाटाचा होईल यांत शंका नाही. परंतु कार्याची उभारणी मुळांतच इतकी लटपटीत आहे कीं, ती गव्हर्नरसाहेबांचें पाऊल या वर्षअखेर विलायतेच्या बोटीवर चढतांच एकतर गडगडेल किंवा ती कांही काल टिकून राहिल्यास तिजपासून सरकाराला इच्छित फळ मिळणार नाहीच; पण जनता अधिक जाणती होऊन तिच्या आकांक्षा वाढल्यामुळे असंतोषाचा भडका मात्र लवकर उडेल. कारण जनतेला सधन व सुखी करण्याचें सामर्थ्य या योजनेंत नाही. या दृष्टीने गव्हर्नरांनी राष्ट्रीय पुढाऱ्यांस आपल्या चळवळीचा शह देण्याचा केवढाहि अट्टाहास केला तरी तो परिणामी सरकारावरच उलटल्यावाचून राहाणार नाही.

---

# आजीबाई आटोपल्या !

डॉ. ॲनी बेझंट यांस बुधवार ता. २० रोजीं तिसरे प्रहरीं चार वाजतां मद्रास येथे देवाज्ञा झाली. मरणसमयीं त्यांचें वय ८६ वर्षांचें होतें. अशा वृद्धापकाळांत त्यांच्या सर्व शक्ति अगदी क्षीण व्हाव्या यांत नवल नाही. गेले कित्येक दिवस त्या इतक्या थकल्या होत्या कीं, त्यांच्या नाकीं सूत धरल्यासारखेंच होतें. बाईच्या चरित्राचा विचार केल्यास त्यांचा एकंदर आयुष्यक्रम लोकोत्तर ठरतो.त्यांचा जन्म इंग्लंडांत झाला; पण त्यांनी आपला देह हिंदुस्थानाच्या हिताकरितां झिजविला व हिंदुस्थानांतच ठेवला. त्या मूळच्या खिस्तधर्मीय होत्या; पण त्यांनी हिंदुधर्माचा अभिमान बाळगून व हिंदुधर्म स्वीकारून त्याचीच कीर्ति सर्व जगभर पसरविली. त्या हाडाने इंग्रज होत्या; पण इतर इंग्रज लोकांप्रमाणे इंग्लंडचा कै[illegible]र न घेता हिंदुस्थानास 'होमरूल' मिळवू[illegible] देण्याच्या कामींच त्यांनी कंबर बांधली, व त्या[illegible]यीं स्वजनांचा राग स्वतःवर ओढवून घेऊन [illegible]दिवासहि पत्करला. एकीकडे बाईच्या जातभाइनी त्यांस अटकेंत ठेवून त्यांजविषयी अत्यंत तिरस्कार दर्शविला व दुसरीकडे हिंदुस्थानाने त्यांना राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानीं बसवून त्यांचा फार मोठा गौरव केला.

बेझंटबाईच्या चरित्रांत वरीलप्रमाणें विरोधाभास आढळतो. यास त्यांचे अद्भुत गुणच कारण झाले आहेत. त्या अगदीं स्वतंत्र बाण्याच्या होत्या. जीं मतें मनाला पटलीं तींच पत्करावयाचीं व त्यापायीं ओढवणाऱ्या संकटास धैर्याने, शौर्याने व उत्साहाने तोंड

घावयाचें हें त्यांच्या जीवनाचें खरें रहस्य होय. त्यांनी प्रथम पाद्रीबुवांशीं लग्न केलें तें ख्रिस्ती धर्मावर त्यांची श्रद्धा होती म्हणून; व पुढे त्याजबरोबर काडी मोडून विवाहबंधनांतून बाहेर पडल्या त्या ख्रिस्ती धर्मावरील श्रद्धा उडाली म्हणून. त्यांनी इंग्लंडांत असताना आपणास सहा महिन्याच्या शिक्षेस पात्र करून घेतलें ते संतति-नियमनाच्या चळवळीवर त्यांचा विश्वास बसला म्हणून व पुढे संततीनियमनाच्या आधुनिक साधनांचा निषेध करूं लागल्या त्या सदर चळवळीवरील त्यांचीं मतें बदललीं म्हणून.

अशा रीतीने आपल्या कल्पनेप्रमाणें त्या जन्मभर सत्याचा शोध करीत होत्या, व त्या सत्याच्या आड येणाऱ्या संकटाशीं झगडत होत्या. सत्याशीं व आपल्या तत्त्वाशीं त्या इतक्या तन्मय झाल्या होत्या कीं त्यासाठी त्यांनी आपल्या नवऱ्याचा, मुलाबाळांचा धर्माचा व देशाचाहि त्याग केला. हिंदुस्थानांत त्या १८९३ सालीं आल्या, व त्यानंतर हिंदुस्थान हा स्वदेश व हिंदुधर्म हा स्वधर्म समजून त्यांच्या उद्धारार्थ त्यांनी उरलेलें सारें आयुष्य खर्च केलें. त्या थिऑसॉफिकल सोसायटीच्या अध्यक्ष होऊन त्यांनी स्वतःस केवळ धर्मकार्याला वाहून घेतलें होतें, तोंपर्यंत हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत त्यांनी आपल्या भोंवती लक्षावधि अनुयायी जमविले. हिंदुस्थानाचा उद्धार केवळ धार्मिक चळवळीने होणार नाही अशी खात्री पटल्यावर त्या सुमारें वीस वर्षांपूर्वी हिंदी राजकारणांत शिरल्या. हिंदी राजकारणांत धडाडीने पडून होमरूलची चळवळ त्यांनी निकराला पोचविल्यामुळे त्यांचें तेज अधिकच खुलून दिसलें व त्यांची कीर्ति सर्वतोमुखीं होऊन त्यांना राजकारणांतहि लाखों अनुयायी मिळाले.

बेझंटबाई कोणत्याहि चळवळींत शिरल्या तरी त्यांत अग्रस्थान मिळवावें अशा प्रकारचे अलौकिक गुण त्यांच्या अंगीं होते. त्यांची बुद्धि कुशाग्र होती, कर्तृत्वशक्ति अचाट होती, विद्वत्ता असाधारण होती, निग्रह निस्सीम होता, वक्तृत्व बृहस्पतितुल्य होतें व स्वार्थ मुळी नव्हताच. या कारणाने त्यांना हिंदुस्थानांत एक वेळ देवतेसमान सन्मान मिळवितां आला. सुदैवाने त्यांना दीर्घायुष्य लाभलें व यौगिक दिनचर्येमुळे, अलीकडचीं तीनचार वर्षे सोडल्यास, त्याना त्याचा आमरण सद्व्यय करावयास सापडला. त्याच्या शाऐशीं वर्षांच्या काळांत हिंदुस्थानांतील तीन पिढ्या तरी गडप झाल्या. दादाभाई जसे हिंदुस्थानाचे आजोबा तशा बेझंट बाई हिंदुस्थानाच्या आजीबाई होत. दादाभाईनी आपलें आयुष्य देशसेवेंत घालविलें, पण बेझंट बाईनी देशसेवेबरोबर धर्मसेवाहि साधली. नास्तिकपणाची व धर्महीनतेची हिंदुस्थानात उसळलेली लाट बाईनी आपल्या पराक्रमाने थोपवून धरून सुशिक्षित व चिकित्सक हिंदु लोकांत स्वधर्माविषयीं अभिमान जागृत केला, त्यांस धार्मिक वळण लावलें आणि राजकारणांत स्वातंत्र्याचे वारे उत्पन्न करून स्वराज्याचा झगडा वरच्या पायरीवर चढविला. हे दोन्ही उपकार इतके मोठे आहेत कीं, त्यांचा विसर हिंदी जनतेला केव्हांहि पडणार नाही. अशा प्रकारची श्रेष्ठ कामगिरी ज्या जगप्रसिद्ध स्त्रीने बजावली तिच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर प्रत्येक हिंदी मनुष्याचें अंतःकरण हळहळल्यावांचून कसें राहील ?

# डॉ. ॲनी बेझंट यांचें अल्प चरित्र

( ले.—ग. स. मराठे ॲक्चुअरी पुणें )

बेझंटबाईंचा जन्म ता. १ आक्टोबर १८४७ रोजीं लंडन येथे झाला; म्हणजे त्यांच्या वयाला आता ८६ वर्षे पूर्ण होत आलीं. त्यांच्या आईचे वडील आयरिश होते व बापाची आई आयरिश असून बाप इंग्रज होता. बाईंचा बाप डॉक्टर असून त्याला पैसा बरा मिळे. बाप धर्माविषयी श्रद्धाहीन होता. पण आई धर्मनिष्ठ होती. बाईंच्या पांचव्या वर्षी त्यांचे वडील वारले व कुटुंबास विपत्ति आली. ॲनीला वयाच्या आठवे वर्षी एका श्रीमंत बाईने शिक्षण देऊन संभाळण्यास नेलें. ॲनी सोळा वर्षांची होईपर्यंत त्या बाईच्या घरीं होती व तिच्या शिकवणुकीने ती भाविक बनली. नंतर एका पाद्री मनुष्याने तिला मागणी घातली. अशा विवाहानें आपणास धर्मकार्य करावयास सांपडेल म्हणून बाईंनी ती मागणी कबूल केली.त्यांचें लग्न होऊन तीन मुलेंहि त्यांना झालीं. परंतु नवरा विचारस्वातंत्र्यास अनुकूल नसल्यामुळे भांडणें होऊन दोघें कायदेशीर रीतीने विभक्त झालीं. एक मुलगी तेवढी बाईंचेजवळ राहिली. विभक्त होण्याचें कारण बाईंची धर्मावरील श्रद्धा उडाली हें होय. ईश्वरानें दुःख कां उत्पन्न केलें व निरपराधी माणसांना तें कां भोगावें लागतें ह्याचा त्यांना त्यांच्या धर्मांत थांग लागेना. त्यामुळे त्या ख्रिस्ती आचार पाळीनात व पाद्रीबोवांची पत्नी ह्या दृष्टीने ही गोष्ट अयोग्य ठरली.

## चार्लस ब्रॅडला यांची भेट

१८७४ मध्ये चार्लस ब्रॅडलॉ यांची व बाईंची गांठ पडली. ब्रॅडलॉ उदार अंतःकरणाचे व न्यायप्रिय होते. ते नास्तिक असून विचारस्वातंत्र्यावर त्यांचा भर होता. त्यामुळे बाई त्यांच्या सोसायटीच्या सभासद होऊन त्यांच्या सहकारी बनल्या. बाईंच्या अंगच्या विलक्षण वक्तृत्वशक्तीचा व लेखनाचा उपयोग नास्तिक ऊर्फ अंधश्रद्धाविध्वंसक विचार-स्वातंत्र्याचा प्रसार करण्यास उपयोगीं पडून त्यांना त्यावर थोडे पैसेहि मिळूं लागले. अर्थात् कित्येकदां गुंड लोकांचा विरोध, दगडफेक हींहि त्यांस सहन करावीं लागलीं.त्यांच्या उद्योगास ज्ञानप्राप्तीची जरूर असल्यामुळे त्यांनी अभ्यास करून मॅट्रिकची परीक्षा दिली व आठ भौतिकशास्त्रांचा अभ्यास करून सर्टिफिकीटेंहि मिळविलीं; परंतु त्यांच्या मतांमुळे त्यांस बी. एस्सी. ची डिग्री मिळण्याचे कामांत अडचण आली. संततिनियमनावरील एका पुस्तकाला सरकारानें बंदी केली म्हणून बाईंनी तें पुस्तक बुद्ध्या छापून विकलें. त्याबद्दल त्यांजवर खटला होऊन त्यांस सहा महिने शिक्षाहि भोगावी लागली. परंतु अपीलांत ती रद्द झाली. बाई थिऑसफिस्ट झाल्यावर त्यांचें मत बदलून संततिनियमन कृत्रिम उपायांनी न करतां मनःसंयमानेनेच करावे असें त्यांचें मत झालें. पण त्यांच्या पहिल्या मतांचा परिणाम असा झाला कीं त्यांच्या पतीने फिर्याद करून त्यांची मुलगी त्यांचेपासून काढून नेली. ह्या गोष्टीने त्यांस अत्यंत दुःख झालें.

## समाजसत्तावादाचा स्वीकार

१८८५ सालीं बाईंनी समाजसत्तावादाचा स्वीकार केला. ह्या बाबतींत ब्रॅडलॉसाहेबांशीं त्यांचा मतभेद झाला. बाईंनी गरीबांना व कामकऱ्यांना संप करून आपली स्थिति सुधारून घेण्याचा मार्ग शिकविला व त्यांचे संघ बनविण्याचे कामीं मदत केली. त्यांनी 'इंग्लंड, इंडिया ॲंड अफगाणिस्थान' या नांवाचें एक पुस्तक १८७८ सालीं लिहिलें. त्यांत त्यांनी हिंदुस्थानाविषयी अत्यंत सहानुभूति दाखविलेली आहे. बाईंच्या मतांविषयीं लोकांचा राग असे तरी त्यांच्या कर्तृत्वाविषयी आदर असे; याचें उदाहरण म्हणजे लंडनच्या स्कूल बोर्डावर त्या सर्वांत अधिक मतें मिळवून निवडून आल्या. तेथे त्यांनी एक अपूर्व कामगिरी केली. ती अशी कीं, कित्येक मुलें अर्धपोटीं येऊन शिकत असत, त्यांना सरकारी खर्चानें खावयास देण्याचा नियम करवून तशी व्यवस्था केली. अशा रीतीनें नास्तिकवादाचा अंगीकार करून अनेक प्रकारें लोकोपयोगी व विचारस्वातंत्र्याचीं कार्यें करण्यांत त्यांचीं पंधरा वर्षे गेलीं. परंतु पुढे त्यांचे चित्तांत असमाधान उत्पन्न झालें.

## आकाशवाणी ऐकूं आली

प्रयत्नवाद जनदुःखहरणास पंगू पडूं लागला व जगाच्या पाठीमागे ईश्वर म्हणून कांहीं शक्ति नाहीं म्हटलें तर जगाच्या राहटीच्या मागे अगदींच कांहीं नाहीं, हें म्हणणें ठीक दिसेना. ईश्वर आहे म्हटलें तर सगळीकडे अन्याय दिसून येत होता. त्यांच्या मनाच्या चलबिचलीला नवीन मेस्मेरिझम इत्यादि प्रयोगहि कारणीभूत होऊं

लागले. ह्या प्रयोगांच्या योगानें मनाच्या विलक्षण शक्ति त्यांस आढळून आल्या व स्पिरिच्युॲलिझम-(परलोकविद्या) च्या कांही प्रयोगांमुळे त्यांचा जडवादहि ढासळूं लागला. अशा स्थितींत एका शांत वेळीं त्यांस असा प्रश्न आकाशवाणीने ऐकूं आला कीं, "तुला सत्य हवें काय? त्यासाठी सर्वस्वाचा त्याग करावयास तयार आहेस काय?" ह्या प्रश्नाला त्यांनी होकारार्थी उत्तर दिल्यावर त्यांस ती वाणी म्हणाली "लवकरच तुझ्या अंतर्यामीं प्रकाश दिसेल." पुढे थोड्याच दिवसांत थिऑसफिकल सोसायटीच्या संस्थापक मॅडम ब्लॅव्हॅटस्की ह्यांचें 'सीक्रेट डॉक्ट्रिन' नांवाचें पुस्तक 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज'चे संपादक ह्यांजकडे अभिप्रायार्थ आलें. त्यावर अभिप्राय देण्याची कामगिरी संपादकांनी बाईवर सोपविली. तें पुस्तक वाचतांना कांही तरी विसरलेलें आठवावें त्याप्रमाणें त्यांची स्थिति होऊन त्या ब्लॅव्हॅटस्की बाईस भेटल्या व थोड्याच दिवसांत म्हणजे १८८९ मध्ये थिऑसॉफिकल सोसायटीच्या सभासद झाल्या. या गोष्टीमुळे त्यांच्या सर्व मित्रांना नवल व खेद वाटला. आपण थिऑसफिस्ट कां झालों याबद्दल बाईंनी एक पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें तें वाचनीय आहे.

मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांच्या हाताखाली राजयोगाचा अभ्यास सुरू करून लवकरच त्यांनी पुष्कळ प्रगति केली. पुढे दोन वर्षांनी ब्रॅडलॉ साहेब व मॅडम ब्लॅव्हॅट्स्की हीं दोन्ही त्यांचीं आदरस्थानें परलोकवासी झाली. थि. सोसायटीच्या कामास त्यांची जरूर पडून त्या १८९३ च्या नोव्हेंबरमध्ये हिंदुस्थानांत आल्या व त्यांनी सर्व हिंदुस्थानभर दौरा काढला. त्या वेळीं गोऱ्या मनुष्यानें हिंदुधर्माला अनुकूल बोलणें ही अपूर्व गोष्ट होती. तशांत बाईचें अद्भुत वक्तृत्व! त्यामुळे एखाद्या महान् विभूतीप्रमाणें त्यांचें ठिकठिकाणीं स्वागत झालें. केसरीने कित्येक आठवड्यांपर्यंत त्यांजविषयीं लेखमाला लिहिली. त्यांनी हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनाचा प्रश्न हातीं घेतला. अर्थात् अंधश्रद्धात्मक रूढींस त्यांनी उचलून धरलें नाही; परंतु हिंदुधर्माचें आध्यात्मिक स्वरूप व त्यास पोषक असणारा कांही आचारांचा गूढार्थ ह्यांचे विवेचन त्यांनी केल्याने हिंदुधर्माविषयी तिरस्कार वाटत असलेल्या अनेक सुशिक्षित लोकांचे मनांत धर्माविषयी अनुकूल अशी प्रतिक्रिया सुरू होऊन कित्येक कट्टे सुधारक थिऑसॉफिस्ट झाले व धार्मिक आचारांची कांस धरूं लागले.

### थिऑसफीचा प्रसार

हिंदुस्थानांतील कामगिरीनंतर त्यांनी जगांत अनेक देशांत दौरे काढून थिऑसफीचा म्हणजे कांही अंशीं पुनर्जन्म, कर्माचा सिद्धांत, भूर्भुवःस्वः इत्यादि अनेक सूक्ष्म लोक व त्यांतील महान् शक्ति इत्यादि हिंदुधर्मांतच फक्त स्पष्ट मांडलेल्या सिध्दांतांचा सर्व जगभर प्रसार करून जवळ जवळ अर्धालक्ष सभासद थिऑसॉफिकल सोसायटीस मिळवून दिले. १९०७ सालीं सोसायटीचे अध्यक्ष कर्नल ऑल्काट वारल्यावर त्या अध्यक्ष निवडून आल्या व दर सात वर्षेपर्यंत पुनः पुनः निवडून येऊन अखेरपर्यंत अध्यक्षच राहिल्या. त्यांच्या थिऑसॉफीविषयक कामगिरीचें वर्णन संपविण्यापूर्वी एवढें सांगितलें पाहिजे कीं, थिऑसॉफी हा विशिष्ट मतांचा संप्रदाय नाही. विश्वबंधुत्वाखेरीज थिऑसॉफी म्हणजे दुसरें कोणतेहि मत नाही, व थिऑसॉफीचीं मतें म्हणून सांगितलीं जातात तीं सोसायटींतील पुढाऱ्यांचीं व बहुतेक सभासदांचीं व्यक्तिशः मतें आहेत. पण तशीं मतें असणें ही गोष्ट सभासद होण्यास आवश्यक आहे असें मुळीच नाही.

हिंदु धर्माची उन्नतिहि धर्माचें शिक्षण आधुनिक शास्त्रज्ञानास धरून पद्धतशीर रीतीनें लहानपणापासून दिल्याशिवाय होणार नाही हें ओळखून बाईंनी काशी येथे सेंट्रल हिंदु कॉलेज व शाळा काढून त्या संस्था उत्तम रीतीनें चालविल्या व हिंदु युनिव्हर्सिटी निघाल्यावर त्या तिच्या हवालीं करून आपण दूर झाल्या. ह्या युनिव्हर्सिटीने प्रिन्स ऑफ वेल्स हिंदुस्थानांत आले त्या वेळीं त्यांस त्यांच्याच जोडीने एल. एल. डी. (डॉक्टर ऑफ लॉज) ची बहुमानार्थक पदवी देऊन त्यांचा गौरव केला.

### होमरूलची चळवळ

महायुद्ध सुरू होण्यापूर्वी थोडे महिने त्या राजकारणांत पडल्या. त्या वेळीं लो. टिळक तुरुंगांत होते व नेमस्त पुढाऱ्यांचें तेज फिकें पडलें होतें. हिंदुस्थानाने स्वराज्याची मागणी जोरानें करण्याची वेळ तर जवळ आली; पण पुढारी तर कोणी नाही असें जाणूनच कीं काय, त्यांनी मद्रास येथे एक साप्ताहिक व एक दैनिक वर्तमानपत्र काढलें. त्यांनी एक होमरूल लीगहि स्थापन केली व जहालमवाळांत समेट करण्याचा मोठा प्रयत्न केला. सरकारचा त्यांजवर रोष होऊन त्यांस अटकेत ठेवण्यांत आलें. ह्यामुळे त्यांची लोकप्रियता वाढून त्या १९१८ सालीं कॉंग्रेसच्या अध्यक्ष निवडल्या गेल्या. परंतु असहकारितेची चळवळ सुरू झाल्यावर त्या कॉंग्रेसपासून दूर झाल्या. तथापि पार्लमेंटांत होमरूल बिल आणण्यासाठी पुढाऱ्यांत एकी करण्याची त्यांनी

प्रार्थ केली. त्यांनी कॉमनवेल्थ ऑफ इंडिया बिलहि तयार केलें. बिलाचा प्रयत्न फसल्यावर त्या दरसाल विलायतेस जात व हिंदी स्वराज्याचा प्रश्न नेटाला लावण्यासाठी त्या मोठा प्रयत्न करीत. तेथील मजूर पक्षाला त्यांनी ह्या बाबतींत पूर्ण वळवून ठेवलें होतें; पण त्या पक्षाच्या हातीं सत्ता आली ती अगदी दुबळी असल्यामुळे त्यांचे प्रयत्न फुकट गेले. वार्ध-क्याचा जोर झाल्यावर अलीकडे दोनतीन वर्षे त्यांचे प्रयत्न साहजिकच शिथिल पडले.

त्यांची सर्वांत महत्त्वाची परंतु बहुजनसमाजाला न पटणारी कामगिरी म्हणजे जगद्गुरूंच्या आगमनाची तयारी करणें ही होय. १९०९ सालीं त्यांनी ह्या आगमनाची घोषणा केली व जे. (म्हणजे जदु) कृष्णमूर्ति नांवाच्या एका दरिद्री मुलाचा अध्यात्मिक अधिकार ओळखून येथे व विलायतेस पाठवून त्याचें शिक्षण केलें. हे कृष्णमूर्ति सध्या जगभर प्रवास करून व्याख्यानें देत असतात, व त्यांचा परिणामहि पुष्कळ लोकांवर होत आहे.

# 'आर्य' नाझींचीं अनार्य कृत्यें

## ( लेखांक १ ला )

### 'केसालाहि धक्का नाहीं !'

ता. ५ मार्च १९३३ हा दिवस केवळ जर्मनीच्याच नव्हे तर, सर्व जगाच्या इतिहासांत लाल शाईने लिहिला जाईल. त्या दिवशीं 'आर्य' म्हणविणाऱ्या नाझींचा नायक हर हिटलर हा शें. ५२ मतांनी चॅन्सेलरच्या पदावर आरूढ झाला. इटालींतील मुसोलिनी हा त्याचा गुरु. पण सुलतानशाही गाजविण्यांत या चेल्याने आपल्या गुरूवरहि ताण केली ! मुसोलिनीचा इटालीच्या राज्यकारभारांत प्रवेश झाला; तेव्हापासूनच युरोप खंड थरथर कांपत होते. केमालपाशाने इजिप्तमध्ये आणि डी व्हॅलेराने आयर्लंडामध्ये ज्या धडाक्याने 'भीमराज्य' ( Dictatorship ) सुरू केले, त्याहिपेक्षा तुफान वेगाने हिटलर याने आपलें भीमराज्य चालू केलें आणि ज्यू व कम्यूनिस्ट यांजवर मोहीम चालविली. रशियामध्ये कम्यूनिस्टांनी इतर लोकांना जितकें 'सळो का पळो' करून सोडलें नसेल; त्याहिपेक्षा जास्त हिटलरच्या नाझी पक्षाने जर्मनींतील कम्यूनिस्टांना 'त्राहि भगवन्' करून सोडलें. परंतु तेथील नाझी पुढाऱ्यांनी आपल्या एका जाहीरनाम्यांत अशी घोषणा केली कीं, जर्मनींत ज्यू लोकांच्या "केसालाहि धक्का नाही !"

### नाझींच्या कार्यक्रमाचा रोख

तसें पाहिलें तर, जर्मनीमध्ये ज्यूंची ( म्हणजे यहुद्यांची ) लोकसंख्या 'दर्या मे खसखस' इतकीच आहे. सहा कोटि जर्मनांमध्ये सहा लाख ज्यू म्हणजे हिंदुस्थानांतील पारशी समाजासारखे. पण हिंदूंची सहिष्णुता हिंदुस्थानाबाहेर सांपडणें शक्य नाही! ज्यू हे अनार्य व जर्मन हे आर्य अशा उच्चनीच भावनेमुळे शंभरांत एक या प्रमाणांत असलेल्या ज्यू लोकांचा कांटा काढावा असा आजच्या जर्मनीने चंग बांधला आहे. शाळा, दवाखाने, व्यापार वगैरे सर्व ठिकाणांतून ज्यू लोकांना डोक्यांतील उवांप्रमाणे विंचरून काढावयाचें कंकण हिटलर याने आपल्या हातांत बांधलें आहे. राजसत्ता प्राप्त होण्याचे आधीपासूनच त्याने जर्मन देश 'निर्यहुदी व निःसमाजसत्तावादी' करण्याचा पैजेचा विडा उचललेला आहे. त्याने आपल्या नाझीपक्षाच्या चळवळीचा जो कार्यक्रम पूर्वीच आंखलेला आहे, त्यांत पुढील कलमें स्पष्टपणें लिहिलीं आहेत—

( १ ) जर्मनीमधील लोक जर्मन वंशाचेच असावे. जर्मनीचा नागरिक म्हणून कोणाहि ज्यू इसमाला त्या देशांत राहतां येऊं नये.

( २ ) ता. २ ऑगस्ट १९१४ नंतर जे जर्मनेतर लोक जर्मनींत राहावयास आले असतील आणि जे जर्मनीच्या पैशावर जगत असतील त्यांची देशांतून हकालपट्टी केली जाईल.

( ३ ) जर्मनींतील वृत्तपत्रांवर जर्मन माणसाचें नियंत्रण राहील.

अशा यहुदी-द्वेषाच्या मशाली हिटलर याने आपल्या नाझी अनुयायांच्या हातीं दिल्या आणि त्यांनी त्या निवडणुकीचे धामधुमींत जोराजोराने नाचविल्या. 'खाकी डगलेवाल्या' नाझींनी यहुदी लोकांच्या दुकानांवर निरोधन केलें, त्यांच्या दुकानांच्या खिडक्या फोडल्या आणि त्यांना दुकानें बंद करावयास लावलीं. पोलीस व सरकार यांनी तिकडे डोळे उघडूनहि पाहिलें नाही. मात्र नाझींनी घरांतील व उपाहारगृहांतील ज्यूंच्या पाठी सडकून काढल्या, तरी नाझी पुढाऱ्यांची प्रौढी अशी कीं, जर्मनींत ज्यू लोकांच्या "केसालाहि धक्का नाही!"

### कानांत दट्टे, तोंडांत बोळे !

निवडणूक होऊन पुरता महिना लोटण्यापूर्वीच ज्यू लोकांच्या पाठीमागे बहिष्काराचें चक्र फिरूं लागलें. ता. १ एप्रिलपासून सर्व ज्यू लोकांच्या व्यवहारावर बहिष्कार घालण्याचें नाझी पक्षानें ठरविलें व तो एक दिवस घातलाहि. त्याचप्रमाणे सरकारानेंहि असें एक फर्मान काढलें कीं, यापुढे जर्मनीमध्य 'अनार्य' लोकांना नोकऱ्या मिळणार नाहीत. जर्मन हे 'आर्य' आणि ज्यू हे 'अनार्य' या समजुतीवर हें फर्मान सोडण्यांत आलें. त्याचप्रमाणे 'अ–जर्मन' वाङ्मयहि भस्मसात् करण्यास हिटलरने मागेपुढे पाहिलें नाही. जर्मनीमध्ये 'अ–जर्मन' या नांवाखाली जें प्रचण्ड ग्रन्थ–दहन करण्यात आलें त्यामध्ये 'पश्चिमआघाडीवरील सामसुमी' सारखीं जर्मनांचा पाणउतारा करणारीं पुस्तकेंच होतीं असें नव्हे, तर शिमग्यांतील होळीमध्ये गोवऱ्यांबरोबर सुंदर देव्हारेहि टारगट पोरसोरांनी जाळून टाकावे, त्याप्रमाणे वरील ग्रंथदहनांत कार्ल मार्क्सच्या 'कॅपिटल' सारख्या ग्रंथराजाचीहि आहुति पडली.

वाङ्मय-दहनाप्रमाणे नाझी सरकारानें वृत्तपत्रांची प्रत्यक्ष होळी केली नसली, तरी त्यांची गळचेपी मात्र केली आहे. कांही वृत्तपत्रें अजीबात बंद करण्यांत आलीं तर, कांहीवर जर्मन गृहस्थांचें, सल्लागार म्हणून, नियंत्रण ठेवण्यांत आलें आणि सरकारी नियंत्रणाचा (सेन्सॉरशिप) पाश तर सर्वच वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करीत आहे. बातमीदारावर पिस्तुलांच्या पहाऱ्यांत आपल्या इच्छेनुरूप बातम्या पाठविण्याची सक्ति होत असल्याचें उघडकीस आलें आहे. अशा तऱ्हेने जनतेच्या कानांत दट्टे व तोंडात बोळे कोंबून वर मोठ्या तोंडाने हिटलर अशी बढाई मारतोच आहे कीं, ज्यू लोकांच्या "केसालाहि धक्का नाही"!

### अनार्यांचा उपद्रव !

गेल्या मे–दिनाचे प्रसंगीं हिटलर यानें असे उद्गार काढले कीं, 'आजपासून ५० वर्षांनंतर मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचे नांवसुद्धा विसरलें जाईल!' त्याचप्रमाणे आपल्या कारकीर्दीतील राइशस्टॅगच्या पहिल्या अधिवेशनांत हिटलर यानें आपल्या 'भीमराज्याची' सूचना दिली. त्यानें त्या वेळीं अशी मोघम धमकी दिली कीं, राष्ट्राला उपद्रव करणारे जे लोक आहेत त्यांना आम्हीं निरुपद्रवी करूं. अनार्य म्हणून यहुदी लोकांना आणि राष्ट्रोपद्रवी म्हणून समाजसत्तावादी लोकांना कुटून-भरडून काढण्याचें धोरण हिटलर यानें निश्चित केलें आणि तें अमलांत आणण्यासाठी जादा अधिकारांचीं शस्त्रास्त्रेंहि आपल्या हातीं घेतलीं. 'राइशस्टॅग' मध्ये नाझी पक्षाचें हुकमी बहुमत असल्यामुळे त्यानें ता. २३ मार्चच्या बैठकींत सर्वाधिकाराचा मुकुट आपल्या डोक्यावर चढवून घेतला. चार वर्षेपर्यंत त्याचा हा सर्वाधिकार चालावयाचा आहे. सर्वाधिकार अर्पण करणारा हा ठराव एकाच बैठकीच्या चटावर तीनहि वाचनें होऊन चुटकीसरशीं मंजूर झाला.

### सर्वाधिकाराचा मुकुट

तो पांच कलमी असून त्यांत कायदेमंडळाच्या संमतीशिवाय सरकाराला कायदे करतां यावे आणि त्यांचा मसुदा चॅन्सेलरने तयार करावा अशी योजना आहे. अध्यक्षांच्या अधिकाराला स्पर्श करूं नये असें त्यांत स्पष्टपणें नमूद केलें असलें, तरी चॅन्सेलरनें बनविलेल्या कायद्याला त्याच्या सहीची आवश्यकता नाही. तसेंच एखादें बिल फेटाळण्याचा 'व्हेटो'चा अधिकार त्याला नाही किंवा लोकमत ('रेफरेण्डम्') घेण्याचाहि त्याला अखत्यार उरलेला नाही. अशा प्रकारें अध्यक्षाला मागें सारून हिटलर यानेच आपल्या हातीं राजदंड घेतला आहे आणि तो त्याचे प्रहार ज्यू व कम्युनिस्ट यांजवर स्वैरपणें करीत सुटला आहे. तरी त्याचें जगाला आश्वासन असें कीं, त्यांच्या "केसालाहि धक्का नाही"!

### तुरुंगांतील गर्दी

"लष्करी कायद्याच्या जोरावर एखादा मूर्खहि राज्यकारभार करूं शकेल" असें 'काव्हूर' म्हणत असे. हिटलर याचें 'भीमराज्य' म्हणजे जवळ जवळ लष्करी कायद्याच राज्य! शतकाशतकांमध्ये एखादाच निर्माण होणारा असा शास्त्रज्ञ प्रो. आइन्स्टिन याच्यावर या भीमराज्याची धाड पडली, त्याचे बँकेंतील पैसे जप्त करण्यांत आले आणि त्याचें जीवितहि धोक्यांत आलें. तेव्हा "अशा ज्यू–द्वेष्टया व आततायी जर्मनीचें मी मुखावलोकनहि करणार नाहीं" असें त्या शास्त्रज्ञानें जाहीर केलें व इंग्लंडाचा आसरा धरला. इतर अनेक जर्मनेतर विद्वानांना ही हिटलरशाही चांगलीच भोंवली आहे. एका ज्यू प्रोफेसरानें तर आत्महत्याहि केली! झडत्या-धरपकडी यांचें सत्र चालूच आहे. 'ट्रेड युनियन'ची चळवळ करणाऱ्या ५० जर्मनांना तुरुंगांत टाकण्यांत आलें आणि ५००० कम्यूनिस्टांना तीच वाट दाखविण्यांत आली. ज्यू व कम्युनिस्ट यांचा असा छळ चालू असतांहि नाझी पक्ष छाती वर काढून असें म्हणतो आहे कीं, त्यांच्या "केसालाहि धक्का नाही"!

# महाराष्ट्र प्रांतिक संगीत परिषद

## अधिवेशन ४ थें

सोलापूर येथे महाराष्ट्र प्रांतिक संगीत परिषदेचें चौथें अधिवेशन दक्षिण-हैद्राबादेचे प्रसिद्ध पुढारी श्री. वामन रामचंद्र नाईक यांचे अध्यक्षतेखाली ता. १९, २० व २१ ऑगस्ट सन १९३३ रोजीं 'श्रीराम संगीत विद्यालयातर्फे' भरविण्यांत येऊन तें यशस्वी रीतीनें पार पडलें. परिषदेस मुंबईचे प्रो. नारायणराव व्यास, पुण्याचे प्रो. विनायकराव पटवर्धन प्रो. जगन्नाथबुवा पंढरपूरकर, प्रो. ना. द. ताबेशास्त्री, लाहोरचे प्रो. धुंडिराज पलुस्कर, इचलकरंजीचे प्रो. मिराशीबुवा, पंढरपूरचे प्रो. दत्तोपंत मंगळवेढेकर, मद्रासचे प्रो. टी. आर. ज्ञानसागरराव, व मिस् जयलक्ष्मी आणि प्रो. काळे, प्रो. इंगळे, प्रो. कानिटकर, व नगर, जत, बार्शी आणि बृहन्महाराष्ट्रांतील व बाहेरील अनेक संगीतप्रेमी लोक उपस्थित होते.

परिषदेस ता. १९ ऑगस्ट रोजीं दुपारी ४ वाजता सुरुवात झाली. स्वागताध्यक्ष प्रो. **जी. पी. पटवर्धन** यांनी जमलेल्या सर्व मंडळींचें स्वागत करून परिषदेच्या पूर्वीच्या अधिवेशनांचा थोडक्यांत इतिहास सांगितला. आतापर्यंत परिषदा गांधर्व महाविद्यालयातर्फे अथवा त्यांचे शाखांतर्फे जरी भरविण्यांत आल्या असल्या तरी त्या सर्व महाराष्ट्राच्याच आहेत, हा मुद्दा विशद करून त्यांनी परिषदेसाठीं घटना तयार करण्याची जरूरी दिग्दर्शित केली. तसेच त्यांनी संगीत कलेबद्दल व संगीतशास्त्राबद्दल वेळोवेळीं जे प्रश्न उपस्थित होतील त्यांचा अधिकृत रीत्या निर्णय देण्यासाठीं व कलावंतांना प्रशस्तिपत्रें देण्यासाठीं एक मध्यवर्ती अखिल भारतीय विद्यापीठ स्थापन करण्याची जरूरी परिषदेच्या नजेरस आणिली. श्रीराम संगीत विद्यालयाची माहिती सांगून आजपर्यंत अनेक कारणांमुळे सोलापुराकडून संगीत कलेच्या अभिवृध्द्यर्थ कांहीं कार्य झालेलें नसलें तरी, हल्लींच्या परिस्थितीचा आढावा घेता, व हल्लीं संगीत कला राजाश्रयावर अवलंबून नसून लोकाश्रयावर अवलंबन आहे ही गोष्ट विचारांत घेतां उत्तरोत्तर येथेहि संगीत कलेचा उत्कर्ष होत जाईल अशी आशा त्यांनी प्रदर्शित केली.

## शुभचिंतनपर संदेश

अध्यक्षांची रीतसर निवडणूक झाल्यावर परिषदेचे चिटणीस प्रो. रा. भी. सोमण यांनी परिषदेस आलेले यशश्चिंतनपर संदेश वाचून दाखविले. त्यांत श्री. न. चिं. केळकर, गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे, केसरी-मराठा संस्था, चीफ ऑफ इचलकरंजी, चीफ ऑफ औंध, संपादक चित्रमय जगत्, संपादक किर्लोस्कर-खबर, प्रो. शं. ग. व्यास अहमदाबाद, ललितकलादर्श, यशवंत व नाट्यकलाप्रवर्तक संगीत मंडळया, प्रो. पाध्ये कोल्हापूर यांचे व मुंबई, पुणें, ग्वाल्हेर, अहमदाबाद, जमखंडी, नाशिक, बऱ्हाणपूर, बेळगांव, कलकत्ता, सातारा, बनारस, अलाहाबाद वगैरे महाराष्ट्राबाहेरील ठिकठिकाणच्या संगीत-कलाभिमान्यांचे संदेश प्रमुख होते.

## अध्यक्षांचें भाषण

यानंतर अध्यक्ष श्री. वामनरावजी नाईक यांनी आपलें भाषण वाचून दाखविलें. संगीत कलेची सुरुवात व वाढ कशी झाली हें सांगून संगीत कलेचें महत्त्व अनेक सुप्रसिद्ध कलावानांच्या उदाहरणांनी त्यांनी विशद केलें. संगीताचा हल्लीं ऱ्हास कसा झाला आहे हें सांगून संगीत शास्त्रांत सुधारणा करण्यासाठीं आपले मित्र कै० गायनाचार्य पं. विष्णु दिगंबर पलुस्कर यांनी जे अविश्रांत प्रयत्न केले त्याचा इतिहास त्यांनी निवेदन केला. त्यानंतर गायनांतील आवश्यक गुण व त्याज्य दोषांचें दिग्दर्शन करून "भगवल्लाभनितान्तसौख्य असें संगीत सोडूं नका" असा सूत्रमय उपदेश त्यांनी केला व "तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता॥" या श्रीमद्भगवद्गीतेंतील वचनानें आपलें भाषण संपविलें. नंतर १५ वर्षांचे आंतील मुलांमुलींचें गायनवादनाचे चढाओढीचे कार्यक्रम होऊन परिषदेचे पहिल्या दिवसाचें काम संपलें.

## मंजूर झालेले ठराव

परिषदेनें एकूण ८ ठराव संमत केले. मंजूर झालेले सर्वच ठराव संगीत कलेच्या उन्नतीच्या दृष्टीने महत्त्वाचे असले तरी भारतीय संगीत विद्यापीठाची स्थापना, संगीताचें मराठीकरण, रागांची स्वरनिश्चिति, प्रांतिक संगीत परिषदेची घटना, ताललेखनपद्धतीमधील एकसूत्रीपणा वगैरे विषयांवरील ठरावांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. ठरावाशिवाय परिषदेमध्यें, शिवरामबुवा गुरव, द. के. जोशी, भागवतराव नित्रडकर वगैरेंकडून निरनिराळ्या विषयांवर निबंधवाचन व चर्चा करण्यांत आली. परिषदेबरोबरच परिषदेस हजर असलेले गायन-वादनविशारदांचे जाहीर जलसे झाले. परिषदेचें काम ता. २१ रोजीं संपलें.

### सोलापूर परिषदेचे विशेष

परिषद सालोसाल अखंडितपणें भरविली जावी या दृष्टीनें परिषदेची घटना तयार करण्याबद्दल ठराव प्रथमच या परिषदेंत संमत झाला. या ठरावाने परिषद केवळ गांधर्व महाविद्यालयाचीच आहे, या आक्षेपास चोख उत्तर मिळालें आहे. संगीत कलेच्या सुव्यवस्थित प्रगतीच्या दृष्टीने भारतीय संगीत विद्यापीठासारखी मध्यवर्ती संस्था स्थापन होणें जरूर आहे, या कल्पनेला परिषदेने जोराची चालना दिली. त्याचप्रमाणे संगीताचें मराठीकरण स्वरलेखन व काललेखन यांच्या पद्धतींत एकसूत्रीपणा आणणें वगैरे ठरावहि परिषदेच्या प्रगतिपर धोरणाचे निदर्शक आहेत. परिषदेच्या चिटणिसांपैकीं श्री. सरस्वतीबाई भंदे या एक आहेत. भारतीय संगीत विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधींच्या दुसऱ्या ठरावावरील चर्चेत कुलीन स्त्रियांनी संगीत कलेकडे जास्त लक्ष पुरविण्यावर भर देण्यांत आला होता.

# शस्त्रसंन्यास कीं युद्धाची तयारी?

ऑक्टोबरच्या १६ व्या तारखेस जिनीव्हा येथे मि. आर्थर हेंडरसन यांच्या अध्यक्षतेखाली भरणाऱ्या निःशस्त्रीकरण परिषदेचें अधिवेशन जवळ येऊन ठेपल्यामुळे युरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रांतील मुत्सद्द्यांची मोठी धांदल उडून गेली आहे. आपल्यास निःशस्त्रीकरण नको असें कोणीच म्हणत नाही. उलट प्रत्येकजण मोठ्या आवेशाने या निःशस्त्रीकरणाची तरफदारीच करीत असतो. प्रत्येकाच्या बोलण्यांत फक्त एवढीच मेख अगर एवढाच हातचा राखून ठेवलेला दिसतो कीं, काही विशिष्ट परिस्थितीमुळे आपल्यास शस्त्रास्त्रांचा पूर्णपणें संन्यास करणें शक्य नाही; इतरांनीं मात्र ताबडतोब संपूर्ण निःशस्त्रीकरण करण्यास आपली मुळीच हरकत नाही, इतकेंच नव्हे, तर तें शक्य तितक्या लवकर केलें पाहिजे!

प्रत्येक राष्ट्राची ही स्वार्थी वृकवृत्ति असल्याने युरोपांतील राजकीय वातावरण अविश्वासाने भरून गेलें असल्यास नवल काय? युरोपांतील या राष्ट्रांची एक मात्र खात्री पटलेली आहे कीं, पुढील महिन्यांतील निःशस्त्रीकरण परिषद जर या अविश्वासाच्या अडचणींत एकदा रुतली तर, आज ना उद्या युद्धाचा वणवा युरोपभर पुनः पेटून त्यांत युरोपीय संस्कृति जळून खाक झाल्याशिवाय राहणार नाही. एकीकडे या युद्धाची भीति व दुसरीकडे अविश्वासाची वृत्ति अशा अवघड पेचांत आज युरोपीय राष्ट्रें सापडलीं आहेत. उलटसुलट भावनांच्या गुंतागुंतीने बसलेल्या या निर्गाठीचा मानसशास्त्रदृष्ट्या उकल होण्यास प्रथम या प्रश्नाचा थोडा पूर्वेतिहास पाहिला पाहिजे.

गेल्या महायुद्धाच्या वेळीं "युद्धाची वृत्तीच नेस्तनाबुद करावी म्हणून हें महायुद्ध सुरू झालें आहे" असा नगारा दोस्त राष्ट्रें पिटीत होतीं. महायुद्ध संपलें, जर्मनीचा पराभव झाला व विजयी राष्ट्रांनी वरील ध्येय साध्य करण्याचें साधन म्हणून जित राष्ट्रांना जबरीने शस्त्रसंन्यास करावयास भाग पाडलें. इतकें ठीक झालें. पण जर्मनी, ऑस्ट्रिया, हंगेरी वगैरे जर्मनीच्या बाजूचीं राष्ट्रें, त्यांचीं नखें काढल्यामुळे, हतवीर्य झालीं म्हणून युद्धाच्या वृत्तीची जगांतून थोडीच हकालपट्टी होणार होती? तें ध्येय साध्य करण्यास शस्त्रास्त्रांनी नखशिखान्त सुसज्ज असलेल्या दोस्त राष्ट्रांनीहि आपला शस्त्रसंभार खाली उतरून ठेवणें जरूरीचें होतें. पण महायुद्ध संपून आज पंधरा वर्षें झालीं तरी दोस्त राष्ट्रांच्या निःशस्त्रीकरणाचा पत्ता नाही; इतकेंच नव्हे तर उलट शस्त्रीकरणच एकसारखें वाढत आहे!

शस्त्रास्त्रांची मनुष्यसंहारक शक्तिहि खूपच वाढूं लागली व त्याकरितां बेसुमार खर्चेहि होऊं लागला. निरनिराळ्या राष्ट्रांनी १९३० मध्ये चार अब्ज, बारा कोटि, ऐंशी लक्ष डॉलर्स, म्हणजे जवळ जवळ तेरा अब्ज रुपये, शस्त्रास्त्रांवर खर्च केले असा आढावा राष्ट्रसंघाने काढला आहे. अशी परिस्थिति डोळ्यांपुढे असल्याने शस्त्रास्त्रांना सर्वच राष्ट्रें कंटाळलीं असल्यास आश्चर्य नाही. म्हणून आपण होऊनच

आपसांतील तडजोडीने शस्त्रसंन्यास करणें हाच मार्ग युरोपीय राष्ट्रांना राहिला. १९३२च्या फेब्रुवारीमध्ये ही तडजोड करण्याकरितां शस्त्र-संन्यास परिषद भरली. परंतु तिला यश आलें नाही. आक्टोबरच्या सोळा तारखेला भरणारी परिषद ही वरील परिषदेचीच पुरवणी होय.

या परिषदेंत भाग घेणाऱ्या निरनिराळ्या राष्ट्रांची विचारसरणी थोडीशी पाहिली असतां परिषदेला यश कां येणार नाही हें चटकन् लक्षांत येतें. प्रथम रशियाचें काय म्हणणें आहे तें पाहूं. निःशस्त्रीकरण परिषदेच्या बैठकींत रशियाच्या प्रतिनिधींनी "सर्व राष्ट्रांनी ताबडतोब शस्त्रांचा पूर्ण संन्यास करावा" असा ठराव मांडला व त्याचा आग्रहहि धरला. या म्हणण्याला इतर राष्ट्रांचा आक्षेप हा कीं, ही सूचना पसार व्हावयाची नाही हें रशियाला माहित असताहि आपण मोठे शांततावादी आहों हें जगाला दाखवून आपल्याविषयी लोकांची सहानुभूति मिळ-विण्यासाठी त्याने हें ढोंग आणिलें आहे. शिवाय रशियाचे परराष्ट्रीय संबंध सलोख्याचे असता-हि त्याजपाशी जरूरीपेक्षा अधिकच सैन्य आहे. आपला लोकसत्तेचा प्रयोग अबाधित-पणें सुरू ठेवतां यावा, यासाठी रशियाने शांततेच्या पुरस्काराचें सोंग आणलें आहे, असाहि आक्षेप त्या वेळीं घेतला गेला. परंतु १९३३ च्या प्रारंभीच रशियाने बाल्टिक संस्थानें, पोलंड, झेको-स्लोव्हाकिया, तुर्कस्थान यांच्याशीं 'चढाऊ धोरणाविरुद्ध' तह केले, त्यावरून रशियाने आपला प्रामाणिकपणा प्रस्थापित केला आहे. या आठवड्यांत फ्रान्सने रशियाशीं याच पद्धती-चा तह करण्याचे प्रयत्न चालविले आहेत त्यावरूनहि तीच गोष्ट सिद्ध होते.

प्रेसिडेंट हूव्हर यांनी अमेरिकेतर्फे अशी योजना मांडली होती कीं, सर्वांनीच आपलीं सैन्यें, आरमार, विमानें इत्यादिकांत तेहतीस टक्के काट मारावा. पण ही योजना मुख्यतः इंग्लंड-च्या विरोधाने फसली. जमाखर्चाचें अंदाज-पत्रक करतांना प्रत्येक वर्षी लष्करी खर्च कमी करण्याचें धोरण आंखावें, असें त्यांचें दुसरें म्हणणें होतें. पण तेंहि इतरांस पटलें नाही. मर्यादित स्वरूपांत निःशस्त्रीकरण व्हावें असें अमेरिकेस वाटतें हें खास; पण नवीन तह झाल्याशिवाय अमेरिका आपला हात आंखडता घेण्यास तयार नाही. या आठवड्यांतच सदतीस नवीं लढाऊ जहाजें बांधण्याकरितां अमेरिकेने चार कोटी सत्तर लक्ष पौंड मंजूर केल्याचें वृत्त प्रसिद्ध झालें आहे. निः-शस्त्रीकरणाचा हा चांगलाच पुरावा म्हणाव-याचा! इटालीलाहि निःशस्त्रीकरण पाहिजे. परंतु त्याची अट एकच आहे. ती ही कीं इटालीबरो-बर फ्रान्सनेहि शस्त्रसंन्यास केला पाहिजे; निदान त्याने आपलीं लढाऊ जहाजें तरी नाहींशीं केलीं पाहिजेत. या म्हणण्याचा अर्थ असा कीं, इतर बाबतींत इटाली फ्रान्सच्या बरोबरीचा आहे, फक्त त्याचीं लढाऊ जहाजें तेवढीं फ्रान्सपेक्षा कमी आहेत. फ्रान्सचीं तेवढीं जहाजें कमी झालीं कीं फ्रान्सच्या बरोबरीचा दर्जा इटालीला येईल.

निःशस्त्रीकरणाला अत्यंत नाखुष असें जर कोणतें राष्ट्र असेल तर तें इंग्लंड होय. ब्रिटिश मुत्सद्द्यांचें म्हणणें असें आहे कीं आज-च आपण आपला शस्त्रसंभार प्रमाणाबाहेर कमी केला आहे व आपल्या साम्राज्याचा पसारा पाहतां यापेक्षां शस्त्रास्त्रें कमी करणें शक्य नाही. इतर सर्व राष्ट्रांनीच जर निःशस्त्रीकरणाला कृतीने संमति दिली तर आपणहि कांही प्रमाणांत निः-शस्त्रीकरण अमलांत आणूं. याशिवाय त्याचे तपशीलांतहि मतभेदाचे मुद्दे अनेक आहेत. उदाहरणार्थ, त्याला 'सब-मरीन्स' म्हणजे पाणबुड्या बोटी नाहींशा कराव्या असें वाटतें. पण 'विमानांतून बँाब टाकणें', 'चिलखती गाड्यांचा उपयोग करणें' ह्या गोष्टी मात्र जरूरी-च्या वाटतात! जर्मनीचें म्हणणें मात्र सरळ, स्पष्ट व सप्रमाण आहे. जर्मनीचे प्रतिनिधि म्हणतात कीं, एक तर सर्व राष्ट्रांनीच पूर्णपणें शस्त्रसंन्यास करावा, नाही तर जर्मनीला इतरांबरोबर शस्त्रास्त्रें ठेवण्याचा अधिकार द्यावा. हें म्हणणें मान्य न झाल्यास

जर्मनी लवकरच स्वतः आपलीं शस्त्रास्त्रें वाढवील. मग त्यामुळे नव्या युद्धाचा प्रसंग आला तरी बेहेत्तर. फ्रान्सची विचारसरणी वरील सर्वांपेक्षां अगदीच निराळी आहे. त्याचें म्हणणें कीं, 'स्वसंरक्षणाला जरूर इतकीं शस्त्रास्त्रें आपण ठेवणारच. निःशस्त्रीकरण परिषदेने नवी योजना काढून सुरक्षिततेची हमी दिल्याशिवाय आपण या भानगडींत पडूंच इच्छित नाही! राष्ट्रसंघानें स्वतःचें सैन्य ठेवावें व तें सुद्धा निरनिराळ्या राष्ट्रांत ठेवावें व जरूर वाटेल त्या वेळीं या सैन्याचा उपयोग करून शांततेचें रक्षण करावें.'

युरोपांतील राष्ट्रांची मनःस्थिति अशा तऱ्हेने एकमेकांस विरोधी असल्याकारणाने शस्त्रसंन्यास परिषदेला यश येईल असें वाटत नाही. गेल्या जुलैमध्ये प्रसिद्ध झालेल्या प्रो. कोल यांच्या ग्रंथांत त्यांनी असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, 'युरोपांतील राष्ट्रें जोंपर्यंत राष्ट्रीय श्रेष्ठत्वाच्या आपल्या कल्पना सोडून, आपण सर्वच एका कुटुंबाचे घटक आहोंत, असें मानण्यास तयार नाहीत तोंपर्यंत निःशस्त्रीकरण शक्य नाही.' या त्यांच्या म्हणण्यांत पुष्कळ अर्थ आहे. युरोपांतील राष्ट्रें आज तरी ही कौटुंबिक भावना मान्य करण्यास तयार नसल्यामुळे आपआपलीं शस्त्रास्त्रें वाढविण्याची त्यांची अहमहमिका संपणें अशक्य वाटतें. शस्त्रांच्या अजस्र कारखान्यांचे भांडवलवाले हे मालक असून त्यांना त्यांच्या स्वार्थामुळे निःशस्त्रीकरण नको आहे व त्यांचें प्रत्येक राष्ट्रावर एवढें वजन आहे कीं, त्याच्या कारस्थानांसच अखेर यश येईल व निःशस्त्रीकरण परिषदेचें तारूं या खडकावर फुटून त्याचे तुकडे झाल्याशिवाय राहणार नाहीत असें वाटतें.

गेल्या आठवड्यांत चाललेली मुत्सद्द्यांची धावपळ व पुढील महिन्यांत होणाऱ्या विचारविनिमयाचे ओघ पाहतां, शांतता प्रस्थापित व्हावी म्हणून केले जाणारे निःशस्त्रीकरणाचे प्रयत्न फारसे प्रामाणिकपणाचे आहेत असें वाटत नाही. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, युरोपांतील राष्ट्रें अशा पेचांत अडकलीं आहेत कीं, त्यांची सदिच्छा असली तरी त्यांना शस्त्रसंन्यास करणें शक्य नाही. जर्मनीने घातलेला धाक आणि हिटलर व त्यांचे सहकारी यांनी आपला बरोबरीचा हक्क प्रस्थापित करण्याचा जाहीर केलेला निश्चय विचारांत घेतला तर येती शस्त्रसंन्यास परिषद मोठी कडाक्याची होणार असें दिसतें. हिंदुस्थानाच्या आजच्या परतंत्र स्थितींत त्याला या परिषदेंत स्थानच नाही. तथापि सदर परिषदेंत एक जागतिक भवितव्याचा प्रश्न सोडविला जाणार असल्याने परिषदेच्या कार्याकडे हिंदी लोकांनी लक्ष देणें जरूरीचें आहे. कारण ही परिषद अयशस्वी होऊन शस्त्रास्त्रांच्या संभारास आळा बसला नाही तर पुनः एकवार पूर्वीच्या युद्धापेक्षाहि भयंकर स्वरूपाचें महायुद्ध सुरू होण्याचा संभव आहे.

# पुणें जिल्हा लोकल बोर्डाचे नवीन कर

## ( अध्यक्षांचा खुलासा )

सा. न.वि. वि. आपले पत्राच्या ता. १९-९-३३ चे अंकांत पुणें जिल्हा लोकल बोर्डाने प्रोफेशन टॅक्स बसविण्याचें ठरविलें आहे, त्या बाबत आलेलीं स्फुटें पाहिलीं. त्याबद्दल खालील खुलासा पाठवीत आहें.

पुणें जिल्हा लोकल बोर्डास कर बसाविणें सांपत्तिक स्थितीचे मानाने अत्यंत जरूर झालें म्हणूनच वरीलप्रमाणें प्रोफेशन टॅक्स बसविण्याचें बोर्डाने ठरविलें आहे. नवीन कर बसविण्याचें ठरविल्यांनंतर त्याविरुद्ध तक्रारी व कर भरणारांचें म्हणणें लोकल बोर्ड कायद्याचें कलम १०० अन्वये मागवावें लागते व त्या तक्रारींचा विचार करून नंतर कर अखेर बसविण्यांत येतो.

पुणे जिल्हा लोकल बोर्डाने शिक्षणाचा ताबा घेतल्यापासून मुळीच कर वाढविला नाही. उलट शक्य तितकी काटकसर करून नवीन शाळा सरकारी मदत मिळाली नाही तरीहि काढल्या.

## बोर्डाची कामगिरी

त्याचप्रमाणे बोर्डानें स्वतःचे खर्चानें आयुर्वेदिक पद्धतीचे पांच दवाखाने काढले असून त्यांस सरकारी ग्रँट मुळीच मिळालेली नाही. नुसते दवाखाने चालवूनच बोर्ड थांबलें नाही, तर सुमारें ३० शिक्षकांना प्रथमोपचारकाचें शिक्षण देऊन त्यांच्यामार्फत औषधोपचाराची योजना बोर्डानें अमलांत आणली होती.

याशिवाय देहू, आळंदी, मरकळ, तुळापूर, वढू यासारखे उपयोगी रस्त्यांचे कामहि बोर्डानें सुरू केलें. सिंधमधील जिल्हे सोडून इलाख्यांतील १० बोर्डानी लोकल फंड सेस वाढविला. परंतु पुणें जिल्हा बोर्डानें लोकल फंड सेस वाढवण्याचें नाकारलें आहे.

वर दर्शविल्याप्रमाणे बोर्डाचें काम चालू असतां सरकारकडून येणारी ग्रँटहि फारच कमी होऊं लागली. आयुर्वेदीय दवाखान्यांना ग्रँट नाही. नवीन शाळांना ग्रँट नाही. शिक्षणाचे ग्रँटमध्यें कपात करणें व कांही बाबींवरील खर्च ग्रँटकरिता नामंजूर करणें तसेंच रस्त्याकरिता येणारी मदत कमी करणें अशा रीतीनें बोर्डाचें उत्पन्न फारच कमी होत चाललें आहे व त्यायोगानें नवीन कर बसविणें जरूर झालें आहे.

बोर्डानें रस्त्यांचे दुरुस्तीकडे दुर्लक्ष करून व शक्य तितकी काटकसर करून आपली सांपत्तिक स्थिति सुधारण्याचा प्रयत्न केला. परंतु यापेक्षां रस्त्याकडे जास्त दुर्लक्ष करणें व त्या उपायानें काटकसर करणें शक्य नाही. मोटारींचे वाहतुकीमुळें पूर्वीइतके रस्ते टिकत नाहीत व जनतेचीहि इच्छा रस्ते चांगले असावेत अशी आहे. अशा स्थितींत बोर्डानें रस्ते सुधारण्याकरिता व शिक्षणाचे वाढीकरिता म्हणून नवीन कर बसविण्याचें ठरविलें आहे.

## करवाढीची कल्पना सरकारची

अर्थात् कोणताहि कर बसविला तरी तो जाचक होणारच व त्याचा भारहि मुख्यत्वेंकरून शेतकरी लोकांवरच पडणार. कारण त्यांची संख्या व जास्त आहे. तथापि प्रत्यक्ष शेतीवर कर बसविण्यापेक्षा धंदा करणारावर कर बसविल्यास तो जनतेच्या मोठ्या लोकसंख्येस कमी जाचक होईल असें वाटतें.

वकील, डॉक्टर, कंत्राटदार, दुकानदार, हॉटेलवाले, शिंपी वगैरे धंदेवाल्यांवर सालाचा जास्तींत जास्त १० रुपये व कमींत कमी एक रुपया कर बसविल्यास त्याचा परिणाम शेतकऱ्यांवर विशेष होईल असें आम्हांस वाटत नाही. व ज्याचे योगानें शेतकरी वर्गास त्रास होईल असा कर बोर्डानें गाळला आहे, उदाहरणार्थ बैलगाड्यांवरील कर.

सदर कराची कल्पना बोर्डाची नाही. सदर प्रकारचे कर व त्याबाबद नियम व साधारणपणें आकार मुंबई सरकारनेंच ठरविले आहेत.

सरकारकडून वास्तविक बोर्डास मोठ्या प्रमाणांत ग्रँट मिळण्यास पाहिजे. परंतु तसें होईल असें दिसत नाही. हल्ली तरी सरकारानें आपला खर्च भागवावा व बोर्डानें आपली सोय मिळेल, तितकी ग्रँट घेऊन व कराची वाढ करून भागवावी अशी परिस्थिति आहे. ती बदलेल तव्हां सर्वच मनु बदलेल; परंतु तोंपावेतो जनतेच्या गरजा भागविणें हें बोर्डाचें कर्तव्य आहे. मग त्याकरितां कर बसविणें भाग झाल्यास कायनेलच्या गोळीप्रमाणें तेंहि कर्तव्य बोर्डास करावयास पाहिजे.

## सुशिक्षितांवरील बोजा

बोर्डास कर बसविण्याचे मार्ग फारच थोडे आहेत. सरकारची मदत वाढणार नाही, सुखसोयी पाहिजेत, अशा स्थितींत आपण अगर आपले विद्वान वाचकांपैकीं कोणी जर दुसरी एखादी कराची अगर उत्पन्न वाढण्याची योजना सुचविली तर त्याचाहि योग्य विचार करण्यांत येईल.

माझे स्वतःचे मतानें शेतसाऱ्यावर बसलेला लोकल फंड सेस जास्त वाढविण्यापेक्षा धंद्यावरील कर कमी जाचक होईल. शेतकऱ्यांपेक्षा निरनिराळे धंदे करणाऱ्या सुशिक्षित जनतेवर प्रत्यक्ष कर बसला तर तिचें लक्ष बोर्डाच्या इतर कारभाराकडे लागून त्याचाहि फायदा बोर्डास होईल.

**हरि विठ्ठल तुळपुळे,**
प्रेसिडेंट, जि. लो. बो., पुणें.

# राजा राममोहन राय

## ( शतसांवत्सरिक पुण्यतिथि )

( लेखक—वि. र. रिसबूड, शिक्षक, महाड.)

उद्यां ता. २७ सप्टेंबर १९३३ रोजीं बंगाल्यांतील ब्राह्म समाजाचे एक जनक राजा राममोहन राय यांच्या निधनास शंभर वर्षें पुरीं होतील. एकोणिसाव्या शतकांत हिंदुस्थानांत जे थोर पुरुष निर्माण झाले, त्यांत राममोहन रॉय यांची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे. अर्थात् त्यांच्या शतसांवत्सरिक श्राद्धदिनाच्या प्रसंगीं त्यांच्या गुणांचें व चरित्राचें स्मरण करणें हें प्रत्येक हिंदी माणसाचें कर्तव्य होय.

राम मोहन यांचा जन्म बंगाल्यांत इ. सन १७७४ सालीं झाला. त्यांची आई शाक्त पंथीय घराण्यांतील व बाप वैष्णव पंथीय घराण्यांतील. अशांच्या पोटीं राम मोहन राय यांची तेजस्वी मूर्ति अवतरली. त्या वेळीं शाळाखातें स्थापन झालें नव्हतें. त्यांच्या जन्माच्यापूर्वी एकच वर्ष 'रेग्युलेटिंग ॲक्ट' पास झाला होता. तरी बंगाल्यांत राजदरबाराची भाषा म्हणून फारशी व आरबी भाषांचाच अभ्यास करावा लागे. राम मोहन यांस वयाच्या बाराव्या वर्षी पाटणा येथे सदर भाषांच्या अभ्यासाकरितां जाणें भाग पडलें. वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत त्यांनी तेथे वरील भाषांचा अभ्यास केला. नंतर ते काशीस गेले. तेथे त्यांनी चार वर्षे संस्कृत भाषेचें अध्ययन केलें. वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत त्यांस इंग्रजीचा गंधहि नव्हता. तथापि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, संस्कृत भाषेचा अभ्यास चालू असतांच मूर्तिपूजेबद्दल त्यांना तिटकारा उत्पन्न झाला. त्यामुळे त्यांचा व वडिलांचा बेबनाव होऊन त्यांस कांहीं दिवस घराबाहेर काढावे लागले. तरी त्यांच्या मतांत अंतर पडलें नाहीं. या अवधींत ते तिबेटांत जाऊन त्यांनीं तेथे बौद्ध धर्माचें ज्ञान मिळविलें. कालगतीनें वडिलांचा राग कमी होऊन त्यांनी राममोहन यांस परत बोलाविलें व मुलाचा धार्मिक मतस्वातंत्र्याचा हक्क कबूल केला.

सरकारी नोकरी ही त्या वेळीं मोठ्या मानाची व स्पृहणीय अशी चीज गणली जात असे व ती नोकरी पुढे वाढून आली असतां सहसा कोणी टाकीत नसे. राम मोहन या सर्वसामान्य प्रवृत्तीस अपवाद झाले नाहींत. त्यांनी कलेक्टर किंवा डि. जज यांच्या हेडक्लार्केचीं व शिरस्तेदाराचीं कामें केलीं; व इ. स. १८१४ सालीं ते सेवानिवृत्त झाले.

### सतीच्या चालीचें निर्मूलन

इ. स. १८१४ पासून १८३३ पर्यंतचा १९ वर्षांचा काळ, हाच राममोहन यांच्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचा व कर्तबगारीचा काळ होय. या काळांत ते समाजसुधारक, धर्मसंस्थापक व राजकारणी पुरुष या तीन नात्यांनी चमकले. एकसमयावच्छेदेकरून वरील तीनहि नात्यांनी त्यांनी आपले उद्योग अपूर्व कर्तबगारीनें यशस्वी करून दाखविले. समाजसुधारणेचें त्यांचें पहिलें महत्त्वाचें कार्य म्हटलें म्हणजे, त्यांनी 'बहुपत्नीकत्वावर' उचललेलें हत्यार होय. सतीच्या चालीचें निंद्य स्वरूप उघडकीस आणून ती बंद होण्याबद्दल त्यांनी प्रयत्न केला. सरकारी कागदपत्रांवरून त्यांनी असें सिद्ध केलें कीं, एकट्या बंगालच्या दक्षिणभागांत १४ वर्षांत ८००० स्त्रिया सती गेल्या. गव्हर्नर-जनरल लॉर्ड विल्यम बेंटिंक यांनी सतीची चाल पुढे कायद्यानें बंद केली असली तरी त्याचें खरें श्रेय राममोहन यांसच दिलें पाहिजे. सतत दहा वर्षे या सतीच्या घातुक चालीविरुद्ध त्यांनी चळवळ केली. इ. स. १८३० मध्यें इंग्लंडांत जाऊन पार्लमेंटाच्या कमिटीपुढे सदर चाल बंद करावी किंवा नाही, असा प्रश्न आला असतां स्पष्ट व निर्भीडपणाची साक्ष देऊन त्यांनी आपली चिकाटी जगजाहीर केली. हा इतिहास वाचून सतीच्या चालीचें निर्मूलन होण्यास बेंटिंकसाहेबांच्या औदार्यापेक्षा राममोहन यांची चळवळच अधिक कारण झाली असें दिसून येईल. सतीच्या चालीच्या उच्चाटनाचा कायदा इ. सन १८३६ सालीं पास झाला. तो पाहण्यास राममोहन जगले नाहीत, हें दैवदुर्विलसित होय.

### धर्मसंस्थापना

भरतखंडांत उपनिषत्कालीं एकेश्वरी मताचेंच प्राबल्य होतें. मूर्तिपूजा ही बौद्ध कालानंतर सुरू झाली. बंगाल्यांत राममोहन यांच्या वेळेस कालीदेवीच्या पूजेचा बहिवाट पडलेली होती. परंतु राममोहन हे पडले मूर्तिपूजेचे विरोधी. म्हणून त्यांनी "ईश्वर एकच असून तो अनादि, अनंत, सर्वव्यापक व सर्वनियंता आहे" या औपनिषदीय तत्त्वज्ञानाचा पुनरुद्धार व प्रचार करण्यासाठी कलकत्यास एक मंडळ स्थापन केलें व त्यास 'आत्मीय

सभा' असें नांव दिलें (इ. स. १८०४). "सर्वांनी एकत्र जमावें, प्रार्थना करावी. धार्मिक प्रश्नांचा ऊहापोह करावा, दुसऱ्यानें प्रार्थना चालविली असतां त्यांत एकाग्र व्हावें" हा सदर सभेचा उद्देश होय. तिचें काम चालवीत असतांना पुराणमतवादी स्वधर्मीय विद्वानांबरोबर व कारणपरत्वें ख्रिस्ती धर्मोपदेशकांबरोबर राममोहन यांचे कडाक्याचे वादविवाद होत. त्यांच्या चरित्राचा निम्मा भाग वरील वादविवादात्मक अशा भाषणांनी व लेखांनी भरलेला आहे. याच 'आत्मीय सभे'चें रूपांतर पुढे इ.स. १८१८ सालीं ब्राह्म समाजांत झालें. सर्वशक्तिमान अशा निराकार ब्रह्मस्वरूपाची उपासना करावयाची टाकून अनेक देवतांना भजणें म्हणजे मनांत द्वैत उत्पन्न करणें व अव्यभिचारिणी श्रद्धेची हकालपट्टी करणें होय. यामुळेच आपलें बिनसतें. म्हणून "परमात्मा एकच आहे, हें औपनिषदीय तत्त्वज्ञान व त्यावरील श्रद्धा आणि मनुष्याचा आचार यांत मेळ बसावा" यासाठी त्यांनी स्वतःला ब्राह्म समाजाच्या प्रचारकार्यास वाहून घेतलें. या समाजाच्या स्थापनेच्या काळीं त्यांनी एक व्यवस्थापत्र लिहून ठेविलें आहे. त्याचा सारांश खाली देत आहें.

"सनातन वैदिक धर्म हा सर्व धर्मांत श्रेष्ठ, त्याचें तत्त्वज्ञान उच्च, संस्कृति शुद्ध, परंपरा सात्विक, ज्यांत शंकराचार्यांनी अद्वैत ब्रह्मधर्माची पताका फडकाविली; रामदास, तुकाराम व चोखामेळा यांसारख्या साधुसंतांनी ज्याचा विजयध्वज रोविला असा हा सनातन धर्म असून व्यवहारांत त्याचें तत्त्वज्ञान उपयोगी पडण्यासारखा आचार कोठे दिसत नाही. अद्वैत ब्रह्मज्ञानासंबंधी पोकळ शब्दपांडित्य हवें तितकें आढळून येतें. पण आचरणांत मात्र द्वैतभाव आढळतो. म्हणून सर्वांनी परमात्मा एकच मानून बाह्य पदार्थांनी त्याची पूजा न करतां त्याला अंतःकरण अर्पावें, सर्वांनी भेदभाव विसरून सामुदायिक प्रार्थना करावी व प्रार्थनेंत चित्तैकाग्र्य करून परमात्म्याच्या आनंदमय स्वरूपाचा अनुभव घ्यावा आणि यासाठी सदर समाजाचें कार्य करणारीं माणसें अधिकाधिक जमवून राष्ट्रीय ऐक्य साधावें.

### आध्यात्मिक ऐक्य

अशा रीतीनें ब्राह्म समाजांत जीं जीं माणसें समाविष्ट होतील, त्यांचीं अंतःकरणें एकरूप होऊन जातील. विचारांत व आचारांत भिन्नता दिसणार नाही. व जर कोठ्यवधि प्रजेंत असें धार्मिक पायावर उभारलेलें आध्यात्मिक ऐक्य नांदूं लागलें तर सनातन धर्मास बळकटी येऊन राष्ट्रोन्नति सुलभ होईल. अन्य धर्मीयांसहि या समाजांत घेऊन सर्व धर्मांचें ऐक्य साधितां येईल. तें ऐक्य झालें म्हणजे ईश्वराचें राज्य आलें; पृथ्वीवर स्वर्ग अवतरला. असें होऊन लोक सुखी होतील." अशा स्वरूपाची त्यांची रम्य अशी धार्मिक दृष्टि असून त्या दृष्टीनें ब्राह्म समाजाच्या कार्याकडे त्यांनी आपलें बुद्धिसर्वस्व खर्चिलें.

# 'महाराष्ट्र कविसंमेलनाच्या अध्यक्षांचें भाषण

ता. १६ सप्टेंबर रोजीं नाशिक येथे सरकारी हायस्कूलच्या सभागृहांत महाराष्ट्र कविसंमेलनाचें अधिवेशन **प्रो. माधवराव पटवर्धन** यांचे अध्यक्षतेखालीं सुरू झालें. त्या प्रसंगीं त्यांनी केलेल्या भाषणाचा सारांश पुढे दिला आहेः—

### कवींची अवहेलना

कविसंमेलनाच्या अध्यक्षपदांत आता बहुमान आहे कीं नाही याविषयीं मतभेद असण्याचा संभव आहे. कवीला आज समाजांत मान नाही, किंबहुना कवि हा एक अवहेलनेचा व अनुकंपेचा विषय होऊन बसला आहे. ज्याला कवि म्हणतात असा मीहि एक पद्यकार आहें याची जाणीव ठेवून मी सांगतों कीं कवि हा शब्दच निन्दागर्भ होत चालला आहे. पद्यरचनेच्या बालिश व निष्फळ नादाला लागून विक्षिप्तपणानें वागणारा व कामांतून गेलेला असा एक प्राणी म्हणजे कवि, अशी समजूत सुशिक्षितांचीहि दिसते. एकाचें कवित्व त्याला आचार्यांची जागा मिळविण्याच्या आड आलें आणि दुसऱ्या एकाचें कवित्व त्याची आचार्यांची जागा जाण्याला अंशतः कारणीभूत झालें! 'आपण काव्याच्या नादीं लागून विद्येची हानि करीत आहां' असें नुकतेंच मला वन्द्य असलेल्या एका विद्याव्यासंगी गृहस्थांनी लिहिलें आहे. विनोदी वाङ्मयाचा तर काय कवि हा मूर्धाभिषिक्त विषय झाला आहे. काव्यप्रांतांत पदार्पण केलेल्या एका धाडशी बुद्धिमान तरुणानें आपल्या प्रतिष्ठेचा पायाच कवींची विटंबना करून घातला. काव्य, नाटक, लघुकथा इ. वाङ्मयाच्या विविध प्रांतांत बहुजनांचें चांगलेंच मनोरंजन होईल अशा रीतीनें कवींचा समाचार घेण्यांत येत आहे. कवींची ही अवस्था शोचनीय आहे. कवींचें वैयक्तिक वर्तन-

वैचित्र्य हें जरी या अधःपाताचें एक कारण असलें तरी तें मौलिक व महत्त्वाचें नाहीं.

### अभिरुचीचा अभाव

आधुनिक कविता तुच्छ व असार वाटते, म्हणूनच आधुनिक कवींच्या विषयीं तुच्छता वाटत असावी. प्राचीन कवि हे आधींच प्रथितयश, त्यांतून ज्यांच्याशीं परिचयहि परिमितच असतो, त्यांच्यावर खरें मत देण्याचें कर्तव्य क्वचितच कोणी करतो. त्यांतून प्राचीन कवि हे सदेह कधीं डोळ्यापुढें येत नसल्यामुळें त्यांच्याविषयींची भावना तशी व्यक्त करण्याचा प्रसंग क्वचितच येतो. आता आधुनिक कविता ही उत्कृष्ट व भव्य नाही हें खरें, तथापि तिच्याविषयीं जी तुच्छता लोकांना वाटते तिच्या बुडाशीं अभिरुचीचा अभाव आणि भ्रामक कल्पनांचा प्रभाव अशीं दोन कारणें आहेत.

कवितेचा रसास्वाद मोठ्या प्रीतीने चाखता चाखता सहजगत्या बुद्धीस मध्यम श्रम पडून ग्रहणशक्ति वाढली, शब्दसम्पत्तींत भर पडली, थोडासा नीतिबोध झाला, कांहीं सुभाषितरत्नें स्मृतिमञ्जूषेत ठेवतां आलीं, प्रसंगविशेषीं वेदान्तासारख्या एखाद्या गहन विषयाचें ज्ञान झालें, आणि थोडेंफार पुण्यहि लाभलें असे वाटलें तर या गोष्टी नको आहेत असें नव्हे. पण या गौण हेतूंना प्राधान्य दिलें जाऊं नये. तें दिलें जाऊं लागलें कीं, त्यांच्या सिद्धीसाठीं ज्या कवितांची निवड अपरिहार्यपणें होते त्यांच्यामुळें कवितेविषयीं अरुचि उत्पन्न होते. इतकेंच नव्हे तर काव्याच्या स्वरूपासंबंधी चुकीचे ग्रह दृढमूल होतात. कांहीं भ्रामक कल्पनानी कवींनी आपलें हसें करून घेतलें आहे एवढेंच नव्हे तर आपल्या प्रगतीचा सम्भवहि नष्ट करून टाकला आहे.

### कलेचें कैलास लेणें

वस्तुतः कलेचें कैलास लेणें का अशिक्षित कल्पना कोरूं शकली आहे? प्रतिभेला, उपजत योग्यतेला, योजकतेला जेव्हा खडतर परिश्रमाची जोड मिळते तेव्हाच उत्कृष्ट, भव्य आणि दीर्घायु अशा कलाकृति निर्माण होतात. प्रतिभा ही जरी निसर्गदत्त असते, ती जरी कष्टसाध्य नाही, तरी ती संस्कारक्षम व विकसनशील नसते असे नाहीं. स्वानुभवाने आणि ज्ञानार्जनाने, म्हणजे भिन्नभिन्न स्थळीं व काळीं होऊन गेलेल्या व्यक्तींच्या अनुभवांचें सार ग्रहण करण्याने प्रतिभा परिणत होत जाते. मूळ कल्पना ही कशी सुचते हें गूढ आहे. त्या कल्पनेला मूर्तस्वरूप द्यायला जें कर्मकौशल लागतें तें कष्टाविना, दीर्घ व्यासंगावांचून सिद्ध होत नाहीं. चित्रकार, मूर्तिकार, नृत्यकार, गवयी, कोणीहि दीर्घपरिश्रमावांचून आपल्या कलेंत निष्णात होत नाही. पण कोणी म्हणेल कीं काव्य म्हणजे कांहीं हस्ताक्षर नव्हे, कीं कित्ते गिरवून आणि खर्डे काढून ते वळणदार व्हावें, काव्यरचना तर मनांतच सिद्ध होते, आणि स्फुरित कल्पना ही मूर्तस्वरूप धारण करून बाहेर पडते. तथापि या मूर्तस्वरूपावर मागाहून संस्कार करता येत नाही असे नाहीं. तसेंच ज्या मनांत हें मूर्तस्वरूप सिद्ध होतें ते स्वतःच संस्कारक्षम असल्यामुळें, जननीच्या प्रकृतीचा जसा गर्भावर परिणाम होतो तसाच प्रकार काव्योत्पत्तीच्याहि बाबतींत होतो व कवीच्या मनावरील संस्कार अपरिहार्यपणें कवितेंत उतरतात. कवीच्या अभ्यासाचा, ज्ञानाचा व अनुभवाचा परिणाम कवितेवर असा अप्रत्यक्षपणें पण निश्चयाने होतो. काव्य हें कवीला ज्ञात असलेल्या गोष्टींचेंच एक नवीन रसायन असतें.

### स्फूर्ति व परिश्रम

कोणत्याहि कलाकृतींत स्फूर्ति आणि सहेतुक परिश्रम यांचा सङ्गम असतो कोणत्याहि महाकवीच्या प्राथमिक कविता बघायला मिळाल्यास त्या कमीअधिक अनुकरणपर, कित्येक मिरवणुकीच्या आहेत असें दिसून येईल आणि त्याच्या उत्कृष्ट कवितांची मूळ हस्तलिखित बघायला मिळतील तर त्यांत त्याने मागाहून विचार करून कशा सुधारणा केल्या आहेत हें दिसून येईल. टेनिसनसारखा इंग्रजी कविच काय, पण मी शारदेचाच कानमंत्र अनुवादित आहें अशी प्रौढी मारणारा केशवसुतहि आपल्या कवितांवरून वारंवार हात फिरवितांना दिसतो टॉल्स्टॉयच्या जगद्विख्यात कादंबऱ्यांच्या हस्तलिखितांत मुद्रणापूर्वी कितीतरी फिरवाफिरव व संस्करण होत असे. अनायासें व अनिच्छया सहज स्फूर्तीने जे बाहेर पडेल तेच कलायुक्त असा आग्रह धरिल्यास आपल्या चोखन्दळ मनाचें पूर्णपणें समाधान होईपर्यंत चित्रावरून कुंचली फिरवीत राहाणाऱ्या चित्रकाराच्या चित्रांची कलाभुवनांतून हकालपट्टी करावी लागेल.

दुसऱ्याचा हात कितीहि कोमलकौशल्याने नटला असला तरी त्याने, आपल्या कवनाला स्पर्श करण्यापेक्षां जीव गेलेला बरा, असें म्हणण्यात स्वाभिमान स्पृहणीय आहे यांत शंका नाहीं; पण अशा स्वाभिमानी कवीने सर्वांगीण निर्दोष सौंदर्य हें ध्येय पुढें ठेवावें, स्वतःच स्वतःच्या कृतींचें परीक्षण करावें, दुसऱ्यांच्या टीकांचा योग्य तो विचार करावा आणि आपली कृति कलापूर्ण करावी, म्हणजे मूळ कल्पनेची विकृति तर होणारच नाही, उलट तिचें स्वरूप अधिक

सुंदर होईल. एखाद्याच्या कृतीवर दुसऱ्याने हात फिरवूं नये या सर्वमान्य नियमालाहि कांही प्रतिभासंपन्न लोक अपवाद मानिले पाहिजेत. आदर्शभूत ग्रंथाचेंहि भाषान्तर करतांना वाटेल ते फेरफार करण्याचे अधिकार जर अनुवादक बजावतात तर ज्यांच्या अंगीं वानराचा विनायक बनविण्याचें सामर्थ्य आहे त्यांनी दुसऱ्यांच्या सामान्य नीरस कृतीवरून आपली संजीवनी लेखणी फिरवून तीस सुंदर पृथगात्मता कां देऊं नये? ही आकृति होत नाही, ही स्वतंत्र निर्मितीच असते. मागाहून परिष्करण करण्याची आवश्यकताच पडूं नये अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनी आधीच अशी तपश्चर्या करावी कीं, सहज स्फुरेल अशी जी कृति निर्माण होईल ती क्षीरसागरकन्यकेप्रमाणें जन्मसिद्ध सौंदर्यानें व निर्दोष वैभवानें युक्त अशीच असेल.

### दृष्टीशिवाय दृश्य

धोक्याच्या दोन सूचना येथें देऊन ठेवणें अगत्याचें आहे. ज्या मनःस्थितींत प्रथम कृति निर्माण झाली त्या मनःस्थितींत जर पुन्हा जातां येण्याजोगें असलें तरच किरकोळ शाब्दिक सुधारणा करण्याच्याहि पुढें जावें. नाही तर सुधारणेच्या भरांत विसंगति उत्पन्न होण्याची भीति असते. त्याच प्रमाणे कलावन्तानें जें ज्ञान मिळवावयाचें तें अप्रत्यक्षपणें विविध कृतींच्या तुलनेनें झालेलें बरें. त्यानें अमुक एका मताच्या संप्रदायांत शिरूं नये. सांप्रदायिकांची कृति स्वतंत्र होणें दुर्घट असतें. तरी दुसरी भीति अशी असते कीं, दृष्टि पृथक्करणशील व भेदैकलक्षी झाली कीं, योजककल्पकता नष्ट होण्याचा संभव असतो. या अतिविचिकित्सक प्रवृत्तीचा कल्पनेवरच नव्हे तर रसिकतेवरहि प्रतिकूल परिणाम घडतो. आधुनिक हिंदी गणितशास्त्रज्ञ रामानुजम् यांची स्फूर्ति, कल्पना ही शास्त्राच्या तर्कशुद्ध अभ्यासानें नष्ट तर होणार नाहीं ना अशी भीति त्यांचे गुरु प्रो. हर्डी यांना पडली होती आणि वयाच्या तीस वर्षांपर्यंत ज्या डार्विनला काव्य वाचून मोठा आनंद होत असे त्याला पुढे कवितेची एक ओळहि वाचणें असह्य झालें. आणि शेक्सपियर तर इतका नीरस व असह्य वाटला कीं, त्याला त्याची शिसारीच बसली.

आम्ही स्वतःसाठी लिहितों, इतरांची आम्हांला पर्वा नाही. या आत्मप्रौढींतहि कांही अर्थ नाही. "दृष्टीविना दृश्य करील काय" अशी उलट पृच्छा एका कवीनेंच केली आहे. यश अथवा अर्थ संपादन करण्यासाठी नव्हे तर केवळ आत्मप्रकटन, मन मोकळे करण्यासाठी जरी रचना केली असेल तरी कोणाला तरी ती वाचून दाखवून त्याची युक्त वा अयुक्त सहानुभूति मिळविल्याविना समाधानाची पूर्तता होत नाही. एखाद्याला बहुजनांची स्तुति हवी असेल तर दुसऱ्याला विशिष्ट वर्गाच्या सहानुभूतीचेंच महत्त्व वाटेल. आपल्या डोळ्यांदेखत आपल्या कृतीचें कौतुक झालें नाही तर डोळे मिटल्यावर पुढे केव्हा तरी तें होईल अशी आशा असते. म्हणूनच कवि 'कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी' असे उद्गार काढतो. कविता ही एक हृदयाची हाक आहे. तिला उत्तर मिळावें अशीच प्रत्येक कवीची इच्छा असते. कविता जर वाचली जाऊं शकत नाही तर ती कितीहि चमत्कृतिमय व शब्दसंपन्न असली तरीहि ती असून नसून सारखीच होय.

ज्या भाषेंत कवि रचना करतो ती एकट्याची नसून लोकांची असते. तिचे जर तो हाल करूं लागला तर त्याला लोकांची सहानुभूति कशी मिळणार? त्यानें स्वतःला क्रांतिकारक सुखेनैव म्हणवून घ्यावें. बहुजनसमाज अशिक्षित आहे आणि भाषेस सुसंघटित स्वरूप प्राप्त झालेलें नाही, अशा स्थितींत साधारण लेखकाचीसुद्धा भाषा आदरणीय व अनुकरणीय ठरते. ही स्थिति बदलल्यानंतरहि असामान्य प्रतिभेच्या लेखकाच्या भाषादोषाकडे कृतज्ञ बहुजनसमाज डोळेझांक करतो. इतकेंच नव्हे तर त्याच्या कांही विक्षिप्त वाक्प्रकारांत कदाचित् त्यांतच त्यांचें वैशिष्ट्य असेल अशा भ्रांतीनें अनुकरण होतें. परंतु अशा रीतीनें त्यांच्या विक्षिप्त वाक्प्रयोगांना अल्पायुषी चलन मिळालें तरी तेवढ्यानें भाषेंत फारशी क्रांति होऊं शकत नाही. सार्वत्रिक शिक्षण आणि शान्तता यांच्या काळांत समाज साधारणपणें स्थितिनिष्ठ व नवविद्वेषी असतो, तेव्हा वाङ्मयविरुचींचा स्वैरपणा समाजास थोडा रुचला व पचला म्हणजे लेखनलटपट्यांचाहि पटेल अशी आशा धरणें व्यर्थ आहे. काव्यकिरीटींचीहि सत्ता जेथे मर्यादित आहे तेथे पद्यपाईकांची प्रतिष्ठा ती किती?

### भाषेंत क्रांति

पण याचा अर्थ कवीनें भाषेंत क्रांति घडवून आणण्याचा विचारच करूं नये असा नाही. जेणेंकरून भाषा आपल्या वाढत्या गरजा भागविण्यास स्वतः समर्थ होईल, नवनव्या कल्पना प्रकट करण्यास लागणारे नवनवे शब्द निर्माण करण्याची निसर्ग शक्ति तिच्यांत येईल, अशा रीतीनें त्या भाषेचें संगोपन करणें हें प्रत्येक लेखकाचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य पाळण्यापासून लेखकाचीहि प्रकटनशक्ति वाढेल. काम भागविण्यासाठी येतील त्या शब्दांचा उपयोग करणें हें असंस्कृत व अशिक्षित मनुष्याचें काम आहे. संस्कृतांतून उसना घ्यावयाचा शब्दहि पारखून घ्यावयाला

पाहिजे. बंगाली—हिंदींत मौलिक शब्द Original या अर्थी वापरतात म्हणून मराठींत तसा तो वापरणें न्याय्य होणार नाही. Original हा शब्द इंग्रजींत Origin पासून निघाला असला तरी त्याचा अर्थ अमूल असा आहे ! अर्थात् 'अमूल' हा प्राचीन शब्द असतांना, 'स्वतंत्र' हा रूढ आधुनिक शब्द असतांना 'मौलिक' ( मूलासंबंधी )हा विपरीतार्थानें वापरणें हें असमंजस व हटवादीपणाचें द्योतक आहे. गुरुकिल्ली, गूढवाद, नक्राश्रु, नाट्यगीत इत्यादि शब्द याच मानसिक दास्याचे द्योतक आहेत. कवि हे जर शब्दसृष्टीचे ईश्वर असतील तर त्यांनी अशा शब्दांची निर्मिति व योजना केली पाहिजे कीं जी चिकित्सक व अचिकित्सक दोघांनाहि पटली पाहिजे.थोडीशी दुर्बोधता पत्करूनहि भावेची सेवा कवींनी व साहित्यसेवकांनी करावीच अशी दूरदर्शी लोकांची अपेक्षा आहे.

### अनुकरण व भाषांतर

मराठी कवितेचें पाऊल भावगीतांच्या क्षेत्रांत निःसंशय पुढे पडलें आहे. पण अनुकरणप्रियतेचा प्रभाव जिकडे तिकडे दिसून येतो. उत्कृष्ट भाषान्तरांचीहि मोठी उणीव आहे. उमर खय्यामच्या भाषान्तररूपान्तरांची एक लाटच उसळलेली दिसते. पण इंग्रजी वाङ्मयांतील इतर उत्कृष्ट काव्यांचें भाषांतर करण्याचें काम कोणी अंगावर घेत नाही. इंग्रजी काव्याशीं मराठी कवितेचा संबंध वर्डस्वर्थ-शेलीच्या थोड्या भावगीतांपुरताच आलेला दिसतो. इतर आधुनिक भाषांतील काव्यें तर दूर राहोच, पण इंग्रजी वाङ्मयांतील उत्कृष्ट काव्याचा एकसहस्रांशहि अद्याप मराठींत सुंदर भाषांतराच्या रूपानें येऊं नये हें दुर्दैव आहे. सारेच हौशी लेखक प्रतिभासंपन्न नसतात. सामान्य हौशी रसिक लेखकाला भाषांतरासारखी निःस्वार्थ साहित्यसेवा नाही. अनुकरण करणाऱ्यांना तर भाषांतराची लाज मुळींच वाटूं नये. मी भाषांतरें केलीं आहेत, आणि हा व्यापार नीच वाटत नाही. जें आपल्याला उत्कृष्ट व जिव्हाळ्याचें वाटतें त्याचें भाषांतर करण्यांत खरोखर आनंद आहे. हें अतिशय कष्टाचें काम असलें तरी मुळांत जर आपल्याला मोठा आनन्द वाटत असला तर भाषान्तर म्हणजे एक खेळ वाटतो. कष्ट कमी पडत नाहीत, पण त्याची जाणीव होत नाही. पद्यरचनेची हौस आहे, दांडगा उत्साह आहे तर महाराष्ट्र कवींनी अनुकरण सोडून भाषांतर हातीं घ्यावे.उत्कृष्ट भाषांतरानें अप्रत्यक्षपणे स्वतंत्र वाङ्मयनिर्मितीसहि चालना मिळते.

# मृत्यूच्या मांडीवरचें पुणें

गेल्या जानेवारी महिन्यांत प्लेगच्या रोगानें पुण्याला स्पर्श केला, पण तो कळत न कळत अशा बेताचा; तथापि प्लेग म्हटला कीं तें मृत्यूने सोडलेलें पकडवारंट असा त्याचा दीर्घ अनुभवामुळे सर्वांच्या मनावर धाक बसला आहे. असल्या या जबरदस्त रोगानें पुणें शहराला आठनऊ महिन्यांत आस्ते आस्ते घेरीत आता मृत्यूच्या मांडीवर ठेवलें आहे. पुण्याची व प्लेगची जानपछान निदान सदतीस वर्षांची जुनी पुराणी आहे. एवढ्या काळांत मनुष्यप्राण्यानें प्लेगला शरण येऊन त्याजपुढे हताश होऊन लोटांगणें घालीत न पडतां त्याला युक्तिप्रयुक्तीनें जिंकण्याचा उद्योग आरंभला व त्यांत या घटकेला बरीचशी सरशीहि मिळविली. म्हणूनच प्लेग पुण्याला ग्रासावयास येऊन नऊ महिने झाले असताहि पुणेकर तितके गडबडलेले दिसत नाहीत.

प्लेगच्या पहिल्या स्वाऱ्यांत दोनतीन महिन्यांच्या आंत मृत्यूचा रोजचा आंकडा शेंदीडशेंच्या वरांत जावा व त्याजपुढे शहरवासीयांना भीतीनें पळता भुई थोडी वाटावी. तशांत तो आठनऊ महिने धिंगाणा घालीत बसला तर त्यानें केलेला संहार आठदहा हजारांपर्यंत जावा यांत आश्चर्य काय? परंतु अलीकडे प्रयत्नवादी मनुष्यापुढे प्लेगला हात जोडावे लागले नसले तरी टेकावे लागले आहेत यांत शंका नाही. एवढें मोठें पुणें शहर. त्याची लोकसंख्या एक लक्ष त्रेसष्ट हजार. त्यांतील विद्यार्थ्यांसुद्धा पांचपंचवीस हजार माणसें अलीकडील दोनच महिन्यांत परगांवीं राहावयास गेलीं असतील असें मानल्यास प्लेगनें मेलेल्यांचा आंकडा नऊ महिन्यांच्या मुदतींत पांचशेंपर्यंतहि जाऊं शकला नाही; याचें श्रेय प्लेगच्या मेहरबानीपेक्षा मानवी प्रयत्नांच्या बहादुरीसच दिलें

पाहिजे. सध्या पुणें शहराची स्थिति पाहिली असता प्लेग नरमांसभक्षक राक्षसाप्रमाणे गल्लोगल्लीं क्रूर मुद्रेने आपलें सावज शोधीत हिंडत आहे व त्याने आघाडीवरील मूषकांच्या रांगेची फळी फोडून आपलें भयसूचक निशाण शहरांतील शेंकडों घरांवर रोविलेंहि आहे.

किल्ला काबीज केला कीं त्यांतील लहान-थोर माणसें शत्रूच्या हातीं सांपडावयाचीं. त्याप्रमाणे उंदीर पडूं लागल्यावर त्या घरांतील माणसें मृत्यूच्या पाशांत अडकून त्यांना स्वतःचें सदन हेंच यमसदन वाटावयाचें. पण पुण्यांत पाहावें तों प्लेगच्या कबजांत गेलेल्या कित्येक घरांतहि तेथील माणसें प्लेगचें प्रभुत्व न मानता त्याला धिटाईने तोंड देऊन राहत आहेत व प्लेगहि आपला हा उपमर्द निमूटपणें सहन करीत आहे. याला कारण इनॉक्युलेशनने मनुष्यमात्रास लिहून दिलेलें अभयपत्र. ज्याने टोचून घेतलें तो मनुष्य आपणास सहा महिन्यांपुरता मृत्यूपासून ताम्रपट मिळाला असें समजून मृत्यूच्या मांडीवर निर्भयपणें बसतो व आपले व्यवहार पूर्ववत् पाहतो.

पंचवीस वर्षांपूर्वी इनॉक्युलेशनविषयी जनतेचें मत अत्यंत प्रतिकूल बनलें होतें. ती पद्धति अपूर्णावस्थेंत असल्यामुळे मनुष्याचा प्लेगकडून काय नाश होईल तो निराळाच, पण तो नाश टाळण्यासाठी निर्माण झालेलें हें इनॉक्युलेशनच मनुष्याच्या प्राणाची आहुति घेत नसलें तरी त्याचे हात, पाय, नाक, कान इत्यादि इंद्रियांपैकीं एखाद्या इंद्रियाची शक्ति हरण करून त्यास जन्माचा पंगू बनविल्यावांचून राहत नसे. यामुळे इनॉक्युलेशन हें प्लेगवर सोडलेलें अमोघ अस्त्र न ठरता त्याची गणना प्लेगाच्या साथीदारांतच करावी लागत होती. पण आता तो मनु पालटला आहे. प्लेगच्या लशींत पुष्कळच सुधारणा घडून आल्यामुळे तिजवर बहुजनसमाजाचा विश्वास बसत चालला आहे. प्लेगच्या सांथीस सुरुवात होतांच बहुतेक सर्व ठिकाणचे लोक स्वतःस खुषीने टोचून घेतात. पुण्यांतील यंदाच्या प्लेगांत याचा प्रत्यय विशेषच येऊन एकंदर लोकसंख्येपैकीं ८८ हजार लोकांनी आतापर्यंत टोचून घेतलें आहे. कित्येकांची मजल याहिपुढे जाऊन त्यांनी लखोटा नुसतीं तिकिटें लावून टपालांत न टाकता तो रजिस्टर करून टाकावा त्याप्रमाणे इनॉक्युलेशनचा दुबार बार भरला आहे.

पुण्यांत टोचलेले लोक ८८ हजार व न टोचलेले लोक पाऊण लाख असें धरल्यास टोचून घेतलेल्या ८८००० (दोनदा टोचलेले सोडून) लोकांपैकीं अवघीं ३४ माणसें प्लेगने पछाडलीं व त्यांतील ११च काय तीं दगावलीं. या अकरांतूनहि उशीरा टोचून घेतलेल्यांचे किंवा संशयितांचे मृत्यु वगळले असतां प्लेगच्या खऱ्या कमाईचे रोखठोक मृत्यु सहाच धरावे लागतात. पण उलटपक्षीं बिनटोचलेल्यांची स्थिति पाहा. बिनटोचलेल्यांची संख्या पुण्यांत साधारणपणें पाऊण लाख आहे. यांतील ४६६ माणसें प्लेगने मेलीं. कोठे टोचलेल्या ८८००० लोकांपैकीं प्लेगचे ६ मृत्यु व कोठे बिनटोचलेल्या पाऊण लाख लोकांपैकीं ४६६ मृत्यु! ह्या दोन प्रकारच्या आंकड्यांतील ठळक फरक डोळ्यापुढे ठेवल्यास इनॉक्युलेशनच्या रामबाण गुणाविषयी कोणाचीहि सहजच खात्री पटणारी आहे.

सर्व उपायांत स्थानत्यागासारखा उत्कृष्ट उपाय दुसरा नाही. परंतु तो ज्यांना अनेक सांसारिक अडचणींमुळे साध्य नसेल त्यांनी इनॉक्युलेशनचाच अवलंब करणें भाग आहे. इनॉक्युलेशन करून घेतल्यावर मनुष्य त्या रात्रीं कांही घंटे तळमळतो व दुसऱ्या दिवशीं तापाने हैराण होऊन अंथरुणावर लोळत पडतो. तथापि शास्त्रीय शोधांनी मनुष्याचें एक एक दुःख कमी करीत आणलें असलें तरी उरलेलें थोडें दुःखहि त्याला अधिकच वाटावयास लागावें अशी शास्त्रीय शोधांची गति अनिरुद्ध बनली आहे. त्या दृष्टीने ज्यांना अपमृत्यूचें संकट दोन दिवसांच्या दुखण्यावर भागलेलेंहि सहन करवत नसेल त्यांच्याकरिता जर्मन लस उपस्थित झाली आहे. या लशीचा गुण असा आहे कीं ती ज्या हाताला टोचली तो हात ठणकत नाहीच, पण त्यानंतर दुसऱ्या दिवशीं

तापानेहि मनुष्य बेजार होत नाही. या लशीच्या गुणाविषयी कित्येक डॉक्टरांनी शंका प्रदर्शित केली असली तरी तिचा गुणकारीपणा नाशाबीत ठरविणारा समाधानकारक पुरावा अद्यापि पुढे आला नाही हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

वरील लस बायर मिस्टर ल्युशियस यांच्या कारखान्यांत तयार झाली असून सदर कंपनी इतर अनेक प्रकारच्या लशी बनविते व त्या सर्व लशी आपल्या गुणांनी जगभर प्रसिद्धि पावल्या असल्याचें समजतें. या कंपनीची प्लेगावरील लस एडनमध्ये व इजिप्शियन सरकाराने इजिप्तमध्ये गेलीं तीन वर्षे वापरली आहे व यंदाहि त्यांनी ती मागविली आहे. त्यावरून तिच्या उपयुक्ततेची व लोकप्रियतेची कोणासहि कल्पना करतां येईल. तसेच पुण्यांत व कोल्हापूर आदिकरून इतर शहरांतहि कित्येक डॉक्टरांनी ती लस पुष्कळांना टोचली आहे. त्यांजकडून अगर त्यांच्या गिऱ्हाइकांकडून लशीविरुद्ध जोंपर्यंत तक्रार आली नाही तोंपर्यंत तिच्या गुणाविषयी शंका घेणें अनुचित होय. पण लशीचे वरील दोनहि उपाय प्रतिबंधक स्वरूपाचे होत. तेवढ्यावर मानवी प्रयत्नांची गति कुंठित झाली नसून प्लेगने एखाद्यास पछाडल्यानंतर प्रतिकारक उपायांनी रोग्याचा प्राण मृत्यूपासून रक्षण करण्याचे प्रयोगहि पुण्यांत सांप्रत सुरू आहेत.

मुंबईच्या हॉफकिन इन्स्टिटयूटमधील एक डॉक्टर रा. नायडू यांचा मुक्काम सध्या पुण्यांत रेल्वेस्टेशनाजवळील सांसर्गिक रोगांच्या सरकारी दवाखान्यांत आहे. ते गृहस्थ सदर दवाखान्यांत जे प्लेगने लागलेले रोगी येतात त्यांजवर आपल्या औषधाचा प्रयोग करून पाहतात. या दवाखान्यांतील रोगी बहुधा दवाखान्यावरील डॉक्टरांना अपेश देण्याकरिताच आलेले असतात. कारण प्लेगहॉस्पिटल हें परलोकच्या प्रवासास निघालेल्या मुशाफरांना बोटींत बसावयाचें बंदरच समजलें जातें. त्यांत असाध्य, असहाय्य, गरीब, निराधार अशाच रोग्यांना त्यांचे आप्तइष्ट आणून सोडतात. त्यांपैकीं शेंकडा ७० रोगी सामान्यतः मरतातच, असा डॉ. नायडू यांचा अनुभव आहे. तथापि असल्याहि रोग्यावर आपल्या औषधाचा प्रयोग करून सत्तरांपैकीं तीस रोग्यांना आपण वांचविलें असल्याचें डॉ. नायडू सांगत आहेत.

त्यांचें म्हणणें असें कीं, कोणीहि मनुष्य प्लेगने लागल्याबरोबर त्यास प्लेग हॉस्पिटलमध्ये आणून ठेवल्यास तो वांचण्याचा संभव फार; तशांतून तो सुखवस्तु घराण्यांतला व पोटापाण्याची आबाळ न झालेला असेल तर त्याची रोगांतून मुक्त होण्याविषयी पुष्कळच खात्री बाळगतां येणार आहे. परंतु प्लेग हॉस्पिटलसंबंधाने एकंदर जनतेनेच इतकी धास्ती पूर्वीच घेतली आहे कीं, त्यांत आपल्या जिवलग माणसास खुषीने त्वरित आणून ठेवण्यास सद्यःस्थितींत तरी कोणीहि फारसे तयार होणार नाही. तथापि सांप्रत रोग्याबरोबर त्याच्या नातलगास शुश्रूषेस राहण्याची परवानगी देण्यांत आली असल्यामुळे रोग्याच्या मनाला तितकाच आधार मिळतो यांत शंका नाही. परंतु इस्पितळामार्फत फक्त रोग्यालाच अन्नपाणी पुरविण्याची व्यवस्था आहे. त्याच्या आप्तेष्टांस तेथून अन्न मिळत नाही. यासाठी त्यांच्या अन्नाची तरतूद कोणी परोपकारी व उदारधी लोकांनी केल्यास त्या पुण्यकृत्याची थोरवी विशेष समजली जाईल. डॉ. नायडू यांचे प्रयोग अद्यापि पूर्णावस्थेस पोंचावयाचे आहेत; परंतु सध्याच्या अनुभवावरून ते यशस्वी होण्याचा संभव पुष्कळ दिसतो. त्याप्रमाणे ते यशस्वी ठरून प्लेगने पछाडलेले रोगी मलेरियाच्या रोग्याप्रमाणे इंजेक्शनाने बरे होऊं लागतील त्या वेळीं प्लेगचें उग्र स्वरूप हल्लीहूनहि पुष्कळच मावळल्यासारखें होईल यांत शंका नाही.

यंदाच्या प्लेगमध्ये पुण्यांतील लोक विशेष जागृत झालेले दृष्टीस पडतात. सबंध शहराकरिता डॉ. नायडू यांच्या अध्यक्षतेखाली प्लेगनिवारक कमिटी स्थापन झाली असून पेठानिहाय इतर कमिट्या आपआपलीं कामें करीत आहेत. पुणें म्युनिसिपालिटीनेहि प्लेगदूषित घरांतील लोकांना राहण्याकरिता चतुः-

शृंगी व पर्वती या बाजूस झोपड्या घातल्या आहेत व त्यांतील रहिवाशांकरिता पाण्याची वगैरे सोयहि केली आहे. धर्मसमजुतीमुळे, धर्मभोळेपणामुळे व अज्ञानामुळे पुण्यांतील निंम्या लोकांनी टोचून घेतलें नसल्याकारणाने यंदाचा प्लेग रेंगाळण्याचीं चिन्हें दिसत आहेत. शहरांतील प्लेगचा थोडाबहुत जोरहि याच लोकांच्या वस्तींत आहे. यासाठी त्यांपैकीं कोणाला सक्तीने शहराबाहेर काढण्याची जरूरी वाटल्यास तशा प्रकारचा अधिकार म्युनिसिपालिटीने सरकारापाशीं मागितला आहे.

हे अधिकार मिळाल्यास रँडशाहीचा जुलूम पुण्यावर ओढवेल अशी कित्येक नागरिकांनी आपली समजूत करून घेतली आहे. परंतु म्युनिसिपालिटी ही संस्था नागरिकांची आहे व तिजकडून जुलूम होईल तर तो थांबविण्याचा शेवटचा अधिकार नागरिकांनाच आहे हें लक्षांत ठेवणारास वरील समजुतींतील भ्रामकपणा सहज कळून येणार आहे. आतापर्यंत पुणें म्युनिसिपालिटी-ने प्लेगनिवारणार्थ जो उद्योग केला आहे त्यावरून तिची कळकळ व्यक्त होत आहे. अशा स्थितींत तिने अंगीकारलेलें कार्य यशस्वी व्हावयाचें तर नागरिकांनी तिला सर्वतोपरी सहाय्य करणें हेंच त्यांचें कर्तव्य होय. तें कर्तव्य आतापर्यंत त्यांनी बजावलें त्याप्रमाणे पुढेहि बजावल्यास पुणें शहर प्लेगच्या संकटांतून त्वरित मुक्त होईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

# भविष्यविषयक नियम व पर्जन्य

( ले.—श्री. रा. ज. गोखले, १७ डे.जि. कॉलनी पुणें ४.)

बऱ्याच लोकांची समजूत अशी दिसते कीं, भविष्यविषयक उत्तरांपैकीं निम्मीं उत्तरें यथार्थ ठरलीं म्हणजे तन्मूलक ज्ञान अथवा नियम खरा असला पाहिजे. कांही असेंहि म्हणतात, " शेंकडा ३० मार्क मिळविणारा विद्यार्थी जर पास, ४५–५० चे वर मिळविणारा दुसऱ्या वर्गात पास, व शेंकडा ६० हून जास्त मार्क मिळविणारा विद्यार्थी पहिल्या वर्गात पास समजण्यांत येतो, तर शेंकडा ५०-६० भविष्यें बरोबर आलीं असतां भविष्य सांगणारा व त्याचे नियम पहिल्या दर्जाचे आहेत असें मानलें पाहिजे."

### अज्ञानी माणसाच्या यथार्थ उत्तराचा संभव

वरील विचारसरणी बरोबर नाही. तींत हें गृहीत धरल्यासारखें दिसतें कीं,तज्ज्ञावांचून कोणाहि अन्य मनुष्याने दिलेलीं भविष्यविषयक उत्तरें शेंकडा तीस या प्रमाणांतहि बरोबर येत नाहीत. यासंबंधाने वस्तुस्थिति पुढीलप्रमाणे आहे:—

भविष्यविषयक सर्व प्रश्नांचीं संभाव्य उत्तरें अनंत असतात असें नसून बऱ्याच प्रश्नांचीं संभाव्य उत्तरें नियमित असतात. उदा०— ( १ ) अमक्या दिवशीं पाऊस पडणार कीं नाहीं याचीं उत्तरें दोनच, ( २ ) एखाद्या जागेसाठी आलेल्या तीनच उमेदवारांपैकीं कोण यशस्वी होणार याचीं संभाव्य उत्तरें तीनच, ( ३ ) पत्त्याचे डावांतून न पाहतां घेतलेला पत्ता कोणत्या जातीचा ( चौकट इ० ) निघणार याचीं संभाव्य उत्तरें चारच असूं शकतात. म्हणून अशा प्रकारच्या अनेक प्रश्नांचीं उत्तरें कोणाहि पूर्ण अज्ञानी माणसाने दिलीं तर अशा अनेक ( थोड्या मात्र नव्हे ) उत्तरांमध्ये यथार्थ उत्तरांचें प्रमाण हें ( संभव शास्त्राप्रमाणे ) संभाव्य उत्तरें : १, अथवा $\frac{१}{\text{संभाव्य उत्तरें}}$ या प्रमाणांत आढळून यावयाचेंच. ( ह्या प्रमाणाचा थोडक्यांत निर्देश करतां यावा म्हणून आपण त्यास " संभवशास्त्रानुरूप येणारें प्रमाण" म्हणूं या.)

### शेंकडेवारी नको

वर दिलेल्या तीन प्रश्नांपैकीं पहिल्या जातीच्या प्रश्नांना दिलेल्या कोणाहि अज्ञाच्या अनेक उत्तरांत शेंकडा ५०, दुसऱ्या प्रकारच्या प्रश्नांच्या उत्तरांत शेंकडा ३३, व तिसऱ्या प्रकारच्या प्रश्नांच्या उत्तरांत शेंकडा २५ यथार्थ उत्तरें यावयाचींच. इतकेंच काय, पण शेंकडा ६० किंवा ९० उत्तरें बरोबर येणें हेंदेखील नियमाच्या सत्यतेचें उदाहरण होत नाही. कारण सर्व समूहांत शेंकडा ६० अथवा ९० इष्ट वस्तु असतील, तर इतकीं

उत्तरें यथार्थ ठरणें अपरिहार्यच आहे. उदा०—महाबळेश्वर येथें जून, जुलै महिन्यांत पावसाचे दिवस सरासरीने अनुक्रमें २५ व ३० असल्यामुळे, या महिन्यांतील 'पावसाचे दिवस' म्हणून कांही दिवस कोणाहि अज्ञाने सांगितले, तर त्यांपैकीं अनुक्रमें शेंकडा ७५ व ९५ बहुधा खरे ठरावयाचेच. म्हणन खऱ्या ज्ञानाची कसोटी 'शेंकडा अमुक उत्तरें बरोबर ठरणे' अशी निरपेक्ष नसून ती सर्व वस्तूंमध्ये इष्टांचे प्रमाण किती आहे यावर अवलंबन म्हणजे सापेक्ष आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां भविष्यविषयक अथवा अज्ञातज्ञापक नियमांच्या सत्यासत्यतेसंबंधाने पुढील नियम निघतात:—

## निर्णायक दोन नियम

(अ) कोणाहि अज्ञाने दिलेल्या उत्तरांत यथार्थ उत्तरांचें प्रमाण संभवशास्त्रानुरूप येणाऱ्या प्रमाणाइतकें येणें अपरिहार्य आहे; म्हणन तितकेंच तें आढळून येईल, तर भविष्याधारभूत ज्ञान अथवा नियम सत्य मानतां येत नाही.

(ब) अनेक उत्तरांतील यथार्थ उत्तरांचें प्रमाण संभवशास्त्रानुरूप येणाऱ्या प्रमाणापेक्षा बरेंच जास्त असेल, तर भविष्याधारभूत नियम सत्य (अंशतः अथवा पूर्णपणें) आहे. नियम किती अंशाने सत्य आहे, याविषयीं साधारण नियम पुढीलप्रमाणे सांगतां येईल:—

(क)

$$\text{सत्यता} = \frac{\text{यथार्थ उत्तरें उणें संभवशास्त्रानुरूप उत्तरें}}{\text{सर्व उत्तरें उणें संभवशास्त्रानुरूप उत्तर}}.$$

वरील दोन नियम पावसाच्या दिवसांसंबंधीच्या भविष्यांस पुढीलप्रमाणे लावतां येतील:—

## पावसाळी दिवसांचा संभव व भविष्य

कोणत्याहि ठिकाणीं विशिष्ट महिन्यांतील पावसाळी दिवसांची संख्या स्थूल मानाने ठराविक असते, व ही संख्या सरकारी रिपोर्टांतून दिलेलीहि आढळते. उदा०-पुण्यास जूनमध्ये पावसाळी† दिवस ८·४, जुलैमध्ये १२·४ व ऑगस्टमध्ये ८·३ असतात. यावरून असें दिसून येईल कीं, कोणाहि माणसाने पुण्यांतील पावसाळी दिवस म्हणन या महिन्यांतील कांही तारखा सांगितल्या तर संभवशास्त्रानुरूप, या तारखांपैकीं जूनमध्ये ३०:८, जुलैमध्ये ३१:१२, ऑगस्टमध्ये ३१:८ या प्रमाणात ( म्हणजे सुमारें $\frac{1}{4}$ ते $\frac{1}{3}$ या प्रमाणांत ) खऱ्या ठरण्याचा संभव आहे. म्हणन भविष्यांतील इतक्या तारखांस पाऊस आढळून आला तर हें भविष्य खरें भविष्य ठरत नाही. तें खरें ठरण्यास दिलेल्या तारखांमध्ये पावसाळी दिवसांचें प्रमाण यापेक्षा बरेंच जास्त (सुमारें $\frac{3}{4}$ निदान $\frac{1}{2}$ ) नेहमीं दिसलें पाहिजे.

वरील नियमाचा दुसरा प्रकार पुढीलप्रमाणे होईल:—

सर्व पर्जन्यकालांतील वाटेल ते दिवस यदृच्छेने घेतले तर त्या दिवसामध्ये

$$\frac{\text{त्या दिवसांची संख्या}}{\text{पर्जन्यकाळांतील सर्व दिवसांची संख्या}}$$

या प्रमाणांत वार्षिक पर्जन्यमानाचा हिस्सा (Proportionate quantity) स्थूल मानाने केव्हांहि आढळून यावयाचा; म्हणून दिलेल्या दिवसांत एवढेंच पर्जन्यमान आढळेल तर तें भविष्याच्या सत्यतेचा पुरावा होत नाही.

वास्तव भविष्य साधार व खरें ठरण्यास निवडलेल्या ( म्हणजे पावसाचे दिवस म्हणून दिलेल्या) दिवसांत वर्षांतील सर्व पाऊस जरी आला नाही, तरी त्यांत सर्व पर्जन्यकालांत पडलेल्या पावसाचा तीन-चतुर्थांश भाग आला पाहिजे.

## कसोटींतील एक व्यंग

वरील कसोटी एकंदरीने बरोबर आहे. तथापि तिच्यामध्ये एक व्यंग आहे. तें हें कीं, सरासरी ही अनेक वर्षांतील सर्वसाधारण स्थिति असल्यामुळे एखाद्या वर्षी याहून बरीच भिन्न स्थिति (भविष्यकारास अनुकूल किंवा प्रतिकूल, उदा०—त्या वर्षी पावसाचे दिवस नेहमीपेक्षा जास्त किंवा कमी येणे ) असण्याचा संभव आहे. यामुळे त्या वर्षाचे भविष्यास खरी कसोटी लागणार नाही; मात्र अनेक वर्षांच्या भविष्यांस ही कसोटी बरोबर लागेल. ही अडचण टाळण्यास, दुसरी एक कसोटी आहे; ती पुढीलप्रमाणे:—

नियमाचें नियामकत्व हें कीं, त्याने निवडलेल्या उत्तरांमध्ये इष्टांचें प्रमाण, शेष अथवा वगळलेल्या वस्तूंमध्ये असणाऱ्या इष्टांच्या प्रमाणापेक्षा, जास्त असलें पाहिजे; निदान तें तितकेंच उपयोगी नाही. कारण तें तितकेंच असेल, तर निवडीचे महत्त्व काय राहिलें ? उदा० विहिरीसाठी योग्य म्हणन निवडलेल्या जागीं खणलेल्या विहिरींमध्ये, पाणी लागलेल्या विहिरींचें प्रमाण, निवड न करतां वाटेल त्या ठिकाणीं खणलेल्या विहिरींपैकीं, पाणी लागलेल्या विहिरींच्या प्रमाणाइतकेंच असेल, तर निवड करणारांचें कौशल्य कोठें राहिलें ? अथवा पास होण्यासारखे म्हणन आगाऊ निवडलेल्या

† दहा सेंट किंवा त्यापेक्षा जास्त पाऊस ज्या दिवशीं पडतो त्यास पावसाळी दिवस म्हणावयाचें अशी वायुशास्त्राची परिभाषा आहे.

विद्यार्थ्यांतील प्रत्यक्ष पासांचें प्रमाण, वगळलेल्या विद्यार्थ्यांतील पासांच्याइतकेंच असले, तर निवडीचें महत्त्व काय ? या तत्त्वाप्रमाणे, भविष्याच्या सत्यासत्यतेचे नियम निघतात ते पुढीलप्रमाणेः-

( १ ) निवडलेल्या वस्तूंमध्ये इष्टांचें प्रमाण वगळलेल्या वस्तूंतील इष्टांचे प्रमाणापेक्षा, बरेंच जास्त असेल, तर त्या नियमांत सत्यता आहे; व अर्थात्

( २ ) हें प्रमाण दोहोंमध्ये सारखेंच असेल तर नियम खरा नाही.

( ३ ) निवडलेल्या वस्तूंमध्ये इष्टांचें प्रमाण, वगळलेल्या वस्तूंतील इष्टांचे प्रमाणापेक्षा, बरेंच कमी असेल, तर दिलेल्या नियमाच्या उलट नियम खरा असण्याचा संभव आहे.

### पावसाच्या सत्यतेची कसोटी

वरील नियमांस अनुसरून पावसाच्या नियमाच्या सत्यतेची कसोटी पुढीलप्रमाणे ठरतेः—

(ड) दिलेल्या तारखांस भिन्न भिन्न स्थळीं दिसणारे पर्जन्याचे प्रसंग, वगळलेल्या तारखांस जे दृष्टीस पडतात, त्यापेक्षा पुष्कळ जास्त प्रमाणांत आढळले पाहिजेत; अथवा त्या क्षेत्रांतील कोणत्याहि एका ठिकाणीं इष्ट कालांतील प्रत्यक्ष पर्जन्याचे दिवस, वगळलेल्या कालातील प्रत्यक्ष पर्जन्याच्या दिवसांपेक्षा पुष्कळ जास्त प्रमाणांत पाहिजेत.

(ई) दिलेल्या तारखांस पडणाऱ्या पावसाची सरासरी वगळलेल्या तारखांस पडणाऱ्या पावसाच्या सरासरीपेक्षा, पुष्कळ जास्त पाहिजे; अथवा दिलेल्या दिवसांतील पर्जन्यमान वगळलेल्या दिवसांतील पर्जन्यमानापेक्षा जास्त प्रमाणांत पाहिजे.

(उ) या तुलनेंत स्पष्ट फरक दिसून न येईल, तर पावसाच्या व बिनपावसाच्या दिवसांची निवड व्यर्थ आहे हें उघड आहे.

वरील नियमांत कांही चूक असल्यास तज्ज्ञांनी दाखवावी अशी विनंति आहे.

हे नियम चूक नसल्यास ते पर्जन्याच्या भविष्यास लावून त्यावरून ह्या भविष्यामध्ये सत्यता किती प्रमाणांत आहे हें ठरवून तें मी प्रसिद्ध करूं इच्छितों. तरी ह्या भविष्यांचे पुरस्कर्ते अथवा त्यांचे प्रतिनिधि यांनी, त्यांच्या भविष्याची आंकडेवार तुलना करण्यास त्यांना केव्हा फुरसत होईल हें कळवावें, म्हणजे पावसासंबंधाचे सरकारानें प्रसिद्ध केलेल्या आंकड्यांचे तक्ते घेऊन मी त्यांचे भेटीस येईन.

तुलना करतांना कांही मतभेद झाल्यास त्याचा निर्णय करण्यास इतिहाससंशोधक श्री. द. वि. आपटे हे माझ्या विनंतीस अनुसरून पंच म्हणून येण्यास तयार आहेत. आणखी कोणी पंच बोलावणें असल्यास बोलवावें.

# भागीपत्रकें नोंदण्याची आवश्यकता

(ले.—महादेव धोंडो विद्वांस, एम. ए. एलएल. बी.)

गतवर्षी 'इंडियन पार्टनरशिप ॲक्ट' पास करण्यांत आला. त्यांतील कलम ६९ हें ता. १ ऑक्टोबर १९३३ पासून प्रत्यक्ष अमलांत येणार आहे.

या बाबतींत एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, भागीदारी अगर भागीपत्र हें नोंदलेंच पाहिजे अशी प्रत्यक्ष सक्ती कायद्यानें कोठेंहि केलेली नाही; पण तें न नोंदल्यामुळे जे दुष्परिणाम होतील ते टाळावयाचे असतील तर भागीदारी नोंदण्याशिवाय गत्यंतर नाही. याप्रमाणे अप्रत्यक्ष रीत्या भागीपत्रक नोंदणें आवश्यक झाले आहे. कलम ६९ असें आहेः—

१ व्यक्तिव्यक्तींमधील करारावरून उत्पन्न होणारे अगर भागीदारीचे कायद्यान्वयें प्राप्त होणारे हक्क बजावण्याकरिता भागींतील एका भागीदारास दुसऱ्या भागीदारावर अगर भागीवर जर कोणत्याहि कोर्टांत दावा आणावयाचा असेल तर ती भागी या कायद्याप्रमाणे नेमलेल्या रजिस्ट्रारकडे नोंदली गेली असेल अगर तो भागीदार भागी नोंदण्याचे रजिस्टरमध्ये भागीदार म्हणून दर्शविला गेला असेल तरच त्यास दावा आणतां येईल.

२ कोणत्याहि कोर्टांत भागीतर्फे तिऱ्हाईत इसमाविरुद्ध करारावरून दावा आणावयाचा असेल तर ती भागी अगर भागीतर्फे दावा आणणारे इसम हे भागीदार म्हणून भागी नोंदण्याचे रजिस्टरमध्ये नोंदले गेले असले पाहिजेत.

३ वर पोटकलम १ व २ यांत नमूद केलेला कायदा, Set-off अगर करारावरून प्राप्त होणारे हक्क यांसहि लागू आहे. पण तो खालील अ व ब यांस लागू नाही.

( अ ) भागी तोडण्याचे अगर तुटलेल्या भागीचे हिशोब घेण्याचे अगर मिळकतीची किंमत वसूल करण्याचे दावे, त्याचप्रमाणे

( ब ) नादारांचे कायद्याप्रमाणे नादार भागीदाराची मिळकत वसूल करण्याचा ऑफिशिअल

अवयवजी, रिसीव्हर अगर कोर्ट यांचा हक्क, यांस लागू नाही.

४ (अ) ज्या भागीचे व्यवहाराचें ठिकाण ब्रिटिश इंडियांत नाही अगर कायद्याचा हा भाग ५५ कलमाप्रमाणे लागू नाही अशा, ब्रिटिश इंडियांतील विभागांत आहे, त्या भागीस अगर त्या भागीचे भागीदारास हें कलम लागू नाही.

(ब) ज्या दाव्याच्या अगर सेट-ऑफचे हक्काची किंमत १०० रु. हून जास्त नाही व ज्याचा विषय प्रेसिडेन्सी शहरांचे नादारांचे कायद्याचें कलम १९ प्रमाणे नाही, अगर प्रॉव्हिन्शिअल नादारांचे कायद्याचे परिशिष्टाप्रमाणे नाही त्या दाव्यास त्यांचे हुकुमनाम्याचे बजावणीस अगर तदंगभूत कोर्टातील इतर कामांस बाध येत नाही.

## सक्ती नाही

यावरून असें दिसून येईल कीं, भागी अगर भागीपत्र नोंदण्याची कायद्याने सक्ती नाही. पण तिऱ्हाईत इसमांविरुद्ध दावे लावावयाचे असतील अगर एका भागीदारास इतर भागीदारांविरुद्ध अगर तिऱ्हाईत इसमाविरुद्ध दावे लावावयाचे असतील तर ती भागी रजिस्टर झाली असली पाहिजे. याला फक्त एक अपवाद सांगितला आहे.तो म्हणजे न नोंदल्या गेलेल्या भागीदाराने भागीविरुद्ध, मग ती नोंदलेली असो अगर नसो, भागीतुटीचा दावा आणण्यास हरकत नाही. या कायद्याप्रमाणे ज्यांची देवघेव १००रु.च्या आंत होते अशा छोट्या भागींना नोंदून घेण्याची आवश्यकता नाही व मोठ्या भागींनासुद्धा प्रत्यक्ष दावा लावण्यासारखी स्थिति प्राप्त होईपर्यंत नोंदून घेण्याची आवश्यकता नाही. भागी अगर भागीदार नोंदलेले असो अगर नसो, तिऱ्हाईत इसमांस त्यांचेवर दावा लावण्यास कोणताहि बाध नाही.

या बाबतींत एक गोष्ट प्रामुख्याने लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, कलम २ प्रमाणे हिंदु एकत्र कुटुंबीय व्यापार चालविणाऱ्या संस्था भागीच्या व्याख्येंत येत नाहीत. सबब त्या नोंदण्याची आवश्यकता नाही.

याप्रमाणे विचार करून भागी नोंदावयाची ठरल्यास कलम ५८ प्रमाणे खालील गोष्टींची जरूरी आहे.

## भागीचा तक्ता

ज्या टापूमध्ये भागीचा व्यवहार चालत असेल अगर चालू करावयाचा असेल त्या टापूचे प्रांतिक सरकाराने नेमिलेल्या भागीचे रजिस्ट्रारकडे पोस्टाने अगर हातपोंचीने योग्य तो तक्ता योग्य त्या फीसह भरून पाठविला पाहिजे व त्यामध्ये विशेषतः १ भागीचें नांव, २ भागीचे व्यवहाराचें मुख्य ठिकाण, ३ इतर व्यवहाराचीं ठिकाणें, ४ भागी अस्तित्वांत केव्हा आली अगर कोण भागीदार भागीस केव्हा मिळाला त्याची तारीख, ५ भागीदारांचीं संपूर्ण नांवें व पत्ते, ६ भागीची मुदत, हीं नमूद करून त्यावर सर्व भागीदारांच्या सह्या असल्या पाहिजेत. विशेष मुखत्यारपत्र दिलें असल्यास मुखत्यारांच्या सह्या चालतील. सही करणारे प्रत्येक भागीदाराने योग्य त्या रीतीने प्रतिज्ञा घातली पाहिजे.

कलम ५९ प्रमाणे रजिस्ट्रार यांचे सर्व अटी पाळल्याबद्दल त्यांचें समाधान झाल्यास त्यांची नोंद रजिस्टरमध्ये सादर केलेलें पत्रक दाखल करून घ्यावयाची आहे.

भागीचे नांवांत अगर व्यापाराचे ठिकाणांत बदल झाल्यास वरप्रमाणे सह्या करून रजिस्ट्रार यांजकडे पाठवावयाची आहे. भागीने कोठे नवीन शाखा उघडल्यास अगर जुन्या बंद केल्यास कोणाहि भागीदाराने रजिस्ट्रार यास कळविलें तरी चालेल. त्याचप्रमाणे कोणा भागीदाराने नांव बदलल्यास अगर त्याचा पत्ता बदलल्यास रजिस्ट्रारकडे कळविलें पाहिजे.

कलम ६३ प्रमाणें कांही भागीदार भागी सोडून गेल्यास अगर कांही भागीदार भागीमध्ये नवीन आल्यास त्यामुळे भागीचे घटनेमध्ये होणारे फरक अगर भागी संपुष्टांत आल्यास त्याची माहिती वरील गोष्टी घडल्या त्या तारखेसह, रजिस्ट्रार यांस कळविली पाहिजे. त्याचप्रमाणें एखाद्या अज्ञान व्यक्तीस सज्ञान झाल्यावर भागीदार राहावयाचें नसल्यास त्याप्रमाणे रजिस्ट्रार यांस कळविलें पाहिजे. यावरून दुसरी एक गोष्ट दिसून येईल. ती ही कीं, भागीच्या सर्व शर्ती घालून भागीपत्रें तयार करून तीं रजिस्टर करण्याची आवश्यकता नाही. प्रथम भागी नोंदतांना कलम ५८ प्रमाणें आवश्यक गोष्टी नमूद केल्या म्हणजे झालें. व वेळोवेळीं वर लिहिल्याप्रमाणें होणारे फेरबदल होतील तसे रजिस्ट्रारकडे नमूद केले पाहिजेत. त्याशिवाय इतर बाबतींत भागीदारांनी आपणास लेखी बांधून घेण्याची आवश्यकता व इष्टताहि नाही. कारण कलम ६८ प्रमाणें भागीदाराने सही करून नोंदलेला कोणताहि कागद त्याचेवर निर्विवादपणें बंधनकारक राहील अशी तजवीज कायद्याने केली असल्यामुळे मागाहून अमुक शर्त नमूद करावयाची राहिली किंवा अमुक शर्त दुसऱ्या शर्तीवर अवलंबून होती अगर अमुक शर्तीचा अर्थ असा नव्हता वगैरे कोणत्याहि तक्रारी चालणार नाहीत.

# वऱ्हाडाची वाट काय ?

नवीन राज्यघटनेप्रमाणें अस्तित्वांत येणाऱ्या हिंदी फेडरेशनमध्ये वऱ्हाडाचें स्थान काय, या विचारानें वऱ्हाडमधील जनतेचें मन अत्यंत साशंक झालें आहे. तिची ही साशंकवृत्ति निवारण्याचें काम वास्तविक सरकारचें. पण प्रांतिक कायदेमंडळांत, वरिष्ठ कायदेमंडळांत व पार्लमेंटांत यासंबंधानें प्रश्न विचारण्यांत आले असतां त्यांचीं उत्तरें उडवाउडवीचीं मिळतात. निजामसाहेबांना वऱ्हाड प्रांत परत देण्याचा प्रश्नच उद्भवत नाही, असें सरकारतर्फे एकदा सांगण्यांत येतें. वऱ्हाडचें भवितव्य ठरवितांना वऱ्हाडाच्या लोकांचें मत अवश्यमेव विचारांत घेण्यांत येईल, असें दुसऱ्या खेपेस आश्वासन देण्यांत येतें. हिंदुस्थान सरकार व निजाम यांच्यामध्ये बोलणीं-चालणीं सुरू आहेत, असें तिसऱ्यांदा उत्तर मिळतें. वऱ्हाडच्या लोकांचा यांत संबंधच नाही, असें चवथ्या वेळीं स्पष्टीकरण करण्यांत येतें. अशा स्थितींत सरकारचें खरें धोरण काय आहे याचा पत्ताच लागत नाही.

बुलढाण्याचे वकील रा. कानिटकर हे मुद्दाम पहिल्या गोलमेज परिषदेचे वेळीं वऱ्हाडाची बाजू मांडण्याकरितां विलायतेस गेले होते. रा. रामराव देशमुख हेहि पार्लमेंटच्या जोड कमिटीपुढे साक्ष देण्यासाठी हाच हेतु मनांत धरून गेले होते. तथापि या दोनहि प्रसंगीं सरकारी धोरण ठामपणें समजलें नाही. सरकारी धोरणाचें स्वरूप अशा रीतीनें नीट कळत नसलें तरी, वऱ्हाडाच्या जनतेची बाजू मात्र जितक्या स्पष्टपणें व जोरानें सरकारापुढें यावयास पाहिजे तितकी आलेली आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. मध्यप्रांताच्या प्रांतिक कायदे-मंडळाचा ठराव, सर्वपक्षीय परिषदेचे ठराव व पत्रकें, निरनिराळ्या जाहीर सभा व यवतमाळ जिल्हा संघासारख्या स्थानिक संस्था यांचे ठराव, या सर्वांच्या द्वारां वऱ्हाडी लोकांचें मागणें काय आहे याची सरकारास व जगास सामान्यतः पुरेशी माहिती झालेली आहे.

आमच्या वऱ्हाडी बंधूंची मनःस्थिति आपल्या भावी दर्जाविषयीं इतकी संशयग्रस्त व्हावी याला कारणेंहि तशींच आहेत. आज वऱ्हाड प्रांताची स्थिति फार विलक्षण आहे. तो धड ब्रिटिश प्रांतहि नाही व धड निजामाचा प्रांतहि नाही. तो मध्यप्रांताच्या लग्नांत वऱ्हाडी म्हणून जातो; पण त्याच्यावर सत्ता चालते हिंदुस्थान-सरकाराची. त्यानें मध्यप्रांताकरिता कायदे पास करावे, पण त्याचे स्वतःचे कायदे मात्र व्हाइसरॉयसाहेबांच्या परवानगीनें व्हावे. त्यानें वरिष्ठ कायदेमंडळांत आपला प्रतिनिधि निवडावा पण त्या सुपारीवर अनुमतिदर्शक गंधाक्षता व्हाइसरॉयांनी वहाव्या. स्वतः वऱ्हाडानें करांच्या रूपानें पुष्कळ पैसा सरकाराकडे भरावा, पण तो मुख्यतः मध्यप्रांतांतील मागसलेल्या भागांच्या उद्धारासाठीं खर्च व्हावा. शिवाय निजामाला दर वर्षी २५ लाख रुपयांचा करभार त्याला द्यावा लागतो तो वेगळाच. सारांश, वऱ्हाड प्रांताचा सांप्रत दर्जा काय असें विचारलें तर तो एक उखाणा घातल्याप्रमाणेंच वाटतो. राजाच्या राज्यांत नाही, माळ्याच्या मळ्यांत नाही, खातात पण तोंडीत नाहीत, अशी त्या पुराण विदर्भाची आज अवस्था होऊन बसली आहे.

ही पोरकेपणाची स्थिति कशी पालटावी हा मुख्य प्रश्न आहे. यासाठी वऱ्हाडाच्या लोकांची मागणी अशी कीं, भावी फेडरेशनमध्ये वऱ्हाड हा प्रांत एक स्वतंत्र घटक म्हणून असावा व तो मध्यप्रांतापासून अलग करण्यांत यावा. खरोखर पाहिलें तर या उपायानें हा प्रश्न सरळ व्याजाच्या उदाहरणासारखा सहज सोडवितां येण्यासारखा आहे. पण सरकाराला तो इतक्या सुलभ रीतीनें, भानगडींत न पडता, सोडविण्याची इच्छा नाही. व म्हणूनच तें निष्कारण चक्रवाढ व्याजाच्या गुंतागुंतींत पडत आहे. सरकाराच्या दृष्टीनें मोठी अडचण १९०२

सालच्या निजामाशीं झालेल्या तहाची. या तहाअन्वयें वऱ्हाडप्रांत हिंदुस्थान सरकाराकडे 'पर्पेच्युअल लीज' म्हणजे कायमच्या पट्टयाने देण्यांत आला. ही तहाची धोंडच मुळांत काल्पनिक आहे अशी आमची समजूत आहे. कारण हिंदुस्थान सरकार जर वऱ्हाड प्रांत राज्यकारभारासाठींच निजामाला न विचारता मध्यप्रांताला जोडूं शकतें, तर तोच प्रांत वेगळा व स्वतंत्र कां करूं शकत नाही हें समजणें कठिण आहे.

आतापर्यंत वऱ्हाडप्रांतांत सुधारणा झाल्या त्या बाबतींत निजामाचा सल्ला घेण्याचा प्रश्नच उभा राहिला नाही. मग वऱ्हाड स्वतंत्र करण्यालाच निजामाची परवानगी कशासाठी लागावी? किंबहुना, आम्हांस तर असें वाटतें कीं, वऱ्हाडचें भविष्यकाळांतील फेडरेशनमधील स्थान ठरविण्याचे कामीं निजाम सरकाराच्या संमति-असंमतीचा संबंधच येत नाही. निजामास दरसाल पंचवीस लाख रुपये पोंचले म्हणजे निजामाचा संबंध संपला. वऱ्हाडाच्या राज्यव्यवस्थेविषयी त्यास बोलण्याचें प्रयोजन नाही. तो प्रश्न सर्वस्वीं हिंदुस्थान सरकाराचा व वऱ्हाडांतील जनतेचा आहे. परंतु ब्रिटिश सरकार व निजाम सरकार या जनतेच्या हक्काचें अस्तित्वच कबूल करण्यास तयार नाहीत. जणुं काय वऱ्हाडाचे लोक हा दुकानदार व गिऱ्हाईक यांमध्ये दिला-घेतला जाणारा मुका मालच!

महायुद्धानंतर जनतेचा स्वयं-निर्णयाचा हक्क सुधारलेल्या राष्ट्रांत मान्य झाला आहे. १८७८ सालीं त्या वेळचे भारतमंत्री लॉर्ड सॅलिसबरी यांनी हिंदुस्थान सरकारास पाठविलेल्या आपल्या पत्रकांत वऱ्हाडाच्या प्रश्नासंबंधी लिहिताना 'हा अब्रूचा, पैशाचा अथवा वैयक्तिक उपभोगाचा प्रश्न नाही; तो वीस लाख लोकांच्या जीवितावरील व मालमत्तेवरील ताब्याचा प्रश्न आहे,' असें नमूद करून ठेवलें आहे. आता ती लोकसंख्या वीस लाखांवरून पसतीस लाखांवर गेलीआहे.त्यामुळे अर्थात् लोकांच्या हितसंरक्षणाच्या मुद्याचें महत्त्व अधिकच वाढलें आहे. स्वतंत्र प्रांत बनविण्यासाठी सायमन कमिशनाने ज्या अटी घालून ठेवल्या आहेत त्या वऱ्हाडाच्या बाबतींत पाळल्या जात आहेत. वऱ्हाड हा एक लहान एकजिनसी प्रांत आहे. त्याची सांपत्तिक स्थिति इतकी समाधानकारक आहे कीं, तो स्वतःच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करून मध्यप्रांताच्या सरकाराला मदत म्हणून दरसाल मोठी रक्कम प्रायः खंडणीप्रमाणे देतो. ही रक्कम १९१२–१३ सालीं एक कोटीचे वर गेली होती व १९३० सालीं साठ हजार रुपयांपेक्षा अधिक होती. शिवाय वऱ्हाडांतील जनतेचें राजकीय मागणीसंबंधी जवळ जवळ ऐकमत्यच सिद्ध झालें आहे.

अशा स्थितींत हिंदुस्थान सरकाराने वऱ्हाडाचें म्हणणें मान्य न करणें अन्यायाचें आहे. सिंध प्रांत आपला स्वतंत्र संसार करूं शकतो, ओरिसा प्रांत आपलें मालकीचें घर उभें करूं शकतो. पण वऱ्हाड प्रांत मात्र आपलें वेगळें बिऱ्हाड चालवूं शकणार नाही असें सरकार कां मानतें हेंच समजत नाही. लहान लहान घटकांचें देखील फेडरेशन होऊं शकतें हेंहि अमेरिका, स्विट्झरलंड व इतर फेडरेशन्स यानी जगास सिद्ध करून दाखविलें आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील किंवा संस्थानी भारतांतील कोणत्याहि भागाची नाही अशी अवर्णनीय व चमत्कारिक स्थिति एकट्या वऱ्हाडाची करून ठेवण्यांत आली आहे. ही स्थिति लवकर दुरुस्त करणें अगत्याचें आहे. आहे या परिस्थितींत साहाजिकच वऱ्हाडांतील जनता फार असंतुष्ट आहे. भावी फेडरेशनमध्ये वऱ्हाडाला मानाची स्वतंत्र जागा मिळाल्याखेरीज हें असंतोषाचें सल नष्ट होणार नाही व तें नष्ट झाल्याखेरीज त्या प्रांताचा पुढील राज्यकारभारहि सुखाने चालणार नाही.

वऱ्हाडाला अशा गोंधळाच्या स्थितींत ठेवण्याचा ब्रिटिश सरकाराचा उद्देश एकच दिसतो. तो हा कीं, निजामसाहेबांना खूष राखावें व कांही ना कांही करून त्यांना फेडरे-

शनमध्ये येण्यास अनुकूल करून घ्यावें. पूर्वी लॉर्ड रेडिंग व निजाम यांचा जो पत्रव्यवहार झाला त्यांतील रेडिंग यांच्या स्पष्टोक्तीने वऱ्हाड परत देण्याच्या प्रश्नास कायमचें कुलूप लागलें. आता तो प्रश्न पुढे येणेंच गैरलागू आहे. अशी एक टूम काढण्यांत आली आहे कीं, मध्य-प्रांताच्या गव्हर्नराला निजामांनी औपचारिक रीतीने वऱ्हाडाचे गव्हर्नर म्हणूनहि नेमावें. कोणी असें सुचविलें आहे कीं, वऱ्हाडांत ब्रिटिशांचें यूनियन जॅक फडकावयाचें त्याच्या जोडीला निजामसाहेबांचें निशाणहि फडकविण्यांत यावें. अशा रीतीने निजाम-साहेबांना स्वतःला विहिणीचा मानपान ब्रिटिश सरकाराकडून जो करून घ्यावयाचा असेल तो ते खुशाल घेवोत. ब्रिटिश सरकारालाहि निजामाचा बडेजाव काय वाढवावयाचा असेल तो ते बेलाशक वाढवोत. वऱ्हाडाच्या जनतेला किंवा हिंदुस्थानांतील इतर लोकांनाहि त्याच्याशीं कांही एक कर्तव्य नाही. वऱ्हाडाच्या लोकांना निजामसरकारच्या राज्यांत पुनश्च सामील होण्याची बिलकुल इच्छा नाही. इतर प्रांतां-प्रमाणे स्वतःच्या हक्काने व स्वाभिमानाने भावी फेडरेशनच्या घटकांच्या पंक्तींत पाटावर बसतां आलें पाहिजे, असें वऱ्हाड प्रांताचें एकमुखी मागणें आहे. या नंतरच्या घटनेंत, किंचित् पान तिरपें करून, वऱ्हाड आता बसण्यास तयार नाही.

ब्रिटिश सरकाराला निजामसाहेबांना कोठून तरी संतुष्टच करावयाचें असेल तर त्यांच्या-जवळ, वऱ्हाडचें मोहरें बळी देण्याखेरीज, इतर पुष्कळ मार्ग नाहीत असें नाही. त्यांचा त्याने सुखेनैव अवलंब करावा व निजाम-साहेबांना फेडरेशनमध्ये ओढून, त्यांच्या नेमलेल्या सभासदांमार्फत आपल्या हातची सत्ता लोकानियुक्त सभासदांच्या हातीं न जाऊं देण्याचा आटोकाट प्रयत्न करावा. तें कांही असलें तरी, एकीकडे हिंदुस्थान सरकार वऱ्हाडा-शीं वागतांना सावत्रपणा दाखवीत आहे; दुसरी-कडे घरीं आलेल्या पण परवश अशा श्रीमंत बहिणीला स्वार्थी भावाने राबवून घ्यावें त्या-प्रमाणें मध्यप्रांत आपली अडचण वऱ्हाडाच्या साहाय्याने निभावून नेत आहे; व तिसरी-कडे वऱ्हाडाचें अवदान आपल्यास मिळालें तर हवेंच आहे असें म्हणून निजाम-साहेब वऱ्हाडाकडे नजर टाकीत जीभ चाटीत आहेत! ही विचित्र व अस्पृहणीय स्थिति मात्र वऱ्हाडाला नवीन घटनेंत क्षणभरहि खपणार नसल्यामुळे, 'वऱ्हाडाची वाट काय', असा ब्रिटिश सरकारास वऱ्हाडी जनतेचा रोख-ठोक सवाल आहे.

# स्फूट सूचना

१ मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साईक्स यांनी गेल्या आठवड्यांत बेळगांवास भेट देऊन तेथील अनेक संस्थांकडून व समाजांकडून मानपत्रें मिळ-विलीं. सर फ्रेड्रिक यांची कारकीर्द आता संपत आली असल्यामुळे जी लोकप्रियता त्यांना आपल्या पांच वर्षांच्या अमदानींत लाभली नाही ती संपादण्याचा त्यांनी इतक्या उशिराने अट्टाहास चालविला आहे. ते आपल्या सध्याच्या उपक्रमांत लोकांकडून स्वतःची आरती करून घेतच आहेत व त्याचप्रमाणे बहुजनसमा-जाला सरकाराच्या कह्यांत आणण्याच्याहि ते उद्योगांत आहेत. बेळगांवास मराठे लोकांनी, अस्पृश्यांनी व मुसलमानांनी त्यांना मानपत्रें दिली. त्या वेळीं त्यांचें हें धोरण अगदी उघडें झालें. त्यानंतर त्यांनी ता. ३० रोजीं गांव-गन्नाच्या पाटील लोकांचा दरबार भरविला. त्यांत त्यांचा उद्देश अधिकच स्पष्टपणें दिसून आला. महाराष्ट्रांत मराठे व महार या वर्गांची संख्या फार मोठी आहे. कर्नाटकांत मराठे संख्येने कमी असले तरी महारांची संख्या जवळजवळ महाराष्ट्राइतकीच कर्नाटकांतहि आहे. राष्ट्रीय सभेच्या चळवळीचा या दोन वर्गांवर साहजिकच विशेष परिणाम होण्या-सारखा असून कायदेभंगाच्या मोहिमेंत कांही मराठे तुरुंगांतहि गेले. महारांत तितकी जागृति नसली तरी राष्ट्रीय सभेने अलीकडे अस्पृश्योद्धाराचें काम हातीं घेतल्यापासून इतर अस्पृश्यांप्रमाणे महार-

वर्गहि राष्ट्रीय सभेच्या कक्षांत जाण्याचा रंग आहे. यासाठी मराठे व अस्पृश्य यांना चुचकारून, आपल्या बाजूस वळवून राष्ट्रीय सभेचें बळ मोडून टाकण्याच्या प्रयत्नांत गव्हर्नरसाहेब आहेत.

---

२ मराठे लोक लढवय्ये आहेत हें गव्हर्नरांना माहीत आहे. त्यामुळे मराठ्यांच्या शौर्याची ते वारंवार तारीफ करतात. ती तारीफ त्यांच्या अंगचा मर्दुमकीचा गुण वाढावा यासाठी नसून स्तुतीनें खूष होऊन मराठे लोक आपल्या तंत्रानें वागूं लागावे यासाठी आहे. गव्हर्नरांनीं पुण्यांतील आपल्या भाषणांत शिवाजी लष्करी शाळेच्या नांवांतील 'लष्करी' या शब्दास आक्षेप घेऊन नापसंती व्यक्त केली. पण तेवढ्यावर न थांबता बेळगांवास गेल्यावर त्यांनी आपल्या लष्करी द्वेषाची याहि पुढे मजल नेली. त्यांच्या भाषणांत बाह्यतः आव होता मराठ्यांच्या स्तुतीचाच, पण अन्तर्यामी मात्र द्वेष भरलेला दृष्टीस पडत होता. ते म्हणाले, 'मराठ्यांनी महायुद्धांत रणांगणावर शौर्य गाजविलें पण मागाहून आपल्या तलवारी मोडून त्यांजपासून नांगराचा फाळ बनविण्याची करामतहि त्यांना दाखवितां आली.' गव्हर्नरसाहेबांचे काय पण हे उद्गार! या उद्गारांना जर गौरवाच्या सदरांत घालावयाचें तर निंदा कोणती हें ठरविणें खरोखरच कठिण आहे. बरें, अशा शूर मराठ्यांनी करावें काय, तर शेती! जी जमीन त्यांच्याच मतें नापीक आहे, तिच्यांतील शेती! असली शेती करून मराठ्यांनी उपाशी मरावें हीच कां गव्हर्नरांची इच्छा? त्यांना मराठ्यांविषयीं खरा अभिमान व कळकळ वाटत असेल तर त्यांची आर्थिक उन्नति घडवून आणण्यास त्यांनी मदत करावी. पण बोलघेवडेपणांतच मुत्सद्दीपणा समजणाऱ्या गव्हर्नरसाहेबांच्या हे लक्षात यावें कसें?

३ मुंबई कार्पोरेशनच्या डी वॉर्डाची पोट निवडणूक लवकरच होणार असून तिच्यासाठी जे उमेदवार पुढे आले आहेत त्यांत रा. पी. बाळू यांची गणना प्रामुख्याने केली पाहिजे. रा. बाळू यांना कार्पोरेशनच्या कामाचा अनुभव असून त्यांची सरकारानें अस्पृश्यवर्गाचे प्रतिनिधि या नात्यानें कॉर्पोरेशनमध्यें नेमणूक केली असताहि त्यांनी आपले वर्तन राष्ट्रीय बाण्यास शोभेल असेंच ठेवलें होतें. आता या खेपेस सरकारतर्फे नेमून न येता डी वॉर्डाच्या सर्वसाधारण मतदारांकडून निवडून येण्याची त्यांची इच्छा आहे, यांत त्यांची लोकसेवा करण्याची स्वतंत्र वृत्तिच दिसून येते. बाळू हे क्रिकेटपटुत्वाच्या गुणानें पूर्वीच लोकप्रिय झाले असून, त्यांना लोकसेवा करण्याची ही सुसंधि लाभल्यास ते आपल्या पूर्वीच्या लोकप्रियतेंत अधिक भरच घालतील यांत शंका नाही. बाळू यांस विशेषतः हिंदूंनी निवडून देण्यानें अनेक कार्यें साधणारीं आहेत. ते अस्पृश्य वर्गांतील एक प्रमुख पुढारी आहेत. त्यांनी राजा-मुंजे-करारास व संयुक्त मतदारसंघास पाठिंबा दिला आहे. त्यामुळे त्यांच्या निवडणुकीनें हिंदूंतील स्पृश्य व अस्पृश्य या पोटभेदांतील सहकार्य व सलोखा वाढण्यास मोठीच मदत होणार आहे. मुंबईतील मध्यम व गरीब स्थितींतील भाडेकऱ्यांना घरभाडें बरेंच अवजड झालें आहे. तें कमी करण्यासंबंधानें मुंबई कार्पोरेशनमध्यें प्रश्न उपस्थित झाल्यास रा. बाळू हे आपलें धोरण भाडेकऱ्यांविषयीं सहानुभूतीचेंच ठेवतील असें समजण्यास हरकत नाही. जातवारीच्या तत्त्वाला विरोध करतांना नेहमीं असें सांगण्यांत येतें कीं, संयुक्त मतदार संघांतूनहि योग्य ते अस्पृश्यादि म्हणजे अल्पसंख्याकांचे पुढारी निवडून येऊं शकतील. तरी हें म्हणणें खरें करून दाखविण्याची हीच संधि असून मुंबईचे नागरिक ती दवडणार नाहीत अशी आम्हास उमेद आहे.

# बेळगांवांत पोलिसांची दंडेली

**केसरीकर्ते यांस**—सा. न. वि. वि.

(१) मुंबईचे गव्हर्नर बेळगांवीं ता. २९-९-३३ दिवशीं यावयाचे होते. ता. २८-९-३३ रोजीं सायंकाळीं बेळगांव येथे राहाणारे श्री. कुलकर्णी व काळे यांना पोलिसांनी अटक करून नेलें; व त्याच दिवशीं रात्रीं श्री. उंडाळे यांसहि पोलिसांनी त्यांचे घरीं जाऊन अटक करून नेलें. या तिघांनाहि शहापूर येथील (सांगली संस्थान) पोलिसांच्या ताब्यांत देण्यांत आलें. शहापूर पोलिसांनी त्यांना ता. ३०-९-३३ रोजीं दुपारीं ३-२३ च्या गाडीने सांगलीस रवाना केलें. वरील तिघेहि तरुण बेळगांवीं राहात असून बेळगांव शहरांत व जिल्ह्यांत फिरून ते सार्वजनिक काम करीत असत. म. गांधी यांच्या २१ दिवसांच्या गेल्या उपोषण-प्रसंगीं त्यांनी जिल्ह्यांत पायीं प्रवास करून सुमारें ४० खेड्यांत अस्पृश्यतानिवारणासंबंधाने प्रचारकार्य केलें होतें.

ही अटक कां झाली व ती बेळगांवीं होऊन त्यांना शहापूर पोलिसांच्या ताब्यांत कां दिलें ? या कामीं संस्थानची मागणी होती किंवा कसें ? ती रीतसर होती किंवा काय तें वगैरे कांहीच समजलें नाही; पण त्यापूर्वीच त्यांची उचलबांगडी सांगलीस करण्यांत आली ती संस्थानी दिवाणांच्या तारेवरून अशी बोलवा आहे.

मुंबई प्रांताचे अधिपति दौऱ्यावर निघाले म्हणजे 'कायदा'हि त्या त्या भागांतून पळ काढीत पुढे धावतो कीं काय, न कळे ! सांगलीच्या अधिकाऱ्यांनी तरी हीं कृत्यें विचारपूर्वक केलीं आहेत कीं परप्रेरणेने केलीं आहेत तें कांहीच समजण्यास मार्ग नाही. नाही तर "संन्याशाकडून परस्पर साप मारावयाचा" या पुराण्या न्यायाला संस्थानी अधिकारी बळी पडले असण्याचा संभव.

(२) येथील नवीन आर्टस् कॉलेजचा नामकरण समारंभहि मुंबई गव्हर्नरांच्या हस्तेंच ता. २९-९-३३ रोजीं झाला. त्या प्रसंगींहि असाच एक शोचनीय प्रकार घडला. या समारंभाच्या ठिकाणीं प्रवेश मिळण्यासाठी कॉलेजच्या विद्यार्थ्यांकरिताहि कॉलेजच्या अधिकाऱ्यांनी पास काढलेले होते, व ते इष्ट विद्यार्थ्यांसच देण्यांत आले होते. पास दाखवून आत प्रवेश मिळे. या प्रवेश मिळालेल्या विद्यार्थ्यांत आठ जणांच्या डोक्यावर खादी टोप्या होत्या तरी त्यांना प्रवेश मिळाला व ते विद्यार्थ्यांत जाऊन बसलेहि. पण नंतर एका पोलीस अधिकाऱ्याचें चित्त त्या खादी टोप्या पाहून खवळलें. व त्याने विद्यार्थ्यांना 'टोप्या काढून टाका' नाही तर चालते व्हा; तसें न कराल तर धक्के मारून (Physically) घालवून देऊं असें धमकावून सांगितलें. विद्यार्थ्यांनी "खादीच्या टोप्या डोकीवर असतांनाच आम्हांस आंत येऊं दिलें; आतां जा म्हणून सांगणें अपमानकारक आहे; गांधी टोपी घातली तर बिघडतें कोठें ?" वगैरे समजून सांगितलें. पण त्या पोलिसाने त्यांना ही जागा वाद घालीत बसण्याची नव्हे, टोप्या काढा नाहीतर चालते व्हा. तुम्हीं तसे न जाल तर तुम्हांला जबरदस्तीनें घालवून देऊं असें पुनः सांगून जवळच असलेल्या एका कॉलेज अधिकाऱ्याकडून विद्यार्थ्यांना पुनः तसेंच सांगविण्यांत आलें. तेव्हा आपल्याच कॉलेजच्या समारंभाच्या प्रसंगीं गोंधळ माजविण्यापेक्षा समारंभ सोडून जाणेंच विद्यार्थ्यांनी पसंत केलें !

श्री. विठ्ठलभाई पटेल यांनी खादीची टोपी बादशहांच्या मुलाखतीच्या वेळीं घातली होती. त्याच बादशहांच्या एका बड्या नोकराच्या छोट्या नोकराने त्याच खादी टोपीवर इतका रोष करावा हें आश्चर्य होय !

**एक माहितगार.**

# हंगेरीच्या जांबोरींतील अनुभव

( आमच्या प्रवासी बातमीदाराकडून )

लंडन, ता. २३–९–३३

## अध्यक्ष बेडन पॉवेल

गोडोलो येथून पाठविलेल्या मागील लेखांत जांबोरीची सामान्य माहिती व व्यवस्था यासंबंधी लिहिलें होतें. जांबोरीच्या पंधरवड्याच्या कार्यक्रमांत आंतरराष्ट्रीय स्काउट परिषद ही एक महत्त्वाची बाब होती. त्या परिषदेला प्रत्येक राष्ट्रांतील प्रमुख व्यक्तींना हजर राहाण्याची विनंति करण्यांत आली होती. परिषदेचे अध्यक्ष लॉर्ड बेडन पॉवेल हे होते. प्रथम निरनिराळ्या राष्ट्रांतून आलेले अभिनंदनपर संदेश वाचून दाखविण्यांत आले. नंतर लॉर्ड बेडन पॉवेल यांनी भाषण केलें. जगांत लीग ऑफ नेशन्स जें कार्य करूं शकली नाही तें कार्य बालवीर चळवळीनें अल्पावधींत करून दाखविलें. यावरून आपल्या चळवळींत ईश्वरी हात आहे हें सिद्ध होतें असा त्यांच्या भाषणाचा मथितार्थ होता. इंटर-नॅशनल स्काउट ब्युरोचे डायरेक्टर मि. ह्युबर्ट मार्टिन यांनी स्काउटिंगची निरनिराळ्या राष्ट्रांत वाढ किती झाली आहे हें सांगितलें. आजमितीला जगांतील बालवीरांची संख्या २२ लक्षांचे वर आहे. इंग्लंडमधील गिलवेल पार्क या स्काउटिंगच्या केंद्रीभूत ठिकाणीं जगांतील २०।२५ राष्ट्रांनी आपले स्काउट मास्तर स्काउटिंगचें उच्च शिक्षण घेण्यासाठीं आजपर्यंत पाठविले आहेत.

## परिषदेंतील वाटाघाट

परिषदेंत पुढील दोन वर्षांकरिता नऊ जणांचें एक कार्यकरी मंडळ नेमण्यांत आलें. स्वीडनमधील स्कॉउट युनिअनने प्रौढ बालवीरांचें ( Rover Scout Moot ) संमेलन स्वीडनमध्ये १९३५ मध्ये भरवावें अशी परिषदेला विनंति केली, व ती परिषदेने मान्य केली. त्याच वेळीं पुनः आंतरराष्ट्रीय परिषद भरणार आहे. ४ वर्षांनी १९३७ सालीं जागतिक जांबोरी कोठे भरवावयाची हें ठरणार आहे. या परिषदेत फक्त चर्चा झाली. कांहीच्या मतें एवढ्या मोठ्या प्रमाणावर जांबोरी भरवून फारसा फायदा होत नाही. जांबोरीचा विस्तार इतका मोठा असतो व येणाऱ्या बालवीरांची संख्या एवढी मोठी असते कीं, कोणाचा कोणाला पत्ता लागत नाही व त्यामुळे बालवीरांचा एकमेकांशीं निकट संबध फार थोडा येतो. हें विधान बऱ्याच अंशीं खरें आहे. कांहींच्या मतें प्रत्येकं खंडांत जांबोरी भरवावी व त्या त्या खंडांत प्रत्येक राष्ट्रानें आपले निवडक प्रतिनिधि पाठवावे. कित्येकांचे मतें जांबोरींत येणाऱ्या बालवीरांची संख्या देशाच्या मानानें बरीच मर्यादित करावी व जांबोरींत ५००० चेवर बालवीरांची संख्या होता होईल तों नसावी. पुढील जांबोरी कोठे भरवावी व तिचें स्वरूप कसें असावें यासंबंधी प्रत्येक राष्ट्राकडून पुढील दोन वर्षांत सूचना मागवाव्या व त्यांचा विचार १९३५ सालीं स्वीडनमध्ये भरणाऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदेने करावा असें ठरले, व या परिषदेचें काम आटोपलें.

## यंदाच्या जांबोरीचें वैशिष्टय

१९२९ सालीं इंग्लंडमध्ये ॲरोपार्क या ठिकाणीं जांबोरी भरली होती व यंदा हंगेरीमध्ये गोडोलो या गांवीं एलिझाबेथ पार्कमध्ये भरली होती. १९२९ च्या जांबोरींत बालवीरांची संख्या ४०-५० हजारांपर्यंत होती. यंदा ती ३०,००० होती. पूर्वीच्या जांबोरींत २-३ दिवस पावसाचा त्रास झाला; तर यंदा उन्हानें कांही कॅंपमध्ये कहर उडवून दिला. यंदाच्या जांबोरींत गायनवादनाची रेलचेल होती. जागोजाग हंगेरियन राष्ट्राचें बॅंडवादन चालत असे. कॅंप फायरचे वेळीं हंगेरियन राष्ट्राच्या बालवीरांचें रंगीबेरंगी पोषाखांत नृत्य चालत असे. सारांश, यंदाच्या जांबोरींत विविधता, सौंदर्य व ललितकला यांची भर पडली होती.

## सह्या घेण्याचा हव्यास

जांबोरींत प्रत्येक बालवीराला हंगेरियन भाषेंतील कांही शब्द परिचयाचे झाले होते. हंगेरियन बालवीर दुसऱ्या राष्ट्रांतील बालवीराला वंदन करून Jo munkat "योमुंकात" हे शब्द उच्चारीत असे. योमुंकात याचा अर्थ जयजयकार असा आहे. रोज रस्त्याने जातां येतां हजारों वेळां या शब्दाचा उच्चार परस्परांना करावा लागे. या शब्दाच्या खालोखाल उपयोगांत येणारे शब्द म्हणजे चेंज व आटोग्राफ हे होत. बालवीर एकमेकांच्या कॅंपमध्ये भेटीसाठी जात व त्या वेळीं आपापल्या देशांतील कांही वस्तूंची ( नाणीं, तिकिटें, चित्रें, कारागिरीचे कांही जिन्नस, बॅजेस इ० ) अदलाबदल करीत. अर्थात् अदलाबदल करतांना

वस्तूच्या किंमतीकडे ते लक्ष पुरवीत असत. हंगेरियन लोकांना त्यांच्या घरीं पाहुणे म्हणून आलेल्या जगांतील बालवीरांचे आटोग्राफ घेण्याची मोठी हौस! आम्हांला पहिले दोनतीन दिवस निदान रोज ४००–५०० सह्या द्याव्या लागल्या असतील. आम्हीं इंग्रजींत आटोग्राफ देत असूं; परंतु त्यांना आपल्या लिपींत आटोग्राफ मागण्याची इच्छा दिसून आली. तेव्हा आम्ही कधीं बालबोध लिपींत तर कधीं मोडी लिपींत आपल्या सह्या देण्याचा परिपाठ सुरू केला.

या हजारो सह्यांचा तुम्हांस काय उपयोग, असें आम्ही कांहीं लोकांना विचारलें. तेव्हा निरनिराळ्या लिप्या कशा असतात हें मौजेनें आम्ही पाहूं व त्यामुळे आमच्या देशांत हजारों बालवीर आले होते, याचें आम्हांस सदैव स्मरण राहील असें त्यांनी स्पष्टीकरण केलें. युरोपांत पोस्टाचीं वापरलेलीं तिकिटें संग्रहांत ठेवण्याचा फार प्रघात दिसून आला. जुने स्टँप बऱ्याच किंमतीस विकले जातात. त्यामुळे हंगेरियन मुलांनी बरींच तिकिटें गोळा केलीं. आटोग्राफ देण्याचा पुढे पुढे इतका कंटाळा येऊं लागला कीं, शेवटीं आटोग्राफ देण्याला आम्हास मनाई केली आहे अशा अर्थाचें हंगेरियन वाक्य ( नेम साबाद इरनं आटोग्राफ ) आम्ही पाठ करून ठेवलें. तें म्हटलें म्हणजे आमच्या पुढचा हंगेरियन लोकांचा घोळका कमी होई.

### फोटो घेणारांच्या झुंडी

दुसरी मौज फोटोची. हंगेरियन लोकांच्या झुंडीच्या झुंडी हातांत कॅमेरा घेऊन रस्त्यावर उभे राहात असत, व रस्त्याने जाणाऱ्या येणाऱ्या परदेशांतील बालवीरांचे, विशेषकरून हिंदी बालवीरांचे, फोटो घेत असत रोज १००-२०० फोटो निघत असत व त्यांत आमचा बराच वेळ जाई. युरोपांत स्त्री-पुरुष समाजांत समान दर्जानें वागत असल्यामुळे व त्यांच्या नीतीच्या व शिष्टाचाराच्या कल्पना आपल्यापेक्षा फारच निराळ्या असल्याने फोटो काढतांनाहि मोठी मौज वाटे. स्त्रीपुरुषांच्या जमावांत हातांत हात घालून हजारो बालवीरांचे फोटो निघत. हंगेरियन लोकांच्या प्रेमाखातर फोटोंत उभे राहाणें जरूर असे. परंतु परकीय स्त्रियांच्यासमवेत फोटो काढला जाणें ही कल्पना आम्हास कशीशीच वाटल्यास नवल नाही!

### तुम्ही परतंत्र कां?

जांबोरींत निरनिराळ्या राष्ट्रांतील बालवीरांचे निरनिराळे गणवेश ( Uniform ) होते. हंगेरियन बालवीरांच्या टोप्यांत एक प्रकारचा गवताचा तुरा खोवलेला असे व तो फार छान दिसे. हिंदी बालवीरांचे खाकी पटके सर्वांचे लक्ष वेधीत असत. इजिप्तमधील बालवीरांच्या डोक्यावर तांबडी फेझ कॅप असे. पॅलेस्टाईन व इराक देशांतील बालवीर डोक्यावरून वस्त्र गुंडाळून त्याचे सोगे पाठीवरून पुढे टाकीत असत. जमेका, गोल्डकोस्ट कॉलनी, सिलोन, हिंदुस्थान या देशांतील बालवीर कृष्णवर्णाचे तर जपानांतील पीतवर्णाचे आणि इतर बालवीर कमजास्त मानाने गौरवर्णाचे होते. इंग्रज बालवीर गाजरासारखे लाल दिसत. हिंदी बालवीरांना पाहून हंगेरियन लोक गांधी, गांधी असे म्हणत. युरोपांत महात्मा गांधी व रवींद्रनाथ टागोर यांचें नांव सर्वतोमुखीं झालें आहे. हिंदी बालवीरांना साधारणतः जे कांही गमतीचे प्रश्न कित्येकदां विचारण्यांत येत असत ते असे-- तुमच्या देशांत सतीची चाल आहे काय? तुमच्या देशांत बायकांना घरांत कोंडून ठेवतात काय? सर्प, विंचू तुमच्या देशांत आहेत तर तुम्ही राहतां कसे? या व असल्या गमतीच्या प्रश्नांचीं योग्य तीं उत्तरें आम्ही देत असूं. परंतु कित्येक वेळां कांही लोक विचारणा करीत की, तुमचा देश एवढा अफाट असून तुम्ही परतंत्र कां? या वेळीं मात्र उत्तर देतांना काय मनःस्थिति होत असेल याची कल्पनाच केलेली बरी.

### भाषेची अडचण व गंमत

जांबोरींत दुभाष्या, तिभाष्या असे अनेक भाषा जाणणारे हंगेरियन स्काउटस असत व त्यांच्या शर्टवर Speak English, Dutch, French इत्यादि मथळे कोरलेले पट्टे असत. परंतु एवढ्या अफाट समुदायांत असे अनेक भाषा जाणणारे बालवीर फार थोडे. त्यामुळे कित्येक वेळां मौज होई. हॉटेलमध्ये जेवावयास गेलें म्हणजे काय मागावें याची पंचाईत पडे. आमची भाषा त्यांना येत नसे व त्यांची भाषा आम्हांस समजत नसे. कांही गोष्टी खुणांवर चालत. आम्ही खाण्याच्या वस्तूंचे हंगेरियन शब्द कागदावर लिहून ठेवीत असूं. उदाहरणार्थ, शाक भाज्या मागवावयाच्या झाल्या म्हणजे " फजेलेक " म्हणावें; वीझ म्हणजे पाणी; ताय म्हणजे दूध; थँक यू म्हणावयाचें झाल्यास 'कसनम' म्हणावें लागत असे. असे ५।२५ शब्द हंगेरियन भाषेंतले बहुतेकांच्या नित्य पाठांतले झाले होते. युरोप खंडांत इंग्रजी भाषा फारच थोड्या लोकांना समजते. जर्मन, फ्रेंच व डच भाषा इंग्रजीपेक्षाहि जास्त प्रचारांत आहे.

जांबोरींत ठिकाठिकाणीं पाण्याचे नळ आणले होते, व तेथेच कधी कधी बालवीर मंडळी स्नानें करीत असत. कित्येक बालवीर दिगंबर होऊन उघड्यावर स्नानें करीत असत. हिंदी शिष्टाचाराच्याविरुद्ध हा प्रकार

असल्याने तें दृश्य किसळवाणें वाटे. घरींदेखील तुम्ही घरांतील मंडळींच्या देखत असेंच नग्न होऊन स्नानें करतां काय, असे आम्हीं विचारलें म्हणजे 'नाही' असें उत्तर मिळत असे. सारांश, आचारविचाराच्या बाबतींत दिसून येणारे उलटसुलट प्रकार पाहून एकमेकांना घटकाभर मौज वाटे, व जग कसें विविध व वैचित्र्यपूर्ण आहे याची त्या वेळीं सत्यता पटे.

अशा रीतीनें १०-१५ दिवसपर्यंत जगांतील बालवीर एकमेकांच्या आचारविचारांची कुतूहलपूर्ण माहिती करून घेत असत, व त्यांच्या सहवासांत मौजेनें काळ घालवीत असत. जांबोरीची माहिती देणारें हंगेरियन भाषेतील एक दैनिक पत्र रोज सकाळीं हंगेरियन मुलें विक्रीकरितां आणीत. त्या पत्राचें नांव मजार चर्केस Magyar cserkesz असें होतें व त्याची किंमत २० फिलर म्हणजे सुमारे दोन-अडीच आणे होती. त्या पत्रांत इंग्रजी, फ्रेंच या भाषांतून कांहीं उतारे व निवडक भाषांतरे देण्यांत येत असत.

### हंगेरियन रोव्हर स्काउटिंग

रोव्हर स्काउट म्हणजे १७ वर्षांचे वयावरील प्रौढ बालवीर. हंगेरियन रोव्हर स्काउट राष्ट्राच्या उन्नतीकरितां फार झटतात. ते दरवर्षी निदान पांच सफरी ( Excursions ) करतात. त्या सफरींत देशाच्या सरहद्दी, इतर देशांतील चाली यांची ते बारकाईनें माहिती करून घेतात; व्याख्यानें देऊन लोकांना देशाच्या परिस्थितीचें आकलन करून देतात; खेड्यापाड्यांतून गरीब लोकांना मदत व्हावी म्हणून फंड गोळा करतात. अशा प्रकारें ते समाजसेवा करतात. निरनिराळ्या देशांतील भाषा शिकण्याचे वर्ग चालवून अन्य भाषांचा (इंग्रजी, फ्रेंच, डच इ.) अभ्यास करतात. देशांतील तरुणाला देशाच्या उन्नतीच्या दृष्टीनें जें जें करतां येईल व करण्यास योग्य आहे तें तें रोव्हर स्काउट करूं शकतो, असा इकडील देशांतला अनुभव आहे. फक्त राजकारणाच्या भानगडींत तो पडत नाहीं.

# कुलाबा जिल्ह्याची सर्वपक्षीय सभा

रविवार ता. १ रोजीं कुलाबा जिल्ह्यांतील सर्वपक्षीय प्रतिनिधींची सभा पेण येथे श्री. जम्नादास मेथा यांचे अध्यक्षतेखालीं भरली होती. निरनिराळ्या तालुक्यांतून बरेच प्रतिनिधि आले होते. श्री. मंडलीक यांनीं सर्वांचें स्वागत करून श्री. न. चिं. केळकर, श्री. ल. ब. भोपटकर वगैरेंचीं पत्रें वाचून दाखविलीं. अध्यक्षांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत, कायदेभंग बंद करून धडाडीचा विधायक कार्यक्रम आंखण्यांत यावा व कायदेमंडळें काबीज करण्यांत यावीं, असें प्रतिपादन केलें. सभेंत बरेच ठराव पसार झाले. शुभ्रपत्रिका प्रतिगामी स्वरूपाची असल्याकारणानें तिचा निषेध करणारा ठराव एकमतानें मंजूर झाला. कायदेभंग ताबडतोब व बिनशर्त परत घेण्यांत यावा, या ठरावावर बराच वाद झाला. शेवटीं ५३ विरुद्ध ४४ मतांनीं ठराव संमत झाला व १६ सभासद तटस्थ राहिले. याशिवाय काँग्रेस कमिट्यांचें पुनरुज्जीवन करणें, कायदेमंडळें व स्थानिक स्वराज्य-संस्था राबवून घेणें, आतापर्यंतच्या धारातहकुबीची सूट व येत्या वर्षी तहकुबी देणें, सर्व जिल्ह्यांत ज्यूरीची पद्धति लावणें, कौन्सिलांच्या निवडणुकी पुनः करणे, ग्रामपंचायती स्थापणें व कुलाबा जिल्हा सभा स्थापणें या विषयांवरहि एकमतानें ठराव मंजूर करण्यांत आले.

सभा समाप्त झाल्यावर रात्रौ श्री. जम्नादास व दा. वि. गोखले यांचीं शुभ्रपत्रिकेवर जाहीर भाषणें झालीं.

# गव्हर्नरांची प्रणययाचना

सरकाराच्या दडपशाही कायद्यामुळे देशांतील राजकीय चळवळ संपुष्टांत आली आहे. राष्ट्रीय सभा व तिचे पुढारी यांच्या हालचाली थांबल्या आहेत; आणि प्रचलित राजकारणास नवें वळण लागून तें जोराने उसळण्यास अद्यापि अवकाश असल्यामुळे या दरम्यानच्या काळांत मुंबईसरकार आपली पोळी पिकविण्याच्या विचारांत आहे. सांप्रत राजकीय पुढारी व जनता यांचा संबंध तुटल्यासारखा झाला आहे. जनतेचें मन विषण्ण व उद्विग्न बनलें आहे. एखादी तरुण स्त्री विधवा व्हावी व तिला असहाय्य स्थितींत पाहून कोणा तरी उल्लू मनुष्याने तिच्यावर पापी नजर ठेवावी त्याप्रमाणे मुंबई इलाख्याचे सध्याचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांचें वर्तन सुरू आहे. त्यानीच पुढाऱ्यांचा कांटा उपटला व तेच त्यांच्या जागीं जनतेपाशीं स्वतःकरिता प्रणययाचना करीत आहेत. आधी सरकाराविषयी जनतेंत प्रेम बिलकुल नाहीं; असलाच तर तिटकारा आहे,व तोहि पुढाऱ्यांच्या छळामुळे अलीकडे पुष्कळच वाढला आहे. जनतेची मनःस्थिति या प्रकारची आहे, आणि गव्हर्नरसाहेब कामान्ध पुरुषाप्रमाणे तिच्यापुढे लाडीगोडीने हरतऱ्हेचे रंगढंग खेळून उतावळेपणाने तिच्या पाणिग्रहणासाठी टपले आहेत. गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांनी हा अतिप्रसंग गेल्या आठवड्यांत बेळगांवीं अनेक समारंभ भरवून केला व पाटील लोकांच्या दरबारांत तर त्याचा अगदीं कडेलोटच झाला. तो एकंदर प्रकार इतका किळसवाणा होता कीं, त्याची कोणाहि स्वाभिमानी मनुष्यास शिसारी आल्यावांचून राहणार नाहीं.

गव्हर्नरांना आपल्या प्रियाराधनांत यश येईल अशी खात्री वाटते; व त्याला कारणेंहि बरींच आहेत. जनता पुढाऱ्यांना कां भजते याची त्यांनी आपल्या मनाशीं मीमांसा केलेली दिसते. त्यांच्या मतें लोकपक्षाचे पुढारी जनतेची मर्जी संपादण्याकरिता काय युक्त्या लढवितात, तर सरकारी अधिकाऱ्यांची उठल्याबसल्या निंदा करतात, त्यांचे दोष दाखवितात, त्यांजवर वर्तमानपत्रांतून व भाषणांतून टीकेची झोड उठवितात आणि त्याकरिता अखेर शिक्षा भोगून व तुरुंगांत जाऊन जनतेच्या प्रेमास व सहानुभूतीस पात्र होतात. जनतेच्या प्रत्यक्ष फायद्याचें कृत्य त्यांच्या हातून सहसा घडत नाहीं व घडलेंच तर त्याचें प्रमाण इतकें अल्प असतें कीं, तें सरकाराने खिसगणतींतहि धरण्याचें कारण नाहीं. उलटपक्षीं खुद्द सरकाराचें सामर्थ्य प्रचंड आहे, प्रजेच्या कल्याणाची खरी गुरुकिल्ली सरकाराच्या हातीं आहे. त्यांच्याजवळ अठरा कारखाने व सतरा खातीं आहेत. त्यांनी परस्परांच्या सहाय्याने जनतेच्या गरजा भागविण्याचें मनावर घेतल्यास तिचा अगणित फायदा होईल व त्या योगाने सरकारावर जनता इतकी मोहून जाईल कीं, तिला आपल्या राजकीय पुढाऱ्यांचा विसर पडून ती सरकारची अर्धांगी बनून राहण्यांतच भूषण मानील.

पुनर्विवाहासाठी झुरणाऱ्या घोडनवऱ्यास शोभण्याजोगेंच गव्हर्नरांचें हें मनोराज्य असून तें साधण्याकरिता ते आपल्या लग्नाच्या तयारीस उत्साहाने लागलेले दिसतात. बेळगांवास त्यांनी या बाबतींत मराठे, मुसलमान व अस्पृश्य यांजबरोबर स्वतंत्रपणें संधान बांधलें; परंतु तेवढ्याने त्यांच्या योजनेची पूर्तता होत नसल्यामुळे त्यांनी गांवगन्नाच्या पाटलांना आणि तालुका व जिल्हा बोर्डांच्या सभासदांना आपल्या समोर मुद्दाम खेचून आणून त्याना आपल्या कटांत ओढण्याचा डाव टाकला. इलाख्याच्या गव्हर्नरापासून व जिल्ह्याच्या कलेक्टरापासून तों थेट गांवच्या पाटलापर्यंत सरकारी लहानथोर मोहरीं आपलीं पगें धरून जागच्या जागीं पवित्र्यावर नेहमी उभींच आहेत. आतापर्यंत हीं सारी मोहरीं जनतेला उपयोगी पडण्यापेक्षा तिजवर अंमल गाजविण्याच्या

किंबहुना तिला लुबाडण्याच्या कारवाईतच गर्क आहेत. परंतु गव्हर्नरसाहेबांच्या लक्षांत ही चूक आता आलेली दिसते. राज्यपद्धतीचें हें तुटकपणाचें व अरेरावीचें धोरण घातक ठरल्याविषयी त्यांची खात्री पटली आहे. या दृष्टीने त्यांच्या भाषणांतील कांही भाग कबुलीजबाबासारखाच वाटतो.

हिंदुस्थानांत गांवोगांव शाळा स्थापून प्राथमिक शिक्षणाचा फैलाव देशभर केला असल्याचा टेंभा बडे इंग्रज मुत्सद्दी व अधिकारी वारंवार मिरवीत असतात; परंतु या प्राथमिक शिक्षणाने बहुजन समाजाचें खरें कल्याण झालें नाही असें गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांना पक्कें कळून चुकलें आहे. त्यांनी या बाबतींत उच्चारलेलें वाक्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ते म्हणतात, 'आम्ही शाळा काढल्या आहेत खऱ्या, पण त्यांत मिळणारें शिक्षण लोकांना अगदीच ठोंबे ठेवण्यापेक्षा बरें आहे इतकेंच.' गव्हर्नरसाहेबानी हिंदी लोकांना देण्यांत येत असलेल्या शिक्षणाची खरी किंमत ओळखली हें एक प्रकारें बरेंच झालें. त्यांच्या मताने सध्याचे सरकारी शाळांतील शिक्षक कुचकामाचे व शिक्षणक्रम कवडीकिमतीचा आहे. या शाळांतून असे विद्यार्थी बाहेर पडले पाहिजेत कीं, ते उत्कृष्ट शेतकरी व कुशल कारागीर निपजतील. खरें पाहिलें असता एक प्राथमिक शिक्षणच काय, पण हिंदुस्थानांतील इंग्रज सरकारचें कोणतेंहि कृत्य इंग्रज लोकांनी हिंदी लोकांच्या शुद्ध हिताच्या बुद्धीने हातीं घेतलें नाही म्हणून त्यापासून हिंदुस्थानाचें कसलेंहि कल्याण साधलें नाही. त्यांनी पाश्चात्य देशांतील सर्व सुधारणांची नक्कल काय ती या देशांत उठवून दिली. परंतु इंग्रज लोकांचें हिंदी लोकांच्या हिताशीं पूर्णपणें तादात्म्य नसल्यामुळे त्यांची एकहि सुधारणा हिंदुस्थानाच्या अंगीं लागली नाही.

त्यांनी पतपेढ्या काढल्या; पण त्यांच्या योगाने शेतकरी व कारागीर, ऊर्जित दशेस न येतां सावकारांच्या ऐवजी पतपेढ्यांच्या कर्जांत बुडाले. त्यांनी शेतकीखातें सुरू केलें; पण त्या खात्याने हिंदी शेतकऱ्यांच्या गरजांची पर्वा न कळगता इंग्लंडास कोणत्या कच्च्या मालाची गरज आहे यावर नजर ठेवून त्याच प्रकारचीं पिकें काढण्यास उत्तेजन दिलें; त्याचा दुष्परिणाम आज सर्वांच्या डोळ्यांत प्रत्ययास येत आहे. दक्षिण महाराष्ट्रांत भुईमूग आणि वऱ्हाडखानदेशांत कापूस यांचा फैलाव फार होऊन शेतकऱ्यांना लंकेंतील सोन्याच्या विटांप्रमाणे पैसाच पैसा कांही काळ दृष्टीस पडला व तो जादूगाराने दाखविलेल्या शेंकडों रुपयांप्रमाणे एकदम दृष्टीआड़हि झाला. गेल्या तीनचार वर्षांत येत येत शेतकऱ्यांना अशी कष्टप्रद स्थिति आली आहे कीं, ते खुळखुळणारे पैसेहि नाहींत व मालाला गिऱ्हाईकहि नाही. हिंदुस्थानाचा राज्यकारभार हिंदी लोकांच्या केवळ हितासाठी चालला असता तर इंग्रज सरकार यापूर्वीच जागें होऊन त्यांनी येथील शेतकीस निराळेंच वळण आधीपासून लावण्यास सुरुवात केली असती. पण येथील बड्या इंग्रज अधिकाऱ्यांना हिंदी लोकांचें हित कळत नाही व दिसतहि नाही. ते उशीरा जागे होतात व रयतेचा प्राण तान्हेने व्याकुळ झाल्यावर विहीर खणण्यासाठी खोरीं, कुदळीं हुडकूं लागतात.

गव्हर्नरसाहेबांचे डोळे कायदेभंगाच्या चळवळीने उघडून त्यांनी हिंदुस्थानाच्या सद्यःस्थितीचा सूक्ष्मपणें विचार चालविला असल्यामुळे त्यांना सरकार आपल्या कर्तव्यास जागलें नाही असें अन्तर्यामीं वाटत असावें. परंतु सरकारचा हा दोष उघड रीतीने कबूल न करतां त्यांनी इतर बयादी सांगितल्या आहेत. ते म्हणतात, 'देशाची सुधारणा अगदीं मंद गतीने होत आहे. पण काय करावें ? देश फार अफाट, लोकसंख्या अति प्रचंड, कार्यकर्त्यांचा तुटवडा, पैसा तोकडा व लोक पुराणप्रिय, यामुळे सारें बिनसलें; पण गव्हर्नरांच्या या सबबींत बिलकुल तथ्यांश नाही. रशियांत राज्यक्रांति घडून आल्यास अवघीं सोळाच वर्षें झालीं ना ? रशिया हा देश हिंदुस्थानापेक्षा कितीतरी मागसलेला.

असें असताहि रशियाच्या सोव्हिएट सरकारान भगीरथ प्रयत्न करून व पंचवार्षिक योजना डोळ्यांपुढे ठेवून सगळा देश कसा गदगदा हलवून सोडला आहे, कारखाने सुरू केले आहेत, शेतकी सुधारली आहे व बहुजनसमाजांत शिक्षण वेगाने फैलावून दिलें आहे.

रशियाची ही कामगिरी केवळ सोळा वर्षांतली. त्या मानाने हिंदुस्थान देश इंग्रज सरकाराच्या छत्राखाली गेलीं शें—दीडशें वर्षे सांपडला आहे. त्यांतील संस्कृति प्राचीन आहे, लोक बुद्धिवान आहेत व भूमिहि समृद्ध आहे. इतकी सगळी सिद्धता असूनहि 'काय करावें,देश अफाट आहे,वस्ती प्रचंड आहे' असें रड । बसण्याची पाळी सर फ्रेडरिक साईक्स यांसारख्या गव्हर्नरावर यावी ही लज्जास्पद गोष्ट नव्हे काय? आता साइक्ससाहेबांनी जनतेला संतुष्ट करण्याकरितां कितीहि जीव कासावीस केला तरी त्याचा काय उपयोग होणार? राज्यपद्धतींत बदल झाला तरच देशाची स्थिति सुधारेल हा—त्यांनी आपल्या भाषणांत सांगितल्याप्रमाणें—त्यांस बाहेरून मिळालेला कानमंत्रच खरा आहे. हिंदुस्थानाचा राज्यकारभार हिंदुस्थानाच्या हिताकरितांच चालला पाहिजे; इंग्लंडाच्या किंवा दुसऱ्या कोणाच्याहि हिताकरितां चालतां कामा नये हें खरें इंगित असून त्याप्रमाणे वागण्याची बुद्धि ब्रिटिश मुत्सद्यांना जोंपर्यंत होत नाही तोंपर्यंत त्यांच्या इतर कसल्याहि प्रयत्नांना यावें तसें यश येणार नाही. जनतेचें प्रेम त्यांजवर बसणार नाही व गव्हर्नरसाहेबांनी कामान्धपणाच्या भरांत घाईघाईने गुडघ्याला बाशिंग बांधलें तरी त्यांचा पुनर्विवाह जनतेशीं जुळणार नाही.

खेड्यांचा उद्धार गव्हर्नर करूं पहात आहेत. त्याकरिता त्यानी खेड्यांतल्या पाटलांना कैक गोष्टी सुचविल्या आहेत. 'घरांत गुरें बांधू नयेत, गांवांत उकीरडे ठेवूं नयेत, विहिरींना पायऱ्या राखू नयेत, जमिनीचे तुकडे पाडू नयेत, चार इयत्ता झाल्याशिवाय मुलांना शाळेंतून काढू नये, नवीं झाडें लावून सर्पणाची सोय करावी व शेणाचा विनियोग खताकडे करावा, असा उपदेश शेतकऱ्यांस करावयास त्यांनी पाटलांना सांगितलें आहे. त्यांचा हा उपदेश वाचून व त्यांनी तो चावडीवर डकविण्यास सांगितल्याचें ऐकून दोन हजार वर्षांपूर्वी अशोक राजाने जे ठिकठिकाणीं जयस्तंभावरून आदेश कोरले होते त्यांची आठवण कोणासहि झाल्याशिवाय राहणार नाही. त्यांनी सरकारी अधिकाऱ्यांची एक साखळीच बांधून त्यांत शेतकीखातें, पशुखातें, फळफळावळखातें, सहकारीखातें, औद्योगिकखातें यांना गोवलें आहे. हे सर्व अधिकारी आपल्या ज्ञानाचा व माहितीचा फायदा जनतेस देतीलच; परंतु त्यांच्या तोडीस तोड अशी खासगी कार्यकर्त्यांची साखळी गुंफणें जरूर असल्यामुळे त्यांनी तो कार्यभाग ग्रामपंचायती, पतपेढ्या, तालुकाबोर्डें, जिल्हाबोर्डें व तालुका डेव्हलपमेंट असोसिएशन्स यांवर सोंपविला आहे.

गव्हर्नरसाहेब म्हणतात त्याप्रमाणे त्यांची योजना हलूं डोलूं लागल्यास तिजपासून खेड्यांतल्या कांहींना कांहीं फायदाच होईल यांत शंका नाही. याकरिता वरील संस्थांचे सभासद व त्याखेरीज जिल्ह्यांतील वकील, डॉक्टर, पेन्शनर, व्यापारी, इनामदार व इतर सुशिक्षित लोक यांनी प्रस्तुत चळवळींत मनःपूर्वक शिरून तिजपासून खेड्यांतील आपल्या गरीब व अज्ञानी देशबांधवांचें हित साधण्याची ही आलेली संधि गमावूं नये असें त्यांस आमचें आग्रहाचें सांगणें आहे. गव्हर्नरसाहेबांचा ही चळवळ हातीं घेण्यांतील हेतु एक प्रकारचा व हिंदी लोकांचा तिच्यांत शिरण्याचा हेतु दुसऱ्या प्रकारचा असला तरी त्यापासून जनतेचें थोडेंफार साधल्यास हितच साधेल हें विसरतां कामा नये. मात्र या युक्तीने हिंदी जनता आपणांवर मोहित होऊन माळ घालील व आपलें पाणिग्रहण करील अशी गव्हर्नराची समजूत असल्यास ती मात्र चुकीची आहे. गव्हर्नर साहेब पुनर्विवाहास तयार असतील, पण जनता त्यास केव्हाहि तयार होणार नाही.

# हिंदुस्थानांतून इटालींत

( ले. नारायण विनायक चौकर.)

व्हेंतिमिल्लिया, इटाली.

'एकच प्याला' नाटकांतील रामलालचें विलायतेस जाण्याच्या अगोदरचें भाषण वाचल्यावर अथवा नाटकाचे वेळीं तें प्रत्यक्ष ऐकल्यावर, 'काय गडकऱ्यांची भाषाशैली!' असे उद्गार पुष्कळांचे तोंडून निघतात. विलायतेस जाणाऱ्याला खरोखरच असें वाटत असेल काय? आजचें हिंदुस्थानाचें दारिद्य व उद्यांचें इंग्लंडचें वैभव त्याच्या नजरेसमोर उभें राहात असेल काय? आधी सामानाची जुळवाजुळव, त्यांतच आप्तेष्टांना भेटण्याची गडबड व मग निघण्याची धांदल. अशा स्थितींत वरीलप्रमाणे विचार करावयाला कोठून फुरसत सांपडणार? नाही म्हणावयाला बोट सुटल्यावर मात्र, 'मायेच्या माणसांपासून आपण दूर चाललों,' ह्या विचारानंतर, 'हिंदुस्थान सोडून चाललों,' ही भावना उत्पन्न होते. प्रत्यक्ष निघाल्यावर निदान आमची तरी अशी स्थिति झाली.

## इटालियन बोटी

जगाचा प्रवास करावा व त्याबरोबरच मुख्यतः गायनाचें तौलनिक अध्ययन करून निरनिराळ्या देशांतील लोकांचे रीतिरिवाज, संवयी इत्यादींची माहिती समक्ष मिळवावी या उद्देशानें आम्ही तिघे, (मा. शंकरराव बिनीवाले फिडल वादनपटु, त्यांचे बंधु रा. पु. गो. बिनीवाले पुणें व प्रस्तुत लेखक नगर) मुंबईहून ता. २२ जूनरोजीं निघालों. इटालियन बोटीवर व्यवस्था चांगली असते व त्या जलदहि जातात, असें आम्हांला अगोदर समजले होते व पुढें अनुभवहि तसाच आला. बोटीवरील लहानमोठ्या अधिकाऱ्यांच्या एकंदर वागणुकींत सहानुभूति होती. खुद्द कप्तानहि मोकळेपणानें बोले.

## हिंदी लोकांतील मतभेद

हल्लीं हिंदुस्थानाचें नांव इतर देशांतील लोकांच्या कानीं थोडथोडें पडूं लागलें आहे. अशा वेळीं हिंदी लोकांनी व विशेषतः परदेशीं जाणाऱ्या हिंदी लोकांनी फार जपून, चोख वर्तन ठेवून, मोठ्या कौशल्यानें वागून सर्वांची सहानुभूति मिळवावयास पाहिजे. हिंदी व युरोपियन हा भेद इतर लोक मुद्दाम करतात; असा गैरसमज क्षुल्लक कारणानें करून बसणें बरोबर नाहीं. आमच्या बरोबर पंजाब, सं. प्रांत, बंगाल येथपासून त्रावणकोरपर्यंतचे निरनिराळ्या प्रांतांतील लोक होते. परंतु त्यांतहि निरनिराळे गट दिसत. कांहीं जणांनी वरीलप्रमाणें गैरसमज करून घेतला, हे आम्हांस दिसत असतांहि गप्प बसण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. आपापसांत कशी कां लठ्ठालठ्ठी असेना, पण दुसऱ्यांस दिसावयास एक व प्रसंगीं तसेंच वर्तन, हा इतर राष्ट्रांचा गुण आपणहि आपलासा करावयास पाहिजे.

## म. गांधींचें उपोषण

ता. ३ जुलै रोजीं आम्ही व्हेनिसला पोंचलों. आम्हांला पुढें रात्रीच्या गाडीनें व्हेंतिमिल्लियास जावयाचें असल्यानें घाई नव्हती म्हणून शहरांत हिंडलों. कोठले तरी निराळे लोक आले आहेत, असें वाटतांच सगळ्यांचे डोळे आमच्याकडे लागत. व्हेनिसचे रस्ते जलमय असून तेथें होड्या चालतात हें सर्वांना ठाऊकच आहे. ट्रॅमप्रमाणें व्यवस्था असलेल्या मोटार बोटीहि तेथें आहेत. अशाच एका 'ट्रॅम' मध्ये मोडकेतोडके इंग्लिश बोलणारा एक इटालियन गृहस्थ भेटला. 'कोण? कोठून आला? कोठें जाणार?' हे जुजबी प्रश्न झाल्यावर 'धर्म व देश' वगैरे संबंधी तो माहिती विचारूं लागला. इतक्यांत एक पोलीस अधिकारी जवळ आला व 'त्यांना गांधींबद्दल विचारा' असें त्या इटालियन गृहस्थास म्हणाला. 'गांधी तुरुंगांतच आहेत काय? त्यांचें उपोषण संपलें कीं नाहीं?' असे प्रश्न त्यानी विचारले. ज्याला त्याला 'गांधी' हें नांव माहीत आहे हे पाहून गंमत वाटली. स्टेशनच्या जवळ येतों तोंच कांहीं जणांनी 'गुडनाइट गांधी' म्हणून आम्हांलाच गांधी बनवून टाकलें! ओळख नाहीं म्हणून एक ब्रहि उच्चारावयाचा नाहीं, असला शिष्टाचाराचा अतिरेक इटालियन लोकांत दिसत नाहीं. स्टेशनावर आल्यानंतर एक अभिनव प्रकार पाहावयास सांपडला. स्टेशनावरील हमाल साधारणतः 'याचको याचकं दृष्ट्वा' या न्यायानें एकमेकांवर गुरगुरत असावयाचे; पण येथील तऱ्हा वेगळी. या हमालांनी आपसांत एक कॅशिअर नेमला होता. त्याच्या गळ्यांत कुलूप लावलेली एक पेटी अडकावली होती. प्रत्येकानें आपली मिळकत त्या कॅशिअरच्या पेटींत आणून टाकावयाची. शिवीगाळ नाहीं. हिस-

कायदा नाही, धक्काबुक्की नाही, घासाघीस नाही, कांही नाही.

**मुस्सोलिनीचें गीत**

व्हेतिमिह्लिया गांवीं आल्यावर बऱ्याच जणांशीं आमच्या ओळखी झाल्या. साधारण बोलणेंचालणें होतांच सगळ्यांचे दोन प्रश्न ठराविक! 'तुम्हाला इटालिया देश आवडला कीं नाही ? आणि 'व्हेति-मिह्लिया गांव आवडलें कीं नाही ?' सामान्य शेत-कऱ्यामाळ्यांच्या येवढेच नव्हे तर लहान मुलांच्या ह्या प्रश्नांत दिसून येणारा एक प्रकारचा स्वाभिमान शिक्षणजन्य असला पाहिजे. दुसऱ्या वर्षाच्या पुस्तकांत 'सिन्योर मुस्सोलिनी' संबंधी धडा आम्हांला पाहावयास सांपडला. राजाच्या शिक्क्यांचीं पोस्टाचीं तिकिटें आहेत, त्याचप्रमाणे 'मुस्सो-लिनी' छापाचींहि तिकिटें आहेत.ह्याच पुस्तकांत धर्मशिक्षणाचा भाग असतो. बँड वगैरेच्या कार्य-क्रमांत आधी राजगीत व मग मुस्सोलीनीचें गीत असते. दोनही गीतांचे वेळीं सगळे लोक खडी ताजीम देतात.

आम्हांला पाहिल्यावर 'इंदियानो, इंदियानो' अशी कुजबूज सुरू होते. ह्या निमित्ताने तरी 'इंडि-या'चें नांव येथें रोज निघते. आम्ही कांही जणांना 'नमस्कार' करावयास शिकविलें. सगळे ओळखीचे लोक आम्हांला आता नमस्कार करूं लागले आहेत.

# जर्मनीचा सुप्रजाजननाचा कायदा

[ ले.—बाळकृष्ण मोरेश्वर कानिटकर,नाशिक. ]

हर हिटलरचें नांव माहीत नाही असा सुशि-क्षित मनुष्य विरळा. त्याचा नाझी पक्ष अधिकारा-रूढ झाल्यापासून जर्मनींत जी भयंकर उलथा-पालथ होत आहे, विचार आचार व व्यवहार यांत जी विलक्षण क्रांती घडून येत आहे ती पाहून मन क्षणभर थक्कच होऊन जातें. वर्तमान-पत्रें वाचणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस रोज कांही तरी विशेष वाटण्यासारखे कार्यक्रम आजकाल जर्मन राष्ट्रांत एकसारखे घडत आहेत. महायुद्धानंतरच्या तहामुळे जर्मन राष्ट्रावर जरी भयंकर अटी लादल्या गेल्या आणि त्याच्या सवलती काढून घेण्यांत आल्या, तरी गेल्या कांही वर्षांच्या जर्मनीच्या धडाडीकडे पाहिल्यास त्या अटींमुळे जर्मन राष्ट्र गांगरलें तर नाहीच तर उलट 'आपत्कालीं शैलही आदळो का, धाके ना जे गाजवी धैर्यडंका' अशीच त्याने कृति करून दाखविली आहे.

सैन्य काय, समाजव्यवस्था काय, परराष्ट्रीय राजकारण काय, बेकारांची तरतूद काय या व इतर अनेक बाबतींत जर्मन राष्ट्राने इतकें कार्य केलें आहे, आणि आपली पडती बाजू इतकी सावरली आहे कीं, युरोप खंडांतील आजूबाजूच्या राष्ट्रांना त्यांची जरा धास्तीच वाटूं लागली आहे. जर्मनींतील इतर कित्येक गोष्टी अचंबा करण्यासारख्या असल्या तरी येत्या जाने-वारी ( १९३४ ) पासून जो एक कायदा जर्मनींत अमलांत येणार आहे, तो फारच क्रांतिकारक आहे. नाझी सरकारने असें ठरविलें आहे कीं, ज्या कोणा स्त्रीस किंवा पुरुषास कांही विशेष रोग झाले असतील किंवा कांही विशेष व्यंग असेल, त्यांच्यावर ऑपरेशन करून त्यांची प्रजोत्पादनक्षमता नाहींशी करावयाची. यामुळे भावी संतति या व्यंगापासून, व्यथांपासून पूर्ण अलिप्त होऊन सर्व जर्मन राष्ट्र तेजस्वी स्त्री-पुरु-षांचें बनेल असा जर्मन शास्त्रज्ञांचा अभिप्राय आहे. या प्रकारें ज्याना ज्यांना ऑपरेशन करावें लागेल त्यांत ज्यांच्या संततीवर असा दुष्परिणाम नक्की होईल असें डॉक्टर ठरवतील ते लोक प्रथम येतील. या प्रकारच्या विकृतींत पुढील गोष्टींचा अन्तर्भाव होईल. नपुंसकत्व ( आनुवंशिक ), वेडेपणा, अपस्मार, आंधळेपणा (आनुवंशिक), मदिरासक्ति, बहिरेपणा, अत्यंत कुरूपता, हातापायांची वक्रता वगैरे. याचप्रमाणें इतर अनेक दोषांचा समावेश त्यांत करण्यांत आला आहे. मुख्य कटाक्ष हे सर्व दोष किंवा व्यंगें ज्यांच्यापासून संततीला होण्याचा संभव आहे त्यांचेवर आहे. त्या सर्वांना असें ऑपरेशन करून घ्यावें लागणार आहे.

याप्रमाणें ऑपरेशन करावें लागणाऱ्या इसमाने स्वतः स्वखुषीने ऑपरेशन करून घ्यावें, किंवा सरकारी 'वंशशुद्धि कोर्टाने' सांगित-ल्यास त्यास त्याच्या इच्छेविरुद्धहि तें करून घ्यावें लागेल. आपल्या मुलाबद्दल ऑपरेशनचा अर्ज पालकाला करता येईल. सरकारी वंशशुद्धि कोर्टावर अपील कोर्ट आहे. परंतु या अपील कोर्टाचा निकाल मात्र जबरदस्तीने बजावण्यांत येईल.

या ऑपरेशनसाठी स्वतंत्र व्यवस्था करण्यांत आली आहे. हा कायदा जर्मनींत अमलांत येणार हें वाचून मि. लिआन एफ व्हिटने, या अमेरिकन सुप्रजाजनन शास्त्रज्ञास आनंदाचें भरतें आलें आहे.

तो म्हणतो " आजकाल जर्मनींत ज्या घडामोडी चालू आहेत त्यात हीच एक विशेष उत्तम गोष्ट आहे. अशा प्रकारें काही मर्यादेपर्यंत प्रजाजनन-शक्ति नष्ट करण्याची काही अमेरिकन संस्थानात (२८ संस्थानात) कायद्याने तरतूद केली आहे. मि. व्हिटनची अशी इच्छा आहे कीं, या नव्या कायद्याप्रमाणे ते कायदेहि लवकरच व्यापक करण्यात येतील. या नव्या प्रयोगापासून राष्ट्राची प्रजा खरोखरच कशी निपजते हे प्रत्यक्ष काल ठरवणार आहे. पूर्वी 'स्पार्टा'मध्ये 'वृद्धांचे' एक मंडळ असे. हे मंडळ नवीन जन्मास आलेले बालक तपाशी आणि त्याच्या परीक्षेत नालायक ठरलेले मूल फेकून देण्यात येई.

यावर कोणी असे म्हणतील की, त्या वेळीं 'भौतिकशास्त्र, शारीरशास्त्र वगैरेंची फार प्रगति झालेली नव्हती. त्यामुळे किरकोळ व्यंगाची मुलेहि मारलीं गेली असतील आणि कित्येक वाईट मुले जगली असतील. आज हे ज्ञान पुष्कळच पूर्णतेला गेल्यामुळे ती अडचण आता येणार नाही. हे जरी थोडें खरें असलें तरी नवा कायदा आहे त्यांतील कित्येक गोष्टी गहाळतातच ! उदाहरणार्थ, पग्रपाश, दळणवळण आणि अनैतिक [illegible] राष्ट्राला पर्ण ताबा मिळविता आला नाही, तोपर्यंत त्यांची संतति सुदृढच होईल असे मानता येणार नाही.

डॉ. हॅरि हॅमिल्टन लॅगलीन ( कार्नेजी इन्स्टिट्यूट, अमेरिका) या तज्ज्ञाच्या मताप्रमाणे हा नवीन जर्मन कायदा मानवाच्या दृष्टीने अत्यंत हितावह व एका राष्ट्राचा प्रयत्न या दृष्टीने पहिलाच ठरणार आहे. त्याचा परिणाम काय व कसे [illegible] ठरविणार आहे [illegible] जाता जाता ही गोष्ट येथे नमूद केल्यावाचून राहवत नाही की, ज्या कायदेमंडळात असले कायदे पसार होतात, या कायदेमंडळावर लोकांचा ताबा असला की, लोकहिताचे कायदे कसे पास करता येतात याचे हे एक उत्तम व नमुनेदार उदाहरण आहे.

# पेण येथील परिषद

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणे रविवार ता. १ रोजी पेण येथे कुलाबा जिल्ह्यातील सर्व पक्षांच्या निमंत्रित सार्वजनिक कार्यकर्त्यांची सभा भरली होती. सभेस दोनशेच्यावर सद्गृहस्थ हजर होते. त्यात प्रामुख्यान डॉ. डोंगरे, श्री. सालोमन वाकुळकर, लेले, लिमये, लक्ष्मणराव पाटील वकील, आमदार ना. ना. पाटील, [illegible] मुरबेकर, गोपाळराव भाटे, काकासाहेब मनोहर, [illegible] धारिया, रंगो रावजी टिळक, शेठ पी. नागरदास, महमदखान मलगखान, गो. आ. [illegible], एल. आर. जोशी, ग. र. मुळे, के. गो. ओक, सि. वि. टिळक, विष्णुपंत मंडलीक, अबदुल्लाखान रहिमखान वगैरे मंडळी होती. याशिवाय मुंबईहून श्री. जमनादास मेथा, डॉ. वेलकर, श्री. शेटे व पुण्याहून श्री दा. वि. गोखले, श्री. त्र्य. वि. पर्वते आले होते.

### सभासदांचें स्वागत

आलेल्या मंडळींचे स्वागत करताना श्री. रा. ना. मंडलीक यांनी जिल्ह्यातील गेल्या दोन तीन वर्षांच्या परिस्थितीचा आढावा घेतला त्यांनी कायदेभंगाच्या चळवळींत जिल्ह्याने घेतलेल्या भागाचा साभिमान उल्लेख करून जिल्ह्यातील विधायककामे करण्याकरिता व रयतांच्या अडचणी व दुःखे यांचा दाद घेण्याकरिता जुन्या चळवळीची सूत्रे पुनः हाती घेण्याचा उपक्रम करावा असे मागितले. तसेच हे करण्याकरिता कायदेभंगाची चळवळ बंद करणे जरूरीचे आहे असे त्यांनी आपले मत दिले. त्यांनी राज्याच्या [illegible] ज्या वेळी जिल्हाधिकाऱ्यांनी सभेस परवानगी दिली व पोलिसांनी [illegible] बंदी केली या-बद्दल त्यांचे आभार मानले [illegible] आपली स्पष्ट मते मांडण्याचा हरएक सभासदाने [illegible] विचारविनिमय [illegible] ठरवावे अशी त्यांनी विनंति केली. [illegible] त्यांनी आलेले संदेश वाचून दाखविले. श्री न. चिं. केळकर यांनी या सभेस जे पत्र पाठविले ते पुढीलप्रमाणे आहे—

### श्री. केळकरांचें पत्र

रा. रा. रामभाऊ मंडलीक यांस कृ. सा. न. वि. वि. [illegible] रोजची सभेचे निमंत्रण पोचले. मला येता आले असते तर मी आलो असतो, पण येऊ शकत नाही याबद्दल क्षमा करावी. व मित्र मंडळींनाहि सभेच कळवावे.

आपण जिल्ह्याच्या दृष्टीने सभेपुढे विषय ठेवले आहेत, ते योग्य असेच [illegible] राहोत, [illegible], जिल्ह्याचे काम जिल्ह्यातील [illegible] त्यात सर्व येते. [illegible] किंवा सहानुभूति [illegible]; पण ते काम निरर्थक न समजता नार्मात्मक [illegible] जावे. व जिल्ह्यातील लोकमताला योग्य [illegible]. जिल्ह्याबाहेरच्या पक्षाशीं संलग्न होण्याकरिता किंवा सहानुभूति दाखविण्याकरिता जिल्ह्यांतील एकी

मोडूं नये. बहुमत अल्पमत अशांनी निर्णय सहसा करूं नये. त्या पक्षास स्वतंत्रपणें ज्यांना जाऊन मिळावयाचें असेल त्यानें व्यक्तिशः मिळावें व उलट त्या पक्षाशीं संबंध ठेवणारा मनुष्य आपणांत आहे अशाविषयीं, जिल्ह्याचें काम करणाऱ्या लोकांनी, आक्षेप घेऊं नये.

प्रत्येक जिल्ह्याला एक जिल्हासभा, एक सर्व वेळ काम करणारा प्रचारक आणि एक वर्तमानपत्र इतकीं अंगें अवश्य आहेत. हीं अबाधित ठेवून व्यक्तिशः हीं सेवें किंवा महत्त्वाचें काम असेल तें स्वतंत्रपणें ज्यांना त्यानें करावें असें मला वाटतें.

मुंबईस नव्या पक्षघटनेचा विचार होणार आहे, व त्याविषयीं माझें मत मी तिकडे कळविणार आहे. पेणला भरणाऱ्या या सभेनेंहि आपला एखादा प्रतिनिधि त्या कामाची माहिती घेण्याकरिता म्हणून पाठवावा व त्यानें परत येऊन वाटल्यास पुन्हा सभा भरवून किंवा मतें घेऊन तिकडे कळवावें. कळावें.

आपला

न. चिं. केळकर.

श्री. ल. म. भोपटकर यांनी आपल्या पत्रांत कायदेभंग बंद करून विधायक कामाला सुरुवात करावी व ग्रामसभेपासून तों कायदेमंडळापर्यंत सर्व संस्थांत राष्ट्रीय पक्षाच्या लोकांनी काम करावें असें लिहिलें होतें.

## जमनादास यांचें भाषण

डॉ. डोंगरे यांनी श्री. जमनादास यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना केल्यावर तिला रीतसर अनुमोदन मिळून ते अध्यक्ष म्हणून स्थानापन्न झाले. आपल्या भाषणांत त्यांनी सध्याच्या राजकीय परिस्थितीचें सिंहावलोकन केलें व कायदेभंगाची चळवळ बंद करावी असें त्यांनी आपलें मत दिलें. यासंबंधी बोलताना ते म्हणाले, कायदेभंग बंद करावा या म्हणण्याचा अर्थ असा कोणी करूं नये कीं, कायदेभंगाच्या तत्त्वावर आमचा विश्वास नाहीं. तसें समजणें चूक होईल. मी तर उलट म्हणतों कीं, राष्ट्राला स्वातंत्र्य मिळेपर्यंत कायदेभंग व त्यासारखीं प्रत्यक्ष प्रतिकाराचीं (डायरेक्ट ॲक्शन) सर्व शस्त्रें आम्ही वापरलीं पाहिजेत. आज कायदेभंग बंद करा असें म्हणतों तें एवढ्याचकरिता कीं, आज तो चालविणें हें डावपेचाच्या दृष्टीनें फायदेशीर नाहीं. कायदेभंग हा अंमलांत आणणें राष्ट्राचें कर्तव्यच आहे. हें त्यांनी मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांच्या पुस्तकांतील उतारे देऊन सिद्ध केलें व तें मत आपल्यास मान्य असल्याचें त्यांनी सांगितलें.

## कायदेमंडळाचा प्रश्न

यानंतर त्यांनी गेल्या तीन वर्षांतील गोलमेज परिषदांच्या कामाचा आढावा घेतला व ते म्हणाले, "सध्याची शुभ्र पत्रिकेंतील योजना ही राष्ट्रास अमान्य असल्याचें जाहीर केलें पाहिजे. कारण ती प्रतिगामी स्वरूपाची आहे. असल्या तऱ्हेचे राज्यघटनेचे होणारे परिणाम हाणून पाडण्याकरिता व ओटावा करारासारख करार होऊं नयेत म्हणून आपण कायदेमंडळें काबीज केलीं पाहिजेत." शेवटीं त्यांनी आक्टोबरच्या ता. २८ ला मुंबईस भरणाऱ्या परिषदेचा उल्लेख करून त्या परिषदेत महाराष्ट्रानें पुढचें राजकीय धोरण ठरवावें व कायदेमंडळाच्या बाहेरील व आंतील असा एक कार्यक्रम ठरवावा असें आपलें मत सांगितलें. आपल्याला अध्यक्षपद दिल्याबद्दल आभार मानून टाळ्यांच्या गजरांत त्यांनी आपलें भाषण संपविलें.

## शुभ्रपत्रिकेचा निषेध

डॉ. सेनगुप्त, डॉ. बेझंट, श्री. मोदगी वगैरे पुढाऱ्यांच्या मृत्यबद्दल दुःखप्रदर्शनाचा ठराव अध्यक्षांनी मांडल्यावर तो सर्वांनी उभें राहून पसार केला. यानंतर श्री. भाटे यांनी शुभ्रपत्रिकेची योजना असमाधानकारक असून त्यांत पुढाऱ्यांनी सुचविलेल्या सुधारणा केल्या न गेल्या तर ती योजना प्रतिगामी स्वरूपाचीच ठरेल असें मत प्रकट करणारा ठराव मांडला. त्याला आमदार पाटील यांनी अनुमोदन दिल्यावर तो पसार झाला.

## कायदेभंग बंद करावा

दुसरा ठराव डॉ. वेलकर यांनी मांडला. त्याचे तीन भाग होते. पहिल्या भागांत कायदेभंग बिनशर्त व तावडतोब बंद करावा; दुसऱ्या भागांत काँग्रेस कमिट्या पुनरुज्जीवित करून त्यांच्याकरवीं विधायक कार्यक्रमास सुरुवात करावी व तिसऱ्या भागांत ग्रामपंचायतीपासून तों कायदेमंडळापर्यंत सर्व संस्था काबीज कराव्या असें म्हटलें आहे. महाडचे श्री. ओक यांनी समर्थनार्थ भाषण करून पुष्टि दिली. या ठरावाच्या पहिल्या भागाबद्दल म्हणजे कायदेभंग बंद करण्याच्या प्रश्नावर बराच वादविवाद झाला. श्री. सुगवेकर यांनी अशी उपसूचना मांडली कीं, सदर ठराव जिल्ह्यांतील राष्ट्रीय सभेच्या शाखा अगर ज्या लोकांनी प्रत्यक्ष कायदेभंगांत भाग घेतला असेल त्यांनी करावा अशी या सभेनें विनंति करावी. याला श्री. मनोहर, श्री. पी. नागरदास यांनी अनुमोदन दिलें. त्यांनी कायदेभंग बंद करावा असें आपलें मत असल्याचें जाहीर केलें. पण ठराव करणें बरोबर नव्हे असें आपलें मत असल्याचें सांगितलें. श्री. लिमये यांनी ठरावाला व उपसूचनेलाहि विरोध केला. त्यांनीहि कायदेभंग बंद करावा असेंच आपलें

मत असलें तरी या ठरावांतून जीं अनेक प्रमेयें निघतील तीं आपल्यास अमान्य असल्याचे सांगितलें; शिवाय वैयक्तिक स्वातंत्र्यावर आपण दडपण घालूं नये वगैरे कारणें सांगितलीं श्री. दा. वि. गोखले यांनी ठरावाच्या उद्देशाचें स्पष्टीकरण करून कायदेभंगाविरुद्ध तत्त्वतः आपण नसल्याचें सांगितले. तथापि सध्याच्या परिस्थितींत कायदेभंग चालू न ठेवणें राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने जरूरीचें आहे व तो बंद ठेवल्याशिवाय इतर विधायक कार्यक्रमाचीं सूत्रें पूर्ववत हातीं घेतां येणार नाहीत असें सांगून त्यावरील इतरआक्षेपांना उत्तरें दिलीं. यानंतर श्री. सुगवेकर यांनी आपली उपसूचना परत घेतली. श्री. जम्नादास यांनीहि आपलें मत सांगून ठराव मताला टाकला तेव्हा डॉ. डोंगरे, श्री. वाकरूळकर वगैरे सभासदांनी आपण कोणत्याच बाजूला मतें देणार नाही तेव्हा तटस्थांचीहि मतमोजणी करावी अशी विनंति केली. ठरावाचा प्रत्येक भाग मताकरिता निरनिराळा टाकावा असें ठरल्यानंतर कायदेभंग बंद करावा याला ५३ अनुकूल, ४४ विरुद्ध १६ तटस्थ अशीं मतें पडून ठराव पसार झाला. राष्ट्रीय सभेतर्फे विधायक कार्यक्रम करावा, हा भाग जवळजवळ एकमताने पसार झाला. व कायदेमंडळें काबीज करावीं ह्या भागाला पूर्ण एकमताने संमति देण्यांत आली.

### नव्या निवडणुकी

कायदेमंडळाच्या नव्या निवडणुकी कराव्या व जिल्ह्याला प्रमाणाबरहुकूम जागा मिळाव्या अशा अर्थाचा ठराव श्री. लेले यांनी मांडला व त्याला श्री. सोहनी यांनी अनुमोदन दिलें. आमदार पाटील यांनी ठरावाला संमति दिली. पण वक्त्यांनी जीं कारणें म्हणून सांगितलीं त्यावर आक्षेप घेतला. अध्यक्षांनी स्पष्टीकरण केल्यानंतर तोहि ठराव मंजूर झाला.

### जमीनधाऱ्याचा प्रश्न

ज्या मुख्य प्रश्नाकरिता ही परिषद बोलावण्यांत आली होती तो प्रश्न म्हणजे जमीनधाऱ्याचा. त्याबाबत एक मोठा ठराव परिषदेने पसार केला. याठरावांतील पहिल्या भागांत कुलाबा जिल्ह्याच्या फेरतपासणीने जो अन्याय केला गेला आहे त्याची दुरुस्ती व्हावी, दुसऱ्या भागांत गेल्या वर्षी जी तीन आणे तहकुबी मिळाली ती माफी समजावी व तिसऱ्या भागांत यंदा अतिवृष्टि, अनावृष्टि व अकालवृष्टि होऊन व धान्याच्या किंमती बेसुमार उतरल्यामुळे जें शेतकऱ्यांचें नुकसान होतें आहे, तें लक्षांत घेऊन धारा पन्नास टक्के माफींत टाकावा अशी मागणी करण्यांत आली. या ठरावावर अनेक भाषणें झालीं व तीं उद्बोधक अशींच होतीं. श्री. पाटील यांनी ओसाड पडलेल्या खारी वगैरे जमिनीचा खंड मालकांनी घेऊ नये म्हणून ठराव मांडला व त्याला श्री. पर्वते यांनी अनुमोदन दिलें. यावर श्री. नागरदास, श्री. लेले, डॉ. डोंगरे यांनी आक्षेप घेतले, पण शेवटीं तो ठराव मंजूरहि झाला. या ठरावाची अंमलबजावणी करण्याकरिता एक कमिटी नेमण्यांत आली.

### ग्रामपंचायती

ग्रामपंचायती स्थापन करून त्याना वाढीस लावाव्या अशा अर्थाचा ठराव पसार केला व हें काम करण्याकरिता एक कमिटी नेमावी असें ठरलें. या ठरावावर बोलतांना अनेक वक्त्यांनी व्यावहारिक अडचणी मांडल्या.

### जंगलाच्या तक्रारी व ज्यूरी

दुसऱ्या एका ठरावाने लोकांना जंगलासंबंधीचे आपले हक्क समजून देण्याकरिता श्री. टिळक यांचीं पत्रकें वाचून दाखवावीं व जंगलाबद्दलच्या तक्रारी दूर करण्याकरिता एक कमिटी नेमावी असें ठरलें. तसेच कुलाबा जिल्ह्यांत ज्यूरीची पद्धति सुरू करावी अशी मागणी करण्यासंबंधीचा ठराव पसार झाला. हल्ली पनवेल व अलीबाग तालुक्यांना हा हक्क आहेच. तोच इतर तालुक्यांना द्यावा असें ठरावांत म्हटलें आहे.

### जिल्हा-सभेची स्थापना

शेवटचा ठराव श्री. पर्वते यांनी मांडला. या ठरावांत असें म्हटलें आहे कीं, जिल्ह्यांतील नित्याचें राजकारण चालविण्याकरिता, तसेच लोकांचीं गाऱ्हाणीं व त्यांच्या तक्रारी दूर करण्याकरिता आणि इतर विधायक काम करण्याकरिता एक जिल्हा-सभा स्थापन करावी व ती कशी करावी याचा विचार करण्याकरिता श्री. टिळक, श्री. पाटील, श्री. भाटे, श्री. वाकरूळकर, डॉ. डोंगरे व श्री. पर्वते (चिटणीस) यांची कमिटी नेमावी. श्री. पर्वते यांनी ठरावाच्या पुष्ट्यर्थ यवतमाळ जिल्ह्यांतील कामाचें उदाहरण सांगितलें व श्री. न. चिं. केळकर यांच्या पत्रांतील सल्ल्याचा उल्लेख केला. श्री. टिळक व श्री. पाटील यांनी ठरावास पाठिंबा दिल्यावर तो पसार झाला.

### समारोप

वरील ठराव झाल्यावर सभेचें काम संपलें. आभारप्रदर्शनाला उत्तर देतांना श्री. जम्नादास यांनी कुलाबा जिल्ह्यांतील कार्यकर्त्यांचे त्यांच्या एकीबद्दल व सहकार्याबद्दल आभार मानले व ता. २८ च्या मुंबईच्या सभेस येण्याविषयी आमंत्रण दिलें. श्री. मंडलीक यांचे आभार मानण्यांत आल्यावर राष्ट्रगीत होऊन सभेचें काम संपलें.

व्याख्यानें

रात्रौ दहा वाजता श्री. दा. वि. गोखले यांचें श्री. जम्नादास मेथा यांच्या अध्यक्षतेखाली 'चांदच्या खलित्यांतील योजना' यावर व्याख्यान झालें. व्याख्यात्यांनी योजना समजावून देऊन तिच्या खऱ्या स्वरूपाचें आविष्करण केलें. श्री. जन्मादास यांनीहि इंग्रजींत या योजनेचा निषेध करून ती हाणून पाडण्याची विनंति केली. आभार-प्रदर्शनानंतर ही सभा खलास झाली.

# लटक्या लढाईने कोण फसणार ?

गाणगापूर, नरसोबाची वाडी, इत्यादि क्षेत्रांच्या ठिकाणीं दत्ताच्या पूजेच्या झांजा–टाळा वाजूं लागून उदा–धुपांचा गंध भोंवताली पसरूं लागला कीं, अंगांत संचार होऊन 'झार्डे' भडाभडा आरडूं–बडबडूं लागावीं, त्याप्रमाणें हिंदुस्थानाच्या स्वराज्याची वाटाघाट सुरू झाली कीं इंग्लंडांतील साम्राज्य-लोभी हुजूरपक्षीय मुत्सद्द्यांचीहि स्थिति होते आणि त्यांच्या तोंडून हिंदविद्वेषाचे फूत्कार बाहेर पडूं लागतात, हा अनुभव कांही नव नाही. तीन गोलमेज परिषदांमधील कार्याची सागता करण्यासाठी, जॉइंट पार्लमेंटरी कमिटीने आपल्या कामास प्रारंभ करतांच, हुजूर पक्षाच्या ब्रिटिश मुत्सद्द्यांनी गेल्या जून महिन्याच्या अखेरसि आपली एक परिषद, मोठा गाजावाजा करून, भरविली आणि आता तीन महिन्यांच्या सुटी-नंतर त्या कमिटीने आपलें उरलेलें काम पुरें करण्यास सुरुवात करतांच हुजूरपक्षीय गणांनी आपली एक जंगी सभा गेल्या ५ व ६ या तारखांस बर्मिंगहॅम येथे पुनः भरविली.

ह्या दोन्ही परिषदांचा आविर्भाव आणि फलश्रुति हीं अगदी एक-छापी होतीं. दोन्ही परिषदांमध्यें विरोधाची राळ इतकी मुबलक उडविण्यांत आली कीं, तिच्या जाळामध्ये भावी हिंदी सुधारणा जळून खाक होतात कीं काय अशीच भीति एखाद्याला वाटावी. जूनच्या परिषदेंत मि. चर्चिल हे आपल्या पारिपार्श्वकांसह हजर राहून 'हिंदुस्थानाला राज्याधिकाराचा गड्डा देऊं नका' असें हात उभारून सांगत होते; पण गेल्या सभेंत त्यांना आपली पायधूळ झाडण्याची संधि देण्यांत आली नाही. मात्र त्यांची भूमिका मुंबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड लाईड यांनी घेतली आणि त्यांनी मि. चर्चिल यांची उणीव कोणासहि भासूं दिली नाही. दोन्ही सभांमध्ये, ब्रिटिश सरकाराच्या हिंदुस्थानविषयक धोरणाबद्दल नापसंती व्यक्त करणारा ठराव मांडण्यांत आला; पण उलटसुलट भाषणें होऊन अखेरीस, पार्लमेंटरी जोड कमिटीचा निर्णय होई-पर्यंत मतप्रदर्शन लांबणीवर टाकावें अशीच उपसूचना पुनः सर थॉमस व्हाइट यांनीच मांडली व ती मंजूर झाली. उपसूचनेच्या विरोधकांची, म्हणजेच एक प्रकारें निंदाव्यंजक ठरावाच्या पुरस्कर्त्यांची, संख्या दोन्ही सभांत साडेतीनशेंच्या घरांत होती. याचा उघड अर्थ असा कीं, त्या साडेतीनशें कट्टर हुजूर-पक्षीय सभासदांना कमिटीच्या निर्णयापर्यंतहि दम धरावा असें वाटत नसून, हिंदुस्थानाला देऊं केलेल्या राजकीय हक्कांची छाटाछाट आताच करावी असा त्यांचा निकडीचा आग्रह होता.

पण उपसूचनेच्या विरोधकांचीं भाषणें बारकाईने पाहिलीं तर असा अंदेशा येतो कीं, ब्रिटिश सरकाराला स्वराज्यदानाचे कामीं, एकाने 'हो' म्हणावें तर दुसऱ्याने 'ना' म्हणावें, असा खेळ, इंग्लंडांतील हुजूर पक्षाचे उजवे-डावे हात, आपापसांत मथून, वरपांगीं विरोधाने, खेळत असावेत. आणि हा संशय हिंदी माणसाच्याच मनांत उद्भवेल असें नाही, तर कोणाहि तटस्थ निरी-क्षकालाहि तो साधारच वाटेल. मुत्सद्दी कावा म्हणतात तो हाच. त्याचें यथार्थ वर्णन, खुद्द एक ब्रिटिश मुत्सद्दी, लॉर्ड मोर्ले हे आपल्या आठवणींत असें करतात कीं, "पार्लमेंटांतील पुष्कळ वादविवाद असे असतात कीं, त्यामध्ये भाग घेणारे परस्परविरुद्ध मतांचे सभासद हे खरोखर अंतर्यामीं एकाच विचाराचे असतात;

परंतु आपलें हें मतैक्य झाकून टाकण्यासाठी आणि विरोधाचा देखावा उभारण्यासाठी एकमेकांना मारक असे युक्तिवाद ते शोधून काढीत असतात." मोर्लेमुनींची ही भावार्थदीपिका हातीं घेतली म्हणजे दोनहि हुजूरपक्षीय सभांचा ग्रंथ कोणालाहि नीट रीतीने लागण्यासारखा आहे.

गेल्या आठवड्यांत भरलेल्या हुजूरपक्षाच्या सभेचा पडदा उघडण्यापूर्वी या कृतक-कलहाच्या जाहिराती आगाऊ भरपूर वांटण्यांत आल्या होत्या. या सभेचा रोख म्हणजे श्वेतपत्रकाने हिंदुस्थानाला मोठें घबाड मिळत आहे व इंग्लंडचें डबोलें बुडत आहे असा पुकारा करणें हा असून, त्याचा हेतु हिंदी लोकांनी श्वेतपत्रकापलीकडे कांही मागणी करूं नये आणि त्यामुळे ब्रिटिश सरकारला अधिक अधिकार देणें भाग पडूं नये हा होता. पार्लमेंटांत बहुसंख्य असलेल्या हुजूरपक्षाला, म्हणजेच त्याचे शिरोमणि सर सॅम्युअल होअर यांना, पार्लमेंटाबाहेरील हुजूरपक्षीयांचा पाठिंबा देऊन त्यांचे हात बळकट करण्यासाठी विरोधाचें हें सारें नाटक उभें केलेलें होतें. पण त्यांत आपलें अंग कांही नाही असें भासविण्यासाठी भारतमंत्री सर सॅम्युअल होअर हे सभेस हजर राहिले असले तरी त्यांनी तेथे आपलें तोंड अजीबात उघडलें नाही. मात्र नेमकें या सभेच्या सुमारास, आपल्या मतदारसंघाला उद्देशून लिहिलेलें एक पत्र त्यांनी प्रसिद्ध केलें. त्यांत, 'आम्ही हिंदुस्थानाला भीतीने शरणचिठ्ठी लिहून देत आहों किंवा एकदम राज्यत्याग करीत आहों असें समजूं नका' असें आश्वासन दिलेलें आहे. बर्मिंगहॅम येथे जमणाऱ्या आपल्या हुजूरपक्षीय जातभाईंना ही एक अप्रत्यक्ष सूचनाच नव्हे काय?

त्याचप्रमाणे 'टाइम्स', 'मँचेस्टर गार्डियन' वगैरे वृत्तपत्रांतूनहि, मोठ्या साळसूदपणाचा आव आणून, कांही लेखकांनी जाहीर केलें आहे कीं, हिंदुस्थानाला श्वेतपत्रकांतील अधिकार बहाल करण्याचे कामीं खळखळ करूं नका! मि. एडवर्ड व्हिलियर्स या गृहस्थांनी 'टाइम्स' मधल्या आपल्या पत्रांत तर असा धाक घातला आहे कीं, 'चर्चिल-लाईड कंपूच्या धोरणाने सरकारी योजनेवर मात केली तर, संभाळा! कॉंग्रेसला, तिचें गेलेलें बळ पुनः प्राप्त होईल!' 'मँचेस्टर गार्डियन' मधील पत्राचा सूर याहिपेक्षा वरच्या पट्टीतील आहे. बिहार-ओरिसा प्रांताचे माजी गव्हर्नर सर ह्यू. मॅक्फर्सन यांनी त्या पत्रांत असा इषारा दिला आहे कीं, "श्वेतपत्रकाला गुंडाळून ठेवलें किंवा त्यांतील हक्क कमी केले तर हिंदुस्थानांत इतका प्रचंड क्षोभ निर्माण होईल कीं, त्यांतून, आजवर झाली नाही इतक्या उत्कटतेची आणि सर्व पक्षांच्या समुच्चयाची कायदेभंगाची नवी चळवळ पेट घेईल." इतर पत्रांचा व भाषणांचा सूरहि एकच; आणि तो म्हणजे "इंग्लंडने जिवाचा धडा करून श्वेतपत्रकांतील स्वराज्य हिंदुस्थानाला देऊन टाकावें, त्यांत थोडीहि माघार घेऊं नये." यांतूनच निघणार उलटा—पण खरा—अर्थ असा कीं, श्वेतपत्रकापेक्षा रतिमात्र अधिकार हिंदुस्थानाला देऊं नका; त्यांतील सुधारणा म्हणजे स्वराज्यदानाची अंतिम सीमा होय.

अशा स्वरूपाचे वारे वाहात असल्यामुळे प्रत्यक्ष सभेंत काय होणार याची अटकळ कोणालाहि आगाऊ होतीच आणि सभेचें काम त्या अटकळीप्रमाणेंच घडलें. आधीपासून नगारे-नौबती झडत असल्याकारणाने सुमारें दोनहजार प्रतिनिधि सभेला हजर होते; आणि तिला महत्त्व चिकटविण्यासाठी पार्लमेंटचे सभासद, मंत्रिमंडळाचे घटक आणि खुद्द भारतमंत्री सर सॅम्युअल हे दाखल झाले होते. अशा प्रेक्षकांपुढे व्हायकौंट वोल्मर यांनी या लुटुपुटीच्या लढाईचा बिगुल वाजविला. त्यांनी असा ठराव मांडला कीं, या सभेचा राष्ट्रीय सरकारावर विश्वास आहे; पण श्वेतपत्रकामध्ये खजिना, लष्कर, पोलीस, व्यापारांतील सवलत आणि हिंदी प्रजेचें हित या पांच बाबींसंबंधी ज्या शिफारसी केलेल्या आहेत, त्यांबद्दल या सभेला धास्ती वाटत आहे याचा जाइंट कमिटीने विचार करावा.

या ठरावांतील पूर्वार्ध हा औपचारिक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण सध्याच्या ब्रिटिश सरकाराच्या कपाळावर 'राष्ट्रीय' त्वाचा मळवट भरलेला दिसत असला, तरीं वस्तुतः तें हुजूरपक्षीयच सरकार आहे. तेव्हा त्यावर आपला विश्वास आहे असें हुजूरपक्षाच्या सभेनें आवर्जून सांगण्यांत कांहींच तथ्य नाही. ठरावाच्या उरलेल्या भागाचा सरळ अर्थ केल्यास त्यांतून असा ध्वनि निघतो कीं सरकारानें श्वेतपत्रकांतून हिंदुस्थानाला देऊं केलेलें, सैन्य व खजिना या बाबतींतील अधिकार प्रमाणाबाहेर असल्यामुळे त्यांना कात्री लावावी !

ह्या ठरावावर भाषणें करतांना हुजूर पक्षीय प्रतिनिधींनी जो मानभावीपणा व कांगावखोरपणा केला, तो पाहून कोणालाहि चीड आल्याखेरीज राहणार नाही. 'नव्या सुधारणा चालू झाल्यास दरसाल सत्तर लाख पौंड हिंदुस्थानाला जादा खर्च करावे लागतील' ही एकाला चिंता; तर हिंदी जहालांच्या हातीं सत्ता गेल्यास हिंदुस्थानांतील शेतकऱ्याची दुर्दशा उडेल ही दुसऱ्याला काळजी ! परंतु हत्तीच्या पावलांत सर्वांचे पाय येतात, त्याप्रमाणे लॉर्ड लॉइड यांच्या भाषणांत सर्व विरोधकांचे रंग उमटलेले होते. त्यांनी आपल्या चर्चिल—छापाच्या भाषणांत अशी भीति प्रकट केली कीं, 'इंग्लंडाचा हिंदुस्थानावरील पगडा उठला कीं, हिंदुस्थानांत बेबंदशाही, गोंधळ व झोटिंगपातशाही यांचें थैमान सुरू होईल' ! हा बागुलबुवा हिंदी जनतेने इतके वेळा पाहिलेला आहे कीं, तो निर्जीव आहे अशी खात्री झाल्यामुळे त्याला हिंदुस्थानांतील मवाळहि भीतनासे झाले आहेत. मात्र कांहीं कांही वेळा रागाच्या भरांत माणूस खरें बोलून जातो, त्याप्रमाणे लॉर्ड लॉईड यांनी इंग्लंडाला हिंदुस्थानाची इतकी विवंचना कां लागून राहते, याची केलेली मीमांसा प्रांजल व स्पष्ट आहे.

आजमितीला ब्रिटिश साम्राज्याची स्थिति अशी नाजूक झालेली आहे कीं, तिच्या कमानींतील एक एक दगड ढिला होऊं लागला असून तिला एकमेव आधार देणारा 'चावीचा दगड' (Keystone) हिंदुस्थान हाच आहे. तो ढासळला—म्हणजे हिंदुस्थान इंग्लंडाच्या हातचा गेला कीं—ब्रिटिश साम्राज्याची कमान जमीनदोस्त होणार या भीतीची जाणीव लॉर्ड लॉइड यांनी आपल्या हुजूरपक्षीय श्रोत्यांना करून दिली; आणि हा भावी अनर्थ टाळण्यासाठी त्यांनीं उपायहिं सुचविला. परंतु तो चुकीचा व त्यांच्याच आंगलट येणारा असा आहे. सायमन कामिशनच्या शिफारशींपलीकडे पाऊल टाकूं नका आणि हिंदी स्वराज्याच्या गाडीला सध्याप्रमाणे भरमसाट वेग देऊं नका असा त्यांचा उपदेश. पण तो अमलांत आल्यास हिंदुस्थानांतील असंतोष कमी न होतां उलट वाढत गेल्यावर साम्राज्याच्या कमानीला बळकटी कशी येणार ? परंतु सरकारातर्फें मि. चेंबर्लेन यांनी जो खुलासा केला, त्यांत श्वेतपत्रकामधील सुधारणा तरी देण्याचें इंगित काय याची फोड केलेली आहे. ब्रिटिशांना आपलें साम्राज्य टिकवावयाचें आहे, तें मुख्यतः व्यापारासाठी. आपल्या मालाला इतर देशांतील बाजारपेठा मोकळ्या सापडाव्या आणि त्यावर आपण आपलें उखळ पांढरें करावें, हा हेतु मनांत धरून त्या हेतूच्या सिद्ध्यर्थ साम्राज्याचें साधन त्यांना वापरावयाचें आहे. या दृष्टीने पाहतां, हिंदुस्थानांत ब्रिटिश व्यापार जोराने फोफावावा अशी जास्तींत जास्त तरतूद श्वेतपत्रकांत केलेली आहे असें आश्वासन मि. चेंबर्लेन यांनी साम्राज्यलोभी हुजूरपक्षीयांना दिलें. तसेच हिंदुस्थानांतील भावी लष्करासंबंधीं सभेंत जी भीति व्यक्त करण्यांत आली, तिचा विचार ब्रिटिश सरकाराने आगाऊच केलेला असून तिच्या निवारणार्थ संरक्षक बंधनांचीं जाळीं पुष्कळच विणण्यांत आलीं आहेत, अशीहि कबुली मि. चेंबर्लेन यांनी स्वच्छ शब्दांनी दिली. त्यामुळे हुजूरपक्षीय सभासदांचें भय मावळून मूळ नापसंतीचा ठराव मागे पडला आणि सर व्हाइट यांचीं,

जॉइंट कमिटीचा निर्णय होईपर्यंत वाट पाहण्याची उपसूचना ७३७ वि. ३४४ मतांनी पसार झाली व सरकाराच्या धोरणाला हुजूरपक्षाची पुष्टि, आधी व्यूह रचून ठेवल्याप्रमाणे, प्रचंड बहुमताने लाभली.

हुजूरपक्षाने सरकाराला मिळवून दिलेल्या या 'विजया'बद्दल लंडन येथील 'मॉर्निंग पोस्ट' 'डेली एक्स्प्रेस' वगैरे पत्रें, सरकाराची पंचारती करण्यास पुढे सरसावलीं आहेत. पण त्या सरकाराने हें समजून चाललें पाहिजे कीं, लढाई जशी लटकी, तसाच तिच्यांतील हा जयहि लटकाच आहे. जर बर्मिंगहॅमच्या सभेने मूळ ठराव नामंजूर करून त्याच्या चिंधड्या उडाविल्या असत्या आणि सरकारी श्वेतपत्राक किंवा जॉइंट कमिटीचा निर्णय याला निःसंदिग्धपणें पाठिंबा दिला असता तरच तो सरकाराचा खरा जय म्हणता आला असता. पण आज काय? सारा अधांत्री कारभार! जॉइंट कमिटीचा निकाल बाहेर पडल्यावर, हुजूरपक्षाने दोनदां म्यान केलेली स्वतःच्या मताची तलवार प्रकट होणार आणि मग सरकाराचा जय-पराजय ठरणार. अर्थात् तो कौल कसाहि पडला तरी, हिंदुस्थानाला त्याचें सुहेर-सुतक कांहीच नाही. कारण मूळ श्वेतपत्रक हेंच स्वीकार करण्याच्या लायकीचें नाही असा खडखडीत अभिप्राय येथील प्रागतिक पुढाऱ्यांनीहि अनेक वेळा जाहीर केलेला आहे. मग त्या श्वेतपत्राकाचे हातपाय कापूं पाहणाऱ्या जॉइंट कमिटीच्या निकालाचें कोडकौतुक हिंदुस्थानाला काय? आणि कैमुतिक न्यायाने त्या निकालाला पायबंद लावणाऱ्या हुजूरपक्षाच्या मताची मातब्बरी ती काय?

## नव्या पक्षाचा नियोजित कार्यक्रम

चालू महिन्यांत ता. २८ व २९ रोजीं मुंबईस बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषद भरण्याचें घाटत आहे. त्या परिषदेपुढे ठेवण्यांत येणाऱ्या कार्यक्रमाचा आशय पुढीलप्रमाणे आहे—

१ चलन आणि हुंडणावळ यांजवरील पूर्ण सत्ता कायदेमंडळामध्येच सुपूर्त केली पाहिजे. ह्या स.त्तेंत सरकारानियंत्रित रिझर्व्ह बँक स्थापणें या गोष्टीचा अन्तर्भाव होईल. अशा बँकेच्या स्थापनेने चलन आणि पतपेढी यांचे संबंध नीट बसून पदार्थांच्या किंमतींत स्थैर्य उत्पन्न होण्यास, हुंडणावळ निश्चित राहण्यास, बँकिंग पद्धतीचा प्रसार करण्यास आणि व्यापार व उद्योगधंदे यांस मदत देण्यास उपयोग होईल.

२ पदार्थांची देवघेव सुरक्षित चालण्यास आणि राष्ट्राराष्ट्रांमध्ये दळणवळण वाढण्यास अनिर्बन्ध व्यापार उपकारक ठरतो असें या पक्षाचें मत आहे. परंतु गेलीं दोनशें वर्षे हिंदुस्थानाचा आर्थिक प्रश्न ब्रिटनच्या स्वाधीन असल्याने व त्यामुळे साहजिकच त्या प्रश्नाला गौण पद प्राप्त झाल्याने हिंदी उद्योगधंद्यांचा पुनरपि बस उत्तम रीतीने बसण्यासाठी विवेकमूलक संरक्षक पद्धति अनुसरणें आज भाग आहे. आणि ही संरक्षक पद्धति लवकरच सोडतां येईल असें वाटत नाही. कारण जगांतील सर्व सरकारें दिवसेंदिवस आर्थिक बाबतींत चढाऊ धोरण स्वीकारीत आहेत. अशी पद्धति अंमलांत आणतांना अर्थातच कामकरी, गिऱ्हाईक आणि राष्ट्रीय सरकार यांच्या हिताकडे लक्ष देण्यांत येईल.

३ कर्जाच्या ओझ्याखाली आज शेतकरी-वर्ग दबला जात आहे. शेतीवरील करहि अतिशय वाढले आहेत. त्यामुळे शेतकरी सावकारांच्या तावडींत सांपडले आहेत. राष्ट्रीय कर्ज वाढल्याचा हा सारा परिणाम आहे. हें राष्ट्रीय कर्ज कमी होण्यासाठी हा पक्ष शिकस्तीचा प्रयत्न करील. लँड-मॉर्टगेज बँका, पतपेढ्या याबद्दल सदर पक्षाचें धोरण नेहमीच सहानुभूतीचे राहील.

४ कामकऱ्यांना त्यांच्या निर्वाहास पुरेसें वेतन मिळावें आणि कामाचे तास कमी करून त्यांना योग्य तितका विसावा मिळावा या गोष्टींकडे पक्षाचें लक्ष राहील. बेकार झाल्यास उदरनिर्वाहाची कांही व्यवस्था करण्याबद्दल, आजारीपण आणि बाळंतपण या वेळीं स्त्रियांची सोय करण्याबद्दल आणि म्हातारपणीं पेन्शन मिळवून देण्याबद्दल हा पक्ष प्रचार करीत राहील. राष्ट्रीकरण करण्यास जे धंदे योग्य झाले आहेत असें दिसून येईल त्यांचें राष्ट्रीकरण कितपत आणि कशा रीतीने होईल या प्रश्नांची छाननी करण्यांत येईल.

५ सार्वत्रिक मतदानपद्धति आणि समान शैक्षणिक सोयी यांच्या योगाने अस्पृश्यांना नागरिकत्वाचा दर्जा प्राप्त होईल, अशी या पक्षाची ठाम समजूत आहे. हा दर्जा त्यांना मिळवून देण्याबद्दल

इतर जे जे उपाय अवलंबण्यांत येतील त्यांना या पक्षाचा पाठिंबा मिळेल.

६ सध्याच्या करपद्धतीची चौकशी करून ती न्याय्य आणि सुसह्य करण्याचा प्रयत्न हा पक्ष करील.

७ मुंबईस ता. २८ व २९ रोजीं भरणाऱ्या बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषदेपुढे हा खर्डा ठेवण्यांत येईल.

# स्फुट सूचना

१ मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यांनी ग्रामोद्धाराच्या प्रश्नाचा पिच्छाच पुरविला आहे. बेळगांवास पाटलांचा दरबार भरविल्यानंतर त्यांनी बुधवार ता.४रोजीं पुण्यास मुंबई इलाख्यांतील राजेरजवाड्यांचा दरबार भरविला. राजेरजवाड्यांवर मुंबईच्या गव्हर्नराची हुकमत आता राहिलेली नाही. तरी त्यांना बोलावण्याचें कारण असें सांगण्यांत आलें कीं, खालसा मुलुखांत ठिकठिकाणीं देशी संस्थानें विखुरलेलीं असल्यामुळे, ग्रामोद्धाराची योजना त्यांनीं आपल्या हद्दींत अमलांत न आणिल्यास खालसा मुलुखांतील ग्रामोद्धाराचें कार्य लंगडे पडेल. गव्हर्नरांनी ग्रामोद्धारासंबंधी पूर्वी केलेल्या भाषणावर असा आक्षेप घेण्यांत आला होता कीं, त्यांच्या योजनेस कायमचें स्वरूप नाहीं. त्या आक्षेपास गव्हर्नरांनी वरील दरबारांत उत्तर दिलें. त्यांनी स्थानिक संस्थांचे दोन वर्ग पाडले आहेत. एक पतपेढ्यांचा व दुसरा ग्रामपंचायतींचा. या दोन संस्थांमार्फत ग्रामोद्धाराचें कार्य करून घ्यावयाचें असून पतपेढ्यांच्या कार्यावर देखरेख तालुका डेव्हलपमेंट असोसिएशन व डिस्ट्रिक्ट असोसिएशन यांची आणि ग्रामपंचायतीवर देखरेख तालुका लोकल बोर्ड व जिल्हा लोकल बोर्ड यांची राहावी. तालुका असोसिएशनचा अध्यक्ष मामलेदार व डिस्ट्रिक्ट असोसिएशनचा अध्यक्ष कलेक्टर असावा. डिस्ट्रिक्ट असोसिएशन व जिल्हा लोकल बोर्ड यांच्या सभासदांनी एकत्र बसून ग्रामोद्धाराकरिता कोणतें सोयीस्कर क्षेत्र निवडावयाचें हें ठरवावें व त्या कार्याकरितां लागणाऱ्या फंडाची उभारणी कलेक्टराने करावी !

---

२ ग्रामोद्धाराच्या चळवळीचें मुख्य सूत्र मुलकी खात्याच्या हातीं देण्यांत यावयाचें असून त्याजकडूनच पैशाचा विनियोग होणार आहे. मुलकी खात्याचे कलेक्टर, डे. कलेक्टर, मामलेदार हे अधिकारी खेड्यात जातील त्या वेळीं त्यांच्या कामांपैकीं मुख्य काम ग्रामोद्धाराचें आहे असें नमूद करण्यांत येणार आहे. आरोग्य, शिक्षण व शेती यांची सुधारणा व प्रगति यांजवर ग्रामोद्धाराच्या चळवळीचा मुख्य जोर राहील. या कामीं त्या त्या खात्यांतील अधिकाऱ्यांची मदत मुलकी अधिकारी घेतील आणि ग्रामोद्धारांतील निरनिराळ्या बाबींचें शिक्षण खेड्यांतील लोकांना बिनतारी संदेश, मोटारींतून हिंडणारे फिरते प्रचारक यांजमार्फत देण्यांत येईल. गव्हर्नरसाहेबांची ही योजना एकंदरींत बरीच मोहक दिसते. त्यांना खेडेगांवाची आर्थिक स्थिति सुधारण्याचा उपाय शेत–सुधारणा हा एकच आपल्या डोळ्यापुढे ठेवला आहे. परंतु तेवढ्याने खेड्यांतील लोक सुखी होणार नाहींत असें आम्हास वाटतें. कारण शेतीवर इतक्या लोकांचा भार सांप्रत पडला आहे कीं, हल्लींहून शेतांत दिढी-दुपटीने पीक आलें तरी शेतकरी कंगाल व दुःखीच राहील.

---

३ ब्रिटिश राज्यापूर्वी खेड्यांतून शेती हा एकच धंदा होता असें नाहीं. खेड्यातून कुंभार, चांभार, धनगर, साळी, कोष्टी, मांग, ढोर, कासार, बुरूड यांचे स्वतंत्र धंदे असून त्यांजवर ते पोट भरीत असत. पण हे सर्व धंदे मोठाल्या परदेशी व स्वदेशी कारखान्यांनी मारून टाकल्यामुळे त्यांची अन्नान्नदशा झाली आहे. या धंदेवाइकांना त्यांच्याच धंद्यांचें सुधारलेल्या पद्धतीने शिक्षण देण्याची व त्यांनी नवीन धर्तीवर सुरू केलेल्या धंद्यांच्या संरक्षणाची तजवीज सरकार करील तरच खऱ्या ग्रामोद्धाराची कांहीं आशा आहे. एरव्ही वायरलेस, ध्वनिक्षेपक यंत्रें व मोटारी यांच्या पायीं लोकांपासून उभारलेला फंड फस्त होऊन परदेशांची भर केल्याचें पातक मात्र सरकारास लागेल. औंधचे श्रीमंत बाळासाहेब यांनी खेड्यांतून पेन्शनरांना राहण्याची सक्ती करण्यांत यावी हा एक ग्रामोद्धाराचा उपाय सांगितला. परंतु त्या उपायाने लहान व मध्यम प्रतीच्या पेन्शनरांना खेड्यांत राहण्याचें भाग पाडलें तर तो त्यांना एक जुलमच वाटेल. कारण खेड्यांतून आता कोणत्याच सोयी राहिल्या नाहींत व वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणाची तरतूद खेड्यांत होण्याचा संभव मुळीच नाहीं. यामुळे पेन्शनर शहराकडे धाव घेतात हें विसरतां कामा नये.

---

४ पुण्यांतील प्लेगचा जोर अद्यापि कमी होत

नसल्यामुळे या कामीं सक्तीचे उपाय अमलांत आणण्याकरिता पुणे शहर म्युनिसिपालिटीने सरकाराकडे विशेष अधिकार मागितले व ते तिला मिळाले. त्याप्रमाणे प्लेगने लागलेल्या एखाद्या रोग्यास त्याच्या घरीं राहूं दिल्यापासून आसपासच्या लोकांना अपाय होण्याची भीति असल्यास त्यास त्या जागेतून हलविण्याचा व दवाखान्यांत पोचविण्याचा अधिकार म्युनिसिपालिटीस मिळाला आहे. तसेंच, एखादें घर प्लेगने दूषित झालें असल्याचें समजल्यास तें स्वच्छ करण्याचा किंवा करविण्याचा अधिकार म्युनिसिपालिटीस आहे. त्याचप्रमाणे सदर घरांतील दूषित वस्तूंचा नाश करण्याचा अधिकारहि म्युनिसिपालिटीस आहे. आजार लवकर हटविण्याकरिता अशा प्रकारचे अधिकार म्युनिसिपालिटीस मिळाले हें योग्यच झालें. प्रश्न काय तो या अधिकारांमुळे शहरवासीयांवर म्युनिसिपालिटीकडून जुलम होईल कीं काय, याबद्दलचा आहे. परंतु म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष, चीफ ऑफिसर व हेल्थ ऑफिसर हे केव्हांहि आपला हा अधिकार तारतम्यानेंच चालवितील, अशी सर्वांची अपेक्षा असणें स्वाभाविक आहे. म्युनिसिपालिटीच्या साधारण सभेपुढे पं. रघुनाथ शास्त्री यांनी 'सक्तीचे अधिकार तहकूब करावे' असा ठराव मांडला असता अध्यक्षांनी सक्ती होणार नाही असें आश्वासन दिलें आणि तो ठराव मागे घेण्यांत आला. यावरून म्युनिसिपालिटी आपला अधिकार सारासार विचाराने चालवील हें उघड होतें. अँब्युलन्सकारमधून रोग्याला इस्पितळांत पोचविण्याची व्यवस्था म्युनिसिपालिटीने केली आहे. त्या गाडींत रोग्याला उचलून घालण्याकरिता जीं माणसें नोकर म्हणून ठेवलीं आहेत त्यांपैकीं कांहींवर धर्मदृष्ट्या सनातनी लोकांचा आक्षेप आहे. परंतु त्यांनी किंवा दुसऱ्या कोणीहि रोग्याला आपल्या स्वयंसेवकांकडून अथवा इतर रीतीने गाडींत घालण्याची व्यवस्था केली तर तिला म्युनिसिपालिटी हरकत घेणार नाही.

# अक्कलकोट संस्थानांतील दडपशाही

अक्कलकोट संस्थानांतील मंगरूळचे रहिवाशी पुजारी बंधु यांजवरील फौजदारी खटल्याची हकीकत वेळोवेळीं केसरींतून प्रसिद्ध झालीच आहे. या दोघांना नुकत्याच प्रत्येकीं एक वर्ष सक्तमजुरी व शंभर रुपये दंड व तो न दिल्यास सहा महिने सक्तमजुरी अशा शिक्षा झाल्या. त्यावर अक्कलकोटचे सेशन्स जज्ज म्हणजे संस्थानाचे दिवाण श्रीयुत परुळेकर यांचेकडे अपील झालें. त्यांत त्यांनी रा. रंगराव पुजारी यांची शिक्षा कायम केली व रा. श्रीपतराव यांजवरील गुन्ह्याची शाबिती तेवढी धरून क्रि. प्रो. को. कलम ५६२ चा अंमल करून दोन वर्षे चांगली वर्तवणूक ठेवण्याच्या जामिनावर त्यांस सोडून दिलें.

### मौजेचा खटला

या प्रकारणाची सर्वच हकीकत थोडी मौजेची आहे, पण त्यावरून संस्थानी कारभाराला ब्रिटिश कार' भारचा 'गुण' लागला नसला तरी 'वाण-मात्र खास लागलेला दिसतो. या पुजारी बंधूंपैकीं रा. रंगराव यांनी अलीकडे तनिश्चार वर्षापासून साऱ्याच्या असह्य बोजाबद्दल व त्यांत तहकुबी व सूट मिळण्याबद्दल संस्थानांत वेळोवेळीं पुढाकार घेऊन खटपट केली. त्यांत संस्थानी अधिकाऱ्यांना "करबंदी" च्या चळवळीचा वास येऊन त्यांनी चळवळ्या लोकांना दहशत बसावी व आपला कारभार निर्विरोध चालावा या अपेक्षेने या खटल्याची उभारणी केली असावी असा तेथील लोकांस संशय वाटतो कारण ही शिक्षा झाली ती कशाकरिता ? तर जमिनींतील पीक चोरून (!) नेल्याबद्दल. जमीन व पीक कोणाचें? तर रा. श्रीपतराव पुजारी यांचेंच, पण सरकारी सारा न दिल्यामुळे तें सरकारजमा झालें असें संस्थानी सरकार म्हणतें. त्या शेतांतील शेत सरकारजमा करून कबजा घेण्याचा विधी तरी सरकाराने रीतसर केला काय ? नाहीं. बरें सारबाकी थकली ती या जमिनीबद्दल काय ? नाही. या जमिनीबद्दलचा सारा तर भरलाच होता, पण याच खातेदारच्या नांवावर पण गहाण स्वरूपी आणि दुसऱ्या ऋणको कुळाच्या कबज्यांत ज्या जमिनी आज कैक वर्षे आहेत, ज्यांचा सारा तीं कुळेंच देत आहेत व पिकें नेत आहेत आणि ज्या जमिनीशीं आणि साऱ्याशीं आपल्याला कर्तव्य नाही, त्या वाटल्यास सरकारने खुशाल जप्त कराव्या म्हणून पुजारी बंधूंनी सरकारास वारंवार कळविलें होतें, त्या जमिनीबद्दल होय.

### दिवाणाशीं बाचाबाची

अर्थात् या खटल्याचें अंतस्थ कारण हा पुजारी बंधूंवरील चळवळीबद्दलचा रोष हें असावें असा तर्क आहे. यंदाच्या सालीं साराव सुलीकरितां दिवाणसाहेब लवाजम्यानिशीं गांवमजकुरी गेले असतां तेथे या पुजारी बंधूंशीं, विशेषतः

रा. रंगरावांची, दिवाणांशी जी बाचाबाची झाली हेंच निकटचें कारण होय. आणि बाचाबाची करण्याच्या या महान अपराधाबद्दलच संस्थानी कारभाऱ्यांनी या शिक्षा दिल्या असाव्या हें न सांगताहि समजण्यासारखें आहे. कारण सारावसुली करणें एवढीच संस्थानी अंमलदाराची मनीषा असती तर ती पुरविणें मोठेंसें कठिण नव्हतें. व बोलाचालीबद्दल आरोपी पुजारीबंधु यांनी दिलगिरी प्रदर्शित केलीहि होती ! पण हें दिलगिरीपत्रहि खिशांत ठेवून पुनः पुजारीबंधूंना शिक्षा झाल्या त्या झाल्याच.

या खटल्यांत आणखी एक स्पष्ट अन्याय झाला आहे आणि तो म्हटला म्हणजे पुजारीबंधूंना बचावाचे सर्व साक्षीदार कोर्टांत तपासण्याची संधि मिळाली नाही हा होय. या खटल्याचे कामीं जप्ती वगैरे बाबतींतील मुद्द्यांवर आरोपीतर्फे साक्षीदार दिलेले होतेच; परंतु फिर्यादी व आरोपी पक्षांची वर लिहिल्याप्रमाणें आपसांत समजूत झाली होती कीं नाही व विशेषतः दिवाण व आरोपी यांची गांवच्या चावडीवर बाचाबाची झाली व त्यामुळेच हा खटला भरला कीं काय हें सिद्ध करण्याकरितां खुद्द दिवाण श्रीयुत परुळेकर यांची व इतरांच्या साक्षी काढल्या होत्या. परंतु दिवाणांची साक्ष घेण्यास कोर्टानें मंजुरी दिली नाही.

### दिवाणांची साक्ष

दिवाणांची साक्ष कोर्टानें काढूं दिली नाही म्हणून बाकीच्या बऱ्याच साक्षीदारांच्या साक्षी देण्याचें नाकारण्यांत मात्र आरोपींचा सात्विक निषेध व वैताग दिसत असला तरी तसें करण्यांत पुजारीबंधूंची आत्मघातकीपणा केला असे आमचें स्पष्ट मत आहे. कोर्टानें नाकारलेल्या साक्षी सोडून, घेऊं दिलेले सर्व साक्षीदार घेतले असते तर आरोपींच्या या वैतागाच्या सबबीवर फिर्यादी पक्षाला जो फुकटचा भलेपणा सध्या मिरवितां येत आहे तो आला नसता व त्या सर्व साक्षीपुराव्यावरून दिवाणांची साक्ष नाकारण्यांतच पाणी मुरतें आहे, ही गोष्ट अधिकच जास्त सिद्ध झाली असती.

अपिलामध्ये से. जज्ज असलेल्या दिवाण परुळेकरांनी आरोपी नंबर १ रा. श्रीपतराव पुजारी यांची शिक्षा फिरवून व जामिनावर त्यांना सोडून अर्धवोबडा न्याय दिला हें खरें; परंतु त्यामुळे तर आरोपी नं. २ श्री. रंगराव पुजारी यांची शिक्षा कायम करण्यांत झालेल्या अन्यायाचें स्वरूप जास्तच स्पष्ट होतें. आरोपी नं. २ रंगराव पुजारी हे जप्त जमिनीचे खातेदार नाहीत; नं. १ श्रीपतराव हे खातेदार आहेत व आरोपी नं. २ हे त्यांचे एकत्रांतील सख्खे बंधु आहेत. जप्त जमिनींतून पीक नेलें असें गृहीत धरलें तरी हें कृत्य आरोपी नं. १ यास फार तर चिकटेल. नं. २ यास चिकटूं शकत नाही. नं. २ रंगराव यांजवर निराळा व स्पष्ट पुरावाहि नाही. पण खेदाची गोष्ट ही कीं, खातेदार गुन्हेगारावर दया दाखवून त्यांस सोडण्यांत आलें. पण त्याचा एकत्रांतील भाऊ म्हणून ज्यास फार तर साथीदार म्हणतां येईल, त्या आरोपी नं. २ ची मात्र एक वर्षाची सक्तमजुरीची निर्घृण शिक्षा कायम झाली. अर्थात् यास कारण हुडकावयास लांब जाण्यास नको. सेशन्स जज्ज दिवाण परुळेकर यांनीच आपल्या अपील ठरावांत म्हटलें आहे कीं, "आरोपी नं. १ श्रीपतराव हा आरोपी नं. २ रंगराव याच्या हातांतील बाहुले आहे, सारावंदीची चळवळ मी कधी केली नाही असें नं. १ म्हणतो, पण शेतकऱ्यांची हलाखीची स्थिति व साऱ्याचा असह्य बोजा याबद्दल सनदशीर चळवळ आज तीनचार वर्षे मी करीत आहें असें आरोपी नं. २ कबूल करतो. त्यावरून त्याची बेपरवाईची वृत्ति दिसते" इत्यादि. यावरून नं. २ ची शिक्षा कायम करण्यांतील हेतु उघड होतो.

### राणीसाहेबांस विनंति

सारांश, आपल्याच शेतांतील माल चोरून (!) नेला असें स्वरूप संस्थानी फिर्यादी पक्षानें कितीहि दिलेलें असलें तरी हा खटला राजकीय स्वरूपाचा आहे हें कोणीहि कबूल करील. अशा तऱ्हेचे खटले चळवळ्या लोकांवर येन केन प्रकारेण उभे करून लोकांचे न्याय्य व कायदेशीर चळवळीचे मार्ग बंद करून टाकूं, अशी संस्थानी अधिकाऱ्यांची कल्पना असेल तर ती फोल आहे. असल्या दडपशाहीनें चळवळ दबत नसून दुप्पट जोरानें उफाळत असते व अंतीं ती संस्थानाला घातक होते असा अनुभव आहे. तुरुंगवासामध्येहि रा. रंगराव पुजारी यांना वाईट रीतीनें वागविण्यांत येतें अशा तक्रारी आहेत व याबद्दलहि निषेध करणें जरूर आहे.

या बाबतींत अक्कलकोटच्या श्री. राणीसाहेब रीजंट यांचें न्याय्य कर्तव्य हेंच कीं, खालच्या अधिकाऱ्यांनी जरी अविचार केलेला असला तरी त्यांनी निदान आपली न्यायप्रिय व प्रजावात्सल्यपूर्ण दृष्टि जागृत ठेवावी. खालचे अधिकारी येतील जातील; पण राज्यकर्ते या नात्यानें त्यांचा आणि प्रजेचा संबंध जास्त चिरस्थाई व जिव्हाळ्याचा आहे. दिवाण सेशन्स जज्जाच्या अपील हुकुमावर पुजारीबंधु श्री. राणीसाहेबांकडे

दाद मागोत किंवा न मागोत; पण रीजंट श्री. राणीसाहेबांनीं आपण होऊन या खटल्याचे कागदपत्र मागवून रा. रंगराव पुजारी यांना बंध-मुक्त करावें व प्रजेचा दुवा घ्यावा आणि बंधमुक्त होईपर्यंत रा. पुजारी यांस राजबंदीप्रमाणेंच वागवावें हें उचित होय.

# सायन्स कॉंग्रेसचे अध्यक्ष

## आचार्य मेघनाद सहा यांचा परिचय

( ले.—श्री. वा. वि. भागवत अलाहाबाद )

यंदाची सायन्स कॉंग्रेस पुण्याला भरणार असून तिच्या अध्यक्षस्थानी भौतिक शास्त्रांतील सुप्रसिद्ध संशोधक व प्रयाग विश्वविद्यालयांतील भौतिक शास्त्राचे प्रमुख आचार्य डॉ. मेघनाद सहा F. R. S. यांची योजना झाली आहे ही गोष्ट आता सर्वांस विदित झालीच आहे. प्राचीन काळीं गणित, ज्योतिष, रसायन इत्यादि विषयात हिंदूंनी बरीच प्रगति केली होती यांत संशय नाही, पण ही उन्नति फार काळ टिकली नाही हेंहि तितकेंच निर्विवाद आहे. नव्या युगांत जगाच्या, विशेषतः पाश्चात्य लोकांच्या, भरभराटीकडे लक्ष दिल्यावर वैज्ञानिक क्षेत्रांत आपण फार मागसलों आहोत हें प्रत्ययास आलें व त्याबरोबर हिंदुस्थानाच्या बुद्धि-मत्तेबद्दल अखिल जगाला शंका वाटूं लागली. परंतु गेल्या थोड्या वर्षांत हिंदुस्थानाने जी अवर्णनीय कामगिरी केली त्यामुळे सर्वांचे डोळे उघडले असून तुच्छतेने पाहणारे लोक, आता हिंदुस्थानाकडे कौतुकाने व आदराने पाहूं लागले आहेत. या प्रगतीचें श्रेय बऱ्याच जणांस द्यावें लागेल. गणितांत श्रीनिवास रामानुजम यांनी कीर्ति मिळविली. भौतिक शास्त्रांत प्रो. सी. व्ही. रामन्, डॉ. मेघनाद सहा, सत्येन्द्रनाथ बोस यांचीं नावें सर्वविश्रुत आहेत. रसायनांत आचार्य प्रफुल्लचंद्र रे, डॉ. नीलरतन धर, डॉ. जे. एन. मुकर्जी, डॉ. एस. एस. भाटनागर इत्यादिकांचीं नावें प्रमुख आहेत. वनस्पतिशास्त्रांत डॉ. जे. सी. बोस व डॉ. बीरबल सहानी यांचें संशोधन अत्यंत महत्त्वाचें आहे. तथापि इंग्लंडच्या सुप्रसिद्ध रॉयल सोसायटीचे सभासद ( F. R. S. ) होण्याचा अपूर्व मान फक्त चौघांसच मिळाला आहे.ते म्हणजे रामानुजम्, जगदीशचंद्र बोस, चंद्रशेखर व्यंकट रामन् व मेघनाद सहा. वयाच्या अवघ्या ३३ व्या वर्षी हा मान आचार्य मेघनाद सहा यांनी मिळविला.

### गणितांत पहिले

डॉ. मेघनाद सहांचा जन्म सन १८९३ सालीं डाका जिल्ह्यांतील सिओरातली या गांवीं झाला.त्यांचे वडील जगन्नाथ साहा हे साधारण व्यापारी होते.कुटुंब मोठें असल्यामुळे प्राथमिक शिक्षण गांवींच झालें व वयाच्या १० व्या वर्षी त्यांस सिमुलिया या गांवीं जाणें भाग पडलें. या ठिकाणीं कासीमपूरच्या जमीनदाराचा वैद्य डॉ. अनंतकुमार दास याने त्यांस आश्रय दिला. येथून त्यांनी मिडलची परीक्षा दिली व डाका जिल्ह्यांत ते पहिले आल्यामुळे त्यांस एक छात्रवृत्तिहि मिळाली. हिच्या बळावर त्यांनी डाक्यास प्रयाण केलें व १९०९ मध्यें कलकत्ता विश्वविद्यालयाची प्रवेश-परीक्षा अत्यंत यशस्वी रीतीने पसार केली. पूर्व बंगाल्यांत त्यांचा नंबर पहिला आला व गणितांत तर ते अखिल विश्वविद्यालयांत पहिले होते.दोनत्र वर्षा-नंतर त्यांनी इंटरची परीक्षा पास केली व त्यांचा नंबर तिसरा आला. पण गणित आणि रसायन या विषयांत त्यांस सर्वांहून अधिक गुण मिळाले. यानंतर त्यांनी बी. एससी.. ( ऑनर्स ) व एम. एस.सी.ची परीक्षा कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉले-जांतून पास केली व ते जरी पहिल्या वर्गांत आले तरी दोनहि वेळेस त्यांचा क्रमांक दुसरा होता.त्यांचा एक सहाध्यायी सत्येंद्रनाथ बोस, ज्यांचें भौतिक शास्त्रांतील 'बोस स्टॅटिस्टिक' हें कार्य सुप्रसिद्ध आहे, तो पहिला आला. या ठिकाणीं सहाला जगदीश-चंद्र बोस व प्रफुल्लचंद्र रे यांच्यासारख्या गुरूंच्या हाताखाली कार्य करण्याची संधि मिळाली.

### 'आचार्य' झाले

एम. एससी. परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर कांही दिवसपर्यंत त्यांनी संशोधन केलें व सन १९१६ मध्ये त्याच सायन्स कॉलेजमध्ये त्यांस एक जागा मिळाली. हें कॉलेज सर तारकानाथ पलित व सर रास बिहारी घोष यांच्या उदार देणगीमुळेच स्थापन झालें होतें. या ठिकाणीं संशो-धनाची व्यवस्था असल्यामुळे त्यांनी सन १९१८ मध्ये डी. एस. सी. साठी आपला निबंध सादर केला. विलायतेंतील तीन सुप्रसिद्ध शास्त्रज्ञांचे

परीक्षकांच्या जागीं निवडणूक होऊन त्यांनी तो मान्य केल्यामुळे त्यांस आचार्योची पदवी मिळाली. हा निबंध ' सापेक्षतेपासून विद्युत् प्रक्रिया सिद्धांताची मांडणी ' व 'विकिरणदाबाचें मापन' या विषयावर होता.

### दहा हजारांचें बक्षीस

याच वर्षी सहांनी 'विशिष्ट विकिरण दाब व नाक्षत्र-भौतिकांतील त्याचा उपयोग' या विषयावर एक लेख लिहिला व त्याबद्दल त्यांस १०००० रु.चें प्रेमचंद्र रायचंद्र बक्षीस मिळालें. तसेंच त्यांस विदेशीं जाण्यासाठी एक छात्रवृत्तिहि देण्यांत आली. त्याप्रमाणे १९ सप्टेंबर सन १९२१ रोजीं ते इंग्लंडास आले. या ठिकाणीं आक्टोबर १९२१ पासून जानेवारी १९२२ पर्यंत त्यांनी फाउलरच्या प्रयोगशाळेंत संशोधन केलें. 'तारकांच्या रश्मिचित्राचा भौतिक सिद्धान्त' हा अद्वितीय लेख त्यांनी येथूनच लिहिला. या वेळेस त्यांच्या नाक्षत्र भौतिकांतील अद्वितीय संशोधनामुळे शास्त्रज्ञांत एकच खळबळ उडून गेली होती. म्हणूनच बर्लिन येथील सुप्रसिद्ध भौतिक रसायन नर्न्स्ट ( ज्याचें रसायनांतील व तापगतिशास्त्रांतील कार्य जगविख्यात असून त्याबद्दल नोबेल पारितोषिक मिळालें आहे. ) याने आपल्या प्रयोगशाळेंत पाचारण केलें. या ठिकाणीं सहांनी बरेच महत्त्वाचें संशोधन केलें. पुढे लवकरच म्युनिच येथे भौतिक शास्त्रज्ञांचें एक संमेलन भरलें. त्या ठिकाणीं प्रो. सोमरफिल्डने त्यास आपल्या संशोधनावर व्याख्यान देण्यास बोलाविलें. केंब्रिज वगैरे ठिकाणीं सर जे. जे. टामसन व लॉर्ड रुदरफोर्ड यांच्यासारख्या जाड्या शास्त्रज्ञांबरोबरहि या संशोधनावर त्यांनी चर्चा केली व या विद्वानांनीहि त्यांच्या कार्याबद्दल त्यांची मुक्तकंठाने स्तुति केली. याच वेळेस सर आशुतोष मुकर्जीच्या प्रयत्नांमुळे सहांसाठी एक जागा निर्माण करण्यांत आली. पण या वेळेस कलकत्ता विश्वविद्यालयाचें व बंगालसरकारचें बरें नसल्यामुळे त्यांस प्रयोगशाळा मिळाली नाही. पुढे लवकरच प्रयाग विश्वविद्यालयाच्या भौतिक शास्त्रांतील मुख्याचार्यांची जागा रिकामी झाली, व ती त्यांस मिळाली. तेव्हांपासून आचार्य सहा हे प्रयाग विश्वविद्यालयांतच आहेत.



### संशोधनासाठी सरकारी मदत

विलायतच्या इन्स्टिटयूट ऑफ फिजिक्सचे तसेंच आन्तरराष्ट्रीय ज्योतिष सभेचे डॉ. सहा हे सभासद असून इंग्लंडच्या रॉयल सोसायटीने त्यांस आपला सभासद निवडून गौरविले आहे. १९३० मध्ये बंगालच्या आशियाटिक सोसायटीनेहि त्यांस आपले सभासद निवडिलें. संयुक्त प्रांताच्या सरकाराकडून त्यास संशोधनासाठीं दरसाल पांच हजार रु.ची मदत मिळत असते. शास्त्रीय ज्ञानाच्या प्रसारासाठी त्यांनी ' यू. पी. ॲकेडमी ऑफ सायन्सेसची ' स्थापना सन १९३१ मध्ये केली व तिच्या अध्यक्षाचा मान गेल्या दोन वर्षांपासून त्यांसच देण्यांत आला आहे.

### सूर्यांतील तत्त्वें किती ?

आचार्य सहांच्या संशोधनाचें विवरण या छोट्या लेखांत करणें कठिण आहे; आणि सामान्य जनतेला समजेल अशा रीतीने त्याची मांडणी करणें तर त्याहूनहि कठीण आहे. डॉ. सहांनी संशोधनाला १९१७ सालीं सुरुवात केली. हें संशोधन विद्युत सिद्धान्तासंबंधांत होतें. १९१८ मध्ये त्यांनी चक्रवर्ती बरोबर 'प्रकाशाचा दाब' यासंबंधांत कांही प्रयोग केले. त्यांचें अत्यंत महत्त्वाचें कार्य 'सहाचा तापदल सिद्धान्त ' या नांवाने सुप्रसिद्ध आहे. एकंदर ९२ तत्त्वें माहीत असतांना सूर्यांत फक्त ५७ तत्त्वांचाच शोध लागला आहे. तेव्हा बाकीचीं तत्त्वें सूर्यांत नाहीत का? असा प्रश्न उपस्थित होतो. डॉ. सहांच्या सिद्धान्तान्वयें सूर्याचा तापक्रम फार असल्यामुळे त्यांचें विदलन होतें व म्हणून यांचें रश्मीचित्र किंवा वर्णाली 'अल्ट्राव्हायलेट' भागांत येतें. पण या किरणांचें शोषण वायूंत होत असल्यामुळे, त्यांचें वर्णालीचित्र मिळत नाही. म्हणूनच हीं तत्त्वें सूर्यांत नाहीत असा आपला गैरसमज होतो. डॉ. सहांनी परमाणूंची रचना व रश्मिविश्लेषण या संबंधांतहि संशोधन केलें असून 'लवणांचे भिन्न रंग व त्यांची उपपत्ति' हा महत्त्वाचा शोध फक्त तीन वर्षांपूर्वीच प्रसिद्ध झाला आहे.

# दक्षिण–आफ्रिकेंतून हकालपट्टी ?

ब्रिटिश साम्राज्याच्या छत्राखाली हिंदुस्थानासारखे जसे परतंत्र देश आहेत, तसेच आयर्लंड, कानडा, द. आफ्रिका इत्यादि स्वतंत्र देशहि नांदत आहेत; परंतु उद्वेगाची गोष्ट अशी कीं, साम्राज्यांतील या सर्व घटकांवर व त्यांतील लोकांवर ब्रिटिश सरकाराची निःपक्षपातीपणाची समान दृष्टि नाही. साम्राज्यान्तर्गत देश किंवा वसाहत स्वतंत्र असो वा परतंत्र असो, त्या सर्वांमध्ये हिंदी लोकांची अवस्था एकाच प्रकारची म्हणजे हीनतेची आणि परवशतेचीच आढळते! हिंदुस्थानासारख्या मायदेशांतहि त्यांना स्वातंत्र्य सुखाचा रसास्वाद घेतां येत नाही, मग द. आफ्रिकेसारख्या परक्या देशांत त्यांचे हाल कुत्रेंहि खात नसेल हें काय सांगावयास पाहिजे ?

हिंदी मनुष्य हा युरोपियन माणसाशीं तुलना करतां मेहनती, अल्पसंतुष्ट, काटकसरी आणि व्यसनाविन्मुख असतो. या चतुर्विध सद्गुणांच्या जोरावरच त्याने आफ्रिकेंतील व्यापार आपल्या हातीं आणला. शेतीभाती, व्यापारउदीम, मोलमजुरी या सर्वांमध्ये हिंदी माणसाशीं गोऱ्या माणसाला टक्कर देतां येत नाही. ब्रिटिश वसाहतींतून हिंदीविरुद्ध गोरे असा जो लढा गेलीं पन्नासपाऊणशें वर्षें लागून राहिला आहे, त्यांतील मर्म तरी हेंच कीं, हिंदी लोकांच्या मितव्ययी राहाणीपुढे पाश्चात्य मजुरांना टिकाव धरवत नाही. मितव्यय हा कांही दुर्गुण नव्हे आणि उधळेपणा हा कांही सद्गुण नव्हे. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, हिंदी लोकांचा मितव्यय हा सद्गुण, दुर्गुण ठरविण्यासाठी गोऱ्या वसाहतवाल्यांनी १८९० सालापासून अनेक लटपटी चालविल्या आहेत. १९१३ सालचें 'एमिग्रेशन बिल' हें एक त्याचें नमुनेदार उदाहरण आहे.

त्या बिलांत असें एक कलम नमूद केलें आहे कीं, "दक्षिण आफ्रिकेंत राहाणाऱ्या कोणत्याहि समाजाची राहणी सर्व देशाच्या किंवा तेवढ्या प्रांताच्या हिताच्या दृष्टीने अयोग्य वाटेल, किंवा एखाद्या संघाची राहाणी अर्थशास्त्रदृष्ट्या किंवा उच्च समाजकल्पनेच्या दृष्टीने अपायकारक ठरेल तर, त्या संघावर अथवा समाजावर 'अनिष्ट' असा शिक्का मारून, त्याची हकालपट्टी करण्याचा अधिकार प्रधानमंडळांतील प्रत्येक व्यक्तीला देण्यांत येत आहे." अर्थशास्त्राचे सिद्धांत आणि उच्च समाजकल्पना यांच्या मोहक नांवाखाली हिंदी लोकांची द. आफ्रिकेंतून उचलबांगडी करण्याचें गोऱ्या वसाहतवाल्यांनी रचलेलें हें पहिलें कारस्थान होय. हिंदी लोकांची संस्कृति आणि समाज वैभवाच्या अत्युच्च शिखरीं विलसत असता, ज्यांची संस्कृति आणि समाज रानावनांतून रानटी श्वापदांप्रमाणे भटकत होता त्या गोऱ्या लोकांनी हिंदी लोकांना अर्थशास्त्र आणि उच्च समाजकल्पना यांचे धडे द्यावे हा उलटा न्याय म्हणावा का ही अधिकारमदान्धता म्हणावी ?

असो. त्या वेळीं म. गांधी, मि. पोलाक इत्यादि सद्गृहस्थांनी सविनय सत्याग्रहाची धुरी देऊन यूनियन सरकाराची धुंदी थोडीफार उतरविली. केपटाऊन–करार हें त्यांच्या प्रयत्नांचेंच लहानसें फळ होय. परंतु केपटाऊन–करार तरी काय मोठासा हिंदी लोकांच्या फायद्याचा आहे ? त्यांतहि अप्रत्यक्षरीत्या 'हकालपट्टीचें' (एमिग्रेशनचें) तत्त्व घुसडण्यांत आलेंच आहे. त्यांत असें एक कलम आहे कीं, 'ज्या हिंदी लोकांना द. आफ्रिकेंतून दुसरीकडे वसाहत स्थापण्यासाठी जावयाचें असेल, त्यांना सरकार मदत करील. बाहेर गेलेले लोक तीन वर्षांच्या आंत यूनियनमध्ये परत येतील तरच त्यांना तेथ राहाण्याचा हक्क आहे.' परंतु पुढे ती योजनाहि आर्थिक चणचणीमुळे यूनियन सरकाराने अव्यवहार्य ठरविली. केपटाऊन–करार पाळून कां होईना, परंतु आपल्याला हा देश सोडावा लागत नाही या विचारानेच हिंदी लोकांनी

करारांतील दोषांकडे दुर्लक्ष करून मान्यता दिली. तरीहि पण त्यांच्या मागची साडेसाती अद्यापि संपलेली नाही.

आपण कितीहि जाचक अटी घातल्या, कितीहि कडक कायदे केले, तरी हिंदी लोक निवडुंगाच्या मुळीप्रमाणे द. आफ्रिकेला चिकटूनच आहेत, हें पाहून यूनियन–सरकाराने आता त्यांना हाकलण्यासाठी निराळाच व्यूह रचला आहे. ' प्रहरिष्यन् प्रियं ब्रूयात् प्रहरन्नपि भारत। प्रहृत्य च कृपायीत शोचेत च रुदेत च' म्हणजे मारावयाचें असल्यास, प्रत्यक्ष मारतांना आणि मारल्यावरहि गोड बोलावें, त्यांच्याबद्दल सहानुभूति दाखवावी, फार काय पण खेदहि करावा आणि शेवटीं रडावेंसुद्धा; या कणिकनीत्यनुसार वागून यूनियन–सरकाराने हिंदी लोकांना अफ्रिकेंतून हुसकण्यासाठी नवेंच धोरण अवलंबिण्याचें ठरविलें आहे. यूनियन–सरकाराचें म्हणणें असें कीं, दिवसेंदिवस हिंदुस्थानांतील पुष्कळच लोक पोटापाण्यासाठी आफ्रिकेंत येतात, शिवाय वसाहतींतहि वाजवीपेक्षा फाजील लोकसंख्या वाढत आहे. तेव्हा हिंदी लोकांना तर कामधंदा मिळावा आणि द. आफ्रिकेच्या वसाहतींत तर गर्दी होऊं नये या दोनहि गोष्टी समाधानकारकपणें साधण्यास हिंदी लोकांच्या वसाहतींसाठी निराळाच एखादा देश शोधणें सोयीचें होईल. हवापाणी आणि इतर सोयी यांनी युक्त असा दुसरा देश सांपडल्यास 'आम्राश्च सिक्ताः पितरश्च तृप्ताः' या म्हणीप्रमाणे यूनिअनसरकाराचा दुहेरी फायदा होईल.

वर वर पाहणाऱ्यांना यूनियन–सरकाराचा हा कोटिक्रम सयुक्तिक आणि सोज्ज्वळ वाटेल. परंतु मखमलीच्या म्यानांत दडवलेल्या खंजिराप्रमाणे यूनियन–सरकाराची ही सूचना हिंदी लोकांच्या अस्तित्वावरच घाव घालणारी आहे. 'वेणीसंहारा'मध्ये 'स्वस्था भवन्तु कुरुराजसुताः सभृत्याः' हे शब्द ज्या सूचक अर्थाने सूत्रधाराने उच्चारले त्याच अर्थाने यूनियनसरकारहि आज अन्य देशीं जाऊन हिंदी लोक 'स्वस्थ होवोत' असें म्हणत आहे! यूनियन–सरकाराच्या सूचनेंतील हा ध्वनि न समजण्याइतके हिंदी लोक आता दूधखुळे राहिलेले नाहीत. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, यूनियनसरकाराच्या या सूचनेस हिंदुस्थानसरकारानेहि आपली संमति दर्शविली आहे!

एमिग्रेशनच्या तत्त्वाला हिंदी लोकांचा मुळीं तत्त्वतःच विरोध आहे. यूनियनसरकाराला खरोखरीच असें वाटतें ना कीं, नाताळ, ट्रान्सवाल इत्यादि भागांत प्रमाणातीत लोकसंख्या वाढली आहे ? मग आमच्या मतें या आपत्तीचा परिहार करण्याचे दोन मार्ग सुचविता येतात. एक मार्ग असा कीं, द. आफ्रिकेंतच इतका अफाट प्रदेश मोकळा पडला आहे कीं, तेथल्या तेथेच अधिक काळ्यागोऱ्यांची सोय अजूनहि लावतां येईल. बरें, हें शक्य नसल्यास काळे आणि गोरे अशा दोनहि जमातींतील लोक विशिष्ट प्रमाणांत द. आफ्रिकेच्या बाहेर दुसऱ्या देशांत वसाहतीसाठी पाठवावेत. काळ्यांनीच त्यांचें असें कोणतें घोडें मारलें आहे कीं, त्यामुळे त्यांची एकट्यांचीच उचलबांगडी करण्याचें सरकाराने ठरवावें ? एमिग्रेशनमध्ये काळा-गोरा असा काय म्हणून भेद करण्यांत यावा ? का गोऱ्यांची गर्दी ती गर्दीच नव्हे ! उलट गोऱ्या वसाहतवाल्यांचीच राहणी इतकी मिजासखोरीची आहे कीं, काळ्याला दोन खण जागा पुरली तर गोऱ्याला दहा खण जागा पुरावयाची नाही. म्हणजे खरोखरीच प्रथम कोणाला बाहेरच घालवावयाची जरूरी असेल तर ती गोऱ्यांना घालविण्याचीच होय. नव्या देशांत हवी तितकी जागा उपभोगण्यास व हवीं तितकीं अरण्यें शिकार करण्यास त्यांना मिळतील, हा त्यांचा काय कमी फायदा आहे ?

वस्तुतः, आज आफ्रिकेमध्ये जे हिंदी लोक वसाहत करून राहिले आहेत, त्यांच्यापैकीं ८० टक्के लोक तेथेच जन्मलेले आहेत; कित्येकांच्या तर, पांचपांच सहासहा पिढ्या तेथे नांदलेल्या आहेत. कित्येकांनी तेथे आपली शेतीभाती, जमीनजुमला करून इस्टेटी केल्या आहेत. आफ्रिकेच्या या वारसांना तुम्ही काय म्हणून

आणि कोणत्या तोंडानें बाहेर जा म्हणून सांगणार? पाठीशीं सत्तेचें बळ उभें असल्याचें माहीत आहे म्हणूनच गोरे वसाहतवाले अशी गुरगूर करूं शकतात. हेच हिंदी लोक स्वतंत्र असते तर, ह्याच गोऱ्या कोठवळ्यांची काय प्राज्ञा होती कीं, त्यांनी हिंदी लोकांना जा म्हणून सांगितलें असतें! परंतु आज द्यूतांत हरलेल्या पांडवांप्रमाणे स्वतः ते जिंकलेले, हिंदुस्थानसरकार पाहावें तों त्यांच्याशीं सावत्र आईप्रमाणे वागणारें आणि यूनियन सरकार तर दुर्योधनाप्रमाणे त्यांचा उच्छेद करण्याला सदैव तयारच झालेले! अशी विषादजनक परिस्थिति निर्माण झाली असता हिंदी लोकांनी यूनियनसरकाराच्या या कारस्थानाविरुद्ध चळवळ अत्यंत मुत्सद्देगिरीने, समंजसपणाने आणि विवेकबुद्धीने चालविली पाहिजे.

या संबंधांत हिंदुस्थानसरकार आणि यूनियनसरकार यांच्या एकमतानें एक चौकशीमंडळ स्थापन होऊन त्याच्या कामास गेल्या २८जुलै १९३३ पासून सुरुवातहि झाली. चौकशी ज्या मुद्दयांवर व्हावयाची त्याचा आशय असा-"हिंदुस्थानांतून येणारे हिंदी लोक आणि द. आफ्रिकेंतील हिंदी लोक यांना दुसऱ्या कोणत्या एखाद्या देशांत वसाहत करून राहतां येणें शक्य आहे कीं नाही हें पाहावें आणि असा देश सांपडल्यास त्यांत वसाहत यशस्वी रीत्या कशी करतां येईल याबद्दल रिपोर्ट करावा; या दोन हेतूंनी चौकशी कमिटी नेमण्यांत येत आहे." कमिटीकडे चौकशीसाठीं जो मुद्दा सोंपविला आहे त्यावरून असें दिसतें कीं, एमिग्रेशनची प्रत्यक्ष योजना सदर कमिटी तयार करणार नाही किंवा तशी एखादी योजना तिच्यापुढे विचारार्थ येणारहि नाही. म्हणजे एकपरी कमिटीचें काम मर्यादित स्वरूपाचें आहे. ही कमिटी नेमल्यानंतर तेथील हिंदी वसाहतवाल्यापुढे असा प्रश्न पडला कीं, सदर कमिटींत काम करण्यास द. आफ्रिकेच्या कॉंग्रेसने आपला अधिकृत प्रतिनिधि पाठवावा किंवा नाही. त्यासाठी ता. १९ व २० ऑगस्ट रोजीं जोहान्सबर्ग येथे मि. जव्हेरी यांच्या अध्यक्षतेखाली कॉंग्रेसची जी खास सभा भरली तिने बहुमताने असा प्रतिनिधि पाठविण्याबद्दल ठराव केला व त्याप्रमाणे मि. एस्. आर. नायडू हे कमिटींत कामहि करीत आहेत.

परंतु कमिटीशीं सहकार करण्याच्या बाबतींत द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांत मतभेद उत्पन्न झाल्याचें दिसून येत आहे, ही अत्यंत शोचनीय गोष्ट होय. विरोधी पक्षाचें म्हणणें असें कीं, कॉंग्रेसने कमिटीशीं सहकार्य करणें म्हणजे एमिग्रेशनला आपली सम्मति देणेंच होय. विरोधी पक्षाचें हें विधान जरासें साहसाचें वाटतें. कारण कॉंग्रेसने कमिटीवर आपला प्रतिनिधि पाठविला तेव्हाच तिने ही गोष्ट जाहीर केली होती कीं, कमिटीचा कोणताहि निर्णय कॉंग्रेसला बंधनकारक नाही. निर्णय अनुकूल झाला, म्हणजे द. आफ्रिकेंतच दुसरीकडे वसाहत वाढविण्याचें ठरलें, तर उत्तमच; नाही तर तो निर्णय झुगारून देण्यास कॉंग्रेस मोकळीच आहे. कॉंग्रेसने इतक्या गोष्टी स्पष्ट केल्यावरहि तिच्यावर तत्त्वभ्रष्टतेचा आरोप करणें शिष्टाचाराचें खास लक्षण नव्हे. कमिटीशीं असहकार करावा असें म्हणणाऱ्या पक्षाचे हात कॉंग्रेसने कधीच बांधलेले नाहीत. तिचें म्हणणें इतकेंच कीं, सामवादाने-समेटाने-वाद मिटला तर बरेंच झालें, नाही तर विरोधाचीं सर्व साधनें आपल्याला मोकळीं आहेतच. कॉंग्रेसची ही भूमिका विवेकबुद्धीला पटण्यासारखीच आहे

कॉंग्रेसचा पक्ष खरा कसा, यूनियन-सरकाराचा पक्ष खोटा कसा हें दाखविण्यास आणि तो युक्तीने पटविण्यास कमिटी हेंच उत्तम स्थान आहे. ( १ ) समानतेचा हक्क बजावण्यासाठीं; ( २ ) नव्या वसाहतीच्या योजनेशीं आमचा बिलकुल संबंध नाही हें दाखविण्यासाठीं; ( ३ ) द. आफ्रिकेंतच वसाहतीस योग्य अशी मुबलक मोकळी जागा आहे ही वस्तुस्थिति पटवून देण्यासाठीं; आणि (४) प्रातांप्रांतांतून जाण्यास असलेले निर्बंध दूर करवून घेण्यासाठी कॉंग्रेसने चौकशी-कमिटींत प्रतिनिधि पाठवून सक्रिय भाग घेणें हेंच

मुत्सद्देगिरीचें आणि समंजसपणाचें लक्षण होय. बरें, इतकेंहि करून कमिटीचें काम आपल्याला अनुकूल नाही असें आढळून आल्यास कोणताहि सुष्टदुष्ट मार्ग अनुसरण्यास कॉंग्रेस मोकळी आहेच. अशी वस्तुस्थिति असतां, नसता बुद्धिभेद करून द. आफ्रिकेंतील कांही हिंदी पुढाऱ्यांनी आपापसांत फूट पाडावी आणि कॉंग्रेसच्या विरुद्ध चळवळ करावी याला म्हणावें तरी काय ? आकाश सर्वत्र फाटलें असताहि, द. आफ्रिकेंतील हिंदी पुढाऱ्यांनी कोणतीहि गोष्ट संघटनेने आणि ऐक्यवृत्तीने साधूं नये आणि आपसांतच सुंदोपसुंदी करावी हें मोठेंच नष्टचर्य होय ! तरी हा सारासार विवेक करून द. आफ्रिकेंतील आमचे हिंदी बांधव एकदिलाने चळवळ चालवतील आणि यूनियन-सरकाराने उभारलेल्या या नव्या कारस्थानावरील मायेचें जाळें दूर सारून तें हाणून पाडतील असा आम्हांस भरंवसा वाटतो.

# हिंदी-जपानी व्यापाराची दिशा

हिंदुस्थानसरकार व जपानसरकार यांच्या दरम्यान व्यापारीतहासंबंधी सांप्रत वाटाघाटी चालू आहेत. जपानाने सुवर्णमापनपद्धतीचा त्याग केल्यापासून येनचा भाव भरमसाट खाली आला व त्यामुळे सर्वच प्रकारचा जपानी माल हिंदुस्थानांत कमालीच्या स्वस्त दराने विकला जाऊं लागला, व त्याची चढाओढ हिंदी उद्योगधंद्याच्या प्रगतीच्या आड येऊं लागली. जपानी मालाची चढाओढ कमी करण्याचा खात्रीचा उपाय जपानी मालावर जादा जकाती बसविणें एवढाच होता. परंतु १९०४ सालचा हिंदी जपानी व्यापारी करार या गोष्टीच्या आड येत असल्यामुळे ता. १० एप्रिल १९३३ रोजीं हिंदुस्थान सरकारने जपानाला अशी नोटीस दिली कीं, १० ऑक्टोबर १९३३ पासून हिंदी-जपानी करार रद्द समजण्यांत येईल. नवा करार कोणत्या स्वरूपाचा असावा याबद्दल सांप्रत वाटाघाट चालू असल्यामुळे जुन्या कराराची मुदत एक महिन्याने वाढविण्यांत आली आहे.

### व्यापाराचें स्वरूप

सांप्रत सिमल्यास ज्या वाटाघाटी चालू आहेत त्यामध्ये कापूस व कापड या दोन पदार्थांनाच विशेष प्राधान्य दिलें जात आहे असें दिसतें. परंतु हिंदुस्थान व जपान यांमधील व्यापारी संबंधाचें क्षेत्र या दोन पदार्थांपुरतेंच संकुचित नाही. हिंदुस्थानांतून कापसाखेरीज पिग आयर्न, कातडीं, गळिताचीं धान्यें, ज्यूट व ज्यूटाचें कापड, लाख वगैरे पदार्थ जपानाला जातात व जपानमधून कापडाखेरीज सिमेंट, घड्याळें, कापूर, मातीचीं भांडीं, कांचसामान, लोखंडी सामान, उपकरणें, कागद, रेशीम व रेशमी कापड, छत्र्या वगैरे पदार्थ हिंदुस्थानांत येतात. नव्या करारांत या सर्व पदार्थांच्या आयातनिर्गतीचा विचार व्हावयास पाहिजे, व तो होईल अशी आशा आहे. हिंदी-जपानी व्यापार गेल्या अडीच तपांत झपाट्याने वाढला असून नवा व्यापारी करार कोणत्या प्रकारचा असावा हें ठरविण्याकरिता हिंदी जपानी व्यापाराची दिशा कोणती आहे, हें माहीत असणें जरूरीचें असल्यामुळे हिंदुस्थानाच्या जपानाबरोबरील आयात निर्गत व्यापारासंबंधीं ठोकळ माहिती पुढे देत आहों.

### हिंदुस्थानांतून होणारी निर्गत

जपानाला पाठविल्या जाणाऱ्या पदार्थांची किंमत उतरल्यामुळे गेल्या कांही वर्षांत जपानाबरोबरचा हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार रोडावला असें निर्गतीच्या किंमतीच्या आकड्यांच वरवर समालोचन करणाऱ्याला वाटतें. परंतु वस्तुस्थिति याहून बरीच भिन्न आहे. महायुद्धापूर्वीच्या वर्षांत हिंदुस्थानाच्या निर्गत व्यापारातील जपानाचा हिस्सा २·६% होता १९३१-३२ सालीं तो ८·७% झाला. १९३२-३३ सालांत तर तो ११% पर्यंत वर गेला. यावरून हिंदुस्थानाच्या निर्गत व्यापारांत गिऱ्हाईक या नात्याने जपानाचें महत्त्व मोठें आहे ही गोष्ट स्पष्ट होते.

### जपानाने हिंदी कापसाची खरेदी कमी केली

जपानाबरोबरील हिंदुस्थानाच्या निर्गत व्यापाराचें वैशिष्ट्य असें कीं, हिंदुस्थानातून जपानला जाणाऱ्या पदार्थांत कापसाचें महत्त्व फार मोठें आहे. १९३२-३३ मध्ये जपानाबरोबरील निर्गत व्यापारापैकीं शेंकडा एकुणएशीं टक्के व्यापार कापसाचा असून निर्गत झालेल्या कापसाची किंमत सुमारें अकरा कोटि रुपये होती. १९३१-३२ सालांत हिंदुस्थानांतून झालेल्या कापसाच्या एकंदर निर्गतीपैकीं

अर्धी निर्गत जपानाला झाली होती. परंतु या निर्गतीबाबतहि एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती अशी कीं, हिंदी कापसाचें जपान हें महत्त्वाचें गिऱ्हाईक अमल तरी प्रतिवर्षी जपान अमूक टन कापूस तरी निश्चितपणें खरेदी करतेंच असे नाहीं. तसेंच गेला दोन वर्षे जपानानें हिंदी कापसाच्या खरेदीबाबत आपला हात आखडता घेतला आहे हे पुढील कोष्टक वरून कळून येईल.

### जपानाला झालेली कापसाची निर्गत

| साल | टन | साल | टन |
|---|---|---|---|
| १९२६–२७ | ३२९ ह. | १९२९–३० | २९३ ह. |
| १९२७–२८ | २२१ ,, | १९३०–३१ | ३०१ ,, |
| १९२८–२९ | २८८ ,, | १९३१–३२ | १९३ ,, |
| | | १९३२–३३ | १९४ ,, |

### पिग आर्यनवरील जबर जकात

कापसाच्या खालोखाल जपान बरोबरील निर्गत व्यापारात पिग आर्यनचें महत्त्व आहे. गेल्या सात वर्षांत जपानला होणाऱ्या या मालाच्या निर्गतींत शेकडा सत्तर टक्क्यांची घट झाली. १९३०–३१ मध्ये हिंदुस्थानातून झालेल्या पिग आर्यनच्या एकंदर निर्गतीपैकीं शेकडा छत्तीस टक्के, १९३१ ३२ मध्ये चौपन्न टक्के, १९३२-३३ मध्ये तेहतीस टक्के हिंदुस्थानातून जपानाला झाली. जपानानें पिग आयर्नच्या आयातीवरील जकात वाढविली असून ती अडीचशे टक्क्याच्या घरांत असल्याचे समजतें. जपानानें पिग आयर्नवर एवढी जबर आयात जकात बसविण्याचें कारण असें कीं, जपानच्या अमलाखालील प्रदेशांत व खुद्द जपानांत पिग आयर्नचें उत्पादन वाढविण्याची जपानाची खटपट चालू आहे. हिंदुस्थानाच्या पिग आयर्नच्या धंद्याच्या भवितव्याच्या दृष्टीनें इतर पेठा कबजांत येईपर्यंत हिंदुस्थानला आणखी कांही वर्षेपर्यंत तरी जपानाचें गिऱ्हाईक पाहिजे आहे. हिंदी पिग आयर्नची जपानाला होणारी निर्गत कशी घटत आहे, हे पुढील कोष्टकावरून कळून येईल—

### पिग–आयर्नची निर्गत

| साल | टन हजार | साल | टन हजार |
|---|---|---|---|
| १९२६–२७ | २२५ | १९२९–३० | ३५१ |
| १९२७–२८ | २७१ | १९३०–३१ | १६० |
| १९२८–२९ | ३५४ | १९३१–३२ | १८८ |
| | | १९३२–३३ | ७१ |

### कातड्यांच्या खपाला वाव

बकऱ्याच्या कमावलेल्या व बिन कमावलेल्या हिंदी कातड्यांचें जपान हें चांगलें गिऱ्हाईक आहे. १९३२-३३ सालीं हिंदुस्थानांतून एकंदर सुमारें एक कोटी दोन लक्ष रुपयांची बकऱ्यांची कमावलेली कातडीं परदेशीं रवाना झालीं. त्यांपैकीं साडेचौस लाख रुपयांचीं म्हणजे शेंकडा सुमारें वीस टक्के किंमतीचीं जपानानें घेतलीं १९३०–३१ सालीं सोळा टक्के जपानानें घेतलीं होतीं.

१९३१ सालांत जपानच्या कमावलेल्या कातड्यांच्या आयातीपैकीं हिंदुस्थानाचा हिस्सा मोठा होता. कमावलेल्या कातड्यांचा जपानाला पुरवठा करण्याबाबत युनायटेड स्टेट्स, जर्मनी व ग्रेटब्रिटन यांची स्पर्धा असते. १९३१ सालीं जपानांत झालेल्या कमावलेल्या कातड्यांच्या आयातीपैकीं शेंकडा चाळीस टक्के आयात हिंदी कातड्यांची होती. या हिंदी जिनसाचा जपानाबरोबरील व्यापार वाढण्यास अजून बराच वाव आहे.

### गळिताच्या धान्यांची निर्गत

हिंदी गळिताच्या धान्यांचा खप जपानांत वाढण्यासारखा आहे असें असून या गोष्टीकडे हिंदुस्थानानें जितकें लक्ष पुरवावयास पाहिजे होतें तितकें पुरविलेलें नाहीं. सांप्रत जपानाच्या पेठेंत या वस्तूंच्या पुरवठ्याबाबत हिंदुस्थानाचें स्थान दुय्यम आहे १९३२ सालीं जपानने परदेशातून एक कोटी अठ्ठेचाळीस लक्ष येन किंमतीचीं गळिताचीं धान्यें खरेदी केलीं. यांत हिंदुस्थानाचा हिस्सा फक्त आठ लक्ष येनांचा होता ! चीन, मँचुरिआ, डच ईस्ट इंडीज या देशातून या वस्तूंचा जपानाला विशेष पुरवठा झाला होता. शेंगदाणा, तीळ, मोहरी वगैरेची हिंदुस्थानातून निर्गत जपानला जवळ जवळ होत नाहींच असें म्हटलें तरी चालेल. हिंदी जवस व एरंडी यांची निर्गत जपानला होत असते हे खरें; परंतु जवसाची निर्गत गेल्या दोन वर्षांत फारच खालावली आहे हे खालील कोष्टकावरून कळून येईल.

### जवसाची निर्गत

| साल | टन | साल | टन |
|---|---|---|---|
| १९२६–२७ | ३२५७ | १९२९–३० | १०२४० |
| १९२७–२८ | ७७८९ | १९३०–३१ | २८५४ |
| १९२८–२९ | १९८३ | १९३१–३२ | ६२५९ |
| | | १९३२–३३ | १५० |

### जुटाच्या निर्गतींत वाढ

जूट, जुटाच्या गोणी व जुटाचें कापड यांची जपानला होणारी निर्गत पाहातां असें दिसतें कीं, जुटाची निर्गत १९३०-३१ पेक्षां गेल्या दोन वर्षांत वाढली आहे व जुटाच्या कापडाची निर्गत फारच कमी असून गोणींची साधारण असली तरी कमी कमी होत चालली आहे.

### हिंदी जुटाची व गोणींची जपानला निर्गत

| साल | जूट टन | गोणींची संख्या |
|---|---|---|
| १९२६--२७ | ९१८९ | २४९ लाख |
| १९२७-२८ | ११७४७ | १८७ लाख |
| १९२८--२९ | १२०३३ | ८८ लाख |
| १९२९--३० | १६००७ | १५७ लाख |
| १९३०--३१ | ६१४० | ५४ लाख |
| १९३१--३२ | ९९१९ | ४६ लाख |
| १९३२--३३ | १४५९० | ९४ लाख |

### लाखेच्या निर्गतीतील स्थिरता

लाख तयार करण्याचा जणुं मक्ताच निसर्गाकडून हिंदुस्थानाला मिळाला आहे. हिंदुस्थानातून जपानला लाखेची बरीच निर्गत होते व ती बरीच स्थिर आहे. लाखेच्या बाबतींत विचार करण्यासारखा प्रश्न जपानी पेठेंत होणाऱ्या परदेशी स्पर्धेचा नसून इतर कोणत्या पदार्थाने लाखेचें जपानी पेठेतून उच्चाटन होण्यासारखें आहे कीं काय याविषयीचा आहे.

### हिंदी लाखेची जपानाला निर्गत

| साल | हंड्रेटवेट | साल | हंड्रेटवेट |
|---|---|---|---|
| १९२६-२७ | १६·६ ह. | १९२९-३० | २७.५ ह. |
| १९२७-२८ | १७·२ ,, | १९३०-३१ | २७·९ ,, |
| १९२८-२९ | २५·९ ,, | १९३१-३२ | ३३·९ ,, |
| | | १९३२-३३ | २६·९ ,, |

## जपानबरोबरील आयात व्यापार

### कापडाच्या आयातींतील वाढ

१९२७ ते १९३० पर्यंत जपानी मालाची आयात किंमतीच्या दृष्टीने दीडपटीने वाढली. १९२६–२७ मध्ये जपानमधून साडेसोळा कोटी रुपयांचा माल हिंदुस्थानांत आला होता. १९२९–३० मध्ये तो आंकडा साडेतेवीस कोटी रुपयांच्यावर गेला. परंतु १९३०–३१ व १९३१–३२ मध्ये बाजारभाव फार उतरल्याने व कांही अंशीं परदेशी कापडाविरुद्ध झालेल्या चळवळीमुळे किंमतीच्या दृष्टीने तो १९२९--३० च्या निम्याइतका खाली आला. १९३२-३३ सालीं येनचा भाव उतरल्यामुळे जपानी मालाच्या किंमती उतरल्या व जहाजांचे दरहि उतरले. त्यामुळे जपानी मालाचा खप हिंदुस्थानांत वाढून आयातीच्या किंमतीचा आकडा साडेवीस कोटीपर्यंत वर गेला. या साडेवीस कोटींपैकीं दहा कोटी रुपयांचे कापड व सूत हिंदुस्थानांत आलें. १९२६–२७ सालीं धुवट, बिनधुवट, सफेत व रंगीत मिळून चोवीस कोटी यार्ड कापड हिंदुस्थानांत आलें होतें. १९३२–३३ सालीं तो आंकडा सत्तावन कोटी यार्डांपर्यंत वर गेला. जपानी कापड व सूत यांच्या हिंदुस्थानांत होणाऱ्या आयातीबद्दल लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, या मालाची आयात गेल्या पांचसहा वर्षांत वाढली असली तरी इतर पदार्थांच्या आयातीचें प्रमाण त्याहीपेक्षा वाढले असून १९२६–२७ सालीं जपानी आयातीपैकीं किंमतीच्या दृष्टीने कापडाची आयात जी दोनतृतीयांशाहून अधीक असे, ती १९३२–३३ मध्ये निम्यापेक्षाहि थोडी खाली आली.

### सिमिटाच्या आयातींत चारशें टक्क्यांची वाढ

१९३१-३२सालाखेरीज करून गेल्या सहा वर्षांत जपानमधून येणाऱ्या सिमिटाचें प्रमाण सारखे वाढत आहे. १९२६–२७ सालीं सुमारें सवानऊ हजार टन सिमिट हिंदुस्थानात आले होतें. १९३२–३३ सालीं तो आकडा चौपटीवर म्हणजे सवाएकूणचाळीस हजार टनांवर गेला ! हिंदुस्थानांत होणाऱ्या कापुराच्या आयातीपैकीं १९२९–३० सालीं ५६ टक्के आयात जपानी कापुराची होती. १९३१–३२ मध्ये जपानी कापुराची आयात बरीच कमी होऊन २५ टक्क्यांपर्यंत आली होती. परंतु १९३२–३३ मध्ये जपानाने आपल्या कापुराचा खप वाढवून तो आंकडा ४३ टक्क्यांपर्यंत वर नेला. जर्मनी व इटाली हे हिंदुस्थानला कापूर पुरवण्याबाबत जपानशीं स्पर्धा करणारे देश आहेत.

### मातीचीं भांडीं, पोर्सलेन व कांचसामान

मातीचीं भांडी व पोर्सलेन यांच्या हिंदुस्थानांत होणाऱ्या आयातींत जपानाचा हिस्सा मोठा आहे. ग्रेटब्रिटन व जर्मनी हे या व्यापारांत जपानाचे प्रतिस्पर्धी आहेत. १९२७-२८ मध्ये या पदार्थांच्या एकंदर हिंदी आयातींत जपानाचा हिस्सा फक्त चाळीस टक्के होता. १९३२-३३ सालीं तो चौसष्ट टक्क्यांपर्यंत वाढला. या सालीं ग्रेटब्रिटन व जर्मनी यांच्या मालाचा हिंदुस्थानांतील खप अर्थातच कमी झाला. जपानी कांच व कांचसामान यांची आयात १९२६ ते १९२९ पर्यंत सारखी वाढत गेली. १९३० ते १९३१ सालीं ती इतर पदार्थांच्या आयातीप्रमाणेंच खालीं आली. परंतु १९३२-३३ मध्ये ती पुनः वाढली. या सालीं साडेपासष्ट लक्ष रुपयांचें कांचसामान हिंदुस्थानांत आलें.

### लोखंडी सामान, उपकरणें, कागद वगैरे

१९२६-२७ सालीं एकोणतीस लक्ष रुपयांचें लोखंडी सामान जपानांतून हिंदुस्थानांत आलें; व १९३० व ३१ या दोन सालांत ही आयात घटली. परंतु १९३२–३३ सालीं ती १९३१–३२च्या दुप्पट

होऊन तीस लक्ष रुपयांपर्यंत वाढली. १९२६-२७ सालीं सुमारें चार लाखांची शास्त्रीय व अन्य प्रकारचीं जपानी उपकरणें हिंदुस्थानांत आलीं. १९२९-३० सालीं त्यांची आयात तिपटीने वाढली. १९३०-३१ व १९३१-३२ मध्ये ती थोडी घटून साडेआठ लक्ष रुपयांवर आली. कागद व पेस्ट बोर्ड यांची आयात १९२६-२७ सालीं सुमारें पांच लाख रुपयांची होती. १९३१-३२ मध्यें ती सुमारें दहा लाख झाली. रेशमी पदार्थांची आयात १९२६-२७ मध्यें एक कोटी अडतीस लक्ष रुपयांची होती १९२९-३० मध्ये तो आंकडा एक कोटी साठ लक्षांपर्यंत वर गेला. पुढील दोन वर्षे मंदीचीं गेलीं व आयात बरीच कमी झाली. परंतु १९३२-३३ सालीं ती पुनः एक कोटी तेतीस लक्ष रुपयांपर्यंत वर गेली.

### तीस हजारांवरून अडीच कोटींपर्यंत

कृत्रिम रेशमाच्या कापडाची आयात गेल्या सहा वर्षांत विलक्षण वाढली. १९२६-२७ मध्ये तीस हजार रुपयांचा या प्रकारचा जपानी माल हिंदुस्थानांत आला. १९३२-३३ पर्यंत ह्या मालाच्या आयातींत सारखी वाढच होत गेली, व या सालीं आयातीचा आकडा अडीच कोटी रुपयांपर्यंत वर गेला. छत्र्यांची आयात १९२७-२८ सालीं सोळा लाख रुपयांपर्यंत गेली होती. परंतु पुढील तीन वर्षे ती कमी कमी होत जाऊन १९३०-३१ मध्ये नऊ लाखांपर्यंत खालीं आली; परंतु पुढील दोन वर्षांत ती वाढून १९३२-३३ सालीं तेरा लाखांपर्यंत वर गेली. या पदार्थांखेरीज साबू, मिठाई, खेळणीं, एनॅमेलचे पदार्थ वगैरे हरतऱ्हेच्या जपानी वस्तू हिंदुस्थानांत येतात.

# गव्हर्नरांचीं दोन भाषणें

## [ १ ]

### सरदारांना ग्रामोद्धार करण्याविषयी सल्ला

पुणें येथील 'गव्हर्मेंट हाउस'मध्ये ता. १० आक्टोबर रोजीं सरदार आणि दुमालदार यांची परिषद भरली होती. त्या प्रसंगीं भाषण करतांना **गव्हर्नरसाहेब** म्हणाले, "मी आज ग्रामोद्धाराच्या विषयावर बोलणार आहें. कारण त्या कामांतहि तुमच्याकडे थोडा वांटा येतोच. ग्रामोद्धाराची जी योजना नुकतीच प्रसिद्ध करण्यांत आली आहे, त्यांत गांव, तालुका, आणि जिल्हा अशी सांखळी आहे. सरकारी आणि बिनसरकारी कार्यकर्त्यांना एकत्र काम करतां येईल अशीच ही योजना आहे. हिंदी लोकांची परिस्थिति व त्यांची परंपरा लक्षांत घेऊनच सदर योजना तयार करण्यांत आली आहे. अशा योजनेला तुमच्या सामाजिक दर्जाचा, तुमच्या परंपरेचा आणि तुमच्या संस्कृतीचा व श्रीमंतीचा उपयोग झाला पाहिजे. सदर योजनेंत तुम्ही जितकें अधिक लक्ष घालाल, तितकें तिचें यश निश्चित होणार आहे. बिनसरकारी संस्थांनी ग्रामोद्धाराच्या बाबतींत पुरेपूर मदत केली तरी सरकारी मदतीची गरज संपली असें नाही. सरकारी उत्तेजन आणि पाठबळ यांची केव्हाहि अपेक्षा राहणारच.

ग्रामोद्धाराची चळवळ हें विधायक कार्य आहे. पुष्कळांचें पुष्कळ सुख हें ब्रीदवाक्य त्या कार्याचा गाभा असून सर्वांचें स्वास्थ्य हें त्याचें अंतिम स्वरूप आहे. या चळवळीच्या कार्यकर्त्यांना विशिष्ट दृष्टि पाहिजे. आणि ती चळवळ त्यांनी व्यावहारिक मार्गांनी चालविली पाहिजे. इतकी मनाची तयारी झाली म्हणजे तेथे पक्षाभिनिवेश लुप्त होतो, व कोणत्याहि पक्षाच्या जातीच्या किंवा धर्माच्या स्त्री-पुरुषाला अशा कार्यांत भाग घेतां येईल.

चळवळ म्हटली कीं, पैसा पाहिजे. सरकार मदत करील, पण ती त्याला मोठ्या प्रमाणांत करतां येणार नाही. खेडेगांवांनी बव्हंशीं स्वावलंबनाच्या मार्गानेच आपली उन्नति करून घेतली पाहिजे. या बाबतींत तुम्हालाहि कांही गोष्टी करतां येणें शक्य आहे. तुमच्यापैकीं कित्येकजण वर्षांतून कांही दिवस आपापल्या जमीनजुमल्यावर राहाण्यासाठी जात असतात. कांहीना, त्यांच्या जमिनी मलेरियाच्या रोगट हवेंत असल्याने, तेथे जातां येत नाही. अशांनी आपल्या खंडकऱ्यांना त्या रोगाचा प्रतिकार करण्याच्या बाबतींत मदत केली पाहिजे. खंडकऱ्यांच्या आरोग्याविषयी तुम्ही फारच थोडी काळजी घेतां, हें चांगलें नाही. दुसरी गोष्ट अशी कीं, तुमचे खंडकरी आणि आश्रित यांच्या मुलाबाळांच्या शिक्षणाच्या सोयी तुम्ही करून दिल्या पाहिजेत. तुम्हांला या चळवळीला खरोखरीच मदत करावयाची असेल तर, शक्य असेल तेथे तुम्ही ग्रामपंचायती, सहकारी पतपेढ्या इत्यादि संस्थांचे सभासद झाले पाहिजे. या रीतीने तुम्हांला तुमचें पूर्वीचें ग्रामनेतृत्व मिळणार आहे. यासाठी तुम्ही आपला एखादा संघहि बनविला पाहिजे."

[ २ ]

**सरदारांना राजनिष्ठेचा उपदेश !**

ता. ११ रोजीं दक्षिणेंतील सरदारांनी गव्हर्नर-साहेबांना प्रयाणपूर्व मानपत्र दिलें. त्याला उत्तर देतांना गव्हर्नर म्हणाले, "तुम्ही मला जें हें मानपत्र दिलें त्याबद्दल मी तुमचा अत्यंत आभारी आहे. भूतकालांत तुमच्या पूर्वजांनी मोगल, मराठे आणि इंग्रज यांची बहुमोल कामगिरी बजावली. पूर्वपरंपरा आणि दर्जा यामुळे तुम्हांला समाजामध्ये साहजिकच प्रतिष्ठेचें स्थान मिळाले आहे. तुम्ही समाजरचनेंतील स्थिर परमाणु असून सरकार आणि जनता यांना सांधणाऱ्या दुव्याप्रमाणें आहात. खेडेगांवांचें नेतृत्व तुमच्याकडे स्वाभाविक रीत्याच आलें असून भावी राज्यघटनेंत महत्त्वाचा कार्यभाग उचलण्यास तुम्हाला संधि मिळेल अशी आशा आहे. त्या वेळीं पूर्वीप्रमाणेंच तुम्ही देश आणि सरकार यांची सेवा कराल यांत शंका नाही.

ज्यांना आपला दर्जा कायम टिकविण्याइतकी ऐपत असेल अशा जुन्या सरदार घराण्यांतील गृहस्थांना सरदारकी देण्याचें सरकारी धोरण कायम आहे. नवी सरदारकी देतांना सरकारानें अर्थातच आतापर्यंत राजनिष्ठा, सामाजिक दर्जा आणि त्या त्या घराण्यांची पूर्वपरंपरा या गोष्टींकडे लक्ष पुरविलें आहे. परंतु सरदारकी बहाल करण्याचा हा एवढाच कांही निकष नव्हे. सरदार हे खेडेगांवांचे पुढारी व्हावेत अशी अपेक्षा आहे. जो सरदार सार्वजनिक कार्यासाठी झटत नाही, तसला ऐदी इसम तुमच्या मालिकेंत बसावा हें तुम्हाला खपणार नाही असें मला वाटतें.

प्रांतिक व वरिष्ठ कायदेमंडळें आणि म्युनिसिपालिटी, लोकलबोर्डें व इतर संस्था यांतील तुमचें काम सरकाराला मान्य आहे. हें काम असेंच पुढे चालू ठेवले तर तुम्हांला भावी संयुक्तघटनेंतहि योग्य तें स्थान मिळाल्याशिवाय राहाणार नाही. भावी प्रांतिक कायदेमंडळ व फेडरल असेंब्ली यांमध्ये तुमच्या वर्गासाठी खास जागा राखून ठेवण्याचें ब्रिटिश सरकारानें ठरविलें आहे. सरकारानें तुमच्या राजनिष्ठापूर्वक केलेल्या कामगिरीचा नेहमींच गौरव केला आहे; व तुमचे हक्क, दर्जा आणि हितसंबंध राखण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. माझी कारकीर्द राजकीय चळवळीमुळे अत्यंत त्रासाची गेली, परंतु तशाहि काळांत तुम्ही जी अभंग राजनिष्ठा दाखविली त्याबद्दल मी तुमचा आभारी आहें. शेवटीं तुम्हाला इतकेंच सांगणें आहे कीं, ग्रामोद्धाराच्या नव्या योजनेंत मनःपूर्वक भाग घेऊन खेड्यांचें कल्याण साधण्यास तुम्ही मदत करा."

# पं० जवाहरलाल नेहरू व हिंदी राजकारण

हिंदी राजकारणाचें भवितव्य आणि जगांतील आंतरराष्ट्रीय घडामोडी यांची मीमांसा करणारे तीन लेख पं. जवाहरलाल नेहरू यांनी प्रसिद्ध केले आहेत. त्यांचा आशय आम्ही पुढें देत आहों.

कारागृहवासामुळे सद्यःस्थितीशीं आपला संबंध राहिलेला नसला तरी त्यामुळेच तात्विक दृष्ट्या निर्विकार बुद्धीने विचार करणें शक्य आहे असा उपन्यास करून ते म्हणतात,

आपलें राजकारण, एक तर, जादुगिरीचें असूं शकेल किंवा तें शास्त्रीय सिद्धांतावर आधारलेले तरी राहूं शकेल. जादूच्या कांडीनें राष्ट्राचें कोडें उलगडेल असें ज्यांना वाटतें, त्यांना युक्तिवाद वगैरे कांही सांगावयास नको. परंतु आपलें राजकारण सशास्त्र चालावें असें ज्यांचें मत असेल, त्यांची भूमिका शुद्ध तर्क व विशद विचार यांवर उभारलेली असली पाहिजे. धर्माच्या, ध्येयाच्या किंवा भावनेच्या पोकळ विचाराकडे त्याचें लक्ष जाता कामा नये. कारण त्यामुळे मनांत घोटाळा उडून पुढील मार्ग दिसेनासा होतो. माझा स्वतःचा जादूवर किंवा धर्मावर विश्वास नाही आणि त्यांचा मला उपयोगहि नाही. मी फक्त शास्त्रीय दृष्टीनेच विचार करणार आहें.

**स्वातंत्र्य कोणाचें ?**

विचार असा कीं, आपण कोठें जात आहों? स्वातंत्र्य? स्वराज्य? वसाहतीचें स्वराज्य? यांपैकीं आपलें मुक्कामाचें ठिकाण तरी कोणतें? या सर्व शब्दांचा अर्थ हवा तो होऊं शकतो. इजिप्त स्वतंत्र आहे ना? पण सध्या त्याचा दर्जा हिंदी संस्थानिकापेक्षा फारसा वरचा नाही. ब्रिटिशांच्या अधिकारावर उभारलेली सुलतानशाही तेथील लोकांवर त्यांच्या इच्छेविरुद्ध लादलेली आहे. आर्थिक दृष्ट्या, ब्रिटिशासारख्या साम्राज्यवादी युरोपियन राष्ट्राची ती एक वसाहत बनून गेली आहे. असें हें इजिप्तचें 'स्वातंत्र्य' आहे!

दुसरा विचार असा कीं, आपण कोणाच्या

स्वातंत्र्यासाठी मुख्यतः झगडत आहों ! कारण राष्ट्रीयत्व या एका शब्दाच्या पोटांत किती तरी पापें आणि परस्परविरुद्ध वर्ग सांठविले जातात ! संस्थानिक, बडे आणि छोटे जमीनदार, शेतकरी, कामकरी, धंदेवाले, पेढीवाले, मध्यमवर्गीय लोक,—अशा किती तरी वर्गांचा मिळून हिंदुस्थान देश बनला आहे. शिवाय, घरचे भांडवलवाले, आणि परदेशचे भांडवलवाले, येथला अधिकारीवर्ग आणि बाहेरचा अधिकारीवर्ग–असेहि भेद किती तरी आहेत. यांपैकीं कोणाचें हित आपण पाहणार ? या प्रश्नाला राष्ट्रीय पक्षाचें उत्तर असे कीं, परक्या लोकांचें कल्याण करण्यापेक्षां आम्ही आमच्या समाजाचें हित आधी साधूं. पण यापुढे त्या उत्तराची मजल जात नाहीं; कारण तसें केल्यास समाजांतील वर्गांना दुखवून त्याची घडी विस्कळित होईल ही त्याला भीति. त्या पक्षाची कल्पना अशी कीं, एकदां राष्ट्र बंधमुक्त झालें म्हणजे भिन्नभिन्न वर्गांचें हित कसें तरी जमवून घेतां येईल. सध्याची राष्ट्रीय चळवळ ही मुख्यतः मध्यमवर्गीय लोकांनी चालविलेली आहे. तेव्हा राष्ट्रीय पक्षाची भूमिका त्या वर्गाच्या कल्याणाची आहे.

राष्ट्रांतील वेगवेगळया वर्गांमध्ये तीव्र कलह उत्पन्न झालेले आहेत हें उघड आहे. त्यामुळे एका वर्गाला पोषक असा प्रत्येक कायदा, प्रत्येक धोरण, हें दुसऱ्या वर्गाला घातक ठरतें. संस्थानिकाला जें प्रिय, तें त्याच्या प्रजाजनाला कुपथ्य; जें जमीनदाराला फायदेशीर, तें त्याच्या कुळाचा नाश करतें. आणि परदेशी भांडवलवाले ज्याची मागणी करतात, त्यामुळे स्वदेशांतील वाढत्या उद्योगधंद्यांचा सत्यानाश होतो. अशी स्थिति असता साऱ्या वर्गांचे हितसंबंध, कोणालाहि न दुखविता, व्यवस्थितपणें जोडतां येतील अशी कल्पना बांधणें हें मूर्खपणाचें आहे. एकाच्या लाभासाठी दुसऱ्याची हानि करणें पावलोंपावलीं अवश्य आहे. चलनाचें एक विशिष्ट धोरण धनकोला हितावह असेल किंवा ऋणकोला तरी असेल,पण दोघांनाहि खास हितावह नाहीं. एकोणिसाव्या शतकाचे प्रारंभीं इंग्लंडने जाणूनबुजून शेतकऱ्यांचें नुकसान केलें आणि धंदेवाल्यांचें हित साधलें. नुकतेंच इंग्लंडने पौंडाची किंमत बदलली आणि पेढया व आर्थिक व्यवस्था यांची सुस्थिति राखण्याचा प्रयत्न केला; पण त्यामुळे उद्योगधंद्यात घोटाळे निर्माण झाले आणि प्रचंड संपाला तोंड देणें इंग्लंडला भाग पडलें.

## 'किंचन'वाले व 'अकिंचन'वाले

या सर्व उदाहरणांचा इत्यर्थ इतकाच कीं, भिन्न भिन्न वर्गांचे कलह चालू असतात. पण हे सारे कलह झाले ज्यांच्याजवळ कांहीं पुंजी आहे त्यांचे. यापुढील पायरी म्हणजे असे वर्ग आणि ज्यांच्याजवळ कांहीं नाहीं असे वर्ग यांचा लढा. हा 'अ-किंचन' लोकांचा व 'किंचन' लोकांचा लढा फार उग्र आहे. पण तो झांकला जातो आणि राजकीय किंवा आर्थिक सत्ता धारण करणारे लोक मूळ मुद्द्यासंबंधी गोंधळ उत्पन्न करतात.

ब्रिटिश सरकार तर आकाशभेदी आरोळ्या ठोकून वारंवार असा पुकारा करीत आहे कीं, इंग्लंड व हिंदुस्थान यांचें हित एकच आहे आणि 'एकमेकां साहाय्य' करून दोघेहि एकाच ध्येयाकडे जाऊन पोंचूं. पण या दोन राष्ट्रांच्या हितसंबंधांतील विरोध राष्ट्रीय पक्षाने विशद केलेला असल्यामुळे वरील पुकाऱ्याला कोणी भुलून जात नाहीं. आपल्याच राष्ट्रांतील आर्थिक कलहाची जाणीव मात्र राष्ट्रीयपक्ष करून देत नाहीं. उलट तो झांकून राष्ट्राच्या मुख्य शत्रूशीं एक होऊन लढूं या असाच उपदेश केला जातो. एवढेंच नव्हे तर, जमीनदार व कुळें, भांडवलवाले व मजूर यांमधील स्वयंसिद्ध असा विरोध कोणी पुढे मांडूं लागला, तर त्यावर टीका होते.

सर्वसामान्य माणसाला तंटेबखेडे नको असतात. तो शांततेचा भुकेलेला असतो, आणि त्यासाठीं बराच त्याग करण्यासहि तो सिद्ध असतो हें खरें. पण शहामृगानें आपलें डोकें वाळूंत खुपसून राहावें, किंवा मांजराने आपले डोळे मिटून दूध पिण्याचा प्रयत्न करावा, त्याप्रमाणें समाजाची शक्ति क्षीण करणाऱ्या कलहाकडे डोळेझांक करणें योग्य होणार नाहीं. अशा स्वस्थ बसण्याने ते कलह नष्ट होणार नाहीत; अनर्थ मात्र ओढवेल. म्हणून या परिस्थितीचा विचार करूनच आपण आपल्या स्वातंत्र्याची कल्पना बनविली पाहिजे. हिंदुस्थानांतील कोणत्या वर्गाचें स्वातंत्र्य मिळविण्यासाठी आपण झटत आहों या प्रश्नाचें उत्तर आपल्याला टाळतां येणार नाहीं. बहुजनसमाज म्हणजे शेतकरी--कामकरी यांचा वर्ग; याला आपण अग्रस्थान देणार कीं दुसरा एखादा अल्पसंख्य वर्ग हा मुख्य समजणार ? अर्थात् स्वातंत्र्याचे फायदे शक्य तितक्या जास्त वर्गांना आपण मिळवून देऊं; पण मुख्यतः कोणासाठी आपण झटत-झगडत आहोंत ? दोन वर्गांत विरोध आला तर आपण कोणाची बाजू घेणार ? या प्रश्नांचीं उत्तरें आम्ही सध्या देत नाहीं असें म्हणणें हें एक उत्तर आहे. आणि त्याचा अर्थ असा कीं, आम्ही सध्या चालू असलेली स्थितिच मान्य करतों.



# पं० जवाहरलाल नेहरू

### खरें साध्य हें !

कितीहि झालें तरी, राज्यघटना काय किंवा स्वातंत्र्य काय, दोन्ही साधनेच होत, साध्य नव्हे. मानवजातीचें कल्याण साधणें व विकास करणें, दारिद्य, दुःख आणि यातना यांचा नाश करणें, आणि शारीरिक व मानसिक दृष्ट्या प्रत्येकाला चांगल्या प्रकारे आयुष्य घालविण्याची संधि मिळणें हें साध्य होय. 'चांगल्या प्रकारें आयुष्य' म्हणजे काय याचें विवेचन येथे करतां येण्यासारखे नाही. पण बहुतेक लोकांना हें मान्य होईल कीं, त्यासाठीं स्वातंत्र्याची जरूरी असते. राष्ट्राच्या दृष्टीने पाहता राष्ट्रीय स्वातंत्र्य हवें, तसेंच व्यक्तीच्या दृष्टीने व्यक्तिस्वातंत्र्यहि हवें; कारण कोणतेंहि बंधन घेतलें तरी तें विकासाला घातकच ठरते. स्वातंत्र्याप्रमाणेच सहकार्यहि हवें. सध्याचें जीवित कितो तरी गुंतागुंतीचें झालें आहे, तें चालू राहाण्याला सहकारिता अवश्य पाहिजे.

### ' क्रांति ' म्हणजे काय ?

इतिहासाचा दीर्घ पट उलगडन पाहिला, तर त्यावर राजसत्तेचीं विविध स्वरूपे जशीं आढळतील, तशीं मालाच्या उत्पादनाचीं व संघटनेचीं आर्थिक दृश्येंहि दृष्टीस पडतील. त्या दोघांचे संबंध एकमेकांत गुंतलेले असून त्यांचा परस्परांवर परिणामहि होतो. ज्यावेळीं आर्थिक स्थिति ही झपाटयाने पुढे जाते आणि राजकीय व्यवस्था तिच्यामागे रेंगाळते, तेव्हा त्या दोहोंत मोठें खिंडार पडतें. ते ओलांडण्यासाठी एकदम पालट करणें जरूर होतें. त्यालाच क्रांति असें म्हणतात. कांही लोक पौर्वात्य राष्ट्रें व पाश्चात्य राष्ट्रें असा भेद मानतात. पण त्याचा नक्की अर्थ मात्र फारसा कोणी सांगत नाही. खरा भेद जो आहे तो निरनिराळ्या देशाच्या आर्थिक स्थितींतील फरकामुळे उद्भवलेला आहे. पूर्व व पश्चिम असा भेद आपल्या साम्राज्याचे वर्चस्व वाढविण्यासाठी भासविला जातो.

### इंग्लंडांतील भांडवलशाही

भांडवलशाहीची इमारत ही, ज्याच्याजवळ शेती नाही अशा कामकरी वर्गावर उभारली जाते. तिचें क्षेत्र म्हणजे सारें जग. युरोपांतील वायव्येकडील देश आणि उत्तर अमेरिका हीं जगांतील उत्पादन लुबाडून त्यावर गबर होत आहेत. आशिया, आफ्रिका, पूर्व युरोप व दक्षिण अमेरिका यांतून पैदा होणाऱ्या मालावर त्यांची चैन चालली आहे. ते जगाच्या संपत्तींत प्रचंड भर टाकीत आहेत हें खरं; पण ती संपत्ति कांही थोड्या राष्ट्रांतील अगदीं थोड्या माणसांचे हातींच खेळत राहाते. भांडवलशाहीच्या या अभिवृद्धीमध्ये, हिंदुस्थानाचा ताबा हा इंग्लंडला अत्यंत महत्त्वाचा होता. प्रारंभी हिंदुस्थानांतील सोन्याने इंग्लंडचे धंदे पोसले गेले आणि इंग्लंड हें 'धंदेवाले राष्ट्र' बनलें. नंतर इंग्लंडातील कारखान्यांना खाद्य म्हणून कच्चा माल पुरविण्यास हिंदुस्थानाने आरंभ केला. उलटपक्षीं, इंग्लंडच्या कारखान्यांत तयार झालेल्या पक्क्या मालाला हिंदुस्थान ही बाजारपेठहि बनली. यामुळे इंग्लंड हे एक मोठें शहर व त्याला लागून असणारें खेडे म्हणजे हिंदुस्थान अशी स्थिति निर्माण झाली.

इंग्लंडांत कामकरी वर्गाच्या चळवळी पुढे सुरू झाल्या. त्या शमविण्यासाठीं त्यांना सवलती देण्यांत आल्या. कामकऱ्याची राहाणी उच्च दर्जाची झाली. कामाचे तास कमी झाले आणि विमा वगैरेंच्या सुखसोयी करण्यांत आल्या. त्यामुळे इंग्लंडांतील कामकऱ्यांचा असंतोष बोथट झाला.

### हिंदुस्थानांतील 'स्वदेशीचा' अर्थ

हिंदुस्थानांत उद्योगधंद्यांची वाढ हळुहळू होत गेली. तिचा परिणाम शेतावर अनिष्ट झाला. हिंदुस्थान परक्या पक्क्या मालाचें गिऱ्हाईक बनला. त्याचे छोटे धंदे कांही सक्तीने बुडविण्यांत आले, तर कांही आर्थिक घडामोडीमुळे नाहीसे झाले. त्यांची उणीव कशानेहि भरून काढण्यांत आली नाही. इंग्लंडने हातभार लावला नाही, एवढेंच नव्हे तर यंत्रावर कर बसवून येथे कारखान्यांची वाढ होण्यास अडथळा आणला. परंतु आर्थिक शक्तीचा ओघ हा थोडाच थांबणार? हिंदी लोकांचे थोडें व परक्या लोकांचें बरेंच असें भांडवल गोळा झालें आणि कारखाने चालू लागले. हिंदी भांडवलाची शेंडी परदेशांतील पेढ्यांचें

हातींच होती. महायुद्धामुळे हिंदी उद्योगधंद्यांना मोठीच चालना मिळाली. त्यांतच, आपल्या साम्राज्यविषयक धोरणाला अनुसरून इंग्लंडने हिंदुस्थानाकडे पाहाण्याची दृष्टि बदलली आणि हिंदी उद्योगधंद्यांना प्रोत्साहन देण्यास सुरुवात केली. मात्र त्याच्या बुडाशीं परकें भांडवलच खेळत होतें. अशा रीतीने हिंदुस्थानांत कारखान्यांची जी लाट उसळली, तिलाच स्वदेशीचें नांव मिळालें; त्यामुळे ब्रिटिशांच्या भांडवलाची हिंदुस्थानावरील पकड पुष्कळच घट्ट झाली.

### भांडवलशाहीवरील प्राणसंकट

सर्व पौर्वात्य राष्ट्रांत उद्योगधंद्यांची वाढ व राष्ट्रीय चळवळ सुरू झाल्यामुळे पाश्चात्यांच्या लुटीला आळा बसला आणि त्यांच्या भांडवलावरील व्याज घटत चालले. त्यांतच, महायुद्धाचीं कर्जे वगैरेंचा बोजा होता. त्यामुळे कामकऱ्यांना पुरेसा पैसा मिळेना. त्यामुळे ते असंतुष्ट होत चालले. शिवाय, त्यांच्या डोळ्यांपुढे रशियाचे जीवंत स्फूर्तीचें उदाहरण होतेंच. तसेंच, संघ, संस्था वगैरे नांवाखाली भांडवल हें फारच थोड्या लोकांच्या मुठींत जाऊन बसलें. उत्पादनाचीं सुधारलेलीं यंत्रें निघाल्यामुळे मजूर बेकार होत चालले. त्यामुळे त्यांचें क्रयसामर्थ्य क्षीण झालें व तयार मालाला गिऱ्हाईक कमी झालें. म्हणून असें तत्त्व बाहेर आलें कीं, सामुदायिक उत्पादनाला सामुदायिक खपाची जरूरी असते. पण लोकांच्या गांठीं पैसा नाहीं, तर ते माल खरेदी कसा करणार? आणि मालाचा खपच नाही तर तो उत्पन्न करून काय फायदा ? व फायदा नसेल तर उद्योगधंदे कोण चालवितो ? अशी आपत्ति भांडवलशाहीवर कोसळली. हिने गेलीं चार वर्षे जगाचें नरडें दाबून धरलें आहे.

या आपत्तीचें बीज, जगांतील संपत्तीची विषम वांटणी हें आहे. थोड्या लोकांच्या हातीं संपत्ति सांचून राहाते हें या अनर्थाचें मूळ होय. भांडवलशाहीचें अपरिहार्य असें हें संकट आहे. ते तिच्याबरोबर वाढत आहे आणि शेवटीं तिला खाऊन फस्त करील. पैशाची किंवा खाद्यपदार्थांची कसलीच वाण सध्या जगांत नाही पूर्वीपेक्षा आता जग कित्ती तरी श्रीमान झालें आहे; आणि अदृष्टपूर्व अशा प्रगतीकडे आशेने पाहात आहे. परंतु आर्थिक व्यवस्था अशी चमत्कारिक आहे कीं, जगाच्या पाठीवर एकीकडे कांही लोक अन्नान्न करून प्राण सोडीत आहेत; तर दुसरीकडे खाद्य पदार्थांचा संहार होत आहे. कापूस, गहूं इत्यादि पदार्थ निसर्ग अनंत हस्तांनी देत आहे; तर मानव त्यांची राखरांगोळी करीत सुटला आहे! याचा अर्थच असा कीं, यापुढे भांडवलशाही ही अगदी उपयोगी नाही. उत्पादनाचीं नवीं साधनें पुढे आलीं, तेव्हां नवी आर्थिक व्यवस्था जन्मास आली पाहिजे. तिला आजच्या भांडवलवाल्यांनी विरोध करावा हें साहजिक आहे.

### पौर्वात्य राष्ट्रांच्या चळवळींतील साम्य

हिंदुस्थानांत धंद्यांची वाढ तुरळक झाली. शेतीवर जगणाऱ्या माणसांची संख्या वाढली. दारिद्र्याबरोबर असंतोष फुगत चालला. मध्यमवर्गाला स्वतःच्या विकास करण्याला अवसर सांपडेनासा झाला. म्हणून त्यांनी राजकीय हक्कांची मागणी सुरू केली आणि तिला चळवळीचें पाठबळ दिलें. इतर पौर्वात्य राष्ट्रांतहि जवळ जवळ अशीच स्थिति निर्माण झाली. इजिप्तमध्ये आणि आशियांतील बहुतेक देशांमध्ये महायुद्धानंतर राष्ट्रीय चळवळी सुरू झाल्या. त्यांचें मूळ बहुजनसमाजाच्या व मध्यम वर्गाच्या दुःस्थितींत होतें. या सर्व देशांतील चळवळींच्या मार्गांतहि विलक्षण साम्य आढळतें. असहकारिता, कौन्सिल-बहिष्कार, परदेशी मालावर बहिष्कार, हरताळ, संप, इत्यादि सोपानपरंपरा दिसून येते. इजिप्त व सीरिया या देशांतल्याप्रमाणे कोठें कोठे अत्याचार झाले, तरी एकंदरींत शांततापूर्ण मार्गावर भर देण्यांत येत आहे. या सर्व चळवळी सर्वत्र चालू आहेत. त्या केवळ स्वराज्य मिळाल्याने थांबणार नाहीत. कारण हा प्रश्न प्रदीप्त जठराग्नीचा आहे.

### भांडवलशाहीची शेवटची तडफड

महायुद्धानंतर भांडवलशाहीची भरभराट झाल्याचा देखावा दिसला. पण तो १९२९ सालापासून, पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे, ढासळून पडत आहे. याचेंच नांव 'व्यापारमंदी'. तिचा खरा अर्थ म्हणजे भांडवलशाहीचा अस्त. मजुरांची चळवळ जोराने पुढे येत आहे. तिला तोंड देण्यासाठी श्रीमंत लोक एक होत आहेत. यांतून फॅसिझम उदय पावला. राष्ट्रीय सरकारें हीं त्याचींच सौम्य प्रतीकें होत अर्थात् ही भांडवलशाहीची शेवटची तडफड आहे! अमेरिका हें भांडवलशाहींतील एकच बडें राष्ट्र असें आहे कीं, जें सरकारी कायद्याने संपत्तीच्या वांटणींतील विषमता थोडी तरी दूर करण्याचा प्रयत्न करतें. प्रे. रुझवेल्टच्या योजनेचें आत्यंतिक पर्यवसान म्हणजे 'सरकारी समाजसत्तावादच'. मात्र, तसें न होतां, ती योजना फसेल आणि तिचें रूपांतर 'फॅसिझम' मध्ये होईल असा संभव आहे. इंग्लंड हें आपल्या स्वभावानुरूप चांचपडत आहे. त्याला हिंदुस्थानांतील सोन्याने सांवरून धरलें. पण तो क्षणिक उपाय आहे. सारीं राष्ट्रें उतरणीला लागलीं असून लवकरच तळ गांठील आहेत.

### जगाचा समाजसत्तेकडे कल

अशा प्रकारें सर्व जगाचें पर्यालोचन केलें तर असें दिसतें कीं, भांडवलशाहीने मालाच्या उत्पादनाचा प्रश्न सोडविला, पण त्याच्याशीं संलग्न असणारा विभागणीचा प्रश्न त्याला सोडवितां येत नाही. तो प्रश्न सोडविण्यासाठी भांडवलशाहीचें उच्चाटनच होणें जरूर आहे.

भांडवलशाहींतून साम्राज्यशाही निघाली. त्यामुळे वसाहतीसाठी व बाजारपेठेसाठी देशांदेशांत भांडणें सुरू झालीं, खुद्द वसाहतींमध्ये राष्ट्रीय चळवळी उत्पन्न झाल्या. त्यांच्याशींहि साम्राज्यशाही झगडत आहे. जकातींमुळेंहि कलह निर्माण झाले. अशा स्थितीमुळे आपत्ति वरचेवर येऊं लागल्या आता तर त्यांची अखंड परंपराच लागून राहिली आहे आणि महायुद्धाची कृष्णछाया पसरत आहे. समाजसत्तावाद तर्कावर व शास्त्रावर अधिष्ठित असल्यामुळें त्याला दिवसेंदिवस बळ चढत आहे. पैसा नष्ट करावा आणि त्या जागीं उत्साह हें माप समजावें असें मत सांगून कांही तज्ज्ञ इंजीनियरांनी अमेरिकेला नुकताच धक्का दिला. इंग्लंडमध्ये मेजर डग्लस यांचें मत मूळ धरीत आहे. तें मत असें कीं, राष्ट्रांतील उत्पन्न झालेल्या पदार्थांची वांटणी सर्व लोकांमध्ये समान प्रमाणांत करावी. यावरून जगांत कोणते वारे वाहत आहेत हें उघड होतें.

### स्वातंत्र्याचे दोन प्रकार

आशियांतहि हे वारे खेळत आहेतच. साम्राज्यशाही व राष्ट्राभिमान याची प्रधान रणभूमि म्हणजे आशिया खंड. भांडवलशाही येथे बाल्यावस्थेंत आहे. पण अमेरिकेंत आणि युरोपांत जर तिचें सूप वाजलें आहे, तर आशियाखंडांत तिचें भवितव्य काय हें दिसतच आहे. आशियांतील देशांत राष्ट्रीय चळवळीबरोबरच आर्थिक स्वातंत्र्य मिळविण्याचे उद्योग चालू आहेत. राजकारणाला समाजसत्तावादाचें स्वरूप येत चाललें आहे. राजकीय आणि सामाजिक असें दोन्ही प्रकारचें स्वातंत्र्य बऱ्याच देशांना एकदमच प्राप्त होईल असा रंग आहे.

### जगापुढील तीन प्रश्न

हिंदुस्थानांत जुनें राष्ट्रीय ध्येय व नवें आर्थिक ध्येय यामध्ये कलह निर्माण झाला आहे. पण आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, सतराव्या शतकांतील उपायांनी आजचे प्रश्न सोडवितां येणार नाहीत. हिंदुस्थानाचा प्रश्न म्हणजे आशियाचा प्रश्न आणि तो जगाच्या प्रश्नाशीं निगडित झालेला. हिंदुस्थानांत जें घडतें त्याचे परिणाम जगावर होतील; आणि जगांतील घडामोडीमुळे हिंदुस्थानाचे भवितव्य ठरेल. जगापुढे आज मुख्य तीन प्रश्न आहेत. ते म्हणजे ( १ ) भांडवलशाहीचें भवितव्य ( म्हणजेच युरोप—अमेरिकेचें भवितव्य ) ( २ ) हिंदुस्थानचें भवितव्य. ( ३ ) चीनचें भवितव्य हे तीनहि प्रश्न अन्योन्याश्रयी आहेत.

### गोलमेज परिषदेने काय साधलें ?

हिंदुस्थानांतील लढा राजकीय स्वरूपाचा दिसत असला, तरी तो मुख्यतः आर्थिकच आहे.

हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळणें जरूर आहे. कारण त्यांतील बहुजनसमाजावर व मध्यमवर्गावर असह्य असा बोजा आहे. तो नाहीसा झाला पाहिजे किंवा कमी तरी झाला पाहिजे. तो किती कमी होतो यावर स्वातंत्र्याचें प्रमाण ठरवितां येईल. उद्या परक्या सरकाराऐवजीं स्वदेशी राजसत्ता चालू झाली आणि हा बोजा जशाचा तसाच राहिला, तर त्याला स्वातंत्र्याची सावलीसुद्धा समजतां येणार नाही. राज्यघटनेचे कागदी घोडे नाचविण्यापासून तर काडीचा फायदा नाही. गोलमेज परिषद ही झालीगेली. तिचा उद्देश धनिक लोकांना ब्रिटिशांकडे वळवून घ्यावें असा होता, आणि तो साधलाहि. तिने स्वराज्य दिलें; पण तें, विठ्ठलभाई म्हणतात त्याप्रमाणे, व्हाइसॅरायांना ! ब्रिटिश भांडवलवाले आणि ब्रिटिश नोकर यांचे हितसंबंध आतापेक्षाहि मजबूत करण्यांत आले. संस्थानिक व जमीनदार यांच्याहि कल्याणाची काळजी घेण्यांत आली. तात्पर्य, हिंदी जनतेला लुबाडणाऱ्या नाना प्रकारच्या मातबर लोकांचें संरक्षण व संवर्धन करण्यासाठी गोलमेज परिषदेची योजना आंखण्यांत आली होती, आणि ती तडीसहि नेण्यांत आली. नंतर असें सांगण्यांत येत आहे कीं, स्वराज्य ही फार महाग चीज आहे आणि त्यासाठी प्रत्येक प्रांताला लक्षावधि पौंडाचा जादा खर्च करावा लागेल. याचा अर्थच हा कीं, जनतेच्या डोक्यावरील बोजा हलका न होतां यापुढे तो जडच होणार. परिषदेला गेलेल्या सभासदांनी स्वतःच्या जातीचें हित पाहिलें आणि हिंदुस्थानांतील पस्तीस कोटि लोकांचें कल्याण ते साफ विसरले.

### हिंदुस्थानाचें ध्येय

अर्थात्, यामुळे हिंदुस्थानांतील राजकीय लढा पुढे चालेल, एवढेंच नव्हे तर, तो अधिक भयंकरहि होईल. पुढारी येवोत वा जावोत, ते चळवळ थांबवोत वा समेट करोत, जनतेच्या पाठीवर भूक ही कोरडे ओढीत आहे आणि तिला चळवळ चालविण्याला भाग पाडीत आहे. म्हणून जनतेची नाग्वणूक थांबविणें हेंच हिंदुस्थानाचें ध्येय आहे.

त्याचा राजकीय अर्थ म्हणजे, ब्रिटिशाच्या ( अर्थात् साम्राज्यशाहीच्या ) बंधनांतून सुटून पूर्ण स्वातंत्र्य संपादन करणें; आणि आर्थिक व सामाजिक अर्थ म्हणजे धनिक वर्गाचे विशिष्ट हक्क नष्ट करणें. सर्व जग या ध्येयासाठीच झगडत आहे. म्हणून भारतीय स्वातंत्र्याचा लढा हा जागतिक युद्धांतील एक भाग ठरतो. जनतेच्या चळवळींत शब्दच्छल नसतो, शिष्टाचार नसतो आणि दरबारी वाटाघाटी नसतात. क्लेश हाच जनतेचा शिक्षक आणि चळवळ हीच तिची शाळा.कायदेभंगाने हिंदी जनतेला न विसरणारें पुष्कळच शिक्षण दिलें आहे.

**ब्रिटिश साम्राज्य आणि जागतिक सहकार्य**

सध्या जगामध्ये आंतरराष्ट्रीय विचार प्रबळ होत आहेत. म्हणून राष्ट्रापुरतें पाहण्याची संकुचित दृष्टि टाकून दिली पाहिजे आणि जागतिक संघटनेकडे नजर ठेविली पाहिजे. स्वातंत्र्य म्हणजे अलिप्तपणा किंवा तुटकपणा नव्हे, तर साम्राज्यशाहीच्या बंधनांतून मुक्तता. इंग्लंड हें सध्या साम्राज्यशाही राष्ट्र आहे. म्हणून त्याचा संबंध तोडल्यानंतरच आपल्याला खरें स्वातंत्र्य लाभेल. आपलें ब्रिटिश लोकांशीं कांही वाकडें नाही; परंतु ब्रिटिश साम्राज्यशाही आणि भारतीय स्वातंत्र्य यांमध्ये मात्र तडजोड नाही आणि तह नाही. इंग्लंडांतून साम्राज्यशाहीचें उच्चाटन होईल. तर त्याच्याशीं आम्ही आंतरराष्ट्रीय गोष्टींत आनंदाने सहकार्य करू. मात्र याचा अर्थ ब्रिटिश कॉमनवेल्थशीं सहकार्य करू असा नव्हे, कारण तो केवळ साम्राज्यशाहीने पांघरलेला एक बुरखा आहे. राष्ट्रसंघामार्फत सर्व राष्ट्रांचें सहकार्य होण्याला जर कोणता प्रचंड अडथळा असेल तर इंग्लंडचें परराष्ट्रधोरण. शस्त्रसंन्यास, हवेंतून बॉंबफेक, मँच्यूरियाचा प्रश्न इत्यादि प्रकरणांवरून हेंच उघड होतें. केलॉग-ब्रियांड कराराने लढाई बेकायदा ठरली असती; पण इंग्लंडाने आपल्या साम्राज्यासाठी अशा कांही अटी त्यांत घातल्या कीं, त्यामुळे त्या करारावर हरताळ फासला गेला. ब्रिटिश साम्राज्य आणि आंतरराष्ट्रीय सहकार्य यांमध्ये दोन ध्रुवांइतकें अंतर आहे.

मुसोलिनी म्हणतो, “साऱ्या जगांत क्रांति होत आहे. परिस्थिति आपल्याला ढकलीत नेत आहे.” या संधीचा आपण फायदा घेतला पाहिजे. चालू राज्यपद्धति सुधारण्याचा प्रयत्न करणें हा निवळ कालापव्यय आहे. हिंदुस्थानाचें ध्येय काय ? तर सामाजिक व आर्थिक समता स्थापणें, एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राला व एका वर्गाने दुसऱ्या वर्गाला नागविण्याची पद्धत नष्ट करणें आणि आंतरराष्ट्रीय सहकार्यावर चालणाऱ्या समाजसत्तावादी जागतिक संघटनेमध्ये राष्ट्रीय स्वातंत्र्य संपादन करणें. हें कांही केवळ स्वप्न नाही;तर तें ध्येय राजकीय क्षितिजावर उदय पावत आहे आणि तें व्यवहारी राजकारणाच्या आटोक्यांतलिहि आहे.

# युद्धाचीं कारणें नाहींशी करा

( ले.—**पां. वा. गाडगीळ.**)

मांच्यूरियांतील युद्धापासून जो एक जगाच्या दृष्टीने महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होऊन बसला तो असा. युद्धांचीं कारणें शोधून काढून त्यांना धैर्याने तोंड देणें हें कर्तृत्व राष्ट्रसंघ जोंपर्यंत दाखवीत नाही तोंपर्यंत युद्धांचा कायमचा शेवट करण्याचें पुण्य राष्ट्रसंघाच्या पदरीं कधीहि पडणार नाही. ज्या राज्यकर्त्यांस प्रजेमध्ये दंगेधोपे होऊं नयेत असें वाटत असेल त्यांनी निवळ पोलीस व लष्कर यांची तयारी जय्यत ठेविली व मुस्कटदाबीच्या कायद्यांचा ग्रंथ मॅजिस्ट्रेटाच्या हातांत दिला म्हणजे भागलें असें होत नाही. ज्या नाना प्रकारच्या आपत्तींनी गांजून जाऊन प्रजा बंड करण्यास प्रवृत्त होते त्यांची चौकशी करून त्यांचें निवारण करण्याचा निःस्वार्थबुद्धीने प्रयत्न करणें व प्रजेचा संतोष राखून तो वाढविणें हें राज्यकर्त्यांचें एकच एक नव्हे तरी आद्य कर्तव्य आहे. आणि राष्ट्रसंघ हें जर सर्व सरकारांचें सरकार तर त्यास हे कर्तव्य कसें टाळतां येईल ? जपानाच्या चीनवरील आक्रमणाने राष्ट्रसंघावर आज जें संकट आलेलें आहे तें राष्ट्रसंघाच्या या कर्तव्यपराङ्मुखतेचेंच फळ आहे.

**राष्ट्रसंघाचें कर्तव्य**

जपानाने चीनवर अन्यायाने आक्रमण केलें हें खरेंच. पण प्रजाजन गुन्हे कां करतात याची अपराधशास्त्राप्रमाणे राज्यकर्त्यांनी जर मीमांसा केली तर राष्ट्रसंघाचें आपल्या प्रजाजांनबद्दल तेंच कर्तव्य ठरत नाही काय? एकाने दुसऱ्यास लुटूं नये हें जसे राजाने फर्मावावें तसेच कष्ट करील त्याला अन्न–वस्त्र–आश्रय मिळण्यांची जबाबदारी राजाने घ्यावी ही राजनीति

आहे. याच न्यायाने राष्ट्राराष्ट्रांनी युद्धें खेळूं नयेत हें फर्मावतांना तुमच्या अन्न–वस्त्राश्रयाची जबाबदारी मी घेतों असें राष्ट्रसंघाने आश्वासन दिलें पाहिजे. हें आश्वासन राष्ट्रसंघाकडून मिळूं शकत नाही, हीच आज सर्वांत मोठी अडचण होऊन राहिली आहे.

औद्योगिक क्रांतीच्या आरंभापासून गेल्या शंभर–सवाशें वर्षांत जीं लहानमोठीं युद्धें झालीं त्या सर्वांचें कारण वाढत्या लोकसंख्येचा चरितार्थ चालविण्यासाठी प्रदेश जिंकणें, वसाहती स्थापणें, व्यापार वाढविणें हें होय. १९१४ सालाच्या महायुद्धाचें तात्कालिक निमित्त कांही असो,इंग्रजासारखें साम्राज्य वाढवून आपल्या वाढत्या लोकसंख्येस नवीन प्रदेश मिळविणें ही त्यांत जर्मनीची खरी महत्त्वाकांक्षा होती. आणि हें जर्मन महायुद्ध संपलें तरी वाढत्या लोकसंख्येच्या राष्ट्रांचा अन्न-वस्त्राचा प्रश्न जोंवर सुटला नाही तोंवर युद्धें कायमचीं थांबविण्याचे कामीं कोणाला कधीहि यश येणें अशक्य आहे.

### वाढत्या लोकसंख्येची सोय

प्रस्तुत मांच्युरियाचे प्रकरणीं चीनवर जपानाने आक्रमण कां केलें यापेक्षा जपानाच्या वाढत्या लोकसंख्येची सोय राष्ट्रसंघाने कां लावूं नये, हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. 'काँटेंपोररी रिव्ह्यू'मध्ये एका लेखकाने यासंबंधी जपानाची बाजू मांडली आहे. तेथे तो म्हणतो " जपान म्हणजे ज्वालामुखींनी भरलेल्या नापीक अशा लहान लहान बेटाचा देश. या १ लक्ष ८० हजार चौरस मैलांच्या देशांत १९३२ च्या खानेसुमारीने पाहतां ६ कोटी ८० लक्ष लोक राहतात. १९३४ सालीं ही लोकसंख्या ७ कोटींच्या घरास जाईल. संपत्तीसंबंधीच्या चढाओढींत जपान फार उशीरा सामील झालें, आणि त्या वेळीं जगांतील राहण्याजोगी सर्व जमीन प्रतिबंधाखालीं आली होती. म्हणून कोरिया व मॉंच्युरिया येथे जपान चढाई करतो. युरोपियन राष्ट्रांनी ज्या मार्गांनी साम्राज्यें वाढविलीं तितपत जपानाचेहि मार्ग समर्थनीय आहेत. जपानाला आपल्या वाढत्या पोराबाळांच्या चरितार्थाची तजवीज करण्याचा हक्क आहे कीं नाही ? याचा एकदा निर्णय द्या. या निर्णयांत जगांत होणाऱ्या सर्व युद्धांचें पहिलें कारण अंतर्भूत आहे आणि आजचा जगाचा नकाशा यानेच बनलेला आहे. मी असें सुचवूं इच्छितों कीं, जपानासारख्या परिस्थितींत जगांतील एखादा देश पडल्यास शांततेच्या व वाटाघाटीच्या मार्गांनी त्याच्या जगण्याची सोय जगाने कांही तरी लाविली पाहिजे किंवा घोर प्रसंग येणार हें समजून राहिलें पाहिजे. जगांत सर्वत्र जपानाला मज्जाव करणें म्हणजे निवळ क्रूरपणा आहे; आणि तें आता शक्यहि नाही. या प्रकरणीं खरी मुद्द्याची गोष्ट आहे ती ही असून तिकडे मात्र कोणीच पाहत नाही."

इटालीची हीच स्थिति. तेथे १ लक्ष १८ हजार चौरस मैलांत सवाचार कोटि लोक राहतात तेथील प्रजा अत्यंत कुशल व कर्तृत्ववान आहे, पण तेथे औद्योगिक उत्कर्षास लागणारें लोखंड, कोळसा, तांबें यांपैकीं कांही नाही. इटालीच्या विद्युच्छक्तीबद्दल बराच बभ्रा आहे. पण वस्तुतः इंग्लंडाशीं तुलना करता इंग्लंडांत दरसाल सुमारें २६ कोटि टन कोळसा निघतो तर इटालींत ४ कोटि टन कोळशाच्या शक्तीइतकी विद्युच्छक्ति दरसाल पैदा होते. शिवाय इटालियनांना इंग्लंड–सारख्या वसाहतीहि फारशा नाहीत. अशा बुभुक्षित अवस्थेंत जपान काय इटाली काय किंवा दुसरें कोणतेंहि राष्ट्र काय, पापप्रवृत्त झालें तर तें कृत्य नीतिदृष्ट्या कितीहि गर्हणीय असलें तरी 'बुभुक्षितः किं न करोति पापम्' या न्यायाने मनुष्यस्वभावाला धरून आहे हें खास. राष्ट्रसंघास जगांतील युद्धांचा शेवट करावयाचा असेल तर त्याने आपल्या प्रजेच्या म्हणजे सभासद राष्ट्रांच्या पोटापाण्याची सोय लावणें हाच पहिला उपाय आहे.

### इंग्लंड व फ्रान्स

पण हा उपाय राष्ट्रसंघ कसा करणार? कारण राष्ट्रसंघ, राष्ट्रसंघ म्हणजे तरी कोण? इंग्लंड आणि फ्रान्स; बाकीचे सभासद एक तर दुबळे आणि स्वतःच बुभुक्षित. कांही दान सुटलेंच तर त्यांनाच हवें आहे; ते दुसऱ्याला काय देणार ? आणि इंग्लंड–फ्रान्सनी युद्धनाशाचा वर सांगितलेला उपाय अमलांत आणावा म्हणजे त्यांनी भावी पिढ्यांच्या नांवाने आंखून ठेवून आज ओसाड टाकलेले प्रदेश बुभुक्षितांना दिले पाहिजेत. ऑस्ट्रेलियाचें क्षेत्रफळ ३०लक्ष चौ. मै. असून लोकसंख्या अवघी ६५ लक्ष. पण जपान्यांना तेथे पूर्ण प्रतिबंध आहे. विपुल भौतिक संपत्ति असलेल्या न्यू झीलंडचें क्षेत्रफळ १ लक्ष ५ हजार चौ. मै. असून लोकसंख्या फक्त ६० हजार आहे. फ्रान्सच्या साम्राज्यांत राहण्यास फ्रेंच लोक फारच थोडे मिळतात. आणि खुद्द फ्रान्समध्ये लोकसंख्या कायम राखण्याकरितां बाहेरून मजुरांची भरती करावी लागते. ब्राझिलचें क्षेत्रफळ हिंदुस्थानाच्या दुप्पट म्हणजे जवळपास ३२ लक्ष चौरस मैल आहे. पण लोकसंख्या फक्त ३ कोटी. तरी सुद्धा बाहेरच्यांना प्रतिबंध आहेच. पण इंग्लंड–फ्रान्स राष्ट्रसंघातर्फे ब्राझिलवर सक्ति

करूं इच्छीत नाहीत. कां करतील? कारण आधी यांनी आपले प्रदेश परक्यांना खुले केल्याशिवाय ब्राझिल अथवा दुसरा कोणी यांचा हुकूम कां मानील!

### जपान व चीन

निरनिराळया राष्ट्रांतील वाढत्या लोकसंख्येची तरतूद कशी लावावी हें पाहणें हें युद्धें थांबविण्याचे दृष्टीने राष्ट्रसंघाचें आद्य कर्तव्य होय. पण 'आज बारा वर्षांत हा प्रश्न जेव्हा जेव्हा आला तेव्हा मुत्सद्द्यांनी (आणि दुर्दैवाने यांत बहुतेक ब्रिटिश साम्राज्यांतील मुत्सद्दीच होते.) हा प्रश्न धुडकावून लावला." आज चीन–जपान प्रकरणीं पुन्हा तो प्रश्न आला आहे. जपानाने चीनची आगळीक केली याबद्दल राष्ट्रसंघातर्फे जपानाला नमवतां येणार नाही असें नाही. पण 'चीनांत नको तर कुठे जाऊं सांगा' असा सवाल जपानाने टाकला तर भावी पिढयांकरिता राखून ठेवलेले साम्राज्यांतील रिकामे प्रदेश जपानाला द्यावे लागतील, म्हणून राष्ट्रसंघाने आरंभीं जपानकडे दुर्लक्ष केलें. हेतु हा कीं, जपानाने मांच्यूरिया जिंकून आपली सोय लावली व चीन त्यास शरण गेला तर परभारेंच पिडा टळली. पण आज वेळ अशी आली आहे कीं चीन शरण जात नसून उलट राष्ट्रसंघाची कसोटीच पाहायला बसला आहे. राष्ट्रसंघाने हातपाय न हालविल्यास अमेरिका चीनची बाजू घेण्याचा विचार करीत आहे. आणि जर कां अमेरिका आणि जपान यांची जुंपली तर प्रो. लास्की यांना वाटतें कीं कानडा व ऑस्ट्रेलिया अमेरिकेला मिळणार आणि मागे झालेल्या युद्धास बरें म्हणवील असें युद्ध भडकेल.

लॉर्ड सेसिल यांनी अलीकडील एका लेखांत अशी कल्पना मांडली आहे कीं, जपानाने मांच्यूरिया जिंकला तरी तो त्यास पचणें कठिण आहे. कारण चीनांत बहिष्कार वाढल्यामुळे जपानाची निर्यात कमी होत आहे. जपानला सतत विरोध असल्यामुळे जपानाला मांच्यूरियांत उद्योगधंद्यांत किफायत होणार नाही. सेसिल यांचा हा युक्तिवाद अंशतः खराहि आहे. पण या कारणाने जपानाने माघार घेतल्यास राष्ट्रसंघाचा उपयोग काय झाला? शिवाय वाढत्या लोकसंख्येचे काय करूं, हा जपानापुढील प्रश्न कांही मांच्यूरियांतून बाहेर पडलें तरी सुटत नाही. उद्या लोकसंख्या जास्त वाढली कीं पुनः ती कोठे घालावी हा प्रश्न अधिकाधिक तीव्र होत जाणार व आजच्यासारख्या आक्रमणावांचून पुनः कांही सुटका होत नाही. अखेर यांत युद्ध उद्भवेल हें जपानहि जाणून आहे. पण पराक्रमण करून लढाईंत तरी मरावें अथवा घरांत कोंडून घेऊन उपाशीं मरावें असा बिनतोड प्रसंग प्राप्त झाल्यास, जपानी लोकांसारखे शूर लोक युद्धच पत्करतील हें खचित.

### वाटेंतील धोंडा

राष्ट्रसंघांत आज जे तुर्कस्थान व इराक सुद्धा ५७ सभासद आहेत त्यांनी एकजूट होऊन इंग्लंड, फ्रान्स यांजकडून राष्ट्रसंघाचें पुढारीपण हिरावून घेतल्याशिवाय या लोकसंख्येची सोय करण्याच्या प्रश्नास राष्ट्रसंघ तोंड पाडील ही गोष्ट अशक्य आहे. सहज दिसून न येणारी पण वस्तुतः खरी असणारी गोष्ट अशी आहे कीं ब्रिटिश साम्राज्य संघ हा राष्ट्रसंघाच्या यशाच्या वाटेवरील मोठी धोंड आहे. पृथ्वीवरील वैभवाचे प्रदेश यांनी जिंकले आहेत. ते रिकामे पडले तरी त्यांत परक्यांची सोय होऊं देत नाहीत. यापुढे महायुद्ध झालें कीं ही साम्राज्याची भोपळयाची मोट फुटून दहा भोपळे दहा दिशांनी जातील ही यांना भीति आहे. युद्ध उत्पन्न झालें तर तें होणार युरोपांत किंवा आशियांत. पैकीं आशियांत हिंदुस्थानाचें मोठें सैन्य परभारें पोसून सज्ज ठेवितां आल्यामुळे तिकडे कोणाची डोकें वर काढण्याची छाती नाही. उरला युरोप. तेथे राष्ट्रसंघांत राहून फ्रान्सला उचलून धरावें व फ्रान्स डोईजड होऊं नये म्हणून मध्येच थोडें जर्मनीस झुकते माप द्यावें आणि युरोपांत सामर्थ्यांचा ताजवा समतोल राखून कोणीकडून युद्धाचा संभव टाळावा एवढीच यांची दृष्टि आहे.

आर्थिक बाबतींत आपलें साम्राज्य तेवढें स्वायत्त झालें कीं मग बकीचक्ष जगाच्या कल्याणाच्या उठाठेवी करून राष्ट्रसंघांत वर्चस्व गाजविण्यास ब्रिटिश प्रधानास कोण उत्साह! पण जर कां आम्हास कोणी थोडा प्रदेश द्या म्हटलें तर ब्रिटिश साम्राज्यांतील सभासदांची गुरगुर सुरू झालीच. महायुद्धानंतर निरनिराळ्या राष्ट्रांच्या ज्या सरहद्दी ठरल्या त्या राष्ट्रसंघाच्या नियमावलींतील १० व्या नियमाने कायम मानल्या आहेत. आणि राष्ट्रसंघाचा पुढाकार तेव्हापासून ब्रिटिशांकडेच असल्यामुळे हा नियम कोणाच्या प्रेरणेने झाला हें सांगावयास नकोच. हा १० वा नियम बदलून जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांच्या लोकसंख्यांची सोय लावण्याच्या दृष्टीने देशांतराचे नवे नियम करून व ते सर्व द. आफ्रिका ऑस्ट्रेलिया यांसारख्या प्रदेशांवर सक्तीने लादून तशी योग्य ती दुरुस्ती या १० व्या नियमांत केल्याशिवाय जगांतील युद्धांचें सनातन कारण नाहींसें होणार

नाही. याने ब्रिटिश साम्राज्याची थोडी छाटाछाट करावी लागेल. पण नाही तर अपरिहार्य अशा महायुद्धांत ती होणार नाही असें साम्राज्यांतील मुत्सद्द्यांस वाटतें काय !

# जिनीवा परिषदेंत हिंदुस्थान

हिंदुस्थानांत काय चाललें आहे हें सुधारलेल्या युरोपियन राष्ट्रांना कळणें अत्यंत जरूर आहे. त्या दृष्टीनें ता. १९ सप्टेंबर रोजीं जिनीवा येथे भरलेल्या आन्तरराष्ट्रीय परिषदेची उपयुक्तता विशेष मानली पाहिजे. परिषदेचें प्रस्तुत अधिवेशन तिसरें असून त्याला हिंदी पुढाऱ्यांपैकीं बाबू सुभाषचंद्र बोस व मुंबईचे प्रसिद्ध बॅरिस्टर श्री. भुलाभाई देसाई यांना हजर राहाण्याचा योग सहज जुळून आला. परिषद आंतरराष्ट्रीय असल्यामुळे तिला इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, जर्मनी, स्वित्झरलंड, चीन, बेल्जम या विविध देशांतून हिंदुस्थानाविषयी कळकळ बाळगणारे स्त्रीपुरुष आले होते. परिषदेच्या अध्यक्षस्थानीं डॉ. पिव्हट यांची योजना झाली होती. ही परिषद हिंदुस्थानाकरिता अस्तित्वांत आलेल्या आन्तरराष्ट्रीय कमिटीने भरविली होती. सदर कमिटीचें प्रचारकार्य युरोपांतील बहुतेक सर्व प्रमुख राष्ट्रांत सुरू आहे. कमिटीच्या अध्यक्षांनी परिषदेच्या प्रारंभी आपल्या कामाचा अहवाल निवेदन केला. हिंदुस्थानांतील कायदेभंगाच्या चळवळीचें यथार्थ स्वरूप कमिटीने युरोपास सांगितल्यामुळे त्याची चळवळीसंबंधी गैरसमज दूर होण्यास बरीच मदत झाली. तिने जाहीर सभा भरविल्या. ब्रिटिश सरकाराकडे अर्ज पाठविले आणि राष्ट्रसंघ, व शस्त्रनियमन परिषद यांना हिंदुस्थानाचीं गाऱ्हाणीं कळविलीं. इंडिया लीग ही संस्था इंग्लंडांत याच धर्तीवर काम करीत असून तिने दडपशाहींतील अत्याचारांची हकीकत पत्रकें छापून ब्रिटिश पार्लमेंटांतील सभासदांच्या नजरेस आणिली. तिच्या आधारावर पार्लमेंटाच्या सभासदांनी भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांना प्रश्न विचारून बेजार केलें.

## हिंदी पुढाऱ्यांचीं भाषणें

आन्तरराष्ट्रीय कमिटीच्या शाखा युरोपांत सर्वत्र पसरलेल्या आहेत. त्यांनीहि परिषदेस आपल्या कामाचा अहवाल सादर केला. परिषदेंत श्री. भुलाभाई देसाई व बाबू सुभाषचंद्र यांचीहि भाषणें झालीं. देसाई यांनी पुर्ण परिषदेची खरी कल्पना आपल्या युरोपियन श्रोत्यांस आणून दिली. त्यांनीं कायदेभंगाची चळवळ थंडावल्याचें कबूल केलें. पण सर्व मोठमोठ्या चळवळी मधून मधून अशाच थंडावत आल्या असल्याने हिंदुस्थान त्या नियमास अपवाद नाही, यांत त्यांच्या मतें कांहीच आश्चर्य नाही. सुभाषचंद्र यांनी आपल्या भाषणांत चळवळ मंदावल्याचा दोष दडपशाहीस दिला हिंदी लोकांचे मूलभूत हक्क इंग्रज सरकार कबूल करीत नाही व हिंदुस्थानाला आर्थिक दृष्ट्या लुबाडीत आहे यामुळे हिंदुस्थानांत असंतोष माजला आहे असें सुभाषचंद्र म्हणाले.

येणेंप्रमाणें भाषणें झाल्यावर अध्यक्ष डॉ. पिव्हट यांनी सुभाषचंद्र व देसाई यांस मार्मिक प्रश्न विचारून माहिती मिळविली. देसाई यांनी दिलेलीं उत्तरें अशीं—'म. गांधींनी अशक्तपणामुळे चळवळ सोडली. राष्ट्रीय सभा मोडून टाकण्यांत आली, ही बातमी खरी नाही. ऑ. इं. कॉ. कमिटीने ठरविल्यावांचून राष्ट्रीय सभा मोडणार नाही.' सुभाष बाबूंचीं उत्तरें पुढीलप्रमाणे—'म. गांधी स्वातंत्र्याचा झगडा जोंपर्यंत चालवितील तोंपर्यंत हिंदुस्थानांतील युवक त्यांस अंतर देणार नाहीत. मजुरांची संघटना हिंदुस्थानांत सुरू आहे. त्यांच्या कार्यकर्त्यांत तीन गट आहेत. एकाचा भर ट्रेड युनियन कॉंग्रेसवर आहे. दुसरा समाजसत्तावादी आहे व तिसरा कम्युनिस्ट आहे.' सुभाषबाबूंनी आपली गणना समाजसत्तावाद्यांत केली ! सुभाषबाबूंनी दडपशाहीमुळे सभा, मिरवणुकी व राष्ट्रीय वाङ्मयांस कसा प्रतिबंध होत आहे याचें परिषदेपुढे वर्णन केलें.

## ठराव

परिषदेंत एकंदर दहा ठराव पास झाले. त्यांतील महत्त्वाच्या ठरावांचा आशय येणेंप्रमाणे—(१) हिंदुस्थानास पूर्ण स्वातंत्र्य मिळालें पाहिजे ही गोष्ट परिषदेस मान्य आहे. (२) म. गांधी व राजबंदी यांचें अभिनंदन, (३) सरहद्दीवर बाँब टाकण्यांत आले त्याचा निषेध, (४) हिंदुस्थानावर इंग्लंडने लष्करी खर्चाचा विनाकारण मोठा बोजा लादला आहे या अन्यायाकडे शस्त्रनियमन परिषदेने लक्ष द्यावें (५) हिंदुस्थान व ब्रिटिश साम्राज्य यांचे दरम्यान वाद उत्पन्न झालें असता त्यांचा निर्णय राष्ट्रसंघ करीत नाही हा अन्याय आहे. (६) हिंदुस्थानाने इंग्लंडास द्यावयाचें कर्ज न्याय्य कोणतें व अन्याय्य कोणतें हें आंतरराष्ट्रीय परिषदेनें ठरवावें (७) हिंदी लोकांस ब्रिटिश साम्राज्यांतील द. आफ्रिका आदि करून देश विषमतेनें वागवितात याचा निषेध (८) वटहुकुमांचा निषेध (९) अंदमानांतील राजबंद्यांना वाईट रीतीनें वागविण्यांत येतें याचा निषेध. सदर कैद्यांना अंदमानांत पाठवूं नये असा निर्णय परिषदेने दिला.

# हिंदु महासभा अजमीरचें पंधरावें अधिवेशन

अध्यक्ष भाई परमानंद यांनी पुढील आशयाचें हिंदींत भाषण केलें:—

## अध्यक्षांचें भाषण

"हिंदु-मुसलसमानांची ऐक्य परिषद मागे जी झाली त्याबद्दल वृत्तपत्रकारांनी फार गवगवा केला. पण त्यावर माझा कधींच विश्वास बसला नाही. हिंदु-मुसलमानांचें ऐक्य निर्माण झाल्यास स्वराज्य जवळच आहे अशी विचारसरणी कांहीजण पुढे मांडीत आहेत. पण ही गोष्ट मला स्वतःला तितकीशी पटत नाही. जोपर्यंत हिंदीमुसलमानांची वृत्ति आपल्या भारतभूमीच्या सेवेविषयी तत्पर अशी बनली नाहीं तोंपर्यंत त्यांच्या ऐक्याचा काहीएक फायदा नाही ही गोष्ट कांहीं कॉंग्रेसभक्त विसरतात. करारमदार करून ऐक्य टिकतें ही गोष्ट अगदीं खोटी आहे. सरकारने जो जातवारीच्या प्रश्नाचा निर्णय दिला तो लोकशाहीच्या मुळावर घाला घालणारा आहे. या निर्णयाने एकी होण्याच्या ऐवजीं बेकी होईल. आपल्या या देशांत अठरापगड जाती व अनेक धर्म असले तरी या सर्वांमध्ये हल्ली एकराष्ट्रीयत्वाची भावना दृग्गोचर होऊं लागली आहे. पण हल्लींच्या जातवारीच्या निर्णयाने ही भावना पुनः नष्ट होण्याच्या मार्गास लागणार आहे याबद्दल फार वाईट वाटतें. या जातवारीच्या निर्णयाचा फक्त मुसलमानांनाच विशेष फायदा झाला. मुसलमानांना कसें दुखवावें या भीतीने कॉंग्रेस पक्षीयांनी मुसलमानांच्या मागण्यास जोराचा विरोध केला नाहीं. कॉंग्रेससारख्या मोठ्या व वजनदार संस्थेने या प्रश्नाकडे डोळेझाक करून हिंदूंच्या जिव्हाळ्याचा प्रश्न एकीकडे सारला ही दुर्दैवाची गोष्ट आहे. यावर एकच उपाय आहे. तो म्हणजे हिंदूंची संघटना करणें हा होय. हिंदूंमध्ये एकराष्ट्रीयत्वाची भावना प्रज्वलित झाल्यास संघटन होण्यास मुळीच अवधि लागणार नाही; पण हिंदूंचें तिकडे लक्षच नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें.

## थोडा पूर्वेतिहास

१८५७ सालचें बंड ही हिंदुस्थानाच्या इतिहासांत फार महत्त्वाची गोष्ट होय. बंडांत हिंदूंनीं व मुसलमानांनी ब्रिटिशसरकारविरुद्ध सारखाच भाग घेतला होता. या गोष्टीवरून ब्रिटिश राज्यकर्ते शहाणे झाले व त्यांनी लोकमताची कदर बाळगतों हें दाखविण्याकरितां कॉंग्रेस स्थापण्याच्या कामीं पुढाकार घेतला. त्या वेळीं सर्व सामील झाले पण मुसलमान त्यांतून फुटून बाहेर पडले. १९०५ पर्यंत सरकारानें तटस्थ वृत्ति धारण केली होती. बंगालच्या फाळणीनंतर देशभक्तीची लाट पसरली व त्याचा लोकांवर बराच परिणाम झाला. १९०६ सालीं डाक्का येथे मुस्लीम लीग स्थापन झाली व पुढे ना. आगाखान यांच्या नेतृत्वाखाली मुसलमानांच्या शिष्टमंडळाने व्हाइसरॉयांची मुलाखत घेऊन इंपीरियल कौन्सिलमध्ये स्वतंत्र मुसलमान प्रतिनिधी घेण्याची मागणी केली. सरकारानें मुसलमानाची मागणी मान्य केली पण पंजाबनें मात्र हा डाव ओळखून १९०८ साली हिंदुसभेच्या चळवळीस प्रारंभ केला.

१९२० सालीं सुधारणा अस्तित्वांत आल्या त्याच वेळीं कॉंग्रेसची असहकारितेची चळवळ व मुसलमानांची खिलाफत चळवळ सुरू झाली. या चळवळी दोनतीन वर्षे चालतात न चालतात तोंच हिंदु पुढाऱ्यांचे खून पडूं लागले. त्यामुळे हिंदूंच्या स्वाभिमानास जोर येऊन त्यांच्यामध्ये संघटनेचें कार्य जोरानें सुरू झालें. पुढे सायमन कमिशनाचा फेरा हिंदुस्थानाकडे आला. त्या वेळीं कॉंग्रेसनें त्यावर बहिष्कार पुकारला. सर्व प्रांतांतले हिंदू पुढारी या कार्यक्रमांत सामील झाले; तथापि पंजाबमधील हिंदु पुढाऱ्यांनी सायमन कमिशनबरोबर सहकार्य करून आपलें म्हणणें पुढे मांडलें. पुढे देशांत ऐक्याची लाट पसरून हिंदु-मुसलमानांच्या पुष्कळ परिषदा झाल्या. मुसलमानांनी आपल्या मागण्या पुढे मांडल्या. त्यांची वृत्ति राष्ट्रीय हितास पोषक नसून केवळ सौदा करण्याची होती असें तेव्हांच दिसून आलें. नेहरूघटना जेव्हां अमान्य करण्यांत आली तेव्हांपासून मुसलमानांच्या आकांक्षांस पालवी फुटली.

## कौन्सिलें काबीज करा

असो. सायमन कमिशनानें जातिविषयक प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला पण तो साध्य झाला नाही. सरकारानें देशांतील असंतोषाचा फायदा घेऊन कमिशनानें केलेल्या शिफारशी सहज बाजूला सारता आल्या तर पाहाव्या या उद्देशानें गोलमेज परिषदेचा घाट घातला. दुसऱ्या गोलमेज परिषदेंत म. गांधींच्या चुकीच्या धोरणाचा फायदा घेऊन मुसलमानांनीं कॉन्झर्वेटिव्ह पक्षाशी संगनमत करून जातिनिर्णय प्रधानांच्याकडून करवून घेतला. यामुळे आपलें किती नुकसान झालें हें सहज लक्षांत येईल. ब्रिटिश सरकार व मुसलमान यांची गट्टी पूर्ण असल्यानें

हिंदु मुसलमानांच्या वरवरच्या एकीने आपला फायदा कसा होणार ? तेव्हा हिंदूमध्ये संघटन करूनच आपलें हितसंरक्षण केलें पाहिजे.

नवीन सुधारणा अमलांत आल्यावर ठिकठिकाणचीं कायदे कौन्सिलें हिंदूंनी काबीज करणें अगत्याचें आहे. हिंदुमहासभेने या कामीं लक्ष घालून आपल्यापैकींच उमेदवार कौन्सिलांत कसे निवडून येतील हेंच पाहिलें पाहिजे. जातवारीचा निर्णय जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत आपण निरनिराळ्या ठिकाणीं सभा भरवून आपलें म्हणणें काय आहे हें सिलेक्ट कमिटीपुढे ठेवण्याची मुख्यत्वाने खटपट केली पाहिजे हिंदुमहासभा ही हिंदूंचीच असल्याने हरिजनांचा उद्धार करण्याची चळवळ तिनेच हातीं घेतली पाहिजे. हें काम उच्चवर्णीयांनी हातीं घेतलें पाहिजे. हिंदुमहासभेने आतापर्यंत कोणत्याहि जातीच्या धर्मामध्ये हात घालावयाचा नाहीं असें धोरण ठेवल्यामुळे देवळें अस्पृश्यांकरितां खुलीं करा असें हिंदुमहासभेस लोकांना सांगतां येत नाही. असें जरी असलें तरी उच्चवर्णीयांनी हरिजनांचा उद्धार करण्याची खटपट करावी."

# आयर्लंडची स्वातंत्र्याच्या मार्गांतील प्रगति

इ. स. १९२१ सालीं आयर्लंडशीं ब्रिटिश सरकारने जो तहनामा केला त्या तहनाम्याने आयर्लंडला अर्धवट स्वातंत्र्य मिळालें.त्या वेळीं असलें हें अर्धेमुर्धे स्वातंत्र्य स्वीकारावें का नाही याविषयी आयरिश लोकांत मतभेद उद्भवून दुही माजली आणि मायकेल कॉलिन्स-सारखा रणपटु त्या यादवीला बळी पडला! या यादवीच्या वेळीं ग्रिफिथ, कॉसग्रेव्ह प्रभृति मुत्सद्दी तहनाम्यानुसार प्राप्त झालेलें अर्धवट स्वराज्य चालवावें असें म्हणणारे होते, आणि डी व्हॅलेरा हे पूर्ण बहिष्कारवादी होते. त्या वेळीं कॉसग्रेव्हप्रभृतींना मताधिक्याचा पाठिंबा मिळाला आणि बहिष्कारवादी डी व्हॅलेरा हे पराजित झाल्याने आयरिश पार्लमेंटापासून अलग राहिले. परंतु आपल्या बहिष्कारवादाची विफलता लवकरच डी व्हॅलेरांच्या प्रत्ययास आली आणि अखेरीस त्यांनी आयरिश पार्लमेंटांत प्रवेश करून घेऊन तद्द्वाराच आपलें ध्येय गांठण्याचा निश्चय केला. आयरिश पार्लमेंटांत प्रवेश करतांना जी राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागते, त्या शपथविधींतील शब्दांचा उच्चार करणें हें त्यांच्या अगदीं जिवावर आलें; तरी पण आपल्या ध्येयाकडे दृष्टि देऊन त्यांनी त्या शपथेचाहि उच्चार केला आणि ते आयरिश पार्लमेंटाचे सभासद होऊन तेथील बहुमत आपल्या पक्षाकडे वळविण्याच्या प्रयत्नाला लागले. या कार्यांत त्यांना लवकरच यश येऊन चालू सालाच्या प्रारंभीं जानेवारी महिन्यांत जी आयरिश डेलची निवडणूक झाली तींत त्यांच्या पक्षाला निर्विवाद बहुमत लाभलें व डी व्हॅलेरा हे त्या सभेच्या अध्यक्षपदावर आरूढ झाले.

हें अध्यक्षपद प्राप्त झाल्या वेळेपासून त्यांनी १९२१ सालच्या तहनाम्यांतील एकेक बंधन ढिलें करण्याचा उपक्रम सुरू केला. आयरिश डेलच्या सभासदाला जो शपथविधी करावा लागतो त्या शपथविधींतील भाषेंत बदल करणें; शेतकऱ्यांकडून वसूल करून जो कर्जफेडीचा हप्ता इंग्लंडला खंडणीवजा द्यावा लागतो तो हप्ता देण्याचें बंद करणें, गव्हर्नर—जनरलची जागाच काढून टाकणें इत्यादि सुधारणा त्यांच्या नजरेसमोर असून आतापर्यंत त्यांनी या कामीं बरेंच यश मिळविलें आहे. वार्षिक हप्ता देण्याचें डी व्हॅलेरांनी साफ नाकारलें असून तो वसूल करण्यासाठी म्हणून इंग्लंडने आयरिश मालावर आयात जकात बसविली आहे; पण या तोडीस तोड म्हणून आयर्लंडनेहि ब्रिटिश मालावर उलट जकात लादली असून आयरिश जनतेने ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचाहि मार्ग अवलंबिला आहे.

पण डी व्हॅलेरा हे नुसत्या एवढ्या डावपेंचांवरच संतुष्ट राहिले नसून त्यांनी कायदेमंडळाच्या मार्फत तीन महत्त्वाचीं बिलें हि पसार करून घेतलीं आहेत.एका बिलाने गव्हर्नर-जनरलाच्या बजेटावरील जादा अधिकाराला खो मिळणार आहे, दुसऱ्या बिलाने आयरिश लोकांना इंग्लंडांतील प्रिव्ही कौन्सिलकडे अपील कर-

ण्याला प्रतिबंध करण्यांत येणार आहे आणि तिसऱ्या बिलानें गव्हर्नर-जनरलची, एखाद्या बिलावर शिक्कामोर्तब करण्याचें नाकारून त्याची कुचंबणा करण्याची सत्ता नष्ट केली जाणार आहे. अशा स्वरूपाचीं हीं तीन बिलें आयरिश डेलमध्ये मंजूर झालींच आहेत. त्यांना आयरिश सीनेटनेंहि संमति दिल्यास त्यांची लगेच बजावणी होऊं लागेल. परंतु आयरिश सीनेट प्रतिगामी धोरणाचें असल्याने त्याने या बिलांना १८ महिन्यांच्या अवधींत मंजुरी न दिली तर आयरिश डेलमध्येच तीं बिलें त्या मुदतीनंतर पुनः पास करून त्यांना कायदेशीर स्वरूप देण्यांत येईल. कारण आयर्लंडच्या राज्यघटनेंत सीनेटच्या नामंजुरीला अशा रीतीने शह देण्याची सोय करून ठेवली आहे.

डी व्हॅलेरांच्या इच्छेनुसार सध्या मंजूर झालेल्या या तीन बिलांना कायमचें स्वरूप मिळाल्यास आयर्लंडच्या स्वातंत्र्याचा प्रश्न बहुतेक सुटल्यासारखाच होईल. अल्स्टर प्रांतासुद्धा सगळ्या आयर्लंडचें एकीकरण करण्याची जी डी व्हॅलेरा यांची महत्त्वाकांक्षा आहे, ती मात्र सफल होण्याचा मार्ग यांत दिसत नाही. कारण आयरिश डेलमध्ये कसलाहि ठराव पास झाला तरी अल्स्टरवाले कांहीं त्या ठरावाला भीक घालणार नाहीत. म्हणून आयर्लंडच्या एकीकरणाचा प्रश्न तेवढा सोडल्यास, इतर सर्व बाबतींत डी व्हॅलेरांचा कार्यक्रम यशस्वी होत चालला आहे आणि पूर्ण स्वातंत्र्याच्या मार्गावर आयर्लंडने पुष्कळच प्रगति केली आहे यांत शंका नाही. पण डी व्हॅलेरा यांनी आपली ही महत्त्वाकांक्षा सफल करून घेण्याला कोणत्या साधनांचा उपयोग केला? १९२१ सालापासून प्रथम कित्येक वर्षें ते कायदेमंडळावर बहिष्कार घालून बाहेर राहिले. त्या अवधींत आयर्लंडचें पाऊल स्वातंत्र्याच्या मार्गावर जोराने पुढे पडलें का तो बहिष्कार त्याज्य ठरवून डी व्हॅलेरा हे डेलचे अध्यक्ष झाल्यापासून आयर्लंडची प्रगति होऊं लागली?

आयर्लंडचा गेल्या बारा वर्षांचा इतिहास या प्रश्नाचें निश्चितपणें उत्तर देत आहे. १९२१ सालचा तहनामा हें एक प्रकारचें साधन आयरिश जनतेला लाभलें. त्या साधनाचा उपयोग करूनच आयर्लंड देश पुढील मजल गांठीत आहे. कॉसग्रेव्ह पक्षाच्या हातांतहि प्रारंभीं कित्येक वर्षें तेंच साधन होतें. परंतु त्यांना त्या साधनाचा योग्य उपयोग करतां आला नाही, अतएव त्यांच्या कारकीर्दींत आयर्लंडची प्रगति होऊं शकली नाही. तेंच साधन डी व्हॅलेरासारख्या धडाडीच्या देशभक्ताच्या हातीं येतांच त्यांनीं त्याच्या साहाय्याने आयर्लंडच्या गुलामगिरीचीं एकेक बंधनें तोडण्याला प्रारंभ केला व त्यांत बरेच यश मिळविलें. सारांश, साधन तेंच असून त्याचा उपयोग करणारा कुशल व कर्तबगार पुढारी न लाभल्यास तें साधन अकिंचित्कर ठरतें; आणि कर्तृत्ववान व धाडशी कार्यकर्ता भेटल्यास त्याच साधनाने अद्भुत चमत्कार करून दाखवून प्रतिपक्षाला चकित करून टाकतां येतें. सारांश, कार्यकर्त्यानें कोणतेंहि साधन वर्ज्य किंवा त्याज्य न मानतां हातीं सांपडेल त्या साधनाचा उपयोग करून आपलें ध्येय गांठण्याचा मार्ग सुकर करून घ्यावा, हेंच डी व्हॅलेरांच्या उदाहरणावरून सिद्ध होतें.

# स्फुट सूचना

१ भात व इतर धान्यें यांचे भाव अलीकडे भरमसाट उतरल्याने साध्यासुध्या शेतकऱ्यांचीच काय, परंतु मोठमोठ्या जमीनदारांचीहि अत्यंत हलाखीची स्थिति झाल्यामुळे मद्रास इलाख्यांत नवीन वाढविलेला धारा रद्द करून घेण्याबद्दल व जुन्या धाऱ्यांतच सुमारें ३३ टक्के सूट मिळविण्याबद्दल जोराची चळवळ सुरू झाली आहे. समाधानाची गोष्ट अशी कीं, या चळवळींत गरीब कुळांपासून तों झामोरीनसारख्या बड्या जहागिरदारांपर्यंत सर्वजण एकभावानें भाग घेत आहेत. तंजावर, कुंभकोण, कालिकत इत्यादि प्रमुख शहरीं जाहीर सभा व परिषदा भरून मद्रास सरकारने शेतसारा कमी करावा असे ठरावहि पास करण्यांत आले. कालिकत येथील परिषद कालिकतचे झामोरीन यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. त्या प्रसंगी अध्यक्षीय भाषणांत झामोरीन यांनी शेतकऱ्यांच्या दुःस्थितीचें स्वानुभवावरून जें वर्णन केलें तें ऐकून व वाचून कोणाच्यहि अन्तःकरणाला पीळच पडेल. झामोरीन म्हणाले, " धान्याचे भाव उतरल्याने पूर्वीसारखें उत्पन्न येईना, व त्यामुळे शेतसारा भरणें माझ्यासारख्या ऐपतदारालाहि अशक्य होऊन बसलें. दरसाल मला १,७५,००० रु. सारा द्यावा लागतो. त्यांपैकीं १३००० रुपये द्यावयाचे राहिले तर रेव्हिन्यू पाटलानें माझ्या घराचा उंबरठा कांही सोडला नाही ! मला माहीत आहे कीं, यंदा या साऱ्याच्या पायीं कित्येक जमीनदारांना आपल्या घरांतील स्वयंपाकाचीं भांडींकुंडींहि विकावीं लागलीं आहेत ! "

---

२. झामोरीन यांचे हे स्वानुभवाचे बोल मलबार, तंजावर इत्यादि जिल्ह्यांतील शेतकऱ्यांची स्थिति किती हीनदीन झाली आहे याचें उत्तम प्रतीक होय. धान्याचे भाव उतरल्याने मजुरी उतरली नाही किंवा शेतसाराहि कमी झालेला नाही. मग शेतकऱ्यांना त्राण उरावा कसा? कालिकतच्या परिषदेंतच सर शंकरन् नायर यांच्या सारख्या अनुभवी नेमस्त गृहस्थानेहि सरकारच्या उदासीनतेबद्दल त्याचा धिक्कार करून असे उद्गार काढले कीं, "शेतसारा कमी झाला नाही तर दारिद्र्य वाढेल व त्याचबरोबर गुन्ह्यांतहि भर पडेल. शेतकऱ्यांचें आर्थिक संकट निवारण्याचा लवकर प्रयत्न न होईल तर, श्रीमंत गरीब होतील, मध्यम स्थितींतील लोक अधिक गरीब होतील व मूळचेच गरीब लोक तर पक्के गुन्हेगार बनतील !" सर शंकरन नायर यांनी भावी परिणामाचें रेखाटलेलें भयानक चित्र खोटें कसें मानावें? शेतकऱ्यांची हलाखी पाहून त्रावणकोर, कोचीन या संस्थानांनीहि यंदा शेतकऱ्यांस सूट दिली आहे. जी गोष्ट संस्थानिकांना शक्य आहे तीच मद्रास सरकारलाहि अशक्य नाही. मद्रासच्या कायदेमंडळाच्या येत्या बैठकींत शेतसाऱ्यांत ३३ टक्के सूट देण्याबद्दलचा ठराव डॉ. सुब्बारायन् हे आणणार आहेत. मद्रास इलाख्याची जी स्थिति तीच आमच्या मुंबई इलाख्याची. येथील शेतकरीहि धान्याचे भाव घसरल्यामुळे व शेतसारा भरण्यास त्राण उरला नसल्याने हवालदिल झाले आहेत. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, मुंबईच्या कायदेमंडळांत शेतकऱ्यांच्या मताची झूल पांघरलेले डझनावारी प्रतिनिधि असताहि त्यांच्याकडून त्यांच्या हितसंरक्षणाबद्दल मद्रास प्रांतांतल्यासारखा प्रयत्न होत नाही. कायदेमंडळांतील प्रतिनिधि आपल्या कर्तव्यास जागले नाहीत तरी मतदारांनी जागे होऊन संघ-सभांच्याद्वारें सरकार दरबारीं आपलें गाऱ्हाणें मांडावें. मद्रास इलाख्यांत सध्या संघ स्थापून, सभा-परिषदा भरवून शेतसारा कमी करण्याबद्दल जशी जोराची चळवळ चालू आहे, तशीच ती मुंबई इलाख्यांतहि झाली पाहिजे. तत्पूर्वीच मद्रास सरकार व मुंबई सरकार यांनी समंजसपणाने साऱ्यांत सूट दिली तर त्यांत त्यांचा भलेपणा दिसणार आहे.

# डॉ. ॲबट यांचें महाराष्ट्रावरील प्रेम

( चिंतामण गणेश कर्वे, पुणें )

डॉ. ॲबट यांचा जन्म ख्रिस्तमसच्या पहिल्या दिवशींच ( २५ डिसेंबर १८५३ ) झाला. बरोबर ७५ वर्षांनी याच दिवशीं सामिट येथे 'स्तोत्रमाले–' चें लिखाण त्यांनी जेव्हा संपविलें, तेव्हा आपण गेलीं ७५ वर्षे हें जग जास्त चांगलें व सुखी करण्यासाठीं काय केलें, काय चुका केल्या, कोणत्या चांगल्या संधी दवडल्या इत्यादि प्रश्न त्यांच्यापुढे उभे राहिले. त्यांतच प्रामुख्यानें ज्या हिंदुस्थानांत आपल्या आयुष्याचा बराच मोठा काळ गेला त्याच्या विषयीं इतर जगाला बरीचशी खरीखुरी माहिती करून देऊन, त्या जगाचे प्रेम आणि सन्मान्यता हिंदुस्थानाला मिळवून देण्याच्या कामीं आपण किती भाग घेतला, कोट्यावधि जीवांच्या गरजा आणि यातना आपल्या हृदयाला भिडाव्या तितक्या भिडल्या का, इत्यादि प्रश्न उसळ्या मारीत होते. तेव्हा यापुढे अधिक काळ जगण्याची आशा त्यांना नव्हती. म्हणून हाच सुदिन मानून त्यांनी ही " स्तोत्रमाला " हिंदभूमी आणि तिचीं लेकरें यांस मोठ्या भक्तिभावानें अर्पण केली. ही देणगी फारच क्षुद्र आहे याची त्यांना जाणीव असून सुदामजीचे मठभर पोहे जेथें श्रीकृष्णांनीं आदरानें स्वीकारले तेथे ही माझी अल्प देणगी उदार अन्तःकरणानें स्वीकारली जाईलच याची त्यांना खात्री वाटली.

हिंदूंच्या पारमार्थिक प्रश्नांचा ते फार खोल विचार करीत. त्यांनी संस्कृतमधून वेदांताचा अभ्यासहि केला. पंडितांशीं व गांवढ्यांशींहि वादविवाद करून पडताळा घेतला. तथापि त्यांचे समाधान झालें नाही. शेवटीं जेव्हा महाराष्ट्र संतांच्या कथा व त्यांनी लिहिलेले ग्रंथ डॉक्टरसाहेबांनी बारीक रीतीनें वाचले तेव्हा त्यांना लख्ख प्रकाश दिसला. ( रामदासाची प्रस्तावना पाहा ) या वेळेपासून त्यांना संतांचें वेड लागल्यासारखें झालें. त्यांनी आळंदी, पंढरपूर, देवगिरी, पैठण, देहू, परळी इ. ठिकाणच्या यात्रा केल्या, व संतांच्या समाधींचें दर्शन घेऊन संतमहिमा प्रत्यक्ष अवलोकन केला. संतांच्या पदरजांनी पुनीत झालेल्या स्थलांच्या सहवासानें या ख्रिस्ती संतांना एक प्रकारचें अवर्णनीय सुख लाभत असे. महाबळेश्वर व भोंवतालचे डोंगराचे कडे, कृष्णाकोयनेचे उगम, परळी व सज्जनगडावरील दासांचा मठ इ. रामदासांना आवडणारे प्रदेश ॲबटच्या पूर्ण परिचयाचे झाले होते. सर्व महाराष्ट्र--संतांची ओळख त्यांना कै. विनायकराव भाव्यांच्या महाराष्ट्र सारस्वतावरून झाली. सातशें संत व त्यांचे २३०० काव्य-प्रबंध यांचीं नांवें देणाऱ्या भाव्यांनाच त्यांचें हें ऋण फेडण्यासाठीं 'दासोपंत दिगंबर' हा मालेंतील चवथा ग्रंथ ॲबटनी अर्पण केला आहे. यावरून भाव्यांच्या 'महाराष्ट्र सारस्वता' ची योग्यता किती मोठी आहे हें सहज कळून येईल.

१ भानुदास ( मूळ आणि भाषांतर )—भक्तविजयांतील अध्याय ४२--४३ सन १९२६.

२ एकनाथ (भाषांतर)—भक्तलीलामृत अध्याय १३--२४ सन १९२७.

३ भिक्षुगीत ( मूळ व भाषांतर )—एकनाथी भागवत अध्याय २३ वा १९२७.

४ दासोपंत दिगंबर ( मूळ व भाषांतर )—दासोपंत चरित्र १९२७

५ बहिणाबाई ( मूळ व भाषांतर )—संत-बहिणाबाईचा गाथा १९२९

६ स्तोत्रमाला ( मूळ व भाषांतर ) ज्ञानदेव, नामदेव, भानुदास, एकनाथ, तुकाराम, रामदास, दिनकर, केशव, कृष्णानंद, त्र्यंबक, देवदास, मोरोपंत, गोविंद व महिपति या कवींचीं स्तोत्रं. १९२९

७ तुकाराम ( भाषांतर )—भक्तलीलामृत अध्याय २५–४० १९३०.

८ रामदास ( भाषांतर )—संतविजय १९३२.

हीं आठ पुष्पें त्यांच्या हातून वाहिलीं गेलीं. भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय इ. पुराणांतून महिपतीनें लिहिलेल्या संतकथा त्यांना फार आवडत व आदर्शचरित्रे असा त्यांचा ते उल्लेख करीत. संतांनी निरूपिलेला भक्तिमार्ग त्यांचें हृदय हलवून सोडी व या ईश्वरभक्तीची महती जगास पटावी म्हणून तर त्यांनी ही भाषांतरमाला सुरू केली. मालेंतील ग्रंथांना ते भरपूर टीपा व कोश जोडीत. यासंबंधीं काम सर्व त्यांचे सहकारी पंडित नरहर रामचंद्र गोडबोले हे करीत. शिवाय कित्येक वेळां आपोष्णि घेणें, घाणा भरणे इत्यादि विधींचा लाक्षणिक अर्थ ( साहजिकपणें अहिंदूंना न समजणारा ) पौराणिक कथानुसंधानें पं. गोडबोले त्यांना समजावीत व या दृष्टीनें भाषांतर चुकूं नये म्हणून काळजी घेत. या मदतीचा गौरवपर उल्लेख त्यांनी प्रत्येक प्रस्तावनेंत केला आहे.

असो. प्राचीन प्रासादिक महाराष्ट्र सारस्वतावर

लुब्ध होऊन त्यांतील मधु आवडीने चाखणारा व त्याचा आस्वाद जगतास करून देण्याची कायावाचामनें खटपट करणारा एक ख्रिस्ती महात्मा अमेरिकेंत होता हें इतिहासाच्या माहितीशिवाय पुढे कोणाला खरें देखील वाटणार नाही. महाराष्ट्राची किंबहुना महाराष्ट्र संतांची केवढी पुण्याई, कीं त्यांना एक विधर्मी भक्त भेटावा व त्याने आपलें शक्ति-वित्त सर्वस्व त्यांच्या पायीं वेंचावें! 'आता विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावें। तोषोनि मज यावें। पसायदान॥ जे खळांची व्यंकटे सांडो।...इ.' ही ज्ञानेश्वरांची सुप्रसिद्ध प्रार्थना डॉक्टरसाहेबांना फार आवडून ते तिचा आपल्या लेखनांतीं उल्लेख करीत. तेव्हा त्यांचा वाग्यज्ञ महाराष्ट्रीयांच्या अवलोकनांत येऊन त्यांनी या महाराष्ट्रभक्ताला कधीं विसरूं नये म्हणून हा लेख लिहिण्याचें मनांत आणिलें.

# वायव्यप्रांतांतील अल्पसंख्य हिंदू

## (हिंदुमहासभेची कैफियत)

अ. भा. हिंदु महासभेचें शिष्टमण्डळ विलायतेस गेलें होतें तेव्हां त्या मंडळामार्फत वायव्य सरहद्द प्रांतांतील अल्पसंख्य हिंदूंची पुढील कैफियत पार्लमेंटच्या जोड कमिटीपुढे मांडण्यांत आली:—

या प्रांतात एकंदर लोकवस्ती २४२५०७६ इतकी असून त्यांत १८५४८७ हिंदू व शीख यांची संख्या आहे. म्हणजे एकंदर लोकवस्तींत हिंदू व शीख यांचें प्रमाण शे. ८ असें पडतें; परंतु ते अल्पसंख्य असले तरी संस्कृति, सुधारणा, जात व धर्म यांनी ते हिंदुस्थानांतील शें. ७५ असणाऱ्या हिंदु समाजाशीं निगडित झालेले आहेत. या प्रांतांत शे. ७५ पठाण आहेत परंतु जाति, संस्कृति, भाषा, धर्म, आचारविचार या गोष्टींनी सरहद्दी बाहेरील अफगाणिस्थानाशीं संलग्न झाले आहेत. शिवाय राजकीयदृष्ट्या हिंदूंना अनुकूल गोष्ट म्हणजे ते लोक चारित्र्याने, शिक्षणाने, संपत्तीने श्रेष्ठ आहेत, हा प्रांत, हिंदुस्थानचें प्रवेशद्वार समजलें जातें. तेव्हा आगामी सुधारणांचा परिणाम या दोन जातींवर काय होईल व आपत्काळीं हें द्वाररक्षकाचें काम कोण करील या गोष्टीकडे लक्ष द्यावयास पाहिजे.

## द्वाररक्षक कोण

हें काम समर्थपणें हिंदु व शीखच करतील. या रक्षणाचा भरंवसा पठाणावर टाकतांच येत नाही असा पूर्वानुभव आहे. स.१९१९ची आठवण अगदीं ताजी आहे. या वेळीं येथील पठाण अमानुल्लाच्या बाजूला गेले. तेव्हा सरहद्दीचें रक्षण आपलेपणाने काम करतील तर हिंदु व शीखच.

या प्रांतांत हिंदू अल्पसंख्य असले तरी त्यांनी अलोट भांडवल तेथे गुंतविले आहे. शहरांत व खेड्यांत त्यांच्या मोठाल्या मिळकती आहेत. प्राप्तीवरील कराच्या उत्पन्नापैकी हिंदू व शीख हेच शें. ८०कर भरतात. याखेरीज इतर कर हिंदुच जास्त देतात. प्रांताचा बहुतेक व्यापार हिंदूंच्या हातीं आहे. हिंदू व शीख लोक असे संपन्न असल्याने अनेक वेळां पठाण लोक त्यांचींच घरें लुटतात. म्हणून त्या प्रांतांत कायदा व सुव्यवस्था यांचे रक्षण त्यांना अगत्याचें व हिताचें वाटतें. एवढ्याच साठीं तेथे त्यांना लायक पोलीस व निःपक्षपाती न्यायदान पाहिजे.

प्रांताच्या गव्हर्नराच्या हातीं सत्ता असल्याने तो साम्राज्यविषयक हितसंबंध दक्षतेनें पाहील; परंतु एखादा पान-इस्लामसारखा प्रश्न उत्पन्न झाला अगर पठाणाच्या फायद्यासंबंधी एखादा प्रश्न निघाला व तो साम्राज्याच्या धोरणाला बाधक असला तर गव्हर्नरला जरूर वाटल्यास तो आपल्या जादा अधिकारांत मन्त्रिमंडळाला न जुमानतां पठाणांची मात्रा चालू देणार नाही हे खरें, तथापि त्या कामीं त्याला हिंदूशिवाय कोणाचाहि पाठिंबा मिळणार नाही. परंतु नेहमीच असें वागून चालणार नाही. त्यामुळे घोटाळे उत्पन्न होतील. यासाठी गव्हर्नरला मदत करण्यासाठी त्याच्या बाजूचा एखादा शीख अगर हिंदू मंत्री तरी अवश्य पाहिजे.

## प्रांतांत तीन मंत्री असावेत

१ जमीन महसूल, पाटबंधारे, जंगल, प्राप्तीवरील कर, अबकारी, स्टॅंप व रेजिस्ट्रेशन यासाठी एक फायनान्स दिवाण.

२ पोलीस, तुरुंग, न्याय व जनरल राज्यकारभार यासाठी गृहमंत्री.

३ व बाकीच्या खात्यासाठी एक मंत्री अशी व्यवस्था पाहिजे.

यासंबंधी हिंदू व शीख यांच्या मागण्या अशा:—

१ गव्हर्नराने आपल्या मंत्रिमंडळांत एक तरी शीख अगर हिंदू मंत्री घ्यावा अशी कायद्यांतच योजना व्हावी. हिंदू मंत्री असण्याचें कारण गव्हर्नरला बिगर मुसलमान मंत्र्याचा पाठिंबा असावा; हिंदू व शीख यांची मोठी मिळकत प्रांतांत असल्याने त्यांचे हितसंबंध पाहाण्यासाठी त्याची गरज आहे. हिंदूंवर होत असलेले जुलूम व त्यांची होत असलेली लूटमार यासाठी त्याची गरज आहे.

हिंदूंचे व्यापारी हितसंबंध मोठे असल्यानें त्यावर लक्ष ठेवण्यासाठीहि त्याची गरज आहे.

हिंदु--शीख समाज शिक्षणामें पुढारलेला असतांहि नोकऱ्यासंबंधांत पक्षपात होत आहे. तेव्हां त्यासंबंधानें एक पब्लिक सर्व्हिस कमिशन नेमावें अगर मध्यवर्ती सरकारच्या पब्लिक सर्व्हिस कमिशनने हें काम करावें.

३ जिल्हा लोकल बोर्डांत शीख व हिंदु यांना राखीव जागा ठेवाव्यात. जि. बोर्डांना मुख्य आर्थिक मदत हिंदु व शीख यांजकडून होत असते.

४ हिंदु व शीख यांच्या विश्वासाचा व गव्हर्नरला जबाबदार असा जादा 'ऑफिसर कमांडिंग' अल्पसंख्य हिंदु--शीखांचे हितसंबंध पाहाण्यास नेमावा.

### चौकशी--कमिटी

या अधिकाऱ्याकडे गेलेल्या तक्रारींची त्यानें चौकशी करावी व त्याने अल्पसंख्यांकांच्या तक्रारींची योग्य दाद लावून द्यावी. मध्यवर्ती सरकार या प्रांताला कांही आर्थिक मदत करील; परंतु प्रत्यक्ष राज्यकारभारांत हात घालणार नाही. यासाठी सूचना अशी कीं, पांच वर्षांनंतर एक चौकशी कमिटी नेमून अल्पसंख्यांकांची स्थिति कशी आहे तें पाहावें.

राज्यकारभार योग्य प्रकारें चालला आहे कीं नाही, राष्ट्र--संवर्धक खात्यांची प्रगती झाली आहे किंवा नाही, अल्पसंख्यांकांच्या जीविताचें व वित्ताचें योग्य रक्षण होत आहे कीं नाही याचीहि चौकशी कमिशनने करावी व चौकशींत समाधानकारक निर्णय लागल्यावर सदर प्रांत वाटल्यास मध्यवर्ती सरकारच्या ताब्यांत पूर्वाप्रमाणें द्यावा.

अल्पसंख्यांकांवर कराचा बोजा जास्त पडेल असे कर बसवूं नयेत; बहुसंख्यांकांवर नोकऱ्या, शिक्षणसंस्था व मिळकत संपादणे यासंबंधांत जादा मेहेरबानी दाखवूं नये. लॅन्ड एलिएशन कायद्यासारखे भेदाभेद करणारे कायदे रद्द करावेत.

## जर्मनी राष्ट्रसंघांतून फुटला !

ता. १४ रोजीं जिनिव्हा येथे निःशस्त्रीकरण परिषदेंत सर जॉन सायमन यांनी जें भाषण केलें. ते जर्मनीला अपमानास्पद असल्याचें पाहून त्याच दिवशीं हर हिट्लर यांनी प्रधान-मंडळाची खास बैठक भरविली. अखेरीस राष्ट्रसंघांतून व निःशस्त्रीकरण परिषदेतून अंग काढून घेण्याचें बैठकींत ठरलें व त्याप्रमाणे हर हिट्लर यांनी सरकारी रीत्या जाहीरहि केलें. अशा तऱ्हेने शेवटीं इंग्लंड, फ्रान्सप्रभृति बड्या दोस्त राष्ट्रांच्या हेकटपणामुळे जर्मनीने तूर्त तरी राष्ट्रसंघ व निःशस्त्रीकरण परिषद यांजवर बहिष्कार पुकारला आहे. प्रधानमंडळाची बैठक झाल्याबरोबर हर हिट्लर व अध्यक्ष फॉन् हिंडेन्बुर्ग यांची मुलाखत झाली. मुलाखतींत असें ठरलें कीं, अन्तर्गत व आन्तरराष्ट्रीय प्रश्नांवर जर्मन जनतेचें मत पुनः एकवार अजमावण्यासाठी सध्याचें राइशस्टॅग बरखास्त करून नव्या निवडणुकी ता. ११ नोव्हेंबर रोजीं कराव्या. अध्यक्ष हिंडेन्बुर्ग यांनी तशा अर्थाचा लगेच हुकूमहि प्रसिद्ध केला. आपल्याला हाच मार्ग कां स्वीकारावा लागला याविषयीं हर हिट्लर यांनी एक महत्त्वाचें पत्रक प्रसिद्ध केलें.

त्या पत्रकांत हर हिटलर म्हणतात, "शस्त्रसंन्यास करण्याविषयी आपली आतुरता जर्मनीने दाखविली असतांहि बड्या राष्ट्रांनी व्हर्सेलिसच्या तहांतील शस्त्रास्त्रें कमी करण्याबद्दलच्या अटी पाळल्या नाहीत. त्यामुळे जर्मनीची अत्यंत निराशा झाली. शस्त्रसमानतेची मागणी नैतिक दृष्ट्या रास्त असताहि बड्या राष्ट्राकडून ती धिक्कारली गेली. त्यामुळें जर्मनीचा मोठाच अपमान झाला आहे. इतका अधिक्षेप झाला असता दुय्यम दर्जाचें राष्ट्र म्हणून जिनिव्हाच्या वाटाघाटींत भाग घेण्यास जर्मनी तयार नाही. वाजवी हक्क मिळाल्याशिवाय तो इतर राष्ट्रांशीं काय म्हणन सहकार्य करील ? जगांत शांतता नांदावी अशी जर्मनीची सदिच्छा असूनहि त्याला आज नाइलाजाने निःशस्त्रीकरण परिषदेंतून बाहेर पडावें लागत आहे. मला अशी खात्री वाटते कीं, या बाबतींत साऱ्या राष्ट्राचा पाठिंबा सरकाराला मिळेल. जगांतून जित आणि जेते अशी भावना नष्ट होऊन समानतेच्या हक्कांना मान्यता मिळेल त्याच वेळीं जगांत खरी आणि टिकाऊ शांति नांदेल. जर्मन लोकांच्या स्वाभिमानाचें रक्षण करण्यासाठीच, सरकाराला हा निर्वाणीचा मार्ग अनुसरावा लागला."

जर्मन सरकारानेहि अशाच आशयाचा खलिता प्रसिद्ध करून त्यांत असें म्हटलें आहे कीं, 'इतर राष्ट्रें शस्त्रसंन्यास करतील तर मशिनगन्स मोडण्यास आणि सैन्य नष्ट करण्यास जर्मनी एका पायावर तयार आहे.' जर्मनीचा हा निर्णय बाहेर पडताच फ्रान्स अमे-

इंग्लंड या राष्ट्रांनी ,जर्मनीने 'अविवेकाचें ... रंग' स्वीकारल्याबद्दल नापसंती व्यक्त केली. जिनिव्हाच्या वातावरणांत तर बॉम्ब फेकल्याप्रमाणे खळबळ उडाली आहे.

# कर्तबगार मुत्सद्दी हरपला !

डॉ. ॲनी बेझंट इहलोक सोडून गेल्यानंतर कांही दिवस लोटतात न लोटतात तोंच विठ्ठलभाई जव्हेरभाई पटेल यांच्यावर काळाने झडप घातली हें पाहिलें म्हणजे 'दुःखं दुःखानुबंधि' असें जें संस्कृत कवीने म्हटलें आहे तें यथार्थ वाटूं लागतें. एकामागून एक, आपापल्या परीने अतिशय कर्तबगार, असे दोन मुत्सद्दी राष्ट्राच्या राजकीय आणीबाणीच्या प्रसंगीं हरपावे ही खरोखर मोठ्या खेदाची व दुर्दैवाची गोष्ट होय. अलीकडे कित्येक दिवस, व्हिएन्ना येथे विठ्ठलभाई पटेल हे अत्यवस्थ पडून आहेत आणि बाबू सुभाषचंद्र बोस स्वतः आजारी असूनहि त्यांची शुश्रूषा करीत आहेत, अशा बातम्या हिंदी जनतेच्या कानावर येत होत्या; तेव्हा या स्थितीचें पर्यवसान कशांत व्हावयाचें तेंहि जनतेने आपल्या मनाशीं हेरून ठेवलेलें होतें. तथापि काल्पनिक व प्रत्यक्ष यांत कायमचा फरक हा राहणारच. मात्र कल्पनेपेक्षा प्रत्यक्षांतील सुख कमी होतें आणि एखादी दुःखजनक गोष्ट घडणार अशी प्रथमपासून अटकळ असली तरी ती प्रत्यक्ष घडली म्हणजे त्या दुःखाचा धक्का पूर्वकल्पनेहून अधिक जोराचा बसतो. याच नियमास अनुसरून विठ्ठलभाईंस स्विट्झरलंड देशांत नायन मुक्कामीं ता. २२ आक्टोबर रोजीं देवाज्ञा झाल्याचें वर्तमान येतांच, भारताच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत दुःखाचा तीव्र धक्का बसावा हें स्वाभाविकच होय. १९३२सालीं कायदेभंगाची मोहीम सुरू होतांच जानेवारींत वटहुकुमान्वयें विठ्ठलभाईंना अटक झाली. फेब्रुवारींत त्यांना नाशिकच्या तुरुंगांतून मुंबईंस इस्पितळांत नेण्यात आलें व तेथून ते प्रकृतीच्या स्वास्थ्याकरिता परदेशीं गेले ते गेलेच. त्यांचे पाय पुनः मायभूमीस लागूं शकले नाहीत. हिंदी जनतेला त्यांचें दर्शन ते पकडले जाण्यापूर्वी काय घडलें असेल तेंच शेवटचें ठरलें ! ईश्वरी नेमानेमापुढे कोणा मानवाचें काय चालणार ?

अगदीं गरीब व 'खेडूत' कुळांत जन्म घेऊन, आपल्या कर्तबगारीने कीर्तिशिखर गाठून, हिंदुस्थानाच्या राजकीय इतिहासांत आपलें नांव अजरामर करून ठेवणाऱ्या अशा फार थोड्या लोकाग्रणींत विठ्ठलभाईंची गणना केली पाहिजे. ते बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण झाले होते ही गोष्ट खरी असली तरी, त्यांनी जवळजवळ सुरुवातीपासूनच कोर्टांवर बहिष्कार टाकलेला होता. त्यांनी आपणास सार्वजनिक कार्यास पूर्णपणें वाहून घेतलें व तें कार्य त्यांनी अखेरपर्यंत सोडलें नाही. या कार्यास त्यांनी अगदी खालच्या पायरीपासून प्रारंभ केला आणि एकेक जिना चढत चढत थेट वरचा मजला गांठावा त्याप्रमाणें ते १९२५ च्या ऑगस्ट महिन्यांत लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष झाले. आणि अत्यंत अभिमानाची व कौतुकाची गोष्ट अशी कीं, ज्या ज्या जागीं त्यांनी काम केलें तेथे तेथे त्यांनी आपल्या उपजत बुद्धिमत्तेची व कार्यक्षमतेची छाप पाडली.

बॅरिस्टर होऊन विलायतेतून परत आल्यावर विठ्ठलभाई हे मुंबईजवळच वांद्रें येथे वास्तव्य करून राहिले. तेथल्या म्युनिसिपालिटींत त्यांनी सभासद या नात्याने कार्य केलें. ठाणें जिल्हा बोर्डाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी इतकें चोख काम बजावलें कीं, अध्यक्षपद सोडतांना त्या जिल्ह्याने त्यांस मानपत्र व देणगी अर्पण केली. मुंबई कार्पोरेशनमध्ये प्रवेश करून घेतल्यानंतर १९२३–२४ सालीं ते स्कूल कमिटीचे अध्यक्ष होते व १९२४-२५

सालीं तर ते मेयर म्हणून गाजले. याच्या पूर्वीपासूनच कायदेमंडळांच्या थोड्या मोठ्या व जास्त महत्त्वाच्या आखाड्यांत त्यांचें काम चालू होतेंच. प्रथमत: मुंबईचें कायदे-कौन्सिल व नंतर मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांच्या पूर्वींचें वरिष्ठ त्याचें नांव निगडित होऊन राहिलें आहे, त्याप्रमाणे वरिष्ठ कायदे-मंडळांतहि त्यांनी रौलॅट बिलाला केलेल्या कडोविकडीच्या विरोधाशीं तें कायमचें संबद्ध होऊन राहिलें आहे.

सार्वजनिक चारित्र्याच्या आरंभापासून



जन्म १८७२ ] श्रीयुत विठ्ठलभाई जव्हेरभाई पटेल [ मृत्यु १९३३

कायदे-कौन्सिल या दोहोंतहि आपल्या चिकाटीनें व बाणेदारपणाने ते लोकादरास पात्र झाले. ज्याप्रमाणे मुंबई इलाख्यांतील सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाच्या बिलाशीं विठ्ठलभाई पटेल हे राष्ट्रीय सभेचे पुरस्कर्ते होते. आपल्या कार्यनिष्ठेच्या जोरावर त्यांनी मुंबईच्या प्रेसिडेन्सी असोसिएशनमधील प्रस्थांना मागें सारून मुंबापुरीचें नेतृत्व स्वीकारलें;

आणि १९१८ सालीं मुंबईस जेव्हा सय्यद हसन इमाम याच्या अध्यक्षत्वाखाली राष्ट्रीय सभेचें जादा अधिवेशन भरलें तेव्हा स्वागत कमिटी-च्या प्रमुखत्वाची माळ विठ्ठलभाई यांच्याच गळ्यांत पडली. नंतर राष्ट्रीय सभेने त्यांना चिटणीस निवडलें आणि राष्ट्रीय सभेचें शिष्ट-मंडळ विलायतेस गेलें तेव्हा ते त्या शिष्ट--मंडळाचेहि चिटणीस होते. महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे उपाध्यक्ष म्हणून बरेच दिवस विठ्ठलभाईंचा महाराष्ट्राशीं संबंध होता. १९२१–२२ सालीं मालेगांव येथे हिंदु–मुसलमानांचा जो दंगा झाला त्याची चौकशी करण्याकरितां म. प्रां. क. ने नेमलेल्या कमिटींत पटेल हे एक सभासद होते. राष्ट्रीय सभेने १९२२ सालीं कायदेभंग चौकशी कमिटी नेमली तींत देखील सभासद म्हणून विठ्ठलभाईंस नेमण्यांत आलें. या कमिटीच्या रिपोर्टाबाबत त्यांनी केलेली कामगिरी सर्वश्रुतच आहे.

स्वराज्य-पक्ष स्थापन झाल्यावर विठ्ठलभाई हे लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्ये गुजराथेतर्फे प्रतिनिधी म्हणून निवडून आले. येथपासून मात्र त्यांच्या कार्याचा प्रभाव शुक्लेंदुप्रमाणे क्रमशः विशेष जोराने वाढूं लागला. १९२५ सालीं ऑगस्ट महिन्यांत सरकारी अध्यक्ष सर फ्रेडरिक व्हाईट यांची मुदत संपल्यावर पटेल हे बहुमताने अध्यक्ष म्हणून निवडून आले. लो. टिळक व न. चिं. केळकर यांचे शब्द वापरावयाचे तर ' पाटील चावडींत बसला. ' अध्यक्षाच्या या गादीवर बसून सुमारें चार वर्षांच्या अवधींत या पाटीलबुवांनी आपल्या पराक्रमाची अशी शर्थ केली कीं, सरकार स्तंभित झालें व जनतेचे डोळे दिपले. पटेलांनी आपल्या अध्यक्षपणाच्या कारकीर्दींत ना. क्रेरर साहेबांना माफी मागावयास लावलें, सर सेनापतींवर दिलगिरी प्रदर्शित करण्याचा प्रसंग आणला आणि पब्लिक सेफ्टी बिल नियमबाह्य ठरविलें.

पब्लिक सेफ्टी बिलाच्या बाबतींत अध्यक्ष पटेल यांनी जी धडाडी व बुद्धिचातुर्य दाखविलें तें फारच थोड्यांच्या ठिकाणीं आढळेल. पब्लिक सेफ्टी बिल जनतेच्या वैयक्तिक स्वातंत्र्यावर व हक्कांवर गदा घालण्याकरितां आणण्यांत आलें होतें. अर्थात् लोकमत त्याच्या विरुद्ध होतें. त्याच वेळीं म्हणजे १९२९ सालीं मीरतचा खटला चालू होता. सदर बिलावर चर्चा झाली, तर तींत मीरत खटल्याचा संबंध न येणें अशक्य होतें. पटेल व सरकार यांचा या बाबतींत वाद, असेंब्लींत व खासगी, असा बराच जोराचा झाला. 'बिल तरी परत घ्या, नाही तर खटला तरी काढून घ्या, ' असा पेच पटेल यांनी सरकारास टाकला. सरकारला कांहीच मान्य होईना. शेवटीं पटेल यांनी रात्रंदिवस खोल विचार करून बिलावर निर्णय दिला व तें नियमबाह्य ठरविलें. पटेल यांचें हें समग्र रूलिंग (निर्णयपत्र) वाचलें म्हणजे त्यांच्या कुशाग्रबुद्धीची साक्ष पटते.

अध्यक्षपद सोडल्यानंतर राष्ट्रीय सभेच्या वार्किंग कमिटीचे ते सभासद झाले आणि त्यांस अटक होऊन सहा महिने शिक्षा झाली. १९३१ सालामध्ये ते प्रचारासाठी विलायतेस गेले व तेथे त्यांनी व्याख्यानद्वारा हिंदुस्थानाची बाजू दुसरी गोलमेज परिषद भरण्याच्या पूर्वी ब्रिटिश जनतेपुढे स्पष्टपणाने व उत्कृष्टपणाने मांडली. 'The Indian View' या नांवाने तेथील ' फ्रेन्ड्स् ऑफ इंडिया ' या संस्थेने त्यांचें एक व्याख्यान प्रसिद्ध केलें आहे. तें पटेल यांचें राजकीय मृत्युपत्रच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. १९३२ सालीं ते अमेरिकेंत याच कामाकरिता गेले. तेथे त्यांनी हिंदुस्थानाविषयी बरींच भाषणें केलीं. तीं इतकीं परिणामकारक झालीं कीं, एक स्वतंत्र लेख लिहून मि. संडरलंड यांनी त्यांच्या प्रभावशालित्वाची ग्वाही दिली; व लाला लजपतराय, जगदीश चंद्र बोस, सरोजिनीबाई नायडू, रवींद्रनाथ टागोर या हिंदी पाहुण्यांनी जसा अमेरिकेंत भारताचा ध्वज फडकविला तसा पटेल यांनीहि फडकविला असें लिहिलें. आयर्लंडांत जाऊनहि त्यांनी हिंदुस्थानाशीं सहानुभूति दाखविण्यासाठी संस्था निर्माण केली व डी व्हॅलेरा यांची भेट घेऊन त्यांचा स्नेह जोडला.

वरील हकीकतीवरून विठ्ठलभाईंच्या अंगच्या सर्व गुणांची महती किती होती हें कळून येण्यासारखें आहे. एकंदरींत त्यांचें सर्व आयुष्य राष्ट्रकार्यार्थ झगडण्यांतच व्यतीत झालें आणि त्या झगड्यांतच त्यांची चंडोल मुत्सद्देगिरी आणि कुशाग्र बुद्धिमत्ता वेळोवेळीं व्यक्त झाली. तापट व तेजस्वी अशा शर्यतीच्या घोड्याला जसा दुसऱ्याचा वरचढपणा सहन होत नाहीं तसा पटेल यांनाहि कोणाचा, विशेषतः जेतृ वर्गाचा, वरचष्मा बिलकूल खपत नसे. नोकरशाहींतल्या अत्यंत नाणावलेल्या मुत्सद्द्यालाहि हार खावयास लावण्याइतकी धमक त्यांच्या अंगीं होती व तिची प्रतीती आणून देण्यासाठींच ते प्रतिपक्षाशीं दोन हात करण्याची कोणतीहि संधि दवडीत नसत. मुंबईच्या कॉर्पोरेशनच्या अध्यक्षाच्या गादीवर असतां याच ईर्षेनें अश्रांत परिश्रम करून त्यांनीं म्युनिसिपल कमिशनरला चकित करून सोडलें आणि असेंब्लीच्या अध्यक्षपदावर आरूढ झाल्यावर तर सर माल्कम हेले व सर जेम्स क्रेरर यांच्यासारख्या गृहमंत्र्यांना ' दे माय धरणी ठाय ' असें म्हणण्याची पाळी आणली !

पटेल यांचा स्वभाव जात्याच लढाऊ वृत्तीचा असल्यामुळे त्यांना निष्क्रिय बहिष्काराचा मार्ग केव्हांच पसंत पडला नाहीं. आणि तेवढ्याकरिताच त्यांनीं 'सिव्हिल डिसओबीडिअन्स कमिटींत' आपला प्रवेश करून घेऊन कमिटीमार्फत कौन्सिल-प्रवेशाचें द्वार खुलें करून घेतलें आणि असेंब्लींत प्रवेश करून तेथे आपला प्रभाव गाजविला. असेंब्लींत प्रवेश मिळाल्या वेळेपासूनच त्यांनीं आपल्या भावी पराक्रमाचें स्थान हेरून ठेवलें आणि योग्य संधि येतांच, सरकारी पगाराची जागा स्वीकारावी कां न स्वीकारावी असल्या दोलाचल वृत्तीला थारा न देतां व बहिष्कारवाद्यांच्या कोल्हेकुईची पर्वा न बाळगतां त्यांनीं अध्यक्षपदावर आरोहण केलें आणि त्या स्थानमाहात्म्यानें जो अधिकाररूपी अंकुश हातीं आला त्या अंकुशाचा मारा मदोन्मत्त प्रतिपक्षाच्या गंडस्थळावर बिनदिक्कत सुरू केला. तथापि लाहोरच्या कॉंग्रेसनंतर असेंब्लींत अशी परिस्थिति निर्माण झाली कीं, विठ्ठलभाईंसारख्या लढवय्यालाहि आपल्या हातचा अंकुश टाकून देणें प्राप्त झालें आणि त्यांनीं हा शस्त्रसंन्यास केल्यावेळेपासून नोकरशाहीरूपी मत्तमातंग किती चेकाळला आहे हें ज्यांनीं पाहिलें असेल, त्यांनाच अध्यक्षपदाचें महत्त्व आणि विठ्ठलभाईंची तेथील कर्तबगारी यांची खरी कल्पना येईल.

सारांश, वांद्र्याच्या छोट्या म्युनिसिपालिटीपासून तों असेंब्लीच्या अध्यक्षत्वाच्या कार्यक्षेत्रापर्यंत ज्या ज्या स्थानीं उभें राहून लोकहितार्थ, स्वाधिकारसंरक्षणार्थ व भावी स्वराज्यसंपादनार्थ प्रतिपक्षाशीं दोन हात करण्याचा प्रसंग आला त्या त्या प्रसंगीं विठ्ठलभाईंनीं आपल्या अंगचें क्षात्रतेज, रणपटुत्व व कुशाग्रबुद्धिमत्व प्रगट केलें आणि आपल्या विजयानें मायभूमीचे तेवढ्यापुरते तरी पांग फेडले. आपल्या या बुद्धिमत्तेचें तेज परदेशांतहि प्रगट करून हिंदभूमीचे आणखी पांग फेडूं अशी मनीषा बाळगून विठ्ठलभाई हे आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत अमेरिकेंत व आयर्लंडांत जाऊन आले. परंतु परिस्थिति अत्यंत प्रतिकूल असल्यामुळे आणि त्यांच्या प्रकृतीनेंहि त्यांना दगा दिल्यामुळे अखेरीस ते स्विट्झर्लंडांत जाऊन राहिले आणि जन्मभर केलेल्या जिवापाड परिश्रमाचा परिणाम त्यांच्या जराजर्जर तनूवर स्पष्टपणें दिसूं लागून त्या झटापटींतच त्यांचा अखेरीस अंत झाला.

विठ्ठलभाईंच्या आयुष्यक्रमणाचा हा चित्रपट नजरेसमोर धरल्यास त्यांत त्यांच्या अंगचे अनेक अलौकिक गुण चमकतांना दिसतात. त्यांतल्या त्यांत त्यांचा चंडोल मुत्सद्दीपणा, त्यांचा तेजस्वी स्वाभिमान आणि त्यांची तैलबुद्धि हे गुण विशेष नजरेंत भरतात. एवंगुणविशिष्ट असा लोकपक्षाचा पुढारी असेंब्लीच्या अध्यक्षपदावर विराजमान झाला व ती कामगिरी त्यानें उत्कृष्टपणें बजावली यांत कांहींच नवल नाहीं. पण खेदाची गोष्ट

हीच कीं जनतेच्या अधिकारांत असलेला राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदाचा मान विठ्ठलभाईंना मिळण्याचा योगायोगच आला नाही! तो बहुमान त्यांना कां प्राप्त झाला नाही याची मीमांसा करण्याचा हा प्रसंग नव्हे. तथापि त्यांच्या अंगच्या एकंदर गुणांचा साकल्येंकरून विचार केल्यास असें निश्चितपणें म्हणावेसें वाटतें कीं, त्यांना जर राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षत्वाचा मान मिळाला असता तर त्यानी राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमाला कांहीतरी अधिक यशस्वी असें वळण लावलें असतें. त्याचबरोबर असाहि विचार मनांत उद्भवतो कीं, असेंब्लीच्या अध्यक्षपदावरून ज्याने राजकारणाच्या डावांत प्रतिपक्षावर वारंवार मात केली, त्या मुत्सद्द्याचा राष्ट्रीय सभेच्या वतीनें गोलमेज परिषदेला गेलेल्या शिष्टमंडळांत जर समावेश झाला असता तर गोलमेज-परिषदेच्या कार्यालाहि इष्ट वळण लागलें असतें आणि स्वतः विठ्ठलभाईंवर अशा प्रतिकूल परिस्थितींत परदेशांत राहून परलोकाला प्रयाण करण्याचा प्रसंग ओढवला नसता! असो. असले हृदयाला शल्यवत् टोंचणारे तर्क करण्यापासून आता कांहीच लभ्यांश नाही. तथापि प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीच जमेस धरून तेवढ्यावरून देखील असें निश्चित सांगतां येतें कीं, विठ्ठलभाई पटेल यांचा आयुष्यक्रम भावी राजकारणी पुढाऱ्याला व लढाऊ वृत्तीच्या देशभक्ताला खातीनें आदर्शभूत असाच मानतां येईल.

# लोकशाही स्वराज्यपक्ष

'डेमोक्रॅटिक स्वराज्य पार्टी' म्हणजे 'लोकशाही स्वराज्यपक्ष' स्थापन करण्यासाठी येत्या शनिवारीं व रविवारीं मुंबईस बृहन्महाराष्ट्राची एक परिषद भरणार असून त्या परिषदेची पूर्व तयारी पूर्ण होत आली आहे. वऱ्हाडांतील एक सुप्रसिद्ध पुढारी बॅ. रामराव देशमुख हे या परिषदेचे नियोजित अध्यक्ष असून बॅ. जम्नादास मेहता हे स्वागताध्यक्ष आहेत आणि श्रीयुत न. चिं. केळकर हे परिषदेचा प्रारंभ करून देणारें प्रास्ताविक भाषण करणार आहेत.

ही परिषद भरविण्याचा हेतु काय आणि या परिषदेंत जो नवीन पक्ष स्थापला जाणार त्या पक्षाचें धोरण कोणतें राहील याविषयीं कित्येकांकडून गैरमाहीतगारपणानें तर कित्येकांकडून जाणूनबुजून गैरसमज करण्यांत येत आहे. या परिषदेची हकीकत आणि नव्या पक्षाचा कार्यक्रम जाहीर झाल्यावर ही गैरसमजूत दूर होईलच; पण तत्पूर्वींच परिषदेला येऊं इच्छिणाऱ्या प्रतिनिधींच्या मनांत कोणताहि किंतु राहूं नये म्हणून या परिषदेचा हेतु व तिचें धोरण यासंबंधानें जरूर तेवढा प्रास्ताविक खुलासा करण्यांत येत आहे.

कॉंग्रेसमधून फुटून बाहेर निघून हा नवा पक्ष स्थापण्याची आताच इतकी घाई काय असा प्रश्न अनेकांकडून विचारण्यांत येतो. थोडासा विचार केला असतां या प्रश्नाचें उत्तर पृच्छक देखील स्वतःच देऊं शकतील. प्रत्यक्ष कॉंग्रेस ही संस्था बेकायदेशीर ठरली नसली तरी ठिकठिकाणच्या कॉंग्रेस कमिट्या बेकायदेशीर ठरल्या आहेत आणि कॉंग्रेसच्या डिक्टेटरांच्या फर्मानामुळे त्या लुप्तप्राय झाल्या आहेत; तेव्हा ज्या संस्थाच मुळच आज मुळीं ठिकाणावर नाही त्या संस्थांमधून फुटून बाहेर निघण्याचा आक्षेपच निरर्थक होय. मोटारमध्ये बसून प्रवासाला निघालें असतां ती मोटार जर वाटेंत गाळात रुतून बसली व चालेनाशी झाली तर त्या मोटारींत नुसतें बसून राहाण्यापेक्षा आपल्या स्वाधीन असलेल्या इतर वाहनांचा उपयोग करून मार्ग आक्रमावा यांतच समंजसपणा आहे. मोटार सोडून जाण्यापूर्वी ती चिखलांतून बाहेर काढण्याचा प्रयत्न करून पाहावा हें खरें आणि येथे जुलै महिन्यांत भरलेल्या परिषदेंत तसा प्रयत्न करण्यांत आला. परंतु मोटारीची गति बंद पडली तरी चालेल पण मोटार मागें वळवून चिखलांतून बाहेर काढण्यांत नामुष्की आहे असाच जेव्हा निर्णय देण्यांत आला, तेव्हा तो नाद सोडून देणें अपरिहार्यच ठरलें.

यावर कित्येकांकडून असा खुलासा करण्यांत येतो कीं, कॉंग्रेसचें सर्वच काम कांही बंद पडलेलें नाही. ज्यांना कायदेभंगाची चळवळ करावयाची नसेल त्यांनी कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम हातीं घ्यावा. विधायक कार्यक्रम हा शब्दप्रयोग दिसतांना भारदस्त दिसतो. पण त्याचें पृथक्करण करून पाहिल्यास त्यातून निष्पन्न काय होतें? हरिजनांच्या उद्धारार्थ चालू झालेल्या चळवळीखेरीज कॉंग्रेसचा 'विधायक कार्यक्रम' असा कोणता

चालू आहे ! आणि 'हरिजनांच्या उद्धाराची' चळवळ एवढीच जर त्या 'विधायक कार्यक्रमाची' व्याप्ति आज दिसत आहे तर त्या चळवळीला काँग्रेससारख्या राजकीय संस्थेचीच जरूरी काय ! श्रीयुत माटे मास्तर आणि श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांच्यासारखे कळकळीचे अस्पृश्योद्धारक तें कार्य आज कित्येक वर्षे काँग्रेसच्या बाहेर राहूनच करीत आहेत व इतरांनाहि तें तसं करतां येण्यासारखें आहे. तेव्हा अस्पृश्योद्धाराची चळवळ करण्यात आपण काँग्रेसचेच कांही तरी कार्य करीत आहो अशी समजत करून घेऊन काँग्रेसवाल्यांनी स्वतःची व इतरांची निष्कारण प्रतारणा कां करावी ! अस्पृश्योद्धाराचें कार्य करण्यांत प्रत्यक्ष सरकारी अधिकाऱ्यांनाहि हरकत येऊं शकत नाही मग आजच्या परिस्थितींत तेवढेंच एक कार्य करूं इच्छिणाऱ्यांनी आम्ही काँग्रेसवाले असें म्हणवून घेण्यांत स्वारस्य काय ! एवढेंच नव्हे तर हल्ली ज्या पद्धतीने हें अस्पृश्योद्धाराचें काम चाललें आहे त्या पद्धतीने तें काम चालविण्यांत काँग्रेसवाल्यांचें वर्तनच परस्पर विसंगत होत आहे. सरकाराविरुद्ध चाललेली कायदेभंगाची मोहीम बंद करूं नये असें एकीकडे म्हणाऱ्यांचें आणि लगेच अस्पृश्योद्धाराच्या कार्यासाठी त्याच सरकारची व बव्हंशीं सरकारजमा अशा कौन्सिलांची मदत घ्यावयाची आणि ज्या कौन्सिलरांनी कायदेभंगाचे कंबरडें मोडणाऱ्या आर्डिनन्सेसना कायद्याचें स्वरूप दिलें त्याच कौन्सिलरांची अस्पृश्योद्धाराच्या बिलाला पाठिंबा मिळविण्यासाठी पायधरणी करावयाची याहून अधिक विसंगत वर्तणूक ती कोणती !

परंतु काँग्रेसवाल्यांच्या या दुटप्पी व विसंगत वर्तणुकीमुळे काँग्रेसच्या इतर सर्व राजकीय चळवळींच्या कार्याची कुचंबणा होत आहे. व्हाइटपेपरचा जो खेळखंडोबा चालला आहे, रिझर्व्ह बँकेचें जें बिल घाईघाईने पसार करून घेण्यांत येत आहे, लँकेशायरचें व जपानचें जें व्यापारी शिष्टमंडळ आपला माल हिंदी जनतेच्या गळ्यांत येन केन प्रकारेण बांधण्यासाठी खटाटोप करीत आहे त्या सर्वांचा प्रतिकार करण्याला व जनतेला वस्तुस्थिति समजून देण्याला मार्ग राहिलेला नाही आणि यदाकदाचित् या व्यापारी शिष्टमंडळाशीं भलताच करारमदार होऊन त्याच्यावर कायदेमंडळाकडून शिक्कामोर्तब करून घेण्याचा उपक्रम असेंब्लीपुढे येईल तर त्याला कसून विरोध करण्यालाहि आजच्या परिस्थितींत योग्य अवसर नाही. यास्तव तूर्त कायदेभंग तेवढा वगळून इतर राजकीय चळवळींचा गाडा पुनः चालता करावा याच हेतूने या नव्या पक्षाची स्थापना होणार आहे. काँग्रेसचें जें ध्येय आहे तेंच या नव्या पक्षाचेंहि ध्येय आहे. मात्र त्या ध्येयसिद्धीसाठी विविध मार्गांनी जे प्रयत्न करावयाचे त्यांत ग्रामपंचायतीपासून तों वरिष्ठ कौन्सिलापर्यंतच्या सर्व प्रतिनिधिक संस्थांचा उपयोग करून घेण्यांत यावा, तें साधन वर्ज्य मानण्यांत येऊं नये, आणि देशांतील मतदारसंघ हाच भावी स्वराज्याचा स्थायी घटक असल्यामुळे त्या मतदारसंघाला सर्व राजकीय प्रश्नांचे मर्म समजून देऊन व त्याचा पाठिंबा मिळवून राष्ट्राच्या प्रगतीचा मार्ग चोखाळावा असा या नवीन पक्षाचा कार्यक्रम आहे.

अर्थातच काँग्रेसच्या ध्येयाला किंवा कार्यक्रमाला विरोध करण्यासाठी ही पक्षस्थापना होत नसून काँग्रेसच्या राजकीय चळवळीचा गाडा जो आज अडून पडला आहे तो निरनिराळ्या रूळांवरून सुरू करणें हाच या पक्षाचा मुख्य उद्देश आहे. आणि म्हणूनच ज्या वेळीं काँग्रेस कमिट्या पुनः पुनरुज्जीवित होतील आणि काँग्रेस संस्था कौन्सिल बहिष्काराचा आग्रह सोडून देईल, त्या वेळीं या नवीन पक्षाचा कार्यक्रम व काँग्रेसचा कार्यक्रम यांत विरोध न राहिल्यामुळे हा नवीन पक्ष पुनश्च काँग्रेसशीं एकजीव होण्याला हरकत घेणार नाही. यास्तव ज्यांना ज्यांना आजच्या राजकीय चळवळीच्या कुचंबणेंतून बाहेर पडून राष्ट्रकार्य करण्याची उमेद व जरूरी वाटत असेल त्यांनी त्यांनी या नवीन पक्षाला पूर्ण पाठिंबा द्यावा. कारण हा पक्ष देखील काँग्रेसचेंच ध्येय शक्य त्या सर्व मार्गांनी गांठण्याचा प्रयत्न करणार आहे.

# स्वदेशी चळवळ व हिंदुस्थानाचें औद्योगीकरण

अलीकडे स्वदेशीसंघ सर्व ठिकाणीं स्थापन होऊन स्वदेशी माल घेण्याकडे लोकांची प्रवृत्ति व्हावी म्हणून जारीचे प्रयत्न चालू आहेत. याच हेतूने स्वदेशी प्रदर्शनें ठिकठिकाणीं भरविलीं जात आहेत. हिंदुस्थानामध्ये बनविलेला माल घेण्याविषयीं लोकांची आवड पुरी करण्याकरितां बारीकसारीक वस्तु स्वदेशांत निर्माणहि होऊं लागल्या आहेत प्रस्तुतची चळवळ सामान्यतः इष्ट वळण घेत आहे; हे खरें असलें तथापि आपल्या समोरच्या स्वदेशी मालाचा अल्प विस्तार पाहून आपण मोठी औद्योगिक क्रांति करूं शकलों अशी समज करून घेतां येत नाहीं. ते उद्दिष्ट गांठण्यासाठी अद्याप आपल्याला पुष्कळच मोठी मजल मारावयाची आहे. स्वदेशी म्हणून प्रदर्शनात मांडला जाणारा माल अगदी अल्प प्रमाणांत तयार होत आहे. आणि जो थोडासा माल तयार होतो त्यासाठी श्रम व पैसा यांचा प्रमाणाबाहेर व्यय झालेला असतो असेंच विशेष तपास केला असतां आढळून येईल. आधुनिक प्रकारच्या औद्योगिक चढाओढींत यशस्वी होण्यासाठीं कमींत कमी द्रव्य आणि वेळ खर्चून अधिकांत अधिक मालाची निपज करण्याचे उपाय अमलांत आणले पाहिजेत. गिऱ्हाइकांच्या भावनांचें पाठबळ हे प्रथम कांहीं वेळ मिळालें तरी तें कायमचे बळ नव्हे. अखेरीस सर्व प्रकारच्या स्वदेशी मालाची कसोटी परदेशाच्या उत्तम मालाशीं तुलना करूनच लावावी लागेल, हे देशी कारखानदारांनी विसरतां कामा नये.

### उद्योग-धंद्यांची आकुंचित कल्पना

आपली उद्योगधंद्याविषयींची कल्पना आकुंचित झालेली आहे. कोणत्याहि औद्योगिक प्रदर्शनांत जाऊन पाहिल्यास या गोष्टीची सत्यता पटेल. देशाचें औद्योगीकरण म्हणजे प्रदर्शनांत बहुधा आढळणाऱ्या साबणांसारख्या वस्तूंचें उत्पादन एवढीच कल्पना आज तरी लोकांची झाल्यासारखी दिसते. तिला प्रथम आळा घातला पाहिजे. उद्योगाचें बाळकडूच अद्यापि आपल्या देशवासीयांना मिळालेलें नसल्यामुळे असल्या प्रदर्शनांत दुसरी जी गोष्ट प्रामुख्याने दिसून येते ती परप्रत्ययनेय-बुद्धीची होय. स्वतंत्रपणे स्वतःच्या गुणांवर उभे राहण्याची खात्री वाटत नसली म्हणजे मनुष्य बहुधा हीन अनुकरणाचे अवलंबन करतो. एखादे दंतमंजन घ्या त्याचें नांव देतांना परदेशांतील एखाद्या प्रसिद्ध नांवाशीं शक्य तितके जुळतें नांव देण्याची देशी कारखानदार काळजी घेईल! एवढेंच नव्हे तर त्याची बाटली, त्यावरील पेटी, लेबल सर्वकांही त्या परदेशी वस्तूच्या सारखी करण्याइतपत मानसिक गुलामगिरी तो दाखवील. ह्या प्रकारामुळे भोळें गिऱ्हाईक कदाचित् फसेल. परंतु स्वदेशी उद्योगधंद्यांचा खरा विजय व्हावयाचा असेल तर देशी कारखानदारांनी अशा युक्त्या करण्यापेक्षा खऱ्या गुणयुक्त वस्तु शास्त्रीय पद्धतीने तयार कशा होतील याची विवंचना केली पाहिजे.

### स्वदेशीचा अर्थ

'स्वदेशी वस्तु बनविणें' म्हणजे काय असतें याचा थोडा विचार करूं आणि आज देशी म्हणून बाजारांत दिसणाऱ्या वस्तु शंभर टक्के स्वदेशी म्हणतां येतील किंवा कसें याचीहि शहानिशा करूं. बऱ्याच वस्तूंचा कच्चा माल त्यांना लागणारी रासायनिक द्रव्यें, फार कशाला त्या वस्तु ठेवण्याकरितां वापरलेल्या बाटल्या, डबे वगैरे साधने बहुतांशीं परदेशी असतात. आणि खऱ्या अर्थाने वस्तूची बनावट (Manufacture) हिंदुस्थानांत होत नसून एक प्रकारची 'जुळणी (Assembling)' काय ती हिंदी भूमींत हिंदी माणसांच्या हाताने होते! ह्या जुळणीची क्रियाहि पूर्वी परदेशांत होत असे ती आता हिंदुस्थानांत होते हें तेवढ्या दृष्टीने चांगलेंच आहे. त्यापासून तिळमात्र फायदा नाहीं असे आमचें म्हणणे नाही. परंतु ह्या प्राथमिक गोष्टीवरून आपलें लक्ष काढून शक्य तितकें लवकर ह्याच्या पुढच्या पायरीचें आक्रमण केलें पाहिजे, ह्यांत दुमत होऊं नये. हल्लीं निरनिराळ्या धातु, रासायनिक द्रव्यें, ॲसिड्स व आलकलीज् वगैरे औद्योगिक महत्त्वाच्या पदार्थांकरितां आपल्याला परक्यांच्या तोंडाकडे पाहावें लागतें. तें थांबण्याकरितां आपणच ते बनविले पाहिजेत, म्हणजे स्वदेशांतच तयार केले पाहिजेत. दुसऱ्या शब्दांत बोलावयाचे म्हणजे हीं द्रव्यें उत्पन्न करण्याचे (Basic industries) महत्त्वाचे कारखाने आपणच उघडले पाहिजेत.

खरें पाहिलें तर आपल्यासारख्या शेतकऱ्यांच्या देशांत एकदम एवढें मोठे औद्योगिक परिवर्तन होणें तितकेंसें सोपें नाहीं. पण आलेल्या संधीचा असा उपयोग करून घ्यावयाचा नसेल, तर मग 'हिंदी वस्तूच घ्या' या स्वदेशीच्या महामंत्राला कांही अर्थच राहत नाहीं. आपल्या देशांत ज्याअर्थी

कच्च्या मालाची संपत्ति इतकी भरपूर आहे, विद्युच्छक्ति वगैरे निर्माण होण्याचें सामर्थ्य इतकें अपार आहे आणि तयार मालाला गिऱ्हाईक तर घरचेंच आणि मोठें आहे, त्याअर्थी ह्या सर्व साधनांचा उपयोग करून आपल्या येथेच मोठे कारखाने निर्माण होण्यास हरकत कां असावी ?

## पद्धतशीर योजना

आमच्या मतें ह्या गोष्टींची उभारणी पद्धतशीर योजना करून झाली पाहिजे. 'हिंदी घ्या' अशी नुसती उठावणी केल्यानें चिरस्थायी स्वरूपाचें कार्य होणार नाही. रशियानें आपल्या उद्दिष्टाच्या सिद्ध्यर्थ पंचवार्षिक योजना आंखून, ती परिश्रमानें अमलांत आणण्यासाठीं आटोकाट खटपट केली तशी आपण केली पाहिजे. आपल्या देशांतील बँकांचे व्यवस्थापक, कारखानदार, मुत्सद्दी राजकारणी लोक, अर्थशास्त्रज्ञ आणि यंत्रविद्याविशारद असे सर्व लोक एके ठिकाणीं येऊन त्यांनी मोठ्या आस्थेनें व कळकळीनें ह्या जिव्हाळ्याच्या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. अलीकडे वैयक्तिक किंवा धंदेविषयक सांघिक हितसंबंधांचा विचार करण्याकरिता त्या त्या शाखेचे लोक आपल्या वार्षिक बैठकी किंवा संमेलनें भरवितात. ह्या सर्व शाखांच्या सहकार्यानें राष्ट्राच्या औद्योगीकरणाचा बिकट प्रश्न सुटण्याची खटपट झाली पाहिजे. केवळ शिक्षणसंस्था, केवळ गिरणीवाले, केवळ धनिक लोक यांच्या एकाकी प्रयत्नांनी हा प्रश्न सुटणारा नव्हे, हेंच तत्त्व आजपर्यंतच्या झालेल्या फुटकळ प्रयत्नांच्या अपयशी इतिहासाचें सार नव्हे काय ?

असें एक सर्वसंग्राहक नियामक मंडळ निर्माण झाल्यावर त्यानें जें पहिलें काम हातांत घेतलें पाहिजे तें हें कीं पांच नाहीं तरी दहा वीस, पंचवीस वर्षांत का होईना, पण कांही महत्त्वाच्या जिनसांच्या बाबतींत हिंदुस्थान पुरता आणि कायमचा स्वावलंबी व्हावा. हें उद्दिष्ट सिद्धीस जाण्यासाठीं हिंदुस्थानभर कारखान्यांची एक सांखळीच तयार झाली पाहिजे. हिंदुस्थान शेतकऱ्यांनी भरलेला आहे. त्याऐवजी त्यांत कारखाने व उत्पादक शहरें यांची समृद्धि झाली पाहिजे. हे कारखाने मोठे व आजतागायत यांत्रिक सुधारणांनी सजविलेले असल्याशिवाय त्यांच्यानें परदेशी उत्पादक कारखान्यांशीं टक्कर देणें होणार नाही. कारण आजच्या जगांत मोठ्या प्रमाणावर उत्पादन केल्याशिवाय टिकाव लागणें कठिण आहे.

## शास्त्रीय ज्ञानाचा आधार

ह्या सर्व खटाटोप शास्त्रीय ज्ञानाच्या आधारावरच आकारांत आणिला पाहिजे. उत्पादन किंवा मालाच्या वांटणीचा मोठा घोटाळ्याचा प्रश्न घ्या. ह्या सर्वांचा विचार शास्त्रीय दृष्ट्या केला पाहिजे. पुष्कळ लोकांना आपला कृषिप्रधान देश उद्योगाच्या चढाओढीत भाग घेऊन उद्योगप्रधान होणें ही फार कठिण गोष्ट वाटते. पाश्चात्य देशांतील परा कोटीला पोंचलेली यांत्रिक आदिकरून कलेतील प्रगति पाहून ते हातपाय गाळू लागतात. आपल्यामध्ये व पाश्चात्य उद्योगसामग्रीमध्ये इतकें जमीनअस्मानाचें अंतर आहे कीं त्यांच्या मतें तें कधींच कमी होणें शक्य नाही. आपण थोडेसे हातपाय हालवूं लागावें तों ते आणखी पुढे जात राहाणार, आणि ही मुंगी-घोड्यांची शर्यत केव्हाच संपणार नाही, असे त्यांचे निराशाजनक विचार आहेत ! दुसरें एक त्यांचें असें म्हणणे आहे कीं, यांत्रिक शास्त्राची वाढ ही स्वतःच्या अनुभवाच्या भक्कम पायावर उभी करावी लागते. इंग्लंडमध्ये वगैरे प्रथम वाफेच्या सामर्थ्याचा शोध लागला. आणि तेथून गेल्या शेंदीडशें वर्षांच्या उत्क्रांतीचें फळ म्हणजे आजचे त्यांचें विलक्षण बळ हें होय. हें आम्ही एकदम अनुकरणानें पचनीं पाडूं म्हटलें तर तें कसें जमावें ?

सकृद्दर्शनीं हें म्हणणें बरोबर वाटतें. परंतु त्यांत तितकेंसं तथ्य नाही. पाश्चात्य देशांतहि औद्योगिक कार्यपद्धतींत अलीकडे बराच फरक झालेला आहे. ही गोष्ट आपण ध्यानांत घेतली पाहिजे. कांही वर्षांपूर्वी उद्योगपद्धति ही कोणालाहि न सांगण्यासारखें व सहज न समजण्यासारखें गुपित असे मानण्यांत येई. आणि बापानें मुलालाच फक्त मरतेवेळीं तें गुपित सांगून आपण जावें अशी प्रथा पडली होती, असेंहि ऐकिवांत आहे. परंतु आता तो काळ बदलला आहे. अलीकडे प्रत्येक गोष्टींचें शास्त्र निर्माण झाल्यामुळें कोणत्याहि शास्त्राचा अभ्यास करणाऱ्याला सर्व गुरुकिल्ल्या हातीं येण्यास वेळ लागत नाही. शास्त्रांचें ज्ञान आतां आंतरराष्ट्रीय होऊन बसलें आहे. पूर्वी केवळ मुखसंक्रमणानें साध्य होणारी विद्या अलीकडे पुस्तकांच्या साहाय्यानें आत्मसात् करतां येते. अर्थात जपाननें ज्या मार्गानें आपली उन्नति करून घेतली त्याच मार्गानें म्हणजे शास्त्रीय ज्ञानाची कांस धरून व काळजीपूर्वक अभ्यासानें, अचूक प्रयोगाच्या व विज्ञानाच्या जोरावर हिंदुस्थानाला आपली प्रगति कां करून घेतां येऊं नये ? हिंदुस्थानांत अव्वल दर्जाचे शास्त्रज्ञ आहेत ही गोष्ट कोणालाहि नाकबूल करतां येत नाही. आपल्या विश्वविद्यालयांतून दरसाल शास्त्रज्ञ पदवीधर हजारांनी तयार होत आहेत. ह्या सर्वांना कामाला लावून आपल्या देशाला ऊर्जितावस्था आणली पाहिजे.'

# रुळावरून घसरलेली गाडी परत रुळावर आली

मुंबईस गेल्या शनिवारीं व रविवारीं दोन दिवस बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषद भरून ती यशस्वी रीतीने पार पडली आणि त्या परिषदेंत 'लोकशाही स्वराज्य पक्षाची' स्थापना यथाशास्त्र झाली. लोकशाही स्वराज्य पक्षाची स्थापना करण्यासाठी बृहन्महाराष्ट्राची परिषद बोलवावी अशी मूळ कल्पना उद्भूत झाल्यावेळेपासून त्या कल्पनेची मूर्त स्वरूपांत परिणति होईपर्यंतचा अत्यल्प अवधि विचारात घेतल्यास, एवढ्या अल्पावधींत ही परिषद इतक्या भव्य स्वरूपांत प्रकट झाली याबद्दल कल्पकांचे व चालकांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. राजकारणाची रुळावरून घसरलेली गाडी परत रुळावर चढवून चालू केली पाहिजे या मताचा ध्वनि व प्रतिध्वनि ठिकठिकाणीं ऐकूं येत होता. तथापि या घसरलेल्या गाडीला परत रुळावर चढविण्यांत पुढाकार कोणी घ्यावा आणि ती गाडी पूर्वीच्याच रुळावर चढवावी का निराळ्या रुळावर बसवावी याविषयी ऐकमत्य होऊं न शकल्याने हें कार्य थबकून राहिलें होतें. परंतु कुलाबा जिल्ह्यांतील श्री. रामभाऊ मंडलीकप्रभृति पुढाऱ्यांनी आपल्या जिल्ह्यापुरतीच एक परिषद प्रथम भरवून लोकमताचा ठाव घेतला आणि नंतर ही बृहन्महाराष्ट्र परिषद मुंबईस भरविण्याचें निश्चित केलें.

हा निर्णय ठरल्यानंतर परिषदेच्या बैठकीला प्रारंभ होण्याला अवधि अगदीच थोडा उरला होता आणि मार्गांत तर विघ्नांचे ढीग पसरलेले होते. काँग्रेसच्या अनुयायांच्या मनांतून आधीपासूनच शंका-कुशंकांचें रण माजून राहिलेलें होतें. त्यांतच कित्येक नवपक्षविरोधकांनी काँग्रेसनिष्ठेच्या गोंडस नांवाखाली या परिषदेचें कार्य कुंठित करण्याच्या उद्देशाने जेव्हा मोहक वाग्जाल पसरलें तेव्हा या परिषदेच्या हेतूविषयींच्या गैरसमजुतींत आणखी भर पडून चालकांचें कार्य अधिकच दुष्कर झालें. तथापि चालकांनी आपला निर्धार तिळभरहि ढळूं न देतां उलट अधिक उत्साहाने आपला मार्ग आक्रमण्याला सुरुवात केली. स्वागतसभेच्या वतीने अनेक पुढाऱ्यांनी निरनिराळ्या जिल्ह्यांतून प्रचारकार्यार्थ दौरे काढले, प्रमुख कार्यकर्त्यांसह विचारविनिमय केला, शंकाकुशंकाचें निरसन केलें, परिषदेच्या उद्देशांचें स्पष्टीकरण केलें आणि राजकारणाचें अडलेलें गाडें पुनश्च चालू करण्याची आवश्यकता, इष्टता व शक्यता पटवून दिली. जर या प्रचारकार्याला आणखी महिना-पंधरा दिवसांचा वेळ मिळाला असता आणि परिषदेचें अधिवेशन अधिक सोयीस्कर अशा वेळेला भरवितां आलें असतें तर ही परिषद याहून अनेक पटींनी मोठ्या प्रमाणांत भरली असती. तरी पण मिळालेल्या कालावधीच्या मानाने पाहतां ७१८ शें प्रतिनिधींनी आपल्या प्रतिनिधिपत्रिका रीतसर भरून वर्गणीसह पाठविल्या आणि त्यांतले तीनचारशें प्रतिनिधि समक्ष हजर होते, यावरून बृहन्महाराष्ट्रांतील लोकमत या परिषदेला सर्वतोपरी अनुकूल होतें हें सिद्ध होत आहे.

वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी श्रीयुत रामराव देशमुख यांनी या वेळीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याची जबाबदारी पत्करण्याचें मनोधैर्य दाखवून स्वागतसभेच्या शिरावरील भार पुष्कळच हलका केला. श्रीयुत न. चिं. केळकर यांनी प्रास्ताविक भाषण करण्याचें कबूल करून परिषदेच्या आक्षेपकांतील एका वर्गाचें तोंड बंद केलें आणि नागपूर ते सांगलीपर्यंतच्या बृहन्महाराष्ट्रांतील सर्व जिल्ह्यांतील व संस्थानांतील प्रमुख कार्यकर्त्यांनी आपल्या आगमनाने अथवा यशश्चिंतनपर संदेशाने चालकांच्या कामगिरीला सक्रिय पाठिंबा देऊन परिषद भरविण्याच्या त्यांच्या मूळ कल्पनेचें चीज केलें. अशा प्रकारें सर्व बाजूंनी पाठिंबा मिळाल्याने परिषदेच्या चालकांनी स्वशिरावर

घेतलेला हा भार त्यांना नुसता सह्यच नव्हे तर उलट सुखसंवेदनाजनकहि झाला असेल यांत शंका नाही. तथापि ज्या परिस्थितींत त्यांनी या कार्याला प्रथम हात घातला आणि ज्या चिकाटीने व धैर्याने त्यांनी प्राथमिक अडचणींतून आपला मार्ग आक्रमिला त्याचा विचार करता परिषदेच्या या अत्यंत यशस्वी अधिवेशनाचें सर्व श्रेय स्वागताध्यक्ष श्री. जम्नादास मेहता आणि डॉ. वेलकर, डॉ. सावरकर, श्रीयुत मंडलीक प्रभृति त्यांचे उत्साही साहाय्यक यांनाच देणें वाजवी होईल. काँग्रेसद्रोहाच्या भ्रामक बुरख्यांतून केल्या जाणाऱ्या विषारी शरसंधानाने निराश होऊन चालकांनी जर हा उपक्रम अर्धवटच सोडून दिला असता तर रुळावरून घसरून खड्ड्यांत पडलेली राजकारणाची गाडी धैर्याने व नेटाने उचलून परत रुळावर उभी करण्याचा जो बहुमान आज बृहन्महाराष्ट्राला मिळाला आहे त्या मानाला बृहन्महाराष्ट्र खात्रीने आंचवला असता असें वाटत असल्यामुळेच आम्ही या चालकांच्या कामागिरीचें कृतज्ञतापूर्वक कौतुक करीत आहों.

परिषद कल्पनातीत प्रमाणांत यशस्वी झाली, लोकशाही स्वराज्यपक्षाची स्थापना झाली, त्या पक्षाने आपली घटना व आपलें उद्दिष्ट जाहीर केलें, आपल्या कार्यक्रमाची रूपरेषा परिषदेपुढे मांडली, अधिक तपशिलांत शिरून कार्यक्रमाला व्यवस्थित रूप देण्याची कमिट्या नेमून तजवीज केली आणि या नव्या पक्षाचें बल वाढवून त्याची संघटना करण्याकरिता शाखा सभा स्थापण्यालाहि अनुज्ञा दिली. अशा रीतीने राजकारणाची अडलेली गाडी या नव्या पक्षाने परत रुळावर आणून ठेवून चालू केली आहे. आता या नव्या संघटनेचा पूर्ण फायदा जनतेला प्राप्त करून घ्यावयाचा असेल तर जनतेने या लोकशाही स्वराज्यपक्षाचे सभासद होऊन व आपापल्या क्षेत्रांत या पक्षाचा कार्यक्रम अंमलांत आणून या नव्या पक्षाविषयीं सक्रिय सहानुभूति दाखविली पाहिजे. आणि नुसत्या बृहन्महाराष्ट्रांतूनच नव्हे तर अखिल भरतखंडांतून अशी सहानुभूति मिळेल असा आम्हांस भरंवसा वाटतो; कारण आज जरी या नव्या पक्षाची स्थापना केवळ महाराष्ट्रापुरतीच होत असली तरी राजकारणाला कोठेंतरी तोंड पाडलेंच पाहिजे म्हणून हा पहिला उपक्रम येथे केलेला असून याच धोरणाला अनुसरून इतर सर्वहि प्रांतांत अशीच पक्षस्थापना होणार आहे.

या नव्या पक्षाचें व काँग्रेसचें ध्येय जर अगदी सारखेंच आहे तर मग या पक्षाला 'काँग्रेस' मधलाच एक अल्पसंख्य पक्ष असें कां मानीत नाही, 'काँग्रेस'च्या बाहेरचा पक्ष असें कां म्हणतां असा आक्षेप या परिषदेंतल्याच कित्येक प्रतिनिधींकडून घेण्यांत आला व त्या मुद्द्यावर विषयनियामक मंडळांत बराचसा वादविवाद होऊन तडजोडीसाठी म्हणून ठरावाचा जो मसुदा तयार करण्यांत आला त्या मसुद्यावरहि परिषदेच्या जाहीर बैठकींत पुनः वादाचें रण माजलें. ध्येयाच्या दृष्टीने पाहिल्यास या पक्षाचें काँग्रेसशीं समानशीलत्वच आहे आणि काँग्रेसचा इतरहि बराचसा कार्यक्रम या पक्षाला संमत आहे. कार्यक्रमाच्या दृष्टीने पाहिल्यास हा पक्ष कायदेभंग तूर्त तहकूब करावा असें प्रतिपादित असून कायदेमंडळांवरील बहिष्कार मात्र या पक्षाला तत्त्वतःच संमत नाही; त्यामुळे तेवढ्यापुरतें या पक्षाचें काँग्रेसशीं पटत नाही. तेव्हा मतभेदाच्या मुद्द्यावर जोर देऊन या पक्षाला काँग्रेसबाह्य पक्ष म्हणावें कां मतैक्याकडेच नजर देऊन याला काँग्रेसच्या अंतर्गत असलेला असाच एक पक्ष मानावें हें एक कोडेंच आहे. म्हणूनच तें कोडें सर्वांच्या मनाला पटेल अशा रीतीने सोडवितां आलें नसल्यास त्यांत कांही आश्चर्य नाही. असल्या पेंचांतून सुटण्याला केवळ बुद्धिगम्य तर्क अथवा उत्कट भावना उपयोगी पडूं शकत नाही. म्हणूनच भावनेचा व्यवहाराशीं मेळ घालून तडजोडीनेच हा वाद मिटाविण्यांत आला. काँग्रेसचें जें आजचें ध्येय तेंच ध्येय याहि पक्षाने मान्य केलें असल्यामुळे या पक्षाचा प्रत्येक सभासद काँग्रेसचा सभासद

असावा असा एका पक्षाचा आग्रह होता. तथापि आजमितीला काँग्रेस कमिट्या बेकायदेशीर ठरल्या असून त्यांचा ठावठिकाणा नसल्याने या नव्या पक्षाचा सभासद होण्यापूर्वी काँग्रेस कमिटीचाहि सभासद होण्याची अट तूर्त अंमलांत आणतां येत नाही! म्हणून काँग्रेस कमिट्यांवरचा बेकायदेशीरपणाचा छाप धुतला जाऊन त्या कमिट्या रीतसर पुनरुज्जीवित होईपर्यंत त्या कमिट्यांच्या सदस्यत्वाची अट अव्यवहार्य ठरणार हेंहि त्या पक्षाला उघड दिसत होतें. तेव्हा सद्यःकालीन व्यवहाराच्या दृष्टीने पर्यवसान सारखेंच होत असल्यामुळे तडजोडीच्या सोयीसाठी ' हा पक्ष काँग्रेसच्या अंतर्गत असावा ' या भागाला बहुमताने संमति दिली. उलटपक्षीं हा पक्ष कायदेभंग तहकूब ठेवावा आणि कौन्सिलावर बहिष्कार नसावा असें आग्रहपूर्वक सांगत असल्याने काँग्रेसचे सर्वच ठराव या पक्षाला शिरसामान्य कसे होतील असा प्रश्न उलट बाजूकडून विचारण्यांत येईलच.यावर नव्या पक्षाने असा तोडगा सुचविला कीं, काँग्रेसने मंजूर केलेल्या ठरावांतल्या जेवढ्या ठरावांना या नव्या पक्षाची संमति मिळेल तेवढेच ठराव या पक्षाच्या सभासदाला बंधनकारक होतील, इतर ठराव बंधनकारक मानले जाणार नाहीत. ही सोडवणूक काँग्रेसवादी पक्षाने एकमताने मान्य केली आणि म्हणूनच त्यांचा ऋणानुबंध अगदीच तोडू नये या सदिच्छेने नव्या पक्षानेहि हा पक्ष ' काँग्रेसच्या अन्तर्गत ' आहे असा खुलासा करण्याचें कबूल केलें.

' त्वयार्धं मयार्धं ' अशा स्वरूपाच्या या तडजोडींत बोलूनचालून एका बाजूने केवळ तर्काची व दुसऱ्या बाजूने केवळ भावनेची छाटाछाट करण्याला संमति दिल्याने आपल्यांतलीच कांही मंडळी नाराज झाली आणि श्रीयुत बाबासाहेब खापर्डे यांनी पौराणिक दृष्टान्त देऊन असा टोमणा मारला कीं,मदनाला जाळून टाकणाऱ्या शंकरालादेखील जसें पार्वतीच्या बाहुपाशांतून बाहेर पडतां आलें नाही तसेंच गांधींचें तत्त्वज्ञान झिडकारून टाकणाऱ्या या पक्षाला काँग्रेसच्या नांवाच्या मोहांतून स्वतःची सुटका करून घेतां आली नाही ! पण त्यावर श्रीयुत केळकर यांनी मार्मिक भाषण करून ही तडजोड मान्य केल्याने आम्ही आपलें बुद्धिस्वातंत्र्य गमावीत नाही, कारण काँग्रेसचा कोणताहि ठराव आमच्या बुद्धीला पटेल तरच तो आमच्या पक्षाला बंधनकारक होईल असें भाष्य केल्यावर ठराव मंजूर करण्यांत आला. हीच तडजोडीची वृत्ति इतरहि एकदोन बाबतींत दिसून आली. श्रीयुत केळकर यांनी आपण या पक्षांतील कोणतीहि अधिकाराची जागा स्वीकारणार नाही असें जाहीर केलें होतें. परंतु या नव्या पक्षाचा जम बसेपर्यंत पहिल्या घटनेंत तरी त्यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें असा सर्वांचाच मनोदय दिसल्यावरून त्यांनी अध्यक्ष होण्याचें मान्य केलें. या नव्या पक्षाने कायद्याच्या जोरावर आपण धर्मकारणांत ढवळाढवळ करणार नाही असें धोरण स्पष्ट केल्या, स आम्ही या पक्षांत सामील होतों- असें म्हणून वर्णाश्रम—स्वराज्य—संघाचे कांही प्रमुख सभासद या परिषदेस आले होते. त्यांनाहि असें आश्वासन देण्यांत आलें कीं,हा नवा पक्ष धर्मकारणांत कोणावरहि कायद्याच्या जोरावर सक्ती करूं इच्छित नाही; तथापि कोणता प्रश्न केवळ धर्मकारणाचा आहे हें ठरविण्याचा अधिकार या पक्षाचा आहे. या तडजोडीच्या ठरावाने त्या सनातनी प्रतिनिधींचें समाधान झालें. यावर कित्येक जहाल सुधारकांकडून असा आक्षेप घेण्यांत आला कीं, या नव्या पक्षाने या ठरावाने आपली सदसद्विवेकबुद्धि सनातन्यांकडे गहाण ठेवली ! वास्तविक पाहातां ज्याने आपली स्वतःची तर्कबुद्धि आगाऊच गहाण टाकली नसेल त्याला हें समजूं शकेल कीं, या नव्या पक्षाने ही जी मर्यादा आपण होऊन मान्य केली आहे त्या मर्यादेची रेषा कोणती हें ठरविण्याचा सर्वाधिकार त्याने स्वतःकडेच शाबूत राखून ठेवला आहे. तेव्हा या संबंधांतलाहि आक्षेप अज्ञानजन्य अथवा दुराग्रहजन्य आहे यांत शंका नाही.

अशा रीतीने अनेकांचा विरोध दूर करून व बहुतेक आक्षेपकांचें समाधान करून या परिषदेने आपलें कार्य मोठ्या कौशल्याने तडीस नेलें. पण खेदाची गोष्ट अशी कीं, या परिषदेंत कम्यूनिस्ट पक्षाचे जे ७।८ ग्रहोपग्रह होते त्यांचें मात्र समाधान कोणत्याच तडजोडीने होऊं शकलें नाही. त्यांच्या समजुतीकरिता त्यांच्या कार्यक्रमांतला बराचसा, पण व्यवहार्य, असा भाग नव्या पक्षाच्या कार्यक्रमांत समाविष्ट करण्यांत आला. परंतु ' हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ' या न्यायाने त्यांची हाव वाढतच गेली आणि दुराराध्य मुसलमानांप्रमाणे जेवढें पदरांत पडलें तेवढें सर्व घेऊनच्या घेऊन पुनः आपले १४ मुद्दे कायमच असल्याचा आविर्भाव त्यांनी आणला आणि कित्येक ठरावांवर उपसूचना मांडून व त्यांच्या समर्थनार्थ म्हणून त्या विषयाशीं संबंध नसलेलीं विसंगत भाषणें करून त्यांनी निष्कारण बखेडा माजविला ! अखेरीस तर त्यांनी एका उपसूचनेवर भाषण करण्याची परवानगी घेऊन, त्या भाषणांत आपल्या कम्यूनिस्ट कार्यक्रमाचा घरून लिहून आणलेला मॅनिफेस्टोच वाचण्याला व त्या मॅनिफेस्टोच्या द्वारें इतर पक्षावर यथेच्छ ताशेरा झाडण्याला सुरुवात केली ! तेव्हा अखेरीस अध्यक्षांना आपला अधिकार चालवून त्यांचें तोंड बंद करावें लागलें! वास्तविक पाहतां या कम्यूनिस्टांचें प्रस्तुतच्या नव्या पक्षाशीं कोणत्याहि महत्त्वाच्या मुद्द्यावर एकमत नसतां त्यांनी प्रतिनिधिपत्रकांतील अटींवर सही करून परिषदेंत येणें व आंत आल्यानंतर त्या अटी गुंडाळून ठेवून आपलें कम्यूनिस्ट तट्टू तेथे दडपूं पाहणें हें गैरवाजवी होय.

असो. एवढा अपवाद वगळल्यास इतर सर्व प्रतिनिधींचें समाधान होईल व त्यांच्या राजकारणी चळवळीला नवें अधिष्ठान लाभेल अशा उत्कृष्ट प्रकारें या परिषदेचें कार्य पार पडलें. या परिषदेने राजकारणाची खड्ड्यांत पडलेली गाडी परत रुळावर आणून सोडली आहे व त्या गाडीच्या एंजिनाचें तोंड पूर्वीप्रमाणेच पूर्ण स्वराज्याच्या ध्रुवताऱ्याकडेच वळलेलें आहे. या मार्गाने ही गाडी जात असता कॉंग्रेसच्या राजकारणाची गाडी या गाडीला वाटेंत आढळली तर ही गाडी तिच्याशीं सहमत करून तिच्या बरोबरीने चालूं लागेल. पण जर कांही कारणाने कॉंग्रेसची गाडी रूळावर आलीच नाही, किंवा रुळावर येऊन भलत्याच दिशेने चालूं लागली तर ही लोकशाही स्वराज्यपक्षाची गाडी कॉंग्रेसच्या गाडीकरिता स्वतःची कुचंबणा करून न घेतां आपला मार्ग स्वतःच्याच शक्तीने व युक्तीने आक्रमीत राहून स्वराज्याचें ध्येय गांठील.

# बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषदेचें अधिवेशन

शनिवारीं रात्रीं परिषदेस आलेल्या सर्व प्रतिनिधींच्या विषय–नियामक मंडळाने रात्रौ ९वाजल्यापासून रविवारीं सकाळीं ७॥ वाजेपर्यंत निरनिराळ्या ठरावांचा कसून व तपशीलवार चर्चा केली व ठरावांचे मसुदे तयार केले. नंतर परिषदेच्या दुसऱ्या दिवशींच्या जाहीर कामास ता. २९रोजीं दुपारीं ३ वाजता सुरुवात झाली. विठ्ठलभाई पटेल, सेनगुप्त, ॲनी बेझंट व नारायणराव देसाई टोपीवाले यांच्या निधनाबद्दल दुःखप्रदर्शनाचा ठराव सर्वांनी उभें राहून पसार केल्यावर, पक्षाच्या प्रस्थापनेचा ठराव एकमताने पास झाला. पक्षाच्या ध्येयाविषयीचा ठराव श्री. जम्नादास यांनी मांडला व दा. वि. गोखले यांनी त्यास अनुमोदन दिल्यावर लालजी पेंडसे यांनी अशा आशयाची उपसूचना मांडली कीं, 'स्वराज्य' याऐवजीं 'स्वातंत्र्य' हा शब्द घालावा व 'लुबाडल्या गेलेल्या जनतेच्या सामर्थ्याने साम्राज्यशाही उलथून टाकून स्वातंत्र्य मिळवावें'. भाषण करतांना पूर्ण स्वराज्य ही भाषारचना दोषयुक्त आहे व खरें स्वातंत्र्य मिळविण्यास वरील मार्गाशिवाय दुसरा मार्ग नाही याचें त्यांनी आवेशयुक्त विवेचन केलें. श्री. खरे व शहा यांनी त्यांस पाठिंबा दिला. श्री. वाघमारे यांनी उपसूचनेस विरोध केल्यानंतर श्री. जम्नादास

यांनी तपशीलवार उत्तर दिलें. त्यांत मुख्यतः राष्ट्रीय वृत्ति हीच वर्गकलहापेक्षा अधिक प्रभावी असते असे त्यांनी सांगितले. नंतर मतास घालतां उपसूचना नापास होऊन मूळ ठराव बहुमताने मंजूर झाला.

सभासदांचे वय १८ असावें कीं २१ असावें याबद्दल बरीच चर्चा झाली. बॅ. आगरवाले व डॉ. सावरकर यांनी १८ या वयोमर्यादेस पाठिंबा दिला. श्री. भोपटकर यांनी विरोध केला. शेवटीं २१ वर्षांचीच मर्यादा असावी असें ठरले.

### राष्ट्रीय सभेमधील पक्ष

मध्यवर्ती मंडळाच्या व अधिकारी मंडळांच्या निवडणुकींचा ५ वा व ६ वा ठराव एकमताने पसार झाल्यावर हा पक्ष राष्ट्रीय सभेच्या अंतर्गत असावा की नाही याबद्दल बरीच चर्चा व वादविवाद झाला. मुबईचे श्री. एम. एम. वर्दे, उमरावतीचे श्री बाबासाहेब खापर्डे, एरंडोलचे श्री. जोशी व दामले यांनी हा पक्ष राष्ट्रीय सभेतील पक्ष नसावा असे आग्रहाने प्रतिपादन केले. श्री. जोशी यांनी आपले मत या ठरावास विरुद्ध असलें तरी शिस्तीकरिता आपण प्रत्यक्ष उलट मत देणार नाही असे सांगितले. मुंबईचे प्रि. फडणीस यांनी मूळ ठरावास पुष्टि दिली. श्री. न. चिं. केळकर यांनी ठरावाचें समर्थन करतांना सांगितले कीं, हा ठराव तडजोडीच्या स्वरूपाचा आहे. तेव्हा यांत सर्वांचें थोडें थोडें साधलें आहे



बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषदेचे अध्यक्ष

**श्रीयुत रामराव देशमुख**

व थोडें बिनसलें आहे. तर्क बरोबर असला तरी व्यवहारावर भर देणें जरूरीचें आहे. ठरावाच्या तपशीलाचें विवरण करून पाहतां या ठरावानें उजव्या व डाव्या म्हणजे विरोधी व अनुकूल अशा दोनहि प्रकारच्या जिवलग स्नेही मंडळींचें समाधान होईल असा हा ठराव आहे. राजकीय पक्षोपपक्ष अविभक्त कुटुंबाप्रमाणें असल्यामुळें तर्कशास्त्रापेक्षा प्रत्यक्ष व्यवहारावरच नजर ठेवणें चागलें. नव्या पक्षाच्या सभासदांपैकीं ९० टक्के सभासद राष्ट्रीय सभेचे सभासद आहेत व तसे ते राहतीलहि. मग बाकीच्या १० टक्के लोकांनी राष्ट्रीय सभेच्या शाखा पुनरुज्जीवित झाल्यावर सभासद होण्याचें कां नाकारावें, असे त्यांनी विचारलें. हेंही ज्यांना नापसंत असेल त्यांनी त्या वेळीं वाटल्यास हा पक्ष सोडून जाणें रास्त होईल श्री. जम्नादास यांनीहि ठरावाचा खुलासा केल्यानंतर तो मतास टाकतां बहुमतानें मंजूर झाला.

## अधिकाराच्या जागा

अधिकाराच्या जागा या पक्षाच्या सभासदांनी काबीज कराव्या या अर्थाच्या ठरावाला श्री. कर्णिक व डॉ. शेट्टी यांनी विरोध केल्यानंतर ठराव बहुमतानें पसार झाला. ९ व १० हे ठराव अध्यक्षांनी मांडले व ते पसार झाल्यानंतर मताधिकार २१ वर्षांवरील प्रत्येक मनुष्यास असावा असा ठराव श्री. जम्नादास यांनी मांडला. त्याला अकोल्याचे पेंडसे यांनी उपसूचना आणली कीं, जहागीरदार, इनामदार वगैरे भांडवलवाले व पांचशें रुपयांवर उत्पन्न असलेले लोक यांना मताधिकार नसावा! डॉ. शेट्टी यांनी त्यांस अनुमोदन दिलें. शेवटीं मूळ ठराव बहुमतानें पसार झाला. १२, १३, १४ व १५ हे ठराव पसार झाल्यानंतर धार्मिक बाबींत सरकारी ढवळाढवळ नसावी अशा १६ व्या ठरावाची चर्चा सुरू झाली. श्री. जोशी यांनी ठरावांतील शेवटचा भाग गाळण्यांत यावा अशी उपसूचना मांडली. श्री. मेनन व श्री. वैद्य यांनीहि ठरावास विरोध केला. श्री. दादासाहेब करंदीकर, श्री. ऐनापुरे, श्री. डावरे यांनी ठरावाच्या समर्थनपर जोराचीं भाषणें केलीं. अखेरीस उपसूचना नापास होऊन ठराव बहुमतानें मंजूर झाला. यानंतर ३२ नंबरपर्यंतचे ठराव वादविवाद न होतां पसार झाले.

## डायरेक्ट ॲक्शन

नंतर या पक्षास 'डायरेक्ट ॲक्शन' चें तत्त्व मान्य असून हा पक्ष ठरवील त्या वेळीं व त्या कार्यापुरता त्याचा उपयोग करण्यांत येईल, असा ठराव श्री. जम्नादास यांनी मांडला. श्री. कर्णिक यांनी आणली उपसूचना मांडतांना त्यांच्या सोशालिस्ट पक्षातर्फे म्हणून एक पत्रक वाचलें! या पत्रकांत आक्षेपार्ह भाग आल्यामुळें अध्यक्षांनी पत्रक वाचण्यास बंदी केली. श्री. पेंडसे यांनी कर्णिक यांस दुजोरा देतांना त्यांच्या दृष्टीनें कायदेभंग कां फसला त्याचें विवेचन केलें. श्री. जम्नादास यांनी उत्तर दिल्यावर उपसूचना नामंजूर होऊन मूळ ठराव मंजूर झाला.

## आभार-प्रदर्शन

अशा रीतीनें ठरावांच्या चर्चेचें काम संपल्यानंतर अध्यक्षांनी समारोप केला. पक्षस्थापना झाली तरी पक्षाचें यश प्रत्यक्ष कामावर अवलंबून असल्यामुळें आपल्यांत बारीकसारीक मुद्द्यांवर कितीहि मतभेद असले तरी जुळतें घेऊन पक्षाचें कार्य यशोदायी होण्यास सर्वांनी एकदिलानें मदत करावी, असें त्यांनी सांगितलें. श्री. जम्नादास यांनी अध्यक्षांचे व प्रतिनिधींचे आभार मानले. डॉ. वेलकर यांनी त्यांस दुजोरा दिला. श्री. सावरकर यांनी स्वयंसेवक पथक, पदें म्हणणाऱ्या मुली, सरदारगृहाचे मालक, ब्राह्मणसभेचे चालक वगैरेंचे आभार मानल्यावर पक्षाचे एकंदर ७५६ सभासद झाल्याचें जाहीर केलें. श्री. दादासाहेब करंदीकर व श्री. मुळे यांनी स्वागत कमिटीचे आभार मानले. शेवटीं राष्ट्रगीत झाल्यावर 'वंदे मातरम्'च्या जयघोषांत सभा विसर्जन करण्यांत आली.

पहिल्या वर्षाच्या मध्यवर्ती मंडळावर पुढील सद्गृहस्थांची निवड झाली आहेः—

## मध्यवर्ति-मंडळ

**अध्यक्ष**—श्री. नरसिंह चिंतामण केळकर, पुणें.

**कार्याध्यक्ष**—बॅ. रामराव देशमुख, उमरावती.

**मुख्य चिटणीस**—बॅ. जम्नादास माधवजी मेथा, मुंबई.

**मदतचिटणीस**—श्री. रा. ना. मंडलीक, मुंबई; श्री. रा. शं. राजवाडे, सोलापूर, महाराष्ट्र, श्री. ना. रा. बामणगावकर उमरावती, वऱ्हाड, श्री. गो. अ. ओगले, नागपूर, मराठी मध्यप्रांत.

**खजिनदार**—श्री. दा. वि. गोखले, पुणें, श्री. ग. वि. साळवेकर, मुंबई.

## सभासद

महाराष्ट्रांतील ११ जिल्ह्यांतर्फे निवडावयाचे ३३ सभासद, मराठी मध्यप्रांतांतील पांच जिल्ह्यांतर्फे निवडावयाचे १५ सभासद, वऱ्हाडांतील चार जिल्ह्यांतर्फे निवडावयाचे १२ सभासद, द. महाराष्ट्रांतील संस्थानांतर्फे निवडावयाचे ७ सभासद,

प्रत्येक जिल्ह्यांनें आपले प्रतिनिधि निवडावयाचे आहेत.

कार्यकारी मंडळ

अध्यक्ष—श्री. न. चिं. केळकर, पुणें.
कार्याध्यक्ष—बॅ. रामराव देशमुख, उमरावती.
जनरल सेक्रेटरी—बॅ. जम्नादास मेहता, मुंबई.

दुय्यम चिटणीस
१ श्री. रा. ना. मंडलीक, पेण.
२ ,, रा. शं. राजवाडे,
३ ,, ना. रा. बामणगांवकर,
४ ,, गो. अ. ओगले.

खजिनदार—श्री. दा. वि. गोखले, पुणें, श्री. ग. वि. साळवेकर, मुंबई.

सभासद—श्री. एम. एन्. तळपदे, श्री. ना. दा. सावरकर मुंबई. श्री. ल. ब. भोपटकर, श्री. पी. जी. जोशी महाराष्ट्र, श्री. न. शि. परांजपे; श्री. बळवंत रावजी देशमुख, मध्यप्रांत, श्री. एम. के. चांदे; श्री. एस. व्ही. केळकर वऱ्हाड. श्री. वि. कृ. जोशी, सांगली. श्री. व्ही. आर. तुळजापूरकर, हैद्राबाद.

# बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषदेचें अधिवेशन

## अध्यक्ष बॅ. रामराव देशमुख यांचें भाषण

### परिषदेचें प्रातिनिधिक स्वरूप

"आजच्या परिषदेच्या अध्यक्षस्थानीं नेमणूक होणें हा मी बहुमान समजतों. तो मान आपण दिल्याबद्दल मी फार आभारी आहें. सध्याच्या राजकीय परिस्थितीच्या दृष्टीने ही वेळ फार आणीबाणीची आहे. तथापि आजपर्यंत घडलेल्या राजकीय बनावाचा विचार करण्याला योग्य वेळ हीच आहे. प्रस्तुत परिषदेवर अनेकांकडून टीका होत आहे. जे आपणास कट्टे राष्ट्रीय सभावाले समजतात अशा कांहीं गृहस्थांनी ही परिषद खरी प्रातिनिधिक नव्हे असें म्हणण्यास सुरुवात केली आहे. ही परिषद सदर गृहस्थांच्या मताची निदर्शक नव्हे असें ते म्हणत असतील, तर त्यांचें म्हणणे अगदी बरोबर आहे. आम्ही त्या लोकांचे प्रतिनिधि नाहीं हें मला कबूल आहे. जे स्वतंत्रपणें विचार करूं शकतात, अशा लोकांना जमविणे व त्यांची संघटना करणे हा आमचा प्रस्तुत परिषद भरविण्यातील हेतु आहे. एखाद्या गोष्टीस मान्यता मिळण्यापूर्वी तिची टवाळी करण्यांत येत असते असें म. गांधी एकदा म्हणाले होते ते खरें आहे. आम्ही नवीन पक्ष स्थापन करतों याचा अर्थ पूर्वीच्या लोकांनी केलेली देशसेवा आम्हांस मान्य नाहीं असा नव्हे.

### लोकशाहीला घातक तत्त्वें

म. गांधी व राष्ट्रीय सभा यांचा स्वार्थत्याग फार मोठा आहे. परंतु त्यावरून गेल्या दहा वर्षांत त्यांनी योजलेले उपाय व केलेलीं कृत्यें अगदी तंतोतंत बरोबर होतीं असे मानतां येणार नाहीं. अंधश्रद्धा व गूढ तत्त्वज्ञान यांचा उपयोग इतरत्र असला तरी तीं लोकशाहीचा प्राण हरण करणारीं आहेत हें कबूल केलेंच पाहिजे. या पक्षाच्या वतीने मी एवढें आश्वासन देऊं शकतों कीं, हा पक्ष इतर पक्षांशीं, ज्या बाबतींत जुळेल त्या बाबतींत, सहकार्य करण्यास तयार राहील. नवीन पक्ष कोणाला विरोध करणार नाहीं, पण शक्य तितकें सहकार्यच करील. देशांत पद्धतशीर लोकशाहीची स्थापना करणें हा आमच्या पक्षाचा एक हेतु आहे. हा मार्ग लांबणीचा व मंद गतीचा आहे, परंतु त्यास इलाज नाहीं. तो तसा असायचाच. गेल्या कांहीं वर्षांत आपणास जादूगिरीची व नाटकी आविर्भावाची संवय लागली असल्यामुळे सनदशीर मार्गाने व्हावयाच्या मंद प्रगतीची किंमत वाटेनाशी झाली आहे. तथापि ही चूक होय हें विसरतां कामा नये.

### देशांतील तीन वर्ग

कायद्याने स्थापन झालेल्या प्रातिनिधिक संस्थांना वर्ज्य मानण्याचा प्रघात गेल्या दहाबारा वर्षांत पडला आहे. परंतु त्यांतहि मौज अशी कीं, त्यांना कनिष्ठ प्रतीच्या प्रातिनिधिक संस्थांशीं संबंध ठेवलेला चालतो, पण प्रांतिक व मध्यवर्ती कायदे-मंडळें यांजबरोबर संबंध ठेवलेला चालत नाहीं. कोणतेंहि कार्य साधावयाचें झाल्यास तें अडवणुकीच्या मार्गाने साधण्याचा प्रयत्न करावयाचा असा त्या संप्रदायाचा दंडक आहे. दुसरे कित्येक लोक असे आहेत कीं त्यांना अडवणुकीच्या मार्गाचें ( डायरेक्ट ॲक्शनचें ) कायमचें वावडें आहे. या दोन प्रवृत्तीच्या लोकांच्या दरम्यान एक वर्ग आहे. प्रातिनिधिक संस्थांचा उपयोग करून राष्ट्रीय सामर्थ्य वृद्धिंगत करावें आणि त्या संस्थाबाहेर चालू असलेल्या अडवणुकीच्या

चळवळींतहि भाग घ्यावा असें तारतम्यमूलक धोरण या वर्गानें आंखलेलें आहे. त्यांतच आमच्या पक्षाची गणना केली पाहिजे.

### स्वराज्याची शाळा

कौन्सिलांपासून फायदा नाही, इतकेंच नव्हे तर, तें एक निर्भेळ संकट आहे असें कट्टर कॉंग्रेसवाले म्हणतात. पण याच लोकांनी आपल्या अडचणींचा कौन्सिलांमार्फत परिहार करून घेण्याचा प्रयत्न केला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मंदिरप्रवेश बिलें हा त्याचाच एक मासला आहे. अशा रीतीनें अप्रत्यक्षपणें पण नाखुषीनें जर कौन्सिलांचा फायदा घ्यावयाचा तर कौन्सिलांची उपयुक्तता कबूल करून तीं काबीज करण्याची लाज काय म्हणून बाळगावी ? परंतु कौन्सिलांत गेले कीं स्वराज्यप्राप्ति झाली असें हा पक्ष मुळींच मानीत नाही. लोकशाही स्वराज्याची कला शिकण्याची कौन्सिलें ही शाळा आहे या दृष्टीनें त्यांचें महत्त्व आहे. आम्हांला कौन्सिलांत आमचें बहुमत करतां येत नाही म्हणून आम्ही कौन्सिलांवर बहिष्कार घालीत आलों असलों, तर त्यायोगानें लोकसत्ताक संस्था चालविण्यास आम्ही असमर्थ आहों असेंच सिद्ध होत नाही काय? लोकसत्ताक संस्था हा स्वराज्याचा पाया आहे. त्या संस्था जे चालवितील तेच स्वराज्याला लायक ठरतील.

### निष्फळ स्वार्थत्याग काय कामाचा ?

स्वराज्य, स्वातंत्र्य हे शब्द फार मोहक आहेत. ते शब्द आपण उच्चारतों तेव्हा त्यांच्या अर्थाकडे दुर्लक्ष करतों. स्वराज्य, स्वातंत्र्य हे शब्द उच्चारल्यानें आपल्या रोजच्या व्यावहारिक अडचणी दूर होणार नाहीत. लोकांपाशीं सतत नुसता स्वार्थत्याग मागण्यांतहि कांही अर्थ नाही. स्वार्थत्यागाचा प्रत्यक्ष फायदा दिसला पाहिजे. तो फायदा दिसला तर जनतेचा स्वार्थत्यागाच्या कृत्यावरील विश्वास वाढतो व त्याच्या आशा वाढीस लागतात. ज्या साधनानें सामान्य माणसाचें पाऊल प्रगतीच्या मार्गावर पुढे पडत राहील, तेच साधन साध्य हस्तगत करून देऊं शकतें. खरोखर एकाच पक्षाच्या नेतृत्वाखाली एकाच मनोवृत्तीचीं माणसें कौन्सिलाच्या आंत आणि बाहेर काम करीत असतांना झगडा कां उत्पन्न व्हावा हें मला कळत नाही. असा एक काळ होता कीं, जेव्हा कायदेमंडळें हीं 'मायामंदिरें' आहेत असें म्हटलें जाई आणि त्यांत प्रवेश करणाऱ्या माणसाचा तीं अधःपात करतात असें सांगितलें जाई. आश्चर्य वाटतें कीं, हिंदुस्थानांतील माणसें अधःपाताला इतक्या सुलभतेने पात्र व्हावीत. आणि जर ती स्थिति सत्य असेल, तर त्या पतनशील माणसांचा उपयोग दुसऱ्या कार्मीहि फारसा होईल असें नाही. अशा पतनशील व देश-बुडव्या माणसांचें यथार्थ दर्शन कायदेमंडळें अल्पमोलानें जनतेला घडवितात हा तरी त्यांचा गुण खास आहे. नाही तर कौन्सिलाबाहेरील अधिक जबाबदारीच्या व स्वार्थत्यागाच्या म्हटल्या जाणाऱ्या कार्यांत त्यांनी देशाला विकून टाकलें असतें !

### आयर्लंडचा कित्ता

आज कॉंग्रेसची स्थिति काय आहे ? अनत्याचारी चढाईचा कार्यक्रम तिनें आंखलेला आहे आणि तेथेंच ती थांबली आहे. मध्या कॉंग्रेस ही सांचलेल्या विचारांचें एक डबकें बनलेलें आहे. प्रगतीचा प्रवाह आटलेला आहे. आयर्लंडांत डी व्हॅलेरानें राजनिष्ठेच्या शपथेचें निराकरण केलें, व्यापारी युद्ध पुकारलें आणि इतरहि अनेक कृत्यें केलीं. तीं सारीं त्यांना राज्ययंत्रावर बहिष्कार टाकून साधतां आलीं असतीं काय ? आयर्लंडपेक्षा आपली राज्यघटना अपुरी आहे हें खरें. पण तिच्यांतील अपुरेपणा काढून टाकण्यासाठी कौन्सिलांच्या आंत आणि बाहेर सारखा प्रतिकार करीत राहणें जरूर आहे. अशा आणीबाणीच्या वेळीं कौन्सिलांवर बहिष्कार घालणें म्हणजे सर्वसत्ताधीश गव्हर्नराला रान मोकळें करून देण्यासारखेंच आहे.

### पोलाद व आत्मा

एखाद्या विशिष्ट अन्यायाचें निवारण करण्याचें साधन म्हणून अडवणुकीची चळवळ आमच्या कार्यक्रमांत सामील करण्यांत येईल. पण त्याच साधनानें, समग्र राजसत्ता बदलणें किंवा क्रांति घडवून आणणें हें कल्पनेच्या बाहेरचें वाटतें. पोलाद आणि आत्मा ( म्हणजे शस्त्र व शील ) यांची झटापट करण्याचा अजब प्रयोग आपण नुकताच संपविलेला आहे. या झटापटींत 'अमर' असणारा आत्मा क्षीण होऊन गेलेला दिसतो. याचें कारण आत्मा ज्या शरीराचे द्वारें व्यापार करतो, त्या शरीराचें सामर्थ्य मर्यादित असतें. पोलादी सत्तेचा माणूस हा आत्मिक सामर्थ्याच्या माणसाचा पाडाव करूं शकतो. म्हणून पोलादाला पोलादच भेटविलें पाहिजे. सत्तेचें पोलादी यंत्र हस्तगत करूनच जर्मनी, इटाली, तुर्कस्थान आणि आयर्लंड या देशांनी यश कमावलें. त्या देशांत उभय पक्ष सशस्त्र होते; पण तशी स्थिति हिंदुस्थानांत नाही हा भेद लक्षांत घेतला पाहिजे. हिंदुस्थानामध्यें तशी वेळ यावयाला अजून फार अवकाश आहे. तोंपर्यंत जो पक्ष आपलें बळ, आपली शिस्त आणि आपली संघटना वाढवील, तोच यश प्राप्त करून घेईल.

### घातक सुधारणा

नव्या सुधारणांमधील संयुक्त राज्यघटना ही अत्यंत घातक व राष्ट्रैक्यावर घाव घालणारी आहे. प्रत्येक प्रांताला संयुक्त घटनेंतून फुटून निघण्याचा हक्क राहील आणि ब्रिटिश साम्राज्यांतील एक एक घटक जसा अलग झाला; तसा एक एक प्रांत सुटा होण्याचा संभव आहे. त्यांतले त्यांत, मुसलमानांच्या वृत्तीमुळे ही भीति अधिकच साधार वाटते. संस्थानिकांचा समावेश ही तर मोठीच आपत्ति आहे. या सर्व गोष्टींचा विचार करून आपल्याला मध्यवर्ती सत्ता कशी हवी, प्रांतांची पुनर्घटना कोणत्या तत्त्वावर व्हावी, इत्यादि प्रश्न आपण सोडविले पाहिजेत. जातवारीच्या तत्त्वावर नोकऱ्या मागण्याचा भयंकर अट्टाहास मुसलमानांनी चालविला आहे, त्याचा निषेध होण जरूर आहे. 'पब्लिक सर्व्हिस कमिशनने' उघड परीक्षा घेऊन नोकऱ्या याव्या व नोकऱ्यांचे लठ्ठ पगार पुष्कळच छाटावे हें इष्ट होय.

### ऐक्याचे वैरी

नवीन राज्यघटना ही जगांतील कोणत्याहि देशांतल्यापेक्षा अत्यंत वाईट आहे. मध्यवर्ती सत्तेमध्ये संस्थानिक व जातवाले यांचा पायबंद घातलेला आहे आणि चार प्रांतांत तर मुसलमानांचें अधिराज्य सुरू होणार आहे. जातिनिर्णय म्हणजे सरकाराच्या केवळ भेदनीतीचें पिल्लूं होय. मुसलमानांना हिंदुस्थानापेक्षा इस्लाम प्यारा आहे आणि लोकशाहीपेक्षा मुस्लीम राज्याला ते श्रेष्ठ समजतात. हिंदुस्थानांत मुसलमानांची सत्ता चालू करण्याचा हट्ट ते चालवितील तर त्याना एवढ्या जोराचा प्रतिकार होईल कीं, त्याचा धक्का हिंदुस्थानालाच काय, पण ब्रिटिश साम्राज्यालाहि बसल्याविना राहणार नाही. असें असूनहि सरकारानें त्यांना स्वतंत्र मतदारसंघ देऊन भेदाचें मूळ रोवलें आहे ! मुसलमानांनी जातीय दृष्टि टाकून राष्ट्रीय दृष्टि अंगीकारल्याशिवाय ऐक्य निर्माण होणें अशक्य आहे, हें ऐक्यपरिषदांवरून स्पष्ट झालें आहे. 'कोणतीहि किंमत देऊन ऐक्य करा' असा उपदेश करणाऱ्या माणसाइतका ऐक्याचा दुसरा कोणीहि वैरी नाही असे मुसोलिनीनें नुकतेंच म्हटलें त्याची सत्यता या ऐक्यपरिषदांवरून पटते.

### नव्या पक्षाचें कार्यक्षेत्र

आपला पक्ष हा पुढे 'अखिल भारतीय' स्वरूपाचा व्हावयाचा आहे हें ध्यानांत घेऊन आपण आपला कार्यक्रम आंखला पाहिजे. आपल्याला उद्योगधंद्यांच्या उत्कर्षाकडे लक्ष द्यावयाचें आहे; पण त्याबरोबरच त्यामुळें शेतीवर अनिष्ट परिणाम न होईल अशी खबरदारी घेतली पाहिजे. तसेंच स्वदेशी कारखान्यांना संरक्षण मिळालें तर त्यामुळें गिऱ्हाईकावर जादा बोजा बसणार नाही अशी दक्षता आपण बाळगली पाहिजे. त्यासाठी जरूर तर कारखान्यावर सरकारी नियंत्रणहि घालावें असें माझें मत आहे.

शेवटीं मला असें सांगावयाचें आहे कीं, हा पक्ष महाराष्ट्रांत निघत असला तरी तो महाराष्ट्रापुरताच नाहीं किंवा सर्व राष्ट्रांतील बुद्धिमत्ता कमी लेखून महाराष्ट्राचें शहाणपण प्रदर्शित करण्याचा त्याचा हेतु नाही. राजकारणाची कोंडी फोडून स्वतंत्र विचार व संघटना करण्याचा उपक्रम कोठे तरी व्हावयास हवा होता; तो या पक्षानें सुरू केला आहे आणि तो सर्व हिंदुस्थानभर पसरेल अशी उमेद आहे."

# हिंदुस्थानांतील विद्यापीठें

( ले.—एक यमुनावासी )

हिंदुस्थानांत विद्यापीठांची स्थापना सन १८५७ सालीं झाली. एकाच वर्षांत तीन विद्यापीठें निघालीं. पुढे पंचवीस वर्षांनी म्हणजे इ.स. १८८२ मध्ये लाहोर येथे पंजाब विद्यापीठ आणि नंतर १८८७ सालांत अलाहाबाद येथे अलाहाबाद-विद्यापीठ अशीं आणखी दोन पीठें निघालीं.

मध्यप्रांत, वऱ्हाड, मध्यहिंदुस्थान आणि राजपुतान्यांतील कांही भाग ह्यांची स्थिति विचित्रच असे. त्यांना मुंबई, कलकत्ता आणि अलाहाबाद हीं तीनहि ठिकाणें सारख्याच अंतरावर असल्यानें शाळाधिकारी आपले विद्यार्थी कोणच्या तरी विद्यापीठाच्या परीक्षेस पाठवीत असत. ह्या प्रांतांतील कॉलेजाची संख्या एका हाताच्या बोटांनी मोजतां येई. विद्यार्थी अमुकच ठिकाणीं परीक्षेस पाठवावेत असा निर्बंध नव्हता. एकाच गांवांत एकापेक्षा अधिक हायस्कुलें असलीं तर एक हायस्कूल परीक्षेकरिता अलाहाबादेस जाई तर दुसरें हायस्कूल कलकत्ता विद्यापीठाशीं जोडलेलें असे. एवढेच नव्हे तर कधी कधी एकाच शाळेतील कांही विद्यार्थी एका विद्यापीठाच्या परीक्षेस

गेल्याचीं आणि बाकीचे दुसऱ्याच विद्यापीठाच्या परीक्षेस गेल्याचीं उदाहरणें दृष्टीस पडत. परंतु ही स्थिति १९०४ चा जो युनिव्हर्सिटी कायदा झाला त्यामुळे बदलली.

राजपुताना, मध्य हिंदुस्थान, मध्यप्रांत आणि वऱ्हाड ह्या प्रांतांतील ह्या शाळा आणि कॉलेजें अलाहाबाद युनिव्हर्सिटीशीं जोडलीं गेलीं. सन १९१२ पासून मध्यप्रांत आणि बिहार हे दोन स्वतंत्र प्रांत झाल्यामुळे आणि त्याच वर्षी युनिव्हर्सिट्यांचे केवळ परीक्षा घेण्याचेंच काम नसून शिक्षण देण्याचेंहि काम आहे हे तत्त्व अंमलांत आल्यामुळे त्या प्रांतांना आपल्या युनिव्हर्सिटया असाव्या असें साहजिकच वाटूं लागलें; हिंदूंनी काशी येथे आणि मुसलमानांनी अलीगड येथे स्वतंत्र विद्यापीठें स्थापण्याचा उपक्रम चालविला; त्रावणकोर, म्हैसूर, निजाम-हैद्राबाद अशा मोठ्या संस्थानांना युनिव्हर्सिट्या काढण्याची इच्छा झाली. पुढे कलकत्ता युनिव्हर्सिटी कमिशनचा रिपोर्ट १९१९सालीं बाहेर पडल्यावर ही इच्छा सर्व हिंदुस्थानभर इतकी बळावली कीं, सन १९१६ पासून १९२९ पर्यंत च्या तेरा वर्षांच्या काळांत तेरा नव्या युनिव्हर्सिट्या हिंदुस्थानात निघाल्या.

कलकत्ता युनिव्हर्सिटीपासून पाटणा, रंगून आणि डाक्का या तीन युनिव्हर्सिट्या वेगळ्या निघाल्या. मद्रासमधून दक्षिण हैद्राबाद, म्हैसूर, आंध्र आणि अन्नामली अशा चार युनिव्हर्सिट्या बाहेर पडल्या. पंजाबपासून दिल्ली वेगळी झाली, आणि अलाहाबादेशीं असलेला संबंध झुगारून मध्यप्रांताने नागपूर येथे स्वतंत्र युनिव्हर्सिटी थाटली. मध्यप्रांतांत त्या वेळीं फक्त जबलपूर आणि नागपूर या दोनच ठिकाणीं कॉलेजे होतीं. पुढे लवकरच वऱ्हाडकरिता उमरावतीस कॉलेज काढण्यांत आलें. ह्या कॉलेजांच्या अल्पसंख्येमुळे मध्यप्रांताला स्वतंत्र युनिव्हर्सिटीची आवश्यकता आहे किंवा नाही हा एक चर्चेचा वादग्रस्त विषय होऊन बसला होता. सॅडलर कमिशन हें वास्तविक कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या सुधारणेकरिता बसले होतें. तथापि त्या रिपोर्टांत केलेल्या शिफारशींचा अंमल, तंतोतंत नाही तरी बऱ्याच अंशीं संयुक्त प्रांतावर झालेला दिसतो. कारण त्या एकाच प्रांतांत अलीगड, बनारस आणि लखनौ अशा तीन नव्या शिक्षण देणाऱ्या युनिव्हर्सिट्या निघाल्या. एवढेच नव्हे तर, अलाहाबाद युनिव्हर्सिटीने युनिव्हर्सिटीचें शिक्षण देण्याचें जें मुख्य कर्तव्य तें अंगीकारून ती शिक्षण देणारी युनिव्हर्सिटी बनली आणि तिला जोडून असलेल्या इतर कॉलेजांच्या परीक्षा घेण्याचें आणि त्यांची पाहाणी करून त्यावर देखरेख करण्याचे काम आग्रा येथे नवीन (Affiliating) युनिव्हर्सिटी स्थापून तिच्याकडे सोंपविलें गेलें. हायस्कूल आणि इंटरमीजिएट ह्या परीक्षांकरिता निराळे बोर्ड स्थापून त्यांचा युनिव्हर्सिटीशीं असलेला संबंध तोडण्यांत आला. राजपुताना आणि मध्यहिंदुस्थान यांना स्वतंत्र युनिव्हर्सिट्या अद्यापि लाभल्या नाहीत. परंतु त्यांच्याकरिता अजमेर येथे हायस्कूल आणि इंटरमीजिएट परीक्षांसाठी बोर्ड झालें आहे आणि कॉलेजच्या पुढील परीक्षांकरिता ( बी. ए., बी. एससी, एम. ए., एम. एससी, एलएल. बी, इ. ) आग्रा युनिव्हर्सिटीशीं असलेला संबंध कायम ठेविला आहे.

त्रावणकोर, कोचीन, त्रिचनापल्ली आणि तिरूपती ह्या ठिकाणी युनिव्हर्सिट्या करण्याचें घाटत आहे. अमृतसर येथे असलेल्या खालसा कॉलेजाचें रूपांतर शीख युनिव्हर्सिटींत व्हावें अशी शीख लोकांनी मागणी केली होती. त्यावर त्यावेळचे पंजाबचे गव्हर्नर (सर मालकम हेले) यांनी अमृतसरकरिता स्वतंत्र युनिव्हर्सिटी करण्याचें घाटत आहे असें सांगितलें होतें. हल्लींहि त्या संबंधांत प्रयत्न चालू आहे. वायव्य सरहद्दीवर नवा प्रांत झाल्याने पेशावर येथे नवी युनिव्हर्सिटी निघूं पाहत आहे.

कोल्हापूर येथे झालेल्या महाराष्ट्र साहित्य सभेंत महाराष्ट्र युनिव्हर्सिटी काढण्याबद्दलचा ठराव पास झाला. मागे एकदा पुण्यास भाषण करीत असतां एका मुसलमान अधिकाऱ्याने महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या आवश्यकतेसंबंधी मत प्रस्थापित केलें. ह्या कामाची योजना कशी करावयाची ह्याचा मसुदा करण्याकरिता एक कमिटी नेमली गेली होती. परंतु कांहीं ' नृपांगणगत ' जातवेड्या लोकांनी प्रादेशिक विद्यापीठांना खो दिला. तथापि लोकांनी एकजूट केल्यास व ' हे पुणेकर, हे मुंबईकर आणि हे कोल्हापूरकर ' असे क्षुद्र भेदभाव मातृभाषेच्या पवित्र मंदिरांत न आणल्यास महाराष्ट्र विद्यापीठ लवकरच मूर्तस्वरूपास येईल यांत संदेह नाही.

# साखरेची गिरणी कशी असावी ?

( ले.—श्री. अनन्त वासुदेव परांजपे, मेकॅनिकल एंजिनियर, वॉकर रोड नागपूर. )

साखरेचे धंद्यास सरकाराने संरक्षण दिल्यापासून बिहार व ओरिसा प्रांतांत बरेच साखरेचे कारखाने झाले आहेत व होत आहेत. ते सर्व मोठ्या प्रमाणावर म्हणजे दरदिवशीं ३०० पासून १००० टन ऊंस पिळणारे आहेत. हे सर्व कारखाने एकाच धर्तीवर आहेत. फक्त यंत्रें तयार करणारे निराळे! त्यांत नवीन सुधारणा कांहीं नाहीं.

आता महाराष्ट्रांतहि साखरेचे कारखाने होण्यास सुरुवात झाली आहे. तरी त्यांत कांहीं सुधारणा असावी व ती सुधारणा नव्या पद्धतीवर व्हावी. कारण यंत्रकलेंत जग फार झपाट्यानें पुढे जात आहे. अशा वेळीं आपण कोणत्याहि तऱ्हेनें मागें नसावें. नाहीं तर, कापडाच्या गिरण्यांची सध्या जी गति झाली आहे तशीच साखरेच्या कारखान्यांचीहि होईल.

कापडाच्या गिरण्यांतून यंत्रांवरील कसर, नफा म्हणून खाऊन टाकली व बाबा आदमच्या यंत्रांवर जपानाशीं टक्कर देतां येत नाहीं म्हणून गिरणीवाले संरक्षण मागत बसले. इतकेंहि करून शेवटीं या सर्व गिरण्यांची यंत्रसामुग्री कचऱ्यांत टाकावी लागेल ती निराळीच!

असो. आजकाल विजेच्या शक्तीवर मोठ्या प्रमाणावर कारखाने चालू आहेत व ते फार चांगले किफायतशीर होत आहेत. त्याप्रमाणेच साखरेचा कारखानाहि विजेवर चालूं शकेल व असे कारखाने दुसऱ्या देशांत चालूं आहेत.

साखरेच्या कारखान्यास आठपासून १६ एंजिनें व बारापासून १५ पंप लागतात. यांपैकीं कांहीं पंप वाफेवर चालणारे असतात, व कांहीं पट्ट्याने म्हणजे एंजिनाचे शक्तीवर चालतात. सेंट्रिफ्यूगल मशिनहि पट्ट्याने चालतात. आता हाच कारखाना विजेवर चालविल्यास एंजिनें व त्यांस लागणारे स्टीम व एक्झॉस्ट पाइप व लॅगिंगचा खर्च, पाणी गोठण्यामुळे होणारें नुकसान, सिलिंडर व ल्युब्रिकेटिंग ऑईल यांचा खर्च चालविण्यास लागणारे पट्टे, पुल्या, शाफ्टिंग बेअरिंग व ते सर्व नीट सुरळीत ठेवण्यास लागणारा खर्च या सर्वांची बचत होते. स्टीम पाइप व एंजिनें कमी झाल्यामुळे कारखान्यांत उष्णता कमी होते. कारखान्यास जागाहि थोडी लागते व त्यामुळे इमारतीचा खर्चहि कमी येतो.

## कारखाना विजेवर कसा चालवावा ?

कारखान्यास लागणाऱ्या शक्ती (पॉवर) करिता टर्बाईन व त्यास जोडून डी. सी. करंटचा जनरेटर बसवावा व ते इतक्या पॉवरचे असावे कीं, कारखान्यास पुरून दोनशे ब्रेक हॉर्सपॉवर जास्त असावी. कारण नोकरांना लागणारे दिवे, गिरणीला लागणारा पाण्याचा पंप व स्प्रे पंपाकरिता लागणारी पॉवर यांतूनच मिळाली पाहिजे. त्याकरिता निराळें ऑइल एंजिन अगर बॉयलर व स्टीम एंजिन बसविण्याचा प्रसंग येऊं नये. कारण खर्च विनाकारण वाढेल. टर्बाईन कॉन्डेन्सिंग असावें व एक पिलट एंजिन व त्याच्या शॅफ्टला जोडलेला डी. सी. जनरेटर मोठ्या जनरेटरच्या व्होल्टेजचा असावा. ज्या वेळेस टर्बाईन चालू नसेल तेव्हा पिलट एंजिन चालवून, पाण्याचा पंप, कारखान्याचे व बाहेरील दिवे, व टर्बाईन चालू करण्याचे वेळेस त्याचे कॉन्डेन्सरमध्ये निर्वात पोकळी करणारा एअर पंप चालवून मग टर्बाईन चालू झाल्यावर एअर पंप व त्यावर चालू असलेलीं इतर यंत्रें, दिवे वगैरे टर्बाईनचे जनरेटरने चालवून पिलट एंजिन बंद करावयाचे असतें. हें पिलट एंजिन शंभर किलोवॅटचा जनरेटर चालविणारें म्हणजे जवळ जवळ १३० ब्रेक हॉर्सपावरचे असावे. टर्बाईनला सिलिंडर ऑईलचा खर्च मुळीच नाहीं. फक्त त्यास ल्युब्रिकेटिंग ऑईल लागतें व तो खर्च दुसऱ्या एंजिनाच्या पन्नास टक्केहि लागणार नाहीं. कारण त्याचे तेल वारंवार उपयोगांत येतें.

## शुगर हाऊसची मशिनरी कशी चालवावी ?

केनकॅरीअरपासून सर्व यंत्रें मोटारीने चालवितां येतील. केनकशर व मिलिंग मशिन्स यांस दोन मोटारी लागतील. या मोटारी उलटसुलट चालवितां येणाऱ्या असाव्यात व तशाच कमीजास्त चालीनेंहि चालवितां याव्या व म्हणूनच डी. सी. करंट उपयोगांत आणावा. या मोटारी ३०० पासून ३५० हॉर्सपावरच्या लागतात. केनकॅरीअरकरिता एक मोटार, केनकटरला एक, मेगास (चिपाडे) कॅरिअरला एक अशा प्रत्येकीं निराळ्या मोटारी बसवाव्या लागतील. सेंट्रिफ्यूगल पंप जितके असतील त्या प्रत्येकास एक एक मोटार जोडलेली असावी. रेसीप्रोटिंग पंप म्हणजे मागेंपुढे किंवा वरखाली चालणारे पंप. ते वर्मगियर

किंवा रिडयूस गियरने चालवितां येतील. सेंट्रिफ्यूगल मशिनलाहि प्रत्येकीं एकेक मोटार असावी. कनव्यू-अरची मोटारहि वर्मगियर अथवा रिडयुस गियरने चालवावी. एअर कॉम्प्रेसर ( ट्यूब वेलला पाणी काढण्यास लागतो ) व व्हॅक्युअम पंप हेहि वर्मगियर अथवा रिडयुस गियरने चालवितां येतील अथवा हळू चालणाऱ्या मोटारीने स्ट्रोक लहान करून चालवितां येतील. या सर्व मोटरींना लागणारी किंमत एंजिन्सना लागणाऱ्या किंमतीपेक्षा बरीच कमी पडेल व यांना ल्युब्रिकेटिंग ऑइलहि कमी लागेल. मोटारीमध्ये आठ दिवसांतून एकदा तेल भरावयाचें असतं व तेंहि कमी झालें असेल तेवढेंच. तसेंच मोटारींना लागणाऱ्या वायरिंगची किंमत स्टीम पाइपिंगचे खर्चाचे मानाने फक्त वीस टक्केच लागेल म्हणजे ऐंशी टक्के पाइपिंगची बचत होईल.

आता स्टीम टर्बाईन कान्डेसिंग असल्यामुळे त्याची एक्झॉस्टेड स्टीम एव्हापोरेटर्स ज्यूस क्लॅरिफिकेशन व सायरप क्लॅरिफिकेशन क्युअरिंग प्लँटच्या कामीं येत नाहीं. पण ती स्टीम कंडेन्सरमध्ये जाऊन व्हॅक्युअममुळे मिळणारा पॉवरचा फायदा तितकाच पॉवर वाढविण्याकडे होतो. टर्बाईनला स्टीम देणारे बॉयलर वॉटर ट्यूब म्हणजे बॅक कॉक विलकॉकचे धर्तीवर असावें, कारण त्यांत चिपाडें ( मेगास ) जाळण्याची फरनेस करण्यास ठीक पडतें. हे बॉयलर ३००–३५० प्रेशरचे असावे. कारण त्यामुळे वाफेची बरीच काटकसर होते.

बॉयलरला सुपरहीटर असावेत व यांची स्टीम फक्त टर्बाईनकरिताच उपयोगांत आणावी; बॉयलरला पाणी देण्याकरिता दोन मोठ्या वर्दिंगटन अगर त्या प्रकारचे डॉंकी पंप असावेत. चिमणी मोठी उंच व लोखंडी असावी; कारण चिपाडें जाळलीं तर त्यांना जळण्यास हवेचा झोत जास्त लागतो. शुगर रूममधील इव्हॅपोरेटर्स ज्यूस क्लॅरिफिकेशन प्लँट, सायरप क्लॅरिफिकेशन व क्युअरिंग प्लॅन्ट यांना लागणारी स्टीम बॉयलरमधूनच घ्यावी लागेल व त्यावर एक प्रेशर रिडयूसिंग व्हाल्व्ह बसवून जरूर त्या प्रेशरला जमवून घेणें अवश्य असतें. पण आजकाल वरील प्लॅन्ट्स हायप्रेशर स्टीमवर चालणारे तयार होऊं लागले आहेत व ते क्रप कंपनी व स्कोटा कंपनी बनवितात. हॉट कन्डेन्स्ड वॉटर फक्त बॉयलर फीड किंवा वॉशिंग या दोनच कामाकरिता उपयोगी पडतें.

आजकाल हिंदुस्थानांत होणारी साखर फक्त ५५ टक्के पांढरी असते. परदेशी साखर अधिक पांढरी असते याचें कारण हें कीं, साखर जास्तींत जास्त पांढरी उतरावी म्हणून परदेशी साखरेच्या कारखानदारांनी एकंदर रीतीमध्ये बराच फरक केला आहे व तो फरक विशेषतः क्युअरिंग प्लॅन्टमध्ये केला आहे. तसेंच ते गंधक व चुन्याची निवळी साखर स्वच्छ करण्याकडे वापरतात व त्याचें प्रमाणहि आपल्याकडे वापरतात त्यापेक्षां दुपटीने अधिक आहे. जाव्हाचे सध्याचे रीतींमध्ये दोन वेळ सल्फेशन करून उंसाचा सर्व रस फिल्टरमधून काढतात. तसेंच जाव्हाचे साखरेचे कारखान्यास लागणारी ज्यूस व सायरप क्लॅरिफिकेशन प्लॅन्ट व क्युअरिंग प्लॅन्ट यांचें प्रमाण हिंदुस्थानात चालू असलेल्यापेक्षा जास्त असतें. आपले कारखानदार किंमतीचे बचतीकडे लक्ष देऊन साखर साधारण पांढरी निघाली म्हणजे पुरे असें म्हणून स्वस्त मशिनरीची निवड करितात. कारण या साखरेच्या व्यापाऱ्यांस माहीत आहे कीं, साखऱ्या दळून व त्याम गुळाचें पाणी देऊन काळी झालेली साखर 'मिर्झापुरी साखर जास्त गोड' म्हणून विकली जाते व त्यावर व्यापारी फायदाहि जास्त मारतात तर, या कारखान्याच्या साखरेस गिऱ्हाईक कां मिळूं नये. पण या सर्वांचा परिणाम संरक्षण निघून चुरस सुरू होईल तेव्हा कारखानदारांस भोगावा लागेल व मग हे सर्व कारखाने डबघाईस येण्याचा प्रसंग येईल; हें सर्व लक्षांत घेऊन साखरेचे कारखादारांनी आतापासूनच चांगली मशीनरी घेऊन १०० टक्के पांढरी साखर आपणांस करतां येईल अशी खबरदारी घ्यावी. तसेंच कारखान्यास लागणारें मनुष्यबळहि कमी लागेल अशा तऱ्हेची मशिनरी आणवावी. मनुष्यबळ कमी लागणें हें यंत्रांवर अवलंबून आहे व हे सर्व विजेवर चालणाऱ्या कारखान्यांत होऊं शकेल. कारण मोटारी वगैरे ज्याचा तो मशिनवाला चालवून घेईल. त्यास निराळीं माणसें ठेवण्याची गरज नाही व त्यामुळे ५० टक्के मजुरी कमी लागेल.

प्रत्येक कारखानदाराने ज्या उंसांत साखरेचें प्रमाण जास्त आहे अशाच जातीच्या उसाची लागवड करावी. जाव्हातले कारखानदार उंसाच्या किंमतीकडे लक्ष देण्यापेक्षां आपणांस चांगली साखर कमी किंमतींत कशी देतां येईल इकडे विशेष लक्ष पुरवितात. कारण त्यांस गिऱ्हाइकी मिळवावयाची असते.

मी शुगर केमिस्ट नसल्यामुळे साखरेसंबंधाने मशीनरीच्या दृष्टीनेच अवश्य तितकी माहिती दिली आहे. जास्त माहिती पाहिजे असल्यास केमिस्टकडून मिळविणे बरें. साखरेच्या कारखान्यासंबंधाने कोणास कांही जास्त माहिती पाहिजे असल्यास मी ती अवश्य पुरवीन इतकें सांगून मी हा लेख संपवितो.

# मद्रासमध्ये स्वराज्यपक्षाची स्थापना

रविवार ता. २९ रोजीं, तामील नाडू, आंध्र व मद्रास शहर येथील पुढाऱ्यांची सभा 'कॉंग्रेस हौस' मध्ये श्री. सत्यमूर्ति याच्या अध्यक्षतेखाली भरली होती. या सभेस मद्रास प्रांताच्यावरील तीन विभागांतून अनेक पुढारी व कार्यकर्ते आले होते. सभेंत बराच विचारविनिमय व चर्चा होऊन 'कॉंग्रेस स्वराज्य पार्टी' या नांवाच्या एका स्वतंत्र पक्षाची संस्थापना करण्यांत आली.

## स्वराज्यपक्षाचा जाहीरनामा

या पक्षाच्या घटनेसंबंधी पुढाऱ्यांनी एक जाहिर पत्रक काढले असून त्यांत असें म्हटलें आहे कीं, 'हिंदुस्थानाला पूर्ण स्वराज्य मिळण्याची दिवसें-दिवस अत्यंत जरूरी वाटत आहे. असें स्वराज्य मिळालें तरच राष्ट्र या नात्याने हिंदुस्थानाचा दर्जा वाढेल व त्याला सुखसमृद्धीचे दिवस दिसतील. परंतु, पांढऱ्या खलित्यांत ग्रथित केलेली योजना व जाति-विशिष्ट निर्णय याकडे लक्षपूर्वक पाहिल्यास हिंदुस्थानांत ब्रिटिश नोकरशाहीची व या नोकरशाहीचीच तळी उचलणाऱ्या जातवाल्या पुढाऱ्यांची अधिकाराच्या सिंहासनावर स्थापना करण्याचा ब्रिटिश सरकाराचा उद्देश स्पष्ट दिसतो. अशा परिस्थितींत जनतेचें सामर्थ्य वाढविण्याकरिता, लोकांना या सर्व गोष्टी समजावून देऊन, त्यांची संघटना केली पाहिजे व त्यांच्या सामर्थ्याच्या जोरावर पूर्ण स्वराज्य संपादन केलें पाहिजे. हें कार्य घडवून आणण्याकरिता एक लढाऊ कार्यक्रम आंखून त्या कार्यक्रमास देशांतील मतदारांचा पाठिंबा मिळविला तर आज सरकारास जातवाल्या लोकांकडून जो पाठिंबा मिळत आहे तो नाहीसा होऊन राष्ट्रीय चळवळीला जोर येईल. राष्ट्रीय सभेचा विधायक कार्यक्रम कायदेमंडळातून व बाहेरूनहि अमलांत आणणें जरूरीचें आहे. पण यापेक्षाहि जमीनधारा, बेकारी, शेतकरी व कामकरी यांची आर्थिक दुःस्थिति व देशांतील दारिद्र्य या निकडीच्या प्रश्नाची तजवीज लावणें अधिक जरूरीचें आहे. याबद्दलच्या लोकांच्या तक्रारी दूर करण्याकरिता जी चळवळ होईल त्यांतूनच स्वराज्य संपादनाचा मार्ग निघेल. याकरिता या पक्षाची आज संस्थापना होत आहे.

### घटना

पूर्ण स्वराज्याचें ध्येय सर्व न्याय्य व शांतताप्रधान मार्गांनी मिळविणें हें राष्ट्रीय सभेचे ध्येय ज्यांना मान्य असेल त्यांनाच फक्त या पक्षाचे सभासद होता येईल. या पक्षाच्या कार्यक्रमांत पुढील गोष्टींचा अंतर्भाव होईल.

### कार्यक्रम

१ पांढऱ्या खलित्यातील योजना व जातिविषयक निर्णय याविरुद्ध इतर पक्षांच्या सहकार्याने देशभर प्रचंड चळवळ करणे.

२ मूलभूत हक्कासंबंधी कराचीस भरलेल्या राष्ट्रीय सभेंत जो ठराव झाला त्या ठरावानुसार जोराचा प्रचार करणें.

३ हिंदुस्थानाच्या पूर्ण स्वराज्याच्या मागणीचा उच्चार हजारों सभा भरवून करणें.

४ आपल्या मागण्यांची अमलबजावणी झालीच पाहिजे असा आग्रह जनतेंत व विशेषतः मतदारांत उत्पन्न करावा म्हणून त्यांना राजकीय शिक्षण देणें.

५ लोकांच्या अडचणी दूर करण्याकरिता व विशेषतः जमीनधारा, बेकारी, मजूरांची दुःस्थिति व शेतकी, उद्योगधंदे व आर्थिक कायदे या योगाने होणारी देशाची लूट बंद करण्याकरिता संघटना करणें.

६ राष्ट्रीय सभेचा विधायक कार्यक्रम, विशेषतः खादी प्रसार व अस्पृश्यतानिवारण या बाबतींत कार्य करणें.

७ शेतकरी व कामकरी यांची संघटना करून त्यांना आपल्या मागण्या मान्य करून घेण्याच्या प्रयत्नांत मदत करणें व स्वराज्याच्या लढ्यांत त्यांना स्थान मिळवून देणें.

८ देशांत होणाऱ्या सार्वजनिक खर्चामध्ये मोठी कपात करणें.

९ राष्ट्रीय वृत्तीच्या जोरावर जातवारींशी सामना देणें.

१० युद्धाच्या सर्व क्षेत्रांवर स्वराज्याचा लढा लढत राहणे.

पूर्ण स्वराज्य ज्यांत नाही अशी कोणतीहि घटना या पक्षास मान्य होणें शक्य नाही. परंतु सरकाराने उत्पन्न केलेल्या प्रत्येक संस्थेंत शिरून त्या संस्थेचा उपयोग देशांतील जनतेला व विशेषतः मतदारांना सुशिक्षित करण्याच्या कामीं केला जाईल व अशा रीतीने पूर्ण स्वराज्याच्या मागणीचें ध्येय गांठण्याचा प्रयत्न हा पक्ष करील.

### ताबडतोबीचीं कामें

पक्षाचे सभासद पुढील कामांस ताबडतोब सुरुवात करतील.

१ पक्षाचे सभासद करणें.

२ पांढऱ्या खलित्यांतील योजना व जातिनिर्णय यांविरुद्ध जोराचा व देशभर असा प्रचार करणें.

३ खादी व स्वदेशी.

४ अस्पृश्यतानिवारण.

५ जातीजातींतील ऐक्य प्रस्थापन करणें.

६ मतदारांना त्यांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्यें यांचें शिक्षण देणें.

### नियम

राष्ट्रीय सभेचें ध्येय व या पक्षाचा कार्यक्रम मान्य असणाऱ्या कोणाहि १८ वर्षे वयाच्या व्यक्तीस या पक्षाचा सभासद होतां येईल.

या पक्षाचे एक अध्यक्ष दोन अगर अधिक उपाध्यक्ष, दोन चिटणीस व दोन खजिनदार व एक कार्यकारी मंडळ नेमलें जाईल.

कोणाला सभासद करून घ्यावयाचें हें ठरविण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाकडे राहील व त्याचा निर्णय अखेरचा समजला जाईल.

देशी भाषेंत व जरूर तर इंग्रजी व हिंदुस्थानी परिषेंत पत्रकें काढून व जाहीर सभा भरवून पक्षाचा प्रचार करण्याचा पक्षाचा उद्देश आहे. या कामाकरिता पक्ष आपला निधी उभारील.

### पहिले अधिकारी

**अध्यक्ष**—श्री. एस. सत्यमूर्ति

**उपाध्यक्ष**—श्री. के. सत्यनारायण चौधरी, श्री. मथुरंग मुदलीयार व श्री. के. भाष्यम आयंगार.

**चिटणीस**—श्री. आर. चंद्रमौळी, श्री. नायकर व श्री. गोपाळ कृष्ण.

**खजिनदार**—श्री. भक्तवत्सल मुदलियार.

# लोकशाहीपक्ष व शेतकऱ्यांचे प्रश्न

लोकशाही स्वराज्य पक्षाच्या मुंबई येथे भरलेल्या परिषदेंत पसार झालेल्या ठरावांकडे नीट बारकाईने पाहिल्यास त्या पक्षानें आंखलेले धोरण किती व्यापक व दूरदृष्टीचें आहे हें सहज लक्षांत येतें. पूर्ण स्वराज्य हे हिंदुस्थानाचें राजकीय ध्येय असल्याचें राष्ट्रीय सभेने यापूर्वीच निश्चित केलें आहे व या पक्षाने त्याच ध्येयास आपली मान्यता दिली असून ते साध्य करण्याच्या न्याय्य व शांतताप्रधान अशा राष्ट्रीय सभेने ठरविलेल्या मार्गालाहि या पक्षाने संमति दिली आहे. मुख्य प्रश्न हा आहे कीं हे ध्येय गांठावयाचें कसें? स्वातंत्र्य मिळविण्याचीं साधनें व राजमार्ग निश्चित व नेमका असा कोणीहि घालून दिलेला नाही. पण राष्ट्रांत, स्वातंत्र्य संस्थापन करण्याचें सामर्थ्य उत्पन्न झाल्याशिवाय मात्र तें कधीहि मिळणार नाही हीहि गोष्ट तितकीच खरी आहे. प्रत्यक्ष आखाड्यांत उतरून कुस्तीस प्रारंभ करण्यापूर्वी शरीर सततच्या मेहनतीने जोरदार तयार करावें लागतें व पुढे प्रत्यक्ष कुस्तींतच अनुभवाने ज्ञान मिळून पहिलवान तयार होतो व तो सर्वत्र विजयी होतो. लोकशाही स्वराज्य पक्षाचाहि दंडक असाच दिसतो कीं प्रथम जनतेला तिच्या राजकीय हक्कांचें ज्ञान सांगोपांग देऊन मग त्या हक्कांकरिता केल्या जाणाऱ्या लढ्यांतूनच स्वराज्याच्या लढ्याची तयारी करावयाची व शेवटीं याच लढ्याच्या मार्गाने स्वावलंबनाच्या जोरावर स्वातंत्र्य मिळवावयाचें.

लोकशाही पक्षाचा वर उल्लेखिलेला दंडक हाच त्या पक्षाच्या कार्यक्रमाचा आत्मा आहे. देशांत अफाट पसरलेल्या शेतकरी वर्गाची आजची आर्थिक दुःस्थिति इतकी भयंकर आहे कीं दारिद्र्याच्या उतारावरील ही घसरगुंडी थांबविली नाही तर शेतकरी रसातळास पोंचल्याशिवाय राहणार नाही. हिंदुस्थानातील शेतकरी म्हणजेच हिंदीराष्ट्र होय म्हणूनच लोकशाही पक्षाने ही घसरगुंडी थांबविण्याचा प्रयत्न करण्याचा चंग बांधला आहे. शेतकऱ्याचा कर्जबाजारीपणा नष्ट करून तो स्वतःच्या पायावर उभा राहिल्याशिवाय त्याची आर्थिक स्थिति सुधारणें शक्य नाही. पण शेतकऱ्याच्या डोक्यावरील कर्जाची धोंड एवढी मोटी आहे कीं, ती खाली उतरण्याचें काम राष्ट्रांतलि सरकाराशिवाय इतर कोणीहि कोणत्याहि उपायानें करूं शकणार नाही. श्री. जम्नादास मेथा यांनी स्वागताध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत यासंबधाची एक योजना स्थूलमानाने मांडली असून तिचा तपशीलवार विचार करण्याकरिता परिषदेने ती कार्यकारी मंडळाकडे पाठविली आहे. श्री. जम्नादास यांची योजना अशी आहे कीं शेतकऱ्यांचे सर्व कर्ज सरकारानें स्वतःचेंच असें राष्ट्रीय कर्ज समजून स्वतःच्या अंगावर घ्यावें. सावकारांना मोबदला म्हणून ठराविक व्याजाच्या दराचे सरकारी कर्जरोखे दिले म्हणजे त्यांचें समाधान होईल. सावकारांस देऊं केलेल्या व्याजापैकीं कांही भाग शेतकऱ्यास द्यावा लागेल. पण तो इतका थोडा व हलका आहे कीं शेतकऱ्यालाहि त्यांचें ओझें वाटणार नाही.

या कर्जरोख्यांवरील बाकीच्या व्याजाची व्यवस्था इतर सरकारी कर्जाप्रमाणेंच होईल. योजनेची ही नुसती रूपरेषा असल्यानें तिचें यथार्थ स्वरूप पूर्णपणें आताच लक्षांत येणार नाही हे खरें. तथापि लोकशाही पक्षाच्या कार्यक्रमाचा रोख कोणत्या दिशेकडे आहे हें यावरून सहज समजण्यासारखें आहे. ज्या देशांतील बहुसंख्य लोक शेतकरी आहेत त्या देशाचें सरकारहि बहुसंख्य अशा शेतकरी वर्गाचेंच हिताहित पहाणारें असलें पाहिजे. या सिद्धांताची जाणीव शेतकऱ्यांत आज असावी तितकी नाही. ही जाणीव उत्पन्न करून देऊन शेतकऱ्यांना राजकीय लढ्याविषयीं आपलेपणा वाटेल असा प्रयत्न हा पक्ष करीत राहील. एवढे एकच कार्य यशस्वी रीतीनें केलें गेलें तरी या पक्षानें मोठीच कामगिरी केली असें होणार आहे.

याशिवाय शेतकरी व सामान्य जनता यांच्यावरील अप्रत्यक्ष कराचा बोजा कमी करणें, कमी व्याजाच्या दरानें चालचलाऊ कामाकरिता सवलतीनें कर्जें मिळण्याची सोय करण्याकरितां शेतकरी बँका काढणें वगैरे विधायक कार्यक्रम लोकशाही पक्षानें आंखला आहेच. सध्या प्रचलित असलेली जमीनधाऱ्याची पद्धति व तिचीं मूलभूत तत्त्वें यांची अमूलाग्र छाननी करून तिच्यांत सुधारणा करणें अत्यंत आवश्यक झालें आहे हे गेल्या तीस चाळीस वर्षांचा या बाबतीचा इतिहास स्पष्टपणें दाखवितो. जमिनीचें मालक सरकार व शेतकरी हा फक्त त्या जमिनीवर राबणारा मजूर ही कल्पना सध्याच्या जमीनधाऱ्याच्या कायद्याच्या मुळाशीं असल्यामुळे शेतकऱ्यास त्यांच्या श्रमाची मजुरी मिळाली म्हणजे पुरे असें त्या खात्यांतील सरकारी अधिकारी मानतात. ही कल्पना मुळांतच चूक व अशास्त्रीय आहे. लोकशाही पक्षाच्या कार्यक्रमांत या प्रश्नाला महत्त्वाचें स्थान दिलें असून तो प्रश्न व्यवहारदृष्ट्या सुटेपर्यंत शेतसाऱ्यांत शेकडा तीस टक्के कपात करावी असें या पक्षाचें म्हणणें आहे व ही कपात घडवून आणण्याचा हा पक्ष प्रयत्न करील. जमीन करणारा शेतकरी मालकी हक्काबद्दल जो खंड देतो त्या खंडांतहि कपात करून जमिनीचे मालक व कसणारा शेतकरी यांचे संबंध निश्चित व न्याय्य अशा तत्त्वावर ठरवून देण्याचा या पक्षाचा विचार आहे असें दिसतें. शेतकऱ्यांचे सर्व प्रश्न शेतकऱ्यांना हितावह होतील अशा पद्धतीनें सोडविण्याचा कार्यक्रम या पक्षानें आंखला असल्यामुळे बहुजन समाजांत या पक्षासंबंधानें एक प्रकारचें सक्रिय औत्सुक्य उत्पन्न होईल यांत शंका नाही.

राष्ट्राच्या जिवंतपणाचें मोजमाप त्या राष्ट्रांतील संघटित संस्थांच्या कार्यानें व उद्योगानेंच करतां येतें असा लोकशाही पक्षाचा विश्वास असल्यानें अशा नव्या संस्था स्थापाव्या व आज अस्तित्वांत असलेल्या संस्था ताब्यांत घेऊन त्यांच्या द्वारें कार्यनिष्पत्ति करून घ्यावी असें या पक्षाचें धोरण आंखण्यांत आलें असल्याचें दिसतें. राजकीय हक्कांची खरी जाणीव ते हक्क वापरतांना जितकी होते तितकी त्याच्या तात्त्विक चर्चेनें होणें शक्य नसतें. या कारणामुळेच ग्रामपंचायतीसारख्या संस्था स्थापन करणें व त्या चालविणें या गोष्टीवर देखील या पक्षानें आपला कटाक्ष ठेवला आहे. स्वराज्याची संस्थापना करण्याची महत्त्वाकांक्षा धरून उद्योग करणाऱ्या लोकांना साध्या ग्रामसंस्था चालविण्याची बुद्धि व सामर्थ्य नको काय? ग्रामसंस्था व त्या तऱ्हेच्या इतर संस्था यांत मिळणाऱ्या स्वावलंबी शिक्षणाचें महत्व जितकें पटावें तितकें लोकांना अद्याप पटलेलें दिसत नाही. पण ही मोठी चूक होत आहे. ही चूक दुरुस्त करून स्वावलंबी, सामर्थ्यवान व स्वराज्य संपादनाचें ध्येय डोळ्यांपुढे ठेवणाऱ्या संस्थांचें जाळें सर्व देशभर पसरण्याचा उद्योग करण्याचें लोकशाही पक्षानें ठरविलें आहे. लोकशाही पक्षाच्या इतर कार्यक्रमाची छाननी यापुढे करण्यांत येईल. त्यावरून त्या पक्षाचें सर्वंकषत्वच टीकाकारांसहि पटल्याशिवाय राहणार नाही हें निश्चित आहे.

# स्फुट सूचना

१ मुंबईचे गव्हर्नर आपली पंचवार्षिक कारकीर्द संपवून या महिन्यांत हिंदुस्थानाला रामराम ठोकण्यापूर्वी आपल्या प्रांतांतील व आपल्या हुकमतीखालील पाटलांचे दरबार भरवून त्यांच्याकडून 'जुलमाचा रामराम' करवून घेत आहेत. प्रस्तुत गव्हर्नराचे अमदानींत दडपशाहीशिवाय दुसरी कांहीच देणगी जनतेच्या पदरांत न पडल्यामुळे त्यांच्या कारकीर्दीविषयी जनतेंत विमनस्कता पसरलेली आहे. ती बेळगांव व सुरत येथे दबून राहिली असली तरी अहमदनगर येथे तिने आपले स्वरूप प्रगट केलें. तेथे नऊ जिल्ह्यांतील पाटलांना सरकारी हुकमाने बोलावून आणून त्यांचा दरबार ता. ३१ आक्टोबर रोजीं भरविण्यांत आला होता. त्या वेळीं पाटलांनी गव्हर्नरांना मानपत्र अर्पण केलें असलें, तरी त्यांना काळीं निशाणें दाखविण्यांत येऊन नगरच्या कांही नागरिकांनी त्या समारंभाला अपशकुनच केला. त्याच प्रमाणे तेथे निषेधाची सभा भरून शेतकऱ्यांच्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडण्यांत आली. अशा विरोधाचा ध्वनि गव्हर्नरांच्या कानीं पडूं नये म्हणून रा. पु. ह. पटवर्धनप्रभृति वीसपंचवीस गृहस्थांना पकडण्यांतहि आलें होतें.

---

२ अशी नाकेबंदी करून पडद्याआड भरविलेल्या पाटलांच्या परिषदेंत गव्हर्नरांनी ग्रामोद्धारासाठी गुरुदान तरी कोणते दिलें ! 'पाटलांना शिक्षण देणारी संस्था प्रत्येक जिल्ह्याला स्थापन करा' अशी मागणी मानपत्रांत केली असता, ग्रामोद्धाराचें कंकण हातीं बांधलेल्या गव्हर्नरांनी आपला नेहमींचा नन्नाचा पाढा म्हटला व आर्थिक तुटीचें तुणतुणें वाजविलें ! पाटलांच्या मुलांना उच्च इंग्रजी शिक्षण मिळावें ही मागणीहि अशीच फेटाळण्यांत आली, लष्करी खात्यांतील नोकऱ्या मुंबईसरकारच्या हातांत नसतात असें सांगून त्यांनी त्यासंबंधाच्या मागणीला वाटाण्याच्या अक्षता लावल्या. पाटलांना परवान्याविना तलवार-बंदूक बाळगतां यावी ही सौम्य, न्याय्य व बिन खर्चाची मागणीहि गव्हर्नरांना मान्य करतां आली नाही. मग त्यांची पगारवाढीची मागणी नाकारण्यांत आली असल्यास त्यांत नवल काय ? १९३१ सालीं पाटलांच्या पगाराचा विचार करण्यांत आला व पाटलांना दिवसभर काम नसतें म्हणून त्यांचा मुशाहिरा अपुरा नाही असा निकाल तेव्हाच लागल्याचें 'शुभवर्तमान' गव्हर्नरांनी आपल्या पाटील श्रोत्यांना ऐकविलें. ज्या गव्हर्नरांच्या कारकीर्दीत लोकांचें पाऊल शिक्षणाच्या क्षेत्रांत पुढे पडलें नाही, त्यांच्या कर्जाचा बोजा हलका केला गेला नाही आणि लष्करी शिक्षणाचें द्वारहि खुलें केलें गेलें नाही त्या गव्हर्नरांना मामुली दरबार आणि औपचारिक मानपत्रें यांच्यावरच आपली तहान भागवावी लागल्यास त्यांत नवल तें काय ?

---

३ नुसते दौरे काढून किंवा ग्रामोद्धाराची महती गाऊन ग्रामोद्धार होत नसतो. हातीं सत्ता व तिचा योग्य उपयोग करण्याची सदिच्छा असली म्हणजेच कार्य होऊं शकतें, ही गोष्ट पंजाब सरकाराने सिद्ध केलेली आहे. तेथील ग्रामोद्धार चळवळीचे एक पुरस्कर्ते मि. ब्रेन यांनी या कामीं चांगलें लक्ष घातलें असून ग्रामोद्धार यशस्वी कसा होतो हे त्यांनी एका विशिष्ट टापूंत सप्रयोग सिद्ध करून दाखविलें; तेव्हा सर्व प्रांतभर ही चळवळ करावी अशी पंजाब सरकाराने योजना करून गेल्या महिन्याच्या १७व्या तारखेस सर्व खात्यांच्या प्रमुखांची एक बैठक भरविली. ग्रामोद्धाराच्या चळवळीशीं सर्व खात्यांचा संबंध येत असल्याने सर्वांनी सहकार्य केलें तरच ही गोष्ट सुकर व सुलभ होणार आहे. जनता या कार्याला फारशी उत्सुक नाही; परंतु सरकारानें अंग झाडून कामास सुरुवात केली तर लोकहि सरकाराशीं या बाबतींत सहकार्य करतात असा अनुभव आहे. पंजाब सरकारला असाच अनुभव आल्याने त्यांनी आपलें कार्यक्षेत्र पंजाबभर वाढविण्याचें योजिलें आहे. उत्तम व सुधारलेलें बींबियाणें पुरविणें, गांवांत उत्तम वळू ठेवणें, घरगुती धंद्यांची वाढ करून गांवांतील लोकांचा रिकामा वेळ व साधनें कामीं लावणें, स्वच्छता व आरोग्य राखणें, वैद्यकी मदत पुरविणें, दाया व सुईणी तयार करणें, प्राथमिक शिक्षण देणें इत्यादि गोष्टी या कार्यक्रमांत येतात. व पंजाबमध्ये त्यांचा फायदाहि दिसून आला आहे. मुंबई सरकारानें पंजाबच्या धोरणाला अनुसरून प्रत्यक्ष कांहीं कामास सुरुवात केली तरच त्यात लोकांचे थोडेफार हित साधणार आहे. नुसत्या दरबारांनी काय होणार ?

# सरकारचा गर्हणीय नकार

॥ मरणान्तानि वैराणि निवृत्तं नः प्रयोजनम् ॥ ॥ क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ॥

वा. रा. ६—१०९—२६

' मरणान्तानि वैराणि ' असाच सामान्यतः सज्जनांचा दंडक असतो. मनुष्य एकदा इहलोक सोडून यमराजाच्या दरबारांत दाखल झाला म्हणजे त्याच्या हाडवैऱ्याचीहि त्याच्या विषयींची वृत्ति बदलते. दुर्जन देखील आपलें पूर्वीचें वैर विसरून जाऊन मृताविषयींचा आपल्या अंतरंगांतला आदर प्रकट करितात, मग रामचंद्रासारखे धीरोदात्त अवतारी पुरुष आपला शत्रुभाव बाजूस सारून मृत प्रतिपक्षीयाविषयी यथोचित आदर व्यक्त करतील यांत नवल काय? आणि म्हणूनच वरील अवतरणांत उध्दृत केलेलें श्रीरामचंद्राच्या तोंडचें वचन आज हजारों वर्षे आर्य जनतेला किंत्यादाखल होऊन बसलें आहे. राम-रावणाच्या घनघोर युद्धांत रावणाचा अंत होऊन युद्धाची परिसमाप्ति झाली आणि रावणाच्या देहाला अंत्यसंस्कार करण्याची वेळ येऊन ठेपली, त्या वेळीं स्वतःवरून जगाची पारख करणाऱ्या कित्येक क्षुद्र मनोवृत्तीच्या राक्षसांच्या मनांत अशी शंका उद्भवली कीं, विजयी रामचंद्राकडून पराजित पक्षाचा अग्रणी जो रावण त्याच्या और्ध्वदेहिक संस्कारालाहि कदाचित् हरकत घेण्यांत येईल. या भीतीने रामाजवळ तशी अनुज्ञा मागण्याला कोणीच धजावेना. परंतु बिभीषणाला रामचंद्रजींच्या उदात्तपणाविषयीं भरंवसा वाटत असल्याने त्याने जिवाचा धडा करून एकदाची परवानगी विचारली व त्याबरोबर रामानें तात्काळ उत्तर दिलें कीं, रावणाच्या मृत्यूबरोबरच आमचें कार्य संपलें आणि वैरभावाचाहि शेवट झाला; आता तो जसा तुझा बंधु तसाच माझाहि बंधु आहे असें समज आणि त्याचा दहनसंस्कार निर्धास्तपणें तुझ्या इच्छेनुसार कर.

रामायणांतील या प्रसंगाचें आज स्मरण होण्याला कारण कै. विठ्ठलभाई पटेलांच्या दहनविधीसंबंधाने मुंबई सरकारने प्रकट केलेली क्षुद्र मनोवृत्तीच होय. विठ्ठलभाईचें जिनीव्हाहून रवाना झालेलें शव आणखी दोन दिवसांनी मुंबईच्या बंदरांत येऊन दाखल होणार आहे. त्या वेळीं त्या शवाचा दहनसंस्कार विधिपूर्वक व सन्मानपूर्वक केला जावा याविषयीं मुंबईकरांनी अत्यंत आस्थेने तजवीज चालविली आहे. त्या तजविजींत अशी एक कल्पना निघाली कीं, विठ्ठलभाईच्या अंत्यविधीसाठी त्यांचे बंधु सरदार वल्लभभाई यांची मुक्तता करण्याविषयी सरकारकडे विनंति करावी. या कल्पनेला अनुलक्षून कित्येकांनी तशी विनंतिहि केली आहे; पण त्या विनंतीला निश्चित नकार मिळणार हें दिसतेंच आहे. तथापि त्या संबंधांत आम्ही सरकारला कांही सांगूं इच्छीत नाही. कारण राजकीय कैद्यांची मुक्तता करणें न करणें ही गोष्ट सर्वस्वीं सरकारच्या मनोभावनेवर अवलंबून आहे आणि सरकारकडून आम्ही असल्या उदात्त मनोभावनेची अपेक्षा करीत नाही.

परंतु विठ्ठलभाईच्या शवाला जो अग्निसंस्कार करावयाचा तो सोनापुरांतल्या संकुचित जागेंत न करतां चौपाटीसारख्या विस्तीर्ण पटांगणांत केला जावा अशी मुंबईकरांची तीव्र इच्छा आहे व तदनुसार म्युनिसिपल कमिशनरकडे रीतसर मागणीहि करण्यांत आली होती. सरकारच्या संमतिविना म्यु. कमिशनरलाहि तशी परवानगी देतां येत नसल्यामुळे म्यु. कमिशनरने सदर प्रकरण मुंबई सरकाराकडे मंजुरीकरितां रवाना केलें आणि त्यावर मुंबई सरकारने गर्हणीय असा नकार दिला आहे! विठ्ठलभाईचें शव मुंबई बंदरांत आल्यानंतर तेथून तन्निमित्त प्रचंड मिरवणूक निघेल आणि त्या मिरवणुकींत लाखों नागरिक भाग घेतील. या लक्षावधि लोकांचा सोनापूरच्या नेहमीच्या दहन—क्षेत्राच्या संकुचित जागेंत

समावेश होणें अगदींच अशक्य असल्यामुळे केवळ सोईच्या दृष्टीनेच चौपाटीच्या जागेची मागणी करण्यांत आली होती तिला बिनदिक्कत नकार देऊन सरकारनें लाखो लोकांच्या मनोभावना कायमच्या दुखविल्या आहेत.

असा नकार देण्याला तसेंच काही सबळ कारण असतें तर ती गोष्ट अलाहिदा होती; परंतु चौपाटीवर दहनक्रिया करूं देण्याला हरकत कां घेण्यांत आली याविषयी मुंबई सरकारने पुळचट कारणें दर्शवून जी कैफीयत प्रसिद्ध केली आहे ती वाचली म्हणजे मुंबई सरकारच्या सल्लागार मंडळांत सारासार विचाराचा आणि दूरदृष्टीचा कोणीच मुत्सद्दी राहिला नाही असेंच निश्चितपणें वाटूं लागतें. कै. लो. टिळकांच्या मरणसमयीं अशी परवानगी दिली गेली असून आताच ती कां नाकारण्यात येत आहे, याचें कारण सरकारतर्फे असें सांगण्यांत येत आहे कीं, टिळकांच्या वेळीं तशी परवानगी दिली तिचेंच परिणाम हल्ली भोगावे लागत आहेत, त्यांत हा आणखी दुसरा दाखला झाला म्हणजे तर हा कायमचाच पायंडा पडेल आणि मग अशी परवानगी केव्हा द्यावी व केव्हा नाकारावी तें ठरविणें हा एक भानगडीचा प्रश्न होऊन बसेल !

या विचारसरणींतले सगळेच दुवे कच्चे आहेत. टिळकांच्या वेळीं अशी सवलत दिली गेली हीच घोडचूक झाली असा या कैफीयतींतून ध्वनि निघत आहे ! जणूं काय मुंबई सरकारच्या त्या वेळच्या सल्लागारांत कोणीच दूरदर्शी मुत्सद्दी नव्हता आणि हल्लीच्या सल्लागार मंडळांतच काय ते सगळे बृहस्पती भरलेले आहेत !! पण हा शुद्ध भ्रम आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, टिळकांच्या अंत्यविधीकरिता चौपाटीवरच्या जागेची परवानगी देण्यांत व पुढेहि त्या जागेवर स्मारक उभारण्याला अनुमती देण्यांत त्या त्या वेळच्या अधिकाऱ्यांनी लोकमताला योग्य तो मान दिला म्हणूनच त्या वेळीं असंतोषाच्या ज्वाला भडकल्या नाहीत आणि सांप्रतचे सल्लागार लोकमत पायाखाली तुडवून विद्यमान असंतोषाच्या कारणांत आणखी एक निष्कारण भर घालीत आहेत.

विठ्ठलभाईंच्या दहनविधीला जागा दिल्याने तेथे चंचुप्रवेश झाला कीं मागाहून स्मारकाच्या उभारणीचा मुसलप्रवेशहि हटकून होणार, अशा विचाराने मुंबई सरकार आताच गांगरून गेल्यासारखें दिसतें. पण या दोहोंत तत्त्वतः मोठेंच अंतर आहे. प्रेतसंस्काराच्या वेळीं परवानगी नाकारण्याने जनतेचीं आधीच दुःखाने हळुवार झालेलीं मनें दुखविलीं जातात, सरकारावर खुनशीपणाचा आरोप करण्याला अवसर मिळतो आणि दुःखावेगाच्या भरांत जनता किती नाराज होईल याचा नेम नसतो. स्मारकाला परवानगी देण्याचा प्रश्न केवळ मोहबतीचा आहे. तशी परवानगी दिली तर त्यांत सरकारला भलेपणा लाभतो. पण ती न दिली म्हणून तेवढ्याने तीव्र असंतोषाचा भडका उडेल असा कांही तो प्रसंग नसतो. टिळकांच्या मृत्यूवार्तेनें अत्यंत उद्विग्न झालेल्या व त्यांच्या शवाचें तरी एकदा अखेरचें दर्शन घ्यावें व त्यांच्या चितेला शेवटचें वंदन करावें अशा कर्तव्यबुद्धीने प्रेतयात्रेसाठी एकत्र जमलेल्या तीन लाख लोकांना नकार देऊन त्यांची त्या वेळीं तीव्र निराशा करणें हें मुत्सद्दीपणाचें झालें असतें काय ? अर्थातच तो प्रसंग ओळखून त्या वेळच्या अधिकाऱ्यांनी विचारपूर्वकच तशी परवानगी दिली. अर्थातच विचार न करतां, घाईघाईने आणि गफलतीने ती परवानगी दिली गेली असा जो आजच्या मुंबई सरकारच्या कैफीयतींतून ध्वनि निघतो तोच अविचाराचा, गैरमाहितगारपणाचा व गैरमुत्सद्दीपणाचा आहे.

अंत्यविधीला परवानगी दिली कीं स्मारक उभारण्याला परवानगी दिलीच पाहिजे असा त्या दोहोंचा जो समवाय संबंध सरकार जोडीत आहे तो कसा चुकीचा आहे हें वरील विचारसरणीवरून वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. लोकमान्यांच्या चौपाटीवरील स्मारकाचा प्रश्न मृत्यूनंतर चारपांच वर्षांनी म्युनिसिपालिटीने हातीं घेतला; आणि त्या वेळीं देखील सरकारने

जर कांटेकोर कायदेशीरपणा दर्शवून, पूर्वीच्या करारांत स्मारकाची परवानगी न मागण्याची अट स्पष्टपणें दाखल आहे सबब स्मारकाला संमती देतां येत नाही, असा जबाब दिलाच असता तर म्युनिसिपालिटी काय करणार होती आणि जनतेने तरी बोटें मोडण्याहून अधिक काय केलें असतें? परंतु १९२४–२५ सालीं मुंबई सरकारचीच वृत्ति निवळली असल्यामुळे सरकारने स्मारकाला परवानगी दिली हा त्या वेळच्या सरकारचा केवळ भलेपणा होय; नहून ज्या अर्थी चौपाटीवर दहनविधीला तुम्ही परवानगी दिलीत त्या अर्थी आता स्मारकाला परवानगी दिलीच पाहिजे अशा कायद्याच्या पेंचांत पकडून कांही सरकारकडून ती परवानगी घेतली गेली नाही. सारांश, दोन्ही वेळचे प्रसंग वेगळे, परिस्थिति वेगळी आणि अंतःस्थ कारणेंहि वेगवेगळीं असल्याने त्या दोहोंचा कार्यकारणसंबंध जोडून, भावी स्मारकाची आपत्ति टाळण्यासाठी वर्तमानकाळीं चौपाटीवरील प्रेतसंस्कारालाहि आम्ही मनाई करितों, असें सांगण्यांत मुंबई-सरकार घोडचूक करीत आहे. स्मारकाचा प्रश्न उपस्थित होईल त्या वेळीं त्याचा स्वतंत्रपणें साधकबाधक विचार करा, पण तूर्तच्या प्रेतयात्रेच्या मिरवणुकीला आणि चौपाटीसारख्या खुल्या जागेंतील अंत्यसंस्काराला हरकत घेऊन विझत चाललेल्या आगींत नवें तेल ओतून मौज पाहण्याचा खेळ करूं नका, असें सरकारला निक्षून सांगणें प्राप्त आहे.

बरें; पुढेमागे स्मारक उभारण्याचा प्रश्न उपस्थित झाला तरी तेवढ्याने मुंबई शहरावर अशी कोणती आपत्ति कोसळणार आहे? चौपाटीच्या विस्तीर्ण पटांगणांत एका पुतळ्याच्या जोडीला आणखी पांचसात पुतळे उभारले गेले म्हणून सरकारचें काय बिनसतें? समुद्रकांठीं पुतळे उभारल्याने चौपटीची सगळी जागा अडून जाईल आणि मग जणूं काय मुंबई शहराचें आरोग्य बिघडेल असा जो सरकारने वरकरणीं कांगावा चालविला आहे त्यांत कांहीच हंशील नाही. 'अंदरकी बात' वेगळीच असली पाहिजे हें न जाणण्याइतकी कांही जनता अप्रबुद्ध नाही. सरकारच्या मनांत काय डाचत असावें तें जनतेला अनुमानाने हेरतां येतें. विठ्ठलभाई हे राजबंदी असतां त्यांची प्रकृति ढासळली; तेव्हा त्यांच्या प्रकृतीला युरोपची हवा मानवेल असें वाटल्यावरून सरकारने त्यांस बंधमुक्त करून तिकडे जाण्यास मुभा दिली. असें असतां विठ्ठलभाईंनी युरोपांत गेल्यावर हिंदुस्थानची दुःस्थिति वेशीवर टांगण्याचे प्रयत्न केले व आयर्लंडमध्ये जाऊन डी व्हॅलेराशीं कांही कारस्थान केलें, ही गोष्ट सरकारच्या मनांत डाचत असावी आणि म्हणूनच कालच्या राजबंद्याला आज राजापेक्षाहि अधिक मान मिळावा हें सरकाराला पाहावत नसावें असें लोकांनी अनुमान केल्यास त्यांत त्यांची चूक काय?

चौपाटीच्या जागेचा अशा कारणाकडे उपयोग होऊं लागल्यास ती जागा म्हणजे दुसरें सोनापूरच होईल अशी कित्येकांस भीति वाटते; पण तीहि निरर्थकच आहे. भलत्याच माणसाविषयी असली मागणी कोण करील? लोकमान्यांच्या निधनानंतर तेरा वर्षांनी हीच काय ती पहिली मागणी आली हें काय दर्शवितें? त्यांतून गैरवाजवी मागणी आल्यास तसें स्पष्ट कळवून सरकाराला नकार देतां येईल. लंडन शहरीं वेस्टमिनिस्टर ॲबेमध्ये प्रेत पुरणें हा मोठा सन्मान समजला जातो. त्या ठिकाणीं परवानगी देणें न देणें हें जसें तारतम्यानेच ठरविलें जातें तसें तारतम्य येथल्या सरकारासहि चालवितां येणार नाही काय? इच्छा असली तर सर्व कांही सुरळीत चालतें, पण जेथे मनापासून इच्छाच नसते आणि ती अनिच्छा स्पष्टपणें बोलून दाखविण्याची तयारी नसते, तेथेच असल्या गुळमुळीत व लंगड्या सबबी पुढे येतात आणि त्यामुळे जनतेच्या दुःखावर मलम चोळण्याऐवजी डागण्या दिल्यासारखा प्रकार होतो.

चौपाटीवरची जागा मिळण्याविषयी अजून प्रयत्न चालूच आहेत. ते यशस्वी नच झाले तर निदान चर्चगेटच्यासमोरची नवी जागा तरी

दिली जावी अशी सूचना पुढे आली आहे. तीहि जागा न मिळेल तर दादरभागांतील स्मशानाचा उपयोग करावा अशीहि योजना सुचविली गेली आहे. यांतून अखेरीस कोणता मार्ग निघतो तें लवकरच कळेल. पण या संबंधांत गांधीजी अगदीच मुग्ध कां? त्यांनीच पुढाकार घेऊन चौपाटीवरच्या जागेची मागणी केली असती तर प्रथमच नकार आला नसता व कार्यक्रमाचा असा विचका झाला नसता. परंतु विठ्ठलभाईंच्या प्रेतयात्रेच्या प्रसंगीं गांधीजी मुंबईसहि येणार नसून तिकडे मध्यप्रांतांत दौऱ्यावर निघणार आहेत! वल्लभभाई मोकळे नसल्यामुळे, त्यांच्यासाठी म्हणून तरी गांधींनी या कार्यक्रमाचें धुरीणत्व स्वीकारणें क्रमप्राप्तच होतें. पण ते येऊं इच्छित नाहीत. अशा रीतीने जरी या कार्यक्रमाला दुहेरी गालबोट लागलें असलें तरी मुंबापुरींतील जनता विठ्ठलभाईविषयींचा आपला आदर शक्य तेवढ्या प्रकारांनीं व्यक्त करील; सरकारने चौपाटीवरील जागा देण्याचें कायमचेंच नाकारलें तर त्याबद्दल तीव्र नापसंती दर्शवील; आणि चौपाटीवरील स्मारकापेक्षा अधिक भव्य व अधिक काल टिकणारें स्मारक इतरत्र उभारून सरकारच्या गर्हणीय नकाराचा सक्रिय निषेध करील, असा आम्हांस भरंवसा वाटतो.

# काँग्रेसच्या गोटांत फाटाफूट

म. गांधींनी पुण्याच्या परिषदेंत सामुदायिक कायदेभंग बंद ठेवून वैयक्तिक कायदेभंग सुरू करावा असें ठरावलें. त्याप्रमाणे वैयक्तिक कायदेभंग कांही कॉंग्रेसभक्तांनीं चालविलेला दिसत असला तरी त्याचे स्वरूप अगदीच मंदावलें आहे. यामुळे खुद्द राष्ट्रीय सभेच्या गोटांतच असंतोष वाढत चालला आहे. सिंधमधील एक पुढारी स्वामी गोविंदानंद हे तुरुंगांतून सुटून आल्यावर त्यांनी राष्ट्रीय सभेच्या धोरणावर उघडपणे हत्यार उपसलें. त्यांचे म्हणणें असें कीं, राष्ट्रीय सभेचें धोरण ठरविण्याचा अधिकार पुण्याच्या परिषदेस नव्हता. तें धोरण ठरवावयाचें तर राष्ट्रीय सभेनें अगर ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीनेच ठरविलें पाहिजे.

त्यानंतर लवकरच मुंबईस बृहन्महाराष्ट्राची परिषद भरून लोकशाही स्वराज्यपक्षाची स्थापना झाली व त्याच्या पाठोपाठ मद्रास इलाख्यांत श्री. सत्यमूर्ति यांच्या प्रेरणेने कॉंग्रेस स्वराज्यपक्ष उदयास आला. महाराष्ट्र व मद्रास या दोन प्रांतांतील हे दोन पक्ष वेगवेगळे दिसत असले तरी त्यांची कार्यपद्धति व तत्वें एकच आहेत. वरील दोन प्रांतांत दोन पक्ष स्थापन झाले, त्याप्रमाणे बंगाल, पंजाब आदिकरून इतर प्रांतहि स्वतंत्र पक्षस्थापनेच्या उद्योगाला लागतील आणि मागेपुढे बहुतकरून या भिन्न भिन्न पक्षांना एकत्र जोडणाऱ्या मंडळाचीहि आवश्यकता उत्पन्न होईल. अशा रीतीने नवीन पक्षामार्फत खुंटलेल्या राजकारणास गति मिळाल्यास राष्ट्रीय सभा मागे पडेल व तिच्या चालकांनी लवकरच सावध होऊन तिच्या कार्याची दिशा न बदलल्यास राष्ट्रीय सभा कायमची लोपहि पावेल अशी भीति राष्ट्रीय सभेच्या कोणाहि हितचिंतकास वाटणे स्वाभाविक होय.

राष्ट्रीय सभेचे विद्यमान चालक आपली दिशा लवकर बदलतील ही आशा न उरल्यामुळेच महाराष्ट्रांत काय किंवा मद्रासेंत काय, नवीन पक्षाची मुहूर्तमेढ तेथील पुढाऱ्यांना रोवणें भाग पडलें. ही सर्व परिस्थिति जाणूनच नुकतेच बंधमुक्त झालेले मुंबईचे एक पुढारी मि. नरीमन यांनी म. गांधींची वर्धा येथे जाऊन गाठ घेतली व तेथून ते आता पं. जवाहरलाल यांस भेटण्याकरितां अलाहाबादेस गेले आहेत. त्यांनी राष्ट्रीय सभेसबंधाने एक जाहीर पत्रक प्रसिद्ध करून आपल्या मनांतील सारी मळमळ ओकून टाकली आहे. त्यांचें मत असे कीं 'राष्ट्रीय सभा ही लोकनियुक्त संस्था असल्यामुळे तिने कोणाहि एकठ्या-दुकठ्या व्यक्तीची बटिक बनून राहता कामा नये. पुण्याच्या परिषदेस राष्ट्रीय सभेचा पाठिंबा मिळालेला नाही व तिने दिलेल्या निर्णयाविषयीहि देशांत तीव्र मतभेद आहे. अशा स्थितींत राष्ट्रीय सभेची बैठक भरवून राष्ट्राचा अभिप्राय ऐकून घेणे हाच प्रशस्त मार्ग होय.'

राष्ट्रीय सभा भरविण्याचा उपक्रम थोडा लांबचा आहे. त्यापूर्वी ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा बोलावणें हा एक जवळचा उपाय आहे. त्या उपायाचा अवलंब करावा असें स्वामी गोविंदानंद यांचेंहि पं. जवाहरलाल यांच्यामागे टुमणें लागलें आहे.

पं. जवाहरलाल यांनी स्वामी गोविंदानंद यांस जें उत्तर लिहिलें आहे, त्यांत तीस सभासदांच्या सह्यांचें एकच पत्र न येतां वेगवेगळीं पत्रें आलीं तरी आपण सभा भरविण्यास तयार आहों असें त्यांनी म्हटलें आहे. परंतु यावर सवाल असा कीं, जवाहरलाल हे इतक्या पत्रांची वाट कां पाहातात? ते राष्ट्रीय सभेचे मुख्य चिटणीस आहेत. त्यांना सभा बोलावण्याचा अधिकार पोंचतोच; मग त्याचा उपयोग ते कां करीत नाहीत?

पं. नेहरू यांच्या या लपंडावाचा अर्थ असा कीं, पुणें परिषदेनंतर जाहीर पत्रक प्रसिद्ध करून म. गांधी यांनी जें धोरण ठरविलें त्याचें उल्लंघन करण्याचें धैर्य जवाहरलाल यांसहि होत नाही. असें असता ज्यांनी देशहितावर नजर देऊन धैर्यानें व नेटानें स्वतंत्र पक्षाची उभारणी केली त्यांजवर अवास्तव टीका करण्यास मात्र त्यांची जीभ चुरुचुरू चालावी ही गोष्ट त्यांस खास भूषणावह नाही. महाराष्ट्राच्या लोकशाही पक्षास लोकमताचा पाठिंबा नाही असें जें त्यांनी विधान केलें आहे तें अत्यंत धाष्टर्याचें व अविचाराचे आहे हें त्यांस समजू नये काय? महाराष्ट्रांत पक्ष स्थापन होतो, मद्रासेसहि पक्ष स्थापन होतो याजवरून लोकमताचा वारा कोणत्या दिशेने वाहत आहे हें जवाहरलाल यांनी ओळखावयास पाहिजे. कम्युनिझमच्या मताची धुंदी डोळ्यावर चढल्यामुळे कौन्सिलांत शिरण्याची मनोवृत्ति दोन पिढ्यांच्या मागची शिळी व त्याज्य आहे असें म्हणून जवाहरलाल यांनी लोकशाही पक्षाच्या पुढाऱ्यांची हेटाळणी केली आहे. पण स्वतः ते कम्युनिझमचा उघडपणें पुरस्कार करावयाला तयार नाहीत; त्यांच्या त्या मतामुळे आणि असल्या अविचाराच्या व धुंदीच्या वर्तणुकीमुळे कॉंग्रेसच्या घराचे वासेहि त्यांच्याविरुद्ध फिरूं लागले आहेत. डॉ. अलम, श्री. बजाज यांच्यासारखे कॉंग्रेसचे एकनिष्ठ सेवक जवाहरलालप्रभृति पुढाऱ्यांच्या दुराराध्य व हट्टी स्वभावास कंटाळून वर्किंग कमिटीचे राजिनामे देऊन मोकळे झाले आहेत. कॉंग्रेसच्या अंतरंगांतच अशी फाटाफूट होत चालली आहे. तिजवरून तरी जवाहरलाल याचे डोळे उघडावयास पाहिजे होते. पण तें बाजूस राहून त्यांनी नवीन पक्षावर तोंडसुख घ्यावयास प्रवृत्त व्हावे हा उन्मादच नव्हे काय?

# डॉ. मुंजे यांची लिस्बनमधील कामगिरी

### लिस्बनमधील पोर्तुगीज वकील

'मी लिस्बन येथे गुरुवार ता. २८ सप्टेंबर रोजीं रात्री पोचलों. दुसऱ्या दिवशीं इंग्लंडच्या लिस्बनमधील वकीलांस भेटलों. या वकीलांचें नांव सर क्लॉड रसेल. त्यांनी माझें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें. त्यांनी मला हरएक प्रकारची मदत करण्याचें आश्वासन दिलें आणि रिपब्लिकचे अध्यक्ष व वसाहत मंत्री यांची मुलाखत घडवून आणण्याचें योजिलें. पोर्तुगालचा इंग्लंडमधील वकील या वेळीं लिस्बन येथे कांही कारणासाठी आला होता. त्याला मी प्रथम भेटलों व कागदपत्र दाखविले. तेव्हा माझ्या कार्यांत कितपत यश येईल याविषयीं त्याचे मत साशंक झालेलें दिसलें. तो म्हणाला 'तुमचें काम थोडें बिकटच आहे. कारण गोमांतकाच्या सरकाराचे कायदेकानू बदलण्यास तुम्ही पोर्तुगीज सरकारास सांगणार आहां!' त्यांची ही शंका ऐकल्यावर मी त्याला दोन उपाय सुचविलें. मी म्हटलें, 'गोव्यांतील नवहिंदु ख्रिस्ती आहेत म्हणून सध्याचे नियम जरा ढिले करून त्यांस माफी देण्यांत यावी. पण हें शक्य नसेल तर त्यांच्या ख्रिस्ती नांवापुढे ऊर्फ म्हणून त्यांस स्वतःचें हिंदुनांव घालण्यास परवानगी मिळावी. नवहिंदूच्या नवीन संततीला हीहि अडचण नाही. कारण त्यांचीं नांवें प्रथमच नोंदावयाचीं असल्यामुळे त्यांना ठेवलेलीं नांवें रजिस्टरांत अनायासें दाखल करतां येतील. अशा रीतीनें नवीन संततीचीहि नांवें ख्रिस्तीच ठेवण्याची नव हिंदूवर जी बळजबरी चालू आहे ती थांबेल.'

### अध्यक्षांची भेट

दुसरे दिवशी मी अध्यक्षांची भेट घेण्यासाठी गेलों. ब्रिटिश वकिल सर क्लॉड रसेल यांनी ती जुळवून आणिली. मी अध्यक्षास पॅलेस डी बेलम या राजवाड्यांत भेटलों. मजबरोबर ब्रिटिश वकिलातीतील एक सेक्रेटरी मुद्दाम आला होता. त्याने दुभाष्याचें काम केलें. माझें स्वागत, भेटीसाठी खास योजलेल्या दिवाणखान्यांत करण्यांत आलें. तेथे अध्यक्षाबरोबर पोर्तुगालचा परराष्ट्र मंत्रीहि हजर होता.

### इंग्रजीचा तर्जुमा

प्राथमिक शिष्टाचार आटोपल्यावर मी अध्यक्षाला उद्देशून इंग्रजीमधून एक छोटेसें भाषण वाचलें. त्यांतील वाक्यन् वाक्य मजबरोबरच्या सेक्रेटरीने

पोर्तुगीज भाषेंतून अध्यक्ष व परराष्ट्र मंत्री यांना सांगितले. अध्यक्षानें पोर्तुगीजमधून उत्तर दिलें. अध्यक्षाला इंग्रजी समजत नाहीं; म्हणून त्याच्या भाषणाचा तर्जुमा परराष्ट्र मंत्र्यानें केला. पण त्याचें इंग्रजीचें ज्ञान तितपतच होतें. त्याचा मथितार्थ असा. 'आपण समक्ष भेटावयास आला याचा अध्यक्षांना अतिशय संतोष झाला. पोर्तुगालचें प्राचीन वैभव वर्णिलेलें ऐकून त्यांची तबियत बिलकुल खुष होऊन गेली आहे. आपण वसाहत मंत्र्यापाशीं जें सांगाल त्याचा पूर्ण विचार अध्यक्ष करतील याविषयीं खात्री असूं द्या.'

अध्यक्षांची भेट झाल्यावर वसाहत मंत्र्याची भेट घ्यावयाची उरली. मी त्याजकडे गेल्यावर पोर्तुगीज भाषेत लिहिलेलें पत्र त्यास दिलें. तें काळजीपूर्वक वाचून तो म्हणाला, आपण गोव्यांतील पूर्वीच्या गव्हर्नरास भेटला होता तसेच विद्यमान गव्हर्नरास कां भेटला नाहीं? मी गोव्याच्या गव्हर्नराशीं पत्रव्यवहार करतोच. पण आपण मात्र हिंदुस्थानात परत जाल तेव्हां त्याला भेटल्यावाचून राहूं नका. आपण गोव्याच्या गव्हर्नरास भेटून माझ्याकडे आला असता तर या भेटीचा उपयोग अधिक झाला असता मी उत्तर केलें 'हिंदुस्थानांत गेल्यावर मी हिंदुमहासभेच्या शिष्टमंडळासमवेत त्यांस भेटणारच आहे.' 'वा फार चांगले' त्याने उलट म्हटलें 'त्यानंतर जरूर पडली तर इकडे या.'

इतकें बोलणें झाल्यावर आम्ही इतर विषयाकडे वळलों. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा कीं 'ब्रिटिश हिंदुस्थानांत राज्यकर्ते व प्रजाजन यांजमधील तटा फार विकोपाला गेला आहे. त्या मानानें गोव्यांतील हिंदी लोक खात्रीनें सुदैवी समजले पाहिजेत. तेथील हिंदी लोकांना जवळजवळ युरोपियनांच्या बरोबरीचे हक्क मिळाले आहेत. ब्रिटिश हिंदुस्थानातल्या प्रमाणें गोवे प्रांतांत भेदभाव बिलकुल नाहीं!'

इतकें झाल्यावर माझें पोर्तुगालमधील कार्य संपलें. आतां गोव्याच्या गव्हर्नराकडे वजनदार शिष्टमंडळ गेलें पाहिजे, त्याचा विचार मी हिंदुस्थानांत परत येईन तेव्हां करूं. ब्रिटिश वकीलातींतील मंडळी मजबरोबर खाजगीरीत्याहि फार चांगली वागली. आमची इतर वेळीं अनेक विषयांवर संभाषणें होत. सर क्लॉड रसेल यांनी मला एकदा उपहारास बोलावलें होतें. तेव्हां हिंदु महासभेचें सामर्थ्य किती आहे, गांधींशी व त्यांच्या कायदेभंगाशीं हिंदु महासभेचा संबंध कसा आहे, असे प्रश्न रसेल यांनी मला विचारले. त्यांस त्यावयाचीं तशींच उत्तरें मी दिलीं. मी म्हणालों "गांधी व राष्ट्रीय सभा हीं राष्ट्राची राजकीय दृष्ट्या प्रतीकें आहेत. राष्ट्रीय सभेच्या खालोखाल हिंदु महासभेची शिस्त व संघटना आहे. ती २५ कोट हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक विषयांची कळकळ बाळगते."

माझी मुलाखत लिस्बनच्या वर्तमान पत्रांतून प्रसिद्ध झाली. ती वाचून कित्येक पूर्व हिंदु असे ख्रिस्ती गोवेकर मजकडे आले. एक हिंदु पुढारी पोर्तुगालमध्यें यावा व त्यानें पोर्तुगीज सरकारापुढें हिंदूंची बाजू मांडावी याचा त्यांना फार अभिमान वाटला. ते लोक मोठे कट्टर ख्रिस्ती आहेत असे नाहीं. पुष्कळ ख्रिस्ती परत हिंदुधर्मांत गेल्याचें ऐकून त्यांना आनंद झालेला दिसला. त्यांनी हिंदुमहासभेच्या कामगिरीबद्दल समाधान व्यक्त केलें. हिंदुमहासभेची त्यांनी स्तुति गाइली आणि असेंहि म्हटलें कीं आम्ही खुषीनें ख्रिस्ती झालों नाहीं. आमचीं मनें अजूनहि हिंदूच आहेत. आम्ही हिंदु झालों तर आम्हांला तुम्ही हिंदुसमाजांत घ्याल काय! आम्हांला आमची मूळची जात मिळेल काय? असे प्रश्न त्यांनी मला विचारले.' यावरून गोवे प्रांतांत शुद्धीकरणास कसें उत्कृष्ट क्षेत्र आहे हें समजतें.

## डॉ. मुंजे यांची मुलाखत



डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे

**'दिआरिओ दे लिस्बोआ ' या पोर्तुगीज पत्रावरून**

( अनुवादक : **अनंत जनार्दन करंदीकर** )

हिंदुस्थानांतील उच्च जातींपैकीं, एक नामांकित नेते सध्या लिस्बनला आले आहेत. म. गांधीप्रमाणें ते जरी जगप्रसिद्ध झाले नसले तरी हिंदुस्थानांत त्यांच्या शब्दाला फार मान आहे. डा. मुंजे हे यांचें नांव असून ते जातीनें मराठा ( महाराष्ट्रीय ) आहेत. याच युद्धप्रिय मराठा लोकांबरोबर पूर्वी मुंबई आणि गोवे या प्रांतांतून पोर्तुगीजांची अनेक युद्धे झालीं आहेत. डॉ. मुंजे हे नेत्रचिकित्सेमध्ये तज्ज्ञ असून यांचा युद्धशास्त्राचा व्यासंगहि फार मोठा आहे. फ्रान्स, जर्मनी आणि इटाली या चारी देशांतील लष्करी विद्यालयें व इतर लष्करी संस्था यांचें यांनी सूक्ष्म निरीक्षण केलें आहे. लंडनच्या राउंडटेबल कॉन्फरन्समध्ये यांनी गांधींच्या बरोबरीनें भाग घेतला असून गांधी जर अभिनव हिंदी राष्ट्राचे प्रेषित असले तर डॉ. मुंजे हे त्या राष्ट्राचें राजकारणचतुर मुत्सद्दी होत.

डॉ. मुंजांची आमच्या प्रतिनिधीनें रोसिओ हॉटेलांत मुलाखत घेतली. तेव्हा डॉक्टरांना पहिलाच प्रश्न हा विचारला 'तुम्ही कोण आहांत?' त्यांनी उत्तर दिलें 'पंचवीस कोटि हिंदू लोकांच्या हक्कासाठी झगडणाऱ्या हिंदुमहासभेचा मी अध्यक्ष आहे.

' आणि गांधी कोण आहेत ? '

' गांधी इंडियन नॅशनल कॉँग्रेसचे अध्यक्ष आहेत.'

' हिंदुस्थानच्या लोकांना इंग्रजांचें जूं झुगारून द्यावयाचें आहे कां ? '

' नाही, आम्ही इंग्रजी सत्तेच्या विरुद्ध नाही. मी स्वतःला ब्रिटिश साम्राज्याचा एक प्रजाजन समजतो. मात्र आम्हाला दक्षिण-आफ्रिका, कानडा, आस्ट्रेलिया वगैरे वसाहतींच्या बरोबरीचे अधिकार हवे आहेत. हिंदुस्थान हें "ब्रिटिश कॉमनवेल्थ ऑफ नेशन्स' मधील इतर राष्ट्रासारखेंच एक राष्ट्र व्हावें अशी आमची इच्छा आहे.

' पण गांधींचें मत असेंच आहे का ? '

' होय, इंग्रजांशीं सहकार्य करून आमची प्रगति होण्याचा संभव असेल तोंपर्यंत आम्ही त्यांच्याशीं सहकार्य करूं असें गांधींनीहि अनेक वेळां जाहीर केलें आहे.

' या सहकार्यापासून आजपर्यंत कांही फायदा झाला आहे कां ? ' ' होय, कांही बाबतींत आता आमचे हक्क मान्य होऊ लागले आहेत. उदाहरणार्थ, आजपर्यंत हिंदी लोकांना लष्करांत अधिकाराच्या जागा देत नव्हते, पण आतां देऊं लागले आहेत.'

'तुमच्या आर्थिक मागण्या काय आहेत?'

' देशी धंद्यांच्या संरक्षणासाठी परदेशी मालावर जकात बसविण्याचें स्वातंत्र्य आम्हांला पाहिजे आहे. ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या गुलामगिरीतून आम्हांला आमची सुटका करून घ्यावयाची आहे. ' ' बरें, तुमच्या देशांतील धार्मिक कलहांविषयीं तुमचे मत काय आहे ? '

" ही गोष्ट कबूल केली पाहिजे कीं, धर्मकलहांच्या बाबतींत इंग्रजांचें वर्तन निःपक्षपातीपणाचें नाही. वास्तविक पाहतां आम्ही पंचवीस कोटि हिंदु आहोत आणि मुसलमान अवघे सात कोटि आहेत. तेव्हा सत्तेचें पारडें वास्तविक आमच्या बाजूला झुकायला पाहिजे पण...जाऊं द्या, सध्या धार्मिक कलह कमी होत चालले आहेत. "

' हिंदुस्थानांत बोल्शेव्हिझमचा प्रसार कितपत झाला आहे ? चीनमध्ये तर बोल्शेव्हिकांनी एक सैन्यहि सज्ज केलें आहे, त्याचप्रमाणें इराणांतील त्यांचा प्रसार वाढत आहे. पण हिंदुस्थानी लोकांना त्याचें भय नाही का वाटत ? '

' हिंदुस्थानांत बोल्शेव्हिझम मुळीच नाही आणि देशामध्यें समतेचें तत्त्व जर अमलांत येईल, तर त्याचा यापुढेहि प्रसार होणार नाही. '

त्यानंतर रवींद्रनाथांविषयी बोलणें निघालें व डॉ. मुंजांनी रवींद्रनाथांचा वाडा, त्यांच्या बागा शांतिनिकेतन विश्वविद्यालय वगैरेंची माहिती सांगितली. त्यानंतर आमच्या प्रतिनिधीनें मुंजांना विचारलें, 'आपण पोर्तुगालमध्ये कशाकरिता आला आहांत?' 'प्रथम पोर्तुगीज रिपब्लिकच्या प्रेसिडेंटांना भेटावयाला आणि मग वसाहत मंत्र्यांच्या बरोबर गोव्यांतील हिंदूंच्या गाऱ्हाण्याविषयीं वाटाघाट करायला. मला गोव्यांतील हिंदूंच्या धार्मिक आणि सामाजिक गाऱ्हाण्यांची दाद लावून घ्यावयाची आहे.'

'वसाहत मंत्र्यापाशीं कोणकोणत्या प्रश्नांची चर्चा व्हायची आहे, हे आम्हांला सांगाल कां?

'ते आतांच सांगणें इष्ट नाही.'

बरें, गोव्यांतल्या हिंदूंचीं गाऱ्हाणीं हीं हिंदुस्थानांतल्या हिंदूंच्या गाऱ्हाण्यासारखींच महत्त्वाचीं आहेत काय ? '

' त्या त्या प्रांतांना आपापल्या गाऱ्हाण्यांचें महत्त्व वाटायचेंच. पण गोव्याच्या गाऱ्हाण्यांत राजकारणाचा कांही संबंध नाही. '

' पोर्तुगीजांविषयी तुमच्या लोकांना काय वाटतें?'

'पोर्तुगीजांविषयीं आम्हां मराठ्यांना आदरच वाटतो'

'बरें, पोर्तुगीजांशीं तुमच्या लोकांचें अधिक जुळतें कां इंग्रजांशीं ?'

'या प्रश्नाचें उत्तर देणें गैरमुत्सद्देगिरीचें होईल !'

एवढी प्रश्नोत्तरें होऊन मुलाखत संपली व डॉ. मुंजांनी आमच्या प्रतिनिधीबरोबर हस्तांदोलन करून त्याला निरोप दिला.

# गीताजयंतीसाठी गीतार्थचर्चा

( ले.-श्री. ग. वि. केतकर. )

### कुंपणाने शेत खाल्लें !

१८ व्या अध्यायाचे शेवटीं ६३ व्या श्लोकांत "यथेच्छसि तथा कुरु" असें बुद्धिस्वातंत्र्य अर्जुनास दिल्यानंतर "सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः" असा उपक्रम करून तीन श्लोक आलेले आहेत.व यांपैकीं अखेरच्या ६६ व्या श्लोकांत "सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज" हें वचन आलें आहे. या वचनाला किंवा या अखेरच्या तीन श्लोकांना कित्येकांच्या मतें अतिशय महत्त्व आहे. श्रीमत् आचार्यांनी मात्र भाष्याचा उपसंहार ६३ व्या श्लोकावरच लिहून त्याचेपुढील भाग गौण मानला आहे. उलट बाबू अरविंद घोष हे तर ६५-६६ या श्लोकांना गीतेचा "सर्वोच्च स्वर" "Diapason" असे नांव देतात. कित्येकांनी तर या तीन श्लोकांचा पुंज हातांत घेऊन सर्व गीतेवर बोळा फिरविला आहे!

### पत्त्यांचा मनोरा

"गीतेंतील १८अध्यायांत सांगितलेले सर्व धर्म सोड व फक्त मला शरण ये" असा या वचनाचा अर्थ केला कीं सर्व गीतोपदेशास एक प्रकारें वैयर्थ्य येतें. या लोकांच्या मताप्रमाणे पूर्वीच्या अध्यायांत केलेला उपदेश हा शेवटीं त्याचा परित्याग करण्यास सांगण्यासाठी केला; आणि हा सर्व उपदेश विसरून जाऊन तूं मला शरण ये असें शेवटीं भगवंतांनी सांगितलें! पत्त्यांचा उंच मनोरा अखेरीस पाडण्याची मौज पाहण्याच्या हेतूने मुलें तो रचतात, तशासारखाच हा गीतेचा खटाटोप वरील प्रकारें अर्थ करणाऱ्यांच्या मताने ठरतो ! अशा रीतीने सर्व गीतारूपी क्षेत्राचा नाश एका टोकास असलेल्या कुंपणाने करणें हे भयंकर दिसतें.

### विशेषणांची श्रेणी

हा भयंकर प्रकार करणाऱ्यांचा 'सर्वगुह्यतम' या शब्दावर विशेष भर असतो. गीतेंत यापूर्वी 'गुह्य' 'परमगुह्य' 'राजगुह्य' 'गुह्यात् गुह्यतर' किंवा 'गुह्यतम' अशीं विशेषणे आलीं आहेत. त्या विशेषणांनी भूषविलेलीं सर्व तत्त्वें टाकून त्या सर्वांहून महत्त्वाचें असे तत्त्व "सर्वगुह्यतम" या मोठ्या विशेषणाने सूचित होतें असें हे टीकाकार प्रतिपादन करतात व सकृद्दर्शनीं त्यांचें म्हणणें बिनतोड वाटतें. पण अगोदर या लोकांनी बाकीच्या विशेषणांनी युक्त अशा तत्त्वांची एकापेक्षा एक वरचढ अशी श्रेणी बसवून दाखवली पाहिजे म्हणजे "सर्वगुह्यतम" ही शेवटची व सर्वांत वरची पायरी असें म्हणणें शोभेल. पण असा क्रम मुळींच बसवितां येत नाही. कारण हीं सर्व विशेषणें एकाच भक्तियोगाला उद्देशून आलेलीं आहेत. त्यांत तारतम्य नाही.

शिवाय ६४ व्या श्लोकांतील "भूयः" हें पद या लोकांच्या आड येणारें आहे. कारण "पुनः सांगतों" असें म्हणून सांगितलेली गोष्ट ही पूर्वीच्या कथनाचाच अनुवाद किंवा पुनरुक्ति असते व तशीच हीहि पुनरुक्ति आहे. अर्थात् मागील ज्या सर्व विवेचनाचा विचार करून "तूं इच्छेस येईल तें कर" असें बुद्धिस्वातंत्र्य अर्जुनास दिलें त्या मागील विवेचनापैकींच एक गोष्ट "पुनः", ६५ व ६६ या श्लोकांत सांगितली आहे. म्हणून हे तीन श्लोक मागील विवेचनावर अगर अर्जुनास दिलेल्या बुद्धिस्वातंत्र्यावर बोळा फिरवूं शकत नाहींत; उलट सर्व विवेचन केल्यानंतर "मामेकं शरणं व्रज" असें वचन आलें असता त्या विवेचनाच्या अनुरोधानेच त्या वचनाचा अर्थ लावावा लागतो.म्हणजे या शेवटच्या वचनावर मागील विवेचनाचा पगडा बसतो; या वचनाचा मागील विवेचनावर पगडा बसूं शकत नाही.

### मी म्हणजे कोण ?

"सर्व वैद्यांना सोडून तूं माझ्याकडे ये" असें रोग्यांना म्हणणारा मनुष्य स्वतः वैद्य असतो. सर्व तत्त्वज्ञान्यांना सोडून × × × याला शरण जा असें शब्द सोडलेलें वाक्य लिहिलें तर सोडलेला शब्द हें एखाद्या तत्त्वज्ञान्याचें नांव असलें पाहिजे असें सहज अनुमान निघतें. याच सामान्य युक्तिवादाचा उपयोग करून "सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज" या वाक्याचा अर्थ केला पाहिजे. तसा तो केला तर तो असा मांडावा लागेल कीं, शाश्वतधर्मप्रतिष्ठा, शाश्वतधर्मगोप्ता, अतंद्रितकर्मवर्ती, सर्वयज्ञभोक्ता, योगाश्रय, सर्वकर्मव्यपाश्रय, "योगेश्वर" अशा मला शरण ये. म्हणजे

इतर सर्व मार्ग सोडून मी आतापर्यंत सांगितलेल्या मार्गाचें तूं आचरण कर इतकाच त्याचा आशय आहे. आणि 'भूयः' म्हणजे 'पुनः सांगतों' या पदानेंहि हे तीन श्लोक पुनरुक्तिवजा ठरतात. अर्जुनाच्या भूमिकेशीं तन्मय होऊन जो गीता वाचतो तोच खरा गीतावाचक असें मानलें तर असा वाचक "विमृश्यैतदशेषेण" या वचनाचे वेळींच सर्व गीतार्थाचा सामग्र्यानें विचार करील व असा विचार केल्यानंतरच या अखेरच्या तीन श्लोकांकडे वळेल. म्हणून या तीन श्लोकांत नवें, अपूर्व, सर्व गीता एकीकडे ठेवण्यासारखें असें कांहीं तरी सांगितलें असलें पाहिजे असें मानणें चुकीचें होय.

# गुप्त कारस्थानावर निर्भीड टीका

काठेवाडांतील संस्थानी प्रजाजनांची परिषद अमरेली येथे सांगलीचे प्रो. अभ्यंकर यांच्या अध्यक्षतेखालीं नुकतीच भरली होती. त्या परिषदेपुढे प्रो. अभ्यंकर यांनी अध्यक्ष या नात्यानें जें विस्तृत भाषण केलें तें अनेक दृष्टींनीं मननीय आहे. सुधारणांचा जो नवीन कायदा घडविण्याचें काम जोड-कमिटीमार्फत चालू आहे तो कायदा हिंदी जनतेला स्वातंत्र्य-प्रद होणारा नसून उलट कायद्याच्या नांवाखालीं एखाद्या खोड्याप्रमाणेच तो होणार आहे, असें प्रो. अभ्यंकर यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत सप्रमाण व साधार सिद्ध केलें आहे.

श्वेतपत्रिकेचें हें परीक्षण प्रो. अभ्यंकर यांनी केवळ संस्थानिकांच्या संबंधापुरतेंच केलें असलें तरी, त्या एका दिशेने पाहिल्यास जर या नव्या योजनेंत इतके दोष दृग्गोचर होतात तर इतर सर्व बाजूंनी त्या योजनेचें असेंच सूक्ष्म निरीक्षण केल्यास तींत आणखी केवढाले दोषांचे डोंगर दिसतील असाहि विचार मनांत उद्भूत होतो आणि या हात-चलाखीच्या खेळाचें पर्यवसान कशांत होणार असाहि विचार मनांत डोकावूं लागून मन विषण्ण होतें.

प्रो. अभ्यंकर यांनी संस्थानी प्रजाजनांच्या हक्कांचा व मागण्यांचा आणि संस्थानिकांचे आपल्या वरिष्ठांशीं जे संबंध आहेत त्यांचा गेल्या १२-१३ वर्षांत सूक्ष्म अभ्यास केला असल्यामुळे या विषयांत ते तज्ज्ञ गणले जातात. अर्थातच त्यांचें एतद्विषयक विवेचन अत्यंत मार्मिक व साधार असून अमरेली येथील अध्यक्षीय भाषणांत त्यांनी मुख्यतः या एकाच विषयाचा साकल्यानें ऊहापोह केलेला असल्यामुळे तें भाषण प्रमाणभूत मानून चालण्यास हरकत नाहीं. अशा भाषणांत त्यांनी हिंदी संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांचे परस्परांशीं संबंध १७७३ पासून १९२० सालापर्यंत कसकसे बदलत गेले आणि आता नवीन सुधारणांचा मनु सुरू होणार असें पाहतांच त्यांनी कोणती नवी कारवाई सुरू केली आहे व भावी संयुक्त राज्यघटनेला ती कशी भोंवणार आहे याचें चित्र ठसठशीत शब्दांत निर्भीडपणें रेखाटलें आहे.

गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल (हिंदुस्थान-सरकार) यांच्याशीं आमचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नसून आम्ही संस्थानिक बादशहांचे प्रतिनिधि जे व्हाइसरॉय त्यांनाच काय ते जाणतों, बादशहा व संस्थानिक यांना एकत्र जोडणारा व्हाइसरॉय हाच एक दुवा आहे, त्या दुव्यांतून येणारा संदेश तेवढाच आमच्यापर्यंत येऊन पोहोचतो, गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल ही व्यक्ति आम्ही जाणत नाहीं, हा सूत्रमय सिद्धान्त या नव्या कारवाईच्या मुळाशीं आहे. या सिद्धान्तानें व्हाइसरॉय व हिंदुस्थानसरकार यांच्या अधिकारांत व कार्यक्षेत्रांत विभाग पाडले आहेत आणि हें विभक्तीकरण मान्य असलें तरच आपण भावी संयुक्त राज्यघटनेंत (Federal constitution) समाविष्ट होऊं असा संस्थानिकांचा निर्धार आहे. राज्य-घटनेच्या मुळांतच द्वैतभावाचें विषारी बीज पेरल्यावर त्या बीजांतून उद्भवलेल्या वेलीला संयुक्त घटनेचें मधुर फळ येण्याचा संभव कितपत आहे तें कोणीहि सांगूं शकेल!

द्वैतभावाच्या विषारी बीजानें भारलेल्या या

संस्थानिकांच्या सहकारितेने जी राज्यघटना निर्माण होणार तिला संयुक्त राज्यघटना असें गोंडस नांव दिलें गेलें तरी वस्तुतः ती घटना संयुक्त नसून विभक्तच आहे. कारण मुळापासूनच तिच्या शाखा विभक्त झालेल्या आहेत; आणि बीज एकच व तेंहि विषारी असल्याने त्या दोनहि शाखांना लागणारीं फळें सारखींच विषारी व घातक होणार आहेत. म्हणजे पोटांत विभक्त भाव बाळगूनच हे संस्थानिक संयुक्त राज्यघटनेंत घुसणार असल्याने संस्थानांतील नागरिकांच्या हक्करूपी अन्नांत ते जसे विष कालवणार आहेत तसेच संस्थानेतर भागांतील नागरिकांच्याहि हक्करूपी अन्नांत ते विष कालवूं पाहत आहेत.

संयुक्त राज्यघटनेंत संस्थानिकांचा समावेश व्हावयाचा असल्यास संस्थानिकांना त्यांचे हक्क अबाधित राहतील अशी हमी दिली पाहिजे! ही हमी पटविण्यासाठीं म्हणून त्यांनी ज्या अटींची यादी सादर केली आहे ती यादी नुसती वरवर चाळून पाहिली तरी त्या अटी संस्थानेतर भागांतील नागरिकांच्या हक्कांवर कसा बोळा फिरवतील तें स्पष्ट दिसत आहे. हे संस्थानिक कायदेमंडळांत आपल्या मर्जीस येईल ते सभासद पाठविणार; त्या सभासदांची संख्या संस्थानी लोकसंख्येच्या प्रमाणाहून अधिक असावी अशी जादा सवलत तर त्यांनी प्रारंभींच मागितली होती; पण आता त्यांची जी मागणी आहे ती 'इससे जादा' आहे! त्यांचा आता असा आग्रह आहे कीं सगळे संस्थानिक संयुक्त घटनेंत समाविष्ट न झाले तरी जेवढे संस्थानिक सामील होतील तेवढ्यांनाच संस्थानी सभासदांकरिता राखून ठेवलेल्या सर्व जागा भरण्याचा अधिकार मिळावा! अशा रीतीने ३७५ खासदारांतले १२५ खासदार आणि २६० नामदारांतले १०४ नामदार संस्थानिकांचे हस्तक असणार आणि हे हस्तक नुसत्या संस्थानी प्रश्नापुरतेंच मत देणार नसून संस्थानेतर प्रश्नांबाबतदेखील मतें देण्याचा अधिकार त्यांना हवा आहे. एवढेंच नव्हे तर दिवाणाविरुद्ध गैरविश्वासाचा ठराव पुढे आला व त्या ठरावांतील कारणांचा संस्थानांशीं बिलकुल संबंध नसला तरीदेखील त्या ठरावावर हे संस्थानी सभासद आपलें मत ठोकून देणार!

याशिवाय संस्थानेतर भागांतील जमाखर्चाच्या अंदाजपत्रकावरहि मतें देऊन त्यांचे हस्तक जुने कर वाढविण्यांत किंवा नवे कर लादण्यांत अंशभागी होणार. परंतु असेंब्लीकडून लादला जाणारा कोणताहि प्रत्यक्ष कर संस्थानांना लागू केला जाऊं नये अशी आपली स्वतःची ते सोडवणूक करून घेणार! फार तर काय, पण हल्ली संस्थानिकांकडून हिंदुस्थान–सरकारास जी खंडणी दिली जाते तीहि यापुढे माफ केली जावी, कारण आम्ही आता तुमच्या बरोबरीचे झालों, असेंहि संस्थानिकांचें मागणें आहे. पण यापेक्षा सर्वांत घातक अशी त्यांची जी अट आहे ती ही कीं, हिंदुस्थानांतील लष्कराचा ताबा आमच्या सर्वांच्या प्रत्यक्ष संमतिविना संयुक्त सरकाराकडे देण्यांत येऊं नये; अर्थातच तशी संमति जोंपर्यंत मिळालेली नाही तोंपर्यंत तो व्हाइसरॉयाकडेच राहावा. सगळ्या संस्थानिकांची संमति कधी मिळूं नये आणि संयुक्त सरकाराकडे सैन्याचा अधिकार कधी सोंपविला जाऊं नये असाच यांतला हेतु उघड आहे. अशा रीतीने ज्या सरकाराला आपल्या लष्करावर हुकमत चालविण्याची सत्ता नाही तें सरकार 'सरकार' या नांवाला तरी पात्र होईल काय?

संस्थानिकांनीं हमी म्हणून मागितलेल्या अटींचें हें दिग्दर्शन केलें आहे. या अटींत आणखी भर पडणार नाही असेंहि म्हणवत नाही. पण एवढ्याच जरी अटी घेतल्या तरी या अटींवर संयुक्त राज्यघटनेंत संस्थानिकांचा समावेश झाल्याने संस्थानेतर भागांतील नागरिकांच्या मूलभूत हक्कांवरच गदा येणार आहे. बरें, एवढा स्वार्थत्याग केल्याने संस्थानांतील प्रजाजनांचें हक्कसंरक्षण होत असतें तर तो स्वार्थत्याग तरी सत्कार्याला लागला असें म्हणून समाधान मानतां आलें असतें. परंतु संस्थानी प्रजाजनांच्या हक्कांबाबत या

संयुक्त घटनेंत एक अवाक्षरहि नाही. उलटपक्षीं हे संस्थानिक संयुक्त सरकारास असें निक्षून बजावीत आहेत कीं, संस्थानी प्रजाजनांच्या मूलभूत हक्कांचा प्रश्नहि काढूं नका, संस्थानांतील अंतर्गत कारभाराकडे नजरदेखील फिरवूं नका, केवळ संस्थानांचाच ज्यांत संबंध असेल असले कायदे संयुक्त कायदेमंडळापुढे येऊं देऊं नका, संयुक्त सरकाराच्या सुप्रीम कोर्टाचा अधिकार आमच्यावर चालवूं नका; आणि इतक्याहि उपर आमची लहर फिरली तर आम्हांस वाटेल तेव्हा विभक्त होण्याची मुभा असली पाहिजे!

इतक्या अटी एकत्र वळून बनविलेल्या बळकट दोरखंडाने प्रजाजनांना जखडून बांधल्यावरदेखील या संस्थानिकांना सुरक्षितपणा वाटत नाही; तेव्हा तो सुरक्षितपणा त्यांना लाभावा म्हणून त्यांच्या मोहबतीखातर हिंदुस्थानसरकार 'प्रिन्सेस प्रोटेक्शन बिल' पसार करूं पाहत आहे. तें बिल पास झालें तर मात्र संस्थानांत किंवा संस्थानाबाहेर कोठेच संस्थानिकाविरुद्ध नुसती कागाळी करण्यालादेखील वाव सांपडणार नाही. संस्थानिकांची मर्जी सुप्रसन्न करून घेण्यासाठी त्यांना हें प्रिन्सेस प्रोटेक्शन बिलाचें खाद्य चारून ब्रिटिश नोकरशाही संस्थानिकांच्याकडून आपला कार्यभाग साधून घेणार आहे. कारण संस्थानिकांचे हस्तक संयुक्त कायदेमंडळांत येऊन बसल्याखेरीज ब्रिटिश नोकरशाहीला आपली सांप्रतची अरेरावी सत्ता यापुढे अबाधित राखतां येणार नाही. ती तशी राखतां यावी एवढ्याचसाठी संस्थानिकांना संयुक्त राज्यघटनेंत ओढून आणण्याची ही कारवाई चालू आहे. ही कारवाई यशस्वी झाल्यास ब्रिटिश नोकरशाही मात्र निर्धास्त होईल यांत शंका नाही. परंतु आपणहि तसेच निर्धास्त होऊं, असा जो संस्थानिकांचा समज आहे तो खरा नसून निवळ भ्रम आहे. संस्थानांतील प्रजाजनांना त्यांचे रीतसर हक्क देऊन संस्थानांत सनदशीर राज्यपद्धति चालू करण्यांत आपल्या इभ्रतीला बाध येईल व सुरक्षिततेला धोका पोंचेल आणि हिंदुस्थानसरकाराच्याऐवजीं व्हाइसरॉयाशीं आपलें नातें जोडल्याने आपल्याला आपल्या संस्थानांत मोंगलाई गाजविण्याला मुभा मिळेल अशी जी त्यांची कल्पना आहे ती आमूलाग्र चुकीची आहे. आपला कार्यभाग साधण्यापुरतें ब्रिटिश नोकरशाहीकडून संस्थानिकांना हें आमिष दाखविण्यांत येत आहे. परंतु व्हाइसरॉयांशीं संबंध जोडल्याने पोलिटिकल खात्यांतील अरेरावी सासूच्या लाथा खाण्याचा प्रसंग टळेल असें मानणें हा शुद्ध भ्रम आहे. संयुक्त राज्यघटनेची इकडे वाटाघाट चालू असतांनाच तिकडे काश्मीर, अलवार, पत्याळा, देवास (थोरली पाती) इत्यादि संस्थानांच्या अधिपतींशीं पोलिटिकल खात्याचें वर्तन कोणत्या प्रकारचें होत आहे तें सर्वश्रुतच आहे. आणि जोंपर्यंत संस्थानिक आपल्या सनदशीर सुराज्य व्यवस्थेने प्रजेचें समाधान करणार नाहीत तोंपर्यंत त्यांना असाच तोंड बांधून बुक्क्यांचा मार खावा लागणार हें निश्चित आहे.

एवंच संस्थानांतील व संस्थानेतर भागांतील चळवळ मारून टाकण्याच्या व आपापलें आसन सुस्थिर करण्याच्या उद्देशाने ब्रिटिश नोकरशाही व संस्थानिक यांनी संगनमत करून हा संयुक्तराज्यघटनेचा डोलारा उभारण्याचा खटाटोप सुरू केला आहे. ही कारवाई सफल होईपर्यंत त्या दोघांत स्नेहभावाचा देखावा चालू राहाणार हें उघड आहे. परंतु एकदां हें कारस्थान तडीस गेलें म्हणजे नोकरशाहीला संस्थानिकांची तब्बेत सांभाळण्याची गरज राहाणार नाही आणि मग, तोंपर्यंत मिटून ठेवलेलीं मांजरीचीं नखें बाहेर निघूं लागून संस्थानिकांच्या अंगांचे वाभाडे काढूं लागतील.

तें कसेंहि असो, तूर्तचा प्रश्न एवढाच आहे कीं, असली धेडगुजरी आणि 'विषकुंभं पयोमुखं' अशा स्वरूपाची ही संयुक्त राज्यघटना जनतेला कितपत पटेल? संस्थानीं जनतेला ती पटणार नाही हें निर्विवाद

आहे आणि प्रो. अभ्यंकर यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत तसेंच मत प्रकट केलें आहे. परंतु संस्थानेतर भागांतील जनतेला ही योजना मान्य आहे अशी प्रो. अभ्यंकरांची समजूत झालेली दिसते आणि त्या समजुतीच्या जोरावरच ते त्या जनतेला उद्देशून असा सवाल टाकतात कीं, या संस्थानिकांच्या शब्दांवर विश्वास ठेवून खऱ्या जबाबदारीचें स्वराज्य मिळेल असें तुम्हास अद्यापि वाटतें काय ? अजून तुमचा भ्रमनिरास झाला नाही काय? आणि तसा भ्रमनिरास झाला असेल तर तुम्ही झारशाही गाजविण्याला चटावल्यामुळे शीलभ्रष्ट झालेल्या या संस्थानिकांचें लोढणें गळ्यांत बांधून घेऊन त्याच्यासह गटांगळ्या खाण्यापेक्षा, या संस्थानिकांचा नाद सोडून देऊन आमचा मार्ग आम्ही सुधारूं असें स्पष्टपणें कां सांगत नाही ?

प्रो. अभ्यंकर याचा जो गैरसमज झाला आहे तो याच मुद्द्यावर होय. संस्थानिकांशीं सहकारिता केली तरच आपल्याला मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीचा अंश मिळेल अशा लोभाने कोणीहि हें लोढणें आपण होऊन गळ्यांत बांधून घेतलें नाही. ब्रिटिश इंडियाच्या प्रश्नाबरोबरच संस्थानी विभागाचाहि प्रश्न सुटला तर त्यांत आम्हांला आनंदच आहे. परंतु संस्थानिकांच्या शब्दावर आणि नोकरशाहीच्या सद्धेतूवर आमचा इतका भोळा विश्वास नाही; आणि म्हणूनच संस्थानिकांच्या प्रतिनिधींची ब्याद वरिष्ठ कायदेमंडळांत घुसणार असें जाहीर होतांच आम्ही तावडतोब ता. २४।१।३१ च्या अंकांतच या योजनेविषयींची नापसंती दर्शविली होती व तिचीं कारणेंहि त्यांत नमूद केलीं होतीं. तेव्हा प्रो. अभ्यंकर म्हणतात त्याप्रमाणे आम्हांला भुरळ केव्हाच पडली नाही. मात्र संस्थानी स्वराज्याचा प्रश्न यांतून वेगळा काढा असें म्हणतांच संस्थानांतील नागरिकच 'तुम्ही आम्हांला सोडून देऊं नका' अशी गळ घालतात ! याचें प्रत्यंतर मुंबईस नुकतीच जी बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषद भरली होती त्या वेळीं चांगलेंच आलें. नव्या पक्षाच्या कार्यक्रमांत ( Federation with or without States ) संस्थानिकांशीं सहकारिता करून किंवा त्यांना वगळून जबाबदार राज्यपद्धति प्राप्त करून घ्यावी असें एक कलम आहे. तेवढ्यावरून संस्थानांतील कित्येक जणांची अशी समजूत झाली कीं, आम्ही संस्थानांतील चळवळीशीं जणू काय फारकतच करीत आहों ! अखेरीस त्यांचा गैरसमज दूर झाला व ते परिषदेला हजरहि राहिले. हें सर्व सांगण्यांतला हेतु एवढाच कीं, आम्हांला या कारवाईने केव्हाच भुरळ पडली नव्हती; पण ज्यांना भुरळ पडली असेल त्यांचीहि ती भुरळ प्रो. अभ्यंकर यांच्या या निर्भीड व सडेतोड टीकेने दूर होईल.

अलवार आणि काश्मीर संस्थानांत चळवळ करण्यासाठी परप्रांतांतून जे जथे गेले होते ते अगदीं गोगलगायीसारखे निरुपद्रवी होते व तसे जथे पाठविण्याला हिंदुस्थान सरकारने बंदी करूं नये असें एक भलतेंच विधान अपुऱ्या माहितीमुळे प्रो. अभ्यंकर यांनी केलेलें दिसतें! त्या जथ्यासंबंधाची त्यांना पूर्ण माहिती असती तर त्यांनी त्यांना असलें निरुपद्रवीपणाचें सर्टीफिकेट दिलें नसतें. असो. असले किरकोळ अपवाद वगळल्यास प्रो. अभ्यंकर यांचें हें भाषण म्हणजे भावी संयुक्त राज्यघटनेसंबंधाने संस्थानिक व ब्रिटिश नोकरशाही यांच्या संगनमताने जें प्रच्छन्न कारस्थान चाललें आहे, त्यावर स्वच्छ प्रकाश पाडणारें व त्याचें खरें स्वरूप व्यक्त करणारें असें असून त्या भाषणाला यासंबंधाच्या आधारभूत वाङ्मयांत कायमचें स्थान मिळेल.

# स्फुट सूचना

हिंदुस्थान सरकाराने साखरेला संरक्षण दिल्या मुळे देशांत साखरेचे अनेक कारखाने निघू लागले आहेत. महाराष्ट्रांतहि ७-८ नवे कारखाने होऊं घातले आहेत. त्यांपैकीं नाशिक जिल्ह्यांत रवळगांव येथे श्री. वालचंद हिराचंद यांनी काढलेला साखरेचा कारखाना ता. ५ रोजीं सर चुनिलाल मेथा यांचे हस्तें सुरू करण्यांत आला. कारखान्याला मुख्य अडचण वाहतुकीच्या साधनांची. तशी अडचण रवळगांवच्या कारखान्यालाहि आहे. रेल्वे स्टेशनापासून कारखाना ३२ मैल दूर आहे. यांपैकीं सुमारें सहा मैल रस्ता आम्हांस दुरुस्त करून द्या, अशी कारखान्यातर्फे जि. लोकलबोर्डाला विनंति केली असता बोर्डे तिकडे लक्ष देत नाही व तेथे इरिगेशन खात्यासाठीं तारकचेरी आहे तिचा उपयोग कारखान्यास करूं द्या अशी अनेक प्रकाराने सरकारकडे विनंति केली असतां सरकार तिकडे लक्ष देत नाही. अशी तक्रार कारखान्याचे व्यवस्थापक शेठ वालचंद हिराचंद यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणांत केली. कारखाना भरभराटीस येण्याला वरील सोयी सरकारोनं अवश्य करून दिल्या पाहिजेत. नाही तर एका बाजूने संरक्षण दिल्याचा आव आणावयाचा व दुसरीकडून मार्गातील अनेक विघ्नें कायमच ठेवावयाचीं ही निःसंशय अनुदार वृत्ति होय! या कारखान्यामुळे त्या भागांतील सुमारें दोन हजार लोकांना मजुरी मिळूं लागली, वीस पदवीधरांना व पन्नास अर्ध-सुशिक्षितांना धंदा मिळाला व आसपासच्या सुमारें वीस गांवच्या लोकांच्या औषध पाण्याची सोय झाली. कारखाना स्थापन होतांच हे प्रत्यक्ष फायदे झाले. या कारखान्यांत प्रत्यहीं १५० ते २५० टन पर्यंत ऊंस गाळण्यात येईल. कारखान्याने स्वतःचा ऊंस लावला असल्याने या महत्त्वाच्या बाबतींत तो स्वावलंबी आहे. महाराष्ट्रांत सध्या साखरेचा फक्त बेलापूरचा कारखानाच चालू आहे. त्याच्या जोडीला जे अनेक कारखाने निघणार आहेत त्यांपैकीं रवळगांवच्या कारखान्याने आघाडी मारली. तो यशस्वी होऊन महाराष्ट्राचें तोंड साखरेने गोड करो असें आम्ही इच्छितों.

---

२ कोल्हापूर, धारवाड, हुबळी वगैरे शहरांना भेट देऊन मुंबईचे गव्हर्नर गेल्या मंगळवारीं मुंबईस परत गेले. या दौऱ्यांत, त्यांना कोल्हापूरच्या लॉ कॉलेजला आपलें नांव दिलें, धारवाडच्या जिल्हा लोकलबोर्डाला लोकलफंड वाढविण्याचा गुरुमंत्र दिला आणि तेथील लिंगायत शिक्षणसंस्थेला जात्यभिमानाचा अतिरेक टाळण्याचा सल्ला दिला. अशीं भिन्न भिन्न 'दानें' गव्हर्नरांना स्थलपरत्वें करावी लागलीं असलीं, तरी त्यांनी गेल्या महिना—दीड महिन्यांतील आपल्या दौऱ्यांत सर्वत्र समदृष्टीने जर कोणतें एक दान केलें असेल तर तें म्हणजे द्रव्यसाहाय्याच्या मागणीला नकार देण्याचें! पण या नियमाला बळकटी आणण्यासाठीच कीं काय, त्यांनी सिद्दापूर येथें या नकाराच्या दानाला एक अपवाद जोडला. कायदेभंगाचें व करबंदीचें केंद्रस्थान म्हणून गाजलेल्या सिद्दापूर शहरीं त्यांनी आपला शेवटचा दरबार ता. ५ रोजीं भरविला आणि त्या वेळच्या भाषणात तेथील शेतकऱ्यांची अकरा हजार रुपयांची साराबाकी माफ केल्याचें जाहीर केलें. सरकारी खजिन्यांतील खडखडाट लक्षांत घेतां ही सारा-माफी 'सद्भावाची खूण' समजता येईल. तथापि मुंबई कायदेमंडळाच्या गेल्या बैठकींत सांगण्यांत आल्याप्रमाणें, या वर्षाचे आरंभीं पिकें उभीं असलेल्या बागाईत जमिनी जप्त किंवा खालसा करण्यापर्यंतचे सर्व उपाय सारा-वसुलीसाठीं योजण्यांत आल्यानंतर, आणि सुपारीचें पीक बुडाल्यामुळे विपन्न झालेल्या कारवार जिल्ह्यांतल्या जनतेला मदत करण्यासाठी मुंबई येथे वर्गणी गोळा करण्यापर्यंतचे प्रयत्न सुरू झाल्यानंतर, अशा निस्त्राण रयतेला उरलेल्या बाकीची सूट देणे म्हणजे आंचळांतील दूध संपल्यामुळे शक्तिपात होऊन पडलेल्या गाईची धार काढण्याचें बंद करण्यासारखेंच होय. परंतु इज्जतीच्या भरीला न पडतां गव्हर्नरसाहेबांनी तेवढी तरी सूट दिली हेच सध्याच्या विपरीत काळांत विशेष होय.

---

३ नगर येथील तरुण पुढारी वकील व कॉंग्रेसचे एक कट्टे अनुयायी श्रीयुत पुरुषोत्तम हरि पटवर्धन यांच्यावर डि. मॅजिस्ट्रेटची भाषणबंदीची नोटीस मोडून भाषण केल्याच्या आरोपावरून खटला होऊन दोन वर्षे सक्तमजुरी आणि पांच हजार रुपये दंड अशी शिक्षा त्यांना देण्यांत आली! श्रीयुत पटवर्धन यांनी भाषणबंदीची नोटीस न जुमानतां नगर येथे भरलेल्या जाहीर सभेंत भाषण केलें व कायद्याच्या दृष्टीने तो गुन्हा ठरतो यांत वाद नाही. तथापि त्यांना देण्यांत आलेली शिक्षा नुसती जबर आहे एवढेंच नव्हे तर इतकी

जबर शिक्षा देण्यांत एक प्रकारें निर्घृणताच व्यक्त होते असें म्हटल्याविना राहवत नाही. भाषणबंदीच्या नोटिशीचा भंग करून श्री. पटवर्धन यांनी कायदेभंग केला हें खरें; पण समजा कीं, पाटलांचा दरबार नाही किंवा गव्हर्नरसाहेबांचें आगमनहि नाहीं, अशा एखाद्या प्रसंगीं पटवर्धन यांनी अशीच नोटीस मोडून भाषण केलें असतें तर त्यांना एवढी कमालीची शिक्षा झाली असती काय ? एवढी शिक्षा झाली नसती असेच कोणीहि म्हणेल. कारण गेल्या दोन वर्षांत अनेकांनी नगरला कायदेभंग केला असून कोणालाहि इतकी अटोकाट डाईजड शिक्षा झालेली नव्हती आणि खुद्द रावसाहेब पटवर्धनांनाहि पूर्वी एवढी शिक्षा झाली नव्हती. पण याच वेळीं अशी कमालीची शिक्षा देण्यांत आली यावरूनच श्रीयुत पटवर्धनांना कायदेभंग जितका भोवला त्यापेक्षां पाटलांच्या दरबारचा रसभंग आणि अधिकाऱ्यांचा मनोभंग अधिक भोवला असें म्हणणें प्राप्त आहे; आणि असें होणें न्याय्य व उचित नाही. अर्थातच श्रीयुत पटवर्धन यांच्या शिक्षेच्या बाबतींत जो अत्यंत निष्ठुरपणा दाखविला गेला आहे त्यामुळे सरकारच लोकांची सहानुभूति गमावते व त्या सहानुभूतीचा ओघ आपोआपच असल्या निष्ठुर शिक्षेला बळी पडलेल्या पुढाऱ्याकडे वळतो. यास्तव सरकारने आपल्या अधिकारांत हें शिक्षेचें अटोकाट माप कमी करून तें न्याय्य प्रमाणांत आणावें आणि आपल्यावरील आक्षेप दूर करावा.

# महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषदेसंबंधी कांही विचार

(ले.—श्री. कृ. पां. भोंडे.)

येत्या नाताळाचे सुटींत नाशिक येथे महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषदेचें पांचवें अधिवेशन भरण्याचें जाहीर झालें आहे. तरी परिषदेच्या चालकांनी खालील गोष्टींचा विचार करावा अशी त्यांना विनंति आहे:—

( १ ) महाराष्ट्र शारीरिक शिक्षण मंडळ या संस्थेची घटना कायम करण्यांत यावी. घटना कायम नसल्यामुळे आजपर्यंत कांहीच काम करतां आलें नाही.

( २ ) ज्या संस्था वरील मंडळास जोडण्यांत येतील तेवढ्या संस्थांना प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क असावा. एक रुपया भरल्यावर प्रतिनिधि करण्यांत येऊं नये. प्रत्यक्ष शारीरिक शिक्षणसंस्थेंतूनच प्रतिनिधि घेण्यांत यावेत. यामुळे 'महाराष्ट्र शारीरिक शिक्षण मंडळ' ही संस्था ऊर्जितावस्थेस येईल.

(३) सामने भरविणाऱ्या संस्थांनी म्हणजे डेक्कन जिमखाना, पी. वाय. सी., हिंदविजय इत्यादि संस्थांनी हुतुतू खो--खो,आट्यापाट्या या खेळाच्या नियमांत एकसूत्रीपणा आणावा.त्याकरिता असल्या संस्थांच्या चालकांची एक कमिटी नेमून निकाल मान्य करण्यांत यावा.

(४) कुस्त्या अगर इतर खेळ परिषदेचे वेळीं ठेवूं नये.त्यामुळे सर्व वळ खेळांत जाऊन विचारविनिमय करण्यास वेळ मिळत नाही.

( ५ ) परिषदेचा अध्यक्ष पुढे वर्षभर निदान महाराष्ट्रांत दौरा काढून जागृति करणारा व शारीरिक शिक्षणासंबंधी काम करणारा असावा.

( ६ ) अध्यक्ष व स्वागताध्यक्षयाचीं भाषणें वाचण्यात वेळ न घालविता, उंची वाढविण्यास काय करावें, ऑर्टोपॉटाचे व्यायाम, खुराक या विषयांसंबंधीं चर्चा करण्यांत यावी. वरील विषयांचे अत्यंत महत्त्व आहे.

( ७ ) कार्यकारी मंडळ सुटसुटीत असावें. कार्यकर्त्यांना खर्चण्यासाठीं रक्कम मंजर करण्यांत यावी.

( ८ ) परिषदेची कचेरी आठ महिने परिषदेचे गांवीं व चार महिने पुढील अधिवेशनाचे जागीं असावी व परिषदेस एक दप्तर असावें.

( ९ ) जमल्यास परिषदेच्या कार्याचा प्रसार करण्याच्या उद्देशानें एक पगारी प्रचारक नेमावा.

( १० ) 'महाराष्ट्र शारीरिक शिक्षणमंडळ' या मध्यवर्ती संस्थेची घटना हिंदुमहासभा अगर कॉंग्रेस यांचे धर्तीवर असावी.

( ११ ) म्हणज जिल्हानिहाय व तालुकानिहाय कचेऱ्या उघडण्यांत येतील.

( १२ ) विशेषतः ऑलिम्पिक सामन्यासाठीं कुस्तीमध्ये खेळाडू धाडण्यांत यावेत व त्यासाठीं परिषदेने शक्य ती खटपट करावी. गेलीं कांही वर्षे कुस्तीमध्ये खेळाडू धाडण्यांत येत नाहीत.

( १३ ) व्यायाम व आरोग्य यांचा शास्त्रोक्त संबंध कसा आहे हें डॉ. के. एस्. म्हसकर यांच्यासारख्या तज्ज्ञ माणसाकडून व्याख्यानरूपानें सांगण्यांत यावे. यामुळे देशी व्यायामपद्धतीवर येण्याऱ्या आक्षेपांचें सशास्त्र खंडन होईल.

आजपर्यंतचीं अधिवेशनें म्हणजे वार्षिक संमेलनासारखीं झालीं. दरवर्षी पास होणाऱ्या ठरावां-

मध्ये एकसूत्रीपणा मुळीच नव्हता. म्हणूनच सर्व ठराव कागदोपत्रीं राहिले. परिषदेचा व्याप एकदम मोठा न करता तिची उभारणी भक्कम पायावर पण लहान प्रमाणांत करण्यांत यावी. वरील सर्व गोष्टी करण्यास द्रव्य पाहिजे.ते निरनिराळ्या जिल्ह्यावर आकारावे.तरुण पिढी सुदृढ,कार्यक्षम व दीर्घायुषी व्हावी ही सर्वांचीच इच्छा आहे. तरी या बाबतीं रीतसर प्रयत्न केल्यास कार्यभाग होईल. साहित्यपरिषद हल्ली घटना झाल्यामुळे फोफावत चालली आहे. अनुस्वार–व्याकरण वगैरे बाबतींत प्रत्यक्ष उपयुक्त काम तिने करून दाखविले आहे. त्याप्रमाणे जर या परिषदेने काम करून दाखविले तर जनता सक्रिय सहानुभूति खात्रीने दाखवील.

आजपर्यंत उपयुक्त विषयावर चर्चा जशी व्हावयास पाहिजे तशी झाली नाही. परिषदेमध्ये मंजूर झालेल्या ठरावाची अम्मलबजावणी करण्यांत आली पाहिजे. परिषदेस येणारे बाहेरगांवचे प्रतिनिधि त्या विषयांत कळकळीने काम करणारे असतात. तरी त्या सर्वांशीं विचारविनिमय जितका जास्त करण्यांत येईल तितका करावा. खेळ, पोवाडे वगैरे गोष्टीत वेळ घालवूं नये. परिषदेस जे अलीकडे मजलसीचे स्वरूप प्राप्त होत आहे त्यास निदान या परिषदेने आळा घालावा.

मुंबई विश्वविद्यालयाने सक्तीच्या शारीरिक शिक्षणाचा ठराव नापास केला याचा कडक निषेध केला पाहिजे. त्याप्रमाणेच मुंबई-सरकारने नेमलेल्या शारीरिक शिक्षण कमिटीने रिपोर्ट करून चार वर्षे होऊन गेली. दिवाणांना जागे करून त्यांतील निदान काही सूचना तरी अमलांत आणावयास सांगावे. मुंबई विश्वविद्यालयाने मद्रासप्रमाणे शारीरिक शिक्षणाचे एक कॉलेज काढावे. शारीरिक शिक्षणाचे बाबतींत मुंबई-सरकारची अनास्था आहे हें परवा महाराष्ट्रीय मंडळ,पुणे,या संस्थेच्या मान्यतेबद्दल विचारलेल्या कौन्सिलांतील प्रश्नोत्तरांवरून दिसून आलेच आहे. अशा रीतीने काम करण्यास क्षेत्र फार मोठे असून शिवाय ते काम अत्यंत जरूरीचे आहे. शारीरिक ऱ्हास जितका लवकर थांबविता येईल तितका केव्हाहि इष्ट आहे.

# अफगाणिस्थानाच्या राजाचा खून



अफगाणिस्थानाचे माजी अमीर

**गाझी नादीरशहा**

अफगाणिस्थानाचे राजे महंमद नादीरशहा गाझी याचा ता. ८ रोजीं दुपारीं तीन वाजता आकस्मिक रीत्या खून झाला. सर्व अफगाणिस्थानास या बातमीने धक्का बसल्यासारखे झालें. प्रजेने नादीरशहाचे पुत्र महंमद जहीरशहा यांच्याविषयीं राजनिष्ठा व्यक्त केली आहे. चार वर्षांपूर्वी अमानुल्लांच्या राज्यत्यागानंतर नादीरशहाचे बंधु सरदार शहा वलीखान यांनी काबूल काबीज केलें व नादिरशहांनी बचा–इ–साकचे बंड मोडून शांतता प्रस्थापित केल्यावर अफगाण जिर्गाच्या ठरावाप्रमाणें राजपद स्वीकारलें होते. आपल्या देशांत त्यांनी पुष्कळ सुधारणा केल्या होत्या व एक अफगाण विद्यापीठहि स्थापण्याचा त्यांचा विचार होता.

# बृहन्महाराष्ट्र परिषद व धर्मविषयक ठराव

**गेल्या सोमवारीं** पंढरपूरचे श्री. गंडाळेशास्त्री, श्री. कवडेशास्त्री व डावरे हे लोकशाही स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांना भेटावयास गेले होते. त्या वेळीं त्यांजमध्ये वरील ठरावासंबंधानें सुमारें तासभर चर्चा झाली. तिचा संवादरूप साराश खाली देत आहों:—

आजहि प्रकृति बरी नाहीं वाटतें ?

ताप अजून सोडीत नाहीं, काय करावें? तथापि आपण आलांच आहां तेव्हां हळुहळू बोलूं.

परिषदेंतील धर्मविषयक ठरावासंबंधीं कांहीं लोकांना शंका आल्या आहेत व मजकडे (गंडाळेशास्त्री) पत्रेंहि येत आहेत.

शंका काय आहे?

भोपटकरांनीं ठरावाच्या शेवटीं एक वाक्य जोडलें. त्यांत म्हटलें आहे कीं, कोणता प्रश्न धर्माचरणाचा आहे व कोणता नाहीं हे पार्टी ठरवील.

ठरावाच्या पहिल्या भागांत कायद्यानें सक्ति होऊं नये असें म्हटलें आहे. तें धोरण तुम्हांला मान्य आहेना?

होय. त्या आश्वासनाच्या आधारावरच आमचे काही लोक पार्टीचे सभासद झाले व आणखीहि होतील.

मग मी तुम्हांला निश्चित सांगतो कीं भोपटकरांचें वाक्य या धोरणाविरुद्ध नाही. तें धोरण व्यवहारांत आणणारेंच आहे. कारण कोणत्या गोष्टीला धर्माचरण म्हणावें किंवा म्हणूं नये याविषयी एखादे वेळीं मतभेद होईल कीं नाहीं. आणि तसा झाला तर पार्टीच्या कार्यकारी मंडळाला त्याचा निकाल करणें प्राप्तच आहे. पण यासंबंधानें दोन गोष्टी लक्षांत ठेवा. पार्टीचें कोणच्याहि बाबतींत धोरण ( पॉलिसी ) ठरवावयाचें तें मुख्य कमिटीच ठरवील. मोठी कमिटीहि ठरविणार नाही. आणि मुख्य कमिटींतील बऱ्याच लोकांनी तुह्मा मंडळींना लेखी किंवा तोंडीं आश्वासन दिले आहे कीं सुधारणा व्हावयाची ती कायद्याच्या किंवा इतर सक्तीनें होऊं नये. लोकांचें मन वळवूनच व्हावी. मग तुम्हांला भीति कसली? कोणती गोष्ट धर्माचरणाची म्हणावी किंवा म्हणूं नये याविषयी मुख्य कमिटी मुख्य धोरणाला अनुकूळ असाच निर्णय करील व संशयाचा फायदा पुराणमतवादी लोकांनाच देईल; शिवाय कायदेमंडळांतील माझा अनुभव असा आहे कीं एखादा प्रश्न पार्टीचा म्हणून करावा कीं नाहीं अशी शंका येईल तेव्हां नेहमीच्या चालचलाऊ मतगणतीनें ती गोष्ट पार्टीची करीत नाहीत. फारच मोठें बहुमत असेल तेव्हां पार्टीचा प्रश्न करतात. शारदा ॲक्टाच्या वेळीं प्रत्येक सभासदाला आपल्या मताप्रमाणे वागण्याची परवानगी दिली होती. पार्टीचा प्रश्न करण्यासंबंधी आग्रह झालाच तर राष्ट्रीय वृत्तीच्या राजकीय प्रश्नासंबंधानें होतो. सामाजिक व धार्मिक याबद्दल होत नाही. तुमचे म्हणणें असे नाही ना कीं, कोणताच धार्मिक किंवा सामाजिक प्रश्न हा कायदेमंडळानें हातींच घेऊं नये ?

आम्ही तसें कसें म्हणूं? धर्म व व्यवहार ( नागरिकत्वाच्या हक्कासंबंधाचे ) यांचे मिश्रण असेल त्यांत न्यायकोर्टाचे चुकीचे ठराव बदलून घ्यावयाचे तर ती गोष्ट कायदेमंडळाशिवाय दुसरें कोण करील?

मग तुम्हांला कशा प्रकारच्या कायद्यासंबंधानें भीति वाटते ?

या कायद्यानेंच प्रथम आमच्या मनाला धक्का दिला. त्यांत सक्तीचें बीज दिसून आलें.

पण सतीचा कायदा व संमत संभोगाचा कायदा यांत सक्ती नव्हती का ?

होय; पण विधवेनें सती न जातां आयुष्य घालविण्याला सशास्त्र पर्याय आहे. कन्सेंट बिलांतील वयाच्या आधी मुलीला रजोदर्शन प्राप्त झालें तर गर्भाधानविधि पुढे ढकलून तो प्रायश्चित्तपूर्वक करतां येतो.

मग मुलीच्या लग्नाचें वय पुढे गेलें तर तिलाहि प्रायश्चित्त सांगितलेंच आहे. किंबहुना लग्न न करताच मुलगी राहिली तरी तो मोठा अधर्म होत नाही.

होय; पण जुन्या गोष्टी झाल्या त्या होऊन गेल्या. शारदा ॲक्टानें मात्र आम्हाला धक्का बसला हें खरें.

तुमची भावना लक्षांत घेण्यासारखी आहे. आणि शारदा ॲक्ट जसा पुढे आला असतां पुराणमतवादी लोकांनी नीट चळवळ केली नाही तसें आता होऊं नये म्हणजे मुळातच घाव पडेल. तुम्ही आपल्या परिषदेंत न्यायाचा वाटेल तो ठराव करा व फार्म्युला बनवा आणि नव्या निवडणुकी उभ्या राहतील तेव्हां उमेदवाराला बेलाशक सांगा कीं यावर सही कर तरच आम्ही तुला मतें देऊं, नाही तर देणार नाही. आणि असा लेख लिहून दिल्यावर कोणीहि सहसा विश्वासघात करणार नाही. पूर्वीपेक्षा आता जागा, उमेदवार, व मतदार सर्वांचीच संख्या वाढणार आहे. दर तीनचार माणसांपैकीं, एखादा

तरी मतदार होईल. यामुळे चढाओढहि होईल. म्हणून पुराणमतवादी लोकांनी वेळींच जागृत राहावें म्हणजे झालें. पुराणमतवादी म्हणून तुम्हांला सुधारकांपेक्षा कमी मतें नाहीत. उलट आजच्या स्थितींत नवे सुशिक्षित हे सुधारक व जुने सुशीक्षित हे सनातनी असाच मेळ प्रायः पडत असल्यावर तुम्ही आत्मविश्वास कां सोडतां ? उमेदवारांना जी कसोटी पूर्वी लागली नाही ती आता लागण्याची वेळ आहे. समाज हाच समाधानाचा धनी. त्याने आपल्या इच्छेप्रमाणे केल्यास त्याला नांवें कोण ठेवील ! आम्ही लोकशाही हें नांव आमच्या पक्षाला घेतलें त्यांतलें तरी बीज हेंच आहे. स्वराज्य व मतस्वातंत्र्य हें आधी व त्यानंतर सुराज्य हा सर्व जगाचा अनुभव आहे.

आपण खुलासा केला तो फार चांगला आहे. आमच्या सर्व लोकांना तो बहुधा पटेल. पण तुम्ही लोकांनीहि एक खबरदारी घेतली पाहिजे ती ही कीं, "अमुक एका बाबतींत तुम्ही तुमच्या इच्छेप्रमाणे सनातन धर्म सोडला मग आम्ही सांगतों त्या बाबतींतहि तो का सोडीत नाही!" असा खोडा आम्हांला घालून अमुक प्रश्न हा धर्माचरणाचा आहे कीं नाही याचा निकाल पार्टीत करूं नका.

अहो ! हें तुमच्या लक्षांत येत नाही कीं वडाची साल पिंपळाला लावून आम्ही अनवस्थाप्रसंग कां करूं ? तुम्ही जे शब्द आह्मा युक्तिप्रामाण्य लोकांच्या तोडीं घातले ते कोणी अशाकरिता वापरतो कीं तुम्हींहि आढ्यतेने हिंदुधर्म हा त्रिकालाबाधित आहे असें म्हणता तेव्हा ती बाजू परतवण्याकरिता. तर्कशास्त्रांत असा नियमच आहे कीं कोणी विनाकारण अतिशय व्यापक सिद्धान्त मांडला तर तो एखाद्या साध्या विशेष उदाहरणाने खोटा पाडतां येतो. उदाहरणार्थ, ब्राह्मणाने कुसीद म्हणजे व्याजवट्टा करूं नये असा धर्म स्मृतींत सांगितला आहे. पण किती तरी ब्राह्मणांच्या घरच्या नैवेद्यवैश्वदेवाचा भात व्याजबट्टयांतून निघतोच कीं नाही?

तें आम्हांलाहि कबूल आहे. आम्ही आचरितों तो धर्म असें न म्हणतां आपद्धर्म असेच म्हणून परिस्थितीच्या जुलमाने असहाय होऊन वापरतो.

ठीक बोललांत. आज चार युगें मनुष्यमात्राला धर्माच्या उत्तम ध्येयाप्रमाणे आचरण ठेवल्याचें समाधान लाभलेंच नाही. पांडवश्रेष्ठ धर्मराज यानेच म्हटलें आहे कीं, धर्माच्या बाबतींतलें सुवर्णयुग म्हणजे ध्येयाचा सोळा आणे अनुभव फार पुरातन काळीं केव्हा तरी लोकांना लाभला असेल. धर्मराजाची जेथे ही स्थिति तेथे तुम्हाआम्हा लोकांचा, सत्प्रवृत्त असूनहि, काय पाड? मनुष्य वर्तमान स्थितीविषयीं असंतुष्ट असतो याचा अर्थच हा कीं आपणाला सद्धर्म कळतो. परंतु परिस्थिति व व्यवहार हा सर्वांना आपले दास-गुलाम करतो. तात्पर्य, आमच्या तोंडीं तुम्ही जे शब्द घातले त्यांचें संकुचित प्रयोजन मीं असें सांगितलें. पण एका गोष्टीचे निमित्त सांगून, भावना बाजूला ठेवून केवळ तर्काने जर तुम्हांला असें कोणी म्हटलें कीं तुम्हांलाहि त्याला असें स्पष्ट सांगण्याचा जन्मसिद्ध अधिकार आहे कीं, ही अनवस्था आम्ही स्वीकारूं इच्छित नाही. तुमच्याप्रमाणे आम्हांलाहि तर्क चालवितां येतो आणि सनातन धर्मविरुद्ध दिसणारी एखादी गोष्ट आम्हांला करावी लागली तरी दुसरी एखादी तशीच गोष्ट कोणती करावी किंवा करूं नये याच तारतम्य आमचे आम्ही पाहून घेण्याला समर्थ आहों. त्यांत तुमची लुडबुड नको. आम्ही एखादी गोष्ट करावीच असें अगदी तुम्हांला वाटलें तर आमचें मन वळवा, आमची समजूत घाला पण कृपा करून आमच्यावर कायद्याचा जुलम करूं नका. असो. पण हें विषयांतर झालेंसें वाटतें. नव्या पार्टीच्या मुख्य कमिटीच्या धोरणासंबंधाने मी जरूर तो खुलासा केला. त्याने तुमचें समाधान होऊन तुमचा विश्वास आम्हांवर बसला तर ठीक; नाही तर नव्या पक्षाचे सभासद होण्यासंबंधाने आम्ही तुमच्यावर स्नेही म्हणून कोणतीहि अवास्तव भीड घालणार नाही.

# आजचा पॅलेस्टाइन व ज्यू लोक

पॅलेस्टाईन हा देश आरबांचा. युरोपीय महायुद्धानंतर त्या देशांत ज्यू लोकांना वसाहती करण्यास परवानगी देण्यांत आली. तेव्हापासून त्या धोरणाचा आरब लोक निषेधच करीत आले आहेत. विदेशांतून, विशेषतः जर्मनींतून, अनेक ज्यू लोक तेथे जाऊन वस्ती करू लागले. तेव्हा आरब लोक संतापून त्यांनी अनेक वेळां या आक्रमणाचा सक्रिय निषेध केला. त्याचेंच एक स्वरूप गेल्या ऑक्टोबरांत झालेल्या दंग्यांत दिसून आलें. या देशाची प्रस्तुत स्थिति काय आहे हें येथे देण्यांत येत आहे.

आज जगांतील सर्व देश आर्थिक आपत्तीच्या

चक्रांत सांपडले असून त्यांच्या जमाखर्चाची तोंड-मिळवणीहि नीट होत नाही. सुदैवाने पॅलेस्टाइन देशाला ही आपत्ति बाधली नाही. उलट खर्चवेंच भागवून थोडीबहुत शिल्लकच तेथील सरकारला टेवतां आली. आज तेथील सरकारची सांपत्तिक स्थिति बरी आहे.स. १९२५ सालीं तेथे याच्या उलट स्थिति होती.आज तेथे अनेक उद्योगधंदे निघाले असून ते आपल्या गरजा भागविण्यास पुरे आहेत व देशांतील माल परदेशींहि पाठवूं शकतात.देशांत संघटना चांगली असल्याने पुढे कदाचित् आर्थिक आपत्ति उत्पन्न झाल्यास तिच्याशीं तेथील धंदेवाले यशस्वीपणे तोंड देतील. तेथील बँकांत आज सत्तर लक्ष पौंड, धंद्यांत गुतविण्याची वाट पाहत, बिनव्याजी, नुसते पडून आहेत.

या सुस्थितीचीं कारणें दोन. एक तर परदेशांतून ज्यू लोक सारखे येत आहेत. अशा येणाऱ्या लोकांची संख्या दर महिना तीन हजार आहे. असा येणारा प्रत्येक इसम सरासरीने आपल्याबरोबर पांचशे पौंड तरी रोख घेऊन येतो. दुसरी गोष्ट युरोपांतील अस्वस्थतेचा फायदा पॅलेस्टाइनला चांगला होत आहे. विशेषेकरून जर्मनींतून मोठमोठ्या रकमा पॅलेस्टाइनचा रस्ता सुधारूं लागल्या आहेत. पॅलेस्टाइनच्या सरकाराविषयी लोकांत विश्वास असल्याचें हें एक चिन्हच म्हणतां येईल.

कांही भागांत अलीकडे पाऊस बरोबर न झाल्याने त्यांची स्थिति हलाखीची आहे हें खरें असलें, तरी सरकार बीं-बयाणें घेण्यासाठीं आपल्या शिलकेंतून चांगली मदत करतें. एवढ्या गोष्टीखेरीज इतरत्र दैन्य नाही. शहरांत बेकारी नाही. खेड्यांतून शेत-मजुरांमध्ये थोडी फार बेकारी आहे, परंतु पाऊसपाणी नीट झाल्यास तीहि दूर होईल. जेरूसलेममध्ये पाण्याचा फार तुटवडा आहे. तो अद्याप दूर झाला नाही. पाणी-पुरवठ्याची सरकारानें एक योजना केली आहे, परंतु ती अद्याप फलद्रूप झालेली नाही.

ज्यू व मुसलमान यांमध्ये मात्र सख्य नाही. त्यांचा हा प्रश्न राजकीय स्वरूपाचा आणि लवकर न सुटणारा असा आहे.त्यामध्ये सनदशीर राज्यघटना अमलांत येण्याला किती काळ लागेल हे निश्चित सांगणें कठीण आहे. जबाबदार लोकप्रतिनिधींच्या द्वारें राज्यकारभार चालविण्यास योग्य असे लोक दोन्ही जमातींत निदान आज तरी आढळत नाहीत! अर्वाचीन राज्यघटना रूढ होण्याइतका तो देश सुधारला आहे असें तज्ज्ञांना वाटत नाहीं. राज्याधिकाराचा प्रारंभ म्हणून देशांत म्युनिसिपल कौन्सिलें निर्माण करण्यांत आलीं आहेत. उभय ज्ञातींत आर्थिक सहकार्य घडून यावें असे प्रयत्न होत असून तेथील हाय-कमिशनर सर आर्थर वॅचोप हे त्या कामीं विशेष लक्ष घालीत आहेत.

कांही कांही बाबतींत आरब व ज्यू यांचें सहकार्य होऊं शकतें. नारिंगांच्या व्यापारावरून ही गोष्ट सिद्ध झाली आहे. त्या देशांत हा धंदा अति महत्त्वाचा व मोठा आहे. नारिंगांची लागवड ज्यू लोक करतात, व त्याची विक्री आणि व्यवहार आरब करतात. या बाबतींत उभयतांचें सहकार्य होतें. आरब व ज्यू यांमध्ये ऐक्यभाव उत्पन्न होण्याच्या गोष्टी दूरच्या आहेत. परंतु एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, असें ऐक्य झालेंच तर तें राजकारणद्वारा न होतां आर्थिक संबंधानेंच होणें शक्य आहे.

जर्मनींत ज्यू लोकांचा छळ सुरू होऊं लागल्यामुळे ज्यू लोकांच्या झुंडी पॅलेस्टाइनची वाट चालू लागल्याने पॅलेस्टाइनमध्ये ज्यू-आरब प्रश्न गंभीर स्वरूपाचा झाला आहे. ज्यू लोकांची ही वाढ अशीच सारखी सुरू राहिल्यास वसाहतवाल्यांचे लक्ष शेजारच्या ट्रान्सजार्डेनियाकडे गेल्याखेरीज राहणार नाही. ट्रान्सजार्डेनियाचा राजा अबदुल्ला हा असून पॅलेस्टाइनपेक्षा तेथे जमीनजुमला थोड्या किंमतींत मिळतो. खेरीज त्या देशांत खनिज पदार्थ मुबलक असून त्यांना अद्याप हात लागलेला नाही. तेव्हा ज्यू लोकांना तें क्षेत्र मानवण्याचा संभव आहे. ट्रान्सजार्डेनियांतील धनिक जमीनदार झिओनिस्ट संघाशीं अशा व्यवहाराबद्दल बोलणेंहि करीत आहेत. त्यावरून ट्रान्सजार्डेनियांत ज्यूंनी वसाहत करण्याचें ठरविल्यास तेथील सरकारला ती गोष्ट मानवेल अशी कल्पना आहे. परंतु ट्रान्सजार्डेनियात सर्व जनता सशस्त्र असून प्रत्येकाजवळ रायफल असते. ज्यू लोकांना तेथे वसाहत करण्यास परवानगी मिळून त्यांनी जमिनी खरेदी केल्यास त्यांच्या संरक्षणाची तरतूद अगोदर करण्यास हवी. आज ट्रान्सजार्डेनिया ब्रिटिश हुकुमतीखाली आहे.त्या देशाचा कारभार चालविण्यास पुरें पडेल इतकें उत्पन्न तेथें होत नाही, म्हणून ब्रिटिश सरकार आपल्या खजिन्यांतून मदत करीत असतें. ज्यू लोकांनी तेथें वसाहत केल्यास त्यांच्या संरक्षणाचा भार ब्रिटिश सरकारास घ्यावा लागेल व आजच्या स्थितींत त्यांना तो झेपण्यासारखा नाहीं. परंतु ब्रिटिशांच्या हुकमतींतल्या लोकांनी तेथें वसाहत केल्यास व्यापारधंदा वाढेल व निदान त्यांच्या संरक्षणाच्या मिषाने का होईना ब्रिटिशांना आपले पाय तेथे रोवण्यास एक सबळ कारण सांपडेल.

# भारतमंत्र्यांच्या पुराणाची समाप्ति

भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांची पार्लमेंटच्या जोड–कमिटीपुढील साक्ष गेल्या आठवड्यांत एकदांची समाप्त झाली. त्यांची साक्ष एकूण एकोणीस दिवस चालली होती व त्या साक्षींत सुमारें पंचेचाळीसशें मुद्द्यांचें त्यांना विवेचन करावें लागलें. अशा प्रकारच्या साक्षीच्या भयंकर दिव्यांतून सुखरूपपणें पार पडल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्याकरितां डॉ. शफत अहमदखान यांनी त्यांस एक मेजवानीहि दिली. त्या भोजनप्रसंगीं आगाखान, शफत अहमदखान इत्यादि गृहस्थांनी त्यांच्यावर उत्तम कामागिरी बजावल्याबद्दल स्तुतीच्या फुलांचा वर्षावहि केला आणि स्वतः होअरसाहेबांनी देखील 'दोन दिवसांच्या साक्षींने आपण घामाघूम झालों असें मि. चर्चिल मजजवळ म्हणाले, मग मला तर किती अवाढव्य शारीरिक कष्ट सोसावे लागले असतील,' असे आपल्या भाषणांत उद्गार काढून स्वतःभोंवतीच दिवे ओंवाळून घेतले. तसेंच सर अकबर हैदरी यांनी हिंदुस्थानास परत येण्यास निघण्याच्यापूर्वी सर सॅम्युअल यांचा थाटाचा पाहुणचार केला व त्या वेळीं 'असा हिंदुस्थानाचें संयुक्त राष्ट्र बनविणारा भारतमंत्री विरळाच असें त्यांच्या कार्याचा गुणगौरव करणारें भाषण केलें. संस्थानिक किंवा त्यांचे प्रतिनिधि आणि मुसलमान अशा लोकांचा भारतमंत्र्यासारख्या अधिकाऱ्याच्या सन्मानार्थ सभा, जेवण वगैरेचा प्रसंग म्हणजे 'अहो रूपं अहो ध्वनिः' अशांतलाच प्रकार होय हें नव्याने सांगावयास नको.

असला हा सारा बाह्य भपका सोडून देऊन सर सॅम्युअल होअर यांच्या शेवटच्या दोनतीन दिवसांच्या साक्षीचें जो सूक्ष्म निरीक्षण करील त्याला या भाट–चारणादिकांच्या देशद्रोही वर्तनाची चीड आल्याखेरीज राहणार नाही. शुभ्रपत्रिकेंतील योजनेप्रमाणे तर हिंदुस्थानाच्या पदरांत कांही विशेष पडत नाही हें स्पष्टच आहे. पण जरूर तर ती योजनाहि बाजूस सारून हिंदी उद्योगधंदे, नौकानयन, ब्रिटनमधील व साम्राज्याच्या वसाहतींतील नागरिकांचे हिंदुस्थानांतील हक्क इत्यादि बाबतींत आपलें स्वतःचें भवितव्य ठरविण्याच्या संबंधांत हिंदुस्थानाला कायमचा लुलापांगळा करून टाकण्याचा भारतमंत्र्यांचा डाव अखेरच्या त्यांच्या जॉइंट कमिटीस सादर केलेल्या लेखी पत्रकांवरून व तोंडी उलटतपासणीवरून उघड झाला आहे. लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे एक सभासद श्री. बी. दास यांनी भारतमंत्र्यांच्या साक्षीचा निषेध करण्यासाठी असेंब्लीच्या तहकुबीची एक सूचनाहि पाठविली आहे. ती मान्य झाल्यास व तिजवर चर्चा झाल्यास भारतमंत्र्यांच्या कारवाईवर लोकपक्षीय सभासदांकडून टीका होईलच. दरम्यान श्री. जयकर व सर फेरोज सेठना यांनीहि एक लेखी पत्र भारतमंत्र्यांकडे पाठवून त्यांच्या साक्षींतील एका महत्त्वाच्या मुद्द्याचा खुलासा मागविला आहे आणि भारतमंत्र्यांनी खुलासा केल्यास तोहि प्रसिद्ध होण्याचा संभव आहे.

तो खुलासा प्रसिद्ध झाला तरी देखील भारतमंत्र्यांचें त्यांच्या साक्षींत व्यक्त झालेलें धोरण प्रतिगामी स्वरूपाचें व हिंदुस्थानास अत्यंत अहितकारक आहे याविषयीं कोणाही दूरदर्शी हिंदी नागरिकास संशय राहाणार नाही. शुभ्रपत्रिकेंतील १२२, १२३ व १२४ हीं कलमें हिंदी उद्योगधंद्यांस उत्तेजन देणें, ब्रिटिश प्रजाजनांत आपापसांमध्ये हिंदी व ब्रिटिश असा भेदभाव न ठेवणें याविषयीं आहेत. हिंदी उद्योगधंद्यांस (सब्सिडी) सांपत्तिक मदत देण्याचा प्रश्न निघाला तेव्हा, एका शंकेस उत्तर देतांना भारतमंत्री म्हणाले कीं, या संबंधांत हिंदी कायदेमंडळाने ब्रिटिश प्रजाजनांमध्ये भेदभाव करणारा कायदा केलाच तर गव्हर्नर–जनरलसाहेबांच्या 'स्पेशल रिस्पॉन्सिबिलिटीज'चा म्हणजे जादा अधिकारांचा ते उपयोग करतील व तो कायदा निरुपयोगी ठरवितील. जे उद्योगधंदे (की इंडस्ट्रीज)

राष्ट्राच्या जीवितास अगत्याचे असतात ते सर्वस्वीं त्या राष्ट्राच्या ताब्यांत पाहिजेत, हा नियम साधारणपणें सर्व प्रमुख स्वतंत्र राष्ट्रांत मान्य केला जातो. अशा कारखान्यांच्या व उद्योगधंद्यांच्या उत्पत्तीसाठी व वाढीसाठी जरूर ते उपाय अमलांत आणण्याची प्रत्येक राष्ट्राला मुभा असणें अवश्य असते.

नौकानयन हा असाच एक धंदा आहे. या धंद्याच्या बाबतींत हिंदुस्थानास जादा सवलती पाहिजेत, त्याशिवाय इतर बड्या देशांशी हिंदुस्थान स्पर्धा करूं शकत नाही, असें श्री. जयकर व सर फेरोज सेटना यांनीं आग्रहाने प्रतिपादन केलें. पण भारतमंत्र्यांनी यावर उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं. राष्ट्राच्या संरक्षणासाठी 'की इंडस्ट्रीज' कायदे—मंडळाच्या अधिकाराच्या कक्षेंत पाहिजेत असें श्री. जयकर यांनी जोराने सांगितलें. परंतु जुन्या कंपन्यांवर नवीं बंधनें लादणें अप्रशस्त होय, असें मोघम उत्तर देऊन तो प्रश्नच टाळण्यांत आला. सर्व स्वतंत्र देश आपल्या किनाऱ्यानजीकच्या वाहतुकीचा धंदा आपल्या सरकारच्या हातांत ठेवतात, इतकेंच नव्हे तर तो धंदा ऊर्जितावस्थेस येण्यासाठी त्याला वाटेल ती मदत करतात. नवीन राज्यघटनेंत हिंदुस्थानास मात्र असा अबाधित हक्क प्राप्त होणार नाही, असें भारतमंत्र्यांच्या साक्षीच्या प्रसिद्ध झालेल्या गोषवाऱ्यावरून दिसूं लागतें! जुन्या कंपन्यांच्या डायरेक्टरांच्या बोर्डावर हिंदी प्रतिनिधि पाहिजेत अशा स्वरूपाच्या अटी लादावयाच्या नाहीत, साम्राज्यांतील नागरिकांत हा हिंदी, हा ब्रिटिश असा डावा—उजवा हात करावयाचा नाहीं, मग 'की इंडस्ट्रीज' हिंदुस्थानाच्या ताब्यांत राहतील असें म्हणण्यांत स्वारस्य काय? एखाद्याने खजिन्याला कुलूप लावावें; त्याची किल्ली आपल्याजवळ ठेवावी व दुसऱ्याला तोंडाने गप्पा मात्र खूप सांगाव्या कीं हा सारा खजिना तुझाच आहे. त्यांतलीच ही स्थिति नाहीं का? किंवा कुलुपाचाच दाखला द्यावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, अक्षरांच्या कुलुपांतील विवक्षित अक्षरें एका ओळींत आलीं म्हणजे तें आपोआप उघडतें; पण तीं अक्षरें कोणतीं तीं मात्र सांगावयाचीं नाहीत. असला हा सर्व कावेबाजपणाचा प्रकार दिसतो.

आणखी एका बाबतींत तर सर सॅम्युएल यांनी आपले गुण अधिकच पाघळले आहेत. ती बाब म्हटली म्हणजे साम्राज्याच्या वसाहतींतील नागरिकांसहि ब्रिटिश नागरिकांस जे हक्क देण्यांत येतील तेच देण्यांत यावेत, त्यांच्या बाबतींत तरतमभाव दाखविला जाऊं नये, असा स्पष्ट निर्देश खुद्द राज्यघटनेच्या कायद्यांत समाविष्ट करण्यांत येणार, ही होय! याच्यासारखी हिंदुस्थानाचा अपमान करणारी दुसरी गोष्ट क्वचितच आढळेल. ज्या वसाहतींत हिंदी लोकांना सामान्य नागरिकत्वाचे हक्कहि दिले जात नाहीत, पोस्टांतील कामाच्या जागीं देखील जेथे भेदभाव दर्शविला जातो, जेथे त्यास बेधडक रानटी लोकांप्रमाणे वागविण्यांत येतें त्या वसाहतींतील नागरिकांना हिंदुस्थानांत ब्रिटिश नागरिकांबरोबर एका पंक्तींत बसावयास मिळालेंच पाहिजे असें कायद्यांत नमूद करणें, या गोष्टीला काय नांव द्यावें हेंच समजत नाहीं! भारतमंत्री हे हिंदुस्थानाचे भारतमंत्री आहेत, वसाहतींचे वकील नाहीत. असें असतां त्यांनी हिंदी जनतेची वकिली न करतां वसाहतींच्या तर्फे वाद करावा हें न्याय्य आहे काय? मेडिकल कौन्सिल बिलाच्या बाबतींत भारतमंत्र्यांनी 'रेसिप्रोसिटीचें' तत्त्व मान्य केलें आहे. तेंच तत्त्व येथेहि लागू पडतें. यासंबंधी प्रतिकार (रिटॅलिएशन) करण्याचा अधिकार हिंदुस्थानच्या हातांत असेल तरच कार्यभाग होण्याची आशा आहे. नाहीं तर वरीलप्रमाणे कलम राज्यघटनेच्या कायद्यांत वज्रलेप होऊन राहिल्यास दक्षिण आफ्रिकेंतील सरकार तर 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला' असें वागूं लागेल!

मि. जाफरउल्ला यांच्यासारख्या नेमस्त व सरकारजमा सभासदालाहि या सूचनेबद्दल उद्वेग वाटला, व एरवीं भारतमंत्र्यांच्या अंगच्या गुणांच्या गौरवाची गौर मांडणाऱ्या

सर हरिसिंग गौरांसदेखील हिंदुस्थानाच्या खिशांत प्रतिकाराचें शस्त्र पाहिजे असें वाटलें. त्यावर मोठ्या दिमाखाने भारतमंत्री म्हणाले कीं, १८५८ च्या राणीच्या जाहीरनाम्यापासून सर्व ब्रिटिश नागरिकांस समानतेच्या नात्याने वागवावें हें हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराचें एक तत्त्वच ठरलेलें आहे, त्याच्यामागे आता जाणें अयोग्य होय ! पण राणीच्या जाहीरनाम्याप्रमाणें हिंदी लोकांस वसाहतींनी वागविलें पाहिजे हें ओघानेच येतें त्याची वाट काय? शिवाय, दक्षिण आफ्रिकेचें सरकार राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला तेव्हा अस्तित्वांत तरी होतें काय, असेंहि भारतमंत्र्यांस विचारतां येईल ! भारतमंत्री म्हणतात कीं, हिंदुस्थानाला आपल्या देशांत इतरांस प्रवेश करण्याची मनाई करण्याचा हक्क आहेच व तो कांही उपेक्षणीय नाही. पण १९२० च्या इंपीरिअल कॉन्फरन्सने सर्वांनाच हा हक्क प्राप्त झालेला आहे. तो कबूल करण्यांत भारतमंत्री हिंदुस्थानावर मोठे उपकार करीत आहेत असें नाही. परंतु किती झालें तरी तो हक्क निषेधात्मकच होय, विधिप्रधान नाही. आणि याच दृष्टीने त्या हक्काचा प्रतिकाराकडे फारसा उपयोग होऊं शकणार नाही. वसाहतींशीं वाटाघाटी करून हिंदुस्थान सरकाराने आपल्या नागरिकांस त्या त्या देशांत हक्क मिळवून घ्यावेत, असाहि भारतमंत्री मानभावी उपदेश करतात. तथापि मुख्य प्रधानानी जातिनिर्णय केल्यावर मुसलमानांशीं तडजोड करूं पाहणें हें जसें व्यर्थ तसेंच राज्यघटनेंत वर उल्लेखिलेलें कलम अनुस्यूत केल्यावर वसाहतींशीं बोलणें-चालणें करणें हेंहि व्यर्थच होय. ज्या राष्ट्राच्या सरकारच्या हातांत विरोधकांचा प्रतिकार करण्याची शक्ति नाही तें राष्ट्र इतर राष्ट्रांच्या दृष्टीने विकलांग अतएव तुच्छ ठरतें हा निसर्गसिद्ध नियम आहे.

भारतमंत्र्यांच्या जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढील साक्षीचें पुराण अशा रीतीने समाप्त झालें आहे. या दीर्घकालिक पुराणांतील वांगी पुराणांत राहतात का त्यांचें भूत होऊन नवीन राज्यघटनेंत तें थैमान घालतें हें सुधारणांचा प्रत्यक्ष कायदा नजरेस पडला म्हणजे कळून येईल. नेहमीच्या पुराणांतील शेवटचा अध्याय रसाळ व गोड असतो. त्याची फलश्रुतिहि सर्वांस सारखी सुखकर व आनंददायी असते. भारतमंत्र्यांच्या पुराणाच्या अखेरच्या अध्यायाची गोष्ट याहून फार वेगळी आहे. इतके दिवस प्रवचन चालू असता जी हिंदी जनता खडबडून जागी झाली नव्हती ती या समारोपाच्या पुराण-श्रवणाने जागी झाली. हिंदी जनतेच्या दृष्टीने या श्वेतपत्रिकाशास्त्रसंपन्न पुराणिकबुवांच्या पुराणाची फलश्रुति इतकीच दिसते कीं, राष्ट्रांतील सर्व राजकीय पक्षांच्या सर्व पुढाऱ्यांनी त्या योजनेच्या व त्यावरील मल्लीनाथीच्या सत्यस्वरूपाचें आविष्करण एकमताने व एकमुखाने करणें, हेंच राष्ट्राचें आजचें कर्तव्य होय. अखिल भारतांतून या योजनेचा तीव्र निषेध करणारा ध्वनि, पार्लमेंटांत कायदा मंजूर होईपर्यंत, सर्वत्र दुमदुमत राहिला तरच त्यांत थोडीबहुत दुरुस्ती होण्याची किंचित् आशा आहे. नाही तर पांढऱ्या कागदांतील योजना आपले पांढरे पाय हिंदुस्थानांत कायमचे रोवून टाकील आणि मग तिचे दुष्परिणाम दूर करणें अशक्य होऊन बसेल.

# स्फुट सूचना

१ बंगाल प्रांतांतील क्रांतिकारकांच्या चळवळीला पायबंद घालण्यासाठी तेथील सरकाराने निरनिराळ्या दडपशाहीच्या कायद्यांच्या स्वरूपाने जवळ जवळ लष्करी अंमलच सुरू ठेविला आहे. पण त्यालाहि न जुमानता अत्याचार होतातच, हें पाहून बंगाल सरकाराला काय करूं व काय न करूं असें होऊन गेल्यासारखें दिसतें. क्रांतिकारकांना हत्यारांचा पुरवठा होतो. तो बंद पाडण्याकरितां रिव्हॉल्व्हर्स, पिस्तुलें अगर तरवारी बिनपरवाना जवळ ठेवणें अगर तीं विकणें

हा फौजदारी गुन्हा समजून त्याला शिक्षाहि जबर ठेवलेली आहे. पण एवढ्यानेंहि भागत नाही असें पाहून बंगाल सरकारानें आता असें ठरविलें आहे कीं, आणखी कांही नवे "ऑर्डिनन्स" पसार करून घेऊन अशा तऱ्हेचा हत्यारांचा व्यापार करणाऱ्या लोकांना हद्दपारीच्या व काळ्यापाण्याच्या शिक्षा ठोठावाव्यच्या! खुद्द कलकत्त्यांत व बंगाल प्रांतांतील इतर बंदरांत परदेशांतून बंदुका, रिव्हॉल्व्हर्स, काडतुसें वगैरे सामान होड्यांतून व मोठ्या गलबतांतून आणलें जातें; हत्यारें आणविण्याची ही व्यवस्था मोठी सुसंघटित आहे, अशी त्या सरकाराची समजूत असल्यानें याबाबतहि कडेकोट बंदोबस्त ठेवला जाणार असून, चोरून हत्यारें बंदरांत आणणाऱ्या गुन्हेगारांनाहि भयंकर शासन करण्यांत येणार आहे. अशाच तऱ्हेचे इतर बाबतींतहि दडपशाहीचे नवे कायदे करून क्रांतिकारकांचा नायनाट करण्याचा बंगालसरकारानें चंग बांधलेला दिसतो. विचाराचा प्रश्न एवढाच कीं, शिक्षा, मोठी शिक्षा, भयंकर शिक्षा अशा चढत्या भांजणीच्या प्रमाणांत शिक्षा देण्याशिवाय क्रांतिकारकांची चळवळ थांबविण्यास दुसरे उपायच नाहीत का सरकारास ते सुचत नाहीत!!

---

२ बंगालमधील क्रांतिकारकांविरुद्ध तेथील सरकारनें चालविलेली लष्करी कायद्याच्या तोडीची मोहीम आणि जपानसारख्या स्वतंत्र देशांतल्या अत्याचारी तरुणांशीं होणारें जपानी कोर्टाचे वर्तन या दोहोंत दिसून येणारा फरक आश्चर्यचकित करून सोडण्यासारखा आहे. बंगालमध्ये ज्याप्रमाणे गेल्या वर्षदोन वर्षांत क्रांतिकारकांच्या हातून तीन-चार खून झाले तसेच जपानमध्येहि तेवढ्याच अवधींत तीन खून झाले. या तीन खुनांपैकीं, दोन खुनांच्या खटल्यांतील आरोपींना यापूर्वीच शिक्षा देण्यांत आल्या असून त्या शिक्षा अगदीच सौम्य स्वरूपाच्या होत्या. फांशीची शिक्षा तर कोणत्याच आरोपीला देण्यांत आली नाही. तिसऱ्या खटल्याचा निकाल नुकताच गेल्या आठवड्यांत लागला. १९३२ च्या मे महिन्यांत जपानचे प्रधानमंत्री इनुकाई यांचा खून पाडल्याबद्दलचा हा खटला होता. त्याची चौकशी दीड वर्ष रेंगाळत चालून अखेरीस दहा आरोपींना १ ते १५ वर्षांच्या कैदेच्या शिक्षा देण्यांत आल्या. या खटल्यांत देखील एकाहि आरोपीला फांशीची शिक्षा दिली गेली नाही. जपानांतील अधिकाऱ्यांना असल्या खुनांची चीड येत नाही असें नाही किंवा असले अत्याचार बंद पडूं नयेत असे त्यांस वाटणें हेंहि शक्य नाही. तर मग तेथें अशा सौम्य शिक्षा कशा दिल्या जातात? याचें कारण एवढेंच दिसतें कीं, भयंकर कडक शिक्षा दिल्या तरच अत्याचार थांबतात आणि गुन्हेगारांना यत्किंचित् दयामाया दर्शविली कीं अत्याचारांचें पीक फोफावतें असली विचारसरणी जपानी अधिकाऱ्यांना पटत नाही. बहुतेक अत्याचारी लोक तरुण, अपरिपक्व बुद्धीचे आणि भावनांध असतात. त्यांना त्यांच्या मार्गापासून परावृत्त करावयाचें असल्यास त्यांना पश्चात्ताप होण्याला संधि द्यावी आणि एका अत्याचारी तरुणाला फांसावर टांगून दुसऱ्या दहापांच तरुणांच्या मनांत सूडबुद्धीचें बीं पेरलें जाऊं नये, असेंच जपानी अधिकाऱ्यांना वाटतें. हिंदी अधिकारी व जपानी अधिकारी यांच्या तर्कपद्धतींत व मानसशास्त्रीय सिद्धांतांतच असा फरक आहे. यांतून कोणती विचारसरणी ग्राह्य व कोणती अग्राह्य हें कालान्तरानेंच निश्चित होईल.

# गांधी विरुद्ध लेनिन

समाजसत्तावाद्यांचे एक सुप्रसिद्ध पुढारी मुंबईचे श्री. डांगे यांनी 'गांधी विरुद्ध लेनिन' या नांवाचें एक पुस्तक कांही वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलें होतें. त्या पुस्तकांत त्यांनी लेनिन व गांधी यांच्यामध्ये कोणत्याहि तऱ्हेचें साम्य नसून त्यांचें तत्त्वज्ञान एकमेकांविरुद्ध आहे असें सिद्ध केलें होतें. जनतेंत दोघांनीहि जागृति केली एवढेंच साम्य त्यांच्या कार्यक्रमांत आहे असेंहि त्यांनी लिहिलें आहे. ह्या मुद्द्यावरील वाद गेल्या आठवड्यांत पुणें येथील टिळक स्मारक मंदिरांत रशियांतील राज्यक्रांतीच्या वाढदिवसानिमित्त भरलेल्या जाहीर सभेत झाला. हा वाद अनेक दृष्टींनी विचार करण्याजोगा असल्यानें त्यांतील महत्त्वाचा भाग सारांशरूपानें पुढे दिला आहे:—

या वादांत श्रीयुत न. वि. गाडगीळ म्हणाले, "तत्त्वतः गांधी व लेनिन यांच्या विचारांत ऐकमत्य आहे. लेनिननें वैयक्तिक अत्याचार बाजूस सारले व १९१७ मध्ये ७ नोव्हेंबर ते १७ नोव्हेंबर या दहा दिवसांत रक्तसिंचनाशिवाय (ब्लडलेस) क्रान्ति घडवून आणिली. ज्या दहा दिवसांतील क्रान्तीमुळे जग हादरून गेलें, त्या दहा दिवसांत रक्तपात झाला नाही यावरूनच लेनिनचा

अनत्याचारावर विश्वास होता असें म्हटलें पाहिजे. लेनिनने बौद्धिक क्रान्ति व अनत्याचार यांची जरूरी ओळखून त्यावर भर दिला. हे मूलभूत सिद्धान्त लेनिनने सोडले नाहींत व गांधीहि सोडीत नाहीत."

### श्री. पां. वा. गाडगिळांचें उत्तर

श्री. न. वि. गाडगीळ यांच्या या विधानांना श्री. पां. वा. गाडगीळ यांनी त्यांच्यामागून लगेच बोलून सडेतोड उत्तर दिलें. ते म्हणाले, "श्री. न. वि. गाडगीळ यांनी भलत्याच गोष्टी पुढे मांडून लोकांची दिशाभूल करण्याचा प्रयत्न केला असल्यामुळे सत्य-कथनाचें कटु कर्तव्य मला बजावणें भाग पडत आहे. लेनिन व गांधी यांच्या तत्त्वज्ञानाचा समन्वय करूं पाहणें म्हणजे अग्नि व पाणी यांचा समन्वय करण्यासारखें आहे ! गांधी व लेनिन यांच्या तत्त्वज्ञानांत व कार्यक्रमांत मुळीच साम्य नाही व तसें तें आहे असें म्हणणें म्हणजे

### ऐतिहासिक सत्यापलाप

करणें होय ! कारण, रशियांतील राज्यक्रान्तीमध्ये अनत्याचाराला जागाच नव्हती. रक्तपाताशिवाय रशियन क्रान्ति झाली असें सांगणें म्हणजे शुद्ध फसवणूक आहे व ज्या दहा दिवसांचें त्यांनी वर्णन दिलें त्यांतसुद्धा मुळींच रक्तपात झाला नाही असें नाही. चार वर्षे रशियांतील क्रान्ति चालू होती. त्या अमदानींत व अखेरच्या दहा दिवसांत दोहों बाजूंस रक्ताच्या नद्या वाहिल्या. रशियांतील परिस्थिति येथे आहे अगर ते मार्ग अवलंबा असे मी म्हणत नाही. माझें म्हणणे इतकेंच कीं, खोटया गोष्टीवर विश्वास ठेवून भ्रमांत पडं नका व लोकांना भ्रमांत पाडूं नका. असंतुष्ट बनलेले लोक पोटाकरिता धडपडूं लागतील व त्यांत जर एखादें महायुद्ध निर्माण झालें तर सरकार व गांधी हे दोघेहि असहाय ठरतील."

### दोघांचे मार्ग भिन्न

यानंतर श्री. चितळे व डॉ. शेट्टी यांनीहि रशियांतील राज्यक्रान्तीचा इतिहास सांगून असें स्पष्टपणें सिद्ध केलें कीं, लेनिन व गांधी यांच्या तत्त्वज्ञानांत, मार्गांत, साधनांच्या उपयोगांत पूर्ण भिन्नता असून त्यांच्यांत पूर्ण साम्य आहे हें सांगणें चूक आहे. गांधींच्या तत्त्वज्ञानाला तरुणांचा पाठिंबा मिळावा म्हणून त्यांच्यांत ऐक्य आहे असं दाखविण्याचा प्रयत्न व्यर्थच ठरेल.

# रुधिरप्रदिग्ध अफगाण तख्त

अफगाणिस्थानाचे राजे नादिरशहा यांच्या खुनाची बातमी गेल्या अंकांत दिलीच आहे. त्यांचा खून दिवसाढवळ्या राजवाड्यांत झाला या गोष्टीने खुनाचें स्वरूप अधिकच भेसूर वाटूं लागलें आहे. खुनाच्या मुळाशीं कृष्णकारस्थान असलें पाहिजे, अशी शंका कोणासहि येण्यासारखी आहे. नादिरशहास अफगाणिस्थानाची गादी चार वर्षांपूर्वी लाभली. ती त्याने स्वपराक्रमाने मिळविली. चार वर्षांपूर्वी अफगाणिस्थानांत अमानुल्लाच्या सुधारणांच्या धोरणाविरुद्ध बेदिली उत्पन्न झाली व त्या वेळीं बच्चा-इ-साक्का हा पुंड प्रबळ होऊन त्याने तख्त बळकावलें व अमानुल्लास देशत्याग करावा लागला. अखेरीस नादिरशहाने आपल्या बंधूच्या साहाय्याने ती बंडाळी मोडली आणि अफगाणिस्थानांतील लोकमत अमानुल्लाला प्रतिकूल असल्यामुळे नादिरशहा स्वतः तख्तनशीन झाला.

त्या वेळेपासून अमानुल्लाचे अनुयायी हे नादिरशहाचे शत्रु बनले. बच्चा-इ-साक्का व त्याचे साथीदार यांचाहि नादिरशहाने निःपात केल्यामुळे त्यांचे अनुयायीहि नादिरशहाविरुद्ध खवळावे व त्यांनीहि सूड घेण्याचा आपल्या मनाशीं बेत ठरवावा, हें मनुष्यस्वभावास धरूनच होय. नादिरशहाच्या शत्रूंची मालिका येथेच संपली नाही. अमानुल्लाच्या बाजूचे कित्येक मातबर लोक नादिरशहाने फांसावर लटकावले. यामुळे नादिरशहाविरुद्ध अफगाणिस्थानांत द्वेषाग्नि धुमसूं लागून. तो केव्हा पेट घेईल याचा नेम नव्हता. नादिरशहा ज्याप्रमाणे प्रतिपक्षाचे एकामागून एक बळी घेत होता, त्याचप्रमाणे प्रतिपक्षीहि चोरटया मार्गांनी नादिरशहाच्या पक्षाचे अधिकारी जगांतून हुसकून लावीत होते. बर्लिनमध्ये अफगाण वकिलास मृत्यूची वाट कांही दिवसांपूर्वी याच पक्षाने दाखविली. खुद्द अफगाणिस्थानांत काबूलच्या ब्रिटिश वकिलातींत असेच तिघा इसमांचे खून पडले. त्यांतून ब्रिटिश वकील मात्र सुदैवाने वांचला.

अशा परिस्थितींतच थोड्या दिवसांमागे लेवाणी जमातींतील तोर मलंग या फकिरास नादीरशहाने फांशीं दिलें व त्याच्यामागून त्याचा गुरु जो मुख्य फकीर त्यालाहि त्याने तीच शिक्षा सुनावली. यामुळे धर्मवेडया मुसलमानांचीं डोकीं भणाणून तेंहि नादिरशहास नवे शत्रु होऊन राहिले. या योगाने नादीरशहास अफ-

गाणिस्थानांत सुरक्षितपणा असा मुळींच वाटेनासा झाला. अफगाणिस्थानाचा इतिहास पाहिला असता तो रक्ताने माखलेलाच दृष्टीस पडतो. अफगाणिस्थानाचे तख्ताहि रक्ताने माखलेलेंच आहे. सन १८३८ त अफगाणिस्थानाचा इंग्रजांनी बनविलेला अमीर शहासुजा हा मारला गेला. अमानुल्लाचा बाप हबीबुल्ला हाहि मारला गेला. अमानुल्लाने तर पोबाराच केला. बच्चा-इ-साका यास राजकीय झगड्यांतच मृत्यु आला. त्याच्यामागून आलेला नादिरशहा यांना तीच वाट लागली. अशा रक्ताने माखलेल्या तख्तावर नादिरशहाचा पुत्र झाहीरशहा हा आता बसला आहे. त्याचें वय अवघें बावीस वर्षांचें आहे. नादिरशहाला वरीलप्रमाणें अफगाणिस्थानांत कट्टे शत्रु असतील तर त्याच्या पुत्राला तरी तें तख्त किती काळ लाभेल हें सांगवत नाही. सैन्य हीच काय ती नवीन राजाची मुख्य शक्ति. त्यावरील सेनापति असदौला हा अमानुल्लाचा पुतण्या आहे. त्याने इमान राखलें तरच झाहीरशहाचा निभाव लागणार हें उघड आहे.

अमानुल्ला इटालींत असला तरी त्याचा डोळा या वेळीं अफगाणिस्थानाच्या गादीवर अधिकच खेळत राहणार यांत शंका नाही. त्यानेहि आपल्या सामाजिक सुधारणा अफगाणांना पसंत असल्यास परत येण्याची तयारी दर्शविली आहे. तथापि या घटकेस अफगाणिस्थान अगदी शांत आहे म्हणतात; परंतु तेथे केव्हा भडका उडेल याचा नेम नसल्यामुळे खैबर घाटांतून अफगाणिस्थानांत जाण्यास ब्रिटिश सरकारानें बंदी केली आहे. नादिरशहाचा खून अबदुल कलीक नांवाच्या माथेफिरूने केला असून त्याला पकडले आहे. सदर इसम गुलाबनबी याच्या नोकराचा मुलगा असून गुलाबनबीच्या मृत्यूचा त्याने सूड घेतला असावा.

# मद्रासमधील काँग्रेस स्वराज्य पक्षाचें पत्रक

मद्रासमध्ये नुकत्याच निघालेल्या काँग्रेस स्वराज्य पक्षाच्या चालकांनी आंध्र प्रांतांतील जनतेला उद्देशून खालील आशयाचें पत्रक काढलें आहे:—

काँग्रेसमधील इतर मित्रांच्या सहकार्यानें आम्ही हा पक्ष काढण्यांत कां पुढाकार घेतला हें स्पष्ट करणें आमचें कर्तव्य आहे, असें आम्ही समजतों. कायदेभंगावर, एक साधन, साध्य नव्हे, या दृष्टीने आमचा सर्वांचा विश्वास आहे. दुर्बल व अरक्षित अशा राष्ट्राच्या हातांतील तें एक स्वातंत्र्यसंपादनाचें शस्त्र आहे हें कोणालाहि नाकबूल करतां यावयाचें नाही.

### एवढी असहिष्णुता कां ?

नवीन पक्ष हा फक्त कौन्सिल-प्रवेशाकरिता आहे अशी कित्येकांची स्वार्थी लोकांकडून दिशाभूल करण्यांत येत आहे. पण सर्वांना हें माहीत आहे कीं, कौन्सिल-प्रवेशाचा प्रश्न अजून दोन वर्षेपर्यंत तरी निघणार नाही. कायदेभंग यशस्वी रीतीनें कोणी चालवून दाखवीत असेल तर त्याच्याशीं आमचें भांडण नाही. या चळवळींतील लोकांची मनोवृत्ति थोडीशी गुलामगिरीची झाली आहे. महात्माजींविषयी आदर दाखवितांना ते दुसऱ्यांच्या मताविषयींच्या असहिष्णुतेने आपल्याच कार्याचा 'नाश करीत आहेत. मग ब्रिटिश लोक असहिष्णु असतात म्हणून त्यांना नांवें कां ठेवावीं ?

श्री. अणे व सरदार शार्दूलसिंग कवीश्वर यांच्या सविस्तर पत्रकांनंतर राष्ट्रीय सभा चालू राहूं शकली नाही. मग पुढे काय ? प्रत्येक स्वयंसेवक स्वतःचा पुढारी बनावा हें सारें ठीक आहे. पण आज देशाची स्थिति तशी नाही. आमच्यासारख्या कांही लोकांना कार्याची दिशा दाखविण्यास एखादी संस्था असावीशी वाटते. नवीन पक्षानें मोठें क्षेत्र निर्माण केलें आहे. आम्ही काँग्रेसाविरुद्ध बंडखोरीहि केली नाही व तिच्याशीं द्रोहहि केला नाही. आमच्याविरुद्ध हे शब्द वापरण्यांत येतील हें आम्हास माहीत नाही असें नाही; पण कोणती नूतन चळवळ टीकेपासून मुक्त राहते ? आम्ही काँग्रेसच्याच बाजूचे आहों; पण आजच्या मानीव लढाऊ कार्यक्रमावर आमचा विश्वास नाही; कारण तो असून नसून सारखाच आहे. शारीरिक व आर्थिक दृष्ट्या आज राष्ट्र थकलें आहे, त्याला आता विश्रांति पाहिजे याविषयीं शंका नाही. दमलेल्या घोड्याला दामटण्यापासून उपयोग काय ?

### राष्ट्रीय सभा सर्वांचीच

राष्ट्रीय सभा ही एक राष्ट्रीय संस्था आहे. तिच्यासाठी जो जो काम करील,—मग तो कितीहि क्षुद्र असो—त्याला त्याला काँग्रेसमध्ये स्थान असलें पाहिजे. फक्त मार्ग वेगळे, ध्येय एकच. याविषयीं घटनेचा कीस काढण्यापासून फायदा नाही. कौन्सिल-प्रवेश हेंच एक या पक्षाचें ध्येय नाही. या पक्षांतील कित्येक लोक

तुरुंगांत जाऊन आलेले आहेत व ते काँग्रेसचे व म. गांधींचे निष्ठावंत अनुयायीहि होते. शुभ्रपत्रिकेंतील राज्यघटनेचा निषेध व कराचीच्या राष्ट्रीय सभेच्या मूलभूत हक्कांच्या ठरावाचा पुरस्कार याविषयी हा पक्ष चळवळ करील. मुख्य गोष्ट म्हणजे ही कीं पस्तीस कोटि मुक्या लोकांना शिक्षण देणें. आपली इच्छा असो वा नसो, या लोकांपैकीं शेंकडा १४ मतदार होणारच, व ते आपला मतदानाचा हक्क बजावणारच. हा आमचा कार्यक्रम. यांत इतरांनी कां सामील होऊं नये हें समजत नाहीं. सर्व जग क्रांतीच्या अवस्थेंतून जात आहे. आणि परिस्थितीची शक्ति अशी जबरदस्त असते कीं ती आपणांस पुढें ढकलणारच.

आंध्रांतील लोक फार कार्यनिष्ठ आहेत. त्यांनी योग्य रीतीने या प्रश्नाचा विचार करावा व नवीन पक्षास येऊन मिळावें.

# जर्मनीचें दोस्त राष्ट्रांना आव्हान !

'स्वाभिमानमूलक शांतता ', 'राष्ट्रमंडळांत समान दर्जा ' अशा अर्थपूर्ण वाक्यांनी अंकित झालेले ध्वज जर्मनींतील प्रत्येक शहरांत आणि खेड्यांत, रस्त्यावर आणि घरावर मोठ्या डौलाने डोलूं लागले होते. ता. १२ नोव्हेंबरचा दिवस उगवला आणि पक्षिगण झाडांच्या ढोल्यांतून बाहेर पडण्यापूर्वीच जर्मनींतील उत्सुक मतदारसंघ मोठ्या आतुरतेने आपल्या घरांतून भराभर बाहेर पडला. कारण त्या दिवशीं निवडणुकी व्हावयाच्या होत्या. जर्मन सरकाराने ता. १४ ऑक्टोबर रोजीं राष्ट्रसंघांतून फुटून आणि शस्त्रसंन्यास परिषदेवर बहिष्कार पुकारून जें स्वाभिमानदर्शक धोरण स्वीकारलें त्याला जर्मन राष्ट्राचा कितपत पाठिंबा आहे हें अजमावण्यासाठीं त्या दिवशीं सार्वत्रिक मतनोंदणी व्हावयाची होती. जर्मन जनतेच्या परीक्षेचीच ती वेळ. डिवचलेला नाग फणफणत चाल करून यावा, त्याप्रमाणेच स्वाभिमानाने पेटलेले आणि अन्यायाने चिडलेले सारे जर्मन मतदार सरकारच्या धोरणाला पाठिंबा देण्यासाठी मतनोंदणीच्या स्थळाकडे धाव घेत होते. मतनोंदणी बंद झाली, तेव्हा सुमारें साडेचार कोटि मतदारांनी मतें नोंदल्याचें उघड झालें ! हर हिट्लर यांच्या आंतरराष्ट्रीय धोरणाला शें. ९४ टक्के मतदारांनी आपल्या अनुमतीचा कौल दिला.

हर हिट्लर याला आणि त्याच्या सरकाराला जनतेचें पाठबळ आहे काय, असा प्रश्न करणाऱ्या वावदूकांचे तोंडाला परवाच्या मतनोंदणीने जशी खीळ पडेल त्याप्रमाणेच फ्रान्स, इंग्लंडप्रभृति राष्ट्रांच्या डोळ्यांतहि अंजन पडेल. लोकसत्तात्मक राज्यपद्धतीच्या विहित तत्त्वाप्रमाणेच हर हिट्लर यांचें परवाचें कृत्य झालें. शस्त्रसंन्यास आणि शस्त्रसमानता या दोन जिव्हाळ्याच्या प्रश्नांच्या बाबतींत आपण जें न्याय्य धोरण स्वीकारलें आहे, त्याला जनतेचा पुरेपूर पाठिंबा आहे इतकें सिद्ध झाल्यावर, जिनिव्हाच्या प्रशस्त सभागृहांत 'शस्त्रसंन्यास, शस्त्रसंन्यास ' असा नुसता जप करणाऱ्या बकध्यानी राष्ट्रांना जर्मनीची मागणी लाथाडणें कठिण जाईल असा पोक्त विचार करूनच हर हिट्लर यांनी सार्वत्रिक मतनोंदणीचा हा डाव टाकला, व समाधानाची गोष्ट अशी कीं, त्या डावांत त्यांना दानहि अनुकूलच पडलें. हर हिट्लर यांनी राष्ट्राचें मत अजमावून पाहण्यांत कोणती 'क्षोभजनक युक्ति' लढविली हें त्या सायमनशास्त्र्यांनाच एक माहीत! एक गोष्ट मात्र खरी कीं, मतनोंदणीची युक्ति 'क्षोभजनक' असण्यापेक्षाहि परवाच्या मतनोंदणींत दिसून आलेली जर्मन राष्ट्राची संघशक्ति ही निःसंशय दोस्तांच्या मनांत धडकी आणि चित्तांत क्षोभ उत्पन्न करणारी झाली!

मतनोंदणी व्हावयाची ती झाली व जनतेने हिट्लर पक्षावरील आपला विश्वासहि पूर्ण प्रकट केला. परंतु प्रश्न असा कीं, नैमित्तिक मतनोंदणी होण्यास निमित्त कोणतें घडलें ? 'फलानुमेयाः प्रारम्भाः ' या न्यायानेच प्रस्तुतच्या निवडणुकीचा अर्थ लावावयास

पाहिजे. जर्मनीचे परराष्ट्रमंत्री न्यूरॉथ यांनी ता. १४ ऑक्टोबर रोजीं निःशस्त्रीकरण परिषदेचे अध्यक्ष मि. हेंडरसन यांना अशी तार पाठविली कीं, 'शस्त्र-संन्यासावर मोठमोठ्या राष्ट्रांनी नुकतीच जी चर्चा केली तिचा विचार करतां परिषदेला आपलें ध्येय गांठतां येणार नाहीं असें वाटतें. अर्थात् या अपेशाचें खापर सर्वतोपरी शस्त्र-सन्नद्ध राष्ट्रांच्याच माथीं फुटणार आहे. कारण शस्त्रनियमन करण्याच्या बाबतींत त्यांनी जे संकेत केले ते पाळण्यास तीं राष्ट्रें स्वतःच तयार नाहींत ! त्याचा साहजिकच असा परिणाम होत आहे कीं, जर्मनीच्या शस्त्रसमानतेच्या मागणीला वाटाण्याच्या अक्षता लागत आहेत. त्यामुळे जर्मन सरकाराला परिषदेंतून अंग काढून घेणें भाग आहे'. व्हॉन न्यूरॉथ यांनी पाठविलेला हा निर्धारयुक्त संदेश म्हणजे परिषदेच्या नाड्यांना बसलेला विजेचा धक्काच होय ! सोहेराचें क्षणांत सुतक व्हावें, त्याप्रमाणे परिषदेचें सारें वातावरण एकदम खिन्न आणि उदास झालें.

स्फटिकवत् पाण्यांत विष कालवावें किंवा उमलणाऱ्या कमळाच्या पाकळ्या चुरगळून टाकाव्या किंवा तयार होत आलेली मूर्ति अविचारानें फोडावी तशासारखा कार्यभाग हिट्लरने केला असा शेराहि धांदरट आणि उतावळ्या मुत्सद्यांनी मारला. परंतु आक्टोबरची १४ वी तारीख मावळून नोव्हेंबरची १२ वी तारीख उजाडली, तों मध्यंतरीच्या काळांत मुत्सद्यांच्या आचार-विचारांत फरक पडत चालला. 'जर्मनी फुटला तर फुटला, त्याची एवढी मातब्बरी काय? उरलेलीं राष्ट्रें आपापसांत शस्त्रनियमनाचा करार करतील' असें तोऱ्यातोऱ्याने प्रतिपादन करणारीं राष्ट्रें आता 'जर्मनीनें राष्ट्रसंघांत सामील होणें हेंच युरोपच्या व जर्मनीच्या हिताचें आहे, जर्मनीशीं वाटाघाट करण्याची प्रत्येक संधि आम्ही साधूं, जर्मनीने करारावर सही केली तरच त्या कराराला व्यावहारिक महत्त्व आहे', अशी नरमाईची भाषा बोलूं लागलीं ! आताच त्यांच्या विचारांत असें स्थित्यंतर होण्यास काय कारण घडलें ? जर्मनी फुटला किंवा रुसला तर यांचें कां अडावें ? जर्मनीनें पुनः राष्ट्रसंघांत यावें याविषयीं यांची इच्छा इतकी तीव्र कां ? आम्हालाहि युरोपांत शांतता आणि समेट पाहिजे असेंच जर्मनीचें-हि म्हणणें होतें तर जर्मनीला राष्ट्रसंघांतून बाहेर पडण्याचा प्रसंग कां आला ? या सर्वच प्रश्नांचीं उत्तरें मोठीं उद्‌बोधक व मनोरंजक आहेत.

डोक्यांत राख घालून जर्मनी राष्ट्रसंघां-तून बाहेर पडण्यास एवढें कारण तरी काय घडलें असा कोणी प्रश्न विचारतील. त्याचें उत्तर समजून घ्यावयाचें तर त्यासाठीं परिषदेंतील सूत्रधारांच्या नागमोडी वर्तनाची थोडीशी पूर्वपीठिका निरीक्षणें जरूरीचें आहे. गेल्या डिसेंबरमध्ये जर्मनीने शस्त्रसंन्यास परिषदेवर प्रथम बहिष्कार पुकारला व तेव्हांच जाहीर केलें कीं, जेतीं राष्ट्रें जर्मनीच्या शस्त्र-समानतेच्या मागणीला मान्यता देणार असतील तरच जर्मनी पुनः परिषदेंत येऊन बसेल. परिषदेचे सूत्रचालक इंग्लंड असल्याने आपण जुळवत आणलेला डाव मध्येच कुचंबूं नये व आन्तरराष्ट्रीय राजकारणांतलें आपलें वर्चस्वहि अबाधित राहावें म्हणून इंग्लंडने थातूरमातूर करून फ्रान्सची अनुमति मिळविली व जर्मनीला त्याची मागणी मान्य असल्याबद्दल आश्वासन दिलें. त्याप्रमाणें सर जॉन सायमन यांनी कॉमन्स सभेंत शस्त्रनियमनाची आपली योजना मांडून तींत जर्मनीचा समान दर्जाचा हक्क कबूल असल्याचें एक कलमहि गोवलें. परिषदेंत पुनः येण्यास इंग्लंडची इतकी कबुली जर्मनीला पुरेशी होती. तात्पुरतें रुसून बसण्यांतील जर्मनीचा हेतु इतकाच कीं, जर्मनीच्या मागणीचा अचूक उच्चार जबाबदार राष्ट्रांकडून व्हावा. पुढें चार राष्ट्रांच्या करारांतहि जर्मनीची मागणी समाविष्ट करण्यांत आली.

इंग्लंड, इटालीप्रभृति नेत्या राष्ट्रांनीच आश्वासन दिल्याने परिषदेंत भाग घेण्यास जर्मनीला कसलाच संकोच वाटला नाही. परंतु

इंग्लंडला आपला शब्द परिषदेंत तितकासा प्रभावी करतां येईना आणि त्या बाबतींतील मोठी अडचण म्हणजे फ्रान्सची. परिषदेच्या बैठकींत इंग्लंडच्या योजनेचें घुसळण प्रत्यक्ष सुरू झालें, त्या वेळीं जर्मनीच्या शस्त्रसमानतेचें व समान दर्जाचें नवनीत त्यांतून निघूं नये म्हणून त्यावर आपल्या विरोधाचें उष्ण पाणी शिंपडण्याचा फ्रान्सने अव्याहत प्रयत्न केला. फ्रान्सच्या विरोधाची कळ थोडीफार मारण्यासाठीं इंग्लंडने आपल्या मूळ योजनेंत थोडासा फरक केला. तो असा-मूळ योजनेंत असें सुचविण्यांत आलें होतें कीं, पांच वर्षांमध्यें मुख्य राष्ट्रांनी आपापल्या शस्त्रास्त्रांत छाटाछाट करून स्वसंरक्षणापुरतींच शस्त्रें आपल्याजवळ बाळगावीं. फ्रान्सच्या मोहबतीखातर परवाच्या बैठकींत सायमनसाहेबांनी पांच वर्षांचा हा काळ आठ वर्षांचा केला. परंतु तेवढ्याने तरी फ्रान्सचें समाधान कोठें झालें ? सायमनसाहेबांनी ता. १४ ऑक्टोबरच्या भाषणांत, (१) आठ वर्षांत जबाबदार व शस्त्रसन्नद्ध राष्ट्रांनी शस्त्रनियमन करावें, (२) व सुरक्षिततेच्या अटींसह जर्मनीचा समानतेचा हक्क मान्य करावा अशीं दोन तत्त्वें प्रतिपादिलीं.

फ्रान्सला इंग्लंडची हीं दोनहि तत्त्वें मान्य नव्हतीं. त्याने आपला असा तृतीय पंथ मांडला कीं, शस्त्रास्त्रांचें नियमन करण्याची भाषा तूर्त बोलूं नये. आठ वर्षेंपर्यंत सर्व राष्ट्रांनी आपापल्या शस्त्रास्त्रांत नवी भर टाकूं नये व हें बंधन तीं राष्ट्रें पाळतात कीं नाहीं हें पाहाण्यासाठीं राष्ट्रसंघाचें एक निरीक्षकमंडळ नेमावें. मध्यंतरीच्या काळांत आपण शस्त्रास्त्रें वाढवणार नाही, इतकेंच नव्हे तर आपल्या निष्पाप स्वभावाबद्दल फ्रान्स, पोलंड व छोटीं बाल्कन राष्ट्रें यांचा आपण विश्वास पटवून देऊं अशी जर्मनीने हमी दिली पाहिजे. इतकी हमी पटल्यावर मग आम्ही जर्मनीच्या मागणीचा विचार करूं. असला दुराग्रही मुद्दा पुढे मांडण्यास फ्रान्सच्या मनाला किमपिहि दिक्कत वाटली नाही. फ्रान्सच्या या बेमुर्वतखोर, आचरट व दुराग्रही युक्तिवादाला इंग्लंडने तेथल्या तेथे स्पष्ट शब्दांनी विरोध करावयास पाहिजे होता. परंतु तसा विरोध झाला नाही. साहजिकच जर्मनीची असा समज झाला कीं, फ्रान्सच्या कुटिल कारस्थानांत इंग्लंड व इटाली यांचाहि हात असला पाहिजे.

फ्रान्सच्या योजनेंत जर्मनीला अद्यापि शस्त्रहीन स्थितींतच खिळून ठेवण्याचा कावा आहे. म्हणे आठ वर्षें जर्मनीने दोस्त राष्ट्रांच्या पादपीठापुढे नत होऊनच राहिलें पाहिजे ! म्हणे त्याला शस्त्रास्त्रें ठेवण्यास मुभा दिली कीं, रणदेवतेच्या दुंदुभि निनादूं लागतील ! म्हणे त्याला समान दर्जा मिळाला कीं, उद्या तो युरोपच्या छातीवर व फ्रान्सच्या मांडीवर गदाप्रहार करील ! कोण ही जेतेपणाची अहंभावना ! कोण ही भीरुता ! कोण ही न्याय आणि सारासार विचार यांची विटंबना ! गेलीं चौदा वर्षें व्हर्सेलिसच्या खोड्यांत आपले पाय गुंतवून ठेवून व दुस्सह अपमान कसाबसा सहन करून ज्याने आपल्या युद्धविन्मुखतेची हमी पटविली त्याच्याजवळूनच नव्या हमीची मागणी, शस्त्रास्त्रवृद्धीच्या पापाने ज्यांचें तोंड बरबरटलेलें आहे त्या राष्ट्रांनी करावी हा कोणत्या राजनीतींतील न्याय ? चौदा वर्षांची हमी ज्यांना पटली नाही, त्यांना पुढील आठ वर्षांची तरी हमी पटेल याचा विश्वास काय ? शिवाय शस्त्रसंन्यासाची आवर्तनामागून आवर्तनें पार पडत असताहि त्याच्या समाप्तीचें तीर्थ घेऊन प्रत्यक्ष शस्त्रसंक्षेपाची दीक्षा घेण्यास जें राष्ट्र अद्यापहि कबूल नाही, तें आठ वर्षांनंतर तरी शस्त्रसंक्षेपाला तयार होईल कशावरून ?

जर्मनीने गेलीं चौदा वर्षें आपल्यावरील शस्त्रनियमनाच्या अटी एकनिष्ठेने पाळलेल्या आहेत. त्या गोष्टीची कोणतीच जाणीव न ठेवतां वरती केवळ जित म्हणून त्याला उणीं उत्तरें बोलावयाचीं व मऊ सांपडला म्हणून कोपराने खणीत खणीत त्याला कायमचाच गाडण्याचें कारस्थान करावयाचें ही न्यायबुद्धि

म्हणावी कीं मदान्धता म्हणावी? जर्मनी तरी काय मेल्या मेंढीचें दूध प्यायला आहे, म्हणून त्याने यापुढेहि तेच अन्याय व तोच पंक्तिप्रपंच उघड्या डोळ्यांनी सहन करावा? जें राष्ट्र स्वातंत्र्याच्या भावनेने भारलें आहे, नवतेजाने प्रस्फुरित झालें आहे आणि नवध्येयाने वेडावलें आहे, तें राष्ट्र दुसरीं राष्ट्रें जेतीं असलीं तरी त्यांचीं दुरुत्तरें काय म्हणून सहन करील? जर्मनीचें सर्व दोस्त राष्ट्रांना असें आव्हान आहे कीं, 'राष्ट्रमंडळांत जर्मनी मानाने पहिल्या दर्जाचें राष्ट्र या नात्याने मिरवणार, सर्व राष्ट्रांना शस्त्रास्त्रांच्या बाबतींत जे हक्क आहेत तेच समानतेचे हक्क जर्मनीलाहि मिळाले पाहिजेत, इतर राष्ट्रें ताबडतोब शस्त्रनियमन करणार असतील तर जर्मनीहि आपलीं शस्त्रास्त्रें शमीच्या झाडावर बांधून ठेवण्यास तयार आहे. पण राष्ट्राराष्ट्रांतील जित–जेतेपणाची भावना जोंवर लुप्त झालेली नाही तोंवर युरोपमध्ये खरी शांतता नांदणें शक्य नाही, व खरें शस्त्रनियमनहि होणार नाही.'

युरोपियन मुत्सद्द्यांना जगांत खरोखरीच निर्बाध शांतता स्थापित करावयाची असेल तर त्यांनी 'मित्रद्रोहं च मा कुरु' हें धृतराष्ट्राचें हितवचन ध्यानीं बाळगून त्याप्रमाणें आपलें आचरण ठेवलें पाहिजे. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, आज फ्रान्सने दुराग्रही दुर्योधनाची स्वार्थपरायण वृत्ति स्वीकारली आहे. या वृत्तीने आपलें अंतिम कल्याण साधणार नाही आणि आपणच आपल्या हातांनी शस्त्रसंन्यासाच्या समुद्रमंथनांतून शस्त्रग्रहणाचें हालाहल विष बाहेर काढल्यासारखें होईल हें जाणून इंग्लंड व इटाली यांनी जर्मनीने राष्ट्रसंघांत व शस्त्रसंन्यास परिषदेंत परत यावें एतदर्थ 'त्वयार्ध मयार्ध'चे प्रयत्न चालविले आहेत. दोस्त राष्ट्रांच्या सदर प्रयत्नांत सच्चेपणा दिसून आल्यास जर्मनी तरी कशाला संन्यास घेईल? त्याला तरी राळ फेकून भुतें उठविण्याची थोडीच इच्छा आहे?

आपले नैसर्गिक हक्क मिळून आपल्याला राष्ट्रमंडळांत समान दर्जाचें आसन लाभावें व स्वतंत्रता, समानता आणि बन्धुता यांच्या नवयुगास प्रारंभ व्हावा अशीच त्याची मनीषा असणार व ती तशी हर हिट्लर याने अनेक वेळां बोलून दाखविली आहे. सुदैवाने इंग्लंड–इटालीच्या नवीन प्रयत्नास यश येऊन रुळावरून घसरलेली परिषदेची गाडी रुळावर आली आणि तिने शस्त्रनियमनाचें उद्दिष्ट मकाण गांठलें तर उत्तमच. परंतु जर करितां तो प्रयत्न फसला तर मात्र शस्त्रसंन्यास परिषदेने शस्त्रग्रहणाचीच भूमिका तयार केली असा विपरीत परिणाम दृष्टोत्पत्तीस यावयाचा! परवाच्या मतनोंदणीने 'शस्त्रसंन्यास कीं शस्त्रग्रहण' असा रोकडा प्रश्नच जर्मनीने युरोपियन मुत्सद्यांपुढे टाकला आहे! आपला आब राखून व जर्मनीचें समाधान करून हे मुत्सद्दी तो प्रश्न कसा सोडवितात हें लवकरच दिसून येईल.

# स्फुट सूचना

१ रशियांतील झारशाही उलथून पाडल्यानंतर बोल्शेव्हिकांनी तेथे आपली सत्ता प्रस्थापित केली आणि कार्ल मार्क्सच्या तत्त्वज्ञानाला अनुसरून लेनिनने रशियांतील जनतेच्या राहाणींत विचार सरणींत आणि राज्यपद्धतींत आमलाग्र फेरबदल केला. बोल्शेव्हिकांचें हें तत्त्वज्ञान युरोपांतील इतर देशांतील राज्यकर्त्यांना न पटल्यामुळे त्यांनी प्रारंभी रशियावर पूर्ण बहिष्कार टाकला व कांही राष्ट्रांनी तर रशियांत यादवी माजवून बोल्शेव्हिकांचा अंमल रसातळास पोचविण्याची धडपडहि करून पाहिली. परराष्ट्रांच्या असल्या कोणत्याहि कारवाईला दाद न देता रशियाने आपली नवी राज्यपद्धति दृढमूल करण्याचे कार्य धीर धोरे चालविलें आणि अल्पावधींतच रशियन राष्ट्र एवढे प्रबळ झालें कीं, शेजारपाजारच्या राष्ट्रांना रशियाशीं स्नेहसंबंध जोडावा असें वाटू लागलें व अनेक राष्ट्रांनी सोव्हिएट रशियाला मान्यता देऊन त्याच्याशीं व्यापारी तह केले. इंग्लंडला

बोल्शेव्हिकांचा सर्वांत अधिक धाक वाटतो. तरी पण आपल्या निर्गत मालाला मिळणारें, १६ कोटि लोकसंख्येचें गिऱ्हाईक हातचें जाऊं नये म्हणून इंग्लंडनहि रशियाशीं स्नेहसंबंध जोडला. या स्नेहसंबंधांत एकदोन वेळां व्यत्यय आला तरी तो संबंध आतापर्यंत कसाबसा टिकून राहिला आहे.

---

२ अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील सरकारनें मात्र इंग्लंडपेक्षा अधिक निर्धार दाखविला आणि आजपर्यंत सोव्हिएट सरकारचा वकील आपल्या दरबारीं येऊं दिला नाहीं. परंतु संयुक्त संस्थानांचे सध्याचे अध्यक्ष मि. रूझवेल्ट यांना हा विभक्तपणा मान्य न होऊन त्यांनीं रशियन सरकाराशीं बोलणें सुरू केलें. त्या निमंत्रणावरून रशियाचे परराष्ट्रमंत्री लिट्व्हिनॉफ हे वॉशिंग्टनला गेले आणि त्यांचें रूझवेल्टशीं बोलणें होऊन उभयतांचा दिलखुलासा झाल्यानें प्रे. रूझवेल्ट यांनीं सोव्हिएट सरकारला मान्यता देऊन त्याचा वकील आपल्या दरबारीं ठेवून घेण्याचें व आपला वकील त्यांच्या दरबारीं पाठविण्याचें कबूल केलें. अमेरिकेचा दृष्टिकोन एकाएकीं इतका कसा बदलला? बोल्शेव्हिकांनीं आपल्या तत्त्वज्ञानांत फरक केला नाहीं किंवा अमेरिकेनेंहि बोल्शेव्हिकांचें मत स्वीकारलें असें नाहीं. अर्थातच उभयतांचें राजकीय तत्त्वज्ञान वेगवेगळें असूनदेखील ज्या अर्थी त्या दोनहि राष्ट्रांची अशी मैत्री जडली त्या अर्थी ती व्यापारी धोरणासाठीं तरी असावी अथवा लष्करी धोरणासाठीं तरी असावी. अमेरिकेंत अलीकडे अनेक आर्थिक भानगडी चालू आहेत; पण रशियाशीं तह केल्यानें अमेरिकेची आर्थिक स्थिति विशेष सुधारणार आहे असें नाहीं. यावरून या स्नेहसंबंधाच्या बुडाशीं मुख्यत: लष्करी धोरणच असावें असें वाटतें. रशिया व अमेरिका या दोहोंच्या दरम्यान जपान हें प्रबळ राष्ट्र असून त्याचा उपसर्ग रशियाला पोंचत आहेच व अमेरिकेलाहि पुढेमागें पोचण्याचा संभव आहे. तेव्हां जपानच्या समानशत्रुत्वामुळेच रशिया व अमेरिका यांची ही गट्टी जमली असावी असा तर्क धावतो. रशियाशीं अमेरिकेचा जो करारनामा झाला आहे त्यांतील तपशील जाहीर झाल्यावर याचा उलगडा होईलच.

# शेतकऱ्यांवरील आजचें संकट

महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांवर सध्या तरी आकाश कोसळल्यासारखें झालें आहे. कांहीं ठिकाणीं अतिवृष्टि तर कांहीं ठिकाणीं अनावृष्टि! कोठें पिकावर पडलेला रोग तर कोठें अवेळीं पाऊस पडल्यामुळें हातांशीं आलेल्या पिकांचें झालेलें वाटोळें! या आपत्तींमुळे हैराण व हताश झालेला शेतकरी आपल्याच ठिकाणीं चुळबूळ करीत असलेला दृष्टीस पडतो. निरनिराळ्या तालुक्यांतील पिकांची आणेवारी होत आली असून सरकारी वसुली अधिकाऱ्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें सर्वत्र दहाबारा आण्यांचें पीक आलें असल्याचे 'रिपोर्ट' वसुली-खात्याकडे केले जातील अगर गेलेहि असतील! शेतांत पुरेसें पीक नाहीं, जागतिक मंदीमुळे हातीं आलेल्या पिकाला भाव नाहीं व सरकारी व सावकारी देणें तर दत्त म्हणून थोड्याच दिवसांत दाराशीं उभें राहणार! या अडचणींच्या पेचांत सांपडलेला शेतकरी भांबावून गेला असल्यास नवल काय? पिकांची आणेवारी न्याय्य झाली आहे कीं नाहीं येथपासून तों सरकारी सारा व सरकारी कर्ज देणें त्याला कितपत शक्य आहे हें पाहून त्याची व्यवस्था लावण्याची कामगिरी नीट पार पाडण्याकरितां प्रांतांतील शेतकऱ्यांचा कळवळा येणाऱ्या लोकांची संघटना उत्पन्न करणें अत्यंत जरूरीचें झालें आहे.

गेल्या पंधरवड्यांत शेतकऱ्यांच्या दुःस्थितीचा विचार करून त्यावर उपाययोजना करण्याकरितां ठाणें, कुलाबा, सातारा व बेळगांव या जिल्ह्यांच्या प्रमुख गांवीं कार्यकर्त्यांच्या सभा भरल्या होत्या. कुलाबा जिल्ह्यांत व ठाणें जिल्ह्यांत गेलीं चार वर्षें धारावाढीविरुद्ध जोराची चळवळ चालू आहेच. सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस पेण येथें भरलेल्या परिषदेंत नेमलेल्या कमिटीची सभा ता. ३ रोजीं अलिबाग येथें भरून त्या कमिटीमार्फत हजारों शेतकऱ्यांचे अर्ज सरकाराकडे जाण्याची व्यवस्था केली जात आहे. या अर्जांत मागील सालीं दिलेली तहकुबी माफींत टाकावी, धारा भरण्याची मुदत दोन महिन्यांनीं पुढें ढकलावी, री-रिव्हिजन सेटलमेंटचा पुनः विचार होऊन सध्याच्या धान्याच्या भावाच्या प्रमाणांत धारा

घेतला जावा वगैरे मागण्या केल्या आहेत. ठाणें जिल्ह्यांतील खातेदार व शेतकरी लोकांच्या प्रतिनिधींचीहि सभा ता. ५ रोजीं कल्याण येथे भरली होती. या सभेचे ठरावहि वरीलप्रमाणेच आहेत. जपानी भात व तांदूळ या प्रांतांत येऊन तो स्वस्त विकला जाऊं लागल्यामुळे भातशेतीस मोठा धक्का बसला असल्याचें त्यांच्या ठरावांत नमूद केलेलें आहे. सातारा जिल्ह्यांतहि अशाच सभा भरल्या व इस्लामपूर तालुक्यांतील पुढाऱ्यांनी थोड्याबहुत कामास सुरुवातहि केली. बेळगांव येथे अशीच सभा ता. ५ रोजीं भरली होती. या सभेला काँग्रेसचे कार्यकर्तेहि हजर होते. शेतकऱ्यांना तहकुबी व सढळ सूट मिळावी, सरकारधारा चाळीस टक्के कमी करावा, तगाईवरील व्याजाचा दर चार टक्के करावा, कर्जबाजारीपणा कमी करण्याकरिता उपाययोजना करावी वगैरे ठराव या बेळगांवच्या सभेंत पसार झाले. महाराष्ट्रांतील इतर जिल्ह्यांतील पुढारी व कार्यकर्ते जागे होऊन या बाबतींत लवकरच हालचाल सुरू करतील यांत शंका नाही.

निरनिराळ्या ठिकाणीं भरलेल्या या सभांचे ठराव व मागण्या पाहतां त्या जवळ जवळ एकाच स्वरूपाच्या आहेत हें सहज लक्षांत येतें. सरकारने आपली जमीनधाऱ्याची व्यवस्था नव्या तत्त्वावर उभारल्याशिवाय व शेतकऱ्यांच्या इतर देण्यांच्या बाबतींत प्रत्यक्ष कायद्यानेच काही नियंत्रण घातल्याशिवाय हे प्रश्न सुटणें शक्य नाही. शेतकऱ्यांच्या डोक्यावर असलेला कर्जाचा डोंगर तरी नुसत्या ठरावाने कसा कमी होईल? शेतकऱ्यांची संघटना करून त्यांच्या परिस्थितीचें ज्ञान करून देऊन व त्यांना उपाययोजनाहि समजून देऊन त्याना स्वतःच्या पायावर उभें राहण्यास व आपल्या दुःखाची दाद स्वतः लावून घेण्यास शिकविलें पाहिजे. त्यांची दाद लावून घेण्याचा तूर्त दुसराहि एक मार्ग आहे व तो म्हणजे कायदेमंडळ हें होय. हीं कायदेमंडळें शेतकऱ्यांच्या हिताची चाड बाळगणाऱ्या त्यांच्याच प्रतिनिधींनी काबीज करून सरकारच्या प्रत्यक्ष कारभारास शेतकऱ्यांच्या हिताचें वळण त्यांनी लावलें तरच हे सर्व प्रश्न नीटपणें सुटले जातील; एरव्हीं नाही.

लोकशाही स्वराज्यपक्षाच्या पुढाऱ्यांनी व कार्यकर्त्यांनी या सर्व प्रश्नांचा व अडचणींचा विचार करूनच आपल्या पक्षाचा कार्यक्रम ठरविला आहे. मुंबईस भरलेल्या बृहन्महाराष्ट्र परिषदेने पसार केलेल्या एकविसाव्या ठरावांत धान्य वगैरे शेतीच्या उत्पन्नाच्या किंमती भरमसाट उतरल्यामुळे व सर्व प्रकारचे अप्रत्यक्ष करहि वाढल्यामुळे सरकारी धारा, खंड व इतर बोजे शेतकऱ्यांच्या सामर्थ्याच्या प्रमाणांत बसविले जावे असें व्यापक धोरण आंखलें आहे. तेहतिसाव्या ठरावांत शेतसारा व खंड यांमध्ये शेंकडा तीस टक्के कपात, इतर स्थानिक करांमध्ये यथाप्रमाण कपात, व्याजाचा दर कमी करणें, शेंकडा सहा टक्के व्याज व मूळ रक्कम देण्यांत आलेली असेल तर तें कर्ज माफींत टाकणें, अप्रत्यक्ष करांचे शेतकऱ्यांवरील ओझें कमी करणें वगैरे बाबी प्रामुख्याने मांडल्या आहेत. या सर्व कामांकरिता प्रथम शेतकऱ्यांचे संघ ठिकठिकाणीं काढले पाहिजेत व एकतिसाव्या ठरावांत म्हटल्याप्रमाणे या मागण्या पुऱ्या करून घेण्यासाठी कायदेमंडळेंहि काबीज करून सरकारी सत्तेचीं केंद्रें हातीं घेतलीं पाहिजेत. शेतकऱ्यांमध्ये जागृति करणें आणि त्यांनी मनांत आणल्यास त्यांच्यावरील संकटांचें निवारण करण्याचें सामर्थ्य त्यांच्या स्वतःच्या हातीं आहे याची त्यांना जाणीव करून देणें हें पहिलें काम आहे. शेंकडा ऐशीं टक्के मतदार शेतकरी आहेत. मग त्यांनी केविलवाणें तोंड करून हताश होण्याचें कारण काय? ते म्हणतील व आपला हक्क बजावतील तर राज्यकारभाराला शेतकऱ्यांच्या हिताचें वळण लागल्याशिवाय राहणार नाही. लोकशाही स्वराज्य पक्षाने मतदारांची ही सुप्त शक्ति जागृत करून ती कामास लावून त्याकरवीं हिंदुस्थानांत स्वराज्य व स्वातंत्र्य प्रस्थापित करण्याचें ठरविलें असल्याने सामान्य जनतेने या पक्षाला पाठिंबा देऊन संघटित अशा कार्याला प्रारंभ करण्याची अत्यंत जरूरी आहे हें सांगणें नकोच.

# काँग्रेसविरुद्ध गांधींहि बंडखोर

(ले.— डॉ. वि. म. भट, येवलें.)

मुंबईस लोकशाही स्वराज्य पक्ष स्थापन झाल्यापासून त्याजवर कांहीं लोक बंडखोरीचा आरोप करीत आहेत. पक्ष-स्थापनेच्या परिषदेत नवीन पक्षाचें काँग्रेसशीं नातें काय राहील याविषयीं एक ठराव मंजूर झाला. त्या ठरावाचा वरील आरोपाच्या दृष्टीनें अधिक खुलासा करणें मला जरूर वाटतें. कारण नवीन पक्षाच्या काँग्रेसनिष्ठेबद्दल आग्रह धरणारांपैकीं मीहि एक आहे.

( १ ) या पक्षाच्या सभासदानें काँग्रेसचा सभासद असलेंच पाहिजे.

वस्तुतः अशी स्थिति आहे कीं, या पक्षांतल्या सभासदांपैकीं शेंकडा ८० अगोदरच काँग्रेसचे सभासद आहेत. आणि यांपैकीं एकाचाहि मानस काँग्रेस सोडण्याचा नसून शक्य तोंवर तिला चिकटूनच राहण्याचा आहे. म्हणजे या पक्षांतले बहुसंख्य लोक जर काँग्रेसचे व काँग्रेसमध्येच राहू इच्छिणारे आहेत, तर मग त्यांनी आम्ही काँग्रेसचे आहोंत व काँग्रेसमध्येच राहणार असें त्या संस्थेबद्दल वाटत असलेल्या आदरानें व अभिमानानें म्हटलें तर त्यांत वावगें तें काय? काँग्रेसबद्दलचा आदर ह्या पक्षांतल्या सभासदांपैकीं बऱ्याचजणांनीं प्रत्यक्ष कायदेभंगांत भाग घेऊन व तुरुंगवास पत्करूनहि दाखविला आहे.

( २ ) जे थोडेसे सभासद काँग्रेसचे सभासद नसतील त्यांना काँग्रेससंस्था आज कायदेशीर रीतीनें—सरकारी कायद्यानें व गांधींच्या हुकुमानें—अस्तित्वांतच नसल्यानें काँग्रेसचे सभासद होतां येतच नाहीं. पण ह्या संस्था पुनः कायदेशीर रीतीनें अस्तित्वांत आल्या म्हणजे मात्र ह्या सभासदांनीं काँग्रेसचे सभासद झालेंच पाहिजे असा ह्या ठरावाचा दुसरा भाग आहे. या दोनही भागांकडे जो पाहील त्याला ह्या पक्षाला काँग्रेसमध्यें राहण्याचा किती अभिमान व आग्रह वाटत आहे ह्याची बरोबर कल्पना येईल. काँग्रेसचें सभासदत्व हें या पक्षाच्या सभासदत्वाची अवश्य अटच आहे, हे ह्या दोनही भागांवरून स्पष्टपणें कळून येतें.

## खोटा आरोप

खरा वाद ह्या ठरावाच्या ३ ऱ्या भागाबद्दल आहे. आणि ह्या तिसऱ्या भागामुळेच या पक्षावर विसंगतीचे, बंडखोरीचे, काँग्रेसद्रोहाचे आरोप केले जात आहेत. पण वर दर्शविल्याप्रमाणें काँग्रेसच्या सभासदत्वाची अट ही ह्या पक्षांतल्या प्रवेशाची जर अवश्य अट मानली आहे तर ह्या काँग्रेसनिष्ठ पक्षाला काँग्रेसद्रोही म्हणणें हा 'वदतो व्याघातः' असून, हा आरोप करणाराच धडधडीत खोटें बोलत आहे असें सिद्ध होतें.

शिवाय काँग्रेसनें ज्या वेळेस चढाईचें धोरण पत्करून कायदेभंगाचें शस्त्र उपसलें होतें त्या वेळेस ह्या पक्षांतल्या कैक सभासदांनीं आनंदानें आपले सर्व मतभेद विसरून कायदेभंगांत पुढाकार घेतला होता, व त्यासाठीं तनमनधनानें सर्व प्रकारची हानि सोसून तुरुंगवासहि पत्करला होता. तेव्हा ज्या पक्षापैकीं शेंकडा ८० अगोदरच काँग्रेसचे सभासद आहेत, त्या पक्षानें जुन्या व नवीन सभासदांस काँग्रेसच्या सभासदत्वाची अवश्य अट आपल्या पक्षाच्या सभासदत्वासाठीं ठेवली हें योग्यच केलें.

## कौन्सिलप्रवेश

एका बाबतींत मात्र ह्या पक्षानें काँग्रेसच्या ठरावाविरुद्ध जाण्याचें ठरविलें आहे. आणि तेवढ्यामुळेच त्याच्यावर बंडखोरीचा गहजब उडाला आहे. आणि ती बाब म्हणजे कौन्सिलप्रवेश ही होय. पण हा गहजब उडवण्यापूर्वीं कांहीं गोष्टी अवश्य ध्यानांत घेतल्या पाहिजेत. त्या अशा:—

( १ ) काँग्रेसनिष्ठा ही फक्त काँग्रेसच्या ब्रीदापुरतीच आहे असा आजवरचा सर्वमान्य संकेत आहे.

( २ ) काँग्रेसचे ठराव सामान्यतः बंधनकारक म्हणून मानले जात नसून ते फक्त शिफारसवजाच आहेत असें खुद्द महात्माजींनी 'यंग इंडियां'त अनेक वेळा कबूल केलें आहे.

( ३ ) यदाकदाचित् जरी ठरावांना बंधनस्वरूपी मानलें तरी जे लोक शेंकडा ९८ ठरावांना बंधनकारक मानतात व एक–दोनापुरतेच बंधनकारक मानीत नाहींत त्या लोकांना शेंकडा ९८ टक्के म्हणजे जवळ जवळ पूर्ण काँग्रेसनिष्ठ म्हणणेंच योग्य होईल का नाहीं?

## हुकुमे हुकुमी

ह्या गोष्टी विचारात घेऊनच मग ह्या पक्षाला, बंड ह्या शब्दाबद्दल खोटा आग्रहच असेल तर, 'बंडखोर' हवें तर म्हणावें. शेंकडा १-२ टक्के बंडखोर

म्हणवून घेण्यास हा पक्ष कबूल आहे, पण ही बंडखोरी ह्या एकट्या पक्षाचीच नाही. पूर्वी कॉंग्रेसने सूत कातण्याच्या केलेल्या अटीवजा ठरावाला कॉंग्रेसमधल्या बहुतेक सभासदांनी गचांडीच दिलेली आहे, आणि कै. मोतिलाल नेहरू, देशबंधु दास, पटेल यांसारख्यांनी तर भर-सभेंत या ठरावाप्रमाणे आम्ही केव्हांहि वागलो नाही म्हणून बंडखोरीची कबुलाच दिलेली आहे.

एवंच, सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं, कॉंग्रेसचे सर्व ठराव अगदी तंतोतंत आजवर कोणींहि फारसे पाळले नाहीत व पाळणाहि शक्य नाही. त्यांत जर चूक होत असेल तर ती कॉंग्रेसने भलत्याच तप-शिलांत शिरण्याचा जो आग्रह धरला, त्यांत आहे. Democracy at the Crossways ह्या पुस्तकाचा कर्ता लिहितो कीं, "लोकसत्तेला राज्यकारभारांत नसती ढवळाढवळ करण्याची विलक्षण खोड असते. प्रत्येक बारीकसारीक कामातसुद्धा 'हुकुमेहुकुमी' चालत असल्याने बुद्धिवान व कर्तृत्वशाली माण-सांना त्यामुळे काम करणेच अशक्य होत. अशा कामाला चतुर व गुणी माणसें तरी कशाला हवींत? कळसूत्री बाहुल्यासुद्धा तीं कामें करतील." म्हणून कॉंग्रेसने मुख्यतः सामान्य धोरणापुरतेंच लक्ष द्यावें, तपशिलांत पडूंच नये, हेंच आजपर्यंतच्या बंडखोरीपासून शिकलें पाहिजे. नाहीं तर सर्वच कमी-अधिक प्रमाणानें कॉंग्रेस-निष्ठ असा विरोधाभास उत्पन्न होतो. बंडखोर सभासदांत ह्या बहुसंख्यांच्या जुलुमांविरुद्ध बंड-खोरीची प्रवृत्ति उत्पन्न होते व तिच्याकडे मग संस्था-चालकांनाहि कानाडोळा करावा लागतो. आणि त्यात मग जे गांधी-नेहरूंसारखे महत्त्वाचे लोक असतात त्यांना ह्या बंडखोरीबद्दल कांही निंदात्मक शासनसुद्धा न झाल्याने व नाव-डत्या लोकांवरच त्या निंदेचे प्रहार आल्याने कित्ये-कांना अन्यायहि सहन करावा लागतो.

## 'अस्पृश्य' कौन्सिलें

हा असला अन्यायाचा प्रकार आज होत आहे. कारण आता तर 'अस्पृश्यां'च्या बाबतींत आलेल्या मंदिरप्रवेशाच्या बिलाला कॉंग्रेसने 'अस्पृश्य' मानलेल्या कायदेमंडळांतूनच पास करून घेण्याचा अट्टाहास खुद्द गांधींनीच चालवल्यामुळे कॉंग्रेस-विरुद्ध खुद्द महात्माजीच बंडखोर झाले आहेत! कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना व अनुयायांना हा स्वतःचा आचार-विरोध चालतो, ह्या मंदिर-प्रवेश बिलापुरते का होईना पण 'अस्पृश्य' कायदेमंडळांतल्या 'सैतानी' सरकारी सभासदांपुढे राजगोपाळाचारींनी 'लांगूलचालन' केलेलें चालतें; पण खुद्द आपल्याच कॉंग्रेसमधल्या, कॉंग्रेसबद्दल अभिमान बाळगणाऱ्या, तिच्यासाठीं सर्व खस्ता खाण्यास तयार असणाऱ्या व शेंकडा ९८ टक्के एक-निष्ठ राहणाऱ्या सभासदांना मात्र कॉंग्रेसद्रोही, देशद्रोही, अशीं सर्वथैव खोटीं विशेषणें कॉंग्रेसचे अनुयायी म्हणविणारे लावतात. एवढ्यावरून त्यांना न्यायाची व सत्याची चाड किती आहे हे वाचकांस तेव्हांच कळून येईल. या पक्षाच्याविरुद्ध बंडाचा आरोप करणेंच चुकीचें आहे.

कौन्सिलप्रवेशाच्या बाबतींत कॉंग्रेसने दुराग्रहा-चें धोरण पत्करल्यामुळेच ह्या ठरावांत "कॉंग्रेसचे ठराव ह्या पक्षानें मान्य केल्याशिवाय ते ह्या पक्षास बंधनकारक नाहींत" अशी पुरवणी घालावी लागली.

इतर बाबतींत ९८ टक्के जुळतें धोरण कॉंग्रेसशीं असल्यानें ह्या पक्षास कॉंग्रेसमध्ये राहण्याचा व कॉंग्रेसनिष्ठ म्हणवून घेण्याचा अधिकार आहे. विरोधाचें कारण नष्ट झाल्यास ह्या पुस्तीची जरूर-सुद्धा राहणार नाही. तो कॉंग्रेसमध्ये पूर्णपणें विलीन होईल.

पुण्याच्या परिषदेच्या ठरावानी जेथें दे. नरिमन-सारख्याचेंहि समाधान झालें नाहीं तेथें आमच्या पक्षाचें झालें नसल्यास नवल नाहीं. दे. नरिमन महात्माजींना भेटून आल्यानंतरहि कॉंग्रेसचें धोरण व वर्तन बदलण्याची हाकाटी करीतच आहेत. ह्या त्यांच्या हाकाटीवरूनच कॉंग्रेसमध्ये कांही तरी 'कुजलें आहे' असें हॅम्लेटप्रमाणे म्हणावेंसें प्रत्येकाला वाटते. पाहावें आता मि. नरिमन यांचें तरी कितपत चालतें तें.

# भागीदारी मत्ता, सरकारी सत्ता, लोकमताला लत्ता !

रिझर्व्ह बँक बिलाचा विचार करण्यासाठी नेमलेल्या सिलेक्ट कमिटीचें काम आटोपून त्या कमिटीने आपला रिपोर्ट कायदे-मंडळाला सादर केला आहे आणि त्या रिपोर्टाची चर्चा करून बिलाची विल्हेवाट लावण्यासाठीं कायदे-मंडळाची बैठकहि दिल्ली शहरीं काल-पासून सुरू झाली आहे. सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टाची रूपरेषा सामान्यतः कळली असली तरी रिपोर्टाच्या प्रती अद्यापि सरकारी रीत्या प्रसिद्ध झाल्या नाहींत आणि त्या रिपोर्टाला जोडलेल्या जागाऱ्या मदभेद—पत्रिकांतील सूचना-चा तर तितकाहि थांग लागलेला नाही. तथापि सिलेक्ट कमिटीचें काम चालू असतां त्या कामाचा जो अहवाल वेळोवेळीं प्रसिद्ध होत आला त्यावरून बिलाच्या मूळ स्वरूपांत सिलेक्ट कमिटीने कितपत फेरफार केला, लोकप्रतिनिधींच्या कोणत्या सूचना झिडकारल्या आणि अखेरीस कोणत्या स्वरूपांत हें बिल असेंब्लीपुढे येत आहे याची कल्पना करतां येण्यासारखी असल्याने कायदेमंडळाने या बिलाची संभावना कशा प्रकारें करावी याचा विचार करूं.

कोणत्याहि राष्ट्राचे अन्तर्गत व बहिर्गत आर्थिक व्यवहार सुसंघटितपणाने व एकसूत्री-पणाने चालण्याला त्या राष्ट्राला मध्यवर्ती बँकेची अत्यंत जरूरी असते आणि म्हणूनच ज्यांत असली एखादी बँक नाही असा कोणताच प्रमुख देश दर्शवितां येणार नाही. परंतु हिंदु-स्थानचा सर्वच कारभार परावलंबी व सृष्टि-विप-रीत असल्याने येथील सर्वसत्ताधारी सरकाराने बँकेने करावयाच्या आर्थिक घडामोडींचाहि मक्ता आजवर आपल्याच हातांत पूर्णत्वाने राखून ठेवला आहे. ही स्थिति व्यवहारदृष्ट्या अनैसर्गिक असल्याने या देशांतहि मध्ववर्ती बँक स्थापिली जावी अशी कल्पना या-पूर्वी उद्भूतच झाली नाही असें नाही. ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता हिंदुस्थानांतील बऱ्याच भागांत प्रस्थापित झाल्या वेळेपासून आतापर्यंत अनेक वेळां ही कल्पना वेगवेगळया स्वरूपांत पुढे आली आहे. या दिशेने पहिला प्रयत्न १८०८ सालीं करण्यांत आला आणि त्यानंतर १८३६, १८६७, १८९९ या सालांतहि असेच प्रयत्न करण्यांत आले; पण ते कोणत्या ना कोणत्या तरी कारणाने निष्फळ ठरले. १९१३ सालच्या चेंबर्लेन कमिशनने या प्रश्नाची तड लावण्याकरितां तज्ज्ञांची एक कमिटी नेमावी अशी शिफारस केली आणि मध्यंतरीं महायुद्धाचें विघ्न उपस्थित झालें नसतें तर त्या वेळीं हा प्रश्न सुटूनहि गेला असता.

महायुद्धाच्या समाप्तीनंतर १९२१ च्या प्रारंभींच 'इंपीरिअल बँकेची' स्थापना झाल्याने हा प्रश्न कांही काळ मागे पडला. पण १९२६ सालच्या हिल्टन यंग कमिशनने पुनश्च या प्रश्नाला चालना दिली आणि त्याबरोबरच 'मध्यवर्ती बँकेचें हें कार्य इंपीरिअल बँकेकडून होऊं शकत नाही, सबब हिंदुस्थानसरकाराने अशी मध्यवर्ती बँक स्थापन करावी' अशी जोराची शिफारस केली. तिला अनुसरून त्या वेळचे फडणवीस सर बेसिल ब्लॅकेट यांनी एक बिल कायदेमंडळाला सादर केलें. ही बँक स्टेट बँक न करता भागीदारांचीच बँक करावी व त्या बँकेच्या डायरेक्टरांत सरकारनियुक्त सभासद घुसडून द्यावे, असा ब्लॅकेट साहेबांचा पहिला बेत होता. त्याला लोकप्रनिधींकडून निकराचा विरोध झाल्यामुळे तिला स्टेट बँकेचें स्वरूप देण्याला ब्लॅकेट राजी झाले. तथापि स्टेट बँकेच्या डायरेक्टरांच्या नेमणुकींत कायदे-मंडळाचा हात कितपत चालावा याविषयी वांधा पडला. त्यांतूनहि कांही तरी तडजोड काढतां आली असती व तशी तडजोड सुचविली जाऊन ब्लॅकेटसाहेबांनाहि ती ग्राह्य वाटूं लागली होती. परंतु कायदे-मंडळाशीं तडजोड करण्याच्या या वार्तेने त्या वेळच्या सुलतान-शाही भारतमंत्र्याचें डोकें भणाणून गेलें आणि ब्लॅकेटसाहेबांना वरून कानमंत्र

मिळाल्यामुळे तें बिल तसेंच कुचंबत पडलें. जुन्या बिलाचें हें घोंगडें तसेंच भिजत ठेवून सर बेसिल यांनी १९२८ च्या प्रारंभीं पूर्वीच्याच आशयाचें बिल निराळ्या स्वरूपांत दडपून देण्याचा दुसरा डाव टाकला; पण असेंब्लीचे अध्यक्ष विठ्ठलभाई पटेल यांच्या दक्षतेमुळे तो डाव फसला आणि ब्लॅकेट साहेबांना तो नादच सोडून द्यावा लागला.

अशा तऱ्हेने आजवर अधांतरीं लोंबकळत असलेला हा प्रश्न नवीन सुधारणाच्या घटनेच्या वेळीं अधिक निकराने पुढे आला आहे. भावी राज्यघटनेंत मध्यवर्ती सत्ता कायदेमंडळाच्या हवाली करावी लागणार व त्याबरोबरच चलन व हुंडणावळ यांचें नियंत्रण करण्याचीहि सत्ता पर्यायाने कायदेमंडळाकडेच जाणार. तशी सत्ता कायदेमंडळाकडे जाऊं नये ही तर विलायतेंतल्या भांडवलवाल्यांची व व्यापाऱ्यांची तीव्र इच्छा.ती इच्छा पूर्ण करण्याकरितां 'संरक्षक बंधनें' आणि 'गव्हर्नर जनरल यांचे जादा अधिकार' यांचा समावेश भावी राज्यघटनेंत प्रामुख्याने होणार आहेच. तरी पण 'द्विर्बद्धं सुबद्धं' हा न्याय लक्षांत घेऊन नोकरशाहीने रिझर्व्ह बँक बिलाची रचनाच अशी केली आहे कीं, त्या बिलाला कायद्याचें स्वरूप येतांच चलन, हुंडणावळ, गंगाजळी ठेव इत्यादि बाबतींत कायदेमंडळाला बोट देखील शिरकवितां येऊं नये! अशा रीतीने कायदेमंडळाच्या अधिकाराची कायमची खच्ची करणारें हें बिल कायदेमंडळांत पसार होण्याला साहाजिकच विरोध होईल. तसा विरोध होऊं नये, निदान कांही विरोधकांचा तरी बुद्धिभेद होऊन सरकार पक्षाला बहुमत लाभावें, या हेतूने असा पेंच टाकण्यांत आला आहे कीं, रिझर्व्ह बँक बिल पास होऊन त्या नव्या कायद्यान्वयें चलन, हुंडणावळ, गंगाजळी ठेवी वगैरेंचा कारभार यशस्वी रीतीने चालूं लागला अशी खात्री पटेपर्यंत मध्यवर्ती सरकाराची सत्ता कायदेमंडळाच्या हातीं दिली जाऊं नये. मध्यवर्ती सत्ता हातीं मिळण्याच्या लोभाने रिझर्व्ह बँक बिलाला होणारा विरोध मंदावेल आणि आपल्या मनाजोगतीं नियंत्रणें घालून बनविलेल्या या बिलाचा खोडा कायदेमंडळाकडून आपखुषीनेच आपल्या पायांत घालून घेतला जाईल अशी नोकरशाहीची अपेक्षा आहे.

१९२७ सालीं सर बेसिल ब्लॅकेट यांच्या बिलावर वादविवाद व खासगी चर्चा होऊन भागीदारांची बँक नको, स्टेट बँकच हवी असें लोकमत त्या वेळींच स्पष्टपणें प्रगट झालें असतां आणि स्टेट बँकेच्या उभारणीला त्या वेळीं ब्लॅकेटसाहेबहि कबूल झाले असता, सरकारने त्यांचा त्या वेळचा शब्द मोडून भागीदारांच्या बँकेचा हट्ट धरावा हें अश्लाघ्य होय. परंतु स्वार्थपरायण सरकारच्या मनाला श्लाघ्याश्लाघ्यतेचा विचार शिवतच नाही. आणि सिलेक्ट कमिटीने स्टेट बँकेचें घोंगडें सरकारच्या गळ्यांत बांधण्याचा प्रयत्न करून देखील बहुमताच्या अभावीं तो सफळ झाला नाही. अर्थातच आता जनतेची सगळी भिस्त कायदेमंडळावर आहे. कायदेमंडळाने ही बँक स्टेट बँकच करावी असा आग्रह धरला व सरकारने बिलच माघारें घेतलें तर भावी सुधारणांचा गाडा कायमचा अडून पडल अशी कित्येकांस धास्ती वाटते.

श्वेतपत्रिकेंतील योजनेंत खरोखरच तसें कांही लोभनीय असतें तर ती योजना कालावधीवर टाकणें अप्रयोजक ठरलें असतें. परंतु श्वेतपत्रिकेंतील योजनाच कुचकामाची असल्याने त्या धास्तींत कांही अर्थ नाही.शिवाय दुसरा बलवत्तर विचार असा कीं, रिझर्व्ह बँक बिल पास होऊन बँकेचा व्यवहार सुरळीत चालू लागल्याखेरीज भावी राज्यघटना अमलांत येऊं शकणार नाही हें खरें असलें तरी, रिझर्व्ह बँकेची रचना कशीहि भलीबुरी केली तरी तिला कायदेमंडळाने संमति दिलीच पाहिजे असलें कांही नैतिक बंधन कायदेमंडळावर नाही; आणि रिझर्व्ह बँकेची एखादी अव्यवहार्य योजना असेंब्लीने नापसंत केली म्हणून सरकाराने दुसरी व्यवहार्य योजना असेंब्लीपुढे मांडूं नये असाहि त्याचा अर्थ होऊं शकत नाही.

रिझर्व्ह बँक आधी स्थापन होऊन चालू लागली पाहिजे, या अटीचा गैरवाजवी फायदा घेऊन सरकार जर अयोग्य योजना जनतेवर लादूं पाहील, अथवा ती योजना फेटाळून लावली गेली म्हणून दुसरी योग्य योजना कायदेमंडळापुढे न मांडतां नव्या राज्यघटनेचें कार्य अर्धवटच सोडून देईल, तर त्याचा दोष कायदेमंडळावर न येतां तो सरकारच्याच माथीं मारला जाईल आणि राज्यघटनेचा गाडा अडून पाडल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या क्षोभाला सरकारच जबाबदार राहील. असली जबाबदारी घेण्याला सरकार तयार होणार नाही आणि तसा प्रसंग टळावा म्हणून रिझर्व्ह बँक बिलांत योग्य ती दुरुस्ती करण्याला सर जॉर्ज शूस्टर हेहि कबूल होतील. मात्र कायदेमंडळाने तितकी खंबिरी दाखविली पाहिजे.

रिझर्व्ह बँक ही स्टेट बँक न करतां भागीदारांची बँक केल्याने राजकारणाच्या वावटळीपासून ती अलिप्त राहील व तिचा कारभार त्या वावटळीबरोबर हेलकावे न खातां संथपणानें चालेल असें सरकार सांगतें. परंतु हिंदुस्थानांतील लोकपक्षाच्या राजकारणाचा तेवढा संपर्क सरकाराला वावडा वाटतो. आणि स्वतः सरकाराचा व सरकारनियुक्त डायरेक्टरांचा संपर्क कांही वावडा वाटत नाही; एवढेंच नव्हे तर तो संपर्क अधिकाधिक वाढावा असेंच सरकारचें धोरण दिसतें. त्याचप्रमाणे इंग्लंडांतील राजकारणांत फेरबदल होऊन एक मंत्रिमंडळ मोडलें व दुसरें आलें, जुने भारतमंत्री गेले व नवे आले आणि त्यामुळे इंग्लंडांतच नवें धोरण सुरू झालें तर त्या वावटळीचाहि रिझर्व्ह बँकेच्या कारभाराला लागलेला संपर्क खपतो. परंतु हिंदुस्थानांतल्या असेंब्लींत एक पक्ष गेला व दुसरा आला तर तेवढ्यामुळे उत्पन्न होणारी वाऱ्याची मंद झुळुकदेखील रिझर्व्ह बँकेला सोसत नाही! केवळ इंग्लंडच्याच हातांत येथील रिझर्व्ह बँकेची वेसण असावी एवढ्यासाठीच असला युक्तिवाद पुढे आला आहे हेंच त्यावरून सिद्ध होत नाही काय ?

असो. रिझर्व्ह बँक ही भागीदारांची बँक झाल्याने बँकेची मत्ता कायद्याने भागीदारांची ठरते; व्यवहारतः पाहता खरी सत्ता सरकारच्या हातांत केंद्रीभूत होते आणि हिंदुस्थानांतील लोकमताला आपला अधिकार प्रभावी करण्याला कोणतेंच साधन नसल्याने लत्ताप्रसाद तेवढा त्याच्या वांटणीला येतो! असली ही तिरपगडी योजना बदलून ही बँक स्टेट बँकच व्हावी असा आग्रह कायदेमंडळाने धरावा. तो यशस्वी झाल्यास पुढील सर्वच वाद मिटतो. परंतु कायदेमंडळांतील कित्येक सभासदांच्या अज्ञानामुळे आणि इतर कित्येकांच्या मिंधेपणामुळे स्टेट बँक करण्याच्या सूचनेला बहुमताचा पाठिंबा नच मिळाला तर निदान या बँकेचीं सूत्रें परकी भांडवलवाल्यांच्या हातीं जाऊं नयेत एवढी तरी खबरदारी कायदेमंडळाने घ्यावी. त्या उद्देशाने सिलेक्ट कमिटींत असें सुचविलें गेलें आहे कीं, बँकेच्या भांडवलापैकीं निदान ¾ भांडवल हिंदी नागरिकांच्याच मालकीचें असावें आणि डायरेक्टरांतले निदान ¾ डायरेक्टर्स तरी हिंदी असावेत. यासंबंधाचा खुलासा ॲक्टात स्पष्टपणें नमूद केला जावा. त्याचप्रमाणे ज्या वसाहतींतून हिंदी जनतेला समानतेने वागविण्यांत येत नसेल त्या वसाहतींतल्या नागरिकांस या बँकेचा भागीदार होण्यास मज्जाव असावा अशी जी सूचना सिलेक्ट कमिटींत पास झाली आहे, तीहि स्पष्ट शब्दांनी ॲक्टांत नमूद केली जावी.

या पुढचा खरा वादाचा मुद्दा म्हणजे रुपयाचा संबंध सोन्याशीं जोडला जावा कां इंग्लंडांतील स्टर्लिंगशीं म्हणजे कागदी चलनाशीं जोडला जावा आणि रुपयाचा भाव किती पेन्स धरावा व कोणत्या दराने बँकेने इंग्लंडच्या हुंड्यांची खरेदीविक्री करावी, हा होय. हलींच्या १८ पेन्सांच्या भावाने हिंदुस्थानाचें अतोनात नुकसान होत आहे व तोच भाव या बिलांत कायम राहिला तर तसें नुकसान कायमचेंच होत राहाणार. वास्तव हा भाव बराच कमी करावा व पुढेहि तो परिस्थितिप्रमाणें बदलावा लागल्यास तो बदलण्याचा अधिकार

हिंदी कायदेमंडळाकडेच राहावा. हा भाव बदलण्याचा अधिकार हिंदी कायदेमंडळाकडे दिला गेला तरी जोंपर्यंत रुपयाचें नातें सोन्याशीं न जोडतां स्टर्लिंगशीं जोडलेलें राहील, तोंपर्यंत विलायतेंतल्या वावटळींचे धक्के हिंदी चलनाला बसल्याशिवाय राहाणार नाहींत. याकरितां हिंदुस्थानातलें आर्थिक धोरण खरें स्वतंत्र होण्याला रुपयाचा संबंध स्टर्लिंगपासून तोडला पाहिजे व तो सोन्याशींच जोडला पाहिजे. या संबधांत सिलेक्ट कमिटींत बराच ऊहापोह झाला. परंतु तो प्रश्न अधांत्रींच राहिला. रुपयाचा भाव १८ पेन्स कायम करण्याच्या प्रश्नावर सरकारी बाजूस अवघीं दोन मतें अधिक पडून विलायती धोरणच मंजूर झालें. परंतु असेंब्लींतील सभासदांनी आता या प्रश्नावर निकराचा सामना देऊन विलायती धोरणाचें हें जूं झुगारून दिलें पाहिजे. त्याचप्रमाणे रिझर्व्ह बँकेचा जो कायदा पास होईल त्या कायद्यांत जरूर ते फेरबदल करण्याची सत्ता हिंदुस्थान सरकारच्या हातींच अबाधित राहिली पाहिजे. एकट्या गव्हर्नर—जनरलकडे तो अधिकार ठेवला गेल्यास विलायतेंतल्या भांडवलवाल्यांच्या विरोधामुळे, वरून कानमंत्र येऊन, गव्हर्नर-जनरल हे दुरुस्ती—बिलाला हरकत घेतील आणि कायदेमंडळाची सत्ता नुसती नामधारी ठरेल. यास्तव दुरुस्ती-बिलाला परवानगी देण्याचा अधिकार गव्हर्नर—जनरल—इन-कौन्सिल याच्याकडेच सोंपविण्यांत आल्याचें कलम बिलांत नमूद केलें जावें. प्रस्तुतच्या बिलांत असा फेरफार होईल तर रिझर्व्ह बँक स्थापन करण्यांत थोडें तरी स्वारस्य आहे; नाही तर हल्लींचें बिल जशाचें तसें पास झाल्यास आर्थिक गुलामगिरिचा नवा पाशच आपण आपल्या गळ्याभोंवती बांधून घेतला असें होईल. कायदे मंडळांतील सभासद असला पाश बांधून घेण्याचा वेडेपणा करणार नाहींत असा आम्हांस भरंवसा वाटतो.

# पत्रकर्त्यांच्या स्फुट सूचना

१ नाशिकच्या तुरुंगांतील अमृतलाल-प्रकरणाइतका क्षोभकारक प्रकार हिजलीच्या तुरुंगांत गेल्या ऑगस्ट महिन्यापासून घडत असल्याचें संतापजनक वृत्त, त्या तुरुंगांत एकवीस महिने शिक्षा भोगून बाहेर आलेले श्री. तारापद लाहिरी यांनी एका पत्रकद्वारें प्रसिद्ध केलें आहे. ‘सरकार सलाम’ म्हणून सुपरिंटेंडटाला मुजरा करण्याची सक्ति वकील, डॉक्टर, वगैरे पदवीधर राजबंद्यांवरहि कशी करण्यांत आली आणि ती न जुमानणाऱ्यांना किती कठोर शिक्षा देण्यांत आल्या, याचें हृदयभेदक चित्र त्यांनी त्या पत्रकांत रेखाटलें आहे. एवढेच नव्हे तर, त्यानंतर कलकत्ता येथे या जुलुमाचा निषेध करण्यासाठी, ‘मॉडर्न रिव्ह्यू’चे संपादक श्री. रामानंद चतर्जी यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली असता, तींत श्री. लाहिरी यांनी तुरुंगाधिकाऱ्यांच्या जुलुमी कृत्यांचा पाढा वाचून, तीं कृत्यें खोटीं असल्यास आपल्यावर सरकारानें खटला भरावा असें आव्हानहि दिलें. अन्यायाचा इतका स्फोट झाल्यानंतर बंगाल—सरकारानें जागें होऊन ता. १५ नोव्हेंबर रोजीं एक पत्रक प्रसिद्ध केलें व घडलेल्या प्रकारांचें सौम्य वर्णन देऊन असें जाहीर केलें कीं, कैद्यांनी ‘सलामा’. ऐवजीं ‘गुड मॉर्निंग, सर’ असें म्हटलें तरी सुपरिंटेंडटाला आदर दर्शविल्यासारखें होईल अशा आशयाचे हुकूम सरकार सोडीत आहे.

---

२ अशा प्रकारें बंगाल--सरकाराला जी परिस्थिति बदलणें भाग पडलें, तिची कल्पना, श्री. लाहिरी यांनी दिलेल्या पुढील वर्णनावरून, यण्यासारखी आहे. गेल्या ऑगस्टमध्ये हिजली तुरुंगांत दोन सत्याग्रही दाखल केले गेले. त्या वेळीं सुपरिंटेन्डेंटापुढे ते ‘गुड मॉर्निंग’ किंवा ‘नमस्कार’ असे शिष्टाचाराचे शब्द उच्चारावयास तयार असता ‘सरकार, सलाम’ असें म्हणून मुजरा करण्याबद्दल त्यांना फर्मावण्यांत आलें. ‘सरकार सलामा’चा विधि केवळ शब्दोच्चारापुरताच नसून सलामाची रीतच अत्यंत अपमानास्पद व संतापजनक असते. म्हणून त्या जुलमाला हिजली येथील कांही राजबंद्यांनी मान वाकविली नाही. तेवढ्यानें सुपरिंटेंडटसाहेबांची तब्येत गरम झाली आणि त्यानें कोणाला दंडाबेडी तर कोणाला कांजीरोटी, अशा शिक्षा

दोन दोन महिनेपर्यंत भोगावयास लावल्या! असा क्रूरपणा दाखवितांना बाबू अखिलचंद्र विश्वास यांसारख्या साठी उलटलेल्या वृद्धालाहि वगळण्यांत आलें नाही. डॉ. राधाकृष्ण पाल यासारख्या वजनदार नागरिकालाहि दोन महिने दंडाबेडीची सजा सुनावण्यांत आली. बाब चारुचंद्र भंडारी एम. ए. बी. एल. या विद्वान गृहस्थांना तर तीन दिवसपर्यंत उभें करून हातकड्या ( Standing hand-cuffs ) घालण्यांत आल्या. गेल्या ऑगस्टपासून आतापर्यंत दंडाबेडीची शिक्षा पन्नास राजबंद्यांना भोगावी लागली. पायावर पांचपांच पौंडांच्या बेड्या, रात्रीं आणि दिवसा, वागविण्याची शिक्षा तर, जशी ७० वर्षांच्या दुबळ्या म्हाताऱ्याला तशी १२ वर्षांच्या कोवळ्या पोरालाहि, बिनदिक्कत ठोठावण्यांत आली! अशा तऱ्हेचे क्षोभकारक आरोप श्री. लाहिरी यांनी जाहीर रीतीने आव्हानपूर्वक केले असतां, बंगाल-सरकार केवळ एक पत्रक काढून म्हणतें कीं, दोघा राजबंद्यांना उद्धट वर्तणुकीबद्दल सजा दिली व सुपरिंटेंडटाने राजबंद्याच्या पुढाऱ्यांची समजूत घालण्याचा पुनः पुनः प्रयत्न केला. सुविद्य व सुप्रतिष्ठ अशा राजबंद्यांच्या या क्रूर छळाच्या प्रकरणाची अशी शाब्दिक सारवासारव केल्याने बंगाल सरकाराचें कर्तव्य संपतें असें कोणीहि म्हणणार नाही. नाशिक तुरुंगांतील अमृतलाल-प्रकरणाचा निष्कर्ष ध्यानीं आणून हिजली येथील तुरुंगाधिकाऱ्यांच्या वर्तणुकीची जाहीर चौकशी सरकाराने केली, तरच प्रक्षुब्ध झालेलें तेथलें लोकमत शांत होईल.

---

३ हिंदुस्थानाच्या लष्करी खात्याने एक पत्रक प्रसिद्ध करून हिंदी तोफखान्याची एक तुकडी तयार करण्यास भारतमंत्र्यांची संमति मिळाल्याचें जाहीर केलें आहे. पायदळ, घोडदळ, विमानदळ इत्यादि लष्करी खात्यांत हिंदी लोक अगदी थोडे का होईना पण आहेत. पण आतापर्यंत हिंदी शिपायांना तोफखान्यांत बिलकूल प्रवेश नव्हता. दिल्लीच्या असेंब्लीच्या बैठकींत लष्करी मंत्री मि. टॉटनहॅम यांनी वरील प्रकारची योजना तयार होत असल्याचें सांगून ठेवलें होतें. त्याप्रमाणें १९३५ सालच्या प्रारंभीं १४ वी रॉयल आर्टिलरीची फील्ड ब्रिगेड विलायतेस परत गेली म्हणजे उपर्युक्त पहिली हिंदी फील्ड ब्रिगेड बंगलोर येथे तिच्या जागीं यावयाची आहे. या ब्रिगेडमध्ये चार बॅटरींचा समावेश करावयाचें ठरलें आहे. लष्कराच्या निरनिराळ्या शाखांतून या पथकासाठी स्वयंसेवक बोलाविण्यांत येऊन त्यांची निवड झाल्यावर, १९३४ च्या एप्रिल महिन्यापासून त्या पथकाचें शिक्षण रॉयल आर्टिलरीच्या चवदाव्या ब्रिगेडमार्फत पुरें केलें जाईल. चार बॅटरीज तयार करण्यांत यावयाच्या त्या अशा—एक पंजाबी मुसलमानांची, दुसरी रजपुतान्यांतील रजपुतांची, तिसरी रांगडे लोकांची व चौथी मद्रासी लोकांची. या हिंदी लोकांना तरी तोफखान्याच्या दळांत प्रवेश मिळत आहे ही गोष्ट सर्वांस समाधानाची वाटेल यांत शंका नाही. पण या चार तुकड्यांत मराठे लोकांचें औषधालादेखील नांव नाही याचें प्रत्येकास सखेदाश्चर्य वाटेल यांतहि शंका नाही. मराठा शिपायांनी महायुद्धांत फ्रान्सच्या रणभूमीवर व मेसापोटेमियांत किती प्रशंसनीय शूरपणा गाजविला आहे व चिकाटी दाखविली आहे याची परभारें ब्रिटिश सेनापति व इतर गृहस्थ यांनी कित्येक वेळा कबुली दिली आहे. असें असतां या पहिल्या फील्ड ब्रिगेडच्या चार तुकड्यांपैकीं एकींतहि एकाहि मराठ्यास दाखल होण्याची संधि देण्यांत येऊं नये ही भारांत अन्यायाची गोष्ट होय. जे मराठे शिपाई गडी रणक्षेत्रावर पराक्रमाची शर्थ करूं शकतात तेच, जरूर तें शिक्षण मिळालें म्हणजे, चतुराईची गोलंदाजीदेखील करूं शकतील हें ओघानेच प्राप्त होतें. सरकारच्या मनांत असतें तर एक बॅटरी मराठ्यांसाठीं राखून ठेवतां आली नसती असें नाही; निदान बॅटरींची जातवार घटना न करतां ती संमिश्र करून त्यांतहि मराठ्यांना वाव देतां आला असता. मराठ्यांना अशा रीतीने अजीबात वगळण्यांत आल्याकारणाने स्वाभिमानी मराठा शिपायांत बरीच बेदिली उत्पन्न होणें अगदी स्वाभाविक आहे. म्हणून सरकाराने मराठ्यांवरील हा अप्रत्यक्ष नापसंतीचा व अविश्वासाचा शिक्का ताबडतोब नष्ट करावा हेंच परिणामीं दूरदर्शीपणाचें ठरेल.

# पार्लमेंटांतील हिंदी राजकारण

ब्रिटिश हौस ऑफ कॉमन्समध्ये हिंदुस्थानविषयक जीं प्रश्नोत्तरें होतात त्यांच्या अनेक तऱ्हा असतात. हिंदुस्थानासंबंधींचें कांही सभासदांचें गाढ अज्ञान हास्याच्या लहरी उत्पन्न करतें, तर कांही सभासद मुद्दाम हिंदुस्थानाचा अपमान करण्याकरिता किंवा हिंदी पुढाऱ्यांची कुचेष्टा करण्याकरिता आडरानांत शिरून प्रश्नांच्या रूपाने आपला कार्यभाग

साधतात. पण बहुतकरून नेहमीचा प्रकार एकाच सांच्याचा असतो. निदान प्रश्नोत्तरें वाचणाऱ्यांची अशी खात्री पटते कीं, प्रश्न विचारणारा व उत्तरें देणारा यांनी पूर्वीच संगनमत करून प्रश्नोत्तरांचें हें नाटक उभें केलें आहे! राजकारणांतील गुंतागुंतीच्या भावी धोरणासंबंधींहि, कांही वेळा गूढ रीतीनें, तर कांही वेळा अगदी उघडपणें, या प्रश्नोत्तरांच्या रूपानें सूचना दिल्या जातात. कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी ह्या प्रश्नोत्तरांच्या फैरीमधून विलायतेंतील प्रमुख पक्षाच्या हिंदुस्थानविषयक मताचा वारा कसा वाहत आहे, हें जसें समजतें, तसेंच स्टेट-सेक्रेटरीच्या राजकारणांतील अनेक मनसुबेहि उघड दिसतात यांत शंका नाही.

## बंगाल्यांतील अत्याचार

गेल्या आठवड्यांत जीं प्रश्नोत्तरें झालीं त्यांत बंगालमधील अत्याचारासंबंधींची चिंता स्पष्टपणें दृग्गोचर होत होती. विशेषतः मिदनापूर येथें ओळीनें तीन डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांचे खून केले गेल्यामुळें, त्यासंबंधीच्या प्रश्नोत्तरांना मोठें गंभीर स्वरूप आलें असल्यास नवल नाही. क्रांतिकारकांच्या गोळ्यांना नुकतेच बळी पडलेले डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मि. बर्ज यांच्या पत्नीच्या तनख्याची व्यवस्था झाली नसल्यामुळें त्यासंबंधीचा प्रश्न विचारला गेला. त्याला उत्तर म्हणून स्टेटसेक्रेटरींनीं सांगितलें कीं, त्यांची व्यवस्था उत्तम केली जाईल व हिंदुस्थानसरकारच्या शिफारशी आल्यानंतर स्टेट–सेक्रेटरी अत्यंत सहानुभूतीनें त्यांचा विचार करतील. या खंबीर आश्वासनामुळें त्या सभासदांचें समाधान झालें असलें पाहिजे. सरकार असल्या महत्त्वाच्या बाबींत नेहमीच दक्ष असतें व हें दर्शविणारेंच तें उत्तर आहे यांत शंका नाही.

## क्रांतिकारकांचा बंदोबस्त

मिसेस बर्ज यांच्यासंबंधींचीं प्रश्नोत्तरें झाल्यावर मि. बर्ज यांचा ज्यांनी खून केला त्यांना काय शिक्षा केल्या गेल्या व अशा तऱ्हेनें पुनः मिदनापूरच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांचा खून होऊं नये म्हणून काय तजवीज करण्यांत आली हे प्रश्न ओघानेंच येतात. ह्या दोनही प्रश्नांना उत्तर म्हणून स्टेट-सेक्रेटरींनीं सांगितलें कीं, ज्यांनी मि. बर्ज यांच्यावर गोळ्या झाडून त्यांचा खून केला ते दोघेहि त्याच वेळीं मारले गेले. त्यांच्याशिवाय चाळीस लोकांना आतापर्यंत अटक केली गेली आहे व त्यांपैकीं तेराजणांवर खटलेहि पण भरले गेले आहेत! नव्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांच्या शरीरसंरक्षणाची उत्तम तजवीज केली असल्याचें स्टेट–सेक्रेटरींनीं जाहीर केलें. तसेंच तेथील हिंदु तरुणांच्या हालचालींना पायबंद घातला असून पोलीस व गुप्त हेर यांच्या खात्यांचें सामर्थ्य अनेक रीतींनीं वाढविलें गेलें आहे. स्टेटसेक्रेटरींच्या म्हणण्याचा अर्थ हा कीं, गुन्हेगारांना शिक्षा देऊनच सरकार थांबणार नाही तर पुनः डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटाचा खून होऊं नये म्हणून कडेकोट बंदोबस्त केला आहे. अर्थॉलच्या डचेसनी विचारलें कीं, कलकत्त्याहून मिदनापुरास पाठविलेल्या पहिल्या अधिकाऱ्यानें खुनाचा तपास प्रथम न करतां पोलिसांविरुद्ध केलेल्या तक्रारीचीच चौकशी केली असें म्हणतात हें खरें काय? तें साफ व पूर्णपणें खोटें आहे असें स्टेटसेक्रेटरींनीं सांगितलें.

## "सुभाषबाबूंना पकडा!"

मि. बर्ज यांच्या खुनाच्या प्रश्नोत्तरांनीं तयार झालेल्या पार्श्वभूमीचा फायदा घेऊन ले. क. सर वॉल्टर स्माइल्स यांनी श्री. सुभाषचंद्र यांना हिंदुस्थानांत आल्यावर पुनः कैदखाना दाखवावा असें आग्रहानें प्रतिपादिलें. त्यांचें म्हणणें असें कीं, बंदीवासांतून त्यांची सरकारनें सुटका केल्यानंतर त्यांनी सरकारविरुद्ध व राजद्रोहात्मक असा प्रचार केला हा त्यांनी गुन्हा केला. सर वॉल्टर स्माइल्स यांची इच्छा स्टेट-सेक्रेटरींनीं ताबडतोब अटकेचा हुकूम सोडावा अशी नव्हतीच. फक्त हिंदुस्थानसरकाराला ही एक सूचना त्यांना द्यावयाची होती व तो त्यांचा डाव उत्तम साधला. कारण स्टेट-सेक्रेटरींनीं असें स्पष्ट उत्तर दिलें कीं, या बाबतींत हिंदुस्थान-सरकाराला योग्य वाटेल तो उपाय करण्यास मुभा आहे. या सूचनेचा अर्थ उघड आहे व तो हा कीं, सुभाषबाबूंना जर उद्यां हिंदुस्थानसरकारानें अटक केली तर स्टेट-सेक्रेटरी तरी त्याच्या इच्छेआड येणार नाहीत, इतकेंच नव्हे तर सरकारानें अटक करणेंच युक्त आहे असें त्यांचें मत असल्याचेंहि त्यांनी ध्वनित केलें. श्री. सुभाष बोस यांना तुरुंगाची भीति वाटणें शक्य नसल्यानें त्यांचें कार्य चालेलच. पण सरकारचें भावी धोरण मात्र वरील प्रश्नोत्तरांवरून स्पष्ट समजतें!

## जपानी आयातीला आळा

वरील प्रश्नोत्तरें झाल्यावर उगा हंगेरीनें इंग्रज लोकांचे कर्जरोखे बुडविले त्या हंगेरीपासून हिंदुस्थानसरकारनें रेल्वेचें सामान का घेतलें असा प्रश्न विचारण्यांत आला. नेहमीच्या पद्धतीप्रमाणेंच हें सामान मागविलें असा त्याला जबाब मिळाला. जपाननें हिंदुस्थानांत हातमोजे-पायमोजे किती पाठविले व या जिनसाच्या आयातींत अतोनात वाढ झाल्यानें हिंदुस्थानांतील कारखाने कसे बसले वगैरेबद्दलचे आंकडे आपण लवकर प्रसिद्ध करूं असें स्टेट-

सेक्रेटरींनी सांगितलें. याप्रमाणेंच ब्रम्हदेशांतील हिंदी व्यापाऱ्यांनी जपानी तांदुळाच्या आयातीबद्दल केलेली तक्रार आपल्यास माहीत असून हिंदुस्थान-सरकार त्याचाहि विचार करीत असल्याचें त्यांनी आश्वासन दिलें. जपानी मालाची हिंदुस्थानांत होणारी आयात यापुढे तरी कमी करण्याच्या उद्योगाला सरकार लागणार असा या उत्तरांतून ध्वनि निघतो.

### पेशावरामधील हकालपट्टी

सर डेव्हिड ग्रेनफेल यांनी पेशावर येथील अठरा घरवाल्यांची जी हकालपट्टी लष्करी अधिकाऱ्यांनी केली त्याबद्दल चौकशी कराल काय, असा प्रश्न विचारला. त्याला उत्तर म्हणून सर सॅम्युअल होअर म्हणाले कीं, हिंदुस्थान-सरकारानें पूर्ण विचार करूनच कायदेशीर रीतीनें सर्व गोष्टी केल्या असतील त्यांत शंका कसली ?

### पुनः अंदमान !

मि. टॉम स्मिथ यांनी अंदमानाला कैदी पाठविण्याचें केव्हां बंद करणार, असा प्रश्न विचारला. त्याला उत्तर देतांना सर सॅम्युएल होअर म्हणाले कीं, १९२१ मध्ये अंदमानांत ११५०० कैदी होते. ते हल्लीं फक्त ६५००च आहेत. कैद्यांची संख्या यापेक्षा ज्यास्त त्वरेनें कमी करणें शक्य नाहीं. कारण हिंदुस्थानातील तुरुंगांत तितकी जागा नाहीं. अंदमानमध्ये आरोग्याच्या दृष्टीनें मात्र पुष्कळच सुधारणा केली गेली आहे. अंदमान हें बेट हल्लीं वसाहतीकरितां मोकळें ठेवलें असल्यानें काळ्या पाण्याची कल्पनाहि कमी होऊं लागली आहे व तेथे जाणें हें कैद्याच्या खुशीवर ठेवलें आहे. राजकीय कैद्यांचा स्वतंत्र वर्ग नाहीं. कायदेभंगाच्या गुन्ह्याबद्दलचे कैदी अगर त्या बाबतींतील बंदी यांना अंदमानांत पाठविलेलें नाहीं !

### बंगालमधील अत्याचार

१९३२ सालीं बंगालमध्ये क्रांतिकारकांनी ७५ अत्याचार केले व १९३३च्या पहिल्या सहामाहींत ते ११ होते असें दाखविणारें पत्रक स्टेट सेक्रेटरींनी सिद्ध केलें आहे.

# श्री. जम्नादास यांचें भाषण

### आक्षेपांना उत्तरें

लोकशाही स्वराज्य पक्षाच्या मुख्य कचेरीच्या उद्घाटनसमारंभाच्या वेळीं श्री. जम्नादास म्हणाले "नवीन पक्षाची स्थापना झाल्यावर त्याच्यावर अनेक लोकांनी अनेक प्रकारची टीका केलेली आहे.त्यापैकीं फक्त दोन मुद्द्यांनाच आज मी येथे उत्तर देतों. आमच्यावरील पहिला आक्षेप असा कीं, आमचा पक्ष कॉंग्रेसची इभ्रत कमी करण्याकरितां उत्पन्न झालेला आहे; पण हें अगदी खोटें आहे. आम्ही कॉंग्रेसची इभ्रत कमी करीत नसून वाढवीत आहों. तुंबलेल्या राजकारणांतून मार्ग काढणारे आम्ही देशाचा घात करीत नसून देशाची उच्च प्रकारची सेवाच बजावीत आहों.

आमच्यावर दुसरा आक्षेप असा कीं, कौन्सिलप्रवेशाची वेळ अद्यापि आली नसतां आम्ही आतापासून विनाकारण त्याच्याकरितां धडपड करीत आहों. ह्या आक्षेपकांना ते स्वतः बोलतात त्याचा अर्थ समजतो कीं नाहीं याची मला शंका आहे. कौन्सिल-प्रवेशाची चळवळ केव्हां सुरू करावी याची नक्की वेळ ते सांगू शकतील काय ? कौन्सिल-प्रवेशाचें तत्त्व जनतेच्या गळीं उतरविण्याकरितां प्रचार करावयास नको काय ? मतदारांना सुशिक्षित करण्याचे जोराचे प्रयत्न आतापासूनच सुरू करावयास नकोत काय ? लोकांचीं दुःखें वेशीवर टांगण्याची जी जी संधि मिळेल तिचा उपयोग करून घेणें हें या पक्षाचें ध्येय आहे; मग ती संधि ग्रामपंचायतींत मिळो किंवा जिनीव्हाच्या आंतरराष्ट्रीय परिषदेत मिळो. आम्ही जॉब-हंटर्स म्हणजे नोकऱ्यांकरितां हपापलेले आहों असें सांगण्यांत येतें; पण तसें नाहीं. आम्ही देशाची शक्य त्या मार्गानें सेवा करण्याकरितां हपापलेले आहों.पक्षाच्या आज्ञेनेच प्रधानमंडळांतील जागा स्वीकारण्यांत येतील आणि त्याहि देशहित साधण्याकरितां, हें विसरूं नये. आम्हाला जे 'जॉब-हंटर्स' म्हणतात ते स्वतः 'मॉब-हंटर्स' म्हणजे जनतेची खोटी खुशामत करणारे असतात ! लोकांना नुसत्या थापा मारून त्यांना हवेवर तरंगत सोडावयाचें व मग त्यांच्याशीं दगलबाजी करून स्वतः हळूच निसटून जावयाचें, हा आम्हाला 'नोकरी-वाले' म्हणणाऱ्यांचा धंदा होय.

सगळा महाराष्ट्र आपल्या पाठीमागे आहे अशी समजूत करून घेणाऱ्या महात्माजींच्या नजरेस मला वस्तुस्थिति आणावयाची आहे.आज महाराष्ट्रांतील शे. ९५ पत्रें नवीन पक्षाच्या बाजूचीं आहेत ही गोष्ट काय दर्शविते ? महाराष्ट्रांत जे थोडे लोक स्वतःला गांधीभक्त म्हणवून घेतात त्यांची गांधी-

भाक्ति म्हणजे केवळ केळकर-द्वेष आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. गांधींचें एकहि तत्त्व कृतींत आणण्याची त्यांची तयारी नाही. केळकरांना शिव्या देऊनच ते आपल्या गांधीभक्तीचें प्रदर्शन करीत असतात!

याप्रमाणे लोकांत पसरलेले कांहीं गैरसमज मी दूर केले आहेत. गैरसमज करून देण्यावरच ज्यांची देशसेवा व जीवन अवलंबून असतें त्यांचे गैरसमज कोणीच दूर करूं शकणार नाही. बाकीच्या लोकांचे गैरसमज प्रचार करून आपण घालवूं शकूं."

# लोकशाही स्वराज्य पक्ष

## मध्यवर्ती मंडळ व कार्यकारी मंडळ

'लोकशाही स्वराज्य पक्षाच्या' स्थापनेसाठीं मुंबई येथे भरलेल्या परिषदेच्या ६ व्या ठरावास अनुसरून पुढील मध्यवर्ती मंडळ (सेंट्रल कौन्सिल) निवडण्यांत आलें आहे.

**अध्यक्ष**—श्री. न. चिं. केळकर पुणें.

**चेअरमन**—बॅ. रामराव देशमुख, उमरावती.

**जनरल सेक्रेटरी**—बॅ. जमनादास मेहता, मुंबई.

**जॉइंट सेक्रेटरी**—१ श्री. रामभाऊ मंडलीक, पेण (मुंबईसाठीं).

२ श्री. रामभाऊ राजवाडे, सोलापूर (महाराष्ट्रासाठीं).

३ श्री. नारायणराव बामणगावकर, उमरावती (वऱ्हाडासाठीं).

४ श्री. गोपाळराव ओगले नागपूर. (मराठी-मध्यप्रांतासाठीं).

**खजिनदार**—१ श्री. दा. वि. गोखले, पुणें २ श्री. जी. व्ही. साळवेकर, मुंबई.

**सभासद**—मुंबई (१५)—डॉ. एम. बी. वेलकर, डॉ. ना. दा. सावरकर, श्री. एम्. एन्. तळपदे, एस्. व्ही. एनापुरे, एस्. व्ही. लळीत, एम्. सी. लेले, डॉ. सी. ए. आठवले, के. व्ही. खानविलकर, एस. आर. सरदेसाई, एस. एस. नवरे, एम. व्ही. गोडबोले, डॉ. पुरंदरे, आप्पाशास्त्री साठे, डॉ. एम. बी. उदगांवकर, एन. व्ही. भावे.

**पुणे जिल्हा**—(३) श्री. ज. स. करंदीकर, कृष्णशास्त्री कवडे, ना. वि. भोंडे.

**सातारा जिल्हा**—(३) श्री. र. पां. करंदीकर, शि. वि. मोडक, गंगाधरपंत निजसुरे (वांई).

**नगर जिल्हा**—(३) श्री. सी. एम्. सप्तर्षि, एम. के. कोऱ्हाळकर, जी. आर. गायकैवारी.

**सोलापूर जिल्हा**—(३) श्री. रा. ग. खाडिलकर, जी. आर. जोशी (पंढरपूर), वालचंद रामचंद कोठारी (माढें).

**नाशिक जिल्हा**—(३) डॉ. वि. म. भट, (येवलें), ग. वि. केतकर, रा. ग. प्रधान.

**पूर्व-खानदेश**—(३) श्री. एच. व्ही. पाटसकर (चाळीसगांव), व्ही. एव. भागवत (चाळीसगांव) एच्. के. कोल्हटकर (जळगांव).

**पश्चिम-खानदेश**—(३) श्री. बी. व्ही. भट (धुळें), ए. व्ही. टिळक (धुळें), एन्. बी. केळकर (धुळें).

**टाणे जिल्हा**—(३) श्री. जी. के. फडके (कल्याण), सी. आर. श्रॉफ (पालघर), एन्. डी. देवधेकर (उंबरगांव).

**कुलाबा जिल्हा**—(३) श्री. बी. पी. जोशी (महाड), व्ही. एन्. मनोहर (पेण), डॉ. व्ही. के. डोंगरे (मुंबई).

**मुंबई उपनगर जिल्हा**—(३) श्री. जी. आर. फाटक (विलेपार्ले), पाटणकर (कुर्ला), पां. म. भागवत (विलेपार्ले).

**रत्नागिरी जिल्हा**—(३) श्री. जे. एन्. लिमये, एम्. जी. शिंदे, एस. एच्. खरे (चिपळूण).

**संस्थानें**—श्री. बा. वि. शिखरे मिरज, जी. के. गोडबोले सांगली, पी. एस्. आठवले भोर, राघवेंद्रशर्मा हैद्राबाद, बिंदोपंत नरगुदकर जमखिंडी, एस. जी. फडके, सांगली, एम. के. आठवले, सांगली.

टीप—वऱ्हाड-मध्यप्रांतांतील नांवें पुढे जाहीर करण्यांत येतील.

### कार्यकारी मंडळ

अध्यक्ष, चेअरमन, जनरल सेक्रेटरी, जॉ. सेक्रेटरी खजिनदार आणि पुढील सभासद—

| | |
|---|---|
| श्री. एम. एन. तळपदे<br>डॉ. ना. दा. सावरकर | मुंबई |
| श्री. ल. ब. भोपटकर<br>श्री. पी. जी. जोशी | महाराष्ट्र |
| श्री. बाबासाहेब परांजपे<br>,, बळवंतराव देशमुख | मध्यप्रांत (मराठी) |
| श्री. एम्. के. चांदे<br>एस्. व्ही. केळकर | वऱ्हाड |

# चढते भाव व वाढतें दारिद्र्य

चलनाचा मुख्य धर्म विनिमयाचें साधन हा असून त्याचा योग्य रीतीने उपयोग केल्यास समाजांतील सर्व धनोत्पादक वर्गांना आपल्या श्रमाचा न्याय्य मोबदला मिळतो. परंतु त्याचा दुरुपयोग केल्यास कांहीं विशिष्ट वर्गांचाच फायदा होऊन बहुजनसमाजाचा तोटा होतो. चलन विषयक व्यवहार एकसूत्री चालावे म्हणून त्यांचें नियंत्रण शासनसंस्थेकडे दिलेलें असतें. स्वतंत्र देशांत सरकार राष्ट्रीय व लोकमतानुवर्ती असल्याने चलनविषयक व्यवहार राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने केले जातात. परंतु देश परतंत्र असला म्हणजे तेच व्यवहार राज्यकर्ते स्वतःच्या हिताच्या दृष्टीने चालवितात व त्यामुळे प्रजेचें नुकसान होतें. हिंदुस्थान देश परतंत्र असल्यामुळे व राज्यकर्त्यांचे व हिंदी लोकांचे आर्थिक हितसंबंध एक नसल्यामुळे राज्यकर्त्यांनी आंखलेलें आर्थिक धोरण बहुशः प्रजेच्या अहिताचें ठरतें असा आजपर्यंतचा अनुभव आहे. रुपयाच्या भावाचाच प्रश्न घेतला तरी या गोष्टीचें चांगलें प्रत्यंतर येतें.

नाण्याची किंमत अनैसर्गिक व वाजवीपेक्षा चढती ठरविली तर संक्रमणकालांत बाजारभाव उतरतात, निर्गत व्यापारावर त्याचा अनिष्ट परिणाम होऊन तो घटतो व आयात व्यापाराला उत्तेजन मिळतें असा अर्थशास्त्राचा सिद्धान्त आहे. गेल्या चाळीस वर्षांत ज्या ज्या वेळीं रुपयाचा भाव ठरविण्याचा प्रश्न आला त्या त्या वेळीं सरकाराने तो वाजवीपेक्षा अधिक ठरविला. त्यामुळे ब्रिटिश व इतर परदेशी मालाच्या हिंदुस्थानांतील खपाला उत्तेजन मिळालें आणि ज्यांना आपली प्राप्ति व शिल्लक परदेशीं पाठवावयाची असते अशा युरोपिअन नोकरांचा, परदेशी व्यापाऱ्यांचा व व्यापारी मंडळ्यांचा आणि विलायतेंतलीं देणीं देतांना हिंदुस्थानसरकाराचा फायदा झाला. परंतु बाजारभाव उतरल्यामुळे हिंदुस्थानांतील अवघा शेतकरी व कारखानदार यांचें अतोनात नुकसान झालें.

१८९४ सालीं रुपयाचा भाव साडेतेरा पेनी असतांना व्यवहारांतील रुपयाचें नाणें घटवून १८९८ सालीं फाऊलर कमिटीच्या शिफारशीप्रमाणे तो भाव सोळा पेनी करण्यांत आला. त्यामुळे संक्रमणकाळांत हिंदी शेतकरी व कारखानदार यांचें अतिशय नुकसान झालें. पुढे कांहीं काळाने ही संक्रमणावस्था संपून कृत्रिम किंमतीचा व बाजारभावाचा मेळ बसला आणि तो १९१७ च्या प्रारंभापर्यंत टिकला. पुढे युद्धसमाप्तिनंतर ज्या वेळीं रुपयाचा भाव पुनश्च ठरविण्याची पाळी आली त्या वेळीं नैसर्गिक भाव लक्षांत न घेतां सरकाराने तो भाव २४ पेन्सांपर्यंत वर नेला! दोन शिलिंगाचा हा भाव टिकवणें शक्य होणार नाही असें हिंदी व्यापाऱ्यांनी बजावून सांगितलें असतां सरकारने आपला हट्ट तडीस नेण्याकरितां गंगाजळींतील पांच कोटी पौंड सोन्याचा फडशा पाडला, व शेवटी नाकीं नऊ आल्यावर तो भाव टिकविण्याचा नाद सोडून दिला! पुढे १९२५ सालीं ग्रेटब्रिटनमध्ये सुवर्णमापनपद्धति सुरू झाल्यावर रुपयाचा भाव ठरविण्याचा पुनः प्रश्न निघाला. जनतेच्या पुढाऱ्यांनी व व्यापाऱ्यांनी रुपयाचा भाव सोळा पेनी करण्याबद्दल पुनः पुनः सरकाराला विनविलें. रुपयाचा भाव सोळा पेनीहून चढता ठेवल्यास बाजारभाव उतरून लोक आर्थिक विपत्तींत पडतील असेंहि लोकपक्षीयांनी सरकारला बजावलें. परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाही व स्वतःच्या बगलबच्च्यांच्या साहाय्याने सरकाराने अठरा पेनींचा भाव हिंदुस्थानावर लादला.

महायुद्धानन्तर चलनव्यवस्थेची पुनर्घटना करतांना जगांतील कोणत्याहि देशाने आपल्या नाण्याची किंमत महायुद्धपूर्व किंमतीपेक्षा वाढविली नव्हती; परंतु हिंदुस्थानच्या

राज्यकर्त्यांनी जगविपरीत व हिंदी जनतेच्या हिताला विघातक अशी ही गोष्ट करण्यास मागेपुढे पाहिलें नाहीं. या चढत्या भावाचा व्हावयाचा तोच अनिष्ट परिणाम झाला. जागतिक व्यापारमंदीचा परिणाम इतर कोणत्याहि देशापेक्षा हिंदुस्थानास अधिक भोगावा लागला व अठरा पेन्सांचा भाव टिकविणेंहि सरकाराला कठिण झालें. परंतु सुंभ जळला तरी ज्याप्रमाणे पीळ नाहीसा होत नाहीं त्याप्रमाणे रुपयाचा अठरा पेन्स भाव कोलमडूं लागला असतांहि हिंदुस्थान सरकाराचे फडणवीस तो भाव शाबूद आहे असें कंठरवानें लोकांना सांगत होते!

परंतु इंग्लंडलाच १९३१ च्या सप्टेंबरांत सुवर्णमापनपद्धतीचा त्याग करावा लागला. रुपयाचा अठरा पेनी सुवर्णभाव टिकविण्याची जबाबदारी कशी झुगारून देतां येईल याची हिंदुस्थानसरकार वाट पाहातच होतें. त्यांना ही संधि मिळतांच विलायतेच्या पावलावर पाऊल टाकून त्यांनीहि रुपयाचा सोन्याबरोबरीचा संबंध तोडून टाकला. हिंदी लोकांना व व्यापाऱ्यांनाहि हायसें वाटलें. आता रुपयाचा भाव उतरणार या आशेने त्यांनी सरकारचें अभिनन्दनाहि केलें. परंतु तिकडे स्टेटसेक्रेटरींचे बेत निराळेच चालले होते. १९२७ सालीं रुपयाचा भाव सोळा पेनी न करतां अठरा पेनी करण्यांतील सरकाराचा हेतु ग्रेटब्रिटनच्या आयात व्यापाराला उत्तेजन देण्याचा होता. परंतु त्या भावामुळे ग्रेटब्रिटनला म्हणून विशेष सवलत मिळाली नव्हती व जपान आणि इतर देश यांच्या चढाओढीमुळे सरकारचा तो हेतु सिद्धीस गेला नव्हता. १९२७सालीं जें हुकलें तें १९३१ सालीं घडवून आणण्योंच स्टेट सेक्रेटरींनी ठरविलें व त्यांनी रुपयाचा संबंध बिनबुडाच्या स्टर्लिंगशीं जोडून दिला. याचा परिणाम असा झाला कीं, जोंपर्यंत अमेरिका, जपान वगैरे राष्ट्रांनी सुवर्णमापन पद्धतीचा त्याग केला नव्हता, व त्याग केल्यावरहि त्यांच्या नाण्याची घसरगुंडी ब्रिटिश स्टर्लिंगइतकी झाली नव्हती, तोंपर्यंत हिंदुस्थानांत ब्रिटिश माल स्वस्त विकला गेला! तसेंच रुपयाचा संबंध बिनबुडाच्या स्टर्लिंगाशीं जोडल्यामुळे सोन्याचा भाव चढला व आर्थिक विपत्तीने हैराण झालेल्या लोकांना जवळचें सोनें विकून आपला गुजारा कसाबसा चालविणें भाग पडल्यामुळे आजपर्यंतची सोन्याच्या ओघाची दिशा बदलून तो ओघ उलटा विलायतेकडे वळला, आणि इंग्लंडचें डळमळलेलें आसन सावरण्यास त्याची मदत झाली.

ब्रिटिश व्यापाऱ्यांचा अशा रीतीने फायदा झाला खरा. परंतु अठरा पेन्स भावाने हिंदुस्थानाचें भयंकर नुकसान झालें व अजूनहि होत आहे. आधीच कच्च्या मालाच्या किंमती पक्क्या मालापेक्षा अधिक उतरल्या होत्या. त्यांतच रुपयाचा भाव वाजवीपेक्षा अधिक ठेवला गल्यामुळे इतर ठिकाणच्या कच्च्या मालाच्या भावापेक्षा हिंदुस्थानांतील कच्चया मालाचे भाव दहाबारा टक्क्यांनी अधिक उतरले. हिंदुस्थानांतील तेवीस कोटींहून अधिक लोक शेतीवर राहात असल्यामुळे व हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार विशेषतः धान्यें व कच्चा माल यांचाच असल्यामुळे हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार सारखा घटत गेला. १९२८ सालीं व्यापारी वस्तूंची निर्गत ३१८ कोटि रुपयांची होती ती १९३२ सालीं १३८ कोटींची झाली! भाव उतरल्यामुळे नुसत्या निर्गतींत जर एवढें नुकसान झालें तर ज्या हिंदुस्थानाचा अंतर्गत व्यापार त्याच्या परराष्ट्रीय व्यापारापेक्षा पंधरावीस पट मोठा आहे असें तज्ज्ञ म्हणतात त्यांतील उत्पादक वर्गाचें व विशेषतः शेतकऱ्यांचें केवढें नुकसान झालें असेल याचा नक्की हिशेब करणेंहि कठिण आहे.

सध्याच्या काळीं बाजारभाव वाढविण्याकरितां नाण्याची किंमत उतरविणें हा शिष्टसंप्रदाय ठरला आहे! इंग्लंड, अमेरिका, जपान, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड वगैरे लहानमोठ्या अनेक देशांनी तो अमलांत आणला आहे; परंतु हिंदुस्थानांतील रुपयाला मात्र त्याच्या राज्यकर्त्यांनी १८ पेन्स भावाने स्वतःच्या बिनबुडाच्या स्टर्लिंगाला जखडून टाकल्यामुळे

त्याची स्थिति वर दर्शविल्याप्रमाणे केविलवाणी तर झालीच आहे, परंतु दिवसेंदिवस ती अधिकच चिंताजनक होऊं पाहात आहे. हिंदुस्थानांत आधींच फारसे धंदे नाहीत जे कांहीं आहेत ते भरपूर संरक्षणाच्या अभावीं आतापर्यंत जेमतेम जीव धरून राहिले आहेत. परंतु जपानने आपल्या नाण्याची किंमत भरमसाट उतरवून आपला माल हिंदी पेठेंत इतका सवंग करून सोडला आहे कीं, सर्वच धंद्यांना त्याचा उपसर्ग पोंचत आहे. आणि हिंदी-जपानी व्यापारी तहाचीं बोलणीं रेंगाळत पडलीं आहेत तीं संपून या चढाओढीचा बंदोबस्त होण्याच्या पूर्वीच हिंदुस्थानांतील धंदे आसन्नमरण स्थितीला जाऊन पोंचतील कीं काय अशी धाकधुक वाटूं लागली आहे.

जी स्थिति जपानाने येनचा भाव उतरवून हिंदी उद्योगधंद्यांची केली आहे तीच स्थिति युनायटेडस्टेट्स, ऑस्ट्रेलिया न्यूझीलंड व कॅनडा यांनी हिंदी शेतीच्या उत्पन्नाची केली आहे. गेल्या पंधरा दिवसांत डॉलरच्या भावांत सुमारें बारा टक्क्यांची घट झाल्यामुळे हिंदी कापसापेक्षा अमेरिकन कापूस स्वस्त विकूं लागला असून त्याच्या चढाओढीमुळे हिंदी शेतकऱ्याची आधींच अर्ध्यावर आलेली भाकरी आणखी अर्धी कमी होणार आहे. ओटावा कराराने साम्राज्यांतील वसाहतींचा माल ब्रिटिश पेठेंत खपावा म्हणून परदेशी मालापेक्षां त्या मालाला विशेष सवलती दिल्या आहेत. परंतु ब्रिटिश साम्राज्यांतील कॅनडा, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड यांच्या नाण्यांची किंमत रुपयाच्या किंमतीपेक्षा अधिक उतरल्यामुळे ब्रिटिश पेठेंतहि या तीन वसाहतींना आपलें धान्य व कच्चा माल हिंदी धान्य व कच्चा माल यांच्यापेक्षा स्वस्त विकणें शक्य झालें आहे १९१४ सालांतील नाण्यांच्या किंमती प्रमाणभूत धरल्या तर असें आढळतें कीं ब्रिटिश स्टर्लिंगाची किंमत सुमारें ३३ टक्के, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड यांच्या नाण्यांची किंमत सुमारें ५० टक्के, व कॅनेडिअन डॉलरची सुमारें ४४ टक्के उतरली असून हिंदुस्थानाच्या रुपयाची किंमत अवघी २१ टक्केच उतरली आहे.

जागतिक आर्थिक मंदीचीं कारणें नष्ट होऊन एकंदर जागतिक व्यापार सुधारेल तेव्हा सुधारेल. परंतु इतर देशांनी आपल्या नाण्यांची किंमत रुपयाच्या किंमतींतील उतारापेक्षा अधिक उतरविल्यामुळे हिंदुस्थानाची शेती व उद्योगधंदे जे आज नष्ट होण्याच्या मार्गाला लागले आहेत ते कांहीं, केवळ जागतिक मंदी नाहीशी झाल्याने, सुधारूं शकत नाहीत. ते जगविण्याकरिता रुपयाचा भाव इतर देशांतील नाण्यांच्या प्रमाणांत कमी करणें हा एकच उपाय आहे. ओटावा परिषदेंत भाषण करतांना हिंदुस्थान–सरकारचे फडणवीस सर जॉर्ज शूस्टर यांनी ठासून सांगितलें होतें कीं हिंदुस्थानाला जर आज कसली जरुरी असेल तर ती बाजारभावांतील वाढीची आहे. परवा नुकतेंच मंगळवार ता. २१ रोजीं चांदीविक्रीनियंत्रणाच्या करारावर असेंब्लींत बोलतांना सर जॉर्ज यांनी युनायटेड स्टेट्सला असें बजावलें कीं, जर डॉलरची किंमत उतरवून तुम्ही हिंदी शेतकऱ्यांचें नुकसान कराल तर तो चांदी कमी खरेदी करील व त्याचा चांदीच्या भावावर अनिष्ट परिणाम होईल. सर जॉर्ज यांना, बाजारभाव चढले तरच हिंदुस्थानाचा तरणोपाय आहे व डॉलरची किंमत अशीच घसरत गेली तर त्यामुळे हिंदुस्थानाचा शेतकरी बुडेल, याची कल्पना आहे. परंतु ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या फायद्याला ज्यामुळे किंचितहि बाध येईल अशी कोणतीहि गोष्ट करण्यास ते तयार नसल्यामुळे रुपयाचा भाव उतरविण्यास हिंदुस्थान–सरकार तयार नाही. एवढेंच नव्हे तर तो भाव टिकविण्याचा सरकारचा निर्धार आहे असें ते सांगत असून रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमिटींतहि त्यांनी आपल्या बगलबच्च्यांच्या साहाय्याने रुपयाचा अठरा पेनी भावच कायम ठेवण्याला कसेंबसें बहुमतहि मिळविलें !

रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमि-

टींत सर जॉर्ज यांनी बहुमत मिळविलें असलें तरी एकंदर आर्थिक स्थिति पाहता अठरा पेनींचा कृत्रिम व घातक भाव सरकारला फार काळ टिकावितां येईल असें वाटत नाही. अठरा पेन्स भावामुळे बाजारभाव उतरून निर्गत व्यापार घटत चालल्याचें वर नमूद केलेंच आहे. पूर्वी अशी परिस्थिति असे कीं, व्यापारी वस्तूंची निर्गत आयातीपेक्षा सुमारें पन्नाससाठ कोटींनी अधिक असे. त्या अधिक किंमतींतून परदेशी व्यापाऱ्यांना, बँकांचा व आगबोट कंपन्यांचा फायदा, मनदी व इतर युरोपिअन नोकरांचीं पेन्शने, विलायतेंत उभारलेल्या कर्जावरील व्याज वगैरे देणीं देऊन शिवाय हिंदुस्थानांत प्रतिवर्षी काहीं तरी सोनें येत असे. परंतु व्यापारमंदी इतकीं वाढली कीं, १९२८ सालीं हिंदुस्थानांतील व्यापारी वस्तूंची निर्गत आयातीपेक्षा सुमारें ८० कोटींनी अधिक होती ती १९३२ सालीं तीन कोटींनीहि अधिक राहिली नाही. हिंदुस्थान सरकाराला आपलीं विलायतेंतील देणी द्यावयाचीं असतात आणि युरोपियन व्यापारी, नोकर वगैरे लोकाना आपल्या शिलकी विलायतेस पाठवावयाच्या असतात. व त्याकरिता त्यांना बाजारांत स्टर्लिंग हुंड्या खरेदी कराव्या लागतात. असल्या स्टर्लिंग हुंड्या बाजारांत भरपूर मिळणें हें निर्गत व्यापार आयातीपेक्षा किती अधिक असतो यावर अवलंबून असतें. अर्थातच गेल्या वर्षीच निर्गत व्यापार खालावल्यावर बाजारांत स्टर्लिंग हुंड्यांची वाण पडून रुपयाचा अठरापेनी भाव कोलमडावयाचा. परंतु सरकारच्या सुदैवामुळे त्यांच्या हिंदी प्रजेच्या वाढत्या दारिद्र्याने त्यांना हात दिला व व्यापारी वस्तूंच्या निर्गतींतील घट सुवर्णनिर्गतीने भरून निघाली.

आता सुवर्णनिर्गतहि घटूं लागल्यामुळे बाजारांतील स्टर्लिंग हुंड्यांचा पुरवठा कमी झाला असून गेल्या शनिवारीं तर विलायती तारेच्या हुंडीचा भाव १ शि. ५$\frac{३}{४}$ पेनीपर्यंत खाली आला होता. रुपयाचा भाव इतका अंगर याहून खाली जाऊं लागला-व तो आज ना उद्या तसा जाणें अपरिहार्य आहे—तर अठरा पेनी भाव टिकविण्याकरिता हिंदुस्थान सरकाराला स्टेटसेक्रेटरीवर रुपयाला १ शि. ५$\frac{४९}{६४}$ पे. भावाने परत हुंड्या विकाव्या लागतील व त्यामुळे ज्या स्टर्लिंगच्या व सोन्याच्या सांठ्याच्या पायावर रिझर्व्ह बँकेचा डोलारा उभारला जाणार आहे तो पायाच डळमळेल. सरकार हें न कळण्याइतकें खास अप्रबुद्ध नाही! परंतु अठरा पेनींचा भाव त्यांच्या सग्यासोयऱ्यांना सोयीस्कर असल्यामुळे तो टिकविण्याची जबाबदारी रिझर्व्ह बँकेच्या माथीं मारण्याचा सरकारचा निश्चय कायम झालेला आहे. रिझर्व्ह बँक बिलांत तो भाव टिकविण्याची कायदेशीर जबाबदारी बँकेवर लादण्यांत आली असल्यामुळे रुपयाचा भाव १ शि. ५$\frac{४९}{६४}$ पेक्षां खाली जाऊं लागला म्हणजे त्याची घसरगुडी थांबविण्याकरिता परत हुंड्या विकून बँकेला स्वतःच्या गंगाजळींतील स्टर्लिंग व सोनें यांचा फडशा पाडावा लागेल, व विलायतेंत स्टर्लिंग कर्जहि काढावें लागेल. बँकेचे हे सर्व प्रयत्न हरेपर्यंत हा प्राणघातक खेळ चालू राहण्याची व्यवस्था रिझर्व्ह बँक बिलांत केलेली असल्यामुळे बँकेचा हा खेळ पुरा होईपर्यंत शेतकरी व हिंदी कारखानदार यांचे डाळे पांढरे होण्याची वेळ येईल. रिझर्व्ह बँक बिल पास होऊन नवी घटना अमलांत आली म्हणजे गव्हर्नर जनरलच्या खास परवानगीवांचून रिझर्व्ह बँकेच्या घटनेंत फेरबदल करण्याचा अधिकार फेडरल असेंब्लीकडे राहणार नसल्यामुळे शेतकरी व कारखानदार यांची अठरा पेनींच्या भावाने होणारी अधिकाधिक दुर्दशा पाहून फेडरल ॲसेंब्लीचें मन कितीहि द्रवलें तरी त्याचा उपयोग होणार नाही म्हणून खासदार सभासदांना आमचें निक्षून सांगणें असें कीं एकंदर व्यापारस्थिति लक्षांत घेऊन सरकार शहाणें झालें व त्यांनी अठरा पेनी भाव टिकविण्याचा नाद सोडला तर ठीकच झालें. परंतु सरकाराने जर तसें केलें नाही तर त्यांनी रिझर्व्ह बँक बिलाच्या चर्चेच्या वेळी

ण्याचा भाव बराच उतरण्यास सरकारास भाग पाडावें. अठरा पेनींचा भाव मान्य न कराल तर रिझर्व्ह बँकेची स्थापनाच करीत नाहा असें जर नामदार फडणविसांनी सांगतलें तर त्यामुळे न डगमगतां खास-दारांनी रिझर्व्ह बँकबिलच फेटाळून लावावें परंतु उघड्या डोळ्यांनी अठरा पेनींच्या भावाला संमति देऊन आपले शेतकरी व कारखानदार यांच्या नाशाला कारणीभूत होण्याच्या पापाचे धनी होऊं नये.

# "गर्जन्ति केचिद् वृथा"

श्रीयुत के. एफ्. नरीमन हे विजापूरच्या तुरुंगांतून जे बाहेर पडले ते जुन्या दशावतारी नाटकांतील राक्षसपार्टीसारखे अक्राळविक्राळ स्वरूपांत आरडाओरडा करीत व तलवार फिरवीत तेथून निघाले. मुंबईस येऊन पोचतात न पोचतात तोंच त्यांनी नव्या लोकशाही स्वराज्य पक्षाला लाखोली वाहिली, गांधीजींच्या सर्वाधिकारित्वाविरुद्ध गिल्ला केला, पं. जवाहरलाल यांना त्याचें कर्तव्य समजावून देण्याचा आव आणला आणि राजकारणाची बिघडलेली घडी अस्मादिकांकडूनच आता नीट साफसूफ बस-विली जाईल अशा आशयाच्या अहंकारपूर्ण वल्गनाहि केल्या. त्या वल्गनांना अनुसरून ते ताबडतोब वर्ध्याला जाऊन गांधीजींना भेटले व तेथून लगेच तडक अलाहाबादपर्यंत फेरफटका करून जवाहिरलालाचीहि त्यांनी गांठ घेतली. त्या उभयतांच्या भेटींत जो कांही विचारविनिमय झाला त्याने कांही आपलें समाधान झालें नाही असें त्यांनी जाहीर केले आणि स्वतःची नवी योजना लवकरच प्रसिद्ध करण्याचें आश्वासन दिलें. दरम्यान ऑ. इं. काँ. कमिटीची बैठक भरविली जावी अशाविषयी आपण प्रयत्न करीत आहों व तो योग लवकरच जुळवून आणवूं अशी फुशारकी मारण्यासहि त्यांनी कमी केलें नाही. पण इतका सगळा हा जो गाजा-वाजा झाला त्याचें अखेर पर्यवसान कशांत झालें म्हणून पाहावयास जावें तों सगळेच ओंफस! एवढा डोंगर पोखरल्यासारखा एखादा भला रुष्ट गुगगुबीत उंदीर तरी बाहेर पडावा! पण त्याच्याऐवजीं उंदराचें एक मरतुकडे पिटकुलें बाहेर पडलें आहे!!

आपल्या मेंदूला बराचसा शीण देऊन मि. नरिमन यांनी आपली खास ठेवणींतली नवी योजना जाहीर केली आहे. ती कोणती तर हिंदुस्थानांतल्या सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांनी एकत्र जमून एक भली जंगी संयुक्त परिषद भरवावी आणि त्या परिषदेंतून 'सर सॅम्युएल होअर यांनी योजिलेली राज्यघटना आम्हांला नापसंत आहे' अशा अर्थाच्या ठरावाचा बांबगोळा फेकून नवी राज्यघटना नेस्तनाबूद करावी! आणि त्या-बरोबरच हिंदीराष्ट्राची किमान पक्ष मागणी काय आहे ती जाहीर करून निदान एवढी सुधा-रणा केली जाईल तरच या राष्ट्राचें समाधान होईल नाही तर होणार नाही असेंहि जाहीर करावें!

मि. नरीमन यांच्या लेखणींतून ही योजना बाहेर पडावी याचें सखेदाश्चर्य वाटतें. सध्या हिंदुस्थानांत प्रवास करीत असलेले पार्लमेंटचे सभासद मि. हेल्स यांनी यापूर्वीच याच स्वरूपाची सूचना केली आहे. नेमस्त पक्षाच्या पुढाऱ्यांना देखील सांप्रतची श्वेतपत्रिका बिलकुल मान्य नाही; मग काँग्रेसला किंवा नुकत्याच स्थापन झालेल्या नव्या लोकशाही स्वराज्यपक्षाला व काँग्रेस स्वराज्यपक्षाला ती अमान्य आहे हें सांगणेंच नलगे. परंतु भली जंगी परिषद भरवून नापरातीचा एक ठराव पास केला कीं, सगळा कार्यभाग आटोपतो काय? ही योजना नापसंत खरी. पण तिच्याऐवजीं दुसरी कोणती तरी किमान मागणी एकमुखानें करा-वयास नको काय? नेहरू–रिपोर्टाच्या रूपाने अशी एकमुखी मागणी तयार झाली होती. तो रिपोर्ट भिरकावून देण्याचें आत्मघातकी कृत्य ज्या काँग्रेसनें केले तीच काँग्रेस आता इतर पक्षांच्या पुढाऱ्यांना एकमुखी किमान मागणी करण्याला आपण एकत्र जमूं या असें कोणत्या तोंडानें म्हणूं शकेल?

शिवाय एकीकडे कायदेभंगाची चळवळ चालू ठेवणें व दुसरीकडे इतर सर्व पक्षांशीं सहमत करून सर्वपक्षीय 'कन्व्हेनशन' भरविणें हें कॉंग्रेसच्या धोरणाला सुसंगत व शक्य तरी आहे काय?

मि. नरीमन यांच्या योजनेंतला सर्वांत कच्चा दुवा याच्या पुढेच आहे. असली सर्वपक्षीय परिषद भरविण्याच्या कामी पुढाकार कोणी घ्यावा? याचें उत्तर नरीमन असें देतात कीं, परलोकवासी लो. टिळक, देशबंधु दास, मोतीलालजी, पटेल अथवा डॅ. सेनगुप्त यांनी ही जबाबदारी आपल्यावर घेतली असती; पण आता त्यांच्या अभावीं त्याचें

राजकारणी तत्त्वज्ञान ज्यांच्यांत मुरलें आहे व जे राष्ट्रीय सभेच्या प्रागतिक धोरणाचे प्रणेते आहेत अशा गांधीजींनीच ही भूमिका घेऊन कार्यभाग पार पाडावा! ज्या गांधीजींच्या अध्यात्मवादाविरुद्ध आणि सर्वाधिकारित्वांत प्रतीत होणाऱ्या अरेरावी-विरुद्ध मि. नरीमन यांनी स्वतःच एवढी हाकाटी चालविली आहे त्याच गांधीजींच्या गळ्यांत ही नवी पुढारीपणाची माळ घालण्याचा विचार मि. नरीमन हेच प्रकट करीत असलेले पाहून कोणीहि चकितच होऊन जाईल! कॉंग्रेसच्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाला, कायदेभंगाच्या चळवळीला आणि गांधीजींच्या स्वाभिमानाला साजेशीच ही सूचना आहे आणि गांधीजी या सूचनेकडे क्षणभर तरी महानुभूतिपूर्ण दृष्टिक्षेप करतील असें जर नरीमन यांना खरोखरीच वाटत असेल तर त्यांच्या विचारसरणींतच एकाएकीं भलतेच परिवर्तन झाले आहे असें मानावें लागेल.

आपल्या या योजनेला गांधीजींची जणुं काय पूर्ण संमतीच आहे अशा आविर्भावाने मि. नरीमन हे यापुढे असा पोक्त सल्ला देतात कीं, सध्या जरी गांधीजींचा कार्यक्रम आगाऊ ठरलेला असला तरी या महत्त्वाच्या व धाडसाच्या नव्या कार्यक्रमाच्या सोयीसाठी हरिजनोद्धारकार्याच्या पुढाऱ्यांनी उदारपणाने गांधीजींना तेवढी सवलत द्यावी आणि या परिषदेचा कार्यक्रम आटोपेपर्यंत हरिजनोद्धाराची मोहीम तहकूब करून गांधींनी या कामाकडे लक्ष पुरवावें! एक वर्षपर्यंत राजकारणाचा संन्यास करूनच गांधींनी हरिजनांचे कार्य प्रारंभिलें आहे याचें मि. नरीमन यांना विस्मरण पडलें आहे काय? का या सर्वपक्षीय कन्व्हेन्शनचें कार्य म्हणजे राजकारणच नव्हे असें त्यांना वाटतें? पण नरीमन हे इतके विसराळू असले अथवा भोळे असले तरी गांधीजी कांही तसे नाहीत हें खास. त्यांना आपल्या कार्यक्षेत्राच्या मर्यादेची जाणीव पूर्ण आहे किंबहुना त्या कार्यक्षेत्राची मर्यादा उल्लंघिली जाण्याची संभवनीयताहि राहूं नये म्हणून ते त्या सीमेच्या रेषेपासून किती तरी अलीकडेच आपले पाय आंखडीत असतात. अर्थातच कै. विठ्ठलभाई पटेल यांच्या प्रेतयात्रेला येण्यासाठी म्हणून देखील ज्यांनी आपला दौरा तीनचार दिवसांपुरताहि तहकूब केला नाही ते गांधीजी नरीमन यांनी सुचविलेल्या या सर्वपक्षीय परिषदेची धुरा आपल्याकडे घेण्याला तयार होतील असें आम्हांस तरी बिलकुल संभवनीय वाटत नाही.

एवंच नरीमन यांची ही कल्पना सर्वतोपरी विचित्र आणि लुळीपांगळी असल्याने ती कार्यक्षम होण्याचा मुळीच संभव नाही. मात्र नरीमन यांच्या प्रारंभीच्या घनगर्जनेचें असलें शुष्क पर्यवसान व्हावें आणि अखेरीस 'गर्जेल तें पडेल काय' असेंच त्यांच्याविषयीं म्हणण्याची पाळी यावी, याचाच आम्हांस खेद वाटतो.

# लखनौ येथील लष्करी शिक्षणाची चळवळ

नुकतेच म्हणजे नोव्हेंबरच्या १ ल्या तारखेपासून १५ तारखेपर्यंत लखनौ येथे ३री (यु. पी.) बॅटॅलियन यु. टी. सी.चा वार्षिक तळ (Training Camp) झाला त्यांत खालील कंपन्या होत्या.

'A' कंपनी—अलाहाबाद युनिव्हर्सिटी (४ पलटणी); 'B' कंपनी—लखनौ युनिव्हर्सिटी (४ पलटणी); 'C' कंपनी—आग्रा युनिव्हर्सिटी (२ पलटणी) अलिगड मुस्लीम युनिव्हर्सिटी (२ पलटणी); 'D' कंपनी—बनारस हिंदु युनिव्हर्सिटी (३ पलटणी) मीरत कॉलेज (१ पलटण) याप्रमाणे या कँपमध्ये पांच विश्वविद्यालयें सम्मिलित झालीं होतीं व कंपन्यांतील जवानांची संख्या ६०० च्या जवळ जवळ होती. त्यांत बनारस हिं.यु.च्या विद्यार्थ्यांपैकीं शेंकडा ७५ विद्यार्थी महाराष्ट्रीय आहेत! यापूर्वीचे कँप अलाहाबाद, खडकी व आग्रा येथें झाले होते.

हा कँप गांवापासून पांच मैलांवर किचनेर लाइन्समध्ये होता व सर्व विद्यार्थ्यांना राहुट्यांतून राहावें लागत असे. रोज सकाळीं व्यायामानतर तीन तास परेड असे. दुपारीं १२ वाजता राहुट्यांचे परीक्षण (Lines Inspection) व त्यानंतर जेवण व ४ वाजेपर्यंत विश्रांति. सायंकाळीं खेळ होत असत. रात्रौ १० वाजता दीपनिर्वाण. मध्यंतरीं दोन दिवस ईस्ट यॉर्कशायर रेजिमेंटचे कवायत व पलटणीचा हल्ला हे कार्यक्रम पाहण्यासाठी १० मैल 'रूट' मार्च होता. दोनहि कार्यक्रम फार प्रेक्षणीय होते. मधून मधून अॅडज्युटंट व रेजिमेंटल सार्जंट मेजर यांच्या हाताखालीं कवायती Ceremonial Battalion Parades होत असत. कँप पाहण्यासाठी १३ तारखेला डिव्हिजनलकमांडर हे व ता.१४ ला ब्रिगेडियर आले होते. त्यांना बॅटॅलियन 'मार्चपास्ट' दिला गेला. त्यांनी बनारसच्या गार्डची चांगली प्रशंसा केली.

या कँपमध्ये खालील सामने झाले (१) कार्यक्षमता ( Efficiency ) हा कप सर्वांत महत्त्वाचा असून ज्या कंपनीला हा मिळतो ती बॅटॅलियनमध्ये सर्वांत पुढे राहते व तिला राहुल्यामध्ये पहिली रांक असते. हा ' D ' कंपनीला महाल्यांदा मिळाला आहे. (२) निशाण बाजी (Shooting) हा कप ' C ' कंपनीला मिळाला. गेल्या वर्षी ' C ' कडेच होता. (३) कार्यक्षम पलटण ( Platoon Efficiency ) हा कप ' D ' ला गेल्यावर्षीप्रमाणेच मिळाला. (४) शिस्त हा कप ' C ' ला मिळाला. (५) गार्ड हा ' B ' ला मिळाला. (६) फुटबॉल—हा ' D ' ला मिळाला. (६) हॉकी-'A' कंपनी. (८) बॉक्सिंग हा ' D ' ला मिळाला. गेलीं पाच वर्षे हा ' D 'कडेच असतो! (९) तालुकदार कप हा सर्वसाधारण खेळांसाठी ' A ' कंपनीला मिळाला (१०) टग ऑफ वार ' D ' कंपनी. वरील निकालावरून बनारस. हिं. यु. लष्करीदृष्ट्या किती कार्यक्षम आहे ते दिसतें.

ता.१२ रोजीं सायंकाळीं यू. टी. सीं.तील महाराष्ट्रियांचा व गांवातील महाराष्ट्रीयांचा परिचय समारंभ श्री. बर्वे यांनी एक उपाहार देऊन घडवून आणला. समारंभाला रँगलर परांजपे [ व्हाइसचॅन्सेलर लखनौ यु.] हे अध्यक्ष लाभले होते. आपल्या भाषणांत त्यांनी स्वराज्य मिळविण्यासाठीं तें रक्षण करण्याची शक्ति पाहिजे इत्यादि गोष्टी सांगून यु. टी. सी सारख्या नाखुषीने मिळणाऱ्या, व असमाधानकारक असल्या तरी मुळींच नसण्यापेक्षा बऱ्या, अशा संधीचा देशांतील तरुणांनी कोणत्याहि बाऊंना न भितां उपयोग करून घ्यावा असा उपदेश केला. तसेंच महाराष्ट्रीयांपैकीं बऱ्याच विद्यार्थ्यांनी लष्करी कार्यक्षमता दाखविली याबद्दल समाधान व्यक्त केलें. यू. टी. सी.मंडळींपैकीं श्री,वाकणकर व श्री.बिडयाई ( महाराष्ट्रीय ) कंपनी कमांडर मेरठ यांचीं भाषणें झाल्यावर मंडळी उपाहारासाठीं उठली. दुसरे दिवशीं श्री. आपटे यांनी यु. टी. सी. तील महाराष्ट्रीयांना उपाहार दिला. दोन्ही समारंभांना 'D' कंपनीचे सार्जंट मेजर खेडकर ( पुणे ) व सार्जंट किर्पेकर ( पुणें ) हे उपस्थित होते.

पुढील वर्षी तिसऱ्या यू. टी. सी. बॅटॅलियनचा तळ अलाहाबाद येथे होणार आहे.

# भावी घटना व संस्थानी प्रजा

## जाहीर व्याख्यान

शुक्रवार ता. १७ रोजीं सायंकाळीं ६ वाजता टिळक—स्मारक मंदिरांत पुणे सार्वजनिक सभेतर्फे लोकशाही स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमावरील दुसरे व्याख्यान **श्री. ल. ब. भोपटकर** यांचें ' भावी घटना व संस्थानी प्रजा ' या विषयावर श्री. **दा. वि. गोखले** यांच्या अध्यक्षतेखाली झालें. प्रारंभीं अध्यक्षाचें प्रस्तावनेदाखल खालीलप्रमाणे भाषण झालें. ते म्हणाले, "आजचा दिवस हा कै. लाला लजपतरायांच्या निधनाचा आहे. तेव्हा व्याख्यानाला सुरुवात करण्यापूर्वी त्याचें स्मरण करणे हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळवून देण्याची यावज्जीव तनमनधनद्वारा ज्या काही थोर पुढाऱ्यांनी अहोरात्र खटपट केली, त्यांत लालाजींचा दर्जा अत्युच्च आहे. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं स्वराज्यसंपादनाच्या बाबतींत ज्या त्रिमूर्तींनी खटपट केली तीं नांवें लहानथोर सर्वांच्या तोंडीं झालीं होतीं आणि ती त्रिमूर्ति म्हणजे लाल बाल व पाल ही होय. सायमन कमिशनावर बहिष्कार पुकारून तो अमलांत आणण्याच्या गर्दीत त्यांना पोलिसाची लाठी लागली व त्या जखमेमुळे त्यांचा आजार वाढला व त्यांतच त्यांचा अंत झाला !! आरंभापासून शेवटपर्यंत राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरिता खटपट करणारे व त्यांतच आपले बलिदान करणारे लालाजी हे आदर्शवत मानून त्यांच्यामागून आलेली पिढी तितकेंच जारीचें कार्य करील अशी मला आशा आहे. असो. आजच्या व्याख्यानाचा विषय दुसरा आहे. नवीन येऊं पाहणाऱ्या सुधारणेत संस्थानिक व ब्रिटिश प्रजाजन हे एके ठिकाणीं येऊं पाहत आहेत. मॉंटेग्यू—चेम्सफर्ड पासून आतापर्यंत ज्या सुधारणा झाल्या त्या सर्व ब्रिटिश प्रजाजनांकरिता झाल्या. पण आता संस्थानी प्रजेचेंहि लक्ष इकडच्या चळवळींकडे वेधूं लागलें व ती चळवळ जोराने पुढे चालविण्यास लोकशाही स्वराज्य पक्ष मदत करणार आहे. "

### भोपटकरांचें भाषण

वरील आशयाचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर श्री. भोपटकर यांचें खालील आशयाचें भाषण झालें. ते म्हणाले, "भावी सुधारणा या १९३४सालीं येवोत किंवा १९३५ सालीं येवोत, हिंदुस्थानाच्या

अर्वाचीन इतिहासांत ही एक अभूतपूर्व गोष्ट आहे इतकें मात्र खरें. या भावी घटनेसंबंधाने श्वेतपत्रिकेंत जें दिग्दर्शन केलें आहे त्यावरूनच आता पार्लमेंटमध्ये बिल सादर होणार आहे. या घटनेमध्ये संस्थानी प्रजेची काय स्थिति होणार आहे हें पाहूं. नवीन सुधारणान्वये मतदारांची संख्या पुष्कळच फुगणार असून मतदाराला कोणत्या तत्त्वावर मत द्यावयाचें व नवीन घटनेचें नेमकें स्वरूप काय आहे हें जर सुशिक्षित वर्गाला कळलें नाहीं तर आम्हाला व्यावहारिक ज्ञान नव्हतें असा शेरा पुढील पिढी आमच्यावर मारल्याशिवाय राहणार नाहीं. नवीन सेन्सस रिपोर्टाप्रमाणे हिंदुस्थानाची लोकसंख्या ३५ कोटी आहे; पैकीं दीड कोटी अस्पृश्य आहेत व त्यांना सर्वांच्या बरोबरीने राजकीय, सामाजिक व धार्मिक हक्क प्राप्त व्हावेत म्हणून म. गांधीच्या नेतृत्वाखाली कार्य सुरु आहे.

### राजकारणाचे विविध पैलू

हिंदी राजकारणाला इतके पैल आहेत कीं, एकेकाने एकेक उचलला तरी चालेल; व याच अनेक पैलपैकीं संस्थानी प्रजेचें हित करणे हाहि एक पैल आहे. हिंदुस्थानांत एकंदर संस्थाने ५६० आहेत व त्यांची एकंदर लोकसंख्या सुमारें आठ कोटी आहे. दीड कोटी अस्पृश्यांना सर्व बाबतींत इतरांसारखे हक्क देण्याची खटपट करून संस्थानी प्रजेबद्दल मात्र एक अवाक्षरहि तोंडांतून न काढतां त्यांना हक्काच्या बाबतींत अस्पृश्य बनविणार कीं काय असा साहजिकच प्रश्न मनांत उद्भवतो. एका बाजूला अधिकारलोलुप अरेराव हिंदी संस्थानिक व दुसऱ्या बाजूला हिंदुस्थानाला कोणताच हक्क द्यावयाचा नाहीं असें ठासून सांगणारी साम्राज्यवादी चर्चिलप्रभृति मंडळी अशांचें संगनमत होऊन बिचाऱ्या संस्थानी प्रजेची मात्र चांगलीच गळचेपी होत आहे. एकंदर लोकसंख्येच्या मानाने पाहता ८ कोटी संस्थानी प्रजा ही कांहीं कःपदार्थ नव्हे. आणि या संख्येची मुळीच गणति न करतां जर ब्रिटिश हिंदुस्थानाला स्वराज्य मिळणार असेल तर तें टिकणे व टिकविणे दोन्हीहि कठीणच होऊन बसेल यांत शंका नाहीं.

### घटनेंतील उंटाचें पिलूं

गेल्या तीनहि गोलमेज परिषदांचे अहवाल ज्याने लक्षपूर्वक वाचले असतील त्याच्या लक्षांत असें येईल कीं, अल्पसंख्य मुसलमान व संस्थानिक यांनी नवीन घटनेंत हक्काच्या बाबतींत चांगलाच हात मारून घेतला आहे. यामुळे उलटा न्याय असा झाला आहे कीं, संख्येंत बहुसंख्य जरी हिंदु असले तरी हक्काच्या बाबतींत ते अल्पसंख्य ठरूं पाहात आहेत! हिंदु लोकांचा असा घात होत असलेला दृष्टीसमोर असतांहि तिकडे कानाडोळा करून कांहीं पुढारी मंडळी हिंदु-महासभेवर व डॉ. मुंजाच्या कामगिरीवर शितोडे उडविण्याच्या खटपटींत आहेत; पण तेच पुढारी, मुसलमानांनी संस्थानांत व ब्रिटिश हद्दींत हिंदूंना किती नडविलें आहे हे ठाऊक असूनदेखील त्याच्याविरुद्ध तोंडातून ब्रह्र काढीत नाहीत! ब्रिटिश हिंदुस्थानांत जी राजकीय चळवळ चालू आहे तिचा परिणाम ब्रिटिश मुत्सद्यांच्या अधिकारांच्या तट्टेवर होऊन तें आपल्या मांडीखालून निसटतें कीं काय अशी त्यांना भीति पडली आहे; व ह्या राजकीय चळवळीचे वारे आमच्या संस्थानांतूनहि वाहूं लागून आमची गादी गुंडाळण्याचा दुर्धर प्रसंग आम्हावर ओढवतो कीं काय अशी संस्थानिकांना भीति पडली आहे; आणि म्हणूनच दोघांनीहि आसन डळमळूं नये म्हणून वर सांगितल्याप्रमाणे महत्त्वाकांक्षी राज्यकर्ते व अरेरावी गाजविणारे संस्थानाधिपति यांनी हातांत हात घालून फेडरेशनचें पिलूं नवीन घटनेंत सोडून दिलें, आणि हें पिलूं पुढे कोणता अनर्थ करील याचा गोलमेज परिषदेस गेलेल्या पुढारी मंडळींनी विचार न केल्यामुळे एकंदर घटनेंत चांगलाच गोंधळ माजला आहे.

प्रथम संयुक्त घटनेची जेव्हा कल्पना निघाली तेव्हा आम्ही व संस्थानी प्रजाजन आता एक झालों आहोंत असे शेख महंमदी मनोरे सामान्य जनतेने आपल्या कल्पनाचक्षुपुढे बांधले. पण दुसऱ्या गोलमेज परिषदेंत संस्थानिकांनी "अहो! फेडरेशन, फेडरेशन झालें असें जे म्हणतां तें ठीक आहे, पण हें फेडरेशन तुम्ही ब्रिटिश हद्दींतील प्रजाजन व आम्ही संस्थानिक याच्यामध्ये आहे. त्यांत संस्थानी प्रजेचा काय संबंध?" असें स्पष्टीकरण करून एका क्षणांत हे शेखमहंमदी मनोरे त्यांनी धुळीला मिळविले. पण या लहान ठिणगीने पुढे कशी आग लावली व संस्थानिकांना अधिक हक्क कसे प्राप्त झाले हे आता पाहूं. फेडरेशनच्या स्थापनेच्या अटी फारच चमत्कारिक आहेत. तसेच संस्थानिकांनी मुत्सद्याच्या पाठीमागे असें टुमणें लावलें कीं, गव्हर्नर-जनरलाला कायदेशीरपणाने व्हाइसरॉय म्हणण्यांत यावें. ही मागणी मान्य केल्याचें मुख्य प्रधानांनी १९३१ च्या जानेवारींत एक जाहीरनामा काढून प्रसिद्ध केले. या मान्यतेमुळे हिंदुस्थानांत द्विदल राज्यपद्धति सुरू झाली. या संयुक्त घटनेंत मध्ये

संस्थानिकांनी समाविष्ट झालें पाहिजे अशी सक्ती नाही. इतकेंच नव्हे तर आज एखादे संस्थानाधिपति आले व उद्या निघून गेले तरी त्यांना 'असें कां करतां' म्हणून कोणीहि पुसतां कामा नये.

### प्रिन्सेस प्रोटेक्शन ॲक्ट

कौन्सिल ऑफ स्टेट व असेब्ली यांमध्ये सामान्य दर्जाच्या सभासदांबरोबर आपणाला बसावें लागू नये म्हणून त्यांनी कौन्सिल ऑफ स्टेटमध्ये असलेल्या एकंदर २६० जागांपैकीं १०४ जागा व असेब्लीमध्ये असलेल्या ३७५ जागांपैकीं १२५ जागा द्या असें सांगून वेटेज मागितलें. आणि तुम्ही जर आमची मागणी मान्य करीत नसाल तर पाहा, फेडरेशन कांहीं होऊं शकणार नाही असा कांहींसा धाकहि त्यांनी घातला. फेडरेशन झालें कीं स्वराज्य आलेंच, मग येवढ्या मागणीसाठी कां मोडा असा औदार्याचा विचार करून हिंदी पुढाऱ्यांनी संस्थानिकांची तीहि मागणी मान्य केली ! संस्थानिकांची पुढील मागणी अशी कीं, कौन्सिल ऑफ स्टेटमध्ये आम्हीच येऊं असें नाही तर आम्ही आमचे हस्तकहि पाठवूं. इतक्या मागण्या मान्य केल्यावर तरी संस्थानिकांचें समाधान झालें का असें कोणी विचारलें तर त्याला 'नाही' असेंच उत्तर द्यावें लागेल. कारण त्यांची पुढील मागणी फारच चमत्कारिक व संस्थानिकांना शोभण्यासारखीच आहे. ती मागणी अशी कीं, आम्ही आमच्या प्रजेंत कसा वागलों तसा गोंधळ घालूं, याबद्दल कोणीहि आमची चौकशी करूं नये आणि वर ज्या मागण्या म्हणून सांगितल्या त्यावरहि कळस चढविणारी मागणी म्हणजे प्रिन्सेस प्रोटेक्शन बिलाने आमच्या हातीं बेलगामी सत्ता द्यावी ही होय. हें बिल अद्याप गुलदस्तांत आहे. पण तें आज ना उद्या असेब्लींत येणार आणि हें जर का पास झालें तर मात्र हल्ली संस्थानी प्रजेचे जे हाल चालले आहेत ते काहीच नव्हेत असे हाल या बिलाचा जर कायदा झाला तर होतील. तेव्हा ही स्थिति प्राप्त होऊं नये म्हणून संस्थानी प्रजेने व ब्रिटिश हद्दींतल्या पुढाऱ्यांनी वेळींच सावध होऊन नुसतें भविष्यकालीन तत्त्वज्ञान न सांगता सांप्रतच्या बिकट परिस्थितीला तोंड देण्यास व्यावहारिक ज्ञानाची जोडहि द्यावी."

वरील आशयाचें श्री. भोपटकर यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांचें समारोपादाखल खालील आशयाचें भाषण झालें. ते म्हणाले, "या फेडरेशनच्या घटनेमध्ये संस्थानिकांना दिलेल्या अधिकारांत बदल करण्याचा अधिकार खुद्द पार्लमेंटालादेखील नाही. आणि याचें कारण असें कीं, संस्थानिकांना दिलेले हक्क हे तहाच्या स्वरूपाचे आहेत. याचा अर्थ असा कीं, जर यांत बदल करावयाचा झाला तर संस्थानिकांची संमति घ्यावी लागेल ! लोकशाही स्वराज्य-पक्षाने संस्थानी प्रजेच्या मागण्यासंबंधीं ठराव करून तिला शक्य ती मदत करण्याचें ठरविलें आहे."

# रशिया–अमेरिकेची अपूर्व युति

॥ न कश्चित्कस्यचिन्मित्रं न कश्चित्कस्यचिद्रिपुः । कारणेन हि जायन्ते मित्राणि रिपवस्तथा ॥

जगांत कोणीहि कोणाचा शत्रु नसतो किंवा मित्र नसतो; शत्रुत्वाचे किंवा मित्रत्वाचे संबंध कारणपरत्वेंच जुळत असतात. १९१७ सालीं रशियांत 'मजुरांचें साम्यमूलक राज्य' स्थापन झाल्याबरोबर त्या सोव्हिएट सरकाराने इतर राष्ट्रांचीं, विशेषतः अमेरिकेचीं, झारशाहींत झालेलीं कर्जें देण्याचें नाकारलें ! साहाजिकच अमेरिकेने रशियावर आन्तरराष्ट्रीय बहिष्कार पुकारून त्याच्याशीं असलेले सर्व संबंध तोडले. अध्यक्ष मि. कूलीज एका प्रसंगीं भाषण करताना म्हणाले, "आन्तरराष्ट्रीय करारांचें पावित्र्य जें राष्ट्र राखीत नाही अशा राष्ट्राशीं स्नेहसंबंध ठेवण्याची आमची मुळींच इच्छा नाही."

रशियामध्ये कम्युनिस्टांचें राज्य होऊन एक तप लोटत आलें. या मध्यंतरींच्या कालांत राष्ट्रांच्या मनोवृत्तींतहि राजकीय स्थित्यंतराबरोबर पालट होत चालला. १९१८ सालीं रशियाशीं आमचा कसलाहि सुएर–सुतकाचा संबंध नाही असें फणफणत म्हणणारी अमेरिका १९३३ सालीं त्याच रशियाला मान्यता देऊन त्याच्याशीं स्नेहयाचना

करीत आहे, या गोष्टींत जितकें वैचित्र्य दिसून येतें तितकीच निसर्गनियमांची अनुल्लंघनीयताहि प्रतीत होते. चिरकाल मैत्री किंवा चिरकाल वैरभाव व्यवहारांत टिकूंच शकत नाही. रशिया-अमेरिकेंतील नवा संबंध हें त्याचेंच द्योतक होय. अमेरिकेच्या अध्यक्षपदावर आरूढ होताच अमेरिकेचा व्यापार कसा वाढेल व आन्तरराष्ट्रीय राजकारणांत आपलें स्थान पहिलें कसें राहील, ही एकच विवंचना मि. रूझवेल्ट यांना लागून राहिली आहे व त्याच दृष्टीने त्यांनी निरनिराळ्या योजना चालविल्या आहेत

डॉलरचा भाव कायद्याने उतरवून धान्याच्या किंमती वाढविणें हें जसें व्यापारवृद्धीचें साधन, तद्वत् परराष्ट्रांशीं व्यापारी करारमदार करणें हेंहि दुसरें एक साधन आहे. पाहिलें साधन अन्तर्गत आहे तर दुसरें बहिर्गत म्हणजे दुसऱ्या राष्ट्राशीं संबंध आणणारें आहे. गेले एकदोन महिने विशेषेंकरून वृत्तपत्रांतून बातम्या येत कीं, अमेरिका व रशिया यांचीं आपापसांत व्यापारी करारासंबंधी कांही बोलणीं चालू आहेत. जागतिक आर्थिक परिषद बिनमुदत थांबल्यावर या वार्तांना विशेषच पालवी फुटूं लागली. शेवटीं ता १७ रोजीं मध्यरात्रीं ११ वाजून ५० मिनिटांनी वाशिंग्टन शहरीं रशिया व अमेरिका या दोन शत्रुराष्ट्रांत 'मित्रत्वाचा करार' झाला व त्या करारासंबंधी अमेरिकेचे अध्यक्ष मि. रूझवेल्ट व रशियाचे प्रतिनिधि एम्. लिट्व्हिनॉफ् यांच्या जोडसहीने एक अधिकृत पत्रक प्रसिद्ध करण्यांत आलें.

या संस्मरणीय पत्रकाचा आशय असाः— "उभय राष्ट्रांत मित्रत्वाचा जो करार झाला त्याच्याच अनुषंगाने आन्तरराष्ट्रीय कर्जें व हक्क एतत्संबंधी प्रश्न गुण्यागोविंदाने कसे सुटतील यासंबंधी आमच्यात विचारावीनिमय झाला. हे गुंतागुंतीचे प्रश्न लवकर सुटावे अशी दोनहि राष्ट्रांची इच्छा आहे." वरील पत्रकांत ज्या कराराचा उल्लेख आहे, त्यांत पुढील मुख्य मुद्दे समाविष्ट झाले असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. उभय राष्ट्राच्या हितसंबंधांना विघातक अशा मतप्रचाराला दोनहि देशांत बंदी असावी. दोनहि देशांत उभय राष्ट्रांच्या नागरिकांना संपूर्ण धार्मिक स्वातंत्र्य असावें, १९२५ सालच्या रशिया जर्मनी कराराप्रमाणे उभय राष्ट्रांच्या नागरिकांना दोनहि देशांत कायदेशीर संरक्षण व आर्थिक हेरगिरीसंबंधांत झालेल्या खटल्यांत पूर्ण सवलती (सेफगार्ड्स) देण्यात याव्या. सायबेरियांतील आपल्या राजकीय हक्कावर पाणी सोडण्यासहि अमेरिका कबूल झाली आहे. मित्रत्वाच्या करारांतील अस्पष्ट राहिलेले तपशील भरण्याचें काम संपविण्यासाठी एम्. लिट्व्हिनॉफ् हे वॉशिंग्टन येथे कांहीं दिवस राहणार आहेत. सदरहू कराराप्रमाणे अमेरिकेचे मि. विल्यम् बुलिट् हे वकील म्हणून रशियांत जाऊन राहाणार असून, रशियाने ट्रीयोनोव्हेस्की यांना अमेरिकन दरबारीं आपले वकील म्हणून ठेवण्याचें कबूल केलें आहे.

भांडवलशाहीची अधिराज्ञी म्हणून ठरलेल्या अमेरिकेने भांडवलशाहीची तिरडी बांधण्यास सज्ज झालेल्या रशियाशीं स्नेह जोडावा यांतील रहस्य काय? हें रहस्य दिसतें तितकें गूढ नाही. आमच्या पुरातन राज्यशास्त्रकारांनी हें गूढ केव्हाच उलगडून ठेवलें आहे. समानशत्रुत्व हें मैत्रीचें समवायी कारण होय. दुथडी भरलेली नदी ओलांडतांना गाय आणि वाघ हीं शत्रुत्व विसरतात. अमावास्येच्या रात्रीं व्यसनोदयांची भावना विसरून सूर्य–चंद्र पुण्यकारक पर्वणी निर्माण करतात. अमेरिका आणि रशिया यांच्या मैत्रीला हे दोन दृष्टान्त दोन तऱ्हांनी लागू पडतात. पहिल्या दृष्टान्तांतील मर्म असें कीं, समान संकटामुळें ज्याप्रमाणे गाय आणि वाघ यांजमधील शत्रुत्व लोपलें, तद्वतच जपानच्या समान शत्रुत्वामुळे अमेरिका व रशिया यांजमधील वैरभाव लोपूं लागला आहे. दुसऱ्या दृष्टान्ताचें प्रयोजन हें कीं, अमेरिका आणि रशिया या दोन प्रबल राष्ट्रांच्या युतीमुळे आन्तरराष्ट्रीय घोटाळ्याचे प्रश्न सुटण्यास मदत होईल, असें आम्हांस वाटतें. निदान आज आन्तरराष्ट्रीय

राजकारणांत इंग्लंड–फ्रान्सप्रभृति राष्ट्रांचें जें नसतें प्रस्थ माजलें आहे त्याला जबरदस्त धक्का बसेल.

जपाननें असें कोणतें कारस्थान रचलें आहे कीं, ज्यामुळे अमेरिका व रशिया या दोन शत्रु राष्ट्रांना स्नेहसंपादनाची गरज भासावी ? या प्रश्नाचें उत्तर जपानने गेलीं दोन वर्षे मांचूरियांत जो धुडगूस चालविला आहे त्यांत सांपडेल. जपानची साम्राज्यतृष्णा अनिवार होऊन म्हणा किंवा त्याच्याच एका सेनापतीने उद्‌गार काढल्याप्रमाणे प्रतिवर्षी वाढणाऱ्या प्रजेची सोय त्याला लावावयाची आहे म्हणून म्हणा, त्याने चीनचें दौर्बल्य ओळखून मांचूरियाची समृद्ध भूमि आपल्या घशात टाकण्याचा डाव टाकला. साउथ मांचूरियन रेल्वेवरून कांही तरी खुसपट काढून जपानने चीनशीं युद्ध पुकारलें. परंतु जपानच्या या आक्रमणाचे धक्के एकट्या चीनलाच बसण्याऐवजीं ते रशिया, अमेरिका, इंग्लंड इत्यादि राष्ट्रांनाहि जाणवूं लागले. जाळ्यांत सांपडलेल्या माशीवर निरनिराळ्या दिशांकडून कोळी जसा आपले पाश टाकीत असतो, त्याप्रमाणे मांचूरियाच्या विलोभनीय भूमीवर निरनिराळ्या व्यापारी राष्ट्रांनी आपले पाश फार वर्षांपासून टाकले आहेत. एका जपानाने हालचाल केल्याने जाळ्याच्या प्रत्येक पाशालाहि स्पंदन व्हावें हें स्वाभाविक होय.

चीन हीं अमेरिकेच्या व्यापाराची मुख्य उतारपेठ. कोणत्याहि राष्ट्रापेक्षा अमेरिकेचा चीनमधील व्यापार मोठ्या प्रमाणांत चालतो. जपानाला मांचूरिया व मांचूरियामागून चीन असे देश स्वसत्तेंत आणतां आले तर आणावयाचे आहेत. चीन देश आपल्या स्वाधीन न झाला तरी, करोलिन व मार्शल हीं पॅसिफिक महासागरात अमेरिका व जपान यांजमध्ये उभी असलेलीं बेटें ताब्यांत घेण्याचा त्याचा निश्चित बेत आहेच. तीं बेटें घेऊन तेथे लष्करी ठाणीं उभारण्याचा जपानचा राजकीय डाव आहे. हीं बेटें एकदां का जपानच्या हातीं गेलीं व त्याने तेथे एकदा का लष्करी नाकेबंदी केली म्हणजे अमेरिकेच्या व्यापाराला मुसक्या बसल्याच म्हणून समजावें. अर्थात् हें भावी संकट ओळखून जपानच्या मांचूरियांतील कारवाईला कांहीं प्रतिबंध घालतां यावा, निदान मांचूरियाच्या आसपास त्याला आपले हातपाय पसरतां येऊं नयेत, या हेतूनेच त्याच्याविरुद्ध एखादी प्रबल सत्ता उभी करतां आली तर पाहावी, असें प्रे. रूझवेल्ट यांनी आपल्या मनाशीं ठरविलें. या कामीं रशिया आपल्या अधिक कामीं येईल असें त्यांना दिसलें आणि म्हणूनच त्यांनी रशियन प्रतिनिधीशीं स्नेहसंबंधाचीं बोलणीं काढलीं.

रशियाला तरी जपानचें आक्रमण थांबावयास पाहिजेच आहे. कारण सायबेरियावर जपानची गिधाडधाड पडण्याची त्याला भीति आहे. आज रशिया व जपान यांजमध्ये हुजत चालली असेल तर ती चायनीज ईस्टर्न रेल्वेबद्दल चालली आहे. वस्तुतः चायनीज ईस्टर्न रेल्वे बांधली ती मूळ झारच्या कारकीर्दींत चीन व रशिया यांच्या खर्चानेच बांधली गेली. ही रेल्वे मांचूरियाच्या बरोबर मध्यांतून जात आहे. गेल्या सालीं जपानने मांचूरिया घशांत टाकून तेथे आपल्या दिमतीखाली मांचूको नांवाचें एक संस्थान स्थापलें! साहजिकच कानामागून येऊन तिखट झालेलें हें बाळ त्या रेल्वेवर स्वतःची मालकी सांगूं लागलें! मांचुकोच्या पाठीशीं जपानचें अवघें लष्कर उभें असल्याने त्याने सदर रेल्वेसंबंधी कायमचेंच भांडण सुरू केलें असल्यास त्यांत काय नवल ? जपानच्या कुरघोडीला राष्ट्रसंघहि पायबंद घालीत नाहीं; चीनहि करावा तसा विरोध करूं शकत नाहीं; मग आपण तरी आताच रणदेवतेला कशाला आवाहन करा; प्रत्यक्ष आपल्या अंगणांतच जपान पाय ठेवूं लागला तर मग पाहूं. या विचाराने जपानपासून कांही खर्च घेऊन ईस्टर्न रेल्वेवरील आपला हक्क सोडण्यास रशिया आज तयार झाल्यासारखा दिसत आहे. रशिया हा मालकी हक्क सोडण्यास तयार

झाला असलाच तर तो याच विचाराने होय कीं, आज दुसऱ्या राष्ट्रांच्या अन्तर्गत कारभारांत आपण हात घालूं नये व आपल्या सीमान्त मर्यादा अधिक बळकट करता आल्या तर कराव्या.

जपान, रशिया आणि अमेरिका यांच्या या तिरपगडी संबंधावरून एक गोष्ट चटदिशीं लक्षांत येईल कीं, दिवसेंदिवस जपान हा एकट्या अमेरिकेला किंवा एकट्या रशियाला भारी होत चालला आहे. अमेरिकेला तर जपानचें हें आक्रमण व्यापार व राजकीय सुरक्षितता या दोनहि दृष्टींनी चिंताजनक आहे. रशियाशीं स्नेहाचा करार करण्यांत चीनमधून नाहीशी होत चाललेली बाजारपेठ, कांहीं दिवसांपुरती कां होईना, रशियांत उघडावी हा अमेरिकेचा उद्देश नसेलच असें नाही. अमेरिकेंतील एका अर्थशास्त्रज्ञाने तर या करारामुळे अमेरिकेचा रशियाशी निर्गत व्यापार ३५ कोटी डॉलर्सनी वाढेल व ६ लक्ष बेकारांना कामधंदा मिळेल असा अंदाज केला आहे ! हा अंदाज अगदींच शेखमहंमदी आहे असें धरून चालले तरी अमेरिकेचा निर्गत व्यापार थोडा तरी वाढेल इतकें अनुमान काढल्यास त्यांत फारशी चूक होणार नाही. रशियानेहि पाहिलें कीं, आज अमेरिकेसारख्या जगांतील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रानेच आपल्याला मान्यता दिल्यामुळे, जगाच्या राष्ट्रमंडळांत सोव्हिएट राज्यपद्धतीलाच मान्यता मिळाल्याप्रमाणे होणार आहे.

या कराराच्या बाबतींत एक गोष्ट मात्र विशेषें-करून लक्षांत ठेवावयास पाहिजे व ती ही कीं, राष्ट्रसंघाला जपानचें हें संकट टाळणें दुर्घट झालें हें पाहूनच राष्ट्रसंघांत सामील नसणाऱ्या या दोन प्रबळ राष्ट्रांनी आपल्यांत मैत्रीचा करार केला आहे. ‘ महदपि परदुःखं शीतलं सम्यगाहुः ’ असाच अनुभव अमेरिका व रशिया या दोन राष्ट्रांना आल्यामुळे, हें वाढून ठेवलेलें दुःख स्वावलंबनाने व अन्योन्याश्रयाने निवारण्याचा निश्चय त्यांनी केलेला दिसतो. रशिया व अमेरिका यांच्या या समानबंधुत्वाने युरोपियन राजकारणाला नवीन कलाटणी मिळाल्याशिवाय राहाणार नाही. जपानच्या वर्धमान साम्राज्यतृष्णेलाहि त्यामुळे प्रतिबंध बसेल यांत शंका नाही. शिवाय ओटावा—कराराला रशिया—अमेरिका यांजमधील हा नवा करार एक परस्पर प्रत्युत्तरच आहे असें कोणी म्हटल्यास त्यांत तरी त्याची काय चूक ?

# स्फुट सूचना

१ पुणें येथे चार महिन्यांपूर्वी भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांच्या परिषदेंतील वादविवादाच्या व मतमतांतराच्या चिखलांत राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमाचीं चाकें जीं एकदा अडकलीं गेलीं तीं बाहेर निघण्याचीं चिन्हे अद्याप दिसत नाहीत. त्या परिषदेनंतर पं. जवाहरलाल नेहरू तुरुंगांतून सुटून आले, त्यांनी म. गांधी व इतर पुढारी यांच्या भेटीगांठी घेतल्या, आपापले तात्त्विक मतभेद स्पष्टपणाने दोघांनी पत्रव्यवहाराच्या रूपाने जगापुढे मांडले, पण कायदेभंगाच्या कार्यक्रमाशिवाय दुसरा कार्यक्रमच नाही, हे गांधीजींचें मत जवाहरलाल यांना नाइलाजाने कबूल करावें लागल्याने गारठलेलें राजकीय वातावरण तसेंच राहिले. पुणें परिषदेनंतर राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांनी ठरविलेला कार्यक्रम कायदेशीर होऊं शकत नाही, म्हणून कराचीच्या स्वामी गोविंदानंदांनी ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा भरवा, असा आग्रहाचा लकडा पं. जवाहरलाल हे राष्ट्रीय सभेचे सरचिटणीस असल्याने त्यांच्यामागे लावला. पण त्याचा उपयोग झाला नाही. कारण पं. जवाहरलाल यांनी प्रांजलपणें जाहीर केलें कीं, स्वतःच्या जबाबदारीवर ते ती सभा बोलविण्यास तयार नाहीत; कारण त्यांना कार्यक्रम बदलावा असे वाटत नाही. पण जर तीस सभासदांनी एकत्र अगर व्यक्तिशः लिहून ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा भरविण्यास सांगितलें, तर चिटणीस या नात्याने ते ती सभा बोलावण्यास तयार आहेत. इतकेंच काय, पण वर्किंग कमिटीच्या कोणीहि एका सभासदाने तशी सभा बोलवावी असें लिहिलें तरी सभा बोलावली जाईल. काटेकोरपणें राष्ट्रीय सभेच्या नियमांकडे पाहतां पं.

जवाहरलाल यांचें म्हणणें पूर्ण कायदेशीर व रास्त आहे यांत शंका नाही.

---

२ ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभास ां-पैकीं तीनचतुर्थांशांपेक्षा अधिक सभासद तुरुंगाच्या बाहेर आहेत. मग घोडे पेंड कोठे खातें ? तीस सह्यासुद्धा का मिळत नाहीत? एक महिन्यापूर्वी विजापूरच्या तुरुंगांतून सुटलेले मुबईचे पराक्रमी पुढारी मि. नरीमन यांनी हा प्रश्न धसास लावण्याचा निश्चय केलेला दिसतो. त्यांनी पत्रकावर पत्रके प्रसिद्ध करून ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा बोलावण्याची व सध्याचा राष्ट्रीय सभेचा कार्यक्रम बदलण्याची जरूरी पटवन देण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. या आठवड्यांत तर त्यांनी एक दीडशे पानांचें पुस्तक प्रसिद्ध करून पुणें परिषदेस आपण हजर असतों तर काय बोललो असतो, कसा युक्तिवाद केला असता, हें लोकांना समजन दिलें आहे. महात्मा गांधींच्या धार्मिक संप्रदायावर, आध्यात्मिक बुद्धीवर व गढ वादावर या पुस्तकांत चढविलेला हल्ला प्रखर आहे यांत शंका नाही. श्री. नरीमन यांच्या म्हणण्याचा आशय असा आहे कीं कायदेभंगाची चळवळ ताबडतोब थांबवावी व राष्ट्रीय सभेचे पुनरुज्जीवन करून शुभ्रपत्रिकेच्या योजनेवर वसून हल्ला चढविला जावा व त्या चळवळीने राष्ट्रांत पुनः नवचैतन्य उत्पन्न करावें. प्रथम लोकमत अनुकूल करून घेऊन मग, कार्यकारी मंडळाचे ते एक सभासद आहेत नव्हा त्या नात्यानें किंवा तीस सभासदांकडून, लिहून ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा भरविण्याचा त्यांचा विचार आहे असें म्हणतात. त्यांना कितपत यश येतें हे लवकरच समजेल. मि. नरीमन यांच्या व लोकशाही स्वराज्यपक्षाच्या पुढाऱ्यांच्या धोरणांत तत्त्वतः व व्यवहारतः कांहींहि फरक नाही. मि. नरीमन यांना, म. गांधी व पं. जवाहरलाल वगैरे राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांना, आपला कार्यक्रम पटवून देऊं असा भोळा भ्रम आहे इतकाच काय तो फरक. या कामांत मि. नरीमन यांची निराशा होईल त्यावेळीं त्यांनाहि लोकशाही स्वराज्य पक्षाला येऊन मिळावे लागेल अगर स्वतःच्या पक्षाच्या नव्या डेरे-राहुट्या थाटाव्या लागतील.

---

३ पुण्यांतील रेल्वे कामगार, गिरणी कामगार वगैरे श्रमजीवी लोकांमध्ये संघटन उत्पन्न करून व त्यांना त्यांच्या हक्कासंबंधी वगैरे शिक्षण देऊन त्यांच्या अडचणींचा परिहार करण्याचे प्रयत्न पुण्यांतील तरुण मंडळींनी चालविले आहेत हें त्यांना भूषणावह होय. या चळवळींत आक्षेप घेण्यासारखें सध्या तरी कांहीहि नाही. पण कोणतीहि नवी चळवळ नीट चालूच द्यावयाची नाही असा कांहींचा संकल्पच असतो. अशा लोकांकडून या चळवळीलाहि आडकाठी येत आहे. आतापर्यंत या श्रमजीवी लोकांच्या जाहीर सभा मंगळवार पेठेंतील गाडीतळाच्या मैदानावर भरत असत, व त्यांत दंगाधोपा अगर शांततामंग कधीहि झाला नाही. असें असतांना या गाडीतळाचे मालक एक जे इराणी गृहस्थ आहेत, त्यांनी या आठवड्यांत या सभांना बंदी केली हें आश्चर्य आहे ! पण त्याहिपेक्षा आश्चर्याची गोष्ट ही कीं, आपल्यास पोलीस सब् इन्स्पेक्टरानी ही जागा देऊं नका असें सांगितलें म्हणून आपण ही जागा देत नाही असा त्यांनी खुलासा केला ! पोलीस अधिकाऱ्यानी ही आडवाट का पत्करिली हें समजणं कठीण आहे या सभासंबंधी आक्षेपार्ह असें त्यांना कांहीहि वाटलें असलें तर त्यांना कायद्याचा राजमार्ग स्वीकारतां आला असता. पण तसें झालेले दिसत नाही. सबर्बन म्युनिसिपालिटीनेहि रेल्वे कामगारांना ‘ वुइलसन गार्डन ’ ची जागा देण्याचे नाकारलें असें समजतें. रेल्वे कामगार युनियनचे नवे अध्यक्ष श्री. के. एन. फडके वकील यांनी रीतसर परवानगी मागितली होती व सर्व प्रकारची हमी देण्यासहि ते तयार होते. पण त्यांची विनंति धुडकावून देण्यांत आली. अशा तऱ्हेनें या कामगारांचा कोंडमारा करून त्यांच्या विचारस्वातंत्र्यावर गदा घालण्यांत कोणाचाच अंतिम फायदा होणार नाही असें आम्हांस वाटतें.

# अस्पृष्टांचा प्रश्न

( ले. : **श्रीपाद महादेव माटे**, एम. ए. पृष्ठसंख्या ६००, किं. २ रुपये, प्रकाशक-शंकर रामचंद्र दाते, लोकसंग्रह छापखाना पुणें ) अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नाचें सुदैवच म्हणून कीं काय त्या विषयासंबंधानें अलीकडे अनेक प्रकारचें चर्चात्मक वाङ्मय प्रसिद्ध होऊं लागलें आहे. नागपूर येथील एका ग्रंथमालेंतून रा. विठ्ठलराव शिंदे यांचे एक पुस्तक निघतें न निघतें, तोंच, त्यापेक्षा सुमारें तिप्पट मोठें असें रा. माटे यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें. आणि हीं दोन्ही

पुस्तकें जो वाचील त्याला या अस्पृश्यतेच्या प्रश्नाविषयीं, विद्यमान स्थितींत सामान्यतः जितकी माहिती मिळवावीशी वाटेल तितकी मिळण्याची सोय झाली आहे. म. गांधी यांनी 'हरिजन' नांवाचें साप्ताहिक वर्तमानपत्र अनेक भाषांतून सुरू केलें आहे. तथापि त्यांत प्रसंगोपात्त उत्पन्न होणार विषय व मतप्रसाराच्या दृष्टीनें विवेचित केले जात असल्यामुळे, त्यांच्या योगानें विचारापेक्षां विकारांचेच पोषण अधिक होतें. 'हरिजना'चा कोणताहि अंक काढून वाचला असतां त्यांत तर्कवितर्क, वादविवाद प्रश्नोत्तरें, शंकासमाधान असल्या गोष्टींचा प्रपंचच फार आढळून येतो. परंतु रा. शिंदे किंवा रा. माटे यांच्या पुस्तकांतील विवेचन शुद्ध विचारप्रवर्तक आढळेल. त्यात खोल मनन आहे व संशोधनहि आहे.

## कायम व टिकाऊ कार्य

रा. माटे यांच्या प्रस्तुत पुस्तकासंबंधानेच लिहावयाचें तर हा विशेष म्हणून सांगतां येईल की, समाजांत राहून, म्हणजे ज्या समाजाच्या मनावरून सनातनी विचारांचें दडपण अद्यापि निघून गेलेले नाही अशा समाजांतच राहून, युक्तिप्रयुक्तीनें त्याचे मन वळवून, केवळ टीका न करता युक्तिसिद्ध विधायक कार्य करून दाखवून, समाजाला आपल्याबरोबर घेऊन जावें, आणि अशा रीतीनें कायम स्वरूपाचे परिणाम घडवून आणावे, हेंच रा. माटे यांनी आपलें ध्येय म्हणून या कामांत ठरविलेलें दिसतें. रा. शिंदे यांच्या कार्यांत तडफ अधिक व म. गांधी यांच्या कार्यांत विक्षिप्तपणा अधिक; व हे दोनहि या कार्यांतील गुणच एक प्रकारें होत. कारण रा. शिंदे यांनी खुद्द अस्पृश्य जातींतच जाऊन राहून आश्रम बांधून अस्पृश्यांच्या सुधारणेचें कार्य अनेक वर्षें केले, आणि म. गांधी हे शिंदे यांच्याप्रमाणे उठून अस्पृश्यांतच जाऊन न राहिले तरी लोकांपासून दूर असणाऱ्या अशा स्वतःच्या स्वतंत्र आश्रमांत त्यांनी खानगीदाखल अस्पृश्यांना ठेवून घेऊन, अस्पृश्यता न मानावी तर ती कशी हें दाखवून दिलें; आणि सर्व देशभर एवढी मोठी चळवळ त्यांच्या पद्धतीप्रमाणे निर्माण केली कीं, तिजमुळे त्रस्त व भीतिग्रस्त अशा सनातनी समाजाकडून त्याविरुद्ध प्रतिक्रिया व विरोध झाल्याशिवाय राहिला नाही.

रा. माटे हे शिंदे यांच्याप्रमाणे जात व समाज सोडून गेले नाहीत, व म. गांधी यांच्याप्रमाणे मंदिरप्रवेशाबाबत सरकारी कायद्याचा आश्रय करून सनातनी समाजाच्या काळजाला त्यांनी हात घातला नाही. यामुळे त्यांच्या हातून अस्पृश्यतानिवारणाचें व्यावहारिक कार्य दिसण्यांत तितकेसें मोठें झालें नाही, तरी जें झालें तें कायम आणि टिकाऊ स्वरूपाचें झालें; समाजांतल्या समाजांतच झालें; त्याचा कोणास राग आला नाही किंवा परकेपणा वाटला नाही; आणि त्याविरुद्ध प्रतिक्रिया तर झाली नाहींच नाही. रा. माटे यांच्या कार्याचा संभार व साधनसंग्रह लहान, किंबहुना त्यांचे सर्वच कार्य अनुकूल असेल त्या गरीबी पद्धतीनेंच झालेलें. यामुळे त्यांना अहिल्याश्रमासारख्या नजरेंत भरण्यासारख्या संस्था काढतां आल्या नाहीत, किंवा त्यांचें नांव महाराष्ट्र प्रांताच्या बाहेर कोणास फारसें कळलें नाही. तथापि महाराष्ट्रापुरतें पाहिलें तर म. गांधी यांचा अस्पृश्यता–निवारणाचा अवतार होण्यापूर्वींच रा. माटे म्हणजे अस्पृश्यतानिवारणाचा उद्योग ही व्याप्ति जशी लोकांना माहीत होती, तशीच त्या अवतारानंतरहि ती टिकून राहिली आहे! आणि ही गोष्ट निराश्रित व असहाय अशा एका व्यक्तीचें कर्तृत्व या नात्यानें रा. माटे यांना खचित भूषणास्पद आहे. इतर चार शाळामास्तरांप्रमाणे प्रपंच निर्वाहाकरिता त्यांना शाळेंत भरवेळच्या कामाची नोकरी करावी लागली, व उरल्या वेळांत ख्रासगी शिक्षणाचे वर्गहि काढावे लागले. पण याच गोष्टी करणार इतर शिक्षक व रा. माटे यांच्यांत किती मोठा फरक आहे! व जो आहे तो त्यांचें ध्येयवादित्व दर्शविणारा आहे हें सिद्ध होत नाही काय?

## कार्यकर्त्यांचे तीन प्रकार

सार्वजनिक कार्य करण्यासंबंधानें संसारी माणसाचे तीन प्रकार दृष्टीस पडतात.—(१) संसाराचें निमित्त सांगून जे मुळींच सार्वजनिक कार्य करीत नाहीत, (२) ज्यांना सार्वजनिक कार्य करण्याबद्दलच वेतन इतकें मिळतें कीं, त्यावरच त्यांचा संसार भागतो, आणि (३) जे इतर उद्योगानें मिळविलेल्या वेतनावर संसार चालवितात, पण त्यांतल्या त्यांत वेळ व पदरचा पैसा–अर्थात् यथाशक्ति–घालून सार्वजनिक कार्य करतात. या तीन वर्गांची प्रतवारी लावावयाची तर ती अशी कीं, पहिला वर्ग अधम, दुसरा मध्यम, व तिसरा उत्तम. पहिल्या वर्गासंबधानें बोलण्याचें कारणच नाही. सार्वजनिक कार्याला संसारामुळे वेळ सांपडत नाही ही गोष्ट कोणाहि माणसासंबंधानें खरी असूंच शकणार नाही. विपन्नांना संपन्नांपेक्षा कदाचित कमी वेळ मिळेल, पण थोडा कमी, तरी मिळेलच. इच्छा मात्र पाहिजे. दुसऱ्या वर्गांतील लोकांची सार्वजनिक कार्य करण्याची स्वाभाविक इच्छा अमान्य करण्याचें कारण नाही. तथापि जे संसारखर्चाकरिता सार्वजनिक कार्य नोकरी म्हणून करितात त्यांनी, ती नोकरी त्यांना

न मिळती तर, काय केलें असतें हें मात्र निश्चितपणें सांगता येत नाहीं. तथापि संसाराचें साधन आणि सार्वजनिक कार्य यांचा मेळ त्याचे बाबतींत पडला म्हणून त्यांना नशीबवान असें मात्र हटकून म्हणतां येईल. पण हें भाग्य अर्थात् थोड्यांनाच लाभतें. पण तिसरा म्हणजे उत्तम वर्ग म्हणून सांगितला त्यांतील लोकांचा विशेष हा कीं, सार्वजनिक कार्य आणि संसारसाधन यांचा मुळीच मेळ नसतां, जे केवळ आपली आवड म्हणून संसार इतर रीतीनें भागवून, वेळांत वेळ व पैशांत पैसा काढून, सार्वजनिक कार्य करतात. ते सार्वजनिक कार्याच्या आवडीच्या खऱ्या कसोटीला उतरतात. नं. २ च्या वर्गांतील लोकांच्या सार्वजनिक कार्याचें महत्त्व त्याच्या सुदैवामुळे यत्किंचितहि कमी करण्याचें कारण नाहीं. परंतु नं. ३ च्या वर्गांतील लोकांना जी कसोटी लागली ती २ च्या वर्गांतील लोकांना लागलेली नसते हें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं.

आमच्या समजुतीप्रमाणे रा. माटे हे ३ ऱ्या म्हणजे उत्तम वर्गांत मोडतात. पहिल्या वर्गांतील लोकांपेक्षा त्यांचें श्रेष्ठत्व वेगळें सांगण्याचें कारणच नाहीं. पण आज म. गांधींनी लाखो रुपये जमवून हरिजनकार्याकरिता जे पगारी प्रचारक व नोकर नेमलेले आहेत त्यांतील कांहीं लोकांनीं तरी ती नोकरी वेतनाकरिता पत्करली आहे, हरिजनसेवेच्या आवडीकरिता पत्करलेली नाहीं हें आम्ही निश्चितपणें सांगूं शकतों. अशा लोकांपैकीं जर एखादा मनुष्य दिमाखानें पुढें येऊन म्हणेल कीं, रा. माटे हे अस्पृश्यतानिवारणाचें कार्य करतात आणि मीहि पण तेंच करतो. तर अशा माणसाची बोळवण करणें सोपें आहे. कारण रा. माटे यांना आपल्या कार्याचा मोबदला म्हणून एक पैहि मिळत नाहीं. उलट जो कांहीं वेळ इतर रीतीनें खर्चला असतां त्यांना संसारसाधनांत भर टाकतां आली असती तो तिकडे न देतां या कामाकडे त्यांनी दिला, इतकेंच नव्हे तर प्रवास, पुस्तकें वगैरेंकरिता वेळोवेळीं पदरमोड केली. त्यांचा हल्लींचा ग्रंथ 'अस्पृष्टांचा ' हा ६०० पानांचा! याबद्दल त्यांना मोबदला मिळण्याचें तर राहोच. परंतु त्यांनी प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें ग्रंथ तयार होऊनहि तो प्रसिद्ध करण्याचें काम बरेंच लांबलें. कारण त्यांना तो छापण्याचा खर्च स्वतः करण्याची अनुकूलता नव्हती. आणि एवढी जबाबदारी अंगावर घेणारा प्रकाशकहि त्यांना लवकर लाभला नाहीं.

## चळवळींतील आपपर भाव

शिवाय हा ग्रंथ म्हणजे केवळ इतर ग्रंथवाचनाचें फळ नव्हे हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. पृष्ठ ४६५ वर माटे यांनी 'अस्पृश्यतानिवारणाचे अनुभव' या सदराखालीं आपल्या कामाची माहिती दिली आहे. तें सर्व काम त्यांनी व त्यांच्या सहकारी महाराष्ट्रीयांनीं अंग मोडून मेहेनतीनें केलेलें आहे. या कामाला १९१७ सालीं प्रारंभ झाला.तो करण्याला केवळ त्यांची आत्मस्फूर्ति हीच कारणीभूत झाली. शिवाय हें काम त्यांनी कोणत्या भावनेनें केलें हें त्यांच्याच शब्दांनी आम्ही देतों. ते लिहितात, "१९१७ सालीं या कामाला सुरुवात केली तेव्हां व तेव्हांपासून पुढेंहि हरतऱ्हेच्या खटपटीस प्रसिद्धी देण्याची वहिवाट आम्ही ठेविली नव्हती. प्रसिद्धीनें मतप्रसार होतो हें खरें; पण सदभिरुचि, त्या प्रसिद्धीमुळे येणारी जबाबदारी, व केलेल्या कामाचें क्षुद्र रूप हीं लक्षांत घेतां प्रसिद्धि न करणें हेंच बरोबर असें आम्हांस वाटलें." या शब्दांतील विनयाची नाजूक भावना लक्षांत घेण्यासारखी आहे. कारण अस्पृश्यतानिवारणाच्या नावानें कांहींहि न करतां, किंवा फारच थोडें करून, व्यस्त प्रमाणांत त्याची जाहिरात व प्रसिद्धी करावयाची, आणि त्याच्या नांवानें बडा ढोल वाजवून कार्याच्या यशापेक्षा स्वतःच्या प्रसिद्धीची इच्छा धरावयाची, असे दुय्यम प्रतीचे किती तरी लोक आज आढळतात. कीर्तनाचे चार शब्दहि न ऐकतां केवळ कपाळाला बुक्का लावून कीर्तनश्रोत्याचा आभास उत्पन्न करीत देवळांतून आंतबाहेर वावरणारे लोक प्रत्येक देवळाच्या परिवारात कांहीं असतातच.म. गांधी यांनी एवढें मोठें कीर्तन उभें केलें तेव्हां रा. माटे याना आपल्या जुन्या कार्याच्या, कीर्तीवर कपाळभर बुक्का व कांहीं खिरापतहि नवें न कांहीं कार्य न करतां, मिळविता आली असती. पण अशा रीतीनें मिरवणुकींत सामील न होतां, त्यांनी आपल्या वांट्याला जो लाभ घेतला तो इतकाच कीं, खुद्द महात्माजींच्या मुलाखती घेऊन या चळवळींत तारतम्य संभाळलें जावें, तें सुटूं नये, अशाविषयीं युक्तिवाद करून त्यांच्या अनुयायांची अप्रियता संपादिली.

या चळवळीवर म.गांधी कडून पाण्यासारखा पैसा खर्च होत असतां रा. माटे यांना आपलें पुस्तक छापण्याला आपल्यांतलाच कोणी धाडसी छापखानेवाला प्रकाशक म्हणून मिळेल अशी वाटच पाहत त्यांना बसावें लागलें. यावरून या चळवळीच्या चालकांत आपपर भाव किती आहे हें दिसून येईल कांहीं प्रसंगीं तर "या चळवळींत मी तुमच्याशीं सहकार्य करण्याला तयार आहे" असें रा. माटे यांनीं कांहीं चालकांना आपण होऊन जाऊन सांगितलें असतां, तीं त्यांची सहकारिता

पक्षभेदामुळे नाकारण्यांत आली हेंहि आम्हांस माहिती आहे.पण रा.माटे यांनी केव्हांहि अस्पृश्यता-निवारण्याची खटपट केली ती आपलें मतस्वातंत्र्य संभाळूनच केलें, कोणा गोटाच्या मिरवणुकींत मिरविण्याकरिता केली नाहीं, किंवा कोणत्याहि लाभाकरिता केली नाहींच नाहीं.

प्रस्तुत ग्रंथातील तात्त्विक व व्यावहारिक हे दोन्ही प्रकारचें विवेचन वरील गोष्टींची साक्ष देतें. कारण त्या विवेचनांत, कांहीं माथेफिरूंच्या पद्धतीप्रमाणें, हिंदु समाजाला लाथा दिलेल्या नाहीत, किंवा त्याजवर शिव्यांची लाखोली वाहिलेली नाही. तसेंच उलट बाजूलाहि अस्पृश्यांविषयीं सहानुभूति वाटते म्हणून त्यांच्याविषयीं भोळ्या भावनांच्यारसानें भिजविलेलीं भंपक विधानेंहि केलेलीं नाहीत; तर निर्भीडपणानें त्यांनाहि काय सांगावयाचें तें सांगितलें आहे. एकंदर समाजाचें मन वळवून त्यांतील एखाद्या विशिष्ट वर्गाचें हित ज्याला साधावयाचें असेल त्याला उभय पक्षीं अशीच निर्भीड व निर्भय वृत्ति ठेवावी लागते, आणि तर्कसहाय अशा सहानुभूतीवर कार्य करून घ्यावें लागते. अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याला जन्म वाहिलेल्या रा. विठ्ठल रामजी शिंदे यांच्या पुस्तकांत जितकी खोल चिकित्साबुद्धि आढळून येते तितकीच रा. माटे यांच्याहि ग्रंथात आहे. पण त्याहिपेक्षा विशेष म्हटलें म्हणजे अस्पृश्यता नष्ट व्हावयाची तर ती कशी होईल याविषयींचा जो विचार रा. शिंदे यांच्या दुसऱ्या विभागाकरिता बराचसा राखून ठेवावा लागलेला दिसतो, तो रा. माटे यांच्या पुस्तकांत विस्तृत व चांगल्या प्रकारें मांडलेला आहे.

### लेखनशैली

याशिवाय त्यांच्या पांच–चार प्रकरणांत प्रतिभासंपन्न व ठसकेदार लेखक या नात्याची त्यांची लेखनशैलीहि प्रकट झाली आहे! तींत विनोद, वक्रोक्ति इत्यादिकांचे चांगले नमुने आढळतात. पुस्तकांत शोधक बुद्धीबरोबर शब्द-कौशल्य भरपूर आढळून येतें. तात्पर्य, हें पुस्तक वाचणाराला रा. माटे हे अस्पृश्यता--निवारणाच्या प्रश्नाच्या आवरणानें अंतर्बाह्य कसे नटले गेले आहेत हे वाचकांना सहज दिसून येईल. रा. माटे विनोदानें म्हणतात त्याप्रमाणें त्यांचें अस्पृश्यतानिवारक मंडळ स्वतः ते सेक्रेटरी व अध्यक्ष रा. भोपटकर या दोघांचेंच असलें तरी त्याच्या प्रत्यक्ष कामांत दहांचा किंबहुना दहांच्या दसपटींचा हातभार लागलेला आहे याचें श्रेय रा. माटे यांच्या अविरत उद्योगाला व उत्साहालाच आहे.रा. माटे हे कौन्सिलवाल्या पक्षाचे ऋणानुबंधी असल्यामुळें काँग्रेसच्या हिशेबाच्या वहींत विधायक कार्याच्या खातीं त्यांचें व त्यांचे ऋणानुबंधी यांचें अस्पृश्यता-निवारणाचें कार्य जमा नसो. परंतु लोकशाही पक्षाच्या सहकारी मंडळींत रा. माटे यांच्यासारखा एकटा कार्यकर्ता असला तरी त्या पक्षाचें विधायक कार्य काय हें ठळकपणें दाखविण्यास पुरेसें होईल.

रा. माटे यांनी असें सर्वांगसुंदर पुस्तक लिहून जशी मोठी कामगिरी केली तशीच तें पुस्तक प्रकाशित करण्याची स्वतःकडे जबाबदारी घेऊन रा. शंकरराव दाते यांनीहि मोठी कामगिरी केली आहे. रा. दाते हे स्वयंस्फूर्तीनें प्रकाशनाचें काम स्वशिरावर घेण्यास पुढे सरसावले नसते तर हा 'अस्पृष्टाचा प्रश्न' आणखी कांहीं दिवस तरी 'अस्पृष्ट' असाच राहिला असता. असो. महाराष्ट्र वाचकवर्गाकडून रा. माटे व दाते या उभयतांच्याहि या परिश्रमाचें योग्य चीज होईल असा आम्हास भरंवसा वाटतो.

---

## कै. माधवरावजी लेले यांचा मृत्यु

श्रीयुत माधवराव व्यंकटेश लेले, बी. ए. एल. सी. ई. यांस बुधवार ता. २२ रोजीं दोनप्रहरीं देवाज्ञा झाली, हें दुःखवर्तमान कळविण्यास आम्हांस मोठा खेद वाटतो. मरणसमयीं श्री. माधवराव यांना ७६ वे वर्ष चालू होतें. त्यांच्या मृत्यूमुळे एक कर्ता व विद्वान साहित्यसेवक नाहींसा झाला याविषयी खेद वाटणें स्वाभाविक आहे.

माधवरावजी लेले यांचें घराणें मूळचे जमखंडी संस्थानांतलें; परंतु कांहीं कारणांमुळें त्यांच्या वडिलांनी जमखंडी सोडून पुण्यास वास्तव्य केलें,म्हणून माधवरावांचें शिक्षण पुण्यासच झालें. ते बी. ए. आणि एल. सी. ई. असे दुहेरी पदवीधर होते; आणि एलएल. बी. व एलएम. ॲण्ड एस. अशा आणखी दोन पदव्या मिळविण्याचाहि त्यांचा मानस होता. परंतु कांहीं घरगुती अडचणींमुळे त्यास तो नाद सोडून द्यावा लागला. तथापि त्यांच्या या व्यापक शिक्षणाचा परिणाम त्यांनी पुढे केलेल्या साहित्यसेवेंत दिसून आला. माधवरावजी हे जसे बहुविध शास्त्राचे अभ्यासक होते तसेच ते बहुभाषाकोविद होते. मातृभाषा व राजभाषा याच्याखेरीज त्यांना पार्शी, संस्कृत, बंगाली, हिंदी, उर्दू,कानडी इत्यादि भाषांचा चांगला परिचय

होता आणि म्हणूनच त्यांच्या लिखाणांतहि नावीन्य व वैविध्य दिसून येत असे. ऐतिहासिक विभागांतील नष्टस्मृतिसाम्राज्य, ऐनी-अकबरी, अकबराचें चरित्र, राजतरंगिणीचें रूपान्तर, संस्कृत साहित्य व नाट्य या विभागांत शाकुन्तल, मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय, मालतीमाधव, मुद्राराक्षस, मृच्छकटिक उत्तररामचरित्र इत्यादि नाटकांचें सार व विचार, सामान्य वाङ्मयविभागात पुष्पवन, स्थानिक स्वराज्य विभागांत म्युनिसिपालिटी व तिचीं कामें इत्यादि त्यांचीं पुस्तकें सुप्रसिद्ध असून त्याखेरीज त्यांनी अनेक विषयांवर नियतकालिकांतून लेख लिहिले आहेत.

कै. माधवरावजी लेले यांनी साहित्यसेवेच्या निमित्ताने जसे साहित्याचे विविध प्रांत पाहिले, त्याचप्रमाणे नोकरीच्या निमित्तानेहि देशातील अनेक प्रांत पाहिले. त्यानी सोंडूर, इंदूर, ग्वाल्हेर, निझाम-हैद्राबाद, कोल्हापूर, पालनपूर इत्यादि संस्थानांतून आणि सागर, सिंध-हैद्राबाद इत्यादि म्युनिसिपालिटयांतून नोकरी केली व तीहि एकाच खात्यांत नव्हे तर इंजीनियरिंग, इरिगेशन, सॅनिटेशन, ड्रेनेज, लँड रेकॉर्डस, लँडरेव्हिन्यू अशा वेगवेगळ्या खात्यांत नोकरी बजावली. अशा प्रकारे माधवरावजी हे सर्व आयुष्यभर विविध व्यवसायांत व्यग्र झालेले असले तरी वेळांत वेळ काढून त्यांनी मातृभाषेची सेवा अखंड चालू ठेवली होती.

त्यांची राहणी स्वाभिमानी व रुबाबदार असून आळस कसा तो त्यांना माहीतच नव्हता. इतक्या संस्थानांतून नोकरी केली तरी त्यांनी कधी मिंधेपणा पत्करला नाही. आणि त्यांचे हें विचारस्वातंत्र्यहि त्यांच्या सर्व लिखाणात स्पष्टपणे प्रतीत होतें. अर्थातच त्यांचे राजतरंगिणी नष्टस्मृतिसाम्राज्यादि ऐतिहासिक व सारविचारमालेतले नाट्यविषयक ग्रंथ मराठी भाषेत चिरकाल टिकून राहतील अशा योग्यतेचे असल्याने माधवरावजी लेले यांच्या नावाला 'नष्टस्मृती'ची भाति राहिलेला नाही.

---

# पार्लमेंटांतील वादाचा निष्कर्ष

गेल्या आठवड्यांत पार्लमेंटमध्ये हिंदुस्थानास देऊं केलेल्या नव्या सुधारणांचा विचार करण्याकरितां जोडकमिटी नेमण्यांत यावी असा ठराव हिंदुस्थानाचे दुय्यम स्टेट सेक्रेटरी मि. बटलर यांनी मांडला व तो पसारहि झाला. या ठरावावर जो वादविवाद झाला व जीं ब्रिटिश प्रधानमंडळातर्फे भाषणें करण्यांत आलीं तीं पाहून हिंदी राष्ट्रीय पुढाऱ्यांनी हिंदुस्थानाच्या स्वराज्याच्या लढ्यांत आपणास कितपत यश आलें याचें सिंहावलोकन व आपल्या पुढील कार्यक्रमाविषयीं पर्यालोचन करणें जरूर आहे असें वाटतें. या वादविवादांत निरनिराळ्या दृष्टींनी महत्त्वाचीं अशीं दोनच भाषणें झालीं. एक कर्नल वेजवुड यांचें व दुसरें हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युएल होअर यांचें. मि. चर्चिल यांनी त्यांच्या नेहमीच्या पद्धतीस अनुसरून खूप गडगडाट केला, हिंदी लोकांच्या स्वराज्याबाबतच्या अपात्रतेचा डंका वाजविला व हिंदुस्थानास नवे राजकीय हक्क दिले तर ब्रिटिश साम्राज्य रसातळास जाणार अशी भयसूचक भविष्यवाणीहि उच्चारली! पण त्यांनी जोड कमिटी नेमण्याच्या प्रश्नासंबंधी आपला मतभेद नाही असें जाहीर कल्यामुळे त्यांच्या हल्ल्याच्या नांगींत विष शिल्लक राहिलेलें नव्हतें. म्हणून या वादविवादाच्या वेळीं तरी, त्यांची नेहमीची खलनायकाची भूमिका त्याना नीट वठवितां आली नाही असेंच म्हणावें लागेल. चर्चिलसाहेबांच्या बगलबच्चांनी ही उणीव भरून काढण्याचा बराच प्रयत्न केला; परंतु त्याच्या कोल्हेकुईत भीषणता नव्हती व विशेष अर्थहि नव्हता. यामुळे त्यांच्या भाषणाचा विचार करण्याचें फारसें कारण नाही.

कर्नल वेजवुड हे हिंदुस्थानाला स्वराज्याचे हक्क द्यावे असें आग्रहाने प्रतिपादन फार वर्षांपासून करीत आलेलीं जीं चारदोन जुनीं बुढ्ढीं माणसें आहेत त्यांपैकीं एक होत. त्यांनी हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीने म्हणून मांडलेली योजना आता हिंदुस्थानांत सुद्धा कोणास पसंत पडणारी

नसल्यामुळे तिची थोडीबहुत थट्टाच झाली. हिंदुस्थानातून आपल्या योजनेस पाठिंबा नाही व गांधींनी आपल्या पत्राला उत्तरहि पाठविलें नाही अशी कबुली त्यांना पार्लमेंटमध्ये द्यावी लागली, त्यामुळे ते स्वतःच हास्यास्पद झाले! हिंदुस्थानचे काही प्रतिनिधी पार्लमेंटमध्ये घ्यावे व पार्लमेंटचे कांही प्रतिनिधि असेंब्लीच्या दिल्ली—सिमल्याच्या बैठकींच्या वेळीं बोलवावे अशली योजना हिंदुस्थानाला तरी कशी पटावी? राजकारणाच्या चळवळीच्या प्रारंभीं असलेल्या सूचनांना पाठिंबा मिळाला असता. पण बालपणास साजेशीं हीं आंगडीं-टोपडीं स्वातंत्र्याच्या विकासाच्या प्रौढ वयांत कशीं उपयोगी पडतील? स्वातंत्र्याच्या अमृतमय दुधाच्या प्राप्तीची महत्त्वाकांक्षा धरणारा आजचा हिंदुस्थान, पार्लमेंटांतील कांही जागांच्या लोभाचें पीठ कालवलेलें पण गुलामगिरीचेंच पांढरें पाणी, बाल अश्वत्थाम्याप्रमाणे स्वीकारणें शक्य नाही. अशा परिस्थितींत कर्नल वेजवुड याच्या योजनेला कोण उचलून धरणार?

कर्नल वेजवुड यांची योजना हास्यास्पद ठरली तरी त्यानी होअरकृत नव्या सुधारणांच्या ग्रंथाचें केलेलें परीक्षण मात्र अत्यंत मार्मिक, सडेतोड व त्या ग्रंथाच्या चिंधड्या उडविणारें होतें. वेजवुड यांनी सांगितलें कीं, या नव्या सुधारणा पदरांत घेऊन त्यांना पाठिंबा देणारा हिंदुस्थानांत तरी स्वतंत्र वृत्तीचा मनुष्य सांपडणें दुर्मिळ आहे. कांही मुसलमान व अल्पसंख्याक जातिनिष्ठ या सुधारणांची तळी उचलून ति याभोवती आपला येळकोट घालतील पण त्यांत कांही आश्चर्य नाही. कारण, जातवारीच्या पायावरच ह्या सुधारणांचा डोलारा उभा केला आहे व कर्नल वेजवूड याच्या मताने "हिंदुस्थानांत यावच्चंद्रदिवाकरौ कायमची दुफळी माजविण्याचा व राष्ट्र या नात्याने हिंदुस्थानाचा विकास न होऊं देण्याचा यशस्वी मार्ग म्हणजेच या सुधारणाची योजना होय!" अर्थात् वर उल्लेखिलेले जातवाले अल्पसंख्य लोक, आपल्या स्वार्थाकरितां या सुधारणांच्या दिवट्या नाचवितील व त्यामुळे राष्ट्रीयत्वाच्या मंदिराला आगहि लावण्यास ते उद्युक्त होतील. पण हे लोक म्हणजे हिंदुस्थान नव्हे हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. तसेंच या सुधारणांचा वरवरचा रंग उडून गेला व जातवाल्यांच्या दृष्टीला आंतील माती अगर शेण दिसूं लागलें म्हणजे त्यांना पश्चात्ताप होईल यांत शंका नाही. कारण या सुधारणांचें स्वरूपच असें बेगडी व कच्च्या रंगाने रंगविलेलें आहे. असो. कर्नल वेजवुड यांच्या अशा तऱ्हेच्या सडेतोड भाषणाने तरी हिंदुस्थानांतील जातवाल्यांच्या डोळ्यांत अंजन पडेल काय?

हिंदुस्थानाचे स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युअल होअर यांनी मात्र आपल्या स्पष्टोक्तीने आजपर्यंतच्या त्यांच्या कामावर कळस चढविला! मादक पदार्थांप्रमाणेच जयाचीहि धुंदी येते असें म्हणतात तें खरें आहे. या धुंदीमुळे दृष्टीला एक प्रकारें अंधत्वच आल्यासारखें होतें व त्याबरोबरच बुद्धीवरहि 'आसुरी' वृत्तीचा पगडा बसतो आणि सुविचार, दूरदृष्टी व सुत्मद्द्यास जरूर असणारी सावधानता वगैरे सद्गुण पार नाहीसे होतात. पाशवी वृत्तीला थैमान घालण्यास रान मोकळें करणारी, अन्याय, जुलूम व जबरदस्ती वगैरे प्रकारांस उत्तेजन देणारी व निःशस्त्र लोकांच्या असहाय्यतेवरच जगणारी दडपशाही सुरू करून आपण राष्ट्रीय चळवळीला पायबंद घातला अशी भारतमंत्र्यांना घमेंड वाटूं लागली असून तिचाच हा परिणाम आहे या स्वराज्याच्या लढ्यासाठी उभे ठाकलेल्या प्रतिपक्षीयांच्या बलाबलाची जर या वेळीं तुलना केली तर वरील घमेंड अनाठायीं अगर निराधार आहे, असें नाही हें कबूल करावें लागेल. पण खोलात जाऊन या प्रश्नाचा विचार केला तर या विजयाने स्टेट सेक्रेटरींच्या दूरदृष्टीच्या बुद्धीची हकालपट्टी झाली असेंच दिसेल. कारण हिंदुस्थानाच्या ध्येयासंबंधी त्यांनी केलेलीं विधानें जशीं अप्रमाण व अप्रस्तुत

आहेत तशींच तीं भावी इतिहासाच्या दृष्टीने अकारण वैर उत्पन्न करणारीं व राष्ट्रीय लक्ष्याला प्रखर स्वरूप आणणारीं आहेत. त्यांचें या वेळचें भाषण म्हणजे हिंदुस्थानांतील राष्ट्रीय पक्षाला एक प्रकारें आव्हानच आहे असें समजण्यास हरकत नाही.

मि. चर्चिल यांनी मोठ्या युक्तीने व लबाडीनें 'या नव्या सुधारणा हिंदुस्थानास लागू करण्याने त्यांना आपण कांहीहि भरीव हक्क देत नाही' असें हाअर यांच्याकडूनच वदविलें. व मग त्यांना असा पेच टाकला कीं, "जर काही भरीव हक्क दिले नाही म्हणता तर ते हिंदुस्थानचे व्हाइसरॉय 'डोमीनियन स्टेटस' मिळणार अशी जी ग्वाही हिंदी लोकांना देत आहेत, त्या ग्वाहीचा अर्थ काय?" सर सॅम्युअल होअर यांना असल्या एखाद्या प्रश्नाची जरूरी होतीच. म्हणून त्यांनी त्या प्रश्नाचा आदरपूर्वक स्वीकार केला व त्याला उत्तर म्हणून त आपल्या पोटांतील पाप बाहेर ओकले. ते म्हणाले कीं, "अहो, जे सगळे लोक म्हणजे तुम्ही व आम्ही बोलतों, तेंच व्हाइसराय बोलले. या सुधारणानंतरची दुसरी पायरी म्हणजे 'डोमीनियन स्टेटस' किंवा वसाहतीसारखें स्वराज्य देणार आहों असा भ्रम मनाशीं धरूं नका. दुसऱ्याच काय पण तिसऱ्या पायरीनंतरहि डोमीनियन स्टेटस मिळणार नाही. किंबहुना थेड क्यांत असेंहि म्हणत येईल कीं, आज तारखेला 'डोमीनियन स्टेटस' जितकें दूर आहे तितकेंच या नव्या सुधारणा दिल्या तरी तें दूरच राहील यांत संदेह बाळगूं नका!" या नव्या घटनेच्या योगाने आपल्याला 'डोमीनियन स्टेटस' च्या रस्त्यावर आणून सोडलें आहे व आस्ते आस्ते कां होईना पण हिंदुस्थानाला स्वतंत्र वसाहतीचा दर्जा प्राप्त होणार अशा ज्या कल्पना, मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनॅल्ड, व्हॉइसराय लॉर्ड आयर्विन यांनी आपल्या वचनांनी उत्पन्न केल्या होत्या त्या सर्वांवर डाबर फासून या सुधारणांचें काळें कुट्ट स्वरूप स्टेट सेक्रेटरींनी आपल्या भाषणाने हिंदुस्थानाच्या पुढे उभें केलें! 'डोमीनियन स्टेटस' ही एक केवळ कल्पना, एक स्वप्न ठरलें! 'डोमीनियन स्टेटस'-ची मुख्य घटना व हक्क मिळत नाहीत हें पूर्वीच ठाऊक होतें; पण जी त्यांची अंधुक छाया दिसत होती तीहि या योगाने नाहीशी झाली.

सर सम्युअल होअर यांनी अशीहि ग्वाही दिली कीं, 'हिंदुस्थानांत त्यांच्या या धोरणासंबंधी गैरसमज कोठेहि नाही. सरकार किती मर्यादेपर्यंत हक्क देणार आहे, याची जाणीव प्रत्येक हिंदी मनुष्यास आहे'. त्यांचें हें म्हणणें खरें आहे. राजकारणांत वचनांना काय किंमत असते याची पूर्ण जाणीव हिंदुस्थानाला होती व ती आता या त्यांच्या भाषणाने ठाकूनठोकून बसविली गेली आहे. मि. बटलर यांनी आपल्या समारोपाच्या भाषणात स्पष्ट म्हटलें कीं, 'ही योजना साम्राज्यवाद्यांच्या ठरीव धोरणाला अनुसरूनच तयार केली आहे याबद्दल संशय नको.' याचा उघड अर्थ हा कीं, चर्चिल, लॉर्ड लॉइड, होअर, मॅक्डोनाल्ड, लॉर्ड आयर्विन हे सर्व लोक एकाच धोरणाने व शिस्तीने वागत आहेत व पार्लमेंटमध्ये जी शाब्दिक लढाई चालते तिचा अर्थ हिंदी लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्यापलीकडे काहीहि नाही. होअर यांनी स्पष्ट खुलासाच केला कीं "डोमीनियन स्टेटसचा प्रश्न निघलाच नाही! हिंदुस्थानाला कायमच्या गुलामगिरींत ठेवावयाचें असेल तर आपल्याला केवळ शस्त्रास्त्रांच्या जोरावरच ठेवतां येईल. ही पाळी न यावी म्हणून मी एवढेंच म्हणतो कीं, केव्हातरी दूरच्या भविष्य काळांत हिंदुस्थानाला जबाबदारीचें स्वराज्य दिलें जाईल इतकेंच!" अजूनहि कोणाचे डोळे उघडले नसतील तर ते होअरसाहेबांच्या या भाषणाने खास उघडतील.

यापुढचा मुख्य प्रश्न असा आहे कीं, या राजकीय आपत्तीचा प्रतिकार कसा करावयाचा? पहिली गोष्ट ही करावयास पाहिजे कीं, या पांढऱ्या खलित्यांतील योजना हिंदुस्थानास अमान्य असल्यामुळे तिचा धिक्कार हिंदुस्थानच्या कानाकोपऱ्यातून निघाला पाहिजे. खेड्यापाड्यांतून तों मोठमोठ्या शहरांपर्यंत अशी जाहीर

घोषणा झाली पाहिजे कीं, या सुधारणा हिंदुस्थानांत तरी कोणालाहि पटत नाहींत व त्या स्वीकारण्यास कोणीहि तयार नाहीं. या प्रश्नासंबंधीं तरी राष्ट्रांतील सर्व पक्षांत ऐक्य होण्यास हरकत नाहीं. निदान आज तरी या सुधारणांचा 'उदो उदो' करणारा असा एकहि राजकीय पक्ष नाहीं हें खास. जे थोडेबहुत जातिनिष्ठ असतील त्यांचीहि खात्री पटवून दिली पाहिजे कीं हिंदुस्थानाच्या स्वराज्याच्या प्रश्नाचा या योजनेनें विच्छेदहाटच होणार आहे व त्यांनी अकुंचित स्वार्थाकडे न पाहतां राष्ट्रीय वृत्तीनेच या प्रश्नाकडे पाहावें. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या पक्षांच्या राजकीय पुढाऱ्यांनीं एकत्र बसून या प्राथमिक चळवळीची योजना ठरविली पाहिजे व ती त्यांना ठरवितां येईल असें वाटतें.

नुसती सर्व पक्षीय अशी एखादी परिषद बोलावून ठराव करून हें काम पुरें होणार नाहीं. ज्या मतदारांच्या किंवा जनतेच्या हातीं या प्रश्नाची खरी तड लावण्याची शक्ति आहे त्यांना या सुधारणांचें खरें स्वरूप समजावून देऊन लोकमताची एवढी जागृती केली पाहिजे कीं, तीमुळे ज्ञातिनिष्ठांच्या स्वार्थी भावना तर जळतीलच, पण या नव्या सुधारणांचीहि राख होईल व पुनः एकवार या प्रश्नाचा विचार करणें सरकारलाहि भाग पडेल! हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांनी स्वतःची अशी एक नवी घटना एकमताने तयार केली पाहिजे व स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार ह्या घटनेशिवाय इतर कोणतीहि घटना आपण स्वीकारण्यास तयार होणार नाही असा निश्चय जाहीर केला पाहिजे. आजपर्यंत या बाबतींत केल्या गेलेल्या प्रयत्नांचा इतिहास आम्हांला माहीत नाहीं असें नाहीं. सर्व पक्षीय परिषदेनें ठरविलेली घटना राष्ट्रीय सभेनेंच स्वतःच्या हाताने मारली ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. परंतु या कामांत कितीहि अडचणी आल्या तरी तोच एक मार्ग या राजकारणाच्या भोवऱ्यांतून सुटण्याचा असल्यामुळे त्याच्याशिवाय गत्यंतर नाहीं. म्हणून ह्या दिशेनेच यापुढे कार्य झालें पाहिजे. आज प्रथम ज्यांच्या ज्यांच्या जिव्हेंत सामर्थ्य आहे अगर ज्यांच्या लेखणींत तेज आहे, त्यांनी त्यांनी या नव्या योजनेची लोकांना समजूत पटवून देऊन त्यांच्याकडून तिचा धिक्कार केला जाईल व त्यामुळे नवचैतन्याची एक नवी लाट उठेल असा प्रयत्न करावा. नव्या चळवळीची ही पहिली पायरी आहे व म्हणून ह्या दिशेकडे राष्ट्रांतील कार्यकर्ते तोंडें वळवतील अशी आम्हांस उमेद आहे. होअरसाहेबांनी दिलेल्या आव्हानाला हिंदुस्थानाचें उत्तर वरील प्रकारचेंच मिळालें तरच तें त्याच्या राष्ट्रीय बाण्याला शोभेल.

# पं. जवाहरलाल नेहरू यांना चोख उत्तर

'भाई परमानंद यांनीं राष्ट्रीय सभेवर हल्ला चढविला यामुळे चिडून जाऊन त्यांचा सूड काढण्याकरिता पं. जवाहरलाल नेहरू यांनीं जितकी विषारी टीका हिंदुसभेवर करतां येण्याजोगी होती तितकी केली. सूडबुद्धीला शहाणपणा सुचावयाचाच नाही! या दृष्टीनें पाहता त्यांनीं हिंदुसभेचे जे कट्टे शत्रु आहेत त्यांच्यावरहि ताण केलेली दिसते. व म्हणूनच अराष्ट्रीय बुद्धीचे अध्वर्यु म्हणून कुप्रसिद्ध असलेले मौ. शौकतअल्ली यांनीहि वरील भाषणाबद्दल त्यांची पाठ थोपटली!' हिंदु-महासभेचे चिटणीस पं. जगन्नारायण यांनी वरील वक्रोक्तीच्या शब्दांत प्रारंभ करून पं. जवाहरलाल यांना प्रत्युत्तर दिलें आहे.

**चुकून हिंदु जन्मले!**

ते पुढे म्हणतात कीं, 'हिंदुसभेचे आपण जुनेपुराणे द्वेष्टे आहोंत' असें जवाहरलाल कबूलच करतात. पं. मालवीय व लाला लजपतराय हे हिंदुमहासभेचे पुढारी होते त्या वेळेलाहि ही महासभा पं. नेहरूंना प्रिय नव्हती, मग आता तर काय ती पसंत पडणें शक्यच नाही. त्यांच्यासारख्या पाश्चात्य देशांत शिक्षण घेतलेल्या व तिकडच्या देशाभिमानाच्या कल्पना अंगीकृत केलेल्या देशभक्तास हिंदु संस्कृतीचें बीज व ध्येयवाद कळला नाही यांत आश्चर्य नाही! लाहोरच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्याने केलेल्या भाषणांत 'आपण हिंदु जन्मास

चुकून आलों ' अशा आशयाचे त्यांनी काढलेले उद्गार आमच्या कानांत अद्याप घुमत आहेत ! ! हिंदु-धर्मावर एवढी प्रीति असणाऱ्या गृहस्थाला हिंदुसभेचें कार्य सहन करवत नाही हे स्वाभाविक होय.

## समाजसत्तावादी मतें

त्यांना जो खरा राग आला आहे तो हिंदुमहासभेने त्यांच्या समाजसत्तावादासंबंधीं भिन्न मत प्रकट केलें म्हणून आला असें दिसतें. परंतु महासभाच काय, पुष्कळ लोकांना त्यांचा समाजसत्तावाद हा भयंकर व राष्ट्रास भलतीकडे नेणारा आहे असें वाटतें. राष्ट्रीय सभेच्या पुष्कळ पुढाऱ्यांनाहि तो पसंत नाही. अशा स्थितींत हिंदुमहासभेनें आपलें उलट मत प्रकट केलें ही एक राष्ट्रसेवाच केली. महासभा ही कांहीं भांडवलशाहीची पुरस्कर्ती नाही व पंडितजींनी त्यांची समाजसत्तावादी बुद्धि चालवून कितीहि गैरसमज पसरविला तरी त्याचा उपयोग होणार नाही.

## कौन्सिलप्रवेश

महासभा सहकार करीत नाही अगर असहकार करीत नाही. फक्त कायदेमंडळांत घुसून तीं काबीज करावीं एवढेंच तिचें मत आहे. पूर्वी स्वराज्य–पक्ष काढून त्यांच्या वडिलांनी जो मार्ग घालून दिला तोच मार्ग राष्ट्र गिरविणार आहे. त्या वेळीं मात्र जवाहरलाल गप्प बसतील हेंहि आम्हांस माहीत आहे. महासभेतहि असे लोक आहेत कीं, ज्यांनी राष्ट्राकरिता हालकष्ट सोसले आहेत. फक्त त्यांचें प्रदर्शन ते करीत नाहीत इतकेंच.

## पंडितजींचें अज्ञान

पं. जवाहरलाल नेहरू यांना आर्यकुमार सभा ही आर्यसमाजाच्या तरुण कार्यकर्त्यांचा सभा आहे हे माहीत नाही. या सभेने अगर हिंदुसभेने हिंदुराज्य स्थापन करून इतर धर्मीयांवर जुलम करावा असे ठराव केलेले नाहीत.आर्यकुमार सभेने एवढेंच ठरविलें कीं, इतर धर्मीय कोणी येवोत वा न येवोत, आपण आपल्या त्यागाने व कष्टाने स्वराज्य मिळविण्याची हिंमत धरावी. यांत काय चुकलें? हे माहीत नसणे हे त्यांचें अज्ञान होय! पं. जवाहरलाल हे जबाबदार पुढारी आहेत. त्यांनी मतभेद झाला कीं, दुसऱ्या संस्थांवर तुटून पडण्याचा उपक्रम केला आहे तो इष्ट नाही. बाकी यापेक्षाहि भयंकर हल्ल्यांतून हिंदुसभा वांचली आहे व तो वांचेलहि.

## राजा नरेंद्रनाथ यांचें मत

लाहोरचे सुप्रसिद्ध हिंदु पुढारी राजा नरेंद्रनाथ यांनी पं. जवाहरलाल यांना दिलेलें उत्तरहि अत्यंत विचारार्ह आहे. ते म्हणतात कीं, पंडितजींच्या भाषणाने मला फार दुःख झालें. विशेषतः, ज्या उच्च हिंदु संस्कृतीचें पालन व्हावें व जिचें संरक्षण व्हावें म्हणून बनारस विद्यापीठ निघालें. विद्यापीठाच्या प्रांगणांत व पं. मालवीयजींच्या अध्यक्षतेखालीं हें भाषण झालें या गोष्टीचें तर विशेषच वाईट वाटतें. कारण भारतीय संस्कृतीचा अभिमान प्रत्येक हिंदूला वाटतो.

## हिंदूंची राजकीय परिस्थिति

राजकारणाच्या दृष्टीने विचार करता एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, भावी सुधारणांची योजना ही राष्ट्रीयत्वाच्या पायावर केलेली नाही. राष्ट्रीय पुढाऱ्यांनी या दिशेने केलेले प्रयत्न फुकट गेले. हिंदु व मुसलमान हे निरनिराळे धार्मिक गट म्हणून मानले गेले आहेत. दुसऱ्या कोणत्याहि समाजापेक्षा हिंदु समाज अत्यंत विस्कळित व भंगलेला आहे व म्हणूनच इतर कोणत्याहि समाजापेक्षा हिंदुसमाजाला आज एकीची अत्यंत जरूरी आहे.हिंदूंचें संघटन झाल्याशिवाय राजकीय घटक म्हणून त्यांना कामच करतां येणार नाही. अशी स्थिति असताना हिंदूंना आपलें संघटन करण्याचा प्रयत्न केला तर त्याना शिव्याशाप कां दिले जातात हें समजत नाही!

## महासभेचे उद्देश

हिंदुमहासभेच्या नियमांत त्या संस्थेचे उद्देश पुढे दिल्याप्रमाणे आहेतः–(१) हिंदु समाजाच्या शाखांउपशाखांमध्ये ऐक्य उत्पन्न करून एका समाजाचे घटक या नात्याने त्यांना संघटित करणें,(२)हिंदुसमाज व इतर समाज यांच्यामध्ये स्नेहाची भावना उत्पन्न करणे व हिंदुस्थानाला स्वराज्य मिळवून देण्याच्या कामीं त्याचें सहकार्य मिळावें या उद्देशाने त्यांच्याशीं सख्य जोडणें, (३) हिंदु समाजांतील दलित वर्गाला सुस्थिति आणण्याचा प्रयत्न करणें, (४) जरूर त्या ठिकाणीं हिंदुसमाजाच्या हक्कांचे व हितसंबंधांचे संरक्षण करणें. हे वरील उद्देश हिंदुमहासभेच्या घटनेंतील आहेत व ते राष्ट्रीय सभेंत पुढारी म्हणून गणल्या गेलेल्या हिंदु राजकीय नेत्यांनी तयार केले आहेत. हिंदु समाजांत या पुढाऱ्यांचे शेंकडों अनुयायी आहेत. ही वस्तुस्थिति असतांना पं. जवाहरलाल हे कोणत्या मुद्दयावर सभेविरुद्ध ओरड करतात हें समजणें कठिण आहे.

## भावी राज्यघटना

भावी राज्यघटनेंत प्रांत हे मुख्य घटकावयव होणार आहेत. दहा प्रांतांपैकीं चार प्रांतात तरी हिंदु अल्पसंख्याक राहणार आणि ज्या प्रांतांत मुसलमान अल्पसंख्याक आहेत तेथे त्यांना जे हक्क दिले आहेत ते हक्क व त्यांच्या संरक्षणाकरितां

ज्या योजना केल्या आहेत त्या योजना हिंदूं-करिताहि केल्या पाहिजेत यांत शंका नाही. मुसलमानांना दिलेल्या जादा हक्काने हिंदूंचें नुकसान होत आहे. या परिस्थितींत स्वतःचें संरक्षण करण्याकरिता हिंदूंनी संघटन करूं नये असें म्हणणें म्हणजे अत्यंत अन्याय करण्यासारखें आहे. अल्पसंख्याक हिंदूंनी आपलें संरक्षण न करतां तेथील बहुमतवाल्या मुसलमान सरकारावर अवलंबून रहावें असें कोणीहि हिंदु म्हणणार नाही.

**महासभेचा राष्ट्रीय बाणा**

वरील परिस्थिति स्पष्ट दिसत असतांना पं. जवाहरलाल आपल्या मागें आपल्या मताचे असे बहुसंख्यांक हिंदु आहेत असें म्हणतात हे खरें कसें? महासभेनें ज्ञातिनिष्ठेच्या विरुद्ध राष्ट्रीयत्वाचाच पुरस्कार केला आहे. व ज्या राष्ट्रीय सभेनें जर हा प्रचार सुरू केला तर तिला महासभेचाच पाठिंबा मिळेल, इतरांचा मिळणार नाही. मुसलमानांच्या ज्ञातिविशिष्ट संस्था निघाल्यानंतर पुष्कळ दिवसांनी महासभेची स्थापना झाली आहे.

**दोषारोपाला जागा नाही**

हिंदु महासभेनें कायदेमंडळांत शिरावें म्हणून ठराव केला व त्यावर पं. जवाहरलाल यांचा आक्षेप आहे. परंतु हे मत निरनिराळ्या पक्षांचें व मोठमोठ्या पुढाऱ्यांचेंहि आहे. राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांपैकीं पुष्कळ पुढाऱ्यांना हें पसंत आहे. खुद्द महात्मा गांधीहि कांही कामाकरिता या तत्त्वाला संमति देतातच. मग एकट्या महासभेवरच दोषारोप कां केला जावा? त्याला बिलकुल जागा नाही. पं. जवाहरलाल आर्य कुमार सभेनें जो ठराव केला असें म्हणतात तो ठराव प्रत्यक्ष झाला नाही असेंहि मला कळतें. तरीहि महासभेवरच त्यांचा रोष असला तर त्याला इलाज काय?

# खोडसाळ गैरसमज

## ( ले.—श्री. रा. ना. मंडलीक )

ता. १४–११–३३ च्या 'नवाकाळ' पत्राच्या अंकांतील 'संकीर्ण समालोचनांत' खालील वाक्यें आढळतातः—

"कॉंग्रेसपक्ष हा वजनदार पक्ष आहे. कॉंग्रेसला कोणत्याहि डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने मान्यता दिली नव्हती. या पक्षाच्या प्रसूतीच्या वेळीं पेणचे डि. मॅजिस्ट्रेटनी मंगलाशीर्वाद दिले आहेत. अर्थात् कॉंग्रेसपेक्षा हा पक्ष कांकणभर वरचढ आहे."इत्यादि. यासंबंधी मी पुढील खुलासा 'नवाकाळ'च्या संपादकांकडे प्रसिद्धीसाठी पाठविला होता. तो त्यांनी प्रसिद्ध केला नाही म्हणून आपणाकडे पाठवीत आहें.

"वरील वाक्यांतील उल्लेखित पक्ष म्हणजे गेल्या महिनाअखेर मुंबईंत बृहन्महाराष्ट्राची राजकीय परिषद भरून तींत स्थापन झालेला लोकशाही स्वराज्य पक्ष होय. हा पक्ष आपला नावडता आहे व त्याविरुद्ध आपल्या मर्जीप्रमाणें आपण टीका करीत असतां, त्याबद्दल मला कांही म्हणावयाचें नाही. त्या टीकेचा परामर्ष लोकशाही पक्षाचीं पत्रें व लेखक घेतच आहेत, व पुढेहि घेत जातील. माझी आपल्याविरुद्ध प्रस्तुत तक्रार इतकीच आहे कीं, वर उद्धृत केलेल्या आपल्या पत्रांतील वाक्यांत उघड उघड सत्यापलाप करण्यांत आला आहे. तो कदाचित जाणुनबजून केलेला नसेलहि! परंतु तो अत्यंत निष्काळजीपणाने केलेला आहे हें खास. असला निष्काळजीपणा महात्मा गांधींचे चेले व सत्य-अहिंसेचे उपासक म्हणविणाऱ्यांस तरी खचित शोभत नाही.

"या पक्षाच्या प्रसूतीच्या वेळीं पेणचे डि. मॅजिस्ट्रेटांनी मंगलाशीर्वाद दिले आहेत." हें आपल्या पत्रांतील विधान धादांत खोटें व खोडसाळपणाचें आहे. 'पेणचे डि. मॅजिस्ट्रेट' यांचा अभिप्रेत अर्थ कुलाब्याचे डि. मॅजिस्ट्रेट असा मी समजतों. कारण पेणला एखादा डि. मॅजिस्ट्रेट अजून तरी नेमण्यांत आलेला नाही. मी पेणचा रहिवासी आहें. ता. १ ऑक्टोबरला पेण येथें कुलाबा जिल्ह्याची जी सर्वपक्षीय परिषद झाली ती भरविण्यांत माझें प्रमुख अंग होतें. लोकशाही स्वराज्य पक्षाचा व माझा तसाच निकट संबंध आहे म्हणून मी अधिकारयुक्त रीतीनें असें स्पष्ट जाहीर करतों कीं, लोकशाही स्वराज्य पक्षालाच काय पण पेण परिषदेलाहि कोणत्याहि डि. मॅजिस्ट्रेटचे मंगलाशीर्वाद कोणीहि मागितलेले नव्हते व कोणाहि डि. मॅ. ने ते दिलेलेहि नाहीत माझें हें विधान खरें नाहीं असें आपलें अजूनहि म्हणणें असल तर तें सिद्ध करण्याविषयी माझें आपल्याला सविनय आव्हान आहे.

पेणची परिषद ही डि. मॅ. ची परवानगी घेऊन भरविण्यांत आली असा एक प्रवाद परिषदेच्या

द्वेष्ट्यांनी पसरविल्याचें माझे ऐकण्यांत आहे. म्हणून मी स्पष्ट प्रसिद्ध करतों कीं, सदर परिषदेकरितां डि. मॅजिस्ट्रेटची परवानगी मुळींच मागण्यांत आली नव्हती. अर्थात् ती त्याने देण्या न देण्याचा प्रश्नच संभवत नाहीं; ऑर्डिनन्स हुकुमाखालीं निर्बंधांत असलेल्या लोकांना सदर परिषदेस हजर राहण्याची परवानगी डि. मॅजिस्ट्रेटांनी दिली होती, व तिला पोलीस रिपोर्टरहि त्यांनी धाडले नाहीत. ही गोष्ट मात्र खरी आहे. पण त्यांत विशेष तें काय आहे? कॉंग्रेसचे अध्यक्ष लो. ना. बापुजी अणे यांनी म. गांधींच्या संमतीने गेल्या जुलैंत पुण्याला कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांची जी परिषद भरविली होती, तिला हजर राहण्याची परवानगी पुण्याच्या व इतर जिल्ह्यांच्या डि. मॅ. नी. आर्डिनन्स हुकुमांच्या निर्बंधांत असलेल्या अनेक पुढाऱ्यांस दिली होती व पुण्याच्या परिषदेलाहि पोलीस रिपोर्टर पाठविण्यांत आले नव्हते, हें सुप्रसिद्ध आहे. पुण्याच्या वरील परिषदेला डि. मॅ. नी मंगलाशीर्वाद दिले होते असे म्हणण्याची आपली तयारी असल्यास पेणच्या परिषदेबद्दल आपण तसलें खोडसाळ विधान केल्याबद्दल मी फारशी तक्रार करीत बसणार नाहीं. लोकशाही स्वराज्य पक्षाचे बाबतींत आजतागायत कुलाब्याच्या डि. मॅ. चा व माझा पत्रव्यवहार झालेला नाहीं किंवा मुलाखतहि झालेली नाहीं. तेव्हां, पक्षाच्या प्रगतीसाठीं त्यांचे मंगलाशीर्वाद मिळवून त्यांचा उपयोग करण्यांत आला, अशी बातमी जर कोणी पिकविली असेल तर ती साफ खोटी असून केवळ दुष्ट बुद्धीने पिकविली आहे असे म्हणण्याखेरीज गत्यंतर नाहीं."

माझा हा खुलासा आपण ताबडतोब प्रसिद्ध करून आपल्या पत्रांतील वर उद्धृत केलेल्या वाक्यांमुळे आपल्या वाचकांचा होणारा गैरसमज दूर करण्याचें श्रेय घ्याल अशी मला आशा आहे.

# पार्लमेंटांतील राजेसाहेबांचें भाषण

### एक मजूर सभासद खवळले !

मंगळवार ता. २१ रोजीं पार्लमेंटाच्या कामास पुनः सुरुवात झाली. पार्लमेंटाच्या बैठकीचा उद्घाटन-समारंभ खुद्द राजेसाहेबांनी करावयाचा अशी वहिवाट आहे व त्याप्रमाणे ह्याहि वेळीं राजेसाहेब आपल्या लव्याजम्यासह हौस ऑफ लॉर्डसच्या सभागृहांत आले व त्यांनीं पार्लमेंट उघडल्याचें जाहीर केलें. या प्रसंगीं बादशहा जें भाषण करतात तें अधिकारारूढ पक्षाच्या धोरणास धरूनच असतें. आपल्या भाषणांत ते म्हणाले,

### शांतता व निःशस्त्रीकरण

"जगांत शांतता नांदावी म्हणून सरकार शक्य ते प्रयत्न करील. निःशस्त्रीकरणाच्या बाबतींत इतर राष्ट्रांबरोबर सरकार सहकार्य करून त्यासंबंधींचे सर्व गुंतागुंतीचे प्रश्न सोडविण्याचा व सर्व राष्ट्रांना पटेल अशी एखादी तोड काढण्याचा सरकार प्रयत्न करील. निःशस्त्रीकरण परिषदेचे प्रयत्न फुकट न जाता ते फलद्रूप होण्याकरितां खटपट करण्यास सरकार चुकणार नाहीं. राष्ट्रसंघाच्या प्रयत्नाने आंतरराष्ट्रीय मैत्री टिकेल असा भरंवसा वाटत असल्याने आम्ही त्या संघाच्या कार्याचाच पुरस्कार करूं.

### व्यापार व उद्योग–धंदे

गेल्या वर्षापासून इंग्लंडाचा व्यापार व उद्योग-धंदे भरभराटीस येतील असा विश्वास उत्पन्न झाला आहे. खर्चाला शिस्तीने पायबंद घालून, नवे नवे उद्योग काढून व व्यापार वाढवून मध्याच्या आर्थिक दुःस्थितींतून मार्ग काढण्याचा व पूर्वीची सुस्थिति प्राप्त करून घेण्याचा प्रधानमंडळ प्रयत्न करील. निरनिराळ्या राष्ट्रांशीं व्यापारी तह करून इंग्लंडचा परराष्ट्रीय व्यापार वाढावा म्हणून ते प्रयत्न करतील. विशेषतः कापड, कोळसा वगैरेंचा निर्गत व्यापार वाढविला जाईल. बेकारीच्या वेळीं मदत व्हावी म्हणून नवे 'इन्शुअरन्स 'चे कायदे करण्यांत येतील व या कायद्याच्या साहाय्याने बेकारांनासुद्धां मदत कशी करावयाची याचा विचार होईल."

### हिंदुस्थानाकरिता सुधारणा

हिंदुस्थानाचा उल्लेख करतांना राजेसाहेब म्हणाले कीं, "नव्या सुधारणांसंबंधाच्या योजनांचा विचार पार्लमेंटच्या जॉइंटकमिटीने हिंदी प्रतिनिधींशीं सहकार्य करून केला. ही कमिटी पुनः नेमण्याची तजवीज करा. आमच्या प्रधानमंडळाला आशा वाटत आहे कीं, याच पार्लमेंटाच्या बैठकींत या सुधारणांचा तक्ता नव्या कायद्याच्या रूपाने मांडण्याच्या त्यांच्या प्रयत्नास यश येईल. हिंदुस्थानाला नव्या सुधारणा कोणत्या द्यावयाच्या हें ठरविण्याच्या कामाची जबाबदारी केवढी आहे याची जाणीव मला पूर्ण आहे. या कामीं ते शहाणपणाने आपलें काम करतील अशी मला आशा आहे."

### धिक्काराची आरोळी

राजेसाहेबांचें वरील भाषण संपण्याच्या वेळीं

पार्लमेंटामधील मजूर पक्षाचे एक जहाल सभासद मि. जे. मॅकगोव्हर्न हे मध्येच आरोळी ठोकून ओरडून म्हणाले कीं, "बेकारांची दुःस्थिति घालविण्याकरिता जी काटकसर करणार होतां त्याचें काय झालें! लोक उपाशीं मरत असताना तुम्ही ही चैन करतां! तुम्हाला धिक्कार असो!" या भाषणाकडे कोणी लक्ष दिलें नाहीं असें म्हणतात.

## चर्चिलकडे लक्ष नको

उदारपक्षातर्फे रार्जेसाहेबांच्या भाषणासंबंधीं बोलतांना सर हर्बर्ट सॅम्युएल म्हणाले कीं, 'हिंदुस्थानाला द्यावयाच्या सुधारणांच्या कामीं सरकारनें आपल्या आंखलेल्या मार्गानेंच जावें. मि. चर्चिल याच्या बोलण्याकडे अगर वळवळीकडे लक्ष देऊं नये.

## पांढरा खलिता

मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड हे उत्तरादाखल बोलताना म्हणाले कीं, "उद्या नेहमीचें काम थोडा वेळ बंद ठेवून जोडकमिटी नेमण्याचें काम करण्यांत येईल पांढऱ्या खलित्यांत मांडलेली योजना व संरक्षक बंधनें हीं प्रधानमंडळास मान्य असून त्यांचा पुरस्कार केला जाईल. जोडकमिटीच्या कामाबद्दल त्यांचे मी आभार मानतों. ती कमिटी आपलें काम लवकर करील अशी आशा आहे. हिंदुस्थानांतील लोकांच्या या राजकीय बाबींसंबंधीं ज्या अपेक्षा आहेत त्या पूर्ण होतील व इंग्लंड राजकीय उत्क्रांतीचा हा प्रश्न समाधानकारक रीतीने सोडवील असें मला वाटतें."

हौस ऑफ लॉर्डसमध्येहि पांढऱ्या खलित्यातील योजनेसंबंधीं लॉर्ड डडले वगैरेंचीं भाषणें झालीं. व्हायकौंट गॅलवे म्हणाले कीं, 'सुधारणांच्या बाबतींत उगीच गडबड करूं नका. सावकाश काम करा, पण चांगलें करा!'

## जोडकमिटीची पुनर्घटना

ता. २२ रोजीं हिंदुस्थानाचे अंडर-सेक्रेटरी मि. बटलर यांनी पार्लमेंटाची जोड-कमिटी नेमण्याचा ठराव हौस ऑफ कॉमन्समध्ये मांडला. कमिटींत पूर्वीचींच नांवें आहेत. जोड-कमिटीच्या आतापर्यंत सत्तर सभा भरल्या. एकंदर वीस हजार प्रश्न विचारले व त्यांपैकीं पाच हजारांवर प्रश्न सर सॅ. होअर यांनाच विचारले गेले. त्यांनी पंचाहत्तर तास साक्ष दिली. आता फक्त ब्रह्मदेशाचेंच काम राहिलें आहे वगैरे माहिती त्याना सांगितली. त्यांच्यानंतर कर्नल वेजवुड यांनी आपली स्वराज्याची योजना मांडली. 'तुम्हाला हिंदुस्थानांतून कोणी पाठिंबा दिला आहे' अशा प्रश्नाला 'मी गांधींना लिहिलें पण त्यांनी उत्तरच पाठविलें नाहीं' असें त्यांनी सांगतांच हंशा पिकला!

## चर्चिल यांची तक्रार

मि. चर्चिल यांनी जोड-कमिटी नेमण्याच्या ठरावास आपण विरोध करीत नाहीं असें सांगितलें. त्यांनी अशी तक्रार मात्र केली कीं, सरकारी पक्षानेंच सर्व सभासद त्या कमिटींत घातले आहेत व हिंदुस्थानांत पुढें होणाऱ्या सुधारणांचें धोरण आजच चालू केलें आहे. संस्थानिकांवर जरी प्रत्यक्षपणे वजन टाकून त्यांची संमति सरकारानें मिळविली नाहीं तरी त्यांचीं मनें वळविण्याकरिता शक्य ते उपाय केले गेले आहेत. हें सिद्ध करणें शक्य नाहीं, परंतु डेव्हिडसन रिपोर्ट पाहिला कीं आर्थिक फायद्याच्या गोष्टी त्यांत कशा घुसडल्या आहेत हें लक्षांत येतें. मि. ऐझाक फूट यांनी मि. चर्चिल यांना 'सरकारी पक्ष सोडून प्रामाणिकपणानें विरोधी पक्षास मिळा' अशी सूचना केली व स्वतः जोड-कमिटींत जाण्याचें नाकारून आता दोष ठेवीत बसण्याच्या त्यांच्या उपक्रमाचा निषेध केला.

## होअर यांचें उत्तर

आणखी दोनतीन भाषणें झाल्यावर सर सॅम्युअल होअर यांनी उत्तर दिलें. त्यांनी कमिटीच्या कामाबद्दल स्तुति करून जनतेच्या हिताकरिताच नव्या सुधारणा देण्यांत येणार आहेत असें सांगितलें. मि. चर्चिल याच्या विधानांना उत्तरें देतांना त्यांनी सांगितलें कीं, खंडणीची सूट ही संस्थानिकांना लांच नव्हे, ती सूट देणें भागच हे त व्हाइसरॉयाच्या भाषणासंबंधीं ते म्हणाले कीं, त्यांचीं भाषणें मी कांहीं आगाऊ तपासूं इच्छित नाहीं. त्यांच्या दोन वर्षांच्या कामगिरीकडे पाहतां आपण त्यांच्यावर विश्वासच टाकला पाहिजे.

## डोमिनियन स्टेटस फार दूर!

ते पुढें म्हणाले कीं, 'हिंदुस्थानास जी घटना आज देण्यांत येणार आहे ती 'डोमिनियन स्टेटस' ची तर नाहींच. पण यानंतरच्या दुसऱ्या अगर तिसऱ्या पायरीनंतरहि तें मिळावयाचें नाहीं! पण केव्हा तरी तें द्यावें लागणार हे खास! लष्कराच्या जोरावरच राजकीय ताबेदारी जर हिंदुस्थानात कायमची टिकावयाची असेल तर मात्र गोष्ट वेगळी. आज त्यांना 'जबाबदारीचें स्वराज्य' देऊं असें आमचें ध्येय असल्याचें सांगत आहों. हिंदुस्थानांत ही गोष्ट सर्वांस माहीत आहे.'

यानंतर मि. बटलर यांनी उत्तरादाखल भाषण केल्यावर जोड-कमिटी नेमण्याचा ठराव पसार झाला.

# दडपशाहीचें ग्रहण सुटलें नाही

परिस्थिति कितीहि बदलली तरी एकदा जडलेलें व्यसन व्यसनी माणसास जसें टाकवत नाहीं, किंवा एकदा एखाद्या गोष्टीची छातींत धडकी भरली म्हणजे भित्र्या माणसाची ती भीति जशी कांही केलें तरी नाहींशी होत नाहीं, तशीच दंडुकेशाही गाजविण्यास चटावलेल्या अधिकाऱ्यांना आपल्या हातांतली जादा अधिकाराची सत्ता सोडवत नाही. कायदेभंगाच्या चळवळीच्या प्रारंभीं सरकारने वटहुकूम फर्मावून कल्पनातीत दंडेलीचे अधिकार मॅजिस्ट्रेटांच्या व पोलिसांच्या हातीं दिले. असले अनिर्बंध अधिकार हातीं आल्यावर 'आधींच उल्हास त्यांत फाल्गुन मास' अशी त्यांची स्थिति झाल्यास त्यांत नवल वाटावयास नको. कायद्यांचा कडक निर्बंध असूनदेखील जेथे मॅजिस्ट्रेटांच्या व पोलिसांच्या विचित्र लीला वारंवार ऐकूं येतात, तेथे ते कायद्याचे निर्बंध 'काळ्या कायद्याने'च शिथिल केल्यावर त्याच्या हातून बेगुमान वर्तन झालें नसतें तरच नवल! अशा रीतीनें मोकाट सोडून दिलेल्या जुलमी अधिकाऱ्यांच्या दंडुकेशाहीचे तडाखे बसल्यामुळे विवळत असलेले आर्त नागरिक, दडपशाहीचें हें ग्रहण केव्हा एकदा सुटेल आणि आपण आपले व्यवहार पूर्ववत् करण्याला केव्हा एकदा मोकळे होऊं, याची अत्यंत आतुरतेने वाट पाहत असता, ग्रहण न सुटता ग्रस्तास्त व्हावा आणि आशेची निराशा व्हावी तशीच स्थिति मुंबई-सरकाराने 'काळ्या कायद्या'ची मुदत एक वर्ष वाढविल्याने येथील जनतेची झाली आहे.

१९३२ साल उजाडतें न उजाडतें तोंच व्हाइसरॉयांच्या वटहुकुमांनी नागरिकत्वाच्या नैसर्गिक हक्कांवर झडप घातली आणि सर्वत्र 'अंधेरी नगरीं' तल्याप्रमाणें कारभार चालू झाला. वटहुकुमांच्या या वरवंट्याखाली चळवळये व बिनचळवळये, 'कायदेभंगवाले' व 'कायदेसंगवाले' उभयतांहि मारखेच ठेचले गेल्यामुळे सहा महिने पूर्ण होण्याच्या आधींच बहुतेक ठिकाणीं बाह्यतः तरी भयानक शांतता पसरलेली दिसूं लागली. अशा परिस्थितींत वटहुकमांची दुसरी फेर झाडण्याची बिलकुल जरूरी नव्हती; आणि वटहुकुमाची कालमर्यादा सहा महिने असावी असें स्पष्ट नमूद करण्यांत, तो कायदा करणाऱ्यांचा हेतु काय असावा तो उघड दिसत असल्यामुळे, तेच वटहुकूम फिरून जारी करणें हें बेकायदेशीर आहे असेंच कित्येक कायदेपंडितांचें मत पडलें होतें. तरी पण जादा अधिकारास चटावलेल्या नोकरशाहीचा हट्ट पुरविण्याकरिता वटहुकुमांचा पुनरुच्चार करण्यांत आला आणि त्या राहूची छाया पुनः पूर्ववत् सर्वत्र घनदाट पसरली.

पहिल्या सहामाहींत कायदेभंगवाल्याकडून उत्तरास प्रत्युत्तर तरी चोख मिळालें होतें; पण या दुसऱ्या सहामाहींत परिस्थिति पुष्कळच बदलली. कायदेभंगाच्या चळवळीचे अध्वर्यु जे महात्मा गांधी त्यांचेंच लक्ष या चळवळीवरून उडून अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीकडे वेधलें गेलें आणि एंजिनाचीं चाकेंच उलटीं फिरूं लागलीं म्हणजे डब्यांचीं चाकेंहि उलटींच फिरतात, त्याप्रमाणे महात्माजींचे अनुयायीहि 'कायदेभंगवाले' म्हणून मिरवण्याच्याऐवजीं 'कायदेसंगवाले' म्हणून मिरवूं लागले! अर्थातच कायदेभंगाच्या चळवळीचा जोम ओसरूं लागला आणि सरकार जर खरें शहाणें व शांतताप्रिय असतें तर १९३२ सालाच्या समाप्तीबरोबरच वटहुकुमांच्या ग्रहणाचीहि समाप्ति झाली असती.

परंतु दंग्याचा भर संपून स्थिरस्थावर होऊं लागलें कीं, पोलिसांच्या धामधुमीला जोर चढतो, हा जसा नेहमीचा अनुभव आहे, तसाच अनुभव या वेळींहि आला. कायदेभंगवाल्या सैनिकांतच मतभेद व फाटाफूट उपस्थित झाल्यामुळे चळवळीचा जोर कमी होऊं लागला असतां दंडुकेबाज अधिकाऱ्यांना आपल्या दंडुकेशाहीचाच हा परिणाम आहे असें वाटूं लागलें आणि त्या मनः-

कल्पित जयाची धुंदी डोळ्यावर चढून कायद्याचा वरवंटा फिरवून ही चळवळ कायमची गाडून टाकूं, असल्या विपरीत भावनेने अधिकाऱ्यांनी वटहुकुमांना कायद्याचें स्वरूप देण्याचें ठरविलें. लांडग्याने आपलें स्वरूप झाकण्याकरिता मेंढीचें कातडें अंगावर घेतलें तरी तेवढ्याने त्याच्या स्वभावांतला दुष्टपणा जसा नष्ट होत नाहीं, तसाच प्रकार येथेहि झाला. वटहुकुमांचा हिडिसपणा झाकण्याकरिता त्याच्यावर जरी कायदेशीरपणाचें पांघरूण घालण्यांत आलें तरी या 'काळ्या कायद्याचें' अंतःस्वरूप वटहुकुमाहून यत्किंचित्‌हि वेगळें नव्हतें.

वटहुकुमावर कायद्याचा छाप मारण्याचा विधि जसा वरिष्ठ कौन्सिलांत झाला तसाच प्रांतिक कौन्सिलांतूनहि झाला. हा विधि होत असता राष्ट्रीय वृत्तीच्या मूठभर लोकनियुक्त सभासदांनी त्याला जितकी कायदेशीर हरकत घ्यावयाची तितकी घेतली;पण तिचा काडीइतकाहि उपयोग झाला नाहीं. मुंबई इलाख्यापुरतेंच बोलावयाचें झाल्यास गेल्या वर्षी नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत मुंबईस भरलेल्या कायदेकौन्सिलाच्या बैठकींत रा. ब. चितळे, काळे, गोखले, जोग, जे. बी. पेटिट वगैरे सभासदानी हा 'काळा कायदा' पसार होऊं नये किंवा निदान त्याचें स्वरूप तरी शक्य तितकें सौम्य करावें म्हणून जंगजंग पछाडले. परंतु सरकारी आणि सरकारजमा सभासदांच्या संयुक्त शक्तीपुढे त्यांची युक्ति फोल ठरून मूळच्या बिलांत म्हणण्यासारखा कांहीच फेरबदल होऊं शकला नाहीं. बिलाची चर्चा नीटपणे व्हावी याकरिता तें सिलेक्ट कमिटीकडे पाठवा, असली साधी मामुली मागणी जेथे झिडकारली गेली तेथे इतर उपसूचनांची विल्हेवाट कशी लागली असेल तें सांगावयास नकोच. केवळ संशयावरून अटक करण्यापूर्वी त्या इसमास आत्मसमर्थन करण्याला संधि तरी द्या, मुंबईस पोलीस कमिशनरकडे हा अधिकार न ठेवतां प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटकडे तो सोंपवा, अटकबंदीचा हुकूम करतांना त्या हुकमाचीं कारणेंहि त्यांत नमूद करा, संशयित माणसास ठाणबद्ध करावयाचें झाल्यास त्याला अगदीच अपरिचित अशा ठिकाणीं तरी ठेवूं नका, बिनचौकशीने अटक करण्याची मुदत कमी करा व ती फिरफिरून वाढविण्याची सत्ता ठेवूं नका, शिक्षेची कमाल मर्यादा ६ महिने व दंडाची कमाल मर्यादा ५०० रुपये याहून अधिक जाऊं देऊं नका,वगैरे अनेक उपसूचना मांडून या 'काळ्या कायद्या' ला थोडा तरी उजळा देण्याचा प्रयत्न कित्येक लोकनियुक्त सभासदांनी केला; पण सरकारच्या दुराग्रहाचा पारा एका अंशानेहि खाली उतरला नाहीं आणि या काळ्याकुट्ट कायद्याचा भेसुरपणा लवमात्रहि बदलला नाहीं.

असल्या हटवादीपणाने तयार केलेल्या कायद्याचा दंडुका नोकरशाहीचे हातीं देण्यांत आला. त्या दंडुक्याचे प्रयोग गेल्या बारा महिन्यांत कोणकोणावर कसकसे करण्यांत आले ते वाचकांच्या नजरेसमोर आहेच. अनेकांना अद्यापि पोलीसठाण्यावर निष्कारण खेटे घालावे लागत आहेत. कित्येकांच्या तोंडाला पक्कें कुलूप ठोकलें आहे, तर कित्येकांना कांहीं मर्यादेपर्यंतच तोंड उघडता येतें, कोणावर आपला राहता गांव सोडून परठिकाणीं राहण्याची सक्ती करण्यांत आली आहे, तर कोणाला आपला गांव सोडून जाण्याला मनाई करण्यांत आली आहे.आणि त्यांतूनहि जे इसम कायद्याच्या कचाट्यांत सांपडतात, त्यांच्यावरच्या रागाचा वचपा काढण्यासाठी त्यांना शिक्षेचें पुरेपूर माप भरावयास लावण्यांत येत आहे! असली बेछूट सत्ता हातीं देणारा कायदा पास करण्याचीच आधी गरज नव्हती. बरें, प्रसंगवशात् हाताशेजारीं शस्त्र असावें म्हणून तें घडवून ठेवलें तरी तें म्यानांतून बाहेर काढण्याची तादृश जरूरी नव्हती तेंहि एक वेळ असो; पण गेल्या बारा महिन्यांतलें चळवळीचें स्वरूप, कॉंग्रेसच्या कट्ट्या अनुयायांच्यादेखील विचारसरणींत झालेलें स्थित्यंतर आणि सरकारनेच चालविलेला शांततेचा व सुव्यवस्थेचा बोलबाला लक्षांत घेतां, त्या कायद्याच्या बजा-

वर्णीची मुदत आणखी बारा महिन्यांनी वाढविण्याला भाग पाडण्यासारखी आपत्ति तरी सरकारावर खास ओढवली नव्हती, हें कोणीहि निश्चितपणें सांगूं शकेल. असें असतां ही मुदत वाढविण्याचा अतिप्रसंग सरकारने कां केला?

या 'काळ्या कायद्या' ची मुदत एक वर्षानें वाढविल्याचें जाहीर पत्रक लिहितांना त्याचें समर्थन कसें करावें याची सरकारलाच भ्रांत पडली असावी, हें त्या पत्रकावरूनच व्यक्त होतें. सरकार स्वतःच कबुली देतें कीं, आता परिस्थिति निवळत चालली आहे आणि या कायद्याचा कोरडा ओढण्याचा प्रसंग क्वचितच येतो. हें जर खरें, तर तो कायद्याचा कोरडा गुंडाळून कां ठेवीत नाहीं, असा प्रश्न साहजिकच विचारण्यांत येईल. हें ओळखून सरकार आत्मसमर्थनासाठीं अशी लंगडी सबब पुढे मांडतें कीं, कित्येक काँग्रेसवाल्यांचा वर्गकलह पेटविण्याचा इरादा दिसून येत आहे. तसा वर्गकलह पेटल्यास त्या कलहाच्या आगींतून ब्रिटिश सरकार, हिंदी संस्थानें आणि जिनगीवाले लोक यांचा बचाव करावा लागेल, एवढ्याकरितांच आम्हाला आमच्या हातांतलें हें हत्यार म्यान करतां येत नाहीं! संकटाच्या प्रसंगाकरिता म्हणून निर्माण केलेल्या जादा अधिकाराचा हा धडधडीत दुरुपयोग नव्हे काय? ज्या संकटाच्या भीतीने गांगरून जाऊन सरकारानें हा कायदा पास करून ठेवला तें भेसुर संकट अद्यापि तसेंच आहे असें सरकार म्हणूं शकत नाहीं. मुंबई इलाख्याच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत दौरा काढून गव्हर्नरसाहेबांनी सर्वत्र मानपत्रें घेतलीं आणि समारंभाच्या निमित्तानें ध्वजहि लावले गेले. हा सर्व प्रकार शांतता प्रस्थापित झाल्याचा द्योतक आहे असें एका तोंडाने सरकार म्हणतें, आणि लगेच दुसऱ्या तोंडाने दडपशाहीचें ग्रहण अद्यापि सुटलें नसून आणखी एक वर्षपर्यंत तें भोवणार असें जाहीर करतें! याची संगती कशी लावावयाची? शांतता प्रस्थापित झाली नसेल तर गव्हर्नरसाहेबांचा झालेला मानपान म्हणजे केवळ जुलमाचा रामराम होय असें तरी सरकारने कबूल करावें, नाहीं तर शांतता प्रस्थापित झाली असून देखील केवळ जादा अधिकाराला चटावलेल्या नोकरशाहीच्या हेक्यामुळेच दडपशाहीची मुदत लांबविण्यांत आली असें तरी कबूल करावें.

वास्तविक पाहतां कायदेभंगाची चळवळ मंदावली आहे हें न समजण्याइतकें कांहीं सरकार मंद बुद्धीचें नाहीं; परंतु पं. जवाहरलाल नेहरूंचा आर्थिक कार्यक्रम आणि दुसऱ्या कित्येक मजूरवर्गाच्या पुढाऱ्यांचा कम्युनिस्ट कार्यक्रम याला बिचकून काळ्या कायद्याची मुदत वाढविण्याचा हा उपद्व्याप सरकारने आरंभिला आहे. पण हा सरकारचा उपद्व्याप उलट सरकारच्याच आंगलट येईल असें आम्ही त्यास स्पष्ट बजावतों. दडपशाहीचा रूळ कितीहि जोराने व कितीहि काळपर्यंत फिरवीत राहिलें तरी असंतोषाचें बीजच नाहींसें केल्याशिवाय शांतता प्रस्थापित होत नाहीं. हा तर सर्वमान्य सिद्धान्त आहे व त्याचा अनुभव इतर देशांतल्याप्रमाणे येथेहि येईल. शिवाय अधिकारक्रांतीकरिता आरंभिलेली अत्याचाराची किंवा अनत्याचाराची उघड चळवळ कांहीं काळपर्यंत तरी जशी जुलमाने दडपून ठेवतां येते तशी विचारक्रांतीची चळवळ दडपून टाकून नामशेष करतां येत नाहीं.

पं. जवाहरलालांचा आणि कम्युनिस्टांचा आर्थिक कार्यक्रम कोणाला पसंत असो वा नसो, मतपरिवर्तनासाठीं म्हणून जोंपर्यंत त्याची तात्त्विक चर्चा होत आहे, तोंपर्यंत ती चर्चा बंद पाडणें न्याय्य नाहीं व तें शक्यहि नाहीं. कोणाच्याहि हातून बेकायदेशीर कृत्य घडल्याशिवाय त्याच्यावर कायद्याची पकड चालूं शकत नाहीं व तशी ती चालविण्याची आपली इच्छाहि नाहीं, असें सरकारनेच अनेक वेळा जाहीर केलें आहे. चार वर्षांपूर्वी कम्यूनिस्टांच्यावर जेव्हा मीरत येथे खटला सुरू झाला त्या वेळींच पं. जवाहरलाल यांचींहि मतें तशींच असतां त्यांच्यावर खटला

कां केला नाही, या प्रश्नाला उत्तर देतांना सरकारनेच असा खुलासा केला होता कीं, जोंपर्यंत त्यांच्या हातून अधिकारक्रान्तीच्या दृष्टीने कोणतेंहि कृत्य घडलें नाही तोंपर्यंत केवळ त्यांच्या मतांवरून त्यांजवर खटला करण्याचा सरकारचा विचार नाहीं; आणि आता मुंबईसरकार दडपशाहीच्या कायद्याची मुदत वाढवितांना सोशालिस्ट व कम्यूनिस्ट यांच्या मतांचीच सबब पुढे करीत आहे! त्यावरून आता दडपशाहीचा रोख सोशॅलिस्ट व कम्यूनिस्ट यांच्या मतांकडे वळणार असें लक्षण दिसतें.

परंतु मतें दडपून टाकूं गेल्यासहि दडपली जात नाहीत; एवढेंच नव्हे तर दडपशाहीच्या या नसत्या उपद्व्यापामुळे त्या मतांचा गाजावाजा होऊन प्रसारहि अधिक होतो आणि क्वचित् प्रसंगीं असेंहि घडून येतें कीं, एरवीं ज्यांना तीं मतें पटलीं नसतीं, त्यांना त्यांजवर चालविलेल्या जुलमाची चीड येऊन त्या मतांचा पुरस्कार करण्याचा अभिनिवेश उत्पन्न होतो. एवंच नैसर्गिक रीत्याच योग्य दिशेकडे वळत चाललेल्या चळवळीच्या ओघांत सरकारच्या या गैरमुत्सद्दीपणामुळेच पुनः प्रक्षोभ उत्पन्न होण्याचा संभव आहे, व तसें झाल्यास त्याची जबाबदारी सरकारला असला वदसला देणाऱ्या नोकरशाहीवरच राहील.

# हुंडणावळीच्या प्रश्नाची चर्चा

### अठरा पेनींचा अट्टाहास

सोमवार ता. २७ रोजीं विलायतेंत हाऊस ऑफ कॉमन्समध्ये मजूरपक्षाचे एक सभासद कर्नल वेजवुड यांनी रुपयाचा भाव कमी करण्याबद्दल हिंदुस्थानांत चाललेल्या चळवळीसंबंधीं हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युअल होअर यांना प्रश्न विचारला. तेव्हा त्यांनी असें सांगितलें कीं, १९२७ साली इंडियन करन्सी ॲक्ट पास झाल्यापासून रुपयाचा जो भाव अस्तित्वांत आहे त्या भावाने रुपयाचें नातें स्टर्लिंगशीं कायम टिकविण्याचा सरकारचा निर्धार असून पूर्वीच्या धोरणांत कांहींच फरक झालेला नाही. विलायतेत सर सॅम्युएल यांनी ज्या दिवशीं हा खुलासा केला त्याच दिवशीं इकडे दिल्लीला रिझर्व्ह बॅंक बिलाच्या सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावर लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत चर्चेला प्रारंभ झाला. त्या वेळीं सर जॉर्ज शूस्टर यांनी खासदार सभासदांना असें बजावून सांगितलें कीं, रिझर्व्ह बॅंक बिलांतील रुपयाच्या भावासंबंधीचें कलम लंडन येथे रिझर्व्ह बॅंकेच्या घटनेचा विचार करण्याकरितां नेमलेल्या कमिटीच्या शिफारशीप्रमाणें घालण्यांत आलें असून सरकार याबाबतींत पडतें घेण्यास अगर तडजोड करण्यास तयार नाही.

### लंडन कमिटीचें खरें मत

सर जॉर्ज यांनी लंडन कमिटीच्या रिपोर्टांतील रुपयाच्या भावासंबंधींच्या विवेचनाचा एक भाग तेवढा उचलून व दुसऱ्या भागाकडे बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करून वस्तुस्थितीचा विपर्यास चालविला आहे. रिझर्व्ह बॅंक बिल असेंब्लीला सादर करतांना रुपयाचा जो भाव अस्तित्वांत असेल त्याचा समावेश बिलांत करावा असें विधान लंडन कमिटीच्या रिपोर्टांत आहे हें खरें; परंतु त्याबरोबरच कमिटीने असा स्पष्ट खुलासा केला आहे कीं, 'उपरिनिर्दिष्ट विधान हें रुपयाचा चालू (अठरा पेनी) भाव चांगला अगर वाईट आहे या संबंधीच्या कमिटीच्या मताचें गमक आहे असें समजूं नये. रिझर्व्ह बॅंक ॲक्ट अस्तित्वांत आला एवढ्यामुळे चालू परिस्थितींत बदल होणार नाही हें दर्शविण्याकरितां रुपयाच्या चालू भावाचा समावेश बिलामध्ये येत आहे. कमिटीच्या हिंदी सभासदांमधील बहुमत असें आहे कीं, रिझर्व्ह बॅंकेचें काम सुरळीत चालण्यास सोयीस्कर असा रुपयाचा भाव ठरविणें आवश्यक आहे. या बहुमतवाल्यांचें म्हणणें असें कीं, जगांतील बहुतेक सर्व देशांच्या चलनविषयक धोरणांत फरक घडून आले आहेत. हिंदुस्थानाच्या चलनपद्धतीवर फार ताण पडूं नये म्हणून हे फरक व एतद्विषयक इतर परिस्थिति यांचें योग्य परीक्षण हिंदुस्थानसरकार व कायदेमंडळ यांनी करणें जरूर आहे'.

### लोकपक्षाची मागणी

लंडन कमिटीच्या रिपोर्टांतील या सर्व विधानांचा साकल्याने विचार केल्यास असें आढळून येतें कीं, बिलामध्यें रुपयाच्या कोणत्या भावाचा निर्देश करावा हें जें कमिटीने सुचविलें तें बिलाच्या रचनेच्या सोयीकरितां असून रुपयाचा भाव कोणता असावा हें ठरविण्याची मुभा हिंदुस्थान सरकार व कायदेमंडळ

यांना कमिटीने ठेवली आहे. व याचाच फायदा घेऊन लोकपक्षाचे पुढारी रुपयाचा भाव उतरवि-ण्यांत यावा म्हणून खटपट करीत आहेत. सर सॅम्युअल यांनी सरकारचें धोरण अठरा पेनींचा भाव टिक-विण्याचें आहे असें सांगितलें व सर जॉर्ज यांनी रुपयाच्या भावासंबंधी सरकार तडजोड करणार नाही म्हणून केवढीहि आदापीट केली; तरी हिंदुस्थानाच्या व्यापाराची खालावत चाललेली स्थिति, सुवर्ण–निर्गतींतील घट व स्टर्लिंग–हुंड्यांची वाण हीं लक्षांत घेतां लोकपक्षाच्या मागणीपुढे सरकार सध्यां मान वाकविण्यास तयार नसलें तरी त्यांना आर्थिक परिस्थितीपुढे आज ना उद्यां मान वांकवावीच लागेल.

## युरोपियन कारखानदारांचें तरी ऐका

रुपयाचा भाव उतरावा म्हणून 'करन्सी लीग ऑफ इंडिया' मार्फत सर्व देशभर जी चळवळ चालू आहे, तिला हिंदी लोकांप्रमाणेंच युरोपियन व्यापाऱ्यांचाहि पाठिंबा अधिकाधिक मिळू लागला आहे ही संतोषाची गोष्ट होय. कराचीचे सर मॉंटेग्यू वेब, कानपूरचे मि. रॅम्से स्कॉट, पंजाबचे मेजर डी. वर्नेनन हे गृहस्थ यापूर्वीच करन्सी लीगच्या चळवळींत सामील झाले होते. कानपूरचे दुसरे एक प्रसिद्ध युरोपियन व्यापारी व कारखानदार मि. गॅव्हिन जोन्स यांनी नुकतेंच भाषण करून रुपयाचा भाव कमी करण्याबाबत करन्सी लीगने चालविलेल्या चळवळीला पाठिंबा दिला. ते म्हणाले कीं, 'रुपयाचा भाव अठरा पेनी ठरविण्यांत चूक झाली असें सर्वसाधारण प्रचलित मत आहे असें मला वाटतें. पदार्थांचे भाव इतके उतरतील असें कळलें असतें तर रुपयाचा भाव अठरा पेनी ठरवावा असें मी म्हटलें नसतें, असें स्वतः सर बेसिल ब्लॅकेट हेहि म्हणाल्याचें मला समजलें आहे. जगांतील इतर कोणत्याहि देशांत रिझर्व्ह बँकेच्या कायद्यामध्ये एका देशाच्या नाण्याचा भाव दुसऱ्या देशाच्या नाण्यांत किती असावा याचा निर्देश असल्याचें मला माहीत नाही. अनियमित मुदतीपर्यंत अठरा पेनींचा भाव टिकविता येणें कठिण आहे. सुवर्णनिर्गत झाली एवढी झाली नसती तर अठरा पेनींचा भाव इतके दिवसदेखील टिक-वितां आला असता असें वाटत नाही. सुवर्णनिर्गत थांबली व ती अशीच चालू राहणें शक्य नाही–तर अठरा पेनींचा भाव टिकणें शक्य नाही'. जगांतील सर्व देश आपल्या नाण्याची किंमत उतरवीत असतां हिंदुस्थान भारी भावाला चिकटून कसा राहूं शकेल ? हिंदी लोकांची वस्तु विकत घेण्याची ऐपत सारखी खालावत आहे. १९२८-२९ सालीं हिंदुस्थानांतील व्यापारी वस्तूंची निर्गत आयातीपेक्षा साडेशाऐंशीं कोटींनी अधिक होती. १९३२-३३ मध्ये ती साडे-तीन कोटींवर आली. ही परिस्थिति भयप्रद व चिंताजनक आहे.

## स्वार्थान्ध सरकार !

करन्सीलीगने रुपयाचा भाव उतरविण्या-बाबत चालविलेली चळवळ देशांतील कार-खानदारांनी चालविली आहे असा आरोप करण्यांत येतो. परंतु ठिकठिकाणच्या शेती-संघांचा पाठिंबा करन्सी लीगला मिळत आहे यावरून हा आरोप किती खोडसाळ आहे हें कळून येतें. हिंदी व्यापारी व जनता यांचा विरोध विघा-तक वृत्तीचा व भावनाप्रधान असतो असें म्हणून सरकार हिंदी लोकांच्या मागणीची हेटाळणी करीत असतें. पण सर माँटेग्यु वेब, रॅम्से स्कॉट, मेजर वर्नेनन व गॅव्हिन जोन्स हे तरी सरकारचे विघातक टीका-कार खास नाहीत. वेळोवेळीं सरकार ज्यांच्या पाठिंब्यावर अवलंबून असतें असेच हे गृहस्थ आहेत. गॅव्हिन जोन्स प्रभृति लोकांच्या टीकेकडेहि सरकारने जें हें दुर्लक्ष चालविलें आहे त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते. ती अशी कीं, स्वतःच्या व विलायतेतील लोकांच्या फायद्या-चा प्रश्न आला म्हणजे हिंदुस्थान सरकार हिंदु-स्थानांतील युरोपिअन व्यापाऱ्यांच्या मतालाहि धाब्यावर बसविते !

# इराणांतील स्वदेशी आंदोलन

(ले. श्री. शां. य. नांद्रे, अष्टें–सातारा.)

स्वराज्य या साप्ताहिक पत्रांत 'ईराण का स्वदेशी आन्दोलन ' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. तो मी वाचकांपुढे मांडीत आहें.

'रेजाशाह पेहलवी यांच्या नेतृत्वाखालीं इराणाला आत्मरक्षणाकरिता तयार होणें भाग पडलें आहे. बाहेरील देशाच्या व्यापारिक आक्रमणापासून आत्म–रक्षणाकरिता इराणच्या सरकारानें आयात-निर्यातीला आपल्या हातीं ठेवलें आहे. जर कोणा व्यापाऱ्याला दुसऱ्या देशाहून माल मागवावयाचा असेल तर त्याला तितक्या किंमतीचा देशी माल बाहेर पाठविल्याबद्दल प्रमाण–पत्र द्यावें लागतें. दहा लाख दीनारांच्या मोटारी इराणमध्ये आणणाऱ्या व्यापाऱ्याला प्रथम दहा लक्षांचा माल दुसऱ्या देशाला पाठवावा लागतो. व्यापारी जर स्वतः बाहेरच्या देशाला माल पाठवूं शकत नसेल तर बाहेरच्या देशाला माल पाठविणाऱ्या व्यापाऱ्यांकडून दहा लाख दीनारांबद्दल निर्यात प्रमाणपत्र हजर केल्यावर तो दहा लाखांची आयात करूं शकतो. बाहेरून येणाऱ्या वस्तूंचीं नांवेंहि प्रसिद्ध केलीं जातात. त्या वस्तुखेरीज इराणांत दुसरी कोणतीहि वस्तु येऊं शकत नाही. सुती वस्त्र, चहा, तेल मोटार, सायकल व मशिनरी या ६ वस्तुच इराणांत येऊं शकतात. आणि त्याहि व्यापाऱ्याच्या इच्छेनुसार; नाही तर सरकारी नियंत्रणानुसार. समजा कीं, दहा लाख किंमतीच्या मोटारी एका वर्षांत इराणांत आणण्यास परवानगी आहे. आणि वर्षाच्या पहिल्या महिन्यांतच दहा लाख किंमतीच्या मोटारी आल्या, तर पुढे ११ महिन्यात बाहेरून एकहि मोटार येऊं शकणार नाही. पांच वर्षांपूर्वी इराणांत बाहेरच्या देशांतून आठ कोटी डॉलरचा माल येत होता, पण आता फक्त दोन कोटींचा येत आहे. आणि तितकाच माल इराणांतून बाहेर जात आहे. या बंधनाचा परिणाम असा झाला आहे कीं, इराणी उद्योगाची वृद्धि झाली आहे. ज्या चिजा बाहेरून येऊं शकत नाहीत त्या इराणांत तयार होऊं लागल्या आहेत. अनेक हुन्नरी व व्यापारी यांना काम मिळालें आहे.'

## कै. माधवरावजी व्यंकटेश लेले



जन्म शके १७८०　ज्येष्ठ शु. १५

मृत्यु शके १८५५　मार्ग शु. ५

# स्फुट सूचना

१ कायदेभंगाच्या चळवळींत नोकरशाहीच्या हस्तकांकडून अनेक सूक्तासूक्त प्रकार घडले. परंतु सरकारच्या दंडेलीविरुद्ध एक ब्रहि न उच्चारण्याच्या मनोवृत्तींत त्या वेळचे कायदेभंग करणारे असल्याने नोकरशाहीच्या हस्तकांस मनमानेल तसा धुमाकूळ घालता आला. कायदेभंग करणारांनी प्रसंगोपात्त न्यायमंदिराचें साहाय्य घेतलें असतें तर नोकरशाहीच्या हस्तकांच्या लीलांस पुष्कळच आळा बसला असता, ही गोष्ट ठाणें कोर्टातील एका खटल्याने सिद्ध केली आहे. स. १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळींत वसई तालुक्यांतील भगवानदास नांवाच्या गृहस्थाने भाग घेतला. तेव्हा त्यास एक महिना स. म. व शंभर रुपये दंडाची शिक्षा झाली. दंड देण्याचें श्री. भगवानदास यांनी नाकारलें. तेव्हा भगवानदास याचे वडील श्री. नानाभाई भाईदास शाह यांजकडून पोलिसाने दंड वसूल केला! भगवानदास आपल्या वडिलांपासून विभक्त राहत होते; त्यांचा नानाभाईच्या मिळकतींत कसलाहि हितसंबंध नव्हता. ही गोष्ट नानाभाई यांनी अधिकाऱ्यांच्या नजरेस आणली असतांहि त्यांजकडून दंड वसूल करण्यांत आलाच! तेव्हा श्री. नानाभाई यांनी ठाणें कोर्टांत सरकारवर दावा लावून दंडाची रक्कम परत मागितली. या खटल्याचा निकाल ठाण्याचे असिस्टंट जज्ज मि. दळवी यांनी नुकताच देऊन सरकारने तीन महिन्यांच्या आंत व्याजासुद्धा सर्व रक्कम वादीस परत करावी असा हुकूम दिला. कायदेभंगाच्या काळांत असे प्रकार कांही थोडे झाले नसतील. परंतु न्यायकोर्टावर बहिष्कार घालण्याच्या आत्मघातकी प्रवृत्तीमुळे असे अन्याय उजेडांत आले नाहीत.श्री.नानाभाई यांनी आपल्या हक्कास जागून नोकरशाहीच्या तोंडून त्यांनी गिळलेलें माणिक ओकण्यास लावलें याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

---

२ गेल्या आठवड्यांत व्हाइसरॉयसाहेबांनी हैदराबाद संस्थानास भेट दिली. त्यांच्या सन्मानार्थ निजामसाहेबांनी हैदराबादेस एक खाना दिला. त्या वेळीं भाषण करून व्हाइसरॉयसाहेबांनी वऱ्हाडच्या प्रश्नासंबंधीचा आपला निकाल एकदाचा जाहीर केला. निजामाचें वऱ्हाडावरील सार्वभौमत्व मान्य करण्यांत आलें असून, आताप्रमाणें मध्यप्रांताशीं जोडूनच भावी फेडरेशनमध्ये वऱ्हाड प्रांत समाविष्ट करून घेण्यास निजामांची अनुमति मिळविण्यांत आली आहे. या नवीन निकालाने वऱ्हाड प्रांताच्या आजच्या स्थितींत कांही फरक पडेल असें वाटत नाही.गेल्या वर्ष-दोन वर्षभर स्थानिक सर्वपक्षीय परिषद भरून फेडरेशनमध्ये वऱ्हाडाला स्वतंत्र घटकाचें स्थान प्राप्त व्हावें अशी चळवळ विलायतेंत व हिंदुस्थानांत झाली. त्या स्वरूपाच्या मागणीला वऱ्हाडांतील बहुतेक प्रभावी लोकमत अनुकूल होतें व मध्यप्रांताच्या कायदेमंडळानेहि तसा ठराव केला होता. परंतु त्यांपैकीं कांहीच मान्य झाल्याचें दिसत नाही ही फार खेदाची गोष्ट आहे. वऱ्हाडांतील जनतेस हा निर्णय मुळीच पटणार नाही. श्री. तांबे, श्री. खापर्डे, श्री. रामराव देशमुख वगैरे वजनदार गृहस्थांनी नापसंतीचा अभिप्राय व्यक्तहि केला आहे. निजामांच्या सार्वभौमपणाची वऱ्हाडांत लक्षणें काय काय असावीत तें व इतर कांही तपशील अद्यापि ठरावयाचे आहेत. ते कांही ठरले तरी, वऱ्हाडची आजची कुचंबणा नवीन योजनेंत काडीमात्र कमी होण्याचा संभव दिसत नाही. वऱ्हाड धड निजामाचा नाही, धड ब्रिटिश सरकारचा नाही, ही अवस्था कायम राहणार. वऱ्हाडचा पैसा जास्तींत जास्त वऱ्हाडांतच खर्च व्हावा हें योग्य असता तसें होणार नाही! वऱ्हाडकरितां कायदे करण्याचें जें स्वातंत्र्य वऱ्हाडास पाहिजे तें त्यांना पुढेंहि मिळणार नाही. अशा स्थितींत वऱ्हाडास फेडरेशनमधील स्वतंत्र घटक या नात्याने लेखणें हें जरी अशक्य वाटलें, तरी निदान मध्यप्रांताशी संलग्न राहूनहि त्यास जमाबंदी व कायदेकानू या बाबतींत प्रांतिक हितासाठी जेवढीं संरक्षक बंधनें अवश्य असतील तेवढीं मिळणें न्यायाचें आहे.

# कै. विठ्ठलभाईंचा गुणगौरव

व्हिएन्ना येथील 'हिंदुस्थान अकॅडेमिकल असोसिएशन' मार्फत कै. विठ्ठलभाई पटेल यांच्या निधनानिमित्त दुःख प्रदर्शित करण्यासाठी सभा भरली होती. तिला तेथें राहणारे हिंदी विद्यार्थी तर उपस्थित होतेच; पण शिवाय चीनचे परराष्ट्रमंत्री मि. मिलर, प्रो. ऑपेनेहेन, प्रो. हॅन्स लॅरेन्स प्रो. श्लेसिंजर, मि. हेलिन वगैरे थोर मंडळीहि हजर होती. असोसिएशनच्या अध्यक्षांनी प्रास्ताविक भाषण केल्यानंतर चीनचे परराष्ट्रमंत्री यांनी भाषण केलें. ते म्हणाले, "श्री. पटेल हे माझे निकट स्नेही होते. एक राजकार्यधुरंधर मुत्सद्दी व एक उत्कृष्ट नागरिक अशा दोनहि नात्यांनी त्यांच्याबद्दल माझ्या मनांत गाढ आदर आहे. त्यांच्या अकालीं निधनामुळे केवळ हिंदुस्थानाचीच हानि झाली आहे असें नव्हे, तर सर्व पौर्वात्य राष्ट्रांचें मोठें नुकसान झालें आहे. कारण श्री. पटेल हे सर्व पौर्वात्य राष्ट्रांत एक अत्यंत थोर गृहस्थ होते. त्यांच्या मृत्यमुळें आपण एका मुत्सद्द्याला मुकलों, एका राष्ट्रवीराला आंचवलो आणि त्यामुळे कधींहि भरून न येणारी अशी हानि पौर्वात्य देशांची झाली."

मि. मिलर हे युरोपियनांच्या वतीने म्हणाले, "विठ्ठलभाईंच्या मृत्यूने हिंदुस्थानाची एक राष्ट्रीय विभूति नाहींशी झाली. त्याबरोबरच आम्हा युरोपियनांनाहि हें कळून चुकलें कीं, आपल्या मातृभूमीच्या उद्धारासाठीं जो पुरुष झगडतो, तो अखिल मानवजातीला लागू असणाऱ्या तत्त्वासाठींहि झगडतो. म्हणून, पटेलांचें मोठेपण हें हिंदुस्थानाच्या सीमेपलीकडे सर्वत्र व्यापून राहिलेलें आहे आणि त्यांच्या मृत्यमुळे हिंदुस्थानाचीच नव्हे तर आमचीहि हानि झालेली आहे. अशा खऱ्या लढवय्याचें स्मरण या प्रसंगीं सर्वांस होणें साहजिक आहे."

डॉ. शर्मा यांनी पटेलांच्या स्वातंत्र्य-लालसेचें गमक म्हणून एक आठवण सांगितली. ते म्हणाले, 'पटेलांची प्रकृति बिघडल्यामुळे मीं त्यांना विश्रांति घेण्यास सांगितलें व म्हटलें कीं, तुम्ही पूर्ण विश्रांति घेणें जरूर आहे; पण तुम्ही ती घेत नाही.' तेव्हा त्यांनी मला उत्तर दिलें, "तुम्हा डॉक्टरलोकांची इच्छा अशी कीं, मानसिक विश्रांतिहि आम्ही घ्यावी. पण तसें होणें अशक्य आहे. मायभूमींत स्वातंत्र्याचा लढा चालू असतां त्यापासून मी माझें मन अलिप्त कसें ठेवूं ?"

अशीं भाषणें झाल्यावर दुःखप्रदर्शनाचा ठराव मांडण्यांत आला व तो एकमतानें मंजूर झाला.

## कुलाबा जिल्हा शाखा

महाड येथे लोकशाही स्वराज्य पक्षाच्या आजपर्यंत झालेल्या सभासदांची सभा श्री. बा. ब. जोशी वकील यांचे घरीं ता. १ डिसेंबर १९३३ रोजीं होऊन लोकशाही स्वराज्य पक्षाचे कार्याचा प्रसार या तालुक्यांत करून सदर पक्षास नवीन सभासद मिळविण्याकरितां खालीलप्रमाणे कार्यकारी कमिटी नेमण्यांत आली:—

१ श्री. महादेव बजाजी वीरकर वकील, अध्यक्ष.
२ श्री. बाळकृष्ण बल्लाळ जोशी, वकील. खजिनदार.
३ डॉ. माधवराव बाबूराव पोवार.
४ श्री. वामन राजचंद्र जोशी, वकील.
५ श्री. सुंदर मेठा बुटाला.
६ श्री. पुरुषोत्तम प्रभाकर जोशी.
७ डॉ. काशिनाथ पांडुरंग पटवर्धन.
८ श्री. चिंतामण कृष्ण ओक.
९ अनंत मोरेश्वर पिंगळे, वकील, चिटणीस.

याप्रमाणे कार्यकारी कमिटी नेमली असून या तालुक्यांत लोकशाही स्वराज्य पक्षाचे नवीन सभासद करून घेण्याचें ठरलें.

## गीतास्तव

(चाल—मितभाषिणी)

मोक्षदानी हीच जनबोधिनी, भुवनीं
सकल अघहरिणी । तोषवी । भवभयतापास
वारोनी ॥ ध्रु० ॥

मायें भ्रमल्या पार्थाकरितां
रमानायकें त्यातें कथितां
संशय विरुनी गांडिव घेतां
मधुरिपुसि सुखवी नीच मारोनी ॥ मोक्षदानी० ॥ १ ॥

धर्म आपुला कधिं नच त्यजितां
आशाविरहित कर्में करितां
टाकुनि मीपण, हरिसि अर्पितां
निरयगति चुकवी ज्ञान देवोनी ॥ मोक्षदानी० ॥ २ ॥

पुणें. | —वा. ग. जोशी.

# रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावरील

# प्रास्ताविक चर्चेचा निष्कर्ष

## खासदार भेदरले !

रिझर्व्ह बँक बिलावरील सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट विचारात घ्यावा या सर जॉर्ज शुस्टर यांच्या ठरावावरील चर्चा गुरुवार ता. १४ रोजीं पुरी होऊन तो ठराव मतें न मोजतांच संमत झाला. या ठरावावरील चर्चेत जी एक गोष्ट प्रामुख्याने दिसून आली ती अशी कीं, रिझर्व्ह बँकेच्या स्थापनेवर नवीन सुधारणांचें भवितव्य सरकारानें अवलंबून ठेवल्यामुळे बहुतेक सर्व खासदार भेदरले गेले असून बिलाचे तारूं विरोधाच्या खडकावर फुटूं देतां कामा नये या मताचे ते बनले आहेत. सन १९२७ च्या रिझर्व्ह बँक बिलाचे दोन प्रमुख विरोधक श्री. रंगा अय्यर व श्री. बी. दास यांनी पांच वर्षांपूर्वी आपण रिझर्व्ह बँक बिलाची मोडतोड केली याबद्दल खेद प्रदर्शित करून आपण या नवीन बिलांत सुधारणा सुचविल्या तरी पूर्वीची चूक करणार नाही असे पश्चात्तापाचे उद्गार काढले ! श्री. बी. दास यांच्यासारख्या स्वतंत्र व राष्ट्रीय वृत्तीच्या सभासदामधील इतका लवचीकपणा सरकारच्या दृष्टोत्पत्तीस आल्यावर लोकपक्षीय खासदारांनी कितीहि अट्टाहास केला तरी, त्यांच्या कोणत्याहि मागणीपुढे बिलाच्या कलमवार चर्चेच्या वेळीं, सरकार नमतें घेणार नाही हे उघड आहे.

## भागीदारांच्या हक्कांचा मागमूसहि नाहीं

सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टाच्या प्रास्ताविक चर्चेत ज्या मुद्द्यांचा विशेष खल झाला त्यांपैकीं पहिला मुद्दा रिझर्व्ह बँक भागीदारांच्या मालकीची असावी कीं सरकारी मालकीची असावी असा होता. या प्रश्नासंबंधीं खासदारांमध्ये बराच मतभेद दिसून आला व बहुमतहि बँक भागीदारांच्या मालकीची असावी या बाजूचेंच दिसलें. डॉ. झियाउद्दीन अहमद हे साधारणपणें सरकारच्या बाजूने असतात. परंतु रिझर्व्ह बँक बिलाबाबत मात्र त्यांनी कट्टया स्वराजिस्टाची भूमिका पत्करली आहे ! बँक भागीदारांची न करतां सरकारीच कां असावी या बाबत ते व श्री. के. सी. नियोगी यांचीं भाषणें माहितीपूर्ण झालीं. डॉ. झिआउद्दीन यांनी १९२८ सालीं सर बेसिल ब्लॅकेट हे सरकारी बँकेच्या योजनेला अनुकूल असल्याचा दाखला दिला व सांगितलें कीं, बँकेला राजकारणाचा संपर्क असूं नये म्हणून जर बँक भागीदारांच्या मालकीची करावयाची असेल तर रिझर्व्ह बँक बिलांतील कोणत्याहि कलमाशीं गव्हर्नर जनरल व स्टेट सेक्रेटरी यांचा संबंध येऊं देता कामा नये. भागीदारांकडून बँकेच्या कारभाराचे नियमन फारच कमी होऊं शकतें या गोष्टीवरहि त्यांनी जोर दिला. श्री. नियोगी यांनी बँकेवर भागीदारांची कशी सत्ता चालणार नाही याचे मुद्देसूद विवेचन करून भागीदारांच्या हातीं बँकेवर हुकमत चालविण्याची यत्किंचितहि सत्ता नसलेली भागीदारी पद्धतीची रिझर्व्ह बँकेची योजना हिंदुस्थानाच्या माथीं मारण्यांतील सरकारचा अंतःस्थ हेतु बँकेच्या कारभारावरील खरा ताबा व्हाइटहॉलमध्ये अधिष्ठित झालेल्या बड्या मोंगलाच्या हातीं देण्याचा आहे असें सांगितलें. श्री. नियोगी पुढे म्हणाले कीं, बँक भागीदारी पद्धतीची करण्यांत यावयाची असूनहि बिलामध्ये भागीदारांच्या हक्कांचा कोठेच सुगावा नाही. भागीदारांना बँकेसंबंधी कोणत्याहि प्रश्नाचा विचार करण्याकरिता सर्वसाधारण सभा बोलावण्याचा अधिकारहि बिलानें दिलेला नाही! श्री. बी. दास यांनी बँक सरकारी मालकीची असावी असें प्रतिपादन केलें. परंतु ती तशी होणार नसेल तर ती शक्य तितकी लोकमतानुवर्ति होण्याकरिता कोणालाहि एका भागापेक्षा अधिक भाग विकत घेतां येऊं नये व एकापेक्षां अधिक मतें असूं नयेत. असें सांगितलें.

## पंक्तिप्रपंचीचा बागुलबोवा

रिझर्व्ह बँकेच्या भागीदारांपैकीं व नियामकांपैकीं तीनचतुर्थांश भागीदार व नियामक हिंदीच असावे असें कायद्यानें ठरवावें अगर ठरवूं नये हा दुसरा महत्त्वाचा मुद्दा होता. सर जॉर्ज यांनी आपल्या भाषणांत असें प्रारंभींच सांगितलें कीं कमींत कमी किती भागीदार व नियामक हिंदी असावे असें कायद्यानें ठरवूं नये. कारण त्यामुळे हिंदी व ब्रिटिश नागरिक असा पंक्तिप्रपंच केल्यासारखें होईल, व हिंदुस्थानांत राहणाऱ्या ब्रिटिश नागरिकांना हिंदी नागरिकांच्या बरोबरीचे हक्क मिळावे असें जें ठरलें आहे, त्याला बाध येईल. परंतु त्यांनी असा खुलासा केला कीं इम्पीरिअल बँक ज्या प्रेसिडेन्सीचे बँकांच्या एकीकरणामधून उत्पन्न झाली त्यांचे भाग युरोपिअनांच्या मालकीचे असूनहि आज इम्पीरिअल बँकेचे शेंकडा पांसष्ट भाग हिंदी लोकांच्या हातीं आले आहेत. ही गोष्ट लक्षांत

घेतां प्रत्यक्ष व्यवहारांत रिझर्व्ह बँकेचे तीन-चतुर्थांशाहून अधिक भाग हिंदी लोकांच्या मालकीचेच राहतील व गव्हर्नर जनरल हे बँकेच्या पहिल्या नियामक मंडळाची नेमणूक करतांना हिंदी लोकांना योग्य तें प्रतिनिधित्व देण्याची खबरदारी घेतील. एस. सी. मित्र यांनी सर जॉर्ज यांना पाठिंबा दिला ! या मुद्द्यावरील एकंदर चर्चा लक्षांत घेतां असें वाटते कीं, लोकनियुक्त खासदारांना बँकेचे तीनचतुर्थांश भाग हिंदी लोकांच्या हातीं असावे व तीनचतुर्थांश नियामक हिंदी असावे असें वाटत असलें तरी कायद्यानें तशी योजना करावी या सूचनेला फारसा पाठिंबा मिळेल असें वाटत नाही. सर जार्ज यांच्या भाषणानें बऱ्याच सभासदांना भुरळ पडली एवढें मात्र खरें !

### सत्येंद्र मित्रांचा बदसूर

ज्या एका मुद्द्यावर लोकपक्ष विशेष संघटित दिसतो तो मुद्दा रुपयाच्या भावासंबंधीचा. रिझर्व्ह बँक सरकारी होवो अगर न होवो, ती भागीदारांची झाल्यास तिचे तीनचतुर्थांश भांडवल हिंदी मालकीचें असावें अशी कायदेशीर योजना होवो वा न होवो, परंतु रुपयाचा भाव अठरा पेनी असतां कामा नये या मुद्द्यावर लोकनियुक्त खासदारांपैकीं बहुतेकजणांचें एकमत आहे. या बाबतींत ज्या थोड्या खासदारांनी बदसूर काढला त्यांत बंगालचे श्री. सत्येन्द्र चंद्र मित्र हे प्रमुख होत. त्यांनी असें सांगितलें कीं, 'बंगालमध्ये या प्रश्नाबाबत दोन मत आहेत. रुपयाचा भाव उतरविल्यानें हिंदुस्थानच्या तिजोरीचा तोटा होईल. बरें, रुपयाचा भाव उतरविल्यानें बाजारभाव चढतील अशी हमी कोणीहि देऊं शकत नाहीं, बंगालमध्ये रुपयाचा भाव उतरविण्याबाबत दुमत आहे असें जे विधान श्री. मित्र यांनी केलें तें अर्धवट स्वरूपाचें आहे ! इंडियन मर्चंटस् चेंबर व बेंगाल नॅशनल चेंबर ऑफ कॉमर्स या बंगालमधील दोन प्रमुख व्यापारी संस्था होत. या दोनहि संस्थांनी रुपयाचा भाव अठरा पेनी कायम करूं नये असें आग्रहाने प्रतिपादन केलें आहे. ' रुपयाचा भाव अठरा पेनी असल्यामुळे बंगालला नवीन उद्योगधंद्याकरिता यंत्रसामुग्री स्वस्त दराने विकत घेतां येते ' 'रुपयाचा भाव उतरल्यास बंगालच्या औद्योगिक प्रगतीला खीळ बसेल' हीं व अशा तऱ्हेचीं बरींच विक्षिप्त विधानें आचार्य सर प्रफुल्लचंद्र रे यांनी केलीं आहेत. व तिकडील इतर कांहीं लोकांनी आचार्य रे यांच्या या मताचा बराच गाजावाजा केला आहे. परंतु आचार्य रे यांची विचारसरणी कोती व वस्तुस्थितीचा विपर्यास करणारी आहे, असें 'फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्रीज' चे अध्यक्ष श्री. नलिनीरंजन सरकार व श्री. निर्मल चंद्र घोष या दोन बंगाली गृहस्थांनी करन्सी लीग ऑफ इंडिया संस्थेच्या वतीने लिहिलेल्या पत्रकांत सप्रमाण दाखविलें आहे.

### सत्येंद्र मित्रांना पडलेली भ्रान्त

रुपयाचा भाव उतरविल्यास बाजारभाव चढतील अशी हमी कोणी देत नाही हें सत्येंद्र मित्र यांचे विधान भ्रांतिमूलक आहे. १९३१ च्या सप्टेंबरमध्ये स्टर्लिंगची सुवर्णापासून फारकत झाली व रुपयाचा संबंध सोन्याशीं तोडून स्टर्लिंगशीं जोडण्यांत आला व त्यामुळे सोन्यामधील रुपयाची किंमत कमी झाली. त्यामुळे हिंदुस्थानांतील शेतीच्या पदार्थांचे भाव चढले. १९३१ च्या सेप्टेंबरमध्ये ताग व चहा यांच्या बाजारभावाचे इंडेक्स नंबर अनुक्रमें ५१ व ७३ होते; डिसेंबरमध्ये ते अनुक्रमें ५८ व ७८ झाले. रुपयाचा संबंध बिनबुडाच्या स्टर्लिंगशीं जोडल्यामुळे रुपयाचा सुवर्णभाव उतरला, परंतु १९२७ सालीं सोळा पेनींऐवजी रुपयाचा भाव अठरा पेनी केल्यामुळे जें नुकसान झालें तें नुकसान कायमच आहे रुपयाचा भाव अठरा पेनींवरून खाली आणून पूर्वीचा अन्याय दूर करा अशी जनतेची मागणी आहे. रुपयाच्या अठरा पेनी भावाने एक पौंडाला जे तेरा रुपये पांच आणे मिळतात त्याऐवजी अठरा पेनींपेक्षा कमी भावानें अधिक रुपये मिळूं लागतील म्हणजे वस्तूंच्या रुपयांतील किंमती वाढतील हें उघड आहे.

### बंगाल विरुद्ध मुंबई !

अखिल हिंदुस्थानांतील प्रमुख युरोपियन व हिंदी कारखानदार, जमीनदार, व्यापारी, शेतकरी वगैरेंनी रुपयाचा भाव कमी करण्याबाबत जी मागणी केली आहे तिला बंगालमधील ज्या कांहीं लोकांनी विरोध चालवला आहे, त्यांच्या विरोधाचे अधिष्ठान शास्त्रीय विचारसरणी नसून प्रांताभिनिवेशावर आहे. बंगाल विरुद्ध मुंबई ही भावना या विरोधाच्या मुळाशीं आहे. मुंबईच्या व्यापारी—कारखानदारांच्या स्वार्थी धोरणाबद्दलच्या नेहमीच्या तक्रारींत कितीहि सत्य असलें तरी त्यामुळे रुपयाचा भाव कमी करावा ही मागणी चुकीची अगर या मागणीला बंगालमधील कांहीं लोकांनी केलेला विरोध उचित ठरत नाही. रुपयाच्या अठरा पेनी भावाचें समर्थन करणाऱ्या गृहस्थांचें पहिलें म्हणणें असें कीं रुपयाचा भाव उतरविण्याची चळवळ मुंबईच्या गिरणीवाल्यांच्या हिताकरिता असून मुंबईचें बंगालवरील औद्योगिक वर्चस्व चालू राहावें हा त्या चळवळीचा

अंतस्थ हेतु आहे. परंतु हा मुद्दा काढणाऱ्यांना वस्तुस्थितीचें ज्ञान तरी नाही अगर त्यांनी जाणूनउमजून अज्ञानी असल्याचा बहाणा तरी खास केला आहे. रुपयाच्या अठरा पेनी भावाने त्याहूनें कमी भाव असण्यापेक्षा यंत्रसामुग्री स्वस्त दराने मिळते हे खरें. परंतु गेल्या पांच वर्षांतील गिरण्यांना लागणाऱ्या यंत्रसामुग्रीचे बंगालमधील व मुंबईमधील आयातीचे आंकडे पाहिले तर असें दिसते कीं बंगालच्या आठपट अधिक आयात मुंबईमध्ये झाली. अर्थातच रुपयाचा भाव कमी झाल्याने यंत्रसामुग्रीचे भाव वाढून कोणाचें अधिक नुकसान होणार असेल तर तें मुंबईच्या गिरणीवाल्यांचें होणार आहे.

**रुपयाचा भाव उतरवणेंच बंगालच्या हिताचें आहे**

रुपयाच्या अठरा पेनी भावामुळे यंत्रसामुग्री स्वस्त मिळते व तो कमी केल्यास ती महाग होईल हें खरें. परंतु यंत्रसामुग्री महाग झाली तरी त्याचा बंगालच्या औद्योगिक प्रगतीवर अनिष्ट परिणाम होईल हें म्हणणें कसें चुकीचें आहे हें श्री. नलिनी रंजन सरकार यांनी सोदाहरण दाखविले आहे. आपण अशी कल्पना करूं कीं रुपयाचा भाव अठरा पेनी असतांना बंगालमध्यें एक नवी गिरणी काढण्याचें ठरलें व त्याकरिता लागणाऱ्या यंत्रसामुग्रीला तेरा लक्ष तीस हजार रुपये पडले. यंत्रसामुग्री दहा वर्षे टिकेल असें आपण धरून चालूं. यंत्रसामुग्रीवर प्रतिवर्षी कमींत कमी दहा लक्ष रुपयाचा माल काढतां येईल. रुपयाचा भाव सोळा पेनी केला तर यंत्रसामुग्रीला पंधरा लक्ष रुपये पडतील, परंतु बाजार साडेबारा टक्क्यांनी चढल्याने त्याच यंत्रसामुग्रीवर प्रतिवर्षी निघणाऱ्या मालाची किंमत लाख सवा लाखाने वाढेल व पहिल्याच वर्षी यंत्रसामुग्रीच्या खरेदीवर झालेला एक लक्ष वीस हजारांचा तोटा भरून निघून पुढील नऊ वर्षे दरवर्षी जादा लाख-सवा लाख रुपये बंगाली गिरणीवाल्यांच्या पदरात पडतील. रुपयाच्या अठरा पेनीच्या भावापेक्षा त्याहून कमी भाव औद्योगिक उन्नतीला जास्त पोषक आहे हें उघड आहे.

**आचार्य रे यांचा कांगावा**

आचार्य रे यांनी यंत्रसामुग्रीच्या किंमतीप्रमाणेच वृत्तपत्रांकरिता लागणाऱ्या कागदाच्या किंमती वाढतील व त्यामुळे बंगालचे नुकसान होईल असाहि कांगावा केला आहे. आचार्य रे यांच्या या कांगाव्यांतील फोलपणा दाखवितांना श्री. निर्मल चंद्र घोष यांनी असें म्हटलें आहे कीं, कागदाच्या किंमती वाढल्यामुळे बंगालबरोबर मुंबईच्या वृत्तपत्रकर्त्यांचाहि तोटा होणार आहे. वर्तमानपत्रांच्या धंद्याच्या यशस्वितेचा जाहिराती हा पाया आहे. सध्याच्या व्यापारमंदीमुळे जाहिरातदारांकडून ज्या कांही जाहिराती येतात त्यांची वसूलीहि होणें कठिण झालें आहे. रुपयाचा भाव कमी केल्याने बाजारभाव वाढून व्यापारउदीम तेज होईल व जाहिरातींचेंहि उत्पन्न वाढेल.

रुपयाचा भाव कमी केला असतां बाजारभाव वाढून निर्गत व्यापाराचा फायदा होईल. १९३२-३३ सालीं बंगालमधून ५५ कोटि ८८ लक्ष रुपयांची निर्गत झाली व मुंबईतून २३ कोटि २ लक्ष रुपयांची झाली. निर्गत व्यापाराच्या दृष्टीने रुपयाचा भाव कमी झाल्याने मुंबईपेक्षा बंगालचाच फायदा अधिक होणार हें उघड आहे.

**आता तरी बंगालला सुबुद्धि सुचली !**

रुपयाचा भाव कमी केल्याने जो फायदा होण्यासारखा आहे तो एकट्या बंगालचा अगर मुंबईचा नसून सर्व देशाचा आहे. आचार्य रे हे विज्ञानशास्त्री आहेत व आचार्य देवांबद्दल बंगाललाच काय परंतु अखिल हिंदुस्थानाला गाढ आदर वाटतो. परंतु राष्ट्रीय अर्थशास्त्र हा त्यांचा विषय नसतां त्यांनी १८ पेनी भावाला अकारण पाठिंबा देऊन स्वतःचें नसतें हंसे मात्र करून घेतलें आहे. वस्तुस्थितिवर निर्दिष्ट केल्याप्रमाणे असतां बंगालमध्ये व्यापारी संघाचें मत प्रमाणभूत न धरतां श्री. मित्र यांच्या सारख्या राष्ट्रीय वृत्तीच्या गृहस्थानें बंगालमधील मूठभर स्वार्थी लोकांनी आचार्य रे यांच्या भोळ्या मताच्या माजवलेल्या अवडंबराला महत्त्व द्यावें हें आश्चर्य होय ! करन्सी लीगच्या वतीने लीगचे अध्यक्ष शेठ मथुरादास वसनजी व सेक्रेटरी श्री. ए. डी. श्रॉफ हे बंगालमधील विरोधाचें मूळ नाहीसें करण्याच्या उद्देशाने कविवर्य रवींद्र नाथ टागोर यांचा आशीर्वाद घेऊन गेल्या आठवड्यांत कलकत्त्यास गेले होते. त्याचें अंगीकृत कार्य यशस्वी झालें असून डॉ. बिधनचंद्र रॉय, मि. फझलुल हक्क, श्री. तुषारकान्ति घोष, मि. अदमजी हाजी दाऊद प्रभृति बंगाल्यातील विविध पक्षाच्या व व्यापारी संस्थांच्या सोळा पुढाऱ्यांनी रुपयाचा भाव कमी करण्याच्या मागणीला पाठिंबा दिला आहे. आता तरी खासदार श्री. सत्येंद्र मित्र हे रुपयाच्या भावाचा प्रश्न असेंब्लींत चर्चेला आला म्हणजे बंगालमधील रुपयाच्या भावावरील दुमत नाहीसे झालें असें सांगून रुपयाच्या अठरा पेनी भावाला विरोध करतील असा आम्हाला भरंवसा आहे.

# मावळत्या गव्हर्नराची कारकीर्द

मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स आपली पांच वर्षांची कारकीर्द संपवून उद्दईक विलायतेस प्रयाण करणार आहेत. नवीन गव्हर्नर लॉर्ड ब्रॅबोर्न हे आज मुंबईस येऊन दाखल होणार आहेत आणि शास्त्रोक्त रीतीने शपथविधि होऊन राज्यकारभाराचीं सूत्रेंहि हातीं घेणार आहेत. वास्तविक पाहिलें तर, एक गव्हर्नर गेला काय व दुसरा आला काय, त्या गोष्टीचें राज्यकारभाराच्या दृष्टीने फारसें महत्त्व नसतें. कारण हें राज्ययंत्रच अशा रीतीने बनून गेलें आहे कीं, कोणीहि अधिकारी असला तरी त्या यंत्राच्या गतीबरोबर तोहि आपोआप व्यवस्थित रीतीने गतिमान होतो. गव्हर्नरासारखा नोकरशाहीच्या देव्हाऱ्यांतील बडा हुद्देदार असला तरी तोदेखील या यंत्राच्या गतींत विशेष ढवळाढवळ करूं शकत नाही. अशी स्थिति असल्याकारणाने व सामान्यतः दर पाच वर्षांनी नेमाने येणारे सर्वच गव्हर्नर एकाच परंपरेंत मुरलेले असे असल्याकारणाने त्यांच्या येण्या-जाण्याचा हर्ष-विषाद मानण्याचें हिंदी जनतेस सहसा प्रयोजन नसतें. तथापि पंचवार्षिक राजवट एका गव्हर्नरच्या नांवाशीं संलग्न होत असल्याकारणाने, मागे काय झालें व पुढे काय व्हावें हें पाहण्याच्या दृष्टीने त्या कालखंडांतील इतिहासाचा आढावा घेणें विचारप्रवर्तक ठरतें.

सन १९२८ च्या डिसेंबर महिन्यांत सर फ्रेडरिक गव्हर्नर झाले. मध्यंतरीं १९३१ सालीं २६ एप्रिलपासून २२ ऑक्टोबरपर्यंत ते विलायतेंत रजेवर असतांना सर अर्नेस्ट हॉटसन ॲक्टिंग गव्हर्नर होते; तो अवधि सोडल्यास परत जाईपर्यंत सर फ्रेडरिक यांची कारकीर्द सुमारें साडेचार वर्षांची होते. हा सर्व काळ इलाख्यास अतिशय धामधुमीचा व हलाखीचा गेला यांत संशय नाही. जागतिक मंदी, राजकीय चळवळ, जातिजातींतील दंगे, आर्थिक आपत्ति वगैरे अनेक कारणांनी परिस्थिति अत्यंत चमत्कारिक झालेली होती. तें कांही असलें तरी, एखादा अधिक कर्तृत्ववान्, अधिक उदारमतवादी, अधिक लायक व अधिक स्वतंत्र बुद्धीचा गव्हर्नर सर फ्रेडरिक यांचे जागीं असता, तर त्याच्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत जनमनांतील वाढलेल्या असंतोषाची प्रखरता किंचित् तरी कमी झाली असती असें म्हणण्यास जागा आहे. कांही गुण सोन्याचा व कांही सोनाराचा हे जसें खरें तसेंच कांही दोष परिस्थितीचा व कांही अधिकारारूढ व्यक्तीचा हेंहि खरें असतें. त्यांच्या पूर्वीचे गव्हर्नर जातां जातां बार्डोलीचा लढा मिटविण्याचें श्रेय पदरांत पाडून घेऊन गेले. व सर फ्रेडरिक हे जातांना दडपशाहीच्या कायद्याची मुदत आणखी बारा महिन्यांनी वाढवून जात आहेत. एवढ्यावरूनहि 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायाने उभयतांच्या कारकीर्दींतील अंतर कोणाच्याहि नजरेंत भरेल.

सर फ्रेडरिक यांच्या कारकीर्दीचा सार्वत्रिक दडपशाही हा स्थायी भाव होय असेंच म्हणणें प्राप्त होतें. १९३० सालांतील व १९३२ सालांतलि कायदेभगाची चळवळ त्यांच्याच कारकीर्दींत पडल्याकारणाने त्या चळवळींचा काळ प्रत्यक्ष दडपशाहींतच गेला व उरला तो मागील-पुढील काळ दडपशाहीच्या पूर्वतयारींत व पश्चात्परिणामांतच गेला. एकूण पांचहि वर्षें दडपशाहीच्या धामधुमींतच गेलीं म्हटलें तरी त्यांत अत्युक्तिदोष नाही. या दडपशाहींत सरकारने काय करावयाचें बाकी ठेवलें होतें? मागे अनुभविलेलीं दुःखें पुनः स्मरणांत आणलीं म्हणजे सुखासारखीं वाटतात असें म्हणतात. पण गेल्या पांच वर्षांत जनतेने जीं जीं अस्मानी-सुलतानी संकटें सोसिलीं त्यांचा शांतपणाने विचार मनांत आणणें हेंदेखील अत्यंत दुःखप्रद होऊन बसलें आहे. शेंकडों सार्वजनिक कार्य करणाऱ्या संस्था गैरकायदा म्हणून ठरविल्या गेल्या; खासगी घरें काबीज करून ठेवलीं; हजारों लोक तुरुंगांत पाठविले; निरपराध

लोकांवर लाठीमार झाला; स्त्रियांना फरफटत ओढून नेलें; वर्तमानपत्रांची मुस्कुटदाबी केली; स्वयंसेवकांवर घोडेस्वार घातले; गोळीबार केला; लष्करी अंमल पुकारला; जमिनी जप्त केल्या! अशी ही यादी किती म्हणून लांबवावी?

खरोखर या सगळ्या कृत्यांची आठवण झाली म्हणजे कोणाहि सहृदय माणसाचें काळीज चर्र झाल्याखेरीज राहत नाही. आणि या विविध दडपशाहीवर १९३० च्या मे-जून महिन्यांत सोलापुरांत घडलेल्या प्रकारांनी तर कळसच चढविला! हत्तीच्या पायांत सर्वांचे पाय सामावतात त्याप्रमाणें सोलापुरांत ज्या गोष्टी घडल्या त्यांच्या पोटांत साइक्ससाहेबांच्या रियासतींतील दडपशाहीच्या सर्व कृत्यांचा समावेश होऊं शकतो. बार्डोली, बिळाशी, चिरनेर, धारासणा, शिरोडा वगैरे सर्व नांवें 'सोलापूर' या एका नांवांत अंतर्भूत होतात. त्यांतल्या त्यांत विशेष चीड आणण्यासारखी गोष्ट ही कीं, सोलापुराची स्थिति स्वतःस यथास्थित ठाऊक असतांना सर फ्रेडरिक जेव्हा सोलापुरास मानपत्र स्वीकारण्यास गेले तेव्हा त्यांच्या तोंडून तेथील लोकांच्या समाधानासाठी एक अवाक्षरहि निघालें नाही, किंबहुना आपण त्या गांवचेच नाही असें त्यांनी त्या प्रसंगीं वर्तन केलें!! तथापि गव्हर्नरसाहेब या सर्व हकीकती विसरले तरी इलाख्यांतील जनता मात्र त्या कदापि विसरणार नाही.

परंतु ही एक दडपशाहीची गोष्ट बाजूस ठेवली तरी दुसऱ्या कोणत्याहि बाबतींतदेखील सर फ्रेडरिकसाहेबांच्या अंगच्या गुणांची साक्ष जनतेस पटली नाही. त्यांच्या अमदानींत मुंबईत दोनतीनदा हिंदु-मुसलमानाचे दंगे झाले. १९३२ सालांतील दंग्यांचा वणवा तर कित्येक आठवडे पेटत राहिला होता. शांतता व सुव्यवस्था यांची सदैव तीव्र चिंता वाहणाऱ्या नोकरशाहीला तो दंगा अधिक तातडीने थांबवितां यावयास पाहिजे होता. राजकीय क्षेत्रांत एखादा मनुष्य शांततेस बाधक असें कृत्य करण्याच्या बेतांत आहे असा सरकारास जरा संशय आला कीं, त्यास सरकार बिनदिक्कत अटक करीत होतें. मग ज्यांनी जातिजातींत वैमनस्य उत्पन्न करण्याचा विडाच उचलला होता अशा गृहस्थांस मुंबईत येऊं व वावरूं दिलें नसतें तर दंग्याचा उपशम लवकर झाला नसता काय? ब्राह्मण—ब्राह्मणेतर वादांतसुद्धा जेव्हा जेव्हा प्रसंग आला तेव्हा तेव्हा तो नष्ट कसा होईल याविषयी कोणतीहि उपाययोजना केली गेली नाही. परवाच कौन्सिलांतील ब्राह्मणेतर पक्षाने त्यांस निरोपाचें मानपत्र दिलें. त्यास उत्तर देतांना त्यांनी त्या पक्षाची पाठ थोपटली व कौन्सिलांत अत्यंत संघटित असा तुमचाच पक्ष आहे, नवीन घटनेंत तुमच्या जातीला राजकीय सत्तेच्या वाढीचें फळ मिळेल, असें म्हणून शाबासकी दिली! मुंबई इलाख्यांत जात्यंधता विशेष प्रकाराने बोकाळत असतां एखाद्या वरिष्ठ अधिकाऱ्याने तिला आळा घालण्याचा अल्पस्वल्प प्रयत्न केला असता तरी तो खात्रीने उपकारकर्ता ठरला असता.

आर्थिक संबंधांत अशीच रडकथा या कारकीर्दींत चालू होती. जमिनीवरील करांचा बोजा बिलकुल कमी झाला नाही. उलट कांही कर वाढलेच! थॉमस कमिटी काटकसरीसाठी नेमली, पण तिच्या शिफारशीवरून दांत कोरून पोट भरत नाही हेंच सिद्ध करण्यापलीकडे दुसरें कांही झालें नाही. कोठे उन्हाळ्यांतील महाबळेश्वरचें सरकारचें वास्तव्य कमी कर, कोठे एक दिवाणपद रद्द कर, अशा जुजबी छाटाछाटीने मुंबई-सरकारच्या पूर्वीच्या अमर्याद खर्चाची तूट भरून निघाली नाही व वाढत्या संसाराची तोंडमिळवणी होऊं शकली नाही हें उघड आहे. पुढील सालचें म्हणजे १९३३–३४ चें बजेट समतोल होईल या आशेकडे गव्हर्नर साहेब बोट दाखवून आपल्या प्रजेचें समाधान करूं पाहात आहेत आणि यदाकदाचित् ही आशा केवळ आकाशपुष्पवत् न ठरली तरी, जनतेच्या डोक्यावरील जुन्या—नव्या करांचा भार त्यांना झेंपण्याइतका कमी झाल्याखेरीज बजेटाचीं तोंडें

मिळाली काय किंवा न मिळाली काय, जनतेस त्याचा तादृश फायदा बेताचाच.

सर फ्रेडरिक यांच्या कारकीर्दीतील कौन्सिलांतील कार्याची कहाणीहि अशीच निराशामय आहे. वटहुकुमी कायदा सरकाराने आपल्या ताटाखालच्या मांजरांप्रमाणें वागणाऱ्या सभासदांच्या साहाय्याने पसार करून घेतला हा मोठ्यांत मोठा पराक्रम झाला. हा कायदा एक वर्ष मुंबई इलाख्यास पुनः लागू करण्यांत आला ही एक गव्हर्नर साहेबांची प्रयाणकाळची मोठी देणगीच होय! कराचीच्या म्युनिसिपालिटीच्या सुधारणेचें महत्त्वाचें बिल पसार झालें; परंतु त्यांतहि जातिनिष्ठ मतदारसंघाचें कलम घालून ठवण्याची खबरदारी घेण्यांत आली आहे ग्रामपंचायतीचा कायदा झाला आहे; पण त्याची अंमलबजावणी होऊं लागून कांही तरी दृश्य फळें येईपर्यंत त्याविषयी कांहीच सांगतां येत नाही. महाराष्ट्र विद्यापीठाविषयी आपणांस कांहीं पोटतिडीक आहे असें गव्हर्नरसाहेबांनी दाखविलें; तथापि त्या कल्पनेमुळे शिक्षणमंत्री व गव्हर्नरसाहेबांचें कार्यकारी मंडळ यांच्या पोटांतच कळ उठल्यामुळे गव्हर्नरसाहेबांचेहि मनोरथ जागच्या जागीं मोडून पडले. आपल्या अख्या अमदानींत चिरस्मरणीय असें आपल्या हातून कांहीच झालें नाही या जाणीवेनें म्हणा किंवा सरकारचें वरून यंत्र फिरलें म्हणून म्हणा, गव्हर्नरसाहेबांनी कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं ग्रामोद्धाराचा प्रश्न हातीं घेतला असें दिसतें. गुजराथ, कर्नाटक व महाराष्ट्र या भागांत पाटलांचे व शेतकऱ्यांचे दरबार भरवून त्यांनी ग्रामोद्धाराचा शाब्दिक थाट उडविला.सर्व भाषणांतून त्यांनी ग्रामोद्धाराचा जयघोष चालविला. पण ग्रामोद्धाराचें हें बाळ जनतेच्या राष्ट्रीयत्वाच्या भावनेला कितपत पोषक होईल तें अद्यापि दिसावयाचेंच आहे.

कित्येक लोक उगवत्या सूर्याची आराधना करणारे असतात; कित्येक मावळत्या सूर्याची उपासना चालवितात; पण उगवते व मावळते गव्हर्नर यांची अशी स्थिति असते कीं,त्या उभयतांवरहि पुष्प संभार कांही हळव्या राजनिष्ठ लोकांकडून संवयीनेच होत असतो. त्याप्रमाणे मावळत्या गव्हर्नरसाहेबांवर तर मानपत्रांचा वर्षाव झाला व त्यांनीहि आपल्या परीने भेटींची व भाषणांची खैरात वांटली. मुंबईच्या कॉर्पोरेशनने दोघांनाहि मानपत्रें बहाल करून आपल्या राजनिष्ठेची ग्वाही दिली. परंतु हा सारा औपचारिक विधि आहे व याला याहून जास्त महत्त्व कोणी समंजस मनुष्य देतहि नाही. मानपत्रांत ज्या गुणांचा निर्देश असेल व ज्या लोकसेवेचा गौरव केला असेल ते सर्व गुण व तो सर्व गौरव परमार्थतः खरा आहे असें मानून सर फ्रेडरिक मुंबई बंदर सोडतील इतके ते भोळे असतील असें म्हणवत नाही; व स्वागताच्या मानपत्रांत जी स्तुति केली असेल ती खरीच आहे असें नवोदित गव्हर्नर मानतील हेंहि अशक्य वाटतें.

तें कसेंहि असलें तरी लॉर्ड ब्रॅबोर्न यांच्यावर मागील कारकीर्दीतील घडामोडींमुळे फार मोठी जबाबदारी येऊन पडली आहे. अत्युग्र व सर्वगामी दडपशाहीमुळे व इतर सर्वसाधारण आपत्तींमुळे जनतेचें कपाळ छिनलें गेलें आहे. शिवाय नवीन राज्यघटना बहुधा त्यांच्याच कारकीर्दींत अमलांत येईल असा रंग दिसतो. अशा परिस्थितींत जनतेचें मन सांप्रत अतिशय नाजूक दशेमध्ये आहे. या वेळीं राज्यकारभाराचा गाडा सुरळीत चालावयाचा म्हणजे तो फार शांत चित्तानें व विचारीपणाने हाकलला पाहिजे. लॉर्ड ब्रॅबोर्न यांस तरुण वयांतच गव्हर्नर नेमण्यांत आलें आहे व सर्वांत तरुण गव्हर्नर तेच असें त्यांची नेमणूक जाहीर झाली तेव्हां सांगण्यांत आलें आहे. म्हणन त्यांच्यावरील जबाबदारी अधिकच वृद्धिंगत होते. आपल्या शिरावरील जबाबदारी ते कशी काय पार पाडतात तें यापुढे दृग्गोचर होऊं लागेल. पूर्वगामी गव्हर्नराच्या

अमदानींत प्रजेच्या अंतःकरणास झालेल्या जखमा जो इलाखाधिपति बऱ्या करील, जुन्या कारकीर्दीतील छळणुकीची आठवण जो बुजवून टाकील आणि स्नेहपूर्णतेने व लोकांच्या न्याय्य आकांक्षा तृप्त करण्याच्या इच्छेने जो राज्यकारभार चालवील तोच जनतेच्या आदरास पात्र होईल, एवढेंच आम्ही उगवत्या गव्हर्नरसाहेबांना आज सुचवून ठेवतों.

# स्फुट सूचना

१ कै. विठ्ठलभाई पटेल यांनी यावज्जन्म आपला देह देशकार्यार्थ झिजविला हें सर्वश्रुतच आहे. राजकारणाची त्यांना नैसर्गिक आवड होती; म्हणूनच विलायतेंतून बॅरिस्टर होऊन आल्या वेळेपासून त्यांनी आपल्या मायदेशाची वकिली पत्करली. त्यांतल्या त्यांत स्वदेशांतील चळवळीचा पाठपुरावा करण्यासाठी परराष्ट्रांतील लोकांना हिंदी राजकारणाची माहिती समजून देऊन आपलें दुखणें जगाच्या वेशीवर टांगल्याने आपली गाऱ्हाणीं दूर होण्याचा संभव आहे हें जाणून परराष्ट्रीय चळवळ करण्याकडे त्यांचा ओढा होता. याच हेतूने कै. लो. टिळकांच्या शिष्टमंडळाबरोबर १९१८ सालीं ते विलायतेस गेले आणि तेथे जातांच तेथील 'इंडिया' पत्राचें धोरण हिंदी लोकमताला अनुकूल असेंच राहील अशी व्यवस्था त्यांनी घडवून आणली. पुढे १९२१ सालापासून काँग्रेसने परराष्ट्रीय चळवळ वर्ज्य केली आणि 'इंडिया' पत्र बंद केलें. हें आत्मघातकी धोरण विठ्ठलभाईंना बिलकूल मान्य झालें नाहीं. ले. असेंब्लीचे अध्यक्ष झाल्यानंतर त्यांनी विलायतची जी सफर केली, ती सफर करण्यांत परराष्ट्रांतील राजकारणाशीं आपला संबंध अगदीच तुटला होता तो परत जोडावा हाहि एक हेतु होता; आणि आपल्या अखेरच्या दुखण्यातहि ते अमेरिकेपर्यंत सफर करून आले; यावरूनहि त्यांची परराष्ट्रीय चळवळीविषयींची कळकळ व्यक्त होते.

---

२ अशा रीतीने राजकारणाचे डाव खेळण्यांतच ज्यांचा सगळा जन्म गेला त्यांनी आपल्यीं मृत्युपत्रांतहि आपली तीच इच्छा प्रकट करावीआणि हिंदुस्थानातर्फे परदेशांत चळवळ करण्याकडे खर्च करण्यासाठी आपलें सर्वस्व देऊं करावें हें त्यांच्या स्वभावास अनुसरूनच होतें. अर्थातच कै. विठ्ठलभाई पटेल यांनी आपली सुमारें एक लक्ष रुपयांची जिनगी परराष्ट्रीय चळवळीकरिता हिंदी राष्ट्राला अर्पण केली आहे. ती रकम ट्रस्टींच्या ताब्यांत राहणार असून तिच्या व्याजांतून हिंदुस्थानातर्फे परदेशांत व्याख्यानें देणें, मिस मेयोच्या पुस्तकासारख्या पुस्तकांतून हिंदुस्थानाची जी बदनामी केली जाते ती खोडून काढणें, राष्ट्रसंघाला हिंदुस्थानची खरी स्थिति समजावून देणें इत्यादि काम होऊं शकतील. मात्र ट्रस्टींनी या रकमेचा याच कार्याकडे व्यय होईल, इतर भलत्याच कामाकडे तिचा दुरुपयोग होणार नाही, अशी दक्षता बाळगिली पाहिजे. नाहीतर टिळकस्वराज्य फंडासारखा एक कोट रुपयांचा फंड जमवून देखील तो जसा मखल्यामध्यें फुकट खर्च होऊन राजकारणाला त्याचा लवलेशहि उपयोग झाला नाही तसा प्रकार यांतहि व्हावयाचा! असो. कै. विठ्ठलभाई यांनी आपल्या मायभूमीच्या कल्याणाची काळजी अशा रीतीने सक्रिय व्यक्त केली याबद्दल कृतज्ञता प्रकट करून त्या रकमेच्या ट्रस्टींनी त्यांची इच्छा योग्य प्रकारें परिपूर्ण होईल अशी तजवीज करावी एवढेंच त्यांस आम्ही सुचवितों.

---

३ फांशीची शिक्षा तहकूब करण्याविषयी वरिष्ठाकडून हुकूम आला असतां तो वेळेवर वाचून न पाहतां तत्पूर्वीच बिचाऱ्या कैद्याला फांसावर टांगून टाकल्याची लाहोरच्या पत्रांतली बातमी खरी असल्याचें पंजाब–सरकारानें जाहीर पत्रकद्वारा प्रसिद्ध केले आहे ! सदरहू कैद्याचा दयेचा अर्ज पंजाबचे गव्हर्नर व सिमल्याचे गव्हर्नर–जनरल या उभयतांनी फेटाळून लावल्यावरून ता. २१ नोव्हेंबर रोजीं फांशीच्या शिक्षेची बजावणी करण्याचे ठरलें. पण तत्पूर्वी ता. १८ नोव्हेंबर रोजीं त्या कैद्याच्या बापाने प्रिव्ही कौन्सिलकडे आपण अपील करणार असल्याचें सेक्रेटरियटकडे तारेने कळविलें. त्यावरून दुसरा हुकूम येईपर्यंत फांशी तहकूब करा अशा आशयाचा रीतसर हुकूम सेक्रेटरियटमधून तयार होऊन तो ता. २१ रोजीं सकाळीं मुद्दाम एका जासुदाबरोबर सेंट्रल जेलमध्यें पोंचता करण्यांत आला. आश्चर्याची व खेदाची गोष्ट अशी कीं, सदर हुकुमाचा लिफाफा ता. २१ पर्यंत जेल सुपरिंटेन्डन्टच्या नजरेसमोरच आला नाही आणि जेव्हा तो नजरेस आला तत्पूर्वीच तिकडे फांसाच्या दोरीने कैद्याच्या प्राणाची विल्हेवाट लावली होती ! या शोचनीय प्रकाराबद्दल पंजाब-

सरकारला दिलगिरी वाटत आहे असें जाहीर पत्रकांत म्हटलें असून या चुकीला जबाबदार कोण हें शोधून काढण्याकरितां व असला प्रकार पुन: घडून येऊं नये या हेतूनें कांहीं सूचना करण्याकरितां चौकशी करण्यांत येणार आहे असेंहि पंजाब-सरकारानें जाहीर केलें आहे.

---

४ चौकशी कमिटीनें या निष्काळजीपणाचें खापर कोणाच्याहि कपाळावर फोडलें आणि नियमांत कसलीहि दुरुस्ती सुचविली तरी फांशी दिल्या गेलेल्या कैद्याचे प्राण कांहीं आतां परत येऊं शकत नाहींत. एवढ्याचकरितां फांशीची शिक्षा देण्याची रानटी चालच बंद करावी असें आम्ही म्हणत आलों आहों आणि असल्या शोचनीय प्रकारामुळें तेंच मत अधिक दृढ होतें. युरोपांतल्या अनेक देशांतून ही चाल बंद केली गेली आहे; आणि इंग्लंडमध्यें याचकरितां नेमलेल्या एका कमिटीनेंहि फांशीची शिक्षा रद्द करावी अशीच शिफारस केली होती. पण सरकारास ती शिफारस मान्य करवत नसल्यास फांशी देण्याच्या कामीं अधिक दक्षता बाळगण्याविषयीं तरी ताकीदीचे हुकूम सोडावे. पूर्वी १९०६ सालीं त्या वेळच्या पूर्व-बंगालचे गव्हर्नर सर बँफील्ड फुल्लर याच्या कारकीर्दीत अशाच चुकीमुळें उदयपत्नी नावाच्या एका कैद्याला फांसावर चढविण्यांत आलें आणि मागाहून ती शिक्षा तहकूब केल्याची तार येऊन पोंचली! यावरून नोकरशाहीला हिंदी कैद्यांचे प्राण म्हणजे कःपदार्थ वाटतात म्हणूनच असल्या चुका घडून येतात असें अनुमान निघतें. ही बेपर्वाई नाहींशी होण्याकरितां ज्यांच्या-ज्यांच्याकडून या कामीं हेळसांड झाली असेल त्या सर्व अधिकाऱ्यांना कडक शासन केलें जावें. सर बँफील्ड फुल्लर याच्या कारकीर्दीत जी चुकी झाली तिचें प्रायश्चित्त ती चूक करणाऱ्या सेक्रेटरीला मिळाल्याचें ऐकिवांत नाहीं आणि आतां पंजाबच्या चौकशीचा अर्थहि जेलमधील बड्या अधिकाऱ्यांना पोंचण्याच्याऐवजी टपालाच्या कामावरील एखाद्या कारकुनाचाच तो बळी घेईल अशी शंका येते. अलीकडे टेलिफोनची सोय सर्वत्र झालेली आहे. तेव्हां फांशी देण्याच्या ऐनवेळीं स्वतः जेल-सुपरिंटेंडेंटनें होम सेक्रेटरीला टेलिफोन करून फांशीची बजावणी करावयाची असा अखेरचा हुकूम त्याजकडून मिळविल्याविना फळी पाडली जाऊं नये एवढा जरी नियम केला तरी असल्या शोचनीय प्रकाराची पुनरावृत्ति होणार नाहीं. पंजाबची चौकशी कामगार कोणता उपाय सुचवितात तें पाहून यासंबंधानें आणखी कांहीं सूचना करूं.

---

# आजचें युरोप

मारण मरणाची शाळा  
हलति बाहुली कळसूत्रापरि  
सज्ज सदा झुंजाला ॥ धृ ॥

शत्रुमित्र ओळख नाही  
स्नेहबंध तोडुनि राही  
रणसेवा हें व्रत घेई  
संगीन रोखुनी उभे सदाचे  
तान्हेले रक्ताला ॥ १ ॥

भावना जळाल्या मनिंच्या  
दैन्य हाच अर्थ दयेचा  
परमेश्वर मेला त्यांचा  
धनराशी खर्चुनी खडे ठेविले  
मारेकरि जगताला ॥ २ ॥

शांतिचे पाठ ते वदले  
मारण्या सदाचे सजले  
सामर्थ्य रणास्तव सगळे  
मारती अंतिं वा मरति ह्याचस्तव  
जन्म तयाचा झाला ॥ ३ ॥

पुणें | बाळ

# म्हैसुरांत व्हाइसरॉयांचा सत्कार

(आमच्या प्रवासी प्रतिनिधीकडून)

व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांची स्वारी रविवार ता. ३ डिसेंबर १९३३ रोजीं सकाळीं ८ वाजता हैद्राबादेहून म्हैसुरास आली. व्हाइसरॉय येण्याचें ठरल्यापासून संस्थानाचे सर्व प्रमुख अधिकारी म्हैसुरास नटाविण्यांत गढून गेले होते. व्हाइसरॉय म्हैसूर स्टेशनावर उतरल्यानंतर त्यांच्याकरितां योजलेल्या प्रासादांत त्यांस मिरवीत नेण्याकरितां आयर्विन रस्ता, सयाजीराव रस्ता हे रस्ते निश्चित केले होते. कोणतीहि मिरवणूक म्हटली कीं ती पाहण्यासाठीं प्रजाजनांपैकीं हजारो तमासगीर न बोलावतांच जमतात. पण त्यांचा समुदाय हक्काचा नव्हे, मर्जीचा. म्हणून मिरवणुकींत जी गर्दी दिसावयास पाहिजे तिची भिस्त अलबत्या-गलबत्या किंवा होळीच्या होळकरावर अधिकारी ठेवीत नसतात. तिची तरतूद ते निराळ्या उपायांनीच करतात. शाळा-कॉलेजांतील विद्यार्थी-विद्यार्थिनी हा त्यांपैकींच एक उपाय होय. म्हैसुरात संस्कृत कॉलेज आहे व आयुर्वेदिक कॉलेजहि आहे. या दोन प्राचीन विद्यांच्या कॉलेजांशिवाय मेडिकल, आर्टस् कॉलेज, हायस्कूल, मुलींच्या शाळा व कानडी शाळा असून त्यांतील विद्यार्थि-विद्यार्थिनींची गणती १०।१५ हजारांपर्यंत सहज भरेल. अशा विद्यार्थ्यांचे जमाव सयाजीराव रस्त्यावर रांगेनें उभे केले होते. मिरवणुकींत हजारो स्त्रीपुरुष सामील झाले होते. पण त्या सर्वांत विद्यार्थी-विद्यार्थिनींची प्रतिष्ठा मोठी. रस्त्यावरून या बाजूने फिरकण्यास इतरांना कोण पंचाईत! ती पंचाईत विद्यार्थ्यांना नव्हती. आपल्यासमोर कोणत्या तरी शिक्षणसंस्थेच्या पाट्या डालीप्रमाणे धरून त्यांनी खुशाल रोखलेले रस्ते ओलांडावे. त्यांना सदर परवानगी.

म्हैसुरांत सभ्य व दरबारी पोषाक विशिष्ट प्रकारचा ठरलेला आहे. टोपयाला रुमाल. तो मागून व पुढून मिळून चौकोनी; अंगांत कोटवजा आंगरखा, तो पायघोळ आणि खालीं धोतर अगर विजार. डोक्याच्या रुमालाचा आकार ना. श्रीनिवास शास्त्री घालतात त्या तऱ्हेचा.रुमाल जितका मोठा असेल तितका तो मनुष्य अधिक संभावित;त्यावरील जरीचे काठ जितके रुंद असतील तितका तो श्रीमंत व रुमालाचे काठ काढून त्याच्या पट्टीला पट्टी भिडवून बांधला असेल तितका तो मनुष्य अकडबाज असा सामान्यतः नियम समजण्यास हरकत नाहीं. द. हिंदुस्थानांत पडदा नाहीं यामुळे समारंभात स्त्रिया पुरुषांबरोबर सरमिसळीनें वावरत होत्या. त्याजकडे पाहिले म्हणजे इकडे बुरखा का नाहीं याचे कारण चटकन लक्षांत येत असे. इकडील स्त्रियांत जिला लख्ख गौरवर्णाची म्हणावी अशी हजारांत एकहि स्त्री आढळणार नाहीं. हें गौरपण राहिलें, पण नुसता नीटसपणा घेतला तर तोहि गौरपणाइतकाच दुर्मिळ आहे. या प्रकारचें दुर्भिक्ष बुरख्यास तसदी न देता इकडील लोकांनीं कबूल केलें. यांत त्यांचा प्राजळपणाच सिद्ध होतो. तथापि बुरख्याची ही उत्तर-हिंदुस्थानी रीत दुसऱ्या एका कारणाकरिता इकडील जनतेनें थोड्या-बहुत प्रमाणांत स्वीकारली असती तर वरील मिरवणुकीच्या समारंभांत तरी बरीच कुरूपता दडल्यामुळे शोभा वाढल्यावाचून राहिली नसती.

मिरवणुकीच्या वेळीं संस्कृत कॉलेजांतील शास्त्री-पंडित हजर राहिले त्यामुळें एक प्रकारचें कुतूहल उत्पन्न झालें. त्यांनीं अंगावर शालजोड्या घेतल्या असून डोक्यालाहि चौकोनी आकृति देण्यास न विसरता शालजोडीचे फरद गुंडाळले होते. इकडील लोकांच्या शेंड्या मात्र फार मोठ्या असतात. जणुं काय थेट स्त्रियांचे केशपाशच. त्यांचा मला थोरला गोंडा त्यांनीं, त्याकरितां थोडासा पदर ओढून, त्यांत झेलून धरला होता. पण जी शेंडी गुरुजींनीं बंदिस्त राखली ती अगदीं उघडी टाकूनच त्यांचे छात्र मिरवणुकींतून लगबगीनें इकडून तिकडे जातांना आढळत होते.

म्हैसूर संस्थानाची बहुतेक शिबंदी व रिसाला बेंगळूर येथें आहे. हा फौजफाटा मिरवणुकीच्या आधीं दोनच दिवस बेंगळुराहून म्हैसुरास आणिला होता. व्हाइसरॉयाची गाडी येण्याच्या पूर्वी पांचसात मिनिटेंच म्हैसूरचे महाराज त्यांच्या जय्यतविषीं स्टेशनावर सामोरे गेले व त्यांस घेऊन आले. मिरवणुकीपुढे पांचपन्नास स्वार व पांचपन्नास बॉडीगार्ड दौडत होते. घोडे बाघेसूद काळेभोर व देखणे असून त्यांजवरील राऊतहि तसेच रुबाबदार होते. सर्व बॉडीगार्डांच्या घोड्यांवरील खोगीर व्याघ्रांबरी होते हा प्रकार विशेष नजरेंत भरण्यासारखा होता. शिबंदीच्या हातीं भाले होते. ते सोनेरी कलाबतूत मढविले होते. व्हाइसरॉय चार घोड्यांच्या गाडींत बसले होते. व त्यांच्या शेजारीं महाराज होते. त्यांचा रुमाल पिवळ्या रंगाचा होता. महाराजांची मुद्रा भव्य

दिसली. त्यांच्या पाठीमागच्या गाडींत लेडी विलिंग्डन व युवराज असून तिसऱ्या नंबरच्या गाडींत दिवाण व व्हाइसरॉयांबरोबरचे बडे अधिकारी होते. त्यामागून अनेक गाड्या, मोटारी व स्वार गेल्यानंतर मिरवणूक संपली. मिरवणुकींत राणीसाहेब लेडी विलिंग्डन यांच्या शजारीं असावयास पाहिजेत; पण त्या कोठेच आढळल्या नाहींत. याचें कारण असें समजलें कीं, त्या सार्वजनिक समारंभांत कधींच येत नाहींत. महाराजांना संतान नाहीं त्यामुळे राणीसाहेब कदाचित् वृत्तीनें उदासीन बनलेल्या असाव्या. पण मग समारंभांतील युवराज कोण असा प्रश्न सहजच उद्भवतो. युवराज म्हटला कीं तो राजाचा मुलगा व मुलगा नसल्यास पुतण्या तरी पाहिजे. पण वर निर्दिष्ट केलेले युवराज हे महाराजांचे सख्खे बंधु होत. येथें त्यांसच युवराज म्हणून संबोधण्यांत येतें. त्यांना एक चिरंजीव असून ते १२ वर्षांचे आहेत.

महाराज स्वतः शास्त्र, कला व विद्या या सर्वांचे भोक्ते आहेत. म्हैसूर संस्थानाची अनेक बाजूंनी प्रगति झाली आहे त्याचें कारण तरी हेंच होय. म्हैसूर शहराच्या भूषणांतील भूषण म्हणजे तेथील बिजलीचा विलास. हा विलास एक आश्विन मासीं नवरात्रांत किंवा व्हाइसरॉयांसारख्या बड्या पाहुण्याच्या आगमनांत आपल्या षोडश कलांनी दृष्टीस पडावयाचा. या दृष्टीनें व्हाइसरॉय आले ती रविवारची रात्र म्हैसुरांत अत्यंत प्रेक्षणीय झाली. महाराजाचा राजवाडा हा एक शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुनाच आहे. राजवाड्याभोवती अत्यंत विस्तृत पटांगण व त्याला सभोंवार तट व त्यांत सुंदर दरवाजे आहेत. आणि दरवाजाबाहेर पुनः बागबगीच्याकरिता विस्तीर्ण मैदान सोडून त्यापलीकडे इतर मोठमोठ्या इमारती, घड्याळाचा मनोरा व माजी महाराजांचा संगमरवरी पुतळा आहे. रविवारीं रात्रीं या सर्वांवर बिजलीचें नर्तन चालू होतें. राजवाडा, त्याच्या सभोंवारच्या इमारती, देवळें व दरवाजे यांजवर विजेचे लाखों दिवे कायमचे गुंफून ठेवले आहेत. त्या सर्व इमारती पांढऱ्या शुभ्र आहेत. त्यांतील विद्युद्दीपांनी रात्रींच्या वेळीं आपले लाखों डोळे उघडल्यावर आकाशांतील चंद्रम्याचें तेजहि लोपल्यासारखें झालें. तो राजवाडा व त्याच्या सभोंवारच्या इमारती चांदीच्या मखरासारख्या झगझगूं लागल्या. त्यावरील दीपपंक्ति या मुक्तामाळेप्रमाणे शोभत होत्या व त्या सर्वांवर चढलेला राजवाड्याचा कळस, त्याच्या खालचा मनोरा व भोंवतालच्या मेघडंबऱ्या रत्नखचित राजमुकुटाप्रमाणे झळाळत होत्या.

व्हाइसरॉय म्हैसुरांत संस्थानी पाहुणचार घेण्यास आले असल्यामुळे त्यांचा मुक्काम आतिथिधर्मास अनुसरून भरपूर तीन दिवस होणार आहे. या तीन दिवसांतील एक सबंध दिवस, निदान रात्र, ते कृष्णराजसागर या प्रचंड धरणाच्या पायथ्याशीं घालविणार आहेत. हें कावेरी नदीचें समुद्रप्राय धरण म्हैसुरापासून अवघ्या बारा मैलांवर आहे. त्या धरणाचें पाणी कोंडून धरल्यावर त्याच्याखालच्या अंगाला कावेरीचा प्रवाह दुभंगून त्याच्या मध्यभागीं एक बेट बनलें आहे. सदर बेटांत उत्तम बगीचा केला आहे. तेथील खरी मजा जलयंत्राची. नदीचा एक पाट बेटाच्या मधून सोडून त्याचें पाणी पुनः नदीस मिळण्यापूर्वी कारंजातून तऱ्हेतऱ्हेने नाचविलें आहे. त्या कारंजांचे किती प्रकार करावे याला सीमाच नाहीं. आतषबाजींतील दारूंत जितके प्रकार असतात तितके किंबहुना त्याहूनहि अधिक प्रकार या जलयंत्राचे आहेत. त्यांची झाडें आहेत, लतामंडप आहेत, कमानी आहेत, पायघड्या घातल्याप्रमाणे वाटा आहेत व बगले आहेत. इतकीं अनेक रूपें धारण करून तें पाणी थुईथुई नाचत असलेलें पाहून लाभणारा आनंद अननुभूत होय.

पाण्याची ही मौज दिवसाची झाली. त्या सर्व कारंजांजवळ विजेचे रिफ्लेक्टर्स बसविले असून त्यांचे तांबडे, जांभळे, हिरवे, निळे, पांढरे असे विविध रंग आहेत. म्हैसुरांत वीज व पाणी यांत विपुलतेच्या बाबतींत सरशी कोणाची हें ठरविणें कठिण आहे. विद्युत् ही चपला पण तिला येथे बंदिवान करून सोडलें आहे. व पाण्याला मात्र प्रथम कोंडून ठेवून पुढे त्याच्या स्वभावाप्रमाणे त्याला धावूं दिले आहे. त्या पाण्याच्या चित्रविचित्र कारंजांवर रात्रींच्या वेळीं विजेचे रिफ्लेक्टर्स आपले रंगीबेरंगी प्रकाश पाडतील तेव्हा कारंजांचें रूपांतर एकदम आतषबाजींतील दारूकामांत होऊन जिकडेतिकडे तारनळे, भुईनळे व चंद्रज्योती यांची विलक्षण शोभा दिसेल यांत शंका नाहीं. ही शोभा पाहण्यास व्हाइसरॉय जाणार असून त्यांजकरिता शामियाने, तंबू, राहुट्या इत्यादि देऊन ठेवल्या आहेत. अशा रीतीनें व्हाइसरॉयांच्या अवघ्या तीन दिवसांच्या आतिथ्याच्यापायीं म्हैसूरसरकाराचे किती लक्ष रुपये खर्ची पडतात पाहावें.

# पुणें–गीताजयंतीचा समारोप

शनिवार ता. २ रोजीं पुणें गीताधर्म–मंडळातर्फे सुरू असलेल्या गीताजयंतीच्या उत्सवांतील प्रवचनांचा समारोप झाला. त्या प्रसंगीं श्री. ज.स. **करंदीकर** यांचें '**गीतेचें यथार्थ स्वरूप**' या विषयावर प्रवचन झालें. ते म्हणाले:—

### प्राचीन तत्त्वज्ञानाचें उत्क्रान्त स्वरूप

गीता हा आर्य तत्त्वज्ञानाचा एक उत्तम ग्रंथ असून तो सर्व जगाला मान्य झालेला आहे. पाश्चात्य पंडितांनीदेखील गीतेवर पुष्कळ वाङ्मय निर्माण केलेलें आहे. 'गीतेंतील तत्त्वज्ञान हें प्राचीन तत्त्वज्ञानाचें उत्क्रान्त स्वरूप आहे' असें पूर्वीच्या एका व्याख्यात्यांनी सांगितलें ते बरोबर आहे. कोणतेंहि तत्त्वज्ञान असो किंवा धर्म असो. तो प्राचीन परंपरेला सोडून अगदींच नवीन स्वरूपाचा जसा असूं शकत नाहीं; तसाच तो हुबेहूब जुन्यासारखाहि असूं शकत नाही.

आमच्या धर्माचा अति प्राचीन ग्रंथ म्हणजे ऋग्वेद होय. त्याच्या पूर्वी काय होतें हें सांगता येत नाहीं. म्हणून तेथूनच आम्ही आमच्या परंपरेच्या विचाराला आरंभ करतो. ऋग्वेदांत अनेक देवतांच्या स्तुतिपर सूक्तें असून त्यांत सुखोपभोगाचीं साधनें मिळण्याविषयीं प्रार्थना आहेत. तथापि ऋग्वेदांत तेवढाच विषय आहे असें मात्र नाहीं. त्यांत तत्त्वज्ञानहि आहे व नासदीय सूक्तांत त्यांतील तत्त्वज्ञानाची परमोच्चकोटि आढळते. स्तुतिपर भागाच्या मानानें तत्त्वज्ञानविषयक भाग कमी आहे असें फार तर म्हणतां येईल.म्हणूनच हा तत्त्वज्ञानाचा विषय अधिक स्पष्टपणें प्रतिपादन करण्याकरिता उपनिषदें तयार झालीं.

गीतेच्या पूर्वीचीं उपनिषदें म्हणजे प्राचीन मानलेलीं दहाबाराच उपनिषदें होत. गीतेनंतर पुष्कळच उपनिषदें तयार झालेलीं आहेत. त्या सर्वांना उपनिषदें (श्रुति) ही संज्ञा मिळाली, पण गीतेला मात्र 'स्मृति' हीच संज्ञा कां देण्यांत आली हें समजणें कठिण आहे.

### निर्गुण-सगुण उपासनांतील अविरोध

उपनिषदांपैकीं कांहीं उपनिषदांत संन्यासमार्ग प्रतिपादन केलेला आहे; तथापि त्यांतहि कर्मयोग अजिबात वगळलेला नसून त्याचाहि ठिकठिकाणीं उल्लेख स्पष्ट रीतीनें आढळतो. या कर्मयोगाचें विस्तृत स्पष्टीकरण भगवद्गीतेनें केलें आहे.गीतेंत वेदांतील व उपनिषदांतील तत्त्वज्ञानाचा समन्वय केलेला आहे असें कित्येकांचें मत आहे.परंतु गीतेंत नुसता समन्वयच नाहीं. समन्वय म्हणजे परस्परविरोधी दिसणाऱ्या विधानांची एकवाक्यता करून दाखविणें एवढाच अर्थ होतो. परंतु गीतेंतील तत्त्वज्ञानांत नुसता असा समन्वयच नसून त्यांत भगवंतांनी स्वतःची विशेष भर घालून पूर्वीच्या तत्त्वज्ञानाला सर्वांगपूर्णता आणली आहे. गीतेनें वेदांतील अनेक देवता मान्य केल्या आहेत हें 'येऽप्यन्यदेवता भक्ता यजंते श्रद्धयान्विताः' अशा आशयाच्या अनेक वाक्यांवरून उघड सिद्ध होतें. परंतु गीता येवढेंच सांगून न थांबतां त्याच्यापुढे 'तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्' असेंहि सांगते. म्हणजे अनेक देवतांची उपासना मान्य करूनदेखील शेवटीं ती परमात्म्याचीच उपासना होते अशा रीतीनें एकत्वहि सिद्ध करून त्याचा उपदेश करते. त्याचप्रमाणें 'मत्तः परतरं नान्यत्', 'मत्तः सर्वं प्रवर्तते', 'प्रभवप्रलयस्थानं निधानं बीजमव्ययम्' इत्यादि अनेक उल्लेखांवरून गीतेनें अद्वैतसिद्धान्तच मान्य केला आहे हें सिद्ध आहे, तथापि गीतेनें सगुण परमेश्वराची उपासना त्याज्य ठरविलेली नाहीं. 'देवान्देवयजो यांति' इत्यादि वाक्यांत 'जो ज्या भावनेनें उपासना करील त्याला तदनुरूप फळ मिळतें असें म्हटलें आहे. पण माझी–परमात्म्याची उपासना करणाऱ्याला परमात्मस्वरूप प्राप्त होतें, असा शेवटीं सिद्धान्त सांगितला आहे.

मीमांसकाचा स्वर्गदेखील गीतेनें अमान्य केलेला नाहीं. परंतु त्यांतसुद्धा 'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' असा दोष सांगून त्याचें गौणत्व दर्शविलें आहे.

### गीतेंतील सांख्यशास्त्र कोणतें ?

सांख्यशास्त्राबद्दल विचार केला असता हल्ली उपलब्ध असलेल्या सांख्यकारिका हा त्या शास्त्रावरील आद्य ग्रंथ नव्हे. या कारिका गीतेनंतरच्या असल्यामुळें त्याचा गीतेंत उल्लेख येण्याचा संभवच नाहीं. तथापि गीतेच्या पूर्वी कोणत्या तरी निराळ्या स्वरूपांत सांख्यशास्त्र होतें असें महाभारतांतील तत्संबंधीच्या अनेक उल्लेखांवरून दिसून येतें. परंतु त्या वेळचे ग्रंथ उपलब्ध नसल्यामुळें त्या शास्त्राचें निश्चित स्वरूप सांगतां येणें शक्य नाहीं. तथापि तत्कालीन सांख्यशास्त्र सेश्वरवादी होतें असें मानण्यास हरकत नाहीं. सांख्यशास्त्रांतील

प्रकृति, पुरुष व त्रिगुण यांचा उल्लेख गीतेत आहे. त्याचप्रमाणे उपलब्ध सांख्यशास्त्रातील पंचवीस तत्त्वांचाहि समावेश गीतेत केलेला आहे. मात्र सांख्याप्रमाणे प्रकृति व पुरुष हीं स्वतंत्र मूळ तत्त्वें म्हणून गीतेंत सांगितलेली नसून त्याहून श्रेष्ठ पुरुषोत्तम तत्त्व हेंच सर्वाचें मूळ ठरविलें आहे.

**' सांख्य ' शब्दाचा अर्थ**

सांख्य शब्दाचा अर्थ ' संख्य म्हणजे युद्ध व तत्संबंधी तें सांख्य ' असा एका वक्त्यानी सुचविला. तो अर्थ माझ्याहि मनात आलेला होता आणि तो दुसऱ्या अध्यायांतील श्लोक ३१ ते ३८ यांत सांगितलेल्या युद्धविषयक प्रतिपादनाशीं जुळण्यासारखाहि दिसतो. परंतु त्यापूर्वीच्या ११ ते ३० पर्यंतच्या वीस श्लोकांत वर्णिलेल्या विषयाशी त्या अर्थाचा संबंध मुळींच जमत नाहीं. आणि ३९ व्या श्लोकांतील ' एषा ' या पदानें ३१ ते ३८ श्लोकच कां घ्यावे याला कांहीं समक नाही. व तसे घेतले तर मागील वीस श्लोकांतील विषयाला कय नाव द्यावयाचें हे कोडे तसेंच रहातें. त्यापेक्षा ' सांख्य ' या शब्दाचा अर्थ ' अलंकारशास्त्रांतील ' ' परिसंख्या ' शब्दाच्या कल्पनेस धरून ' भेदमूलक तत्त्वज्ञान ' (व्यतिरेक ज्ञान) असा करावा, असे मला वाटते. परिसंख्या अलंकारात ( श्रंत्र श्रुतेनैव न कुंडलेन ) एक पक्ष स्वीकारून तो खोडून काढून खरा पक्ष सिद्ध केलेला असतो. म्हणजे दृश्य स्वरूप व तात्त्विक स्वरूप याचा भेद दाखविलेला असतो. त्याप्रमाणे दुसऱ्या अध्यायांतील ११ ते ३० श्लोकापर्यंत आत्मा व अनात्मा यांतील भेद दाखवून देह हा अनित्य असून आत्मा हाच नित्य आहे असें दाखविलें आहे त्याचप्रमाणे प्रकृति व पुरुष हेहि वेगवेगळे मानण्यांत आले आहेत. अशा रीतानें ज्या शास्त्राची उभारणी विषमत्वावर ( अनेकत्वावर ) झाली ते सांख्यशास्त्र होय. याच्या उलट योगशास्त्राची उभारणी 'समत्वा'वर ( एकत्वावर ) झाली आहे. ' बुद्धियोगे त्विमां शृणु ' ( गी. २ ४० )येथून एकत्वबोधक योगाच्या प्रतिपादनास आरंभ झाला आहे. आणि 'समत्वं योग उच्यते' अशी योग शब्दाची व्याख्या गीतेनेंच दिली आहे. सांख्य व योग हे शब्द गीतेत अनेक ठिकाणी अनेक अर्थांनी आलेले आहेत. असेच आणखीहि कांही अनेकार्थक शब्द गीतेंत आले असल्यामुळे मतभेदाला जागा उत्पन्न झालेल्या आहेत. गीतेतील ' योग ' हा पातंजल योग नव्हे हे उघड आहे. कारण पातंजल योगसूत्रे गीतेच्या नंतरची आहेत. गीतेतील सहाव्या अध्यायांत चित्ताची एकाग्रता होऊन ते आत्मनिष्ठ व ईश्वरनिष्ठ होण्यासाठींच अभ्यासयोग, ध्यानयोग आणि सांख्ययोग सांगितला आहे. पण त्यांत पातंजल योगांतली सिद्धिप्राप्ति वर्णिलेली नाही. असो गीताग्रंथाचे तत्पूर्वीच्या ग्रंथांशीं सादृश्य किती व गीतेचें वैशिष्ट्य कोणते तें सूत्ररूपानें पुढीलप्रमाणे दर्शविता येईल.

**गीतेचें वैशिष्ट्य**

वेद—१ वेदांत अनेक देवतांचे अस्तित्व व त्यांची उपासना सांगितली आहे; पण ती गौण व जन्मबंधकारक आहे, म्हणून ' एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति ' हाच सिद्धान्त गीतेला मान्य.

२ सुखप्राप्त्यर्थ यज्ञयागादि करणे हा गौण पक्ष; आनृण्यार्थ यज्ञ करून फलाची अपेक्षा न धरणें हा उत्तम पक्ष गीतेला मान्य.

३ यज्ञ शब्दाची वेदांतील व्याख्या अपुरी असल्यामुळे परार्थाकरिता स्वार्थाचा त्याग आणि शाश्वत सुखाकरिता अशाश्वत सुखाचा त्याग करणे हा खरा यज्ञ होय व त्याचाच गीतेंत पुरस्कार केला आहे.

४ वेदांत बाह्य वस्तुनिष्ठ सुखावर विशेष भर असून मनोनिग्रहाचे नावहि नाही. गीतेचा सर्व भर मनोनिग्रहावर असून अंतःसुख हेच खरें सुख असा गीतेचा सिद्धान्त आहे.

उपनिषदे—१ स्वर्ग हें ध्येय नसून मोक्ष हेच खरें ध्येय हे तत्त्व गीतेला मान्य.

२ ब्रह्मापासूनच सृष्टीची उत्पत्ति व त्यातच तिचा लय हा सिद्धान्त मान्य.

३ जीवात्मा व परमात्मा हे वस्तुतः एकच आहेत हे तत्त्व मान्य.

४ जगन्मिथ्यात्व हे ब्रह्माच्या सत्यत्वाच्या सापेक्षतेने मान्य.

५ जगत् निर्माणच झाले नाही, जग आहे असें मानणे हाच भ्रम आहे, असला मायावाद उपनिषदांतहि नाही व गीतेतहि नाही.

६ मोक्षप्राप्तीसाठी संन्यासच स्वीकारला पाहिजे आणि सर्व कर्मे टाकली पाहिजेत असे कांहीं उपनिषदांत सांगितले आहे पण गीतेत तसे सांगितले नाही.

७ उपनिषदांत, कर्मयोगाचा उल्लेख मधून मधून आढळता आला आहे; गीतेने तोच मार्ग प्रशस्यतर मानून त्यावरच विशेष जोर दिला आहे.

८ लोकसंग्रह, धर्माचे संरक्षण, दुष्टांचा विनाश, धर्मसंस्थापना, अधर्माचा उच्छेद या कल्पना गीतेनेच प्रथम इतक्या स्पष्टपणे मांडल्या.

९ ' ज्ञानादेव तु कैवल्यं ' हा सिद्धान्त दोहोंत सारखाच आहे.

**सांख्यशास्त्र**—सांख्यशास्त्रातील प्रकृति व पुरुष. त्रिगुणात्मक सृष्टि, पंचवीस तत्त्वें इ. कल्पना गीतेने स्वीकारल्या आहेत; पण परमात्मा

किंवा पुरुषोत्तमस्वरूप हें त्या सर्वांहून श्रेष्ठ मानून अद्वैत तत्त्व कायम ठेवलें आहे. सांख्यांच्या प्रकृति-परिणामवादाच्या ऐवजीं गीतेनें पुरुषोत्तमाधिष्ठित प्रकृति—परिणामवाद स्वीकारला आहे ('मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरं' गी. ९-१०). सांख्याच्या मोक्षाचें स्वरूप केवळ प्रकृति व पुरुष यांच्या भेदज्ञानावर अधिष्ठित आहे, पण गीतेची मोक्षाची कल्पना अपरोक्षज्ञानावर अधिष्ठित असून ब्रह्मसायुज्यता हे गीतेतील मोक्षाचें स्वरूप आहे.

पातंजल योग व बादरायणाचार्यांचीं ब्रह्मसूत्रें गीतेनंतरचीं असल्यानें त्यांचा विचार करण्याचें कारण नाहीं.

### लोकमान्यांचा युक्तिसिद्ध सिद्धान्त

असो. आता इतर कांहीं शंकांचा विचार करूं. श्रीशंकराचार्यांचें अद्वैत तत्त्वज्ञान गीतारहस्यकारानीं मान्य करून त्याच्याशीं विसंगत असा कर्मयोगाचा सिद्धान्त प्रतिपादन केला आहे असा आक्षेप एका वक्त्यांनीं त्यावर काढला आहे. परंतु तो सयुक्तिक नाहीं. आचार्यांचें अद्वैत तत्त्वज्ञान लोकमान्यांनीं मान्य केलें आहे, व गीतारहस्यांतील 'अध्यात्म' या प्रकरणांत आचार्यांच्याच तत्त्वज्ञानावर मुख्यतः भर आहे हें खरें. परंतु तो केवळ तात्त्विक भाग आहे आणि त्या भागात पाश्चात्य तत्त्वज्ञान आणि पौरस्त्य तत्त्वज्ञान यांची तुलना करून पाश्चात्यांच्या तत्त्वज्ञानापेक्षा आमचें अद्वैत तत्त्वज्ञान कसें श्रेष्ठ आहे हेंच दाखविलें आहे. आणि केवळ अद्वैत तत्त्वज्ञानापुरतेंच पाहिल्यास तें कर्मयोगाच्या सिद्धान्ताशीं विसंगत नसून सुसंगतच ठरतें. कारण गीतेलाहि अद्वैतसिद्धान्त मान्य आहे. शंकराचार्यांनीं अद्वैतसिद्धीकरिता ज्या आत्यंतिक मायावादाचा स्वीकार केला आहे तो मात्र कर्मयोगाशीं विसंगत म्हणतां येईल. आचार्यांच्या मायावादी विचारसरणी-प्रमाणें जग हें खरोखर झालेंच नाहीं, जग झालें असें मानणें हा भ्रम किंवा आभास आहे. त्याला अस्तित्वच नाहीं ! अशा स्वरूपाचा भ्रमरूपी माया-वाद मान्य केला तर मात्र कर्मयोगाला वाव राहत नाहीं. कारण जग जर झालेंच नाहीं तर 'प्राप्तकर्तव्य' कोठलें आणि 'लोकसंग्रह' तरी कोठला ? परंतु गीतेनें हा मायावाद मान्य केलेला नाहीं. गीतेत 'माया' हा शब्द आला आहे पण त्याचा अर्थ आभास किंवा भ्रम असा नाहीं. ती एक ब्रह्माची अचिंत्य शक्ति आहे. ब्रह्मापासून सृष्टि उत्पन्न होते ती या शक्तीमुळेच होते, व ती शेवटीं ब्रह्मांतच लीन होते. ब्रह्म नित्य आहे व त्या मानानें जग अनित्य आहे, म्हणजे जगाला पारमार्थिक सत्ता नाहीं. परंतु जग उत्पन्न झाल्यावर त्याचा लय होईपर्यंत त्यास व्यावहारिक सत्ता आहे. जग उत्पन्न करणें व त्याचा लय करणें या दोनही गोष्टी ईश्वराधीन आहेत; परंतु जोंपर्यंत जग आहे तोंपर्यंत त्या जगांतील माणसें स्वतःच्या आणि परस्परांच्या कर्तव्याचा विचार करणारच. असा विचार करीत असता याचा केव्हा तरी प्रलय होणार आहे. तेव्हा स्वकर्तव्याचा विचार करण्याची जरूरी नाहीं असें म्हणून चालावयाचें नाहीं. याला नाटकाचें उदाहरण देऊन तें अधिक स्पष्ट करता येईल.

### एक व्यावहारिक दृष्टान्त

नाटकांत एकजण सुमेरसिंगाचें काम करतो व त्याचाच धाकटा भाऊ नारायणरावाची भूमिका घेतो. वस्तुतः, त्या नटाला मी सुमेरसिंग नाहीं व हा नारायणराव नसून माझा भाऊच आहे आणि खेळ आटोपतांच आपण दोघेहि आपापले पूर्वीचे वेष धारण करून बरोबरीनेच घराकडे जाणार आहों हें माहीत असतें. आणि असें आपलें सत्य स्वरूप त्यानें विसरूं नये हेंच श्रेयस्कर आहे. तथापि रंगभूमीवर सुमेरसिंग म्हणून उभें राहिल्यावर तेथें आपलें 'नियतकर्म' करण्याच्या ऐवजीं जर तो आपलें काम सोडून निघून जाऊं लागला तर त्याचें तें करणें प्रेक्षकाच्या दृष्टीनें व नाटकाच्या चालकाच्या दृष्टीनेहि अत्यंत अयोग्यच ठरेल. नाटकांत काम करण्याचें कबूल करण्यापूर्वी त्यानें हा विचार करावयास पाहिजे होता किंवा काम पार पडल्यावर करावयाचा होता. नाटक चालू असतां त्याला हा वेदान्त सांगून कार्यत्याग करतां येणार नाहीं. जर त्यानें ही भूमिका एकदा पत्करली आहे तर ती योग्य रीतीनें वठवणें हेंच त्याचें कर्तव्य होय. त्याचप्रमाणें या सृष्टिरूपी रंग-भूमीचा चालक जो परमेश्वर त्याच्याशीं संचितरूपी करारानें बद्ध होऊनच ज्याअर्थी आपण जन्मास आलों आहों त्याअर्थी आपण स्वीकारलेली भूमिका—आपलें कर्तव्य—योग्य रीतीनें पार पाडणें हेंच श्रेयस्कर होय. अर्जुनाहि अशीच सेनाध्यक्षाची भूमिका स्वीकारून कुरुक्षेत्राच्या रंगभूमीवर उभा असताना मध्यंतरींच आपली भूमिका टाकून जाण्याचा विचार करूं लागला म्हणून श्रीकृष्णानें त्याचा निषेध करून त्याला कर्तव्यबोध केला आणि तूं हें कर्तव्य बजावण्याला 'निमित्तमात्र' न होशील तर त्यांत तुझेंच अक-ल्याण आहे, माझें काम कांहीं अडून राहणार नाहीं अशी त्याची कानउघाडणी केली.

जगांत जन्मास आल्यावर आपण आपली भूमिका बरोबर केली नाहीं तर ईश्वराचें किंवा जगाचें कांहीं अडणार नाहीं. ईश्वर दुसऱ्या एखाद्या नटाकडून ती भूमिका करून घेईलच. परंतु आपण मात्र कर्तव्य-

च्युत होऊं आणि त्यामुळे आपल्याच आत्मिक उन्नतीला बाध येईल. याकरिता या जगांत जन्मास आलेल्या प्रत्येक व्यक्तीने आपलें कर्तव्य अवश्य केलेंच पाहिजे.

### आक्षेपांचें निरसन

यावर असा एक आक्षेप घेण्यांत येत असतो कीं, जीवन्मुक्त ज्ञान्याला अमुकच कर असे सांगण्याचा कोणास अधिकार आहे? आणि लो. टिळकांनी ज्ञानी माणसानें असें करावें आणि तसें करूं नये असा जो विधिनिषेध सांगितला तो त्यांच्या अधिकाराबाहेरचा नाही काय?

या आक्षेपाचें उत्तर असे कीं, ज्ञानी माणसाला ज्ञानोत्तर स्वतःकरिता कांहीं करावयाचें नसतें व त्याच्या स्वतःच्या मोक्षप्राप्तीच्या दृष्टीने त्याजवर कर्माची जबाबदारी उरत नाही, हे गीतेलाहि मान्य आहे. परंतु इतर सामान्य जनांच्या हिताकरिता म्हणजे लोकसंग्रहाकरिता आणि जगच्चक्र चालण्याकरिता त्याने कर्मयोगाचें आचरण करावें असें गीतेचेंच सांगणें आहे. 'न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनां। जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन्' असा विधिनिषेध स्वतः भगवंतांनी गीतेंत घालून दिला आहे. म्हणूनच टिळकांनी त्याचा आपल्या गीतारहस्यांत पुरस्कार केला. टिळकांनी आपल्या पदरचा आग्रह कोठेच कोणावर लादलेला नाही.

लोकसंग्रहार्थ ज्ञान्यानेंहि जें कर्म करावें म्हणून गीता सांगते तें कर्म 'काम्य कर्म' नसून 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' यांत म्हटल्याप्रमाणें ते 'अकर्म'-च असतें. अशा कर्माचा ज्ञानाशीं विरोध येऊं शकत नाही व तें कर्म पारमार्थिक दृष्ट्या बंधनकारकहि होऊं शकत नाही. अर्थातच शास्त्रतः, किंवा तें कर्म करणाऱ्या ज्ञान्याच्या दृष्टीने तें 'अकर्म'च आहे, परंतु व्यवहाराच्या दृष्टीने म्हणजे लोकसंग्रहादि परिणामाच्या दृष्टीने तें 'कर्म' असते, कारण त्या 'कर्मा' पासून जनतेचें मोठें कल्याण होतें आणि म्हणूनच ज्ञान्याने तें 'कर्म' टाकूं नये, असा गीतेचा आग्रह आहे. ज्ञानी माणसाची तें 'कर्म' केल्यापासून जर हानि कांहीं नाही आणि जगाला मात्र मोठा उपयोग होतो तर मग तें कर्म करण्याचें ज्ञान्याने कां नाकारावें? मुलाला बागुलबोवाची भीति वाटूं लागली तर मुलाची भीति घालविण्यासाठी आईने, बागुलबोवा खरा नव्हे, मिथ्या आहे, असला वेदान्त न सांगतां अंधारांत काठी आपटलीच पाहिजे. तशी काठी आपटल्याने आईला कांहीं कोणाला मारल्याचें पाप लागत नाही आणि मुलाची भीति घालवण्याचें कार्य मात्र सफळ होतें. स्थितप्रज्ञांनी याच पद्धतीने लोकसंग्रहार्थ कर्मयोग आचरावयाचा असतो.

अशा रीतीने गीतेने पूर्वपरंपरेचें तत्त्वज्ञान मान्य करून, शक्य तोवर त्याचा समन्वय करून आणि जेथे अपूर्णता दिसली तेथे त्यांत निष्काम कर्मयोगासारख्या तत्त्वाची भर घालून तें तत्त्वज्ञानमंदिर सर्वांग परिपूर्ण आणि सर्वांगसुंदर केलें. हेंच गीतेतील उपदेशाचें वैशिष्ट्य व तेंच तिचें यथार्थ स्वरूप होय.

# अर्जुन-विषाद हा योग नव्हे

(स्वामी केवलानंद)

श्रीक्षेत्र नाशिकचे नागरिक, महापंडित अच्युतराव मोडक यांनी स्वहस्ते लिहिलेल्या मोठ्या अक्षराची गीतेची पोथी माझेजवळ आहे. ही शके १७१८ या वर्षी लिहिलेली आहे. अर्थात् ही अति सुंदर पोथी १३७ वर्षांची जुनी आहे. मूळ श्लोक व 'उवाच' काळ्या लाखी शाईने लिहिले असून मधल्या रेघा व इति श्री० हे तांबड्या अळित्याने लिहिलेले आहे. अक्षर फार सुंदर आहे. या पोथीमध्ये प्रथमाध्यायाचे शेवटीं 'इतिश्री श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादोनाम प्रथमोऽध्यायः' असें लिहिलें आहे. काव्य, साहित्य, धर्मशास्त्र, भक्ति, वेदांत या विषयांवर पंडितवर्य अच्युतराव मोडकांनी पुष्कळ ग्रंथरचना संस्कृतमध्ये केलेली आहे. त्यांना 'विषादो नाम' असेंच गीताप्रथमाध्यायाचे नाम मान्य आहे.

आज ३४ वर्षे झालीं, सद्गुरु श्रीप्रज्ञानंदस्वामीमहाराजांच्यापाशीं मी गीतेचें गुरुमुख केलें. त्या वेळीं मजजवळ आता उल्लेखिलेली पोथीच होती. स्वामीमहाराजांनीहि 'विषादो नाम' हाच पाठ मान्य केला. मी स्वतः तेव्हापासून 'विषादो नाम' असेंच म्हणत असतो.

# शेतकरी कर्जांतून कसा मुक्त होईल?

## वऱ्हाड राष्ट्रीयपक्षाची योजना

मुंबई येथे ता. १९ ऑक्टोबर रोजीं लोकशाही स्वराज्यपक्ष स्थापन झाला. ह्या पक्षाचे मुख्य चिटणीस बॅ. जम्नादास मेहता ह्यांनी शेतकऱ्यांवरील कर्ज कसें नाहीसें होईल ह्याविषयींची एक योजना अखिल–महाराष्ट्र–परिषदेचे स्वागताध्यक्ष ह्या नात्याने केलेल्या भाषणात पुढे आणली होती. त्या योजनेवर विचार होऊन ती अमलांत आणण्याकरिता एक कमिटी लोकशाही स्वराज्यपक्षातर्फे स्थापन झाली आहे.

बॅ. जम्नादास ह्यांच्या योजनेप्रमाणेच वऱ्हाडच्या राष्ट्रीयपक्षाचे कायदेमंडळांतील सभासद श्री. रामभाऊ कानिटकर ह्यांनी मध्यप्रांत कायदेमंडळांत गेल्या ऑगस्टच्या बैठकींत एक योजना सादर केली होती; परंतु शेतकऱ्यांचे कैवारी म्हणविणाऱ्या शेतकरी संघवाल्यांनी व सरकारने त्या योजनेस विरोध केला. शेतकऱ्यांना कर्जमुक्त कसें करावें ह्याविषयींची योग्य योजना आज ना उद्या सरकारास मान्य करावयास भाग पाडूं, असा राष्ट्रीयपक्षाला विश्वास आहे. परंतु ह्या कामी लोकांचे राष्ट्रीय पक्षाला साहाय्य पाहिजे. हें लोकांच साहाय्य मिळावें एतदर्थ लोकांच्या विचाराकरिता शेतकऱ्यांच्या कर्जविमोचनाची योजना स्थूल मानाने येथे राष्ट्रीय पक्षाच्या वतीने सादर करीत आहे.

शेतकऱ्यांवरील कर्जाचा बोजा आटोक्याबाहेर वाढला हें निर्विवाद आहे. कारण शेतींत होणाऱ्या मालाचे भाव उतरले, व्याजाचा दर फार भारी, शिवाय चक्रवाढव्याजाची पद्धति, ह्या योगाने कर्ज फेडणे सर्वतोपरी कठिण होऊन बसलें. ह्याकरिता सरकारने कायदा करून सावकार व शेतकरी ह्यांच्या देण्या–घेण्याच्या संबंधावर नियंत्रण घालणें जरूर आहे, व त्याकरिता कर्जदार शेतकऱ्यांना पैसा पुरविणेंहि अवश्य आहे. तरच शेतकरी जगेल, नाहीतर तो कर्जात मरेल, हें ह्या योजनेचें मूलतत्त्व समजलें पाहिजे. हे तत्त्व मान्य झाल्यावर [ १ ] सावकाराच्या व्यवहाराच्या योग्यायोग्यतेचा विचार करून त्याची शेतकऱ्याकडे घेणे असलेली रक्कम निश्चित करण्याचा पूर्ण अधिकार असलेलें एक मंडळ नेमलें जावें. [ २ ] ह्या मंडळाने ठरविलेली रक्कम कर्जदार शेतकऱ्यांतर्फे सावकारास सरकारने द्यावम्हणजे सरकारी वॉर-लोन-प्रमाणें सरकारी रोखे दरसाल ४ रुपयांच्या दराने ६० वर्षांच्या मुदतीने सावकारास द्यावे. ह्याचा स्पष्ट अर्थ हा कीं, सरकाराने वरील अटींवर सर्व कर्ज लावून घ्यावें. [ ३ ] मंडळ ठरवील ती रक्कम सरकारने शेतकऱ्यांकरिता दिल्यावर, सरकारने लांब मुदतीच्या किस्ती पाडून दरसाल शेंकडा ५ ह्या व्याजाच्या दराने वसूल करून घ्यावी. [ ४ ] ह्याप्रमाणे कर्ज फिटेपर्यंत कोणत्याहि सावकारास असल्या शेतकऱ्यांची जमीन घेतां येऊं नये.

पुष्कळ लोकांना कर्जविमोचनाची ही कल्पना चमत्कारिक वाटेल. पण त्यांत अव्यवहार्य असें काहीच नाही. सरकाराची पत फार मोठी आहे. त्यास शेंकडा ३॥ दराने लागेल तितकी रक्कम कर्जाने मिळेल. सरकाराच्या ह्या वाढत्या पतीचा फायदा कर्जबाजारी शेतकऱ्यांस मिळणे अवश्य आहे. सरकारचा अशा वेळीं जर लोकांस योग्य फायदा मिळाला नाही तर देशांत सरकार असले काय व नसलें काय लोकांस सारखेंच. तेव्हा सरकारच्या वाढत्या पतीचा फायदा कर्जबाजारी शेतकऱ्यास मिळावा, म्हणून लोकप्रतिनिधींनी प्रयत्न करणें अवश्य आहे.

वऱ्हाडच्या राष्ट्रीयपक्षाच्या ह्या योजनेंतील सूक्ष्म स्वरूप लोकशाही स्वराज्य पक्षाच्या ता. १७ डिसेंबर १९३३ ला भरणाऱ्या सभेंत निश्चित होईल. तरी ह्या योजनेस सार्वजनिक हिताची कळकळ असणाऱ्या लोकांचा कितपत पाठिंबा मिळतो हे पाहावें म्हणून ही योजना स्थूलमानाने प्रसिद्ध केली आहे. तरी सार्वजनिक कार्यकर्त्यांना व राष्ट्रीय कार्यास वाहून घेतलेल्यांना अशी विनंति आहे कीं, त्यांनी ह्या योजनेचा तत्त्वतः विचार करावा व आपापल्या भागांतील लोकांचा पाठिंबा मिळवावा. इतकेंच नव्हे तर ह्या योजनेंत कांही सूचना करावयाच्या असतील तर त्याहि कराव्यात. ह्या सर्व बाबतींत जो कांही पत्रव्यवहार करणें असेल तो माझेकडे करावा, किंवा लोकशाही स्वराज्यपक्षाचे वऱ्हाड, तर्फे असलेले चिटणीस श्री. ना. रा. बामणगांवकर संपादक–'उदय', उमरावती, ह्यांचेकडे करावा, अगर लोकशाही स्वराज्य पक्षाचे चिटणीस श्री. रामभाऊ मंडलीक, नेने बिल्डिंग, चर्नीरोड, मुंबई नं. ४, ह्या पत्त्यावर ता. १७ डिसेंबरपर्यंत पोहोचेल, अशा रीतीने करावा.

रामराव माधवराव देशमुख,
अध्यक्ष, वऱ्हाड-राष्ट्रीय-पक्ष,
उमरावती ( वऱ्हाड )

# मुंबईच्या व्यापारी—कारखानदारांवर बंगालचा राग कां ?

बंगाली लोकांची मुंबईच्या कारखानदारांवर वक्रदृष्टि असून वेळ साधून बंगाली लोक आपला राग मुंबईकरांच्या नमिलाच प्रत्ययास आणून देतात. रुपयाचा भाव कमी करण्याबाबतच्या चळवळीला मुंबईकडून प्रारंभ झाला, व श्री. नलिनी रंजन सरकारप्रभृति बऱ्याच वजनदार बंगाली व्यापारी मंडळींचा त्या चळवळीला प्रथमपासूनच पाठिंबाहि मिळाला. परंतु मुंबईकरांचा या चळवळींत स्वार्थी डाव आहे असें बंगालमधील कांहीं लोकांना वाटूं लागलें व त्यांनीं 'बंगाल विरुद्ध मुंबई' या वादाचें काहूर उठवून दिलें. आचार्य सर प्रफुल्ल चंद्र रे यांनीं रुपयाच्या अठरा पेनी भावाला उचलून धरून त्या काहुराला पाठिंबा दिला. हें काहूर शमविण्याकरिता करन्सी लीगतर्फे शेठ मथुरादास वसनजी व ए. डी. श्रॉफ हे कलकत्त्यास गेले व तेथे त्यांनी बंगाली व्यापारी व पुढारी यांच्याशीं रुपयाच्या भावाच्या प्रश्नाबाबत चर्चा केली व त्या चर्चेत त्यांना यशहि आलें ही गोष्ट वेगळी; परंतु या चर्चेच्या वेळीं या मुंबईच्या दोन व्यापाऱ्यांना बंगालच्या मनांत कसली मळमळ आहे हें चांगलेंच कळून आलें.

बंगालचा कापडाचा व्यापार बराचसा मारवाड्यांच्या हातीं असून जुटाच्या गिरण्याहि मारवाडी व युरोपिअन यांच्या हातीं आहेत. महाराष्ट्राप्रमाणेच बंगालचा व्यापारहि फारसा बंगाली लोकांच्या हातीं नाहीं व याचें शल्य अभिनव बंगालला सारखें झोंबत असतें. मुंबईकर पाहुण्यांवर बंगाली मंडळींनी प्रश्नांचा भडिमार करून बंगालचें अंतरंग त्यांच्यापुढे खुले केलें. बंगाली मंडळींचें थोडक्यांत म्हणणें असे—

मिठावरील आयात जकात मुंबईतील मूठभर स्वार्थी भांडवलवाल्याच्या हिताकरिता बसविली गेली. परंतु त्यामुळें बंगालचें नुकसान झालें. टाटांनी आपल्या मालाच्या विक्रीचा मक्ता बिगर बंगाली व्यापारी कंपन्यांनाच कां द्यावा ? मुंबई व अहमदाबाद येथील गिरणीवाल्यांनी बंगालमधील आपल्या विक्रीच्या कामावर बंगालबाहेरील लोक कां नेमावे ? ज्या वेळीं बंगाली कोळशाच्या खाणीवाल्यांनीं अहमदाबादच्या गिरणीवाल्यांना बंगालचा कोळसा स्वदेशी असल्यामुळे वापरा असें सांगितलें त्या वेळीं त्यांनी उच्च भावनांना धंद्यामध्ये स्थान नाहीं अशी भाषा कां बोलावी ? ज्या वेळीं मुंबईचे गिरणीवाले बंगालला स्वदेशी कापड वापरा असें म्हणतात त्या वेळीं लौकिकी विचारसरणीपेक्षां देशाभिमान मोठा उच्च दर्जाचा आहे हा मुद्दा ते पुढे करतात. परंतु ज्या वेळीं बंगाल आपला कोळसा घ्या म्हणतें त्या वेळीं मात्र स्वदेशाभिमानाचा मुद्दा लागू पडत नाहीं असें सांगतात.

बंगाली लोकांनीं वरील कारणांकरिता रुपयाचा भाव कमी करण्याच्या चळवळीला विरोध करणें हें राष्ट्रीय दृष्ट्या आत्मघातकीपणाचें असलें तरी मुंबईच्या कारखानदारांनीं बंगाली बंधूंच्या वरील तक्रारीपासून योग्य तो बोध घेणें आवश्यक आहे. मुंबई, अहमदाबाद वगैरे ठिकाणच्या पारशी, गुजराथी, मारवाडी व्यापाऱ्यांनी व कारखानदारांनी केवळ बंगालसंबंधीच नव्हे तर महाराष्ट्रासारख्या इतर प्रान्तांबाबतसुद्धां अनुदारपणाचें धोरण स्वीकारलेलें आहे. बंगालमध्ये व इतरत्रहि सांप्रत बेकारी वाढती आहे. मुंबईकडील कारखानदारांनीं परप्रान्तांत आपल्या व्यापाराच्या व विक्रीच्या क्षेत्रांत प्रवेश करण्याची अधिकाधिक संधि त्या त्या प्रान्तांतील तरुणांना दिली पाहिजे. 'इंडियन फिनॅन्स' वरून असें समजतें कीं वसनजी शेठजी व मि. श्रॉफ हे बंगाली मंडळींच्या तक्रारींना उत्तरें देण्याच्या भरीस पडले नाहींत व त्यांनी असें कबूल केलें कीं 'बंगालला दिलेल्या या भेटीनें आमचे चांगलेच डोळे उघडले. बंगालच्या तक्रारी आम्ही आमच्या सहकाऱ्यांच्या कानीं घालूं व यापुढे गैरसमजांना जागा राहूं नये म्हणून बंगालच्या व मुंबईच्या पुढाऱ्यांच्या अधिकाधिक गांठीभेटी पडाव्या म्हणून जरूर ती योजनाहि अमलांत आणूं.'

# ही द्या कमींत कमी मागणी

हिंदुस्थानाच्या राज्यकारभारावरील आपली राजकीय, आर्थिक व लष्करी पकड किंचित्‌हि ढिली होऊं न देतां, हिंदी लोकांना आपण मोठे भरीव हक्क देतों आहों असा फक्त आभास उत्पन्न होईल अशी कारवाई ब्रिटिश मुत्सद्द्यांनी चालविली आहे. पांढऱ्या खलित्यांतील योजनेच्या विचारविनिमयांत भाग घ्यावा म्हणून हिंदुस्थानांतून विलायतेंत गेलेले हिंदी प्रतिनिधि या कपटजालांत सांपडले असते तर ब्रिटिश मुत्सद्द्यांचा हा डाव कदाचित् यशस्वी झालाहि असता. पण या आठवड्यांत सर तेज बहादूर सप्रू, बॅ. जयकर, श्री. रंगास्वामी आयंगार व श्री. ना म. जोशी वगैरे हिंदी प्रतिनिधींनी एकत्र व व्यक्तिशः स्वतंत्र असे जे खलिते प्रसिद्ध केले आहेत त्यांवरून, पांढऱ्या खलित्यांतील योजनेस त्यांची संमति नाहीं हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट होत आहे. सर तेज बहादूर सप्रू यांनी एकशेंबावन पानांची तपशीलवार कैफीयत दिली असून या सर्व प्रतिनिधींनी एकत्र असा सदतीस पानांचा एक खलिता लिहिला आहे. नव्या सुधारणांसंबंधी त्यांच्या मतांचें जें चित्र या आरशांत दिसत आहे, त्यावरून असें स्पष्ट म्हणतां येतें कीं, त्यांनी नमूद केलेल्या सुधारणा जर मान्य केल्या गेल्या नाहीत तर पांढऱ्या खलित्यांतील योजनेला हिंदुस्थानांत पाठिंबा देणारा एकहि राष्ट्रीय वृत्तीचा व विचाराचा मनुष्य सांपडणार नाहीं.

गोलमेज परिषदा किंवा पार्लमेंटच्या कमिट्या यांत होणाऱ्या वादविवादाच्या मंथनांतून पूर्ण स्वातंत्र्याचा अमृत—कलश निघावयाचा नाहीं हें कोणास माहीत नाहीं? किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, ज्या ज्या चळवळीचा शेवट सलोख्याच्या वाटाघाटींत होतो त्यांतून पूर्ण स्वातंत्र्याची निर्मिति होणें शक्य नाहीं. तेव्हा गोलमेज परिषदेंतून स्वातंत्र्यप्राप्ति होत नाहीं म्हणून आक्षेप घेण्यांत अर्थ नाहीं. सर तेजबहादूर सप्रू वगैरेंना एवढी साधी गोष्ट कळत नाहीं असें नाहीं. म्हणूनच त्यांनी प्रथमपासून आपली भूमिका या बाबतींत स्पष्ट केली होती. हें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, त्यांच्या कैफीयतीची परीक्षा भलताच निकष लावून करूं नये, एवढाच इषारा प्रथम आम्हांस द्यावयाचा आहे.

पांढऱ्या खलित्यांतील योजना आपल्यास कां मंजूर नाहीं याची कारणें सांगतांना त्यांनी दिलेलें मुख्य व महत्त्वाचें कारण पाहिलें म्हणजे नव्या योजनेच्या कपटनाटकांतील ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या दंभाचा जसा स्फोट होतो, तशीच हिंदुस्थानांतील लोकांची कमींत कमी मागणी काय आहे हेंहि स्पष्ट होतें. या हिंदी प्रतिनिधींनी असें सडेतोड व निःसंदिग्ध शब्दांत नमूद केलें आहे कीं, हिंदुस्थानाला ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींच्या तोलाचें व त्यांच्या बरोबरीचें राजकीय स्थान मिळालें पाहिजे व तें लवकरच दिलें जाईल असें या योजनेच्या द्वारा जाहीर झालें पाहिजे. कानडा हा देश ब्रिटिश साम्राज्यांतच आहे; पण त्याला परकीय देशाशीं ब्रिटिशांच्या हिताविरुद्धहि असणारा असा व्यापारी तह करतां येतो. दक्षिण आफ्रिकेला आपलें स्वतःचें असें स्वतंत्र निशाण उभें करून आपलें राजकीय स्वातंत्र्य जाहीर करतां येतें. व आयर्लंडसारख्या देशास वेस्टमिनिस्टरच्या कायद्याचा आधार नेऊन ब्रिटिश गव्हर्नर-जनरलचाहि अधिकार संपुष्टांत आणतां येतो. वरील प्रकारचे वसाहतींना मिळालेले अधिकार हिंदुस्थानासहि दिले जातील अशी ग्वाही नव्या होणाऱ्या कायद्यांत जाहीर झाली पाहिजे, अशी मागणी आपल्या कैफियतींत या हिंदी प्रतिनिधींनी जी केली आहे तिच्यांतील मर्म हेंच आहे. हिंदुस्थानाची ही कमींत कमी मागणी मान्य केली गेली नाहीं तर नव्या योजनेस कोणाचाहि पाठिंबा मिळणार नाहीं, हें यावरून स्पष्ट होतें.

सर तेजबहादूर सप्रू वगैरे प्रतिनिधींनी या मुद्द्यावर एवढा जोर कां दिला आहे याचें कारण

या सुधारणांचा मागील इतिहास पाहिला म्हणजे सहज लक्षांत येतें. १९१९च्या कायद्यांत वसाहतीच्या स्वराज्याच्या ध्येयाचा मागमूसहि नाही. आस्ते, आस्ते पायरीमागून पायरी अशा पद्धतीने हिंदी लोकांस राज्यकारभाराचें शिक्षण द्यावयाचें वगैरे अनिश्चित स्वरूपाची शब्दरचना त्यांत केली गेली आहे. या शब्दांच्या धुक्यांत पुढील पायरीहि ठामपणें दिसत नाही, मग वसाहतीच्या स्वराज्याचें ध्येय हें बेपत्ता असलें तर त्यांत आश्चर्य काय? अमृतसर येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेंत या मुद्द्याची कसून चर्चा झाली होती; व ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या या फसवेगिरीचा निषेधहि केला गेला होता. "वसाहतीचें स्वराज्य' देऊं असें आम्ही कधीच म्हटलें नव्हतें, फक्त 'जबाबदारीची राज्यपद्धति अमलांत आणावयाची' एवढेंच वचन दिलें गेलें आहे, असें जें सर मालकम हेले यांनी त्यावर भाष्य केलें त्याचा नेहरू रिपोर्टांत जो समाचार घेण्यात आला आहे, त्याचाहि उद्देश हाच होता कीं, हिंदुस्थानाचें राजकीय ध्येय स्पष्ट शब्दांत कायद्यांत नमूद झालें पाहिजे. या धोरणास अनुसरूनच सर तेज बहादूर सप्रू वगैरेंनी असें म्हटलें आहे कीं, 'आता या पायऱ्यांची भाषा पुरे करा. ही नवी राजकीय योजना हीच शेवटची पायरी असें म्हणा व ही पायरी मर्यादित कालांत हिंदुस्थानाने ओलांडली कीं, त्याला वसाहतींना दिलें गेलेलें स्वातंत्र्य मिळालेंच पाहिजे असें जाहीर करा.' गोलमेज परिषदेच्या पहिल्या वादविवादाच्या वेळींच प्रथम या ध्येयाचा विचार व्हावा असें आम्ही आग्रहाने प्रतिपादिलें होतें. पण त्या वेळीं त्या प्रतिनिधींना तें पटलें नाही. पण आता तरी या राजकीय ध्येयाची घोषणा या प्रतिनिधींनी आपल्या कैफियतींत केली ही फार चांगली कामगिरी केली. या ध्येयाच्या घोषणेचा आग्रह अखिल राष्ट्रास मान्य होईल यांत शंका नाही.

मध्यवर्ती सरकारच्या राज्यकारभाराबाबत संयुक्त राज्यपद्धति संस्थापन करून राज्यकारभाराची सर्व जबाबदारी लोकांच्या प्रतिनिधींच्या स्वाधीन शक्य तितक्या लवकर करा अशी या प्रतिनिधींची दुसरी मागणी आहे. सर सॅम्युअल होअर यांच्या योजनेचा असा डाव आहे कीं, प्रथम प्रांतिक स्वायत्तता द्यावयाची व नंतर जुळेल तेव्हा, म्हणजे ब्रिटिश सरकारच्या इच्छेनुसार केव्हा तरी भविष्यकाळांत, मध्यवर्ती सरकारच्या राज्यकारभाराची जबाबदारी लोकांच्या प्रतिनिधींवर टाकावयाची! हा डाव हाणून पाडण्याकरिता सर तेजबहादूर वगैरे प्रतिनिधींनी अशी मागणी केली आहे कीं, १९३४ च्या अखेरपर्यंत प्रांतिक स्वायत्तता अमलांत आणावयाची आणि त्यानंतर एक वर्षाच्या आंत म्हणजे १९३५ सालीं मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीचें स्वराज्य सुरू करावयाचें असा कार्यक्रम ठरला पाहिजे. या बाबतींत सरकारतर्फे पुढे केलेल्या सर्व कारणांची छाननी करून त्यांचें म्हणणें अत्यंत सयुक्तिक पद्धतीने या कैफियतींत खोडून टाकलेलें आहे. हिंदी प्रतिनिधींनी केलेला युक्तिवाद वाखाणण्यासारखा आहे. परंतु आज तपशिलांत न शिरतां, आम्हांला इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, ब्रिटिश सरकाराला पटो वा न पटो हिंदी लोकांस तो युक्तिवाद सर्वथैव पटण्यासारखा आहे व त्याला अखिल हिंदुस्थानाचा पाठिंबाहि खास मिळेल.

स्वतः सर तेजबहादूर सप्रू यांनी या मुद्द्याबाबत नमूद केलेलें मत त्यांच्याच शब्दांत दिलें म्हणजे पुरे. ते म्हणतात कीं, "ज्या घटनेमध्ये प्रांतिक स्वायत्तता प्रथम देऊन, मध्यवर्ती सरकारांतील जबाबदारीचा प्रश्न लोंबकळत ठेवण्याची योजना आहे, ती घटना हिंदी लोकमताला केव्हाहि मान्य होणार नाही. प्रांतिक स्वायत्तता व मध्यवर्ती जबाबदारी यांचा अंमल जवळजवळ एकदमच व्हावयास पाहिजे. हें जर न झालें तर गोलमेज परिषदेची खटपट फुकट गेली असेंच म्हणावें लागेल. म्हणून मला असा इषारा या वेळींच द्यावासा वाटतो कीं, अशा तऱ्हेची घटना मान्य करून ती अमलांत आणण्याचें काम हिंदु-

स्थानांतील कोणताहि संघटित राजकीय पक्ष आपल्यावर घेणार नाही व त्यामुळे देशांत असंतोष माजून पुनः लोकमत क्षुब्ध झाल्याशिवाय राहणार नाही !" सप्रूंचा हा इषारा फार महत्त्वाचा व अर्थपूर्ण आहे. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, हिंदुस्थानातर्फे हें एक प्रकारचें आव्हान असून कमींत कमी अशी हिंदुस्थानाची ही मागणी मान्य न केल्यास हिंदी जनतेला राजकीय हक्कांचा झगडा तीव्र स्वरूपांत चालवावा लागेल, असें सप्रूंचें ब्रिटिश मुत्सद्द्यांस निक्षून सांगणें आहे. सर तेज बहादुरांचें हें सांगणें ब्रिटिश सरकार मान्य करतें का सुईच्या अग्रावरील मातीहि देणार नाही असें म्हणणाऱ्या दुर्योधनाची हट्टी वृत्ति ब्रिटिश सरकार स्वीकारतें, हें आतां पाहावयास सांपडेल.

मध्यवर्ती सरकारच्या राज्यकारभारांत लष्कर, परराष्ट्रीय राजकारण वगैरे जे विषय खास राखून ठेवले आहेत तेहि लवकरच लोकांच्या स्वाधीन करावे, असें या कैफियतींत म्हटलें आहे. लष्करी खातें आजच लोकांच्या ताब्यांत द्यावें असें म्हणणें नाही; परंतु त्या बाबतींत पुढील पांच गोष्टी तावडतोब अमलांत आणाव्या अशी मागणी करण्यांत आली आहेः ( १ ) बिनसरकारी हिंदी गृहस्थाला लष्करी सल्लागार नेमावा. ( २ ) लष्कराचें हिंदीकरण करण्याचा एक निश्चित कार्यक्रम आंखावा. (३) लष्करविषयक धोरणाचा व लष्कराच्या खर्चाचा विचार सरकार व भावी हिंदी प्रधान–मंडळ यांनी एकत्र बसून करावा.(४) लष्करी धोरणाचा विचार करण्याकरिता कायद्यानेच एक कमिटी नेमली जावी. (५) लष्करी खर्च कमी करावा व हिंदुस्थानाच्या बाहेर हिंदी लष्कराचा उपयोग येथील मंत्रिमंडळाच्या विचाराशिवाय केला जाऊं नये. आर्थिक बाबतींत व औद्योगिक स्वातंत्र्याच्या बाबतींत घातलेली संरक्षक बंधनेंहि सैल करावीं असें या कैफियतींत आग्रहाने प्रतिपादिलें आहे या सर्वांचा तात्पर्यार्थ हा आहे कीं, सध्या आंखलेली योजना विस्तृत व भरीव केल्याशिवाय ती हिंदी जनतेस पटणार नाही.

हिंदुस्थानाची कमींत कमी मागणी या दृष्टीने ही कैफीयत पटण्यासारखी आहे यांत शंका नाही. होअरशाही थाटाच्या नव्या योजनेविरुद्ध सर्व राजकीय पक्षांचें मत संघटित करण्याचे प्रयत्न कांही राष्ट्रीय सभेचे पुढारी व मुंबईतील प्रेसिडेन्सी असोसिएशन वगैरे संस्था करीत आहेत. हिंदी प्रतिनिधींनी कमींत कमी म्हणून ज्या मागण्या आपल्या कैफियतींत मांडल्या आहेत त्यावर सर्व पक्षाचें ऐकमत्य होईल असें वाटतें. तसें झाल्यास या मागण्या मान्य केल्या जाव्या म्हणून राष्ट्रांत संघटित अशी सर्वपक्षीय चळवळ करणें शक्य आहे व इष्ट आहे. अशी चळवळ झाली तरच साम्राज्यवादी हुजूर पक्षीय मुत्सद्द्यांच्या डावाला यशस्वी रीतीने विरोध करतां येईल, हिंदी लोकांच्या मागण्या मान्य होतील व श्वेतपत्रिकेंत फेरबदल करून घेतां येईल. मॉंटेग्यू-चेल्म्सफर्ड रिपोर्टाच्या पूर्वी असेंब्लींतील १९ हिंदी सभासदांनी आपली जशी संयुक्त मागणी मांडली होती तशीच भूमिका स्वीकारून जॉइंट कमिटीच्या हिंदी प्रतिनिधींनी ही संयुक्त मागणी केली आहे. अर्थातच पूर्वीच्या परिस्थितींत १९ सभासदांच्या संयुक्त मागणीचा राष्ट्राने जसा उपयोग करून घेतला तसाच उपयोग सप्रूप्रभृतींच्या या कैफियतीचाहि करून घ्यावा.

# स्फुट सूचना

१ न्यायदानाच्या कामांत केवळ सत्याचें व न्यायाचें ध्येय दृष्टीपुढे अढळ ठेवून निर्भीडपणें न्यायनिवाडा करणारे न्यायाधीश विरळाच आढळत असल्यामुळे असली एखादी अपवादभूत व्यक्ति आढळतांच तिचें अभिनंदन व कौतुक करावें तेवढें थोडेंच वाटतें. कलकत्त्याचे चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट बाबू एस. के. सिंह हे अशाच विरळा कोटीपैकीं एक आहेत. त्यांच्यापुढे गेल्या गुरुवारीं बाबू रजनीकांत मुकर्जी यांचा खटला चालला. बाबू रजनीकांत हे ऑ. इं. ट्रे. यूनिअन कॉंग्रेसचे

संघटक चिटणीस आहेत. त्यांनी गेल्या सप्टेंबर महिन्यांत कलकत्त्यास भरलेल्या विद्यार्थी व युवक यांच्या सभेत एक भाषण केलें आणि त्यांत समाजसत्तावादी पक्षाचा कार्यक्रम श्रोतृवर्गापुढें मांडला. त्या भाषणावरून त्यांजवर १२४ अ कलमाखालीं राजद्रोहाचा खटला भरण्यांत आला. हा खटला सुदैवेकरून चीफ प्रे. मॅजिस्ट्रेट एस. के. सिंह यांच्यापुढेंच सुनावणीस निघाला. त्यावेळीं मॅ. सिंह यांनीं रजनीकांत यांच्या समग्र भाषणाची चिकित्सा करून असा निर्णय दिला कीं, समाजसत्तावादाचा कार्यक्रम समाजापुढें मांडण्यानें राजद्रोहाचा गुन्हा होत नाहीं; कारण यांत प्रचलित राज्यकर्त्यांविरुद्ध असंतोष माजविण्याचा किंवा त्यांच्याविषयीं वीट उत्पन्न करण्याचा उद्देश नसून सार्वी राज्यव्यवस्था कोणत्या तत्त्वावर उभारली जावी हें सांगण्याचाच हेतु आहे. हा हेतु साध्य करण्यासाठीं शेतकरी व कामकरी यांचे संघ स्थापित करावे आणि हल्लीं जी सत्ता साम्राज्यवादी, भांडवलवाले आणि जहागीरदार यांच्या हातांत एकवटली आहे ती सत्ता बहुजनसमाजांत विभागली जावी असें आरोपीनें प्रतिपादन केलें आहे; आणि आपल्या भाषणांत कोठेंहि अत्याचाराचा किंवा क्रान्तीचा उपदेश केला नाहीं; म्हणून त्यांचें भाषण कायद्याच्या मर्यादेचें उल्लंघन करणारें ठरत नाहीं. सुधारलेल्या व सुसंस्कृत अशा राज्यघटनेंत व्यक्तिमात्राला आपलें प्रामाणिक मत प्रतिपादण्याचा जो जन्मसिद्ध हक्क असतो त्या हक्काला अनुसरूनच हें भाषण असल्यामुळें आरोपीला दोषमुक्त करण्यांत येत आहे, असा निकाल सदर मॅजिस्ट्रेट यांनीं दिला. इतक्या निर्विकार मनानें आणि केवळ न्यायाच्या उच्च भूमिकेवरूनच आपणापुढें आलेल्या पुराव्याकडे पाहणारे न्यायाधीश जर सर्वत्र लाभतील तर दडपशाहीला किती तरी आळा बसेल !

—— ——

२ ब्रह्मदेश आणि बंगाल प्रांत यांतील दोघा न्यायाधिकाऱ्यांचे स्वतंत्र बाण्याचे हे उद्गार वाचल्यानंतर मुंबईच्या हायकोर्टानें 'नवाकाळ'पत्राच्या जामीनकीच्या जप्तीसंबंधानें जो निकाल दिला तो वाचून मनाला उद्वेग वाटतो ! ता. ६ जूनच्या 'नवाकाळ' पत्रांत राजकीय कैद्यांचा अंदमानांत रवानगी करण्याच्या धोरणाबाबत आणि तेथील कैद्यांशीं होणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वागणुकीबाबत टीकात्मक लेख प्रसिद्ध झाला होता. त्या लेखावरून मुंबई सरकारला राग येऊन ता. १० जुलै रोजीं त्या पत्राची ६ हजारांची जामीन रक्कम जप्त करण्याचा सरकारनें हुकूम दिला. या जप्तीच्या हुकमाविरुद्ध त्या पत्राच्या संपादकांनीं हायकोर्टाकडे अपील केलें व त्याची सुनावणी गेल्या गुरुवारीं फुलबेंचापुढें झाली. 'नवाकाळ'पत्रातर्फे काम चालवितांना श्रीयुत ठाकोर यांनीं असें दाखवून दिलें कीं, १९१९ सालीं नेमलेल्या सरकारी जेल कमिटीनेंच अंदमानबेट ही जागा कैद्यांना ठेवण्याला योग्य नाहीं असें स्पष्ट मत दिलें होतें आणि त्यावरून पुढें १९२१ सालीं असेंब्लींत वादविवाद होऊन अखेरीस सरकारनेंच अंदमानांत कैदी न पाठविण्याचें धोरण जाहीर केलें. असें असतां पुनश्च १९३२ सालीं हिंदुस्थानसरकारनें बंगाल्यांतील कांहीं अत्याचारी कैद्यांची अंदमानाला रवानगी केली व १९३३ सालच्या मे महिन्यांत त्यांतील ९३ कैद्यांनीं आपल्या तक्रारीसाठीं म्हणून अन्नत्याग सुरू केला. त्या अन्नत्यागाच्या सत्याग्रहांत तीन बंगाली कैदी प्राणास मुकले ! अशा परिस्थितींत 'नवा काळ' पत्रानें अंदमानांत कैदी पाठविण्याच्या सरकारच्या धोरणावर आणि जेलमधील अधिकाऱ्यांच्या ज्या वर्तणुकीमुळें अन्नत्याग करून तीन कैदी प्राणास मुकले त्या वर्तणुकीवर, कडक टीका केली. पण त्या टीकेचा उद्देश सरकारनें अंदमानाला कैदी पाठविण्याचें बंद करावें आणि जेलच्या अधिकाऱ्यांच्या वर्तनांत योग्य सुधारणा व्हावी एवढाच होता आणि हा फेरबदलहि न्याय्य मार्गानीं घडवून आणावयाचा हाहि उघड होतें. सारांश, सरकारी धोरणावर टीका करण्याचा आणि असलें धोरण बदला म्हणून आग्रह धरणें हा जो न्याय्य हक्क वृत्तपत्रकारांना कायद्यानें दिला आहे त्या हक्काची मर्यादा यांत ओलांडली गेली नसल्यामुळें हा जामीनजप्तीचा हुकूम रद्द केला जावा असें श्रीयुत ठाकोर यांनीं प्रतिपादन केलें.

——————

३ श्रीयुत ठाकोर यांचें म्हणणें खोडून काढण्याची व जप्तीच्या हुकमाचें समर्थन करण्याची, सरकारी ॲडव्होकेट जनरल कांगा यांना तसदीदेखील पडू न देतां न्यायमूर्तींनीं अपील अर्ज फेटाळून लावला ! अत्याचारी बंगाली कैद्यांच्या वर्तानें वकिली केल्यामुळें अत्याचारी लोकांविषयीं मान्यता दर्शविल्यासारखें होतें, असें जर न्यायमूर्तींनीं म्हटलें असतें व त्या मुद्द्यावर अपिलाचा निकाल दिला असता तर तें मत योग्य कीं अयोग्य असा वादाचा प्रश्न तरी होऊं शकला असता; परंतु त्या मुद्द्यावर निर्णय न देतां केवळ अंदमानांत कैदी पाठवूं नका, आणि यदाकदाचित् पाठविलेच तर निदान त्यांच्यावर सत्याग्रहाची पाळी येईल

असली निष्ठुर वागणूक न ठेवतां दयार्द्र दृष्टीनें त्यांस वागवा, एवढें सांगण्यासाठीं जो लेख लिहिला गेला त्या लेखानें सरकाराविषयीं तिरस्कार व चीड उत्पन्न होते, सबब जामीनजप्तीचा हुकूम रद्द करण्यांत येत नाहीं, असें हायकोर्टानें ठरविल्यामुळे टीका करण्याची मर्यादा अत्यंत संकुचित होत आहे. कारण कोणाचीहि कोणतीहि चुकी दाखविली कीं, तेवढ्यापुरती त्या व्यक्तीविषयीं अप्रीति वाटणारच; आणि तेवढ्यावरून जर ती टीका अयोग्य ठरेल तर मग सरकारच्या कृत्यावर टीका करावयाची तरी कशी ? अर्थातच टीकेची न्याय्यान्याय्यता तींत प्रतिपादन केलेल्या मार्गाला धरून ठरवावयाची असते आणि 'नवा काळ' पत्रानें कांहीं अदमानांत केंदी पाठविणें बंद करण्याला बंडाचा किंवा क्रांतीचा मार्ग सुचविला नव्हता ! जेल कमिटीच्या शिफारशीस अनुसरून सरकारनेंच दयार्द्र बुद्धीनें हा फेरबदल करावा असेंच म्हटलें होतें. असें असता हायकोर्टानें जामीनजप्ती योग्य ठरविली, यामुळे वृत्तपत्रांच्या हक्काचा अत्यंत संकोच होत आहे. यास्तव वृत्तपत्रकारांच्या संघानें हा प्रश्न हातीं घेऊन त्यावर काय उपाय योजावयाचा तें ठरवावें.

# परदेशांतील हिंदी लोकांचा छळ

### काँग्रेसमधील सत्ययुग

स्वातंत्र्याच्या चळवळीतच सारें लक्ष व्यग्र झालें असल्यामुळे परदेशामध्यें हिंदी लोकांचे किती आणि कसे छळ होत आहेत या गोष्टीकडे राष्ट्रधुरीणांचें व हिंदी लोकांचें अक्षम्य दुर्लक्ष होत आहे. १९२० सालापर्यंत परदेशात राष्ट्रीय सभेच्या प्रचाराचें कार्य चालू असल्यानें परदेशीय हिंदी लोकांच्या गाऱ्हाण्यांना वाचा फुटण्यास थोडी जागा तरी होती. परंतु १९२० सालापासून काँग्रेसमध्यें आत्मनिरीक्षण व आत्मशुद्धि यांनी उपलक्षित असें सत्ययुग निर्माण झाल्यानें काँग्रेसनें परदेशावरील आपला तृतीय नेत्र मिटला व त्यामुळे साहाजिकच परराष्ट्रीय प्रचारहि बंद पडला. आता परदेशांतील हिंदी लोकांची माहिती झिरपणार ती युरोपियन वार्ताहरांच्या एकांगी बातमीपत्रांतून. त्या पत्रांमध्यें हिंदी लोकांचीं गाऱ्हाणीं सत्यस्वरूपानें कशी प्रतिबिम्बित होणार ? वस्तुतः, देशामध्यें स्वातंत्र्यसंपादनाची चळवळ जितक्या आतुरतेनें चालविली जाते तितक्याच दक्षतेनें परदेशीय हिंदी बांधवांची विचारपूस केली गेली पाहिजे. प्रत्यक्ष मदतीपेक्षांहि सहानुभूतीचा ओलावा त्यांच्या दुःखित मनाला हुरूप आणण्यास समर्थ आहे. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, नुसती सहानुभूति दाखविण्याच्या कामींहि हिंदी लोकांकडून दिरंगाई केली जाते !

### उदासीन आक्षेपक

परदेशीय प्रश्नांबद्दल आम्ही किती उदासीन असतों याचें प्रत्यंतर पाहाण्यास दूर जावयास नको. द. आफ्रिकेंतून हिंदी लोकांना हुसकून लावण्याचा तेथील गोऱ्या वसाहतवाल्यांचा पद्धतशीर प्रयत्न चालू असता हिंदुस्थानांत त्याच्या निषेधार्थ किती सभा भरल्या व निषेधदर्शक कितीसे ठराव झाले ? यावर कांहीं संभावित असा आक्षेप घेतील कीं, "ज्याच्या पायाला काटा बोचतो, त्याचा त्यानें काढावा, आम्हाला त्याचें काय होय ? शिवाय, आमचीं दुःखें आमच्या पाठीशी लागलींच आहेत. 'आत्मानं सततं रक्षेत्' हें तत्त्व त्रिकालाबाधित आहे. हा मनुष्यस्वभावच आहे." असा आक्षेप घेणाऱ्या आक्षेपकांच्या संकुचित बुद्धीची कींवच केली पाहिजे. दुसऱ्या जातीचे आक्षेपक म्हणतात, "जसा रोग तसा उपाय; तद्देशियांनीच आपलीं गाऱ्हाणीं निवारण करण्याचा सुप्रयत्न केला पाहिजे. कारण तेथील परिस्थितींत काय करतां येणें शक्य आहे, हें तेच उत्तम उमगूं शकतील. शिवाय स्वावलंबन हेंच ध्येयसिद्धीचें अचूक साधन आहे. आमच्या विरोधाचा उपयोग काय ? आमचे ठराव वाचतो तरी कोण ?" पहिल्या आक्षेपकांपेक्षा दुसऱ्या प्रकारचे आक्षेपक थोडे तरी समंजस व दोनगोष्टी ऐकून घेण्यास तयार असतात. तरी त्यांच्या आक्षेपांचा थोडक्यांत विचार करूं.

### द. आफ्रिकेंतील अन्याय

त्या त्या देशांतील लोकांनीं परिस्थित्यनुरूप उठावणी करून आपले वाजवी हक्क प्रस्थापित करून घेण्याचा व होत असलेले अन्याय निवारण्याचा प्रयत्न केला पाहिजे यांत वादच नाहीं. परंतु अशा वेळीं असा विचार करावयास पाहिजे कीं, एकट्याच्या प्रयत्नानें एखादी गोष्ट जितक्या लवकर साध्य होते त्यापेक्षा अधिक लवकर वेळांत दहा माणसांच्या संघटनेनें ती गोष्ट साध्य होते. द. आफ्रिकेंतील लोक हकालपट्टीच्या धोरणाविरुद्ध कंबर कसून चळवळ करीतच आहेत. युनियन सरकारानें वस्ती, प्रवास, व्यापार इत्यादि बाबतींत त्यांजवर जे घोर अन्याय

चालविले आहेत त्याविरुद्ध त्यांनी विरोधाचें शस्त्र उचललेंच आहे. तथापि आज ते परदेशांत हताश स्थितींत खितपत आहेत. त्यांना हिंदुस्थानांतील हिंदी बांधवांच्या साहाय्याची अपेक्षा आहे. अर्थात् हिंदी लोकांनीहि आपुलकीचा भाव ओळखून त्यांना हर-तऱ्हेने मदत नको का करायला? वृत्तपत्रांतून, सभांतून, कायदेमंडळांतून, सारांश, ज्या ज्या स्थानावरून आक्रोश करतां येईल, त्या त्या स्थानावरून युनियन सरकारच्या नव्या धोरणाविरुद्ध एकच गिल्ला झाला पाहिजे. असा गिल्ला झाला तरच सध्या त्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां जें कमिशन बसलें आहे, त्यांजवर थोडा तरी परिणाम होईल.

## जर्मनींतील हिंदी लोक

नुसत्या द. आफ्रिकेंतच हिंदी लोकांचा छळ होत आहे असें नाही, तर स्वतःला सुसंस्कृत, अभिजात आणि आर्यवंशी समजणाऱ्या जर्मनी-मध्येहि त्यांच्या नशिबीं दरवेशाचें जिणेंच आलें आहे. हर हिट्लर अधिकारारूढ झाल्यापासून नाझी लोकांच्या अंगांत वारें संचारल्यासारखें झालें आहे. या विजयोन्मादांत त्यांच्याकडून चांगल्या गोष्टीपेक्षा वाईट गोष्टीच अधिक प्रमाणांत घडू लागल्या आहेत. अन्तर्गत राजकारण व परराष्ट्रीय राजकारण या बाबतींत हर हिट्लर व त्याचें सरकार यांनी अवलंबिलेल्या धोरणाबद्दल आम्हाला प्रस्तुत स्थळीं बरें-वाईट काहीच म्हणा-वयाचें नाही. परंतु त्यानें वंशशुद्धि व त्या पायीं कांही विवक्षित लोकांचा छळ जो चाल-विला आहे, त्याबद्दल दोन शब्द लिहिणे भाग आहे. हर हिट्लर हा स्वतःला आर्यवंशी समजतो व सारें जर्मन राष्ट्र केवळ ‘ आर्यभूयिष्ठ ’ करण्याचा त्याने चंग बांधला आहे. जर्मन लोक तेवढेच शुद्ध आर्यवंशी अशी खोटीच कल्पना उराशीं बाळगल्यामुळे हर हिट्लर यांच्या हातून कांही अक्षम्य चुका व अन्याय होत आहेत. उदाहरणार्थ, जर्मनीमध्ये सध्या जे हिंदी लोक विशेषतः, हिंदु लोक राहत आहेत त्यांना बाडग्या वंशाचे (हाफ-कास्ट) संबोधून हर हिट्लर त्यांना हिणवीत आहेत!

## हिट्लरचें ऐतिहासिक अज्ञान

हिंदु लोक ‘ बाडग्या वंशा ’ चे आणि जर्मन लोक मात्र शुद्ध आर्यबीजाचे असें विधान करीत असतां हर हिट्लर यांना खिस्तपूर्व इतिहास कित-पत माहीत होता याची जबर शंका वाटते. मूळ उत्तर ध्रुवावर राहणारे आर्य लोक तेथून निघून कोणत्या देशांत कसे वसाहत करून राहिले हा प्राचीन इतिहास जे जाणतात त्यांना हें पक्कें स्मरत असेल कीं, आर्योच्या सूर्यवंशी आणि चंद्रवंशी अशा दोन शाखा अनुक्रमें खैबर घाट व गिल्गिट खिंड यांच्या द्वारें हिंदुस्थानांत प्रथम येऊन राहिल्या. आणि त्यांच्याच पैकीं दुसऱ्या एका टोळीने जर्मनीकडील भागांत प्रवेश केला. हिंदुस्थानांत प्रवेश होतांच आर्यांनी आपल्या बाहुप्रतापाने आणि बुद्धिसामर्थ्याने एतद्देशीय अनार्यांचा पाडाव करून आपलीं राज्यें स्थापिलीं व सुधारणा-युगाची मुहूर्तमेढ रोविली! हा इतिहास प्रस्तुत प्रसंगीं सांगण्यांतील प्रयोजन इतकेंच कीं, हर हिट्लर यांना स्वतःला आर्यवंशाचा जितका अभिमान असेल त्याहून दसपट अभिमान हिंदूंनाहि आहे. जर्मन लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारल्याने व त्यांच्यांत ज्ञातिबंधनांची तीव्रता कमी असल्याने त्यांच्या रक्तांत थोडा तरी भेसळ-पणा आलेला असणें अपरिहार्य आहे. परंतु हिंदु-स्थानांतील हिंदु लोकांनी चातुर्वण्याचें पालन कडक शिस्तीने केलें असल्यामुळे ‘ बाडग्या वंशा ’ चा किंवा ‘ भेसळ रक्ताचा ’ आरोप त्यांच्यावर रतिमात्रहि येऊं शकत नाही.

## अविचारमूलक विधान

एवंच, वंशशुद्धीच्या दृष्टीने विचार करतांहि हर हिट्लर यांचें हिंदु लोकांविषयींचें विधान धादान्त खोटें, खोडसाळपणाचें आणि निराधार ठरतें. परंतु इतिहास सत्य आणि स्वच्छ असला तरी तो तित-क्याच शुद्ध स्वरूपांत वाचावा असें कोणतें बंधन सत्ताधाऱ्यांवर आहे? हातीं अनियंत्रित सत्ता आहे म्हणूनच हर हिट्लर हे निर्धास्तपणें अद्वातद्वा बोलू शकतात. सुलतानशाहीचा कैफ डोळ्यावर चढल्यामुळेच त्यांच्या दृष्टीला हिंदूंचें शुद्ध आर्यत्व दिसेनासें झालें व म्हणूनच ते भल-भलतीं दोषस्थळें काढून हिंदूंचा छळ करीत आहेत. युरोपमधील ‘ सेंट्रल कमिटी फॉर इन्डि-पेन्डन्स ’ या संस्थेने आमच्याकडे जें एक पत्रक पाठविलें आहे त्या पत्रकांत तिने जर्मनीमध्यें हिंदी लोकांना ‘ बाडग्या वंशा ’ चे म्हणून कसें हिणविलें जात आहे, त्यांचा तेथे नाझी लोकांकडून कसा छळ होत आहे याचें वर्णन दिलें आहे. अशा दुर्दैवी फेऱ्यांत सांपडलेल्या लोकांत श्री. ए. सी. नंबियार, सौ. सरोजिनी नायडू यांचे चिरंजीव रा. जे. नायडू, मि. फरुकी, रा. तेंडूलकर, रा. व्रजेशसिंग, रा. डी. के. गुप्त, डॉ. रवीन्द्रनाथ टागोर यांचे पुतणे रा. एस्. एन. टागोर व रा. एम्. के. सेन इत्यादि लोक आहेत. या लोकांशिवाय आणखी किती तरी हिंदी लोक नाझींच्या यातनाकुंडांत होरपळत आहेत. परंतु आपला अधिक छळ होईल म्हणून नांवें प्रसिद्ध न करण्याबद्दल त्यांनी आपल्या

मित्रांना विनविलें आहे. म्हणजे धाय मोकलून रडायलासुद्धा चोरी ! तोंड दाबून बुक्क्यांचा मार म्हणतात तो हा ! !

### छळाचा प्रकार

नाझी सरकाराने अधिकाराच्या धुंदींत श्री. ए. सी. नंबियार यासारख्या प्रतिष्ठित हिंदूला विनाहुकूम कैद केले, त्यांची मालमत्ता जप्त केली, घर फोडलें आणि शेवटीं त्यांना नाझींच्या छलगृहांत विनाचौकशी चार आठवडे कोंडून ठेवलें. अखेरीस तर प्रशियांतून त्यांना हद्दपारहि करण्यांत आलें. मालजप्ती किंवा घरफोडी याबद्दल त्यांना कोणत्याहि प्रकारची नुकसानभरपाई देण्यांत आली नाही. बाकी नंबियार यांना जीवदान मिळालें ही तरी मेहरबानीच मानली पाहिजे. कारण त्यांचें शूलारोपणच केलें असतें तरी नाझींचें कोण काय करणार होतें ! रा. नंबियार हे जर्मनी व हिंदुस्थान यांजमधील स्नेहसंबंध वाढविणारी खटपट करणाऱ्या इंडियन इन्फर्मेशन ब्यूरो या संस्थेचे संचालक होत; संस्था हिंदी राष्ट्रीय सभेनेंच तेथे स्थापिली होती व पूर्वीच्या जर्मन सरकारने तिला आपली मान्यताहि दिली होती. अशा राजमान्य संस्थेच्या संचालकालाहि जेथे अर्धचंद्र मिळाला तेथे इतर लोकांचे हाल कुत्रेंहि खात नसेल हें काय सांगावयास पाहिजे ? नाझींनी ज्यू लोकांची जशी शिकार चालविली आहे तशीच ती इतर धर्मीयांची चालविण्याचा नाझींचा विचार दिसतो. अर्थात् त्याचा प्रतिकार करण्याचा संकल्प सुसंस्कृत जगाने केला पाहिजे.

### कुंभकर्णी वृत्ति

परदेशांत हिंदी लोकांची मत्ता जाऊन त्यांना लत्ता बसत आहे आणि आब्रूचें खोबरें होत आहे तरी आम्ही आमच्या कुंभकर्णच ! बरोबरच आहे, कारण आम्ही आमच्या स्वतःवर होणारे अन्यायहि जर येथे निमूटपणें सहन करतों, तर परदेशांतील हिंदी लोकांच्या अन्यायाबद्दल आम्हाला चीड यावी कशी ? नाही तर, तोच जर्मनी पहा रशियामध्य आपल्या वार्ताहरांना छळल्याचें वृत्त येतांच जर्मनीमधून रशियन वार्ताहरांची हकालपट्टी झाली. इंग्लंडने, मास्को-खटला उभा राहता ब्रिटिश आरोपींबद्दल आपल्या जिवाचा केवढा आटा पिटा केला व त्यापायीं रशियाशीं असलेलें व्यापारी नातेंहि कसें तोडलें हा वृत्तान्त ताजाच असल्याने वाचकांच्या स्मरणांत असेलच. याला म्हणावा, आतड्याचा पीळ ! हिंदुस्थान स्वतंत्र नाही हें सगळ्यांनाच माहीत आहे. म्हणून त्याने आपल्या परदेशांतील बांधवांच्या छळाबद्दल त्या सरकाराला जाब विचारूं नये हा कोठला न्याय ? निदान त्या सरकाराकडे चौकशीबद्दल ठराव पाठविण्यास कोणती हरकत ? आक्रमणाचें दिव्य आज न करतां आलें तरी आक्रोशाचें शिंग फुंकण्यास कोणती हरकत ?

# लोकशाही स्वराज्य पक्ष

### सोलापूर जिल्हाशाखेची स्थापना

शुक्रवार ता. ८ रोजीं पंढरपूर येथे सोलापूर जिल्ह्यांतील निरनिराळ्या कार्यकर्त्यांची सभा भरली होती. या सभेस पुण्याहून श्री. दा. वि. गोखले, कल्याणहून श्री. प. वि. महाजन व लोकशाही स्वराज्य पक्षाचे चिटणीस श्री. राजवाडे हे आले होते. पंढरपूर, बार्शी, माढें, करमाळें, सोलापूर, माळशिरस वगैरे तालुक्यांतील पुढारी मंडळीहि हजर होती. जिल्हाशाखा स्थापन करण्याचा ठराव पसार होऊन पुढील अधिकारी मंडळ निवडण्यांत आलें:—

### अधिकारी मंडळ

अध्यक्ष—शेठ गुलाबचंद हिराचंद ( सोलापूर ); उपाध्यक्ष--डॉ. वैशंपायन ( सोलापूर ), श्री. ग. रा. साने ( बार्शी ) व श्री. रा. ल. देशमुख ( माढें ). चिटणीस--श्री. ग. वा. जोशी अॅडव्होकेट (पंढरपूर), श्री. ना. ब. दामले (सोलापूर) व श्री. भि. ल कवडी (करमाळें). कार्यकारी मंडळाचे सभासद-श्री. रं. वि. ळळीत (सोलापूर), डॉ० जगदेवराव देशमुख ( सोलापूर ), श्री. शं. नी. जामदार (सोलापूर ), श्री. भगवंतराव मारुतिराव उबाळे ( बार्शी ), श्री. भा. त्रि. काणे (पंढरपूर), डॉ. रामचंद्र व्होरा ( पंढरपूर ), श्री. द. भ. उटगीकर ( बार्शी ), श्री. म. कृ. गोसावी ( करमाळें ), श्री. बा. ह. फणसळकर ( पंढरपूर ), श्री. त्रि. गो. जोशी ( माळशिरस ) व श्री. वालचंद कोठारी ( माढें ). याशिवाय मध्यवर्ती मंडळावर जिल्ह्यातर्फे असलेले सभासद व आणखी पांच सभासद जादा घेण्याचा अधिकार या मंडळास देण्यांत आला आहे. शाखेची मुख्य कचेरी श्री. ग. वा. जोशी, वकील पंढरपूर, यांच्याकडे ठेवावी असें ठरलें व जिल्ह्यांतील प्रचारकार्याची योजना ठरविण्यांत आली

### पुणें जिल्हाशाखा

रविवार ता. १० रोजीं दोनप्रहरीं ३ वाजता लो. टिळक स्मारक मंदिरांत लोकशाही स्वराज्य पक्षाची, ' पुणें जिल्हाशाखा ' स्थापन करण्याकरिता पुणें जिल्ह्यांतील लोकशाही स्वराज्य

पक्षाच्या मतांच्या लोकांची सभा झाली. सभेच्या वेळेपर्यंत या पक्षाचे ८७ सभासद झाले असल्याचें सांगण्यांत आलें. प्रारंभीं श्री. दा. वि. गोखले यांनी प्रास्ताविक भाषणांत सभेचा हेतु सांगून सभेचें अध्यक्षस्थान श्री. न. चिं. केळकर यांनी स्वीकारावें अशी सूचना केली. तिला श्री. दंडवते वकील यांनी अनुमोदन दिलें. स्थानापन्न झाल्यावर अध्यक्षांनी प्रास्ताविक भाषण केलें. नंतर श्री. दा. वि. गोखले यांनी 'ही सभा पुणें जिल्हाशाखा स्थापन करीत आहे' असा ठराव मांडला, व त्यास श्री. वि. ग. तिखे यांनी अनुमोदन दिल्यावर वरील ठराव सर्वानुमतें पास झाला.

'श्री. ल. ब. भोपटकर यांनी पुणें जिल्हाशाखेचे अध्यक्ष व्हावें' अशी दुसरी सूचना केली गेली व तिला श्री. म. धों. विद्वांस यांनी अनुमोदन दिलें व ती पसार झाली. यानंतर पुणें जिल्हाशाखेचे अध्यक्ष या नात्याने श्री. भोपटकर यांनी पुढीलप्रमाणे चिटणीस, खजिनदार व कार्यकारी मंडळाचे सभासद यांचीं नांवें सुचविलीं व तीं मंजूर झालीं:

### चिटणीस

(१) श्री. दा. न. शिखरे, (२) श्री. ग. म. नलवडे (३) श्री. ना. कृ. झांजले (४) अ. वा. फडणीस.

### खजिनदार

श्री. धों. कृ. साठे.

### सभासद

मुंबई येथे ता. २८ व २९ ऑक्टोबर रोजीं झालेल्या परिषदेंत पास झालेल्या नंबर २३ च्या ठरावानें मध्यवर्ती मंडळावर जे गृहस्थ पुणें जिल्ह्यांतले निवडण्यांत आले आहेत ते या कार्यकारी मंडळांत असून शिवाय पुढील गृहस्थ कार्यकारी मंडळांत असावेत: (१) बॅ. छोटालाल भगवानदास आग्रवाल, (२) मि. डी. बी. पूनावाला, (३) श्री. ग. स. मराठे, (४) म. धों. विद्वांस, (५) शं. रा. दाते, (६) ना. वि. भोंडे, (७) रा. गो. दंडवते, (८) ना. भि. परुळेकर, (९) शि. ल. करंदीकर, (१०) डॉ. गो. स. पळसुले, (११) कृ. म. रानडे (पैसाफंड), (१२) रं. ज्ञा. लडकत, (१३) त्रिं. वि. पर्वते, (१४) वि. ग. तिखे, (१५) ज. ग. दंडवते, (१६) शं. ग. लवाटे, (१७) वि. म. देशमुख, (१८) ना. शं. आपटे.

शेवटीं जे मुख्य ठराव पास झाले ते पुढीलप्रमाणेः—

(१) या सभेने जें वरीलप्रमाणे कार्यकारी मंडळ नेमलें आहे, तें कायम स्वरूपाचें नसून तात्पुरतें असावें.

(२) कार्यकारी मंडळाने जिल्ह्याच्या कामाकरिता मूळ घटनेच्या अनुरोधानें आपली घटना तयार करावी.

(३) सुमारें दोन महिन्यांनंतर कार्यकारी मंडळाची पुनः सभा भरवावी व नव्या घटनेनुरूप फेरनिवडणुकी कराव्या.

(४) या दरम्यान कार्यकारी मंडळानें तालुकानिहाय या पक्षाच्या ठरावाचा प्रचार करावा, शाखा स्थापन कराव्या आणि सभासद मिळवावे.

(५) पुणें जिल्हाशाखेची मुख्य कचेरी श्री. ल. ब. भोपटकर, सदाशिव पेठ, यांचे घरीं असावी.

लोकशाही पक्षाने मुंबई येथे पूर्वी जे ठराव पास केले आहेत व जो कार्यक्रम ठरविला आहे त्यांतील तपशिलाबाबत जर कोणा सभासदाला कांही शंका किंवा प्रश्न विचारावयाचे असतील, किंवा कांही नव्या सूचना मांडावयाच्या असतील, त्या ता. १७ डिसेंबर रोजीं मुंबई येथे भरणाऱ्या मध्यवर्ती मंडळाच्या सभेपुढे लेखी किंवा तोंडी मांडाव्या असें सांगून, सभेचें काम संपल्याचें अध्यक्षांनी जाहीर केलें.

# सोटेशाहीचें सरकारी समर्थन

'इ. स. १९३१–३२ मधील हिंदुस्थान' (India in 1931–32) या नांवाचा सरकारी वार्षिक अहवाल नुकताच प्रसिद्ध झाला आहे. यापूर्वीच्या अहवालांचें बाह्यांग बरेंच बाळसेदार असून अनेक चित्रें, संख्या-दर्शक तक्ते व तुलनात्मक रंगपट यांनी तें भूषविलेलें असे. पण प्रस्तुतचा अहवाल दुष्काळ बाधलेल्या मुलासारखा किडकिडीत अंगाचा व किरकिऱ्या स्वभावाचा असाच निपजला आहे! खर्चाच्या काटकसरीची कात्री याच्यावर बिन-दिक्कत चालविली गेल्यामुळे यांतला चित्ता-कर्षकपणा आणि माहितीचा भरपूरपणा सगळा लुप्त झाला आहे. तथापि अहवालाच्या सालांत सरकारने अंगीकारलेल्या सोटेशाहीचें समर्थन करणें आवश्यक वाटल्यावरून तेवढा भाग यांत विस्तारपूर्वक लिहिला गेला आहे आणि आम्हालाहि तेवढ्याच एका भागाचें समालोचन करावयाचें आहे.

नेहमीच्या संप्रदायाप्रमाणें या अहवालाची कालमर्यादा १९३१ च्या एप्रिल महिन्यापासून तों १९३२ च्या मार्चअखेरपर्यंतच असाव-याची. आणि व्यापार, उद्योगधंदे, शेतकी, आरोग्य, दळणवळण इत्यादि प्रकरणांतील वृत्तान्त नमूद करतांना तेवढीच ठराविक कालमर्यादा विचारांत घेतली गेली आहे. परंतु दडपशाहीच्या धोरणाचें आत्मसमर्थन करण्याला ती कालमर्यादा गैरसोयीची वाटल्या-वरून त्या प्रकरणांतली कथा १९३२ च्या डिसेंबरअखेरपर्यंत आणून भिडविली आहे. पोथ्यापुराणें लिहिणारांचा व वाचणारांचा एक संकेत असतो कीं, शाप, मृत्यु, वियोग इत्यादि शोकपर्यवसायी कथाभागावर लेखनाची किंवा वाचनाची समाप्ति करणें हें अशुभकारक मानलें गेल्यामुळे त्याच्यापुढील आनंदपर्यवसायी प्रकरण लिहिल्यावाचल्याखेरीज लेखन-वाचन-समाप्ति करावयाची नाही. प्रस्तुतच्या अहवाल-लेखकाच्या मनावरहि तसल्याच भावनेचा पगडा बसलेला दिसतो! १९३२ च्या मार्चअखेर सरकारी वर्ष समाप्त होत असल्याने तेथेच या प्रकरणाची समाप्ति केल्यास दंडुकेशाहीला न जुमानतां कायदेभंगाची चळवळ जोराने सर्वत्र फोफावत आहे असा देखावा दर्शवून तेथेच पडदा पाडावा लागणार व त्याचा वाचकांच्या मनावर विपरीत परिणाम होऊन सरकारच्या सामर्थ्याविषयीं भलताच ग्रह त्यांच्या मनात ठाणें देऊन बसणार! वाचकांच्या मनावर असल्या समजुतीचा पगडा बसणें हें सरकारच्या दृष्टीने अनिष्ट वाटल्यावरून नागड्या-उघड्या दडपशाहीवर कायद्याचें पांघरूण घातल्याचा, आणि कायदेभंगाच्या चळवळी-चा महापूर ओसरून तिच्यांत खंड पडूं लागल्याने दडपशाहीचा विजय झाल्याचा, देखावा दाखवून समाप्ति करण्यांत आली आहे.

दडपशाहीच्या दणक्याने कांही दिवस चळ-वळ दबलीशी दिसली तरी तेवढ्याने कांहीं सरकारचें दडपशाहीचें धोरण न्याय्य आणि समर्थनीय ठरत नाही. अर्थातच सरकारच्या वरकरणी विजयाची अहवाल-लेखकाने कितीहि फुशारकी मिरविली तरी त्याची ही वकिली फोलच ठरणार आहे. गांधी-आयर्विन करार कोणी मोडला, ऑर्डि-नन्स जारी करण्यासारखी परिस्थिति केव्हा प्राप्त झाली, लष्करी कायद्यालाहि लाजविणारीं अशीं जीं कित्येक कलमें ऑर्डिनन्सेसमध्ये नमूद केलीं होतीं तीं सुधारलेल्या सरकारास शोभतात काय, ऑर्डिनन्सेसची बजावणी तारतम्यबुद्धि राखून करण्यांत आली काय, कायदेमंडळाची संमति आगाऊ घेणें शक्य नव्हतें काय, सहा महिन्यांची कायदेशीर मुदत संपल्यानंतर फिरून तेच ऑर्डिनन्सेस दुसऱ्यां-दा जाहीर करणें कायदेशीर होतें काय, वर्ष-अखेर चळवळ थंडावलेली दिसत असता तात्पुरत्या आर्डिनन्सेसचें कायद्यांत रूपांतर करणें आवश्यक होतें काय, त्या कायद्याची अम्मलबजावणी निष्कारण जाचक अशी होत आहे कीं काय इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें जर सम-

र्पक देतां आलीं तरच ती वकिली परिणामकारक होईल. परंतु या अहवालांतील हें प्रकरण समग्र वाचूनदेखील वाचकांच्या मनावर त्याचा उलटाच परिणाम होतो.

गांधी–आयर्विन करार कोणी मोडला हा पहिला मुद्द्याचा प्रश्न आहे. या करारामुळे आपला 'विजय' झाला आणि हा करार केवळ 'युद्धतहकुबी' आहे असें काँग्रेसचे अनुयायी म्हणत असत, हें खरें असलें तरी, कराराचा भंग होण्यासारखें कोणतेंहि कृत्य काँग्रेसवाल्यांकडून प्रथम झालें नसता सरकाराकडूनच त्याच्या बजावणींत बांधा यऊं लागला; आणि त्यासंबंधाचा जो पत्रव्यवहार त्या वेळीं प्रसिद्ध झाला होता,त्यावरून करारभंगाचें खापर कोणाच्या माथीं फोडावयाचें याचा निर्णयहि जनतेने तेव्हाच केला होता.प्रस्तुतचा अहवाल वाचल्यानंतरदेखील तो निर्णय बदलण्याला कांहीं कारण दिसत नाहीं. दिल्लीच्या कराराची बजावणी सरकाराकडून नीटशी होईना म्हणून गांधींनी तक्रार केल्यावरून सिमला येथे दुसरा करार झाला आणि गांधीजी विलायतेस निघून गेले. त्याच वेळीं सरकाराने इकडे प्रेस ॲक्टाची नवी आवृत्ति काढून वृत्तपत्रकारांची मुस्कटदाबी केली. दडपशाहीचा नवा अवतार होणार याचें हें पूर्वचिन्हच होय अशीच त्यावेळीं जनतेची समजूत झाली आणि तीच पुढें खरी ठरली; कारण त्यानंतर तीन महिन्यांच्या आतच बंगाल, संयुक्त प्रांत आणि सरहद्दप्रांत या तीन भागांत ऑर्डिनन्सेसचा अम्मल सुरू झाला.

गांधीजी विलायतेंतून परत आल्यानंतर त्यांनी या ऑर्डिनन्सेससंबंधानेच आक्षेप घेऊन त्यांची चर्चा करण्याकरिता व्हाइसरॉयाची मुलाखत मागितली. ती मुलाखत दिली गेली असती तर हें प्रकरण इतकें विकोपाला गेलें नसतें. म्हणूनच व्हाइसरॉयांनी मुलाखत नाकारण्यात चूक केली असें मत केवळ काँग्रेसवाल्यांनीच नव्हे तर तिऱ्हाइतांनी देखील प्रदर्शित केलें असें या अहवालांतच नमूद झालें आहे आणि त्या बाबतींत व्हाइसरॉयांचा नकार योग्य होता असें सिद्ध करण्याचा अहवाल–लेखकाने खटाटोप केला असला तरी त्याने कोणाचीहि खात्री पटण्याजोगी नाही.

या नकारानंतर वर्किंग कमिटीने कायदेभंग जाहीर केला आणि सरकारने ऑर्डिनन्सेसची चौकडी प्रसिद्ध केली. या ऑर्डिनन्सेसमध्ये चौकशीविना अटकेंत ठेवणें, प्रतिष्ठित गृहस्थांना पोलीस चौकीवर खेटे घालावयास लावून त्यांचा उपमर्द करणें, मुलांच्या दंडाबद्दल बापाला तोशीस लावणें, मोटारी इत्यादि वाहनें ताब्यांत घेणें, शांततापूर्ण अशा पिकेटिंगलाहि बंदी करणें वगैरे लष्करी कायद्यांतहि न शोभण्यासारखीं कलमें दाखल केलीं गेलीं असून त्यांची बजावणीहि अत्यंत निष्ठुरपणें करण्यांत आल्यामुळे या जुलमाचें समर्थन करणें अशक्य वाटल्यावरून अहवाललेखकाने तो विषयच टाळला आहे. आणि पुढे जूनअखेरीस ऑर्डिनन्सेसची दुसरी आवृत्ती निघाली तेव्हा त्यामधून यांतलीं कांही कलमें गाळून त्यांचें स्वरूप सौम्य करण्यांत आलें असें समर्थन करून पूर्वीचे वटहुकूम असमर्थनीय होते असा अप्रत्यक्ष कबुलीजबाब या लेखकानेच दिला आहे!

या वटहुकमांची बजावणी निर्घृणतेने केली गेली नाही असें शाबीत करण्यासाठी १९३० च्या चळवळींतल्याप्रमाणे १९३२ च्या चळवळींत दंगेधोपे व लाठीमार यांचे प्रसंग क्वचितच उद्भवले असें म्हटलें आहे; पण त्याबरोबर असा उलट प्रश्न करावासा वाटतो कीं, १९३२ च्या चळवळींत अत्याचार किंवा दंगा यांचा जर मागमूसहि नव्हता तर 'आर्डिनन्सेस' जाहीर न करतां साध्या कायद्यानेच काम भागलें नसतें काय? युद्धासारखी परिस्थिति उद्भवली तरच लष्करी कायद्याच्या तोडीच्या वटहुकुमांचा सोटा उगारावा लागतो; मग जेथे युद्धासारखी परिस्थितिच नाही तेथे असला सोटा उगारणें हेंच मुळी गैरवाजवी नव्हे काय? अहवाललेखकाने एकदाच नव्हे तर अनेकदा असें नमूद केलें आहे कीं, १९३२ सालच्या

चळवळींत दंग्याधोप्याचा व अत्याचाराचा मागमूसहि नव्हता. हें जर खरें तर शांतताप्रिय व अनत्याचारी सत्याग्रही लोकांचा समाचार घेण्याला नित्याचा साधा कायदाच पुरेसा असून देखील निव्वळ दुराग्रहाने सरकारने वटहुकुमांचा नैमित्तिक बडगा उगारला असेंच त्यावरून ठरत नाही काय ?

प्रथम ज्या वेळीं कायदेभंग जाहीर झाला त्या वेळीं सरकारला पुढील भविष्य कळणें शक्य नसल्यामुळे पोलीस व मॅजिस्ट्रेट यांना जादा अधिकार देण्याची जी घिसाडघाई झाली ती क्षम्य मानली तरी सहा महिन्यांचा अनुभव आला असतां, आणि एप्रिलच्या पुढे चळवळीचा जोर ओसरला असें सरकारच पुनः पुन्हा प्रतिपादन करीत असतां, जून महिन्याच्या अखेरीस दुसऱ्यांदा तेच वटहुकूम फर्मावणें हें तरी अक्षम्य ठरत नाही काय ? पहिले वटहुकूम प्रसिद्ध करण्यापूर्वी कायदेमंडळाचा सल्ला घेण्याला अवधीच मिळाला नव्हता; जानेवारींत कायदेभंग सुरू होणार हें भविष्य ओळखून अगोदरच्या नोव्हेंबरांतच कायदेमंडळाकडून जादा अधिकारांचें बिल पास करून घ्यावयाला पाहिजे होतें असें कोणी म्हणूं शकेल काय, असा प्रश्न या अहवालांत मोठ्या दिमाखाने विचारण्यांत आला आहे. पण जून अखेरीला आर्डिनन्सेसची मुदत वाढविण्याचा सरकारचा विचार जर ठरला होता, तर एप्रिल महिन्यांतच कायदेमंडळापुढे त्या स्वरूपाचें बिल कां मांडलें नाही ? हा प्रश्न बिनतोड व निरुत्तर करणारा असल्याने या अहवाल-लेखकाने तोहि अजीबात टाळला आहे. मात्र त्याने अशी टाळाटाळी केली तरी त्यावरून काय अनुमान काढावयाचें तें वाचक काढतोच आणि या बाबतींत सरकारने कायदेमंडळाचा जाणूनबुजून अपमान केला व कायदेमंडळाविषयींचा अविश्वास प्रगट केला असाच त्याचा ठाम ग्रह होतो.

चळवळ मंदावत गेल्यामुळे जून महिन्यानंतर ऑर्डिनन्सेसचा अम्मल संपुष्टांत येणेंच रास्त होतें. असें असतां त्या वेळीं त्याची पुनरावृत्ती करून जो अन्याय करण्यांत आला त्या अन्यायावर, नोव्हेंबर महिन्यांत त्यांना कायद्याचें स्वरूप देऊन, कळस चढविण्यांत आला ! एकीकडे वटहुकुमांच्या शस्त्राने तीन महिन्यांच्या अवधींतच सगळी चळवळ नेस्तनाबूद केली अशी बढाई मारावयाची आणि दुसरीकडे त्या शस्त्राला ताजें पाणी देऊन त्याचे वार चालूच ठेवावयाचे हें वर्तन अत्यंत विसंगत व अक्षम्य होय. अर्थातच ज्या दडपशाहीच्या शस्त्राने केलेल्या जुन्या जखमा अद्यापि बुजल्या नाहीत, आणि नव्या जखमांतून होणारा रक्तस्राव देखील थांबला नाही, त्या शस्त्राचे पोवाडे शस्त्रधारकाने कितीहि गायिले तरी ज्याच्या शरीराचे लचके तोडले गेले आहेत व जात आहेत त्या इसमाच्या मनाला ते पोवाडे ऐकून जसा विषाद वाटतो तसाच विषाद या अहवालातील हे पोवाडे वाचून कोणाहि सत्याग्रही इसमास वाटेल.

या ऑर्डिनन्सेसमुळे सामान्य जनतेच्या व्यवहाराला यत्किंचितहि अडथळा आला नाही असें जें एक विधान या अहवालात पृ. ५५ वर आहे तें अत्यंत चीड आणण्यासारखें आहे. दंडुकेशाही गाजवीत असतांना तिचा प्रतिकार करण्याकरितां जो पुढे झाला, त्याचें कपाळ त्या दांडक्याने सडकलें तर ती त्याचीच चूक झाली, त्यांत आपल्याकडे कांही दोष नाही; आणि आपलें कपाळ सडकलें जाऊं नये म्हणून जे पुढे न फिरकतां दबून दूर राहिले त्यांना मार बसलाच नसल्याने त्यांत तर आपल्याकडे दोष नाहीच नाही; एवंच आपल्या दंडुकेशाहीमुळे कोणालाहि निष्कारण उपसर्ग पोचला नाही असें बडबडण्यासारखेंच हें समर्थन निर्लज्जपणाचें आहे. ऑर्डिनन्सेचा अम्मल जारी झाल्यापासून आतापर्यंत ज्यांना आपले नित्याचे कायदेशीर व्यवहारहि निश्चिंतपणाने करतां आले नाहीत आणि अद्यापि जोंपर्यंत हें ग्रहण असेंच राहील तोंपर्यंत ज्यांची अशीच कुचंबणा होत राहणार त्या इसमांना या सोटेशाहीपासून बिल-

कुल उपसर्ग पोंचला नाहीं असें मानणें हा तर्कशास्त्राचा व व्यवहारशास्त्राचा अक्षम्य विपर्यास होय.

या ऑर्डिनन्सेसविरुद्ध जनतेने कायदेमंडळांतून व बाहेर जाहीर सभांतून अनेक वेळां तक्रार केली. कायदेमंडळांत तर ९।१० वेळां यासंबंधांत तहकुबीच्या सूचना मांडण्यांत आल्या. हल्लींचीं कायदेमंडळें खरीं लोकमतनिदर्शक नसल्याने तहकुबीच्या सूचना पास होऊं शकल्या नाहींत, हें खरें असलें तरी, आर्डिनन्सेसचा अम्मल जनतेने बिनतक्रार सहन केला असें मुळींच नाहीं; आणि असली सोटेशाही गाजवून सरकारने मोठा दिग्विजय मिळविला अशा भावनेने जनता सरकारचें कौतुकाने अभिनंदन करीत आहे असा प्रकार तर सुतरां खरा नाहीं. केवळ संकटाचा प्रतिकार करण्याचा मार्ग सुचत नाहीं, अथवा सुचलेला मार्ग यशस्वी होत नाहीं, म्हणून विषण्ण मनाने जनतेने आपली चळवळ आंखडती घेतली असली आणि तितिक्षा बुद्धीने उघड आक्रोश बंद केला असला तरी तेवढ्यावरून सरकारची ही दडपेगिरी जनतेला न्याय्य व आवश्यक वाटली अगर सोटेशाहीचें हें समर्थन तिच्या मनाला पटलें, असें अनुमान कोणीहि काढूं नये.

# कै. विठ्ठलभाईंचें पुण्यस्मरण

### मुंबईची दुखवट्याची सभा

मुंबई येथे सोमवार ता. ११ रोजीं नगरशेठजींच्या विनंतीवरून श्री. भुलाभाई देसाई यांचे अध्यक्षतेखालीं कै. विठ्ठलभाई पटेल यांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शित करण्यासाठीं नागरिकांची जाहीर सभा नगर–भुवन–मध्ये भरली होती. त्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्याने भाषण करीत असता श्री. भुलाभाई म्हणाले, "विठ्ठलभाईंच्या अन्तकाळीं मी त्यांच्याजवळच होतों. आमचा जेव्हां जेव्हां संवाद होई तेव्हां तेव्हां आपल्या देशाला स्वातंत्र्य कसें मिळेल हा एकच प्रश्न त्यांच्या डोक्यांत घोळत असे. आणि मृत्युसमयीं त्यांनी जे उद्गार काढले तेहि मातृभूमीबद्दल त्यांना वाटत असणाऱ्या निरतिशय प्रेमाने ओथंबलेले असेच होते. मुंबापुरीने शवाची अभूतपूर्व मिरवणूक काढून त्या राजकारणपटूविषयीं योग्य असाच सन्मान प्रकट केला.

### जीविताचें ध्येय

इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानांत आल्यावर श्री. पटेल यांनी आपलें सर्व आयुष्य सार्वजनिक कार्याला वाहिलें. हौस किंवा धंदा म्हणून त्यांनी सार्वजनिक कार्य केलें नाहीं तर, आपलें तें एक पवित्र कर्तव्य आहे याच भावनेने त्यांनी तें केलें. चतुरता, दूरदृष्टि आणि अतुल धैर्य या तीन गुणांनी त्यांच्या सार्वजनिक कार्याला अधिकच तेजस्विता आली होती. असेंब्लीचे अध्यक्ष या नात्याने त्यांनी बजावलेली कामगिरी बिनतोड होती. विठ्ठलभाईंनी आपलें अवघें आयुष्य राष्ट्रकार्यांत वेंचलें. परंतु दुर्दैव असें कीं, तीच राष्ट्रभक्ति सध्याच्या राजवटींत गुन्हा ठरली. इंग्लंडप्रमाणेच हिंदुस्थानांतहि राष्ट्रभक्ति हा गुन्हा नसून सद्गुणच आहे हें इंग्रज लोकांना स्वकर्तृत्वाने पटविण्याचा विठ्ठलभाईंनी प्रयत्न केला. मातृभूमीची सेवा जिवंत असेपर्यंत ती त्यांनी केलीच, परंतु मरणसमयीं राष्ट्रहितार्थ स्वत्वनिवृत्ति करून तीच सेवा मरणोत्तर चालविण्याचीहि सोय करून ठेवली."

### सौ. सरोजिनीबाईंचें भाषण

अध्यक्षांच्या भाषणानन्तर सौ. सरोजिनीबाई नायडू यांनी विठ्ठलभाईंच्या मृत्यूबद्दल शोक प्रदर्शित करणारा ठराव मांडला. ठरावावर भाषण करतांना सरोजिनीबाई म्हणाल्या, "बरोबर एक महिन्यापूर्वी मुंबापुरीने विठ्ठलभाईंच्या शवाला आपल्या आदराचा करभार अर्पण केला. विठ्ठलभाई राष्ट्रकार्यार्थ लढत लढत मरण पावले आणि मरतांनाहि त्यांच्या मनांत राष्ट्राविषयींचें चिंतनच चालू होतें. विठ्ठलभाई हे निधड्या छातीचे योद्धे, मुरब्बी मुत्सद्दी, असेंब्लीचे कुशल कर्णधार आणि मुंबापुरीचे कर्तव्यदक्ष अध्यक्ष होते. कार्य करण्याच्या वेळीं ते कितीहि करड दिसत असले तरी, त्यांच्या स्वभावाच्या कठोरतेतच देशबांधवांच्या प्रेमाचा मऊ गाभा साठविलेला होता. ते कामांत इतके व्यापृत असत कीं, मोकळा वेळ असा कधी त्यांना मिळतच नसे. ते आपल्या मित्राजवळ म्हणत कीं, 'मी जेव्हां मरेन तेव्हांच मला विसावा मिळेल; जिवंत आहे तोंपर्यंत राष्ट्रसेवेंत प्रत्येक क्षण वेंचणें मी माझें पवित्र कर्तव्य

समजतों.' विठ्ठलभाईनी स्वदेशांत तसेच परदेशांतहि हिंदुस्थानाची बाजू मांडून मोठें राष्ट्रकार्य बजावलें."

ठरावाला मौ. शौकतअली यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. जी. व्ही. देशमुख म्हणाले, 'विठ्ठलभाईचें आयुष्य म्हणजे अविरत चालू असलेल युद्धच होतें. राष्ट्रीयत्व हाच त्यांचा धर्म होता.' मि. बी. जे. हॉर्निमन यांनी आपल्या भाषणांत विठ्ठलभाईच्या स्मारकाला मदत करण्याबद्दल श्रोतृवर्गाला विनंति केली.

### स्मारकाचा ठराव

पहिल्या ठरावानंतर श्री. के. एफ. नरीमन यांनी पुढील आशयाचा ठराव मांडला. तो असाः—"कै. विठ्ठलभाईचें त्यांना साजेलसें स्मारक उभारावें असें ही सभा ठरवीत आहे. त्याप्रीत्यर्थ वर्गणी गोळा करण्यासाठीं व हा ठराव कृतींत आणण्यास जे इतर उद्योग करावे लागतील ते करण्यासाठी ही जाहीर सभा बोलावणाऱ्या गृहस्थांची एक स्मारक कमिटी स्थापन करण्यांत येत आहे." सदर ठरावावर भाषण करीत असतां श्री. नरीमन म्हणाले, "कै. विठ्ठलभाई हे आपल्या काळचे मोठे क्रान्तिकारक होते. हिंदी मनुष्य हा कोणतेहि जबाबदारीचें काम उरकण्यास समर्थ असतो हे विठ्ठलभाईनी ले. असेंब्लीचें अध्यक्षपण गाजवून सिद्ध केलें. राष्ट्रसेवा आणि स्वार्थत्याग हे दोन सद्गुण त्यांच्या चरित्रापासून प्रत्येक हिंदी माणसानें शिकण्यासारखे आहेत व त्यांचे राष्ट्रसेवेचें उच्च ध्येय प्रत्येकानें आपल्या डोळ्यांपुढे ठेवलें पाहिजे. ज्या उच्च ध्येयास्तव विठ्ठलभाईनी आपला देह धारातीर्थी ठेवला तें स्वातंत्र्य हिंदुस्थानाला लवकरच मिळेल यांत शंका नाही." श्री. एल. आर. तरसी यांनी ठरावाला पुष्टि दिली. नंतर मुंबईचे नगरशेठ सर ह्यूज कॉक यांच्या आभारप्रदर्शनार्थ ठराव डॉ. एम. सी. जावळे यांनी मांडला व त्याला मि. मेयर निसीम यानी दुजोरा दिला. शेवटीं अध्यक्षांचे आभार मानण्यांत आल्यावर सभा समाप्त झाली.

# स्फुट सूचना

१ ता. ३१ ऑक्टोबर रोजीं अहमदनगर येथे गॅव्हर्नरांनी पाटलांचा दरबार भरविला असता, तेथील एक उत्साही व कर्तृत्ववान पुढारी श्री. पु. ह. ऊर्फ रावसाहेब पटवर्धन यांनी आपल्यावरील भाषणबंदीची नोटीस मोडून व्याख्यान दिलें आणि त्या गुन्ह्याबद्दल त्यांना दोन वर्षें सक्तमजुरी व पांच हजार रुपये दंड अशी कमालीची शिक्षा ठोठावून सरकारनें आपला निर्घृणपणा प्रकट केला. या शिक्षेतील दंडाची रक्कम तर 'लष्करी कायद्या' खालील अमलाला साजेशीच होती, आणि म्हणून ती शिक्षा सौम्य होणें न्यायाच्या दृष्टीने अवश्य आहे असें आम्ही त्याच वेळीं म्हटलें होतें. आता असें कळतें कीं, श्री. पटवर्धन यांच्या शिक्षेविरुद्ध अपील करण्यांत येऊन अहमदनगरचे सेशन्स जज्ज मि. डेव्हिस यांनी दंडाची सर्वच्या सर्व रक्कम रद्द केली आहे. त्याबरोबरच शिक्षेची मुदतहि दोन वर्षांवरून एक वर्षावर आणली असती तर तक्रारीला फारशी जागा राहिली नसती. पण मुळीच कांहीं विचार न होण्यापेक्षा झालें तेवढेंच सही. यापूर्वी थोडेच दिवस आधी कुलाबा जिल्ह्यांतले एक प्रमुख कार्यकर्ते श्रीयुत माधवराव गोसावी यांची शिक्षाहि पुण्याच्या सेशन्स जज्जांनी अशीच कमी करून, भोगलेली तेवढी शिक्षा पुरे आहे, असें म्हणून, त्यांस सोडून दिलें. या दोन्ही उदाहरणांवरून दडपशाहीच्या कायद्यान्वये दिल्या जाणाऱ्या शिक्षा वाजवीपेक्षा कडक असतात असें सेशन्स जज्जाना वाटतें हें उघड आहे. तथापि खालच्या मॅजिस्ट्रेटांच्या मनावर त्याचा कांही परिणाम होईल तरच याचा उपयोग. कारण प्रत्येक खटल्यांत अपील होतेंच असा नियम नसल्यानें, अनेक वेळां अपील न झाल्यामुळे, खालच्या कोर्टांनें दिलेल्या बेताल शिक्षा कायम राहातात.

---

२ दडपशाहीच्या कायद्यानें सरकारी अधिकाऱ्यांना दिलेल्या अमर्याद सत्तेचा उपयोग करतांना कित्येक अधिकारी युक्तायुक्तताहि पाहत नाहीत याचीं आम्ही अनेक उदाहरणें आजपर्यंत दिलीं आहेत. अगदी ताजें उदाहरण ठाणें जिल्ह्याचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांचें आहे. ठाण्याचे कार्यकर्ते ॲडव्होकेट बेडेकर यांच्यावर ठाण्याची हद्द सोडून न जाण्याचा निर्बंध आहे. अलीकडे त्यांनी कायदेभंगाची चळवळ सोडून वकिली सुरू केली आहे. त्या कारणामुळे आणि ते स्वतः कुलाबा जिल्ह्यांतील रहिवाशी असल्यामुळे त्यांना वरचेवर कुलाबा जिल्ह्याच्या हद्दींत जावें लागतें. याकरितां

कुलाबा जिल्ह्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांना भेटून आपले निर्बंध कमी करून घ्यावे या उद्देशाने त्यांनी ठाणें येथील डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांच्याकडे वरील भेटीकरिता ठाण्याची हद्द सोडण्याची परवानगी मागितली. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, ही साधी परवानगी देण्याचेंहि डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांनी साफ नाकारलें ! त्यानंतर त्यांच्या एका अशिलातर्फे त्यांनी सोलापुरास जो एक दावा लाविला आहे, त्या दाव्याच्या कामाकरिता सोलापुरास जाण्याची त्यांनी परवानगी मागितली. पण ठाण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांनी हीहि परवानगी कारणें न सांगतां नाकारली ! ही धंद्याची बाब असल्यामुळे या नकाराला तर वृत्तिच्छेदाचें स्वरूप येत आहे असें वाटतें. कायद्याच्या किंवा कायद्याने मिळालेल्या सत्तेच्या हत्याराचा उपयोग वृत्तिच्छेदाकडे होऊं लागला म्हणजे त्या कायद्याच्या मागचा नैतिक पाठिंबा निघून जातो. असले दडपशाहीचे कायदे पास करूं नका असें सांगतांना लोकप्रतिनिधींकडून हाच आक्षेप मुख्यतः घेण्यांत येत असतो आणि कित्येक दुराग्रही मॅजिस्ट्रेट आपल्या असल्या वागणुकीने तो आक्षेप किती यथार्थ होता हेच सिद्ध करतात. ठाणें डिस्ट्रिक्ट मॅ. नें अॅ. वेडेकर यांना दिलेला नकार सरकारला समर्थनीय वाटतो काय ?

# शिक्षणखात्यांत लष्करी शिक्षणाची जरूरी

### कॅ. मोडक यांचें भाषण

"पुणें येथे स्थापन केलेल्या 'इंडियन नॅशनल डिफेन्स लीग' तर्फे मी आज आपणास शिक्षणखात्यांत लष्करी शिक्षणाची किती जरूरी आहे हें विशद करून सांगणार आहे. खुद्द हिंदुस्थानांतल्या सैन्यावर सरकार जो अवाढव्य खर्च करीत आहे त्याविषयीं येथील जनता व इतरत्र देशांतील लोक ओरड करीत आहेत. आमच्या शिक्षणसंस्थांमध्ये लष्करी शिक्षणाबाबत जी अनास्था दिसून येते ती किती वाईट आहे हें इतरत्र देशातील शिक्षणविषयक संस्थांत प्रचलित असलेल्या पद्धतीकडे नजर फेकल्यास, दिसून येईल.

या शिक्षणाचा उपयोग केवळ पाशवी लष्करी वृत्ति वाढविण्याकरितां नसून उत्तम नागरिक होण्यास व त्यांना कार्यक्षम करण्याकरितांच मुख्यतः असतो. त्याशिवाय वेळप्रसंगीं देशाचें संरक्षण (डिफेन्स) करण्यासहि राष्ट्रांतील तरुण समर्थ करण्याकडे होतो. तसेंच आजमितीला, अशा तऱ्हेचें शिक्षण आमच्या शैक्षणिक संस्थांतून मिळाल्यास तें आर्थिक परिस्थितीचा प्रश्न सोडविण्यासहि उपयोगी पडेल. एकंदरीने पाहतां या शिक्षणाने आम्हाला आमची 'एज्युकेशनल, सिव्हिक, एकॉनॉमिकल, सोशल व नॅशनल' इतक्या सर्व अंगांनी स्थिति सुधारून घेतां येईल. इतर देशांकडे नजर टाकल्यास आपणास असें दिसून येतें कीं, शस्त्रसंन्यासाची ओरड आन्तरराष्ट्रीय परिषदेंतून खूप जोराने जरी चाललेली असली तरी प्रत्येक देश कृतींत मात्र कोणत्या ना कोणत्या पांघरुणाखालीं आपली राष्ट्रीय लढाऊ सुसज्जता वाढवीत आहे. 'डेव्हलपमेंट ऑफ सिव्हिल एव्हिएशन' किंवा व्यापाराकरितां व्यापारी जहाजांची वाढ या वाढण्याने या दोनहि अंगांची संख्या आणि टनेज वाढत चाललें असून 'पॅरिटीच्या' प्रश्नाला प्रत्यक्ष कृतींत मूठमाती दिली जात आहे. युद्धकाळीं हीं सर्व व्यापारी जहाजें व सिव्हिल एव्हिएशनचीं विमानें एकदम सैन्याच्या त्या त्या अंगांत रूपांतरित झाल्याचें आपणास दिसून येईल. लष्कराकडेहि नजर दिल्यास हाच प्रकार आढळून येतो.

### स्वातंत्र्याचें मोल

पूर्वीपेक्षा आजकालच्या फौजांचा शास्त्रीय साधनांच्या वाढीमुळे सातआठ पटीनें खर्च वाढलेला आहे. या अडचणीमुळे मनांत असूनहि कोणत्याहि राष्ट्राला लष्कराची संख्या ज्यास्त वाढविणें शक्य नाहीं. तरी पण ज्याला ते 'प्रिपेयर्डनेस' किंवा 'नेशन् इन् आर्म्स' समजतात त्याकरितां एक विशिष्ट पद्धति, संरक्षणाचा प्रश्न सोडविण्याकरितां म्हणून प्रत्येक राष्ट्राने अंगीकारली आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे प्रत्येक राष्ट्र आपल्या देशांतील बहुतेक झाडून सर्व नागरिकांना शांततेच्या काळांत लष्करी शिक्षण देऊन तयार करीत आहे. व त्याला अपवाद म्हणून फक्त आपल्या देशाकडेच बोट दाखवितां येते. इतर देशांत या शिक्षणाची आवश्यकता म्हणजे 'स्वातंत्र्याचें मोल' असें समजतात. लहानपणापासून ते अखेरपर्यंत लष्करी शिक्षण देणाऱ्या ज्या संस्था आहेत त्या पुढीलप्रमाणे. लहानपणीं 'बॉइज रिझर्व्हर्स' सारख्या संस्था, 'बॉइज् ब्रिगेडस्', 'चर्च लॅड ब्रिगेडस्', 'सेकंडरी स्कूलस कॅडेट कोअर्स', 'ज्युनियर ऑफिसर ट्रेनिंग कोअर्स' विश्वविद्यालयांत असलेली 'सीनियर ऑफिसर ट्रेनिंग कोअर्स' तसेंच मध्यम वयाच्या नागरिकांसाठी व कांहीं मुलांच्यासाठीहि 'रायफल क्लब्स', 'एअर रायफल क्लब्स्', 'टेरि-

टोरिअल रिझर्व्हज', 'सप्लिमेंटरी रिझर्व्हेज,' 'कौंटी असोसिएशन्स्' वगैरे निरनिराळ्या संस्थांच्या द्वारा प्रत्येक राष्ट्रांतील प्रत्येक सामर्थ्यवान व धट्टयाकट्टया माणसाला लष्करी शिक्षण एक ना दुसऱ्या प्रकारें मिळतच असतें.

**यू. टी. सी. आणि ओ. टी. सी.**

इंग्लंडमधील 'ओ. टी. सी.' (ऑफिसर्स ट्रेनिंग कोअर) व आपल्या येथील 'यू. टी. सी.' (युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोअर) यांमध्ये जमीन-अस्मानचा फरक आहे. तर्थाल मुलांचें लष्करी शिक्षण इतकें पूर्ण असतें की, तें शिक्षण घेतलेल्या मुलांना एकदम खड्या सैन्यात किंवा टेरिटोरियल वगैरेंमध्ये कामिशन मिळतें. म्हणजे लष्करी अंमलदार होतां येतें. त्यांना सँढर्स्ट किंवा वूल्विच या लष्करी कॉलेजांमधूनसुद्धा जाण्याची आवश्यकता राहत नाही. इंग्लंडमध्ये तेथील सैन्यांत प्रतिवर्षी अंदाजें पांचसहाशे कमिशन्स दिलीं जातात. त्यांपैकीं सुमारें शंभरदीडशें कमिशन्स खड्या सैन्यांत केवळ या 'ओ. टी. सी.'च्या मुलांना मिळतात. त्याशिवाय टेरिटोरिअल व रिझर्व्ह या सैन्यांतहि अशींच शेकडो कमिशन्स त्या मुलांना मिळत असतात. एका केंब्रिज युनिव्हर्सिटींतच ३५ ते ४५ पर्यंत कमिशन्स मिळत असतात. तुम्हाला येथील सैन्यात कमिशन मिळत नाही; इतकेंच नव्हे तर जातीविशिष्ट किंवा कोमवंदी (क्लास कॉंपोझिशन्)च्या व्यवस्थेमुळें सैन्यांत शिरकाव किंवा भरतीहि मिळत नाही. अशी परिस्थिति उत्पन्न होण्याचें कारण असें कीं, तुम्हाला यु. टी. सी. मध्ये मिळणारें शिक्षण त्यांच्या ओ. टी. सी.पेक्षा अगदीं कुचकामी असतें हेंच होय. तसेंच तुमच्या य. टी.सी.मध्ये फक्त पायदळ हेंच सैन्याचें अंग आहे, तर तेथील ओ. टी. सी. मध्ये आर्टिलरी, इंजीनिअर्स, एअरक्राफ्ट, मशीनगनर्स, कॅव्हलरी वगैरे सर्व विभाग आहेत व मुलांना वाटेल त्या भागांत प्रवेश मिळतो. दोन देशांत जरी इतका फरक असला व तुमच्या यु टी. सी. च्या ब्लॅट्न्स अगदी मर्यादित असल्या तरी जी संधि आहे तिचा फायदा अवश्य करून घेतला पाहिजे व ज्यांना प्रवेश मिळण्यास जागेच्या अभावीं अडचण पडेल त्यांनी स्वतंत्रपणें आपापल्या शाळा व कॉलेजें यामधून तीस तीसच्या जमावाचे असे 'ड्रिल क्लब्स' काढावेत. यायोगानें सैन्यांत शिरण्यासाठीं किंवा डेहराडून कॉलेजमध्ये भरती होण्यासाठी जे गुण अवश्य समजले जातात, (उ. फिजिकल एज्युकेशन, हार्डिहुड, पॉवर्स ऑफ एड्युअरन्स, जनरल नॉलेज, लीडरशिप, कॅरेक्टर डिसिप्लीन) हे तुम्हाला आपल्या अंगीं बाणवितां येतील. व त्यामुळे सैन्यांत शिरकाव करून घेण्यास, मदत होईल. या तुमच्या प्रयत्नास जुने 'यु. टी. सी.'चे विद्यार्थी व शिक्षक खात्रीने मदत करतील. बंदुकीच्या अभावीं साध्या एअरगन्ससारख्या बंदुकी घेऊन तुम्हाला निरनिराळे क्लब्स स्थापन करतां येतील व थोडेसें ज्ञान मिळवितां येईल. त्याचप्रमाणे शास्त्र या दृष्टीने कॉलेजमध्ये जे विषय, पॉलिटिक्स, हिस्टरी, एकॉनॉमिक्स, केमिस्ट्री, इलाक्ट्रिसिटी, एंजीनियरिंग, शिकता त्या सर्वांचा उपयोग लष्कराच्या दृष्टीने काय आहे, किती आहे हे समजून घेण्याकरितां तुम्ही मिलिटरी लायब्ररीज् किंवा स्टडी सर्कल निर्माण करण्याकडे लक्ष द्या म्हणजे उत्तम नागरिकाच्या कर्तव्यांपैकीं पुष्कळ जबाबदारी तुम्हाला पार पाडतां येईल."

वरील आशयाचें कॅ.ग. बा. मोडक यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांनी समारोपादाखल केलेल्या भाषणांत असें सांगितलें कीं, वक्त्यांनी यु. टी. सी. मध्ये मिळणाऱ्या कुचकामी शिक्षणाविषयी जें सांगितलें तें अक्षरशः खरें असलें तरी जे कांही थोडेबहुत लष्करी शिक्षण मिळतें त्याचा विद्यार्थ्यांनी योग्य तो उपयोग करावा व त्यांनी ड्रिल क्लब्स व इतर गोष्टी सुरू करण्याकडे लक्ष द्यावें.

# पूर्ण स्वदेशी मोटारगाडी–कलकत्ता

कलकत्ता येथील म्यु.कॉर्पोरेशनने नुकतीच एक पूर्ण स्वदेशी मोटारगाडी विकत घेतली आहे. ही गाडी श्री. बिपिन विहारी दास नांवाच्या यंत्रकलाकुशल गृहस्थानें तयार केली. ही गाडी या गृहस्थास तयार करण्यास सांगण्यांत आली तेव्हा कॉर्पोरेशनच्या ज्या सभासदांनी हा ठराव केला त्यांची किती तरी कुटाळी करण्यात आली. कारण हिंदुस्थानांत अशा प्रकारची देशी गाडीच तयार करतां येणें अशक्य आहे, असाच सामान्य लोकसमज होता. आणि बिपिन विहारीसारख्या अडाणी माणसाच्या हातून हें काम कसें होणार अशी कुत्सित टीकाहि लोकांनी केली. परंतु तशी गाडी तयार होऊन ती आज रस्त्यावर धावत आहे. पोलीस कमिशनरने ती पास करून तिला ३५९७७ हा नंबर मिळाला आहे. व

कॉर्पोरेशनचे मेयॉर व इतर सभासद हे त्यांतून मजेने हिंडूनहि आले आहेत. अशा रीतीने अशक्य वाटणारी गोष्ट साध्य झाली असून हिंदुस्थानांत एका अत्यावश्यक धंद्याचा उपक्रम सुरू झाला व तो कर-ण्याला कलकत्ता कॉर्पोरेशनने प्रोत्साहन दिलें याबद्दल ह्या संस्थेला धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच आहेत.

या मोटारीपैकीं रबरी धावा, स्पार्किंग प्लग्ज, कार्ब्युरेटर व मॅग्नेटोशिवाय प्रत्येक वस्तू देशी आहे व हीं सर्व यंत्रेहि श्री. दास यांनी आपल्या तुट-पुंज्या साधनांवर तयार केली आहेत. ही गाडी चार सिलेंडरची, १२–१४ अश्वशक्तीची टूरिंग गाडी असून तिला किंमत सुमार ३५०० रु. पडली. या गाडींत पांच माणसें सुखाने बसतात. ताशीं ३५ मैलांपेक्षा जास्त वेगाने ती अद्याप चालवून पाहिली नाही; तथापि ती जास्त वेगाने जाण्यास समर्थ आहे असा तज्ज्ञांचा अभिप्राय आहे. गाडीचे ब्रेक, स्टिअरिंग व्हील या गोष्टी उत्तम साधल्या आहेत

कलकत्ता कार्पोरेशनच्या वर्कशॉपमध्ये बारा सिलेंडरची एक मोटारगाडी तिचें इंजिन व चेसिस हल्ली तयार होत आहे व ही गाडीहि लवकरच रस्त्यावर धावूं लागेल. अशा रीतीने मोटारी-सारखे अत्यावश्यक असें यांत्रिक वाहतुकीचें साधन यशस्वीपणें सिद्ध करण्याचा मान कलकत्ता कॉर्पोरेशनने संपादन केला याबद्दल आम्ही तिचें व श्री. दास यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. देशी भांडवलवाल्यांनी या धंद्याची वाढ करण्याकडे लक्ष देणें अवश्य आहे.

# पुणें अनाथ विद्यार्थिगृह

## ( विद्यार्थ्यांचा प्रचारपाहणी-वृत्तांत )

पुणे अनाथ विद्यार्थिगृहांतील विद्यार्थ्यांना दरसाल दिवाळीच्या सुमारास एक महिनाभर सुटी असते. या सुटींत विद्यार्थी आपापल्या गांवीं घरोघर जातात. यंदा ह्या विद्यार्थ्यांस पुणे शाखेस ४–१०–३३ ते ४–११–३३ व नाशिक शाखेस १५–१०–३३ ते १५–११–३३ पर्यंत सुटी होती. या सुटींत हे विद्यार्थी महाराष्ट्रांतील व इतरत्र सुमारें ४००।५०० गांवीं हिंडले. संस्थेत महाराष्ट्रां-तल्या सर्व जिल्ह्यांतील सर्व स्पृश्य हिंदु जातींचे विद्यार्थी असून त्यांनी गांवीं गेल्यावर काय पाहिलें, ऐकिलें व अनुभविलें यासंबंधाने त्यांजकडून माहिती गोळा करण्यांत आली. विद्यार्थ्याला या माहितीसाठी छापील तक्ता भरून देण्यासाठी दिला असून त्यावर माहिती भरून घेऊन व तिची नक्कल त्याच्या पालकाकडे पाठवून माहिती खरी व बरोबर असल्याबद्दल संस्थेने खातरजमा करून घेतली. सदर माहिती संस्थेला अनेक दृष्टींनी उपयुक्त असून सामान्य वाचकालाहि ती उपयुक्त व बोधप्रद वाटेल म्हणून तीपैकीं कांही भाग प्रसिद्ध करीत आहों.—

### लेखन–वाचन

कांही विद्यार्थ्यांनी सुटींत पांडवप्रताप, शिव-लीलामृत, दासबोध, नवनाथ पोथी इत्यादि धार्मिक ग्रंथ स्वतः वाचले किंवा घरच्या वडील मंडळींना वाचून दाखविले. इंग्रजी वाचन कांही थोड्यांनी केलें; चारपांच जणांनी कविता करून पाहिल्या; निबंधलेखनाचे २१३ च प्रयत्न झाले. अभ्यास कचे असलेले पुढे पूर्ण करण्याकडे फारच थोड्यांनी लक्ष दिलें. सामान्यतः, लहान खेडेगांवींसुद्धा ‘ केसरी ’ व ‘ किर्लोस्कर खबर ’ हीं वृत्तपत्रे पुष्कळांस पाहावयास मिळत व तीं वाचून दाखविण्याचें काम विद्यार्थी करीत.

### नवीन शिक्षण

या बाबतींत बरीच विविधता आहे. सायकल, वत्ती, मोटारसायकल, पेटी, तबला, सतार, टाइप-रायटिंग, दंतमंजन करणें, सत काढून विकणें, लाकडी सामान तयार करणें इत्यादि प्रकार यांत दिसून येतात. ५-६ विद्यार्थ्यांनी नखचित्रांचा व्यासंग वाढविला. एकाने ६० नखचित्रें काढलीं असून त्यावर १० रु.च्या बक्षिसाचें अभिवचन मिळविलें आहे. ३-४ विद्यार्थ्यांनी सुंदर चित्रें व नकाशे काढून ते आपल्या बालपणच्या शाळेंत लावण्यास दिले.

### प्रचार व स्वयंसेवा

संस्थेच्या मदतीसाठी कांही विद्यार्थ्यांनी आपापल्या भागांत फिरून १७५ रुपये संस्थेकरिता मिळविले व ११० रुपयांपर्यंत डायरीविक्री केली. स्वतःकरितां म्हणून रोख १०० रुपये व कांही कपडे कांही विद्यार्थ्यांनी मिळ-विले. याशिवाय मेळ्यांतील पदें म्हणणे, लाठीकाठी व कुस्ती शिकविणें, बाईंडिंग शिकविणें, वर्तमानपत्रें वाचून दाखविणें, घरोघर फिरून औषधोपचार करणें इ. विविध कामें त्यांनी केलीं.

### स्वदेशी-प्रसार

या बाबतींत विद्यार्थ्यांनी चांगलीच कामगिरी केली. खेड्यापाड्यांतून जेथे जेथे विद्यार्थी गेले तेथे तेथे त्यांनी जागोजाग प्रचारपत्रकें भिंतीवर चिकटविलीं व वांटलीं. देवालयें, बाजार, चौक्या, मोटारस्टँड, शाळा, बैलगाडीचे अड्डे इत्यादि ठिकाणीं त्यांनी मोठीं पत्रकें चिकटविलीं. ५-७ गांवीं पोलिसपाटलांनी तीं फाडून टाकलीं! परंतु २-३ गांवच्या ठिकाणीं पाटलांनी तीं चावडीवर नेऊन लावलीं. एका ठिकाणीं पत्रकें लावण्यास बंदी करण्यांत आली. म्हणून विद्यार्थ्यांनी तीं घरोघर जाऊन वांटलीं. या कामाबद्दल संस्थेसंबंधाने बऱ्याच ठिकाणीं प्रशंसोद्गार निघाले आहेत. एका गृहस्थाने हीं पत्रकें मुद्दाम घेऊन बाजारांत प्रमुख ठिकाणीं लावलीं; व त्याच्या प्रती छापून वांटण्याचें ठरविलें आहे. याखेरीज बुकमार्क्स (स्वदेशीपर मजकूर छापलेली) वांटणें, स्वदेशी व्रतपत्रिका भरून घेणें, परदेशी कापड व साखर न वापरण्याबद्दलचीं उपदेशपर पदें म्हणणें इत्यादि प्रयत्नहि झाले. शहरांतील लोकच परदेशी वस्तु अधिक वापरतात अशी टीका ऐकूं आली.

### कौटुंबिक स्थिति

खेडेगांवांतून दारिद्र्य व अनारोग्य भयंकर प्रमाणांत वाढत आहे. किरकोळ ताप, डोकें दुखणें, खरूज इत्यादि विविध रोग वाढत आहेत. कित्येक विद्यार्थ्यांना सुटींत घरीं गेल्याबरोबर आपल्या नातलग मंडळींच्या शुश्रूषेसच लागावें लागलें. सुटीपूर्वीच्या उभ्या वर्षांतील दुःखद प्रसंगामुळे कित्येक विद्यार्थ्यांस मानसिक अस्वास्थ्य भोगावें लागलें. 'ऐन दिवाळीचे दिवशींच वडील अपघाताने वारले व जगाच्या पाठीवर एकटाच राहिलों,' "अन्नपाण्याच्या आबाळीमुळे आजी वारली,' 'स्टोव्हच्या अपघाताने बहीण वारली,' 'पत्रव्यवहारालाहि घरांत पैसा नाहीं, मग जाण्यायेण्याला भाडें कोठून आणावयाचें?' असे दुःखोद्गार कित्येकांना काढावे लागले. एकाला वाटखर्चासाठी पैसे हवेत म्हणून वडलांच्या हातांत शिल्लक राहिलेली एक आंगठी मात्र घरांत होती, तीहि त्यांनी मोडली. व एकाच्या मातोश्रीने एक दागिना गहाण टाकून कर्ज काढलें! एकाने शिवणकाम करून व रानगोऱ्या वेचून, तर एकाने भिक्षा मागून वाटखर्च जमविली!

### आर्थिक प्रश्न व स्थानिक परिस्थिति

या बाबतींत विचार करावा तेवढा थोडाच आहे. बहुतेक पालकांच्या जमिनी व घरें गहाण पडलेलीं आहेत. खेडेगांवांतून पाऊण आणा शेर दूध, १५।२० रुपये खंडी भाताचा भाव, अतिपर्जन्यामुळे झालेली पिकांची नासाडी इत्यादि भयंकर प्रकार दिसतात. सावकारांच्या पायीं शेकडा ५० लोकांचीं गुरें व जमिनी लिलावांत गेल्याचे समजतें. शेतकरी व व्यापारी दोघेहि गांवांत धान्य पिकलें असूनहि उपासमारीने मरत आहेत! स्वस्ताई पुष्कळ, पण पैसा मात्र नाही. पूर्वी गांवोगांव सभा व चळवळी झाल्या; आता त्यांची स्मृति मात्र कायम आहे. खेडेगांवांतून कोणतीहि सार्वजनिक चळवळ दिसून येत नाहीं. महात्माजींच्या चळवळीने बाभन उतरले, त्यांनी शेतकऱ्यांकरितां कांहीच केलें नाही, इत्यादि विधानें ऐकूं येतात. कामधंदा कांही नाही. जिकडे तिकडे बेकारी! शाळेची फी एक आणा, पण तेवढीहि देण्यास पैसा नाही. गांवोगांव तंटेबखेडे वाढत असून लोक कोर्टांत जात आहेत! चांगल्या चांगल्या लोकांना परिस्थिति खालावल्यामुळे तोंड दाखविण्यासहि लाज वाटते. मॅट्रिक होऊन पुढें काय करणार असें लोक विचारतात. परस्परांबद्दल अविश्वास व नैतिक अधोगति मोठ्या प्रमाणावर दिसते. कित्येक ठिकाणीं दिवसा चोऱ्या होत आहेत. ७०० उंबरठ्याच्या एका गांवाला सरासरीने दोन लाख रुपयांच्या कर्जाचा बोजा आहे! एकंदरीने खेडेगांवांतील जीवन सर्वत्र भयाण होत चाललें आहे.

## विद्यार्जनार्थ परदेशगमन

स्वदेशांत न मिळणारें उच्च प्रकारचें शिक्षण इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, जपान इत्यादि परदेशांत जाऊन संपादन करणारांची संख्या महायुद्धपूर्व कालांत समाधानकारक रीतीने वाढत होती. महायुद्धाच्या ऐन धामधुमीच्या काळांत जरी या तऱ्हेच्या विद्यार्जनाला थोडासा आळा बसला तथापि युद्ध संपताच समताप्रिय अमेरिकेंत गरीब विद्यार्थ्यांना पूर्वीप्रमाणेच अंगमेहनतीने पैसा मिळवून विद्याभ्यास करतां येईल आणि जर्मनी आदिकरून देशांतील जनतेची हिंदी विद्यार्थीबद्दलची विशेष सहानुभति फिरून कामास येईल, असेंच सर्वांना वाटत होतें. परंतु महायुद्धानंतरच्या बिकट परिस्थितीला तोंड देतांना अमेरिकेसारख्या उदार राष्ट्रानेहि विद्यार्जनार्थ परिश्रमाने द्रव्य मिळविणाऱ्या कित्येक हिंदी विद्यार्थ्यांना बंदी केली. तेथील विश्वविद्यालयांतील अधिकाऱ्यांच्या सहानु-

मुद्दीमुळे जरी आजहि कांहीं थोडे विद्यार्थी पूर्ववत् श्रमजीवी राहूनहि विद्यार्जन करूं शकतात तथापि त्यांजवर वरील आगमनबंदीची व परिश्रमबंदीची कुऱ्हाड केव्हा कोसळेल याचा नेम नसल्यामुळे त्यांची परिस्थिति विशेष चिंताजनक होती.

## अमेरिकेंतील बंदी उठली

परंतु विश्वविद्यालयीन मंडळींच्या प्रेसिडेंट रूझवेल्ट याजवरील वजनामुळे अमेरिकेंतील 'लेबर' खात्याकडून नुकताच एक महिन्यापूर्वी, ही परिस्थिति बरीच सुधारणारा असा, खुलासा करण्यांत आला ही समाधानाची गोष्ट होय.

यापूर्वीच्या कायद्याने 'विद्यार्थी' म्हणून कोणालाहि अमेरिकेत बंदी नव्हती. मात्र तो काम करून ( gainful labour ) द्रव्य मिळवूं लागला म्हणजे सामान्य मजूर म्हणून त्याची गणना होऊन त्याला आशियातील मजुरांवर ठेविलेली बंदी लागू करण्यांत येई व त्याचा विद्यार्जनाचा मार्ग खुंटे. आता प्रसिद्ध झालेल्या नव्या खुलाशाने यापुढे एखाद्या विद्यार्थ्याजवळील पैसा अपुरा पडला तर किंवा जवळील द्रव्य संपलें तर काम करून आवश्यक तेवढा पैसा मिळविण्यास त्याला मुभा ठेवण्यांत आली आहे. मात्र कोणालाहि आपला विद्याभ्यास संपूर्णतया पुरा करण्याला व्यत्यय होईल अशा तऱ्हेने काम पत्करण्याला परवानगी ठेविलेली नाही. काम स्वीकारणाऱ्या इसमाचें विद्याभिलाषी विद्यार्थी हें स्वरूप जाऊन तेथील मजुरांशीं चढाओढ करणारा चिरवासी मजूर असें त्याचें रूपांतर होऊं नये एवढ्यापुरती त्या खात्याने योग्य ती खबरदारी घेतली आहे, हे त्यांनी केलेल्या 'खरा विद्यार्थी' या शब्दाच्या व्याख्येवरून सहज स्पष्ट होईल.

## खरा विद्यार्थी

परदेशांतील पंधरा वर्षांहून लहान नाही अशा ज्या इसमाला (१) अमेरिकेच्या कॉन्सलने 'विद्यार्थी' या नात्यानेच प्रवेशपरवाना दिला असेल, (२) जो एखाद्या शिक्षणसंस्थेत प्रवेश मिळविण्यालायक असल्यामुळे ज्याला अमेरिकेंतील लेबर सेक्रेटरीने त्यांच्या पसंतीच्या शाळेंत प्रवेश मिळविण्याला मान्यता दिली असेल, (३) जो ठरविलेला अभ्यासक्रम पुरा करण्यापुरताच लागणारा काल अमेरिकेंत काढून दिवसांच्या विद्यालयांत (नाइट स्कूल्स इ. नव्हेत) जात असेल, आणि (४) जो आपलें शिक्षण पुरें होतांच किंवा पुरें करण्याची अपात्रता दिसून येतांच स्वेच्छेनें अमेरिका सोडून जाण्यास तयार असेल त्यालाच खरा विद्यार्थी म्हणावें अशी व्याख्या आहे. या व्याख्येमुळे खरोखरच विद्यार्जनाच्या दृष्टीने जाणाऱ्या गरीब विद्यार्थ्यांनाहि यापुढे अमेरिकेंत युद्धपूर्व कालाप्रमाणेंच सर्व प्रकारच्या सवलती मिळतील हें उघड झालेलें आहे.

## जर्मनींतील स्थिति

प्रेसिडेंट रूझवेल्ट यांच्या कारकीर्दीत परदेशस्थ विद्यार्थ्यांच्या अमेरिकेंतील विद्यार्जनावरील बंदी उठली ही एक हिंदी विद्यार्थ्यांच्या दृष्टीने अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. याच वेळीं जर्मनींतील नाझी राजवटींत हिंदी विद्यार्थ्यांच्या बाबतींत अत्यंत गैरव्यवस्था व छळणूक होत असल्याबद्दलचा प्रत्यक्ष पुरावा तेथून जाऊन आलेल्या एका मोठ्या गृहस्थांनीं लोकांपुढे मांडला व नाझी सरकारच्या वारंवार निघणाऱ्या कांहीं फर्मानांमुळे तो समज दृढावण्यास मदत झाली. परंतु जर्मन गृहमंत्री डॉ. फ्रिकेस् यांनी वेळींच खुलासा केल्यामुळे त्याहि देशांतील हिंदी विद्यार्थ्यांची परिस्थिति तितकी बिकट असल्याचें दिसत नाही. हिंदी व तत्सम म्हणजे जर्मनीबाह्य विद्यार्थी यांत जर्मन लोकांनीं शरीरसंबंध म्हणजे लग्नव्यवहार करूं नयेत असाच त्यांच्या बंदीचा अर्थ असला तर अर्थात् तो इकडील संस्कृतीला धरून असल्यामुळे त्याबद्दल तक्रार करण्यासारखें कांहीं नाही, एवढेंच नव्हे तर कित्येकांना हें बंधन इष्टच आहे असें वाटेल. तात्पर्य, हिंदी विद्यार्थ्यांनी परदेशांत जाऊन विद्याहरण करण्यास मध्यंतरीं कांहीं काळ थोडीशी प्रतिकूल परिस्थिति आली होती, ती आता बरीच निवळली असें म्हणण्यास हरकत नाही.

# ग्रामोद्धाराचें प्रमुख अंग

## शेतकऱ्यांची ऋणमुक्तता

आजकाल जिकडे जावें तिकडे ग्रामोद्धाराची भाषा कानीं पडते. गव्हर्नराच्या दरबाराला जा अथवा पाटलाच्या घरच्या समारंभाला जा, कायदेमंडळांत जाऊन बसा किंवा खेड्यांतल्या चावडींतील गप्पाष्टकांत सामील व्हा, सुशिक्षित नागरिकाशीं चर्चा करा अगर खेड्यांतल्या अशिक्षित कुणब्याशीं शिळोप्याच्या गप्पा मारीत बसा, बिनभांडवलवाल्या कम्युनिस्टांच्या सभेंतलीं जहाल भाषणें ऐका नाहीं तर भांडवलवाल्या राजनिष्ठांकडून केला जाणारा मवाळ उपदेश श्रवण करा, प्रत्येक ठिकाणीं ग्रामोद्धाराची महती गाइलेली हटकून ऐकूं येईल. हेतु वेगळा असेल, विचारसरणी भिन्न असेल, भाषापद्धतींत अंतर असेल आणि ग्रामोद्धाराच्या योजनेंतहि फरक असेल; पण ग्रामोद्धाराची आवश्यकता व उपयुक्तता याविषयीं सर्वत्र ऐकमत्यच आढळून येईल.

अत्यंत भिन्न भिन्न विचारसरणीच्यादेखील कार्यकर्त्यांत ज्या वेळीं एखाद्या गोष्टीच्या महत्त्वाविषयी ऐकमत्य होतें त्या वेळीं ती गोष्ट कोणासहि पटवून देण्याचें कारण राहिलें नाहीं, हें उघड सिद्ध होतें. अर्थातच देशांतील प्रत्येक वर्गांतील कार्यकर्त्याला खेडेगांव हेंच आपल्या कार्याचें केंद्र असून त्या खेडेगांवाची स्थिति सुधारण्यांत, म्हणजेच ग्रामोद्धारांत, आपल्या चळवळीच्या यशस्वितेचें बीज आहे ही गोष्ट कळून चुकली आहे. कार्य विधायक स्वरूपाचें असो अथवा विध्वंसक स्वरूपाचें असो, कार्यकर्ता स्वार्थानें प्रेरित झालेला असो अगर परार्थबुद्धीनें प्रवृत्त झालेला असो, ज्या चळवळीचें बीं खेडेगावांत रुजलें आणि तेथे जिने मूळ धरलें तीच चळवळ खरी टिकाऊ आणि फलप्रद होणार यांत शंका नाहीं. इतर राष्ट्रांतून क्वचित् ठिकाणीं हा नियम लागू होवो अथवा न होवो, हिंदुस्थान देशापुरता तरी हा नियम निरपवाद सत्य आहे. कारण हा देश प्रामुख्यानें खेडेगांवांचा बनलेला आहे; या देशांतील शेंकडा ९० इतके लोक खेड्यांतूनच राहतात आणि अत्यंत प्राचीन काळापासून तों अगदी आधुनिक काळापर्यंत देशांतील प्रत्येक खेडेगांव हें एक स्वयंपूर्ण घटक म्हणूनच नांदत आलें आहे. इंग्रज सरकारच्या राजवटींत खेडेगांवाचें हें महत्त्व हिरावून घेण्याचा प्रयत्न, जाणूनबुजून असो अथवा अज्ञानानें असो, केला गेला; तरी पण खेडेगांवानें आपलें व्यक्तित्व गमावलें नाहीं; एवढेंच नव्हे तर उलट राज्यकर्त्यांनाच तें व्यक्तित्व मान्य करावयास लावलें. याचें प्रत्यंतर पाहावयाचें असल्यास अलीकडे निरनिराळ्या प्रांतांतून ग्रामपंचायतीसंबंधी जे कायदे करण्यांत येऊं लागले आहेत, त्यांत पाहावयास मिळतें.

खेडेगांवाच्या महत्त्वाचें हें मर्म जाणूनच सांप्रत काळीं प्रत्येकाची दृष्टि खेड्याकडे वळली आहे. सरकारला आपलें बूड स्थिर राखण्याकरितां पाटलांचे दरबार भरविण्याची आणि पाटलांना शिक्षण देण्याची जरूरी भासूं लागली आहे. लोकपक्षीय पुढाऱ्यांना आपल्या मतदारसंघाचें पाठबळ मिळविण्याकरितां खेडेगांवांतल्या मतदारांची मनधरणी करावी लागत आहे; जमीनदार, इनामदार, खोत इत्यादि सुखवस्तु वर्गांना आपलें अस्तित्व राखण्याकरितां खेड्यांतील कुळांना संतुष्ट राखावें लागत आहे. विध्वंसक कार्यकर्त्यांना सरकारच्या सत्तेला शह देण्याकरितां खेडवळांचें रान उठविण्याची जरूरी भासत आहे! विधायक कार्यकर्त्यांच्या सर्व सुधारणांची इमारत खेडेगांवांच्या सुधारणेवरच अवलंबून असल्यानें त्यांना ग्रामोद्धाराशिवाय गत्यंतरच नाहीं. अस्पृश्यतानिवारणाचें कार्य हातीं घेणारे हें जाणून

आहेत कीं, आपण शहरांत कितीहि धामधूम केली तरी जोंपर्यंत खेडेगांवांतील लोकांच्या मनांतून अस्पृश्यतेची अढी दूर झाली नाही, तोंपर्यंत आपलें कार्य यशस्वी होण्याची आशा बाळगावयास नको. याकरिताच त्यांचाहि मोर्चा खेड्यांकडे वळूं पाहत आहे.

अशा रीतीने अनेक वर्गांची दृष्टि अनेक कारणांस्तव खेड्याकडे वळून तेथेच खिळून राहिली असली, तरी त्यांतला जो विधायक कार्यकर्ता वर्ग आहे त्याचा हेतु स्वार्थनिरपेक्ष असून त्याच्या कार्यालाच ग्रामोद्धार असें नांव सार्थतेने लावतां येईल. आपल्या देशाची सर्वांगीण सुधारणा होण्याला खेड्यांची सुधारणा झाली पाहिजे आणि ज्या वेळीं खेड्यांतील बहुसंख्य वर्ग आपल्या गांवचा कारभार योग्य रीतीने चालविण्याइतका कार्यक्षम होईल त्याच वेळीं तें खेडें सुधारलें असें म्हणतां येईल. खेड्यांतील बहुसंख्य वर्ग म्हणजे शेतकरी वर्गच होय. अर्थातच शेतकरी वर्गाची सुस्थिति कशी होईल व तो सुखाने कसा नांदूं शकेल याचा विचार करून त्या धोरणाने उपाययोजना केली पाहिजे. या योजनेचा विचार करूं लागताच शेतकऱ्यांच्या शिरावरील कर्जाच्या असह्य भाराचा प्रश्न दत्त म्हणून पुढे उभा राहतो. म्हणूनच लोकशाही स्वराज्य पक्षाने शेतकऱ्याच्या ऋणमुक्ततेचा प्रश्न प्रथमच प्रामुख्याने आपल्या हातीं घेतला असून तो प्रश्न कसा सोडवितां येईल याची चर्चा करण्याकरिता आणि निश्चित योजना मांडण्याकरिता एक कमिटी नेमली आहे व त्या कमिटाने आपल्या कामास प्रारंभ केला आहे.

लोकशाही स्वराज्य पक्षाची स्थापना करण्यासाठी मुंबईस ऑक्टोबरच्या अखेरीस जेव्हा महाराष्ट्र परिषद भरली तेव्हा त्या परिषदेच्या स्वागताध्यक्षांनी आपल्या स्वागतपर भाषणांतच या महत्त्वाच्या प्रश्नाकडे सर्वांचें लक्ष खेचलें आणि आपली एक योजनाहि स्थूल रूपाने पुढे मांडली. त्या योजनेची ती रूपरेषा पाहून कित्येकांनी तिला शेखमहमदी मनोराज्य असेंच विशेषण दिलें! स्वागताध्यक्ष जम्नादास मेथा यांच्या योजनेची मदार राष्ट्रीय कर्ज उभारण्याच्या सत्तेवर अवलंबून आहे व ती सत्ता प्रांतिक स्वायत्तता हातीं आल्याखेरीज आपल्या आधीन होऊं शकत नाही. तेव्हा प्रांतिक स्वायत्तता प्राप्त होणें हेंच ज्यांना शेखमहमदी मनोराज्य वाटत असेल त्यांच्याविषयी आम्हांस कांहीच बोलावयाचें नाही. परंतु प्रांतिक सत्ता हातीं येऊनदेखील राष्ट्रीय कर्जाची उभारणी करून शेतकऱ्यांना ऋणमुक्त करणें अशक्य कोटींतलें आहे असाच ज्यांचा आक्षेप असेल त्यांना आम्ही एवढें निश्चितपणें सांगूं शकतों कीं, या योजनेंत अशक्य असें कांहीच नाही. एवढेंच नव्हे तर बहुतांशीं याच स्वरूपाची एक योजना संयुक्त प्रांताच्या सरकारपुढे श्रीयुत चिंतामणी यांनी मांडली असून भावनगर संस्थानांत तर त्या स्वरूपाचा कायदाहि पसार झाला आहे.

संयुक्त प्रांताच्या कायदेकौन्सिलापुढे 'ॲग्रिकल्चरिस्ट रिलीफ बिल' नांवाचें एक बिल सरकारतर्फेंच मांडलें गेलें असून त्या बिलाची सांगोपांग चर्चा करण्यासाठी सिलेक्ट कमिटी नेमली होती. श्री. चिंतामणी हे त्या सिलेक्ट कमिटीचे एक सभासद होते. त्या सिलेक्ट कमिटींत सदरहू 'रिलीफ बिला' ची चर्चा झाली, त्या वेळीं श्री. चिंतामणी यांना असें आढळून आलें कीं, शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्यासाठी त्या बिलांत जे उपाय सुचविले आहेत ते गळवें झाल्यानंतर मलमपट्टी बांधण्यासारखेच वरवरचे आहेत; त्यांच्यापासून खरी कायमची सुधारणा होणार नाही. शेतकऱ्याची स्थिति सुधारून त्याला निश्चित करावयाचें असल्यास त्याच्या डोक्यावरचा कर्जाचा बोजा कायमचा दूर केला पाहिजे. तो दूर करण्यासाठी आजमितीला त्याचें जें कर्ज असेल तें फेडण्याची सरकारने योजना करावी आणि पुनश्च तो कर्जाच्या पेंचांत न सांपडावा याकरिता त्याच्यावरचा सरकारी साऱ्याचा किंवा खंडाचा बोजा हलका करावा.

शेतकऱ्यांची जुन्या कर्जबाजारीपणांतून मुक्तता करण्यापूर्वी नवें कर्ज काढण्याची गरज त्यास भासणार नाही अशी तजवीज जरूर केली पाहिजे. नाही तर एकीकडे जुन्या कर्जाची फेड होत आहे, तोंच दुसरीकडे नवें कर्ज वाढत आहे असा प्रकार घडून गळका हौद भरण्याचे परिश्रम जसे फोल होतात तसेच ऋणमुक्ततेचे परिश्रमहि फोल ठरतील. शेतकऱ्याला नवें कर्ज काढण्याची जरूरी न भासण्याला त्याच्या प्राप्तींतून त्याला थोडी तरी शिल्लक टाकतां आली पाहिजे व तशी ऐपत त्याला यावयाची झाल्यास शेतसारा व खंड यांचें हल्लीचें प्रमाण निदान शेंकडा २५ ते ३० टक्के तरी कमी करणें प्राप्त आहे. पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे शेतसारा हा धान्यादि पिकाच्या रूपाने वसूल करणें शक्य नाही. तथापि शेतसारा व बाजारभाव यांच्यांत कांही तरी निश्चित प्रमाण सरकारने ठरवून टाकलें पाहिजे. कां तर ८० रु. खंडी भाव असतांना जो सारा ठरला तोच सारा २० रु. खंडी भाव झाल्यावरहि रोखीने वसूल करणें हा अक्षम्य अन्याय होय. असला ढळढळीत अन्याय दूर करावयाचा असल्यास, किंमतीवर शेंकडेवारीने वसूल करावयाच्या आयात-निर्गत जकातीसाठी त्या त्या जिनसांचा बाजारभाव जसा सरकार दरसाल जाहीर करतें, त्याच रीतीने शेतीच्या उत्पन्नाचे भाव, दरसाल वसुलीला प्रारंभ होण्याच्या आधी, सरकारने जाहीर करावे आणि ते भाव सरासरी भावाहून शेंकडा जितके कमी किंवा जास्त असतील त्यांच्या व्यस्त प्रमाणांत शेतसारा जास्त किंवा कमी वसूल करावा म्हणजे, ऐनजिनसी वसुलाची सरकारला अडचण न भासतां, शेतकऱ्यांना ऐनजिनसी वसूल देण्यांत लाभणारी सोय या पद्धतींतहि लाभेल.

शेतसाऱ्याचें प्रमाण बाजारभावाशीं अशा रीतीने निगडित केल्यास शेतकऱ्यांवर सारा भरण्यासाठी सावकाराचे पाय धरण्याची आपत्ति ओढवणार नाही. आणि त्याच्या पूर्वीच्या कर्जाच्या बोजांतून त्याला मुक्त करण्याची योजना तितकी सुकर होईल. या योजनेचें स्थूल स्वरूप असें आहे कीं, सरकारने प्रथम शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणाचे आंकडे जमा करून कर्जाच्या कमजास्तपणाच्या मानाने ऋणकोंचे गट पाडावे आणि एकेका गटाला ही योजना क्रमाक्रमाने लागू करावी. डे. अॅ. रिलीफ ॲक्टाप्रमाणे सावकारांच्या देण्याचा हिशेब करून सरकारने सावकारास ५० वर्षांच्या मुदतीचे बॉंड्स् द्यावे आणि शेतकऱ्यावर त्याच्या कर्जावरील व्याजाबद्दल शेंकडा ३½ टक्के आणि मुदलाच्या फेडीसाठी २ टक्के अशी रक्कम आकारून तेवढी रक्कम शेतसाऱ्याबरोबर वसूल करावी. ज्या शेतकऱ्याला याहून अधिक जलद फेड करण्याची ऐपत असेल त्याला अधिक मोठा हप्ता देण्याला परवानगी असावी; पण सामान्यतः कर्जफेडीच्या हप्त्यांची मुदत २५ वर्षांपेक्षा कमी असूं नये. कारण तसें केल्यास दरसालचा हप्ता फुगत जाऊन शेतकऱ्याला शेतीच्या उत्पन्नांतून कांही शिल्लक राहणार नाही.

हिंदुस्थानासारख्या अफाट देशांतील कंगाल शेतकऱ्यांच्या डोकीवरील कर्जाचा डोंगर एकसमयावच्छेदेंकरून पाहिला म्हणजे १२०० कोटींचा आंकडा दिसूं लागून छाती दडपून जाते. परंतु सावकाराचें न्याय्य देणें किती ठरतें, हें कांटेकोरपणाने व कसोशीने शोधून पाहिल्यास हा आंकडा बराच कमी होण्याचा संभव आहे. शिवाय प्रांतानिहाय शेतसारापद्धति वेगवेगळ्या स्वरूपाची असल्याने ऋणमुक्ततेची योजनाहि प्रांतानिहाय वेगवेगळ्या स्वरूपाची होईल. त्यांतूनहि सर्वच ऋणकोंचें देणें एकदम एका तारखेस फेडलें पाहिजे असें नाही. ज्या ज्या जिल्ह्याची योजना तयार होईल त्या त्या जिल्ह्याची फेड करण्याला सुरवात होईल. अर्थातच कर्जफेडीचें हें लोण शेवटच्या जिल्ह्याला जाऊन पोंचेपर्यंत प्रारंभीं फेड केलेल्या कर्जावरील हप्तेबंदीची वसुली सुरू होईल. एवंच कार्याला व्यवस्थितपणें कळकळीने प्रारंभ केल्यास प्रथम दुर्निवार वाटणाऱ्या

अडचणींचेंहि अल्पश्रमाने निवारण करतां येतें, असा अनुभव येतो, आणि त्या विश्वासावरच लोकशाही स्वराज्य पक्षाने ही योजना तयार करण्याची जबाबदारी आपल्यावर घेतली आहे. मात्र ती जबाबदारी या पक्षाच्या हातून पार पडण्यास त्या पक्षाला अनेकांकडून अनेक प्रकारचें साहाय्य घ्यावें लागेल; आणि शेतकऱ्यांची ऋणमुक्तता हें ग्रामोद्धाराचें व पर्यायाने देशोद्धाराचें प्रधान अंग असल्याने या विधायक कार्यक्रमास सर्वांकडून सद्बुद्धीनें शक्य तितकें साहाय्य मिळेल व हें कार्य तडीस पोंचवितां येईल, असा आम्हांस भरंवसा वाटतो.

# स्वराज्याचा पाया म्हणजे ग्रामपंचायती

वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी व ग्रामपंचायतीच्या कार्यास वाहून घेतलेले तपस्वी श्री. बाबासाहेब परांजपे हे मुंबईस भरलेल्या लोकशाही स्वराज्य-पक्षाच्या सभेसाठी मुंबईस जात असतां वाटेंत पुण्यास उतरले. तेव्हा त्यांनी हातीं घेतलेल्या कार्याची प्रगति कशी काय होत आहे व पुढे कामाचें धोरण काय इत्यादि माहिती विचारण्यासाठीं आमच्या प्रतिनिधीने त्यांची मुलाखत घेतली ती लोकजागृतीच्या दृष्टीने उपयुक्त वाटल्यावरून पुढे देत आहोत.

### ' ग्रामणी ' ची स्थिति

श्री. बाबासाहेब यांनी आपल्या चळवळींचें एक प्रमुख अंग म्हणून 'ग्रामणी' नांवाचें उपयुक्त मासिक गेले एकवीस महिने मोठ्या चिकाटीनें चालविलें आहे. त्याचें मुख्य कार्य म्हणजे 'ग्रामणी' मासिक चालविणें हें नसून ग्रामपंचायत संस्थाचें जाळें सर्वत्र पसरून त्या चळवळीचा प्रसार करणें व तीसंबंधांत जागृति करणें हें आहे. परंतु आज स्थिति अशी झाली आहे कीं, 'ग्रामणी 'चें संपादन-कार्यहि त्यांनाच करावें लागतें, म्हणजे त्यासाठी तज्ज्ञांकडून लेख मिळविणें, ठिकठिकाणची माहिती मिळविणें व मासिकाच्या खर्चाची जबाबदारी पत्करणें या सर्व गोष्टी त्यांना एकटयालाच कराव्या लागतात. संपादकीय 'टेबलवर्क' करणें ही गोष्ट त्यांच्या स्वभावाविरुद्ध व त्यांनी स्वीकारलल्या कार्याची हानी करणारी आहे. बरें, इतकें करूनहि मासिकाचा खपहि असावा तसा नाहीं. लोकांची वाङ्मयासंबंधीं अभिरुची पालटलेली. त्या अभिरुचीप्रमाणें या मासिकांत येणारे विषय मनोरंजक करून द्यावयाचें म्हटलें तर अगेमागे मासिकाचा मूळ हेतु बाजूलाच राहून तें केवळ एक मनोरंजनाचें साधन होईल ही भीति. शिवाय त्यांत ग्रामपंचायतीसंबंधाने वेळोवेळीं होणारे कायदे, त्यांच्या दुरुस्त्या, इतर ग्रामपंचायतींनी केलेलीं कामें इत्यादि चळवळीला उपयुक्त अशी माहिती देणेंच अत्यावश्यक असल्याने आजच्या स्वरूपांत फारसा फरकहि करतां येणें शक्य नाहीं. या संपादनाच्या जबाबदारींतून त्यांना मुक्त होतां आलें म्हणजे दुसऱ्या कोणीहि ती जबाबदारी स्वीकारली तर कार्यप्रसाराच्या कामाला मी मोकळा राहीन असें त्यांचें म्हणणें.

### ' आधी कळस मग पाया रे '

आज मासिकाची जी अनास्था आहे ती दूर होण्याला कोणत्या तरी राजकीय पक्षाने आपल्या चळवळीचें तें एक मुखपत्र व कार्यप्रसाराचें साधन म्हणून हातीं घ्यावयास पाहिजे. देशांतील पुढाऱ्यांना या चळवळीचें महत्त्व दुर्दैवानें पटावयास पाहिजे तितकें पटलें नाहीं. स्वराज्याची इमारत उभारावयाची आहे. तिचा मूळ पाया म्हणजे खेडीं होत. आज कायदेमंडळांत जे प्रतिनिधि निवडून येतात त्यांतील सर्वांत अधिक सभासद खेड्यांतील मतदारांमार्फत निवडलेले असतात. परंतु त्या खेड्यांतील मतदाराला स्वकर्तव्याविषयीं पूर्णतः अज्ञान असतें. तें अज्ञान नष्ट करून त्याला स्वतःच्या कर्तव्याची ओळख पटवून देऊन स्वराज्याच्या गाड्यास जुंपतां आले तरच तो गाडा नीटपणें आपल्या उद्दिष्ट ध्येयापर्यंत जाऊन पोहोंचेल व तसा तो कार्यक्षम होण्याला ग्रामपंचायतींसारखें अन्य साधन नाहीं. आमच्या कार्यकर्त्यांना अद्याप या गोष्टीचें महत्त्व पटत नाहीं. परंतु अखेर त्यांना ग्रामपंचायतीकडेच धाव घेतल्याखेरीज गत्यंतर नाहीं, हेंहि पण तितकेंच खरें आहे.

### ऊर्ध्वगामी राजकारण

गेलीं दहाबारा वर्षें राजकारणाचा मोठा धुराळा उडाला. परंतु त्यांत खालचा थर नाहींसा होऊन तें अधांतरीं आकाशांत तरंगूं लागलें आहे.

पायाकडे कोणाचेंच लक्ष नाही. खेड्यांत आज अशी स्थिति आहे की, तेथील समाज दोन पक्षांच्या कचाट्यांत सांपडला आहे. त्यांपैकीं एक पक्ष म्हणजे ज्या पक्षाचे हितसंबंध खेड्यांत अत्यंत निगडित झाले आहेत असा वर्ग म्हणजे पाटील जमीनदार वगैरे. या वर्गाच्या मागें सरकारी अधिकारी उभे असल्याने खेड्यांतील राजकारण ते या परंपरागत लोकांच्या हातून आपल्या इच्छेनुरूप वाटेल तसें फिरवून घेतात. दुसरा पक्ष म्हणजे क्रांतिकारी. हा वर्ग लोकस्थिति कशी आहे; लोकांची तयारी कितपत आहे याचा मुळींच विचार न करतां एकदम सरकाराप्रमाणे सरकारी राज्ययंत्राच्या जोडीने लोकशाही स्वराज्य स्थापन करण्याच्या गोष्टी बोलत असतो. हे दोन्ही वर्ग ग्रामसंघटनेच्या कार्याला निरुपयोगी होत. म्हणून खेड्यांतील लोकांना इष्ट मार्ग दाखवून त्यावरून नेणारा असा स्वतंत्र राजकीय पक्ष पाहिजे. मग त्यास राष्ट्रीय पक्ष म्हणा अगर प्रागतिक पक्ष असें नांव द्या.

## जिल्हा सभा पाहिजेत

मी मुंबईच्या सभेत तरी हीच गोष्ट प्रामुख्याने सांगणार—मांडणार आहे. लोकशाही स्वराज्य पक्षाच्या जिल्हानिहाय शाखा स्थापन होत आहेत ही गोष्ट ठीकच आहे. परंतु मला त्यापेक्षां व्यापक असा पक्ष पाहिजे व तो जिल्हानिहाय पाहिजे. व्यापक याचा अर्थ असा कीं, खेड्यातील लोकांच्या हिताचें कसलेंहि काम असो, तें ज्यांच्या मदतीने सिद्धीस नेतां येईल अशा सर्व प्रकारच्या लोकांचा समावेश त्या सभेंत व्हावा. अशा रीतीने संघटनेची साखळी खेड्यापासून तालुका, जिल्हा व कायदेमंडळे येथपर्यंत अविच्छिन्न अशी निर्माण झाली पाहिजे. वर जे दोन पक्ष सांगितले (रीॲक्शनरी व रेव्होल्यूशनरी) त्यांच्या हातून हें काम कधींच होणारें नाही. तें काम या पक्षाला करतां येऊन लोकांचा विश्वास संपादन करतां येईल, व स्वराज्याची उभारणी करण्याचें काम फार सुलभ होईल.

## स्वराज्याच्या पायाकडे दुर्लक्ष

खेडीं व त्यातील ग्रामपंचायती म्हणजे स्वराज्याचा पाया होय! परंतु त्याकडे अखिल हिंदुस्थानांतील एकहि पुढाऱ्याचें आतांपर्यंत तरी लक्ष गेलें नाही. आज जीं कायदेमंडळें दिसतात व जीं लढविण्याच्या गोष्टी लोक बोलत असतात तीं निर्माण होतात या खेड्यांतील मतदारांच्यामुळे. अर्थात त्यांना स्वहक्काविषयीं जागृत करण्याचें आद्य कर्तव्य आहे. परंतु नेमकें तेवढेंच कोणी बोलत नाही. उलट गुजराथमध्ये अशा ग्रामपंचायतींवर बहिष्कार घालून त्या मोडून टाकण्यांत आल्या! हा निस्संशय आत्मघात होय. ग्रामपंचायतीसाठी सरकारने कायदा दिला आहे. त्याला लगाम घालून, राबवून आपल्या कामीं जुंपण्यांतच खरें कौशल्य आहे. मुंबई इलाख्यांत ग्रामपंचायतीचा कायदा नुकताच झाला. तो मध्यप्रांताच्या कायद्याइतका उदार नसला तरी कार्यारंभाच्या दृष्टीने खात्रीने टाकाऊ नाही. त्याचा उपयोग पुरेपूर करणें म्हणजेच भावी कायदेमंडळ यशस्वीपणें झुंजविणे होय.

## मध्यप्रांतांतील ग्रामपंचायती

मध्यप्रांतांतील बावीस जिल्ह्यांत सुमारें आठशें ग्रामपंचायती आहेत. त्यांपैकीं केवळ वऱ्हाडांतील चार जिल्ह्यांत ४५० असून एकट्या यवतमाळ जिल्ह्यांतच २५० ग्रामपंचायती आहेत. वऱ्हाडांत इतर प्रांतांच्या मानाने ग्रामपंचायती बऱ्या दिसतात व त्याचें सर्व श्रेय तेथील आमदार श्री. इटकीकर यांना आहे. आज ग्रामपंचायती म्हणजे इटकीकर अशी स्थिति तेथे झाली आहे. या ग्रामपंचायतींसंबंधाने श्री. इटकीकरांशीं वऱ्हाडांतील ग्रामपंचायतींचा इतका पत्रव्यहार सुरू असतो कीं, त्यासाठी सरकारला त्यांच्या गांवीं टपालकचेरी मुद्दाम उघडावी लागली! श्री. इटकीकर यांनी व्यक्तिशः या चळवळीसाठी अविश्रांत परिश्रम घेतले आहेत. परंतु ही चळवळ केवळ व्यक्तिगत असता कामा नये. ती एखाद्या राजकीय पक्षाने आपल्या चळवळींतील एक प्रमुख अंग म्हणून स्वीकारली पाहिजे. कारण त्यावरच भावी स्वराज्यमंदिर अधिष्ठित होणार आहे.

# शब्दकोश भाग दुसरा

## प्रकाशन—समारंभ

गुरुवार ता. १४ रोजीं सायंकाळीं ५ वाजता पुणें येथील महाराष्ट्र शब्दकोशकचेरींत श्रीयुत न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली शब्दकोशाच्या 'दुसऱ्या विभागाचा प्रकाशनसमारंभ झाला. सदर विभाग हा ओ ते ख पर्यंतचा असून त्याची पृष्ठसंख्या ४७७ ते ९१८ पर्यंत म्हणजे ४४१ आहे. या विभागास शब्दकोश—मंडळाच्या संपादकांपैकीं एक प्रमुख संपादक श्रीयुत य. रा. दाते यांनी 'भाषाशास्त्र व

जगांतील भाषा ' या शीर्षकाखाली लिहिलेली ६७ पृष्ठांची विस्तृत प्रस्तावना जोडलेली आहे. समारंभाचे प्रारंभीं श्री. दाते यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणांत शब्दकोशकार्याची माहिती सांगितली.

### केळकरांचे भाषण

शेवटीं अध्यक्ष या नात्याने श्रीयुत केळकर यांचें भाषण झालें. ते म्हणाले, " हल्ली ग्रंथप्रकाशनाची जी एक विशिष्ट पद्धति निघाली आहे ती खरोखरच स्तुत्य आहे. अशा तऱ्हेच्या ग्रंथांना जितक्या मार्गांनी प्रसिद्धि देणें शक्य असेल तितक्या मार्गांनी ती द्यावी. हा शब्दकोश ग्रंथ किती महत्त्वाचा आहे व त्याची उपयुक्तता किती आहे हें निराळें सांगावयास नकोच. अशा तऱ्हेचे कोश काढून संपादक मंडळाने मराठी भाषेवर मोठा उपकार केला आहे असेंच कोणीहि म्हणेल. आज जी ग्रंथनिर्मिती होत आहे, तिला अशा कोशांचा उपयोग होत आहे कीं नाही किंवा ग्रंथलेखक अशा कोशांचा उपयोग कितपत करीत असतील हें पाहूं. माझ्या हातीं पहिला भाग पडल्यापासून आतापर्यंत फार झालें तर मी त्याचा पांचसहा वेळाच उपयोग केला असेल. पुस्तक संग्रही असलें तरी शब्द हुडकून काढून त्याचा लिखाणांत उपयोग करण्याची प्रवृत्ति एकंदरीने कमी. कां कीं, त्याचें कारण प्रसंग कमी. असे प्रसंग व असे शब्द हुडकून काढून लेखांत घालणारे लेखकहि विरळाच. अशी स्थिति का उत्पन्न व्हावी ? याचें कारण हल्लीचें हायस्कूलमधील किंवा कॉलेजांतील शिक्षण हेंच होय. इंग्लिश इन्टू इंग्लिश म्हणजे इंग्रजी शब्दाला प्रतिशब्द द्यावयाचा तोहि इंग्रजीच अशी हल्ली पद्धति आहे. संस्कृत पाठशाळेकडे पाहिलें तरीहि संस्कृतचें शिक्षण संस्कृतमधूनच दिलें जातें. कोशाचा मुख्य उपयोग ग्रंथलेखन व शिक्षण. पण या दोनीहि बाबतींत मराठी कोश बाजूला ठेवून शिक्षण दिले जात आहे. तसेंच लेखहि लिहिले जात आहेत. एखादा लेखक नवा शब्द बनवतो. पण त्याच अर्थाचा शब्द कोशांत कोणता आहे हें तो पाहत नाही. या कोशाचा खराखुरा उपयोग तेव्हाच होईल कीं जेव्हा शाळा–कॉलेजांमधून शिकविण्यांत येणारे विषय हे मराठी भाषेच्याद्वारा शिकविले जातील, व विश्वविद्यालयांत मराठीच्याद्वारें व मराठी विषयाची स्वतंत्र परीक्षा घेतली जाईल. इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स वगैरे राष्ट्रांत तद्देशीय भाषेतून शिक्षण दिलें जातें आणि म्हणूनच त्यांच्या भाषेतील शब्दभांडारांत दिवसागणिक भर पडत आहे. याला अपवाद म्हणजे आमचा दुर्दैवी हिंदुस्थान देश होय. जेव्हा महाराष्ट्र युनिव्हर्सिटी स्थापन होईल तेव्हा या कोशाचा खरा व पूर्ण उपयोग होईल. आज या कोशांचा उपयोग, जे गृहस्थ महाराष्ट्र युनिव्हर्सिटीचा प्रश्न काढतांच मराठी ग्रंथ कोठे आहेत, कोश कोठे आहेत वगैरेंसारख्या अडचणी म्हणून दाखवितात त्यांचीं तोंडें बंद करण्यास तरी खास होईल. पुढे उत्पन्न होणारी उणीव भरून काढण्यास अशा तऱ्हेचे कोश होणें हें अत्यंत जरूर आहे.

### कोशाची समृद्धि

आता अशा तऱ्हेचा कोश किती अंगांनी समृद्ध करतां येईल हे पाहूं. मुख्यतः संस्कृत, जुने मराठी, प्रांतिक बोली, परकी व ग्राम्य, इतक्या प्रकारच्या शब्दांचा समावेश अशा कोशांतून व्हावयास पाहिजे. परक्या भाषेतील शब्दांवर बहिष्कार घालून त्यांना दूर लोटण्याची सावरकरी पद्धत मला मुळीच मान्य नाही. मराठी संस्कृति ही संस्कृतावर अवलंबून असल्यामुळे संस्कृत भाषेतील सर्व शब्द आपल्या कोशांत बेशक घ्यावे. कारण आजीचें धन हें स्त्री–धन असल्यामुळे तें नातीला ( मराठीला ) सर्वच्या सर्व घेण्याचा अधिकार आहे. या कोशांत अग्न्यायतन किंवा अयोर्ध्व असा शब्द दिला आहे. हा मराठी शब्द कसा होतो ? असे जर शब्द चालतात तर मग संस्कृत वाङ्मयाचा मुलूख खालसा करून त्यांतील सर्व शब्द घेण्यांत हरकत काय आहे ? हा एक मार्ग झाला. दुसरा मार्ग म्हणजे जुन्या मराठींतले शब्द. ज्ञानेश्वरींतले शब्द कोणी आपल्या लेखांत लिहिलेले वाचावयास मिळाले तर आपणांस नवीन ज्ञान प्राप्त झाल्याचा आनंद होतो. मग त्यांतील सर्व शब्दांचा सरसहा उपयोग करून हा आनंद द्विगुणित कां करूं नये ? जुन्या मराठींतले शब्द, एक ठिकाणीं करण्यास फारसे आयास पडावयाचे नाहीत. कारण अपरिचयत्वाच्या दृष्टीने महत्त्वाचे शब्द थोडे सांपडतील. यानंतर धंद्यांतले शब्द. यांचा उपयोग उदाहरणें देण्याच्या दृष्टीने फार आहे व सामान्य खेडवळ जनता व तुम्ही सुशिक्षित लोक यांचा एकजीव होण्यास हेच शब्द उपयोगी पडतील. तसेच ऐतिहासिक वाङ्मयांतील पर्शिअन व अरेबिक शब्द. यांचाहि समावेश मराठी शब्दकोशांत करून घेतला पाहिजे. आपल्या पूर्वजांनी ज्या शब्दांना दूषण मानलें नाही त्या शब्दांवर आपण बहिष्कार टाकण्याचें कारण काय ? अशा शब्दांना आपल्या मराठी व्याकरणाचे प्रत्यय लावून त्यावर आपल्या संस्कृतीचा संस्कार केला म्हणजे झालें. इंग्रज बायको करून घेणारा हिंदु मनुष्य व्रात्यस्तोमविधीने आपल्या बायकोला हिंदु करून घेत

नाही का ? मग परकी शब्दांवरच बहिष्कार कां ? येथे आपण आक्रमणपर वृत्ति ठेवावी. ज्ञान कोठल्याहि देशांतलें असलें तरी तें पवित्रच. मग शब्दानेच काय पातक केलें आहे ? शब्दकोश म्हटला की तो नेहमी पवित्र. त्यांत सुश्लिल, अश्लील असा भेदभाव नसतो. या दृष्टीने पाहतां ग्राम्य शब्दांचाहि समावेश कोशांत केला पाहिजे. ग्राम्य शब्द झाले तरी ते आपल्या भाषेंतलेच असतात. तसेच नवीन शब्द बनवून तेहि शब्दकोशांत घातले पाहिजेत. कारण भाषा, व्यवहार, कायदा, लोकमत, रूढि, शास्त्र यांची समव्याप्ती कधी होतच नाही. या जोड्यांचा नेहमी पाठशिवणीचा खेळ सुरू असतो. व्यवहार नेहमी पुढे, भाषा त्याच्या मागे अशी स्थिति नेहमीच असते. असो. अशा तऱ्हेने सर्व बाजूंनी शब्दकोशाचा ग्रंथ समृद्ध करण्यास प्रत्येकाने मदत केली पाहिजे व संपादक मंडळानेहि आक्रमणशील दृष्टि ठेवून शब्दकोश तयार करण्याचें कार्य केलें पाहिजे."

# कलासेवकांचा कर्मयोग

येत्या सोमवारीं नागपूर येथे महाराष्ट्र साहित्य–संमेलनाचें जें अधिवेशन सुरू होणार आहे, त्याच्या शिरावर पूर्वीच्या संमेलनापेक्षा अधिक जबाबदारी पडलेली असून ती यशस्वीपणाने पार पाडली जाईल अशी आशा बाळगण्यास पुष्कळच जागा आहे. मडगांव, हैद्राबाद, व कोल्हापूर यानंतर नागपुरास अधिवेशन भरत असल्याने, संमेलनाने मराठी भाषेच्या चतुःसीमाच ठोकळ मानाने अवलोकन केल्यासारखें झालें आहे; आणि त्यामुळे वरील चार शहरें सामावणाऱ्या चार राजवटींखाली नांदत असलेल्या महाराष्ट्र–भाषाभिमानी जनतेचा केवढा कार्यभार आपल्याला उचलावयाचा आहे, याची जाणीवहि संमेलनाला झालेली आहे. सुदैवाची गोष्ट अशी कीं, गेल्याच वर्षी कोल्हापूरच्या अधिवेशनाने साहित्य-परिषदेचें यंत्र नीट उभें करून साहित्य-संमेलनाच्या हातीं तें दिलें आहे आणि त्यामुळे, संमेलनास जमलेल्या साहित्य-भक्तांच्या तोंडची वाफ, तेथल्या तेथेच हवेंत विरून न जातां, परिषदेच्या एंजिनांत ती वापरली जाऊन कार्यक्षम होण्याची व्यवस्था झालेली आहे.

कार्याचा वाढता बोजा आणि तो उचलण्याची साधनसामुग्री या दोन कारणांमुळे नागपूरच्या साहित्यसंमेलनाबद्दल कोणालाहि औत्सुक्य वाटणें साहजिक आहेच; पण त्याशिवाय त्याला लाभलेल्या ग्रहबळामुळे तर त्या औत्सुक्याचें प्रमाण अधिकच वाढलेलें आहे. १९२० सालाची प्रचंड व क्रांतिकारक राष्ट्रीय सभा पार पाडणारें नागपूर हें ठिकाण, तेथील विद्यापीठाचे कुलगुरु श्री. भवानी शंकर नियोगी हे सूत्रचालक आणि श्री. कृष्णाजीपंत खाडिलकरांसारखे ओजःसंपन्न कलासेवक हे अध्यक्ष, अशा मंगल युतीचें फल, विद्यमान मराठी वाङ्मयाचें सूक्ष्म, सर्वांगीण व यथार्थ निदान होण्यांत दिसलें पाहिजे आणि त्यायोगें तें वाङ्मय निरामय, परिपुष्ट आणि सामर्थ्यशाली होण्यास मदत झाली पाहिजे अशी अपेक्षा करणें सयुक्तिकच होय.

महाराष्ट्र वाङ्मयाच्या संशुद्धीचे व अभिवृद्धीचे प्रयत्न संमेलनाने हातीं घेणें हल्लीच्या काळीं किती निकडीचें आहे, याची कल्पना सरसालांतील ग्रंथ–निर्मितीचें विहंगमावलोकन केलें तरी कोणासहि येण्यासारखी आहे. यंदाचे वर्षी प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची संख्या चारशेंच्या आसपास असल्यामुळे ती सकृद्दर्शनीं समाधानकारक वाटण्यासारखी दिसली, तरी तिचा तिसरा हिस्सा शालोपयोगी पुस्तकांचा असून अहवाल, पद्यावल्या इत्यादि किरकोळ चोपड्यांनी जवळ जवळ तितकाच भाग व्यापलेला आहे. उरलेल्या ग्रंथ–भांडाराचें परिगणन आरंभिलें तर, मान्यतेला चढलेलीं व स्थैर्य पावणारीं, पुस्तकें मोजण्यास दोनहि हातांचीं सगळीं बोटें कांही शिणवावीं लागणार नाहींत !

चालू सालीं संकलन–ग्रंथांचें पीक पुष्कळ आलें असलें आणि तें कितीहि उमदें असलें तरी त्याचें श्रेय प्रस्तुत वर्षाच्या

पदरीं खास बांधतां येणार नाही. नव-निर्मितीच्या दृष्टीनें, 'शब्दकोशाची' पडलेली भर मराठी सारस्वताला संपन्नतेस चढविणारी अशीच ठरेल आणि श्री. कृ. पां. कुळकर्णी यांचें मराठी भाषेसंबंधींचें शास्त्रीय पुस्तकहि उपयुक्त गणलें जाईल. त्याचप्रमाणे, राष्ट्रांत चालू असलेल्या अस्पृश्योद्धाराच्या चळवळीला, महाराष्ट्र शारदेने, श्री. माटे व श्री. शिंदे या दोन हातांनी जो कुसुमभार अर्पण केला, तो वाङ्मयाच्या दृष्टीनेहि बहुमोलाचा आहे. एवढे स्पृहणीय भाग वगळले तर, मराठी वाङ्मयाच्या इतर प्रांतांत मरुप्रदेशाचा उजाडपणाच आढळतो. काव्य घ्या, लघुकथा घ्या, कादंबरी घ्या किंवा नाटक घ्या, अभिनव स्वरूपाचें व चिरस्थायी होण्यासारखें, एखाददुसरेंहि पुस्तक त्यांत सांपडण्याची मारामार. उलट विषारी विचारांचे कढत वारेच त्या मरुप्रदेशावरून वाहूं लागले आहेत.

'खपेल तें लिहावें' या आचरट तत्त्वाचा अंगीकार करून मादक कादंबऱ्यांचे कारखाने चालविणारे बेजबाबदार लेखक आता कलोपासनेच्या नांवाखाली नग्नतेचीं वर्णनें करूं लागले आहेत, एवढेंच नव्हे तर तसें करण्यांतच भूषण मानीत आहेत आणि 'हो! हो! आम्ही नीतिविघातक लिहूं; तुम्ही आमचें काय करणार?' असें जाहीरपणें हटकीत आहेत! अशा नंग्या लेखकांना चाप लावणारा अश्लीलतेचा ठराव गेल्या वर्षी कोल्हापूरच्या संमेलनापुढे आला असतां कांही गफलतीमुळे तो मंजुरीपर्यंत पोंचूं शकला नाही. त्या वेळीं ठरावाला विरुद्ध गेलेलें लोकमत हें अचूक नव्हतें याची खात्री पटविण्यासारखा पुरावा औंधचे पंडित श्री. सातवळेकर यांनी सबंध वर्षभर खपून गोळा केलेला आहे. त्यांत प्रगट झालेलीं सहस्रावधि सद्गृहस्थांचीं मतें लक्षांत घेऊन नागपूरच्या संमेलनानें अश्लील वाङ्मयाचा विचार जबाबदारीनें व जागरूकतेनें करावयास हवा, एवढेंच नव्हे तर, तो विचार कृतींत येण्यासाठी, जुन्या-नव्या मतांच्या विद्वानांची एक समिति नेमून तिच्याकडे पुढील वर्षाच्या वाङ्मयावर टेहेळणी ठेवण्याचें काम सोंपविलें पाहिजे. अशा समितीचा उपयोग, समाजाला मार्गदर्शनाचे कामीं किती होतो, याचें प्रत्यंतर यंदाच्या 'प्रतिभा-साधन समितीनें' चांगल्या प्रकारें आणून दिलेलें आहे.

प्रतिभेचें 'ईश्वरी देणें' किती जोखमीचें व पावित्र्याचें आहे याचा गंध नसलेल्या कांही खुशालचेंडू लेखकांनी वाङ्मयाला एखाद्या खुषमस्कऱ्याच्या किंवा विदूषकाच्या हीन दर्जाला पोंचविण्याचा जो अट्टाहास गेले कांही महिने चालविलेला आहे, त्याचाहि समाचार घेणें साहित्यसंमेलनाला प्राप्त आहे. "समाजहित-दृष्टि कलेच्या वाढीला घातक झालेली आहे" अशी ओरडा करून वाङ्मय निःसत्त्व व परिणामशून्य करूं पाहणाऱ्या अशा थिल्लर व स्वार्थी लेखकांकडून जनतेचा बुद्धिभेद होऊं नये अशी खबरदारी प्रतिष्ठित वाग्भटांनी घेणें जरूर आहे. अध्यात्म मार्गांतील भक्तिमूलक व ज्ञानप्रधान कर्मयोगाप्रमाणे साहित्यक्षेत्रांतहि नीतिमूलक व बोधप्रधान लेखन-योग चालविणाऱ्या विद्वानाचेंच स्थान श्रेष्ठ समजलें पाहिजे.

सदभिरुचि पाळून समाजाला पोषक व सन्मार्गदर्शक असें वाङ्मय निर्माण करणारा हाच खरा सरस्वतीचा उपासक; कलेच्या नांवाखाली भोंवतालच्या चार लोकांना क्षणभर हसविण्यासाठी चटोर गोष्टी सांगणारा लेखक हा केवळ नकल्या किंवा बहुरूपी होय. जगविख्यात लेखक मि. बर्नार्ड शॉ यांनी अशा ढोंगी कलाभक्तांना चोख उत्तर देऊन ठेवलेलें आहे. 'कलेसाठी कला' नसून 'जीवनासाठी कला' आहे असें त्यांचें स्पष्ट मत आहे. "केवळ कलेसाठी एक वाक्यहि लिहिण्याचे श्रम मीं घेतले नसते" असें म्हणून मि. बर्नार्ड शॉ यांनी असें जाहीर केलें आहे कीं, 'लंडन शहराला शिक्षण देणें हें माझें नियत कार्य आहे.' अशा समाजहितबुद्धीचें ध्येय अंतःकरणांत तेवत असल्याविना, केवळ रम्य-मंजुल

शब्दांच्या पंक्ति जमविणें हें साबणाचे रंगीबेरंगी फुगे उडविण्यासारखेंच व्यर्थ व बालिश आहे याची स्पष्ट जाणीव उदयोन्मुख लेखकवर्गाला संमेलनाने करून देणें, वर्तमान कालीं, अत्यंत अवश्य आहे.

नीतिमूलक व बोधप्रधान असा कर्मयोग कलासेवकांनीं निष्कामपणें आचरावा हें खरें; परंतु समाजाहित साधणाऱ्या साहित्यभक्तांच्या योगक्षेमाची चिंता समाजाने वाहावी हेंहि तितकेंच न्यायाचें आहे. सरस्वतीभक्त हा कोणत्याहि देशांत लक्ष्मीपुत्र म्हणून मिरवूं शकत नसला, तरी त्याची 'अगदींच उपासमार' होणें हें 'कोणत्याहि देशाला भूषणावह नाहीं. जीव मुठींत धरून चालणाऱ्या आमच्या मासिकांकडून मोबदल्याची अपेक्षा लेखकवर्गाने करणें हिशेबी होणार नसलें, तरी मोठमोठे इमले उठविणाऱ्या प्रकाशकांनी लेखकांचा न्याय्य वांटा त्यांच्या पदरांत टाकणें अवश्य आहे. परंतु 'बनीया' वृत्तीच-प्रकाशकच काय, पण आमचें मुंबई विद्यापीठहि मॅट्रिककरिता घ्यावयाच्या वेंच्यांच्या मोबदला, त्यांच्या लेखकांना, कपर्दिकहि द्यावयास तयार नाही. या आपमतलबी धोरणाला आळा घालण्याचा विचार संमेलनाने करणें जरूर आहे. जनतेंतील अज्ञान व दारिद्य यांचें निर्मूलन करणें हाच पुस्तकांचा खप वाढविण्याचा राजमार्ग असला; तरी तो कालावधीचा असल्यामुळे, सद्यःकालीं उपयुक्त होतील असे, लेखक-प्रकाशकांच्या संबंधाविषयींचे कांहीं नियम संमेलनाने ठरवून द्यावे.

याशिवाय, महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेसारखे वादातीत व जिव्हाळ्याचे ठराव, कृतींत उतरेपर्यंत, त्यांचा पाठपुरावा संमेलनाने वर्षानुवर्ष अव्याहत केला पाहिजे. गुदस्तां कोल्हापुरास महाराष्ट्र विद्यापीठासाठी जी एक समिति स्थापण्यांत आली तिनें वर्षभरात काय काम केलें याची जशी चांचणी घेण्यांत यावी, तशीच पुढीलवर्षासाठी नेमल्या जाणाऱ्या समित्या,कागदांवरच पडून न राहता, त्यांनी किती काम करावें याचीहि निःसंदिग्ध कल्पना त्यांना देण्यांत यावी.यंदाचें अधिवेशन हें अठरावें असल्यामुळे यापुढे संमेलन हें कायद्याच्या भाषेंत 'सज्ञान' होणार, हें लक्षांत घेऊन संमेलनाने आपला दोन कोटि लोकांवरील अंमल कर्तेपणाने व दक्षतेने चालू केला पाहिजे. अशा कसोटीच्या प्रसंगीं संमेलनाला श्री. काकासाहेब खाडिलकरांसारखे कलावान कर्मयोगी नायक म्हणून लाभले हें एक 'प्रसादचिन्ह'च गणण्यास हरकत नाहीं. त्यांची नाट्यसृष्टि ही, पार्वतीप्रमाणें, विलासशील व नृत्यप्रिय अशी असली तरी, त्यांचे 'केसरीं'तील राजकीय लेख हे, शंकराप्रमाणें, गंभीर व भयानक असेच असत. त्यामुळे साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून, मराठी वाङ्मयाला नीतिमूलक व बोधप्रधान अशा कर्मयोगाचे,आज जरूर असणारे धडे, ते देतील अशीच कोणीहि अपेक्षा करील.

# लोकशाही स्वराज्य-पक्ष

### ठाणें जिल्हा शाखा

लोकशाही स्वराज्य-पक्षाची ठाणे जिल्हा शाखा स्थापन करण्याकरिता मुंबई येथे पक्षाच्या मुख्य कचेरींत श्रीं. जम्नादास मेहता याचें अध्यक्षतेखाली सभा भरली होती. जिल्ह्यातून ठिकठिकाणांहून सुमारे तीस सभासद हजर होते लोकशाही स्वराज्य-पक्षाची ठाणें जिल्हा शाखा स्थापन होऊन तिचें तात्पुरतें अधिकारी मंडळ निवडण्यांत आलें.

| | |
|---|---|
| श्री. छोटालाल रामदास श्रॉफ | (अध्यक्ष) |
| ,, ग. कृ. फडके, | चिटणीस |
| ,, दा. ल. पुरंदरे | दु. चिटणीस |
| ,, ना. दा. देवधेकर | सभासद |
| ,, आ. ज. करंदीकर | ,, |
| ,, गो. ध. वर्तक | ,, |
| ,, के. ल. मेकल | |
| ,, ग. लं. कुंटे | |
| मिसेस जानकीबाई घाटे | |

ठराव २—शाखेच्या सभासदांची संख्या तीनशें झाल्यानंतर सर्व साधारण सभा भरविण्यांत यावी व त्या वेळीं शाखेचं कायमचें अधिकारी मंडळ निवडण्यांत यावें.

ठराव ३—बृ. म. परिषदेंत जे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले ते व यापुढे पक्षाचे सभासदत्वाचा दाखला रीतसर भरून देतील ते या शाखेचे सभासद म्हणून समजण्यांत यावे.

येणेंप्रमाणे काम होऊन सभा बरखास्त झाली.

## कार्यकारी मंडळाची सभा

सदर सभा मुंबई येथे पक्षाच्या मुख्य कचेरीच्या दिवाणखान्यांत ता. १७ डिसेंबर १९३३ रविवार रोजीं पक्षाचे अध्यक्ष श्री. **न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखालीं दुपारीं ३ वाजता झाली. सभेचें काम साडेचार तास चाललें होतें. कार्यकारी मंडळाच्या एकंदर १९ सभासदांपैकीं वऱ्हाड तर्फेचे श्री. सदाशिवराव केळकर वकील (अकोला) व श्री. माधवराव चांदे वकील (खामगांव) व मराठी मध्यप्रांतातर्फेचे श्री. बळवंतराव देशमूख वकील (चांदा) यांच्या खेरीज बाकी सर्व सोळाहि सभासद हजर होते. त्यांचीं नांवें:—

१ न. चिं. केळकर २ जम्नादास एम. मेहता ३ ल. ब. भोपटकर ४ दा. वि. गोखले ५ ग. वि. साळवेकर ६ न. शि. परांजपे ७मा. ना. तळपदे ८ पु. गो. जोशी ९ रामराव माधवराव देशमूख (कार्याध्यक्ष) १० ना. रा. बामणगांवकर ११ गो. अ. ओगले १२रा.शं. राजवाडे १३ ना. दा. सावरकर १४ वि. र.तुळजापूरकर १५ वि. कृ.जोशी १६ रा. ना. मंडलीक.

सदर सभेंत खालील कामें सर्वानुमतें करण्यांत आलीं—

१ मध्यवर्ति मंडळावरील रत्नागिरीचे श्री. जे. एन. लिमये व विलेपार्ल्याचे श्री. गो. रा. फाटक यांनी राजीनामे पाठविले ते खेदपूर्वक स्वीकारण्यांत आले. त्यांच्या जागा भरण्याचा अधिकार सेक्रेटरींना देण्यांत आला.

२ मराठी मध्यप्रांताचे पांच जिल्ह्यांपैकीं चारच जिल्हे पूर्ण मराठी आहेत. त्यांच्यातर्फेने प्रत्येकीं ३ सभासद मध्यवर्ती मंडळावर निवडावयाचे आहेत. त्या प्रांतातर्फेचे चिटणीस श्री. ओगले यांना सदर सभासदांच्या जागा जिल्हा शाखांच्या स्थापनेनंतर भरण्याचा अधिकार देण्यांत आला. नागपुरास होणाऱ्या साहित्य समेलनाच्या कामांतून मुक्त होतांच जिल्हा शाखा स्थापन करण्याचें काम श्री. ओगले हातीं घेणार आहेत.

३ वऱ्हाडच्या चार जिल्ह्यांतर्फे खालील सभासदांची निवडणूक मध्यवर्ती मंडळावर करण्यात आली—

उमरावती जिल्हा—१श्री. फरकाडे मु.पो.शेंदुर, जना ता. मोर्शी, २रावसा. उत्तमराव इटकीकर मु. इटकी ता. दर्यापूर, ३ श्री. चांदूरकर वकील चांदूर.

यवतमाळ जिल्हा—१ अण्णासाहेब जतकर वकील यवतमाळ, २ श्री. बाबासाहेब बापट वकील यवतमाळ, ३ आमदार माधवराव कोल्हे यवतमाळ.

अकोला जिल्हा—श्री. अनंतराव आठल्ये वकील आकोला, २ श्री. मामासाहेब जोगळेकर अकोला, ३ श्री. दाजीसाहेब बेदरकर अकोट'

बुलढाणा जिल्हा—१दादासाहेब सोमण मु.मेहकर, २ श्री. रा. अ. कानिटकर वकील बुलढाणा ३ बॅ. टी. एस. पाटील मलकापूर.

४ आज तारखेपर्यंत १ सोलापूर २ पुणें ३ कुलाबा व ४ ठाणें यांच्या जिल्हा शाखा व महाड, कर्जत व पेण येथे तालुका शाखा स्थापन झाल्या आहेत. जानेवारीअखेर बाकीच्या जिल्हा शाखा स्थापन करण्याचें काम पुरें करून नंतर मध्यवर्ती मंडळाची सभा भरविण्याचें ठरलें.

चिटणिसांनी तयार केलेल्या पक्षाची घटना व नियम यांचा मसुदा वाचण्यांत आला व जरूर त्या दुरुस्त्या त्यात करून तो मंजूर करण्यांत आला. (तो पुढील अंकांत समग्र देण्यांत येईल)

लोकशाही स्वराज्य पक्षाची शाखा म्हणून वऱ्हाड प्रांताकरिता वऱ्हाडच्या 'राष्ट्रीय पक्षास' च हा पक्ष मान्यता देत आहे. तसेंच लोकशाही स्वराज्यपक्षाचें ध्येय, उद्देश, घटना व नियम मान्य करून आपल्या प्रांताच्या परिस्थित्यनुसार आपली स्वतंत्र घटना व शिस्तीचे नियम करण्यासाहि त्या पक्षाला अधिकार आहे. मात्र वऱ्हाडांतील या 'राष्ट्रीय पक्षा'चा उल्लेख जेथे जेथे करण्यांत येईल, तेथे तेथे 'लोकशाही स्वराज्य पक्षांतर्गत राष्ट्रीय पक्ष' असें लिहिण्यांत यावें.

७ कोणत्याहि संस्थानांत योग्य व विवक्षित मर्यादा संभाळून खुद्द त्या संस्थानच्या राज्यकारभारासंबंधाने सभा भरवून चर्चा करण्याचा हक्क हा प्रजाजनांचा मूलभूत हक्क आहे. तो हल्लीं जेथे त्या राज्यकर्त्यांकडून दिला जात नसेल, तेथे हा हक्क प्राप्त करून घेण्यासंबंधाने प्रथम प्रयत्न झाला पाहिजे तो हक्क सर्व प्रकारच्या न्याय्य व शांततेच्या मार्गांनीं मिळविण्याचा प्रयत्न संस्थानी प्रजेने करावा व त्या कामीं या लोकशाही स्वराज्यपक्षाने आपल्या पुढाऱ्यांच्या द्वारा मनःपूर्वक मदत करावी

८ देशांतील लष्करी शिक्षण, लष्कराचें हिंदी

करण व राष्ट्रीय संरक्षण या बाबतींत हिंदुस्थानाचें पाऊल पुढे कसें पडेल, लष्करी खर्चीत काटकसर कशी करतां येईल याचा विचार करून उपाययोजना सुचविण्याकरिता डॉ. मुंजे, कॅप्टन मोडक व अण्णासाहेब भोपटकर यांची कमिटी हा पक्ष नेमीत आहे. कमिटीने आपला रिपोर्ट ता- ३१ मार्च १९३४ पर्यंत करावा.

९ लोकशाही स्वराज्यपक्षाचे उद्देश व धोरण नेहरू कमिटीचा रिपोर्ट व नंतरची आजपर्यंतची राजकीय परिस्थिति लक्षांत घेऊन नेहरू कमिटीच्या घटनेत आणखी कोणत्या गोष्टी घातल्या पाहिजेत याविषयी सूचना करण्याकरिता श्री. रामराव देशमुख श्री. दा. वि. गोखले व श्री. तळपदे यांची एक कमिटी नेमण्यांत येत आहे. ता. ३१ मार्च १९३४ पर्यंत सदर कमिटीने आपला रिपोर्ट करावा.

१० ता. २०।१२।३३ रोजीं मुंबई येथे जी सर्वपक्षीय परिषद भरणार आहे तिला व्यक्ति या नात्याने या पक्षाच्या सभासदाने हजर राहाण्यास हरकत नाही,

११ बृहन्महाराष्ट्र परिषदेचा ठराव २५ या मधील कामांचा विचार पुढे ढकलण्यांत आला.

१२ मालवण येथें येत्या फेब्रुवारीमध्ये म्युनिसिपल निवडणूक होणार आहे. तिला लोकशाही स्वराज्य पक्षाचे उमेदवार म्हणून उभे राहण्याबद्दल श्री. बांदिवडेकरप्रभृति सभासदांकडून परवानगी मागण्यांत आली आहे. त्यांना ती देण्यांत येत आहे. मात्र त्यांनी मालवण येथे ताबडतोब पक्षाची मालवण तालुका शाखा स्थापन करून सभासदांची संख्या शक्य तितकी अधिक वाढवावी व शाखेमार्फत म्यु. निवडणूक लढवावी.

१३ ले. असेंब्लीपुढे असलेल्या मंदिर-प्रवेश बिलाबद्दल पक्षाचें धोरण काय असावें याबद्दल बरीच चर्चा झाली. धर्मवीर डावरे, वैद्यपंचानन कवडेशास्त्री व ऐनापुरे वकील त्यासाठीं मुद्दाम हजर होते. आज ठराव कोणताच करूं नये व श्री. तात्यासाहेब केळकर यांनी त्यांच्याकडे आलेल्या पत्रांना वैयक्तिक नात्याने उत्तरें द्यावीं, असें अखेर ठरलें.

१४ मध्यवर्ती मंडळाचे सभासदांची वर्गणी यंदा पुरती रु. ५ ठरविण्यांत आली आहे. ती हजर असलेल्या सभासदापैकीं १५ जणांनी रोख दिली व श्री. जम्नादास मेहता यांनी मुख्य कचेरीच्या खर्चाकरितां आपली रु. १०१ ची देणगी जाहीर केली.

# लोकशाही स्वराज्य पक्ष व त्याचे टीकाकार

शुक्रवार ता. १५ रोजीं सायंकाळीं ६ वाजता लो. टिळक स्मारक मंदिरांत पुणें सार्वजनिक सभेतर्फे श्री. **न. चिं. केळकर** यांचे अध्यक्षतेखाली **बॅ. छोटालाल भगवानदास आग्रवाल**, यांचें "डेमोक्रॅटिक स्वराज्य पार्टी अँड् इट्स क्रिटिक्स," या विषयावर इंग्रजींत व्याख्यान झालें. बॅ. आग्रवाल आपल्या भाषणांत म्हणाले, "आजच्या 'टाइम्स' पत्रांत अशी एक बातमी प्रसिद्ध झाली आहे कीं जे म. गांधी कौन्सिलचें नांव काढतांच आपलें डोकें फिरतें असें म्हणत असत तेच ज्यांना कौन्सिलाशिवाय इतर काम करतां येत नसेल त्यांनी तें करावें असें आता म्हणूं लागले आहेत. महात्माजींच्या विचारसरणींत ही बरीच प्रगति झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाही.

## प्रामाणिक मतभेद

सांप्रतच्या श्वेतपत्रिकेंतील सुधारणा हिंदी आकांक्षांच्या मानाने अत्यंत अपुऱ्या व असमाधानकारक असल्या तरी मॉंटेग्यु—चेम्सफर्ड सुधारणांपेक्षा त्या कांहीं बाबतींत बऱ्याच प्रगतिपर आहेत, मग मॉंटेग्यु—चेम्सफर्ड सुधारणांच्या कारकीर्दीत जर कौन्सिलप्रवेश मान्य झाला होता तर तो आताच कां मान्य होऊं नये हें कळत नाही. श्री. नरिमन यानी तुरुंगांतून बाहेर पडतांच आमच्या पक्षावर जी भरमसाट टीका केली ती त्यांनी या नवीन पक्षाचे उद्देश पुरते समजून न घेतांच केली असावी असें म्हणावें लागतें. कारण त्यांनी त्यानंतर आपल्या मताचें निदर्शक म्हणून 'व्हिदर कॉंग्रेस' नांवाचें एक चोपडें प्रसिद्ध केलें आहे, त्यांतील बहुतेक विचारसरणी आमच्या पक्षाशीं जुळणारी आहे. त्यांच्या आक्षेपांपैकीं गांधींचा अपमान व कॉंग्रेसशीं विरोध हेच काय ते प्रमुख आक्षेप आहेत. परंतु हे दोनहि आक्षेप फोल आहेत. म. गांधींच्या थोर व्यक्तित्वाविषयी त्यांच्या अनुयायांइतकीच आमच्या पक्षांतील लोकांच्या ठिकाणीं आदरबुद्धि आहे. तथापि राजकीय चळवळीच्या बाबतींत जे आमचे प्रामाणिक मतभेद आहेत ते आम्ही स्पष्ट सांगतों यांत काय दोष आहे? तसेंच आमचा पक्ष हा कॉंग्रेसमधीलच पक्ष असून या पक्षांतील बहुतेक सभासद कॉंग्रेसचे सभासद आहेत व जे थोडे नसतील ते देखील कॉंग्रेसचीं कार्यालयें सुरू होतांच कॉंग्रेसचे सभासद होतील.

या गोष्टी आम्ही निःसंदिग्धपणें सांगत असताहि आमच्या पक्षावर काँग्रेस-विरोधाचा आरोप करणें हा खोडसाळपणा नव्हे काय?

### काँग्रेसचें कार्य

काँग्रेसचें महत्त्व कमी करण्याकरितां किंबहुना नष्ट करण्याकरितां हा पक्ष उत्पन्न झाला आहे असाहि आमच्या पक्षावर आरोप करण्यांत येतो. परंतु तोहि अजीबात खोटा आहे. काँग्रेसचें कार्य सरकारच्या दडपशाहीमुळे आज अजीबात बंद पडलें आहे. तेंच पुनः सुरू करण्याकरितां आमचा पक्ष स्थापन झाला आहे. या पक्षानें पूर्ण स्वातंत्र्य हें काँग्रेसचे ध्येय व शांतताप्रधान असे काँग्रेसचे मार्ग मान्य केले आहेत. याप्रमाणे काँग्रेसचें ध्येय व मार्ग आम्हीं स्वीकारले असतां व काँग्रेसचें बंद पडलेलें कार्य त्याच मार्गानें पुढें चालवीत असतां आम्ही काँग्रेसशीं विरोध करीत आहों असें म्हणण्यास काय आधार आहे? उलट मृतप्राय झालेल्या काँग्रेसच्या कार्यास आम्ही चालना देऊन तिला उद्दीपित करीत आहों असेंच यावरून सिद्ध होत नाहीं काय? सामाजिक व धार्मिक प्रश्न हे प्रत्येक समाजाचे वेगवेगळे असल्यामुळे व आमच्या देशांत अनेक समाज व संस्कृति नांदत असल्यामुळे ते प्रश्न प्रचलित राजकारणापासून वेगळे ठेवावे असेंच महाराष्ट्रीयांचें तरी प्रथमपासून म्हणणें आहे. काँग्रेस ही प्रथम राजकारणाचा विचार करण्याकरितांच निघाली व ती तशींच राहिली पाहिजे. परंतु अलीकडे काँग्रेसमध्ये या सामाजिक प्रश्नांना फाजील महत्त्व येऊं लागल्यामुळे नाहीं ते घोटाळे उत्पन्न होऊं लागले आहेत. हा अनुभव लक्षांत आणूनच आमचा लोकशाही स्वराज्य पक्ष हा केवळ राजकीय पक्ष ठेवण्याचाच आमचा उद्देश आहे. हें विशेषतः सांगण्याचें कारण कांहीं सनातनी पक्षाचे लोक आपल्या पक्षाचीं मतें या लोकशाही स्वराज्य पक्षाच्या नांवाखालीं प्रचलित करण्याचा प्रयत्न करतील कीं काय अशी शंका वाटूं लागली आहे. म्हणून अशा लोकांना आम्ही पुनः बजावून सांगतों कीं, आमचा पक्ष केवळ राजकीय स्वरूपाचा आहे. त्यांत सामाजिक किंवा धार्मिक प्रश्नांची भेसळ करणें केव्हांहि इष्ट नाहीं."

### खेड्यांकडे वळा

वरील आशयाचें बॅरिस्टर आग्रवाल यांचें भाषण झाल्यावर तपस्वी श्री. बाबासाहेब परांजपे यांचें पुढील आशयाचें भाषण झालें. ते म्हणाले, "नवीन पक्षांतल्या कार्यकर्त्या मंडळींनी टीकाकारांच्या आक्षेपांना उत्तरें देण्यांत कालक्षेप न करतां प्रत्यक्ष कार्य करावयास लागावें. या पक्षापुढें मोठें आणि महत्त्वाचें कार्य खेड्यांतील मतदार लोकांना, त्यांना समजेल अशा रीतीनें राजकीय संस्थांचें व त्यांच्या जबाबदारीचें शिक्षण देणें हें आहे. आणि हें कार्य फार अवाढव्य व तितकेंच कठीणहि आहे. कारण खेड्यांत स्थायिक झालेले जातिनिष्ठ किंवा स्वार्थनिष्ठ स्थानिक पुढारी हे लोकांना आपल्याकडे वळविण्याची खटपट करीतच आहेत. सरकार आपल्या सर्व सामर्थ्यासह त्यांना आपल्याला अनुकूल राखण्यास सज्ज उभें आहे. दुसरी टोकाला गांधींच्या असहकारी तत्त्वज्ञानाचे धडेहि आग्रहपूर्वक त्यांना मिळत आहेत. इतक्या अडचणींचा विचार करून लोकशाही स्वराज्य पक्षाला आपलें कार्य करावयाचें आहे. हें लक्षांत आणून प्रथम या पक्षाच्या कार्यकर्त्यांनी त्याच कार्याला लागलें पाहिजे. आज जनतेची स्थिति पाहिली तर असे आढळून येतें कीं, तिला समजुतीच्या दृष्टींनी अनेक गोष्टी अशक्य वाटत असल्या व वेदांताच्या अंतिम म्हणी तिच्या तोंडांत असल्या तरी, कृतीच्या नांवानें पूज्यच दिसतें. अशा स्थितीचें वर्णन करावयाचें झालें तर 'उठलों तर रावण मारीन पण जन्मांत उठेन कीं नाहीं याची शंका' असें करता येईल. या पक्षानेंहि आपल्या हातीं जीं साधनें असतील त्यांचा लोकशिक्षणाकडे अधिकाधिक उपयोग कसा करता येईल इकडे दृष्टि ठेवावी."

### श्रीयुत केळकर यांचें भाषण

अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना श्रीयुत केळकर म्हणाले:—

"बॅ. आग्रवाल यांनी आज फारच चांगलें व व्यवस्थित भाषण केलें. सार्वजनिक कार्यांत पडून त्यांनी भाषण केलें असें हें पहिलेंच. या दृष्टीनें त्यांनी एकदम बरीच मजल मारली यांत शंका नाहीं. आणि ते या पक्षातर्फे मतप्रसार करण्याला पुढेंहि आम्हाला अशीच मदत करीत जातील अशी आशा आहे.

आमचा नवीन पक्ष निघाला तो इतर कोणावर टीका करण्याकरिता निघालेला नाहीं. तसेंच आमच्या पक्षावर कोणी टीका केली तरी त्याला उत्तरें देण्याच्या भरीला आम्ही फारसे पडणार नाहीं. तथापि प्रसंगवशात् टीकेला उत्तरेंहि मिळणारच. आग्रवाल यांनी सांगितलेंच कीं आमच्या पक्षावरील सर्व टीकांचा निष्कर्ष काढला तर त्यांतून भरीव असे कांहींच निघत नाहीं. उत्तर देण्यासारखे टीकाकार त्यांना दोनच दिसले. एक मुंबईचें फ्री प्रेस जर्नल व दुसरे डेप्युटी गांधी मि. नरीमन. पैकीं फ्री प्रेस जर्नल हें फ्री प्रेस न्यूज एजन्सीचें उपांग असून तें पत्र आज जगण्याला गांधी व काँग्रेसपक्ष यांची तळी उचलण्या-

शिवाय त्याला दुसरा मार्ग नाही. असोशिएटेड प्रेस नांवाची दुसरी न्यूज एजन्सी आहे; ती निम-सरकारी आहे म्हणून फ्री प्रेससारखी एखादी लोकपक्षाची न्यूज एजन्सी असावी म्हणून मी या संस्थेला पूर्वी मदत केली आहे. तिच्या पहिल्या डायरेक्टरांपैकीं मी एक होतों. पण त्या एजन्सी-च्या तोट्याची कधी न भरून निघणारी कूस भरून काढण्यास कोण किती पुरा पडणार ? म्हणून फ्री प्रेस जर्नलने हें धोरण स्वीकारलें आहे, व जगण्याचा प्रयत्न चालविला आहे. ती कूस भरून काढण्याला आमच्याजवळ लाख-दोन लाख रुपये असतील तर फ्री प्रेस जर्नल आमच्याहि पक्षाची तरफदारी करील. तात्पर्य, ही टीका धंदेवाईक म्हणून तिजकडे लक्ष देण्याचें कारण नाही.

### आईचें वेड

मि. नरीमन यांचें चोपडें पुष्कळांनी वाचलें आहे. त्यांत काय करावें हें मुळीच नक्की सांगितलें नाही. फक्त दिसेल त्या व्यक्तीवर व संस्थेवर चिखल उडविला आहे! पण मौज ही कीं, हें सर्व गांधींच्या समर्थनाच्या-उद्देशानें केलें असलें तरी त्यांत स्वतः गांधींवरहि कांहीं थोडी टीका नाही. पण मि नरीमन यांचा झोक असा कीं, गांधीजींवर जी काय टीका करावयाची ती आम्ही त्यांचे अनुयायी करूं, इतरांना ती करण्याचा अधिकार नाही. हें पाहून मला एका कुटुंबाची आठवण होते. त्या कुटुंबांतील आईला अर्धवट वेड लागलें होतें व तें सांभाळून तिचे मुलगे तिची शुश्रूषा करीत असत. एक दिवस गांवचा एक गृहस्थ सद्बुद्धीने त्यांजकडे येऊन म्हणाला कीं, तुमच्या आईला वेड लागलें आहे असें ऐकतों; या विकाराला गुणकारी असें एक औषध मजजवळ आहे; तें तुम्हांला द्यावें म्हणून आलों आहे. त्याबरोबर त्या मातेचे प्रेमळ सुपुत्र या गृहस्थाच्या अंगावर काठी घेऊन धावले व म्हणाले, कोणा लुच्च्यानें तुम्हाला सांगितलें कीं, आमच्या आईला वेड लागलें म्हणून ! आणि ते लागलें असलें तरी तिला वेडी म्हणावयाची तर आम्ही म्हणूं ! ठीक आहे, असें म्हणून तो गृहस्थ निघून गेला. परंतु घरीं दिवसभर चालणारा व्यवहार पाहिला तर स्वतः ते मुलगे आईला 'वेडी' म्हणूनच संबोधीत असत !

म. गांधी यांच्यावरील घरच्या व बाहेरच्या टीकेचा प्रकार असाच झाला आहे. गांधींचें आजचें धोरण मि. नरीमन यांनाहि पसंत नाही. त्या धोरणांतले जे दोष काढून टाकले पाहिजेत असें आम्ही म्हणतों, तसलेच दोष तेहि दाखवितात. पण आम्ही ते दोष दाखवतो म्हणून आमच्यावर मात्र रागावतात व जळफळतात !

### आमच्या पक्षाचें धोरण

माझ्या दृष्टीने आमच्या पक्षाचें धोरण व कार्यक्रम मध्यम मार्गी म्हणून निरपवाद आहे. आम्हाला कोणी मवाळ म्हणतात ते म्हणोत; ती आम्ही शिवी मानीत नाही. परंतु नेमस्त-मवाळ पक्ष हा कॉंग्रेसच्या अंतर्गत राहूं इच्छित नाही; व डायरेक्ट ॲक्शन म्हणजे सत्याग्रही विरोधाचे धोरण किंवा कायदेभंग हा नैमित्तिक म्हणूनहि त्याला मान्य नाही, आम्हाला या दोनहि गोष्टी तत्त्वतः मान्य आहेत. या गोष्टी उघड दिसत असतां आंधळेपणाचें सोंग आणून आम्हाला कोणी मुद्दाम मवाळ पक्ष असें नांव देईल तर खुशाल देवो ! पण आमचें खरें धोरण डोळ्यां समोर जेवणाचें जागीं मिरची टांगून तिजकडे नुसतें पाहून वर्षानुवर्ष आळणी जेवणाऱ्या मारवाड्या प्रमाणे नाही किंवा उठल्या-बसल्या तोंडच्या तिखटाचा दिमाखाने बकाणा मारून हाय हाय करीत बसणाऱ्या आधाशाचेंहि नाही. आम्ही पदार्थांत तिखट घालणार नाही अशी प्रतिज्ञा केली नाही किंवा तिखट न घालतां एकहि पदार्थ कधी करणार नाही अशीहि प्रतिज्ञा केलेली नाही. जरूरी व अनुकूलता यांच्या दृष्टीने आमचा पक्ष डायरेक्ट ॲक्शनचा उपयोग करीत आला आहे व करीत राहिलहि. बाकी हातानें कांही न करतां फक्त लोकांची उठावणी करून डायरेक्ट ॲक्शनचे गोडवे गाणारा मात्र आमचा पक्ष नाही. आम्ही राष्ट्रीय सभेंतच आहों व तिच्या-प्रमाणें पूर्ण स्वराज्य हें आमचेंहि ध्येय आहे. तेव्हा वरील एका गोष्टीखेरीज म्हणजे अविचारानें आपलेच पाय खोड्यांत अडकवून घेणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमापेक्षा किंवा धोरणापेक्षा आमच्या पक्षांत काय कमीपणा आहे हें कोणीहि सांगावें.

शिवाय मवाळ व जहाल हे शब्द सापेक्ष आहेत. म्हणून कॉंग्रेसवाल्यांनीहि उगाच आम्हीच खरे जहाल असें म्हणून फुशारकी मारूं नये. जवाहरलाल आम्हांला मवाळ म्हणतील तर त्यांना मवाळ म्हणणारेहि आम्ही दाखवून देऊं. ते या पंडितंमन्यांना हंसून म्हणतातच कीं, निःशस्त्रपणें क्रांती घडवून आणूं म्हणणाराचें तोंड पाहा. असल्या तात्त्विक जहालाला शब्दशूर म्हणून आपल्या मताप्रमाणे आचरण करून दाखविणारा कृतिशूर मनुष्य पुढे येऊन म्हणेल कीं, 'क्रांतीचें

तुमचें तात्त्विक पांडित्य नको; मी जसें डाव्या हातावर शिरकमल घेतलें आणि उजव्या हातांत मला झेपेल तें हत्यार घेतलें तसें तुम्ही करा आणि प्राण द्यावयाला तयार व्हा, तरच तुम्ही खरे जहाल! अनत्याचारी धोरण ठेवून क्रांतिकारक व स्वतः श्रीमंत राहून गरीबांचे कैवारी होऊं पाहणारे शब्दशूर आम्हांला नकोत, असेंहि बोलणारे लोक आहेतच. तात्पर्य, या सापेक्ष निंदागर्भ शब्दांचा उपयोग करण्याच्या मोहाला कोणी बळी पडूं नये. ज्याच्या ज्याच्याकडून राष्ट्रकार्यांत जें जें मिळेल तें तें घेऊन त्याचा उपयोग करावा हेंच खरें उचित धोरण होय आणि लोकशाही स्वराज्य पक्षाने आपलें हेंच धोरण ठरविलें आहे.

# स्फुट सूचना

१ लाहोर सेंट्रल जेलमधून एका कैद्याला चुकीने आगाऊ फाशी दिल्याचें जें प्रकरण उद्भवलें होतें त्याची चौकशी होऊन रिपोर्ट बाहेर पडला आहे. त्यांत आम्ही पूर्वी भाकीत केल्याप्रमाणें तुरुंगावरील बड्या अधिकाऱ्यावर कसलाहि दोषाचा ठपका न येतां तो लखोटा रवाना करणाऱ्या कामगारावर सगळा दोष लादला गेला आहे. कारण काय, तर ज्या लिफाफ्यांत फांशीच्या तहकुबीचा हुकूम होता, त्या लिफाफ्यावर 'अर्जेंट' ( जरूरीचा ) मजकूर आंत असल्याविषयींचा शिक्का मारला गेला नव्हता! जणूं काय ' अर्जेंट ' असा शिक्का न मारलेला लखोटा न फोडता तसाच ठेवण्यांत कांही हलगर्जीपणा नाहीच! असल्या क्षुल्लक चुकीमुळे एखादे वेळीं असला घोर प्रसंग ओढवतो, हेंहि एक फांशीची शिक्षा अजीबात रद्द करण्याला कारण सांगतां येईल. पण सरकारला ती शिक्षा बंद करावयाची नसल्यास निदान असली प्राणघातक गफलत फिरून न घडेल एवढी तरी दक्षता सरकारने बाळगली पाहिजे. या संबंधांत चौकशी कमिटीने कोणत्या सूचना केल्या आहेत त्याचा सरकारी पत्रकांत खुलासा नाही. तरीपण आम्हांस या संबंधात पुढील सूचना अवश्य अंमलांत याव्या असें वाटतें. लिफाफ्यावर नुसतें 'अर्जेंट' एवढें लिहिणें पुरेसें नाही; कारण कितीतरी किरकोळ कामाच्या लखोट्यांवरहि 'अर्जेंट' असा शिक्का मारला जाण्याचा संभव असतो.

२ यासंबंधांत आमची पहिली सूचना अशी कीं, फांशीच्या शिक्षेसंबंधाचा सर्व पत्रव्यवहार नेहमीच वेगळ्या प्रकारच्या लिफाफ्यांतूनच पाठविला जावा. त्या लिफाफ्याचा रंग तांबडा असून त्यावर काळ्या रंगाची क्रॉसची खूण असावी. असले लिफाफे फक्त फांशीच्या पत्रव्यवहारापुरतेच वापरावे, इतर कसल्याहि पत्रव्यवहाराला तसला लिफाफा वापरूं नये; म्हणजे तो लिफाफा पाहतांच तें फांशीचें प्रकरण आहे असें चटकन लक्षांत येईल. दुसरी सूचना अशी कीं, फांशीची शिक्षा झालेला आरोपी अपील आणि दयेचा अर्ज करो वा न करो, प्रिव्ही कौन्सिलपर्यंतच्या अपीलाची आणि बादशहापर्यंतच्या दयेच्या अर्जाची ठराविक मुदत संपूर्णतः संपून जाईपर्यंत फांशीची तारीख नेमूं नये; सर्व मुदती संपल्या अथवा अखेरच्या अपीलाचा व दयेच्या अर्जाचा निकाल लागला म्हणजे त्यानंतर व फांशीची तारीख नेमावी. आणि शेवटची सूचना अशी कीं, केव्हांहि फांशी देण्यापूर्वी टेलिफोनने होममेंबरला कळवून त्यांच्याकडून अखेरचा हुकूम आल्याशिवाय शिक्षेची बजावणी करूं नये. एवढी दक्षता बाळगल्यास असला शोचनीय व अक्षम्य प्रकार पुनरपि घडण्याची शक्यता नाहीशी होईल. सरकारला कैद्याच्या प्राणाची पर्वा वाटत असल्यास या किंवा अशाच प्रकारच्या सूचना सरकार अमलांत आणील.

# डॉ. मुंजे यांचें जाहीर व्याख्यान

बुधवार ता. २० रोजीं सायंकाळीं ६ वाजतां लो. टिळक स्मारक मंदिरांत महाराष्ट्र हिंदु-सभेतर्फे **डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे** यांचें **श्री. न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर व्याख्यान झालें. प्रारंभीं श्री. केळकर आपल्या प्रास्ताविक भाषणांत म्हणाले "डॉ. मुंजे यांचा आजचा व्याख्यानाचा विषय निश्चित असा कांहींच जाहीर झालेला नाही. तथापि ते हिंदु महासभेचे प्रमुख कार्यकर्ते आहेत. तेव्हां जमलेल्या मंडळींना ते हिंदु सभेसंबंधानेच महत्त्वाची माहिती सांगतील. त्यांत माझी सूचना एवढीच आहे कीं, त्यांनी आपल्या व्याख्यानातच सबंध वेळ खर्च न करतां विषयप्रवेशापुरती प्रथम थोडी माहिती सांगावी आणि नंतर हिंदु महासभेच्या कार्यासंबंधानें ज्या कोणास कांही शंका असतील त्या त्यांनीं विचाराव्या व डॉक्टरसाहेबांनीं त्यांचा खुलासा करावा म्हणजे त्यांचें व्याख्यान अधिक उपयुक्त, मनोरंजक व परिणामकारक होईल."

## हिंदु महासभेचे आक्षेपक

व्याख्याते डॉ. मुंजे यानी अध्यक्षांची ही सूचना मान्य करून पुढील आशयाचें भाषण केलें. ते म्हणाले, "हिंदुमहासभेचे मुख्य आक्षेपक इंग्रज लोक व मुसलमान लोक हे आहेत; परंतु त्यांच्या आक्षेपांचे हिंदुमहासभेनें अनेक वेळां खंडन केलें आहे व या आक्षेपकांबद्दल आम्हांला राग येत नाही व भीतीहि वाटत नाही. इंग्रजांना ज्या प्रकारची राज्यपद्धति यावीशी वाटते ती पद्धति हिंदूंनी गुण्यागोविंदाने स्वीकारावी असा त्यांचा मानस व हिंदु तसें स्वीकारूं शकत नाहीत म्हणून त्याचा हिंदु महासभेवर राग. मुसलमानांचा राग मात्र निराळ्या कारणानें आहे. त्यानी आपल्या ज्या जातीय १४ मागण्या पुढें मांडलेल्या आहेत त्या मागण्या अराष्ट्रीय आहेत हें कॉंग्रेसदेखील नाकबूल करूं शकत नाहीं. तेव्हा या अराष्ट्रीय मागण्यांना हिंदुमहासभा विरोध करते म्हणून मुसलमानांचा हिंदु सभेवर राग. हिंदूंना कायद्यानें राजकीय पद्धतीनें दाबून त्यांवर आपला वरचष्मा कायम ठेवावा या हेतूनें इंग्रज सरकारनें मुसलमानांना त्यांच्या १४ मागण्यांपेक्षाहि अधिक सवलती देऊन मुसलमानांशीं राजकीय सख्य संपादन केलें आहे! अशा रीतीनें हिंदूंवर दुहेरी दाब पडत आहे. परंतु या दुहेरी दाबाला हिंदुमहासभेनें आजपर्यंत कधींच भीक घातली नाहीं व अजूनहि तिला त्याची भीति वाटत नाहीं. मात्र लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकून आपलें कार्य साधून घेण्याच्या कलेंत निष्णात असलेले इंग्रज व आपल्या जातीय मागण्या कबूल करून घेण्याकरितां हिंदूंच्या राजकीय लढ्यांत अडथळे उत्पन्न करणारे मुसलमान या दोघांकडून हिंदु समाजाचा बुद्धिभेद करण्याचा प्रयत्न चालू आहे, त्या बुद्धिभेदास हिंदु समाज बळी पडेल कीं काय याबद्दलच काय तें हिंदुमहासभेला दुःख व भय वाटत आहे.

## घरच्या विरोधकांचा वर्ग

मुसलमान समाज जातिनिष्ठ असल्यामुळे त्यांची दृष्टि आपल्या जातीचें अधिकांत अधिक हित कसें साधेल या एकाच गोष्टीकडे असते. या जातिनिष्ठेपुढे त्यांना देशाची किंवा राष्ट्रीयत्वाची मुळीच पर्वा वाटत नाहीं. आणि हिंदुमहासभा ही असल्या संकुचित जातिनिष्ठेच्या अगदी विरुद्ध असल्यामुळे त्यांचा आमच्याशीं विरोध आहे; तोहि त्याच्या दृष्टीनें योग्यच आहे. परंतु आमच्या हिंदु समाजांतील कित्येक स्वतःस शहाणे म्हणविणार लोक, मुसलमान शीं विरोध करण्याची त्यांच्यामध्ये धमक नसतांना, आमच्याशीं तेवढा निष्कारण विरोध करून गैरसमज उत्पन्न करतात याबद्दल मला फार वाईट वाटतें. हिंदुमहासभा जातिनिष्ठ नाहीं. आजपर्यंतच्या आमच्या धोरणांत किंवा ठरावांत किंवा जाहीरपत्रकांत जातिनिष्ठादर्शक असें एकहि वाक्य सापडणार नाहीं. केवळ राष्ट्रीय दृष्टि ठेवूनच हिंदुमहासभा आपलें कार्य करीत आहे. असें असतां हिंदुमहासभेला जातिनिष्ठ म्हणावयाचें आणि जे लोक मुसलमानांना काय मागतील तें द्या असें म्हणून मुसलमानांच्या जातिनिष्ठेला उत्तेजन देतात त्याना मात्र राष्ट्रीय वृत्तीचे म्हणावयाचें हा उलटा न्याय नव्हे काय?

## हिंदूंवरील अन्याय

श्वेतपत्रिकेबद्दल डॉ. मुंजे कांही बोलत नाहीत. तेव्हा त्यांची त्यासंबंधानें काय मतें आहेत तेंहि विचारून घ्यावें असेंहि एकानें सुचविलें आहे. त्यावर माझें असें म्हणणें आहे कीं, हिंदु-महासभेला श्वेतपत्रिकेसंबंधानें ज्या सुधारणा अवश्य वाटत होत्या त्या आम्ही संयुक्त पार्लमेंटरी कमिटीपुढे पत्ररूपानें स्पष्ट मांडल्याच आहेत. श्वेतपत्रिका आहे या स्वरूपांत हिंदुस्थानांतील कोणत्याहि पक्षाला मान्य होणें शक्य नाहीं. लष्करी खातें, परराष्ट्रीय संबंध व आर्थिक संबंध इत्यादि प्रश्नासंबंधानें हिंदुमहा-

सभेने ज्या सुधारणा सुचविल्या आहेत त्या मान्य केल्यावर जी घटना तयार होईल तिचा विचार करण्यांत येईल. जातीय निर्णयाच्या बाबतींत मोठाच अन्याय झालेला आहे. लोकसंख्येच्या मानाने हिंदु लोकांची संख्या शेंकडा ७५ टक्के असता त्याना असेंब्लींत शेंकडा ४२ टक्केच जागा दिलेल्या आहेत, म्हणजे असेंब्लींतील एकंदर जागांपैकीं १०५ जागा हिंदूंना दिल्या असून मुसलमानांना ८२ जागा आणि युरोपियन व अँग्लो इंडियन यांना २६ जागा देण्यांत आल्या. म्हणजे हिंदु बहुसंख्य असतांना देखील असेंब्लींत त्यांना अल्पसंख्य बनविण्यांत आलें आहे! मुसलमानांच्या ज्या १४ मागण्या होत्या त्यांत असा निर्देश आहे कीं, अल्पसंख्याक समाजाला वेटेज देतांना बहुसंख्याकांना बरोबरीचे किंवा अल्पसंख्याक बनविण्यांत येऊं नये. यावरून दिसून येईल कीं, इंग्रज सरकारानें बहुसंख्याक हिंदूंना अल्पसंख्याक करून मुसलमानांना त्यांच्या मागणीपेक्षा अधिक दिलें आहे!

## हिंदुमुसलमानांचा स्वभावविरोध

कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, मुसलमानांना नाखूष करून आम्ही स्वराज्याच्या आड कां यावें? यावर माझें म्हणणें असें आहे कीं, मुसलमानांचा संतोष केल्याने तरी स्वराज्य खास मिळेल अशी खात्री आहे का? पहिल्या गोलमेज परिषदेच्या वेळीं मि. जीना यांचाहि असा आक्षेप होता. त्यावेळीं मी त्यांना अशी तोड सुचविली होती कीं, आपण उभयतां एके ठिकाणीं बसून तुमच्या मागण्या व आमच्या मागण्या एक मताने ठरवूं. व त्या लिहून काढून मोहोरबंद पाकिटांत घालून तें पाकीट बँक ऑफ इंग्लंडच्या स्वाधीन करून ठेवूं; नंतर स्वराज्याची घटना सर्वानुमतें तयार करून ती सरकारपुढे ठेवूं. आणि त्यांना सांगू कीं, आमचे जातिविशिष्ट मतभेद मिटले आहेत. ही आमची राज्यघटना मंजूर करा. त्यांनी ती मंजूर केली तर आपला जातिविशिष्ट करार अमलांत आणूं. सरकारने आमची घटना मान्य न केली तर मात्र ती घटना मिळविण्याकरितां सरकारशीं भांडण्यास तुम्ही आमच्या बरोबर तयार झालें पाहिजे. परंतु ही तडजोड जिनांना पटली नाहीं. तात्पर्य असें कीं, हिंदुमुसलमानांची बेकी हीच काय ती स्वराज्याच्या प्राप्तीला मुख्य अडचण आहे अशी जी कित्येकांची समजूत आहे ती चुकीची आहे.

आमचा हिंदु समाज वेदांती असल्यामुळे कोणत्याहि गोष्टींत विचारांचे फाटे फोडण्याची त्याला सवयच लागलेली आहे. एका मोठ्या गृहस्थाने हिंदु व मुसलमान यांचे स्वभावविशेष एकदा मला मार्मिक शब्दांत सांगितले. तो म्हणाला, "Hindus think, think, think and cannot act, while Mahomedans do not know how to think but act quickly." तेव्हा या स्वभावविरोधामुळे स्वराज्य मिळविण्याच्या काळजीच्या अतिरेकांत कोणतीहि अशी गोष्ट त्यांच्या हातून घडूं नये कीं, ज्यामुळे खरें स्वराज्य मिळण्याचा संभवहि खुंटून जाईल व जातिएकताहि होणें अशक्य होईल. एवढी सावधगिरी हिंदु समाजाने अवश्य घेतली पाहिजे." वरील आशयाचें डॉ. मुंजे यांचें भाषण झाल्यावर बरींच प्रश्नोत्तरें झालीं. त्यांपैकीं कांहीं महत्त्वाचीं प्रश्नोत्तरें पुढें दिलीं आहेत.

## प्रश्नोत्तरें

प्रश्न:—आजच्याच 'टाइम्स ऑफ इंडिया' मध्ये तुमच्यासंबंधाने म्हटलें आहे कीं, श्वेतपत्रिका हाणून पाडण्यासाठी तुम्ही इंग्लंडांत असतां चर्चिल वगैरे कट्टर साम्राज्यवाद्यांशीं संगनमत केलें. ही गोष्ट खरी आहे काय?

उत्तर—इंग्लंडच्या तीनचार खेपांत चर्चिलशीं समक्ष भेटीचा प्रसंग मला केव्हांहि आला नाहीं व कदाचित् प्रत्यक्ष चर्चिल समोर उभा राहिला तर हेच चर्चिल असें मी ओळखूंहि शकणार नाहीं. मी श्वेतपत्रिकेचा विरोध करतों एवढ्याचकरिता जर मी चर्चिलशीं संगनमत केलें असें म्हणावयाचें तर हिंदुस्थानांतील जे जे राजकीय पक्ष श्वेतपत्रिका हाणून पाडण्याकरितां प्रयत्न करीत आहेत त्या सर्वांनीच अशा प्रकारचा चर्चिलशीं कट केला आहे असें म्हणावें लागेल!

प्रश्न—मुख्य प्रधानांनी जो जातिविषयक निर्णय दिला आहे तो बदलून घेण्यासाठी हिंदु समाजाने एकमुखाने मागणी केली तर तो बदलणें शक्य आहे काय?

उत्तर—सबंध हिंदुस्थानच्या हिंदूंनी एकमुखानें मागणी केल्यास तो बदलणें शक्य आहे असें आपल्याला बंगालच्या फाळणीच्या उदाहरणावरूनहि अनुमान करतां येईल. तेव्हां हा अन्याय झाला असून खऱ्या राष्ट्रीयतेला तो विघातक आहे. असें हिंदु समाजास खरोखर वाटत असेल तर तो हाणून पाडण्याचा त्याने निश्चय केला पाहिजे. असा एकमुखी प्रयत्न झाल्यास सरकारास आपला जातिनिर्णय बदलावा लागेल.

प्रश्न—राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान व हिंदु समाज एक झाल्यावर जातिनिर्णय

बदलणें शक्य आहे तर शौकतअलीसारख्या जातिनिष्ठांच्या म्हणण्याला महत्त्व कां द्यावें?

डॉ. मुंजे—राष्ट्रीय मुसलमानाचें आपण एखादें नांव सांगू शकाल काय?

उत्तर—डॉ. अन्सारी.

डॉ. मुंजे—त्यांचें फरीदपूरचें भाषण वाचा. आणि मग राष्ट्रीय मुसलमानाचा नमुना म्हणून डॉ. अन्सारी यांचें नांव पुढे करा. परंतु त्याअगोदर राष्ट्रीयता व जातीयता यांची व्याख्या बरोबर केली पाहिजे. राष्ट्राच्या राज्यव्यवहारामध्ये मी अमुक जातीचा आहें म्हणून मला व माझ्या जातीला राज्यकारभारांत अमुक हक्क विशेष पाहिजेत असें जो म्हणतो त्याला जातिनिष्ठ समजावें व अशा प्रकारची जी मनःप्रवृत्ति तिला सजातीयता म्हणावें. राजकारणांत जात, धर्म किंवा पंथ यांचा संबंध न आणतां केवळ देशहिताच्या दृष्टीने जो विचार करतो त्याला राष्ट्रीय वृत्तीचा मनुष्य समजावें. या व्याख्येच्या आधारें मला जी माहिती आहे तिजवरून राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान गृहस्थ जे दिसत होते ते एकच आणि ते गृहस्थ सर अली इमाम हे होत. हे सर अली इमाम दुसऱ्या गोलमेज परिषदेस आले होते. त्यावेळीं तेथे जातिनिष्ठ मुसलमानांच्या मागण्यांचा ऊहापोह चालला होता. सर अली इमाम हे राष्ट्रीय वृत्तीच्या मुसलमान पक्षाचें कार्य म्हणणें आहे हें मांडण्याकरितां तेथे आपण होऊन उभे राहिले. पण आमच्यांतल्याच कांहीं शहाण्या लोकांनी तो प्रसंग हातचा दवडला!

प्रश्नः—इंग्लंडांत स्वतंत्र वृत्तीचे विद्वान मुत्सद्दी कोणी तुम्हास भेटले काय? व त्यांची जातिनिर्णयाकडे पाहण्याची दृष्टि कशी काय होती?

उत्तरः—इंग्लंडांतील लोक अत्यंत शिस्तीने वागणारे आहेत. आपापसांत कितीहि मतभेद व पक्षभेद असले तरी तिऱ्हाइतापुढे त्यांचें प्रदर्शन ते केव्हांहि करीत नाहीत. सर्वांच धोरण बहुतेक सारखेंच आहे. मला एक विद्वान प्रोफेसर भेटले होते. ते पूर्वी राष्ट्रसंघांतहि होते. त्यांना जातीय प्रश्नांच्या निकालासंबंधाने हिंदुमहासभेने केलेली योजना मी दाखविली. ती निर्दोष असल्याचें त्यांनी मान्यहि केलें; परंतु तसें उघडपणे प्रतिपादन करण्यास मात्र ते तयार झाले नाहीत! कर्नल वेजवुड हे श्वेतपत्रिकेच्या विरोधकांपैकीं एक आहेत व विरोधाच्या अनेक कारणांत इंग्रज सरकारच्या जातीय प्रश्नासंबंधीचा निकाल हा हिंदूंना अन्यायाचा आहे असेंहि एक कारण त्यांच्या अनेक कारणांपैकीं आहे; परंतु त्यांचें मुख्य धोरण श्वेतपत्रिकेंतील राजकीय घटनेला विरोध हें आहे. जातिनिर्णयासंबंधीं जो त्यांचा विरोध आहे तो आनुषंगिक विरोध होय.

प्रश्नः—मुख्य प्रधानाकडे जातीय निर्णयाचें काम सोपविलें त्या वेळीं कोणाला किती जागा देण्यांत येतील याविषयी तुमचा अंदाज काय होता व तो कितपत बरोबर ठरला?

उत्तरः—मुसलमानांना त्यांच्या मागणीप्रमाणे स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत येईल व जेथे त्यांची अल्पसंख्या असेल तेथे त्यांना वेटेजहि देण्यांत येईल असें त्यांना व आम्हालाहि वाटत होतें; परंतु तें वेटेज इतक्या प्रमाणाबाहेर जाईल असा मात्र मुसलमानांचाहि अंदाज नव्हता. सिंध प्रांत आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होण्यासारखा नसेल तर तो स्वतंत्र करूं नये असें सायमन कमिशनने स्पष्ट मत दिलें असतांहि नुकसान सोसून तो प्रांत वेगळा करण्याचें ठरविण्यांत आलें ही गोष्टदेखील मुसलमानांच्या अंदाजाबाहेरचीच होय! मुख्य प्रधानांनी दिलेल्या निर्णयाला 'अवॉर्ड' असें नांव देण्यांत आलें आहे, परंतु तो खरोखर अवॉर्ड नसून सरकारचाच निर्णय आहे. उभय पक्षांनी पंच नेमून त्यांच्यापुढे आपल्या तक्रारी मांडून त्याचा निर्णय मान्य करण्याचें कबूल केल्यावर तो पंच जो निर्णय देतील त्याला 'अवॉर्ड' असें म्हणतात. पण तसें या बाबतींत झालेलें नाहीं म्हणून याला अवॉर्ड म्हणणें बरोबर नाहीं.

प्रश्नः—अस्पृश्यांच्या बाबतींत डॉ. आंबेडकर यांची काय भूमिका होती?

उत्तर—पहिल्या गोलमेज परिषदेच्या वेळीं डॉ. आंबेडकर यांच्याशीं माझें या बाबतींत बोलणें झालें होतें. त्या वेळीं ते सर्वस्वी संयुक्त मतदारसंघाच्यातर्फेचे होते. केवळ जागा राखून द्याव्या इतकीच त्यांची मागणी होती. त्यांनी अस्पृश्यांकरिता शें. २६ टक्के जागा राखून ठेवण्याविषयी मागणी केली. मी ती मुकाट्याने कबूल केली. नंतर तेच म्हणाले कीं, शें. २६ टक्के जागा जास्त होतात, २३ टक्के आपल्याला पुरेत. तेंहि मी मान्य केलें. तेव्हा त्यांची तक्रार मिटून त्यांच्या प्रश्नाचा निकाल लागला व त्यांच्याच अनुमतीने अमेरिकन वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीस कळविण्यांत आलें कीं, अस्पृश्यतेच्या प्रश्नाचा निकाल लागला व हिंदु-हिंदूत कोणत्याहि प्रकारचा मतभेद राहिला नाहीं. पण दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं त्यांनी स्वतंत्र मतदार-संघाचा आग्रह धरला व ते मुसलमानांच्या गोटांत शिरले!

प्रश्नः—अस्पृश्यतानिवारण व वर्णाश्रम-स्वराज्य-संघाची चळवळ यांसंबंधाने हिंदु-महासभेचें काय धोरण आहे?

उत्तर :—राजकीय बाबतींत हिंदु महासभा कोणतेंहि भेद मानीत नाही. सामाजिक बाबतीमध्येदेखील अस्पृश्यता आपल्या समाजांतून समूळ नष्ट व्हावी असेंच हिंदुमहासभेने आपलें धोरण पहिल्यापासूनच जाहीर केलें आहे. अस्पृश्यता कायद्याच्या जोरावर नष्ट व्हावी किंवा होणें शक्य आहे असें मात्र आम्हांस वाटत नाही. कायद्याच्या सक्तीने ती उलट अधिकच दृढ होईल अशी आम्हांस भीति वाटते. समाजाचें मतपरिवर्तन हाच अस्पृश्यतानिवारणाचा खरा व परिणामकारक उपाय होय. मी स्वतः अनेक वेळा जाहीर विनंति केली आहे कीं, अस्पृश्य देवळांत गेल्याने आमचें देऊळ बिटाळत नाही व आमचे देवहि बाटत नाहीत, असें सनातनी लोकांनी मनमोकळेपणाने जाहीर करावें व या अंतर्जातीय कटकटींतून मुक्त व्हावें. परतु ही गोष्ट केवळ प्रचारानेच साध्य होणार; सक्तीने साध्य होणार नाही.

प्रश्नः—जातिनिर्णयाची दुरुस्ती व श्वेतपत्रिकेंतील राज्यघटनेची दुरुस्ती या दोहोंपैकीं कोणती तरी एक गोष्ट सरकारानें देऊं केली तर तुम्ही त्यांत अधिक महत्त्वाची कोणती मानतां?

उत्तर—आम्ही सुचविलेल्या सुधारणांप्रमाणे राज्यघटना दुरुस्त होऊन मिळाली–तशी मिळणें दुरापास्तच आहे—तर ती स्वीकारून जातिनिर्णयांतील अन्याय मान्य करावा कीं नाही हा प्रश्न आम्ही तुमच्या सर्वांच्या समोर ठेवूनच त्याचा निकाल लावूं.

प्रश्नः—जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे हिंदु लोकांतर्फे जी साक्ष देण्यांत आली ती एकमतानें देण्यांत आली काय ! व तिची फलनिष्पत्ति काय झाली ?

उत्तर—आम्ही हिंदुमहासभेच्या मार्फत जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे राजकीय घटनेसंबंधीं जें स्टेटमेंट ठेवलें त्यास सनातनवाल्यांचाहि विरोध नव्हता. त्यांचें म्हणणें केवळ एकच कीं, सर्वधर्मांच्या प्रतिनिधींनी मिळून बनविलेल्या कायदेमंडळामध्ये धार्मिक प्रश्नावर कायदे होऊं नयेत. इतर बाबतींत महाराष्ट्र, वऱ्हाड, बंगाल, पंजाब इत्यादि अनेक प्रांतांचे लोक व अस्पृश्यांचे प्रतिनिधीहि आमच्या शिष्टमंडळामध्ये असतां त्या सर्वांचें म्हणणें एकमुखी होतें व ते सर्व फार शिस्तीने वागले. त्याची फलनिष्पत्ति काय होईल हें आज सांगतां येणें शक्य नाही.

प्रश्नः—कांही प्रांतांतील, उदाहरणार्थ पंजाब, बंगाल, सिंध येथील हिंदु व शीख यांनी जातीय मागण्या केल्या असा एक आक्षेप आहे तो खरा आहे काय?

उत्तर—येथे शिखांच्या गैरहजेरींत त्यांच्या संबंधाने न्यायानेच बोललें पाहिजे. त्यांनी किंवा पंजाब-बंगालमधील अल्पसंख्य हिंदूंनी केव्हाहि जातीय मागणी केली नाही आणि आताहि त्यांची तशी मागणी नाही; परंतु एका समाजाच्याच म्हणजे मुसलमानांच्याच आग्रहाने जातीयतेस राज्यघटनेंत स्थान मिळावयाचें असेल तर मात्र त्यांस आपल्या जातीय हिताकडे लक्ष देणें योग्य वाटतें. याला कोणीहि अन्याय म्हणूं शकणार नाही. तेव्हा शिखांसंबंधीं किंवा अल्पसंख्याक हिंदूंसंबंधी जे आरोप आहेत ते साफ खोटे आहेत. हा जातीयतेचा प्रश्न सामान्य धोरणाने सोडवावा व तेच धोरण सर्वांना सारखें लावण्यांत यावें; ही सामान्य मागणी पंजाब, बंगाल व सिंध वगैरे प्रांतांतील शीख व हिंदु यांना पूर्णपणें मान्य आहे तथापि शिखांचे म्हणणें असें आहे कीं, जर मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ मिळत असेल तर तो आम्हालाहि मिळावा व प्रांताप्रांतांतील अल्पसंख्याक मुसलमानाना जसें वेटेज मिळेल तसेंच तें आम्हांलाहि मिळालें पाहिजे.

वरील आशयाचीं प्रश्नोत्तरें झाल्यावर डॉ. मुंजे यांनी श्रोत्यांना उद्देशून असा सवाल केला कीं, आतापर्यंत जीं प्रश्नोत्तरें झालीं त्यांवरून हिंदु महासभेच्या राष्ट्रीय धोरणाबद्दल आपली समजूत पटली काय? व पटली असेल तर राज्यघटनेंतून जातीयतेचें विष समूळ काढून टाकण्याकारिता जें भांडण हिंदुमहासभेनें चालविलें आहे त्यास तुमचा पूर्ण पाठिंबा राहील काय?

यावर अध्यक्षांनी समारोपाच्या भाषणांत श्रोत्यांना आपल्या आणखी कांही शंका असल्यास त्यांचा खुलासा डॉक्टरसाहेबांकडून करून घ्यावा व हिंदुमहासभेसंबधाने आपले गैरसमज दूर करून घ्यावे अशी सूचना केली. शेवटीं महासभेच्या कार्याला इकडील हिंदु समाजाचा केव्हाहि पाठिंबा आहे असें व्याख्यात्यांना सभेतर्फे आश्वासन देऊन त्यांनी आपलें भाषण संपविलें.

शेवटीं महाराष्ट्र हिंदु-सभेचे चिटणीस श्री. रा. गो. भिडे यांनी व्याख्यात्यांचे, अध्यक्षांचे व श्रोतृवृंदाचे आभार मानल्यावर सभा संपली.



श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर

अध्यक्ष : महाराष्ट्र—साहित्यसंमेलन, नागपूर

श्री. आबा चांदोरकर यांनी संपादिलेल्या श्री-आनंदभुवन ग्रंथमालेंच 'श्रीशिवशाहीचा लेखनालंकार' हें दुसरें पुष्प मराठेशाहींतील निरनिराळ्या दर्जाच्या राजपुरुषादिकांच्या हस्तलेखांचें प्रात्यक्षिकच आहे. त्यांत श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांच्या हातची समाप्ति असलेलें असें पत्र प्रथमच छापलेलें आहे. त्याचें छायाचित्र व लिप्यंतर खाली दिलें आहे. पत्रांतील 'बहुत लिहिणें तरी तुम्ही सूज्ञ असा' ही समाप्ति छत्रपतींच्या घराण्यांतच आढळते, एवढेच नव्हे तर छत्रपति शाहू महाराजांच्या हातच्या पत्रांवरून ती समाप्ति छत्रपति स्वहस्तेंच करीत असत असें निश्चितपणें म्हणतां येते, असें श्री. आबा चांदोरकर यांचें म्हणणें आहे. अद्यापपर्यंत उपलब्ध असलेल्या पत्रांत 'बहुत लिहिणें तरी तुम्ही सूज्ञ असा' अशा भोसले राजघराण्यांत प्रचलित असलेल्या या महत्त्वाच्या समाप्तीचें शिवाजीमहाराजांचें एकहि पत्र उपलब्ध झालेलें नव्हतें. तेव्हां शिवाजीच्या हस्ताक्षराचा नवीन पुरावा म्हणून प्रस्तुत पत्रांतील अक्षरें हीं अभ्यासकांना बहुमोल वाटतील यांत शंका नाही.

[ सं. केसरी. ]

## पत्राचें लिप्यंतर

मसुरल अनाम राजेश्री बापाजी नरसीगराव व विठोजी सितोले देसमुख पा पुणें प्रति राजेश्री शीवाजि राजे उपरी तुम्ही नारो कृष्ण धडफले हुजूर पाठविले त्याणी येउनु माळूम केले कीं कदीम हक देसमुख होनु १९०६ येकुणी से सा व गावखंडी व इनामती व बाजे हक व देसकुलकर्णी होनु ५९४ पांच से चौऱ्याणव आहेत. त्यावरी इनामती खंडणी माहाराज साहेबाचे कारकीर्दीस गावखंडी व बाजे हक व इनामती माफ करुनु यैन हका वरी देसमुखाकडे होन ३०५ तीस से पांच व देसकुलकर्णी होनु ९५ पंच्याणव येणे प्रमाणे च्यारि से होनु घ्यावयाचा तह आहे त्याप्रमाणे माहालचे कारकून आजार लावितातो हाली मोगलाचे धामधुमेने मुलुक वैरान जाला आहे. याकरितां दस्त माफीक इनामती खंडणी घ्यावयाचा हुकूम केला पाहिजे म्हणौनु माळुम केले त्या वरून माहालच्या कारकूनास हुकूम अलाहिदा सादर असे ते दस्त माफीक तुम्हा पासून इनामती खंडणीचा वसूल घेतील बहुत लिहिणें तरी तुम्ही सूज्ञ असा मर्यादेयं विराजते [ स. मु. ]

# शिवाजीमहाराजांचें हस्ताक्षर

( ले:—न. चिं. केळकर )

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक रा. आबा चांदोरकर व रा. आ. बा. जोशी बारामतीकर यांच्या संयुक्त प्रयत्नानें, मराठ्यांच्या इतिहासाच्या एका विशिष्ट अंगासंबंधाचें एक अत्यंत उपयुक्त पुस्तक आजच प्रत्यक्ष प्रसिद्ध होत आहे. (आजच्या अंकातील पृष्ठ ५ वरील मजकूर पाहा.) हें अंग ऐतिहासिक पुरुषांच्या साक्षरतेचें होय. या साक्षरतेचे सुमारें अर्डीचशें नमुने, फोटोझिंको पद्धतीच्या हुबेहुब छायाचित्रांच्या रूपानें, प्रस्तुत पुस्तकांत संग्रहित केले आहेत. 'साक्षरता' याचा अर्थ सामान्यतः 'लिहितांवाचतां येणें' असा असतो. पण कांही लोकांना फक्त वाचतां येतें, लिहितां येत नाही, हा साक्षरतेंत एक भेद आहेच. परंतु हे नमुने त्या सामान्य प्रकारच्या साक्षरतेचे नसून प्रत्यक्ष हस्ताक्षरांचे आहेत; व त्यांतूनहि हें हस्ताक्षर सहीच्या रूपाचें म्हणजे तद्दर्शक मायन्यांच्या अक्षरांत लिहिलेलें आहे. त्यांतील कांही हस्ताक्षरें पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या प्रदर्शनांत लावून ठेविलीं अनेकानी पाहिलीं असतील. तथापि इतर बरींचशीं हस्ताक्षरें पुण्यांतील 'सरकारी पेशवाई दप्तरखान्यांतील' कागदांवरून या ग्रंथांत घेतलेलीं आहेत. आणि इतकें म्हटलें म्हणजे त्यांची दुर्मिळता व त्या कारणानें सिद्ध होणारें त्यांचें महत्त्व वेगळें स्पष्ट करून सांगण्याचें कारणच नाही.

या सरकारी दप्तरांत आधी प्रवेश मिळणें हें अति दुर्घट असल्याचें प्रसिद्धच आहे. तथापि रा. गोविंदराव सरदेसाई यांच्या सहानुभूतीनें अशी कष्टसाध्य परवानगी मिळवून, राजश्री चांदोरकर व जोशी यानी हा जो महत्प्रयासाचा उद्योग केला तो खरोखरीच अभिनंदनीय होय. हीं अडीचशें हस्ताक्षरें अशा ऐतिहासिक पुरुषांचीं आहेत कीं त्यांचीं नांवें मराठ्यांच्या इतिहासांत ठळक अशीं गणलीं जातात.

आणि त्यांतील कांही कांही अक्षरें जीं स्त्रियांचीं आहेत, तीं एका वेगळ्या दृष्टीनेंहि कौतुकास्पद ठरतात. ती दृष्टि म्हणजे मराठेशाहींतील स्त्रियांची साक्षरता! साक्षरतेचे हे अडीचशें नमुने छायाचित्रांच्या कायम स्वरूपांत, म्हणजे अगदीं हुबेहुब मुळांत पहावे तसे, वाचावयास मिळतात इतकेंच नव्हे, तर तीं अक्षरें ज्या कागदपत्रांवरून घेतलीं त्या कागदपत्रांची तपशीलवार माहिती, म्हणजे लेखकाचें नांव, जन्ममृत्यूच्या तिथि, त्यांचे संक्षिप्त ऐतिहासिक वर्णन, त्यांच्या मुद्रा इत्यादि देऊन, प्रामाण्याचे जितके ताणावे लावून त्यांचें व्यक्तित्व ऐतिहासिक रीत्या निश्चित व ठाम करतां येईल तितकें करण्याचा प्रयत्न संपादकद्वयाने केला आहे. म्हणून असलें हें हस्ताक्षरवर्णनाचें पुस्तक प्रसिद्ध झालें याबद्दल मराठी वाचक, विशेषत: मराठ्यांच्या इतिहासाचे भक्त व प्रेमी जन, या संपादकद्वयाचे ऋणी राहतील यांत शंका नाहीं.

हस्ताक्षराने मनुष्याचा स्वभाव व चारित्र्य समजतें अशी एक कल्पना किंवा उपपत्ति अलीक कांहीं पाश्चात्य देशांतील लोक मान्य करतात. ती खरी ठरून कोणी या सर्व हस्ताक्षरांवरून त्या त्या ऐतिहासिक व्यक्तींचे स्वभाव व चारित्र्य वर्णन करील, तर एक प्रकारचें अतींद्रिय असें ऐतिहासिक ज्ञान वाचकाला लाभेल! पण संपादकद्वयाला ती विद्या साध्य नसल्यामुळे, त्यांनी या हस्ताक्षरांचें फक्त वर्णन देऊनच आपली हौस भागविली आहे. या हस्ताक्षरावरून या मनुष्यांचें शील व चारित्र्य कळो किंवा न कळो, परंतु मनाने त्या त्या ऐतिहासिक व्यक्तींचा सन्निकर्ष होण्याचें एक विशेष साधन त्याने वाचकाला हस्तगत करून दिलें आहे, ही गोष्ट तरी खरी. यापैकीं ज्या व्यक्ति सर्वच्या सर्व पत्रं आपल्या हस्ताक्षरानेच लिहीत अशाहि कांही आहेत. उदाहरणार्थ, नाना फडणवीस, बाजीराव, नानासाहेब, महादजी शिंदे, छत्रपति शाहू इत्यादि. परंतु तसें न लिहितां, केवळ शेवटचीं अक्षरें म्हणजे लेखनालंकार, किंवा सहीच्या मायन्याचे शब्द, लिहिणारेहि कांही आहेत. अर्थात् अशांचीं अक्षरें म्हणजे हिऱ्याच्या खाणींत यदृच्छेने लाभणारे हिरे किंवा हिरकण्याच होत.

पण या सर्व हस्ताक्षरांत जें अत्यंत महत्त्वाचें ठरेल असें एक हस्ताक्षर आहे; व तें खुद्द शिवाजीमहाराजांच्या नांवें पाठविलेल्या एका पत्रावरील होय. यांतील शेवटचीं चौदा अक्षरें 'बहुत लिहिणें तरी तुम्हीं सुज्ञ असा' अशीं आहेत. आणि शिवाजीमहाराजांच्या म्हणून समजल्या गेलेल्या हस्ताक्षरांच्या नमुन्यांची दुर्मिळता लक्षांत घेतली असतां, हीं चौदा अक्षरेंच नसून मोत्यांच्या सरांतील तीं चौदा मोत्येंच आहेत असेंच म्हणावें लागेल. माझ्या समजुतीप्रमाणे आतापर्यंत "खुद्द शिवाजीमहाराजांचें हें हस्ताक्षर" असा हक्क ज्यासंबंधाने सांगण्यांत येतो अशीं पत्रें किंवा पत्रांच्या नकला अवघ्या सुमारें पांचसहा आहेत. त्यांतील अस्सलावरील कांही अक्षरांबद्दल, तें शिवाजीमहाराजांचेंच हस्ताक्षर होय अशी ग्वाही कै राजवाडे, रा. शंकरराव देव, रा. दत्तोपंत आपटे, रा. गोविंदराव सरदसाई इत्यादि गृहस्थानी दिलेली आहे किंवा दिलेली होती. पैकीं, कांही हस्ताक्षरें विवादित ठरलेलीं असून त्या विषयींचे वाद जनतेपुढे आले होते. हल्ली रा. चांदोरकर यांनी वाचकांस सादर केलेल्या शिवाजीमहाराजाच्या हस्ताक्षरासंबंधाने असाच वाद होणार नाही असें तरी मीं कसें म्हणावें! कारण शिवाजीमहाराज हे साक्षर होते असा पूर्ण विश्वास मनांत बाळगणारे, व या बाबतींतले प्रतिपक्षी हे अपसिद्धांतवादी आहेत असें म्हणणारे, इतिहासज्ञहि केवळ सत्याभिमानी म्हणून मनांतील शंका, संभवाच्या आशेबरोबरच, बोलून दाखवितात.

शिवाजीमहाराज हे साक्षर होते असें अभिमानाने व आग्रहाने प्रतिपादन करावें लागण्याची वेळ, केवळ वरील अपसिद्धांतवादी प्रतिपक्षीयांमुळेच दुर्दैवाने, आलेली आहे. एरवीं ज्यानी महाराष्ट्राला प्रत्यक्ष स्वराज्याचा लाभ करून दिला, व महाराष्ट्र संस्कृतींत युगांतर केलें, ते नुसते साक्षर होते असें प्रतिपादण्यांत भूषण मानण्याइतका मूर्ख कोण असता! पण सत्याकरिता मूर्खांबरोबर क्षणभर मूर्खहि बनावे लागते पण हा मूर्खपणा सहेतुक असतो हें विसरून चालावयाचें नाहीं. शिवाजीमहाराज हे केवळ काल्पनिक किंवा पौराणिक पुरुष नव्हते हें जितकें सिद्ध मानतां येईल, तितकेंच ते. साक्षर होते हेंहि सिद्ध मानलें पाहिजे अशी माझी स्वतःची तरी समजूत आहे. आणि "ती समजूत खोटी कशी ती ठरवा" असा प्रत्यक्ष पुरावा मीं जसा इतराकडून मागणार नाहीं, तसेंच "शिवाजी साक्षर होता कशावरून हें सिद्ध करण्याविषयींचा पुरावा" कोणीं मागणे हेहि तितकेंच अप्रयोजकपणाचें होईल. अमुक एक विशिष्ट अक्षर हें शिवाजीमहाराजांच्या हातचेंच होय कीं नाही याविषयीं वाद होणें संभवनीय आहे. परंतु शिवाजी साक्षर होता कीं निरक्षर होता अशी शंका येणें ही अप्रबुद्धपणाची कमाल होय असें मीं तरी मानतों.

एका बाजूस शिवाजी निरक्षर होता असा स्पष्ट उल्लेख ग्रँट डफ याने केला आहे. उलट 'शिवाजीने हाताने लिहिलेलीं पत्रें' 'शिवाजीच्या सहीचीं

पत्रें' 'पत्रावर शिवाजीने सही केली' असे उल्लेख कित्येक इंग्रजांच्या पत्रांतूनच आढळतात. मग त्या पुराव्यावरून तरी त्या एका इंग्रजाला या दुसऱ्या इंग्रजाने संक्षेप देण्याचें काम 'इंग्रजनिष्ठ' लोकांनी करावयास पाहिजे होतें. पण ग्रँटडफच्या मराठ्यांच्या इतिहासविषयक प्रेमानेच घात केला म्हणावयाचा! तो सर्वांत अलीकडला इंग्रज इतिहासकार म्हणून तो ताजा आधार कांही लोकांनी उचलला. आणि त्यावर विश्वास ठेवण्यांत त्यांची कदाचित् अशीहि भावना कारणीभूत झालेली असेल कीं, शिवाजीमहाराजांचा पराक्रम आणि त्यांची मानीव निरक्षरता हीं विशेष प्रकारचा कौतुकास्पद असा विरोधाभास उत्पन्न करतात. पण विरोधाभासाच्या प्रेमामुळे साधा सारासार विचार विसरून जाणें हें अगदी भोळेपणाचें किंवा मूर्खपणाचेंच ठरेल. शिवाजीमहाराजांच्या साक्षरतेच्या जोडीला त्यांची भवानी तरवारहि येऊन बसलेलीच आहे! म्हणजे दोन्ही सारखींच विवादित स्वरूपांत आहेत. पण भवानी तरवार आज अस्सल आढळत नाही यामुळे, शिवाजी हा अनत्याचारी वीर, म्हणजे हातांत शस्त्र न धरणारा, होता असें मानणें जितकें हास्यास्पद, तितकेंच शिवाजीचें हस्ताक्षर निर्विवाद मिळत नाही यावरून तो निरक्षर होता हें म्हणणेंहि तितकेंच हास्यास्पद ठरेल, इतकें तरी त्यांना समजावयास पाहिजे होतें!

स्वतः चांदोरकर यांनी इतर पूर्वीच्या पत्रांतील अक्षरांना अस्सल असें मानलेले नाही. याचें एक कारण मनुष्यस्वभावाला धरून असेलहि. का कीं, ज्याला त्याला ब्रह्म हुडकता हुडकता तें आपल्याच हाताला लागलें असा योग्य अभिमान, उपनिषदांतील इंद्राप्रमाणे वाटत असतो त्याप्रमाणे खऱ्या इतिहाससंशोधकाला शिवाजी महाराजांच्या हस्ताक्षराचा अस्सल नमुना हा पुत्रलाभच होय. परंतु केवळ या अभिमानापेक्षांहि अधिक सबळ कारण असें सांगतां येतें कीं, चांदोरकरांच्या पत्रांतील हीं चौदा अक्षरें पूर्वी शिवाजीच्या म्हटलेल्या इतर कोणत्याहि पत्रांत नाहीत. म्हणजे शिवाजीच्या सहीच्या अर्थी हीं अक्षरें घातलेलें असें हेंच एकटें एक पत्र आज जनतेपुढे आहे, इतकें तरी निश्चित म्हणतां येईलच. पण त्याहून अधिक महत्त्वाचें प्रमाण मीं जें समजतों तें हें कीं, ह्या चौदा अक्षरांचा मायना फक्त छत्रपतींनीच लिहिण्याचा असा दंडक असल्याचें मानण्यांत येतें; व प्रत्यक्ष प्रमाणहि त्या दंडकाला पोषक असेंच आहे. कारण शिवाजी, राजाराम, शाहू व कोल्हापूर घराण्यांतील छत्रपति आणि छत्रपतीसदृश त्यांच्या घराण्यातील राज्यकर्त्या स्त्रिया यांनीच तेवढा हा समाप्तीचा मायना वापरलेला आहे आणि तो इतर कोणत्याही ऐतिहासिक स्त्री-पुरुषाने वापरलेला नाही, असें या अडीचशें हस्ताक्षरांच्या नमुन्यांवरूनच दिसून येणारें आहे!

शिवछत्रपतींच्या लेखनालंकाराच्या मायन्याचीं हींच अक्षरे लिहिलीं असलेली आणखी कांही 'पत्रें' उपलब्ध झालीं तर, तें अक्षर व हें अक्षर ताडून पाहून वेगळें ठरल्यास या पत्राविषयी निराळें अनुमान काढावें लागेल. पण त्या दोहोंपैकीं एक तरी खरें मानावेंच लागेल! पण तूर्त तरी या मायन्याचें हें एकच पत्र हातीं असतां, आणि अनुमान प्रमाणाचें बळ बरेचसे त्याच्या बाजूला असतां, या मायन्यांतील अक्षरें स्वतः शिवाजीमहाराजानीच लिहिलीं असें इतर कोणत्याहि रीतीनें असिद्ध ठरेपर्यंत तें सिद्ध मानण्यास अतिरेकी चिकित्सकांसहि हरकत नसावी. तथापि मी कांही इतिहास विषयांतील तज्ज्ञ नव्हे. म्हणून प्रस्तुत पुढे आलेलें अक्षर हेंच शिवाजीमहाराजांचें खास हस्ताक्षर असें घेऊन चालणे योग्य होईल असें माझें मत बनलें असले तरी तें केवळ एक मत म्हणूनच मी पुढें मांडीत आहें. तथापि ह्या मुद्द्याची इतरांकडून चर्चा होईलच. ती झाली म्हणजे याविषयी मलाहि अधिक ज्ञान होईल. आणि हेंहि अक्षर शिवाजीमहाराजांचें नाहीं असें जरी ठरलें तरी देखील शिवाजी निरक्षर होता ही गोष्ट मी कधीहि खरी मानणार नाही.

# प्रासंगिक बोल

**लॉर्ड विलिंग्डन विलायतेस कां जाणार?**

होय—नाही करतां करतां, व्हाइसराय लॉर्ड विलिंग्डन येत्या मे महिन्यांत इंग्लंडला चार महिन्यांच्या रजेवर जाणार असल्याचें ठरून त्याप्रमाणे जाहीरहि झालें आहे. या प्रयाणाचें कारण 'खासगी स्वरूपाचें' आहे असें सरकारानें प्रसिद्ध केलेलें असलें तरी त्याचे धागेदोरे हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेपर्यंत गुंतलेले असले पाहिजेत असें अनुमान काढावयास हरकत नाही. गोलमेज परिषदांचे तीनही हंडे शिजून आता जॉइंट पार्लमेंटरी कमिटीची पाकसिद्धिहि झालेली आहे आणि यापुढे हिंदुस्थानाच्या राजकीय सुधारणांचें बिल पार्लमेंटापुढे

सादर करण्यांत यावयाचें आहे. अशा वेळीं 'ठाण्यावरील माणसा' चें ( मॅन ऑन दी स्पॉट ) मत प्रत्यक्ष रीतीने ऐकण्याची जरूरी ब्रिटिश मुत्सद्यांना वाटणें साहजिक आहे. या महत्त्वाच्या प्रसंगीं, लॉर्ड विलिंग्डन हे ब्रिटिश मुत्सद्यांच्या कानावर कोणता सल्ला घालतात यावर यांचें दूरदर्शित्व व राजकारणपटुत्व अवलंबून आहे. हिंदुस्थानांत पाऊल ठेवल्यानंतर म. गांधींनी पुढे केलेला मुलाखतीचा हात झिडकारण्यापासून तों परवा ऑल-इंडिया काँग्रेस कमिटीच्या वाटेंत धोंड टाकीपर्यंत, लॉर्ड विलिंग्डन यानी लोकमताच्या विरुद्ध दडपशाहीचीं जीं कृत्यें सतत चालू ठेविलीं, त्यांचें परिमार्जन करण्याला त्यांना ही सोन्यासारखी संधि चालून आलेली आहे. ती साधून त्यांनी हिंदुस्थानांतील प्रजेला संतुष्ट करण्याइतके भरीव व भरपूर हक्क देण्यास ब्रिटिश सरकाराला भाग पाडण्यांतच त्यांचे मुत्सद्दीपण आहे. उलटपक्षीं, सत्तेच्या व वरपांगी विजयाच्या धुंदीने अंध होऊन ते जर प्रतिगामी स्वरूपाचा सल्ला देतील तर हिंदुस्थानाचेंच नव्हे तर, इंग्लंडाचेंहि नुकसान केल्याचा दोष भावी इतिहासकार त्यांचे पदरीं बांधल्याशिवाय खचित राहणार नाहींत.

## राजबंद्यांविषयीं अनुदार वृत्ति

राजबंद्यांची प्रकृति विकोपास गेल्याचीं व त्यांना कित्येक वेळां आजाराने मृत्यु आल्याचींहि उदाहरणें कांहीं तुरुंगातून घडलीं आहेत. त्यामुळे साहजिकच या प्रकाराकडे देशांतील जबाबदार व्यक्तींचें लक्ष वेधलें जातें. परंतु पुष्कळ ठिकाणीं सरकारी अधिकारी सन्मान्य नागरिकांनाहि तुरुंगांत जाऊन राजबंद्यांच्या आरोग्याची पूसतपास करण्यास प्रतिबंध करतात व आपल्या मनाचा क्षुद्रपणा प्रगट करतात. तेव्हां, अशा बाबतींत माहिती मिळविण्याचें मुख्य द्वार म्हणजे कायदेमंडळें हेंच होय. गेल्या बुधवारीं ले. असेंब्लींत मि सी. एस. मित्र यांनी मियानवाली तुरुंगांतील राजबंद्यांच्या प्रकृतिविषयीं प्रश्न विचारले. त्यांना सरळ व समाधानकारक रीतीने उत्तर देऊन सभासदांची व पर्यायाने जनतेची उत्कंठा व अस्वस्थता शमविण्याऐवजीं गृहमंत्र्यांनी असे प्रश्न विचारण्याची प्रवृत्तिच मोडून काढण्याचा प्रयत्न केला. विशेष गर्हणीय गोष्ट अशी कीं, त्यांना असेंब्लीचे अध्यक्ष सर षण्मुखं चेट्टी यांनीहि हातभार लावला. गृहमंत्री सर हॅरी हेग यांचा युक्तिवाद असा कीं, क्रांतिकारकांच्या प्रकृतीविषयीं असेंब्लींत वारंवार प्रश्न विचारल्याने त्यांच्याबद्दल व अप्रत्यक्ष रीतीने त्यांच्या कार्याबद्दलहि लोकांत सहानुभूति उत्पन्न होते. इतका पोकळ, लेचापेचा व बालिश युक्तिवाद करून मुस्कटदाबीचा आपला जुलूम समर्थनीय ठरविण्याची पाळी गृहमंत्र्यांवर यावी ही स्थिति खरोखर अनुकंपनीय होय. कैदी राजकीय गुन्हेगार असोत अगर अनैतिक गुन्हेगार असोत, ते अनत्याचारी असोत अथवा अत्याचारी असोत, जोंपर्यंत त्या कैद्यांच्या आरोग्याची काळजी घेणें व त्याना माणुसकीने वागविणें यांची जबाबदारी तुरुंगनियमांनी तुरुंगावरील अधिकाऱ्यांवर टाकली आहे तोंपर्यंत ते अधिकारी आपली जबाबदारी योग्य प्रकारें पाळतात कां नाहीं याची चौकशी करण्याचा प्रत्येक लोकप्रतिनिधीस हक्क आहे. अशी चौकशी केल्याने अत्याचारी कैद्यांविषयीं सहानुभूति दाखविल्याप्रमाणें होतें असा आक्षेप जर कोणी घेईल तर अत्याचारी कैद्याला रोज वेळच्या वेळीं अन्न देणारा भिसीवाला आणि तशा कैद्याला औषधपाणी देणारा जेलमधील डॉक्टर यांच्यावरहि तसाच आक्षेप तो घेऊं शकेल! अत्याचारी कैद्याची गणना मनुष्यप्राण्यांत करावयाची नाहीं असें सरकारचें मत आहे काय!

## चढेल मुसलमानांचे पाठीराखे सरकार

खोपोली ( कुलाबा ) येथील वादस्थलावरील मूर्तिच पोलिसांनीं काढून नेऊन मुख्य पुरावा नाहीसा केला! ही अन्यायाची गोष्ट होते न होते तोंच तींत मुसलमानांच्या दंडेलीची भर पडून हिंदु-मुसलमानांच्या तंट्याचें बीज फार उत्तम प्रकारें पेरलें गेलें! कारण मूर्ति ता. १८ रोजीं काढून नेल्यानंतर ता. २३ रोजीं दुपारीं तीन वाजता वादस्थलावर पाहारा असतानाहि दहा-बारा मुसलमान त्या जागीं गेले व तेथे उदबत्त्या लावून व नारळ फोडून आले! हा सर्व प्रकार पोलिसांचा पाहरा चालू असता झाला व पोलिसांनी त्यांस कोणत्याहि प्रकारें हरकत केली नाहीं. कलेक्टरसाहेबांनी १४४ कलम लागू केलें तें फक्त हिंदूंना हीच प्रथम अन्यायाची गोष्ट झाली. वाद आहे हिंदु व मुसलमान यांचा; तेव्हा उभयतांनाहि तशी बंदी करावयास हवी होती; ती न करतां मूर्ति काढून नेऊन पोलिसांनी पुरावा नाहीसा केला. आणि त्या पक्षपाती धोरणाने चढेल बनून मुसलमानांनी वादस्थलावर मन मानेल तसा पोलिसांसमोर हैदोस घातला, ही तर अन्यायाची परमसीमा झाली. मुंबई-सरकाराकडे याबद्दल तक्रारी गेल्या असता व महाराष्ट्र हिंदुसभेने या प्रकाराची चौकशी होईपर्यंत मुसलमानांनाहि बंदी करा अशी विनंति केली असता सरकारने तिकडे लक्षहि दिलें नाहीं ही सरकारची पक्षपाती वृत्ति अत्यंत अनुचित होय!

# भय्याच्या भाकरीसाठी पिठाची एक चिमटी !

हिंदुस्थानांत लष्कर किती ठेवावें, त्यांत गोरें किती व काळें किती असावें, त्यांच्यावरील अधिकाऱ्यांत हिंदी अधिकाऱ्यांचें प्रमाण कोणतें असावें, त्या लष्करानिमित्त खर्च किती करावा, त्या खर्चाचा बोजा कोणावर किती पडावा, त्या लष्कराने हुकमत कोणाची पाळावी, चाकरी कोठे कोठे करावी इत्यादि भानगडीऱ्या प्रश्नांचें स्वरूप हुबेहूब वरील दृष्टान्तांत दर्शविल्याप्रमाणें दिल्लीदरवाज्यावरील भय्याच्या भाकरीच्या व चाकरीच्या प्रश्नाच्या स्वरूपासारखेंच आहे; आणि त्या प्रश्नाचा निकालहि बहुतांशीं 'भाकरी तुझी चाकरी माझी' अशासारखाच करण्यांत आला आहे; मात्र तो निकाल इतक्या उघड व स्पष्ट भाषेंत न देतां त्याला दिखाऊ न्यायाचा मुलामा देण्याकरिता भय्याची सगळी भाकरी तूंच दे असें न म्हणतां आता ब्रिटिश सरकाराने मोठ्या उदारपणाचा आव आणून यापुढे भय्याच्या भाकरीला लागणाऱ्या शेरभर पिठांतलें एक चिमटीभर पीठ आपण देत जाऊं असें जाहीर केलें आहे. पण हें चिमटीभर पीठ देण्याचें कबूल करण्यांत देखील केवळ निस्स्वार्थी उदारपणा नसून त्यांत अत्यंत गूढ असा मुत्सद्दीपणाचा पेंच आहे. तो समजण्याकरिता या प्रश्नाचा पूर्वेतिहास आपणास पाहिला पाहिजे.

लष्करी खात्यावर होणारा खर्च अतिशय बेताल व डोईजड असा असल्याची हिंदुस्थानची तक्रार बरीच जुनी आहे. कंपनी सरकाराकडून ब्रिटिश सरकाराने हिंदुस्थानाचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतल्या वळेपासून ही कुरकूर चालूच आहे. हिंदुस्थानांत ठेवलें जाणारें खडें सैन्य वाजवीपेक्षा संख्येने अधिक आहे, त्यांत गोऱ्या सैन्याचें जें प्रमाण आहे तें निष्कारण अधिक ठेवलेलें आहे, गोऱ्या लष्करावर होणारा खर्च अत्यंत उधळेपणानें केला जातो, त्या खर्चाच्या मानाने त्या लष्कराचा हिंदुस्थानास व्हावा तितका उपयोग होत नाही आणि हिंदुस्थानांतलें सैन्य हिंदुस्थानाबाहेरच्या कामागिरीवर पाठविलें गेलें असता त्याच्या खर्चाची ण भरपाई ग्रेट ब्रिटनकडून न होता त्यांतला बराचसा भाग हिंदुस्थानाच्या तिजोरींतूनच उचलला जातो, असें गाऱ्हाणें अर्धशतक चालू असून त्याची यापूर्वी दाद लागली नाही आणि 'कॅपिटेशन कमिटी'चा जो निर्णय नुकताच झाला आहे त्याने हा अन्याय दूर न होता उलट तो वज्रलेप करण्याचाच डाव त्यांत दिसून येत आहे.

या अन्यायाची दाद लावून घेण्याचा पहिला प्रयत्न मि. फॉसेट यांनी, ते पार्लमेंटचे सभासद असता, केला; पण त्यांत त्यांना म्हणण्यासारखें यश प्राप्त झालें नाही. त्यानंतर वेल्बी कमिशनच्या वेळीं हा प्रश्न उपस्थित झाला; परंतु तेथेहि कांहीतरी थातुरमातुर करून हिंदुस्थानाची समजूत करण्यांत आली, पण त्याचा कायमचा निकाल करण्यांत आला नाही. १९०७ सालापासून हिंदुस्थानसरकाराने 'कॅपिटेशन' चार्जेसपुरती हिंदुस्थानाच्या वतीने वकिली करून तो खर्च कमी करण्याची खटपट चालविली. परंतु पुढे महायुद्धामुळे तो प्रश्न तसाच अनिर्णीत राहिला. महायुद्धाच्या वेळीं हिंदुस्थानांतल्या सैन्यांतला बराच मोठा भाग येथून दूरवरच्या रणभूमीवर रवाना करण्यांत आला व त्यावरून येथलें सैन्य हिंदुस्थानाच्या संरक्षणाच्या जरूरीपेक्षा बरेंच अधिक आहे ही गोष्ट प्रत्यक्ष अनुभवानेच सिद्ध झाली. असें असतां महायुद्धाच्या समाप्तीनंतर सैन्याची संख्या तर कमी केली गेली नाहीच, पण पूर्वी 'कॅपिटेशन चार्ज' दर सोल्जरागणिक ११ पौंड ८ शिलिंग होता तो २८ पौंड १२ शिलिंग ठरविण्यांत आला आणि हें नवें प्रमाण १९२० सालापासून लागू करण्यांत यावें असें इंग्लंडातील लष्करी खात्यानें फर्मान सोडलें! या दडपेगिरीचा परिणाम मात्र लष्करी खात्याच्या अपेक्षेच्या उलट झाला. हिंदुस्थानसरकारानें २८ पौंड १२ शिलिंग हा नवा दर मान्य केला नाही; एवढेंच नव्हे तर या नव्या दराने हिशेब केला असता जो सुमारें ६ कोट रुपयांचा भरणा

करावा लागला असता तो करण्याचें नाकारून हिंदुस्थानसरकारानें १९२४ सालापासून आतापर्यंत सालोसाल सुमारें दोन कोट रुपयांचाच भरणा केला आणि आपल्या तक्रारीचें टुमणें कायम ठेवून 'कॅपिटेशन चार्जेस'च्या निर्णय कायमचा लावण्याकरितां पंच नेमणें भाग पाडलें आणि त्या पंचांनी जो निकाल दिला त्याचाच प्रस्तुत विचार कर्तव्य आहे.

हा विचार करण्यापूर्वी 'कॅपिटेशन चार्जेस' हें प्रकरण काय आहे व त्याच्या मुळाशीं कोणत्या अन्यायाचें बीज आहे याचा खुलासा केला पाहिजे. लष्करांत नव्या शिपायांची भरती केल्यावर ते आपल्या कामाला लायक होण्याकरितां त्यांना कवाइतीचें व इतर लष्करी कामाचें शिक्षण द्यावें लागतें. व त्या शिक्षणाकरिता लागणारा खर्च लष्करी खात्याला सोसावा लागतो. हिंदी लष्करात ज्या काळ्या शिपायांची भरती होते त्यांच्या शिक्षणासंबंधाचा खर्च येथल्या येथेच होतो. पण येथील लष्करांत जे ६० हजार गोरे सोल्जर्स असतात त्यांच्यांत जी सालोसाल नवी भर टाकावी लागते त्या नव्या रिक्रूटांचें शिक्षण हिंदुस्थानांत न होतां विलायतेंतील वॉर ऑफिसकडून तें शिक्षण तेथे दिलें जातें आणि तें शिक्षण घेऊन तयार झालेले सोल्जर्स हिंदुस्थानांत पाठविले जातात.

यासंबंधांत वॉर ऑफिसने जी झीज सोसली असते तिची भरपाई करण्यासाठी म्हणून हिंदुस्थानांत येणाऱ्या दर गोऱ्या सोल्जराच्या डोईगणीक कांही ठराविक रक्कम हिंदुस्थानाच्या लष्करी खात्याकडून इंग्लंड वसूल करीत असतें. 'कॅपिटेशन चार्जेस' म्हणजे ही सोल्जरावरील डोईपट्टीच होय; मात्र ती त्या सोल्जराने आपल्या पगारांतून द्यावयाची नसून त्याच्याकरिता हिंदी तिजोरीतून विलायती तिजोरींत हा भरणा सालोसाल केला जातो.

एखादा मुलगा पदवीधर झाला व त्याची ती लायकी पाहून एखाद्याने त्याला आपल्या नोकरींत ठेवला, तर त्याच्या बापाने मुलाच्या शिक्षणाला लागलेला खर्च मला भरून द्या अशी मागणी त्या मुलाला नोकरी देणाऱ्याकडे करावी अशांतलाच हा प्रकार आहे! गोरे सोल्जर शिक्षण न घेतांच येथे लष्करांत दाखल झाले असते तर त्यांच्या शिक्षणाकरितां आम्हांस येथे खर्च सोसावा लागला असता हें खरें; परंतु त्या सोल्जरांचें शिक्षण पूर्ण होईपर्यंत त्याला शिकून तयार झालेल्या सोल्जराइतका पगारहि दिला गेला नसता. अर्थातच शिक्षणाप्रीत्यर्थ होणारा खर्च पगाराचें स्केल कमी ठेवून त्यातून भरून घेतां आला असता, परंतु हल्लीचे गोरे सोल्जर लष्करी काम शिकून तयार होऊन येतात म्हणून त्यांच्या पगाराचें स्केलहि ज्यास्त ठेवावयाचें आणि त्यांच्या शिक्षणाचा खर्चहि द्या अशी मागणी करावयाची हा दुहेरी भूर्दंड नव्हे काय?

सोल्जरागणीक द्याव्या लागणाऱ्या या डोईपट्टीचा दर पूर्वी ७ पौंड १२ शिलिंग होता, पुढे तो १० पौंड झाला. त्यानंतर त्याची मजल ११ पौंड ८ शिलिंगावर गेली आणि १९२४ सालापासून तर हा दर २८½ पौंड ठरविण्यांत आला. अशा रीतीने ही रक्कम जेव्हां बेताल फुगत चालली तेव्हा हिंदुस्थानसरकाराने एक प्रकारें सत्याग्रह करून आपण वार्षिक १४ लक्ष पौंडांहून अधिक रक्कम देणार नाही असें वॉर ऑफिसला बजावलें. याच वेळीं तिकडे स्वराज्याच्या पुढील हप्त्याचा विचार चालू झाला नसता तर हिंदुस्थान—सरकाराचा हा सत्याग्रह कितपत टिकला असता याची वानवाच आहे. परंतु तोहि प्रश्न याच वेळीं उपस्थित झाल्यामुळे हिंदुस्थानांत लष्कर किती ठेवावें, त्याचा उपयोग कोणकोणत्या कामाकडे करावा, ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणाला हि तें लष्कर उपयोगी पडत असल्याने त्या लष्कराच्या खर्चांतला कांही भार ग्रेटब्रिटनने सोसावा कीं काय आणि कॅपिटेशन चार्जेसबद्दलची रक्कम किती घेण्यांत यावी अशा सर्वच प्रश्नांचा खल वेगवेगळ्या कमिट्यापुढे होऊन त्यांचा संयुक्त निर्णय आता सरकाराने जाहीर केला आहे.

हा निर्णय अपुरा, अन्यायाचा व अत्यंत अ-

समाधानकारक असा आहे. 'कॅपिटेशन चार्जेस'-बद्दल कांही रक्कम हिंदुस्थानानें दिली पाहिजे असें कमिटीनें ठरविलें; परंतु किती रक्कम द्यावी लागेल याचा हिशेब अनिश्चितच ठेवला, त्यामुळे हा निर्णय अपुरा असून त्यांत भावी वादाचें बी आताच पेरून ठेवलें गेलें आहे. हिंदुस्थानांत जें खडें लष्कर ठेवलें जातें त्याचा उपयोग अंतर्गत बंदोबस्ताकडे आणि सरहद्दीच्या संरक्षणाकडे केला जातो. पण याखेरीज हिंदुस्थानाच्या बाहेरदेखील ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणार्थ त्या लष्कराचा उपयोग होतो. असा त्याचा उपयोग होत असल्यामुळे साम्राज्य—सरकारने हिंदी लष्करी खर्चाला थोडा तरी हातभार लावावा असें कमिटीने ठरविलें असून ती रक्कम सुमारें दोन कोटि रुपये देण्यांत येईल असें जाहीर करण्यांत आलें आहे. ब्रिटिश सरकाराच्या या वरकरणी दिसणाऱ्या उदारपणांतच कणिक—नीतीचा कावा भरला आहे.

हिंदुस्थानांतलें सगळें लष्कर हिंदुस्थानाच्या संरक्षणासाठीच आहे असें म्हटल्यास त्याच्या खर्चातला हिस्सा इंग्लंडला द्यावा लागणार नाही. पण त्याबरोबरच त्या लष्करावर हुकमत चालविण्यालाहि त्याला व्यत्यय येईल. माझ्या देवडीवरील भय्या माझ्या घराच्या संरक्षणाकरितांच आहे, दुसऱ्या भाऊबंदांच्या घरांच्या संरक्षणाची जबाबदारी त्याजवर नाहीं, असें निश्चित झालें कीं, त्या भय्याला पगार किती द्यावा व त्याला कोणतें व किती काम सांगावें हें माझें मीच ठरविणार, त्यांत भाऊबंदांना ढवळाढवळ करतां येणार नाही. पण मी पगार देऊन पोसलेल्या भय्याकडून आपल्या घरांचेंहि संरक्षण परभारें व्हावें असा ज्यांचा कावा असतो, ते भाईबंद असा तुटकपणा मान्य न करतां त्या भय्यावर आपलीहि हुकमत प्रसंगविशेषीं चालावी एवढ्याकरिता त्याच्या पगारांतला थोडासा हिस्सा आम्हीहि सोसतों असें आपण होऊन म्हणूं लागतात, व त्याबरोबरच भय्याला कायमची रजा मात्र देऊं नका असें बजावतात, त्यांतलाच हा प्रकार आहे. हिंदुस्थानानें ५०—६० कोटि रुपये खर्च करून येथे इतकें गोरें व काळें लष्कर ठेवावें आणि त्यांतला फार तर-एक पंचविसांश खर्च देण्याचें इंग्लंडने कबूल करून लगेच हिंदुस्थानांतलें गोरें लष्कर हल्लीपेक्षा बिलकुल कमी करूं नका आणि परराष्ट्रांशीं युद्ध उपस्थित झाल्यास त्या युद्धांत या लष्कराचा उपयोग करण्याला हरकत घेऊं नका असें औद्धत्यतेने सांगावें, हा जुलूमच नव्हे काय ?

भय्याच्या पगारापैकीं एक पैसा अथवा त्याच्या भाकरीला लागणाऱ्या पिठांतलें एक चिमूटभर पीठ देण्याचा उदारपणा दाखवून त्या भय्याला आपल्या कामासाठी राबविण्याचा हक्क प्रस्थापित करण्याचा हा कावा प्रथम सायमन कमिशनच्या रिपोर्टांतून उघडकीस आला आणि इतर बाबतींत जरी त्या रिपोर्टाला केराची टोपलीच दाखविण्यांत आली तरी धूर्त ब्रिटिश मुत्सद्द्यांनी सायमनसाहेबांची ही तेवढी कृति उचलली आणि कॅपिटेशन कमिटीच्या रिपोर्टाच्या पर्वणींत तो कार्यभाग साधण्यासाठीं डाव टाकला. हिंदी लष्करी खर्चांतला आपला हिस्सा म्हणून ब्रिटिश सरकार दोन कोटि रुपयें हिंदुस्थानाला देणार असा इकडे गाजावजा करून त्याबरोबरच 'कॅपिटेशन चार्जेस' च्या वसुलीचा स्वतःचा हक्क इंग्लंडने कायम ठेवला. हिंदी लष्करांतील संख्या कमी करू नये असें बजावलें आणि त्या लष्कराचा साम्राज्य-संरक्षणार्थ उपयोग करण्यांत येईल हें आपल्या स्वार्थसाधूपणाचें तत्त्वहि आमच्यावर लादलें ! म्हणजे कमिटीच्या निर्णयांतील चार मुद्द्यांपैकीं तीन मुद्दे सर्वस्वी स्वतःला अनुकूल होतील अशा रीतीने निकालांत काढून चौथ्या म्हणजे खर्चाच्या मुद्यावर हिंदुस्थानाला सवलत दिल्याचा नुसता देखावा केला !

पण आवळा देऊन कोहळा काढण्यांतलाच हा प्रकार आहे. हिंदुस्थानांतल्या गोऱ्या सैन्याचाच खर्च ३०-३२ कोटि रुपये आहे. तो खर्च सगळ्याचा सगळा सोसावयाला इंग्लंड तयार

झालें तरी गोरें लष्कर येथे कशाला हवें, आमचें संरक्षण करण्यास आम्ही समर्थ आहों, असें हिंदुस्थान कांही थोड्या वर्षांनी तरी सांगूं शकेल इतकी त्यास धमक आहे. असें असतां भय्याच्या भाकरीच्या पिठांत एक चिमटीभर पीठ टाकून या भय्याच्या कामावर माझी हुकमत चालली पाहिजे असा जर कोणी हक्क सांगूं लागेल तर हिंदी लोक तो हक्क कसा कबूल करतील? पण असा स्पष्ट नकार देण्याची धमक हिंदी राष्ट्राच्या अंगीं येण्यास या राष्ट्रांतील तरुणांनी प्रथम राष्ट्रसंरक्षणास सज्ज व समर्थ झालें पाहिजे.

# परदेशी मालावरील जकातींत होणारे फेरफार

**हिंदुस्थान सरकारने ॲसेंब्लीची बैठक बरखास्त करण्यापूर्वी कांही परदेशी मालावरील जकातींत फेरफार करणारें बिल सादर केलें. या बिलाने सुमारें वीस लहान देशी धंद्यांचें थोडेंबहुत तरी संरक्षण होईल असें वाटतें.**

शुक्रवार ता. २२ रोजीं हिंदुस्थानसरकारच्या व्यापारमंत्र्यांनी कांही पदार्थांवरील जकातींत फेर करणारें बिल लेजिस्लेटिव्ह असेंब्लीला सादर केलें. जपानी येनाचा भाव मर्यादेबाहेर घसरल्यामुळे जपानमधून येणाऱ्या हरप्रकारच्या स्वस्त मालाने हिंदुस्थानाच्या पेठांचें आक्रमण केलें आहे. १० एप्रील १९३३ रोजीं हिंदुस्थान सरकाराने जपान सरकारला १९०४ च्या हिंदी-जपानी व्यापारी तह रद्द समजण्याबद्दल नोटीस दिली. कारण त्या तहामुळे एकट्या जपानच्या मालावरच जकात वाढविणें अशक्य झालें होतें. या वेळींच देशाच्या मालाची चढाओढ देशी उद्योगधंद्याला मारक होऊं लागेल त्या देशाच्या मालावरील जकात वाढविण्याचा अधिकार हिंदुस्थान सरकारला देणारा 'उद्योगधंद्याचें संरक्षण करणारा' कायदाहि संमत करण्यांत आला. स्वस्त जपानी मालाच्या या टोळधाडीमुळे अनेक लहान उदयोन्मुख धंदे रसातळाला जाण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं व परदेशी चढाओढीपासून संरक्षण करण्याबद्दल अशा सुमारें चाळीस धंद्यांनी हिंदुस्थान सरकारचा धावा केला.

आता हिंदी जपानी व्यापारी तह रद्द झाला असल्यामुळे ज्या छोट्या हिंदी धंद्यांनी जपानी चढाओढीपासून आपलें संरक्षण करण्याबद्दल हिंदुस्थानसरकारला विनंति केली त्या धंद्यांबरोबर मारक चढाओढ करणाऱ्या जपानी मालावर या नव्या कायद्याप्रमाणें हिंदुस्थानसरकारला जादा जकात बसवितां आली असती. परंतु नवा हिंदी-जपानी व्यापारी तह घडवून आणण्याबाबत सांप्रत बोलणीं चालू असल्यामुळे या नव्या कायद्याचा उपयोग करण्याचें हिंदुस्थानसरकारानें टाळलें आहे हें उघड आहे. हिंदुस्थान सरकाराने जकातींत फेरबदल करण्याच्या या नव्या बिलाच्या उद्देशपत्रकांत असें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थान सरकारला जकातींत करावयाचे हे फेरफार 'सेफगार्डिंग ऑफ इंडस्ट्रीज ॲक्टा'च्या (उद्योगधंद्यांचें संरक्षण करणाऱ्या कायद्याचा) आधार घेऊन अमलांत आणता आले असते; परंतु तसें न करण्याचें कारण असें कीं, त्या कायद्याखाली जकातींत फेरफार करण्याचें ठरविलें असतें तर विशिष्ट देशांच्या मालावरच जकात बसविणें भाग पडलें असतें. सांप्रत तो कायदा मृतवत असला तरी अडीअडचणींचे प्रसंगीं उपयोग करण्यापुरता तो जिवंत आहे हें लक्षात ठेवणें जरूर आहे. नव्या बिलाने जकातींत होणारे फेरफार सर्व परदेशांतून येणाऱ्या मालाला लागू व्हावयाचे आहेत.

ज्या हिंदी उद्योगधंद्यांचें संरक्षण करणें आवश्यक आहे असें हिंदुस्थान सरकाराला चौकशीअंतीं आढळून आलें त्या धंद्यांशीं मारक चढाओढ करणाऱ्या परदेशी मालावरील जकातींत फेरफार करण्याचें सरकारनें ठरविलें असून त्यामुळे सुमारें वीस लहान हिंदी धंद्यांचें थोडेंबहुत तरी संरक्षण होईल असें वाटतें. या नव्या टॅरिफ अमेंडमेंट बिलामुळें जकातींत जे फेरफार केले जाणार आहेत ते ताबडतोब अमलांत यावयाचे असून त्यांचें स्वरूप थोडक्यांत असें आहे. जकातींत फेरफार करतांना सरकारनें जें धोरण आंखलें आहे तें असें कीं, बहुतेक बाबतींत मूल्यानुवर्ति (ॲड व्हॅलोरेम) जकातीचें प्रमाण कायम ठेवून त्याबरोबरच परिमाणानुवर्ति (स्पेसिफिक) किमान जकात ठरविली आहे व या दोहोंपैकीं जी जकात अधिक असेल ती यापुढे वसविली जावयाची आहे. याचा परिणाम साहजिकच असा होईल कीं, स्वस्त जपानी मालाला परिमाणानुवर्ति जकाती

लागू होतील व त्यांची किंमत वाढून देशी धंद्यांचें संरक्षण होईल असें सरकारला वाटत आहे.

नवीन टॅरिफ अमेंडमेंट बिलामुळे ज्या मालाला परिमाणानुवर्ति किमान जकात लागू व्हावयाची आहे. त्यांतील कांहीं पदार्थांचीं नांवें पुढें दिलीं आहेत—

मत्स्यतेल, खडीसाखर, विविध प्रकारचीं जड रसायनें व औषधी पदार्थ, कापसाचे मोजे, दिव्यांचे काचेचे ग्लोब व चिमण्या, रंग व रंगाचें सामान, साबण, एनॅमेलचे लोखंडी सामान, कप, बशा, चहादाण्या, साखरदाण्या, थाळ्या वगैरे चिनी पार्सेलेन व साध्या मातीचीं भांडीं, छत्र्या व तत्सम, माल, बिडाचे नळ, कापडाचे तुकडे, रेशमी व नकली रेशमाचा माल, शिसपेन्सिली, लोकरीचा खरा व नकली माल.

**कांहीं ठळक पदार्थांवरील जकातींतील फेरफार**

( मूल्यानुवर्ति व परिमाणानुवर्ति जकातींपैकीं जी जकात अधिक असेल ती बसविण्यांत येईल. )

| मालाचें नांव | जकात | |
|---|---|---|
| | मूल्यानुवर्ति Advalorem | परिमाणानुवर्ति Specific |
| लोकरीचे मोजे व कापड | ३५% | दर पौंडाला रुपये १८२ |
| कापसाचे मोजे ... | २५% | दर पौंडाला ८१० |
| जड रसायने व मॅग्नेशम क्लोराइड ... | २५% | दर हंड्रेडवेटाला रुपये १८५ |
| पोर्सेलेन व मातीचीं कौलें व विटा... ... | ३०% | दर चौरसफुटाला ८२ |
| छत्र्या ... ... | ३०% | दर नगाला ८८ |
| बूट व जोडे ( पादत्राणें ) | २५% | दर जोडीला ८३ |
| अंगाला लावण्याचे साबण | ३५% | दर हंड्रेडवेटाला रुपये २० |
| मत्स्यतेल ... ... | | दर हंड्रेडवेटाला रुपये १० |
| खडीसाखर... ... | | दर हंड्रेडवेटाला रुपये १०८८ |

# विद्वत्परिषद् व श्रींची भूमिका

( श्रीशंकराचार्य करवीरपीठ ( डॉ. कुर्तकोटी ) यांजतर्फे पुढील मजकूर आमच्याकडे प्रसिद्धीकरिता आला आहे. —सं. के. )

**डॉ. रामचंद्र भीमराव नाईक** आज वास्तव्य मुंबई यांस सा. न. वि. वि.

श्रींचे आज्ञेवरून कळविण्यांत येतें कीं, आपण आताच श्रींचेपुढें ठेवलेल्या पत्रांत सातारा येथे भरविल्या जाणाऱ्या विद्वत्परिषदेच्या चर्चेत श्रींना भाग घेण्यास सवड होईल काय? असें विचारल्यावरून याविषयीं जें काही सांगावयाचे तें काल सायंकाळीं आपणास श्रींनी सांगितलेच आहे. कोणत्याहि धर्मसंबंधी विषयांत श्रीसारख्यांना केव्हांहि एखाद्या पक्षाचा अवलंब करतां येत नाहीं. वादग्रस्त विषयाचें बाबतींत दोनहि पक्षांचीबाजू ऐकून घेऊन त्यावर निर्णय देणें हे ज्या धर्मपीठाचें कार्य आहे त्या कोणत्याहि पीठाला आजकाल राजसत्तेच्या अभावीं सत्ता राहिली नाही. तरी कालगतीच्या योगाने जो प्रसंग आला असेल तो असो, परंतु आपल्या कर्तव्यांत चुकल्याच अपयश मात्र आपणास येऊं नये अशी दक्षता पाळणें हें कोणत्याहि धर्मपीठास अशक्य नाही. धर्मासंबंधी वादग्रस्त विषयांत कोणी शास्त्री पंडित वगैरे विद्वानांनी कोणताहि एक पक्ष धरून आपलें मत प्रतिपादन करणे हें योग्यच आहे. परंतु कोणत्याहि धर्मपीठाने एका पक्षाला आपणांस वाहून न घेतां निर्णय देण्याची आपली पात्रता निष्पक्षपाताने लोकांच्या निदर्शनास आणून देणें केव्हांहि इष्ट आहे. म्हणून श्रींनी आजपर्यंत तसेंच धोरण ठेवलें आहे हें ओळखणारास सांगावयास पाहिजे असें नाही. तेव्हां आपण भरवूं इच्छितां त्या विद्वत्परिषदेंत कोणत्याहि एका पक्षाचा स्वीकार करणें, श्रींना शक्य नाही. आपण आदराने श्रींना विचारलें हें आपलें सौजन्य आहे असें श्रींना वाटतें.

'विद्वत्परिषद' भरविण्याचा सातारा येथील कांही पुढारी सद्गृहस्थांचा उद्देश प्रशंसनीय दिसतो. योग्य रीतीने कार्य झाल्यास कांही तरी फळ निष्पन्न होईल यात शंका नाहीं. त्याविषयीं काय काय करावें असे श्रींना वाटतें ते "नापृष्टः कस्यचित् ब्रूयात्" या स्मृतिवाक्याप्रमाणें सांगण्याचें कारण दिसत नाहीं. तथापि कोणीहि कोणत्याहि मार्गाने सत्कार्य केल्यास त्याविषयीं त्या कार्याची आवड असलेल्या कोणालाहि संतोष वाटल्यावांचून राहाणार नाही. धर्मासंबंधी पुष्कळ विषयात होत असलेला वाद मिटवून धर्मरक्षण झालें तर संतोष आहे. आपल्या भावी विद्वत्परिषदेला तरी त्याचें श्रेय कांही अंशीं तरी येवो, अशी प्रार्थना त्या धर्माच्या प्रभूच्या पायापाशीं करणें श्रींना आपलें कर्तव्य वाटतें.

आपला,
**वि. सी. नवरे.**

# चालू बाजारभाव व मध्यवर्ती बँक

ठाणें येथे नुकत्याच स्थापन झालेल्या 'सार्वजनिक सभा ठाणें' या संस्थेच्या विद्यमानें शनिवार ता. १६ रोजीं रात्रौ तेथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचे दिवाणखान्यांत पुण्याचे सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ प्रो. वामन गोविंद काळे यांचें 'चालू बाजारभाव व मध्यवर्ती बँक' या विषयावर पुढील आशयाचें व्याख्यान झालें

प्रो. काळे म्हणाले, "आजकाल हिंदुस्थानचेंच काय पण सर्व जगांतील देशाचें भवितव्य आर्थिक प्रश्नांवर बरेंचसें अवलंबून आहे. म्हणूनच 'चालू बाजारभाव व मध्यवर्ती बँक' हा विषय मी व्याख्यानाकरितां मुद्दाम घेतला. शिवाय आपल्या सर्वांना माहीत आहेच कीं, वरिष्ठ कायदेमंडळांत हा प्रश्न हल्ली खडाजंगी वादविवादाचा विषय होऊन बसला आहे. सामान्यतः लोकांना हा प्रश्न बिकट व किचकट वाटतो व तसें वाटणें साहजिक आहे; परंतु मी आपल्यापुढे शक्य तितक्या सोप्या भाषेंत या गुंतागुंतीच्या प्रश्नाचें विवरण करणार आहे.

### मध्यवर्ती बँकेचें कार्य

प्रथमतः बँकेचा उद्देश काय हे पाहूं. घाऊक मालाच्या व्यापाऱ्याचे व्यवहार आपल्या सामान्य माणसासारखे रोखीचे नसून उधार असतात व रोख पैशाऐवजीं हुंड्या देण्याघेण्याचे व्यवहार त्यांचेमध्ये फार होतात या हुंड्याऐवजी रोख पैसा देण्याचें काम बँका करतात. व्यापाऱ्याना रोख पैशाची फार गरज असल्यामुळे ते आपल्या हुंड्या बँकेंत हजर करून रोख पैसे घेतात. अशा कित्येक बँका हिंदुस्थानांत हल्ली अस्तित्वांत आहेत. परंतु मध्यवर्ती बँक एकहि नाहीं. अशी बँकांची बँक म्हणजे राजांचा राजा या नवीन बिलानें अस्तित्वात आणण्याचा सरकारचा विचार आहे. या मध्यवर्ती बँकेचें वैशिष्ट्य म्हणजे वाटेल त्या वेळीं नोटा काढण्याचा अधिकार होय. आज हा अधिकार कोणत्याहि बँकेला नाहीं. आज सरकार नोटा काढते तर बँका हुंड्या स्वीकारतात. हीं दोन्हीं कार्यें करणारी जर एक बँक असेल तर पैशाची बचत होऊन थोड्या भांडवलांत जास्त व्यवहार व व्यापार होऊं शकतील हेच कार्य मध्यवर्ती बँकेचें होय.

नोटा काढून भांडवल कमीजास्त करण्याचा अधिकार मध्यवर्ती बँकेला असल्यामुळें पैशावरील व्याजाचा दर शक्य तो स्थिर ठेवणें या बँकेला सोपें जाईल व असा दर स्थिर असणें व्यापाराचे दृष्टीनेहि फायदेशीर आहे. व्यापार केवळ अंतर्गत नसून बाहेरचे देशांशींहि प्रत्येक देशाचा पुष्कळच व्यापार असतो. हिंदुस्थानांतील कच्चा माल बाहेर देशांत जातो त्या वेळीं त्या मालाची किंमत ज्या देशांत हा माल जातो त्या देशांतील नाण्यांत होत असते. परंतु येथील व्यापाऱ्याला परदेशी नाणें घेऊन काय करावयाचें आहे ? त्याला आपले देशांतील नाणेंच पाहिजे असतें व याकरितां दोन देशांतील नाण्यांचा परस्पर संबंध ठरवावा लागतो. यालाच हुडणावळ म्हणतात.

### चलनाची किंमत कशी ठरवितात ?

आता दुसरे असे कीं, प्रत्येक देशांतील नाण्याचें खरी किंमत कृत्रिम किंमतीपेक्षा निराळें असते. उदाहरणार्थ रुपयाची खरी किंमत ६ आणे आहे. म्हणून ही खरी किंमत सोन्याचे वजनाशीं ठरवावी लागते. अमुक एक नाण्याला अमुक एक वजन सोनें देण्याचें वचन प्रत्येक सरकारला द्यावें लागतें. आता इंग्लंडच्या पौंडाचें हल्ली असें नाहीं. इंग्लंडच्या पौंडाचा सोन्याशीं असलेला संबंध काढून टाकण्यांत आला आहे.

आज जागतिक मंदीमुळे सर्व व्यापार कमी होऊन मालाच्या किंमती उतरल्या आहेत. म्हणून प्रत्येक नाण्याचा भावहि उतरणें स्वाभाविक आहे. अमेरिकेनें डॉलरचा भाव उतरविला असून जगांतील बहुतेक देशांनी आपल्या नाण्याचा भाव उतरविला आहे. अमेरिकेचे प्रे. रूझवेल्ट यांनी कच्च्या मालाच्या किंमती कृत्रिम उपायानें वाढविल्या आहेत व त्यामुळे शेतकऱ्यांचा पुष्कळच फायदा झाला आहे.

अशी परिस्थिति असल्यामुळे आज रुपयाचा १८ पेन्स हा कृत्रिम भाव कायम ठेवणें हानिकारक आहे. १६ पेन्स भाव केल्यास कच्चा माल परदेशात पाठविणारा बहुसंख्याक शेतकरी वर्ग उन्नत होईल व मालाचे भाव वाढून हिंदुस्थानांतील व्यापाराची भरभराट होईल.

अशा परिस्थितींत शेतकऱ्यांचे उन्नतीकरितां रुपयाचा भाव १६ पेन्स करणें अत्यंत आवश्यक आहे. त्यांत परदेशी माल वापरणाऱ्या अल्पसंख्याक लोकांचें थोडेंसें नुकसान होईल; पण बहुसंख्याक वर्गाचा व हिंदुस्थानचे जे आधारस्तंभ आहेत अशा शेतकरी लोकाचा फार फायदा होईल.

सरकारनें असें जरी ठरविलें कीं, मध्यवर्ती बँक ज्या वेळीं प्रत्यक्ष कार्य करण्यास सुरुवात करील त्या वेळीं असलेला बाजारभाव कायम करावा तरीहि हरकत नाहीं. परंतु १८ पेन्सांचा भाव कायम करणें हिंदुस्थानाचे व्यापाराला अत्यंत घातुक आहे."



## सूचिपत्र


**असेंब्ली**

असेंब्लींतील मंदिर–प्रवेशाचें बिल ८१
कौन्सिल–बहिष्कारवाद्यांची फटफजिती ९७
परदेशी मालावरील जकातींत होणारे फेरफार ८५४
भल्याची दुनिया नाही ५७९
मंदिरप्रवेशाचें बिल कीं बिलाचा मंदिरप्रवेश ? ५२
मंदिरप्रवेश बिलाला नकार ६२
मंदिरप्रवेश बिलाची इष्टापत्ति ११५, १२१, १३०, १३८
रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावर प्रास्ताविक चर्चेचा निष्कर्ष ७९३
शुस्टरसाहेबांचें शेवटचें बजेट १५१
हिंदुस्थानसरकारचें अंदाजपत्रक १४१

**अस्पृश्यता निवारण**

गुरुवायूर मंदिराविषयीं खुलासा १५
जगाचा विनाशकाल कसा टळेल ! ३७४
पंढरीचा पांडुरंग व अस्पृश्यवर्ग ३६८
वारकरी समाजाचें जाहीर पत्रक १०४
वर्णाश्रम स्वराज्य संघाची बैठक १७६
साताऱ्यांतील एक नमुनेदार संस्था ५७३

**आर्थिक प्रश्न**

अमेरिकेंतील आर्थिक क्रांति कशी झाली? १७२
पुणें शहर म्युनिसिपालिटी २४८, ४२२
प्रो. शहा यांचीं व्याख्यानें ५५०
पुणें जिल्हा लोकलबोर्डाचे नवीन कर ६३६
लंडन येथील आर्थिक परिषद ३३७
हिंदुस्थान सरकारचें नवें कर्ज ५५
हिंदुस्थानवर एक कोटीची धोंड ३९६

**आयर्लंड**

आयर्लंडांतील नवी यादवी. ५५६
आयर्लंडची स्वातंत्र्याच्या मार्गांतील प्रगति ६९१

**इतिहास**

अहमदाबादेची स्थापना २८१
डॉ. ॲबट यांचें महाराष्ट्रावरील प्रेम ६९४
रायगडवरील सिंहासन ३०९
शिवाजी महाराजांचें हस्ताक्षर ८४७

**उद्योगधंदे**

औद्योगिक शिक्षणाची मीमांसा ९३
औद्योगिक विषयावरील चर्चा २२१
औद्योगिक खात्याचे डायरेक्टर मि. अडवानी यांचें भाषण २३९
पूर्ण स्वदेशी मोटारगाडी-कलकत्ता ८२३
निलगिरी पर्वतावरील विजेचें प्रचंड कार्य ११७
साखरेची गिरणी कशी असावी ? ७१५
स्वदेशी चळवळ व हिंदुस्थानचें औद्योगीकरण ७०३
म्हैसूर संस्थानांतील उद्योगधंदे ४८

**कविता**

पृष्ठें २७३, २८८, २९७, ४२४, ५३०, ५६१, ६२४, ७९२, ८००

**कायदा**

न्याय निवाड्याचें निरीक्षण २०८
भागीपत्रकें नोंदण्याची आवश्यकता ६४७

**कायदेभंग**

कायदेभंगाची चळवळ आता थांबवावी ! १५३, १६५
कायदेभंग व लोकमत १६४
कायदेभंगाच्या चळवळीचें हेंच फळ काय! २०९
कायदेभंगाविषयीं लोकमत ३६१
कायदेभंग तहकुबीचे टीकाकार ३८५
कायदेभंगाची तहकुबी ४१३
कायदेभंगाच्या चर्चेची प्रस्तावना ४१७
कार्यकर्त्यांचा कोंडमारा ४०४
तहाच्या मार्गांतील अडचणी ४२५
तारतम्य दाखविण्याची हीच वेळ ! ४३५
तूर्त तरी राजकीय जलप्रलयच खरा ! ४८९
पुण्याच्या परिषदेचें अंतरंग ४६२
पुणें येथील राष्ट्रीय पुढाऱ्यांची सभा ४४९
म. गांधी व श्री. अणे यांची पत्रकें ३०१
संशयित शब्दांचा खुलासा ५२२
हा काय सत्याग्रह कीं अत्याग्रह ? ४५१

**काँग्रेस**

कायदेभंगाच्या चर्चेची प्रस्तावना ४१७
काँग्रेसचा पुढील कार्यक्रम ७१
काँग्रेसच्या गोटांत फाटाफूट ७२४
काँग्रेसविरुद्ध गांधीहि बंडखोर ७५१
पुणें येथील राष्ट्रीय पुढाऱ्यांची सभा ४४९
पं. मालवीय खोटे कीं सरकार खोटें ? ३५१
'तदेकं वद निश्चित्य' ! ४१०
तहाच्या मार्गांतील अडचणी ४२५
तूर्त तरी राजकीय जलप्रलयच खरा ४८९
तेरा वर्षांनी पुनः टिळक ५०५
दडपशाहीचें ग्रहण सुटलें नाही ७८५

म. गांधी व पं. नेहरू यांचा खुलासा ६०५
राष्ट्रीय समेच्या पुढाऱ्यांचें पुढील कर्तव्य २१७
संशयित शब्दांचा खुलासा ५२२
स्वराज्याच्या चळवळीला धोका ६०३

**खटले-अत्याचार**

अंदमानांतून स्वर्ग लोकांत ३५७
इंदुर येथील क्रांतिकारकांचा कट ३३२, ३४९
नाशिक तुरुंगांतील प्रकरण ६, ३६
बंगाल क्रांतिकारकांस अटक ११९
बंगालमधील अत्याचार ५८४
बेळगावांत पोलिसांची दंडेली! ६५३
मीरत खटल्याचें खरें स्वरूप ४१, ५१५
मीरत खटल्याचा निकाल ४३
म. गांधींना एक वर्षाचा बंदिवास ५१७
रा. गोसावी यांजवरील खटला ५४४
लो. अणे यांजवरील खटला ५४५
लो. अणे यांना अटक ५३५

**गिरणी**

गिरणीवाल्यांची तिरंगी परिषद ५५८
पुण्यांतील गिरणीकामगारांचा संप ५८१
देशी गिरण्यांना तारणार कीं मारणार? ३१४

**गीताजयन्ति**

अर्जुन विषाद हा योग नव्हे ८०६
गीताजयन्तिसाठी गीतार्थ चर्चा ७२८
पुणें गीताजयन्तीचा समारोप ८०३

**ग्रामोद्धार**

एक भयंकर खेडें ६०१
गव्हर्नरांची प्रणययाचना ६५९
गव्हर्नरांची दोन भाषणें ६८०
ग्रामोद्धाराचें सरकारी अवडंबर ५७०
ग्रामोद्धाराचा एक प्रयोग ५८२
ग्रामोद्धाराचें प्रमुख अंग ८२७
मुंबई सरकाराचा पुढाऱ्यांना शह ६२५
रा. बापट यांचें प्रचारकार्य ४७१
स्वराज्याचा पाया म्हणजे ग्रामपंचायती ८३०

**चरित्र**

ॲनी बेझंट यांचें अल्प चरित्र ६२९
मिरजेचे डॉ. वान्लेस १९९
स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता विल्यम विल्बर फोर्स ४८७

**जर्मनी**

आर्य नाझींचीं अनार्य कृत्यें ६३१
जर्मनीचा मोक्षकाल समीप आला! २०१
जर्मनी राष्ट्रसंघांतून फुटला ६९६
जर्मनींतलि नवा जोम ५३८
जर्मन लोकांचा साधी राहणी ७९
जर्मनीचें दोस्त राष्ट्रांना आव्हान ७४५
जर्मनीचा सुप्रजाननाचा कायदा ६६१
हिटलर यांचा सोशॅलिस्टांवर सूड ४३०

**जॉ. सि. कमिटी**

इंग्रज व्यापाऱ्यांचा मानभावीपणा ५६२
पै कीं पैसा, पैसा कीं पै? ४४६
प्रांतिक स्वराज्याचा बोजवारा! ४६०
भारतमंत्र्यांच्या पुराणाची समाप्ति ७३९
रिझर्व्ह बँक बटीक बनणार! ५४०

**छायाचित्रे**

श्री. कृ. प्र. खाडिलकर ८४५
श्रीशिवाजीमहाराजांच्या हस्ताक्षराचा नवीन पुरावा ८४६
श्रीमंत सयाजीरावमहाराज गायकवाड १९०
गाझी नादीरशहा ७३५
माधवरावजी व्यंकटेश लेले ७९०
राजा धनराजगिरजी १३५

**परदेश**

अमेरिकेचा कौटुंबिक विध्वंस ७६
आजचा पॅलेस्टाइन व ज्यू लोक ७३७
इंग्लंड व रशिया यांजमधील बेबनाव २६२
इराणांताल स्वदेशी आंदोलन ७९०
दक्षिण आफ्रिकेंतून हकालपट्टी! ६७४
परराष्ट्रीय राजकारण २५२
पाश्चात्य राष्ट्रांतील विचारतरंग ३११
परदेशांतील हिंदी लोकांचा छळ ८१३
परदेशी मालावरील जकातींत होणारे फेरफार ८५४
जिनीव्हा परिषदेंत हिंदुस्थान ६८९
युद्धाचीं कारणें नाहीशीं करा ६८६
रुधिरप्रदिग्ध अफगाण तख्त ७४३
रशिया अमेरिकेची अपूर्व युति ७७१

**परिषदा**

जगाचा विनाशकाल कसा टळेल? ३७४
नाशिकची सर्व धर्म परिषद ३६०, ३६६
प्रयागची सनातन धर्म परिषद १२६
विद्वत्परिषद व श्रींची भूमिका ८५५

**पार्लमेंट**

पार्लमेंटांतील हिंदी राजकारण ७५७
पार्लमेंटांतील वादाचा निष्कर्ष ७७७
पार्लमेंटांतील राजेसाहेबांचें भाषण ७८३
पार्लमेंटमधील महत्त्वाचीं प्रश्नोत्तरें ११४

**पुस्तकपरीक्षण**

अस्पृष्टांचा प्रश्न ७७३
आंधळ्यांची शाळा ५२७

खरा ब्राह्मण ४२०,४२९
गर्जन्ति केचिद् वृथा ७६५
मान्सून २६७
मुक्तात्मा ३५३

**पुण्यतिथी**

राजा राममोहन रॉय ६३८

**प्रवास**

नेपाळचें निरीक्षण २०५
माळव्यांतील सफर २५५
म्हैसूरकडील प्रेक्षणीय स्थळांचें दर्शन ४९,७३,८७
म्हैसुरांत व्हाइसरॉयांचा सत्कार ८०१
हिंदुस्थानांतून इटालींत ६६०
हंगेरीच्या जांबोरींतील अनुभव ६५४

**प्रासंगिक बोल**

पृष्ठें ३७, १२०, ३३५, ८४९

**ब्रह्मदेश**

ब्रह्मदेशानें विभक्त व्हावें काय ? ५३३
ब्रह्मदेशाच्या विभक्तीकरणाचा ब्रह्मघोटाळा ३०६
ब्रह्मदेशाची भावी राज्यघटना ५३०
ब्रह्मी समाजांतील चालीरीति ५७७

**बँक**

चालू बाजार भाव व मध्यवर्ती बँका ८५६
भागीदारी मत्ता, सरकारी सत्ता, लोकमताला लत्ता ७५३
रिझर्व्ह बँक बटीक बनणार ! ५४०
रिझर्व्ह बँक कमिटीच्या सूचना ५४६
रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावरील प्रास्ताविक चर्चेचा निष्कर्ष ७९३

**म. गांधी**

कॉंग्रेसविरूद्ध गांधीहि बंडखोर ७५१
गांधींचें उपोषण व सरकारी पत्रक ५५३
गांधींविरुद्ध लेनिन ७४२
प्रतिष्ठित तिऱ्हाइतांची मध्यस्थी ३६५
म. गांधी व रा. केळकर ११२
म. गांधींना इषारा १७५
म. गांधींचा दुसरा उपवास २७९
म. गांधींना अटक ५११
म. गांधींना एक वर्षाचा बंदिवास ५१७
म. गांधींचें प्रायोपवेशन ५४५
म. गांधींची बिनशर्त सुटका ५५९
म.गांधी व पं.जवाहरलाल नेहरू यांचा खुलासा ६०५
मुलाखत फिसकटल्यावर ४६४
येरवड्यांतील 'हाल' हवाल २७४
सूर्य उगवला पण तो केतूनें ग्रासला ! २९८
व्हाइसरॉय यांनी मुलाखत नाकारली ! ४५५
जवाहरलाल नेहरू-गांधी यांचा पत्रव्यवहार ६२०
देविदास गांधी-लक्ष्मी विवाह ४१५-४५६
प्रतिलोम विवाह अयोग्य आहे ५३७

**मसूर ब्रह्मचर्याश्रम**

मसूर ब्रह्मचर्याश्रमाची सार्वजनिक कार्य-क्षेत्रांतील सद्यःस्थिति ५००
मसूरचा ब्रह्मचर्याश्रम कसा वांचला ? ४०७
मसूरचा महोत्सव ४१९

**मुलाखत**

मुलाखत फिसकटल्यावर ४६४
डॉ. मुंजे यांची मुलाखत ७२६
से. बापट यांची भेट ३१३
से. बापट यांची प्रकृति ३४१
व्हाइसरॉय यांनी मुलाखत नाकारली ! ४५५

**मुंबई—सरकार**

खेड्यांत स्वराज्य छोटें चालेल पण खोटें नसावें ! ८२
गुलाम हुसेन यांचा कबुली जबाब १२३
मावळत्या गव्हर्नरांची कारकीर्द ७९६
मुंबई—सरकारची पुनर्घटना २१
मुंबईकरांनो ! हे घ्या प्रांतिक स्वराज्य ३१
मुंबई इलाख्यावरील अमावास्येची मध्यरात्र ८९
मुंबईच्या गव्हर्नरांचें भाषण ९१
मुंबई कौन्सिलचें कामकाज ५२१
थॉमस कमिटीचा रिपोर्ट ११०
नाकापेक्षा मोती जड काय कामाचा ? ५८६
हा काळोख मध्यरात्रीचा की, पहाटेपूर्वीचा ? १६९

**मृत्यू**

अफगाणिस्थानच्या राजाचा खून ७३५
आजीबाई आटोपल्या ! ६२७
बॅ. सेनगुप्त यांचें शोचनीय निधन ४७०
माधवरावजी लेले ७७६

**पटेल**

कर्तबगार मुत्सद्दी हरपला ! ६९७
विठ्ठलभाईंचें पुण्यस्मरण ८२०
सरकारचा गर्हणीय नकार ७२१

**रेल्वे**

रेल्वेच्या कारभाराचें भावी स्वरूप ५३१
रेल्वेची चुरस मोटारीला भोवणार काय ? २८२
रेल्वेच्या कारभाराची पुनर्घटना ६७४

**लष्कर**

पोलीस हे नोकर कीं धनी ? ६९१

भग्याच्या भाकरीसाठी पिठाची एक चिमटी ! ८५१
भाकरी हिंदुस्थानची व चाकरी इंग्लंडची! २९१
टिळक मंदिरांत रणदेवतेचें दर्शन २६९
लखनौ येथील लष्करी शिक्षणाची चळवळ ७६६
शिक्षण खात्यांत लष्करी शिक्षणाची जरूरी ८२२

**लोकशाही स्वराज्य पक्ष**

श्री. जम्नादास मेहता यांचें भाषण ७५९
कुलाबा जिल्ह्यांतील सर्वपक्षीय सभा ७५६
कुलाबा जिल्हा शाखा ७९२
खोडसाळ गैरसमज ७८२
पेण येथील परिषद ६६२
बृहन्महाराष्ट्र राजकीय परिषदेचे अधिवेशन ७०८, ७११
बृहन्महाराष्ट्र परिषद व धर्म–विषयक ठराव ७३६
भावी घटना व संस्थानी प्रजा (जाहीर व्याख्यान) ७६७
मद्रासमध्ये स्वराज्य पक्षाची स्थापना ७१७
मद्रासमधील कांग्रेस स्वराज्यपक्षाचें पत्रक ७४४
नव्यापक्षाचा नियोजित कार्यक्रम ६६८
रुळावरून घसरलेली गार्डी परत रुळावर आली ७०५
लोकशाहीपक्ष व शेतकऱ्यांचे प्रश्न ७१८
लोकशाही स्वराज्यपक्ष ७६०, ८१५, ८३५
लोकशाहीस्वराज्यपक्ष व तिचे टीकाकार (व्याख्यान) ८३७
शेतकरी कर्जातून कसा मुक्त होईल ? ८०७

**वसंत–व्याख्यान माला**

पृष्ठें २६९, २८९, ३२७

**वाङ्मय–कला**

कलासेवकांचा कर्मयोग ८३३
चिपळूणकर पारितोषिक समारंभ ५८५
पुण्यांतील हत्यारांचा नवा कारखाना १५९
प्रतिभासाधन वादाचा निष्कर्ष ३९३
बृहन्महाराष्ट्र वार्षिक १९३३ २६१
भाषाशुद्धि व भाषावृद्धि ४६
महाराष्ट्र प्रांतिक संगीत परिषद ६३३
महाराष्ट्र कविसंमेलनाच्या अध्यक्षांचें भाषण ६३९
मोरोपंतांचे बारामतींतील स्मारक २६६
वाङ्मयांत विडंबनाचें स्थान ६०७
व्हिएन्नांत प्रो. देवधर ( संगीतज्ञ ) ५६८

**व्यापार**

इंग्रज व्यापाऱ्यांचा मानभावीपणा ५६२
जपानी कापडावरील जकातवाढ कोणाकरता? ३८३
मोटारींची वाहतूक ८६
मुंबईच्या व्यापारी कारखानदारावर बंगालचा राग कां ? ८०८
हिंदी व्यापार सधारला काय ? ५४९
लँकेशायर वे हिंदुस्थान ५६४
हिंदी जपानी व्यापारी दिशा ६७७
व्यापारी शिष्टमंडळाचें आगमन ६११
रेल्वेची चुरस मोटारीला भोंवणार काय ! २८२

**विद्यापीठ**

श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम ३४२
पुण्यांत भरलेल्या विद्यापीठ परिषदेने काय केलें ४३६
पुण्यांतील विद्यापीठ परिषद ४३८
महाराष्ट्र विद्यापीठ परिषद ! ४४२
महाराष्ट्र विद्यापीठाची पुण्यांतील जाहीर सभा ५४२
मुंबई विद्यापीठ व विद्यार्थ्यांची संख्या ४८०
मुंबई विद्यापीठांतील घडामोडी ३९७
महाराष्ट्रांत स्वतंत्र विद्यापीठाची स्थापना १७
महिला विद्यापीठावरील संकट १३२
महाराष्ट्र विद्यापीठाचे शिष्ट मंडळ २१२
मराठीवरील सरकारी संकट २५९
हिंदुस्थानांतील विद्यापीठे ७१३

**शास्त्र**

श्रीजिवाजी वेधशाळा उज्जयनी १४४
प्राचीन शास्त्रें व अधुनिक विद्वान् ३२४
फलज्योतिष–संशोधन १२८
भविष्यविषयक नियम व पर्जन्य ६४५
धर्मपर विषयांचा खल २८६
यंदाच्या पावसाचें अनुमान ३०५
शवविशनाची प्रयोगशाळा १६१
सायन्स कांग्रेसचे अध्यक्ष ६७२

**श्वेतपत्रिका**

खोबरें नाही फक्त करवंटीच ! २२५
पांढरा खलिता व हिंदी प्रतिनिधी ५६६
पैसा नाकाराल तर पै पत्कराल ! ४०१
बिशाद आहे, हिंदुस्थानला स्वराज्य मिळेल ! १७७
ब्रिटिश सरकारच्या पांढऱ्या खलित्याचें काळें स्वरूप ! १८०
भाकड गाईच्या दानाचा दीर्घकालीन वायदा १९४
ब्रह्मदेशाची भावी राज्यघटना ५३०
नीज वेल्हाला, दारी बागुलबावा आला ! ३५७
नोकरशाहीचें गोनावळे व लेकावळें ३६४
या धरणीचा दाह केव्हा शांत होईल ! २४९
लटक्या लढाईने कोण फसणार ? ६६५
सुधारणांचा कायदा व शेतकऱ्यांचा फायदा ! २३६
ही घ्या कर्मातकमी मागणी ८०९

**शस्त्र सन्यास परिषद**

शस्त्रसंन्यास परिषदेवरील संकट टळलें ३२१
शस्त्रसंन्यास कीं युद्धाची तयारी ! ६३८

**शिक्षण**

गुरुजींची रवानगी गुरांच्या गोठ्यांत! ५७
प्राथमिक शिक्षकांच्या पगाराची प्रदक्षिणा १०६
बनारसच्या शिक्षण सोयी ४६६
महाराष्ट्र शारीरिक शिक्षणपरिषदेसंबंधीं कांही विचार ७३४
विद्यार्जनार्थ परदेशगमन ८२५
संसारोपयोगी स्त्री–शिक्षण ३७७
सार्वजनिक कार्याची शिक्षणसंस्था ४१६

**शेती-शेतकरी**

अलिबाग तालुक्यांतील धारावाड ६०
अलिबागेवर विशेष धान्याची धाड ४०६
लोकशाहीस्वराज्यपक्ष व शेतकऱ्यांचा प्रश्न ७१८
शेतकरी कर्जातून कसा मुक्त होईल? ८०७
शेतकऱ्यावरील आजचें संकट ७४९
शेत, शेतकी व शेतकरी २३३,२९४

**समाजसत्ता वाद**

पं. जवाहरलाल व हिंदी राजकारण ६८१

**समारंभ**

श्रीमंत सयाजीराव महाराज यांचा पुण्यांतील सत्कार १८९
केसरी-मराठा कचेरींतील उपहार समारंभ ४५८
खडकी येथील बक्षिससमारंभ ९६
चिपळूणकर पारितोषिक समारंभ ५८५
तळेगांवचा कोनशिला समारंभ १६
नूतन मराठी विद्यालयाचा सुवर्ण महोत्सव ४
पुण्यांतील नगरोत्सव ८५
पुण्यांतील औद्योगिक प्रदर्शनाचा उद्घाटन समारंभ १३६
भोर येथील नवा पूल ४१७
महाराष्ट्र सांवत्सरिक ग्रंथ प्रकाशन समारंभ १००
महाराष्ट्रीय मंडळाच्या ग्रंथालयाचा उद्‌घाटन समारंभ २२८
मसूरचा महोत्सव ४१९
म्हैसूरांतील व्हाइसरॉयांचा सत्कार ८०१
राजापूर आयुर्वेद विद्यालय २६५
लोकमान्यांचे मुंबईतील स्मारक ५०८
शब्द कोश भाग २ रा प्रकाशन समारंभ ८३१
सयाजीरावांच्या पुण्यांतील सत्काराची उपयुक्तता १८६

**संमेलन**

कला सेवकांचा कर्मयोग ८३३
कोल्हापूरच्या साहित्य संमेलनाचें पर्यालोचन १
मराठी संपादकांचे पुण्यांतील संमेलन १४५
मुंबई येथील २६ वें नाट्य संमेलन ४००
साहित्य संमेलन पाहून १२
व्हाइसरॉयांच्या मानपत्राचा निषेध (जाहीर सभा) ४३१

**संकीर्ण**

अरबस्थानांतील हिंदुबांधव ५७५
जाहीर विनंति ५५५
मानपत्राचा ठराव पास झाला! ४२८
मृत्यूच्या मांडीवरचे पुणें ६४२
संसारोपयोगी स्त्रीशिक्षण ३७७
रजिस्टर खात्यांतील गैरसोयी ३१९
हिंस्र वाघांचा सरकाराकडे अर्ज ३७२

**संस्था**

श्रीशिवाजी रायगड-स्मारक-मंडळाची सभा ६१५
श्रीशिवाजी रायगड स्मारक फंड ६१७
धूतपापेश्वर आयुर्वेद ट्रस्ट ३१७
नगर येथील आयुर्वेद संस्था ५६७
पुणें अनाथ विद्यार्थि गृह ८२४
टिळक पर्स फंड ट्रस्ट ५९७
सहकारी संस्थांचें स्वातंत्र्य ६१४
राजापूर आयर्वेद विद्यालय २६५
लोकमान्य पुण्यतिथि मंडळ ३९२

**संस्थानें**

अक्कलकोट संस्थानांतील रयतेची स्थिती २४३
अक्कलकोट संस्थानांतील दडपशाही ६७०
अलवारचे महाराज पदच्युत कां झाले? ३२९
औंधची प्रातिनिधिक सभा ४१४
इचलकरंजी दत्तक प्रकरण ६९
ग्वाल्हेर संस्थानांतील राज्यकारभार २१४
" " " २४१
" " " ३३४
गुप्त कारस्थानावर निर्भीड टीका ७२९
फेडरेशन व महाराष्ट्रांतील संस्थानिकांची बढती ६५
बडोद्याचा राज्यकारभार ३४३
भावी घटना व संस्थानी प्रजा ७६७
मोसेखोऱ्यांत काय घडलें ? ३९१
देवाससंबंधी खरी हकीगत ३८८
निजामशाहींतील अत्याचार ४२१
चळवळीची जोड गोळी ४६८
यापेक्षां झळझळीत वैधव्य बरे! ४२७
संस्थानिकांचें संरक्षण आज कां? ५९५
संस्थानिक व हिंदी लोक यांचें खडाष्टक २४५

**स्फुट सूचना**

पृष्ठें:—३८, ११३, १४३, १६८, १९७, २३१, ३३६, ३३९, ३४७, ३५८, ३६२, ३८१, ३८९, ४३७, ४५३, ४६६, ५२६, ५३५, ५६०, ५७२,

५८९, ६५१, ६६९, ६९३, ७२०, ७३३, ७४१, ७४८, ७५६, ७७२, ७९१, ७९९, ८११, ८२१, ८४०.

**हिंदु-मुसलमान**

अहमदाबाद येथील भयंकर अत्याचार २५२
कल्याणरावांवरील हल्ल्याचा सार्यंत वृत्तांत ४८४
न्यायदेवतेची कबर बांधणार ! ४८१
हिंदु समाज कशाने समर्थ होईल ! २७६

**हिंदु महासभा**

एलिचपूरच्या शुद्धिकरणाचा वाद २९८
डॉ. मुंजे यांच्यावरच गहजब कां ! ५१३
डॉ. मुंजे यांनी कोणाचा घात केला ! ३८०
डॉ. मुंजे यांचें व्याख्यान ८४१
डॉ. मुंजे यांची लिस्बन येथील कामगिरी ७२५
बॅ. रामराव देशमूख यांचें व्याख्यान ५९१
पं. जवाहरलाल यांना चोख उत्तर ७८०
हिंदु समाज कशाने समर्थ होईल ! २७६
हिंदुमहासभेची कैफियत ५१९
हिंदुमहासभा–अजमीरचें १५ वें अधिवेशन ६९०
रेव्हरंड हिंदू झाले ४५९
वायव्य प्रांतांतील अल्पसंख्य हिंदू ६९५

**हिंदी राजकारण**

आजोबांना नातवंडांची काळजी ! ३९४
कृपणांना कर्णाचा मान ३८७
ग्रंथ जुना पण अन्वय नवा ९
बिशाद आहे, हिंदुस्थानला स्वराज्य मिळेल ! १७७
ब्रह्मदेशाच्या विभक्तीकरणाचा ब्रह्मघोटाळा ३०६
मुंबईचा टाइम्स व रा. केळकर ६७
दडपशाहीचें ग्रहण सुटलें नाही ७८५
ना. शास्त्री यांची साम्राज्यनिष्ठा ३७८
जगाचा विनाशकाल कसा टळेल ? ३७४
डॉ. टागोर यांचा पश्चाताप ! ४८३
वऱ्हाडची वाट काय ! ६४९
सरकारी कुत्सित टीकेचा मासला ३७६
सोटेशाहीचें सरकारी समर्थन ८१७
हिंदुस्थानच्या आर्थिक स्वातंत्र्यास इंग्लंडचा विरोध ३३
हिंदुस्थान पन्नास वर्षे परतंत्र ! ५४७
होअरसाहेबांचा पोकळ युक्तिवाद ३४५

**हुंडणावळ**

चढते भाव व वाढते दारिद्र्य ७६१
चालू बाजारभाव व मध्यवर्ती बँका ८५६
भागीदारी मत्ता, सरकारी सत्ता, लोकमताला लत्ता ७५३
हुंडणावळीच्या प्रश्नाची चर्चा ७८८